# सारसंग्रह

अर्थात्

## केसरीचे छोटे फाईल



( सन १९२७–१९२८. )



प्रकाशक—**केसरी मराठा ट्रस्ट**, नारायण पेठ घर नंबर ५६८ **पुणें**.



मुद्रक—**धोंडो वासुदेव विद्वांस**,

यांनीं

**पुणें** येथें नारायण पेठ घर नंबर ५६८, **'केसरी'** छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.



# प्रस्तावना

## केसरीचें छोटें फाईल अर्थात् ' सारसंग्रह '

केसरींतील महत्त्वाचा व संग्राह्य असा थोडाबहुत तरी मजकूर आपल्याला कायमचा संग्रहीं ठेवतां आला तर बरें, असें अनेक वाचकांना नेहमीं वाटत असतें. तथापि ही गोष्ट जितकी इष्ट वाटते तितकी ती कठीणहि असते. केसरीचीं काय किंवा दुसऱ्या कोणत्याहि वर्तमानपत्रांचीं काय, फाइलें नीट बांधून संग्रहीं ठेवणारे वाचक फारच थोडे असतात. त्याचें कारण प्रथम असें कीं, एका वर्तमानपत्रावर अनेक वाचकांची भूक भागवावयाची असते. यामुळें कोणताहि अंक एकदां हातोहात गेला म्हणजे सहसा परत येत नाहीं. आला तर फाटून, विसकटून, मळून परत येतो. आणि मग तो फाईलींत ठेवावासा वाटत नाहीं. बरें, कोणाच्या अंकावर इतरांच्या उड्या नसल्या तरी प्रत्येक अंक वाचून, वेळींच नीट बाजूला काढून, शिल्लक ठेवला जातो असें क्वचितच घडतें कोणी वर्षाचे सर्व अंक अशा रीतीनें ठेविले तरी केसरीच्या ५१ अंकांचें फाईल इतकें जड व अवजड होतें कीं, तें पुठ्ठा घालून बांधवून घेण्याला बराच खर्च येतो. तसेंच कोणताहि विषय हुडकून काढण्याकरितां अंक चाळींत बसण्याला फार वेळ व श्रम लागतात. याशिवाय महत्त्वाची गोष्ट ही कीं, कोणतेहि वर्तमानपत्र घेतलें तरी त्यांतील सगळाच्या सगळाच मजकूर संग्रहीं ठेवण्यासारखा असतो असें नाहीं. अर्थात् ज्याच्या त्याच्या आवडीप्रमाणें कांहीं थोडा मजकूर बाजूला काढून ठेवण्यासारखा असतो. पण तो तसा कातरून काढून व चिकटवून ठेवणें हें देखील तितक्याच परिश्रमाचें काम असून तसें करण्याला लागणारी चिकाटी, फुरसत' किंवा व्यवस्थितपणा पुष्कळांना असत नाहीं. संग्रहालयें वगैरे संस्था ज्या काय समग्र फाइली ठेवतील तितक्याच. पण अशांच्याहि हातून हें काम नेहमी तडीस जातें असें नाहीं. इतिहासदृष्ट्या जुनी माहिती कारणपरत्वें ज्यांना काढण्याचा प्रसंग येतो, त्यांना हा अनुभव पूर्णपणें अवगत आहे. वरील कारणांमुळें केसरीच्या दरअंकांतील कांहीं निवडक मजकुराचा टाईप बाजूला काढून घेऊन केसरी छापखान्यांतच त्याच्या कांहीं वेगळ्या प्रती छापवाव्या, व त्याचें पुस्तक बांधून वर्षाअखेर तें, केवळ छपाईचा खर्च घेऊन, फक्त केसरीच्या वाचकांना द्यावें अशी कल्पना घरच्याच एका केसरीच्या हितचिंतकानें गतवर्षीच्या जुलै महिन्यांत सुचविली. आणि प्रयोगादाखल ती ताबडतोब अमलांतहि आणण्यांत आली.

वरील कल्पनेप्रमाणें, ता. २ ऑगस्ट १९२७ च्या अंकापासून, केसरीच्या दरअंकापैकीं सुमारें ८ कॉलम, म्हणजे रॉयल साईझचीं सुमारें ८ पृष्ठें इतका मजकूर निवडून बाजूला काढून तो वेगळा छापण्यास आम्ही सुरवात केली. परंतु केव्हांहि डिसेंबरअखेर वर्षाचा मेळ पडावा म्हणून या सारसंग्रहाचें अथवा छोट्या फाइलाचें पहिलें वर्ष दिडकें धरून १९२८ च्या डिसेंबरच्या शेवटच्या अंकापर्यंत हा क्रम आम्ही चालू ठेवून त्याप्रमाणें होणारें **सुमारें सहाशें पृष्ठांचें पुस्तक** छापून आज प्रसिद्ध केलें आहे. सुमारें १७ महिन्यांतील केसरीच्या अंकांतून निवडून काढलेल्या मजकुराचें पुस्तक ६०० पानाचें झालें आहे, यावरून सामान्य वाचक प्रायः जितका मजकूर संग्रहीं ठेवूं इच्छील तितका तरी बहुधा यांत आला असेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. कसेंहि असलें तरी केसरींतील मजकूर प्रत्येक वाचकानें स्वतः कातरून, चिकटवून ठेवून, त्याचें पुस्तक स्वतः बांधण्यापेक्षां, या पुस्तकानें उपलब्ध केलेला सारसंग्रह त्याला अधिक सोयीचा वाटेल यांत शंका नाहीं.

असलें पुस्तक काढण्याचा हा पहिलाच प्रयोग म्हणून पुस्तकाची आवृत्ति आम्ही फक्त एक हजार प्रतींचीच धरली आहे, यामुळें अनेकांची निराशा होण्याचा संभव आहे. तथापि या प्रयोगाचा अनुभव तारीख ३१ जानेवारी १९२९ पर्यंत जसा येईल त्याप्रमाणें दुसऱ्या वर्षाच्या पुस्तकाच्या प्रती किती काढाव्या याचा अंदाज करतां येईल. या पुस्तकानें केसरीच्या वांचकांना एक नव्या दिशेनें थोडाबहुत तरी उपयोग होईल अशी आम्हास आशा आहे.

**न. चिं. केळकर,**
**धों. वा. विद्वांस,**
**ट्रस्टी, केसरी व मराठा.**

---

# सारसंग्रहाची अनुक्रमणिका.

# केसरी-सारसंग्रह १९२७-२८

पुस्तक १ लें ] वर्षारंभ ता. १ ऑगस्ट १९२७. [ वर्ष १ लें

## लो० टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाची संयुक्त सभा

रविवार ता. ३१ जुलै व सोमवार ता. १ आगस्ट रोजीं लोकमान्य टिळकांच्या पुण्यतिथी-निमित्त लो.टिळकांच्या राजकीय तत्त्वांचा पुरस्कार करणारी राष्ट्रीय पक्षाची अखिल महाराष्ट्रांतील मंडळी एकत्र जमून, त्यांनीं सध्याच्या राजकीय परिस्थितीबाबत व राष्ट्रीय सभेच्या धोरणाबाबत विचार-विनिमय करावा, व त्या दृष्टीनें लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षाची संघटना करण्याविषयीं उपाय-योजना करावी, अशा हेतूनें श्री. न. चिं. केळकर यांनीं राष्ट्रीय पक्षाच्या पुष्कळ गृहस्थांच्या सूचनेवरून पुण्यास सभा बोलावली होती. सभेस टिळकांच्या राष्ट्रीय पक्षांतल्या महाराष्ट्र, वऱ्हाड-नागपूर व कर्नाटक या प्रांतांतल्या प्रमुख गृहस्थांस निमंत्रणें पाठविलीं होतीं.पुण्यास १९६ व बाहेर ५४७ मिळून ७७३ इतकीं निमंत्रणपत्रकें पाठविलीं होतीं. त्यांपैकीं पुण्यांतील व बाहेरील मिळून २७५ सद्गृहस्थ सभेस जमले होते. जे सभेला येऊं शकले नाहींत त्यांनीं सभेच्या उद्देशासंबंधीं मान्यतादर्शक व यशश्चिंतनपर संदेश धाडले होते व कांहींनीं मार्गदर्शक अशा सूचनाहि केल्या होत्या. अशांची संख्या ५० वर होती.

मंडळीची उतरण्याची सोय सदाशिव पेठेंतील सरदार पटवर्धन यांच्या वाड्यांत केली होती. तेथेंच रविवार ता. ३१ रोजी सभेस सकाळीं ८ वाजतां सुरुवात झाली. प्रथम श्री. दि. वा. दिवेकर यांनीं निमंत्रणपत्रिका वाचून दाखविली व निरनिराळ्या ठिकाणचे आलेले संदेश व सूचनापत्रें यांचें दिग्दर्शन केलें. लो. टिळकांच्या तसबिरीस हार घालण्यांत आल्यावर श्री. न. चिं. केळकर यांच्या सूचनेवरून मंडळींनीं परस्परांचा व्यक्तिशः परिचय करून घेतला.

यानंतर **श्री. न. चिं. केळकर** हे आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले "टिळकांच्या निधनानंतर गेल्या सात वर्षांत मतभेदाचे अनेक प्रश्न उत्पन्न होऊन वाद माजले व टिळकांच्या राष्ट्रीय पक्षांत फूट पडली. ही फूट मोडून एकी करावयाची तर सर्वांनीं खुल्या दिलानें चर्चा करून आपल्याला निदान सर्वमान्य अशा कांहीं कामांत एकत्र येऊन कार्य करण्याची एखादी व्यापक संघटना तडजोडीनें निर्माण करतां येईल काय याचा विचार करण्यासाठीं आपण येथें जमलों आहों. येथें सरकारचे दिवाण ना. प्रधान व कायदे-कौन्सिलाचे सभासद यांचेपासून तों अगदीं कडक असहयोग्यांपर्यंत सर्व मंडळी जमली आहेत. मतभेदाचे असे कांहीं प्रश्न राहतील, त्यांत स्वतंत्रपणें व एकमेकांस न दुखवितां असें कार्य करावें व ज्यांवर एकी होण्यासारखी असेल असे प्रश्न निवडून काढून त्यावर संघटना करून एका भूमिकेवर कार्य करावें असा यांत हेतु आहे."

यानंतर श्रीयुत केळकर यांस सभेचे अध्यक्ष नेमण्यांत आल्यावर सभेपुढें मांडण्यासाठीं स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, हिंदुसंघटन, रॉयल कमिशन, रयतेच्या तक्रारी, कौन्सिलकार्य, खादी, इत्यादि अनेक प्रश्नांची एक यादी सभासदांस देण्यांत आली. पण त्यांतील राष्ट्रीय पक्षाची संघटना करण्याचा विषय मुख्य म्हणून प्रथम विचारार्थ घेण्यांत आला व सुमारें तीन तास या विषयावर मोकळ्या मनानें सर्व ठिकाणच्या मंडळींनीं चर्चा केली.सकाळीं ८ वाजतां सुरू झालेली सभा दुपारीं १२ च्या सुमारास जेवणासाठीं उठली.

पटवर्धन यांच्या वाड्यांतील जागा संकुचित वाटल्यानें सायंकाळीं ५ वाजता टिळकस्मारकमंदिरांत सभेस पुनः सुरुवात झाली. राष्ट्रीय पक्षाची संघटना असावी व ती विद्यमान टिळक स्वराज्य-संघाच्या द्वारें करावी असें बऱ्याच वादविवादानंतर एकमतानें ठरलें. या प्रसंगीं कर्नाटकांतील प्रसिद्ध टिळकभक्त व जुन्या राष्ट्रीय पक्षाचे अभिमानी **श्री. श्रीनिवासराव कौजलगी** यांनीं अत्यंत स्फूर्तिदा-

यक व कळकळीचें भाषण केलें. यानंतर टिळक स्वराज्यसंघाच्या मार्फत एकीच्या दृष्टीनें कार्य करण्यासाठीं त्यांत कोणकोणते विषय व ते कशा रीतीनें घ्यावेत याबद्दल विचार करून निश्चित स्वरूपांत ठराव मांडण्यासाठीं न. चि. केळकर, श्रीनिवासराव कौजलगी, शं. द. देव, अण्णासाहेब भोपटकर, भाऊसाहेब सोमण, बाबूराव गोखले, ना. रा. बामणगांवकर व डॉ. फाटक यांची एक कमिटी नेमण्यांत आली. जेवणानंतर रात्रीं श्री. पटवर्धन यांचे वाड्यांत गोपाळ गायन समाजाचे चालक श्री. देसाई यानीं आपले स्फूर्तिदायक, राष्ट्रीय व ऐतिहासिक पोवाडे गाऊन दाखविले.

वरील कमिटीची बैठक श्री. केळकर यांचे घरीं होऊन सभेपुढें मांडण्याचा एकंदर दहा ठरावांचा मसुदा एकमतानें मंजूर झाला. हा मसुदा पुढीलप्रमाणें—

( १ ) राष्ट्रीय शिक्षण—(अ) टिळक विद्यापीठ, टिळक महाविद्यालय, त्यांच्या शाखा व अशाच प्रकारच्या राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्था यांस मनोभावें मदत करावी.

( २ )कॉंग्रेस—कमिटया स्थापाव्या व वाढवाव्या, सभासद करावेत आणि कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम खेड्यापाड्यापर्यंत पोचवावा.

( ३ ) दारूबंदी व जंगलच्या तक्रारी, लँड—ॲक्विझिशन ॲक्ट यांसारख्या गोष्टींसंबंधीं लोकांत चळवळ करणें व लोकमत जागृत करणें.

( ४ ) ग्रामसंघटना करणें व रयतेचे हक्क व जबाबदाऱ्या यांची रयतेस जाणीव करून देणें.

( ५ ) जमीनबाब:—

( अ ) गैरशिस्त धारावाढीविरुद्ध प्रतिकार.

( आ ) कायम—धारेबंदी.

( इ )इरिगेशन वगैरेसंबंधीं तक्रारींबद्दल चळवळ.

( ई ) सरकाराविरुद्ध इनामदारांच्या हक्कांचें संरक्षण व इनामदारांविरुद्ध रयतांच्या न्याय्य हक्कांचें संरक्षण.

( उ ) शेतकरीसंघ निर्माण करणें.

( ६ ) मजूरसंघटना—भांडवलवाले व मजूर यांच्या हितसंबंधाचा न्यायानें मेळ घालणें.

( ७ ) अस्पृश्यतानिवारण, जातीजातींत सलोखा उत्पन्न करणें, सर्वत्र संयुक्त मतदारसंघाचा पुरस्कार करणें.

( ८ ) शारीरिक शिक्षण सक्तीचें व लष्करी शिक्षण सार्वत्रिक करण्याचा प्रयत्न करणें.

( ९ ) सेवादलें, स्वयंसेवकसंघ, व राष्ट्रीय बालचरसंघ स्थापणें व हल्लीं अस्तित्वांत असलेल्या संस्थांना मदत करणें.

( १० ) देशी संस्थानांतील प्रजेला स्वराज्याचे हक्क संपादन करून देण्यासंबंधीं प्रयत्न करणें.

सोमवार ता. १ आगस्ट रोजीं सकाळीं ८॥वाजतां सभेस पुन: सुरुवात होऊन कमिटीनें एकमतानें मंजूर केलेले वरील दहा ठराव सर्वानुमतें मंजूर झाले. यांहि बाबतींत एखाद्या प्रश्नावर पुन: मतभेद झाल्यास तेवढ्यासाठीं बाकीच्या प्रश्नांसंबंधीं झालेली संघटना मोडूं नये असें ठरलें. कॉंग्रेसकमिट्यांसंबंधाच्या ठरावांत प्रत्यक्ष तसा मजकूर नसला तरी कॉंग्रेसकमिट्यांच्या निवडणुकींत केवळ बहुमतवाल्यांनाच प्रतिनिधित्व न ठेवतां बहुमत व अल्पमत यांचा योग्य प्रमाणांत अंतर्भाव सलोख्यानें करावा असेंहि ठरलें.

कमिटीच्या चर्चेंत स्वदेशी बहिष्कार व कौन्सिलें यासंबंधीं एकमत झालें नव्हतें. त्यासंबंधाची कमिटींत झालेली चर्चा व वादाचे मुद्दे श्री. देव व श्री. न. चि. केळकर यांनीं सभेस निवेदन केले. त्यावर बरीच साधकबाधक चर्चा होऊन उभय पक्षांच्या कांहीं मंडळींनीं बसून सर्वमान्य होईल अशा रीतीचा ठरावांचा मसुदा तयार केल्यावर तो ग. वि. केतकर यांनीं सभेपुढें मांडला व शं. द. देव यांनीं त्यास अनुमोदन दिलें. त्यावर पुन: बरीच चर्चा झाली. श्री. न. चि. केळकर यांनीं ठरावांतील आशय सर्वांस समजावून सांगितला व सलोख्याच्या भावनेनें एकमेकांना एकत्र कार्य करावयाचें आहे ही जाणीव ठेवून वागल्यास व एकमेकांच्या अडचणी ओळखून हा ठराव प्रामाणिकपणें अमलांत आणण्याचा टिळक स्वराज्य—संघामार्फत सर्वांनीं प्रयत्न केल्यास हें एक ऐक्याचें अधिष्ठान उत्पन्न होईल असें सांगितलें. ठिकठिकाच्या मंडळींनीं पुण्याहून आपल्या गांवीं गेल्यावर या योजनेस इतर हजर नसलेल्या मंडळींचाहि पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न करावा अशीहि त्यांनीं विनंति केली. यानंतर हे ठराव मतास घालण्यांत येऊन ते एकमतानें मंजूर झाले. हे ठराव असे:—

( ११ ) टिळक स्वराज्यसंघातर्फे कौन्सिलाच्या बाबतींत प्रचार करावयाचा तो खालीलप्रमाणें असावा—

( अ ) गोहत्ती कॉंग्रेसच्या कौन्सिलासंबंधींच्या ठरावांतील ( सी ) ( डी ) ( ई ) व ( एफ ) या कलमांमधील कौन्सिलासंबंधी धोरण मान्य करावे.

( ब ) ( ए ) व( बी ) हीं कलमें बदलण्याचा प्रयत्न करावा व अधिकाराच्या जागा स्वीकारून कौन्सिलकार्य करावें.

( १२ ) टिळक स्वराज्यसंघानें स्वदेशीच्य प्रचारांत कापडाचे बाबतींत प्रचार करावयाचा तो फक्त खादीचाच करावा.

( ब ) इतर हरतऱ्हेच्या स्वदेशी वस्तूंना व उद्योग—धंद्यांना उत्तेजन द्यावें.

( क ) सर्व प्रकारच्या ब्रिटिश मालावर राजकीय दृष्टीनें बहिष्कार यशस्वी करण्याचा प्रयत्न करावा.

( ड ) कॉंग्रेसची खादी-पोषाकाची सभासदत्वाची अट काढून टाकण्याचा प्रयत्न करावा.

याप्रमाणें या एकंदर १२ ठरावांत ग्रथित झालेल्या सामान्य गोष्टींबद्दल टिळकांच्या राष्ट्रीय पक्षांतील सर्व मंडळींनीं टिळक स्वराज्यसंघाचे सभासद होऊन त्या संघामार्फत चळवळ करावी असें ठरलें. व सकाळीं ८॥ वाजतां सुरू झालेली सभा १२ चे सुमारास संपली.

दुपारीं ३ वाजतां पुनः टिळकमंदिरांत सभा होऊन राहिलेल्या इतर विषयांपैकीं प्रचारकसंस्था स्थापणें या विषयासंबंधीं थोडशी चर्चा झाली.

# लोकमान्य आज असते तर ?

लोकमान्यांच्या विविध चळवळींचें मंथन करून त्यांच्या बुडाशीं असलेलीं तत्त्वें विशदपणें मांडण्यापूर्वी टिळकांच्या पुढारीपणाचें स्वरूप लक्षांत घेणें जरूर आहे. कारण तें स्वरूप कळल्यावांचून त्यांच्या तत्त्वज्ञानाविषयींची आपली आदरबुद्धि निश्चित होणार नाहीं. प्रसंगविशेषीं नेतृत्व गाजविणारे अनेक पुढारी प्रसंगानुरोधानें पुढें येत असतात. कोणी संकटग्रस्तांना केवळ सल्लामसलत देण्याची कामगिरी करतो. कोणी आपत्प्रसंगापुरता साहाय्यार्थ धांव घेऊन तेवढी आपत्ति दूर करून जातो. त्यांच्याहून वरच्या दर्जाचा जो एक पुढाऱ्यांचा वर्ग आहे, तो पिता जसा पुत्राचें लालनपालन करतो, त्याप्रमाणे राष्ट्रीय चळवळीचें संवर्धन करतो, पण त्याची दृष्टि अगदींच स्वार्थनिरपेक्ष अशी नसते. पित्याला ज्याप्रमाणें आपल्या मुलाचा नांवलौकिक झालेला पाहण्याची इच्छा असते तशी या पुढाऱ्यांनाहि आपल्या चळवळीचा बोलबाला होत असला तरच समाधान वाटतें. पण उधळ्या चिरंजिवानें कर्जाचा बोजा वाढविलेला पाहतांच निष्ठुर पिता ज्याप्रमाणे त्याच्याशीं आपला संबंध तोडून टाकतो, त्याप्रमाणें हे पुढारी आपल्या चळवळींत अपयश येत आहे असें पाहातांच तिच्याशीं असलेला संबंध तोडून टाकून हात झाडून मोकळे होतात. लोकमान्यांचें पुढारीपण वरील तीनींहि प्रकारांत वर्णिलेल्या स्वरूपाचें नसून त्यांनीं हातीं घेतलेल्या प्रत्येक चळवळीशी त्यांचा संबंध मातेसारखा असे. माता जशी मुलाला जन्म देते, त्याच्या लालनपोषणासाठीं स्वार्थत्याग करून कष्ट सोसते, आणि अखेरीस तो वैभवशिखरावर चढल्यास केवळ स्वतःच्या कृतार्थतेंतच आनंद मानते, त्याप्रमाणें लोकमान्यांनी स्वराज्याच्या चळवळीस जन्म दिला, स्वतः दुर्धर हालअपेष्टा सोसून तिचें संवर्धन केलें आणि अखेरीस ती पूर्ण यशस्वी झाल्याचा आनंद अनुभवण्याचा सुप्रसंग जरी त्यांस लाभला नाहीं तरी जेवढें यश प्राप्त झालें तेवढ्यांतच स्वार्थनिरपेक्ष आनंद मानला. आणि त्यांनीं भविष्यकालीन चळवळीला मार्गदर्शक म्हणून त्या अर्धवट यशस्वीपणांतच पुढील यशाची किल्ली कशी आहे तेंहि सांगून दिलें. अर्थातच राष्ट्रीय चळवळीचें खरें रहस्य जर कोणत्या एखाद्या पुढाऱ्यास पूर्णपणें कळलें असेल तर तें लोकमान्य टिळकांसच होय. कारण, त्या चळवळीशीं त्यांचें नातेंच तसें निकट व निःस्वार्थ प्रेमाचें होतें. आणि एवढ्याकरितांच राष्ट्रीय चळवळींतील एखाद्या बिकट प्रसगीं विद्यमान पुढारी किंकर्तव्यतामूढ झाले असता टिळकांनीं काय केलें असतें असा जो प्रश्न आपण जिज्ञासेनें विचारतों त्याचें बीज तरी हेंच होय.

मातेला जसें बालकाचें हृद्गत बरोबर कळतें व त्याच्या कल्याणावांचून जसा अन्य विचार देखील तिच्या मनांत उद्भूत होत नाहीं, त्याप्रमाणेंच लोकमान्यांना प्रत्येक चळवळीचें मर्म बरोबर अवगत असे आणि त्या चळवळीच्या यशास्वितेविना अन्य कोणताहि विचार त्यांच्या मनाला शिवत देखील नसे. यास्तव त्यांनीं जें जें केलें त्यांत स्वराज्याच्या चळवळीच्या यशाचें बीज असलें पाहिजे असें समजून चालण्यास हरकत नाहीं. आणि मनांतले विचार जसे गुप्त असल्यानें इतरांना त्यांचा थांग लागत नाहीं तसा कांहीं प्रत्यक्ष कृतीचा प्रकार नसतो. कृति सगळ्या जगासमोर असल्यानें टिळकांच्या हातून अमुक कृति घडली का नाहीं हा वाद निघू शकत नाहीं, तरी सुद्धां ज्याप्रमाणें सगळें रामायण ऐकून झाल्यावर देखील 'रामाची सीता कोण' असा प्रश्न विचारणारे कांहीं हरीचे लाल आपणास आढळतात, त्याचप्रमाणें टिळकांचें चाळीस वर्षांचें सार्वजनिक चरित्र डोळ्यासमोर असून देखील टिळकांनीं कौन्सिलांचें काय केलें असतें, रॉयल कमिशनकडे त्यांनीं कोणत्या दृष्टीनें पाहिलें असतें, संयुक्त मतदारसंघाविषयीं त्यांनीं कोणता अभिप्राय दिला असता इत्यादि प्रश्न साशंकतेनें विचारणारे हरीचे लाल आपणास आढळतात ! यांत केवळ त्यांच्याच कोत्या दृष्टीचा विचार असता तर इतरांनीं त्याची नुसती कींवच केली असती. परंतु त्यांच्या रातांधळेपणानें इतरांचीहि

दिशाभूल होत असल्यामुळें त्यांच्या दृष्टिदोषाकडे दुर्लक्ष करतां येत नाहीं.

### ध्येय श्रेष्ठ साधनें गौण

'स्वराज्य' शब्द उच्चारणें हा देखील ज्या वेळीं गुन्हा गणला जात असे अशा वेळीं ज्यानें 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी घेईनच घेईन' अशी सिंहगर्जना निर्भयपणें केली त्याच्या ध्येयाविषयीं व उद्दिष्टाविषयीं तरी वाद राहिला नाहीं हे तरी मोठें सुदैवच समजावयाचें. परंतु स्वराज्याच्या ध्येयाचा उच्चार टिळकांनीं जितका स्पष्टपणें केला त्याहून अधिक स्पष्टपणें त्यांनीं असें अनेकवार सांगितलें आहे कीं, खरी महती ध्येयाची आहे, साधनें हीं गौण आहेत. "स्वराज्यप्राप्तीसाठीं शत्रूस साष्टांग नमस्कार घालण्यापासून तों शेवटच्या बंडखोरीच्या अति जालीम उपायापर्यंत जो सुचेल तो तो उपाय अवलंबण्यास मी तयार आहे," या त्यांच्या उक्तींत कोणताहि उपाय समाविष्ट व्हावयाचा राहिला आहे असें नाहीं. मग अमुक मार्ग टिळकांना पसंत नव्हता, टिळक असते तर त्यांनीं अमुक तडजोड मान्य केली नसती, असल्या तर्कवितर्कांना आधार काय ?

पण एका अर्थानें मार्गांचा अनेकांगीपणा हाच पुनः संशयास कारणीभूत होतो. कां तर टिळकांना जरी सिद्धिप्रद असे सर्वच मार्ग सारखे वाटत असले तरी एकाच वेळीं अनेक मार्गांचें अवलंबन करतां येत नसल्यामुळें विशिष्ट प्रसंगीं त्यांनीं कोणता मार्ग श्रेयस्कर मानला असता हा प्रश्न शिल्लक राहतोच. परंतु त्याचाहि निर्णय कोणत्या धोरणानें करावयाचा याविषयींहि त्यांचीं कांहीं ढोबळ तत्त्वें ठरलेलीं होतीं. ज्या साधनावर भिस्त ठेवावयाची त्यानें यशःप्राप्तीची थोडी तरी आशा दिसत असली पाहिजे, 'शहाणा सरदार शिपायाची कुवत लक्षांत आणूनच लढाईची सिद्धता करीत असतो असें ते म्हणत असत. आणि याकरितांच कोणताहि अव्यवहार्य कार्यक्रम केवळ तत्त्वनिष्ठेसाठीं म्हणून त्यांनीं अंगिकारला नाहीं. 'सशस्त्र बंड यशस्वी होण्याची निदान आठ आणे तरी खात्री वाटूं लागल्यास बाकीच्या आठ आण्यांबद्दल परमेश्वरावर हवाला ठेवून मी बंड पुकारीन' ही त्यांची उक्ति सर्वश्रुतच आहे. आणि यांतच त्यांनीं व्यवहार्यतेची मर्यादाहि सांगून टाकली आहे. यशाविषयीं सोळा आणे खात्री कोणीच केव्हांहि आगाऊ देऊं शकत नाहीं. अर्थातच तसली हमी मागणारा कार्यकर्ता हा 'ओंठावर पडलेलें जांभूळ कोणी तरी आंत लोटील का' असें म्हणून मार्गप्रतीक्षा करणाऱ्या अजागळांच्या कोटींतलाच समजला पाहिजे. तसेंच जेथें यशाची आशा बिलकुल नाहीं आणि हानि मात्र निश्चित आहे असल्या झगड्यांत आपल्या शक्तीचा अपव्यय करणारा पुढारीहि आत्मघातकीच मानला पाहिजे. कारण अनुयायांचा एकदां उत्साहभंग होऊं लागला म्हणजे साध्या कामांतहि ते टिकाव धरून राहूं शकत नाहींत. उलटपक्षीं लहानसान का होईना, पण एकदां विजय मिळाला म्हणजे त्यांच्या अंगीं स्फुरण चढतें, आणि त्यांचें बळ दुप्पट वाढतें. यास्तव हातपाय गळाठण्याचा प्रसंग न येतां जेणेंकरून आपल्या पक्षाचें बळ वृद्धिंगत होईल असाच कार्यक्रम हातीं घ्यावयाचा आणि त्यांत संपादन केलेल्या विजयाच्या जोरावर अधिकाधिक जोखमेचीं कार्यें त्यांच्यावर सोंपवावयाचीं असा लोकमान्यांचा कार्यक्रम असे.

# तत्त्वांचें अनुकरण हेंच टिळकांचें स्मरण

( **दिनकर वासुदेव दिवेकर** एम. ए. )

"वाटे चरित्र त्यांचें कांहीं आपण तरावया गावें."—मोरोपंत

काल रोजीं लोकमान्य टिळकांस इहलोक सोडून गेल्यास इंग्रजी तिथीप्रमाणें बरोबर सात वर्षें पुरीं झालीं. या सात वर्षांच्या अवधींत लोकमान्यांची स्मृति नाहींशी झाली नाहीं इतकेंच नव्हे, तर ती प्रतिदिवशीं सकाळीं फुलणाऱ्या फुलाप्रमाणें किंवा समुद्राच्या सपाटीवर हरघडीं उठणाऱ्या नवनवीन लाटेप्रमाणें अगदीं ताजीतवानी आहे असें आजहि वाटतें. व चालू चिन्हांवरून असें अनुमानदेखील करण्यास हरकत नाहीं कीं, ही स्मृति भावी कालांतहि कोमेजणार नाहीं किंवा फिकी पडणार नाहीं.

टिळकांचे निधनापूर्वीं हिंदी राजकारणाची स्थिति काय होती आणि आज ते गेल्यापासून सात वर्षांत काय झाली, या दोहोंमधील महद्विरोध हेंच टिळकांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचें, त्यांच्या मुत्सद्दिगिरीचें, त्यांच्या कीर्तीचें व त्यांच्या चारित्र्याच्या यशाचें एक अचूक दर्शक व खात्रीलायक प्रमाण होय. 'आज टिळक हयात असते तर असें झालें नसतें. आज टिळक असते तर तसें झालें नसतें' असे उद्गार व त्यांचे आवर्तक प्रतिध्वनी कानांवर सारखे येऊं लागावेत याचें दुसरें काय कारण असूं शकणार ? सरदारगृहांत टिळक आपल्या मृत्युशय्येवर पड-

त्यावर "भीष्म पडतांचि गेले सर्वांचेहि पळांत आंवाके। नसतां धुरंधर—वृषभ बाळ—वृष भरें करूनि आवांके" अशी हिंदी राजकीय पुढाऱ्यांची अवस्था झाली. टिळकांच्या मरणापासून आतांपर्यंतच्या सप्तसांवत्सरिक अवधींत राजकारणाची जी राळ उडाली आहे ती पुसूंच नये. १९२० सालीं टिळकांच्याभोंवतीं सदैव संनद्ध असा बळकट राष्ट्रीय पक्ष देशभर व्यापून राहिला होता. आज त्या पक्षाला कित्येक पंख फुटून त्याचेहि शतशः तुकडे पडून तीं पिसें सर्वत्र पसरलेलीं आहेत. तेव्हां त्यांच्या सतत परिश्रमानें व दुर्दम्य चळवळीनें सबंध राष्ट्र स्वराज्योन्मुख व राजकारणमय झालें होतें. आतां स्वराज्य ही कल्पना खादीमध्यें जवळ जवळ गुदमरून जाऊन अजीबात लुप्त होते कीं काय अशी रास्त धास्ती विचारी माणसांस वाटूं लागली आहे, व वास्तविक राजकारण तर बेपत्ता झालें आहे. तेव्हां ज्या राजकीय संस्थांतून राजकारणाचीं फुलें विखुरलीं जात, तेथें आतां अन्य विषयांचा बाजार बसला आहे. तेव्हां ज्या राजकीय वातावरणांत राजकारणाचा सिंहनाद दुमदुमत राहात असे, तें आज फुसक्या कोलाहलानें भरलेलें आहे. तेव्हां लाहोरापासून मद्रासपर्यंत आणि कलकत्त्यापासून कराचींपर्यंत सरकाराविषयीं असंतोष जनतेच्या मनांत प्रज्वलित झालेला होता,आतां लोकांचीं अंतःकरणे शांत, बर्फासारखीं थंड व अक्षोभ्य बनलीं आहेत. तेव्हां सरकारला हिंदी लोकांच्या विलक्षण जाज्वल्य आंदोलनाचा दरारा वाटत असे, तर आतां सरकारला पूर्ण स्वास्थ्य व आराम मिळूं लागला आहे. एकूण, राजकारणाची टिळकांनीं महत्प्रयासानें बसविलेली घडी पार विसकटली; जनता दिङ्मूढ झाली, कोणी मार्गदर्शक राहिला नाहीं, सर्व बाजूंनीं नाकेबंदी झाल्यासारखी झाली; आणि टिळकांच्या निधनपूर्वकालीन व उत्तरकालीन राजकीय परिस्थितींत आपणास एकदम 'आशा—निराशा' आणि 'तेजोभंग' अशीं दोन खेदजनक दृश्यें काळाच्या नाटकगृहांतील रंगभूमीवर दिसूं येऊं लागलीं !

परंतु कोणताहि दुःखपर्यवसायी प्रसंग इतका निस्सीम व गाढ खेदमय नसतो कीं ज्यांतून आनंदाची कसली देखील छटा बाहेर उमटूं शकत नाहीं. निसर्गावर रुक्ष व उदासवाणा परिणाम करणारा हिंवाळा संपला म्हणजे मागाहून बहारीच्या वासंतिक समयाची पाळी येतेच येते. कोणत्याहि दिवसाची संध्याकाळ कितीहि अंधकारप्रधान असली तरी संध्येच्या पाठची सख्खी बहीण उषा तिच्या मागें हातांत करा धरून सदैव उभी असतेच. अकोला येथें प्रतिसहकार पक्ष स्थापन झाल्यापासून वर वर्णन केलेल्या अनुकंपनीय राजकीय स्थितीची घटका पाण्यांत पडली व जसजसे दिवस जात आहेत तसतशी ती घटका भरतहि येत आहे असें समजण्यास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. लोकमान्यांच्या राजकीय तत्त्वांवर व धोरणावर अधिष्ठित झालेल्या या पक्षाचा प्रभाव, प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें, राष्ट्राच्या व राष्ट्रीय सभेच्या राजकारणावर पडूं लागला आहे आणि लवकरच तीं तत्त्वें पुनश्च राष्ट्रीय सभेंत सिंहासनारूढ होतील असें अनुमान करण्यास विपुल पुरावा मिळूं लागला आहे. तथापि केवळ या आपोआप होणाऱ्या राजकीय उत्क्रांतीवर विसंबून राहणें पुरेसें नाहीं. प्रस्तुत राजकीय परिस्थिति, येथील व विलायतेंतील, अशी आहे कीं, टिळकांच्या राजकारणाचा पुरस्कार पुनः अत्यंत जोरानें निग्रहानें व सतत व्हावयास पाहिजे. किंबहुना टिळक समक्ष असते तर त्यांनीं जें केलें असतें तें आज सुरू करावयास पाहिजे. स्वराज्य हाच धर्म, स्वराज्य हेंच राजकारण, स्वराज्य हेंच आपल्या आयुष्यांतील सारसर्वस्व ही भावना पूर्वीप्रमाणें सर्वत्र जागृत व्हावयास पाहिजे व राष्ट्रांतील लोकांचीं मनें या एका शिरोधार्य प्रश्नावर एकाग्र केलीं पाहिजेत.

टिळकांना त्यांच्या ईश्वरी प्रेरणेमुळें जें यश प्राप्त झालें तें कदाचित् आपणास प्राप्त होणार नाहीं, किंवा आतां टिळक नाहींत म्हणून कदाचित् थोडी निराशा देखील वाटण्याचा संभव आहे. पण टिळक वारंवार जन्माला येत नसतात. इमर्सननें म्हटल्याप्रमाणें एक अद्वितीय महापुरुष अवतरला म्हणजे ज्या मुशींत निसर्गदेवतेनें त्याला ओतलें ती फोडून टाकण्यांत येते असें दिसतें. कारण त्याच्याचसारखा दुसरा निर्माण होऊं शकत नाहीं.त्याचा पूर्वज तोच व त्याचे वंशज तोच. त्याच्याबरोबर त्याचा वर्ग संपतो. त्याच्या कार्याचें बीं या भूमीवर पडून तें रुजावें, त्यापासून धष्टपुष्ट रोप तयार व्हावें व अखेरीस योग्य हंगाम प्राप्त होतांच त्याच्या समृद्ध फलपुष्पसंभारानें पृथ्वी सुशोभित होण्यास अवकाश मिळावा या हेतूनें हा दैवी नेमानेम असल्यास न कळे. त्याच्यामागून लोक उत्पन्न होतातच.' रविरुचीच्या'मागें तिचें कार्य दीपकावर पडतें,नाहीं असें नाहीं. पण कवीनें विचारल्याप्रमाणें ' विसरविल काय तेज प्रगट करुनि अल्प काजवा तीस ' हेंच खरें. तथापि टिळकांचे अनुयायी व अभिमानी म्हणविणारांनीं एकदिलानें उपरिनिर्दिष्ट पद्धतीनें त्यांचें कार्ययुक्त स्मरण करावयाचें तर संघटित प्रयत्न केल्यास कांहींच यश येणार नाहीं असें कदापि होणार नाहीं. मात्र अंतःकरणांतून

उसळून बाहेर पडणारी इच्छा पाहिजे. अशी अंतः-स्फूर्त इच्छा असेल तर कांहींहि अशक्य नाहीं. टिळक जिवंतपणें आपणामध्यें वावरत नसले तरी त्यांचा आत्मा या राजकीय चळवळींत अंतर्धान पावलेला आहे. आणि त्या चळवळीचा पुनः एकदां पुरस्कार होऊं लागला म्हणजे ते व्यष्टिरूपानें या राजकीय जागृतीस हातभार लावतील याविषयीं संदेह नाहीं. महान विभूती जिवंतपणापेक्षां मरणो-त्तर सूक्ष्मावस्थेंतच अधिक स्फूर्तिदायक व उत्साह-वर्धक होतात असें म्हणतात. त्यांतील सत्याची प्रतीति आम्हांसहि हल्लींच्या प्रसंगीं यावी अशी जगत्सूत्रचालकाची मनःपूर्वक प्रार्थना करून पुण्य-श्लोक लोकमान्य टिळकांच्या पुण्यप्रद स्मृतिपादां-वर हें स्तवन–सुमन समर्पण करतों.

# लोकमान्य टिळकांचा धर्म

( लेखक—**शिवराम गोविंद भावे** )

लो. टिळकांचें अंतःकरण बहुतेक प्रसंगीं निर्वि-कार राहात असे; कठोर टीकेनें त्यांना कधीं वेदना झाल्या नाहींत अथवा संताप वाढला नाहीं; व स्वतः दुसऱ्यावर तीक्ष्ण टीकेचे प्रहार करीत अस-तांनाहि त्यामुळें कोणाच्या मनास दुःख कां व्हावें हें त्यांस समजत नसे. राजकारणांत काय किंवा व्यवहारांत काय शठाशीं शाठ्यनीतीचा अवलंब करणें अयोग्य नाहीं हें आपलें मत ते निर्वि-कारपणें सांगत आणि त्याप्रमाणें कांहीं प्रसंगीं वागण्यासहि कमी करीत नसत. अशा गोष्टी आपण त्यांजविषयीं ऐकतों; तर असा हा स्वभाव बनण्याचें कारण काय व त्यामुळें त्यांचेविषयीं गैरसमज कसे उत्पन्न झाले हेंच थोडक्यांत आज पाहूं.

गीतारहस्यांतील प्रमुख तत्त्व म्हणजे ज्ञानोत्त-राहि लोकसंग्रहार्थ निष्काम कर्म करण्याची आवश्य-कता हें होय, हें तर निर्विवाद आहे, परंतु त्याच्या-चइतकें महत्त्वाचें व जें टिळकांनी निरंतर कृतींत उतरून दाखविलें असें दुसरें तत्त्व म्हणजे ‘ समत्वं योग उच्यते ’ हें होय. सारासार विचारानें सत्या-सत्याचा निर्णय करून कोणत्याहि बाजूस तोल न जाऊं देतां समतोलपणानें वागणें म्हणजेच योग, आणि हेंच टिळकांच्या जीवनाचें रहस्य. सनातन धर्माचें रहस्यहि हेंच असेंहि त्यांनीं आग्र-हानें सांगितलें.

जगांतील इतर धर्मांत आणि सनातन धर्मांत याच बाबतींत मुख्य फरक आहे. बुद्धाचा धर्म, ख्रिस्ताचा धर्म अथवा महंमदाचा धर्म यांना प्रत्येक गोष्टीचें शेवटचें टोंक गांठण्याची इच्छा आहे. वस्तुतः पाहतां महंमदाचा धर्म ख्रिस्ती धर्माच्या तत्त्वावरून सुचलेला आहे. आणि ख्रिस्ती धर्माच्या पायांत बुद्ध धर्माचीं तत्त्वें आहेत. या बुद्धाच्या धर्मांत सत्य दया अहिंसा इत्यादि दहा गुणांची पराकाष्ठा सांगितली आहे. यांपैकीं एकेक गुणाची संपूर्णतया प्राप्ति करून घेण्याकरितां भगवान बुद्धानें निरनिराळे दहा जन्म घेतले अशी आख्यायिका कांहीं पालीमधील ग्रंथांतून आहे! बुद्धाचा आग्रह असा कीं, सत्य म्हणजे तें निर्भेळ सत्य असलें पाहिजे, त्याला असत्याचा संसर्ग सुद्धां उपयोगी नाहीं, दया म्हणजे निर्भेळ दया, अहिंसा म्हणजे निर्भेळ अहिंसा. या तत्त्वाच्या अनुरोधानेंच त्यानें आपला धर्म स्थापन केला.

पण सनातन धर्माला ही पराकाष्ठा मान्य नाहीं. या धर्माच्या मतानें जगांत सर्व गोष्टी परस्पर सा-पेक्ष आहेत; असत्य आहे तर सत्य आहे. सत्य आहे तर असत्यहि आहे. हीच स्थिति दया अहिंसादि इतर गुणांची. या व्यावहारिक जगांत एकटें एकच तत्त्व असें कांहीं नाहीं. वास्तविक ज्ञान्याला हें सर्वच जग मिथ्या आहे. आणि परमेश्वराचें व्यक्त स्वरूप म्हणून पाहिल्यास त्यांत जें असेल तें सर्व त्याला सत्यहि आहे. जगांत वस्तुतः सत्यासत्य आहे आणि नाहींहि. आणि हें ज्याला समजतें तो अमुक गोष्ट सत्य आणि अमुक गोष्ट असत्य असें मानणा-रच नाहीं. तसेंच एकापासून फायदा, दुसऱ्यापासून बाधा हा विषयच त्यांचे ठायीं असत नाहीं. सत्याचें एक टोंक एका ठिकाणीं आणि त्याच्याविरुद्ध दिशेला दुसऱ्या ठिकाणीं असत्याचें टोंक असा प्रका-रच वस्तुतः नाहीं. हें एक वर्तुळ आहे; जेथून निघावें तेथेंच परत यावें लागणार. एक टोंक असत्याचें म्हणून सत्याच्या शोधाला जर निघाल तर पुढें पुनः त्याच ठिकाणीं सत्याचें टोक सांपडेल. व म्हणून जगांत कोणत्याहि वस्तूची पराकाष्ठा मानणें ही गोष्ट अशास्त्रीय आहे. Theory Of Relativity बद्दल मोठ्या पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं जे नवीन विचार जगांत मांडले आहेत त्यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होत आहे.

सनातन धर्मांचें हें महान तत्त्व—कीं जगांत संपूर्ण कांहींच नाहीं—अंगीं पुरेपूर बाणलें असल्या-मुळें सामान्य जगाला शठपणाचीं वाटणारीं कृत्यें अगदीं निर्विकार मनानें टिळक करीत आणि मला

कशाची बाधा नाहीं असें आत्मविश्वासानें म्हणत. महात्मा गांधींनाहि त्यांनीं हेंच सांगितलें. सिंहगड येथें बरेच दिवस परस्परांचें संभाषण झाल्यावरहि टिळकांनीं गांधींना शेवटचें उत्तर जें दिलें तें हेंच कीं, "I do not believe anything is absolute in the world" या जगांत स्वयंसिद्ध, स्वयंपूर्ण, परनिरपेक्ष असें कांहीं आहे असें मला वाटत नाहीं. ज्ञान्याला हीं सत्यासत्य वगैरेंचीं बंधनेंच नाहींत; पण लोकसमुदायाच्या अल्पबुद्धीकडे लक्ष देऊन ज्ञान्यानें वागणें आवश्यक आहे, व त्यासाठीं त्यानें सत्यासत्य अशा दोन भिन्न वस्तू कल्पून आणि व्यवहारांत दोहोंत समता ( बॅलन्स ) ठेवून वागण्याचा यत्न केला पाहिजे.

टिळकांच्या या म्हणण्याचें आकलन न झाल्यामुळेंच कोणी त्यांना कपटनीतिपटु म्हटलें. कोणी त्यांना लोकप्रीति साधण्याकरितां वाटेल त्या न्यायान्याय्य मार्गांचा अवलंब करणारे अशीं नांवें ठेवलीं. या बोटावरची थुंकी त्या बोटावर करणारे गारोडी म्हणूनहि कांहीं त्यांची कमी टवाळी झाली नाहीं ! वेळोवेळीं मतें बदलणार, आणि आपलें अंतःकरणांतील प्रामाणिक मत लोकभयानें बाहेर न सांगणारे अशी त्यांची अवहेलना नेमस्तांनी तर जन्मभर केली. आणि शेवटीं महात्मा गांधींच्या नव्या चळवळीनंतर तर त्यांचें राजकारण वारांगनेसारखें होतें, त्यांत धर्माचें अधिष्ठान नव्हतें, अर्थात् तें हलक्या प्रतीचें होय अशी भावना प्रसृत करण्यांत आली !

जी गोष्ट अत्यंत धर्मपूर्ण भावनेनें टिळकांनी केली तिलाच अधार्मिक म्हटलें जावें हा खरोखर विचित्र योगायोग होय ! आणि याचें कारण प्रतिपक्षीयांना टिळकांची धर्मदृष्टि कधींच उमजली नाहीं हें होय. वर उल्लेखिलेलें टिळकांचें उत्तर जेव्हां आलें त्याच वेळीं गांधींचें त्याला प्रत्युत्तर प्रसिद्ध झालें. त्यांत आपल्याला टिळकांच्या लोककार्याविषयीं कितीहि आदर असला तरी त्यांचें मत आपणास कबूल नाहीं असें गांधींनीं स्पष्टपणें जाहीर केलें होतें. आणि यानंतर गांधींच्याच विचारांची छाप सर्वत्र कांहीं काळ पडल्यामुळें, राजकीय झगड्यांत ज्या प्रांतांना एका सुताचें सुद्धां नुकसान सोसण्याची केवळ कल्पनाहि सहन होणार नाहीं अशा प्रांतांनीं, स्वातंत्र्यवीर प्रसवणाऱ्या महाराष्ट्राला श्रद्धाहीन म्हणण्याचे जेव्हां दिवस आले, त्या वेळीं टिळकांच्या पूर्वीच्या अनुयायांनीं सुद्धां त्यांच्या राजकारणाला अधार्मिक म्हणावें असा प्रकार होऊं लागला !

आणि हा सर्व प्रकार वर दर्शविल्याप्रमाणें, कोणत्याहि गोष्टींची आम्ही पराकाष्ठा प्राप्त करून घेऊं अशा वृथाशेनें ज्यांचीं कृत्यें होतात अशांच्या अशास्त्रीय कल्पनांचे फळ आहे. वास्तविक सत्याची पराकाष्ठा म्हणजे काय ? असत्यच जर नाहीं तर मग सत्य तरी कशाला म्हणावयाचें ? हिंसाच जर नाहीं तर मग अहिंसा या शब्दाला अर्थच काय ? एक सत्यापुरताच विचार केला तर जड गोष्टी (Facts)म्हणजेच फक्त सत्य काय?व्यवहारोपयोगी वळण दिलेल्या जड गोष्टी (Modified facts) या सत्य नाहीत काय ? कसाई गाईचे मागें आहे, मी गाय पाहिली आहे,त्यानें मला प्रश्न विचारल्यावर मी काय सांगावें ? वस्तु पाहिली हें सांगणें सत्यमय का मी पाहिली नाहीं हेंच सांगणें जास्त सत्यमय, एकांत पराकाष्ठवाद्यांच्या दृष्टीनें सत्यकथन साधत असेल तर अहिंसा किंवा दया साधत नाहीं. दुसऱ्यांत त्यांच्या दृष्टीनें असत्यकथन होतें, पण हिंसा टळते. मग जास्त योग्य कोणतें ? अर्थात् समविचारानें जें ठरेल तें. ज्ञानी म्हणेल, मला दोहोंपासूनहि विकार होणार नाहीं; कारण कर्ता अकर्ता मी नाहीं हें ज्ञान मला आहे.पण जागतिक दृष्टीनें समता साधूनच वागणें हें माझें कर्तव्य आहे.

याचाच अर्थ '**समत्वं योग उच्यते**' याच तत्त्वानुसार टिळकांचें आचरण जन्मभर झालें.आणि यामुळें अज्ञानानें पुष्कळ प्रकारचे आरोप त्यांचेवर झाले. तत्त्वप्रतिपादन व तत्त्वपालन या बाबतींत टिळक आणि श्रीकृष्ण यांचें जें साम्य तेंच निंदेच्या बाबतींतहि दोघांत आढळतें. किंबहुना जे आरोप श्रीकृष्णावर शिशुपालादि त्यांच्या प्रतिपक्षीयांकडून झाले तेच आरोप, अगदीं जसेच्या तसे टिळकांवर त्यांच्या प्रतिपक्षीयांकडून झाले. पण त्या आरोपांमुळें शेवटीं श्रीकृष्णाची योग्यता जास्तच तावूनसुलाखून जगाच्या प्रत्ययाला आली. आणि हीच गोष्ट लोकमान्यांच्या बाबतींतहि अवघ्या ५।६ वर्षांत घडून येत आहे.

# लोकमान्यांच्या चळवळीचें रहस्यसूत्र

( ले.—दामोदर विश्वनाथ गोखले, पुणें. )

लोकमान्य टिळकांनीं आपल्या सर्व आयुष्यभर केलेला राजकारणी प्रचंड उद्योग म्हणजे हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीचा प्रारंभींचा इतिहासच होय. गुलामांच्या राष्ट्राला राजकारण नाहीं म्हणून सर्व राजकीय चळवळ म्हणजे हिंदी प्रजेनें सरकारविरुद्ध केलेला राजद्रोहच होय असलीं विलक्षण तत्त्वें

न्यायाचा धारवाडी कांटा हातांत धरणारे इंग्रजी न्यायाधीश बेगुमानपणें ज्या काळीं दडपून देत असत तो काळहि टिळकांनीं पाहिला. इंग्रजांना हिंदुस्थानावर राज्य करण्याचा ताम्रपट परमेश्वरानें दिला नाहीं ह्या विधानाबद्दल त्यांनीं देहदंडहि सोसला. उलटपक्षीं इंग्रजी राज्य म्हणजे रामराज्य, इंग्रजासारखा पोषाक करावा म्हणजे आपण राजकारणांतील स्वरूपतामुक्ति मिळवूं; इंग्रजी भाषा, आचारविचार, न्यायपद्धति, जमीनमहसूल, शांतता व व्यवस्था म्हणजे स्वर्ग अशा वेडसर कल्पनांचाहि सुळसुळाट कमी नव्हता. ऑनररी मॅजिस्ट्रेटी मिळून साहेबाबरोबर खुर्चीला खुर्ची लावून बसण्यास मिळाल्यास आपण कृतार्थ झालों असें मानणारे लोक थोडेथोडके नव्हते. टिळकांचें चरित्र म्हणजे ह्या सर्व विचारसरणीविरुद्ध एक प्रकारचें बंड होतें. त्यांचा साधा पोषाक, सरकारी नोकरी न करतां स्वतंत्र रीतीनें शिक्षणाचें पवित्र कार्य करण्याची त्यांची प्रवृत्ति, व त्यांचा स्वतंत्र बाणा ही पहिली विचारांतील व आचारांतील क्रांति होय. ही क्रांति, हा बंडखोरपणा व ही राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या कल्पनेनें भारलेली त्यांची विचारसरणी म्हणजेच टिळकांचें चरित्र होय.

ब्रिटिशांच्या आर्थिक व राजकीय गुलामगिरींतून सुटावयाचा मार्ग म्हणजे त्यांच्या सत्तेइतकीच प्रबल व सामर्थ्यवान प्रतिस्पर्धी शक्ति लोकांत उत्पन्न करणें हाच एक मार्ग होय, असें त्यांनीं पूर्ण विचारांतीं ठरविलेलें होतें असें त्यांचें चरित्र सूक्ष्म रीतीनें पाहणाऱ्यास तावडतोब पटण्यासारखें आहे. अन्याय व जुलूम यांचा प्रतिकार तावडतोब व निर्भय रीतीनें व्हावा म्हणून लोकांत एक नवीन आवेश व उत्साह उत्पन्न करण्याची त्यांनीं अनेक वेळां आपली शिकस्त केली, यांतील बीज हेंच होय.

लोकमान्यांचें पुढारीपण कसलेल्या सेनापतीसारखें असे. सेनापतीला जर कोणत्या एका गोष्टीची विशेष काळजी घेणें जरूर वाटत असेल तर ती एकाच गोष्टीची असते. ती ही कीं, आपल्या सैनिकांचा आत्मविश्वास ढळूं देतां उपयोगी नाहीं. लढाईस तोंड देण्यापूर्वी शक्य तो विचार करून थोडाबहुत जय निश्चित झाल्याशिवाय तो युद्धास प्रवृत्त होत नाहीं. पुष्कळसें साहस तो करतो खरा. पण तें साहस विजयाचा भरवसा वाटत असल्यामुळेच तो करतो. सदैव मार खाणाऱ्या सैनिकांत दम राहात नाहीं. पराभवामागें पराभव निराशा उत्पन्न करतो व निराशेसारखा तेजोहरण करणारा दुसरा रोग नाहीं. लोकमान्य ह्या निराशेचे शत्रु होते. एकदां मनानें कच खाली म्हणून स्वराज्य घालविलें. पुनः तें मिळविण्याच्या उद्योगांतहि जर हीच नैराश्य वृत्ति उत्पन्न झाली तर स्वराज्याचेंच नव्हे तर स्वराज्याच्या प्रयत्नाचेंहि नांव नको असें ते म्हणत असत. आजच्या नैराश्याच्या काळांत नवीन उद्योगास आरंभ करण्यापूर्वी या त्यांच्या विचारांचा धडा सर्वांनीं जरूर गिरविला पाहिजे.

# मीमांसा–विद्यालय

## गव्हर्नरांचा अभिप्राय

ता. १९ जुलै रोजीं ना. गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांनी मीमांसा–विद्यालयाला भेट दिली. भेटीनंतर त्यांनीं आपला अभिप्राय पुढीलप्रमाणें लिहून पाठविला आहे—

" प्रो. देवधर यांच्या विनंतीवरून ता. १९ रोजीं मीमांसा–विद्यालयास भेट दिली आणि सर्व जगांत अद्वितीय अशी ही संस्था पाहण्याची संधि मला मिळाली याबद्दल मला आनंद झाला. जुन्या आर्य संस्कृतीबद्दलच्या ज्ञानाचा फैलाव करणें व विशेषतः संशोधनास उत्तेजन देणें या कामीं या संस्थेचें काम अमूल्य मानलें पाहिजे. या संस्थेच्या कार्याचें खरें महत्त्व कोणास समजून घ्यावयाचें असेल तर त्याला मी अमेरिकेच्या येल युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर एडगर्टन यांच्यासारख्या नामांकित संस्कृत पंडिताचे या संस्थेबद्दलचे प्रशंसोद्गार वाचावयास सांगेन.

हिंदु कायद्याची सुधारणा करण्याचें कामहि माझ्या मनांत भरलें. या संस्थेशीं संबंध असणाऱ्या सर्वांचें मी अभिनंदन करून तिला सर्व प्रकारें उत्तेजन मिळून तिची उपयुक्तता वाढावी असें इच्छितों.

गव्हर्मेंट हौस पुणे.
ता. २६–७–२७.

सही
**लेस्ली विल्सन.**

# रिझर्व्ह बँक बिलाचें भांडण

## ( ता. ९ ऑगस्ट )

मुंबई व कलकत्ता येथें दोन आठवडे काम चालून, रिझर्व्ह बँक बिलाच्या सिलेक्ट कमिटीनें आपला रिपोर्ट तारीख २५ रोजीं तयार केला. त्यासह हें बिल सिमला येथील असेंब्लीच्या बैठकींत पुढील चर्चेकरितां निघणार आहे. रिपोर्टांत सर्वमान्य अशाच गोष्टी संख्येनें पुष्कळ आहेत. आणि हातांत बिलाचा जुना व नवा मसुदा घेऊन तुलना करून कोणी पाहील तर त्याला वाटेल कीं, कमिटींत मतभेद असा प्रायः झाला नसावा! परंतु ज्या कलमांत मतभेद झाला तीं थोडींच असलीं तरी विशेष महत्त्वाचीं आहेत. सुदैवानें लोकपक्षाचें बहुमत झाल्यानें आतां रिपोर्ट झाला आहे तो लोकपक्षाचा व भिन्नमतपत्रिका सरकारी सभासदांची असें स्वरूप येणार आहे. तथापि इतरहि कांहीं थोड्या वादस्थळांत लोकपक्षाच्या मताप्रमाणें निकाल न होतां सरकार पक्षाचे म्हणणें बहुमतानें मंजूर झालें आहे. याकरितां लोकपक्षाचे कांहीं सभासदहि आपल्या भिन्नमतपत्रिका जोडणार आहेत. रिपोर्टावर औपचारिकरीत्या सर्व सभासदांच्या सह्या असल्या तरी, ह्या परस्परविरोधी भिन्न पत्रिकांमुळें बिलांतील खऱ्या महत्त्वाचीं कलमें अशीं जागेवर फारच थोडीं अबाधित राहिलीं आहेत. इसापनीतींतील दोन बायकांच्या दादल्याची गोष्ट आपण वाचतों. एकीनें त्याच्या डोक्यावरील काळे केस आवडत नाहींत म्हणून ते काढले व दुसरीनें पांढरे आवडत नाहींत, म्हणून ते काढले; आणि शेवटीं टक्कल जागेवर राहिलें! अशीच स्थिति ह्या बिलाची झाली आहे. मुंबईपासून सर बेसिल ब्लॅकेट यांनीं जो धाक दाखविण्याला सुरुवात केली त्यावरून पाहतां, सिमला येथें सरकारनें सर्व बिलच्या बिलच मागें घेतलें पाहिजे. पण प्रायः सरकारचाच हात केव्हांहि अखेरीस अधिक साधतो, म्हणून सर बेसिल यांना याहि बिलांत आपणास अखेर यश मिळेल अशी सकारण आशा वाटत असल्यामुळें बिल परत घेण्याची भाषा त्यांच्या तोंडांतून रिपोर्टानंतर निघालेली नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. लोकपक्षाचें बहुमत झालें तें अगदीं कांठावर झालें आहे. म्हणजे लोकपक्षाला १३ व सरकार पक्षाला १२ अशीं मतें पडून बहुमत झालें आहे. अर्थात् अगदीं कांठावर उभें राहिलेलें हें बहुमत ढांसळून पाडण्याला सरकारला फारसे परिश्रम पडणार नाहींत.

किंबहुना शनिवार ता. २३ रोजीं कलकत्त्यास रिझर्व्ह बँक बिल आणि इंपीरियल बँक बिल यांची चर्चा संपली त्याच वेळीं फिरून सर्वांच्या संमतीनें एकदोन म्हणजे मुख्यच वादस्थळें, पुनः चर्चेला पुढें काढावीं अशा कानगोष्टी हळहळ सुरू झाल्या होत्या. आणि शनिवारीं हजर असलेली सर्व मंडळी सोमवार ता. २५ रोजीं हजर असती तर कदाचित् तो प्रसंग बिनभाडीनें येताहि. पण त्या दिवशीं केळकर, जम्नादास मेथा व शेठ गोविंददास हे तिघे सभासद आपापल्या गांवीं निघून गेल्यानें त्यांच्या पश्चात् ही उलथापालथ करणें अशक्य झालें म्हणूनच ही गोष्ट घडली नाहीं. पण तेव्हांपासून सिमल्याच्या बैठकीपर्यंत तीन आठवड्यांची संधि मिळणार असल्यामुळें सर बेसिल ब्लॅकेट यांचा आशातंतु नुसता जीव धरून राहिला नसेल तर खासगी कारवाईनें अधिक बळकट झाला असेल असा अंदाज आहे. सिलेक्ट कमिटींत मुसलमान सभासद नाराज झाल्यामुळें त्यांचें सगळें टोळकेंच्या टोळकें सरकारास जाऊन मिळणार हें निश्चित आहे. शिवाय सिलेक्ट कमिटींतील एकदोन लोकांचीं मनें बोटचेपी असल्याचें तेथेंच आढळून आलें होतें. आणि तीं वळविण्याचा प्रयत्न अखेरच्या क्षणापर्यंत होईलहि. तात्पर्य, सर बेसिल ब्लॅकेट हे आपलें बिल परत घेणार नाहींत. दोन तीन वादग्रस्त मुद्द्यांपैकीं ते एखादा सोडून देतील व इतर जिंकून घेतील व अशा रीतीनें बिल असेंब्लींत पास होईल असा आजचा अजमास आहे.

मतभेदासंबंधानें इतका तपशील सांगितल्यावर वादस्थळें तरी अशीं कोणतीं असा प्रश्न सहजच सुचतो. त्याचें उत्तर खालीलप्रमाणें आहे. (१) रिझर्व्ह बँकेनें सोन्याचें नाणें चालू करावें कीं नाहीं? (२) रिझर्व्ह बँकेचें भांडवल सरकारी पैशानें उभारावें कीं शेअर काढून उभारावें? (३) रिझर्व्ह बँकेच्या डायरेक्टरबोर्डांत कायदेमंडळानें निवडलेले असे चार दोन किंवा एकदोन तरी प्रतिनिधी असावेत कीं नाहीं? पैकीं बँकेनें सुवर्णचलन कांहीं मर्यादित का होईना पण सुरू करावें अशी सूचना केळकर यांनीं सिलेक्ट कमिटींत मांडली. तिला तेथेंहि नऊच मतें पडल्यानें ती असेंब्लींत मंजूर होण्याची फारशी आशा नाहीं. त्यामुळें हा तडजोडीचा प्रश्नच ठरत नाहीं. तथापि केळकर, जम्नादास मेथा वगैरे मंडळी हा प्रश्न पुनः असेंब्लींत काढणार आहेत.

जो कोणी मनुष्य ठराविक दरानें सरकारला शुद्ध सोनें नेऊन देईल त्याला तितक्या किमतीच्या मोहरा पाडून द्याव्या ही केळकरांची सूचना होती व सिलेक्ट कमिटींत ती नामंजूर झाली. ज्याअर्थी चांदीच्या रुपयाची किमत करन्सी बिलानें सोन्यांत ठरविली आहे त्याअर्थी वीस रुपयाची एक मोहोर हें हिंदुस्थानांतील सोन्याचें नाणें म्हणून ठरवावें, आणि गव्हर्नरजनरल यांना योग्य वाटतील तितक्या मोहरा त्यांनीं टांकसाळींत पाडून त्या रिझर्व्ह बँकेच्या स्वाधीन कराव्या.आणि यापुढें निघणाऱ्या करन्सी व बँक नोटा यांच्यावर २० रुपयां बरोबर एक मोहोर व १० रुपयांबरोबर ½ मोहोर असें प्रमाण अक्षरांनीं उमटवावें. हें खुद्द सरकारनेंहि मान्य करून तशा अर्थाचें कलम सर्वानुमतें दुरुस्त बिलांत घालण्यांत आलेलें आहे. अर्थात् चांदीचा रुपया आणि सोनें याचा नित्य संबंध जोडल्याचें अशा रीतीनें जगजाहीर होणार. आणि यासंबंधाचें दृश्य फल म्हणून सोन्याची मोहोर टांकसाळींतून मूर्त स्वरूपांत बाहेर येणार ही गोष्ट तर पदरांत पडलीच. पण याच्याहिपुढें थोडेंसें जाऊन, केळकर यांनीं अशी सूचना मांडली होती कीं, जो कोणी प्रत्यक्ष सोनें देईल त्याला त्याच्या किमतीइतक्या मोहरा वाटेल तर त्याच्याच खर्चानें सरकारनें पाडून द्याव्या.यांत सरकारला तोशीस अशी कांहींच नाहीं आणि आपल्या गंगाजळींतील सोन्याचा ऐवज कमी होण्याची भीतीहि सरकारला उरत नव्हती. ही सूचना मान्य न झाल्याचें वर दर्शविलेंच आहे. तथापि कोणतीहि प्रगतिपर कल्पना लोकांच्या डोळ्यापुढें सतत जागृत ठेवल्यानें ती पुढें केव्हां तरी सफल होण्याची आशा असते या हेतूनें केळकर व जमनादास मेथा यांनीं असेंब्लीपुढें हें बिल येईल तेव्हां वरील आशयाची उपसूचना पुनः मांडण्याचें ठरविलें आहे. आणि ती नामंजूर झाली तरी वर सांगितल्या दिशेनें तितका फायदाच होईल.

दुसरें वादस्थळ बँकेच्या भांडवलासंबंधाचें. या मुद्द्यावर मुंबईस सरकार पक्षाचा पराभव होऊन, बँकेचें भांडवल सरकारनें भरावें, म्हणजे तें खासगी भागीदारीनें उभारूं नये असें ठरलें. तेव्हां पुढें डायरेक्टरबोर्ड नेमण्याच्या बाबतींत तरी आमच्या मनासारखें घडून आलें तर, हा झालेला निकाल कदाचित् आम्हीं मान्य करूं असें सर बेसिल ब्लॅकेट यांनीं कळविलें होतें. परंतु कलकत्ता येथें ह्या दुसऱ्या बाबतींतहि त्यांच्या मनासारखें घडून आलें नाहीं. तेव्हां पहिल्या मुद्द्यावर झालेला कमिटीचा निर्णय मान्य करण्याला आपण बांधले गेलेलो नाहीं, असा बाहाणा त्यांनीं केला. आणि असेंब्लीमध्यें बिल येईल तेव्हां बँकेचें भांडवल भागीदारीनें जमवावें, सरकारनें तें घालूं नये, अशा अर्थाची उपसूचना ते पुढें आणिल्याशिवाय राहणार नाहींत. पण पूर्वी दर्शविल्याप्रमाणें बोटचेपे मताचीं कांहीं माणसें त्यांना मिळाली तर, डायरेक्टर बोर्डाचा प्रश्न त्यांच्या मनाप्रमाणें सुटण्याची खात्री त्यांना वाटूं लागेल. आणि यामुळें मोबदल्यादाखल भांडवलासंबंधाचा आपला मुद्दा ते सोडून देतील असा संभव दिसतो. मात्र याहि मुद्द्यावर त्यांचें साधलें नाहीं तर तें सगळेच्या सगळें बिलच परत घेतील! म्हणजे मग बँकच मुळीं होणार नाहीं, आणि त्याबरोबर भांडवल कसें उभारावें हा प्रश्नहि आपोआपच जिरून जाईल.

तिसरें वादस्थळ डायरेक्टरबोर्डाच्या रचनेविषयीं. यांत लोकपक्षाच्या बहुमतानें बोर्डावरील कांहीं जागा मध्यवर्ती व प्रांतिक कायदेकौन्सिलांनीं भराव्यात असें ठरविलें आहे. पण भागीदारांच्या भांडवलानें बँक सुरू करूं नये, याविषयीं लोकपक्षाचें मत जितकें ठाम आहे तितकेंच कायदेकौन्सिलांनीं डायरेक्टर नेमून देऊं नयेत अशाविषयीं सरकारचेंहि मत ठाम आहे. आणि यावर कोणत्याहि प्रकारची तडजोड करण्याला ते तयार नाहीं. सरकारचें म्हणणें असें कीं, बँकेसारख्या संस्थेच्या कामांत राजकारणाच्या दृष्टीनें ढवळाढवळ होतां कामा नये. पण ह्या म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थ नाहीं. कारण इतर डायरेक्टर नेमून देण्याचा अधिकार गव्हर्नर जनरल व व्यापारी मंडळें यांना दिला आहे तसाच तो कायदे-मंडळांनाहि असावा यांत वावगें तें काय ? कायदे-मंडळांनी डायरेक्टर निवडून देणें याचा अर्थ, कायदेमंडळेंहि एक मतदारसंघ मानला जावा इतकाच आहे. गव्हर्नर-जनरलनें बँकेचे कांहीं डायरेक्टर नेमले म्हणून त्यामुळें तो जसा बँकेच्या कारभारांत हात घालतो असें समजण्यांत येत नाहीं; किंवा हिंदी, युरोपिअन व्यापारी मंडळांनीं कांहीं डायरेक्टर निवडून दिले म्हणून त्यांचा हात बँकेच्या कारभारांत शिरला असें कोणी म्हणत नाहीं; त्याचप्रमाणें कायदेमंडळांनीं डायरेक्टर निवडून दिले म्हणून कांहीं त्यांचा हात बँकेच्या कामांत शिरला असें मानण्याचें कारण नाहीं. कायदेमंडळाला राजकीय स्वरूप एका अर्थानें आहे हें खरें. परंतु त्या राजकीय स्वरूपाचा उपसर्ग बँकेला कसा लागणार ? कायदेमंडळांनीं आपले प्रतिनिधी डायरेक्टर तीन वर्षांतून एकदां निवडून दिले म्हणजे त्यांचें काम सपलें. त्या प्रतिनिधींचा आणि कायदेमंडळाचा पुढें प्रत्यक्ष काय संबंध येणार ? कायदेमंडळाला विचारून हे डायरेक्टर कोणतेंहि

काम करणार नाहींत. बँकेचे ताळेबंद मागवून घेऊन ते कायदेमंडळ पास करणार असेंहि नाहीं. येऊनजाऊन या डायरेक्टरांना राजकारणाचा वास असला तर इतकाच कीं, ते कायदेमंडळानें नेमून दिलेले आहेत. कायदेमंडळानें निवडून द्यावयाचे म्हणून ते कायदेमंडळाचे सभासद असलेच पाहिजेत असेंहि कलमांत घातलेलें नाहीं, पण कायदेमंडळाच्या द्वारें आलेला राजकारणाचा हा सूक्ष्म वास सरकारच्या नाकाला जर खपत नाहीं तर खुद्द गव्हर्नर–जनरल किंवा हिंदी, युरोपिअन व्यापारी मंडळे यांच्या द्वारें राजकारणाचा वास मुळींच येत नाहीं असें होतें काय? आणि आला तर तो मात्र सरकारला कसा खपतो? गव्हर्नर–जनरल म्हटला म्हणजे तो तर अंतर्बाह्य मूर्तिमंत राजकारणाचा पुतळाच होय. राजकारणाची ती एक सहस्रपुटी मात्रा होय. त्याच्या अंतःकरणाच्या प्रत्येक खणांत राजकारण इतकें खचून भरलेलें असतें कीं राजकारणाच्या विचाराशिवाय तो विचारच करीत नाहीं आणि राजकारणाच्या भाषेशिवाय तो भाषाच बोलत नाहीं आणि त्याबरोबर त्याचे हातीं सत्ताहि अमर्यादित व अबाधित राहते. अशा एका अधिकारी व्यक्तीनें, बँकेचे गव्हर्नर व इतर चार दोन डायरेक्टर नेमले तर त्यामुळें मात्र बँकेचा कारभार बिघडत नाहीं! राजकारणापासून तो अलिप्त राहूं शकतो. आणि प्रांतिक कायदेकौन्सिलांचे शेंकडो सभासद व वरिष्ठ कायदेमंडळाचे शेंकडो सभासद इतक्यांच्यामध्यें निवडणुकीची सत्ता वांटून गेली असतां, म्हणजे अमुकच प्रकारचा मनुष्य निवडून येईल अशी केव्हांहि खात्री नसतां, अशांनीं निवडलेल्या प्रतिनिधींचें राजकारण बँकेच्या कारभाराला भोवेल असें म्हणावयाचें म्हणजे हा नसता वितंडवाद होय.

लोकपक्षाच्या दृष्टीनें पाहूं गेल्यास कायदेमंडळाविषयीं सरकार पक्षाच्या मनांत जो नेहमीं एक प्रकारचा अनादर वाटत असतो तो मात्र ह्या वितंडवादानें, सर बेसिल ब्लॅकेट हे व्यक्त करीत आहेत हें उघड होय. राजकारण म्हटलें तर सर्वस्पर्शी आहे. प्रस्तुतच्या स्थितींत कोणताहि काळा मनुष्य काय, गोरा मनुष्य काय, त्याच्या जाणत्या मनाला तें इतकें चिकटून बसलेलें असतें कीं, त्यापासून तें सोडवतांच येत नाहीं, किंवा मनुष्याच्या अंगाचा रंग हा जसा अंगापासून कोणाला सोडवतां येणार नाहीं, किंवा खरडून काढतां येणार नाहीं त्याप्रमाणेंच राजकारण व मन यांची गोष्ट आहे. पण इतर एखाद्या कामावर मनुष्य नेमावयाचा असतां त्याच्या अंगाचा रंग पाहून जसा कोणी तो नेमीत नाहीं, त्याचप्रमाणें कोणाचें राजकारण काय याचाहि विचार डायरेक्टराच्या जागीं त्याची निवडणूक होतांना कोणी करीत नाहीं. याचें कारणच असें आहे कीं, कोणाचीं कांहीं विशिष्ट राजकीय मतें असलीं तरी, ज्या कामाच्या व्यवहारांत प्रत्यक्ष राजकारण नाहीं त्या कामांत तो आपलें राजकारण घुसडीत नाहीं व घुसडूं नये हें त्याला समजतें. कोणाहि सर्वमान्य समंजस मनुष्याविषयीं हे खचित मानतां येईल. तात्विक दृष्ट्या कोणत्याहि सार्वजनिक कार्याला राजकारणाचें एक अंग अंतिम स्वरूपांत असतें असें कदाचित् प्रतिपादितांहि येईल. पण ह्या कार्याचें विधान काय आहे यावरच त्यांत राजकारण घुसडलें जावें कीं नाहीं हें अवलंबून असतें. आणि त्याप्रमाणें त्या कार्यांत पडलेला मनुष्य वागतहि असतो. निराळ्या भूमिकेवर बसले असतां निराळ्या पद्धतीनें काम करणें ही गोष्ट मनुष्याला शक्य असतें, एवढेंच नव्हे तर सामान्य समंजस मनुष्य ती करूनहि दाखवितो. राजकारणांत पडलेला चळवळ्या मनुष्य घेतला तरी तो ज्यूरीवर नेमला असतां न्यायदानच करील. व्यापारी सभेंत बसला असतां नफानफातोटाच अधिक पाहील. एखाद्या कलामंडळावर नेमला असतां सरसनिरस अशीच निवड करील, किंवा धर्ममंडळांत बसला असतां धार्मिक कोणतें, अधार्मिक कोणतें याचाच तो निर्णय देईल. स्थलपरत्वें यथान्याय किंवा यथानियम किंवा धर्म्य वर्तणूक करणें यावरच मनुष्याची अब्रू अवलंबून असते व तिच्यासाठीं तो जपत असतो. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, कायदे–मंडळानें बँकेवर कोणी डायरेक्टर निवडून दिला म्हणून तो बँकेचा व्यवहार राजकारणामुळें बुडवील किंवा घोटाळ्यांत आणील असें मानण्याचें कारण नाहीं.

शिवाय कायदेमंडळ घेतलें तरी त्यांत नुसते राजकारणीच पुरुष असतात असें नाहीं. तर त्यांत शेतकऱ्यांचे प्रतिनिधी, व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी, सुशिक्षित वर्गाचे प्रतिनिधी, धंदेवाल्यांचे प्रतिनिधी, काळा-गोरा, मागसलेला-पुढारलेला अशा सर्व वर्गाचें व सर्व प्रकारच्या हितसंबंधाचे प्रतिनिधी कायदेमंडळांत असतात. आणि अशा शेंकडो प्रतिनिधींनीं मिळून केलेल्या निवडणुकींत राजकारणाशिवाय ज्याला दुसरा विचार सुचत नाहीं असा डायरेक्टर निवडून दिला जाईल असें कसें घडेल? पण हा प्रश्न तत्त्वापेक्षां आग्रहाचाच अधिक झालेला आहे. आणि ज्या कारणाकरितां सरकारच्या बाजूचा आग्रह त्याच कारणाकरितां लोकांच्या बाजूचा आग्रह हें ओघानेंच प्राप्त होतें. कायदेमंडळावर शिंतोडे उडविण्याची बुद्धि सर बेसिल ब्लॅकेट यांनीं धरली

नसती तर, कदाचित पं. मदन मोहन मालवीय, केळकर, जम्नादास मेहता वगैरेंनी कायद-मंडळाला डायरेक्टर नेमण्याचा अधिकार असावा असा आग्रह धरला नसता.

असो. रिझर्व्ह बँक बिलासंबंधानें वादस्थळें कोणतीं व कशा प्रकारचीं याचें दिग्दर्शन येथपर्यंत झालें. तथापि हीं वादस्थळें कळल्यानें तो वाद जिच्याविषयीं चालला आहे त्या रिझर्व बँकेचें स्वरूप काय हें कळण्यासारखें नाहीं म्हणून रिझर्व्ह बँकेचें स्वरूप आणि तिचें नित्य आणि नैमित्तिक कार्य काय याचें विवेचन पुढील अंकीं करण्याचें योजिलें आहे. तूर्त इतकें सांगणें जरूर कीं, रिझर्व्ह बँकेला तसेंच कांहीं विशेष महत्त्व आहे म्हणून हा एवढा वाद सुरू आहे. इंम्पीरिअल बँक बिल १९२१ सालीं मंजूर झालें तेव्हांहि बँकेचाच प्रश्न होता. परंतु त्या बँकेचें आणि हल्लींच्या रिझर्व्ह बँकेचें स्वरूप वेगळें कसें व किती आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे वादाचें स्वरूप लक्षांत येईल.

# 'बलवंत' टिळक

( ले.—**ग. वि. केतकर.** )

" सोळा ते पंचवीस वयापर्यंत ज्याप्रमाणें प्रत्येकजण आपल्या बौद्धिक उन्नतीकडे लक्ष देतो त्याचप्रमाणें जर तो आपल्या शारीरिक उन्नतीकडे लक्ष पुरवील, आणि ही मिळविलेली शक्ति पुढें दुर्गुणानें अगर भोगातिरेकानें घालवणार नाहीं, तर त्याला म्हातारपणापर्यंत वाटेल तितकें अत्यंत कठीण असें बौद्धिक कार्य करण्याचें सामर्थ्य येईल. "

( आठल्ये यांच्या इंग्रजी टिळकचरित्रांत दिलेले टिळकांचे उद्गार. )

अलीकडे दुय्यम व उच्च शिक्षणसंस्थांतील तरुणांचें लक्ष व्यायाम व शरीरसंवर्धन या विषयाकडे अधिकाधिक वेधलें जात आहे ही आनंदाची गोष्ट आहे. आखाडे व मर्दानी खेळांचे सामने या गोष्टींचा प्रसार हळूहळू पण निश्चितपणें होत आहे. " इंग्रजी शिक्षणानें आमच्या तरुण पिढींतील तेजस्विता, जोम, स्वावलंबन, कर्तृत्वशक्ति वगैरे गुण कमी होऊन निवळ खर्डेघाशी गुलामगिरीतच सुख मानणाऱ्या मंडळींचा जिकडे तिकडे सुकाळ झाला. " ( टि. सू. १६३ ) या शिक्षणानें डोक्यांत पुस्तकी ज्ञान कोंबतां कोंबतां हातापायांच्या काड्या होणें हाच परिणाम सर्वत्र दिसून येऊं लागला. यामुळें आतां इंग्रजी शिक्षण घेणारे तरुण जागृत झाले असून स्वावलंबनानें शारीरिक शिक्षणाचा मार्ग आक्रमण करूं लागले आहेत. सर्वांत मागाहून जागें होणारें सरकार व सरकारी कक्षेंतील विश्वविद्यालयेंहि शारीरिक शिक्षणाच्या व लष्करी शिक्षणाच्या योजनांचा विचार हळूहळू करीत आहेत. व्यायामप्रसारास अधिक अनुकूल असा काल येत आहे. अशा वेळीं लोकमान्यांचा शरीरबलसंवर्धनाबद्दलचा आचार, विचार व उच्चार लोकांपुढें मांडल्यास त्याचा या चळवळीस उत्तेजन देण्याचे दृष्टीनें उपयोग होईल असें वाटून तो देत आहे.

" शरीर घट्ट तर मन घट्ट " या तत्त्वाचें स्वतः लोकमान्य हें एक मूर्तिमंत उदाहरणच होते. त्यांनीं स्वतः आपल्या तरुणपणीं मेहनत करून शरीर कसें कमावलें याची हकीकत त्यांचे सहाध्यायी बडोद्याचे कै. कृष्णराव शारंगपाणी यांनीं आपल्या इंग्रजी आठवणींत दिली आहे. ते म्हणतात " टिळक जेव्हां प्रथम कॉलेजांत आले तेव्हां ते अत्यंत कृश होते. पण चार वर्षांनंतर टिळक कॉलेजांतून बाहेर पडले त्या वेळीं हें स्वरूप पालटून बांधीव शरीर, भव्य छाती, कणखर दंड अशी शरीरसंपत्ति संपादून ते बाहेर पडले. " टिळकांच्या कॉलेजांतील शरीरसंवर्धनकार्यक्रमाचेंहि वर्णन कै. शारंगपाणी यांनीं दिलें आहे. ते म्हणतात " वसतिगृहांत दाखल झाल्याबरोबर टिळकांनीं आपलें शरीर कमावण्याच्या खटाटोपास सुरुवात केली. रोज कांहीं तास नेमानें ते व्यायामगृहांत जात व व्यायाम घेत. सकाळीं तालमींत जाऊन ते मल्लखांब, जोर, जोडी व कुस्ती करीत व व्यायाम झाल्यानंतर बरेचसें दूध पीत. संध्याकाळीं सिंगल बार व डबल बार करण्यास कांहीं विद्यार्थी जमत व त्यांत टिळक सामील होत. सकाळीं बरेच विद्यार्थी नदीवर पोहण्यास जात. त्यांत नाशिकचे कुलकर्णी, पटवर्धन इ. पोहण्यांत तरबेज मंडळी होती. टिळकांनीं त्यांचेपासून पोहण्याची कला पूर्णपणें साध्य करून घेतली व थोडक्याच दिवसांत ते पटाईत पोहणारे बनले. "

प्रो. शं. वि. फडणीस यांना टिळकांनीं स्वमुखानें जो आपला अनुभव सांगितला तो आठवणींत आला आहे तो असा—"१५ वर्षांचा असतांना पोट पुढें आलेलें, कबुतराच्या छातीयेवढी छाती व उंसाच्या कांड्यासारखे हातपाय, अशी प्रकृति होती; पण नंतर भक्कम व्यायाम केला आणि माझें आयुष्य

२० वर्षांनीं वाढलें आहे. माणसाची जन्मतः प्रकृति कशीहि असो, पण व्यायामानें विशेषतः १५ ते २० च्या दरम्यान केलेल्या व्यायामानें प्रकृतींत क्रांति झाल्याशिवाय राहात नाहीं."

कॉलेजांत असतांना परीक्षा देण्याचें सोडून एक वर्ष त्यांनीं केवळ व्यायाम करून ताकद मिळविण्यांत घालविलें या गोष्टीचा उल्लेख श्री. वि. गं. केतकर यांच्या आठवणींत आलेला आहेच.

तरुणपणीं कमावलेली ही शक्ति टिळकांना अखेरपर्यंत उपयोगी पडली. तीन वेळां खडतर तुरुंगवास भोगूनहि ते आपला उत्साह व शारीरिक आणि मानसिक दृढता कायम ठेवूं शकले. आणि कोणत्याहि तऱ्हेचे कष्ट व थंडीवारा सहन करण्याइतकें त्यांचें शरीर घट्ट बनलें. वृद्धपणांत होमरूलच्या प्रचंड दौऱ्यांत तहानभूक किंवा झोप यांची त्यांनीं पर्वा न बाळगतां तरुणांनाहि लाजविणाऱ्या उत्साहानें काम केलें. अमृतसरच्या थंडींत इतर दाक्षिणी लोक जाड जाड कपडे लपेटून बसत असतां टिळक हे उघड्या डोक्यानें व अंगांत एक सदरा घालून व्यवहार करीत असतांना पाहून मौं. शौकत अल्लीना आश्चर्य वाटलें. सरदारगृहांतहि थोडा ताप येऊन गेला असतां ते उघडे बसलेले पाहून शौकत अल्लींनीं असेंच आश्चर्य प्रगट केलें. ते म्हणतात, " मला वाटतें कीं, टिळकांच्या अंतःकरणांत नेहमी पेटलेला अग्नि असल्यामुळें त्यांच्या शरीरांत उष्णता नांदत असेल." प्रो. बेलवलकर यांनीं आपल्या आठवणींत, आगगाडींत इतरांना थंड वाऱ्याचा त्रास होत असतां टिळक खिडकी उघडी टाकून रात्रभर कसे वारा खात होते याचें वर्णन करून आश्चर्य प्रगट केलें आहे. सिंहगडाच्या थंडींतहि ते एक सदरा घालून हिंडत व थंडीला भिऊन जाड जाड लोंकरीचे कपडे लपेटणाऱ्या नाजूक तरुणांची थट्टा करीत! रात्रीच्या वेळीं गुडघा दुखत असतांहि, केसरी छापण्याच्या कामांत आलेली अडचण त्वरेनें दूर करण्याकरितां ते झोंपडींतून गांवांत कसे चालत आले याची हकीकत श्री. यशवंतराव कुलकर्णी यांनीं निवेदन केली आहे. रायगडाच्या उत्सवाचे वेळीं हातांत छत्री घेऊन ती न भिजवतां ते गंगासागर तलावाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत पोहत कसे गेले हें डॉ. मुंजे यांनीं आपल्या आठवणींत सांगितलें आहे.

डेक्कन कॉलेजांत सुमारें २ पुरुष उंचीवरून खालीं उडी टाकून त्यांनीं आपल्या सहाध्यायांस चकित केल्याचें रा. ब. कृ. ब. देवल सांगतात.

सितारामबुवा लिंबगांवकर यांच्या आठवणींत लोकमान्यांनीं एका नवशिक्या विद्यार्थ्यास तो वाहात चालला असतां त्याचा लंगोट धरून ओढीत नदीच्या कांठावर आणलें ही हकीकत आली आहेच.

व्यायामामुळें लोकमान्यांची पचनशक्तीहि चांगली होती व भोजनप्रसंगीं खाण्याची पैज जिंकूनहि पुनः वेळेवर शाळेंत जाऊन नेहमीप्रमाणें त्यांनीं आपला तास घेतल्याचें श्री. बापट यांनीं दिलेल्या हरिभाऊ आमडेकर यांच्या आठवणीवरून दिसून येते.

आठवणींचीं पुस्तकें चाळल्यास टिळकांच्या शारीरिक कणखरपणाचे व तितिक्षेचे असेच अनुभव अनेकांनीं नमूद केलेले आढळतील. 'आधीं केलें मग सांगितलें' या न्यायानें त्यांच्या कक्षेंत येणाऱ्या तरुणांस ते शरीरबलवर्धनाचा उपदेश करीत व या उपदेशाच्या मागें स्वतःचें प्रत्यक्ष उदाहरण असल्यामुळें त्या उपदेशाचा परिणामहि होत असे.

टिळक मंडाले येथें सहा वर्षे कैदेंत असतांना त्यांचे चिरंजीव प्रथम हायस्कुलांत व नंतर कॉलेजांत शिक्षण घेत होते. मंडालेहून टिळकांनीं जीं पत्रें पाठविलीं त्यांवरून त्यांना आपल्या चिरंजिवांच्या शारीरिक शिक्षणाची किती काळजी वाटत होती हे दिसून येतें. त्यांतील कांहीं उतारे सर्वांनाच उद्बोधक वाटण्यासारखे असल्यामुळें पुढें देत आहे. हीं पत्रें केसरीचे मॅनेजरांस आलेलीं होतीं.

मंडाले ता. २ एप्रिल १९१०

"त्यांना घरांत मल्लखांब, जोडी व जोर काढण्याचे हत्ते आणून एक लहानसा तालिमखाना तयार करून द्या व त्यासाठीं न्यू इं. स्कूलमधील तालीममास्तरास एक तास तालीम करून घेण्यास नेमा."

मंडाले ता. १ सप्टेंबर १९१३

" वझे यांच्या तालमींतील मनुष्यास पुनः नेमून त्यांना त्यांच्या व्यायामाची काळजी घेण्यास सांगा. ३० ते ५० जोर, शंभर बैठका, मल्लखांबाच्या वीस उड्या येवढा व्यायाम स्वल्प असून तो केव्हांहि सोडतां कामा नये. हा व्यायाम परीक्षा पास होण्याच्या आड येतो असें शिक्षकांचें म्हणणें असेल तरच तो बंद करा. परीक्षेंत पास होण्यास व्यत्यय येत नसला म्हणजे, पास होण्याच्या लागणाऱ्या ठराविक मार्कीहून कांहीं जास्त मार्क मिळविणें यापेक्षां शारीरिक उन्नतीलाच मी अधिक महत्त्व देतों."

मंडाले ता. १ जानेवारी १९१४

" तुम्ही वझे यांच्या तालमींतील अगर दुसरीकडील मनुष्य नेमा. त्यानें नेमानें सकाळ-संध्याकाळ येऊन बापूकडून तालीम करवून घ्यावी. प्रथम अल्पप्रमाणांत सुरुवात करून हळूहळू प्रमाण वाढवावें. याप्रमाणें करून महिन्याचे अखेरीस दोनशें जोर, तीनशें बैठका व शिवाय मल्लखांब व जोडी करण्याइतकी त्याची तयारी व्हावी.

दरमहिन्यास झालेल्या प्रगतीचा एक तक्ता करावा व तो मजकडे पाठवावा. त्याला चांगला व्यायाम घेण्याची हीच वेळ आहे. त्यानें हें केल्यास त्याची प्रकृति सहा महिन्यांत सुधारेल."

"टेनिस व क्रिकेट ह्यांनी स्नायूंचें पुरेसें संवर्धन होत नाहीं. तेव्हां त्यानें कॉलेजांतील टेनिस व क्रिकेट यासारखे खेळ सोडून रोज सकाळ-संध्याकाळ सांपडेल तितका वेळ वर दिलेले व्यायाम करण्यांत घालवावा. हें त्यास प्रथम थोडें कठीण जाईल हें मला माहीत आहे. पण शरीर संपादन करण्यास याखेरीज दुसरा मार्ग नाहीं."

मंडाले ता. १ फेब्रुवारी १९१४

"मनुष्याच्या आयुष्यांत असा एक ठराविक काळ असतो की, फक्त त्या काळांतच तालीम करून शरीराची वाढ करणें त्यास शक्य असतें. याला वाढीचा काल म्हणतात. जर त्याला जन्म अशक्तपणांत घालवावयाचा नसेल तर त्यानें वेळीच मी सांगितल्याप्रमाणें व्यायाम घ्यावा. जर त्यानें नियमितपणें व नेटानें व्यायाम वाढवून शरीर सुधारलें व एक वर्षाचे अखेर तो सुदृढ झाला तर, परीक्षेंत नापास झाला तरी त्याची मला पर्वा नाहीं. याचप्रमाणे त्याला माझें असें सांगणें आहे कीं, टेनिस व क्रिकेट हे मैदानांतील खेळ असले तरी या कामीं ते निरुपयोगी आहेत. सभ्य गृहस्थ व सभ्य स्त्रिया यांना करमणुकीखातर खेळण्यास ते चांगले. पण स्नायूंचें संवर्धन करण्याचे कामी ते उपयोगी नाहीत. अपुऱ्या श्वासोच्छ्वासाची ( शॉर्ट ब्रीदिंग ) सवय घालविण्यास जोराशिवाय दुसरा परिणामकारक उपाय नाहीं. जोरांनीं छातीची वाढ होऊन ती मजबूत होते."

श्रीमंत जगन्नाथ महाराजांचे ते पालक होते त्या वेळीं त्यांस व बापट कमिशनमधील रावसाहेब बापट वारल्यावर त्यांचे चिरंजीव प्र. वा. बापट यांचे पालकत्व ह्यांचेकडे आलें होतें, तेव्हां त्यांसहि आपल्या पुत्रांप्रमाणेंच टिळकांनीं कळकळीनें व्यायाम घेण्यास सांगितल्याचें आठवणीवरून दिसून येतें. त्याचप्रमाणें शारीरिक सामर्थ्याविषयीं इतर तरुणांशीं झालेलीं त्यांचीं भाषणेंहि आठवणींत आढळतात.

प्रख्यात हिंदी सँडो प्रो. राममूर्ती यांच्याबद्दल टिळकांना केवढा तरी आदर व कौतुक वाटत असे. राममूर्ती भेटावयास आले म्हणजे त्यांचे डोळे या अचाट सामर्थ्याच्या हिंदी माणसाबद्दलच्या अभिमानानें आनंदित झालेले दिसत. राममूर्ती यांना स्वतःची स्वतंत्र सर्कस काढण्याचे कामीं अडचणीच्या प्रसंगीं टिळकांनी साह्य केलें होतें. त्याचा त्यांनी आपल्या आठवणींत कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे, तो असा—" १९०७ च्या जुलै महिन्यांत देवळाली येथें वादळानें माझा तंबू फाटून त्याच्या चिंध्या झाल्या. मला नवा तंबू उभारण्याच्या कामीं पैशाची अडचण आहे हें मी टिळकांना कळविलें. त्यांनीं ताबडतोब देशमुख यांचेकडून तीन हजार रु. मला देवविले आणि पटवर्धन यांस सर्कशीचे व्यवस्थापक होण्यास सांगितलें. माझ्या सर्कशीला पुढेंहि वारंवार भेट देऊन त्यांनीं मला उत्तेजन दिलें. त्यांच्या आगमनामुळें हजारों प्रेक्षकांनीं तंबू चिकार भरून जाई. मला स्वतंत्र सर्कस-कंपनी काढण्यास सांगण्याचा त्यांनीं असा हेतु सांगितला कीं, माझ्या शारीरिक शक्तीच्या प्रयोगामुळें हिंदी तरुणांचे मनांत शरीरबलवर्धनाची आस्था उत्पन्न होईल "......" माझे शक्तीचे प्रयोग पाहून आनंदित होऊन ते म्हणत कीं, पुराणांत वाचलेल्या भीमार्जुनांच्या शक्तीसारखी शक्ति प्रत्यक्ष डोळ्यांनें पाहून मला धन्यता वाटते. त्यांनीं 'इंडियन सँडो' याचे ऐवजीं 'अर्वाचीन भीम' ही पदवी लावण्यास मला सांगितलें व ते शब्द कोरून एक सोन्याचें पदक त्यांनीं मला अर्पण केलें." पुढे एका भेटीचे वेळीं टिळक त्यांस म्हणाले "आपल्या मातृभूमीच्या सेवेनेंच प्रत्येकास आपली आत्यंतिक उन्नति करून घेतां येईल. या कामीं सुदृढ शरीर असणे आवश्यक आहे. उत्तम शरीरसंपत्ति तयार करण्यास देशांत चोहोंकडे व्यायामशाळा स्थापन झाल्या पाहिजेत."

टिळकांच्या शारीरिक शक्तीला तितक्याच कणखर मानसिक व तीव्र बौद्धिक शक्तीची जोड मिळाली होती. अत्यंत क्षोभकारक प्रसंगींहि ते स्थिरबुद्धि ठेवीत. राजकारणी पुरुषाचे हृदयांत प्रचंड आग पेटलेली पाहिजे आणि त्याच्या हृदयाच्या वरच्या बाजूस डोकें बर्फासारखें थंड असलें पाहिजे असें ते म्हणत ( सू. ८६३). त्यांचें आत्मसंयमन जबर होतें. सुपारी खाण्याची इतकी संवय असतां तुरुंगांत सुपारीवांचून कसें चाललें असा प्रश्न विचारतांच ते म्हणत "सुपारी म्हणजे कांहीं श्वासोच्छ्वास नव्हे तर त्यावांचून अडेल. मनावर ताबा असला म्हणजे वाटेल त्या स्थितींत मनुष्यास राहतां येतें." वृद्धपणांत मधुमेहाचा विकार जडला असतां त्यांनीं कित्येक दिवस अत्यंत कडक असें पथ्य पाळलें व अखेर त्या रोगाला पुरतें हटविलें, हें याच निग्रहाच्या जोरावर. या निग्रहाबरोबर असामान्य अशी निर्भयता व धैर्य त्यांचे अंगीं होतें. त्याच्या जोरावर त्यांनीं अनेक आपत्ती न डगमगतां सहन केल्या. युद्ध चालू असतां विलायतेंत जाण्याचे वेळीं बोट बुडण्याची भीति त्यांच्या मनास शिवली

नाहीं. १९०८ सालीं कोर्टांत शिक्षा ऐकण्याचे वेळीं स्वतः ते खंबीर राहिलेच. पण इतरांनीं अश्रू गाळून साहेबापुढें आपल्या कमकुवत मनाचें प्रदर्शन करूं नये अशी त्यांची आज्ञा होती. सुरतेच्या प्रसंगींहि त्यांचें हेंच असामान्य धैर्य दिसून आलें. शारीरिक शक्तीला धैर्य, स्थिरबुद्धि, स्वार्थत्याग व ईश्वरनिष्ठा यांची जोड मिळाल्यानंतर ' बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितं ' या गीतावचनाप्रमाणें तें दैवी किंवा परमेश्वरी बल होतें. एकदां पाय दुखत असतांहि सिंहगडावर वर जाण्यास खुर्ची नेणार गडी न मिळाल्यामुळें ते तशाच स्थितींत गड चढून गेले व वर पोंचल्याबरोबर—

**मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्।**
**यत्कृपा तमहं वन्दे परमानंदमाधवम् ॥**

हा श्लोक त्यांच्या मुखांतून बाहेर पडला. त्यांच्या शरीरबलांत हें भगवंताचें अधिष्ठान अढळ होतें व म्हणूनच गीतेच्या दैवी बलाच्या व्याख्येप्रमाणें ते खरे ' बलवंत ' असून बलोपासक तरुणांनीं त्यांचें हें चारित्र्य डोळ्यापुढें ध्येय म्हणून सतत ठेवण्यासारखें आहे.

# शंकराचार्य व धर्मशास्त्र

(लेखक—**वामनशास्त्री किंजवडेकर.**)

संकेश्वरीं असलेल्या पीठाचीं रूपांतरें होत होत आज तीन पीठें व तीन पीठाधिष्ठित विभूति प्रसिद्ध आहेत. त्यांत एक स्थावर असून दोन चर आहेत. स्थावर असलेल्या पीठाधिष्ठितांचा संबंध तत्प्रांतेतर इतर जनतेशीं येत नसून ते केवळ संस्थानांत कायमचे स्थिर झाल्यासारखे आहेत; आणि ज्या दोन पीठाधिष्ठितांचा संचार होत आहे त्यांतील दोनहि आपापल्या परीनें धर्मसंरक्षण करण्याचें काम यथाशक्ति करीत आहेत. परंतु याहिपेक्षां चालू असलेल्या पद्धतींहून अन्य पद्धतीनें धर्मसंरक्षण करण्याचा यांच्याकडून प्रयत्न झाला तर तो जनतेस हितावह होईल असें वाटतें.

महाराष्ट्रांतील दोन पीठांनीं अशी विभागणी आपापसांत करून घ्यावी कीं एकानें हिंदु-संरक्षण करावें, हिंदु समाज वाढवावा आणि जे हिंदु यत्किंचित् निमित्त पुढें करून स्वधर्मत्याग करण्यास प्रवृत्त होतात आणि परधर्माची दीक्षा घेऊं इच्छितात त्यांना तसें न करूं देण्याविषयींचे उपाय योजावेत. परधर्माची दीक्षा घेऊन आमचे पूर्वज आपत्तिप्रसंगानें परकीय धर्मांत आले पण आतां आम्ही पुनश्च स्वधर्मांत जाण्यास तयार आहों अशी पश्चात्तापपूर्वक कबुली दिली असेल त्यांना स्वधर्मांत घेण्याचे प्रकार योजून आंत घ्यावेत. त्यांच्याकरितां वाटल्यास शूद्र कमलाकर, पराशर-स्मृति इत्यादि ग्रंथांचा उपयोग करून त्यांची व्यवस्था लावावी आणि सर्वमान्य दया-दाक्षिण्यादि गुण त्यांचे वाढतील अशी योजना करावी. दोनहि पीठधिष्ठितांनीं जे उपाय या वेळीं योजावेत असें आम्हास वाटतें तेः—

१ दोघांनीहि आपापल्या दीक्षांना साजतील अशीं विद्वत्ताप्रचुर आणि व्यवहारदक्ष अशा जनसमूहाचीं मंडळें नेमावींत.

२ आलेले प्रश्न कोणत्याहि जातीचे धार्मिक असोत, जातिविषयक असोत, परावर्तनाचे असोत, संवर्धनाचे असोत, ते त्या मंडळाकडे पाठवावेत.

३ उभय पक्षांना बोलावून त्यांची चौकशी व्हावी.

४ आपल्या शासनाधिकारांत सांगितल्याप्रमाणे त्यांची पूर्ण चौकशी झाल्यानंतर, अंतिम निकाल देण्याच्यापूर्वी निकाल देण्याची दिशा उभयवादींच्या प्राड्विवाकांना समजावून सांगावी.

५ विद्वानांचे बहुमत जिकडे होईल तें सार्वजनिक रीत्या विशिष्ट समाजापुढें मांडलें जावें.

६ एवढें झाल्यानंतर मग प्रसिद्ध रीतीनें महाजनसभेंत अंतिम शासन म्हणून प्रसिद्ध करावें. म्हणजे वादी प्रतिवाद्यांची तक्रार केव्हांहि, अपुऱ्या चौकशीबद्दल राहाणार नाहीं;आणि कोणाहि विद्वान माणसानें शासन पाहिल्यास त्यांत दूषणाला जागा नाहीं असेंच त्यानें म्हणावें.

७ कोणाकडूनहि निग्रहानुग्रहाकरितां अर्ज आल्यास त्याची पोंच त्याला उलटटपालीं मिळावी.

८ कोणत्याहि अर्जाचा निकाल होण्यास तीन महिन्यांपेक्षां अधिक काल लागूं नये. एखाद्या कामास जास्त वेळ लागणें शक्य असल्यास तसें अर्जदारास कळवावें.

९ प्रकरणाचा निकाल लागेपर्यंत जो साधारण खर्च लागेल तो सध्याच्या परिस्थितींत आचार्यांनीं अर्जदाराकडून घ्यावा. उत्पन्न हातीं आल्यानंतर घेऊं नये.

१० केव्हांहि विद्वन्मंडळाची मुख्य कचेरी पुण्यांत असावी. या कचेरीची निर्णायक बैठक तिसऱ्या महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत बसून प्रकरणाचा विचार होऊन तें प्रकरण शेवटच्या हुकुमाकरितां

पीठाकडे रवाना झालेंच पाहिजे. तेथून तीन दिवसांनीं आज्ञापत्र बाहेर पडलें पाहिजे.

११ जें आज्ञापत्र पीठाकडून वरील सर्व व्यवस्थेला अनुसरून सुटेल तें प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध व्हावें.

याप्रमाणें सामान्यतः आम्हास जें मठीय व्यवस्थेविषयीं आत्मीय म्हणून वाटलें तें लिहिलें आहे.

आज आपल्या महाराष्ट्रांत आमच्या अगर मठाच्या सुदैवेंकरून लुप्तविद्याप्रांतांतहि जे थोडेबहुत शास्त्री आहेत त्यांचा फायदा महाराजांनीं घेतल्याशिवाय राहूं नये व जीं कांहीं प्रकरणें शास्त्रार्थाचीं असून शास्त्र्यांचा विचार न घेतांच मठीय माणसांकरवीं त्यांचा विचार करण्यांत येतो; ही वस्तुस्थिति खरी असेल तर ती चांगली नाहीं असें आम्हास तरी निदान वाटतें.

ज्या शास्त्रीय विषयांची चर्चा होऊन विद्वत्संमतीनें श्रींचें शासन बाहेर पडावें तेथें जर मठीय माणसांवरच तें येऊन ठेपलें तर " कालाय तस्मै नमः " यापेक्षां दुसरें तरी आम्ही काय म्हणणार ?

आतां असे दिवस राहिले नाहींत कीं, पीठाधिष्ठित व्यक्तींनीं वाटेल तो गांवोगांवीं एकेक धर्माधिकारी नेमून आपला व्यवहार चालवावा.

आतां असें समजा कीं, मठाचें उत्पन्न सध्या अनामत असलेलें सुटलें आणि कोणा तरी दोन व्यक्तींपैकीं तें एका व्यक्तीस मिळालें तर मग जनतेची गरजच आचार्यांना उरणार नाहीं. मग परिस्थिति, जनता, वगैरेंकडे आचार्यांना पाहाण्याचें कारणच नाहीं, असें म्हणून जर कोणी समाधान करूं म्हणेल तर त्यास आमचें उत्तर असें आहे कीं, तें उत्पन्न हातीं आल्यानंतर एखाद्या उदार धनिकाप्रमाणें शंकराचार्य राहणार आहेत काय ? पण तशीं माणसें पूर्वी ज्या समाजांत राहिलीं त्याची स्थिति आज काय आहे तें त्यांनीं पाहावें. शिवाय तसें राहूं देणें न देणें हें केव्हांहि विद्वान् आणि धार्मिक जनतेच्या स्वाधीन आहे हे त्यांनीं विसरूं नये. जनतेच्या धार्मिक अडचणी दूर करणें हेंच आचार्यपीठाचें कर्तव्य आहे. म्हणून उदार धनिकाप्रमाणें त्यांना राहतां येणार नाहीं असें आम्हास वाटतें.

विद्वन्मंडळासाठीं आम्ही पुढील नांवें सुचवितों—
१ श्री. महामहोपाध्याय विरूपाक्षशास्त्री हानगल, २ श्री. महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर, ३ श्री. वे. शा. सं. श्रीधरशास्त्री पाठक, ४ श्री. वे. शा. सं. तर्कविद्वान नागेशशास्त्री उप्पिनबेटागिरी, ५ श्री. वे. शा. सं. महादेवशास्त्री बाके, ६ श्री. वे. शा. सं. कृष्णशास्त्री तेलंग, ७ श्री. वे. शा. सं. वासुदेवशास्त्री पणशीकर, ८ श्री. वे. शा. सं. महादेवशास्त्री कात्रे, ९ पंडित रमापतिशास्त्री, १० वे. शा. सं. दत्तात्रेयशास्त्री पणशीकर, ११ वे. शा. सं. वासुदेवशास्त्री पित्रे इत्यादि.

वरील शास्त्री मंडळींना आणि श्रींनाहि सद्यःस्थितीच्या व्यवहाराची दिशा प्रसंगानुसार कळावी म्हणून वेळोवेळीं राजकार्य-दक्ष आणि व्यवहारचतुर अशा मंडळीची सल्ला मिळावी म्हणून योजना करण्यांत यावी ती येणेंप्रमाणेः—

१ श्री. नरसिंह चिंतामण केळकर, २ डॉ. नानासाहेब देशमुख, ३ श्री. बाळासाहेब मिरजकर, ४ श्री. बेळवी वकील, ५ डॉ. बाबासाहेब परांजपे, ६ श्री. दादासाहेब खापर्डे, ७ श्री. माधव श्रीहरि अणे, ८ डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, ९ श्री. मार्तंड बापुजी वाईकर, १० श्री. माधवराव किनखेडे, ११ श्री. पांडुरंग वामन काणे, १२ श्री. अण्णासाहेब नेने. इ.

याप्रमाणें शंकराचार्य आणि धर्मशास्त्र याविषयीं जे दोन शब्द लिहावयाचे होते ते आम्ही यथामति लिहिले आहेत. विद्वानांनीं लिहिलेला धर्मशास्त्रार्थ आचार्यपादांनीं अमलांत आणावा, विद्वानांचा धर्मशास्त्रार्थ सोडून आज्ञापत्रें बाहेर पडूं नयेत अगर स्वप्रांतांतले विद्वान सोडून परप्रांतीय विद्वानांकडे जाईपर्यंत कोणत्याहि शास्त्रार्थाची मजल येऊं नये. जर त्या त्या विषयाचा ऊहापोह करून सिद्धान्त सांगणारे विद्वान आपल्या प्रांतांत नसतील किंवा असलेल्यांना परप्रांतांतील विद्वानांची गरज भासेल तरच इतर प्रांतीं जाणें नान्तरीयक आहे. विद्वान वेळोवेळीं आपलीं मतें बदलतात असा मठीय आक्षेप विद्वानांवर आहे. परंतु विद्यारण्यांनींच प्रसंगानुसार शास्त्राच्या आधारेंच हा आधार करून ठेविला आहे. जसें विद्यारण्यांनीं मीमांसाशास्त्रावर लिहितांना मातुलकन्यापरिणयाचा निषेध करून प्रायश्चित्तहि सांगितलें आहे; आणि पुनः धर्मशास्त्रांत मातुलकन्यापरिणय अभ्युपेत आहे असें म्हटलें आहे. याचा अर्थ मतें बदलतात असा नसून ग्रंथाची दिशा निरनिराळी असते हें दाखविणें आहे. पण मातुलकन्यापरिणय आज आचार्य मानीत नाहींत असें थोडेंच आहे? विद्वानांनीं ग्रंथ लिहावेत आणि आचार्यांनीं ते अमलांत आणावेत एवढी मात्र गोष्ट खरी आहे. आतां हें प्रकरण लिहितांना आचार्य आणि विद्वज्जनता यांच्यासंबंधीं कमीजास्त शब्द लिहिल्याबद्दल आचार्यपाद आणि विद्वज्जन क्षमा करतील अशी आशा आहे. वर्ष सहा महिन्यांत जी परिस्थिति विद्वान व आचार्य यांमधील संबंधाची कानावर आली यामुळें सुचलेले विचार वर ग्रथित केले आहेत. यामुळें कोणीहि स्वतःचा समज चुकीचा करणार नाहीं अशी पूर्ण आशा आहे. आचार्य किंवा विद्वान यांचीं मनें दुखविणें किंवा उपमर्द करणें असा हेतु मुळींच नाहीं.

# दारू कशी बंद करावी ?

## ( ता. १६ ऑगस्ट )

मुंबई इलाख्यांतून दारूचें व्यसन पूर्णपणे नाहींसे करून टाकण्यासाठीं मद्यपानाला अजीबात बंदी करण्यांत यावी कीं काय याचा विचार करण्याकरितां मुंबई-सरकारने पांच वर्षापूर्वी एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीने मुंबई इलाख्यांत मद्यपानाला सर्वत्र बंदी अवश्य करावी अशी शिफारस केली आणि सरकारनेहि ती मान्य करून वीस वर्षांत तिची पूर्तता करण्याचा संकल्प केला. हा संकल्प सोडल्यानंतर कजूष सरकारला आपलें उत्पन्न बुडेल याचा धाक वाटूं लागला आणि हें बुडतें उत्पन्न व दारूबंदीच्या बजावणी करण्यास लागणारा जादा खर्च या दोहोंची तरतूद अगोदर ठरल्याखेरीज मद्यपानास आळा घालतां येणार नाहीं असा कांगावा सुरू होऊन या दोन मुद्यांवर सल्ला देण्याकरिता गतवर्षी पुनः एक कमिटी नेमण्यांत आली.

या कमिटीपुढें विचाराकरितां दोनच प्रश्न मांडण्यांत आले होते. मद्यपानाला पूर्ण बंदी केल्यास किती उत्पन्नाची तूट येईल व ही बंदी कायमची व पूर्णपणें पाळली जाण्याला खर्च किती येईल आणि ही तूट व हा जादा खर्च भागविण्याकरितां नवीन उत्पन्नाचे कोणते मार्ग शोधावयाचे? या दोन प्रश्नांतून पहिल्या प्रश्नाच्या पहिल्या भागावर कमिटींत फारसा मतभेद झाला नाहीं. अबकारी खात्याचे निवळ उत्पन्न सध्या चार कोटि रुपयांचे असल्याने मद्याला पूर्ण मनाई केल्यास चार कोटींचे उत्पन्न बुडणार असे कमिटींतील बहुमतवाल्यांचे मत पडलें.पण वास्तविक पाहातां केवळ दारूचे उत्पन्न महायुद्धापूर्वी चार कोटि नव्हतें आणि हल्लींच्या दरसाल ठराविक प्रमाणांत दारूचा रतीब तोडण्याच्या पद्धतीनेहि हें उत्पन्न आपोआपच कमी होत जाणार असल्यानें निवळ नुकसान धरावयाचें झाल्यास तें तीन कोटि रुपये धरणें वाजवी होईल असें अल्पमतवाल्यांचें मत आहे व तें सयुक्तिक दिसतें.

पण हा कांहीं मोठा महत्त्वाचा प्रश्न नाहीं. तीन कोटि असो अगर चार कोटि असो, अबकारी खात्यांतून आज मिळणारें हें उत्पन्न दारूबंदीनतर बंद होणार हें सर्वांना मान्य असून ही तूट भरून काढण्याचे उपायहि नवीन कराच्या रूपानें कमिटीनें सुचविले आहेत. परंतु दारूबंदी पूर्णपणे अमलांत आणण्यास जो कडेकोट बंदोबस्त ठेवावा लागेल त्याच्या खर्चाच्या अंदाजांत मात्र उभय पक्षांत पुष्कळच तफावत पडत आहे. अबकारी कमिशनर मि. घोसळ यांनीं सिंधखेरीजच्या बाकीच्या भागाला प्रारंभींचा खर्च पांच कोटि पंधरा लक्ष करावा लागेल आणि दरसाल तीन कोटि अडतीस लक्ष रुपये खर्च येईल असा अंदाज केला आहे. यांत मि. क्लिफर्ड यांचे सिंधच्या खर्चाचे आंकडे अनुक्रमें ५० लक्ष व ६८ लक्ष मिळविले म्हणजे प्रारंभीं सु. ५॥ कोटि खर्च करावा लागून दरसालचा खर्च ४ कोटींवर जाईल असा हिशेब निघतो. आजचें हातचें चार कोटींचें उत्पन्न बुडवावयाचे आणि ते उत्पन्न बुडविण्याकरितां दरसाल आणखी चार कोटि रुपये नवा खर्च करावयाचा आणि त्या नव्या योजनेकरितां प्रारंभींच्या पावणेसहा कोटींच्या खर्चाचाहि वार्षिक हप्ता सुमारें चाळीस लाखांचा भरावयाचा अशी एकंदर जबाबदारी मुंबई इलाख्यावर येऊन पडेल असें दाखविण्याचा अबकारी खात्याचा रोख आहे. पण कमिटीनेंच मि. घोसळ यांचे हे आंकडे उगाच फुगविलेले आहेत असें म्हणून ते अमान्य केले आहेत. अबकारी खात्याचे नवे कमिशनर मि. मॅक्ग्रेगॉर यांनीं आपलें एक एस्टिमेट कमिटीपुढें मांडलें होतें व त्यांत सिंधखेरीज बाकीच्या भागापुरता वार्षिक खर्चाचा अंदाज दोन कोटींचा व प्रास्ताविक खर्चाचा अदाज तीन कोटी ३२ लक्षांचा अदाजला होता. तथापि हे आंकडे देखील कमिटीला वाजवीहून अधिक वाटून ठोकळ मानाने जादा खर्च दरसाल १॥ ते २ कोटि रुपये येईल असे कमिटीने ठरविलें आहे. तरी पण चालू चार कोटींचे उत्पन्न बंद होऊन दीडदोन कोटि पदरमोड करावी लागणार. म्हणजे एकदरीने साडेपांच ते सहा कोटि रुपयाचें नवे उत्पन्न शोधून काढावे लागणार व ती गोष्ट सुलभ नाहीं असे म्हणून बहुमतवाल्यांनीं दारूची पूर्ण बंदी दुष्कर आहे असे दाखवून हातपाय गाळले आहेत!

या बहुमतवाल्यांच्याविरुद्ध कमिटींतल्या चौघां सभासदांनीं आपलीं भिन्न मतें नमूद केलीं आहेत. त्यांत श्री. मादन आणि हुसेनभाई लालजी यांचा एक गट असून श्री. भोपटकर आणि नाशिकचे आमदार प्रधान या दोघांचा एक गट झाला आहे. तसें पाहूं गेल्यास मादन हुसेनभाई आणि भोपटकर व प्रधान यांच्यांत तत्त्वाचा विरोध कोठेंच नाहीं. पण जादा खर्चाचा अंदाज ठरविणें, नवीन करांचे मार्ग सुचविणे व त्यांचा क्रम ठरविणें वगैरे तपशिलाच्या बाबतींत कांहींसा मतभेद दिसून येतो. हुसेनभाई, भोपटकर व प्रधान यांच्या मतें पूर्ण बंदी दहा वर्षांत अमलांत

आणतां येईल. पण मि. मादन यांनीं मद्यपानाचा पूर्ण नायनाट होण्यास वीस ते तीस वर्षें लागतील असा अदाज सांगितला आहे व तो फारच दीर्घसूत्रीपणाचा व निराशाजनक वाटतो.

अबकारी खात्याकडून जादा खर्चाच्या अंदाजाचे जे आंकडे कमिटीपुढें सागण्यात आले ते आकडे पाहिले असतां सरकारचा अबकारी उत्पन्नाचा मोह सुटत नाहीं म्हणून दारूबंदीची अशक्यता दर्शविण्याकरितांच असले आंकडे कमिटीपुढे सागण्यांत आले असावेत असे वाटूं लागतें. सरकारनें दारूबंदीचा कायदा जाहीर करून दारू गाळण्याच्या भट्टया बद केल्या आणि सगळे गुत्ते उठविले कीं त्याबरोबर जणुं काय परप्रांतांतून या इलाख्यावर चोरून दारू पाठविण्याचे हल्ले सुरू होतील व त्याच्या प्रतिकाराकरितां जय्यत तयारी ठेवावी लागेल अशा कल्पनेने हा जादा खर्चाचा अदाज केलेला दिसतो. जलमार्गानें चोरून दारू आणली जाऊ नये म्हणून सिंधच्या उत्तर टोकापासून तो कारवारच्या दक्षिण-टोकापर्यंत सारखी टेहळणी ठेवण्याकरिता १५-२० मोटार बोटी, खुष्कीच्या मार्गानें तसलाच चोरटा व्यापार चालू नये म्हणून सबंध सरहद्दीवर जागोजाग अबकारी चौक्या, त्याशिवाय रेल्वेवर अबकारी तपासणीचीं नाकीं आणि या दोहोंचा पाठपुरावा करण्याकरिता चौकीदारांची रिझर्व्ह फौज आणि चोरट्या व्यापाऱ्यांच्या हल्ल्याचा सुगावा लागतांच या सैनिकांना त्या हल्ल्यास तोंड देण्याकरिता नेण्यासाठीं ४० स्पेशल मोटारी अशा प्रकारच्या जय्यत लढाईच्या तयारीचा कांगावा करण्याचा व्यूह रचून हा सगळा खर्चाचा पसारा माडलेला दिसतो! या जादा सैन्याच्या नुसत्या कपड्याकरितांच आरंभीं २० लक्ष रुपये आणि पुढें दरसाल १२॥ लक्ष रुपये खर्चात नमूद केलेले आहेत!

मोटार बोटी व मोटार लॉरी यांच्या खरेदीकरिता २२ लक्ष रुपये आणि त्यांच्या दुरुस्तीकरिता दरसाल सुमारें तीन लक्ष रुपये या अदाजांत दाखल केले आहेत. यावरून या कडेकोट बंदोबस्ताच्या अवाढव्य खर्चाची वाचकांस कल्पना येईल. याशिवाय आरंभींच्या खर्चात ५६ लक्ष रुपये जमीन खरेदीकरितां व २ कोटि १७ लक्ष रुपये इमारती बांधण्याकरितां खर्च दाखविला असून वार्षिक खर्चात पुनः घरभाड्याकरितां म्हणून २५ लक्ष रुपये आहेत ते निराळेच. अशा रीतीने मालकीची जागा खरेदी करून ठिकठिकाणीं चौक्या बांधून व जेथें चौक्या नसतील तेथे घरभाडें देऊन रखवालदारांची सोय करण्यांत यावयाची व त्यांना जरूर तेथें नेण्याकरितां मोटारीहि सरकारी खर्चानेच ठेवावयाच्या अशी सगळी तजवीज करून पुनः दरसालच्या चालू खर्चात २५ लक्ष रुपये फिरती भत्ता नमूद आहेच. यावरून पूर्ण दारूबंदी अमलांत आणणे अत्यंत दुर्घट आहे असे दाखविण्याचा अबकारी खात्याचा हेतु यांत उघड दिसतो. पण हा डाव कोणाच्या लक्षांत येत नाहीं असे नाहीं. कमिटींतल्या सरकारी सभासदांनीं देखील या अंदाजांतले कित्येक आकडे निष्कारण नमूद केलेले आहेत किंवा निदान वाजवीहून अधिक फुगविलेले आहेत असा शेरा मारला आहे. मग बिनसरकारी सभासदांनी या आंकड्याची कशी शोभा केली असेल ते सांगावयास नकोच. भिन्न मत नमूद करणारे श्री. भोपटकर व प्रधान यांनीं केवळ मुर्वतीस्तव हा जादा खर्च कोट दीड कोट येईल असे म्हटलें आहे. पण मि. हुसेनभाई यांनी तर आपलें असें स्पष्ट मत दिलें आहे कीं, हल्लींच्या पोलिसाच्या संख्येत आणखी थोडीशी भर घातली म्हणजे तेवढ्यावर हें बंदोबस्ताचें काम भागेल.

खरोखर पाहू गेल्यास अबकारी खात्याकडून अगडबंब खर्चाचा हा नुसता बागुलबोवा उभा करण्यात आलेला दिसतो. अफूची किंवा तंबाखूची चोरून आयातनिर्गत होऊ नये याविषयीं हल्लीं कडक बंदोबस्त आहे व ठिकठिकाणीं तपासणीहि ठेवलेली आहे. त्या तपासणीदाराकडून अफू किंवा कोकेन ह्यासारखा सहज लपवितां येण्यासारखा पदार्थहि जर शोधून काढला जातो तर त्यांना दारूच्या बाटल्याची चोरटी आयात पकडतां येणार नाहीं काय? त्याच्याकरितां एवढें कडेकोट नवे सैन्य कशाला हवे? त्यातूनहि ज्या पदार्थांच्या चोरट्या आयातीपासून सरकारच्या उत्पन्नाला धोका पोंचतो त्यांची आयात चोरून न व्हावी याकरितां जेवढा पक्का बंदोबस्त पाहिजे तेवढा बंदोबस्त कांहीं दारूच्या आयातीच्या प्रतिबंधाकरिता ठेवण्यास नको. कारण मद्यपानाला पूर्ण बंदी होऊन अबकारीच्या उत्पन्नावर तुळशीपत्र ठेवल्यावर दारूची चोरटी आयात पकडण्यांत सरकारला उत्पन्नाचा लोभ वाटण्याचे कारणच राहिलेलें नाहीं. अर्थातच क्वचित् ठिकाणीं बंदोबस्त ढिला पडल्यामुळें एखाद्या ठिकाणीं कोणी चोरून भट्टी लावून चार बाटल्या दारू तयार केली किंवा एखादी बाटली चोरून आणली म्हणून तेवढ्याने काय आकाश कोसळणार आहे थोडेंच? एवढ्या पोलिसाच्या बंदोबस्तांतून दरसाल हजारों खून होतात, लक्षावधि चोऱ्या होतात व स्त्रियांच्या अब्रूवरहि घाले पडतात. पण त्यांच्यासाठीं सर-

कारचा जीव कधीं तळमळला नाहीं किंवा त्या बंदोबस्तासाठीं सरकारने स्पेशल मोटारींचा तांडा ठेवलेला नाहीं. मग दारूबंदी जाहीर झाल्यानंतर एकाहि माणसाच्या हातून चुकून देखील त्या बंदीविरुद्ध गुन्हा घडू नये असली अशक्य हांव सरकारनें कां धरावी ? व त्याकरितां पांचसहा कोटींचे खर्चाचे बजेट आणि त्याच्या भरतीसाठीं पांच-दहा नवे कर यांचे भूत लोकांच्या नजरेपुढें कशास नाचवावें ? त्यापेक्षां दारू पिऊन तुमचा जन्माचा धात झाला तरी चालेल पण आमचे अबकारी उत्पन्न आम्ही सोडणार नाहीं असेंच उघडपणें सरकारनें कां म्हणूं नये ?

जादा खर्चाचा हा अदाज तयार करतांना अबकारी खात्याने अमेरिकेतील संयुक्त संस्थानाच्या बंदोबस्ताचे उदाहरण डोळ्यापुढें ठेवलें आहे असें दिसतें. पण संयुक्त संस्थानाच्या एका बाजूस दारूला मोकाट मुभा असलेली तीन हजार मैलांची कानडाची सरहद्द आहे आणि दुसऱ्या बाजूस धाडशी इंग्रज आगबोटवाल्याचा सुळसुळाट असलेला हजारो मैलांचा समुद्रकिनारा आहे. आणि असल्या कडक बंदोबस्तातून लपून-छपून आणल्यामुळें अत्यत महाग पडणारी दारू कल्पनातीत किंमत देऊन खरेदी करणारे अट्टल दारूबाज लक्ष्मीपुत्रहि संयुक्त संस्थानांत शेंकडो आहेत; म्हणून अमेरिकन सरकारास एवढा खडा पहारा ठेवावा लागतो. पण मुंबई इलाख्याची स्थिति सर्वच प्रकारांनीं याच्या उलट आहे. येथले बहुतेक प्रजाजन दारूला स्पर्श करणें हें पाप समजणारे आहेत आणि त्यांचे दारिद्य तर जगजाहीरच आहे. तेव्हां यदाकदाचित् अमेरिकेतल्याप्रमाणे येथे चोरटी आयात करण्याचें कोणीं मनात आणलें तरी चोरटेपणामुळें बेसुमार महाग झालेली दारू खरेदी करण्याला गिऱ्हाईक कोठें मिळणार ? अर्थातच अमेरिकेचे उदाहरण दाखल्यादाखल घेण्यांत अबकारी खात्याकडून येथील परिस्थितीचा बुद्धिपुरस्सर विपर्यास केला जात आहे. अमेरिकेचें उदाहरण नमुन्याकरिता घ्यावयाचेंच तर आपलें कोट्यावधि रुपयांचें उत्पन्न बुडेल, साडेबारा कोटींचा जादा खर्च अंगावर चढेल, इंग्लडाशीं नित्य घासाघासी उभ्दवेल इत्यादि अडचणींची पर्वा न करतां शेंकडो पिढ्या अंगांत मुरलेलें व्यसन एका तडाक्यासरशी अमेरिकेनें हद्दपार केलें या अश्रुतपूर्व धाडसाचे येथील सरकारने अनुकरण कां करूं नये ?

असो. बुडत्या उत्पन्नाचा विचार झाल्यानंतर उत्पन्नाचे नवे झरे शोधण्याचा कमिटीनें खटाटोप केला आहे व त्यांत १ वारसदारीवर कर, २ इनकम टॅक्सचा हिस्सा, ३ प्रांतिक खंडणीची सूट, ४ तंबाखूवर कर, ५ पेटंट औषधावर कर, ६ बँकांतील व्यवहारावर कर, ७ पाटबंधाऱ्यावर कर आणि ८ लोकल फंडाची वाढ इत्यादि प्रकार सुचविले आहेत. लोकल फंडाची वाढ करावी का न करावी व केल्यास ती एक आणा करावी का तीन आणे करावी याविषयीं कमिटींत बराच मतभेद आहे बहुमतवाल्यानीं मान्य न केलेले असेहि काहीं कर श्रीयुत भोपटकर यानीं सुचविले असून शिवाय मुंबईसरकारने निदान अर्धा कोटीची काटकसर करावी असेंहि सुचविलें आहे. नवीन कराची ही यादी फुगतां फुगता ६.७ कोटि रुपये नवे उत्पन्न येईल इतकी ती फुगली आहे. पण वास्तविक उत्पन्न तीन कोटींचेच बुडणार असून बंदोबस्ताकरितां जादा खर्च फार तर एक कोटि रुपये लागणार असल्याने चार कोटींहून अधिक उत्पन्नाची जरूरीच भासणार नाहीं आणि काटकसर अर्धा कोटि व प्रांतिक खंडणीची सूट अर्धा कोटि मिळून एक कोटि वजा केल्यास नवीन ऐनजमा तीन कोटीच उभारावी लागणार व तेवढ्याची तजवीज होऊ शकते हें कमिटींतील सरकारी सभासदासहि मान्य आहे.

मग घोडें पेंड कोठें खाते ? याचे उत्तर ब्रिटिशाच्या अगीं खिळलेली मद्यपानासक्ति आणि वाढत्या उत्पन्नाचा लोभ असेंच कोणीहि देईल. मद्यपानाच्या व्यसनाचे उच्चाटन करणें हें पुण्यकारक व आवश्यक कर्तव्य आहे अशी कल्पनाच दारूबाज सरकारच्या मनात येत नसून यात आपण पानस्वातंत्र्याचा घात करीत आहो असा कांगावा ते करीत आहे ! पण हिंदी लोकांचा या व्यसनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन वेगळा असल्यानें सरकारास या व्यसनाचे समूळ उच्चाटन करणे प्राप्त आहे. अशी पूर्ण बंदी १० वर्षांत अमलांत यावी असें मनांत योजून कमिटीच्या सभासदांनीं वेगवेगळे प्रकार सुचविले आहेत बहुमतवाल्यांनीं प्रत्यक्ष योजना अशी नमूद केलीच नाहीं, यावरून सरकारच्या विरोधी धोरणाचे अनुमान करतां येतें. श्रीयुत भोपटकर यानीं बंदीचा प्रारंभ किती भिन्न प्रकारांनीं करता येईल ते दर्शविलें आहे. श्रीयुत मादन यानीं एका बाजूनें पूर्ण बंदी सुरू करून त्याबरोबरच इतरत्र दारूचा रतीब तोडीत आणण्याचा उपाय सांगितला आहे हे दोनहि उपाय एकाच वेळीं अमलात आणण्यास हरकत नाहीं; एवढेंच नव्हे, तर ते आवश्यकच आहे. कारण एका जिल्ह्यात पूर्ण मनाई करतांना शेजारच्या जिल्ह्यांतल्या •खपावर नजर

न ठेवल्यास बंदीचा उद्देश सफल होणार नाहीं.

या संबंधात आमची अशी सूचना आहे कीं, सक्तीची मनाई, सक्तीची मर्यादित विक्री (Rationing) आणि खुषीची बंदी ( Local option ) या तीनहि प्रकारांचा एकसमयावच्छेदेंकरून अवलंब करण्यांत यावा. ज्या जिल्ह्यांतून मद्यपानाचें व्यसन अगदींच तुरळक म्हणजे एक द्रामाहून कमी आहे अशा सातारा, विजापूर, सोलापूर, नगर, धारवाड, बेळगाव, पुणें व अहमदाबाद इतक्या जिल्ह्यांत एकदम पूर्ण बंदी लागू करावी. जेथें दारूचा खप एक ते तीन द्रामांपर्यंत आहे अशा कारवार, रत्नागिरी, नाशीक, पूर्व-खानदेश व खेडा या जिल्ह्यांना लोकल ऑप्शनचा फायदा घेण्याला पांच वर्षांची मुदत द्यावी. तेवढ्या मुदतींत त्यांनीं खुषीने बंदी मान्य केल्यास ठीकच आहे. ती मान्य न केल्यास पांच वर्षांनंतर तेथेहि सक्तीनें बंदी करण्यांत यावी. ज्या जिल्ह्यांतून तीन द्रामांहून अधिक खप होतो तेथें खपाला आळा घालून दरसाल दहा टक्के दारू कमी करीत जावी आणि पांच वर्षांनंतर त्यांना लोकल ऑप्शनचा हक्क द्यावा. पांच वर्षांत खुषीनें दारू बंद न झाल्यास त्यापुढें तेथेहि ती सक्तीनें बंद करण्यांत यावी.

जेथे पूर्ण बंदी एकदम अमलांत आणावयाची तो भाग सलग असल्यानें या योजनेत विशेष भानगड नसून बदोबस्ताचा खर्चहि फार लागणार नाहीं. मात्र जिल्ह्यातील आणि शहरांतील परिस्थिति वेगवेगळी असल्यामुळें थोडासा घोटाळा होण्याचा संभव आहे. उदाहरणार्थ, सोलापूर शहर वगळून जिल्ह्याचा सरासरी खप पाहिल्यास तो तीन-दशांश द्राम पडतो, पण शहरांतली सरासरी साडेपांच द्राम पडते. तेव्हां सोलापूर जिल्हा वरील योजनेत पहिल्या वर्गांत आला तरी सोलापूर शहर तिसऱ्या वर्गांत जाणार; तेव्हां त्यास जिल्ह्याबरोबरच एकदम सक्ती लागू करावी हेंच युक्त दिसतें. कारण तसें न करतां जिल्ह्यांत मात्र पूर्ण बंदी आणि शहरांत पूर्ण मुभा असें झाल्यास खेड्यातील लोक शहरांत येऊन आपलें व्यसन भागवून घेतील. परंतु शहरांत पूर्ण बंदी एकदम लागू न केली तरी दारूचा रतीब दरसाल दहा टक्के तोडावयाचा असल्यानें त्यांतच खेड्यांतील गिऱ्हाइकांची भर पडल्यास शहरांतल्या मद्यप्यांचा रतीब दहा टक्क्यांहूनहि अधिक तुटेल ही एक इष्टापत्तीच मानली पाहिजे! पण हा तपशिलाचा प्रश्न कसाहि सोडवितां येईल. मुख्य मुद्दा हा कीं, जेथें या व्यसनानें अद्यापि फारच थोडें लोक पछाडले आहेत तेथें एकदम बंदी अमलांत आणणें, त्याहून वरच्या पायरीच्या व्यसनी लोकांस आपलें व्यसन खुषीनें टाकण्यास पांच वर्षांची मुदत देऊन तेवढ्यांत त्यांनीं तें न टाकल्यास पुढें त्यांनाहि सक्तीनें तें सोडवावयास लावणें आणि तोपर्यंत अत्यंत दारूबाज अशा भागांतल्या किंवा शहरांतल्या लोकांच्या व्यसनास कांटेरी लगाम घालून तो आटोक्यांत आणतां आणतां दहा वर्षांत तें समूळ नाहींसें करणे अशा तीनहि प्रकारांचा एकदम अंमल सुरू केला पाहिजे. तसा तो झाला तरच बंदीचा उद्देश सिद्धीस जाईल. नाहीं तर एका जिल्ह्यांत पूर्ण बंदी करून शेजारींच बाटलाबाईला यथेष्ट गोंधळ घालूं दिल्यास चोरटी आयात सुरू होऊन बंदीचा कायदा अपेशी ठरला अशी नोकरशाहीकडून हाकाटी केली जाईल, आणि हा सगळाच डाव उधळून टाकण्याचा तिचा कावा साधेल. याकरितां हा प्रश्न आतां कौन्सिलापुढें येईल त्या वेळीं प्रत्येक आमदारानें आपल्या जिल्ह्यांत आपण पूर्ण बंदी आधीं अमलांत आणूं अशी अहमहमिका बाळगून तो प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

# बडोद्याचा महाप्रळय

( आमच्या खास बातमीदाराकडून )

"ज्या धनाढ्य व दानशूर गुजराथ प्रांतानें आर्त-अभ्यागतांची झोळी संपत्तीनें भरून त्यांना दुःखमुक्त करावें त्याच गुजराथ प्रांताला आज दुसऱ्या प्रांतांकडे याचनेची झोळी पसरावी लागत आहे," असे गुजराथेसंबंधानें करुण व दीन उद्गार म. गांधी यांनीं काढले आहेत. सिंध, काठेवाड, भडोच, अहमदाबाद वगैरे ठिकाणीं अतिवृष्टीमुळें घरेंदारें पिकें व गुरेंढोरें यांचें नुकसान अपरिमित झालें आहे. पण या सर्वांपेक्षां मनुष्यहानीची संख्या बडोदें येथें जास्त असल्याकारणानें तेथें या जळप्रळयाचा प्रकार जास्त भीषण व उद्वेगकारक वाटला. सुमारें गेल्या ६० वर्षांत अशा अतिवृष्टीचा प्रसंग बडोद्यावर आला नाहीं.

बडोद्यावरील अतिवृष्टीचा हा प्रसंग भयंकर असला तरी अपूर्व नव्हता. कारण गेल्या सहा वर्षांत अतिवृष्टीचा प्रसंग दोन वेळां आला होता. पूर्वीच्या दिवाणांचा फलज्योतिषावर विश्वास होता असें म्हणतात. कारण अतिवृष्टीचें भविष्य क्रॉनिकलमध्यें प्रसिद्ध होतांच त्यांनीं अजवा तलावावर निशाणीच्या तोफा नेऊन उभ्या केल्या व गांवांत दवंडी दिली. या वेळींहि

सिमल्याहून वायुशास्त्रज्ञांच्या तारा बडोद्यास येतांच दिवाणसाहेबांनीं गांवांत दवंडी देवविली होती. पण कोणी तिकडे लक्षहि दिलें नाहीं, व शेवटीं पाणवठ्यानें आपला उंबरठा ओलांडून लोकांच्या घराचा उंबरठा ओलांडण्याची तयारी केल्यावर धांवाधांवीस सुरुवात झाली !

आज झाला इतका आकांत एरवीं झाला नसता. परंतु बडोद्याच्या भोंवतालीं सगळीकडेच अतिवृष्टि चालली होती. आसपास सुमारें पांचशें मैलांपर्यंत बरसातीचें मेघदळ आकाशांत अगदीं भरगच्च जमा झालें होतें. शिवाय बडोदें शहर सखल प्रांतांत वसलें असून समुद्रसपाटीपासून अवघें ८६ फूट उंचीवर आहे. जमीन सर्व भुसभुशीत आहे, कठीण कातळ कोठेंच नाहीं. विश्वामित्री नदी गांवांतून जाते व शहरापासून जवळच ढाढर नदी वाहते. वर्षामध्यें सरासरी जितका पाऊस होतो तितका जून महिन्यांत पडून पुरा झाला होता. त्यांतच गांवचें एक धरण अतिवृष्टीमुळें फुटलें, यामुळें आपत्तीचें स्वरूप विशेष भयंकर झालें.

## स्टेशन हेंच घर

ता. २४ रोजीं शहराची स्थिति व ता. २५ सोमवारची स्थिति यांत जमीनअस्मानाची तफावत होती. ता. २४ च्या दिवसाची स्थिति शैशवामध्यें असणाऱ्या मुलाच्या अंतःकरणाप्रमाणें होती. ती अशी कीं, क्षणभर आनंददायक उन्ह शहरावर पडावें, तों दुसऱ्या क्षणीं थोडी हवा फिरली कीं आकाशाचे नेत्र मेघाश्रूंनीं ताबडतोब व्याप्त व्हावेत; पुनः क्षणानें सर्वत्र ऊन्ह पडावें. पण २५ रोजीं जो मुसळधार पाऊस सुरू झाला तो २९ पर्यंत उघडलाच नाहीं! ता. २४ रोजीं लोकांचे सर्व व्यवहार सुरळीत चालले होते व आगगाड्याहि चालू होत्या.ता.२५ रोजीं घरेंदारें व दुकानें पहिल्या मजल्याइतकीं बुडाल्याकारणानें व्यवहार बंद होते, व रेलवेचा फांटा भडोचपर्यंत वाहून गेल्याकारणानें रेलवेवर जाणाऱ्या सुमारें सहाशें-सातशें उतारूंनीं स्टेशन हेंच आपलें घर केलें होतें ! ता. २४ रोजीं स्टेशनानजीकच्या मैदानांत फार तर पाऊलभर किंवा वीतभर पाणी असेल, पण ता. २५ रोजीं रात्रीं तेथें दीड पुरुष पाणी होऊन दुकानांचीं शिखरें बुडून गेलीं व सयाजी गंज व रेसकोर्स यांमधील रस्ता जोडणारा पूल पाण्यामध्यें बुडून गेला. हीच स्थिति क्षणाक्षणानें वाढत गेली ती अहोरात्र पांच दिवस टिकली.

## टेंबीचें धरण कोसळलें !

ता. २४ रोजीं रात्रीं पावसास विलक्षण जोरानें सुरुवात झाली. रात्रभर पाऊस पडत होता. त्या दिवशीं संध्याकाळीं विश्वामित्रीच्या पुलावरून पलीकडे जीं काय माणसें गेलीं असतील तेवढींच; पण पुढें चार दिवस गांवाचा संबंध अजीबात तुटला व अनेकांचे आप्त तीरापलीकडे गेले ते तसेच अडकून पडले. स्टेशनापासून नजर फेंकावी तिकडे पाणीच पाणी झालें होतें व विश्वामित्री तीनशें फूट अलीकडे आली कीं काय असें भासूं लागलें. कमरेइतकें पाणी झालें नाहीं अशी जागा बडोद्यांत राहिली नसेल. शहरानजीकच्या अजवा तलावामध्यें कमानीच्या उंचीवर ६ फूट पाणी चढलें व धरण कोसळूं नये म्हणून तें पाणी सोडून द्यावें लागलें. या दोन-तीन कारणांनीं एरवीं क्षुद्र ओहोळासारखी वाहणारी विश्वामित्री नदी पाणी वाढून पुलाचें वर येऊन वाहूं लागली. या पुरानें पुलाचा एक कठडा वाहून गेला व रस्त्यावर २ पुरुष पाणी झालें. इतक्यांत रात्रीं दहाअकराचे सुमारास टेंबीचा तलाव फुटला व त्यामध्यें टेंबी व हूर्णे हीं गांवें वाहून गेलीं व सुमारें दोनशें माणसें मृत्युमुखीं पडलीं! कित्येक माणसें तर झाडावरून लटकत बसलीं होतीं. त्यांना तीन दिवस काढतां आलें नाहीं. त्यांपैकीं एकदोन व्यापारी 'आम्ही हजार रुपये देतों पण सोडवा' अशी करुणा भाकून याचना करीत होते. तें पाहून कोणाच्याहि डोळ्याला पाणी आल्यावांचून राहिलें नसेल. दोन बायका तर पत्र्याच्या एका घरावर तीन दिवस ताटकळत सुटकेची वाट पाहात बसल्या होत्या. त्या तशाच घेरी येऊन खालीं पाण्यांत पडून मेल्या !

## शहराची दुर्दशा

ता. २४ ते २९ पर्यंत अहोरात्र मुसळधार पाऊस चालला होता. मोठमोठे प्रचंड वटवृक्ष उन्मळून पडले. त्यामुळें तारा तुटून तारायंत्रें बंद पडलीं. बडोद्याच्या आसपास अहमदाबाद, गोध्रा व मुंबई हे तीनहि रेलवेचे फांटे अजीबात वाहून गेले. गांवांत टेलीफोन चालेना, विजेचे दिवे लागेनात, रेलवेच्या लायनी व तारायंत्रें तुटून गेलेलीं, मेघांच्या घनदाट अस्तरामधून भेद करून जाण्याची वायरलेसच्या यंत्राची मात्रा चालेना, अशी खडतर स्थिति झाली. गांवांतील इस्पितळांचे पहिले मजले पुरानें बुडून गेले व रोगी व परिचारक यांस चार दिवस परमेश्वरस्मरण करीत कडकडीत उपासांत काढावे लागले. माणसांची जेथें फिकीर तेथें गुराढोरांची कोण काळजी करणार ? त्यामुळें कित्येक अर्भकांचे दुधावांचून चार दिवस हाल झाले ! रात्रीं उजेड नाहीं. धों धों वाहात असलेला सोसाट्याचा वारा, घरेंदारें धुवून जमीनदोस्त करणारा मुसळधार धों धों पाऊस इंचाइंचानें भोंवतालीं पाणी चढणारें धडाधड ढांसळणाऱ्या घरांचा भयानक आवाज व त्याखालीं

सांपडलेल्या माणसांचे हृदयभेदक विलाप हीं सर्व ज्यांनीं पाहिला असतील त्यांना त्याची आठवण जन्मांत विसरणें अशक्य आहे.

रावपुरा, दांडिया बाजार, सयाजीगंज, कँप, घोडदौड स्टेशन हे सर्व भाग अगदीं एकमेकांपासून चार दिवस विलग झाले होते. व चार पावलांवरची बातमी एकमेकांस चार दिवसांत कळेना! कामाठी बागेमधील लोखंडी बाकें देखील वाऱ्यानें उपर्डी पडलीं व बहुतेक सर्व पशुपक्षी व जनावरें थंडी वारा व पर्जन्य यानें मरून गेलीं. रेसकोर्स व घोडदौड हाच भाग काय तो सर्व शहरांत उंच आहे. येथले पांच-सहा बंगले, गांवांतील रेकॉर्ड ऑफिस, राजवाडा, सरकारी ऑफिसें वगैरे फार थोड्या इमारतींच्या आंत पाणी आलें नसेल. घोडदौडीवर देखील बंगल्यांच्या पायऱ्या बुडून सर्व कांपाउंड जलमय झालें होतें व त्या बंगल्यांना जळमंदिराचें स्वरूप आलें होतें. बडोद्यांत ज्या श्रीमंत अगर सरदार लोकांची एखाद्या जळमंदिराप्रमाणे पाण्याचे शेजारी वाडे बांधून राहण्याची हौस असेल त्यांची ती हौस या पांचसहा दिवसांत पुरी भागली असेल!

## चंद्राची रास बदलली

शनिवारच्या सुमारास चंद्र जलराशींतून दुसऱ्या राशीकडे जाण्याचा योग होता. तो सुदैवानें बरोबर ठरून शुक्रवारीं उत्तर-रात्रीं आकाशांत नक्षत्रें दिसूं लागलीं. गेल्या पांच दिवसांत व रात्रींत अगदीं शपथेला तळहाताइतकेंही निळें आकाश दृष्टीला पडलें नाहीं. तोंच पांचव्या रात्रीं मेघांचें आवरण क्षणमात्र दूर करून आकाशस्थ नक्षत्रांनीं आपलें शुभदर्शन पृथ्वीवरील संकटग्रस्त लोकांना देऊन त्यांचें मन प्रसन्न व धैर्ययुक्त केलें. अशा वेळीं त्या नक्षत्रांचें दर्शन म्हणजे खुद्द परमेश्वरानें दिलेलें अभयवचनच वाटलें. सकाळपासून खरोखरच ढग विरळ होऊं लागले व दुपारीं दोन वाजतां क्षणमात्र का होईना पण एकदांचा सूर्यप्रकाश दिसला!

रेलवे स्टेशनावर पांच दिवस जे लोक बसले होते त्यांची शक्य ती व्यवस्था रेलवे अधिकाऱ्यांनीं स्वार्थत्यागपूर्वक केली. इस्पितळ व स्टेशन येथें हत्ती बुडेल इतकें तीन दिवस पाणी होतें व स्टेशननजीकचे दुकानदार वगैरे लोक जीव बचावण्यासाठीं झाडावर चढले होते. त्यांपैकीं सुमारें पंचवीस-तीस लोकांना वांचविण्यांत आलें. स्टेशनावरील खांबांना व रस्त्यावरील झाडांना दोर बांधून त्यांच्या आश्रयानें माणसांना वांचवून ओढीत आणण्याचें काम फार बिकट होतें. पण तें शौर्यानें केल्याबद्दल बॅ. दास, गेस्ट हाऊसचे सुपरिंटेंडेंट काळेसाहेब, ट्रॅफिक मॅनेजर बर्कतुल्लाखान व रेलवे अधिकारी वगैरे सर्व मंडळी प्रशंसेस पात्र आहेत.

रविवारीं हळूहळू पाणी ओसरून रहदारी सुरू झाली व गांवांत थोडें तरी जातां येऊं लागलें. पण गांवची उध्वस्त स्थिति पाहून मन अत्यंत शोकाकुल झालें. सुमारें २ हजार घरें समूळ नष्ट झालीं, ४ हजार घरें बरींच ढांसळलीं व तीनशेंच्या वर माणसें दगावलीं असा अंदाज आहे. ज्यांची आप्त मंडळी अपघातानें मेलीं त्यांना प्रेतांचे चार दिवसांत काय करावें हें न सुचून त्यांनीं तीं जड अंतःकरणानें नदींत सोडून दिलीं. विश्वामित्रीच्या पुलावरून तर रविवारीं बिनवारशी प्रेतें जनावरांप्रमाणें गाड्यांतून भरून नेलीं. सर्व शहरभर कुजलेलें धान्य, मेलेलीं जनावरें व प्रेतें यांची घाण व दुर्गंधी सुटली होती. ज्यांचीं घरेंदारें गेलीं असतील व ज्यांची स्वकीय मंडळी डोळ्यादेखत वाहत जाऊन मृत्युमुखीं पडलीं असतील त्यांच्या मनोवृत्तीला केवढा जबरदस्त धक्का बसला असेल त्याची दुसऱ्यांना कल्पनाहि करतां येणें शक्य नाहीं. अशा परमेश्वरी कोपापुढें मनुष्याची मदत किती तारूं शकणार हें तर खरेंच. पण संकटाच्या वेळीं बुडत्याला काडीचाहि आधार वाटतो, मग चालत्याबोलत्या माणसाचा उपकार डोंगराइतका मोठा वाटत असेल यांत काय संशय?

## राजकुमार धैर्यशीलराव

वरिष्ठ अधिकारी मंडळींपैकीं कोणकोणा जबाबदार मंडळींनीं काय काय मदत करावयास पाहिजे होती व प्रत्यक्ष किती केली हें लोकांनीं पाहिलेंच आहे! पण राजकुमार धैर्यशीलरावांचे उदाहरणानें अब्रू बरीच बचावली असें म्हणावयाचें! वरिष्ठ अधिकारी देखील माणसेंच आहेत हें खरें. पण अशा प्रसंगीं स्वार्थत्यागपूर्वक पुढें येऊन लोकांची काळजी प्रथम करणें हेंच त्यांचें कर्तव्य होतें. अर्थात् अशा दैवी संकटाच्या प्रसंगीं कोणालाहि दोष देण्यापेक्षां धैर्यशीलरावांच्या प्रजाहित तत्परतेची व सार्वजनिक बुद्धीची प्रशंसाच अधिक अभिप्रेत आहे व त्यांचें उदाहरण अनुकरणीय होतें असेंच कोणिहि अभिमानानें म्हणेल. धर्मभेद व जातिभेद यांचाहि या संकटसमयीं लोप झाला होता व याच दृष्टीनें परप्रांतीय लोकांनींहि गुजराथ व काठेवाड या प्रांतांना मदत केली पाहिजे. सृष्टीच्या खाणींत प्रांतवारी कोठेंच नाहीं. सर्व मनुष्यजात एकाच थराची माती आहे. फक्त संकटसमयामुळेंच हें मनुष्याच्या लक्षांत येतें, एरवीं नाहीं त्याला इलाज नाहीं. सृष्टिजीवनाच्या नैसर्गिक क्रमांत उत्क्रांतीबरोबरच क्रांति व उत्पात यांनांहि परमेश्वरानें स्थान दिलें आहे. याचा हेतु विश्वबंधुत्वाची माणसाला आठवण असावी हा असेल, अगर दुसरा कोणता असेल हे परमेश्वरा एकट्या, तुलाच माहीत!

# नागपूरची हिंदु परिषद

मध्यप्रांत आणि वऱ्हाड या भागांच्या प्रांतिक हिंदुसभेची बैठक नुकतीच नागपुरास अत्यंत यशस्वीपणानें पार पडली. या परिषदेकरितांच दौऱ्यावर असतांना डॉ. मुंजे यांना मोटारीचा अपघात झाला होता व त्यांच्या प्रकृतीविषयीं चिंता वाटूं लागली होती; परंतु सुदैवानें तो अपघात थोडक्यावर निभावला आणि डॉ. मुंजे यांनीं पुनः अश्रांत परिश्रम करून हिंदुसभेची बैठक संकल्पाप्रमाणें सिद्धीस नेली याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. या परिषदेची हकीकत आजच्या अंकांत दुसरीकडे दिली आहे. तीवरून परिषदेच्या कार्याची व्याप्ति लक्षांत येईल. परिषदेचे स्वागताध्यक्ष श्रीमंत धर्मवीर लक्ष्मणराव राजे भोसले हे होते आणि त्यांचें प्रास्ताविक भाषण विचारपूर्ण आणि खऱ्या कळकळीचें असेंच झालें. शुद्धि-संघटन आणि अस्पृश्यतानिवारण या संबंधाचे त्यांचे विचार मार्मिक असून त्यांत त्यांच्या धार्मिक समत्व बुद्धीचें प्रतिबिंब चांगलें दिसून येत आहे.

पण नागपूरच्या हिंदुपरिषदेचें वैशिष्ट्य जर कशांत असेल तर तें अध्यक्षांच्या निवडणुकींत आणि त्यांच्या भाषणांत आहे. सर शंकर नायर यांचें नांव राजकारणांत आजवर प्रसिद्धीस आलेलें आहे. पण त्यांच्या अंतःकरणाच्या पडद्याच्या आड दडून बसलेली हिंदुधर्माविषयींची कळकळ या परिषदेच्या प्रसंगानेंच प्रथम व्यक्त झाली. हिंदुसभेच्या शुद्धिसंघटनेच्या चळवळीचा हेतु त्यांना बरोबर पटला असून या चळवळीविषयीं त्यांना इतकी सहानुभूति वाटत आहे असें आजवर कोणास माहीत नसल्यानें बरेच लोक सरसाहेबांच्या अध्यक्षत्वाविषयीं साशंक होते. परंतु त्यांच्या सडेतोड भाषणानें हा संशय दूर झाला आहे. खिलाफतीच्या चळवळीला हिंदूंनीं प्रोत्साहन दिल्यानें मुसलमानांचा स्वार्थ कमी न होतां उलटा तो वाढला आणि कॉंग्रेसनें मुसलमानांचे सगळे हट्ट पुरविण्याचें धोरण धरल्यामुळें हिंदूंना आत्मसंरक्षणार्थ संघटन करणें न्यायतः प्राप्त झालें असें जें अध्यक्षांनीं हिंदुसभेच्या कार्याचें समर्थन केलें तें यथार्थच आहे. सर शंकर नायर हे कुशाग्र बुद्धीचे न्यायाधीश म्हणून नांवाजलेले असून कॉंग्रेसचेहि ते एका वेळीं अध्यक्ष होते. अशा अधिकारी पुरुषानें दिलेला हा निर्णय न्यायाला धरून असला पाहिजे यांत शंका नाहीं. श्रीयुत नायर यांना हिंदुस्थानाला स्वराज्य मिळूं नये असें वाटतें. असा कांहीं त्यांच्यावर कोणी आरोप करूं शकत नाहीं. अर्थातच त्यांना हिंदुसभेची स्थापना व चळवळ अवश्यक वाटूं लागली यावरूनच ही चळवळ अगदीं अपरिहार्य आहे हें सिद्ध होतें. असो. सर शंकर नायरसारख्या आजपर्यंत हिंदुसभेविषयीं उदास असलेल्या सुधारक पंथाच्या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना हिंदूंचें संघटन झालें पाहिजे हें पटलें व संघटनेला आड येणारीं विघ्नेंहि त्यांनीं दाखवून दिलीं व तीं दूर करण्याकरितां योग्य उपदेश केला. आतां थोडीशी विधायक दृष्टि स्वीकारून हिंदूंच्या धर्माचें अंतरंग कोणतें, हिंदुधर्मांत व परधर्मांत भेद काय, आणि हिंदूधर्माचें जें वैशिष्ट्य असेल त्याचें दृढीकरण कोणत्या आचारविचारांनीं होईल याचा ते असाच पोक्त विचार करतील तर हिंदु-संघटनेच्या कार्यास तें अत्यंत उपकारक होईल.

# जंगलच्या जुलमाविरुद्ध तक्रारी

## कमिटीचा रिपोर्ट

मुंबई प्रांतिक कायदेमंडळांत जंगलखात्याच्या जुलमाविरुद्ध लोकांच्या ज्या तक्रारी आहेत त्यांची चौकशी करण्याविषयीं कमिटी नेमावी असा ठराव ता. ३० जुलै १९२४ रोजीं पास झाला. त्या ठरावास अनुसरून कमिटी नेमली गेली. त्या कमिटींत सरकारी सभासद व बिनसरकारी सभासद यांच्यांत एकमत न झाल्यानें एकत्र रिपोर्ट होऊं शकला नाहीं; त्यामुळें उभयतांनीं आपापल्या सूचना वेगवेगळ्या करून दोन रिपोर्ट लिहिले. त्यांचा विचार करून सरकारनें त्यावर आपला अभिप्राय प्रसिद्ध केला आहे. त्या अभिप्रायांत सरकारी सभासदांच्या बहुतेक सूचना मान्य केल्या आहेत. पण बिनसरकारी सभासदांच्या बहुतेक सूचना फेटाळून लाविल्या आहेत; त्या सर्वांचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें आहेः—

### सरकारी सभासदांनीं केलेल्या शिफारसी

(१) एक वर्षाच्या आंतील वासरांना चराईची फी मुळींच घेऊं नये.

(२) कारवार जिल्ह्यांत कांहीं ठिकाणीं गुरचराईची फी गांवकामगारामार्फत वसूल केली जाते, हीच पद्धत इतरत्रहि अमलांत आणावी.

(३) चराईचें क्षेत्र प्रत्येक खेड्याला किंवा तालुक्याला वेगवेगळें न मानतां सबंध जिल्हा हें एकच क्षेत्र मानावें. मात्र प्रत्येक खेड्यांतील गुरांची त्या खेड्यांतील चराऊ रानांत प्रथम सोय केली जावी.

( ४ ) ज्या गांवांना चराऊ जंगल आहे त्या गांवांतील सर्वच गुरांवर फी आकारण्याची चालू पद्धत कायम ठेवावी. पण ज्या खेड्यांतील गुरें जंगलांत चरण्याला मुळींच जात नाहींत असें सिद्ध होईल तेथें ही फी घेण्यांत येऊं नये.

(५) शेतकीचीं जनावरें आणि शेळयामेंढ्या यांना वेगवेगळीं चराऊ रानें असावीं. आणि त्यांत शेतीच्या जनावरांची सोय आधीं करावी.

(६) चराऊ रानाला कुंपण खेडेगांवांपासून पाव मैलाच्या आंत असूं नये.

(७) गुरांच्याबरोबर गुराखी असून देखील त्याला न जुमानतांहि गुरें रस्त्याच्या किंवा पाणवठ्याच्या शेजारच्या बंदिस्त जंगलाच्या हद्दींत चुकून थोडीशीं शिरलीं तर त्या गुरांना कोंडवाड्यांत घालूं नये.

(८)बंदिस्त जंगलांत गुरें शिरलीं असतां त्यासंबंधीं पंचनामा तेथेंच करावा, गांवांत बसून करूं नये. आणि नुकसानभरपाईची आकारणी डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसरनें करावी व त्या भरपाईशिवाय कोंडवाड्याची फी वेगळी घेऊं नये. आणि जरूर तर जंगलच्या खालच्या कामगारांना त्या भरपाईतून बक्षीस द्यावें.

(९) गवतांच्या कुरणांचा लिलाव शक्य तोंवर गांवकरी, ग्रामपंचायती, तालुका लोकल बोर्ड किंवा अशाच सार्वजनिक संस्था यांना देण्यांत यावा व लिलावाची किंमत पूर्वीच्या तीन वर्षांतील किंमतीच्या सरासरीइतकी असावी आणि असे लिलाव घेणाऱ्यांनीं शेतकऱ्यांना तें गवत अमुक भावानें विकावें अशी शर्त त्या लिलावांत असावी.

(१०) गुरांच्या रहदारीच्या वाटेला कुंपण घालावयाचें असल्यास गांवकऱ्यांना कांटेरी झाडें मोफत देण्यांत यावींत आणि बंदिस्त जंगलापासून पन्नासपट रुंदीची जागा अगदीं साफ ठेवण्याला त्यांना परवानगी असावी.

(११) पुणें जिल्ह्यांतलीं जेवढीं गवताचीं कुरणें लष्करी अधिकाऱ्यांना नको असतील तेवढीं कुरणें जंगलखात्यानें घेऊन तीं चराईच्या उपयोगांत आणावीं.

(१२) कंत्राटदारानें कंत्राट घेतलेल्या जागेवरून इमारती लांकूड हलविल्यावर नवीन लागवड करण्यापूर्वी जो कांहीं झाडझाडोरा शिल्लक राहिला असेल तो गांवकऱ्यांना मोफत नेण्याला परवानगी असावी. त्याचप्रमाणें जेवढे लहान टहाळे जंगलांतून नेण्याला गांवकऱ्यांना परवानगी असते ते टहाळे नेण्याला कंत्राटदाराकडून हरकत न होईल असें करावें.

(१३) शक्य तोंवर ट्रॅन्झिट पासेसची जरूरी ठेवूं नये आणि जेथें तशी जरूरीच दिसेल तेथें जंगलखात्याची कचेरी जवळपास नसल्यास गांवकामगारांना ट्रॅन्झिट पासेस देण्याचा अधिकार देऊन ठेवावा.

(१४) जंगलच्या हद्दींतील लोकांचीं घरें आगीनें जळून गेल्यास मामलेदाराचें सर्टिफिकेट दाखल होतांच रेंज फॉरेस्ट ऑफिसरनें सर्टिफिकेट आणणारांना ताबडतोब जंगलांतील लांकूड तात्पुरत्या झोंपड्या बांधण्याकरितां द्यावें.

(१५) जंगलच्या हद्दींत सुतारकाम करण्यासाठीं लागणारा परवाना अर्ज केल्यानंतर एक महिन्यांत न मिळाल्यास त्यानें आपल्या कामाला सुरुवात करावी. मात्र सुतारकाम चाललेलें लांकूड सरकारच्या सत्तेचें नाहीं याची शाबिती करण्याची जबाबदारी त्याजवरच राहील.

(१६) जंगलांतून आपल्या शेताला पाणी घेण्याची तजवीज केवळ आठ आणे फी घेऊन करूं द्यावी. आणि अशा पाण्याच्या रस्त्याला हरकत होत असेल तर तेथील गवत, वेली वगैरे तोडून टाकण्यास गांवकऱ्यांना परवानगी असावी.

( १७ ) गांवकऱ्याकडून गुरचराईखेरीज इतर कसलीहि फी जंगलखात्यानें घेऊं नये.

( १८ ) पुणें व सातारा या जिल्ह्यांत सुमारें ४०० वर्षांपूर्वी जी जमीन जंगलांत सामील करावयाची म्हणून हद्दीची रेघ आंखण्यांत आली होती त्या हद्दींतील जमीन सरकारनें अद्यापपावेतों बंदिस्त जंगलांत सामील केली नसल्यास आणि आणखी पांच वर्षांत ती तशी सामील होण्याचा संभव नसल्यास ती जमीन ज्याची त्यास परत द्यावी. मात्र त्या जमिनींत सरकारच्या हक्काचीं जेवढीं झाडें असतील तेवढीं तोडून घ्यावीं व त्यापुढील फूट शेताच्या मालकास मिळावी.

येणेंप्रमाणें सरकारी सभासदांच्या शिफारसी असून त्यांतल्या एकदोन खेरीज बाकीच्या शिफारसी सरकारला मान्य आहेत. एक वर्षाच्या आंतील गुरांना चराई–फी माफ असावी अशी सरकारी सभासदांची मागणी आहे. बिनसरकारी सभासद १८ महिन्यांपर्यंतच्या गुरांना माफी असावी असें म्हणतात व ती सूचना सरकारला मान्य आहे. नुकसानभरपाईतून जंगलखात्याच्या कामगारांना केव्हांच बक्षीस दिलें जाऊं नये ही गोष्ट सरकारला मान्य नाहीं. पण अशीं बक्षिसें जरूर तर अपवादादाखलच देण्यांत यावीं. शेवटच्या (१८ व्या) सूचनेसंबंधानें मध्यभागच्या कमिशनरनें चीफ कॉन्झर्व्हेटरला विचारून खुणा केलेली तद्द फॉरेस्टमध्यें घ्यावयाची का सोडून द्यावयाची हें ठरवून जाहीर करावें.

## बिनसरकारी सभासदांच्या शिफारसी

(१) आपल्या हाताखालील कामगार रयतेला त्रास देतात कीं काय याविषयीं डिव्हिजनल फॉरेस्ट ऑफिसरनें कडक नजर ठेवावी व असें उदाहरण आढळल्यास कडक शासन करावें.

( २ ) प्रत्येक जिल्ह्यांत एकेक फॉरेस्ट कमिटी असावी व तिनें जंगलसंबंधाच्या लोकांच्या तक्रारी ऐकून त्यासंबंधीं सरकारकडे रिपोर्ट करावा.

या दोनहि सूचना सरकारला मान्य करवत नाहींत. जंगलखात्याचे अधिकारी रयतांना त्रास देतात अशीं कांहीं उदाहरणें शोधीत हिंडल्यास कांहीं गाऱ्हाणीं नजरेस यावीं यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण तेवढ्यावरून डिव्हिजनल ऑफिसरांना वेगळी ताकीद देण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांची जबाबदारी त्यांना कळत आहे. प्रत्येक जिल्ह्यांत जी फॉरेस्ट कमिटी नेमावयाची तिच्यांत सर्वच सभासद बिनसरकारी असावेत असें म्हणणें असल्यास सरकारला तें मान्य नाही. शिवाय त्या कमिटीनें फॉरेस्ट कामगारांच्याविरुद्ध तक्रारी ऐकून रिपोर्ट करावा ही गोष्ट सरकारला केव्हांहि कबूल व्हावयाची नाहीं.सरकारची अशी सूचना आहे कीं,ज्या ज्या जिल्ह्यांत जरूर असेल तेथें कलेक्टरच्या अध्यक्षतेखालीं कमिटी नेमण्यांत यावी आणि तींत जंगलखातें व रेव्हेन्यू खातें यांतील बिनसरकारी सभासद असावेत. या कमिटीनें रयतांचें म्हणणें सरकारला कळवावें आणि सरकारचें धोरण रयतांना समजून द्यावें. अशा कमिट्या स्थापन करण्याविषयीं योजना ठरविण्याचे हुकूम चीफ कॉन्झर्व्हेटरला देण्यांत आले आहेत.

## सरकारनें मान्य केलेल्या शिफारसी

बिनसरकारी सभासदांनी केलेल्या शिफारसींपैकीं पुढील शिफारसी सरकारनें मान्य केल्या आहेत.

(१) अंजनाचा पाला नेण्याबद्दल दरगाडीमागे महिन्याची फी एकदम वसूल केली जाते ती पद्धत बदलावी.

(२) जंगलानजीकच्या खेड्यांतील लोकांना जे हक्क दिलेले असतात ते त्यांना कळत नसल्यामुळें त्या संबंधाच्या जाहीर नोटिसा प्रत्येक खेड्यांत जाहीर ठिकाणीं लाविल्या जाव्या.

(३) फॉरेस्टची हद्द खेड्यालगत आल्यामुळें रोगराईमुळें खेड्यांची वस्ती व खेड्यांतील पिकांचें क्षेत्र कमी होत आहे. याकरितां खेड्यापासून राखीव जंगलाचें अंतर निदान पाव मैल तरी ठेवण्यांत यावें.

(४) कारवार जिल्ह्यांतील गुळाच्या भट्टीकरितां लागणारें सर्पण फुकट मिळावें.

(५) कुंपणाकरितां लागणारे बांबू काढून नेण्याची मुदत दरसाल जूनअखेरपर्यंत ठेवण्यांत यावी.

(६) कारवार जिल्ह्यांतील जंगलांतून शक्य तितके रस्ते करावे व एक रेल्वेचा फांटाहि लवकरच तेथें काढण्यांत यावा.

(७) पंचमहाल जिल्ह्यांतील मोहरा फुलाचीं सगळींच झाडें तोडलीं जाऊं नयेत व सगळें बी विकलें जाऊं नये.

(८) पंचमहाल जिल्ह्यांतल्या जंगलच्या हद्दींतील शेतीलायक जमिनीचे मोठाले पट्टे धनिक व वशिल्याच्या लोकांना दिले जाऊं नयेत. ते शेतकऱ्यांकरितां राखून ठेवले जावेत व त्यांचे लहान तुकडे करून ते त्यांना द्यावेत.

(९) शेतकऱ्यांना ज्या वेळीं आपल्या शेतांत जरूरीचें काम असतें अशा वेळीं जंगलाची लागवड करण्याचें काम त्यांच्याकडून सक्तीनें घेतलें जाऊं नये.

## सरकारनें अमान्य केलेल्या शिफारसी

वर नमूद केलेल्या किरकोळ शिफारसीखेरीज बाकीच्या सगळ्या महत्त्वाच्या शिफारसी सरकारनें पूर्णपणें किंवा अंशतः अमान्य केल्या आहेत किंवा त्यांची बजावणी कांहीं तरी निमित्तानें पुढे ढकलली आहे अशा शिफारसी व त्यावर सरकारनें दिलेलें उत्तर हीं यापुढे कलमवार देण्यांत येत आहेत.

( १ ) चराईची फी आणि जंगलांतील गवत, अंजनाचा पाला, कुंपणाला लागणारे कांटे, सर्पण, दगड, माती, वगैरेंबद्दलची फी अलीकडे वाढली आहे ती कमी करावी; निदान पूर्वी होती तितकी तरी ती ठेवावी.

उत्तर—चराईची फी दरवर्षाला एका गुराला चार आणे ही फार नव्हे! तेव्हां ही फी आणि जंगलांतील इतर वस्तू नेण्याबद्दल द्यावी लागणारी फी ही कमी करतां येत नाहीं.

( २ ) पुष्कळ ठिकाणीं चराऊ रान कमी आहे, याकरितां दरगुराला किती एकर रान असावें तें ठरवून तितकें चराऊ रान राखण्यांत यावें.

उत्तर—पूर्वीप्रमाणें एकेक तालुका वेगळा न मानतां सबंध जिल्ह्यांतील चराऊ रान एक समजण्यांत येईल. आणि शिवाय कांहीं ठिकाणीं चराईची बंदी करण्याची मुदत हल्लीपेक्षां कमी करावी लागेल. पण झाडें तोडल्यानंतर त्यांच्या फुटीला धोका न पोंचेल अशा पद्धतीनें याची बजावणी करतां येईल.

(३) अंजनाचा पाला कांहीं तरी औपचारिक फी घेऊन जवळ जवळ मोफत देण्यांत यावा, आणि अंजनाचीं झाडें तोडलीं जाऊं नयेत.

उत्तर—फी कमी करण्यास सरकार कबूल नाहीं. पण दुष्काळाच्या वेळीं अंजनाचा पाला फुकट दिला जाईल. त्याचप्रमाणें अंजनाचीं झाडें शक्य तोंवर

निष्कारण तोडली जाऊं नयेत असें बजावण्यांत येईल.

(४) जंगलाच्या हद्दींतील गुन्ह्यांबद्दल सबंध गांवाला दंड करण्याची पद्धत बंद करावी आणि जंगलापासून पांच मैलांहून अधिक अंतरावर असलेल्या गांवकऱ्यांवर वणवा विझविण्याची किंवा इतर कामाला येण्याची सक्ती केली जाऊं नये आणि ते न आल्याबद्दल त्यांना दंडहि होऊं नये.

उत्तर—गांवकऱ्यांना सरोस शिक्षा करण्याची पद्धती दोनहि खानदेश व सातारा या तीन जिल्ह्यांत ता. ६-४-१९२७ पासून एक वर्षपर्यंत बंद करण्यांत आली असून तिच्याऐवजीं जे लोक जंगलाच्या बचावाला मदत करतील त्यांना बक्षिसें देण्याची पद्धत सुरू केली आहे. हा प्रयोग यशस्वी झाल्यास त्याची बजावणी इतर जिल्ह्यांतहि केली जाईल. जितक्या दूरच्या अंतरावरून वणवा विझविण्याला लोक येतील तितके त्यांना बक्षीस अधिक मिळावें हें न्याय्य आहे.

(५) ज्या झाडांची मालकी जंगलखात्यानें आपल्याकडे घेतली आहे त्या झाडांची मालकी जेथें मालकाला देण्यांत आली नसेल तेथें देण्यांत यावी. आणि ठाणें जिल्ह्यांत सागवानाच्या फुटीचा हक्क त्या जिल्ह्यांतील लोकांना मिळावा.

उत्तर—राखीव झाडांबद्दल जमिनीच्या मालकाला जेवढे हक्क लॅंड रेव्हेन्यू कोड कलम ४० ते ४२ व रूल नंबर ५८-६३ यामध्यें नमूद आहेत त्याहून अधिक हक्क मिळणार नाहींत.ठाणें जिल्ह्यांतील जमिनीच्या मालकांना राखीव झाडांच्या फुटीच्या विक्रींतील २० टक्के रक्कम देण्यांत येते.याहून अधिक सवलत देतां येत नाहीं.

(६) ज्या गांवकऱ्यांना उपजीविकेचें कांहींच साधन नसेल त्यांना जंगलांतील टेंकड्यांच्या बाजूची उतरणीची जमीन लागवडीस द्यावी.

उत्तर—अशा उतरणीच्या जमिनीवर लागवड केल्यास डोंगरावरची माती वाहून जाते आणि पुढें उन्हाळ्यांत पाण्याचे झरे आटतात. याकरितां अशी लागवड करूं देणें फायद्याचें नाहीं. तथापि जे सध्या अशी जमीन लागवडीस आणीत असतील त्यांना उपजीविकेचे दुसरें साधन मिळेपर्यंत त्यांच्याकडून जमीन परत घेतली जाणार नाहीं.

( ७ ) फॉरेस्ट ॲक्ट प्रांतिक सरकारांच्या अधिकारांत आणण्यांत यावा.

उत्तर—असली शिफारस करण्याचा अधिकार कमिटीस पोंचत नाहीं म्हणून सरकार तिचा विचार करणार नाहीं.

कारवार जिल्ह्यांतील रयतांचीं गाऱ्हाणीं विशेष असून कांहींचा संबंध केवळ त्या जिल्ह्यापुरताच आहे. अशीं गाऱ्हाणीं दूर करण्यासंबंधानें कमिटींतील बिनसरकारी सभासदांनीं पंचवीस शिफारसी केल्या होत्या. त्यांपैकीं गुळाकरितां सर्पण मोफत देणें, बांबू तोडण्याची मुदत वाढविणें आणि जंगलांतून रस्ते करणें एवढ्या तीनच शिफारसी सरकारनें मान्य केल्या आहेत. बाकीच्या शिफारसींना प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष नकार दिला आहे. या शिफारसींत पुष्कळशा शिफारसी चराईची फी कमी करणें, प्रत्येक गुराला निदान ३ एकर चराऊ रान देणें, शेताच्या भाजणीकरितां, तरीकरितां अगर माड, पोफळ वगैरेंच्या संरक्षणाकरितां लागणारे टहाळ देणें, जंगलांतील माल वाहून नेण्याला गाड्या आणण्याची परवानगी देणें, गांवकऱ्यांना दिलेले हक्क काढून घेण्याचा कलेक्टराला असलेला हक्क रद्द करणें, सर्पणाचे दर कमी करणें, कुंपणांकरितां सागवान मोफत मिळणें, पिकांचा नाश करणाऱ्या जनावरांची शिकार करतां यावी म्हणून बंदुकींचे पासाचे व शिकारीचे नियम सढळ करणें, मिऱ्याची लागवड पुनः सुरू करणें वगैरे संबंधाच्या होत्या. पण कांहींना कांहीं तरी सबब सांगून सरकारनें त्या फेटाळल्या आहेत. इतर जिल्ह्यांतील तक्रारींचीहि अशीच वाट लावण्यांत आली आहे. त्यांतले कांहीं मासले पुढें देण्यांत येत आहेत. ते असे—

( १ ) इंदूरकडच्या भागांत चराईला जाणारीं गुरें खानदेशच्या जंगलांतून जात असतांना वाटेंत त्यांच्याकडून चराईची फी घेऊं नये. आणि जंगलांतील तोडलेलें गवत नेण्याकरितां ज्या गाड्या येतात त्या गाड्यांच्या बैलाबद्दलहि चराईची फी घेऊं नये.

उत्तर--अशी सवलत दिल्यास तिचा गैरवाजवी फायदा घतला जाईल, यास्तव हल्लींचे नियम बदलतां येत नाहींत.

(२) पूर्व-खानदेशांतील शेतकऱ्यांना शेतीच्या आउतांना व वाटेंत मोडलेल्या गाड्यांच्या दुरुस्तीला लागणारें लांकूड आणि गांवकऱ्यांना लागणारें गवत, सर्पण, माती, दगड-धोंडे मोफत मिळावेत.

उत्तर—तापी-तीरावरील जंगलाच्या शेजारच्या गांवकऱ्यांना हल्लींच इतक्या सवलती मिळाल्या आहेत कीं त्या आणखी वाढवितां येत नाहींत.

(३) ठाणें जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना टहाळ नेण्याला गाड्यांचा उपयोग करूं द्यावा.

उत्तर—राखीव जंगलांतून सवलती दिलेल्या वस्तू नेण्याकरितां राखीव जंगलांत गाड्या येऊं देतां येत नाहींत. कारण त्यापासून सगळ्या जंगलाचा नाश होईल.

(४) कुलाबा जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना शेत-

कीच्या उपयोगाकरितां लागणारें इमारती लांकूड फुकट मिळावें.

उत्तर—स्पेशल परवानगीशिवाय फुकट लांकूड देतां येत नाहीं. याकरितां जरूर तेथें शेतकऱ्यांनीं परवाना मिळवावा.

(५) बेळगांव जिल्ह्यांतील जे रयत पन्नास रुपयांपर्यंत शेतसारा देतात त्यांना शेतकामाला लागणारें लांकूड फुकट द्यावें व १५० रुपयांपर्यंत सारा देणाऱ्यांना निम्म्या किंमतीनें तें द्यावें.

उत्तर—बेळगांव व खानापूर ह्या दोन तालुक्यांत दाट जंगल असल्यानें अशी सवलत देण्यांत आली आहे. इतर तालुक्यांतून ती देतां येत नाहीं.

(६) नाशिक जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना शेतकामाला लांकूड फुकट मिळावें.

उत्तर—या जिल्ह्यांत यापूर्वी जंगल इतकें तोडलें गेलें आहे कीं, आतां तेथें फारसें जंगल राहिलेंच नाहीं. म्हणून ह्या जिल्ह्यांत ही सवलत देतां येत नाहीं.

# पुण्यांतील संस्कृत कॉलेज

( ले.—**वामनशास्त्री किंजवडेकर**, चिटणीस सं. कॉ. कमिटी. )

## परदेशीय पंडितांचे अभिप्राय.

बुर्टझ्बर्ग, जर्मनी.
ता. ६-६-२७

आपलें योजनापत्रक पोंचलें. त्याबद्दल आभारी आहें. आपल्या ह्या नवीन प्रयोगाकडे आम्ही जिज्ञासेनें पाहात आहों व तें हल्लीं असलेल्या सर्व संस्कृत कॉलेजांपेक्षां वरचढ होईल अशी खात्री वाटते. सर्वसाधारण धोरणाबद्दल लिहावयाचें म्हणजे डॉ. थिबॉट स्टेन इत्यादि युरोपियन पंडितांप्रमाणें माझेंहि असें मत आहे कीं जुन्या पंडितांना नाहींसे होऊं देऊं नये. जुन्या धर्तीच्या पंडितांविषयीं मला फार आदर वाटतो.

आपला
**जे. जॉली,**
प्रोफेसर ऑफ संस्कृत.

---

ट्यूबिनगेन डेन ब्रन्स स्ट्रीट १६. ता. ७-६-२७

प्रो. गार्बे हे हल्लीं कांहीं दिवस फुप्फुसाचे व प्लूरसीचे विकारानें दवाखान्यांत आहेत व म्हणून ते स्वतः उत्तर लिहूं शकत नाहींत. परंतु त्यांनीं आपलें पत्र व योजनापत्रक वाचलें. त्यांनीं स्वतः काशीस जुन्या पंडितांकडून हिंदी तत्त्वज्ञानाचें शिक्षण घेतलें असल्यामुळें त्यांना ही योजना पसंत आहे हें उघडच आहे. विशेषतः जेथें कीलहॉर्न, भांडारकर, पाठक, आपण यासारख्या विद्वानांकडून संस्कृत वाङ्मयाचा ऐतिहासिक व चिकित्सक दृष्ट्या अभ्यास केला जातो त्या पुण्यामध्यें तर डेक्कन कॉलेजाच्या पूर्णतेसाठीं जुन्या तऱ्हेची संस्था स्थापन होणें हें त्यांस इष्टच वाटतें. आणि त्यांचे मताप्रमाणें ह्या संस्थेमध्यें डेक्कन कॉलेजांतल्याहून अगदीं स्वतंत्र व जुन्या तऱ्हेचे पंडित तयार करावेत. म्हणजे ते प्रत्येक स्वतंत्र शास्त्रांत पारंगत होतील. त्याचप्रमाणें डॉ. गार्बे ह्यांना डॉ. थिबॉट यांचें "त्यांना अगदीं जुन्या तऱ्हेनें शिक्षण द्यावें. त्यामध्यें फरक केल्यास ती पद्धति आपण गमावून बसूं" हें म्हणणें अगदीं मान्य आहे.

मिट् व्हॉर्झग्लिचर होपॅटुंग
मार्गारेट स्टीनर.

---

II ओपाटोव्हिकाज
प्रेग (झेकोस्लोव्हाकिया).
ता. ७-६-१९२७

पूना संस्कृत कॉलेजाच्या योजनापत्रकाची प्रत पाठविल्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. मी डॉ. बुल्हर यांचा शिष्य असल्यामुळें संस्कृत शास्त्रें शिकण्याची जुनी पद्धत राखण्याकरितां पुण्यास संस्कृत महाविद्यालय काढण्याच्या आपल्या चळवळीला माझी पूर्ण सहानुभूति आहे. डॉ. बुल्हर यांना त्यांच्या संस्कृत संशोधन करण्याचे बाबतींत त्यांना मदत करणाऱ्या पंडितांचें गुणवर्णन करतांना मी कितीदां तरी ऐकलें आहे. ते म्हणत कीं, पाश्चात्य अभ्यासकाला शास्त्रांच्या विशेषतः त्यांच्या व्याकरणात्मक व तत्त्वज्ञानात्मक विवरणाचे बाबतींत पंडिताची मदत घेतल्याशिवाय पुढें पाऊल टाकणें शक्य नाहीं. हिंदुस्थानांतील पंडित नाहींसे होणें ही मी फार दुर्दैवाची गोष्ट समजतों. आपल्या योजनेवरून असें दिसतें कीं, अर्वाचीन ऐतिहासिक व चिकित्सक पद्धत मोडून तिचे जागीं जुनी पद्धत सुरू करण्याचा आपला विचार नसून, विद्येचा जुना संप्रदाय राखून त्याची आधुनिक पद्धतीला जोड देण्याचा आपला मानस आहे.

संस्कृताबरोबर पाली, अर्धमागधी इत्यादि प्राकृत भाषांच्या अभ्यासाची जोड देण्याची व जातगोत

न पाहतां सर्व विद्यार्थ्यांस शिक्षण देण्याची व्यवस्था करण्याची आपली कल्पना मला चांगली वाटते.त्यावरून केवळ पूर्वीची रूढीच बळकट करण्याचा आपला विचार नसून संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन व प्राचीन हिंदुस्थानाविषयींचे आपलें ज्ञान वाढविणें यासाठींच आपली संस्था निघणार आहे यावद्दल शंका राहात नाहीं.

आपणास व आपल्या कार्यकारी मंडळास या कामांत यश यावें असें मी इच्छितों.

आपला

**एम. विंटरनिझ.**

---

उपसाला जून १०-६-२७.

आपण पुणें संस्कृत महाविद्यालयाचें योजनापत्रक पाठविल्याबद्दल मी आपला आभारी आहें.

मी सर्व योजनापत्रक काळजीपूर्वक वाचून पाहिलें. आपली योजना मला उत्तम वाटते व त्याबद्दल मला आपलें अभिनंदन केलें पाहिजे. हल्लींच्या पाश्चात्य संस्कृतीला आलेलें यांत्रिक स्वरूप पुढील भवितव्यतेविषयीं काळजी लावण्याजोगें आहे.व तिच्या प्रसारानें जुन्या रूढी संप्रदाय व जुनी संस्कृति यांचा नाश होण्याची भीति असते असा अनुभव आला आहे. हिंदुस्थानांतील जुने पंडित व चमत्कारिक भासणारी पण ऐतिहासिक दृष्टीनें फार मोठ्या किंमतीची अशी त्यांची विद्या यांचा आधुनिक कल्पनांपुढें टिकाव लागणें शक्य नाहीं हें उघड आहे. आणि जर त्या विद्येला मदत मिळाली नाहीं तर कांहीं पिढ्यांनीं ही पंडितगिरी म्हणजे एक कल्पनाच राहील.

ह्या व इतरहि कांहीं दृष्टींनीं जुने संप्रदाय राखणें व ते पुढील पिढीला प्राप्त करून देणें यांकरितां पुणें संस्कृत महाविद्यालय काढून पंडितगिरीचें पुनरुज्जीवन करण्याच्या आपल्या योजनेला माझी मनापासून मदत आहे. महाराष्ट्रीय पंडितांनीं संस्कृत विद्येसाठीं केलेल्या अचाट प्रयत्नांकडे पाहतां या चळवळीचें पुढारीपण पुण्याकडे यावें हें योग्यच आहे. तें विश्रामबागेंत असावें किंवा काय हा स्थानिक प्रश्न आहे व बाहेरच्या माणसाला त्याबद्दल कांहींच निश्चित मत देतां येणार नाहीं. परंतु योजनापत्रकावरून पाहातां ऐतिहासिक दृष्ट्या तरी हें स्थळ या कामास योग्यच आहे.

आपल्या उद्देशांबद्दल आपले पुनः आभार मानून व ते लवकरच पूर्णपणें अमलांत येतील अशी आशा करून मी हें पत्र पुरें करतों.

आपला

**जॉर्ज कार्पेन्टर पी. एच. डी.**

प्रोफेसर ऑफ संस्कृत अँड कंपॅरेटिव्ह फिलॉसफी.

---

ब्रेसलॉ १६ पार्कस्ट्रेस ४०.

ता. १३-६-२७.

मजकडे पाठविलेल्या पत्रांतील मजकूर मी मोठ्या उत्सुकतेनें वाचला. तुम्ही जें हें मोठें कार्य शिरावर घेतलें आहे तें यशस्वी व्हावें अशी माझी इच्छा आहे.

खऱ्या पंडितांच्या ज्ञानांत वैशिष्टय काय असतें याची गुणग्राहकता माझे गुरु कीलहॉर्न यांनीं आपल्या पुस्तकांत अनेक स्थळीं दर्शविली आहे. १८७४ त त्यांनीं लिहिलेल्या नागोजीभट्टाच्या परिभाषेन्दुशेखराच्या भाषांतराला जोडलेल्या प्रस्तावनेंत त्यांनीं आपल्या तिघां पंडितांची गुरुपरंपरा दिली आहे. आणि तीच परंपरा पांच पिढ्या मागें नेली म्हणजे स्वतः नागेशभट्टापर्यंत जाऊन पोंचते.या प्रस्तावनेंत ते लिहितात कीं,भाषांतरांत असें एकही पृष्ठ किंबहुना अशी एकहि ओळ नाहीं कीं जिच्याविषयीं या पंडितांनीं भवति-न-भवति केली नाहीं आणि प्रत्येक संशयित स्थळीं जरी मी माझें मत स्वतंत्रपणें बनविण्याचा प्रयत्न केला आहे तरी या पंडितांच्याबरोबर झालेल्या वादविवादापासून जो मला अमूल्य फायदा झाला तो नाकबूल करणें अन्यायाचें होईल. विद्वत्तेविषयीं आणि बुद्धिमत्तेविषयीं जशी या शास्त्री—पडितांची ख्याति आहे तशीच त्यांच्या विनयशीलतेबद्दलहि त्यांची ख्याती आहे. अशा शास्त्रीपंडितांची संख्या दिवसेंदिवस कमी होत जावी आणि त्यांच्याबरोबरच त्यांच्या परंपराप्राप्त ज्ञानाचाहि लोप व्हावा ही खेदाची गोष्ट आहे. हिंदु लोकांच्या प्राचीन सूत्रमय ग्रंथांचा बरोबर अर्थ लावण्याला या पंडितांची मदत घेणें जरूर आहे. याकरितां हिंदी व युरोपियन संस्कृतज्ञांनीं प्राचीन ज्ञानाचे हे झरे शक्य तितके कायम राखण्याची तजवीज करावी. ती न झाल्यास अर्ध शतकाच्या आंत हे झरे आटून जातील.

आपला

**बी. लायबिश.**

---

एडिंबरो युनिव्हर्सिटी.

ता. १०-६-२७.

प्रो. बेलवलकर यांस—

पुण्यांत निघणाऱ्या संस्कृत कॉलेजाचें अभ्यासपत्रक मी मोठ्या हौसेनें वाचलें. ही योजना पूर्ण विचारानें आणि योग्य कल्पकतेनें तयार केलेली दिसते. पण मला तेथील परिस्थितीचें ज्ञान नसल्यामुळें तेथील सरकारावर किंवा अधिकाऱ्यांवर वजन पडेल असें मत देण्याला मला साधन नाहीं.

ज्या युरोपियन प्रोफेसरांनीं हिंदुस्थान देशे व येथील युनिव्हर्सिट्या यांना भेट दिली आहे तेच तुमच्या या कामाबद्दल अधिकारपूर्ण असें शिफारसपत्र देऊं शकतील.

**ए. बेरिडेल कीथ.**

---

आॅस्लो, नॉर्वे.
ता. २६-६-२७.

पुणें शहरांत संस्कृत पाठशाला स्थापन करून जुन्या शास्त्रीय अध्ययनाचें पुनरुज्जीवन व वाढ करण्याची कल्पना ऐकून अतिशय आनंद झाला. पाश्चात्य तज्ज्ञांना हिंदी संस्कृतीविषयीं कांहीं संशोधन करावयाचें असल्यास तें काम आम्ही अर्वाचीन पाश्चात्य पद्धतीनेंच कारतों. परंतु हिंदी लोकांची मनोभूमिका व त्यांच्या विचारांची गहनता यांची आम्हास कल्पना येण्याला आमच्या पाश्चात्य पद्धती अपुऱ्या पडतात आणि कित्येक वेळां आमच्या कल्पनेवर पाश्चात्य विचारसरणीची छाप बसलेली दिसून येते. अलीकडे हिंदी तज्ज्ञांतहि संशोधनाच्या कार्याची हौस वाढत असून त्या संशोधनासंबंधाचे अनेक महत्त्वाचे लेखहि प्रसिद्ध होत आहेत. ही पद्धति बंद होणार नाहीं व होऊंही नये. पण त्यावरून आम्ही जुन्या शास्त्री-पंडितांचा अगदींच अव्हेर करावा हें बरें नव्हे. अलीकडील हिंदी तज्ज्ञांच्या लेखांत निरुपयोगी टीका दिसून येते व त्या टीकेच्या खालीं हिंदी पंडितांची अमूल्य अशी विचारपरंपरा दडपून गेलेली आढळून येते. ऐतिहासिक दृष्टीनें संशोधन करणाऱ्या तज्ज्ञांना पृथक्करण करणें, सूत्रबद्धता आणणें, सापेक्ष दृष्टि ठेवणें, आणि सूक्ष्म व निश्चित संशोधनपद्धाति निर्माण करणें आवश्यक आहे. प्रत्येक जुन्या संस्कृतीच्या बुडाशीं असा एक पाया असतो कीं तो केवळ तर्कपद्धतीनें दिसूं शकत नाहीं. पण आमच्या भावनेनें आम्हास त्याचें अस्तित्व जाणवलें पाहिजे. या कार्यांत हिंदी व युरोपियन प्रोफेसरांनाही जुन्या शास्त्रीपंडितांचाच खरा उपयोग होऊं शकतो. असा हा वर्ग नाहींसा होऊं देणें किंवा पाश्चात्य विचारसरणीची छाप त्याच्यावर पडूं देणें म्हणजे आमच्यांत जुन्या भावना पुनः उत्पन्न करण्याला होणाऱ्या खात्रीच्या मदतीचा बालिशपणें त्याग करणेंच होय. या योगानें आमच्या प्राचीन शास्त्रांच्या अध्ययनांतला प्राण काढून घेऊन त्याचा नुसता सांगाडा उभा करून ठेवण्यासारखेंच आहे. ज्यांना हिंदी संस्कृतीविषयीं प्रेम वाटतें व त्या संस्कृतीच्या उत्कृष्ट परिणामाचें अध्ययन करण्यासाठीं ज्यांनीं आपलें आयुष्य खर्चिलें त्यांना तुमच्या संस्कृत कॉलेजाची योजना वाचून मोठें कौतुक वाटेल. ही नवी संस्था पाश्चात्य पद्धतीनें चालणाऱ्या संस्थांशीं निगडित केली जाऊं नये. हिंदी संस्कृतीच्या प्राचीन विधात्यांची विचारसरणी कशी होती आणि ते आपल्यापुढील प्रश्न कसे सोडवीत हे समजून देण्याला समर्थ असलेले असे शास्त्री आम्हास पाहिजेत. त्यांनीं आपल्या वारसाकरितां जें ज्ञानरूपी रत्न ठेविलें आहे, त्या रत्नाचा स्वतःसिद्ध प्रकाश आम्हास पाहावयास मिळाला पाहिजे. त्यांत मानवी जातीचे इतर वंश व इतर संस्कृति यांच्या तेजाचें मिश्रण होतां कामा नये.

**स्टेन कोनाव.**

# दारूबंदी आणि नवे कर.

## ( श्री. ल. ब. भोपटकर यांचें भिन्न मत.)

मुंबई इलाख्यांत दारूची पूर्ण बंदी कशी करावी व तशी पूर्ण बंदी केल्यास सरकारचें वार्षिक उत्पन्न किती बुडेल आणि तें बुडतें उत्पन्न भरून काढण्यास नवे कर कोणते बसवावेत हें सुचविण्यासाठीं जी कमिटी गेल्या फेब्रुवारींत नेमली होती त्या कमिटींत एकमत न झाल्यानें **श्रीयुत भोपटकर** यांनीं रिपोर्टाला आपली भिन्नमतपत्रिका जोडली. तिचा सारांश पुढें दिल्याप्रमाणें आहे.

कमिटींतील बहुमत पूर्ण दारूबंदीची अंमलबजावणी करण्याला कचरतें याचा मला खेद वाटतो. मद्यपान बंद झाल्यानें घरोघर सौख्य नांदूं लागेल असें जनरल बूथ यांचें मत आहे व तें खरें आहे. यास्तव सुधारलेल्या प्रत्येक सरकारनें आपल्या स्थलसीमेंतून या व्यसनाचें उच्चाटण करणें हें आपलें आद्य व पवित्र कर्तव्य मानलें पाहिजे.

दारूबंदी झाल्यास उत्पन्न किती बुडेल याचा अंदाज ठरवितांना अगदीं अलीकडचे, किंवा महायुद्धापासूनचे आंकडे न घेतां तत्पूर्वीचे आंकडेहि विचारांत घ्यावे. १९१५-१६ सालीं मुंबई इलाख्यांतील अबकारी खात्याचें उत्पन्न अवघें २ कोटि ३३ लक्ष होतें. तें १९१८-१९ सालीं ३ कोटि ४४ लक्षांवर गेलें आणि १९२०-२१ सालीं तर तें ४ कोटि १६ लक्ष रुपयांच्या शिगेला पोंचलें. तेव्हांपासून उतरत चाललें होतेंच तरी १९२४-२५ सालीं तें ३ कोटि ८३ लक्ष. बंगाल इलाख्यांतलें अबकारीचें उत्पन्न दरमाणशीं ८ आणे आणि मद्रास इलाख्यांतलें

उत्पन्न दरमाणशीं १ रुपया आहे; पण मुंबई इलाख्यांत तें दरमाणशीं दोन रुपये पडतें! परंतु हें प्रमाण कायमचें नसल्यानें सरासरीनें पाहतां दरवर्षी ३ कोटि रुपयांचें उत्पन्न बुडेल असें आपण मानून चालूं.

## बंदोबस्ताचा नवीन खर्च

मद्यपानाला पूर्ण मनाई केल्यास चोरून, गुप्तपणानें किंवा अन्य मार्गांनीं दारू तयार होण्याचा किंवा आणली जाण्याचा संभव आहे. या चोरट्या व्यापारावर नजर ठेवण्याला आरंभीं ४ कोटि ४८ लक्ष रुपये बुडित खर्च येईल, व पुढें दरसाल ५ कोटि ६५ लक्ष खर्च करावा लागेल असा मेसर्स. घोसळ व क्लिफर्ड यांनीं अंदाज वर्तविला आहे! पण मि. मॅकग्रेगर यांचा अंदाज अनुक्रमें ३ कोटि ३२लक्ष आणि २ कोटि एवढाच आहे. मला मॅकग्रेगर यांचाहि वार्षिक खर्चाचा अंदाज मान्य नसून मी हा खर्च फार तर दीड कोटि रुपये पुरेल असें समजून चालतों; कारण हल्लींचा सगळ्या पोलीसखात्याचा खर्च दीड कोटि रुपयेच आहे व तेवढा पोलीसबंदोबस्त पुरेसा आहे. कांहीं तरी अनुमान केलें पाहिजे म्हणून मी हा आंकडा सांगत आहे; या बाबतींत खरा अंदाज करण्याला प्रमाणभूत आधार कांहींच नाहीं.

वास्तविक पाहातां या संबंधांत लोकांच्या मनःस्थितीवरूनच खर्चाची अटकळ बांधावयाची आहे. याविषयीं कमिटीचा अभिप्राय असा आहे कीं, खेडेविभागांत या व्यसनाचा प्रसार अत्यल्प असल्यानें तेथें दारूबंदीची बजावणी जड जाणार नाहीं.

### खेडेविभागांतील दारूचा खप

| जिल्ह्याचें नांव | दरमाणशीं द्राम | जिल्ह्याचें नांव | दरमाणशीं द्राम |
|---|---|---|---|
| नगर | ०·२ | सातारा | ०·३ |
| सोलापूर | ०·३ | विजापूर | ०·३ |
| अहमदाबाद | ०·६ | पुणें | ०.८ |
| धारवाड | ०·९ | बेळगांव | ०·९ |
| खेडा | १·२ | नाशीक | १·४ |
| रत्नागिरी | १·७ | पूर्व–खानदेश | १·८ |
| कारवार | २·४ | पंचमहाल | ३·५ |
| कुलाबा | ४·६ | भडोच | ५·० |
| प. खानदेश | ५·५ | ठाणें | ७·८ |
| सुरत | ११·१ | लग | ... |

### शहरविभागांतील दारूचा खप

| शहराचें नांव | दरमाणशीं द्राम | शहराचें नांव | दरमाणशीं द्राम |
|---|---|---|---|
| जळगांव | ३·९ | सातारा | ४·७ |
| धुळें | ४·९ | सोलापूर | ५·८ |
| हुबळी | ५·८ | भुसावळ | ६·६ |
| नाशीक | ६·७ | अहमदाबाद | ८·० |
| सुरत | ८·६ | धारवाड | ८·७ |
| कुर्ला | १०·४ | नगर | १०·८ |
| बेळगांव | १३·७ | पुणें | १४·८ |
| भडोच | १६·९ | पनवेल | १९·३ |
| ठाणें | २०·२ | अलीबाग | २३·९ |
| वांद्रें | २६·१ | वसई | ३२·० |
| मुंबई | १७·८ | लग | ...... |

वरील कोष्टकावरून दिसून येईल कीं, विजापूर, सोलापूर, सातारा व नगर या चार जिल्ह्यांतला खप अर्ध्या द्रामाहून कमी आहे. धारवाड, बेळगांव, पुणें व अहमदाबाद येथें तो एक द्रामाच्या आंतच आहे. कारवार, रत्नागिरी, नाशीक, पूर्व-खानदेश, अहमदाबाद व खेडा यांत तो १ ते ३ द्रामांपर्यंत आहे. कुलाबा, पश्चिम–खानदेश, भडोच व पंचमहाल यांत ३ ते ६ द्राम असून ठाणें जिल्ह्यांत ९ द्राम व सुरत जिल्ह्यांत तो खप १३·३ द्राम आहे! खुद्द मुंबई शहरांतलें प्रमाण याहून जास्त आहे. सिंध प्रांताची सरासरी ठाणें जिल्ह्याहून कमी आहे.

मुंबई शहर, गुजराथ, महाराष्ट्र, कर्नाटक व सिंध असे इलाख्याचें पांच भाग कल्पिल्यास मुंबई शहर व गुजराथ यांजवर देखरेख अधिक ठेवावी लागेल. कारवार जिल्ह्याखेरीज कर्नाटकच्या बाकीच्या भागाचें व्यसन सहज सोडवितां येईल. महाराष्ट्र व सिंध हे भाग मध्यमावस्थेंत आहेत.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत दारूची बंदी जाहीर झाल्यापासून तिची बजावणी करण्याकडे संस्थानाचा १८ टक्के वसूल खर्ची पडतो असें म्हणतात. येथें या व्यसनाचा पगडा अद्यापि इतका जबर बसला नसल्यानें शें. १० टक्के वसूल म्हणजे सालिना दीड कोटि रुपये बंदोबस्ताच्या कामीं खर्च केल्यास कार्यभाग साधेल. अमेरिकेंत संयुक्त संस्थानांत दरमाणशीं ३ द्रामचा खप होत असे. मुंबई इलाख्यांत हा खप अवघा ०·१४ द्राम आहे. असो. एकंदरींत उत्पन्नांत ३ कोटींची तूट व जादा खर्च १॥ कोटि मिळून ४॥ कोटींचा तुटवडा भरून काढला पाहिजे. याकरितां मी पुढील कर सुचवितों.

### नवीन करांची सूचना

| अ. नं. | उत्पन्नाची बाब | लक्ष रुपये |
|---|---|---|
| १ | खर्चांत काटकसर | ५० |
| २ | प्रांतिक खंडणीसूट | ५६ |
| ३ | इनकम टॅक्स हिस्सा | ५० |
| ४ | जादा इनकम टॅक्स | ३५ |

| अ. नं. | उत्पन्नाची बाब | लक्ष रुपये. |
|---|---|---|
| ५ | हुंड्या, चेक्स, बिलें यांवर कर | ५४ |
| ६ | तंबाकूवर कर | ३० |
| ७ | पेटंट औषधांवर कर | १० |
| ८ | वारसदारीवर कर | ५० |
| ९ | कारखानदारांवर मजूरसंख्येप्रमाणें | ४० |
| १० | हायकोर्टांतील दाव्यावर फी | अंदाज नाहीं |
| | एकूण | ३·७५ |

वारसदारीच्या कराचें उत्पन्न एक कोटि होईल असा कमिटीचा अंदाज आहे. तसेंच जादा कर थोडा वाढविल्यास तिकडूनहि २५ लक्ष रुपये जादा मिळतील. अशा रीतीनें ४½ कोटींची तूट भरून काढतां येईल. याखेरीज टर्मिनल टॅक्स, बेटिंग टॅक्स, शहरांतील भुईभाड्यावर कर, इरिगेशन सेस, नोंदणी—फीची वाढ इत्यादि कर वसूल करण्यासारखे आहेत. परंतु आजच ते कर बसवावे लागणार नाहींत. याखेरीज युरोपांतील बहुतेक सर्व देशांतील मालाच्या पैदाशीवर व विक्रीवर एक कर ठेवलेला आहे त्यास 'टर्न ओव्हर' टॅक्स म्हणतात. याखेरीज लोकल फंडाची वाढ आणि टर्मिनल टॅक्स यांचा हिशेब लक्षांत घेतल्यास एकंदर साडेसहा कोटि रुपयांची भरती होऊं शकेल. पण आधीं पैशाची तरतूद करा' नंतरच दारूबंदीच्या प्रश्नाला हात लावा हें म्हणणेंच चुकीचें आहे. दारूचा वसूल हा पापाचा पैसा होय. तो घेण्याचें आधीं बंद करा आणि मग तुम्हाला जे सुचतील ते वसुलीचे उपाय योजा अशीच विचारसरणी स्वीकारली पाहिजे.

दारूबंदीच्या बजावणीला तीन प्रकारांनीं सुरुवात करतां येईल. इलाख्यांतील ज्या ज्या जिल्ह्यांत व्यसनाचा पगडा पूर्ण बसला नाहीं व ज्यामुळें वसुलाचें नुकसान कमींत कमी होईल अशा ठिकाणीं सुरुवात करणें हा एक मार्ग. इलाख्याच्या पांच भागांपैकीं ज्या भागांत खप सर्वांत कमी तेथें सुरुवात करणें हा दुसरा मार्ग. आणि जेथें दारूचा खप सर्वांत जास्त आहे तेथेंच प्रथम बंदी करणें हा तिसरा मार्ग. यांतला पहिलाच मार्ग मला मान्य आहे. प्रारंभीं दक्षिणभागांत रत्नागिरी, विजापूर, कारवार, मध्यभागांत सोलापूर, सातारा, नगर, नाशिक, उत्तरभागांत भडोच, पंचमहाल, खेडा आणि सिंध प्रांतांत थरपार्कर, नबाबशहा, लारखाना व सरहद्द मिळून चौदा जिल्ह्यांत बंदी सुरू करावी. या योगानें ८१·४ लक्ष रुपयांची वसुलांत तूट येईल. ही भरून काढण्याकरितां बँकांच्या देवघेवी, तंबाकू आणि पेटंट औषधें यांवरील कर पुरा पडेल. बँकांच्या देवघेवीवर कर लादण्यास सरकार नाकबूल असेल तर त्याच्या ऐवजीं मी वारसदारीचा कर सुचवीन.

एकेक भाग क्रमाक्रमानें घ्यावयाचा झाल्यास प्रथम दक्षिणभाग व सिंध हे प्रांत घ्यावेत. वसुलाची तूट ७७ लक्ष होईल. कराची योजना वरचीच कायम आहे. दारूबंदीचा जादा खर्च २० लक्ष रुपये येईल व तो काटकसर करून किंवा इनकम टॅक्स वाढवून भरून काढतां येईल.

उलटपक्षीं जेथें दारूचा खप जास्त तेथेंच बंदी आधीं सुरू केल्यास २० शहरांत मिळून ५४ लक्षांची तूट येईल. यांत मुंबई शहराचा समावेश केल्यास आणखी सवा कोटीची तूट येईल. तिच्या भरपाईकरितां बँकेच्या देवघेवीवरील कर व गिरणीकामगारावर कर असे आणखी दोन नवे कर बसवावे लागतील. मुंबई, सुरत, ठाणें, भडोच, पश्चिम—खानदेश, कुलाबा व पंचमहाल या जास्त दारूबाज जिल्ह्यांना व त्यांतील शहरांना मिळूनच बंदी करावयाची झाल्यास २३४·५ लक्ष रुपयांचा तुटवडा येईल आणि त्याकरितां पूर्वीच्या यादींतले बहुतेक सगळेच कर अमलांत आणावे लागतील. त्यांतले इनकम टॅक्सचा हिस्सा वगैरे कर मंध्यवर्ती सरकारच्या संमतीवर अवलंबून आहेत; पण ती संमती मिळविली पाहिजे.

एवढ्यानें नच भागेल तर ट्रॅन्झिट टॅक्स २० लक्ष, टर्मिनल टॅक्स ५० लक्ष, लोकल फंड व शहरांतील भुईभाडें यांवर कर १५० लक्ष, आणि नोंदणी—फीवाढ १० लक्ष मिळून २ कोटि ३० लक्षांची भरती होईल. याकरितां माझी अशी शिफारस आहे कीं, मुंबई इलाख्याच्या सर्व भागांत दारूबंदीचा कार्यक्रम ताबडतोब हातीं घ्यावा. पण तें शक्य नसल्यास मी जे चार वेगवेगळे कार्यक्रम सुचविले आहेत त्यांतून कोणताहि मार्ग पत्करावा.

**टीप**—याच भिन्नमतपत्रिकेस आमदार रा. ग. प्रधान यांनीं आपली संमती देऊन तीवर सही केली आहे.

# प्रासंगिक बोल.

१ विलायतेंत एखादी सुधारणा व्हावी, एखाद्या उत्साही इंग्रज अधिकाऱ्यानें ती हिंदुस्थानांत आणावी, येथील परिस्थितीचा विचार न करतां तिचा हिंदुस्थानांत प्रसार करावा व 'राजा बोले दळ हाले' ह्या न्यायानें आमच्या अधिकारी वर्गानें व इतरांनींहि तिची टिमकी वाजवीत सुटावें, ही परिस्थिति जशी इतर बाबतींत तशीच शिक्षणपद्धतींतहि लागू आहे. ' डायरेक्ट मेथड ' म्हणून एक इंग्रजी शिकवि-

ण्याची नवी पद्धति सुमारें वीस वर्षांपूर्वी हिंदुस्थानाचे किनाऱ्यावर उतरली व अधिकाऱ्यांचे छत्राखालीं ती सर्व शाळांतून शिरली. इंग्लिश मुलांमुलींना फ्रेंच व जर्मन शिकविण्यासाठीं ही पद्धति फार चांगली आहे असा अनुभव इंग्लंडांत आला होता व मराठी मुलांना गुजराथी अगर हिंदी शिकविण्यासाठीं ही पद्धति फार चांगली आहे यांत शंका नाहीं. पण इंग्रजीसारखी परकी भाषा शिकविण्याकडे त्या पद्धतीचा कितपत उपयोग होईल यासंबंधीं जास्त शोध करणें जरूर होतें. तसेंच त्या पद्धतीवर विश्वास ठेवणारा व त्या पद्धतीचा अचूक उपयोग करणारा शिक्षकवर्ग निर्माण करण्याची तजवीज करावयास पाहिजे होती. तसें कांहीं न करतां इन्स्पेक्टरद्वारा ही पद्धत शाळांवर लादली गेली व तिचा परिणाम आज असा झाला आहे कीं, शाळेच्या वेळापैकीं निम्मा वेळ इंग्रजीला देऊनहि दहा ओळी शुद्ध इंग्रजी लिहिण्याची अगर एखादें इंग्रजी पुस्तक वाचून त्याचा गोषवारा काढण्याची पात्रता विद्यार्थ्यांना येत नाहीं. प्रो. वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं गेल्या बुधवारीं शिक्षाविचारमंडळापुढें हा प्रश्न चर्चेसाठीं मांडला व इंग्रजी शिकवितांना मराठीचें साहाय्य घेण्याची अवश्यकता प्रतिपादिली. कोणत्याहि पद्धतीचा बरेवाईटपणा सापेक्ष असतो. शिक्षकाचे कुवतीप्रमाणें त्याला पटेल त्या पद्धतीनें शिकविण्याची परवानगी पाहिजे; नाहीं तर पद्धतीच्या डोक्यावर आपलें अपेशाचें खापर फोडून मोकळें होण्याची त्यास संधि मिळते.

ह्या बाबतींत डायरेक्टर, इन्स्पेक्टर, हेडमास्तर, इतर शिक्षक व मुलांचे पालक ह्या सर्वांनी मन घातलें पाहिजे. डायरेक्ट मेथड म्हणजे काय हें कोणालाच समजलेलें दिसत नाहीं. मोठमोठ्या विद्वानांत तरी ह्या बाबतींत एकवाक्यता कोठें आहे? मराठीचा कितपत उपयोग करावा, भाषांतर केव्हां सांगावें, व्याकरण शिकवावें किंवा नाहीं, संभाषणांत कोणत्या शब्दांचा अगोदर उपयोग करावा ह्या प्रश्नांवर भयंकर मतवैचित्र्य दिसून येतें. तसेंच या पद्धतीनें विद्यार्थी सर्वस्वी शिक्षकावर अवलंबून असतो व शिक्षक तयारी न करतां वर्गांत आला—बहुतेक सर्व असेच येतात—तर मुलाची प्रगति खुंटते. त्याचप्रमाणें आरंभीं संभाषणावर भर न देतां मुलांस वाचनाची गोडी लावावी असें एक मत प्रचलित होत आहे व डाक्का युनिव्हर्सिटींतील शिक्षणशास्त्राचे प्रोफेसर डॉ. मायकेल वेस्ट यांनीं स्वतः केलेल्या प्रयोगाचे आधारानें या मताला उचलून धरलें आहे. तरी डायरेक्ट मेथडचे बाबतींत हट्ट सोडून विद्यार्थी व शिक्षक यांना पचतील अशा पद्धती अमलांत आल्या तरच इंग्रजी शिक्षणाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटेल.

---

२ मुंबई युनिव्हर्सिटी सिंडिकेटचा रिपोर्ट नुकताच प्रसिद्ध झाला आहे त्यावरून असें दिसून येतें कीं, गेल्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेस ३३९१ विद्यार्थी संस्कृत घेऊन बसले. त्यांपैकीं अदमासें तिसरा हिस्सा विद्यार्थी महाराष्ट्रांतील होते अशी कल्पना केली तर ह्या बहुतेक सर्व विद्यार्थ्यांनीं आपलीं संस्कृतचीं उत्तरें मराठींतच दिलेलीं दिसतात. कारण मराठींतून उत्तरें देणारांची संख्या यंदा ११८१ होती. यावरून निदान महाराष्ट्रांत तरी आतां संस्कृत इंग्रजीचे द्वारा शिकविण्याची पद्धति बहुतांशीं निर्मूल झाली असें दिसतें. त्या मानानें गुजराथी व कानडी प्रांत मागें पडलेले दिसतात. संस्कृतचीं उत्तरें गुजराथींतून देणारे ३४९ होते व कानडींतून उत्तरें देणारे फक्त ५० च होते. त्याचप्रमाणें उर्दूचा अभिमान बाळगणाऱ्या मुसलमान विद्यार्थ्यांनाही अर्जन पर्शिअनचीं उत्तरें इंग्रजींत देणें बरें वाटतें. पर्शिअन घेऊन बसलेल्या ८३६ विद्यार्थ्यांत फक्त चारच विद्यार्थी उर्दू उत्तरें देणारे निघाले. इतिहासाचे प्रश्नांचीहि अशीच स्थिति आहे. एकूण १०००९ विद्यार्थ्यांपैकीं १९०८ विद्यार्थी मराठींतून उत्तरें देणारे असून, ९५५ नीं गुजराथींतून, ११५नीं कानडींतून व पांचांनीं उर्दूतून उत्तरें दिलीं. म्हणजे महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांत मराठींतून उत्तरें देणारांची संख्या अदमासें दोन–तृतीयांश आहे. इतर भाषांचे दावणींत सांपडल्यामुळें मराठी भाषेचीकिती कुचंबणा होते हें वरील आंकड्यांवरून सहज दिसून येईल.

सदर रिपोर्टांत दिलेल्या आंकड्यांवरून आणखी एका प्रश्नावर उजेड पडतो. तो प्रश्न म्हणजे संस्कृत व देशी भाषांचा. मुंबई व पुणें येथें बसलेल्या विद्यार्थ्यांत अनुक्रमें ९०२ व ८०८ संस्कृतचे, आणि ४७२ व ७३२ मराठीचे होते. तसेंच कोल्हापूर, धारवाड व सांगली येथें संस्कृत घेणारांची संख्या मराठी घेणारांपेक्षां थोडी जास्तच होती. पण अहमदाबाद, बडोदा, राजकोट व सुरत येथें अनुक्रमें ३४२, ३२८, २६९, ८९ संस्कृतला व ६८८, ४७९, ३०९ व १७१ गुजराथीला बसले होते. म्हणजे गुजराथी घेणारांची संख्या संस्कृत घेणारांपेक्षां सर्वत्र जास्त होती. संस्कृत भाषेच्या अभ्यासाची गुजराथी विद्यार्थ्यांना जितकी अडचण वाटते तितकी महाराष्ट्रीय व कर्नाटकी विद्यार्थ्यांना वाटत नाहीं; व म्हणूनच ह्या प्रश्नावर युनिव्हर्सिटींत जो वाद सध्या चालू आहे त्याला निष्कारण मराठी–गुजराथी वादाचें स्वरूप आलें आहे. भाषावार विद्यापीठें नसल्यानें या अडचणी उपस्थित होतात.

# स्कीन कमिटी व हट्टी सरकार

## ( केसरी ता. ३० ऑगस्ट १९२७ )

स्कीन कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊन चार महिने होऊन गेले तरी अद्यापि सरकार आपलें मौन टाकून देत नाहीं असें पाहून डॉ. मुंजे यांनीं सरकारला बोलण्यास लावण्यासाठीं स्कीन कमिटीच्या शिफारशींसंबंधीं एक ठराव असेंब्लीपुढें मांडला. बिनसरकारी ठरावांच्या सोडतींत डॉ. मुंजे यांचा ठराव सुदैवानें पहिला निघाला आणि गेल्या गुरुवारीं त्या ठरावाची चर्चा झाली. ही चर्चा त्या दिवशीं संपली नसून पुनः बिनसरकारी कामाचा दिवस येईल त्या वेळीं ती पुरी होईल आणि तींतून काय निष्पन्न होतें तें पाहावयास मिळेलच. पण तत्पूर्वी देखील या प्रश्नासंबंधीं सरकारचें धोरण काय राहील याचें अनुमान करण्याइतकी उघड भाषा दोघां सरकारी सभासदांनीं वापरली आहे. ठरावावर प्रत्यक्ष मतें घेऊन त्याचा सोक्षमोक्ष झाल्यावर सरकारच्या हट्टीपणाविषयीं सर्वांची खात्री पटेलच. पणतत्पूर्वीच हिंदुस्थानचे सेनापति जनरल बर्डवुड आणि त्यांच्या हाताखालचे एक बडे लष्करी अधिकारी कर्नल क्राफर्ड यांनीं आपल्या भाषणांतून हिंदी लोकांच्या आशेचा अंकुर बहुतेक करपवून टाकला आहे! वास्तविक पाहातां डॉ. मुंजे यांच्या ठरावांत दुसरी कोणतीहि अधिक मागणी नसून केवळ स्कीन कमिटीची योजना अमलांत आणा एवढीच शिफारस त्यांत केलेली होती आणि स्वराज्य पक्षानें जरी आपल्या उपसूचनेंत स्कीन कमिटीच्या शिफारसी समाधानकारक वाटत नाहींत अशी प्रस्तावना आपल्या ठरावाला जोडली होती, तरी अखेरीस निदान कमिटीच्या शिफारसी तरी अमलांत आणा अशीच मागणी स्वराज्यपक्षानेंहि केली होती. परंतु सरकारला दोनहि पक्ष सारखेच असल्यानें स्वराज्य पक्षाची काय किंवा डॉ. मुंजे यांची काय, उभयतांचीहि मागणी सारखीच फेटाळावयाची असल्यानें त्या धोरणाचें दिग्दर्शन परवांच्या वादांत थोडेसें झालेंच.

स्कीन कमिटीच्या रिपोर्टाचा विचार आम्ही करतों आहों, तो रिपोर्ट आम्ही दाबून टाकणार आहों अशी समजूत चुकीची आहे, असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें; पण या आश्वासनांत कांहींच जीव नाहीं. कारण दिल्ली-सरकाराकडून विलायतेला ज्या शिफारसी होऊन गेल्या आहेत त्यांत हिंदी लोकांच्या आकांक्षा पूर्ण करण्यासारखा भरीवपणा कितीसा असेल याविषयींच जनरल बर्डवुड व कर्नल क्राफर्ड यांच्या उद्गारावरून संशय येऊं लागला आहे. हिंदी सैन्याची कार्यक्षमता तिळभरहि ढळतां कामा नये. विलायतेंतून लष्करी हुद्द्यांवर होणाऱ्या भरतीचा अखंड प्रवाह खुटतां कामा नये; आणि हिंदुस्थानाचें सैन्य हा ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणाच्या योजनेच्या सांखळींतील एक दुवा असल्यामुळें तो दुवा केव्हांहि कमजोर होतां कामा नये, इतक्या अटी; संभाळून साधल्यास हिंदुस्थानसरकार हिंदी लोकांना लष्करी हुद्देदारांचे दरवाजे खुले करून देणार! वर नमूद केलेल्या तीनहि अटी अशा स्वरूपाच्या आहेत कीं त्या पाळल्या गेल्या आहेत अशी हमी देण्याला कोणीच धजणार नाहीं. आणि ही कसोटी पार पाडली किंवा नाहीं हें ठरविण्याचा अधिकारहि हिंदी प्रजेकडे न राहतां एकट्या सरकाराकडेच राहणार. मग तें सरकार या अटी पूर्णपणें पाळल्या गेल्या आहेत असें सर्टिफिकेट देते आहे कशाला? अर्थातच स्कीन कमिटीनें एवढा खटाटोप करून व कांहीं सवलती देण्याविषयींची शिफारस करून देखील हिंदुस्थानसरकार त्या शिफारसींची छाटाछाट करीत करीत त्या होत्या का नव्हत्या असें करून सोडील असा रंग दिसत आहे.

ले. असेंब्लींतील वादविवादांत डॉ. मुंजे यांनीं राष्ट्रीय पक्षाची बाजू सप्रमाण पुढें मांडली आणि हिंदुस्थानासारख्या अफाट देशाच्या संरक्षणाच्या कार्यांत हिंदी लोकांना भागीदार केल्यावांचून यापुढें तें कार्य हमखास मनाजोगें होणार नाहीं असें बजावलें. हिंदुस्थानाच्या व्यापारावर परकी राष्ट्रांचा डोळा असल्यानें त्यांची केव्हां धाड येईल याचा नेम नाहीं; यास्तव हिंदुस्थानांत हिंदी सैन्य व हिंदी सैन्याधिकारी यांची जय्यत तयारी असली पाहिजे; आणि हिंदी लोक व ब्रिटिश सरकार यांच्या सहकारितेनेंच ही तयारी मनाजोगती होऊं शकेल, एकटें ब्रिटिश सरकार हिंदुस्थानाच्या संरक्षणाची जबाबदारी यापुढें घेऊं म्हणेल तर तें अशक्य आहे, असें डॉ० मुंजे यांनीं बजावलें.

स्वराज्य पक्षातर्फे श्रीनिवास अय्यंगार यांनीं उपसूचनेच्या रूपानें जो ठराव मांडला त्यांत स्कीन कमिटीच्या शिफारसी या अपुऱ्या व असमाधानकारक आहेत असें मत नमूद केलें असलें तरी त्यांनीं आपल्या भाषणांत त्या कमिटीच्या रिपोर्टाची मनमुराद स्तुति केली आणि असें सांगितलें कीं, या रिपोर्टांत हिंदी लोक लष्करी कामाला नालायक आहेत असली भाषा कोठेंहि दिसत नसून हिंदी उमेदवारांना ब्रिटिश उमेदवारांच्या बरोबरीनें वागविलें जावें, त्यांच्यासारखेंच शिक्षण दिलें जावें आणि त्यांच्या जोडीनेंच त्यांस हुद्दारी मिळावी असें

सर्वत्र समतेचें तत्त्व स्वीकारलें असल्यामुळें ही योजना यशस्वी करण्यासाठीं आम्ही सरकारशीं सहकार्य करण्यास कबूल आहों. पण जरकरितां सरकार एवढ्या शिफारसी देखील अमलांत आणणार नाहीं व रिपोर्टाचा विचार करण्याची टाळाटाळ करील तर सहकार्याला कोठेंच वाव राहिली नाहीं असें आम्ही समजूं. हिंदुस्थानांत मराठे, मुसलमान, पंजाबी, शीख इत्यादि अनेक लढवय्या जाती असतांना येथें लष्करी कॉलेजाला भरपूर उमेदवार मिळणार नाहींत ही कल्पनाच कुत्सित पणाची आहे. यास्तव तसला कुत्सित विचार सोडून देऊन सरकारनें या कामीं जनतेशीं सहानुभूतीनें वर्तन करावें. तसें न होईल तर यापुढें सहकारितेची भाषाच बंद पडून पुनः सार्वत्रिक असंतोष व चळवळ माजून राहील.

पण डॉ. मुंजे यांच्या मुद्देसूद कोटिक्रमाचा किंवा श्रीनिवास अय्यंगार यांच्या भावनापूर्ण अशा भाषणाचा सरकारी अधिकाऱ्यांच्या मनावर यत्किंचितहि परिणाम झालेला दिसला नाहीं. कर्नल क्राफर्ड यांनीं तर स्कीन कमिटीच्या सर्वच योजनेची उघड उघड हेटाळणी केली आणि ही योजना अमलांत आणल्यास ' सपशेल फसगत' होईल असलें अभद्र भविष्य वर्तविलें ! सेनाध्यक्षांनीं आपली जीभ इतकी बेताल सोडली नाहीं. किंबहुना त्यांनीं आपलें भाषण शक्य तितकें शर्करावगुंठित करण्याचा यत्न केला.परंतु भाषणाचा मथितार्थ दोघांचा सारखाच. हिंदी उमेदवार अधिकाधिक घेऊं लागल्यास सैन्याची कार्यक्षमता कमी होईल आणि सध्याच ब्रिटिश उमेदवार मिळण्यास अडचण पडूं लागली आहे ती अडचण अधिकच वाढेल आणि लष्करी अधिकाऱ्यांत ब्रिटिश हुद्देदारांचें विशिष्ट प्रमाण असल्याखेरीज सैन्याच्या लायकीची हमी देतां येणार नाहीं हाच त्यांच्या भाषणांतला मुख्य मुद्दा होता. हल्लीं आठ पलटणी वेगळ्या काढून त्यांचें हिंदीकरण सुरू झालें आहे. परंतु अशा रीतीनें हिंदी लष्करी अधिकारी एकीकडे व ब्रिटिश अधिकारी दुसरीकडे असली विभक्तपणाची पद्धति चालू ठेवणें सर्वथैव अयोग्य आहे असें ठरवून स्कीन कमिटीनें या विभक्तपणाच्या धोरणाचा आपल्या रिपोर्टांत खरपूस समाचार घेतला आहे आणि नव्या योजनेंत असला पंक्तिप्रपंच पाळला जाऊं नये असें स्पष्ट बजावलें आहे. ब्रिटिश हुद्देदारांच्या पोटांत तिडीक उठली आहे ती याचमुळें. त्यांना हिंदी ऑफिसरांच्या बरोबरीनें देखील काम करावयाला नको, मग त्यांच्या हाताखालीं वागणें तर दूरच राहिलें. हिंदी ऑफिसर्स नेमण्याकरितां आठ पलटणी वेगळ्या काढण्यांतला हेतु हाच आहे. हिंदी ऑफिसरांची नेमणूक इतस्ततः झाल्यास मागाहून आलेल्या ब्रिटिश हुद्देदारांस पूर्वागत हिंदी हुद्देदारांच्या हाताखालीं मुनेप्रमाणें वागावें लागेल; हा सासुरवास चुकविण्यासाठीं ही सारी धडपड चालली आहे आणि हिंदुस्थानसरकाराकडून विलायत-सरकाराकडे ज्या सूचना गेल्या आहेत त्यांत बहुत करून ही अष्टविभागांच्या हिंदीकरणाची योजनाच पुढेंहि चालू ठेवावी असा हट्ट धरण्यांत आला असेल.

हिंदी हुद्देदारांची भरती त्वरित व्हावी याकरितां स्कीन कमिटीनें सँढर्स्ट कॉलेजांत १९२८ पासून २० उमेदवार घ्यावे आणि ही संख्या दरसाल वाढवीत न्यावी अशी शिफारस केली असून हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज स्थापन करून येथेंहि ऑफिसर तयार करण्यांत यावे अशीहि दुसरी . महत्त्वाची सूचना केली आहे.हिंदी उमेदवारांची संख्या इतकी वाढविण्याचा सेनापतिसाहेबांचा मानस दिसत नाहीं. ब्रिटिश उमेदवारांच्या संख्येला धक्का न लावतां तुम्ही वाटेल तितके हिंदी ऑफिसर्स नेमा, म्हणजे सैन्याची शिरगणती वाढवा, असाच त्यांच्या भाषणांतून अर्थ निघतो. हल्लींच लष्करचा खर्च बेसुमार व डोईजड होत आहे; आणि ब्रिटिश हुद्देदार काढून त्यांच्या जागीं हिंदी अधिकारी नेमण्याची मागणी करण्यांत स्वाभिमानाच्या व स्वावलंबनाच्या दृष्टीबरोबरच काटकसरीचेंहि धोरण आहे. परंतु आतां सेनापतिसाहेब आम्हास सांगणार कीं, हिंदी ऑफिसर्सची संख्या वाढवा पण ब्रिटिशांची संख्या कमी करूं नका ! अर्थातच यांत स्वाभिमानहि नाहीं, स्वावलंबनाहि नाहीं आणि काटकसर तर नाहींच नाहीं; मग असली आत्मघातकी सूचना कशासाठीं मान्य करावयाची?

हिंदुस्थानांत सँढर्स्टप्रमाणें लष्करी शिक्षण देणारें कॉलेज १९३२ पासून सुरू करावें अशी स्कीन कमिटीची सूचना आहे. सर वुइल्यम बर्डवुड यांच्या भाषणांत तिच्याविरुद्ध प्रत्यक्ष टीका अशी आली नाहीं. तथापि हिंदुस्थानांत शिक्षण घेऊन तयार होणारे ऑफिसर्स कमी दर्जाचे ठरतील असें ध्वनित करून आणि सैन्याची कार्यक्षमता यत्किंचितहि कमी होतां कामा नये असें पुनः पुनः बजावून सेनाध्यक्षांनीं कॉलेजाच्या स्थापनेलाहि अप्रत्यक्षतः नाक मुरडलेंच. यावरून विलायतेस रवाना झालेल्या हिंदुस्थानसरकारच्या रिपोर्टांत हिंदी सँढर्स्टलाहि वाटाण्याच्या अक्षताच लावलेल्या असाव्यात असें अनुमान निघतें.

हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज तूर्त काढावयाचें नाहीं, सँढर्स्टला पाठवावयाच्या उमेदवारांची संख्या फारशी वाढवावयाची नाहीं आणि सँढर्स्टमधून

ाशिकून आलेल्यांनाहि ब्रिटिश ऑफिसरांवर हुकमत चालविण्याला संधि न देतां त्यांना सेग्रिगेशन कँपांतल्याप्रमाणें अष्टविभागांत डांबून ठेवावयाची पक्षपाताची पद्धतिच चालू ठेवावयाची असाच एकंदरींत सरकारचा हट्ट दिसतो. मग स्कीन कमिटीच्या शिफारशींपैकीं हिंदी लोकांच्या हातीं लागणार तरी काय? एखाद्या रिपोर्टांत मतैक्य दिसून आलें नाहीं असली सबब सांगण्याला सरकारला सवड असते. या रिपोर्टाविषयीं तशी कुरकुर करण्याला जागा नाहीं. सर अलेक्झँडर स्कीनसारखे तज्ज्ञ अधिकारी कमिटीचे अध्यक्ष होते, कमिटींत युरोपिअनांचे प्रतिनिधि होते, हिंदु मुसलमानाचे प्रतिनिधि यथाप्रमाण होते आणि एवंगुणविशिष्ट अशा कमिटीनें एकमतानें सर्व सूचना मान्य केल्या होत्या. तरी देखील सरकारच्या मर्जीचें शेपूट वांकडें तें वांकडेंच!

स्वतः सेनापतिसाहेबांना देखील स्कीन कमिटीच्या सूचना लाथाडण्यापूर्वी कोठून तरी विरोधाचें भूत उभें केल्यावांचून आपला हात त्यांत कसा शिरकणार याचा बराच विचार पडला असेल. त्यांतूनहि विलायतेंतील उमेदवारांचाच याला विरोध आहे असें म्हटलें तर त्यांत स्वार्थसाधुपणाचे अगदींच नागवें प्रदर्शन होतें; आणि ब्रिटिश मुत्सद्दीपणाची हीच शहामत कीं कोणतीहि गोष्ट करावयाची ती स्वतःच्या मर्जीसारखीच पण ब्रिटिशांच्या हितासाठीं नव्हे तर हिंदी लोकांच्या कल्याणाकरितांच ती करीत आहों असा देखावा केव्हांहि कायम ठेवून ती करावयाची. पण अधिकाऱ्यांना पडणारा असला पेंच दूर करणाऱ्या कनवाळू तोंडपुजांची हिंदुस्थानांत कधींच वाण पडत नाहीं. या पूर्वपरंपरेस अनुसरूनच सेनापति साहेबांची सोडवणूक करण्यासाठीं तिवानाच्या सर खुदाबक्षासारख्यांचें एक शिष्टमंडळ आयत्या वेळीं अचानक सर वुइल्यम बर्डवुड यांच्या भेटीस आलें आणि स्कीन कमिटीच्या सूचनांची बजावणी करूं लागल्यास बिनलढवय्या जातींचा लष्करांत भरणा होऊं लागून लढवय्या जाती मागें पडतील, सिव्हिल सर्व्हिसमध्यें देखील दोन-तृतीयांश उमेदवार उघड चढाओढीनें घेऊन बाकीच्या एक-तृतीयांश जागा जातवारीच्या तत्त्वावर भरल्या जातात, मग लष्करांतल्या जागांपैकीं चार-पंचमांश जागा उघड चढाओढीनें भरणें ही मोठी 'अफसोसकी बात' आहे, तेव्हां लढवय्या जातींनीं ज्या प्रमाणांत आजवर रिक्रूट भरती केली आणि यापुढेंहि त्यांच्या रिक्रूटांचें जें प्रमाण सैन्यांत आढळून येईल त्या प्रमाणांत त्या त्या जातीच्या उमेदवारांना अम्मलदारीच्या जागा मिळाव्या अशी हुजूरचरणीं विनंति करण्यांत आली! या शिष्टमंडळाला सरलष्करसाहेबांनीं काय उत्तर दिलें तें प्रसिद्ध झालें नाहीं. परंतु दुसरे दिवशींच्या भाषणांत स्कीन कमिटीच्याविरुद्ध मत प्रदर्शित करतांना सेनापतींनीं सैन्याची कार्यक्षमता बिघडूं नये असें जें पुनः पुनः बजावलें त्यावरून या शिष्टमंडळास काय उत्तर दिलें गेलें असलें पाहिजे आणि विलायतेस पाठविलेल्या रिपोर्टांत काय तारे तोडले असावेत याचें अनुमान सहज करतां येतें.

डॉ. मुंजे यांच्या ठरावावरील चर्चा अद्यापि पूर्ण झाली नसून पुनः बिनसरकारी कामाचा दिवस येईल दिवशीं हा वाद चालेलच. पण त्या दिवशीं सरकारची कार्पण्यवृद्धि व हट्टी स्वभाव स्पष्टपणें व्यक्त होऊं नये म्हणून या ठरावावर मतें न घेतांच वादविवादाचा गाशा गुंडाळला जावा अशाविषयीं मानभावी उपदेश आतांपासूनच सुरू झाला आहे. आणि त्याकरितां ज्या टाईम्सकारांना डॉ. मुंजे यांचें नांव निषेधावांचून उच्चारणेंहि वावडें वाटत होतें तेच टाईम्सकार आतां त्यांची पाठ थोपटून अंजारून-गोंजारून त्यांना तसा सल्ला देत आहेत! यावरून या ठरावावरील मतनोंदणीच्या वेळेपर्यंत कुटिलनीतिपटु सरकाराकडून आणखी कोणकोणतीं कारस्थानें रचलीं जातील कोणी सांगावें? तरी पण असेंब्लींतील सर्व लोकनियुक्त सभासदांनीं आपली जूट कायम राखून स्कीन कमिटीच्या शिफारसींत तिळमात्र माघार न घेतां त्या अमलांत आणण्याविषयीं आग्रह धरला पाहिजे. सरकार मुसलमानांना फोडण्याचा प्रयत्न करील, पण बॅ. जिना हे स्वतः कमिटीचे सभासद असल्यामुळें त्यांच्या पक्षाचे मुसलमान तरी लोकपक्षाला अनुकूलच राहातील व तेवढ्यामुळें सरकारचा पक्ष दुबळा ठरून श्रीनिवास अय्यंगार यांच्या उपसूचनेसह डॉ. मुंजे यांचा ठराव पास होण्याचा संभव आहे. बजावणीची सत्ता सरकारच्या हातींच असल्यामुळें शाब्दिक ठरावानें कार्य कांहीं होऊं शकत नाहीं हा नेहमींचाच अनुभव आहे. परंतु सरकारचा पक्ष किती लंगडा व कमकुवत आहे एवढें सिद्ध झाल्यानें श्रीनिवास अय्यंगार यांनीं इषारा दिल्याप्रमाणें पुढील चळवळीस या वादविवादाचा उपयोग होईल.

———

# हिंदी गिरण्या व टॅरिफ बिल

वरील विषयावर न्यू पूना कॉलेजांतील हिस्टॉरिकल असोसिएशनमार्फत मंगळवार ता. २३ रोजीं **प्रो. सबनीस** यांच्या अध्यक्षतेखालीं **ज. स. करंदीकर** यांचें व्याख्यान झालें. वेळेच्या अभावीं जे मुद्दे सांगावयाचे राहिले त्यांचाहि समावेश पुढील सारांशांत केला आहे.

हिंदुस्थानांत सुताची व कापडाची पहिली गिरणी १८५६ सालीं सुरू झाली.त्या वेळेपासून वाढत वाढत आजमितीला सुमारें ३०० गिरण्या हिंदुस्थानांत आहेत. त्यांतून २७४ गिरण्या चालू आहेत. त्यांतल्या ४६ गिरण्या नुसत्या सुताच्या आहेत, २३ गिरण्या नुसत्या कापडाच्या आहेत आणि बाकी २०५ गिरण्यांतून सूत व कापड दोनहि निघतें. प्रथम गिरण्या सुरू झाल्या त्या वेळीं कापूस स्वस्त, मजुरी स्वस्त, इतर करहि कमी आणि परदेशांत सुताचा व कापडाचा खप चांगला होई; यामुळे गिरण्यांना नफा होत होता आणि म्हणूनच गिरण्यांची संख्या वाढली. पण अलीकडे कापूस महाग, मजुरी दुपटीतिपटीनें वाढलेली, इतर करांचा बोजा वाढलेला, सुताचा व कापडाचा परदेशांत खप कमी आणि उलट इंग्लंडच्या जोडीनें जपानाच्या सुताची व कापडाची आयात वाढतो चाललेली; यामुळें बहुतेक गिरण्यांना नफा होईनासा झाला आहे. याकरितां एक्साईज ड्यूटी उठविण्याविषयीं गिरणीवाल्यांनीं मागणी केली व दोन वर्षांपूर्वी ती ड्यूटी उठली. तरी पण गिरण्यांना परदेशी मालापुढें टिकाव धरवत नाहीं म्हणून संरक्षक जकातीची मागणी करण्यांत आली. टॅरिफ बोर्डातील दोघां सभासदांनीं आयात जकात चार टक्के वाढवावी व ३२ नंबरावरील सुताला बौंटी द्यावी अशी शिफारस केली. अध्यक्षांनीं सरसकट आयात जकात न वाढवितां जपानी कापडापुरतीच जकात वाढवावी अशी सूचना केली. आणि सुताला बौंटी देण्याची सूचना अमान्य केली. गिरण्यांच्या यंत्रसामुग्रीवरील जकात उठवावी अशी शिफारस मात्र सर्वांनीं एकमतानें केली.

सरकारनें प्रथम गिरण्यांच्या यंत्रावरील जकात तेवढी काढून टाकण्याचें कबूल केलें, मात्र इतर कोणतीहि सवलत देण्याचें नाकारलें. त्यानंतर गिरणीवाल्यांचें शिष्टमंडळ व्हाइसरॉयांच्या भेटीस जाऊन आल्यावर सरकारनें गिरण्यांना लागणाऱ्या बॉबिन्स वगैरे मालावरहि जकात न घेण्याचें आणि सुतावरील जकात दरपौंडास सुमारें दीड आणा वाढविण्याचें कबूल करून नवें बिल तयार केलें व त्याचा विचार सिलेक्ट कमिटींत चालू आहे.या नव्या बिलानें नुसतें कापड काढणाऱ्या गिरण्यांना फायदा बिलकुल नसून नुसतें सूत काढणाऱ्या गिरण्यांचा मात्र फायदा आहे. पण हातमागवाल्याचें नुकसान आहे.ही कारवाई सरकारनें हिंदी गिरणीवाल्यांत फूट पाडण्याकरितां आणि जपानाची सुताची आयात हाणून पाडण्याकरितां केली आहे. यांत हिंदुस्थानाला फायदा कांहींच नाहीं.

पंचाहत्तर वर्षे धंदा चालवून अद्यापि हा धंदा स्वावलंबी होऊं नये हा गिरणीवाल्यांचा दोष होय. मजूरवर्गहि काम करण्याला लायक असा तयार झाला नाहीं आणि आतां मजुरांना दोन मागांऐवजीं तीन माग चालवा म्हणतांच ते संप करतात.सारांश, गिरणीवाल्यांची कार्यक्षमता फारच कमी असें दिसून येतें. पण त्यावरूनच गिरणीवाले भरमसाट नफा घेतात हें विधानहि आपोआपच खोटें ठरतें.ज्याला जपानी चढाओढीविरुद्ध आपला धंदा टिकेल कसा ही चिंता पडली आहे तो धंद्यांत गैरवाकबगार ठरेल, पण तो भरमसाट नफा घेणार कसा ? हल्लीं विलायतेची व जपानाची चढाओढ येथें इतकी चालली आहे कीं, येथील गिरण्यांतील कित्येक जातींच्या मालाची मूळ किंमत देखील परदेशी मालाच्या विक्रीच्या किंमतीहून अधिक पडते.टॅरिफ बोर्डाच्या रिपोर्टाच्या पृ. ४९ वर ही माहिती दिली आहे. गीज एलिफंट व ड्रॅगन या तीन प्रकारचें कापड सोडून, इतर सर्व कापडांत जपानी मालाची किंमत इतकी कमी आहे कीं, हिंदी गिरण्यांचा खर्च देखील पुरता निघत नाहीं. स्नाइप नांवाच्या कापडाचा तागा येथें तयार करण्याला खर्च ११८११८६ येतो तर तोच जपानी तागा रु. १०८४ ला मुंबईस विकला जातो ! 'बो अँड ॲरो ' या खुणेचें कापड येथें १४८८५ला पडतें तर तेंच जपानी कापड येथें १३८१० ला विकलें जातें. अशा स्थितींत जेथें हिंदी गिरणीवाल्यांना नफाच होण्याची मुष्कील तेथें भरमसाट नफा कोठून येणार !जपानी गिरणीवाल्यांचा माल हिंदी मालापेक्षां दहा टक्के कमी किंमतीस येथें येऊन पडतो; म्हणून हिंदी गिरण्यांना संरक्षक जकात १२ टक्के द्यावी असें बोर्डाचें मत आहे.सरकार म्हणतें कीं,हें १० टक्क्यांचें अंतर ११ टक्के आयात जकातीनें कांटलें जातें म्हणून जकात वाढवीत नाहीं.या वादांत गिरणीवाल्यांना किती नफा घेण्याला जागा राहिली तें दिसतच आहे.

इ. स. १९२३ सालापासून हिंदी गिरण्यांचा माल पडून राहूं लागला. त्या सालाच्या अखेरीस १७७००० गट्ठे कापड न विकतां पडून राहिलें.

१९२५ च्या जुलै महिन्यांत ही संख्या १८५००० पर्यंत वाढली. १९२६ सालच्या नोव्हेंबरांत ही संख्या ११८००० होती. इतका माल पाडून ठेवून व्याजाचें नुकसान सोसण्यांत निदान मुद्दलांत तरी तोटा होऊं नये याहून दुसरा कोणता उद्देश असणार?

टॅरिफ बोर्डानें चौकशी केली त्या वेळीं मुंबई-तल्या ५९ गिरण्यांचे नव्या सालचे हिशेब त्यास मिळाले; त्यांपैकीं १६ गिरण्यांना नफा झाला आहे. आणि ४३ गिरण्यांना तोटा झाला आहे असें त्यास आढळून आलें. या १६ पैकींहि तीन गिरण्यांना डिव्हिडंड देतां आलें नाहीं.बाकी ११ गिरण्यांनी ५ ते २० टक्के डिव्हिडंड दिलें, एका गिरणीनें ३४ टक्के दिलें व एका गिरणीनें मात्र १३० टक्के डिव्हिडंड दिलें!! ज्या एखाद्या गिरणीतून अशा रीतीनें भरमसाट डिव्हिडंड देण्यांत येतें तेथें वास्तविक स्थिति अशी असते कीं, मूळचे शेअर–कॅपिटल न वाढवितां कित्येक वर्षे नफ्यांतून गंगाजळी ठेव ठेवण्यांत येते व तीच ठेव भांडवलरूपानें गिरणींत घालून गिरणीची वाढ करण्यांत येते. त्यामुळें मूळचें शअर–कॅपिटल कागदोपत्रीं कमी दिसतें खरें, पण वर्षअखेर जो नफा मिळतो तो मूळच्या शेअर–कॅपिटलवर नसून एकंदर जितकें भांडवल आजमितीला त्या गिरणींत गुंतलें असेल त्या फुगलेल्या भांडवलावरचें तें डिव्हिडंड असतें. हा भांडवलाचा आंकडा शेअर्सच्या किंमतींत दाखविलेला नसल्यामुळें शेअर्सचे भाव मूळच्या आठपट–दसपट वाढलेले व डिव्हिडंडहि शेंकडा १००-१२५ वांटलेलें दिसून येतें. पण त्या ठिकाणीं शेअरहोल्डर्सनी दूरदर्शीपणानें कित्येक वर्षे रिझर्व्ह फंड जमविलेला असतो व त्या रिझर्व्ह फंडाचा गिरणीची वाढ करण्याकडे उपयोग करण्यांत आला म्हणजेच असा बेसुमार नफा वांटलेला दिसतो. पण खऱ्या भांडवलाचा हिशेब लक्षांत घेतल्यास या नफ्याचें प्रमाण एकदम उतरलेलें दिसेल. असो. दोन गिरण्या आपला माल सारख्याच किंमतीला विकत असून एका गिरणीवाल्याला नफा मुळींच होत नाहीं व दुसऱ्यास भरपूर नफा होतो हा डायरेक्टरांच्या दूरदर्शीपणाचा, कार्यक्षमतेचा व परिस्थितीचा परिणाम होय.

कोणत्याहि धंद्याचा विशिष्ट व्यक्तीला मक्ता दिलेला नसून जेथें बाजारांत उघड चढाओढ चालू असते तेथें कोणासहि देशांतील चालू व्याजाच्या दरास अनुसरूनच नफा मिळेल. त्याहून अधिक नफा मिळूं लागल्यास इतर ठिकाणचें भांडवल या धंद्याकडे येऊं लागेल व जादा नफा ताळ्यावर येईल. कोणासहि भरमसाट नफा न होऊं देण्याचा अर्थशास्त्रानेंच असा नैसर्गिक उपाय सांगितलेला आहे. परदेशी कापड घ्यावयाचें नाहीं, देशीच घ्यावयाचें असें म्हटलें तरी देशी गिरण्यांतच चढाओढ लागून थोडक्याच कालांत त्यांचा नफा कमी होतोच. ज्या धंद्यांत भरमसाट नफा मिळतो अशी हांकाटी होईल त्या धंद्यांत कल्पनातीत चढाओढ सुरू झालीच म्हणून समजावें. गिरणीवाल्यांची हीच स्थिति झाली; शाईच्या कारखान्यांचा तोच अनुभव आहे आणि आतां मोटारवालेहि त्याच स्थितीस येऊन पोंचले आहेत. मात्र ज्यानें सर्वांत आघाडी मारली असेल व ज्याचें भांडवल प्रथम मोकळें होऊन रिझर्व्ह फंड वाढला असेल त्याला चढाओढींत टिकाव धरण्याला खंबीरपणा येतो. ज्या पांचपंचवीस गिरणीवाल्यांना भरमसाट नफा होतो त्यांना आघाडी मारल्याचा फायदा हल्लीं मिळत आहे. पण शेंकडा ७५ गिरणीवाल्यांना आपण जगूं कसे याचीच भ्रांत पडली आहे. अर्थातच त्यांचें गिऱ्हाईक तुटलें कीं त्यांना राम म्हणण्याचीच पाळी येणार!

# इजिप्तचें वीररत्न हरपलें

## ( झगलूल पाशाचा मृत्यू.)

इजिप्तचे सुप्रसिद्ध पुढारी व नेते झगलूल पाशा हे ता. २४ आगस्ट रोजीं वयाच्या ७७ व्या वर्षी परलोकवासी झाले. झगलूल पाशा हे विद्वान बॅरिस्टर, उत्कृष्ट वक्ते व अनुभवी मुत्सद्दी म्हणून जितके प्रसिद्ध आहेत त्यापेक्षां इजिप्तमध्यें स्वातंत्र्याची व राष्ट्रीयत्वाची ज्योत पेटवून ती तेवत ठेवणारे धुरंधर व लोकप्रिय पुढारी म्हणूनच ते अधिक मान्य आहेत. आयुष्याच्या पूर्वार्धांत ते बुद्धिगम्य विषयांतच गढले होते हें खरें आहे; पण त्यामुळेंच त्यांच्या उत्तरकालीन राष्ट्रीय भावनामय चळवळीस तेज व सामर्थ्य प्राप्त झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कैरोच्या एल–अझार विद्यापीठांत आवश्यक शिक्षण घेतल्यानंतर ते इजिप्तच्या ऑफिशिअल जर्नलचे संपादक झाले व थोडक्याच दिवसांत अंतर्गत मंत्रिमंडळाकडे म्हणून त्यांची नेमणूक झाली व लवकरच गीझा प्रांताचें आधिपत्य त्यांना संपादतां आलें.

झगलूल पाशाच्या राष्ट्रीय मनोवृत्तीला हें सुखाचें जिणें रुचलें नाहीं व अरबी पाशाच्या बंडांत सामील

असल्याच्या आरोपावरून त्यांना १८८२ मध्यें कारावास पत्करावा लागला. बंदींतून सुटल्यानंतर त्यांची सरकारी नोकरी सुटली व त्यांनीं बॅरिस्टरी सुरू केली. त्यांचें श्रोत्यावर छाप बसविणारें वक्तृत्व तेथेंहि त्यांच्या उपयोगी पडलें व त्यांना नेटिव्ह अपील कोर्टाचे कौन्सिलरची जागा मिळवितां आली. १९०६ सालीं ते शिक्षणमंत्री झाले व त्या कारकीर्दीत इजिप्तच्या शिक्षणाची धांवती प्रगति त्यांनीं करून दाखविली. पुढें लॉर्ड किचेनर यांच्या राजवटीत मंत्रिमंडळांत झालेल्या फरकामुळें झगलूलच्या हातून शिक्षणखातें निघालें. पण कायदे-मंडळाच्या उपाध्यक्षाची जागा त्यांना मिळाली व त्या काळांत त्यांनीं कामाचा चांगलाच अनुभव संपादला.

महायुद्धाच्या वणव्यानें इजिप्तचें कायदे-मंडळ बंद पडून ब्रिटिशांचे पाश इजिप्तभोंवतीं पडले आणि त्याच कारणानें झगलूलच्या राष्ट्रीय वृत्तींना फोफावण्यास वाव मिळाला व ते लोकपक्षाचे पुढारी बनत चालले. इंग्लंडानें इजिप्तला तुर्कस्थानाच्या अधिराज्याखालून मुक्त करून स्वतःच्या पंखाखालीं घेतलें आणि लगेच खेदिव अब्बास हिलमी यास राज्यावरून दूर करून हुसेन कामिल यास इजिप्तचा सुलतान म्हणून बसविलें. मध्यंतरीं हुसेनाच्या आजारामुळें अहमद फौद यास राज्याधिकारी योजण्यांत आलें. १९१८ सालीं अँग्लो-फ्रेंच जाहिरनाम्याप्रमाणें इजिप्तला स्वतंत्र राज्यपद्धति देण्याचा प्रश्न उपस्थित झाला. इजिप्तच्या लोकांस स्वयंनिर्णयी सत्ता प्रस्थापित करण्याचे सर्व हक्क हवे होते. इंग्लंड इजिप्तला कह्यांत ठेवून स्वराज्यदानाचा देखावा करूं पाहात होतें. अर्थातच इंग्लंड व इजिप्त यांच्यांत लढा सुरू झाला व झगलूलकडे लोकपक्षाचें धुरीणत्व निश्चितपणें आलें.

झगलूल पाशांनीं हायकमिशनरांची गांठ घेऊन संपूर्ण स्वायत्तता मागण्यासाठीं इंग्लंडाला जाण्याची इच्छा दर्शविली. पण ती मान्य झाली नाहीं. इकडे मुख्य मंत्र्यानें सुलतानाच्या संमतीनें झगलूल पाशांनाच इंग्लंडाला पाठविण्याचें योजिलें; दरम्यान झगलूलच्या आधिपत्याखालीं १२ मंडळीच्या शिष्टमंडळानें परराष्ट्राशीं पत्रव्यवहार करून इजिप्तच्या न्याय्य हक्कांची उभारणी चालविली व त्यांत ब्रिटिशांचें संरक्षण अमान्य करून स्वयंनिर्णीत स्वातंत्र्य प्रतिपादिलें. अर्थातच ब्रिटिशांस तें सहन न होऊन त्यांनीं झगलूलला हद्दपार करून माल्टा येथें नेऊन ठेवलें. त्यामुळें लोकक्षोभ वाढीस लागला व त्याचें दमन करण्यासाठीं लॉर्ड अलेन्बी यांची तत्काळ नेमणूक झाली. लॉर्ड अलेन्बी यांनीं लोकांचें धोरण ओळखून झगलूल वगैरेंना मुक्त केलें, त्यानंतर झगलूल पॅरिसला गेले आणि शांतता परिषदेंत इजिप्तच्या हक्कांची दाद लावण्याचा प्रयत्न केला, पण त्यांस यश लाभलें नाहीं.

स्वायत्ततेसाठीं इजिप्तमध्यें झालेल्या लोकक्षोभावर उपाय म्हणून लॉर्ड मिल्नर यांच्या अध्यक्षतेखालीं एक मिशन पाठविण्यांत आलें. ब्रिटिश संरक्षणाखालीं राज्यघटनेंत काय सुधारणा करतां येतील त्या सुचविण्याचें या कमिशनचें काम होतें. राष्ट्रीय वृत्तीच्या इजिप्शिअनांना हा अपमान असह्य वाटला आणि नुकत्याच स्वदेशास परत. लेल्या झगलूलनें त्यांच्याविरुद्ध मोहीम करून सर्व इजिप्त हलवून सोडलें. निषेध, संप व बहिष्कार यांनीं इजिप्त देशांत हलकल्लोळ उडवून दिला. त्याच्या परिणामामुळें व अदली पाशाच्या सदिच्छेमुळें पॅरिसच्या प्रतिनिधींशीं संधान बांधून झगलूल व इतर सातजणांच्या शिष्टमंडळानें शिष्टाई करून तडजोड घडविण्यांत आली. या तडजोडीनें इजिप्तचें स्वातंत्र्य मान्य होऊन मर्यादित राजसत्तात्मक घटना अस्तित्वांत आली; आणि इजिप्तमधील परराष्ट्रांच्या व स्वतःच्या हितसंबंधाचें संरक्षण करण्यासाठीं इंग्रजांच्या सैन्याचा तळ इजिप्तमध्यें पडला.

मिल्नर कमिशनच्या रिपोर्टामुळें इंग्लंडाचें इजिप्तमधील मवाळांस हाताशीं धरलें, व राज्यकारभार सुरू केला. झगलूल यांस साहजिकच तें आवडलें नाहीं व विरोधी पक्षाचें मुख्यत्व त्यांनीं पत्करलें. त्यांचा मंत्रिमंडळांत समावेश करून घेण्याचा प्रयत्न झाला, पण अध्यक्षपद न दिल्यामुळें त्यांनीं अधिकारारूढ पक्षाशीं सहकारिता नाकारली. व तो पक्ष प्रातिनिधिक नसल्याचा पुकारा केला. झगलूलला पुनः हद्दपार करण्यांत आलें. मध्यंतरीं अलेक्झँन्ड्रियामध्यें दंगे होऊन वफद पक्ष संकटांत आला व कैरोंत लष्करी अंमल सुरू झाला. लॉईड जॉर्ज यांनीं ब्रिटिश दळणवळणाची सुरक्षितता, इजिप्तचें परकीयांपासून संरक्षण, परराष्ट्रांच्या हितसंबंधाचें संरक्षण, व सुदानचा प्रश्न याव्यतिरिक्त स्वातंत्र्य जाहीर केलें व सदनशीर राज्यघटनेप्रमाणें मंत्रिमंडळ तयार झालें. झगलूलच्या वदफ पक्षास ही घटना मान्य नव्हती तरी झगलूलला बंधमुक्त करून सदनशीर झगड्याचा मार्ग मोकळा ठेवण्यांत आला.

झगलूल सुटून परत येतांच नव्या निवडणुकींत त्याच्या पक्षानें ९० टक्के जागा काबीज केल्या. झगलूल पाशांनीं मुख्य मंत्र्याचीं सूत्रें हातीं घेतलीं व त्याच वेळीं इंग्लंडांत मजूर पक्षाची सरशी झाल्यामुळें मोठ्या उत्साहानें स्वातंत्र्याचा झगडा पुढें चालविला. मि. रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्या भेटीगांठी झाल्या; पण मजूर पक्षानें देखील इजिप्तच्या

मागण्या नाकारल्या. तेथून परत आल्यावर सुदानचा प्रश्न त्यांनीं हातीं घेतला. पण दुर्दैवानें त्याच वेळीं सर ली स्टॅक याचा खून झाला आणि इंग्लंडानें उलट खाऊन झगलूल पक्षाचा मोड करण्याची संधि साधली. खुनाची भरपाई करणें अशक्य व अपमानकारक वाटल्यानें झगलूल पाशांनीं मंत्रिपदाचा राजीनामा दिला. झगलूल पक्षाचें बहुमत असलेलें पार्लमेंट बरखास्त करण्यांत आलें. शिवर पाशा यांनीं नवें मंत्रिमंडळ बनविलें आणि झगलूल पक्षाला खड्यासारखें वगळण्यांत आलें. या नव्या निवडणुकींत देखील झगलूलला बहुमतानें अध्यक्षपद देण्यांत आलें; त्यामुळें पार्लमेंट पुनः मोडलें गेलें. १९२५ च्या आक्टोबरमध्यें लॉर्ड लॉईड हायकमिशनर झाले आणि निवडणुकीचे नियम विरुद्ध पक्षास जाचक करून दोनदां निवडणुकी लढविल्या गेल्या. पण दोनहि वेळां झगलूल पक्षाची सरशी झाली व निवडणूक रद्द करण्यांत आली. तिसऱ्या वेळींहि पुनः झगलूललाच अध्यक्ष निवडण्यांत आलें. पण त्यांनीं सर्व तपाशा यांस मुख्य मंत्री करून आपण कायदेमंडळाच्या अध्यक्षपदांतच संतोष मानला. अशा रीतीनें अपूर्व लोकप्रियतेच्या बळावर इजिप्तला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं झगलूल पाशांनीं आपलें आयुष्य वेंचिलें आणि राष्ट्रकार्य करीत असतां विजयी वीराप्रमाणें परलोकचा रस्ता गांठला. झगलूल पाशाचा हा जीवितवृत्तान्त परतंत्र राष्ट्रांतील पुढाऱ्यांना बोधप्रद व मार्गदर्शक होण्यासारखा आहे.

# स्वदेशीचा पहिला पुरस्कर्ता

स्वदेशी चळवळ व अगदीं अलीकडची खादीची चळवळ यांचा उगम महाराष्ट्रांत असून सार्वजनिक काकांच्याहि पूर्वी एका महाराष्ट्रीयानेंच या चळवळीची रूपरेषा ७५ वर्षांपूर्वी म्हणजे १८५७ च्या धामधुमीच्या पूर्वी महाराष्ट्रीयांपुढें स्पष्ट शब्दांत ठेवली होती. गोपाळराव हरि देशमुख, प्रसिद्ध लोकहितवादी ( इ. स. १८२३-१८९२ ) यांनीं आपल्या शतपत्रीपैकीं ५४ व्या पत्रांत ( प्रभाकर ता. १ एप्रिल १८४९) स्पष्ट लिहिलें आहे--"लोक चोहों देशांत जाऊन व्यापार करूं लागतील, विद्वान होतील, आपले देशांत कापड वगैरे जिन्नस तयार करावयास लागतील तेव्हां सुखी होतील." तसेंच नं. ६० च्या पत्रांत ( ता. १३ मे १८४९ ) ते लिहितात--" दारिद्य मोडण्यास उपाय असा आहे कीं, ब्राह्मणांनीं केवळ कारकून व भट हे दोनच रोजगार आम्ही करूं असें म्हणूं नये. पुष्कळ रोजगार दिवसेंदिवस इंग्रज घेत चालले आहेत. सावकारी, शेतकी वगैरे इंग्रज करूं लागले. हेच रोजगार आपले लोकांनीं करावेत. कांच, कापड, सुरी, कात्री, लांकडी सामान, घड्याळें, यंत्रें इ. पुष्कळ जिन्नस इंग्रज इकडे खपवितात. हें सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावें व येथें जो माल खपणार नाहीं तो दुसऱ्या देशांस घेऊन जावा व विकावा. याविषयीं शोध करावा व इंग्रजांचे देशचें सामान बंद करावें, किंबहुना आपलें सामान त्यांस द्यावें पण आपण त्यांचें घेऊंच नये. जो इकडे उत्पन्न होईल तितकाच माल घ्यावा. विलायती कापड घेऊं नये. आपल्यास जाडीं मोठीं कापडें नेसावयास लागलीं तर काय चिंता आहे ! परंतु आपले देशाचें रक्षण करावें." ह्या लेखांत स्वदेशी व बहिष्कार दोनहि बीजरूपानें सांगितलीं आहेत. लोकमान्यांपूर्वी ४०-५० वर्षे अगोदर स्वदेशी बहिष्काराचा पुरस्कार करणारा गोपाळराव देशमुख हाच पहिला पुरुष दिसतो.

नं. ७६ चा लेख मद्यपानावर आहे. त्यांत गोपाळराव म्हणतात--"इंग्रजी राज्य झाल्यापासून लोकांस सद्गुण लागावयाचे ते एकीकडे राहून महान् भयंकर व त्वरित वृद्धि पावणारा असा एक दुर्गुण लोकांमध्यें प्रगट झाला आहे. तो कोणता म्हणाल तर दारू पिणें. पूर्वीचे राज्यांत दारू कोणी पीत नव्हते व उत्पन्नहि करीत नव्हते. ब्राह्मण व मराठे राज्य करणारे तेव्हां ते दारू उत्पन्न करणारास नीच मानीत. हल्लींचे सरकारची फार विपरीत वर्तणूक आहे. द्रव्याची आशा धरून ते दुर्गुणावर द्रव्य उत्पन्न करतात. मद्यपान करणें हें फार वाईट आहे. येणेंकरून द्रव्य, शक्ति, बुद्धि हीं नाशाप्रत पावतात, पोरेंबाळें उपाशीं मरतात. इंग्रज लोक मोठे उद्योगी, पण त्यांची बुद्धि हिंदु लोकांइतकी नाहीं. इंग्रज लोक दारू वगैरे मादक पदार्थ भक्षण करतात तेणेंकरून त्यांचे बुद्धीस जरा येते. सोपा मुकदमा त्यांस समजतो, पण तक्रारीचा व घोटाळ्याचा मुकदमा त्यांस कितीहि समजावला तरी समजत नाहीं, मग न समजतांच हुकूम देतात हें आम्ही नित्य पाहतों ! आमचें अन्न निर्मळ व इंग्रज लोकांचें अन्न बुद्धिमंद करणारें जड आहे. हें व्यसन मोठें घातकी, लागलें तर सुटत नाहीं. यास्तव शासन नेमून याजपासून लोक परावृत्त केले पाहिजेत. परंतु हें दारू पिणारांचे राज्यांत होईल

काय? ते उत्पन्नावर व लोभावर दृष्टि देत असतील तर हें करणें सरकारास योग्य नाहीं. सरकार बदलौकिक करणारे उत्पन्नाची बाब सोडून देईल तर चांगलें होईल. "

शतपत्रींतील शेवटच्या प्रार्थनेंतील चार-दोन वाक्यें देऊन हें पत्र संपवितों. " नवीन ग्रंथ, वर्तमानपत्रें वाचा. तुमचे शेजारीं काय होत आहे याचा विचार करा. धर्मशील व ईश्वरतत्पर व्हा. या गुणावांचून सर्व व्यर्थ आहे. ईश्वरासंबंधीं व धर्मासंबंधीं ज्ञान लोकांत वृध्दिंगत करा. आळस सोडा. तुमचेमध्यें वास्तविक बुध्दिमान असेल त्यास पुढारी करा व त्याचे अनुमतीनें चाला. सर्व लोकांची जूट असू द्या. आपसांत फूट नसावी हें ध्यानांत वागवा. सर्व देशाची काळजी प्रत्येकजणानें करावी. आपले शत्रूस देखील वाईट इच्छूं नका. प्रपंचसंसार भलाईनें करा. शरीरानें व मनानें देखील पाप करूं नका. प्राणिमात्रावर दया करा, पण क्षमा न करण्याचा प्रसंग येईल तेथें क्षमा करूं नका. सर्व लोकांची काळजी करा. देव सोडूं नका." १८५० च्या सुमारास म्हणजे ७५ वर्षांपूर्वी लोककल्याणेच्छु गोपाळराव देशमुख यांनीं लोकजागृतीची पहिली तुतारी फुंकली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहीं सूर भेसूर आहेत. त्यांचा समाचार निबंधमालाकारांनीं घेतलाच आहे.

नाशिक. १५-८-२७. } **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.**

# प्रासंगिक बोल

१ मुंबईच्या ब्राह्मणसभेचे शंकरवाडींतील सभागृह बांधण्यास मुंबईचे सुप्रसिद्ध सोन्याचांदीचे व्यापारी श्री. हरि केशव गोखले यांनीं दहा हजार रुपये दिले व त्यांतून हें सभागृह बांधण्याचें काम पूर्ण होऊन त्याचा नामकरणविधि ता. २८ रोजीं श्री.वासुदेवराव सोमण यांचे अध्यक्षतेखालीं मोठ्या उत्साहानें पार पडला. श्री. गोखले यांच्या दातृत्वाची कायमची स्मृति राहाण्यासाठीं व्यवस्थापक मंडळीनें सभागृहास त्यांचेंच नांव देण्याचें ठरविलें. श्री.काणे,खेर व गाडगीळ यांनीं श्री. गोखले यांच्यासंबंधीं प्रशंसापर भाषणें केलीं. त्यास उत्तर देतांना ते म्हणाले ' मृत्युसमयीं सुईच्या अग्रावर राहील इतकें सोनें देखील कोणाला बरोबर नेतां येत नाहीं. अर्थात् ज्या परमेश्वरानें माझ्या प्रपंचास पुरून उरणारें धन मला दिलें त्याचा हेतु मी तें समाजकार्यी लावावें असाच असला पाहिजे.' श्री० गोखले यांच्या वृत्तीचीं माणसें ज्या मुंबईच्या ब्राह्मणसभेंत आहेत तिचा सर्वतोपरी उत्कर्षच होणार असें या प्रसंगी सर्वांस वाटलें असेल. हा समारंभ झाल्यानंतर ब्राह्मणसभेच्या गणेशोत्सवांत अस्पृश्यांच्या मेळ्याला परवानगी देण्याबद्दलचा प्रश्न विचारार्थ निघाला. श्री० शंकराचार्य (डॉ० कुर्तकोटी) यांनीं नगराहून मुद्दाम तार करून अस्पृश्यांच्या मेळ्यास शंकरवाडीच्या सभागृहांत येण्यास परवानगी देण्यास मुळींच हरकत नाहीं असें कळविलें होतें व पुणें हिंदुसभेचे अध्यक्ष चित्रावशास्त्री यांनींहि या सभेस मुद्दाम हजर राहून याच विचारास दुजोरा दिला. डॉ० भडकमकर, डॉ.सावरकर व अश्वत्थामाचार्य गजेंद्रगडकर यांनींहि याच विचारास पाठिंबा दिला आणि इतर मेळ्यांप्रमाणेंच अस्पृश्यांच्या मेळ्यासहि ब्राह्मणसभेच्या गणपतीपुढें आपला कार्यक्रम करण्यास परवानगी द्यावी असा ठराव मोठ्या बहुमतानें मंजूर झाला हें कळविण्यास आनंद वाटतो. मुंबईच्या ब्राह्मणसभेसारख्या सुप्रतिष्ठित व विचारी संस्थेनें या ठरावानें एक प्रकारें सर्वांसच मार्ग दाखविला आहे. अस्पृश्य मेळ्याचे चालक व कुमार विनयमंदिराचे प्रमुख श्री. शेट्ये यांनीं या प्रश्नास दांडगाईचें अगर द्वेषबुद्धीचें स्वरूप न देतां सनदशीर मतपरिवर्तनाचें स्वरूप दिलें यामुळें हा प्रश्न सुटण्यास मदत झाली हेंहि विसरतां कामा नये. हा वादग्रस्त प्रश्न अशा योग्य रीतीनें सुटल्यामुळें मुंबईचा गणेशोत्सव यंदा द्विगुणित उत्साहानें पार पडेल अशी आम्हास आशा आहे.

---

२ गृहलक्ष्मी या मुंबईतील मासिकाचे तीन अंक आतांपर्यंत निघाले आहेत. गृहलक्ष्मी हें स्त्रियांचें मासिक व तें मुंबईच्या बकाली हवेंत प्रसिद्ध होतें; इतकें समजल्यानंतर प्रस्तुतच्या खळबळीच्या काळांत त्याच्या धार्मिक धोरणासंबंधानें मन साशंकच राहील. त्याची सामाजिक व धार्मिक मतें सनातन धर्मीय हिंदूंस मानवतील असें निश्चयपूर्वक सांगणें आतांपर्यंतच्या धोरणावरून कठीण आहे. तथापि त्यांतील लेख स्त्रियांचे असतात व त्यांपैकीं बहुतेक स्त्रिया सुशिक्षित आहेत. याकारणानें कित्येक लेखांत प्रकट होणारे विचार जनतेनें लक्ष द्यावें असेच असतात. पदवीधर स्त्रियांतहि प्रो. कर्वे यांच्या महिला-विद्यापीठांतून शिक्षण संपादिलेल्या स्त्रिया यांची विचाराची दिशा सरकारी युनिव्हर्सिटींतून बाहेर पडणाऱ्या पदवीधर स्त्रियांहून साहाजिक वेगळी असते. अशा एका 'कटुसत्यवादिनी' या टोपण नांवांत दडलेल्या गृहीतागमेनें ' येऊं घातलेलें कोडें' या विषयावर

लिहिलेला निबंध जबाबदार स्त्री-पुरुषांनीं दुर्लक्ष करण्याजोगा नाहीं.

---

३ ती म्हणते ' समाजांत जाती अनेक आहेत. त्यांत ' नवीन अबलांची ' एक नवी जात निर्माण होऊं पहात आहे. सुशिक्षित स्त्री हा शब्द उच्चारतांच कल्पनातीत विचार विद्युद्वेगानें मनांत भरतात. स्त्रियांना पुरुषी पेहेरावाचें शिक्षण मिळत असल्यानें त्यांची मनःप्रवृत्ति विचार करण्यासारखीच होत आहे. स्त्री-पुरुष एकाच प्रकारचें शिक्षण ग्रहण करतात, त्यामुळें व्यक्तिस्वातंत्र्याचे विचार उभयतांच्या डोक्यांत सारखेच खेळत असतात. सुशीक्षित स्त्रियांना वाटतें कीं, आम्ही शिकलों त्या गृहकृत्यें करण्यासाठीं शिकलों नाहीं. सुमाता व सुगृहिणी होण्यासाठीं आपण शिकलों ही कल्पनाच त्यांस मानवत नाहीं. त्यांना असेंहि वाटतें कीं, सध्याच्या फुलपांखरासारख्या आनंदी वृत्तीला सांसारिक आयुष्यांत कामकाजानें व सांसारिक जबाबदारीनें विरजण पडेल म्हणून त्या प्रांतांत शक्य तोंवर जाऊं नये व जाणेंच झाल्यास चैनीनें राहातां येईल अशी पैशाची ऊब असणारा किंवा आय. सी. एस. आपला सहचारी असावा. त्यांतहि कुटुंबाच्या परिवारांत वृद्धांना तर बंदीच असावी. पण इतर माणसांचाहि लकडा नसावा. '

'सुशिक्षित स्त्रियांची मनःप्रवृत्ति अशा प्रकारची असल्यामुळें सुशिक्षित पुरुषांस त्यांस सहधर्मचारिणी म्हणून स्वीकारण्याची फारच भीति वाटते. आपल्या मध्यम स्थितींतील अगर गरीबींतील संसाराला या स्त्रिया तुच्छ समजणार व त्यामुळें त्या आपल्या परिस्थितींत एकरूपता पावण्यास सहसा तयार होणार नाहींत अशीहि पुरुषांची खात्री होते. सुशिक्षित स्त्रियांना नवरे ' इंग्लंड रिटर्ण्ड ' पाहिजेत. पण आतां हे 'इंग्लंड रिटर्ण्डहि ' लांबच्या प्रवासानें जणुं भागले म्हणून नोकरी न मिळून घरीं विश्रांति घेत बसतात. अशा रीतीनें सुविद्य व सुसंपन्न घरांच्या अभावीं व्यक्तिस्वातंत्र्यभोक्त्या व चैनीस चटावलेल्या सुशिक्षित स्त्रिया अविवाहित राहाणार व त्यांची समृद्धि होऊन कुटुंबसंस्थाच मोडत चालली तर ' ततः किम्' हा प्रश्न वांकडा पाय करून आपल्यासमोर उभा राहातो. 'पुण्यांतील 'कटुसत्यवादिनी' च्या लेखांतील हा गाभा आहे. पुरुषांचें स्त्रीविषयक विचार स्वार्थबुद्धीचे व पक्षपातीपणाचे या छापील शेऱ्यानें कोणी बाद ठरवितील. परंतु प्रस्तुत विचार खास स्त्रीचे असल्याकारणानें जबाबदार स्त्रीपुरुषांचें व कुटुंबवत्सलांचें लक्ष ते ओढून घेतील अशी आम्हास उमेद आहे.

# राष्ट्रीय पक्षाचा समेट

गेल्या टिळक पुण्यतिथीच्या निमित्तानें टिळकांच्या जुन्या राष्ट्रीय पक्षांत एक असलेल्या, पण टिळकांच्या निधनानंतर मतभेदानें व पक्षभेदानें दुरावलेल्या ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांची व हितचिंतकांची पुण्यास जी खासगी सभा दोन दिवस झाली तिची हकीकत आम्ही त्या वेळींच प्रसिद्ध केली. पण त्या सभेंत झालेल्या समेटाच्या ठरावावर आमचे विचार त्या अंकांत अगर पुढें आतांपर्यंत मुद्दामच दिले नाहींत. हेतु हा कीं, मूळ ठरावाच्या मसुद्यावरच सर्वांचें लक्ष वेधावें व त्यावरच सर्वांनीं विचार प्रदर्शित करावेत. त्यावर आम्ही लिहिलेल्या मजकुराचीच चिकित्सा होऊन मूळ ठरावाकडे दुर्लक्ष होऊं नये. याप्रमाणें गेल्या चारपांच आठवड्यांत बऱ्याच वृत्तपत्रांनीं या समेटाच्या मसुद्यावर आपले विचार प्रदर्शित केले आहेत. प्रतिसहकारवादी मताच्या बहुतेक वृत्तपत्रांनीं समेटाचें अभिनंदन केलें असून त्यापासून कांहीं तरी फलनिष्पत्ति होईल अशी आशा प्रगट केली आहे. कांहीं असहकारी मताच्या वृत्तपत्रांनींहि अनकूल अभिप्राय दिला आहे. उलट एका प्रतिसहकारी पत्रास समेट निरर्थक वाटत आहे. आणि दोनतीन प्रमुख असहकारी वृत्तपत्रांनींहि समेटास प्रतिकूल मत प्रदर्शित केलें आहे. टिळक राष्ट्रीय पक्षाच्या बाहेरच्या एका वृत्तपत्रानें या समेटाला ' प्रतिसहकार पक्षाचें श्राद्ध ' असें नामाभिधान दिलें ! तर एका असहकारी वृत्तपत्रानें हा समेट म्हणजे असहकारी पक्षास लागलेल्या आत्महत्येच्या डोहाळ्याचें चिन्ह होय असें म्हटलें आहे ! कांहीं असहकारी लेखकांनीं प्रतिसहकारी व असहकारी हे पक्ष नेहमीं असेच भिन्न राहावयाचे, त्यांचें ऐक्य होणें शक्य नाहीं असेंहि बजावलें आहे.

या निरनिराळ्या मतांचा विचार करण्यापूर्वी ही सभा भरवण्याचा हेतु काय होता हें पाहिलें पाहिजे. सभेचा मूळ हेतु टिळकांच्या जुन्या राष्ट्रीय पक्षांतल्या पण आज विभक्त झालेल्या मंडळींनीं एकत्र जमून सर्वांना मान्य होईल अशा कांहीं कामांसाठीं एका अधिष्ठानावर यावें व सहकारिता करावी आणि साधल्यास मतभेदाच्या बाबतींतहि देवाण-घेवाण करून कांहीं समेट झाल्यास पाहावें

ह्या होता. आजपर्यंतच्या समेट-प्रयत्नांचा अनुभव असल्यामुळें सभा खासगी स्वरूपाचीच होती. जर कांहीं उभय पक्षीं निर्णय झाला तरच तो जाहीर करावा. न झाला तर नुसती खुल्या दिलानें चर्चा होऊन जो फायदा होईल तेवढा घ्यावा असें धोरण होतें. प्रचलित व चर्चेस घेण्यासारख्या विषयांची एक सुचली तशी यादी करून सभेपुढें ठेवली होती. कारण सभा कोणत्या स्वरूपाची होईल, असहकारी मताचे लोक सभेस येतील किंवा नाहीं, ते आल्यास त्यांचें, प्रतिसहकार-वाद्यांचें व मध्यस्थांचें धोरण काय राहील इत्यादि गोष्टींचा अंदाज अगोदरपासून कळण्यासारखा नव्हता. पहिल्या दिवशीं सकाळीं चर्चेचा मुख्य व प्रथम घेण्यासारखा विषय कोणता यावरच पुष्कळ चर्चा झाली व दुपारीं टिळक स्वराज्य संघ या संस्थेमार्फत उभय पक्षांस सामान्य अशीं व तडजोडीनें ठरतील तीं कार्यें सहकारितेनें करावीं इतक्यापुरतीच सर्वांची एकवाक्यता झाली व सर्व-मान्य असा कार्यक्रमाचा मसुदा तयार करण्यासाठीं उभय पक्षांतील व निरनिराळ्या भागांतील अशा निवडक मंडळींची एक कमिटी नेमण्यांत आली.

टिळकस्वराज्य संघासारख्या संस्थेंत उभय पक्षांनीं सामील होऊन उभयतांचा मतभेद नसेल अशा सामान्य कामांत तरी एक व्हावें येवढें ठरल्यामुळें पुढचा मार्ग बराच सुकर झाला. कारण टिळकांच्या राष्ट्रीय पक्षांत दोनतीन विषय आज कित्येक दिवस वादाचे होऊन राहिले असले तरी उभयतांस मान्य असे राष्ट्रीय चळवळीचे भाग किती तरी आहेत. आणि ज्यांत मतभेद नाहींत अशा कामांत सहकारिते-नें भाग घेण्यास कोणती हरकत? उलट अशा रीतीनें एकत्र आल्यावर इतर वादग्रस्त बाबतींतील मत-भेदाचा तीव्रपणा कमी होण्याचाहि संभव असतो. एकदोन बाबतींत मतभेद असला तरी तो सर्वच ठिकाणीं माजविण्यांत अर्थ काय? वादाची किंवा परस्परांवर वाक्प्रहार करून खालीं ओढण्याची नि-ष्कारण हौस भागवावयाची असेल तर गोष्ट निराळी. पण वादरहित अशा राष्ट्रकार्यांत तरी सहकारितेनें अधिक प्रगति व्हावी अशी तळमळ असेल तर ही सहकारिता होणें शक्य व इष्ट आहे अशीच बहुतेकांची भावना होती. व कमिटीनें याच धोरणानें विचार करून सर्वसामान्य व वादरहित अशा अकरा विषयांचा मसुदा एकमतानें मंजूर केला. आणि कार्य करावयाचें म्हटलें तर या अकरा विषयांत अनेक कार्यक-र्त्यांना पुरून उरेल इतकें कार्य खास आहे.

पण वादरहित विषयांच्या संशोधनानंतर साध-ल्यास वादग्रस्त अशा विषयांवरहि तडजोड करून पाहावी या हेतूनें 'खादी व कौन्सिलें' या दोन विष-यांवर कमिटींत बरीच चर्चा झाली. पण जो काय निर्णय सभेपुढें मांडावयाचा तो एकमतानें मांडला तरच बरें असें वाटल्यामुळें व या दोन विषयांसं-बंधीं उभय पक्षांस ग्राह्य अशी कांहीं तडजोड न निघाल्यामुळें कमिटीनें तो विषय तसाच ठेवला. दुसरे दिवशीं सभेंत या अकरा सामान्य विषयांवर फारसा मतभेद न होतां ते एकमतानें सर्वांस मान्य झाले. खादी व कौन्सिलें यासंबंधीं कमिटींत एकमत कां झालें नाहीं व त्यांत वादग्रस्त मुद्दा कोणता राहिला हें सभेला सांगण्यांत आलें.पण यावर पुनः सभेंत अधिक चर्चा होऊन कांहीं तडजोड झाली तर बरी असें सर्वांना वाटल्यामुळें चर्चा झाली. व ठराव नं.१२ व १३ हे एकमतानें म्हणजे सर्वांनुमतें मंजूर झाले. पण त्याच वेळीं हीहि गोष्ट स्पष्ट कर-ण्यांत आली होती कीं, या ठरावांत पुढें कांहीं मत-भेद उपस्थित झाला तरीहि बाकी राहि-लेल्या सर्वमान्य अशा अकरा बाबतींत सहकारितेनें कार्य करावें, तें सोडूं नये. हा खुलासाहि सर्वांना मान्य झाला. कदाचित् कमिटीनें मंजूर केलेला ११ ठरावांचा मसुदा मान्य करूनच सभा संपलीहि असती. व तेवढ्यापुरती ती यशस्वी झाली असेंच मानलें गेलें असतें. पण अधिकस्या-धिकं फलं या न्यायानें खादी व कौन्सिलें यांतहि तडजोड निघू शकेल अशी सर्वांना आशा व उमेद वाटल्यामुळें त्यावर पुष्कळ वादविवाद झाला व तो निष्फळ न होतां एक सामान्य असा मसुदाहि सर्वमान्य झाला.

सर्व टीकाकारांनीं या शेवटच्या दोन ठरावांवरच भर दिला आहे व बाकीच्या मोठ्या भागाचा विचारच केला नाहीं. याचा अर्थ इतकाच कीं, या दोन वादग्रस्त विषयांवरच्या वादाशिवाय बाकीच्या गोष्टींची त्यांना किंमतच वाटत नाहीं. आणि हा वाद मिटला नाहीं तर बाकीचा सर्व समेट निरर्थक असें ते मानतात. आम्ही असें मानीत नसल्यामुळें १२ व १३ या ठरावांबद्दल पुढें मतभेद होऊन कदाचित् ते वगळण्यांत आले तरीहि बाकीचा समेट व त्यांतील सामान्य कार्यें टिळक स्वराज्य संघासारख्या संस्थेंत एकत्र येऊन सर्वांनीं सहकारितेनें करणें या गोष्टीहि आम्हास महत्त्वाच्या वाटतात व गेल्या पांचसहा वर्षांच्या फुटीनंतर येवढें ऐक्य होत असलें तर तेंहि करून पाहाणें जरूर आहे असें आम्हास वाटतें. कोणत्या पक्षाचें श्राद्ध करणें अगर कोणत्या पक्षानें आत्महत्या करणें असला कांहीं विषयच सभेपुढें नव्हता. कारण सभेला कोणतीहि जुनी संघटना नाहींशी करावयाची नव्हती. फक्त निष्कारण वाद व मतभेद नाहींसा करून सामान्य गोष्टींत सह-

कार्य करण्यासाठीं संघटना करावयाची होती. अर्थात् यांत अमुक पक्षाचा नाश झाला अगर होईल असलीं अनुमानें अप्रस्तुत व निरर्थकच होत. किंवा अमुक पक्ष वेगळे राहणारच, ते एक होणें शक्य नाहीं इ. सांगण्याची जरूरी नाहीं. कारण सर्वांची सर्वच बाबतींत तंतोतंत एकवाक्यता अगर एकरूपता कशीबशी करण्याचा विचार सभेपूर्वी व सभेंतहि नव्हता, नंतरहि तसा नाहीं. त्याचप्रमाणें कोणी काय मिळविलें व कोणी काय घालविलें व मिळविल्याच्या मानानें घालवलें जास्त का घालविल्याच्या मानानें मिळविलें जास्त इत्यादि काथ्याकूट मागाहून टीकाकारांस करण्यास ठीक आहे. पण सभेंत कोणाचीहि ही दृष्टि नव्हती. मतभेद गाळून सामान्य सहकार्य कसें होईल हीच विवंचना चलकांस होती व अजूनहि या समेटाकडे आम्ही याच दृष्टीनें पाहतों. तराजू घेऊन किंवा त्रैराशिक मांडून आवक-जावक अगर नफा-तोटा यांचा हिशेबच करीत बसले तर वादाला अनेक फांटे फुटून तथ्यांश असा कांहींच निघणार नाहीं.

कित्येकांनीं कौन्सिलांतील अधिकाराच्या जागा स्वीकारण्याच्या कलमाशीं रॉयल कमिशनचा नसताच संबध जोडला आहे. त्यांचे म्हणणें असें कीं, कौन्सिलांतील अधिकाराच्या जागा स्वीकारावयाच्या धोरणास संमति दिली कीं असहकाऱ्यांना रॉयल कमिशनवर बहिष्कार घालण्याला तोंड राहाणार नाहीं. पण ही कुशंका पुण्याच्या असहकारी 'स्वराज्य 'पक्षानें कृतीनेंच खोटी ठरविली आहे. कारण ज्या अंकांत या पत्रानें समेटाबद्दल मान्यता दर्शविली त्याच अंकांत या मान्यतेच्या स्फुटाशेजारींच रॉयल कमिशनवरील बहिष्काराचा अग्रलेख आहे. रॉयल कमिशनचा विषय सभेपुढें मांडलेल्या यादींत असतांहि कमिटीनें तो वादग्रस्त म्हणून समेटांतून अजीबात वगळला व त्यासंबंधीं स्वतंत्रपणें स्वमतप्रतिपादनाची प्रत्येक पक्षास मुभा ठेवली. असें असतांहि रॉयल कमिशनचा आणि समेटाचा निष्कारण संबंध जोडण्यांत हंशील नाहीं. संबंध जोडूं लागल्यास अधिकारांच्या जागांप्रमाणें कौन्सिलप्रवेशाचा स्वीकार करणाऱ्यांवरहि रॉयल कमिशनला बहिष्कार घालावयाला तोंड नाहीं, असें म्हणावें लागेल. कारण रॉयल कमिशन हें केवळ अधिकारांच्या जागांसंबंधानें विचार करण्यास येत नाहीं. तर सर्व कौन्सिलांचा व त्यास आधारभूत अशा सुधारणा कायद्याचा विचार करण्यास येत आहे. अर्थात् विसंगतता मानली तर ती कॉंग्रेसमध्यें कौन्सिलप्रवेशाचा स्वीकार करून रॉयल कमिशनवर बहिष्कार घाला असें म्हणणाऱ्यांवरहि येते. न मानली, तर समेटांतील अधिकारांच्या जागांसंबंधाचे कलमावरून रॉयल कमिशनचा मुद्दा उपस्थित होण्याचेंहि कांहीं कारण रहात नाहीं.

'कॉंग्रेसची खादीची अट रद्द करण्याची खटपट करावी.' या कलमानें खादीचीहि गळचेपी या समेटानें केली आहे असें कांहीं टीकाकार म्हणत आहेत. पण ही अट रद्द करण्याची महात्मा गांधींनींच परवानगी दिली असून अशी परवानगी देतांना आपण खादीची गळचेपी करीत आहोंत असें खुद्द गांधींनाहि वाटलें नाहीं. किंवा अशी परवानगी दिल्यानें त्यांच्या खादीकार्यांत कोठें बिघाड झाल्याचेंहि ऐकिवांत नाहीं. आतां खादी चळवळीचे उत्पादक व मुख्य प्रवर्तक म. गांधी यांच्यापेक्षांहि आपण खादीची अधिक काळजी घेतों असें कित्येकांस वाटत असल्यास गोष्ट निराळी. पण महात्मा गांधींनी ही अट रद्द करण्याची परवानगी दिल्यावर इतर खादीभक्त त्याबद्दल आग्रह धरणार नाहींत अशी समजूत असल्यामुळेंच हें कलम समेटांत घालण्यांत आलें आहे. उलट कापडाचे बाबतींत टिळक स्वराज्यसंघानें खादीचाच प्रचार करावा. हा ठराव गिरण्यांना मारक आहे असेंहि कित्येकांनीं प्रतिपादन केलें आहे! तेंहि निरर्थक होय. गोरक्षण सभेनें फक्त गोरक्षणाचा प्रचार केल्यास कोंबड्याबकऱ्यांना तें मारक होतें असें म्हणण्यासारखेंच हें आहे. सारांश या दोन्ही उलटसुलट भीति निरर्थक होत. अशा रीतीनें उभय पक्षांतील टीकांच्या कांहीं आत्यंतिक माणसांना हे शेवटचे दोन ठराव पसंत नाहींत. अधिकारांच्या जागा स्वीकारण्याचें धोरण कबूल करणें कोणास अवघड वाटतें तर कोणास 'संघानें कापडाचे बाबतींत फक्त खादीचाच प्रचार करावा' हा 'च' कार जड वाटतो, आणि येवढ्यासाठीं सर्वच्या सर्व समेटाचे ठराव व्यर्थ ठरविण्यास ते तयार होत आहेत! पण मिळतें घेऊन सहकार्य करण्याची खरी इच्छा असेल तर प्रत्यक्ष कार्य करण्यांत या गोष्टी नडणार नाहींत असें आम्हास वाटतें.

समेटाच्या मसुद्यावर अशा रीतीनें चाललेल्या टीकेकडे लक्ष न देतां कांहींनीं यथाशक्ति हा समेट अमलांत आणण्याचाहि प्रयत्न ताबडतोब सुरू केला आहे ही अभिनंदनीय गोष्ट होय. उदाहरणार्थ, महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस-कमिटीनें हा समेटचा मसुदा व त्याबरोबर कॉंग्रेसचे सभासद वाढविण्याबद्दल व समेटांतील कॉंग्रेस-कमिट्यांसंबंधाचें तडजोडीचें धोरण अमलांत आणण्याबद्दल विनंति करणारीं पत्रकें हजारों छापून तीं महाराष्ट्रांतील सर्व कॉंग्रेस कमिट्यांकडे पाठविलीं. हें पत्रक वृत्तपत्रांतूनहि प्रसिद्ध करण्यांत आलें. आणि

या पत्रकाचा परिणामहि प्रत्यक्ष कार्यांत हळूहळू दिसून येऊं लागला आहे ही आनंदाची गोष्ट होय. उदाहरणार्थ, सातारा जिल्हा कॉंग्रेसकमिटीनें सभासद वाढविण्याचें काम उत्साहानें सुरू केलें आहे. साताऱ्याप्रमाणें इतर जिल्ह्यांनींहि मनावर घेतल्यास महाराष्ट्रांत थंडावलेल्या कॉंग्रेसकमिट्यांना पुनः चैतन्य प्राप्त होईल.आजपर्यंत भांडणामुळें सभासद करण्याचें काम व्हावें तसें झालें नाहीं भांडणाचें मूळ बहुधा प्रतिनिधींच्या निवडणुकींत असतें. पण प्रतिनिधींच्या निवडणुकींत उभय पक्षांना वाव देण्याचें व केवळ बहुमतवाल्यांनाच प्रतिनिधित्व न देण्याचें धोरण ठरल्यामुळें भांडणाचें मूळच काढून टाकल्यासारखें होत आहे. यासाठीं महाराष्ट्र प्रां कॉं. कमिटीच्या विनंतीस अनुसरून सर्व जिल्ह्यांनीं यथाशक्ति कॉंग्रेसचे सभासद वाढविण्याची खटपट करणें जरूर आहे.

समेटाचें मुख्य अधिष्ठान म्हणजे टिळक स्वराज्य संघ. या संघाच्या कार्यकारी मंडळाची सभा पुण्यांत झालेल्या समेटाच्या सभेनंतर होऊन टिळक स्वराज्यसंघाच्या जुन्या सर्व सभासदांची एक परिषद बोलावून त्या परिषदेत समेटाचा मसुदा मान्य करून घ्यावा असें ठरलें आहे. व ती परिषदहि लवकरच बोलावण्यांत येईल. सारांश, टिळक पुण्यतिथीच्या दिवशीं केलेली समेटाची योजना व्यर्थ जाऊं न देतां टिळक स्वराज्य-संघांत सर्वांनीं एकत्र येऊन ती अमलांत आणण्याचा होईल तितका प्रयत्न करून पाहावा असें आमचें सर्वांना सांगणें आहे. यासाठीं टिळक स्व. संघाच्या परिषदेनें समेट मंजूर करून संघाचे सभासद होण्यास उभय पक्षीय कार्यकर्त्यांना विनंति करावी व शक्य तितके सभासद करावे व त्यांतील कार्यांनाहि सुरुवात करावी. कार्यांत मतभेद उपस्थित करूं म्हटले तर हवे तितके आणतां येतात. उलट कार्यनिष्ठेनें मतभेद बाजूस सारण्याचें ठरविलें तर मतभेदाची अडचण भासणार नाहीं असेंच आम्हास वाटतें. यत्न करूनहि समेट टिकला नाहीं तर दोष नाहीं. पण समेट मोडेल या भीतीनें ठरविलेली योजनाच यथासांग अमलांत आणली नाहीं तर मात्र आपल्यावर दोष येईल हें उभय पक्षांनीं लक्षांत बाळगून आरंभिलेलें कार्य तडीस नेण्यांत कसूर करूं नये अशी आमची त्यांस विनंति आहे.

# श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण

सिमला येथें असेंब्लीच्या बैठकींत श्री. साराभाई हाजी यांचा ठराव चर्चेकरितां फिरून निघाला. सदर ठरावांत हिंदुस्थानांतील बँकांची सांप्रत स्थिति कशी आहे याची तपासणी करून बँका कशा वाढवाव्या व त्यांना भांडवल कोठून व कसें पुरवावें याची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमावी असा मजकूर होता. या ठरावास पुष्टि देतांना श्री. न. चिं. केळकर यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें.

प्रस्तुत विषयाचें महत्त्व सरकारास पटलें असून करन्सी कमिशनानें केलेल्या सूचना या विषयास अनुकूलच आहेत. कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यापासून रिझर्व्ह बँक स्थापन करण्याचा विचार चालू आहे. परंतु रिझर्व्ह बँकेच्या स्थापनेनें खेड्यापाड्यांतून राहणाऱ्या लोकांस आपल्या ठेवी ठेवण्यास सोईचें होणार आहे असें नाहीं. शेतकी कमिशनाचाहि या दृष्टीनें उपयोग होईल असें वाटत नाहीं. रिझर्व्ह बँक बिलासंबंधानें बहुसंख्याकांचा जो रिपोर्ट आहे त्यांत सदर बँकेच्या डायरेक्टरांत प्रांतिक कोऑपरेटिव्ह बँकेचा एक प्रतिनिधि असावा अशी शिफारस आहे. तथापि तेवढ्यानें काम भागेल असें वाटत नाहीं. येथील लोकांनीं काढलेल्या बँका व जॉईंट स्टॉक बँका यांचे प्रतिनिधी रिझर्व्ह बँकेवर घेण्याची व्यवस्था नाहीं. यामुळें रिझर्व्ह बँकेकडून अशा बँकेचें संरक्षण होईलच असें म्हणवत नाहीं. इंपीरिअल बँकेच्या शाखा सर्वत्र पसरलेल्या आहेत. परंतु खेड्यांतून राहाणाऱ्या लोकांना आपल्या लहान लहान रकमा ठेवण्यास या शाखा उपयोगी पडणार नाहींत. इंपीरिअल बँकेंतून विविक्षित वर्गाची गरज भागते. या वर्गास हलक्या व्याजानें सदर बँकेंतून रकमा कर्जाऊ मिळतात. इंपीरिअल बँकेकडून फार तर पांच टक्के इसमांस रकमा कर्जाऊ मिळत असतील, पण बाकीच्या ९५ टक्के इसमांची वाट काय? चालू रकमेवर व लहान ठेवीवर व्याज देण्याचें इंपीरिअल बँक नाकारते. सारांश, लहान ठेवीवाल्यांस व ज्यांचेपाशीं बँकेंत ठेवण्यास (सेव्हिंग) रक्कम थोडी आहे अशांस इंपीरिअल बँक निरुपयोगी आहे.इंपीरिअल बँकेच्या लहान शाखा तोट्यांत चालल्या आहेत.या बँकेवर देखरेख करण्यास जे अंमलदार नेमले आहेत त्यांना पगार भारी देण्यांत येतो. इतर बँकांस हा खर्च कमी येतो. बँकर्स इन्स्टिटयूटसंबंधीं बोलतांना सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास यांनीं काढलेले उद्गार विचार करण्यासारखे आहेत. ते म्हणतात—'बँकेच्या धंद्यांत मोठ्या जागा मिळवूं इच्छिणारे आमचे हिंदी तरुण बँकर्स इन्स्टिटयूटच्या परीक्षेस बसतात. त्यांच्या अभ्यासक्रमांत इंग्लिश बँकिंग, त्यासंबंधीं कायदा व व्यवहार इत्यादि विषय आहेत. परंतु रोजच्या व्यवहारांत बँकिंगसंबंधीं हिंदी कायदा, व्यवहार,हुंड्या इत्यादि-

कांचेंहि त्यांस ज्ञान पाहिजे. 'इंडियन इन्स्टिटयूट ऑफ कॉमर्स' इकडे निघाल्यास ती अभ्यासक्रमांतील ही उणीव भरून काढील. अशा प्रकारची संस्था निघाल्यानें बँकेच्या व्यवहाराचें ज्ञान सर्व जनतेंत फैलावेल. नवीन बिलाप्रमाणें रिझर्व्ह बँक स्थापन झाली असें गृहीत धरलें तरी तिच्याहून लहान लहान देशी बँका व हुंडीचीं दुकानें यांचें काय होणार हा प्रश्नच आहे. त्यांचे व्यवहार बंद पडणार अशी भीति वाटते. हुंडीवाले नष्ट झाले व त्यांच्या जागीं देशी बँका आल्या तरी समाधान मानण्यास जागा आहे. तशी कांहीं तोड फडणिसांनीं काढावी अशी त्यांस विनंति आहे.

बँकेचा धंदा हिंदुस्थानांत फार मागसला आहे. रिझर्व्ह बँक काढण्यांत हिंदुस्थानसरकारनें अमेरिकेचें उदाहरण डोळयासमोर ठेवलें आहे, म्हणून हिंदुस्थान व अमेरिका या दोन देशांतील बँकांसंबंधाचे आंकडे देऊन हिंदुस्थान किती मागसलेला आहे हें दाखवितों. हिंदुस्थानांत सात हजार खेड्यांस एक बँक पडते. एकंदर शहरें २३०० आहेत. त्यांपैकीं २६७ शहरांत बँकांच्या कचेऱ्या ६७० आहेत. ६७० कचेऱ्यांपैकीं १७७ कचेऱ्या ११ शहरांत आहेत. ९६ कचेऱ्या लहान शहरांत आहेत व बाकीच्या एका शहरांत एक याप्रमाणें आहेत. अमेरिकेची वस्ती ११ कोटि असून बँकेच्या कचेऱ्या पस्तीस हजार आहेत. इंग्लंडांत ५६३० वस्तीस एक बँक पडते. हिंदुस्थानांत पांच लाख वस्तीस एक बँक आहे. यासाठीं हिंदुस्थानांत अधिक बँका स्थापन होतील अशा सोयी केल्या पाहिजेत. सर बेसिल ब्लॅकेट म्हणतात त्याप्रमाणें इंपीरियल बॅंकेस सवलती दिल्यास बाकीच्या लहानथोर बँका संपुष्टांत आल्यावांचून राहणार नाहींत. सर ब्लॅकेट यांच्या लक्षांत ही गोष्ट आली आहे काय ?

## डेक्कन कॉलेजांतील
# लोकमान्यांचें स्मारक

सा. न. वि. वि. कै० लोकमान्यांचा विद्यार्थिदशेंतील रमणीय आणि भावनापूर्ण काल, कै० आगरकर व इतर सहाध्यायी मित्रांसमवेत, डेक्कन कॉलेजांतील शरीर व बुद्धि या उभयतांच्या विकासास अनुकूल अशा उच्च वातावरणांत गेला असल्यामुळें, सदरहू कॉलेज ही सरकारी संस्था असली तरी सुद्धां—अथवा ती सरकारी संस्था आहे म्हणूनच—त्या ठिकाणीं, विद्यार्थ्यांच्या नित्य नजरेसमोर राहील व त्यांच्या आकांक्षा उद्दीपित करील अशा प्रकारचें एखादें स्मारक उभारलें जाणें अत्यंत उचित व आवश्यक आहे हें कोणीहि कबूल करील. अशा एका स्मारकासंबंधीं योजना करण्याकरितां लोकमान्यांच्या निधनानंतर दोन दिवसांनी, ता. ३ आगस्ट १९२० रोजीं डेक्कन कॉलेज जिमखान्याची ( म्हणजे कॉलेजांतील सर्व विद्यार्थ्यांची) एक सर्वसाधारण सभा, जिमखान्याचे उपाध्यक्ष प्रो० कपाडिया यांच्या अध्यक्षतेखालीं भरून स्मारकाकरितां वर्गणी जमविण्याचें ठरलें व त्याकरितां एक स्मारककमिटीहि नेमण्यांत आली. त्यानंतर दोन वर्षांनीं, जमलेल्या वर्गणीच्या मानानें, कोणत्या प्रकारचें स्मारक उभारावें याबद्दल स्मारककमिटीनें केलेल्या सूचनांचा विचार करण्याकरितां ता० २६ जानेवारी १९२२ रोजीं प्रिन्सिपाल रॉलिन्सन यांच्या अध्यक्षतेखालीं जिमखान्याची एक सर्वसाधारण सभा भरून स्मारकाची प्रस्तुतची योजना निश्चित केली गेली. या योजनेप्रमाणें लोकमान्यांचा उठावदार बस्ट ज्यावर आहे अशी एक तबकडी (Medallion) शिरोभागीं असलेलें एक पुस्तकांचें नक्षीदार कपाट तयार करवून घेऊन त्यांत वेदांच्या चिकित्सक अभ्यासाला उपयोगी असा संस्कृत, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन वगैरे भाषांतील मुख्य मुख्य ग्रंथांचा संग्रह करून तो कॉलेजाच्या लायब्ररींत ठेवणें हा महत्त्वाचा भाग असून, त्याशिवाय प्रतिवर्षी लोकमान्यांच्या नांवानें मल्लविद्येमध्यें आणि पोहण्यामध्यें प्रवीण ठरलेल्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांस एकेक बक्षीस देणें, आणि कॉलेजांतील निरनिराळया भोजनालयांच्या विद्यमानें टेनिस टूर्नमेंटमध्यें सामील होणाऱ्या खेळाडूंतून पहिल्या येणाऱ्या जोडीस त्या त्या वर्षाकरितां द्यावयाची एक चांदीची ' लोकमान्य चँपियन शील्ड ' तयार करणें आणि तत्संबंधीं इतर खर्चाकरितां शक्य तर एखादी रक्कम कायमनिधि म्हणून कॉलेज जिमन्याच्या स्वाधीन करणें वगैरे इतर आनुषंगिक भाग आहेत.

सदरहू योजनेप्रमाणें व्हावयाच्या सर्वच योजना स्मारककमिटीस द्रव्याभावामुळें जरी करतां आल्या नाहींत तरी ज्या गोष्टी करतां आल्या त्यांचा तपशील येणेंप्रमाणें :—

१ शिरोभागीं दोन सिंहांच्या मध्यभागीं लोकमान्यांचें दर्शनीय Medallion असलेलें एक

सुंदर नक्षीदार कपाट सुमारें ५०० रुपये खर्च करून तयार केलें आहे. कपाटाचें लांकडी नक्षीकाम पुण्यांतील सुप्रसिद्ध बेसलरे आणि कंपनी यांनीं केलें आहे, व Medallion शिल्पविद्यानिपुण करमरकर यांनीं केवळ कच्च्या खर्चाकरितां लागणारी रक्कम घेऊन तयार करून दिलें आहे.

२ कॉलेजाच्या लायब्ररींत नसलेल्या दुर्मिळ अशा सुमारें २०० वेदविषयक ग्रंथांचा संग्रह परिश्रमानें जमा करून तो Lokamanya Tilak Vedic Collection या नांवानें कॉलेज लायब्ररींत प्रमुख ठिकाणीं अलग असा ठेविला आहे. सदरहू पुस्तकांकरितां आजवर रु. ९५० खर्च झाले आहेत. अद्याप संग्रह सर्वांशानें परिपूर्ण झाला आहे असें म्हणतां येणार नाहीं. कांहीं दुष्प्राप्य ग्रंथ गोळा करण्याकरितां जर्मनींतील हॅरॉ. सोविट्झ या प्रसिद्ध बुकसेलरकडे मेमोरियल कमिटीच्या नांवें ४ पौंड अनामत ठेविले आहेत. शिवाय शक्य तर प्रतिवर्षी नवीन पुस्तकें घेऊन संग्रहांत भर टाकण्याकरितां ५०० पासून १००० रुपये कायमनिधिवजा बाजूस काढून ठेवण्याचा विचार होता. परंतु जमलेल्या वर्गणींतून या कार्याकरितां दोनशेंहून जास्त रक्कम राखून ठेवितां येईल असें वाटत नाहीं. तथापि वर्गणीचें हें द्वार मोकळें ठेवावयाचें असून यानंतर मुद्दां त्याकरितां मिळणाऱ्या देणग्या कायमनिधींत समाविष्ट करून घ्यावयाच्या आहेत, इकडे लोकमान्यांबद्दल आदर असणाऱ्या व वरील स्मारककार्याबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या सर्व सद्गृहस्थांचें लक्ष वेधणें जरूर आहे.

३ लोकमान्यांची सुंदर प्रतिकृति मध्यभागीं कोरलेली एक रुप्याची 'टेनिस चॅंपियन शील्ड' पुणें येथील कारागीर गोडबोले यांजकडून तयार करवून घेतली आहे, व ती शील्ड जिंकणाऱ्या जोडीस यावर्षाच्या पहिल्या वर्षाच्या बक्षिसाकरितां उक्ती रक्कम रु. २०, कॉलेज जिमखान्याच्या स्वाधीन केली आहे. या कार्याकरितां एकंदर १७०-१७५ रुपये खर्च आला आहे.

४. 'केसरी–मराठा ट्रस्ट' या संस्थेकडून मल्लविद्येंत अथवा पोहण्यांत निपुण ठरलेल्या डे. कॉलेजांतले विद्यार्थ्यांस देण्याकरितां प्रतिवर्षी रु. १५ अथवा तितकें व्याज येईल एवढी कायमनिधीकरितां रक्कम मिळण्याबद्दल अभिवचन मिळालें आहे. संकल्पित दोन बक्षिसांपैकीं एकाची सोय अशा रीतीनें झाली आहे. दुसऱ्या तेवढ्याच रकमेच्या बक्षिसाकरितां लागणारा निधि एकरकमेनें देणारा सत्पुरुष अद्यापि लाभला नाहीं. वरील हकीकत वाचून या कार्याचा भार स्वीकारण्याची स्फूर्ति कोणा तरी लोकमान्यांच्या चाहत्यास होईल अशी उत्कट आशा आहे.

वरील स्मारकाच्या कार्याकरितां रु. पांच हजारांपावेतों मिळविण्याची कमिटीची अपेक्षा होती, परंतु आजपावेतों गोळा झालेल्या रकमेचा आंकडा २ हजारांच्या फारसा पलीकडे गेला नाहीं. सबब मिळालेल्या रकमेंतूनच यावच्छक्य स्मारकाचें कार्य उरकून घ्यावें असा विचार ठरून त्याप्रमाणें लोकमान्य स्मारकाचा उद्घाटनसमारंभ गुरुवार ता. १७ सप्टेंबर १९२७ रोजीं ५। वाजतां कॉलेजाच्या लायब्ररी हॉलमध्यें ना. दिवाणबहादुर हरिलाल देसाई यांच्या हस्तें करविण्याचें ठरविलें आहे. स्मारकाच्या योजनेस सुरुवात झाल्यापासून कॉलेजांतील व कॉलेजाबाहेरच्या ज्या ज्या विद्यार्थ्यांनीं व इतर सद्गृहस्थांनीं स्मारकाकरितां वर्गणी दिली त्यांचीं नांवें जरी स्मारक-कमिटीच्या दप्तरीं नमूद आहेत तरी त्या सर्वांचा आजचा निश्चित पत्ता माहीत नसल्यामुळें स्मारक-कमिटीस सर्वांकडे समारंभाच्या निमंत्रणपत्रिका पाठविणें दुरापास्त झालें आहे. तरी त्या सर्वांस व स्मारककार्याबद्दल सहानुभूति असणाऱ्या इतरांस या पत्रद्वारें समारंभास अगत्य येऊन तो साजरा करण्याची विनंति स्मारककमिटीतर्फे केली जात आहे तिचा स्वीकार होईल अशी आशा आहे. कळावें ही विनंति.

ता. २।९।१९२७.

**श्रीपाद कृष्ण बेलवलकर,**
अ. लोकमान्य स्मारक–कमिटी,
डेक्कन कॉलेज.

# लंडनचें बातमीपत्र

## शिवाजी–टिळक–पुण्यतिथी

ता. २४ जुलै रोजीं येथील इंडियन स्टूडण्टस् यूनियनमध्यें नागपूरचे नगराध्यक्ष श्री. भवानी शंकर नियोगी यांच्या अध्यक्षतेखालीं हिंदी विद्यार्थ्यांनीं शिवाजी–टिळक–पुण्यतिथी साजरी केली. डॉ. ॲनी बेझंट, मजूरपुढारी मि. लॅन्सबेरी, श्री. बाबासाहेब कामत इत्यादिकांचीं टिळकांच्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. टिळकांचे सर्व ग्रंथ यूनियनच्या ग्रंथसंग्रहालयांत ठेवण्याचें ठरून त्याप्रीत्यर्थ

सभेंत वर्गणीहि जमा करण्यांत आली. टिळक हे महान देशभक्त, अपूर्व मुत्सद्दी व राजकारण-कुशल कसे होते हें बाईनीं त्यांच्या नेहमींच्या जोरदार व अस्खलित भाषणांत विशद करून सांगितलें. टिळकांना जितकी विलायती राजकारणाची माहिती असे तितकी जर मला हिंदुस्थानविषयक राजकारणाची माहिती असती तर मी स्वतःस भाग्यवान समजलों असतों. टिळकांसारखा पुढारी माझा कांहीं दिवस येथें पाहुणा होता या स्मृतीचें मी मोठ्या आदरानें प्रेमानें व अभिमानपूर्वक जतन करीत आलों आहे. 'कॉमरेड' टिळक यांची स्मृति जागृत ठेवावयाची झाल्यास प्रत्येक हिंदमात्रानें टिळकांची देशप्रेमाची शिकवण अंगीं उतरविली पाहिजे, असें लॅन्सबेरी यांनीं सांगितलें. श्री. बाबासाहेब कामत यांनीं प्रसंगोचित भाषण करून शिवाजी व टिळक यांची स्मृति कायमची जागृत ठेवण्याची कां आवश्यकता आहे याचें विवेचन केलें. शिवाजी उत्सवासाठीं टिळक पूर्वी कैदेंत गेले तर आज प्रत्यक्ष राजपुत्रांच्या हस्तें शिवाजीच्या पुतळ्याचें अनावरण होतें हा कालमहिमा होय असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. वंदे मातरम् गीत होऊन सभाविसर्जन झाली.

## नामदार जाधवराव यांच्या

# आक्षेपांस उत्तर

( ले.—ज. स. करंदीकर )

शुद्धि व संघटन या विषयावरील व्याख्यानांत नामदार जाधवराव यांनीं हिंदुधर्मावर व शुद्धिकार्यावर जे आक्षेप घेतले त्यांस वेळेच्या अभावीं तेथेंच उत्तर देतां आलें नाहीं. पण शुद्धिसंघटनेच्या कार्याच्या दृष्टीनें त्यांस उत्तर देणें जरूर असल्यानें त्यांचा विचार करण्यांत येत आहे. हिंदुधर्माला आपण सनातन धर्म म्हणतो व जें शाश्वत टिकण्याजोगें असेल त्यासच सनातन म्हणावें हें खरें आहे. पण 'आचारः प्रथमो धर्मः' या वचनानें हिंदुधर्मांत आचाराचें महत्त्व मानलें असलें तरी आचार म्हणजेच धर्म ही जाधवरावांची कल्पनाच चुकीची आहे. कोणीहि शास्त्रज्ञ आचारालाच धर्म मानीत नाहीं. त्यामुळें आचार बदलतात व कित्येक वेळां जुन्या आचारांचा लोपहि होतो, तेव्हां धर्माचा शाश्वतपणा कोठें राहिला असा जो आक्षेप घेण्यांत आला तो चुकीचा आहे. हिंदुधर्मांत धर्माचीं जीं मूलभूत तत्त्वें आहेत तीं शाश्वत आहेत. तीं अद्याप बदललेलीं नाहींत व पुढेंहि बदलणार नाहींत असा हिंदुधर्मीयांस भरंवसा आहे. ईश्वराचें स्वरूप, जीव व शिव यांचा संबंध, जीवाचें कर्तव्य, विश्वाची उभारणी व संहारणी, मोक्षाचें ध्येय आणि मोक्षाचे मार्ग, पुनर्जन्म व कर्मवाद यांसंबंधीं जीं तत्त्वें हिंदुधर्मांत सांगितलीं आहेत तीं तत्त्वें सत्य म्हणूनच शाश्वत आहेत. तेवढ्याकरितांच या धर्माला सनातन धर्म म्हणतात आणि याच तत्त्वांचा केव्हांहि विजय होणार. मग त्या वेळीं त्या तत्त्वांना हिंदुधर्म हें नांव राहिलेलें असो किंवा कोणतेंहि नांव दिलें जावो.

हीं तत्त्वें मान्य आहेत व त्यांचें सनातनत्वीह कबूल आहे. पण मग हिंदुधर्म आचाराला एवढें प्राधान्य कां देतो असा आक्षेप कोणी घेतल्यास त्यास उत्तर हेंच कीं, धर्माचीं तत्त्वें मनावर ठसून त्याप्रमाणें हातून वर्तन घडण्यास मनाला अभ्यास करावा लागतो. आणि हिंदुधर्मानें सांगितलेले आचार म्हणजे या अभ्यासाच्या पायऱ्या होत. ज्याला उच्च तत्त्वें केवळ शब्दांतच राहावीं असें वाटत नसून तीं कृतींत उतरावीं असें वाटतें त्याला आचारबंधनाचा शिस्त पाळलीच पाहिजे. यास्तव आचार आवश्यक ठरत असल्यानें 'आचारः प्रथमो धर्मः' असें शास्त्रकार सांगतात. पण धर्माचें तें अंतिम साध्य नव्हे.

### एक वेद, एक देव, एक वर्ण

पूर्वी एक वेद, एक देव, एक वर्ण होता असें भारतांतलें वचन सांगण्यांत आलें. पण त्याबरोबरच एका वेदाचे चार वेद व एका वर्णाचे चार वर्ण करावे लागले हेंहि त्याच ग्रंथांतून सांगितलें आहे; पण तें मात्र जाधवरावांनीं आपल्या व्याख्यानांत सांगितलें नाहीं. एका वर्णानें जर व्यवहार चालत असता तर श्रीकृष्णाला 'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं' असें सांगण्याची पाळी कां आली असती आणि ते चार वर्ण जर परस्परांपासून अगदीं पृथक्त्वानें ओळखण्यासारखे नसते. लहरीप्रमाणें घटकेंत ब्राह्मण, घटकेंत वैश्य, घटकेंत, शूद्र असें होतां येत असतें तर त्याच भगवद्गीतेंत वर्णसंकराच्या नांवानें अर्जुनानें एवढी ओरड कां केली असती? जेथें समाजांत एकच वर्ण असतो किंवा चार वर्ण असून त्यांतला कोणताहि वर्ण कोणासहि केव्हांहि स्वीकारतां व टाकतां येतो, अशी जेथें स्थिति असते तेथें वर्णसंकर हा शब्द तरी कसा उद्भवतो व वर्णसंकरामुळें असा कोणता दोष घडूं लागतो याचा खुलासा वर्ण हे जन्म-

सिद्ध ठरत नाहींत असें म्हणणाऱ्यांनीं दिला पाहिजे. वर्णसंकर हा शब्द ज्या वेळेपासून भाषेंत रूढ झाला व वर्णसंकर होणें हें एक अरिष्ट मानलें जाऊं लागलें त्या वेळेपासून तरी वर्ण हे जन्मसिद्ध मानले जात असले पाहिजेत; मग तो काळ कोणत्याहि शतकांतला असो.

पूर्वी अमुक एक स्थिति होती एवढें वचन शोधून काढून म्हणून दाखविल्यानें ती स्थिति श्रेयस्कर ठरते असें कोणीहि मानणार नाहीं. उलट, ज्याअर्थी एके वेळीं रूढ असलेली स्थिति पालटली त्याअर्थी ती श्रेयस्कर नसावी अशी शंका घेण्याला ही एक जागा होते. पूर्वी एक वर्ण होता एवढें म्हटल्यानें आजचे सर्व वर्ण मोडले पाहिजेत असें जर सिद्ध होत असेल तर त्याच विचारसरणीनें पूर्वी नियोगपद्धति समाजांत होती, असें दाखवितांच ती पद्धति पुनः रूढ करावी असेंहि म्हणतां येईल ! त्याचप्रमाणें उद्दालक श्वेतकेतूनें स्त्रियांना एकपतित्वाची अट घालण्यापूर्वीच्या काळांत स्त्रियांना अनेक पती वरतां येत असत असें वचन भारतांतून काढून दाखवून आजहि अनेकपतित्वाचा एखाद्या वावदूकास पुरस्कार करतां येईल ! सारांश, पूर्वी कधीं एके काळीं एक वर्ण असला तरी ज्याअर्थी तो टिकला नाहीं व चातुर्वर्ण्य मी प्रस्थापित केलें असें स्वतः भगवान श्रीकृष्ण सांगतात त्याअर्थी आतां पूर्वीच्या दाखल्याची मातब्बरी काय राहिली? नवीन कायदा झाल्यानंतर पूर्वीच्या रद्द झालेल्या कायद्याचा आधार देणें हा दिशाभूल करण्याचा प्रकार होय.

समाजाची सुव्यवस्था राखण्याचा अधिकार राजाचा आहे खरा. पण राजा परधर्मी असला तर धर्मनियंत्रणाची सत्ता राजाकडून धर्मगुरूकडे सहजच जाते. प्रजेचा धर्म वेगळा व राजाचा धर्म वेगळा अशी आपत्ति आली असतां धर्माची पायमल्ली होते व धार्मिक नियंत्रण निर्बल होतें. ही आपत्ति लक्षांत घेऊन आद्य शंकराचार्यांनीं दूरदृष्टीने धर्माच्या नियंत्रणाचा अधिकार चालविण्याकरितां आचार्यपीठें निर्माण केलीं आणि त्यामुळें राजा कोणत्याहि धर्माचा असला तरी धार्मिक वाद परधर्मीयाच्या दरबारांत निर्णयार्थ न जातां स्वधर्माच्या धर्मगुरूकडे निर्णयार्थ जाऊं लागले. आणि तेवढ्यामुळें मुसलमानांच्या एवढ्या घोर उत्पातांत राजकीय सत्ता समूळ नष्ट झाली असतां हिंदुधर्म टिकून राहूं शकला, याबद्दल हिंदुमात्रानें कृतज्ञ असावयास पाहिजे. त्याच्या ऐवजीं जाधवरावासारखे आक्षेपक या व्यवस्थेची थट्टा करतात याचें सखेदाश्चर्य वाटतें. ज्ञानेश्वर व त्यांचीं भावंडें यांच्या शुद्धतेचा वाद आचार्यपीठाकडे न जातां पैठणच्या ब्राह्मणापुढें मांडण्यांत आला हें खरें. पण त्यावरून मठाचा अधिकार चालत नव्हता असें कसें सिद्ध होतें ? व्यवहाराच्या सोईसाठीं पीठाकडून प्रसिद्ध क्षेत्रांतील ब्राह्मणांना असे अधिकार देण्यांत आलेले असतात. पण ते क्षेत्रस्थ ब्राह्मण पीठाचे प्रतिनिधि म्हणून अधिकार चालवीत असतात.

हल्लींचें शुद्धिसंघटनेचें कार्य हिंदुसभेच्या चालकांकडून इतक्या कसोशीनें, कळकळीनें व स्वार्थत्यागपूर्वक चालविलें जात असून जाधवरावांनीं या चळवळीवर अप्रामाणिकपणाचा शेरा मारावा हें अगदीं अनुचित होय. आर्यसमाजाला मात्र त्यांनीं प्रामाणिकपणाचें सर्टिफिकेट दिलें ! पण मलकाना रजपुतांची आर्यसमाजानें केलेली शुद्धि, ठाणें जिल्ह्यांतल्या ख्रिस्ती कोळ्यांची हिंदु मिशनरी सोसायटीनें केलेली शुद्धि आणि गोडबोले किंवा धाकस या ख्रिस्ती झालेल्यांची हिंदुसभेनें केलेली शुद्धि यांत हेतूंत व परिणामांत कोणता फरक आहे तें जाधवराव तरी सांगूं शकतील काय ? सत्यशोधक समाज एक वेद, एक देव, व एक वर्ण मानतो असें जाधवराव यांनी सांगितलें. पण सत्यसमाजिस्ट कोणत्या वेदाचें कोठें कसें अध्ययन करतात, कोणत्या देवाची कोणत्या प्रकारानें पूजाअर्चा करतात आणि त्यांच्यांत जर एकच वर्ण आहे तर सत्यशोधकांतले मराठे किंवा मराठेतर हे विवाहाच्या वेळीं जातकुळी कडूगोड वगैरे भेदांची चौकशी कां करीत असतात, त्याचा खुलासा व्हावयास पाहिजे. समाजाची शपथ अमुक प्रकारची आहे एवढें सांगितल्यानें हा खुलासा होत नाहीं. त्या शपथेची बजावणी समाजांत कितपत होते तें पाहूनच त्या समाजाचें खरें स्वरूप लोकांकडून ठरविण्यांत येत असतें.

## बौद्ध धर्म

बौद्ध धर्मांत एक वर्ण आणि एक किंवा एकाहूनहि कमी वेद व देव असल्याने बौद्ध धर्म हिंदुधर्मापेक्षां श्रेष्ठ होय असें सांगण्याचा जाधवरावांचा कटाक्ष होता. पण हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा प्रसार झाल्यावरच संन्यासमार्ग बोकाळला आणि भिक्षूर भिक्षुणी व विहार यांचें बंड माजून जनतेत निवृत्तीची छाया पसरत चालली व त्यामुळेंच परकीय लोकांना फावलें असें इतिहास सांगत आहे. मुसलमानांनीं सिंध प्रांत जिंकला तो त्या प्रांतांत बुद्धधर्माचा पूर्ण प्रसार झाल्यामुळेंच जिंकला असें मध्ययुगीन इतिहासकार नानासाहेब वैद्य यांचें मत आहे व तें बरोबर आहे. बौद्ध धर्मांतील अहिंसेच्या अतिरेकामुळेंच मुसलमानांना व्हावा तसा विरोध होऊं शकला नाहीं.

बेळगांवच्या जनतेनें राजे लक्ष्मणराव भोसले यांना दिलेल्या मानपत्रांतून मधलेंच एक वाक्य घेऊन हिंदुमहासभेची सगळी चळवळ याच हेतूनें चालली आहे काय असा जाधवरावांनीं प्रश्न केला! जणुं काय बेळगांवचें एक मानपत्र म्हणजे हिंदुसभेचा स्मृतिग्रंथ आणि त्या स्मृतिग्रंथाला धरून सर्वत्र आचरण व्हावयाचें आहे! बेळगांवच्या नागरिकांना राजेसाहेबांच्या अंगीं जे विशिष्ट गुण दिसले त्यांचें वर्णन त्यांनीं आपल्या मताप्रमाणें केलें त्यांत हिंदुसभेचा संबंध काय ? सत्यशोधक समाजाचे पुढारी प्रत्यक्ष तमाशा घेऊन देवब्राह्मणांची निंदा करून गांवोगांवीं अत्याचारांचें बीज पसरवितात आणि त्या उपदेशास अनुसरून कित्येक ठिकाणीं आड पाडणें, पिकें कापणें, आग लावणें, सक्तीनें जमिनी पड पाडणें असले प्रकार घडत असतात. तरी पण समाजाचे अध्यक्ष ते अत्याचार वैयक्तिक आहेत, समाजाचा व त्याच्या तत्त्वांचा त्या अत्याचारांशीं कांहीं संबंध नाहीं असें म्हणून अलिप्त राहूं पाहातात. पण बेळगांवच्या नागरिकांनीं दिलेल्या एका मानपत्रांतील वाक्यावरून हिंदुमहासभेच्या सगळ्या चळवळीवर ते अप्रामाणिकपणाचा शिक्का मारतात हें कोठलें तर्कशास्त्र ?

'यतो धर्मस्ततो जयः' ही कसोटी उलटी लावून ज्यांचा जय झाला असेल किंवा होत असेल त्यांचा धर्म खरा आणि ज्याअर्थीं हिंदूंचा आज जय कोठेंच दिसत नाहीं त्याअर्थी हिंदुधर्म हा खरा धर्म नव्हे असाहि विचित्र सिद्धान्त जाधवरावांनीं मांडला. जयापजयावरून धर्माची कसोटी ठरवूं लागल्यास प्रत्येक धर्म एकदां खरा आणि एकदां खोटा असें ठरवितां येईल. कारण प्रत्येक धर्माच्या अनुयायांचा जय व पराजय केव्हां ना केव्हां तरी झालेलाच आहे. आणि ज्या वेळेला जर्मनी व इंग्लंड यांसारखीं एकाच धर्माचीं दोन राष्ट्रें झगडतात त्या वेळीं एकाच्या जयावरून तोच ख्रिस्ती धर्म खरा आणि त्याच वेळच्या दुसऱ्याच्या पराजयावरून तोच ख्रिस्ती धर्म खोटा असेंहि ठरूं लागेल! हिंदु लोकांचीं राज्यें गेलीं यावरून त्यांचा धर्म खोटा ठरत नसून त्यांनीं आपला धर्म पाळला नाहीं एवढेंच सिद्ध होतें. सारांश, हिंदुधर्मीयांची आजची स्थिति हलाखीची असली तरी त्यावरून हिंदुधर्मातील सनातन तत्त्वें टाकाऊ ठरत नसून त्यांचें पालन होत नाहीं म्हणून तीं जय देऊं शकत नाहींत एवढेंच सिद्ध होतें. सारांश, जाधवरावांसारख्यांची भावना व विचारसरणी ही कांहीं हिंदुधर्माचें यापुढें तरी चांगलें पालन व रक्षण व्हावें आणि हिंदुधर्मीयांचा सर्वत्र अभ्युदय व्हावा याला अनकूल व पोषक अशी नाहीं. किंबहुना हिंदुधर्मीयांतच सनातन धर्माची हेटाळणी करण्याची असली प्रवृत्ति सुरू झाली आहे म्हणून हिंदूंची स्थिति आज अशी शोचनीय झाली आहे. ती सुधारावयाची असल्यास हिंदुधर्माविषयींचा आदर कसा वाढेल आणि त्यांत चातुर्वर्ण्याची व चारहि आश्रमांची योग्य जोपासना होऊन प्रत्येकजण आपलें कर्तव्य यथाशास्त्र कसें करूं लागेल याविषयीं विचार करण्यांत आला पाहिजे.

# सरकारी संगिनी कशाकरितां ?

" नार्तत्राणाय नः शस्त्रं किन्तु हन्तुमनागसः "
—नवी राजनीति

ईश्वर सुष्टांचें पालन व दुष्टांचें दंडन करण्याकरितां प्रसंग पडेल त्या वेळीं भूतलावर अवतार घेतो. पण या भूतलावर राजांचें नेहमीचें अस्तित्वच याच कार्याकरितां असल्यानें राजांनीं दुष्टांपासून सुष्टांचें रक्षण नेहमींच केलें पाहिजे. किंबहुना या जगांत मात्स्यन्याय बोकाळूं नये म्हणूनच तर राजाची संस्थापना करण्यांत आली. आणि याच कारणास्तव—

दंडयं दंडयते नो यः पापदंडसमन्वितः ।
तस्य राष्ट्रे न संदेहो मात्स्यो न्यायः प्रकीर्तितः ॥

असें वचन दंडय लोकांचें दंडन न करणाऱ्या राजास उद्देशून बार्हस्पत्यनीतींत सांगितलें आहे. मनुस्मृतींतील वचन तर याच्याहून अधिक स्पष्ट आहे. मनु म्हणतोः—

अदंड्यान् दंडयन् राजा दंडयांश्चैवाप्यदंडयन् ।
अयशो महदाप्नोति नरकं चैव गच्छति ॥

अपराधी लोकांना त्यांच्या अपराधाबद्दल शासन न करणें आणि निरपराध्यांचा निष्कारण छळ होणें यासारखें राज्याला बाधक दुसरें कोणतेंहि पाप नाहीं. पण अलीकडे ब्रिटिश सरकारला ही अवदसा आठवूं लागली आहे. इंग्रज सरकारची राजसत्ता या देशांत प्रस्थापित होण्याला तत्पूर्वीच्या राजांच्या वेळीं चालू असलेला पुंडपणाच पुष्कळ अशांनीं कारणीभूत झाला. मुसलमानांच्या राज्यांत असह्य छळ होऊं लागला म्हणून हिंदूंनीं ती सत्ता झुगारून देऊन आपलें स्वराज्य स्थापिलें. पण त्यांतहि कालांतरानें कांहीं दिवटे राज्याधिकारी निपजल्यानें दुष्ट उन्मत्त होऊन सुष्टांचा बेगुमानपणें छळ करूं लागले व त्या छळास त्रासून हिंदी प्रजेनें इंग्लिशांच्या संगिनींचा आश्रय केला. इंग्लिशांनींहि त्या वेळची परिस्थिति लक्षांत घेऊन व आपलें

आसन अढळ करण्याकरितां त्या संगिनी ठग व पेंढारी यांच्यासारख्या लुटारूंचा बंदोबस्त करण्याच्या कामीं योजिल्या व त्यायोगानें पेंढाऱ्यांची पुंडाई नामशेष होऊन प्रजेला एक प्रकारें समाधान वाटलें.व या समाधानाच्या भ्रमांतच आत्म-संरक्षणाचा यत्किंचितहि विचार मनांत न आणतां हिंदी लोकांनीं आपलीं शस्त्रें सरकारच्या स्वाधीन केलीं; आणि सरकारच्या आश्वासनावर विसंबून पर्यायानें त्यांनीं आपली मानहि सरकारच्या हातीं दिली! पण आतां सरकार तें आश्वासन कितपत पाळीत आहे? सरकारच्या संगिनी आतां कोणाचें रक्षण करीत आहेत? साधूंचें परिपालन आणि दुष्टांचें निर्दालन करण्याचें व्रत सरकार इमानेंइतबारें पाळीत आहे काय? असे अनेक प्रश्न सरकारला विचारण्याचे प्रसंग अलीकडे येऊं लागले आहेत. पण त्या प्रश्नांचें समाधानकारक असें उत्तर सरकारला देतां येईल असें वाटत नाहीं.

कोहटच्या दंग्याच्या वेळीं सरकारच्या संगिनी काय करीत होत्या? मोपल्यांच्या बंडाच्या वेळीं तरी सरकारच्या संगिनींनीं दुबळ्या पण राजनिष्ठ प्रजेचें कितीसें संरक्षण होऊं शकलें? सरहद्दीवरच्या पठाणांनीं सरसकट हिंदु लोकांना आपल्या प्रांतांतून लाथ मारून नुकतेंच हांकून लावलें हें धडधडीत पाहात असतां ब्रिटिशांच्या संगिनी स्तब्ध कशा व कां राहिल्या? या व अशाच स्वरूपाच्या कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर एकच द्यावेंसें वाटतें व तें हेंच कीं, इंग्लिश सरकारच्या संगिनी या आतां पूर्वी-सारख्या न्यायगृत्त पण आर्त प्रजाजनांचें पालन करण्याकरितां उन्मार्गवर्ती दंगेखोरांच्या छातीवर रोंखल्या जात नसून, त्या संगिनी दंडेली करणाऱ्या दंगेखोरांचें संरक्षण करण्यासाठीं आणि न्याय मागण्या-करितां पुढें येणाऱ्या पापभीरु लोकांना दटावण्या-साठीं रोंखल्या जात आहेत. तळेगांवास पाहा, सोलापुराकडे नजर फेंका किंवा सुरतेच्या मिरव-णुकीच्या मनाईचें चित्र डोळ्यांपुढें आणा; कोठें झालें तरी माथेफिरू लोकांच्या दंडेलीच्या दटावणीस भिऊन पूर्वापार वहिवाटीनें मान्य केलेले आणि न्यायकोर्टांनीं शाबीत ठरविलेले हिंदु लोकांचें हक्क त्यांना उपभोगूं न देण्याकरितां त्या संगिनींचा उपयोग आजकाल केला जात आहे!

गेल्या मंगळवारीं तळेगांवास घडलेल्या प्रक्षोभ-कारक प्रकाराची सविस्तर हकीकत आजच्या अंकांत आमच्या बातमीदाराकडून जशी आली तशी सविस्तर दुसरीकडे दिली आहे. ती वाचली असतां आम्ही या लेखाच्या प्रारंभीं केलेलें विधान सरका-रच्या धोरणास कसें लागू पडूं लागलें आहे तें वाच-कांच्या लक्षांत स्पष्टपणें येईल. सरकारचें सगळें पोलीसखातें आणि लष्करी खातें व त्यांचीं शस्त्रास्त्रें हीं कशाकरितां आहेत? कायद्यानें वागणाऱ्या व आ-पल्या न्याय्य हक्कांची देखील पुरती बजावणी कर-ण्यास न धजणाऱ्या आणि दुसऱ्या कोणाच्याहि वाटेस चुकून देखील न जाणाऱ्या अशा न्यायनिष्ठ प्रजाजनांच्या हक्कांचें जर सरकारच्या शस्त्रास्त्रांनीं संरक्षण होत नसेल आणि तींच शस्त्रास्त्रें अत्याचारी बदमाषांच्या हट्टांचें कोड पुरविण्याकरितां उपयोगांत येत असतील तर या राज्यांत न्यायाला वास्तव्य करण्याला जागाच राहिली नाहीं असेंच म्हणावें लागेल. आणि आजकाल ठिकठिकाणीं दिसून येणारी परिस्थिति आम्हाला तसें म्हणण्यास भाग पाडीत आहे. पुंडाईची चटक लागलेल्या माथेफिरूंनीं आज येथली मूर्ति भ्रष्ट केली, उद्यां दुसरीकडच्या मिरव-णुकीवर धोंडफेंक केली, परवां हिंदूंच्या देवळांत मांस टाकलें, तेरवां मशिदींतून गोळ्या झाडून विद्यार्थ्यांचे बळी घेतले, आपल्या गांवांतून हिंदूंची सरसकट हाकालपटी केली, हिंदूंच्या लेकी, सुना फुस-लावून नेल्या; अशा अत्यंत संतापजनक व एकाहून एक वरचढ अशा बदमाषगिरीच्या बातम्या नित्य येत असतां पोलिसांच्या पायीं पंधरा कोटि आणि लष्कराच्या पायीं साठ कोटि रुपये खर्च करणारें सरकार या गोष्टींचा बंदोबस्त कसा करीत आहे म्हणून कोणी पृच्छा केल्यास त्याचें उत्तर काय येईल? तळेगांवदाभाड्यास खुद्द सेनापतींच्या घराण्यांतून ज्याची पूजाअर्चा चालत असे अशा देवाची मूर्ति छिन्नविच्छिन्न केली जाते आणि त्या गोष्टीचा अद्याप पत्ता न लागतां आणि एकाहि माथेफिरूला त्याबद्दल प्रायश्चित्त न मिळतां उलट दाभाडेसरकारांनाच मिरवणूक काढण्याची मनाई करण्याकरितां बडे बडे अधिकारी तळेगांवास धांवत जातात. आणि कदाचित् मनाईहुकुमाच्या दटा-वणीपेक्षां धर्मभावना अधिक प्रबळ ठरून सेनापति-साहेब मिरवणूक काढण्याचें मनांत आणतील म्हणून त्यांच्याभोंवतीं अधिकाऱ्यांचा कोट उभा-रला जातो; हें दृश्य खरोखरीच ब्रिटिश सरकारच्या इभ्रतीचें नाव राखूं शकतें की उलट त्याच देखाव्यामुळें सरकारची दानत उलटी फिरली असा जगभर डांगोरा पिटला जातो याचाहि विवेक मतिभ्रष्ट व शीलभ्रष्ट अधिकाऱ्यांना राहिलेला दिसत नाहीं. सोलापूरच्या हिंदूंनाहि गेलीं तीन वर्षें असेंच रडगाणें गाण्याचा प्रसंग येत आहे. आणि असाच प्रकार ज्या ज्या ठिकाणीं हिंदूंच्या मिरवणुकी अधिकाऱ्यांनीं अन्या-यानें बंद पाडल्या त्या त्या ठिकाणीं दिसल्या-खेरीज राहात नाहीं.

पण मुसलमानांच्या संबंधांत याच सरकारी अधिकाऱ्यांची वागणूक सर्वतोपरी कशी उलटी

असते पाहा. कोठल्याहि मुसलमानांनीं कोणत्याहि दिवशीं कसलीहि मिरवणूक काढण्याचें मनांत आणल्यास त्यांना सहसा प्रतिबंध केला जात नाहीं; त्यांच्या मिरवणुकीला जुन्या वहिवाटीचा दाखला विचारला जात नाहीं; अमुकच दिवशीं ही मिरवणूक कां काढण्यांत येते अशाविषयीं विचारपूस केली जात नाहीं; अमक्याच रस्त्यानें ती नेली जाऊं नये असा प्रतिबंधहि करण्यांत येत नाहीं. ते ठरवितील तो दिवस, योजितील तीं साधनें व चालूं लागतील तो रस्ता त्यांना मोकळा असतो. इतकी मुभा मिळाल्यावर त्यांचा उच्छृंखलपणा बेताल कां होणार नाहीं ? व वाटेल त्या ठिकाणीं ते नंगा नाच कां घालणार नाहींत ? मुसलमानांची दंडेली सरकारला कशी अनावर होत चालली आहे हें पाहावयाचें असल्यास कलकत्त्याच्या मार्केटांत सरकारच्या इभ्रतीचें थडगें खणून त्यांत पुरलेल्या वेड्या पिराच्या प्रेताचें एखादें उदाहरण देखील पुरेसें होईल.

पण या सर्वांपेक्षां नुकताच नागपुरास झालेला व अद्यापि पूर्णपणें शांत न झालेला उद्वेगजनक दंगा सरकारच्या हल्लींच्या मनोवृत्तीचें कायमचें स्मारक म्हणून इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखा आहे. आजपर्यंत अत्याचारी मुसलमानांना देखील पुंडाई करण्याला कांहीं तरी तात्कालिक व दृश्य शारण लागत असे. पण नागपुरास दंगा सुरू करण्यापूर्वी मुसलमानांनीं कसल्याहि निमित्ताची अपेक्षा धरली नाहीं. कांहीं माथेफिरूंच्या डोक्यांत दंडेली करण्याचा विचार उद्भवला आणि झाली लगेच दंग्यास सुरुवात. वाद्यांचा वाद उद्भवला नव्हता, मशिदीचें एखादें भिंताडहि तेथें उभें नव्हतें, किंवा मिरवणुकीला कसलीहि अडवणूक नव्हती. असें असतां मुसलमान गुंडांनीं दंग्यास प्रारंभ केला. सापासारखा दुष्ट प्राणी देखील समोर चालला असतां कांहीं तरी धक्का लागल्याशिवाय मागें उलटून चावा घेत नाहीं. पण नागपूरच्या या दंगेखोरांना मिरवणुकींतून परत उलटून उगाच कोणावर तरी लाठी चालविण्याला किंवा गोळीबार करण्यालाकसल्याहि निमित्ताची अपेक्षा भासली नाहीं. अर्थातच ज्याप्रमाणें मदोन्मत्त झालेलें दैत्य आपणच कांहीं तरी कुरापत काढून कलह माजवीत असत त्याप्रमाणें नागपुरास हा कलहाग्नि पेटविण्यांत आला. आणि तो शमविण्यासाठीं सरकारनें मागाहून आपलें सगळें बळ खर्च केलें तरी तीन दिवसां पर्यंत तो शांत झाला नाहीं. अद्यापिहि तो पूर्ण विझला नसून आंतल्या आंत धुमसतच आहे आणि तो पुनः केव्हां पेट घेईल याचा नेम नाहीं. मुसलमानांनीं उकरून काढलेल्या या भांडणांत अनेक निरपराधी माणसांचा अत्यंत क्रूरपणानें वध करण्यांत आला. ज्यांचा दंग्याच्या कारणाशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध येण्याचा संभव नाहीं असे शाळांतील व कॉलेजांतील विद्यार्थीहि दंगेखोरांच्या गोळीबारास बळी पडले आणि कांहीं अल्पवयी मुलांना भोंसकून ठार मारल्याचीहि वदंता आहे.

अशा रीतीनें चेकाळून गेलेल्या मुसलमानांनीं नागपुरास दोनतीन दिवस जो धुमाकूळ घातला त्या वेळच्या त्यांच्या वर्तनावरून ब्रिटिश सरकारच्या इभ्रतीचा दाब त्यांच्या मनावर यत्किंचितहि राहिला नाहीं असेंच अनुमान निघतें. आणि कोहटला असो, पूर्वबंगाल्यांत असो, नागपुरांत असो किंवा सोलापुरांत असो, ज्या ज्या वेळीं मुसलमान बदमाष पुंडपणाचें प्रदर्शन सुरू करतात त्या त्या वेळीं जणुं काय या देशांत ब्रिटिश सरकारचें अस्तित्वच नाहीं असेंच त्यांच्या मनानें घेतलें असावें असें दिसतें. आणि त्यांची अशी ही समजूत होण्याला सरकारचें विपरीत वर्तनच कारणीभूत झालें आहे. सरकारनेंच त्यांना डोकीवर घेऊन शिरजोर बनविल्यामुळें आतां ते सरकारच्याच डोक्यावर मिऱ्यें वाटूं लागल्यास त्यांत नवल तें काय ? कोठेंहि कसलीहि उद्दामपणाची मागणी करून हिंदूंच्याकडून नकार येतांच लाठाळपणा सुरू करण्याला ते यत्किंचितहि डरत नाहींत. याला कारण सरकारच्या संगिनी त्यांच्या प्रतिबंधाकरितां नसून हिंदूंच्या न्याय्य व परंपरागत हक्कांना प्रतिबंध करण्यासाठींच आहेत अशी त्यांची समजूत झालेली दिसते. आणि तशी त्यांची समजूत होण्याला नोकरशाहीचा अम्यायच कारणीभूत होत आहे. तळेगांवच्या दाभाड्यांच्या गणपतीचें विसर्जन सरकारनें संगिनी रोंखून कसें बंद पाडलें हें दृश्य पाहिल्यानंतर आधींच गुर्मीत असलेला मुसलमानी समाज अधिकच शेफारून जाईल हें न सांगतांहि समंजस माणसास समजणार आहे. पण मग शहाण्यासुर्त्या व चाणाक्ष सरकारी अधिकाऱ्यांच्या लक्षांत ही गोष्ट कशी येत नाहीं ? आपणच निर्माण केलेला आणि भलताच वर देऊन प्रबल करून ठेवलेला भस्मासुर केव्हां तरी एकदां आपल्याच डोक्यावर हात ठेवण्यास उद्युक्त होईल हें न समजण्याइतके ते खास भोळे नाहींत. परंतु स्वार्थाच्या आणि अहंपणाच्या मनोवृत्तींत गुरफटून गेल्यामुळें ब्रिटिश मुत्सद्द्यांचें मन गोंधळून गेलेलें दिसतें.

स्वराज्याचा भावी हप्ता देण्याचें टाळण्याकरितां सरकारच्या मध्यस्थीशिवाय हिंदू-मुसलमानांचे तंटे बंद पडणार नाहींत असें सरकारला हिंदी लोकांच्या मनावर ठसवावयाचें आहे. याकरितांच असल्या दंग्यांची सांथ पसरणें स्वार्थी नोकरशाहीला

इष्ट वाटत असावें आणि अहंपणामुळें तिला असेंहि वाटत असेल कीं, सर्कशीचा मॅनेजर जसा वाघास खेळवितो त्याप्रमाणें आपण या दंगेखोरांना खेळवूं आणि आपला खेळ मनाजोगा वठतांच पुनः त्यांना आपण आवरून पिंजऱ्यांत कोंडून टाकूं. परंतु दुसऱ्यांस भेडसावण्याकरितां मोकळा सोडलेला वाघ केव्हांना केव्हां तरी आपल्या मालकावरहि उलटण्याचा संभव आहे ही गोष्ट मदांध अधिकाऱ्यांच्या आज लक्षांत येत नाहीं. याकरितांच ठिकठिकाणच्या दंग्यांचा खेळ ते आज अदूरदृष्टीमुळें कौतुकानें न्याहाळीत बसले आहेत. आणि प्रतिक्षणीं त्यांना अशी अपेक्षा वाटत आहे कीं, आतां हिंदू व मुसलमान हे दोघेहि, किंवा निदान त्रस्त झालेले हिंदू तरी, लाचार होऊन आपणाकडे मध्यस्थीची याचना करण्याकरितां येतील. आणि मग त्यांस "पाहा बुवा, स्वराज्याचे अधिकार तुमच्या हातीं दिल्यास तुम्हास आत्मसंरक्षणहि करतां येणार नाहीं; याकरितां तुम्ही स्वराज्याची हांव सोडून द्या आणि आम्ही जेवढीं चारदोन खातीं तुमच्या स्वाधीन करूं तेवढीं घेऊन आमच्याशीं कृतज्ञतेनें व संतुष्टवृत्तीनें वागा;" असला मानभावी उपदेश करून त्यांस स्वराज्याच्या मागणीचा आग्रह सोडून देण्यास लावतां येईल. व्हाइसरॉयांच्या सगळ्या भाषणाचा रोख याच स्वरूपाचा होता. आणि आपण असलें भाषण करतांच हिंदू व मुसलमान पुढारी आपल्याकडे मध्यस्थी करा, मध्यस्थी करा म्हणून धांव घेतील अशी त्यांस मोठी आशा वाटून राहिली असावी. पण पुढाऱ्यांनी आपापसांतच वाटाघाट चालविली, जनतेला उद्देशून जाहीर पत्रक काढलें आणि आपणच तडजोडीनें हा वाद मिटवूं असा त्यांना अद्यापि भरंवसा वाटत आहे असें त्यांच्या कृतीवरून दिसूं लागलें. पुढाऱ्यांचा हा आत्मविश्वास नोकरशाहीला कसा खपावा? अर्थातच तो आत्मविश्वास नाहींसा करून टाकण्याला पुनः कोठें तरी कलहाग्नि पेटला पाहिजे असें नोकरशाहीस वाटणें स्वाभाविक आहे. नोकरशाहीच्या अशा मनःस्थितींत नागपूरचा दंगा उद्भवला ही गोष्ट तिला इष्टापत्तीच वाटली असावी असें कोणी मानल्यास तें चुकीचें ठरेल असें वाटत नाहीं. त्यांतूनहि मध्यप्रांताचे धोरणी गव्हर्नर रजेवर गेलेले असून त्यांच्या जागीं अभिनिविष्ट असे अधिकारी तात्पुरता अधिकार गाजवीत असल्यामुळें त्यांच्याकडून दंग्याचा उपशम ताबडतोब होऊं शकला नसावा.

तें कसेंहि असो. हिंदू-मुसलमानांच्या दंग्यांत सरकारचें धरसोडीचें वर्तन अखेरीस सरकारलाच बाधक होणार असलें तरी आजमितीला तरी सरकार हिंदूंच्या न्याय्य हक्कांचें देखील संरक्षण करण्याला आपल्या शक्तीचा व संगिनींचा उपयोग करूं इच्छित नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. अर्थातच अशा परिस्थितींत हिंदूंनीं संघटन करून आत्मसंरक्षण करावें आणि जेथें जेथें मुसलमानांची दंडेली दिसेल तेथें तेथें त्यांजवर बहिष्कार टाकावा हाच एक स्वावलंबनाचा, स्वाभिमानाचा व खात्रीनें यशस्वी होणारा मार्ग दिसतो. संगमनेरच्या दंग्याच्या वेळींच आम्ही हा उपाय सुचविला होता. त्याचा अवलंब तळेगांवच्या लोकांनीं केला आहे ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे. इतरत्रहि याच स्वाभिमानाच्या मार्गाचें अवलंबन झालें तरच हिंदु समाजाचा बचाव होईल. नाहीं तर आज स्वधर्माचरणहि अशक्य आणि उद्यां स्वराज्यप्राप्तीहि अशक्य अशी स्थिति होईल. यास्तव सरकारची बदललेली दानत लक्षांत घेऊन हिंदूंनीं आत्मसंरक्षणास उद्युक्त व्हावें.

# पुस्तकपरीक्षण

## ' छन्दोरचना '

रविकिरणमंडळ, पुणें, याचे एक सभासद माधवराव पटवर्धन, एम. ए. ह्यांचा 'छन्दोरचना' हा नवा ग्रंथ पुणें येथील 'आर्यसंस्कृति मुद्रणालया'नें नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यांत पटवर्धन यांनीं पूर्वी अन्य ठिकाणीं प्रसिद्ध केलेले कांहीं निबंध पुनः छापलेले असून कांहीं भाग नवा लिहून घातलेला आहे. या विषयावर स्वतंत्र नवें पुस्तक एकदमच लिहावयास बसल्यानें जशी एकसूत्रता आली असती तशी पूर्वी लिहिलेले निबंध एकत्र केल्यानें आलेली नाहीं. तथापि 'कांहीं साहित्यविषयक विचार' असें ह्या ग्रंथाचें संग्राहक नांव मानिलें असतां वरील उणीव भासत नाहीं. छन्दःशास्त्रावर आजपर्यंत गोडबोले, चिपळूणकर, राजवाडे, रद्दी, जोशी इत्यादिकांनीं लिहिलेल्या सर्व ग्रंथांचा परामर्ष घेऊन हें पुस्तक लिहिलेलें आहे. परंतु तें केवळ अनुवादात्मक नसून त्यांत विचारस्वातंत्र्य पुष्कळच दिसून येतें. पटवर्धन यांची प्रसिद्धी आतांपर्यंत कवि या नात्याचीच होती. पण ह्लींच्या पुस्तकानें हें निखालस सिद्ध केलें आहे कीं, कवि झाला म्हणजे त्याला चिकित्सक

बुद्धि नसावी किंवा नसते असें नाहीं. एकाच राज्यांत १८ विविध कारखाने असतात किंवा परस्परविरोधी अशीं न्यायदान व मुत्सद्देगिरी हीं खातीं असतात. त्याचप्रमाणें बुद्धिवान मनुष्यांमध्येंहि कवित्व व चिकित्सक बुद्धि यांनीं वास केल्यास खरोखर काय हरकत ? पटवर्धन यांनीं त्या ग्रंथांत चिकित्सक बुद्धि कसून चालविली आहे इतकेंच नव्हे, तर छन्दःशास्त्राचा विषय अत्यन्त परिश्रमपूर्वक तळापासून ढवळून काढला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. गोडबोले चिपळूणकर हे बिचारे जुन्या काळांत म्हणजे फक्त जुन्या कवितेच्या काळात जन्मले; व त्यांनीं संस्कृत, प्राकृत छन्दापलीकडे फारशी मजल मारली नाहीं. आणि राजवाडे यांनीं नवी करामत करून दाखविली असतांहि, पटवर्धन यांनीं त्यांच्यावर ताण केली आहे याचें कारण हेंच कीं, राजवाडे यांनीं पुष्कळसा मनाचाच मामला केला. पण त्यांच्या नेहमींच्या तुच्छताबुद्धीनें आधुनिक कवितासंग्रहाशीं त्यांनीं परिचय केला नव्हता. उलट पटवर्धन यांनीं त्यांना कविता विषयाची अत्यन्त आवड असल्यामुळें, बहुतेक आधुनिक कविता व पद्यसंग्रह यांचा सहानुभूतिपूर्वक व संशोधनपूर्वक अभ्यास केल्याचें उघड दिसतें. म्हणून त्यांचा ग्रन्थ जसा विवेचक तसा सुरसहि झाला आहे. ग्रन्थाच्या नांवाप्रमाणें त्यांत छन्दःशास्त्राचा विशेष विचार करूनहि शिवाय त्यांनीं सातव्या व आठव्या प्रकरणांत, पद्यांतील व्याकरणविशेष व पद्यभाषा हीं जीं दोन प्रकरणें लिहिलीं आहेत तीं तर आमच्या दृष्टीनें फारच मौल्यवान आहेत. आणि त्याच्यायोगानें साहित्यविचाराला सर्वसाधारण रीत्या मार्गदर्शक पद्धतीची विशेष मदत होणार आहे.

## वृत्त, छंद व जाति

प्रथम यमक, गण व अक्षर यांचा विचार करून नंतर त्यांनीं वृत्ताविचार व छन्दोविचार केला असून, स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें छन्द व जाति यांच्या विस्ताराची जी रचना केली ती खरोखरच स्वतंत्र व शास्त्रीय अशी कामगिरी होय. वृत्त, छन्द व जाति असे तीन वेगळे प्रकार त्यांनीं मानले आहेत. परंतु यासंबंधानें आमचें मत असें आहे कीं, हें वर्गीकरण फारसें समर्पक नाहीं. स्वतः त्यांनीं म्हटल्याप्रमाणें ताल हा पद्याला अवश्य आहे असें मानलें असतां ह्या तिहींनाहि एकच नांव व कदाचित् वृत्त हेंच नांव पुरेल असें वाटतें.

कोणताहि एक ताल घेतला असतां त्याला अनुसरून पद्यकार स्वतःकरितां एक ठराविक किंवा नवा स्वतंत्र सांचा बनवितो. आणि तो सांचा अक्षरगणयुक्त किंवा मात्रागणयुक्त अशा शब्दसमूहानें भरून काढतो. ज्याला ताल नाहीं अशा पद्याचा विचार पटवर्धन यांना कर्तव्य आहे असें दिसत नाहीं. पण तालात्मक अशा पद्यांचा त्यांना विचार करावयाचा आहे असें म्हटलें तर मग कोणताहि सांचा हें एक वृत्त असें मानलें म्हणजे कार्यभाग होईल. पद्यांत किती चरण असावेत, किंवा धृपद व अंत्रा मिळून त्याचे किती व कसे तुकडे पाडावेत, हें पद्यकारांच्या इच्छेवर अवलंबून राहील. मात्र गृहीत केलेल्या तालाला अनुसरून एक किंवा अनेक आवर्तनांनीं सम साधली म्हणजे झालें. समावर्तन साधलें म्हणजे मग त्या समेंत बसणारा सर्व शब्दसमूह मिळून एक संपूर्ण सांचा, किंवा पद्यकोटींतील अणु किंवा इंग्रजींत ज्याला यूनिट (unit) म्हणतात तो तयार होतो. मग फरक राहिला तो फार थोडा. फक्त अक्षरगणांचें बंधन किंवा मात्रागणांचें बंधन कवि स्वतःला घालून घेतो इतकाच विचार उरतो. आणि तोहि पद्यकाराच्या इच्छेवरच अवलंबून राहील. अर्धी किंवा दिडकी अक्षरें जोंपर्यंत मान्य झालेलीं नाहींत व जोंपर्यंत अशा अक्षरांना वेगळ्या खुणा मिळालेल्या नाहींत, तोंपर्यंत अक्षर म्हटलें कीं, ऱ्हस्व किंवा दीर्घ असेल तसेंच उच्चारिलें किंवा लिहिलें पाहिजे हा निर्बंध टळत नाहीं. आणि हा निर्बंध राहील तोंपर्यंत ऱ्हस्व अक्षरांचा उच्चार सोईकरितां दीर्घ व दीर्घाचा ऱ्हस्व केला तरी ती चूकच मानली पाहिजे. मग ती चूक विद्वानहि करो. चुकीला चूक म्हणूनच तिचा निर्देश केला पाहिजे. जुन्या गद्यांत किंवा नवीन कवितेंतहि अशा सवलती पद्यकार घेत आले आहेत. म्हणून त्या चुकारूपी अपवादांना नियमांचें स्वरूप देणें बरोबर होणार नाहीं. लघु किंवा गुरु अक्षरें हीं जशीं लिहिलीं जातात तसाच त्यांचा उच्चार करणें हें शुद्ध व विहित मानलें तर अक्षरगण किंवा मात्रागण यांच्याशिवाय तिसरा गण संभवत नाहीं. आणि या दोन गणांपैकीं, कोणताहि स्वीकारून, कोणत्याहि एका स्वीकृत तालांत समेपासून समेपर्यंत जो पद्यात्मक शब्दप्रबंध केला तें वृत्त असें म्हटल्यानें कार्यभाग होऊं शकतो. तथापि आधुनिक कवितांना जाति या सदराखालीं घालून त्यांचेहि सनियम सनिर्बंध असे सांचे बनवितां यतात. ही जी नवीन दृष्टि पटवर्धन यांनीं वाचकांना दिली ती अभिनंदनीय होय.

जातिविस्तार प्रकरणांत निरनिराळीं पदें घेऊन किंवा निरनिराळे आधुनिक पद्यप्रबंध व नाटकांतील वगैरे पदें घेऊन त्यांना मात्रांच्या संख्येनें नियमबद्धता आणलेली असते. निरनिराळ्या चालींचीं पद्यें किंवा पदें घेतलीं असतां, त्यांचा थोड्याफार फरकानें विनिमय होण्याजोगा असतो. विविधांमध्यें साम्य

हुडकून काढतां येतें व एकाचें रूपांतर फार थोड्या फरकानें दुसऱ्यांत करतां येतें, हें उदाहरणें घेऊन दाखविण्याचा पटवर्धन यांनीं जो प्रयत्न केला आहे तो विशेष अभिनंदनीय होय व त्यांत त्यांची चौकसबुद्धि विशेष दिसून येते. पुष्कळ वेळां तितक्याच गणसंख्येचीं पद्यें असतांहि केवळ चाल वेगळी म्हणून वेगळीं वाटतात. पण चाल ह्या शब्दांत नुसता ताल नसून संगीत स्वररचनादि असते यामुळें वेगळेपणा दिसतो. पण तो खरा नव्हे. एकच अभंग निरनिराळ्या रागांत म्हटला असतां तीं निरनिराळीं वृत्तें असल्याचा चुकून भास होतो. पण तो आभासच असतो. मात्र रागदारीच्या म्हणण्यांत आलापाची भर पडल्यानें मात्रांची संख्या बदलते तेथें मात्र तो सांचा किंवा तें वृत्त खरोखरच वेगळें ठरतें. पण पद्यरचना करतांना पद्यकार कोणत्याहि एका रागदारींत आपल्याशीं गुणगुणत असला तरी, तें पद्य हा विशिष्ट मात्रागणसंख्येचा किंवा अक्षरगणसंख्येचा एक संपूर्ण सांचा किंवा यूनिट (unit) होय इतकीच प्रतीति अपरिचित वाचकाला होते. पटवर्धन यांच्या विवेचनांतून इतकाच बोध घ्यावयाचा कीं, पद्यकाराला आपल्या इच्छेप्रमाणें किंवा आवडीप्रमाणें किंवा सोईप्रमाणें, वाटेल तो सांचा घेऊन त्याला त्यांत पद्य बसवितां येईल, मात्र त्यानें स्वीकारलेलें गणबंधन बरोबर पाळलें पाहिजे. मग म्हणणारा तें कोणत्याहि रागांत म्हणो.

या नवीन हुडकून काढलेल्या जातींना नांवें हवींत म्हणून पटवर्धनांनीं तीं प्रचलित पद्यांतील प्रमुख शब्दांचीं नांवें घेऊन एक नवीनच वृत्तमाला तयार केली आहे. पण हा प्रयत्न पुष्कळसा फुकट जाईल असें आम्हाला कष्टानें म्हणावें लागतें. कारण पटवर्धनांनीं उदाहरणाकरितां कविता घेतल्या त्या सर्व आधीं लोकांच्या तोंडीं आहेतच असें नाहीं. यामुळें वृत्तदर्पणांतल्या थोड्याशा कविता पाठ करून वृत्तांचीं नांवें व चाली हीं जशीं ध्यानांत राहतात तशीं पटवर्धन यांना बनविलेलीं वृत्तें किंवा जाती लक्षांत राहतील असें वाटत नाहीं. जुन्या वृत्तकारांनीं इच्छेला येतील तींच नांवें दिलीं आहेत. त्या दृष्टीनें पाहतां पटवर्धनांनीं नवीन वृत्तें हुडकून दाखवून दिल्यावर त्यांनींहि आपल्या आवडीचीं नांवें का देऊं नये ? पण फिरून असें म्हणावेसें वाटतें कीं, या सर्व प्रयत्नापेक्षां, तालांचीं मूलतत्त्वें (व तींहि फार थोडीं आहेत) तीं समजावून देण्याचा प्रयत्न कोणी तालज्ञानें केला आणि तीं समजून घेण्याचे परिश्रम पद्यकारांनीं केले तर, पटवर्धनांचीं जातिनामें लक्षांत ठेवण्यापेक्षां आपलीं आपणच तालाचीं कोष्टकें मांडून पद्यकारांनीं पद्यें रचल्यास त्यांचें काम अधिक सुलभ होईल. व पद्य म्हटलें कीं तें तालांत बसलें पाहिजे हा जो निर्बंध तोहि आपोआप पाळतां येईल.

## माझा भरत देखिला काय ?

पटवर्धनांच्या हौशी सृष्टिनिर्मितीनें कसे प्रकार घडतात हें दोनतीन उदाहरणांवरून कळून येईल. ‘माझा भरत देखिला काय-कुणि तरि साङ्गा हो’ हें पद आणि त्याची चाल प्रसिद्ध आहे. आणि लघु गुरु हे भेद समजणाराला त्याचें ध्रुपद व अंत्रा मिळून किती मात्रांचा सांचा तयार होतो हें सहज ठरवितां येईल. या पदाच्या ‘जाती’ला पटवर्धनांनीं ‘भरत’ हें नांव दिलें आहे. पण ही जाति कशी सिद्ध होते तें पाहा. “उपचंद्रकान्ताच्या परंतु साधारणतः दीर्घस्वराङ्कित संवृत अक्षरान्त अशा तीन पडिक व चौथी उपचंद्रकान्त मिळून कडवें होतें. ध्रुपद उपचन्द्रकान्त व विचन्द्रकान्त मिळून होतें.” (पृष्ठ १८६). आतां हें वर्णन कोणाला कसें समजणार, व कोण किती लक्षांत ठेवणार? त्याच्या ऐवजीं ‘माझा भरत देखिला काय, कुणि तरि सांगा हो’ हें पद दोनतीन वेळां ऐकणारालाहि, मात्रा वगैरेचा प्रपंच न कळला तरी तें लक्षांत ठेवतां येईल, व त्याबरहुकूम पद्यरचना करतां येईल व त्यांतल्या मात्रा मांडून घेतल्या तर कामच झालें. दुसरें उदाहरण ‘मुद्रिका’ ही ‘जाति’ बायकांच्या तोंडांतील ‘मुद्रिका’ या गाण्यावरून पटवर्धनांनीं घेतली आहे. पण त्याचा खुलासा पटवर्धनांच्या भाषेनें असा आहे कीं, “मञ्जरी, उद्धव आणि प्रविसूर्यकान्त या तीन पंक्ती मिळून ही जाति होते. दुसरी व तिसरी पंक्ती मिळून एक समजून एका रेषेंत लिहितात तसें समजल्यास ती जोड पंक्ति द्वितीय पद्यांत द्विमात्रिक विराम असलेली प्रसूर्यकान्त मात्रावलि होईल.” (पृष्ठ १८८).

तिसरें उदाहरणः—‘कृतान्तपुरुषा असा होशी निष्ठुर तूं बा कसा’ ही होय. ही पुष्कळांच्या तोंडीं असेल. पण ह्या जाती’चें पटवर्धनांचें नांव ‘मनी’ कां तर “गणी आणि अवगुणी अशी ही। द्वाड आमुची। मनी” अशी एक ओळ ‘अज्ञातनाद’ नामक पद्यसंग्रहांत यांना आढळली आहे. पण सामान्यतः ह्या ‘मनी-’पेक्षां हा ‘कृतान्तपुरुष’ च लोकांच्या अधिक परिचयाचा असतो; म्हणून ह्या जातीला ‘कृतान्त’ हें नांव दिलें असतें तर अधिक बरें झालें नसतें काय ? बरें, ह्या साध्याभोळ्या मनीचें वर्णन किती बिकट आहे पाहा “पादाकुलकाच्या दोन व तीन पंक्ती आणि सूर्यकान्त व सूर्यकला वा विसूर्यकान्त मिळून ही जाति सिद्ध होते.” निरनिराळ्या जातींमध्यें विनिमय कसा होऊं शकेल व त्यांत मूलभूत सारखेपणा कसा असतो हें दाखविण्याच्या

शास्त्रीय दृष्टीनेंच हा सर्व अपरिचित व्याख्यांचा प्रपंच पटवर्धनांनीं केला आहे ही गोष्ट कोणीहि कबूल करील. पण या चर्चेपासून विधायक असें साहाय्य फारसें कोणास होणार नाहीं इतकीच आमची तक्रार आहे. । नवीन शास्त्र शिकावयाचें झालें तर त्यांतील पारिभाषिक शब्द तरी होतां होईतों सोपे परिचित असावेत असा नियम आहे. पण सिद्धान्त नवा आणि परिभाषाहि सगळीच्या सगळी अपरिचित व नवसंघटित असें झाल्यास बोध कसा व्हावा ? खेंचराची जाती माहीत नसणाराला "घोडा व गाढव मिळून खेंचर बनतें" असें सांगितलें तर कांहीं तरी कळेल. कारण त्याला खेंचराची कल्पना नसली तरी गाढव व घोडा यांच्या स्वरूपाचीच असते. पण पटवर्धनांच्या या विवेचनांत् मूळ घटकहि अपरिचित.

असो. टीकास्पद हा विषय इतकाच सोडूं देऊं. परंतु यानंतर 'पद्याची भाषा' व 'पद्यांतील व्याकरणविशेष' या दोन प्रकरणांत पटवर्धन यांनीं जे नियम किंवा सिद्धान्त दिले आहेत ते आम्हाला एकंदरीनें फारच पसंत वाटतात हें आम्ही मोठ्या आनंदानें नमूद करतों. या प्रकरणांतील चर्चा फारच मार्मिक झालेली आहे. संस्कृत शब्द पद्यकारांनीं कितपत व कसे वापरावेत, मराठी भाषेंतील जुन्या शब्दभांडाराचें मूल्य पुष्कळ असतां त्याची आपण हयगय किती करतों, परभाषेंतील शब्द कोठपर्यंत टाळावेत व कोठपर्यंत घ्यावेत, याविषयीं पटवर्धन यांचें विवेचन फारच समर्पक आहे. ते स्वतः आपल्या कवितेंत उर्दू, पर्शियन वगैरे शब्द फार घालतात असा त्यांच्यावर आक्षेप आहे. तो खरा असला तरी निदान त्यांचें 'श्रेयस' हें त्यांच्या 'प्रेयसा'हून वेगळें आहे ह्यांत शंका नाहीं. पृष्ठ २१७-१८ यावर भाऊसाहेबांच्या बखरींतील एक उतारा देऊन त्यांतील अनेक परकी शब्दांऐवजीं संस्कृत किंवा मराठी शब्द घातले तरी हानि कशी होत नाहीं हें त्यांनीं दाखविलें याबद्दल सावरकरांप्रमाणें आम्हीहि त्यांचे आभारी आहों. पण याहिपुढें जाऊन पृष्ठ २१८ च्या शेवटीं जीं ५-७ वाक्यें लिहिलीं आहेत तीं आम्हाला फारच आवडलीं. तो उतारा नसून तीं त्यांचीं स्वतःचीं वाक्यें आहेत आणि पटवर्धन हे इच्छा असल्यास फारसी शब्द वगळून व जुने मराठी शब्द घालून उत्कृष्ट गद्य कसे लिहूं शकतात याचा तो एक उत्तम मासला म्हणून देण्यासारखा आहे. यावनी शब्दांमधील दांडगेपणाच्या अर्थाचा सहवास आमच्या फार दिवसांच्या परिचयाचा झाल्यामुळें केवळ यावनी शब्दाबाहेर आवेश नाहीं अशी आमची समजूत होऊन गेली. पण ही चूक आहे. आवेश हा शब्द—स्वरूपापेक्षां शब्दार्थांत अधिक असतो आणि अर्थाच्या दृष्टीनें संस्कृत किंवा मराठी भाषेंतील शब्द कमी आवेशयुक्त नाहींत. फक्त ते आवेशाच्या अर्थानें ऐकण्याची आपली संवय गेली इतकाच त्याचा अर्थ. पार्शियन शब्दांच्या या कोशकारांनीं, यावनी शब्दांची रेलचेल आपल्या कवितेंत करणाऱ्या या कवीनें मराठी भाषेला दिलेली ही थोरवी विशेष अभिनंदनीय होय. पटवर्धनांच्या ग्रन्थांत विनोदाला एरवीं जागा नव्हती. पण आपल्या पार्शियन भाषेच्या ज्ञानामुळें राजवाड्यांच्या ज्या चुका त्यांनीं पृष्ठ २०० वर दाखवून दिल्या आहेत त्या वाचल्या म्हणजे फार मौज वाटते.

एका वाक्यांत ग्रंथपरामर्ष करावयाचा तर आम्ही असें म्हणूं कीं, साहित्यशास्त्रासंबंधानें मराठींत जे कांहीं ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत या ग्रंथानें मौल्यवान भर घातलेली असून, विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत चालू करण्यासारखें पुस्तक मराठींत नाहीं असें म्हणणाऱ्यांना पटवर्धन यांनीं या ग्रंथानें सक्रिय असें उत्तर दिलें आहे. पटवर्धन यांच्या काव्याप्रमाणें त्यांचे गद्य ग्रंथहि असेच आणखी निर्माण होवोत अशी इच्छा प्रदर्शित करून हें पुस्तकपरीक्षण संपवितों.

# सुरुंगकामाकरितां डायनामिट

( ले.—**जनार्दन सीताराम जोशी,** पोस्ट परशुराम, जि. रत्नागिरी. )

आमचे विहिरीला सुरुंग लावणें पाण्याचा ओलावा येऊन दारू भिजे याकारणानें अशक्य झाल्यामुळें आम्ही डायनामिट काडतुसांचा सुरुंगाकडे उपयोग केला. त्या संबंधांत आलेला अनुभव बऱ्याच लोकांना बोधप्रद व मार्गदर्शक होईल अशा समजुतीनें पुढील माहिति प्रसिद्ध करीत आहें.

परवाना—इलाख्याचे शहरीं कमिशनर ऑफ पोलीस इतर गांवीं डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, जिल्ह्याजिल्ह्यांचे यांजकडून "ई" फॉर्मावर मिळवावा. अर्ज करणें तो एक आण्याचा कोर्ट फी स्टँप लावून करावा. सबंध सुरुंगाकरितां तीन जिन्नस लागतात.

( १ ) डायनामिट किंवा जेलिग्नाइट किंवा जेलाटिन डायनामिट किमान परिमाण पांच रत्तल.

(२) डेटोनेटर्स...किमान परिमाण १०० नग.

(३) सेफ्टी फ्यूज किंवा बत्ती किमान परिमाण २४ फुटी एक एक बंडल.

जिल्ह्यांच्या मॅजिस्ट्रेट कचेरींत कोणत्या फॉर्मावर लायसेन्स द्यावें व डायनामिट म्हणजे काय व

M4107

जेलिग्नाइट किंवा जेलाटिन डायनामिट कशाकरितां अर्जदार मागतो आहे हें समजणें आपल्या देशाच्या सद्यःस्थितींत शक्य नसल्यामुळें दोन किंवा अधिक प्रकारच्या काडतुसांची मागणी करावी. "ई" फॉर्मावर परवाना मिळाला म्हणजे स्फोटक द्रव्यें एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेतां–आणतांना हरघडीं पासपोर्टाची जरूरी लागत नाहीं.

## डायनामिट कोठें मिळतात ?

माझे माहितीप्रमाणें इलाख्यांत कदाचित् दोनतीन प्रांतांपैकीं तरी फक्त एकाच शहरीं व तेथेंहि एकाच दुकानीं हीं स्फोटक द्रव्यें मिळतात. नोबेल्स एक्स्प्लोझिव्हज (Nobel's Explosives) कंपनी लिमिटेड या ग्लासगो येथील कारखान्यांतील माल विकणारी 'धी ॲंग्लो-सयाम कॉर्पोरेशन लिमिटेड' (The Anglo-Siam Corporation Limited) एवर्ट लॅथॅम ब्रँच (Ewart Latham Branch) एवर्ट हाऊस, कोट, मुंबई, या नांवाची पेढी आहे. तिच्या ॲंटॉप हिल (Antop Hill) मॅगॅझिनमधून रेल्वे स्टेशनावर माल रवाना होत असतो, व ज्यांचे गांवाशेजारीं रेल्वे स्टेशन असेल त्यांस बिल चुकतें केल्यावर रेल्वेची रसीद मात्र हातांत मिळते. नुसत्या पेट्याहि पाहण्यास मिळत नाहींत. जी. आय. पी. रेल्वेवर चार्ज माफक पडतो, परंतु सदर्न मराठा रेल्वेवर किमान चार्ज ४० मणांचा (म्हणजे सबंध एका वाघिणीचा) भरावा लागतो. आगबोट कंपन्यांपैकीं कोंकणपट्टीच्या कंपन्या असल्या स्फोटक द्रव्यांची पार्सलें किंवा मालाच्या गठड्याहि नेऊं शकत नाहींत. सदर्न मराठा रेल्वेलगत असणाऱ्या गांवांसहि किमान आकार भारी पडतो म्हणून हा माल जात नाहीं. अशा स्थितींत आजवर शेंकडो लोकांनीं या अडचणीला पाहून डायनामिट लावण्याचा नाद सोडून दिलेला आहे. व या संकटाचा बाऊ मलाहि दाखविण्यांत आला होता. परंतु बॉम्बे गव्हर्मेंटच्या १८ जून सन १९१४ च्या भाग १ ला पृष्ठें १३००–१३५१ यावर इंडियन एक्स्प्लोझिव्हज रूल्स १९१४ त्यांतील नियम नं. ९८ अन्वयें व त्या तारखेनंतर निघालेल्या गव्हर्मेंट रेझोल्यूशन्सचे आधारें अशी एक सवलत ठेवली आहे कीं, ५ पौंड डायनामिट, २०० डेटोनेटर्स व लागेल तितकीं वत्तीचीं बंडलें योग्य प्रकारें काळजी घेतली असतां पॅसेंजर गाडीनें किंवा आगबोटीनें नेण्यास हरकत नाहीं. ह्या सन १९१४ पासून अस्तित्वांत असलेल्या सवलतीची माहिती सदरील एजन्सीदुकानांत पंचवीस वर्षें काम करीत असलेल्या कारकुनास नव्हती. ऑफिसरसाहेबांसहि माहीत नसेल कोणास ठाऊक ! या सवलतीचा फायदा घेणारांस मॅगॅझिनमधून पॅकबंद केलेली पेटी जातीनें मिळूं शकते.

## डायनामिट कसा बाळगावा ?

Explosive Rules 1914 हें पुस्तक सरकारी पुस्तकें विकणाऱ्या ऑफिसराकडून टाऊन हॉल, मुंबई येथें मिळतें. त्यांतील माहितीवरून लोखंडाचा किंवा पोलादाचा स्पर्श होऊं न देतां हा डायनामिट कसा बाळगावा याबद्दल विचारच पडतो. परंतु थोडेसे पौंड जवळ बाळगण्याच्या स्वानुभवावरून व भांडूप येथील एका मोठ्या कारखान्यांत शेंकडो पौंड सांठविणारें मॅगॅझिन् बांधलेलें डोळ्यांनीं पाहिलेलें आहे त्यावरून मॅगॅझिन (कोठार) कसें बांधावें याबद्दल मी सल्ला देऊं शकेन. डायनामिटाचा परवाना घेतांना किती परिमाणाचा (quantity) परवाना घ्यावा हें गूढच पडतें. एजन्सी दुकानांत "How to sink wells with Nobel's Explosives" या नांवाचें एक पत्रकवजा पुस्तक मिळतें. त्यांतील माहिती वाचून माझी तरी 'खर्च फार येणार' अशी समजूत होऊन निराशा झाली. परंतु डायनामिट लावून सुरुंग उडविण्याचें काम प्रत्यक्ष कसें होतें हें पाहाण्याचा माझा दृढसंकल्प असल्यामुळें भांडूप येथील एका कारखान्यांत व कल्याण येथील एका मिशनरीच्या विहिरींत चाललेल्या कामावर जाऊन प्रत्यक्ष उठत असलेलें काम व स्फोटक द्रव्यांबाबतचा खर्च यांचा अंदाज करतां आशेला जागा आहे असें पटलें व गेले २॥ महिने आमचे विहिरीवर काम करून अनुभवानें असें निश्चित सांगतों कीं, साध्या देशी दारूच्या सुरुंगापेक्षां डायनामिट सुरुंग अडीचपट अधिक काम देतात. शिवाय खर्च सवापटीइतकाहि येत नाहीं. यावरून डायनामिट सुरुंग स्वस्तच पडतात हें उघड आहे माझ्या अनुभवाप्रमाणें डायनामिट काडतुसें लागतात. त्यांचें प्रमाणः—अडीच ते तीन फूट सुरुंगास १॥ काडतुसें. "१×३½" तीन ते साडेतीन फुटी सुरुंगास २ काडतुसें "१×३½" सुरुंग सपाट कातळाला लावले असतां वरच्याहून २५ टक्के अधिक.

## इतर माहिती

डायनामिटच्या सुरुंगाचा धडाका फार मोठा असतो, सबब तो लावण्याच्या भानगडींत पडूं नये असा भ्रमाचा समज आहे. बांधलेल्या विहिरींत त्यांचा उपयोग मी करून, इमा-

रतीला धक्का न लागतां ८ फूट खोल कातळ फोडण्याचें काम अनुभवपूर्वक केलें आहे. व त्यापासून पाण्याचे झरे नाहींतसे होतात असा अनुभव माझा नाहीं. तेव्हां अनुभवावर भरंवसा ठेवून खरोखरच अज्ञानी परंतु वाचेनें लांब लांब गप्पा मारणाऱ्यांच्या बातांवर विश्वास वाचकांनीं ठेवूं नये. डायनामिटचें प्रायमरी Primary वरील काडतूस तयार करण्याकरितां रोजीं पांच रुपये किंवा दरमहा शंभर रुपये पगार मागणारा फोरमन नेमण्याची गरज नाहीं. ती विद्या तीन दिवसांत कोणाहि चाणाक्ष व धीट माणसास हस्तगत करतां येईल इतकी सोपी आहे. परतंत्र हिंदुस्थानांत हत्यारांचा ( तसाच स्फोटक द्रव्ये न बाळगण्याचा ) कायदा जारी आहे. अशा स्थितींत इतकी सोपी विद्याहि दुर्मिळ आहे. कोणास या विषयाबाबत माहिती पाहिजे असल्यास प्रत्यक्ष भेटींत अगर उत्तरास तिकीट पाठविल्यास शक्य तितकी पत्रद्वारें मी शक्त्यनुसार देईन.

# बहिष्कार, सत्याग्रह व प्रतिकार

गेलीं चारपाच वर्षे हिंदुस्थानांत हिंदू-मुसलमानांचे दंगे सुरू असले तरी अलीकडे दोनतीन वर्षांतच त्यांच्या ज्वाळा महाराष्ट्रांत विशेष खेळूं लागल्या आहेत. त्यांतूनहि यंदाचे वर्षी या दंग्यास बरेंच उग्र स्वरूप प्राप्त झालें असल्यामुळें त्याचा उपशम कोणत्या उपायांनीं करतां येईल याचा विचार करण्याची जबाबदारी महाराष्ट्रांतील हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांवर येऊन पडली आहे. हिंदु व मुसलमान या दोन समाजांखेरीज सरकाराचाहि संबंध दंग्याशीं असल्याकारणानें सरकारासहि आपणावरील जबाबदारी अंगाबाहेर टाकून चालणार नाहीं. किंबहुना शासनसंस्था या नात्यानें सरकारावरील जबाबदारी सर्वांत प्रमुख होय हेंहि विसरतां कामा नये. परंतु मुसलमान पुढारी व सरकार आपणावरील जबाबदारी ओळखण्यास स्वतंत्र असल्यामुळें आज हिंदु पुढाऱ्यांस अनुलक्षूनच लिहिण्याचें आम्ही योजिलें आहे.

गेल्या चार-पांच वर्षांच्या अनुभवावरून पाहतां सरकार आपल्या प्रजासंरक्षणाच्या कर्तव्यास अलीकडे जागत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांना तर हिंदू-मुसलमानांतील दंगे पाहून आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या असें एका फ्रेंच लेखकानें त्यांची हिंदुस्थानांत असतां भेट घेऊन प्रसिद्ध केलें आहे. नवे व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनाहि अशाच उकळ्या एकांतीं फुटत असतात कीं काय हें आजच सांगतां येत नाहीं. पण याचीहि माहिती ते विलायतेस परत गेल्यानंतर एखादा फ्रेंच अगर अमेरिकन फिरस्ता सांगत सुटेलच. तोंपर्यंत तरी निदान सहानुभूतीचा देखावा त्यांनीं चालविला आहे. पण या सहानुभूतीच्या पोटांतच दंग्यांचें विषारी बीज आहे कीं काय असा संशय देशांतील त्यानंतरच्या रागरंगावरून आल्यावांचून राहात नाहीं. व्हाइसरॉयांनीं सिमल्याच्या शिखरावर उभें राहून जरूर तर मी आपल्या सेवेला हजर आहे, कसेंहि करा पण आपसांतील यादवी मिटवा असा हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांस उपदेश केला.आणि त्याच्या पाठोपाठ थोड्याच अवधींत बरेली,कानपूर, नागपूर, सोलापूर इत्यादि शहरीं हिंदू-मुसलमानांचे दंगे झाले व त्या दंग्यांनीं सिमल्यावरील व्हाइसरॉयाकडे व ऐक्य परिषदेकडे विकट हास्य करून पाहिलें! व्हाइसरॉय दंगे शांत व्हावेत असें म्हणतात व त्याच क्षणीं देशांत दंगे अधिक पेट घेतात हीच ब्रिटिश राज्याची हिंदुस्थानावरील कदर काय ? नागपूर, मध्यप्रांताच्या राजधानीचें शहर, गव्हर्नरांचें निवासस्थान, ब्रिटिश सरकारचें मोठें केंद्र. त्यांत एक हजार मुसलमान मिरवणूक काढतात, हिंदूंस लीलेनें दगड मारतात,गचांड्या देतात,व गोळ्या झाडून हिंदूंस ठार करतात.त्यांच्या मिरवणुकीस पोलिसांचा पास लागत नाहीं, त्यांस पोलीस आडवे येत नाहींत, त्यांच्या हातांतून पोलीस काठ्या काढून घेत नाहींत आणि त्यांच्यापासून पोलीस हिंदूंचें रक्षणहि करीत नाहींत ! शांतता व सुव्यवस्था यांचा तोरा मिरविणाऱ्या सरकारची नागपुरांतील ही शांतता व सुव्यवस्था वाखाणण्यासारखी नाहीं असें कोण म्हणेल? लहरीस येईल तेव्हां क्षणार्धांत जालियांवाला बाग बनविणाऱ्या सरकारास इच्छा असूनहि एक हजार मुसलमानांस कह्यांत ठेवतां आलें नाहीं असेंच हिंदूंनीं समजावयाचें काय ?

नागपूरच्या हत्याकांडाचें भरतवाक्य संपलें नाहीं तोंच सोलापुरास हत्याकांडाची नांदी सुरू झाली. सोलापुरास हिंदूंच्या आषाढी मिरवणुकीवर ता.१०जुलै रोजीं मुसलमानांनीं हल्ला केला होता;तरीदेखील मुसलमानांच्या मोहरम,संदल,गलफ,झेंडा या मिरवणुकींचा मोका येतांच त्यांस सरकारनें मुळींच हरकत घेतली नाहीं. पण उलटपक्षीं गणपति विसर्जनांतील हिंदूंची मिरवणूक येतांच तिलाच काय पण त्यापुढच्या दोन महिन्यांतील साऱ्याच मिरवणुकींस सरकारनें १४४ वें कलम लावून बंदी केली. ही बंदी मुसलमान दंगा

करतील म्हणून झाली म्हणतात ! मुसलमानांच्या मोहरमांत हिंदूंची भीति सरकारास वाटली नाहीं म्हणून मुसलमानांच्या मिरवणुकीच्या हक्कावर सरकारनें गदा आणिली नाहीं. आणि उलट हिंदूंच्या गणपतिविसर्जनांत मुसलमानांची भीति सरकारास वाटली म्हणून हिंदूंच्या मिरवणुकीच्या हक्कावर सरकारानें गदा आणिली ! हिंदु व मुसलमान यांमधील दंगे न मिटतां चिघळतात ते सरकारच्या याच पक्षपाती धोरणामुळें. हिंदूंच्या मिरवणुकीस शांतता व सुव्यवस्था राखण्याचेंच ढोंग करून सरकारनें आडकाठी घातली हें उघड आहे. शांतता व सुव्यवस्था राखणें हें जसें सरकारचें कर्तव्य तसें लोकांच्या हक्कांचें संरक्षण करणें हें कोणाचें कर्तव्य? हक्कसंरक्षणानें देशांत खरी शांतता व सुव्यवस्था नांदेल कीं, हिंदु शांतताप्रिय आहेत म्हणून त्यांजवर मुसलमानांचा जुलूम व सरकारी कायद्यांचाहि जुलूम चालविल्यानें देशांत शांतता नांदल ? हिंदूंच्या मिरवणुकी सरकार बंद पाडतें व मुसलमानांच्या मिरवणुकी सरकार चालू ठेवतें याचा अर्थच असा कीं, हिंदू शांततेनें राहणारे व कायद्यानें चालणारे आहेत व मुसलमान दंगा करणारे व कायदा गुंडाळणारे आहेत हें सरकारास कळून चुकलें आहे. आणि हें जर सरकारास माहीत आहे तर शांतताप्रिय व कायदेशीर हिंदूंचा कोंडमारा करून आणि दंगेखोर व बेकायदेशीर मुसलमानांस मोकाट सोडून देशांत शांतता व सुव्यवस्था नांदेल असेंच सरकारास वाटतें ना ? मुसलमानाची मनोरचनाच अशी आहे कीं, त्याचा धर्माभिमान जागृत झाला असतां तो स्वधर्मवेडा व परधर्मद्वेष्टा बनतो. पण हिंदु लोक मुसलमानांप्रमाणें धर्मवेडे नसले तरी देशाभिमानानें त्यांचा स्वाभिमानहि जागृत केला असल्यानें ते सरकारचा अगर मुसलमानांचा राजकीय अगर धार्मिक जुलूम इतःपर सहन करणार नाहींत. हिंदूंनीं आपले धार्मिक हक्क सोडले, मिरवणुकी बंद ठेवल्या व बधार्थ न्यायाच्या गोमातेचे हंबरडे कठोर अन्तःकरणानें ऐकले तर हिंदु-मुसलमानांतील दंगे थांबण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं असेंहि कित्येक उफराट्या काळजाच्या अधिकाऱ्यांकडून सांगण्यांत येतें ! पण हें दास्य, हा नादानपणा, ही अप्रतिष्ठा पत्करून लाभणारी मुर्दाडपणाची शांतता हिंदूंना नको आणि असलें नामुष्कीचें स्वराज्यहि त्यांना नको. आपले धार्मिक हक्क आणि संस्कृति यांचें ज्या योगानें संरक्षण होईल असेंच जातिवंत स्वराज्य त्यांस हवें आहे व त्याकरितां कितीहि हालअपेष्टा भोगाव्या लागल्या तरी हिंदुलोक आपलें ध्येय सोडणार नाहींत असा स्पष्ट इषारा सरकारास वेळींच देऊन ठेवणें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

तूर्त तरी सरकार मुसलमानांस डोक्यावर घेऊन, नाचत आहे.त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, मुसलमानांचा प्रत्येक हट्ट पुरविल्यावांचून सरकारास गत्यंतर राहिलेलें नाहीं. मुसलमानांची मूळ मागणी नमाज पढण्याचे वेळीं हिंदूंनीं मशिदींवरून वाद्यें वाजवीत जाऊं नये अशी होती. ती मागणी वाढत वाढत मशिदीवरून हिंदूंनीं केव्हांहि वाद्यें वाजवूं नयेत, मशिदीच्या आजूबाजूस असलेल्या घरांतूनहि वाद्यें वाजवूं नयेत, मोहरमच्या दिवसांत साऱ्या गांवात वाद्यें वाजवूं नयेत, मशिदीसमोरून जातांना हिंदूंनीं वाहनांतून खालीं उतरावें व खालीं बसलेल्या हिंदूंनीं ताबुतापुढें उठून उभें राहावें असें मुसलमानांचें फर्मान हिंदूंना सुटत आहे ! अहमदाबादेस हा करन कऱ्याचा वसा नुकताच अनुभवास आला. मशिदीजवळच्या देवळांत एक ब्राह्मण कीर्तन करीत असतां तें त्यास नमाजाच्या वेळीं बंद ठेवण्यास मुसलमानांनीं सांगितलें. ब्राह्मणानें ती वेळ टाळून कीर्तन सुरू ठेवलें तरी मुसलमानांची तक्रार आहेच व तक्रारीच्या पाठोपाठ बडगाहि तयार आहेच. तेव्हां हिंदूंनीं माघार कोठवर व काय म्हणून घ्यावयाची ?

ज्या गांवचे मुसलमान दंगेखोर व तंटेबाज आहेत त्यांस दंगाधोपा व तंटाबखेडा सरकार करूं देतेंच. परंतु ज्या गांवच्या मुसलमानांस हिंदूंशी तंटा करण्याचें अवसान नाहीं त्यांचें विकत श्राद्ध घेऊन सरकारी अधिकारी सव्यापसव्य करीत बसतात. तळेगांवचे मुसलमान आपलें भांडण हिंदूंशीं भांडेनात तेव्हां पुण्याहून कमिशनर व पोलीस सुपरिंटेंडंट यांनीं जाऊन व मुसलमानांचें भांडण भांडून गणपतिविसर्जनास हरकत घेतली. डि. मॅजिस्ट्रेटनें १४४ वें कलम लावून मिरवणुकीस बंदी केली असतां तळेगांवच्या हिंदूंनीं विठोबाची पालखी काढली व सरकार म्हणतें तें गृहीत धरलें तरी पोलिसांनीं बंदोबस्त ठेवला असल्यामुळें मुसलमानांनीं दंगा केला नाहीं हें उघड आहे. मग हाच बंदोबस्त गणपतिविसर्जनाच्या मिरवणुकीस ठेवून सरकारी अधिकाऱ्यांस मिरवणुकीस परवानगी देऊनहि दंगा टाळतां आला नसता काय ? सरकारची फूस, पक्षपात व अन्याय म्हणतात तो हाच. तो हातानें चालू ठेवावयाचा व तोंडानें मात्र शांतीच्या माळेचे मणी ओढावयाचे अशा ढोंगीपणानें का कोठें शांतिदेवी प्रसन्न होत असते ?

सारांश, सांप्रत हिंदूंस दोघांपासून आपला बचाव करून घ्यावयाचा आहे. एक मुसलमानांपासून व दुसरा सरकारी अधिकाऱ्यांपासून. 'फोडा व झोडा' या कुटिल राजनीतीच्या तत्त्वाला अनुसरून सरकारला हिंदू-मुसलमानांतील तंटे मनांतून ह-

वेच असतात आणि सरकारच्या फुसलावणीनें अगर सरकारानें कानाडोळा केल्यामुळें हे तटे चिघळतात हें खरें.पण अशी फूस सरकार हिंदूंना न देतां मुसलमानांसच देतें, यावरून परधर्मीय अशा हिंदु समाजाशीं दंडेलीनें व द्वेषबुद्धीनें वागण्याची मुसलमानांची प्रवृत्ति स्वाभाविक आहे व ती सरकारनें ओळखली आहे हें सिद्ध होतें. दंग्याचा प्रारंभ सरकारच्या फिसालतीनें झाला नाहीं हें मलबारांतील दंग्यावरून व इतर कित्येक ठिकाणच्या दंग्यांवरून दिसून येतें. अशा ठिकाणीं दंग्याची दीक्षा मौलवी व उलेमा यांच्याकडून मुसलमानांस मिळते आणि ती मिळाल्यानंतर नोकरशाही या आयत्याच पेटलेल्या होळीवर आपल्या पोळ्या भाजून घेण्याची संधि सहसा दवडीत नाहीं.तें कसेंहि असलें तरी दंग्याची प्रवृत्ति मुसलमानांत स्वभावतःच असून, नुसत्या नोकरशाहीच्या नांवानेंच बोटें मोडीत न बसतां, हिंदूंनीं मुसलमानांस दंग्याची दुर्बुद्धि पुनः सुचणार नाहीं अशाच उद्योगास आतां लागलें पाहिजे. मुसलमान हिंदूंवर कारणावांचून चालून येतात त्याप्रमाणें उलट हिंदूंनींहि मुसलमानांवर विनाकारण चालून जाऊन अत्याचारास प्रवृत्त व्हावें असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं. त्यांनीं शांततेच्या व सदनशीर मार्गांचाच अवलंब करून मुसलमानांस शुद्धीवर आणिलें पाहिजे. अशा मार्गांतला पहिला उपाय म्हणजे बहिष्कार. हा बहिष्कार घालून व मुसलमानांच्या नित्य व नैमित्तिक व्यवहारांतील नाड्या आंखडून त्यांस रंजीस आणतां येतें असा तळेगांवचा जुना व नवा अनुभव आहे. त्यांच्याशीं सामाजिक व व्यावहारिक संबंध तोडणें जसें जरूर आहे तसेंच त्यांच्या धार्मिक उत्सवापासून व मिरवणुकीपासूनहि हिंदूंनीं अलिप्त राहणें आवश्यक आहे.

सरकार मुसलमानांस फूस देतें याचा अर्थ असा कीं, १४४कलम लावून हिंदूंच्या मिरवणुकीस मात्र सरकार मनाई करतें आणि मुसलमानांपासून हिंदूंचें संरक्षण करण्याचें टाळतें.या बाबतींतहि तळेगांवच्या हिंदूंनीं घालून दिलेला धडा सर्व ठिकाणच्या हिंदूंनीं गिरवून, बेकायदेशीर हुकूम तोडून व सत्याग्रह करून देहदंड सोसण्यास तयार व्हावें हा दुसर उपाय होय. जग शूरास मान देतें व भ्याडास तुच्छ लेखतें हें तत्त्व हिंदूंनीं सदैव हृदयांत बाळगावें. त्याचप्रमाणें आपलें शरीरबल व प्रतिकारशक्ति वाढवून सरकारच्या मदतीवांचून मुसलमानांचे हल्ले संघटनेनें व एकजुटीनें परतविण्यास शिकावें. बहिष्कार, सत्याग्रह व प्रतिकार या तीन मात्रा तीन रोगांवर लागू पडणाऱ्या आहेत. बहिष्कारानें हट्टी मुसलमान ताळ्यावर येतात, हक्काची पायमल्ली करणारे हुकूम सोडणाऱ्या सरकारास सत्याग्रह कर्तव्याचा न्याय्य मार्ग दाखवून देतो व उन्मत्तपणानें हिंदूंच्या अंगावर चालून जाणाऱ्या मुसलमानांस प्रतिकार परतवितो. या करितां स्वतःच्या स्वाधीन असलेल्या या तीन साधनांचा यापुढें प्रसंगानुसार अवलंब करण्यांतच हिंदूंचा तरणोपाय आहे.

# करंदीकरांचें आक्षेपांस उत्तर

( ले.—**भास्करराव जाधव** )

ता. ६ सप्टेंबरच्या केसरीच्या अंकांत 'जाधवराव यांच्या आक्षेपांस उत्तर' या मथळ्याखालीं ज. स. करंदीकर यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत "आचारः प्रथमो धर्मः" या वचनानें हिंदुधर्मांत आचाराचें महत्त्व मानलें असलें तरी आचार म्हणजेच धर्म ही जाधवरावांची कल्पनाच चुकीची आहे. कोणीहि शास्त्रज्ञ आचारालाच धर्म मानीत नाहीं असें करंदीकर म्हणतात. पण कोणत्याहि स्मृतिग्रंथाच्या आचाराध्यायाकडे लक्ष दिलें किंवा हिंदुधर्मरक्षक जो शास्त्रीवर्ग त्यांच्या आचार—व्यवहारप्रायश्चित्तनिर्णयावर नजर टाकली तर आचारांतच धर्म आहे असें दिसून येईल. माझें म्हणणें आचार म्हणजेच धर्म असूं नये असें असतांहि त्याउलट मत माझ्या गळ्यांत बांधण्यांत आलें आहे याचें मला मोठें आश्चर्य वाटतें.

पूर्वी एक वेद व एक वर्ण होता; पण पुढें एका वेदाचे चार वेद, एका वर्णाचे चार वर्ण कां करावे लागले हें मात्र जाधवरावांनीं आपल्या व्याख्यानांत सांगितलें नाहीं असा आक्षेप आहे. एका वेदाचे चार भाग अध्ययनाच्या सोयीसाठीं केले असले तरी तेवढ्यावरून एका ब्राह्मण वर्णाचे ऋग्वेदी, यजुर्वेदी, सामवेदी, अथर्ववेदी या जाती झाल्या व परस्परांत बेटीव्यवहार बंद पडला हें मी दाखविलें होतें. एका ग्रंथाचे चार भाग पडल्यावर एकेका भागाचा अभिमान धरण्यांत व पुढें त्या अभिमानाचा दुष्परिणाम म्हणजे इतराबरोबर व्यवहार बंद करणें ही चूक झाली आहे. यास उपाय म्हणजे वेद एक आहे व एकेका भागाचा अभिमान धरणें चुकीचें आहे अशी लोकांची खात्री पटविली पाहिजे. एका वर्णाचे चार वर्ण जरी श्रमविभागाच्या तत्त्वावर झाले असले तरी 'शूद्रो ब्राह्मणतां याति ब्राह्मणो याति शूद्रताम्' या मनुवचनाप्रमाणें

सर्वांचाच हंस हा वर्ण आहे ही भावना कायम करणें संघटनेच्या दृष्टीनें जरूर आहे. वर्णसंकर चा बागुलबुवा पुढें करून करंदीकर भगवद्गीतेच्या आधारानें जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य व जातिभेद सिद्ध करूं पाहात आहेत, त्यास उत्तर ता. ८ सप्टेंबरच्या ज्ञानप्रकाशांत एका वाचकानें दिलेलें आहेच म्हणून पुनः चर्वितचर्वण करण्यास नको.

"राजा परधर्मी असेल तर धर्मनियंत्रणाची सत्ता राजाकडून धर्मगुरूकडे सहजच जाते. प्रजेचा धर्म वेगळा व राजाचा धर्म वेगळा अशी आपत्ति आली असतां धर्माची पायमल्ली होते व धार्मिक नियंत्रण निर्बल होतें. ही आपत्ति लक्षांत घेऊन आद्य शंकराचार्यांनी दूरदृष्टीनें धर्माच्या नियंत्रणाचा अधिकार चालविण्याकरितां आचार्यपीठें निर्माण केलीं" वगैरे करंदीकरांचीं विधानें निवळ भ्रम उत्पन्न करणारीं आहेत. पण याबद्दल जास्त विस्तार करण्याचें हें स्थल नव्हे. हिंदुधर्माला एक गुरु नाहीं. पंथभेदानें अनेक गुरु झाले आहेत. शंकराचार्यांचा अधिकार माध्व, रामानुज, वल्लभ पंथाचे लोक मुळींच मानीत नाहींत. गौड सारस्वतांचे गुरु वेगळेचआहेत. हिंदूंतील लिंगायतवर्ग शंकराचार्यांचा अधिकार झुगारून देणारा आहे. इतर ब्राह्मणेतर सध्याच्या शंकराचार्यांची कितीशी पर्वा करतात हें महशूर आहे. अशा प्रसंगीं शंकराचार्यांच्या जोरावर हिंदुसंघटन करूं पाहिल्यास विघटनच होणार आहे. शंकराचार्यांचे पीठास धार्मिक बाबतींत मुळींच अधिकार नव्हते व नाहींत. त्यांनीं फक्त अद्वैतमताचा उपदेश व शिक्षण द्यावें इतकेंच त्यांचें काम. 'मठच्छात्रादिनिलयः!' धर्मासंबंधीं अधिकार या मठाकडे नाहीं. क्षेत्रस्थ ब्राह्मण पीठाचे प्रतिनिधि म्हणून अधिकार चालवीत असतात असें करंदीकर म्हणतात. पण यास पुरावा देणें कठीण पडेल. याचे उलट पुरावा मात्र भरपूर आहे.

बाकीच्या मुद्द्यांवर स्वतंत्र व्याख्यानें द्यावीं लागतील. हा लेख बराच लांबल्यानें येथेंच पुरा करतों.

**उत्तरास प्रत्युत्तर**—( ज. स. करंदीकर. ) कोणताहि स्मृतिग्रंथ विशिष्ट आचार म्हणजेच धर्म असें मानीत नाहीं, पण समाजांत शिस्त राहण्यासाठीं आचारपरिपालन जरूरीचें आहे असें मात्र स्मृतींचें स्पष्ट मत आहे. अमुकच आचार पाळा असें न म्हणतां देशकालपरिस्थितीस अनुसरून पण कोणता तरी आचार पाळावा असें सांगणारे स्मृतिकार आचार म्हणजेच धर्म मानतात असें कसें म्हणतां येईल? जाधवराव मात्र एखादा विशिष्ट आचार उदाहरणादाखल घेऊन तो आचार बदलूं शकतो एवढ्यावरूनच हिंदुधर्माचें सनातनत्व हिरावून घेत आहेत! अर्थात् या त्यांच्या विचारसरणीमुळेंच आचार म्हणजेच धर्म असें ते मानतात असें स्पष्ट अनुमान निघतें. सनातनत्वाविरुद्ध त्यांनींच पुढें आणलेला हा लंगडा कोटिक्रम त्यांनीं सोडून न दिल्यास हें मत त्यांच्या गळ्यांत पडणारच; त्यास माझा काय इलाज?

एका वेदाचे चार विभाग अध्ययनाच्या सोयीसाठीं आणि एका वर्णाचे चार वर्णाश्रमविभागाच्या सोयीसाठीं झाले ही हि गोष्ट जाधवरावांनीं आतां मान्य केलीच आहे. आणि संघटन करावयाचें तेंहि ही सोय कायम ठेवूनच करावें असें हिंदुसभेचें मत आहे. राज्यकारभाराचे सोयीसाठीं हिंदुस्थानाचे आठदहा विभाग केले असतां सर्वांमध्यें "हिंदी" ही भावना कायम राखण्याकरितां हे विभाग मोडण्याची जरूरी जशी नसते, किंबहुना ते मोडल्यानेंच अधिक गोंधळ माजतो, त्याप्रमाणेंच चातुर्वर्ण्यादि विभागांचा प्रकार आहे. गीतेच्या पूर्वीच चातुर्वर्ण्य प्रस्थापित झालें होतें एवढ्यापुरता मी गीतेचा दाखला दिला होता. 'स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः' या वचनावरून वर्णभेद हा जन्मसिद्ध आहे असेंच त्या वेळेसहि मानण्यांत येत होतें व तें जन्मसिद्ध मानल्यावांचून त्या श्लोकाचा अर्थच होऊं शकत नाहीं. तें मत अर्जुनाचें असलें तरी तें मत खोडून काढण्याकरितां गीता सांगितली नसून उलट जन्मसिद्ध वर्णधर्म टाकूं नये असेंच श्रीकृष्णानें अर्जुनास गीतेंत सांगितलें. आणि मी स्वतः जर माझें कर्तव्य न करीन तर प्रत्येकजण आपला वर्णाश्रमधर्म टाकूं लागेल आणि मग 'संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः' अशी आपत्ति ओढवून तिचा दोष माझ्याकडे येईल असें श्रीकृष्णाचें त्यासंबंधीं स्पष्ट वचन आहे.

श्रीशंकराचार्यांचे पीठास धार्मिक बाबतींत मुळींच अधिकार नाहींत हें जाधवरावांचें आतांचें मत 'द्राक्षें आंबट' या स्वरूपाचेंच आहे हें ज्यांस कोल्हापूरचा १९०१ पासून १९१८ पर्यंतचा श्रीशंकराचार्यांच्या गादीसंबंधाचा वाद अवगत आहे त्यांस सांगावयास नकोच. क्षेत्रस्थ ब्राह्मण पीठाचे प्रतिनिधि म्हणून जर अधिकार चालवीत नव्हते तर ते कोणाचे प्रतिनिधि म्हणून तो अधिकार चालवीत होते? श्रीशंकराचार्यांच्या धर्मनिर्णयाचे शेंकडो कागदपत्र इतिहासमंडळांत मिळण्यासारखे आहेत ते पाहण्याची जाधवरावांनीं तसदी घेतल्यास पुरावा कोणत्या बाजूचा आहे याची खात्री त्यांस पटेल.

# डॉ० मुंजे यांचें भाषण

डॉ. मुंजे यांनीं असेंब्लीच्या चालू बैठकींत सैन्याच्या हिंदीकरणासंबंधानें पुढील ठराव मांडला—'हिंदुस्थान देश आत्मसंरक्षणार्थ समर्थ व्हावा या दृष्टीनें पुढील योजना ताबडतोब अमलांत आली पाहिजे. स्कीन कमिटीनें एकमतानें शिफारस केल्याप्रमाणें पंधरा वर्षांत निम्मे लष्करी अधिकारी हिंदी नेमण्यांत यावेत, सँढर्स्टसारखें कॉलेज हिंदुस्थानांत स्थापन व्हावें व त्यांतून बाहेर पडणाऱ्या अधिकाऱ्यांची नेमणूक हिंदी सैन्यावर व्हावी. या ठरावावर भाषण करतांना डॉ. मुंजे म्हणाले, " या ठरावाचा हिंदुस्थानाशीं जिव्हाळ्याचा संबंध आहे. सांप्रत सर्व हिंदुस्थानास निःशस्त्र बनविण्यांत आलें असून सुशिक्षित वर्गाचा स्वदेशसंरक्षणाच्या कार्याशीं संबंध तोडलेला आहे, यामुळें देशांत भयंकर स्थिति निर्माण झाली आहे. शस्त्रें काढून घेण्याचे गूढ परिणाम त्या वेळीं हिंदी लोकांच्या लक्षांत न आल्यामुळें त्यांनीं तीं निमूटपणानें काढून दिलीं. पण राष्ट्रीय सभा स्थापन होतांच तिच्या लक्षांत ही चूक आली. तिनें शस्त्राच्या कायद्याविरुद्ध चळवळ चालविली. त्या चळवळीची उपयुक्तता हिंदुस्थानाचे तत्कालीन सरसेनापति ड्यूक ऑफ कॅनाट यांसहि पटली. त्यांनीं हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज स्थापन करण्याची खटपट करण्याचें अभिवचनहि तेव्हां दिलें. पण सरकारनें महायुद्धापर्यंत या बाबतींत कांहीच केलें नाहीं. सदर युद्धांत हिंदुस्थानाच्या संरक्षणाची सारी जबाबदारी इंग्रजांनीं आपल्या शिरावर घेणे धोक्याचें आहे असें सरकारच्या प्रत्ययास आलें·हिंदुस्थानाच्या किनाऱ्याचें संरक्षण परकीय हल्ल्यापासून करणें अशक्य ठरलें. अलीकडे युद्धशास्त्रांत इतके महत्त्वाचे फेरबदल होत आहेत कीं, कधीं काळीं नवें महायुद्ध उपस्थित झालें तर हिंदुस्थान व इंग्लंड यांचें दळणवळण तुटण्याचाहि संभव फार आहे. हें संकट आमच्याप्रमाणें सरकारच्याहि डोळ्यास दिसत आहे.

पंजाबचे गव्हर्नर सर माल्कम हेले यांनीं स्कीन कमिटीपुढील साक्षींत सांगितलें कीं, 'माझ्या मतें ही बाब फार महत्त्वाची आहे. आशिया खंडांतील इतर राष्ट्रांपासून हिंदुस्थान राजकीय दृष्ट्या गेल्या दोन पिढ्या अलग होता. पण हा अलगपणा अलीकडे मोडत चालला आहे. यामुळें सरहद्दीवरील दंगेधोपे मिटविणें एवढेंच सैन्याचें कार्य उरलें नाहीं. ही गोष्ट उघड असून हिंदी सैन्याकरितां उत्तम हिंदी अधिकारी कसे मिळवावेत हा प्रश्न महत्त्वाचा होऊन राहिला आहे. '

हिंदुस्थान व इंग्लंड यांचें दळणवळण तुटलें तर कोणती परिस्थिति उद्भवेल इकडे हिंदुस्थानानें लक्ष पोंचविलें। पाहिजे. हिंदुस्थानाचा किनारा सहा हजार मैलांचा आहे. व्यापारी दृष्ट्या त्याचा उपयोग एवढा मोठा आहे कीं, सदर व्यापार हस्तगत करण्यासाठींहि एखादें परराष्ट्र त्याजवर डोळा ठेवावयाचें. चीन व जपान यांची स्थिति पालटत आहे. येत्या ५।१० वर्षांत ही स्थिति कोठपर्यंत बदलेल हें कोणी सांगावें ? वायव्य सरहद्द व ईशान्य सरहद्द या दोन सरहद्दी धोक्याच्या आहेत. ईशान्य सरहद्द चीन व तिबेट यांच्या लगत्यानें एक हजार मैलांची आहे. चिनी सरहद्दीवरील लोक अवखळ आहेत. ते आज चीनच्या तंत्रानें चालणारे आहेत. चिनांत सध्या खळबळ चालू आहे. चीनच्या दुर्दैवानें चीन रशियाच्या पाशांत अडकला तर त्याचा परिणाम हिंदुस्थानास अनिष्ट होणार नाहीं काय ? वायव्य सरहद्दीचा बचाव तिकडील आडदांड जातींच्या मर्जीवर आहे. सदर हद्दीपलीकडे अफगाणिस्थान असून तो अलीकडे ब्रिटिश वर्चस्वापासून पूर्णपणें स्वतंत्र झाला आहे. या स्वातंत्र्याचा फायदा घेऊन अफगाणिस्थान राष्ट्र या दृष्टीनें आपली लष्करी व शास्त्रीय तयारी लवकरच पूर्णत्वास नेईल. अशा रीतीनें एका बाजूनें चीन व दुसऱ्या बाजूनें अफगाणिस्थान यांजपासून हिंदुस्थानास आपला बचाव करावयाचा आहे. आणि आर्थर व्हिन्सेंट यानें आपल्या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें जर्मनीचें आरमारी बळ मोडलें असल्यामुळें युरोपचें आरमारी महत्त्व लवकरच मागें पडून तें महत्त्व आशिया खंडास व पॅसिफिक महासागरास येणार आहे

अशा स्थितींत इंग्लंड एखाद्या मोठ्या युद्धांत सांपडून त्याचें दळणवळण हिंदुस्थानाशीं तुटलें तर काय होईल याचा विचार आपणास केला पाहिजे. सरहद्दीवरील लोकांस हत्यारें वापरण्यास प्रतिबंध नाहीं. त्यांची एकूण संख्या तीस लक्ष असून त्यांपैकीं पांच लक्ष जवान बंदूक वापरणारे निघतील. इंग्लंड दुसरीकडे युद्धांत गुंतलें असतां अशा जवानांपासून हिंदुस्थानाचा बचाव कसा होईल ही काळजीच आहे. अफगाणिस्थानाचा अमीर आज इंग्लंडाचा दोस्त आहे म्हणून ठीक आहे. परंतु तो स्वतंत्र असल्यामुळें उद्यां बिथरला व आपल्या युद्धसामुग्रीचा व तयारीचा उपयोग हिंदुस्थानाविरुद्ध करूं लागला तर कठीण प्रसंग येतेल. या परिस्थितीचा विचार करतां एकट्या ब्रिटिशांचे हातून हिंदुस्थानाचें रक्षण होईल असें वाटत नाहीं. हिंदी लोक व इंग्रज लोक यांच्या पूर्ण सहकारितेनें हिंदुस्थानाचा बचाव होईल.आम्ही एकटे हिंदी लोकहि

देशाचें रक्षण करण्यास आज असमर्थ आहोंत. आमच्या पूर्वजांनीं साम्राज्यें स्थापिलीं व चालविलीं त्याअर्थी आमच्या अंगांत क्षात्रतेज आहे हें सिद्ध झालें आहे. परंतु इंग्रजी अमलामुळें व निःशस्त्रपणामुळें आज आमचें सामर्थ्य लोपल्यासारखें दिसत आहे. आर्थर व्हिन्सेंट आपल्या पुस्तकांत म्हणतो, 'या दृष्टीनें हिंदुस्थानावर पूर्वीपेक्षांहि अधिक जबाबदारी आहे. ही जबाबदारी आपल्या कीर्तीस शोभेल अशा रीतीनें त्यानें पार पाडली पाहिजे. ब्रिटिश सरकारास आशिया खंडांत युद्ध करावें लागेल तो मोठा प्रसंग वगळला तरी इतर प्रसंगीं जमिनीवरचा शत्रु हिंदुस्थानावर चालून आला तर हिंदुस्थानाचा बचाव हिंदुस्थानासच करावा लागेल. त्यास साम्राज्याची मदत मिळणार नाहीं. रशियाची हिंदुस्थानावर व्हावयाची स्वारी टाळतांना मधील सरहद्दीवरील रानटी लोकांचा बंदोबस्त हिंदुस्थानानेंच केला पाहिजे.'

समुद्रावरून व जमिनीवरून हिंदुस्थानाची जी परिस्थिति बदलत आहे तीहून विमानांच्या योगानें ती अधिक जलद बदलेल. विमानांतून इंग्लंडहून हिंदुस्थानाचा प्रवास दोनतीन दिवसांवर तर अफगाणिस्थानाहून हिंदुस्थानाचा प्रवास दोनतीन तासांवर येणार आहे. तव्हां हिंदुस्थान हातचें जाऊं नये अशी इंग्लंडाची इच्छा असेल तर स्कीन कमिटीनें ज्या सूचना एकमतानें केल्या आहेत त्या तरी हिंदुस्थानसरकारानें अमलांत आणाव्या अशी माझी विनंति आहे."

# पुस्तकपरीक्षण

## कौटिलीय अर्थशास्त्र

### ( पूर्वार्ध. )

[ कौटिलीय अर्थशास्त्र पूर्वार्ध मूळ व भाषांतरासह. भाषांतरकार ज. स. करंदीकर पुणें व ब. रा. हिवरगांवकर नगर. प्रकाशक ग. र. मुळे कर्जत जि. कुलाबा. किं. ३ रुपये. ]

वरील सुप्रसिद्ध संस्कृत ग्रंथाचा पूर्वार्ध, मूळ व भाषांतर मिळून, या ग्रंथांत दिला आहे. सदर भाषांतर जनार्दन सखाराम करंदीकर व बळवंत रामचंद्र हिवरगांवकर यांनीं मिळून केलेलें असून, कर्जत येथील गजानन रघुनाथ मुळे यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे. मूळ ग्रंथाचें नांव प्रसिद्ध आहे. परंतु तो अलीकडेच लोकांना उपलब्ध झाला आहे आणि त्याचें श्रेय शामशास्त्री व गणपतिशास्त्री ह्या दक्षिण-हिंदुस्थानांतील पंडितांनाच दिलें पाहिजे. ग्रंथाचा कर्ता कौटिल्य किंवा कौटल्य ह्यापैकीं कोणत्या तरी एका नांवाचा होय. पण त्याचें व्यक्तिनाम विष्णुगुप्त असें असून मौर्यवंशांतील प्रसिद्ध राजा चंद्रगुप्त ह्याचा तो गुरु होता. चाणक्य ह्या नांवानें तो त्या संबंधांत प्रसिद्ध आहे. नंदवंश समूळ खणून काढून त्यानें आपला मानसपुत्र चंद्रगुप्त याला राज्यावर बसविलें, आणि त्याचा पुढें कांहीं दिवस कारभारहि केला. ह्या दृष्टीनें विजयनगरचा विद्वान व राजकारणी पुरुष माधवाचार्य याच्याशीं त्याची सहजच तुलना होते. दोघेहि अत्यंत विद्वान, स्वाभिमानी, संसारविन्मुख व राजकारणधुरंधर असेच होऊन गेले. माधवाचार्यांचे अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. चाणक्याचेहि प्रस्तुत ग्रंथाशिवाय इतर कित्येक ग्रंथ असण्याचा संभव आहे. पण तो फार प्राचीन काळचा यामुळें ते नष्ट झाले असावेत. आणि सर्वांत अधिक प्रसिद्ध व मान्य म्हणून अर्थशास्त्र हा ग्रंथ मात्र उरला असें अनुमान निघतें. प्रस्तावनेंत भाषांतरकारांनीं चाणक्य ऊर्फ कौटिल्य हाच या ग्रंथाचा खरा कर्ता होय ही गोष्ट सप्रमाण सिद्ध केली आहे. तथापि मूळ ग्रंथाच्या शेवटीं, दोन श्लोकांत, ग्रंथकाराचें वर्णन आलें आहे तें स्वतः कौटिल्यानेंच लिहिलें असेल असें वाटत नाहीं. मूळ ग्रंथाची प्रत करतांना, प्रारंभीं किंवा शेवटीं, अशी भर त्यांची प्रत करणारा घालतो किंवा इतर लोक घालतात आणि मग तो भाग मूळ ग्रंथांतला असें समजून त्याचें कर्तृत्वहि ग्रंथकाराकडे दिलें जातें. पण प्रमाण म्हणून मांडतांना ह्यांत थोडा धोका असतो. मृच्छकटिक नाटकाचा कर्ता शूद्रक आहे असें मानितात. आणि ह्या नाटकाच्या ज्या प्रती छापल्या जातात त्यांत शूद्रकासंबंधाचा जो श्लोक प्रारंभीं दिला आहे तोहि ग्रंथाचा भाग समजला जातो. पण त्या श्लोकांत शूद्रकाचें गुणवर्णन आहे; इतकेंच नाहीं तर 'शूद्रकोऽग्निप्रविष्टः' असा त्याचा मृत्युपर उल्लेख आहे. अर्थात् हा श्लोक स्वतः शूद्रकानें लिहिलेला नव्हे. असो. हें प्रमाण सोडलें असतां, भाषांतरकारांनीं बाकीचीं प्रमाणें दिलीं आहेत तीं समर्पक वाटतात.

ग्रंथाची छपाई उत्कृष्ट झालेली असून मूळ संस्कृत भाग व भाषांतर हीं दोनहि दिल्यामुळें अभ्यासकाला फारच साहाय्य झालें आहे. कारण मूळ ग्रंथाच्या सूक्ष्म अध्ययनापासून अजून किती तरी सिद्धान्त निष्पन्न होण्यासारखे आहेत. ह्या सूक्ष्म अध्ययनाला भाषांतरानें चांगलें चलन मिळेल यांत

शंका नाहीं.पण ग्रंथाचें भाषांतर ताडून पाहणें हें काम महत्त्वाचें असल्यामुळें डाव्या पानावर संस्कृत व उजव्या पानावर मराठी असा हा ग्रंथ छापला असता तर अधिक बरें झालें असतें असें वाटतें.किंवा निदान जागा फुकट जाऊं नये म्हणून वर संस्कृत व खालीं मराठी असें छापिलें असतें तर अधिक सोय झाली असती.

हें काय नुसतें संस्कृताचें मराठी भाषांतर, ह्या वरवरच्या दृष्टीनें हा ग्रंथ करण्याला विशेष मेहनत पडली नसेल असा सामान्य वाचकांचा समज कदाचित् होईल.पण ती मात्र मोठी चूक होईल. कारण ह्या भाषांतराचें स्वारस्य शब्दाला प्रतिशब्द देऊन, अर्थ सांगण्यांतच खरें आहे आणि हे प्रतिशब्द देतांना प्रत्येक शब्दाची सूक्ष्म छाननी करावी लागली आहे; शिवाय मूळ सूत्रें सामान्य वाङ्मयात्मक म्हणजे इतिहास किंवा वर्णन किंवा संभाषण अशा स्वरूपाचीं नाहींत तर तीं पारिभाषिक आहेत. म्हणून त्यांच्या खऱ्या अर्थाची छाननी करणेंच प्राप्त आहे. ह्या दृष्टीनें हें भाषांतर करण्यास भाषांतरकाराला फारच परिश्रम पडले असतील यांत शंका नाहीं. ग्रंथ सूत्ररूप असल्यामुळें त्यांत अर्थपूर्ण शब्द खेंचून भरलेले आहेत. व्याकरणानें सोडविण्याचे असे प्रश्न त्यांत क्वचितच येतात. कित्येक शब्दांच्या भाषांतरांत मतभेद होण्याचा संभव उघडच आहे. आणि त्या ग्रंथाचा जसजसा अधिक अभ्यास विद्वान लोक करतील तसतसे हे मतभेद अधिक प्रगट होतील. पूर्वी ह्याचीं जीं दोन भाषांतरें झालेलीं आहेत त्यांचा योग्य फायदा भाषांतरकारांनीं घेतलाच आहे. पण त्यांनीं आपली अशी स्वतंत्र बुद्धीहि चालवून अर्थ बिनचूक देण्याची पराकाष्ठा केली आहे. आणि ही गोष्ट पृष्ठ १९ ते २१ वर 'कांहीं वादग्रस्त स्थलांचें विवेचन' म्हणून दिलें आहे त्यावरून उघड दिसून येतें.

मूळ ग्रंथाचें नांव 'अर्थशास्त्र' असें आहे. त्यावरून इंग्रजींत ज्याला Political Economy' म्हणतात त्यांत असणारे विषय यांत असतील असें कोणाला सकृद्दर्शनीं वाटेल. पण तें अर्थशास्त्र वेगळें व हें वेगळें. इंग्रजींतला Political Economy हा शब्द तरी त्यांतील विषयांशीं कितपत जुळतो आहे ? शास्त्राला नांव देतांना केव्हांहि अशीच अडचण पडते; आणि त्याचें एक कारण असें कीं, अतिव्याप्ति व अव्याप्ति टाळण्यासारखा एकच व सुटसुटीत असा शब्द मिळणें कठीण असतें. वेदविद्या, तर्कशास्त्र, अर्थशास्त्र (वार्ता) व दंडनीति अशा चार विद्या जुन्या लोकांनीं मानिलेल्या आहेत. पैकीं वेदविद्या ह्या ग्रंथांत मुळींच नाहीं. आणि ग्रंथकारांनीं तर्कशास्त्राला सर्वविद्याप्रदीप असें मानलें आहे. तरी तर्कशास्त्राचा विचार त्याला ह्या ग्रंथांत कर्तव्य नाहीं. तथापि नांव अर्थशास्त्र असतांहि, दंडनीतीचीं कांहीं प्रकरणें ह्या ग्रंथांत आहेत. अशा रीतीनें अर्थ, अनर्थ, नय, अनय ह्या चोहोंचाहि विचार या अर्थशास्त्रांत आढळतो. म्हणून ह्याला अर्थशास्त्र आणि दण्डनीतिशास्त्र असेंहि कदाचित् यथार्थपणें मानतां आलें असतें.

प्रस्तुत पूर्वार्धांत ९० अध्याय आलेले आहेत, आणि ते वाचले असतां या ग्रंथाचा उत्तरार्ध लवकरच प्रसिद्ध व्हावा अशी वाचकाला उत्कंठा लागल्याशिवाय राहात नाहीं. स्वतः चाणक्यानें ग्रंथासंबंधानें असें लिहिलें आहे कीं, तो समजण्याला सुलभ व त्यांतील शब्द, अर्थ व तत्त्वें हीं निःसंदेह आहेत. स्वतः ग्रंथकाराच्या दृष्टीनें या सर्वच गोष्टी खऱ्या असतील; परंतु आज शेंकडो वर्षांनंतर, संस्कृत भाषा सामान्यतः अवगत असली तरी, पारिभाषिक शब्द पुष्कळसे प्रचारांतून गेल्यामुळें अर्थ समजावयाला पंचाईत पडते. शिवाय तत्त्वांच्या दृष्टीनें मूळ ग्रंथकाराच्या वेळीं तरी तीं निःसंदेह मानलीं गेली होतीं कीं नाहीं ह्याची खात्री काय ? पण ग्रंथकार स्वतः तरी निःसंदेह असावा लागतो;आणि हा तसा होता हें मात्र खरें. कारण प्रस्तुत ग्रंथांत, त्यापूर्वीच्या ग्रंथकारांचे अशा विषयावरील समग्र ग्रंथ विचारांत घेऊन, त्यांची चिकित्सा करून, पूर्वाचार्यांनीं असें मत दिलें आहे, पण माझें मत तसें नाहीं, वेगळें आहे असें ग्रंथकारानें अनेक ठिकाणीं सांगितले आहे. इंग्रजींत ज्याला डायजेस्ट असें म्हणतां येईल तशा प्रकारचा हा ग्रंथ आहे. कारण त्याला रूढी, आचारविचार व वस्तुवर्णन ह्यांच्या संग्रहाचें स्वरूप आहे. केवळ मनानें कल्पिलेल्या गोष्टींच्या प्रबंधाचे स्वरूप नाहीं. बऱ्याच ठिकाणीं चाणक्यानें आपली बुद्धि चालविली असावी. तथापि त्याच्या बहुतेक लिहिण्याला प्रचलित आचारविचाराचा स्वतंत्र आधार असला पाहिजे असें उघड दिसतें.

या ग्रंथांतील मजकुराचे दोन भाग करतां येतात. एकामध्यें राज्यकारभार, त्याचीं अंगें,उपांगें, विद्यमान संस्था, लोकप्रवृत्ति, धर्म-अधर्म, नय-अनय यांचे नियम, विधि, निषेध, प्रायश्चित्त किंवा शिक्षा व निरनिराळ्या उद्योगधंद्याच्या वहिवाटीचे नियम हे आहेत. पण दुसऱ्या भागांत स्वतःची बुद्धि चालविण्यासारखा व चालविलेला असाहि मजकूर आहे. राजनीतीसंबंधानें पुष्कळसा मजकूर दुसऱ्या भागांत येईल. पहिल्या भागांतील रूढी व आचार हे आजच्या समाजांत अनुभवाला सर्वस्वी येणारे नाहींत, कारण शेंकडो वर्षांनंतर सर्वच परि-

स्थिति बदलते. फार काय पण एकाच काळांत शेजार-शेजारच्या राष्ट्रांतहि एकाच प्रकारच्या संस्था आणि एकाच प्रकारचे आचारविचार असत नाहींत. परंतु ह्या दुसऱ्या भागांतील विचार सर्वस्वी मनुष्य-स्वभावाशीं संगत असेच असल्यामुळें, हजारों वर्षांपूर्वी ते जसे होते तसेच ते आजहि आहेत. आणि आज ते जसे आहेत तसेच आणखी हजारों वर्षे राहतील ह्यांत शंका नाहीं. भारतांतील कणिकनीति किंवा भीष्मपर्वांत सांगितलेली नीति हीच प्रायः आजहि तत्त्ववेत्त्यांना संमत आहे व पुढेंहि राहील. कारण धर्मवृत्ति व कपटवृत्ति हीं दोन मनुष्यांच्या मनाचीं अंगें जवळ जवळ त्रिकालाबाधित आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. साम, दाम, दंड, भेद यांच्या संबंधानें प्राचीन भरतखंडांतील कणिकनीति किंवा इतिहासकालीन चाणक्य ग्रंथांतील राजनीति हीं मध्ययुगांतील इटाली देशांतील मॅकेव्हेलीनें लिहिलेल्या ' Prince ' ह्या ग्रंथांतील राजनीतींशीं जुळते, हें तो ग्रंथ वाचून पाहणारास सहजच कळून येईल. परंतु एखादें राष्ट्र सुधारलें आहे कीं नाहीं याचा विचार हल्लीं केवळ भौतिक दृष्टीनें करतात. मानसशास्त्राच्या दृष्टीनें तो करण्यांत येत नाहीं. ऑरिस्टॉटलचें तत्त्वज्ञान प्रणीत झालेल्या ग्रीस देशापेक्षां आज यंत्रविद्येंत प्रसिद्धीस आलेल्या जर्मनीलाच अधिक सुधारलेला मानतात. म्हणून राजनीतीपेक्षां राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें आजच्या कालाला या ग्रंथाचें महत्त्व अधिक आहे. कारण त्यावरून एक गोष्ट निर्विवाद रीतीनें सिद्ध होते कीं, हजारों वर्षांपूर्वी राज्यकारभाराची व नागरिक समाजाचीं अंगें, उपांगें आर्य समाजांत इतकीं परिणतावस्थेला गेलेलीं होतीं कीं, आजच्याशीं त्यांची तुलना केली असतांहि लाजेनें खालीं मान घालण्याचें आम्हांस बिलकुल कारण नाहीं.

# इतिहासाची पुनरावृत्ति

[ तळेगांवास अधिकाऱ्यांनीं हिंदूंच्या पुरातन वहिवाटीस न जुमानतां त्यांच्या धार्मिक मिरवणुकींना बंदी केल्यामुळें तेथील हिंदु लोकांत झालेल्या क्षोभाची हकीकत गेल्या दोन अंकांत आम्हीं दिलीच आहे. १८९६ सालीं असाच प्रसंग सरकारी अधिकाऱ्यांच्या उपद्यापानेंच उत्पन्न झाला होता त्यावर ' केसरी 'नें केलेल्या टीकेंतील दोन उतारे पुढें देत आहों. त्यावरून इतिहासाची पुनरावृत्ति कशी तंतोतंत होत असते हें दिसून येईल.]

( केसरी २२ सप्टेंबर १८९६ अग्रलेख–"श्रीगजाननाचा राष्ट्रीय महोत्सव" )

"सरकारी अम्मलदार मुसलमान लोकांस जी कधीं कधीं सवलत देतात ती भिऊन देत नाहींत, तर लोकांमधली दुफळी कायम राहावी या हेतूनें देत असतात. दाभाड्यांचें तळेगांव ( पुण्याजवळील रेलवे स्टेशन ) या गांवीं जो प्रकार झाला त्यावरून तर हें आमचें अनुमान अधिकच दृढ होतें. साताराच्या छत्रपतिमहाराजांचे सेनापति दाभाडे हे या गांवचे इनामदार होत. ह्यांनींच हें गांव वसविलें व त्यांत आपल्या पदरच्या मुसलमान नोकरांस राहाण्यास जागा दिली इतकेंच नव्हे, तर मशीद बांधण्यास जागा दिली. बडोद्यास ज्याप्रमाणें मुसलमान सरदार गणपतीच्या स्वारीबरोबर जातात त्याचप्रमाणें दाभाड्यांच्या गणपतीबरोबर जाण्याची तळेगांवच्या मुसलमान लोकांची पहिल्यापासून रीत होती, व त्यांच्यासह गणपतीची स्वारी त्यांच्या मशिदीवरून वाजतगाजत जात असे अशी आज दोनशें वर्षांची वहिवाट आहे. ही वहिवाट असल्याबद्दल तेथील मुसलमान लोकांनीं मामलेदारसाहेबांपुढें दोन वर्षांपूर्वी लेखी कबुली दिली आहे. तेव्हां वहिवाटीचा प्रश्नच राहिला नाहीं. मुसलमान लोकहि आपण होऊन दंगा करण्यास इच्छित नव्हते व नाहींत. परंतु तळेगांव येथें नुकताच एक मुसलमान फौजदार गेला आहे. तो तेथें गेल्यावर तंटा सुरू झाला, व त्यांत पूर्वापार वहिवाट सिद्ध झाली असतांहि पुण्याच्या कलेक्टरसाहेबांनीं हिंदूंचे जामीन घेतले व गणपतीची मिरवणूक दुसऱ्या मार्गानें काढावी असा जाहिरनामा प्रसिद्ध करविला. कलेक्टरसाहेबांची ही वर्तणूक आमच्या मतें अत्यंत दांडगेपणाची आहे. वहिवाट जेथें शाबीत होत नाहीं तेथें एक पक्षीं ही दांडगाई चालेल. पण एकदां वहिवाट शाबीत झाली, म्हणजे ज्याच्या त्याच्या हक्कास ज्यास त्यास निर्वेध रीतीनें उपभोग घेण्यास मिळेल अशी तजवीज करणें हें पोलिसांचें व मॅजिस्ट्रेटांचें खरें कर्तव्य आहे. त्यांतून तळेगांवसारख्या लहानशा गांवांत दंगा न होण्याची तजवीज ठेवणें फारसें कठीण आहे असें आम्हांस बिलकुल वाटत नाहीं. तळेगांवच्या लोकांनीं अद्याप आपले गणपती विसर्जन केले नाहींत, व आपल्या योग्य हक्कांचा सरकारांतून अखेर-निकाल होईतोंपर्यंत गणपती हलवूं नयेत असा त्यांचा संकल्प आहे. हा संकल्प कांहीं वावगा नाहीं. कारण आमचें असें मत आहे कीं, या कामीं कलेक्टर व पोलीस सुपरिंटेंडेंट यांनीं निवळ दांडगाई केलेली आहे; व सरकारपुढें जर हें प्रकरण नीट रीतीनें मांडलें तर लॉर्ड सॅंढर्स्ट यांच्या कारकी-

दींत असल्या प्रकरणाचा योग्य निकाल लागेल अशी आम्हाला पूर्ण उमेद आहे. यासाठीं हें प्रकरण शेवटपर्यंत न्यावें अशी तळेगांवकरांस अगत्याची सूचना आहे."

(केसरी मंगळवार ता. ६ आक्टोबर १८९६ स्फुट सूचना नं. २ ) "तळेगांव येथील मिरवणूक काढण्यासंबंधी अधिकाऱ्यांनीं आणलेल्या अडथळ्याची हकीकत मागें आम्ही दिलीच आहे. मशिदीवरून वाद्यांसह मिरवणूक नेण्याची पूर्वापार वहिवाट असतां अधिकाऱ्यांनीं जेव्हां जाणूनबुजून खो आणला तेव्हां हिंदु लोकांस न्याय मिळण्याचें दुसरें कांहींच साधन उरलें नाहीं. गांवांत मुसलमानांची संख्या दोनशांपेक्षां कमीच आहे; व पोलिसांच्या मनांत असतें तर या मुसलमानांचा बंदोबस्त करून वहिवाटीप्रमाणें हिंदूंची मिरवणूक काढून देण्यास त्यांस कांहीं पंचाईत पडली नसती. परंतु हिंदूंकरितां त्यांनीं येवढी खटपट कां करावी ? अशा रीतीचा जेव्हां अन्याय होऊं लागला तेव्हां मुसलमानांशीं आपण संबंधच ठेवूं नये असा तळेगांवच्या हिंदूंनीं कट केला. मुसलमानांस कोणी धान्य, पैसाअडका, कापड वगैरे कोणताच जिन्नस देईना इतकेंच नव्हे, तर त्यांस कोणी शिवेहीना. हिंदूंचा जेव्हां असा कट झाला तेव्हां मुसलमान लोकांस आपले रोजचे देखील व्यवहार चालविण्याची पंचाईत पडली, व त्यांनीं कलेक्टरसाहेबांस असा अर्ज केला कीं, हिंदूंच्या या त्रासांतून आम्हास कसें तरी मुक्त करा. हल्लींच्या स्थितींत आमच्या गुराढोरांस वैरण किंवा आम्हास धान्य मिळेनासें झालें आहे. कलेक्टरसाहेबांस जेव्हां ही गोष्ट तारेनें कळविण्यांत आली, तेव्हां त्यांनीं मुसलमान अर्जदारांस असा जबाब दिला कीं, "अर्जदारांनीं इसापनीतींतील 'पोट आणि अवयव' ही गोष्ट वाचावी." कलेक्टरसाहेबांनीं दिलेलें हें उत्तर पाहून आम्हास फार मोठें आश्चर्य वाटतें. यांनींच गैरशिस्त हुकूम देऊन प्रथमतः कज्जे लावून दिले आणि आतां पुनः पोट आणि अवयव यांची गोष्ट मुसलमानांस वाचावयास सांगण्यास हेच तयार. एकास म्हणावयाचें छू व दुसऱ्यास म्हणावयाचें पाठीस लाग, तशांतलाच कांहीं अंशीं हा प्रकार आहे. पोट कोण व अवयव कोण ? तथापि हिंदूंच्या तर्फेचा हा जबाब आहे असें धरून चाललें तर, मुसलमानांस ज्यांनीं आपल्या हुकमांनीं चिथवून दिलें त्यांच्याकडूनच मुसलमानांस हा जबाब मिळतो तेव्हां त्यांत काय इंगित असावें त्याचा आमच्या मुसलमान बंधूंनीं विचार करावा. हिंदू आणि मुसलमान एक आहेत व असले पाहिजेत. परंतु कांहीं अधिकाऱ्यांस मनांतून या दोन जातींत तंटे असणेंच इष्ट वाटतें, व त्याकरितां ते एकदां मुसलमानांस तर एकदां हिंदूंस चिडवून देत असतात, परंतु पोट आणि अवयव अशा दृष्टीनें पाहिलें असतां हे प्रकार आपणास अत्यंत घातुक आहेत. करितां उशीरानेंच का होईना, पण पुण्याच्या कलेक्टरांनीं केलेला उपदेश आमच्या मुसलमान बंधूंनीं लक्षांत ठेवून अजून तरी डोळे उघडून त्याप्रमाणें वर्तन करावें अशी त्यांस आमची विनंति आहे."

# इनामदारवर्गांतील जागृति

मुंबई इलाख्यांतील सरदार व इनामदार लोकांची दुसरी प्रांतिक परिषद पुणें येथें गेल्या शुक्रवारीं व शनिवारीं भरली ती अनेक दृष्टींनीं यशस्वी झाली. परिषदेला निमंत्रण ' डेक्कन सरदार दुमालदार ' सभेनें दिलें. येथील सरदार घराण्यांतील एक पुढारी गृहस्थ, सरदार खंडेराव चिंतामण मेहेंदळे, यांची योजना स्वागताध्यक्षाचे जागीं झाली. परिषदेचें अध्यक्षस्थान इचलकरंजी संस्थानाचे अधिपति श्रीमंत बाबासाहेब घोरपडे यांनीं स्वीकारलें. सभेवर ब्राह्मणेतर इनामदारांनीं प्रत्यक्ष बहिष्कारच पुकारला नसला तरी ब्राह्मणेतर सरदारांची संख्या फार थोडी होती. परंतु पोटइनामदारांपासून संस्थानिकांपर्यंत—म्हणजे शराकती इनामदार, दुमालदार, वतनदार, जहागीरदार, सरंजामदार, सरदार इत्यादि सर्व दर्जाचे इनामदार ह्या परिषदेला हजर होते. एका संशोधकानें असा पुरावा मिळविला आहे कीं, सन १८८१ चे सुमारास लोकमान्य टिळक हे एका इनामदार—दुमालदार संघाचे चिटणीस असून, त्यांनीं संघटनेच्छु इनामदारांशीं सहकारिता केली होती. तथापि त्या प्रयत्नाचें फळ तेव्हां विशेष आल्याचें दिसत नाहीं. याचें कारण संघटित कार्य करण्याची बुद्धीच इनामदारवर्गामध्यें तेव्हां तितकीशी नव्हती. परंतु अलीकडे या बुद्धींत फरक पडलेला आहे. गतवर्षी सातारा येथें सरदार मुतालीक यांच्या प्रयत्नानें परिषद भरविण्याची कल्पना प्रथम निघून ती रंगारूपाला आली. त्यापूर्वीहि इनामदारांनीं ८-१० वर्षें आपलीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगण्याची खटपट मधून मधून केली होती.

कांहीं वर्षांपासून इनामदारवर्गाचे प्रतिनिधी कायदेकौन्सिलांत निवडून येऊं लागले आहेत. श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर, कुरुंदवाडकर, मुतालीक, मुजुमदार, मुदलियार वगैरे गृहस्थांनीं मुंबई-कौन्सिलांत इनामदारांचे प्रतिनिधी म्हणून कामे केलीं. १९२४ ते १९२६ या तीन सालां दक्षिणेंतील सरदार-इनाम-

दारांना वरिष्ठ कौन्सिलांत आपला प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार मिळाला. सरदार मुतालीक यांनीं त्यांचें कार्य तेथेंहि केलें. परंतु परिषद जिल्हानिहाय फिरतीवर निघाल्यापासून जें जागृतीचें काम होतें तें दोनतीन वर्षांनीं एखादी निवडणूक उपस्थित झाल्यानें होत नाहीं. म्हणून गतवर्षींच्या पहिल्या परिषदेनंतर ताबडतोब यंदा दुसऱ्या परिषदेचा उपक्रम झाला याबद्दल आम्ही चालकांचें अभिनंदन करतों. पुढील वर्षी परिषद कर्नाटकांत बोलावण्यांत येणार असल्याचें समजतें. तसें झालें तर फारच चांगलें. कारण फक्त निवडणुकीच्या प्रसंगानें महाराष्ट्राच्या कर्नाटकावर व कर्नाटकाच्या महाराष्ट्रावर स्वाऱ्या झाल्या असतां, एकंदर इनामदारवर्गाचें हित साधण्यापेक्षां निवडणुकीच्या स्पर्धेमुळें विनाकारण व्यक्तिद्वेष मात्र बळावतो; आणि व्यक्तिद्वेषापुढें समाजहित लोपून जातें असा अनुभव येतो. पण परिषद भरविल्यानें ही आपत्ति टळेल. निरनिराळ्या उपप्रांतांतील इनामदारांचा स्नेहपरिचय वाढेल, व गरजा, अडचणी, गाऱ्हाणीं यांचें ज्ञान परस्परांना करून देऊन संघशक्तीनें कांहीं उपाययोजना करण्यांत येईल. या कारणाकरितां परिषद भरविण्याची ही परंपरा अखंड चालू ठेवावी अशी आमची या वर्गाला सूचना आहे. ती पार पाडण्याला लागणारी ऐपत या वर्गामध्यें नाहीं असें कोणीच म्हणणार नाहीं. आणि त्याला लागणारी सामुदायिक हितबुद्धि उदित झाल्याचींहि चिन्हें आतां दिसूं लागलीं आहेत.

इनामदारवर्गाची उत्पत्ति कशी झाली? समाजाला त्याचें महत्त्व काय? आज त्यांची स्थिति काय आहे? भावी स्थिति कशी होईल? त्यांचीं दुःखें व गाऱ्हाणीं कोणतीं? लोकांत त्यांच्याविषयीं अप्रीति कां? त्यांच्याविषयीं खऱ्या व खोट्या कल्पना कोणत्या? या वर्गानें मनावर घेतलें तर स्वतःची स्थिति सुधारून आपल्या खानदानीचा उपयोग समाजकार्याला त्यांना कसा करतां येईल? या अनेक मुद्दयांचें विवेचन स्वागताध्यक्ष मेहेंदळे व अध्यक्ष इचलकरंजीकर यांच्या भाषणांत आलेंच आहे. यंदाच्या परिषदेंत मान्य झालेल्या १०-२० ठरावांत मिळून, इनामदारवर्गाच्या मागण्या बहुधा सर्व संकलित केल्या गेल्या आहेत. आणि मुंबई इलाख्याचे गव्हर्नर यांनीं नुकतीच इनामदारवर्गाच्या शिष्टमंडळाची भेट घेऊन, त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याविषयीं आश्वासनहि दिलें आहे. या सर्व गोष्टी लक्षांत घेतां, इनामदारवर्गांत जागृति उत्पन्न झाली असून, तिचें थोडेंथोडें फलहि त्यांच्या पदरांत पडत चाललें आहे असें दिसतें.

तथापि एकंदर इनामदारवर्गासंबंधानें आज लोकांत जी भावना आहे तिच्याविषयीं दोन शब्द लिहिणें अवश्य आहे असें वाटतें. इनामदारांसंबंधानें ही भावना दोन प्रकारची आहे. कांहीं लोकांना 'इनामदार' हें त्यांचें नुसतें नांव उच्चारल्याबरोबर ते फार प्रतिष्ठित वाटतात. राजे हे जसे देवाचे अंश तसेच इनामदार हे राजाचे अंश! त्यांच्या अधिकाराचें प्रमाण लहान पण त्यांचा अधिकार यांना अस्सल राजकीय स्वरूपाचा वाटतो. कांहीं रयतवर्गाचे तर इनामदार हेंच सरकार होय. इनामदाराला शेतसाऱ्याची माफी असते, याचा अर्थ आपल्या 'राज्याच्या' मालकीचा एक लहानसा तुकडाच सरकारनें काढून इनामदाराला दिला! इनाम जमिनीची मालकी खालीं पाताळापर्यंत व वर स्वर्गापर्यंत इनामदाराला असते! त्याच्या हद्दींत खाणी काढण्याला त्याला सरकारची परवानगी लागत नाहीं! त्याच्या हद्दींतील जंगल त्याच्या मालकीचें असतें! त्याच्या हद्दींत इमारत बांधण्याला सरकारी परवानगी घ्यावी लागत नाहीं. शेतीशिवाय अन्य कामाकडे जमिनीचा उपयोग इनामदारांनीं किंवा त्यांच्या कुळांनीं केल्यास त्यांना "बदलून साऱ्याचा" भूर्दंड पडत नाहीं! लँड रेव्हिन्यू कोडाच्या ८८ कलमाप्रमाणें इनामदारीचे अधिकार मिळाले असतां शिपाई किंवा तगादेदार पाठवून कुळाच्या मालाच्या जप्त्या करून इनामदारांना आपली सारावसुली करतां येते. इत्यादि कांहीं पक्क्या व कांहीं कच्चया समजुतीमुळें अडाणी लोकांच्या मनांत अजून इनामदारवर्गाविषयीं एक प्रकारची पूज्यता नसली तरी प्रतिष्ठिततेची भावना असते खास.

सुशिक्षित लोक घेतले असतां, त्यांच्या मनाला वरील सर्व कारणें पटत नसलीं तरी त्यांनाहि इनामदारवर्गाची एका वेगळ्या दृष्टीनें प्रतिष्ठा वाटते. ती अशी कीं, इनामदारवर्ग हा जुन्या खानदानीचा आहे. इनामपत्रें सनदा व त्यांत लिहिलेलीं इनामें देण्याचीं कारणें यांच्यायोगानें इनामदारवर्गाचा जुन्या स्वराज्याशीं संबंध पोंचतो म्हणून त्यांना ऐतिहासिक मान्यता व नैसर्गिक पुढारीपणच आहे. शिवाय जंगम मिळकतीपेक्षां स्थावर मिळकत अधिक स्थिर व प्रतिष्ठित, धारण करणाराला सहज दगा न देणारी, नित्य कांहीं ठराविक उत्पन्न देणारी, व कारणपरत्वें प्रसंगविशेषीं मोठा फायदा करून देणारी अशी ही इनामदाराची मिळकत होय. अर्थशास्त्राला प्रारंभ जुन्या व नव्या समजुतीप्रमाणेंहि जमिनीपासूनच होतो. तसेंच इनामदार—वतनदार लोकांच्या अंगीं एक प्रकारचें सहज दाक्षिण्य, त्यांच्या वागणुकीची चालीरीतीची ढब डौलदार, अतिथिअभ्यागतांचा सत्कार, पाहुण्यांचा पाहुणचार वगैरेविषयीं त्यांची तत्परता, वगैरे कांहीं खऱ्या

व कांहीं खोट्या मानीव गुणांनीं हा वर्ग कांहीं सुशिक्षित लोकांनांहि मान्य असतो.

ही एक बाजू झाली. पण ह्यालाहि एक दुसरीहि बाजू आहे. आणि तिचें वर्णन अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत फार चांगलें केलें आहे. ते म्हणतात " आमच्या वर्गाची स्थिति कोणी ना धनी कोणी ना गोसावी अशी आज झाली आहे. हिंदु विभक्त कुटुंबामध्यें एखादी गतभर्तृका स्त्री जशी घरांतील सर्व मंडळींना जड वाटते, परंतु तिला सर्वांचे काबाडकष्ट मात्र करावे लागतात, आणि ती तें आपलें कर्तव्य म्हणून करीत असते, तशी आपली स्थिति आहे· सरकारला आमचा वर्ग म्हणजे आपल्या गळ्यांतील एक धोंड असें वाटतें; व इतरांना तर आम्ही आयत्या पिठावर रेघा ओढणारी आळशी मंडळी आहोंत असें वाटत असतें. " तसेंच सरदार मेहेंदळे यांनीं आपल्या भाषणांत हीच गोष्ट निराळ्या शब्दांनीं सांगितली. ते म्हणाले " क्वचित् प्रसंगीं कांहीं तुसड्या वृत्तीच्या, उद्दाम, बेमुर्वतखोर, लहरी, क्षुद्र मनोवृत्तीच्या वेगवेगळ्या दर्जाच्या अंमलदारांशीं आपला संबंध येतोच येतो. या नाजूक परिस्थितीतून प्रतिष्ठितपणें निभावणें मुष्किलीचें होतें. या अंमलदारांचा असा एक चमत्कारिक ग्रह झालेला दिसतो कीं, हा दुमालदार वर्ग ऐतखाऊ खुशालचेंडू आहे. समाजरूपी वृक्षावर बांडगुळाप्रमाणें पोसून त्याचें रक्त हा शोषण करीत असतो. तेव्हां ह्याचें अस्तित्वच नाहींसें करण्याचें धोरण पत्करून या वर्गास नेहमीं पेंचांत आणण्यास व त्याला नाउमेद करण्यास हे अधिकारी कांहीं तरी खुसपट शोधून काढीत असतात व दरडावीत असल्याचा बोभाटा होत असतो. इनामदार वर्गाची पायमल्ली करण्याची प्रवृत्ति समाजांतील कांहीं बिनबुडाच्या, उपरी, उच्छृंखल आणि लोकशाहीचा-समतेचा—घोष करीत वागडणाऱ्या, पण वागण्यांत मूलभूत तत्त्वाचें रहस्य न उमगल्यामुळें स्वतःच्या चालचर्येत व व्यवहारांत त्या तत्त्वाची ओळख सुद्धां विसरणाऱ्या, लोकांत दिसून येते. पूर्वीचा इतिहास पाहतां सरदार दुमालदारांचा वर्ग अस्तित्वांत येण्याचीं कारणें राज्यघटनेंत व सुबुद्ध समाजरचनेंत सहज सांपडणारीं असतां, या वर्गाच्याच मात्र आनुवंशिक व जन्मतः प्राप्त होणाऱ्या मान्यतेचा, स्वास्थ्यस्थितीचा व तालेवारीचा हेवा व दुःस्वास कां केला जावा हें कोडें उलगडणें अंमळ कठीण आहे. पण हें कळणें कठीण असलें तरी व नव्या मन्वंतराच्या वाहत्या वाऱ्याला ठाकूरकीनें व भलेपणानें पाठ देऊन इतरांबरोबर या वर्गानेंहि भारदस्त रीतीनें व विवेकानें थोडें नमतें घेऊन, म्हणजे चिडून न जातां, आपल्या तालेवारीनें व समजूतदारीनें स्वाभिमानपूर्वक मान्यतेचें स्थान संभाळून, वागण्याचा बाणा निर्भयपणें चालविला पाहिजे." सरदार मेहेंदळे यांचे हे शब्द अर्थात् धीरवृत्तीचे आहेत. पण इनामदारवर्गापुढें उभें राहिलेलें आजचें संकट दुस्तर आहे अशी जाणीव त्यांच्या शब्दांतूनच ध्वनित होते. परवां मुंबई-कायदेकौन्सिलांत दोन-तीन सभासदांनीं तर असें स्पष्ट बोलून दाखविलें कीं, हा इनामदारवर्ग अजीबात नष्ट झाला तर आम्हाला पाहिजे आहे. आणि कराचीचे नारायणदास बेचर हे तर म्हणाले कीं, "माझ्या हातीं राज्यसत्ता आली तर एका दिवसांत मी ही इनामदारी पद्धति नामशेष करीन." अशा अविचारी लोकांच्या हातीं सत्ता देण्याइतका ईश्वर अजून वेडा बनला नाहीं हें निराळें. तथापि कायमधारापद्धतिविरुद्ध बंगाल्यांत वावटळ डोकावूं लागलीच आहे आणि सरकारी अधिकाऱ्यांनींहि हळूच इनामदार-जमीनदारांच्या स्थैर्याला धक्का देण्यासारख्या हुकुमांचा उपक्रम केला आहे.

खालच्या अधिकाऱ्यांच्या वर्तनाविषयीं सरदार मेहेंदळे यांनीं आपल्या भाषणांत तक्रार केली आहे. पण तें वर्तन वरिष्ठ सरकारच्या धोरणाचेंच प्रतिबिंब होय. मराठी राज्य संपल्यानंतर एल्फिन्स्टन वगैरे कांहीं मुत्सद्यांनीं जुनी खानदानी व वतनदारी यांना फारसा धक्का न लावतां ती शिल्लक ठेविली. पण सरकारला ही वतनदारी हळूहळू नडूं लागल्यामुळें निरनिराळीं कमिशनें बसवून वतनदारीच्या मागें संपादकत्वाच्या हक्कचौकशीचा ससेमिरा लावून, सनदा मागवून घेऊन, त्यांचा अर्थ व निर्णायकत्व यांची मीमांसा नवीन नियमांनीं करवून, अखेर " रुपयांतील कांहीं आणे कायम उत्पन्न, तुम्हाला तोडून देतों, तुम्ही आपले बाकीचे वतनदारीचे हक्क सोडून द्या, आणि हें तुमच्या फायद्याचें आहे " असें त्यांना समजावून कांहीं लालुचीनें तर कांहीं धाकदपटशानें निरनिराळ्या वेळीं सेटलमेंट्स करण्यांत आलीं.

त्यानंतरहि वतनदार कुळकर्णी तरी हे कामाला उपयोगी म्हणून शिल्लक राहिले होते. पण गेल्या १०-१५ वर्षांत त्यांचीहि सरकारनें वाट लाविली ! खालीं रयतेपासून वर सरकारपर्यंत चारचाकी गाडी धांवत जाईल असे सरळ रस्ते केले आणि तसें करतांना वाटेंत या इनामदारांचीं व वतनदारांचीं टेकाडें टेंगळें सगळीं फोडून मोकळी केलीं. पण एवढ्यानेंच संपलें असें नाहीं. कारण वतनदार संपले तरी, साधे इनामदार शिल्लक उरतातच. म्हणून तीहि अडचण काढून टाकण्याकरितां 'होमरूल लीग' ची चळवळ, असहकारितेची चळवळ यांचा फायदा घेऊन, सरकारनें इनामें देखील आपल्या कृपेवर सर्वस्वी अवलंबून आहेत, ' इनामदारी

म्हणजे इमानदारी ' असें इनामदारांच्या प्रत्ययास आणण्याचा उपक्रम केला. आणि ज्या सनदांतून "इमानदारी कायम असेल तोंपर्यंत इनाम चालेल " असें कलम असेल तेथें वतन चालविणें न चालविणें हें आपल्या इच्छेवर अवलंबून राहील असें इनामदारांना जाणविलें. तात्पर्य, वरखालीं सर्वच बाजूला इनामदारवर्गाला लोक पाण्यांत पाहूं लागले.

पण आमच्या मतें वास्तविक इनामदारवर्गावर कोणीं असें शस्त्र धरण्याचें कारण नाहीं.त्यांचा हेवा करण्याइतका तो वर्ग आज श्रेष्ठ नाहीं. आणि त्याची हेटाळणी करण्याइतका तो क्षुद्रहि नाहीं. इनामदारी हा इतर चार सत्ता–प्रकारांप्रमाणेंच मिळकतीचा एक सत्ताप्रकार होय. अधिकाराच्या दृष्टीनें पाहिलें असतां इनामदारांना खरे असे अधिकार कांहींच नाहींत! कोणत्याहि इनामदाराला मुलकी फौजदारी अधिकार नाहींतच. लँड रेव्हेन्यू कोडाप्रमाणें वसुलीचे कांहीं अधिकार कित्येकांना असले तरी त्याच्यावर मुलकी अधिकाऱ्याकडे तक्रार करण्यास जागा असतेच. आणि ज्यांना हे अधिकार नाहींत त्यांना वसुली करण्याकरितां सरकारची मदत मागावी लागते. इनामदार हेच तेवढे ऐतखाऊ म्हणजे न मिळवितां खाणारे असेंहि म्हणतां येत नाहीं.कारण त्यांच्यासंबंधानें हें जितकें म्हणतां येईल, तितकें तें समाजांतील इतर अनेक वर्गासंबंधानेंहि म्हणतां येईल. वतनें हीं मूळ ज्या संस्थापकांनीं कांहीं विशेष गुणांवर मिळविलीं, मग त्यांत धर्माचा संबंध असो वा राजकारणाचा संबध असो,अर्थशास्त्रदृष्ट्या ज्याला उपयोग(Services) म्हणतां येईल तो आपणाला झाला म्हणूनच देणारांनीं तीं इनामें दिलीं. मूळ आशीर्वाद देणारांचा किंवा अभीष्टचिंतन करणाराचा उपकार आणि ज्यावर तो केला त्याची कृतज्ञता यांचें फळ इनाम होय. तें काढून घेण्याचा कोणास अधिकार नाहीं. आशीर्वाद व धर्मबुद्धि या रेडियमसारख्या सदा स्फुरणशाली असतात.

पराक्रमानें मिळविलेल्या इनामाबद्दलहि असेंच म्हणतां येईल. पुष्कळ इनामें त्यांच्या संपादकांनीं देह खर्ची घातल्यामुळें मिळालीं आहेत.अर्थात् त्याकरितां दिलेलें बक्षीस योग्य म्हणून केव्हांहि अबाधितचा राहिलें पाहिजे. त्यांतूनहि आमच्या इकडे विलायतेंतल्या उमराव लोकांप्रमाणें कोणाच्याहि पदरीं लाखों बिघे जमीन असत नाहीं.इनाम हें विभाज्य असल्यामुळें मूळच्या इनामाच्या वांटण्या होऊन हल्लींच्या पिढीच्या पदरीं लहान लहान तुकडेच राहिले आहेत. पुष्कळ इनामें परघराण्यांत खरेदीनें गेलेलीं आहेत, व या खरेदीदारांना ऐतखाऊ म्हणतां येत नाहीं. सामान्य इनामदाराच्या वार्षिक उत्पन्नाइतकें उत्पन्न असणारे समाजांत हजारों धनिक लोक सांपडतील. पण यांतल्या पुष्कळांनाहि ऐतखाऊ असें कां म्हणतां येणार नाहीं? मुंबईचे गिरणीवाले बडे शेठ हे इनामदार नसले तरी कांहीं ऐतखाऊ, कांहीं बेसुमार पैसा उधळणारे, व इनामदारवर्गाच्या अंगांतील दुर्गुण असणारे असे नाहींत काय? स्वदेशी चळवळींत गिरणीवाल्यांनीं बेसुमार नफा मिळवून किती अब्रू घालविली हें प्रसिद्धच आहे. परवां युद्धांत "झटपट श्रीमंत" बनलेल्या लोकांनीं कितीसा सच्चेपणा दाखविला? तथापि नवीन बोल्शेव्हिक मताचाच आधार घेतल्याशिवाय हे व असले वर्ग समाजांतून पाखडून टाकावे किंवा कापून टाकावे असें कोणास म्हणतां यावयाचें नाहीं. जगांतली सगळी संपत्ति,सगळें भांडवल, आणि अर्थशास्त्राच्या भाषेनें बोललों तर 'परिश्रमाशिवाय मिळविलेला सर्व स्थिर किंवा वाढता नफा'(Unearned increment) बोल्शेव्हिकांच्या प्रचंड कढईंत घालून समाजद्वेषाच्या आगीनें तो वितळवावयाचा अशी स्थिति येईपर्यंत एकट्या इनामदाराचीच तेवढी शेंडी धरून त्याला सडकणें योग्य होणार नाहीं. म्हणून सरसरकार व इनामदार यांच्यामध्यें वाद उत्पन्न झाला असतां कोणीहि सार्वजनिक टीकाकार इनामदारांचीच वकिली व तरफदारी करील.पण इनामदार व त्यांची रयत यांच्यामध्यें वाद उत्पन्न झाला तर न्यायबुद्धीनें ज्याची बाजू खरी दिसेल त्यालाच तो सहानुभूति दाखवील.कायदेशीर हक्क म्हटले म्हणजे ते इनामदाराला व रयतेलाहि आहेत.आणि या नव्या कारखानदारीच्या काळांत भांडवलवाले व मजूर यांच्या विरोधी हक्कांचा मेळ जसा पुढाऱ्यांनीं घातला पाहिजे, एकाचाच पक्ष घेऊन चालणार नाहीं, त्याप्रमाणें इनामदार व त्यांची रयत यांच्याहि विरोधी हितसंबंधाचा मेळ घालणें हेंच शहाणपणाचें धोरण होय.

यानंतर इनामदारांच्या कर्तव्यासंबंधानें लिहावयाचें. पण या कर्तव्याची जाणीव स्वतः इनामदारवर्गालाहि झाली आहे हें परवांच्या परिषदेंतील भाषणावरून दिसून आलें आहे. स्वतः जागा झालेल्याला जागा करण्याचें कारण नाहीं. पण सरकारविरुद्ध आपले हक्क व अधिकार पुढें मांडण्यांत इनामदारांची जितकी जागृति दिसून येते तितकीच त्यांनी रयतेविषयीं आपल्या कर्तव्याबद्दलहि दाखविली पाहिजे. त्यांनीं स्वतःला जीर्ण, ऐतिहासिक, दगडी इमारतीप्रमाणें निश्चल समजूं नये व सरकाराकडून पुराणवस्तुसंरक्षक कायद्याची मदत मागूं नये ! तर समाजरूपी सजीव देहाचा आपण एक अवयव आहों अशी भावना ठेवून वागावें आणि नैसर्गिक पुढारी म्हणून समाजसेवेच्या धुरेला किंवा धारेला मान देण्याला तयार व्हावें. असें झालें म्हणजे मग त्यांचा दुःस्वास कोण करील ?

# कौटिलीय अर्थशास्त्र

## पुस्तकपरीक्षण

## ( उत्तरार्ध )

व्हिन्सेंट स्मिथ वगैरे इतिहासकारांनीं प्राचीन भरतखंडांत राज्यव्यवस्था कशी होती ह्याचें थोडें-बहुत वर्णन दिलें आहे तें फार त्रोटक आहे. परंतु हल्लींचा ग्रंथ वाचला म्हणजे राजकीय व सामाजिक संस्था निर्माण करण्यांत व त्या चालविण्यांत आपल्या पूर्वजांनी किती बुद्धि खर्च केली होती हें सूक्ष्म व तपशीलवार कळून येतें. आतां हल्लींच्या काळीं एकेक शास्त्रच इतकें परिणत झालें आहे कीं, एकांतून दहा शास्त्रें निघालेलीं असतात. आणि वडाच्या झाडाच्या पारांब्या वरून खालीं येऊन भूमींत रुजून फिरून त्यांचे वृक्ष होऊन वर जावे त्याप्रमाणें शास्त्रांच्या शाखांचा व भाषेचा विस्तार झाला आहे. असे विस्तार पूर्वकालीं नव्हते. समाजाचें तें बालपण होतें. म्हणून त्या वेळीं व्यवहारहि संकुचित होता. हें तत्त्व लक्षांत घेतलें म्हणजे कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत आलेल्या निरनिराळ्या अनेक विषयांचा संग्रह व विवेचन एकत्र कसें झालें असेल ह्याची कल्पना येते. कारण ह्या ग्रंथांत, आधुनिक दृष्टीनें बोलावयाचें तर, धर्मशास्त्र येतें, सामाजिक शास्त्र येतें, व्यवहारशास्त्र येतें, प्रायश्चित्तशास्त्र येतें, दायभागशास्त्र येतें, न्यायशास्त्राचें मूलतत्त्व येतें, मुलकी खात्याचा कारभार येतो, दिवाणी काम चालविण्याचा कायदा येतो, फौजदारी काम चालविण्याचा कायदा येतो, पिनल कोड येतें, स्थानिक स्वराज्याचीं तत्त्वें येतात, व्यापारी संघाचें शास्त्र येतें, मजूरसंघाचें शास्त्र येतें, म्युनिसिपालिटीचा कायदा येतो, ग्रामसंस्था येते, एवढेंच नव्हे तर निरनिराळ्या धंद्यांतील कारागिरीचीं मूलतत्त्वेंहि येतात. अलीकडे वाढलेला समाजव्यवहार लक्षांत घेतला असतां इतक्या सर्व गोष्टींचा एकत्र संग्रह व विचार करणारा ग्रंथ कोणत्याच भाषेंत मिळूं शकणार नाहीं. पण कालांतरानें, विशेषतः भौतिक सुधारणा व व विद्याभ्यासाच्या ज्ञानाचीं साधनें वाढल्यामुळें, असा फरक पडणारच.

असो. ह्या ग्रंथांतील मजकूर किती मनोरंजक आहे व तुलनात्मक दृष्टीनें तो किती बोधप्रद आहे याची यथार्थ कल्पना, प्रत्यक्ष ग्रंथ वाचल्याशिवाय, वाचकाला करून देणें अशक्य आहे. कांहीं दिवसांपूर्वी महाराष्ट्रांतील राज्यव्यवस्थेसंबंधीं रामचंद्रपंत अमात्य ह्यांचा एक लहानसा जुना ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्याचें कौतुक आपण किती तरी करतों. पण असे १०-२० ग्रंथ भरतील इतका उत्कृष्ट आणि विशेषतः प्राचीन म्हणून कौतुकास्पद असा मजकूर या 'अर्थशास्त्र' ग्रंथांत उपलब्ध झालेला आहे. स्थलसंकोचामुळें आम्हाला द्यावा वाटतो इतका तपशील ह्या परीक्षणात्मक लेखांत ह्या ग्रंथाचा देतां येत नाहीं. तथापि कांहीं कांहीं गोष्टींचा उल्लेख केल्यावांचून आम्हाला राहावत नाहीं. पहिल्या अधिकरणांत म्हणजे २१ अध्यायांत राजे लोकांचें कर्तव्य व व्यक्तिशः त्यांनीं करण्याचा कारभार यांचीं तत्त्वें सांगितलीं आहेत तीं फारच मनोरंजक आहेत. अमात्य व मंत्री यांची नेमणूक कशी करावी, त्यांची निष्ठा कशी पारखावी, हेर कोण कसे नेमावे, त्यांचा उपयोग कसा करावा, राजनिष्ठ व फितूर ह्या लोकांशीं राजानें कसें वागावें, दूतांची व हेरांची योजना कशी करावी, राजपुत्राशीं संबंध कसा ठेवावा, राजाची दिनचर्या कशी असावी इत्यादि विषयांचें विवेचन वाचलें म्हणजे राजनीतींत ह्या मनुष्याचें मन किती शिरलें होतें हें कळून येईल.

यांतील कांहीं कांहीं भाग अर्थात् हास्यास्पद असा वाटतो. पण त्याविषयीं आम्हाला इतकेंच सांगावयाचें कीं, तो कागदावर लिहिला म्हणून कदाचित् तसा वाटो. पण प्रत्यक्ष राजे लोकांचें चारित्र्य व दिनचर्या ह्यांची ज्यांना माहिती आहे किंवा त्याची कल्पना ज्यांना आहे त्यांना तो हास्यास्पद वाटणार नाहीं. राजे लोकांच्या मनांतून येऊन जाणाऱ्या विचारांनाच येथें नियमांचें स्वरूप दिलें आहे. ते विचार तेथें गूढ असतात. ह्यात ते प्रगट केले आहेत इतकेंच काय तें. कपट हें नेहमीं गूढ असावें अशी समजूत असल्यानेंच कपटाचरणाचा उघड व नियमबद्ध उपदेश हास्यास्पद वाटतो. कटवाले एकांतांत कट करतात म्हणून कटवाल्यांची भाषा ही सार्वजनिक भाषा होऊं शकत नाहीं. परंतु समजा, एखादा कट चालला असतांना, कटवाल्यांना न कळत जर फोनोग्राफ लावला व त्याच्या तबकड्या लावून सर्व संभाषण एखाद्या मोठ्या सभेपुढें प्रगट करून दाखविलें तर तें ज्या कारणाकरितां हास्यास्पद वाटेल त्याच कारणाकरितां कौटिल्याच्या कपटनीतीचा लेखहि हास्यास्पद वाटेल. अमात्याच्या निष्ठेची परीक्षा कशी करावी याविषयींचे नियम बालिश स्वरूपाचे आहेत असें भाषांतरकारांनीं म्हटलें आहे. पण कित्येक आधुनिक राजे लोकांच्या

कारस्थानाच्या कृतींचीं खेळांचीं वर्णनें जीं तुम्ही आम्ही ऐकलेलीं आहेत त्यांहून कौटिल्याचें वर्णन अधिक अद्भुत म्हणवत नाहीं. दुसरें असें कीं, या मजकुराला जर बालिश म्हणावयाचें तर इतर अनेक प्रकरणांतून अशा बालिश गोष्टी किती तरी आढळतात. पण एका काळांतील लोकांनीं दुसऱ्यांना हंसावें इतकाच त्याचा अर्थ. प्रत्येक राष्ट्रांत जुन्या काळीं अशाच बालिश गोष्टी किती तरी रूढ होत्या. पण त्या कालानुसार त्यांना प्रौढपणाच होता. इतिहासकार लेकें याचा ' History of Rationalism ' हा ग्रंथ जो वाचील त्याला युरोप खंडांत मध्ययुगीन सामाजिक चालीरीती कशा होत्या याचें चित्र पाहावयास सांपडेल. पण त्या चालीरीतींना त्या काळचे प्रौढ प्रतिष्ठित लोकहि मान देत, म्हणून त्यांना बालिश म्हणतां येत नाहीं.

दुसऱ्या अधिकरणापासून सामाजिक व्यवस्था व राज्यव्यवस्था हे विषय लागतात. ते वाचले असतां, ज्याला आपण खात्यांचा कारभार म्हणतों, तो तेव्हां किती परिणतावस्थेला पोंचला होता हें दिसून येईल. यासंबंधांत वाचकांना अध्याय २२ गांवव्यवस्था, अध्याय २५ किल्ल्यांतील नगररचना, अध्याय २७ फडणिशी कारभार, अध्याय ३१ आज्ञापत्र—पद्धति, अध्याय ३७ पण्याध्यक्ष, अध्याय ४० वजनें—मापें, अध्याय ४२ शुल्काध्यक्ष, अध्याय ४४ सूतकाम, अध्याय ५६ जमाबंदी, अध्याय ५७ नगरव्यवस्था, अध्याय ६६ गायराने शेतें वगैरे, अध्याय ७० मजूर व कामगार, अध्याय ७१ सहकारी मंडळाचे नियम, अध्याय ७८ समाजकंटकांचा बंदोबस्त, अध्याय ७९ व्यापाऱ्यांपासून प्रजेचें रक्षण वगैरे हे अध्याय वाचण्याची आम्ही शिफारस करतों. अध्याय ५७ वाचला असतां हल्लींच्या कोणत्याहि म्युनिसिपल ॲक्टाची आठवण झाल्याशिवाय राहात नाहीं. गांवच्या लोकांची खानेसुमारी नोंदवावी, आल्यागेल्याची वर्दी द्यावी, वैद्य लोकांनीं आपल्या माहितींतल्या रोग्यांची व रोगाची वर्दी द्यावी, उन्हाळ्यांत आगीचा बंदोबस्त करावा, ओसाड जागा कारखाने गुत्ते भडभुंजांचीं दुकानें हलवायांचीं दुकानें खाटिकांचीं दुकानें वगैरेंची तपासणी करावी, गांवांत गवती छपरें राहूं देऊं नये, आगीचा बंदोबस्त न ठेवील त्यास दंड करावा, भलत्या ठिकाणीं प्रेतें पुरूं नयेत, सार्वजनिक जागीं घाण करूं नये, ती करणारास दंड करावा, प्रेतें अमुक पद्धतीनें बाहेर न्यावीं वगैरे नियम ह्या पद्धतींत दिले आहेत. एका नियमाविषयीं विशेष उल्लेख करावासा वाटतो तो हा कीं, रस्त्यावर कचरा टाकणाऱ्याला ⅛ पण दंड करावा. असो. याचप्रमाणें कौतुकाच्या म्हणूनहि कांहीं गोष्टी सांगतां येतील. उदाहरणार्थ, खोटीं नाणीं तोडून टाकण्याचे नियम यांत आहेत. आणि पाळीव कबूतरांच्या गळ्यांत मोहोरबंद लखोटा बांधून त्यांना उडवून दूरच्या राजाला बातमी द्यावी ही विद्याहि यांत सांगितली आहे. १८७० सालच्या पॅरिस शहराच्या वेढ्यांत ही युक्ति अमलांत आणण्यांत आली तिचें कौतुक झाल्याचें प्रसिद्ध आहे. कौटिल्याच्या वेळींहि ही विद्या रूढ होती असें दिसतें.

असो. अशीं उदाहरणें कित्येक दिलीं तरी संपणार नाहींत. पण आम्ही एवढेंच सांगतों कीं, तुलनात्मक दृष्टीनें अभ्यास करणाराला सामाजिक रचना, नगरकारभार, राज्यव्यवस्था, दायभाग, व समाजांतील निरनिराळ्या भागांचें परस्पर महत्त्व या विषयांच्या संबंधानें संशोधन करून जुनें कसें होतें ? नव काय आहे ? दोहोंत फरक कोणता ? तो कशानें पडला असेल ? वगैरे गोष्टींचा अभ्यास करण्याला किती तरी वाव आहे. पण ह्या कोरड्या अभ्यासापेक्षां आणखी एक फायदा या ग्रंथाचा असा आहे कीं, ह्या ग्रंथांत उपयोगांत आणण्यासारखें अमूल्य शब्दभांडार आहे. इंग्रजी शिक्षणानें कल्पना नव्या आल्या. परंतु जुन्या संस्कृत ग्रंथाचा अभ्यास नष्ट झाल्यानें, पारिभाषिक शब्दांची अडचण पडूं लागली हा अनुभव सर्वांनाच आहे. ह्या दृष्टीनें पाहतां, ह्या ग्रंथांतील शब्द हल्लींच्या वस्तुस्थितीला जुळण्यासारखे असतील ते घेऊन व पुढें आणून प्रचलित केले, तर नव्या-जुन्या सामाजिक स्थितीचा सांधा आयता जुळविल्यासारखें होईल. आणि या फायद्याच्या दृष्टीनें भाषांतरकारांना आमची अशी सूचना आहे कीं, दुसऱ्या भागांत कांहीं पानें खर्ची पडलीं तरी तीं खर्ची घालून, त्यांनीं या संबंध ग्रंथांतील पारिभाषिक शब्दांच्या अर्थासंबंधाचा कोश द्यावा.

असो. ऐतिहासिक व सामाजिक दृष्ट्या अतिशय महत्त्वाचा असा हा संस्कृत ग्रंथ मराठी वाचकांना उपलब्ध करून दिल्याबद्दल सर्व मराठी वाचक वर्ग भाषांतरकारांचा सदैव ऋणी राहील इतकें सांगून हें ग्रंथपरीक्षण पुरें करतों.

# केसरी–मराठा ट्रस्टींचा खुलासा

केसरी व मराठा या पत्रांचा ट्रस्ट झालेला असून हीं पत्रें छापखाना वगैरेबद्दलची सर्व वहिवाट आमचेकडे ट्रस्टी या नात्यानें सोंपविण्यांत आलेली आहे. या ट्रस्टच्या उपयोगाकरितां गायकवाड–वाड्याचा एक भाग आम्हाकडे ट्रस्टडीड-अन्वयें व निरंतरच्या भाडेचिठ्ठीवरून आहे. अलीकडे या जागेच्या वहिवाटीस अनेक प्रकारांनीं बाध यऊं लागला, तेव्हां लोकमान्य टिळक व त्यांचे चिरंजीव यांनीं नेमून दिलेल्या पंचांकडे आमचेपैकीं धोंडो वासुदेव विद्वांस यांनीं गेल्या मे महिन्यांत तक्रारी अर्ज गुदरून पंचकयास होण्यासाठीं आपली तयारी दर्शविली. परंतु लोकमान्यांच्या चिरंजिवांनीं लोकमान्यांची इच्छा व स्वतः ट्रस्टडीडमध्यें केलेली योजना यांस न जुमानतां पंचांसमोर हजर होण्याचें व आपलें म्हणणें मांडण्याचें नाकबूल केलें. तेव्हां नाइलाज होऊन वहिवाटीच्या हरकती कायमच्या दूर करून घेण्यासाठीं आम्हास पुणें फर्स्ट क्लास कोर्टांत लोकमान्यांच्या चिरंजिवांवर दावा करणें भाग पडलें. या दाव्याचें काम चालू असून त्याचा निर्णय व्हावयाचा आहे. दरम्यान या वादासंबंधानें कित्येक वर्तमानपत्रांतून अयथार्थ निराधार लेख लिहिले जात आहेत. त्यांतील प्रत्येक मुद्द्यावर भरपूर व समर्पक उत्तर आम्हांस देतां येईल. तथापि न्यायकोर्टाचा निकाल होईपर्यंत या बाबतींत कांहीं लिहिण्याचा आमचा विचार नाहीं. जे लोक आमच्याविषयीं पूर्वग्रहदूषित नसतील, त्यांना सर्व खुलासा आजच करीत बसण्याचें कारण नाहीं. आणि जे तसे असतील त्यांच्यापुढें खुलासा करण्यापासूनहि कांहीं फायदा नाहीं. तात्पर्य, कोर्टांत गेलेलें प्रकरण कडेला लागेपर्यंत या वादाविषयीं विशेष कांहीं लिहिण्याचा आमचा विचार नाहीं. तरी आमच्याविषयीं सहानुभूति असणारांनीं व हितचिंतकांनीं कोणत्याहि प्रकारचा गैरसमज करून घेऊं नये अशी विनंति आहे. निंदकांना आमची कसलीच विनंति नाहीं. त्यांनीं आपलें कर्तव्य खुशाल करीत राहावें.

**न. चिं. केळकर,**
**धों. वा. विद्वांस,**
ट्रस्टी, केसरी–मराठा संस्था.

# डॉ. ॲनी बेझंट यांचीं ऐंशी वर्षें

( ले.—**ग. स. मराठे** )

( **पूर्वार्ध** )

येत्या शनिवार ता. १ आक्टोबर रोजीं डॉ. ॲनी बेझंट यांचे वयास ८० वर्षें पूर्ण होतात. इतकें वय असूनहि त्यांचा तरुण मनुष्याप्रमाणें काम करण्याची अजून धमक आहे. त्यांचें थोडक्यांत चरित्र देण्याचें योजिलें आहे.

**जन्म व बालपण**—यांचा जन्म लंडनमध्यें १८४७ सालीं झाला. यांची आई व बापाची आई आयरिश होत्या. बाप डॉक्टर असून तत्त्वज्ञानाचा अभ्यासी होता. तो लवकरच निवर्तल्यामुळें डॉ. बेझंट यांचें बालपण गरीबीमध्यें गेलें. परंतु मिस् मॅरिएट नांवाच्या एका परोपकारी बाईनें त्यांना स्वतःच्या घरीं ठेवून घेऊन सोळावे वर्षापर्यंत त्यांना पुष्कळ शिक्षण दिलें. बेझंटबाईंचे वडील नास्तिक होते. परंतु आई भाविक व भक्तिमार्गी होती. डॉ. बेझंट ह्याही प्रथम भक्तिमार्गी होत्या. परंतु वडिलांचा स्वतंत्र वृत्तीनें अभ्यास करण्याचा गुण त्यांच्यांत आला. मि. बेझंट नांवाच्या एका धर्मोपदेशकानें त्यांस लग्नाची मागणी घातली व जरी त्यांची आठच दिवसांची ओळख होती तरी धर्माचें व परोपकाराचें काम करावयास सांपडेल अशा समजुतीनें त्यांनीं वयाचे २० वे वर्षी त्याजबरोबर लग्न केलें.

**संसार**—पुढें सहा वर्षांमध्यें त्यांना २ मुली झाल्या. ह्या मुदतींत त्यांचा अभ्यास चालूच होता. त्यांच्या एका तान्ह्या मुलीच्या आजारीपणांत त्यांना अशी प्रबळ शंका आली कीं निरपराधी जीवांना परमेश्वर दुःख कां देतो ? ह्याचें उत्तर ख्रिस्ती धर्मांत नसल्यामुळें त्या नास्तिक झाल्या व धार्मिक विधीचें आचरण त्या करीनाशा झाल्या. त्यामुळें त्यांच्या पतीशीं त्यांचें पटेना म्हणून त्यानें बाईशीं काडीमोड करून घेतली व एक मुलगी आपले ताब्यांत घेतली. पुढें कांहीं वर्षें त्यांनीं गव्हर्नेस (मुलें संभाळणें) व नर्सचें काम करून आपली उपजीविका चालविली. त्यांची आई आजारी पडून मृत्यु पावली व आईच्या विनवणीवरून म्हणून त्यांनीं ‘ होली कम्यूनिअन् ’ म्हणून संस्कार करून घेतला. परंतु त्यांनीं संस्कार करणाऱ्या पाद्र्याला स्पष्ट सांगितलें कीं, माझा ह्यावर विश्वास नाहीं. पुढें त्यांस उपास-

मारीचे दिवस आले व मुलीच्या पोटापुरतें सुद्धां अन्न घालणें कधीं कधीं कठीण पडूं लागलें. तरी ह्या दिवसांत त्यांनीं आपलें वाचन चालू ठेविलें होतें.

**जडवादाचा प्रचार**—बाईना ईश्वर आहे ही गोष्ट कबूल नव्हती तरी तो नाहीं असेंहि त्या म्हणत नव्हत्या. फक्त अंधश्रद्धा नसावी असा त्यांचा आग्रह होता. ह्यामुळें त्या फ्री थिंकर (स्वतंत्र विचार) पक्षाला जाऊन मिळाल्या.या पक्षाचा प्रचार करण्यासाठीं त्या व्याख्यानें देत गांवोगांव हिंडूं लागल्या व त्या वेळीं त्यांची लोकांकडून हेटाळणी व छळ झाला. त्या पक्षाचे प्रमुख चार्लस ब्रॅडलासाहेब होते. ब्रॅडलासाहेब हे किती सुविचारी व न्यायप्रिय होते हें हिंदुस्थानांतल्या प्रचलित राजकारणाच्या सुरुवातीची ज्यांना माहिती आहे त्यांना ठाऊक असेलच. व्याख्यानांच्या वेळीं अभद्र शब्द, धक्काबुक्की व दगडफेंक सुद्धां त्यांना सहन करावी लागली. २७ व्या वर्षापासून ४२ व्या वर्षापर्यंत त्या जडवादीच होत्या. त्या चळवळींत त्यांचें अंग स्वातंत्र्यपोषकच असे. इंग्लंडनें आपले ताब्यांतील सर्व राष्ट्रांस होमरूल द्यावें असा त्यांचा आग्रह होता. गरीब वर्गाच्या हितासाठीं त्यांनीं इतकी चळवळ केली कीं त्यांचेवर गरीब वर्गाचें अतिशय प्रेम बसलें व एक प्रसंग असा आला कीं, ब्रॅडलासाहेब पार्लमेंटचे सभासद निवडून आले असतांहि त्यांच्या नास्तिकपणामुळें त्यांना हांकून देण्याचा पार्लमेंटानें प्रयत्न केला. हें ऐकून बाहेरचा लोकसमूह खवळून कॉमन्ससभेवर हल्ला करण्यास निघाला. त्या वेळीं बेझंटबाईच्या नुसत्या हाताच्या खुणेनें लोक परतले.

ह्या चळवळीनें सरकारला कायदा बदलून नास्तिक लोकांना पार्लमेंटसभेंत येण्याची सवड करून द्यावी लागली. दुसरा एक प्रसंग असा आला कीं, संततिनियमनासंबंधानें डॉ. नाऊलटन नांवाच्या मनुष्यानें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. परंतु बीभत्सपणाच्या सबबीवर सरकारनें तें जप्त केलें. वास्तविक हें पुस्तक बीभत्स नव्हतें व गरीबांची स्थिति सुधारण्याच्या हेतूनेंच तें लिहिलेलें होतें. जरी त्यांतील विवेचन बाईंना सर्वस्वी पसंत नव्हतें, तरी सरकारच्या ह्या मुद्रणस्वातंत्र्य नाशक कृत्याचा निषेध करण्यासाठीं बाईनीं सत्याग्रह करण्याचें ठरविलें व ग्रंथकाराच्या परवानगीनें तें पुस्तक पुनः छापून जाहीर रीतीनें विकलें, तेव्हां सरकारनें त्यांना पकडून त्यांच्यावर खटला केला. ह्या खटल्यांत त्यांना कैद दंड व जार्मान अशी शिक्षा झाली, पण अपिलामध्यें कांहीं निराळ्याच मुद्द्यावर ही शिक्षा रद्द झाली. तरी त्यांनीं पुस्तक पुनः विकावयाचें ठरविलें, पण मग सरकार त्यांच्या वाटेस गेलें नाहीं.

ह्या प्रकरणाच्या आधारावर त्यांचे नवऱ्यानें त्यांची दुसरी मुलगीहि त्यांचेकडून कोर्टामार्फत काढून घेतली. ह्याचें त्यांस इतकें दुःख झालें कीं त्या कांहीं दिवस अतिशय आजारी पडल्या. पुढें त्या सोशालिस्ट (समाजसत्तावादी) झाल्या. ह्या वेळच्या त्यांच्या दीनदुःखनिवारक कामगिरीमुळें मजूर पक्षांतील लोकांचे मनांत त्यांच्याविषयीं अत्यंत आदर व प्रेम उत्पन्न झालें, व तें अजून कायम आहे. ह्या वेळीं त्यांनीं अभ्यास करून मॅट्रिक्युलेशनची परीक्षा दिली व पुढेंहि त्यांनीं आठ निरनिराळीं शास्त्रें शिकून त्यामध्यें टीचरचें सर्टिफिकेट मिळविलें. त्यांची लंडनच्या स्कूल-बोर्डावर सभासद म्हणून निवडणूक झाली व प्राथमिक शाळेंतील गरीब मुलांस मधल्या वेळचें जेवण स्कूलबोर्डातर्फे फुकट देण्याची खटपट करून त्यांत त्यांनीं यश मिळविलें. चाळीस वर्षांचे सुमारास मेस्मेरिझम, स्पिरिचुॲलिझम (परलोकविद्या) व क्लेअरव्हायन्स (अंतरदृष्टि) ह्यांचीं कांहीं उदाहरणें त्यांस दिसून येऊन त्यांची जडवादावरील श्रद्धा मावळूं लागली. त्याचप्रमाणें दीनांच्या दुःखनिवारणासाठीं पर्वताएवढे प्रयत्नसुद्धां फुकट जातात तेव्हां ह्याच्या मुळाशीं जडवादाखेरीज दुसरें काय असेल ह्याबद्दल त्यांस तळमळ उत्पन्न झाली.

**थिऑसफी**—मॅडम् ब्लॅव्हट्स्की ह्या बाईनीं लिहिलेलें सीक्रेट डॉक्ट्रिन नांवाचें पुस्तक रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज ह्या मासिकाकडे अभिप्रायार्थ पाठविलें. तो ग्रंथ दुसऱ्या कोणास समजेना म्हणून संपादकांनीं बेझंटबाईंच्याकडे अभिप्रायार्थ पाठविला. त्या पुस्तकानें एकदम त्यांना पूर्वीचें कांहीं तरी हरवलेलें सांपडल्यासारखें वाटलें व त्यांनीं मॅडम ब्लॅव्हट्स्की यांना भेटून अधिक चौकशी केली. त्यांचे सांगण्यावरून त्यांचेविरुद्ध असलेलें सर्व वाङ्मय वाचून बाई थिऑसफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या. या गोष्टीनें इतकी खळबळ उडाली कीं, त्यांचें डोकें फिरलें असें ब्रॅडला वगैरे त्यांचे मित्रांस वाटलें. ही गोष्ट १८८९ मध्यें झाली व दोन वर्षांतच जेव्हां मॅडम ब्लॅव्हट्स्की ह्या मरण पावल्या ते वेळीं बेझंटबाई सोसायटीच्या पुढाऱ्यांपैकीं एक झाल्या. थिऑसफीसंबंधानें त्या पुस्तकें लिहूं लागल्या व सन १८९३ सालीं म्हणजे ४६ व्या वर्षीं त्या हिंदुस्थानांत आल्या. हिंदुस्थानांतील शाळांमध्यें धार्मिक भावनांचा परिपोष होण्याऐवजीं उलट परिणाम होतो हें पाहून त्यांनीं काशी येथें सेंट्रल हिंदु कॉलेज स्थापिलें व हिंदुधर्माच्या शिक्षणाकरितां अनेक पुस्तकें लिहिलीं. हें कॉलेज अत्यंत परिश्रमानें त्यांनीं उदयास आणिलें होतें तरी पंडित मदन मोहन मालवीय ह्यांचे सहकार्यानें

त्यांनीं हिंदु युनिव्हर्सिटी स्थापन करून तें कॉलेज बिनशर्त युनिव्हर्सिटीचे स्वाधीन केलें. हिंदु युनिव्हर्सिटीनें पुढें एकदां त्यांस डॉक्टर ऑफ लॉज ही विद्वत्त्वनिदर्शक पदवी दिली. त्यांनीं इतर ठिकाणींहि स्वतंत्र शाळा स्थापन केल्या आहेत व स्त्रीशिक्षणाकरितां एक कॉलेज काशी येथें काढिलें आहे. ह्या शाळा व कर्नल आलकॉट ह्यांनीं अडयार येथें काढिलेली अस्पृश्य लोकांकरितां शाळा ह्या त्यांनीं अजून चालविल्या असून त्यासाठीं त्यांना अतोनात खर्च करावा लागतो. १९०७ सालीं आलकॉटसाहेब वारल्यानंतर बाई थिऑसफिकल सोसायटीच्या अध्यक्ष झाल्या व त्या दर सात वर्षांनीं पुनः निवडून येऊन अजून अध्यक्ष आहेत. त्यांचे अध्यक्षपणाचे सुरुवातीस सोसायटीचा प्रसार अगदीं थोडा होता.पण तो आज सर्व जगभर झाला आहे. ४० देशांमध्यें हिच्या शाखा निघाल्या असून सुमारें अर्धा लक्ष लोक सभासद झाले आहेत. त्यांपैकीं हिंदुस्थानाबाहेरील सभासद चाळीस हजारांहून अधिक आहेत. ह्याचें एक कारण म्हणजे इतर धर्मांतील लोकांस पुनर्जन्म, कर्म, परमेश्वरी सूत्र वगैरेसंबंधीं थिऑसफीचे तत्त्वज्ञान अत्यंत हृदयंगम वाटतें हें होय.

**हिंदी राजकारण**—१९१३ सालच्या अखेरपर्यंत त्या हिंदी राजकारणांत फारशा पडत नसत. परंतु त्या वेळेस ( पुढें लढाई सुरू होणार हें ओळखूनच कीं काय ) त्यांनीं राजकीय बाबतीमध्यें जोरानें कार्य करण्याचें मनांत आणलें. आधीं त्यांनी हिंदी राजकारणाचा पद्धतशीर अभ्यास केला व १९१४ चे सुरुवातीस कॉमनवील हें साप्ताहिक व कांहीं महिन्यांनीं न्यू इंडिया हें दैनिक सुरू केलें. तसेंच विलायतेंत व हिंदुस्थानांत व्याख्यानांची झोड उठवून सर्व राजकीय पक्षांत एकी व्हावी व लो.टिळक आणि व त्यांचे अनुयायी ह्यांस कॉंग्रेसमध्यें शिरतां यावें म्हणून शक्य ती खटपट केली. ह्या खटपटीस इतरांचे साहाय्य मिळून १९१६ सालीं लखनौ येथें संयुक्त कॉंग्रेस घडून आली, बाईंनीं "नॅशनल होमरूल लीग" म्हणून काढली. कारण लो. टिळकांच्या होमरूलचा प्रसार महाराष्ट्र, दक्षिण-महाराष्ट्र, वऱ्हाड व मध्यप्रांत ह्यांचेबाहेर फारसा झाला नाहीं. बाईंच्या चळवळीचा परिणाम इतका झाला कीं, १९१७ सालीं सरकारनें त्यांस बंदींत घातलें. न्यू इंडिया पत्राची जामीन रक्कम जप्त केली व पत्रावर खटलाहि केला. बाई अटकेंत असतांनाच हिंदी राष्ट्रानें त्यांना एकमतानें कॉंग्रेसचे अध्यक्ष नेमलें. बाईंचें वजन अमेरिकेंत व इतर देशांत फार होतें. डॉ. सर सुब्रम्हण्यं अय्यर ह्यांनीं गुप्तपणें प्रेसिडेंट वुइल्सन यांजकडे पत्र पाठवून हिंदुस्थानसरकारच्या अरेरावीची बातमी पाठविली. ह्यामुळें व इतर चळवळींमुळें बाईंची सुटका होऊन त्या कलकत्ता येथें कॉंग्रेसच्या अध्यक्ष झाल्या.

( अपूर्ण )

# संस्थानिकांची कारवाई

( प्रो. ग. र. अभ्यंकर बी. ए. एलएल. बी. )

## पैशासाठीं सावज पकडलें !

ह्लींच्या कोणत्याहि चळवळीला पैशाचें पाठबळ लागत असतें व या चळवळीस हैद्राबादच्या निजामसाहेबांनीं पैशाची मदत केली आहे असेंहि सदर बातमीदाराचें म्हणणें आहे. अशा रीतीनें सिमल्याच्या बातमीदारानें या चळवळीचा हेतु, तिची घटना, त्यांतील चालक व पैशाचा पुरवठा करणाऱ्याचें नांव खुलासेवार दिलें आहे. यांत मौजेची गोष्ट ही आहे कीं, पैशाचा पुरवठा करण्याकरितां जें सावज या चतुर संस्थानिकांनीं गांठलें आहे, त्यावरून त्यांचा कावेबाजपणा निदर्शनास येणार आहे. शिष्टमंडळ विलायतेस जाण्यापूर्वी जामसाहेब हैद्राबादेस गेले होते व त्यावरूनच यांत कांहीं तरी गूढ हेतु आहे असें त्या वेळीं वाटत होतें. आतां त्याचा उलगडा झाला आहे. आपण स्वतंत्र आहों, हिंदुस्थानसरकाराशीं आपला कांहीं संबंध नाहीं किंवा आपण त्यांचे मांडलीकहि नाहीं अशा तऱ्हेची एक भ्रांति निजामसाहेबांचे डोक्यांत खिळलेली आहे व त्यांनीं ती व्यक्तहि केली आहे. लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं निजामसाहेबांची चांगली कानउघाडणी करून त्यांच्या डोळ्यांत अंजन घातलें. व विश्वासू दोस्त याचा अर्थ हाताखालील मांडलीक असा स्पष्टपणें त्यांनीं निजामास कळविला, व त्याची ग्वाही प्रसिद्धपणें सर्व संस्थानिकांना दिली. परंतु निजामसाहेबांच्या डोक्यांतील हें वेड अद्याप गेलें नाहीं. हिंदुस्थानसरकार व आपण बरोबरीच्या नात्याचे स्वतंत्र घटक आहोंत अशी अद्याप त्यांची समजूत आहे व हीच कल्पना ह्लींच्या संस्थानिकांच्या चळ-

वळीच्या मुळाशीं आहे. हिंदुस्थानसरकाराशीं आपलें कांहीं नातें नाहीं, हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन झाली तरी तिच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं, आपले संबंध प्रत्यक्ष बादशहांशीं आहेत अशी या चळवळीची रूपरेषा आहे. अर्थात् या चळवळीचें पोषण करण्यास व तत्प्रीत्यर्थ झीज सोसण्यास या चळवळीच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वानें वेडावलेला मनुष्यच तयार होणार. तेव्हां निजामाला भारवाहक बनविण्यांत जाम, बिकानेर व पतियाळासारख्या धूर्तत्रयांनीं आपलें कौशल्य खर्च केलें असावें याबद्दल शंका नाहीं.

## कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ !

शिष्टमंडळाच्या अनुवादानेंच सर मायकल ओडवायर व लॉर्ड सिडनहॅम यांनीं आपले तारे मासिकांतून तोडले आहेत. या चळवळीचा हेतु लक्षांत घेतला तर संस्थानिकांच्या व ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकांच्या महत्त्वाकांक्षा यांत विरोध नाहीं हें म्हणणें किती अप्रामाणिकपणाचें व साहसाचें आहे हें सहज दिसून येईल. हिंदुस्थानास भावी स्वराज्य प्राप्त झाल्यास तें लोकप्रतिनिधींचें होणार. त्यापासून आपला घात होईल, आपल्या हक्काची पायमल्ली होईल व आपली अरेरावी निरंकुशपणें चालणार नाहीं ही ठाम समजूत संस्थानिकांच्या पुढाऱ्यांची झाली आहे. अशा समजुतीनें खटपट करणाऱ्याच्या भावना हिंदी स्वराज्याच्या अगदीं विरुद्ध आहेत याबद्दल निराळा पुरावा कशाला पाहिजे ? तसेंच हल्लींच्या नोकरशाहीपासूनच आपलें हित होईल व तिच्या आश्रयानेंच आपला योगक्षेम चालेल ही कल्पना किती आसुरी आहे हें सांगण्याचें कारण नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील चळवळीचें रहस्य एकाच गोष्टींत आहे. तें हें कीं, परकीय नोकरशाही जाऊन स्वकीयांच्या हातीं सत्ता आली पाहिजे, तरच आत्मोद्धार होईल, तरच खऱ्या स्वराज्याचा आस्वाद घेतां येईल. परकीय नोकरशाहीचें उच्चाटन हें हिंदु आकांक्षेचें मुख्य ध्येय आहे. परकीय नोकरशाहीचें निरंतर वास्तव्य हें संस्थानिकांचें ध्येय आजमितीला प्रगट होत आहे. या दोनहि कल्पना परस्पर विरोधी आहेत हें कोणासहि सहज दिसून येणार आहे.

भावी स्वराज्याबद्दलचा हा भयंकर द्रोह व स्वकीयांबद्दलचा संस्थानिकांचा विलक्षण अविश्वास पाहून मन स्तिमित होतें. परकीय नोकरशाहीवर विसंबून राहाण्यास सर्व संस्थानिक तयार आहेत. मात्र स्वकीय लोकांच्या हातीं सत्ता आल्यास आत्मनाश होईल असें त्यांस वाटूं लागलें आहे ही भावना किती विपरीत आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. ब्रिटिश हिंदुस्थानांतील मुत्सद्यांनीं आजपर्यंत संस्थानिकांबद्दल अत्यंत आदर व्यक्त केला. पूर्ववैभवाचीं ती चिन्हें आहेत म्हणून त्यांजबदल पूज्यबुद्धि ठेविली. स्वराज्याचे अवशिष्ट घटक म्हणून त्यांचा सन्मान केला. त्यांच्या अवगुणांकडे, त्यांच्या दुष्कृत्यांकडे डोळेझांक केली. त्यांना अपूर्व उत्साहानें गौरविण्यांत आलें. आत्मीयपणानें त्यांची थोरवी गायिली. त्यांच्या गुणाची महती वाढविली. संकटांचे वेळीं त्यांस मदत केली. ते अडचणींत असतांना त्यांस सहानुभूति दाखविली. त्यांच्यावर कोणी हात टाकला तर त्याचा निषेध केला. हरएक प्रसंगीं त्यांच्याकडे जिव्हाळ्यानें व ममत्वानें हिंदी पुढाऱ्यांनीं पाहिलें. इतकें असूनहि याच देशबांधवांच्या उन्नतीमुळें आत्मनाश होईल अशी भीति संस्थानिकांस वाटावी हा दैवदुर्विपाक होय. स्वतःच्या हाडामांसाच्या, पूर्वसंस्काराच्या, पूर्वेतिहासाच्या व संबंधाच्या हिंदी बांधवांबद्दल अविश्वास वाटून धर्मानें, जातीनें व परंपरेनें अत्यंत भिन्न अशा परकीय नोकरशाहीबद्दल संस्थानिकांना विश्वास वाटावा हाच विलक्षण व्यामोह होय. इतकेंच नव्हे तर या मोहग्रस्त वृत्तीनें त्यांनीं भावी स्वराज्याचा वृत्तिच्छेद करण्यास तयार व्हावें हा भवितव्यतेचा महिमा होय. कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ म्हणतात तें खरें आहे.

# श्रीशिवभारत

## लेखांक १ ला

श्री 'शिवभारत'* हा ऐतिहासिक काव्यग्रंथ नुकता प्रसिद्ध झाल्याचें आम्ही वाचकांस गेल्याचे मागील अंकीं विदित केलेंच आहे. तथापि हा ग्रंथपरिचय वाचनाच्या भुकेचा उद्बोध करविणाऱ्या औषधाप्रमाणें होईल. भूक भागविणारें खाद्य तें नव्हे. म्हणून या ग्रंथाच्या विस्तृत माहितीचें खाद्यहि आम्ही द्यावें अशी वाचकांची अपेक्षा असणार याबद्दल शंका नाहीं. पण या ग्रंथाचें महत्त्व असें आहे कीं, हें खाद्य एकदोन लेखांत आम्हीं दिलें तरी,

*[श्रीशिवभारत-संपादक व प्रकाशक सदाशिव महादेव दिवेकर, भा. इ. सं. मंडळ पुणें अगर मु. कल्याण. किं. रु. ६].

खाद्य खाण्याविषयींची मनुष्यमात्राला सहज असलेली वृत्ति वाचकांमध्यें जागृत झाल्याशिवाय राहाणार नाहीं. ही वृत्ति म्हणजे कोणतेंहि खाद्य लोकांच्या हातून न खातां तें आपल्याच हातांत घेऊन खाणें. आणि याहि पलीकडची एक स्वाभाविक वृत्ति म्हटली म्हणजे, खाद्य आपल्याच हातानें तर खावेंच, पण तेंहि शक्य तर आपल्या मालकी हक्काचें असावें. अन्नसत्रांतील अन्न आपण आपल्याच हातानें जेवलों, व कदाचित् तें अन्न पौष्टिकहि असलें, तरी स्वाभिमानी मनुष्याच्या अंगाला तें खाल्लेलें अन्न लागत नाहीं. त्याप्रमाणें 'शिवभारताची' जी माहिती आम्हीं देण्याचें योजिलें आहे ती वाचून ज्यांच्या खिशांत खर्चण्याला सहा रुपये असतील ते हा ग्रंथ विकत घेऊन, सत्तेचा एक गृहालंकार म्हणून आपल्या ग्रंथसंग्रहांत ठेवतील आणि हे सहा रुपये खर्चण्याची पात्रता दुर्दैवानें ज्यांच्या अंगीं नसेल असे मराठी वाचक निदान आपापल्या टापूंतील ज्या कोणाकडे हा ग्रंथ मिळण्यासारखा असेल त्याच्याकडे धांव घेऊन तो वाचल्याशिवाय राहणार नाहींत याविषयीं आम्हाला शंका वाटत नाहीं.

आतां ग्रंथाआधीं ग्रंथसंपादकांचा थोडासा परिचय करून देणें योग्य होईल. हे संपादक म्हणजे सदाशिव महादेव दिवेकर हे होत. हे कल्याण येथील एक रहिवासी असून मुंबईस व्यापार करितात. तथापि पुणें येथील इतिहाससंशोधक मंडळाचे ते एक अत्यंत जिव्हाळ्याचे व उपकारी सभासद आहेत. कारण इतिहाससंशोधनाविषयीं त्यांच्या मनांत तसेंच निस्सीम प्रेम आहे. मनुष्यानें निर्वाहाचा उद्योग धंदा सोईचा म्हणून कोणताहि केला तरी त्याची सर्व अभिरुचि उपजीविकेच्या धंद्यानें प्रायः समाधान पावत नाहीं. यामुळें उपजीविकेचा धंदा एक आणि खऱ्या आवडीचा व्यासंग दुसरा अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. सरकारी नोकरी किंवा राजकारण यांत पडलेले अनेक लोक जसे खऱ्या मनानें पाहिलें असतां वाङ्मयाचे भोक्ते आढळतात त्याप्रमाणें इतर व्यवसायांतहि ते आढळतात; मग कोणाला शुद्ध वाङ्मयाची आवड असो, कोणाला इतिहासाची आवड असो, किंवा कोणाला संशोधनाची आवड असो. युरोपियन लोकांतहि अशा गोष्टी घडताताच. आपल्या इकडील युरोपियन सिव्हिलियन लोकांपैकीं मि. जॅकसन व मि. फ्लीट यांच्यापैकीं पहिल्याला संस्कृत भाषेच्या अभ्यासाची आणि दुसऱ्याला शिलालेख व ताम्रपट यांच्या वाचनाची आवड स्वतःच्या सरकारी कामापेक्षांहि अधिक होती ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तसेंच आपल्याकडील विनायक लक्ष्मण भावे यांनीं व्यापार मिठाचा केला व तो यशस्वी रीतीनेंहि केला. तथापि त्यांचा उरलासुरला वेळ, किंबहुना धंद्याची नजर चुकवून एक प्रकारच्या सात्विक चौर्य वृत्तीनें त्यांतून मिळविलेला वेळ, त्यांनीं मराठी भाषेंतील जुने कवी व ग्रंथकार आणि महानुभाव ग्रंथसंग्रह यांच्या संशोधनांतच घालविला.

सदाशिवराव दिवेकर यांचीहि गोष्ट अशीच आहे. संसाराचें साधन म्हणून त्यांना दिवसभर व्यापारांत खपावें लागतें. तरी या कामां । वेळ व बुद्धि यांच्या गुणाकारानें निर्माण होणारी त्यांची तन्मयता व्यापारांत जितकी दिसून आली किंवा उपयोगी पडली त्यापेक्षांहि इतिहाससंशोधनाच्या कामीं त्यांची तन्मयता अधिक भरली. कारण येथें वेळ थोडा असला तरी व्यापाराच्या मानानें त्यांनीं या कामीं बुद्धि अधिक खर्चिली आहे. कॉलेजाचा अभ्यास पुरा करण्याची त्यांना सवड असती तर ते युनिव्हर्सिटीची पदवी घेऊन संशोधक म्हणून पुढे येऊं शकते. अशा पदवीचें अधिष्ठान संशोधकाला अर्थातच अधिक उपयोगी पडतें. परंतु युनिव्हर्सिटीच्या पदवीपेक्षांहि ग्रंथकार या नात्यानें मिळणारी पदवी, तो ग्रंथ लोकांना मान्य होण्यासारखा असल्यास, अधिक भूषणास्पद आहे यांत शंका नाहीं. दिवेकर यांनीं या ग्रंथाच्या उपोद्घातामध्यें आपला स्वतःचा या दृष्टीचा परिचय वाचकांना थोडासा करून दिला आहे. सरकारी नोकरींत असतांनाहि आवडीचें काम म्हणून तें करणारे कै. रावबहादूर काशिनाथपंत साने यांच्या काव्येतिहास संग्रहानें दिवेकर यांना प्रथम इतिहासवाचनाची गोडी लागली व त्यांतूनच संशोधनाची गोडी निघाली. तें संशोधन आजपर्यंत २५।३० वर्षे त्यांनीं चालविलें आहे.

दिवेकर लिहितात—"कोणत्याहि प्रसंगानें परमुलखीं अगर परगांवीं गेलों म्हणजे उद्योगाचें काम उरकून संशोधनाचेंहि शक्य तितकें काम, कागदपत्रें मिळण्याचीं स्थळें धुंडाळून, करीत गेलों व आजामितीपावेतों शक्त्यनुसार पैसा खर्चून ऐतिहासिक सामुग्री संपादण्याची खटपट मीं चालविली आहे." कै. राजवाडे यांना त्यांनीं अनेक ऐतिहासिक कागदपत्र फार वर्षांपूर्वी पुरविले, त्यांतील कांहीं राजवाड्यांनीं आपल्या चौथ्या खंडांत छापलेहि आहेत. उपोद्घाताचें पृष्ठ ३ वरील त्यांनीं मिळविलेल्या ऐतिहासिक साधनांची यादी पाहिली, म्हणजे दिवेकर यांच्या 'हाताला यश आहे' असेंच म्हणणें प्राप्त आहे. त्याचप्रमाणें प्रस्तुत शिवभारत हा ग्रंथ त्यांच्या आढळांत कसा आला, त्याची प्रत त्यांनीं किती परिश्रमानें मिळविली व हल्लींच्या स्वरूपांत ती प्रसिद्ध करण्याला त्यांना किती श्रम पडले याचाहि त्यांनीं दिलेला वृत्तान्त मनोरंजक आहे. तो सर्व

आम्ही येथें देत नाहीं; पण तंजावासारख्या दूरच्या ठिकाणीं तामील भाषेंत हातीं लागलेल्या ग्रंथावरून अनुमान बांधून, प्रथम तामीलमधील भाषांतरावरून त्याचा अभ्यास करून, नंतर मूळ संस्कृत ग्रंथाचा पत्ता लावून त्याची प्रत मिळवून, तीं संशोधून, भाषांतरवून, तिला दत्तोपंत आपटे यासारख्या मार्मिक इतिहासज्ञाकडून प्रस्तावना लिहवून, अनुरूप चित्रें व नकाशे घालून, हा सुमारें सवासहाशें पानांचा ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केला आणि आपल्या इतिहास प्रेमाचें कायमचें स्मारक करून ठेवलें याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करतों.

ग्रंथसंपादकाचा परामर्ष घेतल्यावर मूळ ग्रंथाकडे वळूं व पुढें त्यानंतर या ग्रंथाला आपटे यांनीं जी प्रस्तावना जोडली आहे तिच्या विषयींहि थोडेंसें विवेचन करूं. शिवभारत हा ग्रंथ परमानंद नामक कवीनें संस्कृत भाषेंत जुन्या काव्याच्या पद्धतीनें लिहिलेला आहे. त्याचे एकंदर मूळ अध्याय किती व श्लोकसंख्या खरोखर किती होती याचा निर्णय करतां येत नाहीं; परंतु स्वतः ग्रंथकार कित्येक अध्यायांचे शेवटीं 'शतसाहस्त्र्याम् संहितायाम्' असें लिहितो. यावरून कदाचित् त्यानें एक लक्ष श्लोक केले असावे किंवा निदान तितके करण्याचा त्याचा संकल्प असावा हे उघड दिसतें. दिवेकर यांना मिळालेल्या प्रतींत पहिले ३१ अध्याय संपूर्ण असून ३२ व्याचे फक्त नऊ श्लोक आहेत व तेथेंच खंड पडलेला असल्यामुळें, प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं जुन्या पद्धतीचा जो समाप्तिमंत्र तो लिहितो तेथें तो नाहीं.मग हा खंड मूळ ग्रंथकाराच्या हातूनच काव्यरचना थांबली म्हणून पडलेला असो, किंवा त्याची प्रत करणाराच्या हातून लिहिण्याचें काम तेथें खंडित झालें म्हणून पडला असो. कसेंहि म्हटलें तरी आज अपूर्ण स्थितींत हा ग्रंथ हातीं येत आहे याबद्दल हळहळ वाटल्याखेरीज राहात नाहीं. युरोपियन पंडित बर्नेल व ग्रंथसूचिकार ऑफ्रेट यांच्या यादींत शिवभारताच्या हस्तलिखिताचा उल्लेख आहे. पण त्यावरूनहि हा ग्रंथ त्यांच्या वेळीं अखंड अशा स्थितींत होता असें दिसत नाहीं.

असो. या सवा एकतीस अध्यायांत श्लोकसंख्या २२६२ इतकी आहे. त्यांपैकीं पहिल्या पांच अध्यायांत मालोजी व शहाजी यांच्या संबंधाची हकीकत असून बाकीच्यांत शिवाजीमहाराजांचें यशोवर्णन आहे. पहिल्या अध्यायांत कवीनें ग्रंथांतील उद्दिष्ट विषयाचा उल्लेख केला आहे. यांतील इतर भाग सोडून दिले तर "यत्र युद्धान्यनेकानि शिवस्य यवनैस्सह" एवढा एकच उल्लेख इतिहासविषयक आहे. "शिवाजीमहाराजांनीं तत्कालीन यवनांशीं केलेल्या अनेक युद्धांचें वर्णन मी देणार आहे." असें कवी म्हणतो यावरून तीं युद्धें चालू असतांना, म्हणजे त्यांतील कांहीं अजून व्हावयाचीं होतीं अशा स्थितींत, त्यानें हें काव्य लिहावयास घेतलें, किंवा सर्व युद्धें संपून महाराजांना राज्याभिषेक होऊन स्वस्थता लाभल्यानंतर लिहावयास घेतलें असे दोनहि अर्थ संभवतात.

पण एवढी गोष्ट खरी कीं, उपलब्ध ग्रंथांत प्रभानवल्ली हस्तगत करण्यापर्यंत म्हणजे शके १५८३ च्या ज्येष्ठ महिन्यापर्यंतचीच हकीकत आढळते. अध्याय ६ शिवराजप्रभव यांत शके १५५१ च्या फाल्गुन मासीं शिवाजी जन्मला असें श्लोकात्मक स्पष्ट लिहिलें असून, सातव्या अध्यायांत तो सुमारें सात वर्षांचा होई पर्यंत शिवाजीनें केलेल्या बाललीलांचें काव्यवर्णन आहे ! आठव्यांत शके १५५८ मधील निजामशाहीच्या अंताची हकीकत, नवव्यांत शिवाजीचा बंगलोर येथें झालेला विद्याभ्यास, दहाव्यांत शके १५६३ त शिवाजीचें पुण्यास आगमन व पुढील विद्याभ्यास, अकराव्यांत शके १५६९ मधील शहाजीच्या उत्कर्षाविरुद्ध आदिलशाहीच्या प्रतिक्रियेचा प्रारंभ, बाराव्यांत श. १५७० मध्यें शहाजीची कैद, १३ ते १६ या अध्यायांत श. १५७१ मधील शिरवळ येथील युद्ध, मुसेखानाचा वध, फत्तेखानाचा पराभव, शहाजीची सुटका, व सोनोपंतानें सांगितलेली राजनीति इतका विषय आहे. म्हणजे एकंदरीनें ही शिवजन्मापासून पहिल्या वीस वर्षांतील हकीकत आली; व तिजवरून शिवाजी वयाच्या १७ किंवा १९ व्या वर्षापासून स्वाऱ्या-शिकाऱ्या आणि राजकारण स्वतंत्रपणें करूं लागला होता असें दिसतें. शके १५८१ तील हकीकतीनें आठ अध्याय (१७ ते २४) व्यापिले आहेत. अफजलखानाची स्वारी व वध, पन्हाळ्यावरील जय, रुस्तुमखानाचा पराभव इतके विषय त्यांत येतात. नंतर अध्याय २५ ते ३० यांत शके १५८२ या एकाच वर्षांतील विषय येतात. ते शाहीस्तेखानाची स्वारी, पन्हाळगडचा वेढा, कारतलबखानाचा पराभव, उंबरखिंडीचें युद्ध, आणि राजापुरावरील शिवाजीची स्वारी, आणि शेवटल्या म्हणजे ३० व ३१ या अध्यायांत शके १५८३ मधील शृंगारपूर व प्रभानवल्ली हीं ठाणीं शिवाजीनें हस्तगत केल्याची हकीकत आहे.

३२ व्या अध्यायांत ग्रीष्म ऋतूचें वर्णन करण्याच्या ओघांत कवि असतांच नवव्या श्लोकाशीं ग्रंथगति खुंटलेली आढळते. हा खंड मूळ कवीच्या हातचा किंवा प्रत करणाऱ्याच्या हातचा असावा हें कळण्यास आज मार्ग नाहीं. पण शके १५८३

च्या पुढील सुमारें १९-२० वर्षांची शिवाजीच्या चरित्राची हकीकत वर्णन करण्याचें काम कवि हा स्वतः जिवंत असता तर सुखासुखी सोडता असें वाटत नाहीं. एक लक्ष श्लोकात्मक अनुपुराण पूर्ण करण्याची त्याची उमेद अर्थातच कायम असली पाहिजे आणि यापुढील जयसिंगप्रकरण, शिवाजीची दिल्लीच्या बादशहास भेट, कैद, सुटका, राज्यारोहण असल्या काव्यरुचीच्या गोड घांसांचा आस्वाद घेतल्याशिवाय कवि राहिला नसता ही गोष्ट कोणीहि मान्य करील. अर्थात् उपलब्ध काव्य खंडित असून तितकेंच तें प्रसिद्ध करावें लागत आहे. याचा परिणाम खाचित असा होईल कीं, इतिहासदेवतेचे विश्वासू चौकस मनोदूत उरलेल्या काव्यखंडाचा शोध लावून तो हस्तगत करण्याविषयीं दक्ष व उत्सुक राहतील आणि कदाचित् रसिक इतिहासज्ञांची उरलेली अर्धी भूक पुढेंमागें निवेल. तथापि आज जेवढें काव्य उपलब्ध होऊन प्रसिद्ध झालें तेवढ्याचाहि परामर्ष घेतलाच पाहिजे आणि तेवढ्यावरूनहि या कवीचें अंतरंग व त्याची पद्धति यांजविषयीं अनुमानें काढतां येतील.

# धर्मभावनांवरील टीकेचा गुन्हा !

## ( श्री. न. चिं. केळकर यांचें भाषण )

या बिलाच्या चर्चेच्या वेळीं न. चिं. केळकर यांनीं असेंब्लींत ता. १६ सप्टेंबर रोजीं भाषण केलें त्याचा सारांश खालीं दिला आहे:—

" धर्माविरुद्ध होणाऱ्या अवास्तव टीकांपासून धर्माचें संरक्षण करण्याकरितां हें बिल पुढें आणलें आहे. तथापि हें पास होण्यापूर्वी त्यांत बरीच सुधारणा होईल अशी मला आशा आहे. सिलेक्ट कमिटीपुढें हें बिल गेलें असतांना सिलेक्ट कमिटीचा सभासद या नात्यानें माझी स्वतंत्र मतभेदपत्रिका मी बिलास जोडली होती. याहि दृष्टीनें या बिलासंबंधीं मी माझें म्हणणें थोडक्यांत पण स्पष्टपणानें आपणापुढें मांडणार आहे.

### नवीन कायद्याची व्याप्ति

एखादा नवीन गुन्हा आस्तित्वांत आणणारें कलम पिनल कोडांत येऊं लागलें कीं त्याविरुद्ध माझें मनांत बंडखोरी उभी राहते. नालस्तीपर व विद्वेषकारक अशा लेखकांना पायबंद हवा; पण त्याबरोबर गुन्ह्याची निश्चित मर्यादा ठरवून अपवादांचा स्पष्ट नामनिर्देशहि केला पाहिजे. जेवढा गुन्हा तितकाच प्रतिबंध असावा; त्यापेक्षां दंडकाची अतिव्याप्ति असूं नये. रोग बरा पण औषध नको असें न व्हावें.

प्रथमतः या कायद्याच्या व्याप्तीमध्यें कोणकोणते लोक येतात हें पाहूं. कांहीं लोक असे असतात कीं, प्रत्यक्ष विद्वेषच पाहिला तर तो त्यांचे मनांत अत्यंत जळजळीत असतो. पण नुसता मनांत हवा तेवढा द्वेष असला तरी तो कायद्याच्या कचाट्यांत कसा येणार ? ज्याच्या मनांतील रागद्वेष शब्दांत अगर कृतींत उतरूं शकत नाहीं तो मनुष्य कायद्याचे दृष्टीनें अमर्षशून्यच म्हणावयाचा. कायदा त्याला स्पर्श करूं शकत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारचे लोक असे असतात कीं, त्यांचा रागद्वेष शब्दांत अगर कृतींत उतरून प्रभावी होतो. प्रहार करण्याच्या बुद्धीबरोबर प्रहार करण्याचें धारिष्टहि त्यांचे अंगीं असतें ! अशा लोकांपासून कोणाच्या मनोभावना दुखावल्या गेल्या तर कायद्यानें अर्थात् मध्यें पडून धर्माच्याभोंवतीं आपली संरक्षक शक्ति उभी केली पाहिजे.

पण लोकांचा तिसराहि एक वर्ग आहे. हा म्हणजे सत्प्रवृत्त टीकाकारांचा. कोणतीहि सुधारणा घडवून आणण्याकरितां यांना आपल्या टीकेचें शस्त्र सतत चालू ठेवावेंच लागतें. पण तें करतांना कोणाच्या व्यक्तिविषयक नाजूक भावना दुखवाव्या अगर अन्यायानें टीकेचा हल्ला चढवावा अशी त्यांची इच्छा नसते. या लोकांचें कार्य प्रामाणिकपणानें व निर्वेध चालू राहण्याला यांना नवीन कायद्यापासून संरक्षण नको काय ? सिलेक्ट कमिटीनें बिलाचा जो अखेर मसुदा पास केला आहे त्यांत अतिव्याप्तीचा दोष घडला आहे व या वर्गाचें नवीन बिलापासून संरक्षण व्हावयास पाहिजे तितकें तें होत नाहीं, अशी माझी तक्रार आहे.

### टीकाकार व कायदा

जगांतील सुधारणांचा एकंदर इतिहास पाहिला तर टीका व टीकाकार यांनीं त्यांत फार बहुमोल कामगिरी बजावली आहे व असेंब्लींत बसून नवे कायदे करतांना या लोकांना निष्कारण पायबंद बसून त्यामुळें एकंदर सुधारणेचें कार्य थांबू नये इकडेहि आपण लक्ष दिलें पाहिजे. टीकेच्या व्याप्तीपेक्षां कायद्याची व्याप्ति, कार्य व उद्देश संकुचित असतो व तसाच तो असला पाहिजे. कायदाहि लोकांना शिक्षण देतो. पण तें अभावरूपी किंवा निषेधात्मक असतें. काय काय करूं नये इतकेंच फार तर कायदा सांगेल. चांगल्या गोष्टी हमखास

घडवून आणण्याची 'प्रयोजक' शक्ति कायद्यांत नाहीं. अर्थात् लोककल्याण घडून यावयाचें तर तें समाजांतील व्यक्तींची इच्छा, शिक्षण व सुसंस्कृति यांवरच केव्हांहि अवलंबून राहणार! टोलनाक्या-वरील आडव्या दांड्याप्रमाणें सामाजिक व्यव-हाराचे मार्गावर कायदा बसलेला असतो. कार्याकार्यांची मर्यादारेषा त्यानें आंखून ठेवलेली असते. ती ओलांडून तुम्ही पलीकडे जाऊं लागलां कीं दंडरूपी टोल अगर दस्तुरी तुम्हांस द्यावीच लागते. या मर्यादेला भिडण्यापूर्वी तुम्ही काय केलें व नंतर काय कराल हें तो दंड (दांडा) पाहात नाहीं.

## टीकेचे हक्कदार कोण ?

कांहीं विशिष्ट वर्गांना अगर लोकांना रास्त टीका करण्याचा हक्क निसर्गसिद्ध असतो म्हणून त्यांना कायद्याचें संरक्षण मिळालेंच पाहिजे. उदाहरणार्थ, या संरक्षणाचे पहिले हक्कदार समाजांतील अश्रद्धा-वादी अगर सूक्ष्म शंकेखोर लोक हे होत. समाजामध्यें दृढमूल प्रस्थापित झालेल्या रूढीच्या अगर मतांच्या अभेद्य दुर्गावर हे लोक कधीं समोरून छातीठोक हल्ला चढवीत नाहींत. पण नदीच्या प्रवाहांत उभें असतां पायाखालील वाळू जशी कणाकणानें न कळत झरून जात असते, त्याप्रमाणें लोकमतामध्यें सूक्ष्मपणानें पण निश्चित फरक घडवून आणण्याचें या वर्गाचें काम चालू असतें. व थेंबाथेंबानें झिमझिम पडणाऱ्या पावसानें कालांतरानें का होईना पण सृष्टींत प्रचंड घडामोडी होतात, मैदानांच्या ठिकाणी पर्वत होतात व पर्वतांचे जागीं मैदानें होतात, त्याच-प्रमाणें या अश्रद्धावादी अगर शंकाप्रवृत्त लोकांच्या हातून सूक्ष्म रीतीनें का होईना पण परिणामीं लोक-मतामध्यें अत्यंत आश्चर्यकारक स्थित्यंतरें होतात.

## समाजशास्त्रज्ञ

यानंतर समाजशास्त्रवेत्त्यांचा वर्ग. हा आप-ल्या निवांत खोलीमध्यें बसून परिश्रमपूर्वक आंकडे जमवीत असतो व खऱ्या हकीकती व गोष्टी टिपून ठेवीत असतो. लौकिक दृष्ट्या चांगल्या—वाईट सर्वच गोष्टी त्याच्या खातीं जमा असतात. त्याला ग्राम्य अशाहि आचारविचा-रांची नोंद करावी लागते. पण निर्विकार बुद्धीनें चालविलेल्या या आंकडेगिरींतून कांहीं तरी सिद्धान्त काढण्याची त्याची सर्व खटपट असते. अशा आंकडे शास्त्रज्ञांच्या पुस्तकांतील वाईट गोष्टींवर केवळ त्या गोष्टी नजरेस आल्यानें अमुक एका वर्गाच्या भावना दुखावल्या जातात, म्हणून तुम्ही कांट मारूं लागलां तर सिद्धान्तवादी मनुष्य आपले सिद्धान्त कसे तयार करणार? म्हणून अंतिम दृष्टीनें या लोकांना काय-द्याचें संरक्षण असणें अवश्य आहे.

## तार्किक व तत्त्ववेत्ते

यानंतरचा तार्किक लोकांचा वर्ग. या लोकांचा वर्ग नेहमीं कोठें तरी जागृत असतो म्हणूनच निर-निराळे संप्रदाय आणि त्यांचीं बंडें यांचा विनाशकाल येतो. खऱ्या बौद्धिक युक्तिवादाच्या दारूगोळ्यापुढें भोळ्या भावना तटाच्या भिंतीप्रमाणें कोसळून पडूं लागतात.

नंतर गूढ संशोधनांत निमग्न असणारा तत्त्ववेत्ता. यालाहि कायद्यानें आपल्या कक्षेतून सोडलें पाहिजे. यतिधर्म अगर संन्यासधर्म ज्यानें घेतला त्याला ज्याप्रमाणें पूर्वीच्या काळीं कायद्यांचीं बंधनें लागू नसत त्याचप्रमाणें याहि बाबतींत झालें पाहिजे. तत्त्ववेत्ता संसारांत बसला उठला तरी यती प्रमाणेंच शून्यसंशोधन करीत असतो. व्यष्टीपेक्षां सम-ष्टीवरच त्याची दृष्टि असते. एका कोणत्याहि वृक्षा-पेक्षां समग्र वृक्षारण्यच त्याचे दृष्टीस दिसत असतें. अर्थात् अशा लोकाकडून निघालेल्या सकृद्दर्शनीं व्यक्तिविषयक अशा वाटणाऱ्या उद्गारांनीं, कोणाची बेअदबी अगर निंदानालस्ती झाली असें कां मानावें? गुन्हा करण्याचा उद्देशच ज्यांच्या मनांत नाहीं त्यांच्यावर गुन्हा कां लादावा ?

## विनोदी टीकाकार

यानंतर विनोदप्रिय व वक्रोक्तिप्रिय कुचेष्टेखोर लोक. यांच्या हातून होणारी मनुष्यजातीची सेवा फार श्रेष्ठ दर्जाची आहे हें कबूल केलें पाहिजे. यांच्या विनोदाला थोडें वात्रटपणाचें स्वरूप असलें तरी अहंमन्यता, भोंदूपणा, भ्रामक समजुती, गर्व, अहंकार यांचीं जीं अनेक जाळीं व जळमटें समाजाच्या मनांत राहून गेलेलीं असतात तीं थट्टेखोरी व सूक्ष्म उपहास यांच्या फुंकरांनीं नकळत ते दूर करीत असतात. तसेंच वक्रोक्ति ही क्वचित् कठोर व निर्दयपणाची असली तरी हें शस्त्र समाजाच्या हिताकरितांच धरणारानें हातीं धरलेलें असतें. रोगावर शस्त्रक्रिया करणारा डॉक्टर व लोकसमजुतीवर वक्रोक्तीचें शस्त्र चालविणारा विनोदी लेखक यांत फरक तो काय ?

## टीकाकार व जगाची सुधारणा

असो. या व अशा सदरांत पडणाऱ्या सर्व लोकांना कायद्यानें मुक्तद्वार ठेवलें पाहिजे. जगाच्या इतिहासांत सामाजिक व धार्मिक लढ्याचे असे प्रसंग वारंवार आले आहेत. प्रत्येक संस्कृतीच्या युगाबरोबर त्या संस्कृतीचे बरेवाईट टीकाकारहि निर्माण झाले आहेत. त्यांच्या प्रयत्नामुळेंच आज-पर्यंत मनुष्यजातीची धारणा व सुधारणा हीं झालीं आहेत. युरोपांतील प्रसिद्ध आडमुठा सुधारक लूथर यानें तत्कालीन पोपच्या सत्तेविरुद्ध बंड पुकारून चर्चच्या दारावर आपली प्रश्नपत्रिका प्रत्यक्ष खिळे

ठोकून चढविली! पण त्याच्याहि पूर्वी इरॅस्मस यानें आपल्या एका पुस्तकांत परलोकाचें काल्पनिक वर्णन करून, इहलोकीं मोठमोठे साधू व महात्मे म्हणविणारे लोक तेथें किती हालअपेष्टा सोशीत असतात याचें वर्णन केलेलें इतिहासज्ञांस माहीत आहेच. फ्रेंच राज्यक्रांतीची गोष्ट घेतली तर रूसो हा बोलूनचालून अश्लील व आडमुठेपणानें हवे तसे टीकेचे कोरडे उडवीत असे. त्याच्या उलट व्हॉल्टेअर याची टीका मोठी सूक्ष्म, पायघोळ असे! पण समाजाला उन्नतावस्थेप्रत आणून लोकांचें मन तयार करणें हें एकच कार्य दोघांनींहि घडवून आणलें.

**रास्त टीकेला मुक्तद्वार हवें**

आणि ज्या काळांत आपण राहतों त्या वर्तमानकाळांत तरी आपणाला हेंच दिसून येईल. महत्त्वाचे दृष्टीनें ज्याला "ऐतिहासिक" असें नांव यथार्थतेनें लावतां येईल अशा वर्तमानकालीन वादांचींहि उदाहरणें देतां येतील. येशू ख्रिस्त हा ऐतिहासिक पुरुष होता काय? श्रीकृष्णाची रासलीला सदोष कीं निर्दोष होती? महंमदाचें चारित्र्य कसें होतें? बुद्धाचा अभक्ष्यभक्षणातिरेकानें मृत्यु झाला काय? या व अशा धार्मिक विषयांवर रणें पडलीं होतीं. त्याचप्रमाणें बालविवाह, विधवाविवाह, संततिनियमन, अशा सामाजिक प्रश्नांचाहि उल्लेख करतां येईल. सदभिरुचि ज्याला म्हणतां येईल ती अशा प्रश्नांच्या ऊहापोहामध्यें सर्व ठिकाणीं हटकून पाळली जातेच किंवा जाईलच हें संभवत नाहीं. तथापि टीकाकारांची विशाल दृष्टि व सार्वजनिक हितबुद्धि लक्षांत घेतां इतर बारीक गोष्टी आपण विसरूं शकतों. व्यक्तिविषयक कोणाचें नुकसान केल्याशिवाय सद्भावनेनें असे वाद करत येतात, मग आजमितीला असे सर्व टीकाकार नामशेष होऊन त्यांचा निर्वंश झाला असें कोणी कां मानावें?

सिलेक्ट कमिटीच्या मताला जी भिन्नमतपत्रिका मी जोडली आहे तींत मी हेंच दर्शविलें आहे. व सद्भावनेनें टीका करणाऱ्या वर्गाला जें कायद्यानें संरक्षण मिळावयास पाहिजे तें नवीन कायद्यानें मिळणार नाहीं ही अडचण मी दिग्दर्शित केली आहे. अशा दृष्टीनेंच आपण या बिलांत योग्य ते फेरफार करून नंतरच तें असेंब्लीनें पास करावें अशी माझी सूचना आहे.

# डॉ. ॲनी बेझंट यांचीं ऐंशी वर्षे

( ले.—ग. स. मराठे )

( उत्तरार्ध )

**काँग्रेसशीं संबंध**—१९२० सालापर्यंत बेझंटबाई काँग्रेसमध्यें येत असत. परंतु त्या वेळेपासून पुढें काँग्रेसमध्यें विचारप्राधान्य जाऊन भावनाप्राधान्य उत्पन्न झालें, त्यामुळें त्यांनीं काँग्रेसशीं सहकार्य करण्याचें सोडून दिलें. मात्र राष्ट्रीय चळवळीला विवेकप्रधान करण्याचें विधायक कार्य त्यांनीं जोरानें चालू ठेविलें. तें कार्य म्हणजे निरनिराळ्या कौन्सिलांतील सभासद व इतर राजकीय पुढारी यांचें एक नॅशनल कन्व्हेन्शन स्थापन करून त्याचे द्वारा "कॉमनवेल्थ ऑफ इंडिया" नांवाचें बिल पार्लमेंटापुढें ठेवण्यासाठीं तयार केलें व विलायतेस जाऊन हें बिल पार्लमेंटापुढें आणण्यासाठीं मजूर पक्षाकडून खटपट करविली. ह्या बिलाशीं तपशिलाचे बाबतींत कोणाकोणाचा मतभेद झाला. तथापि बिलाची रचना फारच पद्धतशीर व विचारपूर्ण आहे असें सर्वांचें मत आहे. सर्व राष्ट्राची एकी व्हावी ह्या दृष्टीनें १९२४ सालीं त्यांनीं पुन: गांधीजींशीं समेट करण्याचा प्रयत्न केला व त्यांचे इच्छेप्रमाणें पुढील वर्षी दररोज अर्धा तास सूत कांतण्याचेंहि त्यांनीं कबूल केलें. इतक्या वृद्ध वयांत व इतर अनेक कामांचा लकडा पाठीमागें असतांहि डॉ. बेझंट यांनीं हें सूत कांतण्याचें व्रत इतक्या प्रामाणिकपणें चालविलें की, गांधीजींच्या पट्टशिष्यांपैकींही थोड्यांनींच तसें चालविलें असेल. अजूनहि त्या इंग्लंड व अमेरिकेमध्यें प्रवास करीत असतांना हिंदुस्थानाच्या पारतंत्र्याविषयीं प्रत्येक मोठमोठ्या शहरीं व्याख्यानें देत असतात. पूर्वी लिहिलेल्या राजकीय पुस्तकांतच "इंडिया बाऊंड ऑर फ्री" ह्या नवीन पुस्तकाची नुकतीच भर टाकून तें अमेरिकेंत प्रसिद्ध केलें व तेथील वर्तमानपत्रांत त्यावर अभिप्रायहि आले. मिस मेयो ह्या बाईकडून हिंदुस्थानाला अपमानकारक असें जें पुस्तक अलीकडे लिहिलें गेलेलें आहे तें कदाचित् याचीच प्रतिक्रिया म्हणून असेल.

मजूर पक्षांतील एक प्रमुख असे बाईचे शिष्य मि. ग्रॅहॅमपोल या पार्लमेंटांतील सभासदाकरवीं शेंकडों प्रश्न विचारून, वर्तमानपत्रांत लेख देऊन व हिंदुस्थानविषयक माहिती हवी असेल त्यांस ती परिश्रमपूर्वक देऊन हिंदी मनुष्य करणार नाहीं इतकी हिंदुस्थानाची सेवा त्या करीत आहेत. हिंदुस्थानांतून परदेशांत जाणारे लोकांस थिऑसफिस्ट लोक प्रेमानें

मदत करतात व हिंदुस्थानविषयक सद्भावना उत्पन्न करण्याचें काम शक्य तितकें करीत असतात.

**धर्मसाधनः**—बाईचें सनातन धर्मावर विशेष प्रेम आहे. परंतु त्यांचा कोणत्याहि हिंदुधर्मीय समाजांत संग्रह होणें शक्य नसल्यामुळें त्यांना कोणी हिंदु समजत नाहीं. तसेंच बाईच्या धर्मा-विषयीं बोलतांना हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, हिंदुधर्माचा अमुक एक निश्चित आचार आहे असें नाहीं. हिंदुधर्म म्हणजे सनातन धर्माच्या अध्यात्मिक तत्त्वांचें प्रतिपालन अशा अर्थानें बाईचें आचरण आहे. त्यांचा पुनर्जन्मावर पूर्ण विश्वास आहे इतकेंच नव्हे, तर पूर्वीच्या जन्मांचें त्यांस ज्ञानहि झालेलें आहे. त्यांच्या शिष्यसंप्रदायांतील लोकांस त्यांची मुख्य शिकवण म्हणजे चित्तशुद्धि, परोपकार व सद्गुरुप्राप्तीसाठीं आपआपल्या स्वभावानुसार अहर्निश प्रयत्न करणें अशाच प्रकारची असते. ह्यांचे संप्रदायांत अनेक पंथांचे अनेक देशांतील अनेक भावनाप्रधान लोक आहेत व प्रत्येकास त्याच्या अधिकाराप्रमाणें परमार्थाचा मार्ग दाखविण्याचें काम त्या उत्तम रीतीनें करतात. बाईचा मुख्य मोठेपणा म्हणजे ज्याप्रमाणें भौतिक ज्ञानाचा उत्कर्ष भौतिक शास्त्राच्या संशोधनात्मक अध्ययनामुळें झाला त्याचप्रमाणें अध्यात्मिक ज्ञानाची वाढ होण्यासाठीं अध्यात्मिक शास्त्राचें पद्धतशीर संशोधन व अध्ययन करण्याचा मार्ग त्यांनीं घालून दिला हा होय. ह्यासाठीं त्यांनीं अड्यार येथें १९२२ सालापासून ब्रह्मविद्याश्रम म्हणून एक उच्च शिक्षणाची पाठशाळा काढली आहे. ह्या पाठशाळेमध्यें ब्रह्मविद्येचें अध्ययन सहा प्रकारांनीं होतें. ते म्हणजे (१) धर्म (२) तत्त्वज्ञान (३) शास्त्रें (४) कला (५) वाङ्मय (६) अंतर्विद्या. ह्या पाठशाळेंत परदेशांतीलहि अध्यात्मजिज्ञासु लोक येऊन शिकून जातात. ब्रह्मविद्येच्या शिक्षणाची सोय घरबसल्याहि थिऑसफिकल सोसायटीचे सभासदांस करून घेतां येते. धर्मसाधनाविषयीं बाईचा जिव्हाळ्याचा प्रयत्न म्हणजे जगद्गुरूंच्या आगमनाविषयीं होय. ह्यासंबंधीं थोडीशी माहिती पूर्वी केसरींत आलेलीच आहे व अधिक पाहिजे असेल ती आनंदानें पुरविण्यांत येईल.

**इतर चळवळीः**—हिंदुस्थानांत सध्या "बॉय-स्काऊट"च्या चळवळीचा इतका प्रसार झाला आहे त्याचें पहिलें कारण बेझंटबाईच आहेत हें थोड्यांसच माहीत असेल. इतर देशांत हीच चळवळ पुष्कळ वाढली होती तरी ती हिंदुस्थानांत आणण्याची सरकारची इच्छा नव्हती. बाईनीं ह्या विषयांत तज्ज्ञ असा एक लष्करी अम्मलदार (थिऑसफिस्ट) आपलेकडे घेऊन त्याचे द्वारें प्रथम आपल्या शाळांमधून स्काउटिंग सुरू केलें व तेथून तयार झालेले लोक ठिकठिकाणीं पाठविले. त्यांतीलच एक सध्याचे मुंबई इलाख्यांतील स्काऊट कमिशनर श्रीयुत व्यंकटेश्वरम् हे होत. ह्यांनीं मला पत्र लिहून माझे मार्फत नूतन मराठी हायस्कूलमध्यें स्काउटिंगची चळवळ सुरू केली व पुण्यास बॉय-स्काऊट असोसिएशन सुरू केली. अशा रीतीनें इतरहि अनेक ठिकाणीं अनेक पथकें तयार झालीं व त्या योगानें सरकारला लाजेकाजेस्तव सरकारी शाळांतूनहि अशीं पथकें काढावीं लागलीं. व मग योग्य वेळ येतांच बाईनीं आपलीं पथकें सरकारी पथकांशीं जुळं दिलीं व सरकारनेंहि त्यांस (त्या स्त्री असून) "ऑनररी स्काऊट कमिशनर फॉर इंडिया" अशी पदवी दिली. मद्रास येथें त्यांचे प्रयत्नानें मुलांसाठीं कोर्ट निघालें असून यावर स्त्री मॅजिस्ट्रेट नेमली आहे. ह्याशिवाय बाईच्या प्रामुख्यानें ज्या चळवळी त्यांच्या अनुयायांनीं काढिल्या आहेत त्यांपैकीं कांहींचा निर्देश करतों. (१) इंटर-नॅशनल कॉरेस्पॉंडन्स लीग–निरनिराळ्या राष्ट्रांतील परिचयोत्सुक लोकांचा एकमेकांशीं संबंध आणून देणें (२) इंटर-नॅशनल ऑर्डर ऑफ सर्व्हिस-अनेक लोकसेवेचीं कामें राष्ट्रभेद मनांत न आणतां करणें (३) राऊंड टेबल–मुक्तिफौज ही सैन्यांतील शिस्तीचें जसें अनुकरण करते त्याप्रमाणेंच नाइटहूड व शिव्हलरीचें अनुकरण करून लोकसेवेस हें वाहून घेणारें आहे (४) ऑर्डर ऑफ दि गोल्डन चेन–परमेश्वराचें कार्य करण्यासाठीं सांखळी बनवून स्वतःस तिचे दुवे समजणारे (५) ब्रदर्स ऑफ सर्व्हिस–स्वतःचें तनमनधन संस्थेस अर्पण करून प्रमुख (डॉ. बेझंट) यांची आज्ञा होईल ती ती कामगिरी करणारे स्त्री-पुरुष (६) वुइमेन्स(स्त्रियांची) इंडियन असोसिएशनहिच्या पासष्ट शाखा हिंदुस्थानभर आहेत.काम स्त्रीवर्गाची स्थिति सुधारणें व हक्क मिळविणें (७) थिऑसफिकल मुस्लीम असोसिएशन (८) लीग ऑफ पेरेंटस् ॲण्ड टीचर्स–मुलांचें शिक्षण प्रेमाच्या व समजुतीच्या पायावर करणें (९) म्यूझियस कॉलेज–बुद्धधर्मीय सीलोनध्यें शिक्षणाचा प्रसार करणें (१०) भारत समाज–हिंदुधर्मांतील शक्तीच्या बीजांची वाढ करणें (११) थिऑसफिकल यहुदी असोसिएशन (१२) लिबरल कॅथोलिक चर्च–ख्रिस्ती धर्माचें थिऑसफिकल तत्त्वानुसार उज्ज्वल केलेलें स्वरूप (१३) ऑर्डर ऑफ दि स्टार–जगद्गुरूंच्या आगमनावर श्रद्धा ठेवणारे. ह्या कार्यावर बाईचा सध्या फार भर असून त्यासाठीं त्या सारख्या त्रिखंड हिंडून प्रचार करीत आहेत.

# मुंबई विद्यापीठाची नवी रचना

हिंदुस्थानांतील विद्यापीठांची सुधारणा करण्याची बतावणी करून कर्झनसाहेबांनीं १९०४ सालीं नवा युनिव्हर्सिटी कायदा केला आणि सगळ्या विद्यापीठांची मुस्कटदाबी करून विद्यापीठें हीं सरकारच्या हातचीं बाहुलीं करून सोडलीं. पण काल हा असल्या कारस्थानवाल्यांचा सूड घेण्यास खंबीर असल्यानें कालांतरानें कर्झनसाहेबांचें धोरण मागे पडत जाऊन अलीगड, काशी, इत्यादि ठिकाणीं नवीं विद्यापीठें अस्तित्वांत येऊं लागलीं आणि निरुपायानेंच का होईना, पण सरकारला त्या विद्यापीठांना आशीर्वाद द्यावा लागला. सरकारच्याच कायद्यानें अस्तित्वांत आलेलीं परंतु ज्यांच्यावर सरकारची प्रत्यक्ष करडी नजर चालू शकत नाहीं अशीं विश्वविद्यालयें अस्तित्वांत येऊन ती लोकप्रिय होत चाललेलीं पाहून हिंदुस्थानसरकारलाहि वैषम्य वाटूं लागलें. आणि आपल्या हाताखालच्या विश्वविद्यालयांची पुनर्घटना करण्यापूर्वीं उच्च शिक्षणाच्या सद्यःस्थितीची चौकशी करून शिफारसी करण्याकरिता सरकारने सॅडलर कमिशनची नेमणूक केली

या कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊन नऊदहा वर्षें होत आलीं. तेव्हां आतां कोठें मुंबई युनिव्हर्सिटीच्या पुनर्घटनेचा प्रश्न नवे शिक्षणमंत्री नामदार हरीलाल देसाई यांनीं हातीं घेतला आणि तत्संबंधीं एक बिल गेल्या जुलैमध्यें त्यांनीं कायदेमंडळास सादर केलें. हें बिल तयार करण्याच्या पूर्वीं युनिव्हर्सिटी सुधारणा कमिटीचा एक रिपोर्ट प्रसिद्ध होऊन चुकला होता. आणि त्या कमिटीने मुंबई इलाख्यांतील उच्च शिक्षणाच्या सुव्यवस्थेसाठीं इलाख्यांतील इतर भागांत भाषावार विद्यापीठें असावींत असा अभिप्रायहि नमूद करून ठेवला होता. इतकी सर्व पूर्वचौकशी होऊन विद्यापीठांच्या सुधारणेची दिशा देखील बहुतांशीं ठाम झाल्यावर कमिटीच्या त्या शिफारशीस अनुसरून जुन्या विद्यामंदिरांची डागडुजी करणें आणि नव्या विद्यामंदिरांचा पाया घालणें अशी दुहेरी कामगिरी शिक्षणमंत्र्यांना करावयाची होती. पण नामदार हरीलाल देसाई यांनीं तसलें दुरंगी बिल कौन्सिलपुढें न मांडतां नव्या युनिव्हर्सिटीचा विचार अगदींच दृष्टीआड टाकून केवळ जुन्या युनिव्हर्सिटीची सुधारणा करणारें एकदेशी बिल पुढें आणलें. आणि कायदेमंडळांत त्या एकांगी बिलाला पासूनपुसून बकाकी आगण्याचा लोकपक्षानें कितीहि प्रयत्न केला तरी तो बराच निष्फलच ठरला. या बिलांत मुख्यत्वेंकरून कोणत्या सुधारणा अंतर्भूत व्हावयास पाहिजे होत्या त्याचें दिग्दर्शन आम्ही ता. १९ जुलैच्या अंकांत केलें होतें. त्या सूचनांपैकीं कांहीं थोड्या सूचनांचा अंतर्भाव सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टांत झाला होता आणि कायदेमंडळांतील उपसूचनांच्या द्वारें इतर सुधारणांचा प्रवेश या बिलांत व्हावा अशी अपेक्षा होती, पण ती सगळी अपेक्षा विफल ठरली.

युनिव्हर्सिटी बिलाचा जो पहला मसुदा प्रसिद्ध झाला होता त्यांत खऱ्या सुधारणांच्या नांवानें भोपळ्याएवढें नसलें तरी आवळ्याएवढें शून्य होतें; परंतु सिलेक्ट कमिटींतील वादविवादांत खऱ्या सुधारणांचा थोडासा चंचुप्रवेश तरी झाला आणि सिलेक्ट कमिटीचे अध्यक्ष जर खरे सुधारणाप्रिय आणि खंबीर असते तर व्हाइस–चॅन्सेलरची निवड सेनेटनेंच करावी ही सूचना सिलेक्ट कमिटींत मंजूर झाली असती. परंतु या प्रश्नावर सिलेक्ट कमिटींत समसमान मतें पडलीं असतां कमिटीचे अध्यक्ष हरीलाल देसाई यांनीं आपलें जादा मत विरुद्ध देऊन व्हाइस–चॅन्सेलर नेमण्याचा अधिकार पूर्वींसारखा चॅन्सेलरच्याच हातीं राहावा असें ठरविलें. त्याचप्रमाणें दरमहा तीन हजार रुपये पगाराची रेक्टरची जागा नवी निर्माण करण्याबाबतहि अध्यक्षांनीं आपलें जादा मत देऊन रेक्टरची वर्णी लावण्याची सोय करून ठेवली. तथापि विद्यार्थ्यांच्या शारीरिक शिक्षणाची आणि लष्करी शिक्षणाची सोय करण्याची जबाबदारी सेनेटच्या माथीं मारणें, सेनेटनें एखाद्याची पदवी काढून घेतली असल्यास ती परत मिळविण्याचा मार्ग खुला करून ठेवणे आणि मुख्यतः नवीन कॉलेजें जोडून घेण्याची सत्ता सरकाराकडे न ठेवतां तो अधिकार सेनेटकडे देणें एवढ्या बाबतींत सिलेक्ट कमिटीने मूळच्या मसुद्यांत योग्य दिशेनें सुधारणा सुचविल्यामुळें सिलेक्ट कमिटींतून उजळा मिळून बाहेर पडलेलें बिल अगदींच टाकाऊ वाटेनासें झालें होते आणि ज्या सुधारणा अध्यक्षांच्या जादा मताच्या प्रतिकूलतेमुळें सिलेक्ट कमिटींत मंजूर होऊं शकल्या नाहींत त्या सुधारणा कायदेमंडळांतील वादविवादांत मंजूर करून घेण्याचीहि अंधुक आशा वाटूं लागली होती.

परंतु सिलेक्ट कमिटीच्या शिफारसीसह मूळ बिलाचा मसुदा दुसऱ्या वाचनाकरितां जेव्हां कौन्सिलपुढें आला तेव्हां सगळाच रंग बदललेला

दिसला. व्हाईस-चॅन्सेलरची निवड सेनेटने करावी का चॅन्सेलरनें करावी असा प्रश्न चर्चेकरितां पुढें आला असतां चॅन्सेलर हा सेनेटने निवडलेलाच पाहिजे असे ज्यांनीं ठासून सांगितलें होतें आणि आपल्या भिन्न-मतपत्रिकेत विरोध दर्शवून तशी उपसूचना मांडण्याची धमकीहि दिली होती त्यांनीं देखील कौन्सिलांतील मतमोजणीच्या वेळीं व्हाइस चॅन्सेलर हा सरकारनियुक्त असावा असेच मत दिलें! आजपर्यंत सरकारच्या पुढ्यांत राहूनच ज्यांचा जन्म गेला असे आमदार भास्करराव जाधवप्रभृति ब्राह्मणेतर व नूरमहंमद-प्रभृति मुसलमान हे सरकारच्या विरुद्ध मते देत आहेत आणि सरकारला एकजात विरोध करण्याची प्रतिज्ञा करूनच जे निवडून आले असे शेठ राजमल, आटवणे व कर्की आणि प्रतिसहकार अगर स्वतंत्र पक्षाचे भोसले, देशपांडे, सुर्वे, मुकादम, स्वामीनारायण हे सरकारच्या बाजूनें मतें देत आहेत असा देखावा खरोखरीच अभूतपूर्व असा होता! आणि ज्यांना हल्लीं कौन्सिलांतील अंतरंगांत काय चाललें आहे याची वार्ता नाहीं त्यांना खरोखरीच हें कोडें उकलणे अशक्य आहे. परंतु नूरमहंमद व जाधव यांचा सरकारशीं विरोध जितका दिखाऊ तितकाच काँग्रेस पक्ष व प्रतिसहकार पक्ष यांचें सरकाराशीं संगनमतहि दिखाऊच होते.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, सरकारने आजपर्यंत मुसलमान व ब्राह्मणेतर याना गोंजारून जो भस्मासुर निर्माण केला तो आतां त्याच सरकारच्या डोकीवर हात फिरविण्याइतका स्वतःला प्रबळ समजूं लागला आहे आणि त्या पक्षांच्या मागण्या व धमकावण्या सरकारला असह्य वाटूं लागल्या आहेत. या युनिव्हर्सिटी बिलांतच या जातिनिष्ठ पक्षांना सरकारनियुक्त सभासदांची संख्या चाळिसाची पन्नास करून त्यांतल्या अर्ध्या जागा स्वतःच्या पक्षाकरितां राखून घ्यावयाच्या होत्या. तालुकाबोर्डापासून तों वरिष्ठ कौन्सिलापर्यंत किंबहुना रिझर्व्ह बँकेच्या डायरेक्टरापर्यंत देखील जातवार प्रतिनिधित्वाच्या खुळाची मजल जाऊन पोंचली आहे. परंतु विद्यापीठासारख्या सरस्वतीच्या पवित्र मंदिरांत तरी असलें जातिविशिष्ट प्रतिनिधित्वाचें खूळ शिरूं नये म्हणून शिक्षणमंत्री हरीलाल यांनीं मुसलमान व ब्राह्मणेतर यांची ही मागणी साफ नाकारली. या नकाराबद्दल सूड उगविण्यासाठीं ही भस्मासुराची स्वारी सगळ्या युनिव्हर्सिटी बिलाचीच रक्षा करण्याला तयार झाली. आणि नेहमींप्रमाणें काँग्रेस पक्ष, प्रतिसहकार पक्ष व स्वतंत्र पक्ष यांनीं जर सरकारला विरोधच केला असता तर मुसलमान व ब्राह्मणेतर यांचा कावा आयताच साधला असता. ही आपत्ति टाळण्याकरितां ज्ञातिनिष्ठ पक्षाला विरोधक असा एक पक्ष निर्माण करणे आवश्यक आहे असें वाटल्यावरून स्वतंत्र, स्वराजिस्ट व प्रतिसहकार यांचा एक संयुक्त पक्ष निर्माण करण्याचा विचार चालू झाला. आणि त्या पक्षाचीं तत्त्वें, हेतु व रचना ठरण्यापूर्वी तूर्त पुढें आलेल्या युनिव्हर्सिटी बिलावर सरकारला आपण कोणत्या बाबतींत पाठबळ द्यावें आणि सरकार-पक्षाकडून आपल्या कोणत्या सूचना मान्य करून घ्याव्या याची वाटाघाट होऊन व्हाइसचॅन्सेलर सरकारनियुक्त असावा या सूचनेला पाठिंबा द्यावा आणि युनिव्हर्सिटीला निदान एक लक्ष सतरा हजारांची ग्रँट देण्याचे कलम - बिलांतच नमूद करावे आणि जातवार प्रतिनिधित्वाचें भूत या बिलांत शिरूं देऊं नये असें ठरून कित्येक स्वराजिस्ट व प्रतिसहकारवादी यांनी या बिलाच्या वेळीं सरकारच्या बाजूने मते दिलीं. वास्तविक पाहातां जितक्या वेळां यांनीं सरकारच्यातर्फे मते दिलीं त्याहून अधिक वेळां त्यांनीं सरकारी सभासदांस आपल्या बाजूनें मते द्यावयाला लाविलें आणि त्यामुळेंच चिडून जाऊन मुसलमान सभासदांनीं सरकारला 'विश्वासघातकी' म्हटलें व त्याचा नक्षाहि उतरविण्याची धमकी दिली!

अशा रीतीने सरकार पक्ष आणि हा नवा अस्तित्वांत येणारा संयुक्त पक्ष यांच्या सलोख्यामुळें बिलाला जे नवे स्वरूप प्राप्त झालें त्यांत युनिव्हर्सिटीला कायमची किमान ग्रँट देऊन अध्यापनाची सोय करणे, विद्यापीठाचें केवळ परीक्षा घेण्याचें ध्येय बदलून त्याला खरें अध्यापना-मंदिर बनविणें, सरकारनियुक्तांची संख्या ४० च्या वर न वाढविणें, रेक्टरची नवी जागा निर्माण करून देखील ती न केल्यासारखी करणें, नालायक ठरविलेल्या सभासदाला परत निवडणुकीला उभें राहण्याचा हक्क देणें, एकदा काढून घेतलेली पदवी परत मिळण्याचा मार्ग मोकळा ठेवणे आणि विशेषतः शारीरिक व लष्करी शिक्षणाची जबाबदारी सेनेटवर लादणें, इतक्या पथ्यकर गोष्टी संपादन करतां आल्या. उलटपक्षीं व्हाइस-चॅन्सेलरची निवड चॅन्सेलरने करणें आणि कॉलेजाचा संबंध जोडण्याचा किंवा तोडण्याचा अधिकार सेनेटकडे न राहतां तो सरकारकडे देणें या दोन बाबतींत लोकपक्षाला हार खावी लागून सरकारचा आग्रह मान्य करावा लागला. गव्हर्नर-जनरल यांना व्हिजिटरचे

अधिकार देणें आणि त्या अधिकाराची बजावणी सनेटच्यापरोक्ष करण्याची सवलत ठेवणें हें एक शल्य अद्यापि शिल्लकच आहे. आणि त्यासंबंधानें वरिष्ठ सरकाराकडे पत्रव्यवहार होऊन नंतर त्या कलमाचा विचार व्हावयाचा आहे. पण तो निकाल लोकपक्षाच्या मताविरुद्धच होणार असें मानून चालण्यास हरकत नाहीं. एवंच या तीन महत्त्वाच्या बाबतींत सरकारनें आपला हट्ट ।शेवटास नेला असेंच । मानलें पाहिजे.

एकंदरींत पाहतां या बिलानें आज जें साधलें तें अत्यल्पच दिसतें. पण जातवारीच्या तत्त्वानें होणारी हानि टळली ही मोठी गोष्ट होय. ती टाळण्यासाठीं सरकारपक्षाला दिलेली किंमत बरीच जबर झाली असें तिन्हाहिताला वाटणें साहजिकच आहे. पण एकीकडे जातवारी व एकीकडे नोकरशाहीचा सत्तेचा लोभ या दोन आपत्तींत इकडे आड व तिकडे विहीर अशीच लोकपक्षीय सभासदांची स्थिति झाली असली पाहिजे. आणि सरकारी नियंत्रण थोडें अधिक असलेलें पुरवलें, पण ही जातवारी नको असें लोकपक्षाला वाटलें आणि उलट जातवारीच्या जाचांतून सुटण्यास लोकपक्षाला अनुकूल करण्यासाठीं त्यांच्या कांहीं सूचना मानण्याची सरकारनेंहि तयारी दर्शविली. अशा परिस्थितींतून बाहेर पडलेलें बिल हें लोकपक्षास पूर्ण समाधानकारक असणें शक्य नाहीं. परंतु मुंबई युनिव्हर्सिटीचा पाऊणशें वर्षांचा जुना गाडा इतका बेढब, निरुपयोगी व खिळखिळा झालेला होता कीं, त्याच्या जागीं दुसरा कसलाहि नवा गाडा आणला असता तरी तो ग्राह्य ठरला असता. एवढ्याच तुलनात्मक दृष्टीनें पाहिल्यास नव्या विद्यापीठाची योजना ही 'दगडापेक्षां वीट मऊ' या न्यायानें तूर्त बरी म्हणण्यास हरकत नाहीं. पण सरकारी इमारतीचें बांधकाम संपतांच जसें दुरुस्तीचें काम सुरू होतें त्याप्रमाणें हें बिल पास होऊन नवें विद्यापीठ अस्तित्वांत येतांच त्याची दुरुस्ती करण्यास प्रारंभ केला पाहिजे.

# स्फुट सूचना

१ या महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत तीन प्रसिद्ध व्यक्तींच्या जन्मदिवसानिमित्त महोत्सव झाले. जर्मन महायुद्धांतले प्रख्यात रणपंडित व जर्मन राष्ट्राचे हल्लींचे अध्यक्ष जनरल हिंडेंबुर्ग, थिऑसफिकल सोसायटीच्या अध्यक्ष डॉ. बेझंटबाई आणि हिंदी राष्ट्रीय सभेचे माजी अध्यक्ष म. गांधी या त्या तीन। व्यक्ती होत. या तीनहि व्यक्ती आपापल्या परीनें विख्यात असल्या तरी प्रत्येकाच्या प्रसिद्धीचें कारण वेगळें, प्रत्येकाचा कार्यक्रम वेगळा आणि प्रत्येकाच्या यशापयशाचें मोजमापहि वेगवेगळें असल्यानें प्रत्येकाच्या समारंभाचें स्वरूपहि वेगळ्या प्रकारचें होतें. महायुद्धापूर्वी जर्मन राष्ट्रांत लष्करी बाणा बळावलेला दिसत होता. पण महायुद्धानें जर्मनीचा मद उतरविल्यामुळें गेलीं सातआठ वर्षें तेथलें लष्करी प्रस्थ बरेंच मोडलें होतें. परंतु हिंडेंबुर्गची अध्यक्षपदावर योजना झाल्यापासून जर्मन गरुडपक्ष्याला नवे पंख फुटल्याप्रमाणें होऊन जर्मनींत नवजीवनाचा संचार होऊं लागला आणि गेल्या आठवड्यांतला हिंडेंबुर्गच्या जन्मोत्सवानिमित्त जर्मनींत झालेला उत्साहपूर्ण समारंभ हें त्या नवजीवनाच्या भरतीचें दृश्य चिन्हच होय. युरोपिअन राष्ट्रांकडून महायुद्धानंतर जर्मनीवर लादल्या गेलेल्या अटींचें ओझें जसजसें हलकें केलें जात आहे तसतसा जर्मनीचा जुना लष्करी बाणा आपलें डोकें वर काढीत आहे. आणि थोड्याच वर्षांत जर्मनीची तरुणपिढी महायुद्धानें शिकविलेल्या धड्याकडे दुर्लक्ष करून पुनः लष्करशाहीचें बंड सर्वत्र पसरवील अशीं चिन्हें या महोत्सवप्रसंगावरून दिसूं लागलीं आहेत.

---

२ डॉ. बेझंट यांच्या वयाला ८० वर्षें पूर्ण झालीं असून त्यांची कर्तृत्वशक्ती व वक्तृत्वशक्तीहि अद्यापि शाबूत आहे आणि त्यांच्या थिऑसफिस्ट अनुयायांची संख्या दिवसेंदिवस वाढत असल्यामुळें त्यांची लोकप्रियता अद्यापि कायम आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मध्यंतरीं बेझंटबाईवर अनेक आपत्ती ओढवल्या, तथापि त्या सर्वांतून त्या अलौकिक बुद्धिमत्तेनें व दृढनिश्चयानें पार पडल्या. आणि त्या वेळेपासून आपल्या यशाला पुनः तशी उतरती कळा न लागेल याविषयीं त्या सतत दक्षता बाळगीत असतात. अर्थातच सध्याची वेळ त्यांच्या लोकप्रियतेच्या भरतीची अगर ओहोटीचीहि नसून भरती—ओहोटीच्या मध्यंतरीं कांहीं काळ समुद्राचें पाणी स्थिर राहतें तशा 'समे'ची ही संधि आहे. आणि त्यांच्या कीर्तीला यापुढें ओहोटी लागण्याची भीति बाळगण्यासारखी स्थिति दिसत नाहीं.

३ तिसरी व्यक्ति म. गांधी ही होय. साधुत्वाच्या दृष्टीनें त्यांची अद्यापि कमान चढती असली तरी केवळ राजकीय दृष्ट्या पाहतां त्यांच्या यशाच्या भरतीची व समेचीहि वेळ निघून जाऊन सध्या ओहोटीची वेळ आहे. हें आम्हीच म्हणतों असें नव्हे तर स्वतः महात्माजीहि ही गोष्ट जाहीरपणें कबूल करतात. हिंदु-मुसलमानांची एकी, असहकारितेचा कार्यक्रम आणि खादीची चळवळ या तिहेरी कार्यक्रमांतून त्यांचे दोन कार्यक्रम अपेशी झाले आणि आतां त्यांचा व त्यांच्या अनुयायांचा सगळा भर तिसऱ्या म्हणजे खादीच्याच कार्यक्रमावर आहे. अर्थातच त्यांच्या वाढदिवसानिमित्त झालेल्या भाषणसमारंभांत त्यांच्या अनुयायांनीं खादीच्याच चळवळीला प्राधान्य द्यावें हें स्वाभाविकच आहे. तथापि भरतीचें रूपांतर जसें ओहोटींत होतें, तसेंच ओहोटीचें रूपांतरहि भरतींत होऊं शकतें हें लक्षांत घेऊन आणि जो राजकीय कार्यक्रम यापूर्वी अपेशी ठरला तो सोडून दुसरा कणखर व भरदार कार्यक्रम स्वीकारून महात्माजी पुनः राजकारणांत पडतील तर हल्लींची स्थिति बदलून पुनः हिंदी राजकारणाला तेज चढूं लागेल. नऊ वर्षांपूर्वी जर्मन राष्ट्र इतकें सपशेल चीत झालें असतां त्या राष्ट्रानें धीर न सोडतां आपला कार्यक्रम सद्यःस्थितीला जुळता असा करून आपलें डोकें वर काढलें आणि हिंडेनबुर्गच्या जन्मोत्सवाच्या समारंभानें जर्मनी पुनः जागा झाला असें त्यानें सर्व जगास जाहीर केलें. जर्मनीच्या महायुद्धांतील पराभवाच्या मानानें पाहतां हिंदी राष्ट्राचा असहकारितेंतील पराभव कांहींच नव्हे. मग येथील पुढाऱ्यांनींहि आपल्या राष्ट्राच्या उत्कर्षाची उमेद धरून नवा कार्यक्रम कां आरंभूं नये ?

# श्रीशिवभारत

## लेखांक २ रा

या काव्याचें नांव व त्यांत योजलेली श्लोकसंख्या यांवरून कवीचा उद्देश यावच्छक्य सर्व शिवचरित्र संस्कृत काव्यरूपानें लिहिण्याचा होता असें उघड दिसतें. आणि या एका गोष्टीमुळेंच यापूर्वी मराठी इतिहासविषयक जीं दोन संस्कृत काव्यें प्रसिद्ध झालीं आहेत त्यांच्याशीं याची तुलना सहज करतां येते. हीं दोन काव्यें म्हणजे शके १८४४ सालीं कै. विश्वनाथपंत राजवाडे यांनीं एका मोठ्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध केलेलें ' राधा–माधवविलासचंपू ' नांवाचें काव्य, आणि शके १८४५ सालीं हल्लींच्या ग्रंथाचे संपादक सदाशिवराव दिवेकर यांनीं प्रसिद्ध केलेलें ' पर्णालपर्वतग्रहणाख्यान ' हीं होत. हीं दोनहि काव्यें जयराम पिंड्ये नामक महाराष्ट्र पंडितानें लिहिलेलीं आहेत, परंतु अंतःस्वरूप पाहतां त्या दोहोंत पुष्कळच फरक आहे. चंपू काव्य हें कवीनें महाराष्ट्र प्रांतीं असतांच लिहिलें. कर्नाटकांत असणाऱ्या शहाजी राजाकडून कांहीं देणगी–संभावना लाभावी व तेथील पंडितांच्या दरबारांत कीर्ति व्हावी या आशेनें तें काव्य घेऊन कवि बंगलोरास गेला. दरबारांत प्रवेश झाल्यावर " तुमचें एखादें काव्य म्हणून दाखवा पाहूं " असें त्याला शहाजीनें म्हटल्यावर त्यानें जवळच्या या काव्यांतील भाग वाचून दाखविला, असा स्पष्ट उल्लेख आहे. यानंतर कवीचें बस्तान शहाजीच्या दरबारीं बसलें. तें बसल्यावर राजाच्या समीप असणाऱ्या कवीला अनुभव घडतात तसे यालाहि घडले, देणग्या मिळतात तशा याला मिळाल्या, कीर्ति लाभते तशी याला लाभली, खुषमस्करी करावी लागते तशी यानेंहि केली.

शहाजीच्या मरणानंतरहि हा कवि बंगलूरासच जाऊन–येऊन होता असें दिसतें. कारण त्यानेंच पुढें ' पर्णालपर्वतग्रहणाख्यान ' शके १५९४ मध्यें लिहिलें व शहाजीचा मुलगा व शिवाजीचा सावत्र भाऊ व्यंकोजी यांस तें म्हणून दाखविलें असा उल्लेख आहे.

चंपूच्या सहाव्या अध्यायापासून शहाजीचा थोडासा उल्लेख येतो. परंतु एकंदरीनें पाहतां पुढल्या अध्यायांतहि ऐतिहासिक अशी फारशी माहिती चंपूकारानें दिलेली नाहीं. पूर्वीचा भाग स्वतंत्र रीतीनें एखाद्या कविपंडिताप्रमाणें हौसेकरितां व कीर्तीकरितां कवीनें लिहिला, आणि पुढील भागांत मुख्यतः काव्यबुद्धीच मनांत ठेवून राजवर्णन करावयाचें तें शहाजीच्या निमित्तानें केलें, असा आमचा तर्क आहे.

पहिले पांच अध्याय स्वेच्छात्मक वर्णनाचे आहेत, व महाकाव्य किंवा चंपू यांच्यामध्यें राजवर्णन असावेंच लागतें म्हणून तें करून म्हणजे वर्णन काल्पनिक देऊन नांव मात्र शहाजीचें घातलें आणि अशा रीतीनें एक पंथ दो काज ही म्हण खरी केली. धड राधाकृष्णाचें नांवहि ग्रंथाच्या बहुतेक भागांत नाहीं, म्हणून त्याला राधा–माधवविलासचंपू हें नांव यथार्थ नाहीं आणि उरलेल्या भागांत क्वचित् शहाजीचें नांव किंवा समक्ष पाहिलेल्या राजशोभेच्या आठवणींच्या वर्णनाचा पुसट उल्लेख .हीं

असलीं तरी त्याला इतिहासग्रंथहि म्हणतां येत नाहीं. तात्पर्य, एकंदरीनें पाहतां हा चंपू म्हणजे केवळ काव्य इतकीच त्याची किंमत ठरते. त्याला ऐतिहासिक किंमत नाहीं.

आपल्या प्रस्तावनेंत या ग्रंथाविषयीं स्वतः राजवाडे काय लिहितात पाहा. "ह्या पांच उल्लासांत संभोग-विप्रलंभ, स्त्रियांचें नखशिखांत वर्णन इत्यादि मनोन्मादक, बालिश व चारगट वर्णनें कवीनें अपूर्ववर्णित रीतीनें दिलीं आहेत. त्यांत इतिहासभाग असलाच तर तो इतकाच आहे कीं, शहाजीकालीन सभा, जांत कवित्व कशाला म्हणत तें समजण्यास एक साधन उत्पन्न होतें. काव्यांतील हा इतिहासभाग सहाव्या उल्लासापासून लागतो. अर्थात् हा काव्य-भाग तत्कालीन कवित्वाचा पुरावा होईल. तत्कालीन इतिहासाचा पुरावा होणार नाहीं." पण शहाजीच्याहि काळीं महाराष्ट्रांत संस्कृतज्ञ कवी व पंडित होते इतकें अनुमान एरवींहि सहजच करतां आलें असतें. त्याला एवढी प्रस्तावना लिहिण्याचें किंवा सबंध काव्य छापण्याचेंहि कारण नव्हतें. आणि खरेंच बोलावयाचें तर या चंपूला ऐतिहासिक स्वरूप आहे असा जो भ्रम वाचकांचा होतो तो केवळ राजवाडे यांच्या प्रस्तावनेमुळें. ही प्रस्तावना अर्थात् चांगली आहे पण तिच्यांतील सर्व भाग मूळ ग्रंथांतील विषयाला किंबहुना नसत्या शहाजी–शिवाजीलाहि धरून आहे असें नाहीं. कोणत्याहि विवेचनाला निमित्त किती घ्यावें याचा नियम राजवाड्यांनीं कधींच पाळलेला नाहीं; यामुळें चंपूच्या प्रस्तावनेंतील पहिल्या सवाशें पानांत जें विवेचन आहे तें निमित्ताला कांहीं तरी शोभेसें आहे. परंतु पुढील पाऊणशें पानांतील विवेचन विद्वत्तापूर्ण असलें तरी चंपूच्या प्रस्तावनेंत तें कां घातलें याला कांहींच कारण दिसत नाहीं. शहाजी हा नमुनेदार क्षत्रिय असला तरी तो क्षत्रियकुलमालिकेंतील किंवा वंशमालिकेंतील असा कांहीं मेरुमणी खचित नव्हे कीं एक सरणी तेथें संपली व दुसरी तेथूनच सुरू झाली. अर्थात् पाणिनीय कालापासून भारतीय क्षत्रियांचा परंपरित इतिहास द्यावयाचा तर मध्य-मेरू म्हणून शहाजीच्याचभोंवतीं त्याचें एक टोंक कां बांधावयाचें हें कळत नाहीं.

पण त्याहीपेक्षां कळत नाहीं ती गोष्ट ही कीं, शहाजीच्या कालाचें निमित्त करून यापुढील पंचाहत्तर पानांत दिलेलें त्रैवर्णिक पद्धतीचें विवेचन याच प्रस्तावनेंत कशास करावयास पाहिजे होतें? पण पळसाच्या पानाचा तुकडा खालीं लावून वर चंदनी चौरंगावर ठेवलेल्या प्रशस्त रुप्याच्या ताटांत पक्वान्नांचें भोजन करून वैराग्यवृत्ति मिरविणाऱ्या आधुनिक उदेपूरच्या रजपूतराजावरहि राजवाडे यांची निमित्ताचा आधार घेण्यांत ताण आहे! जयरामकृत चपूंत आढळणारे चारदोन इतिहासकण पाहतां त्याला एवढी व असली प्रस्तावना लिहून ऐतिहासिक साधनाचें नसतें महत्व प्राप्त करून देणें ही गोष्ट राजवाडेच करूं जाणत.

आतां दुसऱ्या दोन ग्रंथांसंबंधानें विचार करूं. या दोहोंपैकीं म्हणजे पर्णालपर्वतग्रहणाख्यान आणि शिवभारत या दोहोंमध्यें इतिहासाचें साधन या दृष्टीने 'आख्याना' चीच पायरी वरची लागेल असें आम्हास वाटतें. आख्यानाचा कर्ता जयराम कवि हाच वरील चंपूचाहि कर्ता होय. आणि एकाच कवीनें असे दोन निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ कसे लिहिले असा प्रश्न कित्येकाना सुचेल. पण त्याचा खुलासा अगदीं सोपा आहे. आमच्या समजुतीप्रमाणे ज्याला चंपू हें नांव देण्यांत आलेलें आहे त्याचे खरोखर दोन भाग स्वतंत्र मानले पाहिजेत. पहिल्या भागाचा इतिहासाशीं यत्किंचित्हि संबंध नाहीं. महाराष्ट्रांत आधींच पूर्ण केलेलें तें काव्य कवि बंगलूर येथें शहाजीकडे घेऊन गेला व तेथें राहिल्यावर चंपूकाव्य सांगोपांग पूर्ण करण्याकरितां राजसभावर्णन, राजवर्णन वगैरे जे विषय अवश्य असतात ते लिहितांना समोर असलेल्या शहाजी राजाचा व त्याच्या राजवैभवाचा उपयोग कवीनें सहजच थोडथोडा करून घेतलेला आहे. तथापि हेतु व स्वरूप यांच्या दृष्टीनें तें काव्यच होय, इतिहास नव्हे. तपशीलच सांगावयाचा तर चंपूच्या एकंदर अध्यायांत फार तर दहावीस स्थळें अशीं सांपडतील कीं ज्यांत इतिहासाचें थोडेसें गमक आहे. यादीच द्यावयाची तर शहाजीमहाराजांच्या पदरीं असलेल्या सत्तर कवि, पंडित वगैरे गुणी जनांची यादी व त्यांपैकीं कांहींजणांकडे असलेल्या अधिकारांचें वर्णन, आजपर्यंत अप्रसिद्ध असलेल्या शहाजीच्या रक्षापुत्राची—कोयाजी—संबंधींची विस्तृत माहिती, शिवाजीच्या ज्येष्ठ भावाला म्हणजे सभाजीला विधियुक्त यौवराज्याभिषेक झाला होता ही नवी माहिती, शहाजी गुणिजनांची संभावना कशी करी या संबंधींचे उल्लेख, मुसलमान तवारिखकारांनीं सर्वस्वी गाळून टाकलेल्या शहाजीच्या मीर जुमल्यावरील स्वारीचा विस्तृत उल्लेख, रायलू, पिनगोंडा, व तेलीचरींच्या स्वाऱ्यांचे उल्लेख, शहाजीला नरसाबाई नामक गौण स्त्रीचे पोटीं झालेल्या संताजी नामक पुत्रासंबंधींची माहिती, वगैरे व्यक्तिवाचक स्पष्ट उल्लेख, आणि तत्कालीन समाजस्थितिदर्शक कांहीं अस्पष्ट वर्णनें इतकींच खरी ऐतिहासिक सामुग्री म्हणतां येईल. सर्वांत गमक हें कीं, कवीनें शहाजहान व शहाजी यांचा

उल्लेख एकत्र केला असून उत्तरेस जसा शहाजहान हा दिक्पाल तसा दक्षिणेंत शहाजी हा होय असें लिहिलें आहे. सारांश एकंदर ८० मोठ्या आकाराच्या पानाच्या ग्रंथांत दहावीस स्थूल स्वरूपाचीं इतिहासाचीं गमकें म्हणजे कांहींच नाहीं.

राजवाडे यांनीं या चंपूतून पस्तीस दरबारी मंडळी व पस्तीस आगंतुक मंडळी इतक्यांची नावें हुडकून काढलीं आहेत. शहाजीची म्हणून दिनचर्या जी या ग्रंथांत वर्णन केली आहे ती पाहिली म्हणजे असें उघड दिसतें कीं, ती राजेलोकांच्या संकेतरूढ व मानीव अशा दिनचर्येच्या कायम ठशाची एक प्रत आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थिति मानतां येत नाहीं. रोज सकाळीं मंगलध्वनीच्या निनादांत तुफान ऐरावत, सवत्स गाय, पुत्रिणी ब्राह्मणी, विदूषक, टेंग ब्राह्मण, व पाण्यातून नुकताच बाहेर निघालेला डुक्कर हे शहाजीच्या पुढून कवायती शिपायाप्रमाणे नेले जात हें विधान ऐतिहासिक असें कोण मानील? हंस, चाष, मत्स्य यांचे शुभ शकुन घेत राजा वृक्षाखालून जाई असें कवि लिहितो. मग हल्लीच्या सर्कशीप्रमाणें या पक्ष्यांना राजा आल्याबरोबर शुभशकुनदर्शन देण्याला शिकविलें असल्यास न कळे!

पण याच कवीच्या पर्णालपर्वतग्रहणाख्यानाकडे पाहिलें म्हणजे अगदीं वेगळा प्रकार दिसून येतो. या आख्यानांत अवघे चारशेच श्लोक आहेत. पण त्यांत ऐतिहासिक हकीकत खच्चून भरलेली असून काव्यस्वरूपाचे श्लोक त्या मानानें कमी आहेत. याचें कारण असें दिसतें कीं, चंपू हा केवळ काव्यदृष्टीनें लिहिण्याचाच कवीचा उद्देश होता तर हें आख्यान लिहिण्याचा मुख्य उद्देश इतिहास लिहिण्याचाच होता. यांतील कांहीं अध्यायांच्या शेवटीं 'पर्णालपर्वतग्रहणाख्यानें शिवराजचरित्रे' असा उल्लेख आहे तर कांहीं ठिकाणीं 'शिवराजचरित्रे पर्णालग्रहणवर्णने' असा उल्लेख आहे. पण शिवचरित्रापैकीं हें आख्यान हा एक भाग नसून या आख्यानाच्या रूपानें कवीनें तेवढ्यापुरतें शिवाजीचें चरित्र वर्णिलें असावें असें वाटतें. शिवभारतकाराचा हेतु एकंदर भोसले वंशाचा व शिवाजीचा इतिहास लिहिण्याचा होता तसा हेतु जयराम कवीचा होता असें दिसत नाहीं. या कवीचीं आणखी कांहीं अशींच आख्यानें उपलब्ध झाल्यास या मुद्द्याचा निर्णय अधिक निश्चित रीतीनें करतां येईल. शहाजीच्या कारकीर्दीच्या शेवटीं व व्यंकोजीच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं हा कवि महाराष्ट्र व बंगलूर येथें जाऊन-येऊन असे व एखादा मोठा ऐतिहासिक प्रसंग घडून आला म्हणजे त्याविषयीं काव्य रचून तो आश्रयदात्याला सादर करी असें दिसतें. या आख्यानाच्या प्रारंभीं कवीनें स्वतःच असें सांगितलें आहे कीं, पन्हाळ्याच्या आख्यानाप्रमाणें शिवाजीनें सुरत लुटल्याचें आख्यानहि हिंदी व मराठी भाषांत रचलें होतें. अशींच इतरहि कांहीं आख्यानें असतील. कसेंहि असो; हें आख्यान केवळ श्लोकबद्ध इतिहासरूप आहे व त्यांत पन्हाळ्याच्या स्वारीचें वर्णन अथपासून इतिपर्यंत सुसंबद्ध रीतीनें केलेलें आहे. पण याहून या ग्रंथाचें अधिक वर्णन येथें देण्याचें कारण नाहीं.

# बालविवाहप्रतिबंधक बिल

## श्री० बेळवी यांचें भाषण

असेंब्लीमध्यें श्री. रायसाहेब हरबिलास शारदा यांनीं आणलेलें बालविवाहप्रतिबंधक बिल सिलेक्ट कमिटीकडे न पाठवतां लोकमत अजमावण्यासाठीं तें प्रसृत करावें या सूचनेस पाठिंबा देतांना श्री. बेळवी यांनीं जें भाषण केलें त्याचा सारांश पुढें दिला आहे.

"इतरांइतकीच मलाहि सामाजिक सुधारणेसंबंधीं आस्था आहे. मी स्वतः माझ्या पद्धतीप्रमाणें सामाजिक सुधारकच आहे. माझ्या स्वतःच्या तीन मुलींचीं लग्नें मीं १४ वर्षांच्या पुढें केलीं. सामाजिक सुधारणेवर माझा भरंवसा असला तरी ती सुधारणा कायदेमंडळामार्फत घडवून आणणें हें मला पसंत नाहीं. आपल्या राष्ट्रांत भिन्न जाती, भिन्न संस्कृति व भिन्न भिन्न शैक्षणिक दर्जा यांची खिचडी आहे; म्हणून मला कायदेमंडळामार्फत सुधारणा घडविणें हें पसंत नाहीं. शिवाय या बिलानें हिंदूंच्या कौटुंबिक व्यवस्थेच्या मुळावरच घाव घातला आहे. हिंदूंच्या दृष्टीनें लग्न हा एक ऐच्छिक करार नसून एक धर्मविधि आहे. इंग्लंडला जाऊन शिक्षण घेऊन आलेले मूठभर लोक सोडले तर बाकीचा मोठा बहुजनसमाज या बाबतींत पुराणप्रिय आहे. लाला लजपतराय म्हणाले कीं, खरें पाहिलें तर हिंदुधर्मशास्त्रांत बालविवाहाचें तत्त्व कोठेंच सांगितलेलें नाहीं. जुन्या ग्रंथांचें संशोधन केलें तर त्यांच्या या म्हणण्यास कांहीं आधार सांपडणें शक्य आहे हें खरें. मी आर्यसमाज किंवा ब्राह्मो समाज यांचा अनुयायी असतों तर मीहि याच *बिलाला* संमति दिली असती. पण

हिंदूंचा बहुजनसमाज आज केवळ वेदांतील नियमांनाच प्रमाण मानणारा असा नाहीं. आमच्या समाजाचें जसें आहे तसें स्वरूपच लक्षांत घेतलें पाहिजे. आमचे कांहीं विशिष्ट पंथ, विशिष्ट श्रद्धा व चालीरीती आहेत. त्यांचा मान राखून व त्यांना धरूनच सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत. वैदिक काळाची गोष्ट निराळी व आजच्या हिंदु समाजाची गोष्ट निराळी. समाजाच्या चालीरीती चुकीच्या असतील, पण त्यांचा एकाएकीं उच्छेद होऊं शकत नाहीं. आज या बिलाला पाठिंबा देणारे लोक निवडणुकीच्या वेळीं आपलीं मतें प्रगट करते तर ते निवडूनच आले नसते. अजूनहि या प्रश्नावर लोकमताची कसोटी पाहण्याकरितां राजीनामे देऊन पुनः निवडणुकीस उभे राहिले तर ते निवडून येणार नाहींत.

तुम्हाला या असेंब्लीबाहेरच्या लाखों लोकांच्या भावना विचारांत घेतल्या पाहिजेत. १८५८ सालच्या राणीच्या जाहिरनाम्यांत लोकांच्या धार्मिक बाबतींत सरकार हात घालणार नाही असें सरकारनें वचन दिलें आहे. आतां तुम्ही सामाजिक बाबतींत कायदा करून लग्नाला केवळ कराराचें स्वरूप देत आहां. हिंदूंची लग्नासबंधीं अशा तऱ्हेची कल्पना नाहीं. आमचेकडील प्रांतांत सुधारणेचें पाऊल पुढें पडत चाललें असून मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा १६ व १८ पर्यंतहि गेली आहे. पण पुराणप्रिय लोकांवर सक्तीनें तुमच्या या सुधारणेच्या कल्पना लादण्याचा तुम्हास मुळींच हक्क नाहीं. सरकारी कायद्यानें सती बंद केल्याचें उदाहरण पुष्कळदां सांगण्यांत आलें आहे. पण तें उदाहरण या बाबतींत गैरलागू आहे. लग्न व गर्भाधान या दोन गोष्टी हिंदूंच्या दृष्टीनें अगदीं वेगवेगळ्या आहेत. लग्न अगोदर झालें असलें तरी पुढें कांहीं वर्षांनीं दुसरा संस्कार होऊं शकतो. लग्न हा एक आमचा धार्मिक संस्कार आहे. विवाहाचें बंधन हें अभेद्य असून मृत्यूनेंच तें नाहींसे होतें. हिंदु विधवांची संख्या वारंवार पुढें आणण्यांत येते. पण विधवांना आज पुनर्विवाहास कायद्यानें बंदी नाहीं. मी विधवाविवाहास अनुकूल आहें. पण कायद्यानें विधवाविवाहाची सक्ती करण्यास तयार नाहीं. विधवाविवाहाची बंदी असणाऱ्या कांहीं जाती आहेत. बाकीच्या जातींत विधवाविवाह रूढ आहे. ज्यांना पुनर्विवाहाची बंदी आहे अशा विधवांची संख्या एकंदर संख्येच्या मानानें फारच थोडी भरेल. सामाजिक सुधारणा करण्याचा मार्ग घाईघाईनें कायदे करून टाकणें हा नव्हे.

या कायद्यास संमति देण्यास उतावीळ झालेल्या लोकांना मी असे विचारतों कीं, तुम्ही या प्रश्नासंबंधीं जनतेंत जागृति करण्याची काय खटपट केली आहे? लाला लजपतराय यांची गोष्ट निराळी. ते आर्यसमाजिस्ट आहेत. पण आर्यसमाजाचीं तत्त्वें कितीहि चांगलीं असलीं तरी तीं लोकांना मान्य झालेलीं नाहींत. लोक जोंपर्यंत तीं मान्य करावयास तयार नाहींत तोंपर्यंत त्यांच्या मतांप्रमाणेंच चाललें पाहिजे. लोकांत शिक्षणाचा प्रसार नाहीं. कायद्याच्या सक्तीनें लोकांवर सुधारणा लादण्यापेक्षां त्यांच्या शिक्षणाचा प्रसार करून स्वखुषीनें ते सुधारणा करण्यास तयार होतील असें केलें पाहिजे. यासाठीं हें बिल लोकमत अजमावण्यासाठीं प्रसृत करण्यास योग्य आहे. लोकांना त्याची माहिती होऊं द्या, त्यावर वादविवाद होऊं द्या, त्याच्या विचारार्थ हजारों जाहीर सभा भरूं द्यात, आणि या सभांतून लोकमत या बिलाच्या बाजूला आहे असें दिसूं द्या, म्हणजे मग मी त्यास आनंदानें पाठिंबा देईन. मी स्वतः आजहि या बिलास अनुकूल आहें. पण मी लोकांच्यातर्फे बोलत आहें. असेंब्लीच्या बाहेर असलेल्या हजारों हिंदूंचे विचार मी मांडीत आहें, आणि यासाठींच हें बिल लोकमतासाठीं प्रसृत करण्याच्या सूचनेस मी मनःपूर्वक पाठिंबा देतों.

# संस्कृतमहाविद्यालयाची योजना

## युरोपियन विद्वानांचे अभिप्राय

पुणें येथील संस्कृत कॉलेजाच्या योजनेसंबंधीं परदेशांतील कांहीं प्राच्य विद्याभक्तांनीं प्रदर्शित केलेले आणखी कांहीं अभिप्राय पुढें दिले आहेतः—

८ मार्टिमर रोड, केंब्रिज.
११ जुलै १९२७.

पुण्यास प्रामुख्यानें संस्कृत शाखेसाठीं वाहिलेलें कॉलेज काढण्याच्या योजनेसंबंधीं माहिती पुरविल्याबद्दल फार आभारी आहें. कार्यकारी कमिटीला त्यांच्या योजनेंत यश लाभेल असा माझा विश्वास आहे. प्राचीन परंपरागत हिंदी विद्या नष्ट होण्याचें भय आहे खरेंच. ही होऊं घातलेली हानि टाळण्यासाठीं प्रयत्नांचा पराकाष्ठा करावी.

ई. आय. रॅपसन.

---

१ आगस्ट १९२७.

प्रो. बेलवलकर यांस—

आपण पाठविलेल्या योजनापत्रकांत प्राचीन हिंदु शास्त्राभ्यासपद्धतींच्या संरक्षणाची व पुनरुज्जीवनाची योजना आहे. महत्त्वाचे परिणाम घडवणाऱ्या या संस्थेची माहिती दिल्याबद्दल मी आभारी आहें. पंडितांच्या भरीव व पूर्ण ज्ञानाचा माझ्या चित्तावर उत्तम ठसा उमटलेला आहे. इतर कोणत्याहि लोकांत नसलेला असा हा हिंदी पांडित्यांचा विशेष गणलेल परंपरागत विद्येचा अमोलिक सांठा कायम राखण्यासाठीं व्यवहार्य उपाय योजला पाहिजे असें मला वाटतें. महाभाष्याच्या तिसऱ्या भागांत डॉ. कीलहॉर्न यांनीं लिहिलेले 'या पंडित स्नेह्यांनीं मला जें कांहीं शिकविलें त्याबद्दल मी त्यांचा बहुत ऋणी आहें' हे शब्द मला आठवतात. ही कीलहॉर्नची उक्ति शास्त्री लोकांची पद्धति व आमची आधुनिक पद्धति यांचें एकीकरण कसें फलदायी होतें तें दर्शविते. तुम्हाला यश लाभो असें मी मनःपूर्वक इच्छितों.

ए. हिलेब्रॅण्ड.

---

येल युनिव्हर्सिटी.
आगस्ट २२।१९२७.

प्रो. बेलवलकर यांस—

मी नुकताच अमेरिकेहून परत आल्यावर तुमचें १७ मेचें पत्र व तुमच्या कमिटीनें योजलेल्या पुणें संस्कृत कॉलेजाचें योजनापत्रक मला मिळालें. तीं दोनहि काळजीपूर्वक वाचून उत्तर देत आहें.

आपल्या योजनेसंबंधाची माहिती एकल्यामुळें झालेला आनंद व ती यशस्वी होईल अशी माझी अपेक्षा यांचें वर्णन करणें कठीण आहे. नुकतेंच हिंदुस्थानामध्यें मी जे एक वर्ष घालविलें त्या वेळीं आपल्या नियोजित शाळेकडून पुरस्कारिलेल्या जुन्या अभ्यासपद्धतीचा पाश्चात्य पंडितांना व विशेषतः हिंदी लोकांना किती अमोलिक व महत्त्वाचा उपयोग होतो हें प्रत्यक्ष पाहण्याची एकहि संधि मी दवडली नाहीं. अशा अभ्यासाकडे हिंदुस्थानांतील हिंदी व इंग्रजी शिक्षणाभिमान्यांचें दुर्लक्ष असलेलें पाहून मला फार वाईट वाटे. माझें असें मत आहे कीं, कोणत्याहि हिंदी विद्यार्थ्यांच्या शिक्षणांत स्वतःच्या ऐतिहासिक संस्कृतीचें अर्थात् स्वदेशाच्या संस्कृतीचें, ज्ञान हें एक प्रमुख महत्त्वाचें अंग असलें पाहिजे. त्यापेक्षां अधिक ज्ञान असणें चांगलें खरें, पण एवढें तरी प्रथम पाहिजे. परंतु हल्लीं सरासरी तेवढें मिळतें किंवा तेंहि मिळत नाहीं. एक पक्षीय विचार करणें झाल्यास (मला तो मान्य नाहीं) हिंदी मनुष्यानें केवळ हिंदी ऐतिहासिक संस्कृतीचाच अभ्यास करणें हें केवळ पाश्चात्य संस्कृतीचा अभ्यास करण्यापेक्षां अधिक संमत व तद्देशीयाला ( पर्यायानें जगाला ) अधिक उपयुक्त आहे. प्राचीन हिंदी संस्कृतींत 'शिकण्यासारखें कांहीं नाहीं' असें मत त्याविषयीं यत्किंचितहि माहिती नसलेल्यांचें किंवा अत्यंत पूर्वग्रहदूषित व संकुचित दृष्टीच्या लोकांचेंच असूं शकेल. असें मत कोणाहि हिंदी गृहस्थाचें तरी नसेल अशी माझी अपेक्षा आहे; परंतु बरेच हिंदी गृहस्थ तसें मत असल्यासारखें किंवा जवळ जवळ त्यासारखें वागत असल्याचें दुःखानें नमूद करावे लागतें! याचसाठीं हिंदी संस्कृतीच्या ठेव्यासंबंधीं असलेल्या अनादराचें उच्चाटन करणाऱ्या कोणत्याहि उपक्रमाचें मी स्वागत करतों.

परंपरागत हिंदी पंडितांच्या विद्वत्तेविषयींच माझा आदर व संस्कृत विद्येच्या विद्यार्थ्यांना त्याचें वाटणारें महत्त्व मी नमूद करूं इच्छितों. गतवर्षी पुणें, काशी आणि श्रीनगर येथील विद्यमान जुन्या परंपरेच्या विद्वानांजवळ अभ्यास करण्याचा योग मला आला, तसाच अमेरिकेंतहि अभ्यास चालू ठेवण्याचा योग यावा एवढीच माझी इच्छा आहे. हे पंडित आम्हा पाश्चात्यांना इतरत्र क्वचितच शिकतां येण्यासारख्या महत्त्वाच्या गोष्टी शिकवूं शकतात. हिंदी तत्त्वज्ञानासंबंधीं पद्धतशीर प्रवीणता मिळविलेल्या बहुतेक पाश्चात्यांना या पंडितांजवळ शिकण्याचा सुयोग लाभला आहे आणि तें सर्व साहजिक घडलेलें नाहीं. आधुनिक पाश्चात्य विद्वानांच्या अभ्यासपद्धतींतहि कांहीं स्वतंत्र गुण आहेत असें मला वाटतें तुमच्या योजनेंतहि ते स्पष्ट मान्य केले आहेत. पण या फायद्याकडे दुर्लक्ष झालें तरी भय नाही. शास्त्री लोकांच्या विशिष्ट पद्धतीचें महत्त्व व तिची उपयुक्तता यांकडे दुर्लक्ष होऊन आमच्या खऱ्या अभ्यासांत व्यत्यय येण्याचें मात्र मोठें भय आहे. पाश्चात्य इंडोलॉजिस्टांना जुन्या पद्धतीचें पुनरुज्जीवन व संरक्षण हिंदी लोकांपेक्षां कमी उपयुक्त नाहीं, या केवळ पाश्चात्य दृष्टीनेंहि मी या तुमच्या नव्या उपक्रमाचा पुरस्कार करतों. आपणा सर्वांना पाश्चात्य आणि परंपरागत हिंदी अशा दोनहि अभ्यासपद्धती हव्या आहेत.

तुमच्या कमिटीचे सहाचिटणिसांत माझे गुरु पंडित वामनशास्त्री किंजवडेकर असल्यानें मला या उपक्रमासंबंधीं विशेष आपलेपणा वाटतो. शास्त्रीबुवांनीं मला पूर्वमीमांसेमध्यें प्रवेश करून देण्यासाठीं बरेच श्रम घेतले आहेत.

फ्रँकलिन इगर्टन,
सॅलिसबरी प्रोफेसर, संस्कृत व तौलनिक तत्त्वज्ञान, येल युनिव्हर्सिटी.

# जमीन विभाग प्रतिबंधक बिल

शेतीच्या जमिनीच भाऊबंदकीच्या वांटण्यामुळें अगर अन्य अनेक कारणांनीं जे लहान लहान तुकडे होतात तसे लहान तुकडे यापुढें होऊं देऊं नयेत आणि जेथें असे अत्यल्प तुकडे झालेले आहेत तेथें त्यांचें एकत्रीकरण करावें या उद्देशानें मुंबईच्या कायदेमंडळापुढें सर चुनीलाल मेथा यांनीं एक बिल मांडलें असून गेल्या आठवड्यांत त्याचें पहिलें वाचन होऊन बिलाचा कलमवार विचार करून दुरुस्ती करण्यासाठीं सिलेक्ट कमिटीहि नेमण्यांत आली. या बिलाचा उद्देश जरी तात्त्विक दृष्ट्या चांगला असला तरी बिलांतील कलमांचा विचार करतां हा एक प्रकारचा उलटा बोल्शेव्हिझमच आहे असें वाटूं लागतें. व त्याकरितां बिलाचा निदान दुसरा भाग तरी साफ गाळून टाकावा असें आमचें मत, हें बिल प्रसिद्ध झालें त्याच वेळीं, आम्हीं प्रदर्शित केलें होतें. बोल्शेव्हिक लोक जमीनदाराच्या मोठमोठाल्या इस्टेटी घेऊन त्यांचे तुकडे करून ते रयतांना वांटून देण्याचा उद्योग करीत असल्यानें बहुजनसमाजाच्या तात्कालिक हिताच्या दृष्टीनें तरी त्यांचें तें कृत्य समर्थनीय असतें. परंतु हल्लींच्या बिलाचा उपक्रम याच्या अगदीं उलट आहे. म्हणजे या बिलानें ज्याची जमीन सर्वांत लहान असेल त्याची जमीन शेजारच्या मोठ्या क्षेत्राच्या मालकानें आपल्या ताब्यांत घेण्याचा आणि अशा रीतीनें मोठ्यानें लहानांना गिळण्याचा मात्स्यन्याय अमलांत आणण्याचा उपक्रम कायदेशीर ठरविला जाणार आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील आजवरची परंपरा आणि कायदे लक्षांत घेतां राजा हा जमिनीचा मालक नसून रयत हाच जमिनीचा मालक आहे. अशी येथील लोकांची ठाम समजूत आहे. रयतेचा हा पूर्वापार चालत आलेला हक्क अमान्य करून तो बुचाडून घेण्याचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष प्रयत्न सरकारने आजवर अनेक केले, पण त्यांचा हेतु जावा तसा तडीस गेला नाहीं. पण या जमिनीच्या तुकड्यांचें एकीकरण करण्याच्या बिलानें मात्र कलेक्टर हाच गांवच्या जमिनीचा, व्यावहारिक दृष्ट्या तरी, मालक ठरणार असून तो ज्याला जमीन देईल व त्या जमिनीबरोबरच तिच्या वहिवाटीविषयीं सनद ज्याला देईल तो सरकारचें कूळ बनणार आहे!

असलें हें क्रांतिकारक बिल पहिल्या वाचनाच्या पूर्वीच फेटाळलें जावयास पाहिजे होतें. परंतु मुंबई प्रांतिक कायदेमंडळांत लोकपक्षाचें बहुमत नसल्यामुळें तसें होऊं शकलें नाहीं. आणि त्याचबरोबर दुसरेंहि एक कारण असें कीं, या बिलाचा पुरस्कार करणारे ना. सर चुनीलाल यांनीं बिलांतील कोणत्याहि कलमाबद्दल आपण सिलेक्ट कमिटींत आग्रह धरणार नाहीं अथवा सुचविलेली दुरुस्ती बिलाच्या मूळ तत्त्वाच्याविरुद्ध आहे, सबब ती मान्य करण्यांत येऊं नये, असला आक्षेप घेणार नाहीं असें आश्वासन दिलें आणि त्यामुळेंच सिलेक्ट कमिटी नेमून बिलाचा विचार करण्यास हरकत नाहीं असें वाटून बहुतेक आमदारांनीं पहिल्या वाचनास संमति दिली. शेत-जमिनीचे तुकडे दिवसेंदिवस फारच लहान होत चालले आहेत आणि वाजवीपेक्षां लहान चिरफळ्या झाल्यानें शेतीचें अत्यंत नुकसान होतें, सबब ही आपत्ति कोणत्या तरी उपायानें टाळली पाहिजे एवढें तत्त्व सर्वांसच मान्य आहे. आणि प्रस्तुतच्या बिलाचें पहिलें वाचन मंजूर झाल्यानें जर कोणत्या तत्त्वास संमति दिल्याप्रमाणें होत असेल तर ती संमति वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें अगदींच मर्यादित आहे. जमिनीची चिरफाड होतां होईल तो आणखी अधिकाधिक तरी होऊं नये याकरितां कायद्यानें कांहीं उपाययोजना करावी एवढ्यापुरतें सर्वांचें एकमत आहे असें मानण्यास हरकत नाहीं. व तेवढेंच तत्त्व सर्वमान्य आहे एवढें गृहीत धरून सिलेक्ट कमिटीनें इतर सर्व कलमांचा दूरदृष्टीनें विचार करून त्यांतलें जे जें कलम तत्त्वाच्या दृष्टीनें किंवा व्यवहाराच्या कसोटीनें अपायकारक वाटेल तें तें दुरुस्त करून त्याचा विषारीपणा नाहींसा करण्याचें कार्य केलें पाहिजे तरच हें बिल दुसऱ्या वाचनाच्या वेळीं विचार करण्याच्या लायकीचें होईल.

जमिनीची लागवड किफायतशीर होण्याकरितां जमिनीचा तुकडा किमान पक्ष किती क्षेत्रफळाचा असावा हाच पहिला वादग्रस्त प्रश्न आहे, व तो अखेरपर्यंत तसाच राहील असें वाटतें आणि 'किफायतशीर लागवड' याचा अर्थ या कायद्यापुरता तरी निश्चित केल्याशिवाय वरील प्रश्नाचे उत्तर देतां येणें कठीण आहे. वाफेचे एंजिनावर चालणारे लोखंडी नांगर व पंप ज्या शेतांत चालू ठेवतां येतील अशा शेताची लागवड लहानसान शेतांपेक्षां अधिक किफायतशीर होते हें अर्थशास्त्रानें कोणीहि सिद्ध करून देऊं शकेल. पण तेवढ्यावरून कांहीं ज्या ठिकाणीं एवढीं मोठालीं यंत्रें काम करूं शकत नाहींत किंवा मोठ्या प्रमा-

णावर लागवड करण्याला हरकत येते तीं सगळीं शेतें बिनकिफायतीचीं असें म्हणतां येणार नाहीं. आणि तसें म्हणण्याची सिलेक्ट कामिटीची दृष्टीहि असतां कामा नये. कारण तशी दृष्टि ठेवल्यास रयतांचा हक्क लुबाडून घेऊन सगळी जमीन भांडवलवाल्यांच्या हातीं देण्याचा सरकारचा उद्देश आहे अशी शंका घेण्याला आयताच आधार मिळेल आणि असल्या भांडवलशाही योजनेला कोणीहि पाठिंबा देणार नाहीं.

लागवडीचें किमान क्षेत्र किती असलें तरी चालतें हें प्रत्यक्ष जमीन करणाऱ्यांच्या अनुभवावरूनच ठरविलें पाहिजे. शेताचे क्षेत्रफळ दहा एकर असो किंवा अर्धा एकर असो, जर एखादा शेतकरी त्या शेताची मशागत करून त्यावर आपल्या, कटुंबाचा प्रत्यक्ष उदरनिर्वाह करीत असेल तर तेवढा लहानसा तुकडा देखील 'किफायतशीर लागवडीचा' असेंच मानलें पाहिजे. अर्थातच जमिनीच्या ज्या तुकड्यावर शेतकऱ्याचा प्रपंच वर्षभर चालत नसल्यानें त्याला कांहीं दिवस तरी दुसरीकडे मोलमजुरी करावयास जावें लागतें तें जमिनीचे क्षेत्र 'किफायतशीर' जमिनीच्या सदरांत येऊं शकणार नाहीं. हा विचार स्वतःची जमीन स्वतः कसणाऱ्या संबंधाचा झाला. पण जो जमिनीचा मालक आपली जमीन खंडानें दुसऱ्याला देऊन व त्या खंडाचें जेवढें उत्पन्न येईल तेवढ्याची आपल्या इतर उत्पन्नांत भर टाकून स्वतः प्रपंच चालवीत असेल त्याची जमीन किफायतशीर आहे कीं नाहीं याचा विचार तरी इतरांनीं कां करावा? जमिनीचा जो कांहीं खंड येईल तो भरीस भर म्हणून त्या मालकाला उपयोगीं पडत असल्यास त्या मालकाकडून ती जमीन काढून घेण्याचें प्रयोजन तरी काय? यावर कोणी कदाचित् असे म्हणेल कीं, ही जमीन कितीहि लहान असली तरी मालकाचें त्यांत कांहीं नुकसान नसलें तरी जो खंडकरी ती जमीन खंडानें करीत असेल त्याचा तरी निर्वाह तेवढ्या जमिनीवर कसा होईल? पण या शंकेचा परिहार असा कीं, तो खंडकरी एवढीच एक जमीन वहिवाटीत नसून असलेच आणखी पांचचार तुकडे खंडानें करीत असेल व त्या सर्वांवर मिळून त्याला भरपूर प्राप्ति होत असेल. प्रत्यक्ष आंकड्यांनींच ही गोष्ट स्पष्ट करण्याकरितां असें समजूं कीं, क, ख, ग व घ अशा चौघां इसमांची प्रत्येकीं तीन एकर जमीन आहे आणि च हा शेतकरी त्या चौघांची मिळून १२ एकर जमीन खंडानें करतो आणि त्या गांवांतील किफायतशीर लागवडीचें किमान प्रमाण १० एकर ठरविलें गेलें आहे. अशा परिस्थितींत 'च' हा शेतकरी एकंदर १२ एकर जमीन वहिवाटींत असल्यानें तो नव्या कायद्याच्या कात्रींत सांपडूं नये आणि क, ख, ग व घ हे चौघेहि जमिनीचे मालक अन्य व्यवसाय करीत असून जमिनीचें उत्पन्न केवळ पुस्तीदाखल मानीत असल्यानें त्यांनाहि कायद्याच्या कचाटींत धरलें जाऊं नये. अर्थातच किफायतशीर लागवडीचें क्षेत्र किमान प्रमाण ठरविलें तरी त्याची बजावणी कोणावर कां करावयाची या संबंधांत जे नियम करावयाचे त्यांत शेंकडो अपवाद व प्रत्यपवाद निघाल्यानें ते नियम अतिशय भानगडीचे होतील आणि त्यांची बजावणी न्यायानें व निःपक्षपातबुद्धीनें करणें जवळ जवळ अशक्य होईल.

पण आधीं किफायतशीर लागवडीचें किमान क्षेत्र ठरविणेंच किती भानगडीचें आहे पाहा. प्रत्येक पिकागणिक हें क्षेत्र कमजास्त होईल. भातजमिनीचा जेवढा तुकडा निर्वाहाला पुरेसा होईल तेवढाच गव्हाच्या पिकाचा तुकडा असल्यास शेतकऱ्यास तो परवडणार नाहीं. याच रीतीनें गहूं, ज्वारी, बाजरी, भुईमूग, हळद, कापूस, तंबाखू अशा प्रत्येक पिकागणिक लागवडीचें क्षेत्र वेगवेगळें ठरवावें लागेल आणि प्रत्येक पिकाबद्दलचें असें कोष्टक तयार केलें तरी तेवढ्यानें सगळी भानगड मिटत नाहींच. कारण गव्हाच्या पिकाचें किमान क्षेत्र ५ एकर आणि ज्वारीचें ७ एकर ठरलें असलें आणि एखाद्याची जमीन सहा एकर असली तर ती किमान प्रमाणाहून कमी आहे असें दाखल करावयाचें का नाहीं हा प्रश्न पुनः भानगडीचाच होऊन बसणार. कारण मालकाला आपली जमीन हातची जाऊं नये असें वाटत असल्यास तो म्हणेल कीं, मी या जमिनींत गहूं पिकविणार आहे. आणि उलटपक्षीं त्याला ती जमीन कोणा तरी शेजाऱ्याच्या गळ्यांत बांधावयाची असल्यास तो ती जमीन गव्हाच्या लायक नाहीं, ज्वारीच्या लायक आहे असें सांगेल! हा वाद कोणीं कसा तोडावयाचा? आणि प्रत्येक इसम आपल्या शेतांत अमुकच ठराविक पीक करतो, दुसरें करीत नाहीं याची टेहळणी तरी किती ठेवावयाची? अर्थातच या भानगडी मिटविण्याकरितां किमान क्षेत्राचे प्रमाण शक्य तितकें कमी धरावें लागेल आणि तसें तें कमी धरणें हेंच न्यायाच्या व व्यवहाराच्याहि दृष्टीनें योग्य ठरेल. कारण जमिनीच्या चिरफळ्या करण्यास आजपर्यंत कोणत्याहि प्रकारचा प्रतिबंध नसल्यामुळें जे विभाग पडत आले, किंबहुना सरकारनेंच आपल्या कोर्टामार्फत जी वांटणी यापूर्वी

मंजूर केली तीच वांटणी हें बिल उद्यां मंजूर होतांच निरुपयोगी ठरावी आणि पूर्वीं वाटप केल्याचे सगळे श्रम फुकट जावेत हें उचित नव्हे. यास्तव नव्या कायद्यानें जुन्या वहिवाटीला विनाकारण धक्का न लागेल अशीच खबरदारी नव्या कायद्याच्या कलमांच्या शब्दयोजनेंत घेतली पाहिजे.

जमिनीचें किमान प्रमाण जसें पिकाप्रमाणिक वेगळें ठरवावें लागणार त्याचप्रमाणें तें देशविभागाप्रमाणेंहि वेगळें ठरवावें लागेल. कारण जेथें पाऊस भरपूर व हमखास पडतो तेथील शेती व जेथें पाऊस बेताबाताचाच पडतो, किंबहुना पांच-चार वर्षांतून एखाद्याच वर्षीं तो हंगामशीर पडतो तेथील शेती यांत जमीन-अस्मानाचा फरक पडणार. त्याचप्रमाणें बागाईत, जिराईत असेंहि फरक असून शिवाय जेथें आज कालव्याचें पाणी मिळत नसल्यानें किमान क्षेत्र मोठें ठरवावें लागेल त्याच ठिकाणीं कालव्याचें पाणी आल्यास किमान क्षेत्र पूर्वींच्या अर्ध्यानेंहि परवडेल. अशा ठिकाणीं एकदां नवा कायदा लागू केला आणि त्यानंतर कालव्याची सोय झाली तर पूर्वीं ज्यांच्या जमिनी लहान म्हणून काढून घेतल्या गेल्या त्यांचें निष्कारण कायमचें नुकसान झाल्याप्रमाणें होणार नाहीं काय? बरें, जेथें कालवा सुरू होण्याचा संभव आहे तेथे त्याकरितां किती वर्षें वाट पाहावयाची हाहि एक विचाराचाच प्रश्न आहे.

जमिनीचें किमान क्षेत्र ठरविणें इतक्या भानगडीचें असून तें ठरविण्याचा सर्वाधिकार कमिशनरला दिलेला आहे! कमिटीचा सल्ला मान्य करणें न करणें हें केवळ त्याच्या लहरीवर अवलंबून राहणार. एकीकडे प्रत्यक्ष राजांचे व गव्हर्नरांचे अधिकार मर्यादित करून लोकशाहीच्या तत्त्वाचा पुरस्कार केला जात असतां दुसरीकडे एकट्या कमिशनरला असला अनियंत्रित अधिकार देणें हें अत्यंत गैर होय. याकरितां कमिटीच्या सल्ल्याप्रमाणेंच कमिशनरनें हें प्रमाण ठरवावें असा निर्बंध त्याजवर असावा. एखाद्या गांवाला हा कायदा लागू करावयाचा असल्यास जमीन धारण करणाऱ्यांपैकीं दोन-तृतीयांश लोकांची संमति असली पाहिजे असें एक कलम याच बिलांत आहे. पण त्याच कलमांत जमिनीच्या मालकांचें मात्र अत्यल्प बहुमत देखील ग्राह्य समजावें असें म्हटलें आहे. यांत असा पक्षपात कां? आमच्या मतें जमिनीचे मालक आणि जमीन धारण करणारे या उभयतांना बहुमताचें प्रमाण सारखेंच ठेवावें व तें दोन-तृतीयांश न ठेवतां तीन-चतुर्थांश असावें.

दोन-तृतीयांशाच्या ऐवजीं तीन-चतुर्थांश बहुमत असलें पाहिजे असा नियम केला तरी मुख्य मुद्द्याचा प्रश्न वेगळाच असून तें कोडें कसें सोडवावयाचें याचा विचार या बिलांत नसल्यानें हें बिल सर्वथैव निरुपयोगी होणार आहे. नवीन योजनेप्रमाणें जमीन एकत्रित केल्यास ज्यांची जमीन नाहींशी होईल त्यांची व्यवस्था काय? हा एक बेकारांचा नवाच वर्ग निर्माण केल्याप्रमाणें होणार असून त्यांच्या उदरनिर्वाहाची सोय लावल्याशिवाय त्यांच्या तोंडांतला घांस जबरीनें काढून घेणें ही अक्षम्य दंडेली होईल. तेव्हां अशा रीतीनें नवे बेकार निर्माण करणें कितपत न्याय्य ठरतें? आणि त्यांची बेकारी दूर करण्याची साधनें सरकारच्या हातीं आहेत का नाहींत याचा विचार केल्याशिवाय असला झारशाही कायदा करून ठेवणें अत्यंत धोक्याचें नाहीं काय? देशांत उद्योगधंद्यांची वाढ होत नाहीं व दुसरीकडे पोटापाण्याची सोय लागत नाहीं, म्हणून इतके लोक जमिनीचा जेवढा तुकडा मिळेल तेवढ्यालाच बिलगून बसतात. पण देशांत जिकडे तिकडे नवे धंदे निर्माण होऊं लागल्यास शेतकरी लोक आपण होऊनच शेतीनें मिळणारी अपुरी भाकर सोडून जेथें पुरेशी भाकर मिळेल तिकडे वळतील, आणि मग असला कायदा करण्याचे देखील कारण उरणार नाहीं. परंतु तसली कांहीं तजवीज न करतां हा कायदा पास करणें म्हणजे नवा धंदा नाहीं व जुनाहि हातचा गेला असला आपत्तीचा प्रसंग शेतकऱ्यांवर मुद्दाम आणण्यासारखें होणार आहे.

जमिनीच्या छोट्या तुकड्यांची विल्हेवाट लावणें आणि सबंध गांवाला हा कायदा लागू करावयाचा म्हटल्यास जमिनीचें नवें वाटप करणें हें काम इतक्या भानगडीचें व लांचलुचपतीला अवसर देणारें होईल कीं, इनाम कमिशनच्या वेळीं जितक्या भानगडी झाल्या नसतील तितक्या या नव्या प्रकरणांत उपस्थित होतील! सरकारला आपले सगळे अधिकारी शुक-वामदेवासारखे निःस्पृह वाटत असले तरी आम्ही सरकारास स्पष्ट बजावतों कीं, हा नसता मोह उत्पन्न करून अधिकाऱ्यांचा व रयतेचा अंत पाहाण्याच्या भानगडींत सरकारानें पडूं नये. कारण कोणाच्याहि तोंडचा घांस काढून घेऊन तो भलत्याच एखाद्याला कायमच्या सनदेनें देऊन टाकण्यासारखा 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं' असा अधिकार हातीं दिल्यानें अधिकारी व रयत यांचे संबंध हल्लींपेक्षां अगदींच विपरीत प्रकारचे होतील व ते शांततेलाहि बाधक होतील.

याखेरीज सावकारांच्या देण्याघेण्याचा प्रश्न सह

कारी संस्थांच्या भागीदारांच्या कर्जाच्या हमीचा प्रश्न आणि ही सगळी योजना अमलांत आणण्याकरितां कराव्या लागणाऱ्या अवाढव्य खर्चाचा अंदाज या सर्वांचा विचार करूं लागल्यास या बिलानें शेतकऱ्यांचें कल्याण होण्यापेक्षां त्याचें अकल्याणच होण्याचा संभव अधिक दिसतो. यास्तव इतक्या नसत्या भानगडी उपस्थित करण्यापेक्षां सरकारनें फक्त निरनिराळ्या प्रकारच्या जमिनीच्या क्षेत्रांचें किमान प्रमाण सल्लागार कमिटीच्या बहुमतानें ठरवून तें जाहीर करावें आणि त्या किमान प्रमाणाहून कमी आकाराचे नवे तुकडे पाडल्यास ते रेव्हेन्यू खात्यांतल्या अथवा ज्युडिशिअल खात्यांतल्या कोणत्याहि व्यवहारांत मान्य केले जाणार नाहींत एवढेंच जाहीर करावें, म्हणजे हल्लीं जेवढी विभागणी झाली आहे तिच्याहून आणखी लहान चिरफळ्या होणार नाहींत. आणि येवढ्यानें हें अरिष्ट समूळ नष्ट केलें गेलें नाहीं तरी तें अधिक पसरण्याचा तरी संभव नाहींसा केला एवढ्यांतच सरकारनें समाधान मानून राहावें हेंच श्रेयस्कर आहे.

# सर एम्. विश्वेश्वर अय्या यांचें भाषण

स्वदेशी बाजार व औद्योगिक प्रदर्शन यांच्या समारोपाच्या वेळीं सर विश्वेश्वर अय्या यांनीं जें भाषण केलें तें पुढीलप्रमाणें—" या प्रदर्शनांतला माल आपण पाहिलाच आहे. त्यांत कलकत्ता काशी लखनौ जयपूर कराची अहमदाबाद मद्रास नागापट्टम् अशा दूरदूरच्या शहरांहून माल आला आहे. या प्रदर्शनाला प्रारंभ १९२२ सालीं झाला त्या वेळेपासून त्याचें सारखें पुढें पाऊल पडत आहे.

प्रदर्शनाचें व्यापारी पदार्थसंग्रहालयांत रूपांतर करावें व हें संग्रहालय कायमचें ठेवण्यांत यावें असा चालकांचा हेतु आहे. आणि रे म्यूझियम फंडाचे ट्रस्टी जर याला मान्यता देतील आणि आपल्याजवळचें त्या फंडाचें ३५००० रुपये खर्च करण्याला कबूल होतील तर ही संस्था कायम होईल. तिला म्युनिसिपालिटीकडूनहि चालू खर्चाकरितां कांहीं रक्कम मिळेल. आणि अशा म्यूझियमच्या इमारतीकरितां लागणारी जागा श्रीमत सरदार जगन्नाथ महाराज यांनीं देण्याचें कबूल केलें आहे. अशा रीतीनें कायमची प्रदर्शन कमिटी आणि तिच्या ताब्यांत म्यूझियमची इमारत व वस्तुसंग्रह आल्यावर महाराष्ट्राच्या भावी आर्थिक उन्नतीचा विचार करण्याचें तें एक केंद्र होईल. व त्याच्या विद्यमानें व्यापारी व कारखानदार यांना विचारविनिमयाकरितां सभा भरवितां येतील. म्हणून मी या प्रदर्शन कमिटीचे अध्यक्ष, सभासद आणि चिटणीस यांचे त्यांच्या या लोककार्याबद्दल आभार मानतों.

परलोकवासी महादेव गोविंद रानडे यांच्या प्रेरणेनें पस्तीस वर्षांपूर्वी या शहरांत औद्योगिक परिषद आणि प्रदर्शनें भरविण्यांत आलीं. त्या वेळीं सगळ्या भरतखंडाचें लक्ष पुणें शहराकडे लागलेलें असे आणि आतां लवकरच उद्योगधंद्याचें पुनरुज्जीवन होईल असें वाटूं लागलें होतें. परंतु ती आशा प्लेग व दुष्काळ यांच्या तडाख्यांत नाहींशी झाली. ' इंडस्ट्रिअल असोसिएशन ऑफ वेस्टर्न इंडिया ' या नांवाची त्या वेळची संस्था नामशेष झाली. आणि रे म्यूझिअम ही त्याच पंथास लागली. त्या वेळीं येथें सुताची व रेशमाची गिरणी होती व तीहि आतां बंद झाली आहे. जुन्या संस्थांपैकीं रे पेपर मिलखेरीज दुसरी कोणतीहि संस्था आतांपर्यंत तग धरून राहिली नाहीं. पुणें शहराची वाढ होत आहे. सरकारी व खासगी इमारतींची वाढ होत आहे. पण नवीन धनोत्पादक असा एकहि धंदा या पुणें शहरात सुरू झाला नाहीं. सोलापूर शहर उद्योगाचें केंद्र बनलें आहे. किर्लोस्कर बंधु व ओगले बंधु यांनीं स्तुत्य धाडस करून नवे धंदे काढले. पण तसें धाडस येथें कांहीं दिसून आलें नाहीं.

## उद्योगधंद्यांचें पुनरुज्जीवन

मुंबई इलाख्याची लोकसंख्या १८७१ सालीं २ कोटि ३० लक्ष होती ती १९२१ सालीं २ कोटि ६८ लक्ष भरली. परंतु त्याबरोबर संपत्ति उत्पादन करणाऱ्या धंद्यांची वाढ झाली नाहीं. येथील जनतेची मासिक प्राप्ति ४ ते ५ रुपये आहे. जपानी माणसाची प्राप्ति याच्या तिप्पट असते ! इंग्लंडाची चौदापट असते आणि अमेरिकेची तीसपट असते. अन्नवस्त्र आणि आश्रयस्थान या जनतेच्या मुख्य गरजा होत. पण त्याहि येथें नीटपणें भागविल्या जात नाहींत. कोणत्याहि देशांत शेतकी, उद्योगधंदे व नोकरी हे तीन धनोत्पादनाचे मार्ग असतात. त्यांपैकीं आपली शेतकी अगदीं जुन्या पद्धतीची आहे. शेताचे इतके लहान लहान तुकडे झाले आहेत कीं त्यांची लागवड करणें नुकसानकारक होतें. उद्योगधंद्याविषयीं पाहावें तर मुंबई, कलकत्ता, कानपूर, अहमदाबाद वगैरे शहरांपलीकडे त्यांच्याकडे लक्षच दिलें जात नाहीं. कारखान्यांचें युग सुरू होण्यापूर्वी हिंदुस्थान देश व्यापारांत इतर देशांशीं टिकाव

धरूं शकत होता. पण फॅक्टरी पद्धती तिकडे सुरू झाल्यापासून या देशाचा टिकाव लागेनासा झाला. यावरूनच आपल्या उद्योगधंद्याचें पुनरुज्जीवन करावयाचें झाल्यास त्याची दिशा कोणती हें लक्षांत येईल. हिंदुस्थानांतील लोकांना व्यापार, बँकिंग, विमा कंपन्या वगैरे बाबतींत परराष्ट्रांत कामगिरी करून द्रव्यप्राप्ति करून घेण्यालाहि मार्ग नाहीं.

देशाची लोकसंख्या वाढली पण त्याबरोबरच संपत्तीचें उत्पादन न वाढलें तर त्या देशाची स्थिति अशीच व्हावयाची. याकरितां येथील जनतेमध्यें जागृति उत्पन्न केली पाहिजे. आणि अल्पसंतुष्टता कमी करून हल्लींपेक्षां चांगलें अन्नवस्त्र व चांगलें घर मिळविण्याची इच्छा उत्पन्न करून त्यांना हल्लींपेक्षां अधिक मेहनत करण्यास लाविलें पाहिजे. सामान्य जनतेंत शिक्षणाचा प्रसार झाल्यास तिलाहि नवीन यंत्रें आणि यंत्रें चालविणारी नवी शक्ति यांच्याविषयीं आदर वाटूं लागेल. व तसें होण्यास परदेशांतील नमुन्याप्रमाणें औद्योगिक व धंदेविषयक शिक्षणावर अधिक भर दिला पाहिजे. रेलवे, गलबतें, हीं वाहतुकीचीं साधनें आणि बँका यांची पद्धतशीर वाढ केल्यास हिंदी शेतकऱ्यांचाहि त्यांत फायदाच होईल. सारांश, सर्वांचें शिक्षण व विशेषतः उद्योगधंद्यांचें शिक्षण, उद्योगधंद्यांची माहिती जमा करण्याचें साधन आणि प्रत्यक्ष धंद्यांची वाढ या तीन गोष्टी आर्थिक उन्नतीला आवश्यक आहेत. जपान, इंग्लंड वगैरे देशांत सरकार स्वतःच उद्योगधंद्याच्या वाढीकडे लक्ष पुरवितें. म्हणून आपणहि सरकारला कायद्यानें उद्योगधंद्याच्या वाढीला हरतऱ्हेनें मदत करण्यास भाग पाडलें पाहिजे. जबर जकाती बसवून मोटारी तयार करण्याचा धंदा हिंदुस्थानांत काढतां येईल. बहुतेक देशांत मोटारींवर जकात ३३ ते ५० टक्के आहे, पण येथें ती १५ टक्के करण्यांत आली. देशी धंद्यांकरितां स्वदेशाचा बाजार सर्व राष्ट्रांत राखलेला असतो. रेलवेसाठीं व सैन्यासाठीं स्वदेशीच माल वापरण्याचें ठरविल्यास अनेक धंद्यांची वाढ होईल.

आतां जनतेला स्वतः काय करतां येईल तेंहि पाहिलें पाहिजे. जनतेला स्वतःचा पैसा व योजकता यांचा उपयोग उद्योगधंद्याच्या उत्कर्षाकडे कसा करतां येईल तें पाहूं. उद्योगधंद्यांत प्रत्यक्ष पडलेल्यांचा व हितचिंतकांचा एखादा कारखानदारसंघ स्थापन केला पाहिजे. त्यांच्या कार्यकारी मंडळांत एक पगारी सेक्रेटरी, एक हिशेबनीस व त्यासाठीं एक कार्यालय असल्यास त्याचा कारखानदारांना उपयोग होण्याजोगा आहे. उद्योगधंद्यांत खेळतें भांडवल पुरविण्यासाठीं शंभर रुपयांचा एक भाग याप्रमाणें एक मोठा फंड उभारावा. उद्योगांत पडलेल्या व्यक्तींनीं व मंडळांनींहि या फंडाचे भाग घ्यावे. कारखानदारसंघानें निवडलेले आठ प्रतिनिधी व फंडाच्या वर्गणीदारांनीं निवडलेले आठ अशा सोळाजणांच्या सल्लागार मंडळानें आपल्यांतील चौघांचें एक औद्योगिक मंडळ (बोर्ड ऑफ इंडस्ट्रीज) उभारावें, संघांचें कार्यकर्तृत्व व पैसा या बोर्डाकडे असावा. हे चौघेजण लोकांच्या विश्वासांतील, व्यापाऱ्यांत सचोटीबद्दल प्रसिद्ध व संघाचा उत्कर्ष साधण्यासाठीं शक्य तितकी मेहनत करूं इच्छिणारे असावेत. सल्लागार मंडळांतील चौघांनीं व बोर्डांतील एकानें दरवर्षी पाळीप्रमाणें जागा रिकामी करावी. पण पुनः निवडून येण्यास त्यांस हरकत नसावी.

बोर्डानें तूर्त आर्थिक मंडळाचे स्वरूपांत वेगवेगळ्या कारखानदारांना कर्जाऊ रकमा देऊन व इतर अनेक रीतीनें चालू उद्योगधंद्याची सुस्थिति राखण्याचा व त्याबरोबरच संघाच्या भागीदारांना फायदा देण्याचा व्याप करावा. रक्कम किती जमवावी हें प्रांतांच्या मगदुरावर व जिल्ह्यांतील कारखानदारांच्या सल्ल्यानें ठरविलें पाहिजे. २५ लाखांचा तरी निधि आवश्यक आहे. सध्याच्या उद्योगधंद्याच्या आत्यंतिक गरजा भागविण्यासाठीं दहा लक्ष निधी किमान पक्ष हवा. ह्या बोर्डाचें व कारखानदारसंघाचें कार्यालय, चिटणीस व हिशेबनीस एकच असावेत. प्रथम तज्ज्ञांचा सल्ला कांहीं फी देऊन घ्यावा. पण उद्योगधंदे वाढले म्हणजे स्वतःचे तज्ज्ञ नेमतां येतील. अखिल महाराष्ट्रासाठीं स्वतंत्र संघ असावा असें भावनाप्रधान लोकांना वाटेल. पण मध्य व दक्षिणविभागांतील जिल्हे मिळून एक गट करणेंच अधिक फलदायी होईल. कारखानदारसंघांच्या प्रत्येक जिल्ह्यांतील स्थानिक शाखांनीं स्वकर्तव्याची स्मृति कायम राखावी आणि तीन वर्षांच्या अवधींत एक तरी मूलभूत मोठा धंदा व प्रायोगिक व निदर्शक स्थानें प्रत्येक जिल्ह्यांत स्थापावीं. बोर्डानें व त्याच्या कारभाऱ्यांनीं त्यांच्या निरीक्षणाखालील धंद्यांची व विशेषतः साहाय्य दिलेल्या धंद्यांची आर्थिक प्रगति आठवड्याच्या आठवड्यास लक्ष देऊन पाहावी.

दक्षिणमध्यें तीन प्रकारचे धंदे उत्तेजनार्ह आहेत (१) कापडाच्या गिरण्यासारखे लोकांच्या मुख्य गरजा भागविणारे मोठे धंदे. (२) लोखंड, पोलाद, यंत्रें यांशीं संबंध असलेले इंजीनिअरिंग धंदे. (३) घरगुती धंदे.

## बोर्डाचीं कामें

नवीन बोर्ड स्थापलें गेल्यास त्यास खालील कामें हातीं घेतां येतील. (१) सरकारकडे मागण्या करणें व लोकांना विनंति करणें. (२) प्रामाणिक व्यवस्थे-

खालील व इतर दृष्टीनें भक्कम चालू धंदा अयोग्य चढाओढीमुळें किंवा पेढीच्या वगैरे सवलती नसल्यानें बुडणार नाहीं याविषयीं नजर ठेवणें. (३) औद्योगिक पेढी किंवा पेढ्या स्थापन होईतों आर्थिक संघाचें काम करणें. (४) जरूर तर कांहीं धंद्याच्या मालाच्या खपाची व्यवस्था पाहणें. (५) गरजू लोकांना योग्य फी घेऊन धंदेवाईक किंवा आर्थिक सल्ला देण्याची व्यवस्था करणें. (६) चालू धंद्यांतील दोष व अव्यवस्था दाखवून देणें. (७) धंद्यांची व उत्पादनांची आंकडेवारी माहिती जमा करून ठेवणें. (८) औद्योगिक पाहणी करून नव्या योजना तयार करणें. (९) कंपनी बँका काढण्याच्या पद्धती लोकांना समजावून देणें (१०) धंद्यांच्या संयुक्त हितसंबंधाची निगा राखणें व वैयक्तिक बाबतींत जरूर तें साहाय्य करणें. प्रत्येक उद्योगधंदा स्वतंत्रपणें भांडवल उभारून स्वतःच्या जबाबदारीवरच चालला पाहिजे. (११)स्वतःच्या तज्ज्ञांच्या साहाय्यानें जगाच्या व्यापाराच्या व धंद्यांच्या हालचाली पाहून तदनुसार संबद्ध कंपन्यांना किंवा पेढ्यांना सूचना करणें इत्यादि.

बोर्ड ऑफ इंडस्ट्रीजमध्यें चौघांना घेण्यास सांगण्याचा हेतु लहान समुच्चयास आत्मप्रतीतीनें कार्य करतां येतें. प्रातिनिधिक संस्थांत जर अशिक्षित धंदेवाले असले तर कार्य न होतां भांडणें होतात. कांहीं अनुभवानंतर इतर सहकार्याचे मार्ग स्वीकारतां येतील. सरकारनें अशीच व्यवस्था केल्यास त्यांशीं सहकारी व पूरक असें बोर्डाचें काम चालेल. सरकारलाहि ह्या बोर्डास अनेक प्रकारें साहाय्य करतां येईल; बोर्डाच्या निधीमध्यें भाग घेऊन लोकांचा त्यावरील विश्वास वाढवितां येईल; त्या निधीला कांहीं स्वतःच्या कमी व्याजाच्या ठेवीनें जोड देतां येईल; या संघाच्या ऋणपत्रावर व्याजाची हमी देतां येईल. किंवा सहकारी चळवळीस दिलेल्याप्रमाणें एक लक्ष किंवा तशीच कांहीं रक्कम संघाच्या खर्चासाठीं देतां येईल. उत्कृष्ट योजना म्हणजे दहा वर्षेंपावेतों वार्षिक दहा लक्षांची मदत देऊन औद्योगिक खात्याच्या संचालकांस या बोर्डावर नेमून त्यांस या संघाच्या वतीनें काम करण्यास सांगणें ही होय. या योजनेमुळें औद्योगिक खात्याच्या संचालकांस जनतेमधून सरकारी रक्कमेच्या दहापट रक्कम उभारतां येऊन औद्योगिक पेढीच्या रूपानें कारखान्यांमधून संचालन देतां येईल. बुडत्या उद्योगधंद्यांना वर काढण्याच्या ईर्षेनें काम करूं इच्छिणाऱ्या निखालस प्रामाणिक अशा लोकांमधून प्रतिनिधी निवडले तर पैसा धांवत बाहेर येईल असें मुंबईच्या व येथल्या उद्मी स्नेह्यांनीं मला आश्वासन दिलें आहे.

औद्योगिक उन्नति हें विशेषतः जनतेचें कार्य आहे आणि उपरिनिर्दिष्ट प्रकारें जनतेच्या संघाचा त्यावर ताबा असणें, इतर कोणाचाहि ताबा असण्यापेक्षां, अधिक हितकर व सोईस्कर आहे. स्वायत्त संस्थांचें उदाहरण घेतलें तर उपरिनिर्दिष्ट प्रकारांनीं सवलती देण्यानें सरकारच्या कार्यकक्षेचें उल्लंघन होत नाहीं. सरकारनें जर उदाहरण घालून दिलें तर तिला संस्थानिक व जहागीरदारहि यथाशक्ति मदत करतील. मी वर्णिल्याप्रमाणें व्यवस्था यशस्वी होण्यास हें काम हातीं घेऊं शकणारे चौघे कर्तबगार व विश्वासू चालक शोधून काढले पाहिजेत. एक चालक याच कामाला वाहिलेला व अत्यंत कर्तबगार असावा व त्याला कांहीं वेतन व सर्व प्रवासव्यय दिला जावा.या प्रांतांतील व जिल्ह्यांतील प्रमुख लोकांपैकीं शंभर पुरुषांनीं पांच वर्षेंपर्यंत या कार्यासाठीं स्वतःला वाहून घेण्याचें लेखी अभिवचन दिलें पाहिजे व त्या अवधींत आपल्या कार्यकक्षेंत यावच्छक्य या चळवळीचा उठाव केला पाहिजे

धंद्यांत पडलेल्या लोकांच्या सांप्रतच्या अडचणींचा निरास करण्यास प्रथम त्यांनीं स्वतःच झटणें, सरकारनें प्रयत्न करणें आणि जनतेची सहानुभूति मिळविणें असे तीन उपाय आहेत. त्या तिघांनीं किंवा निदान दोघांनीं एकवटून काम केल्याविना गत्यंतर नाहीं. कारखानदारांनीं आपला संघ स्थापण्याचें ठरविलें आहे आणि ते सरकारची व जनतेची सहानुभूति मिळवतीलच. सध्याचे कांहीं कारखाने योग्यकालीन साहाय्याच्या अभावीं बुडाले तर त्यानंतर इतरांवरहि तशीच पाळी येईल. उद्योगधंद्यांची शीघ्र वाढ करणें हें सध्याचें पवित्र राष्ट्रीय कार्य आहे. बेकारी घालविण्यास तो एकच उपाय आहे. सध्या प्रत्येक मनुष्यास पुरेसें काम मिळत नाहीं.सर्व प्रधान गरजा परदेशांतून भागविल्या जातात; यांस बंदी होऊन लोकांनाच त्या गरजा भागवितां आल्या पाहिजेत. इतक्या गरीब जनतेला इतकें आळशी राहूं देणें युक्त नाहीं. कारखान्यांची वाढ शेतकीला जाचक असल्याची कल्पना खोटी आहे. कारखान्यांची वाढ होतांच शेतकीमध्यें अधिक सुधारलेल्या कल्पना येऊन शेतीचें उत्पन्न वाढतें असा अमेरिकेचा अनुभव आहे. विद्यापीठांनीं आतां वाङ्मयाकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांचा ओघ बंद पाडून शेतकी,स्थापत्य, व्यापार, धंदे यांकडे तो वळविला पाहिजे. मागील प्रयत्न सरकारच्या दुर्लक्षामुळें व लोकांच्या उत्कटतेच्या कळकळीच्या अभावामुळें फसले. सरकारचें धोरण कसेंहि असलें तरी स्वावलंबनानें व सहकार्यानें सांप्रतच्या उद्योगांचें संवर्धन व नव्या हरतऱ्हेच्या उद्योगांचें संजीवन आपण केलें पाहिजे.

# डॉ० मुंजे यांची मुलाखत

## ऐक्य परिषदेंतील खरा प्रकार.

ऐक्य परिषदेंतील वाद्यांच्या व गोवधाच्या वादासंबंधीं कांहीं मुसलमानांनीं एकपक्षीय व विकृत अशा तऱ्हेची हकीकत प्रसिद्ध केली आहे. तिला उत्तर म्हणून हिंदूंची खरी बाजू पुढें येण्यासाठीं फ्री प्रेसच्या बातमीदारानें हिंदुमहासभेचे अध्यक्ष डॉ.मुंजे यांची मुलाखत घेतली.तिचा सारांश पुढें दिला आहे.

### गोवध

डॉ. मुंजे म्हणाले " गोवध व वाद्यबंदी हे समान दर्जाचे प्रश्न मानून ते एकमेकांच्या मोबदल्यांत घालणें व अशा रीतीनें दोनहि प्रश्नांबद्दल मिळून एक सामान्य योजना मांडणें चुकीचें आहे. अशा रीतीनें हे प्रश्न मांडण्यास वस्तुस्थितीचा व धर्मभावनेचाहि आधार नाहीं. व त्यायोगें हे प्रश्न समाधानकारक सुटणें किंवा शांतता उत्पन्न होणें शक्य नाहीं. हिंदु लोक हजारों वर्षांपासून गाईला पूज्य मानीत असून गोरक्षण हें धार्मिक कर्तव्य समजतात. ही धर्मभावना सर्व हिंदूंत सारखी असून हिंदूंनीं गोवध होऊं नये यासाठीं राज्यत्याग केला व लढाया केल्या. मोंगल राजांनींहि या धर्मभावनेबद्दल सहानुभूति दाखविली.आजचे मुसलमान संस्थानिक व अफगाणिस्थानचे अमीर यांनींहि गोवधास आळा घाळण्याबद्दल हुकूम काढले आहेत. अमीर हिंदुस्थानांत आल्यावेळीं दिल्लीच्या जुम्मा मशिदींत ईदचे वेळीं गोवध होईल तर मी ईद नमाझला येणार नाहीं असें त्यांनीं सांगितलें. या गोष्टीवरून गोवधाचा प्रश्न सलोख्यानें सुटण्यास काय करावयास पाहिजे याचाहि बोध होईल.

हिंदूंना गाईबद्दल वाटणारी धार्मिक पूज्यता व त्यांच्यावरील गोरक्षणाची धार्मिक जबाबदारी सर्व प्रमुख मुसलमान पुढाऱ्यांनीं मान्य केली आहे. उलट मुसलमानांनीं गोवध केलाच पाहिजे अशी धर्माज्ञा नाहीं, गाईऐवजीं इतर जनावरें मारल्यानेंहि धर्माचें काम भागतें. जोंपर्यंत ब्रिटिश सोल्जरांसाठीं नित्य होणारा गोवध बंद करतां येत नाहीं तोंपर्यंत मुसलमानांनीं गोवध बंद करावा अशी हिंदूंना अपेक्षा करतां येत नाहीं, हें त्यांना माहीत आहे.पण हिंदू–मुसलमान हे पुढें कायद्यांत प्रथित करण्यासाठीं योजना करावयास बसले असतां, ज्या ठिकाणीं पूर्वी गोवध झाला नाहीं त्या ठिकाणीं तो चालू करण्यास जर ते परवानगी देतील तर ते पुढील भांडणाची सिद्धताच करून ठेवतील. पुढें अस्तित्वांत येणाऱ्या शहरांच्या किंवा खेड्यांच्या बाबतींत त्यांत वस्ती करणाऱ्या हिंदु,मुसलमान शीख रहिवाशांनीं गोवधाबद्दल आपापसांत करार करावेत हें मान्य करण्यास हिंदू तयार आहेत. त्याचप्रमाणें हल्लीं जेथें गोवध होतो तेथें तो गांवाबाहेर कत्तलखान्यांत झाला तर तो हिंदूंच्या दृष्टीच्या बाहेर असल्यामुळें वादाचे प्रसंग टळतील असें हिंदूंना वाटते. याप्रमाणें हिंदूंनीं या प्रश्नाचे बाबतींत जी अखेर योजना सुचविली तिच्यांत वादाचा प्रसंग टळून शांतता नांदावी हाच हेतु होता.

### वाद्यांचा प्रश्न

हिंदूंना धार्मिक दृष्ट्या वाद्यवादन जसें अवश्य आहे तसें मुसलमानांना वाद्यनियंत्रण धार्मिक दृष्ट्या आवश्यक नाहीं. वाद्य बंद करण्यास सांगण्यांत प्रार्थनेंत अडथळा येतो तो दूर करणें व मशिदीचा मान राखणें असे दोन हेतू असतात. पण मोटार, ट्रॅम, इत्यादि वाहनांचा आवाज अगर गुरांच्या गळ्यांतील घंटांचा आवाज यापेक्षां वाद्यवादनापासून अधिक अडथळा होत नाहीं. सार्वजनिक ठिकाणीं प्रार्थनामंदिरें असणाऱ्या कोणत्याहि धर्माच्या लोकांना ही अडचण असतेच. पुष्कळ ठिकाणीं मोटारचा व गिरण्यांचा आवाज बंद करणें अशक्य असतें. हिंदु देवालयांतील उपासकहि हा आवाजाचा त्रास सहन करतात आणि अगदीं परवांपर्यंत मशिदीवरून मुसलमानांच्याहि मिरवणुकी वाद्यें वाजवीत जात. वाद्यांसंबंधीं मुसलमानांची हरकत बहुतेक ठिकाणीं अगदीं नवीन उपस्थित झालेली आहे व दिल्लीच्या जुम्मा मशिदीच्या व फत्तेपुरी मशिदीच्या बाबतींत ही हरकत जुनी असली तरी फार जुनी नाहीं. उलट हजारों वर्षांपासून सर्वत्र हिंदूंच्या धार्मिक व घरगुती मिरवणुकींत वाद्य वाजविणें हा महत्त्वाचा भाग आहे व लहानमोठ्या गांवांत रोजच्या रोज अनेक तऱ्हेच्या हिंदूंच्या मिरवणुकी निघत असतात. आणि मुसलमानांनीं जागोजाग रस्त्यावर मशिदी बांधलेल्या असल्यामुळें वाद्यबंदी केल्यास हिंदूंच्या सामाजिक जीवनक्रमांत असह्य अडथळे उत्पन्न होतात. रस्ता सोडून बाजूला असलेल्या मशिदीपुढें मुद्दाम वाद्यें वाजवून त्रास देण्याचा हिंदूंचा हेतु कधींच नसतो. धार्मिक व सामाजिक समारंभांतील वाद्यांना अडथळा नसावा या हिंदूंच्या मागणींत दुसऱ्यांना त्रास देण्याचा हेतु आहे असें मुळींच म्हणतां यावयाचें नाहीं.

मशिदींना मान देण्याच्या बाबतींत मुसलमानांना मागणी करण्यास तोंडच नाहीं. कारण मुसलमानी इतिहास हा हिंदु देवळांच्या विध्वंसाच्या हकीकतींनीं खच्चून भरलेला असतां हिंदूंनीं मात्र

या बाबतींत उच्च धार्मिक कल्पनांमुळें तसेंच उलट वर्तन सत्ता असतांहि केलेलें नाहीं. हिंदूला स्वाभाविकपणेंच आपल्या देवळाप्रमाणें इतरांच्या मशिदीबद्दल आदर वाटतो. पण यासाठीं वाद्य बंद करणें हिंदूंना आवश्यक वाटलें नाहीं व तीं बंद करविणें हेंहि पूर्वी मुसलमानांस अवश्य वाटलें नाहीं. पण मान देण्याची ही नवी पद्धत जेव्हां लाठीच्या किंवा सरकारी हुकुमाच्या जोरावर हिंदूंवर लादण्यांत येते तेव्हां हिंदूंनाहि आपल्यांतील सर्व बळ खर्च करून आपल्या धार्मिक जीवनाचें रक्षण करणें अपरिहार्य ठरतें. असें असलें तरीहि कांहीं इतिहासप्रसिद्ध मशिदींच्या बाबतींत, धार्मिक मिरवणुकीखेरीज इतर मिरवणुकींचे वेळीं वाद्यें बंद करण्याची हिंदूंची तयारी आहे. हिंदूंना वाद्यांचें धार्मिक महत्त्व असल्यामुळें सर्वत्र सर्व मशिदींपुढें वाद्यें बंद करणें ही गोष्ट मात्र अशक्य आहे.

## मुसलमानांच्या योजना

मुसलमानांनीं हिंदूंपुढें एक योजना मांडली. ही प्रथम श्रीनिवास अय्यंगार यांनीं सुचविली होती ती अशी कीं, हिंदूंना वाटेल तेथें वाद्यें वाजविण्यास मुभा असावी व मुसलमांना वाटेल तेव्हां वाटेल तसा गोवध करण्याची मुभा असावी. मुसलमानांनीं ही योजना चटकन स्वीकारली यावरून हें उघड होतें कीं, वाद्यांसंबंधाची त्यांची हरकत खरी नसून केवळ गोवधाची मुभा मिळण्यासाठीं मोबदला म्हणून ती पुढें करण्यांत येत आहे! वाद्यें व गाय यांच्यासंबंधीं हिंदूंच्या धर्मभावना जुन्या व तीव्र असल्यामुळें त्यांना ही योजना मान्य असणें शक्य नव्हतें. गोवधाला अशी मोकळीक देण्यानें प्रत्येक गांवीं दंगेधोपे माजतील. सारांश, हिंदूंनीं मांडलेल्या योजनेनेंच खरी शांतता प्रस्थापित होईल.

या परिषदेसंबंधीं मुसलमानांनीं जी हकीकत प्रसिद्ध केली आहे तिचा निषेध लजपतराय यांनीं केलाच आहे. परिषदेचे अध्यक्ष जिना यांनीं तयार केलेला परिषदेचा सारांशच फक्त प्रसिद्ध करावा, इतर कांहीं प्रसिद्ध करूं नये असें ठरलें होतें. नवीन वाद उपस्थित होऊं नयेत असा यांत हेतु होता. पण तो साधला नाहीं. आतां हिंदू आणि मुसलमान या दोघांच्याहि योजना जगापुढें असून त्यांत समंजसपणाच्या व व्यावहारिक सूचना कोणाच्या आहेत हें जग ठरवील. सर महंमद शफी व सर महंमद इक्बल यांसारख्या मुसलमान पुढाऱ्यांचे उद्गार लोकांनीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. ते म्हणतात कीं, 'हा वाद मुख्यतः राजसत्तेबद्दल आहे. आणि पंजाबांतील हा राजकीय सत्तेचा वाद मिटला तर इतर प्रांतांत सलोखा नांदेल.' याचा अर्थ उघडच असा आहे कीं, वाद्यबंदी व गोवध या संबंधाच्या मुसलमानांच्या आग्रहाशी त्यांच्या धर्माचा बिलकुल संबंध नाहीं! उद्यां मुसलमान सांगतील त्या राजकीय मागण्या मान्य केल्या कीं, वाद्यांसंबंधीं व गोवधासंबंधीं हिंदूंचीं टाळकीं सडकण्याचा उपक्रम बंद होईल. सारांश, मुसलमानांना राजकीय सत्ता पाहिजे व हिंदूंना शांतता पाहिजे. पण अडचण अशी आहे कीं, मुसलमानांच्या राजकीय आकांक्षांना मर्यादा नाहीं. त्यांची लांबी व रुंदी सारखी वाढत चालली आहे. यामुळें हिंदूंपुढें असा प्रश्न आहे कीं, एक तर मुसलमानांपुढे नमून त्यांच्या ज्या ज्या जातवारीच्या मागण्या येतील त्या त्या मान्य कराव्या किंवा ही जातवारी धिक्कारानें बाजूस सारून राष्ट्रीयत्वाच्या अधिष्ठानावर खंबीरपणें उभें राहावें व जे जे हल्ले येतील त्यांचा पौरुषत्वानें प्रतिकार करावा.

---

# श्रीशिवभारत

## लेखांक ३ रा

आतां 'शिवभारत' या ग्रंथाकडे वळून त्यांत ऐतिहासिक माहिती किती आहे हें थोडें पाहूं. हें काव्य वाचणाराला तेव्हांच असें दिसून येईल कीं, यांत चंपू ग्रंथाच्या मानानें पुष्कळच अधिक ऐतिहासिक माहिती दिलेली आहे पण चारशें श्लोकांच्या पर्णालाख्यानांतील माहितीप्रमाणें ती ठाशीव नाहीं. कारण या ग्रंथांत तीन प्रकार स्पष्टपणें आढळतात. कांहीं भागांत निवळ काव्य आहे, कांहीं भागांत निवळ इतिहास आहे, व कांहीं भागांत इतिहास व काव्य यांचें संमिश्रण आहे. उदा० अध्याय ७ यांत शिवाजीच्या बाललीलांचें वर्णन केलेलें आहे त्यांत हुडहुडकून काढणारालाहि इतिहासबीज सांपडणार नाहीं. उलट त्याच्याच पुढचा आठवा अध्याय पाहिला तर त्यांतील ७२ श्लोकांपैकीं पहिले५०।५२ श्लोक केवळ इतिहासपरच आहेत. त्यांत काव्य असें नाहींच म्हटलें तरी चालेल. क्वचित एखादी उपमा मधून मधून झळकते. पण आधुनिक गद्य ग्रंथकारहि अशा उपमा देणारे सांपडतील. "जें काव्य दिसतें त्याला ऐतिहासिक स्वरूप कां मानूं नये ! व जो ऐतिहासिक भाग दिसतो तोहि कदाचित् कल्पनारचित कां नसावा!" अशी दुहेरी शंका एखादा चिकित्सक यासंबंधीं उपस्थित करूं शकणार नाहीं असें नाहीं. पण सूक्ष्मपणें पाहणाराला ही शंका फार वेळ टिकणार नाहीं. कारण दिसण्यांत काव्य असतांहि त्यांतील इतिहासबीज चाणाक्ष मनुष्याला तेव्हांच हुडकून काढता येतें आणि दिसण्यांत वस्तूनामें असलेलें वर्णनहि केवळ काल्पनिक होय असें तेव्हांच कळतें. याचीं कांहीं उदाहरणें देऊं.

अध्याय एकमधील श्लोक ११ ते १९ यांतील शिवाजीचें वर्णन. यांत स्थूल वर्णन असलें तरी, शिवाजीविषयीं लोकांची तेव्हां कल्पना काय होती हें त्यावरून उघड दिसतें. मालोजी हा 'मराठा' राजा असें म्हटलें हा इतिहास आणि त्याच्या घोड्याच्या खुरांनीं भीमा नदीच्या कांठचा प्रदेश तुडविला हाहि इतिहास. पण त्याच्या दुंदुभिपासून उठणाऱ्या लहरींनीं समुद्र खवळून टाकला हें निवळ काव्य. कारण मालोजीच्या सेनेची आणि समुद्राची दुरूनहि नजरानजर झाली नव्हती. मालोजीनें शंभू पर्वतावर तळें बांधलें हा इतिहास. पण सोन्याच्या पायऱ्या असलेल्या मोठमोठ्या विहिरी बांधविल्या हें काव्य. मालोजीचे मुलगे जन्मले तेव्हां झालेल्या उत्सवाचें वर्णन हें काव्य. पण त्यांचीं नावें शहाजी व शरिफजी अशीं ठेवलीं हा इतिहास. मालोजी इंदापूरच्या स्वारींत होता, शौर्यानें लढला व मेला हा इतिहास. पण रक्ताच्या नद्या धो धो वाहावयास लागल्या हें काव्य. अध्याय दोनमधील ४६ ते ५९ या श्लोकांत शहाजीची स्त्री जिजाबाई हिचें केलेलें वर्णन हें काव्य पण शरिफजीला विश्वास, रायाची दुर्गा नांवाची मुलगी दिली हा इतिहास- विठोजी भोंसल्याचे मुलगे संभाजी, खेळोजी, मल्लाजी, मंबाजी, नागोजी परसोजी, त्र्यंबकजी आणि बक्काजी या नांवाचे होते आणि ते सर्व मलिकंबराच्या तंत्रानें चालत हा इतिहास. पण ते सूर्याप्रमाणें तेजस्वी व पर्वताप्रमाणें धिप्पाड होते हें काव्य. हत्तीच्या गर्दीपायीं जाधव व भोसले यांचें युद्ध झाल्याचा प्रकार बहुतेक सर्व इतिहासच होय.

चौथ्या अध्यायांत १० ते २१ या श्लोकांत निजामशाहीचे पक्षपाती कोण कोण होते त्यांची नांवनिशी दिली आहे. त्यांतील नांवें हा इतिहास, आणि या प्रत्येक नांवाच्या मागें एकेक गुणदर्शक विशेषण लावलें आहे तें कदाचित् त्या त्या व्यक्तीविषयीं वस्तुस्थितिदर्शक असेल, किंवा एकदां एखादें विशेषण लावण्याची सुरुवात केली म्हणजे सर्वांना तीं पुरवावयाचीं अशी हौस बळावल्यामुळें तीं विशेषणें वस्तुस्थितिदर्शक नसण्याचाहि संभव आहे. पांचव्या अध्यायांतील दैत्यरूप म्लेंच्छांचा अवतार व विष्णुरूप शिवाजीचा अवतार या विषयाचें सर्व वर्णन केवळ पौराणिक कल्पनामय व काव्यमय होय. पण सहाव्या अध्यायांतील शिवाजीच्या जन्माचा शक, संवत्सरनाम, अयन, ऋतु, मास, तिथि वगैरे गोष्टी या केवळ शुद्ध इतिहास होत. त्यांत कविकल्पनेला थारा नाहीं. शिवजन्माच्या संस्कारांचें व समारंभांचें वर्णन बहुतेक काव्यमयच आहे, पण शिवजन्माच्या वेळीं शहाजी हा दर्याखानाशीं युद्ध करण्याला गेला होता हें काल्पनिक नाहीं. तें इतिहासबीजच आहे. अध्याय ९ मधील शहाजीनें जिंकलेल्या कर्नाटकी व म्हैसुरी राजांचीं वर्णनें हीं ऐतिहासिक होत. पण त्याच अध्यायांतील बंगळूर शहराचें वर्णन कांहीं वस्तुस्थितिदर्शक तर कांहीं काव्यमय असावें. शिवाजी मूळाक्षरें शिकला हें ऐतिहासिक विधान, पण त्याला गुरुजी पाहिलें अक्षर सांगतात तोंच तो दुसरें सुद्धां अक्षर लिहून दाखवी ही केवळ अतिशयोक्ति. दहाव्या अध्यायांतील शहाजीचें शिवदर्शन हा काव्य विषय. पण शहाजीनें आधिपत्य देऊन शिवाजीला पुण्यास पाठविलें हा इतिहास.

अध्याय १० मधील ३४ ते ४० या श्लोकांत सांगितलेल्या सर्व विद्या शिवाजीला शिकविण्यांत आल्या हें केवळ सांकेतिक वर्णन होय. मर्दानी व लष्करी खेळ शिवाजीला शिकविले हें खरें दिसतें पण "इंगितेषुच मायासु विषनिर्हरणादिषु तत् तद् रत्नपरीक्षायां अवधानं लिपिष्वपि" हें वर्णन खचित ऐतिहासिक नाहीं. ११ व्या अध्यायांतील मुस्तफाखानाच्या स्वारीचें वर्णन पुष्कळसें ऐतिहासिक होय. अध्याय १२ मधील सुमारें निम्मा भाग ऐतिहासिकच होय. २१ व्या अध्यायांतील अफजुलखानाच्या वधाच्या प्रसंगांत तर ऐतिहासिक स्वरूपाची हकीकत पुष्कळच आलेली आहे. अशा रीतीनें निश्चित इतिहास व निश्चित काव्य किंवा काव्येतिहास हें ओळखण्याची सुलभ गमकें या ग्रंथांत गोविलीं आहेत. तथापि आम्ही पूर्वी दर्शविल्याप्रमाणें इतिहासवर्णनाच्या दृष्टीनें, 'पर्णालपर्वताख्यान' हें काव्य शिवभारतापेक्षांहि अधिक नमुनेदार ऐतिहासिक स्वरूपाचें मानावें लागतें.

तथापि, या ग्रंथाची पद्धति काव्याची असली तरी भूमिका निःसंशय इतिहासाची आहे. मूळ चित्र इतिहासकथानकाचें व त्याच्या भोंवतीं काव्याची भरपूर वेलबुटी काढलेली इतकेंच मानतां येईल. जेथें काव्याचा संबंध नाहीं तेथेंहि नुसत्या सूचनेवरून काव्यपर वर्णन करण्याची प्रवृत्ति मनुष्याला होते. उदाहरणार्थ, एखाद्या वंशांतील नुसती पिढीवार नांवनिशी द्यावयाची असली तरी आपण असें पाहतों कीं, वंशाला वृक्षाची उपमा सहजच येत असल्यामुळें, वंशमालिका लिहावयाची तर ती प्रत्यक्ष वृक्षाचें चित्र काढून लिहितात. त्याच्या बुंध्यांत, डाहाळींत, पानांतून वंशसमुत्पन्न व्यक्तींची नांवें चितारलीं जातात. मग बोलूनचालून एखाद्या पुराणाची व काव्याचीच वर्णनपद्धति स्वीकारल्यावर ऐतिहासिक हकीकतीबरोबर काव्यात्मक वर्णनें ग्रंथकारानें समाविष्ट करावीं यांत आश्चर्य नाहीं ! शिवभारत, पर्णालाख्यान यासारखे ग्रंथ या एक प्रकारच्या ऐतिहासिक बखरीच होत. बखरी गद्यात्मक असतात व प्रायः मराठींत असतात. आणि हे ग्रंथ संस्कृतांत आहेत, पद्यात्मक आहेत, इतकाच फरक. पण बखरींतील सर्व गुणदोष या ग्रंथांना लागू पडतात. बखरी गद्यात्मक असल्यामुळें त्या लिहिणारे काव्यपद्धतीचीं सहसा वर्णनें करीत सुटत नाहींत, किंवा पदोपदीं उपमा अलंकार घालीत नाहींत. तथापि काव्यबुद्धि खुलविण्याच्या भरांत काव्यरचनेंतील कांहीं कांहीं खेळ बखरकारहि खेळलेले आहेत. आधीं इतिहासकार, त्यानंतर बखरकार, व त्यानंतर हे काव्यग्रंथकार अशी इतिहासलेखकांची सरसत्वाच्या दृष्टीनें चढती भांजणी आहे. पण ऐतिहासिक सत्याच्या दृष्टीनें अर्थात् उतरती भांजणी लागते.

निवळ इतिहासकराला आपला विषय समजावून सांगण्याकरितांहि अलंकाराचा आश्रय करणें कमीपणाचे वाटतें. उलट असलया काव्यकर्त्यांना निवळ ऐतिहासिक स्वरूपाच्याहि गोष्टी सांगतांना त्या नीरस ठरल्या तर आपल्या कीर्तीला व कुळाला बट्टा लागेल असें वाटून, होईल तितकें कल्पनामय सृष्टीचें वर्णन ते मधून मधून करीत असतात. प्रामाण्यासंबंधानें बखरकारांविषयीं जें म्हणतां येईल तेंच या काव्य ग्रंथकर्त्या विषयीं म्हणतां येईल. अलीकडच्या काळांत चिकित्सात्मक संशोधन अधिक बळावल्यामुळें, बखरी, बखरकार व असले काव्य ग्रंथ यांची अवज्ञा सहजच होते. परंतु इतिहासप्रेमी लोकांना त्यांच्याविषयीं कृतघ्न बनतां येत नाहीं. जयराम कवि किंवा परमानंद कवि यांनीं १९ व्या व २० व्या शतकांतील चिकित्साबुद्धीचा सर्वस्वी अंगिकार केला नसला तरी, त्यांनीं स्वतः पाहिलेली व ऐकलेली जी ऐतिहासिक माहिती आपल्या ग्रंथांत दिली आहे, तिनें चिकित्सक इतिहासवाचकांवरहि पुष्कळ उपकार होण्यासारखे आहेत. असा एक काळ यापूर्वी होता कीं तेव्हां बखरी व असले काव्य ग्रंथ हींच इतिहास-जिज्ञासा पुरविण्याचीं मुख्य साधनें होतीं. इतर साधनें विद्यमान नव्हतीं असें नाहीं. पण तीं भूमिगत द्रव्याप्रमाणें असून निरुपयोगी होतीं. भूमिगत द्रव्य सांपडण्याला जी एक दृष्टि लागते म्हणतात तशाच प्रकारची दृष्टि इतिहाससंशोधनांत लागते. या बखरी व हे काव्य-ग्रंथ यांच्या काळीच महाराष्ट्रांत, असलेले शिलालेख नाणीं ताम्रपट वगैरेंचा उपयोग करण्याला ही दृष्टि लावण्यांत आलेली नव्हती. ती दृष्टि आतां आली आहे. यामुळें मध्यें शतकेंच शतकें इतकें अंतर पडलेल्या त्या जुन्या व या नव्या काळांतील मनांचा धागा त्या साधनांनी जितका निकट जोडला जातो तितका दरम्यानच्या काळांतील अचिकित्सक लोकांच्या मनांचा जोडला गेला नव्हता. प्राणिशास्त्रांत असा एक चमत्कार आढळतो कीं, मधील एखादीदुसरी पिढी टाकून आजा-पणजांचें रूप नातवा-पणतवांच्या चेहऱ्यांत मधल्या पिढीच्या पुरुषांपेक्षां अधिक यथार्थ प्रगट होतें. त्याच रीतीनें बखरीच्या काळांतील लोकांना, त्यांच्या पूर्वीच्या पिढीचें ऐतिहासिक ज्ञान जितक्या यथार्थतेनें झालें त्यापेक्षांहि हल्लींच्या इतिहासज्ञांना तें रूप अधिक यथार्थतेनें कळूं लागलें आहे. तथापि बखरी होत्या व असले ऐतिहासिक ग्रंथ होते म्हणूनच इतिहासाच्या निदान स्थूल आठवणीची तरी परंपरा अबाधित राहिली हा त्यांचा मोठाच उपयोग होय.

पुराव्याच्या शास्त्राच्या दृष्टीनें पाहातां या दोन-

तीन काव्यंग्रथांची योग्यता खरोखर बखरीपेक्षांहि अधिक ठरते. त्याचें कारण बखरी या प्रायः इतिहास घडल्यानंतर बऱ्याच दिवसांनीं लिहिलेल्या आहेत.पण श्रीशिवभारत, पर्णालाख्यान व चंपू हीं तीनहि काव्यें त्यांत वर्णिलेल्या इतिहासाशीं बहुधा समकालीन आहेत. सर्वांत जुनी बखर सभासदी. ही राजारामाच्या वेळची. पण तींत हकीकत एका पिढीच्या पूर्वीची म्हणजे श्रीशिवाजीमहाराजांच्या वेळचीं आहे. उलट कवि परमानंद, कवि जयराम, हे शहाजी-शिवाजी यांच्याशीं समकालीन असून, त्यानीं तत्कालीन इतिहास म्हणून लिहिला यामुळें त्यांचें महत्व विशेष मानावें लागतें. पण पुराव्याच्या शास्त्राच्या आधारानें समकालीन लोकांना जें अधिक महत्व मिळतें त्यांतहि हेंच आढळते कीं, कोणताहि पुरावा समकालीन असला म्हणून तेवढ्यावरून तो विश्वास ठेवण्याला पात्र असतो असें मात्र नाहीं.समकालीन पुरावा विषमकालीन पुराव्यापेक्षां श्रेष्ठ खरा. पण उलटपक्षीं विषम कालांतील लोकांना, वर दर्शविल्याप्रमाणें, इतिहासनिर्णयाचीं नवीन साधनें उपलब्ध झाल्यामुळें त्यांच्या उद्योगाची फलनिष्पत्ति सत्याच्या दृष्टीनें क्वचित् समकालीनापेक्षांहि अधिक महत्त्वाची ठरूं शकेल. दुसरे पक्षीं लेखक समकालीन असला म्हणून तो सत्यच लिहील असें नाहीं. इंग्रजी इतिहासकार सर वॉल्टर राले याची गोष्ट प्रसिद्धच आहे. तो तुरुगांत असतां त्यानें जगाचा इतिहास वेळ जाण्याकरितां लिहिला. पण त्याच्या समोरच घडलेल्या एका गोष्टीचें वर्णन म्हणून त्यानें लिहिलें तें अनेक बाबतींत चूक होतें असें त्याला कळून आलें. तेव्हां "इंद्रियगोचर गोष्टींचें ज्ञान जर मला यथार्थ होऊं शकलें नाहीं, तर कधींच न पाहिल्या, न ऐकल्या जगाचा इतिहास मी काय लिहिणार!" असें म्हणून जगाच्या इतिहासाचें हस्तलिखित त्यानें जाळून टाकलें! तात्पर्य, तत्कालीन लेखक हा बिनशर्त विश्वासास पात्र असलाच पाहिजे ही समजूत फोलपणाची होय. कोणतीहि गोष्ट छापलेली म्हणून ती खरी अशी भावना असणाऱ्या भोळ्या लोकांची थट्टा सहजच होते. कारण हल्लींच्या काळांतील आपलीं वर्तमानपत्रें घेतलीं तरी त्यांत जवळ आसपास घडणाऱ्या एकच प्रसंगाचें वर्णन किती निरनिराळ्या प्रकारचें व विरोधी असते हें आपण पाहतोंना! जी गोष्ट आजच्या वर्तमानपत्रांची तीच प्रस्तुतच्या ऐतिहासिक काव्यग्रंथांची समजावी. "मीं शिवाजीचें दर्शन घेतलें, मी शाहाजीला काव्य ऐकविलें, मीं व्यंकोजींशीं बोललों" असे उल्लेख समकालीनत्व दाखवितात यांत शंका नाहीं. तथापि समकालीन वर्णनकार भावनांना बळी पडणारा असल्यास तो स्तुति किंवा निंदा ही अन्यायानें करूं शकेल.इतकेंच नव्हे तर नुसती हकीकत म्हणून देतांनाहि काव्यबुद्धीला वश होऊन, म्हणजे कोणाहि व्यक्तीविषयीं प्रेम किंवा द्वेष नसतांनाहि, तो अयथार्थ असें वर्णन ओघांतच करूं शकेल. या सर्व गोष्टी, बखरी काय किंवा हे काव्य ग्रंथ काय, यांतील ऐतिहासिक बीजाचे कण टिपून काढतांना लक्षांत ठेवणें जरूर आहे.

# विषारी नागिणीचा दंश

गेले तीनचार महिने हिंदुस्थानविषयक एका ग्रंथानें इंग्लंड व अमेरिका यांत नुसता धुमाकूळ घातला. छापखानेवाल्यांनीं कागदांचे गठ्ठे सोडले, पुस्तकविक्यांनीं पैशाच्या थैल्या सोडल्या, वाचकांनीं धीर सोडला. आणि हें सर्व कशामुळें घडलें? तर एका गोऱ्या कातडीच्या स्त्रीनें लाज सोडली म्हणून! या स्त्रीचें नांव 'मिस मेयो' व तिच्या ग्रंथाचें नांव 'भारतमाता.' पण या दोनहि नांवांत विसदृशता ठेंचून भरली आहे. मेयो हें नांव हिंदुस्थानांतील लोकांना पूर्वपरिचित आहे. त्या नांवाचे एक उदार मतवादी गृहस्थ १८७० च्या सुमारास हिंदुस्थानाचे व्हाइसरॉय होऊन आले होते. वरिष्ठ सरकार आणि प्रांतिक सरकार यांच्या जमाखर्चाची फाळणी त्यांनीं प्रथम केली आणि आज असणाऱ्या निम्याशिम्या आणि पुढें मिळणाऱ्या संपूर्ण प्रांतिक स्वातंत्र्याचा पाया त्यांनीं घातला.इंग्रजींत या कारभाराच्या योजनेला 'डिसेंट्रलायझेशन ऑफ प्रॉव्हिन्शिअल फायनान्स' असें नांव आहे. हे लॉर्ड मेयो अंदमान बेटांची तपासणी करण्यास गेले असतां शेरअली नामक एका काळेपाण्यावरील वहाबी कैद्यानें त्यांचा खून केला! या दोनहि गोष्टींमुळें लॉर्ड मेयो यांचें नांव हिंदुस्थानाच्या लोकांना परिचित व प्रियहि आहे. उलट मिस मेयो यांचेंहि नांव हिंदी लोकांच्या स्मरणांत अखंड राहील. पण तें त्यांनीं आपल्या पुस्तकांत हिंदुस्थानाच्या अब्रूचा भयंकर रीतीनें खून केला आहे म्हणून! लॉर्ड मेयो यांच्या मनांत हिंदुस्थानांतील लोकसत्तेचा पाया घालावयाचा होता. मिस मेयो

यांच्या मनांत हिंदुस्थानच्या लोकांच्या पायांत पारतंत्र्याच्या बेड्या कायमच्या राहण्याला मदत करण्याचें आहे !

आतां अशा पुस्तकाला ' भारतमाता ' असें नांव ग्रंथकर्त्रीनें कां द्यावें ? तर त्याचें एक उत्तर असें कीं, चित्ताकर्षक नांव ठेवल्यानें पुस्तक खूप खपावें म्हणून. भारतमाता ! किती पवित्र नांव ! पण आंतील अपवित्र मजकूर पाहातां विरोधाभासाचें एखादें अधिक समर्पक उदाहरण सांपडणें अशक्य असें वाटतें. कारण या ग्रंथकर्त्रीच्या मनांत वाचकांना शेवटीं असें सांगावयाचें आहेसें दिसतें कीं, " हें पाहा जिच्या मुलांमध्यें इतकी अनीतिमत्ता, इतका भ्रष्टाकार, इतका मूर्खपणा अवतरलेला आहे अशी ही हिंदमाता, भारतभूमि, दुरून तुम्हाला मोठी आदरणीय, कीर्तिमती, भावनारम्य दिसते; आणि अशा आईचीं मुलें म्हणून तुम्हाला हिंदी प्रजेबद्दल कौतुक व सहानुभूति वाटते आणि तिला आज नाहीं उद्यां राजकीय स्वातंत्र्य द्यावें असें तुम्हा भोळ्या लोकांच्या मनांत येतें. पण खरा प्रकार मीं या ग्रंथांत वर्णन केला आहे तो वाचून पाहा म्हणजे ही हिंदमाता नव्हे, तर ती अनीतिकर्दमांत लोळणारी व मुलांचें लेंढार प्रसवणारी अशी एक म्हातारडी डुकरी आहे आणि तिची प्रजा म्हणजे तिच्या अंगावर लोळणारी व उगीच शेपट्या हलवीत उकीरडे फुंकीत हिंडणारी डुकरें होत. कसलें त्यांचें कौतुक करतां ? " आतां ज्या ग्रंथकर्त्रीला हिंदुस्थानाबद्दल इतकें वाईट लिहावयाचें होतें तिनें कृपा करून तत्सदृश यथार्थ वर्णनपर असें दुसरें एखादें नांव तरी ग्रंथाला द्यावयाला पाहिजे होतें. पण द्वेषबुद्धीची करामतच अशी असते. तिला उघड घाल्यापेक्षां गुप्त घालाच अधिक प्रिय असतो. अस्सल द्वेषबुद्धि समोरून तोंडावर वार करीत नाहीं. ती अंधारांत गुप्त छापा घालील.निदान वार करावयाचा तो पाठीवर तरी करील. ग्रंथाला नांव ' भारतमाता ' असें सोज्वल देऊन आंत हिंदी समाजाची घाणेरडी निंदा खचून भरावयाची,हें कृत्य म्हणजे सैतानी कलेचा तो एक विलासच होय. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें मोहक नांव देऊन ग्रंथ अधिक खपावा ही स्वार्थी दृष्टीहि त्यांत आहेच.

पण त्यांतल्या त्यांत स्वार्थी दृष्टीपेक्षां दुष्ट बुद्धीची दृष्टिच या ग्रंथाच्या उत्पत्तीला अधिक कारणीभूत झालेली आहे. ग्रंथकार बाई ही कोणी एखादी समाजशास्त्रांतील संशोधक नाहीं. आरोग्यशास्त्रावर म्हणूनहि तिनें हा ग्रंथ लिहिलेला नाहीं. त्यांत कोणत्याहि एखाद्या उच्च ध्येयाचा ध्यास नाहीं. किंवा तत्त्वचिकित्सेची तळमळहि नाहीं. बरें, केवळ चार पैसे मिळावेत येवढ्याकरितांच हा खटाटोप आहे असें म्हणावें तर केवळ तसेंहि दिसत नाहीं. कारण ग्रंथ पुष्कळ खपावा या स्वतः ग्रंथकर्त्रीच्या इच्छेपेक्षां त्याचा प्रसार करण्याकरितां इतर कित्येकांचा प्रयत्नच अधिक होत असल्याचें प्रत्ययाला आलें आहे ! आणि बाईला ग्रंथाकरितां माहिती पुरविण्यांत इंग्रज सरकारचे अधिकारी व अँग्लो-इंडियन लोकांचे दूत फार खपले असें लोक उघड बोलतात. ग्रंथकर्त्रीनें आपला हेतु राजकीय असल्याचें जें ध्वनित केलें आहे त्याला या अवांतर गोष्टींवरून पुष्टीच येते. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चिरोलसाहेबांना हिंदुस्थानांतील अस्वस्थता हा ग्रंथ लिहिण्याला मुंबईसरकार व कोल्हापूरकर छत्रपति यांच्याकडून जशी मदत झाली, तशी व त्याच हेतूनें हा प्रस्तुतचा ग्रंथ लिहिण्याला मिस मेयो या बाईला सरकाराकडून व संस्थानिकांकडून मदत झालेली आहे. राजकीय मतप्रसार हाच या ग्रंथाचा मूळ हेतु आहे. व तें मतहि हेंच कीं, हिंदुस्थानचे लोक कोणतेहि अधिकार देण्याला योग्य नाहींत !

पण मुख्यतः याच दृष्टीनें हें पुस्तक लिहिलें गेलें याला आणखी एक प्रत्यंतर असें आहे कीं, याच बाईनें यापूर्वी 'आइल्स ऑफ फीअर' म्हणजे 'भीतिद्वीप' नांवाचें एक पुस्तक फिलिपाईन बेटांतील लोकांसंबंधाचें लिहिलेलें प्रसिद्ध आहे. त्यांतहि फिलिपिनो लोकांची अशीच मनसोक्त नालस्ती तिनें केलेली आहे. फिलिपाईन बेटांत स्वातंत्र्याची चळवळ सुरू आहे, व स्वातंत्र्याच्या मागणीचा प्रश्न निघाला कीं पात्रतेचा प्रश्न त्याबरोबरच निघतो हें प्रसिद्ध आहे. फिलिपिनो लोक अनेक दृष्ट्या नादान आहेत असें दाखविलें म्हणजे त्यांच्या स्वातंत्र्याच्या मागण्या अर्थातच असंबद्ध ठरणार ! अशा रीतीनें फिलिपिनो व हिंदी या दोघां राष्ट्रांचा अकारण द्वेष या बाईनें साधला आहे. अकारण म्हणण्याचें कारण असें कीं, या बाईचें व्यक्तिशः नुकसान या दोहों राष्ट्रांपैकीं एकाहिकडून झालेलें नाहीं.मग ही बाई चांगली लेखिका आणि परनिंदा हा विषय तिचा हातखंडा असें पाहून तिला या कामीं कोणी पैसे देऊन प्रवृत्त केली असो, किंवा स्वतः तीच इतकी उच्छृंखल उपद्व्यापी कीं हें आवडतें काम म्हणून तिनें आपल्या स्फूर्तीनेंच चालविलें असो. दुसरा प्रकार खरा असला तर ही बाई म्हणजे एक पांढऱ्या रंगाची विषारी नागीणच म्हटली पाहिजे. पण पहिला प्रकारहि असंभवनीय नाहीं. कारण इंग्रज सरकार मतप्रसाराच्या कामीं अमेरिकन बायांचाहि उपयोग करीत असल्याचा आम्हाला अनुभव आहे. पूर्वी १९१५ सालीं इंग्रजसरकारानें

अमेरिकन लोकांचे म्हणून कांहीं अभिप्राय हिंदी राज्यकारभारासंबंधानें चोपड्याच्यारूपानें प्रसिद्ध केले होते. तसेंच कोल्हापूरास एक मिशनरी म्हातारी बाई होती ती परत गेल्यावर तिनें या कारभाराला दिलेलें सर्टिफिकेट सरकारनें छापलें होतें.

अब्रू नसलेल्या मनुष्यानें बेअब्रूला फार जपावें, किंवा दिवाळखोर व्यापाऱ्यानें शेणाची पणती लावून ठेवण्याचा प्रसंग पुढें येणार असतां आधीं मोठा भपका करावा, त्याप्रमाणें इंग्रज सरकार परदेशांत आपल्या बेअब्रूला फार जपत असतें. आणि तेथें आपल्या तर्फे मतप्रसार करून हिंदी लोकांची बेअब्रू होईल अशा प्रयत्नांना उत्तेजन देत असतें. आम्हाला तर असें वाटतें कीं, या बाईला इंग्रज सरकारनें हें 'भारतमाता' पुस्तक लिहिण्याला पैसे व उत्तेजन दिलें असावें; कारण ही बाई हिंदुस्थानांत येऊन गेली तेव्हां हिंदुस्थानसरकारच्या अनेक अधिकाऱ्यांनीं, विशेषतः प्रसिद्धी खात्याच्या अधिकाऱ्यांनीं, तिला वाटेल ती माहिती पुरविली. हें पुस्तक प्रथम अमेरिकेंत प्रसिद्ध झालें. लगेच त्याची आवृत्ति इंग्लंडांत निघाली. पुस्तक छापून होण्याचे आधींच त्यांतील उतारे प्रसिद्ध होऊं लागले. प्रमुख वर्तमानपत्रांत त्याचें परीक्षण येण्याला आगाऊच सुरुवात झाली. पुस्तकविक्यांच्या दुकानावर तोबा झडूं लागला. क्लब व चहापानगृहें यांतून चर्चेला दुसरा विषय उरला नाहीं. आगगाड्या व आगबोटी यांवर प्रवाशांनीं करमणुकीला कोणतें पुस्तक बरोबर न्यावें हें ठरून गेल्यासारखें झालें. आणि हे सर्व कशामुळें? तर त्या पुस्तकांत हिंदुस्थानाच्या लोकांची जी मनसोक्त अभद्र बाष्कळ अश्लील शब्दांनीं निंदा केली आहे तिजमुळें! हिंदुस्थानच्या लोकांची निंदा करण्याला व वाचण्याला इंग्रज लोक मनानें किती तयार असतात हें या पुस्तकावरून फार चांगलें कळून आलें म्हणावयाचें!

इतकें सांगितल्यावर केसरीच्या वाचकांना सहजच अशी जिज्ञासा उत्पन्न होणार कीं, या पुस्तकांत असें आहे तरी काय? म्हणून आम्हालाहि ती थोडीशी पुरविली पाहिजे. पण ती पुरविण्यापूर्वी एकदोन सावधगिरीचे शब्दहि लिहिणें जरूर आहे. अशाकरितां कीं, त्यांच्या मनाची विशेष रीतीनें अशी आधीं तयारी करून न ठेविली तर एकदम त्यांच्या मनाला धक्का बसावयाचा. पण तो धक्का पुस्तकांतील विधानें खरीं असून त्यांनीं हिंदुस्थानची बेअब्रू रास्त रीतीनें बाहेर काढली म्हणून नव्हे, तर केवळ त्यांच्या अश्लीलतेनें व गलिच्छपणानें! हल्ली मराठी वाचकांपुढें अश्लील वाङ्मयाचा प्रश्न आहे. त्या दृष्टीनें आमचें आम्हालाच प्रथम असें विचारावेंसें वाटलें कीं, या बाईवर टीका करण्याकरितां तरी आम्ही पुढें देणार त्या कांहीं विधानांचा उच्चार केसरीनें करावा कीं नाहीं. पण शेवटीं मनानें असा निर्णय केला कीं, हीं विधानें आम्हीं केवळ अवतरणें म्हणून घेत आहों, तीं आमचीं स्वतःचीं नव्हत. आणि तीं अवतरणें दिल्याशिवाय वाचकांना मिस मेयोच्या पुस्तकाची खरी कल्पना येणार नाहीं, आणि हिंदुस्थानचे हितशत्रु राजकारणाच्या युद्धांत कसल्या कसल्या घाणेरड्या निंद्य तिरस्करणीय साधनांचा उपयोग करूं शकतात याचें यथार्थ ज्ञान लोकांना एरवीं होणार नाहीं.

त्याचबरोबर दुसरीहि गोष्ट आधींच सांगून टाकणें श्रेयस्कर वाटतें ती ही कीं, आम्हाला स्त्रीदाक्षिण्याची कल्पना मान्य असली तरी या बाईच्या पुस्तकाचा समाचार घेतांना आम्ही ही दाक्षिण्याची कल्पना क्षणभर जाणूनबुजून दूर ठेवणार आहों. स्त्रिला दाक्षिण्यबुद्धीनें वागवावें हें बरोबर. पण केव्हां? ती स्वतः सभ्य स्त्रीप्रमाणें वागत असेल तेव्हां. ती स्वतःच जर आपला स्त्रीपणा विसरेल, आणि चार अक्षरें लिहितां येतात येवढ्या हक्कावर पुरुषांची अमर्यादा करण्याला तयार होईल, तर तिनें दाक्षिण्यानें वागवून घेण्याचा आपला हक्क गमावला असें सहजच आपोआप ठरतें. स्त्रीदाक्षिण्य या शब्दांत स्त्री हा अनुयोगी शब्द महत्त्वाचा असून दाक्षिण्य हा शब्द निवळ प्रतियोगी ठरतो. जेथें स्त्रीत्व नष्ट झालें तेथें दाक्षिण्याची जबाबदारीहि संपली. या वादाचा आपल्या पौराणिक वाङ्मयांत निर्वाह झालेलाच आहे. श्रीरामचंद्रानें ताटका राक्षसीचा वध केला, तसेंच श्रीकृष्णानें पूतनेला ठार मारिलें अशाहि ठिकाणीं स्त्रीजातीच्या पक्षपाती तत्त्ववेत्त्यांनीं शंका काढली होती कीं, स्त्रीवध हा अशिष्टाचार झाला. पण त्याचा परिहार असा करण्यांत आला आहे कीं, स्त्रिया या जेव्हां आततायी बनतात तेव्हा त्या स्त्रीजातिभ्रष्ट ठरतात, व त्या ठिकाणीं धर्मयुद्धांतला स्त्रीविषयक विशेष नियम पाळण्याचें बंधन कोणावर नाहीं.

त्याचप्रमाणें नरकासुर वधाचीहि अशीच एक गोष्ट आहे कीं, नरकासुराचा वध करण्याला जेव्हां श्रीविष्णु गेले व त्यांनीं आपलें शार्ङ्गधनुष्य सज्ज केलें तेव्हां नरकासुराच्या स्त्रीनें पतीचा जीव वांचविण्याकरितां नेसण्याचें वस्त्र सोडून दिलें व नग्न होऊन ती विष्णूपुढें उभी राहिली. हेतु हा कीं नग्न स्त्री पाहूं नये, पुरुषानें नेत्र मिटावे किंवा मुख फिरवावें, या शिष्टाचाराला अनुसरून श्रीविष्णु नेत्र मिटतील किंवा तोंड फिरवितील, आणि अशा रीतीनें आपल्या पतीचें संरक्षण होईल. परंतु या प्रसंगावधानी स्त्रीप्रमाणें श्रीविष्णूलाहि शिष्टाचाराचा धर्माधर्म कळत होता, म्हणून त्यानें नेत्र न मिटता

किंवा तोंड न फिरवितां आपलें शरसंधान चालू ठेवून नरकासुराचा वध केला. मिस मेयो बाईचें पुस्तक ज्यांनीं वाचलें असेल त्यांना हें तेव्हांच दिसून येईल कीं ही बाई ईश्वरनिर्मित लक्षणांनीं स्त्री असली तरी निर्मात्या ईश्वराला मूर्ख ठरविण्याच्या निश्चयानें ती मर्यादा सोडून नंगी बनली आहे व पुरुषजातीवर तिनें ताण केली आहे! तसेंच हा तिचा नंगेपणा नरकासुराच्या स्त्रीप्रमाणें आत्मसंरक्षणार्थ नसून, पूतना किंवा ताटका या राक्षिसणीप्रमाणें परघाती अत्याचारी आततायी स्वरूपाचा आहे. म्हणून तिच्यासंबंधानें लिहितांना आम्ही या बाईची भीड-मर्यादा ठेवण्याचें कारण नाहीं. येथें 'आततायिनमायांतं हन्यादेवाविचारयन्' हेंच शास्त्र अनुसरण्याचा विचार आम्ही केला आहे. आणि इतकी प्रस्तावना करून पुढील लेखांत मिस मेयो या बाईच्या पुस्तकांतील कांहीं मासलेवाईक विधानें वाचकांपुढें ठेवून आम्हीं त्यांवर थोडीशी टीका करणार आहों असें सांगून हा प्रास्ताविक लेख पुरा करतों.

# बोल्शेव्हिकांचे राज्यक्रांतीचे मार्ग

[ रेव्ह्यू दे द मोंदवरून ]

( लेखक—**अ. ज. करंदीकर.** )

### लेखांक १ ला

इंग्लंड व रशिया यांचा पुनः बेबनाव होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. रशियाच्या प्रयत्नानें चीनमधील ब्रिटिश सत्तेला उतरती कळा लागल्यामुळें ब्रिटिश सरकार अगदीं चिडून गेलें आहे. नुकताच हॉर्निमनच्या 'हेरल्ड' कचेरीवर हल्ला करून आणि स्प्रॅट व मिरजकर यांजवर खटले करून हिंदुस्थान-सरकारनें आपला जळफळाट जगास व्यक्त करून दाखविला आहे. या त्यांच्या कृतीनें रशियाच्या बागुलबोवानें इंग्लंडला कसें ग्रासलें आहे याची चांगली कल्पना येते. सरकार रशियाला भीत आहे याचें कारण ब्रिटिश साम्राज्यांत क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न रशियांतून होत आहे अशी त्यांची समजूत आहे हें होय. वास्तविक पाहता रशियापासून हिंदुस्थान देश जितका दूर तितकाच हिंदी समाज बोल्शेव्हिक तत्त्वापासून दूर आहे. तरी पण रशियांतील क्रांतिकारकांच्या चळवळीला ब्रिटिश सरकार इतकें कां भितें याची हिंदी जनतेला जाणीव करून देण्यासाठीं वर निर्दिष्ट केलेल्या फ्रेंच मासिकांतले लेखाच्या आधारें पुढील माहिती देण्यांत येत आहे

क्रांति किंवा बंड हें दोन तऱ्हेचें असतें. एक शिपायांचें बंड व दुसरें सामान्य लोकांचें बंड. शिपायांचें बंड हें स्वतःच्या जोरावर यशस्वी होऊं शकतें. पण लोकांना सैन्याचें पाठबळ मिळाल्याशिवाय त्यांचें बंड यशस्वी होत नाहीं. लोकांच्या बंडाचा जोर त्यांच्या प्रक्षोभाच्या तीव्रतेवर व अत्याचार करण्याच्या सामर्थ्यावर अवलंबून असतो तर शिपायांच्या बंडाचा जोर त्यांच्या शिस्त व चिकाटी या गुणांवर आणि साधनसामुग्रीवर अवलंबून असतो. या दोनहि तऱ्हेच्या बंडांचा स्वरसंगम झाल्यास क्रांतीचें कार्य सुलभ होईल ही कल्पना मनांत येऊन बोल्शेव्हिकांनीं आपला राज्यक्रांतीचा मार्ग आंखला आहे.

### क्रांतीचें शास्त्र

बोल्शेव्हिकांच्या अत्याचाराकडे पाहून कोणाची कल्पना होईल कीं, हा तर निवळ अराजकांचा गोंधळ आहे. यांत शिस्त कोठली आणि शास्त्र कोठलें? पण ही समजूत चुकीची आहे. बोल्शेव्हिकांच्या अत्याचारांचा विशेष हा आहे कीं, हे सर्व अत्याचार क्रांतीच्या शास्त्राचा व व्यवहाराचा पूर्ण अभ्यास केलेल्या थोड्याशा लोकांनीं आधींपासून ठरवून ठेवलेले असतात व या अत्याचारांनीं मुख्य कार्यक्रमाला कधींच अडथळा येत नाहीं बोल्शेव्हिकांच्या अर्थशास्त्रविषयक सिद्धांतांत कोणाला दोष काढतां येईल. पण त्यांच्या क्रांतीच्या सिद्धांतांत कोणाला बोट शिरकवितां येणार नाहीं.

क्रांति करणें ही एक कला आहे असा कार्लमार्क्सनें उद्गार काढला आहे. यावर लेनिनचें भाष्य आहे कीं, लोकांच्या हातून कांहीं यशस्वी क्रांति आपोआप घडून येत नाहीं, क्रांति होण्यासाठीं लोकांची तयारी करावी लागते. आणि लेनिननें आपल्या पूर्वींच्या क्रांतीच्या प्रयत्नांचा अभ्यास करून व त्यांतले दोष टाळून जो कट उभारला त्यांतील कटवाल्यांना फारशी खुनाखुनी न करतां १९१७ सालीं रशियाचें सर्व राज्य काबीज करतां आलें. पुढें १९२० पर्यंत बोल्शेव्हिकांचें रशियांतील आसन स्थिर झाल्यावर १९२१ सालीं त्यांनीं पोलंड, बल्गेरिया, युगोस्लाव्हिया, हंगेरी, जर्मनी, इटाली, स्पेन इतक्या ठिकाणीं बंडें उपस्थित केलीं. यांतील यशापयशाचा आढावा काढून आतां पुनः दुसरा प्रयत्न करण्याला ते सज्ज झाले आहेत.

महायुद्धाच्या वेळीं अमुक ठिकाणीं लढाई झाली किंवा अमुक लोक मेले, यापलीकडे सामान्य लोकांना एखाद्या बातमीचा कांहींच अर्थ कळत नसे. पण त्यावरूनच रणनीतिनिपुणांना त्या लढाईचे हेतु व परिणाम यांचा अंदाज करतां येत असे व दोनहि पक्षांच्या डावपेंचांचें एकंदर धोरण कळून येत असे. तीच अवस्था आतां ठिकठिकाणीं होणाऱ्या बोल्शेव्हिकांच्या अत्याचारांची आहे. हे अत्याचार कशासाठीं होत आहेत, याचा सामान्य लोकांना कांहींच बोध होत नाहीं. पण यांचा जर कालक्रमानें व स्थलानुक्रमानें विचार केला व या अत्याचारांमुळें उजेडांत आलेल्या कागदपत्रांचा अभ्यास केला तर बोल्शेव्हिकांच्या उपद्व्यापावर बराच उजेड पडेल !

## क्रांतीचा क्रम

सध्याचें युग हें शास्त्रीय युग आहे. आतां क्रांतीची तयारी करावयाची तीदेखील शास्त्रशुद्ध रीतीनें करावी लागते. आतांच्या क्रांतीला पहिल्या प्रथम पुढारी हवे असतात, मग तत्त्वें, मग त्या तत्त्वांना अनुसरणारे अनुयायी, मग तात्कालिक ध्येय आणि कार्यक्रम, शिवाय प्रत्येक संधीचा पूर्ण फायदा घेण्याची तयारी इतक्या गोष्टी लागतात. या सर्व गोष्टी अगदीं लष्करी धर्तीवर उभारलेल्या संस्थांतच शक्य आहेत. बोल्शेव्हिकांची ' तिसरी इंटर–नॅशनल ' ही अशी संस्था आहे.

या संस्थेचीं तीन मोठीं पोटमंडळें आहेत. एक शत्रूंच्या विषयींची राजकीय व लष्करी माहिती एकत्र करण्याचें खातें, दुसरें क्रांतिकारकांच्या संस्था व चळवळी चालविणारें खातें व तिसरें बंडाची उठावणी करणारें खातें. या खात्यांकडून निरनिराळ्या देशांतून बंडें करण्याचे कार्यक्रम तयार करण्यांत येतात व संधि मिळाल्यास त्याची अंमलबजावणी करून दाखविली जाते. ही केवळ काल्पनिक घटना नव्हे. हीं तीनहि मंडळें जारीनें आपला उद्योग चालवीत आहेत. कांहीं दिवसांपूर्वी इंग्लंडमध्यें चळवळ करण्याला जरूर ते कागदपत्र व माहिती मागविण्यासाठीं, रोझेनहोल्टझनें लंडनहून मास्कोला केलेली तार पकडली गेली होती. जमा केलेल्या माहितींचें तात्विक दृष्ट्या व व्यावहारिक दृष्ट्या महत्त्व काय याची चिकित्सा करण्यासाठीं स्वतंत्र विद्यालयें काढलीं आहेत. यांना सँढर्स्टसारख्या लष्करी शिक्षण-संस्थांची उपमा देतां येईल. या विद्यालयांनीं गेल्या दहा वर्षांतील आंदोलनाचा अभ्यास करून असा निष्कर्ष काढला आहे कीं, साधनसामुग्रीची जुळवाजुळव पूर्ण व्हावयाच्या आधीं व आपली क्रांतीची मसलत परिपक्व व्हावयाच्या आधीं बंड उपस्थित करावयाचें नाहीं. कारण अकालीं बंड केल्यानें भावी विजयाचा काळ लांबणीवर टाकला जातो. लष्करी दृष्टीनें हा निष्कर्ष फार महत्त्वाचा आहे. कारण साधनसामुग्रीची सज्जता, सैन्याची व्यवस्थेशीर मांडणी व हल्ल्याचा कार्यक्रम आधींपासून निश्चित करणें, यांच्या जोरावर अगदीं सुलभ रीतीनें विजय मिळवितां येतात. महायुद्धाचा असा अनुभव आहे कीं, फसलेल्या चढाईत जितकें स्वपक्षाचें नुकसान होतें तितकें प्रत्यक्ष पराजयानें देखील होत नाहीं.

पोलंडवरील रशियाची स्वारी फसल्यावेळेपासून बोल्शेव्हिकांनीं दुसरा एक धडा घेतला आहे तो हा कीं, प्रत्येक देशांतील क्रांति ही त्या त्या देशांतील मजूरवर्गानें आपल्याच स्थानिक पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं घडवून आणली पाहिजे. त्यांना यश मिळेल अशी खात्री होईपर्यंत मास्कोनें त्यांना शिक्षण द्यावें व त्यांच्या संस्थांचें पालनपोषण करावें. तिसऱ्या इंटर–नॅशनलचा सध्याचा कार्यक्रम हाच आहे.

या बोल्शेव्हिक पुढाऱ्यांच्याबद्दल एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं,या सर्व पुढाऱ्यांचा मास्कोशीं प्रत्यक्ष संबंध असतो व मास्कोशीं संबंध असण्यावरच त्यांचें पुढारीपण अवलंबून असतें. कोणाहि पुढाऱ्यानें मास्कोच्या विरुद्ध वर्तन केल्याचा संशय आल्यास रशियाच्या सूचनेवरून स्थानिक कम्यूनिस्ट त्या पुढाऱ्याला पदच्युत करतात. अशीं उदाहरणें फ्रान्समध्यें शेंकडो झालीं आहेत. निरनिराळ्या रणभूमीवर अधिकार गाजविणाऱ्या सेनापतीला केंद्रसत्तेला संशय आल्यास पदच्युत व्हावें लागतें त्यांतलाच हा प्रकार. यामुळें जगभर कम्यूनिस्ट पार्टी तेवढी एक आहे. आतां स्थानिक आंदोलनासाठीं व पक्षसंघटनेसाठीं रशियानें केलेली पुढाऱ्यांची योजना व त्यांच्यांतील अधिकारविभागणी यांचा एक मासला पाहा.

मी. सेमार-जनरल सेक्रेटरी व इंटरनॅशनलच्या राजकीय खात्याला फ्रान्समधील पक्षसंघटनेसाठीं जबाबदार. यांचीं इतर कामें, तरुण कम्यूनिस्टांची संघटना, निरनिराळ्या धंद्यांतील मजुरांची सिंडिकालिझमच्या तत्त्वाप्रमाणें संघटना व परराष्ट्रांतील मजूरचळवळींशीं संबंध ठेवणें.

## फ्रान्समधील उद्योग

मो. मादान, दुय्यम सेक्रेटरी फ्रान्समधील संघटनेचे प्रमुख—कम्यूनिझमच्या अभ्यासाचीं मंडळें स्थापणें, फ्रान्समधील स्थानिक व परदेशी मजुरांची एकी घडवून आणणें व म्युनिसिपालिट्या व स्थानिक स्वराज्य इत्यादि संस्थांमधून कम्यूनिस्ट पक्षाचें बल वाढविणें.

मो. सेलिए पॅरिस कॉर्पोरेशनचे सभासद व मदत-सेक्रेटरी-शेतकऱ्यांचे संघ स्थापणें, कार्लमार्क्सचें तत्त्वज्ञान शिकविण्यासाठीं शाळा काढणें, मजुरांना पत्रव्यवहारानें शिक्षण देणें व म्युनिसिपालिटीचें काम.

मो. मादान सुझान जिरोल्त-पॅरिस शहर व सेनाविभागांतील पुढारीपण आणि सैनिकांमध्यें चळवळ.

मो. दोरिओ, सेनाविभागाचे डेप्युटी-वसाहतींतील आंदोलन.

मो. काल्झॉक-ग्रंथप्रकाशन व वर्तमानपत्रांतून चळवळ.

या साऱ्या पुढाऱ्यांनीं, विशेषतः वसाहतींत चळवळ करणाऱ्या दोरिओसाहेबांनी, केलेले उद्योग आतां सर्वांना परिचित झाले आहेत.

कम्यूनिस्ट पक्षाच्या सर्व तरुणांनीं लष्करी शिक्षण घ्यावें यावर रशियाचा फार कटाक्ष आहे युरोपांत लष्करी शिक्षण सक्तीचेंच असल्यानें सामान्य शिपाईगिरीचें ज्ञान सर्वांना असतेंच. पण कम्यूनिस्ट तरुणांनीं तेवढ्यावर संतुष्ट न राहतां लष्कराच्या निरनिराळ्या शाखांची संपूर्ण माहिती मिळवावी व शक्य तर लष्करांत महत्त्वाचा अधिकार प्राप्त करून घ्यावा यासाठीं प्रोत्साहन देणारीं पत्रकें वारंवार वांटलीं जातात. त्याशिवाय युद्धशास्त्राच्या निरनिराळ्या अंगोपांगाचा अभ्यास करणारीं कम्यूनिस्ट मंडळें गुप्तपणें शिक्षण देत असतात तीं निराळींच.

## कम्यूनिस्टांचा गुण

कांहीं कांहीं गोष्टी अगदीं स्पष्ट बोलणें हा कम्युनिस्ट पक्षाचा एक मोठा गुण आहे. पक्षसंघटनेचा व पार्लमेंटमधून जागा पटकावण्याचा उद्योग करीत असतांनासुद्धां हे स्वतःच्या शांतताप्रियतेविषयीं दुसऱ्यांचा गैरसमज करून देत नाहींत. ते स्वपक्षीयांना व परपक्षीयांना नित्य जाणीव करुन देत असतात कीं, आपल्या चळवळीचें पर्यवसान रक्तपातांत व यादवी युद्धांत होणार आहे. त्यांच्या वर्तमानपत्रांतूनहि या धमकीची वारंवार पुनरावृत्ति होत असते!

कम्यूनिस्ट पक्षाच्या जाहिरनाम्यावर व आज्ञापत्रकावर कोणाचीहि सही नसते हाहि मुद्दा लक्षांत घेण्यासारखा आहे. पुढाऱ्यांची पकडापकड होऊं नये या दृष्टीनें या पद्धतीचा थोडासा उपयोग आहेच; पण याहून महत्त्वाचें दुसरें एक तत्त्व त्यांत गोवलें आहे. तें म्हणजे कोणाहि पुढाऱ्याची लोकप्रियता पक्षाला घातक होऊं नये हें होय, किंवा व्यक्तिनिष्ठेनें तत्त्वनिष्ठेला अंतराय होऊं नये हें होय. ट्रोट्स्कीची लोकप्रियता कमी करून त्याला वठणीवर आणण्याचा कम्यूनिस्ट पक्षाचा यशस्वी उपक्रम लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

कोणत्याहि लढाईचा महत्त्वाचा भाग पूर्वतयारीचा होय. व्हर्डूनच्या लढाईला सुरुवात झाल्यावर मार्शल पेतेन निष्काळजीपणानें फिरत असलेला पाहून एका अधिकाऱ्यानें त्याला विचारलें, आपलें काम संपलें वाटतें; तेव्हां तो म्हणाला, माझी पूर्वतयारी इतकी पूर्णतेला गेली आहे कीं, आतां विजयानंतर काय करावयाचें याचाच मी विचार करीत आहे. बोल्शेव्हिकांनीं फ्रेंच मार्शलचा कित्ता गिरवून पूर्वतयारीवर सर्व सामर्थ्य खर्चण्याचें ठरविलें आहे.

---

# स्वयंनिर्णयाचे तत्त्वाची पायमल्ली

मागील सर्व आठवडाभर दिल्ली राजधानींत मोठी धामधूम उडून राहिली होती. व्हाइसरॉय साहेबांनीं अखिल भरतखंडांतील प्रमुख पुढाऱ्यांना पाचारण करून खासगी भेटींत त्यांच्याशीं कांहीं महत्त्वाच्या विषयावर जनान्तिक अशी चर्चा केली. व्हाइसरॉयांशीं असलें हितगुज करण्याला दूरदूरच्या प्रांतांतून निमंत्रित पुढारी एकामागून एक येत होते. व प्रत्येकाशीं कानगोष्टी करून व्हाइसरॉय त्यांना निरोप देत होते. या निमंत्रित मंडळींत महात्मा गांधीहि होते. त्यांनीं व्हाइसरॉयांचें निमंत्रण येतांच आपला दौऱ्याचा ठरलेला कार्यक्रम बाजूस सारून त्याच पावलीं दिल्लीकडे मोर्चा वळविला. आणि ज्याअर्थी स्वतः महात्माजींनींहि हें निमंत्रण झिटकारिलें नाहीं त्याअर्थी इतर कोणाहि निमंत्रित पुढाऱ्यानें तें झिटकारिलें नसेल हें सांगावयास नकोच.

पण व्हाइसरॉयांच्या बोलावण्यावरून दिल्लीची यात्रा करणाऱ्या या सर्वांचीच सारखी निराशा झाली असेल. दिल्लीहून खासगी भेटीकरितां आपणास निमंत्रण कां आलें, याची प्रथम कोणासच कल्पनाहि नव्हती. किंवा फार तर अलीकडे देशभर गाजून राहिलेल्या हिंदू-मुसलमानांच्या वादाचा निर्णय करण्यासाठीं व्हाइसरॉयांना कांहीं सल्लामसलत हवी असेल एवढीच त्यांच्या कल्पनाशक्तीनें धाव घेतली असेल. कारण रॉयल कमिशनचा प्रश्न अशा अकल्पित रीतीनें आज उद्भवेल अशी कोणाचीच कल्पना नव्हती. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या बैठकीच्या वेळीं रॉयल कमिशनचा प्रश्न सर्वांच्या डोळ्यापुढें ताजा असल्यानें त्या वेळीं व्हाइसरॉय कांहीं तरी जाहीर घोषणा करतील अशी सर्वांची अपेक्षा होती. परंतु ती वेळ निघून गेल्यावर कांहींहि आगा-पिछा नसतां एकाएकीं हा प्रश्न कसा उद्भवावा आणि त्याकरितां व्हाइसरॉयींनीं आपण होऊन पुढाऱ्यांना या वेळीं दिल्लीस टाकोटाक कां बोलावून घ्यावें हें कोडें कांहीं दिल्लीस जाण्यापूर्वी त्यांना उलगडलें नसेल. पण ज्या धांदलीनें हा सर्व बनाव बनविण्यांत आला ती धांदल लक्षांत घेतां आणि व्हाइसरॉयांच्या बोलावण्याचा झोकनोक पाहतां या कारस्थानांत व्हाइसरॉय हे सूत्रधार नसून हीं सूत्रें विलायतेहून हलविलीं जात आहेत हें उघड दिसूं लागलें. आणि जी निमंत्रित मंडळी येतांना जिज्ञासायुक्त औत्सुक्यानें धापा टाकीत आली तीच मंडळी जातांना विषण्ण मनःस्थितींत जड पावलांनीं परत फिरली.

या निमंत्रित सल्लागार मंडळींत म. गांधी होते, बॅ. जिना, जयकर होते, कॉंग्रेसचे भावी अध्यक्ष डॉ. अनसारी होते, कॉंग्रेसचे विद्यमान अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगारहि होते. असेंब्लीचे अध्यक्ष ना. पटेल हे तर 'एतत्कर्मप्रधानदेवते' प्रमाणें आरंभापासून अखेरपर्यंत साक्षीभूत होते. या सर्वांशीं व्हाइसरॉयांनीं जी कांहीं चर्चा केली ती जनान्तिक अशी केली आणि स्वतः व्हाइसरॉयच या गोष्टीची जाहीर घोषणा करीपर्यंत कोणीहि हें गुपित फोडूं नये अशाविषयीं सर्वच निमंत्रित गृहस्थांना व्हाइसरॉयांनीं 'आळी मिळी' घातली असल्यानें त्यांनीं व्हाइसरॉयांची मुलाखत घेऊन बाहेर पडल्यापासून आपल्या तोंडाला अगदीं पक्कें कुलूप घातलें आहे. पण श्रीमंताच्या वाड्यांतली अत्यंत गुप्त गोष्टहि गुप्तपणेंच गांवभर पसरत असते त्याचप्रमाणें दिल्लीच्या राजवाड्यांतलें हें रहस्य दिल्लीच्या वेशीवर चिकटविलेल्या एखाद्या जाहिरनाम्याइतकेंच सर्वतोमुखीं झालें आहे. नाटकांतलें एखादें पात्र आत्मगत म्हणून भाषण करीत असतांना तें ज्याप्रमाणें तिसऱ्यामजल्यावरील श्रोत्यालाहि स्पष्टपणें ऐकूं येतें त्याचप्रमाणें या गुप्त वाटाघाटींतल्या प्रत्येकाच्या भाषणाचा परिणाम व्हाइसरॉयांच्या मनावर काय झाला, त्यांचा चेहरा केव्हां प्रसन्न झाला, केव्हा खिन्न झाला, याचीं देखील वर्णनें आतां जगजाहीर होऊं लागलीं आहेत; तेव्हां ज्या मुख्य विषयावर ही वाटाघाट झाली त्याची वार्ता सर्वांना कळल्यावांचून कशी राहणार!

'षट्कर्णो भिद्यते मंत्रः' या नियमानुसार असो अथवा अन्य कोणत्याहि कारणानें असो, पडद्याआड चाललेल्या या सल्लामसलतीचा गौप्यस्फोट झाला असून कोणत्या भावी नाटकाची ही नांदी आहे त्याविषयींचीं अनुमानेंहि प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत. त्यावरून एकंदरीत असें दिसतें कीं, रिफॉर्म्स आक्टाची जी दुसरी आवृत्ति निघावयाची तिच्या पूर्वतयारीसाठीं एक पार्लमेंटरी कमिशन नेमलें जाणार आणि त्या कमिशननें साक्षीपुरावा घेऊन आपला रिपोर्ट पार्लमेंटला सादर केल्यानंतर नवें बिल तयार होऊन तें पार्लमेंटपुढें येणार. सरकारी रीत्या अद्यापि कोणतीच गोष्ट जाहीर झाली नाहीं. तथापि या गुप्त समजल्या जाणाऱ्या पार्लमेंटरी कमिशनाविषयीं इतकी वित्तंबातमी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत आहे कीं, आतां व्हाइसरॉयांना जाहीर करण्याला शिल्लक म्हणून

कांहीं उरलें असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. या कमिटींत सात सभासद असणार, तिचें अध्यक्षपद लिबरल पक्षाचे एक पुढारी सर जॉन सायमन याना देण्यांत येणार; सभासदांत लॉर्डांच्या सभेंतले लॉर्ड बर्नहॅम व लॉर्ड स्ट्रॅथकोना आणि कॉमन्स-सभेंतले मेसर्स वॉल्श, लेन फॉक्स, कॅडोगन व मेजर अॅटली इतक्या सभासदांचा समावेश होणार आणि हें कमिशन येत्या फेब्रुवारींत हिंदुस्थानांत येऊन पूर्वतयारी करून परत विलायतेला जाणार आणि आक्टोबरांत परत हिंदुस्थानांत येऊन साक्षी घेण्याचें काम आटोपून रिपोर्ट लिहिण्याकरितां परत विलायतेला जाणार इतकी माहिती आजच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे! तरी पण ही सगळी माहिती अनधिकृत अशा मुखांतून बाहेर आली असल्यानें तिला खरें महत्त्व नसून तीच माहिती जेव्हां राजमान्य गोमुखांतून बाहेर पडेल तेव्हांच तिला खरें महत्त्व येईल!

या कमिशनचे अध्यक्ष सर जॉन सायमन हे लिबरल पुढारी चिरोल खटल्यांत लोकमान्य टिळकांच्या तर्फे वकील होते व ते कांहीं महिन्यांपूर्वी व्हाइसरॉयांचे पाहुणे म्हणून हिंदुस्थानांत येऊन येथील स्थिति पाहून गेले आहेत. लॉर्ड्स स्ट्रॅथकोना व बर्नहॅम हे दोघे पक्के कॉन्झर्व्हेटिव्ह असून त्यांतले लॉर्ड बर्नहॅम हे तर 'डेली टेलिग्राफ' पत्राचे मालक आहेत आणि तें पत्र किती हिंदद्वेष्टे आहे याची ज्यास माहिती असेल त्यांना हें गुणी बाळ या कमिशनमध्यें कां आलें व त्यांत तें आपले गुण कसे उधळणार याचा आगाऊच अंदाज करतां येईल. मेसर्स वॉल्श व अॅटली हे मजूर पक्षाचे प्रतिनिधि असून वॉल्श हे मजूर मंत्रिमंडळांत युद्धमंत्री होते. असलें हें कमिशन हिंदुस्थानांत येऊन रिफॉर्म्स अॅक्टाची बजावणी कशी झाली, त्यांत दोष कोणते आहेत, हिंदी लोकांची संपूर्ण स्वराज्य चालविण्याची पात्रता कितीशी आहे व त्या मानानें त्यांना आणखी किती अधिकार द्यावा या विषयीं कसा अभिप्राय देईल याची कल्पना कोणासहि येईल.

पण सध्या या कमिशनमधील सभासदांच्या लायकी नालायकीचा प्रश्न नसून या कमिशनमध्यें हिंदी सभासदांचा समावेश कां नाहीं हा मुख्य प्रश्न आहे. रिफॉर्म्स अॅक्टाच्या ८४ (अ) कलमान्वयें जें कमिशन नेमावयाचें त्यांत केवळ पार्लमेंटच्या विद्यमान प्रतिनिधींतलेच सभासद असावेत असा कांहीं निर्बंध नाहीं. अर्थातच पूर्वीच्या अनेक रॉयल कमिशनमध्यें ज्याप्रमाणें हिंदी सभासद समाविष्ट केले गेले होते त्याप्रमाणें याहि कमिशनमध्यें हिंदी प्रतिनिधींचा समावेश व्हावयास पाहिजे होता. परंतु सध्या ब्रिटिश राज्यकारभाराचीं सूत्रें हुजूर पक्षाच्या हातीं असून त्या पक्षाला हिंदी जनतेच्या उन्नतीविषयीं कितीशी कळकळ वाटते तें सर्वश्रुतच आहे. आणि प्रस्तुतचा कमिशनचा डाव ही अशा हिंदद्वेष्ट्या कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचीच कारवाई असल्यामुळें तिच्या बुडाशीं कोणतें कारस्थान असावें याचा तर्क कोणासहि करतां येईल. असें जर आहे तर कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें हें कमिशन नेमण्याची घाई तरी कां करावी? रिफार्म्स आक्टांतील कलमाप्रमाणें पाहतां दहा वर्षांच्या आंत कमिशन नेमलेंच पाहिजे असें कांहीं नाहीं आणि दहा वर्षे पूर्ण होण्याला अद्यापि तब्बल दोन वर्षें अवधि असल्यानें हुजूर पक्षानें आतांच अक्षता टाकून हा वेताळ जागृत कां केला अशीहि कित्येकांकडून शंका प्रदर्शित करण्यांत येईल. पण या शंकेचें समाधान सरळ व सोपें आहे. हुजूर पक्षाचें आसन आज जसें विलायतेंत पक्कें स्थिर आहे तसें तें यापूर्वी कधींहि नव्हतें व यापुढेंहि केव्हां तरी त्यास इतका निर्वेधपणा लाभेल का नाहीं याची शंकाच आहे. आणखी एका वर्षानें इंग्लंडांत निवडणुकीची धामधूम सुरू होणार आणि नव्या पार्लमेंटांतलें बहुमत हुजूर पक्षाकडेच झुकतें राहिलें तरी आजच्याइतकें निर्विवाद बहुमत त्या पक्षाला लाभणार नाहीं. यास्तव नव्या निवडणुकीनंतर रॉयल कमिशन नेमावयाचें म्हटल्यास त्यांत उदार व मजूर पक्षांतले जे सभासद त्यांना नको आहेत ते कदाचित् येण्याचा संभव आहे. म्हणून आज सगळे हुकूम आपल्या एकट्याच्या हातीं असल्यानें त्याचा फायदा घेऊन भावी रिफॉर्म्सना अपशकुन करण्याचें कार्य याच पर्वणींत उरकून घ्यावें असें हुजूर पक्षास वाटणें साहजिक आहे.

हिंदुस्थानांतील प्रस्तुतची परिस्थिति पाहून त्यावरूनहि कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षास हल्लींचीच पर्वणी आपल्या कृष्णकारस्थानास योग्य आहे असें वाटलें असावें. कारण आजकाल या देशांत हिंदू-मुसलमानांत जेवढा बखेडा माजला आहे तसा तो आणखी दोन वर्षांनीं राहीलच असें नाहीं. तेव्हां या कलहाग्नीच्या धगीनें तापलेल्या तव्यावर आपली स्वार्थाची पोळी आजच भाजून घ्यावी असें हुजूरपक्षानें ठरविलें असावें. किंबहुना अशी संधि आपणास प्राप्त व्हावी एवढ्यासाठींच हा कलहाग्नि पेटत असतां त्याच्याकडे जाणून बुजून दुर्लक्ष करण्यांत आलें असावें. मिस मेयोचें 'मदर इंडिया' हें पुस्तक अचानकपणें याच वेळीं प्रसिद्ध होतें, व त्याच्या हजारो प्रती विकत घेण्यांत येऊन त्या पार्लमेंटच्या सभासदास मुद्दाम नजर करण्यांत येतात यावरूनहि हिंदुस्थानाविरुद्ध कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षानें उभारलेल्या

कारस्थानाचे धागेदोरे किती दूरवर पसरले आहेत याची कल्पना करतां येईल.

अशा रीतीनें आपल्या कुटिल कारस्थानाची पूर्व-तयारी करून कॉंझर्व्हेटिव्ह पक्षानें आतां त्याच्या उभारणीचें काम आरंभिलें आहे असें दिसतें. व्हाइसरॉयांनीं आपला दौरा मध्येंच टाकून इतक्या तांतडीनें दिल्लीस परत येऊन तारायंत्रद्वारें निमंत्रण देऊन पुढाऱ्यांच्या ज्या घाई घाईनें मुलाखती घेतल्या त्या विलायतेंतील सासूबाईकडून तसे हुकूम सुटल्यावरूनच घेतल्या असाव्यात हें उघड आहे. भावी कमिशनमध्यें हिंदी सभासद शपथेलाहि असूं नये, तें केवळ गौरवर्णीयांचेंच बनवावें, ही कल्पना व्हाइसरॉयांची नसून ती विलायतेंतल्या ओडवायर-प्रभृति कूटमंडळाच्या मेंदूंतूनच निघाली असावी व ती व्हाइसरॉयांना स्वतःला मान्यहि नसावी असें वाटतें. याचें गमक हेंच कीं, कमिशनमध्यें हिंदी सभासद नसावेत याविषयीं विलायतसरकार व हिंदुस्थानसरकार यांचें एकमत आहे असें विलायतच्या तारायंत्रद्वारें आवर्जून सांगण्यांत येत आहे! आणि त्यामुळेंच तर हा संशय दृढावतो. तें कसेंहि असो. पार्लमेंटरी कमिशनमध्यें हिंदी सभासदांचा समावेश करण्यांत येणार नाहीं ही गोष्ट हिंदी पुढाऱ्यांस आगाऊ कळवून त्यांची समजूत घालण्याची कामगिरी लॉर्ड आयर्विन यांना वरील हुकमावरून करावी लागली व ती त्यांनीं गेल्या आठवड्यांत कशीबशी उरकली !

ही कामगिरी बजावीत असतांना व्हाइसरॉयांना तें तत्त्व स्वतःला तरी कितपत पटलें होतें याचा खुलास कळणें असंभवनीय असल्यानें त्याचा विचार बाजूस ठेवला तरी ज्यांची समजूत घालण्याकरितां म्हणून त्यांनीं मुलाखती घेतल्या त्या हिंदी पुढाऱ्यांची तर समजूत पटल्याप्रमाणें दिसत नाहीं. कारण व्हाइसरॉयांच्या अंतरंगात काय चाललें आहे त्याची देखील गुप्त बातमी स्वतःस कळते अशी फुशारकी मारणारे जे अँग्लो-इंडियन पत्रांचे खास बातमीदार त्यांनीं देखील एकंदरींत व्हाइसरॉयांची ही संजयशिष्टाई फसली असाच अभिप्राय नमूद केला आहे आणि यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नाहीं. हिंदी जनतेला भावी स्वराज्याचा पुढचा हप्ता केवढा द्यावयाचा याचा विचार करण्याकरितां कमिशन नेमावयाचें आणि त्या कमिशनवर एकाहि हिंदी गृहस्थाची नेमणूक न व्हावी ही स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाची उघड पायमल्ली होय. आणि ज्या राष्ट्राचा हा असा उपमर्द करण्यांत आला त्याच्याकडूनच मला याबद्दल मुळींच कांहीं विषाद वाटत नाहीं असें अभिवचन मिळवावयाचें हें शक्य तरी कसें आहे ?

तरी पण असला कबुली जबाब मिळविण्याकरितां या मुलाखतींत व्हाइसरॉयाकडून वकिली बाण्याचें बरेंच कौशल्य खर्च करण्यांत आलें असें दिसतें. हें रॉयल कमिशन नसून ही नुसती प्रास्ताविक पार्लमेंटरी कमिटी आहे आणि पार्लमेंटरी कमिटींत पार्लमेंटाच्या बाहेरचे सभासद घेतां येत नसल्यानें हिंदी लोकांचा तींत समावेश करतां येत नाही असा सरकारतर्फेचा कोटिक्रम आहे. यावर, रॉयल कमिशन न नेमतां पार्लमेंटरी कमिटी नेमण्याची शक्कल तरी तुमचीच ना, मग ती सोडून देऊन रॉयल कमिशनच नेमा म्हणजे झालें असें एक उत्तर आहेच. पण पार्लमेंटरी कमिटी झाली तरी तींत देखील सकलातवाला हे पार्लमेंटचे हिंदी सभासद आणि लान्सबरी सारखे मजूर सभासद यांचा तरी समावेश करा असें दुसरेंहि उत्तर देतां येण्यासारखें असून तें प्रतिपक्षाला निरुत्तर करणारें आहे. १९१९ सालीं पास झालेल्या रिफॉर्म्स आक्टांत कमिशनचा उल्लेख स्पष्ट असतां रॉयल कमिशनच्या ऐवजीं पार्लमेंटरी कमिटी नेमण्याचें कारण काय ? पार्लमेंटनें स्वतःच्या माहितीसाठीं एखादी कमिटी नेमली व इकडे पाठविली तर तसें करण्याचा तिला अधिकार आहे; पण असली केवळ सरकारी चौकशी या पूर्वींहि झाली आहे आणि आतांहि भारतमंत्र्याना हिंदुस्थान सरकाराकडून वाटेल ती माहिती मागवितां येईल. त्यांतूनहि सरकारी दप्तरांतल्या माहितीशीं पडताळा पाहण्याकरितां कोणा बिनसरकारी पुढाऱ्याची मुलाखत घ्यावयाची झाल्यास गव्हर्नर-जनरल किंवा गव्हर्नर यांच्याकडून पाचारण होतांच त्यांची भेट घेण्याचें कोणीहि नाकारील असें आजच्या परिस्थितींत तरी दिसत नाहीं. पण अशा रीतीनें जी माहिती मिळवावयाची तिचा इतका गाजावाजा कशाला? व त्या कमिटींत आपला समावेश नाहीं म्हणून हिंदी लोक तरी तक्रार कशाला करतील ? परंतु हिंदी लोकांना कमिटींत न घेतल्याच्या दोषाचें निराकरण करण्यासाठीं आज ज्या कमिटीचें महत्त्व मुद्दाम अत्यल्प दर्शविण्यांत येत आहे त्याच कमिटीचा रिपोर्ट पार्लमेंटपुढें सादर झाला म्हणजे हेंच सरकार कमिटीच्या शब्दाला श्रुतिवाक्याप्रमाणें मानूं लागेल ! याकरितांच आपल्या परोक्ष आपल्या विरुद्ध पुरावा पार्लमेंटपुढें मांडला जाऊं नये आणि स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाची पायमल्ली होऊं नये म्हणून हिंदी लोकांची कमिटींत आपला समावेश होण्याबद्दलची मागणी आहे आणि ती मान्य न झाल्यास कमिटीचा रिपोर्ट केवळ एकपक्षीय झाल्यानें त्या एकतर्फी निकालाला न्याय दृष्टीनें पाहतां काडीचीहि किंमत दिली जाणार नाहीं.

कमिटीच्या रिपोर्टावर असा एकतर्फी निकालाचा दोषारोप लादला जाऊं नये व तो रिपोर्ट कवडीमोल होऊं नये म्हणून हिंदी लोकांना कमिटीच्याबरोबर सहकार्य करतां येईल अशी योजना करण्यांत येणार आहे असें एक आमिष सरकाराकडून पुढें केलें जात आहे. पण 'गाढ्याबरोबर नळ्याची यात्रा' झाली तरी त्यास जसें महत्त्व चढत नाहीं त्याप्रमाणें कमिटीच्या सभासदांच्या शेजारच्या कांहीं खुर्च्यावर हिंदी सभासदांची स्थापना झाली तरी रिपोर्ट किंवा भिन्नमतपत्रिका लिहिण्याचा जेथें हक्क नाहीं तेथें या नाटकी देखाव्याचा उपयोग काय ! कमिशनपुढें साक्षीदारांनी उत्तम साक्ष दिली तरी कमिशनमध्यें जर सगळीं उलट्या बाहुल्यांची माणसें असलीं व त्यांनीं ती साक्ष कःपदार्थ ठरविली तर त्या साक्षीचा उपयोग काय ! पार्लमेंटचे सभासद कमिशनचें मत तेवढेंच पाहाणार; साक्षी. पुरावा वाचून पाहणारा सभासद विरळाच. अर्थातच ज्या कमिशनमध्यें आपल्या मताचा सहानुभूतीनें विचार करणारा आपला असा सभासदच नाहीं तेथें साक्ष देणें अरण्यरुदनवत् होणार हें निश्चित आहे. आणि जर कोणाला राहवतच नसेल तर त्यानें आपला घसा मोकळा करण्याला तसलें अरण्यरुदन करावें; पण कोणतीहि जबाबदार संस्था असला रिकामा उपव्याप करण्याच्या भरीस पडणार नाहीं.

सारांश, राष्ट्रीय सभेसारख्या हिंदी राष्ट्राच्या प्रातिनिधिक सभेनें हें कमिशनचें सोंग मान्य करून त्याजपुढें आपली शिष्टाई करावी अशी सरकारची अपेक्षा असल्यास ती साफ चुकीची ठरेल. हिंदी सभासदांची कमिशनवर नेमणूक होऊन देखील ते सभासद जर सर्वमान्य नसतील तर त्यांच्यावर देखील बहिष्कार पडण्याचा संभव असतो; मग येथें तर सरकारनें आपण होऊनच हिंदी लोकांवर बहिष्कार घातला आहे ! सरकारच्या या गैरमुत्सद्दीपणाच्या ठरावामुळें आतां या कमिशनला आपण कितपत मान द्यावा याचा वादच राहात नाहीं. सरकारकडूनच बहिष्काराचा उगम झाल्यामुळें कॉंग्रेसलाहि जर कांहीं स्वाभिमान असेल तर जशास तसें या न्यायानें वागणें प्राप्त आहे. अर्थातच सरकारच्या या चुकीच्या धोरणामुळें कमिशनवरचा बहिष्कार स्वतः सिद्धच ठरत आहे. कॉंग्रेसला स्वाभिमान राखावयाला दुसरा मार्गच राहत नाहीं. वास्तव व्हाइसरॉय किंवा भारतमंत्री यांना जर हिंदी लोकमताची कांहीं चाड असेल तर त्यांनीं कमिशनच्या नांवावर असलें एकतर्फी नाटक करण्याच्या भरीस न पडतां रिफॉर्म्स आक्टांत नमूद आहे त्याप्रमाणें रॉयल कमिशन नेमावें व त्यांत हिंदी लोकांच्या सर्वमान्य पुढाऱ्यांचा समावेश करून स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा अल्पांशानें तरी बोज राखावा.

# श्रीशिवभारत

## लेखांक ४ था

समकालीन पुराव्याला उद्देशून लिहितांना आम्ही वर हीं तीन संस्कृत काव्यें आणि बखरी यांचा उल्लेख केला. पण त्याबरोबर आणि त्यांच्याच बरोबरीनें पोवाड्यांचाहि उल्लेख करणें प्राप्त आहे. कारण वरील काव्यें संस्कृत पंडितांनीं लिहिलीं आणि पोवाडे हे प्रायः अशिक्षित अशा प्राकृत कवींनीं लिहिले इतकाच फरक. एरवीं इतिहासाचीं साधनें या दृष्टीनें त्यांच्यांत तरतम भाव लावितां येत नाहीं. बखरीसंबंधानें सांगतांना एकहि बखर आंतील हकीकतीशीं समकालीन नाहीं हें दर्शविलें आहे. आणि हीं संस्कृत काव्यें मात्र समकालीन आहेत असेंहि सांगितलें आहे. पण बरेचसे पोवाडे देखील असेच समकालीन आहेत. उदाहरणार्थ,अफजुलखानाचा पोवाडा घ्या. सर्व उपलब्ध पोवाड्यांपैकीं सर्वांत जुना असा हा पोवाडा आहे. त्याच्या सदतिसाव्या चौकांत शाहीर अज्ञानदास म्हणतो कीं "विरमाल राज्याचा गायिला. शिवाजी सरजानें इनाम घोडा बक्षीस दिला. शेरभर सोन्याचा तोडा हातांत घातला." या पोवाड्यांतील हकीकत घडली त्याच सुमारास तिचा पोवाडा झाला या गोष्टीचें प्रत्यंतर असें कीं, त्यांतील हकीकतीला इतर ऐतिहासिक साधनांतून प्रत्यंतर मिळतें. शिवभारताच्या प्रस्तावनेंत दत्तोपंत आपटे यांनी प्रथम अफजुलखानाच्या स्वारीचा थोडासा पूर्ववृत्तान्त देऊन या पोवाड्यांतील ५ वा चौक "देश दुनिया काबिज केली, बारा मावळें घेतलीं" इ. उद्धृत करून असें म्हटलें आहे कीं,इतर रीतीनें दिसून येणारा हकीकतींचा अनुक्रम हाच जवळ जवळ या पोवाड्यांत सांगितला आहे.

यानंतर तानाजीचा पोवाडा घ्या.त्यांतील ५५ व्या म्हणजे शेवटच्या चौकांत आपणाला राजगडावर निमंत्रण कसें झालें, आपणाला पोवाडा रचण्याविषयीं आज्ञा कशी झाली, तो पोवाडा आपण सदरेला डफ-तुणतुणें घेऊन कसा गाऊन दाखविला, व त्या-

करितां आपणाला हजार रुपयांचा तोडा बक्षीस कसा मिळाला याची बित्तंबातमी तुळशीदास शाहीरानें दिली आहे. अर्थात् या पोवाड्याचा कवीनें स्वतःविषयीं लिहिलेला भाग प्रस्तुत तीनहि संस्कृत काव्यांच्या कर्त्यांनीं स्वतःसंबंधीं त्यांत लिहिलेल्या मजकुराइतकाच विश्वसनीय मानला पाहिजे. आणि तसा तो न मानण्याला कांहींच सबळ कारण नाहीं. बाजी पासलकराचा पोवाडाहि समकालीनसा दिसतो. त्याची भाषा निःसंशय जुनी दिसते.पोवाडाकार यमाजी यानें दुसऱ्या चौकांत 'बंदा बाजीचा म्हणवितो' असें म्हटलें आहे तेंहि विश्वसनीय वाटतें.

राजवाडे यांनीं वरील तीनहि पोवाड्यांना समकालीन मानल्याचा उल्लेख आहे. आपल्या साधनांच्या चौथ्या खंडाच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात " शालिग्राम यांनीं छापलेल्या पोवाड्यांपैकीं अफजुलखानाचा व बाजी पासलकराचा पोवाडा अस्सल आहे. अर्थात् ते ते प्रसंग झाल्यावर लागलेच लिहिलेले आहेत." तानाजीच्या पोवाड्यांतील कांहीं भाग कदाचित् कोणी मागाहून घुसडून दिलेला असावा. पण हा आक्षेप इतर अनेक पोवाड्यांना लागू पडण्यासारखा आहे.कारण पोवाडेच्यासे काय प्रक्षिप्त भाग घुसडून देण्याचें जणुं काय आपल्याला वरदानच आहे असें सर्वांसच वाटत असतें!त्याचें एक कारण असें असावें कीं,जुनी पिढी व नवी पिढी या एकजीव असतात.वंशपरंपरागत घरांत जसें आपण राहतों, त्यांतला कांहीं भाग आपल्या हातानें दुरुस्त करतों व कांहीं त्यांत नवाहि बांधतों, असें असतां समुच्चयानें घर वडिलार्जित असें सांगतों, त्याचप्रमाणें पोवाड्यावर लुब्ध असलेले व स्वतः एखाददुसरें कडवें किंवा चौक अनुकरणप्रेमानें करूं शकणारे छोटे कवी आपली कृति जुन्या शाहिराच्या कृतींत मिसळून देतात. आणि यांत आपण कांहीं वावगें करीत नाहीं असेंहि त्यांना प्रामाणिकपणानें वाटत असतें! दुसरें कारण असें कीं, घरच्या एखाद्या जुन्या बाडांत जुनें काव्य किंवा लेख किंवा पाठसंग्रह लिहिला असला तर त्याच्याच पुढें व वेगळेपणा स्पष्ट न दर्शवितांहि कित्येकजण स्वतःचा मजकूर त्यापुढें लिहीत जातात. आणि संशोधक लोक पुष्कळ वेळां त्या सबंध बाडाचें कर्तृत्व एकाच व्यक्तीकडे देतात ! जुन्या बाडावर लिहिणारे लोक दस्तऐवज बनावट करण्याच्या बुद्धीनें लिहीत नाहींत. तर कागद कमी खर्चण्याची संवय, निदान प्रकरणें विषयवार वेगळीं तुटक न ठेवण्याची संवय, हीच त्याला कारणीभूत असते. पण खरी चूक होते ती अज्ञानी पण भोळ्या संशोधकांची ! कारण ते मात्र सर्व बाड एकच समजून छापतात व त्यामुळें घोटाळा होतो. खुद्द राजवाडे यासारख्या चिकित्सकानें राधामाधव चंपू या नांवाखालीं शहाजीशीं संबंध असलेलें व मुळींच संबंध नसलेलें काव्य एकच ग्रंथ म्हणून छापलें हें संशोधकाच्या या वरील चुकीचें एक ठळक उदाहरण म्हणून खचित देतां येण्यासारखें आहे.

जुन्या बाडांची प्रतिकृति म्हटली तर आपल्या टिपणवह्या होत. या वह्यांतून आपण वाचनक्रमप्राप्त अशा गोष्टी अनेक एकापुढें एक लिहितों. इंग्रज वगैरे लोकांत यांना टॉपिक बुक किंवा कॉमनप्लेस बुक म्हणतात, पण तें जरी एकाच्या हातचें असलें तरी तें सर्व मिळून एक पुस्तक नव्हे. युरोपिअन लोकांत फॅमिली बायबल म्हणून असतें. आणि वडिलार्जित मिळकत जशी क्रमानें पुढील पिढ्यांना प्राप्त होते तसेंच हें फॅमिली बायबलहि वडील शाखेकडे पिढ्यानपिढ्या जात असतें.आशा या फॅमिली बायबलच्या सुट्या कोऱ्या पानावर दरपिढींतला कर्ता मनुष्य घरांतील मुलांच्या जन्मतिथी व घराण्यासंबंधीं घडलेल्या ठळक गोष्टी लिहितो. निदान जुन्या काळीं तरी अशी वहिवाट होती. पण एखाद्या भोळ्या मनुष्यानें अशा एखाद्या बायबलांतील हे सर्व लेख एकच ऐतिहासिक ग्रथ साधन म्हणून एकत्र छापले तर तें जसें हास्यास्पद होईल तशीच आपल्या इकडील कित्येक संशोधकांचीहि स्थिति आहे. नारायणरावाच्या पोवाड्याचें मूळ खरे सातच चौक आहेत. पण त्याचे आद्यंत कायम ठेवून कोणी हौशी कवीनें त्या साताचे तेरा केले.मात्र कृपा येवढी केली कीं, ज्या चौकांत कवीनें आपलें नांव-गांव लिहून सहीशिक्क्यानिशीं तो पुरा केला तो चौक शेवटीं १३ वा ठेवला.पण यानंतर एक हरीचा लाल असा भेटला कीं, त्यानें आणखी एक चौक चौदावा करून या तेराव्यापुढें जोडला. या अव्यापारेषु व्यापार करणाऱ्याला विनायकराव भावे यांनीं अजागळ म्हटलें आहे. पुढें एका प्रतींत हा चौदावा चौक आढळला म्हणून तो मूळचाच समजून छापणारांनीं तो तसाच छापून दिला. पण या छापणाऱ्याला भाव्यांनीं कांहीं विशेषण दिलेलें नाहीं !पण आमच्या मतें तें अजागळ या शब्दापेक्षां अधिक निंदाव्यंजक व बोचणारें असेंच खरोखर दिलें पाहिजे.

असो. या तीन जुन्या पोवाड्यांनंतर पेशवाईंत व त्यानंतर झालले पोवाडे हेहि पुष्कळसे समकालीनच आहेत. अर्थात् इतिहासाचें साधन या दृष्टीनें त्यांस बरेंच महत्त्व आहे. आणि त्यांतला काव्यवर्णनाचा भुस्सा कुशल हातानें पाखडून बाजूला टाकला असतां त्यांत ऐतिहासिक सत्याचे स्वादिष्ट व पौष्टिक कण पुष्कळच उरतात. इतकेंच नव्हे तर आम्ही असेंहि म्हणतों कीं, संस्कृत ऐतिहासिक काव्यांत ऐतिहा-

सिक माहिती असली तरी ती वाचणाऱ्यांची संख्या तेव्हां व आतांहि फारच थोडी. शिवाय त्यांनीं काव्य-वर्णनाला घेतलेले अलंकार पुष्कळसे सांकेतिक. त्यांत जिवंत भावना कमी. याच्या उलट विनायकराव भावे यांना आपल्या महाराष्ट्र सारस्वतांत लिहिल्याप्रमाणें शाहीर लोकांनीं आपलीं काव्यें ऐकवून लोकांचे देह आनंदानें व स्फूर्तीनें फुगवून सोडले. शाहीर लोक सामान्य जनतेतीलच असल्यामुळें त्या जनतेशीं समरस असत. " लोकांची मनोदेवता हीच त्यांची खरी देवता होती व ते तिच्याशींच बोलत. हे शाहीर जानपद भाषा वापरीत. ते प्रायः नित्यांतले शब्द आपल्या कवनांत योजीत. त्यांच्या विचाराचें वळण खरें खरें मराठ मोळ्याचें असें होतें. व कांहीं प्रसंग खेरीज-करून सर्व ठिकाणीं ते लोकांच्या नित्यांतल्या शब्दवटिका योजीत. यामुळें त्यांच्या कवनांत एक तऱ्हेचें जीवन आढळतें." पोवाड्यांच्या समकालीनत्वाच्या मुद्दयाचा प्रत्यक्ष उल्लेख भावे यांनीं यांत केला नसला तरी खालील रसभरित वर्णनांत सूक्ष्म दृष्टीनें पाहाणाराला समकालीनत्वाचा मुद्दा इतर रसाहून अधिक सरस भासेल. भावे लिहितात " ज्या लढाईचें वर्णन पुढल्या चौकांत ( आंगणांत ) गोंधळी एकतारींत गात असेल, अंगेजणीनें चढाई करून चढाविलेल्या ज्या हल्ल्याचें वर्णन शाहीर आंगणांत म्हणत असेल त्या लढाईत माझा भाऊ होता, ही कल्पना कोणत्या बहिणीला मोहून टाकणार नाहीं? त्या स्वारींत माझा बाप होता हा अभिमान कोणत्या मुलाला वाटणार नाहीं? त्याच लढाईतल्या लुटींतून आणिलेल्या मोत्यांचा कंठा आज माझ्या गळ्यांत आहे, तेथेंच मिळविलेल्या बक्षिशींतली तरवार ही माझ्यासमोर खुंटीवर ठेवलेली आहे, हें मनांत येतांच कोणती बायको द्रव्यलोभ पार विसरून जाऊन अंगावरचा शालू माडीवरून त्या शाहिराच्या अंगावर फेंकणार नाहीं? आणि हें पाहून गळ्यांतला शेरभर सोन्याचा गोफ कोणता धनी त्या शाहिराच्या गळ्यांत घालणार नाहीं? असे हे प्रसंग स्वराज्यांत वारंवार येत आणि अशा वेळीं शाहिरांच्या अंगावर बक्षिसांचा पाऊस पडे. "

वरील वर्णन करण्यांत भावे यांचा हेतु शाहिरांचें महत्त्व सांगण्याचा आहे. पण शाहिराला बक्षिसाचा जो आनंद होतो तसाच इतिहाससंशोधकाला हा पोवाडा समकालीन लिहिलेला होय या शुद्ध ज्ञानानें आनंद होतो हें सांगण्याचें भावे यांना त्या स्थलीं अभिप्रेत नसलें तरी अप्रत्यक्ष रीतीनें तें सहजच सिद्ध होत आहे. आणि हें सर्व येथें सांगण्याचें आमचें प्रयोजन हेंच कीं, समकालीन पुराव्याला महत्त्व देणाऱ्या राजवाड्यांच्या सारख्या संशोधकानें राधामाधवविलास चंपूसारखें काव्यसंशोधण्याचे श्रम घेऊन पावणेतीनशें पानांचा ग्रंथ छापला, पण त्यांनीं सगळ्या हयातींत अशा पोवाड्यांचें संशोधन व छपाई केली नाहीं. कै. शंकरराव शाळिग्राम यांनीं मोठ्या परिश्रमानें सन १८७९ सालीं पोवाड्यांचें पुस्तक प्रथम छापलें याचा अर्थ साने चिपळूणकरप्रभृति इतिहाससंशोधकांच्या मनांत जी इतिहाससंशोधनाची स्फूर्ति आली तिनेंच शाळीग्राम यांना उद्युक्त केलें होतें. राजवाडेप्रभृतींचा सर्व उद्योग त्यानंतरचा आहे. तथापि त्यांनीं अप्रसिद्ध पोवाड्यांचें संशोधन फारसें केलें नाहीं. ( त्यांच्या तिसऱ्या खंडांतील कर्नाटकच्या मोहिमेचा अपूर्ण पोवाडा एवढाच काय तो आमचे समजुतीप्रमाणें त्यांनीं संशोधून छापलेला पोवाडा होय. ) उलट ज्या शाळिग्रामांनीं पोवाड्यांचीं बाडेंच्या बाडें जमवून छापविलीं त्यांतील अशुद्धावर मात्र सडकून टीका करून राजवाड्यांनीं बिचाऱ्या अशिक्षित शाळिग्रामांचा उपहास मात्र केला आहे.

# बोल्शेव्हिकांचे राज्यक्रांतीचे मार्ग

[ रेव्ह्यू दे द मोंदवरून ]

( लेखक—अ. ज. करंदीकर. )

## लेखांक २ रा

क्रांति घडवून आणावयाची ती धाडसी अल्पसंख्याक अनुयायांच्या मदतीने घडवून आणावयाची हा लेनिनचा पहिला सिद्धान्त होता. १९१७ सालीं रशियांत लेनिनच्या पक्षाचे लोक फार तर पांच लाख असतील. पण या मूठभर लोकांनीं १२ कोटि लोकसंख्येचा रशिया देश आपल्या हाताखालीं घातला.

लेनिनचा कार्यक्रम दुहेरी होता. एक तर जनतेला आपल्या बाजूला वळवून घेणें व दुसरा भाग म्हणजे अधिकारी पक्षाला निर्बल करणें.

त्यांतला लोकमत आपल्या बाजूला वळवून घेण्याचा कार्यक्रम पाहा.

### लोकसंग्राहक कार्यक्रम

(१) मजुरांमध्ये चळवळ—वर्तमानपत्रें, हस्तपत्रकें, प्रबंध, सिनेमा व नाटकें यांच्या द्वारानें.

(२) संमेलनें, वार्षिक उत्सव, बोल्शेव्हिक सप्ताह व प्रदर्शनें.

(३) कार्ल मार्क्सच्या नांवानें काढलेलीं विद्यालयें व अर्थशास्त्राच्या अभ्यासाचीं मंडळें, प्रचारकवर्ग तयार करणें.

(४) क्रांतिकारक तरुणांची मंडळीं, यांतून पुढारी तयार करणें व मजूरसंघटना, यांतून अनुयायांची तयारी करणें.

(५)लोकांत जागृति व असंतोष राहावा यासाठीं संप करणें व मजुरांचीं गाऱ्हाणीं लोकांपुढें मांडणें. शिवाय प्रचारकार्याला उपयोगी पडतील असे खटले अंगावर ओढून घेणें.

(६) लोकांना क्रमाक्रमानें अधिकाऱ्यांचा उपमर्द करावयाला शिकविणें.

(७) सुशिक्षित मध्यम वर्ग व भांडवलवाला वर्ग यांचें वजन कमी करणें.

(८) धर्म आणि धर्मोपदेशक यांची निंदा करणें.

(९) कौटुंबिक बंधनें तोडणें, स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीला पाठिंबा देणें, मुलांमुलींचें सहशिक्षण.

(१०) श्रीमंतांनीं दुःखी दरिद्री लोकांना मदत करण्यासाठीं काढलेल्या संस्थांची निंदा करणें.

## सरकारला निर्बल करण्याचा कार्यक्रम

(१) केंद्रसत्तेंतील अधिकाराच्या जागा न स्वीकारणें (कारण त्यामुळें सरकाराबरोबर कम्यूनिस्ट पक्षाचीहि बदनामी होईल.) पण सरकारविरोधी पक्षाला शक्य तितकी मदत करणे.

(२) केंद्रसत्तेंतील अधिकाराच्या जागा स्वीकारल्या नाहींत तरी स्थानिक स्वराज्याच्या सर्व संस्था कबजांत घेणें, विशेषतः म्युनिसिपालिट्या.

(३) बारीकसारीक गोष्टींत सरकारला वांकावयाला लावणें, त्याला मजुरांना सवलती द्यावयाला भाग पाडणें, क्रांतिकारक पुढाऱ्यांना तुरुंगांतून सोडून द्यावयाला लावणें, संप करून सरकारी कामाला अडथळा आणणे, एकंदरीनें सरकारला नरम आणणें.

(४) सैन्यांत फंदफितुरी करणें, सैनिकांच्या अत्याचारांविरुद्ध चळवळ करून लोकमत कलुषित करणें व त्यांना शिक्षा देवविणें, सैन्यांतील लोक पार्लमेंटाच्या विरुद्ध बंड करून डिक्टेटरशिप स्थापण्याचा प्रयत्न करीत आहेत अशी पार्लमेंटरी सरकारची समजूत करून देणें, सैन्यावरील मुख्याधिकार मुलकी अधिकाऱ्यांच्या हातीं यावा याबद्दल खटपट करणें व सैन्याला मुलकी अधिकाऱ्यांचे हुकूम पाळण्याची संवय लावून आत्मप्रत्ययहीन बनविणें, शिलकी सैन्याच्या व पेन्शन घेतलेल्या शिपायांच्या मार्फत सैन्यांत प्रवेश करून घेणें.

या कार्यक्रमाच्या यादीवरून तज्ज्ञांना बोल्शेव्हिकांच्या संघटनाकौशल्याची कल्पना येईल. पण अतज्ज्ञांच्यासाठीं यांतील कांहीं कलमांचा थोडा अधिक ऊहापोह करणें जरूर आहे.

## कार्यक्रमाचें स्पष्टीकरण

बोल्शेव्हिकांनी जनतेचे दोन वर्ग मानले आहेत; पैकीं एक मजूर वर्ग व दुसरा 'बुडवा' म्हणजे बुद्धिजीवि आणि भांडवलवाल्यांचा वर्ग, यांत मजूर वर्गाला संभूयसमुत्थानाची संवय असते व बुद्धिजीवि वर्गाला ती नसते. मजुरांच्या गरजा अगदीं प्राथमिक असतात. मजूर कोणत्याहि धंद्यांतले असोत पण म्हातारपणाचें पेन्शन कामाच्या तासांची मर्यादा, अपघातांचा विमा, संपाचा अधिकार या सगळ्या प्रश्नांवर ते सर्व एकत्रित होऊं शकतात, त्यांच्याप्रमाणे इंजीनियर, वकील, सरकारी अधिकारी, व्यापारी, डॉक्टर वगैरे एकत्र होऊ शकत नाहींत. बौद्धिक उन्नति ज्या प्रमाणांत होत जाते त्या प्रमाणांत बुद्धिजीवि लोकांच्या गरजा अगदीं विभिन्न होतात व त्यांना कोणत्याहि कामाकरितां एकत्र आणणें कठीण जातें.

कम्यूनिस्ट पत्रांतून चाललेली चळवळ केवळ मजूर वर्गाकरितां चालली असते या कम्यूनिस्ट पत्रांतील अग्रगण्य म्हणजे L'. Humanite'. याखेरीज या पक्षाचीं नऊ सुप्रसिद्ध पत्रें फ्रान्समध्यें चालत आहेत.

मजुरांच्या सर्व भांडणांत कम्यूनिस्ट लोक पुढाकार घेतात हें स्वाभाविकच आहे. पण सामुदायिक अत्याचार करणें हें कम्यूनिस्टांना पसंत नाहीं; कारण त्यानें पक्षाचें सामर्थ्य क्षीण होतें. पण वेळोवेळीं वैयक्तिक अत्याचार होणें हें आपल्या पक्षांत कांहीं 'हुतात्मे' उत्पन्न व्हावेत व कार्याची लोकांत प्रसिद्धि व्हावी या दृष्टीनें त्यांना इष्ट वाटतें. प्रतिपक्षावर अत्याचाराचे खटले भरणें हाहि या कार्यक्रमांतलाच एक भाग होय. स्वतःच्या सामर्थ्याचें लोकांत प्रदर्शन करावयासाठीं प्रचंड मिरवणुकी काढणें व थोडा वेळ आपली सत्ता गाजविण्यासाठी सर्वांची रहदारी बंद पाडणें हा उपायहि पुष्कळ वेळां अवलंबिला जातो.

कम्यूनिस्ट पक्षाचा मुख्य राग बुद्धिजीवि वर्गावर आणि भांडवलवाल्यावर. हे लोक संख्येनें व संघटनेनें मजूर वर्गापेक्षां दुर्बल असले तरी सरकारी अधिकाराच्या जागा बहुधा यांच्या हातांत असतात. शिवाय अनेक शतकांच्या परंपरेचा यांना पाठिंबा असल्यानें हे फार चिवट बनले आहेत. यांना दुर्बल करण्यासाठीं कम्यूनिस्ट पक्षानें एक अजब युक्ति लढविली आहे. बुद्धिजीवि लोक

हे आर्थिक कारणामुळें संघटित होऊं शकत नाहींत तरी देखील धर्म, समाज, संस्कृति, देशाभिमान वगैरे कल्पनांच्या बंधनांनीं हे एकजीव झाले आहेत. म्हणून या कल्पनांवरच हल्ला करून त्यांची परंपरा बुडवावी म्हणजे ज्ञानाच्या वाळवंटांतील सुवर्णकण वेंचणारे हे लोक वाळूच्या कणांप्रमाणेंच विस्कळित होऊन जातील अशी कम्यूनिस्टांची समजूत आहे.

## समाजधर्मावर हल्ला

राजकारण धर्मापासून अलिप्त ठेवावें यासाठीं पूर्वींचे विचारी लोक चर्च आणि पाद्री यांच्यावर हल्ला करीत. पण हा हल्ला अगदीं मर्यादित स्वरूपाचा वाटून कम्यूनिस्टांनीं आतां सरसकट धर्मावरच हल्ला चालविला आहे त्यांचें म्हणणें असें कीं, समाजांत श्रीमंत व दरिद्री हे वर्ग नेहमीं राहावेत व श्रीमंतांना गरीबांनीं लुटूं नये यासाठीं धर्माची उत्पत्ति झाली आहे ! म्हणून हा वर्ग धर्म, दैववाद व ईश्वरेच्छेच्या ठिकाणी आत्मसमर्पण यांचा उपदेश करीत असतो. त्यामुळेंच खरा धार्मिक मनुष्य हा कम्यूनिस्ट चळवळीला अगदीं उपयोगी पडत नाहीं. लेनिननें तर असें म्हटलें आहे कीं, साधारण लोकांनीं आक्रोश करूं नये म्हणून धर्म ही अफूची गोळी श्रीमंतांनीं शोधून काढली आहे ! लेनिनच्या या उद्गारामुळें धर्मावरील हल्ल्यांना नवीन तेज चढलें आहे.

कौटुंबिक जीवनावर जे आघात होत आहेत त्यांत इतकेसें नावीन्य नाहीं. मुलांना कुटुंबापासून अलिप्त ठेवून शिक्षण देणें व मुलांमुलींना एकत्र शिक्षण देणें हे प्रयोग कांहीं नवीन नाहींत. स्त्रीस्वातंत्र्य व सर्व स्त्रिया राष्ट्रीय मालकीच्या करण्याची कल्पनाहि ॲरिस्टोफेनिसच्याइतकी जुनी आहे. या दोनहि कल्पना अन्योन्याश्रयी आहेत कीं काय समजत नाहीं. प्राचीन ग्रीसमध्यें या दोनहि कल्पना एकत्र उदभवल्या. अर्वाचीन फ्रान्सांत व रशियांतहि स्त्रीस्वातंत्र्याच्या चळवळीबरोबर सर्व स्त्रिया राष्ट्रीय मालकीच्या करण्याची कल्पना निघाली ! रशियांतल्या विकृत कल्पना वाचकांपुढें मांडण्यांत अर्थ नाहीं. केवळ पॅरिसच्या कम्यूनिस्ट कांग्रेसमधील कांहीं निवडक मुक्ताफळांचा अहेर त्यांना पुरेल. तो असा—'कुटुंब आणि कौटुंबिक मनोवृत्ति अस्तित्वांत असेपर्यंत कोणतीहि क्रांति घडून येणें शक्य नाहीं'; 'कुटुंब ही संस्था परोपजीवि वर्गाच्या सोयीसाठीं भिक्षुक वर्गाने अस्तित्वांत आणली आहे'; 'या संस्थेचा नायनाट करणें अवश्य आहे' 'स्त्रियांचें वैशिष्ट्य प्रकट व्हावें अशी तुमची इच्छा असेल तर त्यांना घराबाहेर काढा'; 'आपल्या अपत्याचीच काळजी घेत राहणारी स्त्री एखाद्या कुत्रीपेक्षां अधिक योग्यतेची नाहीं'; 'ती स्त्री नसून नुसती मादी आहे!' असल्या विकृत मनोभूमिकेवर माल्थसच्या तत्त्वज्ञानाचें व संततीनियमनाच्या प्रचाराचें बीज पडल्यावर त्याचा वेल किती झपाट्यानें वाढत असेल याची सहज अटकळ करतां येईल.

## कवडीमोल राष्ट्राभिमान

आपल्या शासनसंस्थेचा अभिमान व राष्ट्राभिमान या कल्पनांच्या नाण्यांनाहि कम्यूनिस्ट लोकांच्या मनोराज्यांत कवडीचीहि किंमत नाहीं. पण फ्रेंच लोकांच्या राष्ट्राभिमानाविरुद्ध उघड मोहीम काढल्यास आपलाच अनुयायी वर्ग बिथरावयाचा म्हणून फ्रेंच बोल्शेव्हिक या फंदांत सहसा पडत नाहींत. स्वातंत्र्यप्रिय फ्रेंच लोकांची सहानुभूति मिळविण्यासाठीं ते स्वातंत्र्याचे भोक्ते, पुरस्कर्ते व स्वातंत्र्याच्या पवित्र कार्यांत बळी पडलेले हुतात्मे म्हणून मिरवितात, व लोकांची सहानुभूति आपल्या पक्षाला आहे असा विश्वास पटला म्हणजे सर्व राष्ट्राभिमानी लोकांवर मुसोलिनीच्या अनुयायित्वाचा आरोप करतात. या धूर्तपणानें सध्या फ्रान्स देशांत कम्यूनिस्टांचें बस्तान चांगलें बसलें आहे.

मजूरेतर वर्गावर कम्यूनिस्ट पक्षानें चालविलेल्या चढाईचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे श्रीमंतांनीं दुःखी दरिद्री लोकांच्या मदतीसाठीं काढलेल्या संस्थांची निंदा हा होय ! श्रीमंतांच्या या संस्थांचा मजुरांपासून अधिक पैसे काढण्याला, निदान मजूरांना समाधानवृत्ति शिकवावयाला व श्रीमंताची काळजी दूर करावयाला कसा उपयोग होतो हें मजुरांना समजावून सांगून त्यांना स्वावलंबी बनविण्याचा उद्योग कम्यूनिस्ट करीत असतात. यामुळें श्रीमंताचें समाजावरील उरलेंसुरलें वजन नष्ट होण्याच्या पंथाला लागलें आहे. मजूर हा भांडवलवाल्यांचा गुलाम आहे. तो कधीं स्वतंत्र व्हावयाचा असेल तर त्यानें सदा असंतुष्ट राहिलें पाहिजे. पण संकटसमयीं श्रीमंतांची मदत स्वीकारल्यानें तो कृतज्ञ होतो आणि आपल्याला मिळालेल्या मदतीवरच नव्हे तर श्रीमंतांच्या सर्व धनावरच आपला अधिकार आहे हें तो विसरतो. ही विचारसरणी अतिशय आकर्षक रीतीनें मांडलेली कोणाला पाहावयाची असेल तर त्यानें Blasco Ibanez या सुप्रसिद्ध स्पॅनिश कादंबरीकाराची La Cite' des futailles (पिपांचें-दारूच्या पिपांचें-शहर) ही कादंबरी वाचावी. लेनिननें धर्माला अफूच्या गोळीची उपमा दिली, तर या कादंबरीकारानें परोपकाराच्या संस्थांना दारूच्या पाणपोईची उपमा दिली आहे ! !

# बहिष्कार घालाल तो सक्रिय घाला

सुधारणा कामिशनचा जाहिरनामा व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यानी हिंदुस्थानात प्रसिद्ध केला, त्याच दिवशीं मुख्य प्रधान मि. बाल्डविन यानी त्याविषयी पार्लमेंटमध्ये भाषण केले. हा जाहिरनामा व हे भाषण दोनहि एकाच अर्थाची होती. फक्त शब्द निरनिराळे होते. कामिशनच्या सभासदांची नावे या पूर्वी काही दिवस हिंदुस्थानात प्रसिद्ध झाली होती. विलायतेतहि ती लोकाना कळली नव्हती असे नाही. तथापि हे गुपित हिंदुस्थानात आधी फुटले गेले याबद्दल प्रधानमंडळाने किंचित् नापसंती दर्शविली. वास्तविक दोन दिवस इकडे किंवा तिकडे आधी लोकाना नावे समजल्याने कोणताच घातपात झालेला नाही. पण विलायतेत आमची शिस्त अधिक हिंदुस्थानच्या आधिकाऱ्यात ती कमी असा बाहणा प्रधानमंडळाला सहज करता आला. कामिशनच्या सभासदांची नावे प्रधानमंडळाच्या तोंडून निघण्याच्या आधी प्रसिद्ध होणे ही गोष्ट आमच्या मते एखाद्या विद्यापीठाच्या परिक्षेची प्रश्नपत्रिका ठरल्यातारखेच्या आधी फुटण्याइतकी काही अपवादास्पद नाहीं. निदान एक गोष्ट तरी या नेमणुकीविषयी बरेच दिवस आधी फुटली होतीच की नाही? ती म्हणजे या कमिशनवर कोणाहि हिंदी गृहस्थाची नेमणूक होत नाही ही होय. पण या गोष्टीचा प्रधानमंडळाने गवगवा केला नाही. आणि गवगवा करून तरी काय उपयोग? कारण गोष्ट खरीच होती. आणि याविषयी लोकांच्या आक्षेपाला देण्यासारखे उत्तरहि सरकाराजवळ नव्हते. बरे, नावे इकडे आधी फुटलीं म्हणून लॉर्ड आयर्विन याना कोणी बडतर्फ करीत नव्हते! अर्थात् गवळी धार काढीत असता दुधात तो पाणी घालणार त्यावरून गिऱ्हाइकाचे लक्ष निघून तिसरीकडे जावे म्हणून गवळ्याच्या घरच्या माणसानी खोटी कलागत आपापसात करण्यासारखेच हे धूर्तपणाचे होते.

कामिशनवर हिंदी सभासद एकहि का नेमण्यात आला नाही याची कारणे सरकारतर्फे सांगण्यात आली आहेत. त्यातील मुख्य कारण हे की "सुधारणेच्या या वादात दोन पक्ष वादी प्रतिवादी यासारखे आहेत. एक नोकरशाहीचा व दुसरा हिंदी प्रजेचा. नोकरशाहीचे म्हणणे दिल्या तेवढ्याच सुधारणा पुऱ्या आहेत. किंबहुना वाजवीहून अधिक आहेत. आणि लोकांचे म्हणणे त्या अगदीच क्षुद्र अपुऱ्या निराश जनक व निरुपयोगी अशा आहेत. अर्थात् कामिशनवर सभासद घ्यावयाचे तर वादी पक्षाचे नकोत व प्रतिवादी पक्षाचेहि नकोत. निरनिराळया हितसंबंधाचे प्रतिनिधी घ्यावयाचे म्हटले तर हिंदुस्थानातील नोकरशाहीचे घेतले पाहिजेत, गोऱ्या व्यापारी मंडळाचे घेतले पाहिजेत, जातवार प्रतिनिधित्व मागणाऱ्या लोकांचे घेतले पाहिजेत, भावनाप्रिय राष्ट्रीय पक्षाचे घेतले पाहिजेत, विवेचक नेमस्त पक्षाचे घेतले पाहिजेत, संपन्न जमीनदारांचे घेतले पाहिजेत, गांजलेल्या कुळांचे घेतले पाहिजेत, गबर भांडवलवाल्यांचे घेतले पाहिजेत, गरीब मजूरवर्गाचे घेतले पाहिजेत. तात्पर्य, अशा रीतीने प्रत्येक वर्गाचा एक एक प्रतिनिधि घेता घेता कमिशनच्या सभासदांची संख्या बेसुमार वाढली असती. आणि निरनिराळ्या हितसंबंधांची तोंडमिळवणी करता करता सरकार बेजार झाले असते!"

दिसण्यात विलायती प्रधानमंडळाची ही तक्रार काही अंशी बरोबर आहे. निदान वादाचे खरे मर्म माहीत नसणाऱ्या परक्या माणसाला तरी ती खरी भासण्याचा संभव आहे. दुर्दैवाने धर्माभिमान व जात्यभिमान याची मजल हिंदुस्थानात तुला नको मला नको घाल कुत्र्याला असे म्हणण्यापर्यंत पुढे गेलेली आहे. आणि सरकारला हे मर्म माहीत असल्याने त्याचाहि ते अशा रीतीने फायदा घेत आहे. म्हणून या बाबतीत सरकारला नावे ठेवीत असता, आमच्यातील बेसुमार मतभेदामुळें स्वतः आमची आम्हालाच थोडीबहुत नावे ठेवून घेणे टळत नाही. एखादेवेळी असेहि वाटते की, एखादा थोडासा धूर्त मुत्सद्दी या प्रसंगी प्रधानमंडळाला मिळाला असता तर तो हे आमचे मर्म लक्षात घेऊन असेहि म्हणता की, "तुम्हाला काय स्वयंनिर्णय पाहिजे? घ्या देतो. तुम्ही हिंदी पुढारी लोकांच्यापुढे या स्वयंनिर्णयाचे निशाण उभारा, आपलेच एक राऊंड टेबल कॉन्फरन्स म्हणजे राष्ट्राची पंचायत निवडा, तिला स्वराज्याची घटना करण्याला बसवा, एकमताने घटना तयार करा व आमच्याकडे पाठवा. म्हणजे तीच आम्ही मंजूर करू. आम्हाला तरी वेगळे डोके खाजविण्याचे श्रम हवेत कशाला"? पण असा एकहि धूर्त आज प्रधानमंडळात नाही ही कृपाच झाली म्हणावयाची. कारण त्यामुळे आमची अब्रू तरी थोडी बचावली असेच एखादा आमच्यातील स्पष्टवक्ता आपल्या लोकावरील सात्विक रागानें म्हणावयाचा.

पण असे धाडस झाले तरी ते करण्याला धाडसी स्वभावात जी एक दिलदारी लागते तीहि हल्लींच्या प्रधानमंडळात नाही. कपटाने डाव खेळावयास बसणाऱ्यालाहि शंभर संभवात एक संभव असा घेऊन चालावा लागतोच की, आपले कपट फसेल व ते फसले तर डाव अंगावर येऊन भरावा लागेल. पण कपटाने जुगारीचा डाव खेळणाऱ्यामध्ये बाजू अंगावर घेण्याची जितकी तयारी असते तितकीहि हल्लींच्या राज्यकर्त्यांमध्ये दिसून येत नाही. त्याएवजी अधिकाराची गुर्मीच त्याच्या अंगात मुसमुसत असून "आम्हीं करू तेच चालते मग शंभरातून एक संभव तरी आपणांविरुद्ध का स्वीकारा" असे म्हणणाऱ्या गर्विष्ठ दुर्दम मनुष्याची मनोवृत्तीच त्याच्या ठिकाणीं प्रकट होत आहे.

ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांत स्वयंनिर्णयाची अशी संधि विलायतच्या प्रधानमंडळानें यापूर्वी दिल्याचा दाखला आहे.आणि तोहि वरच्याप्रमाणें कपटाने प्रतिपक्षावर डाव करावा अशा बुद्धीने नव्हे तर सरळ बुद्धीने.१९०९ साली दक्षिण-आफ्रिकेतील वसाहतींचे संयुक्त स्वराज्य स्थापन करण्यात आले. तेव्हा प्रधानमंडळाने त्यांशी असा करार केला की, "तुम्ही निरनिराळे वसाहतवाले एकमताने जी स्वराज्यघटना निश्चित करून मान्य कराल ती एक अक्षरहि न फिरविता आम्ही पार्लमेंटचा कायदा करून तुमच्या स्वाधीन करू." आणि हे आफ्रिकन वसाहतवालेहि इतके शहाणे समंजस ठरले की, त्यांनी निश्चयाने आपली पंचायत बोलाविली. तिला निर्णयाचा अधिकार दिला. आणि त्या पंचायतीत निरनिराळ्या हितसंबंधाचा विरोध असताहि राष्ट्रीय बुद्धीच्या रसायनात तो विरोध जिरवून टाकून त्या पंचायतीने स्वराज्याची घटना बनविली. आणि आपले वचन ब्रिटिश प्रधानमंडळाकडून खरे करवून घेतले. या पंचायतीच्या सभासदानी तीत शिरताना अशी शपथच घेतली होती की "आम्ही अवश्य तितके दिवस बसू, लागतील तितके श्रम करू, भांडावे लागेल तितके भांडू-तंडू, कोणाला कितीहि स्वार्थत्याग करावा लागला तरी करू, पण एकमतानें स्वराज्यघटना केल्याशिवाय सभा विसर्जन करू देणार नाहीं. आणि आम्ही पंचायतीमध्ये बसून आत काय करतो काय बोलतो याची एक शब्दानेंहि बाहेर परिस्फुटता होऊ देणार नाही." आम्हा हिंदुस्थानच्या लोकामध्ये दक्षिण-आफ्रिकेतील बोअर आफ्रिकांडर इंग्रज राष्ट्रीय साम्राज्यवादी गोऱ्या निमगोऱ्या लोकासारखे काही तरी निश्चयाचे बळ करारीपणा स्वार्थक्षमता व्यावहारिक शहाणपण शिस्त व सर्वंकष अशी राष्ट्रीय बुद्धि असती तर काय बहार झाली असती!

हिंदी लोकाना एकजुटीने स्वयंनिर्णयाचा अधिकार सरकारने दिला किंवा न दिला तरी तो आपल्या हाती घेऊन अशी एखादी पंचायत किंवा राऊंड टेबल कॉन्फरन्स भरवून स्वराज्यघटना एकमताने आम्ही ठरविली असती तर पूर्वी वचनबद्ध नसताहि सरकारला ती देत नाही म्हणणे कठीण गेले असते. म्हणून आम्हाला असे वाटते की, हल्ली नेमलेल्या कमिशनवर जर खरोखरच बहिष्कार घालण्याची लोकांची इच्छा असेल तर त्याचा खरा प्रकार म्हणजे राष्ट्रीय सभेने पुढारीपण घेऊन, किंवा निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या पुढाऱ्यानी एकत्र पुढे येऊन, आपल्या नावाने निमंत्रणे काढून पंचायत बोलवावी आणि दक्षिण-आफ्रिकेतील वसाहतवाल्यानी एकीच्या बळावर जशी स्वराज्याची योजना केली तशी एखादी हिंदुस्थानाच्या संबंधाने करावी. दुर्दैवाने राष्ट्रीय सभेने आजच्या तिच्या एककल्लीपणाने अशा कामी पुढारीपण घेण्याचा अग्रमान आपल्या हातानेच गमाविला आहे. पण निरनिराळ्या वर्गाचे पुढारी एकत्र झाले तरी त्याना ही वाण खचित भरून काढता येईल. जे काय पाहिजे ते शिस्तीचे प्रेम व निश्चयाचे बळ पाहिजे.

येत्या कमिशनवर बहिष्कार खरा परिणामकारक व्हावयाचा तर तो अशा राष्ट्रीय पंचायतीचे सक्रिय प्रत्युत्तर देऊन होईल. एरवी एकट्या लिबरल पक्षाने, एकट्या जात्यभिमानी पक्षाने, एकट्या राष्ट्रीय पक्षाने किंवा राष्ट्रीय सभेच्या एखाद्या माजी अध्यक्षाने नुसता आपल्यापुरता बहिष्कार पुकारूनच नव्हे, तर इतर विशेषप्रयत्न न झाल्यास, एकवटून बहिष्कार घालू म्हणण्यानेहि काही फारसे काम होणार नाही. कारण बहिष्काराचे शब्द संकीर्ण आवाजाने उच्चारल्यासारखे भासले तरी कोणाचा सूर खालचा तर कोणाचा सूर वरचा, कोणाचा प्रांजल तर कोणाचा कपटी, कोणाचा स्वार्थी तर कोणाचा निःस्वार्थी हे उमगण्याइतका धूर्तपणा म्हणजे स्वरसंज्ञान सरकारच्या कानात खचित आहे. हे सर्व लोक मिळून कमिशनच्या नेमणुकीला काही विधायक प्रत्युत्तर देतील तरच त्याला खरे तेज चढेल. एरवी लिबरल पक्ष कमिशनवर बहिष्कार घाला म्हणतो, मुसलमान पुढारी बहिष्कार घाला म्हणतो, कांग्रेस पुढारी बहिष्कार घाला म्हणतो, येवढ्याने या सर्वांचा अर्थ एकच आहे असे सिद्ध होणार नाही.

लिबरल म्हणणार कमिशनवर बहिष्कार घाला, कारण कमिशनच्या योजनेत सहविचाराला कायदे-

कौन्सिलच्या कमिट्या नेमणे हा एक भाग आहे. आणि त्या पक्षाचे पुष्कळ पुढारी आज कोणत्याहि कौन्सिलांत नाहीत व कमिशनवरहि नेमले गेले नाहीत. अर्थात् त्याना या कमिशनमध्ये किंवा सहविचारमंडळात कोठेहि स्थान नाही म्हणून बहिष्कार घाला असे ते म्हणत असण्याचा संभव आहे. सर अबदुल रहिम बहिष्कार घाला म्हणतात पण तो काय स्वयंनिर्णयाच्या सत्याग्रहानें! खचित नव्हे. निर्लेप पार्लमेंटरी कमिशन नेमले तर कदाचित् त्याच्यापुढे जातवार मतदारसंघ जातवार सरकारी नोकऱ्या जातवार प्रतिनिधी इत्यादि जातवारीच्या मागण्याची डाळ शिजणार नाही म्हणून. पण अशा निरनिराळ्या हेतूने निरनिराळ्या लोकांनी उच्चारलेला 'बहिष्कार' हा शब्द एकच असला तरी आतून तडे गेलेल्या भांड्याप्रमाणे त्याचा आवाज खणखणीत निघणे शक्य नाही. हाच बहिष्काराचा आवाज खणखणीत निघेल, पण तो केव्हां ? तर स्वयंनिर्णयाचे तत्त्व हिंदुस्थानाला लागू केले पाहिजे असा जो आग्रह १९१९ सालच्या व त्यापूर्वीच्या चळवळीत धरण्यात आला होता तोच सर्व पक्षाकडून आजहि सारखाच धरण्यात येईल तर. आणि स्वयंनिर्णयाचे तत्त्व खरे प्रस्थापित व्हावयाचे तर दक्षिण-आफ्रिकेत घडल्याप्रमाणे सर्व पक्षानी एकदिलाने राष्ट्रीय पंचायत नेमून तिचा निर्णय होईल तो आम्ही मान्य करू असे छातीठोकपणे सांगण्याची त्यांची तयारी झाली तरच होईल. एरवी सरकार कोणच्याहि कमिशनवर कसले तरी लोक नेमते आणि 'हे पाहा आम्ही हिंदी लोक नेमले' असे म्हणून स्वयंनिर्णय दिल्याचा बाहणा करते ही गोष्ट लोकांच्या परिचयाचीच आहे. हल्लीच्या कमिशनवर सरकारने चार हिंदी गृहस्थ नेमले असते तर आज बहिष्कार बहिष्कार म्हणून ओरडणाऱ्या कित्येक वर्गानीच उलटा उपदेश कसा केला असता व बहिष्कार घालू पाहणाऱ्या बाकीच्या पक्षांची टवाळी कशी केली असती याचीहि कल्पना आम्हाला सहज करता येते.

अर्थात् हे प्रांजलपणाचे विचार आमच्यापुरते झाले. म्हणजे आम्हा प्रजाजनात काय वैगुण्य आहे या दृष्टीने झाले. पण या वैगुण्याचा फायदा सरकारला या प्रस्तुत प्रसंगी घेता येत नाहीं असेच आमचे म्हणणे आहे. पोटात कपटबुद्धि ठेवून किंवा हिंदी लोकांची एकी होणे शक्य नाही हे आमचे मर्म ओळखूनहि का होईना आफ्रिकेतील वसाहतवाल्याप्रमाणे सरकारने आम्हाला पंचायतपद्धतीने स्वयंनिर्णय करण्याची संधि दिली असती व ती मग आम्ही घेतली नसती किंवा प्रयत्नात फसलो असतो तर आम्हाला नावे ठेवण्याला सरकार मोकळे आहे. पण वर दर्शविल्याप्रमाणे अशी कपटाची हुल्लड करूनहि म्हणजे सहज शंभरात एक संभव एक टक्का जोखीम सोसून चुकूनहि आम्हाला स्वयंनिर्णयाचा अधिकार देण्याची सरकाराची इच्छा नाही. म्हणूनच नोकरशाही व हिंदी प्रजा याना वादी प्रतिवादी बनवून, स्वतःकडे न्यायाधीशाचे काम घेऊन, काडीने काडी उडवून अखेर या कमिशनाकडे बोट दाखवून मोकळे होण्याचे सरकारने योजले असावे हे उघड दिसते. एरवी त्याच्या मनात या कमिशनवर हिंदी लोकांची नेमणूक करावयाचे आले असते तर त्याला योग्य अशी चार नावे सुचली नसती किंवा कोणी सुचविली नसती असे नाही. वाईट हिंदी लोक कमिशनवर नेमले जाण्यापेक्षा मुळीच न नेमले गेलेले बरे असाहि विचार वैतागाने मनात येऊ शकतो. कारण सरकारने हिंदी लोक नेमण्याचा बाहणा करावा आणि आपल्याच धाबळी खालची चार कबुतरे वर उडवावी व शेवटी त्यांच्या तोंडून आपल्याच मनचे वदवून हिंदी लोकाना व जगाला फसवावे असा प्रकार आपण नेहमी पाहतो. आणि त्यामुळें असा हा वैतागी विचार मनात येतो. पण हिंदी लोक या हल्लीच्या कमिशनवर न नेमण्यात या नेहमीच्या कपटधर्माशिवाय दुसरा एखादा प्रांजलपणाचा किंवा उदात्त हेतु होता हे सरकारच्या इतर कृत्यावरून नजरेस येईपर्यंत या आमच्या वैतागाचा फायदा सरकारला घेता येणार नाही. आणि हिंदी लोक कमिशनवर न नेमण्याच्या अपवादातून त्याना सुटता येणार नाहीं.

तात्पर्य हिंदी लोक कमिशनवर नेमले नाहीत, हे स्वयंनिर्णयाच्या हक्काच्या दृष्टीनें गैर झाले असे ज्या ज्या बहिष्कारवाल्याना वाटत असेल त्यांनी नुसत्या बहिष्कारापुरती तुमची आमची एकी होऊ द्या असे म्हणण्यापेक्षा स्वयंनिर्णयाचे निशाण आपण सर्व मिळून उभारावे, व स्वयंनिर्णय करावयाचा तर स्वार्थ व जातवार बुद्धि टाकून देऊन केवळ निर्भेळ राष्ट्रीय दृष्टीने राष्ट्रीय पंचायत बनवून तिचा निर्णय मान्य करण्याची तयारी जाहीर करावी, असे आमचे आग्रहपूर्वक सांगणे आहे. अशा तऱ्हेचे काही समर्पक व विधायक उत्तर दिल्याशिवाय कमिशनवरील वरवरचा बहिष्कार यशस्वी होणार नाही असे आम्हाला वाटते. हिंदी लोकांत खरी एकी होऊ शकते की नाही याचे सरकारला उत्तर देण्याला त्यानी हे एक प्रकारे स्पष्ट आव्हानच राष्ट्राला दिले आहे. यावर निरनिराळ्या पक्षांचे गट एकत्र जमून बहिष्काराचा विचार करतील खरे; तरी त्यापुढे एक पाऊल टाकून राष्ट्रीय पंचायत किंवा राऊंड टेबल कॉन्फरन्स भरवून ते

कसे यशस्वी करता येईल याचाहि कसून विचार करणें प्राप्त आहे म्हणून त्याचाच कसून विचार व्हावा अशी आमची सूचना आहे. निवळ 'बहिष्कार' एवढी रुक्ष चार अक्षरे उच्चारण्यापुरता सर्वांचा आवाज एकमेकात मिळून गेल्याने कोणाचेच खरे समाधान होत नाही.

# बोल्शेव्हिकांचे राज्यक्रांतीचे मार्ग

[ रेव्ह्यू दे द मोंदवरून ]

( लेखक—अ. ज. करंदीकर. )

लेखांक ३ रा

आतां सरकारी सत्ता आपल्या हातांत घ्यावयाच्या बोल्शेव्हिकांच्या मार्गाची माहिती सांगावयाची. ही माहिती मुख्यतः बोल्शेव्हिकांच्या प्रकाशांत आलेल्या कागदपत्रांवरून व प्रसिद्ध पुस्तकांवरून घेतली आहे. कम्युनिस्टांनीं राज्य चालविण्याची जबाबदारी अंगावर घ्यावयाची नाहीं ही गोष्ट पूर्वीच सांगितली आहे.यामुळें त्यांना तत्त्वनिष्ठ राहतां येतं व शिवाय इतरांचें दोषाविष्करण बेजबाबदारपणानें करतां येतें. त्यांतच एखादा पक्ष आपल्याला कम्यूनिस्टांचा पाठिंबा मिळावा म्हणून त्यांच्या कार्यक्रमांतील कांहीं भाग उचलून तो अमलांत आणूं लागला तर तिकडूनहि कम्यूनिस्टांचा फायदा आहेच. ळव येईल तेव्हां त्या पक्षाला उलथून पाडण्याला कम्यूनिस्ट मोकळेच. रशियांत लेनिनच्या अनुयायांनीं याच मार्गाचा अवलंब केला. प्रथम झारविरुद्ध ड्यूमाच्या पुढाऱ्यांना त्यांनीं मदत केली.नंतर ड्यूमाच्या पुढाऱ्यांना हुसकून देण्यासाठीं केरेन्स्कीला हातीं धरलें. मग काळ अनुकूल आहेसें पाहून केरेन्स्कीला पदच्युत करून त्यांनीं आपल्या हातीं अधिकार घेतला.

स्थानिक स्वराज्याच्या संस्था आगाऊ हस्तगत करून ठेवणें हा बोल्शेव्हिक कार्यक्रमाचा एक विशेष आहे. आजपर्यंत लोकसत्तावादी पक्षाच्या ज्या क्रांत्या झाल्या त्यांत केवळ केंद्रसत्ता तेवढी आपल्या कबजांत घेण्यावर कटाक्ष होता. यामुळें क्रांति झाली तर वरचे अधिकारी तेवढे बदलत, पण अधिकाराची अंमलबजावणी करणारे खालचे लोक तेच राहात. बोल्शेव्हिकांना असली वरवरची क्रांति नको असून त्यांना आमूलाग्र परिवर्तन घडवून आणावयाचें असतें. म्हणून स्थानिक स्वराज्याच्या संस्था स्वाधीन करून घेण्याचें फर्मान १९२४ सालीं सुटलें तेव्हांपासून पॅरिस व इतर महत्त्वाच्या म्युनिसिपालिट्यांमधून कम्यूनिस्टांचें वर्चस्व सारखें वाढत आहे.

## इतालींतील चळवळ

कम्यूनिस्टांचे क्रांतीच्या मार्गावरील पहिले डावपेंच पाहावयाचे असल्यास वाचकांनीं सर पर्सीव्हल फिलिप्स या आंग्ल लेखकाचें Red Dragoons and Black Shirts हें पुस्तक वाचून पाहावें. कम्यूनिस्टांनीं इटालींत क्रांति करावयाची ठरविल्यावर प्रथम मजुरांच्या सभा भरूं लागल्या. या सभांतून सर्व संपत्तीवरील व सर्व सुखसोयींवरील मजुरांच्या हक्कांचें प्रतिपादन व्हावयाला लागलें.पुढें वरिष्ठ वर्गाविरुद्ध युद्धाचा पुकारा झाला. मजुरांच्या हक्कावर सरकार व भांडवलवाले घाला घालीत आहेत असें निमित्त पुढें करून संप सुरू झाले. मग तडजोड करण्याच्या सरकारी प्रयत्नांचें पर्यवसान भांडवलवाल्यांना प्रतिक्षणीं माघार घ्यावयाला लावण्यात होऊं लागलें. अशा प्रत्येक विजयाबरोबर मजुरांच्या पुढाऱ्यांचा शिरजोरपणा अधिकच वाढला. मजूरसंघांत सामील नसलेल्या मजुरांना काम मिळण्याची पंचाईत पडूं लागली. या आर्थिक बहिष्काराच्या जोरावर मजूरसंघाच्या सभासदांची संख्या सारखी फुगत चालली. मजुरांतील एकजुटीमुळे सर्व म्युनिसिपालट्या त्यांच्या हातीं पडल्या व रेल्वे यूनियनच्या मार्फत दळणवळणाच्या मार्गावर कम्यूनिस्टांची सत्ता प्रस्थापित झाली. इकडे पार्लमेंटांतील सोशियालिस्ट पुढारी कम्यूनिस्टांना मदत करीत होतेच. 'राजाला पदच्युत करा' अशा आरोळ्या त्यांच्या भरपार्लमेंटांतून ऐकूं येत असत.

चळवळीचा पारा इतका चढावयाला सुमारें दोन वर्षे लागलीं. याच मुदतींत सैन्यामध्यें फंदफितूरी करण्याचें काम जारीनें सुरू होतें. त्याहिपेक्षां भयप्रद गोष्ट म्हणजे सैन्याचा स्वाभिमान नष्ट करण्याचा उपक्रम झाला होता ही होय.महायुद्धांत जखमी झालेल्यांचा व पेन्शनींत निघालेल्यांचा आपल्या आयुष्याची खराबी करून भांडवलवाल्यांची गुलामगिरी करण्याबद्दल उपहास चालू झाला ! कामावर असलेल्या लष्करी अधिकाऱ्यांवर रस्त्यांत दिवसाढवळ्या हल्ले करून त्यांचे युनिफॉर्म व पदकें हिरावून घेण्यांत येत होतीं. असल्या हल्ल्यांचा गोळीबारानें व रक्तपातानें प्रतिकार केल्यास लोकमत अधिकच क्षुब्ध होई. कित्येक प्रसंगीं गोळीबार झाल्यावर मजुरांनीं लष्करी अधिकाऱ्यांना आगगाडींत बसूं

देण्याचें नाकारलें व सरकारालाहि लष्करी अधिकाऱ्यांना आपला युनिफॉर्म घालून सार्वजानक ठिकाणीं जाण्याला मनाई करावी लागली!

## दंगे व संप

दंग्यांचा व संपांचा असा धुमाकूळ चालू असतांना टयूरिनच्या मजुरांनीं एके दिवशीं सर्व कारखाने आपल्या हातीं घेतले, मालकांना पिटाळून लावलें व इंजीनियरांची कत्तल केली. इतकें झाल्यावर राजानें लष्कराला चालून जाण्याचा हुकूम सोडला. पण आतां आधीं लष्करच जाग्यावर उरलें नव्हतें व रेल्वेच्या मजुरांनीं सैन्याची वाहतूक आधींच बंद करून टाकली होती.

पण बोल्शेव्हिकांचा हा प्रयत्न थोडा अकालीं झाला.त्या वेळीं प्रत्यक्ष राजसत्ता आपल्या हातीं घेण्याइतकी त्यांची तयारी नव्हती. शिवाय याच वेळीं मजूर पक्षांतून फुटलेल्या मुसोलिनीनें आपली स्वतंत्र संघटना उभारली होती. मुसोलिनीच्या कर्तबगारीपुढें अकिंचित्कर कम्यूनिस्ट पुढाऱ्यांना हार खावी लागली. पण त्यामुळें बोल्शेव्हिकांच्या कार्यक्रमाला कमीपणा येत नाहीं.कारण मुसोलिनीनें सत्ता बळकावण्याचा आपला धडा बोल्शेव्हिकांपासूनच घेतला होता.

प्रत्यक्ष क्रांतियुद्धाला प्रारंभ झाल्यावर बोल्शेव्हिकांची सर्व काळजी दूर होते. कारण लोकक्षोभाला क्रांतियुद्धाचें स्वरूप मिळण्यापूर्वीच तो शांत होईल कीं काय ही सर्वांत मोठी धास्ती दूर होते. पूर्वीची योजना परिपक्व झाली असल्यास क्रांतियुद्धांत कोठेंच हरकत येत नाहीं किंवा माघार घ्यावी लागत नाहीं. या युद्धप्रसंगीं देखील जनतेशीं कसें वागावयाचें व अधिकारी वर्गाशीं कसें वागावयाचे याविषयीचे बोल्शेव्हिकांचे नियम ठरलेले आहेत.

## लोकांशीं वागण्याचे नियम

(१) परोपजीवी वर्गाला भिवविण्यासाठीं मजुरांनीं सर्व रस्ते व्यापून टाकावेत, स्वतःच्या चौक्या बसवाव्या,गस्ती हिंडवाव्या,सर्वांचीं वाहनें अडवावीं.

(२) वर्तमानपत्रें बंद पाडावीं म्हणजे त्या लोकांना कोणतीहि बातमी कळणार नाहीं. बँका बंद कराव्यात म्हणजे त्यांना पैसे मिळणार नाहींत. त्यांचीं वाहनें काढून घ्यावीं. त्यांना एकत्र जमण्याला हरकत करावी.

(३) बँका, कारखाने, गिरण्या, भाड्यानें द्यावयाच्या चाळी, सर्व लोकोपयोगी संस्था 'राष्ट्रीय मालकी'च्या करून टाकाव्या.

(४)बँका,कंपन्या व भांडवलवाले यांजपासून सक्तीनें पैसे उकळून द्रव्यसाहाय्याची तरतूद करून घ्यावी.

(५) लोकपक्षाचीं झटपट न्याय देणारीं कोर्टें उघडणें व त्यासाठीं पोलिसांची तजवीज करणें,आपल्या नांवाचें कार्ड दाखविल्याशिवाय कोणालाहि रस्त्यांतून जाऊं न देणें, म्हणजे भांडवलवाले व इतर गुन्हेगार पळून जाण्याचा संभव कमी.

(६) भांडवलवाल्यांची व तत्पक्षीयांचीं शस्त्रें काढून घेणें.

## सरकार पक्षाशीं वागण्याचे नियम

(१)सर्व तऱ्हेचीं दळणवळणाचीं साधनें आपल्या ताब्यांत घेऊन केंद्रसत्तेचा इतर प्रांतांशीं असलेला संबंध तोडून टाकणें.

(२) त्याचप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांचा व स्थानिक लष्कराचा केंद्राशीं असलेला संबंध तोडणें. त्रासदायक व्यक्तींची विल्हेवाट लावणें.

(३) कम्यूनिस्ट पक्षाचें प्राबल्य असेल त्या त्या ठिकाणीं जुनी सत्ता उलथून पाडून अधिकार आपल्या हातीं घेणें.

( ४ ) जेथें आपला पक्ष प्रबल नसेल तेथें प्रत्यक्ष बंड करावयाचें नाहीं. मात्र त्या भागाचा इतर भागाशीं संबंध तोडून टाकावयाचा; म्हणजे हुकूम, वार्ता, द्रव्य, व मनुष्यसाहाय्य यांच्या अभावीं ते प्रांत आपोआपच शरण येतील. सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे पराजय टाळणें.

( ५ ) राज्यकारभाराच्या खात्यांना हात लावावयाचा नाहीं. तीं जशीं काम करीत असतील तशींच चालूं द्यावीं. शक्य तर मुख्याधिकार तेवढा कम्यूनिस्ट मंडळांना आपल्या हातीं घ्यावा.

(६) लष्कराशीं लढण्याचा प्रसंग टाळावा. निरनिराळ्या छावण्यांचें परस्परांशीं दळणवळण होऊं देऊं नये. अधिकाऱ्यांना पकडावें. सैन्याची संघटना विस्कळित करावी. शिपायांना लष्कर सोडून जावयाला चिथवावे. म्हणजे प्रथम एकटेदुकटे शिपाई मग मोठ्या टोळ्याच पळून जातील. फितूर शिपायांचें सैन्य एकत्र करून आपल्याला सैन्याचें पाठबळ आहेसें भासवावें. या सैन्याच्या साहाय्यानें इतर पलटणींना फितवावें.

लोकांच्या बरोबर वागण्याचे नियम हे वेढा पडलेल्या शहरांतील लष्करी अधिकाऱ्यांच्या वर्तणुकीचें हुबेहूब अनुकरण आहे. रात्र पडली कीं लोकांना घराबाहेर जाण्याची मनाई केली, दिवसा प्रत्येक चव्हाट्यावर आपल्या नांवाचें कार्ड दाखवावें लागलें, क्रांतिकारकांचे पुढारी कळूं देतील त्याखेरीज बातमी मिळत नाहींशी झाली, अपरिचित पोलिसांनीं रस्ते व्यापले, वाहनें जप्त झालीं, शस्त्रें काढून घेतलीं गेलीं, बँकांतून पैसे मिळत नाहींसे झाले; एकत्र जमण्याला हरकती येऊं लागल्या, कुटुंबासकट पळून जाण्याची सोय उरली नाहीं, म्हणजे परोपजीवी वर्गाची काय दशा होत असेल हें १९१७ तील रशियाच्या इतिहासावरून कोणालाहि

कळून येईल. त्या दिवसांत रशियांत असलेले लोक सांगतात कीं, क्रांतिकारकांचा प्रतिकार करण्याचीं साधनें मिळणें तर दुष्कर होतेंच, पण त्याहिपेक्षां एकमेकांची एकमेकांना बातमी मिळणें अधिक कठिण होतें. बाहेरच्या जगाची बातमी तर विचारावयाला नकोच. कारण बातमी विचारणें हाच गुन्हा होता. पळून जावयाचें मनांत आणले तरी जावें कोठें ? जाऊं तेथेंहि क्रांतिकारकांचें प्राबल्य असलें तर काय करतां ? बातमी मिळेनाशी झाली कीं भांडलवाल्यांचे हातपाय थंड पडतात. इंग्लंडच्या गतवर्षींच्या सार्वत्रिक संपांत वर्तमानपत्रें बंद पडल्यामुळें अधिकारी वर्गाची किती त्रेधा झाली होती हें वाचकाना आठवत असेलच.

## शासनपद्धतींतील दोष

सरकारावर आघात करण्याचे बोल्शेव्हिकांचे मार्ग विसाव्या शतकांतील शासनसंस्थांचें विशेष स्वरूप लक्षांत घेऊन निश्चित करण्यांत आले आहेत. बेसुमार केंद्रीकरण हा आधुनिक शासनसंस्थांचा सर्वांत मोठा दोष आहे. प्रांतोप्रांतीं पार्लमेंट व बलिष्ठ गव्हर्नर असते तर तितक्या ठिकाणीं स्वतंत्र क्रांत्या कराव्या लागल्या असत्या व एखाद्या प्रांतांत क्रांतीचा प्रसार झाला नसता तर तो प्रांत केंद्रसत्तेच्या संरक्षणाला धांवून आला असता. पण दुर्दैवानें फ्रान्समध्यें ही स्थिति नाहीं. तिचे प्रत्येक विभागाचे अधिकारी हे नुसते केंद्रसत्तेच्या हुकमाची अंमलबजावणी करणारे लोक असतात.टेलिफोननें वरिष्ठ अधिकाऱ्यांची सल्ला घेतल्याशिवाय हे कोणताच निश्चय करीत नाहींत. या संवयीमुळें आणीबाणीच्या प्रसंगीं स्वतंत्र बुद्धि चालवावयाला ते अगदीं नालायक असतात. शिवाय त्यांच्या स्थानिक तिजोरींत द्रव्याचा अभावच असल्यानें त्यांना फार दिवस दम धरतां येत नाहीं. विजेच्या मुख्य कारखान्यांत कांहीं तरी भानगड झाली कीं सारें शहर काळोखांत, अशीच सध्याच्या राज्ययंत्राची अवस्था आहे.

पूर्वी पॅरिसमध्यें बंड उद्‌भवलें कीं त्याचा हल्ला प्रथम सरकारी कचेऱ्यावर व पार्लमेंटच्या सभागृहावर होत असे. व अधिकारी लोकांना पकडण्यांत बंडवाले निष्कारण काळ घालवीत असतां सैन्य सज्ज होऊन बंडवाल्यांवर हल्ला करी व बंडाचा बींमोड करून टाकी. आतां बोल्शेव्हिक लोक व्यक्तींना धरण्याच्या भानगडींत मुळींच पडत नाहींत ते पहिल्या प्रथम टेलिफोन, पोस्ट, टेलिग्राफ व वर्तमानपत्रें यांवर आघात करतात;म्हणजे मग बातम्या मिळत नाहींत व हुकूम सुटत नाहींत ! एकदम सरकार उलथून पाडण्याकडे बोल्शेव्हिकांचा कटाक्ष नाहीं, सरकारला पक्षघात झाला तरी त्यांचें काम भागतें

टेलिग्राफ, टेलिफोन आणि पोस्ट यांजवर हल्ला करावयाचें कारण इतकेंच कीं तीं परत शत्रूंच्या हातीं जाऊं नयेत. वास्तविक पाहतां पूर्वतयारीच्या काळांतच हीं खातीं कम्यूनिस्टांनीं जिंकलेलीं असतात.कम्यूनिस्टांची सूचना मिळावयाचा अवकाश कीं सरकारचें टपाल वाटेंतच जप्त केलें जातें.आपल्या खात्यांतील क्रांतीची त्या खात्याच्या मुख्याधिकाऱ्याला कांहींहि दाद नसते. केरेन्स्कीच्या वेळीं असेंच झालें. तो आपल्या ऑफिसांत बसून आपल्या प्रधानांची व सेनापतींची वाट पाहात होता. पण याचे निरोप त्यांना पोंचत नव्हते व त्यांचे निरोप केरेन्स्कीला पोंचत नव्हते ! मुसोलिनीच्या रोमवरील स्वारीच्या वेळींहि हाच प्रकार घडून आला. मुसोलिनीची स्वारी येत आहे म्हणून कळल्यावर रोममध्यें प्रधानमंडळाची व मुख्य मुख्य अधिकाऱ्यांची बैठक बसली व त्यानीं हाताखालच्या सेनापतींना ही स्वारी थांबविण्यासाठीं, रोममध्यें मार्शल लॉ पुकारण्यासाठीं, मुसोलिनीला बंडवाला म्हणून जाहिरनामे काढण्यासाठीं हुकूम सोडवयाला सुरुवात केली ! पण या हुकमाचा एक शब्द देखील त्यांच्या बैठकीच्या जागेपलीकडे जाऊं शकला नाहीं. या अपूर्व बैठकीची हकीकत वाचकांनीं पर्सीव्हल फिलिप्सच्या पुस्तकांतून अवश्य वाचावी. येथें इतकें सांगितलें म्हणजे पुरें कीं, दुसऱ्याच दिवशीं मुसोलिनीनें रोम शहर व इटालीची राज्यसत्ता आपल्या हातीं घेतली. इटालीच्या लोकांच्या सुदैवानें ते एखाद्या लेनिनसारख्या लांडग्याच्या तावडींत न सांपडतां मुसोलिनीसारख्या मेंढपाळाच्या सत्तेखालीं आले एवढाच काय तो फरक. पण दोघांचेहि राज्यक्रान्तीचे व सत्ता मिळविण्याचे मार्ग एकच.

बोल्शेव्हिकांची तर्कशुद्ध विचारसरणी व धूर्तपणाचा कार्यक्रम यांचा मोह पडून हिंदुस्थानांतील एखाद्या पक्षानें त्यांच्या मार्गाचा अवलंब करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगावी हें स्वाभाविक आहे. पण हिंदुस्थानाच्या विशेष परिस्थितींत राज्यक्रांतीचे बोल्शेव्हिक उपाय उपयोगी पडतील असें दिसत नाहीं. केंद्रसत्तेचें स्थानिक अधिकारी वर्गाशीं असलेलें दळणवळण तोडून राज्यकारभार विस्कळित करणें व आपल्या संघटनेच्या जोरावर सत्ता आपल्या हातीं घेणें हें बोल्शेव्हिकांचें मुख्य सूत्र हिंदुस्थानाला लागू पडण्याजोगें नाहीं. कारण हिंदुस्थानांतील सत्तेचें केंद्र विलायतेंत आहे. कम्यूनिस्टांच्या मार्गानें हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळवावयाचें म्हणजे प्रथम विलायतचे लोक कम्यूनिस्ट झाले पाहिजेत. ( समाप्त )

# पार्लमेंटरी कमिशन

## व्हाइसरॉयांचें जाहीर पत्रक

पार्लमेंटरी कमिशनचीं नांवें जाहीर करतांना व्हाइसरॉयांनीं जें पत्रक प्रसिद्ध केलें आहे त्याचा आशय असा—आठ वर्षांपूर्वी ब्रिटिश पार्लमेंटानें हिंदी राज्यकारभारासंबंधीं एक कायदा केला. प्रतिनिधिक राज्यपद्धतीच्या साधनानें हिंदुस्थानाला जबाबदार राज्यपद्धतीचे ध्येय गांठतां येतें किंवा नाहीं हें अनुभवानें पाहाण्याचा त्यांत हेतु होता. त्यांतली कोणतीहि व्यवस्था वज्रलेप नसून अनुभव येईल त्याप्रमाणें तींत फेरबदल करावा अशा उद्देशानें दहा वर्षांनीं कमिशन नेमावें व त्या कमिशननें हिंदुस्थानाच्या प्रगतीविषयीं रिपोर्ट करावा असें त्या वेळीं ठरलें होतें.

हें कमिशन यापूर्वीच नेमलें जावें म्हणून हिंदी लोकांकडून प्रयत्न करण्यांत आले. पण ब्रिटिश सरकारला ती मागणी मान्य झाली नाहीं. जोंपर्यंत हिंदुस्थानांत असहकारितेचें गैरमुत्सद्दीपणाचें वातावरण पसरलें होतें तोंपर्यंत ब्रिटिश सरकारनें ही मागणी नाकारली. पण अलीकडे असहकारितेचें वारें कमी होऊं लागलें असून व्यावहारिक दृष्टीने विचार होऊ लागला आहे. अशा वेळीं गेल्या आठ वर्षांचें सिंहावलोकन करून त्यावरून हल्लींच्या रिफॉर्म ॲक्टाविषयीं मत प्रदर्शित करण्याकरितां आतांच कमिशन नेमण्याचे ठरविलें आहे. कारण कमिशनपुढें साक्षीपुरावा येऊन रिपोर्ट तयार होऊन त्या रिपोर्टास अनुसरून नवीन योजना तयार होईपर्यंत बराच कालावधि लागणार; त्यामुळें नवी योजना चालू करण्यास गैरवाजवी विलंब होईल म्हणून हें कमिशन आताच नेमण्यांत येत आहे.

हल्लीं हिंदुस्थानांत हिंदू—मुसलमानांत व हिंदूच्या जातीजातींत वैमनस्य पसरलें आहे. अशा वेळीं हें कमिशन नेमूं नये अशी सबब आम्हास सहज सांगतां आली असती; पण हिंदू—मुसलमानांत जो कलहाग्नि धुमसत आहे तो भीतीमुळें व संशयामुळेंच इतका वाढला आहे. भावी राज्यव्यवस्था कशा प्रकारची होणार आहे हें निश्चितपणें न समजल्यानेंच हे तंटे वाढत आहेत. अर्थातच ह जातीजातींतील तंटे बंद झाल्याशिवाय कमिशन नेमावयाचें नाहीं म्हटल्यास तें कधीच नेमण्याचा प्रसंग येणार नाहीं; ही आपत्ति टाळण्याचा उपाय कमिशन नेमणें हाच होय व त्याकरितांच हे दंगेधोपे बंद होण्याची वाट न पाहातां कमिशन नेमण्यांत येत आहे.

कमिशनवर सोंपविलेलें काम अतिशय कठीण आहे. या कमिशननें जी माहिती मिळवावयाची तींत हल्लींची राज्यपद्धति कशी चालली आहे, शिक्षणाची वाढ किती झाली, प्रातिनिधिक राज्यपद्धतीच्या तत्त्वाचीं बीजें या भूमींत कितीशीं रुजलीं; या व याचसारख्या इतर प्रश्नांची माहिती मिळवून कमिशनर्स रिपोर्ट सादर करतील. आणि त्या रिपोर्टास अनुसरून जबाबदार राज्यपद्धति कितपत अमलांत आणावी व हल्लींच्या पद्धतींत वाढ करावी का दुरुस्ती करावी किंवा छाटाछाट करावी व त्याचप्रमाणें प्रांतिक कायदेमंडळांनाहि दुहेरी कौन्सिल द्यावें कीं काय याचा विचार व्हावयाचा आहे.

या कमिशनला हिंदुस्थानांतील गेल्या आठ वर्षांतील कारभाराचें यथातथ्य वर्णन पार्लमेंटपुढें करावयाचें आहे. त्याचप्रमाणें या वस्तुस्थितीपासून जी भावी योजना अमलांत आणणे योग्य वाटेल ती योजना सुचविण्याचीहि कमिशनर्सची तयारी पाहिजे. अर्थातच कमिशनर्स हे पूर्वग्रहापासून अलिप्त आणि कार्यक्षम असे असले पाहिजेत. आणि ज्या कमिशनमध्यें हिंदी सभासद आणि नोकरशाहीतले सभासद समाविष्ट होतील तें कमिशन असें अगदीं निर्लेप व निःपक्षपाती कसें राहील ? आणि असल्या संमिश्र कमिशनचा रिपोर्ट अगदीं यथार्थ स्वरूपाचा आहे असें पार्लमेंटला तरी कसें वाटेल ?

याकरितां ज्यांच्या शब्दांवर पार्लमेंटला निर्धास्तपणे विश्वास ठेवतां येईल अशा हिंदुस्थानाला त्रयस्थ अशा सभासदांचें कमिशन नेमण्यांत येत आहे. कमिशनमधील गृहस्थांचीं नांवें पुढें दिल्याप्रमाणें—

१ **अध्यक्ष**—सर जॉन सायमन.

२ **सभासद**—व्हायकौंट बर्नहॅम, लॉर्ड स्ट्रॅथकोना, ना. ई. कॅडोगन, ना. स्टीफन वॉल्श, कर्नल जॉर्ज लेनफॉक्स, मेजर सी. आर. ॲटली.

पार्लमेंटाच्या ज्या सभासदांची या कमिशनवर नेमणूक केली गेली आहे त्यांनीं साक्षीपुरावा अमुकच पद्धतीनें घ्यावा असें आम्ही त्यांना सांगूं शकत नाहीं. तथापि रिफॉर्म्स कायद्याची दुरुस्ती करण्याची योजना पुढें येण्यापूर्वीं आणि ती योजना पुढें आल्यानंतरहि हिंदी लोकमत कळण्यासाठीं कायदेमंडळाच्या कमिटीचें मत कमिशनर्सनीं मागवावें आणि कमिशनर्सनीं त्या

मताची आपल्या इच्छप्रमाणें तपासणी करावी असें त्यांस सुचविण्यांत येत आहे.

कमिशननें जो साक्षीपुरावा घ्यावयाचा आहे त्यांत कांहीं तत्त्वाचा भाग असेल व कांहीं तपशिलाचा म्हणजे बजावणीखात्याचाहि भाग असेल. एवढ सगळेंच काम कमिशनर्सना उरकणार नाहीं. याकरितां बजावणीखात्याच्या संबंधाचा तपशिलाचा भाग कमिशननें दुसऱ्या एखाद्या कमिटीकडे सोंपविल्यास बरें, असें आम्हास वाटतें.

याकमिशननें केलेला रिपोर्ट हिंदुस्थानसरकार व ब्रिटिश सरकार यांनी तपासल्यानंतर ब्रिटिश सरकार नव्या बिलाचा मसुदा तयार करून पार्लमेंटपुढें मांडील. परंतु हिंदी लोकमत प्रदर्शित करण्याला संधि दिल्याखेरीज तें बिल पास करण्यांत येणार नाहीं. त्या बिलाचा विचार करण्याकरितां जॉइंट पार्लमेंटरी कमिटी नेमण्यांत येईल व त्या कमिटीशीं विचारविनिमय करून आपलें मत सांगण्याकरितां हिंदी कायदेमंडळांचे प्रतिनिधी आणि स्वतंत्र साक्षीदारहि विलायतेस बोलावण्यांत येतील आणि जॉइंट कमिटीपुढें त्यांच्या साक्षी झाल्यानंतर मग पार्लमेंट त्या बिलाचा अखेर निर्णय करील.

या कार्यक्रमाच्या पद्धतीने हिंदी लोकांना पार्लमेंटच्या सभासदापुढें व जॉइंट कमिटीपुढें आपलें मत मांडण्याला व त्यांची खात्री करण्याला संधि मिळणार आहे. आणि हिंदी लोकांना माझें असें आव्हान आहे कीं, त्यांचा पक्ष जर खरा असेल तर त्यांनीं या संधीचा फायदा घेण्यास पुढें यावें आणि पार्लमेंटच्या सभासदांची खात्री पटवून द्यावी. हा कार्यक्रम आणि विशेषतः कमिशनमध्ये हिंदी सभासदाचा समावेश न होणे या संबंधानें कित्येकांकडून आक्षेप घेण्यांत येतील. पण त्यांना माझें असें सांगणे आहे कीं, त्यांनीं या कमिशनपुरताच विचार न करतां ही सगळी योजना सलग एक आहे असें समजून तिची छाननी करावी. यांत मतभेदाला व टीकेला जागा असली तरी तो मतभेद व ती टीका मित्रत्वाच्या नात्याने करावी. मतभेद असले तरी त्यांत पराचा कावळा करूं नये. आपल्यापुढें हा जो बिकट प्रश्न येऊन पडला आहे तो आपण एकविचारानें झटूं तर जसा सुटेल तसा तुटकपणानें सुटणार नाहीं. यास्तव ज्या प्रश्नावर हिंदमातेचे व तिच्या संततीचें एवढें हिताहित अवलंबून आहे त्या प्रश्नाचा निर्णय आपण एकविचाराने व शहाणपणानें लावाल अशी मी मनःपूर्वक आशा बाळगतों.

# एक नमुनेदार समारंभ

रविवार ता. ६ रोजीं भवानी पेठेंत श्री. डावरे यांच्या जागेंत **ठाकूर रघुराजसिंग** यांस त्यांच्या शौर्याबद्दल बक्षीस देण्याचा समारंभ झाला. बक्षीस म्हणून एक परशु व कट्यार हीं हत्यारें दिलीं. मानपत्रहि दिलें व शंभर रुपयांची थैली पेठकर मंडळी लवकरच वर्गणी करून देणार आहेत. सभेत गुप्ते वकील, जाधव, नलावडे वगैरेंचीं भाषणें झाल्यावर अध्यक्ष **न. चिं. केळकर** म्हणाले, “आजच्या समारंभाला पोलीस अधिकारी पाहिजे होते. किंबहुना पोलीस सुपरिंटेंडंट यांनीच आपल्या हातानें हीं बक्षिसें द्यावयास पाहिजे होतीं. कारण रघुराजसिंग यानीं दरोवडेखोर पकडून पोलिसांचेंच काम केलें. अशीं बक्षिसें पोलीसखात्यांतहि देतात. रघुराजसिंग यांच्या अंगावर पोलीसखात्याचा डगला नसला तरी ते सहकारी स्वयंसेवक पोलीसच होत. या गृहस्थानें स्वतः निःशस्त्र असतां सशस्त्र दरोवडेखोरास पोलिसाच्या स्वाधीन करीपर्यंत पकडून ठेवलें. त्याच्या पोटावर चार जखमा झाल्या. आंतडी बाहेर पडण्याइतक्या मोठ्या व खोल जखमा होत्या! हा मनुष्य प्रत्यक्ष लढाईवर गेला असता तरी अधिक शौर्य तें काय दाखविता ! लढाईंत असें शौर्य दाखविणाराला बहुमानार्थी तरवार बक्षीस देतात. पण हत्यारांच्या कायद्यामुळें आपणास तरवारहि देण्याघेण्याला पारखी झाली आहे. सरकारनें या बाजूनें लोकांना पंगू केलें आहे. हत्यार हें नाव घेतांच पोलीस डोळे वटारतात व लोक घाबरून जातात. पण सरकारचा हा जाच संभावित भल्या लोकांना मात्र होतो. चोर दरोवडेखोर बदमाष लोकांना अद्यापि सरकार झडत्या घेऊन निःशस्त्र करूं शकत नाहीं. ते तीं शस्त्रें धाडसाच्या मदतीला घेऊन दरोवडे घालतात, खून करतात. आपण लोकांचें संरक्षण पूर्णपणे करीत नाहीं व लोकांजवळ तें संरक्षण करण्याचीं साधनें राहूं देत नाहीं हा दुहेरी अन्याय करतों हें सरकारच्या लक्षांत कसें येत नाहीं ! ज्या देशांत हत्यारांचा कायदा नाहीं तेथें लोक हत्यारें सर्रास बाळगतात म्हणून कांहीं तेथें गुन्हे अधिक होत नाहींत. पण आपणांहि आतां कायदा सांभाळून हत्यारें वापरण्यास शिकलें पाहिजे. नऊ इंच पात्याची मर्यादा असेल तर भर मर्यादेपर्यंत हत्यार वापरून तरवारी मोठें जंबिये वापरण्याच्या हक्काकरितां

झगडलें पाहिजे. दिवस असे आले आहेत कीं ज्यानें त्यानें स्वसंरक्षण करण्याला तयार झालें पाहिजे. आत्मसंरक्षण करण्याला पिनल कोडानेंहि पुष्कळ सवलत दिली आहे. पोलीस संरक्षण करून किती करणार? हल्लीं पोलीसखात्यांत वरच्या लोकांचे पगार मात्र फार वाढले असून गरजेइतकी खालीं जवानांची संख्या ठेवली जात नाहीं. बाजारपेठा सरकाराला प्राप्तीवरील कर किती तरी देतात. मग त्यांच्या पेठांत पूर्वी असलेले चौकी-पहारे कमी कां व्हावे ? पण हें भांडण भांडत बसण्यापेक्षां आधीं ज्या त्या पेठेंतील लोकांनीं आपलें संरक्षण करण्याच्या मार्गाला लागलें पाहिजे. पेठेंत आज जो एकावर घाला तोच उद्यां दुसऱ्यावर असें समजून यत्किंचित् कोणावर संकट आलें असतां सगळ्या पेठेनें धांवून गेलें पाहिजे. तसेंच पेठेंतील जे तरुण धाडसी जवान मर्दुमकी करण्यासारखे असतील त्यांची संघटना करून त्यांनीं गुण प्रकट केल्यास त्यांना असेंच उत्तेजन दिलें पाहिजे.”

# कमिशनच्या तोंडीस तोंड द्या

हिंदुस्थानांतील सुधारणांच्या बाबतींत नेमावयाच्या पार्लमेंटरी कमिशनची वार्ता जाहीर होऊन पुरते दोन आठवडेहि झाले नाहींत तोंच अखिल भरतखंडांत त्या कमिशनविरुद्ध सर्वत्र सभा भरून बहिष्कार पुकारण्यांत आला. यावरून सरकारचें हें अपकृत्य हिंदी लोकांना किती उपमर्दकारक वाटत आहे याचें आपोआपच प्रत्यंतर आलें. परंतु बहिष्कार पुकारण्यांत सर्वांचींच कारणें सारख्या स्वरूपाचीं नाहींत आणि त्यामुळें यांतील कांहीं सूर परस्परांशीं आंतून विसंवादी असल्यानें बहिष्काराचें गाणें अखेरपर्यंत सुरेल राहील कीं नाहीं याची आम्हास शंका वाटते. पण कमिशनच्या नेमणुकींत सरकारनें एवढी घोडचुकी केली आहे कीं तिच्यामुळें अत्यंत थंडगार प्रकृतीच्या माणसांच्या अंगाचाहि भडका उडाला आहे. आणि या संतापाच्या भरांत इतर किरकोळ मतभेद नाहींसे होऊन कमिशनवर पुकारावयाच्या बहिष्कारासंबंधानें सहसा कोठेंहि विरोध दिसून आला नाहीं. तीन दिवसांपूर्वी मुंबईस भरलेल्या प्रचंड जाहीर सभेंत सरकारच्या ‘सर’ पदवीनें भूषित झालेले दिनशा माणिकजी पेटिट हे अध्यक्ष होते; सर चिमणलाल सेटलवाड हें मुख्य वक्ते होते; बॅ. जयकर व जिना यांनीं त्यांना दुजोरा दिला; आणि व्यापारी वर्गाचे पुढारी सर फेरोझ सेटना व रतनसी मुरारजी यांचीं नांवें जम्नादास मेथा, हॉर्निमन वगैरेंच्या जोडीनें वक्त्यांच्या यादींत झळकत होतीं. यावरूनहि ही गोष्ट अत्यंत स्पष्टपणें निदर्शनास आली. तथापि एवढ्या अल्पकालीन ऐकमत्यानें हुरळून न जातां हें मतैक्य कायमचें कसें टिकेल आणि मुख्यतः तें प्रभावशाली कसें होईल याचाच या वेळीं राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं काळजीपूर्वक विचार केला पाहिजे. बहिष्कार सक्रिय व विधायक होईल तरच तो बिनशर्त घालण्यांत स्वारस्य व फायदा.

पार्लमेंटरी कमिशनची योजना कानीं पडतांच या कमिशननें आपल्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला बाध येतो म्हणून कित्येक असहयोगी सरकारावर चरफडूं लागले आहेत तर इतर बहुतेकांनीं सरकारनें राऊंड टेबल कॉन्फरन्स बोलावलें नाहीं, किंवा कमिशनवर हिंदी प्रतिनिधी घेतले नाहींत, किंबहुना कायदेमंडळाच्या कमिटीला देखील कमिशनच्या सभासदांच्या बरोबरीचा दर्जा न देतां त्यांना केवळ साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत उभें करण्याचा विचार प्रगट केला या अपमानकारक गोष्टीविरुद्ध आक्षेप घेतला आहे. त्यांत पहिला जो निर्भेळ स्वयंनिर्णयी पक्ष आहे त्याचें केव्हांच कशानेंहि समाधान होण्यासारखें नसल्यानें त्यास आम्ही एवढीच सूचना देतों कीं, ज्या वेळीं ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थान देश आपल्या आधिराज्याखालीं घेतला त्या वेळेसच स्वयंनिर्णय ठार झाला. आणि ज्या दिवशीं हिंदी राष्ट्र पुनः निर्भेळ स्वतंत्र होईल त्याच वेळीं स्वयंनिर्णयाचें पुनरुज्जीवन होणार आहे. पार्लमेंटाच्या किंवा व्हाइसरॉयांच्या कोणत्याहि संजीवनी मंत्रानें हिंदुस्थानाचा स्वयंनिर्णय खरा व पुरा सजीव होऊं शकत नाहीं. तेव्हां हा स्वयंनिर्णयाचा वाद या वेळींच कशाला पुढें आणतां ? तो वाद कायमचाच चालू आहे आणि कमिशन आलें व गेलें तरी कधींहि न मिटणाऱ्या या वादाचा या कायद्याच्या वादाशीं कांहीं संबंध नाहीं. तेव्हां सध्यांच्या वादांत निर्भेळ स्वयंनिर्णयाचा मुद्दा गैरलागू असल्यानें तूर्त तो बाजूस ठेवलेलाच बरा.

निर्भेळ स्वयंनिर्णय जर आज शक्य नाहीं तर मग कमिशनमध्यें हिंदी सभासद न घेतले अगर असेंब्लीच्या कमिटीला कमिशनरांच्या बरोबरीचा अधिकार न दिला तर त्यांत तरी तुमचें काय बिघडलें ? असा आक्षेप कदाचित् पुढें येईल. पण त्याचा निर्वाह असा

कीं, हिंदी जनतेला कोणती राज्यपद्धति हितावह आहे हें टरविण्यांत हिंदी लोकांच्या मताला जितक्या प्रमाणांत वाव मिळेल तितक्या प्रमाणांत स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा बाज संभाळला गेला असे होणार आहे. आणि एवढ्या संकुचित स्वयंनिर्णयाला देखील ब्रिटिश सरकारनें मान्यता दिली नाहीं म्हणूनच हिंदी राष्ट्रपुरुषाच्या अंगाचा तिळपापड होत आहे. आरोपी म्हणून कोर्टापुढें जबानीकरितां खेचलें जाणें आणि बरोबरीच्या नात्यानें सहकार्य करून एखाद्या गोष्टीचा ऊहापोह करण्याचा अधिकार दिला जाणें या दोहोंत जमीन अस्मानाचें अंतर आहे. आणि प्रस्तुतच्या सरकारी योजनेंत असेंब्लीच्या कमिटीला ज्यूरीच्या किंवा असेसरांच्या इतकाहि अधिकार न देतां तिची केवळ साक्षीदार म्हणून बोलवण केली जाणार असेल तर हा अपमान हिंदी राष्ट्रानें केव्हांहि निमूटपणें सहन करतां कामा नये.

तात्त्विक दृष्टीनें हा एथवर विचार झाला. पण याच्याहिपेक्षां सूक्ष्म अशा व्यावहारिक दृष्टीनें सरकारच्या या कृतीचें निरीक्षण केल्यास हें केवळ पांढऱ्या पायांचें पार्लमेंटरी कमिशन हिंदी राष्ट्राच्या बऱ्याकरितां येत नसून तें सुधारणांच्या मुळावरच घाव घालील कीं काय अशीहि जबर शंका येते म्हणून त्याचा सक्रियप्रतिकार करण्यास लागलें पाहिजे. जर्मन महायुद्धाच्या कचाट्यांत सांपडल्यावेळीं हिंदी राष्ट्राला संतुष्ट राखून त्याजकडून द्रव्यबल व मनुष्यबल उकळण्याकरितां १९१७ सालची जबाबदार राज्यपद्धतीची जाहीर घोषणा करण्यांत आली. आणि कॅले बंदर देखील जर्मन घेतात कीं काय अशी जेव्हां अत्यंत आणीबाणीची वेळ आली होती त्या वेळीं मॉटेग्युसाहेबांचा रिपोर्ट लिहिला गेला! अर्थातच त्यावेळीं हिंदी राष्ट्राला कुरवाळून त्याची कांहीं तरी समजूत काढण्याची आवश्यकता तीव्रपणें भासत असल्यामुळें सुधारणांचा एवढा हप्ता तरी हिंदी राष्ट्राच्या पदरांत पडला. मॉटेग्युसाहेबांचा रिपोर्ट तयार होणें आणि प्रत्यक्ष रिफॉर्म्स आक्ट पास होणें यांच्या दरम्यान महायुद्ध संपून संयुक्त राष्ट्रें विजयी झाल्यानें मॉटेग्युसाहेबांनीं जेवढा संकल्प सोडला होता तेवढाहि आमच्या पदरांत पडला नाहीं हें खरें. परंतु पोटावळ्याच्या पोटांत कितीहि दुखलें तरी तो प्रत्यक्ष नकार देऊं शकत नाहीं या दृष्टीनें नोकरशाहीलाहि त्या वेळीं, चरफडतच कां होईना, पण कशाबशा नव्या सुधारणा अमलांत आणाव्या लागल्या. परंतु त्यावेळचा सूड आतां उगवून घेण्याचा नोकरशाहीचा व विलायतेंतील तिच्या पित्त्यांचा इरादा दिसत आहे. आणि एवढ्याकरितांच रिफॉर्म्स आक्टाच्या ८४ व्या कलमांत असलेली दहा वर्षांची मुदत मुद्दाम दुरुस्ती बिलानें आठ वर्षांवर आणून आतांचें हें कमिशन कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाच्या अमदानीच्या आंत बार उडवून देण्याकरितां नेमलें जात असावें असा संशय घेण्यास वाटेल तितके आधार सांपडण्यासारखे आहेत.

अशा या कपटनाटकांतील गुप्त कारभाराचा अगाऊ सुगावा लागूं नये म्हणूनच या कमिशनमधून हिंदी लोकांस खड्यासारखें वेगळें काढण्यात आलें असावें.नाहीं तर हिंदुस्थानांतील ३५कोटि लोकसंख्येंत सरकारला आपल्या पूर्ण विश्वासाचीं पांचचार माणसें आढळलीं नसतीं असें नाहीं. परंतु कितीहि मवाळांतला मवाळ आणि सरकारचा मिंधा इसम शोधूनकाढला तरी तो देखील मॉटेग्युसाहेबांच्या रिपोर्टाच्याहि मागें जाऊन पीछेहाट करा असें म्हणण्यास कबूल कसा होईल? एवींतेवीं कमिशनमध्यें नेमणूक करून देखील त्यास अखेर नाखुष करावयाचेंच. मग तेवढ्यासाठीं कमिशनच्या भ्रमाचा भोपळा मात्र आगाऊ फुटण्याची जोखीम अंगावर कां घ्या? त्यापेक्षां हिंदी लोकाना कमिशनवर मुळींच न घेतां आपल्या निःपक्षपातीपणाची बतावणी करणेंच बरें असा बर्कनहेड आणि कंपनी यांनीं पोक्त विचार ठरविलेला आहे कीं काय कळत नाहीं!

हिंदी सभासद कमिशनवर घेतल्यास नोकरशाहींतलेहि प्रतिनिधी कमिशनवर घ्यावे लागतील असला कोटिक्रम कित्येकांकडून पुढें येतो. परंतु हल्लींच्या कमिशनमध्यें प्रत्यक्ष सिव्हिल सर्व्हंटस नसले तरी त्यांचे बाप आजे मामे कोणीना कोणी तरी कमिशनमध्यें आहेतच. शिवाय कमिशनच्या सेक्रेटरीचें काम करण्याच्या निमित्तानें सभासदांच्या दिमतीस फर्डेशाही सिव्हिलियन कामगार दिला जाईल. आणि कलेक्टरसाहेबाच्या सहीनें प्रसिद्ध होणाऱ्या रिपोर्टांतला केवढा भाग स्वतः कलेक्टरचा आणि केवढा भाग त्याच्या शिरस्तेदाराचा असतो याचा ज्यास अनुभव आहे त्यास या भावी कमिशनच्या रिपोर्टांत सिव्हिल सर्व्हंटांचा हात किती दूरवर पोंचूं शकेल त्याचा अंदाज करतां येईल. सारांश, हिंदी लोकांचे प्रतिनिधि कमिशनवर न घेण्यांत जो निःपक्षपातीपणाचा डौल मारण्यांत येतो तो किती पोकळ आहे हें यावरून वाचकांच्या लक्षांत येईल.

या कमिशनपुढें ज्या प्रश्नांची मुख्यतः शहानिशा होणार आहे त्यात गेल्या आठवर्षांत शिक्षणाची वाढ किती झाली, मतदारसंघांना आपली जबाबदारी कितपत कळूं लागली, मतदारांचें आपल्या प्रतिनिधींच्या कामाकडे कितपत लक्ष असतें,

द्विदल राज्यपद्धति कितपत यशस्वी झाली, जीं सोंपीव खातीं दिवाणांच्या हातीं दिलीं गेलीं त्यांचा कारभार कसा काय चालला आहे, कर वाढविण्याच्या योजनांना कौन्सिलाकडून कितपत विरोध होतो, आणि यापुढील हप्ता म्हणून पोलीस-खातें व न्यायखातें दिवाणाकडे द्यावयाचें म्हटल्यास शांततेच्या व सुव्यवस्थेच्या दृष्टीनें तें कितपत शक्य व श्रेयस्कर आहे इत्यादि प्रश्न प्रामुख्येंकरून येणार. आणि या प्रश्नांवर नोकरशाही व तिचे विलायतेतले भाईबंद यांचा अभिप्राय हिंदी राष्ट्राला कितपत अनुकूल ठरेल याचा विचार करण्याचेंहि कारण नाहीं.

कमिशनचे अध्यक्ष सर जॉन सायमन हे आतांपासूनच असें सांगूं लागले आहेत कीं, पाश्चात्य राष्ट्रांतील लोकशाहीची पद्धति पौर्वात्य राष्ट्रावर जुलमानें लादण्याची माझी बिलकुल इच्छा नाहीं ! या सोज्वळ सद्हेतूच्या नांवाखालीं मतदारीच्या हक्कांची गळचेपी करण्याचा इरादा दडून बसला नसला तर भाग्यच समजावयाचें ! हिंदी राष्ट्राचे कट्टे शत्रु लॉर्ड सिडनहॅम हेहि असा इषारा देऊं लागले आहेत कीं, प्रबळ अल्पसंख्याक असे मुसलमान ब्रिटिश सरकारचे दोस्त व मांडलीक असे शेंकडोशें राजे व संस्थानिक, आणि हिंदुस्थानांत कोट्यवधि रुपयांचें भांडवल गुतवून बसलेले ब्रिटिश व्यापारी यांच्या हितसंबंधास कोणत्याहि प्रकारें बाध येणार नाहीं आणि हिंदुस्थानांत शांतता व सुराज्य नांदेल अशा स्वरूपाची नवी राज्यघटना केली तरच ती ब्रिटिश पार्लमेंटास पसंत पडेल! अशा या सर्व व्यक्त चिन्हांवरून भावी कमिशनचा रिपोर्ट कोणत्या वळणावर जाणार याचा अंदाज थोडाबहुत तरी आजच करण्यास हरकत नाहीं. याकरिताच आमचें असें निक्षून सांगणें आहे कीं बहिष्कार नुसता जाहीर करण्यानें आपलें कर्तव्य संपत नसून आपल्या कर्तव्यास नुसती सुरुवात होते. नुसता बहिष्कार हा निष्क्रिय आहे. तो स्वतः काही भावी संकटाचा प्रतिकार करूं शकत नाहीं. याकरितां बहिष्काराला सक्रिय स्वरूप देऊन त्याच्या जोरावर भावी अरिष्टाचा प्रतिकार करण्यास झटलें पाहिजे. मिस मेयोचें पुस्तक हेंहि एक नोकरशाहीच्या हातांत मिळालेलें नवें हत्यार असून स्वराज्याच्या भावी लढ्यांत नोकरशाहीकडून तें हत्यार हिंदी लोकांविरुद्ध चालविलें जाण्याचा संभव असल्यानें तें हत्यार जेणेंकरून बोथट होईल असा प्रतिकाराचा उपाय प्रथम योजिला पाहिजे. याकरितां या पुस्तकांतील खोडसाळ विधानें खोडून काढून पाश्चात्यांच्या समाज व्यवस्थेशीं तुलना करून पाहतां पौर्वात्य समाज किती सोज्वळ आहे तें दाखवून देऊन मजूर पक्षाचा गैरसमज दूर केला पाहिजे.

सायमन कमिशनचा रिपोर्ट हें प्रतिपक्षाच्या हातीं लागणारें दुसरें शस्त्र होय. प्रस्तुत प्रसंगीं या शस्त्राच्या प्रहाराला मुख्यतः जपलें पाहिजे. कमिशनमध्यें हिंदी सभासदांचा प्रवेश झाल्यास ते सभासद कमिशनच्या रिपोर्टांतच इतर सभासदांच्या हेत्वाभासात्मक विचारसरणीचा खरपूस समाचार घेतील. आणि तसे सभासद घेतले नाहींत तर असेंब्लीनें नेमावयाच्या कमिटीलाच तें काम करावें लागेल. रिफॉर्म्स आक्टानें एका रुपयांतला पुरता दोन आणे देखील अधिकार हिंदी लोकांच्या हातीं निर्वेधपणें दिला नसून, आठ वर्षांच्या अवधींतच सुधारणा किती झाली, कोठें झाली, कशी झाली याची चौकशी करणें हा अत्यंत कावेबाजपणा होय. म्हणून यालाहि जनतेच्या वतीनें समर्पक उत्तर मिळण्याची तरतूद केली पाहिजे. त्या उत्तरात गेल्या आठ वर्षांतील प्रत्यक्ष प्रगति तर नमूद होईलच. पण त्याबरोबरच सरकारकडून दिवाणांच्या मागणीप्रमाणें बजेटांतून रक्कम न मिळाल्यानें सोंपीव खात्यांची उपासमार कशी झाली, सोंपीव खात्यांतील वर्गावर्गी व नेमणुका यासारख्या क्षुल्लक कामांतहि गव्हर्नरसाहेबांचा दिवाणांना केवढा सासुरवास सोसावा लागतो, नवीन सुधारणा घडवून आणण्यास जुन्या म्हणून डोईजड बनलेल्या त्या त्या खात्यांतील इंपीरिअल सर्व्हिसच्या कामगारांची संकुचित दृष्टि कशी आड येते, इत्यादि प्रगतिप्रतिबंधक कारणांचाहि पाढा वाचला गेला पाहिजे.

सक्रिय बहिष्काराचें तिसरें व खरें महत्त्वाचें अंग म्हणजे स्वराज्ययोजना तयार करणें हें होय. सरकारच्या वतीनें कमिशनकडून जी योजना मांडली जाईल तिला ठणठणीत उत्तर म्हणून आपली एक सर्वमान्य योजना मांडण्यांत यावी. कमिशनमध्यें हिंदी सभासदांचा समावेश झाला असें गृहीत धरलें तरी त्यांना पुढें करण्याला एक योजना हवीच. हिंदी सभासद कमिशनवर न घेतां कायदेमंडळाच्या कमिटीकडे तीच कामगिरी सोंपविली गेली, तरी त्या कमिटीलाहि आपली योजना सांगावीच लागेल. आणि तेवढीहि सवलत न मिळाल्यानें कमिशनवर कडकडीत बहिष्कार घातला तरी पुढें पार्लमेंटरी कमिटीच्या किंवा पार्लमेंटाच्या किंवा राष्ट्रसंघाच्या माहितीकरितां तरी हिंदी राष्ट्राची एकमुखी मागणी म्हणून एखादी योजना तयार केलीच पाहिजे.

एतावता कोणत्याहि परिस्थितींत हिंदी राष्ट्राला आपली म्हणून एक विधायक योजना तयार करणें अपरिहार्य आहे. व ती हिंदी राष्ट्रानें एकदिलानें तयार करण्यांत खरें स्वारस्य असून बहिष्काराची खरी फलश्रुतिहि त्यांतच आहे.

ासाठीं हिंदी राष्ट्रांतील असहकारी, प्रतिसहकारी, र्ण सहकारी, जहाल, नेमस्त, मवाळ, हिंदु, मुसलमान, शीख, पार्शी, ब्राह्मण, अँग्लो-इंडियन, ब्राह्मणेतर, भांडवलवाले, मजूरवाले, इनामदार, मिरासदार जितके म्हणून पक्षोपपक्ष असतील त्या सर्वांचे दोन दोन प्रतिनिधी घेऊन त्यांची राऊंड टेबल कॉन्फरन्स भरवावी, आणि त्या कॉन्फरन्समध्यें एकमतानें सविस्तर योजना तयार करून ही आमची मागणी! कमिशनला हेंच आमचें उत्तर! असें म्हणून ती योजना जाहीर करण्यांत यावी. आणि ती योजना मंजूर होईपर्यंत आपल्या चळवळींत खंड पडूं देऊं नये. अशा रीतीनें या वेळीं सर्व पक्ष एकदिलानें झटून या कार्यास हातभार लावतील तर त्यांतच राष्ट्राचा तरणोपाय आहे. आणि सरकारी कमिशनच्या तोंडीस तीच बरोबर तोड होणार आहे. नाहीं तर नुसता निष्क्रिय बहिष्कार घातल्यानें त्यांचें कमिशन यावयाचें तें येईल, भलतासलता रिपोर्ट करून त्यास अनुसरून नवेंच तिरपगडें उपस्थित करील आणि मग कदाचित् पूर्वीचा आक्ट होता तोच बरा होता असेंहि म्हणण्याची पाळी येईल ! ही आपत्ति टाळावयाची असल्यास कमिशनच्या रिपोर्टाच्या आधींच आपला रिपोर्ट आणि पार्लमेंटरी बिलाच्या आधींच हिंदी राऊंड टेबल कॉन्फरन्सनें तयार केलेलें बिल जगापुढें मांडलें गेलें पाहिजे. आणि घेऊं तर हेंच बिल घेऊं दुसरी कोणतीहि योजना स्वीकारणार नाहीं, असा सक्रिय व विधायक बहिष्कार पुकारला पाहिजे, तरच स्वराज्याच्या लढ्यांत आपला टिकाव लागण्याचा संभव आहे.

# स्व-पर-संरक्षणाचे हक्क

( डॉ. वि. म. भट. येवलें. )

**लेखांक १ ला**

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ भगवद्गीता
नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन ॥ मनुस्मृति

' हिंदु हा भ्याड आहे आणि मुसलमान हा दंडेल आहे ' हा महात्मा गांधींनी केलेला कयास बऱ्याच अंशानें सत्य आहे, असें म्हणणें कित्येक वेळां भाग पडतें. वीर शशिमोहनच्या खटल्यांत ज्या गोष्टी उघडकीस आल्या व त्या वाचल्या म्हणजे असले अत्याचार निमूटपणें सहन करणारे लोक हीं खरोखरच मनुष्यें आहेत का अशी शंका येऊं लागते. प्रत्यक्ष आपल्या मायबहिणींवर अत्याचार होत असताना, प्राणाहूनहि प्रिय अशा त्यांच्या व म्हणून आपल्याहि अब्रूची विटंबना डोळ्यासमोर एखाद्या नरपशूकडून होत असतांना, जे हिंदु स्त्री-पुरुष स्वस्थ बसतात, अत्याचाराचा प्रतिकार करीत नाहींत, त्या नरपशूंच्या नरडीचा घोट घेण्यासाठीं ज्यांचें रक्त उसळत नाहीं, त्यांना मनुष्य तरी कां म्हणावें हें खरोखरच समजत नाहीं. पण अशीं निर्मनुष्यत्वाप्रत पोंचलेलीं माणसें नव्हे द्विपाद प्राणी आमच्यांत आहेत खरे ! ते आमचे, आमच्या तेजस्वी हिंदुधर्माचे आहेत हें म्हणण्याची खरोखर शरम वाटते. अथवा निर्मनुष्याप्रत पोंचलेले हे द्विपाद प्राणी जेथें माणसें आहेत कीं नाहीत ह्याचीच शंका आहे तेथें त्यांना अमुक धर्माचे म्हणून म्हणावें तरी कसें ! मनुष्याला धर्म असूं शकतो. जी माणसेंच नाहींत त्यांना धर्म तरी कोठला !

पण अन्यायाची, अत्याचाराची ज्यांना चीड आहे, ज्यांचे बाहू अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठीं स्फुरण पावतात, नरपशूंच्या अधम कृत्यांकडे पाहून जे आपल्या प्राणांचीहि पर्वा न करतां त्या अधमाधमांस योग्य प्रायश्चित्त-कंठस्नानानें सुद्धां-देतात त्यांची कृत्ये मनुष्यनिर्मित कायदाहि कशीं समर्थनीय ठरवितो, हें आज मला दाखवावयाचें आहे. अत्याचार, छळ, बलात्कार पाहून जो मनुष्य ताबडतोब त्याचा प्रतिकार करण्यास उठतो तो कायदे बियदा पाहात बसत नाहीं. आपलें कृत्य कायदेशीर आहे किंवा नाहीं, त्यामुळें आपल्याला त्रास होईल कीं काय, हा विचारहि त्याच्या मनाला, त्या त्वेषाच्या भरांत, शिवत नसतो. पापाचा प्रतिकार आणि पुण्याचें पालन, दुर्जनांना शासन आणि सज्जनांचें प्रतिपालन यासाठीं, ह्या धर्मासाठीं जो प्रसंगी आपला देहहि ठेवण्यास तयार असतो तो पिनल कोडाच्या शिक्षेला भिऊन कर्तव्यपराङ्मुख होईल हें संभवतच नाहीं. तरी पण ह्या धर्मरक्षणाच्या कर्तव्यात शिक्षा होत नाहीं, उलट न्यायशास्त्र हें कर्तव्य करण्यास लोकांस अधिकृत करतें, हें मला ह्या लेखांत दाखवावयाचें आहे. स्व-परसंरक्षणाच्या हक्काचें अज्ञान असल्यामुळेंच जर कांहीं सदिच्छेचीं पण कायद्यांच उल्लंघन होऊन कदाचित् ' धर्म करतां कर्म उभें राहावयाचें ' ह्या भीतीनें त्या धर्मापासून पराङ्मुख होणारीं माणसें तो हक्क अमलांत आणावयास भीत असलीं तर त्यांची भीति दूर

व्हावी, त्यांना आपल्या हक्कांचें यथार्थज्ञान व्हावें, आणि त्यांनीं 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृ-ताम्' ह्या श्रीकृष्णप्रणीत आर्य धर्माचें आचरण करण्यास सदैव तत्पर असावें, ह्या हेतूनें मी ह्या हक्काच्या कायद्याचें कायदेशीर विवरण सामान्य वाचकांसाठीं करण्याचें योजिलें आहे.

प्राचीन काळीं आपल्या भरतखंडांत वर्ण-व्यवस्थेप्रमाणें प्रजारक्षण हें राजाचें व क्षत्रियांचें नेहमींचेच काम असे. 'प्रधानं क्षात्रिये कर्म प्रजानां परिपालनम्' 'प्रजानां रक्षणं कर्म क्षत्रियस्य समासतः' असें याज्ञवल्क्य व मनुस्मृतींत स्पष्ट सांगितलें आहे. हल्लींहि सरकारचे कर्तव्यांत त्याचा समावेश आहेच. पूर्वीच्या क्षात्रियांऐवजीं सांप्रतचे क्षत्रिय हे पोलीस या नांवानें संबोधले जातात, एवढाच फरक आहे. पण सदासर्वदा व सर्वत्र पोलिसांचीच वाट पाहात बसावयाचें, ते वेळेस नसले तर आपण आपलें किंवा परक्याचें रक्षण दुष्टांना मारून करावयाचें नाहीं, असें कोठेंच सांगितलें नाहीं. मनूनें तर

शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते।
द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते॥
आत्मनश्च परित्राणे दक्षिणानां च संगरे।
स्त्रीविप्राभ्युपपत्तौ च घ्नन्धर्मेण न दुष्यति॥
गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम्।
आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्॥
नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन
प्रकाशं वाप्रकाशं वा मन्युस्तं मन्युमृच्छति॥

असें आपल्या स्मृतीच्या ८व्या अध्यायांत (श्लो. ३४८-३५१) स्वच्छ लिहिलें आहे. त्यांत क्षत्रियांप्रमाणेंच ब्राह्मण आणि वैश्य यांपैकींहि पाहिजे त्यानें शस्त्र घेऊन आत्मसंरक्षण व परसंरक्षण करावें. क्षत्रियाच्या किंवा राजाच्या आश्रयाची वाट पाहूं नये, असें स्पष्ट सांगि-तलें आहे. आणि प्राचीन कालच्या किंवा हल्लींच्या कोणत्याहि धर्मशास्त्रांत हा आत्मसंरक्षणाचा व पर-संरक्षणाचा हक्क मान्यच केला आहे. हल्लींच्या इंग्र-जांच्या राज्यपद्धतींत तो हक्क कसा, कोणी, कोठें, कशा-साठीं, अमलांत आणावयाचा त्या संबंधानें कांहीं नियम—कायदे—ठरविले आहेत त्यांशींच आपणास प्रस्तुत कर्तव्य असल्यानें आपण त्या नियमांचें अथवा कायद्यांचेंच विवेचन करूं.

त्या विवेचनाचे पूर्वी निसर्गांतील कांहीं सर्व-सामान्य गोष्टी आपण पाहूं. त्यांपैकीं जी पहिली गोष्ट आपल्या नजरेस पडते ती ही कीं, प्रत्येक प्राणी आत्मरक्षणाकरितां सदैव तत्पर असतो. आत्मरक्षणाची (Self-preservation) बुद्धि ही प्राणिमात्रांत उपजत आहे. आणि त्या बुद्धीमुळेंच उत्क्रान्त झालेल्या प्राण्यांजवळ कांहींना कांहीं तरी आत्मरक्षणाचें साधन सिंहादिकांचे तीक्ष्ण दांत, नखें व प्र पक्ष्यांच्या तीक्ष्ण चोंची, सर्पाचें विष, प्राण्यांचीं शिंगें इत्यादि साधनेंहि त्या त्या प्राण्. आत्मरक्षणासाठीं उपयोगी पडतात. मनुष्यप्राण्या-जवळ बुद्धि असल्यानें त्यानें आत्मरक्षणासाठीं अनेकविध साधनें निर्माण करून ठेवलीं आहेत, आणि दिवसानुदिवस तीं वाढत आहेत.

## स्वसंरक्षण

परशत्रूपासून स्वसंरक्षण करण्याच्या ह्या उप-जत बुद्धीमुळें आणि खालीं दिलेल्या कारणानें, न्यायशास्त्रानें आत्मसंरक्षणाचा हक्क सर्वत्र आणि सर्वदा मान्य केला आहे. सुधारलेल्या व सुसंघटित अशा राष्ट्रांत प्रजेच्या संरक्षणाचें काम जरी संरक्षक सैन्याकडे सोंपाविलेलें असतें तरी जेथें अशा संरक्षणाची मदत मिळणें शक्य नसतें तेथें, प्रत्येक मनुष्यानें आपलें शरीर (body), जीवित, आपण स्वतः हव्या त्या उपायानें, प्रसंगीं परशत्रूस अवश्य तितका जायबंदी करून, अथवा ठारहि मारून सुरक्षित ठेवावें, हें तत्त्व न्यायशा-स्त्रास पूर्ण संमत आहे. कारण दुष्ट आततायी माणसें हीं थोड्याशा संरक्षकांस सहज झुकांडी देऊन व्यक्तीवर आघात करूं शकतात. पण जेथें प्रत्येक मनुष्य आपल्या जीविताचें संरक्षण करण्यास सावध व तत्पर असतो तेथें हीं दुष्ट माणसें कोण-कोणास चुकवूं शकतील? आणि देशांत कोणत्याहि स्वरूपाची सत्ता—लोकतंत्री, एकतंत्री, वा बहुतंत्री राज्यांत असली तरी, प्रजेच्या संख्येच्या मानानें संरक्षकांची संख्या ही कितीशी असणार? संरक्ष-कांची संख्या थोडी आणि संरक्षणीयांची संख्या पुष्कळ, ही स्थिति जर सर्वत्र कोणत्याहि राजस-त्तेत असणार, तर मग प्रत्येक राज्यांत प्रजेचा शरीरसंरक्षणाचा उपजत हक्क मानणें अवश्यच ठरतें, आणि म्हणून प्रत्येक सुधारलेल्या राज्यांत हा आत्मसंरक्षणाचा हक्क मानला जातो.

आत्मसंरक्षणाची जी ही उपजत बुद्धि ती प्रथ-मतः जरी स्वतःच्या जीवितापुरती उत्कट असली तरी, मनुष्यास सुखानें जिवंत राहून योगक्षेम चाल-विण्यास कांहीं तरी धनाची व स्थावर-जंगम मिळ-कतीची, वित्ताची (property) जरूर अस-ल्यानें, त्या मिळकतीच्या संरक्षणाचीहि बुद्धि त्याच्या मनामध्यें उत्पन्न होते. आणि म्हणून आत्म-संरक्षणाच्या या नैसर्गिक हक्कांत जीविताबरोबरच आपलें वित्तरक्षण करण्याचाहि हक्क न्यायशास्त्रानें मानला आहे.

**एवंच आत्मसंरक्षणाचा हक्क म्हणजे स्वतःचें जीवित व वित्त ह्या दोहोंचें संरक्षण करण्याचा हक्क होय.**

## पर-संरक्षण

.णी हा कुटुंब करून राहाणारा प्राणी .न व कुटुंबांतील लहान लहान मुलेंबाळें, .ला स्त्रिया, वृद्ध व अशींच दुबळीं झालेलीं माणसें हीं आत्मसंरक्षण करण्यास असमर्थ असल्यानें, अशा अबलसंरक्षणाचाहि भार कुटुंबांतील कर्त्या व धट्टयाकट्टया पुरुषांवर पडतो. आणि आपल्या बायकापोरांबद्दल व इतर नातलगांबद्दल वाटणाऱ्या ममतेमुळं कुटुंबांतील मोठीं कर्ती माणसें तो आनंदानें व स्वतः झीज सोसूनहि पत्करितात. ह्यामुळें स्वतःच्या जीवरक्षणाबरोबरच स्वेतरांचें, पण प्रथमतः अगदीं जवळच्या नातलगांचें संरक्षण करण्याची बुद्धि उत्पन्न होते. ' स्व ' म्हणजे अगदीं स्वतःच्या एकुलत्या एक जीवापुरताच जो अर्थ असतो त्यांत मग स्वीय अशा जवळच्या नातलगांचाहि समावेश होतो. मनुष्यांत जशी स्वार्थबुद्धि तशीच कांहीं अंशीं तरी परोपकारबुद्धीहि परमेश्वरानें ठेवल्यानें व मनुष्य हा समाजप्रिय प्राणी असल्यानें आपल्या कुटुंबानंतर शेजारपाजारच्या, जातीच्या, धर्मातल्या, गांवांतल्या, देशांतल्या लोकांच्या आणि अखेर अखिल मावीनजातीच्या संरक्षणाकरितांहि तो आपल्या परोपकारबद्धीच्या तीव्रतेनुसार तयार होतो. कित्येक परोपकारी माणसें यांपैकीं आपणा स्वतःस प्रिय असणाऱ्या कोणत्याहि मनुष्यसमाजाच्या संरक्षणासाठीं आपलेंच काय पण आपल्या सर्वस्वाचेंहि बलिदान करण्यास तयार असतात. ही जी ईश्वरदत्त उपजत परोकारबुद्धि मनुष्यांत आहे तिचा उपयोग दुर्बलांचें संरक्षण करण्याचे कामीं राज्यांतल्या पोलीस-सैन्यापेक्षां अधिक होत असल्यानें न्यायशास्त्रानें तिलाहि मान्यता देऊन आत्मसंरक्षणाबरोबरच पर-संरक्षणाचाहि हक्क कबूल केला आहे.

## स्व-पर-संरक्षण

यामुळेंच कायद्यांत ह्या प्रकरणास of the Right of Self-defence 'आत्मसंरक्षणाचे' प्रकरण असें न म्हणता 'स्व-पर-संरक्षणाचें' प्रकरण (Of the Right of Private Defence) असें व्यापक नांव दिलें आहे. आत्मसंरक्षणाचा हक्क या शब्दानें केवळ स्वतःचें जीवित रक्षण्याचा हक्क एवढाच प्रथम बोध होतो. त्यांत स्वतःच्या वित्तरक्षणाचाहि हक्क कसा समाविष्ट होतो, हें वर सांगितलेंच आहे. पण कायद्यांत परसंरक्षणाचाहि हक्क मान्य असल्यानें आत्मसंरक्षणापेक्षां स्व-पर-संरक्षण हीच शब्दयोजना अवश्य आहे.

आत्मसंरक्षणाच्या वरील व्यापक अर्थांत जसें स्वतःचें जीवित व वित्त या दोन गोष्टींचें संरक्षण येते त्याप्रमाणेंच ' स्व-पर-संरक्षण ' ह्या शब्दांत स्वतःचें व परक्याचें जीवित व वित्त ह्यांचें संरक्षण येतें.

# 'महाराष्ट्रीय' पुढाऱ्यांचा जाहिरनामा

बॅरिस्टर जयकर, डॉ. मुंजे, श्रीयुत न. चिं. केळकर, माधवराव अणे, अण्णासाहेब भोपटकर यांनीं पार्लमेंटरी कमिशनसंबंधानें आपला अभिप्राय जाहीर केला आहे तो असाः—

स्टॅटयूटरी कमिशनसंबंधानें ब्रिटिश पार्लमेंटांत केलेली जाहीर घोषणा, तीवरील व्हाइसरॉयांचें भाष्य आणि ब्रिटिश प्रधानांची सहकारितेविषयींची विनंति लक्षपूर्वक वाचून आणि कमिशनच्या कार्यक्रमाविषयीं प्रसिद्ध झालेली माहिती पाहून आमचें असें ठाम मत झालें आहे कीं, प्रसिद्ध झालेली ही योजना हिंदी लोकांच्या न्याय्य आकांक्षांचें समाधान करण्याला अपुरी असून हिंदुस्थानाला अनेक कारणांसाठीं उपमर्दकारक वाटत आहे.

आमचें असें मत आहे कीं, ज्या कोणत्याहि योजनेंत हिंदी लोकांना पुढें नमूद केलेले हक्क दिले जाणार नाहींत ती योजना हिंदी राष्ट्राच्या स्वाभिमानाला व इज्जतीला पटणार नाहीं व त्यांना ग्राह्य वाटणार नाहीं.

( १ ) कमिशनपुढें वेळोवेळीं जो साक्षीपुरावा येईल व ज्याच्यावरून कमिशन आपला निर्णय ठरविणार असेल तो साक्षीपुरावा पाहाण्याला व त्यावर अभिप्राय प्रकट करण्याला आणि त्या साक्षीपुराव्यांत भर घालण्याला हिंदी कमिटीला अधिकार असावा.

(२) कमिशनपुढें तोंडी साक्ष देण्याला जे साक्षीदार येतील त्यांची उलटतपासणी करण्याला आपला पुरावा दाखल करण्याला आणि एकंदर पुराव्याची नीट मांडणी करण्याला अधिकार असावा.

( ३ ) कमिशननें आपला अभिप्राय ठरवून रिपोर्ट करण्यापूर्वी हरप्रसंगीं कमिशनशीं ऊहापोह करून कमिशनच्या मताला योग्य वळण लावण्याला कमिटीला संधि मिळावी.

हिंदी प्रतिनिधींना असे अधिकार देण्याच्या ऐवजीं हल्लींच्या योजनेंत त्यांना केवळ साक्षीदाराचा अपमानास्पद दर्जा दिला असून रिफॉर्म ॲक्टांत अल्प तरी प्रगति व्हावी एवढें सांगण्याला देखील त्यांना कमिशनपुढें याचना करावी लागणार आहे. आणि जो स्वराज्याचा हक्क मनुष्यमात्राला जन्मसिद्ध आहे त्या मूलभूत हक्काकरितां त्यांना आपली पात्रता सिद्ध करण्यासाठीं कमिशनच्या उलटतपासणीचा अपमान सोसावा लागणार आहे. याऐवजी हिंदी राष्ट्राची अशी मागणी आहे कीं, भावी

चौकशींत हिंदी राष्ट्रातर्फे जे जे प्रतिनिधी निवडले जातील त्यांना हिंदी राष्ट्राची भावी स्वराज्याची योजना तयार करण्याचा संपूर्ण अधिकार देण्यांत न आला तरी निदान पार्लमेंटरी कमिशनच्या बरोबरीचे व असहकारितेचे तरी त्यांना अधिकार दिला जावा.

हिंदी राष्ट्राची ही किमान मागणी आहे व तेवढी देखील मान्य न होईल तर हिंदी राष्ट्राला स्वाभिमान व इज्जत संभाळून या कमिशनच्या कामांत सहकार्य करणें किंवा कमिशनला मदत करणें शक्य होणार नाहीं.

या महत्त्वाच्या प्रसंगीं हिंदी राष्ट्रानें आपलें मत इतक्या स्पष्टपणें व एकदिलानें जाहीर केलें याचा आम्हास आनंद वाटतो. पण आम्ही अशी आशा करतों कीं, यापुढेंहि हें मतैक्य असेंच कायम राहील. निदान हिंदु व मुसलमान या दोन प्रमुख समाजांत तरी ही एकी टिकेल आणि पूर्वीप्रमाणें कोणताहि एक समाज अयोग्य मार्गानें दुसऱ्या समाजाला वगळून आपला स्वार्थ साधण्याचा प्रयत्न करणार नाहीं अशीहि आशा आहे.

### ब्रिटिश मजूर पक्षाच्या मागण्या

हिंदुस्थानासंबंधीं नेमलेल्या पार्लमेंटरी कमिशनमध्यें हिंदी प्रतिनिधींचाहि समावेश झाल्याखेरीज मजूर पक्षाचे सभासद कमिशनमध्यें काम करूं शकणार नाहींत असें मजूर पक्षानें भारतमंत्री लॉर्ड बर्कनहेड यांना कळविलें होतें. पण ती मागणी मान्य होण्याचें लक्षण दि॰. मजूर पक्षानें आतां पुढीलप्रमाणें ॰ आहे—

(१) हिंदी कायदेमंडळानें नेमलेल्या कमि॰ कमिशनच्या सभासदांच्या बरोबर बसण्याचा हक्क असावा.

(२) कमिटीनें साक्षीदारांना स्वतः प्रश्न विचारावे किंवा अध्यक्षांना ते प्रश्न विचारण्यास सांगावें.

(३) कमिशनपुढें आलेला पुरावा खोडून काढण्याकरितां नवा साक्षीपुरावा देण्याचा अधिकार कमिटीला असावा.

(४) कमिशनपुढें आलेला सर्व गुप्त सुद्धां पुरावा कमिटीला पाहावयास मिळावा.

(५) कमिशननें आपला रिपोर्ट लिहिण्यास बसण्यापूर्वी या कमिटीचा सल्ला जरूर घ्यावा.

(६) कमिशन व कमिटी यांचें एकमत झाल्यास दोघांनीं एकत्र शिफारशी कराव्या आणि मतभेद झाल्यास कमिटीला वेगळा रिपोर्ट करण्याची परवानगी असावी व तो रिपोर्ट पार्लमेंटापुढें ठेवला जावा.

(७) कमिशनच्या शिफारशीस अनुसरून जें बिल तयार होईल त्याचा विचार करण्याकरितां जेव्हां पार्लमेंटरी कमिटी नेमली जाईल त्या वेळीं तिच्याशीं कमिशनचा जसा जेवढा संबंध येईल तसा तेवढा संबंध या कमिटीचाहि यावा.

# मुंबईचें बातमीपत्र

(आमच्या बातमीदाराकडून)

### एकच हाहाःकार

गेल्या ता. १० तारखेपासून रविवारपर्यंत मुंबई नगरांत प्रचंड वादळ होऊन आषाढ महिन्यांत जसें वातावरण अभ्राच्छादित होतें तसें एकसारखें होतें व वादळी वारे सारखे वाहात होते. ता. १२ रोजीं येथील भाऊच्या धक्क्यावरून इंडियन कोऑपरेटिव्ह कंपनीची 'तुकाराम' बोट व बॉम्बे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीची 'जयंती' बोट सकाळीं ७॥ वाजतां अनुक्रमें ८२ उतारू व ५४ खलाशी आणि ५१ उतारू आणि ४५ खलाशी घेऊन दाभोळ बंदराला जाण्याकरितां निघाल्या. नित्याप्रमाणें ह्या बोटी त्याच दिवशीं रात्रीं परतून रविवारीं सकाळीं यावयास पाहिजे होत्या. परंतु त्या न आल्यामुळें बोटीचे अधिकारी चिंताग्रस्त झाले व सर्व दिवसभर आशेवर राहिले. त्याच दिवशीं रात्रीं हरेश्वरहून एक तार अशी आली कीं, तुकाराम बोट येथें जवळच बुडाली आहे. तुकाराम व जयंती बोटी हर्णैपर्यंत गेल्यावर तेथें त्यांस प्रचंड तुफानी वारा व पर्वतप्राय लाटा ह्यांनीं जेरीस आणलें व हर्णै बंदरांत शिरणें व पुढें दाभोळेस जाणें शक्य नाहीं हें पाहून त्यांनीं मुंबईकडे मोर्चा वळविला. दाभोळ बंदर मुंबईपासून ९० मैलांवर असून हर्णै हें पहिलेंच बंदर त्या घेणार होत्या. बोटी परतल्या तेव्हां जयंती बोट तुकारामापुढेंच होती. जंजिऱ्यापासून सुमारें चार मैल अंतरावरील समुद्रांत ह्या बोटी असतांना एका प्रचंड लाटेनें तुकाराम बोटीस समुद्रांत तळाशीं घातलें. ह्याच बोटीवरील लोकांपैकीं २६ मनुष्यें ह्या भयानक अपघातांतून वांचलीं असून बोटीवरील सर्व अधिकारी मरण पावले. वांचलेला एक खलाशी व इलेक्ट्रिशिअन असें सांगतो कीं, आमच्यापुढें जयंती होती. आम्ही पाण्यांत बुडालों तेव्हां दोनहि बोटी दिसत होत्या व वर येतांच दोनहि दिसेनाशा झाल्या! जयंती बोटीचा कांहींच भाग अगर तीवरील माणसांचीं प्रेतें सांपडलीं नसल्यामुळें जयंती बुडाली कीं नाहीं ह्याची शंकाच गुरुवारपर्यंत तिच्या कंपनीच्या अधिकाऱ्यांस होती. परंतु

..धार्थ पाठविलेल्या बोटी निराशेनें ..गुरुवारीं पोर्ट ऑफिसरनें पत्रक काढून ..ना व बोटींना असा इषारा दिला आहे कीं, ..ला तेथेंच जवळपास बुडाली असावी म्हणून सावधपणें जावें. तुकाराम बोट कोठें बुडाली हें तिच्या शोधार्थ पाठविलेल्या 'टिळक' बोटीनें पाहिलें असून तिची पांच-सहा फूट समुद्रावर असलेली डोलकाठीहि दिसते. ह्या बोटींतून गेलेल्या लोकांच्या नातलगामध्यें अत्यंत हृदयभेदक हाहाःकार उडाला असून ह्या किनाऱ्याला बोटी सुरू झाल्यापासून असा अपघात कधीं झाला नव्हता असेंच लोक म्हणत आहेत.

# प्रासंगिक बोल

औंध, सांगली व सातारा या तीन ठिकाणचे नमस्कार एका नांवाचे पण तीन पंथांचे आहेत. ह्या तीन पंथीं नमस्कारांची माहिती सध्याच्या व्यायामविषयक चळवळींत जनतेच्या नजरेखालून जाणें आवश्यक असल्यामुळें साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमधील एक शिक्षक श्री. गो. रा. माटे एम. ए. यांच्याच शब्दांत ती दिलेली बरी —

श्री. माटे म्हणतात—"नमस्काराच्या तीन पद्धती महाराष्ट्रांत चालू आहेतः—१श्री. औंधकरांची २ सांगलीचे परांजपे ह्यांची व ३ सातारकरांची. ह्या तीनहि तऱ्हांत बराच फरक आहे. परांजपे ह्यांच्या नमस्कारांत जोर व बैठक ह्यांचें मिश्रण आहे. श्री. औंधकरांचा मंत्र म्हणण्यावर बराच जोर आहे. औंधकराची श्वास घेण्याची पद्धत व सातारकरांची श्वास घेण्याची पद्धत ह्यांतहि थोडा फरक आहे. औंधकरांच्या पद्धतीप्रमाणें नमस्कार घालतांना आढ्याकडे बघण्यानें पोटांतील आंतड्यांना वाजवीपेक्षां जास्त ताण बसतो. सातारकरांची पद्धत थोडीशी पाश्चात्य व्यायामाच्या पद्धतीवर गेलेली आहे."

"सातारा न्यू इंग्लिश स्कूलमधील नमस्कारांत आठ क्रिया ठेवल्या आहेत.:—

१ हात जोडून ताठ उभें राहणें. ह्याच वेळीं श्वास घेणें. २ कंबर वांकवून हात पायांच्या बाजूला पण त्यांच्याच रेषेंत ठेवणें. गुडघे न वांकवितां पाय ताठ ठेवणें. ह्यावेळीं श्वास सोडावा. ज्यांना शक्य असेल त्यांनीं ह्या स्थितींत असतांना कपाळ गुडघ्यांना लावण्याचा प्रयत्न करावा. ह्या ठिकाणा बेंबीचा भाग ओढला जातो. ३ उजवा पाय मागें न्यावा. ४ डावा पाय मागें न्यावा. टांचा व गुडघे जुळावेत व श्वास घ्यावा. ५ छाती, कपाळ व गुडघे जमिनीवर एकदम टेकावेत. या वेळेस हनुवटीनें गळ्याची घाटी दाबली जाते. ह्यालाच जालंधर बंध म्हणतात. छाती व गुडघे टेकल्यामुळें बाकीचा सर्व भाग विशेषतः बेंबीचा भाग आंत ओढला जातो आणि त्यायोगानें उड्डयान, मूल बंध वगैरे तीन बंध होतात. ही सर्व क्रिया कुंभकांत करावी. ६ कपाळ, छाती व गुडघे एकदम वर उचलून ४ च्या स्थितींत यावें. ह्याहि स्थितींत कुंभक ठेवावा. ७ उजवा पाय पुढें आणावा. ८ डावा पाय उजव्या पायास जुळवावा व गुडघे ताठ करावे व कपाळ गुडघ्यास लावण्याचा प्रयत्न करावा व श्वास हळूहळू सोडून द्यावा. पुनः १च्या स्थितींत येतांना श्वास घ्यावा."

"नमस्कार हा एकच व्यायाम असा आहे कीं, ज्यांत सर्व शरीराला एकाच वेळीं व्यायाम होतो. इतर कोणत्याहि पाश्चिमात्य व पौर्वात्य व्यायामपद्धतींत हा फायदा होत नाहीं. मनगटें, पुढला हात, दंड, मान, मांड्या व पाय यांना सारखा व्यायाम होतो. श्वासोच्छ्वासामुळें फुप्फुसांना नियमित व्यायाम होतो. वांकण्यानें व ताठ उभें राहण्यानें पोटांतील आंतड्यांना व पाठीच्या कण्याला व्यायाम मिळतो. नमस्कारानें पचनशक्ति चांगली सुधारते. श्रीमंत औंधकरांनीं लिहिल्याप्रमाणें हा व्यायाम सर्व काळीं, सर्व स्थळीं, आबालवृद्धांना व स्त्रियांना कांहींएक साधनसामुग्री न लागतां व एकहि पैसा खर्च न करावयास लागतां घेतां येतो. पाय मागें नेणें व पुढें आणणें ह्यांत डोंगर चढण्यांत जो व्यायाम होतो तोच वरील क्रियेनें होतो. Hundred up चे Exercise चें तत्त्व नमस्कारांत समाविष्ट केलेलें आहे. नमस्काराच्या तत्त्वावरच मॅकफेडननें व ग्रूस सदरलंड, इंग्लंडचा जुजुत्सूकर्ता, यानें आपले व्यायाम बसविले आहेत."

# कमिशनच्या माथ्यावर खापर !

सुधारणा कमिशन नेमल्याचे जाहीर झाल्यापासून हिंदुस्थानामध्ये लोकमताची जी खळबळ झाली तिचा बराच उपयोग झाला असे पार्लमेंटमध्ये गुरुवारी–शुक्रवारी झालेल्या चर्चेवरून दिसून येते लोकमताची खळबळ झाली त्यात विध्वंसक व विधायक असे दोनहि प्रकारचे बहिष्कार पुकारले गेले होते. बहिष्कारवादी लोकांपैकी अनेकांची अनेक कारणे होती. १ काहींची कारणे मनात गूढ होती. २ काहींनी बहिष्काराची कारणे उघड सांगितली पण फेरबदल कोणते झाले असता आपण बहिष्कार उठवू किंवा योग्य ती सहकारिता करू हे सांगितले नव्हते. आणि ३ काहींनी बहिष्काराची कारणे सांगताना त्याबरोबरच प्रत्यक्ष विधायक सूचनाहि केल्या होत्या, व त्यांचा हेतु असा होता की काय केले असता हा बहिष्कार उठेल व योग्य ती सहकारिता कमिशनला लाभेल हे पार्लमेंटला नीट समजून यावे. या तीन वर्गांपैकी पहिल्या व तिसऱ्या वर्गापेक्षा दुसऱ्या वर्गाची स्थिति थोडी अधिक बिकट आहे. कारण त्यांनी जी दोन प्रकारची कारणे बहिष्काराला म्हणून दिली ती आता निघून जाऊ शकत नाहीत असे पक्के ठरले आहे.

## काही लोकांवरचा कठीण प्रसंग

ही दोन कारणे म्हणजे पार्लमेंटने कमिशनवर हिंदी लोक नेमले नाहीत आणि राऊंड टेबल कॉन्फरन्सचा म्हणजे स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य केला नाही. गेल्या आठवड्यात कमिशनच्या बिलाचे तिसरे वाचन संपून ठरावाच्या रूपाने कमिशनच्या सभासदांची नावेहि पार्लमेंटने निश्चित केली. त्याअर्थी या दोनहि कारणांनी बहिष्काराला प्रवृत्त झालेल्या लोकांना कमिशनशी यापुढे कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवता येणे शक्य नाही. त्यांनी पूर्वी आपली कारणे दिली व ती कारणे तर आता निघून जात नाहीत ! म्हणून कमिशनशी कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवणे हे सहजच त्यांच्या स्वाभिमानाला घातक होणार. अर्थात् बॅरिस्टर जिना सारखे स्वतंत्र पक्षाचे बहिष्कारवादी, सप्रू सेटलवाड चिंतामणी शिवस्वामी यांच्यासारखे लिबरल पक्षाचे बहिष्कारवादी, श्रीनिवास अय्यंगर नेहरू यांच्यासारखे राष्ट्रीय सभावाले बहिष्कारवादी यांना यापुढे कमिशनशी संबंध ठेवता येणार नाही हे उघडच आहे. काही केले तरी आता हिंदी सभासद कमिशनवर नेमला जात नाही आणि काही केले तरी राऊंड टेबल कॉन्फरन्स भरविण्यात येत नाही!

उरल्या दोन पक्षांपैकी ज्यांनी काही सांगितलीच नव्हती त्यांची स्थिति थोडी अधिक बरी. का की त्यांची कारणे जगाला न कळल्यामुळे त्यांच्या मनात आल्यास विद्यमान परिस्थिति स्वीकारून त्यांना कमिशनचा उपयोग करून घेता येण्यासारखे आहे. त्यांना असे म्हणता येईल की "कमिशनचा पहिला जाहिरनामा त्यावरील पार्लमेंटातली पहिली भाषणे किंवा व्हाइसरॉयसाहेबांचे जाहीर पत्रक, आणि गेल्या आठवड्यात पार्लमेंटसभेत वादविवाद झाले त्याप्रसंगी प्रधानमंडळातर्फे व लेबर पक्षातर्फे करण्यात आलेले खुलासे, यांच्यायोगाने कमिशनची घटना बदलली नसली तरी त्याचे स्वरूप थोडेबहुत पालटल्यासारखे झाले आहे. म्हणून आम्ही जरी उघडपणे कारणे दिली नव्हती तरी कमिशनमध्ये अशा काही प्रकारचे फेरफार व्हावेत असेच आमचे मत होते. आणि ते आता घडून आल्यामुळे आम्हाला बहिष्कार ठेवण्याचे कारण नाही" ! !

## प्रतिसहकाराची भूमिका

तिसरा बहिष्कारी वर्ग विधायक बहिष्कार घालणाऱ्या लोकांचा. त्यांनी आपली कारणे पूर्वीच स्पष्ट शब्दांनी मांडली होती. त्यांत कमिशनची हल्लीची घटना आहे तशीच असली तरी, निदान वरिष्ठ आणि कनिष्ठ कायदेमंडळांनी नेमल्या जाणाऱ्या कमिट्यांना हक्क व अधिकार काय असावेत हेहि त्यांनी विशद करून सांगितले होते. पार्लमेंटातील वादविवाद पाहता यांनी केलेल्या सर्वच सूचना पार्लमेंटकडून स्वीकारल्या गेल्या असे म्हणता येत नाही. तथापि हिंदुस्थानातील मंडळांशी कसे संबंध ठेवावेत याविषयी कमिशनला सकृद्दर्शनी पूर्ण अधिकार दिल्याकारणाने, विधायक बहिष्कारवादी लोकांनी घातलेल्या अटी पाळल्या जाण्याचा कदाचित् काही संभव दिसतो. म्हणून विधायक बहिष्कारवादी लोकांनी, उदाहरणार्थ प्रतिसहकारी पुढाऱ्यांनी, पूर्वी पुढे टाकलेले पाऊल आजहि तेथेच कायम आहे. म्हणजे पुढे मनाप्रमाणे फेरबदल झाले तर कमिशनचा उपयोग करून घ्यावयाचा, आणि न झाले तर बहिष्कार घालू असे पूर्वी सांगितले होते तो तसाच टिकवावयाचा. आणि तो टिकवावयाची त्यांची तयारीहि आहे.

केळकर वगैरे कित्येक पुढाऱ्यांनी "बहिष्काराची घोषणा थोडीशी योग्य वेळेच्या आधी होत आहे" असे जे मत सुमारे १५ दिवसापूर्वी प्रदर्शित केले

..थ असाच होता, व ते मत ..खरे हे आता तरी कळून येईल. कमा-..न्यरा खुलासा होणार हे उघड होते. ..ना आजमितीलाहि सर्व खुलासा झाला असे म्हणता येत नाही. कारण कमिशन जाहीर कर-ताना पूर्वी पार्लमेंटात जी भाषणे झाली ती व गेल्या आठवड्यात फिरून पार्लमेंटात जी भाषणे झाली ती या दोहोंतील अंतर कोणालाहि तेव्हाच स्पष्टपणे दिसून येईल. पण अजूनहि सर्व खुलासा झाला असे म्हणता येत नाही. कारण या दुसऱ्या प्रसंगींच्या भाषणात आतां फक्त इतकेच निष्पन्न झाले आहे की हिंदी लोकमताची सहकारिता कशी संपादन करावी यांविषयी कमिशनला पार्लमेंटने पूर्ण मुखत्यारी दिली आहे. पण या मुखत्यारीचा उपयोग स्वतः कमिशन कसा काय करणार हे आताच कसे कळणार? कमिशनचे अध्यक्ष सर जॉन सायमन यांनी जे पहिले भाषण केले त्यात केवळ तोंडदेखला सामान्य शिष्टाचारच होता. त्याहून अधिक काही नव्हते. म्हणून कमिशन हिंदुस्थानात येईल, ते आल्यावर कामाला सुरुवात करताना अध्य-क्षांचे खुलासेवार भाषण होईल, आणि कायदेमंडळाने नेमलेल्या कमिट्याशी कमिशनचा प्रत्यक्ष संबंध कसा राहणार हे निश्चित व जाहीर होईल, तेव्हाच विधायक बहिष्कारवाद्यांच्या मताप्रमाणें बहिष्कार घालावयाचा की नाही हे नक्की ठरविता येईल. एरवीं आज बहिष्कार घातला म्हटले व न घातला म्हटले या दोहोंची फलश्रुति सारखीच.

### संसर्ग प्राप्त असेल तरच बहिष्कार

कोणी बहिष्कार घातला न घातला याची कसोटी आज लागण्यासारखी नाहीं. जो तो आपल्या जागी स्वस्थच बसलेला आहे. कमिशनला उद्देशून अमुक एक गोष्ट त्याने करावी अशी आज अपेक्षाहि नाही कायदेमंडळाना कमिट्या निवडण्याचे अजून निमंत्रण नाही. साक्षीदाराना साक्षीला येण्याचे आमंत्रण नाही. किंवा कमिटीनें खासगी रीतीने सल्लामसलत घेण्याचाहि उपक्रम केलेला नाही. अशा रीतीने संसर्ग-योगच नसल्या-मुळे बहिष्कार आज प्रत्यक्ष संभवत नाही. संसर्ग हा अनुयोगी व बहिष्कार हा त्याचा प्रतियोगी असतो. तोंडाने कोणी बहिष्कार घातला म्हणावे किंवा कोणा म्हणू नये इतकेच काय ते. कारण बहिष्कार घालण्याची अगर न घालण्याची क्रिया कमिशन इकडे आल्यावरच उपस्थित होणार. कायदेमंडळानी नेमलेल्या कमि-ट्याना कोणते अधिकार मिळावयाचे ते तेव्हाच ठरणार. म्हणून बहिष्कार घालणे योग्य का अयोग्य हेहि तेव्हाच ठरेल. आज जी मते प्रदर्शित केली जातात ती बेजबाबदार नसली तरी हवेत वावड्या उडविल्यासारखीच आहेत. बहिष्कारवादी लोकांच्या निग्रही करारी स्वभावाचे खरे प्रदर्शन होण्याची खरी वेळ पुढेच आहे. आणि सायमन कमिशनने जर हिंदी लोकमताला जितका मान व अधिकार देणे योग्य तितका दिला नाही तर केवळ जातवार हक्क मागणाराशिवाय कोणीहि कमिशनपुढे साक्षीला अगर सल्लामसलतीला जाईल असे आम्हास तरी वाटत नाही.

काँग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास आय्यंगार यानी आपल्या मुलाखतीत म्हटल्याप्रमाणे तर हा बहिष्कार घालण्याजोगी सोपी गोष्टच दुसरी कोणती नाहीं. कमिशनवर बहिष्कार घालण्याने कोणतेच कायदे-मंडळ ओस पडत नाही. न्यायकोर्टे बंद पडत नाहीत. शिक्षणसंस्था बंद पडत नाहीत. कोर्टातील वकिली बंद पडत नाही. घरी बसून करण्याची वकिली बंद पडत नाही. वर्तमानपत्राची वर्गणी वसूल होण्याची बंद पडत नाही. विलायतेच्या सफरी बंद पडत नाहीत! आणि इतक्या गोष्टी प्राप्त नाहीत म्हणून सांगितल्यावर मग तुरुंगवास हालअपेष्टा वगैरेहि या बहिष्कारवाद्याला भोगावयाला लागत नाही हे वेगळे सांगावयास नकोच. मात्र कित्येक वेळा श्रीनिवास अय्यंगार याना 'माझ्या भाषणाने अगर मतप्रदर्शनाने मी लोकाची विनोदबुद्धि जागृत करतो' अशी जाणीवहि नसते. त्यातलाच हाहि एक प्रसंग होऊन गेला. आणि त्यानीं काढलेल्या जाहिरनाम्यात बहिष्कारवादी लोकांची ते थोरवी वर्णन करीत होते की टवाळी करीत होते हे वाच-काना कळून यावे म्हणून या जाहिरनाम्यातील त्यांचेच शब्द आम्ही देतो.

### हे समर्थन की टवाळी?

ते म्हणतात " बहिष्काराविषयी सर्वांचे एक-मत आहे. यावरून तो यशस्वी होईल असे उघड दिसते. आज तो टिकला तसाच तो यापुढे टिकेल. तो फसण्याचे कारण काय? असहकारिता फसली त्याप्रमाणें हाहि बहिष्कार फसेल असे जे कित्येक लोक म्हणतात तसे येथे होण्याचे कारणच नाही. तो बहिष्कार वेगळा हा बहिष्कार वेगळा! तो बहिष्कार घालण्याला मनुष्याला फारच मोठा स्वार्थत्याग करावा लागत होता. हल्लीचा बहिष्कार हा नुसता राजकीय बहि-ष्कार आहे! स्वार्थत्यागनिष्ठ बहिष्कार नाहीं. हा बहिष्कार नुसता तोंडाने घालण्याचा आहे! त्याच्या योगाने आमचा व्यवहार आमची राहाणी आमची मते यात काडीचाहि फरक होण्याचे कारण नाही. आणि स्वार्थत्याग तर मुळीच नाहीं. मग नुसता बहिष्कार तोंडाने म्हणण्याला कोणाचे काय जाते"!

पण आम्हाला वाटते की या गोष्टी श्रीनिवास अय्यंगार यानी सांगण्या वींहि लोकाना माहित होत्या. प्रचलित बहिष्कारानें स्वार्थाची हानि नाही हे कोणालाहि कळते आहे. दुर्दैवाने कमिशनवर सभासद कोणाला नेमले नाही. ते नेमले असते तर काही बहिष्कारवाद्यांच्या अंतःकरणाची खरी शीर दाबली गेली असती ! आता प्रश्न एवढाच की कमिशनपुढे साक्षीला जावयाचे की नाही ? त्याचे उत्तर असे की साक्षीला गेले नाही म्हणजे झाले ! त्या वेळात इतर नित्यनैमित्तिक गोष्टी काय थोड्या करता येतात ? येऊन जाऊन प्रश्न इतकाच आहे की साक्षी न देणे म्हणजे निरनिराळ्या वर्गाचे मत कमिशनपुढे न मांडणे यात देशाचे काही नुकसान आहे किंवा नाही ! आणि बहिष्कार हा एकच शब्द घेऊन जे बोलत उठले नाहीत, ज्यानी थोडेबहुत आजुबाजुला मागेंपुढें पाहिले, बहिष्काराचे स्वरूप व परिणाम लक्षात घेतले, त्यानी मनाशी विचार केला असला तर तो फक्त याच दृष्टीने. याच दृष्टीने त्यानी सहकारिता शक्य होण्याच्या विधायक सूचना केल्या. पण त्याहि जर कोणी मानल्या नाहीत तर राष्ट्रीय स्वाभिमानाच्या दृष्टीने बहिष्कार घालण्याला ते लोक मागे घेणार नाहीत हे उघड आहे. कारण श्रीनिवास अय्यंगार यांच्याच शब्दात बोलावयाचे असेल तर बहिष्कारांत स्वार्थत्यागाचा अंशहि नाही. बहिष्कारात धैर्याची कसोटी नाही. मग ते तरी त्यावर बहिष्कार का न घालतील ?

पार्लमेंटच्या दोन्ही सभामध्यें गेल्या गुरुवारी व शुक्रवारी जो वादविवाद झाला त्यावरून आता एक गोष्ट निश्चित ठरली ती ही की, हिंदी लोकानी कमिशनवर बहिष्कार घालावा अगर न घालावा हे सर्व सायमन कमिशनच्याच हाती आहे. प्रधानमंडळ व या कमिशनचे सभासद यांच अंतःस्थच काही ठरले असले तर गोष्ट वेगळी. पण सर जॉर्ज सायमन यानी मनात आणले तर आजच्या बहिष्कारवाद्याना देखील ते कमिशनशी सहकारिता करावयास लावतील इतके कमिशनला अधिकारस्वातंत्र्य पार्लमेंटने दिल्याचे जाहीर झाले आहे. कमिशन हिंदुस्थानात गेले पण हिंदी कायदेमंडळाने आपली कमिटी नेमली नाही, किंवा कमिशनपुढे साक्ष देण्याकरिता कोणी पुढे आले नाहीत तर ती कमिशनचीच एक प्रकारे बेअब्रू होईल. 'आले तसे हात हलवीत परत गेले' असे वर्णन होण्यात कमिशनची तरी काय शोभा ? आणि ज्याअर्थी सर जॉन सायमन हे मतस्वातंत्र्याचे भोक्ते आहेत, लिबरल पक्षापैकी एक प्रमुख पुढारी आहेत, आणि आपला पुष्कळ लाभाचा वकिलीचा धंदा सोडून ते या कामाला वेळ देण्याला तयार झाले आहेत, त्याअर्थी कमिशनवर बहिष्कार पडून त्याची बेअब्रू व्हावी ही गोष्ट त्याना सहसा पटणार नाही असे वाटते. आणि इतक्या प्रतिकूल गोष्टी असताहि जर त्याना हिंदी लोकमताचा अनुनय करता आला नाही तर त्यांच्या अंगी मुत्सद्देगिरी नाही असेच आम्ही तरी म्हणू.

## स्टे. से. चे रावणशाही भाषण !

पण ही सर्व पुढची गोष्ट आहे. पार्लमेंट सभेतील वादविवाद वाचून एक गोष्ट मात्र उघड दिसते ती ही की, कमिशनच्या प्रत्यक्ष घटनेत काहीएक फरक न करताच आपली जबाबदारी आपणावरून काढून टाकून तिचे गाठोडे प्रधानमंडळाने सायमन कमिशन व हिंदी जनता यांच्या पाठीवर अडकावून दिले आहे ! लॉर्ड बर्कनहेड यांनी कॉन्झर्व्हेटिव्ह स्टेटसेक्रेटरीला साजेल असेच भाषण केले. हिंदुस्थानाचा इतिहास हिंदुस्थानातील जातिद्वेष व तलवारीने जिंकलेले राज्य तलवारीनेच राखण्याची अवश्यकता वगैरे ठराविक गोष्टी त्यांच्या भाषणात होत्या. त्यानी कमिशनच्या सभासदांची स्तुति केली. हिंदी सभासद कमिशनवर नेमण्यात अडचणी काय होत्या त्या सांगितल्या. पार्लमेंटच्या जबाबदारीचा बीजमंत्र त्यानी रूढ पद्धतीने उच्चारला. 'मिस मेयोच्या पुस्तकाला आम्ही मदत केली नाही' असे म्हणून आपले मत विकृत झालेले नाही असे भासविले. "कमिशन हे एखाद्या ज्यूरीप्रमाणे हिंदुस्थानात जाऊन सर्व बाजूनी समालोचन करून सल्लामसलत घेऊन आपला काय तो निकाल सांगेल, व नंतर जॉइंट पार्लमेंटरी कमिटी बसून योग्य दिसेल ते पुढे आम्ही करू. पण कमिशनने योग्य वाटेल त्या रीतीने हिंदुस्थानातील लोकमत अजमावावे, व त्यानी हिंदी लोकांशी सल्लामसलत करावी" अशा मोघम शब्दानी त्यानी मनोगत सांगितले.

अंडर-सेक्रेटरी अर्ल विंटर्टन यांचे भाषण लॉर्ड बर्कनहेडच्या भाषणापेक्षा अधिक स्पष्ट होते. त्यानी प्रथम हे सांगितले की "हिंदुस्थानाने आयर्लंड व ईजिप्त यांच्या गप्पा मारू नयेत. आपल्यापुरते पाहावे व बोलावे. ईजिप्तमध्यें मुख्य धर्म एकच आहे. आयर्लंड मध्ये कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट यांच्यात द्वेष असला तरी हिंदु-मुसलमानांच्या इतकी त्यांची मजल गेली नव्हती. कमिशनवर हिंदी गृहस्थ नेमण्याला अडचणी होत्या. तथापि या स्थितीत देखील हिंदी राष्ट्राच्या 'ध्येया'ला अनुसरून 'व्यावहारिक' दृष्टीने सुधारणांची चर्चा करणे शक्य आहे. तेव्हा कायदेमंडळाने नेमलेल्या कमिटीतील सभासद हे काही केवळ साक्षीदार म्हणून पुढे यावयाचे नाहीत. यापुढे स्वराज्यविषयक सुधारणा कशा व्हाव्यात याची योजना मांडण्याचा अधि-

कार त्यानांहि राहील. आणि कमिशनवर कोणत्याहि बाबतीत आम्ही एका अक्षरानेहि बंधन घातलें नाहीं." असा अर्थ बिर्टन यांच्या भाषणाचा आशय आहे. तात्पर्य, प्रधानमंडळातर्फे झालेल्या या दोन भाषणांत स्पष्ट आश्वासन असें कोणतेंच नव्हतें, किंवा कमिशननें कोणत्या रीतीनें हिंदी लोकांची सहकारिता संपादावी याविषयीं कांहींच विधायक उल्लेख नव्हता.

## लेबर पक्षाचा प्रांजल खुलासा

पण एका अर्थी या चर्चेतील मुख्य भाषण लेबर पक्षाचे पुढारी रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं केलें. या भाषणांत दोनहि प्रकार आहेत. प्रधानमंडळाच्या धोरणांत निदान त्यांच्या पूर्वीच्या उद्गारांत काय चुकलें हें दाखवून यानीं टीका केली. पण त्याचबरोबर यानीं कमिशनच्या सूचनेला आपण कसून विरोध का करीत नाहीं किंबहुना संमतीच का देतों याचाहि खुलासा केला. हा खुलासा यानीं करण्याचें कारण उघड होतें. हिंदुस्थानांतील टीकाकारांची व बहिष्कारवादी लोकांची सर्व भिस्त आज पार्लमेंटांतील लेबर पक्षावर होती. लिबरलपक्ष तर नामशेष आहे व त्यापैकीं कोणाहि प्रमुख पुढाऱ्यानें या वादविवादांत भाग घेतला नाहीं. मुख्य विरोधी पक्ष म्हणजे लेबर पक्ष व त्याचे पुढारी रॅम्से मॅक्डोनाल्ड. पूर्वी लेबर पक्षाला पार्लमेंटमध्यें बहुमत लाभलें तेव्हां मॅक्डोनाल्ड हे मुख्य प्रधान होते. व फिरून नव्या निवडणुकी होऊन तसा प्रसंग आला तर मॅक्डोनाल्ड हेच भावी मुख्य प्रधान होतील असें अर्ल विंटर्टन यानीं सांगितलें. कमिशन सर्वसंमत करण्याकरितां त्यांत मजूर पक्षाचे दोन प्रतिनिधी मागवून घेण्यांत आले आहेत. व त्यांच्या नेमणुकीला रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं संमति दिली आहे. प्रतिकार कांहीं होईल तर लेबरपक्षाकडून! व या प्रतिकाराचा उत्तम व परिणामकारक प्रकार म्हटला म्हणजे मजूर पक्षाचे जे दोन प्रतिनिधी नेमून दिले गेले आहेत त्यानीं आपण होऊन राजीनामा देणें किंवा लेबर पक्षानें त्याना राजीनामा द्यावयास भाग पाडणें. याविषयीं विलायतेकडे हिंदुस्थानांतून योग्य मार्गानें खटपटहि बरीच झाली. तथापि तें कांहीं घडून आलें नाहीं. आणि एका सकलातवाल्याशिवाय लेबर पक्षाच्या कोणाहि प्रमुख सभासदानें कमिशनवर टीका करावी तशी केली नाहीं. हिंदुस्थान आपल्या पक्षावर विश्वास ठेवतो आणि अडीअडचणीच्या वेळीं आपला पक्ष त्याना मदत करतोहि ही गोष्ट मॅक्डोनाल्ड याना माहीत असल्यानें हल्लींच्या प्रसंगीं जो विश्वासघात झाला त्याचा खुलासा त्याना सहजच करावा लागला. आणि हा खुलासा करतांना आपण कोणत्या समजुतीनें कमिशनच्या सूचनेला संमति देतों हें त्याना सांगावें लागलें.

## असें घडावें पण होईल का ?

रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं बोलून दाखविलेल्या समजुतीप्रमाणें कमिशन जर खरोखरच वागलें तर आज प्रचलित झालेला बहिष्कार दूर होऊन हिंदी पुढारी कमिशनशीं सहकारिता करतील असें मानण्यास जागा आहे. मॅक्डोनाल्ड यानीं कायदेमंडळाना हिंदी पार्लमेंट असें बहुमानार्थी विशेषण लावलें व हिंदी लोकाना "आमचें पार्लमेंट व तुमचें पार्लमेंट यांच्या सहकारितेनें कार्य करूं या" असें प्रतिष्ठितपणाचें निमंत्रण दिलें! पण हा भाग तोंडदेखल्या सांप्रदायिक शिष्टपणाचा म्हणून आपण सोडून देऊं. पण मॅक्डोनाल्ड यांच्या भाषणांत नुसता शब्दगौरवच आहे असें मात्र आम्हाला वाटत नाहीं. कारण त्यानीं पुढें असेंहि बोलून दाखविलें कीं, "हिंदी कायदेमंडळानें नेमिलेल्या कमिटीला केवळ साक्षीदाराप्रमाणें जबानी अगर पक्षकाराप्रमाणें पुरशीस देऊन बाजूला सरावें लागेल अशी गोष्ट नाहीं. ही कमिटी केवळ आपली उलट तपासणी करून घेण्याकरतां नेमावयाची नाहीं. या कमिटीचे सभासद हे आमचे 'कलीग्स' म्हणजे सहकारी सभासद असतील. या कमिटींत व त्या कमिटींत विचारविनिमय होईल. तडजोडीची भाषणें होतील. आणि दोनहि कमिट्यांची बुद्धिमत्ता व विचारसरणी एकत्र करून जितका चांगल्यांत चांगला रिपोर्ट पार्लमेंटकडे सादर केला जाईल तितका केला जावा अशीच आमची इच्छा आहे. आणि ती कमिशनच्या अध्यक्षाकडून स्पष्ट केली जावी. तसेंच साक्षीदार तपासणी पार्लमेंटरी कमिशनप्रमाणें हिंदी कमिशनपुढेंहि व्हावी व सर जॉन सायमन यानीं दोघांच्या संयुक्त सभेचें अध्यक्ष व्हावें. किंबहुना दोनहि कमिशनच्या सभासदांचे हक्क सारखेच असावेत अशी योजना असावी. आणि हिंदी कमिशनला किंवा कमिटीला जरी आमच्या कमिटीबरोबर रिपोर्ट करण्याचा अधिकार नसेल तरी तिनें आपलाहि रिपोर्ट पाठवावा व त्याचा आम्ही विचार करावा. असें घडून आलें असतां हिंदुस्थानांतील लोकांच्या मनांत आलेले संशय दूर होतील."

## रॅ० मॅक्डोनाल्ड तोंडी का देतात ?

रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं वरील अर्थाचें भाषण केल्यामुळें त्यानीं कमिशनला का विरोध केला नाहीं व आपल्या पक्षातर्फे संमति का दिली हें उघड दिसून येईल. पण प्रश्न सहजच असा उपस्थित होतो कीं या त्यांच्या सामोपचाराच्या भाषणाला किंमत काय ? मॅक्डोनाल्ड यानीं आपली समजूत म्हणून कितीहि जीव तोडून सांगितलें तरी "ही

तुमची समजूत आहे ती बरोबर आहे आणि आमचीहि अशीच समजून आहे " असे अर्ल विंटर्टन यानी किंवा मुख्य प्रधान बाल्डविन यानी आपल्या भाषणात का सांगितले नाही? यावरून सहजच अशी शंका येते की प्रधानमंडळ व लेबर पक्ष यांचा हा निवळ सिद्ध साधकपणा नसेल कशावरून ! पण त्याला उत्तर असे की, केवळ आजच तसे कोणास न्यायबुद्धीने म्हणता येणार नाही. हा सिद्धसाधकपणा का सावळा गोंधळ का हिंदी मताचा अनुनय करण्याचा प्रामाणिक प्रयत्न हे ठरण्याला काळ पुढे म्हणजे प्रत्यक्ष हिंदुस्थानात कमिशन येईल तेव्हा आहे. आज घाईने कायमचे मत ब ।विण्यापासून फायदा नाही व घाईने मत बनविण्यापासून आज अडलेहि नाहीं. हिंदुस्थानचे नशीब कोणत्याहि गोष्टीत खोटे हे तर आज आपण घेऊनच चालले आहो. आणि सर सायमन हे ब्रीदाने लिबरल व शब्दाने अघळपघळ बोलणारे असले तरी प्रत्यक्ष कृति काय करतील याची कोणास ग्वाही देता येत नाही. तथापि प्रतिसहकारवादी लोकांकडून तरी बहिष्कारांच्या शर्ती प्रगट झाल्या होत्या, व हिंदी लोकमताने आपणाला सावधगिरीची सूचना दिली होती, एवढी तरी गोष्ट या कमिशनला उद्या कबूल करावी लागेल. आणि ही धोक्याची सूचना लक्षात न घेता जर कमिशन हट्टाने एकतर्फी काम करण्याला प्रवृत्त होईल तर, सावधगिरीचा बावटा ओलांडून बेधड ुढें जाणाऱ्या आगगाडीला जशी थडक खावी लागते तशी या कमिशनला हिंदी लोकमताकडून थप्पड खावी लागेल !

भावी संभव हा अशा रीतीने दोन प्रकारचा असल्याने दरम्यान स्वतः हिंदी पुढाऱ्यांनी काय करावे याविषयी आम्ही पूर्वी दिग्दर्शन ेले आहे व तेच आजहि फिरून एक वेळ सांगतो. आणि ते हे की, बहिष्कार घालावयाचा न घालावयाचा, काही म्हटले तरी स्वराज्यविषयक मागणी, तिची तपशीलवार घटना योजना व कार्यक्रमासंबंधी विधायक सूचना यांची तयारी ठेवण्याची जबाबदारी त्यांच्यावरील टळत नाही. असेब्लीमध्ये पूर्वी फक्त स्थूल रूपाने मागण्या नमूद करण्यात आलेल्या आहेत. तपशीलवार योजना, मांडले ी नाही. १९१९ साली पार्लमेंटरी कमिटीपुढे काँग्रेस व मुसलमान समाज यांच्यातर्फे मागण्या नमूद करण्यात आल्या. पण आता काळ बदलून नवे प्रश्न उपस्थित झाले आहेत. म्हणून स्वराज्याची योजना, त्यातील ताबडतोब मिळण्याचा हप्ता, व मतदारसंघ आणि अल्पसंख्याक लोक यांच्याविषयी समाधानकारक एकदिलाची सूचना तयार करणे हे बहिष्कारवादी व बिनबहिष्कारवादी दोघांचेहि आज सारखेच कर्तव्य ठरते.

## अय्यंगारांचे वाटोळे टेबल !

राऊंड टेबल कॉन्फरन्स करिता काँग्रेसने राउंड टेबल मांडून ठेविले आहे खरे. पण पाहावे तो त्याच्याभोवती बसण्याला एका विशिष्ट वर्गाच्या अर्धवट असहकारितावाद्यांच्या शिवाय दुसरा कोणीच उपस्थित नाही. मुसलमान फटकून निघू पाहात आहेत. बॅ. जिना हे आताच म्हणू लागले की, 'मस्लीम लीगमध्यें बहुमत ठरेल तसेच मला अध्यक्ष म्हणून वागावे लागेल!हिंदुसभा आपले हक्क कसे संभाळले जातील या चिंतेत आहे.अस्पृश्य वर्ग व अल्पसंख्याक लोक यानी "बहिष्कारात ही बरी संधि आली तेव्हा आपणच आपले घोडे दामटू या" असे म्हणून रिकीबीत पाऊल ठेविले आहे. लिबरल पक्षाचे लोक बहिष्कार पुकारण्याला तयार परंतु स्वयंनिर्णयात पुढारीपणा घेण्याला किंवा अनुयायी होण्याला तयार असण्याचे चिन्ह नाही. ते आपल्यापुरती कदाचित् योजना करतील. पण स्वयंनिर्णय व राऊंड टेबल कॉन्फरन्स याविषयी आग्रह किती बाळगतील याची अद्यापि शंकाच आहे. आणि येत्या डिसेंबरमध्ये भरणाऱ्या त्यांच्या स्वतंत्र फेडरेशनमध्ये त्याचे धोरण कळून येईलच. पण ते काँग्रेसशी सहकारितेचे नाही असे आजहि स्पष्ट दिसते. तात्पर्य, या राऊंड टेबलाभोवतीच्या खुर्च्या भरण्याची अद्यापि काही व्यवस्था अगर योजना दिसत नाही ती व्हावी. कित्येक बहिष्कारवादी लोक म्हणतात त्याप्रमाणे, जर बहिष्कार खरा सार्वत्रिक असेल तर त्या वाटोळ्या मेजाच्याभोवतालच्या खुर्च्या भरण्याला अडचण पडू नये. नुसत्या शाब्दिक बहिष्कारापेक्षा हिंदी पुढाऱ्यांनी सहविचार यशस्वी करून दाखविणे हाच खरा अधिक परिणामकारक मार्ग आहे. आणि इकडे येऊ घातलेल्या कमिशनला हे जुटीचे बळ पुरे अनुभवाला याव यात िता बहिष्कार सक्रिय व विधायक करावा असे आमचे म्हणणे आहे.

वरिष्ठ कायदेमंडळाने आपली कमिटी नेमावी की नाही हा अर्थात् यापुढचा उपस्थित होणारा प्रश्न आहे. आणि त्या संबंधानेहि आमचे स्पष्ट मत असे आहे, कायदेमंडळाने अशी कमिटी नेमावयाची व ती कमिशनशी सहकारिता करण्याला नेमावयाची तर, आधी रॅम्से मॅक्डोनाल्ड यानी उल्लेखिल्याप्रमाणें, आणि प्रतिसहकारवादी किंवा विधायक सूचना करून शर्ती घालून बहिष्कार पुकारणारे इतर पक्ष यानी मागणी केल्याप्रमाणें, या हिंदी कमिशनला कोणत्या नात्याने वागविण्याला हे विलायती कमिशन तयार आहे हे त्यांच्या तोंडून आधी निश्चित वदविले पाहिजे. तरच हिंदी कमिटी किंवा हिंदी कमिशन

नेमण्याचा उपयोग. आज कायदेमंडळाने कमिटी नेमावी किंवा न नेमावी यापैकीं कोणतेच उत्तर बिनशर्त देता येत नाही. तसेच एक गोष्ट निश्चित मानावी की कमिशनच्या घटनेत जरी काही फरक होत नाही, तरी हिंदी कमिशनला पूर्वीच्या अजमासापेक्षा थोडेसे अधिक अधिकार मिळण्याचा संभव आहे. पण तो संभव निराधार ठरला तर हिंदी राष्ट्राला बहिष्कार घालण्याशिवाय दुसरा मार्ग नाही. व तो घालण्याला कोणाची हरकत येईल असें आम्हांस वाटत नाही.

# स्व-पर-संरक्षणाचे हक्क

## ( डॉ. वि. म. भट, येवले. )

### लेखांक २ रा

इंडियन पिनल कोडाच्या ९६ ते १०६ ह्या कलमांत ह्या हक्काविषयींचा कायदा समाविष्ट झालेला आहे.

हिंदुस्थानांतील हा कायदा विलायतेंतल्या कायद्याप्रमाणेंच बव्हंशीं आहे. पण शतकानुशतकाच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक पारतंत्र्यामुळें हिंदुस्थानांतील लोकाची जुलूम,अन्याय, अत्याचार सहन करण्याची प्रवृत्ति अगदी हाडींमासीं खिळल्यानें हिंदुस्थानांतील लोकांस स्वपरसंरक्षणाच्या बाबतींत कायद्यांत अधिक सवलती ठेवण्यांत आल्या आहेत. सरकारी कायद्याच्या सल्लागारांनीं ( लॉ कमिशनर्स) पिनल कोडावर आपली जी मतपत्रिका लिहिली आहे तिचा मथितार्थ असा कीं, "जर आम्ही एखाद्या धीट, साहसी, शूर आणि अन्यायाची चीड येऊन तडकाफडकी त्याचा तीव्र प्रतिकार करणाऱ्या व कायद्याबियद्याना झुगारून देणाऱ्या लोकांकरितां कायदा सुचवीत असतों तर ह्यापेक्षांहि अधिक निर्बंध या स्वपरसंरक्षणाच्या हक्कावर आम्ही घातले असते. पण ह्या देशांत तसें करणें योग्य नाही. कारण येथील लोकांत स्वपरसंरक्षणाची प्रवृत्ति अत्यंत कमी दिसून येते. लुटारू व पुंड व नीच लोकांच्या भयंकर अत्याचारांचा प्रतिकार न करतां ते निमूटपणें सहन करण्याची हिंदी लोकांची संवय विलक्षण असून समाजस्थैर्याबद्दल निराशा उत्पन्न करणारी आहे. तेव्हां अशा स्थितींत स्वपरसंरक्षणाच्या हक्कावर अधिक निर्बंध घालून त्यांना त्यापासून परावृत्त करण्यापेक्षां निर्बंध कमी करून त्यांच्यात पौरुष उत्पन्न करण्याची आमची इच्छा आहे. आणि एखाद्या माणसास दरवडेखोराचा प्रतिकार करीत असता प्रतिकारमर्यादेचें अतिक्रमण होऊन त्यापायीं कोर्टांतील न्यायानें त्यास फांशीची शिक्षा झाल्यास जें समाजाचें नुकसान होईल त्या नुकसानापेक्षां स्वसंरक्षणाचा हक्क अधिक सैल सोडल्यानें कमीच नुकसान ह्या देशांत होणार आहे."

ह्या कायदेपंडितांनीं ६०-७० वर्षांपूर्वी जे हे उद्गार काढले आहेत ते आजहि अक्षरशः खरे आहेत. बंगाल, पंजाब, मलबारमध्यें हिंदु लोकांवर व विशेषतः स्त्रियांवर होणारे व झालेले बलात्कार शेकड्यांनी मोजतां येतील. इतकें होऊनहि आत्मसंरक्षण आणि आपल्या स्त्रियांच्या अब्रूचें संरक्षण करणारे शशिमोहनसारखे शूर वीर क्वचितच आढळावेत, ही एकच गोष्ट वरील उताऱ्यांतील सत्याची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे.

### आत्मसंरक्षण ही उपजत बुद्धि आहे

आत्मसंरक्षण ही उपजत बुद्धि व हा उपजत हक्क आहे. ह्या व्यक्तिगत जन्मसिद्ध हक्काचा ज्यांना उपभोग घेतां येत नाहीं त्यांना काय म्हणावें हेंच समजत नाहीं. "हिंदुस्थानातील लोकांत पौरुष उत्पन्न व्हावें" हे लॉ कमिशनर्सनी लिहिलेले शब्द हत्यारांचा कायदा होण्यापूर्वीचे आहेत. त्या कालांत म्हणजे सशस्त्र असतांना सुद्धां जर लोक इतके पळपुटे व भ्याड होते, तर मग शस्त्रें गेल्यानंतर ते किती भ्याड झाले असतील, याची कल्पना वाचकांना करता येईलच. अथवा कल्पना कशाला, बंगाल, पंजाब, मलबार या प्रांतातील हिंदु लोकांवरील व स्त्रियांवरील मुसलमानांचे अत्याचार हेंच त्याचे प्रत्यक्ष प्रत्यंतर आहे. ह्याच्या अगदीं उलट उदाहरण मुसलमानांचें, आणि त्यांतहि पहाडी व बलुची मुसलमान लोकांचें होय. त्या जातींत व सरहद्दीवरील पठाणांच्या देशांत स्त्रियांचें पातिव्रत्य भ्रष्ट केल्यास त्या कालींच, पण तें न जमल्यास मागाहूनहि भ्रष्ट करणाऱ्या व्यक्तीचाच नव्हे तर त्याच्या कुटुंबांतील सर्व किंवा अनेक माणसांचे खून पडतात! आणि हे खून इतके पडतात कीं त्यासाठीं खुनी माणसांस फांशी दिलाच पाहिजे, हा नियमहि तेथें रद्द झालेला आहे!

असो. लाजिरवाणी गोष्ट असली तरी बरेचसे हिंदू नामर्द, नादान, शेळपट आहेत ही गोष्ट खरी. त्याला पारतंत्र्य, शस्त्रांचा कायदा, स्वपरसंरक्षणाच्या हक्कांचें अज्ञान, अहिंसाधर्माचा अतिरेक वगैरे कारणें

आहेत. ह्या कारणांमुळें आमची मनोवृत्तीच इतकी भेकड बनली आहे कीं, ती आम्हास अवश्य तेथेंहि हिंसा करूं देत नाही. आणि एवढ्यासाठींच महात्मा गांधींची अहिंसा बोकाळू नये अशी आमची इच्छा आहे. अगोदरच भ्याड, शेळपट, नादान अशा लोकांनी जें राष्ट्र भरलें आहे, जेथें स्वपरसंरक्षणार्थ हिंसेचा सर्वमान्य अधिकारहि बजावला जात नाहीं, जेथें सरकारचे कायदेपंडितहि लोकांत पौरुष उत्पन्न व्हावें म्हणून प्रयत्न करतात, त्या लोकांत कोठें एखादा शशिमोहन, किंवा एखादा खरगबहादुर परोपकारार्थ हिंसेला प्रवृत्त व्हावयाचा. आमच्यांत असा एखादाच तेजस्वी, मानी, परोपकारी व स्वार्थत्यागी जो निघणार त्याची ही वृत्ति ह्या अहिंसाधर्माच्या उठल्यासुटल्या होणाऱ्या उपदेशानें नाहींशी होइल, हाच गांधींच्या अहिंसातिरेकावर आमचा खरा आक्षेप आहे. हिंसेची वारंवार प्रवृत्ति ज्या लोकांत उत्पन्न होते त्यांना हा अहिंसोपदेश अवश्य आहे. पण जेथें अवश्य तेथेंहि हिंसा जर उपयोगांत आणली जात नाहीं तर मग त्या लोकांत उगाच अहिंसेचे बंड माजविण्याचे कारण काय ? उलट सरकारच्या कायद्याच्या सल्लागारांनीं लोकांत स्वपर-संरक्षणाची प्रवृत्ति उत्पन्न करण्याकरितां या जन्म-सिद्ध हक्कावर असलेले इतर देशांतील निर्बंध ह्या देशांत जसे सैल केले आहेत त्याप्रमाणेंच अवश्य तेथें तरी हिंसेची प्रवृत्ति उत्पन्न होण्यासाठी शस्त्रांचा कायदाहि ढिला करावा असाच आग्रह आम्ही धरला पाहिजे. कोहाट, मुलतान, लाहोर, सुरत, इंदूर, बडोदें, सोलापूर, मलबार, कलकत्ता इत्यादि ठिकाणीं झालेले दंगे सरकारासहि शमवितांना किती प्रयास पडले ह्याची जाणीव सरकारास व लोकांस आहेच. आणि त्याचें खरें कारण लोकांच्या नादान-पणाबरोबर त्यांची निःशस्त्रता हेंहि आहे.

लोकांस शस्त्रें दिल्यास रक्तपात अधिक होईल, अधिक दंगे होतील हा सरकारचा नेह-मींच आक्षेप आहे. तो खोटा आहे, हें ज्या देशी संस्थानांत हत्यारें वापरण्याचा हक्क आहे तेथें रक्त-पात व दंगे होत नाहीत, या गोष्टीवरून सिद्ध आहे. पण तो खरा मानला तरी अधिक दंगे व रक्तपात पुरवला, पण हा शेळपटपणा नको असें म्हणण्याची वेळ आली आहे. सरकारकडूनहि रक्षण वेळेवर होत नाहीं. आमच्यांत स्वपरसंरक्षणाची प्रवृत्ति नाहीं म्हणून तें होत नाहीं. आणि ती प्रवृत्ति जेथें आहे तेथे शस्त्रादि साधनें नाहीत म्हणून उत्तम रक्षण होत नाहीं. अशा स्थितीत बेथॅम ह्या कायदेपंडि-तानें म्हटल्याप्रमाणें स्वपरसंरक्षणाच्या नैसर्गिक पण विझत आलेल्या प्रवृत्तीस उद्दीपित करणें, आणि बऱ्याच लोकांस निदान साधीं शस्त्रें तरी वापर-ण्याची मोकळीक ठेवणें, हे दोनच उपाय आपणा-जवळ आहेत. पहिला उपाय लेखक व वक्ते ह्यांनीं, मनांत आणल्यास, अमलांत आणण्यासारखा आहे, आणि त्यासाठींच ह्या विषयाचें विवेचन मी येथें करीत आहे. दुसरा उपाय पुष्कळ अंशीं सरकार-च्या हातांत आहे. त्यासाठीं पुढाऱ्यांनी ह्या बाबतीं-त सरकारास भंडावून सोडून शस्त्रास्त्रें वापर-ण्याच्या अधिक सवलती लोकांस मिळवून देण्याचा प्रयत्न करणे अवश्य आहे.

पण सरकार हत्यारांचा कायदा सैल करील असें तूर्त तरी दिसत नाहीं. लोक सशस्त्र झाल्यास ते प्रथम आपल्याचविरुद्ध उठतील अशी त्यास भीति वाटते! पण ही भीति निराधार आहे. नुसत्या बंदुका–तरवा-रींनीं हल्लींचीं युद्धें होत नाहींत. सरकारजवळ ह्या हत्यारांखेरीज मशीनगन्स, मोठमोठ्या तोफा, विमानें, बॉम्ब्स, ग्यास, टॅंक्स वगैरे किती तरी अधिक प्रभावी अशीं सस्त्रास्त्रें आहेत. त्यांच्यापुढें बंदुका–तरवारींचा टिकाव किती लागणार ? आणि स्वपरसंरक्षणासाठीं ह्यापेक्षां अधिक शस्त्रें फारशीं लागतहि नाहींत. ह्या शस्त्रांपुरताच तरी कायदा ढिला करण्यास कोणतीच हरकत नाहीं. प्रजाहितदक्षतेच्या दृष्टीनें पाहिलें तर तो अशा स्थितींत सैल करणें हेंच सरकारचें कर्तव्यकर्म आहे. आणि त्यास तसें करावयास लावणें हें लोक-धुरीणांचें काम आहे.

## काठी, लाठी, खंजीर

पण बंदुका–तरवारी मिळाल्या नाहींत म्हणून हिंदूंनीं अडून बसावयास नको. स्वपरसंरक्षणासाठीं साधी काठी, लाठी किंवा खंजीर–जंबियासारखीं साधनेंहि पुरेशीं असतात. तरवारी, बंदुका, भाले वगैरे हत्यारानीं आपल्या अंगावर चढाई करून येणाऱ्या शत्रूस काठी–जंबियासारख्या शस्त्रापेक्षां त्वरित व अधिक वचक बसतो हें सत्य आहे. पण तीं साधनें देणें हें सरकाराधीन असल्यानें तीं नेह-मीच आणि सर्वांस मिळतीलच अशी अपेक्षा कर-ण्यांत हंशील नाहीं. तदभावीं नेहमींच्या काठी, लाठी वगैरे साधनांचाच उपयोग प्रत्येक मनुष्यानें अवश्य शिकावा. स्वपरसंरक्षण हें बहुधा थोड्या व्यक्तींमधील तांबडतोबीचें व हातघाईचें काम असतें. तें कसें हें पुढील विवेचनावरून वाचकांस समजून येईल. अशा कार्यांस मिळेल त्या साध-नांचा योग्य उपयोग करतां येणें यावरच यशाप-यश अवलंबून असतें. आणि हत्यारांचा कायदा हा जसा हिंदूंस तसा मुसलमानांस किंवा इतरांसहि लागू असल्यानें शत्रु हा नेहमीं सशस्त्रच असेल असेंहि नाहीं. त्याच्याजवळ असलेलें किंवा तसेंच

प्रकारचें साधन आपणाजवळ असलें म्हणजे स्वपर-संरक्षण करणें हें अगदीं सर्वस्वी शक्य आहे.

प्रकृत विषयाला जोडून हिंदूंच्याबद्दलच इतकें विवेचन करण्याचें कारण मिनल कोड तयार करणाऱ्याचे शब्द आज अर्ध्या शतकानंतरहि हिंदूंच्या बाबतींत तरी खरे आहेत, हें होय. स्वपरसंरक्षणाचा अधिकार हा हिंदु, मुसलमान व इतर सर्व लोकांस सारखाच दिलेला आहे. पण आज वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदूंखेरीज इतर धर्मीय लोक हा अधिकार यथायोग्य बजावितात. आणि हिंदूच मात्र त्यांत कमी पडतात. अशा स्थितींत मुख्यतः त्यानाच उद्देशून या विषयाचा ऊहापोह करणें भाग पडलें. असो. सांगावयाचा मुद्दा इतकाच कीं, हिंदुस्थान देशांत स्व–पर–संरक्षणाच्या कायद्यांत असलेल्या सवलतींनीं सुद्धां इष्ट कार्यभाग झालेला नाहीं. साधनांच्या म्हणजे शस्त्रास्त्रांच्या सवलतीहि अधिक दिल्याखेरीज इच्छित हेतू परिपूर्ण होणार नाहींत.

# गीताजयंतीची भेट

( ले. ज. स. करंदीकर. )

लेखांक १ ला

मार्गशीर्ष शु॥ ११ हा गीताजयंतीचा पुण्यकारक दिवस असून त्या दिवशीं आर्यसंस्कृतीच्या प्रत्येक अभिमान्यानें गीतेसंबंधीं अल्प तरी चर्चा करावी असें विनंतिपत्र गीताप्रचारक मंडळाच्या चिटणिसांनीं प्रसिद्ध केलें आहे. त्या विनंतीस अनुसरून गीतेसंबंधीं कांहीं विचार वाचकांपुढे मांडीत आहे. हे विचार जयंतीच्या पूर्वी प्रसिद्ध करण्यांत असाहि एक हेतु आहे कीं, ज्या लहानसान गांवीं गीतेवर प्रवचनकार किंवा व्याख्याता मिळं शकणार नाहीं त्या ठिकाणच्या वाचकांस हा लेख वाचून गीता–जयंती साजरी करतां यावी. गीता ग्रंथाची खरी योग्यता अलीकडील काळांत लोकमान्यांनींच यथार्थतेनेच जाणली. यास्तव गीतेतील तत्त्वज्ञानाविषयीं लोकमान्यांनीं कोणते विचार प्रकट केले आहेत याचें दिग्दर्शन गीतारहस्यांतील त्यांचेच कांहीं उतारे देऊन प्रथम करणें बरें.

"गीतेतील भक्तिमार्ग कर्मप्रधान असून केवळ पुष्पांनीं किंवा वाचेनेंच नव्हे तर स्वधर्मोक्त निष्काम कर्मांनींहि परमेश्वराचें पूजन होतें व असें पूजन प्रत्येकानें अवश्य केलें पाहिजे हें त्यातील मुख्य तत्त्व आहे." ( गीतारहस्य पृ. ४३६ )

"माझी दृढ भक्ति करून मत्परायणबुद्धीनें स्वधर्माप्रमाणें प्राप्त झालेलीं कर्में करीत जा, म्हणजे इहलोकीं व परलोकीं उभयत्र तुमचें कल्याण होईल, भिऊं नका असें, अर्जुनाला निमित्त करून, भगवान सर्वांसच आश्वासन देत आहेत. यासच कर्मयोग असें म्हणतात व हेंच सर्व गीताधर्माचें सार होय." ( गीतारहस्य पृष्ठ ८५० )

"गीतेंत कर्मयोग गौण आणि संन्यासयोग मुख्य समजणें म्हणजे यजमानास त्याच्याच घरांत पाहुणा ठरवून पाहुण्यास यजमान करण्याइतकेंच असमंजसपणाचें होय." ( गीतारहस्य पृष्ठ ४६६ )

वरील उताऱ्यांत लोकमान्यांच्याच शब्दांनीं गीता ग्रंथ हा कर्मयोगपर ग्रंथ कसा आहे तें दर्शविलें आहे. असें असतां संन्यास सांप्रदायिकांनीं गीतेचा सगळा ओघ बदलून गीता कर्मसंन्यासपर बनविली याचा आचंबा वाटतो. गीतेचा उपक्रमोपसंहार तर कर्मयोगपर आहेच, पण त्याशिवाय गीतेत अथपासून इतिपर्यंत "म्हणून तूं कर्म कर" असा उपदेश अविच्छिन्नपणें केलेला असून उलटपक्षीं "म्हणून तूं कर्मे टाक" असा उपदेश कोठेंहि केलेला नाहीं. अर्थातच कर्मत्यागाविषयींच्या एकाहि स्पष्ट वचनाचा आधार नसतां गीतेंत सर्वकर्मसंन्यास सांगितला आहे, असें म्हणणें केवळ निराधार होय.

गीतेंत कर्म करण्याविषयींचा उपदेश किती विविध प्रकारांनीं केला आहे व त्याला किती तऱ्हेचीं सयुक्तिक कारणें सांगितलीं आहेत तीं पाहिलीं असतां, गीतेंत कर्मयोगाचा उपदेश ओतप्रोत भरला असल्याची खात्री पटते. हें वाचकांच्या स्पष्टपणें लक्षांत यावें म्हणून त्याचें साधार वर्गीकरण देण्यांत येत आहे. तें असें—

## गीतेंतलीं कर्मयोगपर वचनें

(१) कर्मत्याग अशक्य आहे. (३–५) (३–३३) (१८–७) (१८–११) (१८–५९) (१८–६०)

(२) नियतकर्माचा त्याग करूं नये. (१८–५) (१८–४८)

(३) यज्ञादि कर्में टाकिल्यानें अघायुत्वाचा दोष लागतो. (३–१६) (३–१२) (३–१३)

(४) श्रेष्ठ पुरुषांनीं कर्म टाकल्यानें अज्ञ लोकांचा बुद्धिभेद होतो आणि संकरादि आपत्ति ओढवते. (३–२१ ते २९)

(५) कर्में टाकल्यानें मिथ्याचाराची प्रवृत्ति होते. (३–६)

(६) कर्में न केल्यानें नैष्कर्म्य साधतेंच असें नाहीं. कारण अकर्मांतहि कर्म असतें. (४–१८)

(७) जनकादि कर्मानेंच मुक्त झाले. कर्माचरणानें लोकसंग्रह साध्य होतो. (३–२०) (३ २१)

(८) कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग सुलभ आहे. (५–६)

(९) कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे. (३–७) (३–८) (६–४६) (१२–१२)

(१०) स्वकर्मांत(वर्णधर्मांत)सकृद्दर्शनीं कांहीं दोष दिसला तरी तो आचरल्यानें कांहीं पाप लागत नाहीं (१८–४७)

(११) संन्यास व कर्मयोग सारखेच मोक्षदायक आहेत. तथापि कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे. (५–२)

(१२) कर्मयोगाचें थोडेसें आचरण देखील मोठ्या भयापासून तारतें. (२–४०)

(१३) यांत अभिक्रमनाश नसून विघ्नंहि कमी. (२–४०)

(१४) स्वकर्म टाकल्यानें परधर्म आचरण्याकडे प्रवृत्ति होते व तशी प्रवृत्ति होणें भयावह आहे. (३–३५)

(१५) गीतेच्या उपदेशाची पूर्वपरंपरा मनु,इक्ष्वाकु इत्यादि कर्मयोगी राजर्षींची आहे. (४–१ व २)

(१६) कर्मयोग हा चारहि वर्णांना विहित आहे. यांत कोणालाच मज्जाव नाहीं. (१८–४५)

(१७) स्वधर्माचरणानेंच परमेश्वराची उपासना होते व त्यापासून मोक्ष मिळतो. (१८–४६)

इतक्या विविध पर्यायांनीं कर्मयोगाचरणाविषयीं गीतेंत बजावलें आहे. याच्या उलट कर्मसंन्यासाची स्थिति पाहा.—(१) सर्वकर्मसंन्यास केला पाहिजे असें गीतेंत कोठेंहि म्हटलें नाहीं. (२) संन्यासग्रहण न केल्यास दोष लागतो असें गीतेंत कोठें सांगितलें नाहीं. (३) कर्मसंन्यासाशिवाय इतर मार्गांनीं आत्मज्ञान मिळत नाहीं असेंहि म्हटलें नाहीं. उलट ध्यानयोग, कर्मयोग व भक्तियोग असे आत्मज्ञानप्राप्तीचे पृथक् पृथक् मार्ग आहेत असें सांगितलें आहे (१३-२४). (४) कर्मसंन्यास केल्यानें समाजाचें अगर जगाचें कोणतेंहि कल्याण होतें असें म्हटलें नसून उलट असले संन्यासी जगांत असून नसून सारखेच. समाजाशीं त्यांचा किंवा त्यांच्याशीं समाजाचा अर्थाअर्थी बिलकुल संबंध नाहीं; असें म्हणून संन्यासमार्गाची एक प्रकारें उपेक्षाच केली आहे (३–१७ व १८). (५) संन्यासमार्ग केवळ ब्राह्मणवर्णाला तेवढा विहित असून इतरांना त्यांत मज्जाव आहे. पण गीता तर स्वच्छ सांगते कीं,

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेपि यान्ति परांगतिम्॥९-३२

मग अशी सर्वसंग्राहक मोक्षोपदेश करणारी गीता ही संन्यासमार्गी असें म्हणण्याला आधार काय? कर्मयोगाप्रमाणेंच सांख्ययोग हीहि एक निष्ठा असल्यामुळें तिचें विवरण प्रसंगोपात्त गीतेंत आलें आहे. पण त्यांत कोठेंहि 'म्हणून तूं असा कर्मसंन्यास कर' असा उपदेश नाहीं किंवा कर्मसंन्यासाची प्रशंसाहि नाहीं.

गीतेंत जर सर्वकर्मसंन्यास सांगावयाचा असता तर तसें सांगण्याचा प्रसंग आला असूनहि कर्मसंन्यासाचा उपदेश न करतां त्या त्या ठिकाणीं कर्माची आसक्ति टाकावी असाच उपदेश गीतेनें कां केला? उदाहरणार्थ, गीतेचा पंधरावा अध्यायच पाहा. हा अध्याय गीतेचा सारभूत असा अध्याय मानला जातो. या अध्यायांत संसारवृक्षाचा च्छेद करण्याचा उपदेश करतांना देखील भगवंतांनीं 'अकर्मशस्त्रेण' किंवा 'संन्यासशस्त्रेण' असें साधन न सांगतां 'असंगशस्त्रेण' असेंच साधन सांगितलें आहे व त्याच अध्यायांत 'निर्मानमोहा जितसंगदोषा' या वाक्यांतहि कर्मसंन्यास वर्णिला नसून अनासक्तीच वर्णिली आहे. त्याचप्रमाणें इतरहि अनेक ठिकाणीं असक्तबुद्धीचेंच माहात्म्य वर्णिलें असून 'त्यज कर्मैव तस्मात्त्वं' असें कोठेंहि सांगितलें नाहीं. यावरून गीतेचा उपदेश कर्मसंन्यासपर आहे का कर्मयोगपर आहे तें वाचकांच्या लक्षांत येईल.

## कर्मयोग्यांचा ज्ञानप्राप्तीचा क्रम

गीतेंत कर्मत्यागाचा आग्रह कोठेंहि नसल्यानें कर्मयोग्यावर सर्वकर्मसंन्यास लाण्यासाठीं संन्यासमार्गीयांनीं कर्माचरणानें चित्तशुद्धि मात्र होते पण आत्मज्ञान होत नाहीं. कारण ज्ञानाचा व कर्माचा 'तमःप्रकाशवत्' विरोध आहे आणि म्हणून आत्मज्ञानाकरितां कर्मसंन्यासच केला पाहिजे अशी एक क्लृप्ति लढविली आहे. कर्माचा व ज्ञानाचा विरोध नसून कर्माचा व ध्यानाचा विरोध आहे आणि ज्ञानी स्थितप्रज्ञ कर्में करूं शकतो असें पंचदशीकारांनींहि म्हटलें आहे आणि गीतेंतहि ज्ञानी माणसें कर्मयोगाचें आचरण करीत असल्याचे प्रत्यक्ष दाखलेच दिले आहेत. अर्थातच कर्म व ज्ञान यांच्या आत्यंतिक विरोधाची ही क्लृप्ति निराधार ठरते. त्याचप्रमाणें कर्मयोगाची मजल चित्तशुद्धीपलीकडे जाऊं शकत नाहीं व कर्माचरण करणाऱ्याला आत्मज्ञान होत नाहीं असें म्हणणें हेंहि गीतेंतील सिद्धान्ताच्याच विरुद्ध आहे.

॥ ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ॥
॥ अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ॥१३-२४

या श्लोकांत भगवन्तांनीं कर्मयोगानें आत्मसाक्षात्कार होतो असें स्पष्ट सांगितलें असून ध्यानमार्ग, सांख्यमार्ग, कर्ममार्ग हे वेगवेगळे मार्ग आहेत असें निस्संदिग्ध रीतीनें सांगितलें आहे. कर्माचरणानें केवळ चित्तशुद्धीच होत असती व आत्मसाक्षात्कार होत नसता तर या ठिकाणा कर्मयोग्याला कर्मयोगानें ज्ञान होतें असें प्रतिपादन केलें नसतें. पण या ठिकाणींच काय पण गीतेंत अशीं शेंकडो स्थळें आहेत कीं, जेथें कर्मयोगाचें आचरण केलें असतां ज्ञानप्राप्ति होते, एवढेंच नव्हे तर मोक्ष मिळतो असें सांगितलें आहे.

या संबंधांत गीतेत जो क्रम सांगितला आहे तो असा १ यज्ञार्थ कर्म, २ बुद्धियोग, ३ ज्ञानपरिपाकार्थ कर्मयोग, ४ अपरोक्ष साक्षात्कार, ५ सिद्धावस्थेंतील लोकसंग्रहार्थ कर्मयोग. यावरून कर्माची मजल चित्तशुद्धीपलीकडे जाऊं शकत नाहीं ही संन्यासमार्गीयांची कल्पना सपशेल खोटी ठरते. "स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः," "स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः", "कर्मणैव हि संसिद्धिं आस्थिता जनकादयः," "असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः," "सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम्" इत्यादि वचनांतून कर्मयोगी आत्मज्ञानी होऊन परब्रह्मपदाला कसा पावूं शकता ते सांगितलें आहे. कर्मयोग्याचें आचरण हें सात्विक स्वरूपाचें असतें आणि ज्ञानस्फूर्ति हा सत्त्वगुणाचा स्वाभाविक धर्म आहे. गीतेंतच 'सत्त्वात्संजायते ज्ञानं' 'सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते' इत्यादि वचनांतून सत्त्वगुणानें ज्ञानाची स्फूर्ति होत असें म्हटलें आहे. तात्पर्य, कर्मयोगाचरणानें आत्मज्ञान, आत्मसाक्षात्कार व मोक्ष या सर्वांचा यथाक्रम लाभ होतो व त्यांत मध्यंतरीं कोठेंहि कर्मसंन्यासाचा आधार घ्यावा लागत नाहीं.

## गीतेंतील कांहीं श्लोकांचा नवा अर्थ

गीतेंतील श्लोकांची चिकित्सापूर्वक चर्चा करतांना मला कांहीं शब्दांचे किंवा वाक्यांचे वेगळे अर्थ सुचले, ते वाचकांच्यापुढे चर्चेकरितां म्हणून मांडीत आहे. स्थलसंकोचास्तव जुना अर्थ कोणता व तो अग्राह्य कां वाटतो याचा ऊहापोह केलेला नाहीं. पण गीतार्थाच्या कोणत्याहि पुस्तकांतून जुना अर्थ काढून पाहिल्यास जुन्या-नव्यांतला फरक लक्षांत येईल.

(१) निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे॥१-३१

या युद्धांत स्वजनांचा वध केल्यानें श्रेयाची प्राप्ति होईल असें लक्षण कितीहि विचार करून पाहिलें तरी दिसत नाहीं. उलटपक्षीं श्रेयाच्या उलट म्हणजे अकल्याणकारक परिणाम होण्याचीं चिन्हें मात्र डोळयासमोर उभीं आहेत.

(२) गुरून् हत्वा हि महानुभावान् । श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ॥
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव । भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ २-५ ॥
न चैतद् विद्मः कतरन्नो गरीयो। यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः॥
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः समुखे धार्तराष्ट्राः ॥२-६

धृतराष्ट्र पक्षांतील ज्यांना (भीष्मादिकांना) ठार मारून आम्हाला जिवंत राहण्याची देखील इच्छा नाहीं असे भीष्म-द्रोणादि गुरु आमचे प्रतिपक्षी होऊन आमच्यापुढें युद्धास उभे राहिल्यामुळें आम्ही त्यांना जिंकावें किंवा त्यांनीं आम्हास जिंकावें (अर्थात् आम्ही प्रतिकार न करतां त्यांना आम्हास जिंकूं द्यावें) या दोहोंतून कोणता पक्ष आम्हाला श्रेयस्कर होईल हें समजत नाहीं. भीष्मादिक हे गुरु अर्थात् महात्मे आहेत असें समजून त्याच्यावर शस्त्र न चालवितां आम्ही या लोकीं भिक्षाटन देखील करणें बरें, का उलटपक्षीं हे गुरु अर्थलोलुप आहत असें जाणून त्यांच्यावर शस्त्र चालवून त्याच्या रक्तानें माखलेले राज्यादिक भोग आम्ही याच ठिकाणीं उपभोगावे हें बरें ?

अर्जुनानें विचारलेली हीच शंका युद्धापूर्वी धर्मराजानेंहि जवळजवळ याच शब्दांनीं प्रदर्शित केली होती. पाहा उद्योगपर्व अ. १५४ श्लोक २२ "कथं ह्यवध्यैः संग्रामस्त्वार्यैः सह भविष्यति । कथं हत्वा गुरून् वृद्धान् विजयो नो भविष्यति॥" या शंकेचें उत्तर त्या वेळीं स्वतः अर्जुनानें असें दिलें होतें कीं, ज्याअर्थी कुंती व विदुर यासारखीं सात्विक माणसें युद्ध करण्यास सांगत आहेत त्याअर्थी यांत पाप नसलें पाहिजे. पण या उत्तरानें पूर्ण समाधान न झाल्यानें आतां स्वतः अर्जुन तोच प्रश्न श्रीकृष्णास विचारीत आहे. हा पूर्वापार संबंध लक्षांत घेतल्यास 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः" याचा अर्थ वर दिल्याप्रमाणें घेणें सुसंगत ठरतें.

(३) ॥ योगः कर्मसु कौशलम् ॥ २-५०

जें कोणतेंहि कर्तव्य करण्याची पाळी येईल तें कर्तव्य प्रियच मानण्याची (गोड करून घेण्याची) बुद्धि कर्मयोगामुळें प्राप्त होते. (प्राप्त कर्तव्य करण्यांत सुख असो वा दुःख असो, तें कर्तव्य आपल्या मनाजोगतें प्रिय असो वा अप्रिय असो- तें मनःपूर्वक व आनंदवृत्तीनें करणें यांतच कर्मयोगाचें खरें सारसर्वस्व आहे. या-

पूर्वीच्या ४८ व्या श्लोकांत सिद्धि व असिद्धीसंबंधीं समत्वबुद्धि ठेवणें म्हणजे 'योग' होय असें सांगितलें असता 'योगः कर्मसु कौशलं' याचा अर्थ करतांनाहि बहुतेकांनी पुनः तपलीच समत्वबुद्धि म्हणजे योग, कर्म करून अकर्म साधणें म्हणजे योग, कर्म करण्याची खुबी म्हणजे योग, कर्माची बंधनकारकता टाळणें म्हणजे योग असे मोघम अर्थ दिले आहेत; पण हा अर्थ 'योगः कर्मसु कौशलम्' या पदांतून कसा आला तें सांगितलें नाहीं. मी वर दिलेला अर्थ

"नद्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ॥१८-१०

या श्लोकांत कुशल शब्दाचा जो अर्थ आहे तो अर्थ मुख्य धरून त्यावरून दिला आहे म्हणून त्याला गीतेचाच आधार आहे. )

(४) मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ॥ १५-१५

यांत 'अपोहनं' शब्दाचा अर्थ कोणी विवेक, कोणी अविद्या, कोणी मीमांसा, कोणी व्यावृत्तिरूप ज्ञान, कोणी स्मृति व ज्ञान यांचा नाश असा दिला आहे. त्यापैकी विवेक आणि व्यावृत्तिरूपज्ञान हे दोन अर्थ बऱ्यापैकी आहेत. परंतु एकनाथी भागवतांत

सविकान्येव सेवेत पुमान् सत्त्वविवृद्धये ।
ततो धर्मस्ततो ज्ञानं यावत् स्मृतिरपोहनम् ॥
११-१३-६

असा श्लोक असून तेथें 'अपोहनं' चा अर्थ स्वतः नाथमहाराजांनीच 'सविलास अविद्या निरसन, अपोहन या नांवे' असें स्पष्टीकरण केलें आहे. त्यास अनुसरून येथेंहि 'अपोहन' म्हणजे 'मोहनाश' असा अर्थ घ्यावा हें अधिक सयुक्तिक दिसतें.

(५)अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम्(१६-८)

या श्लोकांतल्या 'संभूत' या पदाचा अर्थ 'उत्पन्न झालेला' असा न घेतां 'संभूय समुत्थान' यांतल्याप्रमाणें 'संबंध जडलेला, 'निगडित झालेला' 'सहकारी' असा अर्थ घ्यावा, म्हणजे अर्थ चांगला लागतो, तो असा—

( आसुरी वृत्तीचे लोक म्हणतात कीं ) या जगांत परस्परांचा परस्परांशीं कांहीं संबंध नाहीं; स्वेच्छाचाराकरितांच हें जग निर्माण झालें आहे. ( गीतेंत पूर्वी 'सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा' आणि 'परस्परं भावयंतः 'इत्यादि श्लोकांतून या सृष्टींत जो जो प्राणी जन्मास येतो तो तो कांहीं तरी कर्तव्यबद्ध होऊनच जन्मास येतो असें सांगितलें आहे. ही कल्पना ज्यांना मान्य आहे ते दैवी संपत्तीचे पुरुष असून याच्या उलट स्वतःच्या सुखापलीकडे दुसऱ्या कशाचीहि पर्वा न करणारे ते आसुरी संपत्तीचे लोक होत. व त्यांच्या मतें या जगांत परस्परांचा परस्परांशीं कोणत्याहि नात्यानें कर्तव्याच्या दृष्टीनें संबंध जडलेला नसतो. म्हणजेच हे जग अपरस्परसंभूत असें आहे, असा आसुरी वृत्तीच्या लोकांचा अभिप्राय असतो.

(६) सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥३-३३

ज्ञानी मनुष्य देखील आपल्या प्रकृतिस्वभावाप्रमाण कर्म करण्याला प्रवृत्त होतो; मग सामान्य माणसें प्रकृतिवश होऊन कर्माचरण करतील यांत नवल काय ? ( प्रकृतीचा एवढा प्रभाव असल्यामुळें कर्मेंद्रियांना ) प्रतिबंध करून काय उपयोग ? ( या श्लोकांत बाह्येंद्रियांना जखडून टाकल्यानें चेष्टाभाव म्हणजे अकर्मत्व साध्य होऊं शकत नाहीं हे सांगण्याचा हेतु आहे. मनोनिग्रह करणें अवश्य आहे व तो करण्यांत सात्त्विकत्व असून तें सर्वांनी प्राप्त करून घ्यावें. त्याला या वचनानें बाध येत नाहीं. पण मी माझ्या बाह्येंद्रियांना कांहींच करूं देणार नाहीं असें म्हटल्यास ज्ञान्याचाहि तो आग्रह चालणार नाहीं ! मग इतरांची कथा काय ? )

(७) ॥ परधर्मो भयावहः ॥ ३-३५

या श्लोकांत स्वधर्म टाकून परधर्माचें आचरण करणें हें भयावह म्हणजे अनर्थकारक आहे असें सांगितलें आहे पण भयावह कां याच्या कारणाचें नीटसें स्पष्टीकरण केलें नाहीं. तें स्पष्टीकरण 'इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ । तयोर्न वशमागच्छेत् तौ ह्यस्य परिपन्थिनौ ' या ( ३-३४ ) श्लोकांत आणि 'न द्वेष्ट्यकुशलं कर्म । कुशले नानुषज्जते ' ( १८-१० ) या श्लोकांत सांगितलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास स्वधर्म सोडून परधर्माचरण करण्यांत 'योगः कर्मसु कौशलं 'आणि 'तयोर्न वशमागच्छेत्' इत्यादि श्लोकांत सांगितलेले निर्बंध पाळले जाऊं शकत नाहींत म्हणून 'परधर्माचरण ' भयावह म्हटलें आहे. स्वधर्माचरणांत जसें निष्कामत्व साधतें तसें परधर्माचरणात निष्कामत्व साधत नाहीं; कारण परधर्माचरण हें बोलूनचालून रागद्वेषप्रयुक्त किंवा कामनायुक्तच असणार, म्हणून तें बंधनकारक होणार असा भगवंताचा अभिप्राय दिसतो.

# श्रीशिवभारत

## लेखांक ५ वा

शिवभारताचे सामान्य स्वरूप त्याचे विशेष महत्त्व व त्यात ग्रथित झालेले इतिहासबीज याविषयी पूर्वी विवेचन केलेच आहे. तथापि या ग्रंथासंबंधाने सुचणारे आणखीहि काही थोडे विचार या लेखात नमूद करून हे परीक्षण संपवू. श्री. दत्तोपंत आपटे यानी आपल्या प्रस्तावनेत या ग्रंथातील केवळ इतिहासस्वरूपाची विधाने एकत्र करून प्रबंधरूपाने दिली आहेत. त्यावरून या ग्रंथात शिवचरित्रातला कोणता काल आहे, कोणते प्रसंग आहेत व वाचकाना पूर्वी अपरिचित असलेली अशी नवी माहिती कोणती आहे हे कळून येईलच. तथापि शिवचरित्रपर इतर ग्रंथ आणि शिवभारत यातील तारतम्य कळावयास पाहिजे तर आपटे यानी प्रस्तावनेत प्रत्येक शिवचरित्रग्रथाची जी भूमिका म्हणून दिली आहे ती वाचकानी लक्षपूर्वक वाचावी असे आमचे सांगणे आहे. आम्ही नुसती 'भूमिका' म्हणतो याचे कारण हे की आपटे यानीच दर्शविल्याप्रमाणे शिवचरित्रपर असा कोणताहि ग्रंथ नाही की ज्यात काही उणेपणा व वैगुण्य नाही.

एखादा दगडी पुतळा सर्व बाजूनी घडता येत असला तरी प्रेक्षकाला तो फक्त समोरूनच पाहावयास सापडतो. पण सामान्य प्रेक्षकापेक्षा ज्याची अधिक मार्मिक व सत्यान्वेषणाची दृष्टि असते तो पुतळयाचे केवळ सन्मुख दर्शन घेऊन समाधान न पावता त्याच्या भोवती हिंडून त्याचे चारहि अंगानी निरीक्षण करील. कारण कित्येक वेळा व्यक्तिविशेष पटविणारी चिन्हे व लक्षणे ही केवळ चेहऱ्यावरून न पटता आजूबाजूलाहि दिसणारी असतात. म्हणून पुतळा पाहणारा जरी फक्त सन्मुख दर्शन घेतो तरी पुतळा करणारा शिल्पकार आपल्या कलाविषयाची चित्रे व फोटो ही जितक्या निरनिराळ्या बाजूची मिळतील तितकी मिळवीत असतो व जेथे ती तयार न मिळतील तेथे आपल्या हाताने रेखाटून घेतो. शिवाजीमहाराजांचे चरित्र अशा शिल्पकाराच्या दृष्टीने पाहिलेले व मांडलेले असे आजवरच्या कोणाच्याहि ग्रंथात आढळत नाही.

प्रेक्षक पुतळयाजवळ ज्या ठिकाणी उभा असेल किंवा ज्या ठिकाणी उभे राहण्यापुरती त्याला जागा मिळाली असेल तेथून यथाप्रमाणदर्शनशास्त्राच्या अनुरोधाने जितका भाग पाहावयास सापडेल तितकाच तो पाहू शकतो व पुतळयाची त्याची ओळख म्हटली म्हणजे त्याला त्या अंगाने पटली तितकीच. या न्यायाने आजवर बखरी व इतिहास वगैरे शिवचरित्राची जी साधने उपलब्ध झालेली आहेत त्यात शिवाजीसंबंधी इतिहासाची फक्त एकेकच बाजू पाहावयास सापडते व तीच त्याची भूमिका होय. स्वतः शिवभारत हा ग्रथ घेतला तरी कवींद्र परमानंदानेहि शिवाजीकडे एका विशेष भूमिकेवरच उभे राहून पाहिलेले आहे, पण प्रस्तावनालेखक आपटे यानी आपली दृष्टि सर्व बाजूनी फिरविल्यामुळे त्याना निरनिराळया भूमिका एकाजवळ एक मांडून वाचकाला सत्यनिर्णय करण्याला साहाय्य देता आले आहे.

सभासदाची बखर शिवाजीच्या मृत्यूनंतर लवकरच लिहिली गेली आहे तरी त्यातील प्रसंगाचा कालानुक्रम आगेमागे झाला आहे. 'थोरल्या महाराजानी पराक्रम केला आणि चार पातशाह्यांशी दावा मांडला. असे असता औरंगजेबाने येऊन किल्ले घेतले व अनर्थ केला हे कसे घडले?' असे राजारामाने विचारल्यावरून बखरकाराने ही बखर लिहिली आहे. चिटणिशी बखर पुढे पुष्कळ वर्षानी लिहिली असून तीत इतिहासापेक्षा पुराणाचे स्वरूप अधिक नटले आहे. आणि शास्त्राधार पुराणे दंडनीति राजधर्म राजमयूख रमलशास्त्र दिनचर्या पराक्रम कथा या साधनावरून ही बखर लिहिली असे स्वतः बखरकारच म्हणतो! तेव्हा या चरित्रग्रंथाला इतिहासाचे स्वरूप किती थोडे आहे याची कबुली बखरकार आपल्याच तोंडाने देत आहे. सभासदी बखरीचा प्रसंगांच्या घालमेलीचा दोष जमेला धरून शिवाय वर दर्शविलेल्या अनैतिहासिक साधनांच्या उपयोगाची भरहि त्यातच त्याने घातली आहे.

ग्रँटफ्ड हा इतिहासकार—म्हणजे नव्या दृष्टीने सत्यान्वेषण करून चिकित्सक प्रबंध लिहिणारा. पण त्यानेही आपल्या ग्रथाला मुख्यतः आधार बखरी आणि घराण्यांच्या कैफियती यांचाच घेतल्यामुळे त्याची मांडणी जरी इतिहासकाराची असली तरी तारखा प्रसंग व व्यक्तिसंबंध यांच्या विधानात त्याच्या अविश्वसनीयतेचे बिज उरतेच. इतिहासकाराच्या दृष्टीने ग्रँटडफ हा पुष्कळ चांगला. कारण ऐतिहासिक संशोधनाच्या या नव्या काळात आपल्या इतिहास-ग्रंथात दंतकथा पेरण्याच्या व त्याना अर्धवट इतिहासस्वरूप भासवून दडपून देण्याच्या मोहास जितके किंकेडसाहेब बळी पडले तितकाही ग्रँटडफ पडलेला नाही. हा त्याचा गुणच घेतला पाहिजे. यानंतर राजवाडे

यांच्या ऐतिहासिक बुद्धीविषयी लिहिण्याचे कारणच नाही. तथापि त्यानी शिवचरित्राचे असे संशोधन फारसे केलेले नाही. तसेच त्याना नवीन साधने अशी या काळची फारशी मिळालेली नाहीत. निदान स्वतंत्र शिवचरित्र ग्रंथ लिहिण्याइतकी ती मिळालेली नव्हती. आणि उपलब्ध सर्व साधने एकत्र घेऊन संगतवार चरित्रपर प्रबंधहि त्यानी लिहिलेला नाही.

शहाजीविषयक राधामाधव चंपु हा ग्रंथ त्यांच्या हाती पडला. पण दुर्दैवाने शिवभारत हा ग्रंथ त्याना पुरा माहीत नव्हता किंवा मिळाला नाही. आणि जेधेशकावलीसारखे साधन हाती आले असताहि घाईने बनविलेल्या काही एका ग्रहामुळे त्यानी त्याची छाननी करून शिवचरित्राची जितकी चर्चा त्याना करता आली असती तितकीहि त्यानी कोठे केली नाही. प्रो. जदुनाथ सरकार यांची दृष्टि राजवाड्यांप्रमाणे केवळ इतिहासकाराचीच आहे. तथापि त्यानी शिवाजी पाहिला तो मुख्यतः फारशी बखरकार व काही इंग्रजी ग्रंथकार यांच्या भूमिकेवर उभे राहून गेल्या चाळीस ! वर्षांत मराठीत प्रकाशित झालेल्या संशोधनात्मक साधनांचाहि त्यानी उपयोग केला आहे नाही असे नाही. पण या साधनांची निवडानिवड करताना व त्याची ग्राह्याग्राह्यता ठरविताना त्यांची दृष्टि जितकी निर्दोष राहावयास पाहिजे तितकी ती राहिली नाही. आपटे यानी जदुनाथ सरकार याना "काफीखान व ग्रँटडफ याचे आधुनिक अवतार" असे म्हटले आहे हे वर्णन सर्वस्वी न्यायाचे आहे असे आमच्याने म्हणवत नाही. तथापि जदुनाथ सरकार याना मराठीचे ज्ञान फारशीइतके नाही आणि मराठी संशोधकानी पुढे आणलेली सर्व साधने त्यानी वाचून पाहून पारखून घेतली असेहि आम्हास म्हणवत नाही.

प्रो. सरकार यानी ग्रँटडफच्यापुढे बरीच मजल मारली आहे.तथापि बखरकार म्हटला म्हणजे येथून तेथून सगळा सारखाच असतो, मग त्याने मराठी भाषेत लिहिले काय किंवा पर्शियन भाषेत लिहिले काय सारखेच, ही गोष्ट जितकी पटावी तितकी त्याना पटलेली दिसत नाही. शिवचरित्राची साधने विजापुरी व मोंगली इतिहासात सापडतील असे प्रो. जदुनाथ सरकार याना वाटते. पण शिवाजीचा परामर्ष फारशी बखरकारानी घेण्याइतकी त्याची योग्यता त्याला प्राप्त होण्यापूर्वी शिवाजीचे पुष्कळसे चरित्र होऊन गेलेले होते. उलट जी गोष्ट फारशी बखरकाराना लागू तीच डच पोर्तुगीज किंबहुना इंग्रज व्यापारी व वसाहतवाले यांच्या कागदपत्रातून शिवाजीसंबंधी मिळणाऱ्या इतिहाससाधनानाहि लागू पडते, हे पोर्तुगीज दप्तरे व डच लोकांची डागरजिस्टरे याना महत्त्व देणारानीहि लक्षात ठेवले पाहिजे अशी आमची सूचना आहे.

इंग्रज व्यापारी शिवाजीच्या मुलखाजवळ राहणार असले तरी शिवाजी वखारीवर चालून गेला किंवा सुरतेच्या इंग्रज व्यापाऱ्यांचे शिष्टमंडळ रायगडावर राज्यारोहणसमारंभाला गेले असे प्रत्यक्ष प्रसंग वगळले असता, समकालीन अशाही युरोपियन अखबारनवीसाना शिवाजीची जी माहिती मिळाली ती उडत उडत कर्णोपकर्णी व चुकीच्या दूषित ग्रहाच्या पाचचार वस्त्रातून गाळलेलीच मिळाली असली पाहिजे हे उघड आहे. पण असले दूषण खुद्द मराठीत असलेल्या इतिहाससाधनाना लागू शकत नाहीं. पराक्रम करून प्रसिद्ध झालेला ऐतिहासिक पुरुष हा नभोमंडळात जवळ जवळ डोक्यावर आलेला किंवा दोनप्रहर उलटून क्षितिजाकडे जाण्यास हळूहळू निघालेल्या सूर्यासारखा होय. त्याच्याकडे डोळे उघडे ठेवून कोणास नजर लावता येत नाहीं, म्हणून त्याच्या स्वरूपाचे वर्णन होणार ते अस्पष्ट आणि तेजाने गोंधळून गेलेल्या मनाकडून व्हावे असेच होणार. पण ज्यानी पहाटच्या अंधारातले आकाश पाहिले, ज्यानी अरुणोदय पाहिला, ज्यानी सूर्यबिंब क्षितिजावर येऊन वर चढत असलेले पाहिले, अशा प्रेक्षकानी केलेले सूर्याचे वर्णन अधिक विश्वसनीय असेल यात शंका कसली ! अर्थात् शहाजी व शिवाजी यांच्या संबंधी जी माहिती दानपत्रें इनामपत्रें जमिनीचे कागद पंचायतींचे निवाडे करीणे सनदापत्रे वगैरेतून मिळते ती सर्वात अधिक विश्वसनीय हे उघड आहे. आणि असली ही सर्वांगीण समकालीन माहिती मराठीत लिहिलेल्या इतिहाससाधनातच मिळणार. ती दुसरीकडे कशी मिळेल ?

या दृष्टीने पाहता शिवभारताची योग्यता शिवचरित्राला साधनरूपाने अतिशय आहे हे कोणाच्याहि लक्षात येईल. याहि ग्रंथकाराने शिवाजी पाहिला तो नभोमंडळात आल्यावर पाहिला ही गोष्ट खरी. तथापि खुद्द सूर्यमंडळावर असणाऱ्या प्रेक्षकाचे डोळे पृथ्वीवर किंवा इतर ग्रहावर असणाऱ्या प्रेक्षकाच्या डोळ्याइतके तेजाने दिपत नाहीत, निदान त्या तेजोमय प्रदेशातही त्याला आसपासचे उच्चनीच दिसत असते. या दृष्टीने शिवभारतकाराने केवळ ऐतिहासिक दृष्टीने जे प्रसंग आपल्या ग्रंथात वर्णिलेले आहेत त्याना विद्यमान इतर कोणत्याहि साधनापेक्षा अधिक महत्त्व आहे. बखरी किंवा ऑर्मे ग्रँटडफ यांच्या तुलनेने किंवा कसोटीने शिवभारताची विश्वसनीयता ठरत नसून उलट शिवभारताच्याच कसोटीने या इतरांची विश्वसनीयता ठरविण्याचा प्रसंग आहे. राधा-माधवविलास चंपूच्या प्रस्तावनेत

राजवाड्यांना बखरीच्या पलीकडे जाऊन शहाजी-संबंधाने ऐतिहासिक माहिती देता आली याचे कारण त्यानी तंजावरच्या शिलालेखाचे अध्ययन केले होते म्हणून. पण आता शिवभारत ग्रंथ प्रसिद्ध झाल्यामुळे शहाजी व शिवाजी यांची चरित्रे लिहिणाराची चर्चा आणखी एक मजल पुढे जाते. याचे कारण तंजावरचा शिलालेख लिहिणारानेच या शिवभारताचा आधार घेतला आहे. प्रो. सरकार यानी या शिलालेखाचाहि उपयोग केलेला नाही व त्याचा आधार घेतलेला नाही. शिवभारताचे ज्ञान त्याना नव्हते हे सांगावयासच नको.पण आता शिवभारत ग्रंथ छापून प्रसिद्ध झाल्यानंतर तरी ते त्याचा कितपत आधार घेतात किंवा त्याला कितपत मान्यता देतात हे आपोआप दिसून येणार आहे.

प्रो. सरकार याना संस्कृत भाषेचे ज्ञान फारशी भाषेइतके आहे की नाही हे आम्हास माहीत नाही. पण सुदैवाने मराठीपेक्षा त्याना संस्कृत अधिक कळत असावे असे आम्हास वाटते. मग अजूनहि ते आमच्या इकडील या साधनापेक्षा फारशी दप्तराना व बखरीना अधिक महत्त्व देतात की काय हे कळणे हा एक मोठा कौतुकाचाच विषय आहे. शिवभारत झाले तरी त्याला शिवाजीमहाराजांच्या चरित्राची सर्व अंगे एखाद्या दगडी पुतळ्याप्रमाणे विश्वसनीय किंवा यथास्वरूप हुबेहूब अशी दाखविता आलेली नाहींत ही गोष्ट कोणीही मान्य करील. तथापि परमानंद कवीच्या ग्रंथात जी भूमिका आहे ती इतर कोणत्याही चरित्रग्रंथातील भूमिकेपेक्षा अधिक उपयुक्त व यथार्थ दर्शन घडविणारी आहे खरी असें निःसंदेहपणें म्हणता येते. आपटे याच्या प्रस्तावनेत जो एक महत्त्वाचा भाग आहे तो हा की त्यानी पूर्वीच्या सर्व चरित्रग्रंथातील माहिती जमेस धरून शिवभारतातील माहितीने नव्या गोष्टी कोणत्या कळतात हे विवेचक बुद्धीने दिले आहे. तसेच इतर ग्रंथात जी काही माहिती आहे पण ती शिवभारतात नाही असे का घडले असेल याचाही खुलासा त्यानी चांगला केला आहे. दुसऱ्या मुद्दयाच्या विवेचनाने फक्त संशयनिवृत्ति होते, पण पहिल्या मुद्दयाच्या विवेचनाने निश्चित स्वरूपाच्या ज्ञानात नवा भर पडते.

कोणताहि चरित्रकार चरित्रविषयासंबंधाने लिहिताना एकादे गोष्ट सोडीत नाही असे होत नाहीं. त्याच्या दृष्टीने आवश्यक किंवा कमी महत्त्वाच्या वाटलेल्या गोष्टी सोडून देतो. दुसऱ्याला त्या अधिक ठळकपणाने दिसतात म्हणून तो त्याना विशेष महत्त्व देतो. तसेच एका चरित्रकाराला माहिती नसते ती दुसऱ्याला असू शकते. अशा रीतीने एका चरित्रग्रंथांत आहे ते दुसऱ्यात नाही असे घडते. पण एकात आहे ते दुसऱ्यात नाही येवढेच कारण लावून जर आपण ग्राह्याग्राह्यता ठरवू लागलो तर ग्राह्यता ही कोणालाच लाभणार नाही. म्हणून रचनात्मक बुद्धीचे काम हेच असते की दात पाडलेल्या चक्राप्रमाणे निरनिराळे चरित्रग्रंथ एकात एक बसवून ते एकमेकाला पूरक कसे होतात हेच मुख्यतः पाहावयाचे. या दृष्टीने आपटे यांची प्रस्तावना अत्यंत उपयुक्त आहे. त्यानी शिवचरित्रातील निरनिराळे प्रसंग घेऊन साधकबाधक चर्चा केली आहे. पण त्या सर्व मुद्दयांचा परामर्ष या परीक्षणलेखात घेता येणे शक्य नाही म्हणून ते काम आम्ही न करता ते ग्रंथवाचकावरच सोपवितो. तथापि एका मुद्दयाकडे वाचकाचे विशेष लक्ष पुरवाव अशी आमची शिफारस आहे.

हा मुद्दा शिवजन्माच्या नवीन तिथीसंबंधाने होय. या मुद्दयाचा पूर्वी पुष्कळ वाद झाला असल्याकारणाने आपटे यानी आपल्या प्रस्तावनेत त्याला फारशी जागा दिलेली नाही. पण पूर्वी वाद झाला तेव्हा शिवभारत हा समग्र ग्रंथ लोकापुढे नव्हता. त्यातील एक लहानसा उतारा लोकापुढे येत होता. आणि अशा तुटक उताऱ्यावरून त्याला किती महत्त्व द्यावयाचे याविषयी लोकाना शंका आली असल्यास नवल नाहीं. पण आता हा समग्र संस्कृत ग्रंथ मराठी भाषांतरासह छापून प्रसिद्ध झालेला आहे. तेव्हा नव्या शिवजन्मतिथीचा उल्लेख कोठे तरी यदृच्छेने चुकून एखाद्या चिटोऱ्यात किंवा कागदपत्रात नजरेला आल्यासारखा आहे. किंवा विस्तृत चरित्रग्रंथात यावा त्या पद्धतीनें त्या क्रमाने व तपशीलवार आलेला आहे की नाही, हे वाचकाला स्वतःच पाहावयास सापडणार आहे. या ग्रंथातील केवळ काव्यात्मक भाग बाजूस ठेवला असता निवळ ऐतिहासिक दृष्टीने लिहिलेला असा भाग किती आहे हे आम्ही पूर्वीच्या एकदोन लेखात वाचकांच्या पुढें मांडलेलेच आहे. तसेच त्याने ज्या थोड्या प्रसंगाचा कालनिर्देश केला त्यात तपशीलवार बारीक नजरेने माहिती कशी दिली आहे, म्हणजे शक मिति वार घटका वगैरे साक्षेपाने कसे दिले आहेत हे पाहिले म्हणजे त्यात चूक असण्याचा संभव नाही असे कोणासहि वाटेल. अफझलखानाच्या वधाची आणि त्याप्रमाणे शिवजन्माची माहिती कालनिर्देशाच्या दृष्टीने इतकी तपशीलवार दिली आहे की कोणी ती मुद्दाम बनावट लिहिली असे म्हणण्यापेक्षा दुसरा आक्षेप तिजवर घेता येत नाही आणि ती तशी बनावट का लिहावी याला काही कारणहि नाही.

शिवचरित्रकार परमानंदाला खोटी तिथी लिहून एकाचे राज्य काढून दुसऱ्यास द्यावयाचे नव्हते. किंवा

हल्लीच्या इतिहाससंशोधकांप्रमाणे अहंकारबुद्धीने त्याला वाद घालण्याचा होता असे दिसत नाही. मग ती तिथी तो बनावट का लिहील याचे उत्तर वाचकानी दिले पाहिजे. आता बखरकारानी तरी शिवजन्माचे दुसरे एक साल कां द्यावे असाहि प्रश्न याला उत्तरादाखल विचारता येईल. आम्ही स्वतः या मताचेच आहो की दुसरा म्हणतो ते जन्मवर्ष कां लिहिले गेले असेल याचा खुलासा परिहार किंवा सूचना करण्याचा बोजा प्रत्येक प्रतिपक्षावर पडतो. पण बखरकार हे कालानुक्रमाने पाहता शिवभारतकाराच्या नंतरच होत. एकहि बखरकार शिवसमकालीन नाही. पण शिवभारतकार हा काहीसा शिवसमकालीन आहे ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. स्वतःचा पुरावा पुढें मांडण्याच्या बरोबर दुसऱ्याच्या पुराव्याचा खुलासा व निर्वाह करण्याचा बोजा प्रत्येक प्रतिपक्षावर येत असतो. पण शिवभारताचा आधार घेणाऱ्यावर हा बोजा जितका पडतो त्याहून बखरीचा आधार घेणाऱ्यावर तो अधिक पडतो येवढेच आमचे म्हणणे आहे.

# स्व-पर-संरक्षणाचे हक्क

( डॉ. वि. म. भट, येवले. )

लेखांक ३ रा

## हक्कांचें स्पष्टीकरण

सामान्य वाचकाकरिता मी येथें ९६ ते १०६ ह्या इंडियन पिनल कोडामधील कलमांचें भाषांतर माझ्या शब्दांत दिलें आहे. सरकारी भाषांतर मी पाहिलें नाहीं त्यामुळें शब्दांत कदाचित फरक वाटेल, पण अर्थांत फरक नाहीं. हायकोर्टाच्या निवाड्यांतून उपयुक्त तेवढी टीका मी प्रत्येक कलमापुढें दिली आहे. मेन, नेल्सन, गौर, रतनलाल वगैरे सर्वमान्य ग्रंथकारांच्या टीकेंतील उपयुक्त भागहि मी वगळला नाहीं. सामान्य वाचकांस उपयुक्त नाहींत म्हणून निवाड्यांचे उल्लेख मात्र मीं टाळले आहेत.

"स्व-पर-संरक्षणासाठीं केलेलें कोणतेंहि कृत्य गुन्हा होऊं शकत नाहीं" असें ह्या कायद्याचें पहिलें कलम आहे. (क. ९६) ह्यांत प्रथमतः जी एक गोष्ट ध्यानांत धरली पाहिजे ती ही कीं, स्वपरसंरक्षण हें पिनल कोडखालीं गुन्हा म्हणून गणल्या गेलेल्या कृत्याविरुद्ध असलें पाहिजे. गुन्ह्याविरुद्ध संरक्षणाचा हक्क आहे. गुन्ह्याखेरीज इतर कोणत्याहि गोष्टीविरुद्ध नाहीं.

स्वपरसंरक्षण कां केलें हें संरक्षकानें अधिकाऱ्यांस साद्यंत निवेदन करावें. कारण ज्या गुन्हेगाराविरुद्ध हा संरक्षणाचा हक्क आपण बजावतों त्याला कांहीं तरी इजा आपण केलेली असते. त्यासाठीं त्यानें किंवा त्याच्या पक्षांतील माणसानें न्यायासनासमोर फिर्याद केल्यास संरक्षकानें आपलें म्हणणें अधिकाऱ्यांच्यापुढें मांडल्याखेरीज त्यांना तरी आपली बाजू कशी समजणार ? ह्यांत आपला नैसर्गिक हक्क आपण बजावल्यानंतर न्यायासनासमोर जाण्याचा त्रास आपणास भोगावा लागतो हे खरें. पण त्याला गत्यंतर नाहीं. कारण वर सांगितल्याप्रमाणें, आपला हक्क आपण शत्रूनें केलेल्या गुन्ह्याविरुद्ध बजावला, का गुन्ह्याखेरीज आपणच कोणत्या तरी मानलेल्या तात्कालिक किंवा मागील दुष्कृत्याबद्दल बजावला, हें ठरणें इष्ट असतें. आणि हा हक्क बजावतांना केलेली इजा किंवा प्राणहरण हें गुन्ह्याच्या मानानें अवश्य होतें किंवा त्यापेक्षां अधिक होतें, आणि संरक्षण करण्यापूर्वी सरकारी संरक्षक पोलिसांचें साहाय्य मिळविणें शक्य होतें किंवा नाहीं हें ठरलें पाहिजे. आणि थोडा विचार केल्यास ह्या तीनहि गोष्टी योग्य न्यायासनासमोर ठरणें हे समाजहिताच्या दृष्टीनें अवश्य आहे, असें प्रत्येक वाचकाच्या ध्यानांत येईल. कारण संरक्षणाचा हक्क हा फक्त गुन्ह्याविरुद्ध आहे; ह्या हक्काच्या बजावणीत आवश्यकतेपेक्षां अधिक इजा किंवा प्राणहानि होतां कामा नये; आणि सरकारी संरक्षकांचें साहाय्य मिळविण्याची संधि असतांना कोणीहि स्व-पर-संरक्षण करूं नये; हीं ह्या कायद्यातील मुख्य तत्त्वें आहेत. त्यांचें महत्त्व पुढील विवेचनांत येणार असल्यानें येथें त्याबद्दल विशेष लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

## हायकोर्टाचे निर्णय

पण संरक्षित्याने अज्ञानानें जरी आपली बाजू न्यायासनासमोर मांडली नाहीं, आणि न्यायासनासमोर ती अन्य रीतीनें आली, तरीहि न्यायाधीशांनीं ती विचारांत घ्यावी असें मद्रास, कलकत्ता, लाहोर इत्यादि हायकोर्टांत ठरलें आहे.

"९९ कलमांत सांगितलेल्या निर्बंधाखेरीज प्रत्येक माणसास शारीरिक गुन्ह्यांविरुद्ध (१) आपल्या स्वतःचें आणि इतरांचें शरीररक्षण करण्याचा हक्क आहे. (२) आणि त्याचप्रमाणें (अ)

चोरी (थेफ्ट) (आ) बळजबरीनें किंवा मारहाणीनें केलेली चोरी अथवा लूट ( रॉबरी ) ( इ ) वित्तहानि (मिसचीफ) आणि (ई) बळजबरीनें केलेलें अतिक्रमण ( क्रिमिनल ट्रेसपस ) ह्या गुन्ह्यांविरुद्ध किंवा त्याबद्दल केलेल्या प्रयत्नांविरुद्ध, आपली स्वतःची किंवा इतरांची, स्थावर अथवा जंगम मिळकत रक्षिण्याचा प्रत्येक माणसास अधिकार आहे. " ( कलम ९७ )

ह्या कलमांत स्वपर-संरक्षणाचा हक्क जीवित आणि वित्त ह्यांपुरता स्पष्ट केलेला असून त्याची व्याप्तीहि दाखविली आहे. शारीरिक आणि वित्तविषयक ठराविक ४ गुन्ह्यांविरुद्धच हा हक्क आहे, हें कलमांत स्पष्ट आहे. पण ह्याकरितां शत्रूकडून गुन्हा किंवा गुन्ह्याचा प्रयत्न घडल्यावर मग आपण संरक्षणाचा हक्क बजवावयाचा, तेथपर्यंत गुपचुप बसावयाचें, असा मात्र ह्याचा अर्थ नव्हे. गुन्हा आतां होणार अशी सकारण भीति वाटूं लागल्याबरोबरच संरक्षणाच्या हक्काची अंमलबजावणी करण्यास हरकत नाहीं. पुढें कलम १०२ व १०५ ह्यांत हें स्पष्ट सांगितलेंच आहे.

## वित्तसंरक्षण

वित्तसंरक्षणाच्या बाबतींत त्या मिळकतीचा निदान ताबा तरी आपल्या किंवा इतराच्या हातांत कांहीं काल शांतपणानें असला पाहिजे. त्या मिळकतीबद्दल जर वाद असतील तर ज्याच्या ताब्यांत ती मिळकत आहे त्याला तिचें संरक्षण करण्याचा पूर्ण अधिकार आहे. अखेरीस न्यायासनासमोर दिवाणी कज्जांत ती मिळकत कोणाचीहि ठरो. पण तेथपर्यंत ज्याच्या ताब्यांत ती मिळकत आहे, मग तो मालक असो वा नसो, त्याला तिचें रक्षण करतां येतें. सारांश, असलेला ताबा राखण्याचा हक्क आहे, नसलेला ताबा मिळविण्याचा हक्क या कायद्यांत नाहीं, तो दिवाणी कायद्यानें मिळवितां येतो. ताबा असणाऱ्या माणसास जर हा अधिकार आहे तर प्रत्यक्ष मालकास तो आहेच हें सांगण्याची जरूर नाहीं.

वित्तविषयक जे चारच गुन्हे सांगितले आहेत त्यांत पुष्कळच उणेपणा राहिला आहे. दरवडा ( डेकॉइटी ) आणि घरफोडी ह्यासारख्या तितक्याच क्रूरतेनें होणाऱ्या आणि नुकसानकारक गुन्ह्यांचा त्यांत उल्लेखहि नाहीं हा मोठाच दोष त्यांत राहिला आहे. पण हे गुन्हहि उपरिनिर्दिष्ट गुन्ह्यांत समाविष्ट होतात असा कोर्टांचा संकेत आहे.

पिनल कोड तयार करणारांनीं या देशांत ज्या अधिक सवलती संरक्षित्यांना दिल्या आहेत त्यांपैकीं एक सवलत म्हणजे हव्या त्या माणसाला हव्या त्या माणसाचें जीवित किंवा वित्त संरक्षण करण्याचा अधिकार दिला आहे, ही होय. विलायेंतत हा हक्क फक्त पीडिताच्या नातलगांना किंवा त्यांच्याशीं इतर संबंध असलेल्या लोकांनाच-मालक, नोकर, पालक, पालित वगैरेंनाच-बजावतां यतो, इतरांस बजावतां येत नाहीं.

## हक्काच्या मर्यादा

हा हक्क बजावण्यापूर्वी कलम ९९ मध्यें सांगितलेले निर्बंध मात्र जरूर ध्यानांत ठेवले पाहिजेत. त्या निर्बंधांनीं मर्यादित केलेल्या क्षेत्रांतच काय तो हा स्वपरसंरक्षणाचा हक्क आहे, ही गोष्ट सदैव ध्यानांत ठेवली पाहिजे.

"वयाच्या लहानपणामुळें, नेणतेपणामुळें, वेडेपणानें किंवा मादक पदार्थांनीं धुंद झाल्यामुळें, अथवा गैरसमजुतीनें एखादें अपकृत्य अपकर्त्याच्या हातून घडल्यास, जरी तें गुन्हा असतांहि गुन्हा म्हणून न ठरलें तरी, त्या अपकृत्याविरुद्धहि प्रत्येकास स्वपरसंरक्षणाचा हक्क आहे." ( कलम ९८ )

ह्या कलमाचा अर्थ थोडासा स्पष्ट करणें जरूर आहे. कांहीं अपकृत्यें कर्त्याकडून बुद्धिपुरस्कर झालेली नसल्यानें तीं गुन्हे ठरत नाहात आणि बालवय, नेणतेपण, वेड, धुंदी अथवा गैरसमजूत ह्यामुळें होणाऱ्या कृत्यात हेतु असण्याचा संभवच नसतो. म्हणून तीं कृत्ये गुन्ह जरी न ठरलीं तरी, प्राणाची किंवा वित्ताची हानि करणारीं असल्यास, त्यांच्याविरुद्ध स्वपर-संरक्षणाचा प्रसंग येणारच. पण स्वपरसंरक्षण हें गुन्हा किंवा त्याचा प्रयत्न ह्यांविरुद्धच काय तें मान्य आहे, असें ह्या हक्कांतील आदिसूत्र आहे. मग अपकर्त्याच्या हेतूच्या अभावीं जीं हानिकारक कृत्यें गुन्हे ठरत नाहींत त्यांचा प्रतिकार करावा कीं न करावा असा प्रश्न येतो. त्याचें या कलमानें उत्तर दिलें आहे. उदाहरणच द्यावयाचें तर श्री. श्रद्धानंदांचा खुनी अबदुल रशीद हा जरी वेडा असता तरीहि खून करतांना त्यावर हत्यार चालविण्यास ह्या कलमानें प्रत्येकास मोकळीक ठेवली होती.

ह्यापुढचें ९९ कलम हें निर्बंधात्मक कलम असल्यानें प्रत्येकानें तें सदैव ध्यानांत धरलें पाहिजे.

## अधिकाऱ्यांसंबंधानें मर्यादा

एखाद्या सरकारी नोकरानें, आपल्या अधिकारांत, प्रामाणिकपणानें एखादें कृत्य किंवा त्याचा प्रयत्न केल्यास जरी तें कृत्य सर्वतोपरी कायदेशीर नसलें तरी आणि त्या कृत्यामुळें मरण अथवा जबर दुखापत होईल अशी सकारण भीति नसल्यास त्या कृत्याविरुद्ध कोणासहि स्वपरसंरक्षणाचा हक्क नाहीं.

त्याचप्रमाणें एखाद्या सरकारी अम्मलदाराच्या आज्ञेनें एखादें कृत्य किंवा त्याचा प्रयत्न

झाल्यास, ती आज्ञा जरी पूर्णपणें कायदेशीर नसली तरी त्या आज्ञेनें केलेलें कृत्य प्राण-हानि किंवा जबर दुखापत करील अशी सकारण भीति नसल्यास, त्या कृत्याविरुद्धहि कोणास स्वपरसंरक्षणाचा हक्क नाहीं.

सरकारी अधिकाऱ्याकडून संरक्षण मिळविण्यास जेथें वेळ आहे तेथें कोणासहि स्वपरसंरक्षणाचा हक्क नाहीं.

स्वपरसंरक्षणासाठीं अवश्य असलेली दुखापत करण्यापेक्षां अधिक इजा करण्याचा अधिकार कोणासहि नाहीं.

स्पष्टीकरण ( १ ) वरील पहिल्या कलमांत सरकारी अधिकारी आहे असें जर संरक्षित्यास माहीत नसेल किंवा माहित असण्याचें कारण नसेल तर त्याच्या कृत्याविरुद्ध स्वपरसंरक्षणाचा अधिकार प्रत्येकास आहे.

स्पष्टीकरण ( २ ) वरील दुसऱ्या कलमांत संरक्षित्यास जर सरकारी अधिकाऱ्याच्या आज्ञेनें तें कृत्य होत आहे हें माहीत नसेल, किंवा तसें माहीत असण्यास सबळ कारण नसेल, किंवा तें कृत्य करणारा मनुष्य कोणाची आज्ञा आहे हें सांगत नसेल, किंवा ती आज्ञा लेखी असल्यास ती मागतल्यावर दाखवीत नसेल, तर त्या कृत्याविरुद्ध स्वपरसंरक्षणाचा हक्क त्यास पूर्णपणें आहे." ( कलम ९९ )

## अधिकाऱ्याची जबाबदारी

ह्या कलमांत सरकारी अधिकाऱ्यांनीं स्वतः किंवा त्यांच्या आज्ञेप्रमाणें त्यांच्या हस्तकांनीं केलेलीं कृत्यें जर त्यांच्या अधिकाराबाहेर फारशीं नसलीं तर, आणि त्या कृत्यांपासून मरण किंवा जबर दुखापत होण्याची भीति नसेल तर, त्या कृत्यांच्याविरुद्ध संरक्षणाचा हक्क नाहीं. अधिकाऱ्यांस मुळींच हक्क नसतांना जर एखादें कृत्य त्यांनीं केलें असेल तर त्या कृत्याचा अवश्य तितका प्रतिकार प्रत्येकाला करतां येईल. पण कांहीं तरी अधिकार असून त्याच्या मर्यादेबाहेर जर अधिकारी गेला, किंवा हुकूम फर्मावला, आणि कृत्य जर प्राणघातक किंवा जबर दुखापत करणारें नसेल तर मात्र त्या कृत्याचा प्रतिकार करतां येणार नाहीं. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे अधिकाराचें अतिक्रमण चालेल, पण अधिकाराचा अभाव मात्र चालणार नाहीं. आणि शिवाय तें अधिकाऱ्याचें कृत्य मरणाची किंवा जबर दुखापतीची भीति उत्पन्न करणारें नसलें पाहिजे. तें जर तशी भीति साहाजिकपणें उत्पन्न करणारें असेल आणि पूर्ण कायदेशीर नसेल तर ह्या अधिकाऱ्याविरुद्ध



किंवा त्याच्या हस्तकाविरुद्ध संरक्षणाचा हक्क प्रत्येकास आहे. तसेंच हें विशिष्ट कृत्य करणारा माणूस सरकारी अधिकारी आहे, किंवा त्याच्या आज्ञेनुसार ते होत आहे, हें जर एखाद्यास माहीत असेल, किंवा माहीत असण्यास सबळ कारण असेल, तरच त्यास त्या कृत्याविरुद्ध संरक्षणाचा अधिकार नाहीं. एवढ्यासाठीं सरकारी अधिकाऱ्यानें आपण अधिकारी आहोंत ह्याबद्दलची त्या मनुष्याची खात्री पटविली पाहिजे. हस्तकाकडून तें कृत्य होत असल्यास, त्या हस्तकानें अधिकाऱ्याच्या परवानगीनें तें कृत्य मी करीत आहें अशी त्याची खात्री केली पाहिजे. तशी न केल्यास त्या कृत्याविरुद्ध प्रतिकार करण्याचा हक्क प्रत्येकास आहे.

सरकारी अधिकाऱ्याचीं कृत्यें बहुतकरून कायदेशीर असतात. तीं गुन्हे असण्याचा संभव नसतो. आणि गुन्हा नसल्यानें त्याच्याविरुद्ध संरक्षणाचा हक्क असणें शक्य नाहीं, अशी ह्या कलमांतील कारणपरंपरा आहे. कदाचित् एखादे वेळेस त्यांच्या अधिकारमर्यादेचें अतिक्रमण त्यांच्याकडून झाल्यास, आणि तें प्राणघातक किंवा जबर दुखापत करणारें नसल्यास, तें अतिक्रमणहि कायद्यानें क्षम्य मानलें आहे. कारण बऱ्याच वेळेस सरकारी अधिकारी म्हणजे एखादा साधा अडाणी पोलीस शिपाईच असतो आणि त्याला त्याच्या अडाणीपणामुळें अधिकाराचें अगदीं तंतोतंत काटेतोल ज्ञान असणें शक्य नसतें. म्हणून जरासें अधिकाराचें अतिक्रमण त्याच्या हातून झाल्यास तें त्याला माफ आहे. अधिकाऱ्याच्या अडाणी हस्तकाबद्दलहि तोच न्याय लागू आहे. शिवाय चुकलेल्या अधिकाऱ्याच्या वरिष्ठाकडून त्यानें केलेल्या अपकृत्याचा प्रतिकार करून घेतां येतो.

## पोलीस मदतीची अपेक्षा

आपणावर हल्ला होण्याचा बळकट संभव आहे हें, सरकारनें ठवलेल्या संरक्षकांना—पोलिसांना—कळविण्यास सवड असल्यास त्यांच्या मदतीनें आपलें रक्षण करून घेणें हें योग्य आहे, हें सांगण्याची जरूरच नाहीं. पोलीस हें संरक्षणासाठींच सरकारनें ठेवलेलें असतें. त्या कर्तव्यकर्मासाठीं पोलिसाजवळ शस्त्रेंहि दिलेलीं असतात. तेव्हां सवड असल्यास त्यांस कळवून त्यांची मदत घेणें हें स्वपरसंरक्षणापेक्षां अधिक सोपें व अधिक फलदायी आहे हें कोणासहि कळेल. म्हणून जेथें अशी सवड असेल तेथें स्वपरसंरक्षणाच्या हक्काची जरूरी नसल्यानें तो हक्क ठवला नाहीं, यांत कांहींच गैर नाहीं. तशी सवड नसल्यास संरक्षणाचा हक्क आहे, हें उघड आहे.

त्याचा अर्थ असा मात्र नाहीं कीं, प्राप्त संकटाला तोंड न देतां पोलिसांना कळविण्यासाठीं आपण

पळून जाऊन शत्रूच्या हातीं आपलीं माणसें व चीजवस्त लागू द्यावीं. पळून जाऊन पोलिसांना खबर देणें हें शक्य जरी असलें तरी कायदा तसें करावयास सांगत नाहीं. उलट, संकटप्रसंगीं आपण स्वतःच हजर राहून त्याचा प्रतिकार करण्यास सर्व तयारीनिशीं सज्ज असावें असाच अनेक न्यायाधीशानीं ह्या कलमाचा अर्थ केला आहे. एखाद्या रस्त्यानें गेल्यास आपणावर हल्ला होईल असें कळलें असल तरी त्या मार्गानें जाऊं नये असें हें कलम सांगत नाहीं. उलट त्या मार्गानें जाऊन हल्ला आल्यास सर्व सिध्दता करून त्याचा प्रतिकार करावा, असाच त्याचा अर्थ आहे असें ईस्टनें आपल्या 'प्लीज ऑफ दि क्राऊन'मध्यें म्हटलें आहे. संकट प्राप्त होण्याचे अगोदर त्याचा खात्रीलायक सुगावा लागला असल्यास, व त्याला तोंड देण्याचे पूर्वी पोलिसांस कळविण्यास सवड असल्यास, पोलिसांस कळवावें असा ह्याचा अर्थ आहे. स्वपरसंरक्षण हें तर करावेंच करावें. सवड असल्यास तें पोलिसांकडून करवावें, तशी सवड नसल्यास तें आपण स्वतः करावें. कोणत्याहि प्रसंगीं, सदासर्वदा, पोलिसांकडूनच रक्षण करवावें, असें म्हटल्यास मग स्वपर-संरक्षणाचा हक्क तो कोठें राहिला? म्हणून पोलिसांस कळविण्यास सवड नसल्यास आपणा प्रत्येकास स्वपरसंरक्षणाचा पूर्ण हक्क आहे.

आवश्यकतेपेक्षां अधिक इजा स्वपरसंरक्षणासाठीं हल्ला करणाऱ्यास करूं नये. यांतील तत्त्व इतकेंच कीं, स्वपरसंरक्षणाचा हक्क हा फक्त 'संरक्षणा' पुरता आहे; हल्ला करणाऱ्या माणसास त्याच्या गुन्ह्यास योग्य अशी 'शिक्षा' देण्याकरितां नव्हे. गुन्ह्यास 'शिक्षा' देण्याचें काम न्यायाधीशाचें आहे, फक्त स्वपरसंरक्षण एवढेंच आपलें काम असतें. ह्या संरक्षणासाठीं कांहीं ठराविक प्रसंगीं मात्र शत्रूस ठार मारण्याचाहि हक्क संरक्षकास आहे. पण त्या प्रसंगाखेरीज इतर वेळेस संरक्षणापुरती आवश्यक तेवढीच इजा करण्याचा संरक्षकास अधिकार आहे, मग तो संरक्षक पोलीस असो वा एखादा साधा माणूस असो. पण गुन्हेगारास जी इजा संरक्षकानें करावयाची ती ज्या मानानें गुन्ह्याचा रास्त अंदाज त्यास वाटेल त्या योग्य अंदाजाप्रमाणें झाल्यास हरकत नाहीं. प्रत्यक्ष गुन्ह्याचे मान कदाचित् कमी असेल, पण तें अधिक वाटल्यास अंदाजाप्रमाणें गुन्हेगारास इजा केल्यास ती क्षम्य आहे. योग्य अंदाज आणि प्रत्यक्ष मान ह्यांतील फरक त्वेषाच्या भरात संरक्षकास कळणें शक्य नसते, हें हायकोर्टानींहि कबूल केलें आहे.

## ठार मारण्याचा हक्क

"खालीं सांगितलेल्या गुन्ह्यांपैकीं कोणताहि गुन्हा करणाऱ्या गुन्हेगारास वरच्या ९९ कलमांत सांगितलेल्या निर्बंधाच्या व्यतिरिक्त, ठार मारण्याचा किंवा इतर कोणतीहि इजा करण्याचा हक्क प्रत्येकास आहे,—

(१) ज्यामुळें मरणाची भीति साहाजिकपणे उत्पन्न होईल असा हल्ला (अॅसॉल्ट).

(२) ज्याचा परिणाम अंगास जबर दुखापत करील अशी साहाजिक भीति उत्पन्न करणारा हल्ला.

(३) स्त्रीवर जबरी संभोगाच्या हेतूनें केलेला हल्ला.

(४) अभोग्य प्राण्यांशीं किंवा अभोग्य स्थलीं संभोग करण्याच्या उद्देशानें केलेला हल्ला.

(५) कोणाहि व्यक्तीस त्याच्या किंवा तिच्या पालकाच्या संमतीवांचून पळवून नेण्यासाठीं केलेला हल्ला.

(६) सरकारी अधिकाऱ्यांचा आश्रय घेणें अशक्य होईल अशी ज्यामुळें सबळ भीति वाटेल अशी अटक करण्याच्या उद्देशानें केलेला हल्ला" (कलम १००)

हें कलम फक्त शरीररक्षणापुरतें आहे. मालमिळकतीचें रक्षण करण्यासाठीं प्रसंगीं शत्रूस ठार मारण्याचा हक्क उत्पन्न करणारें कलम १०३ आहे तें पुढें येईल.

गुंड लोकांच्या हल्ल्यांपासून स्वतःचा व इतरांचा बचाव करण्यासाठीं त्या गुंडांस हवी ती इजा करण्याचा किंवा प्रसंगीं ठारहि मारण्याचा हक्क प्रत्येकास आहे, असें हें कलम स्पष्ट सांगत आहे. त्या गुंडांच्या हल्ल्यांमळें वर सांगितलेल्या ६ पोटकलमांत पडेल असा एखादा गुन्हा होण्याची 'सबळ भीति' उत्पन्न होईल असा तो हल्ला असला पाहिजे. त्या गुंडाच्या हल्ल्यामुळें वर सांगितलेल्या गुन्ह्यांपैकीं एखादा गुन्हा घडला पाहिजे, असा मात्र याचा अर्थ नाहीं. गुन्हा घडेतोंपर्यंत थांबण्याची जरूरच नाहीं. गुन्हा घडेल अशी सकारण भीति उत्पन्न झाली म्हणजे संरक्षणाचा हक्क अमलांत आणावयास हरकत नाहीं.

९९ कलमांत सांगितलेले निर्बंध हे जसे इतरत्र पाळले पाहिजेत तसेच ते येथेंहि पाळले पाहिजेत. पोलिसांस कळविण्यास सवड असल्यास त्यांच्या आश्रयानें हल्ला परतविणें अधिक सोपें म्हणून त्यांचा आश्रय अवश्य घ्यावा. पण तशी सवड नसेल, आणि हल्ला होऊन वर सांगितलेल्या गुन्ह्यांपैकीं गुन्हा घडण्याची जबर भीति असेल तर शत्रूस हवी ती इजा करून, प्रसंगीं ठारहि मारून आत्मसंरक्षण करावेंच करावें.

# घमेंडखोर बर्कनहेड यांना उत्तर

हिंदुस्थानांत यावयाच्या रॉयल कमिशनसंबंधानें ब्रिटिश पार्लमेंटांत वादविवाद होऊन सभासदाचीं पूर्वी प्रसिद्ध झालेलीं नावेंच हिंदी लोकमतास न जुमानतां कायम करण्यात आलीं. या चुकीचे परिणाम, तिची दुरुस्ती योग्य वेळी न झाल्यास, कोठपर्यंत व कसे पोचतील याचें दिग्दर्शन गेल्या अंकीं आम्ही केलेंच आहे. या वादविवादांत हुजूर पक्ष व मजूर पक्ष यांनींच भाग घेतला व उदार पक्ष मूग गिळून स्वस्थ बसला. हुजूरपक्ष हिंदी सभासदांची कमिशनमध्यें नेमणूक करील ही हिंदुस्थानांतील बहिष्कारवाद्यांची अपेक्षा जशी खोटी ठरली, त्याचप्रमाणे मजूर पक्ष कमिशनवर बहिष्कार घालून आपल्या सभासदांची कमिशनमधून नांवें काढून घेईल या आशेसहि जागा राहिली नाहीं. हिंदी लोकमतानें प्रकट केलेल्या आपल्या अकाळविकाळ स्वरूपाचा पार्लमेंटांत एवढाच परिणाम दृष्टीस पडला कीं, हुजूर पक्षाच्या पुढाऱ्यांनीं आपलीं भाषणें बरींच तोंड आवरून केलीं. आणि मजूर पक्षाचे अग्रणी व इंग्लंडचे माजी मुख्य मंत्री मि. रॅमसे मॅक्डोनाल्ड हे आपणास हिंदुस्थानाचे मित्र समजत असल्यामुळे, हिंदी लोकमतास कस्पटासमान मानून नेमल्या जाणाऱ्या या कमिशनाशीं मजूर पक्ष संबंध ठेवतो याबद्दल ते पुष्कळच ओशाळलेले दिसले. आणि त्यांनीं आपल्या भाषणांत गोड व लाघवी शब्दांनीं हिंदुस्थानास अंजारण्यागोंजारण्याचा प्रयत्न केला. पण कितीहि म्हटलें तरी मॅक्डोनाल्डसाहेब हे आज तिऱ्हाईत. ते मंत्रिमंडळांत नसल्यामुळें त्यांच्या वचनांना सत्तेचा वजनदारपणा नाहीं. हिंदुस्थानाचे खरे सत्ताधीश मुख्य मंत्री मि. बाल्डविन व भारतमंत्री लॉर्ड बर्कनहेड. बाल्डविन बोलताना शब्दांत कोठें गुंतले नाहीत. परंतु त्यांनीं या वेळीं वापरलेली भाषा मवाळीची तरी होती. एकंदरींत सर्वांचेच सूर पूर्वीपेक्षा खालीं उतरले असल्याकारणानें बर्कनहेड यांनाहि आपला सूर खालीं लावणें भाग पडलें होतें तरी जात्याच पहाडी असा त्यांचा आवाज इतरांच्या आवाजांत मिसळन न जातां वेगळा निघाला व अस्सल इंग्रजाची ओळख त्यांतूनच चांगली पटली.

आजचे लॉर्ड बर्कनहेड हे पूर्वीचे लॉर्ड कर्झन यांचे नवे अवतार होत एवढें त्यांचे वर्म सांगितलें म्हणजे त्यांचें हुबेहूब वर्णन झालें. ते कर्झनसाहेबाप्रमाणेंच सामान्य स्थितींतून वर आले आहेत. प्रखर बुद्धिमत्ता व दीर्घोद्योग या गुणांवर ते चढले. आणि आधीं दुःखाचे चटके व मग वैभवाची सावली यांचा अनुभव घेत नामांकित बॅरिस्टर, लॉर्ड चॅन्सलर अशा पायऱ्या क्रमाक्रमानें पादाक्रांत करून ते आज भारतमंत्रिपदावर आधिष्ठित झाले आहेत. त्यांची सांप्रत पन्नाशी उलटली आहे व पन्नाशी उलटण्यापूर्वीच त्यांना लॉर्ड हा किताब पटकावता आला आहे. पण अशा रीतीनें जगांतील खांचखळग्यांतून मुशाफरी करीत उंच ठिकाणीं पोंचलेल्या माणसांत व्यवहारकुशलता, विनयशीलता अनुकंपा व सहानुभूति इत्यादि गुण प्रकट व्हावेत, व तसे ते पुष्कळदा होतातहि. परंतु याच्या उलटहि अनुभव कधीं कधीं येत असतो. ज्या पायऱ्या मागें टाकीत माणस पुढें गेला त्याच पायऱ्यांस त्यानें लाथाडावयाचें, त्याच स्थितींतील लोकांस तुच्छ लेखावयाचें, व दुःखितांशीं कनवाळूपणानें न वागतां त्यांच्या दुःखावर कठोरपणानें प्रहार करावयाचा असाहि अनुभव येतो. मानवजातींतील ही जी दुसरी कोटी त्या कोटींत बर्कनहेडसाहेब यांची गणना होत. ते विवादपटु आहेत व प्रख्यात वक्ते आहेत. या प्रसंगीं त्यांनीं आपल्या वक्तृत्वाची सरबत्ती हिंदुस्थानावर केली आणि तींत त्यांनीं हिंदुस्थानाचे इतक्या निर्दयतेनें व शिरजोरपणानें वाभाडे काढले कीं, त्यामुळें त्यांनीं आपल्या भाषणांत बलात्कारानें जो लवमात्र समंजसपणा खेंचला आहे त्याचें भानहि न राहून, स्वाभिमानी हिंदी माणसाच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोंचते. लॉर्ड कर्झन यांनीं मुखरस पाघळून वंगभंगाच्या वेळीं हिंदुस्थानास बहिष्काराची किंकाळी फोडावयास लावली. आणि आज लॉर्ड बर्कनहेड तशाच प्रकारच्या कोलत्या फेंकून हिंदुस्थानांत बहिष्काराचा भडका उडवीत आहेत.

लॉर्ड बर्कनहेड यांनीं शें—दीडशें वर्षांपूर्वीची जुनी खपली काढून व हिंदुस्थानास इंग्रजांनीं कसें जिंकलें याची आठवण देऊन हिंदी लोकांच्या स्वाभिमानास डवचलें आहे. तें असें:—" हिंदी लोक पूर्वी एकमेकांचे गळे कापीत होते. त्यांस जिंकून व त्यांच्या हातांतील तलवारी काढून घेऊन इंग्रजांनीं मध्यें पडून हिंदुस्थानास यादवी व बेबंदशाही यांच्या कटांतून वांचविलें " अशी बर्कनहेडसाहेबांनीं आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाची फुशारकी मारली आहे. नंतर ते म्हणतात:—"ईस्ट इंडिया कंपनी आधीं हिंदुस्थानाची धनीण बनली व मागाहून तिचा अधिकार ब्रिटिश पार्लमेंटानें आपल्या हातीं घेतला. हिंदुस्थानाचे कुलमुखत्यार आज ब्रिटिश पार्लमेंट आहे. व त्यानें निर्माण केलेलें सैन्य

आरमार व सिव्हिल सर्व्हिस यांच्या मेहरबानीवर हिंदी लोकांचें जीवित व वित्त यांची धडगत आहे. हें संरक्षण पार्लमेंटानें काढून घेतलें कीं हिंदी लोक एकमेकांच्या मानगुटीस पुनः बसूं लागतील. हिंदी लोकांस इंग्रजांच्या मदतीवांचून आत्मसंरक्षण करतां येत नाहीं म्हणून त्यांस स्वयंनिर्णयाचा हक्क नाहीं. हिंदी लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क नाहीं म्हणून कमिशनमध्यें हिंदी सभासदांस स्थान नाहीं. आणि हिंदी सभासदांस हक्काचें स्थान नाहीं म्हणून कमिशन निवळ पार्लमेंटातील सभासदांचेंच बनविण्यांत आलें आहे. १९१९ सालीं सुधारणा कायदा पास झाला त्यांत कमिशनमध्यें हिंदी इसमास घेऊं नये असे स्पष्ट शब्द नाहींत हें खरें आहे. पण त्यासाठीं हिंदी सभासदांची नेमणूक पार्लमेंटरी सभासदांच्या बरोबरीनें करण्याचें ब्रिटिश सरकारनें मनात आणलें असलें तरी हिंदुस्थानाची स्थिति तशी कोठें आहे? हिंदी लोकांपैकीं कोणाकोणाला म्हणून कमिशनमध्यें घ्यावयाचें? कमिशनचें दार एकदां उघडलें कीं त्यांत ब्राह्मणेतर डोकावूं लागतील, ब्राह्मण आपलें चंबूगबाळें आंत टाकतील, मुसलमान दम देतील, अस्पृश्य वुरून डोळे फाडतील, ख्रिश्चन हिरमुसले होतील, शीख गुरुद्वार दाखवितील, व जंगली माणसें गुरगुरतील. खेरीज इंडियन सिव्हिल सर्व्हिस म्हणजे लॉईड जॉर्जसाहेबांनीं वर्णिलेला पोलादी हाडांचा सापळा आपला हक्क सांगण्यास सज्ज आहेच! या सर्वांची सोय लावण्यास कमिशन हें कांहीं गांवजेवण आहे कीं काय? कमिशनमध्यें हिंदी लोकांस अशा रीतीनें मज्जाव केला याचा अर्थ असा नाहीं कीं, हिंदी लोकांस काय पाहिजे तें आम्हास मुळींच समजून घ्यावयाचें नाहीं. तें समजून घ्यावयाचें आहे व घेतलेंहि पाहिजे. त्याकरितांच वरिष्ठ कायदेकौन्सिलांची लोकनियुक्त कमिटी, तशाच प्रांतिक कौन्सिलांच्या लोकनियुक्त कमिट्या त्या त्या कायदेमंडळांनीं निवडावयाच्या असून, कमिशन हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं हिंडेल तेव्हां सदर कमिट्यांकडून कमिशनच्या सभासदांस हिंदी लोकमताचे ताजे तहानलाडू व भूकलाडू वारंवार वाढवून कमिशनचें मन हिंदी लोकमताच्या आहारावर ठेवावयाचें आहे. बरें, याहि उपर आमचें कमिशन तरी करणार करणार असें काय? तें पार्लमेंटाकडे आपला रिपोर्ट पाठवील. पण त्या रिपोर्टावरून सुधारणेचा नवा हवा बनविणार मंत्रिमंडळ. त्या हव्याची चिकित्सा स्वतंत्र जॉइंट पार्लमेंटरी कमिटीकडून होईल. पण तेव्हां तिजपुढें हिंदुस्थानाच्या वरिष्ठ कायदे-कौन्सिलानें नेमलेल्या कमिटीस अधिकउणें सुचविण्याची व होय-नाहीं म्हणण्याची शेवटची संधि मिळेलच. यापेक्षां हिंदुस्थानातील लोकमतास अधिक मान तो काय द्यावयाचा? व आजच्या हुजूर पक्षाऐवजीं दुसरा एखादा पक्ष ब्रिटिश पार्लमेंटांत सत्ताधारी असता तरी तो अधिक काय तुम्हास देता? आम्ही हिंदुस्थानास दिलेला हा मान मोठा आहे! व तो कमिशनहूनहि मोठा आहे!" असें भारतमंत्री लॉर्ड बर्कनहेड यांच्या वक्तृत्वपूर्ण भाषणाचें सार आहे.

पण बर्कनहेड यांच्या भाषणाचा पूर्वरंग उत्तरार्धाशीं साजेसा नाहीं. त्यांना शेवटीं सबुरीची भाषा बोलावयाची होती व ती हिंदुस्थानास रुचावी अशी त्यांची इच्छा होती तर त्यांनीं प्रथम केलेले लाठीचे हात तिला साजेसे नाहींत. ते हिंदुस्थानास सर्कशीतील सिंह समजले. व रिंग-मास्तर सिंहावर पिस्तुल रोखून पिस्तुलाच्या धाकांत आपणास हवी तशी उडी त्या सिंहास टाकावयास लावतो त्यांतला प्रकार लॉर्ड बर्कनहेड यांनीं मांडला आहे. हिंदी लोकमताला त्यांना मनापासून मान द्यावयाचा होता तर त्यांनीं हिंदुस्थानास, 'तूं परतंत्र आहेस, घालूं त्या घासाचा मालक आहेस, आमच्या कमरेस लटकलेली व म्यानांतून आम्ही म्हणूं तेव्हां उसळी मारणारी तलवार पाहा आणि मग बहिष्काराची घमेंड मार' अशी धमकावणी घालावयास नको होती. ही भाषा बरोबरीच्या नात्याची नव्हे. ही भाषा धन्यानें गुलामाशीं वापरावयाची आहे. आम्ही हिंदुस्थानास यादवींतून व बेबंदशाहींतून सोडविलें अशा गप्पा लॉर्ड बर्कनहेड यांनी मारूं नयेत. इंग्रज लोकांनीं हिंदुस्थान जिंकण्यापूर्वी हिंदुस्थानांत यादवी व बेबंदशाही होती, तर नव्हती कोणत्या देशांत? इंग्रज व्यापारी हिंदुस्थानांत आले तेव्हां रोमन कॅथोलिक व प्रॉटेस्टंट इंग्लंडांत एकमेकांचे गळे कापीत होते व क्रॉमवेल खुद्द इंग्लंडच्या चार्लस राजास फांशी देऊन बेबंदशाही माजवीत होता हें एकट्या बर्कनहेडसाहेबांस आठवत नसलें तरी लाखों हिंदी लोकांस माहीत नाहीं कीं काय? बरें, ज्या यादवींतून व बेबंदशाहींतून हिंदुस्थानास सोडविल्याची ग्वाही लाटसाहेब देत आहेत ती यादवी व बेबंदशाही इंग्रजांच्या संगिनींच्या व लष्करी सामर्थ्याच्या बडेजावकींत आजहि कशी बंद पडलेली नाहीं हें दिल्ली लाहोर, कलकत्ता व सोलापूर हीं शहरें प्रत्यहीं हात वर करून सांगत आहेत. त्याचा गलबला ऐकत असतां स्वसामर्थ्याची ऐट मारण्याचें सोडून बर्कनहेड यांनीं आपली मान शरमेनें खालींच घालावयास पाहिजे. इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील यादवी व बेबंदशाही बंद पाडली असें क्षणभर गृहीत धरलें तरी त्यांत फुशारकी मारण्यासारखें काय आहे? यादवी व बेबंदशाही बंद पडली असली तरी त्यानें हिंदुस्थान सुखी संतुष्ट व समृद्ध झाला काय? हिंदुस्थान स्वराज्य मागतो याचा

अर्थच तो इंग्रजी राज्यांत सुखी, संतुष्ट व समृद्ध नाहीं. आणि जर तो सुखी, संतुष्ट व समृद्ध नाहीं किंवा तुरुंगांत अडकवून टाकलेल्या असहाय कैद्याप्रमाणें तो दुःखी असंतुष्ट व दरिद्री आहे, तर यांत बर्कनहेड यांनीं फुशारकी मारण्यासारखें काय आहे ?

ब्रिटिशांनीं सैन्य, आरमार व सिव्हिल सर्व्हिस काढून नेली तर काय होईल ही बर्कनहेडसाहेबांची फुशारकीहि इंग्रजी राज्याच्या नालायकीची टिमकीच वाजवीत आहे. लाखो हिंदी सैन्य फ्रान्समध्यें ओतलें म्हणून जर्मनीनें इंग्लडच्या प्राणावर आणलेलें संकट शेपटीवर गेल्याची कबुली बर्कनहेडसाहेबांनीं फ्लँडर्सच्या रणभूमीवरील हिंदी वीरांचें स्मारक उघडतांनाच दिली आहे. केवळ शिपाईगिरीवर आपला चरितार्थ चालविणारे लाखो शिपाईगडी इंग्रजी राज्यापूर्वी ज्या हिंदुस्थानांत होते व प्रसंग पडल्यास लाखोच काय पण कोट्यावधि नवे शिपाई निर्माण करण्याचें सामर्थ्य ज्या भारतभूमीच्या कुशींत आहे, तिचें क्षात्रतेज सत्तेच्या पायाखालीं दाबून ठेवून ' आमच्या फिरत्या संगिनीशिवाय व आमच्या तरत्या आरमाराशिवाय तुमचा त्राता कोण ? ' असे ज्या सत्ताधाऱ्याच्या तोंडातून उद्गार निघतात त्यांचा धिःकार तो वेगळा काय करावयाचा ?

कमिशनमध्यें हिंदी सभासद घ्यावयाचें ठरलें कीं हिंदु, मुसलमान, ब्राह्मणेतर, ख्रिश्चन, अस्पृश्य व भिल्ल यांपैकीं कोणास नको म्हणावें व कोणास होय म्हणावें याची पंचाईत पडेल अशी कांगावखोरपणानें लॉर्ड बर्कनहेड यांनीं हिंदुस्थानांतील अठरापगड जातींची टवाळी केली आहे. पण या बाबतींत सगळा शहाणपणाचा मक्ता आपणास मिळाला आहे असे त्यांनीं समजण्याचें कारण नाहीं. जाती अनेक असल्या तरी हिंदुस्थानास मिळवयाचें स्वराज्य एकच आहे हें जाणण्याची अक्कल हिंदी लोकांस आहे. बर्कनहेड व त्यांचे जातभाई इंग्रज लोक शहाणे ना ? तरीसुद्धां कमिशन नेमतांना पक्षभेद लक्षात घेऊन लिबरल, कॉन्झर्व्हेटिव्ह व मजूर या त्रिविध पक्षांस राजी राखण्याकरितां त्यांतून यथाप्रमाण सभासदांची निवड ब्रिटिश पार्लमेंटास करावी लागलीच की नाहीं ? मग तुमच्यांत जातिभेद आहे म्हणून तुमचे सभासद आम्हास नकोत असें बोट बर्कनहेड व त्यांचे साथीदार यांनीं हिंदी लोकांच्या डोळ्यांत घालण्यांत अर्थ काय ?

तात्पर्य, लॉर्ड बर्कनहेड यांनीं अशा प्रकारें हिंदुस्थानाचा उपमर्द, उपहास, टवाळी व नालस्ती करून आणि इंग्रजी सामर्थ्याचा, शहाणपणाचा व घमेंडीचा दिमाख दाखवून आपल्या हेतूविषयीं जनतेचीं मनें प्रथमपासूनच गढूळ बनविलीं ही मुत्सद्दीपणाच्या दृष्टीनें त्यांची घोडचूक होय. बर्कनहेड यांसच काय, पण प्रस्तुतच्या एकंदर ब्रिटिश मंत्रिमंडळास खरें धोरणच नाहीं. ते असतें तर हिंदी लोकमताची समजूत त्यांना थोडक्यांत घालणें कठीण नव्हते. आहे याच सायमन कमिशनमध्यें कांहीं जागा लोकसमाजास मान्य अशा हिंदी सभासदांस दिल्यानें हिंदुस्थानची इभ्रत राहून स्वयंनिर्णयाच्या तत्त्वास मान मिळत होता. ती एक गोष्ट केवळ दुराग्रहास पेटून, पार्लमेंटरी कमिशनाचा स्वतःच्या घमर्डीत भलताच अर्थ करून, रॅम्से मॅक्डोनाल्ड यांच्या शिष्टाईस लाथाडून, हिंदी लोकमतास तुच्छ लेखून न घडून आल्यामुळें मोठीच चूक करण्यांत आली आहे. या चुकीचें प्रायश्चित्त वरिष्ठ कायदेकौन्सिलाच्या कमिटीस सायमन कमिशनच्या बरोबरीचे अधिकार मिळाले तरच प्रधान मंडळानें घेतलें असें होईल. पुढे कमिशननें आपला रिपोर्ट पार्लमेंटास सादर केल्यानंतर जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या माडीस मांडी लावून बसण्याचें मधाचें बोट बर्कनहेड यांनीं हिंदुस्थानाच्या तोंडास लावले आहे. पण त्यानें कोणाचें समाधान होईल असें वाटत नाहीं!

हिंदुस्थानाच्या स्टेटसेक्रेटरी सबधानें जशी कांहीं रीतच पडून गेली आहे कीं, जो म्हणून नवा स्टेटसेक्रेटरी गादीवर बसेल त्यानें मुख्य मुख्य प्रसंगीं हिंदुस्थानानें स्वराज्य गमावल्याच्या गुन्ह्याची आठवण त्याला होईल तितक्या अपमानास्पद शब्दांनी करून द्यावी. पण त्याला उत्तर म्हणून आमचीहि रीत अशीच आहे कीं, जशास तसे या पद्धतीनें अशा अरेरावीला अशा प्रत्येक प्रसंगीं योग्य तेंच उत्तर द्यावयाचें. आणि ते उत्तर हेंच कीं, हिंदी लोकांनीं जरी जुनें स्वराज्य गमावलें असलें तरी नवें स्वराज्य मिळविल्याशिवाय ते स्तब्ध बसणार नाहींत. गर्वाचें घर खालीं या न्यायानें किंवा चक्रनेमिक्रमानें पडतो तो चढतो व चढतो तो पडतो! म्हणून लॉर्ड बर्कनहेड यांनींहि खूप समजून ठेवावें कीं, इंग्लंडला झालें तरी ईश्वरानें सगळ्या जगावर यावच्चंद्रदिवाकरौ राज्यसत्ता गाजविण्याचा ताम्रपट किंवा मक्ता दिलेला नाहीं. ज्या कोंवलवाण्या तोंडानें इंग्लंडनें युद्धांत हिंदी सैन्याचा धावा केला त्यानें फिरून हिंदुस्थानापुढें लष्करी गुर्मीची भाषा बोलणें हें खचित लज्जास्पद होय. तसेंच ज्या गोऱ्या सैन्याच्या जिवावर हा सगळा दिमाख, त्याला आत्मसंरक्षणार्थ इंग्लंडमध्ये परत बोलावून घेण्याची कधी वेळ येणार नाहीं असें तरी कोणीं सांगावें ? बर्कनहेड साहेबांनीं

आपल्या पूर्वजांचा इतिहास वाचला आहे. पण त्यांच्या वंशजांचा इतिहास अजून घडावयाचा आहे, म्हणून तो लिहावयाचाहि आहे. तेव्हां तो ते कसा वाचणार? युरोपांत जे स्वार्थबुद्धीचें भूत आज नाचत आहे तें असेंच आणखी कांहीं दिवस नाचत राहिल्यास, पूर्वी रोमन लोकांना, इंग्लंडचें राज्य इंग्रज लोकांवर सोंपवून, आपलें सर्व सैन्य रोमला परत बोलवावें लागलें तसेंच हिंदी लोकांच्या स्वाधीन हिंदुस्थानचें राज्य करून इंग्लंडातल्या इंग्रजांना गोरें सैन्य परत बोलवावें लागणार नाहीं कशावरून? महायुद्धामध्यें इंग्लंडच्या काळजाचे ठोके कसे पडत होते तें सगळ्या जगाला ऐकूं आलें. आणि इंग्लंडची जी अब्रू तेव्हां एका शब्दविक्रीनें गेली ती बर्कनहेडसारख्या रावण राजानें गर्वोक्तींचे हंडे आतां कितीहि भरले तरी परत येत नाहीं. पण अशा प्रकारच्या उत्तराला साजेल असें धोरण हिंदी लोकांनींहि प्रस्तुत प्रसंगी ठेवलें पाहिजे. कमिशनवर चारदोन कसले तरी हिंदी लोक नेमल्यानें हिंदुस्थानाच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काची पूर्ण भरपाई झाली असती असली दुबळी भाषा व भावना टाकून देऊन, हिंदुस्थानांत खरी एकी आहे व तिच्या जोरावर आम्ही काय वाटेल ते करूं शकूं असें इंग्लंडातील जाणत्या लोकांना जाणविलें पाहिजे. निरनिराळ्या पुढाऱ्यांनीं एकत्र बसून स्वतःची स्वराज्याची योजना तयार केली पाहिजे. पार्लमेंटरी कमिटीच्या बरोबरीचे हक्क कायदेमंडळानें नेमलेल्या कमिटीला मिळणार असतील तरच आम्ही तुमच्याशीं सहविचार करूं, तसें न घडल्यास तुमच्या कमिटीवर बहिष्कार पडावा म्हणून कायदेमंडळाची कमिटीहि मुळीं नेमणार नाहीं, असें एकमुखानें जाहीर केलें पाहिजे. तात्पर्य बहिष्कार या नुसत्या शब्दोच्चारानें सर्व कांहीं मिळेल अशी स्वतःची समजूत करून न घेतां किंवा दुसऱ्याची समजूत करण्याचा प्रयत्न न करतां स्वयंनिर्णयाचें विधायक कार्य करावें आणि सक्रिय अशा ऐक्याच्या भूमिकेवर खंबीर उभें राहावें अशी आमची बहिष्कारवादी लोकांना सूचना आहे. जोंपर्यंत स्वतः आम्हांला स्वयंनिर्णय करून दाखवितां आला नाहीं, जोंपर्यंत आम्ही अमुक स्वराज्य-योजना अमक्यानें केली असें म्हणून तेवढ्याचकरितां ती तुच्छ मानितों पण स्वतःची अशी कांहीं योजना करीत नाहीं, जोंपर्यंत राष्ट्रीय सभा पूर्वीप्रमाणें सर्वपक्षसमावेशक होत नाहीं, तोंपर्यंत लार्ड बर्कनहेडसारख्यांना आमच्या क्षतावर चोंच मारण्याला जागा राहणार हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

# इंडियन टेरिटोरिअल फोर्स ऊर्फ हिंदी नागरिकांची फौज

( ले.—प्रो. द. गो. कर्वे. )

स्वतःचें जीवन व प्रगति ह्यांच्या आड येऊं पाहणाऱ्या अडचणींस स्वसामर्थ्यानें दूर सारणें हें प्राणिमात्राचें कर्तव्य आहे. आत्मसंरक्षण करण्यास समर्थ नसलेला सजीव सृष्टींतील कोणताहि पदार्थ, मग तो झाडझुडूप, जनावर, मनुष्य कोणी का असेना, चिरकाल जिवंत राहूं शकत नाहीं, व राहिलाच तर त्याचा आयुष्यक्रम जोमदार व प्रगमनशील होण्याची आशा नसते. एकंदर सजीव सृष्टींत दिसून येणारा हा नियम व्यक्तिशः मनुष्यमात्रास व मनुष्यांच्या समाजासहि लागू पडतो. बुद्धीच्या योगानें स्वतःचें अस्तित्व व प्रगति ह्यास विरोधक असलेलीं संकटें शोधून काढून त्यांस योग्य उपाय योजण्याची मनुष्यांत विशेष पात्रता असल्यानें आत्मसंरक्षणार्थ अहर्निश झटणें हा त्यांच्या बाबतींत केवळ नैसर्गिक नियम नसून तें अत्यंत उच्च प्रतीचें सामाजिक कर्तव्य समजलें पाहिजे. स्वसंरक्षणाशिवाय जीवनच अशक्य, मग तें अखंड पारतंत्र्यात न घालवितां स्वतंत्रेच्या मोकळ्या व उत्तेजक वातावरणांत घालविण्याची महत्त्वाकांक्षा असल्यास संरक्षणाचें महत्त्व किती मानलें पाहिजे हें शब्दानें व्यक्त करणें अशक्य आहे.

पूर्वकालीन राजे लोक व त्यांचे एकनिष्ठ प्रजाजन स्वदेशाच्या रक्षणाकरितां जिवापाड झटत व प्रसंगीं वित्त प्राण व वैयक्तिक प्रेम ह्यांचा बळी देण्यासहि मागेपुढें पाहात नसत, ह्या गोष्टीची महाराष्ट्रीय जनतेस नेहमीं जाणीव असल्यानें तिची आज नव्यानें आठवण करून देण्याचें कारण नाहीं. परंतु पूर्वीची एकतंत्री राज्यपद्धति जाऊन तिच्या जागीं कमी-अधिक प्रमाणात लोकसत्तात्मक राज्यपद्धति सर्वत्र अस्तित्वांत येऊं लागल्यापासून प्रत्येक राष्ट्रांतील नागरिकांवरील स्वसंरक्षणाची जबाबदारी द्विगुणित झालेली आहे. राजाचे सेवक व प्रजाजन कितीहि एकनिष्ठ असले तरी त्यांस अनेक प्रसंगीं स्वार्थत्याग करूनच राजकार्य करावें लागतें. ह्या सद्गुणासच स्वामिभक्ति ह्या नांवानें संबोधण्याची वहिवाट आहे. परंतु निवळ स्वामिभक्तीच्या अगर त्याहूनही उच्च दर्जाच्या म्हणजे स्वदेशप्रेमाच्या जोरावर राष्ट्रीय

स्वरूपाची संघटना करणें एकतंत्री राज्यांत अशक्यप्राय असतें. बहुतेक जुन्या राज्यांत भाडोत्री व कित्येक ठिकाणी परकी लोकांच्या फौजा बाळगून दौलतीचें रक्षण करण्याची पद्धत असे हें सर्वांस ठाऊक आहे. परंतु परकी व भाडोत्री सैन्य आणीबाणीच्या प्रसंगीं राष्ट्रास पूर्णपणें उपयोगी पडत नाहीं असा आजवरचा अनुभव आहे.

## नागरिक सैन्याचें महत्त्व

प्रजासत्ताक राज्यपद्धतींत नागरिक म्हणजे कर भरणारा व प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षपणें राष्ट्रीय सरकार निवडण्यास मत देणारा इसम, हाच राज्याचा मालक असल्यानें राष्ट्रीय संरक्षणाची जबाबदारीहि व्यक्तिशः त्याजवरच येऊन पडते. राज्यपद्धति जों जों प्रजासत्ताक होत जाते तों तों परकी शत्रू व अंतर्गत दंगेखोर ह्यांपासून स्वतःचें संरक्षण करण्याचा बोजा प्रजाजनावर पडतो असा स्थूल नियम घालण्यास हरकत नाहीं. कर देणारा, निवडणूक करणारा व हातांत बंदूक घेऊन लढणारा असें अर्वाचीन नागरिकाचें वर्णन केल्यास तें यथार्थ ठरेल. आत्मसंरक्षण करण्याची सिद्धता हें अत्यंत महत्त्वाचें राजकीय कर्तव्य आहे. एवढेंच नसून निसर्गनियमानें व तसाच सरकारी कायद्यानें तो हक्कहि प्रत्येक नागरिकास दिलेला आहे. अलीकडे युद्ध सुरू झालें असतां जे लक्षावधि लोक असंख्य प्रकारची शस्त्रें घेऊन रणांगणावर उभे राहातात ते सर्व भाडोत्री व धंदेवाईक शिपायांतून शोधून काढूं असें म्हटल्यास निवळ खर्चाच्या दृष्टीनें तरी ती गोष्ट साध्य होईल किंवा नाहीं याची वानवा आहे. आणि एखादें राष्ट्र लाखों शिरगणतीची खडी फौज बाळगून राहिलें तरीहि देशप्रेमाच्या व स्वातंत्र्यलालसेच्या प्रेरणेनें सज्ज झालेल्या दुसऱ्या सैन्याशीं तिचा टिकाव लागणें लष्करी दृष्ट्या अशक्य आहे. पोटासाठीं लागणाऱ्या दहा शिपायांस प्रेमासाठीं दोन हात करणारा एक शिपाईहि भारी असतो. अर्वाचीन राज्यपद्धतींतील एक प्रमुख कर्तव्य व हक्क, राष्ट्रीय संरक्षणाची तरतूद करण्याची काटकसरीची योजना आणि लष्करी शास्त्रास संमत असलेल्या मार्गानें शत्रूस मुठींत ठेवण्याचें साधन ह्या सर्व नात्यांनीं नागरिकांच्या फौजांचें महत्त्व विशेष आहे.

गेल्या महायुद्धाच्या वेळीं ब्रिटिश साम्राज्याच्या निरनिराळ्या भागांतून कोट्यावधि लोक आपापलें नित्याचें कामकाज सोडून साम्राज्यावर ओढवलेलें संकट दूर करण्यास पुढें सरसावले. शांततेच्या काळीं साम्राज्यांतील एकंदर फौज पुरी दहा लाखहि नसतां एक कोटीच्या वर सैन्य खडें करणें भाग पडल्यानें ब्रिटिश सरकारास सामान्य नागरिकांस लष्करी शिक्षण देण्याचें महत्त्व विशेष स्पष्टपणें कळून आलें. फ्रान्स, जर्मनी वगैरे इतर युरोपियन राष्ट्रांत ठराविक वर्षांच्या मुदतीपर्यंत लष्करी नोकरी सर्व नागरिकांस सक्तीचीच असे. त्यामुळें शक्य तितक्या कमी खर्चांत अधिकांत अधिक सैन्य बाळगणें त्यांस शक्य होई. परंतु इंग्लंड व ब्रिटिश साम्राज्याचे बहुतेक इतर भाग ह्यांत आपखुषीनें लष्करांत नोकरी करणाऱ्या शिपायाची खडी फौज बाळगूनच संरक्षणाचें काम मुख्यतः केलें जाई. धंदेवाईक सैन्यास जोड म्हणून लष्करी स्वयंसेवकांच्या पलटणी व शाळाकॉलेजांतून विद्यार्थ्यांचे लढाऊ संघ कांहीं असत हें खरें. तरी सर्व नागरिकांस अगर त्यांच्यापैकीं बऱ्याच मोठ्या भागास लष्करी शिक्षणाचा ओनामा देऊन त्यांस राष्ट्रीय संरक्षणास जरूर तेवढें सज्ज ठेवण्याचें धोरण इंग्लंडमध्यें महायुद्धापूर्वी पद्धतशीरपणें अमलांत आणलें जात नसे. गेल्या आठदहा वर्षांत मात्र खेडींपाडीं व शहरें ह्यांत राहणाऱ्या नागरिकांची पलटणें तयार करून पायदळ, रिसाला, तोफखाना, वैमानिक दल इत्यादि युद्धकलेच्या निरनिराळ्या अंगाची त्यांस जरूर तेवढी ओळख करून देण्याचे प्रयत्न वाढत्या प्रमाणावर होत आहेत.

## हिंदुस्थान व नागरिक फौज

हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचाच एक भाग असून त्याचें क्षेत्रफळ दहा लाख चौरस मैल व लोकसंख्या बत्तीस कोटि आहे. एवढ्या राष्ट्राचें रक्षण करण्यास खडी फौज ठेवून तिची तयारी नेहमीं जय्यत ठेवावयाची असें म्हटलें तरी खर्चाचा बोजा कल्पनातीत पडणार. उलट दोन–अडीच लाख धंदेवाईक सैन्य बाळगून जवळ जवळ तितकेच अगर अधिक लोक स्वयंसेवक म्हणून स्वतंत्र नागरिक पलटणींत भरले तर कमी खर्चानें हिंदुस्थानाचें संरक्षण होण्याची खात्री पटून शिवाय साम्राज्याच्या व निरनिराळ्या वेळीं साम्राज्याचे दोस्त समजल्या जाणाऱ्या राष्ट्रांच्या लष्करी सामर्थ्यास बळकटी येईल हें उघड आहे. इंग्लंडांतील व हिंदुस्थानांतील लष्करी तज्ज्ञांच्या ध्यानांत ही गोष्ट महायुद्ध चालू असतां प्रामुख्यानें आली. सन १९२० साली हिंदुस्थानसरकारनें इंडियन टेरिटोरियल फोर्स ॲक्ट, किंवा हिंदी नागरिक सैन्याबद्दलचा कायदा पास केला. त्याचा मुख्य उद्देश आपल्या देशांतील खड्या फौजेस वेळेवर साहाय्य होईल असें स्वयंसेवक सैन्य निर्माण करणें हाच होता. त्या वेळीं आपल्या इकडील अनेक राष्ट्रीय पुढारी सुशिक्षित वर्गांत लष्करी नोकरींत घेण्याविषयीं चळवळ करीत असल्यानें नवीन नागरिक सैन्यांत त्यांचाच प्रामुख्यानें अंत-

र्भाव करावा असें त्या वेळच्या सेनापतीचें मत होत व वरील कायद्याचा वरिष्ठ कायदेमंडळांत विचार होत असतां त्यांनीं तें स्पष्टपणें बोलूनहि दाखविलें. हळूहळू प्रस्थापित होणाऱ्या लोकसत्तेचें आनुषंगिक पण आवश्यक अंग, हिंदुस्थानाच्या व साम्राज्याच्या संरक्षणाची खात्रीलायक व्यवस्था आणि हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गांत लष्करी पेशाची खरी पात्रता व आवड किती आहे याची कसोटी हीं तीनहि अंगें १९२० च्या कायद्यांत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें गोंविलेलीं आहेत.

## इंडियन टेरिटोरियल फोर्स अॅक्ट १९१९

या कायद्यान्वयें सर्व हिंदुस्थानांत मिळून पायदळ सैन्याच्या वीस पलटणी उभारलेल्या असून त्यांच्यांत नांवें दाखल केलेल्या नागरिकांची संख्या अदमासें तेरा हजार आहे. याशिवाय निरनिराळीं कॉलेजें व विश्वविद्यालयें ह्यांच्यांत शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां सहासात पलटणी असून त्यांची शिरगणती जवळ जवळ चार हजार होईल. देशाची लोकसंख्या व संरक्षणास अवश्यक असलेलें मनुष्यबळ ह्या दोहोंच्या मानानें नागरिक पलटणींत सैनिकांची संख्या मर्यादित असून ती वाढविण्याचा विचार हल्लीं चालू आहे. निरनिराळ्या प्रांतांत वरील वीस पलटणी वांटून दिलेल्या आहेत. इंग्रजी अमलाखालील हिंदुस्थान व संस्थानी मुलूख ह्यांच्यांतील कोणत्याहि हिंदी मनुष्यास या पलटणींत आपलें नांव दाखल करतां येतें. अर्जदाराचें वय १८ च्या वर व ३१ च्या आंत असणें अवश्यक असतें. एकदां पलटणींत नांव घातलें म्हणजे शारीरिक दुर्बलतेखेरीज इतर कारणानें सहा वर्षें-पर्यंत सहसा बाहेर पडतां येत नाहीं प्रतिवर्षी चार आठवडे लष्करी शिक्षण घ्यावयाचें असतें. पहिल्या वर्षी मात्र प्रत्येक नव्या सैनिकास सर्वसाधारण शिक्षणाचा क्रम सुरू होण्यापूर्वी त्याला लागूनच चार आठवडे अधिक शिक्षण घेणें जरूर असतें. पहिल्या व पुढील वर्षांचा शिक्षणक्रम होत असतां खाणें पिणें व कपडालत्ता ह्याचा जो खर्च होईल तो सरकार सोसतें, एवढेंच नव्हे तर शिवाय खड्या हिंदी फौजेंतील शिपायास ज्या दरानें पगार व भत्ता मिळतो त्याच दरानें वरील पलटणींत सैनिकांसहि पगार व भत्ता देतात.

## नागरिक फौजेची जबाबदारी

सरकारी खर्चानें म्हणजे पर्यायानें कर देणाऱ्यांच्या पैशानें मिळणाऱ्या या शिक्षणाचा राष्ट्रास जरूर तेव्हां मोबदला देण्याची नागरिक पलटणींतील लोकांवर अर्थातच सक्ती केली जाते. मामलेदार, कलेक्टर वगैरे मुलकी अधिकाऱ्यांस दंगेखोर लुटारू इत्यादिकांचें नियंत्रण करण्यास पोलीस-खात्याची मदत अपुरी पडली तर लष्करी अधिकाऱ्यांच्या हुकमावरून नागरिक सैनिकांस आपल्या पलटणींत दाखल होऊन बंडखोरी मोडण्यास मदत करणें भाग पडतें. तसेंच युद्ध सुरू झाल्यास देशाच्या कोणत्याहि भागांत जाऊन शत्रूशीं लढाई करणें व जरूर पडल्यास शत्रु हिंदुस्थानांत येऊन दाखल होण्याची वाट न पाहतां राष्ट्राच्या बचावाकरितां त्याजवर चाल करून जाणें हेहि टेरिटोरियल पलटणींतील शिपायाचें कर्तव्य आहे व तें करण्याचा प्रसंग आला तर सरकार त्यांस भाग पाडील. परंतु सामान्यतः नागरिक सैन्याचा उपयोग दंगेखोरांस शासन करण्याकरितां व खडी फौज हलली तर पहारा करण्याकरितांच व्हावयाचा असून गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल म्हणजे प्रत्यक्ष व्हाइसरॉयसाहेब व त्यांचे खास सल्लागार ह्यांचा तसा हुकूम झाल्याखेरीज स्वदेशांत अगर परदेशांत लढाईवर जाण्याची सक्ती केली जाणार नाहीं. संकट-कालीं प्रत्यक्ष रणभूमीवर जावें लागलें तरीहि शक्य तितक्या लवकर कायमच्या लष्करांतील लोकांस पाठवून नागरिकांची सोडवणूक करण्याचें धोरण स्वीकारण्यांत येईल. सहा अगर त्याहून कमी वर्षांपर्यंतच पलटणींत जरूर तेव्हां नोकरी करण्याचें नागरिकानें कबूल केलेलें असतें. त्या मुदतीनंतर तर कोणतीच जबाबदारी त्याजवर राहात नाहीं.

## पलटणींतील हुद्दे व पगार

नागरिक पलटणांतील सैनिकांचे हुद्दे शिपायापासून तों सुभेदारापर्यंत सर्व खड्या हिंदी फौजे-प्रमाणेंच असतात. सुशिक्षित व वजनदार वर्गांपैकीं कोणी तसा अर्ज केल्यास नागरिक सैन्यांत त्यांस एकदम अंमलदाराची जागाहि मिळूं शकते. एका पलटणींत म्हणजे सुमारें सातशें इसमांत अम्मलदार १५-२० असल्यानें ह्या वरिष्ठ दर्जाच्या जागा मर्यादित असणार हें उघड आहे. तरी स्वतःचें आपल्या आप्तेष्टांचें व देशबांधवांचें स्वातंत्र्यसंरक्षण करण्यास आजमितीस सर्वथैव आवश्यक असलेल्या लष्करी शिक्षणाचा फायदा कोणत्याहि दर्जाचा शिपाई म्हणून मिळाला तरी तो अमूल्य लाभ होय असें कोणताहि हिंदी देशभक्त मानील. नांव दाखल केल्यावर पुढील शिक्षण, बढती, रजा, पगार, बडतर्फी वगैरे बाबतींत सरकारनें कांहीं नियम केलेले आहेत. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट अशी कीं, नागरिक सैन्याच्या बाबतींत नवी भरती, शिक्षणक्रम, वार्षिक हजेरी, पगार, बढती व इतर बाबतींत सर्वस्वी लष्करी अधिकाऱ्यांच्या हातांत असा न जातां प्रत्येक प्रांतांतील सरकार

मंडळास या बाबतींत विशिष्ट अधिकार दिलेले असतात. ह्या मंडळांत एकच लष्करी अधिकारी असून सरकारनें नेमलेले दोन खासगी गृहस्थ असतात. सर्व महत्त्वाच्या बाबतींत ह्या मंडळाकडे अर्ज करून दाद मागतां येत असल्यानें होतकरू नागरिकांस स्वयंसेवक पलटणींत नांव घातल्यास आपणावर निष्कारण जुलूम होईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाही.

### बेळगांव येथील नागरिक पलटण

सर्व हिंदुस्थानास लागू असलेल्या वरील कायद्यास व सरकारी धोरणास अनुसरून मुंबई इलाख्यांतहि नागरिकांचे एक पायदळ पलटण बनविण्यांत आलें आहे. ह्यामध्यें एकंदर सातशें लोक असून ते महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांतून व जातींतून भरती करतां येतात. या पैलटणीचें मुख्य ठिकाण बेळगाव हे असून येथेंच वर्षांतून माहिनाभर सर्व सैनिकांचें शिक्षण होतें. ह्या पलटणीस पांचव्या मराठे पायदळाची अकरावी पलटण असें म्हणतात. महाराष्ट्रीय लोकास ज्या पलटणीचा लष्करी शिक्षणार्थ उपयोग करून घेतां येईल अशी हीच पलटण असल्यानें हिच्याविषयीं तपशीलवार माहिती या लेखाचे उत्तरार्धांत देण्याचें योजले आहे.

### ११५ मराठा लाईट इन्फन्ट्री बेळगांव

१ पलटणींत नांवें दाखल करण्यास पुढील इसम लायक आहेत. ब्रिटिश अमलाखालील अगर संस्थानांच्या ताब्यांतील मुलुखांत राहणारा कोणीहि हिंदी इसम १८ ते ३१ वर्षांचा असल्यास व तो सर्व दृष्टींनी धडधाकट असल्यास त्यास पलटणींत घेतलें जातें. गुन्हेगार जातींतील लोक, कैद, काळेपाणी अगर फटके ह्यांची शिक्षा झालेले गुन्हेगार, चांगल्या वर्तणुकीबद्दल ज्यांचा जामीन घेण्यांत आला आहे असे इसम, इत्यादिकांस ह्या पलटणींत घेत नाहींत. खऱ्या फौजेंत तीन वर्षे चांगली नोकरी केलेल्या इसमांस वयाच्या ३५ व्या वर्षापर्यंत घेण्याची मुभा आहे.

२ नोकरीची मुदत—नांव घातल्या दिवसापासून सहा वर्षेपर्यंत नोकरी करण्याची पलटणींतील प्रत्येक इसमावर जबाबदारी आहे. खऱ्या फौजेंत तीन वर्षे किंवा युनिव्हर्सिटी ट्रेनिंग कोरमध्यें दोन वर्षे नोकरी केलेल्या इसमास कमींत कमी चार वर्षे नोकरी करावी लागते.

३ शिक्षणाची व नोकरीची जबाबदारी—( अ )पलटणींत नांव घातलेल्या प्रत्येक इसमास लष्करी अधिकारी हुकूम करतील त्याप्रमाणे पहिल्या वर्षी ५६ व पुढें २८ दिवसांपर्यंत कोणत्याहि मुदतींत शिक्षण घेण्यास गेलें पाहिजे. ( सामान्यतः फेब्रुवारी व मार्च महिन्यांत हें शिक्षण दिलें जात असल्यानें ज्या नागरिकांचा शेतीशीं संबंध येतो त्यास आपले कामाचे दिवस फुकट न दवडतां कांहीं दिवस शिक्षण मिळवून चरितार्थहि चालवितां येतो. ) (ब) पलटणींत दाखल झालेल्या प्रत्येक इसमास पुढील प्रसंगीं प्रत्यक्ष लष्करी नोकरी करावी लागेल.

वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्याचा तसा हुकूम झाल्यास मुलकी अधिकाऱ्यांस मदत करणें व पहारा वगैरे काम करणें.

गव्हर्नर–जनरल–इन–कौन्सिल ह्यांचा हुकूम होऊन तो हिंदुस्थानसरकारच्या गॅझेटांत प्रसिद्ध होऊन देशांतील खऱ्या सैन्याच्या मदतीस सरकारनें बोलावलें तर हजर राहून लष्करी कामगिरी करणें.

अगदीं आणीबाणीच्या वेळीं गव्हर्नर–जनरल-इन–कौन्सिल यांनीं खास फर्मान काढल्यास परराष्ट्रांत जाऊनहि लष्करी नोकरी करणें.

४ ह्या पलटणींतील एखाद्या इसमानें आपण होऊन खऱ्या सैन्यांत आपली कायमची अगर तात्पुरती बदली करून घेतली तर त्याजवर खऱ्या सैन्याइतकीच नोकरीची जबाबदारी येऊन पडेल.

५ शिस्त—पलटणींतील अंमलदार व सर्व दर्जाचे शिपाई वार्षिक शिक्षणार्थ एकत्र जमले असतील तेव्हां, लष्करी नोकरीस त्यांस इतर वेळीं बोलविलें असतां त्यांच्या स्वतःच्या इच्छेनुसार त्यांस कायम फौजेस जोडले असेल तेव्हां आणि सरकारी सैन्याचा भाग त्या नात्यानें ते जेव्हां जेव्हां वागत असतील किंवा त्यांस मानण्यांत येत असेल तेव्हां, खऱ्या फौजेस लागू असलेला शिस्तीबद्दलचा कायदा त्यांसहि लागू केला जाईल. विशेषतः वार्षिक शिक्षणाकरितां अगर विशिष्ट कामगिरीकरितां त्यांस हुकूम करून बोलाविलें असतां ते योग्य वेळीं ठराविक ठिकाणीं हजर न झाल्यास त्यांस कैद केलें जाऊन त्यांजवर लष्करी कोर्टापुढें खटला भरला जाईल.

५ पगार व भत्ता— शिक्षण अगर कामगिरी याकरितां एकत्र जमले असतां अगर कायम फौजेस जोडले असतां त्या पलटणींतील लोकांस खऱ्या सैन्यांतील इसमाइतकाच पगार मिळेल.

| | | | |
|---|---|---|---|
| ऑनररी लेफ्टनंट व सुभेदार | महिना | १३० | रु. |
| ऑ. सेकंड लेफ्टनंट व जमादार | ,, | ७५ | ,, |
| हवालदार | ,, | २५ | ,, |
| नाईक | ,, | २२ | ,, |
| लॅन्स नाईक | ,, | १८ | ,, |
| शिपाई | ,, | १६ | ,, |

त्याशिवाय दररोज जेवणास शिधा, वरखर्चास भत्ता आणि अंगांत घालण्यास लष्करी कपडे मिळतात. आपापल्या गांवाहून शिक्षणाच्या अगर लष्करी कामगिरीच्या ठिकाणीं येण्यास व तेथून परत घरीं जाण्यास लागणारा खर्च, म्हणजे आगगाडीचें भाडें, पंधरा मैलांस दोन आणेप्रमाणें वाटखर्च व दिवसास चार आणेप्रमाणें पोटगी, प्रत्येक इसमास सरकारातून मिळेल.

पलटणींत नांवें नोंदविण्याची पद्धत--बेळगांव येथील पलटणीचा मुख्य अधिकारी,प्रत्येक जिल्ह्याचा कलेक्टर, व प्रत्येक तालुक्याचा मामलेदार ह्यापैकीं कोणासहि अर्ज केल्यास पलटणींत नांव नोंदण्याचा तक्ता पुरविला जातो. तो कलेक्टर अगर मामलेदार ह्याच्या समक्ष भरून व त्याजवर सही करून पलटणीच्या मुख्य अधिकाऱ्याकडे पाठविण्याची व्यवस्था करावी. मुख्याधिकाऱ्यास अर्जदार इतर बाबतींत योग्य आहे असें दिसून आल्यास तो त्यास त्याच्या राहण्याच्या ठिकाणाजवळील मुख्य सरकारी इस्पितळांत वैद्यकीय तपासणीस जाण्याचा हुकम करतो. ह्याप्रमाणे तपासणी होऊन शारीरिक दृष्टीनें अर्जदार योग्य ठरला म्हणजे त्यास ताबडतोब राजनिष्ठेची शपथ देऊन पटावर रुजू करण्यांत येतें.

महाराष्ट्रीय जनतेस आग्रहाची विनंति—इंडियन टेरिटोरियल फोर्स ऊर्फ हिंदी नागरिकांची फौज आणि त्या सैन्यांतील महाराष्ट्राच्या वांट्यास आलेली ११।५ मराठी पायदळ पलटण ह्याबद्दल वर जी माहिती दिली आहे तिचा महाराष्ट्रातील सर्व जातींचे व वर्गांचे तरुण गृहस्थ पूर्णपणें उपयोग करून घेतील अशी आम्हास उमेद आहे. वास्तविक महाराष्ट्रासारख्या लढाऊ प्रांतांत ७०० शिपायांची एक पलटण म्हणजे सबंध समुद्रांत शिंपीभर पाणीहि नाहीं सालोसाल रिकाम्या पडणाऱ्या शें-सवाशें जागा नीटपणें भरणें कठीण जावें हें सुचिन्ह नव्हे. खऱ्या व बिनचूक माहितीचा अभाव हें एक कारण आजवर थोड्याबहुत प्रमाणात पुढे करता येई. परंतु प्रस्तुत पत्रकांनें तेंहि दूर झालें आहे. ह्याखेरीज इतर कोणतीहि माहिती पाहिजे असल्यास पुणें जिल्हा टेरिटोरियल फोर्स असोसिएशन या संस्थेच्या चिटणिसाकडे चौकशी केल्यास ती पुरविली जाईल. बेळगांव येथील पलटणींत नावें दाखल केल्यावरही तेथील शिपायांस वारंवार ज्या अडचणी येतील त्यांचा लष्करी अधिकाऱ्याकडून योग्य दाद लावून घेण्यासही वरील संस्था शक्य ती मदत करील. दिवसानुदिवस हिंदुस्थानसरकारच्या राज्यकारभारांत हिंदी लोकांचा शिरकाव होत असून साम्राज्यान्तर्गत स्वराज्य आम्हास ताबडतोब द्यावें अशी जनतेची मागणीही आहे. लोकसत्तेचे हक्क मागणाऱ्या नागरिकांनी राष्ट्रसंरक्षणाची मिळेल ती संधि स्वतःच्या लष्करी शिक्षणास अवश्य उपयोगांत आणली पाहिजे. मराठे, क्षत्रिय इत्यादि पुरातन लढवय्या जातींस तर अशी संधि सोन्यासारखी भासली पाहिजे. परंतु इंडियन टेरिटोरियल फोर्स ही फौज सुशिक्षित वर्गास लष्करी शिक्षण व राष्ट्रीय संरक्षण ह्याबद्दल किती कळकळ आहे हें पाहण्याकरिता सरकारनें काढलेली आहे हे विसरतां कामा नये. कारकून, दुकानदार, खासगी नोकर, मास्तर ह्या वर्गांनींहि आपापली पोटार्थी कामें क्षणभर बाजूस ठेवून जरूर झाल्यास थोडा स्वार्थत्याग करूनही या संधीचा फायदा घ्यावा अशी आमची त्यांस आग्रहाची विनंति आहे. वास्तविकपणें ७०० जागांस ७ लाख अर्जदार महाराष्ट्रांतून पुढें यावयास हवे. म्हणजे एक पलटणीच्या ऐवजीं निदान शें-पन्नास पलटणें काढा असें आपणास सरकारपुढें मागणें मांडता येईल. लष्करी शिक्षण हें वाघिणीचें दूध असून तें मिळण्याची अल्पस्वल्प संधि दवडणेंहि मूर्खपणाचें होय हे आम्ही महाराष्ट्रीयांस सांगावयास हवें असें नाहीं. तरी आत्मस्फूर्तीनें शेंकडों, हजारों, लाखों महाराष्ट्रीय बांधव आपल्या तालुक्या या व जिल्ह्याच्या अधिकाऱ्यास अर्ज करून आम्हास लष्करी शिक्षण देऊन तरवारबहाद्दरीच्या कामास लावणाऱ्या मराठा पलटणींत दाखल करा असा अर्ज करतील अशी आम्हास उमेद आहे.

## तक्ता नं. १

पलटणींत घेण्यापूर्वी पुढील प्रश्न विचारण्यांत येतात—

इंडियन टेरिटोरियल फोर्समध्यें नांव दाखल करावयाच्या अर्जांत पुढील माहिती असावी.

संपूर्ण नांव, बापाचें नांव, धर्म, जात व वर्ण ( Religion, Class & tribe ) हल्लींचा पूर्ण पत्ता,कायमचा पूर्ण पत्ता, जन्मतारीख, आधीं दुसऱ्या राज्याचा प्रजाजन असून पुढें हिंदुस्थानसरकारचा प्रजाजन झाला असल्यास त्याची तारीख, धंदा, पूर्वी लष्करी नोकरी केली असल्यास तिचा तपशील, ज्या पलटणींत नांव दाखल करावयाचें तिचें नाव, सही तारीख सही (अ) डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट (कलेक्टर ) (ब) भरती करणारा अधिकारी (क) पलटणीचा मुख्य अधिकारी व तारीख.

## तक्ता नं. २

१ तुमचें नांव काय ? २ तुमच्या वडिलांचें नांव काय ? ३ तुम्ही ब्रिटिश प्रजाजन आहां काय ?

४ तुमचें गांव तालुका व जिल्हा कोणता ? ५ तुमचा सध्यांचा धंदा काय ? ६ धंद्याचें ठिकाण कोणतें ? ७ शिक्षण कोठवर झालें आहे ? ८ वय किती ? ९ तुम्हास काळ्यापाण्याची, कैदेची अगर फटक्याची कधीं शिक्षा झाली आहे काय, अगर तुम्हाकडून चांगल्या वागणुकीबद्दल कधी जामीन घेतला आहे काय ? १० सरकारचे खडें अगर शिलकी सैन्य, संस्थानांतील साम्राज्याच्या नोकरी-करितां ठेवलेली फौज व नेपाळ सरकारची फौज ह्यांत सध्या तुमचें नांव आहे काय ? ११ वरील सैन्यांत अगर इंडियन डिफेन्स फोर्समध्यें पूर्वी कधीं नोकरी केला आहे काय? १२ लष्करी नोकरी-बद्दल जी उत्तरें दिलीं तीं सर्वैथैव खरीं आहेत काय? १३ (वरील तक्त्यांत) तुम्ही १९२०चा इंडियन टेरि-टोरियल फोर्स ॲक्ट या कायद्यान्वयें नांव नोंदण्यास तुम्ही तयार आहां काय ? १४ तुम्हास कोणत्या पलटणींत नांव घालावयाचें आहे ? १५ वरील कायद्यान्वयें लष्करी शिक्षण घेण्यास व कामगिरी करण्यास तुम्ही तयार आहां काय ? असें करतांना जातिबंधनें तुमच्या लष्करी कर्तव्याच्या आड तुम्ही येऊन देणार नाहींना ?

(टीप—खड्या फौजेंत जातिबंधनांत ढवळा-ढवळ न करण्याचें जें धोरण स्वीकारलें जातें तेंच नागरिक पलटणींतहि अवलंबिलें जाईल.)

१६ कायद्यांत नमूद केल्याप्रमाणें तुम्हास बडतर्फ करीपर्यंत नोकरी करण्यास तुम्ही कबूल आहां काय ? १७ ह्याच कायद्यान्वयें नागरिक सैन्यांत दाखल होण्यास तुम्ही पूर्वी अर्ज केला होता काय ? केला असल्यास त्याचा निकाल काय झाला? १८ इंडियन टेरिटोरियल फोर्समधून तुम्हास काढून टाकण्यांत आलें आहे काय ? १९ वरील सर्व प्रश्नांस तुम्ही जीं उत्तरें दिलीं आहेत तीं सर्वैथैव खरीं आहेत व कायद्यान्वयें तुमचीं सर्व कर्तव्यें पार पाडण्यास तुम्ही तयार आहां का ?

सही—अर्जदारास वरील सर्व प्रश्नांचा अर्थ पूर्णपणें समजला असून नांव नोंदविण्याच्या सर्व अटी त्यास मान्य आहेत. भरती करणाऱ्या अधिकाऱ्याचें नांव.

### शपथेचा नमुना

मी शपथपूर्वक असें सांगतों कीं, बादशहा सरकार व त्यांचे कायदेशीर वंशज ह्यांशीं राज-निष्ठेनें वागून मी प्रामाणिकपणें व विश्वासूपणें इंडियन टेरिटोरियल फोर्समध्यें नोकरी करीन आणि खुष्कीनें अगर समुद्रमार्गानें मला आज्ञा होईल तेथें जाऊन माझ्या वरिष्ठ अंमलदारांचा हुकूम मी स्वतःच्या प्राणासही न जुमानतां पाळीन.

### प्रतिज्ञेचा नमुना

मी गंभीरपणें व निश्चयानें अशी प्रतिज्ञा करतों कीं, बादशहा सरकार व त्यांचे कायदेशीर वंशज ह्यांशीं राजनिष्ठेनें वागून मी प्रामाणिकपणें व विश्वासूपणें इंडियन टेरिटोरियल फोर्समध्यें नोकरी करीन आणि खुष्कीनें अगर समुद्रमार्गानें मला आज्ञा होईल तेथें जाऊन माझ्या वरिष्ठ अंमलदारांचा हुकूम मी स्वतःच्या प्राणासहि न जुमानतां पाळीन. माझ्यापुढें योग्य तऱ्हेनें शपथ प्रतिज्ञा घेतली. ज्याच्या-समोर सही केली त्या अधिकाऱ्याची सही, तारीख, हुद्दा.

# बहिष्कार व त्याची खरी कारणे

दोन आठवड्यापूर्वी प्रस्तुत विषयावर लिहिताना आम्ही असे म्हटले होते की, हिंदी लोकांच्या असंतोषाचे खापर डोक्यावर फोडण्याला प्रधान मंडळाने पार्लमेंटरी कमिशनला धनी करून ते स्वतः नामानिराळे झाले आहे. आणि तेथपर्यंत मजल आली तर ते खापर कमिशनच्या डोक्यावर फोडण्याला हिंदी राष्ट्र केव्हाहि मागे घेणार नाही. हे खापर फोडावयाचे म्हणजे कमिशनवर कड-कडीत बहिष्कार घालावयाचा. म्हणून कमिशन आपला कपाळमोक्ष अशा अपमानास्पद रीतीने करून घेणार की आपले कपाळ बचावणार हे आता सर्वस्वी कमिशनच्या हातीच राहिले आहे. ही अशी सावध-गिरीची स्पष्ट सूचना कमिशनचे अध्यक्ष सर जॉन सायमन याना आम्ही त्याच लेखात दिली आहे. या भावी अपघाताचे कारण हिंदी राष्ट्राला स्वयं-निर्णयाचा जो मर्यादित हक्क आहे तोहि बजावण्याला संधि न मिळण्याचा संभव हेहि आम्ही तेव्हाच दर्शविले होते. तोच मुद्दा आणखी थोडा स्पष्ट करून सांगण्याचा आज आमचा विचार आहे. गुन्हेगार झाला तरी त्याला शिक्षा देण्याला काढण्याच्या आधी आपला बचाव करण्याची संधि द्यावी हे न्यायबुद्धीचे एक सर्वसंमत असे तत्त्व आहे. त्याला फिर्याद वाचून दाखवली जाते. त्याच्यावरील आरोप स्पष्ट शब्दानी लिहून व वाचून दाखविला जातो. त्याला गुन्हा कबूल करण्याला किंवा त्याचे परिमार्जन करण्याला अवश्य ती संधि दिली जाते. आणि नंतरच त्याला शिक्षा सुनावण्यात येते. शिकारीत देखील ही न्यायबुद्धि अनुसरली जाते. कारण खरा शिकारी निजलेल्या

श्वापदाला गोळी घालीत नाही तर आधी त्याला जागे करून शब्दाने आव्हान करून नंतरच गोळी घालतो. सायमन कमिशनवर बहिष्काराची गोळी घालावयाची तरी त्याला जागे करून ती घालणे हेच खऱ्या धैर्याचे लक्षण आम्ही समजतो. म्हणून कमिशनकडून हिंदी राष्ट्राची अपेक्षा काय आहे, व ती अपेक्षा सायमनसाहेबाकडून संभाळली न गेली तर बहिष्कार आज पुकारला गेला त्याहूनहि अधिक कडक असा बहिष्कार त्यावर घालणे योग्य कसे होईल, हे पुनः स्पष्ट करून सांगण्याचा आमचा विचार आहे.

आजवर बहिष्काराची चळवळ झाली ती हि एका दृष्टीने ठीकच आहे. कारण शिकारीपूर्वी हाके लोकांनी जमाव करून रान उठवावेच लागते. त्याप्रमाणे बहिष्काराच्या आतापर्यंतच्या चळवळींने रान उठले आहे. पण खऱ्या शिकारीचा प्रसंग कमिशन प्रत्यक्ष इकडे येऊन सायमनसाहेबानी आपले तोंड उघडले म्हणजेच येणार. कारण हिंदी राष्ट्राचा अनुनय करून सहकारिता संपादावयाची की नाही याची कमिशनवरची सर्व जबाबदारी प्रधानमंडळाने प्रतिपक्षाचे पुढारी रॅमसे मॅकडोनाल्ड यांच्या तोंडून स्पष्ट शब्दात वदविली आहे. अर्थात् मॅकडोनाल्ड यानी सुचविल्याप्रमाणे, इकडील कायदेमंडळानी नेमलेल्या कमिट्याशी नाते कसे ठेवावे न ठेवावे याची जबाबदारी यापुढे सर्वस्वी सायमन कमिशनवरच आलेली आहे. सायमनसाहेबानी काही दिवसापूर्वी जे प्रास्ताविक भाषण केले त्यात नुसता सामान्य शिष्टाचार होता, अधिक काही नव्हते, हे आम्ही पूर्वी दर्शविलेच होते. अर्थात् त्यांचे खऱ्या निर्णयात्मक बुद्धीचे भाषण कमिशनच्या कामाच्या आरंभीच होणार. म्हणून ते होईपर्यंत बहिष्कार आगाऊच कायमचा घातला असे म्हणण्यात ज्याप्रमाणें अर्थ नाही, त्याचप्रमाणे सायमनसाहेबाना पुढे कोणतीहि सबब राहू नये म्हणून, कमिशनपासून आमची अपेक्षा काय आहे हेहि त्याना स्पष्ट शब्दानी आगाऊच कळविणे जरूर आहे. शिकारीपूर्वीची हाक किंवा आव्हान असे आम्ही म्हटले ते हेच होय. व ही अपेक्षा कोणती व ती करण्याचा हक्क आम्हाला का आहे हेच स्पष्ट करून सांगणे हा आमचा आजचा विषय आहे.

पण हे होण्यापूर्वी दुसऱ्याहि एका गोष्टीचा खुलासा करणे जरूर आहे. ती अशी की कमिशनची नेमणूक झाल्याबरोबर, म्हणजे पार्लमेंटातील भाषणाच्या आधीहि, जो बहिष्कार पुकारला गेला तो मुख्यतः एकाच गोष्टीला उद्देशून होता. ती म्हणजे कमिशनवर हिंदी गृहस्थांची नेमणूक करण्यांत आली नाही ही होय. पण ही गोष्ट बहिष्काराला सर्वस्वी पुरी होत नाही असे आमचे मत पूर्वी होते व तेच आजहि आहे. किंबहुना कोणी तरी कसले तरी दोन तीन सभासद कमिशनवर नेमून आमच्या बहिष्कारबुद्धीचे कंबरडे प्रधानमंडळाने मोडले नाहीं ही एक प्रकारे आम्ही कृपाच समजतो. कारण अशा प्रकारच्या कारवाईनें आमचा विरोध लुला-पांगळा करून टाकला असता. रॉयल कमिशनवर कसले तरी दोन तीन हिंदी सभासद नेमणे ही एक गोष्ट एका बाजूला, आणि हिंदी कायदेमंडळाने निवडून दिलेल्या कमिट्या दुसऱ्या बाजूला, अशा दोन हातांत दोन वस्तू घेऊन जोखून पाहिल्या असता, अधिक वजनदार कोण भरेल हे सामान्य बुध्दीच्या मनुष्यालाहि सहज समजण्यासारखे आहे. स्वयंनिर्णयाचे तत्त्व, काही मर्यादेत का होईना, पण व्यवहारात थोडे तरी उतरावे, त्याचा थोडाबहुत तरी अमल व्हावा, त्याचे थोडेबहूत तरी फळ पदरात पडावे, आम्हाला हवे तसे आमचे आम्ही आमच्याच लोकाकडून करून घेतले किंवा निदान सुचविले असे थोडेबहुत तरी समाधान आम्हाला लाभावे, अशी जर आमची इच्छा असली तर ती कोणापासून किंवा कोणाच्या द्वारे अधिक सफळ होईल? कमिशनवर सरकारने 'नेमलेल्या' कसल्या तरी दोन-तीन सभासदांनी? की कायदेमंडळानी 'निवडलेल्या' कमिट्यानी?

जुन्या रॉयल कमिशनांचा ज्याना थोडासा अनुभव आहे त्याना ह्या प्रश्नाचे उत्तर देण्याला क्षणाचाहि विलंब लागणार नाही. व ते खऱ्या मनाने उत्तर देतील तर आमच्या मताप्रमाणेच देतील असा आमचा पूर्ण भरंवसा आहे. कदाचित् हीच गोष्ट लक्षांत घेऊन 'हिंदी सभासद कमिशनवर नेमून घेण्याच्या भानगडीत आपण पडू नये' असा इषारा पंडित मोतीलाल नेहरू यानी परस्पर विलायतेत दिला होता हे वाचकांच्या ध्यानात असेलच. त्यानी तर आपली मजल कॉंग्रेसने स्वातंत्र्य पुकारण्यापर्यंत नेऊन सोडली होती! रॉयल कमिशनवर हिंदी सभासद नेमण्याची कारवाई किती असमाधान-कारक व कपटाची असते हे आपल्या पूर्ण परिचयाचे आहे. हे प्रत्येक कमिशन 'पॅक्ड' असते. म्हणजे त्याच्यावर सरकारतर्फेचे, त्याची बाजू सांभाळणारे, त्याच्या मनाप्रमाणे काम करणारे, त्याचे पूर्व नियोजित सिद्धांत सिद्ध करून देणारे, व मनांत नसले तरी शिस्तीकरिता मोहबतीकरिता भिडेकरिता किंवा अभिलाषबुद्धीने सरकारच्या मताप्रमाणे निकाल करून रिपोर्टावर सह्या ठोकणारे, असेच लोक बहुमत होण्याइतके हेरून पाहून त्यावर नेमले जातात. आणि या 'गोऱ्या' तोंडावर भूषणार्थ गालबोट लावावे

त्याप्रमाणे एखादा दुसरा चांगला हिंदी मनुष्य लोकमत व्यक्त करणारा नेमला जातो. याचा परिणाम असा होतो की,अशा लोकमतप्रदर्शक एकदोघा सभासदाना कमिशनचे काम चालू असता विरोधी प्रबळ बहुमताशी धावतं युद्ध आतल्या आत करीत बसावे लागते. आणि शेवटीं केवळ भिन्नमतपत्रिका जोडून आपले कर्तव्य आपण केले असे समाधान मानून घ्यावे लागते.

स्वतः सभासदांची ही स्थिति झाली. पण लोकसमाजाची स्थिति काय होते पाहा ! कमिशनवर आपल्या खात्रीचा असा एखादा सभासद नेमल्याने आपल्याला त्यावर सहसा बहिष्कार घालवत नाही. आणि तो बिचारा एकटा–दुकटा असहाय असल्यामुळे इतर पाचसातांच्या गर्दीपुढे जमावापुढे त्याचे काही चालतहि नाही. म्हणजे उष्टे खाल्ले पण तूप लाभले नाही अशी दुहेरी फजीति लोकांची होते. आज कमिशनवर एकहि हिंदी सभासद नसल्याने 'मळमळीत सौभाग्यापेक्षा झळझळीत वैधव्य बरे ' ही म्हण तरी खरी होणारी आहे. कमिशनला बहिष्काराची लाथ मारावयाची झाली तर, त्यावर बसणाऱ्या बिचाऱ्या आपल्याच एखाद्या मनुष्याला ती लागेल या भीतीने पाय मागे घेण्याची बुद्धि एरवी व्हावयाची तशी तरी आतां होणार नाही. लागली लाथ तर पार्लमेंटरी कमिशनलाच लागेल मग लागेना का ? असे सहज म्हणता येण्यासारखे आहे.

याच्या उलट कसे ते पाहा. समजा,या कमिशनवर एखादा जिना एखादा सप्रू एखादा नेहरू एखादा अली इमाम नेमला गेला असता तर त्याच्या जोडीला एखादा दरभंग्याचा राजा एखादा सर अबदुल कयूम एखादा पानगलचा राजा एखादा सर उमर हायातखान नेमला गेला असता. दुष्टनष्ट सावकार कर्ज देतानाच आधी त्यातून व्याजाचे पैसे आगाऊ काढून घेतो, त्याप्रमाणे कमिशनवर एक लोकमतवादी प्रागतिक किंवा राष्ट्रीय सभासद नेमताना त्याच्याबरोबर दोन प्रतिगामी होयबा नेमण्याची सरकारची रीत असते. यामुळे आधीच बेतोल झालेल्या ताजव्यातून जोखून शिवाय वजन करताना हाताने उलटा धक्का देऊन जे भरेल ते मालाचे माप अखेर गिऱ्हाइकाच्या पदरांत पडावयाचे अशी दुकानदारीची कपटी पद्धति सरकारची आहे. कमिशन नेमण्याचे ठरले की त्यातल्या तीन–चतुर्थांश जागा सरकार आपल्या करिता राखून ठेवतं. आणि उरल्या एक–चतुर्थांशात हिंदुस्थानातील निरनिराळ्या वर्गाची तजवीज लावते.

म्हणजे समजा, दहा सभासद नेमावयाचे असतील तर त्यांची वाटणी सामान्यतः अशी होते. एक लिबरल लॉर्ड तर एक कॉँझर्व्हेटिव्ह लॉर्ड हवाच. हाऊस ऑफ कॉमन्समधील लिबरल कॉँझर्व्हेटिव्ह व लेबर या तीन पक्षाना एक एक जागा का नको? अशा रीतीने पाच जागा खपल्या. उरल्या पाचात कमिशनपुढील विषयाचा तज्ज्ञ म्हणून एक हवा.आणि सगळे तज्ज्ञ कायते इंग्लंडातच असल्यामुळे तो इंग्रज असणार हे ठरलेलेच ! उरल्या जागा चार. त्यात एक हिंदुस्थानातला बडा अधिकारी हवाच. तो तर स्थानिक उपाध्यायच. उरल्या तिहीत एक कोणी जमीनदार राजा महाराजा हवा कारण त्याचा हितसंबंध मोठा. मग उरले दोन.त्यात एक मुसलमान किंवा अशाच आवडत्या मागसलेल्या वर्गाचा प्रतिनिधि हवाच. उरला एक. तो लिबरलसारख्या त्यातल्या त्यात सरकारला जवळ असलेल्या पक्षातला नेमला की काम झाले. अशा रीतीने कमिशनच्या सभासदांची वाटणी होते. पूर्वी इटालीत अशी म्हण असे की, ' कोणत्याहि रस्त्याने गेलो तरी शेवटी रोमलाच पोचावयाचे' त्याप्रमाणे कमिशनच्या सभासदांची कशीहि वाटणी केली तरी शेवटी प्रचंड बहुमत सरकारतर्फेच व्हावयाचे.

पण स्वतः घरधन्यानेच जर असे केले की, निरनिराळी नाती लावून घरी आलेला मलीदा सगळा आपणच खाल्ला तर इतराना काय मिळणार? म्हणजे मुलाचा बाप म्हणून मी, बायकोचा नवरा म्हणून मीच, चुलत्याचा पुतण्या म्हणून मीच, पुतण्याचा चुलता म्हणून मीच, व सगळ्याच्या शेवटी कर्ता मुखत्यार घरधनी म्हणून मीच. अशा रीतीने त्याने सगळ्यांचा हिस्सा आपणच घेऊन खाल्ला तर इतराना काय उरणार ? कमिशन नेमताना सरकारची हीच पद्धति असते.पार्लमेंटची जबाबदारी म्हणून, विलायतेतील लोकपक्षाचा हक्क म्हणून, हिंदुस्थानसरकारचा हितसंबंध म्हणून, गोऱ्या व्यापाऱ्यांचे भांडवल गुंतले म्हणून, मूठभर गोऱ्या लोकांचे संरक्षण व्हावे म्हणून, व अल्प संख्याकांचे हित पाहिले जावे म्हणून- अशा अनेक रीतीनी आपले हस्तक सरकाराने कमिशनवर नेमल्यावर हिंदुस्थानातील स्वतंत्र लोकमतामध्ये त्याच्यावर जागा कितीशी उरणार? जुने पब्लिक सर्व्हिस कमिशन व निरनिराळी करन्सी कमिशने या सर्वांच्या अनुभवावरून, हल्लीच्या प्रसंगी एखादा चांगला व एक–दोन वाईट असे हिंदी गृहस्थ या सुधारणा कमिशनवर नेमले असते म्हणजे लोकमताला मोठा पेचच येऊन पडला असता.तो असा की आपलेच दात व आपलेच ओठ! कमिशनला लाथ मारता येत नाही व वंदनहि करिता येत नाही! अशा नेमणूकी झाल्या असल्या तर स्वयंनिर्णयाच्या वरिष्ठ हक्काच्या आग्रहाने हल्लीच्यातील

किती बहिष्कारवादी बहिष्काराची काठी हातीं घेऊन उठले असते हे लोकांनी पाहिलेच असतें !

पण हा सर्व प्रपंच पुनः एकवार सांगण्याचें कारण असें की, खऱ्या स्वयंनिर्णयाला जें बहिष्कारवादात महत्त्व यावयाचें तें कित्येक बहिष्कारवादी अजूनहि देत नाहीत. आणि कायदेमंडळानें कमिट्या नेमून त्यांच्याकरिता पार्लमेंटरी कमिशनच्या बरोबरीचे हक्क आग्रहानें मागणें या स्वयंनिर्णयाच्या प्रकाराकडे या लोकांनीं अद्याप यावें तितकें लक्ष दिलेलें नाही. हिंदुस्थानांतील आजचें कायदेमंडळ आहे त्याहून अधिक लोकमतदर्शक व प्रातिनिधिक होणें उद्यां शक्य आहे व आजच्या कायदेमंडळांत अनेक पक्ष उपपक्ष असल्यामुळें लोकमत त्यांच्या द्वारें जितकें घसघशीत सिद्ध व्हावयाला पाहिजे तितकें होत नसेल. तथापि लोकांचें म्हणणें, पार्लमेंटपुढें म्हणा किंवा जगापुढें म्हणा, मांडावयाचें असल्यास कमिशनवर सरकारनें 'नेमलेल्या' अशातशा दोन तीन सभासदांपेक्षा कायदेमंडळानें 'निवडलेल्या' कमिट्या ह्याच तें काम करण्याला अधिक पात्र होत होत यांविषयीं कोणीहि समंजस मनुष्य शंका घेणार नाही. १९२४–२५ सालीं कायदेमंडळानें सुधारणांच्या ज्या हप्त्याची मागणी केली तिला राष्ट्रीय मागणी ( नॅशनल डिमांड ) हें नांव प्राप्त झालें आहे. तें नांव देतांना कायदेमंडळाचें प्रातिनिधिक स्वरूपच लोकांनीं लक्षांत घेतलें आहे.

पण खेदाची गोष्ट अशी कीं पार्लमेंटरी कमिशनवर बहिष्कार घालतांना या कायदेमंडळाची कोणाला नुसती आठवणहि झाल्याचें दिसत नाहीं मुंबईच्या दुसऱ्या जाहीर सभेंत कायदेमंडळाची आठवण झाली. पण ती इतक्यापुरतीच कीं कायदेमंडळानें आपली कमिटी नेमू नये. पण हें कशाकरितां ? तर बहिष्कारांत कायदेमंडळाचीहि मदत व्हावी म्हणून. पण त्याच्यापुढें आपण एक पाऊल गेलों म्हणजे याची असंबद्धता सहज दिसून येते. ती अशी कीं, कायदेमंडळानें अशा रीतीनें बहिष्कार घालावा तो कां ? तर कमिशनवर कोणी हिंदी गृहस्थ सरकारनें 'नेमले' नाहींत म्हणून ! याचा फिरून अर्थ काय ? तर स्वतः कायदेमंडळानें आपली कमिटी नेमून स्वयंनिर्णय करण्याच्या हक्कापेक्षा, तिनें आपल्या तोंडानें व कृतीनें, सरकारनें कमिशनवर 'नेमलेल्या' अशातशा दोनतीन सभासदांना हिंदुस्थानाकरितां निर्णय करण्याचा हक्क अधिक आहे अशी कबुली द्यावी असाच याचा अर्थ होत नाहीं काय? अर्थात् बहिष्काराच्या चळवळींत 'या विशिष्ट कारणाकरिता' कायदेमंडळाला सामील करून घेणें म्हणजे एखाद्याला खड्ड्यांत गाडण्याकरितां स्वतः त्याच्याच हातून खड्डा खणविण्यासारखें होय असें आम्हाला तरी वाटतें! मुंबईच्या सभेनें कायदेमंडळाला अशा रीतीनें बहिष्काराला जुंपून घेण्याकरिता निमंत्रण करण हा त्या मंडळाचा बहुमान नसून अपमान आहे असें आम्ही स्पष्ट म्हणतों.

प्रतिसहकारी पुढाऱ्यांनीं आपल्या जाहीरनाम्यांत म्हटल्याप्रमाणें मुंबईच्या या सभानीं जर असे ठराव केले असते कीं, 'कायदेमंडळाकडून नेमल्या जाणाऱ्या कमिटीला कमिशनच्या-बरोबरीचे हक्क असावेत व ते न मिळतील तर स्वतः कायदेमंडळानें आपली कमिटीच नेमू नये,' तर त्यांनीं स्वयंनिर्णयाच्या हक्काची जाणीव ठेवली असें आम्ही म्हटलें असतें. अशा प्रकारचें कमिशन हें "उगाच गळ्यांत लुडबुडणाऱ्या अजागल-स्तनाप्रमाणें दूध न देणारें किंवा शेळीच्या शेपटी-प्रमाणें लाज रक्षण न करणारें म्हणून व्यर्थ आहे.आम्ही जर संबंध ठेवावयाचा तर पुढें नेमल्या जाणाऱ्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीशींच ठेवू. हें कमिशनच मुळीं नको होतें." असें कोणी म्हणेल तर त्याच्यांत कांहीं तरी अर्थ आहे. कारण आजीहि कांहीं बहिष्कार वादी त्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीवर बहिष्कार घालीत नाहींत तर या मधल्या कमिशनवरच घालतात हें वाचकांनीं नीट ध्यानांत आणावें. पण कमिशन अनवश्यक म्हणून नाहीं, तर त्यावर हिंदी सभासद नेमले नाहीं म्हणून ! याकरितां आम्ही फिरून हीच गोष्ट निक्षून सांगतों कीं, भलतें कारण लावून घातलेल्या बहिष्काराला यश मिळणार नाहीं. कारण त्यावर सर्वांचें एकमत नाहीं.

पण बहिष्काराला यश यावें अशी इच्छा असेल आणि त्याला खरें कारण लावलें जाईल तरच तें येईल. व तें खरें कारण म्हणजे पार्लमेंटरी कमिशनच्या बरोबरीनें कायदेमंडळानें नेमलेल्या कमिटीला हक्क जरूर असले पाहिजेत, व स्वयंनिर्णयाचा अधिकार खरोखर त्या कमिटीलाच आहे हें होय.आतां दुर्दैवानें कायदेमंडळामध्यें आज अशा कांहीं चांगल्या पुढारी लोकांचा समावेश नाहीं कीं,ज्यांचें मत स्वयंनिर्णया-च्या कामीं अवश्य घेतलें पाहिजे.पण ही गोष्ट लक्षांत येऊन मुख्य प्रधान बाल्डविन यांनीं सांगून टाकलें आहे कीं, "कमिट्यांच्या निवडणुकीचे नियम बदलून कायदेमंडळानें आपणांत नाहीं असे लोक खुशाल आंत घ्यावेत." पण मौज ही कीं बॉल्डविन साहेब हे कायदेमंडळाचा व त्याच्या अधिकाराचा जितका ओझरता उल्लेख करतात तितकाहि आजचे प्रमुख बहिष्कारवादी करीत नाहींत हें आश्चर्य नव्हे काय !

तात्पर्य, कायदेमंडळाची नुसती आठवणहि बहिष्कारवादी लोक हल्लींच्या वादांत चळवळींत व ठरावांत ठेवीत नाहींत. जी ठेवतात ती बहिष्कारांत त्यांच्याकडून मदत घेण्यापुरती ! पण स्वयं-

निर्णयाच्या हक्काच्या बजावणीत त्याचा संबंध असल्याचा ते उल्लेखहि करीत नाहीत ! म्हणून बहिष्काराची चळवळ अजून योग्य मार्गावर नाही असे आम्ही म्हणतो.व ती योग्य मार्गावर यावयाची तर बहिष्कारवादी लोकांच्या सभातून कायदे-मंडळानी नेमावयाच्या कमिट्यांना जे अधिकार हवे त्यांचा स्पष्ट उच्चार होत गेला पाहिजे.प्रतिसहकारी लोकांच्या जाहिरनाम्यात त्या अधिकारांचा स्पष्ट उच्चार शर्तीच्या रूपाने केला गेला आहे. त्या पाळल्या गेल्या तर, कमिशनवर असे-तसे कोणी दोनतीन सभासद नेमण्यापेक्षा स्वयंनिर्णयाचे तत्त्व अधिक सिद्ध होईल व मग बहिष्कार घालण्याचे कारण उरणार नाही. पण त्या अटी पाळल्या गेल्या नाहीत तर बहिष्काराला प्रतिसहकारीहि सिद्ध आहेतच. ते मागे का घेतील ?

# स्व-पर-संरक्षणाचे हक्क

( डॉ. वि. म. भट, येवले. )

**लेखांक ४ था**

स्वपरसंरक्षणाचा एवढा जबरदस्त हक्क असतांना सुद्धां हिंदुस्थानांत मुसलमान गुंडांकडून हिंदु स्त्रियांवर अत्याचार घडावेत, आणि शेंकडो अत्याचार झाले असतांना ते सर्व निमटपणें येथील लोकांनीं सहन करावेत, ह्यापेक्षां तटस्थ हिंदूंच्या अधोगतीची परमावधि ती आणखी कोणती राहिली ? पण ह्या दुर्बलतेमुळे त्या गरीब अबलांना नुसते अत्याचारच सहन करून भागत नाहीं तर नादान हिंदू त्या अबलांना टाकून देऊन त्यांना धर्मांतर करण्यास किंवा वारांगना होण्यास भाग पाडतात. आणि आपल्या शेळपट हिंदुत्वाचा टेंभा मिरवतात.असले हिंदुत्वास कलंक लावणार हिंदू जितके नाहींसे होतील तितका हिंदुधर्म उज्ज्वलच होईल.

पण पुरुष भेकड, शेळपट, नामर्द असले म्हणून बायकांनीं हे अत्याचार सहन करावेत असे मात्र नाहीं. पोलिसाचें संरक्षण मिळणें शक्य नसल्यास आपल्या पातिव्रत्यावर हल्ला करणाऱ्या नराधमास तथल्या तेथे ठार करण्याचा त्यांना, किंवा त्यांच्या शेजारच्या इतर बायकांनाहि,अधिकार आहे. स्वपरसंरक्षणाचा हक्क पुरुषासच फक्त आहे, बायकांस नाहीं, असें मुळींच नाहीं. प्रत्येक 'माणसास' हा हक्क आहे. तेव्हां प्रसंग पडल्यास खुद्द स्त्रियांना सुद्धां हा हक्क बजावण्यास हरकत नाहीं. स्वपरसंरक्षणच काय, पण रणांगणात शत्रूंच्या सशस्त्र सैन्यांनशीं युद्ध करणाऱ्याहि अनेक स्त्रिया या भरतखंडांत होऊन गेलेल्या असतांना स्त्रियांनी स्वतःच्या पातिव्रत्याच्या रक्षणार्थ सर्वस्वी परावलंबी राहण्याचें कांहीच कारण नाहीं.

"वर सांगितलेल्या गुन्ह्याखेरीज इतर गुन्हा जर शत्रूकडून होण्याचा बळकट संभव असेल तर त्यास संरक्षणासाठी ठार मारण्याचा हक्क मात्र कोणास नाहीं.९९ कलमांत सांगितलेल्या निर्बंधाव्यतिरिक्त इतर कोणतीहि इजा त्यास करण्याचा हक्क आहे." ( कलम १०१ )

हल्ला करणाऱ्या शत्रूस ठार मारण्याचा हक्क १०० कलमात सांगितलेल्या ६ गुन्ह्यांपुरताच आहे. त्या कलमांतहि इतर इजा करण्यास सांगितली आहे. पण तेवढ्याने नच भागले तर प्रसंगीं शत्रूचा प्राणहि घेण्यास त्यात सवड ठेवली आहे. ह्या कलमांतल्या ६ गुन्ह्यांखेरीज इतर गुन्ह्यांविरुद्ध संरक्षणाचा हक्क निर्दिष्ट केल्याने शत्रूस ठार मारण्याचा हक्क ते गुन्हे तितके भयंकर नसल्यानें ठेवला नाहीं. पण ठार मारण्याचा हक्क नसला तरी संरक्षणासाठी अवश्य असल्यास त्यास आजन्म आठवण राहील इतकी दुखापत करण्याचा हक्क आहेच आहे.

## संरक्षणाच्या हक्काची मर्यादा

"गुन्हेगाराकडून गुन्हा, किंवा त्याचा प्रयत्न अथवा त्याबद्दल त्याने दाखविलेली धमकी ह्यामुळे शरीरास धोका आहे असा बळकट संभव किंवा भीति वाटूं लागतांच स्वपरसंरक्षणाचा हक्क सुरू होतो. आणि जोंपर्यंत हा सबळ संभव वाटत आहे तोंपर्यंत हा हक्क चालू असतो." ( कलम १०२ )

ह्या कलमांत संरक्षणाचा हक्क केव्हां सुरू होतो व तो किती वेळपर्यंत चालू असतो ह्याची मर्यादा सांगितली आहे. गुन्हा होणार असा बळकट संभव दिसणें ही सुरुवातीची, आणि तो संभव नाहींसा होणें ही ह्या हक्काच्या अखेरची खूण आहे. पण संभव किंवा भीति वाटूं लागणें म्हणजे काय ? एखाद्या भित्र्या माणसास हवी तेथे व हवी तेव्हां भीति वाटते. मग अशा माणसास सदासर्वदा वाटणारा संभव किंवा भीति ही जर ह्या हक्काची खूण धरली तर उठल्यासुटल्या तो स्वसंरक्षण करण्याचा किंवा करवून घेण्याचा

प्रयत्न करील. ही अनवस्था टळावी म्हणून ह्या कलमाचा अर्थ सामान्यतः धीट असणाऱ्या माणसास वाटणारा संभव असा न्यायाधीशांनीं ठरविला आहे. त्या संभवास सबळ कारण असलें पाहिजे. तसें कारण नसल्यास हा हक्क अमलांत आणतां येणार नाहीं.

"९९ कलमांत सांगितलेल्या निर्बंधाखेरीज इतर प्रसंगीं स्वपरवित्तसंरक्षणाचे कामीं, खालीं दिलेल्या गुन्ह्यांपैकीं गुन्हा किंवा त्याचा प्रयत्न करणाऱ्या गुन्हेगारास ठार मारण्याचा किंवा दुसरी कोणतीहि दुखापत करण्याचा हक्क आहेः—

(१) मारहाण करून केलेली चोरी अथवा लूट (रॉबरी);

(२) रात्रीं केलेली घरफोडी (हाऊस ब्रेकिंग);

(३) राहतें घर, तंबू, जहाज वगैरेस आग लावणें, किंवा ज्या ठिकाणीं माल सांठविला जातो अशा ठिकाणास आग लावणें;

(४) चोरी (थेफ्ट), मालाची नुकसानी (मिसचीफ) आणि परवानगी-वांचून केलेला गृहप्रवेश, हे तीन गुन्हे घडत असतां स्वपरसंरक्षणाचा हक्क न बजावल्यास मरण किंवा जबर दुखापत होण्याचा संभव असल्यास." (कलम १०३)

ह्या गुन्ह्यांत स्वपरसंरक्षणाचा हक्क न बजावल्यास प्राणहानि किंवा जबर दुखापत होण्याचा व मालमत्तेचा नाश होण्याचा संभव असल्यानें साहसिकाचा (गुन्हेगाराचा) प्राण घेण्याचाहि अधिकार प्रत्येकास दिला आहे. ९९ कलमांतील अपवाद किंवा निर्बंध जसे अन्यत्र तसे येथेंहि लागू आहेत.

"वर सांगितलेल्या कलमांतील गुन्हा नसून जर साधी चोरी (थेफ्ट), मालाची नुकसानी (मिसचीफ) किंवा परवानगीवांचून गृहप्रवेश (क्रिमिनल ट्रेसपस) यांपैकीं गुन्हा किंवा त्याचा प्रयत्न होत असेल तर, ९९ कलमांतील निर्बंधाखेरीज त्या गुन्हेगारास ठार मारण्याशिवाय इतर कोणतीहि इजा करण्याचा हक्क आहे." (कलम १०४)

"मालमिळकतीस धोका पोंचण्याचा बळकट संभव आहे असें वाटूं लागल्याबरोबर तिच्या संरक्षणाचा हक्क सुरू होतो.

चोरी करून चोर चीजवस्त घेऊन पळून जाईपावेतों, अथवा पोलिसांचे साहाय्य मिळेपर्यंत, अथवा ती चीजवस्त तेथल्या तेथें परत मिळेपर्यंत चोराविरुद्ध संरक्षणाचा हक्क आहे.

मारहाण करून होणाऱ्या चोरीच्या व लुटीच्या गुन्ह्यात गुन्हेगार प्राणघात किंवा जबर दुखापत **किंवा अटक करीत असतां, अथवा त्याचा** प्रयत्न त्यासाठीं चालू असतां, अथवा तत्काल मरण, दुखापत किंवा अटक होईल असा बळकट संभव वाटत आहे तोंपर्यंत संरक्षणाचा हक्क आहे.

परवानगीवांचून गृहप्रवेश अथवा मिळकतीची नुकसानी ह्या गुन्ह्यांत जोंपर्यंत तो गुन्हा घडत आहे तोंपर्यंत त्याविरुद्ध संरक्षणाचा हक्क आहे.

रात्रीच्या घरफोडीच्या गुन्ह्यांत त्या उद्देशानें केलेला परवानगीवांचून गृहप्रवेश जेथपर्यंत चालू आहे तेथपर्यंत त्याविरुद्ध संरक्षणाचा हक्क आहे." (कलम १०५)

ह्या कलमांत स्वपरवित्तसंरक्षणाचा हक्क केव्हां सुरू होतो व तो किती वेळपर्यंत चालू ठेवतां येतो, ह्याच्या कालदर्शक मर्यादा सांगितल्या आहेत.

चोरीच्या गुन्ह्यात माल–मिळकत 'परत मिळेपर्यंत' ह्या शब्दांचा अर्थ न्यायाधीशानी 'तेथल्या तेथें' परत घेईपावेतों असा ठरविला आहे आणि तो रास्तहि आहे. नाहीं तर हा हक्क कांहीं वर्षांपर्यंतहि चालू राहावयाचा! स्वपरसंरक्षणाचा हक्क हा पुष्कळसा प्रतिबंधात्मक असल्यानें गुन्हा घडण्याच्या ठिकाणीं, आणि त्या वेळीं, त्याचा उपयोग करावयाचा असा त्यांतील हेतु आहे. म्हणून 'तेथल्या तेथें' परत मिळेपावेतों असाच अर्थ अभिप्रेत आहे. पण ती मिळकत कांहीं कालानें सांपडल्यास तिच्या संरक्षणाचा हक्क पुनः उद्भूत होतो, असें मेनचें मत आहे; इतरांचें नाहीं.

## निरपराध्यांस दुखापत

"एखाद्या माणसावर हल्ला होत असतां तो मरणार असा जर बळकट संभव दिसला, आणि स्वपरसंरक्षणाचे कामीं एखाद्या निरपराधी माणसासहि दुखापत होण्याचा संभव असला तर निरपराधी माणसास होणाऱ्या दुखापतीची जोखीम पत्करूनहि स्वपरसंरक्षणाचा हक्क अमलांत आणावा." (कलम १०६)

एखाद्या माणसावर बऱ्याचशा लोकांनीं हल्ला केला आणि त्यामुळें आपण मरूं असा जर त्यास बळकट संशय आला आणि त्या जमावांत कांहीं लहान मुलें असली तर संरक्षणाचे कामीं त्यांपैकीं कांहीं निरपराधी मुलांस दुखापत होणारच. अशा प्रसंगीं त्या मुलांना होणाऱ्या दुखापतीची जोखीम पत्करूनहि जर त्यानें स्वतः आपलें किंवा त्याचें दुसऱ्यांचें संरक्षण केलें तरी त्या निरपराधी मुलामाणसांस होणाऱ्या दुखापतीबद्दल तो जबाबदार नाहीं. वाळल्याबरोबर ओलेंहि कधीं कधीं जळतें तें असें; पण त्याला इलाज नाहीं. स्वपरसंरक्षण हा इतका महत्त्वाचा हक्क आहे कीं, त्याच्यासाठीं क्वचित् प्रसंगीं गुन्हेगाराबरोबर एखाद्या सावासहि इजा **झाली तरी पत्करेल, पण तो हक्क बजावल्याशिवाय**

राहूं नये, असा न्यायशास्त्राचा दंडक आहे. न्यायशास्त्र ह्या हक्काला किती किंमत देतें, ह्या हक्काचें माहात्म्य किती मानतें याचें हें स्पष्ट प्रत्यंतर आहे.

वर वर्णन केल्याप्रमाणें ह्या हक्काचें सरकारी कायद्याच्या मुशींतून निघालेलें स्वरूप आहे. ह्या स्वरूपांत बरेच दोष आहेत. खुद्द कायदे रचणाऱ्या मंडळानेंहि ते कबूल केले आहेत. पण त्याची सुधारणा कशी करावी हें अद्याप कोणीच सुचविलें नाहीं. त्यांतील अतिव्याप्ति आणि अव्याप्ति ही चाणाक्ष वाचकांच्या तत्काळच नजरेस येते. डॉ. गौर यांनीं आपल्या पुस्तकांत ते दोष ठिकठिकाणीं दाखविले आहेत. पण ते फारसे बाधक होत नसल्यानें त्याकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं. आहेत तेच हक्क अमलांत आणण्याची जेथें मारामार तेथें दुरुस्तीकडे कोण लक्ष देतो ?

## आहे या कायद्याचा उपयोग

असो. निर्दोष नसला तरी आहे त्या कायद्यानें सुद्धां आपणास स्वपरसंरक्षणाचे पुष्कळच हक्क दिले आहेत. त्या हक्कांची अंमलबजावणी करण्याचें काम आपलें आहे. हिंदुस्थानांतील मुसलमान, इंग्रज, अँग्लो-इंडियन, शीख, गुरखे, पठाण वगैरे जाती या आपल्या हक्कांचा उपयोग करण्यांत सदैव तत्पर असतात. तत्पर कोणी नसलेच तर ते आमच्यातले पुष्कळसे नेभळट हिंदूच होत. हिंदू-मुसलमानांच्या दंग्यापैकीं कोणत्याहि दंग्याची हकीकत वाचा. त्यात बहुधा प्रथम आगळीक मुसलमानांची, मार हिंदूंनीं खाल्लेला, जखमी किंवा मृतांत हिंदू अधिक, पटापट दुकानें किंवा घरें बंद करण्यांत हिंदू अधिक तत्पर, हिंदू देवळांवर व स्त्रियांवर अत्याचार, हिंदूंचें नुकसान अधिक, ही स्थिति बहुशः आढळावयाचीच. हें असें किती दिवस चालू द्यावयाचें त्याचा हिंदूंनीं विचार करणें अवश्य आहे. या 'धकाधकीच्या मामल्यांत' हिंदु टिकणार कीं नाहीं? इतर लोक आपापला धर्म व संस्कृति टिकवीत असतां आम्हीं हिंदूंनींच मागसावयाचें कीं काय ? त्याबद्दल आम्ही कांहींच खटपट करावयास नको काय ? आमच्या ज्या आर्य संस्कृतीनें जगाला सर्वोत्कृष्ट तत्त्वज्ञान शिकविलें, जी आज ऋग्वेदकालापासून हजारों वर्षे सर्व संकटांना तोंड देऊन जिवंत आहे, जींत श्रीराम, श्रीकृष्ण ह्यांसारखे सर्व जगाला आदर्शभूत असे अवतार होऊन गेले, आपल्या मालकीच्या राज्याच्या हिश्शाचें संरक्षण करण्यासाठीं आततायी बंधूंशीं लढण्यांत अठरा अक्षौहिणी सैन्यहि कुरुक्षेत्रावर गारद झालें तरी हरकत नाहीं पण स्वपरवित्त-संरक्षणाच्या हक्काचें रक्षण करा असें महाभारत जेथें सदैव उपदेशीत आहे, अत्याचार तर दूरच पण जेथें म्लेंच्छाला तोंडहि दिसूं नये म्हणून ज्या देशांतील आर्य रजपूत स्त्रियांनीं अग्निप्रवेश केला, अगदीं अलीकडे पाहिलें तरी जेथें शिवछत्रपति व पेशवे ह्यांनीं अत्याचारी मुसलमानांना दे माय धरणी ठाय करून सोडलें त्या देशांत, त्या भरतखंडांत, त्याच संस्कृतीच्या हिंदूंना आपलें, आपल्या स्त्रियांचें व आपल्या वित्ताचें संरक्षण करतां येऊं नये, संरक्षणाचा हक्क व अधिकार असला तरी तो बजावतां येऊं नये, ह्यापेक्षां अधिक दुःखाची, विषादाची, शतधा हृदय विदीर्ण करून सोडणारी, अशी कोणती गोष्ट असूं शकेल? त्या अधोगतीचा, नामर्दपणाचा हिंदूंना तिटकारा कधीं येणार ? नुसतें जगावयाचें, कांहींहि झालें, कितीहि उपमर्द, अपमान, अधोगति झाली तरी जगावयाचें, हेंच का आतां हिंदूंचें ध्येय आहे ? ' काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुंक्ते' ह्या सुभाषिताप्रमाणें पिंड खाऊन कावळेहि जगतात, उकिरड्यावर गाढवेंहि पुष्ट होतात, तसेंच का हिंदूंना जगावयाचें आहे? नुसत्या जगण्यातच सारा पुरुषार्थ आहे असाच का हिंदूंचा समज झाला आहे? आर्य संस्कृतीचें कांहीं ध्येय हिंदूंपुढें आहे, हें हिंदू विसरलेच कीं काय ? असेंच जगावयाचें असेल तर हिंदु लोक ह्या जगांतून जितक्या लवकर नष्ट होतील तितकें बरें ! म्हणजे त्यांचा हा कित्ता इतर लोकांच्या तरी डोळ्यांपुढें फार दिवस राहाणार नाहीं.

पण जो आर्यधर्म अनेक शतकें अनेक हल्ल्यांना परतवून टिकला आहे त्याचे सगळेच अनुयायी इतके सत्त्वहीन झालेले नाहींत, एवढें त्यांतल्या त्यांत सुख आहे. शीख, रजपूत, गुरखे, मराठे वगैरे हिंदु जाती अद्यापहि धीर, वीर, शूर आहेत, ही आशेला प्रफुल्लित करणारी गोष्ट आहे. उज्ज्वल हिंदुधर्माचे आधारस्तंभ ह्या जाती आहेत. क्षत्रियांचा बाणा ह्या लोकांत अद्यापि जिवंत आहे. ह्याच लोकांनीं २-३ शतकांच्या पूर्वीच इस्लाम संस्कृतीस तीव्र व प्रचंड विरोध केल्यामुळें आज हिंदु संस्कृति जिवंत आहे. आणि ह्या व यांचसारख्या जाती जोंपर्यंत जिवंत आहेत तोंपर्यंत हिंदुधर्माचा ध्वज हा अखंड फडकत राहील. ह्या जातींतील लोकांत स्वपर-संरक्षणाची वृत्ति बरीचशी कायम आहे. ह्या त्यांच्या ज्योतीला उत्तेजन दिलें पाहिजे. त्यांच्यांत यदाकदाचित् स्वपरसंरक्षणाच्या कायद्याचें अज्ञान असलें तर तें नाहींसें व्हावें, त्यांचे हक्क त्यांना यथार्थतेनें कळावेत म्हणून, हा लेख मी लिहिला आहे. इतर हिंदु जातींनींहि ही तेजस्वी वृत्ति अंगीं आणून आपलें, आपल्या बायकापोरांचें व इतरांचें रक्षण करण्यास शिकावें अशी त्यांना माझी प्रार्थना आहे.

ज्या शूर पूर्वजांचे ते आपणास वंशज म्हणवितात,ज्या रामकृष्णादि देवांचें पूजन करतात, त्यांच्या नांवाला साजेल अशी कृति करणें हें त्यांचें कर्तव्यकर्म आहे.

मरणहांक तों चुकेना । देह वांचवितां वांचेना।
विवेकी होऊन समजाना । काय करावें ॥

ही समर्थोक्ति ध्यानांत ठेवन हिंदुस्थानांतील इतर शूर जातींप्रमाणें आपणहि स्वपरसंरक्षणतत्पर व्हावें अशी माझी त्यांना विनंति आहे.

हिंदूखेरीज इतर ज्या शूर जाती आहेत त्यांनीं आपली स्वपरसंरक्षणतत्परता कायम ठेवावीच. पण हल्लीं मुसलमानांत जो हिंदुद्वेष पसरला आहे त्यामुळें हा हिंदू-मुसलमानांचा प्रश्न नवाच उद्भवून दोघांनाहि जरूर व प्रिय असलेला स्वराज्याचा प्रश्न मागें पडूं पाहात आहे. म्हणून मुसलमान बंधूंनीं हिंदूंच्या वरची अतिक्रमणाची वृत्ति नाहींशी करावी अशी त्यांना माझी इतरांप्रमाणेंच सूचना आहे. ह्या ममत्वाच्या सूचनेकडे मुसलमान आज लक्ष देणार नाहीत हें मी जाणून आहें. पण त्यांनीं हेंहि लक्षांत ठेवावें कीं, स्वपरसंरक्षणाचा हक्क हिंदू आज जरी बजावीत नसले तरी आज नाहीं उद्यां ते पूर्णपणें बजावल्याशिवाय राहाणार नाहींत.

# अकोला ब्राह्मण परिषदेचें कार्य

अकोल्यास ब्राह्मण परिषदेचें आगमन होण्यापूर्वी तिचीं चार अधिवेशनें पंढरपूर पुणें कऱ्हाड व वांई या स्थलीं भरलीं होतीं. तीं सर्व अधिवेशनें आपआपल्या परीनें महत्त्वाचीं असलीं तरी अकोला येथील परिषदेस जें महत्त्व प्राप्त झालें तें महत्त्व त्यापूर्वी भरलेल्या परिषदांच्या वांट्यास क्वचितच आलें असेल. ही परिषद अखिल महाराष्ट्रांतील दशविध ब्राह्मणांची होती व तिजपुढील कार्यक्रमहि आगाऊ गाजलेला व ठरलेला होता. ब्राह्मणांमधील पोट-जातींचे संघटन व एकीकरण हें कार्य अकोल्यास घडून यावयाचे असून त्याची पूर्वतयारी वे.महादेव-शास्त्री दिवेकर, श्री. वासुदेवराव मुंडले व वे. खर्शीकर यांनीं लेखनद्वारा व भाषणद्वारा करून ठेवली होती. विषय निकडीचा तसाच वादाचा असल्यामुळें अखिल महाराष्ट्रातील गृहस्थ, भिक्षुक, शास्त्री, पंडित यांचें लक्ष त्याकडे आधींपासून वेधून राहिलें होतें.

परिषद अकोल्यास भरावयाची यामुळें वऱ्हाड नागपूर व खानदेश या सभोंवतालच्या प्रदेशांतून परिषदेस प्रतिनिधींचा समुदाय अधिक लोटावा यांत नवल नाहीं. सदर प्रदेशांतील पंचद्राविड ब्राह्मणांपैकीं प्रमुख पुढारी, निवडक शास्त्री-पंडित व आस्थेवाईक प्रतिनिधी परिषदेस उपस्थित झाल्यानें तिचा वजनदारपणा वाढला होता. त्या-खेरीज तत्प्रांतीय पंचगौडांपैकीं कित्येक गौडांनीं हजर राहून तिच्या दशविधपणास एक प्रकारें संमतीच दिली होती. वऱ्हाड, नागपूर व खानदेश या प्रांताबाहेरील सातारा,पुणें, मुंबई,ठाणें,नाशिक इत्यादि महाराष्ट्रांतील व इंदूर वगैरे बृहन्महाराष्ट्रांतील निवडक शास्त्री–पंडितांच्या व विद्वान गृहस्थांच्या आगमनानें परिषदेचें अखिल महाराष्ट्रीयत्व शाबीत झालें होतें.परिषदेच्या अध्यक्षपदास वाई येथील प्राज्ञ-पाठशाळेचे उत्पादक व चालक ब्रह्मश्री नारायण-शास्त्री मराठे हे द्विजवर्य लाभले होते. या प्रकारचें अधिवेशन वऱ्हाडांत पहिलेंच असल्यामुळे ब्राह्मणांप्रमाणें ब्राह्मणेतरांतहि उत्साह व उत्सुकता उत्पन्न होऊन प्रेक्ष-कांच्या जागा ब्राह्मणेतरांनीं गजबजून सोडल्या होत्या. ब्राह्मण स्त्रिया केवळ प्रेक्षक या नात्यानें हजर नसून कित्येक विदुषींनीं परिषदेंत भाग घेत-ल्यानें तर परिषदेची सर्वमान्यता निःसंशय प्रत्य-यास आली.

ब्राह्मण की ब्राह्मण्य या भोंवऱ्यांत प्रथम सांप-डलेली ही परिषद त्यांतून वांईस सुटून तेथेंच ती नीट रस्त्यावर आली. ब्राह्मण्याचे रक्षण भारतीय ब्राह्मणांनींच तें काय करावयाचें ? निसर्गतः ब्राह्मण्य जगभर आहे व त्याचें रक्षण करण्याचें काम सर्वांचेंच आहे. भारतीय ब्राह्मणांपुढें किंबहुना महाराष्ट्रीय ब्राह्मणांपुढें ब्राह्मण जातीतील ब्राह्मण्य टिकविण्याचा प्रश्न आहे. ब्राह्मणांतील ब्राह्मण्य टिकवावयाचें असेल तर ब्राह्मण जात टिकली पाहिजे हें उघड होय.या दृष्टी-नें ब्राह्मण्यरक्षण परिषद हें नांव बदलून ब्राह्मण परि-षद हें नांव परिषदेनें धारण केलें हें योग्यच झालें.

परंतु ब्राह्मणवर्ग हा चातुर्वर्ण्यात्मक हिंदु समाजाचा एक प्रमुख घटक असल्यामुळें त्यास हिंदु समाजां-तील आपलें स्थान व कार्यक्षेत्र ओळखूनच स्वतःची संघटना करणें प्राप्त आहे. परकीय अमलाखालीं सांप्रत हिंदु समाज विस्कळित बनला आहे.त्याच्यां-तील ब्राह्मणेतरवर्गास अविश्वासानें घेरलें आहे. व अस्पृश्यवर्गास ख्रिस्ती, मुसलमान आदिकरून परध-र्मीय आपल्या कळपांत ओढण्यास टपले आहेत. अशा स्थितीत ब्राह्मणेतरवर्ग व अस्पृश्यवर्ग यांस विसरून आपली वेगळी जूट बनविणें हा राष्ट्रीय, धार्मिक व सामाजिक दृष्ट्या गुन्हा होय. आणि यदाकदाचित

त्यांनीं तसा अट्टाहास केला तरी त्यांस त्या कामीं यश लाभण्याचाहि संभव फारच कमी. अकोला परिषदेनें अशा प्रकारची चूक होऊं दिली नाहीं ही संतोषाची गोष्ट होय. सर्व हिंदू समान दर्जाचे असून त्यांस वेदाधिकार आहे असा सदर परिषदेत मंजूर झालेला ठराव कित्येक जुन्या मताच्या ब्राह्मण मंडळीस फारच जड वाटला असेल तर ब्राह्मण परिषदेवरील कित्येक अब्राह्मण टीकाकारांस तो फारच हलका लागला असेल हे आम्ही ओळखून आहों. परंतु सद्यःपरिस्थितींत ब्राह्मण परिषदेस या बिंदूपासून मागें वळतां आलें नसतें व पुढेंहि झुकतां आलें नसतें ही गोष्ट दोनहि टीकाकडून ताणून धरणाऱ्या टीकाकारांनीं विसरतां कामा नये. ब्राम्हणेतरांच्या पौरोहित्यासंबंधानें परिषदेनें अंगिकारलेलें दिलदारपणाचें धोरण सर्वथैव योग्य होय असेंच कोणीहि म्हणेल. एक अस्पृश्यांचा विटाळ सार्वजनिकरीत्या घालविण्याचा ठराव मंजूर व्हावयाचा राहिला. सदर ठराव विषयनियामक कमिटींतून पार पडला व वेळेची सबब आड न येती तर तो यंदाच्या बैठकींतहि बहुमतानें मान्यता पावला असता. तथापि परिषदेचें प्रगतिपर धोरण लक्षांत घेतल्यास अकोल्याच्या अधिवेशनांत जें कार्य अपुरें राहिलें तें पुढील बैठकींत पूर्ण होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं.

येथवर ब्राह्मणवर्गाचें ब्राह्मणेतर वर्ग व अस्पृश्यवर्ग यासंबंधीं जें कर्तव्य त्याचा विचार झाला. यापुढे ब्राह्मण परिषदेनें ब्राह्मणांतील रोटीबेटी व्यवहाराचे बाबतींत जी महत्त्वाची कामगिरी बजाविली तिजविषयीं विवेचन करणें क्रमप्राप्त होय. चातुर्वर्ण्य हें वैदिक धर्माचें विशिष्ट लक्षण समजलें जातें. हजारों वर्षांपूर्वी निर्माण झालेलें हें चातुर्वर्ण्य कालाच्या ओघांतून वहात येत असतां मूळच्या शुद्ध स्वरूपांत सांप्रत दृष्टीस पडूं नये यांत नवल नाहीं. चातुर्वर्ण्याचा हळूहळू लोप होऊन त्याचें स्थान सहस्रावधि जातींनीं व्यापून टाकलें असून अशा या जातिनिष्ठ समाजास जगांत दाखला सांपडणें कठीण आहे. जातिसंस्था आधुनिक लोकशाहीच्या काळांत कित्येकांच्या मतें हिंदु समाजास पायबंद होऊन बसली असेल. तरी पण संस्कृतिरक्षणाचा तिनें हजारों वर्षें बजावलेली बहुमोल कामगिरी तिच्या आक्षेपकांसहि कबूल करावी लागेल. तथापि हा पायबंद तोडून टाकून हिंदु समाज एकजीव, एकसंधि व अखड बनवावयाचा झाला तरी ज्या क्रमानें व ज्या मार्गानें हिंदुसमाज या थरास येऊन पोंचला त्याच क्रमानें व त्याच मार्गानें त्यानें मागें हटत गेलें पाहिजे यांत संशय नाहीं. त्यानें पोटजातींतून मुख्य जातींत व मुख्य जातींतून मुख्य वर्णांत शिरलें पाहिजे. शास्त्रशुद्ध व सुव्यवस्थित मार्ग हाच व हिंदुसंघटनहि हेंच.

हिंदुसंघटनेच्या व्यापक कार्यांतच ब्राह्मणांचें संघटन व एकीकरण या कार्याचा समावेश होतो. बृहदारण्यकोपनिषदांतील 'ब्रह्म वा इदमग्र आसीत्' या वचनाप्रमाणें चातुर्वर्ण्यापैकीं एक ब्राह्मणवर्गच प्रथम उत्पन्न झालेला असो किंवा पुरुषसूक्तांतील विराट पुरुषाच्या अवयवाप्रमाणें चारहि वर्ण एकदम उद्भवलेले असोत.वेदकालीन शास्त्रज्ञांनीं समाजांतील व्यक्तींस त्यांच्या गुणावरून कर्में वांटून दिली व कर्मानुसार वर्ण बनविले हेंच खरें. वर्ण आपआपलें नियत कर्म करीत होते तोंपर्यंत वर्णव्यवस्था अन्वर्थक राहिली. आणि एकाच वर्णांतील कित्येक व्यक्ती अन्य वर्णाचे व्यवसाय सतत करीत राहिल्यानें कालांतरानें वर्णास जन्मसिद्धपणा आला. जाति संस्थेचा उगम हाच होय व तो स्मृतिकालापूर्वीच झालेला आहे असें मनुस्मृतीवरून म्हणतां येतें. प्रारंभीं एका वर्णाचे चार वर्ण समाजविकास पद्धतीनें झाले. त्याच पद्धतीस अनुसरून एकाच ब्राह्मणवर्णाच्या पोटीं अनेक पोटजाती जन्मास आल्या. चातुर्वर्ण्यांत जसा ब्राह्मणवर्ण पहिला तसा चार वेदांत ऋग्वेद पहिला. ऋग्वेदामागून यजुर्वेद, यजुर्वेदामागून सामवेद व सामवेदामागून अथर्ववेद अशीं वेदांची रचना झाली, व फिरून कर्मविभागपद्धतीवर ब्राह्मणांतच हे चार वेद वांटण्यांत आले. एकाच यजुर्वेदाचें कृष्ण–यजुर्वेद व शुक्लयजुर्वेद असें जुळें बनलें आणि त्या सर्व वेदांस मिळून शाखा व सूत्रे फुटलीं तीं वेगळींच. यामुळें जितके वेद तितक्या उपजाती व वेदांच्या जितक्या शाखा व सूत्रें तितक्या उपजातींच्या पोटजाती अशी ब्राह्मण उपजातींची व पोटजातींची वाढ क्रमशः होत गेली.

यज्ञप्रसंगीं चारहि वेदांची गरज असे व यज्ञांत ऋग्वेदी होता, यजुर्वेदी अध्वर्यु, सामवेदी उद्गाता व अथर्ववेदी ब्रम्हा लागत असल्यानें चतुर्वेदीय ब्राह्मण परस्परांस तुल्यबल समजत, आणि त्यांचा अन्नोदक व्यवहार व शरीरसंबंध घडण्याला प्रत्यवाय येत नसे. परंतु कालान्तरानें यज्ञसंस्था मागें पडली. विवक्षित ब्राह्मण ज्या वेदाचा त्या वेदाचा व क्वचित् शाखेचाहि दुरभिमान त्याच्या अंगीं बाणला आणि तो अन्यवेदीय अगर शाखीय ब्राह्मणास कन्या देण्यांत कमीपणा समजूं लागला. वेद व शाखा यांनीं पाडलेल्या फुटींत कालेंकरून आहारभेद, आचारभेद, भाषाभेद, प्रांतभेद, यांची भर पडून ब्राह्मणांचीं

अनेक उपजातींनीं व पोटजातींनीं शकलें उडविलीं. हिंदुधर्मास उपमाच द्यावयाची झाली तर वटवृक्षाची उपमा चांगली शोभेल. हिंदुधर्मरूपी वटवृक्षास फुटलेल्या चातुर्वर्ण्य या चार शाखा होत. त्या चार शाखांपैकीं ब्राह्मणशाखेस वेदाच्या पारंब्या फुटून त्या जमिनींत शिरल्या व त्या पारंब्यांच्या स्तंभास शाखा सूत्रांच्या नव्या फांद्या व देशभेद, आचारभेद व आहारभेद आदिकरून असंख्य पल्लव येऊन त्याची इतकी विस्तृत व निबिड गुंफा बनली कीं तिची गुंतागुंत शहाण्या ब्राह्मणांसहि उमजेना. अशा या अफाट वटवृक्षाकडे पाहून ब्राह्मणवर्ग स्तंभित होऊन उभा राहिला व आपल्या शाखेचा सदर वृक्षाशीं संबंध दाखवितांना त्याची मति कुंठित झाली.

अखिल हिंदुस्थानभर पसरलेल्या ब्रह्मवृंदांचे देशपरत्वें ठळक दोन भेद पडतात. विंध्य पर्वत व त्यापासून वाहात गेलेली नर्मदा नदी यांनीं ब्राह्मण समाज दुभंगला असून त्या पर्वताच्या अगर नदीच्या उत्तर दिशेस उरलेले ते गौड व दक्षिण दिशेस गेलेले ते द्राविड होत. गौड पांच तसे द्राविडहि पांच आहेत. सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, मैथिल व उत्कल हे पंचगौड आणि द्राविड, आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र व गुर्जर हे पंच द्राविड होत. पंचद्राविडाप्रमाणे पंचगौडांतहि अनेक भेद उद्भवले आहेत. पंचद्राविडांपैकीं महाराष्ट्रीय ब्राह्मणांत सुमारें सत्तावीस पोटजाती असून त्यांची संख्या दशलक्षाच्या आंतबाहेर आहे. पंचगौडांचे तीन पोटभेद महाराष्ट्रांत आहेत,व त्यांची संख्या एक लक्षाच्या किंचित् पुढे सरकेल.महाराष्ट्रीय द्राविड ब्राह्मणांतील पोटजातींत उदक, अन्न, व कन्या,असे चढते पर्याय आहेत. कांहीं पोटजाती जेथें उदक घेतात तेथें अन्न घेत नाहींत, आणि जेथें अन्न घेतात तेथें कन्या देत नाहींत. द्राविड ब्राह्मणा–ब्राह्मणांत ही स्थिति तर द्राविड–गौड यांमधील संबंध बोलावयास नको. पोटजातींचे इतके लहानमोठे कप्पे पडले आहेत कीं त्यांस भाऊबंदकीच्या वांटण्यामुळें महाराष्ट्रांत जमिनीच्या ज्या लहानमोठ्या लंगोट्या फाटल्या आहेत त्यांचाच दाखला शोभेल. महाराष्ट्रांत एकीकडे ऋग्वेदी देशस्थ व शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन हे मोठ्यांत मोठे दोन वर्ग होत तर दुसरीकडे सहवासी व भट्टप्रभू हे छोट्यांत छोटे दोन वर्ग होत.ऋग्वेदी देशस्थ व शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन यांची संख्या प्रत्येकीं अडीच तीन लाख भरेल व भट्टप्रभूंची अवघी तीनशेहि भरणार नाहीं. या दोन खुंटांच्या दरम्यान इतर पोटजाती बसल्या आहेत. प्रत्येक पोटजातीचें संख्याबल जसें कमीअधिक तसे तिचे सामाजिक हाल कमी अधिक. कांहीं जातींत मुली अधिक म्हणून त्यांचीं लग्नें होण्याचा संभव कमी, तर कांहीं जातींत मुलगे अधिक म्हणून त्यांजवर ब्रह्मचर्याची जबरदस्ती जास्त. एक वेळ अशा प्रकारचें पृथक्त्व कांहीं जातींस मोठें सुखावह वाटलें असेल. परंतु अलीकडे देशस्थिति बदलल्यामुळें पोटजाति या कैद्यांच्या कोठड्या बनू पाहात आहेत. उदाहरणार्थ, भट्टप्रभूंचाच पोटभेद घेऊं.हा पोटभेद कऱ्हाड्यांतील असून त्यांजवर क्षुल्लक कारणावरून ग्रामण्य होऊन तो अलग पडल्यामुळें त्याच्या अवघ्या चाळीस घरांत सात मुके मुलगे, दोन मुक्या मुली, कैक विधवा, विधुर व अविवाहित स्त्रीपुरुष आज हयात आहेत. सुशिक्षित व पुढारलेल्या ब्राह्मण समाजानें हें काय भूषण समजावयाचें? एखाद्या जातीभोंवतीं ग्रामण्य झालें तरी त्या शिक्षेलाहि शेवट हा पाहिजेच हें समाजानें ओळखावयास नको काय?

आतां राहातां राहिला प्रश्न शास्त्रार्थाचा. पोटजातींच्या एकीकरणास शास्त्र मुळींच आड येत नाहीं. आणि रूढी निरर्थक ठरल्यास तीहि मोडून टाकण्यास हरकत नाहीं. एकंदर वेद चार असले तरी त्यांपैकीं सामवेदी व अथर्ववेदी ब्राह्मण महाराष्ट्रांत अवशिष्ट नाहींत. जे मूठभर सामवेदी व अथर्ववेदी होते त्यांनीं सोयीकडे लक्ष देऊन ऋग्वेदाचाच स्वीकार केला. सर्व गौड ब्राह्मण यजुर्वेदी असतां महाराष्ट्रांत प्रविष्ट झालेल्या सारस्वतादिकरून गौडांनी ऋग्वेदाचाच आश्रय केला. यावरून वेदाची अडचण दुर्लंघ्य नव्हे हे सहज समजण्यासारखें आहे. हीच गोष्ट आणखी एका रीतीनें दाखवितां येते.कोंकणस्थांतील हिरण्यकेशी शाखेचे ब्राह्मण कृष्णयजुर्वेदी होत. तथापि त्यांचा शरीरसंबंध ऋग्वेदी कोंकणस्थ ब्राह्मणांशीं घडतो हें सुप्रसिद्धच आहे. देशस्थ ऋग्वेदी व आपस्तंबशाखीय कृष्णयजुर्वेदी यांजमधील लग्नव्यवहारहि असाच रूढ आहे. भिन्न वेद व भिन्न शाखा बेटी व्यवहारास विघ्न आणीत नाहींत ही गोष्ट रूढीनेंच कांहीं पोटजातींपुरती सिद्ध झाल्यानंतर मान्य व तुल्यबल अशा पंचद्राविडांतील पोटजातींच्या एकीकरणाविरुद्ध अकोल्याच्या ब्राह्मण परिषदेंत कांहीं शास्त्रीपंडितांनीं व त्यांस हातीं धरणाऱ्या मूठभर गृहस्थांनीं केलेला गिल्ला अज्ञानमूलक ठरत नाहीं काय? मातुलकन्यापरिणय, व मामा–भाचीचीं लग्नें असले प्रकार कांहीं प्रांतांतील देशस्थ ब्राह्मणांत प्रचलित आहेत व शुक्लयजुर्वेदांतील माध्यंदिनशाखीय ब्राह्मणांत मातुलगोत्र पहाण्याचाहि प्रघात आहे. यांपैकीं पहिल्या दोन चाली मोडतां येणार आहेत

व दुसरा प्रघात जुनाट असला तरी त्यासहि मुरड घालणें कठीण नाहीं.

सारांश, सांप्रत देशांत दळणवळणाचीं साधनें वाढलीं आहेत. शिक्षणप्रसाराबरोबर सर्व ब्राह्मणसमाज संस्कृतीच्या समान पातळीवर येत आहे. आचारविचारांत साम्य उत्पन्न होत आहे. दुराग्रह व पूर्वग्रह अस्ता, सजात आहेत. क्षेत्रविकास करणें अनेक अडचणीं-मुळें भाग पडत आहे. सर्व ब्राह्मण मूळचे एकच आहेत ही जाणीव उत्पन्न झाली आहे. आणि संघटनेची आवश्यकता सर्व बाजूंनीं भासत आहे. तर मग एका विशिष्ट दिशेनें ब्राह्मण समाजाच्या पोटांत हजारों वर्षे चालू राहिलेली क्रिया परमावधीस पोंचून व तिचे दुष्परिणाम पूर्णपणें अनुभवास येऊन आतां प्रतिक्रियेस प्रारंभ करणें जरूर आहे हे आपणास समंजस मानणाऱ्या ब्राह्मण समाजानें ओळखावयास पाहिजे. त्याप्रमाणें उशीरा का होईना, ब्राह्मणवर्गास ही गोष्ट पटली व त्यानें अकोल्यास ठरावरूपानें ती पटल्याचें जगास दाखविलें याबद्दल परिषदेचें अभिनंदन करणें जरूर आहे. ब्राह्मणसमाजाच्या हालचालीवर इतर हिंदुधर्मीयांचेहि डोळे असून त्यांसहि ब्राह्मण परिषदेनें संघटनेच्या व एकीकरणाच्या बाबतींत अनुकरणीय उदाहरण घालून दिलें आहे. शेंकडो नव्हे, हजारों वर्षांच्या रूढ आचारास व कल्पनेस धक्का देणाऱ्या परिषदेंतील रोटीबेटी व्यवहाराच्या ठरावांनीं जुन्या शास्त्री-पंडितांस राग यावा हा पूर्वसंस्काराचा परिणाम होय. परिषदेंतील ठराव हे नेहमींच मतप्रदर्शक असतात, बंधनकारक नसतात, याकारणानें त्यांची अम्मलबजावणी आस्ते आस्तेच होणार असल्यामुळें त्यांचे सुपरिणाम जसजसे नजरेस पडतील त्या प्रमाणांत शास्त्रीपंडितांचा विरोधहि शिथिल होत जाईल असा आम्हास भरवसा आहे. परिषद दशविध ब्राह्मणांची आहे असें अगाऊ प्रसिद्ध झालें असतां गौड ब्राम्हणांचे प्रतिनिधी अत्यल्प प्रमाणांत परिषदेस हजर राहिले, ह्यामुळें परिषदेच्या चालकांचा हिरमोड व्हावा हें स्वाभाविक होय, तरी पण पंचगौडांशीं सहाध्ययन, सहानुष्ठान व सहासन करण्याच्या ठरावास स्वयंप्रेरणेनें मान्यता देऊन पंचद्राविडांनीं समानतेचा हात पंचगौडांपुढें केला आहे. त्याचा स्वीकार निदान पुढील परिषदेंत तरी गौडब्राम्हण करतील अशी उमेद बाळगणें गैर होईल काय !

# अफगाणिस्थानचें पुनरुज्जीवन

## मोरिस पेर्नोच्या लेखावरून

**( ले.—अ. ज. करंदीकर. )**

अमीर अमानुल्लाच्या आगमनाच्या वेळीं त्यांच्या कारकीर्दींत अफगाणिस्थानाला प्रथम स्वातंत्र्य मिळालें या गोष्टीचें साहजिकपणेंच स्मरण होतें. अफगाणिस्थान हा वास्तविक पाहतां हिंदुस्थानाचा एक भाग. अशोकापासून अकबरापर्यंतच्या कोणाहि भारतीय सम्राटाला अफगाणिस्थान आपल्या कब्जांत असल्याखेरीज आपल्या साम्राज्याच्या सुरक्षिततेविषयीं विश्वास वाटत नसे. शहाजहानाच्या कारकीर्दींत इराणी लोकांनीं कंदाहारचा किल्ला मोंगलांकडून जिंकून घेतला. या वेळेपासूनच मोंगल बादशाहीला खरी उतरती कळा लागली. त्यानंतर सुमारें शंभर वर्षांनीं नादिरशहाची सुप्रसिद्ध स्वारी होऊन मोंगल बादशाहीचा नायनाट झाला. नादिरशहाच्या मृत्यूनंतर अफगाण लोकांनीं बंड उभारून स्वराज्याची स्थापना केली व तेव्हांपासून इराणी, शीख, इंग्रज व रशियन इतक्या जातींच्या उघड व गुप्त हल्ल्यांना तोंड देऊन अफगाणांनीं आपलें स्वराज्य राखले आहे. अफगाणांचें स्वराज्य जरी दीडशेंहून अधिक वर्षें चालत आलें आहे तरी अफगाणिस्थानाला पूर्ण स्वातंत्र्य मिळाल्याला अजून पुरीं दहा देखील वर्षें झालीं नाहींत.

स्वातंत्र्य मिळाल्यापासून अफगाणिस्थानाच्या परराष्ट्रीय धोरणांत एक महत्त्वाचा फरक घडून आला आहे. इतके दिवस इंग्लंड व रशिया या भांडखोर राष्ट्रांना परस्परांपासून दूर ठेवणें एवढेंच काय तें अफगाणिस्थानाचें कार्य होतें. इंग्लंड व रशिया यांच्या भांडणांत "महावने वनगजयोरिवांतरे। गतागतैर्ध्रुवमिह खिद्यते श्रिया" यासारखीच अफगाणिस्थानाची स्थिति झाली होती. प्रत्येक भांडणांत बलिष्ठांचा पक्ष स्वीकारावा व उभयतांकडून विश्वासघातकीपणाबद्दल निंदा करून घ्यावी अशी त्या देशाची शोचनीय अवस्था झाली होती. स्वातंत्र्य जिंकून घेतल्यापासून अमीर अमानुल्लांनीं हें धरसोडीचें धोरण टाकून, सर्वांशीं सख्य ठेवावयाचें, कोणच्याहि शेजाऱ्याचें फाजील प्रस्थ माजूं द्यावयाचें नाहीं व सर्वतोपरी स्वावलंबी बनावयाचें हें नवें धोरण आंखलें आहे. या नव्या पंथाची दीक्षा देऊन तींत अफगाणिस्थानाची प्रगति करून देण्याचें मार्गोप-

देशकाचें कार्य तुर्कस्थानानें अंगिकारिलें आहे. १९२५ सालीं मोरिस पेर्नोपाशीं, तुर्की परराष्ट्रीय खात्यांतील एका अधिकाऱ्यानें उद्गार काढले होते कीं, आणखी दोन वर्षांत अफगाणिस्थानाच्या सैन्याची किती सुधारणा करून दाखवूं ते तुम्हाला दिसेलच.या कार्यक्रमाप्रमाणें अफगाण सैन्याची सुधारणा आतां पूर्ण झाली असावी आणि देशीपरदेशी शत्रूंचें भय नाहींसें झालें असावें असा अंदाज करण्यास हरकत नाहीं. नाहीं तर अमीरसाहेब आतां परदेशाच्या सफरीला निघालेच नसते. सैन्यांतच नव्हे तर सामाजिक सुधारणेच्या बाबतींत देखील अमीरसाहेब तुर्कस्थानाचें अनुकरण करीत आहेत. १९२४ सालीं अफगाण मुलींना आपला पति निवडण्याचा हक्क देण्यांत आला. या कायद्याचा अफगाण मुल्लांनी तीव्र विरोध केला आणि एका हातांत कुराण व दुसऱ्या हातांत नवीन कायदा घेऊन हे मुल्ला देशभर हिंडले! त्यांच्या आगळीकपणानें कांहीं प्रांतांतून बंडहि झालें. पण सरतेशेवटीं १९२५ च्या मार्च महिन्यांत या बंडाचा बीमोड झाला. यावरून त्या देशांत सामाजिक सुधारणेला मुल्ला लोकांकडून कसा विकराचा विरोध होत आहे हें समजून येतें व त्या मानानें अमीराच्या धाडसी सुधारणावादित्वाचें कौतुकहि वाटतें.

नवीन कल्पनांचा प्रचार करावयाचा म्हणजे मनुष्य स्वाभाविकपणेंच नवीन साधनांचा उपयोग करतो. इंपीरियालिझमची कल्पना फैलावण्यासाठीं इंग्रजांनीं हिंदुस्थानांत नवी दिल्ली राजधानी बांधली आहे. स्वातंत्र्याची व सुधारणेची कल्पना आपल्या देशाला पटविण्यासाठीं अमानुल्लांनीं दार-उल-अमान नांवाची नवी राजधानी बांधण्याचा उपक्रम केला आहे. या भावी राजधानीवर अमीरसाहेबांचें अपत्यनिर्विशेष प्रेम आहे. पेर्नोनें मोठ्या अभिमानानें उल्लेख केला आहे कीं, या नव्या शहराचा नकाशा एका फ्रेंच शिल्पज्ञानें तयार केला आहे व त्याच्या योजनेप्रमाणें हें काम चाललें आहे. शास्त्रीय विषयांचें आपलें हे परावलंबित्व अफगाण लोकांच्या मनाला अतिशय डांचत आहे व तें दूर करण्याविषयीं ते सारखे झटत आहेत. अमीरसाहेबांच्या सध्याच्या सफरीचा या कार्याला बराच उपयोग होईल.

अमीरांच्या आगमनानिमित्त हिंदुस्थानांतील वृत्तपत्रांतून अफगाणिस्थानाविषयीं माहिती देणारे बरेच लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्या सर्वांत अफगाणिस्थानांत धार्मिक स्वातंत्र्य असल्याचा उल्लेख आहे. या बाबतींत पेर्नोचें मत अगदीं उलट आहे. त्याच्या जोसेफ नांवाच्या ख्रिस्ती चाकराला अफगाणिस्थानांत मुळीं प्रवेशच मिळाला नाहीं! काबूलच्या 'अमान्-इ-अफगाण' या सरकारी पत्रानें 'कॉन्शन्सचें' स्वातंत्र्य आमच्या राज्यांत नाहीं असें उघडपणें प्रसिद्ध केलें आहे. हिंदू, ख्रिस्ती व ज्यू यांना जिजिया कर देणें व आपल्या धर्माचा प्रसार न करणें या अटीवरच अफगाणिस्थानांत राहूं देतात. मुसलमानी धर्माचे अनेक पंथ आहेत. त्यांतल्या शिया लोकांना तेवढ्या सर्व सवलती आहेत. पण अहमदिया पंथाच्या कांहीं लोकांना काबुलांत दगडांनीं ठेचून मारण्यांत आलें होतें हें सर्व प्रसिद्ध आहे. इतर धर्मांच्या प्रचारकांना किंवा मिशनऱ्यांना येथें प्रवेशहि मिळत नाहीं हे सांगावयाला नकोच.

मुल्लांच्या प्रभावाचें एक विचित्र उदाहरण सांगावयाचें म्हणजे बँकांचें सांगतां येईल. मुसलमानी धर्मानें व्याज घेण्याला मनाई केली आहे. यामुळें काबुलांत अजूनपर्यंत एकहि बँक उघडली नाहीं! अफगाण व्यापाऱ्यांना कर्ज काढावयाचें झाल्यास हिंदुस्थानाकडे किंवा तुर्कस्थानाकडे तोंड वेंगाडावें लागतें. याच कारणामुळें पेशावर, समर्कंद, बुखारा वगैरे सरहद्दीवरील शहरांना व्यापारी दृष्टीनें फार महत्त्व आलें आहे.

अफगाणिस्थानचे परराष्ट्र संबंध अजून अनिश्चित आहेत. इंग्रजी कारस्थानांचा संशय काबूलसरकारला सदा येत असतो. अफगाणिस्थानांतलें १९२४ सालचें बंड इंग्रजांच्या कारस्थानाशिवाय उद्भवलें नाहीं असें तेथें उघडपणें प्रतिपादिलें जातें. पूर्वी अफगाणसरकारला हिंदुस्थानसरकार वार्षिक तीस लक्ष रुपये खंडणी देत असे. ती रक्कम अजूनहि हिंदुस्थानच्या बजेटांत खर्ची पडत असावी. आणि तिचा विनियोग मात्र गुप्तपणें अफगाणिस्थानांत कारस्थानें खेळविण्यांत होत असावा असा संशय पेर्नोनें प्रदर्शित केला आहे! तें कसेंहि असो. पण सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे इंग्रज लोक एकदां हार खाऊन कायमचे स्वस्थ बसतील अशी कल्पनाही काबुली लोकांना करवत नाहीं हें खरें. नव्या अमिरांना इंग्रजांनीं एकदां दोन विमानें फुकट देऊं केलीं होतीं. पण फुकट मिळालेला हा सौदा अखेरीस फार महाग पडेल असें समजून अमिरांनीं त्या विमानांच्या मोबदला दहा हजार पौंडांची रक्कम पोंचती केली. धूर्त रशियन लोकांनीं सहा उत्कृष्ट विमानें सर्व साधनसामुग्रीसह नांवाची किंमत घेऊन विकलीं व त्यानंतर लवकरच २५ अफगाण विद्यार्थी विमानविद्या शिकण्यासाठीं रशियांत गेले. इंग्लंडप्रमाणेंच रशियानेंहि आपल्या कारस्थानांनीं अफगाणिस्थान अगदीं पोखरून टाकला आहे. माहितीच्या ताजेपणाच्या व विश्वसनीयपणाच्या दृष्टीनें अलीकडील रशियन इंग्रजांना मागें टाकतात असा पेर्नोचा अभिप्राय आहे. काबू-

लच्या बाजारांत एका पौंडाला सोन्यामध्यें २२ शिलिंगांवर किंमत असलेलें रशियन नाणें मिळत असतें, यावरून काबुलांत रशियन नाणें सढळ हातानें पेरलें असावें, हें कोणालाहि कळून येईल. या दोनहि कारस्थानी शेजाऱ्यांपासून स्वतःचें संरक्षण कसें करावें हा महत्त्वाचा प्रश्न आज काबूलसरकारापुढें येऊन पडला आहे. परदेशचें शास्त्रीय ज्ञान व सुधारलेली समाजरचना यांचा अफगाणिस्थानांत प्रवेश झाला व त्याला परदेशांत नवे मित्र मिळाले तरच हा प्रश्न सुटेल. अफगाणिस्थानाला युरोपांतील राष्ट्रांचा कोरड्या सहानुभूतीचा कांहींच उपयोग नाहीं. इंग्लंड व रशिया यापैकीं एकावरहि त्यास पूर्ण विश्वास टाकतां येत नाहीं. अशा स्थितींत अफगाणिस्थानाला नांव घेण्याजोगा मित्र तुर्कस्थानच उरतो. युरोपियन राष्ट्रांपासून आत्मसंरक्षण करून घेण्यासाठीं इस्लामी राष्ट्रसंघ उभा करण्याचें केमालपाशाचें सध्याचें धोरण पाहिलें असतां हेंच अनुमान दृढ होतें. या इस्लामी राष्ट्रसंघाच्या बाब-तींत हिंदुस्थानांतील मुसलमान कोणती वृत्ति स्वीकरतील, याची काळजी स्वतंत्र मुसलमानांना लागली असावी असें अमीरसाहेबांच्या कराचीच्या भाषणावरून वाटतें. अमानुल्लांच्या इषाऱ्यावरून सरहद्दीवरच्या उपद्व्यापी मुल्लांना हिंदुस्थानांत थारा मिळेनासा झाला तरी तेवढ्यानें आमच्या देशावर अमीरसाहेबांनीं मोठेंच उपकार केले असें सर्व लोकांस वाटेल.

# हुतात्म्याचें पुण्यस्मरण

(ले. श्रीपाद शंकर नवरे)

पवित्र यमुनेच्या तीरावर दिल्ली राजधानींत स्वामी श्रद्धानंद यांचें बलिदान झाल्याला एक वर्ष होऊन गेलें. कांहीं थोर पुरुषांच्या कार्याला त्यांच्या हयातींतच भरतीच्या पाठोपाठ ओहोटी लागलेली आढळते, कांहींचें कार्य त्यांच्या मृत्यूपर्यंत टिकतें तर कांहीं महात्म्यांचें कार्य त्यांच्या हयातींत अंकुररूपानें राहून मरणोत्तर वटवृक्षाप्रमाणे विस्तार पावतें. स्वामी श्रद्धानंदांचा समावेश या शेवटल्या कोटींत होतो. आपल्या ७० वर्षांच्या दीर्घकालीन आयुष्यांत लोकसेवेचें खडतर व्रत आंगिकारून त्यांनीं मोठ्यांत मोठी देशसेवा आणि धर्मसेवाहि केली. पण त्याहून शतपटीनें अधिक कार्य त्यांच्या मृत्यूनें केलें आहे! थोर विभूतींचें जगणें स्फूर्तिदायक, तसें मरणेंहि स्फूर्तिदायक!

स्वामीजी ७० वर्षें जगले पण रौलेट ॲक्टाच्या चळवळीपर्यंत किंवा अमृतसर काँग्रेसपर्यंत म्हणजे त्यांच्या वयाच्या ६२ व्या वर्षापर्यंत त्यांचें नांव पंजाबच्या बाहेर फारच थोड्यांना माहीत होतें. तथापि तेवढ्या अवधींत स्वतः आंखून घेतलेल्या मर्यादित क्षेत्रांत त्यांनीं भरीव कार्य करून ठेवलें आहे. आयुष्याचे शेवटीं एवढ्या महत्त्वास चढलेला मनुष्य पूर्वी कोणत्या पायऱ्यावरून आणि परिवर्तनांतून गेला होता हें समजणें आश्चर्यजनक मनोरंजक आणि तितकेंच बोधप्रद आहे. बालपण हूडपणांत आणि उडाणटप्पूपणांत, तारुण्य दुर्जनांच्या संगतीनें चंगीभंगी करण्यांत आणि पात्तिशीच्या पुढील आयुष्य लोकैषणा, वित्तैषणा' पुत्रैषणा यांना अजीबात बाजूस सारून सर्वस्वार्पण समाजसेवा करण्यांत! पूर्ववयांत पूर्ण नास्तिक तर उत्तरवयात पराकाष्ठेची आस्तिक्यबुद्धि. एक मनःस्थिति अशी येऊन गेली कीं, चित्ताची अशांतता शमविण्याकरितां त्यांनीं ख्रिस्ती धर्माकडेहि धाव घेतली होती. पण हिंदु समाजाच्या सुदैवानें कांहीं कारणानें ते त्या वेळीं मागें परतले.

स्वामींच्या आयुष्याचा विकास हिंदुधर्मांतर्गत आश्रमव्यवस्थेच्या वळणानें झाला. अभ्यासक्रम चालू असतां २१ व्या वर्षी त्यांनीं गृहस्थाश्रम पत्करला. त्यानंतर अवघ्या तेरा वर्षांनीं पत्नी निवर्तली आणि भरज्वानींत असतांनाहि त्यांनीं वानप्रस्थाश्रम स्वीकारला व ५९ व्या वर्षापर्यंत तो कडकडीत पाळला. पुढील ११ वर्षें चतुर्थाश्रमांत गेलीं. या दृष्टीनें स्वामी आदर्श हिंदु दिसतात. स्मृतिग्रंथांतून वर्णन केलेलें वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांचें हें मूर्तिमंत उदाहरण कार्यकर्त्यांस मार्गदर्शक झाल्यावांचून राहाणार नाहीं. 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः' किंवा 'आयुर्यज्ञेन कल्पताम्' या अत्युच्च वैदिक ध्येयाला अनुसरून स्वामींनीं आपला जीवितक्रम शेवटास नेला. संन्यास घेतांच त्यांना जगाचा कंटाळा आला नाहीं किंवा कार्याचा विसर पडला नाहीं. कर्मयोगी मनुष्य स्वतःच्या मोक्षसुखांत संतुष्ट न राहतां समाजाच्या मोक्षाकरितां वारंवार जन्म घेण्याची इच्छा बाळगतो. हत्येपूर्वी ३।४ दिवस एका स्नेह्याजवळ स्वामी म्हणाले, "पंडितजी, इस कालियुगमें मोक्षकी इच्छा नहीं रखता! मैं तो केवल इतना चाहता हुं कि चोला बदल कर दुसरा शरीर धारण करूँ! अब इस शरीरसे सेवा नहीं हो सकेगी! इच्छा है कि

।फिर इसी भारतवर्षमें जन्म लेकर इस जीवनके कार्य पूरा करूँ! ”

## स्वामींचें कार्यक्षेत्र

स्वामींचें कार्यक्षेत्र अत्यंत विस्तीर्ण होतें. राजकारणापेक्षां समाजकारणांत व तत्संबद्ध धर्मकारणांतच त्यांनीं आपलें बहुतेक आयुष्य वेंचलें. स्वामी दयानंदांच्या समागमानें त्यांची संशयित धर्मभावना वैदिक धर्मामध्यें स्थिरता पावली. आर्यसंस्कृतीविषयीं त्यांचा अभिमान प्रज्वलित झाला. आणि वैदिक काळीं दिसणारें हिंदु समाजाचें शुद्ध आणि तेजस्वी स्वरूप पुनः प्रस्थापित करावें अशी महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनानें धरली. वेदांमध्यें उत्तम समाजव्यवस्था आणि उत्कृष्ट धर्मतत्त्वें आहेत व नवीन कोणतीहि सुधारणा करणें झाल्यास तिला या वैदिक कल्पनांचें अधिष्ठान असलें पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे. सरकारी शिक्षणपद्धतींतील दोष टाकून भावी पिढीला कार्यकर्ती, धर्माभिमानी आणि स्वराज्योन्मुख करण्याकरितां पंजाबांत दयानंद अँग्लो-वेदिक कॉलेज दयानंदांच्या अनुयायांनीं काढलें. पण हळूहळू तें सरकारी चाकोरीनेंच चाललेलें दृष्टीस पडतांच प्रयत्नांची शिकस्त करून, स्वतःची सर्व मालमत्ता अर्पण करून कांगडीच्या गुरुकुलाची त्यांनीं स्थापना केली.

वेदांना धनगराच्या लावण्या समजून हिंदूंच्या प्राचीन ज्ञानाची कुचेष्टा करणाऱ्या इकडील सुधारकांतला आणि दयानंद, श्रद्धानंदप्रभृति आर्यसमाजी सुधारकांतला महत्त्वाचा फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. पाश्चात्य जगाशीं संबंध आल्यावर या देशांत धार्मिक व सामाजिक सुधारणेचे वैयक्तिक व सामुदायिक पुष्कळ प्रयत्न झाले, पण आर्यसमाजाइतकें यश कोणालाहि न येण्याचें कारण त्यांच्या मानसिक ठेवणींतील हा फरक होय.

धार्मिक तटस्थतेच्या नांवाखालीं इंग्रज सरकारनें ख्रिस्ती मिशनऱ्यांस हिंदुस्थानाच्या कुरणांत स्वैर रीतीनें चरण्यास कशी मुभा दिली व तिचा त्यांनीं कसा फायदा घेतला हें १९ व्या शतकांतील समाजसुधारणेच्या नांवाखालीं चाललेल्या त्यांच्या कुटिल हालचाली पाहिल्या म्हणजे चांगलें कळून येतें. या प्रयत्नांस व मुसलमान मौलवींच्या गुप्त कारवाईस आळा घालून हिंदु समाजाचें रक्षण करणें अवश्य होतें. तें आर्यसमाजानें उत्कृष्ट रीतीनें चालवलें आहे. सहिष्णु समाजाला त्यानें जयिष्णु बनविलें. या कामीं त्यांना पुष्कळ झीज सोसावी लागली. खुद्द दयानंदापासून आपल्यांतील अस्सल मोहरे धर्मवेदीवर बळी द्यावे लागले. गेल्या वर्षभर तर या यज्ञकुंडाला विशेष प्रज्वलित स्वरूप प्राप्त झालें आहे. एवढ्या अवधींत १०।१२ आर्यसमाजी कार्यकर्ते मुसलमानांच्या हत्याकांडांत बळी पडले. पण यामुळें गलितधैर्य न होतां आर्यसमाजाचें बल व उत्साह प्रतिदिन कसा वाढत चालला आहे हें नुकत्याच दिल्लीस झालेल्या आर्यसमाजाच्या कांग्रेसवरून कळून येतें.

‘इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि’ हीं दोनहि हत्यारें, त्यांना आलेला गंज काढून टाकून, आर्यसमाजानें पाणीदार केलीं आहेत. वैदिक वाङ्मय व प्राचीन शास्त्रें यांच्या अभ्यासाला आर्यसमाजानें मोठें चालन दिलें आहे. त्यांच्या गुरुकुलांत या अभ्यासाला प्राधान्य आहे. हें प्राचीन ज्ञानभांडार परिस्थित्यनुरूप त्यांनीं सर्व वर्णांना व स्त्रीपुरुषांना खुलें करून दिलें आहे. या मानसिक शिक्षणाबरोबर विद्यार्थ्यांच्या शारीरिक बलवर्धनाकडे विशेष लक्ष दिलें जातें. दुष्टांशीं गांठ पडली असतां अहिंसेचें व प्रेमाचें फाजील स्तोम माजविणें वैदिक शिकवणीच्या विरुद्ध आहे असें आर्यसमाजी समजतात. गुजराथेंत आर्यसमाजी लोकांनीं चालविलेल्या शाळा आहेत. त्यामध्यें विद्यार्थ्यांच्या समोर स्वामी दयानंद व श्रीशिवाजीमहाराज हे दोन आदर्श समोरासमोर ठेवलेले प्रस्तुत लेखकानें पाहिले आहेत. श्रद्धानंदांच्या देखरेखीखालीं चालू झालेल्या ‘अर्जुन’ पत्रावर ‘अर्जुनस्य प्रतिज्ञे द्वे न दैन्यं न पलायनम् ’ हें ध्येयवाक्य लिहिलेलें आढळतें.

## आर्यसमाजाची कामगिरी

हिंदूंच्या विशिष्ट समाजरचनेचा व स्पृश्यास्पृश्यतेच्या कल्पनांचा फायदा घेऊन परधर्मीयांनीं आजपर्यंत त्याच्यावर अनेक प्राणघातक आघात केले व त्यांचें बल घटवलें. कालांतरानें शिरलेलें हें वैगुण्य ओळखून आर्यसमाजानें हिंदु समाजाला तात्कालिक निराळें स्वरूप दिलें. आर्यसमाज व त्यांचे पुढारी परधर्मीयांच्या डोळ्यांत सलण्याचें मुख्य कारण हेंच.मोपल्यांनीं बाटवलेल्या हिंदूंची शुद्धि श्रद्धानंदांनीं करतांच जुन्या लोकांचें लक्ष तिकडे वेधलें. या शुद्धीकार्याच्या प्रस्थापनेमुळें मौलाना-मौलवींचें व पाद्री भटांचें कंबरडेंच मोडल्यासारखें झालें आहे.आर्यसमाजापूर्वी किंवा नंतर समाजसुधारणेकरितां बद्धपरिकर होऊन बाहेर पडलेले अनेक समाज अस्तित्वांत आले. पण त्यांना उचलून धरण्यास श्रद्धानंदासारखा हिंमतवान आणि त्यागी मनुष्य न मिळाल्यामुळें त्यांचें अस्तित्व कागदापत्रांकडे आज क्वचितच दिसतें. आपसांतील फुटीचें गंडांतर दयानंदांच्या पश्चात् ८-१० वर्षांनीं आर्यसमाजावरहि आलें होतें. पण स्वामी श्रद्धानंद,

लाला हंसराज इ. पुढाऱ्यांच्या कार्यैकनिष्ठ व स्वार्थ-त्यागी मनोवृत्तीमुळेंच तें टळलें.

श्रद्धानंदांच्या नेतृत्वाखालीं आर्यसमाजानें उत्तर-हिंदुस्थानांत सामाजिक महत्कार्य केलें आहे.हजारों अस्पृश्यांची अस्पृश्यता पार धुवून जाऊन त्यांना माणु-सकीचे हक्क मिळाले आहेत.ठिकठिकाणीं विखुरलेल्या गुरुकुलांतून वैदिक धर्माचा अभ्यास होऊं लागला आहे. जालंधरच्या कन्या महाविद्यालयासारख्या सर्वस्वी पौरस्त्य वळणावर चाललेल्या स्त्रियांच्या शाळांनीं स्त्रीशिक्षणाचें पाऊल बरेंच पुढें नेलें आहे. कुंभमेळ्यासारख्या यात्राप्रसंगीं किंवा दुष्काळाच्या कहरांत लोकांस मदत करून अनाथांचें परित्राण केलें जात आहे. विधवागृहें अनाथालयें यांतून असहाय बायकामुलांचें अधोगतीपासून रक्षण होत आहे.दवाखाने व संस्था तर कित्येक आहेत. बाहेर गेलेल्या चार लाख हिंदूंना त्यांनीं पुनः स्वधर्माचा लाभ करून दिलेला आहे. हिंदुस्थानांतच नव्हे तर आफ्रिका, मेसापोटोमिया, जावा, सुमात्रा, फिलि-पाइन्स इ० परस्थळीं आपले उपदेशक पाठवून आर्यधर्माचा प्रसार चालवला आहे. आधुनिक कालांत आवश्यक असलेला 'संघटितपणा' हा गुण सर्व कार्यांत दिसून येतो हा आर्यसमाजाचा विशेष होय.

समाजकारणांत जहालपणाच्या किंवा क्रांतीच्या बाता मारणारा सुधारक वीर राजकारणांत गोगल-गाईइतका बुळबुळीत असतो हा आपल्या इकडला अनुभव आहे. पण श्रद्धानंदांनीं व त्यांच्या आर्य-समाजानें समाजकारणांतील आपली आघाडी राजकारणांतहि कायम ठेवली होती व अद्यापि ठेवली आहे. याबद्दल मोठें गमक म्हणजे चिरोल-साहेबांनीं आपल्या 'हिंदुस्थानांतील अस्वस्थता' या पुस्तकांत आर्यसमाजाकरितां स्वतंत्र प्रकरण खर्ची घालून, दिलेलें लांबलचक सर्टिफिकेट होय! स्वामींचें बहुतेक आयुष्य समाजकारणांत गेलेलें असलें तरी राजकीय क्षेत्रांतील त्यांची काम-गिरी कमी महत्त्वाची नाहीं. ते विचारानें लोकमान्य संप्रदायांतील होते. डायरच्या संगिनीनें गर्भगळित झालेल्या लोकांस धीर देऊन आणि सरकारच्या डुरकावणीस न जुमानतां अमृतसर कॉंग्रेस घडवून आणण्याचें श्रेय स्वामींनाच आहे. गुरुकुलाला एक लाख रुपयांची सरकारी ग्रँट मिळत असतांहि स्वतःचें स्वातंत्र्य कायम ठेवण्या-करितां त्यांनीं तिचा धिक्कार केला!

स्वामींची कामगिरी अशी बहुविध आहे.हिंदु समा-जावर त्यांनीं उपकाराचें एवढें मोठें ओझें करून ठेवलें आहे कीं त्यांची आठवण कधींच विसरणें शक्य नाहीं. हिंदुधर्माच्या रक्षणाकरितां दधीचि ऋषीप्रमाणें स्वतःच्या अस्थी पुढच्या पिढीच्या स्वाधीन केल्या आहेत. त्या अस्थींत फार मोठें सामर्थ्य आहे. त्यांत हिंदु समाजाचा भविष्यकाळ लिहिलेला आहे. त्यांत हिंदूंच्या उन्नतीचा जीवनमंत्र कोरलेला आहे. तिकडे तरुण पिढीचें लक्ष जाईल काय?

# केसरीच्या वाचकाना निवेदन

केसरी-मराठा संस्थेला मी १८९६ साली येऊन मिळालो. या संस्थेकडील माझ्या नोकरीला येत्या मार्च महिन्याच्या १५ व्या तारखेस बत्तीस वर्षें पुरीं होतात. या मोठ्या कालावधीत मजकडे मराठा-पत्राचे संपादकत्व १९ वर्षें होते. केसरीचे संपादकत्व मजकडे १७ वर्षे होते. सुमारे नऊ वर्षे मी दोन्ही पत्रांचा एकटाच संपादक होतो.या नोकरीच्या काळात आजारीपणामुळे केव्हा काम न करता आले तर चार दोन आठवडे सवलत मिळे व माझे काम इतर मंडळी करीत. उलट स्वतः संपादक नव्हतो अशा वेळी मी या दोनहि पत्रातून मधून मधून लेख लिहीत असे. तात्पर्य, या दोनहि पत्रांशी माझा संबंध आजवर उपसंपादक किंवा मुख्य संपादक किंवा ट्रस्टी म्हणून बत्तीस वर्षे अखंड राहिला. या बत्तीस वर्षात मी मोठी रजा अशी कधीच घेतली नाही. म्हणून आता ता. १ जानेवारी १९२८ पासून एक वर्षाची रजा घेण्याचे मी ठरविले आहे. वयाला छपन्नावे वर्ष असल्यामुळे विश्रांतीची जरूरी थोडथोडी भासू लागली आहे. हल्ली मधून मधून आजारी पडतो. यामुळे स्नेही डॉक्टर मंडळीचाहि असा आग्रह आहे कीं, चारदोन आठवडे अशी किरकोळ रजा न घेता एकवार सबंध एक वर्षभर रजा घ्यावी व मानवेल तेथें राहून किंवा हिंडून-फिरून पूर्ण विश्रांती अनुभवावी.

वास्तविक अशी रजा गतवर्षींच घेण्याचा माझा विचार होता. परंतु असेंब्लीची निवडणूक वगैरे अनेक कारणानी ती घेता आली नाही. शिवाय लो. टिळकांचे चरित्र यंदा पुरे करून प्रसिद्ध करण्याचे अ-भिवचन वाचकाना देऊन बसलो होतो. म्हणून ते पार पाडण्याचे काम भरीला भर म्हणून गेल्या सातआठ महिन्यात अविश्रांत करावे लागले. सुदैवाने तो सुमारे बाराशे पानांचा ग्रंथ आता छापून होत आला असून लवकरच प्रसिद्ध होईल. तात्पर्य, वरील सर्व कारणाकरिता केसरीच्या वाचकांकडून एक वर्षाची

रजा मी हक्काने मागून घेत आहे व ते ती आनंदाने देतील अशी मला आशा आहे.

या रजेच्या अवधीत केसरीची कायदेशीर व इतर जबाबदारी डोक्यावर राहिल्यास मनाला खरी विश्रांती मिळणार नाही. म्हणून आमच्या सहकारी मित्रांपैकी श्री. गजानन विश्वनाथ केतकर बी. ए. एलएल बी. ( लो. टिळकांचे नातु ) यांचे नांव केसरीचे जबाबदार संपादक म्हणून दाखल करण्याचे ठरविले आहे. तरी मी पुनः कामावर येईपर्यंत केसरीसंबंधीं म्हणजे संपादकीय कार्यासबंधीं सर्व प्रकारचा पत्रव्यवहार किंवा इतर व्यवहार लोकांनीं श्री. केतकर यांच्याशीच करावा.

मी संपादक म्हणून काम करीत होतो तेव्हां ते काम अर्थात माझ्या सहकारी मित्रमंडळीच्या आधारावरच करीत होतो. आणि मी आता रजा घेत आहे ती झाली तरी त्यांचा आधार व विश्वास वाटत असल्यामुळेच घेत आहे.

माझ्या रजेच्या मुदतीत देखील केसरी-मराठ्याकडे ट्रस्टी या नात्याने अर्थातच माझे लक्ष राहील. शिवाय १९२९ च्या जानेवारी पासून, किंवा शक्य तर १९२८ च्या आगष्ट पासून, केसरी आठवड्यातून दोन वेळ काढण्यास प्रारंभ करावा अशीहि योजना मी मनात आणीत आहे. आणि योजना कायम ठरल्यास ती अमलांत आणण्याच्यावेळी मी पुन्हा केसरी आपल्या हातीं पूर्वीप्रमाणे घेणारच आहे.

एक वर्षाइतक्या लांब मुदतीची खरी रजा घ्यावयाची तर संपादकाचे नांव बदलणे व ती गोष्ट केसरीच्या वाचकाना कळविणे योग्य व अवश्य असे वाटले म्हणूनच ती प्रसिद्धपणे कळविली आहे. शेवटी 'स्वीकुर्वंतु महाशयाः प्रणमनं यावत् पुनर्दर्शनं' ही विनंति करून हे निवेदन संपवितो.

पुणें, ता. २७।१२।२७ } न. चिं. केळकर.

# संस्थानिकांनीं काय साधलें ?

रॉयल कमिशन लवकरच नेमलें जाणार असें समजल्यापासूनच हिंदुस्थानांतील निरनिराळ्या घटकांमध्ये स्वाभाविकपणें त्या दिशेनें अनेक प्रकारच्या हालचाली सुरू झाल्या. कॉंग्रेसनें राज्यघटनेची योजना करण्याचें इतक्या दिवस दिरंगाईवर पडलेलें काम तात्र्डतोब हातीं घेतलें.नरम–गरम पुढाऱ्यांच्या विलायतयात्रा सुरू झाल्या. निरनिराळ्या ज्ञातींमध्यें भावी राज्यघटनेंत आपल्याला कोणतें स्थान राहील याबद्दल वाटाघाट सुरू झाली व ब्रिटिश प्रजेप्रमाणें संस्थानी प्रजेनेंहि आपले हातपाय हलविण्यास सुरुवात केली. या सर्व लोकांच्या खटपटीबरोबरच 'धड ना राजा धड ना प्रजा' अशा स्थितींत असलेल्या संस्थानिकांनीहि आपल्या पद्धतीप्रमाणें कांहीं उघड कांहीं गुप्त अशी हालचाल सुरू केली.विलायतेस दूत पाठविले. तेथें बड्या लोकांच्या भेटीगांठी घेतल्या. येथील व्हाइसरॉयांसारख्या बड्या अधिकाऱ्यांशीं खलबतें केलीं. त्यांच्या पाहुणचाराचे प्रसंग नित्यापेक्षां अधिक होऊं लागले.पण या सर्व खटपटीचें धोरण काय याचा मात्र लोकांना फारसा सुगावा लागला नाहीं.नाहीं म्हणावयास विलायतेस जाऊन आलेल्या संस्थानिकांच्या हस्तकांनीं आपल्या लेखांतून येवढेंच जाहीर केलें कीं, "ब्रिटिश हिंदुस्थानाला स्वराज्य मिळण्याच्या विरुद्ध संस्थानिक नाहींत " या मोघम व वरवर चांगल्या दिसणाऱ्या विधानांत किती तरी खोल अर्थ भरले होते! कारण यांत ब्रिटिश प्रजेचा स्वराज्याचा प्रश्न वेगळा आणि संस्थानें व ब्रिटिश सरकार यांचा संबंध वेगळा–त्याचा याचा कांहीं संबंध नाहीं हा एक ध्वनि–व दुसरा या स्वराज्याच्या हक्कांच्या विचारांत संस्थानी प्रजेचा अंतर्भाव करण्याचें कारण नाहीं–त्यांचे धनी सर्वस्वी संस्थानिक होत–असा दुसरा ध्वनि त्यांतून निघत होता. व ते दोनहि ध्वनि संस्थानिकांच्या आत्मघातक व राष्ट्रघातक गुप्त धोरणाचा संशय उत्पन्न करीत होते.

ना. व्हाइसरॉयांनीं संस्थानिकांच्या प्रश्नासंबंधीं एक कमिटी नेमण्याचें कांहीं दिवसापूर्वी राजकोटला जाहीर केलें. आणि नुकतींच त्या कमिटीच्या सभासदांचीं नांवें व कार्यक्रम हीं जाहीर केलीं. तीं पाहिलीं असतां हे दोन्ही संशय खरे ठरूं पाहात आहेत. संस्थानिकांच्या खटपटीनें जो हा अंकूर बाहेर आला त्यावरून त्यांनीं कोणतें बीज पेरलें असावें व कसलें खतपाणी घातलें असावें याचाहि अंदाज होतो. 'तज्ज्ञांची कमिटी' ही शब्दयोजना व तिचा प्रत्यक्ष व्यवहारांतील अर्थ हिंदी लोकांच्या चांगल्या परिचयाचा आहे. त्यायोगें सरकारनें हिंदी हिताच्या विरुद्ध व ब्रिटिशांच्या फायद्यासाठीं ठरविलेल्या एखाद्या योजनेला शास्त्रीय आधार देण्याची व्यवस्था होऊन शिवाय हिंदुस्थानच्या खर्चानें या विलायती तज्ज्ञांना यथास्थित मलीदा चारण्याचीहि परभारें व्यवस्था होत असते ! ब्रिटिश सरकारच्या कुटिल राजनीतींतील 'तज्ज्ञांची कमिटी' ही एक बेमालूम मानभावीपणाची ठरीव क्लृप्ती आहे.

या संस्थानिकांच्या कमिटीचे अध्यक्ष सर हायकोर्ट बटलर हे असून मि. सिडने पील व प्रो. होल्स्वर्थ हे सभासद आहेत. सिडने पील हे कांहीं वर्षे पार्लमेंटचे सभासद होते याशिवाय त्यांची विशेष प्रसिद्धी कांहींच नाहीं. ते कशाचे तज्ज्ञ आहेत कोणास ठाऊक ! होल्स्वर्थ हे राज्यघटनात्मक कायद्यांचे पंडित आहेत. पण त्यांना हिंदी संस्थानांचा परिचय त्यांनीं वाचलेल्या पुस्तकांतील माहितीपेक्षां अधिक नाहीं. अध्यक्ष बटलर हे मात्र सिव्हिल सर्व्हिसमधील असून त्यांनींहि सरकारच्या परराष्ट्रीय खात्याचे मंत्री म्हणून काम केलेलें आहे.

आज पाहावें तों संस्थानांचे संबंध हे याच ‘ परराष्ट्रीय ’ खात्यांत मोडतात ! जणुं काय संस्थानें हीं हिंदुस्थानच्या बाहेर कोठें तरी आहेत ! या वर्गीकरणाविरुद्ध नुकत्याच मुंबईस झालेल्या अ. भा. संस्थान परिषदेनें निषेधहि केला आहे. संस्थानिकांचा ‘ दोस्त ’ म्हणतां म्हणतां ‘ दुय्यम दर्जाचे दोस्त ’ ‘ संरक्षित दोस्त ’ ‘ मांडलिक ’ असें म्हणत म्हणत अखेर संस्थानांच्या वाटेल त्या गोष्टींत वाटेल तेव्हां प्रजेच्या हितासाठीं ( ! ) हात घालण्याचा स्वयंभू अधिकार बोलून व बजावून या दोस्तांना ‘जमीनदोस्त’ कसें करण्यांत आलें ही सर्व कारवाई परराष्ट्र खात्याचे मंत्री या नात्यानें बटलरसाहेबांच्या पूर्ण परिचयाची झालेली असेल. यामुळें त्यांचा निर्णय कशा प्रकारचा होईल हें न सांगतांहि कळण्यासारखें आहे. आणि बटलरसाहेब जो निर्णय देणार त्याचा शास्त्रीय साधार पाठपुरावा होल्स्वर्थ करणार व सिडने पील हे हातास हात लावून पूर्तता करणार! ही या कमिटीची फलश्रुति आजच सांगतां येण्यासारखी आहे. कमिटींत संस्थानिक किंवा त्यांचा प्रतिनिधी असा कोणी नाहीं. तरीहि पत्याळाच्या अधिपतींनीं कमिटीचें स्वागत केलें आहे ! असल्या कमिटीविरुद्ध ब्रहि न काढतां निमूटपणें तो अपमान गिळण्यासारखी संस्थानिकांची शोचनीय अवस्था पाहून त्यांची कींव येते. पण याला तेच जबाबदार आहेत. आपल्या अनियंत्रित अरेरावी कारभारानें संस्थानी प्रजेला अनेक नियंत्रणांनीं जखडून टाकणाऱ्या संस्थानिकांना ब्रिटिश सरकाकारनेंहि तसेंच बांधून टाकावें यांत नवल नाहीं. ‘यथा प्रजा तथा राजा’ प्रजेच्या नियंत्रणाच्या शृंखला लोखंडी तर यांच्या सोन्याच्या व मखमलीनें मढविलेल्या, पण जखडून ठेवण्याच्या बाबतींत सारख्याच जाचक !

संस्थानिकांचे ब्रिटिश सरकारशीं तहनाम्यान्वयें संबंध ठरलेले आहेत असें संस्थानिक कधीं कधीं म्हणतात.पण प्रथम तहनाम्यांचे कालपरिस्थित्यनुसार अर्थ केले.पाहिजेत म्हणून व पुढें तहनाम्यांतूनहि जो अर्थ निघणें शक्य नाहीं तो साधण्यासाठीं या तहनाम्याहून अगदीं स्वतंत्र असे सार्वभौम सत्तेचे स्वयंभू अधिकार सांगून व बजावून तहनाम्याची किंमत ब्रि.सरकारनें कागदाच्या चिठोऱ्याइतकी करून टाकली आहे. स्वयंभू हक्काच्या मर्यादा कोठें स्पष्ट लिहिलेल्या नसल्यामुळें सरकारच्या वेळोवेळीं होणाऱ्या कृतीनेंच ती मर्यादा ठरणार. म्हणून आज संस्थानें व ब्रि. सरकार यांच्यामधील संबंध हे अलिखित व अनिश्चितच आहेत. वस्तुतः अशा अनिश्चित स्थितींतच ते ठेवण्यांत संस्थानिकांचें हित होतें. कारण अशा स्थितींत संस्थानी कारभारांत हात घालावयाचा तो अगदीं अपरिहार्य प्रसंगींच हि. सरकार घालील. उलट एकदां हडसूनखडसून अमुक अमुक बाबतींत व अमुक अमुक परिस्थितींत हिं. सरकारनें संस्थानांच्या कारभारांत हात घालावा असा स्पष्ट नियम लिहिला गेला म्हणजे जी गोष्ट आज अपरिहार्य व अपवादात्मक परिस्थितींत होते ती नित्य नियमानें होऊं लागेल. सारांश, आज ब्रिटिश सरकारानें नेमलेल्या कमिटीकडे हे संबंध ठरविण्याचें काम सोंपविणें म्हणजे संस्थानिकांनीं हात दाखवून अवलक्षण करून घेण्यासारखेंच.आहे. इंदूर, नाभा, हैद्राबाद किंवा भरतपूर या संस्थानांच्या बाबतींत जें अपवादभूत म्हणून धोरण स्वीकारलें गेलें त्याला कमिटीच्या हातून सार्वत्रिक, सार्वकालिक व नियत असें स्वरूप प्राप्त होईल इतकेंच नव्हे तर अपवादात्मक म्हणूनहि आज ज्या गोष्टी सरकारला करतां येत नाहींत त्याहि करण्याचे अधिकार त्यांस प्राप्त होण्याचा संभव आहे.

कमिटीच्या कार्यक्रमपत्रिकेंतील शब्दयोजना पाहिली तर ही गोष्ट स्पष्ट दिसून येईल. ती कार्यक्रमपत्रिका अशी—“ (१) सार्वभौम सत्ता व संस्थानें यांच्या परस्परसंबंधाविषयीं, विशेषतः तहनामे, करार व सनदा आणि रूढी यांच्यामुळें उत्पन्न होणाऱ्या जबाबदाऱ्यांचा विचार करून, रिपोर्ट करणें ( २ ) संस्थानें व ब्रिटिश हिंदुस्थान यांच्यामधील जमाखर्चाच्या व आर्थिक संबंधाबद्दलच्या व्यापक प्रश्नांची चौकशी करणें व ( ३ ) हे संबंध अधिक समाधानकारक रीतीनें जुळावे यासाठीं कमिटीला अवश्य व इष्ट वाटतील त्या नव्या सूचना करणें. ” पहिल्या कलमांत तहनाम्याचा उल्लेख असला तरी शेवटच्या रूढींनें त्यावर बोळा फिरविण्याची व्यवस्था केली आहे. आर्थिक संबंधाच्या प्रश्नांना ‘ व्यापक ’ म्हणून त्यांचे बाबतींत तहनाम्याचें बंधन मानण्याचें कारण नाहीं हें सुचविलें आहे. आणि शेवटच्या कलमांत तर इष्ट व अवश्य वाटतील अशा हव्या

त्या नव्या सूचना करण्याचा अधिकार कमिटीला दिला आहे !

पण आज असें हात दाखवून अवलक्षण करून घेण्यास संस्थानिक तयार झाले याचें कारण त्यांना यापेक्षां यापुढील येणारें संकट मोठें वाटलें व म्हणून तें टाळण्यासाठीं त्यांनीं हें पत्करलें. हिंदी कायदेमंडळाचे अधिकार वाढतां वाढतां परराष्ट्रीय संबंधाचें खातें किंवा निदान त्यांतील संस्थानिकांचा विभाग तरी या कायदेमंडळाच्या अधिकारकक्षेंत येण्याचा आज ना उद्यां संभव आहे. त्यापूर्वींच हिं. सरकारचे व आपले संबंध ठरवून टाकले म्हणजे त्यांत हिंदी कायदेमंडळास फारशी ढवळाढवळ करतां येणार नाहीं असा संस्थानिकांना विचार केलेला दिसतो. हिं सरकार आज हे संबंध ठरवितांना फक्त आपल्यापुरतें पाहील. पण हिंदी लोकांच्या कायदेमंडळाचे हातीं आजच्यासारख्या अनिश्चित स्थितींत हे संबंध गेल्यास संस्थानी प्रजेला अधिक अधिकार देण्याचे दृष्टीनें कायदेमंडळ त्यांत ढवळाढवळ करील. हिंदुस्थानांतल्या राज्यपद्धतीप्रमाणें संस्थानांत राज्यपद्धति सुरू व्हावी, दोन्हींहि प्रजेला सारखें स्वातंत्र्य मिळावें व सर्व हिंदुस्थानची मिळून एक संयुक्त (फेडरल) अशी घटना व्हावी अशी हिंदी लोकांची आकांक्षा आहे. असल्या संयुक्त राज्यघटनेंत संस्थानिकांना सनदशीर अधिकारी ( कॉन्स्टिटयूशनल गव्हर्नर) यासारखे अधिकार राहतील. ही गोष्ट संस्थानिकांना नको आहे. त्यांना आपलें अस्तित्व निराळें राखावयाचें आहे व प्रजेलाहि हक्क द्यावयाचे नाहींत.

येवढें साधण्याकरितां, सार्वभौम सरकारशीं हवें तेवढें नमतें घेण्यास ते तयार आहेत. तहनामे करार हे पायाखालीं तुडवले गेले तरी चालेल, ब्रि. सरकारचा हवा तो सासुरवास पत्करूं, पण प्रजेला अधिकार व हिंदी लोकांना आपल्या कारभारांत हात घालण्याचा हक्क प्राप्त होण्याचा प्रसंग नको ! अशीच या एकंदर प्रकारावरून त्यांची वृत्ति उघड होत आहे. किंबहुना संस्थानिक व बडे ब्रि. अधिकारी यांची दोनहि प्रजेच्या विरुद्ध ही एक गुप्त कारवाईच होय आणि तिचा जितका निषेध करावा तितका थोडाच होईल. आणि ही गुप्त कारवाई चालू असतां " हिंदी स्वराज्याला संस्थानिकांचा विरोध नाहीं " असें त्यांच्या हस्तकांनीं जाहीर करावें हा शुद्ध मानभावीपणा नव्हे काय ? कारण संस्थानिकांची ही प्रत्यक्ष कृति अशा प्रकारची आहे कीं त्यायोगें हिंदुस्थानाच्या भावी राज्यघटनेच्या कामीं कायमचा व दुर्भेद्य असा अडथळा उत्पन्न व्हावा. आणि यासाठीं सार्वभौम सरकारचें त्यांचेवरील नियंत्रण अधिक जाचक झालें तरी पत्करण्यास ते सिद्ध आहेत. सारांश, आपलें नाक कापून हिंदी स्वराज्याला अपशकुन करण्याचा प्रयत्न असेंच संस्थानिकांच्या या उपक्रमाचे स्वरूप आहे.

आजच्या स्थितींत संस्थानें व ब्रि. हिंदुस्थान यांची संयुक्त घटना होणें अगदीं अशक्य व असंभवनीय आहे, तसा प्रयत्न झाल्यास हिंदुस्थानाच्या कारभारांत घोटाळे उत्पन्न होतील म्हणून संस्थानांच्या प्रश्नांत तूर्त हात घालूं नका असें सर शिवस्वामी अय्यर यांचेसारखे राज्यघटना-कायदेपंडित म्हणत आहेत. पण प्रत्यक्ष परिस्थितींतून नवे मार्ग काढीत असतांच राज्यघटनाशास्त्र बनत असतें. संयुक्त घटना अमेरिकेंत प्रथम उत्पन्न होण्यापूर्वी तरी राज्यघटनाशास्त्रज्ञांच्या पुस्तकांत ती कोठें होती ? प्रत्यक्ष परिस्थितींतूनहि मार्ग काढण्यासाठींच ती नवी उत्पन्न करावी लागली आणि मग राज्य घटनाशास्त्रज्ञांची अविभाज्य सत्तेची तात्विक कल्पनाहि त्यामुळे त्यांना बदलावी लागली. युरोपमधील देशांच्या घटनांचा इतिहास पाहिला तर त्यांनाहि अशा प्रकारच्या अनेक अडचणींतून मार्ग काढला आहे असें त्यांना दिसून येईल. सारांश, त्या दिशेनें प्रयत्न केल्यास व हिंदुस्थानाची संयुक्त घटना करण्याचे दृष्टीनें संस्थानांची आजपासून सुधारणा केल्यास संयुक्त संघटना होणें अशक्य अगर अडचणीचेंहि होणार नाहीं. मुंबईच्या परिषदेंत स्वागताध्यक्ष राजाबहादुर गोविंदलाल यांनीं आपल्या भाषणांत सांगितल्याप्रमाणें पूर्वी ६९४ संस्थानें होतीं तीं आतां ५६१ च आहेत. हा संकोच कसा झाला हें सरकारच्या पोलिटिकल खात्यालाच माहीत. पण सरकारला आपल्या सोयीसाठीं जसा संकोच करतां येतो त्याप्रमाणें स्वराज्यघटनेच्या सोयीसाठींहि लहान लहान संस्थानांचे गट करून अगर अन्य रीतीनें ही संस्थानांची संख्या अधिक आटोपशीर करतां येईल व ब्रिटिश प्रजेइतकेंच संस्थानी प्रजेसहि हक्क प्राप्त झाल्यास समान दर्जामुळें संयुक्त संघटना करणें सुलभ जाईल. कॉंग्रेसचे अध्यक्ष डॉ. अन्सारी यांनींहि आपल्या भाषणांत हिंदुस्थानाची संयुक्त राज्यघटना करण्याबद्दलच सुचविलें आहे. सर्व हिंदुस्थानाची मिळून एक घटना करावयाची तर संयुक्त घटनाच करणें प्राप्त आहे.

पण संस्थानिकांना संयुक्त संघटना ही एक प्रकारची आपत्ति वाटते. ब्रिटिश सरकारचे मांडलिक म्हणून कितीहि कनिष्ठ दर्जा प्राप्त झाला तरी चालेल, पण स्वतंत्र हिंदुस्थानाच्या संयुक्त घटनेंत सनदशीर अधिकारी होणें ही गोष्ट त्यांना नको

आहे. अरेरावी ब्रिटिश राज्यसत्तेच्या ताटाखालचीं मांजरें होणें त्यांना श्रेयस्कर वाटतें. पण प्रभावी लोकसत्तेचें नियंत्रण स्वीकारणें ही त्यांचे दृष्टीनें मोठी नामुष्कीची गोष्ट होय. हिंदुस्थानाची संयुक्त संघटना होण्याचे बाबतींत आज जी संस्थानांची अडचण आहे ती ते कायमची व पक्की करून ठेवीत आहेत. ज्या संस्थानिकांच्या रक्षणासाठीं ५७ सालच्या बंडांत हिंदी शिपायांनीं व लोकांनीं आपलें रक्त सांडलें व प्राणाहुती दिल्या त्याच संस्थानिकांकडून अशा रीतीनें हिंदुस्थानावर ब्रिटिशांचा अंमल कायम व पक्का करून ठेवण्याची व्यवस्था होत आहे. ५७ सालच्या बंडानंतरहि हिंदी पुढाऱ्यांनीं संस्थानिकांच्या हक्कांचें अभिमानानें संरक्षण करण्याचीच खटपट केली. या सर्व उपकारांची फेड अशा रीतीनें होत असलेली पाहून संस्थानिकांबद्दल आज जी कांहीं थोडी आपलेपणाची सहानुभूति लोकांत आहे तीहि नष्ट झाल्याशिवाय राहणार नाहीं.

पण संस्थानिक स्वतः होऊन प्रजेला अधिकार देण्यास तयार नसले किंवा हिंदुस्थानाच्या संयुक्त संघटनेंत सामील होण्यास तयार नसले तरी द. संस्थान प्र. परिषदेचे अध्यक्ष श्री. बाबूराव गोखले यांनीं म्हटल्याप्रमाणें जगभर पसरलेल्या लोकसत्तेच्या लाटेला संस्थानिक आपल्या केरसुणीनें कोठवर अडवणार? ज्या लोकसत्तेच्या ओघाला त्यांच्याहून वरिष्ठ अशा ब्रि. साम्राज्यसत्तेलाहि हळूहळू वाट काढून देणें प्राप्त होत आहे त्या ओघापुढें हतप्रभ झालेल्या बुद्धिबळांतील राजांनाहि आज ना उद्यां नमावें लागेल. आज प्रजेवरील जी अनियंत्रित सत्ता राखण्याकरितां ब्रिटिश सरकाराशीं संगनमत करून संस्थानिक आपले हक्क घालवीत आहेत, ती सत्ताहि उद्यां प्रजेच्या चळवळीनें हळूहळू कमी होणारच होणार. हेंहि गेलें व तेंहि जाणार. मग यांत संस्थानिकांनीं काय साधलें? यापेक्षां त्यांनीं आपण होऊनच प्रजेला जबाबदारीचें स्वराज्य दिलें तर आज त्यांच्या तहनाम्यान्वयें उत्पन्न झालेल्या हक्कांबद्दल उदासीन असलेली, किंबहुना हे हक्क नष्ट व्हावेत असेंच मनांतून इच्छिणारी प्रजा, त्या हक्कांच्या संरक्षणाच्या कामीं संस्थानिकांच्या बाजूनें पूर्वीप्रमाणेंच आत्मीय भावनेनें झगडेल यांत संशय नाहीं.

# श्री. न. चिं. केळकर यांची मुलाखत

ता. २३ रोजीं श्री. न. चिं. केळकर यांची अ. प्रे. च्या बातमीदारानें मुलाखत घेतली. त्यांत ते म्हणालेः—मद्रासच्या काँग्रेसला जाणें मला अशक्य होत आहे याबद्दल अतिशय वाईट वाटतें. पण कधीं कधीं वैयक्तिक कारणें हीं सार्वजनिक आवश्यकतेपेक्षां प्रबळ ठरतात. टिळकचरित्राचा दुसरा व शेवटचा खंड छापून काढण्याचे कामांत मी हल्ली गढलेला आहें. या खंडाची सुमारें १२०० पृष्ठें होणार असून असेंब्लीच्या बैठकीला जाण्यापूर्वींच मला हें छापण्याचें काम संपवावयाचें आहे. बहिष्काराच्या चळवळीसंबंधानें ते म्हणाले, मी हें पूर्वींच स्पष्ट केलें आहे कीं, कायदेमंडळाच्या कमिट्यांना मागितलेले अधिकार व दर्जा हीं मिळालीं नाहींत तर योग्य वेळीं मी बहिष्काराच्या चळवळींत सामील होईन. तोंपर्यंत व्हाइसरॉयांनीं आपल्या विश्वासांतील कांहीं लोकांपुढें कांहीं नवीन सूचना मांडल्या आहेत त्यांचें काय होतें याचे मी निरीक्षण करीत आहे. बहिष्काराचा कालिमा न लागावा म्हणून लोकमत वळविण्यासाठीं सरकार कांहीं तरी प्रयत्न करील असें मी पूर्वींच केसरींत म्हटलें होतें.

मजूर पक्षाच्या धोरणासंबंधीं ते म्हणाले, "मजूर पक्षानें कमिशनला संमति दिली असून स्वाभिमानी हिंदी लोकांच्या आकांक्षा व मनोभावना यांच्याबद्दल त्यांच्या मनांत पूर्ण सहानुभूति आहे. यामुळें त्यांची परिस्थिति अडचणीची झाली आहे. याची मला सहानुभूतिपूर्वक जाणीव आहे. यासाठीं हिंदी लोकांनीं आपलें धोरण न सोडतां मजूर पक्षाला अम्हांस उपयोगी पडता येईल अशा विधायक सूचना त्यास कराव्या असें माझें मत आहे.

काँग्रेसविषयीं ते म्हणाले, "जुळली तर स्वराज्याची योजना, नाहीं तर निदान राऊंड टेबल कॉन्फरन्सची तरी योजना, करण्याच्या कामींच काँग्रेसनें मुख्यतः आपलें लक्ष एकवटावें असें माझें मत आहे. जोंपर्यंत निरनिराळ्या राजकीय पक्षांनीं आपापल्या जबाबदार अशा कमिट्या नेमून त्या कमिट्या एकमतानें ठरवतील त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय केला नाहीं तोंपर्यंत बहिष्काराच्या प्रश्नावर आज दिसणारें ऐक्य हें तडकलेलें भांडें होय असें म्हणणेंच माझ्या मतें योग्य ठरेल. मुसलमानांतील फूट आहे. काँग्रेस जणुं काय अस्तित्वांतच नाहीं असें मानून प्रागतिकांचें संमेलन भरत आहे. आणि काँग्रेसकडे पाहावें तर देशांतील अग्रगण्य राजकीय संस्था हा आपला अधिकार बाहेरच्या लोकांनीं मानून त्यांस आंत येण्याची बुद्धि व्हावी यासाठीं लागणारी व्यापक दृष्टि न ठेवतां, मनुष्यस्वभाव न ओळखतां व सध्याचे अडथळे काढून न टाकतां,

आपल्या छत्राखालीं सर्व जगानें यावें असें काँग्रेस निमंत्रण करीत आहे! या गोष्टींनीं आजची परिस्थितीहि बरीच घोटाळ्याची झाली आहे.

उलट मद्रास कांग्रेसनें अशा तऱ्हेचें कांहीं न करतां, जगाच्या व्यवहाराचे दृष्टीनें अव्यावहारिक पण दिसण्यांत आकर्षक व शूरत्वाचें दिसणारें धोरण पुनः स्वीकारून आपल्याला कायमचा अलगपणा प्राप्त करून घेतला तर मला विशेष आश्चर्य वाटणार नाहीं.

शेवटीं ते म्हणाले कीं, भिन्न भिन्न राजकीय पक्षांनीं तातडीनें पण निश्चयानें सायमन कमिशन व सरकार यांना एकमुखीपणानें तोंड देण्याची खटपट केली नाहीं तर त्यांची स्थिति अडचणीची व अपमानास्पद होईल अशी मला भीति वाटते.

# महाराष्ट्र हिंदुधर्मपरिषद

## तळेगांवचें विशेष अधिवेशन

पूर्वी प्रसिद्ध झाल्याप्रमाणें मंगळवार ता. २० रोजीं तळेगांव-दाभाडे येथील सेनापति दाभाडे यांचे वाड्याचे आवारांत घातलेल्या मंडपांत दुपारीं दोन वाजतां महाराष्ट्र हिंदुधर्मपरिषदेच्या विशेष अधिवेशनास सुरुवात झाली. प्रारंभीं मुरुडकरबुवा यांचें ईशस्तुतिपर व स्वागतपर पद्यगायन झाल्यावर स्वागताध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांनीं भाषण केलें.

### स्वागताध्यक्षांचें भाषण

स्वागताध्यक्षांचे भाषणात अध्यक्षांच्या भाषणाचें काम करूं नये असें आपलें मत असल्यामुळें आपण थोडक्यांत भाषण करणार असल्याबद्दल सांगून ते म्हणाले, अशा आणीबाणीच्या प्रसंगीं स्वागत कोणी कोणाचें व कशाबद्दल करावयाचें अशा अर्थाचें पद म्हटलें गेलें हेंच स्वागत समजा. स्वागताचे शिष्टाचार करण्याची ही वेळ नाहीं. याच शब्दांनीं मी आपलें स्वागत करतों. तळेगांवास ही सभा भरण्याचें कारण आपणास विदितच आहे. तळेगांवकरांवर जें संकट आलें आहे तशींच संकटें इतर ठिकाणीं हिंदु समाजावर येत आहेत. तेव्हां या प्रसंगाला सर्वांनीं मिळून जुटीनें तोंड देणें अवश्य आहे. या प्रसंगांत पुष्कळ लोकांनी स्वार्थत्याग केला, हाल सोसले व अजूनहि सोसावे लागतील. आजहि याच प्रकरणावर लिहिलेल्या लेखासंबंधीं पुण्यास एका वृत्तपत्रावर खटला चालू आहे. कायद्याच्या दृष्टीनें आपल्याला या खटल्यासंबंधीं अधिक कांहीं म्हणतां येत नाहीं. पण या खटल्यांतील लोकांसंबंधीं आपल्याला काळजी व सहानुभूति वाटत आहे व त्यांना आपण विसरलों नाहीं येवढाच उल्लेख आपण करूं शकतों, व तो मी प्रारंभींच करून ठेवतों. पूर्वी नाशिक यवतमाळ पुणें देऊळगांवराजा या ठिकाणीं जी महाराष्ट्र हिंदुधर्मपरिषद भरली त्याच परिषदेची ही जादा सभा भरत आहे. आणि हें अधिवेशन विशेष कारणाकरितां या स्थळीं भरत असल्यामुळें इतर सामान्य ठराव न येतां विशेष व तात्कालिक महत्त्वाचे ठरावच येथें व्हावयाचे आहेत. सध्या ऐक्याच वातावरण चालू असतां हिंदुसंघटनेच्या परिषदा कशाला, असा आक्षेप घेण्यांत येतो. पण ऐक्याचे प्रयत्न चालू असतांहि प्रत्येक घटकानें आपापलें संघटन चालूच ठेवलें पाहिजे व दोनहि प्रकारचे प्रयत्न एकाच वेळीं चालूं शकतात असा आपला अनुभव आहे. यानंतर डॉ. मुंजे हे अखिल भारतीय हिंदुमहासभेचे अध्यक्ष झाले, हा मान त्यांचा एकट्याचा नसून सर्व महाराष्ट्राचा आहे असें सांगून व या लहान गांवांतील परिषदेसाठीं ते इतक्या लांबून येथें आले याबद्दल आभारप्रदर्शन करून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

यानंतर श्री. नारायणराव गुंजाळ यांनीं डॉ. मुंजे यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल रीतसर सूचना करून त्यास शेठ गीरिधर कालिदास, नारायणराव महाजन गोकुळशेठ म्यु. अध्यक्ष, भिकू पाटील दाभाडे म्यु. सभासद, वाडेकर अमरचंद म्यु. सभासद व फणसळकर वकील (वडगांव) या सद्गृहस्थांनीं अनुमोदन दिल्यावर अध्यक्षांनीं पुढीलप्रमाणें भाषण केलें.

### अध्यक्षांचें भाषण

"आपल्या हक्कांवर आलेल्या ज्या आपत्तींच्या प्रतिकारार्थ तुम्ही ही परिषद बोलावली तशाच तऱ्हेच्या आपत्ती महाराष्ट्रांत इतरत्र आलेल्या असून स्वानुभवानें मी असें सांगतों कीं यांत स्वावलंबनपूर्वक प्रयत्न केल्यानेंच आपलें संरक्षण होऊं शकेल. मुसलमानांनीं हिंदूंच्या परंपरागत हक्कांना हरकत घ्यावी व सरकारी अधिकाऱ्यांनी पक्षपातीपणानें मुसलमानांची बाजू घ्यावी ही तळेगांवची तक्रार केवळ स्थानिक नाहीं. उत्तर-हिंदुस्थानांत अलाहाबादसारख्या गांवीं वर्षानुवर्ष रामलीलेच्या मिरवणुकी बंद पडल्याची हकीकत आपल्या कानावर आलीच असेल. नागपूरवरहि अशीच आपत्ति आली होती, पण हिंदु लोकांचा या बाबतींत दृढनिश्चय सरकारला दिसून आल्यामुळें अधिकाऱ्यांनीं असले हुकूम करण्याचें सोडलें असून मुसलमानहि तडजोडीस

तयार झाले. याच निश्चयानें व योग्य मार्गांनीं तुम्ही हा झगडा चालविल्यास यांतून मार्ग निघेल."

याप्रमाणें प्रस्तावना करून या वादांत हिंदूंची बाजू कशी न्याय्य आहे हें दाखविण्यासाठीं सिमल्याच्या ऐक्यपरिषदेपुढें डॉ.मुंजे यांनीं स्वतः हिंदूंच्या वतीनें केलेल्या खुलाशाचें पुढीलप्रमाणें दिग्दर्शन केलें. गोवध व वाद्यबंदी यासंबंधीं श्रीनिवास अय्यंगार यांनीं सुचविलेल्या व मुसलमानांनीं आणि पुढें ऑल–इ. कॉं. कामिटीनें मान्य केलेल्या योजनेचा फोलपणा या खुलाशानें त्यांनीं दाखविला. "गोवधाचा प्रश्न हा हिंदूंचा धार्मिक प्रश्न आहे आणि गोहत्या वांचविण्यासाठीं हिंदूंनीं इतिहासांत लढाया व रक्तपात केल्याचे दाखले आहेत. गोहत्या करण्याचा कोणाचा हक्क हिंदु मान्य करण्यास तयार होणार नाहीं. आज नाइलाज म्हणून हिंदूंच्या दृष्टीआड होणारी गोहत्या ते चालू देतील. पण (१) आजपर्यंत जेथें गोवध झाला नाहीं अशा ठिकाणीं गोवध होऊं नये (२) पवित्र क्षेत्राचे ठिकाणीं गोवध होऊं नये व गोवधाची सर्रास परवानगी दिल्यास हवीं तेथें वाद्यें वाजवूं देऊं ही अट मुसलमानांनीं कबूल केली यावरूनच वाद्यांचा प्रश्न धार्मिक नाहीं हें दिसून येतें. मुसलमानांची वाद्यासंबंधीं हरकत अगदीं अलीकडची आहे. हिंदु हे मुद्दाम मुसलमानांना त्रास देण्याकरितां वाद्यें वाजविण्यास कधींच प्रवृत्त होत नाहींत, कारण हिंदूंना दुसऱ्याच्या धर्माबद्दलहि आदर आहे. पण त्यासाठीं हिंदूंना हट्टानें वाद्यें बंद करावयास भाग पाडण्याचा प्रयत्न झाला तर हिंदूहि प्रतिकार केल्याखेरीज राहणार नाहींत. या बाबतींतही दिल्लीच्या जुम्मा-मशिदीसारख्या कांहीं जुन्या मशिदींपुढें आपल्या बिनधार्मिक अशा मिरवणुकींतलीं वाद्यें थांबवण्यास हिंदू तयार होतील. पण सर्वच मशिदींपुढें वाद्यें थांबविणें अशक्य होय. कारण वाद्यवादन ही हिंदूंच्या धार्मिक व सामाजिक जीवनांतली एक महत्त्वाची गोष्ट आहे."

याप्रमाणें ऐक्यपरिषदेपुढें हिंदूंच्या तर्फे मांडलेल्या सूचनांचें दिग्दर्शन करून ते म्हणाले, "हिंदूंची बाजू न्याय्य आहे हें कोणाहि निःपक्षपाती मनुष्यास मान्य करावें लागेल. हिंदू–मुसलमानांच्या एकीच्या बाबतींत माझें असें मत आहे कीं, कॉंग्रेस किंवा सरकार यांनीं या बाबतींत योजलेले उपाय हेहि तेढ वाढविण्यासच कारणीभूत होणारे आहेत. खऱ्या राष्ट्रीयत्वाच्या पायावरच हिंदु–मुसलमानांची एकी होऊं शकेल. मुसलमान करतील त्या मागण्यांना संमति देण्यानें ही एकी साध्य होणार नाहीं. हिंदूंचा असला उदारपणा हें त्यांच्या कमकुवतपणाचें फल आहे. हिंदूंमध्यें मुसलमानांइतका कडवेपणा किंवा गुंडपणा नाहीं. यामुळें शांतता कशी तरी संपादन करण्यासाठीं खंडणी देण्याप्रमाणें त्यांना सवलती दिल्यानें एकी होणार नाहीं. कारण असल्या एकींत प्रबळ पक्ष संधि मिळाल्यावर पुनः आणखी सवलती दुर्बल पक्षाकडून उकळण्यास तयार होईलच.

माझ्या मतें पुढील उपायांनीं हिंदू-मुसलमानांचें ऐक्य नांदूं शकेल. ते उपाय असे—(१) सर्व धर्मांच्या विद्यार्थ्यांना सामान्य अशा शैक्षणिक संस्था (२) सयुक्त मतदारसंघ. या बाबतींत हल्लींचे गैरसमज जाण्याकरितां अगदीं थोडया कालपर्यंत म्हणजे फार तर १० वर्षेपर्यंत राखीव जागा ठेवण्यास मी संमति देईन (३) नोकऱ्यांच्या बाबतींत जातवारी न ठेवतां, ठराविक परीक्षांची अट ठेवून त्यांत प्रावीण्य मिळविणाऱ्यांनाच जागा मिळाव्या (४) राज्यकारभाराचे बाबतींत कोणत्याहि प्रकारें जातवारीचें धोरण ठेवूं नये (५) अल्पसंख्याक अगर बहुसंख्याक अशा कोणत्या जातीला इतर वर्गावर वर्चस्व करूं देऊं नये. (हिंदू बहुसंख्याक असल्यामुळें ते मुसलमानांस दडपूं पाहतात अशी एक तक्रार सांगण्यांत येते पण ती साफ खोटी आहे. कारण हिंदु हा सहिष्णु, कायदेशीर वर्तन करणारा म्हणून प्रसिद्ध असून मुसलमान हा कडवा आहे. पारशी लोक अल्पसंख्य असून त्यांना हिंदुस्थानांत आपली उन्नति करून घेतां आली हें एकच हिंदूंच्या सहिष्णुतेचें उदाहरण देतां येईल. मुसलमान अल्पसंख्याकांनीं मात्र सहिष्णु अशा हिंदु बहुसंख्येवर गेलीं कांहीं वर्षें अरेरावी चालविली आहे.)

अशा प्रकारची परिस्थिति असल्यामुळें राष्ट्रीयत्वाच्या खंबीर पायावर उभे राहून येतील त्या संकटांना तोंड देण्यास तयार व्हावें, अगर मुसलमान ज्या ज्या वेळीं जें जें मागतील तें देण्यास सिद्ध व्हावें, असे दोनच मार्ग हिंदूंपुढें आहेत. हा दुसऱ्या प्रकारचा उपाय कॉंग्रेसचे पुढारी करूं पाहात आहेत. पण ह्या उपायानें रोग न हटतां तो अधिकच वाढेल. सरकारचेंहि मुसलमानांशीं हेंच धोरण आहे व गुंडगिरीला भिऊन शांतता राखण्यासाठीं मुसलमानांचे सर्व हट्ट सरकार पुरवीत आहे. कारण हिंदू फार तर सभा भरवतील, शाब्दिक निषेध करतील. पण मुसलमानांप्रमाणें दांडगाई करीत नाहींत अशी अधिकाऱ्यांची खात्री असते. यामुळें न्यायान्याय न पाहतां कशीतरी शांतता राखण्यासाठीं अधिकारी हिंदूंवरच नियंत्रण घालतात.

यामुळें मुसलमानांप्रमाणें परिणामांविषयीं बेपर्वा होऊन, अधिकाऱ्यांच्या अन्यायाचे परिणाम मुसलमानांना दुखविलें असतां जसे होतात तसेंच हिंदूंच्या

बाबतींतहि होतील. अशी परिस्थिति उत्पन्न केल्याशिवाय हिंदूंची परिस्थिति सुधारणार नाहीं. तळेगांवच्या स्थानिक परिस्थितीविषयीं मला इतकेंच सांगावयाचें कीं, गुंडागिरीला तोंड देण्यास तुम्ही तयार झालें पाहिजे व जरी तुम्हाला अधिकाऱ्यांचे हुकूम मोडावे लागले तरी कायद्याच्या मर्यादेच्या आंत राहण्याची तुम्ही खबरदारी घ्यावी. परमेश्वर तुम्हास यश देवो! "

(डॉ. मुंजे यांचें लेखी भाषण अशा प्रकारचें होतें. पण प्रत्यक्ष भाषण करतांना त्यांनी या विवेचनांत ऐतिहासिक व स्वानुभवाचे असे बरेच समर्पक दृष्टान्त सांगितले. यामुळें प्रत्येक मुद्दा श्रोत्यांना पटून अगदीं साधारण मनुष्यास देखील त्यांचें म्हणणें स्पष्टपणें कळलें.)

याप्रमाणें अध्यक्षांचें स्फूर्तिदायक भाषण झाल्यावर पहिला ठराव श्री. **वामनशास्त्री दातार** यांनीं मांडला तो असा.

**ठराव पहिला**—समाजाच्या पुरातन अशा धार्मिक सामाजिक चालीरीती व दिवाणी हक्क यांमध्यें अयोग्य व अन्याय्य रीतीनें ढवळाढवळ करण्याचें धोरण सरकारनें अलीकडे स्वीकारलें आहे त्याचा ही सभा निषेध करीत आहे व सर्व हिंदूंना अशी शिफारस करीत आहे की, त्यांनीं सर्व योग्य मार्गांचें अवलंबन करून आपले वरील सर्व हक्क पुनः प्रस्थापित करण्याची खटपट करावी.

**टीप**—" योग्य मार्ग " या शब्दांत धडधडीत अन्याय्य हुकूम मोडणें याचाहि अंतर्भाव होतो.

या ठरावावर भाषण करतांना त्यांनी नाशिकला सभाबंदीचा हुकूम काढून अधिकाऱ्यांनीं नसता वाद कसा उपस्थित केला याची हकीकत सांगितली. गुलाबचंद दोशी यांनीं सोलापूरची हकीकत सांगून ठरावास पुष्टि दिली. श्री. ज. स. करंदीकर, त्रिंबकराव शेटे ( जुन्नर ) यांनीं पुष्टिकारक भाषणें केल्यावर श्री. आण्णासाहेब भोपटकर यांनीं तळेगांव-प्रकरणांत निरनिराळ्या अधिकाऱ्यांनी लहरी विक्षिप्तपणा अज्ञान व हट्ट कसे चालविले याचें कायदेशीर रीतीनें दिग्दर्शन केलें व ठराव सर्वानुमतें मंजूर झाला.

दुसरा ठराव **डॉ. सावरकर** यांनीं मांडला तो असा.

**दुसरा ठराव**—सिमला येथील ऐक्य परिषदेपुढें हिंदु समाजाचे पूज्य व वंदनीय पुढारी पंडित मदन मोहन मालवीय यांनीं वाद्यें व गोहत्या या बाबतींत जीं मतें मांडलीं त्यांस या सभेची पूर्ण संमति आहे.

ऐक्यपरिषदेपुढें श्रीनिवास अय्यंगार यांची **गोवधाच्या धार्मिक व वाद्यांच्या बिनधार्मिक प्रश्नांचा** मोबदला करण्याची योजना मुसलमानांनीं तत्काळ उचलल्यामुळें हिंदूंची बाजू स्पष्टपणें मांडण्याचें काम पं. मालवीय व डॉ. मुंजे यांनीं कसें केलें हें सांगून संकट आल्यावर प्रतिकार करण्यापेक्षां दुसऱ्याला संकट आणण्याची छातीच होऊं नये अशा प्रकारें हिंदु समाजानें समर्थ व्हावें असा त्यांनीं उपदेश केला. या ठरावास श्री. दाजीशास्त्री चांदेकर व डॉ. सुरतकर यांनीं अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें मंजूर झाला.

यानंतर तिसरा ठराव नाशिकचे **पं. सीतारामशास्त्री** यांनीं मांडला तो असा.

**ठराव तिसरा**—अस्पृश्यतेचें संपूर्णपणें निवारण करण्यासाठीं हिंदु समाजांतील सर्व जातींनीं व पंथांनीं जोराचे व नेटाचे प्रयत्न करावेत अशी त्यांना या सभेची विनंति आहे.

पं. सीतारामशास्त्री यांनीं या ठरावावर हिंदींत जोरदार भाषण केलें आणि श्रीराम व श्रीकृष्ण यांच्या चरित्रांतील प्रमाणें देऊन अस्पृश्यता निवारण करणें कसें आवश्यक व धर्म्य आहे तें सांगितलें. श्री. हिरवे ( पौड ) यांनीं या ठरावास अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें मंजूर झाला.

चौथा ठराव पुण्याचे श्री. **यशवंतराव दाते** यांनीं मांडला तो असा.

**ठराव चौथा**—हिंदु समाजाच्या जीवितावर आणीबाणीचा प्रसंग सांप्रत आला आहे इकडे लक्ष देऊन सर्व हिंदूंनीं समता स्वतंत्रता व बंधुता या तत्त्वावर आपली सामाजिक धार्मिक व इतर बाबतींत संघटना करावी अशी या परिषदेची समस्त हिंदु समाजास विनंति आहे.

या ठरावास श्री. कानडेशास्त्री व श्री. द. रा. गुमे यांनीं अनुमोदन दिल्यावर तो सर्वानुमतें मंजूर झाला.

पांचवा ठराव अध्यक्षांनींच मांडला व तो सर्वानुमतें मंजूर झाला तो असा.

**ठराव पांचवा**—तळेगांवप्रकरणांत जे हिंदु कौन्सिलर उठून गेले व सरकारी अपकृत्याचा निषेध केला त्याबद्दल ही सभा त्यांचें अभिनंदन करते. त्याचप्रमाणें तळेगांवप्रकरणांत ज्यांनीं प्रत्यक्ष द्रव्यरूपानें कायदेशीर सल्ला देऊन व इतर रीतीनें मदत केली त्याबद्दल ही सभा त्यांचे आभार मानीत आहे.

## स्वागताध्यक्षांचा समारोप

स्वागताध्यक्ष श्री. न. चिं. केळकर हे समारोप करतांना म्हणाले, ' सभेच्या मुख्य कार्याविषयीं मी प्रारंभीं बोललों नाहीं, पण यासंबंधीं थोडक्यांत सर्व मुद्दा सांगण्यासारखा आहे. या कामीं अधिकाऱ्यांनीं कारण नसतांना जाणूनबुजून एका

म्हणजे मुसलमान वर्गाविषयीं पक्षपात करून हिंदु समाजाचे परंपरागत हक्क पायाखालीं तुडविले आहेत. हायकोर्टापर्यंत हिंदूंचे हक्क प्रस्थापित झाले तरीहि आम्ही वहिवाटीचे कोणतेच हक्क मानावयास तयार नाहीं असें तरी अधिकाऱ्यांनीं एकदां जाहीर करावें म्हणजे आमच्या शक्तीप्रमाणें आम्हालाहि पुढचा मार्ग आक्रमण करतां येईल. पण वहिवाटीचे हक्क मानीत नाहीं असें जाहीर न करतां व आमच्या सवालास स्पष्ट उत्तर न देतां त्यांनीं पिंजऱ्यांतील वाघावर खडे मारून डिवचण्यासारखें आम्हास कायद्याच्या व सत्तेच्या कात्रीत धरलें आहे. हें नैतिक युद्ध नव्हे असं मी त्यांना बजावतों. तळेगांवचे लोक सल्ला विचारावयास आले असतां हुकूम मोडण्याची घाई करूं नका असा सल्ला आम्हीं देतों याचें कारण अजून वहिवाटीचे हक्क बुडाले असें सरकारनें जाहीर न केल्यामुळें कायदेशीर हक्काचें भांडण इतर सामोपचाराच्या रीतींनें भांडण्यास अवसर आहे म्हणून. नाहीं तर हुकूम मोडा असा सल्ला फुकटचा देण्यांत आमचें काय जातें? नुसता सल्लाच नव्हे तर हुकूम मोडून मिरवणूक काढण्यास मीहि येईन व काय शिक्षा किंवा दंड भोगावयाचा तो भोगीन. तो प्रसंग आलाच तर त्याला कोणी भितो असें नाहीं. ज्या दिवशीं हिंदूंचे परंपरागत व दिवाणी कोर्टांत मान्य झालेले हक्कहि आम्ही मानीत नाहीं असें निर्लज्जपणें सांगण्याची अधिकाऱ्यांना बुद्धि होईल त्या दिवशीं सनदशीर मार्ग संपला म्हणून आम्हीहि आम्हाला ईश्वर जशी बुद्धि देईल त्याप्रमाणें हक्करक्षणासाठीं काय करावयाचें तें करूं हा या परिषदेचा संदेश अधिकाऱ्यांकडे जावा यासाठींच मी सांगत आहें. '

याप्रमाणें भाषण झाल्यावर अध्यक्ष डॉ. मुंजे यांनीं पुढील आशयाचा समारोप केला.

### अध्यक्षांचा समारोप

'तळेगांवचा लढा हा महाराष्ट्रीयांच्या परीक्षेचा प्रश्न आहे. महाराष्ट्रीय मनुष्य विचारी असला तरी एकदां विचारपूर्वक एखाद्या वादांत पडल्यावर शेंडी तुटो की पारंबी तुटो, अशा चिकाटीनें भांडतो हा आपला स्वभाव व लौकिक कायम ठेवण्याच्या दृष्टीनें हा लढा आपल्याला शेवटास नेला पाहिजे हें ध्यानांत बाळगा. इंग्रज येण्यापूर्वी या प्रांतांत हिंदूंचें राज्य असल्यामुळें तेथें दिवाणी हक्क सिद्ध करण्याचा बोजा आपल्यावर नाहीं, तो मुसलमानांवर आहे असें सरकारी अधिकाऱ्यांस बजावा. निगडीच्या प्रकरणासंबंधीं या पंचक्रोशींत मुसलमान शेजारीं आल्यानें कोणत्या प्रकारची परिस्थिति उत्पन्न होईल याची जाणीव त्यांस करून द्या. हे प्रकरण श्री.भोपटकरासारख्यांनीं हातीं घेतलें आहे व त्याचें महत्त्व लक्षांत घेऊन ते योग्य रीतीनें तडीला नेतील असा माझा भरंवसा आहे.'

याप्रमाणें भाषण करून त्यांनीं सर्वांचे आभार मानले व राष्ट्रगीत' झाल्यावर सायंकाळीं ७ च्या सुमारास या परिषदेची परिसमाप्ति झाली.

# संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय

" स्वातंत्र्य हा आत्म्याचा धर्म आहे. स्वातंत्र्य असेल तर आत्मा आहे. हें तत्त्व अविनाशी असल्यामुळें कोणाला भीत नाहीं. राजकीय तत्त्वज्ञानाचें या तत्त्वांतच पर्यवसान झालें पाहिजे. जें राष्ट्र उद्योगाला लागलें नाहीं त्याला या वेदांताचा उपदेश करणें, त्याचा आत्मा जागृत करणें जरूर आहे."

**—लो. टिळक.**

कित्येक पुढारी म्हणतात, रॉयल कमिशन अशा रीतींनें नेमलें गेलें हा हिंदुस्थानाला शापांतला वरच मिळाला. शाप की वर हें पुढें अनुभवानें काय तें दिसून येईलच. पण कमिशनानें हिंदुस्थानवर एक प्रकारें यक्षिणीची कांडी फिरविली हें मात्र खरं! कारण कोणाच्याहि कल्पनासृष्टींत न येणारे असे चमत्कार त्यानें घडविले. 'बहिष्कार' हा शब्द प्रागतिकांच्या तोंडून क्वचित् चुकून-माकूनच बाहेर पडावयाचा. पण गेल्या आठवड्यांत मुंबईस भरलेल्या प्रागतिकांच्या परिषदेत प्रत्येक लहान-मोठ्या पुढाऱ्याच्या भाषणांत कमिशनावर बहिष्कार हेंच पालुपद होतें. आपला बहिष्कार म्हणजे असहकारिता नव्हे, आपण अजून योग्य तडजोडीचें द्वार कायमचें बंद केलें नाहीं इ. गोष्टी सांगून प्रागतिक पुढाऱ्यांनीं त्यांतल्या त्यांत नेमस्तपणाच्या परंपरेचा दुवा जोडण्याचा प्रयत्न केला. पण अशा रीतीनें कितीहि तोल सांवरून बोललें तरी बहिष्कार तो बहिष्कार. यामुळें त्यांनीं आपला सुविचारीपणाचा लौकिक घालविला असा टाईम्ससारखीं पत्रें त्यांस दोष देत आहेत. कॉंग्रेसची व त्यांचीं बहिष्काराचीं कारणें निराळीं व बहिष्काराची पद्धतीहि भिन्न खरी. पण बहिष्कार घालण्यापुरती जी दोघांची एकवाक्यता दिसते तशी एकवाक्यता महत्त्वाच्या

राजकीय प्रश्नांवर देशांत आज बरींच वर्षें दिसली नाहीं. यामुळेंच ती अपूर्व अशी वाटल्यास नवल नाहीं. प्रागतिकांनीं बहिष्कार घातल्यामुळेंच काँग्रेसला अधिक जोर आला यासाठीं काँग्रेसच्या ठरावाबद्दलहि टाईम्सनें प्रागतिकांनाच जबाबदार धरलें आहे! 'तूं नाहीं तर तुझ्या बापानें पाणी गढूळ केलें, त्याबद्दलहि तूंच दोषी' असें म्हणून बिचाऱ्या कोंकरावर हल्ला करणाऱ्या इसापनीतींतील लांडग्यासारखेंच टाईम्सचें हे वर्तन होय.

## उत्साहाचे बरेवाईट परिणाम

प्रागतिकांमध्यें कमिशनासंबंधीं इतकी खळबळ झाली, मग काँग्रेसमध्यें ती कोणत्या कोटीला पोंचली असेल याची कांहींशी कल्पना काँग्रेसच्या बातमीपत्रांवरून येण्यासारखी आहे. गोहत्तीची काँग्रेस व मद्रासची काँग्रेस यांत जमीन-अस्मानाचें अंतर पडलें. गोहत्तीस नसता उत्साह युक्तिप्रयुक्तीनें उत्पन्न करण्याची पुढाऱ्यांनीं खटपट केली, पण तीहि साध्य झाली नाहीं. उलटपक्षीं मद्रासेस उत्साहातिरेकाला व्यवहाराच्या मर्यादा घालतां घालतां अनुभवी पुढारी टेकीस आले! कांहीं बाबतींत त्यांना ही मर्यादा घालतां आली पण बऱ्याच बाबतींत मुळींच घालतां आली नाहीं. म्हणून या उत्साहातिरेकाचे कांहीं चांगले व कांहीं वाईट असे परिणाम दिसून आले. काँग्रेसच्या सर्वच महत्त्वाच्या ठरावांवर रॉयल कमिशनच्या वातावरणाचा परिणाम स्पष्ट दिसतो. स्वातंत्र्याचा ठराव, राष्ट्रीय सर्वपक्ष परिषद भरवून स्वराज्ययोजना करण्याचा ठराव व हिंदू-मुसलमान-ऐक्याचा ठराव यांना मद्रासला जें महत्त्व प्राप्त झालें तें इतर वेळीं झालें नसतें. दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं स्वातंत्र्याच्या ठरावाला बेझंटबाईंनीं संमति दिली नसती व हिंदू-मुसलमानी ऐक्याच्या, हिंदूंच्या दृष्टीनें अत्यंत हानिकारक अशा, ठरावाला मालवीयांनी इतक्या विस्मयजनक रीतीनें पाठिंबा दिला नसता. असल्या उत्साहाच्या भरांत मंजूर झालेला हा हिंदू-मुसलमानी ऐक्याचा ठराव खरोखर ऐक्य प्रस्थापित करण्याच्या कामीं किती उपयोगी पडेल याची आम्हास शंकाच वाटते. कारण या बाबतींत पूर्वानुभव फार खडतर आहे. आजपर्यंत हिंदू-मुसलमानांतील अनेक करारमदार, ऐक्ययोजना हीं सर्व फोल ठरलीं आहेत. तपशीलवार केलेल्या योजना जेथें फलद्रूप झाल्या नाहींत तेथें काँग्रेसची मोघम उदार योजना कशी अमलांत येणार? आजपर्यंत एका समाजानें दुसऱ्या समाजाचे जे हक्क म्हणून मान्य केले नाहींत ते काँग्रेसनें मंजूर करून उभयतांस 'मारामारी करूं नका व कोर्टांतहि जाऊं नका' असा उपदेश केला आहे! विषयनियामक कमिटींत पुढाऱ्यांनीं एकमेकांना लोटांगणें घातलीं असतील किंवा आलिंगनें दिलीं असतील. पण पुढाऱ्यांनीं जी सहिष्णुतेची व समेटाची वृत्ति स्वीकारली ती जनतेंत ते कितपत पसरवूं शकतील? आणि ती वृत्ति जनतेंत नाहीं-विशेषतः मुसलमानी जनतेंत नाहीं-तोंपर्यंत सहिष्णुतेचे उत्साहभरांत केलेले ठराव उपकारक न ठरतां अपकारकच ठरतील.

## पूर्वानुभवाचें विस्मरण

अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत मागील अनुभवावरून योग्य तो बोध घेऊन पुढें पाऊल टाका असें बजावलें असतांहि मद्रासेस पूर्वानुभवाचें स्मरण या उत्साहाचे भरांत कोणास फारसें राहिलें नाहीं. कारण कानपूरच्या ठरावानें कौन्सिलांतून जी 'जा-ये' झाली ती व्यर्थ व कित्येक प्रसंगीं हास्यास्पदहि ठरली. तरी पुनः कमिशनाबद्दल नापसंती व्यक्त करण्याच्या अनेक कार्यक्रमांत ती एक पद्धत स्वीकारण्यांत आलीच आहे. पण कौन्सिलें कायमचीं सोडण्याच्या असहकारानें वर डोकें काढल्यामुळे त्याला बगल देण्याकरितां कौन्सिलवाल्यांना असें करावें लागलें असावें. आणि कौन्सिलांत सर्वांचा मिळून एक लोकपक्ष करून वागण्याची डॉ. अन्सारी यांच्या भाषणांतील सूचनाहि या वेळीं त्यांना आठवली नाहीं, किंवा आठवूनहि कांहीं उपयोग झाला नाहीं असें दिसतें. रॉयल कमिशनामुळे अव्यवहार्य असहकारितेकडे काँग्रेसचा कल पुनः झुकूं लागला होता, यामुळें कौन्सिलवाल्यांना तिला कसेंबसें आवरून धरतां आलें व पूर्ण कौन्सिलबहिष्काराचे ऐवजीं तात्पुरत्या गैरहजेरीनें भागलें इतक्यांतच त्यांनीं समाधान मानलें.

## परदेशीय वातावरण

पण एका, म्हणजे पूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाच्या, बाबतींत काँग्रेस गांधीभक्त असहकाऱ्यांच्याहि आवाक्याबाहेर गेली. अहमदाबादेस हसरत मोहानी यांनीं स्वातंत्र्याचा ठराव आणल्यापासून तो वेळोवेळीं काँग्रेसमध्यें व प्रांतिक काँग्रेस-कमिट्यांमध्यें पुढें येत होता. गांधींनीं आपलें सर्व वजन व कुशलता खर्च करून आजपर्यंत त्याला थोपवून धरलें होतें. पण मद्रासला या ठरावास दोनतीन बाजूंनीं अधिक अनुकूल वातावरण लाभलें. रॉयल कमिशनानें उत्पन्न केलेला क्षोभ त्याला उपकारक झाला. त्याचबरोबर पंडित जवाहरलाल नेहरूंनीं आपल्याबरोबर आणलेल्या परदेशीय वातावरणानें त्यास जोर आला. पुष्कळ दिवसपर्यंत बाजूला टाकलेलें परदेशीय प्रचाराचें काम काँग्रेसनें गेल्या वर्षीं थोडेसें हातीं घेतलें व ब्रुसेल्स येथील साम्राज्यपीडित राष्ट्रांच्या संमेल-

नास हिंदुस्थानाचे प्रतिनिधि म्हणून पं. जवाहरलाल नेहरू यांस नेमलें. हा परदेशीय प्रचार कॉंग्रेसचे हातून केवळ यदृच्छेनेंच घडला होता. तरीहि या पहिल्याच उपक्रमाचा कॉंग्रेसवर तत्काळ परिणाम दिसून आला. सर्व जग साम्राज्यवादास कंटाळले आहे. मजुरांची बेकारी, संपत्तीची विषमता, लष्करी खर्चाची वाढ, लढाया, इ. सर्व अनिष्ट आपत्ती या साम्राज्यतृष्णेनें जगावर ओढवल्या आहेत. यामुळें जगभर 'साम्राज्य' हा शब्दच विद्वेषकारक होऊन बसला आहे. जगांतील साम्राज्यविरोधी चळवळींची हिंदी स्वराज्याच्या चळवळीस सहानुभूति मिळवावयाची असेल तर हिंदुस्थानानेंहि तितक्याच तीव्रतेनं साम्राज्यवादास झिडकारावयास नको काय ? हीच विचारसरणी पंडित जवाहरलाल नेहरूंची असली पाहिजे व तिचा परिणाम कॉंग्रेसवर झाल्यावांचून राहिला नाहीं. कॉंग्रेसनें चीनविषयीं, भावी युद्धांत भाग न घेण्याविषयीं, व साम्राज्यपीडित राष्ट्रांच्या परिषदेंत भाग घेण्याविषयीं जे ठराव मंजूर केले तेहि या परदेशीय वातावरणाच्या प्रभावामुळेंच होत. परदेशीय प्रचारामुळें हिंदी लोकांच्या प्रश्नासंबंधी परदेशांतील लोकांना खरी माहिती कळते व ब्रिटिश सरकारच्या प्रचारकांकडून होणारे गैरसमज दूर होतात, येवढ्यासाठी कॉंग्रेसने परदेशीय प्रचारकार्य हातीं घ्यावें असें आम्ही आजपर्यंत म्हणत आलों आहों. पण या फायद्याखेरीज उलट परदेशीय चळवळींचें व वातावरणाचें हिंदी लोकांस अधिक ज्ञान होऊन तदनुसार आपलें धोरण आंखण्याची बुद्धि होते हाहि एक या प्रचाराचा फायदा मद्रास येथें अनुभवास आला.

## क्रीड बदललें नाहीं

या ठरावास अनुकूल अशी तिसरी गोष्ट म्हणजे तो राष्ट्रीय सभेच्या घटनेंतील 'क्रीड' न बदलतां केवळ ठराव या स्वरूपानें पुढें आला ही होय. यापूर्वी तो 'क्रीड' बदलण्याच्या स्वरूपात पुढें येत होता. यामुळें खादीच्या नियमानें अगोदरच संकुचित झालेलें कॉंग्रेसचें क्षेत्र अधिकच संकुचित होण्याची भीति होती. पण पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं या ठरावानें 'क्रीड' बदलत नाहीं असा खुलासा केला. शिवाय 'हिंदुस्थानांतून ब्रिटिश सैन्य काढून न्यावें' अशा अर्थाचा या ठरावाचा दुसरा भाग मूळ मसुद्यांत होता, तो आजच्या परिस्थितींत व्यवहारातीत व म्हणून दिसण्यात हास्यास्पदहि होता. पण तोहि पं. जवाहरलाल यांनीं गाळून टाकला. तेव्हां अखेर 'पूर्ण स्वातंत्र्य हें हिंदुस्थानाचें ध्येय आहे असें राष्ट्रीय सभा जाहीर करते' येवढाच सुटसुटीत एकजिनसी ठराव शिल्लक राहिला. अशा तिहेरी अनुकूलतेनें हा ठराव पुढें आल्यामुळें त्याच्या विरोधकांचें फारसें चालले नाहीं व शेवटीं पं. मालवीय व डॉ. बेझंट यांनींहि ठरावास अनुकूलता दर्शविली. 'न्याय्य व शांतताप्रधान मार्गांनीं स्वराज्य मिळविणें' हें ब्रीद कायम ठेवून कॉंग्रेसनें 'हिंदुस्थानाचें ध्येय स्वातंत्र्य आहे' असें जाहीर केलें. याचा अर्थ हाच कीं, 'शक्य तर साम्राज्यांत व जरूर तर बाहेर' हा जुना 'स्वराज्य' शब्दाचा केलेला अर्थ कायम आहेच व तो अर्थ मान्य करून कॉंग्रेसमध्ये जितक्या लोकांना व पक्षांना येणें शक्य आहे तितक्यांना कॉंग्रेसचें द्वार खुलें आहे. मात्र स्वातंत्र्याचें ध्येय मान्य नसणाऱ्यांना यापुढें अल्पमतवादी म्हणूनच राष्ट्रीय सभेंत स्थान मिळेल. कारण कॉंग्रेसमधील बहुमत आज स्वातंत्र्यध्येयवादी बनलें आहे. सारांश, या ठरावानें कॉंग्रेसच्या पायाचें क्षेत्रफळ कमी न करतां कळस अधिक उंच चढविला गेला व तो बहुमताचे अधिष्ठानावर सुप्रतिष्ठित झाला.

अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत कॉंग्रेसचा मताधिकार व्यापक करा अशी सूचना केली होती. तिला अनुसरून खादी पोषाकाच्या अटींत बदल व्हावयास पाहिजे होता. पण ती गोष्टच कोणी काढली नाहीं. अशा रीतीनें कॉंग्रेसचें क्षेत्र अधिक व्यापक करण्याचें हें आवश्यक काम राहिलें तरी निदान 'स्वातंत्र्या'च्या ध्येयाचा अंतर्भाव क्रीडमध्यें न केल्यामुळें तें क्षेत्र अधिक संकुचित होण्याचें तरी टळलें. यापुढेंहि स्वातंत्र्यवादी पक्ष 'क्रीड' बदलण्याचा आग्रह न धरतां झालेल्या ठरावावरच संतुष्ट राहील अशी आम्हास आशा आहे. केवळ स्वातंत्र्यवाद्यांकरितां एकजिनसी अशी 'रिपब्लिकन कॉन्फरन्स' जवाहरलाल नेहरूंनीं कॉंग्रेसच्याच मंडपांत नंतर भरविली. त्यांत त्यांनीं हवें ते क्रीड ठेवावें व हवे ते ठराव करावेत. पण कॉंग्रेसमध्यें त्यांना मिळालेल्या स्थानांतच त्यांनीं संतुष्ट राहावें. कॉंग्रेसलाच 'रिपब्लिकन कॉन्फरन्स' बनविण्याचा प्रयत्न करूं नये. यांतच त्यांचें, राष्ट्रीय सभेचें व राष्ट्राचेंहि हित आहे. म. गांधींनीं प्रथम कॉंग्रेसलाच सूतसंघाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. पण पुढें त्यांची चूक त्यांना कळून येऊन त्यांनीं स्वतंत्र सूतसंघ काढला व सूतनिष्ठांना कॉंग्रेसमध्यें मानाचें स्थान मिळालें येवढ्यांतच समाधान मानलें. तसेंच स्वातंत्र्यवाद्यांनींहि आपलें धोरण ठेवावें.

## स्वातंत्र्यवादाचा थोडा इतिहास

१९०७-०८ सालीं म्हणजे २० वर्षांपूर्वी बाबू अरविंद घोस यांच्यासारख्या स्वातंत्र्यवाद्यांनाहि कॉंग्रेसमध्यें स्थान मिळालें पाहिजे असें लो. टिळक

प्रतिपादन करीत होते. आम्हालाहि जागा द्या असें वीस वर्षांपूर्वी म्हणणाऱ्या स्वातंत्र्यवाद्यांनीं आज काँग्रेसमध्यें मानाची जागा मिळविली! १९०८ ते १४ पर्यंत मवाळांच्या हातांतच काँग्रेस होती व १४ ते २० पर्यंत महायुद्धाच्या परिस्थितींत ध्येयवादाची चर्चा करण्यास सवड व अनुकूल वेळहि नव्हती.१९२०पासून असहकारितेनें निर्माण केलेल्या वातावरणांत स्वातंत्र्यवादानें पुनः डोकें वर काढलें व काँग्रेसचें ब्रीदच बदलण्याचा घाट घातला. पण असहकारितेचे अध्वर्यु महात्मा गांधी हेच त्याच्या विरुद्ध असल्यामुळें त्यांनीं त्यास वेळोवेळीं बाजूस सारलें.अखेरीस मद्रासला या स्वातंत्र्यवादाला योग्य स्वरूपांत काँग्रेसमध्यें स्थान देण्याचें पुण्य रॉयल कमिशनानें संपादून घेतलें !

'स्वातंत्र्य' कोणास नको आहे ? आज स्वातंत्र्य मिळविण्यास लागणारी साधनसामुग्री, सिद्धता व परिस्थितीहि नसली तरी त्या अंतिम ध्येयाची जाणीव परतंत्र राष्ट्राचे मनांत राहणारच. आणि तिचाच उच्चार काँग्रेसनें केला.१८९७ सालीं लोकमान्य टिळकांचा खटला चालविण्यासाठीं प्यू व गार्थ हे बॅरिस्टर कलकत्त्याहून मुद्दाम पाठविण्यांत आले होते. त्यांनीं टिळकांना विचारलें "तुमचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्याचें नसून केवळ स्वराज्याचेंच आहेना!" तेव्हां टिळकांनीं हंसून उत्तर दिलें " परतंत्र राष्ट्रांतील लोकांनीं स्वातंत्र्याची इच्छा बाळगणे हा कांहीं गुन्हा नाहीं. स्वराज्य हें माझें आजचें साध्य आहे. याचें कारण पूर्ण स्वातंत्र्य हें आजच्या व्यावहारिक राजकारणाच्या मर्यादेपलीकडे आहे हेच होय. " काँग्रेसनें स्वातंत्र्याचा ठराव केल्यावर टाईम्सकारासारखे लोक विचारतात कीं, तुमचें सैन्य कोठें आहे, आरमार कोठें आहे, वैमानिक दल कोठें आहे? पण सरकार पक्षाकडील हा प्रश्न नेहमींचाच आहे. कारण असेंब्लीमध्यें स्वराज्याची मागणी केली त्या वेळींहि तुमची संरक्षणाची तयारी कोठें आहे हाच प्रश्न सरकारतर्फे विचारण्यांत आला होता ! ही तयारी नाहीं म्हणून जर डोमीनियन स्टेटस किंवा वसाहतींसारखें स्वराज्य याबद्दलचें ठराव करण्याचें कोणी सोडीत नाहीं तर मग स्वातंत्र्याचा ठराव करण्याचें तरी तेवढ्यासाठीं कां सोडावें ?

## डोमीनियन स्टेटस व स्वातंत्र्य

शिवाय डोमीनियन स्टेटस व स्वातंत्र्य यांच्यामध्यें फरक तरी कितीसा आहे ? वाटेल तर साम्राज्याच्या बाहेर जाण्याचाहि अधिकार डोमीनियन स्टेटसमध्यें येतो असें ना. शास्त्रीच एकदा म्हणाले होते. डोमीनियन स्टेटस मिळाल्यावर हिंदुस्थानाला जरी साम्राज्यांत राहावेंसें वाटलें तरी साम्राज्याला हिंदुस्थानाची काय जरूरी राहाणार ? इंग्लंड व वसाहती यांना एकत्र निगडित करणारे धर्म, भाषा, वंश व परंपरा यांचे बंध पक्के आहेत.तशी हिंदुस्थानाची गोष्ट नाहीं.हिंदुस्थान फक्त इंग्लंडच्या आर्थिक फायद्याकरितां साम्राज्यास जोडला गेला आहे.हिंदुस्थानाला खरें डोमीनियन स्टेटस मिळाल्यावर हा आर्थिक फायदा लवकरच संपुष्टांत येईल. मग हिंदुस्थानानें जरी साम्राज्याला जाऊन चिकटूं म्हटलें तरी साम्राज्यच हिंदुस्थानाला दूर लोटील. वेदांतामध्यें पहिल्या क्षणीं अज्ञाननिवृत्ति व दुसऱ्या क्षणीं ज्ञानप्राप्ति असा क्रम मानतात. तशाच तऱ्हेचा क्रम खरें पूर्ण डोमीनियन स्टेटस व स्वातंत्र्य यांचा आहे.शिवाय आज डोमीनियन स्टेटस हवें म्हणणाऱ्याला तरी कोठें सरकारनें व्यवहार्यतेचें सर्टिफिकेट बहाल केलें आहे ? वाघ म्हटलें खातो व वाघोबा म्हटलें तरी खातोच; मग जें म्हणावयाचें तें कां न म्हणा.शिवाय डोमीनियन स्टेटस हवें म्हटलें म्हणजे 'तुमच्या साम्राज्याला आम्ही कांहीं तरी किंमत देतों. आम्हाला या साम्राज्यांत सलोख्यानें व स्वतंत्रपणें नांदण्याची शक्यता आहे' असें म्हटल्यासारखें होतें. पण येवढी तरी मळमळ कशाला ? हिंदुस्थानातील जनतेच्या मनांत साम्राज्यासंबंधीं आदरभाव लवलेशहि शिल्लक राहिलेला नाहीं. साम्राज्य म्हणजे संभावित व संघटित लुटीचा व्यवसाय आहे. हिंदुस्थान आज असहाय स्थितींत जबरदस्तीनें साम्राज्याच्या रथाच्या चाकाला बांधून फरपटत ओढलें जात असले तरी तें मिळणाऱ्या पहिल्या संधीचा फायदा घेऊन त्यापासून मोकळें होईल. हाच काँग्रेसच्या स्वातंत्र्याच्या ठरावाचा अर्थ आहे. आणि बर्केनहेडच्या उद्धट साम्राज्यमदाला आजच्या स्थितींत हिंदुस्थानाला येवढेंच शाब्दिक उत्तर देणें शक्य आहे. तें त्यानें कां देऊं नये ?

## ठरावाचा एक विपरीत अर्थ

पण या स्वातंत्र्याच्या ठरावाचा खरा अर्थ सोडून त्याबद्दल दोनहि बाजूंनीं गैरसमज होण्यासारखे आहेत.आणि ते दोनहि काँग्रेसमध्येंच व्यक्त झाले. स्वातंत्र्याचा ठराव केल्यावर आजच्या परिस्थितींत करण्याचें व्यावहारिक राजकारण सोडलें पाहिजे हा एक गैरसमज होय. काँग्रेसमध्ये सर्वपक्षीय कन्व्हेन्शन भरवून स्वराज्ययोजना करण्याचा ठराव आला असतां एका गृहस्थानें त्याला विरोध करून सांगितलें कीं, "अहो, आतांच स्वातंत्र्याचा ठराव केला आहना! मग हा स्वराज्ययोजनेचा ठराव कशाला करतां ? त्याची आतां जरूरच राहिली नाहीं." पण स्वातंत्र्याच्या ठरावाचा हा विपरीत अर्थ काँग्रेसला मान्य झाला नाहीं. स्वातंत्र्याचा ठराव करूनहि काँग्रेसनें स्वराज्ययोजना करण्याची व्यवस्था

केली, सरकारच्या योजना हाणून पाडण्याकरितां कौन्सिलांतूनहि जाण्यास सांगितलें व सरकारच्या निषेधपरहि ठराव मंजूर केले. सारांश, कॉंग्रेसच्या मतें आजच्या व्यवहाराच्या मर्यादा ओळखून त्याप्रमाणें वागत असतांहि अंतिम परमोच्च ध्येयाची जाणीव ठेवतां येते. डोमीनियन स्टेटसचें ध्येय ठेवूनहि जर 'आज प्रांतिक स्वायत्तता द्या व मध्यवर्ती कारभारांतील कांहीं खातीं तोडून द्या. कौन्सिल ऑफ स्टेट नाहींसें करा ' असें म्हणतां येतें, मग स्वातंत्र्याचें ध्येय ठेवूनहि तसें कां म्हणता येऊ नये? स्वातंत्र्याच्या ठरावाचा उपयोग आजच्या स्थितींत फक्त मानसिकच मानला पाहिजे. अंतिम ध्येयाची जाणीव व उच्चार येवढाच आज त्या ठरावाचा अर्थ आहे. आजपर्यंत तो उच्चार सामुदायिक रीत्या करण्यांइतकीहि राष्ट्राची मनःस्थिति नव्हती. ती सायमन कमिशनानें व बर्कनहेडच्या उद्दामपणामुळे निर्माण झाली व तीच कॉंग्रेसमध्यें ठरावरूपानें प्रकट झाली.

## मरण्याचा बाष्कळ वेदान्त

दुसरा गैरसमज महंमद अल्लीचा. ते म्हणाले, 'आम्हाला सैन्य नको, आरमार नको, वैमानिक दल नको, कांहीं नको! पुष्कळसे लोक तोफांच्या पुढें व विमानांतील बॉंबगोळ्यांच्या खालीं मरावयास सिद्ध झाले कीं पुरें.' अशा रीतीनें मरावयास तयार होणाऱ्यांची संख्या जितकी अधिक मोठी तितका स्वातंत्र्याचा लाभ अधिक लवकर होणार असें त्यांनीं आंकडेवार प्रमाणहि बसवून टाकलें! रणांत प्रतिकार न करतां मी मेलों तर माझें पारमार्थिक कल्याण होईल येथपर्यंतच धर्मसंमूढ व अप्रतिकाराची लहर आलेल्या अर्जुनाचे विचार गेले होते. पण आजच्या अप्रतिकारवाद्यांनीं याच्याहि पलीकडचा शोध लावलेला दिसतो. कारण त्यांच्या मतें प्रतिकार न करतां मेल्यानें केवळ पारमार्थिक कल्याणच नव्हे तर जयहि मिळतो ! पण केवळ अप्रतिकार स्थितींत शांतपणें मरण्याने 'श्रीमत्स्वातंत्र्याचा ठेवा' मिळतो, असा जगाचा अनुभव नाहीं. तेव्हां या अभिनव सिद्धान्ताचा प्रयोग प्रथमतः बिचाऱ्या हिंदुस्थानावर नको. केवळ निमूटपणें मरण्याची तयारी करण्यासाठींच जर स्वातंत्र्य–ध्येयाची घोषणा असेल तर ती हानिकारकच ठरेल. सारांश, अंतिम साध्याच्या जाणिवेबरोबरच अंतिम साधनांचीहि जाणीव होत नसेल तर त्या अंतिम साध्याच्या उच्चाराचा किंवा जाणिवेचाहि कांहींच उपयोग नाहीं.

१९०८ सालीं 'केसरी' मध्यें 'राजकीय पक्षोपन्यास' या मथळ्याखालीं आलेल्या अग्रलेखांत, इंग्रजी राज्याचे पुरस्कर्ते, दोषदर्शक, स्वराज्यवादी व स्वातंत्र्यवादी असे पक्ष मांडून त्याच्याहि पलीकडला एक प्रत्यक्ष स्वातंत्र्यकारी पक्ष कल्पिला आहे. व त्यासंबंधीं असें म्हटलें आहे कीं "या वर्गांतील लोकांची संख्या सध्याच्या स्थितींत सांपडणें कठीण आहे. तथापि विवेचनाच्या परिपूर्तीसाठीं त्याची आम्ही शेवटीं परिगणना केली आहे." ( लो. टि. केसरींतील लेख भाग ३ पृ. २४४.) आजाहि हीच परिस्थिति कायम असली तरी त्या वेळेप्रमाणें आतांहि स्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानाच्या वेदांतांतील अंतिम भूमिका स्वातंत्र्यवादी पक्षाची नसून स्वातंत्र्यकारी पक्षाची आहे हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. स्वातंत्र्यवादी जे बोलतो तें स्वातंत्र्यकारी करून दाखवितो. या स्वातंत्र्यकाऱ्याचीं जीं साधनें तींच अंतिम साधनें असून जगांतील स्वातंत्र्याच्या इतिहासांत तीं स्पष्ट व नियमानें आढळून येतात.

## अंतिम साध्य व अंतिम साधनें

अंतिम साध्य हें जितकें आजच्या व्यवहाराच्या दृष्टीच्या टप्प्यापलीकडे तितकींच हीं साधनेंहि पलीकडेच आहेत. पण एकाची स्मृति झाल्याबरोबर दुसऱ्याची स्मृति अपरिहार्यपणें होते हें टाईम्सकाराच्या " तुमचें सैन्य–आरमार कोठें आहे" या प्रश्नावरूनच दिसून येतें. आजचीं साधनें निराळीं आहेत खरीं.पण अंतिम साध्याबरोबर अंतिम साधनांची जाणीव राहिल्यानें आजच्या साधनांत 'नित्यानित्यविवेक' जागृत राहतो व फाजील साधननिष्ठा उत्पन्न होत नाहीं. कितीहि दूरचा भविष्यकाल घेतला तरी त्याचे कांहीं व्यक्त–अव्यक्त धागेदोरे वर्तमान कालाला येऊन भिडलेले असतात. अगदीं अंतिमांतल्या अंतिम साध्य–साधनांचे सूक्ष्म धागेधोरे आजच्या व्यवहारांतहि पाहिले असतां दिसतीलच. ते न ओळखतां महंमद अल्लीप्रमाणें अविवेकीपणानेंच केवळ या दूरच्या ध्येयाचा उच्चार कॉंग्रेसमध्यें केला गेला असेल तर त्याचा कांहींच उपयोग नाहीं. या लेखाच्या अग्रभागीं जें लोकमान्यांचें वचन दिलें आहे त्यांत त्यांनीं स्वातंत्र्याच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा वेदांतोपदेश राष्ट्राला करणें जरूर आहे असें म्हटलें आहे. पण या वेदांतानें जर नित्यानित्यविवेक उत्पन्न होत नसेल तर त्याचा काय उपयोग ? पण महंमद अल्ली कांहीं म्हणाले तरी परदेशांतून फिरून आलेले जवाहरलाल नेहरू यांना हा विवेक असेल. तो या ठरावानें राष्ट्रांत उत्पन्न झाला तरच त्याचा फायदा आहे. तो कांहीं प्रमाणांत तरी होईल अशी आशा असल्यामुळेंच हा ठराव आणून, ता व्यवहाराच्या सांच्यांत बसवून, कॉंग्रेसकडून मंजूर करून घेतल्याबद्दल पंडित जवाहरलाल नेहरू यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों.

# बहिष्कार जाणवूं लागला

सरकार पक्षाची तरफदारी करण्याचें मुंबईच्या टाईम्सकारांचें धोरण ठराविक व सर्वश्रुत आहेच. या धोरणानुसार गेल्या कांहीं दिवसांत सायमन कमिशनचा पाठपुरावा करण्याची त्यांनीं शिकस्त केली. बहिष्काराची उसळलेली लाट परतवावी किंवा निदान तिचा जोर तरी कमी करावा यासाठीं त्यांनी नाहीं नाहीं ते उपद्याप करून पाहिले. बहिष्कार घालणाऱ्यांची थट्टा केली, राज्यघटना तयार करणाऱ्यांविरुद्ध कुचेष्टेखोर लेख व कविता छापल्या, अल्पसंख्य व मागसलेल्या वर्गांना बहिष्काराविरुद्ध उठावणी दिली आणि बहिष्काराविरुद्ध लहानशी बातमी सांपडल्याबरोबर ती फुगवून सांगितली; पण व्यर्थ. गेल्या नाताळांत ज्या परिषदा झाल्या त्यावरून त्यांच्या प्रयत्नाचा कांहीच परिणाम झाला नाहीं, असें त्यांस दिसून आलें. नाताळांतील बहुतेक महत्त्वाच्या परिषदांतून बहिष्काराचे ठराव मंजूर झाले. कॉंग्रेसमध्यें एकमतानें बहिष्कार मंजूर झाला. मुसलमानांमधील फुटीची टाईम्सकारांसारख्या सरकार पक्षीयांना मोठी आशा होती; पण कलकत्त्यास जें मुस्लीम लीगचें अधिवेशन झालें त्यांत बहुतेक प्रमुख व प्रतिष्ठित मुसलमान सामील होऊन त्यांनी बहिष्काराचा ठराव केला. या अधिवेशनापुढें लाहोरची फुटून निघालेली लीगची बैठक अगदींच फिकी पडली. तिला कोणीहि वजनदार मुसलमान पुढारी गेला नाहीं, प्रत्यक्ष त्या बैठकींतून खिलाफतवाले उठून गेले व पुढें अ. भा. मुस्लीम लीगनें पंजाबच्या या शाखेचा संबंधहि तोडून टाकला! अशा रीतीनें पंजाबच्या बैठकीचा विचका झाल्यामुळें त्यांचा सहकारितेचा ठराव पुढें करण्यांतहि स्वारस्य राहिलें नाहीं.

अखिल-भारतीय ख्रिश्चन परिषदेलाहि कमिशनची घटना पसंत नसून देशांतील पुढारी एकमतानें ठरवितील त्या मार्गानें जाण्याची तयारी याहि परिषदेनें दर्शविली आहे. हिंदुमहासभेनेंहि बहिष्कारच पुकारला. नेहमीचा भरंवशाचा प्रागतिक किंवा मवाळ पक्ष, पण त्या पक्षाच्या परिषदेंतहि, भिन्न कारणांनीं का असेना, बहिष्कारच जाहीर झाला! व्यापारी लोक हिशेबी, पण त्यांच्या परिषदेनेंहि तेच धोरण स्वीकारलें. तेव्हां कोठें कांहीं अस्पृश्य, कांहीं महाराष्ट्रांतले ब्राह्मणेतर तर कांहीं असंतुष्ट मुसलमान अशा तुकड्यांची एक कंथा तयार करून तिच्या योगानें टाईम्सकारांनीं सहकारितेचें रूप सजविलें तरी तें कितीसें सजवणार? शिवाय या अल्पसंख्य किंवा असंतुष्ट लोकांच्या परिषदांनीं तरी कमिशनला कोठें चांगुलपणाचें प्रशंसापत्र दिलें आहे? आपल्या विशिष्ट ज्ञातीच्या हितासाठीं म्हणून आहे या स्वरूपांत किंवा कोणत्याहि स्वरूपांत कमिशनपुढें आपली बाजू मांडलीच पाहिजे एवढेंच त्यांचें म्हणणें आहे. संपूर्ण हुजूर पक्षीय किंवा ओडवायर-सिडनहॅम इ. हिंदविद्वेषी कंपूचेंहि कमिशन नेमलें गेलें असतें तरीहि त्यांची ही सहकारिता कायमच राहिली असती. कारण त्यांच्या राजकारणाचें धोरण अजून सहकारितेच्या पलीकडे कधींच गेलेलें नाहीं. पण असल्या लोकांच्या सहकारितेंतून कितीहि ओढाताण केली तरी, कमिशन चांगलें आहे किंवा बर्कनेहेडनीं पार्लमेंटांत कमिशनची तरफदारी करतांना पुढें केलेली विचारसरणी योग्य आहे, असा अर्थ मुळींच निघूं शकत नाहीं. सारांश, नाताळांतील परिषदांनंतर टाईम्सकारांना आपली भेदनीति सफळ होत नाहीं असें स्पष्ट दिसून आलें. पण एक धोरण फसलें म्हणून हताश न होतां गेल्या ता. २ च्या अंकांत त्यांनीं एकदम तोंड फिरवून निराळेंच बोलणें सुरू केलें आहे.

इतके दिवस टाईम्सकार म्हणत कीं, कमिशनची घटना ही एक सिद्ध गोष्ट मानली पाहिजे. आहे यापेक्षां ती अधिक चांगली कदाचित् करतां आली असती, पण झाली गोष्ट होऊन गेली; आतां ती बदलणार कशी? यास्तव त्यांच्या मतें समंजस म्हणून गणल्या गेलेल्या लोकांना त्यांचा पोक्तपणाचा सल्ला किंवा उपदेश असा होता कीं, 'कमिशनच्या घटनेंत बदल व्हावा याबद्दल आतां प्रयत्न करणें वेडेपणाचें आहे. झालें तें झालें. आता 'स्थितस्य गतिश्चिंतनीया' या न्यायानें त्यापासून चांगलें निष्पन्न व्हावें या दृष्टीनें तुम्ही खटपट सुरू करा!' ब्रिटिश सरकारच्या तोंडून निघालेला शब्द म्हणजे टाईम्सकारांच्या मतें जणुं काय वेदवाक्य किंवा दगडावरची रेघ; ती फिरविण्याची वेडी आशा हिंदी लोकांनी—विशेषतः त्यांतील समंजस म्हणून नाणावलेल्या मवाळ लोकांनीं—करूं नये. पण कमिशनविरुद्ध बहिष्काराच्या चळवळीस अपेक्षेबाहेर जोर चढून तो सर्व देशव्यापी बनण्याचीं चिन्हें पाहून टाईम्सकारांनीं ही भाषा बदलली आणि मोठा संभावितपणाचा आव आणून आतां टाईम्सकार म्हणतात कीं, गेल्या पंधरवड्यांत घडलेल्या गोष्टींचा विचार करतां सरकार पक्षाच्या पुढें दोन मार्ग दिसतात. एक मार्ग म्हणजे झालें तें झालें असें म्हणून तसेंच पुढें दडपीत जाण्याचा व दुसरा मार्ग म्हणजे पुनः एकदां गंभीरपणें झालेल्या गोष्टींचा विचार करून कांहीं नवा मार्ग निघतो कीं काय हें पाहाण्याचा. यापैकीं पहिला, आजपर्यंत स्वतः समर्थन केलेला मार्ग, आतां त्याज्य ठरवून आपल्या

घोरणांतील नवा फांसा टाइम्सकारांनीं बातबेतानें पुढें टाकला आहे. पार्लमेंटला अधिकार असला तरी एकंदरीनें कमिशन नेमण्याची पद्धति व त्याची घटना बनवण्याची तऱ्हा हीं काहीं मोठीशीं समर्थनीय अशीं नाहींत; आणि सायमन हे जरी इंग्लंडांत प्रसिद्ध असले तरी बाकीची कमिशनवरील माणसें अगदींच अप्रसिद्ध व कनिष्ठ दर्जाचीं नेमलीं गेलीं! अशा प्रकारें झालेली चूक अर्धवट कबूल करून टाईम्सकार म्हणतात, "ते कसेंहि असले तरी सर शिवस्वामी अय्यर अगर सर चिमणलाल सेटलवाड यांच्यासारख्या विचारी व वजनदार लोकांच्या मनांत विश्वास उत्पन्न होईल अशा तऱ्हेची कमिशनची घटना ज्याअर्थी नाहीं त्याअर्थी सरकारनें त्यांच्याशीं कांहीतरी तडजोड करण्याचा मार्ग शोधून काढला पाहिजे." हें म्हणताना टाईम्सकारांनीं मवाळांची खूप स्तुति केली आहे व ती उठून दिसावी यासाठीं लेखाचे प्रारंभीच त्यांनीं कॉंग्रेसला अडाणी ठरवून तिची निंदा व कुचेष्टाहि करून ठेवली आहे. हें विवेचन करून टाइम्सकारांनी असें सुचविलें आहे कीं, सर जॉन सायमन यांनीं येत्या हिंवाळ्यांत एकटेच हिंदुस्थानांत यावें, येथील परिस्थिति पाहावी आणि ती प्रत्यक्ष पाहून व अनुभवून हिंदुस्थानाच्या राज्यघटनेची चौकशी करण्याचा उत्तम मार्ग पार्लमेंटला सुचवावा आणि व्हाइसरायांनींहि आपलें वजन खर्च करून ती गोष्ट घडवून आणावी. आहे याच स्थितींत कमिशन येऊन गेल्यास त्याच्यापुढें कोणी तरी साक्षीदार साक्ष देण्यास जातील, पण कमिशनचा हिंदुस्थानांतील पहिलाच दौरा निषेध, हरताळ व धिःकार यांनीं गजबजून जाईल व कमिशनच्या निर्णयाला परिणामकारक अशा लोकमताचा पाठिंबा मुळींच मिळणार नाहीं अशीहि टाईम्सकारांनीं भीति प्रदर्शित केली आहे.

एकीकडे सर जॉन सायमन व व्हाइसरॉय यांस याप्रमाणें सूचना करून दुसरीकडे मवाळांनाहि त्यानीं जातांजातां पुनः सामोपचाराचा उपदेश केलाच आहे. त्यांतील सूचना सूक्ष्म असल्या तरी त्यांतील ध्वनि चाणाक्ष वाचकांना सहज कळण्याजोगा आहे. टाईम्सकारांचा व्यंग्यार्थ असा कीं, "मवाळांनीं तडजोडीचें द्वार उघडें ठेवलें, हें फार चांगलें केलें; पण ते निश्चित स्वरूपाच्या सूचना कां मांडीत नाहींत? या बाबतींत कायदेमंडळांचें राज्यघटनेच्या दृष्टीनें महत्त्व असलें तरी मवाळ लोकांचे पुढारी आज कायदेकौन्सिलांत नाहीत, ही त्यांची अवघड अडचण आम्ही जाणतों. कायदेमंडळाच्या कमिट्यांना समान अधिकार देऊन मवाळांची सोय होण्यासारखी नाहीं हें खरें. पण या कमिट्या कायदेमंडळांतूनच नेमाव्या असें कोणी सांगितलें आहे? दुर्दैवानें कायदेमंडळांच्या बाहेर राहिलेल्या समंजस लोकांचीहि कमिटी कमिशनला नेमतां येईल. कमिशनवरच हिंदी सभासद नेमण्याचा आग्रह धरण्याची जरूर नाहीं. म्हणून मवाळांनीं ब्रिटिश पार्लमेंटचा अधिकार व त्याचें प्रतिनिधिभूत म्हणून पार्लमेंटरी कमिशन यांची आवश्यकता मान्य करावी. फक्त त्याचें काम हिंदुस्थानांत करण्यासाठीं तशाच धर्तीचें एखादें मंडळ (कॉरेस्पॉंडिंग बोर्ड) कसें नेमावें व त्याचा दर्जा व कार्य कोणत्या स्वरूपाचें असावें या प्रश्नावरच त्यांनीं जोर द्यावा." कायदे-मंडळांनीं निवडलेल्या कमिटयांना समान अधिकार देण्यापेक्षां कमिशनवरील हिंदी सभासदांच्या नेमणुकीला मवाळ इतकें अधिक महत्त्व कां देतात याचें मर्म टाईम्सकारांच्या मतें वरीलप्रमाणें आहे! कसेंहि करून मवाळांची सहकारिता लाभली म्हणजे बाकीच्यांची टाईम्सकारांना पर्वा नाहीं. कारण असहकारितेच्या पहिल्या तीन वर्षांत त्यांच्याच जिवावर नाहीं का सरकारनें कौन्सिलें चालविलीं? मग कमिशनचें वर्षसहामहिन्यांचें काम रेटावयास कोणती अडचण? पण सायमनसाहेबांनीं येथें येऊन त्यांनीं परिस्थितीची पाहणी केल्यावर, त्यांनाहि मवाळ इतक्या अनुभवानतर टाईम्सकारांच्या अपेक्षेइतके लवचीक आढळतील असें आम्हांस वाटत नाहीं.

खरोखरच सायमनसाहेब परिस्थिति पाहाण्यास येथें आले तर त्यांना, आहे या स्थितींत, कमिशनशीं कोणीहि सहकारिता करण्यास तयार नाहीं हें स्पष्ट दिसेल; पण तडजोडीचा प्रश्न काढला व बहिष्काराचें हेतुसंशोधन केलें तर त्यांना निरनिराळ्या भूमिका दिसतील व कोठपर्यंत तडजोड करून काम भागेल हें ठरवावें लागेल. कॉंग्रेस ही मोघम 'स्वयंनिर्णय' म्हणून बोलून बसली आहे. खरा स्वयंनिर्णय म्हणजे हिंदुस्थानांतील सर्व पक्षांनीं मिळून योजना करावी व पार्लमेंटनें यत्किंचितहि फरक न करतां ती मान्य करावी. त्याच्या खालोखाल म्हणजे अध्यक्ष डा. अन्सारी यांनीं आपल्या भाषणांत सुचविलेली राउंड टेबल कॉन्फरन्स; म्हणजे सरकारचे अर्धे व लोकांचे अर्धे प्रतिनिधी यांनीं एकत्र बसून एकविचारानें निर्णय करणें. यांत स्वयंनिर्णय असला तरी तो अर्धामुर्धा आहे, संपूर्ण नाहीं. याशिवाय अंशतः स्वयंनिर्णय साधण्यासारखे अनेक पर्याय सांगतां येतात. उदाहरणार्थ, लोकनियुक्त म्हणजे निरनिराळ्या राजकीय पक्षाच्या सभा यांचे निवडलेले प्रतिनिधी अगर कायदेमंडळानें निवडलेले लोकनियुक्त प्रतिनिधी कमिशनवर घेणें, किंवा निरनिराळ्या पक्ष-

संस्थांनीं किंवा कायदेमंडळांनीं निवडलेल्या प्रतिनिधींच्या कमिटीला प्रारंभापासून, अखेर स्वतंत्र रिपोर्ट पार्लमेंटरी कमिटीपुढे मांडण्यापर्यंत, अधिकार देणें इ. कमिशन नेमलें गेल्यावर आजच्या स्थितीत कमिशनला घालण्यासारखी व ज्यांत स्वयंनिर्णयाला कांहीं तरी जागा आहे अशी अट घालावयाची तर ती हा शेवटीं सांगितलेला स्वयंनिर्णयाचा प्रकार स्वीकारून घालतां येते. बाकीचे स्वयंनिर्णयाचे प्रकार पाहिले तर कमिशनच रद्द केल्याशिवाय ते साधत नाहींत.

प्रतिसहकार पक्षाच्या पुढाऱ्यांनीं प्रथम जो बहिष्काराचा जाहिरनामा काढला त्यांत व पुढें महाराष्ट्र प्रांतिक-काँग्रेस कमिटी व सार्वजनिक सभा यांतून या जाहिरनाम्यास अनुसरून जे बहिष्काराचे ठराव केले त्यांत हाच स्वयंनिर्णयाचा पर्याय स्वीकारला होता. प्रतिसहकार पक्ष मुख्यतः कौन्सिलांसंबधींच्या विशिष्ट धोरणानें स्थापन झाला असल्यामुळें कौन्सिलांचा व कमिशनचा ज्या बाबतींत संबंध येतो त्यांत स्वयंनिर्णयाचे दृष्टीनें कोणत्या अटी घालण्यासारख्या होत्या याचें दिग्दर्शन त्यानें केलें. कायदेमंडळाच्या कमिटीला आमूलाग्र व सार्यंत समान दर्जा व अधिकार देणें हें सायमनसाहेबांच्या हातांत किती आहे याची शंकाच आहे. ते करावयाचें म्हटल्यास त्यांना कदाचित् पुनः पार्लमेंटकडेहि विचारणा करावी लागेल, हें खरें. पण त्यांच्या तोंडून याबद्दलचा स्पष्ट खुलासा वदविण्याचा व बहिष्काराची जबाबदारी केवळ पार्लमेंटवरच न ठेवतां प्रत्यक्ष कमिशनच्याहि गळयात अडकविण्याचा प्रतिसहकार पक्षाच्या सूचनेंतील मुख्य हेतु होता. परंतु कायदेमंडळासंबंधीं बाहेरून काहीं ठराव करणें हें केव्हांहि सूचनेच्या स्वरूपाचें व कायदेमंडळांतील बहुमतावर अवलंबून असल्यामुळें अनिश्चितच असतें, आणि असेंब्लींतील काँग्रेस पक्ष व जीना आणि मालवीय यांच्या अनुयायांचा स्वतंत्र पक्ष यांना ही सूचना मान्य होण्याचा संभव नाहीं हें काँग्रेसच्या व मुस्लीम लीगच्या निर्णयावरून उघड झालें. अशा स्थितींत प्रतिसहकार पक्षानें काँग्रेसमध्यें झालेल्या बहिष्कार-निर्णयास विरोध न दर्शविणे हें साहजिकच आहे.

वर जे स्वयंनिर्णयाचे पर्याय दिले आहेत त्यांत कमिशनवर हिंदी लोक सरकारनें नेमणें याचा अंतर्भाव आम्ही केला नाहीं; कारण ती स्वयंनिर्णयाची अटच नव्हे. ती पराधीन 'स्व' निर्णयाची अट होय. हिंदी लोक नेमावयाचे ते 'प्रातिनिधिक' ( रिप्रेझेंटेटिव्ह ) असावेत अशी मवाळांनीं सूचना केली आहे हें खरें. पण प्रातिनिधि म्हणूनच सरकार कोणत्या प्रकारच्या नेमणुका करतें हें सर्वश्रुत आहे. व्यक्तिशः कितीहि चांगले असे लोक सरकारनें नेमले तरी निवडणुकींत जो स्वयंनिर्णयाचा अंश येतो तो नेमणुकींत मुळींच नाहीं. नेमणुकीवर मवाळ संतुष्ट आहेत असें पाहून टाईम्सकारांनी त्यांना त्यांची मागणी आणखीहि एक पायरी खालीं आणण्यास सुचविलें आहे; नेमणूक स्वीकारावयाची तर मग ती कमित्यांवर स्वीकारा व कमिटीच्या अधिकारासंबंधीं चर्चा करा असें त्यांचें म्हणणें. पण मवाळांनीं तडजोडीचें द्वार कितीहि उघडें ठेवलें असलें तरी असल्या तडजोडीला ते खास तयार होणार नाहींत. आम्ही तर त्यांस असेंहि सुचवितों कीं, त्यांनीं प्रातिनिधिक शब्दाचा अर्थ स्पष्ट करून त्यांत नेमणुकीच्या ऐवजीं निवडणुकीचें तत्त्व घालावें. कमिशनवर हिंदी प्रतिनिधी नेमण्याचा आग्रह धरण्याचें कारण अशीं कमिशनें दर दहा वर्षांनीं यावयाचीं आहेत, तेव्हां आज हिंदी प्रतिनिधी कमिशनवर न घेण्याची रूढी मान्य केल्यास ती एक अलिखित कायदाच होऊन बसेल व पुढें प्रत्येक वेळी ती नडेल असें मवाळांनीं आपल्या जाहिरनाम्यांत प्रसिद्ध केलें आहे व तें सयुक्तिक आहे. पण नेमणुकीचा पायंडा तरी त्यांनी कां मान्य करावा ? तोहि पुढें नडणार नाहीं काय? तेव्हां कमिशनवर जे हिंदी लोक पाहिजेत ते नेमलेले पाहिजेत असें न म्हणतां निवडलेले पाहिजेत असेंच त्यांनी कां म्हणूं नये? आणि असें म्हटल्यावर कायदेमंडळाला कांहीं प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार त्यांना मागावाच लागेल आणि मग स्वतःचा पक्ष कायदेमंडळांत नाहीं म्हणून प्रागतिक त्याकडे दुर्लक्ष करतात असा टाईम्सकारांचा व इतरांचा त्यांच्यावरील आरोपहि वृथा ठरेल.

पण या निरनिराळया पर्यायांचा आजच्या परिस्थितीत अधिक विचार करण्याचें कारण नाहीं. सरकार किंवा सायमन हे खरोखरच जर तडजोड करावयास निघतील तर त्याचा विचार करतां येईल. आतांच आपल्या हातांतील सर्व पत्ते टेबलावर मांडून आपला डाव उघडा करण्याची वेळ नाहीं. सरकार तडजोडीस तयार होईपर्यंत बहिष्काराची चळवळ एकमुखी व निश्चित करण्याच्या मार्गासच सर्वांनीं लागलें पाहिजे. टाईम्सकारांच्या लेखाचा जो आम्हीं थोडा विस्तृत ऊहापोह केला तो या संयुक्त बहिष्काराचे परिणाम आजच प्रतिपक्षाला थोडेबहुत जाणवूं लागल्याचें एक गमक म्हणूनच होय. टाईम्सकारांचा एक कान सरकारी अंतस्थ तारायंत्राला सदैव लागलेला असल्यामुळें त्यांतील सूक्ष्म ध्वनि त्यांना ऐकूं येत असतात, व त्याचेच पडसाद त्यांच्या लिखाणांतून उमटतात असा अनुभव आहे. त्यांच्या धोरणांत जी पालट झाली ती या आंतल्या तारायंत्रावर

बहिष्काराच्या चळवळीचे आघात उमटूं लागल्यामुळेंच झाली असावी असें अनुमान करावयास हरकत नाहीं व त्यावरून प्रत्यक्ष कमिशन आलें नसतानांहि बहिष्काराची चळवळ आजपासूनच करणें किती अवश्य आहे हें उघड होतें. एवढ्याशा सूक्ष्म परिणामानें कोणी हुरळून जाणें वेडेपणाचें ठरेल. पण असहकारितेच्या स्वरूपतः निष्फळ झालेल्या चळवळीमुळें कांहीं लोकांचें मन चळवळीविषयीं बिचकणारें झालें आहे व ' याचा प्रत्यक्ष परिणाम काय ?' असें पदोपदीं प्रत्येक चळवळीच्या वेळीं विचारण्याची प्रवृत्ति वाढली आहे; ती अगदींच गैर आहे असें नाहीं. प्रत्येक चळवळीचे परिणाम दाखवीत दाखवीतच मनुष्यस्वभाव ओळखणारे कुशल पुढारी ती चढवीत असतात. ज्या चळवळींत अखंड निरर्थकता व अखंड पराजय चालू असतो तींत लोकांचा दम उखडतो. या बाबतींतले पूर्वीचे अनुभव लक्षांत घेऊन सरकारच्या पुढ्यांतल्या टाइम्सकारांचे मतपरिवर्तन हा बहिष्काराचा अगदीं सूक्ष्म असाच परिणाम असला तरी तो आम्ही लोकांचे नजरेस आणीत आहोंत. बहिष्काराच्या पाचरीचें टोंक सरकारपक्षाला सलूं लागलें आहे याचें हें निदर्शक आहे आणि यासाठींच एकमुखी व जोराच्या बहिष्काराच्या चळवळीचा घाव या पाचरीच्या दुसऱ्या बाजूला मारून ती जितकी आंत शिरकेल तितकी शिरकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. गेल्या नाताळांत काँग्रेसपासून प्रागतिक परिषदेपर्यंतच्या देशांतील सर्व मोठ्या प्रातिनिधिक संस्थांचा या चळवळीला पाठिंबा मिळाला आहे. अशा तऱ्हेची एकवाक्यता पूर्वी कधीहि लाभली नव्हती. असहकाराचे युगांतहि ती नव्हती. असहकारितेचा पूर ओसरल्यावर राष्ट्रांत जे लहानमोठे वाद माजले ते या चळवळीचे बाबतींत तरी पुढें आणण्याचें कांहींच कारण नाहीं. पूर्वीचें युग संपून सायमन कमिशनमुळें निराळेंच युग सुरू झालें आहे. काँग्रेसचे अध्यक्ष डॉ. अन्सारी यांनीं सांगितल्याप्रमाणें यावेळीं जुन्या अनुभवाचा फायदा घेऊन नवीन चळवळीचें धोरण आंखलें पाहिजे. कमिशन प्रत्यक्ष येथें आल्यावर जी चळवळ होणार ती एकमुखी होण्याचें पहिलें साधन म्हणजे सर्व पक्षांच्या प्रतिनिधींच्या कन्व्हेन्शनमध्यें तयार होणारी स्वराज्य-योजना हें होय. नाताळांतील निरनिराळ्या परिषदांनीं या कन्व्हेन्शनसाठीं प्रतिनिधी निवडण्याचा उपक्रम केला आहे. ते एकत्र जमून व सर्वमान्य अशी योजना तयार करून बहिष्काराच्या चळवळीला निश्चित व खंबीर असें बौद्धिक अधिष्ठान प्राप्त करून देतील अशी आम्हास आशा आहे.

# महात्मा गांधींचा घोटाळा

मद्रास काँग्रेसनंतरच्या ता. ५ च्या 'यंग इंडिया'च्या अंकांतच गांधींनीं लिहिलें होतें कीं, काँग्रेसचे बरेच ठराव बेजबाबदार व उतावीळपणें झाले. बेजबाबदारी व उतावीळपणा सिद्ध करण्याकरितां नमुन्यासाठीं म्हणून त्यांनीं त्या अंकांत दोन ठराव पुढें केले होते. एक स्वातंत्र्याचा व दुसरा ब्रि. मालावरील बहिष्काराचा. पुढें—मागें लवकरच स्वातंत्र्याच्या ठरावास आपला विरोध कां याचा अधिक खुलासा करूं असेंहि त्यांनीं ता. ५ च्या अंकांत वाचकांना अभिवचन दिलें होतें. आणि उतावीळपणाच्या ठरावास विरोध करण्याच्या कामांत तरी सावकाशी उपयोगी नाहीं म्हणूनच कीं काय, त्यांनीं पुढच्या ता. १२ च्या अंकांतच तांतडीनें या विरोधाचा खुलासाहि करून टाकला आहे. खुलासा विस्तृत आहे. पण त्यांत स्पष्ट असें कांहींच न निघता विचारांचा घोटाळा मात्र होण्याचा संभव अधिक दिसतो.

## गूढ विवेचनाचा नमुना

गांधींनीं विवेचन करण्याची एक ठरीव पद्धति आहे. ती दिसावयास सूक्ष्म अशी दिसते. पण तींत विचारापेक्षां केवळ भावनेचा सूक्ष्मपणाच अधिक असतो. पिंजारी ज्याप्रमाणें कापूस पिंजून काढतो त्याप्रमाणें आपली विरोधाची भावना पिंजून त्याची रास ते पुढें मांडतात. त्यांत मनुष्य पडला म्हणजे त्याला कांहीं बोचत नाहीं, पण त्याच्या विचारालाहि कोठें धर सांपडत नाहीं. भाविक व अल्पविचारी माणसाला या पिंजलेल्या कापसानें गुदगुल्या होऊन सुख वाटतें. पण निश्चितार्थजिज्ञासूला मात्र गुदमरल्या सारखें होतें ! विचारांच्या सरळ सरणीपेक्षां भावनेचे नागमोडी हेलकावे अधिक असल्यामुळें विचारी माणसाला त्यांच्या लेखांत आलेल्या निरनिराळ्या विषयांच्या विवेचनाची संगति उमगत नाहीं. उलट भाविकाला मागेंपुढें पाहाण्याचें भान न राहिल्यामुळें तो न अडखळतां या टोकापासून त्या टोकापर्यंत अधांत्री तरंगत जातो. मद्रासच्या काँग्रेस-सभेमधील त्यांना विपरीत वाटणाऱ्या निर्णयामुळें तर त्यांची विवेचनपद्धति अधिकच घोटाळ्याची झाली आहे. या भावनामय शब्दजालाच्या उत्तरादाखल उलट तितकेंच भावनामय शब्दजाल मांडून स्वातंत्र्याच्या ठरावाची

तरफदारी करणारेहि लोक स्वातंत्र्यवाद्यांत आढळतील; नाहीं असें नाहीं. कारण त्यांत पूर्वी गांधीभक्त असलेले व त्यांच्या विशिष्ट विषयविवेचनपद्धतींत तरबेज झालेले लोक बरेच आहेत. उलट या शब्दजालातून वादाचे नक्की मुद्दे तेवढे निवडून स्पष्ट उत्तर देणारेहि आहेत.

स्वातंत्र्याचा ठराव मांडणारे पं. जवाहरलाल नेहरू यांनीं उतावीळपणाच्या आक्षेपाला असेंच स्पष्ट उत्तर दिलें आहे. स्वातंत्र्याच्या ठरावाची चर्चा नवी नाहीं, जुनीच आहे. काँग्रेसमध्यें तो अकल्पितपणें नवा विषय एकदम आला असेंहि नाहीं. शिवाय त्यावर विषयनियामक मंडळांत तीन तास वाद झाला. व त्यांत मोठमोठ्या पुढाऱ्यांनींहि भाग घेतला होता. तेव्हां हा ठराव उतावीळ किंवा बेजबाबदार कसा म्हणतां येईल? ठराव मंजूर होण्याच्या पद्धतीवरील आक्षेप अशा प्रकारें निर्मूल ठरत असल्यामुळें म. गांधींनां आतां अगदीं मूलतःच आक्षेप घेण्यास सुरुवात केली आहे. "स्वातंत्र्य (इंडिपेंडन्स) याचा मला अर्थच कळत नाहीं." इतकेंच नव्हे तर "तो शब्द इंग्रजी असून त्याचा हिंदी लोकांना कळण्यासारखा कोणत्याहि हिंदी भाषेंत पर्यायशब्दहि देतां येणार नाहीं" येथपासून आक्षेपाना सुरुवात झाली आहे! "स्वातंत्र्याचा मला अर्थच कळत नाहीं" हें गांधींचें म्हणणें ऐकून "सत्य म्हणजे काय?" हें विचारणाऱ्या ख्रिस्तकालीन रोमन न्यायाधीशाची आठवण होते. कारण सत्याच्याच तोडीचा स्वातंत्र्य हाहि एक ईश्वरत्वाचा धर्म आहे. स्वातंत्र्य हा शब्दहि जुना संस्कृत असून तो इंग्रजीवरून कोणी नवीन बनविलेला नाहीं आणि 'इंडिपडन्स'ला पर्यायशब्द म्हणून गेलीं वीस वर्षे राजकीय वादविवादांत त्याचा सर्रास उपयोगहि होत आहे.

## जनावरास देखील स्वातंत्र्य कळतें

पण गांधींना स्वातंत्र्याचा अर्थ कळेनासा झाला केव्हांपासून? काँग्रेसची त्याला मंजुरी मिळाल्यापासून कीं काय? कारण पूर्वी त्याना तो चांगला कळत होता. हसरत मोहानी याच्या ठरावास विरोध करण्याच्या वेळीं तो त्यांना चांगला उमगला होता. कारण स्वातंत्र्य म्हटले म्हणजे साम्राज्यबंधविमोचन त्यांत येते, तेव्हा तें आजच स्पष्ट ठरवूं नये. 'शक्य तर आंत, जरूर तर बाहेर' असें मोघम धोरणच ठेवणें बरें असें म्हणूनच त्यांनीं त्या वेळीं व नंतर या ठरावास विरोध केला होता. पण आतां ही विचारसरणी कोण मानणार? कारण साम्राज्यांत राहण्याची अशक्यता व बाहेर जाण्याची जरूरी आज सर्वांनाच स्पष्टपणे दिसूं लागली आहे. तेव्हां तें सोडून देऊन अर्थाबद्दलच शंका घेण्यास गांधींनीं सुरुवात केली आहे! पण हा अर्थाचा वादहि त्यांना फारसा उपयोगी पडणार नाहीं. 'इंडिपेण्डन्स' ही इंग्रजी कल्पना लोकांना कळणार नाहीं व त्याचे देशी भाषेंत भाषांतरच होऊं शकणार नाहीं हें त्यांचें म्हणणें हस्यास्पद आहे. 'स्वतंत्रपणा' हा वैयक्तिक आयुष्यांत प्रत्येकाला हवा असतो व तोच राष्ट्रीय बाबतींतहि पाहिजे असें म्हटलें तर त्याचा अर्थ प्रत्येक मनुष्यप्राण्यास कळेलच. इतकेंच काय पण जनावराला देखील स्वातंत्र्याचा अर्थ चांगला कळतो. वाघापासून तों उंदरापर्यंतच्या पिंजऱ्यांत नवीनच कोंडलेल्या कोणत्याहि प्राण्याची पिंजरा फोडून बाहेर जाण्याची धडपड आणि ती साध्य होत नसल्यानें होणारा खेद आणि त्वेष यांचा त्याच्या डोळ्यावर दिसून येणारा आविर्भाव पाहिला तर "यालाहि स्वातंत्र्य म्हणजे काय तें चांगलें कळतें" असेच कोणाहि सहृदय माणसाच्या तोंडून उद्गार निघतील. पुष्कळ दिवस पिंजऱ्यात राहिलेल्या प्राण्याला कदाचित् बाहेर जाण्यास भीति किंवा दुःखहि वाटेल. "पण बाहेर जाणे म्हणजे काय?" हेंच त्याला कळेनासें होणें अशक्य होय. हिंदी लोकांना खरोखरच स्वातंत्र्याचा अर्थ समजत नसेल, इतकी त्यांचीं मने नादान झालीं असतील, तर स्वातंत्र्याचा ठराव रद्द करण्याऐवजीं, तो सर्वांना स्पष्ट समजून देणे व 'स्वातंत्र्य म्हणजे काय तें मला समजत नाहीं' असे विचारणारा एकहि प्राणी हिंदुस्थानांत आढळणार नाहीं असें करणें हेंच काँग्रेसचें आद्य कर्तव्य ठरतें. किंबहुना स्वातंत्र्याची कल्पना इंग्रजी व म्हणून परकी अशी असली तरीहि ती काँग्रेसने लोकाना समजावून देणेच योग्य होईल.

## रूढ शब्दांची वतनदारी!

जरी कदाचित् स्वातंत्र्याचा अर्थ लोकांना कळला तरी पुढें गांधी म्हणतात कीं, जुना दादाभाईसारख्यांनीं रूढ केलेला स्वराज्य शब्द काढून त्याचे जागीं स्वातंत्र्य शब्द घालणें म्हणजे अब्रह्मण्यम्—भ्रष्टाकार (सॅक्रिलेज) होय! पण कोणतीहि सुधारणा म्हटली म्हणजे तिला जुनी रूढी थोडी तरी मोडून काढावीच लागते. जुन्या चालीच्या वतनदारीप्रमाणें शब्दांचीहि वतनदारी होऊन बसली तर सुधारणेस जागाच राहणार नाहीं. गांधींनाहि प्रथम असे चिरपरिचित व वतनदार बनून राहिलेले शब्द बाजूला काढावे लागलेच. ज्या क्रीडमध्यें 'स्वराज्य' शब्द आहे त्यांतलेच 'कायदेशीर व सनदशीर' हे परंपरागत रूढ शब्द काढून त्याऐवजीं 'न्याय्य व शांतताप्रधान' हे शब्द त्यांनींच आणले. गांधींनीं हिंदी राजकारणांत पाऊल ठेवलें त्या वेळीं "होमरूल" हा शब्द बराच रूढ

झाला होता. पण त्याला आयर्लंडच्या इतिहासाचा व तदनुषंगिक 'अत्याचारांचा' वास येतो अशी त्यांची समजूत झाल्यामुळें त्यांनीं तो खड्यासारखा निवडून बाजस काढला! तेव्हां शब्दरूढीचें कारण गांधीं आज पुढें करतात तें केवळ त्यांना सोयीचें आहे म्हणून, असेच इतरांनीं कां मानूं नये? शिवाय 'स्वराज्य' शब्द सुद्धां लोकांमध्यें पुढाऱ्यांनीं रूढ केला तव्हां "जबाबदारीचे हक्क" किंवा "प्रातिनिधिक हक्क" अशा तऱ्हेचे जुने शब्द बाजूस सारावे लागलेच. आणि स्वातंत्र्याच्या ठरावानें क्रीडमधील स्वराज्य शब्द कायमच ठेवला आहे. त्याला हातच लावला नाहीं. मग निदान आजच्या घटकेला तरी रूढी मोडण्याचा भ्रष्टाकार केल्याचा आरोप 'स्वातंत्र्य' वाद्यावर गांधींनीं कां लादावा? आणि "स्वातंत्र्य विरुद्ध स्वराज्य" असा कोर्टांतील वादी-प्रतिवादींचा निदर्शक मथळा देऊन नसता विरोधाभास कां उत्पन्न करावा?

स्वातंत्र्यवाद्यांना गांधी आणखी विचारतात कीं 'तुम्हाला स्वातंत्र्य पाहिजे तरी कोणत्या प्रकारचें? इंग्लंड, रशिया, स्पेन, इताली, तुर्कस्थान, चिली, भूतान हीं सर्व आपापल्या परीनें स्वतन्त्रच आहेत. मग यां पैकीं तुम्हांस कोणतें स्वातंत्र्य पाहिजे? तुम्ही हिंदी स्वातंत्र्य पाहिजे असें म्हणाल, पण हिंदी स्वातंत्र्याचीहि प्रत्येकाची व्याख्या निराळी ठरेल.' प्रश्न विचारतांना गांधींनीं जी स्वतंत्र देशाची यादी दिली त्यावरूनच "स्वातंत्र्य म्हणजे काय तें मला कळत नाहीं" हें त्यांचें म्हणणें फोल ठरतें. कारण या यादींतील देशांत राज्यपद्धतीचे प्रकार भिन्न असले तरी सर्वांना सामान्य अशी स्वतंत्रता या यादीवरून स्पष्ट होतेच होते. आणि स्वातंत्र्याचा प्रतिवादी म्हणून जो स्वराज्य शब्द त्यांनीं पुढें केला आहे त्याचा तरी अर्थ अगदीं निश्चित कोठें आहे? कारण याच लेखांत गांधी म्हणतात कीं, कोणत्याहि वेळीं राष्ट्र ज्याप्रमाणें कृति करील त्यावरून स्वराज्याचें स्वरूप बदलतें राहील! बरें, एकीकडे ध्येय हें लोकांना नीट समजणारें पाहिजे असें त्यांच्या नावडत्या स्वातंत्र्याचे बाबतींत म्हणत असतां दुसरीकडे स्वतःच्या आवडत्या अनत्याचाराच्या ध्येयाविषयीं ते काय म्हणतात तें पाहा! "अनत्याचार हे ध्येय म्हणून मान्य न करतां व त्याचें तत्त्वज्ञान न समजताहि लोक ते अमलांत आणूं शकतात. कारण सामान्यतः लोकांना आपल्या सर्व कृतींच्या मागें असलेलें तत्त्वज्ञान समजत नाहीं!" मग स्वातंत्र्याचें ध्येय तरी अगदीं तंतोतंत व बिनचूक लोकांना कळलेंच पाहिजे असा गांधींचा आग्रह कां?

## प्रसंगानेंच बुद्धि सुचते

हें झालें अर्थासंबंधीं. आतां प्रसंगासंबंधानें गांधी म्हणतात "इंग्रजांनीं सायमन कमिशनच्या रूपानें अपमान केला म्हणून एकाएकीं तुमचें ध्येय स्वातंत्र्य हें बनलें कीं काय? लोकांना उत्तरें देण्यासाठीं कोणी ध्येयें बदलत नसतात. ध्येय असें परिस्थितीवर अवलंबून नसावें—तें परिस्थितिनिरपेक्ष असेंच असलें पाहिजे." म्हणजे स्वातंत्र्य ध्येय पुकारावयाला जी एक अनुकूल म्हणून गोष्ट सांगण्यात आली तीच त्यांनीं अशी उलटविली. पण स्वातंत्र्याचें ध्येय हें स्वयंसिद्धच आहे. ते कांहीं बर्कनहेडला उत्तर देण्याकरितां कोणी नवें बनविलें नाहीं. त्या ध्येयाची व्यक्तिगत घोषणा पूर्वीं होतच होती. पण सर्व राष्ट्रानें सामुदायिक रीतीनें त्याची घोषणा करण्यासारखी राष्ट्राची मनःस्थिति बनली ती सायमन कमिशनमुळें. स्वातंत्र्यवादाचा सामुदायिक उच्चार हे या मनःस्थितीचें निःशंक आहे आणि ही मनःस्थिति सायमनकमिशनच्या ध्वनीमुळे लोकांच्या अंतःकरणांत कोणता प्रतिध्वनि निघाला हें स्पष्ट सांगतें. यामुळें स्वातंत्र्याचा ठराव हें बर्कनहेडला हिंदी राष्ट्राचें उत्तर होय असें पुष्कळांनीं म्हटलें. यापूर्वीं स्वातंत्र्य कोणास नको होतें असें नाहीं. फक्त काँग्रेसमध्ये त्याचा उच्चार करणें कितपत सोयीचें अगर गैरसोयीचें, हितकारक अगर अहितकारक इतकाच प्रश्न होता. सायमन कमिशनच्या नेमणुकीमुळें त्या प्रश्नाचें उत्तर स्वातंत्र्याच्या बाजूनें दिलें. राष्ट्राची कृति ही परिस्थितीला प्रतियोगी अशीच असते. परकीय सरकाराशीं असहकारिता करावी हें गांधींचें तत्त्व तरी पंजाब-प्रकरणापूर्वी कोठें होतें? पंजाब-प्रकरणानेंच अमृतसरचे निर्भेळ सहकारितावादी गांधी हे यावज्जीव असहकारवादी बनले ना? मग सायमन कमिशनमुळें स्वराज्यवादी राष्ट्र स्वातंत्र्यवादी बनलें यांत अस्वाभाविक असें काय झालें?

## ध्येयाचा उच्चार म्हणजे दुर्बळपणा!

पण उत्तरच द्यावयाचें तर तें असे केवळ शाब्दिक कां? तोंडच्या नुसत्या वाफेनें आपली दुर्बलता मात्र दिसते. हा गांधींचा यापुढील आक्षेप आहे. त्याच्या मतें काँग्रेसनें कोणताहि ठराव न करता सर्व परदेशी कापडाची होळी केली असती आणि सर्व देशभर परदेशी कापडांच्या अशा होळ्या करण्याला प्रोत्साहन दिलें असतें किंवा मुख्य जज्जापासून चपराशापर्यंत-सैन्यांतील लोकांसुद्धां-सर्व सरकारी नोकरांचा संप घडवून आणला असता तर तें खरें उत्तर झालें असतें. पण या गोष्टींना स्वातंत्र्यवाद्यांचा तरी विरोध कोठें आहे? अधिक चांगला गोष्ट दाखवून मूळ चांगल्याचा चांगुलपणा नाहींसा

करतां येत नाहीं हें गांधींच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं. एकाहून एक चढ गोष्टी सांगावयाच्या म्हटल्या तर त्या कोणासहि सुचतील. नुसता संप करण्यापेक्षां सर्वांनीं जूट करून हिंदुस्थानातील सर्व इंग्रजांना बोटींत घालून स्वदेशीं पाठवून देण्याची कॉंग्रेसनें व्यवस्था केली तर ते याहूनहि चांगले उत्तर होणार नाहीं काय ? शिवाय कॉंग्रेस स्वातंत्र्याच्या ठरावानें केवळ शाब्दिक उत्तर देऊन स्वस्थ बसती तर गोष्ट निराळी. पण हिंदु-मुसलमानांची एकी, राष्ट्रीय योजनेचा तयारी व ब्रिटिश मालावरील बहिष्कार या ठरावांनीं सक्रिय उत्तराचाहि थोडाबहुत विचार कॉंग्रेसने केलाच. जें मिळविण्याचें सामर्थ्य नाहीं त्याचा उच्चार म्हणजे दुर्बलत्व असें म्हटलें म्हणजे कोणत्याहि ध्येयाचा उच्चार किंवा ठराव दुर्बलत्वदर्शकच ठरेल. कारण ध्येय म्हटलें म्हणजे ती आजच प्रत्यक्ष प्राप्त करून घेण्यासारखी गोष्ट केव्हांहि नसते. आणि तशी ती झाली म्हणजे मग तिला ध्येयस्वरूपच राहात नाहीं !

स्वातंत्र्याच्या दूरच्या ध्येयाचा उच्चार नको, आजच्या मर्यादित कार्यक्षेत्रांत मर्यादित दृष्टि ठेवा असें म्हणतां म्हणतां गांधींनीं स्वतःच आपली महत्त्वाकांक्षा स्वातंत्र्याच्याहि पलीकडे धांव घेते असे सांगून टाकलें आहे! " हिंदुस्थानाची मुक्तता करून तद्द्वारा पाश्चिमात्यांच्या लुटारूपणाच्या तावडींत सांपडलेल्या जगांतील सगळ्या दुर्बल मानववंशाची मुक्तता करणें " ही ती आकांक्षा होय! अशा तऱ्हेनें स्वातंत्र्याच्याहि पलीकडे त्यांचें ध्येय असतां अलीकडच्या स्वातंत्र्याच्या ध्येयाला त्यांची हरकत कां असावी ? आणि स्वातंत्र्यापलीकडील हें ध्येय तरी कॉंग्रेसनें कोठे दृष्टीआड केलें आहे ? जगांतील साम्राज्यपीडित राष्ट्रांच्या चळवळींत भाग घेण्याचें ठरवून कॉंग्रेसनें त्या ध्येयाच्या दृष्टीनें आजच यथाशक्ति पाऊल टाकण्याचा उपक्रम केलाच आहे. बरें, या पलीकडच्या ध्येयाचा उच्चार गांधींनी कशाकरितां केला ? तर स्वातंत्र्याच्या घोषणेला आपला विरोध स्पष्ट करण्यासाठीं ! हा विरोध स्पष्ट करतांना या पलीकडच्या ध्येयाची ज्योत मी लपवूं शकत नाहीं असे तेच म्हणतात. एकूण कोणाला तरी उत्तर देण्यासाठीं ध्येयाचा उच्चार करावा लागतो, हें गांधींच्याच कृतीवरून सिद्ध झालें. मग कॉंग्रेसहि बर्कनहेडला उत्तर देतांना आपल्या स्वातंत्र्याकांक्षेची ज्योत लपवूं शकला नाहीं यांत काय आश्चर्य ?

गांधींच्या घोटाळ्यांत इतस्ततः विखुरलेल्या सर्व मुद्यांची सांखळी बनवून आम्हीं त्यांस क्रमशः उत्तरें दिलीं पण त्यांच्या एका वाक्याचा अर्थ लावणें सर्वांसच कठीण जाईल. तें वाक्य असें. "व्यक्तिशः मला स्वातंत्र्याची (इंडिपेंडन्सची) इच्छा नाहीं, कारण त्याचा अर्थ मला कळत नाहीं; परंतु ब्रिटिशांच्या सत्तेच्या जोखडापासून मी मुक्तता ( फ्रीडम ) इच्छितों. " 'इंडिपेंडन्स' नको पण 'फ्रीडम' हवें याचा अर्थ तरी काय ? हिंदी लोकांना समजेल अशा भाषेत बोलत जा, म्हणून स्वातंत्र्यवाद्यांना टोमणा मारल्यावर लगेच इंग्रजी भाषाकोविदांनाहि न उलगडेल असें हें कूटवाक्य गांधींनीं लिहिलें आहे! पण शोधल्यास याचाहि उलगडा त्यांच्या लेखांतूनच होण्यासारखा आहे. वरील कूटवाक्यानंतर त्यांनीं सैतानी इंग्रजी राज्याचें भेसुर चित्र यथार्थ रंगविलें आहे. व तें झाल्यावर लगेच ते म्हणतात " पण सर्व परिस्थितींत अनत्याचार हें माझें ब्रीद आहे. माझें साधन म्हणजे जबरदस्ती नसून मन वळविणें हें आहे. तें साधन म्हणजे जुलमी माणसाला पीडा न देतां स्वतः पीडा सोसण्याचें ( आत्मक्लेशाचें ) आहे, हें साधन रामबाण होय अशी माझी समजूत आहे." या एका विधानानें गांधींच्या कूटवाक्याचाच केवळ नव्हे तर त्यांच्या सर्वच घोटाळ्याचा उलगडा होतो. इंग्रजी 'जूं' झुगारण्यासाठीं वाटेल ती किंमत देण्यास आपण तयार असल्याचें याच लेखांत ते म्हणतात. पण अनत्याचाराचें ब्रीद सोडण्याची किंमत मात्र त्यांना देववणार नाहीं हें त्याच्याच वरील विधानावरून स्पष्ट होतें. हेंच त्यांच्या स्वातंत्र्य-विरोधाचें बीज आहे, स्वातंत्र्याचें ध्येय त्यांच्या निरपवाद निःसीम अनत्याचाराच्या चौकटींत बसत नाहीं त्याला ते काय करणार? पण येवढेंच त्यांनीं एकदां स्पष्ट म्हणून टाकलें असतें तर बाकीचा घोटाळा व निष्कारण काथ्याकूट वांचला नसता काय? त्यांचें खरें म्हणणें सूत्ररूपानें सांगावयाचें तर—

अकृत्वा परसंतापमगत्वा परमंदिरं ।
'स्वराज्यं' प्राप्यते यत्तु स्वातंत्र्यादपि तद्बहु ॥

या श्लोकानें सांगावें लागेल. अनत्याचार व असहकारिता हीं साधनें न सोडतां जितका ध्येयवाद स्वीकारतां येईल तितकाच ते स्वीकारावयास तयार आहेत. पण कॉंग्रेसनें हीं साधनें मान्य केलीं तीं केवळ तात्कालिक धोरण म्हणूनच. तेव्हां गांधींनीं आपल्या साधननिष्ठेची गवसणी कॉंग्रेसला घालण्याचा प्रयत्न करूं नये. स्वातंत्र्याच्या ठरावासंबंधीं बोलतांना कॉंग्रेसचे अध्यक्ष डॉ. अन्सारी यांना म्हणावेंच लागलें कीं, 'आज आमचें अनत्याचार हें धोरण आहे खरें, पण उद्यांचें काय सांगावें?' स्वातंत्र्यवाद स्वीकारल्यावर साधनांचे बाबतींत हा नित्यानित्यविवेक करावाच लागतो. आणि तो गांधींच्या साधननिष्ठेशीं जुळत नाहीं म्हणून त्यांना स्वातंत्र्याचा ठराव नको असेच यावरून सिद्ध होतें.

# शहा अलमचा गोवधनिषेध

( लेखक—**गो. स. सरदेसाई, मुंबई नं. ४.** )

सालबाईच्या तहानें इंग्रजांचा झगडा संपल्यावर स. १७८३ त नाना फडणीस व महादजी शिंदे यांनीं मराठशाहीचा क्रमप्राप्त कार्यभाग हातीं घेतला. पैकीं नानानें दक्षिणेंतलि टिपूकडील प्रकरण पुरें करून महादजीनें उत्तरेकडील बादशाही प्रकरण संपविलें. हिंदुपदपातशाहीचा जो उद्योग पेशव्यांनी अंगिकारिला, त्याचें मुख्य उद्दिष्ट स्वधर्मसंरक्षणाचें होतें. अखिल हिंदुस्थानांत हिंदुधर्माचा उच्छेद कोठेंहि होऊं नये, मंदिरांचे पूजानैवेद्य व तीर्थस्थळांतील यात्रा निर्विघ्नपणें तडीस जाव्या अशाविषयीं मराठ्यांची दक्षता होती. पेशव्यांनीं शिंदे होळकरादि सरदारांस हिंदूंचीं धर्मस्थळें आपल्या ताब्यांत घेण्याबद्दल वारंवार आज्ञा पाठविलेल्या आढळतात. महादजीनें सन १७८४ त बादशहास भेटून त्याचा कारभार आपल्या हातीं घेतला आणि पुढील सात वर्षांत एकेका प्रकरणाची तड लाविली. त्यांत हिंदुस्थानांत कोठेंहि गोवध होऊं नये, असा हुकूम बादशहापासून मिळवून तो राज्यांत सर्वत्र प्रसिद्ध करावा, अशी नानाची महादजीस सारखी टोंचणी चालू होती. तदनुसार महादजीनें बादशहापासून गोवधबंदीचें फर्मान घेऊन तें प्रसिद्ध केलें, असे उल्लेख महादजीच्या चरित्रांत व अनेक कागदांत आढळतात. नातू, बर्वे, कीन इत्यादींनीं असे उल्लेख केले आहेत. परंतु तें फर्मान प्रत्यक्ष सबंध छापलेलें अगर लेखी मला कोठेंहि आढळलें नाहीं. आज वर्ष दोन वर्षें तें फर्मान पैदा करण्याचे माझे प्रयत्न चालू असून मजकडे त्यासंबंधानें पुष्कळांची पृच्छाहि आलेली आहे. ग्वालेर व इतरत्रहि पुष्कळ तपास केला, परंतु मूळ फर्मानाची नक्कल मिळेना. शेवटीं अकल्पित रीतीनें तें नुकतेंच माझ्या हातीं आलें, म्हणून त्याचा मराठी भावार्थ प्रसिद्धीसाठीं मी देत आहे.

गोवधाच्या विषयावर एका धर्मात्म्यानें निबंध मागवून महात्मा गांधींच्या मार्फत एक हजार रुपयांचें बक्षीस जाहीर केलें होतें. त्याप्रमाणें निबंध आले, त्यांचें परीक्षण श्री. चिं. वि. वैद्य व श्री. आनंद शंकर ध्रुव, बनारस युनिव्हर्सिटीचे मुख्याचार्य, या विद्वद्वर्यांनीं केलें. त्यांतल्या एका निबंधांत शहा अलम बादशहाचें हें फर्मान लेखकानें दिलें होतें. हे लेखक श्री. नंदकिशोर अग्रवाल चौधरी नांवाचे टाटा नगरजवळच्या जमशेटपूर येथील कारखान्यांत (ओ. आयू. सेक्शन) नोकर असून, त्यांस पत्र लिहून हें फर्मान मी मागविलें. त्यांनीं तें एका हिंदी पुस्तकांतून घेतलें. या हिंदी पुस्तकाचे नांव 'भारतरक्षक'—अर्थात् गाय असें असून तें 'शोभाराम स्मारक ग्रंथमालेंत' शोभारामपुत्र डॉक्टर रामचंद्र गुप्त यांनीं पत्याला राज्यांत सेखा गांवीं लिहून प्रसिद्ध केलेलें आहे. त्याची मूळ फारशी नक्कल व त्याचा उर्दूंतील तर्जुमा श्री० नंदकिशोर यांनीं कृपा करून त्या हिंदी पुस्तकांतून उतरून मला पाठविला याबद्दल मी त्याचा फार फार आभारी आहें. त्या उर्दू मजकुराचे हिंदी भाषांतर एका मित्रांनीं मला करून दिलें त्याचाच मराठी अनुवाद मी पुढें देत आहें. प्रस्तुत समयीं या विषयाची देशभर चर्चा चालली असल्यानें पुष्कळांस या फर्मानाची अपेक्षा आहे, आणि तें मूळ फर्मान कोठें कोणाजवळ आहे याचा तपास करण्यास सुलभ पडावें म्हणूनच मी वरील तपशील साक्षेपानें देत आहें. मराठशाहीचें कर्तृत्व काय होतें आणि तें सिद्धीस नेण्यास अगदीं अखेरपावेतों नाना व महादजी हे दोघे कसे झटत होते, याची कल्पना या फर्मानावरून येईल. महादजींच्या मृत्यूनंतर खर्ड्याची लढाई होऊन निजामाशीं तह झाला. त्यांत सुद्धां निजामाने आपल्या राज्यांत गोवध करूं नये, असे कलम नानानें गोवून घेतलेले, पारसनिसांनीं भारतवर्ष मासिकांत छापलें आहे ( भा. व. पु. १ प. या. ले. ८ ). हिंदुस्थानांत गोवध करून लोकांचीं मनें दुखवूं नयेत, अशा प्रकारची आज्ञा खुद्द बाबर बादशहानें पुत्र हुमायून यास केलेली प्रसिद्ध आहेच. त्यानंतर अकबर बादशहानें तर नुसता गोवधच नव्हे तर एकदर प्राणिहत्या मना केली होती, त्याचा उल्लेख शहा अलमच्या या फर्मानांत सुद्धां आहे. सारांश, एवढे प्रतापी व ऐश्वर्यसंपन्न मोगल बादशहा देखील लोकानुरंजनासाठीं कसे झटत होते, याची कल्पना वाचकांस होईल. शहा अलमचें हें फर्मान चंद्र १३ जिल्हेज सन ३१ चें असून, त्या बादशहाचा जुलूस ता. २२-१२-१७५९ रोजीं सुरू झाला असल्यानें फर्मानाची तारीख २५-८-१७९० येते. या वेळीं महादर्जी उत्तरेंत बादशहाची व्यवस्था लावीत होता. फर्मानाच्या आरंभीं प्रस्ताव आहे तो असा—

'एकदा अकबर बादशहानें समस्त इस्लामी विद्वानांची सभा भरवून प्रश्न केला कीं, आपल्या सेवेशीं माझी एक प्रार्थना आहे. कृपा करून मला असें विदित करा कीं, हजरत पैगंबराच्या हादीमध्ये बैल अगर दुभती गाय यांच्यासंबंधानें काय

आज्ञा दाखल आहे ! त्यावरून मौलवी कुतुबुद्दीन पीरशहा आणि मौलवी साबीरबक्ष यांनीं हादीं-तील वचन काढून दाखविलें तें असें—' चार इसम पापकर्मे म्हणून समजावे, एक पिंपळाचें किंवा बोरीचें हिरवें झाड कापणारा, दुसरा मनुष्य–विक्रय करणारा, तिसरा गाईचा वध करणारा, आणि चौथा व्यभिचार करणारा. हे चार इसम निःसंशय नरकास पोंचतात ही गोष्ट कुराणांत सुद्धां स्पष्ट शब्दांनीं प्रमाण मानिलेली आहे. त्यासंबंधानें कुराणांत वचन असून त्यावर पैगंबर रसूलनें बनविलेले नियमही आहेत. यावरून गोवधाचे बाबतीत परमेश्वराची सर्वथा मनाई आहे, याविषयीं संशय नाहीं. (या फतव्याचे खालीं मौलवींच्या सही व साक्षी आहेत.) वरील वचनाचीच नक्कल बादशहा शहा अलम गाजीच्या दरबारीं चिन्हांकित फर्मानांत दाखल असून तें छ १३ जिल्हेज स. ३१ रोजी प्रसिद्ध झालें, तें येणें-प्रमाणें.

समस्त राज्यप्रबन्धक, खिलाफतचे कार्यकर्ते, तसेंच बादशहाच्या कृपेस पात्र असे अमीर व परगणानिहायचे शासक आणि प्रांतोप्रांतीचे कारभारी व जबाबदार अधिकारी या सर्वांस कळविण्यांत येतें कीं, बादशहाच्या कारभारांत व मालिकागिरीत स्वामींची आज्ञा म्हणून या मुबारीक फर्मानाचें पालन अवश्य करण्यात यावे, आणि सर्वांनीं स्पष्ट ध्यानांत बाळगावे कीं, पशुसुद्धां विधात्याच्या सृष्टींतलेच जीव असून ते निरुपयोगी होत असे समजूं नये. त्यांतहि विशेषतः बैल व गाय हे प्राणी अगणित लाभ देणारे आहेत. कारण मनुष्य व पशु या दोघांचेंहि जीवन धान्याच्या पैदासीवर अवलंबून असून, गाय व बैल यांच्याशिवाय शेतीचें काम बिलकुल साध्य होणार नाहीं. मेहनतीशिवाय खेती नाहीं, आणि मेहनतीस तर बैलांचें साह्य अवश्य पाहिजे. यास्तव जनतेचा संसार व निर्वाह चालण्यास गाईची अत्यंत जरूर आहे; आणि गाईवरच मनुष्यांचे व पशूंचे जीवन अवलंबून आहे. यास्तव आमचे प्रिय पुत्र महाराजाधिराज माधवराव सिंधिया बहादूर यांनीं आमचेकडे विनंती केली, त्यावरून आम्ही आपल्या उदार अंतःकरणानें व हर्षपूर्ण दृष्टीनें आमच्या समस्त राज्यभूमीमध्यें गोकुशीचा म्हणजे गो-हत्येचा परिपाठ सर्वथैव मना करीत आहों. या आमच्या फर्मानाचा अंमल इतउत्तर राज्यांतील समस्त अधिकाऱ्यांनीं सावधगिरीनें प्रयत्न-पूर्वक करून ही आज्ञा पाळीत जावी कीं जेणें-करून कोणतेहि नगर, कसबा, गांव यांत गोहत्येचें नांव सुद्धां दिसू नये. इतक्याउपर जर कोणी इसम या आज्ञेच्या विरुद्ध वागून गोवधाच्या पापांत लिप्त होईल, तर तो बादशहाच्या कोपास पात्र होऊन दंड पावेल.

(नक्कल फर्मानशाही दरबाब मुमनियत गोकुशी, जी महाराज सिंधियाचे दरबारांत पितळेवर खोदून ठेवलेली आहे.) या फर्मानाचा अंमल समस्त मराठी संस्थानात अद्यापि होत आहे.

# मद्रास राष्ट्रीय सभा

## पास झालेले ठराव

(१) ऑल-इं. काँ. कमिटीचें पूर्वीचे एक चिटणीस श्री. पृथ्वीशचंद्र रे यांच्या अकालीं निधनाबद्दल राष्ट्रीय सभेस दुःख होत असून त्याच्या कुटुंबाविषयीं सभेस सहानुभूति वाटत आहे.

(२) काकोरीच्या खटल्यांत श्री. एस. रामप्रसाद बिस्मल, राजेंद्रनाथ लहिरी, असफउल्ला व रोशनसिंग यांस खुनशीपणानें क्रूर शिक्षा देण्यांत आल्या आहेत. सदर शिक्षांचा तीव्र निषेध जनतेने व्यक्त केला असताहि सरकारने त्यांच्या शिक्षा कमी केल्या नाहींत, या सरकारच्या कठोरपणाबद्दल राष्ट्रीय सभेस अत्यंत दुःख वाटत असून ही सभा त्यांच्या कुटुंबाविषयीं सहानुभूति व्यक्त करीत आहे.

(३) ब्रुसल्स शहरीं १९२७च्या फेब्रुवारी महिन्यांत साम्राज्यशाहीविरुद्ध संघ निर्माण झाला असून त्या संघाची ही सभा स्वागत करीत आहे. आणि ऑल-इं. काँ. कमिटीनें साम्राज्यशाहीशीं झगड्याचे बाबतींत सदर संघांशीं सहकार्य करण्याचा जो ठराव पास केला आहे तो या सभेस मान्य आहे.

(४) चिनी लोकांनी बंधमोचनार्थ जें युद्ध चालविलें आहे त्याबद्दल राष्ट्रीय सभेस अत्यानंद वाटत असून ऑल-इं. काँ. कमिटीच्या ठरावाप्रमाणें चीन देशास पाठवावयाच्या हिंदी शुश्रूषा पथकास सरकारने बंदी केल्याबद्दल ही सभा सरकारचा धिःकार करीत आहे. ब्रिटिश सरकार आपले साम्राज्यशाहीचे हेतु तडीस नेण्याकरितां चिनांत हिंदी सैन्याचा उपयोग करीत आहे व चीनच्या स्वातंत्र्य युद्धास व्यत्यय आणीत आहे याबद्दल राष्ट्रीय सभेस संताप होत आहे.

चिनात असलेलें हिंदी सैन्य व पोलीस यांस सरकारनें ताबडतोब परत बोलवावें अशी राष्ट्रीय

सभेची मागणी आहे. सभेच्या मतानें चिनी लोक हे हिंदुस्थानाचे बंधु असल्यामुळें कोणाहि हिंदी इसमान हिंदुस्थान-सरकारच्या वतीनें चिनी लोकाशीं लढण्याकरितां अगर चिनी लोकांविरुद्ध काम करण्याकरितां चिनांत जाऊं नये अशी या सभेची मागणी आहे.

मेसापोटेमिया, इराण, सर्व ब्रिटिश वसाहती व परदेश यांत जें हिंदी सैन्य, पोलीस किंवा वकिलातीवरील गार्ड असतील त्यांस परत बोलावण्यांत यावें.

(५) कांहीं हिंदी लोक परदेशांत गेले आहेत व कांहीं जाऊं इच्छितात. त्यांस येण्याची व जाण्याची परवानगी न देण्याचें जे सरकारचें धोरण आहे त्याचा ही राष्ट्रीय सभा निषेध करते. पास पोर्टच्या बाबतींत इतर अनेक शिष्टाचार पाळावे लागतात. ते बंद करून सर्वांस येण्याजाण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असावें.

श्री. शापूरजी जे. सकलातवाला यांचा परवाना सरकारनें रद्द केला व त्यायोगानें त्यांस हिंदुस्थानांत येण्यास बंदी करून एक प्रकारची हद्दपारी भोगावयास लावली तिचा ही सभा विशेषच निषेध करते. ब्रिटिश पार्लमेंटांत सभासद या नात्यानें काम करीत असतां व कित्येक वेळीं त्यांस कोणाहि सभासदाचें साहाय्य मिळालें नसतां हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याकरितां झगडून त्यांनीं जें धैर्य दाखविलें त्याबद्दल ही सभा कौतुक व्यक्त करीत आहे.

(६) हिंदुस्थानांत, पूर्व-समुद्रावर व विशेषतः वायव्य सरहद्दीवर ब्रिटिश सरकार लढाईची जंगी तयारी करीत आहे ती पाहून राष्ट्रीय सभेस चिंता वाटते. हिंदुस्थान स्वातंत्र्याकरितां साम्राज्यशाहीविरुद्ध जे प्रयत्न करील त्याचा कोंडमारा या तयारीनें होणार आहेच. पण त्याहिखेरीज त्यामुळें अनर्थकारक युद्ध लवकर रू होऊन त्या कामीं हिंदुस्थान परकीय साम्राज्यवाद्यांच्या हातांतील साधन होऊन बसणार आहे.

हिंदुस्थानाच्या आसपासच्या देशांशीं हिंदुस्थानांतील लोकांचें भांडण नाहीं. त्या देशांबरोबर गुण्या-गोविंदानें राहण्याची त्याची इच्छा आहे व याबरोबरच्या युद्धांत भाग घ्यावा की नाहीं व त्याजबरोबर सहकार्य करावें कीं नाही हे ठरविण्याचा हिंदी लोकांचा हक्क आहे असें ही सभा जाहीर करते.

(७) नागपूरच्या सशस्त्र सत्याग्रहाचे पुढारी श्री. आवारी व त्यांचे अनुयायी यांचा कणखर देशाभिमान व स्वार्थत्याग यांचेंही राष्ट्रीय सभा अभिनंदन करीत असून आवारी यांच्या ८० दिवसाच्या अन्नत्यागाबद्दल तिला फारच सहानुभूति वाटत आहे.

(८) हिंदुस्थानापासून ब्रह्मदेश स्वतंत्र करण्याचे सर्व प्रयत्न राष्ट्रीय सभेस नापसंत असून हिंदुस्थानाच्या ईशान्येस नवा सरहद्द प्रांत निर्माण करण्याच्या कल्पनेचा ही सभा धिःकार करीत आहे.

हिंदी लोक व ब्रह्मी लोक यांनीं एकमेकांच्या फायद्याकरितां शक्य त्या उपायांनीं एकजूट बनवावी असें या सभेचे उभयतांस सांगणें आहे.

(९) पूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य हेंच हिंदी लोकांचें ध्येय असल्याचें ही राष्ट्रीय सभा जाहीर करते.

(१०) बंगालचा १८१८ सालाचा तिसरा रेग्यूलेशन व बंगालचा १९२५सालचा क्रि. लॉ अमेंडमेंट ॲक्ट याखालीं हिंदुस्थानाच्या नागरिकांस व राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यास चौकशीवांचून अटकेत ठेवण्याचें अगर हद्दपार करण्याचें जें धोरण हिंदुस्थान-सरकारनें व बंगाल-सरकारनें स्वीकारलें आहे त्याचा ही राष्ट्रीय सभा जोरानें निषेध करीत आहे. आणि मातृभमीकरितां ज्यांनीं सरकारच्या वरील दडपशाही धोरणामुळें आजवर हाल सोसले आहेत व अद्यापहि सोशीत आहेत त्यांचे ही सभा अभिनंदन करीत आहे.

चौकशीवांचून अटकेत ठेवलेल्या सर्व कैद्यांची व त्याचप्रमाणे १९२५ च्या बंगाल क्रि. लॉ अ. ॲक्ट खालीं शिक्षा पावलेल्या सर्व राजकीय कैद्यांची ताबडतोब सुटका व्हावी अशी या राष्ट्रीय सभेची मागणी आहे. १९१८ चा बंगालचा स्टेट प्रिझनर रेग्यूलेशन नंबर ३ खालीं सरकारनें सरदार संतसिंग यास पकडून शिक्षा दिली याबद्दल ही सभा सरकारचा जोराचा निषेध करीत आहे.

(११) ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानाच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काकडे पूर्ण दुर्लक्ष करून स्टॅट्यूटरी कमिशनची नेमणूक केली आहे त्याअर्थीं सदर कमिशनवर सर्व काळीं व सर्व स्थळीं बहिष्कार घालणे हा स्वाभिमानाचा एकच मार्ग हिंदुस्थानांस उरला आहे. यासाठीं हिंदी लोकांनीं व देशांतील सर्व काँग्रेस-संस्थांनीं कमिशन हिंदुस्थानांत येईल त्या दिवशीं त्याबद्दल आपली नापसंती सामुदायिक रीतीनें दर्शवावी. हिंदुस्थानांतील ज्या ज्या शहरीं कमिशन जाईल त्या त्या शहरींहि अशीच नापसंती दर्शविण्यांत यावी. हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्ष कमिशनावर परिणामकारक बहिष्कार घालतील अशा रीतीनें लोकमत तयार करण्यांत यावें.

हिंदी कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासद, हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचे व वर्गांचे पुढारी व इतर लोक यांनीं कमिशनपुढें साक्षीस जाऊं नये, त्याजकरितां होणाऱ्या समारंभास हजर राहूं नये, कमिशनसाठीं सिलेक्ट कमिटया स्थापन करण्यास मदत

देऊं नये व सदर कमिटयांत काम करूं नये.कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासदांनीं कायदेमंडळांत हजर राहूं नये आणि हजर राहावयाचें झाल्यास आपल्या जागा न जातील याकरितां, बहिष्कार परिणामकारक व यशस्वी व्हावा याकरितां दिवाणमंडळ मोडण्याकरितां व वर्किंग कमिटीच्या मतानें जें बिल अगर ठराव राष्ट्रहिताच्या आड येणार असेल त्यास प्रतिबंध करण्याकरितांच त्यांनीं हजर राहावें अशी राष्ट्रीय सभेची आज्ञा आहे. बहिष्कार परिणामकारक व पूर्ण व्हावा याकरितां इतर पक्ष व संस्था यांच्याशीं सहकार्य करण्याचा अधिकार ही सभा वर्किंग कमिटीस देत आहे.

(१२) द. आफ्रिकेंतील हिंदी वसाहतवाल्यांना हिंदुस्थान–सरकार व यूनियनसरकार याचे दरम्यान झालेल्या करारानें किंचित् सुख मिळणार आहे तें राष्ट्रीय सभेस कबूल आहे व हिंदी वसाहतवाल्यांना अधिक चांगल्या रीतीनें वागविण्याची यूनियनसरकारची इच्छा सदर करारावरून व्यक्त होत आहे. तथापि यूनियनमधील मतदानाचा अधिकार मिळालेल्या लोकांचा दर्जा हिंदी वसाहतवाल्यांस प्राप्त झाल्यावांचून सभेचें समाधान होणार नाहीं.यासाठीं सभेची यूनियन–सरकारास अशी विनंति आहे कीं, १९२६ सालाचा वर्णविद्वेषक कायदा व १९२७ च्या दारूबिलांतील कलम रद्द करून, त्यांनीं सलोख्याचा जो पाया घातला आहे त्यावर आफ्रिकेंतील हॉटेलांत नोकरी करण्याची हिंदी लोकांस असलेली बंदी काढून व नाताळांतील सेग्रीगेशनचें कलम रद्द करून तो दृढ करावा.

द. आफ्रिका व पूर्व–आफ्रिका यांतील हिंदी वसाहतवाल्यांस योग्य दर्जा मिळवून देण्याच्या कामीं दीनबंधु सी. एफ. अँड्रयूज यांनीं मानवहितबुद्धीनें जें कार्य केलें आहे त्याबद्दल ही सभा आपली कृतज्ञता व्यक्त करते.

पूर्व–आफ्रिकेंत संयुक्त राज्य स्थापन करण्याच्या विचारानें जें कमिशन नेमण्यांत आलें आहे त्यांत हिंदी प्रतिनिधी घेतलेले नाहीत. त्यांतील प्रदेशास स्वराज्याचे हक्क देऊन तेथील गोऱ्या वसाहतवाल्यांस गरीब नेटिव्हांस अधिक बुचाडण्याची सत्ता देण्यांत येत आहे. तसेंच गोरे लोक पूर्व–आफ्रिकेंत राहावयास येण्यापूर्वींच कित्येक शतकें तेथें हिंदी लोक जाऊन तद्देशीयांशीं व्यापार करीत आहेत त्यांजवरूनहि नवीन व्यवस्थेखालीं गोऱ्या लोकांकडून कायद्यांत बदल होऊन जुलूम होण्याच्या संभव आहे. या सर्व गोष्टींचा राष्ट्रीय सभा निषेध करीत आहे.

( १३ ) हिंदुस्थानाकरितां यापुढें राज्यघटनेंत फेरबदल होतील त्या वेळीं सर्व प्रांतांतील कायदेमंडळांत व वरिष्ठ कायदे मंडळांत संयुक्त मतदारसंघ असावेत असें राष्ट्रीय सभेचें मत आहे.

हिंदु व मुसलमान या दोनहि जातींच्या वाजवी हितसंबंधाचें रक्षण होईल अशी त्यांची खात्री होणें इष्ट असल्यामुळें त्यांची तशी इच्छा असल्यास प्रत्येक प्रांतिक कायदेमंडळांत व तसेंच वरिष्ठ कायदेमंडळांतहि त्या त्या प्रांतांतील लोकसंख्येच्या प्रमाणांत संयुक्त मतदारसंघामध्यें त्या त्या जातीकरितां जागा राखून ठेवण्यांत याव्या.

लोकसंख्येच्या प्रमाणांत ज्या जागा अल्पसंख्याकांना मिळावयाच्या त्यापेक्षां अधिक जागा त्यांना मिळावयास पाहिजेत असें त्या प्रांतांतील हिंदुमुसलमानांच्या एकविचारानें ठरलें तर त्याप्रमाणे प्रांतिक कौन्सिलांत व वरिष्ठ कौन्सिलांतहि जागा ठेवण्यांत याव्या.

पंजाबांतील जागा राखून ठेवतांना तेथील महत्त्वाची अल्पसंख्य जात जी शीखांची तिच्याहि प्रतिनिधींचा विचार पूर्णपणें करण्यांत येईल.

मुसलमान पुढाऱ्यांचें म्हणणे असें आहे कीं, वायव्य सरहद्द प्रांत व ब्रिटिश बलुचिस्थान यांत इतर प्रांतांच्या बरोबरीनें सुधारणा कायदा लागू व्हावा. मुसलमान पुढाऱ्यांची ही मागणी वाजवी आहे असें राष्ट्रीय सभेचे मत असून ती अमलांत यावी. पण ती अमलांत आणतांना सदरील प्रांतांतील न्यायखात्याची पद्धतीहि त्याच वेळीं सुधारली जाईल अशी काळजी घेण्यांत यावी.

सिंध प्रांतहि वेगळा व्हावा अशी एक मागणी आहे. तिजसंबंधीं राष्ट्रीय सभेचें मत असें आहे कीं,राष्ट्रीय सभेनें आपल्या घटनेंत मान्य केलेल्या तत्त्वाप्रमाणें भाषावार प्रांतरचना करण्याची वेळ आतां आली असल्यामुळें तशा प्रांतरचनेचें कार्य एकदम हातीं घेण्यांत यावें व जो प्रांत असली रचना भाषावार व्हावी असें म्हणेल त्याची तशी रचना करण्यांत यावी. आंध्र, उतकल, सिंध व कर्नाटक यांपासून सदर रचनेस आरंभ व्हावा असें राष्ट्रीय सभेचें मत आहे.

पुढील घटनेंत सदसद्विवेकबुद्धीचें स्वातंत्र्य कबूल करण्यांत यावें व त्या स्वातंत्र्यास बाध आणणारा कोणताही कायदा करण्याचा अधिकार प्रांतिक अगर वरिष्ठ कौन्सिलास असूं नये.

सदसद्विवेकबुद्धीची स्वतंत्रता म्हणजे श्रद्धेचें व उपासनेचें स्वातंत्र्य,धार्मिक कृत्यें व धार्मिक समाज यांचें स्वातंत्र्य, धर्मशिक्षण व धर्मप्रसार या बाबतींत परधर्मीयांच्या मनोवृत्ती न दुखावल्या जातील

व त्यांच्या हक्कांची पायमल्ली न होईल अशा बेताचें स्वातंत्र्य. कायद्याचा एखादा मसुदा, ठराव, सूचना दुरुस्ती यांचा संबंध जातींशीं पोंचणारा असल्यास व त्यास सदर जातींतील तीन-चतुर्थांश सभासद विरुद्ध असल्यास सदर बाबी प्रांतिक अगर वरिष्ठ कौन्सलांत कोणी आणूं नयेत.

प्रत्येक कायदेमंडळाच्या बैठकीच्या सुरुवातीस हिंदू-मुसलमान सभासदांची एक कमिटी नेमण्यात यावी व तिनें जातीजातींल प्रश्न कोणते हें ठरवावें.

## भाग दुसरा

वाद्यें कोठेंहि वाजविण्याचा आपणास हक्क आहे असें हिंदू म्हणतात व बलिदानाकरितां अगर खाण्याकरितां गाई कोठेंहि मारण्याचा आपणास हक्क आहे असें मुसलमान म्हणतात. या त्यांच्या समजुतीस न दुखवितां गोवधाचे बाबतींत हिंदूंच्या मनोवृत्तीचा शक्य तितका विचार करावा अशी मुसलमानांनीं मुसलमानांस प्रार्थना करावी व मशिदीपुढील वाद्यवादनाच्या बाबतींत मुसलमानांच्या मनोवृत्तीचा शक्य तितका विचार करावा अशी हिंदूंनीं हिंदूंस प्रार्थना करावी. या दृष्टीनें राष्ट्रीय सभा हिंदू-मुसलमानांस अशी आज्ञा करते कीं, त्यांनीं गोवध बंद करण्याकरितां किंवा मशिदीपुढील वाद्यास बंदी करण्याकरितां अत्याचार अगर कायदा यांचा आश्रय करूं नये.

प्रत्येक व्यक्तीला अगर समूहाला युक्तिवादानें अगर मनधरणीनें दुसऱ्याकडून धर्मांतर करून घेण्याची मोकळीक आहे. पण ही गोष्ट जबरदस्तीनें लबाडीनें अगर आमिष दाखवून करूं नये. १८ वर्षांच्या आंतील व्यक्तींकडून त्यांच्या वडिलांच्या अगर पालकाच्या व्यतिरिक्त धर्मांतर करून घेऊं नये. १८ वर्षांच्या आंतील व्यक्ती वडील अगर पालकांवांचून अनाथ अशी आढळल्यास तिला तद्धर्मीय माणसांच्या स्वाधीन करावें. एखाद्याचें धर्मांतर करवितांना तें गुप्तपणेंहि करूं नये किंवा त्याचा फारसा बभ्रा करून उत्सवहि करूं नये. एखादें धर्मांतर गुप्त रीतीनें, बलात्कारानें, लबाडीनें अगर गैरवाजवी रीतीनें झालें असेल अगर १८ वर्षांच्या आंतील व्यक्तींचें झालें असेल तर त्या गोष्टीची चौकशी वर्किंग कमिटीनें नेमलेल्या लवादांनीं करावी.

स्वराज्याची घटना बनविण्याकरितां एकत्र जमावें अशी देशांतील सर्व पक्षांची इच्छा दिसते. तिकडे लक्ष देऊन व वर्किंग कामिटीनें काढलेल्या सर्क्युलरास अनुसरून घटनेचे निरनिराळे मसुदे कमिटीकडे आले आहेत त्यांचा विचार करून ही राष्ट्रीय सभा वर्किंग कामिटीस पुढील गोष्टी करण्याचा अधिकार देत आहे. राजकीय, मजूर, व्यापारी व जातिविशिष्ट अशा अनेक संस्था, आपआपल्या कमिटया नेमतील त्याजबरोबर वर्किंग कमिटीनें सहकार्य करावें अगर त्यांस जोडून घ्यावें स्वयंनिर्णयाच्या पायावर स्वराज्यघटना तयार करावी व दिल्लीस मार्च महिन्यापूर्वी स्पेशल कन्व्हेन्शन भरविण्यांत येईल त्यापुढें तिनें ती पसंतीकरितां ठेवावी. सदर कन्व्हेन्शनमध्यें ऑल-इं. काँ. कमिटीचे सभासद वर निर्दिष्ट केलेल्या इतर संस्थांचे प्रतिनिधी व पुढारी आणि वरिष्ठ कायदेमंडळाचे व प्रां. का. मंडळें यांचे लोकनियुक्त सभासद यांस हजर राहतां येईल.

(१५)हिंदी संस्थानिक व त्यांचे प्रजाजन यांच्या हिताच्या दृष्टीनें हिंदी संस्थानांत लवकरच प्रातिनिधिक संस्था स्थापन व्हावी व जबाबदार राज्यपद्धति सुरू व्हावी असें या राष्ट्रीय सभेचें स्पष्ट मत आहे.

(१६)ब्रिटिश मालावर बहिष्कार घालण्यासंबंधानें ऑल-इं. काँ. कमिटीनें केलेला ठराव या राष्ट्रीय सभेस मान्य असून सदर बहिष्कार परिणामकारक होण्याकरितां प्रां. काँ. कमिटयांनीं आपआपल्या प्रांताच्या परिस्थितीस अनुसरून कोणत्या ब्रिटिश मालावर बहिष्कार घालावयाचा त्याची निवड करावी व त्यावर बहिष्काराची अम्मलबजावणी करावी.

**किरकोळ**—ऑल-इं. काँ. कमिटीच्या सभासदाची वर्गणी १० रु. असावी (१) श्वेब कुरेशी (२) जवाहरलाल नेहरू (३) सुभाषचंद्र बोस यांस जरनल सेक्रेटरी आणि (१) जमनलाल बजाज व (२) रेवाशंकर जगजीवन जव्हेरी यांस खजिनदार नेमण्यांत यावें. पुढील राष्ट्रीय सभा कलकत्ता येथें भरावी.

# स्वराज्य-घटनेची तात्विक चर्चा

सायमन कमिशनची नेमणूक करण्यांत भारतमंत्र्यांनीं उद्दामपणानें भरतखंडाचा जो अपमान केला त्या अपमानानें चिडून जाऊन भरतखंडांतील राजकीय संस्थांतील अग्रेसर अशा राष्ट्रीय सभेनें सायमन कमिशनवर कडकडीत बहिष्कार घालण्याचा ठराव केला आणि राष्ट्रीय सभेच्या आनुषंगिक अशा मुस्लीम लीगसारख्या संस्थांनींहि राष्ट्रीय सभेच्याच ठरावास दुजोरा दिल्यानें बहिष्काराविषयीं आतां दुमत राहिलें नाहीं असें मानून चालण्यास हरकत नाहीं. सायमनसाहेब व त्यांचे साथीदार अशा निर्भेळ गोऱ्या कमिशनचे पांढरे पाय ज्या दिवशीं मुंबई बंदरास लागतील त्या दिवशीं अखिल भरतखंडांत हरताळ पाळला जावा आणि कमिशनचा निषेधहि जाहीर सभांतून व्यक्त केला जावा अशी राष्ट्रीय सभेची आज्ञा आहे आणि राष्ट्रीय सभेच्या पोट-संस्थांकडून त्या आज्ञेस अनुसरून सर्वत्र बहिष्कार पुकारला जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत.

पण निषेधाचा हा एक भाग झाला. हरताळ पाळणें आणि आम्ही कमिशन मानीत नाहीं असें जाहीर करणें हा बहिष्काराचा निष्क्रिय प्रकार झाला. बहिष्काराची खरी किंमत त्याच्या सक्रिय स्वरूपावरूनच ठरत असते; याकरितां 'बहिष्कार घाला पण तो सक्रिय घाला' असा इषारा आम्ही पूर्वीच दिला होता आणि राष्ट्रीय सभेनेंहि बहिष्काराच्या केवळ विघातक स्वरूपावर संतुष्ट न राहातां विधायक स्वरूपाचा विचार करण्याचें योजिलें आहे व वर्किंग कमिटीनें त्याकरितां येत्या महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत दिल्ली शहरीं सर्वपक्षीय पुढाऱ्यांची परिषद भरवून स्वराज्यघटनेची चर्चा करण्याचें ठरविलें आहे हे यथायोग्यच झालें.

हिंदुस्थानांतून स्वराज्याच्या ध्येयाचा ध्वनि प्रकट होऊं लागल्यापासून हें भावी स्वराज्य कोणत्या स्वरूपाचें असावें तें निश्चित करण्याच्या हेतूनें अनेकांनीं आजपर्यंत त्याची मनोमय मूस ओतली होती. परंतु स्वराज्य-घटनेला अगदीं परवां परवांपर्यंत प्रत्यक्ष मूर्त स्वरूप आलें नव्हतें. बेझंटबाईनीं आपल्या 'कॉमनवेल्थ ऑफ इंडिया' बिलानें पूर्वीच्या निर्गुण व निराकार अशा कल्पनेला प्रथम सगुण व साकार बनावलें आणि त्या वेळेपासून आतांपर्यंत निरनिराळ्या मूर्तींची घडणावळ चालूच आहे; आणि अशा मूर्ती बनविण्यांत मद्रासी पुढाऱ्यांनीं प्रामुख्यानें अग्रस्थान पटकावलें आहे. राष्ट्रीय सभेचे माजी अध्यक्षत्रय बेझंटबाई, श्री. विजयराघवाचार्य आणि श्रीनिवास अय्यंगार यांनीं आपापल्या घटना प्रसिद्ध केल्या असून त्याखेरीज इतरांहि कित्येक सूचना वर्किंग कमिटीपुढें येऊन दाखल झाल्या आहेत. आणि त्या सर्वांचा विचार होऊन त्यांतून सर्वसंग्राहक अशी एक घटना तारतम्यानें तयार केली जाईल असें वाटतें. अशी ही भावी घटना सर्वसंमत होण्यास तिचें स्वरूप कोणत्या प्रकारचें असावें याची तात्विक चर्चा करण्याचें आम्ही योजिलें आहे.

वर्किंग कमिटीपुढें स्वराज्याच्या एकाहून एक सरस अशा अनेक घटना येऊन पडल्या असल्या तरी त्या सर्व घटना मद्रासच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या पूर्वीच तयार केलेल्या असल्यामुळें त्यांत 'निर्भेळ स्वातंत्र्य' हें हिंदुस्थानाचें अंतिम ध्येय मानलें नसून त्यांतील कोणत्याहि बिलाची मजल वसाहतीच्या स्वराज्याच्या ( Dominion Status ) पलीकडे गेलेली नाहीं. एवढेंच नव्हे तर हिंदी पुढाऱ्यांचें एकमत होण्यासाठीं आपणाला तूर्त 'वसाहतीच्या' स्वराज्याच्या ताकावरच आपली निर्भेळ स्वातंत्र्यरूपी दुधाची तहान भागवून घेतली पाहिजे आणि व्यावहारिक दृष्ट्या पाहूं गेल्यास हें ताकाचें पाणी जवळ जवळ दुधाइतकेंच स्वादिष्ट आहे असें माजी अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार यांनीं आपल्या स्वराज्य-घटनेच्या प्रस्तावांत लिहून ठेविलें आहे ! पण हा सगळा विचार मद्रासच्या राष्ट्रीय सभेच्या आधींचा झाला. आणि आतां मद्रासची राष्ट्रीय सभा 'निर्भेळ स्वातंत्र्य' हें आपलें अंतिम ध्येय असल्याची घोषणा करून बसली आहे. तेव्हां आतां जी स्वराज्यघटना तयार करावयाची ती 'डोमीनिअन स्टेटस'च्या स्वरूपाची करावयाची का निर्भेळ स्वातंत्र्याच्या स्वरूपाची करावयाची ही पहिली अडचण दिल्लीस भरणाऱ्या सर्वपक्षीय परिषदेच्या पुढें येऊन पडणार आहे.

स्वराज्यघटनेचा जो मसुदा तयार करावयाचा तो पार्लमेंटाकडे मंजुरीकरितां पाठवावयाचा असल्यास त्याला निर्भेळ स्वातंत्र्याचा वासहि येतां कामा नये. कारण तसला मसुदा आपण पार्लमेंटाकडे पाठविणें यांतच 'वदतो व्याघातः' असा दोष आपल्या पदरीं येतो; आणि ब्रिटिश पार्लमेंटच्या दृष्टीनें असल्या साम्राज्यबहिर्गत राष्ट्राच्या घटनेचा विचार पार्लमेंट कशाकरितां करील ? अर्थातच पार्लमेंटाकडे पाठवावयाची घटना निर्भेळ स्वराज्याची असूं शकत नाहीं; ती संमिश्र स्वराज्याचीच तयार करावी लागणार हे उघड आहे. परंतु असलें संमिश्र स्वराज्य आपण होऊन कबूल

करावयाचें तर मद्रासच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत संपूर्ण स्वातंत्र्याची जी घोषणा केली तिला किमत राहात नाहीं. हा पेंच सोडविण्याच्या कामात परिषदेंतील पुढाऱ्यांच्या बुद्धिमत्तेची, स्वाभिमानाची आणि व्यवहारकुशलतेची कसोटीच लागणार आहे. सायमन कमिशनवरील निष्क्रिय बहिष्काराचें दुसरें सक्रिय स्वरूप म्हणून जर ही स्वराज्य-घटना तयार होत असेल तर ती पूर्ण स्वातंत्र्यवादी अशीच असली पाहिजे. परंतु सायमन कमिशनच्या भावी रिपोर्टाला प्रत्युत्तर म्हणून जर ही कैफीयत तयार करावयाची असेल तर ती ब्रिटिश पार्लमेंटानें विचारांत घेण्याच्या लायकीची असली पाहिजे. पण अशी कैफीयत आतां आपण होऊन सादर करण्यांत राष्ट्रीय सभेचा एक प्रकारें कमीपणा आहे, या दृष्टीनें स्वातंत्र्याचा ठराव केल्यानंतर घटनेच्या नादीं लागूं नये असें सत्यमूर्ती यांनीं म्हटलें. परंतु आयरिश फ्रीस्टेटनेंहि असला कमीपणा स्वीकारला आहे. सिनफेनपक्षाची स्थापना झाल्यावेळेपासून निर्भेळ स्वातंत्र्याच्या ध्येयाचा आयर्लंडला केव्हांहि विसर पडला नाहीं; तथापि इंग्लंडाशीं वाटाघाट करून स्वराज्य-घटनेला इंग्लिश पार्लमेंटाची संमति संपादण्यासाठीं आयर्लंडलाहि वसाहतींच्या स्वराज्याच्या दर्जावर तूर्त संतुष्ट राहावें लागलें आहे. आणि राज्यक्रान्ति घडवून आणण्याच्या उपाययोजनेच्या कामांत हिंदुस्थान आयर्लंडापेक्षां किती मागसलेला आहे हें काहीं कोणी कोणास सांगावयास पाहिजे असें नाहीं. याकरितां बर्किंग कमिटीनें बोलाविलेल्या परिषदेंत जी घटना तयार होईल ती संपूर्ण स्वायत्त वसाहतीच्या दर्जाच्या सीमेच्या आंतच आंखली जाईल असें वाटतें.

तरी पण मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत जो निर्भेळ स्वातंत्र्याचा ठराव झाला त्याचा हेतु काय व त्याची बजावणी करण्याची अवश्यकता केव्हां उत्पन्न होईल एवढी जाणीव या बिलांतच ब्रिटिश पार्लमेंटाला करून दिली पाहिजे. आणि ती ब्रिटिश पार्लमेंटाला चिरपरिचित अशा भाषेंत करून दिल्यास तिला ती तात्काळ पटेल. ब्रिटिश पार्लमेंटाची सुधारणा करणारें रिफॉर्म बिल लॉर्डांच्या सभेनें ज्या वेळीं नामंजूर केलें त्यावेळीं लॉर्डांची सभाच नामशेष करूं अशी भाषा चळवळया लोकात सर्वतोमुखीं झाली व तिचा इष्ट असा परिणाम होऊन लॉर्डांच्या सभेला हार खाणें भाग पडलें. हिंदुस्थानानें तयार करावयाच्या स्वराज्य-घटनेसंबंधानेंहि असें म्हणण्याचा प्रसंग येईल कीं, जर ब्रिटिश सरकार ही घटना मंजूर करणार नाहीं तर आम्हीहि ब्रिटिश साम्राज्याचा संबंध मानणार नाहीं. अर्थातच स्वराज्य-घटनेचा मसुदा तयार करावयाचा तो साम्राज्यसंबंध तुटलेला नाहीं असें समजूनच तयार करावा; पण त्याबरोबरच त्यांत अशीहि योजना जाहीर करून ठेवावी कीं, ब्रिटिश पार्लमेंटनें हें बिल जशाचें तसें पास न केल्यास किंवा बिल पास करून देखील मागाहून हिंदुस्थानाच्या हितसंबंधास विरोध येईल अगर हिंदुस्थानाच्या स्वाभिमानास बाध येईल असें वर्तन केल्यास ब्रिटिश संबंध तोडून टाकण्याचा विचार ठरविण्याचा आणि स्वराज्य-घटनेंत तशी दुरुस्ती करण्याचा अधिकार भावी हिंदी कायदेमंडळानें आपणाकडे राखून ठेवला आहे. असा स्पष्ट इषारा देऊन ठेवल्यास त्यांत राष्ट्रीय सभेच्या ठरावाचाहि बीज राहील आणि तयार केलेली घटना ब्रिटिश पार्लमेंटाकडे पाठविण्यालाहि प्रत्यवाय येणार नाहीं.

स्वराज्य-घटनेच्यासंबंधाचा हा पहिला प्रास्ताविक विचार झाला. यानंतरचा दुसरा महत्त्वाचा आणि थोडासा वादग्रस्त असा प्रश्न म्हटला म्हणजे हिंदी राष्ट्राची स्वराज्य-घटना एकसूत्री ( Unitary) असावी का संयुक्त स्वरूपाची ( Federal ) असावी हा होय. सालमचे महर्षि विजयराघवाचार्य हे एकसूत्री घटनेचे पुरस्कर्ते आहेत. उलटपक्षी श्रीनिवास अय्यंगार, बेझंटबाई, फेन्नर ब्रॉकवे, ए. रंगास्वामी अय्यंगार प्रभृति मंडळी अमेरिकेंतल्याप्रमाणें संयुक्त स्वरूपाची घटनाच शक्य व श्रेयस्कर आहे असें मानणारी आहे. यूनिटरी पद्धतीनें खर्च कमी येतो, मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांच्यांत विरोध व धुसफुस सुरू होण्याचा प्रसंग येत नाहीं आणि ज्ञातिनिष्ठ किंवा प्रांतनिष्ठ तुटकपणा नाहींसा होतो असें त्या पद्धतीच्या पुरस्कर्त्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें हिंदी संस्थानांचा हिंदी सरकारशीं संबंध कसा राहावा याचा उलगडा यूनिटरी पद्धतीनें जसा लवकर होईल तसा फेडरल पद्धतीनें होणार नाहीं असेंहि त्यांचें मत आहे! परंतु यांत फारसें तथ्य दिसत नाहीं. हिंदुस्थान देशाचा विस्तार, येथील विविध भाषा व संस्कृति आणि प्रांतिक स्वायत्ततेची आकांक्षा व परंपरा लक्षांत घेतल्यास या भरतखंडांत केंद्रीभूत अशी एकसूत्री सत्ता प्रस्थापित करण्यापेक्षा प्रांतिक स्वायत्तता उपभोगणाऱ्या प्रांतांचें संयुक्त अशा मध्यवर्ती सत्तेंत एकीकरण करणेंच अधिक सुलभ आणि श्रेयस्कर ठरेल. त्याचप्रमाणें हिंदी संस्थानांचा समावेश संयुक्त राज्यपद्धतींत जितका स्वाभाविकपणें होऊं शकेल तितका तो केंद्रीभूत राज्यपद्धतीत होऊं शकणार नाहीं. आतां अशा पद्धतीनें प्रांताप्रांतात तुटकपणा अधिक वाढतो असा जो एक आक्षेप घेण्यांत येतो त्यास समर्पक उत्तर हेंच कीं, हा तुटकपणा पूर्वीपासूनच हिंदी लोकांच्या हाडींमासीं खिळलेला आहे. तो फेडरल

राज्यपद्धतीनें अधिक वाढावयाचा नाहीं, कारण अधिक वाढण्यास आतां वावच राहिलेला नाहीं. आणि हा तुटक स्वभाव नाहींसा होणें शक्य नाहीं म्हणूनच एकसूत्री राज्यपद्धती अव्यवहार्य मानून संयुक्त राज्यपद्धती स्वीकारणें प्राप्त आहे. अमेरिकेंतील संस्थानांनीं संयुक्त राज्यपद्धतीच कां ग्राह्य मानिली याची कारणमीमांसा करतांना विजयराघवाचार्य असें सांगतात कीं, अमेरिकेची घटना ठरण्यापूर्वींच तेथें तरा वेगवेगळीं संस्थानें अस्तित्वांत होतीं व तीं आपलें पृथक्त्व सोडून देण्यास कबूल होईनात. हुबेहूब तशीच स्थिति हिंदुस्थानांतहि आज आहे ही गोष्ट विजयराघवाचार्य यांच्या लक्षांत कशी आली नाहीं याचेंच आश्चर्य वाटतें. येथील प्रांताप्रांतामधील आजपर्यंतच्या संबंधाकडे नजर फिरविल्यास सर्वांना एका सूत्रांत गोवणें हें अव्यवहार्यच ठरेल. यास्तव हिंदुस्थानाची भावी राज्यघटना संयुक्त पद्धतीचीच असावी व तींत प्रत्येक प्रांताला अंतर्गत राज्यव्यवस्थेपुरती पूर्ण स्वायत्तता असावी. संयुक्त पद्धतीच्या राज्यकारभारानें राष्ट्र दुर्बळ होतें वगैरे जे आक्षेप आहेत तेहि फोलच आहेत. कारण राष्ट्राची सगळी लष्करी व्यवस्था एकमुखीच राहावयाची आहे. त्याचप्रमाणें दिवाणी, फौजदारी वगैरे कायद्यांतील जेवढे कायदे तात्विक व व्यापक स्वरूपाचे असतील ते सर्व प्रांतांना सारखेच लागू व्हावयाचे असल्यानें प्रांतिक स्वायत्तता राखून देखील सर्व राष्ट्र संघटित व सामर्थ्यवान राहूं शकेल.

स्वराज्याच्या घटनेंतील तिसरा महत्त्वाचा प्रश्न कायदेमंडळांचा. प्रांतिक व वरिष्ठ सरकारचे अधिकारी ज्या कायदेमंडळांना जबाबदार राहावयाचे तीं कायदेमंडळें कशीं असावींत ? तीं द्विशाखात्मक असावींत का एकशाखात्मक असावींत ? कायदेमंडळांतील सर्व सभासद मतदारांनीं निवडलेले असेच असावेत, त्यांत सरकारनियुक्त सभासद एक देखील असूं नये, हें तत्त्व सर्वमान्य होण्याजोगें आहे. अर्थात् भावी हिंदी कायदेमंडळांतून असल्या उभयान्वयी सभासदांना जागाच ठेवली जाणार नाहीं हें उघड आहे. मात्र वरिष्ठ कायदेमंडळाच्या दोन शाखा असाव्यात असाच बहुतेकांचा आग्रह दिसतो सबब त्याचा विचार केला पाहिजे. प्रांतिक सरकारास प्रांतिक स्वायत्तता देऊन संयुक्त स्वरूपाची राज्यघटना बनविल्यास प्रांतिक कायदेमंडळेंहि द्विशाखात्मक असावींत असाहि कित्येकांचा आग्रह आहे आणि हिंदी जनतेला ही द्विशाखात्मक पद्धति मान्य असो वा नसो, सायमन कमिशनच्या मार्फत ब्रिटिश सरकार असलीं दुहेरी प्रांतिक कायदेमंडळें हिंदुस्थानावर लादणार असें भविष्य श्रीनिवास अय्यंगार यांनीं आगाऊच वर्तविलें आहे !

सायमन कमिशन कोणत्या शिफारसी करील आणि ब्रिटिश सरकार त्यांतल्या कोणत्या शिफारसी मान्य करील याचा आम्हास विचार करावयाचा नाहीं. परंतु हल्लींचें कौन्सिल ऑफ स्टेट हें असेंब्लीच्या मार्गांत एक विघ्नच असून असलीं कौन्सिल ऑफ स्टेट्स प्रांतोप्रांतीं सरकार निर्माण करूं पाहात आहे! यावरूनच कौन्सिल ऑफ स्टेट सारखें लोढणें असेंब्लीच्या व त्याचप्रमाणें प्रांतिक कौन्सिलांच्या गळ्यांत नसावें हेंच युक्त ठरतें. यास्तव भावी राज्यघटनेंत प्रांतिक सरकारांत व वरिष्ठ सरकारांतहि एकच एक कौन्सिल असावें, दोन सभा असण्याचें कारण नाहीं. बहुतेक सर्व देशांतून कायदेमंडळें दुशाखी असतात म्हणून त्यांत कांहीं विशेष जादू आहे असें मानण्याचें कारण नाहीं. दोन सभा ठेवण्यांत तत्त्व काय हेंच आम्हास समजत नाहीं. एका सभेंतल्या सभासदावर जर विश्वास नसेल तर त्यांचा निर्णय फिरविण्याकरितां दुसरी सभा स्थापन करण्यापेक्षां एकच लोकप्रतिनिधि-सभा विश्वासार्ह व सर्वतोपरी लायक कशी होईल याचाच विचार करणें व त्याप्रमाणें त्या कायदेमंडळाची रचना निर्दोष अशी करणें हेंच तर्कशुद्ध व जास्त हितावह नव्हे काय? सारांश, ही द्विशाखात्मक कायदेमंडळाची अंधपरंपरा हिंदुस्थानानें तशीच पुढें न चालवितां ती सोडून देऊन वरिष्ठ सरकारांत व प्रांतिक सरकारांत एकेकच कायदेमंडळ ठेवावें आणि तें कायदेमंडळ अत्यंत श्रेष्ठ दर्जाचें व कार्यक्षम कसें होईल याचा विचार करून स्वराज्यघटनेंत त्याची शक्य तितकी निर्दोष अशी रचना करावी.

याशिवाय कायदेमंडळांत ज्ञातिविशिष्ट प्रतिनिधी असावे कीं काय, हिंदु-मुसलमान मतदारसंघ संयुक्त असले तरी मुसलमानांकरितां वेगळ्या जागा राखून ठेवण्याची पद्धति कायमच ठेवावयाची का कांहीं कालमर्यादेनंतर ती बदलावयाची, तज्ज्ञांच्या ज्ञानाचा कायदेमंडळास फायदा मिळण्याकरितां विश्वविद्यालयें, व्यापारी संस्था, कारखानदार इत्यादिकांचे स्वतंत्र मतदारसंघ बनवावयाचे कीं काय, प्रांतिक व मध्यवर्ती सरकारांत अधिकारविभागणी आणि करवसुलीची व जमाखर्चाची वांटणी कशी करावयाची आणि मुख्यतः संस्थानिकांचे संबंध कोणत्या स्वरूपाचे ठेवावयाचे आणि संस्थानी प्रजाजनांचा संस्थानाबाहेरच्या कारभारांत व संस्थानाबाहेरच्या हिंदी लोकांचा संस्थानाच्या कारभारांत कितपत प्रवेश असूं द्यावयाचा इत्यादि अनेक प्रश्नांची चर्चा करणें जरूर असल्यानें ती यथाक्रम करण्यांत येईल एवढें सांगून आजच्या प्रास्ताविक चर्चेची येथेंच समाप्ति करूं.

# चीनचें अन्तरंग

## ( पूर्वार्ध )

हिंदुस्थानाचा जीव चीनकडे ओढतो याचीं कारणें अनेक आहेत. हिंदुस्थान आशिया खंडांतील, चीनहि आशिया खंडांतलाच. हिमालयाच्या दक्षिणेस हिंदुस्थान व हिमालयाच्या उत्तरेस चीन. हिंदुस्थान बौद्ध धर्माचा पिता व चीन बौद्ध धर्माचा पुत्र. जी संस्कृति हिंदुस्थानाची तीच संस्कृति बहुतांशीं चीनची. हिंदुस्थान पराधीन, चीनहि बहुतांशीं पराधीन. हिंदुस्थानाची धडपड स्वातंत्र्याकरितां, चीनची धडपडहि स्वातंत्र्याकरितांच. चीन व हिंदुस्थान हे दोनहि देश मोठे आणि चीन व हिंदुस्थान या दोनहि देशांतील लोकसमूहहि मोठा. हिंदुस्थानाचें भांडण इंग्रजांशीं, चीनचें भांडणहि इंग्रजांशींच. चीन स्वतंत्र झाल्यानें हिंदुस्थानाच्याहि स्वातंत्र्यास पर्यायानें मदत होईल. हिंदुस्थान मूळचा राजसत्ताक, चीनहि राजसत्ताक. यासाठीं हिंदुस्थानाचा जीव चीनकडे ओढतो. हिंदुस्थान देश सर्वस्वी परतंत्र खराच. परंतु त्याहि पारतंत्र्यांत चीनविषयीं कळकळ दाखविण्याची एकहि संधि गेल्या वर्षांत हिंदुस्थानानें वांया जाऊं दिली नाहीं. गौहत्तीची राष्ट्रीय सभा व मद्रासची राष्ट्रीय सभा या दोनहि महासभांतून चीनचें नांव दुमदुमलें. गौहत्तीपेक्षां मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत तें अधिकच दुमदुमलें.

चीनच्या यादवी युद्धांत जखमी होऊन पडणाऱ्या वीरांची शुश्रूषा करण्याचें पुण्य आपणास लाभावें अशी हिंदुस्थानाची फार इच्छा असल्यामुळें हिंदुस्थानांतून चिनांत एक शुश्रूषा पथक पाठविण्याचें गेल्या वर्षी राष्ट्रीय सभेनें ठरविलें. पण राष्ट्रीय सभेची ही क्षुल्लक हौसहि हिंदुस्थान-सरकारनें पुरविली नाहीं. जणुं काय चीनची हिंदुस्थानानें अशा प्रकारें मैत्री संपादन केली असती तर चीन देश हिंदुस्थानास इंग्रजांच्या बंदिशाळेंतून सोडविण्याकरितां इंग्रज सरकारावर चालून आला असता. मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें गौहत्तीसहि मागें टाकून चीन देश आपला मित्र असल्याचें जाहीर केलें आहे. चीनच्या पायांतील इंग्रजांची शृंखळा आवळून बसविण्याच्या पापकर्माचे अंशभागी कोणाहि हिंदी माणसानें होऊं नये अशी राष्ट्रीय सभेनें त्यास शपथ घातली आहे व हिंदुस्थान-सरकारनें आपलें सर्व हिंदी सैन्य हिंदुस्थानांत परत आणावें असा हिंदुस्थान-सरकारपाशीं हट्ट धरला आहे. राष्ट्रीय सभेच्या या अनुज्ञांचा किंवा विज्ञप्तींचा प्रत्यक्ष परिणाम कांहींहि होणारा नसला तरी खऱ्या भारतपुत्राचा जीव चीनवर किती जडला त्याचें हें उत्कृष्ट गमक होय यांत शंका नाहीं. अशा चीन देशाच्या अन्तरंगांत कोणती घालमेल चालू आहे याची माहिती हिंदुस्थानांत जितकी होईल तितकी थोडीच समजली पाहिजे.

### चिनची आकृति व वस्ती

चीनची आकृति युरोपाएवढी व वस्ती युरोपाइतकी म्हणजे चाळीस कोटि आहे एवढें सांगितलें असतां चीन आपल्या पायांतील शृंखळा आदळतो, तिचा आवाज एवढा मोठा कां होतो हें कोणाच्याहि लक्षांत येईल. सुपीक, सजल व समृद्ध चिनांत हिंदुस्थानाप्रमाणें शें. ८० माणसें शेतकरी आहेत याचेंहि आश्चर्य कोणास वाटणार नाहीं. त्याखेरीज व्यापारी व जमीनदारवर्गहि मोठा व वजनदार आहे. कृषिप्रधान देशांतील सामान्य जनसमूह कष्टाळु, अल्पसंतुष्ट व चळवळीस जात्याच प्रतिकूल असतो तसाच तो चिनांतहि प्रतिकूल आहे. पितृतर्पण, पिंडदान, वायु, अग्नि, वरुण आदिकरून देवतांची पूजा यांत निमग्न होणारा व मोठमोठीं कुटुंबें करून राहणारा तो समाज आहे. त्याचा हा परिपाठ आजकालचा नसून चार-पांच हजार वर्षे अविच्छिन्न चालत आलेला आहे. प्रत्येक गांव इतका आत्मसंतुष्ट व अल्पसंतुष्ट आहे कीं, त्याजवर जीं राज्यें येतील व जीं जातील त्यांजकडे तो तिऱ्हाइतासारखा तुटकपणानें आश्चर्यपूर्वक पाहत राहतो. राज्यें आलीं अगर गेलीं तरी तीं त्याजवरून तरंगणाऱ्या ढगासारखीं किंवा पंख पसरून उडणाऱ्या पांखरासारखीं कांहींच फेरबदल घडवून आणीत नाहींत. मांचू घराणें पेकिंगमध्यें बसून चीनवर तीनचारशें वर्षे राज्य करीत होतें खरें. परंतु त्याचा अंमल दिल्लीच्या मोंगल बादशाहीसारखाच ढिला होता. सर्व सत्ता त्या त्या प्रांतांतील सुभेदाराच्या हातीं व तेहि ठरलेल्या कराचे मालक असल्यामुळें खेडेगांवचा जीवनक्रम निर्वेध राही. वरील संथपणाची स्थिति चीन देशांत १८५८ पर्यंत कमीअधिक प्रमाणांत अनुभवास येत होती. युरोपियन राष्ट्रास आशिया खंडांत प्रविष्ट झाल्यावर प्रथम भेटणारा समृद्ध व विस्तृत देश चीनच्या अलीकडे हिंदुस्थानच. बुभुक्षित पाश्चात्य राष्ट्रांस खूप चरावयास येथें सांपडलें व हिंदुस्थानांत खाऊन-पिऊन व धष्टपुष्ट होऊन इंग्लंड चीनकडे अभिलाषबुद्धीनें पाहूं लागलें.

युरोपियन राष्ट्रांची सावली चीन देशावर सतराव्या व अठराव्या शतकांतच पडली होती. परंतु ती

त्या वेळीं फारशी टिकली नाहीं. कारण जिन्नस तोलावयाच्या तराजूवर इंग्रजांनीं हिंदुस्थानाचें पाणी जोखलें व मालमसाल्याबरोबरच हिंदुस्थान देशहि खरेदी करीत आणिला याची खबर चीनच्या मांचू घराण्याच्या कानापर्यंत पोंचली होती. इंग्लंडावर तिसरा जॉर्ज राज्य करीत असतां त्यानें आपला वकील चीनचा बादशहा चेनलंग याजकडे व्यापारी सवलर्ता मिळविण्याकरितां पाठविला होता. त्यानें आपल्याबरोबर कांहीं नवीन व चमत्कारिक जिनसा नजराणा म्हणून आणिल्या होत्या. हेतु हा कीं, त्या जिनसांच्या लोभानें तरी बादशहा सवलती देईल. त्या प्रसंगीं बादशहा चेनलंग यानें वकिलाबरोबर परत पाठविलेला पुढील निरोप मुत्सद्दीपणाचा आहे.

"आमच्या संस्कृतीचा फायदा घ्यावा अशी तुमची इच्छा आहे. तुमची नम्रता फार स्तुत्य आहे. तुमच्या देशाचा वकील आमच्या दरबारांत असावा व त्यानें तुमच्या देशाचा चीनबरोबर व्यापार सुरू आहे त्याजवर देखरेख ठेवावी अशी तुमची अपेक्षा आहे. पण ती मला मान्य करवत नाहीं. आमची संस्कृति तुम्हाला साधणार नाहीं, तुम्ही पाठविलेल्या देणग्या आम्हास पोंचल्या. तुमच्या देणग्या व जिनसा चमत्कारिक असतील. पण आम्हाला तुमच्या देशांतील जिनसांची गरज नाहीं. आमच्या देशांत कांहीं कमी नाहीं."

चीनच्या बादशहाचें वरील उत्तर अर्थपूर्ण आहे. त्यांत चीन देश पूर्णपणें स्वावलंबी कसा आहे हें दाखविलें असून तुमच्या मोहक व चमत्कारिक वस्तूंस व तुम्हास चिनांत स्वैरपणें वावरूं दिल्यानें चीन देशास हिंदुस्थानाप्रमाणें संपत्तीस व स्वातंत्र्यास मुकावें लागेल असेंहि बजावलें आहे. चीनचा ब्रिटिशांपासून दूरदूर पळण्याचा हा डाव फार दिवस साधला नाहीं. कारण १८५८ त इंग्लंडानें आपल्या मनगटाच्या बळावर चीनपासून या सवलती मिळविल्या आणि फ्रान्स, रशिया, अमेरिका, जपान, जर्मनी यांसहि सदर सवलती द्याव्या लागल्या. त्या सुमारास पेकिंगची राजसत्ता इतकी दुर्बल बनली होती कीं, १८६० सालीं इंग्लंड व फ्रान्स यांनीं पेकिंग शहरहि काबीज केलें! चीनचें अवसान या प्रसंगानें युरोपियन राष्ट्रांनीं पुरतें ओळखून त्याचे लचके तोडले. १८९५ त जपानानें फोर्मोसा बेट बळकावलें, १८९७त शँटंग प्रांत जर्मनीनें घेतला, १८९८ त फ्रान्सनें हाँगकाँग व हैनान हीं बेटें मिळविलीं, १९०० त बॉक्सर बंडाचें निमित्त करून रशियानें मँचूरिया हस्तगत केला व या लांडगेतोडीस वेळींच आळा बसला नसता तर चीनचें राज्य आज दृष्टीस पडलें नसतेंच. परंतु त्यास गिळंकृत करणाऱ्या युरोपियन शुंभ-निशुंभांतच कलागत लागून परस्पर त्यांचाहि कदाचित् चुराडा उडाला असता.

## अमेरिकेचा साळसूदपणा

सर्व पाश्चात्य राष्ट्रांत अमेरिका आपणास मोठी साळसूद समजते. तिनें पाहिलें कीं, असा परिणाम होणें बरें नव्हे. त्यांत चीनची हानि आहेच. पण त्याहूनहि युरोपियन राष्ट्रांची हानि अधिक आहे. यासाठीं १८९९ सालीं तिनें 'सबूर' असा हुकूम सोडला! चीन हा देश एकछत्री राहावा, त्यांत व्यापार करण्यास सर्वांस सारखी मोकळीक व संधि मिळावी, असें तिनें ठरविलें. व्यापारी सत्तेपेक्षां राजकीय सत्ता केव्हांहि श्रेष्ठच. कारण राजकीय सत्तेच्या ताब्यांत व्यापार राहूनच्या राहून सबंध प्रजाजनांसहि आपल्या लगामीं लावतां येतें. त्याहिपेक्षां राजसत्तेचा विशेष उपयोग म्हणजे व्यापाराचा मार्ग कायमचा निष्कंटक राहातो. हें कार्य राजकीय सत्तेवांचून व यादवी युद्धावांचून चिनांत साधल्यास त्यांत सर्वच युरोपियन राष्ट्रांस समाधान कां न वाटावें ? चिनांत युरोपियन राष्ट्रांस चिनी बादशहापासून पुढीलप्रमाणें सवलती मिळाल्या (१) युरोपियन मालावर पांच टक्के जकात आहे ती वाढूं नये ( २ ) युरोपियनांवर चिनी कायद्याचा अंमल नसावा ( ३ ) मिशनऱ्यांस ख्रिस्ती धर्माचा प्रचार चिनांत कोठेंहि करण्यास मुभा असावी, त्यांस जमीन कोठेंहि खरेदी करतां यावी व घर बांधतां यावें (४) युरोपियनांच्या वस्तीत चिनी लोक राहिले, किंवा चिनी लोकांनीं कर दिला तरी त्यांस म्युनिसिपालिटीच्या व इतर कारभारांत मताधिकार नसावा.

वरील तहान्वयें चिनांत जपानी, रशियन, ब्रिटिश व अमेरिकन इत्यादि परराष्ट्रीय चार लाखांपर्यंत घुसले. या चार लाखांपैकीं अमेरिकन तेरा हजार, इंग्रज वीस हजार, रशियन एक लाख व जपानी दोन लाख आहेत. त्यांनीं समुद्रतीराचीं व नदीकिनाऱ्याचीं बहुतेक बंदरें व्यापलीं. चिनी लोकांच्या संथपणानें चाललेल्या जीवनक्रमांत त्यांनीं विविध साधनांनीं खळबळ उडवून दिली. हीं सर्व बंदरें युरोपियनांच्या चळवळीचीं केंद्रें बनलीं. त्या बंदरांतून त्यांनीं आपली स्वतंत्र वसाहत केली. व त्यांत म्युनिसिपालिट्या स्थापल्या, गिरण्या काढल्या, आगगाड्या चालविल्या, शाळा-कॉलेजें उघडलीं व दवाखाने सुरू केले. अशा अनेक संस्थांपैकीं आरोग्य-विषयक व शिक्षण-विषयक संस्था मिशनऱ्यांच्या आणि इतर संस्था व्यापारी वर्गाच्या हातीं होत्या. त्यांच्या संरक्षणासाठीं त्या त्या राष्ट्रांचें थोडें-बहुत आरमार व सैन्य असे आणि न्याय-मनसुबा करण्यास व तंटे-बखेडे तोडण्यास

वकील असे. दुर्योधनास त्याची माता गांधारी हिनें शरीराच्या विशिष्ट भागापुरता अमरपट्टा दिला होता तसाच अमरपट्टा पाश्चात्य संस्थांस व चळवळीस या तहानें मिळाल्यामुळें त्यांनीं आपले उद्योग नेटानें चालविले.

### नवा देखावा

हा देखावा चिनी डोळ्यांस अगदींच नवा होता. तो पाहून चिनी डोळे दिपून गेले. चिनी मुलें मिशनऱ्यांच्या शाळा—कॉलेजांत शिकावयास गेलीं, चिनी रोगी मिशनऱ्यांच्या दवाखान्यांतील दवा खाऊन निरोगी होऊं लागले, चिनी कामगार युरोपियनांच्या गिरण्यांतील संचा चालवीत बसले व चिनी हमाल गोद्यांतील गठ्ठे उठवावयास गेले. परदेशचा माल चीनभर पसरला व तो जेथें जेथें पसरला त्या त्या ठिकाणच्या स्वजातीय मालाच्या मानेस नख देऊन आपण चिरंजीव झाला. युरोपियनांनी बहुतेक नाक्याचीं बंदरें धरलीं होतीं. तीं तीं बंदरें म्हणजे चीनच्या शरीरांतून रक्त खेळविणाऱ्या धमन्याच होत. या धमन्यांचा युरोपियनांस दुहेरी उपयोग झाला. एक तर त्यांजमार्फत परकीय माल परकीय कल्पना व परकीय विचार चीनच्या शरीरांत भिनले आणि त्या त्या धमन्यांस तुंबड्या लावून त्यांनीं त्यांजमार्फत द्रव्यहि शोषून घेतलें चीन देश आधींच गरीब. पण त्यांतहि होते नव्हते ते लहान प्रमाणावरील पुष्कळ धंदे सफाई बुडून चीन देश पांढरा पडला. यांहिपेक्षां चिनी लोकांच्या विचारांत व कल्पनांत घडून आलेला फरक फारच विलक्षण.चिनांत ख्रिस्ती धर्माचा प्रसार बराच झपाट्यानें झाला. प्रेस्बिटेरियन चर्चचें कार्य तेथें किती भरभराटलें हें पाहिलें म्हणजे त्यावरून ख्रिस्ती धर्मांतील इतर पंथांच्या प्रसाराचीहि कल्पना होईल. आज चीनमध्यें प्रेस्बिटेरियन पंथाच्या सोळा सोसायट्या असून त्यांचा रेव्हरंड डॉ. केपलर हा जनरल एक्झिक्यूटिव्ह सेक्रेटरी आहे. इतकेंच नव्हे तर सांप्रतच्या क्रांतींत राष्ट्रीय पक्षाचा सेनापति या नात्यानें लढणारा सेनापति चँग-कियांग हा ख्रिस्तीच आहे. कान—फुत्सु, लाऊ-त्सु व बौद्ध हे फार जुने धर्मपंथ चिनांत आहेतच. पण त्याखेरीज मुसलमान दीड कोटि आहेत व मिशनऱ्यांच्या प्रयत्नानें ख्रिस्त्यांची वस्तीहि वाढत्या प्रमाणांत आहे.

# आंग्ल कवि थॉमस हार्डी

( ले.—**एक अभ्यासक** )

व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीत इंग्लिश वाङ्मयाचे वाटिकेंत जे अनेक ग्रंथकार-रूपी वृक्षांचे सोट फोफावले त्यांतील शेवटचा व काळाची नजर चुकवून एखाद्या उत्तुंग तालवृक्षाप्रमाणें आपल्या एकाकी वैभवांत डुलत राहाणारा इंग्लंडांतील सुप्रसिद्ध कादंबरीकार व कवि थॉमस हार्डी हा काळाच्या ओघांत उन्मळून पडला हें वर्तमान ऐकून त्याचे ग्रंथाचे वाचकांस क्षणभर विषाद वाटल्यावांचून राहाणार नाहीं. मोठमोठीं साम्राज्यें, टोलेजंग प्रासाद किंवा वटपिप्पलादि प्रचंड वृक्ष—सारांश जें जें कांहीं विभूतिमत् आहे त्याचें केवळ अवशिष्ट छायारूप अस्तित्व जरी नष्ट झालें तरी मानवी मन विषण्ण होत असतें; मग १८४० सालीं साध्या कुलामध्यें जन्मास येऊन, १९ साव्या शतकाचा कादंबरी—सम्राट म्हणून ज्यानें यश मिळविलें, ज्याला एल्एल्. डी.च्या मानाच्या पदव्या देऊन ऑक्सफोर्ड, केंब्रिजसारख्या प्रख्यात विश्वविद्यालयांनी स्वतःस भूषवून घेतलें, विख्यात ग्रंथकार व स्वतः पंचम जॉर्ज भूपति यांनीं ज्याचा गुणगौरव केला, ज्याच्या हयातींत त्याच्या कादंबऱ्या चलच्चित्रपटावर व लंडनच्या रंगभूमीवर अहमहमिकेनें पुढें आणण्यांत आल्या व नोबेल प्राईझ न मिळाल्यानें मलिनलक्ष्म ज्याच्या यशोधवलिमेची लक्ष्मी अधिकच खुलवीत होतें असा हा कविसम्राट कालवश झाल्यावर कोणा सहृदय वाचकाचें भान क्षणभर नाहींसें होणार नाही?

अशा प्रसंगीं कादंबरीकार हार्डी यांचें वैशिष्ट्य कशांत आहे हें पाहाणें आपणास उचित आहे. सुप्रसिद्ध कादंबरीकार स्टीव्हन्सन यानें हार्डीसारखें मला लिहितां येईल तर त्या कलेची किंमत म्हणून मी माझा हात सुद्धां कलम करून देईन,असे प्रशंसोद्गार मुक्तकंठानें काढिले आहेत. ज्या काळीं आपल्या नवलकथांना नवीन विषय मिळविण्याकरितां लेखकांना आफ्रिकेच्या घनदाट व हिंस्र श्वापदांनीं व्याप्त अशा जंगलांत, किंवा सहारासारख्या रखरखीत वाळवंटांत, उत्तर-दक्षिण ध्रुवासारख्या बर्फमय प्रदेशांत, किंवा चीन—जपानसारख्या प्राचीन गूढ प्रदेशांत, सैबीरियाचे थंड मैदानांत किंवा नायगारा नदीचे धबधब्याकांठीं, लंडन पॅरिस न्यूयॉर्क वगैरे आधुनिक संस्कृतीचे व ऐषआरामाचे आगरांत किंवा कॉन्स्टान्टिनोपल बगदाद वगैरे मुसलमानी विलासी राजधान्यांत, इत्यादि नाना देशांत

मानसिक भराऱ्या माराव्या लागत होत्या; किंवा एवढ्यावरहि न भागलें तर रोमन, ग्रीक, ओटोमन किंवा अनेक प्राचीन देशांचे कुतूहलपूर्ण अशा मानवी घडामोडींनीं व्यापलेले इतिहास उलथेपालथे केले जात होते. अशा काळीं त्या कारागिरानें पश्चिमइंग्लंडांतील साध्या व गरीब शेतकऱ्यांचे जीवनावर, ज्याप्रमाणें चितारी साध्या वर्णसामुग्रीनें उत्कृष्ट चित्र निर्माण करतो, किंवा सायंकाळचे वेळीं बाष्परूप ढगांना निसर्गचित्रकार रविराज सोनेरी, गुलाबी, मखमाली इत्यादि आकर्षक असे गडद रंग देतो, त्याप्रमाणें भावनेच्या प्रकाशाचा झोत पाडून मुलामा चढविला; व द्रष्टा मात्र पाहिजे म्हणजे नेहमींच्या जीवितांतहि अतिपरिचयाचा पडदा दूर सारून त्यांतच गूढ व सुप्त भावनांचा खळखळाट कर्णगोचर कसा होतो हें दाखविलें, यांतच आमचे दृष्टीनें त्याचें मोठेपण आहे. कारण अद्भुत कथांचे चमचमित मसाल्याचे पदार्थ वाचकांस चारून त्यांची तामसी वृत्ति संतोषित करण्यापेक्षां आजपर्यंतचे प्रख्यात सात्विक वाङ्मयपोषक रोजच्या जीवितांतच काव्य कसें भरून राहिलें आहे हें दाखवीत आले आहेत.

## हार्डी व वर्डस्वर्थ

कवितेला साधा विषय चालतो ही गोष्ट वर्डस्वर्थनें ज्याप्रमाणें सिद्ध केली त्याचप्रमाणें कादंबरीचे बाबतींत हार्डीनें सिद्ध केली एवढ्या बाबतींत जरी त्यांचें साधर्म्य असलें तरी वर्डस्वर्थ निसर्गाला ज्याप्रमाणें गुरु मानीत असे व वाऱ्याच्या झुळुकेंत, निर्झराचे नर्तनांत किंवा एखाद्या गळून पडणाऱ्या शुष्कपर्णांत त्याला ईश्वरी संदेश जसा दिसत असे, व सर्व विश्व एकजिनसी चैतन्यानें भरलेलें आहे असा जो भास होत असे त्या प्रकारची वृत्ति हार्डीची नाहीं. निसर्गाकडे तो एखाद्या भयभीत बालकाप्रमाणें पाहातो. हें कांहीं तरी अकल्प्य, गूढ व मानवी शक्तीहून मोठें आहे अशी त्याची भावना आहे. त्याच्या कादंबरींत निसर्गाचीं वर्णनें आहेत, तीं, तीं तीं पात्रें त्यांचे त्या वेळचे विशिष्ट मनोवृत्तींचे झरोक्यांतून व त्यांचे सर्वसाधारण मनोविकासानुरूप, त्यांना निसर्ग जसें दिसलें त्याप्रमाणें केलीं आहेत. यामुळें त्याचे वर्णनांना एक प्रकारें मानुष अतएव जिव्हाळ्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. 'पानी तेरा रंग कैसा जिसमें मिले वैसा ' याप्रमाणें निसर्गाला सुखदुःख कांहीं नसून त्या त्या वेळीं द्रष्ट्याच्या भावनेनुरूप त्याच्या निसर्गाचें स्वरूप पालटत असतें.

एखाद्या चांदण्या रात्रीचें वर्णन करावयाचें तर रजनिनाथ आपली प्रिया रोहिणी हिच्यासह आकाशांत भ्रमण करीत होता व चिमखड्या चांदण्या त्याच्याशीं लपंडाव खेळत होत्या असल्या ठराविक ठशांची न करतां, एखाद्या चांदण्याचे मध्यरात्रीं एखाद्या ओसाड माळावर उभें राहिलें असतां पृथ्वी पूर्व दिशेकडे परिभ्रमण करीत आहे याचा प्रत्यक्ष भास मनुष्यास होत आहे इतकी निश्चित शांतता त्या वेळीं होती अशा तऱ्हेचीं मानवी भावनेचे चष्म्यांतून दिसणारीं, सूर्यास्त, वादळ, एखादा सृष्टिसौंदर्याचा मनोरम देखावा, कडक थंडीचा दिवस किंवा बर्फ पडण्याच्या वेळचें सृष्टिस्वरूप, यांचीं निसर्गवर्णनें त्यानें केलीं आहेत.

निसर्गवर्णन हें अर्थात् आनुषंगिक आहे. त्याचा मुख्य हेतु स्वभावपरिपोष हा आहे. व या बाबतींत त्याचा हात धरणारा कोणी नाहीं. त्याचे कादंबरींत पात्रें फार थोडीं असतात, पण त्यांचे परस्पर आघात-प्रत्याघातावर किंवा स्वभावविनिमयावर त्याचे कादंबरीची प्रगति अवलंबून असते. बाह्य घडामोडींचीं कथानकें खुलविण्यास मुळींच मदत लागत नसून एक किंवा दोन पात्रांचे स्वभावपरिपोषानें भावनोत्कर्षाची परिसीमा त्याचे कादंबरींत गांठली जाते. म्हणून मानवी भावनांचे सूक्ष्म छटांचा चितारी असें त्यास यथार्थतेनें म्हणतां येतें व हीच त्यानें इंग्लिश कादंबरीचे इतिहासांत घडविलेली क्रांति आहे.

मानवी जीविताकडे पाहाण्याची त्याची दृष्टि सापेक्ष आहे. मनुष्य कोण, कोठून आला व कोठें निघाला याविषयीं निश्चित असें त्यास मत नसल्यामुळें तत्कालीन अज्ञेयवाद्याप्रमाणें, रात्रीच्या अंधारांत उजेडाकरितां चांचपडणाऱ्या बालकाप्रमाणें अंतिम सत्याविषयीं त्याची भावना आहे. मनुष्य म्हणजे विश्वाच्या प्रवासास निघालेले मुशाफर. प्रवासांत ज्याप्रमाणें तात्पुरत्या गांठी पडतात त्याप्रमाणें मनुष्यांचा या विश्वपटावर संबंध येतो. मानवी जीवित हें अशा संबंधांनीं व्याप्त आहे. अकल्पित गांठी पडल्या, क्षणभर हंसले, क्षणभर रडले, श्रम भागले. बस्स खलास. त्यावर विस्मृतीचा पडदा पाडून दुसरे प्रवासास सुरुवात. याप्रमाणें मानवी जीवित म्हणजे भावनांचा खेळ व कादंबरीकाराचें कर्तव्य म्हणजे जग जसें भासलें तसें रंगविणें. हें असें कां व कसें असा प्रश्न न विचारतां प्रतिभा सांगेल त्याप्रमाणें रंगविणें एवढेंच त्याचें काम असें त्याचें मत आहे. जगाला उपदेश करण्याचा तो आव आणीत नाहीं. कलाविलास हें त्याचें कार्य. मानवी जीवित म्हणजे हृदयाचे सागरांत उठणाऱ्या भावनांचे लाटावर हेलकावत जाणारी जीवितनौका. मानवी मनाच्या सतारीवर हात फिरवून हे भावनातरंग कोण निर्माण करतो कोण जाणे. मानवी प्रपंच हा असा चालू आहे व त्याचें

निर्हेतुक असें चित्र उठवणें हें कादंबरीकाराचें कार्य अशी त्याची कल्पना आहे. अर्थात् त्यांतहि एक प्रकारचें कलेच्या रचनेचे दृष्टीनें पूर्णत्वाकडे अनुसंधान ठेवावें लागतें व तसें हार्डीनें ठेवलेंहि पण आहे.

## प्रणयाचा प्रकार

कादंबरी म्हटली म्हणजे त्यात प्रणय आलाच व हार्डीचे सर्व कौशल्य प्रणयी जनांचे भाव दिग्दर्शित करण्यांत खर्च झालें आहे. स्त्रीहृदयाचे गूढ व गुंतागुंतीचे मनोविकार उकलून दाखविण्यात त्याचें कौशल्य अप्रतिम आहे. प्रेमासंबंधीं त्याची कल्पना उच्च नाहीं. नसानसातून सळसळणारे जीविताचा प्रभाव प्रेमभावना प्रस्फुटित करण्यांत होतो. स्त्रीहृदयांत प्रेमकलिका प्रथम विकसित होत असतां ह्या गूढ भावांचे स्वाधीन त्याचा पूर्ण अर्थ न कळल्यामुळें व कोणी मार्गदर्शक न भेटल्यामुळें, ती न कळत होत असते. तिचे हृदयाचे क्षितिजावर प्रेमरूपी चैतन्याचा सूर्य उगवतो व सूर्यापुढें लाजणाऱ्या उषेप्रमाणें लाजेचा रक्तिमा वनितावदनावर दिसूं लागतो. परंतु प्रथम स्त्री या भावास सर्वस्वी पारखी असते. अशा वेळीं मंद वाऱ्याचे झुळकेनें कंपायमान होणाऱ्या लतेप्रमाणें स्त्री म्हणजे एका नाज़ूक भावनेचें अस्तित्व. स्त्रीचें हें सौंदर्यच तिला मारक होत असतें, हें निष्ठुर सत्य हार्डीनें आपल्या शोकपर्यवसायी कादंबऱ्यांत दाखविलें आहे.

शाकुंतलांत, "न खलु न खलु बाणः संनिपात्योऽयमस्मिन् मृदुनि मृगशरीरे तूलराशाविवाग्निः। क्व बत हरिणकानां जीवितं चातिलोलं क्व च निशितनिपाता वज्रसारा शरास्ते" ॥ याप्रमाणें सामिधा तोडावयास निघालेले ऋषी प्रत्यक्ष हरिणासंबधानें राजास म्हणत असले तरी त्या त्रिकालदर्शी ऋषींना जणु काय हरिणाप्रमाणेंच निरागस अशा शकुंतलेची कींव येऊनच कीं काय हरिणाचे निमित्त करून ते शकुंतलेकरितांच राजास विनवीत होते, त्याचप्रमाणें बर्फाप्रमाणें धवल व तूलराशीप्रमाणें मृदु अशा टेस्, जूड, बाथशेबा इत्यादि स्त्रियांचे वतीनें निष्ठुर दैवाविरुद्ध हार्डीनें हातां लेखणी धारण केली आहे. जगांत निष्ठुर दैवाचा खेळ चालू आहे व स्त्रियांचे नाज़ूक हृदयांत प्रेमरूपानें प्रवेश करून तेंच दैव आपला क्रूर खेळ खेळत असतें हें दृश्य कोणाहि वाचकांस विमनस्क करतें. डॉ. बेलवलकर म्हणतात त्याप्रमाणें शकुंतलेचा भाव सात्विक झाल्यामुळें असो किंवा प्रो. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें शकुंतलेचें नशीब फिरल्यामुळें असो, शकुंतलेचा शेवट आनंदपर्यवसायी झाला आहे तर हार्डीच्या कादंबऱ्यांची प्रेतयात्रा शोकसागराचे तीरावर पोंचविण्यांत आली आहे.

## नीतिबंधनावर कोरडे

मनास शांतता देणारा कोणताहि दैवी आधार न मिळाल्यामुळें हार्डीनें समाजांतील प्रचलित नैतिक बंधनावर कोरडे ओढले आहेत व त्याचाच अस्पष्ट पडसाद मराठी वाचकांना "बंधनाच्या पलीकडे" या कादंबरींत कांहीसा पाहावयास सांपडेल. हार्डीची प्रेमाची कल्पना वैषयिक प्रेमापलीकडे गेली नसल्यामुळें एकेका स्त्रीला त्यानें तीन-तीन चार-चार पुरुषांचे दाराशी लागोपाठ प्रणयभिक्षा मागावयास लावलें आहे व वनिता व चंचलता हे शब्द समानार्थक होत या शेक्सपिअरच्या वाक्याची सत्यता जगास पटवून दिली आहे. ध्येयवाद व निष्ठुर सत्य यांचें समीकरण केव्हांहि या जगांत बसावयाचें नाहीं असें तो दाखवितो. व न कळत जर एखादी स्त्री पतित झाली, परंतु मनानें ती जर पवित्र असेल, तर तो एक उदार शिक्षणाचा धडाच तिला मिळाला इतकी तरफदारी करण्यापर्यंत त्याची मजल जाते! पौर्वात्य स्त्रीजनांच्या सात्विक प्रेमाची ज्यांना कल्पनाच नाहीं त्यांचे हातून अशीच भेसुर चित्रें निघावयाचीं!

हार्डीच्या कादंबऱ्या घ्या, कविता घ्या, भावगीतें घ्या, लघुकथा घ्या किंवा त्याचें प्रसिद्ध पौराणिक नाटक 'डिनॅस्ट' घ्या, सर्वांत अथपासून इतिपर्यंत एकच एक भेसुर रडवा सूर कायम आहे. या विश्वाचा अखिल पसारा हा एका अज्ञात निष्ठुर दैवाचा खेळ आहे अशी त्याची समजूत आहे. त्यामुळें त्याचे कादंबऱ्यांतून जो विनोद आहे तो सर्व खेडवळ लोकांचे तोंडीं घातलेला आहे. हॅम्लेटमध्यें ज्याप्रमाणे थडगें उकरणारी पात्रें विनोदी आहेत त्याप्रमाणें तो आहे. नैराश्यानें हृदय करपलें असतां फांसावर चढणाऱ्या मनुष्याचे तोंडावरील मंद स्मिताप्रमाणें किंवा स्मशानांतील एखाद्या मुंडक्याच्या तोंडावरील विकट हास्याप्रमाणें तो भासतो. त्याचे विचारांना घुबडांची संगति मानवते. त्याचा समकालीन जो जॉर्ज मेरेडिथ हा प्रपंचाकडे उगवत्या सूर्याकडे आपण पाहतो त्या आशापूर्ण न सजीव दृष्टीनें पाहतो तर हार्डी ह्याला सूर्य निस्तेज व निष्प्रभ होत जाऊन अंधकार प्रभावी होतो अशी सायंकाल जास्त जिव्हाळ्याची वाटते. सर्वत्र नैराश्याची अंधारी रात्र पसरली असून कालसागराचे तीरावर लाटांचे खेळ चालू आहेत. बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर व नश्वर जीविताचें एक चित्र काढलें, पुसलें, दुसरें काढलें, याप्रमाणें ईश्वरी लीला अनंत काल चालू आहे. क्षणैक अनुभवलेल्या सुखाचीं स्मृतिमुक्ताफळें फिरून फिरून चाखण्यांत मनुष्य काळ कंठीत असतो. परंतु मनुष्य हा दैवाचे हातचें

एक खेळणें आहे. हा त्याचे नैराश्यवादाचा निष्कर्ष आहे व हें तत्त्व त्याचे कादबऱ्यांत त्याचप्रमाणें त्याचें प्रचंड पौराणिक नाटक जें डिनॅस्ट यांत त्यानें दाखविलें आहे. आजपर्यंत जे प्रख्यात वीर, मुत्सद्दी इत्यादि अतिमानुष व्यक्ती होऊन गेल्या म्हणून आपण समजतों ते सर्व क्षुद्र मषकाप्रमाणें होत. या विस्तीर्ण कालाचे मैदानावर अनेक राष्ट्रें, प्रचंड सेनासागर इत्यादिकांच्या काळ्या सावली एका पाठीमागून एक चालू आहेत. या सर्वांचा सूत्रचालक कोण हें कोणास ठाऊक ? याप्रमाणें त्यानें डिनॅस्ट या विश्वरूपदर्शनांत दाखविलें आहे.

### नैराश्य वाद

हार्डीचा हा नैराश्यवाद ब्रिटिश लोकमताचा निदर्शक असें मानतां येईल काय? समकालीनांचे विचारांना ग्रंथकार हे तोंड पाडतात असें समजण्यांत येतें व तसें जर असेल तर त्याचे विचार हे १९ व्या शतकाचे टेनिसनप्रभृति कवी, मिल स्पेन्सरप्रभृति तत्त्वज्ञ किंवा हक्स्ले टिंडालेप्रभृति भौतिक शास्त्रज्ञ यांचे विचारांशीं सुसंगत आहेत. मानवी जीवितांत, प्रपंच भोगून मनुष्य आयुष्याचे उतरणीवर लागला म्हणजे नैराश्याची झांपड त्याचे डोळ्यांना लागूं लागते. त्याचप्रमाणें राष्ट्रांतील विचारी लोकांचे विचारालाहि नैराश्यवादाची कीड लागली तर तें ब्रिटिश साम्राज्यहि अधोगतीच्या मार्गाला लागलें असें बाह्य जनांनीं समजावयाचें काय ! सध्या जरी निश्चित कांहींच बोलता येत नसलें तरी ब्रिटिश साम्राज्यहि या अफाट व अनन्त विश्वांत अणुप्रमाण होय. हार्डीनें दाखविल्याप्रमाणें सर्वच ऐहिक वस्तूंची ती गत आहे. व त्याला त्याचे स्वतःचे वाङ्मयाचा सुद्धां अपवाद नाहीं. याचकरितां साध्या राहाणीची त्याला ज्याप्रमाणें आवड होती, त्याचप्रमाणें तो आक्रमशील साम्राज्यवादाचे विरुद्ध होता व महायुद्धाचे विरुद्ध त्याच्या लेखणीने जोराची चळवळ केली. कार्लाइलनें शेक्सपिअरविषयीं ' जसें निरपेक्ष विधान केलें आहे तसें विधान हार्डीविषयीं करण्याला त्याचा सापेक्षवाद जरी आडवा येत असला, तरी हार्डीनें मानवी भावनांचा उत्कृष्ट कादंबरीकार ही पदवी इंग्लिश वाङ्मयांत मिळविली आहे असें अपवादाचा मुरड न घालतां म्हणावयास हरकत नाहीं.

# चीनचें अन्तरंग

## लेखांक २ रा

युरोपियन मिशनरी व व्यापारी यांनीं शाळा, दवाखाने, दुकानें व कारखाने यांचा व्याप चिनांत ठिकठिकाणीं मांडलेला पाहून आपल्याहून निराळीं माणसें जगांत आहेत व त्यांचे व्याप आपल्याहून वेगळे आहेत याचे किरण सामान्य चिनी जनसमूहाच्या मनांत शिरले व मिशनऱ्यांच्या शाळेंत शिकून भूगोल–इतिहास व भौतिक शास्त्रें यांचें मनास चिडविण्यापुरतें त्रोटक ज्ञान ज्यांस मिळालें ते नवयुवक आपल्या परस्थ गुरुजींकडे व गुरुजींच्या व्यापारी बंधूकडे व धर्मप्रसारक कार्याकडे संशयित व भयभीत मुद्रेने पाहूं लागले. चिनी लोकांचें चीन हें एक राष्ट्र आहे याचें ज्ञान त्यांस होण्यास चिनी लोकांहून इतर लोकांचीं राष्ट्रें जगाच्या पाठीवर आहेत हें ज्ञान प्रथम मिळवावें लागलें व तें मिळतांच त्यांच्यांतहि राष्ट्राभिमान उदय पावला. चीनच्या मानेभोंवतीं परकीयांनीं पाश अडकाविले आहेत. त्यांजपासून सुटका करून घ्यावयाची तर चीनची जीर्ण व क्षीण बादशाही मोडून त्या ठिकाणीं प्रजासत्ताक राज्यपद्धीत स्थापन करण्याचा बूट चीनमधील तरुणांत मिघाला व त्याप्रमाणें यूएनशिकाय हा १९११ सालीं चीनच्या अध्यक्षपदावर चढूनहि बसला. पण प्रजासत्ताक राज्य स्थापन झालें म्हणून प्रजासत्ताक राज्यपद्धति देशांत ताबडतोब रूढ होते असें नाहीं. युएनशिकाय अध्यक्ष होता म्हणजे तो प्रतिबादशाहाच होता. त्याच्या हाताखालीं मोठें सैन्य असल्यामुळें त्यानें आपला कारभार प्रजासत्ताक राज्यास गुंडाळून ठेवून आपल्या मर्जीस येईल तसा चालविला . चीन देश एवढा अवाढव्य आहे कीं त्याचे बारीस प्रांत पाडावे लागले आहेत. प्रत्येक प्रांत म्हणजे एक स्वतंत्र देशच समजण्यास हरकत नाहीं. त्या प्रत्येक प्रांतावर सुभेदार किंवा व्हाइसरॉय असून सुभेदारी बहुधा वंशपरंपरेनेंच चालते. हे सुभेदार यूएनशिकायच्या वेळीं आपआपले प्रांत दाबून बसले होतेच व युएनशिकायच्या मृत्यूनंतर त्याच्याइतका बलिष्ठ अध्यक्ष चिनास न लाभल्यामुळें सुभेदारांच्या अमलास अधिकच बळकटी आली. अशा रीतीनें चीनचें प्रजासत्ताक राज्य प्रांतापर्यंतहि पोंचलें नाहीं; मग खेड्यापर्यंत त्या राज्याचें नांवहि पोंचलें नसल हे काय सांगावयास पाहिजे!

### पेकिंगची राज्यव्यवस्था

चीनची पेकिंगमधील राज्यव्यवस्था एक अध्यक्ष, एक उपाध्यक्ष, २६४ सभासदांचें सेनेट

व ५६९ सभासदांची प्रतिनिधी-सभा अशी आहे. पण हें सर्व बऱ्याच अंशीं कागदी घोडेच होत. चीनच्या राज्यव्यवस्थेंत किंवा जनसमूहाच्या मनोवृत्तींत व विचारसरणींत यामुळें कांही महत्त्वाचा फरक पडला नसला तरी तेव्हांपासून नव्या सुशिक्षित वर्गाचें लक्ष देशस्थितीकडे आस्थेवाईकपणानें लागून राहिलें आहे यांत शंका नाहीं. चीन देश आमूलाग्र राजसत्ताक राज्यपद्धतीपासून लोकसत्ताक राज्यपद्धतीवर न्यावयाचा तर नवी किल्ली जनतेच्या मनांत व डोक्यांतच फिरविली पाहिजे अशी तरुण सुशिक्षितांची खात्री पटून नव्या मनूंत हातीं आलेल्या सत्तेचा विनियोग त्या दिशेनें करण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं युरोपियन मिशनऱ्यांच्या शाळांवर विसंबून न राहातां स्वतःच्या शाळा शहरोशहरीं व गांवोगांवीं घातल्या, त्या शाळांस लायक शिक्षकांचा पुरवठा करण्याकरितां फ्रान्स, अमेरिका व इंग्लंड या देशांतून चिनी तरुणांस शिक्षण संपादण्यासाठीं पाठविलें. त्यांनीं परत चिनांत आल्यावर जुन्या शाळा नीट चालवून नव्या शाळांचा प्रसार केला आणि या रहाटगाडग्यांतील मोघे गणितश्रेढीनें एकसारखे वाढत गेले. त्याचा आज परिणाम असा दृष्टीस पडतो कीं, चिनांतील बेचाळीस कोटि लोकसंख्येपैकीं साडेतीन कोटि लोकांस लिहितां—वाचतां येऊं लागलें आहे. परदेशांत विद्यासंपादनार्थ गेलेले विद्यार्थी आठ हजारांपर्यंत पोंचले आहेत. व दरसाल वरील प्रमाणांत नव्या विद्यार्थ्यांचा ओघ स्वदेशांतून परदेशांत वाहात असतो व जुन्या विद्यार्थ्यांचा ओघ परदेशांतून स्वदेशांत येत असतो. हे जुने विद्यार्थी आठ हजार मुखांनीं देशांत स्वातंत्र्याची वाफ उत्पन्न करतात, व सोळा हजार हातांनीं ती देशभर फैलावतात.

## पेकिंग व कंतान

पेकिंगचें राज्य दुबळें असलें तरी तें स्वराज्यत्र असल्यानें या लोकजागृतीच्या कार्यास त्यांजकडून प्रतिबंध होत असे. तथापि पेकिंगचें दुबळें राज्य मोडून खऱ्या लोकसत्ताक राज्याची प्राणप्रतिष्ठा करण्यांत चिनी पुढारी आपली बुद्धि व शक्ति खर्च करीत आहेत. कंतान येथें क्युओमिंटँग नामक राष्ट्रीय पक्ष डॉ. सन्यत्सेन याच्या उद्योगानें उभारला जाऊन निराळें राज्य तेथें चालू होऊं लागलें हें वाचकांस अवगत आहेच. पेकिंग येथील राजकीय अंमल पेकिंग शहराभोंवतीं बांधलेल्या तटबंदीबाहेर फारसा गाजत नव्हता, तसेंच कंतान येथील राज्याचें अस्तित्वहि पुष्कळ दिवस कंतान शहराबाहेर ऐकूं जात नव्हतें. त्याहि स्थितींत तुलना करावयाची तर कंतानपेक्षां पेकिंगच्या राज्यासच मान्यता अधिक होती. कारण पेकिंग ही चीनची फार प्राचीन राजधानी. चिनात राज्य असलें तर तें पेकिंगमध्येंच असावयाचें अशी सार्वत्रिक समजूत व परराष्ट्रीयांनींहि आपली मान्यता पेकिंग येथील राज्यासच दिलेली. या दृष्टीनें पेकिंगच्या राज्यास लुटपुटीचें म्हटलें तर कंतानच्या राज्यास भातुकलींतलेंच संबोधावयास पाहिजे. तथापि या दोनहि प्रतिस्पर्धी राज्यांत राष्ट्रीय अभिमानाचा व कर्तृत्वशक्तीचा अस्फुट जोर कंतानच्या राज्यांतच होता. कंतानचें राज्य आपसांतील यादवी माजविण्याकरितां मुळींच नव्हतें. पेकिंगचें राज्य लोकमतास व प्रजासत्ताक तत्त्वास धरून चालेना म्हणून कंतान येथें चिनी देशभक्तांस आपली स्वतंत्र राज्यस्थापना करावी लागली.

कंतानची आकांक्षा दोन प्रकारची होती. एक तर चीनसाठीं सर्वसमर्थ असें मध्यवर्ती लोकसत्ताक असें राज्य स्थापून त्याचा अंमल चिनांतील बावीस प्रांतांवर मजबूत बसवावा व दुसरी आकांक्षा अशी कीं, परराष्ट्रीयांनीं चीनची दुबळी स्थिति पाहून चीनवर अपमानकारक व नुकसानकारक तहाच्या अटी लादल्या आहेत त्या फिरवून घ्याव्या. त्यांची दुसरी आकांक्षा किंचित् विस्तारानें मांडल्यास तिची कल्पना वाचकांस चांगली होईल. (१) इंग्लंड, अमेरिका, जपान व फ्रान्स यांतील लोकांना चिनांत ज्या सवलती मिळाल्या आहेत त्या चिनी लोकांना त्यांच्या त्यांच्या देशांतून मिळाव्या. (२) चिनांतील परराष्ट्रीयांवर चिनी कायदा चालत नाहीं तो चालू व्हावा. (३) ख्रिस्ती मिशनऱ्यांना स्वधर्मप्रचाराकरितां चीनभर कोठेंहि घरें बांधतां येतात, जमिनी खरेदी घेतां येतात. कोणी चिनी इसमानें स्वधर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यास त्यास अनुसरण्याची पूर्ण मोकळीक देण्यांत आली आहे. पण यांपैकीं कोणतीहि सवलत ख्रिस्ती धर्मास मिळूं नये. (४) परदेशांतून चिनांत यावयाच्या मालावर पांच टक्के जकात कायमची बसविण्यांत आली आहे. ही जकात वाढविण्याचा अधिकार चिनास नसल्यामुळें चीनचें जकातीचें नुकसान होतेंच. पण त्याहिपेक्षां चिनांतील जुन्या धंद्यांचें व बाल्यावस्थेंतील नव्या धंद्यांचें परदेशी मालाच्या शिरजोरपणापासून जें रक्षण व्हावयास पाहिजे तें न झाल्यामुळें चीन देश फारच नागवला जात आहे. (५) युरोपियनांच्या चीनमधील लहानमोठ्या वसाहती हीं स्वतंत्र राज्यें मानण्यांत येतात; इतकेंच नव्हे तर त्यांत राहावयास आलेल्या चिनी लोकांस नागरिकत्वाचे हक्क युरोपियनांच्या बरोबरीनें मिळावयास पाहिजेत ते मिळत नाहींत.

## तक्रारींचें महत्त्व

चिनी लोकांच्या वरील तक्रारी महत्त्वाच्या आहेत. त्यांत चिनी लोकांचा, देशाभिमान धर्माभिमान व स्वाभिमान सांठविलेला आहे. चीन हा देश स्वतंत्र आहे. हिंदुस्थानासारखा जिंकला गेलेला नाहीं. या दृष्टीनें त्या देशास कोणत्याहि स्वतंत्र देशाच्या बरोबरीचे हक्क व अधिकार पाहिजेत. हे हक्क व अधिकार चिनी लोकांस परदेशांत प्राप्त होत नाहींतच, पण खुद्द स्वदेशांतहि परकीयांच्या बरोबरीचे अधिकार त्यांस मिळत नाहीत. त्यांस आपल्या देशाचा कारभार स्वतःचें हित गुंडाळून ठेवून परकीयांच्या हिताकरितांच चालवावा लागतो. उदाहरणार्थ, चीनचें उत्पन्न खर्चाच्या मानानें कमी आहे. तर ते जकातीच्या व इतर साधनांनीं वाढवितां आले पाहिजे. चिनी लोकांनीं चालविलेल्या गिरण्यांतील कापड चिनांत खपावयास पाहिजे असेल तर परदेशी कापडावरील जकात वाढविण्याची सत्ता चिनास मिळणें आवश्यक आहे. परकीय ख्रिस्ती धर्माचा प्रसार चिनात होऊं नये अशी चिनी लोकांची इच्छा असेल तर ख्रिस्ती मिशनऱ्यांचा संचार चिनांत होऊं देणे न देणे चीनच्या मर्जीवर अवलंबून राहिले पाहिजे. पण यापैकीं एकहि अधिकार चिनास नाहीं. ही स्थिति अशीच सुरू राहिल्यास चीन देश अधिकाधिक दरिद्री होईल, तेथील कारखाने अधिकाधिक बुडत जातील, ख्रिस्ती धर्म अधिकाधिक प्रसार पावेल-बेकारी माजेल, प्रजा दुर्बल बनेल व चिनास आपले; डोकें वर काढण्यास सवड न राहून तो आज नाहीं उद्यां सांप्रतच्या मिळमिळीत सौभाग्यासहि मुकून परराष्ट्रांच्या पचनीं पडल्यावाचून राहाणार नाहीं.

## देशभक्तांची चळवळ

चिनी देशभक्ताच्या मनाची तडफड उडते ती प्रस्तुतच्या अपमानास्पद जिण्यामुळें व भावी विनाशाच्या भीतीमुळें. वह्या दोनहि आपत्ति चुकविण्यासाठीच चीननें परराष्ट्रीयांच्या हक्कसंबंधाविरुद्ध आपली चळवळ सुरू केली. चिनी देशभक्ताच्या या चळवळीच्या ओघास रशियातील बोल्शेव्हिकांच्या चळवळीचाहि ओघ येऊन मिळाल्यानें चळवळीचा जोर दुप्पट वाढला. बोल्शेव्हिकास आपल्या समाजसत्तावादाचा जगभर प्रसार करून जगांत भांडवलवाल्यांनीं स्थापिलेली सर्व प्रकारची सत्ता बुडवावयाची आहे. चिनी राष्ट्रभक्तांस परकीय व्यापाऱ्यांची सत्ता चिनांत नको व बोल्शेव्हिक मतप्रसारकांस व्यापाऱ्यांची सत्ता जगांतच नको. अशा रीतीनें उभयतांच्या उद्देशांचा मेळ बसला तरी त्यांची कार्यपद्धति मात्र एक नाहीं. बोल्शेव्हिकांना समाजसत्तावाद उत्पन्न करावयाचा आहे म्हणजे चिनी राष्ट्र मजुरांचें व शेतकऱ्यांचें बनवावयाचें आहे. समाजसत्ता म्हणजे कोणाहि एका व्यक्तीची अगर वर्गाची सत्ता नव्हे. त्यांतील व्यक्तीस अगर वर्गास स्वतःच्या मालकीची मत्ता अशी नाहीं. व्यक्तीनें होतील ते कष्ट करावे व राष्ट्रानें मिळेल त्यांत तिला पोसावें. एखादा नवा देश बोल्शेव्हिकांनीं वसाहतीस घेतला तर त्यांस अशा प्रकारच्या राज्यपद्धतीचा प्रयोग करून पाहातां येण्यासारखा आहे. पण चीन हे राष्ट्र फार प्राचीन आहे. त्यांतील समाज फार जुना आहे. त्या समाजाची स्वेच्छेनें कांहीं विशिष्ट प्रकारची रचना झाली आहे. व ती सदर समाजाच्या अंगवळणीं पडली आहे. चिनांत व्यापारी, जमीनदार, सुखवस्तू व सरदार यांचे वर्ग हजारों वर्षांपासून बनले आहेत व त्या सर्वांचे वेगवेगळे हितसंबंध उत्पन्न झाले आहेत.

चिनी राष्ट्रीय पक्षास बोल्शेव्हिकांच्या या चमत्कारिक मताची ओळख नसेल असें म्हणवत नाहीं. परंतु त्यांस बोल्शेव्हिकांच्या मतांची नसली तरी मदतीची गरज होती यांत शंका नाहीं. चिनांतील सर्व जनतेस हत्यारें बाळगण्याची पूर्ण मोकळीक आहे. आणि चिनांतील सर्व सैन्य एकवटलें तर तें बारा लक्ष सहज भरेल. पण हें सैन्य एकाच्या ताब्यांत नसून ठिकठिकाणच्या सरदारांनीं आपआपल्या पदरीं बाळगलेलें आहे. या सरदारास टूचन म्हणतात. हेच सरदार बहुतकरून प्रांताप्रांताचे सुभेदार आहेत व त्यांच्याच सैल सत्तेखालीं चीनचे वेगवेगळे प्रांत सांप्रत सांपडले आहेत. पेकिंगचे राज्य चालविणारा चँगत्सोलीन हा मांचूरियाचा सुभेदार आहे. व या सर्व सुभेदारांस आपल्या हातची सत्ता स्वाभाविकच सोडावयास नको आहे. कँतानच्या राष्ट्रीय पक्षास या सुभेदारांस जिंकून सर्व चीनवर प्रजासत्ताक राज्याचा एकछत्री अंमल बसवावयाचा आहे व होता. पण तो सुभेदाराशीं लढून त्यांस वठणीवर आणून बसवावयाचा तर राष्ट्रीय पक्षापाशीं पैसा पाहिजे, शस्त्र पाहिजे व सैन्य पाहिजे. हें सर्व साहित्य मिळवून देण्याचें बोल्शेव्हिकांनीं कबूल केल्यावरूनच चीनच्या राष्ट्रीय पक्षानें रशियाच्या बोल्शेव्हिकांशीं स्नेहसंबंध जोडला. या स्नेहसंबंधाचे बरेवाईट परिणाम चीनवर कोणते घडले या मनोरंजक विषयाचें विवेचन पुढील खेपेवर टाकणें भाग आहे.

*

# हरताळाची पहिली सलामी

दोन महिन्यापूर्वीचा हिंदुस्थान हाच काय अशी शंका आजच्या हिंदुस्थानाचें अवलोकन करणाराच्या मनांत आल्यावांचून राहात नाहीं. दोन महिन्यांपूर्वी हिंदुस्थान देश दुहीनें भंगला होता, भांडणांनीं पोखरला होता व निराशेनें व्यापला होता. उत्तरेंत व दक्षिणेंत हिंदू-मुसलमानांचे दंगे होत होते आणि हिंदूंचे खुनावर खून पडत होते. हिंदुस्थानाच्या या विस्कटलेल्या सामर्थ्याचा व व्यग्र झालेल्या मनःस्थितीचा फायदा घेण्याचें इंग्लंडच्या हुजूर मंत्रिमंडळानें ठरविलें आणि आपल्या राजवटींत मुदतीपूर्वी घाईघाईनें कमिशन नेमून हिंदुस्थानाच्या राजकीय प्रगतीचा मार्ग खुटविण्याचा व्यूह रचला. पण हुजूर मंत्रिमंडळ या डावांत चकलें खरेंच. आपली भेदनीति हिंदु-मुसलमानांतील भांडणांच्या रूपानें चांगली फळास आली या फाजील व अविचाराच्या घमेंडींत ब्रिटिश मंत्रिमंडळास हिंदुस्थानांतील पक्षभेदाचें इंगित समजून घेण्याची फिकीर वाटली नाहीं. हिंदूंस मुसलमानांच्या मशिदीपुढें वाद्यें वाजविण्यास मिळणें व मुसलमानास हिंदूंच्या पूज्य गोमातेचा बळी घेणें याहून श्रेष्ठ कर्तव्यच उरलें नाहीं, अशी बुद्धीस भुरळ पडून ब्रिटिश मंत्रिमंडळानें सायमन कमिशनाची नेमणूक केली. पण इंग्रजांच्याच कृतीमुळें राजकारण हा हिंदुस्थानाचा आत्मा बनून राहिला आहे. आणि हिंदुस्थानांत जहाल-मवाळ, राष्ट्रीय-लिबरल, हिंदू-मुसलमान, ब्राह्मण-ब्राह्मणेतर व स्पृश्य-अस्पृश्य अशा प्रकारच्या फळ्या पडल्या असल्या तरी त्या सर्वांना राजकारणानें सारखेंच व्यापलेलें आहे. त्या सर्वांच्या मुळाशीं थोडीबहुत राष्ट्रीय भावना आहे, राजकीय आकांक्षा आहे, स्वातंत्र्याची प्रीति आहे व स्वाभिमानाची ज्योतहि आहे, हें रहस्य ब्रिटिश मुत्सद्यांच्या डोक्यांत उतरलें नाहीं. यावरून त्यांना धूर्त म्हणावयाचें कीं मूर्ख ठरवावयाचें याचा निराळा उलगडा करण्याचें आतां कारण उरलें आहे असें आम्हास वाटत नाही. सर्व हिंदी लोकांस अस्पृश्य मानून सायमन कमिशनपासून दूर लोटल्यामुळें आपल्यांतील अस्पृश्यता घालविण्यासाठीं भगीरथ प्रयत्न करणाऱ्या भारतीयांच्या स्वाभिमानास ब्रिटिश मंत्रिमंडळानें उद्दामपणानें दंश केला. त्याचा परिणाम व्हावयाचा तोच होऊन आपण सर्व एकाच विराट शरीराचे अवयव आहोंत असा सर्व पक्षांस साक्षात्कार घडून ऐक्याची वीज सर्वांमधून एकदम चमकली व **'तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम्'** या न्यायानें आजच्या घटकेला तरी सर्व पक्ष एका कमिशनविरोधी पक्षांत विलीन झाले.

मुसलमानांस जवळ ओढून हिंदूंस दूर लोटल्यानेंच धार्मिक तंटे वाढतात व मवाळांस थोपटून जहालांस धोपटल्यानेंच राजकीय पक्षभेद जोरावतात याचा धडा ब्रिटिश मुत्सद्यांनीं चांगला गिरवला आहे असें मानलें तर सध्याचें त्यांचें वर्तन त्यांच्या पूर्वेतिहासाशीं विसंगतच दिसतें. पण कमिशन नेमताना हें सर्व शहाणपण विसरण्याची दुर्बुद्धि त्यांस झाल्यामुळें दोनच महिन्यांत हिंदुस्थानांत इतकें विलक्षण परिवर्तन घडून आलें कीं त्यास हिंदुस्थानाच्या पूर्वेतिहासांत तोड सांपडणें कठीण आहे. दर दहा-पांच वर्षांनीं हिंदुस्थानाचें सामर्थ्य एकवटून उभें राहातें असा अलीकडचा अनुभव आहे. वंगभंगाच्या चळवळींत जहाल मवाळ सामील झाले होते, पण मुसलमान अलिप्त होते. असहकारितेच्या चळवळींत हिंदू-मुसलमान एका झेंड्याखालीं उभे होते पण मवाळ तुटक राहिले होते. पण आजच्या सायमन कमिशनाच्या चळवळींत हिंदू-मुसलमान व जहाल-मवाळ यांचा संगम झाला आहे. इतकेंच नव्हे तर शीख व पार्शी यांचाहि तिला पाठिंबा मिळाला आहे.

भीमसेनाच्या सामर्थ्याविषयीं अशी गोष्ट सांगतात कीं, त्याची पाठ जमिनीस लागताच त्याच्या अंगांत दहा हजार हत्तीचें बळ संचरत असे. तोच दृष्टान्त हिंदुस्थानासहि लागू पडतो. स्वराज्याच्या लढ्यांतील अपयशामुळें निराशेची पूर्ण झांपड हिंदुस्थानावर पडली का त्यास त्याच्या अंतस्थ सामर्थ्याची जाणीव करून देणारी घटना उत्पन्न होते. सायमन कमिशनाच्या अंजनानें हिंदुस्थान कसा खडबडून जागा झाला आहे याचें प्रत्यंतर ता. १५ जानेवारी रोजीं श्रीक्षेत्र काशी येथें भरलेल्या सर्वपक्षीय परिषदेंत पाहावयास सांपडलें. त्या परिषदेंत डॉ. अन्सारी, पं. मालवीय, सर सप्रू, सी. वाय. चिंतामणी, बिपिनचंद्र पाल, पंढरिनाथपंत तेलंग व डॉ. मुंजे यांसारखे भिन्न भिन्न पक्षाचे व बहुधा नजरेस नजर न भिडविणारे पुढारी एकाच बैठकीवर एकमेकांच्या मांडीस मांडी लावून बसले. आणि त्या सर्वांनीं मिळून सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा व ता. ३ फेब्रुवारी रोजीं हरताळ पाडण्याचा ठराव एकमतानें पास केला.

वरील ठरावाची अंमलबजावणी करण्याकरितां सर्व प्रांतांतून प्रांतिक व राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं दौरे काढले आहेत. पंडित मालवीय, मौ. अबदुल कलाम

आझाद व डॉ. अन्सारी यांनीं आपली मोहीम पंजाबावर सुरू केली आहे. महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख गांवांतून प्रां. काँग्रेसकमिटीच्या विद्यमानें महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांनीं व्याख्यानांची झोड उठवून हरताळाचा व बहिष्काराचा संदेश सर्वत्र पोंचविला आहे. काशीची म्युनिसिपालिटी आपल्या सर्व कचेऱ्या ता. ३ रोजी बंद ठेवणार आहे. त्याचप्रमाणें काशीच्या हिंदु विश्वविद्यालयानेंहि आपल्या संस्थांस त्या तारखेस सुट्टी देण्याचें ठरविलें आहे. मध्यप्रांतीय कायदेमंडळाचा कणखरपणा, धिटाई व बाणेदारपणा सुप्रसिद्धच आहे. आपल्या त्या पूर्वापार लौकिकास अनुसरून सायमन कमिशनशीं कसलाहि संबंध न ठेवण्याचा ठराव सदर कौन्सिलांत सहज रीतीनें पास झाला व त्या ठरावाप्रमाणें तंतोतंत वागण्याचें दिवाण राघवेंद्रराव व दिवाण रामराव यांनीं जाहीर केलें. मध्यप्रांतानें जो चेंडू फेंकला तोच मद्रास कौन्सिलानें उचलून धरून कमिशनास अस्पृश्य लेखण्याचा निश्चय एकसष्ट विरुद्ध अठ्ठावीस मतांनीं कायम करण्यांत आला.

सायमनसाहेब आपल्या सहा साथीदारांनिशीं मुंबईस ता. ३ फेब्रुवारीला येतील. त्यावेळीं त्यांस हरताळाच्या रूपानें बहिष्काराची पहिली सलामी देण्याचा मान हिंदुस्थानाचें महाद्वार अशा मुंबई शहरास मिळणार असल्यानें हरताळ यशस्वी होण्यासाठीं मुंबई शहर आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहे. गिरण्यांतील कामगार, गोदींतील हमाल दुकानांतील व्यापारी आणि शाळेतील विद्यार्थी व विद्यार्थिनी यास त्या दिवशीं घरीं बसावयास सांगून मुंबईचे रस्ते ओस पाडण्याचा मुंबईतील वेगवेगळ्या संस्थांचा संकल्प आहे. मुंबईचें अनुकरण सर्व हिंदुस्थानांत व महाराष्ट्रांत होईल यांत शंका नाहीं. पुण्यातील पुढाऱ्यांनींहि सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत प्रा. कॉ.कमिटीचे अध्यक्ष ल. ब. भोपटकर यांचे अध्यक्षतेखालीं सर्वपक्षीय बैठक भरवून हरताळ कमिटी नेमली असून तिच्या मार्फत पुण्यांतील बाजार, दुकानें व इतर सार्वजनिक व्यवहार बंद ठेवण्याचे उपाय योजले जात आहेत. पुणें म्युनिसिपालिटींतहि हरताळ मंजूर होऊन म्युनिसिपल शाळा, म्युनिसिपल कचेऱ्या व रेमार्केट त्या दिवशीं बंद राहाणें व शहरांतील व्यापारी पेठांतून पुढाऱ्यांच्या प्रयत्नानें शुकशुकाट दिसणें कठीण नाहीं. यासंबंधाचा ठराव डॉ. वि. दा. फाटक व श्री. दा. वि. गोखले हे ता. २ रोजीं म्यु. च्या सभेंत मांडणार असून तो मंजूर झाल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु त्याखेरीज व्यवहारांची मोठी हालचाल म्हणजे पुण्यांतील शाळा-कॉलेजांची व कोर्टकचेऱ्यांची. पैकीं कोर्ट-कचेऱ्या बंद ठेवणें आपल्या स्वाधीनचें नसलें तरी ज्या शाळा-कॉलेजांचे चालक सरकारी कायद्यानें बांधले गेले नाहींत ते काशीच्या हिंदुविश्वविद्यालयाचें अनुकरण करतील अशी आम्हास आशा आहे. वकीलवर्गानें व पक्षकारांनींहि एका दिवसापुरती कोर्टाची पायरी न चढण्याचा निश्चय केल्यास तो तडीस नेणें त्यांस कठीण नाहीं.

महाराष्ट्रांतील इतर प्रमुख शहरेंहि हरताळाच्या बाबतींत आपल्या कर्तव्यास चुकणार नाहींत अशी आम्हासखात्री वाटते.पण त्याखेरीज हजारों लहानमोठ्या गावांतून पसरलेल्या बहुजनसमाजासहि या राष्ट्रीय कार्याचे अंशभागी होतां येईल.काशीच्या सर्व पक्षीय परिषदेंत ठरल्याप्रमाणें ता.३ फेब्रुवारी रोजीं जनतेनें दिवसा सर्व व्यवहार बंद ठेवून सायंकाळीं जाहीरसभा भरवाव्या व सरकारानें हिंदी लोकमतास पायाखालीं तुडवून नेमलेल्या या सायमन कमिशनचा ठरावरूपानें धिःकार करावा. राष्ट्रीय अपमानाविषयीं संताप दर्शविण्याचा हाच एक सोपा व सोयीचा मार्ग असून त्याचा अवलंब गांवोगांवच्या पुढाऱ्यांनीं करावा अशी त्यांस आमची आग्रहाची विनंति आहे. त्यायोगानें लोकमत व्यक्त होऊन जनतेस प्रचलित राजकारणाचें शिक्षणहि अनायासें मिळणार आहे. ब्रिटिश साम्राज्यछत्राखालीं नांदणाऱ्या इतर देशांवर असले मानहानीचे व हक्काच्या पायमल्लीचे प्रसंग ओढवले असतां त्यांनीं जें उग्र स्वरूप धारण केलें त्याची जनतेनें आठवण ठेवली तर हिंदुस्थानांतील बहिष्काराच्या चळवळींत "हरताळ नको डेमॉन्स्ट्रेशन नको" असे म्हणणाऱ्या कांहीं पुढाऱ्यांचे इशारे कसे अनाठायी व निरुपयोगी आहेत, हें लोकांच्या लक्षांत येईल.

महायुद्धांत प्रवर्तित केलेलें स्वयंनिर्णयाचें तत्त्व इजिप्तला लागू न केल्यामुळें त्या देशांत १९१८ सालीं असंतोषाच्या ज्वाळा भडकल्या.त्या ज्वालांचा खरा उपशम ईजिप्त देशास स्वातंत्र्य दिल्यानेंच झाला असता. परंतु इंग्रजांनीं ईजिप्त देशास परतंत्र केलें ते त्यास स्वातंत्र्य देण्याकरितां खास नव्हे. इंग्रजांस ईजिप्तचें सैन्य, आरमार व परराष्ट्रीय संबंध आपल्या मुठींत ठेवून उरलेले अल्पस्वल्प अधिकार ईजिप्तच्या स्वाधीन करण्याची इच्छा होती व त्या दृष्टीनें ईजिप्तचे निरीक्षण करण्यासाठीं त्यांनीं १९१९ च्या डिसेंबर महिन्यांत मिल्नर कमिशन ईजिप्तमध्यें पाठविलें. त्या वेळीं सदर कमिशनावर बहिष्कार घालण्यासाठीं ईजिप्तमधील लोकपक्षीय पुढाऱ्यांनीं कंबर कसली. कमिशनपुढें साक्षी देण्यास कोणीहि जाऊं नये अशी त्यांनीं खटपट चालविली व लोकांनीं संप पुकारला.

या चळवळींत पुष्कळ स्त्रियाहि सामील झाल्या. जो पुढारी साक्षीस जाईल त्याजवर टेहळणी ठेवण्यांत आली व त्याची जनतेकडून हेटाळणी होऊं लागली. अलअझर विश्वविद्यालयानें ईजिप्त देशास पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचा हक्क आहे अशा आशयाचा खलिता मिल्नर कमिशनाकडे पाठविला व ईजिप्त देश इंग्रजांच्या छत्राखालीं न ठेवण्याचें पत्र खुद्द राजपुत्रांनीं मिल्नरकडे रवाना केलें! अशा रीतीनें ईजिप्तमधील जनतेनें सुतक्याप्रमाणें वागविलेल्या मिल्नर कमिशनास केवळ अलेक्झांड्रियामधील फ्रेंच, इटालियन व ग्रीक व्यापाऱ्यांच्या साक्षींवरच आपलें काम भागवून ईजिप्तमधून पाय काढावा लागला. ईजिप्तमधील या प्रकाराची ओळख आज देण्याचें कारण येवढेंच की, हरताळाचा उपाय कडक म्हणून त्यास विरोध करणाऱ्यांच्या हें लक्षांत यावें की, इतर देशांपेक्षा हिंदुस्थानानें आंखलेला बहिष्काराचा व हरताळाचा कार्यक्रम सौम्यच ठरतो. इतका सौम्य उपायहि हिंदुस्थानानें अमलांत आणूं नये काय?

ईजिप्तमध्यें घडलेल्या सर्वच प्रकारांचें अनुकरण हिंदुस्थानांत व्हावें असें कोणीहि म्हणणार नाहीं. पण ईजिप्तप्रमाणें हरताळ व बहिष्कार मात्र हिंदुस्थानांत कडकडीत पाळला जाणें अत्यावश्यक आहे. हिंदुस्थानांतील हरताळाचें व बहिष्काराच्या चळवळीचें सध्याचें स्वरूप पाहून भेदरून गेलेल्या आंग्ल व आंग्लोइंडियन पत्रकारांनीं आणि सर ओड्वायरसारख्या हिंदुस्थानाचें अन्न खाऊन हिंदुस्थानाच्या घरचे वासे मोजणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यांनीं आपल्या आगलावेपणाच्या उद्योगास खंड पडूं दिलेला नाहीं. मुंबईच्या टाईम्सकारांनीं हरताळाच्या पोतडींतून अत्याचाराचा नागोबा निघेल असा धाक मवाळपक्षास घालून हरताळास आपण विरुद्ध आहों असें उघडपणें त्यांनीं जाहीर करण्याचा त्या पक्षास उपदेश केला आहे! पण टाइम्सकारांचा हा डाव साधला नाहीं. तसेंच मुंबईतील मुसलमान व बडे पार्शी यांस चुचकारून हरताळ–बहिष्काराविरुद्ध उठविण्याचीं त्यांनीं कारस्थानें रचलीं. पण तीं कारस्थानें टाईम्सकारांवरच उलटून पार्श्यांनीं व मुसलमानांनीं हरताळ–बहिष्कारास अनकूल अशा प्रचंड सभा मुंबईस भरवून टाईम्सकारांस चूप बसविलें.

हरताळ हें बहिष्काराचें दर्शनी अंग आहे, पण तें परिणामकारक आहे. तथापि तें कार्य संपल्यावर बहिष्काराच्या मुख्य कार्यास सुरुवात होते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. सर सायमन व त्यांचे साथीदार मुंबईहून थेट दिल्लीस जाणार आणि दिल्लीस फेब्रुवारी व मार्च या दोन महिन्यांत मुक्काम ठेवून जरूर तर त्याच मुदतींत प्रांतिक कौंसिलांनाहि भेट देणार. कायदेमंडळांच्या भेटीस कमिशन येईल त्यावेळीं त्याचा निषेध म्हणून लोकनियुक्त सभासदानीं कायदेमंडळें ओस पाडणें हें जरूर आहे. सायमन कमिशन या खेपेस हिंदुस्थानची फक्त टेहळणी करून परत फिरणार व पुढील हिवाळ्यांत पुनः हिंदुस्थानांत येऊन साक्षीपुरावा घेणार. दरम्यानचा सातआठ महिन्यांचा अवधि मोठा असल्यानें तेवढ्यांत हिंदुस्थानांतील जनतेंत फूट पाडण्याचा उद्योग हिंदद्वेष्टे इंग्रज लोक चालू ठेवतीलच. हिंदूंच्या भीतीनें मुसलमानांस, ब्राह्मणांच्या भीतीनें ब्राह्मणेतरास व स्पृश्यांच्या भीतीनें अस्पृश्यांस साक्षीस प्रवृत्त करण्याकडे अँग्लोइंडियन पत्रकार व इतर इंग्रज लोक दरम्यानच्या काळाचा उपयोग करून घेणार आहेत.

मुसलमान, ब्राह्मणेतर व अस्पृश्य यांजकडून अशा रीतीनें शह बसल्यावर काँग्रेस पक्ष, लिबरल पक्ष व मुस्लीम लीग पक्ष यांना साक्षीस जाणें भाग पडेल असा लंडन टाइम्सचा कयास आहे! हा कयास खोटा ठरविणें हिंदी पुढाऱ्यांचें यापुढील कर्तव्य होय. ब्राह्मणेतर वर्गाचा कल बहिष्कार मोडण्याकडे आतांपासूनच असल्याचा बळकट संशय श्री. भास्करराव जाधव व बोलेप्रभृति ब्राह्मणेतर पक्षीय यांच्या वर्तनावरून घेतां येतो. परंतु असे महाराष्ट्रांतील मूठभर ब्राह्मणेतर वगळल्यास मद्रासेकडील प्रचंड ब्राह्मणेतर समाज अशा प्रकारचें देशद्रोहाचें कृत्य माथीं मारून घेण्यास सिद्ध होणार नाहीं अशी आमची अटकळ आहे. तथापि पुढील आठ महिन्यांचा काळ बहिष्कार टिकविण्याच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा असल्यानें ज्या पक्षांची बहिष्काराच्या बाबतींत आज एकवाक्यता दृष्टीस पडते त्या सर्व पक्षांनीं हें ऐक्य असेंच कायम राखून इतर तटस्थ व विरुद्ध पुढाऱ्यांस आपल्या मतास वळवून घेण्याची संधिहि दवडूं नये. इंग्रज लोक व हिंदी पुढारी यांजमधील झगड्याची व अकलेच्या डावपेंचाची ही वेळ असून त्या वेळेत बहिष्कारवादी पक्ष आपलें बल जितकें वाढवील व प्रतिपक्षाचें बल कमी करील तितकें यशाच्या दृष्टीनें थोडेंच होय. यासाठीं हरताळ पूर्णपणें यशस्वी होतांच बहिष्कार यशस्वी करण्याच्या पुढील तयारीस पुढाऱ्यांनीं तावडतोब लागणें जरूर आहे.

# संस्थानिक व पोलिटिकल अधिकारी

( ले.—ग. रं. अभ्यंकर वकील. )

ब्रिटिश परराष्ट्रीय खात्यांतील अधिकाऱ्यांचा सासुरवास पत्करण्यास संस्थानिक तयार आहेत यांतील दुसरा एक हेतु असा आहे कीं, हे अधिकारी हिंदुस्थानाबाहेरील असल्यामुळें येथील परिस्थितीची त्यांस कांहींच माहिती असणार नाहीं व त्यांच्या अनभिज्ञपणाचा फायदा घेऊन आपले अरेरावी चोचले खुशालपणें चालवितां येतील अशी त्यांची भावना आहे. हिंदुस्थानसरकारच्या पोलिटिकल खात्यातील अधिकारी लहानपणींच येथें नोकरीस येतात व कांहीं काळ लोटल्यावर संस्थानिकांचीं बिंगें त्यांस दिसूं लागतात. व जसजसा त्यांचा अनुभव वाढत जातो तसतसे ते आपलें दडपण संस्थानिकांवर लादूं शकतात व हें दडपण वाढत चालले कीं, संस्थानिक त्यांच्या सेवेला व त्यांना आळविण्याला अगदीं हजर राहातात, व त्यांचे अगदीं गुलाम बनतात. ब्रिटिश परराष्ट्रीय खात्यांतील अम्मलदार हिंदुस्थानांत सर्व काळ राहतील असा नियम नाहीं. हिंदुस्थानाबाहेरील सर्व स्वतंत्र देशांतून परराष्ट्रीय खात्याचें एक ठाणें असतें. त्यांत ब्रिटिश सरकारचे वकील असतात व त्यांच्या हाताखालीं पोलिटिकल अधिकारी असतात. अर्थात् ब्रिटिश परराष्ट्रीय खात्यांतील नोकर लोकांच्या बदल्या निरनिराळ्या देशांतून होत असतात. व त्यायोगानें हिंदुस्थानांतच हे लोक कायम नोकरीचा सर्व काळ घालवतील असा संभव नाहीं. व म्हणूनच दगडापेक्षा वीट मऊ या न्यायानें ब्रिटिश परराष्ट्रीय पोलिटिकल अधिकारी संस्थानिकांना हवे आहेत.

संस्थानिकांना युरोपिअन ऑफिसर पाहिजे आहेत याचें दुसरें कारण असें आहे कीं, हिंदी गृहस्थास पोलिटिकल ऑफिसर नेमल्यास त्यायोगानें आपला मानभंग होईल अशी ते उघडपणें तक्रार करीत आहेत ! हिंदुस्थान—सरकारच्या सर्व खात्यातून हिंदी गृहस्थाचा अधिक शिरकाव व्हावा व राज्यकारभारांतील जबाबदारीच्या जागा हिंदी गृहस्थास देण्यात याव्या याबद्दल राष्ट्रीय सभेची मागणी पुष्कळ वर्षे चालली आहे. हिंदुस्थान—सरकारनें या सुधारणेबद्दल संस्थानिकांचीं मत एकवार मागितलीं होतीं; व विश्वसनीय माहितीवरून असं समजते कीं, यच्चयावत् संस्थानिकांना—फार थोड्या अपवादाखेरीज—बहुतेकांनीं पोलिटिकल खात्यांत हिंदी लोकांचा समावेश होऊं नये असा अभिप्राय व्यक्त केला. आपल्याच देशबांधवांचा, संस्थानिकांचा हा द्रोह पाहून मोठा विस्मय वाटतो. परंतु या विजातीय भावनेचें खरें कारण असें आहे कीं, हिंदी पोलिटिकल अधिकारी युरोपियन पोलिटिकल अधिकाऱ्याप्रमाणें समाजाशीं अगदीं फटकून राहात नसल्याकारणानें संस्थानिकांच्या यथार्थ स्थितीचें ज्ञान त्यास फार जलद होतें. त्यांचा बरेवाईटपणा त्यास सहज दिसून येतो. त्यांचीं व्यसनें, त्यांचीं दुष्कृत्यें अशा अधिकाऱ्याच्या उघडकीस तत्काळ येतात. संस्थानिकाच्या नुसत्या पाहुणचारावर किंवा बडेजावावर किंवा बाहेरच्या भपक्यावर विसंबून राहून हिंदी अधिकारी केव्हांहि फसणार नाहीं. संस्थानिकाचें मर्म थोड्याशा परिचयानें त्याला कळून येईल. व अशा संस्थानिकांना व त्यांच्या स्वैर वर्तनाला लगाम घालण्याचा तो तावडतोब प्रयत्न करील.

संस्थानिकांना हिंदी पोलिटिकल ऑफिसर कां नको याचें खरें कारण वर नमूद केलें आहे. सामान्य स्थितींतील हिंदी मनुष्य पिढीजाद श्रीमंतींत न वाढल्यामुळें पोलिटिकल अधिकारी होण्यास नालायक आहे हें संस्थानिकांचें म्हणणें दांभिकपणाचें आहे. युरोपियन पोलिटिकल अधिकारी थोर कुळांतील असतात किंवा गर्भश्रीमंतींत वाढलेले असतात असा मुळींच प्रकार नाहीं. युरोपियनाच्या कुळगोत्रानें संस्थानिकांचा अपमान होत नाहीं; मात्र हिंदी अधिकाऱ्याच्या सामाजिक दर्जानें त्यांची मानखंडना होते हें म्हणणें धाडसाचें आहे. या मानापमानाच्या कल्पना मानसिक कोतेपणावर अवलंबून आहेत व त्या व्यक्तिविषयक क्षुद्र बुद्धीच्या निदर्शक आहेत असेंच म्हणावें लागतें. खालील दोन उदाहरणावरून आमच्या म्हणण्याची सत्यता दिसून येईल. मि. सच्चिदानंद सिंह (हल्लीं लॉर्ड सिंह) यांस पहिले हिंदी कार्यकारी कौन्सिलाचे सभासद लॉर्ड मिंटोसाहेबाच्या कारकीर्दींत नेमण्यांत आलें. या नेमणुकीच्या विरुद्ध असा एक आक्षेप होता कीं, सामान्य हिंदी मनुष्यास एवढ्या मोठ्या अधिकाराच्या जागेवर नेमल्यास त्यायोगानें संस्थानिकांना वैषम्य वाटल व त्यांना आपला अपमान झाला असेंहि वाटेल. परंतु लॉर्ड मिंटोसाहेबांना जो अनुभव आला तो अगदीं आश्चर्यकारक होता. मिंटोसाहेबांच्या चरित्रात असे लिहिलें आहे कीं, मि. सिंह यांची नेमणूक झाल्यानंतर ग्वाल्हेरचे माजी महाराज अलिजाबहाद्दर शिंदे हे कांहीं कामाकरितां सिमल्यास आले. त्यांनीं पहिली गोष्ट तेथें गेल्यावर केली ती ही कीं, त्यांनीं प्रथमतः आपण

होऊन मि. सिंह यांच्या घरीं जाऊन त्यांची गांठ घेतली. लॉर्ड मिंटो यांना ही गोष्ट ऐकून फार आश्चर्य वाटलें व हिंदी संस्थानिकांमध्येंहि सन्माननीयांचा गौरव करण्याची कल्पना रुजूं लागेल असा त्यांस विश्वास वाटूं लागला.

याच्या उलट एक अनुभव हिंदुस्थानाचे माजी कमांडर-इन-चीफ सर ओमूर क्रेग यांनीं आपल्या एका पुस्तकांत नमूद केला आहे. लॉर्ड हार्डिंज यांनीं आपल्या कारकीर्दीत असा एक हुकूम काढला कीं, हिंदुस्थानसरकारच्या मुख्य वस्तीच्या शहरीं संस्थानिक लोक आल्यास कार्यकारी कौन्सिलाच्या सभासदांच्या त्यांनीं भेटी घ्याव्या. कार्यकारी मंडळाचे या वेळीं हिंदी सभासद होतेच. परंतु ते लोक संस्थानिकांच्या मतानें थोर कुळांत जन्मलेले नव्हते व याच कारणामुळें त्यांना ते हलक्या दर्जाचे वाटत. या तक्रारीबद्दल क्रेगसाहेबांनीं असें नमूद केलें आहे कीं, युरोपिअन एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलरांची ओळख नसतांना देखील हिंदी संस्थानिक त्यांच्या घरीं जाऊन ओळखी करून घेतात, मग हिंदी अधिकाऱ्यांच्या बाबतींत त्यांनीं ही अपमानकारक वर्णभेदाची प्रतारणा कां करावी हें समजत नाहीं. या दोन उदाहरणांवरून हिंदी पोलिटिकल अधिकाऱ्याबद्दलची असहिष्णुता केवळ भ्रामक समजुतीवर व लब्धप्रतिष्ठितपणाच्या संवयीवर अवलंबून आहे असें दिसून येईल. सबब या आक्षेपात कांहीं अर्थ नाहीं.

बादशहांशी संस्थानिकांचा प्रत्यक्ष संबंध ठेविला तरी व तसें करणें व्यवहार्य आहे असें मानलें तरी संस्थानिकांची स्थिति फोफाट्यांतून निघून आगींत पडल्याप्रमाणें होणार आहे. बादशहांशीं प्रत्यक्ष संबंध असावेत असें म्हणणारांची बादशहांच्या व्यक्तीसंबंधीं अगदीं चुकीची समजूत दिसत आहे. व ती त्यांनीं स्वतःच्या उदाहरणावरून बनविलेली दिसते. परमेश्वराची सगुण स्वरूपाची कल्पना आपल्या स्वतःच्या उदाहरणावरून मनुष्यानें बनविलेली आहे. परमेश्वराचें उदात्त स्वरूप—पुरुषोत्तमाचें किंवा एखाद्या सर्वांगसुंदर नरश्रेष्ठाचें—मानण्यांत आपली स्वतःचीच कल्पना या ध्येयांत प्रतिबिंबित झालेली दिसते. मनुष्य परमेश्वराचें ध्यान तो एखाद्या उंटाप्रमाणें आहे असें समजून कधींच करीत नाहीं. मानसिक बुद्धिमत्ता ज्या उपाधींनीं मर्यादित झाली आहे त्याचाच हा दोष आहे. याच कारणामुळें बादशहा म्हणजे आपल्याप्रमाणेंच एक बलाढ्य अरेराव, कर्तुमकर्तुम् समर्थ, आर्जवानें किंवा खुशामतीनें प्रसन्न होणारा प्राणी अशी संस्थानिकांची भावना दिसते. अशा बलाढ्य बादशहाला एकवार संतुष्ट केल्यानंतर मग तो संस्थानिकाची अनियंत्रित सत्ता निरंकुशपणें चालवूं देईल अशी त्यांची कल्पना झालेली असावी. परंतु इंग्लंडाच्या बादशहांबद्दलची ही कल्पना अत्यंत चुकीची आहे. ग्रेटब्रिटनमध्यें बादशहांस पार्लमेंटच्या संमतीशिवाय कांहींएक करतां येत नाहीं. स्वयंशासित वसाहतींच्या बाबतींतहि बादशहांचे अधिकार असेच मर्यादित आहेत. याखेरीज जे इतर ब्रिटिश साम्राज्याचे भाग आहेत व जे बादशहांच्या खास नजरेखालीं आहेत असें मानण्यांत येतें तेथील राज्यकारभारहि बादशहांच्या व्यक्तिविषयक मर्जीवर अवलंबून नसून तो प्रिव्ही कौन्सिलाच्या संमतीनें व जबाबदार मंत्र्याच्या सल्ल्यानें चालवावा लागतो. हिंदी संस्थानिकांचें नियंत्रण हिंदुस्थान—सरकाराकडून काढून बादशहांच्या खास नजरेखालीं ठेवलें तर प्रिव्ही कौन्सिल व जबाबदार मंत्री याची प्रत्यक्ष हुकमत संस्थानिकावर चालूं लागेल. स्वतंत्र वातावरणांत वाढलेले हे मुत्सद्दी अनियंत्रित सत्तेला संचार करण्याला क्षणभरहि अवसर न देतां त्या सत्तेचा संहार तत्काळ करतील. संस्थानिकांचा हल्ली बादशहांशीं अप्रत्यक्ष संबंध आहे. म्हणजे बादशहांचा संबंध जबाबदार मंत्र्याशीं, जबाबदार मंत्र्याचा संबंध हिंदुस्थानसरकाराशीं व हिंदुस्थान-सरकारचा संस्थानिकांशी या दूरान्वयामुळें संस्थानिकांची अनियंत्रित सत्ता आजपर्यंत टिकली आहे. खास नजरेखालीं ते जातील तर त्यांचा नाशच होईल व याच कारणासाठीं बादशहांशीं प्रत्यक्ष संबंध ठेवूं इच्छिणाऱ्या अरेरावी संस्थानिकांची हौस आत्मघातकीपणाची आहे असें दिसून येईल.

---

# पहिली सलामी झडली; पुढें काय ?

हिंदी राष्ट्राचा स्वयंनिर्णयाचा अधिकार पायाखालीं तुडवून भारतमंत्र्यानें भारतमातेचा धडधडीत अपमान केला असतां सायमन कमिशनवर कडकडीत बहिष्कार घालून भारतवासीयांनीं बर्कनहेडला खडखडीत जबाब दिला हें यथोचितच झालें. या कमिशनची नेमणूक जाहीर करतांना व्हॉइसरॉयांनीं ता. ८ नोव्हेंबरला जें भाषण केलें त्या भाषणानें हिंदी जनतेच्या अंत:करणारास घरे पडून इंगळ्या लावल्याप्रमाणें वेदना होऊं लागल्या. त्यानंतर ता. २४ नोव्हेंबर रोजीं बर्कनहेडसाहेबांनीं लॉर्डांच्या सभेंत जें भाषण केलें त्यानें तर त्या जखमेंत मीठ चोळल्याप्रमाणें होऊन अधिकच भडका झाला. त्या भडक्यानें सावध होऊन लॉर्ड आयर्विन हे हिंदी जनतेंत फ़ुट पाडण्याकरितां कांहींजणांचीं मनें वळविण्यासाठीं आपल्या मोहक वाणीनें या जखमेवर मलमपट्टी करण्याचा कावा करतात कीं काय अशी शंका वाटत होती; परंतु व्हॉइसरॉयांचें भाषण समग्र वाचून ती शंका दूर झाली. त्यांची भाषा बर्कनहेडच्यासारखी रावणशाही थाटाची नसून सभ्य व सौम्य होती. पण दोहोंचा इत्यर्थ एकच.

सायमन-सप्तक जेव्हां सात समुद्र ओलांडून हिंदुस्थानास येण्यास निघालें त्या वेळीं बर्कनहेड यांनीं नाटकी आविर्भाव करून असें भासविलें कीं, सुटलों आपण एकदांचे या त्रासांतून ! आतां ते लॉर्ड आयर्विन व सर जॉन सायमन तिकडे काय वाटेल तें करोत ! पण या नाटकी देखाव्यांत देखील तत्त्वाचा प्रश्न उपस्थित झाल्यास आपला अधिकार आपण गाजवूंच असा इषारा देण्यास ते विसरले नाहींत ! अर्थातच भारतमंत्र्यांनीं आयर्विन यांना हिंदी लोकांचीं संतप्त मनें शांत करण्यास फारच थोडी संधि ठेविली होती. पण व्हाइसरॉयांनीं तेवढ्याहि 'पडत्या फळाच्या आज्ञेचा' फायदा न घेतां बर्कनहेड यांच्याच भाषणाची 'री' ओढली आणि हिंदी लोकांना जणुं काय एक प्रकारें आव्हानच दिलें.

कमिशनमध्यें हिंदी सभासदांचा समावेश करण्याचा अधिकार आतां कोणासच राहिला नाहीं हें उघड होय. पण भारतमंत्र्यांची तशी इच्छा असती तर ते कायदेमंडळाच्या कमिट्यांना काही अधिक अधिकार देऊं शकले असते. आणि ज्याअर्थी त्यांनीं या गोष्टीचा विचारहि केला नाही त्याअर्थी या बाबतींत भारतमंत्री पुढें पाऊल टाकण्यास नाखुष आहेत असें उघड दिसतें. अशा परिस्थितींत लॉर्ड आयर्विन तरी काय सांगणार ! कांहींतरी बोललेंच पाहिजे म्हणून त्यांनीं जुनेंच कोटिक्रम नवीं सोंगें घालून असेंब्लीपुढें मिरवले. पण तशानें कोण फसणार ! हिंदी जनतेला स्वयंनिर्णयाचा अधिकार द्यावयाचा नाहीं हा कुटिल निश्चय कायमच असल्यामुळें त्याची संपादणी करण्याला पोंचट कारणाशिवाय दुसरें साधन त्यांच्याजवळ राहिलें नाहीं. अर्थात् गारुडयाच्या खेळांतल्याप्रमाणें घटकाभर छां छू करून त्यांनीं वेळ मारून नेली. पण त्यांच्या या हातचलाखीनें किंवा जिव्हाचापल्यानें भोळ्या भाबड्यांचीहि फसगत होणें शक्य नाहीं. व्हाइसरायांच्या भाषणांतली मुख्य तक्रार एवढीच कीं, हिंदी राष्ट्राचा उपमर्द करण्याचा आमचा हेतु नसतांना तो हेतु तुम्ही आमच्यावर कां लादतां ? पण आमचा हेतु नव्हता असें नुसतें म्हटल्यानें तो हेतु झांकला जाऊं शकत नाहीं. बळेंच लाथ मारावयाची आणि अपमान करण्याचा माझा हेतु नव्हता असें सांगत सुटावयाचें यांतलाच हा प्रकार आहे ! आणि ज्याचा पाय खरोखरच चुकून लागला असेल तो लगेच त्याबद्दल दिलगिरी दर्शवितो व पायहि आवरतो. पण येथें पाहावें तों एकवारच नव्हे तर त्रिवार त्याच गोष्टीचा उच्चार झाला. आणि त्यांत पश्चात्तापाचा व चुकीच्या दुरुस्तीचा लवलेशहि प्रकट झाला नाहीं; मग हा उपमर्द सहेतुक आहे असें कां म्हणूं नये?

हिंदी जनतेला वरील अनुमान काढण्याला एवढाच एक आधार आहे असें नाहीं. स्टॅटयूटरी कमिशन याचा पार्लमेंटच्या सभासदांचेंच कमिशन असा अर्थ बर्कनहेडखेरीज इतर कोणाच्याहि डोक्यांत आला नव्हता. पण आतां तोच अर्थ अक्षरशः खरा व बंधनकारक मानावयाचा झाल्यास आम्ही असें विचारतों कीं, यापुढें अल्पावधींतच पार्लमेंट बरखास्त झालें तर सायमन सप्तकाची समाप्ति व्हावयाची काय ? तेंहि एक वेळ असो. पण कमिशन नेमण्याची मुदत स्वतःच्या सोयीसाठी अलीकडे ओढून आणण्यासाठीं जशी 'इंडिया आक्टा'ची चुटकीसरशी दुरुस्ती करण्यांत आली, तशीच दुरुस्ती करून याहि अडचणीचा परिहार करतां आला नसता काय? परंतु ज्याला पाहाण्याची इच्छा नाहीं त्याच्यासारखा आंधळा कोणी नाहीं व ज्याला समजून घ्यावयाचेंच नाहीं त्याच्यासारखा वेड पांघरणाराहि दुसरा कोणी नाही! नाहीं तर लॉर्ड सिंह व सकलातवाला हे हिंदी गृहस्थ पार्लमेंटचेच सभासद आहेत असल्या जगजाहीर गोष्टीचा बर्कनहेडला विसर कसा पडला असता ?

जुन्या सबबी वादविवादांत टिकूं शकत नाहींत हें माहीत असून देखील व्हाइसरॉयांनीं

आणखी एक जुनी शक्कल पुढें आणली. एकदा पार्लमेंटकडे रिपोर्ट पाठवून दिला कीं, सायमन-सप्तकाची आयुर्मर्यादा संपणार. पण असेंब्लीची कमिटी त्यानंतर आस्तित्वांत राहून तिला पार्लमेंटरी कमिटीशीं वाटाघाट करण्याची अश्रुतपूर्व अशी संधि मिळणार आहे ! यावरून सायमन-सप्तकापेक्षां तुमच्या असेंब्लीच्या कमिटीचा अधिकार अधिक नव्हे काय अशी व्हाइसरॉय पृच्छा करीत आहेत ! पण असल्या धूळफेकीनें सगळी हिंदी जनता आंधळी थोडीच होणार आहे ! आयर्विन यांची ही विचारसरणी मान्य केल्यास न्यायाधिशापेक्षां पक्षकाराचा अधिकार श्रेष्ठ ठरूं लागेल ! कारण न्यायाधिशाच्या तोंडून एकदां निकाल बाहेर पडला कीं, त्या खटल्यापुरतें त्याचें आयुष्य संपतें. परंतु ज्या पक्षकाराच्या विरुद्ध निकाल झाला असेल त्याला मात्र वरिष्ठ कोर्टापुढें जाऊन अपिलांत पुनः तेंच रडगाणें गाण्याची मुभा असते. असलीच मुभा असेंब्लीच्या कमिटीलाहि मिळणार. असेंब्लीच्या कमिटीनें प्रथम आपला साक्षीपुरावा घेऊन स्वतःचा रिपोर्ट सायमन सप्तकापुढें मांडावा. त्या सप्तकानें तो नाकारल्यास खुद्द पार्लमेंटरी कमिटीपुढें तोच साक्षीपुरावा मांडावा. पण आम्हीं विचारतों कीं, तो मांडून तरी काय उपयोग ? जो रिपोर्ट कुचकामाचा ठरवून सायमन-सप्तकानें झिडकारला तोच रिपोर्ट पार्लमेंटरी कमिटी ग्राह्य मानील आणि सायमनसप्तकाचा रिपोर्ट बाजूस सारून असेंब्लीच्या कमिटीनें तयार केलेल्या रिपोर्टास अनुसरून नवा आक्ट बनवील हें संभवनीय आहे असें समजण्याइतके हिंदी लोक भोळसट आहेत असें लॉर्ड आयर्विन यांस वाटतें काय ? सारांश, एका कोर्टाच्या निकालाविरुद्ध दुसऱ्या कोर्टाकडे अपील करण्याची परवानगी मिळाल्यानें पक्षकार हा जसा न्यायाधिशाहून श्रेष्ठ ठरत नाहीं, त्याचप्रमाणें असेंब्लीच्या कमिटीला सायमन-सप्तकाच्या निकालाविरुद्ध गाऱ्हाणें गाण्याला विलायती यात्रा करण्याची मुभा मिळाल्यानें ती कमिटी सायमन कमिशनहून श्रेष्ठ ठरत नाहीं.

हिंदी सभासद कमिशनमध्यें न घेण्यांत वाटेल तर पार्लमेंटची चूक झाली असें म्हणा, पण हा जाणून बुजून अपमान केला असें म्हणूं नका असेंहि आयर्विनसाहेब गयावया करून सांगत आहेत. पण हा अपमान नव्हे तर काय हा बहुमान समजावयाचा? ज्या सत्येंद्रप्रसन्न सिंहांना लॉर्डाची पदवी दिली, प्रिव्ही कौन्सिलर केलें, अंडर-सेक्रेटरी नेमलें, बिहार प्रांताची सुभेदारी दिली, जर्मनीबरोबर झालेल्या व्हर्सेलीसच्या तहावर ब्रिटिश साम्राज्याच्यातर्फे सही करण्याच्या कामावर ज्यांची योजना करण्यांत आली ते लॉर्ड सिंह सायमन-कमिशनमध्यें बसण्याला अपात्र ठरविण्यांत आले हा त्यांचा बहुमानच समजावयाचा ना ? ज्या शफीसाहेबांनीं स्वतःची सदसद्विवेकबुद्धि बाजूस सारून मुडीमन कमिटीच्या रिपोर्टावर सरकारच्या बाजूनें सही केली त्या शफीसाहेबांची देखील सायमनसप्तकांत वर्णी लागली नाहीं. हा देखील त्यांचा अपमान नसून आपल्या राजनिष्ठेच्या अतिरेकाचें हें बक्षीसच आहे असेंच त्यांनींहि मानावयाचें ना ? अशाच प्रकारें ज्यांनीं आजपर्यंत खाविंदचरणीं मिलिंदायमान होण्यांतच आपलें जीवितसाफल्य आहे असें मानलें त्या सवांचाहि बहुमान करण्यांत आला आहे! असलीं किती तरी गाळीव रत्नें सरकारला सहज हस्तगत करतां आलीं असतीं. पण असल्या सोलीव मवाळांचा देखील सायमनसप्तकाच्या अंतरंगांत प्रवेश होऊं नये असे ज्या सरकारला वाटलें त्या सरकारचा हेतु वेडावांकडा नाहीं, तो अत्यंत शुद्ध आहे, असे व्हाइसरॉयांनीं कितीहि कंठशोष करून कळविलें तरी तें कोण खरें मानूं शकेल ?

सर महंमद शफी किंवा सर उमर हयातखान अशासारख्यांची कमिशनवर नेमणूक झाली असती तर त्यायोगानें हिंदी राष्ट्राचें समाधान झालें असतें किंवा तें कमिशन भारतभूमीचा भाग्योदय करूं शकलें असतें असें समजण्याइतका आचरट आतां कोणीहि राहिला नाहीं. स्वयंनिर्णयाचा पूर्ण हक्क न दिला तरी निदान राऊंड टेबल कॉन्फरन्स इतक्या अर्धवट हक्कावर बोळवण करण्याचें सरकारनें मनांत आणलें असतें तर त्यांस सध्याच्या परिस्थितींत हिंदी राष्ट्रानें संमति दिली असती. परंतु सरकारनें काय केलें असतें तर आमचें समाधान झालें असतें हा प्रश्नच आज राष्ट्रासमोर नसल्यानें त्याचें कल्पित उत्तर देऊन त्या परिस्थितींत मतभेदाचें केवढें प्रदर्शन खुलें झालें असतें याचा चित्रपट रंगविण्याचें आतां कारणच उरलें नाहीं. सरकारनें एवढी मोठी प्रचंड घोडचूक केली आहे कीं, अगदीं सरकारच्या वतीच्या प्रेमांध माणसाला देखील तिचें अस्तित्व नाकबूल करतां येइनासें झालें आहे. प्रळयकाळचा महापूर आला म्हणजे सखल प्रदेशांत राहणारा व डोंगर-पठारावर राहणारा, झोंपडींत राहणारा व सातमजली हवेलींत राहणारा, बिनपोहणारा आणि अत्यंत पटाईत पोहणारा या सर्वांना तें संकट सारखेंच जाणवतें व त्यांतून पार पडण्याकरितां नावेसारख्या एकाच साधनाचा ते सर्व आश्रय करतात; त्याप्रमाणेंच या वेळींहि सर्व पक्षांच्या सर्वमान्य पुढाऱ्यांनी स्वयंनिर्णयरूपी एकाच नावेचा आश्रय केला आहे. अशा वेळीं हा महापूर हल्लींपेक्षां शंभर फूट कमी असता तर

माझें घर वांचलें असतें, पण तुझी झोंपडी मात्र वाहून गेली असती असें एकानें दुसऱ्यास हिणाविणें, किंवा उलटपक्षीं माझी तेवढी झोंपडी वाहून गेली असती व तुझी हवेली सुरक्षित राहिली असती तर तूं माझ्याशीं सहकार्य करण्यास तयार झाला नसतास असें एकानें दुसऱ्यास टोंचून बोलणें कार्यविघातक होय. सहेतुक असो वा यदृच्छेनें असो, चुकीमुळें असो वा कुटिल भेदनीतीमुळें असो, या वेळीं सर्वांवर समान संकट आल्यामुळें या नोव्हाच्या नावेंत गरीब गाई व गुरगुरणारे वाघ, अत्यंत निरुपद्रवी कोंकरें व अत्यंत क्रूर असे लांडगे हे सर्व आपापला वैरभाव विसरून एकत्र नांदत आहेत. सर फेरोज सेठनासारखे सरकारच्या गळ्यांतले ताईत हे पुण्यास शिवाजी मंदिरांत व्याख्यान देण्यासाठीं मुद्दाम येतात आणि हरताळ पाडूं नका असें कंठरवानें सांगणारे सौम्यतम वृत्तीचे सीतलवाद हरताळाच्या दिवशीं मुंबईच्या समुद्रकिनाऱ्यावरील विराटसभेचें अध्यक्षस्थान स्वीकारतात हा देखावा हेंच दर्शवीत नाहीं काय ?

पण या प्रासंगिक एकीचा आपण पूर्ण फायदा घेऊन ही एकी अभंग केली पाहिजे आणि ही स्वयनिर्णयरूपी नोव्हाची नाव स्वातंत्र्यरूपी मेरूच्या एखाद्या शिखरानजीक नेऊन तेथेंच ती बळकट बांधून टाकली पाहिजे. हें साध्य होण्याकरितां प्रथम ही नाव एकविचारानें आणि योग्य दिशेनें सुरक्षितपणें चालविण्याची तजवीज करणें जरूर आहे. बहिष्कार पुकारला, हरताळ पाळला, सायमनसमकाचा जाहीर निषेध केला, सगळें कांहीं केलें. पण ही नुसती पहिली सलामी झडली. आतां यापुढील कार्यच खरें महत्त्वाचें आणि राष्ट्राची कसोटी पाहणारें आहे. सायमन कमिशनवर बहिष्कार पुकारणें सोपें आहे, पण तो बहिष्कार तुम्हालाच विघातक होईल अशी धमकी व्हाइसरॉयांनी आपल्या भाषणांत दिली आहे. अशा धमकीला भीक न घालतां आतां आपण स्वावलंबनाच्या सर्व साधनांची जुळवाजुळव करून प्रतिपक्षाची कारवाई निष्फळ केली पाहिजे. स्वराज्याची घटना ठरविणें हा यापुढील सर्व चळवळीचा पाया होय. तो पाया खंबीर झाल्यास त्यावरील इमारत टिकाऊ होईल. याकरितां तो पाया पक्का मजबूत कसा होईल याचा विचार पुढाऱ्यांनीं करून त्या तरतुदीस आधीं लागावें. त्याबरोबरच स्वावलंबनाची पहिली पायरी म्हणून परदेशी मालावरील बहिष्कार आणि स्वदेशी मालाचा प्रसार हें कार्य हातीं घेतलें पाहिजे. वर्किंग कमिटी व कित्येक प्रांतिक कमिट्या यांनीं कोणकोणत्या परदेशी वस्तूंवर बहिष्कार टाकावा हें ठरविण्यासाठीं कमिट्या नेमल्या आहेत. त्या कमिट्या आपापलें काम शक्य तितकें त्वरित करतीलच. परंतु तत्पूर्वीहि परदेशी कापड, साखर, मीठ, खेळणीं यासारख्या कित्येक परदेशी वस्तूंवर प्रांतांनीं बहिष्कार टाकण्याजोगा आहे. याकरितां पोट-कमिट्यांच्या रिपोर्टांची वाट पाहात न बसतां तुर्त या दोन-चार वस्तूंपासूनच प्रारंभ केला तरी केवढें मोठें कार्य होणारें आहे.

दुसरें एक महत्त्वाचें आणि अधिक तांतडीचें कार्य म्हणजे परदेशांशीं दळणवळण ठेवून त्यांच्याशीं स्नेहसंबंध जोडण्याचें. आतांपर्यंत आपण सगळ्या जगाकडे इंग्लिशांच्या चष्म्यांतून पाहात आल्यामुळें तो चष्मा जो रंग दाखवील तोच आपण खरा मानीत आलों. इंग्लिश चष्म्यांतून रशिया लाल रंगाचा दिसतो म्हणून आपणहि त्यास लाल रंगाचा बागुलबुवा मानीत आलों. पण तो खराच लाल आहे का दुसऱ्या कोणत्या रंगाचा आहे हें आपण आपल्या स्वतःच्या डोळ्यानें पाहावयास नको काय ? असलें परावलंबन सोडून आपण कानडासारखें स्वावलंबी बनलें पाहिजे. कानडानें आपला वकील आजपर्यंत एकट्या वॉशिंग्टनलाच ठेवला होता; यापुढें टोकियोलाहि त्याचा वकील राहणार आहे. हिंदुस्थानाच्या राष्ट्रीय सभेनेंहि आपले वकील वॉशिंग्टन टोकियो, मास्को, रोम, जिनीवा वगैरे ठिकाणीं कां ठेवूं नयेत ? त्यांना आजच वकिलांचा दर्जा व हक्क मिळणार नाहींत हें खरें; परंतु हिंदी राष्ट्राला परदेशचें राजकारण इत्थंभूत व यथातथ्य कळूं लागेल हा फायदा कांहीं दुर्लक्ष करण्याइतका क्षुद्र नाहीं. आणि त्याबरोबरच परदेशांत विद्यार्जनाकरितां जाणाऱ्या शेंकडों विद्यार्थ्यांना हे परराष्ट्रीय वकील मार्गदर्शक होतील हाहि मोठा उपयोग होणार आहे. असो. अशाच प्रकारचीं अनेक कार्यें स्वातंत्र्येच्छु भरतखंडाला करावयाचीं आहेत. पण त्यांतलीं वर निर्दिष्ट केलेलीं स्वराज्यघटना तयार करणें, निवडक परदेशी मालावर बहिष्कार घालून देशी मालाचा प्रसार करणें आणि परराष्ट्रांशीं स्नेहसंबंध जोडून तेथें आपले वकील व विद्यार्थी पाठविणें एवढीं कार्यें जरी तूर्त हातीं घेण्यांत आलीं तरी सायमन कमिशनवरील आपला बहिष्कार अगदींच निष्क्रिय किंवा निष्फळ न होतां तो सक्रिय व फलदायक होऊं लागेल. याकरितां हिंदी पुढाऱ्यांनीं आतां आपला मोर्चा सायमनकडून वळवून या कार्याकडे लावावा.

---

# मद्रासची राष्ट्रीय सभा

( ले. दामोदर विश्वनाथ गोखले. )

लेखांक ३ रा.

मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत भावी महायुद्धाच्या संकटाची जाणीव हिंदी मुत्सद्यांना आहे व यापुढें लवकरच जें युद्ध होणार आहे त्या युद्धांत जागृत झालेलें हिंदी राष्ट्र मागील युद्धाच्या वेळीं झालेल्या चुका दुरुस्त करणार आहे अशा अर्थाचा जो सहावा ठराव झाला त्यालाहि भविष्यकाळीं निकरानें सुरू होणाऱ्या स्वातंत्र्याच्या लढ्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्व आहे. या ठरावाचें हें महत्त्व लक्षांत येण्याकरितां आपण

## युद्धाचा मागील इतिहास

पाहूं. सन १९१४ सालीं युरोपांत युद्धाचा वणवा पेटला त्या वेळीं हिंदी राजकारणी पुढाऱ्यांना त्या युद्धाची जाणीवहि नव्हती. महायुद्ध सुरू झाल्याचें जाहीर झाल्याबरोबर संकटकाळीं लहान मूल अज्ञानामुळें आपल्या आईस चिकटतें तसें आपलें हिंदी राष्ट्र इंग्रजी राज्यकर्त्यांना चिकटलें. महायुद्धाच्या वेळीं लष्करी कायदा सुरू होईल या भीतीनेंहि स्वतःवर कोणतीहि कायद्याची ब्याद येऊं नये म्हणून सर्वांत उत्तम, सोपा, व सद्यःफलदायी असा राजनिष्ठाप्रदर्शनाचा मार्ग राष्ट्रानें पतकरला. शिवाय महायुद्धाचा निकाल काय होतो कोणास ठाऊक ! अपरिचित अशा जर्मन बादशहाच्या करड्या अमलापेक्षां परिचित व पाडगा झालेला इंग्रजी अम्मलच बरा असाहि विचार नव्हता असें नाहीं. या सर्व विचारसरणींत न सांपडलेले असे चारदोनच लोकमान्य टिळकांसारखे मुत्सद्दी हिंदुस्थानांत होते. त्यांनीं युद्धविषयक बाबतींत अनेक उलटेसुलटे पाचपेंच केले. तरुणांना लष्करांत सामील व्हावें व लष्करी शिक्षण घ्यावें असेंहि सांगितलें व त्या दृष्टीनें होणारा फायदा वस्ताद इंग्रज घेऊं देत नाहींत असें पाहिल्याबरोबर पवित्रा बदलून युद्धांत भरती करूं नये, कोणीहि सरकारला मदत करूं नये अशीहि चळवळ त्यांनीं केली. त्यांत फारसें यश आलें नाहीं. याचें कारण त्यांच्या युक्त्याप्रयुक्त्या चुकीच्या होत्या असें नसून राष्ट्रांत तयारीच नव्हती. इतकेंच नव्हे तर असल्या अडचणीच्या प्रसंगीं लागणारें मनोधैर्य दूरदृष्टि व धाडसहि राष्ट्रांत नव्हतें ही गोष्ट स्पष्ट कबूल केली पाहिजे. त्याचा परिणाम मात्र असा झाला कीं, हिंदी राष्ट्रांतील मनुष्यबळ व संपत्तीचें बळ हें सर्व हिंदुस्थानाच्या उपयोगी यत्किंचितहि न पडतां सर्वस्वी इंग्रजांच्या उपयोगी पडलें. हिंदुस्थानास फायदा राजकीय अगर दुसरा कोणताहि झाला नाहींच नाहीं. उलट युद्ध संपतांच 'गरज सरो व वैद्य मरो' या न्यायानें रौलेट कायद्यासारखे कायदे व अमृतसरची कत्तल बक्षिसादाखल हिंदुस्थानास मिळाली. जी गोष्ट ज्या वेळीं करूं नये ती त्या वेळीं करावयाची व जी ज्या वेळीं करावी ती करावयाची नाहीं हा आमच्या राष्ट्राचा स्वभावच आहे. यामुळेंच आपल्यावर

## उलटा डाव

होतो हें समजून घेतलें पाहिजे. इंग्रज संकटांत होते त्या वेळीं संकटाचा फायदा न घेतां महायुद्धाच्या वेळीं महात्मा गांधींनीं त्यांच्याशीं सहकार केला. व मी सर्वश्रेष्ठ धनुर्धर म्हणून आकाशांत उडणारा जर्मन बादशहा केसर याला सुद्धां युद्धांत पालथा घातल्यानें विजयोन्माद आलेल्या विजयी इंग्रजाबरोबर महायुद्धानंतर ते असहकार करूं लागले ! मोपल्यांनीं इंग्रजांविरुद्ध बंड उभारलें ही अलीबंधूंची मुसलमानी गप्प जर खरी असेल तर हें बंड युद्धकालांत न करतां महायुद्ध संपल्यावर कां केलें गेलें व त्यांत इंग्रजांच्या ऐवजीं हिंदु बांधवाचींच डोकीं कां फुटलीं हें एक कोडेंच आहे. पण त्यांची मिरवतात ती शेखी खरी मानली तरी त्या बाबतींत मुत्सद्दीपणाचा अभाव होता ही गोष्ट स्पष्ट होते. असहकारितेचा डाव अंगावर आला याचें खरें कारण एकच कीं, भलत्या वेळीं त्या शस्त्राचा उपयोग केला गेला. इतर दिलीं जात असलेलीं पराभवाचीं कारणें खरीं नाहींत. युद्धकालाचें तें अस्त्र आहे, युद्धोत्तरकालाचें नव्हे. जसा युद्धकालीं केलेला सहकार अंगावर आला तसाच युद्धोत्तर केलेला असहकारहि अयशस्वी ठरला. यांत दोष कोणाचाच नाहीं. राष्ट्रानें असेच राजकारणाचे धडे शिकावयाचे असतात.

मुख्य गोष्ट ही आहे कीं, राष्ट्रांतील राजकारणी पुढाऱ्यांची दृष्टि गरुडाप्रमाणें सर्वव्यापी पाहिजे व अचूक झडप योग्य वेळीं घालण्याची राष्ट्राची तयारी पाहिजे. भावी महायुद्धांत फार मोठा फायदा निश्चित होत असल्यास हिंदुस्थान सहकारहि करील. उलटपक्षीं स्वातंत्र्याचें निशाणहि नच उभारील कशावरून ! निदान स्वखुषीनें मदत करणार नाहीं हें निश्चित. पण ह्या सर्व गोष्टींत हिंदी राष्ट्र स्वतःचा

निर्णय स्वतः करील. याचा अर्थच असा कीं हिंदुस्थान यापुढें

### युद्धविषयक स्वयंनिर्णय

आपला आपण करणार. सहाव्या ठरावाचें तें सूत्रच आहे. हिंदी राष्ट्राचें हित ज्यायोगानें अधिकात अधिक साधेल अशीच विचारसरणी आपण अमलांत आणूं; इतर भावनाप्रधान राजनिष्ठा वगैरे भपकदार नांवाखालीं पुनः फसविले जाणार नाहीं, असा या ठरावानें आपला निश्चय राष्ट्रीय सभेनें जाहीर केला आहे. हिंदी राष्ट्राचें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्यासाठीं चाललेले प्रयत्न हाणून पाडावे व साम्राज्यवादी इंग्रजी मुत्सद्यांच्या हातचें हिंदुस्थान बाहुलें बनावें म्हणून जी लढाईची तयारी चालविलेली आहे तिची जाणीव आम्हास पूर्ण आली आहे असें ठरावांत स्पष्ट म्हटलें आहे. शेवटीं अशा तऱ्हेच्या महायुद्धाच्या वावटळींत इंग्रजी राष्ट्र सांपडल्यास हिंदी जनता त्या युद्धांत भाग घेणार नाहीं व कोणत्याहि तऱ्हेची मदत इंग्रजाना करणार नाहीं असा जाहीर इषारा या ठरावानें दिला आहे.

हा जाहीर इषारा, ही घोषणा व हा कृतनिश्चय म्हणजे इंग्रजी मुत्सद्यांच्या राजकारणाच्या मुख्य व्यूहावर एक मोठी कुऱ्हाडच आहे. आज इंग्रजांना हिंदुस्थान पाहिजे आहे तें केवळ त्यांच्या स्वहिताकरितां पाहिजे. हिंदुस्थान ही एक इंग्लंडाची राखीव बाजारपेठ, कच्च्या मालाचें खास मालकीचें कोठार, व्यापाराची सुबत्ता करून देणारा देश, लष्करी सैन्य व आरमार व आतां विमानें या सर्व खात्यांतील लोकांस शिक्षण घेण्याचें क्षेत्र, व शेवटीं स्वतःवर संकट आलें असतां ज्याच्या जिवावर इंग्लंडला जगतां येईल असा देश व महायुद्ध उभें राहिल्यास माणसें धान्य व संपत्ति वाटेल तितकी पुरविणारें आपल्या कह्यांत असलेलें राष्ट्र, अशी इंग्रजी मुत्सद्यांची, अधिकाऱ्यांची व लोकांची समजूत झाली आहे व दीडशें वर्षांच्या इतिहासानें ती खरीहि ठरली आहे. १९१९ सालीं नव्या सुधारणा हिंदुस्थानास द्यावयाचा कायदा झाला खरा. पण त्या कायद्याच्या पोटांत जो हेतु ग्रथित केला होता त्यांत

### इंग्रजी कावा

भरपूर होता. सुधारणांचे प्रणेते मॅंटेग्युसाहेब यांनीं पार्लमेंटमधील सदर विषयावरील त्यांच्या एका भाषणांत असें स्पष्ट सांगितलेलें नमूद आहे कीं, हिंदुस्थानास आम्ही सुधारणा या म्हणतों याचें स्पष्ट कारण असें आहे कीं, पुनः जें महायुद्ध होईल त्या युद्धाच्या वेळीं हिंदुस्थानानें स्वखुषीनें व आपलेपणाच्या भावनेनें इंग्लंडास मदत करावी व हाच उद्देश खरा व स्पष्ट आहे. इंग्रज हिंदुस्थानाचे राज्यकर्ते असले तरी ते माणसेंच आहेत. त्यांनाहि स्वार्थ-परार्थ कळतो व सामान्य जनतेप्रमाणें मोठ्या प्रमाणावर स्वतःचा फायदा कसा करून घ्यावयाचा हे शास्त्र त्यांनाच उत्तम अवगत आहे. आपल्याला तें मुळींच कळत नाहीं. मॅंटेग्युसाहेबांनीं आपल्या भाषणांत सुधारणा देण्याचा हेतु म्हणून जो सांगितला तो स्पष्टपणें आपणच समजून घेतला पाहिजे होता. आजपर्यंत ही गोष्ट झाली नाहीं. पण मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत वर उल्लेखिलेला जो ठराव आहे त्या ठरावामुळें साम्राज्याच्या मुळावरच घाव घालून राष्ट्रीय सभेनें नव्या युगांतील एका नव्या भरदार चळवळीस प्रारंभ केला आहे. खरोखरच जर युद्ध सुरू झालें, तर चार-पांच कोटि लोकवस्तीचा, अत्यंत लहान, भरपूर अन्नसुद्धां न पिकणारा हा चिमुकला इंग्लंड देश इतर युद्ध्यमान बलाढ्य राष्ट्रासमोर कसा काय टिकाव धरील हें सांगणें कठीण आहे. हिंदुस्थान मदत करीत नाहीं, निदान स्वखुषीनें नाहीं, धान्य कपडा माणसें शिपाई यांचा पुरवठा करीत नाहीं, असा जर पेंच येऊन पडला तर इंग्लंडसारख्या या अल्पसंख्याक इंग्रजी राष्ट्रास हार खावी लागेल. हिंदुस्थानाच्या मदतीचें एवढें महत्त्व आहे. भावी युद्धांत एकाकी पडलेला इंग्लंड देश, हिंदुस्थानानें मदत करीत नाहीं म्हणतांच, हां हां म्हणता जमीनदोस्त होईल यांत शंका नाहीं. तात्पर्य, मुत्सद्दीपणाची लबाडीची व तकलुपी भाषा सोडून दिली तर एक गोष्ट स्पष्ट दृग्गोचर होते ती ही कीं, चांगलीं-वाईट कोणतींहि साधनें उपयोगांत आणून इंग्लंडाला हिंदुस्थानाची मदत शाबूत ठेविली पाहिजे आहे. गोष्टीमधून अमुक राजाचें मरण अमुक गुहेंत ठेवलेल्या अमक्या पक्ष्याच्या पंखांत आहे असें लिहितात तद्वत् पण प्रत्यक्ष सत्य गोष्ट म्हणजे इंग्रजी

### साम्राज्याचा मृत्यु

हिंदी असंतोषांत व ऐनयुद्धाच्या संकटकाळीं हिंदुस्थानानें मदतीचा हात आखडता घेण्यांत आहे हें सांगावयास नको. बाहेरून संकटें नसल्यामुळे चैनींत लोळणारा इंग्लंड, दरोबस्त चतुरंग सैन्य सदैव सज्ज ठेवलेला इंग्लंड व बरोबरीच्या अगर वरचढ इतर राष्ट्राच्या स्नेहाच्या सावलींत असलेला इंग्लंड हिंदुस्थानास कधींहि दाद देणार नाहीं. सर्व चळवळी पालथ्याउलथ्या करील. हिंदुस्थानानें सशस्त्र बनण्याचा प्रयत्न करून बंडाचें शेवटचें अस्त्रच सोडलें तर प्रश्न वेगळा. पण तें आज शक्य कोटींत नाहीं. व शिवाय त्याकरितां हिंदी राष्ट्रास किंमतहि प्रमाणाबाहेर खास द्यावी लागेल इंग्लंड दुसऱ्या एखाद्या युरोपमधील युद्धांत गुंतलें तर मात्र ही परिस्थिति पालटल्याशिवाय

राहत नाहीं. लहानशा इंग्लंडला हिंदुस्थानाच्या मनुष्यबळाची, द्रव्यबळाची आणि बुद्धिबळाची जरूर आहे; किंबहुना त्या बळांतच त्याचा प्राण आहे. "इंग्लंडवरील संकट म्हणजे हिंदुस्थानाची संधि" असा सूचक शब्दप्रयोग गेल्या युद्धाच्या वेळीं बादशहांनीं केला. अर्थात् त्या वेळीं हिंदुस्थानानें मदत संकटकाळीं करावी व बक्षीस घ्यावें असें म्हणण्याचा त्यांचा रोख होता व त्यांत सत्य आहे. फक्त ही तरवार दुहेरी धारेची आहे इतकेंच. मदत केली नाहीं तर काय असाहि भविष्यसूचक सवाल त्यांतच उत्पन्न होतो. मांटेग्युसाहेबांनीं मेसापोटेमिया कमिशनच्या वेळीं पार्लमेंट सभेमध्ये जें भाषण केलें त्यांत असें स्वच्छ म्हटलें कीं, यापुढें होणाऱ्या युद्धांत हिंदुस्थानानें आपलेपणाने मदत केली पाहिजे व असें करण्याची हिंदी राष्ट्राला इच्छा व स्फूर्ति व्हावी म्हणूनच आपल्याला त्यास सुधारणा द्याव्या लागतील. ही भाषा सुज्ञ, दूरदर्शी मुत्सद्याची आहे. हिंदुस्थानांतून नुकतेंच बंगालची गव्हर्नरी सोडून गेलेले लॉर्ड लिटन यांनींहि अशाच अर्थाचा लेख लिहून हा मुद्दा स्पष्ट केला आहे. या सर्वांचा अर्थ हा कीं, हिंदी लोकांना ताबडतोब त्यांना पाहिजे असें स्वराज्याचे हक्क देण्यांतच इंग्लंडचा शहाणपणा आहे. कारण तरच हिंदी लोक त्यांना युद्धाच्या वेळीं मदत करतील. विजयानें धुंद झालेल्या साम्राज्यवाद्यांना हा सुविचार पटत नाहीं म्हणूनच राष्ट्रीय सभेनें आपला हा

### हुकुमी पत्ता

बाहेर काढला आहे. हा ठराव व यांत गर्भित असलेलें धोरण जाहीर करण्यांत राष्ट्रीय सभेच्या नवमतवाल्या पुढाऱ्यांनीं फार मोठा डाव टाकला आहे. इंग्लंडला ही एक प्रकारची नोटीस आहे. व ती योग्य काळीं व्यवहारसृष्टींत आणणें ही गोष्ट शक्य असल्यानें त्याला सुरुंगाच्या दारूचें स्वरूप आलें आहे. साम्राज्याच्या पायांतच ती ठेवल्यामुळें वरील इमारत धोक्यांत आणण्याचें सामर्थ्य तींत आहे. राष्ट्रीय सभेंत इतर पुष्कळ ठराव सायमन कमिशन, हिंदू-मुसलमानांची एकी वगैरेबद्दलचे केले गेले. ते यथायोग्य आहेत व त्यांची चर्चा राष्ट्र करीत आहे व करील. परंतु राष्ट्रीय सभेनें जो युद्धविषयक बाबतींत ठराव केला त्याचें महत्त्व क्रांतीइतकें आहे. किंबहुना ही एक विचारक्रांतीच आहे. इतर चळवळींबरोबरच पण प्रामुख्यानें राष्ट्रीय सभेचे प्रचारक व पुढारी यांनीं पुढील महायुद्धाच्या वेळीं हिंदुस्थानांत काय करावें, कसें वागावें, याचें शिक्षण आतांपासून देण्यास सुरुवात केली तर राष्ट्र तयार होईल व पुढारी जागृत राहिल्याने मागील चुकीची आवृत्ति होणार नाहीं. नव्या चळवळीची दिशा अशी ठेवली जाईल अगर ठेवावी असें वाटूं लागेल खचित! खूप स्पष्टपणा ठेवल्यास थोडथोडाबहुत खटले वगैरेंच्या अडचणींतून बाहेर पडून ही चळवळ पचनीं पडेल व तिचाच उपयोग होईल. इंग्लंडांतील मुत्सद्दी याचा विचार करून आगाऊच गोष्टी विकोपास जाऊं न देता हिंदुस्थानास स्वराज्य देतील तर ठीक; नाहीं तर त्याची जबाबदारी त्यांच्यावरच राहून त्यांनाच खडे खावे लागतील. राष्ट्रीय सभेच्या मुख्य ठरावाची फलश्रुति वरीलप्रमाणें आहे. उदयोन्मुख तरुण हिंदुस्थान याचा खास फायदा घेईल तरच ईश्वरी कृपेने त्यांचे राजकारणविषयक मनोरथ पूर्ण होतील. (समाप्त.)

# सिंधु-खोऱ्यांतील अपूर्व शोध

हिंदुस्थानाच्या पुराणवस्तु-संशोधन खात्यानें सिंधु नदीच्या खोऱ्यांत जें संशोधनकार्य चालविलें आहे त्यापैकीं मोहेन्जोदारो यथील माहिती मागें केसरीच्या वाचकांना दिली आहे. त्यानंतर तेथें व हराप्पा येथें जास्त खणतीचें काम झालें. व तेथें सांपडलेल्या अवशेषांची माहिती सिंधु संस्कृतीवर जास्तच प्रकाश पाडणारी व मनोरंजक असल्यानें ती सारांशरूपानें पुढें देण्यांत येत आहे. सदर हकीकत पुराणवस्तुसंशोधन खात्याचे प्रमुख सर जॉन मार्शल यांनीं पत्रकरूपानें प्रसिद्ध केली आहे.

### माहेन्जोदारो

मोहेन्जोदारो येथें संशोधनकार्यानें एकंदर १३ एकर जागा व्यापिली असून त्या जागेवर तीन शहरें होतीं. या तीन शहरांपैकीं तिसऱ्या शहरांतील इमारती उत्तम बांधलेल्या आहेत. सर्व इमारती पक्क्या विटांनीं बांधलेल्या असून त्यावर चुन्याच्या दर्जाहि केलेल्या आहेत. शहराच्या वायव्य कोपऱ्यांत एके ठिकाणी बुद्धाचा स्तूप असून त्याखालीं शहरांतील मुख्य मंदिर असावें असा अंदाज आहे. येथें ज्या इमारती सांपडल्या त्यांत एक ३९ फूट लांब २३ फूट रुंद व दहा फूट खोलीचें एक तळें सांपडलें आहे. हें स्नानासाठीं असावें किंवा तें शहराचा पाणीपुरवठा करण्याचा सांठा तरी असावा. तळ्याच्या तीन बाजूंनीं कठडे असून समोरच्या बाजूस बांधीव पटांगण व त्यावर लहान लहान खोल्या आहेत. या सर्वांच्या भोंवतीं सहा फूट जाडीची भिंत आहे व त्यांतून

आंत येण्यास दोन दरवाजे ठेवले आहेत. तळ्याच्या समोरच्या बाजूस ज्या खोल्या सांगितल्या त्यांतील मधल्या जागीं मोठी विहीर आहे व तिचें पाणी या तळ्यांत सांठविलें जात असावें. या खोल्यांचा उपयोग स्नानगृहासाठींहि होत असावा. त्यांत जी विटांची फरशी केली आहे ती फार उत्तम आहे. विटांना खोंचा घेऊन त्या एकमेकांत पक्क्या अडकविल्या आहेत. पाणसांठ्याची जागाहि अतिशय भक्कम केली आहे. चौफेर दहा फूट जाडीच्या पक्क्या विटांच्या भिंती व त्यावर चुन्याचा गिलावा केला असल्यानें पाण्याचा बिंदूहि बाहेर जाणार नाहीं. याला जोडून एक सहा फूट उंचीची पक्की कमान बांधली असून तींतून पाणी शहरांत नेलें असावें.

याखेरीज मोहेन्जोदारो येथें इतर खासगी घरांचे जे अवशेष सांपडले आहेत त्यावरून नाईलच्या तीरावरील बाबिलोनकाळपेक्षांहि यांची संस्कृति श्रेष्ठ असून त्यांच्यापेक्षां येथील लोक जास्त सुखस्वास्थ्यांत होते असें म्हणतां येतें. सुमेरटापूंत ऊर येथें जे नवे शोध लागले त्यावरून मोहेन्जोदारो व ऊर यांत अत्यंत साम्य आढळतें. याखेरीज द. मेसापोटेमिया व सिंध यामध्यें चांगलेंच दळणवळण असावें अशाबद्दलीहि पुरावा उपलब्ध झाला आहे. ऊर येथील घरें मोहेन्जोदारो येथील घरांच्या तोडीचीं नाहींत व मोहेन्जोदारो येथें जी सुंदर ड्रेनेजची पद्धत होती तीहि ऊर येथें सांपडत नाहीं.

## हराप्पा

हराप्पा हें ठिकाण मोंन्हेजोदारोपासून ४५० मैलांवर आहे व तेथील संशोधनांत मोहेन्जोदारोपेक्षाहि प्राचीन अवशेष सांपडतात. तेथें एक मोठें ताम्रपात्र सांपडलें असून त्यांत तांब्याचीं बरींच हत्यारें, गदा, दुधारी कुऱ्हाडी, खंजीर, भाल्याचीं फळें, करवत, वाकस, छिन्या इत्यादि हत्यारें सांपडलीं आहेत. यांपैकीं कांहींवर चित्रलिपींत मजकूर लिहिला आहे. याबरोबर सुमारें १५० वेगवेगळ्या आकाराचे शिक्के सांपडले आहेत. त्यांपैकीं एकांत शिरस्त्राण घातलेले ७ पुरुष चालत असल्याचें दर्शविलें आहे. दुसऱ्यांत एक मनुष्य वाघावर शस्त्र घेऊन हल्ला करीत आहे इ.

येथेंच जमिनीच्या खालच्या थरांत दुचाकी तांब्याचा रथ सांपडला आहे. आतांपर्यंत कोठेंहि दुचाकी वाहन सांपडलें नसल्यानें हा नमुना सर्वांत जुना आहे. येथील बहुतेक इमारती नादुरुस्त आहेत, तथापि एक मात्र पूर्ण शाबूत आढळली. ही इमारत १६८×१३६ एवढी मोठी असून त्यांत बरेच दिवाणखानेहि आहेत. या जागेंत धान्याचें कोठार असावें असा तर्क आहे. मेसापोटोमियांतील सुमेरियन संस्कृति व इतिहासपूर्वकाळांतील मोहेन्जोदारो व हराप्पा येथील संस्कृति यांत निकट संबंध असल्यानें आतापर्यंत त्यांचा उल्लेख 'इंडो-सुमेरियन' संस्कृति असा करण्यांत येत असे. परंतु अलीकडच्या शोधांत असें स्पष्ट दिसून आलें आहे कीं, संस्कृतिसादृश्याखेरीज उभय देशांत व्यापारी दळणवळणहि मोठ्या प्रमाणावर होतें. व म्हणून येथील संस्कृतीला यापुढें 'इंडो-सुमेरियन संस्कृति' असें न उल्लेखितां ' सिंधु संस्कृति ' असें म्हणण्यांत येईल.

## कालनिर्णय

मोहेन्जोदारो येथें जीं तीन शहरें उकरून काढण्यांत आलीं आहेत तीं ख्रि. श. पूर्वी ३५०० पासून २५०० वर्षांपूर्वीचीं असावीं. यांची बरोबर तारीख सांगतां येत नाहीं. परंतु पहिल्या शहराच्या बांधणींत दुसऱ्यापेक्षां व दुसऱ्याच्या बांधणींत तिसऱ्यापेक्षां पुष्कळच फरक आढळतो. परंतु पहिलें शहर ख्रि.श.पूर्वी २७०० वर्षांचें असेल तर दुसरें ख्रि. श. पू. ३००० वर्षांपूर्वीचें व तिसरें ख्रि. श. ३३०० वर्षांपूर्वीचें आहे. हराप्पा येथें जमिनीच्या वरच्या थरात सांपडलेलीं शहरें मोहेन्जोदारो येथील खालच्या थराच्या समकालीन असावीं असें मानण्यास आधार आहेत.

## शेती व अन्न

हराप्पा व मोहेन्जोदारो यासारखीं लोकवस्तीनें गजबजलेलीं शहरें शेतीखेरीज असणेंच संभवनीय नाहीं. यासंबंधानें विशेष माहिती उपलब्ध झालेली नसली तरी मोहेन्जोदारो येथें जे गहूं सांपडले आहेत ते आज पंजाबमध्यें पिकणाऱ्या गव्हासारखे आहेत. त्यावरून असें अनुमान निघतें कीं सिंधांत व पश्चिम-पंजाबभागांत त्या वेळीं पाऊसकाळ पुष्कळच होता. सिंधमध्यें सिंधु व सतलजपासून निर्माण झालेली वहिंदा अशा दोन मोठ्या नद्या होत्या. दूध-भाकरीखेरीज लोक मांसाहारहि करीत असावेत असें अनुमान करतां येण्याजोगे आधार सांपडले आहेत. त्यांत जलनिवासी प्राणी जास्त असावेत असें त्यांचीं अर्धवट भाजलेलीं जीं हाडें सांपडलीं त्यावरून वाटतें. घरगुती जनावरांत मोठ्या शिंगाच्या गायी-बैल, शेळया-मेंढरें, कोंबडीं-बदकें, कुत्रा घोडा, हत्ती यांचा समावेश होतो. गायींचे तर कळपचे कळप होते. जनावरांचे जे अवशेष सांपडले आहेत त्यावरून पाहतां व शिक्क्यावरून जीं चित्रें आहेत त्यावरून वाघ, हत्ती यांची समृद्धि असावी. सिंह मात्र नसावा.

## कपडे व पोषाक

पडीक घराचे जे ढीग आहेत त्यांत मागाच्या चात्या व कापूस सांपडला आहे. कापसाला बाबिलोनचे लोक व ग्रीक लोक सिंध व सिंधन असें म्हणत

असत. यावरून कापसाचें जन्मस्थान सिंध प्रांत असावा असा आतांपर्यंत नुसता तर्क होता. परंतु मोहेन्जोदारो येथें प्रत्यक्ष सांपडलेल्या पुराव्यानें तो सर्वस्वी खराच ठरला आहे. पुरुषवर्ग दोन वस्त्रें परिधान करी, १ नेसण्याचें एक व पांघरण्याचें एक पांघरावयाचें वस्त्र उजव्या हाताखालून घेत. पुरुषवर्ग दाढीमिशा राखीत असे. व सर्व केस कपाळावरून मागें घेऊन बांधीत. माळा, अंगठ्या, कर्णालंकार, बांगड्या, कमरपट्टे इत्यादि अलंकार वापरण्याची रूढी होती. श्रीमंत लोक सुवर्णाचे व चांदीचे अलंकार वापरीत. गरीब लोक शंखाचे वापरीत. दोहोंचेहि नमुने उपलब्ध झाले आहेत.

### धातू

सोन्या–रुप्याखेरीज सिंध लोकांना तांबें, जस्त, कथील यांची माहिती होती. तांब्याचा उपयोग हत्यारें, भांडीं, खंजीर, सुरे, कोयते, छिन्न्या, तारा, दागिने याकडे करण्यांत येई. हे सर्व प्रकार घडून करीत तथापि ओतकामाचेहि कित्येक नमुने सापडल आहेत. बलुचिस्थान, राजपुताना, अफगाणिस्थान येथें तांब मुबलक सांपडे. जस्त मात्र सुमेर किंवा खोरासानमधून येत असावें. जस्तांत तांब्याचें मिश्रण करून त्याचे वस्तरे, करवती, बांगड्या, गुंड्या इ० प्रकारहि करीत. पंचरसी धातूंचे पदार्थ तयार होत. हराप्पा व मोहेन्जोदारो येथें हत्यारांपैकीं बाणांचीं टोकें, भाल्याचीं फळें, गदा, कुऱ्हाडी, इत्यादि हत्यारें आढळतात. याखेरीज चिनी मातीच्या जातीचीं सुंदर भांडींहि आढळतात. वापरण्यासाठीं सर्वसामान्य मातीचीं भांडीं असत व तींहि नाना आकाराचीं व सुंदर असत. त्यावर पशुपक्ष्यांचीं सुंदर चित्रें काढलीं जात असून तांबडा व काळा रंगाहे त्याना देण्यांत येत असे. अशाच प्रकाराचीं भांडीं उत्तर-बलुचिस्थानांत व वझिरीस्थानांत सांपडलीं आहेत.

उपलब्ध झालेल्या शिक्क्यांवरून लेखनकलाहि तेथील लोकांना माहीत होती. लिहिण्यासाठीं उपयोजण्यात आलेल्या लेखण्या सांपडतात. सुमारें एक हजार शिक्के सांपडले आहेत. त्यांचा उपयोग व्यापारी मालावर शिक्के मारण्याकडे केला जाई. त्यांपैकीं कित्येकांवर पशूंचीं चित्रें कोरलेलीं आढळतात.

कलाकौशल्यांतहि हे लोक मागें नव्हते. वानर, कुत्रे, बैल, व आंखुड शिंगाचीं जनावरें यांचीं चित्रें प्रमाणशीर काढलेलीं आहेत. याखेरीज संगमरवरी, माती व पंचरस यांचे मनुष्यांचे पुतळेहि सांपडले आहेत. ते अर्वाचीन चित्रकलेच्या दृष्टीनें नमुनेदार नसले तरी तत्कालीन चित्रकलेची कल्पना देण्यास पुरेसे आहेत.



मृतांना जाळीत का पुरीत हें नक्की सांगतां येत नाहीं. तथापि मृताच्या शरीरांतील एखादा अवयव कापून तो पुरीत असें दिसतें. बाकीच्या शरीराचें काय करीत हें सागण्यासारखा पुरावा नाही. दहन करण्याची प्रथाहि रूढ होती असें स्मशानभूमीसारखी एक जागा सांपडली त्यावरून म्हणतां येतें.

या लोकांचा धर्म कोणता असावा याविषयींहि बरींच अनुमानें काढतां येण्याजोगीं आहेत. बाबिलोनियाप्रमाणें व मेसापोटेमियाप्रमाणें मातृदेवतेच्या पूजनाची प्रथा रूढ असावी असा तर्क आहे. कारण तशा प्रकारच्या मूर्ती वरील देशाप्रमाणेंच येथेंहि शिक्क्यावर आढळल्या आहेत. तथापि सिंधमधील संस्कृतींत हिंदी वैशिष्ट्य आहेच. एका मुद्रेवर नागासनावर मांडी घातलेला मनुष्य आहे, याखेरीज कांहीं विशिष्ट पद्धतीच्या अंगठ्या सांपडतात त्या धर्मप्रसंगीं वापरण्यांत येत असत. अद्यापि त्यांचा जास्त उलगडा झालेला होत नाहीं. परंतु त्यांचें धार्मिक स्वरूप मात्र स्पष्ट दिसतें. अशाच प्रकारचे जिन्नस हराप्पा व मोहन्जोदारो येथेंहि सांपडतात.

### संस्कृतीचा प्रसार

वर निर्दिष्ट केलेली सिंध संस्कृति बलुचिस्थान, वझिरीस्थान, सिध, कच्छ, काठेवाड यामार्गें दक्षिणेपर्यंत पसरली होती. तिनें हिंदुस्थान, राजपुताना व गंगेचा दुआब व्यापला होता कीं नाहीं हें अद्यापि अनिश्चित आहे. उत्तर-हिंदुस्थानांत जे तांब्यांचे पदार्थ सांपडतात त्यावरून सिंध संस्कृतीचे लोण उत्तर–हिंदुस्थानाला व पश्चिम-हिंदुस्थानालाहि पोचलें होते. आशिया व युरोप यांमध्यें ॲड्रिॲटिकपासून जपानापर्यंत जी कॅलकोलिथिक संस्कृति पसरली होती ती सिधुसंस्कृतीचा अंशभाग होती एवढी गोष्ट निर्विवाद आहे. या संस्कृतीचें केंद्रस्थानें नाईल, युफ्रेटिस, टैग्रिस, करून व सिंधु या नद्यांच्या खोऱ्यांत होतीं. आशिया खंडांत जें संस्कृतिचक्र फिरत होतें व त्याची जसजशी उत्क्रान्ति होत गेली तसतशी त्याबरोबरीनें सिंधु संस्कृतीची प्रगति होत होती. मेसापोटेयिया, सुमेर, बाबिलोन व सिंध यांचें एकमेकांत जलमार्गानें व खुश्कीनें दळणवळण होतें. या दोन संस्कृतींत जसें विलक्षण सादृश्य आढळतें, त्याप्रमाणें विसदृशताहि दिसते. हल्लीं उभय संस्कृतींत भाषाभेद असला तथापि या काळीं मात्र भाषा एक असावी. निदान दोनहि भाषा अत्यंत जवळच्या तरी असाव्यात असा पुरावा आढळतो. सुमेरिन व इजिप्शिन संस्कृतींचें जन्मस्थान मेसापोटेमियाच्या पूर्वेस कोठें तरी असावें असें एक

मतें बनत चाललें आहे. व त्यावरून त्याचें जन्मस्थान उत्तर-हिंदुस्थानहि असूं शकेल. परदेशांत वसाहतीसाठीं लोक जात व तेहि मोठ्या प्रमाणावर. अशा स्थितींत उत्तर-हिंदुस्थानांतील लोक सिसटानमार्गें ट्रान्सकॅस्पियाकडे जाणें अपरिहार्य होतें. परंतु कोणताच एक देश एखाद्या संस्कृतीचें जन्मस्थान मानणें गैर ठरणार असलें तरी उपलब्ध संस्कृतींत सिंधु संस्कृति मात्र प्राचीनतम ठरते.

# बहिष्कार हलवून पक्का झाला!

कमिशनच्या कार्यपद्धतीसंबंधींचा खुलासा व्हाइसरॉयांना भेटण्यापूर्वी सायमन हे करूं शकले नाहींत व सायमनला भेटण्यापूर्वी व्हाइसरॉयहि करूं शकले नाहीत. सायमन यांना बंदरावर वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींनीं घेरून खोदखोदून विचारल्यावर येवढेंच बाहेर निघालें कीं, कमिशनच्या कार्यासंबंधीं बरेच गैरसमज आहेत त्याबद्दल लवकरच खुलासा करण्यांत येईल. उलट व्हाइसरॉयांनींहि आपल्या भाषणांत "तुमचा अपमान करण्याचा ब्रि. सरकारचा अगर कमिशनाचाहि विचार नाहीं" अशा तऱ्हेच्या पोकळ आश्वासक युक्तिवादावर वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. अखेर दोघे भेटले तेव्हां कार्यपद्धतीसंबंधाचा काय तो खुलासा बाहेर आला! दोघांनीं एकमेकांस भेटल्याशिवाय निश्चित कांहीं ठरावलें नव्हतें. यावरून नोकरशाहीच्या अंतर्गत अभेद्य एकसूत्रीपणाची कल्पना येईल. नोकरशाहीच्या यंत्रांतील वरचें मोठें चक्र म्हणजे स्टेट-सेक्रेटरी; त्यापासून खालच्या लहानशा अधिकाऱ्यापर्यंतचीं सर्व चक्रें दात्यांत दाते अडकवून टाकल्या प्रमाणें आहेत. सायमनसाहेब स्टेट-सेक्रेटरीकडून काय ठरवून येतात त्याची वाट पाहात व्हाइसरॉय बसले. उलट व्हाइसरॉयांना भेटून त्यांचेकडून हिंदुस्थानांतील परिस्थितीची नीट माहिती झाल्यावरच या ठरलेल्या धोरणाचें कोणत्या पद्धतीनें व कसकसें आविष्करण करावयाचें याचा निर्णय होणार असल्यामुळें सायमनहि बंदरावर व मुंबईच्या स्टेशनावर आपले ओंठ घट्ट आवळून बसले. धोरण विलायतेंतच ठरलें होतें. त्याची मांडणावळ दिल्लीस कायम झाली, आणि सायमनचें खुलासापत्रक बाहेर पडलें.

## सर्वांचें एकच उत्तर!

सायमन व व्हाइसरॉय या दोघांची अशी अपेक्षा असावी कीं या खुलाशानें बहिष्कार पक्ष दुभंग होईल, किंवा निदान त्यांत बरीच मोठी फूट तरी पडेल. आणि एकदां अशी फूट पडल्यावर एका पक्षास बगलेंत मारून दुसऱ्यास कसें झोडपावयाचें याचें कसब नोकरशाहीला चांगलेंच अवगत आहे. पण ही अपेक्षाच मुळांत खोटी ठरली. असेंब्लींतील बहिष्कारवादी पक्षांनीं हा खुलासा सर्वस्वी असमाधानकारक ठरवून आपला बहिष्कारासंबंधाचा पूर्वीचा निश्चय अचल आहे असेंच जाहीर केलें. आणि कायदेमंडळाच्या बाहेर असलेल्या प्रागतिक पक्षाच्या पुढाऱ्यांनींहि तीच घोषणा केली. बहिष्कारवादी पुढारी ज्या तत्त्वाकरितां कमिशनशीं संबंध ठेवूं इच्छित नाहींत त्या तत्त्वावर त्यांची दृष्टि निश्चल आहे; आणि भाषेच्या लाघवानें अगर हातचलाखीच्या युक्तिवादानें नोकरशाही त्यांना चळवूं शकत नाहीं, हें तिच्या प्रत्ययास आलें. सरकारानें कांहीं केलें तरी त्यांची 'री' ओढणारे कांहीं असंतुष्ट व तृतीयपंथी गण व गट हिंदुस्थानांत विखुरलेले आहेत व त्यांनीं सायमन सप्तकाच्या स्वागतार्थ व अभिनंदनार्थ पाठविलेल्या संदेशांची नामावळी प्रसिद्ध करण्यांत आली आहे. असल्या लोकांच्या पाठिंब्यानें कमिशनला व त्याच्या निर्णयाला खरें महत्त्व येणें शक्य नाहीं हें जाणूनच बहिष्कारवाद्यांमध्यें फूट पाडण्याचे आणखीहि कांहीं किरकोळ प्रयत्न कमिशनच्या या पहिल्या फेरींत कदाचित होतील. पण सायमनच्या या पहिल्या खुलाशाला जें सर्वांकडून त्वारत व एकाच सुरांत उत्तर मिळालें त्यावरून हे इतर प्रयत्नहि सिद्धीस जाणें शक्य नाहीं हें उघड होतें.

## हात बांधलेलें स्वातंत्र्य

सायमनच्या खुलाशाचा आशय आज दुसरीकडे दिला आहे. त्यांत वरवर प्रामाणिकपणाचा आव भरपूर आणला आहे, पण सूक्ष्म दृष्टीनें छाननी केल्यास केवळ आभासानें हिंदी लोकांना चकविण्याचा उद्देश त्यांत आरंभापासून अखेरपर्यंत दिसून येतो. बर्कनहेड यांनीं कमिशन हें पार्लमेंटचेंच असलें पाहिजे व हिंदी राज्यघटनेसंबंधाचा निर्णय करण्याचा अधिकार पार्लमेंटचाच आहे हा मुद्दा जोरजोरानें सांगितला होता. त्याविरुद्ध हिंदुस्थानांत आक्षेप येत आहेत असें पाहून, त्यांना टाळण्यासाठीं सायमन म्हणतात कीं, कमिशन हें पार्लमेंटचें किंवा सरकारचें हस्तक नाहीं, तें बादशहांनीं हिंदी कायदेमंडळाच्या प्रतिनिधींना बरोबरीच्या दर्जानें भेटण्यासाठीं पाठविलें आहे! जणुं काय ब्रि. राज्यघटनेंत 'बादशहांनीं अमुक केलें' असें म्हणण्याचा अर्थ न कळण्याइतके हिंदी लोक दुधखुळे आहेत. कमिशन पार्लमेंटचें हस्तक नाहीं तर

मग कमिशनचा रिपोर्ट पार्लमेंटाकडे कशाला ! आणि हिंदी कायदेमंडळाच्या प्रतिनिधींना भेटण्यासाठीं जर बादशहांनीं हे सात शहाणे इकडे पाठविले तर त्यांना पाठविण्याच्या अगोदर किंवा निदान त्यांच्या बरोबर तरी या भेटीस येणाऱ्या लोकांबद्दल बादशहांनीं कायदेमंडळास एखादा संदेश धाडावयाचा होता. निदान सायमन यांनीं स्वतःचा खुलासा तरी कायदेमंडळाला उद्देशून लिहावयाचा होता. पण त्यांनीं व्हाइसरॉयांना पत्र लिहिलें व त्याच्या प्रती माहितीसाठीं व्हाइसरॉयांनीं कायदेमंडळाच्या सभासदांना वांटल्या ! शिवाय सर्व खुलासा लिहून झाल्यावर सायमन म्हणतात कीं "हा खुलासा पार्लमेंटच्या हेतूला अनुसरूनच आहे असा माझा विश्वास आहे." कमिशन हे जर पार्लमेंटचें हस्तक नाहीं तर मग त्याच्या हेतूला धरूनच सर्व केलें पाहिजे इतकी काळजी कशाला ? कमिशनच्या कार्यासंबंधीं कमिशनला पूर्ण स्वातंत्र्य दिलें आहे असें विलायतेत सांगण्यांत आलें व सायमन यांनींहि आपल्या खुलाशांत त्याचा उच्चार केला आहे. पण हें स्वातंत्र्य कोणत्या प्रकारचें आहे याचा सायमन यांच्या या सावधगिरीवरून चांगला बोध होतो. सायमन हे पार्लमेंटाच्या शद्बानेंच केवळ नव्हे तर पार्लमेंटाच्या अंतस्थ हेतूनेंहि बांधलेले आहेत. शब्दांतून एखादे वेळीं पळवाट काढतां येते. पण अंतस्थ हेतूच्या बंधनांतून मात्र अशी पळवाट काढतां येत नाहीं. हा हेतु कोणता हें सायमन यांनीं सांगितलें नसलें तरी पार्लमेंटाच्या प्रत्यक्ष कृतीवरून तो आतां उघड झालेला आहे. पार्लमेंटाच्या मूळ हेतूतच हिंदी लोकांचा कोणत्याहि प्रकारचा समान दर्जा मान्य करावयाचा नसून हिंदी लोकांना त्यांच्या हीनत्वाची जाणीव द्यावयाची आहे. या अंतस्थ हेतूनें आपल्याला बांधून घेतल्यामुळें त्याला विसदृश अशी कोणतीहि गोष्ट सायमन करूं शकत नाहींत. सायमनसाहेबाची स्वतंत्रता म्हणजे हात बांधलेली स्वतंत्रता होय!

## निर्णयाची राखीव जबाबदारी

कमिशनच्या रिपोर्टासंबंधानेंहि या खुलाशांत त्यांनीं अशीच हातचलाखी केली आहे. सायमन म्हणतात कीं "कमिशनच्या रिपोर्टांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या सर्व पक्षांच्या मतांचें व योजनांचें यथायोग्य दिग्दर्शन करण्यांत येईल. मात्र कमिशन या सर्वांचा विचार करून जे स्वतःचें मत देईल त्याबद्दल कमिशनच जबाबदार राहील." कोणत्याहि कमिशनच्या रिपोर्टांत पुढें आलेल्या सर्व मतांचें दिग्दर्शन करणें आवश्यकच असतें. यांत सायमनसाहेबांनीं नवीन तें काय सांगितलें ? साध्या न्यायकोर्टांतील खटल्यांत देखील निकालपत्रांत दोन्ही बाजूंचें म्हणणें काय तें न्यायाधीश थोडक्यांत मांडीत असतातच. पण हा कांहीं त्या निकालपत्राचा मुख्य भाग नसतो. मुख्य भाग म्हणजे अखेर न्यायाधिशाचें बनलेलें निर्णायक मत. त्याचप्रमाणें कमिशनच्या रिपोर्टाचा मुख्य भाग म्हणजे कमिशनचा स्वतःचा अभिप्राय; याबद्दल खुद्द कमिशनच जबाबदार राहील असें म्हणण्यांत सायमन यांना असें भासवावयाचें आहे कीं, कायदेमंडळाच्या कमिट्यांना या कमिशनच्या रिपोर्टाचें बंधन नाहीं. कमिशनाविरुद्ध पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देण्यास कायदेमंडळाचे प्रतिनिधी मोकळे राहतील. पण याच विधानांतून दुसराहि असा अर्थ निष्पन्न होतो कीं कमिशन आपला रिपोर्ट स्वतंत्रपणें लिहील. त्यांत कायदेमंडळाच्या कमिट्यांना हात घालण्याचें कारण नाहीं. केळकर-जयकर यांच्या ठरावांत प्रत्येक निर्णय ठरविण्याच्या वेळीं त्या निर्णयाला वळण देण्याचा अधिकार कायदेमंडळाच्या कमिटीला असावा असा एक भाग होता. पण पार्लमेंटच्या हेतूप्रमाणें सर्वस्वी कमिशन चालणार असें म्हटलें म्हणजे निर्णय करण्याच्या बाबतींत तें कायदेमंडळाच्या कमिटीला कसा हात घालूं देईल ? सारांश, निर्णयाची जबाबदारी कायदेमंडळाच्या कमिटयांकडे यत्किंचितहि ठेवावयाची नाहीं, याचा अर्थ या कमिट्यांना ज्यूरी इतकाहि हक्क नाहीं. मग न्यायाधीशाच्या बरोबरीचा हक्क तर मुळींच नाहीं हें उघड होय. आपल्या खुलाशांत सायमन यांनीं या कार्यपद्धतींत वाटल्यास आणखी कांहीं दुरुस्त्या सुचविल्यास त्यांचा विचार करतां येईल असें म्हटलें आहे. पण कायदेमंडळाच्या कमिटयांना समान हक्क देण्याचें त्यांच्या हातांतच नाहीं हें त्यांच्या खुलाशाच्या पहिल्याच भागावरून उघड होत आहे. यामुळें यापुढें होणाऱ्या आणखी खुलाशांची अगर दुरुस्त्यांची कोणी हिंदी पुढारी वाट पाहात बसून बहिष्काराची चळवळ थांबवितील अशी सायमनसाहेबांची अपेक्षा असल्यास ती सर्वस्वी चुकीची ठरेल यांत शंका नाहीं.

## कमिशनची कांटेकोर मेहेरबानी !

कायदेमंडळाच्या कमिटीचा पार्लमेंटशीं कांहीं संबंध नाहीं. ती कमिटी रिपोर्ट करणार कायदेमंडळाकडे. तो वाटल्यास कायदेमंडळानें व्हाइसरॉयामार्फत पार्लमेंटाकडे पाठवावा. अगर कमिटीनें तशी इच्छा प्रदर्शित केल्यास कमिशनच्या रिपोर्टाचे बाजूला या कमिटीचा रिपोर्ट टांचून बादशहांकडे पाठविण्याची व पोस्टाचा खर्च वांचविण्याची मेहरबानी कमिशन करील ! आणि दोनहि अगदीं एकाच दिवशीं प्रसिद्ध करण्यांत येतील ! इतका समान दर्जा मिळाल्यावर मग हिंदी लोकांना

काय पाहिजे ? कमिटीच्या घटनेसंबंधानें विचार केला तरी त्यांत असाच आभास दिसून येतो. त्या कमिटीचें स्वरूप खरें प्रातिनिधिक नसतांहि तिचें वर्णन मात्र अगदीं कमिशनाशीं समान असें भासविण्यासारखीं शब्दयोजना केली आहे. सायमन म्हणतात, "जसें पार्लमेंटानें आपल्यांतील सर्व पक्षांचें कमिशन नेमलें तशी तुम्हींहि असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेटमधील सर्व सभासद मिळून सातजणांची कमिटी नेमा." असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांमधील निवडलेले, नेमलेले व सरकारी असे सर्व सभासद एकत्र जमून त्यांनीं कमिटी नेमली तर ती कोणत्या प्रकारची होईल हें सांगावयास नकोच. शिवाय पार्लमेंटला सर्व पक्षांचा अंतर्भाव सात या संख्येंत करतां आला तसा हिंदी कायदेमंडळांनीहि त्याच संख्येंत सर्व पक्षांचा अंतर्भाव केला पाहिजे. पुरावा घेतांना कमिशनच्या संख्येपेक्षां थोडे अधिक असे कायदेमंडळाचे लोक कमिशनशेजारी बसले तर कमिटीचें वजन संख्येच्या दृष्टीनें कदाचित् अधिक भरेल. म्हणून कमिटीच्या सभासदांची संख्या सातांहून जास्त असतां उपयोगी नाहीं असें ठरवून कमिटीचा समान दर्जा अगदीं काटेकोर रीतीनें सायमनसाहेबांनीं राखला आहे! प्रांतिक कायदेमंडळांच्या कमिट्याहि मध्यवर्ती कायदेमंडळाप्रमाणेंच होणार. कमिशनसाठीं मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांनीं स्वतंत्र हस्तक नेमून सरकारी पुरावा तयार करून ठेवलाच आहे. यांपैकीं मध्यवर्ती सरकारच्या पुराव्याची छाननी कमिशन बरोबर मध्यवर्ती कायदेमंडळाच्या कमिटीनें करावी प्रांतिक पुराव्याचा छाननीचे वेळीं प्रांतिक कायदेमंडळाच्या कमिटीनें त्यांत भाग घ्यावा. त्याचबरोबर वरिष्ठ कायदेमंडळाच्या कमिटींतील कांहीं मंडळींनीं वाटल्यास प्रांतिक पुराव्याची कल्पना येण्यासाठीं तेथें बसावें; त्याला सायमन यांची हरकत नाहीं.

## समान दर्जाची संभावित थट्टा

सरकारी पुराव्याखेरीज जो इतर साक्षीपुरावा कमिशनपुढें येईल त्यावेळीं देखील मध्यवर्ती कायदेमंडळाच्या कमिटीनें कमिशन बरोबर बसावें. पण त्यांतहि सायमन यांनीं एक हातचा राखून ठेवलाच आहे. कांहीं साक्षीदार असे भेटतील कीं ते कमिशनपुढें उघड साक्ष देणार नाहींत. आमची साक्ष दारें लावून घ्या म्हणून सांगतील त्या वेळीं काय करावयाचें ? कमिटीला समान दर्जा द्यावयाचा आहे खरा. पण तो इतक्या बेतानें कीं कमिशनच्या खोलीचीं दारें लावून बसण्याचे वेळीं कमिटीनें बाहेर जावें ! वस्तुत: सातजणांपुढें जें गुप्त म्हणून मांडलें जातें तें चौदा जणांपुढेंहि गुप्त म्हणून कां येऊं नये ? पण हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यासंबंधीं कांहीं अशा गोष्टी आहेत कीं त्या हिंदी प्रतिनिधींपुढें मांडणें धोक्याचें आहे. आणि कांहीं असे लोकहि आहेत कीं ज्यांना हिंदी प्रतिनिधींपुढें साक्ष देणें कमीपणाचें वाटत असल्यामुळें ते त्यासाठीं "मला कांहीं गुप्त गोष्ट सांगावयाची आहे" ही सबब हटकून पुढें करतील. अशा गुप्त साक्षी घेण्याचें कारण फारसें पडणार नाहीं असें आज सायमन म्हणतात.पण प्रत्यक्ष काम सुरू झालें म्हणजे अशा गुप्त साक्षी घेण्याचा प्रसंग पदोपदीं येईल. आणि 'समान दर्जा'च्या या कमिटीला या गुप्त साक्षींमुळें वेळोवेळीं आपल्या कमीपणाची जाणीव होत राहील ! पण गुप्त साक्ष झाल्यावर त्यांत काय झालें हें प्रामाणिकपणें कमिटीला सायमन सांगणार आहेत. मात्र ज्या कारणांसाठीं ही साक्ष गुप्तपणें झाली तीं कारणें नीट ध्यानांत बाळगून काय सांगावयाचें तें सांगतील. कमिटीच्या 'समान दर्जा'ची ही संभावित थट्टाच नव्हे काय ? शिवाय खुद्द कमिशनवर हिंदी सभासद एकहि न नेमण्यांतला पार्लमेंटचा हेतूहि या गुप्त साक्षींच्या व्यवस्थेवरून दिसून येत आहे. खुद्द कमिशनवर हिंदी सभासद नेमले असते तर त्यांना एखाद्या साक्षीच्या वेळीं असें बाहेर घालविणें शक्यच नव्हतें. हिंदी सभासद न नेमण्यांत त्याच्यापुढें साक्ष देण्यास कमीपणा वाटणाऱ्यांची सोय सांभाळणें हाहि पार्लमेंटचा एक हेतु असला पाहिजे. त्याच हेतूनें सायमननीहि बांधलेले असल्यामुळें गुप्त साक्षीच्या वेळीं कमिटीनें बसूं नये असें त्यांनीं म्हणणें स्वाभाविकच होय. तेव्हां कसा तरी शाब्दिक समान दर्जा साधावा म्हणून सायमन म्हणतात, "आम्ही जशा स्वतंत्रपणें साक्षी घेऊं तशा वाटल्यास कमिटीनेंहि स्वतंत्रपणें साक्षी घ्याव्या, त्याला आमची हरकत नाहीं." ते कशाला हरकत घेतील ? त्यांचा रिपोर्ट निराळा. कमिटीचा निराळा. त्यांच्या रिपोर्टाबद्दल सर्वस्वी तेच जबाबदार. कमिटीच्या रिपोर्टाबद्दलहि सर्वस्वी कमिटीच जबाबदार; मग तिनें हव्या तितक्या स्वतंत्र साक्षी घेतल्या तरी त्यांत सायमन यांचें काय बिघडलें ?

## गाड्याबरोबर नळ्याची यात्रा

कमिट्यांना हा असला 'समान दर्जा' मिळणार तोहि त्यांच्या जन्मापासून.पण खरें पाहिलें तर कमिशनच्या रिपोर्टाचें स्वरूप या कमिट्यांच्या जन्माचें आधींच ठरून जाईल. कारण कमिशनची ही पहिली प्रास्ताविक भेट आहे. या प्रास्ताविक भेटींत कमिशन दोन महिने हिंदुस्थानभर हिंडून येथील नोकरशाहीशीं खलबतें करून विलायतेस जाणार व तेथेंहि हुजूर

पक्षाच्या मंत्रिमंडळाशा खलबत करून येत्या आक्टोबरमध्यें हिंदुस्थानास यावयास निघणार. त्या सुमारास या कमिट्या नेमावयाच्या आहेत. सर्व सरकारी पुरावा आजच तयार आहे. त्याचें स्वरूप सरकारी अधिकाऱ्यांकडून कमिशनला कळणारच.आणि विलायतेंत गेल्यावर येथील नोकरशाहीचें मनोगत व तेथील हुजूर पक्षाचें मनोगत यांच्या धोरणानें पुढें काय करावयाचें याची आगाऊच रूपरेषा तयार होणार. मागून जन्माला येणाऱ्या कमिट्यांच्या बारशाला जेवलेलें हें कमिशन या कमिट्यांना कसें खेळवील हें सहज समजण्यासारखें आहे. असेंब्लीच्या कमिटीला समान दर्जा मागण्यांत कमिटी व कमिशन मिळून होणाऱ्या चौकशीला राऊंड टेबल कॉन्फरन्स सारखें स्वरूप यावें व त्यायोगें अंशतः तरी स्वयंनिर्णय साध्य व्हावा असा हेतु होता. पण पार्लमेंटच्या मूळ हेतूशीं तो सर्वस्वी विसदृश असल्यामुळें 'समान दर्जा' च्या नावाखालीं 'गाड्याबरोबर नळ्याची यात्रा' अशासारखी, दुय्यम दर्जाची व सर्वस्वी निरुपयोगी अशी राबणूक कमिटीकडून करविण्याची योजना सायमनसाहेबांनीं मांडली आहे. सायमन हे विलायततील तीक्ष्ण बुद्धीचे नामांकित वकील असतील.पण हिंदी पुढाऱ्यांना असल्या लपंडावानें आपण सहज चकवूं अशी त्यांची अपेक्षा असल्यास ती वेडेपणाची होय हें त्यांच्या योजनेला सर्व पक्षीय पुढाऱ्यांनां जें तत्काळ उत्तर दिलें त्यायोगें सिद्ध झालें आहे. समान दर्जा मूळ पार्लमेंटच्या हेतूमध्येंच नाहीं, मग त्या हेतूनेंच सर्वस्वी चालणारे सायमनसाहेब तो दर्जा कायदेमंळाच्या कमिटीला कसा देऊं शकणार? जें आडांत नाहीं तें पोहऱ्यांतहि येऊं शकत नाहीं. सारांश व्हाइसरॉयांच्या भाषणानंतर श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं जें मत प्रसिद्ध केलें तें सायमन साहेबांच्या खुलाशानें,खुंटा हलवून बळकट केल्याप्रमाणें पक्कें झालें आहे. यामुळें कमिशनशीं खासगी भेटींत देखील संबंध न ठेवतां बहिष्कार सर्वतोपरी कडक व परिपूर्ण करणें व तो केवळ कमिशनपुरताच न ठेवता पुढें होणाऱ्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीवरहि तसाच बहिष्कार टाकणें हेंच हिंदी लोकांचें कर्तव्य ठरतें.

# सायमनचें खुलासापत्रक

सायमनसाहेबांनीं व्हाइसरॉयांना कमिशनच्या कार्यपद्धतीसंबंधानें लिहिलेलें जें पत्र प्रसिद्ध करण्यांत आलें आहे त्याचा सारांश पुढीलप्रमाणें आहेः-"कमिशनला आपल्या कार्यपद्धतीसंबंधानें पूर्ण स्वातंत्र्य ठेवलें आहे असें तुम्ही आपल्या भाषणांत सांगितलें व मीहि हिंदुस्थानांत उतरल्याबरोबर कमिनशचा अध्यक्ष या नात्यानें कमिशनची कार्यपद्धति लवकरच जाहीर करीन असें सांगितलें. या संबंधीं हिंदुस्थानांत बराच गैरसमज झालेला दिसतो. कमिशनची रीतसर बैठक हल्लींच्या प्राथमिक भेटीच्या वेळीं होणार नसल्यामुळें आपल्याला पत्र लिहूनच मी हा खुलासा करीत आहे.

कमिशनपुढें मांडण्यासाठी मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांनीं पुरावा तयार केला आहे. हा पुरावा कमिशन व हिंदी कायदेमंडळांनीं निवडलेलीं तत्सदृश मंडळें यांच्या संमिश्र सभांपुढें मांडला जावा व या सभांचेंहि अध्यक्षस्थान माझेकडे असावें. हिंदी कायदेमंडळांमधील दोस्तांची सहकारिता लाभावी इतकेंच नव्हे तर त्यांनी सर्व पुराव्याची हिंदुस्थानाच्या हिताच्या दृष्टीनें छाननी करतां यावी हें न्याय्य व योग्य ठरेल यासाठीं ही संमिश्र योजना सुचविली आहे. यासाठीं दोनहि वरिष्ठ कायदेमंडळांना लवकरच एक कमिटी नेमण्यास सांगावें. सोयीच्या दृष्टीनें ही कमिटी सातजणांचीच असलेली बरी. अशाच तऱ्हेच्या कमिट्या प्रांतिक कायदेमंडळांनींहि निवडाव्या.

मध्यवर्ती राज्यकारभारासंबंधाचा विचार चालू असतां कमिशनबरोबर मध्यवर्ती कायदेमंडळाच्या कमिटीनें बसावें. प्रांतिक कारभाराचा विचार चालू असतां प्रांतिक कायदेमंडळांच्या कमिटीनें बसावें. या वेळीं मध्यवर्ती कमिटीला किंवा तिच्या कांहीं सभासदांना प्रांतिक कमिटीबरोबर बसण्याचीहि परवानगी देतां येईल. संमिश्र सभेच्या हिंदी विभागाची रचना कशी करावयाची याचा तपशील निरनिराळ्या हिंदी पक्षांनीं ठरवावा. आमचे कमिशन जसें ब्रिटनमधील सर्व पक्षांचें आहे तसाच या कमिट्यामधूनहि सर्व पक्षांचा अंतर्भाव व्हावा.

सरकारी पुराव्याखेरीज इतर साक्षीपुरावा घेण्याचे वेळीं या संमिश्र सभेच्या दोन विभागांना निरानिराळ्या साक्षी घेण्याचे प्रसंग येतील. साधारणतः सरकारी साक्षीपुराव्याप्रमाणेंच इतर व्यक्ती किंवा संस्था यांचा साक्षीपुरावा संमिश्र सभेपुढें घेण्यास हरकत येण्याचें कांहीं कारण नाहीं. पण स्वतंत्रपणें साक्षी घेण्याचा प्रसंग उत्पन्न झाल्यास ती साक्ष स्वतंत्र कां घेतली याचीं कारणें लक्षांत ठेवून, त्या साक्षीची हकीकत कमिशनमार्फत कमिटीला कळविण्यांत येईल. हिंदी कमिट्यांनींहि वाटल्यास अशा निराळ्या साक्षी घ्याव्या.

कमिशन हें हिंदुस्थानसरकारचें अगर ब्रि.सरकारचेंहि हस्तक नाहीं, तर हिंदी कायदेमंडळांतील लोकांकडे बरोबरीच्या नात्यानें जाण्यासाठीं पार्लमेंटमधील सभासदांचें व सर्वतोपरि स्वतंत्र असें बादशहांनीं नेमलेलें मंडळ आहे. हिंदी राज्यघटनेसंबंधींचा निर्णय या कमिशनकडून होणार नाहीं. तो निर्णय होण्यापूर्वी इतर प्रतिनिधींबरोबर कायदेमंडळाच्या प्रतिनिधींनाहि जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें आपलें म्हणणें मांडण्याची संधि देण्यांत येईल. सध्याच्या कमिशनला केवळ रिपोर्ट व सूचना करावयाची आहे व त्या रिपोर्टांत हिंदुस्थानांतील सर्व मतांचें, आकांक्षांचे व योजनांचें दिग्दर्शन करण्यांत येईल. त्यावरून कमिशनचें जें मत होईल त्याबद्दल कमिशनच जबाबदार राहील. कायदेमंडळाच्या कमिटीनेहि कायदेमंडळाकडे रिपोर्ट करावा व घटनेंतील नियमाप्रमाणें तो असेंब्लीमार्फत पार्लमेंटकडेहि पाठवितां येईल. पण कमिटीची तशी इच्छा असल्यास आम्ही आपल्या रिपोर्टाला कमिटीचा रिपोर्टहि जोडूं व दोनही एकाच वेळीं बादशहांपुढें जातील व एकाच वेळीं प्रसिद्ध होतील.

या योजनेमुळें समान दर्जा मिळून खुल्या दिलाची चर्चा होऊं शकेल. कमिशनची सध्याची भेट प्राथमिक आहे व संमिश्र सभेच्या कामाला येत्या आक्टोबरमध्येंच प्रारंभ होईल. पण आम्ही कार्यपद्धति ठरवायाच्या बाबतींत अधिक चर्चा करावयास तयार आहोंत व या पत्रकांत ज्यांचा अंतर्भाव झाला नाहीं अशाहि गोष्टींचा विचार करतां येईल. यासाठीं ही गोष्ट आम्ही जाहीर केली आहे. ही योजना सुचविणांना आम्ही ब्रि. पार्लमेंटच्या हेतूप्रमाणेच वागत आहोंत असा आमचा विश्वास आहे."

### लोकपक्षाचें उत्तर

सायमनच्या या पत्रकावर असेंब्लींतील निरनिराळ्या पक्षांच्या प्रतिनिधींनीं विचार करून पुढील-प्रमाणें उत्तर दिलें आहे—

"सायमन यांनीं प्रसिद्ध केलेल्या पत्रकांत दर्शविलेल्या कमिशनच्या कार्यपद्धतीबद्दल आम्ही अत्यंत काळजीपूर्वक विचार केला.पण कमिशनच्या आजच्या घटनेच्या विरुद्ध व त्याच्या कार्ययोजनेविरुद्ध आमच्या ज्या हरकती आहेत त्या कांहीं तत्त्वावर आधारलेल्या आहेत. त्या तत्त्वांच्या दृष्टीनें पाहतां सायमनच्या खुलाशानें कांहींच बदल झालेला नाहीं. यामुळे या परिस्थितींत या कमिशनशीं कोणत्याहि वेळीं व कोणत्याहि स्वरूपांत आम्हाला संबंध ठेवावयाचा नाहीं हा आमचा पूर्वीचा निश्चय कायम आहे." या उत्तराखालीं डॉ. अन्सारी, श्रीनिवास अय्यंगार, मौ. अबुल कलाम अझाद,मौ. महंमदअली, लाला लजपतराय, पंडित मदन मोहन मालवीय, श्री. जयकर, श्री. केळकर, मि. जिना, सर पुरुषोत्तमदास, मौ. महंमद याकूब व राजा गझनफरअली यांच्या सह्या आहेत.

# राघोबाचा वकील हणमंतराव

(ले.—**गो. स. सरदेसाई**, रियासतकार, पावेल बिल्डिंग, **मुंबई ४.**)

राघोबादादानें इंग्रजांचा आश्रय करून पेशवाई मिळविण्याचा उद्योग केला, तो निष्फळ होऊन तळेगांवावर त्यास महादजीचे स्वाधीन व्हावें लागलें. युद्धाचे डावपेंच आपण सांगितलेले इंग्रज सेनापतीनें स्वीकारिले नाहींत, म्हणून असा प्रसंग आपल्यावर उद्भवला, असें दादास वाटून इतउत्तर हिंदुस्थानांतील इंग्रजांशीं संबंध न ठेवितां, परभारें इंग्लंडच्या राजाकडे वशिला लावून तिकडूनच स्वतंत्र फौज मदतीस आणून मग पुण्यावर स्वारी करावी असा बेत त्यानें ठरविला. आणि त्या कामगिरीवर आपले दोन वकील एक ब्राह्मण हणमंतराव व दुसरा भागियार पारशी असे ता. ११-९-१७८१ रोजीं इंग्लंडास रवाना केले. या गोष्टीचा उल्लेख सर एडमंड बर्क यांच्या पत्रव्यवहारांत आहे. इंग्लंडांत बर्कनें या वकिलांची बर्दास्त उत्तम प्रकारें ठेवून दादास पत्र लिहिलें कीं इंग्लंडाच्या राजाकडून तुम्हास स्वतंत्र फौजेची मदत मिळणें शक्य नाहीं. तेव्हां ते वकील सन १७८२ च्या पावसाळ्यात इंग्लंड सोडून हिंदुस्थानास परत आले.

येथून इंग्लंडास जाणारा पहिला ब्राह्मण हा हणमंतराव असून सामाजिक दृष्ट्या या वकिलातीचें महत्त्व मोठें. परत आल्यावर हणमंतरावाची व्यवस्था कशी झाली, तो कोण, मूळ वास्तव्य कोठें, हल्लीं त्याचा वंश कोठें नांदत आहे, वगैरे बाबी कळण्यासंबंधीं आपली सर्वांची मोठी जिज्ञासा असूनहि बर्कच्या इंग्रजी पत्रापलीकडे ह्या प्रकरणासंबंधानें मराठी कागदांत मला कोठेंहि यत्किंचित् उल्लेख आढळला नाहीं. तपास करीत असतां गुजराथेतून मला असें कळलें कीं, महाराष्ट्रांत हण-

मंतरावाचा छळ झाल्यामुळें तो परागंदा होऊन भडोचेस जाऊन राहिला, आणि तेथें भार्गव नामक गुर्जर ब्राह्मणाशीं शरीरसंबंध होऊन हणमंतरावाचें कुटुंब अद्यापि नांदत आहे. या माहितीची शहानिशा होऊन खरा प्रकार सिद्ध व्हावा या हेतूनें ही पृच्छा केसरीकडे प्रसिद्धीसाठीं पाठवीत आहे. आशा ठेवितो कीं कोणी वाचक या गोष्टीचा छडा लावून त्यावर जास्त प्रकाश पाडितील.

हणमंतरावासंबंधानें भडोच येथें पुढील आख्यायिका उपलब्ध झाली. त्या शहरीं 'भार्गव' ब्राह्मणांची मोठी वस्ती असून हल्लीं एक गृहस्थ त्यांची जंत्री व पूर्वहकीकत तयार करीत आहेत. त्या तपासांत त्यांस असें कळलें कीं, हणमंतराव हा मूळ कोंकणस्थ ब्राह्मण, आडनाव दीक्षित, राजापूरचा राहणारा. हा आपाजी दीक्षित या नांवानें प्रसिद्ध होता. त्याचा मेहुणा त्रिकमजी गोकुळजी आश्लोटे म्हणून राजपुरास एक धनसंपन्न सावकार होता. राजापुरास या दोघांचें वास्तव्य अवघड झाल्यामुळें ते दोघेहि भडोचेस येऊन राहिले. त्यांचा शरीरसंबंध भडोचेस आल्यावर झाला असावा. आपाजी दीक्षिताचा मुलगा तातोबा यानें राजापूरच्या धूत पापेश्वर रस्त्यावर वडिलार्जित घर होतें तें शके १७२१ त विकलें.

## भार्गव ब्राह्मण

मरहूम जी. एच्. देसाई नांवाच्या गुर्जर गृहस्थानें भडोचची हकीकत छापली आहे. त्यांत खालील मजकूर आहे. दक्षिणेतून भडोचेस आलेलीं भार्गव ब्राह्मणांची शेवटचीं कुटुंबें दीक्षित व आश्लोटें हीं होत. त्यांचें मूळ ठिकाण राजापूर. आपाजी नांवाचा त्यांत एक प्रमुख गृहस्थ होता. त्यांजवर नाना फडणिसाची इतराजी होऊन संकट आलें. तेव्हां त्या कुटुंबानीं संवत् १८३० च्या सुमारास राजापूर सोडून भडोचेस प्रयाण केलें. त्यातला शेवटचा गृहस्थ घेलाभाई नरभेराम दीक्षित नांवाचा जो नुकताच स. १९०५ सालीं ८७ वर्षांच्या उमरीत मरण पावला, त्यानें मला समक्ष असें सांगितलें कीं, हणमतराव ऊर्फ आपाजी हा पेशव्यांचे पदरीं सरदार होता. त्याचा मुलगा तातोबा. तातोबाचा मुलगा मला (घेलाभाईला) भेटत असे; तो मला नेहमीं सांगे कीं, माझा आजा विलायतेस गेला होता. मला ही गोष्ट प्रथम खरी वाटली नाहीं. परंतु 'पारशीप्रकाश' भाग १ हें पुस्तक मी वाचलें, त्याच्या पृष्ठ ६० वर भडोचची हकीकत आहे. तींत हणमंतराव व मणियार पारशी या दोघांस राघोबादादानें विलायतेस पाठविलें, असा मजकूर मी वाचला तेव्हां माझी खात्री झाली कीं, हणमंतरावाचा नातू सांगतो ती गोष्ट सत्य आहे.

वरील दंतकथांचा तात्पर्यार्थ असा निघतो कीं, हणमंतराव ऊर्फ आपाजी दीक्षित आणि त्रिकमजी गोकुळजी आश्लोटे हे राजापुरचे राहणारे, स्नेही होते. त्रिकमजी सावकारी करी व हणमंतराव पेशव्यांचा नोकर होता. त्यांनीं रघुनाथरावांचा पक्ष स्वीकारिल्यामुळें नाना फडणिसाकडून उपद्रव पावून स. १७७४ च्या सुमारास देशांतर केलें आणि ते भडोचेस येऊन राहिले. त्या ठिकाणीं पुढें त्यांचा शरीरसंबंध होऊन, हल्लीं ते भार्गव नामक गुर्जर ब्राह्मणांत अंतर्भूत झाले आहेत. राजापूर रत्नागिरी वगैरे ठिकाणीं गुर्जर लोक व्यापाराच उद्देशानें पुष्कळ वर्षें राहत आले आहेत.

राजापूरचे कोणी जुने रहिवासी या प्रकरणाचा छडा लावून देतील तर मोठा उपयोग होईल.

याच संबंधांत आणखी एक हकीकत अशी कळते कीं वडगांवच्या तहांत स. १७७९ त भडोच शहर इंग्रजानीं महादजीस दिलें, त्याचा ताबा घेण्याकरितां त्यानें आपला एक कारभारी कोणी भास्करराव नांवाचा तेथें पाठविला. त्यानें स. १७८३ त भडोचचा ताबा घेऊन तेथें वास्तव्य केलें, आणि आपल्या नांवाचें एक मंदिर बांधलें तें भृगुभास्करेश्वर नांवानें अद्यापि प्रसिद्ध आहे. या भास्कररावांचाहि तपास लावणें जरूर आहे. हा भास्करराव सुद्धां मूळचा राजापुरचा हणमंतरावाचा संबंधी होता असें कळतें.

भडोचच्या भार्गव ब्राह्मणांचा दक्षिणी ब्राह्मणांशीं पूर्वापार परिचय असलेला दिसतो. प्रभुराम भट नांवाचा सुरतेचा एक भार्गव ब्राह्मण दुसरे बाजीरावाजवळ ब्रह्मावर्त येथें गवई म्हणून राहिला होता. यावरून दिसतें कीं, रघुनाथरावदादा आठ-नऊ वर्षें गुजराथेंत राहिल्यामुळें तेथें गुर्जर ब्राह्मणांशीं त्याचा व त्याच्या परिवाराचा परिचय वाढून शरीरसंबंधीहि घडून आले. जरूर भासली म्हणजे अशक्य वाटणाऱ्या गोष्टी जुळून येतात. गुर्जर महाराष्ट्रीय किंवा अन्यप्रांतीय ब्राह्मणांत हल्लीं शरीरसंबंध रूढ नाहींत, कारण अलीकडील शांततेच्या युगांत आमचें राष्ट्रीय जीवन आकुंचन पावलें आहे. परंतु पूर्वीच्या सजीव युगांत परप्रांतीं जाऊन व्यवहार करण्याची किंबहुना विलायतेपर्यंत मजल मारण्याची लोकांस पाळी येई, त्यामुळें सामाजिक निर्बंध सैल राहून जरूरीप्रमाणें बदलत जात. भोसल्यांनीं पूर्वकिनाऱ्यावर कटक येथें कांहीं दाक्षिणी कुटुंबें नेलीं, तीं पुढें बंगाल्यांत जाऊन तद्देशीय बनलीं असल्याचें कळतें. हे प्रकार नांवनिशीवार बाहेर येतील तर आजकाल मोठा उपयोग आहे. या सर्व गोष्टींचा तपास करून मला कळवावें अशी वाचकांस माझी कळकळीची विनंति आहे.

# गामा आणि झिस्को

जगांत अजिंक्यपत्र मिळवून हिंदुस्थानास येऊन हिंदी लोकांकडूनहि अजिंक्यपत्र मिळविण्याच्या ईर्षेनें युरोपांतील सुप्रसिद्ध पोलिश मल्ल झिस्को हा येथें आला. त्याची कुस्ती पतियाळाचा प्रसिद्ध मल्ल गामा याशीं ठरली होती. आपण गामा याला सहज लोळवूं व त्यानंतर इतरहि हिंदी वीरांस आव्हान देऊन आपण विजयाचा झेंडा मिरवीत परत जाऊं अशी दर्पोक्ति झिस्कोनें हिंदी किनाऱ्यावर पाऊल टाकतांच काढली होती. परंतु हिंदुस्थान पारतंत्र्यांत असला तरीहि त्याच्या गुणविकसनाला पूर्ण वाव मिळाल्यास हिंदुस्थान जगांत श्रेष्ठ पद सहज प्राप्त करूं शकेल ही गोष्ट गामानें झिस्कोला धूळ चारून सत्य करून दाखविली आहे.

गामाचा पूर्वेतिहास वाचकांस मनोरंजक वाटेल असा असल्यानें तो थोडक्यात पुढें दिला आहे.

गामाचें वय हल्लीं ४४ वर्षांच असून त्याची उंची ५ फूट ७ इंच असून वजन २४० पौंड आहे. तो मद्याला स्पर्शहि करीत नसल्यानें नेहमीं उत्साहपूर्ण असा दिसतो. गामाचे वडील व आजे हे दोघेहि प्रसिद्ध मल्ल होते. व त्यांनीं मिळविलेलीं अनेक विजयचिन्हें त्यांच्या वंशजांनीं अद्याप जतन करून ठेविलीं असल्यानें त्यांच्या वंशजांस आपल्या पूर्वजांच्या कीर्तीचें नित्य व पदोपदीं स्मरण होत असतें व त्यामुळें ते त्यांच्या पावलावर पावलें टाकीत जात असतात. गामाचे वडील तो अल्पवयी असतांना वारले व त्याच्या आईवर त्याचें संगोपन करण्याची जबाबदारी पडली. बालवयापासूनच मल्लविद्येकडे गामाचा ओढा दिसूं लागला व सुदैवानें लवकरच त्यानें एक नामांकित मल्ल म्हणून लौकिक संपादन केला. अल्पकाळांतच हिंदुस्थानांत त्याला कोणी जोडीदार नाहींसा झाला. तेव्हां परदेश पादाक्रान्त करण्यासाठीं तो १९१० मध्ये विलायतेस गेला. त्या वेळीं तेथें व्हाईट सिटी प्रदर्शन भरलें असून जगांतील अनेक नामांकित मल्ल जमा झाले होते. तेथें विजयी होणाऱ्या वीरास जगांत मल्लयुद्धांतील अग्रपूजेचा मान मिळणार होता. डॉ. रोलर, जॉन लॅम्ब, हॅकेन स्मिड इत्यादि वीर तेथें उपस्थित होते. त्यांना गामानें आव्हान केलें असतां अगोदर छोट्या मल्लाबरोबर लढ असा त्यांनीं त्याचा उपहास केला. परंतु गामानें लिव्हरपूल, मँचेस्टर, ग्लास्गो इत्यादि ठिकाणीं प्रत्येक सामनेवाल्याला चीत केलें तेव्हां वरील गृहस्थांनीं त्याचें आव्हान स्वीकारलें. त्यानें डॉ. रोलर याला अवघ्या तीन मिनिटांत चीत केलें. तीच अवस्था हॅकेन स्मिडची झाली. तेथें तीस जपानी पहेलवान नहि होते. त्यांनाहि त्यानें आव्हान केलें व 'तुम्हा सगळ्यांना १॥ तासांत धुळीस मिळवितों, या' असें सांगतांच त्यांनीं स्वस्थ बसून अब्रू राखण्याचा शहाणपणाचा मार्ग स्वीकारला. दोन स्विस मल्लांची तर त्यानें कमरडीच मोडली. त्याच वेळीं इमामबक्षानें इटालियन वीर जॉन लॅम्ब याला लोळवला. अशा रीतीनें सर्वांची विल्हेवाट लावल्यावर शेवटची कुस्ती गामा व झिस्को यांमध्यें ठरविण्यांत आली. झिस्को त्या वेळीं सर्वश्रेष्ठ मल्ल म्हणून नांवाजला गेला होता. ही लढत सतत दोन तास चालली. झिस्को चढाई न करतां फक्त बचाव करीत होता. पहिल्या दिवशी अनिर्णीत कुस्ती झाल्यानें पुनः दुसरे दिवशीं गामानें त्यास आव्हान दिलें. परंतु झिस्कोनें क्रीडांगणाकडे तोंडहि फिरविलें नाहीं. तेव्हां सर्व जगांत प्रमुख मल्ल म्हणून चॅम्पियनशिप गामाला मिळाली व ती तेव्हांपासून आजतागायत त्यानें रक्षण केली आहे. विलायतेहून परत आल्यावर गामा व इमामबक्ष यांना पतियाळाच्या महाराजांनीं आश्रय दिला.

## गामाचा प्रतिस्पर्धी झिस्को

हा रशियन बाल्टिक टापूंत जन्मला असून तो अनेक भाषाप्रवीण आहे. त्यानें वकिलीचा अभ्यास केला. परंतु त्याचा स्वाभाविक ओढा कुस्तीकडे असल्यानें त्यानें वकिली न करतां मल्लाचा पेशा पत्करला. यानें आजपर्यंत दोन हजार कुस्त्या लढल्या आहेत. नेहमीं मोकळ्या हवेंत काम करण्याची त्यास आवड आहे. तो धूम्रपान व मद्यपान केव्हांहि करीत नाहीं. 'माझ्या वयाला ६० वें वर्ष लागेल तेव्हां खरी कुस्ती मला करतां येईल' असें तो म्हणत असतो. झिस्कोचें वय सुमारें ३८ असून वजन २४५ पौंड आहे. त्याची उंची ५ फूट १० इंच आहे. त्याची गर्दन २२ इंच, छाती ५५ इंच, मनगट १३ इंच आहे. बिगमन नावाच्या प्रसिद्ध मल्लास त्यानें ३।४ वेळां सहज लीलेनें लोळविलें आहे.

महायुद्धकाळांत झिस्को रशियांत होता. तेथें रशियन मल्ल ॲबर्ग यांशीं त्याची कुस्ती झाली. ॲबर्गन जर झिस्कोला चीत केलें तर झिस्कोला हा हेर समजून ठार करण्यांत येईल असें झिस्कोला कळविण्यांत आलें. ही कुस्ती त्याच्या जिवावरचाच प्रसंग होता. ॲबर्ग मोठा नामांकित मल्ल असून आखाड्याभोंवतीं झिस्को केव्हां पडतो व आपण त्याला गोळ्या केव्हां घालतों अशा रीतीनें रशियन सैनिक सज्ज होते. परंतु त्या दिव्यांतून तो सैनिकांस लांच देऊन कसाबसा निसटला. झिस्कोनें अमे-

रिका, युरोप, न्यूझीलण्ड,आस्ट्रेलिया इ. देशांत जय मिळविला आहे. जपानी मल्ल तारोमाकी यास त्यानें लोळविलें आहे. १९१२ सालीं लंडन येथें गामाची व त्याची पुनः लढत झाली.ती.३-३॥तासां-वर टिकली व तीहि अनिर्णीत अशीच झाली. झिस्कोबरोबर फ्रँक जडसन नांवाचा एक मल्ल येथें आला असून आपणहि जगांतील कोणाहि मल्लाशीं लढूं असें तो म्हणतो. त्याचें वय २६ वर्षांचें असून वजन २१५ पौंड आहे.

ही प्रचंड कुस्ती ता. २९ जानेवारी रोजीं पतियाळा येथें झाली. हिंदुस्थानाच्या सर्व भागांतून हजारों प्रेक्षक ही कुस्ती व अशाच मोठमोठ्या मल्लांच्या होणाऱ्या कुस्त्या पाहावयास आले होते. नवानगरचे जामसाहेब, भोपाळचे नबाब, झिंद, कपु रथळा, पन्ना येथील राजे, सर हारकोर्ट बटलर इ.प्रमुख गृहस्थहि हजर होते. ता. २९ रोजीं मुख्य कुस्ती व्हावयाची होती. त्यापूर्वीच्या रात्रीं मोठा पाऊस पडून सर्व आखाडा पाण्यानें भरून गेला. परंतु पतियाळा-दरबारनें तो पूर्ववत् दुरुस्त केला. कुस्तीच्या दिवशीं आकाश निरभ्र झालें. ता. २९ रोजीं सायंकाळीं कुस्ती बराच वेळ चालणार अशा समजुतीनें सर्वत्र विद्युद्दीप व सर्चलाइट यांची व्यवस्था करण्यांत आली होती. उभय वीर आखाड्यांत उतरले. लोकांचें लक्ष त्यांजकडे वेधलें इतक्यांत म्हणजे अवघ्या एक मिनिटाचे अवधींत गामानें झिस्कोला चीत केलें व 'हिंदुस्थानाचा विजय झाला' 'वाहवा गामा' असा विजयध्वनि सर्वत्र निघूं लागला. नंतर गामाच्या तसबिरीची नगरांतून मोठी मिरवणूक काढण्यांत आली. गामानें कुस्ती जिंकून हिंदुस्थानाला अपूर्व यश मिळवून दिलें याबद्दल त्याचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच होणार आहे.

# दिल्लीस युद्धाला तोंड लागलें !

सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा ठराव शनिवार ता.१८ रोजीं दिल्लीच्या लेजिस्लेटिव्ह असें-ब्लींत अनुकूल ६८ व प्रतिकूल ६२ मतें पडून मंजूर झाला. कमिशनवरील बहिष्काराच्या चळवळीनें, हिंदी राष्ट्र व साम्राज्यवादी ब्रिटिश मुत्सद्दी यांचे दर-म्यान सुरू झालेल्या लढ्याला लोकपक्षाच्या या अपूर्व विजयानें चांगलेंच तोंड लागलें यांत शंका नाहीं. सदर ठराव हिंदी राजकारणांत नोकरशाही-बरोबर पसतीस वर्षें झुंजलेले वयोवृद्ध वीर लाला लजपतराय यांनीं मांडला व त्यावर दोन दिवस कडाक्याचा वादविवाद होऊन विजयश्रीनें अखेर लोकपक्षाच्याच गळ्यांत माळ घातली. प्रसंगहि तसाच अटीतटीचा असल्यामुळें नोकरशाहीला आपल्या बाजूच्या सभासदांचा झाडून सारा फौज-फांटा असेंब्लीच्या सभागृहांत हजर ठेवावा लागला यांत नवल नाहीं. सर्वसमर्थ नोकरशाहीस आपली सेना अशा रीतीनें उभी करणें अवघड नाहीं; पण याखेरीज तिला फितुरीहि करावी लागली, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आपली फळी खंबीर राखून प्रतिपक्षाच्या फळींतील कच्च्या दिलाचीं माणसें धाकानें, अभिलाषानें व फुसलावणीनें फोडण्याची विद्या शिकण्यास नोकर-शाहीस दुसऱ्या कोणा गुरुजींचे पाय धरावयास नकोत. ही विद्या तिनें भल्याभल्यावरहि चालविली व झुलफीकारखान आदिकरून कित्येक मुसलमान सभासदांस आपल्या काबूंत आणलें.

अबदुल लतीफ फरूखी व याकुब हसन हे दोन बहिष्कारवादी मुसलमान त्या दिवशीं गैरहजर राहिले! डॉ. हरिसिंग गौर हे एकांडे शिलेदार तर बेगुमानपणें सरळ सरकारी लॉबींत शिरले व मुद्दाम लोकपक्षापुढें नाक खाजवून त्यांनीं आपली पुण्याई सरकारच्या बाजूनें खर्च केली ! सरकारास दैवानें आणखीहि एका रीतानें हात दिला. कराचीचे हिंदु सभासद हरचंदराय विशनदास शरपंजरीं पडले असतां त्यांच्या कर्तव्यनिष्ठेनें त्यांस कराचीहून दिल्लीस ओढून आणलें; परंतु लोकपक्षास त्यांच्या मताचा उपयोग होण्यापूर्वींच मृत्यूनें त्यांस ओढून आपल्या-जवळ नेलें व त्यामुळें लोकपक्षाचें एक मत बुडालें. तथापि लोकपक्षास या मृत्यूनें अपशकून न होतां त्यांतील राष्ट्रहितबुद्धीस उलट नवीन स्फुरण आलें व त्याचा योग्य तोच परिणाम होऊन त्यानें सर-कारास वरील प्रकारें आठवण राहाण्याजोगा परा-जयाचा टोला लगावला.

असेंब्लीचें लक्षण ठीक नाहीं हें आगाऊच ओळखून तेथील डाव अंगावर उलटूं द्यावयाचा नाहीं या तजविजीस ब्रिटिश मुत्सद्दी बरेच दिवसां-पासून लागले होते. असेंब्लीच्या बैठकीस या महिन्याच्या प्रारंभीं सुरुवात होतांच व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं आपल्या भाषणानें मोहनी टाकून पाहिली. सायमनसाहेबांनीं दिल्लीच्या वेस्टर्न हॉस्टेलमध्यें बाडबिछाड ठेवलें नाहीं तोंच व्हाइस-रॉयांशीं खलबत करून खुलाशाच्या रूपानें

आपलें शब्दजाल पुढाऱ्यांवर पसरलें. त्या शब्दजालाची मांडणी अशी होती कीं, तिला फसून कांहीं सावजें आपल्या भजनीं लागतील अशी सायमनसाहेबांची अटकळ होती. पण सायमनसाहेब वकिली ठकविद्येंत कितीहि निपुण असले तरी त्यांची ही पारध फसली. सायमनसाहेबांचें बोलणें अशा रीतीनें फोल ठरल्यावर त्यांचे पाठीराखे लॉर्ड बर्कनहेड यांस उसळी आली. लॉर्ड बर्कनहेड यांनीं प्रसंग वेळ ओळखावयास पाहिजे होता. दीर्घ सूचना करून घ्यावयास हवी होती. हिंदुस्थानांतील लोक कांहीं शब्दांच्या मागें धावून अर्थास विसरणारे वेडेपीर नाहींत. त्यांत ब्रिटिश राज्यघटना कोळून प्यालेले सर तेजबहादुर सप्रूसारखे कायदेपंडित आहेत. राजकारणांत जन्मभर सरकारशीं झुंजून काळयाचे पांढरे केंस झालेले लाला लजपतराय यांजसारखे मुत्सद्दी आहेत आणि राष्ट्राचा तिळमात्रहि अपमान सहन न करणारे बॅ. जिना-जयकर यांजसारखे स्वाभिमानी पुरुष आहेत, हें सत्तेच्या घमेंडीत व अधिकाराच्या धुंदींत लॉर्ड बर्कनहेड यांच्या लक्षांत आलें नाहीं. त्यांनीं अलीकडे कांहीं दिवस तोंड मिटलें होतें. पण तें पुनः उघडलें आणि हिंदुस्थानास गोंजारण्याकरितां म्हणून जीं मुक्ताफळें त्यांनीं गाळलीं त्यापेक्षां अंगावर फेंकलेले तोफेचे गोळे फार बरे असें म्हणण्याची पाळी त्यांनीं हिंदी लोकांवर आणिली. ते म्हणाले, "बहिष्कार खुशाल घाला. त्याला भिऊन कमिशन आपलें काम मुळींच थांबविणार नाहीं. असेंब्लीच्या सभासदांना विचारतो कोण? हिंदुस्थान हा अठरा-पगड जातींच्या लोकांचा देश आहे. त्यांत मुसलमान आहेत, अस्पृश्य आहेत, अँग्लो-इंडियन आहेत. ते आमच्या नेत्रकटाक्षांची वाट पाहात आहेत. ते आमच्यापुढें साक्षीस येतील, त्यांजवर आम्ही आपलें काम भागवून घेऊं. आम्ही हिंदुस्थानाचे ट्रस्टी आहोंत. आम्ही करूं तें होईल. तुम्हाला तशी घमेंडच असेल तर आमच्यापासून राजकीय हक्कांचा एकहि कपर्दिक तुमच्या झोळींत पडणार नाहीं हें लक्षांत ठेवा. तुमच्या अडेलतट्टूपणास मान तुकावून कमिशनमध्यें तुमचे प्रतिनिधी तरी घ्यावयाचे किती? तसे प्रतिनिधी सोळा घ्यावे लागतील. पार्लमेंटचे सभासद सात व तुमचे सोळा असें होऊन तुमचें बहुमत झाल्यावर कमिशनचा पार्लमेंटरीपणा काय राहिला? भले गृहस्थ हो ! आहांत कोणत्या भ्रमांत? व्यवहार ओळखून कांहीं व्यावहारिक सूचना कराल तरच त्या आम्ही ऐकून घेऊं, नाहीं तर बसा खुशाल बहिष्काराचा जप करीत. पण त्यानें आमचें काय अडणार ! "

लॉर्ड बर्कनहेड यांच्या या उद्गारांत सत्तेचा दर्प, स्वतःच्या शहाणपणाची घमेंड व हिंदी पुढाऱ्यांविषयींची तुच्छता याशिवाय दुसरें काय आहे? मुंबईच्या टाइम्सकारांस देखील हें भाषण वाचून बर्कनहेडसाहेबांचें डोकें ठिकाणावर राहिलें नाहीं असें वाटलें. सुईनें काम व्हावयाचें तेथें सुरा लावून बसणारा धटिंगण हिंदी राजकारणाच्या नाजूक परिस्थितींत भारतमंत्रीपदावर असणें हें इंग्लंडचें दुर्दैव होय असें टाइम्सकारांच्याहि मनांत आलें असेल. पण बर्कनहेड यांची ही चूक हिंदी राष्ट्राच्या पथ्यावर पडली आहे. अशा रीतीनें लॉर्ड आयर्विन, सर जॉन सायमन असेंब्लींतील गृहमंत्री मि. क्रेरार व लॉर्ड बर्कनहेड यांनीं आपआपल्या परीनें कोणी चुचकारून, कोणी मधाचें बोट लावून, कोणी साखर पेरून तर कोणी पिस्तुल रोखून सर्कशींतील सिंहाप्रमाणें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या पिंजऱ्याभोंवतीं जमून हिंदी राष्ट्रास आपल्या मनाजोगी उडी मारावयास लावण्याची शिकस्त केली. पण ती राष्ट्रीय मुत्सद्यांच्या दक्षतेपुढें, व्यवहारचातुर्यापुढें व अनुभवजन्य खंबीरपणापुढें वायां गेली.

लॉर्ड बर्कनहेड यांनीं कितीहि सोंग आणून असेंब्लीचें महत्त्व नाकारलें तरी तिचें वजन फार मोठें आहे, हें त्यांच्या रागारागाच्या भाषणावरूनच कळून येतें. असेंब्लीतील सभासद तरी साठ लक्ष हिंदी लोकांचे सरकारमान्य प्रतिनिधी आहेत. राष्ट्रीय सभा एकट्या राष्ट्रीय पक्षाची, लिबरल परिषद एकट्या नेमस्त पक्षाची, हिंदूसभा केवळ हिंदूंची व मुस्लीम लीग केवळ मुसलमानांची असें कदाचित् सरकारला म्हणतां येईल; पण असेंब्लीची गोष्ट तशी नाहीं. तिच्यांत स्वराजिस्ट आहेत, प्रतियोगी आहेत, स्वतंत्र आहेत, लिबरल आहेत, हिंदुसभाभक्त आहेत व मुस्लीम लीगवालेहि आहेत. यामुळें तिचे मत म्हणजे आजच्या घटकेस राष्ट्राचें मत होय हें सरकारासहि नाकारणें शक्य नाहीं. सायमन कमिशनवर तिनें बहिष्कार घातला म्हणजे अखिल राष्ट्रानें तो बहिष्कार घातला असेंच सिद्ध होत असल्यामुळें वरून केवळाहि बेफिकिरीचा आव आणला तरी आंतून सरकारच्या काळजानें ठाव सोडला होता. तथापि सरकारच्या या डावपेचास न जुमानतां असेंब्लीनें आपल्या सडेतोड निर्णयानें हिंदी राष्ट्र दुबळें असलें तरी जिवंत आहे, सत्ताहीन असलें तरी जागृत आहे, त्यास न्याय मिळत नसला तरी अन्यायाची तीव्र चीड आहे, तें पारतंत्र्यांत असलें तरी स्वातंत्र्याची जबर आकांक्षा त्यास आहे असें दिल्लीच्या नव्या राजधानींतून जगास ऐकूं जाईल इतक्या धीरगंभीर स्वरानें जाहीर केलें! हिंदुस्थान एक झालें तर

केव्हांहि ब्रिटिशांस पुरून उरण्याइतकें त्यांत सामर्थ्य आहे असा आत्मविश्वास या निर्णयामुळें हिंदी लोकांत उत्पन्न झाल्याखेरीज खचित राहाणार नाहीं.

बहिष्काराचा ठराव लाला लजपतराय यांनीं मांडला हें वर सांगितलेंच आहे. तो पास झाल्याबद्दल मानाचें महावस्त्र लाला लजपतराय यांसच बहाल केलें पाहिजे. बहिष्काराचा हा ठराव मांडतांना लाला लजपतराय बोलत नव्हते, तर लालाजींच्या मुखानें अखिल हिंदी राष्ट्र बोलत होतें. त्यांत त्वेष होता, अन्तःकरणाची तळमळ होती, व बहिष्कार-वाद्यांवर येणाऱ्या आक्षेपांचें खंडण होतें. लाला लजपतराय मनापासून बोलत होते म्हणून त्यांचें भाषण श्रोत्यांच्या कानाशीं न थांबतां थेट मनाशीं जाऊन भिडलें. सायमन कमिशनइतकें लायक कमिशन हिंदुस्थानाच्या किनाऱ्यावर कधींच उतरलें नाहीं अशी फुशारकी लॉर्ड बर्कनहेड यांनीं मारली होती. या कमिशनची लायकी काय, तर त्याला हिंदुस्थानाच्या स्थितीचें ज्ञान नाहीं, हिंदुस्थानाच्या इतिहासाचा गंध नाहीं व हिंदुस्थानचें राजकारण कशाशीं खावें हेंहि त्यांस माहीत नाहीं! अशा कमिशनानें हिंदुस्थानांत येऊन हिंदुस्थानच्या स्थितीची चौकशी करणें आणि आंधळ्यानें हत्ती कसा असतो त्याचें वर्णन करणें यांत फरक काय? असें अडाणी कमिशन आणि हिंदुस्थान-सरकार व भारतमंत्री यांचें गीत गाणारा फोनोग्राफ यांत फरक काय? असा लालाजींचा सवाल आहे. कमिशन हिंदुस्थानाच्या आकांक्षा पुरविण्यासाठीं नेमलें आहे याच मूलभूत गोष्टीवर लालाजींचा किंवा कोणाचाच विश्वास नाहीं. त्यांच्या मतें हिंदुस्थानाचा प्रश्न असा आहे कीं, तो कमिशनच्या हातून सुटणार नाहीं. ब्रिटिश मुत्सद्दी व हिंदी मुत्सद्दी यांनीं एका बैठकीवर बसावें व उभयतांनीं परस्परांच्या सल्लामसलतीनें व विचारविनिमयानें हिंदुस्थानास मानवेल अशी स्वराज्याची योजना ठरवावी. पण हिंदुस्थानास कधींकाळीं तरी स्वराज्य मिळावें अशी ब्रिटिश मुत्सद्यांची इच्छाच नसल्यामुळें कमिशनबरोबर कोणत्याहि स्थितींत सहकार्य केल्यापासून हिंदुस्थान चा फायदा नाहीं असेंच आपलें स्पष्ट मत लालाजींनीं असेंब्लींत बोलून दाखविलें.

लाला लजपतराय यांच्या ठरावास असेंब्लींतील निरानिराळ्या पक्षांतर्फे श्रीनिवास अय्यंगार, पं. नेहरू बॅ. जयकर, बॅ. जिना, पं. मालवीय इत्यादिकांनीं पुष्टि दिली. श्रीनिवास अय्यंगार व पं. नेहरू यांची भिस्त स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर होती. स्वयंनिर्णयाचें तत्त्व सर्व पक्षांच्या विचारसरणीच्या मुळाशीं आहे. पण त्यानें व्हावयाचें समाधान प्रत्येक पक्षाच्या मनोरचनेवर व शक्याशक्यतेच्या तारतम्यावर अवलंबून आहे. सायमनसाहेबांनीं कायदेमंडळाच्या कमिटीस दिलेले अधिकार कमिशनच्या बरोबरीचे नाहींत. वास्तव सायमन आले तसेच त्यांनीं परत जावें आणि पार्लमेंटापासून व राजापासून हिंदी सभासदांस कमिशनरांच्या बरोबरीचे हक्क मिळवून आणावे. असें झालें तरच कमिशनबरोबर सहकार्य करण्याची गोष्ट आपण बोलूं. तोंपर्यंत तुमच्या कमिशनशीं आम्हास बिलकुल संबंध ठेवण्याचें कारण नाहीं असें बॅ. जयकर यांनीं बजावलें. बॅ. जिना यांनीं एकंदर वादाच्या मुळाशीं जाऊन असें स्वच्छ सांगितलें कीं, समान दर्जा व समान सत्ता देण्याचा अधिकार ज्यांनीं कमिशनची नेमणूक केली त्या पार्लमेंट सभेसच आहे, सायमनसाहेबांस नाहीं. अशा स्थितींत कमिटीचे सभासद व वाटेचा वाटसरू यांची योग्यता हिंदुस्थानाच्या दृष्टीनें सारखीच आहे.

असेंब्लीच्या निर्णयानें हिंदुस्थानाचें खरें स्वरूप सरकारच्या, कमिशनच्या व हुजूर पक्षाच्या नजरेस आणलें आहे. यापुढें कमिशन अस्तित्वांत असेपर्यंत स्वाभिमानी हिंदी राष्ट्राच्या कणखर अंतरंगाची व उग्र प्रक्षोभाची प्रचीति या सत्ताधाऱ्यांना सारखी येत राहील असें आंदोलन राष्ट्रांत झालें पाहिजे. असेंब्लीचा निर्णय हा या लढ्याचा शेवट नाहीं तर प्रारंभ आहे. हिंदी राष्ट्राची हीनदीन याचक वृत्ति पाहण्याच्या हौसेनें बर्कनहेड यांनीं पाठविलेल्या कमिशनला प्रारंभापासून अखेरपर्यंत जागृत व खवळलेल्या हिंदुस्थानाचें भयानक विश्वरूप दिसावयास पाहिजे. त्याशिवाय ब्रिटिशांचा साम्राज्यमद उतरणार नाहीं. या दृष्टीनें चळवळीस प्रारंभहि झाला आहे. बंगालमध्यें सुभाषबाबूंच्या नेतृत्वाखालीं एक हजार स्वयंसेवकांचें दल उभें राहून कमिशनच्या आगमनाच्या प्रसंगीं परदेशी कापडावरील बहिष्काराची मोहीम सुरू करण्यांत येणार आहे. मद्रासकडे १४४ कलमान्वयें सरकारनें काढलेले दडपशाहीचे हुकूम मोडण्याची तयारी होत असून आंध्र प्रां. कॉं. कमिटीचा निर्णय झाल्याबरोबर श्रीनिवास अय्यंगार, सत्यमूर्ती, डॉ. वरदराजलू नायडू इत्यादि प्रमुख पुढारी पुढें होऊन प्रथम हा सरकारी हुकूम पायाखालीं तुडविण्यास सिद्ध आहेत. महाराष्ट्र प्रांतिक कमिटीनेंहि ब्रिटिश मालावरील बहिष्काराचा कार्यक्रम ठरवून तो नेटानें पार पाडण्याची तयारी केली आहे. अलीबाग तालुक्यांतील धारावाढनिवारणाच्या चळवळीप्रमाणें असहकारितेंत प्रसिद्धीस आलेला बार्डोली तालुकाहि करबंदीच्या चळवळीस तयार असून दे. वल्लभभाई पटेल हे आपलें अहमदाबाद म्यु.च्या अध्यक्षत्वाचें काम सोडून या चळवळींत पडले आहेत. प्रतिकार-

प्रधान राष्ट्रीय चळवळ करण्याची ही पर्वणीच राष्ट्राला लाभलेली आहे. तिचा फायदा राष्ट्र भरपूर घेतल्याशिवाय राहणार नाही असा भरंवसा वाटतो. चळवळीच्या मार्गे दडपशाही हा नेहमींचा क्रमहि या वेळीं कसा चुकेल ? पण पूर्वीप्रमाणें या वेळीं राष्ट्रीय कार्यकर्ते सरकारच्या दडपशाहीस पुरून उरतील यांत शंका नाहीं.

सायमनसाहेब परत जाऊन बर्कनहेड यांना शहाणपणाच्या गोष्टी सांगतील, किंवा बर्कनहेड त्यायोगें वळतील या दोनहि गोष्टी अशक्य व असंभवनीय होत. पण हिंदी राष्ट्रापुढें निराळीच आशा व दिशा पंडित जवाहरलाल नेहरूंच्या नव्या स्वातंत्र्यवादी पक्षानें मांडली आहे; इतकेंच नव्हे तर सर शंकरन् नायर यांच्यासारखे वृद्ध व अनुभवी मुत्सद्दीहि तिचाच अनुवाद करीत आहेत. कमिशनने कांहीं न दिलें किंबहुना दिलें तेंहि काढून घेतलें तरी त्याची फिकीर नाहीं. लवकरच जगांत मोठें युद्ध सुरू होऊन त्यांत इंग्लंड अडकणार हें निश्चित आहे. आणि आज कमिशन जें करील त्याचें सव्याज उट्टें या प्रसंगीं हिंदुस्थान काढून घेईल हें पक्कें लक्षांत ठेवा असें शंकरन् नायर हे ब्रिटिश मुत्सद्यांना बजावीत आहेत. आणि त्या वेळीहि ब्रिटिश मुत्सद्दी हिंदी राष्ट्राच्या आकांक्षेच्या आड येतील तर साम्राज्यच झुगारून हिंदुस्थान बाहेर पडेल असा त्यांनां अखेरचा इषाराहि स्पष्टपणें दिला आहे. इंग्रज येथून गेल्यावर कदाचित् देशांत अराजकता माजेल, पण त्याचा येवढा बाऊ कशाला? आम्ही या अराजकतेंतूनहि आपला मार्ग काढण्यास समर्थ आहोंत असें लालाजींनीं असेंब्लींत छातिठोकपणें सांगितलेंच आहे. असेंब्लीच्या निर्णयानें सुरू झालेल्या लढ्यांतील धोरणाचें शेवटचें टोंक भावी महायुद्धाला व त्या प्रसंगीं हिंदुस्थानाने करावयाच्या कृतीला जाऊन भिडलेलें आहे. आणि या दृष्टीनें पुढील सर्व चळवळींची योजना झाली तरच राष्ट्रीय चळवळीची पर्वणी आपण साधली असें होईल.

# रिझर्व्ह बँक किंवा गंगाजळी पेढी

(ले.—न. चिं. केळकर.)

(ले. १ ला)

(प्रास्ताविक)

रिझर्व्ह बँक बिल छातींत धक्का बसून असेंब्लींत उलथून पडलें. तथापि तें फिरून केव्हां तरी पायावर उभें राहाणारच नाहीं कशावरून! मुलांच्या खेळांतील कांहीं बाहुल्या अशा जड बुडाच्या केलेल्या असतात कीं त्यांचें डोकें जमिनीला लागलें तरी त्या फिरून टण करून उभ्या राहतात! शिवाय खरें बोलावयाचें तर रिझर्व्ह बँक ही संस्था जितकी सरकारला हवी आहे तितकीच ती हिंदुस्थानांतील लोकांनाहि हवी आहे. पण कांहीं कारणाकरितां हें बिल दोघांनाहि नको अशी वेळ परवां आली खरी. कायदेमंडळाचा ताबा थोडाहि राहील तर सरकारला ती नको. आणि कायदेमंडळाचा ताबा थोडाहि न राहील तर लोकांना ती नको. कसेंहि असो, हा विषय आज हातावेगळा झाला तरी पुनः एका ना दुसऱ्या रीतीनें तो लोकांपुढें येणारच आहे. म्हणून या महत्त्वाच्या बाबीसंबंधानें केसरीच्या वाचकांना थोडी थोडी माहिती मधून मधून देण्याचें आम्ही योजिलें आहे. सुदैवानें तूर्त वादाची धूळ खालीं बसल्यानें या पेढीविषयीं माहिती देण्याला व घेण्याला दृष्टि निर्मळ राहील. वाद थांबल्यानें राजकारणाच्या चुरशीची लज्जत निघून गेली तरी, झाला एवढ्या वादानें हा विषय काय आहे हें समजून घेण्याची वाचकांची जिज्ञासा जागृत झाल्याशिवाय राहिलेली नाहीं असें आम्हांस वाटतें.

## जुन्या-नव्या पेढींतील फरक

'रिझर्व्ह बँक बिल' हा शब्द—प्रयोग आजपर्यंतच्या चर्वितचर्वणानें लोकांच्या तोंडीं बसलेला असला तरी वर आम्ही त्याच्या भाषांतरांत जो शब्दप्रयोग दिला आहे तोहि सोपा व सुटसुटीत असल्यानें पुढील सर्व विवेचनांत आम्ही तोच सर्वत्र योजणार आहों. 'गंगाजळी पेढी' शब्दांचा सामान्य अर्थ कळण्याला अवघड नाहीं. तथापि प्रथम पेढी या शब्दाचें थोडेसें विवेचन करून नंतर या पेढीचा कोणत्या 'गंगाजळीशीं' काय संबंध आहे हें सांगूं. ही नवी पेढी लोकांना हल्लीं परिचित असलेल्या इतर पेढ्यांसारखीच कांहीं कांहीं बाबतींत आहे. मात्र ह्यच्यांत व इतर पेढ्यांत कांहीं विशेष महत्त्वाचा फरकहि आहे. आणि त्यांतच या पेढीचें खरें वैशिष्ट्य आहे. इतर पेढ्यां-

प्रमाणें या पेढीलाहि भांडवल हवें, कार्यालय हवें, मुख्य कारभारी (गव्हर्नर) व दुय्यम कारभारी हवा; हे दोघे तिचा सर्व कारभार करणार. पण हे कारभारी माहितगार, हुषार, मोठ्या पगाराचे व वजनदार असले तरी त्याच्यावर देखरेख करून त्यांना मुख्य गोष्टींत तपशीलवार हुकूम वेळोवेळीं देण्याला नियामक मंडळ ( डायरेक्टर बोर्ड ) हवेंच. पेढीचें काम फारच मोठ्या प्रमाणावर आणि घाऊक चालणार असल्यामुळें तिचीं मुख्य कार्यालयें मुंबई, कलकत्ता, मद्रास अशाच ठिकाणीं राहतील. या मोठ्या शहरांबाहेरहि या पेढीचा कांहीं कांहीं व्यवहार चालू ठेवणे अवश्य. यामुळें तिच्या स्वतःच्या शाखाहि बाहेर कांहीं तरी राहतीलच, किंवा हें बाहेरचें काम स्वतःच्या शाखांकडून करणें सोईचें न वाटलें तर इंपीरियल बँकेसारखा एखादा एजंट, मुनीम किंवा हस्तक नेमून त्याच्याकडूनाहि हिला तें करून घेतां येईल. या पेढीच्या नित्याच्या कामांत मुख्यतः खालील गोष्टींचा समावेश होतो—

## पेढीचीं कामें

१ देशांतील इतर पेढ्यांशी निकट संबंध ठेवणें, त्यांच्या ठेवी ठेवून घेणें, त्यांच्या आर्थिक स्थितीची माहिती वेळोवेळीं घेणें, त्यांना गरज पडेल तेव्हां कर्ज देणें, त्यांच्या हुंडया पटविणें, त्यांना लागेल तें चलनी नाणें, नोटा पुरविणें, इत्यादि.

२ सामान्य लोकांच्या ठेवी ठेवून घेणें, त्यांच्या हुंड्या पटविणें, त्यांना सोनें विकत देणें, त्यांचें सोनें विकत घेणें,त्यांना चलनी नाणें, नोटा पुरविणें इ.

३ सरकारच्या कायम ठेवी किंवा चालू ठेवी ठेवून घेणें, वरिष्ठ व प्रांतिक सरकारांच्या पैशाअडक्याचा व्यवहार त्यांना हवा तर करणें, वरिष्ठ सरकाराकडून बाजाराला गरज असेल त्याप्रमाणें चलनी नाणें व आपल्या नांवाच्या नोटा काढून इतराना पुरविणें, सरकारी गंगाजळी ( सोन्याची रुप्याची कर्जरोख्यांची ) आपल्या संग्रहीं व ताब्यांत ठेवणें आणि तिची काळजी घेणें, विलायतेला किंवा इतर ठिकाणीं त्यांच्याकरितां पैसा किंवा सोनेंनाणें हुंड्या देऊन पाठविणें, त्यांच्याकरितां सोनें वगैरे घाऊकपणें परदेशांत लागेल तसें खरेदी करून आणाविणें इत्यादि.

४ या सर्व व्यवहाराचे हिशेब रीतसर ठेवणें, स्वतःचे कायमचे हिशेबनीस ठेवून ते हिशेब तपासविणें आणि सरकारनें ते पाहाण्यास मागितले असतां त्यांस दाखविणें इ.

वरील यादीवरून या नव्या मोठ्या पेढीचा संबंध वरिष्ठ व प्रांतिक सरकारांशीं, व्यापाऱ्यांशीं, बाजारांशीं व खासगी लोकांशीं काय येणार हें दिसून येईल. परदेशाशींहि या पेढीला व्यवहार करावे लागतील आणि त्याकरितां परदेशांतहि तिला आपल्या शाखा किंवा हस्तक ठेवावे लागतील.

वर दिलेल्या यादींतील बरींचशीं कामें हल्लीं इतर म्हणजे खासगी किंवा समाइक भांडवलाच्या पेढ्या करीतच आहेत. शिवाय या खासगी पेढ्या करीत नाहींत किंवा त्यांना करतां येत नाहीं असाहि कांहीं व्यवहार आहे, तो इम्पीरियल बँक करीत आहे. हल्लीं चालू असलेले हे त्यांचे व्यवहार या अनेक पेढ्या यापुढेहि करीतच राहतील. सुवर्ण गंगाजळीच्या पेढीचा नवा कायदा करण्यांत त्यांचा तो अधिकार काढून घेण्याचा हेतु नाहीं. झालाच तर कांहीं थोडा फरक इम्पीरियल बँकेच्या व्यवहारांत होईल. पण जो मुख्य फरक पडेल तो या इतर पेढ्यांच्या कारभारांत न पडतां एका अर्थी स्वतः सरकार जो पैशाअडक्याचा कारभार हल्लीं करीत आहे त्यांतच मुख्यतः पडेल. तो फरक अशा रीतीनें कीं,सरकार हल्लीं उपयोगांत आणीत असलेले आर्थिक व्यवहाराचे कांहीं अधिकार या नव्या मोठ्या पेढीला देईल. अर्थात् या नव्या संस्थेमुळें सरकारच्या अधिकाराची विभागणी होईल.

अशा रीतीनें या नव्या पेढीच्या कारभाराची रूपरेखा आंखल्यानंतर तिच्याकरितां नवा कायदा करण्याचें काय कारण हा प्रश्न सहजच उत्पन्न होतो व त्याचें उत्तर थोडेसें प्रथम दिलें पाहिजे. आज सरकार स्वतः एखाद्या पेढीवाल्याप्रमाणें कांहीं कारभार करीत आहे, हें वर दर्शविलें आहे. त्यापैकीं कांहीं कारभार आज इम्पीरिअल बँक करते व कांहीं कारभार सरकारनें आपल्या हातीं राखून ठेवला आहे. इंपीरियल बँकेकडे ठेविलेल्या अधिकारांत कर्ज देणें घेणें, हुंड्या पटविणें,कर्जरोख्यांचा व्यवहार करणें हे मुख्यतः येतात. हीं कामें लोकांकरितां खासगी पेढ्याहि करतात. तथापि इम्पीरियल बँक देखील कायद्यानेंच अस्तित्वांत आलेली आहे. याचें मुख्य कारण सरकार आपले कोट्यावधि रुपये या बँकेकडे बिनव्याजी ठेवीत असतें.तो पैसा सुरक्षित राहावयाचा तर तिचा कारभार योग्य रीतीनें चालला पाहिजे. आणि तसें घडतें कीं नाहीं हें पाहाण्याकरितां सरकारला आपले कांहीं डायरेक्टर नियामक मंडळावर नेमावे लागतात. ही बँकहि इतर बँकांप्रमाणें मूळ समायिक भांडवलानेंच अस्तित्वांत आलेली आहे, म्हणून तिच्या भागीदारांना कांहीं डायरेक्टर निवडून देण्याचा अधिकार आहेच. तथापि सरकारी पैशाची सगळी देवघेव या बँकेकडे असते. आणि २०-२५ कोटींपर्यंत सरकारी पैसा काहींएक व्याज न देतां बँकेला उपयोगांत आणतां येतो. अर्थात् अशा निकट संबंधाला स्वतंत्र कायद्याचें अधिष्ठान असल्याशिवाय चालणार नाहीं.आणि

या कायद्यामुळें व या संबंधामुळें इंपीरिअल बँकेला लोक सरकारी बँक समजतात हें स्वाभाविकच आहे.

### इंपीरिअल बँक

ही बँक एवढी मोठी आहे कीं, तिच्या हल्लीं १६० शाखा आहेत. तिची स्वतःची गंगाजळी म्हणजे राखून ठेवलेला द्रव्यनिधि ५ कोटींचा असून, तिच्याजवळ सरकारी व खासगी मिळून ठेवी ७५-८० कोटींपर्यंत असतात. दरसाल ६० पासून ८० कोटींपर्यंत तिचा हुंड्यांचा व्यापार चालतो. आणि दरसाल तिला कोटि दीड कोटि रुपये इतका नफा होत असून, भागीदारांना दरशेंकडा १५-१६ टक्के नफा म्हणजे डिव्हिडंड वाटतां येतो. असें असून लोकांना कर्ज देतांना ही पेढी सामान्यतः ६ टक्क्यांहून अधिक व्याज घेत नाहीं. अर्थात् ही पेढी एवढी धनत्तर असल्यामुळें पुष्कळ लोकांचें म्हणणें असें आहे कीं, या सरकारी किंवा निमसरकारी पेढीलाच गंगाजळी पेढीचें स्वरूप यावें. परंतु सरकारला ती गोष्ट पसंत पडली नाहीं. त्यांनीं रिझर्व्ह बँकेची वेगळी योजना केली आणि त्याप्रमाणें बिल पुढें आणलें. सरकारला मनांतून खरोखर रिझर्व्ह बँक खासगी भागीदारीच्या भांडवलानें उभारलेली हवी असें होतें तर, इंपीरिअल बँक तयारच होती व ती सहजच उपयोगी पडली असती. पण खासगी लोकांना भागीदारीमुळें या बँकेच्या कारभारांत जितका ताबा चालवितां येतो तितकाहि सरकारला नको होता. हिंदी व्यापारी लोक नव्या रिझर्व्ह बँक बिलाच्या विरुद्ध होते त्याचें एक मुख्य कारण हेंच होय.

गंगाजळी पेढीसारखी एखादी पेढी असावी ही गोष्ट तत्त्वतः कोणालाहि अमान्य नाहीं. त्याचें कारण असें कीं, हल्लींच्या स्थितींत पैशाअडक्याच्या सर्व धोरणांत विलायतेंतील स्टेट सेक्रेटरीची हुकमत चालते. त्या हुकमतीमुळें हिंदुस्थानाच्या लोकांचें अकल्याण होतें व विलायतेंतील लोकांचा फायदा होतो. हिंदुस्थानाचा सुवर्णनिधि विलायतेंत ठेवला जातो व थोडेंबहुत व्याज मिळण्याच्या सबबीवर त्याचा उपयोग विलायतेंतील व्यापारी, भांडवलवाले, कारखानदार, पेढीवाले यांना हलक्या व्याजानें कर्जाऊ पैसा देण्यांत होतो. अर्थात ही गोष्ट आपापल्या परीनें लोकांना व हिंदुस्थानसरकारलाहि मनापासून आवडत नाहीं. म्हणूनच सरकारी फडणविसांची गंगाजळी पेढी हिंदुस्थानांत स्थापण्याविषयींची खटपट सुरू आहे.

### सरकारचा हेतु

या खटपटीचा हेतु सर्वस्वी लोकांचा फायदा करण्याचा आहे असें नाहीं. तथापि स्वातंत्र्य हें सर्वांना हवेंच असतें, त्याप्रमाणें हिंदुस्थान-सरकारलाहि हवें आहे. गंगाजळी पेढी निघाली तर त्यांना स्टेट-सेक्रेटरीचा आर्थिक कारभार सहज बंद पाडतां येईल व आपल्या पैशा-अडक्याचा व्यवहार केवळ आपल्या स्वतंत्र इच्छेप्रमाणें चालविण्याचें तें एक साधन होईल. उलट ही सत्ता विलायतेंतून निघून हिंदुस्थानांत यावी ही गोष्ट लोकांनाहि हवीच आहे. कारण भांडावयाचेंच झाल्यास या देशांतल्या अधिकाऱ्यांशीं कायदेमंडळांच्या द्वारें किंवा इतर रीतीनें जसें कसून भांडतां येईल तसें ६००० मैलांवर राहणाऱ्या स्टेट-सेक्रेटरींशीं भांडतां येत नाहीं. हिंदुस्थान-सरकार व विलायत-सरकार यांच्यामध्यें कोणता व्यवहार कोणत्या मार्गानें चालतो हें लोकांना हल्लीं फारसें कळतहि नाहीं. गंगाजळी पेढी हिंदुस्थानांत झाली व तिच्यावर लोकपक्षाचे कांहीं थोडे तरी डायरेक्टर असले म्हणजे हा व्यवहार हळूहळू लोकांना सहज दिसून येऊं लागेल. डोळ्यापुढें काम चालल्यानें तें कसें चालतें तें कळतें. आणि अनिष्ट रीतीनें तें चालत असल्यास त्यांतील अनिष्ट कारभाराचा प्रतिकार थोडाबहुत तरी करतां येतो.

आज या कारभारांत कांहीं घोटाळा झाला व त्याबद्दल कोणी हिंदुस्थान-सरकारला जबाबदार धरूं लागलें म्हणजे ते करावयाचें तें समर्थन करून वरती अशी सबब सांगून मोकळें होतें कीं, आम्ही काय स्टेट-सेक्रेटरीच्या हुकमतीचे बंदे गुलाम. त्यांनीं अमुक अमुक हुकूम असा कां दिला हें आम्हाला माहीत असलें तरी तें बाहेर सांगतां येत नाहीं. व तो आम्हालाहि पसंत न पडला तरी त्याचें समर्थन करणें आम्हाला प्राप्तच आहे. गंगाजळी पेढी हिंदुस्थानांत झाली तर ही सबब राहणार नाहीं व हरएक बाबतींत हिंदुस्थान-सरकारला जबाबदार धरतां येईल. वर्षांतून वरिष्ठ कायदेमंडळाच्या दोन बैठकी होतात. सरकारी जमाखर्च व अंदाजपत्रक हीं मंजूर नामंजूर म्हणतां येतात. आणि या सर्वांच्या वादविवादांत सरकारी पैशा-अडक्याचा व्यवहार कसा चालतो हें कळवून घेऊन त्याच्यावर टीका करतां येते व कांहीं बाबतींत नियंत्रणहि घालतां येतें.

हिंदुस्थान-सरकार व लोकपक्ष यांच्या भांडणांत लोकपक्षाचा नेहमीं हटकून जय होईल असा अर्थ नाहीं. परंतु ज्यांच्याशीं भांडावयाचें तो प्रतिपक्षी निदान समोर तरी उभा असतो. आणि त्याला हटकलें असतां त्याला कांहीं तरी जबाब द्यावा लागतो; कांहीं समर्थन करावें लागतें; कांहीं चूक आपल्या पदरांत घ्यावी लागते, प्रतिपक्षाचें म्हणणें कांहीं बरोबर आहे असें म्हणावें लागतें, व त्याप्रमाणें

थोडेंबहुत करावेंहि लागतें. गंगाजळी पेढी हिंदुस्थानांत काढण्याची खटपट करण्याच्या कामीं व उलट ती निघण्यास होतील तितक्या अडचणी आणण्याचे कामीं या तीन पक्षांपैकीं कोणाचा हेतु कसा आहे याची कल्पना वरील विवेचनावरून होईल.

## सरकार व लोकपक्ष

हिंदुस्थान-सरकार व लोकपक्ष यांची दृष्टि तंतोतंत एकच नसली तरी वेळीं त्यांच्यांत कांहीं तडजोडीनें एकमत होऊं शकतें, ही गोष्ट या बिलाच्या इतिहासांत दिसून आली आहे. कारण गेल्या सप्टेंबरमध्यें गंगाजळी पेढीचें बिल चर्चेला निघालें तेव्हां तिचें भांडवल भागीदारी पद्धतीनें उभारावें या कल्पनेला लोकपक्षानें विरोध केला. आणि हें भांडवल सर्वस्वी सरकारनेंच आपलें घालावें ही कल्पना बहुमतानें बिलांत प्रविष्ट केली आणि हिंदुस्थान-सरकारनें ती मान्य केली. पुढें पेढीचें नियामक मंडळ म्हणजे डायरेक्टर बोर्ड कसें असावें याचा वाद निघाला. त्यांतहि अखेर तडजोड होण्याचा रंग अगदीं आला होता. पण इतक्यांत स्टेटसेक्रेटरीकडून तारेनें खलिता येऊन हिंदुस्थान-सरकार व लोकपक्ष यांच्यांतील हा समेट लाथाडण्यांत आला! आणि आपल्या म्हणण्याचा विनंतिअर्ज घेऊन सर बेसिल यांना विलायतेस जावें लागलें. पण तेथें गेल्यावर स्टेट-सेक्रेटरीचाच हात इतका चालला कीं, सरकारी भांडवल या पेढींत घालण्याची जी गोष्ट, कांहीं अटींवर का होईना पण, हिंदुस्थान-सरकारनें मान्य केली होती तीहि गोष्ट स्टेट-सेक्रेटरीच्या आग्रहामुळें सर बेसिल यांना सोडून द्यावी लागली. व भागीदाराच्या तत्त्वावर रचलेलें नवीन बिल इकडे घेऊन यावें लागलें! सर बेसिल हे कितीहि हुषार किंवा आपल्या परीनें अरेराव असले तरी, विलायत-सरकारापुढें त्यांना नमतेंच घ्यावें लागणार. पण हें नवें बिल इकडे लोकांना मुळींच मान्य नव्हतें, म्हणून त्यांची फजिती झाली. ब्लॅकेटसाहेबांचे दोनहि दरडीवरचे हात निसटून त्यांना पाण्यांत पडावें लागलें आणि आपल्या सर्व मनोरथांना मुकावें लागलें!

तिसऱ्याच्या हातची आर्थिक सत्तेची भाकरी आधीं ओढून आपणा दोघांच्या हातीं घेऊं व मग वाटेल तर तिचा मोठा भाग कोणी घ्यावा, धाकटा कोणी घ्यावा याबद्दल आपापसांत भांडूं यापुरतें व या दृष्टीनें हिंदुस्थान-सरकार व लोकपक्ष यांचे गंगाजळी पेढीच्या बाबतींत एकमत होतें. १९१९ सालीं नव्या सुधारणा अमलांत आल्या तेव्हां स्टेट-सेक्रेटरी मॉंटेग्यूसाहेब यांनीं एक नवा संकेत असा निर्माण केला कीं, ज्या आर्थिक बाबतींत हिंदुस्थान-सरकार व लोकपक्ष यांचें एकमत होईल त्यांत विलायत-सरकारनें केव्हांहि सहसा बिघाड करूं नये. या संकेताला हल्लींच्या विलायत-सरकारनें मान दिला असता तर उभय पक्षांच्या समेटानें गेल्या सप्टेंबरमध्येंच गंगाजळी पेढी अस्तित्वांत आली असती. कारण भांडवल सरकारी असावें हें हिंदुस्थान-सरकारनें कांहीं अटींवर मान्य केलेंच होतें. आणि उलटपक्षीं कायदेमंडळानें प्रत्यक्ष कोणी डायरेक्टर निवडून देऊं नये हा हिंदुस्थान-सरकारचा आग्रह कदाचित् लोकांनीं मान्य करून त्याच्या मोबदला तोच हेतु साधणारी दुसरी कांहीं सूचना पुढें टाकली असती व ती हिंदुस्थान-सरकारनें मान्य केली असती. पण 'शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं' ही म्हण चांगलीच प्रत्ययाला आली. अर्थात् हें भांडण येथेंच संपलें असें नाहीं. किंबहुना त्याचा नुकताच प्रारंभ होय. म्हणून कल्पना अशी आहे कीं, पुढें-मागें कोणत्या तरी स्वरूपांत गंगाजळी पेढी स्थापित होईल व तसें झालें म्हणजे मग लोकांचें भांडण चालावयाचें तें विलायत-सरकाराशीं न चालतां हिंदुस्थान-सरकाराशीं सुरू होईल.

असो. अशा रीतीनें या नव्या गंगाजळी पेढीच्या वादाची थोडक्यांत कल्पना वाचकांना दिल्यानंतर आतां पुढें या पेढीकडून व्यवहार होणार तो कोणता व तिला गंगाजळी पेढी कां म्हणावयाचें याचें विवेचन पुढील लेखांत करूं.

---

# मुंबई इलाख्याचा जमाखर्च

सोमवार ता. २० रोजीं मुंबई प्रांतिक कायदेमंडळाची बैठक मुंबईस सुरू झाली. त्या वेळीं फडनवीस सर चुनीलाल मेथा यांनीं चालू वर्षाचें दुरुस्त अंदाजपत्रक आणि येत्या सालचें कच्चें अंदाजपत्रक कायदेमंडळापुढें मांडलें. त्या जमाखर्चाची वाचकांना कल्पना येण्याकरितां त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

## खातेवार जमा

(आकडे लक्ष रुपयांचे)

| खात्यांचें नांव | १९२६-२७ | १९२७-२८ (कच्चा अंदाज) | १९२७-२८ (दुरुस्त अंदाज) |
|---|---|---|---|
| शेतसारा | ४६७ | ५३० | ५४५ |
| अबकारी | ४०९ | ४०० | ३८६ |
| स्टँप | १६८ | १७८ | १७४ |
| जंगल | ७६ | ७४ | ७२ |
| नोंदणी | १२ | १३ | १२ |
| विशिष्ट कर | १९ | २२ | २१ |
| पाणीपट्टी | ४९ | ६४ | ५४ |
| व्याज | ११९ | १०९ | ११० |
| दिवाणी खातीं | ५९ | ५६ | ५७ |
| सिव्हिल वर्क्स | १६ | १७ | १७ |
| इतर | ४३ | ३७ | ५५ |
| एकूण | १४३७ | १५०० | १५०३ |

## खातेवार खर्च

| | | | |
|---|---|---|---|
| रेव्हिन्यू | ६६ | ६६ | ६७ |
| अबकारी | ३४ | ४७ | ४८ |
| जंगल | ४१ | ४२ | ४२ |
| नोंदणी | ७ | ७ | ७ |
| कालवे | ९५ | ११७ | १११ |
| व्याज | ११५ | १२४ | १२० |
| कर्जफेड | १२ | ९ | १० |
| कारभार | २२३ | २२३ | २२० |
| न्याय | ७४ | ७३ | ७४ |
| तुरुंग | २५ | २६ | २५ |
| पोलीस | १६७ | १६७ | १६७ |
| शिक्षण | १९९ | २०५ | २०५ |
| दवाखाने | ५० | ४८ | ४७ |
| आरोग्य | २० | २४ | २२ |
| शेतकी | २७ | २८ | २८ |
| सिव्हिल वर्क्स | १२२ | १२१ | १३३ |
| पेन्शन | ५६ | ५६ | ५२ |
| दुष्काळनिवारण | ११ | २० | २० |
| दुष्काळफंड | ३५ | ५ | ००० |
| स्टेशनरी | १५ | १८ | १८ |
| इंग्लंडांतील खर्च | ३३ | ३४ | ३५ |
| इतर | १०१ | ३६ | ४८ |
| एकूण | १५२८ | १४९२ | १५०६ |

## १९२८-२९ सालचें अंदाजपत्रक

( आंकडे लक्ष रुपयांचे )

| खात्याचें नांव | जमा रुपये | खर्च रुपये |
|---|---|---|
| जमीनमहसूल | ५३८ | ६५ |
| अबकारी | ३९१ | ५२ |
| स्टँप | १७० | .३ |
| जंगल | ७४ | ४५ |
| नोंदणी | १२ | ७ |
| विशिष्ट कर | २१ | ... |
| पाणीपट्टी (कालवे) | ५५ | ११० |
| व्याज | १०३ | १०५ |
| राज्यकारभार | ००० | २२३ |
| न्याय | १८ | ७४ |
| तुरुंग | ५ | २५ |
| पोलीस | ११ | १७० |
| शिक्षण | १३ | २०९ |
| दवाखाने | १३ | ५४ |
| आरोग्य | १४ | ३० |
| शेतकी | ४ | २९ |
| सिव्हिल वर्क्स | १८ | १२५ |
| पेन्शन | १३ | ५० |
| दुष्काळफंड | २१ | ७ |
| स्टेशनरी | ४ | १५ |
| वरिष्ठ सरकारास खंडणी | ..... | ३७ |
| इंग्लंडांतील खर्च | ..... | ३८ |
| इतर | ३२ | ९७ |
| एकूण | १५२६ | १५६० |

वरील जमाखर्चाच्या कोष्टकावरून मुंबई इलाख्यांतील खर्च किती उधळेपणानें चालला आहे त्याचे प्रत्यंतर येतें. गेल्या पांच वर्षांत सालअखेरची शिल्लक किती असे व त्यांत फॅमिनफंड किती असे व आतां त्या रकमा किती कमी झाल्या आहेत हें पुढील कोष्टकावरून कळून येईल.

## सालअखेरची शिल्लक (आकडे लक्ष रुपयांचे)

| वर्ष | चालू शिल्लक | फॅमिनफंड | एकूण शिल्लक |
|---|---|---|---|
| १९२३-२४ | ४५१ | ९४ | ५४५ |
| १९२४-२५ | ४९२ | १४४ | ६३६ |
| १९२५-२६ | ४६९ | १९५ | ६६४ |

| | | | |
|---|---|---|---|
| १९२६–२७ | २१७ | २४२ | ४५९ |
| १९२७–२८ | ७३ | १८१ | २५४ |
| १९२८–२९ | ७ | १६२ | १६९ |

पांच वर्षांपूर्वी जेथें साडेचार कोटि रुपये चालू शिल्लक होती तेथें आतां पुरी ७ लक्षांहि शिल्लक नाहीं. फॅमिन-फंड तरी वाढला आहे म्हणावें तर तोहि दोन वर्षांपेक्षां ८० लक्षांनीं उतरलेलाच दिसतो. गेल्या वर्षी गुजराथेंत झालेल्या प्रळयामुळें बरीचशी शिल्लक खर्च झाली खरी, पण बहुतेक चालू शिलकेचा तर फडशा तत्पूर्वीच पडला होता. फॅमिन फंडांत दरसाल ६३ लक्ष रुपये ठेवण्यांत यावे असा जो नियम आहे तो जाचक आहे व त्यामुळें चालू जमाखर्चाला धक्का बसतो हें खरें; तरी पण पाटबंधाऱ्यासारख्या कामावर त्या फॅमिन-फंडांतली अर्धी रक्कम खर्च करतां येते. पण आधीं फॅमिन-फंड म्हणून एकीकडे गंगाजळी ठेव ठेवावयाची व दुसरीकडे त्याच ठेवींतून लगेच पाटबंधारे वगैरे कामाकरितां खर्च करावयाचा ही पद्धतीच चुकीची असल्यानें यापुढें दरसाल १२ लक्ष रुपयेच फॅमिन-फंडांत ठेवावे व फंडाची कमाल मर्यादा ७५ लक्ष रुपयेच असावी आणि त्या फंडांतून प्रत्यक्ष दुष्काळनिवारणाच्या कामाशिवाय इतर कसलाहि खर्च होऊं नये असा नवीन नियम करण्यांत येणार आहे. त्याचप्रमाणें मुंबई-सरकारास अद्यापि वरिष्ठ सरकारला ३७ लक्ष रुपये खंडणी द्यावी लागते. हा बोजाहि जाचक असल्यानें तो बोजा उठला तरच मुंबई-सरकारच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी होणार आहे; नाहीं तर येत्या बजेटांतील ऐनजमाखर्चांत ३४ लक्षांची तूट येणार आहे!

# उधळा कारभार, असह्य करभार

मुंबई इलाख्याचें वार्षिक अंदाजपत्रक गेल्याचे मागील सोमवारीं सर चुनीलाल मेथा यांनीं कौन्सिलपुढें मांडलें आणि गेल्या आठवड्यांत त्यावर तीन दिवस सपाटून वादविवाद झाला. वादाचा निष्कर्ष हाच कीं, मुंबई इलाख्याच्या जमाखर्चास जें उधळेपणाचें वळण लागले आहे तें अद्यापि बदलत नाहीं किंवा आटोक्यांतहि येत नाहीं. गतवर्षीचें अंदाजपत्रक हें मेथासाहेबांचें पहिलेंच बजेट असल्यानें त्या वेळीं आम्ही अशी आशा प्रदर्शित केली होती कीं, एक–दोन वर्षांच्या अनुभवानें सर चुनीलाल मेथा हे जुन्या फडणावसांनीं सुरू केलेल्या दिवाळखोरीच्या कारभारास आळा घालून मुंबई इलाख्याच्या जमाखर्चाला नमुनेदार वळण लावतील. पण ही आशा खरी ठरण्याचें लक्षण दिसत नाहीं. गतवर्षीच्या बजेटांत मेथाजींनीं काटकसर करण्याचा थोडा तरी प्रयत्न केला होता, यंदाच्या बजेटांत तेवढाहि प्रयत्न झालेला दिसत नाहीं, आणि सर चुनीलाल यांच्या कारकीर्दीचें हें शेवटचेंच वर्ष असल्यानें यापुढें त्यांच्या हातून ही कामगिरी होण्याला संधीच राहात नाहीं.आणि या निराशेच्या वैतागानेंच यंदाच्या बजेटांत त्यांनीं फारसें मन घातलें नसावें असें वाटतें. कोर्ट फी व स्टांप ॲक्ट यांची मुदत वाढविण्याच्या वादविवादाच्या वेळीं त्यांनीं एका वर्षापुरती मुदत वाढवा म्हणजे पुरें असें म्हणून जी तडजोड केली तीवरून आपण अधिकारसूत्रें हातचीं ठेवल्यावर मग त्या जमाखर्चाचें कांहींहि होवो असला त्यांचा वैताग उघड व्यक्त होतो. पण मेथासाहेबांना, स्वतःवरची तेवढी जबाबदारी टळली म्हणजे झालें मग आपल्या पश्चात् कांहीं का होईना, असें वाटत असलें तरी इलाख्यांतील कर देणाऱ्या साऱ्याच रयतांना तसें वैतागून कसें चालेल? त्यांना या प्रश्नाची योग्य रीतीनें तड लाविली पाहिजे असेंच वाटत असल्यानें त्यांच्या दृष्टीनें या अंदाजपत्रकाचें निरीक्षण होणें जरूरीचें आहे.

रिफॉर्म आक्टाच्या उदयाबरोबरच उधळेपणाचाहि उदय झाला आणि त्या वेळेपासूनच या बकासुराची भूक शांत होण्याकरितां त्याला नवीन कराचें बलिदान करण्यांत येऊं लागलें. १९२१-२२ सालांत या इलाख्याचें सर्वसाधारण उत्पन्न १२ कोटि ७८ लक्ष होतें आणि खर्च किती करण्यांत आला तर १४ कोटि ८४ लक्ष! म्हणजे या नव्या मन्वंतरांतील पहिल्याच वर्षांत शिलकेंतल्या २ कोटि ६ लक्ष रुपयांचा फडशा उडाला! असला उधळेपणा सतत चालू राहणें शक्यच नसल्यामुळें उत्पन्नाची कांहीं तरी नवी बाब शोधून काढणें अपरिहार्य झालें व त्याकरितां कोर्ट फी स्टँप व जनरल स्टँप यांची किंमत वाढविण्यांत आली आणि करमणुकीवर नवाच कर लादण्यांत आला. हा कर बसवितेवेळीं असें अभिवचन देण्यांत आलें कीं, या करांतून जें उत्पन्न येईल तें शिक्षणाभिवृद्धीकडे खर्चण्यांत येईल. पण कर लादतांना दिलेलें वचन प्रत्यक्ष वसूल हातांत येऊं लागल्यावर बाजूसच राहून कर तेवढा डोक्यावर बसला

आणि शिक्षणाची वाढ मात्र त्या प्रमाणांत झाली नाहीं. नव्या सुधारणांच्या पहिल्याच अमदानींत असला दिवाळखोरपणा सुरू होऊन नवीन कर डोक्यावर बसूं लागलेले पाहताच कौन्सिलरांनीं हें तट्टू आवरण्याकरितां त्याच्या तोंडांत काटेरी लगाम दिला. त्या वेळच्या लोक पक्षाच्या बहुमताच्या बळापुढें सरकार हातटेकीस येऊन १९२२ ते १९२५ पर्यंत खर्चाचा आंकडा जमेच्या शिगेच्या आंत राखण्यांत आला. पण १९२६ सालापासून पुनः हें तट्टू उधळत चाललें! १९२६—२७ सालांत वार्षिक उत्पन्न १३ कोटि १२ लक्ष असून वार्षिक खर्च १४ कोटि २० लक्ष झाला! म्हणजे निवळ शिलकेंतल्या एक कोटि आठ लक्ष रुपयांचा चक्काचूर उडविण्यांत आला! यामुळें शिल्लक संपून गेल्यानें १९२७-२८ सालांत पुनः थोडासा हात आखडतां घेण्यांत आला. तरी पण जमा १३ कोटि ९४ लक्ष आणि खर्च १३ कोटि ९७ लक्ष होऊन तीन लक्षांची तूट आलीच! आणि १९२८—२९सालच्या अंदाजपत्रकांत तर मेथासाहेबांनीं गतसालाइतकाहि काटेकोरपणा राखला नसल्यानें जमा १४ कोटि ३६ लक्ष आणि खर्च १४ कोटि ७० लक्ष नमूद असून ३४ लक्षांची तूट पडणार आहे. प्रांतिक सरकाराकडून वरिष्ठ सरकाराकडे मेस्टन करारास अनुसरून जी ३७ लक्ष रुपयांची खंडणी भरणा करण्यांत येते तिची येत्या वर्षापासून सूट मिळेल या आशेवर मेथासाहेबांनीं आद्यापेक्षां खर्च अधिक दाखविणारें हें अंदाजपत्रक तयार केलें आहे. वरिष्ठ सरकारच्या फडणविसाकडून तसें वचन आगाऊ मिळालें असल्यामुळें कदाचित सर चुनीलाल यांनीं खर्चाविषयीं इतकी बेफिकिरी दाखविली असेल. तरी पण ही खंडणीची ३७ लक्षांची रक्कम वजा टाकली तरी खर्चाचा आंकडा १४ कोटि ३३ लक्ष रुपये राहतो त्याची वाट काय? १९२२-२३ सालापासून १९२७-२८ सालापर्यंतच्या सहा वर्षांच्या जमेची सरासरी १३ कोटि ८३ लक्ष भरते आणि त्याच सहा वर्षांतील खर्चाची सरासरी १३ कोटि ६७ लक्ष भरते. अर्थातच उत्पन्न प्रत्यक्ष वाढल्याशिवाय वार्षिक खर्चाचा आंकडा केव्हांहि १३ कोटि ८३ लक्ष रुपयाच्या मर्यादेच्या पलीकडे जाऊं देणें म्हणजे पूर्वीच्या अनुभवाकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करण्यासारखें आहे. पण मेथासाहेबांनीं आपलीं अधिकारसूत्रें खालीं ठेवतांना भलेपणा मिळविण्याकरितां खर्चाचें तोंड मोकळें सोडून ही खैरात केली असावी. पण या उधळपट्टीच्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याकरितां त्यांना दोन गोष्टी अगाऊ गृहीत धराव्या लागल्या आहेत. वरिष्ठ सरकार खंडणीची सूट सोडील ही पहिली गृहीत गोष्ट होय आणि स्टांप आक्ट व कोर्ट-फी आक्ट यांची मुदत चालू वर्षअखेर संपत असली तरी ती मुदत पुनः वाढविण्यांत येईल ही दुसरी गृहीत गोष्ट होय. सर चुनीलाल यांच्या सुदैवानें या दोनहि गोष्टी त्यांच्या मनाजोगत्या घडून आल्या तरी तेवढ्यानें त्यांच्यावरचा उधळेपणाचा आक्षेप उडून जातो असें नाहीं. कारण असल्या अनुमान धपक्यावर खर्चाची मदार अवलंबून ठेवणारा फडणवीस खरा हिशेबी नव्हे.

स्टांप आक्ट व कोर्ट फी आक्ट यांची मुदत एक वर्ष वाढविण्याला कायदे-मंडळाची कशीबशी संमति मिळाली आहे आणि यापुढे दिल्ली—सरकाराकडून खंडणीची सूटहि मिळाली तरी देखील मेथासाहेबांना आपल्या अंदाजपत्रकांत शिक्षणासारख्या महत्त्वाच्या व उपयुक्त खात्याकडे जरूरीइतका खर्च करण्यास सवड सांपडूं नये आणि दांत कोरून पोट भरण्याची हांव धरणाराप्रमाणें हायस्कुलांची व कॉलेजांची फी वाढवून, इमारतीकरतां यावयाच्या ग्रँटस बंद ठेवून, ट्रेनिंग कॉलेजाचे वर्ग बंद करून, सक्तीचें शिक्षण सुरू करण्याचे विनंति अर्ज नाकारून शिक्षणखात्याची विल्हेवाट लावण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारावा हें अत्यंत अश्लाघ्य होय. उच्च शिक्षणाचे कट्टे द्वेष्टे लॉर्ड सिडनहॅम यांनीं उच्च शिक्षणाची खच्ची करण्याकरितां फी वाढविण्याचा हा उपक्रम केला व तो सिडनहॅमी काव्याला साजेसाच होता. पण सर चुनीलाल यांनीं केवळ दोन लक्ष रुपयाची उत्पन्नांत भर घालण्याकरितां फी वाढविण्याचें पातक करण्यास प्रवृत्त व्हावें याचें सखेदाश्चर्य वाटतें! चौदा कोटींचा कारभार करणाऱ्या फडनविसांना दोन लक्ष रुपयांची तूट भरून काढण्याला बिचाऱ्या विद्यार्थ्यांचे खिसे कातरण्याशिवाय दुसरा कोणताच उपाय सुचला नाहीं काय? मेथांनीं स्वीकारलेला हा मार्ग तर निंद्य आहेच, पण त्यांत त्यांचा हेतूहि सफल होणार नाहीं हें आम्ही त्यांस आगाऊच बजावून ठेवतों. कारण सरकारी हायस्कुलांतील व कॉलेजांतील फीचा बोजा आधींच असह्य असल्यानें विद्यार्थ्यांची संख्या घटत चालली आहे आणि तो बोजा आणखी वाढल्यास ती संख्या आणखी कमी होऊन फीचें उत्पन्न वाढण्याच्याऐवजीं तें उलट कमी मात्र होईल.

विद्यार्थ्यांची फी वाढविल्यास उत्पन्न अधिक न येतां तें कमीच येईल अशी वेळ येऊन पोंचली आहे असें जें विधान आम्ही केलें तें विधान इतर अनेक बाबतींतहि लागू आहे आणि सरकार मात्र त्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करीत आहे. कोणताहि कर किंवा दर वाढविला आणि वाढीच्या प्रमाणाइतकें उत्पन्न जर

वाढलें नाहीं तर तो कर किंवा दर जाचक होऊं लागला अशी खूणगांठ मारून ठेवावी आणि त्या उत्पन्नांत उलटी तूट येऊं लागली तर कर भरणाऱ्यांच्या हलाखीला सीमाच राहिली नाहीं असेंच खात्रीनें समजावें. पोस्टाचे दर वाढले, रेल्वेचें भाडें वाढलें, स्टँप फी वाढली या व अशाच प्रकारच्या सर्व वाढींचा परिणाम असाच दिसून आला कीं उत्पन्नांत जशी वाढ व्हावी तशी ती न होतां कांहीं बाबतींत तर तें उलट घटत चाललें आहे. ही हलाखीची स्थिति ओळखून रेल्वेखात्याचे मंत्री सर जॉर्ज रेनी यांनीं उतारूंचें व मालाचे भाडें कमी करून उत्पन्न वाढविण्याचा प्रयोग करून पाहण्यास सुरुवात केली आहे व त्याचा त्यांना उत्तेजनकारक असाच अनुभव येईल. पोस्टखात्यानेहि कार्डापाकिटांच्या व तारांच्या बाबतींत हेंच धोरण स्वीकारावयास हवें. पण त्या खात्याच्या वरिष्ठांचे डोळे अद्यापि उघडत नाहींत. अस्तु. मुंबई इलाख्या पुरतेंच बोलावयाचें झाल्यास कोर्ट फी व स्टांप या खात्यांत तसाच अनुभव येऊं लागला आहे. तरी पण आमचे मेथा त्या कायद्यांची मुदत आणखी एकेक वर्ष वाढवीतच आहेत !

अबकारीच्या उत्पन्नांतहि तूट येऊं लागली हेंहि मुंबई इलाख्यांतील व्यापारविषयक हलाखीचेंच निदर्शक आहे. अशी हलाखी आपल्याच एका प्रांतांत दिसून येते का ती सार्वत्रिक आहे हें पाहण्यास सर चुनीलाल यांनीं मद्रास, बंगाल, संयुक्त प्रांत, पंजाब वगैरेकडे नजर फेकली. तींत त्यांना बंगाल प्रांतांतहि स्टांपाच्या उत्पन्नांत गतवर्षी २८ लाखांची तूट आल्याचें आढळून आलें. पण इतर कोठेहि तशी तूट दिसेना; तेव्हां त्यांनीं आपल्या मनाच्या समाधानासाठीं असा तर्क लढविला कीं, बंगाल व मुंबई हे दोनहि प्रांत व्यापारप्रधान आहेत आणि मद्रास, संयुक्त प्रांत इत्यादि भाग हे कृषिप्रधान आहेत. तेव्हां उद्योगधंद्यांतली मंदाई बंगाल व मुंबई या दोन प्रांतांना भोवत आहे, इतर प्रांतांना भोवत नाहीं, हें स्वाभाविकच आहे! परंतु मेथाशेठजींचें हें अनुमान अगदींच डळमळीत पायावर उभारलेलें आहे. मुंबई इलाख्यांतल्या गिरण्यांच्या हलाखीमुळें येथील स्टांपाचें उत्पन्न कमी येऊं लागलें हें खरें, पण गिरण्यांच्या हलाखीला तरी कारण काय? शेतकऱ्यांची सुस्थिति असल्यास गिरण्यांच्या मालाला गिऱ्हाईक मिळतें व गिरण्या भरभराटत जातात. उलटपक्षीं शेतकऱ्यांच्याच घरीं नकार घंटा वाजूं लागल्यावर गिरण्याहि डबघाईस येतात. यास्तव मुंबई इलाख्यांतील गिरण्यांच्या दुःस्थितीचें मूळ शोधूं गेल्यास तेंहि शेतीच्या अवनतींतच आढळून येईल. पण जेथें प्रत्यक्षच पुरावा आहे तेथें तर्क व अनुमान करीत बसण्याचें कारणच नाहीं. शेतसाऱ्याच्या वसुलाचे आंकडे पाहिल्यास त्यावरून याचा उलगडा होऊं शकेल. रिव्हिजन सेटलमेंट करून शेतसारा वाढविण्याचा सरकारचा खटाटोप एकसारखा चालू आहे. त्याबरोबरच शेतीच्या व शेतकऱ्याच्या स्थितींत सुधारणा होत गेली असती तर जमीन–महसुलाचे आंकडे किती तरी फुगत गेले असते. आणि वस्तुस्थिति तर त्याच्या उलट दिसत असल्यानें मेथांनीं निराशेनें असे उद्गार काढले कीं, १९२६-२७ सालांत जमीन महसूल जितका कमी जमा झाला तितका तो गेल्या आठ वर्षांत कधींच कमी आला नव्हता. एखाद्या वर्षी दुष्काळामुळें बाकी थकून राहते; पण शेतकऱ्यांची दुरवस्था कायमची नसल्यास ती थकलेली बाकी पुढें एकदोन वर्षांत वसूल होते. आणि येथें पहावें तों १९२६-२७ सालांतली सूट पुढेंहि दोन वर्षांत भरून आलेली नाहीं.

शेतीच्या हलाखीचें आणखी एक प्रमाण याच बजेटांत सांपडतें; तें असें कीं, शायलॉकशाही सरकारनें उंसाच्या पिकाला द्यावयाच्या पाण्याचा आकार पूर्वी दरएकरी ४५रु. होता तो ६६ रुपये पर्यंत वाढविला होता. हा जबर आकार भरणें अशक्य आहे अशी मळेवाल्यांनीं तक्रार केली तरी तिचा उपयोग झाला नाहीं. पण एवढा जबर कर भरून आंतबट्ट्याचा व्यवहार करण्याचें नाकारून रयतांनीं जेव्हां ऊंस लावण्याचेंच सोडून देण्याचें ठरविलें तेव्हां सरकार शुद्धीवर आलें आणि आतां मेथासाहेब जाहीर करतात कीं, गुळाचा भाव फारच मंदीचा झाल्यानें उंसाच्या पाण्याचा आकार पूर्वीइतकाच म्हणजे एकरीं ४५ रुपयेच कायम केला आहे. कर वाढविला असतां उत्पन्न न वाढतां उलट पूर्वी इतकेंहि उत्पन्न येईनासें झालें म्हणजे कराचा भार असह्य झाला असें खात्रीनें समजावें असें जें तत्त्व आम्हीं वर नमूद केलें आहे त्याची प्रचीति आल्यानें सरकारनें उंसाच्या पाण्याच्या बाबतीपुरता आपला हट्ट सोडला. तथापि शेतसारा, कोर्टफी, स्टांप, शाळेची फी, कॉलेजची फी या सर्वांना हेंच तत्व सारखेंच लागू असल्यानें एके ठिकाणच्या अनुभवानें सरकारने सावध होऊन दुसरीकडचीहि चूक सुधारावयास पाहिजे. पण एके ठिकाणीं ठेंच लागली तरी त्या अनुभवानें शहाणपण शिकावयाचें नाहीं आणि दुसऱ्यांदा लागणारी ठेंच टाळावयाची नाहीं असा सरकारचा दुराग्रहच असल्यास त्यास पदोपदीं ठेंचा लागण्याचा प्रसंग येणार हें उघड आहे.

येथवर बजेटांतील सर्वसाधारण खात्यांचाच विचार झाला. त्यांतच जर इतका बेतालपणा आढळून येतो तर याच्या पुढचा बॅकबेच्या भरावाचा आणि एकंदर डेव्हेलपमेंट खात्याचा विचार करूं लागल्यास त्यांतला सरकारचा उतावळेपणा व उधळेपणा पाहून कोणीहि विचारी मनुष्य आश्चर्यचकित होईल यांत नवल काय? आमदार नरीमन यांनीं एवढी आपत्ति सोसून ज्या कामांतलीं काळींबेरीं बिंगें बाहेर काढलीं त्याच कामावर येत्या बजेटांत आणखी ४८ लक्ष रुपये खर्च होणार आहेत. पण ही खर्चाची रक्कम जमेच्या फुगविलेल्या रकमेच्या आड दडवून टाकण्यांत आली आहे. बॅकबेच्या भरावानें जी जमीन तयार होत आहे तिची विक्री केल्यास २ कोटि ५ लक्ष रुपये किंमत येईल असें गृहीत धरून या कामावरील खर्च ४८ लक्ष रुपये सदर किंमतींतून वजा टाकून या कामावर खर्चाच्या ऐवजीं उलट सुमारें १ कोटि ६० लक्ष रुपये जमा दाखविले आहेत. या बाबतींत सरकारला 'यो ध्रुवाणि परित्यज्य अध्रुवं परिषेवते। ध्रुवाणि तस्य नश्यन्ति अध्रुवं नष्टमेव च' असाच कटु अनुभव आतांपर्यंत आला असून पुढेहि त्याची पुनरावृत्ति होण्याचा संभव आहे. असें असून सरकार हा नाद सोडून देत नाहीं व त्यास तो सोडून देण्याला भाग पाडण्याइतकें कायदे-कौन्सिलांत मतैक्य नाहीं याचाच विषाद वाटतो.

एवंच, मुंबई-सरकारच्या जमाखर्चाचीं सूत्रें सर चुनीलाल मेथा यांच्या हातीं आल्यानें जी किंचित आशा वाटूं लागली होती ती पार वितळून जाऊन सरकारचा उधळेपणाचा कारभार या इलाख्याला आणखी कांहीं वर्षें तरी असाच भोवणार आणि या उधळेपणाची संपादणी करण्याकरितां रयतेच्या डोक्यावरील आधींच असह्य झालेला करभार असाच कायम राहणार असें वाटूं लागलें आहे. नुसत्या साध्या तक्रारीनें सरकारचे डोळे कांहीं उघडत नाहींत असा आजवरचा अनुभव आहे आणि त्या निराशेच्या उद्वेगानेंच अलीबाग व बार्डोली तालुक्यांत सत्याग्रहाची चळवळ चालू झाली आहे. या सत्याग्रहाच्या चळवळीचें अंजन डोळ्यांत गेल्यावर तरी सरकारचें डोकें ताळ्यावर येतें काय तेवढेंच पाहावयाचें आहे. पण तें अंजन परिणामकारक होण्यास चळवळ चिकाटीनें व जुटीनें चालली पाहिजे. तशी ती चालविण्यांत येईल तरच तिचा व्हावा तसा उपयोग होईल.

# रिझर्व्ह बँक किंवा गंगाजळी पेढी

(ले.—न. चिं. केळकर.)

(ले. २ रा)

## या पेढीचा व्यवहार

मागील लेखांत गंगाजळी पेढीच्या बिलाचा वाद कां व कसा होता हें सांगितलें. आणि ही नवी पेढी काय काम करणार हेंहि तेवढ्यापुरतेंच सांगितलें होतें. तथापि तिच्या महत्वाची खरी कल्पना येण्याकरितां तिच्या व्यवहाराची थोडी अधिक फोड करून सांगितली पाहिजे. या पेढीच्या कामांत एक भाग खासगी व्यापाराच्या स्वरूपाचा व दुसरा सरकारी अधिकाराच्या उपयोगाचा आहे. पैकीं खासगी व्यापाराचा भाग म्हटला म्हणजे (१) कर्ज देणें घेणें (२) कर्जरोख्याचा व्यवहार करणें व (३) हुंड्या पटविणें हा होय.

पण हा व्यवहार करणारी इंपीरिअल बँक व अर्थात् इतर खासगी बँका अस्तित्वांत राहाणारच असल्यामुळें या पेढीमार्फत हा व्यवहार फार थोडा होईल. उदाहरणार्थ, खासगी लोकांना कर्ज लागल्यास त्यांचें कर्ज इंपीरिअल बँक व इतर बँका भागवतील. त्याकरितां या बँकेकडे कोणास जाण्याचें कारण नाहीं. सरकारलाहि जर केव्हां कर्ज लागलें तर ही बँक तात्पुरतें देऊं शकेल; आणि स्वतः सरकारनें कर्ज काढावयाचें ठरविलें तर ही पेढी अस्तित्वांत आल्यावर तो व्यवहार सरकार प्रायः ह्या बँकेकडून करवील. मात्र सरकारला उचलून दिलेलें कर्ज भरभक्कम तारण घेऊनहि शिवाय सामान्यतः तीन महिन्यांपेक्षां अधिक मुदतीवर ठेवणार नाहीं. इंपीरिअल बँक किंवा खासगी पेढ्या अधिक मुदत देऊं शकतात व प्रायः देतातहि.

स्वतः कर्ज घेण्यासंबंधानें ह्या पेढीला कारण पडणार नाहीं हें उघड आहे. मात्र एक विशेष कारण आहे. आणि तेव्हांहि हें कर्ज ही पेढी जाणूनबुजून कांहीं एका हेतूनें घेईल. तें कारण असें— बाजारांत नाणें, नोटा किंवा पतीवरचा व्यवहार किती चालू द्यावा हें ठरविण्याचें धोरण ह्या नव्या पेढीकडे येणार असल्यामुळें, एखादे वेळीं बाजारांत कृत्रिम कारणांनीं उलाढाली सुरू झाल्या, सट्ट

होऊं लागले, नाणें विनाकारण पुष्कळ वाढलें, किंवा बँकांतून आपल्या पतीवर अधिक आगळा पैसा किंवा उधारी कर्ज घेऊन लोक पैशाखेरीज इतर पदार्थांचे सौदे फाजील लाभाच्या बुद्धीनें करूं लागले, तर अशा वेळीं बाजारची थोडी तंगी करणें हें समाजाच्या हिताचें होऊं शकेल. म्हणून अशा वेळीं ही पेढी बाहेरचा पैसा आपणाकडे आण्याकरितां मुद्दाम कर्जहि काढील. किंबहुना तसें करणें हें एक कर्तव्यच होईल. परंतु याव्यतिरिक्त स्वतःच्या व्यवहाराकरितां असें तिला कर्ज काढावें लागणार नाहीं.

दुसरा व्यवहार कर्जरोख्यासंबंधाचा. या संबंधानें विशेष सांगण्याचें कारण नाहीं. ही पेढी या संबंधानें जो व्यवहार करील तो मुख्यतः कोणास दिलेल्या कर्जाबद्दल तारण ठेवून घेण्याकरितां किंवा सरकाराकरितां किंवा गंगाजळीची भर करण्याकरितां करील.

तिसरा व्यवहार हुंड्या पटविण्याचा. पण याहि बाबतींत ही पेढी अपील कोर्टासारखी होईल. म्हणजे सामान्य मनुष्याच्या हुंड्या पटविण्याचें काम इंपीरिअल बँक व इतर बँका करतीलच. पण या बँकांना जेव्हां आपण स्वीकारलेल्या हुंड्या ताबडतोब पटवून त्याची रोकड करण्याची इच्छा होईल, किंवा या पेढ्यांना कर्ज लागेल तेव्हां ही नवी पेढी त्यांच्या सोईकरितां हा व्यवहार करील. हुंड्यांच्या या सामान्य व्यवहाराला 'डिस्काउंटिंग' असें म्हणतात व ही पेढी हुंड्यांचा जो व्यवहार करील त्याला 'रिडिस्काउंटिंग' असें स्वरूप राहील. या तीनहि प्रकारच्या व्यवहारांत या नव्या पेढीला अर्थातच फायदा होईल. पण हा तिच्या व्यवहाराचा मुख्य भाग मानण्यांत येणार नाहीं.

याशिवाय पेढीचा 'क्लिअरिंग हाऊस' सारखाहि उपयोग होऊं शकेल. म्हणजे निरानिराळ्या बँकांच्या देण्याघेण्याची हिशेबी वजावाटीहि ह्या पेढीमार्फत होऊं शकेल. प्रत्यक्ष पैसा दिल्याशिवाय किंवा घेतल्याशिवाय वजावाट करणें ही एक व्यापारांतील मोठी सोय असते व ज्या निरनिराळ्या बँकांचा या पेढीशीं व्यवहार चालेल त्यांच्या व्यवहाराचा वरचेवर परस्पर हिशेब बजावाट करण्याचें ही पेढी हें एक मोठें साधन होऊं शकेल.

हा सर्व व्यवहार सामान्य पद्धतीचा झाला. पण सरकारी अधिकारी पद्धतीचा म्हणून जो व्यवहार ही सरकारी पेढी करील तोच खरा महत्त्वाचा असून त्यांत या पेढीचें वैशिष्ट्य राहणार आहे. तो व्यवहार म्हणजे सोने विकत घेणें विकणें चलनी नोटा काढून पुरविणें व नाणें पुरविणें हा होय. पण या यासंबंधानें एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही कीं, नाणें व चलनी नोटा पुरविण्याचा अधिकार जरी या नव्या बँकेकडे येईल तरी प्रत्यक्ष टांकसाळ व चलनी नोटा छापण्याचा छापखाना या गोष्टी सरकारच्या हातींच राहतील. परंतु आजच्या व पुढील स्थितींत फरक हा होईल कीं किती रुपये पाडावे व किती चलनी नोटा छापाव्या याचा विचार सरकार यापुढें स्वतः करणार नाहीं. तो विचार करण्याचें काम या नव्या पेढीकडेच सोंपाविण्यांत येईल. आणि प्रत्यक्ष व्यवहार असा चालू लागेल कीं, नाणें व चलनी नोटा यांच्या संबंधानें कोणास किती मागणी करावयाची असेल ती या पेढीकडेच करावी लागेल. सरकारच्या करन्सी ऑफिसकडे करतां येणार नाहीं. पेढीकडे केलेली ही मागणी तिला हातीं असलेल्या साधनांतून भागवितां आली तर ती भागवील. पण जेव्हां ती या पेढीला इतर रीतीनें भागवितां येणार नाहीं तेव्हां आणखी किती नाणें पाहिजे किंवा किती चलनी नोटा पाहिजेत याचा कयास व निश्चय ही पेढी आपल्या मनांत करील व त्याप्रमाणें सरकारकडे मागणी करावयाची ती हीच पेढी करील.

तिला चलनी नाणें पाहिजे असेल तर ठराविक दराप्रमाणें सरकारकडे चांदी भरावी लागेल व मग सरकार आपल्या टांकसाळींतील अधिकाऱ्याकडून त्या चांदीचे रुपये ठराविक दराप्रमाणें पाडून या पेढीच्या स्वाधीन करील. याच्या उलट आपल्या हातीं उगाच फाजील नाणें आहे असें वाटलें व तें काढून टाकावेंसें वाटलें तर तिला असाहि अधिकार राहील कीं, सरकारकडे जावें व हें नाणें परत घ्या असें सरकारास तिनें म्हणावें. आणि सरकारनें तें परत घेऊन तिला त्याचा मोबदला अवश्य असेल त्या स्वरूपांत द्यावा. चलनी नोटा काढावयाच्या त्या सरकारी छापखान्यांत प्रायः छापवाव्या लागतील. परंतु हल्लीं त्या नोटा सरकारी म्हणून छापल्या जातात त्या यापुढें या पेढीच्या म्हणून तिच्या नांवानें छापल्या जातील. मात्र या पेढीपेक्षां सरकारचा विश्वास व आधार लोकांना केव्हांहि अधिक वाटणार म्हणून नोटा बँकेच्या नांवच्या असल्या तरी निदान कांहीं दिवसपर्यंत, म्हणजे पेढीचा विश्वास लोकांना पुरा पटेपर्यंत, त्या नोटांवर सरकारी मुख्य अधिकाऱ्याची सही व राजा-बादशहाच्या चित्राचा छाप ठेवण्यांत येईल. म्हणजे व्यवहार जरी पेढीच्या नांवाचा तरी अखेर तारण सरकारचें आहे असा लोकांना विश्वास पटेल.

विलायतेंत 'बँक ऑफ इंग्लंड'ला व इतर फक्त १–२ बँकांना आपल्या नांवानें नोटा काढण्याचा अधिकार आहे व या नोटांवर सरकारी अधिका

त्याची सही किंवा राजाचा छाप असत नाहीं. पण त्याचें कारण त्या बँकेच्या व्यवहारावर तिकडील लोकांचा विश्वास तितका पटलेला आहे. तिकडील या बँकांनीं देखील चलनी नोटा किती काढाव्या याला कायद्यानें मर्यादा घातलेली आहे व या बँकेचा जो हिशेब वेळोवेळीं प्रासद्ध होतो त्यावरून ही मर्यादा संभाळली जात आहे, इतकें पाहून लोकांचे समाधान होतें. आमच्या या गंगाजळी पेढीचे हिशेब असेच वेळोवेळीं प्रसिद्ध होत जातील आणि तिलाहि या बाबतींत कायद्याचें बंधन राहील. तथापि तेवढ्यानेंच लोकांचे तूर्त कदाचित् समाधान होणार नाहीं; म्हणून वर सांगितलेली अधिकाऱ्याची सही व बादशहाच्या छापाची योजना कांहीं दिवस चालू ठेवण्यांत येईल.

सरकारी अधिकारानें होणाऱ्या या दुसऱ्या प्रकारच्या व्यवहारांत बराच फायदा आहे. तो फायदा हल्लीं सरकार आपणाकडे घेतें. त्याचें कारण सर्व व्यवहाराची जबाबदारी सरकारनें हल्लीं आपणाकडे ठेविली आहे. पण गंगाजळी पेढी अस्तित्वांत आली म्हणजे सरकार हा सर्व व्यवहार त्या पेढीकडे देईल व त्या व्यवहाराबरोबर त्या व्यवहाराचा फायदाहि अर्थात् बँकेकडेच जाईल. या फायद्याचा उपयोग मात्र केवळ ती एक उत्पन्नाची बाब समजून, मामुली खर्चाकडे पेढीनें करावयाचा नाहीं. तर त्याचा मुख्य उपयोग म्हटला म्हणजे गंगाजळी वाढवून समृद्ध करणें हा आहे. हल्लीं चलनी नाणें व चलनी नोटा काढण्याच्या व्यवहारांत सरकारला सुमारें ४½ कोटि रुपये नफा होतो. तो कसा होतो हे पुढें सांगण्यांत येणार आहे. तूर्त इतकेच सांगतों कीं, लोकपक्षाची मागणी आहे त्याप्रमाणें ही बँक सरकारी भांडवलानेंच उभारण्यांत आली तर ही पेढी व सरकार याशिवाय या फायद्याला तिसरा कोणी भागीदार असणार नाहीं. म्हणून सालोसाल जो ऐननफा मिळेल त्यांतील सुमारें निमा भाग प्रथम कांहीं वर्षे अवश्य तितका सुवर्णनिधि जमविण्याकडे खर्च होऊन सुमारें निमा नफा सरकारकडे जमा होईल. उलट ही पेढी सरकारी भांडवलानें न उभारतां भागीदार पद्धतीनें उभारली गेली तर सरकारला जो नफा मिळावयाचा तो नफा भागीदारांना वांटून देण्यांत येईल. परंतु ही नवी पेढी केवळ भागीदारांच्या फायद्याकरितां स्थापण्यांत येणार नाहीं. व्यक्तिलाभापेक्षां, तिचा कांहीं उच्च हेतु व उद्दिष्ट आहे. एकंदर राष्ट्राची पत संभाळणें व बाजार संभाळणें हीं जोखमीचीं कामें या पेढीकडे राहाणार म्हणून खासगी भांडवल घालणाऱ्या भागीदारांना झालें तरी कांहीं मर्यादेपर्यंतच हा नफा वांटून देण्यांत येईल. त्याशिवाय उरणारा नफा वर लिहिल्याप्रमाणें सुवर्णनिधि जमवून वाढविण्यांत व राष्ट्राची पत वाढविण्यांकडे उपयोगांत आणण्यांत येईल.

पण वर दर्शविलेला हा सुवर्णनिधि कां जमवावयाचा व कां वाढवावयाचा व त्यानें राष्ट्राची पत कशी राखली जाणार किंवा वाढली जाणार ही मुख्य गोष्ट अद्याप सांगावयाचीच आहे. परंतु ती समजण्यापूर्वी हल्लीं देशांतील पैशाअडक्याचा व्यवहार व परदेशाशीं व्यापार कसा चालतो याचें सामान्यतः वर्णन देणें अवश्य आहे. तो व्यवहार समजल्याशिवाय गंगाजळी ही चीज काय आहे हें समजणार नाहीं. आणि गंगाजळीची समजूत पडल्याशिवाय या नव्या गंगाजळी पेढीचें स्वारस्य व महत्त्वहि कळणार नाहीं. म्हणून देशांतल्या देशांत चालणाऱ्या पैशाअडक्याच्या व परदेशांशीं होणाऱ्या व्यापाराच्या व्यवहारासंबंधानें कांहीं गोष्टी सांगणें अवश्य आहे. त्या पुढील लेखांत सांगूं.

# चीनचें अन्तरंग

## लेखांक ३ रा

चिनांतील राष्ट्रीय व रशियांतील बोल्शेव्हिक यांचें सूत प्रारंभीं चांगलें जमलें. कारण भांडवलवाल्या युरोपियन व्यापाऱ्यांच्या तावडींतून चिनास सोडविण्याचा उद्देश दोघांसहि सामान्यच होता. राष्ट्रीय पक्षास चिनांत मध्यवर्ती व मजबूत सत्ता स्थापन करावयाची होती. हें कार्य फार बिकट व व्यापक होतें. त्यास रणसाहित्य व द्रव्यसाहाय्य या दोहोंची गरज असून राष्ट्रीयपक्षापाशीं त्या दोन्ही गोष्टींचा अभाव होता. आधुनिक पद्धतीचें रणसाहित्य युरोप अगर अमेरिका याच खंडांतून मिळावयाचें. पण त्या खंडांतील प्रमुख राष्ट्रांस ही गोष्ट वावडी असल्यानें तो मार्ग राष्ट्रीयपक्षास खुंटल्याप्रमाणेंच होता. अशा स्थितींत रशियाची मदत घेण्यावांचून राष्ट्रीय पक्षास गत्यंतर नव्हतें. रशिया स्वतंत्र आहे व त्याची गणना युरोपखंडांत करता येण्यासारखी आहे. युद्धशास्त्रांत तो युरोपांतील कोणत्याहि राष्ट्राची बरोबरी करील. त्याजबरोबर चिनी राष्ट्रीयपक्षानें सख्य जोडण्याचें ठरविल्यावर बोल्शेव्हिक लोक

त्यास सर्व सामग्री पुरवूं लागले. त्यांस दारू-गोळा, तोफा व बंदुका यांचा पुरवठा रशियांतून झाला. इतकेंच नव्हे तर रशियन सैनिकांनीं व सेनापतींनीं नवीन पद्धतीचें कवाइती शिक्षण चिनी तरुणांस देण्याची महत्त्वाची व जरूरीची कामगिरीहि बजावली.

बोल्शेव्हिकांनीं या प्रकारें चिनी राष्ट्रीय पक्षाचें कार्य साधून दिलें खरें, पण त्याबरोबरच आपलेंहि कार्य साधलें. त्यांना आपल्या मताचा प्रसार चिनांत करावयाचा होता. त्याकरितां बोरोदिन प्रभृति प्रचारक चीन देशांत ठिकठिकाणीं पेरून ठेवण्यांत आले. त्यांनीं कम्युनिझमचा म्हणजे समाजसत्तावादाचा अभ्यास करण्याकरितां मंडळें स्थापन केलीं, त्यांत शिकून तयार झालेल्या तरुणांच्या मार्फत शेतकऱ्यांचे व कारखान्यांतील मजुरांचे संघ उत्पन्न केले आणि चिनी भाषेंत वर्तमानपत्रें व पुस्तकें छापून ता सर्वत्र फैलावून दिलीं. कांहीं चिनी तरुणांस मास्को येथें समाजसत्तावादाचें वरिष्ठ शिक्षण संपादन करण्याकरितां पाठविण्यांत आलें. चिनी स्त्रियांत स्त्रीस्वातंत्र्याची चळवळ पूर्वी नव्हती, तिचें बीजारोपण डॉ.सन्यत्सेन यांच्या पत्नीच्या मदतीनें करून त्याची मजल हँकौ येथें स्त्रियांसाठीं स्वतंत्र महाविद्यालय स्थापण्यापर्यंत गेली. आतां त्या ठिकाणीं स्त्रियांना लष्करी शिक्षण देण्याचीहि सोय झाली आहे !

## राष्ट्रीय पक्षाचें ध्येय

एकीकडे बोल्शेव्हिक मतांचा शिरकाव चीनच्या कोनाकोपऱ्यांतून चालू होता व दुसरीकडे राष्ट्रीय पक्ष आपली युद्धाची तयारी करीत होता. पेकिंग शहर राष्ट्रीय पक्षाच्या हातीं येण्यांत राष्ट्रीय पक्षाचा खरा विजय होता. कारण मध्यवर्ती सत्तेचा तो पाया होय. पेकिंग शहर काबीज करणें जितकें महत्त्वाचें तितकेंच प्रयासाचें. त्या कार्यास हात घालण्यापूर्वी राष्ट्रीय पक्षानें आपलें ध्येय चिनी जनतेच्या कानावर घातलें. त्यानें चिनी जनतेस पुढील गोष्टी कळविल्या.( १ ) स्वदेशांतील साम्राज्यवादी पक्ष व परदेशचे साम्राज्यवादी लोक यांपासून चीन देशाची सुटका करणें (२) लोकसत्ता स्थापून मताधिकार सर्वांस देणें ( ३ ) देशात आर्थिक व सामाजिक सुधारणा घडवून आणणें. या संदेशाचें इंगित बहुजन समाजास कळण्यासारखें नव्हते. तरी सामान्य जनतेचा तृतीय नेत्र जो जाणता सुशिक्षित वर्ग त्यास हें इंगित समजलें. आणि त्यांजमार्फत राष्ट्रीय पक्षाच्या स्वराज्यसिद्धीस जनतेची जी अनुकूलता मिळावयास पाहिजे ती मिळणें, निदान तिचा विरोध टळणें सुलभ झालें. राष्ट्रीय पक्षानें जनतेपुढें ठेवलेल्या ध्येयावरून चिनांत स्थाईक होऊन राहिलेल्या व शिरजोर बनलेल्या परदेशीय व्यापारी, मिशनरी व कारखानदार यांविरुद्ध ही राष्ट्रीय पक्षाची चळवळ आहे हे उघड झालें.

## शांघाय येथील अत्याचार

राष्ट्रीय पक्षाच्या या पवित्र कार्यास जनतेची मूक संमति मिळाली खरी, तरी पण तिच्यांत सामुदायिक आवेश व उत्साह उत्पन्न होण्यास कांहीं तात्कालिक निमित्त घडावें लागतें. तें निमित्त शांघाय येथें ता. ३० मे रोजीं अवचित घडलें. त्या पूर्वी एक महत्त्वाची घटना जमून आली. ती अशी कीं डॉ. सन्यत्सेन कंतानहून राष्ट्रीय पक्षाचा अध्यक्ष या नात्यानें पेकिंग येथील चँगत्सोलीन आदिकरून प्रतिपक्षीयांशीं ऐक्याचें खलबत करण्यास गेला. पण तेथेंच आजारी पडून त्याचा ता. १२ मे १९२५ रोजीं एकाएकीं अंत झाला. पण पेकिंग येथें जातांना त्यानें राष्ट्रीय पक्षाचें सेनापत्य चांगकैशेक यास देऊन ठेवलें असल्यामुळें राष्ट्रीय पक्ष डगमगला नाहीं. डॉ. सन्यत्सेन याची शिष्टाई सफळ झाली नव्हती. त्यांतच सन्यत्सेनसारखा मोहरा गमावल्यामुळे उत्पन्न झालेल्या बिकट स्थितीनें राष्ट्रीय पक्षाच्या जुटीस मजबुती आली. सन्यत्सेनाच्या मृत्यूनंतर बरोबर अठरा दिवसांनीं शांघाय शहरीं युरोपियन वस्तींत दंगा झाला. कांहीं चिनी विद्यार्थी, मजूर व इतर समुदाय एका पोलीस चौकीच्या रोखानें जात होता. पोलीस-चौकींत हत्यारें होतीं तीं घेण्याचा या घोळक्याचा इरादा असेल अशी कल्पना करून युरोपियन म्युनिसिपालिटीच्या चेअरमननें त्यांजवर गोळया झाडल्या. त्या योगानें सहा चिनी इसम जागच्या जागीं ठार होऊन बरेचजण जखमी झाले. आणखी एका महिन्यानें कंतान येथील युरोपियन वसाहतींत युरोपियनांनीं याहूनहि भयंकर कृत्यें केलीं. कंताननजीक शामीन नामक लहानसें बेट आहे. या बेटांत युरोपियनांचा कामधंदा चालतो. त्यांचीं घरेंहि तेथेंच आहेत. एक चिनी पलटण युरोपियनांच्या या वस्तीवरून कवाइतीनें जात होती. पलटणींतील एका शिपायाच्या बंदुकींतून एक गोळी उडाली. तेवढें निमित्त युरोपियनांना पुरलें. तिजवर ब्रिटिश व फ्रेंच फौजेनें मशीनगन्स रोखून गोळयांचा वर्षाव केला. त्यांत चवेचाळीस चिनी ठार झाले ! त्यापैकीं चार विद्यार्थी होते.

युरोपियनांच्या वरील अत्याचारानें चिनी लोक खवळले. त्यांनीं युरोपियन व विशेषतः ब्रिटिश मालावर आणि चीनमधील त्यांच्या सर्व उद्योगधंद्यावर बहिष्कार पुकारला. जनतेच्या या खळबळीचा फायदा चिनी राष्ट्रीय पक्षास आयताच मिळून त्यांच्या सैन्यानें चँगकैशेक याच्या हाताखालीं

पेकिंगच्या रोखानें कूच चालविलें. बोल्शेव्हिकांच्या प्रयत्नानें चिनांतील कित्येक खेड्यापाड्यांतून शेतकरीसंघ व मजूरसंघ स्थापन झाले होते. त्यांनीं पुढील मुलूख राष्ट्रीय सैन्य येण्यापूर्वीच पोखरून ठेवला असल्यामुळे राष्ट्रीय सैन्यास हरतऱ्हेची मदत मिळत गेली. अशा रीतीनें कंतानपासून शांघायपर्यंतचा मुलूख राष्ट्रीय सरकारास अल्पावकाशांत सर करतां आला. पण यांगत्से नदीपाशीं राष्ट्रीय सैन्य पोचल्यावर त्याची प्रगति खुटली. ही प्रगति खुंटण्यास बोल्शेव्हिकांची फूस मिळून हँकौ व नानकिंग या ठिकाणीं चिनी लोकांकडून जे अत्याचार घडले ते कारणीभूत झाले. या अत्याचारांत युरोपियन व्यापाऱ्यांस बरेंच नुकसान सोसावें लागलें व त्याबद्दल चिनी राष्ट्रीय सरकारानें युरोपियन राष्ट्रांपाशीं दिलगिरीहि प्रदर्शित केली.

## राष्ट्रीय पक्षावरील संकट

पण हें प्रकरण केवळ युरोपियनांवर अत्याचार होऊन न थांबतां तें एक राष्ट्रीय सरकारच्या जिवावर नवें संकटच बेतलें. समाजसत्तावादी बोल्शेव्हिक प्रचारकांच्या उपद्व्यापानें शेतकरी व मजूर यांत जी नवीं मतें प्रसृत झालीं त्यांनीं चिनी समाजाच्या मुळाशीं सुरुंगच पेरल्यासारखा झाला. शेतकऱ्यांचे जमीनदारांबरोबर भांडण जुंपलें व मजूर कारखानदारांस आडवं लागले. फार काय पण चीन देशांत पुढें निर्माण व्हावयाचें सरकार रशियांतील बोल्शेव्हिक सरकाराप्रमाणें समाजसत्तावादीच बनेल याबद्दलची हमी राष्ट्रीय सरकारापाशीं समाजसत्तावादी मागूं लागले. समाजसत्तावाद्यांच्या मतांचा पगडा कांहीं राष्ट्रीय पुढाऱ्यावरहि बसून राष्ट्रीय पक्षांत समाजसत्तावादी राष्ट्रीय व शुद्ध राष्ट्रीय अशी फूट पडली. आपसांतील या नव्या यादवीमुळें राष्ट्रीय सैन्यास यॉगत्से नदी ओलांडून पेकिंग जवळ करणें जड गेलें; पण एवढ्यावरच न भागतां हँकौ, नानकिंग व कंतान अशीं राष्ट्रीय सरकारचीं तीन शकलें उडालीं. परराष्ट्र मंत्री यूजीनचेन यानें मंत्रिपद सोडले, चँग कैशेक यानें सेनापत्याचा त्याग केला व राष्ट्रीय पक्षाच्या नाड्या फिरून थंडगार पडत चालल्या.

चँग कैशेक हा शुद्ध राष्ट्रीयपक्षाचा पुढारी आहे. त्याच्या पक्षाची मध्यतरीं सरशी होऊन शुद्ध राष्ट्रीय पक्षानें समाजसत्तावाद्यांची पुंडाई बंद करण्याकडे आपलें लक्ष वळविलें. त्यांनीं बोरोदिनप्रभृति प्रचारकांस प्रथम चिनांतून हाकून लावलें. व मागाहून चिनी बंडखोरांस जागच्या जागीं बसविलें. तरी अद्यापि या समाजसत्तावाद्यांच्या बंडाचा पुरा बीमोड झाला आहे असें नाहीं. कैक रशियान व चिनी समाजसत्तावादी चीन देशांत आजहि वावरत आहेत. त्यांपैकीं कित्येक जणांनीं तीन महिन्यापूर्वी गुप्त करस्थान रचून राष्ट्रीय पक्षाचें आदिपीठ जें कंतान तें ताब्यांत घेऊन त्यावर आपली औट घटकेची शिराळशेटी गाजविली. त्या शिराळशेटींत कंतानचीं एक हजार घरें जळालीं, दहा हजार पौंड किंमतीच्या जवाहिरांची लूट झाली व कित्येक माणसें प्राणास मुकलीं. कंतानचा ताबा राष्ट्रीय सरकारानें लवकरच घेऊन कंतानची रशियन वकिलात कंतानाबाहेर काढली.

बोल्शेव्हिक व चिनी राष्ट्रीय यांचें एक वेळ सूत होतें, पण त्यांच्यांत आतां छत्तिसाचा आंकडा पडला आहे. याचा परिणाम व्हावयाचा तोच होऊन चिनी राष्ट्रीय पक्षास रशियापासून रणसाहित्याची व पैशाची मिळणारी मदत थांबली. त्या बरोबर राष्ट्रीय सैन्याचे पेकिंगवर आपलें निशाण रोवण्याचे मनोरथहि ढासळले. आज चिनांत यांगत्से नदीच्या उत्तरेस अनेक सुभेदार पूर्ववत्‌च शेर होऊन बसले आहेत. दक्षिणेस राष्ट्रीय पक्षाचा अंमल अवशिष्ट असला तरी तो मजबूत नाहीं. चिनांत मुख्य व सर्वंकष सत्ता कोणतीच नाहीं आम्ही जकात बाबीचा फेरविचार करण्यास तयार आहों, पण तो चिनातील कोणत्या जबाबदार सत्तेशीं करावयाचा हा इंग्लंड आदिकरून युरोपियन राष्ट्रांचा जुना प्रश्न नव्यानें उभाच आहे. कर्जफेडींत चीनपासून जकातखात्याचा इंग्लडनें घेतलेला ताबा इंग्लंडकडे कायमच आहे. इंग्लंडचें चाळीस कोटी रुपयांचें कापड चिनांत खपतें. त्याचा खप कसा वाढवावा या फिकीरींत इंग्लंड आहे. आणि रशियापासून चिनी राष्ट्रीय पक्षास सर्व प्रकारची मदत मिळत होती, ती थांबल्यामुळें यापुढें कोणाची मदत मागावी या फिकीरींत चीनचा राष्ट्रीय पक्ष आहे. चिनीराष्ट्रीय पक्ष परिस्थितीचा हा कोट फोडून त्यांतून कसा बाहेर पडतो हा विषय हिंदुस्थानच्या दृष्टीनेंहि मनोरंजक असल्यामुळें त्याजकडे हिंदी देशभक्तांचे लक्ष वेधून राहाणें स्वाभाविक होय.

---

# गोव्यांतील शुद्धीचें महत्व

मागें वळून पाहिलें म्हणजे आश्चर्य वाटेल इतकी हिंदु समाजाच्या मनोवृत्तींत आज पालट झाली आहे. आणि ही पालट समाजाच्या जिवंतपणाची व चिवटपणाचीहि साक्ष पटवीत असल्यामुळें आनंद होऊन आशावादहि बळावतो. प्रसंग ओळखून व विवेक करून आपली क्रिया पालटील तोच भाग्यपुरुष आणि तोच जिवंत समाज. फार दूरची गोष्ट नाहीं, दहावीस वर्षांपूर्वीच हिंदु समाजाच्या बाहेर गेलेलीं माणसें समाजांत परत आणण्याची गोष्ट काढली तर कित्येकांना महत्संकट वाटे; कित्येकांचे अंगावर शहारे येत; कित्येक सचिंत होत. एकेकाळीं हिंदुसमाजांतच असून मोहानें, लोभानें अगर बलात्कारानें बाहेर गेलेलीं माणसेंहि परत घ्यावींत का न घ्यावींत याविषयींच लोक साशंक तर मग अगदींच बाहेरच्यास आंत घेण्याची गोष्ट दूरच राहिली. पण अगदीं गळ्याशीं संकट आल्यावर व उशीरा कां होईना हिंदु समाज सावध झाला हीच भाग्याची गोष्ट होय. शुद्धीस बिचकणाऱ्या हिंदु समाजानें आतां ती संजीवनी हातीं घेतली आहे आणि तिच्या अनुभवानें समाजांत अधिकाधिक आत्मविश्वास उत्पन्न होत आहे. बाटलेल्या लोकांना आपल्यांत घेतलें तर ते आपल्याला पचतील कीं नाहीं अशा विवंचनेंत हिंदु समाज होता.पण परिस्थितीच्या कोंडींत सांपडल्यावर " न संशयमनारुह्य नरो भद्राणि पश्यति। संशयं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति " ही शिकवण लक्षांत घेऊन हिंदु समाजानें या संशयाचें आरोहण करण्याचा हिय्या केला, आणि खाद्य हेंच अधिकाधिक भुकेचें औषध व्हावें तसा या शुद्धीच्या संजीवनीचा परिणाम झाला ! पूर्वहिंदूंना तर परत घेतलेंच पाहिजे, पण अपूर्वहिंदूंनाहि हिंदु समाजांत घ्यावें असा देखील आज चोहोंकडून ध्वनि निघत आहे. मिस मिलरच्या शुद्धीकरणाच्या वादांत तिचा लग्नाचा हेतु आणि तेंहि तुकोजीरावांच्या दोन राण्या जिवंत असतांना तिसरें लग्न,यामुळेंच या शुद्धीकरणाबद्दल कित्येक जण विरोधी व कित्येक साशंक आहेत. पण तिच्या शुद्धीकरणाच्या बाबतींत या भावी अनिष्ट गोष्टीचा धागा नसता तर केवळ शुद्धीकरण या दृष्टीनें त्याला फारशी प्रतिकूलता दिसून आली नसती. कारण पूर्वहिंदू खाऊं आणि अपूर्वहिंदू तोंडीं लावूं अशी आज हिंदु समाजाची सर्वभक्षक वृत्ति दिसूं लागली आहे.

हिंदूंना कित्येक शतकें चालत आलेली चूक दुरुस्त करावयाची असल्यामुळें या बाबतींत त्यांनीं कितीहि उत्साह दाखविला तरी तो थोडाच होईल. कारण या उत्साहाला पुरून उरेल इतका कार्याचा डोंगर हिंदु समाजापुढें उभा आहे. सुलभसंकोची, प्रसरणशून्य, असंघटित आणि विस्कळित अशा एकट्या हिंदुधर्मीय समाजाशीं दोन जबर प्रसिष्णु, शीघ्रप्रसारक व संघटित अशा परधर्मीय समाजाची गांठ पडली आहे. एक वनचर वरून पर्वत ओलांडून हिंदु समाजावर घसरला व दुसरा जलचर समुद्राच्या लाटेसरसा उसळी मारून आंत घुसला. त्यांचे धर्म येनकेन–साधक तर आपला येनकेन–संकोची. अशांची गांठ पडल्यावर झाला तेवढा संकोच थोडाच वाटतो. जाण्यास मुक्तद्वार पण परत येण्याच्या मार्गांत अनंत तट अशा या पूर्वस्थितींत हिंदु समाज टिकला तरी कसा याचेंच आतांच्या शुद्धिसंजीवनीनें प्रसरणशील बनलेल्या हिंदु समाजास आश्चर्य वाटेल. असो. हिंदु समाजाची प्रसरणशील वृत्ति तयार झाली. पण कृतीचा मार्ग निरलस व धडाडीच्या प्रयत्नानें आक्रमण केला तरच ही वृत्ति पालटल्याचा उपयोग. परधर्मीय समाज पूर्वी मऊ सांपडलेल्या हिंदु समाजाला उकरीतच होते. आतां हिंदु समाज अधिक टणक झाला; यामुळें तेहि सावध होऊन हिंदु समाजाकडून होणारें हें शुद्धीचें आक्रमण थांबविण्यासाठीं सुधारून वाढविलेले प्रयत्न करणारच. त्याला हिंदु समाज पुरून उरला तरच त्याच्या या जागृतीचा खरा उपयोग.

उत्तरेकडील संकट आर्यसमाजानें व मालवीयजींच्या हिंदुमहासभेनें थोपविलें, इतकेंच नव्हे तर परधर्मीयांस संकट वाटण्याइतकें तिकडे कार्य झालें. जुलमानें मुसलमान झालेले पण हिंदु संस्कृतीच्या व परंपरेच्या खुणा ज्यांनीं अद्यापिहि जिवंत ठेवल्या असे मलकाना रजपुतांसारखे समाज हजारांनीं परत स्वधर्मांत आले. दक्षिणेकडे मात्र धर्मांतराच्या संकटांत सांपडलेले अशा तऱ्हेचे अनेक समाज असतांहि त्यांना हात घालण्याचा हिंदु समाजाचा प्रयत्न अद्याप तितका यशस्वी झाला नव्हता. झाले ते प्रयत्न किरकोळ फुटकळ झाले. गोव्याकडे व वसईकडे अंतरंगानें व संस्कृतीनेंहि पूर्ण हिंदू पण जुलमाचा रामराम म्हणून अपरिहार्यतेनें ख्रिश्चन राहिलेले हजारो ख्रिश्चन आहेत. त्यांना शुद्ध केलें पाहिजे अशी वाटाघाट सुरू होती. पण प्रत्यक्ष त्या कार्यास कोणीकडून कसा हात घालावा हें सांगून तें करून दाखविण्यास कोणी पुढें आलें नव्हतें. विशेषतः गोव्यासारख्या कडवट ख्रिश्चनांच्या सत्तेखालीं असलेल्या भागांत या कार्याला तोंड

कसें लागणार या विवंचनेंत .हिंदुसभेचे कार्यकर्ते होते. खुद्द गोमांतकांतील हिंदु कार्यकर्तेहि याचा विचार करीत होते. बाटविलेले लोक हिंदु व्हावयास तयार होते, पण एकेकटे शुद्धीकरण करून घेण्यास भीत होते.एकदम मोठ्या प्रमाणात शुद्धीकरण करणें हा या स्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग होता. आणि त्याची सिद्धता गोव्यासारख्या ख्रिश्चन सत्तेखालीं व ख्रिश्चनांच्या वर्चस्वाखालीं असलेल्या प्रांतांत करणें बिकट व धाडसाचेंच होतें.

पण रामदासांच्या शिकवणीचा प्रसार करणारे एक महंत व त्यांचे शिष्य हें प्रसंगोचित धारिष्ट करण्यास तयार झाले. त्यांनीं या बिकट परिस्थितींतून मार्ग काढून तेथील लोकांचीं मनें तयार करून शुद्धिसमारंभाची भूमिका तयार केली, आणि या प्रयत्नास फळ येऊन गेल्या ता.२६रोजीं नव्या गोमांतकांत चिंबुल मुक्कामीं पहिल्याच सत्रांत सुमारें एक हजार गावडे ख्रिस्ती लोकांचा शुद्धीकरणविधि श्री. विनायकमहाराज मसूरकर यांचे शिष्य श्री. आनंदमूर्ती यानीं केला. या समारंभास गोमांतकांतील बहुतेक सर्व हिंदु संस्थांचे प्रमुख, सुशिक्षित, शास्त्रीपंडित, व्यापारी, जमीनदार इ. मंडळी जमलेली होती आणि ज्यांना येतां आलें नाहीं त्यांनीं संमतिदर्शक पत्रें पाठविलीं होती. त्याच दिवशीं कुर्क येथेहि अशीच आणखी ४०० गावडे लोकांची शुद्धि करण्यांत आली. त्यानंतर अशाच गटानें एकामागून एक शुद्धीकरण चालू असून आतापर्यंत ही संख्या ३३०० इतकी झाली आहे. या वार्तेनें महाराष्ट्रांतील हिंदु समाजांत सर्वत्र एकच आनंदीआनंदाची उर्मि उसळावी, व जिकडून तिकडून या अपूर्व शुद्धीकरणाचें अभिनंदन व्हावें यांत नवल नाहीं. हें कार्य तडीस जाईपर्यंत हिंदु-महाराष्ट्र त्याचा सर्वतोपरी पाठपुरावा करील अशी आम्हास आशा आहे. हें शुद्धीकरण झाल्यावर कांहीं ख्रिस्ती लोक त्याविरुद्ध कारवाई घडवून आणण्याकरितां गोव्याच्या गव्हर्नराकडे गेले होते. पण गोव्यात अलीकडे धर्मस्वातंत्र्यजाहीर झालें असल्यानें या कार्यांत हात घालण्याचें गव्हर्नरांनीं नाकारलें असें कळतें व तसें असल्यास तो त्यांचा थोरपणाच होय.

ख्रिश्चनांचा विरोधाचा हा राजरस्ता जरी अशा रीतीनें खुंटला असला तरी इतर अनेक अडचणी व संकटें दुसऱ्या रीतीनें शुद्धीकृतांवर,शुद्धि करणारांवर व हिंदुसमाजावर आणण्याची खटपट यापुढें त्यांचेकडून होणारच नाहीं असें सांगतां येत नाहीं. त्याला तोंड देण्यासाठीं व हें कार्य परिपूर्ण होण्यासाठीं लागणारें सर्व प्रकारचें साहाय्य महाराष्ट्र देईलअशी आम्हास आशा आहे. या कार्यासाठीं दोन प्रकारचें साह्य पाहिजे. एक सर्वत्र सभा भरून या कार्यास पाठिंबा देणें व दुसरें द्रव्यसाहाय्य. पंधरावीस हजार गावडे लोक हिंदुधर्मांत आणावयाचे म्हणजे त्यांच्या शिक्षणाची व त्यांच्यावर इतर ज्या कांहीं अडचणी येतील त्या दूर करण्याची व्यवस्था करणें अवश्य आहे.प्रत्यक्ष शुध्दीला खर्च थोडा लागतो पण पुढील व्यवस्थेसाठीं पैशाची जरूरी अधिक लागते.यासाठीं शाब्दिक पाठिंबा देणाऱ्या हिंदूंच्या प्रत्येक सभेंतून या कार्यासाठीं निधी गोळा होऊन तो व्यवस्थापक ब्रह्मचर्याश्रम मसूर जिल्हा सातारा या पत्त्यावर पाठविला जावा. कोणी केसरी कार्यालयाकडे रक्कम पाठविल्यास आम्ही ती त्यांचेकडे धाडूं. मलकानांच्या शुद्धीकरणाच्या कार्यांत श्रद्धानंदांनीं एक लाखाची मागणी केली व लाला हंसराज यांनीं दीड लाख रु. पुढें केले! तेहि त्या कार्यास पुरले नाहींत. या दृष्टीनें पाहतां महाराष्ट्रांतून या कामीं निदान पंधरावीस हजार रुपये तरी जमवून पाठविणें अवश्य आहे.

व्यक्तिशः शुद्धीकरण हें हिंदुसमाजास नवीन असलें तरी जातिशः शुद्धीकरण हें ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां हिंदु समाजास नवीन नाहीं. हिंदुस्थानांत आर्य–अनार्य याचा एक समाज झाला तो अनार्यांना जातिशः आर्यसमाजरचनेंत समाविष्ट करूनच झाला. आजहि जातिघटित हिंदु समाजांत जातिशः शुध्द झालेल्यांची स्वतंत्र जात होत असल्यामुळें शुद्धीकरणानंतर त्यांना कोणत्या जातींत समाविष्ट करावें व कसें करावें हा पुढचा जातीकरणाचा प्रश्नच राहात नाहीं. हिंदुधर्मांतून ख्रिश्चन व मुसलमानी धर्मांत गेल्यावरहि बऱ्याच हिंदूंनीं आपले जातींचे गट कायम ठेवले. ख्रिश्चन व मुसलमानी समाजांत आजहि कोठें कोठें जाती आढळतात त्या यामुळेंच होत.व्यक्तीला शुद्ध केल्यावर जुने संबंध तोडणें व नवे जोडणें या क्रिया आवश्यक ठरतात. पण जातिशः शुद्धीकरणांत संबंधाचें जाळेंच्या जाळेंच बाह्य धर्मांतून उठून हिंदुधर्मांत येतें. म्हणून संबंध तोडावेहि लागत नाहींत व जोडावेहि लागत नाहींत.एखादीच व्यक्ति परधर्मांतून हिंदुधर्मांत आल्यावर कांहीं दिवस अस्थिर राहण्याचा संभव असतो, पण जात ही ताबडतोब स्थिर होते. भ्रष्टीकरण हें पूर्वी व्यक्तिशः व जातिशःहि झालें. अर्थात् त्याला प्रतिक्रियारूप शुद्धीकरण हेंहि व्यक्तिशः व जातिशः अशा दोनहि रीतींनीं व्हावयास पाहिजे. व्यक्ती ही एका धर्मांतून उचलून दुसऱ्या धर्मांत शुद्धीकरणानें नेऊन ठेवावी लागते. पण जातिशः शुद्धीकरणांत जाति ही पूर्वीच्याच जागीं स्थिर राहून तिच्या डोक्यावरील एका धर्माचें छत्र काढून दुसऱ्या धर्माचें छत्र तेथें आणलें इतकाच फरक होतो. जाति ही बसल्या जागींच सुप्रतिष्ठित असते. व्यक्तिशः शुद्धिकरण हें

करावयास सोपें पण टिकावयास कठिण. उलट जातिशः शुद्धीकरण हें करावयास अवघड पण टिकविणें अगदीं सुलभ. असें जातिशः शुद्धीकरण दक्षिणेकडे आतांपर्यंत झालें नव्हते. म्हणूनच गोव्यांतील या शुद्धीकरणाची महती विशेष आहे. या शुद्धीकरणामुळें इतरहि अशाच संभवनीय व प्रयत्नसाध्य जातिशः शुद्धीकरणाकडे हिंदुसमाजाचें लक्ष अधिक लागेल व एका ठिकाणचा हा अनुभव दुसऱ्या ठिकाणीं उपयोगी पडल्याखेरीज राहणार नाहीं.

गोव्यांत घडलेलें हें शुद्धीकरण महाराष्ट्रीय हिंदूंचेंच आहे. गावडे लोक हे महाराष्ट्रांतील मलकानाच होत. हे गावडे नव्या गोमांतकांत चिंबल, करमळी, ताळगांव, कुर्क, कालापूर इ. गांवांत पसरलेले असून जन्म, लग्न व मरण यावेळच्या तीन संस्कारांखेरीज त्यांच्यांत ख्रिस्तीपणा असा कांहींच नसून बाकीच्या प्रसंगीं ते आचारविचारांत पूर्ण श्रद्धाळू हिंदूच होते. चार शतकें त्यांनीं आपला हा हिंदुधर्म, हिंदु चालीरीती, हिंदु आचार व हिंदु पोषाखहि कायम ठेवला. ते परसंस्कृत हिंदूच होते; ते आतां स्वसंस्कृत हिंदु होत आहेत. चारशें वर्षांपूर्वी तरवारीच्या जोरावर ख्रिस्त्यांनीं बळकाविलेला प्रांत इतक्या दिवसांनंतर व तोहि शांततेनें हिंदूंनीं आक्रमिला. या गावडे लोकांची वस्ती सुमारें १५-२० हजार आहे व ते सर्वच्या सर्व शक्य तितक्या त्वरेनें शुद्ध झाले पाहिजेत आणि त्यांच्या संस्कारांची, शिक्षणाची इ. व्यवस्थाहि झाली पाहिजे. गोमांतकांतील हिंदू तर या कार्यास सिद्ध आहेतच, पण सर्व महाराष्ट्रांतील हिंदूंनीं हें कार्य आपलें आहे व तें तडीस नेण्याचा बोजाहि आपल्यावर आहे हें ओळखलें पाहिजे. महाराष्ट्राचा एक महत्त्वाचा भाग निजामशाहींत मुसलमानी अंमलांत अडकला आहे, हा दुसरा भाग पोर्तुगीजांच्या अमलाखालीं सांपडला आहे. आणि इंग्रजांच्या सत्तेखालीं असलेला भागहि वऱ्हाड मध्यप्रांत व मुंबई इलाखा या चिरफाडीच्या प्रांतरचनेंत दुभंगला गेला आहे. राजकीय दृष्ट्या जरी अशा रीतीनें विभागणी झाली असली तरी भाषा, धर्म व संस्कृति या दृष्टीनें तो एक व अखंड आहे. आणि एका देहाच्या कोणत्याहि अवयवाचे सुखदुःखभोग जसे एका जीवालाच पावतात तसेच हे विभाग चळवळीच्या व संवेदनेच्या दृष्टीनें तरी संलग्नच असावयास पाहिजेत.

श्रीसमर्थांनीं शिवाजीमहाराजांच्या स्वराज्य संस्थापनेच्या प्रयत्नाचे वेळीं प्रसंग ओळखून 'मराठा तितुका मेळवावा' अशी घोषणा केली. मुसलमानांच्या हातून मराठ्यांनीं महाराष्ट्र सोडविल्यावर त्यांनीं बाहेर स्वाऱ्या सुरू केल्या. त्या स्वाऱ्यांचे वेळींच 'हिंदु तितुका मेळवावा' या धर्मकारणाची जोड मिळावयास पाहिजे होती. त्याबरोबरच त्या वेळीं शुद्धीच्या संजीवनीची जोड दिली गेली असती तर काय काय झालें असतें हा विचार आतां निरर्थक असला तरी इतिहास वाचतांना तो मनांत डोकवून चित्ताला चटका लावल्याखेरीज राहात नाहीं. तरी पण आजच्या काळांत उशीरा का होईना, समर्थांच्या शिकवणीनें व स्फूर्तीनच हें हिंदूंच्या मेळाव्याचें कार्य होत आहे हें पाहून कोणास आनंद होणार नाहीं ? त्याचप्रमाणें स्वामी श्रध्दानंद व महाराष्ट्रांतील आद्य हिंदु मिशनरी गजाननराव वैद्य हे हा प्रसंग पाहण्यास जगले असते तर त्यांना आपल्या कार्याची ही परिणति पाहून केवढा आनंद वाटला असता हीहि कल्पना या वेळीं मनांत साहजिकपणें येते. थोर पुरुषांची व कार्यकर्त्यांची स्मृति जागृत करणारी जशी ही घटना आहे तशीच ती भावी कालासंबंधीं निरनिराळ्या आशाहि उत्पन्न करणारी आहे. या शुद्धीकरणांत तात्कालिक राजकारण नाहीं हें खरें. पण विचारांची धांव या प्रसंगांवरून परंपरेनें राजकारणाला जाऊन भिडते हेंहि तितकेंच खरें. हिंदुस्थान जर स्वतंत्र व्हावयाचें तर ब्रिटिश मुलूख, संस्थानें यांच्याप्रमाणेंच पोर्तुगीज व फ्रेंच यांच्या ताब्यांत असलेल्या प्रदेशांचा विचारहि त्यांत अवश्यमेव येतो. आणि भाषावार प्रांतरचना करावयाची तर यापैकीं कोणता भाग कोणत्या प्रांतात समाविष्ट केला जाणार हाहि विचार मनांत उद्भवून स्वतंत्र हिंदुस्थानांतील स्वतंत्र महाराष्ट्र प्रांतांत गोमांतकाचा अवश्य अंतर्भाव केला पाहिजे असेंच म्हणावें लागतें. आणि या अंतिम ध्येयाचे धागे आजच्या व्यवहारांतहि येतात. ते जोडावयाचे म्हणजे गोमांतकाला महाराष्ट्रीय चळवळींत, हिंदु चळवळींत आणि राष्ट्रीय चळवळींतहि हक्काचें प्रातिनिधित्व द्यावयास नको काय ?

राष्ट्रांतील तीन धर्मांपैकीं दोन धर्मांचे दरवाजे खुले व एकाचे बंद असण्यानें खऱ्या धर्मस्वातंत्र्यास बाध येऊन धर्मदृष्ट्या कृत्रिम व घोटाळ्याची परिस्थिति उत्पन्न होते. ती या शुद्धिचळवळीनें नाहींशी केली व धार्मिक बाबतींत हिंदुस्थानांत खऱ्या स्वयं-निर्णयाचा मार्ग मोकळा केला. धार्मिक स्वयंनिर्णयाच्या दृष्टीनें केवळ राष्ट्रीय व राजकीय अशा भूमिकेवरहि शुद्धीचें महत्त्व आहे. आज तें कोणास दिसत नसलें अगर पटत नसलें तरी कालांतरानें तें पटल्याखेरीज राहणार नाहीं असा आम्हांस भरंवसा आहे. कृत्रिम अडचणींनीं मनांतून एक धर्म तर नांवानें दुसराच धर्म अशा अर्धवट

स्थितींत समाजाचा कोणताहि भाग असणें ही राष्ट्रीय व सामाजिक दृष्टयाहि चांगली गोष्ट मानतां येणार नाहीं. म्हणूनच गोमांतकांतील गावड्यांचें संघशः शुद्धीकरण हे धार्मिक प्रांतिक व राष्ट्रीय अशा सर्व दृष्टींनीं महत्त्वाचें व हितकारक असल्यामुळें, त्या कार्यास सर्व बाजूंनीं पाठिंबा मिळून तें त्वरित व पूर्णपणें तडीस जाईल अशी आम्ही उमेद बाळगतों.

# प्रतियोगीच्या पुढें अतियोगी

सायमन कमिशनच्या नेमणुकीमुळें हिंदी राष्ट्रांत खळबळ उडून बऱ्याच मोठ्या प्रमाणांत जी एकी घडून आली तिचा राजकीय चळवळीच्या दृष्टीनें पुरेपूर फायदा राष्ट्रांतील पुढाऱ्यांनीं व कार्यकर्त्यांनीं घेतला पाहिजे. चळवळ थंडावल्यासारखी झाली होती ती कमिशननें पुनः चेतवली खरी. पण राष्ट्राचें पाऊल पूर्वीच्या मानानें कांहीं तरी पुढें पडेल अशी या चळवळीला दिशा लावली नाहीं तर ती केवळ तात्पुरती ठरेल. सायमन कमिशन हें 'आगमापायी' व अनित्य आहे. पण चळवळ ही नित्याची आहे.आजपर्यंतच्या सर्वच चळवळीची दिशा स्वाभाविकपणें सरकारच्या आगळिकीस तोंड अगर समर्पक रीतीनें उत्तर देणें अशाच स्वरूपाची होती. परकी सरकारच्या आगळिकीचा योग्य प्रतिकारहि राष्ट्र करणार नाहीं तर तें मृत राष्ट्रच समजलें पाहिजे. अन्यायाचा प्रतिकार हें जागृतीचें व जिवंतपणाचें चिन्ह होय. तें हिंदी राष्ट्राच्या आजपर्यंतच्या अनेकविध राष्ट्रीय चळवळींत दिसून आलें. पण प्रभविष्णुता ही जिवंतपणाच्या पुढची पायरी आहे. सरकारच्या उत्तरास प्रत्युत्तर, ठोशास ठोसा, कारवाईला उलट कारवाई, याप्रमाणें तोंड देणें हें काम जोंपर्यंत सरकार अस्तित्वांत आहे तोंपर्यंत केलेंच पाहिजे. पण या प्रतियोगी प्रयत्नांना पुरून उरेल इतकी शक्ति राष्ट्रांत उत्पन्न झाली तर या प्रयत्नाबरोबरच राष्ट्राला अधिक कांहीं करतां येईल. सरकारने कांहीं नवीन गांजणूक, अकल्पित भानगडी किंवा नसती आगळीक करावी आणि मग लोकांनीं तिचा प्रतिकार करावा; यापेक्षां प्रतिकाराबरोबरच लोकांनीं सरकाराविरुद्ध सरकारला तितकीच चिंता उत्पन्न करणाऱ्या गोष्टीहि उपस्थित कराव्या, म्हणजेच खरोखर 'जशास तसें' हें धोरण पूर्णतेस पोंचेल. जशास तसें हें तत्त्व केवळ बचावातच अमलांत आणावयाचें असें नाहीं तर शक्ति असल्यास चढावांतहि अमलांत आणावयास पाहिजे. दोन सैन्याचें युद्ध जुंपलें म्हणजे शत्रूचे हल्ले परतवण्याबरोबरच शत्रुपक्षाकडील कच्ची, ढिली अगर सदोष बाजू पाहून तीवर हल्लाहि करावा लागतो. इतकेंच नव्हे तर शत्रूनें आपल्या मुलुखावर स्वारी केली तर तीस पायबंद बसावा म्हणून दुसऱ्या बाजूनें शत्रूच्या मुलखावरहि स्वारी करावी लागते. जशास तसें या धोरणाच्या बचावी स्वरूपाला आजपर्यंत प्रतियोगी हें नांव रूढ झालें असल्यामुळें याच धोरणाच्या चढावी स्वरूपाला तितकेंच सुटसुटीत नांव द्यावयाचें झालें तर 'अतियोगी' असें देतां येईल. नामसादृश्यामुळें एक दुसऱ्याची पुढची पायरी आहे हेंहि त्यावरून दिसेल.

आजपर्यंतची चळवळ ही बहुधा केवळ कृतीस प्रतिकृति अशा स्वरूपाची असल्यानें चळवळ चेतविण्याची आगलावी काडी सरकारच्या हातीं असे. सरकारनें कांहीं तरी नवें कुलंगडें उपस्थित करावें, आणि मग तें धरावें कां सोडावें, धरून चावूं देणें वाईट का सोडून पळूं देणें वाईट अशा विचारांत लोकांनीं घुटमळावें व प्रसंगीं दुभंगहि व्हावें! सरकार सर्वसामर्थ्यवान असल्यामुळें त्यांना अशा रीतीनें रोज नवे डाव, नव्या आपत्ती उपस्थित करून लोकांना त्यांतच चूर ठेवतां येतें व यामुळें लोकांना स्वतंत्र विचाराची फुरसूतच राहात नाहीं. पण लोकांचें सामर्थ्य, जूट, प्रतिकारशक्ति व आकांक्षा हीं निरनिराळ्या चळवळींनीं वाढत चाललीं आहेत. हीं अशींच वाढत जातील तर या आपत्तींना तोंड देऊन शिवाय सरकारलाहि चिंतामग्न करण्यासारखें त्यांच्यावर उलट कांहीं आक्रमण करतां येईल.ठोसा मारल्यावर उलट ठोसा तर द्यावाच, पण दुसऱ्या वेळीं या प्रथम ठोसा देणाऱ्याच्या हातांतील ठोसेबाजीची रग कमी करण्याकरितां अगोदरच ठोसा का देऊं नये? पहिल्या दिलेल्या ठोशाचें उत्तर व पुढच्या ठोशांना प्रतिबंध म्हणून अगोदरच ठोसा!

रोगहरणापेक्षांहि प्रतिबंध चांगला नव्हे काय? ही आक्रमणशीलता सर्व कृतींत उतरणें ही दूरची गोष्ट असली तरी मनात व वाचेंत आणि थोड्याबहुत प्रमाणांत कृतींतहि ती सुरू करण्याइतकें सामर्थ्य आज राष्ट्रांत खास आहे. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाची जगभर बदनामी करण्यासाठीं मिस मेयोकडून "हिंदमाता" पुस्तक लिहावें व मग हिंदी लोकांनीं त्याचा जोरजोरानें निषेध करावा, पुस्तकें लिहावीं, व्याख्यानें द्यावीं, लेख लिहावे. मग सरोजिनीबाईनीं अमेरिकेंत जाऊन मिस मेयोच्या पुस्तकाविरुद्ध व्याख्यानें देण्याची कल्पना पुढें यावी. ब्रिटिशांनीं हिंदी लोकांना

नादान ठरवावें, त्याची जाहिरात जगभर द्यावी व मग हिंदी लोकांनीं त्याचा इनकार करीत उठावें हें चालू आहे. मिस मेयोचा हिंदी लोकांनीं तीव्र निषेध केला हें जिवंतपणाचें लक्षण. पण प्रभविष्णुतेचें लक्षण निराळेंच असतें. ब्रिटिशांनीं हिंदी लोकांची नालायकी नसतांहि नालायक म्हणून म्हणावें.पण गल्या शंभर वर्षांच्या हिंदुस्थानाच्या कारभारानें ब्रिटिश लोकच राज्य करण्यास नालायक आहेत याचाच डांगोरा अगोदरच जगभर व्हावयास नको होता काय ? ब्रिटिशांनीं हिंदुस्थानानें बंड केल्यास काय होईल याचा अगोदर विचार करून निरनिराळीं नाकीं आजच दाबून ठेवण्याची व्यवस्था करावी, हिंदी स्वराज्याचे शत्रू कोण आहेत ते हुडकून त्यांच्याशीं अगोदरच सधान ठेवावें.अशा वेळीं ब्रिटिशांचे शत्रू कोण, त्यांचीं मर्मस्थलें कोणतीं, त्यांच्यावर आपत्ति येण्याची दिशा व संधि कोणती याचा विचार हिंदी लोकांनींहि आगाऊच कां करून ठेवूं नये ?

ब्रिटिश लोकांना आपल्या बचावाचा विचार अखंड करावयास लावून, चढाईचा विचार करण्यास फुरसूतहि न देणें हें अतियोगी चळवळीचें पराकाष्ठेचें फल आहे. पण इतक्या प्रमाणांत अतियोगी चळवळ तूर्त करणें शक्य नसलें तरी कांहीं प्रमाणात बचावाची भूमिका ब्रिटिशांवर लादणें हें आजच्याहि स्थितींत अशक्य नाहीं. संपूर्ण स्वातंत्र्य हें ध्येय जाहीर करून या दिशेनेंच राष्ट्रानें एक पाऊल टाकलें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. साम्राज्यांतर्गतपणा ही कांहीं स्वाभाविक गोष्ट नाहीं. ती विकृति असून पूर्ण स्वतंत्रता हीच राष्ट्राची प्रकृति आहे. स्वाभाविक स्वातंत्र्य सोडून कृत्रिम साम्राज्यव्यवस्थेंत हिंदुस्थानानें राहावें हें पटवून देण्याची जबाबदारी हिंदुस्थानावर नाहीं. ती ब्रिटिश साम्राज्यावर आहे. स्वतंत्र होण्यापेक्षां साम्राज्यांत राहण्यांत अधिक हित आहे असें त्यांनीं दाखविलें पाहिजे.तें त्यांनीं सांगितल्यावर मान्यकरणें अगर न करणें ही हिंदुस्थानाच्या खुषीची गोष्ट होय.

आक्रमणशील सामर्थ्य उत्पन्न झालें म्हणजे तशा प्रकारची मनोवृत्तीहि निर्माण होते. आजपर्यंत ब्रिटिशांनीं म्हणावें कीं, "आम्ही हिंदुस्थानाचे हितकर्ते, परमेश्वरांनीं हिंदुस्थानाच्या उद्धाराकरितां आमचा व हिंदुस्थानाचा संबंध घडवून आणला !" ब्रिटिश मुत्सद्यांनीं असें ठांसून म्हटल्यावर मग हिंदी लोकांनीं त्याविरुद्ध कोटिक्रम करून ते खोडून काढण्याचा प्रयत्न करावा ! पण ही पश्चात् बुद्धि चळवळ होय. याऐवजीं आगाऊ बुद्धीची ( अनागतविधातृत्वाची ) चळवळ राष्ट्राला करतां आली तर राष्ट्र निवळ जिवंतपणाच्या पायरीवरून प्रभविष्णुतेची पायरी चढूं लागलें असें म्हणतां येईल. या दृष्टीनें स्वातंत्र्यवाद्यांनींहि कां म्हणूं नये कीं, "ब्रिटिशांनीं साम्राज्यतृष्णेच्या नादीं लागून आपला अनेक तऱ्हांनीं अधःपात करून घेतला आहे. साम्राज्यस्थापना म्हणजे संभावित लुटारूपणा हें एक पाप व ते पाप टिकविण्यासाठीं करावीं लागणारीं इतर पापें यामुळें होणारा नैतिक अधःपात तर आहेच. पण त्यापेक्षांहि लढाया, बेकारी, संपत्तीची विषमता व त्यायोगें उत्पन्न होणारे कलह इत्यादि आपत्ती या साम्राज्याच्या नादीं लागल्यानेंच इंग्लंडवर ओढवलेल्या आहेत.आणि या आपत्तींतून इंग्लडला सोडवावयाचें असेल तर हिंदुस्थानांतून त्यांचा हात बाजूला काढणें हाच उपाय आहे. अर्थात् ब्रिटिशांचे खरे हितकर्ते हिंदी स्वातंत्र्यवादीच नव्हेत काय ? साम्राज्याच्या आपत्तिकारक गर्तेतून त्यांना सोडविण्यास पृथ्वीच्या पाठीवर जर कोणी समर्थ असेल तर ते हिंदी लोक होत. ब्रिटिशांना वांचविण्याची ही परमेश्वरी प्रेरणाच हिंदुस्थानाला झाली आहे!"

मद्रासच्या राष्ट्रीय सभेंत पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या नव्या पक्षाच्या प्रेरणेनें जे ठराव झाले ते बहुतेक असे अतियोगी व अनागतविधातृत्वाच्या स्वरूपाचे होते. म्हणूनच पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं राष्ट्राच्या राजकारणाला एक नवीन प्रकारची दिशा लावली असें सर्व म्हणत आहेत. स्वातंत्र्याच्या ठरावाचें अतियोगी स्वरूप वर दिग्दर्शित केलेंच आहे. भावी युद्धासंबंधीं व साम्राज्यविरोधी राष्ट्रसंघाशीं सहकार्य करण्यासंबंधीं जे ठराव झाले ते अशाच आलोचनी बुद्धीचे आहेत. सरकारनें युद्ध उपस्थित करावें, रिक्रूट मागावे,पैसे मागावे व मग आपण त्यांना अटी घालाव्या हें प्रतियोगी धोरण आलेल्या प्रसंगाचा फायदा घेण्यापुरतें ठीक आहे ते अस्वल आलें म्हणजे त्याची झाप चुकविण्यासारखें आहे. पण मद्रासच्या कॉंग्रेसने 'अस्वला आधींच आरोळी' ठोकली आहे. लवकर मोठ्या युद्धांत इंग्लंडला पडावें लागणार त्या वेळीं हिंदुस्थान काडीचेंहि साह्यकरण्यास तयार होणार नाहीं असा आगाऊच इषारा सरकारला या ठरावानें दिला आहे. आमचा हा नकार ठरलेला. तो बदलावयाचा असेल तर ब्रिटिशांनीं आपण होऊन हिंदुस्थानास ते काय मोबदला देणार हें सांगावें. मग आम्ही त्यावर सात केवळ हिंदी लोकांचे कमिशन नेमूं व त्याचा विचार करूं. मेहरबानी म्हणून वाटल्यास त्यांच्या पार्लमेंटची सातजणांची कमिटीहि या कमिशनबरोबर बसूं देऊं. पण गुप्त साक्षींच्या वेळेला त्या कमिटीला बाहेर घालवूं असें आतांच स्वच्छ सांगितलें पाहिजे. वांकडी तार सरळ करण्यास ती उलट बाजूस तितकीच खेंचावी लागते.

साम्राज्यविरोधी राष्ट्रसंघांत सामील होण्याची गोष्टहि अशीच आहे. ती चळवळ म्हणजे परराष्ट्रीय राजकारणाचें अतियोगी स्वरूपच होय. परराष्ट्रांत जाऊन इंग्रज लोक आमच्या संबंधीं गोष्टी व वर्णनें सांगतात तीं चुकीचीं व खोटीं कशीं आहेत हें दाखविलेंच पाहिजे. पण ती केवळ बचावाची चळवळ झाली. साम्राज्यवादाचाच जगांतून नायनाट केला पाहिजे असें सांगून साम्राज्यवाद्यांवर बचाव करीत बसण्याची भूमिका लादणें हेंच त्यांच्यावर खरें आक्रमण होईल. सारांश, सरकारची आगळीक व आपला प्रतिकार याबरोबरच उलट आपल्याकडून आगळीक होऊन सरकारला प्रतिकार करण्याची पाळी कांहीं बाबतींत तरी आली पाहिजे. यालाच आम्ही अतियोगी चळवळीचा उपक्रम असें म्हणतों. तो थोडाबहुत मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें केला आहे. राष्ट्राचें सामर्थ्य चळवळीच्या संधीनें असेंच वाढत गेल्यास या अतियोगी चळवळीच्या नव्या दिशा राष्ट्रापुढें येऊं लागतील. या दिशेनें पुढें पाऊल टाकण्यास राष्ट्र उद्युक्त होईल अशा तऱ्हेचें मानसिक परिवर्तन करण्याची कमिशनर्बहिष्काराची चळवळ ही एक संधि आहे व त्याचा राष्ट्रीय कार्यकर्ते पुरा फायदा घेतील अशी आम्हास आशा आहे.

# पुस्तकपरीक्षण

**चमत्कारनिर्णय**—( सं. डॉ. श्री. रा. देसाई. प्र. गो. ल. देसाई, विज्ञाननौकाकार्यालय, जयाजी बाजार लष्कर ग्वाल्हेर, किंमत दीड रुपया.)

हें पुस्तक श्रीमायानन्द चैतन्य यांनीं तयार केलें असून त्यामध्यें चमत्काराविषयीं लोकभ्रम कसा रूढ आहे व तो व्यक्तीला व समाजाला सर्वथैव कसा घातक आहे, हें सयुक्तिक व सप्रमाण दाखविलें आहे. ‘ चमत्कारावाचून नमस्कार नाहीं ’ या रूढ म्हणीवरून कोणाहि थोर पुरुषामध्यें थोडाबहुत तरी चमत्कार असावयास पाहिजे, अशी बहुजनसमाजाची समजूत असल्याचें दिसून येतें. साधु, संत, बुवा, बाबा किंवा महाराज या वर्गांत तर चमत्कारावाचून गत्यंतरच नाहीं अशी स्थिति झाली आहे. वाचकांनीं हें पुस्तक काळजीपूर्वक वाचल्यास वरील समजुतीचा घातकपणा चांगलाच कळून येण्याजोगा आहे. या दृष्टीनें पाहातां हें पुस्तक अपूर्व आहे यांत शंका नाहीं.

कांहीं आधुनिक सुशिक्षितांनीं ह्या चमत्कारमीमांसेचा थोडाफार विचार केला आहे हें खरें. पण रूढ असलेल्या यच्चयावत् सर्व दंतकथा खऱ्या कशा ठरविता येतील इकडेच बहुतेकांचा कल असल्याचें दिसून येतें. पण प्रस्तुत ग्रंथकारानें या बाबतींत लोकांच्या या भोळ्या भावनेस चांगलाच धक्का दिला आहे. ‘चमत्कार’ कल्पनाच साफ खोटी आहे असें ग्रंथकारानें सयुक्तिक सिद्ध केलें असून त्यांत जुन्यानव्या सर्व प्रकारच्या चमत्कारांचा परामर्ष घेतला आहे. या विवेचनातील कांहीं किरकोळ स्वरूपाचे दोष ठळकपणें वाचकाच्या नजरेस येण्यासारखे आहेत. ग्रंथकारानें ते पुढील आवृत्तींत काढून टाकावेत या हेतूनें त्यांचा प्रथमच उल्लेख करतों.

शास्त्रीय सिद्धान्ताचें विवेचन करतांना भाषेचा सोपेपणा एकसारखा कायम ठेवणें अवघड असतें; म्हणूनच ज्या त्या शास्त्रांतील बहुजनसमाजाचे तोंडीं रूढ झालेले पारिभाषिक शब्द शक्य तितके उपयोगांत आणण्याची पद्धति शिष्टसंमत आहे. असें न करतां प्रत्येक लेखकानें स्वतःच्या सोयीप्रमाणें आपापल्या पुस्तकाची नवीन परिभाषा बनविल्यास ती निष्कारण दुर्बोध झाल्यावांचून राहात नाहीं. ‘कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्’ ही संस्कृत शब्द योजना लोकांच्या तोंडीं प्रायः रूढ झाली आहे आणि तिचा अर्थहि साधारणपणें ठरल्यासारखाच आहे. असें असतां या म्हणीचा अर्थ करतांना कल्पना व भाषा फारच दुर्बोध झाली आहे (पृ. ९). वरील म्हण व तिचा अर्थ जसाच्या तसाच उपयोगांत आणला असता तर विवेचनाची हानी झाली असती असें पूर्वापर संदर्भावरून दिसत नाहीं. त्याप्रमाणेंच पारिभाषिक शब्दांची योजना देखील शक्य तितकी रूढीला धरूनच करणें जरूर आहे. सकाम कर्म व निष्काम कर्म हे पारिभाषिक शब्द असून सर्वांच्या परिचयाचे आहेत. आणि या शब्दांचे अर्थ देखील सामान्यतः लोकास माहीत आहेत. असें असतां संचित म्हणजे निष्काम कर्म व प्रारब्ध म्हणजे सकाम कर्म असें दिलें आहे ( पृ. ४९ ). या चमत्कारिक शब्दयोजनेमुळें उत्पन्न होणाऱ्या अनेक अडचणी टाळण्याकरितां वरील दोन शब्दांची फोड व तिचें समर्थन पुष्कळ विस्तारानें करावें लागलें आहे. त्याचप्रमाणें दृष्टान्त किंवा उदाहरणें देखील इतिहास किंवा लोकव्यवहार यामध्यें प्रसिद्ध असलेलींच यावयास पाहिजेत. प्रस्तुत पुस्तकांत बहुतेक दृष्टान्त लोकप्रसिद्धच आहेत, परंतु कांहीं उदाहरणें अगदींच चमत्कारिक दिसतात. अफूचा व्यापार करणाऱ्या दोन इसमांचा दृष्टान्त हें असेंच एक उदाहरण होय (पृ. ४५-४६ ).

“सिद्धस्य गतिश्चिंतनीया” या न्यायानेंच बहुतेक चमत्कार खरे ठरविण्याचा आजपर्यंत पुष्कळांनीं प्रयत्न केला आहे. त्यांत कोणी चमत्कार रूपकात्मक ठरविले

तर कोणी त्याचा वेगळाच अभिप्राय काढून दाखविला. या प्रयत्नानेंहि चमत्कारबुद्धीला शास्त्रीय पाठिंबा मिळून ती अधिकच दृढमूल झाली. प्रस्तुत ग्रंथकारानें बऱ्याच चमत्कारांचा योग्य समाचार घेतला असून चमत्कार-कल्पना ही अजीबात खोटी आहे असें अनेक ठिकाणीं कंठरवानें सांगितलें आहे. तथापि कांहीं कल्पना अशक्य व खरोखरच असंभवनीय दिसत असून देखील त्यांची येन केन प्रकारेण उपपत्ति लावण्याचा जो निष्फळ प्रयत्न या पुस्तकांत दिसतो त्यावरून या चमत्कार-कल्पनेच्या मोहकपणानें प्रस्तुत ग्रंथकारासहि अंशतः तरी पछाडलें आहे असेच म्हणावें लागतें. उदाहरणार्थः-रामानें छायारूप सीता आश्रमांत ठेविली व खरी सीता अग्नीत लपविली. ही कथा घेऊन या चमत्काराची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न केला आहे! सीतेला अग्नींत ठेविली म्हणजे तिला ज्ञानाग्नींत दग्ध केली म्हणजे तिला ज्ञानाचा बोध केला. इतकी दूरान्वित कल्पना केल्यानंतर चमत्काराची मीमांसा करण्यांत स्वारस्य तें काय राहिलें? (पृ. १४५) दुसरें उदाहरण म्हणजे मारुतीनें द्रोणागिरि पर्वत आणल्याची कथा होय. ग्रंथकार म्हणतात, 'मारुतीनें पर्वतच्या पर्वत उचलून आणला नसून, पर्वतावरून मुख्य दिव्य औषधी द्रोणांत ठेवून आणल्या, आणि याच अर्थानें त्याला द्रोणागिरि असें नांव दिलें आहे' (पृ. १५०). अशाच प्रकारचें एकनाथांनीं महारांना भोजन दिल्यानंतर पितरांना भोजन देऊन तृप्त केल्याचें उदाहरण होय. व वरील पद्धतीनेंच ग्रंथकारानें त्याची कांहीं तरी उपपत्ति लावली आहे. उपपत्तीची ही पद्धति स्वीकारल्यास कोणत्याहि चमत्कारिक दंतकथांचें समर्थन करणें अवघड जाईल असें वाटत नाहीं. उदाहरणार्थ, गजगौरीच्या कथेंत 'भीमानें स्वर्गांतून इंद्राचा ऐरावत आणला' असें वर्णन आहे. याचें तात्पर्य असें सांगतां येईल कीं "पूर्व ही इंद्राची दिशा. इंद्राकडे म्हणजे त्या दिशेच्या इंद्र नांवाच्या राजापासून 'ऐरावत' या नांवाचा हत्ती पराक्रम करून आणला व कुंतीचें गजगौरी व्रत निर्विघ्नपणें पार पाडलें."

असो. अशा कल्पनांनीं चमत्कारांची खरी मीमांसा न होतां, त्यांची अशी उपपत्तीच अधिक हास्यास्पद होते. आणि व्यक्तीचे व समाजाचे मनांत ही हानिकारक चमत्कारबुद्धीच दृढ होण्यास ती कारणीभूत होते. यापेक्षां ज्या चमत्कारांची उपपत्ति लागत नाहीं ते सर्वथैव कविकल्पनात्मक किंवा आमूलाग्र मिथ्या होते असें म्हणणें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अधीक श्रेयस्कर होय. प्रस्तुत ग्रंथकारांनीं अशा अनेक चमत्कारिक व अद्भुत पौराणिक कथा साफ खोट्या आहेत असें अनेक ठिकाणीं स्पष्ट म्हटलें आहे. मग इतर चमत्कारांचें अशा रीतीनें समर्थन करण्याचा त्यांनीं इतका अट्टाहास कां केला न कळे!

प्रस्तुत पुस्तकांत झालेली विषयाची मांडणी देखील दुसऱ्या आवृत्तींत बदलावयास पाहिजे. कारण चमत्कारनिर्णयाच्या वाचनाला सुरुवात झाल्यापासून प्रसिद्ध चमत्कारिक गोष्टींचा निर्णय सदर ग्रंथकार कसा काय लावतो, हें पाहाण्याकडे वाचकाचे डोळे लागून राहाणें साहजिक आहे. परंतु पृ. २१२ पासून सुरू होणाऱ्या परिशिष्टापर्यंत वाचकांची ही जिज्ञासा अतृप्ततच राहाते. पृ. २१२ ते २६७ पर्यंतचा मजकूर पुस्तकाचे मध्यें यावयास पाहिजे होता. कारण चमत्कारांचें वर्गीकरण, त्यांचा कार्यकारणभाव व त्यांना लागू पडणारीं अनेक प्रकारचीं उदाहरणें आणि त्यांचें शास्त्रशुद्ध तात्पर्य वगैरे मनोरंजक व बोधप्रद असे विषय याच प्रकरणांत आले आहेत. या उदाहरणांचीच अधीक सयुक्तिक उपपत्ति करून त्याला पहिल्या व दुसऱ्या भागांतील विषय जोडले असते तर हें विवेचन अधिकच सरस वठलें असतें. पहिल्या दोन भागांतील पुष्कळ चिकित्सक विषय अनवश्यक व अप्रस्तुत वाटतो तर परिशिष्टांतील विवेचन अपुरें वाटूं लागतें.

असो. परिशिष्टांतील चमत्कारांचें वर्गीकरण अत्यंत मार्मिक व शास्त्रशुद्ध आहे. त्याचा नीट अभ्यास केल्यास कोणता चमत्कार कोणत्या सदरांत घालावयाचा याची कोणालाहि सहज अटकळ होण्याजोगी आहे. चमत्कार-कल्पनेपासून उत्पन्न होणारी भावना खऱ्या जिज्ञासेस कशी मारक असते हें प्रस्तुत ग्रंथकारांनीं कित्येक ठिकाणीं फारच उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. प्राचीन ऋषींनीं व आचार्यांनीं इतकी मोठी शास्त्ररचना केली असून देखील अशा शास्त्रप्रचुर संस्कृतीची इतकी भयंकर अवनति कां झाली? असा प्रश्न प्रत्येक विचारी हिंदूच्या मनांत उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाहीं. बुद्धीला सतेज करणारें हें शास्त्रीय वाङ्मय हिंदूंची सामाजिक अधोगति थांबविण्यास कां समर्थ झालें नाहीं? या प्रश्नाचें उत्तर हिंदूंचा 'भोळा भाव' हें होय. ज्यांनीं ज्यांनीं शास्त्रीय ग्रंथ लिहून ठेविले त्यांच्या त्यांच्या चरित्राविषयीं कांहीं ना कांहीं अद्भुत कल्पना लोकांत भरपूर प्रचलित असल्याचें दिसतें. उदाहरणार्थ, कालिदासाला झालेला काली देवीचा प्रसाद, पाणिनी ऋषीला ऐकूं आलेलीं शंकराच्या डमरूंतील सूत्रें, भट्टोजी दीक्षितास झालेला समंधाचा अनुग्रह व वामन पंडितास ब्रह्म-

राक्षसाकडून मिळालेला इषारा इत्यादि. अष्टसिद्धीच्या कल्पना तर इतक्या अमर्याद वाढल्या आहेत कीं कित्येक चांगल्या चांगल्या सुशिक्षितांना देखील या सिद्धींच्या जोरावर इंग्रजांपासून आपलें स्वातंत्र्यहि हिसकावून घेतां येईल असें वाटतें !!

व्यक्तिसामर्थ्य कितीहि वाढले तरी समष्टीच्या कक्षेतून व्यक्तीला बाहेर पडतां येत नाहीं हा सिद्धान्त प्रस्तुत ग्रंथांतील विवेचनानें जिज्ञासूस चांगलाच पटेल अशी आमची समजूत आहे. अष्टसिद्धींची प्रचलित कल्पना अशी कीं, अणिमा सिद्धि प्राप्त झालेला मनुष्य वाटेल तितकें सूक्ष्म रूप धारण करतो व परमाणूप्रमाणें आपल्या स्थूल देहानें सर्वत्र संचार करूं शकतो. याचप्रमाणें इतर सिद्धीविषयीहि अशाच भ्रामक समजुती प्रचलित आहेत. वस्तुस्थिति अशी आहे कीं, स्थूल देहाशीं या सिद्धींचा कांहींएक संबंध नसून, त्यांचा मनुष्याच्या अंतःकरणाशीं संबंध आहे. ज्याचें आत्मसंयमन पूर्ण झालें व अंतःकरण शुद्ध झालें, त्याच्या बौद्धिक विकासामध्यें या सर्व अष्टसिद्धी प्रगट होतात. म्हणजे, अणिमा गरिमादि सिद्धी हे या स्थूल देहाचे धर्म नसून शुद्ध बुद्धीचे धर्म आहेत. अष्टसिद्धीवरील प्रस्तुत ग्रंथांतील विवेचन अत्यंत समर्पक असून पूर्ण शास्त्रशुद्ध आहे. त्याचप्रमाणें प्रस्तुत पुस्तकाच्या १५० पृष्ठापासून १८० पर्यंत पातञ्जल योगदर्शनाच्या विभूतिपादांतील बहुतेक सूत्रांचें विवेचन स्पष्ट, सुबोध व अगदीं स्वतंत्रपणें केलें आहे. प्रस्तुत पुस्तकांत श्रीमच्छंकराचार्यांच्या परकायाप्रवेशापासून तो थेट बेझंटबाईंच्या कृष्णमूर्तीच्या नवावतारापर्यंतच्या सर्व कल्पनांचा चांगलाच समाचार घेतला आहे. आजपर्यंत सर्वांनीच चमत्कारकल्पनेचें समर्थन करतांना भगवान पतंजलीचा यथास्थित आधार घेतला आहे.परंतु सूक्ष्म दृष्टीनें पतंजलीचा अभिप्राय काय होता हें निर्विकारबुद्धीनें पाहिल्यास रूढ चमत्कारकल्पनेचा मात्र चमत्कार वाटूं लागतो !! योगी एकाएकीं अन्तर्धान पावतो, म्हणजे त्याला आपल्या स्थूल देहावरील दृश्यपणा पार नाहींसा करून टाकतां येतो, असल्या कल्पनेस पतंजलीचा आधार आहे असें सर्वसाधारण समजतात परंतु त्याचा खरा अर्थ असा आहे कीं, स्वतः स्थूल देह अदृश्य करावयाचा नसून, योग्याला जो पदार्थ पाहावयाचा नसतो किंवा नको असेल त्या पदार्थावरून दृष्टि न हलवितां तो पदार्थ स्वतःला दिसेनासा करणें हेंच खरें 'अन्तर्धान' होय. त्याचप्रमाणें परकायाप्रवेश म्हणजे जिवंतपणीं एका देहांतून दुसऱ्याच्या मृत किंवा जिवंत शरीरांत जाणें व तेथून चाहेल त्या वेळीं परत पूर्वशरीरांत येणे असा अर्थ घेतात. परंतु तो अर्थ सूत्रकाराला अभिप्रेत नसून ज्ञान व तपश्चर्या यांनीं निर्विषय झालेल्या बुद्धीला कारणदेहांत प्रवेश करतां येणें म्हणजे जीवात्म्याचें शुद्ध स्वरूप स्पष्ट समजणें हाच अर्थ सूत्रकार पतंजलि ऋषीस अभिप्रेत आहे, असें प्रस्तुत ग्रंथकारानें ठासून सांगितलें आहे ( पृ. १४२ व १६१ ). ग्रंथकारांनीं पतंजलीच्या सूत्रांचे वाक्यार्थ लावण्यांत फारच उत्कृष्ट बुद्धिकौशल्य दाखविलें आहे. आणि म्हणूनच भगवान पतंजलीच्या योगदर्शनावर लेखकांनीं एक स्वतंत्र व सविस्तर असें मराठी भाष्य लिहून प्रसिद्ध करावें अशी आमची त्यांना शिफारस आहे.

चमत्काराची खरी व्याख्या प्रस्तुत पुस्तकांत एकदोन ठिकाणीं फार चांगली व स्पष्ट दिली आहे. त्याचा अभिप्राय असा कीं, ज्या कार्याचें कारण वर वर पाहातांना मुळींच समजत नाहीं परंतु त्याचा काळजीपूर्वक शोध केल्यावर 'कार्यकारण' संबंध कळतो व हा संबंध कळल्यावर या वेळीं जो सहज आश्चर्ययुक्त आनंद होतो हाच ग्रंथकाराच्या मतें खरा चमत्कार होय. चमत्कार म्हणजे कारणांचे अभावीं घडलेलें कार्य नव्हे तर अज्ञात पण प्रयत्नेज्ञय कारणांनीं घडलेलें व सकृद्दर्शनीं कार्यकारणसंबंधाचा सहज उलगडा होऊं शकत नसलेलें कार्य होय. चमत्काराचा असा खुलासा करणाऱ्या पुस्तकांत मायानंदांनीं स्वतःला 'भगवान' ही पदवी लावून घेणें हें मात्र चमत्कारिक दिसतें.

---

# रिझर्व्ह बँक किंवा गंगाजळी पेढी

( ले.—न. चिं. केळकर )

## लेखांक ३ रा

### गंगाजळीचा उगम

गंगाजळी पेढी म्हणजे गंगाजळीच्या जिवावर चालणारी पेढी. पण गंगाजळी याचा रूढ अर्थ घेतला असतां, वरील विधान दिसण्यात चमत्कारिक दिसतें म्हणून थोडासा खुलासा केला पाहिजे.

गंगाजळी शब्दाचा अर्थ गङ्गोदकानें भरून ठेवलेलें भांडें. या भांड्यांतील उदकाचा उपयोग कोणीहि रोजंच्या खर्चाला करीत नाहीं. आणि कोणी तें तसें खर्च करूं म्हणेल तर या खर्चाला गंगाजळी एक दिवसहि पुरणार नाहीं. मग गङ्गोदक खर्चावयाचें नाहीं तर तें भांड्यांत भरून तरी कशाला ठेवावयाचें? असा प्रश्न सहजच येतो. त्याचें उत्तर हें कीं, समाराधनेसारख्या प्रसंगीं तीर्थ म्हणून लोकांच्या हातावर एकेक पळी घालण्याकरितां किंवा मनुष्य मरावयाला टेकला असतां शेवटीं त्याच्या तोंडांत पवित्र तीर्थ म्हणून घालण्याकरितां. आपल्या संस्थानिक वगैरे लोकांनीं ठेवलेल्या द्रव्यनिधींना अशा अर्थानें गंगाजळी हें नांव देत असत. 'शिंद्यांची गंगाजळी' प्रसिद्ध होती. तिचा अर्थ हाच कीं, त्या खजिन्यांत एकदां पैसा पडला म्हणजे मग तो पुनः सहसा बाहेर निघावयाचा नाहीं. जुन्या–पुराण्या सालचेंच नाणें कोणाला हवें असेल तर सराफ त्या गंगाजळींत हात घालणार किंवा दुष्काळासारखी एखादी अकल्पित आपत्ति संस्थानावर आली तर संस्थानी हुकमानें पैसा थोड्या मुदतीपर्यंत खर्चाकरितां त्यांतून निघणार. नव्या 'गंगाजळी पेढी'ची गंगाजळी जवळ जवळ अशाच स्वरूपाची आहे. पण तिच्यांतील सगळाच्या सगळा द्रव्यनिधि नुसत्या सोन्यारुप्याच्या लगडीच्या रूपानें किंवा नाण्याच्या रूपानें ठेवलेला नसतो, तर त्यांत व्याज उत्पन्न करणारे कर्जरोखेहि असतात. पेढीच्या खर्चाला वगैरे ही व्याजाची रक्कम उपयोगी पडते. विशेष परिस्थितींत मुदलालाहि केव्हां केव्हां थोडाबहुत हात लावावा लागतो. पण तो प्रकार वेगळा व तसा प्रसंगहि थोडा. गङ्गोदकाची गंगाजळी किंवा शिंद्यांची गंगाजळी यासारखी बहुतांशीं या पेढीची गंगाजळी आहे. पण थोडा फरक आहे तोहि सांगितला. कारण गंगोदकाच्या भांड्यांतील पाणी व्याजानें रक्कम वाढते तसें वाढत नाहीं. उलट वाफ होऊन थोडें थोडें कमीच होतें! पण असो.

#### चलनाचे प्रकार

या पेढीच्या गंगाजळीचा उगम कशांत आहे हें आतां पाहूं. हा उगम हल्लींच्या आपल्या चलनी पद्धतींत आहे असें आम्ही प्रथमच सांगतों. पण तो कसा हें खुलासेवार कळण्याकरितां हल्लींच्या आमच्या चलनी पैशाच्या व्यवहाराची थोडीशी माहिती व्हावयास पाहिजे म्हणून ती आधीं देतों. चलन म्हणजे सरकारी चलन हें प्रथम समजलें पाहिजे. हें चलन आज मुख्यतः दोन प्रकारचें आहे—(१) चांदीचा रुपया (२) कागदी नोट. तिसऱ्याहि एक प्रकारचें चलन गतवर्षींपर्यंत बाजारांत सर्रास चालू नसलें तरी,कायदेशीर समजलें जात होतें. पण १९२७ च्या मार्चमध्यें जो कायदा झाला त्यानें हें सोन्याचें नाणें व्यवहारांतून म्हणजे कायदेशीरपणांतून काढून टाकलें आहे. यामुळें हल्लीं जर कोणाजवळ सोन्याचे सॉव्हरिन असतील तर त्याला ते वितळवून किंवा विकून टाकून किंवा तिजोरींत भरून मिळेल तो पैसा उभा केला पाहिजे. ते वितळविले असतां त्यांच्यांतील सोन्याची किंमत आज सुमारें दरसॉव्हरिनला सवातेरा रुपये प्रमाणें भरेल. अशा रीतीनें सोन्याचें नाणें बाजारांतून निघून गेल्यामुळें, त्याचा आपणास हल्लींच्या विषयाच्या चर्चेंत विचार करण्याचें कारण नाहीं. फक्त चलन हा शब्द आला म्हणून, त्या शब्दाची पूर्तता करण्यापुरता त्याचा उल्लेख केला. शिवाय सोन्याचें नाणें कायदेशीर होतें तेव्हांहि त्याचा गंगाजळीशीं म्हणजे तिच्या हेतूशीं कांहीं संबंध नव्हता. कारण तें नाणें बोलूनचालून सोन्याचें म्हणून त्याला दुसरें कोणी तारण लागत नसे. तें या देशांत किंवा परदेशांत आपल्या पायावर नेहमीं खडें राहणारें आहे. पण वर जे दुसरे चलनाचे प्रकार सांगितले त्यांची गोष्ट मात्र तशी नाहीं. म्हणूनच त्यांना तारण लागतें व हें तारण म्हणजेच गंगाजळी. त्या गंगाजळीचे दोन प्रकार आहेत. निदान आजपर्यंत तरी होते. एकाचें नांव 'पेपर करन्सी रिझर्व्ह' म्हणजे कागदी चलनी नोटांची गंगाजळी व दुसऱ्याचें नांव 'गोल्ड

स्टँडर्ड रिझर्व्ह ' म्हणजे सुवर्णमापनाची गंगाजळी. प्रत्यक्ष सोन्याच्या नाण्याला तारण लागत नाहीं हें वर सांगितलेंच आहे. चलनाचें सुवर्णमापन म्हणजे सोन्याचे किंमतीनें चलन मोजणें. पण तें तसें मोजतांना सोन्याच्या बरोबरीनें त्याची किंमत राहील असा नियम नसतो व म्हणूनच त्याला तारण लागतें. असो. आतां ज्या दोन चलनांचा आपणाला विचार करावयाचा त्यांत पेपर करन्सी म्हणजे चलनी नोटा येतात व सोन्याच्या मापानें मोजला जाणारा चांदीचा रुपया येतो. पैकीं चांदीच्या रुपयाला सोन्यानें मोजणें हें दिसण्यांत कांहीं तरी ठीक दिसतें. कारण त्यांत कांहीं तरी चांदी आहे. सोने हा राजा म्हटला तर चांदीला प्रधानपणाचा तरी मान खास मिळेल. पण कागदी नोटांना सोन्याच्या किंमतीनें मोजावयाचें हें म्हणणें चमत्कारिक दिसतें.

## गंगाजळीच्या दोन तऱ्हा

तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत शिरलें तर नोटा देऊन चांदीचे रुपये मिळतात त्याअर्थी कागदी नोटांची किंमत सोन्याच्या मानानें किती भरते हेंहि पाहावयास पाहिजे. म्हणून पेपर करन्सी रिझर्व्ह व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह या दोहोंचें कार्य व हेतु एकच म्हटलें तरी चालेल. अलीकडे कांहीं दिवसपर्यंत अशीं दोन वेगवेगळीं नांवें प्रचारांत आहेत खरीं. पुढें हे दोनहि रिझर्व्ह ( गंगाजळी ) एकच करण्यांत येतील. तरी पण आजच्या घटकेला तीं दोन वेगवेगळी मानतात म्हणून पेपर करन्सी रिझर्व्ह व गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह यांचा अर्थ वेगवेगळा करून सांगितला पाहिजे.

आतां प्रथम पेपर करन्सी रिझर्व्ह हें काय आहे तें पाहूं. नोटा म्हणजे बोलूनचालून चलनी कागद. यामुळें या चलनाला सगळीच्या सगळी किंमत कृत्रिम असते ही गोष्ट उघड आहे. जवळजवळ एकाच आकाराच्या कागदावर सारख्याच खर्चानें दहा रुपयांची नोट अगर दहा हजार रुपयांची नोट छापली जाते ! अर्थात् जो ह्या दोन कागदांच्या तुकड्याच्या दर्शनी किंमतींतील फरक तो केवळ सरकारनें कायद्यानें ठरविलेला आहे म्हणून! नोटा छापण्याचा अधिकार कायद्यानें सरकाराशिवाय इतर कोणालाहि नाहीं. किंबहुना एखादी खासगी नोट काढून ती आपआपल्यात चालवूं असें कोणी म्हटलें तरी तो एक गुन्हाच होतो. कायद्याच्या आधारानें सरकारनें छापलेल्या नोटा आज सरासरी १९० कोटि रुपयांच्या आहेत. यापैकीं सरासरी १५५ कोटि रुपयांच्या नोटा बाहेर लोकांच्या हातीं असतात. आणि सुमारें २५ ते ३० कोटि रुपयांच्या नोटा सरकारी खजिने किंवा इंपीरिअल बँक ह्यांच्या संग्रहीं असतात. पैकीं सरकारी खजिन्यांतील व इंपीरिअल बँकजवळील नोटा वगळल्या असतां लोकांच्या हातीं ज्या सुमारें १५० कोटि रुपयांच्या नोटा खेळत असतात ते व्यवहाराच्या दृष्टीनें १५० कोटि रुपयेच होत. अर्थात् इतके रुपये लोकांनीं सरकारांत भरून ह्या नोटा विकत घेतल्या असा ह्याचा अर्थ आहे. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें नोटा छापण्याचा खर्च इतका थोडा असतो कीं, ह्या १५० कोटि रुपयांच्या नोटा छापण्याचा व कागदाचा मिळून एकंदर खर्च १ लाख किंवा ५० हजार आला असेल नसेल !

तेव्हां प्रश्न हा कीं, लोकांनीं १५० कोटि रुपये सरकारांत भरून हे जे कागद घेतले त्यांचें काय होणार? याचें पहिलें उत्तर असें कीं, जोंपर्यंत लोकांच्या हातीं या नोटा खेळत्या राहात आहेत तोंपर्यंत त्यांची सगळीच्या सगळी किंमत उभीच आहे. त्यांत एक पैसा कमी होणार नाहीं. बाजारांत दहाची किंवा दहा हजारांची नोट भरण्यांत कोणी कोणास दिली तरी घेत नाहीं म्हणण्याचा कोणासहि अधिकार नाहीं. देणाराप्रमाणें घेणारालाहि त्या नोटेच्या कागदावर लिहिलेली किंमत खरी धरून चालावें लागतें. पण त्याचें दुसरें उत्तर असें आहे कीं, ह्या नोटा कोणाला हातीं ठेवावयाच्या नसल्या व त्या बाजारांत देण्याचें कारण नसलें तर त्यांनीं त्या नोटा घेऊन सरकारी खजिन्यांत किंवा निदान मुंबईस सरकारी करन्सी ऑफिसांत भरल्या असत, त्यावरील दर्शनी किंमतीचे रुपये त्यांना मिळतील असें अभिवचन खुद्द नोटेवरच लिहिलेलें आढळेल. कायद्यानें तें अभिवचन सरकारला पाळावें लागतें व प्रत्यक्ष व्यवहारांत तें पाळलें जातेंहि. अशा रीतीनें कागदी नोटांचा मूळ उगम जेथून, तेथेंच त्या परत गेल्या असतां, त्याची किंमत तयार असते. पण थोड्या थोडक्या नोटा खजिन्यावर जातील तोंपर्यंत ठीक. व त्या वटविण्याइतके रुपये सरकाराजवळ केव्हांहि मिळतील.

## नोटांचें तारण

पण आपण अशी कल्पना करूं कीं, आज लोकांच्या हातीं ज्या १५० कोटि रुपयांच्या नोटा आहेत, त्या लोकांनीं कट करून सगळ्याच्या सगळ्या आणून सरकारी करन्सी ऑफिसमध्यें एकदम दिल्या तर त्यांच्या किंमतीइतकें चांदीचें नाणें सरकारजवळ असेल काय ? अर्थात् असणार नाहीं. कारण इतक्या नोटांच्या भरपूर किंमतीइतके नगदी चांदीचे रुपये जर सरकारला खजिन्यांत नेहमीं बाळगावे लागले व बाळगतां आले तर हा नोटा छापण्याचा खटाटोप तरी कशाला? त्या छापण्याचा खर्च कितीहि थोडा असला तरी वरील

कल्पनेच्या प्रसंगांत तेवढासा खर्चहि भूर्दंड म्हणावयाची पाळी यावयाची. पण तो खरोखरी भूर्दंड नव्हे. कारण त्या एवढ्याशा खर्चानें १५० कोटि किंमतीचे रुपये पाडण्याला लागणारी चांदी खरेदी करण्याची वांचली. हा त्यांत केवढा तरी फायदा. पण आतां आपण ह्याच्या अगदीं उलट कल्पना करूं कीं, गेल्या महायुद्धांत कित्येक राष्ट्रें गडबडलीं तेव्हां घडलें त्याप्रमाणें या नोटा लोकांनीं करन्सी कचेरींत आणून भरल्या आणि सरकारनें त्यांना असें सांगितलें कीं, या नोटांचा मोबदला देण्याला आमच्याजवळ पैसा शिल्लक नाहीं. तर याचा अर्थ सरकारनें लोकांना फसवून १५० कोटि रुपयांचें दिवाळें काढलें असा होईल. पण सुराज्य किंवा सुस्थित राज्य म्हणून जेथें आहे तेथें कल्पनेंतील हे दोनहि प्रकार व्यर्थच होत. म्हणजे १५० कोटी रुपयांच्या नोटांचें तोरण म्हणून १५० कोटि रुपये कोणतेंहि सरकार शिल्लक ठेवीत नाहीं. आणि हिंदुस्थानांतील लोक १५० कोटींच्या नोटा सरकारावर एकदम आणून वटवीतहि नाहींत. अर्थात् ह्या दोहोंमधील तिसरी कांहीं तरी स्थिति अमलांत असते. आणि तिनें सर्व व्यवहार प्रायः सुरळीत चालतात. ही मधली स्थिति म्हणजे सरकारनें कांहीं एका प्रमाणांत, चलनी नोटांच्या ऐवजीं देण्याकरितां म्हणून कांहीं नगदी रुपये नेहमीं संग्रहीं तयार ठेवावयाचे. आणि असें केलें असतां, तारण शेंकडा १०० इतकें भरपूर न ठेवतांहि दिवाळें निघण्याचा प्रसंग येत नाहीं. याचें कारण असें कीं, लोकांच्या हातीं असलेल्या नोटा कांहीं एका मर्यादेपलीकडे खजिन्यांत परत एकाच वेळीं जात नाहींत हा प्रत्यक्ष अनुभव असतो, आणि जाणार नाहींत हें शास्त्रसिद्ध अनुमान असतें.

विमा कंपनींत विमा उतरलेले शेंकडा १०० लोक जसे एकदम मरत नाहींत तशीच ही गोष्ट होय. किंवा कोणत्याहि गांवातील सगळ्या घरांत एकदम मुलें जन्माला आलीं किंवा गांवांतील सगळ्या घरांत एकदम सर्व मनुष्यें मेलीं असें होत नाहीं. तर सामान्यतः दररोज किती मनुष्यें जन्मतील किंवा मरतील याची किमान व कमाल मर्यादा अनुमानशास्त्रानें व आंकड्यांच्या हिशेबानें ठरवितां येते. अशा रीतीनें चलन पद्धतीच्या बाबतींत असें अनुमान करतां येतें कीं, नित्य व्यवहारांत दररोज किंवा दरसाल अमुक इतक्या नोटा परत पाठविण्याकरितां म्हणजे त्याच्या मोबदला नगदी रुपये मागविण्याकरितां सरकारांत येऊं शकतील. हें सरासरीचें प्रमाण झालें. कित्येक प्रसंगीं ही मागणी वाजवीहून पुष्कळ खालीं जाईल व एखादें युद्ध, दिवाळखोरीची सांथ वगैरे नैमित्तिक प्रसंगीं ती मर्यादा या सरासरीच्या बरीच वर जाईल. आंकड्यांनीं बोलावयाचें तर असें म्हणूं कीं, बाहेर १०० रुपयांच्या नोटा खेळत्या असल्या तरी, मोबदल्याकरितां म्हणून सरकारनें आपल्या खजिन्यांत ४० रुपये ठेवले तरी प्रायः काम भागतें. एखादे वेळीं २० रुपयांच्याच नोटा मोबदल्याकरितां येतील. आणि तसें झालें तरी सरकाराजवळ तितकी तयारी असतेच. चाळीसच्या चाळीस रुपये द्यावे लागतील इतका प्रसंग फारच क्वचित्. पण आला तरी दिवाळखोरी नाहींच म्हणावयास हरकत नाहीं. पण हें प्रमाण वर झुकत चाललें आणि चाळिसाच्या वरहि मजल जाण्याचा संभव आहे असें सरकारास वाटलें तर त्यांच्याजवळ सत्तेची टांकसाळ असते, आणि बाजारांत चांदी विकत घेऊन, रुपये पाडून, नोटांऐवजीं रुपये देण्याचा खर्च त्यांना भागवितां येतो. वरील सर्व विवेचनावरून हें दिसून येईल कीं, चलनी नोटांकरितां कांहींएक तारण म्हणून सरकारला ठेवावें लागतें. या चलनी नोटा म्हणजेच पेपर करन्सी आणि त्याचें तारण हेंच रिझर्व्ह म्हणजे गंगाजळी. आंकड्यांनीं सांगावयाचें तर तें असें कीं, गेल्या वर्षाच्या मार्च महिन्यांत या गंगाजळीची वांटणी खालीलप्रमाणें होती. एकंदर चलनी नोटा १८४ कोटि; त्यांच्याकरितां सोन्या-चांदीचें तारण म्हणून सरकाराजवळ सुमारें ९६ कोटि किंमतीचे चांदीचे रुपये, १२०-२२ कोटी रुपयांचें सोनें नाणें आणि ८॥ कोटि रुपयांची चांदी इतका ऐवज हातीं असल्यावर सरकारला आपलें दिवाळें निघण्याची जशी भीति नाहीं, त्याचप्रमाणें आपल्या नोटांचे रुपये बुडतील अशी भीति लोकांनाहि नाहीं! हाच या गंगाजळीच्या तारणाचा उपयोग.

---

# राजकारणाचे अंतीं रण आहे

अनागतविधाता च प्रत्युत्पन्नमतिश्च यः ।

द्वावेव सुखमेधेते दीर्घसूत्री विनश्यति ॥

—महाभारत शांतिपर्व

गेल्या अंकीं आम्ही 'प्रतियोग' व त्याचेंच परिणत स्वरूप 'अतियोग' यांचें थोडेसें दिग्दर्शन केलें आहे. मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें एक पाऊल पुढें टाकून 'स्वातंत्र्य' ध्येयाची घोषणा केली. या अंतिम ध्येयाचा उच्चार कित्येकांना अगदींच निरर्थक व निरुपयोगी तर कित्येकांना अडचणीचा व विघातक वाटतो. आमच्या मतें तो निरुपयोगी नाहीं. पण त्या उच्चाराबरोबरच भावी अंतिम ध्येयासाठीं अवश्यक ठरणारा भावी व्यवहार व त्याचीं आजच्या व्यवहारालाहि भिडणारीं सूत्रें यांची जाणीव उत्पन्न करून ती राष्ट्रांत अखंड टिकविण्याचे प्रयत्न झाले नाहींत तर मात्र हा ध्येयोच्चार निरुपयोगी व कदाचित् विघातकहि ठरेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अतियोगी प्रयत्नवादाविना स्वातंत्र्यध्येयवाद, काठीविरहित भाल्याचें टोंक अगर इंधनविरहित अग्नि याप्रमाणें ठरेल आणि सायमन कमिशनवरील रागाचे भरांत तोंडची दवडलेली वाफ यापेक्षां प्रतिपक्षी त्यास अधिक किंमत देणार नाहींत. ध्येयानुसार वृत्तींत व कृतींत पालट झाला तरच राष्ट्रांत स्वातंत्र्यध्येयवाद मुरला असें म्हणतां येईल. या मनोवृत्तींतील बदलाचा विचार अनेक बाजूंनीं करतां येण्यासारखा आहे. स्वराज्याची चळवळ प्रत्युत्पन्नमतित्वावर, प्रसंगाला पुरें पडण्याच्या प्रतियोगी कृतीवर भागली. पण स्वातंत्र्याच्या चळवळींत राष्ट्रीय कार्यकर्ते अनागत-विधाते व अतियोगी बनले पाहिजेत. त्यांनीं आज अनागत पण भावी काळांत ज्यांची प्राप्ति अपरिहार्य आहे अशा घटनांची आगाऊ विवेचना केली पाहिजे. भावी जागतिक युद्धासंबंधाचा विचार आम्ही गेल्या अंकीं लिहिलाच होता. पण विचारांच्या आटोक्यांत त्याचेपलीकडेहि एक युद्ध आहे. तेंहि आज अनागत असलें तरी त्याचा विचार क्रमप्राप्त आहे. तो टाळून चालावयाचें नाहीं. आणि टाळावयाचा असेल तर 'स्वातंत्र्या'चें ध्येय निमूटपणें सोडून दिलेलें अधिक बरें.

साम्राज्यांतर्गत स्वराज्य एक वेळ युद्धावांचून मिळेल, पण स्वातंत्र्य मात्र अखेरच्या अंतिम युद्धाखेरीज मिळणें संभवनीय नाहीं. आजपर्यंतच्या इतिहासाला ज्ञात असलेल्या सर्व प्रकारच्या व सर्व परिस्थितींतल्या अनेक परतंत्र राष्ट्रांचा स्वातंत्र्यप्रयत्नांचा इतिहास अवलोकन केला तर त्यांतून एकच एक अबाधित व सर्वमान्य असा सिद्धान्त निघतो. तो हाच कीं कोणत्याहि परतंत्र राष्ट्राला अखेरीस शस्त्राशिवाय स्वातंत्र्य प्राप्त झालेलें नाहीं. स्वातंत्र्य व युद्ध यांची युति अखंड आहे. किंबहुना स्वातंत्र्याची कल्पना मनांत येतांच युद्धाची कल्पना त्याबरोबर येणें अपरिहार्य आहे. तशी येत नसेल तर ती स्वातंत्र्याची कल्पनाच भ्रामक व खोटी होय. या गोष्टींचा इषारा स्वातंत्र्यध्येयाचें प्रतिपादन करणाऱ्या प्रत्येक वक्त्यानें व लेखकानें राष्ट्राला दिला पाहिजे. पौराणिक घनःश्याम श्रीरामापासून तों आधुनिक स्वातंत्र्याच्या झगड्यांतील वीरांपर्यंतचे सर्व पुरुष व त्यांचे प्रयत्न हे 'रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळेना' असाच सिद्धान्त गर्जून सांगत आहेत. प्रत्यक्ष 'राजकारण' या पंचाक्षरी शब्दालाहि विचारलें तर तो देखील 'रण' या अंतिम अक्षरांनीं असेंच सुचवितो कीं 'सर्वं राजकारणं परतंत्राणाम् रणे परिसमाप्यते'

आजपर्यंतच्या सर्व परतंत्र राष्ट्रांच्या परिस्थितीपेक्षां हिंदुस्थानाची परिस्थिति अत्यंत बिकट आहे. सर्व इतिहास धुंडाळला तरी अशा भयंकर परिस्थितींत सापडलेलें दुसरें राष्ट्र आढळावयाचें नाहीं. जितांच्या बाजूला अवाढव्य व अनावर प्रदेशविस्तार, धर्मभेद, पंथभेद, वंशभेद, परंपराभेद, जातिभेद, भाषाभेद, व संस्कृतिभेद व हितसंबंधभेद यांची अपरंपार खिचडी आणि जेत्यांच्या बाजूला जगांत पहिल्या प्रतीची साम्राज्यसत्ता व सर्व प्रकारचें शस्त्रबळ शास्त्रबळ, बुद्धिबळ, युक्तिबळ, ऐक्यबळ यांचा अमूप सांठा, असला बिनतोड प्रसंग इतिहासांत कोणत्याहि राष्ट्रावर आजपर्यंत आलेला नाहीं. हिंदुस्थानाचें हें उदाहरण असें अत्यंत विलक्षण असलें तरी तेवढ्यामुळें वर दिलेल्या परतंत्रांच्या राजकारणांतील अबाधित सिद्धान्त मात्र हिंदुस्थानाला लागू नाहीं असें म्हणतां यावयाचें नाहीं. उलट हिंदुस्थानाची परिस्थिति जितक्या पटीनें अधिक बिकट तितक्या पटीनें हा अंतिम सिद्धान्त अधिकच बळकट होतो. स्वजातीय व सजातीय लोकांपासून स्वातंत्र्य मिळविण्यास लहानसान सुटसुटीत व एकमुखी एकजीव राष्ट्रांना जर संग्राम अखेरीस करावा लागला तर हिंदुस्थानाला तो कसा टाळतां येईल? इटाली, पोलंड, ग्रीस इत्यादि युरो-

पियन राष्ट्रांचा, अमेरिकेचा व दक्षिण–आफ्रिकेचा इतिहास जर दृष्टीआड करावयाचा नसेल तर त्या इतिहासांनीं कंठरवानें सांगितलेला हा अबाधित सिद्धान्त मान्य केला पाहिजे.

पण आजचें निःशस्त्रांचें निःशस्त्र राजकारण चालविणारे देशांतील सर्व पक्षोपपक्ष यावर असें विचारतील कीं, "राजकारणांतल्या या अंतिम सिद्धान्ताची आज वाच्यता कशाला ? तो कोणास मान्य नाहीं ? पण त्या सिद्धान्ताइतकाच दुसरा सिद्धान्तहि खरा आहे कीं, आज या अंतिम सिद्धान्तापासून राष्ट्र बरेंच दूर आहे. आजच्या परिस्थितींत सशस्त्र बंड हें अशक्य, अव्यवहार्य आहे इतकेंच नव्हे तर राष्ट्रहितदृष्ट्या विघातकहि आहे. उगाच त्या अंतिम सिद्धान्ताचा नुसता उच्चार करणेंहि राष्ट्रीय दृष्ट्या चुकीचें. कारण त्यामुळें तीव्र नैराश्य उत्पन्न होऊन आजच्या शांततामय राष्ट्रोन्नतीच्या प्रयत्नांत शिथिलता येईल. राजकारणांतला हा अखेरचा सर्वमान्य सिद्धान्त या चालू पिढींत तरी दृष्टाच्या टप्प्यांतला नाहीं. मग या लांबच्या गोष्टीचा उच्चार किंवा विचार तरी कशाला ? तें पुढें काय व्हावयाचें तें होईल. न बोललें तरीहि होणारच. मग त्याच्या बोलण्यानें व विचारानें आजच्या परिस्थितिप्राप्त मार्गामध्यें बिघाड कशाला ? "

राजकारणांतील रणाचा अंतिम सिद्धान्त आजच्या पिढीच्या तत्कालिक दृष्टीच्या टप्प्यांत येत नाहीं हें खरें. पण तत्कालिक दृष्टीच्या टप्प्यांत नसला तरी मनाच्या टप्प्यांत खास आहे. मन हें स्वैरसंचारी आहे. 'बैसिजे तरी हिंडवी दाही दिशा' असें तें देशकालाच्या मर्यादांचा विचार न करतां वाऱ्यासारखें यथेच्छ भ्रमण करूं शकतें व करीतहि असतें. या दृष्टीनें वर वर्णन केलेले अंतिम विचार देशाची विवंचना करणाऱ्याचे मनांत अनेक वेळां येऊन त्यांत भयंकर खळबळ केल्याशिवाय राहात नाहींत. मरण हें शक्य तितकें दूर लोटावें हा प्रत्येक व्यक्तीचा प्रयत्न. मरणाचा विचारहि अशुभ व खेदकारक. पण व्यक्तीच्या मनांत तो अनेकवार आल्याशिवाय राहतो काय ? आतां या विचारानें नैराश्यवाद नेहमींच उत्पन्न होतो असें नाहीं. ज्या मरणाच्या प्रदेशांत पाऊल टाकणारा मानवी प्रवासी पुनः त्या प्रदेशाची हकीकत सांगावयास परत येऊं शकत नाहीं त्या संबंधीं विचार करतां मन दिङ्मूढ होऊन हॅम्लेटसारखे कांहीं लोक " जगावें का मरावें" या कोड्यांत गुरफटून निष्क्रिय होत असतील. पण उलट याच मरणाच्या निर्घृण अंतिम अपरिहार्यतेवर नजर देऊन "गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्' असा निश्चय करून त्या दृष्टीने जन्मभर स्वकर्तव्याचरण निरलसपणें करणारे कर्मयोगीहि अनंत निपजतात. याखेरीज अगदीं प्रवाहपतित व्यावहारिकहि मरणाचा अंतिम विचार सोडीत नाहींत. मरण अपरिहार्य म्हणून स्वतःच्या अंत्यविधीच्या साहित्याची आजच कोणी जमवाजमव करीत नाहीं हें खरें. पण तो मृत्युपत्र करून ठेवतो, व आयुष्याचा विमाहि उतरतो. या दृष्टीनें तो मरणाचीच तयारी करीत नसतो काय? मरणाआधीं सरणांत घालणें हें मूर्खपणाचें किंवा मरणाचा विचार करून गांवठी संस्कृतांतील म्हणीप्रमाणें 'कर्तव्यं तरि मर्तव्यं' ' न कर्तव्यं तरि मर्तव्यं ' असें म्हणून प्राप्तकर्तव्य टाकणारेहि मूर्खच. पण मनुष्याच्या जीवितयात्रेच्या अंतिम टोकावर लक्ष देऊनच कर्तव्य, स्फूर्ति, त्याग व कर्मयोग हींहि घडत असतात व व्यावहारिक योजनाहि व्यवहारी करीत असतात हें विसरतां कामा नये.

आत्महत्या करणें हा कायद्यानें गुन्हा ठरविलेला असला तरी स्वतःच्या मृत्यूचा विचार नेहमीं मनांत बाळगणें हा कांहीं गुन्हा नाहीं. उलट प्रपंचांत अनासक्तचित्त राहावें व सुखदुःखादि द्वंद्वांच्या आवेगांची तितिक्षा उत्पन्न व्हावी म्हणून धर्महि हा विचार मनांत बाळगण्यास सांगत असतो. सरकारविरुद्ध सशस्त्र बंड करणें, त्याची तयारी करणें व त्याला उक्तीनें अगर क्रियेनें कोणत्याहि प्रकारें प्रोत्साहन देणें हा पिनल कोडानें गुन्हा ठरविला आहे. आणि ही कायदेशीर दृष्टि बाजूस ठेवून केवळ देशहितदृष्टि ठेवली तरीहि अशा प्रकारची उक्ति अगर कृति आजच्या परिस्थितींत आपलेंच नुकसान करणारी आहे हें खरें. पण असें असलें तरी आजच्या तत्कालिक दृष्टीच्या टप्प्याबाहेरची ही अंतिम अपरिहार्यता मनांत व राजकीय विचारक्षेत्राच्या एका कोपऱ्यांत जागृत असावी असें म्हणण्यांत गुन्हा नाहीं. प्रत्यक्षतः नुकसान नाहीं आणि प्रस्तुतच्या शांततामय चळवळीला योग्य, सूक्ष्म व दूरदर्शी वळण लावण्यास मात्र ही अंतिम अपरिहार्यतेची जाणीव अतिशय उपयोगी पडणारी आहे. दृष्टीच्या टप्प्याचे बाहेर असलेल्या गोष्टींचा आजच्या कार्यक्रमावर परिणाम होत नाहीं असें मुळींच नाहीं. जातिभेद सर्वस्वी मोडणें ही दृष्टीच्या टप्प्याच्या बाहेरची व कांहीं अंशीं अनिश्चित अशी गोष्ट असली तरी आज आपण पोटजातींचें एकीकरण करतोंच कीं नाहीं ? भाषावार प्रांतरचना सर्व हिंदुस्थानांत पूर्णपणें अमलांत येणें ही या पिढीच्या दृष्टीच्या टप्प्याचे बाहेर पडते. पण त्या दिशेनें ती गोष्ट केव्हां तरी व्हावयाची आहे हें मनांत ठेवून आपण आजच्या कामांचें धोरण आंखतों. भूतकालाची जुनी परंपरा एकदम तोडतां येत नाहीं व तोडणें इष्टहि नसतें. या

भूतकालाचा धागा गृहीत धरूनच आपल्याला पुढें जावयाचें असतें. भूतकालाच्या छायेंतून जसा वर्तमानकाल सुटत नाहीं तसा तो भविष्यकाळाच्या छायेंतूनहि सुटत नाहीं. भूतकाळाच्या गोष्टी जशा निश्चित असतात तशा भविष्यकाळाच्या निश्चित नसतात हें खरें. पण मनांतून भविष्यकाळाविषयीं कांहीं तरी अंदाज, आशावाद, तर्क याचा आधार असल्याशिवाय वर्तमानकालाची कार्यप्रवृत्ति ध्येयशून्य व अनिश्चित अशीच राहते.

या भविष्यकाळाच्या अंतिम कल्पनेची छाया आजच्या कामाच्या धोरणावर कशी पडते? आजचें राजकारण निःशस्त्र व शांततामय आहे. तें कांहीं दिवस तरी तसेंच राहणार. भावी युद्धाच्या नुसत्या अंधुक कल्पनेनें त्यांत कसा फरक होऊं शकेल? असे प्रश्न सहजच कोणी विचारतील. पण सूक्ष्म विचार केला असतां तेंहि दिसून येणें फारसें कठीण नाहीं. त्याचें कांहींसें दिग्दर्शन आम्ही यापुढील लेखांत करणार आहोंत.

# गोव्यांतील पोर्तुगीजांचा धर्मप्रसार

(ले.—**रामकृष्ण गोपाळ भिडे.**)

मसूर ब्रह्मचर्याश्रमांतील उत्साही कार्यकर्ते श्री.आनंदमूर्ती यांनीं गोवें प्रांतांत सुमारें ४००वर्षेपर्यंत बंद झालेलीं हिंदुधर्माचीं द्वारें खुलीं करून गेल्या आठवड्यांत हजारों पूर्वहिंदूंना पुनरपि स्वधर्मांत अधिष्ठित केलें. या वार्तेनें प्रत्येक हिंदुधर्माभिन्याचें अंतःकरण आनंदानें उचंबळून आल्याखेरीज राहाणार नाहीं. बाह्यतः परधर्माचा डाग लागला असला तरी इतक्या दीर्घकालांतहि तेथील शुद्धिकृतांनीं आजतागायत आपलीं अंतःकरणें हिंदुधर्माच्या अभिमानानें सारखीं प्रज्वलित ठेविलीं होतीं, ही एकच गोष्ट त्यांजबद्दल आदर उत्पन्न करण्यास पुरेशी आहे.

तलवारीच्या धारेवर धर्मप्रसार व त्याजबरोबर राज्यप्रसार करण्याच्या तत्त्वाचा आद्यजनक इस्लाम--धर्मानुयायी हसन-बिन-सुब्बाह हा असून त्याच्या अनुयायांनीं एका काळीं जगभर कसा गोंधळ माजविला होता ही गोष्ट इतिहासज्ञांस परिचित आहे. खड्गाचें साहाय्य घेण्याचा मूळ उपक्रम इस्लामियांनीं केला व त्यानंतर कांहीं कालानें ख्रिस्ती लोकांनींहि त्याच तत्त्वाचा अंगिकार केला. युरोपांत प्रॉटेस्टंटांचा झालेला अमानुष छळ त्यांचीं तीं इन्क्विझिशन कोर्टें वगैरे अंगावर शहारे आणणारे अघोरी प्रकार सर्वश्रुत असेच आहेत. या हत्यारी पंथाचा--मुसलमान व ख्रिस्ती--सर्वच इतिहास अत्यंत भीषण व रोमांचकारी कथांनीं भरलेला आहे. तथापि प्रस्तुतच्या लेखांत त्यांचा परामर्ष न घेतां गोवें प्रांतांत धर्मप्रसार करतांना ख्रिस्त्यांनीं काय काय प्रकार केले, लोकांचा कसा भयंकर छळ केला याचा इतिहास थोडक्यांत देण्याचें योजिलें आहे. प्रसिद्ध इतिहासकार थिओडोर ग्रीसिंगर यानें 'जेसुइट लोकांचा इतिहास' म्हणून एक उत्तम ग्रंथ लिहिला असून त्यांत त्यांचीं सर्व कृत्यें नमूद केलीं आहेत व प्रस्तुतचा लेख बव्हंशीं त्याच पुस्तकाच्या आधारें लिहिला आहे.

या हत्यारी पंथाचा इस्लामी जनक ज्याप्रमाणें उम्मर खय्यमचा सहाध्यायी हसन-बिन -सुब्बाह त्याचप्रमाणें ख्रिस्ती धर्मांतील या पंथाचा जनक इग्नेशस लॉयोला हा स्पॅनिश सरदार होय! यानें ख्रिस्ती धर्मप्रसारासाठीं 'सोसायटी ऑफ जीजस् वॉरियर्स' नांवाचा स्वतंत्र वर्ग निर्माण केला. त्याचे सर्व अनुयायी कृष्णवर्ण वस्त्रें परिधान करीत याच सुमारास लूथरनें धर्मसुधारणेचें कार्य हातीं घेतलें होतें व लोकसमाजाचा ओघ त्याजकडे वळूंहि लागला होता. अशा वेळीं कोणा तरी बलिष्ठाच्या साहाय्याची अपेक्षा तिसरा पोप पॉल यांस उत्पन्न होऊन त्यानें इग्नेशस याला साहाय्यार्थ बोलावलें व त्यानेंहि तें काम आनंदानें पत्करलें.

या वेळीं पोर्तुगालवर तिसरा जॉन राजा राज्य करीत होता. यापूर्वीच पोर्तुगीजांचा अंमल गोव्यासुद्धां सर्व मलबार किनारा, सीलोन मलाक्का व सुंदा या बेटांवर अल्फान्सो अल्बुकर्क या पोर्तुगीज वीरानें बसविला होता. वास्कोद-गामा हा केप ऑफ गुडहोपमार्गें ज्या वेळां हिंदुस्थानात आला त्या वेळीं त्याला कांहीं ठिकाणीं ख्रिस्ती पंथानुयायी लोक दिसले असें म्हणतात. परंतु पोर्तुगीज राष्ट्र हें अस्सल रोमन कॅथॉलिक संप्रदायाचें असल्यानें ज्या ज्या प्रांतावर आपला अंमल आहे त्या ठिकाणीं एकजात अस्सल कॅथॉलिक धर्मच नांदला पाहिजे, नास्तिक मताचा उच्छेद केला पाहिजे अशी धर्मवेडेपणाची भावना पोर्तुगीज राजा जॉन याच्या अंतःकरणांत खेळत असल्यानें आपण ज्या धर्मापुढें मान लववितों त्या धर्मापुढेंच आपल्या नवसंपादित प्रजाजनांनीं माना

लववित्याखेरीज ते " पोर्तुगालचे सत्प्रजाजन " होणार नाहींत असें वाटलें व त्याच वेळीं म्हणजे स. १५४० च्या सुमारास इग्नेशस लॅयोला यानें स्थापिलेल्या ख्रिस्ती धर्मवीरांच्या पंथाचीहि माहिती त्याला लागली व त्यानें इग्नेशस यांस आपल्या साहाय्यार्थ येण्याबद्दल प्रार्थना केली. मूर्तिपूजकांना ख्रिस्ती करणें हा तर या पंथाचा मुख्य हेतूच असल्यानें इग्नेशस यानें आपले दोन सच्छिष्य रॉड्रिग्ज व फ्रान्सिस झेवियर यांना लिस्बनकडे रवाना केलें. त्यांच्या धर्माभिमानानें जॉन राजा अत्यंत खूष झाला व त्यानें फ्रॅन्सिस झेवियर याला हिंदुस्थानाकडे जाण्यास परवानगी दिली. झेवियर याला पोपमहाराजांच्याकडूनहि अधिकारपत्रें मिळालीं होतीं. त्या अधिकारपत्रानें झेवियर याला आखिल हिंदुस्थानांतील पोपचा प्रतिनिधि नेमला असून सर्व नास्तिकांना ख्रिस्ती करून घेण्याचा अधिकार देण्यांत आला होता. याखेरीज आशिया खंडांत पोर्तुगीजांचा जेथें जेथें अंमल होता तेथील अधिकाऱ्यांनीं त्यांस हरएक प्रकारें मदत करावी असा स्पष्ट निर्देश अधिकारपत्रांत असून जॉन राजानें फ्रॅन्सिस झेविअरची सर्व राजेरजवाड्यांस शिफारस केली होती. अशा तयारीनें ता. ७ एप्रिल १५४१ रोजीं झेवियर हिंदुस्थानांत येण्यास निघाला व गोवें प्रांतांत ता. ६ मे १५४२ रोजीं येऊन पोहोचला.

गोवें प्रांतांत पाऊल टाकल्याबरोबर त्यानें आपल्या कार्यास सुरुवात केली. येथें येतांच त्यानें आपलें राजैश्वर्य बाजूस ठेवले व एखाद्या सामान्य माणसाप्रमाणें तो दवाखान्यांत गरिबांची शुश्रूषा करूं लागला व भीक मागून आपला चरितार्थ चालवूं लागला. परंतु या मार्गानें आपला इष्ट हेतु सफल होईल असें त्याला दिसेना, तेव्हां त्यानें गोव्याचा बिशप डॉन-जॉन-द–अल्बुकर्क यांस आपलीं अधिकारपत्रें दाखविलीं. त्याची मदत मागितली व उपदेश करण्यास सुरुवात केली. परंतु देशी भाषा त्याला येत नव्हती म्हणून तो काय बडबड करी हें लोकांस समजत नसे. तेव्हां त्याने हिंदुस्थानी ( मराठी? ) भाषेच्या अभ्यासास सुरुवात केली,त्याबरोबर त्यानें एक ख्रिस्ती कॉलेजहि काढलें व या वेळीं त्यानें आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. त्यानें तेथें अनेक शाळाहि घातल्या परंतु द्रव्याखेरीज त्या चालणार कशा? तेव्हां त्यानें सरकारी सैन्याच्या मदतीनें गोव्या भोंवतालच्या सर्व हिंदु देवालयांचा विध्वंस करून तेथील अपरंपार संपत्ति या नव्या शिक्षणसंस्थांकडे लावली ! फ्रॅन्सिस झेवियर यानें तेथें जो धर्मप्रसार केला तो सर्वस्वी सैन्यबलावर केला. हिंदुधर्ममंदिरांचा उच्छेद करणें, मूर्तीचें भजन करणें, त्याच मंदिरांत ख्रिस्ताच्या क्रूसाची स्थापना करणें व त्याच्याशेजारीं तरुणांना शिक्षण देण्यासाठीं इमारत उठविणें हा त्याचा क्रम होता. यानंतर त्यानें आपल्या मदतीसाठीं पोर्तुगालहून आणखी मिशनरी मागविले. ते येतांच पोर्तुगीज अंमल जेथें होता त्या त्या ठिकाणीं तद्देशीय मिशनरी तयार करण्यासाठीं मठ स्थापन करण्यांत आले. तद्देशीय म्हणजे गोव्यांतीलच लोक, पण ते ख्रिस्ती मिशनरी होणार कसे? या कामींहि झेवियरनें लष्करी सामर्थ्यच उपयोगांत आणलें. गोवें प्रांतांतील घरंदाज अशा १२० घराण्यांतील तरुणांना सैन्यबळावर घरांतून ओढून काढून त्यांना मिशनरी बनविण्यासाठीं पोर्तुगालहून नव्यानें आलेल्या धर्मोपदेशकांच्या स्वाधीन करण्यांत आलें !

परंतु अशा रीतीनें त्यांना सक्तीनें ख्रिस्ती धर्मांत घेतलें गेलें तरी ख्रिस्ती धर्माला त्यांना पचवितां येईना. ते तोंडानें मिशनरी सांगत ते शब्द उच्चारीत परंतु त्यांच्या चाली आचारविचार मूळचेच कायम राहिले व पोर्तुगीज पाद्री त्या गांवाहून दुसरीकडे गेला कीं त्या गांवचे ब्राह्मण त्यांना पुनः हिंदु करून घेत. [ गोवें प्रांतांत बाटलेल्यांना परत स्वधर्मांत घेतलें जात नसे असें सांगण्यांत येतें, परंतु इतिहासकार थिओडोर ग्रीसिंगर तर असें म्हणतो कीं,—" It so happened that the native priests, the Brahmins, had not the least difficulty in bringing the people back again to the religion in which they had been born and bred. " (P. 91) ]

ब्राह्मणवर्गानें अशा प्रकारें उलट आक्रमण करण्यास सुरुवात केल्याचें पाहून झेविअरचा मित्र ॲन्टोन क्रिमिनल यानें ब्राह्मणांचा मनस्वी छळ केला. तेव्हां ब्राह्मणवर्गानें इतर हिंदुधर्मीय राजांना आपणास या संकटांतून सोडवा अशी परोपरीनें प्रार्थना केली. परंतु 'मला काय त्याचें?' हीच वृत्ति तेथेंहि आड आली. क्रिमिमल यानें आपल्या अनुयायांच्या मदतीनें ब्राह्मणांचा संहार करण्याचा सपाटा सुरू केला व अशा या संधीचा फायदा घेऊन झेवियर यानेंहि स्पेनमधील इन्क्विझिशन कोर्टाच्या धर्तीवर गोवा येथें एक कोर्ट उघडलें व इतर स्वतंत्र हिंदुधर्मीय राजांनीं असहाय स्थितींत सोडलेल्या तेथील प्रजेची गांजणूक सुरू झाली. मिशनऱ्यांच्या मदतीला पोर्तुगीज सैन्य, तर उलट प्रतिपक्षी निर्बल. अशा स्थितींत तेथील लोकांवर कसे अत्याचार व जुलूम झाले असतील याची कल्पना करतां येण्याजोगी आहे. जो कोणी बाटलेला वा बाटविलेला

हिंदु फिरून मूर्तिपूजा करील अगर ख्रिस्ती धर्मप्रसारास अडथळा करील त्याला या कोर्टापुढें खेंचण्यांत येई. या रीतीनें असंख्य ब्राह्मणांवर व विशेषतः त्यांतील जे धनवान होते त्यांजवर पहिल्यांदा दृष्टि फिरून त्यांचे अमानुषपणें वध करण्यांत आले. कित्येकांची मत्ता फुकटांत सांपडावी म्हणून त्यांना हद्दपार करण्यांत आलें व त्यांची ईस्टेट ख्रिस्ती सोसायटीला धर्मप्रसारार्थ देण्यांत आली. एखाद्या इसमानें ख्रिस्ती होण्याचें नाकारतांच मंदाग्नीवर हळूहळू भाजून त्यांचे प्राण घेण्यांत येत. नित्य असे शेंकडों प्रकार होऊं लागल्यानें हिंदु लोक भीतीनें गर्भगळित झाले व त्यानंतर गोव्यांत धर्मप्रसाराचें काम झेवियरला बरेंच सुकर होऊ लागलें. लोकांच्या कत्तली करून, त्यांना लुटून जी अलोट संपत्ति त्यानें कमाविली तिच्या बळावर गोवें प्रांतांत मोठमोठीं कॉलेजें त्यानें उठवून दिलीं व हिंदु मंदिरांचा विध्वंस करून त्या जागीं व त्याखेरीजहि इतरत्र कित्येक ख्रिस्ती मंदिरें त्यानें बांधलीं.

गोवें प्रांतांत अशा रीतीनें कृतकार्य झाल्यावर झेवियर हा ख्रिस्ती धर्मप्रसारार्थ चीन जपान या देशांकडे गेला व तिकडेच डिसेंबर स. १५५२ सालीं वयाच्या ४६ व्या वर्षी ख्रिस्तवासी झाला. झेवियर यानें आपल्या अवघ्या दहा वर्षांच्या कारकीर्दींत इतकें प्रचंड धर्मप्रसाराचें कार्य करून ठेवलें होतें कीं, त्यायोगें ख्रिस्ती मिशनऱ्यांचा मार्ग अगदीं बिनधोक असा झाला होता. अर्थात् झेवियरच्या मृत्यूनंतर जेसुइट लोकांनीं जिहादाचा उघडा मार्ग सोडून अन्य मार्ग धरला. विदेशी ख्रिस्ती मिशनरी आपल्या मूळ वेषांत जाऊन लोकांस उपदेश करूं लागले म्हणजे लोक बिचकतात असा त्यांस अनुभव होता. म्हणून आपल्या वेषांत परिवर्तन करून ते अस्सल ब्राह्मणाप्रमाणें वेष परिधान करूं लागले. हिंदु लोक बाटले तरी त्यांच्यावर बाप्तिस्माचें फक्त पाणी शिंपडण्यापलीकडे फारसा उपयोग होत नाहीं असाहि त्यांस अनुभव आला. तेव्हां त्यांनीं असा युक्तिवाद सुरू केला कीं, ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यावर ख्रिस्ती नांवच धारण केलें पाहिजे असेंहि नाहीं व आपल्या चालीरीतीहि कायम ठेवल्या तरी हरकत नाहीं. पेटर कॉन्स्टॅटिनो बेस्ची नांवाचा मिशनरी तर संस्कृत शिकला. ब्राह्मणाप्रमाणें वागूं लागला. लोक तर त्यास साधू साधू म्हणूं लागले. मोठमोठ्या उच्च प्रतीच्या लोकांत तो वागूं लागला.परंतु अंतरंगानें तो पूर्ण जेसुइट होता व त्याचे इतर मदतनीस हें पूर्ण जाणूनहि होते. परंतु भोळ्या हिंदु लोकांना त्याचा कावा उमगला नाहीं. याचाच दुसरा जोडीदार पेटर बार्थेलेमी म्हणून होता. तो वरीलप्रमाणें उच्च प्रतीच्या लोकांत न मिसळतां अगदीं खालच्या प्रतीच्या लोकांत मिसळे. त्यांजबरोबर आहारविहार करी. वेश्यावर्गांत त्याचें जाणेंयेणें फार असे. ख्रिस्ती धर्मांत देहविक्रय करून द्रव्य मिळवूं नये असें सांगितलें आहे, तेव्हां आम्हाला ख्रिस्ती कसें होतां येईल? असें त्या म्हणत. त्यावर बार्थेलेमी म्हणे, "अं. त्यांत काय आहे. व्यवसाय कायम ठेवूनहि तुम्हास ख्रिस्ती होतां येईल. त्या धंद्यापासून मिळणाऱ्या द्रव्यांतील बराचसा भाग ख्रिस्ताच्या नांवानें धर्म करा व तुमच्या मोहजालांत सांपडतील त्यांना ख्रिस्ती धर्मांत घ्या म्हणजे झालें."

वरील हकीकतीवरून गोवें प्रांतांत पोर्तुगीज ख्रिस्त्यांनीं धर्मप्रसार कसकसा व कोणकोणत्या मार्गांनीं केला याची स्थूल कल्पना वाचकांस येईल. अशा प्रकारें जुलम, जबरदस्ती, मोह, फसवणूक या मार्गांनीं परधर्मांत गेलेल्या आपल्याच रक्तमांसाच्या व संस्कृतीच्या लोकांस पुनः आपल्या धर्मांत व तेंहि राजीखुषीनें घेणें हें कोणाचेंहि कर्तव्यच ठरेल. म्हणूनच गोवें प्रांतात जें अपूर्व शुद्धिकार्य झालें तें अत्यंत अभिनंदनीय होय.

# विदेशी मालावर बहिष्कार घाला

## इंग्लंडानें काय केलें ?

ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांत व्यापार करण्यास सुरुवात केली त्या वेळीं कंपनी मुख्यतः हिंदी कापड विलायतेंत पाठवी. कापड अत्युत्कृष्ट असल्यानें त्याचा तेथें इतका खप होई कीं, विलायतेंतील कापडाचे कारखाने ओस पडले. तेथील कामगारांस काम मिळेनासें झाल्यानें ते बेकार झाले. त्या वेळीं स्वाभिमानी इंग्लन्डानें जो मार्ग स्वीकारला तो आज हिंदुस्थानानें स्वीकारला पाहिजे. त्या वेळीं इंग्लन्डानें पुढीलप्रमाणें एक कायदाच पास करून टाकला.

"गरीबास उद्योग देणारा व देशी कारखान्यास उत्तेजन देणारा कायदा" हें त्या कायद्याचें नांव असून त्यांत पुढील कलमें होतीं.

१ ईस्ट इंडीजशीं गेलीं दोन वर्षें व्यापार जोरानें सुरू आहे. परंतु यापुढेंहि तो तसाच सुरू राहिल्यास देशांतील द्रव्यशोषण होईल. मजुरांना काम मिळ-

णार नाहीं व कारखाने चालणार नाहींत. त्यामुळें देशाच्या एकंदर प्रगतीला मोठाच धक्का बसून बेकारांना पोसण्याचें ओझें देशावर पडेल. मजुरांपैकीं कित्येकजण पोटासाठीं परदेशांतहि जाऊं लागले आहेत. ही सर्व आपत्ति दूर होण्यासाठीं राजेसाहेबांनीं पार्लमेंटच्या सल्ल्यानें व त्यांच्या अनुज्ञेनें असा कायदा केला आहे कीं, ता. २९ सप्टेंबर १७०१ पासून कोणीहि माणसानें बंगालमधील रेशमी अगर इतर कापड व इराण, चीन अगर ईस्ट इंडियामधून येणारें कसलेहि रंगाचें कापड चिटें, इत्यादि आणतां कामा नये; यापुढें तें कोणीहि वापरतां अगर इंग्लंड देशांत कसल्याहि कामासाठीं उपयोगांत आणतां कामा नये.

२ ता. २९ सप्टेंबर १७०१ नंतर अशा प्रकारें कोणी कापड आणल्यास तें सरकारजमा करून परत पाठविलें जाईल. व असें कापड कोणी आणलें आहे कीं काय याबद्दल संशयित वखारींची व दुकानांची झडती घेण्यांत येऊन कापड जप्त करण्यांत येईल. याखेरीज अशा प्रकारचें कापड कोणाजवळ सांपडल्यास अगर कोणी दुसऱ्यास विकतांना आढळल्यास कापड जप्त होऊन त्यास दोनशें पौंड दंड करण्यांत येईल.

३ देशांत हा माल कोणी आणल्यास तो जप्त होऊन त्या इसमास ५०० पौंड दंड करण्यांत येईल व असा माल कोणी आणीत असल्याची वर्दी दिल्यास त्याला मालाच्या किंमतीपैकीं व दंडाच्या रकमेपैकीं ⅓ रक्कम बक्षीस देण्यांत येईल.

या कायद्यावरून ब्रिटिशांनीं स्वदेशी प्रसारासाठीं कसे कडक निर्बंध घातले होते हें लक्षांत येईल. व यामुळेंच जगावर त्यांनीं आपलें व्यापारी व राजकीय वर्चस्व गाजविलें. 'स्वराज्य पाहिजे तर स्वदेशी आचरा' हा महामंत्र सर्वांनीं जपला पाहिजे.

# लोकमताची अक्षम्य विटंबना

हिंदुस्थानांतील प्रचलित राज्यपद्धतीचें सूक्ष्म निरीक्षण करण्याच्या हेतूनें सायमन-सप्तक इकडे आलें आहे. त्या कमिशनाचा दृष्टिकोन वेगळाच असल्यानें त्याला येथील स्थितीचें यथार्थ आकलन होईल कीं नाहीं याची शंकाच आहे. पण छायाचित्राच्या कांचेसारखें जर एखादें यथार्थग्राही कमिशन येथें येऊन आजच्या लोकमताच्या स्थितीचें अवलोकन करील तर त्याला सर्वत्र लोकमताची अत्यंत उद्वेगजनक अशी विटंबना होत असलेली आढळून येईल. या देशांतील राज्यकारभारांत हिंदी लोकमताची पायमल्ली विविध प्रकारांनीं चालू आहे. तथापि त्यांतले दोन प्रकार अधिक ठळकपणें नजरेसमोर आल्यानें मनाला अधिक तापदायक वाटतात. जेथें खरें लोकमत प्रकट होऊं शकतें तेथें तें अधिकारशून्य आहे व जेथें तें अधिकारयुक्त आहे तेथें खरें लोकमत प्रकट होऊं शकत नाहीं. म्हणजे 'दांत आहेत तर चणे नाहींत आणि चणे आहेत तर दांत नाहींत' अशासारखी आजची लोकमताची स्थिति झाली आहे. असेंब्लींत लोकमताची चुणूक दाखविण्याइतकी एकजूट सुदैवेंकरून केव्हां केव्हां लाभते; पण तेथें तर एखादा फाटकातुटकाहि अधिकार असेंब्लीच्या बहुमतावर अवलंबून ठेवलेला नाहीं. आणि प्रांतिक सरकारांत कित्येक खातीं लोकमताला जबाबदार ठरवून तोडून दिलीं आहेत तर तेथें लोकमताची एकजूट व्हावी तशी होऊं शकत नाहीं. कागदोपत्रीं सरकारनें लोकपक्षाचें बहुमत दर्शविलें आहे. परंतु मुंबई इलाख्याच्या गळ्यांत बांधलेलें सिंध प्रांताचें लोढणें. आणि या प्रांतांत निवडुंगासारखा पसरलेला व कितीहि तोडला तरी पुनः वाढणारा ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद या दोहोंच्या तडाक्यांत सांपडल्यामुळें खरें लोकमत इतकें संकुचित झालें आहे कीं तें प्रभावशाली होऊं शकत नाहीं. अर्थातच 'इतोभ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशीच लोकमताची दुरवस्था चालली आहे!

असेंब्लीचें सध्याचें चित्र डोळ्यापुढें आणल्यास काय दृष्टीस पडतें बरें? सरकारच्या कृपणपणास किंबहुना कुत्सितपणास त्रासून जाऊन असेंब्लीनें सरकारच्या लष्करी धोरणाचा प्रत्यक्ष निषेध करणारा ठराव पास केला व तोहि थोड्याथोडक्या रडक्या बहुमतानें नव्हे तर ७० विरुद्ध ४१ इतक्या दणक्या बहुमतानें! पण उपयोग काय? 'न पादपोन्मूलनशक्ति रंहः शिलोच्चये मूर्छति मारुतस्य' असाच तेथें अनुभव आला. बहुमताच्या या झंजावातापुढें झाडेंझुडपें समूळ उपटून त्यांचा फन्ना उडाला असता. पण तेथले सत्ताधारी हे दगडासारखे अचल राहिले आहेत. जणुं काय वावटळ आली केव्हां, गेली केव्हां याची त्यांना दादहि नाहीं! एवढ्यानेंच निराश न होतां 'फिरून यत्न करून पाहा' या म्हणींतील उपदेशास अनुसरून लोकपक्षानें दुसरा हल्ला चढविला आणि कार्यकारी मंडळाचा फिरती भत्ता छाटून टाकला. तिसऱ्या तडाक्यानें लष्करचा खर्च नामंजूर करण्यांत आला व चौथ्या चकमकींत स्टेट-

सेक्रेटरीच्या खात्याची चंदी उधळून टाकण्यांत आली. पण लोकमताच्या या प्रक्षोभाचा प्रभाव कितीसा टिकून राहिला म्हणाल तर भोपळ्याएवढें शून्य! लोकमतानें निर्जीव केलेले हे राक्षस व्हाइसरॉयांच्या संजीवनी मंत्रानें पुनः सजीव होऊन पहिल्यासारखेच पुनः लोकपक्षाशीं सामना करावयास तयार! लोकमताची ही विटंबना असह्यच नव्हे काय? ज्याला थोडाबहुत तरी स्वाभिमान आहे त्याला लोकमताची ही अशी पायमल्ली होत असलेली पाहून काय वाटेल बरें!

पण एका अर्थानें ही विटंबना पुरवली; कारण हिच्यांत स्वतःच्या दुर्बलतेचें प्रदर्शन असलें तरी त्याचा दोष असला कायदा करणाऱ्या कुटिल मंत्र्याच्या माथीं मारतां येतो व त्यांत स्वतःला लज्जेनें मान खालीं घालण्यासारखा अपमानाचा प्रसंग तरी नाहीं. परंतु जेथें लोकपक्षाच्या हातीं थोडीबहुत सत्ता दिली आहे तेथें ती सत्ता चालवितां येऊं नये या मूर्खपणाच्या प्रकाराला काय म्हणावें? प्रांतिक सरकारांचीं कांहीं खातीं लोकपक्षाच्या अधिकारकक्षेंत दिलेलीं आहेत आणि इतर खातीं राखीव असलीं तरी त्यांच्या संबंधाचे अनेक महत्वाचे ठराव कायदेमंडळास नामंजूर करतां येतात. असें असून तेथेंहि जेव्हां आपल्या लोकमताची निशाणबाजी चालू शकत नाहीं तेव्हां तो एक विचार करण्यासारखाच प्रश्न येऊन पडतो. या बाबतींत मध्यप्रांताचें कायदेमंडळ तेवढें अपवादात्मक मानतां येईल.बाकी इतर सगळे एकाच माळेचे मणी. त्यांतल्या त्यांत डाव्या उजव्या हाताइतपत फरक असेल, पण जात एकच. लोकमताची छाप कायदेमंडळावर हटकून पडेल अशी कायदेमंडळाची रचना बहुधा कोठेंहि आढळत नाहीं. मद्रास प्रांतानें यंदा शक्य तितकी जूट करून लोकमत प्रभावी करण्याचा प्रयत्न केला. तरी पण स्वराज्यपक्षानें हाणून पाडलेली दिवाणगिरी पुनः उभारली गेली आणि सायमन कमिशनशीं सहकारिता करणारे मुख्य दिवाण सुब्बाराय हे पूर्वीहून अधिक बळकट होऊन लोकमताची विटंबना करण्यास सज्ज होऊन राहिले आहेत. लोकमतच दिवाणगिरीला अनुकूल असतें किंवा दिवाणांचा कारभार त्यास संमत असता तर ती गोष्ट वेगळी. मग त्या दोषाचें खापर राज्यपद्धतीच्या माथ्यावर न फोडतां जनतेच्या अज्ञानावर फोडावें लागलें असतें. परंतु जेथें जनतेचें मत सरकारच्या विशिष्ट धोरणाच्या विरुद्ध असलेलें स्पष्टपणें नमूद केलें जातें तेथें देखील तें लोकमत निर्बळ व वांझ ठरावें ही लोकशाहीची व जबाबदार राज्यपद्धतीची निवळ थट्टा होय. मद्रासच्या कायदेमंडळांत जमीनधाऱ्याची फेरपाहाणी व वाढ, अस्पृश्यवर्गाची हेळसांड, अबकारीचें अनिष्ट धोरण, न्याय व अम्मलबजावणी खात्यांची फारखत इत्यादि प्रश्नांवर सरकार पक्षाचा सहा वेळां पराभव झाला. बंगाल प्रांतांतल्या इरिगेशन खात्याची बेपर्वाईची वर्तणूक, गुरचराईच्या फीची बेसुमार वाढ, हत्यारांचा परवाना नाकारण्याची कलेक्टरला असलेली अकुंठित सत्ता इत्यादि अनिष्ट प्रकारांचा निषेध म्हणून बंगालच्या कायदेमंडळानें खर्चाच्या मंजुरीला विरोध केला. पण रिफॉर्म्स आक्टानें बनविलेलें हें राज्ययंत्र असें विचित्र आहे कीं, लोकमताची किल्ली उलटीसुलटी कशीहि फिरवा, होकायंत्राचा कांटा जसा नेहमीं उत्तरेकडेच वळलेला दिसतो त्याप्रमाणें या राज्ययंत्राचा कांटा नेहमीं सरकारच्या इच्छेस अनुसरूनच वळलेला दिसतो. लोकमताच्या विजयाची परमावधि म्हणजे दिवाणांना पदभ्रष्ट करणें ही होय. पण तेथेंच तर या यंत्राच्या रचनेची सगळी मख्खी आहे. दिवाणांना पदच्युत केलें तरी सोंपीव खात्यांचा कारभार लोकतंत्रानें न चालतां सरकारच्या तंत्राप्रमाणेंच चालतो आणि सोंपीव खातीं सरकारच्या हातीं जाण्याची ही आपत्ति टळावी म्हणून दिवाणांना पदभ्रष्ट करण्याचा प्रत्यक्ष ठराव पास न करतां इतर रीतीनें नाराजी दाखविली तर दिवाण इतके शेफारून जातात कीं, सरकारी अधिकाऱ्यांपेक्षां तेच लोकमताची अधिक हेटाळणी करूं लागतात. बंगाल प्रांतांत याचा अनुभव पूर्णपणें येऊन चुकला आहे आणि मद्रास इलाख्यांतलि कायदेमंडळालाहि सध्या हाच पेंच पडला आहे.

पण मुंबई इलाख्याचा प्रकार या सर्वाहून विचित्र आहे. येथें जी लोकमताची विटंबना होत आहे ती स्वतःला लोकप्रतिनिधी म्हणविणाऱ्यांकडूनच होत आहे. सरकारी अधिकारी हे सरकारी धोरणाला बांधले गेलेले असणार आणि सरकारनियुक्त सभासद हे मिंधेपणामुळें सरकारचे अंध पाठीराखे बनणार हें आधींच कळून चुकलें असल्यामुळें त्यांच्या तोंडून लोकमत प्रकट होईल अशी कोणी अपेक्षाच करीत नाहीं. परंतु जे आमदार जनतेचे प्रतिनिधी म्हणून मतदारांकडून निवडून पाठविले गेले त्यांनींच मतदारांशीं बेइमानपणा करावा हें अक्षम्य होय, यासंबंधांत लोकमान्य टिळकांनीं कित्येक वर्षांपूर्वी केलेली कडक टीका आजच्या या बेइमानी आमदारांना अक्षरशः लागू पडते. "लोकमताच्या पुरस्कर्त्यांनीं आपला संभावितपणा राखण्याकरितां अथवा सरकारी अधिकाऱ्यांकडून वाहवा मिळविण्याकरितां तडजोड करून लोकमत सरकारास विकून टाकावें यापरतें दुसरें कोणतेंहि बेभरंवशाचें किंवा बेइमानीपणाचें कृत्य

आहे असें आम्हास वाटत नाहीं. आम्ही जो वकील नेमतों तो आमच्या घरची मिळकत विकण्याकरितां नव्हे; आमच्यासाठीं भांडण्याकरितां होय." (टिळक-सूक्तिसंग्रह पृ. २४७.) मुंबई प्रांतिक कायदे-मंडळांत असल्या बेभरंवशाच्या व बेइमानी कौन्सिलरांचाच केवढा मोठा घोळका जमला आहे हें बार्डोलीच्या शेतसारावाढीच्या निषेधाच्या वेळीं आणि हार्वेसाहेबांच्या खटल्याचा खर्च सरकारनें सोसावा का त्यांचेकडून वसूल करावा या प्रश्नावर ज्यांनीं सरकारतर्फे मत दिलीं त्यांच्या यादीवरून कळून येण्याजोगें आहे. कांहीं विशिष्ट अपवाद सोडून दिल्यास बहुतेक सर्व मुसलमान सभासद दोनहि वेळां सरकारच्या पुढ्यांत शिरले आणि ब्राह्मणेतर पक्षाचे प्रतिनिधी एकदां उघड सरकारला मिळाले तर एकदां घुम्यासारखे तटस्थ राहिले. जणूं काय कौन्सिलांतील मतमोजणीशीं त्यांचा कांहीं संबंधच पोंचत नव्हता!

मुसलमानांचा स्वार्थसाधूपणा बेहद्द वाढला आहे आणि आपमतलबाखेरीज ते कधींहि हिंदूंच्या बाजूनें मतें देत नाहींत हें खरें. पण या दृष्टीनें देखील त्यांनीं बार्डोलीच्या सारावाढीच्या व हार्वे-नरीमनच्या प्रश्नावर लोकमत झुगारून देण्याचें कारण नव्हतें. आज जसा बार्डोलीस सारा वाढला आहे तसाच उद्यां सिंध प्रांतांतहि वाढणार नाहीं कशावरून? आणि गुजराथ प्रांतांत तरी मुसलमान शेतकरी अगदींच नाहींत असें नाहीं. मग त्यांच्या हितासाठीं तरी त्यांनीं सरकारचा निषेध करावयास हवा होता. हार्वेच्या खर्चाच्या प्रकरणांत तर एका बाजूला केवळ दंडेली व उधळेपणा तर दुसऱ्या बाजूला न्याय व काटकसर असा हा सामना होता. रयतांच्या हातून पिळून काढलेल्या करवसुलींतून ६० हजार रुपये उगाच एखाद्या गोऱ्या बड्या पगारवाल्याला बहाल करण्याला मंजुरी देण्यांत मुसलमानांनीं कोणता स्वार्थ पाहिला? सरकारची खुषमस्करी केल्यानें त्यांच्याकडून पुढें केव्हां तरी एखादा सवलतीचा तुकडा चघळावयाला मिळेल या आशाळभूतपणाखेरीज सरकारच्या बाजून मतें देण्याला मुसलमानांना दुसरें कोणतें कारण होतें? परंतु असला तोंडपुजेपणा करून देखील सरकार मुसलमानांना परभारें हिंदूंच्या हक्कावर गदा आणून त्यावर चरण्याला मोकळें सोडतें व हिंदू मुसलमानांत वैमनस्य उत्पन्न करतें; स्वतःच्या पदराला खार लावून कोणतीहि सवलत मुसलमानांना देत नाहीं, एवढें तरी इतक्या दिवसांच्या अनुभवावरून या मिंध्या सभासदांना कळावयास पाहिजे.

ब्राह्मणेतर पक्षाच्या बेइमानीपणाची मीमांसा करणें तर याच्याहिपेक्षां कठीण आहे. मुसलमान कितीहि स्वार्थांध झाले तरी त्यांच्या स्वार्थापुरतें तरी त्यांचें स्वतःचें धोरण निश्चित असतें. पण ब्राह्मणेतर पक्षाला तेवढेंहि धोरण नाहीं. सिंध प्रांतासारखा त्यांना एखादा प्रांत वेगळा तोडून मागावयाचा नाहीं; मुसलमानांसारखे वेगळे मतदार-संघ त्यांना मिळवावयाचे नाहींत किंवा राखावयाचे नाहीत; अथवा आपण अल्पसंख्याक म्हणून इतर कोणत्याहि बहुसंख्य समाजापासून त्यांना आत्मसंरक्षण करण्यासाठीं सरकारच्या कच्छपीं लागण्याचें कारण नाहीं. असें असतां हा ब्राह्मणेतर पक्ष 'ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे' या कोटींत मुद्दाम जाऊन पडतो याचें सखेदाश्चर्य वाटतें. ब्राह्मणेतर पक्षांतल्या मतदारांचा बहुतेक भरणा शेतकऱ्यांचा आहे व म्हणून हा पक्ष आपल्याला शेतकऱ्यांचा कैवारी म्हणवितो. परंतु बार्डोलीला झालेली शेतसाऱ्याची वाढ रास्त आहे व ती कमी करण्याची जरूरी नाहीं असें पर्यायानें कबूल करण्यांत या पक्षानें शेतकऱ्यांचें हित साधलें का शेतकऱ्यांच्या हितसंबंधावर निखारा ठेवला हें कोणीहि सांगूं शकेल. आपण सरकार पक्षातर्फे मत दिल्यास आपल्याच समाजांत आपली छीः थूः होईल अशी जाणीव त्यांस असल्यानें उघड सरकारच्या बाजूनें मतें नोंदविण्याचे धाडस त्यांना करवलें नाहीं. परंतु आपला तटस्थपणाहि तितकाच घातक आहे हेंहि त्यास कळणें जरूर होतें. शेतसाऱ्याच्या वाढीचा प्रश्न शेतकऱ्यांना मोठा जिव्हाळ्याचा होऊन बसला असून बार्डोलीसारखी तक्रार इतर अनेक जिल्ह्यांतून आजवर उपस्थित झाली आहे व सरकारनें हा प्रश्न लवकरच लोकमतानुसार निकालांत न काढल्यास इतर अनेक ठिकाणींहि असाच लढा उपस्थित होईल. यार्कारतांच कायदेमंडळाच्या संमतीखेरीज नवी सारावाढ करूं नये अशा अर्थाचा ठराव मुंबई-कौन्सिलांतच पूर्वी पास झाला आहे व तो सरकारनें बेगुमानपणें लाथाडला आहे. अशा परिस्थितींत ब्राह्मणेतर पक्षानें नरीमनच्या ठरावाला पाठिंबा देणें हे त्या पक्षाचें कर्तव्य होतें. तें कर्तव्य झिटकारून तटस्थ राहण्यांत या पक्षानें शेतकरी मतदार-संघाशीं बेइमानगिरी केली.

अशा रीतीनें सिंधचे मुसलमान केवळ स्वार्थ-लंपट, इतर मुसलमान त्यांच्याविरुद्ध जाण्याला न धजणारे आणि ब्राह्मणेतर पक्ष बिनबुडाचा आणि केवळ ब्राह्मणद्वेष्टा. अशा स्थितींत मुंबई इलाख्यांत खऱ्या लोकमताची कायदेमंडळांत एक-सारखी कुचंबणा होत राहावी हें अपरिहार्य आहे. असेंब्लींत लोकमत प्रकट होतें, पण त्याला अधि-काराचें अधिष्ठान नाहीं. बंगाल व मद्रास या-

सारख्या प्रांतांत लोकमताला एकसारखें हेलकावे बसत असल्यानें तें स्थिर व निश्चित होऊं शकत नाहीं आणि मुंबईसारख्या प्रांतांत बेभरंवशाच्या व बेइमानी आमदारांच्या विक्षिप्त वर्तनामुळें लोकमताला स्पष्ट वाचाच फुटत नाहीं ! एतावता सर्वच बाजूंनीं लोकमताची कुचंबणा अगर विटंबना चालू आहे. सुधारणा कायद्यांत जर कोणता मुख्य दोष असेल तर तो हाच कीं, त्या कायद्यानें लोकमताला क्वचित्स्थळीं अधिकार दिलासा भास मात्र उत्पन्न केला. पण बहुतेक सर्व ठिकाणीं लोकमताची बेधडक पायमल्ली चालू आहे. ही विटंबना थांबविणें सर्वस्वी मतदारांच्या आधीन नाहीं. कारण कांहीं ठिकाणीं कायद्यांतच दुरुस्ती करावी लागेल. पण जेवढ्या ठिकाणीं मतदाराना या बेइमानीपणास आळा घालतां येण्यासारखा आहे तेवढ्या ठिकाणीं तरी मतदारानीं आपल्या प्रतिनिधींना त्यांच्या असल्या अवसानघातकी वर्तनाबद्दल जाब विचारावयास नको काय ?

# मिस मिलरचें शुद्धीकरण

फार दिवस गाजत असलेला व अखिल हिंदुस्थानांत चर्चेचा विषय होऊन बसलेला अमेरिकन कुमारी मिस नॅन्सी मिलर, सर तुकोजीराव होळकर यांची भावी वधू, हिचा शुद्धीकरणसमारंभ मंगळवार ता. १३ रोजीं सकाळीं ८॥ वाजता गोदातटाकीं गंगापूर येथील श्रीशंकराचार्य डा. कुर्तकोटी यांच्या मठासमोरील पटांगणांत मोठ्या थाटानें पार पडला. श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी व संकेश्वरचे श्रीशंकराचार्य यांमध्यें वाद असल्यामुळें व कुर्तकोटी यांचें अधिकारक्षेत्र नर्मदातटाक हें आहे असें शिरोळकरस्वामींचें म्हणणें असल्यानें डॉ. कुर्तकोटी यांनीं श्रीशंकराचार्य या नात्यानें हें शुद्धीकरण करूं नये असा मनाईहुकूम शिरोळकरस्वामींतर्फे नाशिक कोर्टानें डॉ. कुर्तकोटी यांजवर बजावला. परंतु आपण खासगी व्यक्ति या नात्यानें या कृत्यास आशीर्वाद देणार असल्याचें श्रींनीं कळविलें व पूर्वी ठरल्याप्रमाणें सर्व विधि यथासांग पार पडला.

ता. १२ ला कु. मिलर, तिची आजी मिसेस शेपर्ड, राजभगिनी सौ. भीमाबाई चांगण व सावित्रीबाई वगैरे मंडळी इंदूरहून आली. त्याच दिवशीं दुपारीं मिलरचा शपथविधि श्रींच्यापुढें झाला. मला लहानपणापासून हिंदुधर्माबद्दल आदर वाटत असून या धर्माचें अधिक ज्ञान व्हावें म्हणूनच मी हिंदु होत आहे व जन्मभर याच धर्मांत राहाण्याचा माझा निश्चय आहे असें बाईनें श्रींचे पुढील शपथेंत सांगितलें.

या हिंदुकरण समारंभासाठीं शहरांतील प्रमुख लोकांचें एक कार्यकारी मंडळ नियुक्त केलें गेलें होतें. या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष श्री.पाटणकर वकील व चिटणीस वैद्य दातारशास्त्री व अभ्यंकर वकील हे होते. सोमवारीं कु मिलरनें कार्यकारी मंडळाच्या सभासदांची भेट घेऊन त्यांना आपला हेतु सकारण निवेदन केला.

हिंदुकरणसमारंभांत सोयीसाठीं दोन विभाग केले होते.सर्व धार्मिक विधि श्रीक्षेत्र गंगापूर येथील श्रीशंकराचार्यांच्या मठापुढील घाटावर सकाळीं झाला व सायंकाळचा व्याख्यानें वगैरे व्यावहारिक समारंभ नाशिक येथें यशवंतमहाराजांचे पटांगणावर झाला. गांवापासून ५।६ मैल दूरवर सकाळचा समारंभ असतां देखील समारंभास पुष्कळच गर्दी लोटली होती. मिस मिलर हिनें सर्वस्वी हिंदु पद्धतीचा पोषाक धारण केला होता. कपाळीं कुंकुमतिलक, गळ्यांत हिरव्या मण्यांची पोत, हातात हिरव्या बांगड्या व जरीचा हिरवा शालू नेसून सर तुकोजीरावांची भावी वधू हिंदु बनली होती. समारंभास बरोबर ८॥ वाजतां सुरुवात झाली. मिस मिलरनें सर्व विधी गंभीरपणें व आस्थापूर्वक केले, होमहवनादि विधि होऊन मंगलवाद्यांच्या गजरांत मिस मिलर हिचें हिंदु नांव देवी शर्मिष्ठा असें ठेवण्यांत आलें व 'हिंदुधर्मकी जय'-च्या जयजयकारात हा समारंभ समाप्त झाला. समारंभ समाप्त होण्यापूर्वी थोडा वेळ आधीं श्रीशंकराचार्यांचें आगमन झालें व त्यांनीं मिस मिलरला आशीर्वादपूर्वक श्रीफल व वस्त्रादि प्रसाद दिला. त्या वेळी मुंबईचे डॉ. सावरकर यांनीं थोडक्यांत भाषण करून हिंदुधर्माचें द्वार खुलें झाल्याबद्दल आनंद प्रदर्शित केला. त्यानंतर कुमारी शर्मिष्ठा हिला अनेकांकडून अहेर करण्यांत आले.

समारंभानंतर शर्मिष्ठाबाई आपल्या मुक्कामाच्या जागीं जात असतां वाटेंत अस्पृश्य समाजानें तिला मानपत्र दिलें.दुपारीं शर्मिष्ठाबाई या गांवांतील श्रीदत्तमंदिरांत दर्शनासाठीं गेल्या. तेथे अनेक स्त्रिया जमल्या होत्या व त्यांनीं तिचें स्वागत केलें व हळदकुंकू देऊन ओटी भरली.

सायंकाळीं यशवंतरावमहाराजांच्या पटांगणावर गोदातीरीं प्रचंड जाहीर सभा झाली. शर्मिष्ठा व श्रीशंकराचार्य यांचें आगमन झालें तेव्हां लोकांनीं

अत्यंत उत्साहानें त्यांचें स्वागत केलें. जमलेल्या मंडळींत स्थानिक प्रमुख पुढारी, सरदार, जहागिरदार, काळेगोरे अधिकारी, हिंदु सभा, आर्यसमाज, साधु महामंडळ वगैरे संस्थांचे कार्यकर्ते होते. निरनिराळ्या इंग्रजी-मराठा प्रमुख वृत्तपत्रांचे आणि अ. प्रे. व फ्री प्रेस अशा संस्थांचे एकंदर २५-३० बातमीदार आले होते. श्रींच्या आगमनानंतर कवि कोचरगांवकरकृत ईशस्तवनपर व स्वागतपर पद्यें झालीं. नंतर वे. पुरुषोत्तमशास्त्री गर्गे यांनी कु. शर्मिष्ठाबाईच्या अभिनंदनार्थ केलेले संस्कृत श्लोक त्यांनीं वाचून दाखवले. प्रथम सहानुभूतिदर्शक आलेल्या तारांचा व पत्रांचा उल्लेख करण्यांत आला. श्री. कु. शर्मिष्ठा देवी, पाटणकर वकील व संपादक स्वधर्म इत्यादींच्याकडे मिळून एकंदर दोनशेंवर तारा व पत्रे आलीं होतीं. संदेशवाचनानंतर कु. शर्मिष्ठाबाईंनी पुढीलप्रमाणे भाषण केलें.

## मिस मिलरचें भाषण

"श्रीशंकराचार्यांनीं मला आपल्या धर्मांत घेतलें याबद्दल मी त्यांची अत्यंत ऋणी आहे. ज्या लोकांची मातृभूमि हिंदुस्थान नाहीं, पण ज्यांना हिंदु संस्कृतीचा व धर्माचा अभिमान वाटतो त्यांना हिंदुधर्मांत घेण्यास कित्येक लोक विरुद्ध आहेत ही गोष्ट चमत्कारिकच आहे. आज आपण या समारंभास हजर राहिलों यावरून हिंदुधर्माचें द्वार खुलें करण्यास आपण सिद्ध झालों हे स्पष्ट दिसून येते. मी शाळेंत जात असल्यापासून हिंदुधर्मासंबंधींचीं कांहीं इंग्रजी पुस्तकें वाचीत असें व त्यांनीं माझें मन आकर्षित करून घेतलें होतें. मला त्यांतील रहस्य कदाचित् न समजेल. परंतु माझ्या मनाचा ओढा तिकडे होता ही गोष्ट मात्र निर्विवाद आहे. दोन वर्षांपूर्वी या माझ्या इच्छेस जास्त चालना मिळाली व हिंदुधर्माचें जास्त ज्ञान मिळविण्याची माझी लालसा वाढूं लागली. त्यांतील सुंदर कथा, आश्चर्यजनक तत्त्वज्ञान व सर्वश्रेष्ठ धर्माबद्दलच्या जुन्या भावना जागृत झाल्या. माझें हिंदुधर्माबद्दलचें ज्ञान अगदींच अपुरें असलें तरी मला तोच धर्म खरा मार्ग दाखवील ही गोष्ट मात्र पटली. मी हिंदु झालें तरी ख्रिस्ती धर्मांतील सत्तत्त्वें मी सोडलीं असें नाहीं व सहिष्णु हिंदुधर्मालाहि ती गोष्ट अमान्य होण्याजोगी नाहीं. श्रीशंकराचार्यांच्या व आपणा सर्वांच्या साहाय्यानें मला हिंदुधर्माचें यथातथ्य ज्ञान क्रमशः होईल अशी उमेद वाटते. मला तुम्ही आपणापैकींच एक समजा व मीहि हिंदु समाजांत राहून त्याचा गौरव वाढविण्याचाच सदैव प्रयत्न करीन."

## डा. कुर्तकोटींचा आशीर्वाद

देवी शर्मिष्ठा हिला आशीर्वाद देतांना श्रीशंकराचार्य म्हणाले, "हिंदुधर्मांच्या फार दिवस बंद असलेल्या द्वाराचा आज आपण पुनरुद्घाटनसमारंभच करीत आहोत. सांप्रतच्या प्रश्नाकडे तात्विक धार्मिक ऐतिहासिक व व्यावहारिक दृष्टीनें पाहिलें पाहिजे. 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे धर्माचें एक सूत्र आहे. विश्वोपकारी अद्वैततत्त्वावर आपला धर्म नटलेला असल्यानें त्यासारखा बुद्धीला व भावनेला पटणारा दुसरा धर्म नाहीं. पाखण्डांना वैदिक धर्मांत घ्यावें असें आपल्या धर्मांत स्पष्ट म्हटलें आहे. हिंदुधर्म हा जगाचा धर्म असें मी म्हणतो तें केवळ भावनेनें नसून वस्तुस्थितिकथन आहे. इतर धर्ममतांनीं एकेक तत्त्व उचललें आहे. हिंदुधर्मांत सर्व तत्त्वांचा समावेश होतो व म्हणूनच प्रत्येक व्यक्तीचा वैदिक धर्मावर हक्क आहे. व मिलरने आज धर्मांतर केलें नसून आपला जन्मसिद्ध हक्क बजावला आहे. अवैदिकांना वेदधर्मांत घेण्याची परंपरा ऋग्वेदकाळापासूनची आहे. इतिहासकालांतले त्याबद्दलचे अनेक दाखले देतां येण्याजोगे आहेत.

प्रस्तुतचें शुद्धीकरण केवळ धर्मलालसेनें होत नसून तें सहेतुकतेच्या दोषानें व्याप्त आहे व या पीठाचा पुढें होणाऱ्या विवाहाशीं प्रत्यक्ष संबंध नसला तरी प्रस्तुत विवाह इष्ट नाहीं ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे. मिलरला शुद्ध करून घेण्याबद्दल अनेक संस्थांनीं आग्रह केला तरी पीठाकडूनच आपलें शुद्धीकरण झालें पाहिजे हा तिचा आग्रह पाहून पीठाबद्दल तिच्या मनांत बराच आदर आहे असें दिसतें. व पीठाकडे तिनें धांव घेऊन हिंदु करून घेण्याबद्दल विनंति केली तेव्हां तिला विन्मुख पाठविणें पीठाला योग्य झालें नसतें. जो आपणास हिंदु करून घ्या म्हणेल त्याला त्याच्या धर्मजिज्ञासेच्या घोषणेवर धर्मांत घ्यावयाचा. आतां या गोष्टीचा दुरुपयोग होणार नाहीं असें नाहीं. परंतु असें भिऊन कसें चालेल ! हिंदुधर्म भित्रा नाहीं, अवसानघातकी नाहीं, याच दृष्टीनें शर्मिष्ठेला आम्ही हिंदुधर्मांत घेतलें."

याप्रमाणें श्रींचें भाषण झाल्यावर तिला देणगीदाखल गीता देण्यांत आली. यानंतर अनेक वक्त्यांचीं भाषणें झाल्यावर मिस शर्मिष्ठेनें व सर तुकोजीरावांची भगिनी श्री. ताराबाई यांनीं सर्वांचे आभार मानल्यावर समारंभ समाप्त झाला.

---

# गोवें प्रांतांतील शुद्धीकरण

## दडपशाहीस सुरुवात झाली!

गोवें प्रांतांतील शुद्धीकरणाची हकीकत आमच्या वाचकांस सविस्तरपणें समजली आहे. तिसवाडी महालांत प्रथमतः शुद्धीकरणाच्या कार्यास सुरुवात झाली व तेथील एका गांवाखेरीज सर्व गांवें (सुमारें ९) शुद्ध करून घेण्यांत आलीं. या शुद्धीकृतांचें व शुद्ध करून घेणारांचें अभिनंदन करण्यासाठीं पुण्यास जी जाहीर सभा झाली तींत इतक्या सहजासहजीं हें शुद्धिकार्य होत असल्याचें पाहून आनंद प्रदर्शित केला होता. परतु हीच स्थिति कायम राहील कीं काय याबद्दल संशयहि प्रगट केला होता व दुर्दैवानें तो खरा ठरला. वरील महालांत शुद्धिकार्य होण्याचें राहिलेलें गांव करमाळी. तेथें ता. ६ रोजीं शुद्धिकार्य करण्याचें ठरलें होतें. परंतु गांवांत दोन तट पडून शुद्धिकार्य लांबणीवर पडण्याचें कारण म्हणजे तेथील मत्सरी अशा ख्रिस्ती लोकांनीं नाना प्रकारच्या कंड्या पिकवून लोकांस निष्कारण भीति वाटावी असे प्रयत्न केले व दुर्दैवानें ख्रिस्ती लोकांचा उद्देश सफल झाला. ठरल्या दिवशीं सर्व गांवांची शुद्धि झाली नाहीं तरी गांवांतील एका प्रमुख गृहस्थांस मात्र शुद्ध करून घेण्यांत आलें.

त्या गांवीं शुद्धिकार्य ठरल्यावेळीं होत नाहीं असें पाहून शुद्धिकार्य करणारी मंडळी फोंडामहालांतील केरी गांवीं ता. ७ रोजी जमा झाली. त्या ठिकाणीं सर्व महालांतील शुद्ध होऊं इच्छिणारे लोक जमा झाले होते व त्यांच्या विचारानें प्रत्येक गांवाचें शुद्धिकार्य पृथक्पणे करावें असें ठरून केरी या गांवचा ता. ११ हा दिवस मुक्रर करण्यांत आला. ही बातमी त्या महालांतील पाद्री धर्माधिकाऱ्यास लागतांच त्यानें ता. १० रोजीं महालांतील प्रमुख ख्रिस्ती मंदिरांत प्रत्येक गांवचे दोन दोन प्रमुख लोक बोलावून नेले. तेथें पाद्री व सदर गृहस्थ यामध्यें काय प्रकार झाला हे समजण्यास साधन नसलें तरी त्यानें बोलावून घेतलेले लोक परत आल्यावर त्यांचा व इतर गांवकऱ्यांचा जो व्यवहार दृष्टीस पडला त्यावरून ठरलेले शुद्धिकार्य त्या दिवशीं न करणेंच बरें असें शुद्धि करणाऱ्या प्रमुख गृहस्थांनीं ठरविलें. पाद्रीसाहेबांनीं निमंत्रित केलेल्या लोकांखेरीज इतर लोक आमची शुद्धि आजच व तीहि ठरल्यावेळीं करा असें म्हणत होते. परंतु त्या वेळी शुद्धिकार्य न करण्याचें मंडळीनें ठरविलें. व त्याप्रमाणें शुद्धिकार्यासाठीं येत असलेल्या लोकांस कळविण्यांत आलें.

हा प्रकार झाल्यानंतर शुद्धिकार्य करणारांपैकीं प्रमुख गृहस्थ श्री. गणपतिबुवा हे केरीहून पणजीस जाण्यासाठीं निघतांच त्यांस पोलिसांनीं एकदम अटक करून फोंडा येथें नेलें. तेथें दुपारपर्यंत त्यांची वास्तपुस्तहि कोणी केली नाहीं. त्यांस अटक झाल्याची वार्ता तेथें पसरतांच तेथील प्रमुख गृहस्थ श्री. देसाई यांनीं महत्प्रयासानें त्यांची गांठ घेऊन त्यांस खाद्यादि वस्तू दिल्या. श्री. गणपतिबुवांना अटक झाल्यानंतर ता. १२ रोजीं प्रसिद्ध गृहस्थ श्री. दादा वैद्य यांसहि पणजी येथें पोलिसांनीं बोलावून घेतलें. तें कशासाठीं हे अद्याप समजलें नाहीं. दादा वैद्य हे कांहीं काळ पोलिसाच्या पाहाऱ्यांत होते, पण त्यांना ता. १३ रोजीं रात्रौ १० वाजतां सोडून दिलें आहे असें कळतें.

श्री. गणपतिबुवांस पकडल्याची वार्ता इतर प्रचारकांस लवकर समजली नाहीं. कारण त्यांपैकी बरेचसे गृहस्थ कालापूर या गांवीं सुमारें ३०-४० लोक शुद्ध होण्याचे राहिले होते त्यांचें शुद्धिकार्य करण्यास गेले होते व तेथें त्यांनीं त्यांना शुद्ध करून घेतलें. हा प्रकार इकडे होत असता ता. १२ रोजीं म्हणजे सोमवारीं चिंबल येथें शुद्धीकृतांनीं मोठ्या प्रमाणावर सत्यनारायण करण्याचें ठरविलें होतें व त्यासाठीं श्री. आनंमूर्ति, शास्त्रीबुवा इत्यादि गृहस्थहि तेथें उपस्थित होते. त्या वेळीं श्री. आनंदमूर्ती व शास्त्रीबुवा यांनाहि पोलिसांनीं अटक करून पणजीस नेले व अशा रीतीनें केवळ शांततेनें चाललेल्या एका धर्मकार्यास व्यत्यय आणला आहे.

आनंदमूर्ती आदि गृहस्थ गोवें प्रांतांत करीत असलेलें शुद्धिकार्य केवळ धर्मकार्य आहे आणि त्यात लोभ, मोह, धाकदपटशा वगैरे कोणताहि अनिष्ट प्रकार नाहीं. केवळ शुद्धीकृतांच्या इच्छेवरूनच त्यांना शुद्ध करून घेण्यांत येत आहे. गोवें प्रांतांत लोकसत्ताक राज्यपद्धति असून तेथें सर्वांसच धर्मस्वातंत्र्य आहे असें जाहीर झालें आहे. असें असतां श्री. आनंदमूर्ती, गणपतिबुवा व शास्त्रीबुवा यांना अटक कां व कशाबद्दल करण्यांत आली याचा उलगडा होत नाहीं. आनंदमूर्तिप्रभृति मंडळी सातारा जिल्ह्यांतील मसूर येथील ब्रह्मचर्याश्रमांतले शिष्य असून ही संस्था शुद्ध धार्मिक स्वरूपाचीच आहे. अशा एका संस्थेतील प्रचारकांस गोव्याच्या हद्दींत निष्कारण अटक होते व त्यांचा छळ होतो

याचा विचार हिंदुस्थानसरकारच्या अधिकाऱ्यांनीं करावयास नको काय ?

### हिंदूंची सहानुभूति व साहाय्य

मंगळवार ता. १३ रोजीं सकाळीं चिंबल येथील शुद्ध झालेले सुमारें ४०० गावडे लोक काब येथील राजवाड्याकडे गव्हर्नरास आनंदमूर्तींना व इतर प्रचारकांना सोडण्याची विनंति करण्यास गेले होते. गव्हर्नरांनीं त्यांना पणजीच्या राजवाड्याकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते गेले. तेथें त्यांनीं कोंकणी भाषेंत गव्हर्नरांना असें सांगितलें कीं, "आनंदमूर्तींनीं आम्हास बळजबरीनें हिंदु केलें अशा समजुतीवर सरकारनें त्यांस अटक केल्याचें समजतें. पण सरकारची समजूत खोटी आहे. आम्ही स्वखुषीनें हिंदु झालों आहों. तेव्हां आनंदमूर्तिप्रभृतींना सोडून द्यावें.' यावर गव्हर्नरांनीं दरबारीं भाषेंत उत्तर दिलें कीं "मला सर्व धर्म सारखेच आहेत. तुम्ही तुम्हाला हवा तो धर्म स्वीकारा. त्याला कायद्याची हरकत नाहीं. आनंदमूर्तिप्रभृतींना कां पकडलें याची चौकशी करतों व योग्य न्याय देतों."

पोर्तुगाल सरकारनें गोवा सरकारला असें कळविलें आहे. कीं हिंदूप्रमाणेंच ख्रिस्ती गावडे व कुंभार या जातींना मुलामुलींचीं लग्नें १४ व १२ वर्षांच्या वयांत करण्याची परवानगी दिली आहे. गोव्याच्या आर्चबिशपानें खटपट करून ही सवलत मिळविली असे म्हणतात. पण यामुळें शुद्धि बंद पडेल अशी त्यांची अपेक्षा असल्यास ती चुकीची होय.

पुढील आशयाची तार महाराष्ट्र हिंदुसभेचे अध्यक्ष श्री. चित्रावशास्त्री यांनीं पोर्तुगीज गोव्याचे गव्हर्नर यांजकडे पाठविली आहे.

"मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाच्या हिंदुधर्मप्रचारकांना पकडल्याची बातमी आल्यामुळें इकडील हिंदु समाजांत मोठी खळबळ उडाली आहे. आणि पोर्तुगीज सरकारनें जाहीर केलेल्या धार्मिक स्वातंत्र्याच्या तत्त्वाला धक्का पोंचणार नाहीं अशी काळजी घेण्याविषयीं व पकडलेल्या हिंदु प्रचारकांवर काय आरोप ठेवण्यांत आले आहेत हें कळविण्याविषयीं आपणास विनंति करण्याचा अधिकार महाराष्ट्र हिंदुसभेनें मला दिला आहे. तरी आपण जरूर ती तजवीज कराल अशी आशा आहे."

रविवार ता. ११।३ दिवशीं मुंबई प्रांतिक हिंदुसभेच्या वतीनें शंकरवाडींत श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) यांचें 'गोव्यांतील शुद्धि' या विषयावर व्याख्यान झालें.

गोवें प्रांतांत शुद्धिकार्य करीत असलेल्या श्री. आनंदमूर्तिप्रभृतींना पकडल्याचें वृत्त कळतांच मुंबई—कायदेकौन्सिलांतील गुंजाळ, सुर्वे, राजमलप्रभृति ३५ सभासदांनीं व कार्पोरेशनमधील डॉ. सावरकरप्रभृति ६ सभासदांनीं गोव्याच्या गव्हर्नरजनरलांस तार पाठवून आनंदमूर्तींना कोणत्या अपराधाकरितां पकडलें याबद्दल जाहीर पत्रक प्रसिद्ध करण्याची व पकडलेल्या इसमांस योग्य रीतीनें वागवून वकिलामार्फत स्वतःचा बचाव करण्याची योग्य संधि देण्याची विनंति केली आहे.

# गोव्याचें बातमीपत्र

(आमच्या खास प्रतिनिधीकडून)

मडगांव ता. १८.

चिंबल मुक्कामीं आनंदमूर्ति यांना पकडण्यांत आलें. त्यापूर्वी दोन दिवस गणपतिबुवा यांना अटक करण्यांत आली होती. ही पकडापकड होण्यापूर्वी चिंबल येथें मोठ्या प्रमाणावर एक सत्यनारायण करण्याचें तेथील शुद्धीकृतांनीं ठरविलें व सोमवारीं (ता. १२) रात्रीं तो फारच थाटानें व उत्साहानें करण्यांत आला. या समारंभास सुमारें दोन हजार शुद्धीकृत जमा झाले होते. या ठिकाणींहि त्या वेळीं ५ गावडे व एक मुसलमान शुद्ध करून घेण्यांत आला. शुद्ध करून घेण्याबद्दल येथील लोकांत अहमहमिका उत्पन्न झाली आहे. व नेटानें काम चालविल्यास अल्पावधींतच राहिलेले सर्व गावडे शुद्ध होतील असा अंदाज आहे.

सत्यनारायण यथासांग पार पडल्यावर श्रीआनंदमूर्ति व मोडकशास्त्री प्रसाद घेऊन निघणार इतक्यात त्यांना पकडून पणजी येथें नेण्यांत आलें. यापूर्वी श्रीगणपतिबुवा यांनाहि तेथें अटकबंद ठेवण्यांत आलें होतेंच. गोवें प्रांतांतील तुरुंगाची व्यवस्था फार शिथिल असते असा बाहेर फार लौकिक आहे. कदाचित तो खराहि असेल. परंतु यांच्या बाबतींतील अनुभव मात्र सर्वस्वी उलटा आला. प्रथमतः त्यांना अत्यंत गलिच्छ जागेंत ठेवण्यांत आलें. प्रत्येकाला प्रथमपासूनच वेगवेगळ्या ठिकाणीं ठेवण्यांत आलें होतें व त्यांजकडून इष्ट अशी जबानी घेण्याचा कसून प्रयत्न करण्यांत आला. इष्ट अशी म्हणण्याचे कारण या तिघांनींहि

घडली तीच हकीकत वरचेवर सांगितली असतां पुनः, नीट सांगा, तुमच्याविरुद्ध भक्कम पुरावा आमच्याजवळ आहे, असें त्यांस बजावण्यांत येत होतें! मारण्याचा धाकहि घालण्यांत आला! गणपतिबुवा यांना तर जटा हलवून त्या छाटून टाकतों असाहि दम दिला गेला असें कळतें. पहिले तीन दिवस त्यांच्या खाण्याचे फार हाल झालें व त्यांस निवळ उपवास काढावे लागले. परंतु ब्राह्मणांच्या हातचें असल्याखेरीज अन्न ग्रहण करणार नाहीं असे त्यांनीं पोलीस अधिकाऱ्यांस निर्धारानें कळविल्यानें अखेरीस त्याना ब्राह्मणाचें अन्न देण्याची सोय झाली. या अटकेमुळें शुद्धीकृत गावडे लोकांत एकच गडबड उडाली. ते घाबरून गेले असें नव्हे, परंतु जी मंडळी अत्यंत प्रेमानें आपणास धर्मोपदेश करीत आहेत त्यांस अटक झाली व ती आपल्यासाठीं झाली अशी गावड्यांची समज होऊन सुमारे ७-८ शें गावडे गव्हर्नरांच्या वाड्यावर जमा झाले. ( त्यांना गव्हर्नरांनीं काय उत्तर दिलें ती हकीकत दुसरीकडे दिलीच आहे.—**सं. के.**)

गोवें प्रांतांत अशी धरपकड झाल्याची बातमी महाराष्ट्रांत व इतरत्र पसरतांच तेथेहि स्वाभाविकपणें जी विलक्षण खळबळ उडाली तिच्या लाटा पोर्तुगीज गोव्यावर येऊन एकसारख्या आपटूं लागल्या. मुंबई-कायदेमंडळाचे ३५ सभासद, मसूर आश्रम, असेंब्लीचे सभासद व श्रीशंकराचार्य( डॉ.कुर्तकोटी )इत्यादिकांनीं गोंवेसरकारला यासंबंधांत जाब मागून अटकबंदी गृहस्थावरील आरोप तरी जाहीर करा नाहीं तर त्यांस सोडून द्या अशी मागणी केल्याचें समजतें. गोंवें-सरकारावर असा गहजब व तोहि जबाबदार सर्वमान्य व्यक्तींकडून होऊं लागतांच अधिकाऱ्यांची दंडेली कमी झाली व अटकबंदीवरील कडक देखरेख एकदम कमी होऊन त्यांस सौम्यपणें वागावण्यांत येऊं लागलें. आणि ता. १७ रोजीं सकाळीं त्यांस एकदम सोडून देण्यात आलें. त्यांस पणजीहून पोलीस पाहाऱ्यांतून आगगाडीनें ब्रि. हद्दीपर्यंत (कॅसलरॉकपर्यंत) आणून सोडलें. पणजीहून त्यांस मुक्त करतांना पुनः गोंवें प्रान्ताच्या हद्दींत पाऊल टाकल्यास कायम तुरुंगांत डांबून ठेवूं असें तोंडी बजावण्यांत आलें!

या हद्दपारीमुळे एकंदर परिस्थिति चिंताजनक झाली आहे. ज्या ३ हजार लोकांना शुद्ध करून घेण्यांत आलें त्यांना धर्मशिक्षण देणें, त्यांचे धार्मिक विधी करणें यासारखीं कामें होण्याला या 'धर-सोडी'नें मोठाच व्यत्यय आला आहे. यापुढची कामगिरि मुख्यतः गोंवें प्रांतांतीलच स्थानिक हिंदु जनतेनें करावयास पाहिजे. त्या संबंधीं आपण काय धोरण आंखावें हें ठरविण्यासाठीं उद्यां म्हणजे सोमवारीं पणजी येथें हिंदु समाजाची जाहीर सभा भरणार आहे. आपण हा प्रश्न तडीस नेल्याखेरीज सोडणार नाहीं असा मसूर ब्रह्मचर्याश्रमाचे संस्थापक श्री. विनायकमहाराज यांचा निश्चय असून या अंगीकृत कार्यास समर्थांचे आनंदवनभुवन सर्वस्वी पाठिंबा देईल असाहि त्यांस भरंवसा आहे.

# पत्रकर्त्याच्या स्फुट सूचना

१ गोव्यांत शुद्धिकार्याचा प्रचार करणारे मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमांतील कार्यकर्ते प्रचारक श्री. आनंदमूर्ति, गणपतिबुवा व मोडकशास्त्री यांना गोव्यांतील पोलिसांनीं पकडून हद्दपार केल्याचें वृत्त आज दुसरीकडे दिलेंच आहे. अधिकाऱ्यांच्या या अरेरावी कृत्यानें एक गोष्ट आपोआप उघड झाली कीं, या तिघां प्रचारकांविरुद्ध कोणत्याहि प्रकारचा गुन्हा कायदेशीर रीत्या शाबीत करणें अधिकाऱ्यांना शक्य नव्हतें. "आनंदमूर्तीवरच्या आरोपाची चौकशी करून न्याय्य तें करीन" असें गव्हर्नरांनीं गांवड्यांना आश्वासन दिलें. पण तें कृतींत मात्र उतरलें नाहीं. आणि कोणताहि आरोप सिद्ध झाला नसतां बिनचौकशीनें या तीन निरपराधी ब्रिटिश प्रजाजनांस उचलून बाहेर काढण्यांत आलें! प्रचारकांवर काय आरोप आहेत याबद्दल गव्हर्नरांना ठिकठिकाणच्या प्रमुख हिंदूंनीं तारेनें पृच्छा केली असतां त्याचें अद्याप उत्तर नाहीं! तीन ब्रिटिश प्रजाजनांना अपराध नसतां उचलून हद्दपार करण्याच्या या सुलतानी कृत्याबद्दल ब्रिटिश सरकारनें पोर्तुगीज सरकारास जाब विचारावयास नको काय? हिंदी प्रजाजनांच्या परदेशीय हितसंबंधाचे बाबतींत ब्रिटिश सरकार जागरूक नसतें या पूर्वानुभवामुळेंच पोर्तुगीज पोलीस अधिकारी निश्चितपणे आनंदमूर्तीप्रभृतींची हांकलपट्टी करण्यास धजले. यासाठीं सरकारच्या सुप्त परराष्ट्रीय खात्यास डिवचून या प्रसंगीं जागें करण्याचा साधेल तो प्रयत्न करणें जरूर आहे. शिवाय गोव्यांत हिंदु ब्रिटिश प्रजाजनांस अशा तऱ्हेनें वागविण्यात आल्यास ब्रिटिश मुलुखांत सुखानें राहणाऱ्या गोवानीज लोकांकडे निराळ्या दृष्टीनें पाहणेंहि ओघानेंच प्राप्त होईल. प्रचारकांना बाहेर काढलें तरी गोव्यांत जुने-नवे हिंदु आहेत व शुद्धीची संजी-

वनीहि त्यांच्या हातीं आहेत. यामुळें शुद्धीचें कार्य मागें हटण्याचें ऐवजीं तें दृढमूल होऊन बळावण्याचाच अधिक संभव आहे. एकट्या मसूरच्या ब्रह्मचर्याश्रमाशीं हा लढा नसून अखिल हिंदु समाजाशीं आहे, यांची आंतून व बाहेरून जितक्या रीतीनें पोर्तुगीज सरकारला जाणीव देणें शक्य आहे तितक्या रीतीनें या वेळीं दिली पाहिजे. या बाबतींत सत्य व न्याय हीं पूर्णपणें हिंदूंच्या बाजूचीं असल्यानें अखेर पोर्तुगीज सरकारलाच माघार घ्यावी. लागेल. मात्र या धकाधकीच्या जगांत सोशिक, मृदु व शांत सत्यापेक्षां प्रतिकारी, तीक्ष्ण व चळवळें सत्यच प्रभावी ठरतें हें हिंदूंनीं लक्षांत ठेवावें.

# रिझर्व्ह बँक किंवा गंगाजळी पेढी

## ( ले.—न. चिं. केळकर )

### लेखांक ४ था

### गंगाजळीचा उगम ( २ )

मागील लेखांत गंगाजळीच्या एका उगमाचें वर्णन आलें. त्याचाच दुसरा भाग 'गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह' हा होय. 'पेपर करन्सी रिझर्व्ह' या नांवांत कागदी नोटांचें चलन दर्शविणारे प्रत्यक्ष शब्दच आहेत. 'गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह' यामध्यें चांदीचा रुपया दर्शविणारे प्रत्यक्ष शब्द नाहींत परंतु अर्थ तोच आहे. सोन्याच्या मापानें काय मोजावयाचें? तर चांदीचा रुपया. मग तो प्रत्यक्ष चांदीच्या स्वरूपांत असो किंवा कांहीं एका संकेतानें कागदावर त्याची किंमत लिहिलेली असो. गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह हे शब्द उच्चारताना चांदीच्या रुपयाप्रमाणें चलनी नोटांतील रुपयेहि चांदीच्या रुपयांचें रूप घेऊन आपल्या डोळ्यापुढें येतात. कारण अखेर सोन्यानें मोजावयाची ती चांदी होय, कागद नव्हे.

प्रश्न असा कीं, रुपयांच्या नाण्यांत चांदी किती असावी वगैरे सर्व गोष्टी ठरलेल्या असतां त्यांना पुनः सोन्याच्या मापानें निराळें मोजण्याचें कारण काय? आणि रुपयांना सोन्याच्या मापानें मोजण्याचें ठरलें तरी त्यांना तारण कशाला? कापडाच्या दुकानांत तागयावर कापडाचा दर्जा व त्याची लांबी लिहिलेली असते. अशा तागयांना दुकानदार वेगळें तारण म्हणून कांहीं ठेवीत नाहीं. तागयावर गिरणीचा नंबर व वाराचा आंकडा पाहून तागयाचा दोरा न तोडतां गिऱ्हाईक तो उचलून घेऊन जातो. गिऱ्हाईक तो ताग स्वतः वार घालून मोजून पाहील तेव्हां तो कमी भरेल तर तितकें माप पुरें करून देण्याकरितां दुकानदाराला त्या जातीचें कापड तारण म्हणून शिल्लक ठेवावें लागत नाहीं. मग चांदीचा रुपया हा जर अशा ठराविक मापानें मोजला जावयाचा तर त्याला तारण कशाला हवें? त्याचें उत्तर हें कीं, सोन्याच्या मापानें मोजलें असतां चांदीच्या रुपयाची किंमत केव्हां केव्हां कमी भरण्याचा संभव असतो. तागयांतील कापड धुतल्याशिवाय आटत नाहीं, म्हणून तें केव्हांहि वार लावून मोजलें तरी तितकेंच भरणार. तसेंच उन्हाळ्यांत वार कांहीं फार लांब होत नाहीं किंवा थंडींत तो फार आंखूड होत नाहीं. पण रुपयाला लावलेल्या सोन्याच्या मापाचें तसें नाहीं. कारण हें माप म्हणजे चांदी व सोनें यांच्या बाजारी किंमतीचें एक ठराविक प्रमाण आहे. आणि या दोनहि धातूंची किंमत कमीजास्त होत असल्यामुळें रुपयांत चांदीचा ऐवज कायम असला तरी सोन्याच्या मापांत त्याची किंमत कमी किंवा जास्ती भरूं शकते. आतां ही किंमत फक्त अधिकच भरावयाची असें असतें तर गंगाजळीच्या तारणाचें कारण नाहीं. पण पुष्कळ वेळां ती कमीहि भरते म्हणून त्याची कायदेशीर किंमत खरी करून देण्याकरितां तारण अवश्य असतें. शिवाय दुसरेंहि एक कारण आहे; तें असें कीं, चांदी व सोनें ह्यांची किंमत जरी कायम राहिली तरी परदेशच्या व्यवहारांत बाजारची तंगी किंवा ढिलाई कोणत्याहि इतर कारणांनीं झाल्यास व बाजारनिरखांत फरक पडल्यास रुपयाच्या मोबदला बाजारी वस्तु मिळण्याची किंमत कमीजास्त होऊं शकते पण या कारणांचें सविस्तर विवेचन पुढें करूं.

चांदीचा रुपया सोन्याच्या प्रमाणांत मोजला असतां जो चढ–उतार होतो त्यालाच हुंडणावळीचा चढ–उतार असें म्हणतात. विलायतेशींच मुख्यतः हिंदुस्थानाचा व्यापारी संबंध असल्यामुळें आणि इतर परदेशाशीं आलेल्या व्यापारी संबंधाचीहि हिंदुस्थानाच्या व्यापाराशीं वजावाट मुख्यतः विलाय

तेंत होत असल्यामुळें व विलायतेंतील सरकारी खर्चा-करितां हिंदुस्थानाला दरवर्षी २५-३० कोटि रुपये तरी पाठवावे लागत असल्यामुळें रुपयाची सोन्याच्या मापानें मोजलेली किंमत कमी झाल्यास त्रास पडतो व तोटा होतो. ही गोष्ट आज सुमारें ४० वर्षे एक-सारखी अनुभवाला आलेली आहे. पूर्वी रुपयाची ही किंमत प्रत्यक्ष कायद्यानें ठरविण्यांत आलेली नव्हती. अलीकडे ती तशी ठरविण्यांत आलेली आहे. रुप-याची किंमत प्रथम पुष्कळ वर्षे २४ पेन्स होती. पुढें पुष्कळ वर्षे १६ होती व हल्लीं १९२७ मार्च-पासून ती १८ पेन्स ठरविण्यांत आली आहे. रुपयाची किंमत १८ पेन्स याचा अर्थ विलायतेंत १८ पेन्सांना जितकें सोनें विकत मिळेल तितकें सोनें असा अर्थ आहे १८ पेन्सांना ८$\frac{1}{2}$ ग्रेन्स म्हणजे सुमारें ४$\frac{2}{3}$ गुंजा सोनें मिळतें, मिळेल किंवा मिळत राहील अशी कायमची कल्पना धरून रुपयाची ही किमत सरकारनें कायद्यानें ठरविली आहे. वास्तविक रुपयांत सोनें नाहीं, चांदीच आहे व कोणी केव्हांहि त्यांतील चांदी काढून ती विकून सोनें घेतो असा अर्थ नाहीं. परंतु ठोकळ मानानें कांहीं एक प्रमाण धरून त्या प्रमाणांत ही किंमत कायम करावी लागते म्हणून ती केली आहे.

आतां प्रत्यक्ष हिंदुस्थानांतील व्यवहारांत ह्या किंमतीचा प्रश्न कधींच उद्भवावयाचा नाहीं. कारण रुपयाची किंमत २४ पेन्स ठरविली काय, १६ पेन्स ठरविली काय किंवा १८ पेन्स ठरविली काय, हिंदु-स्थानाच्या चतुःसीमेंत रुपया तो रुपया, बाजारांत त्याला हुंडणावळ द्यावी लागत नाहीं व घ्यावी लागत नाहीं; रुपयांना नोटा मिळतात, नोटांना रुपये मिळ-तात. लोकांना सरकार रुपये देतें व लोकांकडून रुप-येच घेतें. इकडील कुळानें इकडील सावका-राला, सावकारानें कुळाला, किंवा व्यापा-ऱ्यानें व्यापाऱ्याला रुपये देतां घेतां त्याची किंमत सोन्यांत किती आहे हा प्रश्न कोणाच्याहि कधींच लक्षांत येत नाहीं. कायद्यानें त्याची जी किंमत ठरविली त्याच किंमतीला तो कोणासहि स्वीका-रावा लागतो. पण हिंदुस्थानांतील लोकांवर काय-द्याचें जें बंधन या कामीं आहे तें परदेशीं कसें चालणार? परदेशांत हा कायदा लागू नाहीं. पर-कीय व्यापारी आपल्या देशांत केव्हांहि चांदीच्या रुपयाचें दर्शन देखील घेत नाहींत. कारण हे रुपयाचें नाणें परदेशांत चालत नाहीं व तेथें कोणाच्या हातीं चांदीचा रुपया पडला तर त्याला फक्त त्यांतील चांदीच्या ऐवजाइतकीच किंमत परदेशी लोक देणार आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणे सोन्याच्या मापानें मोजलेली रुपयाची किंमतहि अनेक कार-णांनीं बदलते. यामुळें ती किंमत कमी भरेल तेव्हां ती भरून द्यावी लागते. मग ही तूट भरून देण्याची जबाबदारी कोणावर? तर त्याचें सहजच उत्तर असें येतें कीं, ज्यानें रुपयाची किंमत अमुक इतकें सोनें ठरविली त्यानेंच ती जबाबदारी पुरी करून दिली पाहिजे. लोक सरकारला सहजच म्हण-तात कीं, तुम्ही कायद्यानें ठरविलेली रुपयाची किंमत खरी समजून चालून, आम्ही त्याचा व्यव-हार केला व करतों. देशांतल्या देशांत हा व्यवहार जोंपर्यंत होतो तोंपर्यंत रुपयाच्या पोटांत शिरून त्यांत चांदीचा ऐवज किती आहे किंवा त्याला अमुक इतकें सोनें मिळेल कीं नाहीं याचा प्रश्न तुम्ही आम्हाला करीत नाहीं, आम्ही तुम्हाला करीत नाहीं. हें सर्व ठीक झालें. व्यवहाराला प्रतिबंध किंवा अडचण न आली, आणि सर्वांनींच जर रुपयाची दर्शनी किंमत खरी मानली व सर्रास देवघेव केली तर या नाण्याच्या ऐनजिनसी किंमतीची चौकशी कोण कशाला करील!"

बरें, तुम्ही कायद्यानें किंमत ठरविली नसती तर वेळीं मिळेल त्या भावानें आम्ही पर-देशाचें नाणें किंवा सोनें विकत घेऊन, तें पर-देशीं पाठविलें असतें व आपला व्यवहार भाग-विला असता, त्यांत तुमच्याकडे विचारावयास आलों नसतों. पण कायद्यानें तुम्ही आमचे हात चोंहोंकडून बांधून ठेवले आहेत. रुपया वितळवून त्याची चांदी करून ती परदेशीं पाठवावी म्हटलें तर आमचा तोटा म्हणून आम्हाला तसें करतां येत नाहीं. कारण १६ आणे देऊन विकत घेतलेले रुपये वितळवून हातीं १० आणे किंमतीची चांदी घेऊन, दर रुपयामागें सहा आणे तोटा शहाणा मनुष्य कसा करून घेईल? चांदीची किंमत अगदीं वाढली वाढली असें म्हटलें तरी ही ६ आण्यांची तूट भरून येण्याइतकी वाढणें सहसा शक्य नाहीं. बरें, इकडे सोन्याचें नाणें चालू असतें तर आमचा प्रश्न आपोआप सुटला असता. कारण मग आम्हाला आमच्याजवळचेंच सोन्याचें नाणें परदेशीं पाठवितां आलें असतें. तसें झालें म्हणजे चांदीची किंमत कमी-जास्त झाल्याचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं; व सोन्याच्या किंमतींत जरी क्वचित थोडाबहुत फरक झाला असें घडलें तरी, सोन्याची किंमत प्रत्येक देशांत सारखीच असते. इकडून विलायतेला सोन्याचें नाणें किंवा सोनें पाठविण्याला जितका अवधि लागेल तेवढ्यांत सोन्याची किंमत बदलली तरी फारशी बदलूं शकत नाहीं. आणि बदलली तरी इतकी थोडीच बदलूं शकेल कीं असें नुकसान कोणाच्याहि खिजगणतींत राहूं शकणार नाहीं. येऊन-जाऊन आमचें सोनें परदेशीं पाठ-विण्याला वाहतुकीचा थोडासा खर्च लागेल तो

आम्ही सहज सोसूं शकतों. वाहतूक ही कोणालाहि सोसावीच लागते. मुंबईस आम्ही बँकेंतून रुपये घेतले व दूरगांवीं न्यावयाचे म्हटले तर थैल्या वाहून नेण्याला किंवा हुंडी पटवून घेण्यालाहि थोडाबहुत खर्च करावा लागतो, तसा विलायतेस सोनें पाठविण्याला लागणारा खर्च आम्ही केला असता व तोहि आमच्या खिजगणतींत नसता. पण तिकडूनहि तुम्ही आमचें नाक बंद केलं आहे, कारण हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें तुम्ही चालू करीत नाहीं इतकेंच नव्हे, तर पूर्वी चालू होतें तेंहि बंद केलें. सोन्याचें नाणें चालू असल्याशिवाय तें संग्रहीं ठेवतो कोण? आणि संग्रहीं नसलें तर तें परदेशीं पाठवावयाचें कोठून? हुंडणावळीचा धंदा करणाऱ्या पेढ्यांकडे आयत्या वेळींसोन्याचें नाणें मागावयास गेलों तर कायदा तें दिलेंच पाहिजे असा नाहीं. तुम्ही कायद्यानें रुपयाची किंमत ४७/८ गुंजा सोनें इतकी ठरविली. पण त्या भावानें आम्हाला सोन्याचें नाणें परदेशीं पाठविण्याला देण्याचें बँकेवर काय बंधन आहे?

बरें, आमचें आम्हीच सोनें संग्रहीं ठेवून तें वेळीं पाठवावें म्हटलें तर चलनी नाण्याच्या स्वरूपात नसलेलें सोनें संग्रहीं राहूं शकत नाहीं. त्याला पाय फुटतात. म्हणजे त्याचे दागिने तरी होऊन जातात व मग ते मोडण्याचें जिवावर येतें किंवा खर्चिकपणा वाढतो व चैनीच्या पदार्थांत सोनें विरून जातें असे प्रकार होतात. या सर्व कारणांकरिता तुम्ही कायद्यानें काढलेली चांदीची नोट ( म्हणजे चांदीचा रुपया ) याची ४७/८ गुंजा इतकी किंमत तुमची तुम्हीच वाटेल त्या रीतीनें खरी करून द्यावयास पाहिजे. नाहीं म्हणून सांगतां कोणाला? मनुष्याला सरकारनें तुरुंगांत नेऊन बसविलें असतां त्याच्या पोटाला घालण्याची जबाबदारी जशी सरकारावर येते, त्याप्रमाणें चांदीच्या रुपयाची सोन्याच्या मापांत नसती भारी किंमत तुम्ही ठरवून दिली तर ती पुरी करून देणें हें तुमचें नैतिक कर्तव्य आहे, कायदेशीर कर्तव्य आहे, व तें तुम्ही न कराल तर तो नुसता जुलूम म्हणावा लागेल व तुमची बेअब्रू होईल. कागदाच्या पाठीवर वाटेल ती रक्कम लिहावी, चांदींत हिणकस मिसळून त्याच्या तुकड्यावर वाटेल ती किंमत लिहावी हा तुमचा जुलमी प्रकार देशांतल्या देशांत चालतो. पण त्याचें कारण झालें तरी तुम्ही कायद्यानें स्वतःला असें बांधून घेतलें आहे कीं, रुपयांचा आंकडा लिहिलेला कागद लोकांकडून आम्ही दर्शनी किंमतीला स्वीकारूं आणि आमच्याकडे आमचे रुपये कोणी परत दिले तर आम्ही दर्शनी १६ आणे किंमत परत देऊं. पण रुपयाच्या गळ्यांत सोन्याच्या मापानें मोजलेली म्हणून जी किंमत तुम्ही कायद्यानें बांधून दिली आहे तिची वाट काय? तुमचे प्रजाजन परदेशीं गेले असतां तुम्हाला त्यांचा पासपोर्ट देऊन त्यांच्या सर्व हक्कांचें रक्षण आपल्या जोखमीवर करावें लागतें. त्याचप्रमाणें तुमचा हा कायदेशीर रुपया आम्ही परदेशीं पाठविणारे झालों तर त्याच्या हक्काचें म्हणजे त्याच्या सोनेरी किंमतीचें रक्षण तुम्हालाच करून दिलें पाहिजे.

हिंदुस्थान–सरकार जुलमी असलें तरी सुधारलेलें आहे. त्याला आपलें हें कर्तव्य टाळतां येत नाहीं व जुलुमाला दिवाळखोरीच्या बेअब्रूची भर घालतां येत नाहीं. म्हणून चांदीच्या रुपयाची ४७/८ गुंजा सोन्याची किंमत परदेशीं उभी राहात नाहीं असा जेव्हां प्रसंग येईल तेव्हां ती त्यांना भरून द्यावी लागते. आणि ती केव्हां कशी भरून द्यावी लागेल हें सांगतां येत नसल्यामुळें, ती भरून देण्याकरितां आपल्याजवळ तारणाचा ऐवज ठेवावा लागतो. अर्थात् अशा हेतूनें ठेवलेलें जें तारण त्याचेंच नांव 'गंगाजळी' व त्याला सुवर्ण गंगाजळी (गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह) म्हणण्याचें कारण असे कीं चांदीच्या रुपयाची सोनेरी किंमत पटवून देण्याचें कार्य या गंगाजळींतून व्हावयाचें असतें.

असो. अशा रीतीनें या दोन गंगाजळींचा उपयोग दोन प्रकारचा आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल. कागदी चलनी गंगाजळीचा उपयोग कोणी कितीहि चलनी नोटा सरकारकडे आणल्या असतां त्याच्या मोबदला चांदीचे रुपये देणें हा आहे. आणि सुवर्ण गंगाजळीचा उपयोग चांदीच्या रुपयाचें सोनें करून देण्याचा आहे. गतवर्षी झालेल्या कायद्यानें रुपयाची किंमत सोन्यांत ठरविली त्याबरोबरच त्या किंमतीनें रुपये व सोनें यांचे उलट–सुलट व्यवहार करण्याचें बंधनहि सरकारनें आपणावर उघडपणें घालून घेतलें आहे. तें असें कीं, या ठराविक दरानें कोणी रुपये दिले तर सरकारला सोनें देणें प्राप्त आहे व कोणी सोनें आणून दिलें तर त्याला रुपये देणें प्राप्त आहे. पहिल्या गंगाजळीचा प्रत्यक्ष उपयोग करण्याचा प्रसंग सहसा कसा येत नाहीं हें मागील लेखांत सांगितलें आहे. पण या दुसऱ्या गंगाजळीचा उपयोग वेळोवेळीं आज अनेक वर्षे सरकारास करावा लागला आहे. हुंडणावळीच्या भावांत अदलाबदल अतिशय झाली यामुळें सुवर्ण गंगाजळीचें महत्त्व अधिक पटूं लागलें. आणि यापुढें या दोन गंगाजळी वेगळ्या न ठेवतां एकच करण्यांत येतील त्याचें झालें तरी हेंच कारण होय. या उभयविध

गंगाजळीच्या उगमाचें हें इतकें वर्णन झालें. ही गंगाजळी आज सरकारच्या स्वाधीन आहे. पण सरकार एखाद्या पेढीवाल्याप्रमाणें सर्रास व्यवहार करीत नाहीं म्हणून या गंगाजळीचा उपयोग लोकांच्या लक्षांत येत नाहीं. पण सरकार आपल्याजवळची ही गंगाजळी एखादी रिझर्व्ह बँक काढून तिच्या स्वाधीन करील तेव्हां त्या गंगाजळीचा उपयोग व व्यवहार लोकांच्या दृष्टीला अधिक पडेल.

# जमीनविभागणी बिल कां नको?

## निगडींतील एक संवाद

यंदा जसा हवा तसा पाऊस पडल्यामुळें सुभान्याचें शेत चांगलें पिकलें होतें. इतकें चांगलं पीक गेल्या ७।८ वर्षांत नव्हतें. या कारणानें सुभान्या व त्याचें कुटुंब आनंदांत होतें. सुभान्याचा व निगडीच्या तलाठ्याचा लोभ मोठा. सुभान्याच्या शेतांत कांहीं नवीनवाळ पिकली कीं ती खंडोपंत तलाठ्याच्या घरीं पोंचती व्हावयाची. हुरड्याच्या दिवसांत खंडोपंतांस हुरडा खावयास बोलावण्याची वहिवाट सुभान्या आपल्याकडून मोडीत नसे. परंतु अलीकडे ७।८ वर्षांत शाळू हुरड्याला येण्याच्या आंतच करपून टाकण्याची वाहवाट हस्ताच्या पावसानें पाडल्यामुळं सुभान्यास आपली पाहुणचाराची वहिवाट मोडावी लागली. पण हें वर्ष सुबत्तेचें आलें. दरनक्षत्र आपली हजेरी लावल्यावांचून गेलें नाहीं. कैक वर्षे वाहावयास विसरलेल्या ओढ्यांनीं आपलीं कोरडीं पडलेलीं मनें वितळवून सोडलीं. सुभान्याचा शाळू चांगला उगवून आला. कणसास चिकटा न पडतां दाणा भरला व शाळू ऐनहुरड्यांत येतांच सुभान्याच्या बायकोनें एक दिवस शेतांत बाटुक उपटीत असतां म्हटलें, 'आपल्या गांवच्या बामणाला हुरडा खायाला बोलवायाची आठवणच नाहीं जणुं. दरवरसाला आपण नव्हतों बोलवत त्यांना'?

'होय वेळेवर आठवण केली आमच्या कारभारणीनं. मीबी विचारांत होतोच. बघतो बामणाला भेटून. त्याला हुरडा दिल्यावाचून मी कधी हुरडा खाल्ला आहे कां तूच सांग.' सुभान्या व त्याची बायको गया यांचें वरील प्रकारचें भाषण झालें. सुभान्या खंडोपंतांस जाऊन भेटला व हुरड्याचा दिवस ठरून त्याप्रमाणें खंडोपंत व त्यांच्या घरीं आलेले पुण्याचे पाहुणे बंडोपंत हुरडा खाण्याकरितां दिवस बराच कलल्यावर शेतांत गेले. सुभान्यानें दोघांना रामराम करून शेजारच्या चिंचेच्या झाडाखालीं बसण्याकरितां घोंगडी हंतरून ठेवली. त्यानें बायकोस गोवर पेटवावयास सांगून आपण शेतांत कणसें काढण्याकरितां गेला. जातांना त्यास खंडोपंतांनीं थट्टेनें बजावलें 'दिवाणा हुरडा काढूं नकोस हं सुभान्या! हे आमचे पुण्याचे पाहुणे आहेत. त्यांना हुरडा परतलेला काढून दिलास तर आपल्या गांवचा दुर्लौकिक पुण्यापर्यंत होईल.'

'असं कुठं झालय पंत!' सुभान्या हसत म्हणाला. 'असला वाईट हुरडा चारलेला कधी आठवतोय का तुम्हाला? सांगा.'

सुभान्यानें निवडक कणसें काढून आणिलीं आणि त्यांतलीं दोन-दोन तीन-तीन कणसें गोवरांत एकदम लावून देऊन हिरवेगार दाणे घोंगडीवर चोळले व त्याचा अगदीं गरमगरम पसा भरून व गोंड काढून तो पाहुण्यांच्याच हातांत प्रथम ठेवला. इतर साहित्य भोंवतालीं सिद्ध होतेंच. पण त्याला हातहि न लावतां बंडोपंतांनीं तोंडांत जो नुसताच हुरड्याचा घास घातला तितका गोड घास त्यांनीं सन्या जन्मांत खाल्ला नसेल. तो घास व त्याच्या नंतरचे घास बंडोपंत एकीकडे खात होते व त्यांची बैठक टेकावर असल्याकारणानें वाऱ्याबरोबर डुलणाऱ्या त्या शाळूच्या शेताकडे ते दृष्टि टाकीत होते. शेत पाहून सहज बंडोपंतांनीं विचारलें 'का सुभानराव तुमचें हें तुकडें किती एकरांचें?'

'असेल, धनी, दोन-अडीच एकर'. खंडोपंताकडे पाहून 'कसें पंत?' पंतांनीं सहज रीतीनें डोळे बारीक करून व डोक्यास वर हिसका देऊन संमति दर्शविली.

'इतकेंच का? मग सरकार हें तुमच्याकडे मुळींच राहूं देणार नाहीं.'

'भले धनी! असं कुठं झालय या इंग्रजी राज्यांत? सरकारची पट्टी वेळच्या वेळीं भरली म्हणजे काय भीति आहे आम्हाला? काय पंत, सांगा माझी पट्टी कधी थकली आहे का?'

'तें खरं सुभान्या! पण पट्टी भरून देखील तुझी जमीन जाणार, समजलास' खंडोपंत म्हणाले.

'मग आजवर नाहीं कुठं गेली ती? आतांच जायाला ती थोडीच कोणाची अन्यायानं लाटली आहे!'

खंडोपंतासहि नव्या बिलाची कांहीं फारशी माहिती नव्हती. ते एवढेंच म्हणाले, 'हे पुण्याचे पाहुणे फार हुषार आहेत. त्याची गोष्ट तूं आपला ऐकून ठेव!'

'हे पुण्याचे बामण आपल्याच काखेंतून कांहीं तरी खूळ काढीत असतील झालं. सरकार तसं कधींबी करायचं नाहीं.'

'सुभान्या, अरे तूं वेडा आहेस. सरकार असा कायदाच करणार आहे की, ज्यांचे म्हणून जमिनीच लहान तुकडे असतील ते त्याच्यापासून काढून घ्यावयाचे' बंडोपंतांनी गंभीर चर्या करून सांगितलें.

'वाः कायदा केला म्हणून आम्ही बरा तो ऐकूं. आमची जमीन घ्यायला ती बरी फुकटची लागली आहे.'

'अरे ते फुकट कशाला घेतील ? तुझ्या जमिनीची पंचामार्फत किंमत ठरवितील आणि ती घेताल.'

'सरकार माझी जमीन घेऊन तिच्यांत स्वतः नांगर धरणार असेल नाहीं ! काय राव थट्टा करताय मजसारख्या अडाणी माणसाची!'

'सरकार स्वतः जमिनात नांगर धरणार नाहीं हें खरें. पण ती कायद्याने तुजपासून काढून तुझ्या बांधास बांध लागून असलेल्या तुझ्या शेजाऱ्यास खरेदी देईल.'

'ती कशापायी? माझ्यान् सरकारचा वाकुडपणा आहे होय'?

'याचें कारण वेगळेंच आहे. सरकार म्हणतें, जमिनीच्या वांटण्या होत होत त्यांचे इतके लहान तुकडे पडत आहेत कीं त्यांत पिकलेलें एखादें शेत व चैत्रांत गौरीपुढे मांडलेली शेतें यांजमधील फरक कळणें कठीण झालें आहे. यामुळें जमिनीची मेहनत होत नाहीं, यंत्राचा उपयोग करतां येत नाहीं व शेतें नीट पिकत नाहीत. यासाठीं जमिनीचे लहान लहान तुकडे एकत्र, करावयाचे व ते एकाच इसमास खरेदी द्यावयाचे.'

मध्येंच खडोपंतासहि हा विषय अधिक समजून घेण्याची इच्छा झाल्यामुळें त्यांनीं बंडोपंतांस विचारलें, 'जमिनीचा तुकडा कमींत कमी किती लहान असावयाचा हें ठरलें असेलच ?'

'नाहीं' पंतांनीं सांगितलें, 'तसं ठरलें नाहीं. कारण तें ठरविणें सोपें नाहीं. हें सारें पावसापाण्यावर अवलंबून आहे. ज्या भागात पाऊस पुष्कळ पडतो त्या भागांत शेतकऱ्याच्या एका मध्यम कुटुंबास जमिनीचा लहान तुकडा पुरतो. पण सोलापूर, नगर वगैरे दुष्काळी जिल्ह्यांत तेवढ्याच कुटुंबाचें पोट भरण्यास त्याच्या चौपट जमीनहि पुरणार नाहीं. यासाठीं प्रत्येक जिल्ह्याला कलेक्टर, शेतकी खात्याचा डेप्युटी डायरेक्टर व सरकारनें पसंत केलेले जिल्हा लोकल बोर्डाचे तीन सभासद यांची एक कमिटी सरकार नेमील. तिनें जमिनीचा अगदीं लहानांत लहान तुकडा केवढा असावा हें आपल्या जिल्ह्यापुरतें सांगावें व कमिशनरानें अखेरचा निकाल द्यावा.'

प्र.—ठरलेल्या प्रमाणापेक्षां अमका तुकडा लहान आहे हें सर्व शेतकऱ्यांस समजणार कसें ?

उ.—'असा तुकडा असेल त्याची नोंद 'क' पत्रकांत 'लहान तुकडे' या सदराखालीं होईल.'

प्र.—मग या लहान तुकड्यांचें काय करावयाचें ?

उ.—शेजारचे शेतकरी कबूल असतील तर त्यांस ते खरेदी द्यावयाचे आणि ते कबूल न होतील तर इतर कोणासहि ते खरेदी देतां येतील.

प्र.—शेजारचा शेतकरी जमिनीचा तुकडा घेण्यास कबूल आहे. परंतु त्याजपाशीं रोख पैसा नाहीं तर त्यानें काय करावें ?

उ.—विहिरी पाडण्यास किंवा ताली घालण्यास सरकार जशी तगाई देतें तशी जमीन खरेदी करण्यास देईल व त्याजपासून ती हप्तेबंदीनें वसूल करून घेईल.

खडोपंत—लहान जमिनीची अशा रीतीनें विक्री होण्यापूर्वी सदर जमिनीच्या मालकाला आपली जमीन कोणास ताबेगहाण देऊन किंवा इच्छेप्रमाणें कोणासहि खरेदी देऊन रक्कम काढणें भाग पडलें तर त्यानें काय करावें ?

उ.—त्यानें ही गोष्ट मामलेदारांस कळवावी. मग मामलेदार शेजारच्या जमिनीच्या मालकांस सदर व्यवहाराच्या शर्ती कळवितील आणि शेजारी नाकबूल असतील तर ती जमीन इतरांस विकण्यास अगर इतरांकडे गहाण ठेवण्यास परवानगी मिळेल.

सुभान्या—म्हणजे त्याला गरज लागेल तेव्हां पैसा मिळावयाचा नाहींच तर!

बंडोपंत—अलबत. नाहींच मिळणार. त्याची जमिनीवरील मालकी तितक्यापुरती कमीच झाली. अहो सुभानराव, फार काय, पण एखादा इसम आपली जमीन दुसऱ्याकडे खंडानें लावणारा असला तरी त्यानें ती जमीन आपल्या शेजाऱ्याकडेच लावली पाहिजे.

प्र.—त्याच्याकडून योग्य तो खंड न येईल तर ?

उ.—तो देईल तोच खंड घेतला पाहिजे हें तर झालेंच.

खडोपंत—हं बंडोपंत ! हें तुम्ही एखादा-दुसऱ्या तुकड्याचें सांगितलें. पण एखाद्या गांवांत लहान लहान तुकडे पुष्कळ असले तर ?

बंडोपंत—त्यांचीहि व्यवस्था बिलांत आहेच. अशा गावांची कलेक्टरानें चौकशी करावी; व निम्म्यापेक्षां कमी नाहींत इतके मालक किंवा दोन-तृतीयांशापेक्षां कमी नाहींत इतके धारण करणारे कबूल असतील तर त्या गावाच्या लहान लहान

जमिनी कशा एक करावयाच्या याची योजना तयार करून ती मंजूर करण्यासाठीं कलेक्टरानें गव्हर्नर-इन-कौन्सिल यांजकडे अर्ज करावा व त्यांची मंजुरी घ्यावी.म्हणजे सरकार त्या कामासाठीं कन्सॉलिडेशन ऑफिसर नेमील.त्यानें गांवचामुलकी पाटील व आणखी दोन इसम यांची मदत घ्यावी.

खंडोपंत—अशा रीतीनें केलेली वांटणी जमिनीच्या मालकास पसंत न पडली तर?

बंडोपंत—वाः, त्या फेरवांटणीपत्रकावर कन्सॉलिडेशन ऑफिसर त्यांजपासून कबुलीच्या सह्या घेईल. व याउपर तक्रार निघाल्यास तिचा विचार डिस्ट्रिक्ट जज्ज व दोन असेसर हे करतील. असेसरांपैकीं एक मात्र कन्सॉलिडेशन ऑफिसरच असल.

खंडोपंत—असं कसं? तोच अधिकारी असेसरांत म्हणजे हा गुळाचा गणपति आणि गुळाचा नैवेद्यच नव्हे काय?

बंडोपंत—ही तर त्यांतली गोम आहे.

सुभान्या—मला यांतलं फारस कळत नाहीं म्हणा. पण विचारतो, सरकार आम्हाला कबूल असेल तरच अस करणार नव्हे का?

बंडोपंत—(हंसून) कबुली काय! सरकार आहे तें. कबुली बोल बोल म्हणतां घेईल. आम्हा कुळकर्ण्यांचीं वतनें खालसा करतांना जसा आमच्या कबुलीचा फार्स झाला तसाच हा व्हावयाचा.

सुभान्या—हां. मी अगदींच विसरलों. खरं हो खरं पंत. तुम्ही म्हणतां तें अगदीं खर. पण मला आपली शंका आली कीं मजसारख्या लहान तुकड्यांच्या धन्याची वाट काय?

बंडोपंत—तुम्हाला तुमच्या जमिनीचे रोख पैसे मिळतील.

सुभान्या—पैशाला घेऊन काय करतां? हे पैसे आम्ही आपल्या जमिनी यापूर्वीच विकून केले नसते का? आमचं आमच्या जमिनीवर ओली-कोरडी भाकर मिळन कसबसं पाट भरत म्हणून आम्ही सावकाराचं कर्ज काढूनहि त्या जतन करून ठेवल्या. त्या विकल्या कीं हे पैसे सावकार घेऊन जाईल. आन् आमच्या खाका वर!

बंडोपंत—सगळयांनाच कर्ज असतं असं नाहीं. बाकीच्यांनीं त्या पैशांतून कोणचाहि धंदा करावा!

उ.—धंदा आहे कुठं हाका मारायला? धंदा असता तर एवढ्याशा तुकड्यासाठीं आम्ही आपला जीव कशाला काढून ठेवला असता?

प्र.—मग तुमचं म्हणणं काय सुभानराव?

उ.—म्हणणं काय असायचय? रोजंदारीशिवाय आम्हाला धंदा नाहीं. रोजंदारी करून व मुंबईकराचीस राहून कुत्र्यामांजरासारखे आम्ही जगायला तयार नाहीं.

प्र.—जमीन काढून घेतली तर सरकारनें तुमच्या गांवांतल्या गांवांत तुम्हाला धंदा मिळवून द्यावा हेंच तुमचें म्हणणेंना?

उ.—हेंच म्हणणं. अहो माझा बाप सांगत होता कीं, त्याच्या बापाच्या वेळी जमिनीला कोणीहि विचारीत नव्हतं. इतर मार्गांनीं व गांवांत अन्नूनं राहून पैका मिळाला तर उन्हांत टाळकी तापवून घाम गाळायला कोण तयार होईल हो?

बंडोपंत—असं तुम्ही आपलं म्हणणं स्पष्टपणानं सरकारच्या कानावर घातलं पाहिजे. तुम्ही असं म्हटलं पाहिजे कीं, आम्हाला आमच्या गांवच्या गांवांत आमच्या पोटापाण्याची सोय आधीं लावा व मग हा कायदा पास करा.

सुभान्या—इतकं आम्हा कुणब्याना कळतं तर आमची अशी दशा का झाली असती? हे आमच्या गांवचे बामण खंडोपंत ना? ते काहीबी सांगत नाहींत.

बंडोपंत—ते कसे सांगतील? ते पडले सरकारचे नोकर! ते असें सांगतील तर त्यांची नोकरीच राहाणार नाहीं.

सुभान्या—तेंहि खरंच, पण तुम्ही राव आम्हाला देव भेटलात. मी आमच्या गांवांत ही गोष्ट सांगतो व नवा कायदा आम्हाला नको असा अर्ज गांवकऱ्याकडून सरकारकडे करवितो.

बंडोपंत—पण सुभाराव! आणखी एक गोष्ट मुद्द्याची राहिली. जमिनी तुमच्या मालकीच्याना? मग सरकारनें तुमची पट्टी थकली नसतां तुमच्या हातून त्या काढून घेतल्या तर तुमचा मालकी हक्क बुडतो हें उघड नाहीं काय?

सुभान्या—खरंच हें इतका वेळ माझ्या ध्यानांतबी आलं नाहीं. आम्ही आमचा मालकी हक्क सोडण्यास तयार नाहीं.

बंडोपंत—तसा तुम्ही आपल्या अर्जांत स्पष्ट खुलासा करण्यास विसरूं नका बरं का!

इतकें संभाषण होत आहे तों संध्याकाळ बरीच झाली. झांजड पडली. हुरड्याकरितां केलेला गोवर वाऱ्यानें विझून गेला. बंडोपंतांनीं त्या मोकळ्या हवेंत गोड लागलेला हुरडा प्रमाणाबाहेर खाल्ला होता तरी त्यांचें खाणें पूर्वीच संपलें होतें. तरी खंडोपंतांच्या धोतरांत सुभान्यानें आणखी हुरडा मुलाबाळांकरितां बांधून दिलाच. उठतां उठतां खंडोपंतांनीं चंची सोडली व विडान् तंबाखू खात-खात त्यांनीं घरची वाट धरली. सुभान्या वस्तीला शेतांतच असल्यामुळें पंतांना व पाहुण्यांना दूरवर घालवून पुनः शेतात राखणीकरितां परत आला. पण त्याच्या मनास आपलें शेत जाणार ही लागलेली हुरहुर मात्र गेली नाहीं.

# रशियांतील बोल्शेव्हिक राज्य

## लेखांक १ ला

### प्रास्ताविक

युरोपांतील ज्या राष्ट्रांनीं मिळून महायुद्ध केलें त्यांपैकीं बहुतेकांच्या तें अंगावर आलें. त्यांपैकीं या नाहीं त्या रूपानें ज्याच्या राज्यघटनेंत फरक झाला नाहीं अशीं मोठीं राष्ट्रें इंग्लंड व फ्रान्स हींच. अमेरिकाहि युद्धांत सामील झाली होती. परंतु ती युद्ध चालविण्याकरितां नव्हे तर संपविण्याकरितां. त्यामुळें युद्धाची झळ अमेरिकेस कोणत्याहि प्रकारें लागू नये हें स्वाभाविक होय. याशिवाय उरलेल्या राष्ट्रांत जर्मनी, ऑस्ट्रिया-हंगेरी, इताली, तुर्कस्थान व रशिया या राष्ट्रांस महायुद्ध चांगलेंच भोंवलें. जर्मनीचे माणसापरीनें माणूस गेले व पैशापरीनें पैसा खर्च होऊन जर्मन राष्ट्र कर्जाच्या कर्दमांत पक्कें रुतलें. पण या नुकसानीखेरीज त्याजवरील कैसर बादशहाची रावणी सत्ता रसातळास जाऊन त्या ठिकाणीं लोकसत्ता आली ही मोठीच क्रांति समजली पाहिजे. ऑस्ट्रिया-हंगेरी हें जुनें राज्य मोडलें व त्याचीं लहान लहान लोकसत्ताक शकलें पडलीं. इताली देशाचा राजा व त्याला अंकित असें पार्लमेंट कायम राहूनहि कालान्तरानें पार्लमेंटचें कवच फोडणारी व एकमुखी सत्ता गाजविणारी अशी नवी राज्यपद्धति सिनॉर मुसोलिनी याच्या डोक्यानें घेतली व ती कदाचित् प्रचलित झाल्यास सांप्रतच्या जगातील बहुरंगी राज्यघटनेच्या प्रदर्शनांत एक नवाच नमुना मांडल्याप्रमाणें होईल.

तुर्कस्थानाचें मोठें राज्य लहान बनलें, साम्राज्याचें स्वरूप जाऊन त्याला स्वराज्याचें स्वरूप प्राप्त झालें आणि सुलतान व खलीफ या दोघांसहि अर्धचंद्र मिळून केमाल पाशाच्या देखरेखीखालीं लोकसत्ताक राज्याची नौबत झडूं लागली. यामुळें मुसलमानी देशांत लोकशाहीचें नवें बीं पेरलें गेलें असून त्याचा राजकीय व धार्मिक दृष्ट्या अखिल इस्लामी समाजावर विलक्षण परिणाम दृष्टीस पडल्यावांचून राहाणार नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं फ्रान्स देशांत राज्यक्रान्ति झाली त्या वेळीं नेपोलियनाच्या धडाडीच्या धोरणामुळें युरोप खंडांत लोकसत्ताक राज्यपद्धतीची पर्वणी प्राप्त झाली आहे अशीं सुखस्वप्नें पुष्कळांस पडलीं. पण तीं नेपोलियनाच्या चुकीमुळें व युरोपांतील राजांनीं त्याजविरुद्ध तात्काळ कट केल्यामुळें खोटीं ठरलीं. जर्मन महायुद्धाचा उगम असलेल्या लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या उमाळ्यांतून खास झाला नाहीं. त्यास कैसर बादशहाचा साम्राज्यमदच कारण झाला. पण मौज अशी कीं, साम्राज्यशाहीचे हे मनोरे कोठच्या कोठें ढांसळून पडून त्या प्रत्येक राजसिंहासनाच्या खालून लोकसत्तेनेंच डोकें वर काढलें व अशा रीतीनें नेपोलियन बोनापार्टच्या काळांत धुमसत पडलेल्या लोकसत्ताक अग्नीचा भडका नेमका शंभर वर्षांनीं युरोपांत उडून त्यांत बादशाही व राजशाही अमलांच्या आहुत्या पडल्या. याचें कारण ज्या ज्या देशांत बादशाही अमलाचें दडपण होतें त्या त्या देशांतील जनतेचीं मनें सदर अमलाविरुद्ध खवळलेलीं होतीं. पण सैन्याच्या आधारावर स्थिरावलेल्या त्यांच्या सत्तेपुढें योग्य समयाची वाट पाहात जनतेस गप्प बसणेंच भाग होतें. हें दडपण महायुद्धाच्या धक्यांनीं डळमळूं लागतांच डोक्यावरचें दडपण पायाखालीं दाबून लोकसत्ता ठिकठिकाणीं अवतरली.

महायुद्धामुळें युरोपांत घडून आलेल्या सर्व क्रान्त्यांत रशियांतील राज्यक्रान्तीस निखालस वेगळेंच स्थान देणें भाग आहे. ही क्रान्ति प्रथम सर्वसामान्य क्रान्त्यांच्या पाऊलवाटेनेंच चालत गेली. रशियांतील झारचा एकतंत्री व सुलतानी अंमल संपून लोकशाही स्थापन व्हावी याबद्दल रशियन प्रजाजनांनी गलीं पाऊणशें वर्षें सतत चळवळ चालविली होती. तिला न जुमानता झार बादशहांनीं आपलाच हट्ट धरल्यामुळें त्यांस परराष्ट्रांशीं युद्धप्रसंग झाले त्यांत यश मिळविण्याचा संभव मुळींच राहिला नाहीं. सुमारें वीस चवीस वर्षांपूर्वी रूसो-जपानी युद्धांत जपानसारख्या पौर्वात्य व नवशिक्या राष्ट्रापुढें रशियास हार खावी लागली. तेव्हांच झारचें धाबें दणाणून त्यास ड्यूमा ही लोकप्रतिनिधि—सभा प्रजेच्या आग्रहावरून स्थापन करणें भाग पडलें. पण सदर सभेसहि खरी सत्ता न मिळाल्यामुळें रशियन लोकांचीं मनें असंतुष्ट राहिलीं तीं राहिलींच.

जर्मन महायुद्धांत रशियाचा झार सर्व्हियाचा पक्ष घेऊन जर्मनीशीं लढण्यास उभा राहिला. परंतु झारच्या अमलावर सैनिकांचेंहि प्रेम नसल्यामुळें जर्मनीच्या प्रत्येक धडकीपुढें रशियन सैन्य कोलमडतच गेलें. युद्धांत रशियन प्रजेची पुष्कळ

उपासमार झाली. लाखों शिपाई प्राणास मुकले आणि कपाळच अपेश चुकलें नाहींच. या संकटांनीं प्रजा त्रस्त होऊन गेली व झारच्या अमलाला कंटाळली. झारहि पेंचांत पडला व जुलमी राजाचें दुर्भाग्य तेंच जुलमाखालीं बेजार झालेल्या प्रजेचें भाग्य या सार्वत्रिक सिद्धान्तास अनुसरून डयूमानें झार बादशहास तख्त सोडण्याची आज्ञा केली ! झारनें प्रसंग ओळखला व निमूटपणें सिंहासन मोकळें केलें. झारच्या मागून त्याचा भाऊ ग्रँड डयूक हा अधिक लोकप्रिय असल्यामुळें त्याची सिंहासनावर स्थापना करण्यांत आली. ही गोष्ट १९१७ च्या मार्च महिन्यात घडली. रशियांत सनदशीर राज्यव्यवस्था सुरू झाली. ही व्यवस्था इतर ठिकाणाप्रमाणे प्रथम अर्थातच मध्यमवर्गाच्या हातीं होती व तिचा अध्वर्यु केरेन्स्की हा होता.

वरील नव्या राजवटींत रशियाचा महायुद्धाशीं संबंध कायमच राहिला. लोकांची उपासमार व सैनिकांचे हाल चालूच होते. ही संधि न दवडण्याचा बोलशेव्हिक पक्षाचा पुढारी लेनिन यानें निश्चय केला. सर्वांत अधिक दुःखें शिपाई, शेतकरी व कामकरी यांसच भोगावीं लागत होती. त्यांस जो पक्ष आपल्या बाजूस ओढील त्याच्या हातांत रशियाचीं राज्यसूत्रें पडणार होतीं. बोल्शेव्हिक पक्षाचा जन्म या त्रिवर्गाच्याच हितासाठीं असल्यामुळें त्रिवर्ग त्यास अनुकूल होणें कठीण नव्हतें. पण या कार्यास हात घालण्यात विलक्षण धाडस होतें. हें धाडस करण्यास लेनिनच्या जिवलग दोस्तांनाहि हिय्या करवेना. पण लेनिन यानें उडी घेतली. त्यानें युद्ध तहकूब झाल्याचें रणक्षेत्रावरील रशियन सैनिकास कळविलें आणि शेतकऱ्यांस, कामकऱ्यांस व शिपायांस संदेश पाठविला कीं हा अफाट देश तुमचा आहे, या समृद्ध जमिनी तुमच्यासाठीं आहेत व हे मोठमोठे कारखाने तुमच्या मालकीचे आहेत. या बातमीनें सर्व देशभर आनंदी-आनंद पसरला. मृत्यूच्या जबड्यातून तारणारा लेनिन सैनिकास परमेश्वर वाटून लाखों सैनिक त्याच्या निशाणाखालीं उभे राहिले. ज्याचें सैन्य त्याचें राज्य या न्यायानें रशियाचें स्वामित्व लेनिन व त्याचे दोस्त यांजकडे आलें. देशभर पसरलेल्या कोट्यावधि शेतकऱ्यांची मूक सहानुभूति लेनिन यास मिळाली. त्यांच्या जोरावर लेनिन यानें केरेन्स्की व त्याची साहाय्यक डयूमा यांच्या हातचीं राज्यसूत्रें १९१७ च्या नोव्हेंबर महिन्यात काढून घेऊन ग्रँड डयूक यांस पदच्युत केलें.

युरोपांतील राज्यक्रांतीच्या इतिहासाचा विचार केल्यास त्यासहि उत्क्रांतीचेंच तत्त्व लागू पडतें व तें इंग्लंडाच्या इतिहासांत खुलासेवार नजरेस येतें. इंग्लंडाच्या राजाचे पहिले मंत्रिमंडळ ऊर्फ पार्लमेंट आर्चबिशप, बिशप, अॅबट व बॅरन अशा बड्या लोकांचें व सरदार मंडळीचेंच होतें. ही राज्यघटना तिसऱ्या हेनरीपर्यंत टिकून होती. तिसऱ्या हेनरीच्या कारकीर्दींत म्हणजे तेराव्या शतकांत सरदार मंडळीस आपल्या साहाय्यार्थ मध्यमवर्गास बोलावणें जरूर वाटलें व तेव्हांपासून मध्यमवर्गाची सत्ता सारखी वाढीस लागून अॅस्क्विथसाहेब इंग्लंडाचे मुख्य मंत्री असतां मध्यमवर्गाच्या कॉमन्स सभेच्या हातास हात लावण्यापलीकडे लॉर्डांच्या सभेस महत्त्वाचा अधिकार उरलाच नाहीं. सारांश, इंग्लंडांतील सत्ताधारी बिशप-बॅरन यांच्या हातून सत्तेचें संक्रमण गेल्या पांचशें वर्षांत व्यापारी किंवा मध्यमवर्गांत झालें. अलीकडे गेल्या पन्नास वर्षांत मजुरांचा उदय इंग्लंडांत झाला असून थोड्याच वर्षांपूर्वीं मजूर पुढाऱ्याच्या हातीं इंग्लंडचीं राज्यसूत्रें औटघटका पडलीं होतीं.

पूर्वकाळीं किंबहुना अद्यापिहि ज्यांच्यापाशीं सैन्याचें किंवा संपत्तीचें बळ मोठें ते राज्यसत्तेचे मालक अशी स्थिति आहे. परंतु यापुढें सैन्य किंवा संपत्ति याऐवजीं संख्या हेंच सत्तेचें अधिष्ठान होणार असा रंग दिसूं लागला आहे आणि कोणत्याहि देशाच्या एकंदर लोकवस्तीत शेतकरी व कामकरी यांचीच संख्या मोठी असते. अर्थातच या उत्क्रांतींत राजाचा मुकुट अखेरीस मजुरांच्याच डोक्यावर शोभूं लागणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. या उत्क्रांतीचें वर्तुळ इंग्लंडच्या इतिहासांत ठळक रेघानी काढलेलें दृष्टीस पडतें. तितक्या स्पष्ट रेषा रशियाच्या इतिहासावर उमटल्या नाहीत हें खरें आहे. रशियांत झार व सरदार-मंडळ यांच्या मगरमिठींतून राजदंड फारसा सुटला नव्हता व मध्यमवर्गाच्या किंवा डयूमासभेच्या हातांत तो नीटसा आला नव्हता. तोंच मजुरांनीं बंड करून त्याजवर झडप मारली व रशियांत मजुरांचा अंमल गाजूंहि लागला. गेल्या नोव्हेंबर महिन्यात मजुराच्या म्हणजे बोल्शेव्हिकांच्या अंमलास रशियांत दहा वर्षें पुरीं झालीं. बोल्शेव्हिकांचा अंमल ही जगातील अश्रुतपूर्व गोष्ट होय यांत शंका नाहीं. या दृष्टीनें बोल्शेव्हिकांचीं तत्त्वें व सत्ता हीं कोणत्या प्रकारचीं आहेत व तीं रशियांत कितपत अमलांत आलीं आहेत याचा वृत्तान्त मनोरंजक असल्यामुळें त्याचें विवेचन क्रमशः करण्यांत येईल.

# पालकांनों, इकडे दृष्टि वळवा

गेल्याचे मागील आठवड्यांत येथील शिक्षाविचार मंडळाच्या विद्यमानें शिक्षणविषयक चर्चेचा सप्ताह झाला. त्यानंतरच्या आठवड्यांत येवलें येथें राष्ट्रीय शिक्षण परिषदेचें पांचवें अधिवेशन होऊन त्यांतहि शैक्षणिक विषयाचीच वाटाघाट झाली. पण हे दोनहि समारंभ सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणाऱ्यास परस्पर विपरीत अशीं दोन दृश्यें दिसून आलीं असल्यास व तीं पाहून 'हें चित्र पाहा आणि हें चित्र पाहा' असे उद्गार त्या प्रेक्षकाच्या तोंडून निघाले असल्यास त्यांत नवल नाहीं. एकीकडे पाहावें तों भव्य इमारती, इंग्रजी भाषेंतील २६ अक्षरेंहि पुरीं न पडतील एवढ्या लांबलचक पदव्यांनीं विभूषित असे शिक्षक व चालक, हजाराच्या आंकड्यांनीं मोजावा लागणारा छात्रगण, लक्षावधि रुपयांच्या देणग्यांचा वर्षाव आणि या सर्वांहून अधिक प्रभावी असा सरकारचा वरद हस्त आणि दुसरीकडे पाहावें तों चंद्रमौळी इमारती, एकाहि पदवीची उपाधि न बाळगणारा शिक्षक वर्ग व चालक वर्ग, शतकार्धशतकाचीहि मर्यादा सहसा न ओलांडणारी छात्रगणांची अल्प संख्या, कपिलाषष्ठीच्या पर्वणीसारखीच क्वचित काळीं येणारी एखाद–दुसरी अल्पस्वल्प देणगी आणि सर्वांत जाचक अशी सरकारची वक्रदृष्टि! अशा परस्पर विरोधी परिस्थितींतील विद्यार्थ्यांची शारीरिक बौद्धिक व नैतिक दृष्ट्या तुलना केल्यास पहिल्या प्रकारच्या संस्थांतून बाहेर पडणारे विद्यार्थी सर्वतोपरी सरस ठरावे आणि त्यांच्या पालकांचें पूर्ण समाधान झालेलें दिसावें अशीच अपेक्षा सकृद्दर्शनीं कोणीहि करील. पण वस्तुस्थिति तशी नसून जवळ जवळ याच्या उलट प्रकार दिसून येतो. राष्ट्रीय शाळांतील शिष्य जसे शरीरानें व मनानें खंबीर, बुद्धिमत्तेंत अपरप्रत्ययनेय व आचरणांत शीलसंपन्न असे आढळून येतात तसे तद्व्यतिरिक्त शाळांतील विद्यार्थी आढळून येत नाहींत.

असा विपरीत प्रकार घडून येण्याचें कारणहि उघडच आहे. जसें बीं पेरावें तसें फळ मिळतें; जशा भावनेनें शिक्षण द्यावें तशी भावना विद्यार्थ्यांच्या मनांत मूळ धरून राहाते आणि ज्या साधनांचा उपयोग करावा त्या साधनांना अनुरूप असाच परिणाम दृग्गोचर होतो. निमसरकारी व सरकारी शिक्षणसंस्था परंपरा व परिस्थिति यांच्या चक्रव्यूहांतून बाहेर पडूं शकत नसल्यानें किंवा इच्छित नसल्यामुळें त्या संस्थांतून दिल्या जाणाऱ्या शिक्षणांत अथपासून इतिपर्यंत दोषांचा बुजबुजाट आढळावा हें स्वाभाविक होय. स्वार्थांध व अधिकारलोलुप अशा सरकारचें शिक्षणविषयक तत्त्व व धोरण ठरलेलें आहे आणि त्यांत तें आपण होऊन रतिमात्रहि फरक करूं इच्छित नाहीं. याच कारणास्तव खुद्द सरकारी किंवा सरकारच्या छायेखालीं असलेल्या शाळांतून जें शिक्षण दिलें जातें त्याचा परिणाम राष्ट्रीय उन्नतीच्या चळवळीला अपायकारक असा होतो. कसा तो पहा. सरकारच्या कह्यांत असलेल्या किंवा गेलेल्या शाळांतून शारीरिक शिक्षणाची हेळसांड होते त्यामुळें विद्यार्थ्यांचीं मणगटे दणगट बनत नाहींत; धार्मिक शिक्षणाचा पूर्ण अभाव असल्यामुळें विद्यार्थी धर्मभावनाशून्य अतएव देहात्मवादी होतात व त्यांना उच्च ध्येयच राहात नाहीं; त्यांना मिळणारें वाङ्मयशिक्षण अराष्ट्रीय असल्यानें त्यांचे विचारहि राष्ट्राभिमानशून्य होत जातात; त्यांना शिकविलें जाणारें समाजशास्त्र पौर्वात्य राष्ट्रांच्या दीर्घकालीन अनुभवाशीं विसंवादी असून त्यापासून त्यांच्या मनांत समाजरचनेविषयीं विपरीत कल्पना उद्भूत होतात व ते समाजविध्वंसक होतात. राजकीय शिक्षणांत तर पदोपदीं त्यांच्या पदरांत नालायकी बांधली जात असल्यामुळें आपण खरोखरीच स्वराज्याला अपात्र आहों अशी त्यांची भावना दृढमूल होऊन जाते. शास्त्रीय आणि औद्योगिक शिक्षण बोंडल्यानें दूध पाजल्यासारखें इतक्या बेताबातानें दिलें जातें कीं, त्याचा व्यवहारांत उद्योगधंद्यांच्या वाढीस काडीमात्र उपयोग होत नसून केवळ पाश्चात्यांचे चोचले व चैनीचे प्रकार मात्र आपल्यांत शिरतात आणि आपण त्यांच्या मालाचे एक कायमचे गिऱ्हाईक होऊन बसतों व सर्पाला दूध पाजण्याप्रमाणें आमच्या शत्रूसच अधिकाधिक बलसंपन्न करूं लागतो! याशिवाय या शाळांतून गुरु–शिष्यसंबंध प्रेमाचे व विश्वासाचे न राहतां गुरूंना शिष्यांची पुरती तोंडओळख देखील नसते आणि शिष्यांच्या अंतःकरणांत गुरूविषयीं यत्किंचितहि आदरभाव वसत नसतो. या कारणामुळें विद्यार्थ्यांना जी शिस्त लागावी व ते जसें शीलसंपन्न व्हावेत तसे होत नाहींत आणि म्हणूनच हल्लींच्या शिक्षणपद्धतीविरुद्ध पालकांची एकजात तक्रार आहे.

येथील शिक्षणसप्ताहांत पालक व शिक्षक यांनीं परस्परांना जो निवडक वाक्सुमनांचा अहेर केला

त्यांत चालू शिक्षणपद्धतीच्या या ओंगळ स्वरूपाचें पूर्ण आविष्करण झालें. या दोषांची जबाबदारी सरकार, विश्वविद्यालय, शिक्षणसंस्थांचे चालक, शिक्षक, पालक व विद्यार्थी या सर्वांमध्यें कशीहि विभागली जावो, तिचा दुष्परिणाम अखेरीस व्यक्तिशः पालकाला आणि संघशः राष्ट्राला भोवूं लागतो. याकरितांच ही स्थिति सुधारण्याची चळवळ मुख्यतः पालकांनीं आणि राष्ट्रधुरीणांनीं केली पाहिजे. पण पालकांना अंधपरंपरा व गतानुगतिकत्व सोडवत नाहीं आणि राष्ट्रधुरीणांचें इकडे जावें तितकें लक्ष जात नाहीं. वास्तविक पाहातां पालकांना सरकारी किंवा निमसरकारी शिक्षणाचा आणि सरकारी विश्वविद्यालयाच्या पदव्यांचा मोह पाडण्याचें आतां पूर्वीसारखें फारसें कारण राहिलें नाहीं. या शाळांतून शेकडा ९० मुलें तरी पांढरपेशा वर्गाचींच असतात व त्या वर्गाला सरकारी नोकरी जवळ जवळ दुर्मिळच झाली आहे. बरें, इतर स्वतंत्र राष्ट्रांतल्या विद्यार्थ्यांप्रमाणें या देशांतील सरकारी व निमसरकारी विद्यालयांतील विद्यार्थी स्वावलंबी व धाडसी निपजतात व पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि जाऊन आपलें पोट भरूं शकतात म्हणावें तर तिकडूनहि निराशाच. स्वेच्छेनें असो वा परेच्छेनें असो सरकारी चाकोरींतून बाहेर पडलेला सद्यःकालीन विद्यार्थी व्यापारांत किंवा उद्योगधंद्यांत कोठें तरी घुसण्याचा प्रयत्न करूं लागल्यास सुशिक्षितांपेक्षां अशिक्षितच बरा असें म्हणून त्याचें शिक्षणच त्याच्या नालायकीचें सर्टिफिकेट मानलें जातें! अर्थातच जें औषध पुष्टिकारक म्हणून पोटांत घ्यावें तेंच औषध विषासारखें प्राणघातक व्हावें अशासारखाच हा विपरीत प्रकार होय. परंतु असा कटु अनुभव सध्याच्या शिक्षणपद्धतीचा येत आहे हें नाकारतां येणार नाहीं. तेव्हां ज्या शिक्षणाच्या योगानें विद्यार्थी आपल्या भावी स्वावलंबनाच्या आयुष्यक्रमाला नालायक न ठरतां उलट अधिक लायक होईल तसलें शिक्षण मिळण्याची सोय पालकांनीं करून घेणें जरूरीचें आहे.

चालू शिक्षणक्रमास स्वतः पालकच इतकीं नाकें मुरडीत असतां आपल्या पाल्यांना ते पुनः तसल्याच भटारखान्याकडे कां पाठवितात हा एक विचारणीय प्रश्न आहे. याचें उत्तर हेंच कीं सोडतीची चटक लागलेल्या इसमास ती चटक जशी सोडवत नाहीं तशीच गतानुगतिक अशा रूढिदासांना प्रचलित शिक्षणाचा मोह सोडवत नाहीं. सोडतीच्या लक्षावधि तिकिटांतून फारच थोड्या तिकीटवाल्यांना नांव घेण्याजोगें बक्षीस मिळणार, इतरांच्या पदरास खार मात्र लागणार, हें प्रत्येकास आधींपासून अवगत असतें. तथापि ज्या थोड्या भाग्यवानांना तो लाभ मिळणार असेल त्या थोड्यांत माझें नांव न येईल कशावरून? हा मोहच ज्याप्रमाणें लक्षावधि लोकांचें वाटोळें करण्यास कारणीभूत होतो त्याप्रमाणेंच जी एखाददुसरी बडी जागा, इंपीरिअल किंवा प्रॉव्हिन्शियल सर्व्हिसमध्यें हिंदी लोकांना प्राप्य असेल ती माझ्याच मुलाला प्राप्त होणार नाहीं कशावरून? असल्या मोहक भ्रमानें प्रत्येक पालक आपल्या पाल्याला या सरकारी चरकांत आग्रहानें घुसवितो आणि मग तो पाल्य त्यांतून पाल्यासारखा शुष्क होऊन बाहेर पडतो. ही शोचनीय स्थिति लक्षांत घेऊनच कै. प्रो. विजापूरकर यांनीं प्रथम समर्थ विद्यालयाची स्थापना केली त्या वेळीं असल्या विद्यार्थ्यांना उद्देशून 'पहा राहिला देहमात्रें चिपाडें' असें मोठ्या कळवळ्यानें म्हटलें होतें. परंतु अत्यत तेजस्वी व टवटवीत विद्यार्थ्यांना 'चिपाडें' बनविणाऱ्या शिक्षणाचा मोह पालकांना अद्यापि आवरतां येत नाहीं, ज्यांना नोकरी हटकून हमखास मिळणार आहे त्यांचें एक असो. पण ज्यांना सरकारी नोकरी मिळण्याचा किंचितहि संभव नाहीं, 'चाकरी केली तरच भाकरी मिळेल' असे जे अनन्यगतिकहि नाहींत, ज्यांना घरच्या शेतीचा किंवा इतर कसल्या कारखान्याचा व्यवसाय घरबसल्या हस्तगत होण्यासारखा आहे त्या भाग्यवान पुरुषांनीं देखील या चक्रांत हातपाय अडकवून घ्यावेत याचा अत्यंत विषाद वाटतो.

राष्ट्रीय विद्यालयांतील विद्यार्थी निदान लब्धप्रतिष्ठित परावलंबी प्राणी तरी बनणार नाहीं. त्याला कोणताहि प्रामाणिकपणाचा व्यवसाय कमीपणाचा वाटणार नाहीं, त्याला दारिद्र्याची धास्ती न वाटतां श्ववृत्तीची मात्र चीड येईल, कूपमंडूक वृत्तीमुळें दारिद्र्यपंकांत खितपत न पडतां पृथ्वीच्या पाठीवर खुशाल कोठेंहि जाण्याचें धाडस करून तो आपल्या नशिबाची परीक्षा पाहील. तो श्रमसहिष्णु, शिस्तीनें वागणारा आणि शीलसंपन्न असल्यानें जेथें जाईल तेथें प्रत्येकास तो हवासाच वाटेल. त्याची कल्पकता खुरटलेली नसल्यानें आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर तो नवीन शोध लावून आपला व्यवसाय अधिक फलप्रद करील. 'तस्येयं सस्यपूर्णा वसुंधरा' ही श्रुति तो खरी करील आणि 'वसुंधरा' हें नांव तो सार्थ करून दाखवील.

पण विद्या अशी वीर्यवती होण्याला उभयता गुरुशिष्यांची तपश्चर्याहि तशीच कडकडीत पाहिजे. गुरुशिष्यांचें ध्येय एकच असावें लागतें आणि त्यांच्यांत परस्परांविषयीं अनुक्रमें प्रेम व आदरभाव तसाच निस्सीम असावा लागतो. बाजारभावानें आपल्या जा-

णाऱ्या देवघेवींत असली ध्येयनिष्ठा कशी असूं शकेल ? राष्ट्राभिमानानें प्रेरित होऊन स्वराज्यसंपादनाच्या साधनाची तळमळ लागलेला विवेकवैराग्यसंपन्न शिक्षक आणि स्वयंस्फूर्तीनें स्वतःला स्वदेशाच्या सेवेला वाहून घेणारा एकनिष्ठ शिष्य या उभयतांची जेव्हां गांठ पडते तेव्हांच ही गोष्ट शक्य कोटींत येऊं शकते. उघड्या डोळ्यानें आपल्या पोटच्या गोळ्याची मान सरकारी शिक्षणाच्या चरकांत स्वतः अडकवून दिल्यावर आपल्या बालकाची दामटी वळलेली पाहून शिक्षकवर्गाविरुद्ध आणि विश्वविद्यालयाविरुद्ध चरफडणारे पालक आणि मास्तरकी हाहि एक इतर धंद्यासारखाच धंदा आहे, देणावळ तशी धुणावळ हा न्याय या धंद्यालाहि लागू आहे, मुलगा आमच्या ताब्यांत अवघे सहा तास असतो तर पालकांच्या ताब्यांत १८ तास असतो, तस्मात् मुलाचें शील बनविण्याची तीन-चतुर्थांश जबाबदारी पालकावरच पडते, असले कोटिक्रम करणारे शिक्षक या उभयतांचे वकिली डावपेंच ऐकून विषण्ण झालेलें मन राष्ट्रीय शिक्षण-परिषदेंत निरनिराळ्या राष्ट्रीय शाळांच्या चालकांनीं निवेदन केलेला स्वानुभव ऐकून खरोखरीच उदात्त भावनेच्या जलसिंचनानें शांत होईल असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. ' पगार मिळून किती महिने झाले आठवतच नाहीं ' असें सहज विनोदानें सांगून आपलें राष्ट्रकार्य अखंड चालू ठेवणारा शिक्षकवर्ग कोणास आदरणीय वाटणार नाहीं ? देह आपदेनें पीडिला । क्षुधेतृषेनें वोसावला । तरी निश्चयो राहिला । तो सत्त्वगुण ॥ (रामदास) असे सत्त्वगुणसंपन्न शिक्षक आणि गुरुभक्त शिष्य या उभयतांनीं जेथें स्वतःचा देह मातृभूमीच्या सेवेला अर्पण केला असेल तेथें कोण कोणाचें गाऱ्हाणें कोणापुढें सांगणार ? अर्थातच पालकांना जर आपल्या बालकांच्या आयुष्याला कांहीं उच्च ध्येय लावून द्यावयाचें असेल तर त्यांनीं आपल्या दोषाचें खापर सरकारी अगर निमसरकारी शाळांवर फोडण्याचा प्रसंगच प्राप्त न होईल अशी सावधानता ठेवून आपल्या मुलांना स्वतंत्र व राष्ट्रीय बाण्याचें शिक्षण देण्याचा संकल्प केला पाहिजे. यांतच त्यांचा स्वार्थ आणि राष्ट्रार्थ दोनहि साधणार आहेत. एकीकडे मुलांना वर्गात बसविण्याला जागा नसली तरी आगगाडीच्या डब्यांत मेंढरें कोंबल्याप्रमाणें मुलांना वर्गात कोंबावयाचें आणि मग या मास्तरानें अवघ्या वर्षांत माझ्या मुलाला एकहि प्रश्न विचारला नाहीं म्हणून रडगाणें गावयाचें ! त्यापेक्षां जेथें शिक्षकांची देखरेख विद्यार्थ्यांवर अखंड राहूं शकते आणि विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेला व ध्येयाला सुसंगत व ज्याच्या योगानें मुलाच्या नैसर्गिक गुणांचा पूर्ण विकास होऊं शकेल असलें शिक्षण जेथें दिलें जातें तसल्याच विद्यालयांत आपल्या मुलाला पाठवावयाचें असा निश्चय पालकांनीं करावयास नको काय? व तो निश्चय करण्यासाठीं असल्या विद्यमान राष्ट्रीय शाळांकडे त्यांनीं आपली दृष्टि वळवावयाला नको काय?

येथवरचा विचार केवळ विद्यार्थ्यांच्या व पालकांच्या इष्टकामनासिद्धीच्या दृष्टीनें झाला. पण पालक जर याहून अधिक दूरवर विचार करणारे आणि स्वातंत्र्याचे चहाते व भक्त असतील तर राष्ट्रीय शिक्षण हें एक स्वराज्यसंपादनाचे साधन असल्यानें स्वराज्यसंपादनाच्या सिद्धीसाठींहि त्यांनीं आतां यापुढें तरी राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्थांचा परामर्ष जरूर घेतला पाहिजे. राष्ट्रानें स्वराज्यसंपादन हें आपलें ध्येय मुक्रर केलें आहे आणि राष्ट्रीय शिक्षण हें त्याचें सर्वमान्य साधन आहे. अर्थातच साध्याबरोबर साधनाचीहि उपासना करण्याची वेळ आली आहे. राष्ट्रीय शिक्षणाच्या चालकांनींहि आतां आपल्या संस्थेचें ध्येय राष्ट्राच्या ध्येयाशीं समरस असें केलें असल्यानें राष्ट्रीय शिक्षणाच्या संस्थांचा विस्तार व प्रसार करणें राष्ट्रपुरुषांचें कर्तव्य ठरत आहे. एकच एक राष्ट्रीय शाळा पृथकत्वानें पाहिल्यास ही संस्था स्वराज्यसंपादनाचें साधन कशी होऊं शकेल अशी शंका येते. परंतु असल्या संस्थांचें जाळें देशभर पसरल्यास सरकारासहि त्यांची भीति वाटूं लागेल इतकें हें साधन जाज्वल्य आहे. मात्र या साधनाची जाज्वल्यता तें वापरणाऱ्यांच्या शिस्तीवर व शौर्यावर अवलंबून आहे. तत्त्वच्युति होण्यापेक्षां मरण बरें; पण फुकट मरून कार्यहानि करून घेण्यापेक्षां आपल्या अल्पबीजाचा वटवृक्षासारखा विस्तार करून व त्याची परंपरा कायम राहील अशी योग्य तजवीज करून नंतर आपलें आत्मार्पण करणें यांत खरा पुरुषार्थ आहे. तेव्हां या परस्पर विसंवादी दिसणाऱ्या मार्गांचा समन्वय सारासार विचारानें केल्यास या राष्ट्रीय शिक्षणसंस्था स्वराज्यसंपादनाच्या कार्यांत समर्थांच्या मठाप्रमाणें राष्ट्रप्रेमाचीं स्फूर्तिदायक केंद्रस्थानें होऊं शकतील. यास्तव ज्या ज्या हिंदवासीयांना स्वराज्यसंपादनाचें ध्येय मान्य असेल त्यांनीं आपली दृष्टि राष्ट्रीय शिक्षणसंस्थांकडे वळवून त्या संस्थांस हरएक प्रकारें साहाय्य करून मातृभूमीचें ऋण अंशतः तरी फेडावें.

# अंतिम रणाची दीर्घ सूचना

दीर्घ सूचना आधीं कळे। सावधपणें तर्क प्रबळे।
जाण-जाणोनि निवळे। यथायोग्य ॥

**दासबोध**

मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें स्वातंत्र्याचा ठराव केला त्याच वेळीं त्या ठरावाच्या अर्थाविषयीं एक-दोन गैरसमज दिसून आले व त्याचें आम्ही त्याच वेळीं निराकरण केलें होतें. त्यानंतरहि निरनिराळ्या वृत्तपत्रांतून स्वातंत्र्याच्या ध्येयासंबंधीं विचार प्रदर्शित केले जात आहेत. कोणी या ध्येयाचा आजच्या व्यवहाराशीं कांहींच संबंध नाहीं असें मानतात, तर कोणी या ध्येयासाठीं व्यावहारिकपणा अजीबात सोडलाच पाहिजे असें म्हणतात. कोणी म्हणतात कीं स्वातंत्र्यासाठीं आम्हास शस्त्राची जरूरी नाहीं, तर कोणी म्हणतात कीं स्वातंत्र्यासाठीं आवश्यक ठरणारें शस्त्रग्रहण आज शक्य नसल्यामुळें या नुसत्या शाब्दिक ध्येयाचा कांहींच उपयोग नाहीं. या भिन्न भिन्न कल्पनांमध्यें थोडा सत्यांश आहे व थोडा मिथ्यांशहि आहे. त्याचा निर्णय होण्यासाठीं ऐतिहासिक दृष्ट्या स्वातंत्र्य-ध्येयवादाचें अंतिम पर्यवसान कशांत आहे याचें ता. १३ मार्चच्या अंकांतील प्रासंगिक लेखांत आम्ही दिग्दर्शन केलें होतें.

राजकारणांतल्या अंतिम अपरिहार्य रणाची दीर्घ-सूचना ही वर्तमान मार्गक्रमणास वळण लावणारी नसती तर आम्ही तिचा इतका ऊहापोह केलाच नसता. अंतिम विचार जर अप्रस्तुत व वर्तमानाशीं असंबद्ध असेल तर तो हास्यास्पदच ठरेल. उदाहरणार्थ, हिंदुस्थानास स्वातंत्र्य मिळाल्यावर त्यानें बाहेरच्या राष्ट्रांवर स्वाऱ्या कराव्या का न कराव्या असल्या प्रश्नाचा काथ्याकूट कॉंग्रेससारख्या प्रतिष्ठित संस्थांतूनहि झालेला कधीं कधीं आपण ऐकतों. या सर्व काथ्याकूटाचा वर्तमान कालाशीं कांहींच संबंध येत नसल्यामुळें तो वाचून हंसू आल्याशिवाय राहात नाहीं. परंतु आम्ही सांगत आहोंत तो अंतिम रणविचार असा असंबद्ध नाहीं येवढें दाखविण्यापुरतेंच 'कांहींसें' विवेचन जरूर वाटल्यामुळें करीत आहोंत. विचारांना दिशा किंवा अनुरोध दाखविण्यापुरतेंच तें होईल. त्याचा लक्ष्यांश प्रत्येकानें विवरून घ्यावा.

स्वातंत्र्य-युद्धाची अंतिम अपरिहार्यता जर राजकारणी पुरुषाच्या मनांत अखंड असेल तर ते निरपवाद कायिक वाचिक मानसिक अहिंसेला राष्ट्रीय तत्त्वनिष्ठेच्या पदवीला नेणार नाहींत. उलट आजच्या शांततामय चळवळींतली शांतता ही तात्कालिक आपद्धर्मासारखी आहे हें जितक्या रीतीनें लोकांच्या मनावर बिंबविणें शक्य असेल तितक्या रीतीनें ते बिंबवितील. स्वातंत्र्यप्राप्तीच्या चळवळीची अशांतता ही प्रकृति असून शांतता ही विकृति होय. अर्थात् सद्यःकालीन चळवळीला जाचक परिस्थितीमुळें प्राप्त झालेलें शांततेचें स्वरूप हें अपवादात्मकच मानलें पाहिजे. या आपद्धर्माला सद्गुण-स्वरूप देऊन गोंडस बनविणें चुकीचें आहे. विशिष्ट परिस्थितीमुळें आपल्याला चळवळ शांततेनें चालविणें प्राप्त होतें याची मनाला सतत खंती वाटावयास पाहिजे. ज्या परिस्थितीमुळें चळवळ शांततेची ठेवणें प्राप्त होतें, त्याच परिस्थितीमुळें ती शांततेची असल्याबद्दल वारंवार ग्वाही देत बसणें हेंहि अवश्य असतें हें खरें. पण अशी ग्वाही देतांना शांततेची मर्यादा हें एक आपसुखी नीतिबंधन असें उगाच का भासवावें? तें एक जखडणारें जड-जोखडच होय हें सत्य तरी लपवून ठेवण्यांत अर्थ कोणता? एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर त्याच्या इच्छेविरुद्ध अंमल चालविणें या घटनेंतच अशांततेचीं बीजें खच्चून भरलेलीं आहेत. त्या घटनेविरुद्ध शांततेची चळवळ करणें हाच एक प्रकारें विरोधाभासच मानावा लागेल. कायमचें घर बांधावयाचें तर मनुष्य पाया खोल खणतो. पण तात्पुरता तंबू ठोकावयाचा तर त्याच्या खुंट्या बेतानेंच ठोकाव्या लागतात. कारण त्या केव्हां तरी लवकरच उपटून काढावयाच्या असतात. सध्याच्या चळवळींतील शांततेचा उपदेश हा अशाच तात्कालिक स्वरूपाचा असला पाहिजे. "आज आमचें धोरण अनत्याचाराचें आहे पण उद्याचें काय सांगावें?" या डॉ. अन्सारी यांच्या उद्गारांत स्वातंत्र्यवाद्यांची अनत्याचारविषयक वृत्ति थोडक्यांत व्यक्त होते.

युद्ध हें जवळच्या अगर दूरच्या भविष्य कालांत विहित व अटळ मानलें म्हणजे झालेल्या अगर होणाऱ्या युद्धकथा या केवळ एका कानानें ऐकून दुसऱ्या कानानें सोडून देण्यासारख्या न मानतां त्या तपशीलवार अभ्यसनीय अशाच मानाव्या लागतील हें उघड होय. युद्धविद्या ही आतां एकजिनसी

राहिली नसून अनेकांगी व अफाट झाली आहे. केवळ शारीरिक बल व कौशल्य यावर ती अवलंबून राहिलेली नाहीं. यंत्र, शस्त्र, रसायन इ. भौतिक शास्त्रातील अनेक शोधांनीं ती सज्ज झालेली आहे. युद्धरचनेंत व पद्धतींत झालेल्या या सर्व स्थित्यंतराकडे स्वातंत्र्यवाद्यांची दृष्टि प्रासंगिक मनोविनोदनापुरतीच केवळ असतां उपयोगी नाहीं. भावी पिढीला आत्मसात् करण्यासारखा एक जीवनावश्यक विषय याच नात्यानें खऱ्या स्वातंत्र्यवाद्यांनी या अनेकांगी युद्धविद्येकडे पाहिलें पाहिजे. स्वातंत्र्यवादी व आतियोगी तरुण हा केवळ शरीरबलसंपन्न होऊन कसें भागेल ? तो धनुर्धर, शस्त्रास्त्रज्ञ व व्यूहज्ञहि व्हावयास नको काय ?

तरुण पिढी शरीरबलसंपन्न व्हावी यासाठीं शारीरिक बलांत प्रवीण ठरणाऱ्यांस पारितोषिकें देऊन उत्तेजन देण्याचा उपक्रम चालू आहे. पण घट्ट शरीराबरोबर मनहि घट्ट पाहिजे. प्रत्यक्ष युद्धांतच काय तें शूरत्व लागतें असें नाहीं. तर शांततेच्या काळांतहि आपत्प्रसंगीं जीविताचें अगर वित्ताचें संरक्षण करण्यासाठीं प्राणहि धोक्यांत घालण्याची वेळ येते. शरीरबलाबरोबर अशा प्रकारच्या धाडसाला ज्या ज्या रीतीनें उत्तेजन मिळेल त्या त्या रीतीनें तें दिलें पाहिजे. अशा प्रसंगीं आंगचोरपणें केलेल्या जीवितरक्षणापेक्षां जीव धोक्यांत घालून प्रसंगीं मरणहि पत्करणें हे शतपटीनें अधिक श्रेयस्कर असतें, ही गोष्ट आंगवळणीं पडावयास हवी. थोडीशी कोठें धकाधकी झाल्याचें वृत्त वाचतांच अंगांत हुडहुडी अगर शिरशिरी भरण्यास रखीच सध्याच्या समाजाची वृत्ति आहे. ती पारतंत्र्य-जन्य मरतमढ्या स्मशानशांततेचाच स्वाभाविक परिणाम आहे. ती झाडून राष्ट्र उठेल तरच तें स्वातंत्र्यप्राप्तीला खरें सज्ज झालें असें म्हणतां येईल.

आपत्प्रसंगीं जीवनरक्षणाखेरीज दुसऱ्याहि एका बाबतींत शांततेच्या काळांतहि वीरवृत्तीची चुणक दाखावण्याचे प्रसंग येतात. पाश्चिमात्य स्वतंत्र राष्ट्रें पाहिलीं तर त्यांच्यांत विमानविद्या, वाहनांतील वेगांची चढाओढ, पृथ्वी प्रदक्षिणा, समुद्रयान, गिर्यारोहण इ.कामात जीवहि धोक्यात घालुन अचाट साहसाचीं कृत्यें करण्यास शेंकडो तरुण पुढें येतात. उत्तरदक्षिण ध्रुवाचे शोध लावण्यात एकामागून एक युरोपियन प्रवासी बळी पडत असले तरी ही प्रवृत्ति थांबत नाहीं. विमानावेद्येतील धाडसी प्रयत्नातहि पुष्कळांना अपघात होऊन मृत्यु येतात. पण अपघाताना व मृत्यूलाहि न जुमानतां हा अशीं साहसें करण्यास अहमहमिकेनें धाडसी पुरुष पुढें येतात व राष्ट्राकडून त्याचा उत्साहानें गौरव करण्यात येतो. रणभूमीवरील शौर्याचा जितका सन्मान होतो तितकाच या शांततेच्या काळांतील धाडसाचाहि होत असतो. कारण तरुणांची ही धाडसी वृत्तीच युद्धाचे वेळींहि उपयोगी पडते. राज्यें शक्तीनेंच मिळतात व शक्तीनेंच चालवितां येतात. आणि आधुनिक काळांत शक्ति देवतेची पूजा यंत्र, शस्त्र व शास्त्र यांच्या उपकरणांनीं होत असते आणि साहसी भक्तच या देवीला प्रिय असतो. स्वातंत्र्याची आकांक्षा या शक्तिदेवीच्या उपासनेनें पूर्ण होईल. या उपासनेवांचून स्वातंत्र्यवाद सांगणें व्यर्थ होय. "शक्तीनें मिळती राज्यें। युक्तीनें यत्न होतसे। शक्ति युक्ति जये ठायीं। तेथें श्रीमंत नांदती ॥ (रामदास).

'न शक्यं मृदुना वोढुमायासस्थानमुत्तमम्' असें राज्यासंबंधीं महाभारतांत म्हटलें आहे. राज्य हें आयासस्थान असल्यानें तें 'मृदु' उपायांनीं चालविणेंहि अशक्य असतें. मग मिळविणें तर त्याहून अशक्य. स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या राष्ट्राचा काल हा तीक्ष्ण काल असतो. 'तीक्ष्णकाले भवेत् तीक्ष्णो' या नियमाप्रमाणें तीक्ष्ण नीति हीच त्या कालांत विहित असून मृदु नीति ही अप्रस्तुत होय. क्षमा, शांति, अहिंसा इत्यादि सद्गुण-संवर्धनाचा हा कालच नव्हे. या वेळीं त्याचा उपदेश म्हणजे दुष्काळांत केलेला लंघनाचा किंवा निराहाराचा उपदेश होय! हा उपदेश आज अदेशकाले व अपात्रे असा असल्यामुळें हीनच ठरेल. आज 'नास्थाने प्रक्रिया क्षमा' हें सांगण्याचीच जरुरी अधिक. "बले दंडः समाहितः" याच तीक्ष्ण नीतीचा उपदेश स्वातंत्र्यप्रयत्नास प्रवृत्त झालेल्या राष्ट्राला करावयास हवा.

असो. तुमची स्वराज्याची योजना कोठें आहे असें सरकार वेळोवेळीं विचारीत असल्यानें आपण ती घडविण्याचा प्रयत्न करतों. पण त्याबरोबरच दुसराहि एक अडचणीचा सवाल सरकार नेहमीं टाकीत असतें. तो म्हणजे "आम्ही येथून ससैन्य निघून गेल्यावर तुम्ही आपलें रक्षण कसें कराल ?" हा होय. 'तुम्ही गेल्यावर अंदाधुंदी व अराजकता माजेल. पण आजच्या कुराज्यापेक्षां असली अराजक अंदाधुंदी शतपटीनें अधिक चांगली' असें याला एक उत्तर देतां येतें, व असेंबलींत लाला लजपतराय यांनीं आणि 'यंग इंडिया'तून म. गांधींनीं तें दिलेंहि आहे. पण येवढें उत्तर देऊन या प्रश्नाची वासलात लावून भागावयाचें नाहीं. सरकार स्वखुषीनें ससैन्य येथून निघून जाणें असंभवनीय. पण स्वखुषीनें अगर नाखुषीनें कसेंहि तें येथून जाणें हें जर आपलें साध्य आपण मानतो तर अराजकता पत्करण्याच्या व सोसण्याच्या मानसिक तयारीपेक्षा तिची व्यवस्था लावण्याची बौद्धिक योजकता अधिक चांगली नव्हे काय ?

सरकारपुढें मांडण्याच्या स्वराज्य-योजनेपेक्षां ही स्वसंरक्षणाची योजनाच स्वातंत्र्यवाद्यांना अधिक अवश्य व विचारणीय होय. यांतच परराष्ट्रांचा, विशेषतः हिंदुस्थानाच्याभोंवतीं असलेल्या राष्ट्रांचा विचार येतो. 'ब्रिटिश सैन्य गेलें तर परराष्ट्रें तुमच्यावर हल्ला करतील' असें सरकार सांगतें. पण परराष्ट्रीय सैन्य हल्ल्याकरितांच येतें असें नाहीं. तें साहाय्यार्थहि येऊं शकेल ! याचा विचार सरकारला न सुचला तरी स्वातंत्र्यवादी लोकांच्या दीर्घ सूचनेंत व बौद्धिक योजकतेंत तो अखंड वावरावयास हवा.

आतां कोणी असें म्हणेल कीं ब्रि. सरकार हें धूर्त असल्यानें तें रणाचा अंतिम प्रसंग येऊं देणार नाहीं. कांहीं तरी तडजोडीनें तो टाळण्याचा प्रयत्न करील. हें अगदींच असंभवनीय आहे असें नाहीं.तथापि ब्रिटिशांना लागलेला साम्राज्यलालसेचा रोग जबरदस्त असून तो हिंदी धन्वंतऱ्यांच्या हातूनच नाहींसा व्हावयास पाहिजे. सुदैवानें शस्त्रक्रियेशिवाय रोग हटला तर शस्त्रक्रियेची वैद्यालाहि कांहीं हौस नाहीं! पण ब्रि. सरकारला शहाणपणा सुचावयाला तरी शक्तींची सिद्धताच हवी. ही सिद्धता स्वातंत्र्य मिळविण्याच्या कामीं उपयोगांत आणण्याची जरी जरूर पडली नाहीं तरीहि तिचा संग्रह कांहीं फुकट जात नाहीं. तीच शक्ति पुढें स्वातंत्र्यरक्षणाच्या कामीं राष्ट्राला उपयोगी पडेल. शक्ति ही केव्हांहि फुकट जात नसून तिचा संग्रह सर्व कालीं राष्ट्रास उपकारकच होतो.

स्वातंत्र्यध्येयवादाबरोबर जी अंतिम रणाची कल्पना येते ती आज प्रचलित कार्याच्या धोरणाशीं संबद्ध कशी होऊं शकते येवढें दाखविण्यापुरतेंच हें जुजबी विवेचन आहे. स्वातंत्र्याचा विहंगम मार्ग परतंत्रतेच्या शब्द-मर्यादेंत जितका दिग्दर्शित करतां येतो तितकाच केला आहे. स्वातंत्र्यध्येयवाद नुसता कल्पनारम्य वाटतो म्हणून आवडीखातर राष्ट्रानें तो स्वीकारणें हें घातक होय. त्यापेक्षां जुना रुळलेला "कणशः क्षणशः" आक्रमण करणारा पिपीलिका मार्गच बरा. 'फुकाचे मुखीं बोलता काय वेचें ' अशा प्रवाहपतित थिल्लर वृत्तीनें स्वातंत्र्यवाद बोलण्यानें राष्ट्राचा फायदा न होतां नुकसानच होईल. यासाठींच आम्ही हें दिग्दर्शन केलें आहे. हा ध्येयवाद म्हणजे 'चाउटीच्या गोष्टी ' नव्हत. त्याचा आगापिछा नीट ओळखून व आपली शक्ति अजमावून-पडताळून जाणतेपणानें तो राष्ट्रानें स्वीकारला तरच तो खरा स्वीकारला. नाहीं तर बोराच्या बीशीं अहमहमिकेनें उड्डाणस्पर्धा करणाऱ्या रामसेनेप्रमाणें ध्येयवादाच्या एकापेक्षां एक अशा शाब्दिक उड्या हास्यास्पदच ठरतील. कल्पनारम्य ध्येयवादाच्या शाब्दिक भरीस पडून "घासामागें घास घातला। अवकाश नाहीं चावायाला। आवघा बोकणा भरला। पुढें कैसें?" अशीच राष्ट्राची अनुकंपनीय अवस्था होईल. व्यक्तीप्रमाणेंच राष्ट्रहि 'समजलें आणि वर्तलें' तरच भाग्यवान, नाहीं तर करंटें !

# गोव्यांतून हिंदुधर्माचें उच्चाटन !

## १५४० ते १७४०

(ले.—**रामकृष्ण गोपाळ भिडे**)

युरोपांत पोर्तुगीज लोक अव्वल दर्जाचे दर्यावर्दी म्हणून एका काळीं नाणावले गेले होते, व त्यांच्या दर्यावर्दीपणाला धाडसाचीहि जोड मिळाल्यानें त्यांनीं सर्व जगभर स्वैरसंचार केला. त्या काळीं अज्ञात असलेलें अमेरिका खंड शोधून काढण्याचा मान ज्याप्रमाणें पोर्तुगीज राष्ट्राचा, त्याप्रमाणें हिंदुस्थानासारख्या दूरदेशीं येऊन तेथें आपली आक्रमणशीलता दाखविण्याचा उपक्रम युरोपांतील राष्ट्रांपैकीं प्रथमतः कोणी केला असेल तर तोहि पोर्तुगीजांनींच. व या पोर्तुगीजांनींच इंग्रजांस मुंबई बेट आंदण देऊन इंग्रजांस हक्काची अशी बसावयास जागा दिली ही गोष्टहि इतिहासज्ञांस परिचित आहे. पोर्तुगीजांनीं मोठ्या धाडसानें सर्व जगभर सफरी केल्या, आपलें साम्राज्य प्रस्थापित करण्याचाहि प्रयत्न केला व तो तात्पुरता थोडासा साधला असला तरी साम्राज्यसंस्थापनेच्या पोटीं त्यांचें जें एक विशिष्ट ध्येय होतें तें सदैव यशस्वी होणारें नसल्यानें युरोपाबाहेर साम्राज्यप्रस्थापकाचा अग्रमान त्यांचा असला तरी कालांतरानें साम्राज्याच्या केवळ नाममात्र अवशेषाखेरीज विद्यमान काळीं त्यांजजवळ फारसें शिल्लक राहिलें नाहीं. युरोपांत पोर्तुगीज राजवंश अत्यंत धर्मवेडा असल्यानें व जेथें जेथें आपली सत्ता स्थापित होईल त्या त्या ठिकाणीं राजाचा जो धर्म तोच प्रजेचा झाला पाहिजे आणि आपल्या राज्यछत्राखालीं परधर्मीयांनीं नांदणें म्हणजे आपल्या धर्म-

निष्ठेस तो मोठाच कलंक होय अशी पोर्तुगालमधील सत्ताधाऱ्यांची धर्मभावना त्या वेळीं असल्यानें त्यांच्या हातून खुद्द पोर्तुगालमध्यें जसे धर्मसुधारकांवर अनन्वित जुलूम झाले त्याचप्रमाणें त्यांच्या अमलाखालीं असलेल्या परधर्मी प्रजेवरहि झाले.

## पोर्तुगीजांचें सत्य स्वरूप

स. १५१० सालीं अल्बुकर्क यानें गोवा प्रान्त हस्तगत करण्यापूर्वी तेथे विजापूर पातशाहीचा अंमल होता. त्या अमलांतून आपली सुटका करून घेण्यासाठीं त्या वेळीं तेथील हिंदूंनीं तिमय्या नाईक नांवाच्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं अल्बुकर्क याच्याशीं संगनमत करून मुसलमानी अंमल झुगारून दिला. हिंदूंनीं एक सत्ता झुगारुन दिली पण तापेक्षां सवाई जुलमाखालीं मात्र ते सांपडले ! अल्बुकर्कला ज्या वेळीं तिमय्या नायकानें साहाय्य करण्याचें ठरविलें त्या वेळीं अल्बुकर्क व तेथील हिंदु यांच्यामध्यें असा स्पष्ट करार झाला होता कीं, पोर्तुगीजांनीं हिंदूंच्या धर्मांत, चालीरीतींत व न्यायनिवाड्याच्या पद्धतींत कांहीं ढवळाढवळ करूं नये व हिंदूंच्या पंचायती मुसलमानी पातशाहीस जी खंडणी देत तेवढीच खंडणी पोर्तुगीजांस द्यावी. या कराराप्रमाणें पोर्तुगीजांनीं जाहिरनामाहि प्रसिद्ध केला. त्यानंतर १५१५, १५२३, १५२६ सालीं हाच जाहिरनामा कायम असल्याबद्दल अभिवचनेंहि देण्यांत आलीं. परंतु इष्टफलप्राप्तीपर्यंत दिलेल्या अभिवचनांची वासलात पुढें कशी केली जाते हा अनुभव आपणा हिंदुस्थानवासीयांस कांहीं नवा नाहीं. पाश्चात्यांच्या इतर अभिवचनाप्रमाणेंच हीं अभिवचनें, जाहिरनामे व करारनामे कागदाच्या चिटोऱ्याच्या किंमतीचे समजले जाऊन पोर्तुगीजांनीं आपलें सत्य स्वरूप बाहेर दाखविण्यास प्रारंभ केला. अपेक्षेप्रमाणें सर्व प्रांत, आंतील गढ्या, किल्ले, कोट व माऱ्याच्या जागा या सुद्धां पूर्णपणे हातीं आल्यावर त्यांनीं आतांपर्यंत पांघरलेला सौम्यपणाचा बुरखा फेकून दिला व धर्मप्रसाराचें आपलें खरें स्वरूप बाहेर काढलें.

स. १५४० च्या सुमारास त्यांनीं पहिला प्रहार केला. त्या वेळीं पोर्तुगीजांनीं असें प्रसिद्ध केलें कीं, "आतांपर्यंत आम्ही तुम्हास अनेक अभिवचनें दिलीं. परंतु आमचा असा समज होता कीं या अवधींत तुम्ही आपला खोटा धर्म टाकून आमच्या सत्यधर्माच्या छायेखालीं याल. त्याप्रमाणें तुम्ही आलां नाहीं. आमच्या धर्माप्रमाणें मूर्तिपूजा नास्तिकतेचें लक्षण असल्यानें यापुढें आमच्या राज्यांत एकहि हिंदु मंदिर दिसतां कामा नये." धर्मवेडे पोर्तुगीज एवढें प्रसिद्ध करूनच न थांबतां त्यांनीं तिसवाडी महालांतील—म्हणजे हल्लीं जेथें पणजी शहर आहे त्या सभोंवतालच्या सुमारें तीस गांवांतील एकूण एक हिंदु मंदिरें पाडून मातींत मिळविलीं. परंतु नुसतीं हिंदु मंदिरें पाडून त्यांचें समाधान थोडेंच होणार होतें? स. १५४१ मध्यें पोलीस अधिकाऱ्यांनीं तिसवाडी टापूंतील सर्व प्रतिष्ठित हिंदु पकडून आणले. गोव्यांत हिंदूंचीं देवालयें फार मोठीं असून त्यांस उत्पन्नहि फार मोठें असे व या सर्व उत्पन्नाची व्यवस्था पंचायतीमार्फत होत असे. वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें हिंदु पुढारी पकडून आणल्यानंतर त्यांस असें सांगण्यांत आलें कीं, 'तुमचीं मंदिरें आतां नाहींशीं झालींच आहेत. तेव्हां त्यांचें उत्पन्न आतां तुमच्याकडे ठेवण्यांत काय तात्पर्य ? त्यांचें उत्पन्न तुम्ही न घेतां यापुढें तें ख्रिस्ती मंदिरांस लिहून द्या.' अशी मागणी झाल्यावर, तींतून सुटण्यास अन्य उपाय नसल्यानें हिंदु पुढाऱ्यांस असल्या नामुष्कीच्या मागणीपुढे लवावें लागलें. त्यांना वाटलें कीं, एवढ्यावर तरी निभेल. परंतु पुढें त्यांजवर जे अत्याचार झाले त्याचें हें केवळ प्रास्ताविक स्वरूप होतें.

## कायदेशीर जुलूम

स. १५३४ मध्ये गोव्यामध्येंच (हल्लींचें जुनें गोवें) ख्रिस्ती मठाची स्थापना करण्यात आली होती व त्याच्याकरवीं सर्वत्र धर्मप्रसाराच्या कार्यास सुरुवातहि झाली होती. वर सांगितल्याप्रमाणें हिंदूंच्याकडून सक्तीनें घेतलेलें उत्पन्न या कार्यासाठीं मठाकडे देण्यांत आलें. परंतु हा धर्मप्रसाराचा गाडा येथेंच न थांबतां आतां तो भरधांव धावूं लागला १५४६ सालीं पोर्तुगीजांनीं असा कायदाच केला कीं, हिंदूंचीं जरी सार्वजनिक मंदिरें नष्ट करण्यांत आलीं असलीं तरी ते आपल्या घरांत मूर्ती ठेवून पूजा करतातच. तेव्हां यापुढें खासगी घरांतून मूर्ती ठेवणें, कथापुराणें करणें, उत्सव करणें इत्यादि प्रकार कोणी केल्यास त्यांची मिळकत जप्त करण्यांत येईल. याहि जुलमापुढें हिंदूंनीं मान वांकविली व मूर्ती नाहींशा करून कागदावर किंवा पानावर मूर्ती रेखाटून धर्मपालनास सुरुवात केली ! गोमांतकांतील हिंदूंच्या गुलामगिरीचा व धर्मच्छलाचा सर्वच इतिहास अत्यंत करुणास्पद आहे. होईल त्या जुलमापुढें गोमांतकांतील हिंदूंइतकी मान वांकविल्याचें हिंदुस्थानाच्या इतिहासांत अन्य उदाहरण नाहीं. हिंदूंवर एक नवा जुलूम करावा व तो त्यांनीं निमूटपणें सहन करावा तोंच पहिल्यावरहि ताण करणाऱ्या नव्या जुलमाची तलवार डोकीवर लोंबत असलेली दिसावी, हा प्रकार सतत २०० वर्षें चालला होता. त्या वेळीं पोर्तुगीजांच्या स्वाधीन हल्लींइतका प्रांत नव्हता. त्यांच्या ताब्यांत तिसवाडी, सासष्टी व बारदेश इत-

केच महाल म्हणजे सुमारें शंभर गांवांचा मुलूख होता व पोर्तुगीजांनी सर्व धार्मिक जुलूम केले ते याच भागांत.

वरील जुलूम सुरू असतांच धाकदपटशा, मोह, आमिषें याद्वारां बाटविण्याचा कारखाना सुरूच होता. सन १५५७ मध्यें असा एक जाहिरनामा काढण्यांत आला कीं, 'ज्या हिंदु विधवा किंवा मुली बाटविण्यांत येतील त्यांना नवऱ्याच्या अगर बापाच्या मिळकतींतील हिस्सा मिळावा.' हा जाहिरनामा काढून फार दिवस झाले नाहींत तोंच आणखी असा जाहिरनामा काढण्यांत आला कीं, एकंदर ब्राह्मणांनीं एक महिन्याचे आंत आपलें घरदार जमीनजुमला विकून हद्दपार झाले पाहिजे. याप्रमाणें कोणी न केल्यास त्यास जन्मठेप शिक्षा होऊन त्याची सर्व इस्टेट जप्त करण्यांत येईल. १५६३ सालीं पुनः नवा जाहिरनामा काढून वैद्य सुतार व कुणबी यांखेरीज सर्व हिंदूंना हद्दपार करण्यांत आलें.

## पाद्र्यांची कारवाई

या सर्व धर्मप्रसाराच्या कामीं खुद्द पोर्तुगीज सरकारचें कसें साहाय्य होतें व त्यांनीं गोमांतकांत साधू साधू म्हणून गाजलेल्या फ्रान्सिस झेवियरला धर्मप्रसारार्थ कसें पाठविलें व त्यानें तेथें काय काय अत्याचार केले हें मागील एका लेखांत वर्णिलेंच आहे. एखादा हिंदु गृहस्थ पुरुष संतति नसतां वारला तर व त्याची बायको अगर मुलगी ख्रिस्ती होणार नसेल तर त्याची सर्व मिळकत त्याच्या एखाद्या बाटग्या नातलगाला द्यावी, एखादा पोरका हिंदु मुलगा ख्रिस्ती होत नसल्यास त्याची मिळकत ख्रिस्ती मनुष्यास द्यावी असा कायदाच करण्यांत आला! हिंदूंवर अशी सक्ती चालली असतां ख्रिस्ती लोकांस नाना प्रकारच्या सवलती देण्यांत येत असत. नव्या ख्रिस्त्यांस जमिनीवरील साऱ्याची माफी देण्यांत आली. सक्तीच्या खुषीनें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याचें काम सुरू होतेंच. ता. १० आगस्ट १५६० या दिवशीं गोव्याजवळील दीपवती (देवाडी) बेटावर १५१० इसमांना ख्रिस्ती करण्यात आलें. पुढें तर या अत्याचारास ऊतच आला. स. १५५७ मध्यें असें आज्ञापत्र निघालें कीं, ज्या ज्या ठिकाणीं अधार्मिक लोक असतील तेथें जाऊन ख्रिस्ती धर्मप्रवचनें करावीं व त्या प्रवचनांना प्रत्येक हिंदूनें हजर राहिलेंच पाहिजे. असें जो हिंदु करणार नाहीं त्याला भयंकर शिक्षा देण्यांत येऊन जहाजावर खलाशाचें काम करण्यास पाठविण्यांत येईल. १५६७ सालीं आणखी एक कायदा करण्यांत आला व त्याच्या आधारें कोणाहि हिंदूनें आपल्या धर्मशास्त्राचा ग्रंथ आपल्याजवळ बाळगूं नये असा मनाईहुकूम काढण्यांत आला! परंतु पाद्री लोकांना धर्मप्रसाराचे मार्ग हे अगदींच रुक्ष वाटूं लागले. दियोग रुद्रीगीश नांवाच्या पाद्र्यानें तर लोटली येथील प्रसिद्ध रामनाथाचें मंदिरच पेटवून दिलें. सरकारनें त्याच्या या कृत्यास पाठिंबा दिला एवढेंच नव्हे तर सासष्टी महालांतील एकूण एक हिंदु मंदिरें धुळीस मिळवावीं असें फर्मानच काढलें व याचा परिणाम असा झाला कीं, अत्यंत अल्प काळांत २८० देवालयें मातींत मिसळलीं गेलीं. दियोग रुद्रीगीश यानें हें जें महत्कार्य केलें त्याचें चिरस्मरण राहावें एतदर्थ तो ख्रिस्तवासी झाल्यावर रायतूर येथील त्याच्या थडग्यावर पुढील शब्द कोरून ठेवलेले आहेत:—

"या भूमींतील हिंदु देवालयांचा विध्वंस करणारे कापितांव रुद्रीगीश हे ता. २१ एप्रिल १५५७ पासून येथें चिरशांति घेत आहेत."

फ्रान्सिस झेविअर (पोर्तुगीज सां फ्रान्सिस्क शाविग्रार) यानें घालून दिलेली धर्मप्रसाराची परंपरा अखंड सुरूच राहिली. लग्नमुंजीसारखे विधी आमच्या राज्यात होतां कामा नये असा एक नवा हुकूम निघाला. कोणाहि हिंदूनें घोड्यावरून, पालखींतून अगर छत्री घेऊन हिंडतां कामा नये असेंहि एक फर्मान निघालें. या सर्वांचा परिणाम असा भयंकर झाला कीं, ज्या सासष्टी प्रांतांत एकहि विधर्मी मनुष्य नव्हता व जेथें ख्रिस्ती मठ एकहि नव्हता त्या ठिकाणीं अवघ्या ५० वर्षांत ३० वर मोठमोठीं ख्रिस्ती मंदिरें उभारलीं जाऊन बहुतेकांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला. कित्येकांनीं शरीरकष्टाच्या भयानें, तर कित्येकांनीं शेतजमिनींचे पाश तोडवेनात म्हणून व कांहींनीं वैभवलालसेनें ख्रिस्ती धर्म स्वीकारला. परंतु केवळ धर्मश्रद्धेनें एकहि हिंदु ख्रिस्ती झाला नाहीं. याप्रमाणें ख्रिस्तीकरणाचें कार्य धडाक्यानें सुरू असतां तेवढ्यानेंहि पाद्र्यांची तृप्ति होईना! त्यांनीं सरकाराकडून देशी भाषाबंदीचा एक कायदाच पास करून घेतला. आपला धर्मप्रचार करण्यास देशी भाषा आड येते असा त्यांना अनुभव येत असल्यानें यापुढें प्रत्येकानें पोर्तुगीज भाषेतच सर्व व्यवहार केला पाहिजे असा कायदाच करण्यांत आला. परंतु तो अपुरा वाटला म्हणूनच की काय कोण जाणे १७४५ त असा कायदा करण्यांत आला कीं, ज्यांना पोर्तुगीज भाषा येत नसेल त्यांना विवाहच करतां येणार नाहीं! ख्रिस्ती हजामांनीं हिंदूंची हजामत करतां कामा नये असेंहि एक फर्मान निघालें!

## धर्मवेडाचा विपरीत परिणाम

परंतु या सर्व प्रकाराचा परिणाम असा झाला कीं हिंदूंनीं देशत्याग केला. शेतीला मजूर मिळे-

नासे झाले. हिंदु मंदिरांचा विध्वंस झाल्याकारणानें सर्वत्र स्मशानशांतता वावरूं लागली. व्यापारास ओहोटी लागली व यामुळें सरकारी तिजोरी रिती पडूं लागली. उलटपक्षीं, ख्रिस्ती मंदिरें भरारलीं. हिंदु देवस्थानांच्या जमिनी या मंदिराकडे सरकारनें घेण्यात आल्यानें ख्रिस्ती मंदिरें व त्यांचे पुजारी फार बलिष्ठ झाले. खेरीज हातीं पैसा खेळूं लागल्यानें व्यापारहि त्यांनाच आवरला व यामुळें खुद्द सरकारी तिजोरापेक्षां यांच्या तिजोऱ्यांना द्रव्याचा पूर येऊं लागला. ही स्थिति बरी नव्हे, यास कांहीं आळा घातला पाहिजे अशाबद्दल गोव्याच्या गव्हर्नरानें राजाकडे पुष्कळ तक्रारी केल्या.परंतु राज्यविस्तारा-पेक्षांहि धर्मप्रचाराकडे त्याचें लक्ष विशेष असल्यानें त्यानें पाद्र्यांच्या दुष्कृत्यांना आळा न घालतां त्यांना एक प्रकारें प्रोत्साहनच दिलें. हा प्रकार सतत २०० वर्षें चालला होता.

वर सांगितलेंच आहे कीं, पोर्तुगीजांनीं जेथें प्रथम धर्मप्रसार केला व जेथें आपली सत्ता स्थापित केली तो मुलूख फारच थोडा होता; हा मुलूख म्हणजे (१) तिसवाडी महाल. यांत पणजी, जुनें गोवें इत्यादि भाग येतो यात हल्लींच्या विभागणीत ३० गांवें व ९ बेटें आहेत. (२) सासष्टी महाल गांवें ६६ व ४ बेटें (३) बारदेश गावें ४८ व २ बेटें व (४) मुरगांव तेरा गांवें या भागास जुन्या काबीजादी असें म्हणतात. कारण पोर्तुगीजांनीं हा भाग प्रथम हस्तगत केला. अर्थात् त्यांच्या धार्मिक अत्याचारांचा सर्व मारा या भागांतील अवघ्या १७० गांवांवर पडल्यानें तेथें पोर्तुगीजांनीं कसकसे अनन्वित प्रकार केले असतील याची कल्पना वर दिलेल्या हकीकतीवरून थोडीशी होईल.

पोर्तुगीज गोमांतकांतील एकंदर ११ महालां-पैकीं वर निर्दिष्ट केलेले ४ महाल त्यांनीं प्रथम जिंकून घेतले व त्यानंतर नव्या काबीजादींतील सात महाल कांहीं सांवतवाडीकर भोंसल्याकडून व बरेचसे सवंदेकर नांवाच्या लिंगायत राजाकडून १७६० नंतर घेतले. या नव्या काबीजादींत धार्मिक जुलूम फारसे झाले नाहींत. याचा अर्थ पोर्तुगी-जांनीं धर्मप्रसार अगदींच केला नाहीं असें नसून धर्मवेडाचें खूळ खुद्द युरोपांतच कमी झालें होतें हें एक कारण, व या नव्या काबीजादींतील रयत अशा धार्मिक जुलमांना सहजासहजीं नमणारी नव्हती हेंहि दुसरें एक कारण होतें. अर्थात् जुन्या काबीजादींमध्ये ख्रिस्ती लोकसंख्या जास्त असून नव्या काबीजादींत हिंदू मताधिक्यांत आहेत. हल्लीं गोवें प्रांतांत शुद्धीकरणाची चळवळ सुरू आहे ती जुन्या काबीजादींपैकीं तिसवाडी महालांत आहे. अल्बुकर्कनें हाच टापू प्रथम हस्तगत केला व ख्रिस्ती धर्मांचें सर्व वैभव प्रामुख्येंकरून याच भागांत आहे.

# पावसाचें भविष्य

## ( ले.—ज. स. करंदीकर. )

### गतवर्षींच्या भविष्याचा पडताळा.

इ. स. १९२७ सालाच्या पावसाचें भविष्य गत-वर्षीं मेअखेरीस प्रसिद्ध करण्यांत आलें. त्या भवि-ष्यापैकीं किती भाग बरोबर उतरला तें प्रथम पाहून नंतर चालू सालाच्या पावसाळ्याचा विचार करूं.

गतसालाच्या पावसाच्या भविष्यांत ता. २० जुलैची बुधाची छोटी युति आणि सप्टेंबरच्या आरंभींची बुधाची व त्यानंतरची शुक्राची युति याच्यायोगानें सर्वत्र पाऊस झाल्याचा अनुभव आला. ता. १० नोव्हेंबरला जी शेवटची रविबुध-युति झाली तिचाहि अनुभव ता. ११ ते १४ च्या वादळानें चांगलाच आला. ता. ३ डिसेंबरची रवि-शनियुति पावसाळ्याच्या अखेरीस आल्यामुळें तिचा उपयोग महाराष्ट्रांत झाला नाहीं; तरी पण त्या युतीचा पाऊस म्हैसूर व मद्रास या प्रांतांत ठिकठिकाणीं पडला. महाराष्ट्रांत मृगपंचकाच्या पावसापेक्षां मघापंचकाचा पाऊस अधिक पडला आणि खरीपाचीं व रब्बीचीं अशीं दोनहि पिकें सा-धलीं. पावसाच्या तारीखवार अनुमानांत जून व जुलै या दोन महिन्यांत ज्या ज्या तारखांना पाऊस पडेल असें म्हटलें होतें त्या त्या तारखांना पाऊस पडून त्याखेरीज ता. ५, १४ व २८ जून आणि ता. ३ व २२ जुलै या तारखांनाहि पाऊस पडला. आगस्ट महिन्यांत ता. १ ते ४ पर्यंत पाऊस पडला पण तो अंदाजापेक्षां कमी पडला. आणि ता. १५ ला सुरू व्हावयाचा पाऊस ता. १२ पासूनच सुरू झाला. याशिवाय ता. २०, २३ व ३१ या तारखांना पाऊस अंदाजाहून अधिक पडला. सप्टेंबर महि-न्यांत ज्या ज्या तारखांस पावसाचें भविष्य केलें होतें त्या त्या सर्व तारखांना पाऊस पडून त्याखेरीज ता. १४, १५ व २६ असे आणखी तीन दिवस

पाऊस पडला. आक्टोबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत मात्र महाराष्ट्रांत कोठेंच पाऊस पडला नाहीं. त्याचप्रमाणें नोव्हेंबर महिन्यांतल्या शेवटच्या पंधरवड्यांतला पाऊसहि मुळींच पडला नाहीं. जुलैच्या शेवटच्या आठवड्यांतल्या वादळानं ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यांतला आणि नोव्हेंबरच्या ११ते१४ पर्यंतच्या वादळानें नोव्हेंबरच्या शेवटच्या आठवड्यांतला पाऊस नाहीसा केला असें दिसतें. पावसाच्या तारीखवार अनुमानांत कित्येक वेळां दोन-तीन दिवसांचा फरक पडल्यासारखा दिसतो. पण तो फरक वाऱ्याच्या वेगाचा अंदाज ठरविणें शक्य नसल्यामुळें पडतो. वाऱ्याचा वेग अंदाजाहून अधिक जोराचा असल्यास अंदाजापेक्षां एक-दोन दिवस आधींच पाऊस पडेल; उलटपक्षीं वारा कमजोर असल्यास पावसाला एक-दोन दिवस उशीर लागेल; किंवा कदाचित् तो पाऊस शेवटपर्यंत पोंचूंहि शकणार नाहीं. ग्रहांच्या युत्या व इतर योग यावरून पावसाची उत्पत्ति झाली एवढें निश्चित ठरतें. पण तो पाऊस देशभर कोणत्या वेगानें पसरेल हें टाईम-टेबलाप्रमाणें अगदीं तंतोतंत सांगणें कठिण आहे. यास्तव एखाद-दुसऱ्या दिवसाचा फरक पडल्यास तेवढ्यानें पावसाचें अनुमानच सपशेल चुकलें असें मानणें बरोबर होणार नाहीं. सकाळीं आठ वाजल्यानंतर पडलेला पाऊस दुसऱ्या दिवशीं नोंदला जातो यामुळेंहि कित्येक वेळा एका तारखेचें अंतर पडतें.

तुकाराम व जयंती या बोटी बुडाल्या पण तें भविष्य पावसाच्या भविष्यांत दिलें नव्हतें असाहि एक आक्षेप एका टीकाकारानें घेतलेला आमच्या पाहण्यांत आला आहे! अशाल्या टीकाकारांना पावसाच्या भविष्याचीं मूलभूत तत्त्वें व भविष्याची व्याप्ति यांची कल्पनाच नसते. ता. १० नोव्हेंबरला रवि-बुध-युति आहे व तिचा पाऊस ता. ११ पासून पडणार एवढें सांगणें हें पावसाचें भविष्य देणाऱ्याचें काम; पण त्या वादळाच्या दिवशीं तुकाराम व जयन्ती या बोटींचे कप्तान आपल्या बोटी हाकारतील आणि वादळ सुरू झाल्यावर देखील जंजिऱ्याच्या बंदरांत आसरा न घेता पुढें जातील का मागें परततील यासंबंधाचें भविष्य वर्तविणें हें पावसाळ्याच्या भविष्याच्या क्षेत्रांत येऊं शकत नाहीं एवढें तरी टीकाकारांना कळावयास हवें.

## १९२८ सालाचा पावसाळा

आतां १९२८ सालाचा विचार करूं. या वर्षांतली पहिली रवि-बुधयुति ता. ९ जानेवारीला होऊन गेली. महाराष्ट्रांत त्या वेळीं पावसाळ्याचे दिवस नसल्यानें तिचा प्रभाव येथें दिसूं शकला नाहीं. पण मद्रास इलाख्यांत त्या वेळीं सर्वत्र पाऊस पडला. त्यानंतर ता. २ फेब्रुवारीला बुध व नेपच्यून यांचा प्रतियोग व क्रांतिसाम्य असल्यानें ता. ३ फेब्रुवारीला सर्वत्र पाऊस पडून गेला. आणि हा पाऊस होऊन गेल्यामुळें ता. २५ फेब्रुवारीला जी रविबुधाची छोटी युति झाली त्या वेळीं पावसाला जोर राहिला नाहीं. तथापि कडक थंडी आणि पहांटे दव अनुभवास आलें. आतां यापुढें रविबुधाची मोठी युति ता. ४ मे रोजीं व्हावयाची आहे. ते वळवाच्या पावसाचे दिवस असल्यानें या युतीचा पाऊस कर्नाटकांत व महाराष्ट्रांतहि पडेल. आणि हा पावसाचा योग ता. ३० एप्रिलपासून ता. ७ मेच्या दरम्यान अनुभवास येईल. ता. २९ जूनला छोटी युति असून त्यानंतर तीनच दिवसांनीं रवि-शुक्रयुति आहे. या युतीचा परिणाम ता. २९ जूनपासून ता. ५ जुलैपर्यंत दिसून येईल. बुधाची मोठी युति ता. १६ आगस्टला असून तिला रविचंद्राच्या व बुधचंद्राच्या युतींचें पाठबळ आहे. या युतीचा परिणाम युतीपूर्वी एक आठवडा व युतीनंतर एक आठवडा दिसून येईल. बुधाची सहावी लहान युति ता. २४ आक्टोबरला होत आहे. त्या युतीचा पाऊस ता. १८ ते २६ आक्टोबरपर्यंत होईल. शेवटची युति ता. १८ डिसेंबरला आहे. ही युति पावसाळ्यानंतरची असल्यानें महाराष्ट्रांत तिचा पाऊस पडण्याचा संभव नाहीं. पण धारवाड-बेळगांव जिल्ह्यांत त्या वेळीं पाऊस पडेल.

बुधाच्या व इतर ग्रहांच्या युतीचा येथवर विचार झाला. आतां या युती व इतर ग्रह यांचा साकल्येंकरून विचार करून तारीखवार पावसाचें अनुमान ठरवूं. हें अनुमान तूर्त एप्रिल ते सप्टेंबर-अखेर सहा महिन्यांचेंच दिलें आहे. आक्टोबर, नोव्हेंबर व डिसेंबर या तीन महिन्यांतील पावसाच्या तारखा जून महिन्यांत प्रसिद्ध करण्यांत येतील. पावसाचें अनुमान लवकर प्रसिद्ध करण्याविषयीं अनेकांकडून सूचना आल्यावरून तें अनुमान दोन हप्त्यांनीं प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे.

## तारीखवार पावसाचें अनुमान

**एप्रिल**—ता. ५, १०, १४, ३०.

**मे**—ता. ४, १३, २१.

**जून**—ता. ४, ५. ८, ११, १३, १७, १८, १९, २६, २७, २९.

**जुलै**—ता. १, ५, ८, ९, १४, १५, २१, २२, २८, ३१.

**आगस्ट**—१, ५, ६, ८, १०, २०, २३, २४.

**सप्टेंबर**—३, ६, १०, १२, २०, २१, २४, २९, ३०.

# प्रो. कर्वे यांचें खरें कार्य

( ले.—वाग्भट नारायण देशपांडे संपादक ऐक्य )

कै. लॉर्ड मोर्ले यांनीं आपल्या आठवणी लिहितांना आधींच्या प्रस्तावनेंत स्वतःच्या आयुष्यक्रमाबद्दल थोडेसे विचार प्रदर्शित केले आहेत. त्यांत आपल्या दीर्घ चरित्रानें सिंहावलोकन करताना ते म्हणतात कीं, 'टु लिव्ह इज टु औटलिव्ह' ही जुनी म्हण किती यथार्थ आहे हें मी आपल्या जीवनक्रमाने निरीक्षण केलें म्हणजे पटतें. विद्यार्थीदशा संपवून मनुष्य जेव्हां लोककार्याच्या आखाड्यात पहिल्यांदा उतरतो त्या वेळच्या समाजांतल्या कल्पना व ध्येयें आणि दीर्घ कालानंतर आयुष्याच्या उत्तरार्धात त्याच्या दृष्टीस पडणाऱ्या कल्पना व ध्येयें यांत त्याला कितीतरी अंतर दिसतें, आणि ही सर्व क्रांति त्याच्या डोळ्यांदेखत झाली असल्यानें किंबहुना त्यात त्यानं यथाशक्ति भागाहि घेतलेला असल्यानें दीर्घ कालाच्या या दोन टोकांतील अंतर पाहून त्याचें चित्त आश्चर्यचकित होणे साहजिक आहे. आपल्या बालपणातल्या किंवा तारुण्यांतल्या समाजातल्या कल्पना, तत्कालीन लोकांच्या आकांक्षा, आचार, विचार व ध्येयें ही सर्व पूर्णपणे बदलून त्यांची जागा नव्या कल्पनांनीं, नव्या आकांक्षांनीं आचारविचारांनीं आणि ध्येयांनीं घेतलेली ज्यानें पाहिली व त्यातून जो ( औटलिव्ह् ) तरुन गेला त्यानेंच खरें आयुष्य भोगलें असा मोर्ले यांच्या म्हणण्याचा आशय आहे. याच्यापुढें आणखी थोडें जाऊन आपणास असें म्हणतां येईल कीं, ही नवीं ध्येयें व आचारविचार समाजात प्रचलित होण्यास ज्याचें कार्य कारणीभूत झालें त्यानें आपल्या आयुष्याचा खरा सद्व्यय केला.

मोर्ले यांच्याप्रमाणें हे उद्गार तितक्याच यथार्थत्वानें ज्या कांहीं थोड्या पुरुषांस आपल्या महाराष्ट्रांत काढतां येतील त्यांपैकीं ज्यांचा उद्यां ७१ वा वाढदिवस मोठ्या उत्साहानें साजरा करण्यांत येणार आहे ते प्रो. कर्वे हे एक पुरुष होत. १८५८ सालीं म्हणजे बंडाच्या धामधुमीच्या वेळीं जन्म. त्यामुळें इंग्रजी राज्याची संघटना, त्यानें आरंभीच्या सुशिक्षितांवर अल्पकाल पसरलेलें मोहजाल, त्यांतून त्यांची पुढें झालेली जागृति, गेलेले अधिकार मिळविण्यासाठीं झालेल्या अधिकाधिक व्यापक व तीव्र स्वरूपाच्या राजकीय चळवळी, त्यांना पाहावयास मिळाल्या. जिल्ह्याचा कलेक्टर हाच राजा मानून त्याच्या एका शब्दानें दबून जाणाऱ्या लोकांचा काल जसा त्यांनीं पाहिला तसाच पुढें गव्हर्नरासच काय पण व्हाइसरॉयांसहि तुच्छ लेखून त्यांच्याविरुद्ध भरकौन्सिलात दणदणीत भाषणें करणाऱ्या पुढाऱ्यांचा काल त्यांनीं पाहिला. राजकीय क्षेत्राप्रमाणें सामाजिक क्षेत्रांतहि त्यांनीं अशीच आश्चर्यकारक क्रांति पाहिली. पण ती नुसती तटस्थपणानं पाहिली नाहीं, तर ती घडवून आणण्यांत त्यांनीं स्वतः अत्यंत महत्त्वाचीकामगिरी केली. स्टेटसेक्रेटरी व व्हाइसरॉय यावर यथेच्छ तोंडसुख घेतलेलीं पुढाऱ्यांचीं आजचीं भाषणें वाचणाऱ्या हल्लींच्या काळांतील तरुणास एका यःकश्चित् गोऱ्या अधिकाऱ्याच्या शब्दास चाळीस वर्षांपूर्वी किती मान असे आणि त्याच्या अवकृपेस त्या काळीं समाजांत मान्यता मिळविलेले लोकहि किती भीत असत या गोष्टी जशा सांगून खऱ्या वाटणार नाहींत, त्याचप्रमाणे आज अत्यंत जुन्या पद्धतीच्या कुटुंबांतहि १७।१८ वर्षांपर्यंत अविवाहित राहिलेल्या आणि नुसतें मराठीच नव्हे तर थोडेंबहुत इंग्रजीहि शिकलेल्या मुली पाहाणाऱ्या हल्लींच्या काळांतल्या तरुणास १० वर्षांवर मुलगी अविवाहित ठेवणे त्या वेळीं लोकांस किती अवघड व भयंकर वाटे, व तिला र-ट-फ वाचण्याइतकें शिकविणें सुद्धां समाजास किती अप्रिय होतें याची यथार्थ कल्पना येणार नाहीं. समाजस्थितीचें अत्यंत हुबेहूब व मार्मिक चित्र म्हणून अवघ्या २५ वर्षांपूर्वी अत्यंत लोकप्रिय झालेली हरिभाऊंची "पण लक्षात कोण घेतो ?" ही कादंबरी आजच्या पिढींतल्या पुष्कळ तरुण मुलांमुलींस दुर्बोध अशी झाली आहे. आणखी दहा वर्षांनीं ती जेव्हां युनिव्हर्सिटींत परीक्षेसाठीं नेमली जाईल तेव्हां तर त्यांतील पुष्कळ चालीरीतींचें आणि भाषाप्रयोगांचें यथार्थ आकलन होण्यासाठीं टिपणांचें एक मोठें पुस्तक तयार करावें लागेल.

समाजाचें हें सगळें स्थित्यंतर प्रो. कर्वे यांनीं पाहिलें. शाळेंत जाणाऱ्या मुलींची होणारी टवाळी, समाजसुधारकांची होणारी हेटाळणी, सक्रिय सुधारकांचा होणारा छळ, स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह इत्यादि आज बहुतेक सर्वमान्य झालेल्या गोष्टींविरुद्ध बहुजनसमाजाकडून घेतले जाणारे वेडगळ व आज हास्यास्पद वाटणारे आक्षेप हे सर्व त्यांनीं पाहिले आहेत; नव्हे, त्यांचा स्वतः अनुभवहि घेतला आहे. इंग्रजी शिक्षणानें नवी विचारदृष्टि प्राप्त झाल्यानें स्वतःच्या समाजस्थितीबद्दल

जे खळबळ उडवून टाकणारे विचार त्या वेळच्या तरुणांत उत्पन्न झाले व ज्याचें चित्र हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून कुशलतेनें काढलें आहे त्याचाहि अनुभव प्रो. कर्वे यानीं स्वतः घेतला आहे. पुनर्विवाहितांकडे समाज आज सहानुभूतीनें जरी नसला तरी उदासीनपणानें पाहतो पण ही स्थिति ३५ वर्षांपूर्वी नव्हती. त्या काळीं त्यांचा होणारा अपमान प्रो कर्वे यांनीं धीरानें सोसला आहे व समाजसुधारकांवर होणाऱ्या कठोर व क्वचित चटोर टीकेचे आघात त्यांनीं सहन केले आहेत. सक्रिय सुधारकास त्या काळीं समाजाकडून किती त्रास सोसावा लागे व आज क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टींसाठीं पुराणप्रिय लोक त्या वेळीं किती दुराग्रह धरून बसत याची कल्पना या व भावी पिढींतील लोकांस प्रो. कर्वे यांच्या विस्तृत आत्मचरित्रावरून येईल.

पण हा सर्व छळ त्यांनीं धीरानें व कार्यनिष्ठा अढळ ठेवून सोसला यांतच केवळ कर्व्यांचें खरें महत्त्व व असामान्यत्व नाहीं. भावी पिढींतील लोक जेव्हां कर्व्यांचें नांव ऐकितील तेव्हां त्यांच्या डोळ्यासमोर त्यांचा हा छळ उभा राहील असें नाहीं. प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं जो पुनर्विवाह केला त्याचेंहि महत्त्व पुढील पिढ्यांस वाटणार नाहीं. विधवांच्या शिक्षणासाठीं व उन्नतीसाठीं त्यांनीं जो स्वार्थत्याग केला व अलौकिक चिकाटी दाखवून जे प्रयत्न केले ते आज त्यांच्या सम अगर निकट कालीनांस कितीहि मोठे वाटले तरी भावी पिढ्यांना ते तितके मोठे वाटणार नाहीत. कारण पदार्थ कितीहि मोठा असला तरी दूर अंतरावरून तो लहान दिसावा हा दर्शनशास्त्रांतला नियम काळासहि लागू आहे. समाजसुधारणेच्या बाबतींत प्रो. कर्व्यांइतके जरी नसले तरी आपापल्या शक्ती-प्रमाणें टिकाऊ कार्य स्वार्थत्यागानें केलेले इतरहि कांहीं सुधारक होते. समाजाकडून होणारा छळ व निंदा त्यांनींहि कर्व्यांइतक्याच धीरानें सोसली. कर्व्यांप्रमाणें तत्त्वनिष्ठेनें पुन. र्विवाह करणारे आणखीहि दुसरे सुधारक झाले. पण तें कांहींहि असलें तरी समाजसुधारणेच्या इतिहासांत कर्व्यांचें नांव अजरामर होऊन राहिलें असून त्यानें राष्ट्रावर आपला कायमचा ठसा उमटून ठेविला आहे यांत संशय नाहीं. प्रो. कर्व्यांचे नांव आज-पासून ५० वा १०० वर्षांनी जेव्हां उच्चारिलें जाईल तेव्हां त्यांनीं स्थापन केलेली स्त्रियांची-युनिव्हर्सिटी हीच त्या लोकांच्या डोळ्यापुढें प्रामु ख्यानें येईल व त्यामुळेंच त्यांचें नांव केवळ महा-राष्ट्राच्याच नव्हे तर सर्व हिंदुस्थानाच्या इतिहा-सांत अक्षय्य राहील. हेंच त्यांच्या सर्व कार्याचें सारसर्वस्व असून त्यांच्या चरित्रशिलेवर तें इतकें खोल कोरलें आहे कीं, कालाच्या प्रवाहानें त्या शिलेवरील त्यांचीं इतर कार्याक्षरें कितीहि पुसट झालीं तरी हीं अक्षरें तशींच कायम राहतील; किंबहुना तीं अधिक ढळढळीतपणानें जगाच्या दृष्टीस पडतील.

याचें कारण उघड आहे. कारण या युनिव्ह-र्सिटीच्यायोगानें कर्व्यांनी स्त्रीशिक्षणाच्या क्षेत्रांत एक क्रांति घडवून आणली आहे. ही युनिव्हर्सिटी स्थापन करण्यापूर्वी कर्व्यांनीं स्त्रीशिक्षणाच्या आणि सामाजिक सुधारणेच्या इतर बाबतींत जें कार्य केलें तें क्षुण्ण मार्गानें केलें. त्यांतहि त्यांची अवर्णनीय चिकाटी, असामान्य तत्त्वनिष्ठा, आणि अलौकिक धैर्य हे गुण दिसून आले हें खरें. परंतु आधींच्या पुढाऱ्यांनीं जीं तत्त्वें उच्चारलीं तीं आचरणांत आण-ण्यापलीकडे आणि त्यांचा प्रसार करण्यापलीकडे तें कार्य नव्हतें. स्त्रियांच्या युनिव्हर्सिटीची गोष्ट तशी नाहीं. आजपर्यंतच्या वहिवाटलेल्या मार्गापासून भिन्न असा काढलेला हा एक वेगळा मार्ग आहे. शिक्ष-णाभिलाषी स्त्रिया या मार्गानें गेल्यास त्या उन्नतीच्या शिखरावर पोंचण्याऐवजीं पहिल्याच अज्ञानाच्या आणि असमानतेच्या गर्तेत पडतील अशी त्या वेळीं कट्टया सुधारकांनींहि भीति व्यक्त केली, व अजूनहि पुष्कळांच्या मनांत ती आहे. परंतु या स्वतंत्र विश्वविद्यालयाची कल्पना आज जरी कित्ये-कांस रुचली नाहीं तरी ती तर्कशुद्ध आहे व आपल्याच काय पण कोणत्याहि समाजास अवश्य अशी आहे हें निःपक्षपातानें विचार करणारास मान्य करावें लागेल. स्त्रियांचें कार्यक्षेत्र पुरुषांपेक्षां वेगळें असून समाजाच्या प्रगतीसाठीं व स्थैर्या-साठीं तें तसेंच वेगळें राहणें इष्ट आहे व तें कार्य उत्तम रीतीनें त्यांना करतां यावें म्हणून त्यासाठीं लागणारें शिक्षण त्यांना देण्यांत आलें पाहिजे हें तत्त्व कोणासहि नाकबूल करता येणार नाहीं. या तत्त्वांत स्त्रियांचा कमी दर्जा कबूल केल्याचा कित्ये-कांस वास येतो, पण तो अगदींच अयुक्त आहे. वकील, डॉक्टर, एंजीनियर इत्यादि वेगळीं कामें करणाऱ्यांस वेगवेगळें शिक्षण देण्यांत ज्याप्रमाणें कमीपणाचा प्रश्न उत्पन्न होत नाहीं त्याप्रमाणेंच उत्तम पत्नी व माता होण्यासाठीं स्त्रियांस वेगळें शिक्षण द्यावें असें म्हणण्यांत तो कां उत्पन्न व्हावा. पण हा विचार सोडून दिला तरी जें शिक्षण पुरु-षांच्या बाबतींत इतकें दोषपूर्ण आहे असें कबूल करण्यांत येतें तें स्त्रियांना देण्याचा दुराग्रह धरणें वेडेपणाचें होत नाहीं काय ? शिवाय स्त्रियांनीं पुरु-षांच्या कार्यक्षेत्रांत भाग घेऊन त्यांच्याशीं स्पर्धा करण्यांतच दोघांची खरी समानता आहे असें

क्षणभर वादासाठीं कबूल केलें तरी तें ध्येय समाजाच्या सद्यःस्थितींत कितपत साध्य होण्यासारखें आहे याचाहि विचार केला पाहिजे. या आग्रहाचा परिणाम एवढाच होईल कीं, ही स्थिति प्राप्त करून घेणे फारच थोड्या स्त्रियांना शक्य होऊन शेंकडा ९५ स्त्रियांना पुरुषी शिक्षणांतील अनेक अडचणींमुळें शिक्षणापासूनच विन्मुख राहावें लागेल, किंवा अर्ध्याकच्च्या शिक्षणावरच तृप्ति मानावी लागेल, आणि मग धड पुरुषांशीं स्पर्धा करण्याचीहि लायकी नाहीं, आणि मातृपदाची व गृहिणीपदाची जबाबदारी योग्य तऱ्हेनें पार पाडण्याचीहि कर्तृत्व नाहीं अशी आमच्या स्त्रियांची शोचनीय स्थिति होऊन त्याचा समाजावर आणि कुटुंबावर दुष्परिणाम झाल्याविना राहणार नाहीं. शेंकडा ९९ स्त्रिया कांहीं तरी अर्धेमुर्धे शिक्षण घेतलेल्या व १ बी. ए. झालेली ही आजच्या समाजांतली स्थिति खास स्पृहणीय नाहीं. अशा स्थितीपेक्षां ही एक बी. ए. न झाली तरी चालेल, पण बाकीच्या ९९ स्त्रिया चांगल्या सुशिक्षित व उच्च विचारांचें आणि बदललेल्या परिस्थितीचें यथार्थ आकलन करण्यास समर्थ अशा असणे हेंच समाजास केव्हांहि हितावह होय. हेंच ध्येय पुढें ठेवून प्रो. कर्व्यांनीं आपल्या विश्वविद्यालयाची स्थापना केली, आणि स्त्रीशिक्षणाच्या कार्यास खरी व उपयुक्त दिशा लाविली. प्रो. कर्व्यांनीं स्त्रीशिक्षणाच्या कार्यक्षेत्रांत हीच महत्त्वाची क्रांति घडवून आणली आणि हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय.

कर्व्यांच्या युनिव्हर्सिटीची इतकी अवश्यकता असून सुद्धा तिचें कार्य अद्यापि व्हावें तितकें यशस्वी झालें नाहीं हें खरें; पण हा दोष त्याच्या तत्त्वांतला नसून समाजाचा आहे. रुळलेल्या मार्गाची आवड हा दोष एकट्या पुराणमतवादी लोकांत नसून रूढीविरुद्ध बंड करणारे नवमतवादी सुधारकहि त्या दोषापासून मुक्त नाहींत. तसेंच सरकारी मान्यतेची मोहिनी जोंपर्यंत समाजाच्या मनावर आहे तोंपर्यंत असले प्रयत्न कालांतरानेंच यशस्वी होणार. मुलांच्या शिक्षणाच्या बाबतींत सरकारी मान्यतेची आवश्यकता कांहीं तरी कबूल करतां येईल. पण ज्या मुलींचीं पुढें लग्नें करून त्यांना संसारपाशांत अडकविण्याचा त्यांच्या आईबापांचा मनोदय निश्चित आहे तेथेंहि त्यांना सरकारमान्य शिक्षणाचें अधिक प्रेम वाटावें हें आश्चर्य होय! पण कर्व्यांच्या विश्वविद्यालयाची स्थापना ज्या तत्त्वावर झाली आहे तें तत्त्व इतकें सत्य आहे कीं त्याचा विजय आज डोळ्यात भरण्यासारखा झाला नसला तरी आणखी थोड्याच वर्षांनीं त्याचे यश समाजास दिसूं लागेल. सरकारी हायस्कुलांतून अपुरें व निरुपयोगी शिक्षण घेऊन संसारात पडलेल्या ज्ञानलवदुर्विदग्ध स्त्रिया आज घरोघरीं आढळतात. पण आणखी दोन पिढ्यांतच त्यांच्या जागीं मातृभाषेच्या द्वारें यथासांग शिक्षण घेतलेल्या व शिक्षणामुळें मन व विचार विकसित होऊन मातृपदाची व गृहिणीपदाची जबाबदारी उत्कृष्ट रीतीनें पार पाडणाऱ्या, आपल्या पतीची खरी गृहिणी होणाऱ्या स्त्रिया प्रत्येक कुटुंबात दिसूं लागतील. तेंच प्रो. कर्व्यांच्या कार्याचें खरें मर्म होय. या भावी प्रगतीचा पाया मोठ्या दूरदर्शीपणानें, अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत आणि विलक्षण स्वार्थत्याग व कष्ट करून कर्व्यांनीं आज घातला हीच त्यांची खरी व चिरस्थायी राष्ट्रसेवा होय. या युनिव्हर्सिटीच्या यशाबरोबर त्यांच्या कार्याचा विस्तार होईल, आणि त्यांचें नांव देशाच्या सामाजिक इतिहासांत अजरामर होऊन राहील. हें भावी उज्ज्वल यश जड देहाच्या डोळ्यांनीं पाहण्याचें भाग्य खुद्द कर्व्यांच्याच काय पण आजच्या पिढींतल्याहि फारच थोड्यांच्या वांट्यास येईल, परंतु प्रो. कर्व्यांच्या या ७१ व्या वाढदिवसाच्या मंगल प्रसंगीं, त्यांच्यासारख्या कर्मवीरास आणखी दीर्घायुष्य लाभो! आणि त्यांनीं लावलेल्या या रोपाची त्यांच्या हातून प्रेमळ जोपासना होऊन त्याचा मोहोर आलेला वृक्ष होवो असें आम्ही इच्छितों.

# रशियांतील बोल्शेव्हिकांचें राज्य

## लेखांक २

### मनोराज्य

साम्राज्याची हाव बोल्शेव्हिकांस नाहीं व त्यांना साम्राज्याची कल्पना तत्त्वतः पसंत नाहीं हें बोल्शेव्हिकांचा अंमल रशियांत स्थापन होतांच लेनिनप्रभृति बोल्शेव्हिक पुढाऱ्यांनीं कृतीनें सिद्ध केलें. झारच्या वेळीं रशियन साम्राज्याचें क्षेत्रफळ ८४१७११८ चौ. मैल होतें व लोकवस्ती १८ कोटि २० लक्ष होती. एवढ्या विस्तृत प्रदेशापैकीं फिनलंड, पोलंड, लटव्हिया, लिथुआनिया व

इस्थोनिया यांस स्वातंत्र्य देण्यांत आलें. रशियन साम्राज्यांतून इतका प्रदेश वेगळा होऊन जो उरला त्याचें क्षेत्रफळ ८१८६१४४ चौ. मैल असून लोकसंख्या १४ कोटि ४८ लक्ष आहे. म्हणजे वस्तीच्या दृष्टीनें रशिया सुमारें एक-चतुर्थांश भागास मुकला असे समजण्यास हरकत नाहीं. क्षेत्रफळ मात्र तितक्या प्रमाणांत कमी झालें नाहीं. याचें कारण रशियाच्या पश्चिमचे जे दाट वस्तीचे लहान प्रांत तेच रशियांतून फुटून निघाले.

अशा रीतीनें फुटून उरलेल्या देशास युनायटेड सोशिआलिस्ट सोव्हियटिक रिपब्लिक्स असें नांव मिळालें असून त्याची राजधानी मॉस्को शहर होय. पेट्रोग्राड पीटर्सबर्ग ही रशियाची झारच्या अमदानींतली जुनी राजधानी. ती रशियाच्या एका कोपऱ्यांत असल्यामुळें मॉस्को हें मध्यवर्ती शहर बोल्शेव्हिकांस अधिक सोयीचें वाटलें. मॉस्को व त्यासभोंवारचा प्रदेश आशिया खंडांत मोडतो. त्यायोगानें सांप्रतचें रशियन राज्य खास आशियाटिक समजण्यास हरकत नाहीं. बोल्शेव्हिक हा शब्द सांप्रत समाजसत्तावादी या अर्थानें वापरण्यांत येतो. परंतु त्याचा मूलार्थ बहुसंख्य असा आहे. बोल्शेव्हिक म्हणजे बहुसंख्य व मेनशेव्हिक म्हणजे अल्पसंख्य. एकाच राजकीय पक्षांतील दोन फळ्यांस हीं दोन नांवें मिळालीं. व त्यापैकीं बोल्शेव्हिक या शब्दाचा अर्थ अगदींच विपरीत होऊन बसला. ज्या समाजसत्तावाद्यांचा अंतर्भाव बोल्शेव्हिक या शब्दांत होतो त्याची फोड प्रथम करणें आवश्यक होय.

देशांतील संपत्ति निरनिराळ्या लोकांच्या हातीं असते व तिचें उत्पादन जो तो आपल्या सोयीप्रमाणें व शक्तीप्रमाणें प्रचलित कायद्यांस व नीतिनियमांस धरून करतो. परंतु यंत्रकलेच्या शोधानें उत्पादनाच्या मामुली साधनांत विलक्षण फेरबदल झाला. यंत्रानें माणसांच्या मदतीची बरीचशी गरज कमी केली व ज्याच्यापाशीं यंत्र त्यास शेंकडो नव्हे हजारों माणसांचें बळ आलें. यंत्राच्या साहाय्यानें व पुष्कळ अंशीं माणसांच्या मदतीवांचून त्यास एका बाजूस कामाचे डोंगर पाडतां येऊं लागले व दुसऱ्या बाजूस संपत्तीच्या राशी घालतां येऊं लागल्या. असे यंत्राचे दहापांच धनी एकवटले कीं त्यांस आपलें व्यापारी साम्राज्य निर्वेधपणें चालविण्यास हरकत नाहीं. यांत अशा प्रकारचें एक नवीन संकट उद्भवलें कीं जो एकदां यंत्रसामर्थ्यावर श्रीमंत बनला त्याच्या घरीं लक्ष्मी आपला चंचलपणा सोडून देऊन कायमची दासी होऊन राहावयास आली व ती त्याच्या घरीं वंशपरंपरेनें नांदूं लागली. उलटपक्षीं ज्याच्या कपाळावर मजुरीचा शिक्का एकदां बसला तो वज्रलेप होऊन राहिला. अशा रीतीनें जशी भांडवलवाल्याची तशी मजुरांचीहि एक वेगळी जात झाली.

## कार्ल मार्क्स

संपत्तीची अमर्याद वाढ होणें व ती मूठभर श्रीमंतांच्या अंकित राहाणें हें राष्ट्राच्या स्वास्थ्यावर व स्थैर्यावर मोठेंच संकट असल्यामुळें युरोपांतील विचारी लोकांचें लक्ष त्याकडे वेधलें. कार्ल मार्क्स नामक पुरुष जर्मनींत एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं जन्मास आला व त्यानें या सामाजिक प्रश्नावर अनेक ग्रंथ लिहून लोकमत जागृत केलें. समाजसत्तावादाची चळवळ हीच होय. तिचा प्रसार ऑस्ट्रिया, इताली व स्वित्झर्लंड या देशांतून झाला. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत या नवमतानें युरोपचा पूर्वभाग पूर्णपणें ग्रासून सोडला. झारचा करडा अम्मल चालू असल्यानें या चळवळीस रशियांत थारा मिळणे शक्य नव्हतें. तरी पण रशियन स्त्री-पुरुष शिक्षणसंपादनार्थ स्वित्झर्लंड आदिकरून देशांतून राहात असतां त्यांच्यात समाजसत्तावाद शिरला. तो इतक्या प्रमाणानें कीं त्यास घाबरून झारनें १८३७ मध्यें परदेशीं गेलेले विद्यार्थी परत बोलावले. हे विद्यार्थी रशियांत परत आले खरे, पण त्यामुळें समाजसत्तावादाचा वणवा न विझतां अधिकच चेतला.

संपत्ति उत्पन्न करण्याच्या नवीन साधनांमुळेंच संपत्ति समाजांत विषमतेनें वांटली जाते. यंत्रकला उदयास आली नव्हती त्या काळीं कारखानदार व कारागीर यांचें सामर्थ्य अल्प होतें. आणि त्यांनीं आपल्या कारखान्यावर अगर धंद्यावर कितीहि पैसा मिळविला तरी तो इतराच्या डोळ्यावर आणि मजुरांच्या पोटावर येण्यासारखा नव्हता. यांत्रिक शोधांनीं ही स्थिति पालटली यांत शंका नाहीं. परंतु या नवीन संकटाचें मूळ जें यंत्र तें फोडून किंवा तोडून टाकणें हा संकटनिवारणाचा खरा व टिकाऊ उपाय नव्हे. यंत्रें हीं टिकावयाचींच व त्यांतून मालाची व संपत्तीची पैदास अचाट व्हावयाचीच. या स्थितीवर तोडगा एवढाच कीं जीं यांत्रिक साधनें मूठभर भांडवलवाल्यांच्या व कारखानदाराच्या हातीं आहेत तीं त्यांजपासून काढून घेऊन सरकारच्या स्वाधीन करावयाचीं. सरकार हें स्वतंत्र देशांत लोक बनवितील त्यासारखेंच असणार. त्या सरकारनें हीं साधनें आपल्यापाशीं बाळगून त्यांचा उपयोग विशिष्ट वर्गाच्या कल्याणाकरितां न करतां सर्वांच्या फायद्याकरितां करावा.

समाजसत्तावादाचें स्वरूप या प्रकारचें आहे व बोल्शेव्हिकांची राज्यव्यवस्था या तत्त्वावर अधिष्ठित झाली असल्यामुळें

राशियांतून भांडवलवाल्यांच्या व कारखानदारांच्या मालकी हक्काचें उच्चाटन झालें आहे. समाजसत्तावाद्यांच्या विचारसणीला एकदां ही दिशा लागल्यानंतर तिचा विकास होत जाणें स्वाभाविक होय. युरोपियन सुधारणेचा उगम भौतिक शास्त्रांतून झाला असल्यामुळें तिच्यांत धर्म, ईश्वर, आत्मा, पुनर्जन्म, कर्मवाद या अध्यात्मिक चर्चेस वाव नाहीं. तरी पण सदर शास्त्रज्ञांनीं अध्यात्मिक तत्त्वज्ञानाविरुद्ध एकजुटीनें हत्यार असें कधींच उपसलें नव्हतें. कित्येक शास्त्रज्ञ नास्तिक अगर तटस्थ असत. परंतु त्यांनीं जनतेचा बुद्धिभेद बहुधा केला नाहीं. पण समाजसत्तावाद्यांचें धोरण अगदींच भिन्न आहे व त्याचा उलगडा रशियांतील बोल्शेव्हिकांच्या तत्त्वज्ञानांत उत्कृष्ट प्रकारें होतो. त्यास फक्त चालता-बोलता समाज तेवढा दिसतो व त्याच्याच ऐहिक सुखस्वास्थ्याची ते काळजी वाहतात. समाजाचें आद्यतत्त्व कोणतें आहे व त्याच्या अंतीं काय असावें याची फिकीर बोल्शेव्हिक करीत नाहींत. त्यांस आत्मा, देव व धर्म हीं कबूल नाहींत. सामर्थ्याचा हा खेळ आहे असें ते समजतात. संपत्ति हें सर्व कल्पनांचें जीवन असून संपत्तीच्या छायेखालीं बसल्यानंतर व पोटांत स्वास्थ्य असल्यानंतर माणसास धर्माचे व अध्यात्माचे ढंग सुचतात. अशा ढंगांत शिरण्याचें कांहींच कारण नाहीं. सृष्टींत अतींद्रिय असें कांहींच नाहीं. प्रत्येक गोष्टीचा उलगडा सृष्टिनियमाप्रमाणेंच घडत असून त्याकरितां ईश्वराकडे जाण्याचें अगर परमात्म्याचा शोध लावण्याचें मुळींच कारण नाहीं. मनुष्य त्यास जसें वळण लावावें तसा बनतो. त्याजपुढें कुटुंब, जात, राष्ट्र हे घटक ठेवण्यांत आले व ते त्यानें उचलले. याऐवजीं समाज हा एकच घटक त्यास लहानपणापासून माहीत करून दिला तर त्याजवरच त्याचें मन जडेल. समाजाचा स्वार्थ तोच व्यक्तीचा स्वार्थ व समाजाचें सुख तेंच व्यक्तीचें सुख या समजुती ठाम बनतील. चित्रकला, शिल्पकला, नृत्यकला यांचा जन्म मनुष्याच्या मनोवृत्तींतून झाला तसेंच समाज हेंच काय तें सर्वस्व याहि समजुतीस मानवी मनोवृत्तींत कायमचें स्थान मिळेल. तात्पर्य, कौटुंबिक भावनेनेंच मनुष्यानें समाजाकडे पाहावयास शिकावें. तसें केल्यास त्यास अत्युच्च अशा आनंदाचा लाभ घडेल.

## समाज हेंच कुटुंब

समाज हेंच एक कुटुंब ही भावना सर्वांच्या अन्तःकरणांत दृढावली म्हणजे समाजहितार्थ ज्यानें त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें काम करावें व त्यापासून जी संपत्ति उत्पन्न होईल ती ज्याला त्याला त्याच्या गरजेप्रमाणें वांटून द्यावी. मी जी किफायत करीन ती माझ्याच पदरांत पडली पाहिजे असें कोणीहि समजण्याचें कारण नाहीं. समाजसुखाहून व्यक्तीचें सुख वेगळें गणलें गेलें तरच व्यक्तीला स्वतःचा स्वतंत्र द्रव्यसंचय करण्याची गरज वाटावी. पण व्यक्ति व समाज हे समान सुखदुःखाचे वांटेकरी होत ही भावना प्रत्येकाच्या मनांत बाणल्यानंतर बुद्धिमत्ता, कर्तृत्व व कौशल्य यांच्या कमीअधिक प्रमाणाबरोबर व्यक्तीस मिळावयाच्या संपत्तीची कमीअधिक वाटणी न करता सर्व व्यक्ती समान लेखून प्रत्येक व्यक्तीस तिच्या गरजेप्रमाणें राष्ट्राच्या समाईक संपत्तीचा अंश द्यावा असें समाजसत्तावाद्यांचें तत्त्व आहे व तेंच बोल्शेव्हिक राज्यव्यवस्थेंत गोवलें गेलें आहे. या तत्त्वाची पेरणी जुन्या पिढीच्या अन्तःकरणांत होणें कठीण असलें तरी नवीन पिढीचा शिक्षणक्रम याच धोरणानें आंखल्यास रशियन समाज हळूहळू नवीन राज्यव्यवस्थेशीं समरस होईल असा बोल्शेव्हिक मुत्सद्यांस भरंवसा वाटतो.

रशियन राज्यपद्धतींतील पंचायत हा घटक समजला जातो. सोव्हिएट म्हणजे पंचायत. या पंचायती खालपासून वरपर्यंत स्थापन झाल्या आहेत. पंचायतींचे प्रांतपरत्वें गट पडतात व त्या गटांची मध्यवर्ती संस्था कॉंग्रेस बनते. प्रत्येक प्रांताची वेगळी कॉंग्रेस आहे व प्रांताप्रांताच्या सर्व कॉंग्रेससभांचें एकीकरण ऑल रशियन कॉंग्रेसमध्यें होतें. अखिल राशियाचें राष्ट्रीय व परराष्ट्रीय धोरण मध्यवर्ती कार्यकारी कमिटी ठरविते व राज्यकारभाराचीं मुख्य सूत्रें तेथूनच हलूं लागतात. ही राज्यव्यवस्था कांहीं अंशीं अमेरिकेंतील राज्यव्यवस्थेप्रमाणेंच समजण्यास हरकत नाहीं.

## श्रीमंतांवर राग

रशियन राज्यपद्धति प्रातिनिधिकच होय. तथापि प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार सुधारलेल्या इतर राष्ट्रांप्रमाणें हितसंबंधानुरूप वांटलेला नाहीं. हिंदुस्थानांतील प्रातिनिधिक पद्धति सदोष असली तरी जमीनमहसूल देणारा, इन्कम टॅक्स भरणारा, अल्पसंख्याक असलेला, मागसलेला व विशिष्ट प्रमाणांत शिक्षण संपादलेला, यांस आपल्यातर्फे कौन्सिलांत किंवा असेंब्लींत प्रतिनिधी पाठविण्याचा हक्क आहे. परंतु राशियांत फक्त तो कामकरी वर्गासच प्राप्त झाला आहे. त्याशिवाय इतर वर्ग अस्पृश्य किंबहुना बहिष्कृत मानले जातात. ज्याच्यापाशीं पैसा तो बोल्शेव्हिकांचा शत्रु व ज्याच्यापाशीं निवळ लंगोटी तो बोल्शेव्हिकांचा मित्र अशी समजुतीची उलथापालथ बोल्शेव्हिकांनीं करून टाकली आहे. सत्तेच्या जोरावर एकाच

राव व रावाचा रंक केल्याचीं तुरळक उदाहरणें इतिहासांत आढळतात. परंतु कोट्यावधि जनतेवरून ही यक्षिणीची कांडी फिरविल्याचें उदाहरण जगांत आजतागायत एकट्या रशियाचेंच होय असें म्हणण्यांत अतिशयोक्तीचा लेशहि नाहीं.

रशिया यापूर्वी ग्रीक चर्चचा अनुयायी होता व त्याचा ख्रिस्ती धर्माभिमानहि जाज्वल्य होता. या धर्माभिमानामुळेंच रशियाचे झार व तुर्कस्थानाचे मुसलमान सुलतान यांचे झगडे उडाले आहेत. परंतु धर्म ही भावनाहि श्रीमंतांनीं गरिबांस आपल्या हुकमतीखालीं कायमचे डांबून ठेवण्याकरितां पिकविली आहे या समजुतीनें रशियन सरकारनें कामकरी वर्गास धर्मासंबंधीं पूर्ण मोकळीक दिली आहे. त्यांनीं ख्रिस्ती राहावें अगर न राहावें, त्यानीं ख्रिस्ती धर्मास अनुकूल चळवळ करावी अगर प्रतिकूल चळवळीस हात घालावा त्यास सरकारची हरकत नाहीं. ख्रिस्ती धर्माशीं रशियन सरकारनें घटस्फोट केला आहे. पैशाच्या अभावीं पूर्वीच्या राजवटींत रशियन कामकऱ्यांस आपल्यातर्फे वर्तमानपत्रें चालवितां येत नव्हतीं. नवीन सरकारनें त्यांस हें सर्व साहित्य पुरविण्याचें कबूल केलें आहे; त्यांना आपल्या सभा भरविण्याकरितां इमारती व दिवाबत्ती पुरविली आहे; त्यांच्या मुलांबाळांकरितां मोफत शिक्षणाची सोय जमविली आहे; हत्यारें बाळगण्याचा अधिकार फक्त कामकऱ्यांस दिला आहे व लष्करांतील इतर किरकोळ कामें सुखवस्तु लोकांवर सोंपविलीं आहेत.

# प्रासंगिक बोल

## सिंध प्रांत व हिंदुमहासभा

जबलपुरास हिंदुमहासभेनें सिंध हा एक अलग प्रांत करावा कीं नाहीं या प्रश्नासंबधानें आपलें निश्चित धोरण जाहीर केलें याबद्दल हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांवर असहिष्णुतेचा व आकुंचित धोरणाचा आरोप कांहीं कॉंग्रेसवाल्या एकांगी वृत्तीच्या लोकांकडून करण्यांत आला आहे. वास्तविक 'भिन्न मतदारसंघ' राष्ट्रीय दृष्ट्या विघातक असून संयुक्त मतदारसंघ बनविण्यांत यावेत याची सत्यता जिनाप्रभृति पुढाऱ्यांना पटली असतांना, सिंध प्रांत वेगळा बनवावा व वायव्य सरहद्दीवरील प्रांताला सुधारणांचा कायदा लावण्यांत यावा आणि असे झाल्याशिवाय संयुक्त मतदारसंघ अमलांत येऊं नयेत या मुसलमानांच्या म्हणण्याचा अर्थ हें काय आतां कोणाला नव्यानें सांगण्याची जरूरी नाहीं. जिना, मौ. महमद याकूब वगैरे पुढाऱ्यांनीं असें स्पष्ट सांगितलें कीं दक्षिणेच्या बाजूला हिंदु बहुमतवाल्यांचे जसे नऊ प्रांत आहेत तसेच आमचेहि पण उत्तरेच्या बाजूला शक्य तितके जास्त प्रांत बनविण्यांत यावेत. या मुसलमानाच्या मागणीच्या बुडाशीं भाषावार प्रांतरचना करण्यांत यावी हें तत्व आहे अशी भ्रामक समजूत कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनीं करून घेतली आहे व सर्वपक्षीय परिषदेनें फक्त सिंध प्रांताचीच आर्थिक व सामाजिक दृष्ट्या पाहणी करण्याकरितां एक कमिटी नेमली यावरून 'भाषावार प्रांतरचना' एकदम अगर धिमेधिमे अमलांत यावी ही दृष्टि सर्वपक्षीय परिषदेनें ठेवली नाहीं हें उघड होत नाहीं काय? कमिटीचा निकाल प्रसिद्ध होण्यास अवकाश आहे. परंतु जिनांच्या मुस्लीम लीगनें आपण कमिटीचा रिपोर्ट शिरसावंद्य मानू व कमिटीनें सापत्तिक व आर्थिक दृष्ट्या विभागणी करणें श्रेयस्कर नाहीं असा निकाल दिला तर आपला हट्ट चालविणार नाहीं असें मोघम वचन तरी कोठें दिलें आहे? उलट आमचा कलकत्ता येथील मुस्लीम लीगनें केलेला ठराव आम्हाला बदलणें शक्य नाहीं असें त्यांनीं सांगितलें.

***

या मुसलमानांच्या अचल मागणीला हिंदुमहासभेनें प्रत्युत्तर देणें प्राप्त होतें व त्यालाच अनुसरून हिंदुमहासभेनें आपलें निश्चित धोरण जाहीर केलें. सध्याच्या परिस्थितींत सांपत्तिक व आर्थिक दृष्ट्या सिंध प्रांत वेगळा बनविणें शक्य नाहीं ही मुसलमानांची खात्री असली तरी बहुमतवाले आम्ही मुसलमान ती उणीव भरून काढूं अशी प्रौढी ते मारीत आहेत. पण केवळ बहुमतानें या गोष्टी ठरणें शक्य नाहीं व अल्पमतवाल्या हिंदूंवर प्रमाणाबाहेर कराचा बोजा लादण्यांत येईल त्याला कोण जबाबदार? मुसलमानांचें बहुमत असलेल्या बंगाल व पंजाब प्रांताचा अनुभव, सायमन कमिशन व दिवाणगिऱ्या या बाबतींत कसा आला हें सर्वांस माहीतच आहे व इतर प्रांतांतून मुसलमान प्रतिनिधींचे धोरण कोणत्या स्वरूपाचें असतें हेंहि पदोपदीं उघड होत आहे. शिक्षण खात्यांत मुसलमान किती? इन्कमटॅक्स खात्यांत मुसलमान किती? लष्करी खात्यांत मुसलमान किती? वरिष्ठ अधिकाराच्या जागा मुसलमानांना

राखून कां ठेवीत नाहीं ? त्या शेंकडा १५ टक्के राखून ठेवा ! ३३ टक्के मिळण्याचा आमचा हक्क आहे अशा प्रकारच्या प्रश्नमालिका व ठराव यापलीकडे दुसरें कांहीं समतेचें प्रगमनशील राष्ट्रीय धोरण मुसलमानांचें आहे असें दिसत नाहीं. या मुसलमानांनीं व त्यांच्या टाईम्स आदिकरून साथीदारांनीं हिंदुमहासभेच्या स्पष्ट व अस्खलित धोरणावर असहिष्णुतेचा व आकुंचिततेचा छाप मारावा ही त्याची वृत्ति आपमतलबी व स्वार्थीपणाची आहे. बरें, भिन्नप्रांत रचना मागणाऱ्या सर्व प्रांतांचा पाहणी करण्याकरितां एक चौकशी कमिटी नेमण्यांत येऊन त्या चौकशी कमिटीनें समान दर्जा, समान हक्क व एकप्रकारें समतेचा कायदा अमलांत आणण्याला हिंदुमहासभेची तयारी होती व आहे हें सिंधबरोबरच उत्कल, आंध्र, कर्नाटक वगैरे प्रांतहि वेगळे बनविण्यांत यावेत अशा अर्थाचा ठराव दिल्ली येथें हिंदु महासभेच्या कार्यकारी कमिटीनें केला यावरून सिद्ध झालें आहे. कोणत्याहि मतलबी टीकेस न जुमानतां जबलपूर येथें हिंदुमहासभेनें आपलें स्पष्ट धोरण जाहीर केलें हें यथायोग्यच झालें.

# मराठी लेखनशुद्धि

( लेखक—**गोविंद पांडुरंग पावशे**, सातारा. )

मराठी प्रचलित लेखनपद्धतीला ' शुद्धलेखन ' असें विशिष्ट नामाभिधान जरी प्रतिष्ठित केलें आहे तरी तें इतके अशुद्ध व अनवस्थित बनलें आहे कीं, त्याला अशुद्धलेखन असें म्हटलें तरी चालेल. तें कसेंहि असो पण त्याचें शुद्धीकरण करणें अत्यावश्यक आहे हें मात्र बहुतेकांना पटलें आहे. म्हणून त्यांपैकीं कित्येकांकडून बऱ्याच वर्षांपूर्वीपासून या चळवळीचा उपक्रम करण्यांत आलेला आहे व त्यात आपणहि अंशभागी व्हावें अशी स्फूर्ति झाल्यामुळे मी त्या कामास उद्युक्त झालों आहें.

लेखनाचें शुद्धीकरण करावयाचें तर त्यांत यणाऱ्या ऱ्हस्व-दीर्घादि विषयांचा यथाक्रमानें विचार केला पाहिजे. पण प्रचलित लेखनांत अवास्तविक अनुस्वारांचेंच स्तोम माजलें आहे; लेखनाचें शुद्धिसर्वस्व ह्या अनुस्वारावरच अधिष्ठित म्हणून लेखनांतून ह्याचे उच्चाटन झालें असतां बरेंच काम होईल असें वाटत असल्यामुळें मी प्रथम हेंच काम हातीं घेतलें आहे. आणि ह्याच्या परिणामाचें धोरण लक्षांत आल्यावर इतर ( ऱ्हस्व—दीर्घादि ) विषयासंबंधीं एखादा लेख लिहिण्याचा विचार आहे. लेखनशुद्धि करण्याची ही चळवळ पूर्वीं एके काळीं इतकी रंगारूपास आली होती कीं, तिच्यामुळें सरकारी पुस्तक कमिटीनें कांहीं आवश्यक सुधारणायुक्त व्यवस्था सुचविली होती. पण तिला कित्येकांनीं हरकत घेतली. म्हणून विद्याखात्याचे मे. डायरेक्टरसाहेब यानीं ता. ३०।९।१९०४ रोजीं मे. काव्हर्नटनसाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं एक कॉन्फरन्स भरविलें. त्यामध्यें डॉ. भांडारकरप्रभृति बडे बडे विद्वान व अधिकारी असे २० मेंबर होते. त्यामध्यें आक्षिप्त अनुस्वारांच्या बाबतींत विशेष चर्चा न करतां डॉ. भांडारकर हे एक कोंकणस्थ तज्ज्ञ आाण प्रो. काथवटे हे एक देशस्थ तज्ज्ञ या उभयतांच्या अभिप्रायानुसार ह्या विषयाचा निर्णय पुस्तक कमिटीनें करावा असें ठरलें. व त्याप्रमाणें तिनें तजवीज करून अध्यक्षाकडे रिपोर्ट पाठविला व त्यांनीं कॉन्फरन्सच्या एकंदर हकीकतीचा रिपोर्ट मे. डा. सा. यांचेकडे पाठविला व त्यावरून त्यांनीं अखेर निकाल केला तो असा—जे अनुस्वार संस्कृत किंवा प्राकृत यांत आढळणार नाहींत, किंवा ज्यांचा प्रघात विद्वान लोकांच्या बोलण्यांत नाहीं, ते अनुस्वार सोडून द्यावे. उदा.-धावतो, सवय शेपूट, लाकूड, काव, कोपट, ऊस, भोकणे इत्यादि. सदरहू कॉन्फरन्सची व तत्संबंधीं अवांतर हकीकत मराठी शालापत्रकाच्या माहे आक्टोबर १९०४ च्या अंकात प्रसिद्ध झालेली आहे.

वर दिलेला मे.डा. सा. यांचा निकाल व लेखनविषयक इतर निकाल अमलांत येऊं नयेत अशी ज्यांची उत्कट इच्छा होती अशा कांहीं विशिष्ट शिष्टांनीं सरकारांत कारवाई करून तो सर्व व्यूह ढांसळून टाकला. त्यासंबंधीं हकीकत मराठी व्याकार कै. वा. रा. भि. जोशी यांनी आपल्या मराठी भाषेची घटना या पुस्तकांत प्रसिद्ध केली आहे. वरील हकीकतीवरून पाहातां सदरहू विरोधकांची कारवाई यशस्वी होण्याला दोन कारणें संभवतात. त्यांतलें पाहिलें हें कीं, कॉन्फरन्सच्या मेंबरांपैकीं या कामाकडे ज्यांची योजना केली होती त्यांनीं अनुस्वारांचें शास्त्रीय दृष्टीनें परीक्षण न करतां केवळ व्यावहारिक तारतम्यानेंच आपला अभिप्राय कमिटीकडे कळविला असावा. दुसरें कारण हें कीं, सदरहू विरोधी पक्ष अधिक वजनदार असावा.

असो. अशा प्रकारच्या चळवळीचा पुरस्कार करण्याला कोणा तरी असाधारण व्यक्तीचा अथवा संस्थेचा आश्रय मिळाल्याशिवाय ती परिणामकारक होणें शक्य नाहीं हे जाणून मी प्रथमतः या जिल्ह्यांतील निरनिराळ्या ठिकाणच्या प्राथमिक शिक्षकसमूहापुढें व्याख्यानें दिलीं व अखेर जिल्हा शि. संघाच्या सभेत एक व्याख्यान दिलें व त्या संघाच्या कार्यकारी मंडळापुढें आपला इष्ट हेतु व्यक्त केला. तेव्हां "तुमचा सर्व तत्त्वें आम्हांस पटतात, पण त्यांचा पुरस्कार करणें आम्हांस इष्ट नाहीं" अशा प्रकारचें उत्तर मिळालें. तेव्हां मी त्यांना दोष न देतां त्या मार्गांतून परावृत्त झालों. नंतर येथें (सातान्यास) न्यू इंग्लिश स्कूलच्या प्रमुख चालकांनीं "शिक्षाविचारमंडळ" नांवाची जी संस्था थोडे दिवसांपूर्वीच स्थापिली होती तींमध्यें सभासदत्वानें प्रविष्ट झालों व तेथें आपला उद्दिष्ट विषय उपस्थित केला आणि त्यासंबंधानें २।३ जाहीर व्याख्यानें दिलीं. नंतर त्याच्या निर्णयाकरितां कमिटी नेमिली गेली पण तिनें आपलें काम कसेंबसें तरी उरकून एक निर्णयपत्र तयार केलें. त्यांत मजवांचून इतर मेंबरांचा ठराव असाः—ज्या अनुस्वारांची उपपत्ति लागत नाहीं असे अस्पष्टोच्चारित अनुस्वार (अनुनासिक) प्रचलित लेखनामध्यें आहेत ते काढून टाकावेत.

माझा भिन्न ठराव असा—व्युत्पत्ती सिद्ध असोत वा नसोत, पण ज्यांचा स्पष्ट (खणखणीत) उच्चार होतो असे जे सार्वत्रिक अनुस्वार आहेत तेवढे ठेवून बाकीचे लेखनांतून काढून टाकावेत.

याप्रमाणें दोन ठराव त्या पत्रांत नमूद केले. पण कार्यकारी मंडळानें पूर्वी कबूल केल्याप्रमाणें तें प्रकरण पुढें योग्य मार्गास न लावितां तसेंच ठेवून दिलें आहे.

असो. याप्रमाणें परिस्थिति झाल्यामुळें मी हताश होऊन बरेच दिवसपर्यंत स्तब्ध झालो होतों. पण पुढें गेल्या मे महिन्यांत पुणें येथें जें साहित्यसंमेलन झालें त्यामध्यें सुदैवानें मराठी शुद्धलेखनास वळण लावण्यासंबंधीं एक ठराव पास होऊन त्याच्या तजविजीसाठीं एक कमिटीहि नेमिली असें वृत्त समजलें. तेव्हां माझी आशा अंकुरित झाली आणि मी प्रस्तुत विषयासंबंधीं लेख लिहिण्यास उद्युक्त झालो. तेव्हां जिचें मागें वर्णन केलें आहे ती सन १९०४ सालीं निष्फळ झालेली चळवळ आणि सध्याच्या चळवळीत स्वतः अनुभविलेली लोक परिस्थिति याचीं चित्रें प्रथमारंभींच दृष्टीसमोर उभीं राहिलीं. तेव्हां आतां केवळ व्यावहारिक युक्तिवादाचा कांहींच उपयोग होणार नाहीं असें वाटल्यामुळें, आणि ज्यांना संस्कृत किंवा प्राकृत भाषेंत आधार नाहीं म्हणजेच उपपत्ति लागत नाहीं ते अनुस्वार काढून टाकण्यास प्रतिपक्षीयांची मान्यता असल्यामुळें त्याशिवाय बाकीच्यांना आधार आहेत असा त्यांचा जो निश्चित समज आहे तो अगदीं चुकीचा आहे हें सिद्ध करण्यास शास्त्राधारपूर्वकच लेख लिहिला पाहिजे असें विचारांतां ठरलें.

या विषयांत १ अनुस्वार म्हणजे ज्याचा उच्चार स्पष्ट होतो आणि जो अक्षराच्या माथ्यावर टिंबानें (बिंदूनें) लिहितात तो. जसें–संशय, संरक्षण, सिंह इ. २ अनुस्वारालाच त्याच्या पुढील व्यंजनाच्या जातीचा (परसवर्ण) अनुनासिक वर्णादेश होतो. जसें–रङ्ग, पञ्च, कण्ठ, दन्त, कम्प, इ० ३ अनुनासिक ह्याची वर्णांत गणना नाहीं. हा कांहीं शब्दांवर स्वयंसिद्ध असतो व कांहीं शब्दांवर आगम होतो हा अक्षराच्या माथ्यावर(ँ)असा अर्धचंद्राकारावर बिंदून लिहितात पण तें उचित नाहीं. जसें आँ, उँ,ऊँ,महाँ,जघन्वाँ इ० मराठींत कित्येक केवळ प्रयोगी अव्ययावर हा असतो, पण तो टिंबानेंच लिहितात. जसें-आं, अं, हं, उंः, इ० (आँ, अँ, हँ, उँः इ०)

४ अनुनासिककल्प—हाच प्रस्तुत वाद विषयीभूत असल्यामुळें ह्याचे वर्णन पुढें यथाप्रसंगीं येणार आहेच.

वरील चारापैकीं पहिले तीन मात्र संस्कृतांत आणि प्राकृतांत आहेत. पण चौथ्याचें त्या भाषांत अस्तित्वच नाहीं.

आतां पुढील विषयप्रतिपादनाच्या सोयीकरितां वरील चारांना पारिभाषिक संज्ञा करतों. त्या अनुक्रमें अशा—१गोचर, २ परचर, ३ कुमार, ४ अजागल.

येथून पुढें याच संज्ञांचा (नांवांचा) उपयोग केला जाईल. तरी वाचकांनीं याविषयीं सावधान असावें.

संस्कृतांत गोचर (अनुस्वार) कोणाला म्हणतात हें कांहीं मराठी वैयाकरणाला समजलें नव्हतें असें दिसतें म्हणून संस्कृत व्याकरणांत त्याची घटना कसकशी होते तें सांगतों. ते असेः—पदान्तीं 'म्' असून त्याच्यापुढें व्यंजन (हल्) आलें असतां त्या 'म्' ला अनुस्वारादेश होतो. अर्थात् तो त्याच्या उपान्त्य स्वरावर लिहावाच लागतो (मोऽनुस्वारः ८।३।२३) पाणिनीय अष्टाध्यायी.

'म्' किंवा 'न्', अपदान्ती असून त्याच्यापुढें अंतस्थ आणि अनुनासिक (ङ ञ ण न म) यांशिवाय कोणतेंहि व्यंजन असेल तेव्हां त्या न् किंवा म् यांना अनुस्वारादेश होतो. (नश्चापदान्तस्य झलि ८।३।२४) (कोणत्याहि अनुनासिक वर्णापुढें स्वर जोडला कीं त्यासह त्याचें अक्षर बनतें.)

हेंच अनुस्वाराचें मुख्य शास्त्र आहे. ह्यांत आणखी पोटनियम आहेत, पण येथें त्याचें कारण नाहीं.

ह, र, श, ष, स, ह्यांपैकीं कोणतेंहि व्यंजन अनुस्वारापुढें आलें तर तो अनुस्वार कायम राहातो, कारण तेथें परसवर्ण आदेश होण्यास मार्ग नाहीं.

अजागलास शास्त्रसिद्ध भाषेंत अस्तित्व नाहीं. याला वर्णोच्चाराचें जें शास्त्र 'शिक्षा' त्यांतील आधार असे—

शंकितं भीतमुद्धृष्टमव्यक्तमनुनासिकं । काकस्वरं शिरसि गतं तथा स्थानविवर्जितं॥ उपांशुदष्टं त्वरितं निरस्तं। विलंबितं गद्गदितं प्रगीतं। निष्पीडित ग्रस्तपदाक्षरं च। वदेन्नदीनं न तु सानुनास्य ॥ (पाणिनीय शिक्षा ७।३४-३५)

न करालो न लंबोष्ठो नाव्यक्तो नानुनासिकः गद्गदोबद्धजिव्हश्च प्रयोगान् वक्तुमर्हति ॥ (नारदीय शिक्षा २।८।१२)

वरील दोनहि प्रकारच्या शिक्षावाक्यांत वक्त्यानें भाषणांत कोणकोणते दोष न होण्याविषयीं अथवा न करण्याविषयीं दक्ष असलें पाहिजे हेंच सांगितलें आहे आणि त्यांतच सानुनासिक (नाकांतून) भाषण करणें हें दोषार्ह आहे, अर्थात् निषिद्ध आहे, असें स्पष्ट सांगितलें आहे. तेव्हां ज्या शास्त्रानें त्यांचा निषेध केला आहे त्याच शास्त्रांत त्याचें अस्तित्व शक्य नाहीं हेंच सिद्ध होत नाहीं काय?

यावर शंका--संस्कृत भाषेचें शास्त्र कसेंहि असो, पण मराठी भाषेंत जर हे रूढ झाले आहेत तर ते काढून टाकतां येणें शक्य नाहीं. अर्थात् त्यांची शास्त्रीयता स्वीकारणें योग्य नाहीं का? या शंकेचें समाधान-मराठी भाषा ही संस्कृत व प्राकृत या दोनहि भाषे-पासून बनलेली आहे म्हणून त्यांची जी संस्कृति, तीच मराठीमध्यें आनुवंशिकत्वानें उतरली आहे. त्याचें ढळढळीत प्रत्यंतर हेंच कीं, मराठी भाषेच्या उत्पत्तिस्थितिवृद्धीचें मूळ पीठ असा जो बृहन्महाराष्ट्राचा कोंकणव्यतिरिक्त अफाट प्रदेश, त्यांतील लोकांच्या भाषणांत अजागलांचें (अनुच्चारित अनुस्वारांचें) अस्तित्व नाहीं. अर्थात् तीच भाषा शास्त्रसिद्ध आहे आणि कोंकण प्रांतांत मात्र रूढ झालेली जी अजागलप्रचुर मराठी भाषा ती शास्त्रतः निषिद्ध हेंच खरें दिसत आहे. अर्थात् तिला शास्त्रीयता प्राप्त होणें शक्य नाहीं. तथापि तिच्यांतून अजागलांचें उच्चाटन करतां येणें शक्य नाहीं. पण ते लेखनांतून काढून टाकणें सहज सुलभ आणि अत्यावश्यक आहे म्हणून आमचा लेखनापुरता आग्रह आहे व तो सत्य आहे.

यावर शंका—असें जर आहे तर लेखनविषयीभूत जे गोचरादि प्रकार स्वीकारले त्यांत अजागलांचें प्रयोजन काय? समाधान—कोणत्याहि भाषेचे जे जसे उच्चार असतील ते तसे आपल्या लिपीनें लिहितां येतील अशी शक्य तितक्या सोयीची लेखनपध्दति बनविण्याची जर आमची महत्त्वाकांक्षा आहे तर मराठी सर्वसाधारण शिष्ट लेखनांतून जरी अजागल नष्ट करावयाचे तरी त्यांना लेखनपद्धतींतुन नष्ट करतां येत नाहीं. कारण समजा कीं, एखाद्या नाटकलेखकाला लिहावयाच्या नाटकांत जर कांहीं खास कोंकणी पात्रें योजावयाचीं असलीं तर त्यांच्या तोंडीं त्याची अजागलयुक्त भाषाच घातली पाहिजे, अर्थात् तीच लिहिली पाहिजे. मात्र ते अजागल, भिन्नत्वानें समजण्यासाठीं त्यांचें लेखनचिन्ह स्वतंत्र असलें पाहिजे व तें मी सुचवितों तें असें उदा. त्यांनें जर ते घेतलें तर हें मी घेतों. हेंच वाक्य त्यांने जर ते घेतले तर हे मी घेतो, याप्रमाणें लिहावें. (ते, ने, ले, हे, तो.)

# ग्वाल्हेरच्या साहित्यसंमेलनाचें निरीक्षण

## पूर्वार्ध

पुण्याच्या महाराष्ट्रीय साहित्यसंमेलनांत श्रीमंत सरदार चंद्रोजीराव आंग्रे यांनीं तेराव्या साहित्यसंमेलनास ग्वाल्हेरकरांतर्फे निमंत्रण दिल्यावेळेपासून हें संमेलन कितपत यशस्वी होईल याची धाकधूक वाटत होती. ग्वाल्हेर शहर महाराष्ट्रापासून अतिशय दूर; त्यांतून संस्थानी कारभार आणि रीजन्सीचा अधिकार; शिवाय बरीचशी संस्थानी प्रजा उर्दू किंवा हिंदी भाषलाच मातृभाषा मानणारी! अशा या अडचणींत संमेलनास स्थानिक सहानुभूति व बाहेरचा पाठिंबा कितपत मिळेल अशी शंका मनांतून डोकावणें स्वाभाविक होतें. त्यांतून संमेलनाच्या अध्यक्षपदावर वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी श्रीयुत माधवरावजी अणे यांची निवड झालेली ऐकतांच मुंबई शहराच्या एका कोपऱ्यांतून जी ओरड सुरू झाली तीहि कित्येकांस अपशकुनासारखी भासली. तथापि स्वागताध्यक्ष चिंतामणराव वैद्य व कार्याध्यक्ष

चंद्रोजीराव आंग्रे यांनीं आपल्या कार्यकुशलतेनें सर्व विघ्नांचें निरसन करून संमेलन यशस्वी करून दाखविलें, याविषयीं त्यांचें कौतुक करावें तेवढें थोडेंच आहे.

***

साहित्यसंमेलनाचे दिवस जसजसे जवळजवळ येत चालले तसतसा ग्वाल्हेरच्या कार्यकारी मंडळाचा उल्हास व आत्मविश्वास वृद्धिंगत होत चालला. ठिकठिकाणाहून अनेक प्रसिद्ध साहित्यसेवक येणार असल्याचीं पत्रें येऊन थडकलीं; त्याबरोबर त्यांच्या आनंदाला भरती येऊं लागली. पण दुधाच्या कढईत मिठाचा खडा पडावा त्याप्रमाणें तात्यासाहेब केळकर जबलपुरास हिंदुमहासभेकरितां जाणार असल्यानें ग्वाल्हेरीस येऊं शकत नाहींत या वार्तेनें त्यांच्या आनंदांत विरजण पडलें. परंतु हिंदुमहासभेच्या कार्याचें महत्त्व लक्षांत घेऊन ग्वाल्हेरकरांनीं आपल्या मनावरील निराशेची छटा दूर सारली आणि आंखलेला कार्यक्रम तडीस नेण्याची तयारी पूर्ववत् उत्साहानेंच त्यांनीं चालू ठेवली. संमेलनास ग्वाल्हेरदरबाराची सक्रिय सहानुभूति मिळण्याचें निश्चित होतांच प्रतिनिधींकडून राहण्याचा व भोजनाचा खर्च घेतला जाणार नाहीं असें जाहीर करण्यांत आलें. प्रतिनिधींना उतरण्याकरितां कंपूकोठी राजवाड्याची जागा मुक्रर करण्यांत आली. संमेलनाच्या कार्याकरितां सरस्वतीमंदिर शृंगारण्यास सुरुवात झाली. ग्वाल्हेर संस्थानांतील शेतकीखाते, जंगलखातें व औद्योगिक खातें यांच्या विद्यमानें शेतकीचें, हुन्नर कलेचें व उद्योगधंद्यांचें आणि खनिज व उद्भिज वस्तूंचें प्रदर्शन संमेलनाच्या शेजारींच थाटण्यांत आलें.

***

संमेलनास प्रारंभ सात तारखेस सकाळींच होणार असल्यानें सहाव्या तारखेसच बहुतेक प्रतिनिधी येऊन दाखल झाले. त्यांत बेळगांव जिल्हा, गोवें प्रांत, हैद्राबाद, कलकत्ता, काशी, झांशी, सागर, नागपूर, बुलढाणा, उमरावती, जबलपूर, धार, देवास, महू, इंदूर, बडोदें, जयपूर, अजमीर, दिल्ली, मुंबई, पुणें, सांगली, इचलकरंजी, वांई, ठाणें, कल्याण अशा विविध ठिकाणांहून शें-सवाशें प्रतिनिधी येऊन दाखल झाले. ग्वाल्हेरकरांनीं अडीचशें पाहुण्यांची राहण्याची सोय करून ठेविली असल्यानें त्यांना ही अल्पसंख्या पाहून विषाद वाटला असेल. पण उत्तर-हिंदुस्थानाच्या रखरखीत उन्हाळ्यांत इतक्या दूर अंतरावर संमेलनास जाण्याची अनुकूलता असणारे प्रतिनिधी शें-दीडशेंहून अधिक मिळणें आधींच दुरापास्त. त्यांतून ईस्टरच्या सुटींत संमेलनाची चोहोंकडेच गर्दी उसळलेली. कोणी हिंदुसभेच्या कार्यांत निमग्न तर कोणी आपल्या जिल्ह्यांतील किंवा प्रांतांतील राजकीय परिषदेच्या कार्यक्रमांत गढलेला. अशा परिस्थितींत इतके प्रतिनिधी जमले हेंच विशेष. ग्वाल्हेरकरांचें अगत्याचें निमंत्रण आणि प्रतिनिधींच्या मनांतील मातृभाषेचें प्रेम यांच्या संयुक्त प्रेरणेनेंच ग्वाल्हेरीस इतके तरी साहित्यभक्त एकत्रित होऊं शकले. अपरिहार्य कारणामुळें येऊं शकले नाहींत त्यांच्या तारा अगर पत्रें आलीं होतीं. त्यांत श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी), श्रीमंत सयाजीराव गायकवाड, सर तुकोजीराव होळकर, श्रीमंत इचलकरंजीकर, ग्वाल्हेरचे रेसिडेंट, धारचे महाराज, भोपाळचे नबाब, म. गांधी. न. चिं. केळकर, दादासाहेब खापर्डे, दादासाहेब करंदीकर, बॅ. जयकर, वामनराव नाईक वगैरेंचीं नांवें होतीं.

***

परस्थ पाहुणे साहित्यसंमेलनाकरितांच ग्वाल्हेरीस आले होते. ते कांहीं इतर कोणत्या राजकीय चळवळीकरितां आले नव्हते, व ग्वाल्हेरीस तसा कोणताहि राजकीय प्रश्न किंवा प्रसंग आगेमागें उपस्थितहि झालेला नव्हता. असे असतां प्रतिनिधींकडून वाङ्मयविषयाखेरीज इतर कोणत्याहि विषयावरील आपलीं मतें आपण येथें बोलून दाखविणार नाहीं असा कबुली जबाब लिहून घेण्याची जरूरी काय होती. कदाचित् साहित्यसंमेलनास दरबाराची जी सहानुभूति मिळाली ती बहुतकरून त्या अटीवरच मिळाली असल्यानें कार्यकर्त्यांचा नाइलाज झाला. असेल, आणि संस्थानांतील प्रजाजनाना असले ' आडविहिरी 'चे प्रसंग नेहमीं येतात, आणि असल्या अटी न संभाळाव्यात तर असली सोवळी चळवळदेखील करणें मुष्किलीचें होतें हें खरें. तरी पण प्रतिनिधींची तक्रार अशी कीं, असली अट घालण्यांत आली आहे असें स्वागतसभेनें अगोदर जाहीर करावयास हवें होतें. म्हणजे आयत्या वेळीं प्रतिनिधींची जशी फसगत झाली तशी झाली नसती.

***

या अटीमुळें प्रतिनिधींची व स्वतः ग्वाल्हेरच्या मंडळींचीहि निष्कारण कुचंबणा झाली. संमेलनाच्या कार्यक्रमाखेरीज इतर कोणताहि अवांतर कार्यक्रम ठरविल्यास तो दरबाराच्या अटीच्या मर्यादेंत येईल कीं नाहीं याची निश्चित कल्पना कोणासच नसल्यानें इतके प्रतिनिधी परठिकाणाहून येऊन त्यांच्या येण्याचा ग्वाल्हेरकरांना कांहींच लाभ झाला नाहीं आणि प्रतिनिधींच्याहि मनांत आपण इतक्या परिश्रमानें येथें जे आलों ते मेजवान्या झोडण्याकरितां व प्रेक्षणीय स्थळें पाहण्याकरितांच काय असा प्रश्न उद्भवून त्यांनाहि रुखरुख लागून राहिली.

मुंबईचे पां. वा. काणे, काशीचे प्रो. पुणतांबेकर, बुलढाण्याचे यादवराव काळे, नागपूरच्या 'महाराष्ट्र'चे संपादक ओगले, पुण्याचे प्रोफेसर चाफेकर, इंदूरचे श्रीयुत सरवटे, नागपूरचे प्रो. बेहरे व पेंडसे इत्यादि चतुरस्र व विद्वान मंडळी एकत्र जमा झाली असतां त्यांच्या विद्वत्तेचा ग्वाल्हेरकरांना नुसता ओझरता परिचय देखील झाला नाहीं. नाहीं म्हणावयास नाशिकचे रा. सा. वझे, पुण्याचे प्रो. पोतदार, बाबासाहेब देशपांडे, गीतावाचस्पति भिडेशास्त्री यांचीं व्याख्यानें व प्रवचनें कार्यक्रमांत कशींबशीं समाविष्ट झालीं. पण संमेलन समाप्त होऊन प्रतिनिधींचे मोर्चे घराकडे वळल्यानंतर आणि थकलेभागलेले स्थानिक कार्यकर्ते कृतकार्य होऊन विश्रान्तीची अपेक्षा करूं लागल्यानंतर हे असले कार्यक्रम कितपत उत्सुकतेनें तडीस नेले जातात याची ज्यांना माहिती आहे त्यांना जेवढीं प्रवचनें व व्याख्यानें झालीं तेवढ्यानें श्रोत्यांच्या किंवा वक्त्यांच्या मनाची तृप्ति झाली असेल असें म्हणवणार नाहीं.

***

असो. प्रत्यक्ष संमेलनाचा कार्यक्रम अगदींच सुटसुटीत होता व तो दरबारी थाटानें पार पडला. स्वागताध्यक्षांचें भाषण सौजन्यपूर्ण, मार्मिक व ऐतिहासिक माहितीनें भरलेलें असें होतें. अध्यक्ष श्रीयुत अणे यांना आपलें भाषण समग्र लिहून काढण्यास व छापविण्यास फुरसतच मिळाली नाहीं. यामुळें महाराष्ट्रीय साहित्यभक्तांची मोठी हानि झाली. छापील भाषण वाचण्यापेक्षां प्रत्यक्ष भाषण करणें हें अधिक परिणामकारक असतें हें खरें. पण त्याचा लाभ तेथें हजर असतील तेवढ्यांनाच; इतर हजारो साहित्यप्रेमी लोकांची भूक कायमचीच अतृप्त राहिली. अध्यक्षांनीं आपल्या भाषणाचा जो आराखडा तयार केला होता व त्याकरितां जी साधनसामुग्री जुळविली होती त्याची ज्यांस माहिती आहे त्यांना तर अध्यक्षांचें भाषण समग्र तयार होऊन छापलें गेलें नाहीं याची रुखरूख विशेष लागून राहिली असेल. कादंबरीकारांनीं कोणत्या बंधनाचे आंत अवश्य राहिलें पाहिजे व कोणत्या 'बंधनाच्या पलीकडे' पाऊल टाकूं नये, कविता सयमक असावी का निर्यमक असावी, वाङ्मयांत चरित्र ग्रंथांचें स्थान कोणतें, मराठी साहित्याच्या वाढीची खरी कसोटी कोणती या संबंधानें अध्यक्षांचे विचार फारच मार्मिक व मननीय होते.

***

संमेलनाला जे प्रतिनिधी आले होते त्या सर्वांचा विषयनियामक कमिटींत समावेश करण्यांत आला होता व त्या कमिटींत बरीच बोधप्रद अशी चर्चा झाली. संमेलन भरविण्याला परवानगी देण्याचा व संमेलनाच्यां शिलकेंतली चौथाई वसूल करण्याचा अधिकार तेवढा मराठी साहित्य परिषदेकडे असून संमेलनांतील ठरावांची बजावणी करण्याला मात्र परिषद बांधली गेली नाहीं याविषयीं पुष्कळच वाटाघाट झाली आणि परिषदेतर्फे नियमदुरुस्तीचें आश्वासन देण्यांत आल्यावरच प्रतिनिधींनीं आपली तक्रार तहकूब ठेवली. शुद्धलेखनाच्या पद्धतीसंबंधानें, विशेषतः अनुच्चारित अनुस्वार गाळण्यासंबंधानें, अनुकूल व प्रतिकूल अशी बरीच भवति-न-भवति झाली. आणि अखेरीस साधकबाधक माहिती मिळवून अभिप्राय देण्याकरितां साहित्य परिषदेनें एक कमिटी नेमावी असें ठरून हा वाद निकालांत निघाला. शिवभारताबद्दल कल्याणचे श्रीयुत सदाशिवराव दिवेकर यांचे व 'प्रतापगड 'चें युद्ध या युद्धविषयक वाङ्मयाचा नवीन उपक्रम केल्याबद्दल कॅप्टन मोडक यांचे आभार मानण्याचे ठराव विषयनियामक कमिटीनें मंजूर केले. पण त्यानंतर गतसालात प्रसिद्ध झालेल्या अनेक पुस्तकांचीं नांवें पुढें येऊन त्या त्या ग्रंथकारांचें अभिनंदन करण्याच्या सूचना पुढें येऊं लागल्यामुळें अनवस्थाप्रसंग टाळण्याकरितां अशा प्रकारें केवळ मामुली ग्रंथलेखनाबद्दल कोणाचेंहि अभिनंदन करण्याचा ठराव मांडला जाऊं नये असें तत्त्व कमिटीनें मान्य केलें व ही शिफारसपरंपरा बंद करण्यांत आली.

***

कार्याध्यक्ष श्रीमंत सरदार आंग्रे यांनीं शारदामंडळाच्या स्थापनेची सूचना विषयनियामक कमिटीपुढे मांडली आणि तिजविषयीं उपयुक्त चर्चा होऊन योजना निश्चित करण्याकरितां एक मंडळ निवडण्यांत आलें. सरकारनें आक्षेपार्ह ठरवून जप्त केलेल्या वाङ्मयाच्या पुनर्मुद्रणाला परवानगी मिळण्याच्या दृष्टीनें निबंधमालेंतील 'आमच्या देशाची स्थिति' 'काळ' पत्रांतील निवडक निबंध, सावरकर यांचें 'मॅझिनीचें चरित्र' आणि पांगारकर यांचें 'रामदासीबोवा' अशा चार पुस्तकांबद्दल प्रथम सरकारकडे विचारणा करण्यांत यावी असें ठरलें. या ठरावाची चर्चा सुरू असतांना संस्थानी वातावरणांत हा ठराव वावडा ठरतो कीं काय अशी धास्ती वाटूं लागली होती. पण तो गैरसमज लवकरच दूर होऊन सदर ठराव सर्वानुमतें मंजूर झाला. अश्लील वाङ्मयाचा निषेध करण्याचा एक ठराव पुढें आला होता. सत्तेशिवाय नुसत्या निषेधाचा कांहीं उपयोग होत नाहीं, करिता ठराव करण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं असें कमिटींतील लोकमत दिसून आलें. पण प्रत्यक्ष

मेंत मोजून पाहतां तीं समसमान पडलीं, तेव्हां अध्यक्षांनीं आपलें जादा मत देऊन अश्लील वाङ्मयाच्या निषेधाचा गतसालाचा ठराव कंठाळी ठरावांत समाविष्ट केला.

# दंड बैठका व नमस्कार

( लेखक—बाळासाहेब पंतप्रतिनिधि सं० औंध ).

ता. १८ एप्रिल सन १९२८ इ० चे केसरींत "शाळांतील शारीरिक शिक्षण" या मथळ्याखालीं शारीरिक शिक्षण कमिटीचे प्रश्नावलीस कराचीचे इन्जीनिअरिंग कॉलेजाचे प्रिन्सिपाल गंगाधर नीळकंठ गोखले यांनीं पाठविलेलीं उत्तरें छापण्यांत आलीं आहेत तीं आम्ही साग्र वाचून पाहिलीं. गोखले यांचे विचार मननीय आहेत याजबद्दल बिलकुल शंका नाहीं. तथापि त्यांनीं ४१ वे प्रश्नास जें उत्तर दिलें आहे तें व जो आपला अनुभव म्हणून दिला आहे तो मात्र पटण्यासारखा नाहीं.

शक्तीच्या व प्रमाणाच्या बाहेर दंड, बैठका व नमस्काराचा व्यायाम करून शरीरस्वास्थ्य गमाविलेल्या कांहीं व्यक्तींचीं उदाहरणें सांपडूं शकतील. परंतु तेवढ्यावरून या व्यायामापासून शरीरास अपाय होतो असें सर्वसाधारण विधान करून या शरीरबलसंवर्धक व्यायामाविषयीं विद्यार्थीवर्गांत अनुत्साह व अप्रीति उत्पन्न करणें एकंदरींत राष्ट्रीय दृष्ट्या घातुक होईल असें आम्हास वाटतें. कोणताहि व्यायाम योग्य प्रमाणांत केला तरच तो फलदायी होणार हें उघड आहे. मग विशेषत: दंड, बैठका व नमस्कार याच बाबतींतच हा नियम विशेष लागू कां करण्यात यावा तें समजत नाहीं. कोणत्याहि बाबतींत अतिरेक केला असता तो केव्हांहि हानिकारकच होणार. सबब कोणताहि व्यायाम करण्याचा तो प्रत्येक मनुष्यानें आपले शक्तीचे व प्रकृतीचे मानानेच केला पाहिजे.

दंड, बैठका व नमस्कार यांसारखे शरीरबल जोरानें वाढविणारे व्यायाम अत्यंत अवश्यक आहेत. सबब ते कमी करून कधींच चालावयाचें नाहीं. हे व्यायाम योग्य प्रमाणांत अवश्य घेऊन मग आपले सवडीप्रमाणें व आवडीप्रमाणें इतर व्यायाम घेतले पाहिजेत असें आमचें ठाम मत झालें आहे. आम्ही दंड, बैठका व नमस्कार हे तीनहि व्यायाम बरींच वर्षें करून पाहिले असून त्यासंबंधीं आम्हास कोणताच विपरीत अनुभव आलेला नाहीं. नमस्काराचा व्यायाम तर आम्ही या तीनहि व्यायामांत अत्यंत श्रेष्ठ समजतों. आम्ही आज सतत वीस वर्षें नमस्काराचा व्यायाम अगदीं नियमितपणें घेत असून त्याचा आमचे शरीरप्रकृतीवर अत्यंत उत्तम अशा प्रकारचा परिणाम झालेला आहे. नमस्काराचे व्यायामापासून बलसंवर्धन तर होतेंच. परंतु त्याशिवाय उत्तम प्रकारचें आरोग्य व कार्यक्षमता प्राप्त होते हें आम्ही आमच्या वीस वर्षांच्या अनुभवावरून खात्रीनें सांगूं शकतों. नमस्कार घालण्यास सुरुवात केल्यापासून आम्ही कधींहि आजारी पडलों नाहीं. एवढेंच नव्हे तर आम्हास कधीं खोकला पडसें देखील आलें नाहीं. यावरून नमस्काराचे व्यायामाची योग्यता कळून येईल. आम्ही आमचे संस्थानांतून सर्व शाळांतून नमस्काराचा व्यायाम सक्तीचा ठेविला आहे. त्यायोगानें विद्यार्थ्यांचे शरीरावर व आरोग्यावर उत्तम प्रकारचा परिणाम झालेला आहे. आमचेप्रमाणेंच औंध येथील आणखी बऱ्याच लोकांस व मास्तर मंडळीसही अनुभव आलेला आहे.

अशा प्रकारचा, आरोग्य, कार्यक्षमता व दीर्घायुष्य प्राप्त करून देणारा, हा सूर्यनमस्काराचा व्यायाम सर्व शाळा व कॉलेजातून अवश्य सुरू झाला पाहिजे, असें आमचें ठाम मत झालें आहे. व त्याप्रमाणें आम्ही हा व्यायाम आमचे संस्थानांतील सर्व शाळांमधून सुरू केला असून त्यापासून विद्यार्थ्यांचे शरीरप्रकृतीवर फारच उत्कृष्ट परिणाम झाला आहे हें नमूद करण्यास आम्हास फार संतोष वाटता. आमच्या या अनुभवाचा शाळांचे चालक योग्य तो उपयोग करून घेतील असा आम्हास भरंवसा आहे.

# समाजशास्त्रदृष्ट्या शिक्षणाचा विचार

( लेखक—**गो. म. जोशी** )

'Then perhaps we may have done with lies. For in sociology fictions have their uses no doubt, but on the whole they are noxious.' All Carthill.

ॲरिस्टॉटल आपल्या नीतिशास्त्रविषयक चर्चेला ध्येय काय असा प्रश्न विचारून चर्चा करतो आणि आपल्याकडे देखील 'प्रयोजनमनुद्दिश्य न मंदोऽपि प्रवर्तते' असा नैय्यायिकांचा दंडक आहे. म्हणून प्रथमतः समाजांत जें शिक्षण रूढ व्हावें अशी अपेक्षा असेल त्या शिक्षणाचा हेतु काय, त्यापासून आपण समाजावर कोणते सत्परिणाम घडवून आणूं इच्छितों, प्रत्येक कर्माच्या एका टोंकाला हेतु व दुसऱ्या टोंकाला परिणाम हीं असतात व त्यामुळें हेतु निश्चित असून आपण अंगिकारिलेल्या मार्गांत हेतुपरिणामांचें ऐक्य घडवून आणण्याचें सामर्थ्य आहे किंवा नाहीं, या सर्व प्रश्नांची यावच्छक्य असंदिग्ध अशी चर्चा झाली पाहिजे. हेतु अनिश्चित असल्यास ज्याप्रमाणें विनाश त्याप्रमाणें हेतु निश्चित असून मार्ग चुकला असल्यासहि विनाश ठरलेलाच.

या हेतूनें शिक्षणशास्त्रावरील आधुनिक वाङ्मय वाचून पाहिलें तर 'परीक्षा पास होणें' 'उदरनिर्वाहाची सोय होणें' 'व्यक्तीच्या सर्व शक्तींची सम प्रमाणावर वाढ होणें' 'सत्प्रवृत्त, नीतिमान आणि प्रतिष्ठित अशा व्यक्तींची निपज करणें' 'सुदृढ शरीरांत सुदृढ मनाची वाढ करणें' 'संपूर्ण जीवनाची तयारी करणें' इत्यादि ध्येयें सांपडतात आणि वर वर पाहिलें तर हीं ध्येयें बरींच मोहक वाटतात. परंतु शास्त्र या दृष्टीनें छाननी करूं लागलों असतां या सर्व गोंधळांतून कांहींच अर्थ निष्पन्न होत नाहीं. उदाहरणार्थ, सत्प्रवृत्त व नीतिमान व्यक्ति उत्पन्न करणें हें ध्येय ठेवल्याबरोबर एकदम प्रश्न उत्पन्न होतो कीं, नीति म्हणजे काय? सत्प्रवृत्ति कशास म्हणावें? आणि मग अर्थातच आयुष्यक्रमाच्या विविधतेमुळें वेगळाल्या व्यक्ती वेगळालीं उत्तरें सुचवितात. येशु ख्रिस्त ज्याला नीति म्हणेल त्याला फ्रेडरिक निट्शे दुसरेंच नांव देईल हॉब्सच्या मतानें जें चांगलें असेल तें हेकेलच्या मतानें चूक ठरेल; टॉलस्टॉय, गांधी हे ज्याला डोक्यावर घेऊन नाचतील तो डार्विन, हेकेल, वेजमान वगैरेंच्या मतानें आचरटपणा ठरेल. मग त्यांतून शिक्षकानें कोणती नीति गृहीत धरून शिक्षणाची रूपरेषा आंखावयाची? अशा तऱ्हेनें खोल विचार करूं लागलों असतां आज सांगितलेलीं सर्व ध्येयें गैरलागू किंवा अपुरीं ठरूं लागतात. 'संपूर्ण जीवन' या शब्दसमुच्चयामध्यें कांहीं तरी अर्थ असेल अशी सकृद्दर्शनी आशा वाटते. परंतु स्पेन्सरसाहेबाचा 'लिबरल एज्युकेशन' ग्रंथ वाचला म्हणजे ती देखील फोल ठरते.

आर्यसमाजशास्त्रामध्यें याच सूत्राचा अवलंब केलेला आहे. परंतु तेथें त्याचा काय अर्थ केला जातो ही गोष्ट खऱ्या हाडाच्या प्रत्येक ब्राह्मणाला माहीत आहे, निदान ती असावयास तरी पाहिजे. कारण तो नित्यकर्मांतील वैश्वदेव व यज्ञ करूं लागला कीं अग्नीपुढें प्रार्थना करतो कीं 'प्रजाभिरग्ने अमृतत्वं स्याम' म्हणजे हे अग्ने या हिंसाप्रिय सृष्टीमध्यें मी प्रजांच्या रूपांनीं अमृतपद प्राप्त करून घेईन. आतां पुरुष म्हणजे काय? प्रजा म्हणजे काय? प्रजेमुळें या नश्वर सृष्टीमध्यें पुरुषाला लक्षणेनें नव्हे तर प्रत्यक्षतः अमरत्व कसें प्राप्त होतें हा सिद्धान्त रानांत राहणाऱ्या ऋषींच्या शहरांत राहणाऱ्या सुशिक्षित वंशजाना जरी कळला नाहीं तरी तो सिद्धान्त सुप्रसिद्ध वंशशास्त्रज्ञ 'ऑगस्टस वजमान' यानें आपल्या 'दि थिअरी ऑफ हेरिडिटी' या ग्रंथांत वंशशास्त्रदृष्ट्या मांडून दाखविला आहे. आणि तोच सिद्धान्त एकंदर त्याच्या सर्व ग्रंथाचा व उत्क्रांतिशास्त्राचा सारभूत असा आहे. आर्यसमाजशास्त्र हें आजच्या समाजशास्त्रज्ञांच्या कचेरींत रुजू नसल्यामुळें त्याची चर्चा कोणी करीत नाहीं. परंतु त्याशिवाय इतर वर सांगितलेलीं ध्येयें समाजशास्त्रदृष्ट्या अत्यंत अनिश्चित आणि गैरलागू आहेत. 'चॅटरएन हिल' आपल्या 'हेरीडिटी ॲंड सेक्शन्स इन सोशिऑलॉजी' या ग्रंथांत म्हणतो, 'आपली सध्याची शिक्षणपद्धति अत्यंत आचरटपणाची आहे. कारण कीं तींत फक्त व्यक्तिगत जीवनाचाच विचार केलेला असून समष्टिस्वरूपाच्या ध्येयाचा फार तर काय त्याच्या स्वतःच्या पुढील पिढीचा देखील विचार केलेला दिसत नाहीं.' वर उल्लेखिलेला ग्रंथकार पुढे म्हणतो 'The aim of all education to day seems to be to concentrate the present generation on itself' (आजच्या सर्व शिक्षणाचा हेतु आज असलेल्या पिढीला भूतभविष्यकाळ नसल्याप्रमाणें तात्कालिक हिताहिताचा विचार करावयास लावणें असा दिसतो. पान ३०७).

असें होण्याचें कारण हें आहे कीं, आजचें सर्व राज्ययंत्र आणि समाजरचना हीं कांट, फिश्ट वगैरे उदारमतवादी तत्त्ववेत्त्यांच्या मेंदूंत असलेलीं व त्यांनीं कागदावर लिहिलेलीं परंतु सृष्टीमध्यें नसलेलीं उदार तत्त्वें व त्याप्रमाणेंच त्यांच्या पायावर पाय देऊन येणारे उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञ 'फिजिओक्रॅट्स' 'टर्गो' 'अॅडॅम स्मिथ' 'रिकार्डो' 'जॉन स्टुअर्ट मिल' 'बास्टिआ' यांच्या मेंदूंत उठलेल्या कल्पनालहरी यांचीं प्रत्यक्ष स्वरूपें आहेत. आणि त्यामुळें व्यक्तीचा विचार करतांना कांटचें सूत्र Man should be taken as an end in himself and not as means to an end' (समाजशास्त्रामध्यें व्यक्ति हा समाजाचें साधन नसून साध्य मानली पाहिजे) याचा अवलंब केला जातो. परंतु यांत आपला कांहीं घोटाळा होत नसेल अशी तत्त्ववेत्त्या अव्यावहारिक कांटला मुळींच शंका आली नाहीं. परंतु अर्थशास्त्रज्ञ थोडे जास्त व्यावहारिक असल्यामुळें, न जाणो येथें व्यक्ति व समष्टि यांच्यामध्यें विरोध येण्याचा संभव आहे अशी शंका त्यांना आल्याशिवाय राहिली नाहीं. परंतु त्यावर त्यांनीं आपल्या मेंदूंतून शक्कल काढून असें ठरविलें कीं, 'व्यक्तीचें व समाजाचें हित मुळीं एकरूपच असतें.' (पाहा Recordo principles of Political Economy and Taxation.)

व्यक्तीचा फायदा पाहाणें हें समष्टीच्या हिताशीं अत्यंत सुंदर मिलाफ करूं शकतें या मताचें उद्घाटन करणारे वाटेल तेवढे उतारे 'अॅडॅम स्मिथ' (वेल्थ ऑफ दि नेशन्स) 'मिल' 'बॅस्टिया' यांच्या ग्रंथांतून काढून देतां येतील. त्यांना त्यांच्यापैकींच एक परंतु प्राणशास्त्राचा थोडासा गंध असलेला 'मॅंचेस्टर स्कूल ऑफ लिबरॅलिझम' मधील तत्त्ववेत्ता 'हर्बर्ट स्पेन्सर' उत्तर देतो 'एका अर्थानें बोलावयाचें तर समाजाचें हित व्यक्तीचे हिताशीं निगडित झाल्यासारखें दिसतें तर दुसऱ्या अर्थानें व्यक्तीचे हिताचा समाजाचे हिताशीं आत्यंतिक विरोध आहे.' (प्रिन्सिपल्स ऑफ बायोलजी भाग २ रा पाहा.) यांचीं मतें किती अशास्त्रीय आणि भ्रांत आहेत, व त्याचा अवलंब केल्यामुळें युरोपांतील समाजरचना आज कोणत्या अधोगतीला जाऊन पोंचलेली आहे त्याची चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे येथें इतकेंच सांगावयाचें आहे कीं, आजचें युरोपचे राज्ययंत्र, उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञांच्या आणि तत्त्ववेत्त्यांच्या मेंदूंतून निघालेलें कल्पनांचे गुंतवळ किंवा कांटचीं सूत्रें यांचे हुकूम मानावयास सृष्टि तयार नसल्यामुळें सृष्टीमध्यें अशा तऱ्हेची समाजनिरपेक्ष ध्येयरूप व्यक्ति असूं शकेल असें कल्पनाशक्तीला कितीहि ताण दिला तरी प्रतीत होऊं शकत नाहीं. थोरो, टॉलस्टॉय, गांधी हे समाजांतच उत्पन्न होऊं शकतात. आणि तशी एखादी व्यक्ति अस्तित्वांत आली असल्यास समाजशास्त्राशीं त्या व्यक्तीचा कोणत्याहि तऱ्हेचा संबंध पोंचत नाहीं. त्या व्यक्तीला हिमालय किंवा इतर पर्वतांतील सर्व गुहा समाजानें मोकळ्या ठेवलेल्या आहेत. म्हणून व्यक्तींचा विचार करतांना त्या व्यक्ती जे समाज किंवा ज्या तज्जन्य संस्कृतिरूपी महान अवयवांचे घटकावयव असतील, ते समाज व त्या संस्कृती त्याच्या भोंवतालीं पसरलेले इतर समाज व इतर संस्कृती यांच्यापेक्षां या हिंसाप्रिय सृष्टीमध्यें जास्त काळ टिकाव कसा धरूं शकतील याची विवेचना करावयाची असते. आणि त्याप्रमाणें या व्यक्तिरूप अणुरेणुतुल्य घटकावयवाला घडण द्यावयाची असते. किंवा अलीकडील अगदीं शास्त्रीय कांटेतोल भाषेंत सांगावयाचें तर मनुष्य हा समाजाचा एक कण आहे म्हणून प्रथम समाज व त्यानें उत्पन्न केलेल्या संस्कृती यांचे उदयास्त कोणत्या तत्त्वावर होत असतात याची थोडीशी चर्चा केली असतां व्यक्तींच्या घडणीसंबंधीं अनुमानें काढण्यास बरेंच सोपें पडेल.

अलीकडे सुधारणा, प्रगति, सुधारलेलीं राष्ट्रें, मागसलेले समाज वगैरे शब्दांचा उपयोग अनेक वेळां केला जातो. परंतु प्रगति म्हणजे काय, ती मोजण्याचें साधन कोणतें याची रूपरेषा दाखविली जात नाहीं व त्यामुळें आपल्याला आवडती अशी एखादी कल्पना घेऊन ती जेथें दिसून येणार नाहीं त्या समाजांना मागसलेले असें नामाभिधान लाविलें जातें म्हणून प्रथमतः समाजांच्या उदयास्तांचीं तत्त्वें काय आहेत त्याची थोडक्यांत चर्चा करूं. प्रगति दोन प्रकारची असते. पिंडगत किंवा पुरुषगत (Biological and Hereditary) (Sychologcial and Traditional) आणि मानसिक किंवा सांस्कृतिक. त्यांपैकीं पहिल्या प्रगतीचा बीजहेतु हिंदुधर्मशास्त्रकार ज्याला प्रकृति म्हणतात (चातुर्वर्ण्यं प्रकृतिविशेषात् संस्कारवशाच्च वसिष्ठ स्मृति) व हिंदु शारीरशास्त्रज्ञ ज्याला शुक्रबिंदु म्हणतात (शुक्रशोणितसंभवो हि पुरुषः) त्यामध्यें आहे. ही प्रगति फारच मंद म्हणजे नैसर्गिक निवडीच्या तत्त्वावर पिढ्यानुपिढ्या चाललेली असते हा गोष्ट डार्विनपासून वेजमान, हेकेलपर्यंत झाडून सर्व प्राणिशास्त्रज्ञांनीं मान्य केलेली आहे. असें होण्याचे कारणासंबंधीं त्यांच्यामध्यें बारीकसारीक मतभेद आहेत. परंतु मुख्य सिद्धान्त जो प्रगतीचा मंदपणा तो त्या सर्वांना सारखाच मान्य आहे.

तर दुसऱ्या प्रगतीचें स्थान मानसपिंड हें आहे. परंतु विकारात्मक मनामध्यें उत्पन्न होणाऱ्या कल्पना, वासना, भावना त्या मनुष्यापेक्षां फार मोठ्या ( ट्रान्सेंडेंटल ) अवयवांत म्हणजे समाजांतच उत्पन्न होत असल्याकारणानें व त्यांना आवरून धरण्याची सोय सृष्टीनें त्यांच्या शारीर पिंडांत ठेवली नसल्याकारणानें ही प्रगति एकदां सुरू झाली म्हणजे वाटेल तेवढी भराभर जाऊं लागते. अशा तऱ्हेनें या दोन प्रगतींचे बीजहेतु व गति भिन्न असल्यामुळें कोणत्याहि समाजामध्यें काळजी न घेतल्यास या दोन प्रगतींमध्य लवकरच विषमता उत्पन्न होऊं लागते आणि अशी विषमता उत्पन्न होऊं लागली म्हणजे समाजांत तीन पर्याय उत्पन्न होऊं लागतात.

## पहिला पर्याय

पहिला—पिंडदृष्ट्या सुदृढ परंतु सामाजिक संस्कृतीच्या दृष्टीनें अनुत्क्रांत आणि निकृष्ट अवस्थेत असलेला समाज. भूतकाळामध्यें असे होऊन गेलेले समाज गोथ, हूण, वेंडाल वगैरे लोकांचे होत. त्यांनीं भौतिक शक्तीचें कार्य जें युद्ध व विनाश हें केल्यानंतर ते जगतितलावरून नष्ट झाले. एका विवक्षित काळीं रणसंग्रामपटु व तेजस्वी असलेले समाज उत्क्रांतीच्या झगड्यांत जगत नाहींत आणि अयुध्यमान समाज मरत नाहींत हे दोनहि सिद्धान्त पाहिले म्हणजे अन्वयव्यतिरेकानें समाजधारणेमध्यें युद्ध किती थोडें कार्य करतें हें सहज दिसून येईल आणि तें बरोबरहि आहे. कारण युध्द हें निसर्ग व समाज यांच्या सीमेवर आहे. निसर्गांत जीवनकलह आहे तर समाजांत कलहशांतीचा प्रयत्न आहे. या वर उल्लेखिलेल्या लोकांनीं केवढाल्या लढाया मारल्या तरी देखील त्यांना समाजस्थिति कायम ठेवतां आली नाहीं, ही गोष्ट पुढें असून देखील १७ व्या शतकापूर्वी जवळ जवळ दोन हजार वर्षें आहे हीच समाजरचना कायम असलेली व त्या शतकानंतरहि तीच समाजरचना कायम असलेली हिंदु संस्कृति सतराव्या शतकांत मारलेल्या व वरील लोकांनीं मारलेल्या लढायांशीं तुलना करतां भातुकलींतील भासणाऱ्या लढाया मारून स्थिर केली गेली असल्या तऱ्हेच्या खुळचट आणि बावळट कल्पना आमच्याकडे पसरविल्या जाव्या हें आश्चर्य नव्हे काय ! हूण लोकांच्या युद्धाचें एडवर्ड गिबन आपल्या ' डिक्लाईन अँड फॉल ऑफ दि रोमन एम्पायर ' या ग्रंथामध्यें वर्णन करतो ' युक्झीनपासून अॅड्रिॲटिकपर्यंतचा पांचशें मैल रुंदीचा सर्व टापू ॲटिला या हूण सरदारानें आणिलेल्या हूण सैनिकांनीं स्वारी करून व जिंकून एकदम फस्त केला.' या लोकांनीं केलेल्या स्वाऱ्यांचीं वर्णनें मूळ गिबनमधून आमच्या इकडे शौर्याच्या वेळीं अवेळीं गप्पा मारणारांनीं जरूर वाचून पाहावींत म्हणजे युद्धाचें समाजधारणेमध्यें किती थोडें कार्य आहे तें त्यांना समजून येईल.

## दुसरा पर्याय

दुसरा—पिंडगत प्रगतीकडे दुर्लक्ष करून नुसत्या सांस्कृतिक प्रगतीच्या जोरावर मानवोत्क्रांति करूं इच्छिणारे समाज भूतकाळीं होऊन गेले. असे समाज म्हणजे अथेन्स, रोम, इजिप्त देशांतील संस्कृति व आधुनिक काळीं युरोपच्या विकृतीनें घेरलेलीं सर्व राष्ट्रें. असे समाज या जगांतून नष्ट होतात. परंतु मानसपिंडांत उत्पन्न झालेल्या कांहीं कल्पना ते जगाला वारसा म्हणून ठेवीत असतात. त्याप्रमाणें अथेन्सचें कलाकौशल्य व तत्त्वज्ञान आणि रोमचें राज्ययंत्र व कायदा हीं आजहि प्रतीत होऊं शकतात. आतां येथें युरोपियन विकृतीला या कलमामध्यें घालण्याचा आम्हाला काय अधिकार आहे असा प्रश्न उत्पन्न होणें शक्य आहे. आम्हाला असा कांहींच अधिकार नाहीं. परंतु त्यांच्यांतीलच मोठमोठाले आचार्य आपल्या संस्कृतीचें ध्येय सांगतांना तशी व्याख्या करीत असतात. डॉ. रिची आपल्या डार्विनिझम् आणि पॉलिटिक्स ग्रंथांत म्हणतात, आनुवंशिक गुण वगळून मनुष्याच्या उन्नतीस ज्या युक्त्या मदत करतात त्यांची बेरीज म्हणजे संस्कृति. अशा समाजाची—मानव प्राण्याची चुटकीसारखी प्रगति घडवून आणण्याच्या गडबडींत पिंडगत अधोगति होत असते. चार्लस प्रेसकॉट हा अमेरिकन इतिहासकार म्हणतो कीं, 'रोमच्या साम्राज्यानें इतर सर्व साम्राज्यांप्रमाणेंच मानववंशाची अधोगतीच केली. ज्या संस्कृति गेल्या त्या गेल्या. परंतु आज असलेल्या युरोपियन समाजाची स्थिति काय आहे याचें थोडेसें दिग्दर्शन अस्थानीं होणार नाहीं. जे. बी. हेक्रॅफ्ट आपल्या डार्विनिझम अँड रेस प्रोग्रेस ग्रंथांत म्हणतो, 'आधुनिक समाजामध्यें व्यक्तींची जी फाजील काळजी घेतली जाते त्याचा प्रत्यक्ष परिणाम म्हणून त्या समाजामध्यें वंशांची अधोगति होत चालली आहे ही गोष्ट सहजच दिसून येईल.' तोच ग्रंथकार पुढें म्हणतो, रोगप्रतिबंधक वैद्यकीच्या प्रगतीमुळें व बाह्य परिस्थितीनें पिंडाला दीर्घायुष्य उत्पन्न केल्यामुळें समाजांतील वंश अधोगतीला चाललेले आहेत. कारण कीं रानटी मानल्या गेलेल्या काळांत समाजांतील ज्या व्यक्ती दुर्बल असल्याकारणानें आयुष्याच्या सुरुवातीलाच नैसर्गिक निवडीच्या तत्त्वावर नष्ट होत असत त्या आज जास्त दिवस जगून प्रजोत्पादन करूं शकतात व ती सर्व दुर्बल प्रजा प्रत्येक

पिढीला वाढत चाललेली आहे.असेंच मत डॉ. अर्न्स्ट हेकेल यानें आपल्या हिस्टरी ऑफ क्रिएशन ग्रंथांत नमूद केलें आहे. परंतु यापेक्षां जॉर्ज चॅटरटन हिल यानें आपल्या हेरेडिटी आणि सिलेक्शन इन सोशिऑलॉजी या ग्रंथांत जास्त स्पष्ट मत दिलेलें आहे. तो म्हणतो,पाश्चात्य संस्कृतीमध्यें पिंडगत प्रगति व सांस्कृतिक प्रगति या दोनहि बाबतींत आज भयंकर अधोगति झालेली आहे. युद्धशास्त्रामध्यें आपण फार पुढें गेलेले असल्यामुळें इतर संस्कृति जरी आपल्यावर हल्ला करूं शकल्या नाहींत तरीहि अंतर्गत विकृतीमुळें आपल्या संस्कृतीचा नाश होऊन तुर्की साम्राजाच्या नाशाची पुनरावृत्ति फारच मोठ्या प्रमाणावर घडून येईल. याशिवाय या बाबतींत अपराधविज्ञानशास्त्र मनोविकृतिशास्त्र, गर्भविज्ञानशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र, गरमी—परमाशास्त्र, वगैरे अनेक शास्त्रांचे आधार देणें शक्य आहे. परंतु विस्तारभयास्तव ते देतां यत नाहींत.

## तिसरा पर्याय

तिसरा—पिंडगत प्रगति व सांस्कृतिक प्रगति सम प्रमाणावर घडवून आणूं इच्छिणारे समाज. हे समाज स्वतःहि नष्ट होत नाहींत व आपली संस्कृतीहि नष्ट होऊं देत नाहींत. किंचित्काळ नुसत्या पिंडदृष्ट्या सुदृढ समाजापुढें त्यांना नमतें घ्यावें लागतें. ही स्थिति मुसलमानांच्या स्वाऱ्यापुढें हिंदु समाजाची झाली होती. किंचित्काळ नुसत्या दिखाऊ संस्कृतीपुढें त्यांना हटावें लागतें. कारण दिखाऊ संस्कृतीचा मानसपिंडाशीं संबंध असल्यामुळें तिच्यामध्यें तात्कालिक यश मिळवून देण्याचें सामर्थ्य आहे. ही स्थिति आज हिंदु समाजाची झालेली आहे. परंतु येथें प्रश्न मात्र अत्यंत बिकट होऊन बसतो. पिंडप्रगति सृष्टि करीत असते व सृष्टि एडिसनच्या लाखों शोधानीं किंवा जर्मनांच्या झेपेलिनांनीं कितीहि जरब दिली तरी आपली गति वाढविण्यास तयार नाहीं व मानस प्रगति आपली गति कमी करण्यास तयार नाहीं. पुष्कळ वेळां पिंडप्रगति एक असून संस्कार वेगळे असतील आणि कांहीं वेळां संस्कार एक असून पिंडप्रगति वेगळी असेल. परंतु या दोनहि स्थितींत नाश हा निश्चित ठेवलेलाच समजावा. अकबर बादशहाला राजा झाल्याबरोबर आपला वंश व रजपूत वंश समान दिसूं लागून मोंगलांनीं रजपूत रक्ताचे मिश्रण करण्यास सुरुवात केली व त्यामुळें चौथ्या पिढीलाच त्या वंशाची अधोगति झाली. बादशहा औरंगजेबाचें सर्व चरित्र प्रो. फेरी हा ज्याला. जन्माचा गुन्हेगार 'बॉर्न क्रिमिनल' म्हणतो त्या स्वरूपाचें आहे व त्याच्यानंतर सर्वत्र अंधेर हीच स्थिति सर्व मुसलमानी संस्कृतीची अठराव्या शतकांत झाली होती असें कार्टहिल म्हणतो. रजपुतांनीं मात्र समसंस्कारांनीं भुलून न जातां आपला वंश वेगळा आहे ही गोष्ट लक्षांत ठेवून त्याचें रक्षण केलें व ते वंश आज शिल्लक आहेत. हीच स्थिति जगांतील सर्व राजवंशांची झाली. जो राजसत्तेचा तो द्रव्याचाहि परिणाम समाजांतील घटकावयवांवर होत असतो. कारण कीं समद्रव्यानेंहि समान संस्कृतीचा भास होऊं लागतो. मग येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं कोणतेहि समाज शाश्वत राहूं नयेत असा सृष्टीचा नियम आहे किंवा काय? कांहीं शास्त्रज्ञब्रुवांनीं स्थितिलय हा नियम समाजांना लागू आहे अशीं विधानें केलेलीं आहेत. परंतु ऑगस्टस वेजमान त्यांना उत्तर देतो कीं प्रत्येक जातीनें उत्क्रान्ति व नाश यांच्या चक्रांतून गेलेंच पाहिजे असें नाहीं. अशा तऱ्हेचे दोन समाज या जगांत आहेत;एक ज्यू समाज व दुसरा जातिसंघटित हिंदु समाज. येथेंच आपणाला पिंडप्रगति व सामाजिक प्रगति यांचा मेळ घातलेला दिसतो. हिंदुस्थानाचा इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो हिंदुधर्माच्या गंभीर जलाशयावर तरंग क्वचितच उठतात. याचा राजसत्ता किंवा शारीरिक ऱ्हास याच्याशीं कोणताहि संबंध नाहीं. जॉर्ज चॅटरटन हि ज्यू समाजाबद्दल म्हणते' 'शारीरिक दृष्ट्या निश्चित खाली असून देखील हा समाज युरोपांत जीव धरून राहिला ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट आहे. आणि मध्ययुगांत तर राजसत्तेचा जेथें म्हणून यत्किंचितहि संबंध पोंचला असेल अशा सर्व धंद्यांतून कायद्यानें त्यांची हांकलपट्टी केलेली होती.' वरील चर्चेवरून उत्पन्न होणाऱ्या सिद्धान्ताचा परामर्ष पुढील लेखांत घेऊं.

# विदर्भ पंचांगनिर्णय परिषद

आगाऊ जाहीर केल्याप्रमाणें सदरील परिषद ता. १५ एप्रिल रोजीं दुपारीं १२ ते ५ पर्यंत गिरोली येथें परमहंस सच्चिदानंदस्वामीमहाराजांचे देवालयांत भरली होती. स्वागताध्यक्ष श्री. दादासाहेब थत्ते वकील हे होते. विदर्भांत चालू असलेल्या निरयन पंचांगांपैकीं कोणतें पंचांग वापरणें योग्य आहे या व्यावहारिक प्रश्नाचा निर्णय करण्याकरितां ही परिषद बोलाविली आहे असें

सांगून त्यांनीं अध्यक्षाची सूचना मांडली. तिला रीतसर अनुमोदन मिळाल्यावर श्री. के. ल. दप्तरी हे अध्यक्षस्थानापन्न झाले. अध्यक्षांनीं वाचून दाखविलेल्या आपल्या भाषणांत सभेपुढील प्रश्नांचें स्पष्टीकरण करून ग्रहलाघवी, टिळक, केतकी पंचांग यांच्या ग्राह्याग्राह्याचें सुबोध निरूपण केलेलें होतें. सभेला श्रीपाद कृष्ण कोल्हटकरादिकांकडून सहानुभूतिपर संदेश आले होते. सभेंत एकंदर तीन ठराव एकमतानें मान्य करण्यांत आले. नंतर अध्यक्षांनीं वे. शा. सं. मोघे यांचें एक पत्र वाचून दाखविलें. त्यांत त्यांनीं मोघे हे ग्रहलाघवीय पंचांगेंहि करतात अशा उठलेल्या कंड्या खोट्या असल्याचें लिहिलें होतें.

सभेंत पास झालेले ठरावः—( १ ) पूर्वपरंपरेनें चालत आलेलें ग्रहलाघवी पंचांग व सांगलीच्या ज्योतिषसंमेलनांत विद्वान लोकांनीं ठरविलेलें शुद्ध पंचांग यांपैकीं ग्रहलाघवीय पंचांगांतलें गणित बीजसंस्कृत नसल्यानें दृक्प्रत्ययास मिळत नाहीं. तेव्हां सर्व जनतेचीं धर्मकृत्यें बरोबर वेळेवर व्हावींत म्हणून ही परिषद सांगली परिषदेनें केलेल्या ठरावाप्रमाणें होणारीं पंचांगें हीच सर्व लोकांनीं वापरावींत अशी शिफारस करते.

( २ ) ग्रहलाघवीय पंचांगें करणारे कांहीं लोक सामान्य लोकांच्या दृक्प्रत्ययास येणाऱ्या उदयास्त व ग्रहणादि गोष्टी मात्र शुद्ध पंचांगाशीं मिळतील अशा देतात म्हणून ही परिषद अशा लोकांचा निषेध करते व प्रामाणिकपणें ग्रहलाघवी पंचांगें वापरणारांनीं असलीं पंचांगें वापरूं नयेत अशी विनंति करते.

( ३ ) सांगली परिषदेनें केलेल्या ठरावाला अनुसरून होणाऱ्या पंचांगांचा प्रसार विदर्भांत करण्यासाठीं कमिटी नेमून तिजकडे खालील कामें सोंपवावींत.

(अ नवीन करणलता ग्रंथ शिकवण्याची व्यवस्था करणें ( आ ) आपल्या प्रांतांत अशीं पंचांगें करणारांस द्रव्यसाहाय्य व इतरहि मार्गांनें मदत करणें ( इ ) विदर्भांतील सर्व गांवीं नवीन पंचांगाचा प्रसार करणें.

कमिटींतील गृहस्थांचीं नांवेंः—राम बापूसाहेब लोथे ( अध्यक्ष ), दास भटजी अयाचित ( उपाध्यक्ष ), सखाजीशास्त्री शुक्ल, नारायण रामचंद्र लोथे, नरहर लक्ष्मण जोशी ( चिटणीस ), देवीदास आप्पाजी जोशी ( सेक्रेटरी ),श्री. मा. ना. डाऊस, पां. दा. थत्ते, कृष्णशास्त्री पुराड उपाध्ये, वि. तु. कविमंडन, यादवराव जहागीरदार, नारायणशास्त्री तळेगांवकर, राजेश्वर माधव कस्तुरे ( सभासद ). याप्रमाणें कामकाज झाल्यावर अध्यक्षांनीं समारोपादाखल भाषण केलें त्यांत त्यांनीं होतकरू तरुणांना ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करण्याचा उपदेश केला, नंतर आभारप्रदर्शन, पानसुपारी होऊन सभा यशस्वीपणें समाप्त झाली.

# मराठी लेखनशुद्धि

( लेखक—**गोविंद पांडुरंग पावशे**, सातारा. )

अजागल आणि कुमार हे एकाच जातीचे आहेत असें बहुतेक समजतात. पण तें चुकीचें आहे.शिक्षा ग्रंथांत कुमाराचें जें वर्णन केलें आहे त्यांत कुमाराला 'रंग वर्ण' ही संज्ञा केली आहे व तो द्विमात्रक असतो असें सांगितलें आहे आणि अजागलास मात्रात्व मुळींच नाहीं म्हणून तो तज्जातीय नाहीं.

उदा.—'म्हणे विश्वामित्र स्वमनिं सकळांचे भरवसे' हें शिखरिणी वृत्त आहे म्हणून त्यांतील स्वमनिं हा 'न' गण आहे. अर्थात् निं हें अक्षर लघु (एक मात्रक) आहे व त्याच्यावर अजागल असून तें द्विमात्रक झालें नाहीं.

एतावता संस्कृत, प्राकृत व मराठी या तीनहि भाषांत अजागलास शास्त्रतः अस्तित्व नाहीं; म्हणून जें जेथें नाहीं तें तेथें आहे असें म्हणणें हें अज्ञानाचें लक्षण ठरेल. (अवस्तुनि वस्त्वारोपोऽज्ञानम्). असो. आतां अजागलसमर्थनकारांच्या या मताचा पूर्वपक्ष ग्रहण करून त्याच्या निवारणासंबंधीं विवरण करतों तें असें—

वस्तुतः लेखनांतील जीं स्थळें अजागलक्षम आहेत असें ज्यांना वाटत असेल त्यांनीं तीं सारीं टिपून काढून त्या त्या ठिकाणच्या अजागलांचें सोपपात्तिक समर्थन करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. पण कोणीहि अजागलवादी वैयाकरणांनीं किंवा इतर लेखकांनीं तसें केलेलें दिसून आलें नाहीं. नाहीं म्हणावयाला जोशीबोवांनीं आपल्या प्रा. बो' व्या.त कारक प्रत्ययासंबंधानें कांहींसा ऊहापोह केलेला आहे. पण त्यांतहि उपपत्तीपेक्षां बालिश कोटिक्रम आणि प्रच्छन्नतेनें देशस्थाविषयीं तुच्छता यांचाच अधिक उपयोग केला आहे!

येथें वाचकांना एक धोक्याची सूचना देऊन ठेवता कीं या लेखांतील देशस्थ आणि कोंकणस्थ या शब्दांपासून देशावरची भाषा बोलणारा तो देशस्थ

आणि कोंकणांतली भाषा बोलणारा तो कोंकणस्थ इतकाच अर्थबोध सावधानतेनें घ्यावा.

'विविधज्ञानविस्तार' मासिकाच्या माहे आक्टोबर १९२५ च्या अंकांत गोविंद कृष्ण मोडक यांनीं 'मारोपंता व आजचें शुद्धलेखन' या मथळ्याखालीं एक समतोल आणि विचार-परिप्लुत लेख लिहिला आहे. त्यांत अनुस्वारासंबंधानें बऱ्याच विचारणीय सूचना केल्या आहेत. व अजागलांचें लेखन टिंबानें न लिहितां पोकळ पूज्यानें लिहावें असेंहि सुचविलें आहे. पण अजागल-रक्षणाचे कामीं मात्र त्यांची कांहीं अंशीं अंधश्रद्धाच दिसत आहे.

त्यानंतर 'केसरीच्या ता. २०।४।२६ च्या अंकांत दत्तात्रय केशव केळकर बी. ए. मु. पाचगणी यांनीं 'मराठी लिपींतील अनुच्चारित अनुस्वारांची अडगळ' या मथळ्याखालीं जो लेख दिला आहे त्यांत त्यांनीं मराठी लेखनांतून अजागलांचें उच्चाटन करावें हेंच सुचविलें आहे.

## अजागलांची उपपत्ति

केळकर यांच्या वरील लेखास प्रत्युत्तर देण्याच्या निमित्तानें 'केसरी'च्याच ता. ४।५।२६ च्या अंकांत कृ. पां. कुलकर्णी एम. ए. सातारा यांनीं एक लेख दिला आहे. त्यांत त्यांनीं अजागलांच्या समर्थनार्थ जी शास्त्रीय उपपत्ति दिली आहे, तीमध्यें मुख्यत्वें कारक प्रत्ययांपैकीं मराठींत जे अजागलक्षम होतात ते त्यांच्या मूळ संस्कृत व प्राकृत प्रत्ययापासून कसकसे निष्पन्न होतात तें दाखवून अजागलांचें मंडनपूर्वक समर्थन केले आहे आणि तसेच थोडके आख्यात व कृत् प्रत्यय आणि तद्धित प्रत्यय यांच्यासंबंधीं उदाहरणें मात्र दिलीं आहेत आणि शेवटीं 'इतर प्रत्ययांतील अनुस्वारांची अशीच उपपत्ति लावतां येईल' (शिष्टं स्पष्टम्) असा शेरा दिला आहे.

वर सांगितलेल्या उपपत्तींत जे संस्कृत प्रत्यय दिले आहेत त्यांतील कांहीं वास्तविक नाहींत आणि कांहींत सुसंगति नाहीं. संस्कृत प्रत्ययापासून मराठी प्रत्यय निष्पन्न करण्याची विचारसरणीच चुकीची दिसत आहे. तात्पर्य हेंच कीं ही उपपत्ति कोणाहि तज्ज्ञास पटणार नाहीं. अजागलांना संस्कृतांत किंवा प्राकृतांत व्युत्पत्तीचा आधार आहे असें म्हणणारे पुष्कळच आहेत. पण ती व्युत्पत्ति कसली आणि आधार कसला हें दाखविण्यास प्रायः कोणी सिद्ध होत नाहीं; त्यामुळें त्याविषयीं त्यांची विचारसरणी कशी आहे आणि त्या व्युत्पत्तीचीं तत्त्वें कोणतीं ह्यांचा बरोबर थांग लागत नव्हता; पण कुलकर्णी यांच्या सदरहू लेखामुळें सरणीचें धोरण व तीं तत्त्वें लक्षांत आलीं हें एक अनायासें मोठेंच काम झालें.

लेखनांतील अजागलक्षम स्थानांची निवड करून तीं स्थानें आजपर्यंत कोणीहि प्रसिद्ध केलीं नस. त्यामुळें त्या त्या ठिकाणच्या अजागलास पृथक्त्वानें उपस्थित करून त्यांच्या निरासाची सिद्धता करतां येत नाहीं व त्याचें कारणहि नाहीं. म्हणून आतां त्यांचे समर्थन ज्या तत्त्वांच्या आधारानें केलें जाणें संभवनीय आहे तेवढींच उपस्थित करून त्यांचा फोलपणा दाखवून देतों. तो असा—

आतां अगोदर ज्या गोष्टीचा उलगडा करणें प्राप्त आहे त्यांतील पहिली गोष्ट ही कीं, संस्कृतांत व प्राकृतांत ज्यांची उपपत्ति लागत नाहीं ते अजागल काढून टाकावे हा ठराव बहुतेकांना मान्य झाला आहे व ज्यांना तो मान्य आहे त्यांच्याच मतानें असें सिद्ध होत आहे कीं तसले अजागल कोंकणस्थी भाषेंत आहेत (पुष्कळसे तेच आहेत). अर्थात् ते संस्कृतांतील किंवा प्राकृतांतील अनुस्वारांचे किंवा अनुनासिक वर्णांचे अपभ्रंश नव्हत, म्हणजेच त्यांना झालेला आदेश नव्हत. यावरून अजागलांच्या उत्पत्तीला सं. तील किंवा प्रा. तील अनुस्वार किंवा अनुनासिक वर्ण कारणीभूत नसतात आणि म्हणून इतर (समर्थनविषयीभूत) जे अजागल त्यांचेंहि जन्मनातें सं. तील किंवा प्रा. तील अनुस्वाराशीं किंवा अनुनासिक वर्णाशीं जोडूं पाहाणें निरर्थक आहे.

दुसरी गोष्ट ही कीं, उपर्युक्त दुसऱ्या प्रकारचे जे अजागल त्यांना मराठींत अस्तित्व आहे आणि त्यांना संस्कृतांत किंवा प्राकृतांत व्युत्पत्तीचा किंवा उपपत्तीचा आधार आहे असा जो पूर्वपक्ष आम्ही वादाकरितां स्वीकारला आहे तो कोंकणस्थी भाषेसंबंधाने स्वीकारला आहे.

आतां पूर्वसंकल्पानुसार अजागलसमर्थनाचीं तत्त्वें (गमकें) त्यांच्या निरसनाकरितां उपस्थित करतों तीं अशीं:—

१ करणम्, धरणम्, हसनम्, इ. सं. शब्दांपासून मराठींत करणें, धरणें, हंसणें इ. शब्द होतात.

येथें सं. शब्दाच्या अंत्य 'म्' चा अजागल बनतो. आणि त्यांच्या उपान्त्य अचा ए होतो व त्यांच्यावर तो अजागल बसतो. म्हणजे याचा शास्त्रीय भाषेंत स्पष्ट अर्थ असा आहे कीं, त्या मकाराला अजागल आदेश होतो. पण हें म्हणणें निखालस अशुद्ध आहे.

मोठमोठ्या कुशाग्रबुद्धीच्या विद्वानांनीं हें तत्त्व प्रस्थापित केलें असल्यामुळें तें अशुद्ध आहे असें म्हणणें सहजासहजीं कोणालाहि पटणार नाहीं. कारण, करणम्—करणें; धरणम्—धरणें; हसनम्—हंसणें अशीं रूपांतरें होणें हें अगदीं स्वाभाविक आहे हें

कोणालाहि चटकन पटतें. त्यामुळें त्याविरुद्ध माझ्यासारख्या यःकश्चित् मनुष्याचा युक्तिवाद ऐकून घ्यावयालाहि कोणी तयार होत नाहीं. पण वाचकांमध्यें थोडे तरी तथ्यजिज्ञासू असतीलच आणि ते माझ्या म्हणण्याचा विचार करतील अशी मला आशा आहे.

## अजागलवादी विद्वानांस प्रश्न

प्रश्न १ला—आतां येथें अजागलवादी विद्वानांस पहिला एक असा प्रश्न करतों कीं, हंसणें, याच्या 'णें' वरील अजागल हा जसा 'म्' चा झाला तसा त्याच्या आद्य 'हं' वरील अजागल कोणाचा झाला?

प्रश्न २ रा—ज्ञानम्, धनम्, फलम् इ० सं० शब्दांच्या अन्त्य 'म्' चा वरीलप्रमाणेंच लोप होऊन ज्ञान, धन, फल इ० शेंकडो शब्द मराठींत रूढ झालेले आहेत तर मग त्यांच्या अन्त्याक्षरावर त्या लुप्त 'म्' चे अजागल होऊन कां बसत नाहींत?

प्रश्न ३ रा—मरणें-मरण; वळणें-वळण; कालवणें-कालवण इ०

न० लिं० उभयविध शब्दांपैकीं एकारान्तावरच अजागलांनीं कां बसावें? किंवा त्यांच्या अन्त्य 'ए' या संयुक्त स्वरापैकीं ( अ + इ- ई ) पुढच्या 'इ' मध्येंच अजागलचुंबक धर्म आहे काय?

प्रश्न ४ था—दिलें, केलें, घेतलें इ. जे अजागलयुक्त एकारान्त शब्द लिहिले जातात, तेच शब्द देशावर व कोंकणांतहि आणि संभावित शिष्ट लोकांच्याहि बोलण्यांत प्रायः दिले, केले, घेतले. (अंत्य 'अ' चा उच्चार किंचित् उदात्त करून) असे उच्चारिले जातात. अर्थात् त्या अच्या पुढचा इ स्वर नष्ट होत असतो, आणि अलीकडे संवादात्मक भाषणाचें (विशेषतः स्त्रियांचें) लेखन करण्यांत ते शब्द दिलं, केलं, घेतलं इ. प्रकारें लिहिण्याचा जो प्रघात पडला आहे त्याचें कारण काय? त्या 'इ' बरोबरच तो अजागल जात नाहीं काय?

प्रश्न ५ वा—बरें, त्या अवशिष्ट अचा उच्चार उदात्त करावा हें समजण्याकरितां ते अजागल लिहिले जातात असें मानावें तर 'अग, तिकड काय बघतेस आधी इकड बघ' असलें वाक्य 'अगं तिकडं काय बघतेस आधीं इकडं बघ' असें कां लिहूं नये? अथवा लिहीत नाहींत? असो. आतां इतकेंच पुरें.

२—वल्हितव्यम्-बोलावें; चलितव्यम्-चालावें; कर्तव्यम्-करावें इ. शब्दयुग्मांतील मराठी शब्दांच्या अंतीं जे अजागल आहेत ते संस्कृत शब्दांचा लुप्त होणारा जो अन्त्य 'म्' त्याला आदेश झालेले आहेत. यावरून आदेशाचें तत्त्व पहिल्या प्रकारांत आणि यांत एकच आहे. पण प्रत्ययनिष्पत्तीच्या तत्त्वासंबंधीं विचारसरणी विलक्षणच दिसत आहे. **पण त्याविषयीं ऊहापोह येथें कर्तव्य नाहीं.**

३ दंत-दांत; कंठ-कांठ; ग्रंथि-गांठ; घंटा-घांट; इ. शब्द युग्मांतील मराठी शब्दांच्या अद्याक्षरावरील जे अजागल आहेत ते सं. शब्दांतील त्याच अक्षरावरील गोचराला आदेश झाले आहेत.

४ श्यामल-सांवळा; कोमल-कोंवळा; सीमा शींव; हिम- हिंव; ग्राम-गांव; नाम- नांव; इ. शब्दयुग्मांतील मराठी शब्दांवर जे अजागल आहेत ते सं. शब्दांतील मकाराला आदेश झाले आहेत. आणि त्याच मकाराला दुसरा वकारादेशहि झाला आहे हा यामध्यें विशेष आहे.

५ मोत्तिअं—मोतीं; तलअं-तळें; बीजम्- ह्यांतील मोत्तिअं, तलअं हे दोनहि शब्द प्राकृतांतील असून त्यांच्या अंतीं जे अनुस्वार आहेत ते गोचर आहेत. आणि मराठींतील अजागल हे त्यांनाच झालेले आदेश असून ते उपोपान्त्यावर जाऊन बसले आहेत. त्याचप्रमाणें बीजम् या सं. शब्दाच्या अन्त्य 'म्' चा अजागल होऊन तो बीं( मराठी ) याच्या अन्त्यावर जाऊन बसला आहे म्हणजे हा दोन वर्ण टाकून गेला आहे.

६ मराठींतील अनेक वचनी सामान्य रूपावर जे अजागल येतात त्याविषयीं कुलकर्णी यांनीं अशी एक उपपत्ति बसविली आहे कीं, संस्कृतांत षष्ठीच्या ब. व. 'नाम्' प्रत्ययाच्या योगानें जें शब्दाचें प्रत्यययुक्त रूप तयार होतें, व नंतर त्याचेंच प्राकृतांत जें अपभ्रष्ट रूप होत त्यांतला प्रत्ययांश जाऊन जें रूप शिल्लक राहातें, तसेंच मराठींतील कोणत्याहि शब्दाचें अनेक वचनी सामान्य रूप होत असतें. म्हणून त्या लुप्त होणाऱ्या 'नाम्' प्रत्ययाच्या मकाराचा अनुस्वार म्ह० अजागल होऊन तो त्या सामान्य रूपावर जाऊन बसतो. उदा०— रामाणाम्-रामाणं (प्रा०) रामां (म०) इत्यादि.

७ संस्कृतांतील तृतीयेचा जो 'इन' प्रत्यय त्यांतल्या 'न' ला एक व० एँ आणि अनेक व० ईं जोडून नें, नीं. असे मराठी अजागलयुक्त प्रत्यय जोशीबोवांनीं बनविले आहेत. यावरून पाहातां विद्यमान 'न्' चा अजागल होऊन त्यालाच जोडलेल्या स्वरावर (नें, नीं अक्षरावर) जाऊन बसतो.

येणेंप्रमाणें हीं जीं सात प्रकारचीं तत्त्वें कथन केलीं या सर्वांमध्यें (७वा सोडून) 'म्' या वर्णाला अथवा तदुत्पन्न गोचराला, तो लुप्त झाला असतां अजागलादेश होतो हे तत्त्व साधारण आहे. पण हें होणें शास्त्रतः शक्य नाहीं. कारण "निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति" अशी परिभाषा आहे. याचा स्पष्ट अर्थ जें दाखवितां येत नाहीं म्हणजे लुप्त होतें किंवा झालेलें असतें त्याला आदेश झालेला असतो.

# ग्वाल्हेरच्या साहित्यसंमेलनाचें निरीक्षण

## उत्तरार्ध

विषयनियामक कमिटींतून पंचविसाहून अधिक ठराव तावूनसुलाखून निघण्यास दोन दिवस खर्च करावे लागले. पण संमेलनाच्या जाहीर कार्यक्रमांत हे सगळे ठराव मंजुरीच्या टाकसाळींतून शिक्कामोर्तबानिशीं बाहेर काढण्यास अवघे तीन तास पुरले ! त्या तीन तासांतला अर्धा वेळ तर ते ठराव वाचून दाखविण्यास व मतें विचारण्यांतच गेला असेल. यावरून एकंदर ठरावांपैकीं किती ठरावांवर कितीशीं भाषणें झालीं असतील याचा वाचकांना अंदाज करतां येईल. विषयनियामक कमिटींत ठराव सुचविण्यांत व वादविवाद करण्यांत जी उत्सुकता दिसून येत असे ती उत्सुकता ठराव मांडण्याचें ठरतांच मावळून जाऊन 'हा ठराव अध्यक्षांनीं पुढें मांडावा' हें पालुपद हटकून पुढें येई ! यामुळें २६ ठरावांपैकीं अवघ्या ७ ठरावांवर काय तीं भाषणें झालीं. बाकीचे १९ ठराव अध्यक्षांनींच सभेपुढें मांडून पास करून घेतले. ज्यांवर भाषणें झालीं त्यांतला शुद्धलेखनाचा तेवढाच ठराव काय तो वादग्रस्त होता व त्यावर अनुकूल–प्रतिकूल भाषणें होऊन तेवढा ठराव बहुमतानें पास झाला. बाकीच्या सहा ठरावांवर भाषणें झालीं तरी तीं मामुली स्वरूपाचींच होतीं. त्यांतला एक ठराव तर ग्वाल्हेरदरबार व कार्याध्यक्ष आंग्रे यांच्या आभारासंबंधाचा होता आणि परिषदेला आलेल्या बड्यांत बड्या अशा विद्वानांचीं व विदुषींचीं भाषणें याच ठरावावर झालीं. श्रीमती काशीबाई कानिटकर, यादवराव काळे, पां. वा. काणे, लेलेशास्त्री व स्वतः चिंतामणराव वैद्य या सर्वांची वक्तृत्वशक्ति या ठरावावरील भाषणांतच व्यक्त झाली. याहून अधिक महत्त्वाचा विषय त्यांच्या वक्तृत्वास लाभला नाहीं. श्री. सौ. कमलाबाईसाहेब किबे यांच्याहि वक्तृत्वास अशाच मामुली आभाराच्या ठरावाचा बांध घालण्यांत आला होता. पण त्यांनीं त्या 'बंधनाच्या पलीकडे' जाऊन श्रोतृवर्गाला आणि विशेषतः संस्थानिकांना आपल्या कर्तव्याची जाणीव करून दिली. संमेलनाच्या व्यवस्थापकांनीं "मराठी आमुची बोली। शिवाजी आमुचा राणा ॥ गनिमी आमुचा कावा। मराठी आमुचा बाणा ॥" अशी जाहीर ग्वाही कार्यक्रमपत्रिकेंतच दिली होती. पण ती नुसती लेखातच राहूं नये, कृतींत उतरावी हेंच सांगण्याचा कमलाबाईसाहेबांचा हेतु होता व तो त्यांनीं निर्भीडपणें बोलून दाखविला.

***

एवंच, संमेलनास आलेल्या बहुतेक वक्त्यांना जरी तोंड उघडण्याचा प्रसंगच आला नाहीं तरी निबंधलेखकांना थोडीशी आणि कवींना मात्र भरपूर संधि मिळाली. निबंधलेखकांत ग्वाल्हेरचे श्रीयुत भालेराव यांनीं 'महाराष्ट्रीयांचें हिंदी सारस्वत' या विषयावरील उत्कृष्ट निबंध वाचून दाखविला. रा. सा. वझे यांनीं शिल्पशास्त्रावरचा आपला निबंध न वाचतां त्याचा सारांश थोडक्यांत पण चटकदार रीतीनें सांगितला. वे. शा. रंगाचार्य रड्डी यांनीं 'मराठी संगीत नाटकें' या निबंधांतील गोषवारा वाचून दाखविला. श्रीयुत देशपांडे यांचा 'ज्ञानेश्वरकालीन मराठीचें स्वरूप' आणि ताटके यांचा 'अश्लील वाङ्मय' या निबंधांची मजल वेळेच्या अभावीं प्रस्तावनेपलीकडे फारशी न जातां त्यांना तेथेंच मुक्काम करावा लागला. श्रीमती कृष्णाबाई भागवत यांनीं 'कवि व काव्य' या निबंधांतील मुख्य भाग थोडक्यांत वाचून दाखविला. महंत गोपीराज महानुभाव यांचें पंजाबांतील महानुभावी साहित्याची माहिती देणारें पत्र वाचून दाखविण्यांत आलें.

***

कवींची संभावना याहून अधिक उत्साहजनक अशी झाली. अध्यक्षांची निवड होण्याच्या आधींच पुण्याचे प्रो. लेलेशास्त्री यांनीं आपलें शिंदे-कुल-गुणवर्णन हें काव्य स्वतः गाऊन दाखवून श्रोतृवर्गास तल्लीन करून सोडलें. कविसंमेलनाच्या वेळीं आनंदराव टेकाडे, कुंजविहारी, कवि गिरिश, नाशिकचे महाबळ, बाळासाहेब खापर्डे, बाबासाहेब देशपांडे, ग्वाल्हेरचे कवि भालचंद्र सावंत इत्यादिकांनीं स्वकृत व परकृत अशीं निवडक काव्यें मनमुराद गाऊन दाखविलीं; आणि त्यानंतर संमेलनाच्या कार्यक्रमाच्या आदिअंतीं आणि विशेषतः श्रीमती महाराणीसाहेबांच्या आगमनप्रसंगीं कांहीं कवींना काव्यगायनाला अवसर देण्यांत आला. मराठी कविसंमेलनाप्रमाणेंच हिंदी कविसंमेलन व उर्दू कविसंमेलन यांच्याकरितांहि एकेक स्वतंत्र दिवस देण्यात आला होता व त्यांचा कार्यक्रमहि मनोरंजक झाला असा त्या त्या भाषांतील तज्ज्ञांचा अभिप्राय दिसून आला.

संमेलनांतील ठरावांवरील भाषणापेक्षां काव्य-गायनाचा कार्यक्रम जितका उठावदार झाला तितक्याच प्रमाणांत सरस्वती–मंदिरांतील बैठ्या कार्यक्रमापेक्षां मनरंजनमंडळाचा स्थलनिरीक्षणाचा व परेडीचा कार्यक्रम अधिक उठावदार झाला. ग्वाल्हेरच्या किल्ल्याच्या पायथ्याशीं ग्वाल्हेर संस्थानांतील पुराण वस्तुसंशोधन खात्यानें जमविलेल्या पुरातन वस्तू अत्यंत व्यवस्थित रीतीनें मांडून ठेवल्या होत्या आणि प्रतिनिधींना त्या दाखवून व समजून देण्याची तजवीज त्या खात्याचे अधिकारी श्रीयुत गर्दे यांनीं केली होती. त्या खात्यामार्फत सर्व प्रतिनिधींना वनोपाहार देण्यांत आला व त्या वेळीं मुलांमुलींनीं गाऊन दाखविलेल्या 'आनंद कंद ऐसा। हा हिंद देश माझा' आणि 'प्रभावशाली परम मंगला महाराष्ट्र देश। तुला प्रभातीं प्रसन्न हृदयें प्रणाम परमेशा' या मधुर व स्फूर्तिदायक पदांनीं श्रोत्यांचीं मनें उचंबळून सोडलीं. त्यानंतर श्रीयुत गर्दे यांनीं मॅजिक लँटर्नच्या साहाय्यानें ग्वाल्हेर संस्थानांतील पुराण वस्तूंची माहिती सुबोध रीतीनें सांगितली; आणि सरकारी पुराण वस्तुसंशोधनखात्याचे सुपरिंटेंडेंट रा. सा. दीक्षित यांनीं स्वतः तयार करविलेल्या स्लाइड्सच्या साहाय्यानें मोहेंजोदारो व बंगाल्यांतील पहाडपूर येथील संशोधनाची व त्यावरून प्रस्थापित होणाऱ्या सिद्धान्ताची मनोरंजक माहिती दिली. मंगळवार ता. १० रोजीं सकाळीं ग्वाल्हेर शहरापासून ५ मैल अंतरावर असलेल्या थट्टीपूर परेड ग्राउंडवर ग्वाल्हेर संस्थानांतील तोफखाना, घोडदळ व पायदळ यांची परेड जनरल रावराजे राजवाडे यांनीं प्रतिनिधींच्याकरितां मुद्दाम करविली आणि त्या सैन्याची चलाखी व टापटीप पाहून प्रतिनिधी 'बहोत खूष' झाले. तेथून प्रतिनिधींच्या वेगवेगळ्या तुकड्या करून त्या सर्वांना ग्वाल्हेरचा किल्ला, शिंदेघराण्यांतील प्रमुख व्यक्तींच्या छत्र्या, जयविलास, मोतीमहाल इत्यादि राजवाडे, इस्पितळ, वर्कशॉप, जयाजीमहाराजांचा व श्रीमती जिवाबाईसाहेबांचा पुतळा, भेलशाची पंचरसी तोफ इत्यादि वस्तू व स्थळें दाखविण्यांत आलीं. प्रतिनिधींना दोनप्रहरीं मेजवानी देण्यांत आली. नंतर कॅप्टन मोडक यांनीं कांहीं निवडक मंडळींना महाराजपूरचें रणक्षेत्र दाखवून तेथील लढाईच्या हालचालींची माहिती करून दिली. तेथून सर्व प्रतिनिधी झांशीच्या लक्ष्मीबाई राणीसाहेबांच्या छत्रीच्या दर्शनास गेले व कित्येकांनीं त्या स्थळीं हार अर्पण केले. सायंकाळीं जलविहार राजवाड्याच्या बागेंत ग्वाल्हेरच्या स्टेट–कौन्सिलाचे सभासद व सेक्रेटारिएटमधील अधिकारी यांनीं पाहुण्यांना उपाहार दिला व त्या वेळीं बँडवादनहि चालू होतें.

***

अशा रीतीनें मेजवान्या, गायनवादन, काव्यश्रवण, प्रेक्षणीय वस्तुदर्शन, उपहार इत्यादि पाहुणचारांत प्रतिनिधींचे चारपांच दिवस आनंदांत गेले. स्वयंसेवकांची कार्यतत्परता वाखाणण्यासारखी होती. संमेलन यशस्वी करण्याची उत्कट इच्छा वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंत सर्वांच्या अंतःकरणांत एकसारखीच असल्यानें सर्व कामें सुरळीत यंत्रासारखीं चाललीं होतीं. अशा सर्व बाजूंनीं संमेलनाचें कार्य उत्तम रीतीनें पार पडलें. त्यांत नांव ठेवण्यास कोठेंच जागा नव्हती. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, बृहन्महाराष्ट्रांतील महाराष्ट्रीयांचें प्रत्यक्ष संमेलन जरी घडवून आणता आलें नाहीं तरी अनेक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय पुढारी एकत्र जमल्यानें मराठी भाषाविषयींच्या मातृप्रेमास जें चालन मिळालें तें चिरपरिणामीं झाल्याशिवाय राहणार नाहीं. तथापि प्रत्यक्ष कार्य कोणतें झालें हा प्रश्न शिल्लक राहतो व त्याचें उत्तर देण्याची जबाबदारी शारदामंडळाची कमिटी, शुद्धलेखन कमिटी आणि शास्त्रीय परिभाषेची कमिटी या कमिट्यांतील सभासदांवर आहे. त्यानीं कांहीं कार्य करून दाखविलें तर ग्वाल्हेरकरांनीं एवढा खटाटोप केल्याचें विशेष चीज होणार आहे.

# बटलर कमिटीचें कार्य

( प्रो. ग. र. अभ्यंकर बी. ए. एलएल. बी. )

या कमिटीच्या सभासदांची योजनाही कांहीं विशिष्ट हेतूनेंच केलेली दिसते. तिचे अध्यक्ष सर हारकोर्ट बटलर हे जरी अलीकडे ब्रह्मदेशचे गव्हर्नर होते तथापि ते पोलिटिकल खात्यामध्यें मुरलेले आहेत. लॉर्ड कर्झनसाहेबांची कारकीर्द जरी खालसा मुलखांतील राज्यव्यवस्थेच्या बाबतींत प्रतिगामी धोरणाची होती तथापि संस्थानांच्या बाबतींत ती निस्संशय कार्यक्षम झालेली आहे. आपल्या अनेक भाषणांतून त्यांनीं संस्थानिकांच्या कर्तव्याबद्दल फार निर्भीडपणें टीका केली आहे.

संस्थानिकांनीं प्रजेचे आपण ट्रस्टी आहों ही जाणीव सदैव लक्षांत ठेवावी असा त्यांनीं उपदेश केला. संस्थानिकांच्या खासगी खर्चास आळा घालण्याचा त्यानीं प्रयत्न केला. स्वतःचें राज्य सोडून परदेशांत उच्छृंखलपणे मौज मारणाऱ्या संस्थानिकांची त्यांनीं कानउघडणी करण्याचा प्रयत्न केल्यामुळें संस्थानिक खडबडून जागे झाले. संस्थानाच्या कारभाराकडे उदासीन वृत्तीनें पाहाण्याचें १८५७ च्या बंडानंतरचें धोरण कर्झनशाहीमध्यें समूळ पालटलें. ब्रिटिश मुत्सद्यांना ह्या नवीन धोरणाबद्दल साशंक वृत्ति वाटूं लागली व ह्याचसाठीं मिंटोसाहेबांनीं उदेपूर येथील आपल्या भाषणांत संस्थानाच्या अन्तर्गत कारभारांत आपण हात घालणार नाहीं हें पूर्वीचे धोरण जोरानें प्रतिपादन केलें. मिंटोसाहेबांच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत या धोरणाचाच अनुवाद करण्यांत आला व एका दृष्टीनें संस्थानाच्या प्रगतीची पीछेहाट यानें झाली. मिंटोसाहेबांचें हें धोरण पांच वर्षें कृतींत उतरविण्याचा मान हल्लींचे ह्या कमिटीचे अध्यक्ष बटलरसाहेब यांस मिळालेला आहे. मिंटोसाहेबाच्या अमदानींतील फॉरेन व पोलिटिकल सेक्रेटरींचें काम सर हारकोर्ट बटलर यांजकडे होतें. त्यायोगानें पोलिटिकल खात्याचे बेजबाबदारपणाचें धोरण त्यांच अंगीं मुरलेलें आहे. संस्थानी ऐषआराम व थाटमाट यांचा त्यांनीं संपूर्ण आस्वाद घेतला आहे. पुष्कळ संस्थानिकाचा त्यांच्याशीं लोभ जडला आहे; व एका दृष्टीनें संस्थानिकांचे ते पुरस्कर्तेच आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. व या कारणामुळें कमिटीचें अध्यक्षस्थान याच्याहून भिन्न गृहस्थास द्यावयास पाहिजे होतें. कमिटीचे दुसरे दोन सभासद होल्डस्वर्थ व नामदार पील ह्यांना संस्थानिकांच्या परिस्थितीची मुळीच माहिती नाहीं. त्यांतील एक गृहस्थ उत्तम कायदेपंडित आहेत व दुसरे उत्तम फडणवीस असून अर्थशास्त्रात पारंगत आहेत. संस्थानिकांच्या दर्जाबद्दलच्या त्यांच्या कल्पना पुस्तकावरूनच झालेल्या आहेत.

## संस्थानिकांचा दर्जा

पिढीजाद राज्यपदाचा लाभ, स्वतंत्र राज्यघटना व खालसातीहून भिन्न अशी परिस्थिति ह्या तीनहि गोष्टींमुळें परस्थ मनुष्यास व संस्थानाचा निकट सहवास नसलेल्या इसमास संस्थानिकांचा दर्जा म्हणजे पाश्चिमात्य राष्ट्रांतील स्वतंत्र परराज्याच्या दर्जाप्रमाणेंच भासतो. निकट सहवासानें संस्थानिक हीं नुसतीं बाहुलीं आहेत हा प्रत्यय पदोपदीं येतो व याच कारणामुळें अशा चौकशीच्या कामीं संस्थानाच्या प्रत्यक्ष स्थितीचें अज्ञान असलेल्या इसमाची नेमणूक करण्यानें कोणताहि तादृश फायदा होण्याजोगा नाहीं. त्यांतून अशा गृहस्थास संस्थानी प्रश्नाची दुसरी बाजू म्हणजे संस्थानी प्रजेची बाजू ही मुळींच कळूं न दिल्यानें किंवा बुद्धिपुरस्पर त्यांच्यापासून दूर ठेवल्यानें ह्या गृहस्थांची दृष्टि ते स्वतंत्र विचाराचे असले तरी व्यापक व दूरदर्शित्वाची खास होणार नाहीं. वस्तुतः या दोन अवस्थांबरोबर संस्थानिक व संस्थानी प्रजा व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजन त्याचे प्रतिनिधी त्या कमिटीवर नेमले असते तर कमिटीचें काम समतोलपणाचे होऊन तें एकपक्षीय कधीच झालें नसतें. ज्या लोकांचा हितसंबध या चौकशीशीं आहे व ज्यांची माहिती सभासदास संपूर्ण आहे असा एकहि गृहस्थ सभासदांत नाहीं व यामुळें कमिटीची घटना सर्वस्वी टाकाऊ झाली आहे. कमिटीचे काम एककल्लीपणाचें दिसून आल्यास किंवा तें संकुचित झाल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहीं नाहीं.

## कमिटीचें कार्यक्षेत्र

या कमिटीकडे जे दोन प्रश्न सोंपविले आहेत ते खालीलप्रमाणें आहेत—

(१) साम्राज्यसरकार व हिंदी संस्थानें ह्यांचे परस्पर संबंध, तहनामे, सनदा, करार व वहिवाट यांस अनुसरून किती आहेत याबद्दलची चौकशी करणें.

(२) खालसांतील मुलूख व संस्थानें यांच्या अन्योन्य संबधांत सांपत्तिक व औद्योगिक बाबतींत कोणत्या अडचणी येतात त्यांचा विचार करून त्याबद्दल सूचना करणें.

या दोन प्रश्नांपैकीं पहिला प्रश्न अत्यंत व्यापक आहे. साम्राज्यसरकार व हिंदी संस्थानें यांच्यांतील संबंध हा शब्दप्रयोग स्पष्टपणे कळण्यासारखा नाहीं. साम्राज्य–सरकार ह्याचा अर्थ ब्रिटिश सरकार व संस्थानें असाहि होईल. सेक्रेटरी ऑफ स्टेट व संस्थानें असाही होईल व हिंदुस्थानसरकार व संस्थाने असाही होईल. तव्हां हे संबंध ठरवितांना साम्राज्यसरकार या शब्दसमूहाची व्याप्ति काय आहे हें कमिटीच्या धोरणांत नमूद केले नाहीं व यायोगानें अनेक तर्क–वितर्क, दीर्घ शंका व असंबद्ध कोटिक्रम ऐकूं येत आहेत. कित्येकांचें म्हणणें सार्वभौम सत्तेचें अधिष्ठान म्हणजे पंचम जॉर्ज हेच सार्वभौम सत्तेचे द्योतक आहेत व संस्थानाचे संबंध प्रत्यक्षपणें इग्लंडाच्या राजघराण्याशीं आहेत. कांहीं धूर्त संस्थानिकांनी या म्हणण्याचाच अनुवाद चालू केला आहे. कित्येकांच्या मतें हिंदुस्थानाचे बादशहा यांच्या नांवाने जरी राज्यकारभार चालतो तथापि हिंदुस्थानांतील एकतंत्री राजाप्रमाणें इंग्लंडाचे बादशहा नसून ते तेथील राज्यव्यवस्थेचे म्हणजे पार्लमेंटाच्या हुकमतीखालीं

चाललेल्या राज्यपद्धतीचे मुख्य घटक आहेत. राज्यव्यवस्था पार्लमेंटाच्या हुकमतीनेंच चालते. पार्लमेंटानेंच हिंदुस्थानास राज्यघटना दिली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया हा अधिकारी पार्लमेंटास जबाबदार आहे. १८५८ च्या कायद्यानें हीच गोष्ट प्रस्थापित केली आहे. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें आपली जबाबदारी हिंदुस्थानसरकारकडे सोंपविली आहे व हिंदुस्थानसरकार आपलें नियंत्रण संस्थानिकांवर चालविते. ह्या पूर्व-परंपरेमुळें साम्राज्य-सरकार व संस्थानिक यांतील संबंध म्हणजे १८५८ च्या कायद्यानें पार्लमेंटानें ज्यांच्याकडे हिंदुस्थानाचा राज्यकारभार सोंपविला तें हिंदुस्थान–सरकार व संस्थानिक याच्यातील संबंध असा कित्येक पहिल्या प्रश्नाचा अर्थ करतात.

या कमिटीच्या बाबतीत जी कारवाई चालू आहे तीहि याच संबंधाने आहे. संस्थानिक लोक आपण बादशहाचे मांडलीक आहों ही गोष्ट नाकबूल करीत नाहींत.इंग्लंडाच्या राजांनी हिंदुस्थानाचे बादशहा ही पदवी धारण केल्यापासून व संस्थानिकांनीं लिटनसाहेबांच्या दिल्ली दरबारास हजर राहून आपल्या स्वतःच्या कृतीनें ह्या मांडलीकपणाची कबुली दिल्यामुळें आतां त्या प्रश्नास फारसें महत्व उरलें नाहीं. शिवाय इंग्लंडाच्या पार्लमेंटानें मंजूर केलेल्या इंटरप्रिटेशन ॲक्ट यांतील व्याख्येनें संस्थानिक म्हणजे इंग्लंडाच्या बादशहाचे मांडलीक असाच अर्थ केला आहे. पार्लमेंटानें हा कायदा कोणत्याहि संस्थानिकांचें मत घेऊन किंवा त्यांची कबुली घेऊन केलेला नाहीं. किंबहुना हा कायदा संस्थानिकांवर लादण्यांत आला आहे. कांहीं झालें तरी तो कायदा अस्तित्वांत आहे. तेव्हां संस्थानिकाची स्थिति मांडलिकांची आहे ही गोष्ट त्यांस कबूल आहे. परंतु त्यांचें म्हणणें आपण बादशहांचे मांडलीक आहों, स्टेटसेक्रेटरीचे नव्हे, हिंदुस्थान–सरकाराशीं आपला संबंध नाहीं व रेग्युलेटिंग ॲक्टापासून १९१९ च्या कायद्यापर्यंत हिंदुस्थानावर पार्लमेंटानें जें निरंकुश प्रभुत्व गाजविलें आहे त्याचा ते मुळींच विचार करीत नाहींत.

## हिंदुस्थानसरकार म्हणजे मुनीम

त्यांचें म्हणणें बादशहांचें हिंदुस्थानसरकार हें नुसतें मुनीम आहे.ह्या मुनीमाकडेच बादशहांनीं संस्थानिकांवर नजर ठेवण्याचें काम निरंतर सोंपवावें असा कांहीं निर्बंध नाहीं.आजपर्यंत तो सोंपविला आहे.परंतु ज्याअर्थी हिंदुस्थानाचा राज्यकारभार आपल्या नोकरशाहीमार्फत न चालवितां बादशहा तो हिंदुस्थानाच्या प्रजेच्या प्रतिनिधीकडे सोंपविणार आहेत त्याअर्थी संस्थानिकांवर देखरेख करण्याचें काम भावी हिंदुस्थानसरकाराकडे म्हणजे भावी प्रजासत्तात्मक राज्याकडे न सोंपवितां बादशहांनी स्वतंत्र प्रतिनिधी नेमून त्यांजकडे सोंपवावें असा संस्थानिकांचा आग्रह आहे. यांतील हेतु संस्थानिकांवर आजपर्यंत हिंदुस्थानसरकार व त्याचें एक घटक म्हणजे पोलिटिकल खातें हें बादशहांचे नोकर या नात्यानें हुकमत चालवीत. बादशहांच्या नोकराऐवजीं हिंदी प्रजेस जबाबदार असें लोकनियुक्त मंत्रिमंडळ स्थापन झाल्यास व हिंदुस्थानसरकारचा कायदा तत्त्वतः आहे ह्याप्रमाणेच राहिल्यास गोऱ्या नोकरशाहीच्या ऐवजी काळी नोकरशाही संस्थानिकांवर नियंत्रण चालवील.

हल्लींची गोरी नोकरशाही गव्हर्नर–जनरल व सेक्रेटरी ऑफ स्टेट यांस जबाबदार असते, काळी नोकरशाही मंत्रिमंडळाच्या हुकमतीखालीं वागेल व कायदेमंडळास जबाबदार राहील. म्हणजे संस्थानिकांवरचें नियंत्रण हिंदुस्थानाच्या भावी स्वराज्याच्या पुढाऱ्यांचे हातीं क्रमशः प्राप्त होईल. संस्थानिकाना हेंच नको आहे. ह्या कमिटीच्या बाबतींत जें खलबत चाललें आहे तें याचसाठीं आहे. संस्थानिकांचें म्हणणें खालसातील राज्यकारभार बादशहा खुशालपणे लोकांच्या स्वाधीन करोत. तेथे स्वराज्य नांदो, जबाबदार मंत्रिमंडळ अस्तित्वांत येवो, आम्हास त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. ह्या भावी स्वराज्याच्या कक्षेतून आम्हास बाहेर काढावें व मांडलीक ह्या नात्यानें आमच्यावर बादशहांनीं स्वतंत्र मुनीम नेमून स्वतःच्या नजरेखालीं आमचा योगक्षेम चालवावा, यावच्चंद्रदिवाकरौ आमच्या प्रजेवर एकतंत्री सत्ता गाजविण्याचा आम्हास अधिकार द्यावा व खालसातीच्या बाबतीत गव्हर्नर–जनरलसारखा एक नामधारी मुनीम नेमून खरी राज्यव्यवस्था लोकांच्या स्वाधीन खुशाल करावी; ह्याच म्हणण्याच्या समर्थनार्थ सार्वभौम सरकार या शब्दांचा अर्थ हिंदुस्थानाचे बादशहा व त्यांच्याशींच आपला प्रत्यक्ष संबंध आहे असा संस्थानिक करतात. वरील विवेचनावरून कमिटीकडे सोंपविलेल्या पहिल्या प्रश्नाबद्दल किती तीव्र मतभेद आहे व संस्थानिकांनीं काढलेला विलक्षण अर्थ ग्राह्य मानल्यास संस्थानी प्रजा व खालसांतील प्रजा ह्यांचें केवढें अपरिमित नुकसान होणार आहे हें दिसून येणार आहे. व याचसाठीं ऐतिहासिक दृष्ट्या संस्थानांचे संबंध कोणाशीं आहेत हे पाहाणें जरूर आहे व याच प्रश्नाचा साधार विचार केल्याखेरीज संस्थानिकांनीं चालविलेल्या गुप्त कटापासून भावी स्वराज्यास कसा धोका आहे हें नीट समजणार नाहीं.

तसेंच ह्या पहिल्या प्रश्नांतच जो महत्त्वाचा विचार दिसून येतो तो हा आहे कीं, संस्थानिक लोक असें प्रतिपादन करतात कीं आपण जरी मांडलीक आहों तरी कांहीं एका विशिष्ट बाबीपुरती आम्ही आपली सत्ता मर्यादित करून घेतली आहे. बाकी संस्थानाच्या इतर सर्व कारभारांत आपण संपूर्णपणें स्वतंत्र आहों, आपला दर्जा मांडलिकाचा नाहीं व आपल्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार ब्रिटिश सरकारास नाहीं. स्वतंत्र संस्थानिक ह्या शब्दांचा अर्थ संस्थानाच्या प्रत्येक बाबतींत अप्रतिहत सत्ता चालविण्याचा हक्क एवढाच आहे. कोणत्याहि संस्थानिकाची किंवा राष्ट्राची सत्ता या चार लक्षणांनीं युक्त असते.

(१) प्रेजवर कर बसविणें व त्याचा उपयोग करणें. (२) कायदेकानू करणें. (३) राज्यकारभार चालविणें. (४) व राज्याचा बंदोबस्त ठेवणे. ह्या गुणचतुष्टयाचा समुच्चयानें ज्या व्यक्तीमध्यें अगर राष्ट्रामध्यें वास आढळून येतो त्यास स्वतंत्र राजा किंवा स्वतंत्र राष्ट्र म्हणतात. संस्थानिकांच्या बाबतींत ह्यापैकीं एक गुण किंवा एक अधिकार त्यास प्राप्त झालेला नाहीं. राज्यात शांतता ठेवणें, बंदोबस्त ठेवणें, परचक्रापासून संस्थानाचें संरक्षण करणें, अन्तःकलहापासून संस्थानाचा बचाव करणें या गोष्टी हिंदी संस्थानिकांकडे सोंपविल्या नाहीत त्या साम्राज्यसरकारनें आपल्या हातीं ठेवल्या आहेत ही गोष्ट संस्थानिकांना मान्य आहे. ह्या बाबतींत मतभेद नाहीं. कर बसविणें व तो खर्च करणें, संस्थानापुरते कायदे करणें व संस्थानाचा राज्यकारभार हांकणें या गोष्टी पुष्कळ संस्थानिकाना दिल्या आहेत हेंही खरें आहे व या प्रत्यक्ष परिस्थितीवरून संस्थानिक लोक असें म्हणतात कीं जर हे तीन हक्क आम्हास अबाधितपणें दिले आहेत तर आमच्या राज्यकारभारांत ब्रिटिश सरकारनें हात घालणें अन्यायाचें आहे. ह्या तीन गोष्टींपुरतें आम्ही स्वतंत्र आहों. ह्याच स्वरूपाचे आमचे तहनामे व करारमदार झाले आहेत. सबब जोंपर्यंत परचक्र किंवा बंड ह्या संबंधाची अडचण येत नाहीं तोंपर्यंत ब्रिटिश सरकारनें कोणत्याही कारणाकरितां आमची संस्थानांतील अन्तर्गत राज्यकारभाराची जी संपूर्ण हुकमत आहे तिचा बिघाड करूं नये, त्यांत हात घालूं नये. त्यायोगानें तहनामे निरर्थक होतील व ब्रिटिश सरकारचे पदरीं वचनभंगाचें पातक येईल असें संस्थानिक म्हणतात.

## संस्थानिक व सार्वभौम सरकार

संस्थानिक व सार्वभौम सरकार यांचे संबंध तीन गोष्टींनीं मर्यादित झालेले आहेत (१) संस्थानिकाशीं केलेले तहनामे व करारमदार (२) संस्थानिकांच्या बाबतींत स्वीकारलेलें वहिवाटीचें धोरण (३) सार्वभौम सरकार या नात्यानें तहनाम्याव्यतिरिक्त अस्तित्वांत असणारी जबाबदारी. या तीनहि गोष्टींचें योग्य आकलन केलें असतां संस्थानिक लोक वर जे चार प्रकारचे अधिकार सांगितले त्यांपैकी कोणत्याहि प्रकाराबद्दल स्वतंत्र आहेत, पराधीन नाहींत असें म्हणतां येणार नाहीं. तहनामे व करारनामे विशिष्ट परिस्थितींत विशिष्ट कारणाकरितां केलेले आहेत. प्रत्येक बाबतींत तहनाम्याकडे बोट दाखवून चालणार नाहीं. तहनामे केल्यावेळची परिस्थिति पार बदलून गेली आहे. नवीन प्रश्न रोज उत्पन्न होत आहेत, तेव्हां तहनाम्यावर भिस्त ठेवून संस्थानिकांच्या हक्काचें संरक्षण होईल ही समजूत चुकीची आहे. वहिवाटीच्याबद्दलहि तशीच गोष्ट आहे. बलाढ्य सार्वभौम सरकार व कमकुवत संस्थानिक यांच्या नित्य दळणवळणामध्यें जी वहिवाट, जो राबता, जो दाखला घालण्यांत आला तो ' बळी तो कान पिळी ' या न्यायानें सार्वभौम सत्तेच्या जोरावर मांडलिक संस्थानिकांवर लादण्यांत आला आहे. तेव्हां वहिवाटीच्या मुद्द्यावरहि फारशी भिस्त आहे अशातला प्रकार नाहीं संस्थानिकाचें खरें स्वातंत्र्य या तिसऱ्या गोष्टीवर म्हणजे सार्वभौम सरकार या नात्याचा जो हक्क आहे त्यावर अवलंबून आहे. हा हक्क स्पष्टपणें लक्षांत यावा यासाठीं उघडपणें त्यातील रहस्य समजून घेतलें पाहिजे व तें खालीं दिल्याप्रमाणें आहे.

एखादा संस्थानिक दुर्वृत्त झाला, त्याची प्रजा त्याचें ऐकेना, बंड करण्यास तयार झाली तर त्यांतून निभावण्याचा मार्ग कोणता? संस्थानिक व त्याची प्रजा ह्या दोहोंमधीलच हा प्रश्न असता तर हल्लीच्या काळीं हा लढा एका निमिषार्धांत मिटला असता. संस्थानिक हतवीर्य आहेत, हतबल आहेत, गांजलेल्या प्रजेस संस्थानिकास नामोहरम केव्हांच करतां येईल व तसें करण्याचा प्रजेचा नैसर्गिक हक्क आहे. इतिहास त्याची साक्ष देत आहे. प्रजेच्या ह्या जन्मसिद्ध हक्काचा उल्लेख हिंदुस्थानाचे माजी सेक्रेटरी ऑफ स्टेट लॉर्ड क्रॅमब्रुक ह्यांनीं एका ठिकाणीं केला आहे; परंतु संस्थानी प्रजा हक्क बजावीत नाहीं याचा अर्थ प्रजेचा भलेपणा हा नसून प्रत्येक संस्थानिकाच्या गादीमागें ब्रिटिश संगिनींचा कोट उभा केला आहे. संस्थान कितीहि लहान किंवा मोठें असो, त्यांतील प्रजेला सार्वभौम सत्तेशीं तोंड मुळींच देतां येणार नाहीं. निमिषार्धांत तिचा संहार होईल व याच कारणासाठीं हल्लींच्या काळीं संस्थानिकांचे राजमुगुट, संस्थानिकांचीं तख्तें अढळ राहिलीं आहेत. याचे कारण ब्रिटिश सर-

कार संस्थानिकांचें जें संरक्षण करतें त्यांतच आहे. या संरक्षणाबरोबरच जी जबाबदारी संस्थानिकांवर आहे व जी जबाबदारी सार्वभौम सरकारावर आहे ती ही कीं, सस्थानिकांनीं आपल्या प्रजेस सतावूं नये, बंड करण्यास प्रवृत्त करूं नये, सुराज्यानें त्यांचें संरक्षण करावें व त्यांचा संतोष संपादन करावा. सार्वभौम सरकारावर ही जबाबदारी आहे कीं जो संस्थानिक जुलमानें आपल्या प्रजेला वैतागून सोडील त्यास पदच्युत करणें, संस्थानाच्या कारभारींत हात घालून संस्थानी प्रजेला स्वराज्य देणें ही होय. संस्थानिक व साम्राज्यसरकार यांची ही जबाबदारी नजरेपुढें ठेविली व ही तहनाम्यानें उत्पन्न झाली नसून सार्वभौम सरकार व मांडलीक या नात्यानें उत्पन्न झालीं असल्यामुळें ती दृष्टीपुढें ठेवल्यास कमिटीपुढील पहिल्या प्रश्नाचा विचार करतांना फारच मदत होणार आहे. हीच दृष्टि नजरेपुढें ठेवून आम्ही पहिल्या प्रश्नाबद्दल विचार करणार आहों.

# रशियांतील बोल्शेव्हिक राज्य

## लेखांक २ रा

## फलनिष्पत्ति

समाज कार्यक्षम होण्यास तो चतुरंग असावा लागतो. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हीं समाजाचीं चार अंगें होत. मग हीं अंगें हिंदुस्थानांतल्याप्रमाणें जन्मसिद्ध असोत किंवा पाश्चात्त्य देशांतल्याप्रमाणें कर्मसिद्ध असोत. तीं तीं कामें करणारे वर्ग किंवा व्यक्ती समाजांत नसतील तर तो समाज त्या त्या प्रमाणांत लुला पडल्यावांचून राहाणार नाहीं. रशियांतील बोल्शेव्हिकांनीं वैश्यांवर रागावून केवळ शूद्रांचें राज्य स्थापलें आणि रशियाचा मालक कामकरीवर्ग बनविला. कामकरीवर्गानें चार वर्णांच्या चारीहि प्रकारच्या कामगिऱ्या आपल्याच अंगावर घेण्याचें ठरविलें. परंतु मानवी सत्तेला व मानवी कर्तृत्वशक्तीलाहि सीमा आहे. विवक्षित सीमेवरच ती शक्ति जाऊन थांबते. रशियांत देखील असेंच घडलें. रशियांत क्रांतीपूर्वी सुशिक्षित वर्ग होता, अमीर उमराव होते, कारखानदार होते व शेतकरीहि होते. त्याखेरीज कामकऱ्यांचा असा स्वतंत्र वर्ग अस्तित्वात होता. परंतु त्यापैकीं कामकरी व कामकऱ्यासारख्या स्थितीचे शेतकरी यांसच फक्त उत्तेजन देण्याचे बोल्शेव्हिकांनीं ठरविलें.

पूर्वकालीं राजसत्तेचा व्यापकमी असे. राजसत्ता एका राजाची किंवा एकमुखी होती. त्या वेळीं राजसत्तेच्या मर्यादितपणामुळें राजानें आपल्या शिरावर स्वतःस झेपतील इतक्याच जबाबदाऱ्या घ्याव्या हे स्वाभाविक होय. परंतु राजसत्ता ही लोकसभेच्या रूपानें प्रकट होतांच तिचें सामर्थ्य अनंत पटींनीं वाढलें. कारण पार्लमेंटाच्या पद्धतीप्रमाणें पार्लमेंटाच्या सभासदांस निवडून देणारे जितके मतदार तितके राजे बनले व त्यांनीं ज्यांच्या हातीं आपली सत्ता सोपविली त्या पार्लमेंटाच्या सभासदांनीं आपल्या वतीनें मंत्रिमडळ नेमून ठेवलें. जनतेचा व्यक्तिशः अगर सामुदायिक कारभार पूर्वींपेक्षां राजसत्तेनें आपल्याकडे किती ओढावा हें पार्लमेंटाचे सभासद ठरवूं लागले व कारभाराच्या या वाढीबरोबर मंत्र्यांची संख्याहि वाढत चालली. शासनाच्या बाबतींत पूर्वी न्याय, करवसुली, सैन्य, परराष्ट्रीय संबंध, धर्मनिर्णय, मालाची आयात–निर्गत इत्यादि गोष्टी मोडत असत. निदान हिंदुस्थानांत तरी एवढ्याच बाबींचा समावेश होत असे.

सांप्रत हिंदुस्थानांत हिंदी शासनसंस्था लोकांच्या हातीं नाहीं. तथापि ज्यांच्या देशांत पार्लमेंटाचा कारभार अमलांत आहे असे इंग्रज लोक येथें राज्य करीत असल्यामुळें त्यांनीं किती तरी कारभार आपल्या मुठींत आणिला आहे. माणसाची व मालाची वाहतूक, तसेंच जासुदाचें काम समाज आपल्या सोयीप्रमाणें पूर्वी करीत होता. परंतु सांप्रत सरकारनें हे धंदे पूर्णपणें अगर अंशतः आपल्या हुकमतीखालीं घेतले आहेत. याखेरीज अफू, गांजा, मीठ, मद्य, करमणुकीचे खेळ, लोकांचें परदेशांत जाणें–येणें, हत्यार वापरणें, बोलणें, लिहिणें इत्यादि व्यापार आपल्या नियंत्रणाखालीं सरकारनें राखले आहेत ते वेगळेच. हिंदुस्थानासारख्या मागसलेल्या देशाची ही स्थिति तर इंग्लंडाची स्थिति काय असेल याची वाचकांस सहज कल्पना होईल. पण रशियांतील सोव्हिएटसरकारचें समाधान एवढ्यानेंहि झालें नाहीं. लोकसत्ताक राज्याखालचे देश लोकव्यवहाराचें बऱ्याच मोठ्या प्रमाणानें नियंत्रण करतात हें खरें. पण सोव्हिएटांनीं ते सारे व्यवहारच आपल्या ताब्यांत घेतले आहेत.

## सरकारचा व्याप

देशांतील धनोत्पादनाचीं मुख्य साधन गिरण्या, कारखाने, खाणी व कृषि हीं होत. यापैकीं पहिलीं तीन साधनें धनिकवर्गाच्या म्हणजे वैश्यांच्या मालकीचीं असल्यामुळें कामकरीवर्गास म्हणजे शूद्रास क्लेशांत, दारिद्र्यांत व दुःखात दिवस काढावे लागतात ही तर बाल्शेव्हिकांची मुख्य तक्रार व ती दूर करण्यासाठीं बोल्शेव्हिकांचें राज्य रशियांत अवतरलेले. हीं साधनें राष्ट्राच्या मालकीचीं असावीं अशी ओरड समाजसत्तावाद्यांनीं अलीकडे बरींच वर्षे चालविली आहे. गिरण्या, खाणी व कारखाने राष्ट्राच्या मालकीचे होणें म्हणजे त्यांपासून मिळणारा फायदा एकट्या धनिकवर्गास न जातां राष्ट्राच्या वांट्यास येणें. ही योजना अमलांत आणण्याचे अनेक मार्ग आहेत. त्यांपैकीं एका मार्गाचा अवलंब करून रशियाच्या सोव्हिएट सरकारनें त्यासाठीं स्वतंत्र खातीच काढलीं. पोस्ट, तारायंत्र व रेलवे हीं खातीं हिंदुस्थानांत जशीं सरकारमार्फत चालतात तशी गिरण्या, कारखाने व खाणी यांची व्यवस्था रशियन सरकार आपल्या नोकरवर्गाकडून ठेवीत आहे.

रशियांतील जमिनीचा कांहीं भाग जमीनदाराच्या ताब्यांत होता व कांहीं भाग शेतकरीवर्ग मालकी हक्कानें वहिवाटीत होता. बोल्शेव्हिकांनीं रशियाचीं राज्यसूत्रें हातीं घेतांच जमीनदाराचा जमिनीवरील हक्क अजीबात उडविला. त्याबरोबर शेतकरीवर्गास वाटलें कीं, सर्व जमिनीचे मालक आपणच झालों. परंतु ही चूक लवकरच त्यांच्या ध्यानांत आली. समाजसत्तावाद्यांच्या तत्त्वाप्रमाणें देशांतील सर्व स्थावर व जंगम मिळकत समाजाच्या मालकीची आहे, व्यक्तीच्या मालकीची नाहीं. शेतकऱ्यानें जमीन नांगरावी, कुळवावी, पेरावी व पिकवावी.परंतु जमिनींत जें धान्य पिकेल त्यांपैकीं शेतकऱ्यापाशीं त्याच्या कुटुंबपोषणास जरूर तेवढेंच ठेवण्यांत येऊन बाकीच्या धान्यावर सरकार समाजाची म्हणजे आपली मालकी गाजविणार. जगांतील सर्वसामान्य मनुष्यजातीचे उद्योग स्वार्थमूलक आहेत, आधीं स्वार्थ व मग परमार्थ. आधीं आपण मग समाज ही मनुष्याची रीत आहे व तीच रशियन शेतकऱ्यांसहि लागू आहे. आपल्या मेहनतीचें सारें फळ आपणास लाभत नाहीं हें रशियन शेतकऱ्याच्या लक्षांत आलें तेव्हां त्यानें स्वतःच्या कुटुंबास पुरेल इतकेंच धान्य पिकविण्याचें ठरविलें.त्याबरोबर लाखों एकर जमिनी पड राहूं लागल्या व रशियन राष्ट्रांस हवे तेवढें धान्य उत्पन्न न झाल्यामुळें दुष्काळ पडला.

रशियांत राज्यक्रांति झाली तिच्या पाठोपाठ जगभर राज्यक्रांत्या घडून रशियांतील बोल्शेव्हिकांनीं ज्या तत्त्वावर समाजाची नवी घडी बसविण्याचें ठरविलें त्याच तत्त्वावर इतरहि देश आपली घडी बसवितील अशी बोल्शेव्हिक पुढाऱ्यांची समजूत होती. पण ती खोटी ठरून समाजसत्तावादी असा रशिया हा एकच देश पृथ्वीतलावर शिल्लक राहिला. या नव्या देशाचा व्यवहार नव्या प्रकारचा व जुन्या देशाचा व्यवहार जुन्या प्रकारचा. यामुळें त्या उभयतांचा मेळ न बसून रशियाचें जुने बेत फिसटकले. त्याची इतर देशांत पत राहिली नाहीं व त्याला औद्योगिक बाबतींत जर्मनी व इंग्लंड आदिकरून कारखानदार देशावर अवलंबून राहाणें इष्ट वाटेना. अशा स्थितींत आपल्या सर्व गरजा स्वदेशांतल्या स्वदेशांत भागविणें हा एकच मार्ग रशियास शिल्लक उरला. तथापि या गोष्टी चुटकीसरशा घडून येत नाहींत. त्या कालावधीनेंच घडावयाच्या असतात.यासाठीं परदेशचा माल खरेदी करणें रशियास कांहीं वर्षें तरी अपरिहार्यच होय. रशियांतील गिरण्यांत व कारखान्यांत रशियास पुरून परदेशास पाठविण्याइतका माल पूर्वी पैदा होत नव्हता व हल्लींहि पैदा होत नाहीं. या कारणानें रशियाच्या अफाट जमिनींतून पिकणारें धान्य हीच त्याची आजची मुख्य संपत्ति. पण शेतकरीवर्गानें गरजेपेक्षां अधिक धान्य न पिकविण्याचें ठरविल्यामुळें तीहि संपत्ति रशियन सरकारच्या उपयोगीं पडेना. असा पेच येतांच रशियन सरकारनें शेतकरीवर्गास आपल्या जमिनीचे तात्पुरते मालक ठरविलें व त्याचा इष्ट परिणाम रशियाच्या अन्तःस्थितीवर घडला. अशा रीतीनें रशियास परिस्थितीपुढें कच खाणेंच भाग पडलें यांत शंका नाहीं.

### मोठ्या कारखान्यांची वाढ

बोल्शेव्हिक सरकाराचा मुख्य भर मोठ्या गरजेचे कारखाने वाढविण्यावर आहे. पण अशा कारखान्यांत लागणाऱ्या वस्तूंचीं यंत्रें भारी किंमतीचीं असतात व तीं परदेशांतच पैदा होतात. त्यास जरूर तें भांडवल सरकारापाशीं नसल्यामुळें कारखान्यांतून काम करणाऱ्या मजुरांच्या पोटास चिमटा घेऊन पुढील आशेवर रक्कम जमविण्यांत येत आहे. ही रक्कम पुरेशी जमत नाहींच. त्यामुळें सरकारास आणि शेतकऱ्यांस बूट, साबण व कपडा यांची वाण भासते. त्या जिनसा त्यांस मिळाल्यावांचून ते आपल्या अंबारांतील धान्य विकण्यास तयार होत नाहींत. आणि त्यांनीं धान्य विक्रीस काढल्यावांचून रशियन सरकारच्या भांडवलाची भरती होत नसल्यामुळें सधन शेतकऱ्यांकडून सक्तीनें धान्य

विक्रीस ठेवण्यांत येत आहे. अशा रीतीनें नव्या राजवटींत कामकरीवर्ग काय किंवा शेतकरीवर्ग काय झारशाहींतल्यापेक्षां अधिक सुखी झालेला नाहीं.

समाजसत्तावाद्यांस प्रिय अशा कामकरी व शेतकरी वर्गाची जर ही हलाखी तर त्यांच्या डोळ्यांत खुपणाऱ्या धनिक व सुशिक्षित वर्गाचे हाल अत्यंत होत असतील हें सांगावयास नकोच. अमीरउमरावांचा वर्ग झारच्या कारकीर्दीत दिमाखानें वागत असे. त्याचा नक्षा आतां पार उतरला आहे. त्यांची जहागीर खालसा झाली व वाडे सरकारजमा झाले. त्यांपैकीं पुष्कळांनीं हलक्या नोकऱ्या पत्करल्या असून त्यांच्या हाताखालीं जे मजूर म्हणून पूर्वी कष्ट करीत असत तेच त्यांचे वरिष्ठ बनून त्यांच्या डोक्यावर सांप्रत मिरे वांटीत आहेत! जुना सुशिक्षित वर्ग सांदीकोपऱ्यांत पडला आहे. तो पोट भरण्यापलीकडे दुसऱ्या कोणत्याहि फंदांत शिरत नाहीं. त्यांपैकीं कांहीं सरकारी नोकरींत आहेत. परंतु त्यांजवर वरिष्ठाचा डोळा असतो. त्याला कामावर येण्यास तीन खेपा उशीर झालेला दिसला कीं त्यास बडतर्फ करण्यांत येतें. त्यांना आपलीं दुःखें उघडपणें बोलण्याची चोरी वाटते. प्रत्येक कचेरींत भिंतीवर हस्तलिखित वर्तमानपत्रें डकविण्यांत येऊन त्यावर सर्व नोकर आपल्या तक्रारी लिहून ठेवतात. ती एक तक्रारींची पट्टीच होय. अंतःकरणांतील दुःखें ओकण्यास त्यांस हें एकच साधन शिल्लक आहे. वकिली व डाक्टरी या धंद्यांत कांहीं सुशिक्षित आहेत. त्यांपैकीं डॉक्टरांस पगार फारच थोडा मिळतो. ही उणीव खासगी रीतीनें रोग्यांस औषधोपचार करून ते भरून काढतात. वकीलवर्ग स्वाभाविकच खटाटोपी असल्यामुळें त्यांजवर सक्त नजर राहाते.

## सुशिक्षितांचे हाल

सुशिक्षितांस राहावयाची जागा अगदींच थोडी मिळते. बहुधा त्यांच्या वांट्यास तळमजला येतो. जी खोली जेवणाची तीच निजण्याची. घरीं ना नोकर ना चाकर. प्रपंचाची सर्व नेआण ज्याची त्याजवर पडते. सुशिक्षित वर्ग झारच्या कारकीर्दीत सुखी व संपन्न होता. पण हल्लीं त्यांचा बहुतेक पैसा अन्नवस्त्रांतच खलास होतो. त्याजपाशीं जिवाला रंजविणारा पियानो नाहीं, ग्रामोफोन नाहीं कीं हार्मोनियम नाहीं. त्याच्या घरांतील सर्व आनंद पार मावळला आहे. तथापि जीविताला थोडी तरी लज्जत आलीच पाहिजे यासाठीं तो पोटाला चिमटा बसला तरी सिनेमा पाहिल्यावांचून राहत नाहीं. सुशिक्षित वर्ग झारशाहींत सांप्रतहून पुष्कळच सुखी व संपन्न होता. पण अन्न व वस्त्र यापलीकडील कलाकौशल्याकडे व काव्यनाटकाकडे बोल्शेव्हिक सरकारनें तूर्त पैसा खर्च न करण्याचें ठरविलें असल्यामुळें सुशिक्षित वर्गाची उपासमार झाली किंवा त्याजकडून व्हावयाची वाङ्मयसेवा थांबली तरी त्याची बोल्शेव्हिक फिकीर बाळगीत नाहीत. तथापि ज्ञानप्रसार हा राष्ट्रास जिवंत ठेवणारा झराच अजीबात आटल्यामुळे रशियाची बौद्धिक हानि फार मोठी होत आहे यांत शंका नाहीं.

मोठे कारखाने तसा मोठा व्यापारहि सरकारच्या स्वाधीन आहे. सरकारनें आपलीं दुकानें ठिकठिकाणीं स्थापन केलीं असून त्यांतून गिऱ्हाइकांस माल घ्यावा लागतो. यामुळें सरकार ठरवील ती जिनसांची किंमत. दुकानें सरकारी नोकर चालवतात व त्यांजवर नजर ठेवण्यास वरिष्ठ अधिकारी असले तरी स्वतःच्या दुकानाची काळजी दुकानाचा मालक जितकी घेईल तितकी नोकर घेणार नाहीं हें उघड होय. याकारणानें मालाची नासधूस फार होते, माल चोख मिळत नाहीं, किंमत भलतीच पडते व सर्व प्रकारचा मालहि दुकानांत असतोच असें नाहीं. धंद्यांतील चढाओढींत जसे कांहीं तोटे असतात तसे कांहीं फायदेहि होतात. चोख माल व माफक किंमत हे अशाचपैकीं फायदे असून त्यास रशियांतील जनता मुकली आहे. इतकेंच नव्हे तर कापड बूट व भांडीं यांचाहि तिला भरपूर पुरवठा होत नाहीं. किरकोळ विक्रीचीं दुकानें मात्र खासगी व्यापारी अद्यापि चालवितात. पंचवीस टक्के मालाचा या दुकानांतून उठाव होतो.

मॉस्कोसारख्या शहरांतूनहि क्रान्तीनंतरच्या दहा वर्षांत नवीं घरें बहुधा बांधण्यांत आलीं नाहींत. सरकारी खातीं वाढल्यामुळें सरकारी नोकरांची व कचेऱ्यांची संख्या वाढली. मोठाल्या खासगी इमारती कचेऱ्यांनीं घेतल्या व लहान लहान घरांतून नोकरांचीं बिऱ्हाडें आलीं. शहरांतील वस्ती इतकी फुगली कीं पूर्वी ज्या जागेंत दोन माणसें राहात असत तींत आठ माणसें राहूं लागलीं. कुमारिकांचे गर्भपात रशियांत फार होतात. कारण कुमारिका गरोदर राहिल्या तर तें अद्यापिहि पातक गणलें जातें. अशा गुन्ह्यांस पूर्वी कडक शिक्षा असे ती शिक्षा आतां रद्द करण्यांत आली आहे. जिला आपला गर्भ काढून घ्यावयाचा असेल तिनें दवाखान्यांत जावें व उघडपणें गर्भपात करावा. त्यास कायद्याची मुळींच हरकत नाहीं!

# संस्थानिकांची चौकशी करा

( ले.–का. न. केळकर हायकोर्ट वकील, पुणें.)

बटलर कमिटीमार्फत संस्थानिकांनीं आपल्या प्रजेविरुद्ध जी कारवाई चालवली आहे तिची हकीकत आतां सर्वांस मशहूर आहेच. इंग्रजी राज्यात सध्या "स्वातंत्र्य" फारच बोकाळ लागलेलें दिसतें-कोणी व्यक्तिस्वातंत्र्य मागतो, कोणी पानस्वातंत्र्याची मागणी करतो तर आमचे संस्थानिक प्रजेवर अनियंत्रित जुलम करण्याच्या हक्काची मागणी करीत आहेत ! अर्थात् प्रतियोगित्वाच्या न्यायानें संस्थानी प्रजेनें "संस्थानिकांच्या कारभाराची चौकशी करा" अशी मागणी केली तर तें रास्तच होय. पुण्यास हैद्राबाद परिषदेनें अशा अर्थाचा ठराव केला आहे व इतर संस्थानी परिषदांतूनहि या ठरावाचें अनुकरण होणें इष्ट आहे. संस्थानी प्रजेनें तरी जुलुमाची गय किती दिवस करावी ? संस्थानी प्रजेच्या या मागणीला थोडेसें कायदेशीर हक्काचेंहि स्वरूप आहे व त्याचेंच विवरण या लेखात करावयाचें आहे.

संस्थानिकांचें म्हणणें असें आहे कीं, 'आम्ही मांडलिक नाहीं. तहनाम्याचे योगानें आमचा दर्जा स्वतंत्र आहे. आम्ही माडलिक असला तरी सार्वभौम बादशहाचे आहों, हिंदुस्थानसरकारचे नाहीं. उद्यां हिंदुस्थानात स्वराज्य झालें म्हणजे लोकपक्षाच्या पुढाऱ्यांच्या हातीं सत्ता जाऊन हिंदुस्थानसरकारचें स्वरूप बदलूं शकेल. म्हणून भावी हिंदी स्वराज्याच्या पुढाऱ्यांशीं संस्थानी प्रजेचा कांहीं-एक संबंध असूं नये. संस्थानी प्रजेवरील संस्थानिकांची मालकी अबाधित आहे आणि ती तशीच राहिली पाहिजे. तिला नियंत्रण घालण्याचा कोणासही हक्क नाहीं. प्रजेवर कर बसवणें, कायदे करणें, राज्याचा बंदोबस्त ठेवणें व राज्यकारभार चालविणें वगैरे सर्व बाबतींत आमचे आम्ही मुखत्यार आहोंत. व जोंपर्यंत परचक्र अगर अंतस्थ कलह उत्पन्न झाले नाहींत तोंपर्यंत तहनाम्यान्वयें ब्रिटिश सरकारला आमच्या अधिकारात हात घालतां येत नाहीं ! '

तहनाम्यांचा आधार संस्थानिक घेवोत. पण बुडत्यानें काडीचा आधार पाहावा त्यापैकीच त्यांची गत होय. कारण आतां या तहनाम्यांना काडीची देखील किंमत उरलेली नाहीं. सार्वभौम सरकार म्हणेल ते करूं शकतें याचा अनुभव गेल्या ५० वर्षांत भरपूर आलाच आहे. तहनाम्याची गोष्ट सोडून दिली तरी ( Misrule ) गैरव्यवस्था व बेबंदशाही या बाबतींत संस्थानिकांच्या कारभारांत हात घालण्याचा सार्वभौम सरकार या नात्यानें ब्रिटिश सरकारला जो स्वयंभू हक्क आहे त्याची व्याप्ति व खरें मर्म संस्थानिकांच्या लक्षांत आलेलें दिसत नाहीं; किंबहुना सार्वभौम सरकारच्या या विशिष्ट हक्कांतच संस्थानिकांची जबाबदारी आणि त्यांच्या प्रजेचें संरक्षण हीं अनुस्यूत झालेलीं आहेत. व त्यामुळें 'हक्क व जबाबदारी' यांचें तीन पक्षांच्या बाबतींत जें एक समीकरण उत्पन्न होतें तें असें—

( १ ) संस्थानिकांनीं गैरव्यवस्था अगर बेबंदशाही माजविली असतां सार्वभौम सरकारनें त्याना पदच्युत करण्याचा ' अधिकार ' आपल्या हातीं ठेवला. पण त्याचबरोबर इतर सर्व बाबतींत ते नीट वागले असतां तहनाम्याप्रमाणें त्यांचें संरक्षण करण्याची ' जबाबदारी ' पत्करली.

( २ ) सार्वभौम सरकाराकडून संरक्षण होण्याचा ' हक्क ' संस्थानिकांनीं मिळविला. पण त्याचबरोबर प्रजेला चांगलें वागविण्याची व तिला न छळण्याची ' जबाबदारी ' त्यांचेकडे आली.

( ३ ) संस्थानी प्रजेनें केवळ संस्थानिकांचेच प्रजाजन म्हणून राहण्याचा 'जबाबदारी' पत्करली. पण जबाबदारी पत्करली तर तिचा प्रतियोगी असा हक्क मिळणें वाजवी व आहे. व जुलम झाला असतां सार्वभौम सरकारकडे तक्रार चालून संस्थानिकांची चौकशी व्हावी हाच तो 'हक्क' होय. त्याशिवाय हें समीकरण पुरेंच होत नाहीं. आघाताबरोबर प्रत्याघात अगर ध्वनीबरोबर प्रतिध्वनि उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें राजकीय समाजांत हक्काबरोबर जबाबदारीहि उत्पन्न होत असते. पण संस्थानिक पडले देवाचे लाडके दौलतदार ! म्हणून त्यांना जबाबदारी नको. निर्भेळ हक्कांचें गाठाडें मात्र पाहिजे !

पण या बाबतींत आतां प्रत्येकाच्या शीलाची व ध्येयनिष्ठेची परीक्षाच होण्याची वेळ आली आहे. संस्थानी प्रजेला संस्थानिकांच्या हातून स्वराज्याचे हक्क मिळतील ही आशा व्यर्थ आहे. किंबहुना बटलर कमिटीपुढें संस्थानिकांनीं जी कारवाई केली त्यामुळें संस्थानी प्रजेलाहि आपला निश्चय निर्वाणीनें जाहीर करण्याचा प्रसंग यावा हें प्राप्तच होय. एरवीं आपल्या राजांची जाहीर चौकशी व्हावी असा ठराव कोणती राजनिष्ठ प्रजा आपल्या हाताने करील? पण निष्ठेलाहि मर्यादा असते. आणि स्वतःच्याच कृत्यांनीं

त्या राजनिष्ठेचें सत्त्वहरण करण्याची संस्थानिकांनीं वेळ आणली तर प्रजेनें तरी मूग गिळून कोठपर्यंत बसावें? तहनाम्यांनीं उत्पन्न झालेल्या इमानदारीचा संस्थानिक इतका कांगावा करतात. पण जबरदस्तीशीं तहनाम्याची भाषा ते न बोलतील तर आश्चर्य! पूर्वी ग्रीक व रोमन सरदार आपल्या विजयरथांच्या पाठीमागें पाडाव केलेल्या शत्रूंना गुलामांप्रमाणें बांधून नेत असत त्याप्रमाणें आजचे मांडलिक संस्थानिक व्हाइसरॉयापुढें बद्धकर व विनतशीर्ष असतात. या मानहानीला तहनाम्यांनीं उत्पन्न झालेल्या इमानदारीचें त्यांनीं सोज्वळ स्वरूप न द्यावें तर काय करावें? पण जुलमजबरदस्तीला जो मान आहे तो प्रजेच्या सात्त्विक राजनिष्ठेला मात्र नाहीं. प्रजेशीं इमानदारी ही चीजच संस्थानिकांना माहीत नाहीं !

सार्वभौम सरकारच्याहि बाबतींत एक शब्द लिहिणें वाजवी होईल. खालसा मुलुखांतल्या एखाद्या वर्तमानपत्रानें अगर व्यक्तीनें संस्थानी प्रजेच्या वतीनें एखादा सहानुभूतीचा शब्द उच्चारला अगर चळवळ केली तर प्रिन्सेस प्रोटेक्शनसारखे कायदे होतात, वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी करण्यांत येते, व ब्रिटिश सरकारची संस्थानिकांशीं असलेली इमानदारी व मैत्री बिघडते अशा कांगावखोरीला सुरुवात होते. पण ज्या तहनाम्यांनीं इकडची शेंकडो-हजारों प्रजा सरकारनें संस्थानिकांना जामीनकी म्हणून दिली ती संस्थानी मुलुखांत जुलमांत खितपत पडली असतांना मात्र या इमानदारीला बाध येत नाहीं! जबरदस्तीला संरक्षणाची हमी देऊन जुलूम झालेल्यावरच अधिक जुलूम होण्याची पाळी यावी ही गोष्ट सरकारला खचित लज्जास्पद होय. बटलर कमिटीपुढें प्रजाजनाची बाजू देखील ऐकली जाऊं नये हें दुसऱ्या कशाचें लक्षण! संस्थानी प्रजेचें जुलमापासून संरक्षण व्हावें अशी हमी सरकारनें घेतली आहे. ही जबाबदारी त्याचे हातून पार पडत नसेल तर देशांत सार्वभौम सरकार असलें काय व नसलें काय लोकांच्या दृष्टीनें सारखेंच. प्रजाद्रोहाचें कंकण हातीं बांधून संस्थानिकांनीं सर्व जनलज्जा बाजूस ठेवली असली तरी सार्वभौम सरकार या नात्यानें संस्थानी प्रजेचा अशी उपेक्षा व्हावी ही गोष्ट सरकारच्या इभ्रतीला बट्टा आणण्यासारखी आहे. खालसा प्रजेच्या बाबतींत इंग्रज सरकारहि संस्थानिकांचेच भाऊबंद शोभण्यासारखे असले तरी त्रयस्थांच्या बाबतींत कित्येक वेळां ते न्यायानें वागतात असा इतिहासाचा अनुभव आहे; मग तें सात्त्विक न्यायबुद्धीनें असो, अगर आपल्या मर्दपणाचें प्रदर्शन करण्याच्या राजस बुद्धीनें असो. पण कोणत्याही दृष्टीनें घ्या, संस्थानी मुलखांत जोंपर्यंत जबाबदारीचें स्वराज्य स्थापण्याचा उपक्रम सुरू होत नाहीं तोंपर्यंत सार्वभौम या नात्यानें संस्थानिकांच्या कारभारावर सरकारनें कसून नियंत्रण करावें व प्रत्येक जुलमाची निःपक्षपातीपणानें चौकशी करावी. खालसा प्रजेचा व सरकारचा हितविरोध असेल, पण संस्थानी प्रजेचा तर तो असण्याचा संभव नाहींना? एकाच्या वाईटपणाचा फायदा दुसऱ्यास सहानुभूति मिळण्याकडे झाला तरी खालसा प्रजेला त्यांत यत्किंचितहि वाईट वाटणार नाहीं. उलट आपल्या चुलत भाऊबंदांना का होईना पण न्याय मिळाला हे पाहून त्यांना आनंदच वाटेल. बटलर कमिटीपुढें संस्थानिकांनीं आपली बाजू मांडून संस्थानी प्रजेवर अनियंत्रित ताबा मागितला आहे. अशा विपरीत स्थितीमध्यें जबाबदार राज्यपद्धति निर्माण होईपर्यंत असा ताबा देऊं नये व संस्थानिकांच्या कारभाराची वरिष्ठ सत्ताधीश या नात्यानें सरकारनें चौकशी करावी, इतकीच साधी मागणी संस्थानी प्रजा करीत आहे. व संस्थानिकांचें म्हणणें बाजूस सारून सरकारनें प्रजेची बाजू घेतली तर त्यांच्या न्यायाच्या ब्रीदाला तें एकदां तरी जागलें असेंच जग म्हणेल. पाहावें सरकारला काय बुद्धि होते तें !

## खेड्यापाड्यांची संघटना

वर्तमानपत्रें व व्याख्यानें यांचे द्वारें शहरांतील पुढाऱ्यांकडून जनतेस शिक्षण मिळावयाचें त्याची हद्द आतां बहुतेक गांठल्यासारखीच आहे. राजकीय चळवळींत नवा जोम उत्पन्न व्हावयास चळवळीचीं नवीं केंद्रें शोधून काढणें भाग आहे. असहकारितेची चळवळ ओसरल्यावर पुढाऱ्यांचें लक्ष हीं नवीं केंद्रें हुडकून काढण्याकडे वेधलें व या गोष्टीचा उच्चार देशबंधु दास यांनीं जोरानें केला. ग्रामसंघटना म्हणजेच नवीं केंद्रें हुडकण्याचा प्रयत्न. आमचीं खेडीं इंग्रजी राज्यापूर्वी सुसंघटित होतीं. इंग्रजांची संघटनेची कल्पना वेगळी हिंदी लोकांच्या संघटनेची कल्पना वेगळी. हिंदुस्थानांतील खेडीं राजकीय, सामाजिक, धार्मिक व औद्योगिक या चारहि बाबतींत स्वयंपूर्ण, संघटित व स्वावलंबी होतीं. परंतु इंग्रजी राज्यांत इलाखा, प्रांत, जिल्हा, तालुका या टप्प्यांनीं राजकीय सत्ता खालीं उतरत येत असतां खेडेगांवापाशीं पूर्वीच्या राजकीय सत्तेचा अंश फारच थोडा उरला. वरून हुकूम सुटतील ते बजावण्याचेंच काय तें काम गांवाच्या पाटील-कुळकर्ण्यांकडे उरलें

व त्या हुकुमापुढें मान वांकविण्यापलीकडे गांवकऱ्यांचें महत्त्व राहिलें नाहीं.बलुतेदारांचे हक्क सरकाराकडून कायदेशीरपणें मानले गेले नाहींत. एवढ्यावरच हा अनिष्ट प्रकार न थांबतां ग्रामसंस्थेस अत्यंत प्रतिकूल वारें वाहूं लागलें. आगगाड्यांतून येणाऱ्या परदेशी मालानें खेड्यांतील उद्योग-धंदे बुडाले. धंदे बुडाल्यामुळें रिकामे झालेले कारागीर व शेतकरी त्याच आगगाड्यांत बसून मुंबई, अहमदाबाद, कराची हीं शहरें पाहावयास गेले. आणि वर्तमानपत्रांतून अपरिचित व उलटसुलट विचारांची चर्चा येत राहिली याचा परिणाम असा झाला कीं, खेडेगावांतील जुनी शिस्त नष्ट झाली, बंधनें मोडलीं, ग्रामिक जीवित निर्जीव झालें व खेड्यावर प्रतकळा आली.

परकीय राज्य व त्याच्या मदतीनें उत्पन्न झालेले जोरदार उलट प्रवाह याजपुढें वाहून गेलेली ग्रामसंस्था हिचें पुनरुज्जीवन करणें अनुकूल परिस्थिति प्राप्त झाल्यावांचून फार कठीण आहे. तथापि खेडेगांवांतून नवीन वारें खेळविल्यावांचून नाकरशाहास लोकमताचा शह देणेंहि शक्य नाहीं. या दृष्टीनें सातारा जिल्ह्यात थोड्याबहुत प्रमाणांत उद्योग सुरू झाल्याचें वाचकांस माहीत आहेच. खेड्यापाड्यांचा संघटना या विषयावर साताराचे वकील श्री. शंकर विष्णु भिडे बी. ए. एलएल. बी. यांनीं एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें असून त्यांत संघटनेची रूपरेखा आंखण्यांत आली आहे. ती अशी—पांच-सात कोसाच्या अंतरानें साधारणपणें दहा-पांच खेडीं असतात. त्यांचा एक गट बनवून त्यांजवर एका स्वयंसेवकाची नेमणूक करावी. त्यानें खेड्यातील जनतेस जरूर अशा बारीकसारीक धंद्याची उभारणी करणें, आखाडा स्थापणें, जुने व नवे उत्सव साजरे करण, शाळा काढून त्यांत इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपर्यंत शिक्षणाची सोय लावणें इत्यादि कामांस मदत करावी.त्याखेरीज फिरतीं वाचनालयं,आरोग्यमंडळ, व वैद्यकमंडळें स्थापून त्यांजमार्फत खेड्यांतील लोकांची बौद्धिक, शारीरिक व आरोग्यविषयक उन्नति घडवून आणावी. ह्या कार्याचें नेतृत्व जिल्हा व तालुका कॉंग्रेस-कमिट्यांकडे असावें व तिला लागणारा पैसा धनिक वर्गानें पुरवावा. ही योजना फार चांगली असून तिचा सुधारणा तिचा अंमल करीत असतां येणाऱ्या अनुभवानेंच होणार आहे. सदर पुस्तकास जोडलेल्या परिशिष्टांत खेडेगांवांतून कोणती माहिती स्वयंसेवकान मिळवावी, याचेंहि टांचण आहे व तें बरेंच मार्गदर्शक आहे. परंतु कांहीं बारीक व स्थानिक अडचणी वगळल्यास सर्व खेड्यांचे प्रश्न सामान्यतः एकाच स्वरूपाचे असतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

ग्रामपंचायतीचें महत्त्व या बाबतींत विशेष आहे. पण त्यावर श्री. भिडे यांनीं द्यावा तितका जोर दिलेला नाहीं. सांप्रतचा ग्रामपंचायत कायदा लोकांवर कर बसवून म्युनिसिपालिटीचें ढोबळ काम करून घेण्याचा आहे या कायद्याची दुरुस्ती होऊन पंचायतीकडे दिवाणी व फौजदारी अधिकार अल्प प्रमाणांत येणें इष्ट आहे.ते अधिकार प्राप्त झाल्यास ग्रामपंचायत ही ग्रामसंघटनेच्या कार्याचें केंद्र होईल व तिजमार्फत जुनीं खेडीं नव्या काळांत आणन सोडतां येतील व स्वयंसेवकाकडे कार्याची दिशा दाखविण्याहून विशेष जोखमीचें काम शिल्लक उरणार नाहीं. तरी सातारा जिल्ह्यांत पुढाऱ्यांनीं व विशेषतः कौन्सिलांत निवडून आलेल्या आमदारांनीं या महत्त्वाच्या प्रश्नाकडे लक्ष पुरविणें अवश्यक होय असें आम्हास वाटतें.

## वकील परिषदेचे ठराव

शनिवार ता. ५ रोजीं दुपारीं ४ वाजतां अधिवेशनास पुनः सुरुवात होऊन निरनिराळे ठराव पास करण्यात आले.त्याचा गोषवारा पुढें दिला आहे.

( १ ) मॅजिस्ट्रेटच्या व जज्जाच्या जागांवर वकिलांच्याच नेमणुका कराव्या, ( २ ) हायकोर्टांत वकील व ॲडव्होकेट याच्यामध्यें भेद असूं नये, व हायकोर्टाच्या ओरिजिनल बाजूला वकिलांना वकिली करण्याची परवानगी असावी, ( ३ ) तरुण व अननुभविक वकिलाना त्या धंद्याचें शिक्षण देण्याची व्यवस्था करावी, ( ४ ) वकिलीच्या परीक्षेच्या अभ्यासक्रमांत सुधारणा करावी; ( ५ ) ऑनररी मॅजिस्ट्रेटस नेमण्याची पद्धत रद्द करण्यांत यावी; ( ६ ) न्याय व अंमलबजावणी खात्यांची विभागणी करावी; ( ७ ) न्यायखात्यातील वरिष्ठ जागा केवळ हिंदी लोकांनाच द्याव्या; ( ८ ) डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट रद्द करण्यांत यावा; ( ९ ) वतन ॲक्टांत दुरुस्ती करावी; ( १० ) बार कौन्सिलवर मुंबईबाहेरच्या वकीलवर्गाचे प्रतिनिधी नेमण्यांत यावे; ( ११ ) हिंदुस्थानांत वरिष्ठ कोर्ट स्थापन करण्यात यावें; ( १२ ) महाराष्ट्र बार कौन्सिल नांवाची संस्था निर्माण करण्यांत यावी; ( १३ ) अलीबाग येथें डिस्ट्रिक्ट कोर्ट स्थापन करण्यांत यावें; निदान तेथे फर्स्ट क्लास सबजज्जाची नेमणूक करण्यात यावी; ( १४ ) वकिलांना म्हातारपणात म्हणून एक प्रॉव्हिडंट फंड स्थापन करण्यांत यावा; ( १५ ) हिंदु लॉ ची सुधारणा करण्याकरितां हिंदु लॉ रिसर्च व रिफॉर्म असोसिएशनला महाराष्ट्रांतील वकिलांनीं मदत करावी, वगैरे.

# जपानचें चीनमधील कारस्थान

चिनांतील यादवी गेल्या आठ महिन्यांत थंडावली होती व ती थंडावण्यास कारणेंहि तशींच घडलीं होतीं. एक तर राष्ट्रीय पक्षास रशियाच्या सोव्हिएट सरकाराकडून सैन्याची व दारूगोळ्याची जी मदत मिळत होती ती दोनहि राष्ट्रांचें बिनसल्यामुळें थांबली व दुसरें असें कीं, राष्ट्रीय पक्षाचीं दोन शकलें पडून त्याचें सामर्थ्य आपसांतील भांडणें मिटविण्यांतच संपून गेलें. तथापि अलीकडे महिन्या सवा–महिन्यांत चँगकैशेक याच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रीय सैन्यानें नव्या दमानें पेकिंग–सरकाराविरुद्ध मोहीम सुरू केली व यांगत्से नदीपलीकडील मुलूख तें हळूहळू सर करीत चाललें. या नव्या मोहिमेंत राष्ट्रीय सैन्य सारखें विजयामागून विजय मिळवीत गेलें असें नाहीं. त्याला पेकिंगच्या सेनेपुढें कांहीं ठिकाणीं हार खावी लागल्याच्या बातम्याहि मध्यंतरीं ऐकूं आल्या. परंतु त्यांतहि अपयशापेक्षां यशाचा भागच अधिक दृष्टीस पडला. यांगत्से नदी ओलांडल्यावर उत्तरेस शांटंग प्रांत लागतो. यांगत्से नदी गांठीत असतां राष्ट्रीय फौजेस पेकिंगच्या सैन्याबरोबरच शांघायमधील इंग्रजांशीं व यांगत्से नदीच्या कांठाकांठानें हँकौपर्यंत पसरलेल्या इंग्रजांच्या वसाहतींशीं तोंड द्यावयाचें होतें. त्या कामीं राष्ट्रीय सैन्यांतील कांहीं शिपायांच्या हातून आगळीक घडून कित्येक इंग्लिश व अमेरिकन वसाहतवाल्यांच्या जीवितास व वित्तास नानकिंग शहरीं किंचित् धक्का पोंचतांच इंग्रजांनीं व अमेरिकनांनीं आकाशपाताळ हालवून चिनी राष्ट्रीय पक्षास चांगलीच तंबी दिली व त्यास नाकधुऱ्या काढण्यास लावलें. त्या प्रसंगीं अमेरिकेनें इंग्लंडाप्रमाणेंच हेका धरून वरील प्रकरण नेटास लावलें असतें तर त्याचे अनिष्ट परिणाम आन्तरराष्ट्रीय दृष्ट्या फार दूरवर पोंचल्यावांचून राहिले नसते. परंतु अमेरिकेची आणि फ्रान्स, इटाली व जपान यांची मदत आपणास मिळणार नाहीं असा रंग दिसतांच इंग्लंडानें हा प्रसंग शहाणपणानें टाळून नुसत्या माफीवरच भागविलें.

परंतु जें संकट एका वर्षापूर्वी टळलें तेंच गेल्या आठवड्यांत अन्य रीतीनें ओढवून चीनचें भवितव्य फिरून गोत्यांत सांपडलें. शांघाय प्रांताच्या उत्तरेस शांटंग प्रांत आहे. हें वर सांगितलेंच आहे. शांघाय शहरीं इंग्रजांनीं आपला व्यापार उद्योगधंदे यांचे हातपाय पसरून ठेवले आहेत. त्याप्रमाणेच शांटंग प्रांतांत जपानाचें प्रस्थ फार मोठें आहे. शांटंग प्रांतांत राष्ट्रीय सैन्य नुकतेंच घुसून त्याच्या पेकिंगसरकारच्या सैन्याशीं झटापटी उडाल्या. राष्ट्रीय सैन्यास पेकिंग सरकारापासून सिनानफू हें नाक्याचें शहर सर करावयाचें होतें. सिनानफू हें मोठें रेलवेचें जंक्शन असून तेथून रेलवेचा एक फाटा टिन्स्टिनवरून पेकिंगकडे जातो व दुसरा सिंगटौस पोंचतो. सिनानफू शहर बऱ्याच खडाजंगीनंतर राष्ट्रीय सैन्यानें पेकिंग सरकारच्या सैन्यापासून जिंकून घेतलें. परंतु तें जिंकून घेत असतां त्या शहरांतील जपानाच्या वसाहतीस सैनिकांच्या दांडगाईची झळ लागली. चिनी शिपायांनीं आपली मालमत्ता लुटली अशी जपानाची तक्रार आहे. चीनचें राष्ट्रीय सैन्य व त्याचा अधिपति चँग-कैशेक यांना जपानाच्या वसाहतीस उपद्रव देण्यापासून कांहीं फायदा नव्हता व तो त्याचा उद्देशहि नव्हता. कांहीं बाजारबुणग्यांनीं जपानी वसाहतींत शिरून नासधूस केली असली तर ती त्यांची चूक होय. व ती सेनापति चँगकैशेक अगर त्याचे जबाबदार अधिकारी यांच्या हुकुमावरून झालेली नव्हे. पण या चुकीचा संथपणानें व समजूतदारीनें विचार करण्याची जपानाच्या लष्करी अधिकाऱ्यास पर्वा काय ? त्यांनीं गोळीबार चालवून चिनी सैन्याची कत्तल मांडली.

चीनचें लष्करी सामर्थ्य अल्प, त्या मानानें जपानचें सामर्थ्य किती तरी मोठें. जपानानें चालविलेल्या या गोळीबारास गोळीबारानेंच उलट जबाब देण्याची हिंमत चीनच्या राष्ट्रीय सैन्यांत नव्हती. राष्ट्रीय सेनापति चँगकैशेक यानें जपानी सैन्याचा अधिपति फूकुडा यास वस्तुस्थिति नीट समजावून देण्याचा प्रयत्न केला. फूकुडा यास चँग कैशेक यांचा युक्तिवाद पटला व दोघांचा समेटहि झाला. फूकुडा यानें अशा रीतीनें भांडण मिटविलें तरी जपानाच्या मंत्रिमंडळाचा क्रोध शमला नाहीं. चीन देश सहजासहजीं पकडींत आला असल्यामुळें त्यास स्वतःचा जुना डाव साधून न घेतां मोकळें सोडण्याची जपानी मंत्रिमंडळाची इच्छा नव्हती. त्यांनीं या वांग्याचें भूत बनविण्याचे ठरविलें व चीनच्या आगळिकीचा सर्वत्र गवगवा केला. जणुं काय चीन आपल्याबरोबर लढण्याकरितां उठला आहे अशी हूल उठवून देऊन जपानानें युद्धाची जंगी तयारीहि चालविली. जपानांतून पंधरा हजार सैन्य चिनांत उतरविण्याचा हुकूम युद्धमंत्र्यानें सोडला व पिचलीच्या आखातांत जपानाचीं क्रूझरें वावरूं लागलीं.

फूकुडा व चँगकैशेक यांनीं आपसांत कांहीं तडजोड चालू ठेवली होती. तिला अनुसरून चँगकैशेक यानें चिनी सैन्य जपानाच्या वसाहतींतून विशिष्ट मुदतीच्या आंत हलवावें असेंहि ठरलें होतें.

परंतु ही योजना जपानाच्या मंत्रिमंडळास पसंत पडली नाहीं. त्यास इतक्या सौम्य अटीवर हा तंटा न मिटवितां स्वार्थबुद्धीनें चिनावर अपमानकारक शर्ती लादावयाच्या होत्या. हें कार्य घडवून आणण्याकरितां फूकुडा याच्या जागीं जपान सरकारनें इवाकुरा याची नेमणूक केली. त्यानें फूकुडा याचें सर्व धोरण बदलून टाकलें. सीनानफू येथील रेलवे स्टेशन, तार व टेलिफोन इवाकुराच्या हुकमावरून जपानी सैन्यानें ताब्यांत घेतलेच. पण त्याखेरीज सिनानफूपासून सिंगटौपर्यंतच्या आगगाडीच्या फांट्यावर सात मैलांच्या आंत राष्ट्रीय सैनिकांनीं फिरकतां कामा नये असेंहि इवाकुरानें फर्माविलें. सिंगटौ हें बंदर पिचलीचे आखातावर आहे. सिंगटौ ते सीनानफू हा प्रदेश म्हणजे सगळा शांटंग प्रांत. जपानाच्या वरील धोरणानें हा सगळा प्रांत जपानाच्या घशांत पडणार यांत शंका नव्हती. या कारणानें जपानी सेनापति इवाकुरा यानं घातलेल्या शर्ती राष्ट्रीय पुढारी चँगकैशेक यास मान्य झाल्या नाहींत. इतकेंच नव्हे तर या अटी अपमानकारक असून जपानाची सत्ता चिनांत प्रस्थापित करण्याचा व चीनच्या स्वातंत्र्यावर घाला घालण्याचा हा जपानी सरकारचा डाव होय अशी पेकिंगचा पुढारी चँगत्सोलीन याचीहि खात्री पटून त्यानें चिनी राष्ट्रावरील या नव्या संकटाचें निवारण होईपर्यंत यादवी युद्ध तहकूब ठेवलें असल्याचें जाहीर केलें. चीन हा देश चँगकैशेक व चँगत्सोलीन यांचा स्वदेश होय. या दृष्टीनें चँगत्सोलीन यानें स्वीकारलेलें धोरण मुत्सद्दीपणास व देशाभिमानास साजेसें होतें यांत शंका नाहीं. चँगकैशेक व चँगत्सोलीन या उभयतांची ज्या संकटाच्या उग्रपणाविषयीं एकवाक्यता झाली त्या संकटाचें खरें स्वरूप वाचकांस समजणें अगत्याचें आहे.

शांटंग म्हणजे कियोचौ प्रांत. चीनचा लचका तोडून कोणाही परकीय राष्ट्रानें आपलें राज्य चीनमध्यें स्थापन करूं नये हें धोरण सर्व राष्ट्रांना मान्य होण्यापूर्वी चीनची जी थोडीबहुत लांडगेतोड झाली तिच्यांत शांटंग हा तुकडा १८९७ सालीं जर्मनीनें आपल्या पंजांत पकडला. त्या प्रांतांत खनिज संपत्ति विपुल असल्यामुळें ती उकरून काढण्याच्या आशेनें जर्मनीनें शांटंग प्रांतांत पाण्यासारखा पैसा ओतला. महायुद्धांत ज्या दोन प्रचंड फळ्या पडल्या त्यांत इंग्लंड, फ्रान्स आदिकरून दोस्त राष्ट्रांच्या कटांत जपान देश सामील झाला. ती वेळ इंग्लंडाच्या दृष्टीनेंहि मोठी आणीबाणीची होती. इंग्लंडास आपलें सगळें आरमारी व लष्करी बळ युरोपांत जर्मनीविरुद्ध एकवटावें लागलें. पण इंग्लंडाचें मुख्य साम्राज्य आशिया खंडांत पसरलेलें. हिंदुस्थान, ब्रह्मदेश यांसारखे ब्रिटिश साम्राज्याच्या दौलतीचे खांब आशिया खंडांत-ब्रिटिश आरमार व फौजफाटा युरोपांत गुंतून पडल्यामुळें हिंदुस्थान व ब्रह्मदेश या देशांचें परचक्रापासून संरक्षण करण्यास इंग्लंड असमर्थ होतें. इंग्लंडाच्या या अडचणीचा फायदा घेऊन ब्रिटिश साम्राज्य धुळीस मिळविण्याची धमक आशिया खंडांतील राष्ट्रांपैकीं जर कोणांत असली तर ती एकट्या जपानांतच होती. या दृष्टीनें जपान आपल्या लगामीं पक्का राहील अशी तरतूद करणें ब्रिटिश मुत्सद्यांस भाग असल्यामुळें त्यांनीं शांटंग प्रांत जपानास मिळवून दिला.

पण इंग्लंडाचें हें कृत्य हालवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवण्यापैकींच होतें. महायुद्ध संपलें, इंग्लंडावरील संकट टळलें व इंग्लंड आणि इंग्लंडाचे दोस्त विजयानंदांत बेहोष झाले. त्यानंतर व्हर्सेलीसच्या परिषदेनें महायुद्धांत कमीअधिक प्रमाणांत सांपडलेल्या लहानमोठ्या राष्ट्रांशीं व्हावयाच्या तहाची वाटाघाट केली. सदर वाटाघाटीचे वेळीं चीनलाहि आपली बाजू मांडण्याची संधि मिळाली. चीनचा शांटंग प्रांत जर्मनीनें मिळाविला होता खरा. तथापि महायुद्धांत जर्मनी चारी मुंड्या चीत होऊन त्याच्या आफ्रिका व आशिया खंडांतील वसाहती हिरावून घेण्यांत आल्या असल्या तरी चीनचा शांटंग प्रांत चिनास परत देण्याऐवजीं जपानास का मिळावा असा चिनी वकिलानें दोस्त राष्ट्रांस सवाल टाकला. चिनी वकिलाच्या या सवालांतील सयुक्तिकपणा अमेरिकेस पटून सदर प्रांत चिनासच मिळणें न्यायाचें असल्याबद्दल अमेरिकेची खात्री झाली. परंतु इंग्लंड व फ्रान्स हीं दोन राष्ट्रें जपानाबरोबर वचनबद्ध झालेलीं. अमेरिकेची कुमक महायुद्धाच्या अखेरीस मिळाल्यामुळें विजयश्रीनें इंग्लंड-फ्रान्सास वरिलें हें खरें असलें व त्याबद्दल हे दोस्तद्वय अमेरिकेचे उतराई असले तरी विजय पदरांत पडल्यावर अमेरिकेच्या शब्दास मानण्याची वृत्ति इंग्लंड-फ्रान्सांत शिल्लक राहिली नाहीं.

अमेरिकेचे अध्यक्ष विल्सनसाहेब यांचा उदो उदो संपून त्यांस भारतीय युद्धांतील विदुराच्या शिष्टाईचा दुबळेपणा प्राप्त झाला-अमेरिकेच्या सल्ल्यास इंग्लंड व फ्रान्स या दुकलीनें भीक घातली नाहीं. या अन्यायाचा चिनी वकिलास राग येऊन त्यानें व्हर्सेलीसच्या तहावर सही करण्याचें नाकारलें. तथापि अन्य कारणानें चीन हा राष्ट्रसंघाचा सभासद राहिलाच. त्यानंतर अमेरिकेंत वॉशिंग्टन शहरीं भरलेल्या परिषदेंत चीननें हाच प्रश्न उपस्थित केला व जपानानें चीनपासून ५ कोटि ६० लक्ष येन इतकी खंडणी घेऊन सदर प्रांतांतील हक्कसंबंध चिनास देण्याचें ठरविलें. तथापि खाणी व व्यापार या बाबतींत कांहीं हक्क जपानानें चीनपासून राखून ठेवलेच.

शांटंग प्रांतांतील आगगाडीचे रस्ते जर्मनीनें पदरचा पैसा खर्च करून बांधले होते. त्यांचा मालकी हक्क जपानापासून चीननें विकत घेतला खरा.पण त्याबद्दल जपानास भरावयाची रक्कम चीनपाशीं नसल्यामुळें तेच रस्ते जपानाकडे तारण ठेवून जपानानें चीनपासून रक्कम कर्ज काढून ती जपानासच भरली व त्या कर्जाची फेड होईपर्यंत रेलवेवरील सर्व देखरेख जपानाच्या ट्रॅफिक मॅनेजराकडेच रहावी असें ठरलें.

हा सर्व कागदी घोड्यांचाच नाच होय. त्यांत चीनच्या पदरांत प्रत्यक्ष फायदा कांहींच पडला नाहीं. चीननें साधलें तें एवढेंच कीं, जपान जर्मनीची अनायासें हस्तगत झालेली मिळकत चिनास परत देण्यास केव्हांहि तयार नव्हता तो खंडणीच्या मोबदल्यावर तरी तयार झाला. तथापि यापासून चीनला तात्कालिक तोटाच सोसावा लागला. कारण शांटंग प्रांत जपानाकडे राहावयाचा तो राहूनच्या राहून जपान चीनचा सावकारहि होऊन बसला. जपान हें अत्यंत प्रबळ राष्ट्र या नात्यानें क्षुल्लक अत्याचाराच्या सबबीवर चीनास गुरकावीत आहेच. पण त्या मनगटाच्या जोरास सावकारी गुर्मीचाहि पाठिंबा आहे हें विसरतां कामा नये. गरीब बिचारा चीन जपानचा स्वार्थी कावा ओळखून आहे. अत्याचाराबद्दल चिनास प्रायश्चित्त म्हणून शांटंग प्रांत जपान कायमचा गट्टहि करणार असेल. अशा संकटावस्थेंत अमेरिकेनें मध्यस्थी करून आपल्या राजकीय हक्कांचें व स्वातंत्र्याचें संरक्षण करावें अशी चिनी राष्ट्रीय पक्षाची अपेक्षा होती. पण अशा प्रकारच्या तडजोडीस चीनप्रमाणें जपान तयार नसेल तर मध्यस्थीचें कार्य अशक्य होय असें अमेरिकेनें जाहीर केलें आहे. अमेरिकेची शिष्टाई जपानच्या बेपर्वाईनें फसल्यामुळें आतां चिनास राष्ट्रसंघाचे पाय धरावे लागले आहेत.

चिनी राष्ट्रीय पक्ष राष्ट्रसंघाचा सभासद नाहीं.हा सदस्यत्वाचा अधिकार पेकिंग–सरकारचा असून प्रस्तुतची फिर्याद पेकिंग--सरकारच्या वतीनें आल्यावांचून राष्ट्रसंघ हातीं धरणार नाहीं. राष्ट्रीय पक्षानें राष्ट्रसंघाकडे पाठविलेल्या फिर्यादींत आपली बाजू खुलासेवार मांडली आहे. जपानी सैन्यानें विनाकारण गोळीबार करून सीनानफू येथील शेंकडो चिनी सैनिक व नागरिक ठार मारले, चिनी परराष्ट्रीय वकिलाचें नाक कापून त्याचा व त्याच्या हाताखालील तीन अधिकाऱ्यांचा प्राण घेतला आणि सरतेशेवटीं ज्यांतील अटी कबूल होणार नाहींत असा निर्वाणीचा खलिता चिनी राष्ट्रीय पक्षाकडे पाठवून त्याच्या उत्तराची वाटहि न पाहातां युद्धाला सुरुवात केली. जपानानें ताबडतोब ही लढाई थांबवावी व आपलें सैन्य चीनमधून काढून घ्यावें अशी राष्ट्रीय पक्षाची मागणी आहे. राष्ट्रीय पक्षानें राष्ट्रसंघापर्यंत धाव मारतांच जपानचे मुख्यमंत्री टणाका यांनीं सिनान फू येथील परिस्थिति आतां निवळली असल्यामुळें युद्धाची गरज उरली नसल्याचें ध्वनित केलें आहे. सीनानफू येथील लढा चीन व जपान यांजमधील मुत्सद्यांच्या मार्फत मिटेल असा त्यांस भरंवसा आहे. आणि ज्या कुरापतीमुळें वरील प्रकरण इतक्या हातघाईवर आलें तिच्याशीं चिनी सैन्याचा प्रत्यक्ष संबंध नसून सदर सैन्यामधील कम्यूनिस्ट पक्षाचें तें कृत्य असावें अशी टणाका यांची समजूत आहे. राष्ट्रीय सैन्य व पेकिंग सरकार यांजमधील युद्धप्रसंगांत हात घालण्याची टणाका यांची इच्छा नाहीं.तथापि टिन्स्टिन व पेकिंग या बाजूस युद्धप्रसंग चालू असतां परराष्ट्रीयांच्या बचावाची जबाबदारी अंगाबाहेर टाकण्यास टणाका तयार नाहींत.

चीन व जपान यांजमधील युद्धप्रसंग इंग्लंडच्या मागील युद्धप्रसंगाप्रमाणेंच टळेल याबद्दल कोणास फारशी शंका नव्हती. परंतु सीनानफू येथें चिनी सैन्यावर तोफा डागून जी प्राणहानि जपानी सेनापतींनीं केली त्याची चौकशी करण्यासंबंधानें एकहि अक्षर टणाका बोलत नाहींत. तसेंच शांटंग प्रांतांत जमविलेलें सैन्यहि हलविण्याचा त्यांचा विचार नाहीं. किंबहुना पेकिंग व टिन्स्टिन या बाजूकडील धामधुमीचा उल्लेख करून वरील सैन्य तसेंच चिनांत ठेवण्याचाहि टणाका यांचा बेत दिसतो आणि अशा रीतीनें शांटंग प्रांतावरील चीनची राजकीय सत्ता उडवून तो प्रांत कायमचा पचवून टाकण्यासहि जपान मागेंपुढें पाहाणार नाहीं. चीनच्या दुर्बलावस्थेंत जपानाची ही अरेरावी संभवनीय आहे यांत शंका नाहीं.परंतु इंग्लंड व जपान यांची पूर्वीची जूट आतां मोडली असल्यामुळें ब्रिटिश मुत्सद्दी जपानाचा नवा डाव साधूं देतील असें वाटत नाहीं. जपान व चीन दोन्ही देश समान संस्कृतीचे व धर्माचे असतां चीनच्या उद्धाराचे कामीं जपानाकडून साहाय्य होण्याचें बाजूस राहून जपान भली बुरी संधि साधून व चीनचे लचके तोडून आपली साम्राज्यविस्ताराची हाव भागवीत आहे हें आश्चर्य होय. यावरून साम्राज्यवाद हा गोऱ्या युरोपियनांचा असो वा पिंवळ्या आशियाटिकांचा असो, तो जगाच्या स्वातंत्र्यास व स्वास्थ्यास सारखाच घातक ठरतो हेंच सिद्ध होतें. जपानचें हें अरेरावीचे वर्तन पाहून चिनांतील उभयपक्षांनीं पुष्कळच बोध घेण्यासारखा आहे. दोघांच्या यादवीनें तिसऱ्याचें फावतें याचें हें ताजे उदाहरण पाहिल्यानंतर सावध होऊन पेकिंग सरकार राष्ट्रीय पक्षाशीं स्नेहसंबंधाचें नातें जोडून त्यास चिनांत मध्यवर्ती अशी एक राष्ट्रीय सत्ता स्थापन करण्यास मदत करील तर त्यापासून

उभयपक्षांचें अंतिम हित साधणार आहे. वाईटांतून चांगलें काढण्याची बुध्दि चिनी देशभक्तांत वसत असल्यास ते ही संधि खात्रीनें दवडणार नाहींत. परंतु इतकें शहाणपण पेकिंग सरकारांत आहे असें गेल्या दीड वर्षांतील भांडणांतून तरी दृष्टीस पडलेलें नाहीं.

# प्रांतिक परिषदेवरील आक्षेप

## टीकाकारांना उत्तर

म. प्रां. परिषदेविरुद्ध घेण्यांत आलेल्या आक्षेपांना उत्तर म्हणून खालील अधिकृत खुलासा श्री. शि. म. परांजपे स्वागताध्यक्ष, ल. ब. भोपटकर, अध्यक्ष, म. प्रां. कॉं. क. व श्री. दि. वा. दिवेकर चिटणीस, म.प्रां.कॉं. क. यांच्या सहीनें प्रसिद्ध करण्यांत आला आहे.—

नुकत्याच झालेल्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेनें जातिविषयक व सामाजिक प्रश्नाबाबत स्वीकारलेल्या धोरणानुसार परिषदेंत घडलेल्या कांहीं गोष्टींसंबंधीं गैरसमज पसरविण्याचे प्रयत्न चालू आहेत असें दिसतें. ह्या प्रश्नासंबंधीं आतांपर्यंत वृत्तपत्रांतून जीं विधानें करण्यांत आलीं तीं पूर्णपणें दिशाभूल करणारीं व परिषदेसंबंधीं मोठाच गैरसमज उत्पन्न करणारीं आहेत. म्हणून जनतेनें परिषदेच्या कार्याबद्दल स्वतंत्र विचार करून आपला निर्णय द्यावा यासाठीं जशा गोष्टी घडल्या तशा त्या तिच्यापुढें मांडणें जरूर वाटत आहे.

परिषदेच्या विषयनियामक मंडळापुढें जातिविषयक व सामाजिक प्रश्नासंबंधीं अनेक प्रश्न ठरावरूपानें आले होते. त्यापैकीं कांहीं फारच वादग्रस्त होते. सिंध वेगळा करणें, ज्यांत मुसलमान बहुसंख्य आहेत अशा प्रांतांतूनहि त्याना राखीव जागा देणें, सार्वजनिक पाणवठ्याचा उपयोग करण्यास व मंदिर-प्रवेशास अस्पृश्यवर्गाला परवानगी देणें इ. प्रश्न त्यांत होते. परिषदेंतील कॉंग्रेसवाल्या लोकांच्या मतभेदांचा विचार करतां विषयनियामक मंडळाला परिषदेच्या कार्यक्रमांत सामाजिक व जातिविषयक वादविवाद उत्पन्न होण्यासारख्या प्रश्नांवरील सर्वच ठराव गाळून टाकणें युक्त वाटलें. आणि म्हणून असें ठरविण्यांत आलें कीं, खुद्द कॉंग्रेसवाल्या लोकांमध्येंच ज्या प्रश्नांसंबंधीं तीव्र मतभेद आहेत असे प्रश्न सध्या तरी विचारांत घेण्यांत येऊं नयेत.

कॉंग्रेसचे सर-चिटणीस पं. जवाहरलाल नेहरू यांनीं अलीकडेच प्रतिपादलेलें व परिषदेचे स्वागताध्यक्ष, अध्यक्ष व महाराष्ट्रांतील इतर प्रमुख कॉंग्रेसवाले लोक यांना मान्य झालेलें राजकारण व धर्मकारण यांच्या विभक्तीकरणाचें तत्त्व विषयनियामक मंडळासहि स्वीकारावेंसें वाटलें. ह्याच तत्त्वानुरोधानें हिंदु-मुसलमानांचे संबंध, सिंधची विभागणी हे व अशासारखे वर उल्लेखिलेले सर्व ठराव व त्याबरोबरच प्रचारमंडळाच्या ठरावांतील जातीजातींत व पोटजातींत ऐक्यवृद्धि करण्याचें व अस्पृश्यतानिवारणाचें अशीं दोन कलमेंहि गाळून टाकण्याचें वि. नि. मंडळानें मान्य केलें. वि. नि. मंडळाच्या अध्यक्षांनीं यावर मंडळाचें मत प्रत्यक्ष अजमावूनहि पाहिलें व सदरील दोन कलमें व ह्या विषयांवरील सर्व ठराव गाळून टाकण्याचें ठरलें. याला फक्त एका सभासदाखेरीज बाकी सर्वांची संमति मिळाली. एवढेंच नव्हे तर, ज्या बैठकींत हीं कलमें व हे ठराव गाळण्याचें ठरलें त्याच वेळीं असें मुद्दाम स्पष्टपणें जाहीर करण्यांत आलें होतें कीं, हीं कलमें गाळण्यांत आलीं ह्याचा अर्थ असा नाहीं कीं, महाराष्ट्रांतील कॉंग्रेसवाले जातीजातींत ऐक्य करण्याच्या व अस्पृश्यतानिवारणाच्या विरुद्ध आहेत. इतकेंच काय पण त्याच बैठकींत असेंहि सांगण्यांत आलें कीं, जरूर पडल्यास वि. नि. मंडळ स्वतःला सामाजिक परिषद असें नांव घेऊन हे सर्व ठराव व कलमें मान्य करावयास तयार आहे.

महाराष्ट्रीय कॉंग्रेसवाल्यांनीं मागासलेल्या वर्गांना मोठा अन्याय केला, अगर ऐक्यासाठीं त्यांनीं मूलभूत तत्त्वाचा त्याग केला अथवा समाजाच्या एखाद्या विभागाला त्यांनीं नागरिकत्वाचे हक्क नाकारले असें म्हणणें हें पूर्णपणें अन्यायाचे होईल. असा एकहि प्रमुख महाराष्ट्रीय कॉंग्रेसभक्त नाहीं कीं, ज्याला जातीजातींत ऐक्य व अस्पृश्यतानिवारण नको आहे. जातीजातींत ऐक्य व अस्पृश्यतानिवारण या बाबी साध्य होण्यासाठीं चालविलेल्या चळवळींना गेलीं कित्येक वर्षें पुष्कळ महाराष्ट्रीय कॉंग्रेसभक्तांनीं सतत साहाय्य दिलें आहे, ही गोष्ट परिषदेच्या टीकाकारांनाहि पूर्णपणें अवगत आहेच व पुढेंहि असल्या चळवळींना मदत करण्यास ते कधींहि माघार घेणार नाहींत.

धर्म व राजकारण यांची फारकत करणारें तत्त्व स्वीकारण्यांत महाराष्ट्रीय कॉंग्रेसभक्तांचा हेतु कॉंग्रेसच्या राजकारणांत कसलाच घोटाळा न होऊं देण्याचा होता. म्हणून शक्य तोंवर हे दोनहि भाग

स्वतंत्र ठेवावेत व त्यांजपासून अनवश्यक घोटाळा होऊं न देतां ह्या दोनहि चळवळी चालविल्या जाव्यात हेंच स्पृहणीय होय असें ठरविण्यांत आलें.

ह्या बाबतींतील वस्तुस्थिति अशी आहे. परिषदेच्या प्रतिनिधींची अशी अंतःकरणपूर्वक इच्छा होती कीं, परिषदेच्या कार्यांतील एकवाक्यता कोठल्याहि प्रकारच्या क्षुल्लक विघातानें बिघडूं नये. पण दुर्दैवानें आमच्याच कांही बांधवांना परिषदेसंबंधीं व सामाजिक आणि जातीय प्रश्नांबद्दलच्या महाराष्ट्रीय कॉंग्रेसभक्तांच्या धोरणासंबंधीं गैरसमज पसरविण्यांत शहाणपणा वाटला. आम्ही पुनः एकदां अशा लोकांना व इतरांनाहि जाहीरपणें असें कळवितों कीं, जातीजाती व पोटजातींत ऐक्यवृद्धि करण्यास अगर अस्पृश्यांना व मागसलेल्या वर्गांना उच्च वर्णी यां बरोबरीचा दर्जा प्राप्त करून देण्यास विरुद्ध कोणीहि प्रमुख महाराष्ट्रीय कॉंग्रेसभक्त विरुद्ध नाहीं. ह्या परिषदेत महाराष्ट्रानें एकमतानें स्वराज्याच्या लढ्यासाठीं प्रांतिक संघटना करण्याचे निश्चित केलें आहे, म्हणून ज्याचा अभिमान आपणा सर्वांस सारखाच आहे त्या महाराष्ट्राच्या वतीनें आम्ही आमच्या बांधवांना अशी विनंति करतों कीं, त्यांनीं यापुढें तरी परिषदेसंबंधीं गैरसमज पसरविण्याचें व त्यायोगानें महाराष्ट्रीयांच्या भावना एकमेकांसंबंधीं कलुषित करण्याचें सोडून द्यावें. ज्याच्यासाठीं आपण सर्व हिंदी लोक झगडत आहोंत तें स्वराज्य संपादनाचें कार्य हें हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचें व सर्व विभागांचें आहे. आमच्या बांधवांच्या मनांत परिषदेविरुद्ध एखादी तक्रार राहिली असेल तरी ती प्रस्तुत खुलाशानें पूर्णपणें नाहींशी होईल. हिंदुस्थान व त्याचा उद्धार यांविरुद्ध तरी त्यांचें कांहीएक गाऱ्हाणें नाहीं खास. म्हणून एकमेकाविरुद्ध गैरसमज पसरविण्याचें, समाजांतील एक वर्ग दुसऱ्याविरुद्ध उठविण्याचें व अशा रीतीनें हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यसंपादनाच्या मार्गांत अडथळे उत्पन्न करण्याचें पाप आमच्याच मंडळींनीं करूं नये.

**शि. म. परांजपे** (स्वागताध्यक्ष),
**ल. ब. भोपटकर** (अध्यक्ष म.प्रां.कॉं. क ),
**दि.वा. दिवेकर** (चिटणीस म.प्रां. कॉं. क.).

# मराठी लेखनशुद्धि

( लेखक—**गोविंद पांडुरंग पावशे**, सातारा. )

यावर कोणी असें म्हणेल कीं त्या 'म्' ला जेथें एकदम आदेशच होतो तेथें तरी अजागलादेश होईल कीं नाही ?

उत्तर—याला शास्त्राधार मिळणें शक्य नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. पण तूर्त तें गृहीत धरलें आहे म्हणून सांगतों कीं मराठींत येणारा धातू प्रातिपदिक, आणि प्रत्यय हे हलन्त (व्यंजनान्त) केव्हांहि असत नाहीत. ते मूळांत हलन्त असले तर त्याचें तें अन्त्य हल तेथेंच राहून जातें किंवा त्यांत स्वर मिळून त्याचें अक्षर बनतें. कदाचित् त्याला नवीन अक्षरहि जोडलें जातें. अशी स्थिति होत असल्यामुळें आदेशाचें कारणच राहात नाहीं.

प्रकार ३ रा—यांतील दंत किंवा दन्त इ. शब्दावरील किंवा आंतील गोचराला किंवा परचराला 'आ' हा आदेश होत असतो म्हणजे द+आं+त=दांत असा शब्द बनत असतो.

प्रकार ४ था—यांतील श्यामल—सावळा इ. शब्दांतील 'म्'ला 'व्' हा आदेश झाला म्हणजे तो 'म्' शिलक राहातच नाहीं.

प्रकार ६ वा —यांतील, कुळकर्णी यांनीं सामान्य रूपाची जी उपपत्ति बसविली आहे ती अपवादांनीं व्याप्त आहे त्यामुळें व्यर्थ आहेच. पण तिच्यामुळें त्यांच्या विचारसरणींतील अनवधानता, अव्यापकता इ. गुण मात्र प्रकट झाले आहेत.

प्रकार ७ वा—यांतील नें,नीं, या प्रत्ययांची व त्यावरील अजागलाची विचित्र घटना लक्षांत आणली असतां येथले अजागल हे जिवंत 'न' चीं भूतें (पिशाचें) पुढील स्वरांच्या बोकांडीं बसल्याचें दिसत आहे. आणि हें जोशीबोवांचें तत्त्व अमलांत आणलें तर कोणत्याहि लेखांत कोठेंहि येणारीं 'न' च्या आणि 'म' च्याही बाराखडींतील सारीं अक्षरें ह्या भूतांनीं झपाटलीं जातील.

जोशी व कुळकर्णी यांनीं संस्कृतांतील किंवा प्राकृतांतील प्रत्ययापासून मराठी प्रत्यय निष्पन्न करण्यांत त्या कामीं मुख्यत्वें आधारभूत जें आदेशशास्त्र तें पाहिलें नसून 'येन केन प्रकारेणाऽजागलः सुस्थिरो भवेत्' हें एक मुख्य ध्येय दृष्टीपुढें ठेविलें असावें असें दिसतें.

### अजागलाचा उपयोग

प्रथम पुरुषी क्रियापद अनेक वचनीं सामान्य रूप द्व्यर्थी शब्दाचा भेद इत्यादि प्रकार स्पष्ट समजण्याची सोय त्यावरील अजागलानें होते असा युक्तिवाद कित्येकांकडून करण्यांत येतो. पण अशामुळें सोयीच्या ऐवजीं उलट गैरसोय अनेक प्रकारें होते हें दाखवून

देतां येईल. पण येथें एकच मुख्य तत्त्व सांगतों तें हें कीं, कोणताहि शब्द वाक्यात असतो तेव्हांच त्यापासून विशिष्ट अर्थादिकांची अपेक्षा संभवते आणि ती वाक्यांतील पूर्वापार शब्दांच्या साहाय्यानें पूर्ण होते. इतकेंच काय पण प्रसंगविशेषीं त्या अजागलविरहित शब्दापासून अर्थांतर अथवा श्लेष निष्पन्न होणें संभवनीय असतें.

'बुडत्यास काडीचा आधार' या न्यायानें कोणी अजागलवादी जर असें म्हणतील कीं आमचे हे सारे अजागल मराठींतच आगमानें प्राप्त झाले आहेत तर त्याचेंहि उत्तर द्यावें लागेल.पण हा जर-तारी प्रश्न सध्या उपस्थित झाला नसला तरी या-पूर्वीच हें तत्त्व एका गृहस्थांनीं प्रस्थापित करून ठेविलें आहे म्हणून त्याचा समाचार घेतल्यावांचून पुढें जाणें प्रशस्त नाहीं. म्हणून तत्संबंधीं उपन्यास करतों तो असा.

गोविंद शंकरशास्त्री बापट यांनीं आपल्या व्युत्पत्तिप्रदीप या पुस्तकांत असें प्रतिपादन केलें आहे कीं, मराठींत दहीं या शब्दावर अनुस्वार देणें सशास्त्र आहे व त्याला ८।४।५७ (पाणिनीच्या अष्टाध्यायींतील) या सूत्राचा आधार आहे असे लिहिलें आहे. पण त्यावरून या सूत्राच्या कक्षेंत येणाऱ्यांपैकीं वाटेल त्या शब्दांवर अनुस्वार द्यावा असा अभिप्राय निष्पन्न होत आहे. पण तें सर्वच भ्रामक आहे. आणि कसें तें पाहूं.

"अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः" ८।४।५७ हें तें सूत्र आहे आणि "वावसाने" ८।४।५७ हें त्याचें पूर्वसूत्र आहे व ह्यांतील "वा" याची व अवसाने याची ही अनुवृत्ति करून अप्रगृह्यस्य अणः अवसाने अनुनासिकः वा स्यात् असें प्रस्तुत सूत्राचें विवरण कौमुदींत केलें आहे आणि त्याचें उदाहरण दधिँ, दधि असें वैकल्पिक दिलें आहे. बापटशास्त्री यांनीं कौमुदींतील वर दिलेलें उदाहरण पाहून दधि यापासून झालेला मराठी दही हा शब्द तसाच आहे असें समजून तो दहीं असा अजागलयुक्त बनविला आहे. पण ह्यामध्यें त्यांची दिशाभूल झालेली स्पष्ट दिसत आहे. कारण सूत्राचा अर्थ असा आहे कीं, 'अण' म्हणजे अ, आ, इ, ई, उ, ऊ, (अ इ उ ण) ह्या सहापैकीं कोणताहि स्वर पदान्तीं असून तो अप्रगृह्य म्हणजे संधिक्षम असेल तरच त्याला विकल्पानें अनुनासिकागम (अजागल नव्हे) होतो. आणि दधि हा शब्द त्या लक्षणांनीं युक्त आहे. कसा तो पाहूं.

दधि + अन्न=दध्यन्न; दधि + आयन=दध्ययन, दधि + इच्छा=दधीच्छा; दधि + उदक=दध्युदक; दधि+ओदन अध्योदन इ. संस्कृतांत संधी होतात.

आतां प्रगृह्य आणि अप्रगृह्य कोणाला म्हणतात तें सांगणें क्रमप्राप्तच आहे म्हणून सांगतों कीं, प्रगृह्य नव्हे तो अप्रगृह्य. कोणत्या स्वराला केव्हां प्रगृह्य म्हणावें याविषयीं पुष्कळ नियम आहेत. पण ते येथें न देतां त्याचें लक्षण मात्र देतों. ते "प्लुत प्रगृह्य अचि नित्यम्" ६।१।१२५ असें आहे. म्हणजे प्लुत स्वर आणि प्रगृह्य स्वर यांच्यापुढें स्वर आला असतां ते त्याच्याशीं संधि न पावतां नित्य प्रकृतिभावानें (जशाच्या तसेच) राहातात. (प्रगृह्य स्वर पदान्तींच असतात.) तथापि त्यांना अनुनासिकागम होत नाहीं.

वरील वैकल्पिक नियम पाणिनींनें व्याकरणांत दिला तो तेथेंच राहून गेला आहे. त्याचा उपयोग व्यवहारांत कोणी कसा केला असेल तो असो; पण लेखनांत तरी कोणी अनुनासिक लिहीत नसत हें अनुभवास येत आहेच.

मराठी भाषेंत प्रगृह्य आणि अप्रगृह्य स्वरांची निवड कोणी केलेली नाहीं आणि करण्याचें प्रयोजनहि नाहीं. कारण मराठींत प्रकृति प्रत्यय यांच्या योगावांचून अन्यत्र संधीच होत नाहींत. म्हणून पदान्तीं येणारे सारे स्वर प्रगृह्यच समजले पाहिजेत. अर्थात् प्रस्तुत दही हा शब्द संधि पावतो किंवा कसें तें आतां पाहूं.

दही अगदीं थोडें आहे, हें दही आपल्यासाठींच-ना ? तें ताजें दही इकडे आण पाहूं; अहो, तें दही उद्यांला होईल इ. यावरून मराठी शब्दांचे अन्त्य स्वर आणि त्यांच्या पुढील स्वर यांचा संधि होत नाहीं हें स्पष्ट दिसत आहे. पण बापटशास्त्री यांच्या लक्षांत हें रहस्य आलें नाहीं, किंवा त्यांनीं ह्याचा विचारच केला नसावा असें वाटतें.

संस्कृत व प्राकृत भाषेंत आणि मराठी भाषेंतहि 'म्' 'न्' हे वर्ण प्रथम आगमानें येऊन नंतर त्यांना गोचरादेश होतो, अशा शब्दांचीं उदाहरणें पुष्कळ आहेत, पण तीं येथें न येतां एवढेंच सुचवितों कीं, मराठींत षष्ठ्यन्त शब्दाचा अनेक वचनी सामान्य रूपावर जो अनुस्वार देतात तो ह्यापैकींच आहे असें समजावें. कारण तो गोचर आहे.

विषयप्रतिपादनाच्या ओघांत ज्या विद्वान लोकांच्या तात्विक मतासंबंधानें मला टीका करावी लागली अथवा मी केली ती प्रामाणिक असल्यैमुळें त्या व्यक्तीविषयीं माझ्या ठिकाणीं किंचितहि अनादर नाहीं हें सर्व वाचक जाणतीलच.

परंतु त्या टीकेमध्यें कोणाकोणाला क्रोधजनक कडकपणा जाणवेल तर तो जाणवावा असाच माझा हेतु आहे. कारण आमच्यासारख्यांच्या टीका-विषयक लेखाकडेहि दुर्लक्ष करण्याकडे प्रायः ज्यांची प्रवृत्ति असते त ह्यामुळें तरी निवृत्ती होऊन ह्या लेखाचा समाचार घेतील असें वाटतें. कारण–

" ज्वलति चलितेन्धनोऽग्निर्विप्रकृतः पन्नगः फणां कुरुते " असा सर्वसाधारण व्यवहार आहे.

असो. आतां शेवटीं या संबंधानें अनुकूल अभिप्रायांची आणि प्रतिकूल आक्षेपांची प्रतीक्षा करीत लेखणी कानावर ठेवतों.

[ **टीप**—या लेखांत मूळ लेखकानें अनुच्चारित अनुस्वार दिलेले नाहींत. परंतु इतर लेखांतील पद्धतीस अनुसरून (करेक्शन्सची पद्धति एकसारखी राहावी म्हणून) अनुच्चारित अनुस्वार आम्ही दिले आहेत. **—के. क.** ]

# प्रासंगिक बोल

## १ गुप्त पोलीसखात्याची कारवाई

गुप्त पोलिसांच्या एका अत्यंत निंद्य व कुटिल कारस्थानाची हकीकत लाहोरच्या ' ट्रायब्यून ' पत्रानें नुकतीच उघडकीस आणली आहे. तीवरून आपलें पोट जाळण्यासाठीं गुप्त पोलीस नवेनवे कट कसे उत्पन्न करतात, त्यांत देशांतील अननुभवी परंतु देशप्रेमी तरुणांना कसे गुंतवून घेतात व अखेरीस त्यांच्या माना कायद्याच्या कांटेरी फासांत अडकावून आपली बहादुरी कशी मिरवितात याची चांगलीच कल्पना येते. कांहीं दिवसांपूर्वी लाहोर स्टेशनावर के. सी. बानर्जी नांवाच्या तरुणाजवळ एक पिस्तुल व कांहीं काडतुसें सांपडल्यावरून पोलिसांनीं त्याजवर खटला केला व मॅजिस्ट्रेटनें त्यास पांच वर्षांची सक्तमजुरीची शिक्षाहि ठोठावली. परंतु पुढें लागलीच अशीहि बातमी पसरली कीं, सदर बानर्जी यांस एकाएकीं बिनशर्त सोडून देण्यांत आलें ! अशा प्रकारच्या कटवाल्यास एकाएकीं बिनशर्त सोडून दिल्याचें समजतांच लोकांस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. यासंबंधी ' ट्रायब्यून 'पत्रानें जास्त शोध करून जी माहिती मिळविली, तीवरून मात्र गुप्त पोलिसाच्या कुटिल नीतीबद्दल लोकांस विलक्षण संताप उत्पन्न झाला. सदर बानर्जी हा गुप्त पोलीसखात्यांतीलच नोकर असून लाहोर येथें कट करून त्यांत तरुणांना ओढून त्यांच्याकरवीं चोऱ्या–दरवडे घालून ऐनवेळीं सर्वांना एकदम पोलिसांच्या स्वाधीन करावयाचें या उद्देशानें त्यास लाहोर येथें पाठविण्यांत आलें होतें ! परंतु लाहोर पोलिसांच्या तो माहितीचा नसल्यानें त्यास अटक होऊन शिक्षा झाली. कदाचित् त्याला मुद्दाम अटक करून शिक्षा देऊन त्याजवर अस्सल देशभक्तीचा छाप मारविला म्हणजे राजरोसपणें देशभक्त म्हणून मिरवूं लागून त्यानें कोवळ्या पोरांस फसवावें व अशा रीतीनें आपली पोळी सारखी पिकती ठेवावी असाहि एक डाव यांत असावा असा लोकांचा तर्क आहे.

***

बानर्जीला तुरुंगांत घातल्यावर त्यानें तेथून गुप्त पोलिसांच्या अधिकाऱ्यांस तीन पत्रें लिहिलीं.त्यावरून सी.आय. डी. खातें देशांत मुद्दाम अराजकता उत्पन्न करण्यासाठीं आपले दूत कसे पसरीत असतें याची योग्य कल्पना येते. आपणास बहाली–बढती मिळावी म्हणून नसत्या ठिकाणीं अराजकतेचें बीं पेरून त्यापायीं कित्येक निरपराधी लोकांचा बळी घेण्याच्या या कारस्थानपटु खात्याचें क्रिमिनल इन्व्हेस्टिगेशन हें नांव बदलून क्रिमिनल इन्स्टिगेशन असेंच नांव ठेवावयास पाहिजे. लाहोर येथें या खात्याचे नीच कारस्थानास वाचा तरी फुटली. पण या खात्याचीं कित्येक कृत्यें अंधारांतून बाहेर पडणें कठीण असते. देशांत अराजकता माजली आहे, तरुणांच्या कटाचें जाळें देशभर पसरलें आहे, त्याचा केव्हां कोठें भडका उडेल याचा नेम नाहीं अशा आरोळ्या पोलीसखात्याच्या पक्षपाती पत्रांनीं आजपर्यंत कांहीं कमी ठोकल्या नाहींत. मुंबईच्या एका पत्रानें थोडे दिवसांपूर्वी बंगाल व सांवतवाडी यामध्यें कटाचा दुवा जोडून बंडाचें काल्पनिक पण भेसूर चित्र रेखाटलें होतें. अर्थात् अशा प्रकारच्या कटाचें स्वरूप पुष्कळ वेळां जसें भासवितात तसें मुळांत नसतें ही गोष्ट लोकनिदर्शनास आली हें एका परीनें ठीकच झालें.

# पैसे गिळणारें यंत्र

( ले. प्रल्हाद केशव अत्रे लंडन.)

ता. २० मार्चच्या अंकांत 'प्रासंगिक बोल' या सदराखालीं जी. आय. पी. रेलवे कंपनीनें बोरी बंदरावर अलीकडे ठेविलेल्या तिकिटाच्या यंत्रासंबंधीं तक्रार केलेली आहे. सदरहू यंत्र आपलें काम व्यवस्थितपणें कां बजावीत नाहीं हें कळत नाहीं. पण अशा प्रकारचीं अनेक यंत्रें येथें प्रत्येक रेलवे स्टेशनावर, एवढेंच काय पण पोस्ट ऑफिसांत व निरनिराळ्या दुकानांतून ठेविलेलीं आहेत. त्यांचेविरुद्ध तक्रार करण्यास यत्किंचितही जागा नाहीं. ज्या वेळीं या यंत्रांत तिकिटे किंवा वस्तू नसतात त्या वेळीं त्यावर 'Empty' अशी सूचना आपोआप येण्याची व्यवस्था केलेली असते व तशी सूचना एखादे वेळीं नसली तरी कोणी आंत चुकून पैसे टाकले तरी ते यंत्राच्या पोटांत गडप न होतां बाहेर आपोआप पडतील अशी अंतर्गत रचना केलेली असते. यदाकदाचित् यंत्र नादुरुस्त झालें तर त्यावर Out of order अशी सूचना लावलेली असते. यंत्रसृष्टींत इतकी सुधारणा झालेली असतांना जी. आय. पी. कंपनीच्या पदरांत हें जुनें पुराणें आयुध कोठून पडलें असावें? विलायतेच्या वातावरणांत चोखपणें आपली कामगिरी बजावणाऱ्या यंत्राचा हा परागंदा भाऊ हिंदुस्थानाच्या मर्यादेंत पाऊल टाकतांच पैसे गिळंकृत करण्याचें कसब कोठून शिकला असावा? बाकी यांत नवल नाहीं. यंत्रेंच काय पण येथील माणसेंहि हिंदुस्थानांत गेलीं म्हणजे अशींच बिघडतात.

# 'देवाचे लाडके इंग्रज'

( आंद्रे मोरवास या फ्रेंच टीकाकाराच्या लेखावरून )

( अनुवादक—अनंत जनार्दन करंदीकर. )

फ्रेंच लोकांना गूढ गोष्टींचें अगदीं वावडें आहे. त्यांच्या या स्वभावविशेषाला अनुलक्षून सेंतबव्हने विनयशीलपणानें म्हटलें आहे कीं, देव कांहीं फ्रेंच नाही. पण बहुतेक साऱ्या इंग्रजांचा दृढ विश्वास आहे कीं, देव हा इंग्रजच आहे ! बर्नार्ड शॉच्या सेंट जोन नाटकातला इंग्रज धर्माधिकारी जोनला देवदूतांचे शब्द ऐकूं येतात हें नाकारतो. कारण त्याच्या मतें देवदूत बोलणार इंग्रजींत आणि जोनला तर इंग्रजी समजत नाहीं ! कोणी म्हणतील कीं, हा शॉचा खोडसाळपणा आहे. पण तसें नव्हे. इंग्रजांची तशी अहंमन्यपणाची समजूतच आहे. उदाहरणार्थ, लॉर्ड कर्झनसाहेबांनीं आपल्या एका ग्रंथाला कशी नमुनेदार अर्पणपत्रिका जोडली आहे पाहा. ते लिहितात—ईश्वराच्या खालोखाल ब्रिटिश साम्राज्यावरच मानवजातीचें कल्याण अवलंबून आहे असें माझ्याप्रमाणेंच ज्या लोकांना वाटत असेल त्यांना हा ग्रंथ मी समर्पण केला आहे ! सेसिल र्‍होडस तर जन्मभर घोकत होता कीं, ही पृथ्वी अँग्लो-सॅक्सन देवानें अँग्लो-सॅक्सन जातीकरितांच निर्माण केली आहे !

असले अहंमन्य इंग्रज लोक फ्रेंच लोकांवर आक्षेप घेतात कीं, त्यांना आपला फ्रेंचपणा विसरून अखिल मानवजातीशीं समरस होतां येत नाहा. असा आक्षेप घेतांना ते एवढीच गोष्ट विसरतात कीं, इंग्रजांना मानवजातीशीं एकजीव होतां येत असलें तर त्याचें कारण इतकेंच कीं, ते इंग्रज जातीबाहेर मानवांचें अस्तित्वच ओळखत नाहींत. एखाद्या फ्रेंच किंवा जर्मन गृहस्थानें आपला देश व आपली संस्कृति इतरांपेक्षां चांगली असें म्हटलें म्हणजे त्याच्यावर संकुचित राष्ट्राभिमानाचा आरोप करण्यांत येतो. पण इंग्रजांना आपली संस्कृति इतरांपेक्षां श्रेष्ठ असें सुद्धां म्हणावें लागत नाहीं. त्यांचा कधींच निर्णय होऊन चुकला आहे कीं, इंग्रजी संस्कृति हीच खरी संस्कृति आणि इंग्रजांचें अनुकरण इतर लोकांत ज्या प्रमाणांत होईल त्या प्रमाणांत ते लोक 'सुधारलेले' या संज्ञेला पात्र होतील. परक्यांच्या चालीरीती त्यांना queer, funny किंवा quaint वाटतात. Their queer little French ways यासारखे शब्द त्यांच्या बोलण्यांत वारंवार ऐकूं येतात. इतर जगाविषयीं इंग्रजांची वृत्ति ही मुलांना सांभाळणाऱ्या गव्हर्नेसच्या वृत्तीसारखीच असते. एखादी इंग्रज गव्हर्नेस फ्रेंच कुटुंबांत आणली तर ती एकामागून एक घरांतल्या सर्व खोल्या व्यापून अखेरीला गरीब

बिचाऱ्या फ्रेंच आईबापांना कोठल्या तरी अंधारकोठडींत कोंडून टाकते. स्वतः इंग्रज लोकांनीं इंग्लंडमध्यें उतरल्यावर तेथल्या मूळच्या रहिवाश्यांना पश्चिमकिनाऱ्यावरच्या एका कोपऱ्यांत डांबून ठेवून आपण सारा देश बळकावला आणि आतां ते मूळच्या रहिवाश्यांना 'वेल्श' म्हणजे परके म्हणून संबोधतात!

इंग्रजांच्या बोलण्यांत परस्पर-विरोधी सिद्वान्त आले किंवा कृतीमध्यें विसंगति दिसून आली तरी त्याचा त्यांना दरकार नसतो. कारण तर्कशास्त्राला ते कधींच जुमानीत नाहींत. तर्कशास्त्राचें आधिपत्य केवळ फ्रान्स देशांत २+२ मिळून जेथें नेहमीं चारच होतात, असा फ्रान्स हा एकच देश असेल. केंब्रिजमध्यें २+२=४ होते आणि ऑक्स-फोर्डमध्यें तर बेरीज करण्याचा कमीपणा देखील कोणीहि पतकरत नाहीं.

इंग्रजांचा सर्वांत अधिक चीड आणणारा गुण म्हणजे नसत्या ठिकाणीं ते नैतिक विचार घुसडतात. सुंदर चित्रें पाहून रस्किन असें म्हणत नाहीं कीं, तीं सुंदर आहेत म्हणून मला आवडतात.तो म्हणतो 'चित्रांच्या ठिकाणीं नैतिक सौंदर्याचा मला साक्षात्कार घडतों म्हणून मी त्यांच्यावर प्रेम करतो.'आपल्या सदसद्विवेकबुद्धीला न दुखवितां सुंदर मुलींच्या दर्शनाचें सुख अनुभवतां यावें यासाठीं रस्किन ढोंग करतो कीं, All pretty girls are angels. याचप्रमाणें इंग्रज व्यापाऱ्यांचीं वर्तमानपत्रें रोज सुचवीत असतात 'All good customers are angels.' रोज या सिद्धान्ताची आवृत्ति केल्यानें अखेरीस त्यांचा यांच्यावर विश्वासहि बसतो.या अंधविश्वासांत त्यांचे ते सुखानें राहतात; पण या विश्वासाच्या जोरावर जेव्हां सर्व जगाला दोष द्यावयाला ते निघतात तेव्हां त्यांचा निषेध करणें प्राप्त होतें.

इंग्लंडमध्यें शांततावादाचा व आंतरराष्ट्रीय बंधुत्वाचा प्रचार करणारे जे ध्येयवादी आहेत त्यांच्यापासून परराष्ट्रांना फार धोका पोंचण्याचा संभव असतो. स्वतः इंग्लंडचें त्यांच्याकडून काडीचेंहि नुकसान होण्याचा संभव नाहीं. लॉर्ड हाल्डेननें एकदां म्हटलें आहे 'आमचे शांततावादी लोक म्हणजे आमचें शिलकी सैन्य, त्यांच्या मतप्रचारामुळें युद्धाला सुरुवात करतांना शत्रूंना आमचें सामर्थ्य आहे त्यापेक्षां कमी भासतें; पण युद्ध सुरू झालें कीं बहुतेक सारे कट्टे देशभक्त बनतात. मग युद्धाला प्रथम प्रारंभ करणारे मुत्सद्दी कांहीं दिवस युद्ध चालवून थकले म्हणजे हे जुने शांततावादी पुढें येतात व युद्ध जिंकून दाखवितात. उदाहरणार्थ, आमचे आताचे प्रधान लॉईड जॉर्ज इंग्रजी अनार्किस्टांचा राष्ट्रसंरक्षणाच्या कामीं होणारा उपयोग या विषयावर एक मनोरंजक प्रबंधहि लिहितां येईल. इंग्रजांचा खरा राष्ट्रीय गुण म्हणजे ढोंगीपणा होय. या ढोंगीपणाचा मी पाहिलेला एक मासला सांगून हा लेख पुरा करतों.

एका सुंदर कॉटेजमध्यें एक इंग्रज कुटुंब राहात होतें. अपत्यहीन पति आणि पत्नी हींच त्या कुटुंबांतील माणसें. या उभयतांनीं एक सयामी माजर पाळलें होतें. मांजराचें नांव 'सारावाक.'

सकाळपासून संध्याकाळपर्यंत घरधनीन डॉरिस एकसारखी सारावाकचें कौतुक करण्यांत गुंतलेली असावयाची. रात्रीं देखील मालकिणीच्या बिछान्याजवळच सारावाकचा बिछाना. एकदां रात्रींच्या वेळीं सारावाक बाहेरच्या बागेंत शिकारीला गेली. बागेंतल्या सशांच्या बिळांपाशीं टपत राहून तिनें एका पिल्लाची शिकार केली व त्याचें प्रेत ती आपल्या बिछान्यावर घेऊन आली. दुसऱ्या दिवशीं चहाच्या वेळीं डॉरिस ती अमंगळ गोष्ट मला मोठ्या कौतुकानें तिखटमीठ लावून वर्णन करून सांगावयाला लागली; पण मला त्या वर्णनाचा वीट येत आहे हें पाहून ती आपल्या पतीला म्हणाली, 'या फ्रेंच लोकांना मुक्या प्राण्यांचें कौतुक देखील करावयाला येत नाहीं. यांच्या मनांत त्या प्राण्यांविषयीं प्रेमच नाहीं; तिचा पति आर्चिबाल्ड तिच्या म्हणण्याला दुजोरा देऊन आपला अनुभव सांगावयाला लागला. डॉरिसच्या जनावरांवरील प्रेमाला भरती येऊन ती सारावाकला जवळ ओढून म्हणाली 'सारावाक, ' हा दुष्ट फ्रेंच गृहस्थ कांहीं तुझ्यावर प्रेम करीत नाहीं '. इतक्यांत सारावाक तिच्या हातून निसटली व मोठ्या चलाखीनें उडी मारून तिनें एक उंदीर पकडला आणि त्याच्याशीं आपला नेहमींचा प्राण घेण्याचा खेळ खेळूं लागली. मला त्या उंदराचे हाल बघवेनात. आर्चिबाल्डला मी म्हटलें 'त्या उंदराला मार तरी; नाहीं तर सोडव तरी. ' डॉरिसला माझा राग आला. ती उद्गारली 'सारावाक, आज तुझें दुर्दैव ओढवलें आहे खास; तुला कसलेंहि सुख भोगूं देऊं नये असें या फ्रेंच गृहस्थाच्या मनांत आहे.' मग ती मला म्हणाली 'वाः, हा तर माझ्या सारावाकचा आवडता खेळ आहे.' मी म्हटलें 'खरें आहे डॉरिस. पण आतां तुझें प्राण्यावरचें प्रेम कोठें गेलें? त्या प्राण्याचा जीव भीतीनें कसा व्याकूळ झाला आहे पाहा.' तिनें आश्चर्यानें विचारलें, कोणाचा? उंदराचा! उंदराला तर हा खेळ आवडतो! नाहीं का आर्चिबाल्ड! आर्चिबाल्डनें पुनः एकदां तिला पाठिंबा दिला. इकडे त्या उंदरानें तडफडून प्राण सोडला तेव्हां उद्वेगानें खुर्चीवर पडून मी विचार करूं लागलों. हा खरा इंग्रजांचा स्वभाव. दुसऱ्यांवर टीका करावयाच्या वेळीं भूतदयेच्या गोष्टी बोलावयाच्या

आणि कधीं आयर्लंड, इजिप्त किंवा हिंदुस्थान या देशांतील जुलुमाचा प्रश्न निघाला तर उंदराला हा खेळ आवडतो या मासल्याचें उत्तर द्यावयाचें! जोंपर्यंत उंदीर मांजराच्याच तावडींत सांपडलेला आहे तोंपर्यंत त्याला तो खेळ आवडतो नाहीं असें म्हणून तरी काय उपयोग? उंदराला मांजराचा खेळ आवडतो असेंच इंग्रज मनुष्य म्हणत राहणार!

# सोळा–आणे स्वराज्य

मद्रासच्या कॉंग्रेसमध्यें 'संपूर्ण स्वातंत्र्य' हें हिंदी राष्ट्राचें ध्येय म्हणून एकमतानें मान्य झालें, याचें श्रेय त्या ठरावाच्या प्रवर्तकांइतकेंच परिस्थितीलाहि दिलें पाहिजे. हिंदी राष्ट्राचा स्वयंनिर्णयाचा हक्क पायाखालीं तुडवून एकजात गोरें व असमाधान-कारक असें स्टॅटयुटरी कमिशन नेमून हुजूर पक्षीय ब्रि. सरकारनें हिंदुस्थानाचा उपमर्द केला आणि त्यांतच बर्कनहेडच्या उद्दाम भाषणांची भर पडली. आणि यामुळें उत्पन्न झालेल्या अत्यंत क्षोभकारक परिस्थितींत स्वातंत्र्याचा ठराव पुढें आला. अशा वेळींहि त्या ठरावावर बराच मोठा वादविवाद होऊनच तो मंजूर झाला यावरून या ठरावाचें महत्त्व लक्षांत येईल. ठराव मंजूर होण्याला विशिष्ट प्रसंगानें मदत झाली असली तरी हा ठराव केवळ प्रासंगिक महत्त्वाचा नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण सायमन कमिशनाचा प्रासंगिक क्षोभ उत्पन्न होण्यापूर्वींहि स्वातंत्र्यवादी पक्ष अस्तित्वांत होता व आपलें ध्येय कॉंग्रेसकडून मान्य व्हावें अशी त्या पक्षाची खटपट चालूच होती. सायमन कमिशनामुळें या पक्षाला अपेक्षेपेक्षां थोडें अधिक लवकर यश मिळालें हें खरें, पण हा क्षोभकारक प्रसंग उत्पन्न झाला नसता तरीहि स्वातंत्र्यवाद्यांचे प्रयत्न चालू राहून त्यांना आज ना उद्यां खास यश मिळालें असतें.

पण ज्या विशिष्ट परिस्थितींत स्वातंत्र्याचा ठराव मंजूर झाला त्यावरून कित्येक लोकांची अशी अटकळ होती कीं हा स्वातंत्र्यवाद तात्कालिक क्षोभाबरोबर जिरेल. कित्येकांनीं आपली समजूत करून घेतली कीं, बर्कनहेडच्या उद्दामपणाला व सायमन कमिशनाच्या असमाधानकारक नेमणुकीला केवळ एक प्रासंगिक प्रत्युत्तर किंवा प्रतिक्रिया या स्वरूपाचा हा ठराव आला तसा जाईल किंवा निदान त्याचें महत्त्व तरी कमी होईल. पण मद्रासच्या कॉंग्रेसनंतर निरनिराळ्या प्रांतांतून झालेल्या परिषदांमधून याच ठरावाचा पुनरुच्चार झाला. आणि हा ठराव चार घटकांचा सोबती किंवा चार दिवसांचा पाहुणा नसून तो कॉंग्रेसच्या व राष्ट्राच्या राजकारणांत कायमचें वास्तव्य करणार अशीं चिन्हें उघड दिसूं लागलीं. यामुळें स्वातंत्र्याच्या ध्येयाविरुद्ध मद्रासला जे आक्षेप पुढें आले होते ते व जे आले नव्हते तेहि आतां पुढें येत आहेत. आणि विरोधकांचा विरोधहि निरनिराळ्या मार्गांनीं दृग्गोचर होऊं लागला आहे.

महाराष्ट्र प्रांतिक परिषदेंत उघड रीतीनें स्वातंत्र्याच्या ठरावाला विरोध झाला नाहीं. पण विषय-नियामक कमिटींत मात्र या ध्येयास कांहीं उघड व कांहीं प्रच्छन्न विरोध दिसून आला. चारच लोकांनीं विरोध केला खरा, पण त्यांत एक वृद्ध राष्ट्रीय, एक गांधीभक्त वृद्ध राष्ट्रीय, एक तरुण मवाळ व एक पूर्वी मवाळ पण अलीकडे प्रतिसहकारी म्हणविणारे वृद्ध असे वर्गबोधक लोक होते, या चौघांच्या विरोधावरून उपलक्षणानें त्या त्या वर्गांतील बऱ्याचशा लोकांच्या मनोवृत्ती व्यक्त झाल्या. परिषदेंत या ध्येयास विरोध केल्यास तो निष्फळ ठरेल म्हणून तेथें कोणी विरोध केला नाहीं हें खरें. पण स्वातंत्र्यवाद्यांनीं हा आज परिस्थितीच्या दडपणामुळें दबलेला विरोध युक्तिवादानें मूलतःच नाहींसा होईल असा प्रयत्न करणें जरूर आहे.

स्वातंत्र्यवादाच्या स्वकीय आक्षेपकांना व परकीय विरोधकांना उत्तरें देण्यानें जनतेंत स्वातंत्र्याची कल्पना रुजविण्याचें कार्यहि होत राहील. यासाठीं मद्रासच्या कॉंग्रेसनंतर स्वातंत्र्याच्या ध्येयासंबंधीं सामान्य विवेचन आम्ही केलें असलें तरीहि आज पुनः नव्या आक्षेपांच्या व विरोधी प्रयत्नांच्या दृष्टीनें आम्ही तो विषय हातीं घेतला आहे.

'स्वातंत्र्य' ध्येय पुकारल्यावर आजच्या सरकारी राज्ययंत्रांत शिरून काम करणें कसें सुसंगत ठरतें, असा एक अडचणीचा सवाल स्वकीयांकडून पुढें येतो. पण या आक्षेपकानीं ऐतिहासिक तारतम्य-बुद्धि थोडी चालवून पाहावी. वसाहतींच्या स्वराज्याची भाषा तोंडानें बोलत असतांना, कौन्सिलांत दोनचार प्रतिनिधींना नुसती बोलण्याची सत्ता मिळाल्यावर तिचा होईल तसा उपयोग राष्ट्रानें करून घेतलाच कीं नाहीं. पुढें सुधारणा कायदा झाल्यावर वसाहतीच्या स्वराज्याचें ध्येय मानणारे लोक, आज निदान प्रांतिक स्वायत्तता या अशी मागणी करीत होतेच. मग त्याच न्यायानें पंडित मोतीलाल नेहरू अगर श्रीनिवास अय्यंगार म्हणतात कीं, स्वातंत्र्य हें आमचें ध्येय असलें तरी, आजच इंग्रज सरकार 'डोमीनियन स्टेटस' एकदम देत असलें तर आम्ही तें घेऊं. पण या बोलण्यावरून या

दोघां पुढाऱ्यांनीं स्वातंत्र्याचा ध्येयवाद सोडला किंवा सोडला पाहिजे असें होत नाहीं. स्वातंत्र्य मिळाल्यावर संस्थानिकांचें काय करावयाचें अशीहि एकानें शंका काढली आहे. पण डोमीनियन स्टेटसच्या ध्येयांत तरी संस्थानिकांचें काय करावयाचें हें कोठें ठरलें आहे ? हिंदुस्थानाचें स्वराज्य व संस्थानें यांचा मेळ बसत नाहीं म्हणून त्यांचा प्रश्न तूर्त बाजूला ठेवा असे सर शिवस्वामी अय्यर आजहि म्हणत आहेत. पण तेवढ्यासाठीं डोमीनियन स्टेटसचें ध्येय त्यांनींहि सोडलें असें होत नाहीं. मग स्वातंत्र्यवाद्यांनीं या अडचणीमुळें आपलें ध्येय कां सोडावें ?

स्वातंत्र्याचा ठराव करून मवाळांना कॉंग्रेसमध्यें येण्याचा मार्ग बंद झाला हें वाईट झालें असाहि आक्षेप ऐकूं येतो व कित्येकांची मजल तर येथपर्यंत जाते कीं, मवाळांना भिवविण्यासाठीं बुजगावणें म्हणूनच हा ध्येयाचा ठराव करण्यांत आला आहे ! या ठरावाचें स्वारस्य व आवश्यकता इतर रीतीनें प्रतीत न झाल्यामुळें कित्येकांना हें म्हणणें खरें वाटतें. जणुं काय मद्रासला मवाळ कॉंग्रेसच्या दाराशीं येऊन अगदीं आंत पाऊल टाकण्यास तयार होते, व त्यांना अडविण्यासाठीं मुद्दाम परदेशांतून स्वातंत्र्यवादाचा हा अडसर घेऊन पं. जवाहरलाल धावत आले व तो आडवा पडल्यावर मवाळ परत फिरले ! तसें असतें तर हें म्हणणें थोडें तरी शोभलें असतें.पण मवाळांनीं सायमन कमिशनावर बहिष्कार जाहीर केला तेव्हांहि त्यांनीं कॉंग्रेसचे मार्ग व धोरण यांचा व आपल्या बहिष्काराचा कोणी बादरायण संबंध लावूं नये याबद्दल किती तरी खबरदारी घेतली ! त्यांनीं तीन तीनदां घोळून घोळून सांगितलें कीं, आमच्या बहिष्काराचा व त्या कडवट 'नॉन–को–ऑपरेशन' चा बिलकुल संबंध नाहीं. त्यांच्या त्या रानवट कायदेभंगाशीं अगर हरताळाशींहि आमचा संबंध नाहीं. आम्ही विद्यार्थीवर्ग यांत ओढण्याचा बेतालपणा मुळींच करणार नाहीं. आमचा हा बहिष्कार अत्यंत सोज्वळ, नाजूक व सोंवळा आहे. त्याला त्या कॉंग्रेसच्या मार्गाचा व धोरणाचा बिलकूल विटाळ लागला नाहीं व लागणार नाहीं.बांध काढून टाकल्यावर ज्याप्रमाणें पाण्याचा लोंढा आपोआप वाहतो त्याप्रमाणें स्वातंत्र्याचा ठराव काढून टाकल्याबरोबर मवाळ कॉंग्रेसकडे धांव घेतील अशी गोष्ट असती तर हा ठराव करावा कीं न करावा याचा त्या दृष्टीनें विचार करतां आला असता. पण सध्याच्या कॉंग्रेसच्या धोरणाला व मार्गाला दुरून काठीनेंहि स्पर्श न करणाऱ्या मवाळांनीं स्वातंत्र्याचा ठराव केवळ आमच्या मार्गांत आडकाठी करण्यासाठींच पुढें आला असें म्हणणें हास्यास्पद होय. शिवाय मवाळांचें बळ, वैशिष्ट्य, महत्त्व हें सर्व त्यांच्या नेमस्तपणांत आहे.त्यांच्या पाठीमागें कॉंग्रेसची भडक पार्श्वभूमिका असल्याशिवाय त्यांच्या साध्य–साधनांच्या नाजूक छटा तरी सरकारला उठून कशा दिसणार ? मवाळांनी कधीं न केलेली बहिष्काराची गोष्ट ज्या प्रसंगीं केली त्या प्रसंगीं जहालांनीं स्वातंत्र्याचें ध्येय, साम्राज्यवादास उघड विरोध व साम्राज्यासाठीं भावी युद्धांत सामील न होण्याचा निश्चय या गोष्टी केल्या तर त्यांत काय नवल ? आपण येवढा धीर करून सायमन कमिशनावरील बहिष्काराची उडी मारली तरी पुनः राजकीय पुरोगामित्वाच्या बाबतींत कॉंग्रेसमध्यें व आपल्यामध्यें अंतर आहे तेंच कायम आहे असे पाहून कित्येक मवळांना कदाचित् खेद वाटत असेल. पण त्यांनीं मागील इतिहासाचें अवलोकन केल्यास त्यांचें वैशिष्ट्य व महत्त्व या वैषम्यांतच आहे असें दिसून येईल. पुढच्या लोकांनीं पुढें सरल्याशिवाय मागचे पुढें यावयाचे नाहींत व सर्वांच्या मागून येणारें सरकारहि हलावयाचें नाहीं.

स्वातंत्र्याचें ध्येय फार दूरचें आहे हा मवाळांप्रमाणेंच कित्येक राष्ट्रीयांचाहि आक्षेप आहे. पण ध्येय म्हटलें कीं तें दूरचेंच असावयाचें.ध्येयाचा खुंट रोवण्यास प्रस्तुत परिस्थितीच्या किती पुढें धांवावयाचें हा काय तो प्रश्न. दादाभाई नौरोजी यांनीं १९०६ सालीं कॉंग्रेसचे पोठावरून 'स्वराज्या'ची घोषणा केली. त्याला वीस वर्षें होऊन गेलीं. आणि त्यांनीं उच्चारलेलें ध्येय प्रत्यक्ष हस्तगत होण्यास कदाचित् आणखी तितकींच वर्षें जातील. तेव्हां परिस्थितीच्या पुढें चाळीसपन्नास वर्षें ध्येयवादाची धांव जाणें ही कांहीं नवी गोष्ट नाहीं. १९०६ सालीं सरकारनें स्वराज्याचें ध्येय मान्य केलें नव्हतें. आज तें ध्येय मान्य करून पण अडचणी दाखवून 'आस्ते कदम'चा उपदेश तें करीत आहे,मग आजपासून चाळीसपन्नास वर्षांनीं इजिप्तप्रमाणें हिंदुस्थानाचें स्वातंत्र्याचें ध्येय मान्य करून स्व-पर-संरक्षणाच्या सबबीवर नियंत्रण ठेवण्यासाठीं ब्रि. सरकार भांडत आहे अशी भविष्यकाळची कल्पना आशावाद्यांचे मनांत कां येऊं नये ? ऐतिहासिक तारतम्यानें पाहिलें तर आज स्वातंत्र्यध्येयाचा उच्चार करणारे लोक दादाभाईंच्यापेक्षां अधिक धांवरे ध्येयवादी खास ठरत नाहींत.

हे स्वकीयांचे आक्षेप झाले. पण सरकार किंवा त्यांची पाठ राखणारीं पत्रें यांची या ठरावाला विरोध करण्याची दृष्टि याहून अगदीं वेगळी आहे. आंग्लो–इंडियन पत्रांनीं पं. मोतीलाल नेहरू, श्रीनिवास अय्यंगार यांच्यासारख्या हिंदी पुढाऱ्यांच्या भाषणांतून, स्वतःच्या मतास अनुकूल असा निष्कर्ष काढून हे पुढारी डोमीनियन स्टेटस मिळालें

तर ध्यावयास तयार आहेत असें आनंदानें जाहीर केलें! यावरून हिंदी लोकांनीं साम्राज्यान्तर्गत स्वराज्याच्या मर्यादेंतच राहावें व त्या बंधनाच्या पलीकडे जाण्याची स्वातंत्र्याची भाषा बोलूं नये असें या पत्रकारांस वाटत असल्याचें उघड होतें. ब्रिटिश राष्ट्राचें ध्येय साम्राज्यसंरक्षण व संवर्धन हें आहे. आणि ' डोमीनियन स्टेटस ' व हें साम्राज्यवादाचें ध्येय यांचा तसा विरोध येत नाहीं. पण स्वातंत्र्याचे ध्येय मात्र ब्रिटिश राष्ट्राच्या ध्येयाशींच विरोधी आहे. 'डोमीनियन स्टेटस'मध्यें साम्राज्यसत्तेचा फायदा जास्त ध्यावयाचा कीं कमी ध्यावयाचा इतकाच प्रश्न येतो. हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटस देणें वा न देणें हा वाद म्हणजे साम्राज्याची दोरी धरून चाललेली रस्सीखेंच होय. पण स्वातंत्र्याच्या ध्येयासंबंधाचा वाद म्हणजे ही दोरी सोडून देऊन ती प्रतिपक्षाच्या अंगावर फेंकण्यासारखें आहे. यामुळें डोमीनियन स्टेटस पुरवलें पण हें स्वातंत्र्य नको असें साम्राज्यवादी इंग्रजांना वाटूं लागावें हें साहजिक आहे. आपल्यापैकीं कांहीं व्यवहारमग्न व शांत विचारी लोकांना ' स्वातंत्र्य ' हें ध्येय फार दूरचें म्हणून पसंत पडत नाहीं. ते जवळ आलें तर त्याला कोणता हिंदी मनुष्य दूर लोटील? पण इंग्रजांची गोष्ट निराळी. त्यांना तें ध्येय दूरचें म्हणून नव्हे तर त्याच्या साम्राज्यवादाच्या ध्येयाशीं साक्षात् विरोधी म्हणूनच अधिक बोचतें.

'स्वातंत्र्या 'चें ध्येय पुढें येण्यापूर्वी एक प्रकारें अस्वाभाविक परिस्थिति होती. साम्राज्याचें बंधन आपण होऊनच आपल्यावर लादून घेत होतों. पण तें दूर फेंकून दिल्यावर आतां सरकारपक्षीय लोकांवर 'साम्राज्याचें बंधन माना' असें हिंदी पुढाऱ्यांना सांगण्याची पाळी आली आणि हिंदी पुढारी आतां मोकळेपणानें त्यांना उलट विचारणार कीं हें बंधन आम्ही कां मानावें? बाबू सुभाषचंद्र बोस यांनीं आपल्या भाषणांत म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थान म्हणजे कांहीं कानडा किंवा ऑस्ट्रेलिया नव्हे. तुमचा आमचा धर्म एक नाहीं, वर्ण एक नाहीं, कांहींएक नाहीं; परंपरा निराळी, संस्कृति निराळी, हितसंबंध निराळे, भाषा निराळी. मग आम्हीं साम्राज्यांत राहण्याची कशाला व काय म्हणून इच्छा बाळगावी? तुम्ही साम्राज्यांत राहण्यास सांगतां, कारण त्यांत तुमचा फायदा आहे. पण आमचा फायदा काय, तो तुम्ही आम्हास पटवून द्या. ती जबाबदारी तुमच्यावर आहे. साम्राज्याचें बंधन आज आमच्यावर सक्तीनें लादलें गेलें असेल. पण तें खुषीनें मान्य करण्यास त्याची आवश्यकता व उपयुक्तता आम्हास पटली पाहिजे व ती पटवून देण्याची जबाबदारी, अस्वाभाविकपणें साम्राज्य लादणाऱ्यांवर आहे. स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करून हा जबाबदारीचा बोजा राष्ट्रानें आपल्या डोक्यावरून काढून सरकारच्या डोक्यावर टाकला आहे. व तो त्यांना जाणवूंहि लागला आहे. हेंच आंग्लो-इंडियन पत्रांच्या प्रयत्नांवरून उघड होतें.

'स्वातंत्र्य' ध्येयाचा जो पुष्कळांना बाऊ वाटतो तो त्या ध्येयाच्या दूरपणामुळें नव्हे, तर त्याच्या मागोमाग अपरिहार्यतेनें ज्या साधनांचा उच्चार व स्वीकारहि करावा लागेल त्यामुळेंच होय. 'स्वातंत्र्य' म्हटल्याबरोबर त्याच्या साधनांचें भयानक स्वरूप डोळ्यापुढे उभें राहतें व आजपर्यंतच्या शांततेच्या चळवळींची संवय झालेलें मन कच खातें. शिवाय हीं साधनें उपयोगांत आणण्याची शक्ति राष्ट्रांत आज आहे काय? किंवा पुढें कधीं काळीं निर्माण होईल काय? हे प्रश्नहि मनांत डोकावतात. आणि या गोष्टी अशक्य किंवा अत्यंत दुरापास्त वाटल्या म्हणजे अर्थातच हें ध्येयहि अशक्य व दुरापास्त म्हणून बाजूला सारावेसें वाटतें. पण ध्येयाचा उच्चार, ज्या वेळीं त्याच्या सर्व साधनांची जय्यत सिद्धता असेल, त्याच वेळीं करावयाचा, नाहीं तर नाहीं असें म्हणून चालावयाचें नाहीं. कारण सर्व साधनें सिद्ध झालीं तर ध्येयोच्चाराची जरूरच नाहीं.

या दृष्टीनें पंजाबच्या प्रांतिक परिषदेनें स्वातंत्र्याच्या ध्येयाबरोबर तें शक्य त्या मार्गांनीं मिळवावयाचें अशीहि त्याला पुस्ती जोडली. यांत त्यांनीं सरळ ओघानें येणारी एक गोष्ट स्पष्ट करण्याखेरीज अधिक कांहींच केलें नाहीं. साध्याप्रमाणें साधनांचे बाबतींतहि एक नसता बोजा आपण अंगावर घेऊन बसलों होतों. सनदशीर, कायदेशीर किंवा निदान शांततापूर्ण मार्ग असावेत इ. मर्यादा या परिस्थितीनें प्राप्त आहेतच. पण इंग्रज सरकारचा असा काय चांगुलपणा अगर नैतिक हक्क आहे कीं आपण आपली चळवळ अमुकच मर्यादेंत ठेवण्याचें नैतिक बंधन आपल्याला लावून घ्यावें? साम्राज्याच्या बंधनाप्रमाणें हें साधनांचें बंधन आज आपल्याला पाळावें लागत आहे, पण साध्यसाधनांचीं हीं बंधनें स्वाभाविक व आपखुषीचीं नसून त्या अस्वाभाविक आपत्ती होत ही जाणीव स्वातंत्र्याच्या ठरावानें राष्ट्राला करून दिली आहे व देत राहणार हेंच पंजाबच्या प्रांतिक परिषदेंतील ठरावावरून व्यक्त होतें.

'स्वातंत्र्या'च्या ध्येयोच्चाराकडे कानाडोळा करून भागत नाहीं, कारण तें आपोआप बाजूस न पडतां पसरत चाललें आहे हें पाहून त्याचे विरोधक त्याचा प्रतिवाद हरतऱ्हेनें करूं लागले आहेत ही स्वातंत्र्यवाद्यांनाहि इष्टापत्तीच होय. कारण ध्येयवाद हा दोनहि बाजूंनीं गदगदां हलवूनच राष्ट्रांत

बद्धमूल होणें शक्य आहे. स्वातंत्र्याच्या ध्येयाचा एकदां मद्रासला उच्चार केला तो पुरे झाला; आतां त्याबद्दल कांहीं करावयाचें उरलें नाहीं, अशी कित्येकांची समजूत आहे. पण ती चुकीची आहे. हें ध्येय आबालवृद्धांच्या, सुशिक्षित-अशिक्षितांच्या मनांत व वाणींत उतरलें पाहिजे व वावरत राहिलें पाहिजे. कोणाहि हिंदी मनुष्याला झोंपेंतून जागें करून तुझ्या राष्ट्राचें ध्येय काय हा प्रश्न विचारल्याबरोबर माझ्या राष्ट्राचें ध्येय 'स्वातंत्र्य' असें उत्तर तत्क्षणीं सर्वांकडून यावयास पाहिजे. ही गोष्ट सोपी नाहीं. म्हणून स्वातंत्र्यवाद्यांनीं केवळ कॉंग्रेसनें मान्यता दिली एवढ्यावर स्वस्थ न बसतां यापुढील सर्व प्रकारच्या लहानमोठ्या राजकीय चळवळीमध्यें हें स्वातंत्र्यवादाचें सूत्र अखंड ठेवावें. कोणत्याहि लहानमोठ्या, विधायक वा विध्वंसक चळवळीच्या वेळीं पूर्वी जसा 'स्वराज्याचा' उच्चार होत असे तसाच आज स्वातंत्र्याचा व्हावयास पाहिजे.तुम्हास स्वतंत्र व्हावयाचें आहे म्हणून सर्व प्रकारची उन्नति करा व स्वातंत्र्यास उपकारक अशी प्रतिकारशक्ति व संघटना निर्माण करण्यासाठीं सरकारविरोधक चळवळी करा हें यापुढील राजकीय प्रचाराचें पालुपद बनावयास पाहिजे. जुन्या 'स्वराज्य' ध्येयावरून 'स्वातंत्र्या' च्या ध्येयाकडे राष्ट्रच्या राष्ट्र खेंचावयाचें असल्यास दे. सुभाषबाबू यांची "सोळा–आणे स्वराज्य" ही शब्दयोजना फार चांगली आहे. 'स्वातंत्र्य' म्हणजे दुसरें–तिसरें कांहीं नसून स्वराज्याची पूर्णावस्थाच होय. आणि 'सोळा–आणे स्वराज्य तर सोळा-आणे प्रयत्न' हें सूत्रहि त्याबरोबरच पाहिजे. ध्येयापेक्षा साधनाला परिस्थितीची मर्यादा अधिक असते हें खरें. पण ही मर्यादा केवळ परिस्थितिप्राप्त आहे, ध्रुव व निरंतरची नाहीं ही गोष्ट या सूत्रावरून लोकांच्या नित्य डोळ्यापुढें राहील.

# रामायणाचा उपसंहार

( ले. **का. न. केळकर,** हायकोर्ट वकील, पुणें.)

कल्पनेनें कल्पना सुचत जाते अगर फांदींतून फांदी फुटते.त्याप्रमाणें महाभारत व भागवत या ग्रंथाचे उपसंहार प्रसिद्ध झाल्यानतर वाल्मीकि रामायणाचाहि उपसंहार अशाच रीतीनें प्रसिद्ध व्हावा, अशी कित्येक जिज्ञासु वाचकांची साहजिक इच्छा होती. व ती 'महाराष्ट्रीय' यांनीं लिहिलेल्या वरील ग्रंथामुळें संपूर्ण नाहीं तरी बरीचशी सफळ होईल असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'महाराष्ट्रीय' हे लेखक महाराष्ट्रास पूर्ण परिचित असून त्यांचा गीतारहस्यनिर्णय हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. काव्य व्याकरण व वेदान्त या विषयांप्रमाणेंच ग्रंथकर्त्यांचा रामायणासंबंधींहि अनेक वर्षांचा व्यासंग असून पूर्वी लोकशिक्षण मासिकांत रामायणावर त्यांनीं एक सुंदर व विवेचनात्मक लेखमाला लिहिली होती. अशा लेखकाकडून सदर उपसंहार ग्रंथ लिहवून तो प्रसिद्ध करून 'चिपळूणकर आणि मंडळी'नें मराठी धार्मिक वाङ्मयांत मौल्यवान अशी भर घातली आहे असें निःसंशय म्हणतां येईल. धार्मिक व पौराणिक वाङ्मयाच्या प्रकाशनाचें कार्य हातीं घेऊन, चिपळूणकर मंडळीनें सतत चोवीस वर्षे स्वार्थत्यागपूर्वक महाराष्ट्राची सेवा केली आहे. निःसीम ध्येयवादित्वाखेरीज हें राष्ट्रकार्य तडीस गेलें नसतें. याकरितां ग्रंथाचे प्रकाशक व चिपळूणकर मंडळीचे चालक श्री. ठकार यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

## 'महाराष्ट्रीय' यांचा ग्रंथ

प्रारंभीं हे सांगितलें पाहिजे कीं, महाभारताचा उपसंहार डोळयासमोर असल्याकारणानें रामायणाच्या उपसंहाराबद्दलहि लोकांची कांहींएक अपेक्षा बनून राहिली असेल. व असें असल्यास ती या ग्रंथाच्या बाबतींत कितपत पुरी होईल याबद्दल शंका वाटते. कारण ग्रंथकर्त्यानें या पुस्तकांत वेगळ्या पद्धतीचें अवलंबन केलें आहे. ऐतिहासिक दृष्टि व चिकित्सक पद्धति या दोनही बाबतींत ग्रंथकर्त्याशीं अनेकांचा मतभेद होण्याचा संभव आहे. तथापि विवेचनपद्धति व अनुमानें याबद्दल कोणाचा मतभेद असला तरीहि ऐतिहासिक विवेचनाला उपयोगी पडणारी साधनसामुग्री व प्रमाणें महाराष्ट्रीय यांनीं फार परिश्रमपूर्वक एकत्र केलेलीं वाचकांस आढळून येतील. सहृदयता हा ग्रंथकाराचा मोठा गुण होय. व याची जोड मिळाल्याकारणानें या ग्रंथांतील अनेक भाग फारच चित्तवेधक व मनोरम झाले आहेत. तथापि कांहीं ठिकाणीं ग्रंथकर्त्याचीं अनुमानें सदोष आहेत असें दिसून येतें. त्या सर्वांचा परामर्ष या टीकालेखांत घेणें शक्य नाहीं. तसें केल्यास तो एक स्वतंत्र ग्रंथ होऊं शकेल. अनेक मुद्दयांचा या लेखांत नुसता नामनिर्देश

करितां येईल. व ग्रंथाच्या गुणगौरवापेक्षां मत-भेदाच्या मुद्द्यांनाच क्वचित् जास्त प्राधान्य द्यावें लागेल. परंतु कांहीं मुद्द्यांची विस्तृत चर्चा व्हावी याकरितांच हा टीकालेख लिहिण्याचें योजिलें आहे. असो.

## रामायणाची योग्यता

ग्रंथाच्या पहिल्या भागात रामायणाची योग्यता ग्रंथकर्त्यानें वर्णन केली असून त्यांत, रामायण काव्याचा हेतु लोकशिक्षण हाच होता. वाल्मीकि ऋषींच्या अंगीं प्रवृत्तिपर निवृत्ति बाणली असल्याकारणानें महर्षि हे रामचरित्रास कसे मोहून गेले, रामायणाचा विशेष यथार्थदर्शन हा होय, रामायण काव्य असून इतिहास आहे, रामचरित्राचा विशेष स्वार्थत्याग हा होय, साहित्यशास्त्राच्याहि दृष्टीनें रामायणाचें फार महत्त्व आहे वगैरे मुद्दे फार मार्मिकपणानें सांगितले आहेत. रामायण महाकाव्य हें सर्वच दृष्टींनीं असें आहे कीं, तें ज्याच्या हातांत पडेल त्याला, तो सहृदय असेल तर, वेड लाविल्यावांचून तें सोडणार नाहीं. धीरोदात्त चरित्रें, गंभीर विचार, उच्च हेतु, बहुविध काव्यमय वर्णनें अशा विविध संभारानें नटलेले ग्रंथ जगाच्या वाङ्मयांत फारच थोडे सांपडतील. आज सुमारें पांच हजार वर्षेपर्यंत या ग्रंथानें आपली छाप भरत खंडावर कायम ठेविली असल्याकारणानें त्यास एक प्रकारें राष्ट्रीयत्व प्राप्त झालें आहे. केवळ रामाच्या दरबारांतच या काव्याची वाहवा झाली इतकेंच नव्हे तर, आजपर्यंत हजारों वाचकांना त्यापासून संकटसमयीं जीवन व स्फूर्ति प्राप्त झाली आहे.

## रामायणाचा अद्भुतरम्य इतिहास

अशा या काव्याचा जन्म, त्याला मिळालेला महर्षि वाल्मीकीसारखा अलौकिक लेखक, ज्या विशिष्ट मनःस्थितींत हें काव्य लिहून झालें व ज्या परिस्थितीत तें जगापुढें आलें ती परिस्थिति, या सर्वच गोष्टी इतक्या अद्भुतरम्य व कौतुक करण्यासारख्या आहेत कीं रामचरित्राप्रमाणेंच त्याहि अजरामर होऊन राहतील. अर्वाचीन लेखकांच्या कृतींच्या जन्माबद्दल अनेक हकीकती वाचण्यांत येतात. पण त्यांत कौतुक करण्यासारखें अगर चित्ताकर्षक काय आहे हें खरोखरच दुसऱ्यानें येऊन सांगावें लागतें! परंतु रामायणाची गोष्ट सर्वच अद्वितीय होय. रामाला त्याचा चरित्रकारहि समकालीनच मिळाला. इतकेंच नव्हे तर, राम ज्याप्रमाणें प्रवृत्तिपर व निःसीम कर्मयोगी होता त्याप्रमाणें वाल्मीकि ऋषीहि खरे कर्मयोगी असून असून लोकशिक्षण देण्याच्या बुद्धीनें प्रेरित होऊनच त्यांनीं हा ग्रंथ लिहिला. लोकसंग्रह व लोककल्याण हेंच त्यांचें इतिकर्तव्य होतें. नाहीं तर संसारपाश तोडून अरण्यवासी झालेल्या या पुरुषाला लोकांकरितां रामचरित्र वर्णन करून सांगण्याची काय जरूरी होती? वर्तमानकाळीं घडणाऱ्या गोष्टींचें ऐतिहासिक महत्त्व जाणण्याला फार मोठी प्रतिभा लागते. व ही प्रतिभाशक्ति वाल्मीकीचे अंगीं असल्यानें ते फार कौतुकानें व उत्सुकतेनें रामचरित्र अवलोकन करीत होते. केवळ सोळा वर्षांचें कोंवळें तरुणपण असतांना रामानें केलेला राज्यत्याग, दंडकारण्यांत केलेला पराक्रम, देवांनाहि अजिंक्य झालेल्या रावणाला जिंकून केलेला लंका दिग्विजय, व याहिपेक्षां म्हणजे केवळ लोकाराधनेकरितां सीतात्याग करून प्रकट केलेला मनोजय, या सर्वच गोष्टींनीं महर्षि रामचरित्रावर मोहून गेले होते. अशा परिस्थितींत रामानें परित्याग केलेली सीतादेवी त्यांच्याच आश्रमांत आश्रयाला आल्यानें रामचरित्राचा विषय त्यांना जास्तच जिव्हाळ्याचा झाला.

वाल्मीकींनीं सीतादेवीचा व लवकुशांचा प्रतिपाळ केला. पण रामाचीं मुलें व सीता यांना मोठ्या युक्तीनें व लोकापवाद टाळून त्यांना रामाचे हवाली करावयाची होती. याकरिताच त्यांनीं लव व कुश यांना रामचरित्र शिकविलें. रामचरित्र रामापुढें गाऊन प्रसिद्ध करण्याला रामाचींच मुलें मिळणें यापेक्षां जास्त औचित्य तें कोणतें? याकरितां त्यांनीं लव व कुश यांना अयोध्येस पाठविलें. पण जातांना त्यांना सांगितलें कीं, कोणी विचारलें तर आम्ही ऋषिकुमार आहों असें सांगा. कोणी कांहीं देऊं लागला तर आम्ही तापसी आहों, आम्ही कांहीं घेत नाहीं असें म्हणा. रामचंद्र बहुधा या मुलांना बोलावून नेऊन विचारील अशी वाल्मीकि ऋषींची अटकळ होतीच. म्हणून त्याचें उत्तरहि त्यांनीं मुलांना असें सांगून ठेवलें कीं, "कोणत्याहि रीतीनें राजाची अवज्ञा करूं नका. कारण मुलांनों! राजा हा धर्मतःच सर्व लोकांचा पिता आहे." याचा अर्थ असा कीं, वस्तुतः तो सामान्य मनुष्यासारखा वाटला तरी धर्मतः तो सर्वांचाहि—म्हणजे तुमचाहि पिता आहे. तुम्ही रामाचेच पुत्र आहां हे सांगण्याची कोण ही नाजूक कामगिरी व केवढा द्राविडी प्राणायाम! पुढें हे तेजस्वी ऋषिकुमार नगरांत कसे गेले, यज्ञसभेंत त्यांनीं रामायण कसें गायिलें व अखेर रामचंद्रास सीतेची व आपल्या मुलांची कशी ओळख पटली तें सर्वांस माहीत आहेच. ग्रंथकर्त्यानें ही मनोवेधक हकीकत पहिल्या भागांत विस्तारानें दिली नाही. ती खरोखर देण्यासारखी आहे. उत्तरकांड प्रक्षिप्त आहे कीं नाहीं याबद्दल सुमारें १५ वर्षांपूर्वी महाराष्ट्रीयांचा व प्रो० शिवरामपंत परांजपे याचा वाद चालला होता, त्या वेळीं लिहिलेल्या लेखांत ती अनुषंगानें आलेली दृष्टीस पडते.

## काव्यस्फूर्तीच्या कारणाची मीमांसा

काव्याचा हेतु लोकशिक्षण हा असतो कीं कलाविलास होय हा वाद सोडून दिला तथापि, वाल्मीकींच्या स्फूर्तीचें सद्यःकारण म्हणजे क्रौंचवधाचा प्रसंग होय हें म्हणणें मनाला पटत नाहीं. क्रौंचवधानें त्यांच्या मनाला एवढा चटका लागला असता तर क्रौंचवधावरच त्यांनीं एखादें काव्य केलें असतें. पण आमच्या मतानें याची मीमांसा थोडी वेगळी आहे. व खालील कार्यकारणभावास ऐतिहासिक दृष्टयाहि ग्रंथांत पुष्टीच मिळते. क्रौंचवधाच्या निमित्तानें का होईना, वाल्मीकि ऋषीच्या शोकाला काव्यमय पाझर फुटण्याचें खरें कारण असें कीं, दृश्य सृष्टीप्रमाणेंच अदृश्य मानसिक सृष्टींतहि दुसरें एक मानवी क्रौंचमिथुन त्यांच्या डोळ्यासमोर होतें. निषादाच्या बाणाप्रमाणेंच दुर्धर जनापवादाचा बाण वर्मी लागून सीता व रामचंद्र हें मानवी मिथुन घायाळ झालें होतें. रामचंद्रानें सीतेचा त्याग केला असून सीता वाल्मीकींच्या आश्रमांत आली होती. व अशा रीतीनें मूर्तिमंत शोकच त्यांच्या आश्रमांत वाढत होता. याच मनःस्थितींत वाल्मीकि ऋषि हे एके दिवशीं तमसा नदीवर स्नानाला गेले असतां झाडावर बसलेल्या क्रौंचमिथुनापैकीं एकाचा निषादानें बाणानें वध केला हें पाहतांच सादृश्यसाम्याची प्रतीति होऊन त्यांच्या तोंडून शोकमय छंदोबद्ध वाणी बाहेर पडली ! व हाच रामायण काव्याचा उगम होय.

### 'काव्य, पुराण व इतिहास'

रामायण काव्य असून 'इतिहास' आहे हें ग्रंथकर्त्याचें विधान मान्य होण्यासारखें आहे; पण त्यांतील ऐतिहासिक माहितीची प्रामाण्याचे दृष्टीनें प्रतवारी लावली तर ते त्या कसोटीस कितपत उतरेल याविषयीं मात्र शंका आहे. आज रामायणाची श्लोकसंख्या सुमारें चोवीस हजार आहे. पण रामायण हे काव्य लव व कुश यांनी रामाच्या यज्ञसभेंत 'गाऊन दाखविलें' असा जो उल्लेख सांपडतो, त्यावरून फार तर दोन—तीन दिवसात गाऊन दाखविण्याइतकेंच मोठें हें काव्य असावें असा तर्क करतां येतो. म्हणजे हें काव्य चार अगर पांच हजार श्लोक इतक्याहून मोठें नसावें. पण आजच्या रामायणांत काव्यमय वर्णनें, पुराणमय दंतकथा, पूर्वीच्या ऐतिहासिक वैदिक कथांचा संग्रह, शेंकडो पुनरावृत्तीचे श्लोक इत्यादि गोष्टी आल्यामुळें सहजच मूळ ग्रंथाचें स्वरूप पांचसहापट वाढलें! अनुष्टुप छंदांतील श्लोक तेवढेच वाल्मीकींचे व इतर वृत्तांतील श्लोक हे दुसऱ्याचे म्हणून प्रक्षिप्त असें ग्रंथकारानें ठरविलें आहे. पण ही रीत बरोबर नाहीं. अनुष्टुप श्लोक हे वाल्मीकीशिवाय इतरांना करतां येणेंच शक्य नव्हतें, असें मानण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें इतर वृत्तांतील श्लोकहि रघुवंशांत कालिदासानें केल्याप्रमाणें वाल्मीकीनें केलेच नसतील असेंहि म्हणण्यास आधार नाहीं. तसेंच मूळ रामचरित्र घडलें व आजचें रामायण प्रसिद्ध झालें या दोहोंमध्यें सुमारें तीन हजार वर्षांचें अंतर पडतें. एवढ्या काळांत रामाबद्दल तो अवतार असल्याची कल्पना निर्माण होऊन रामकथेभोंवतीं एक प्रकारचें अतिमानुषत्व उत्पन्न झालें. आजच्या रामायणांत रामाला देवादिकांनीं मदत केल्याची हकीकत व दिलेलीं अभयवचनें, तसेंच तत्कालीन स्थितीविषयीं असंभाव्य कल्पना सांपडतात, त्यांचा उदाहरण म्हणून निर्देश करतां येईल. व 'महाराष्ट्रीय' यांनीं अस्सल ऐतिहासिक म्हणून जो भाग अगर सर्ग मानला असेल, त्या प्रत्येकांत वरील गोष्टी आहेत असें सिद्ध करतां येईल. रामायणांतील प्रक्षिप्त भाग म्हणून एक स्वतंत्र प्रकरणच ग्रंथकर्त्यांनें जोडलें आहे. पण त्यांनीं ठरविलेल्या प्रक्षिप्त भागाखेरीज इतर राहिलेलें तें सर्व अस्सल ऐतिहासिक अशी हमी ते देऊं शकतात काय? आमच्या मतें अशी हमी कोणासहि देणें अशक्य आहे. महाभारत मूळ व्यासांचे केवढें, वैशंपायनाचें केवढें व त्यांत सौतीनें किती भर घातली हें जसें निवडून काढतां येत नाहीं, तीच गोष्ट रामायणाची. रामायणांत बौद्ध लोक व श्रमण यांचे उल्लेख सांपडतात, ग्रीक लोकांमध्यें प्रचलित असलेल्या राशिगणनेचे त्यांत उल्लेख येतात, चातुर्वर्ण्याचे संबंधानें कटाक्ष असल्याचे उल्लेख त्यांत आढळतात. अगस्ति, भरद्वाज, रघु, दिलीप, सगर व भगीरथ यांनीं दक्षिणेमध्यें केलेल्या स्वाऱ्यांचे उल्लेख त्यांत आढळतात. अशा रीतीनें महाभारताप्रमाणेंच सुमारें तीन हजार वर्षांच्या आर्य संस्कृतीचें मिश्रण असलेला इतिहासाचा हा 'साधनरूप' ग्रंथ आहे एवढेंच फार तर म्हणतां येईल. पण खऱ्या दृष्टीनें त्याला 'इतिहास' म्हणतां येत नाहीं. इतिहासाचा धागा त्यांत सापडता एवढ्याकरितां त्याला वाटल्यास इतिहास म्हणावें. पण रामायणाचें खरें वर्णन करावयाचें म्हणजे "काव्य पुराण व इतिहास" या त्रिदळ विशेषणानें केलें तरच तें अधिक यथार्थ ठरेल. अर्थात् अशा ग्रंथांतून ऐतिहासिक अनुमानें काढावयाचीं तर तीं फार कसोशीनें व जपूनच काढलीं पाहिजेत. व ही मर्यादा ग्रंथकर्त्यानें सभाळली नाहीं, काव्यमय इतिहास लिहितांना खुलवून केलेलीं वर्णनें वस्तुस्थितिदर्शक मानलीं व त्यावरून ऐतिहासिक अनुमानें काढलीं असा आक्षेप या ग्रंथावर घेतां येण्यासारखा आहे.

## ग्रंथांतील इतर मुद्दे

या ग्रंथाच्या नवव्या भागांत स्थलनिर्णय व आठव्या भागांत रामायणांतील व्यक्तींचा कालनिर्णय करण्याचा प्रयत्न ग्रंथकर्त्यानें केला आहे. या विषयांचा वाद गेलीं पन्नास वर्षें होत असून पुढें आलेलीं सर्व साधकबाधक प्रमाणें ग्रंथकर्त्यानें एकत्र मांडलीं आहेत. अर्थात् कोणतेंहि एकच निश्चित मत आज ग्राह्य मानतां येणें शक्य नाहीं. तथापि पुढें आलेलीं प्रमाणें व विवेचन हें सर्वच दृष्टींनीं उपयुक्त असल्याकारणानें वाचकांनीं तें मुळांतूनच वाचण्यासारखें आहे. रामायणकालीं वर्षारंभ पौष महिन्यांत होत असे, असें एक विधान ग्रंथकर्त्यानें शोधून काढलें असून त्यावरून ज्योतिषशास्त्रदृष्ट्या रामचरित्राचा काल शकपूर्व २४५० धरला आहे. तसेंच सध्याचें गोदावरीच्या उगमाजवळचें जनस्थान हींच पंचवटी, तुंगभद्रा नदीच्या तीरावरील हॉस्पेट अगर हंपीनजीकचा प्रदेश हीच किष्किंधा, सीलोन हीच लंका असें सिद्ध केलें आहे. विस्तारभयास्तव या मुद्द्यांची चर्चा या लेखांत करतां येत नाहीं. भाग सहा संदिग्ध परामर्ष व भाग आठ संकीर्ण विवेचन हे दोन स्वतंत्र भाग कां केले हें समजत नाहीं. या दोहोंतही बरेच उपविषय येऊन गेले आहेत. पांचव्या भागांत प्रचलित दंतकथांविषयीं लिहिलें आहे व तेंहि वाचनीय झाले आहे.

पण या सर्वांपेक्षा भाग दहा हा ग्रंथकर्त्यानें उत्कृष्ट लिहिला असून त्यांत रामायणांतील पात्रांचें गुणदोषविवेचन केलें आहे. थॅकरे यानें म्हटल्याप्रमाणें आत्यंतिक श्रद्धा ही क्वचित् एखादे वेळीं सूक्ष्म टीकाकाराचेंहि काम करतें. आणि या म्हणण्याचें प्रत्यंतर या भागावरून दिसून येतें. हा भाग सुमारें शंभर पानांचा असून अत्यंत वाचनीय झाला आहे. व तो वाचून तत्कालीन दरबारी राजकारस्थानाची चांगली ओळख पटून प्रत्येक व्यक्तीचे स्वभावविशेष नीट लक्षांत येतात. महाभारताच्या उपसंहारामध्यें असें परीक्षण आलेलें नाहीं व तें या ग्रंथांत फारच सुंदर व मार्मिक वठलें आहे या गोष्टीचा मुद्दाम निर्देश करणें जरूर आहे.

## दरबारचें राजकारण

महाभारतातील मुख्य कथा कौरव–पांडव यांच्या गृहकलहाची आहे. कुटुंबांत कलह विकोपाला गेले असतां ते कोणत्या थराला जातात, याचें महाभारत हें उत्तम निदर्शन असून हे गृहकलह होऊं न देण्यास मुख्य पुरुषानें कसें वागले पाहिजे, याचें निरूपण रामायणांत आहे. अविभक्त कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीला सहनशील व्हावें लागतें आणि मुख्य पुरुष तर पूर्णपणें सहनशील असावा लागतो हें रामचरित्रावरून दिसतें. दशरथाच्या दरबारांत यौवराज्य भरताला द्यावयाचें कीं रामाला द्यावयाचें याबद्दल मोठें कारस्थान चाललें होतें. व खरोखर या कलहाचें बीज दशरथानेंच पेरून ठेविलें होतें. भाविकपणानें पौराणिक कथा या दृष्टीनें रामायण वाचणारांच्या ही गोष्ट लक्षांत येत नाहीं. दशरथानें अतिशय वृद्धपणीं कैकेयी ही तरुण बायको केली होती. असुर विवाहविधीनें हें लग्न झालें, व शुल्क म्हणून कैकेयीचे बापानें कैकेयीचा मुलगा भरत यालाच युवराजपद मिळालें पाहिजे अशी अट दशरथाला घातली होती. किंबहुना या अटीवरच हें लग्न झालें! कैकेयीला दशरथानें पूर्वी वर दिला होता व तें वचन पुरें करण्याकरितां रामानें चौदा वर्षें वनवास स्वीकारला अशी आपली सर्वसाधारण समजूत असते, पण तीं खरी नाहीं. दशरथ हा सत्प्रवृत्त पण कामाधीन व दुबळा होता. सत्प्रवृत्तीच्या एका लहरींत त्यानें रामासच युवराज करण्याचें ठरविलें व भरत हा मातुलगृहीं असतां रामाच्या अभिषेकाची वार्ताहि त्याला लागूं न देतां तडफेनें हा समारंभ उरकून टाकावयाचा असें त्याच्या मनांत होते. या प्रसंगीं कैकेयीचा बाप कैकय व भरताचा सासरा जनक या दोघांना मुद्दामच समारंभास बोलावणें केलें नव्हतें. कदाचित् ते आल्यानें विघ्न उपस्थित होईल व लढाईपर्यंत मजल जाईल अशीहि भीति होती. पण मंथरेच्याकरवीं कैकेयीला हें सर्व राजकारण नीट समजून तिनें आयत्या वेळीं हा सर्व व्यूह ढांसळून पाडला! दरबारचें हें सर्व राजकारण रामाला पूर्णपणें माहीत होतें. पण त्यानें थोर मन करून अत्यंत मोठा स्वार्थत्याग केला इतकेंच नव्हे तर अविभक्त कुटुंबांतील कर्ता पुरुष या नात्यानें दशरथानेंहि दाखविली नाहीं इतकी कर्तव्यतत्परता प्रकट केली. अंतर्भेदी संस्थानी राजकारणाचा मासला याप्रमाणें रामायणांतहि पाहावयास सांपडतो व त्याचें विवेचन ग्रंथकर्त्यानें फार मार्मिकपणानें केलें आहे. कौसल्या, सुमित्रा व कैकेयी या दशरथाच्या तीन राण्यांमध्यें कशी स्पर्धा चालली होती, यौवराज्याच्या प्रसंगामुळें या खटपटींना कसा भर आला, कांहीं मंत्री लोक या बाजूचे तर कांहीं त्या बाजूचे होऊन कसे राजकारण खेळत होते, राम व भरत या बंधूंचें वास्तविक निस्सीम प्रेम असतां केवळ दशरथानें उत्पन्न केलेल्या हितविरोधामुळें दोघांचीहि मनोवृत्ति एखाद्या सुवर्णाच्या ताजव्याप्रमाणें कशी सूक्ष्मदर्शी झाली होती, या सर्वांचें उत्कृष्ट व हृदयंगम स्वभावचित्र ग्रंथकारानें या भागांत रेखाटलें आहे. प्रस्तुत ग्रंथांतील हा भाग आमचे मतानें फारच बहारीचा असा वठला असल्याकारणानें त्यांतील मध्यवर्ती कल्पना मुद्दाम वर दिली आहे.

## अनार्य लोकांची संस्कृति

ग्रंथाच्या दुसऱ्या प्रकरणांत ग्रंथकर्त्यानें रामायणकालीन लोकस्थिति वर्णन केली आहे. तींत राजा व प्रजा यांचे अधिकार, वैभव व राज्यव्यवस्था, परदेशांशीं व्यवहार, राजाकडून होणारें धर्मरक्षणाच कार्य, वर्णव्यवस्था, मूर्तिपूजा, लोकांचे व्यवसाय, नाणीं, वस्त्रालंकार इत्यादि अनेक विषयांची माहिती एकत्र केली आहे. तसेंच तिसऱ्या व चौथ्या भागांत वानर व राक्षस यांच्या स्वरूपाबद्दल ज्या कित्येक लोकविलक्षण समजुती रूढ झालेल्या आहेत त्या खोडून काढणारीं मार्मिक प्रमाणें दिलीं आहेत. राक्षस आणि वानर यांच्या चालीरीति व संस्कृति यांचेबद्दलहि माहिती या विभागांतून आलेली आहे. या तीनहि भागांवरून, रामायणांतील इतिहास हा कोणत्या लोकांचा हें स्पष्ट होतें.

## अनार्यांची 'संस्कृत' नांवें !

रामायणासारख्या प्राचीन काव्यामधून इतिहास व काव्य हीं वेगवेगळीं निवडून काढणें हें अवघड तर खरेंच. पण तारतम्यभाव व चिकित्सक दृष्टि थोडीशी चालविली असतां तें अगदींच अशक्य नाहीं. वाल्मीकि हा अयोध्येच्या राज्यांतील प्रजाजन होता व निदान रामायण काव्य हें रामापुढेंच यज्ञसभेत गाऊन दाखवावयाचें असल्याकारणानें खुद्द रामासंबंधीं हकीकत व रामराज्याची वस्तुस्थिति हीं अनैतिहासिक रीतीनें वर्णन केलीं असतील हें संभवत नाहीं. पण हें विधान वानर व राक्षस यांच्या सामाजिक स्थितीचें जें ग्रंथकर्त्यानें वर्णन दिलें आहे त्याला मात्र लागू नाहीं. ग्रंथप्रामाण्य आम्हालाहि मान्य आहे. पण प्रत्यक्ष व अप्रत्यक्षप्रमाणासंबधानें पुराव्याचे कायद्यांत जी एक कसोटी दिली आहे त्यानें ग्रंथप्रामाण्यहि अजमावून पाहतां येतें. रामराज्यांतील माहिती हें वाल्मीकीचें प्रत्यक्ष ज्ञान म्हणतां येईल. पण वानर व राक्षस या अनार्य राज्यासंबंधानें व त्यांतील लोकासंबंधानें जें वर्णन केलें आहे त्यावर प्रामाण्यबुद्धि कितपत ठेवितां येईल हा प्रश्नच आहे. आर्य व अनार्य अशीं दोन टोकें असलेल्या या समाजांच्या संस्कृतीचें वर्णन जर तंतोतंत एकच येऊं लागलें तर वाचकांस शंका कां येऊं नये? पण आश्चर्य हें कीं, ग्रंथकर्त्यानें या बाबतींत रामायणांतील प्रत्येक शब्द ग्राह्य मानला आहे! रामायणांतील दशग्रीव, इंद्रजित, कुंभकर्ण, सुबाहु, त्रिशिर, यज्ञशत्रु, खर, दूषण, ब्रह्मशत्रु वगैरे अनेक राक्षसांचीं, तसेंच सुग्रीव, अंगद, हनुमान वगैरे वानरांचींहि जीं संस्कृत नांवें आलेलीं आहेत तीं मूळचीं त्या लोकांचींच तशीं असावींत असेंहि ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे. पण हे लोकच जर अनार्य तर त्यांचीं नांवें तेवढीं संस्कृत असावींत हा एक वदतोव्याघातच नव्हे काय?

## नांवें संस्कृत कां !

हीं नांवें संस्कृत कां आहेत याचें उत्तर अगदीं सोपें आहे. अनार्य भाषांतील कांहीं शब्द, त्यांचे उच्चार व अर्थ पाहिले तर हीं नांवें किती कठोर कर्णकटु व रसहीन लागतात याची कल्पना येते. ज्या सुसंस्कृत समाजापुढें रामायण काव्य गायलें जावयाचें होतें त्यांत हीं नांवें खचित रसहानि करणारीं व दुर्बोध वाटलीं असतीं. म्हणून काव्याच्या सोयीकरितां शक्य तितकीं अन्वर्थक पण संस्कृत नांवें योजून वाल्मीकीनें आपलें काव्य सजविलें व हें म्हणणें कोणासहि सहज पटण्यासारखें आहे. ग्रंथकर्त्याला काव्याची माहिती आहेच. वाटल्यास त्यानें चिनी लोकांचीं नांवें मराठी काव्यांत गोवून तें काव्य कसें काय उतरतें याचा अनुभव घेऊन पाहावा! पण इतकाहि तर्क करावयास नको. रामायणांतील अनार्य नांवांचा शोध अलीकडे कोणी "जी रामदास" या नांवाच्या गृहस्थांनीं केला असून त्यांनीं आपला लेख बिहार व ओरिसा रिसर्च संस्थेच्या मासिकांत प्रसिद्ध केला आहे, त्यावरून रामायणावर एक वेगळाच प्रकाश पडतो. रामदास यांनीं मुंदारी या अनार्य जातीच्या लोकांमध्यें जाऊन शबर वगैरे अनेक भाषांचा अभ्यास करून हे शोध लाविले. निदान हे शोध आज जगापुढें आलेले असतां रामायणांतील राक्षसादि अनार्य लोकांचीं नांवें संस्कृतच होतीं या म्हणण्यावर कोणीहि विश्वास ठेवणार नाहीं!

## राक्षसांच्या नीतिकल्पना

वानर व राक्षस यांच्या संस्कृतीसंबंधानें ग्रंथकारानें जें वर्णन केलें आहे त्यांत सुप्रतिष्ठित तर्कापेक्षां अंधश्रद्धेचाच भाग अधिक दिसून येतो. वानरांचीं व राक्षसांचीं नांवेंच संस्कृत होतीं, येथून सुरवात केली म्हणजे वानरांची व राक्षसांची संस्कृतीहि रामराज्यांतील आर्य लोकांइतकीच सुधारली होती, असें ग्रंथकारानें रामायणावरून सिद्ध केलें असेल हें वाचकांस न सांगतांहि कळेल! उदाहरणार्थ, सीताहरणापासून रावणाला मारीचानें परावृत्त करण्याचा जो उपदेश केला त्यावरून, तसेंच सीता परत देऊन रामाशीं युद्ध न करण्याबद्दल बिभीषणानें रावणाला जो उपदेश केला त्यावरून राक्षसांच्या नीतीच्या कल्पनाहि आर्य लोकांइतक्याच उच्च होत्या, परस्त्रीहरण हें पाप आहे, याविषयीं त्यांचें ऐकमत्य दिसतें असें ग्रंथकर्त्यानें अनुमान काढलें

आहे! तें कितपत बरोबर आहे, हें वाचकांनीं ठरवावें. केवळ सदुपदेश आळविण्यासाठीं वाल्मीकि ऋषींनीं लिहिलेल्या वाक्यातून असें ऐतिहासिक अनुमान निघत असेल तर, इसापनीतींतील गोष्टी सांगणाऱ्या बेडकांना व जनावरांनाहि नीतीच्या कल्पना मनुष्याइतक्याच होत्या असें विधान करावें लागेल! तसेंच "राक्षस हे वेदाचें अध्ययन करीत, वेदप्रामाण्य मानीत." अर्थात् वेदप्रामाण्य मानणाऱ्या राक्षसांमध्यें चातुर्वर्ण्यव्यवस्थाहि असलीच पाहिजे हें ओघानेंच आलें. व आश्चर्य कीं, हें ग्रंथकाराने खरोखरच तसें विधान केलें आहे. इतकेंच नव्हे तर "रावण हा ब्राह्मण होता. ब्रह्मराक्षस म्हणून निर्देश आढळतो तो राक्षसांतील ब्राह्मण वर्णाचा होय. म्हणजे सध्याप्रमाणें ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन वर्ण त्या वेळीहि राक्षसात होते असें म्हणतां येईल" असा शेरा मारला आहे!

## रावण म्हणे ब्राह्मण होता !

ग्रंथकर्त्यासारख्या जबाबदार लेखकानें सारासार दृष्टि यत्किंचितहि न चालविता अशीं अनुमानें काढावींत याचें आश्चर्य वाटतें. कित्येक वेळां अश्रद्धेप्रमाणेंच अंधश्रद्धा हीहि परिणामाच्या दृष्टीनें सारखीच घातक ठरत असते. रावण ब्राह्मण होता,' या मताचा पुरस्कार कोल्हापूरचे कै. शाहू छत्रपति करीत होते हें अनेकांना माहीत आहेच. पण उपसंहार—लेखक 'महाराष्ट्रीय' हि दुर्दैवानें त्याच मताचा अनुवाद करतात हें पाहून खरोखरच खेद वाटतो. रावण ब्राह्मण होता व राम म्हणे ब्राह्मणेतर होता! पण हे शब्दप्रयोगच खरोखर हास्यास्पद नाहीत काय? "ब्राह्मण व ब्राह्मणेतर असे दोन वर्ण हल्लींप्रमाणें त्या वेळींहि असावत" असें विधान ग्रंथकर्त्यानें केलें आहे. पण सर्व प्राचीन वाङ्मयांत ब्राह्मणेतर लोक हा एक 'वर्ण' असल्याचें वचन कोणास काढून दाखवितां येईल तर तें आम्हास हवें आहे. आर्य व अनार्य हें वर्गीकरण प्राचीन वाङ्मयांत आढळतें. पण कांहीं शहाण्यांच्या डोक्यांतून 'ब्राह्मण व ब्राह्मणेतर' हे जे वर्गीकरण अलीकडे निघालें आहे त्याला पांच पन्नास वर्षांहून अधिक वर्षांचा इतिहास नाहीं. राम हा त्या वेळच्या ब्राह्मणेतर चळवळीचा एक मोठा पुढारी होता, असें चित्र ग्रंथकर्त्यास काढावयाचें होतें असें त्यांच्या ग्रंथावरून दिसत नाहीं. कारण ठिकठिकाणीं चातुर्वर्ण्यपद्धतीबद्दल त्यांनीं जी अतिशयोक्ति केली आहे तीच त्यांना बाधक होते. या सर्वांचा अर्थ इतकाच की, अलीकडच्या राजकारणांतील शब्दाचा उपयोग न करण्याचें तारतम्य ग्रंथकर्त्यास राहिलें नाहीं व यामुळेंच दोन परस्पर विरोधी कल्पना मात्र ग्रंथांत रेखाटण्याचें त्यांनीं श्रेय घेतलें!

## थोडा पूर्वकालीन इतिहास

पण असें वस्तुस्थितीचा विपर्यास करणारें विधान आजच व प्रथम 'महाराष्ट्रीय' यांनीच केलें आहे असें नाहीं. इंग्रजी शिकलेल्या पहिल्या पिढींत ब्राह्मण व ब्राह्मणेतर अशा शब्दांनीं राम-रावणांचा उल्लेख करणारे अनेक विद्वान व शिष्टंमन्य पंडित होते. याकरितां या प्रश्नाचा खोल विचार करणें जरूर आहे. प्रस्तुत वादाचा निर्णय करण्यास आपण एका प्रश्नाचें निश्चित उत्तर ठरविलें पाहिजे. राक्षस हे एक आर्य तरी असले पाहिजेत, अगर अनार्य तरी असले पाहिजेत. वेदविद्या व चातुर्वर्ण्य या दोन गोष्टी आर्य संस्कृतीमध्येंच विशिष्ट होत्या. अर्थात् ज्या अनार्यांचा आर्यांमध्यें अजून समावेशच झाला नव्हता त्यांच्यामध्यें त्या जाऊंच शकत नाहींत. रामाचे वेळीं पंजाबापासून तों थेट गंगेपर्यंत आर्यांनीं उत्तर-हिंदुस्थानांत वसाहती निर्माण करून राज्येंहि स्थापलीं होतीं हें खरें. तथापि विंध्य पर्वताखालील प्रदेश केवळ अज्ञातच मानला जात असे, गंगा व यमुना यांचेमधील टापू देखील सुरक्षित नव्हता, व तेथें आर्य व अनार्य राक्षसादिकांच्या नेहमीं झटापटी होत. या टापूंतील माणसांना ओढून नेऊन राक्षस बेलाशक त्यांचा बळी देऊन नरमेध यज्ञ करीत. संध्येमध्यें "दक्षिणायै दिशे यमाय नमः" अशी ऋचा आहे तिचा खरा अर्थ त्या वेळीं फार चांगला समजत असेल! कारण सर्व दक्षिण प्रदेश अनार्यांनीं इतका परिपूर्ण व्यापला होता कीं, दक्षिणेंत पाऊल ठेवणें म्हणजे यमाच्या दारांतच पाऊल ठेवल्याप्रमाणें होतें! यमुना नदीचें नांवहि असेंच पडलें आहे. वनवासांत यमुनापार होण्याकरितां रामसीता व लक्ष्मण कालिंदी तीर्थावर आले. नाव यमुनेच्या मध्यभागीं आल्यावर सीतेनें अशी प्रार्थना केली कीं, "आई यमुने, तुझ्या प्रसादानें माझा भ्रतार चौदा वर्षांचा वनवास संपवून सुखरूप परत आल्यावर मी तुझी षोडशोपचारें पूजा करीन." अर्थात् या वनवासांतून आपणापैकीं कोणी सुखरूप परत अयोध्येस येईल कीं नाहीं याचीच सीतेला शंका होती. दक्षिण दिशा ही अशा रीतीनें त्या वेळीं अज्ञात व भयंकर अशी मानली गेली होती, यामुळेंच रामानें दंडकेंत वनवासाला जाण्याचें महत्त्व होतें. नाहीं तर त्यांत वैशिष्ट्यहि नव्हतें. तात्पर्य, अगस्ति ऋषीप्रमाणें क्वचित् एखाद्यानें यापूर्वी दक्षिणेंत प्रवेश केला असला तरी, वैदिक संस्कृतीचा या काळीं दक्षिणेंत प्रसार झाला असल्याचा इतिहासांत पुरावा नाहीं. अर्थात्, राक्षस यज्ञयाग करीत, वेदांचें अध्ययन करीत, रावण हा स्वतः अग्निहोत्री होता, रावणाने वेदांवर एक भाष्य केलें होतें, वेदांचीं पदें पाडून म्हणावयाची जी एक

पद्धत सध्या प्रचारांत आहे तिचा आद्य प्रवर्तक रावण होय अशा ज्या सर्व आख्यायिका आहेत त्या सर्व भाकडकथाच मानल्या पाहिजेत. येथे अंध-श्रद्धा कुचकामाची होय. राक्षसांत जर चातुर्वर्ण्य होतें तर ब्राह्मणाखेरीज इतर कोणत्याहि वर्णाचा उल्लेख त्यांच्यांत कां सांपडूं नये, याचें उत्तर कोणी देत नाहीं !

## खुद्द रामाचा पुरावा

पण खुद्द रामानेंच, रावण ब्रह्मकुलोत्पन्न होता, याबद्दल संशय प्रदर्शित केल्याचें उत्तर-कांडांत नमूद आहे. व त्याने या वादाचा निकाल लागण्यासारखा आहे. उत्तर कांडांतील रावणासंबंधानें इतर उल्लेख जर ग्रंथावर प्रामाण्य-बुद्धि ठेवून ग्राह्य मानावयाचे तर खुद्द रामानेंच त्याविषयीं संशय प्रदर्शित केल्याचाहि उल्लेख कां ग्राह्य मानावयाचा नाहीं ? ग्रंथकर्त्यानें कांहीं तरी कल्पना केली, पण आम्ही झालें तरी ही दुसरी एक कल्पनाच मांडतों असें म्हणतां येऊं नये म्हणून मूळ श्लोकच खाली सादर करतों. राम अगस्ति ऋषींना म्हणतात—

पुलस्त्यवंशादुद्भूताः राक्षसा इति नः श्रुतम् ।
इदानीमन्यतश्चापि संभवः कीर्तितस्त्वया ॥

"पुलस्त्यवंशापासून राक्षस उत्पन्न झाले असें आमच्या ऐकण्यांत होतें. परंतु सांप्रत दुसरी-कडूनहि राक्षसाची उत्पत्ति झाली असल्याचें आपण कथन केलें आहे." आजचा रामायण ग्रंथ निदान दोन हजार वर्षांपूर्वीचा आहे. व त्या ग्रंथांतच रामाची ही शंका नमूद आहे. यावरून रावणाच्या ब्राह्मणत्वा-वर कितपत विश्वास ठेवावा हें वाचकांनींच ठरवावें! रामायणांत हवे ते उल्लेख सांपडूं शकतात. ग्रंथ-कर्त्यानें वानरांतहि चातुर्वर्ण्यव्यवस्था असल्याचें विधान केलें नाहीं हें भाग्य! तथापि ग्रंथकर्त्यास सांप-डत नसल्यास उत्तरकांड सर्ग ६ श्लोक ४७-४८ यांत वानरांचे नगरांतहि चातुर्वर्ण्यव्यवस्था अस-ल्याचा उल्लेख आढळतो, तो आम्ही ग्रंथकर्त्यास नजर करतों.

पुण्या पुण्यवती दुर्गा चातुर्वर्ण्यपुरस्कृता ।
विश्वकर्मकृता दिव्या मुनियोगाच्च शोभना ॥

मग वानरांतहि चातुर्वर्ण्य होतें असें रामायणावरून म्हणण्याची ग्रंथकाराची तयारी आहे काय ? अनार्य लोकांसंबंधीं व आर्य लोकांसंबंधीं ग्रंथांतील वर्णनें समोरासमोर मांडलीं तर तीं इतकीं सारखीं दिसतात कीं त्यांच्या संस्कृतींत फरक काय, असा प्रश्न पडतो. पण ही एकवाक्यताच ग्रंथ-कर्त्यास बाधक ठरते. काव्यांत अतिशयोक्ति खपते, इतिहासाला ती चालत नाहीं. ऐतिहासिक अनु-मानें काढण्याला सारासार दृष्टि चालविली पाहिजे ती याकरितांच.

चातुर्वर्ण्याच्या उल्लेखासंबंधानें आणखीहि एक शब्द सांगितला पाहिजे. अतिरेकानें एखाद्या शब्दाचें अर्थस्वारस्य निघून जातें, अशीच गत या शब्दाची झाली आहे. व या शब्दाचा वाटेल तिकडे, वाटेल तेथें उपयोग करण्याची पूर्वकालीन ग्रंथांमध्यें फार प्रवृत्ति दिसून येते. उदाहरणार्थ, शिल्पशास्त्रावरील कांहीं संहितांत वस्तूंची परीक्षा करण्याकरितां चातुर्वर्ण्य उपयोगांत आणिलें आहे. शिल्पाकरितां लागणाऱ्या कोणत्याहि वस्तूची वर्ण लिंग, वय आणि अवस्था हीं पाहावीं. लांकूड घ्यावयाचें असल्यास 'ब्राह्मण लांकूड' असल्यास चांगलें, वगैरे उल्लेख सांपडतात. त्याचप्रमाणें चांगला बैल म्हणजे 'ब्राह्मण वृषभ' त्याचे खालो-खाल क्षत्रिय, वैश्य व शूद्र, अशी प्रतवारी लावि-लेली आहे. कशाचा उल्लेख चातुर्वर्ण्यपद्धतीनें करावा व कशाचा करूं नये, यांत सारासार विचा-रच दिसत नाहीं. इतकी ही पद्धति पूर्वकालीन लोकांना फार सोयीची व प्रिय वाटत असावी.

## चातुर्वर्ण्याची मीमांसा

पण रामायणांत चातुर्वर्ण्यव्यवस्थेबद्दल उल्लेख इतके निरंकुश कां आले आहेत, याचें खरें कारण इतिहासांत सांपडतें. बौद्ध धर्मानें वैदिक धर्मावर महाभारतकाळीं मोठें संकट आणिलें होतें. चातु-र्वर्ण्याची व्यवस्था मोडून बुद्धाला एक जात करा-वयाची होती. धर्म विसरून केवळ नीति म्हणजे सर्वस्व असें मानण्यांत येऊं लागलें होतें व चाहों-कडे पाखांड मताचा फैलाव होत होता. बौद्ध धर्माला अशोकानें राजाश्रय दिल्यामुळें या भांड-णाचें स्वरूप फार तीव्र झालें होतें. म्हणून एका अर्थानें वैदिक धर्माचा फैलाव करण्याकरितां व त्याला राष्ट्रीयत्व देण्याकरितांच मूळ भारत व रामा-यण यांचा आकार वाढवून त्यांना महाकाव्याचें स्वरूप देण्यांत आलें. रामायणांत चातुर्वर्ण्याचा उल्लेख इतका कटाक्षानें सांपडतो, इत-केंच नव्हे, तर कित्येक ठिकाणीं औचित्यभंग करूनहि वाटेल तेथें या शब्दानें धुमाकूळ घातला आहे, याचें खरें कारण बौद्ध धर्मविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया बुद्धि हें होय. "यथा बुद्धस्तथा चोरः" हें वाक्य रामायणांत सांपडतें त्यावरून बौद्ध धर्माबद्दल वैदिक धर्माभिमान्यांना किती तुच्छताबुद्धि वाटत होती हें दिसून येतें.

## वर्ण बदलतां येतो

महाभारतकाळीं अगर रामायणकाळीं म्हणजे इ. पूर्वी १०० वर्षांच्या सुमारास चातुर्वर्ण्या-संबंधीं जी कल्पना होती, असें ग्रंथकारानें मानलें आहे, तीहि खरोखर रामचरित्राचे वेळीं म्हणजे इ. पू. सुमारें अडीच हजार वर्षांच्या सुमा-रास नव्हती असें इतिहासावरून म्हणावें लागतें.

कारण रामाच्या काळीं चातुर्वर्ण्य हें जातिविशिष्ट न मानतां खऱ्या अर्थानें गुणकर्मविशिष्ट होतें. कोणी यज्ञयागाचा धंदा करो, अगर कोणी क्षत्रियाचा पेशा पत्करो. पण ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन वर्ण पूर्वी एकच मानले जात. त्यांत भेद नव्हता. चातुर्वर्ण्याच्या मर्यादा आतांच्या इतक्या त्या काळीं कृत्रिम व बोजड नव्हत्या. "हिंदु म्हणवून घेईल तो हिंदु" अशी ज्याप्रमाणें हिंदुत्वाची व्याख्या आज कित्येकजण करतात त्याचप्रमाणें, वाटेल त्या वर्णाचें म्हणवून घेणें ही गोष्ट केवळ ऐच्छिक होती. वृत्ति अगर धंदा आपण बदलूं शकतों; त्याचप्रमाणें कोणासहि वर्ण बदलतां येत असें व त्यांत आजच्या-इतकें त्या काळीं आश्चर्य अगर अधर्म वाटत नसे. क्षत्रियाचा ब्राह्मण झालेला विश्वामित्र रामकाळीं रामाच्याच राज्यांत राहात होता, व त्याचें गोत्र लावणारीं शेंकडो ब्राह्मण कुलें आज हयात आहेत. भारतीय युद्धांत हजारों ब्राह्मण वीरांनीं सैनिकाचा पेशा पत्करला होता. व द्रोण व अश्वत्थामा हे तर सेनापति होते! अधिकारानें अगर गुणकर्माचा हक्क बजावून ज्याप्रमाणें, खालच्या वर्णांतील मनुष्य ब्राह्मण होई त्याचप्रमाणें कर्तव्यविन्मुख झालेला ब्राह्मण पतित गणला जाऊन त्याचे सर्व अधिकार नष्ट होत. अशा ब्राह्मणाकडून राजानें कर घ्यावे, त्याला दंड करावे, किंबहुना वेठीसहि धरावें अशीं वचनें महाभारतांत सांपडतात.

### मन्वंतरें कां झालीं ?

चातुर्वर्ण्य म्हणजे एक ठराविक सांच्याची आज कल्पना होऊन गेली आहे.परमेश्वराप्रमाणेंच चातुर्वर्ण्य हें ज्यांना अनादि मानावयाचें असेल त्यांची गोष्ट आपण सोडून देऊं. कारण कोणाच्या श्रद्धेस विना कारण कोणी धक्का देऊं नये. पण जगांतील इतर सर्व गोष्टींप्रमाणेंच चातुर्वर्ण्य व्यवस्थेसहि उगम व उत्क्रांति असली पाहिजे हें इतिहासज्ञांस पटण्यास हरकत नाहीं. उत्तरध्रुवापाशीं सर्व आर्य लोक असतांना जातिभेद उत्पन्न झाला नव्हता. नंतर आर्य लोक दक्षिणेकडे येऊं लागल्यावर त्यांचा अनार्यांशीं संबंध आला. व त्यामुळें आर्य व अनार्य असा भेद उत्पन्न होऊन चातुर्वर्ण्याची उत्पत्ति झाली. आर्यवंशांतील जे लोक युरोप खंडांतच स्थायिक होऊन राहिले त्यांच्यांत जातिभेद उत्पन्न झाला नाहीं, व प्रगमनशील व विजयिष्णु स्वभावाच्या भारतीय आर्यांतच तो कां उत्पन्न झाला याचें खरें कारण त्यांचा अनार्यांशीं आलेला संबंध हेंच होय. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे भिन्न नसून एकच आर्य लोक होते. कर्मानें जरी त्यांचे भिन्न भिन्न व्यवसाय व वर्ण होत असले तरी, कालांतरानें त्यांना रूढीचें शृंखलाबद्ध स्वरूप प्राप्त होतांच प्रत्येक वेळीं मन्वंतर होऊन नवीन मनु निर्माण झाले. अशा रीतीनें चातुर्वर्ण्य हें जन्मसिद्ध नसून गुणकर्मनिष्ठ आहे हें वारंवार प्रस्थापित झालें आहे. याबद्दल विस्तृत चर्चा करण्यासारखी असून हवीं तेवढीं प्रमाणें काढून देतां येण्यासारखीं आहेत. चातुर्वर्ण्याचे बाबतींत उत्क्रांतिवाद कबूल केला तर, ग्रंथकर्त्यानें ज्या प्रकारचें चातुर्वर्ण्य मानलें आहे त्या प्रकारचें ते रामकाळीं म्हणजे चार हजार वर्षांपूर्वी नसलें पाहिजे हें उघडच ठरतें. अशा बाबतींत ऐतिहासिक दृष्टीसच प्रामाण्य देऊन निर्णय केला पाहिजे व याकरितांच या मुद्द्याचें इतकें विस्तृत विवेचन केलें आहे.

## ब्रिटिश राजनीतीचा अधःपात

॥ विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः ॥ —भर्तृहरि.

दे. भ. वल्लभभाई यांच्या नेतृत्वाखालीं बार्डोली तालुक्यांतील रयतांनीं धारावाढीविरुद्ध निर्धारपूर्वक चालविलेला लढा आतां अगदीं निकरावर आला आहे. रयतांना वळविण्याचा, भिवविण्याचा फोडण्याचा सर्व कांहीं प्रकार करून थकल्यावर आतां सरकारनें रयतेला पठाणाकडून वठणीवर आणण्याचा नितांत निर्दयतेचा प्रकार चालू केला आहे. बार्डोलींत आतां पठाणराज्य सुरू झालें असून रयतेला पूर्वीची पेंढाऱ्यांची लटालूट पुरवली, पण हा पठाणशाही छळ नको असें होऊन गेलें आहे. पण कितीहि छळ झाला तरी शपथ मोडावयाची नाहीं हा तेथील लोकांचा निर्धार कायम असल्यानें या सत्त्वपरीक्षेस बार्डोली तालुका आतांपर्यंत पुरून उरला आहे. आणि सरकारनें कितीहि छळवाद केला तरी तेथील रयत या दिव्यांतून यशस्वीपणें पार पडेल असा सर्वांस भरंवसा वाटत आहे.

बार्डोलीच्या या लढ्यास कशी व कां सुरुवात झाली व त्यांत सरकारची बाजू किती लंगडी आहे हें गुजराथेंतील राजीनामा देणारे आमदार व गव्हर्नरसाहेब यांच्या दरम्यान जो पत्रव्यवहार झाला त्याचे प्रसिद्धीकरणानें जगासमोर आलें आहे. बार्डोली वगैरे तालुक्यांची फेरधारेबंदी करण्याकरितां नेमलेले सेटलमेंट ऑफिसर मि.जयकर यानीं एका पद्धतीनें पाहाणी करून सारावाढ ठरविली. सेटलमेंट कमिशनरांना ती पद्धति अमान्य होऊन कुळांकडून जमीनदारांना खंड किती मिळतो तें पाहून त्यावर आकारणी करावी असें त्यांचें मत पडलें. सेटलमेंट ऑफि-

सरचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला व त्याविरुद्ध शेतकऱ्यांनीं आपले तक्रारअर्ज रुजू केले. पण सरकारनें सेटलमेंट कमिशनराचें तत्त्व ग्राह्य धरलें. मात्र त्यानें जेवढी वाढ करण्याचें ठरविलें होतें तेवढी वाढ न करतां सुमारें २० टक्के वाढ मंजूर करून नवीन आकारणी लागू केली. यांत रयतांची मुख्य तक्रार अशी कीं, ज्या सेटलमेंट रिपोर्टाविरुद्ध आम्ही अर्ज पाठविले तो रिपोर्ट बाजूस सारून वरिष्ठ अधिकाऱ्याच्या शिफारशीवरून जर सरकार आकारणी ठरवितें तर त्या वरिष्ठ अधिकाऱ्याचा रिपोर्टहि प्रसिद्ध व्हावयास पाहिजे व त्या रिपोर्टाविरुद्ध रीतसर तक्रारअर्ज मागावले पाहिजेत.ज्याअर्थी सरकारनें हा मार्ग न स्वीकारतां व सेटलमेंट कमिशनराच्या रिपोर्टावर रयतांचें म्हणणें काय आहे तें ऐकूनहि न घेतां धारावाढ कायम केली त्याअर्थी हा हुकूम अन्यायाचा,जुलमाचा व बेकायदेशीर आहे यास्तव वेगळा स्वतंत्र कामगार नेमून फेरचौकशी करा, रयतांची तक्रार ऐकून घ्या आणि नंतर मग जी काय वाढ योग्य वाटेल ती करा. बार्डोलीच्या रयतांची ही मागणी सनदशीर आहे, रास्त आहे आणि अगदीं नेमस्त स्वरूपाची आहे. असें असतां मुंबईसरकारनें तीहि अमान्य करून बार्डोली तालुक्यांतून दंडेलीनें सारा वसूल करण्यास सुरुवात केलेली पाहताच गुजराथ प्रांतांतील आठ आमदारांनीं कौन्सिलांतील जागांचे राजीनामे देऊन फेरनिवडणुकीला उभे राहण्याचा आपला निश्चय गव्हर्नर साहेबांस कळविला आणि पंजाबच्या लष्करी कायद्याच्या प्रकरणांत सर शंकर नायर यांनीं जसा आपला निषेध जगजाहीर करून सरकारी धोरणाची भरचवाठ्यावर बेअब्रू केली त्याप्रमाणें मुंबई कौन्सिलांतील आमदारांनींहि मुंबई-सरकारच्या अब्रूचे धिंडवडे काढले.

पण नोकरशाही अलीकडे इतकी निगरगट्ट बनली आहे कीं, तिला आपल्या दुर्लौकिकाचीहि फिकीर वाटेनाशी झाली आहे. आठ आमदारांनीं सरकारच्या चुकांचें माप त्यांच्या पदरांत घालून राजीनामे दिले असतां सरकारनें उलट त्यांच्याच राजीनाम्याची थट्टा करून स्वतःच्या मूर्खपणाचें प्रदर्शन केलें आहे. आपल्या शिरावरचा कराचा बोजा वाढूं नये असें वाटणें हें मनुष्यस्वभावाला अनुसरूनच आहे. तेव्हां ही स्वाभाविक व स्वतःसिद्ध गोष्ट पुनः सिद्ध करण्याला राजीनामे देण्याचीच जरूरी आहे असे नाहीं, असें म्हणून सरकारनें राजीनामे देणाऱ्यांची टवाळी केली आहे! पण आमदारांनीं हे राजीनामे बार्डोली तालुक्यांत धारावाढ करावी का करूं नये हें ठरविण्याकरितां दिले नसून धारावाढ करण्याची सरकारनें सध्या स्वीकारलेली पध्दति सनदशीर आहे का बिनसनदशीर आहे हें ठरविण्याकरितां दिले आहेत. आणि हे आमदार याच मुद्द्यावर राजीनामे देऊन पुनः निवडून आले तर सरकारची धारावाढीची पद्धति मतदारांना अमान्य आहे असें सिध्द होऊन सरकारचा तो सक्रिय निषेध होईल.

प्रत्येक मनुष्य आपल्यावरचा कराचा बोजा दुसऱ्यावर ढकलूं पाहातो; त्याप्रमाणेंच गुजराथचे मतदारहि नव्या निवडणुकीनें हीच स्वाभाविक गोष्ट सिध्द करतील; पण प्रत्येक मतदारसंघानें अशी टाळाटाळी करण्याला प्रारंभ केल्यास स्थानिक स्वराज्य, प्रांतिक स्वराज्य वगैरे संस्थांचीं कामें तरी कशीं चालावयाचीं असा सरकारनें राजीनामा देणाऱ्या आमदारांना उलट प्रश्न विचारला आहे! मुद्दाम वेड पांघरून पेडगावास जावयास निघालेल्या सरकारला या प्रश्नाचें उत्तर काय येईल हें माहीत नसेल असें नाहीं. पण ज्याअर्थी प्रतिपक्षाकडूनच उत्तराची अपेक्षा सरकार करीत आहे त्याअर्थी सरकारास आम्ही स्पष्ट सांगतों कीं, सरकारानें असली भलतीसलतीं काळजी करून झुरणीस लागूं नये! देशांत ग्रामसंस्थेपासून तों लेजिस्लेटिव्ह असेंब्लीपर्यंतच्या सर्व प्रातिनिधिक संस्थांतून नवे कर बसाविण्याच्या व जुने कर वाढविण्याच्या सूचना वेळोंवेळीं पुढें येतात व मंजूर होतात म्हणूनच या सगळ्या संस्थांचा कारभार आजपर्यंत चालला आहे व तसाच तो पुढेंहि चालेल. मुंबई–सरकारनें कोर्टफी वाढविली, स्टँपफी वाढविली, करमणुकीवर नवा कर लादला आणि या सर्व गोष्टी आमदारांच्या बहुमतानेंच घडून आल्या व त्या वेळीं कोणीहि राजीनामे दिले नाहींत. यावरूनच कोणत्याहि संस्थेचा कारभार चालविण्यास करभार देण्याची अवश्यकता आहे हें साधें तत्त्व प्रतिनिधींना कळतें हे उघड आहे. पण ज्याअर्थी बार्डोलीच्या धारावाढीविरुद्ध एवढी चळवळ उद्भवली व राजीनामे देण्यापर्यंत पाळी आली त्याअर्थी ही धारावाढ कर बसविण्याच्या न्याय्य तत्त्वाला सोडून झाली असली पाहिजे हेंहि तितकेंच उघड आहे. आणि बार्डोलीच्या काय किंवा अलीबागच्या काय, धारावाढीच्या प्रतिकाराच्या बुडाशीं हेंच तत्व आहे कीं प्रतिनिधींच्या संमतीखेरीज कोणताहि कर बसविला किंवा वाढविला जाऊं नये. पोस्टाचें कार्ड पाव आण्याला विकावें का अर्ध्या आण्याला विकावें ही गोष्ट जर दरसाल असेंब्लींतील सभासदांच्या मतानेंच ठरविली जाते तर शेतसारा दरएकरीं कोणत्या जमिनीस किती घ्यावा याची मर्यादा ठरविण्याचा हक्क कौन्सिलांस कां असूं नये? इतर करांना जे नियम लागू तेच शेतीवरील करालाहि

लागू करावे असा अभिप्राय जॉईंट पार्लमेंटरी कमिटीनें दिला आहे. पण त्यायोगानें आपली रावणशाही सत्ता कमी होते म्हणून त्या शिफारशीस अनुसरून नवा कायदा करण्याची सरकार, टाळाटाळी करीत आहे व त्यामुळेंच पेण, पनवेल अलीबाग, बार्डोली वगैरे ठिकाणीं सत्याग्रहापर्यंत पाळी आली आहे. आणि या सत्याग्रहामुळें आपला हा गुप्त कावा चवाठ्यावर आला म्हणून सरकार राजीनामा देणाऱ्या आमदारांच्या नांवानें बोटें मोडीत आहे.

कायदे-कौन्सलाला सरकार अगदींच धाब्यावर बसवितें ही गोष्ट जगजाहीर झाल्यानें आपली नाचक्की होते असें वाटून आत्मसमर्थनासाठीं मुंबईसरकार आतां असें सांगत सुटलें आहे कीं, बार्डोलीच्या सारावाढीचा प्रश्न कौन्सिलांत निघाला असतां बहुमत सरकारच्याच बाजूस मिळालें; तेव्हां कौन्सिलाच्या बहुमतानें जी गोष्ट ठरली तिच्याविरुध्द सरकारनें तरी कशी वागणूक करावी ? अशा रीतीनें मुंबई सरकारनें आपल्या बचावासाठीं कौन्सिलाच्या बहुमताची सबब पुढें करणें हें सैतानानें बायबलाचा आधार दाखविण्या इतपतच सयुक्तिक आहे ! मुंबईच्या कायदमंडळांत दुर्दैवानें योग्य संघटना नसल्यानें आणि विशेषतः मुसलमानांचा विरोध व ब्राह्मणेतरांचा घातक तटस्थपणा यामुळें नरीमन यांचा ठराव त्या वेळीं नापास झाला हें खरें. परंतु तो ठराव पास झाला असता तर त्याची वासलत सरकारनें कशी लावली असती हें निराळें सांगावयास नको. नरीमन यांच्या नापास झालेल्या एका ठरावाकडे बोट दाखवून आत्मसमर्थन करणाऱ्या सरकारला आमदार प्रधान यांच्या ठरावाची आठवण होऊन थोडी तरी शरम वाटावयास हवी होती. नवें लँड रेव्हेन्यू बिल तयार करून शेतसारा बसविण्याचा अधिकार कौन्सिलकडे येई पर्यंत नवीन फेरपहाणी करूं नये व १९२४ नंतर जेथें फेरपाहणी केली असेल तेथें तिची बजावणी होऊं नये असा स्पष्ट ठराव पास झाला असतां तो धाब्यावर बसवून ज्या नोकरशाहीनें धारावाढीचा धुमाकूळ सर्वत्र माजविला आहे तिला कायदेमंडळाच्या मताची कितीशी पर्वा वाटते तें लहान पोरासोरांसहि कळून चुकलें आहे. असें असतां चार वर्षांपूर्वी पास झालेला कायदेमंडळाचा ठराव पायाखालीं तुडवून बेकायदा सारावाढ करणाऱ्या सरकारनें तत्त्वासाठीं राजीनामा देणाऱ्या आमदारांचीच उलट थट्टा करावी हा शुध्द कोडगेपणा होय.

पण सरकारला कायदेमंडळाच्या ठरावाचा हा कार्डीचाहि आधार यापुढें उपयोगी पडणार नाहीं अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. कारण ज्या आमदारांनीं त्या वेळीं नरीमनच्या ठरावाच्या विरुध्द मत दिलें त्यांतले भूतो, खुरों, डोंगरसिंग वगैरे आमदार आतां पश्चात्ताप पावून बार्डोलीच्या सारावाढीची फेरचौकशी व्हावी असें म्हणूं लागले आहेत. आणि केवळ याच एका मुद्द्यावर नवा ठराव येत्या कौन्सिलापुढें आल्यास त्यांत सरकारला हटकून हार खावी लागेल. आणि सरकारच्या बार्डोलींतल्या आज मितीला चालू असलेल्या अत्याचाराकडे नजर फेंकल्यास सरकाराविरुद्ध निषेधदर्शक ठराव पास करणें ही शिक्षा अगदींच सौम्य मानली पाहिजे. कारण बार्डोलीवर पठाणांची टोळधाड सोडून तेथील रयतांचा जो छळवाद सरकारनें आरंभिला आहे तो ऐकतांच अंगावर शहारे येतात. इतर कोणीहि सरकारी नोकर असलीं हलकटपणाचीं कामें बेगुमानपणें करण्यास तयार होईना म्हणून सरकारनें उडाणटप्पू पठाणांची टोळी तयार केली आणि त्यांना रयतांची मालमत्ता जप्त करून आणण्याच्या कामावर नेमलें. जे पठाण रेल्वे स्टेशनांतील मिठाच्या पोत्यांतून शेर दोन शेर मीठ चोरण्यासहि लाजत नाहींत ते पठाण घरांत घुसल्यावर काय काय लीला करीत असतील याची कल्पनाच करावी. मनुष्य एकदां विवेकभ्रष्ट व शीलभ्रष्ट झाला म्हणजे त्याला तसलेच संवगडे जमवावे लागतात; त्याप्रमाणें सरकारनें एकदां सोटेशाही चालू करण्याचें ठरविल्यावर त्याच्याभोंवतीं असलीच शीलभ्रष्टांची सेना जमावयाची. परंतु लवकरच सरकारला याचे प्रायश्चित्त भोगावें लागल. . यदाकदाचित् पठाणांच्या दंडुक्यांच्या जोरावर जप्ती करकरून सरकार आज बार्डोलीचा पांच–सहा लक्ष रुपयांचा वसूल एकदा पदरांत पाडून घेईल.पण असलें पाप पचणें अशक्य असतें. असल्या पेंढारशाहीनें लोकांत जो असंतोष माजतो तोच अखेरीस अनियंत्रित सत्तेच्या मुळावर येतो. नादिरशहानें दिल्लींत लूट केली किंवा सर्जेराव घाडग्यानें पुण्यांतील घरांना खणती लावून संपत्ति जमा केली ती त्यांच्या कारकीर्दींतील अखेरचींच पापकृत्यें ठरलीं. त्याचप्रमाणें अनियंत्रित नोकरशाहीचा दंडुकेशाहीनें केलेला हा सारावसूल अखेरचाच ठरेल. ज्या आमदारांनीं गेल्या मार्च महिन्यांत गैरसमजतीनें सरकारला पाठिंबा दिला ते आमदारहि आतां यापुढें सरकारची सत्ता अशी उच्छृंखलपणें चालावी असें म्हणूं शकणार नाहींत. अर्थातच शेतसारा ठरविण्याचा व त्यांत फेरबदल करण्याचा अधिकार बेलगामी नोकरशाहीकडे असावा का लोकशाहीच्या तत्त्वास अनुसरून तो कायदेमंडळाकडे असावा या प्रश्नाचा लवकरच कायमचा निर्णय लावून घेणें प्राप्त आहे. आणि बार्डोलीस सरकारनें जे गुण उधळले आहेत ते लक्षांत घेतां यापुढें ही सत्ता अशीच अनियंत्रित राहावी असें

कोणीहि आमदार म्हणणार नाहीं. आजमितीला बार्डोलीच्या रयतांचे अत्यंत हाल होत आहत हें खरें. पण या सत्त्वपरीक्षेत ते टिकले तर त्यांचा छळवाद हाच नोकरशाहीचा अखेरचा शंभरावा गुन्हा ठरून तिच्या पापाचा घडा पूर्ण भरेल आणि यापुढें पुनः कोणत्याहि ठिकाणच्या रयतांवर असली गुंडगिरी सहन करण्याची पाळी येणार नाहीं. दे. ब. वल्लभभाई पटेल यांच्या उत्कृष्ट नेतृत्वाखालीं बार्डोलीची रयत या सत्त्वपरीक्षेस टिकेल आणि आपल्या अलौकिक आत्मत्यागानें मुंबई इलाख्यांतील सगळ्याच रयतांच्या मागची सुलतानशाहीची पीडा कायमची दूर करील असा आम्हास भरंवसा वाटतो.

# रशियांतील बोल्शेव्हिक राज्य

### लेखांक ४ था

## प्रयत्नांची दिशा

रशियांत लेनिनच्या प्रयत्नानें समाजसत्तावाद्यांचें राज्य स्थापन झालें आहे खरें; तरी पण त्यावरून रशियांतील पंधरा कोटि रहिवासी समाजसत्तावादी बनले आहेत असें कोणी समजूं नये. कारण समाजसत्तावादाचीं तत्त्वें बहुजनसमाजांत बिंबणें व तदनुरूप वागण्याची त्यांजकडून तयारी होणें ही फारच बिकट गोष्ट आहे. झारच्या अमलाखालीं कोणीहि व्यक्तीनें स्वतःस कम्यूनिस्ट म्हणविणें हें मृत्यूस निमंत्रण करण्यापैकींच होतें. पण आतां कम्यूनिस्टांचा अंमल प्रस्थापित झाल्यामुळें कम्यूनिस्ट यांस रशियाचे राजे समजण्यास हरकत नाहीं. यासाठीं आपणास कम्यूनिस्ट म्हणवून घेण्याची कोणाहि महत्त्वाकांक्षी रशियनास इच्छा असणें स्वाभाविक होय. या दृष्टीनें रशियांत कम्यूनिस्टांचें संख्याबल कोट्यवधीनें वाढलें असेल असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे व गुणांपेक्षां संख्येवर नजर देण्याचें बोल्शेव्हिक पुढाऱ्यांनीं मनांत आणिलें तर त्यांस आपली संख्या सहज वाढवितां येणार आहे. परंतु वस्तुस्थिति मात्र याहून वेगळी आहे. राज्यकारभारांत कम्यूनिस्ट पक्षाचे सभासद सारे दहा लाख देखील नाहींत. याचें कारण असें आहे कीं पक्की कम्यूनिस्ट मताचीं माणसें मिळणेंच अशक्य असतें. ज्यांचा कम्यूनिस्ट मतांवर विश्वास नाहीं व जे कम्यूनिस्ट मतांप्रमाणे वागण्यास तयार नाहींत अशांची भरती कम्यूनिस्ट पक्षांत होऊन त्यांचें संख्याधिक्य झाल्यास सांप्रतचें रशियांतील बोल्शेव्हिक राज्य कोसळून पडेल व त्या ठिकाणीं कदाचित् भांडवलवाल्यांचा पक्ष किंवा मध्यम वर्ग अधिकार बळकावून बसेल अशी भीति आहे.

### कम्यूनिस्ट सभासद

कम्यूनिस्ट बनण्यांत व्यक्तीचा तादृश फायदा कांहींच नाहीं. त्यांना पक्षाची कडक शिस्त पाळावी लागते. त्यांनीं पक्ष सांगेल तेथें गेलें पाहिजे व पक्ष सांगेल तें काम केलें पाहिजे. फार दारू पितां कामा नये, कम्यूनिस्टानें फार जुगार खेळतां कामा नये, व ख्रिस्ती चर्चमध्यें प्रार्थनेस जातां कामा नये. इतकीं पथ्यें सभासदानें पाळण्याचें कबूल केलें तरी त्याला पैशाची प्राप्ति मोठी होते असें नाहीं. त्याला दरमहा २२५ रुबलपेक्षां जास्ती पगार मिळत नाही. मात्र त्याच्या हातीं अधिकार मोठा असतो व तेंच कम्यूनिस्ट पक्षाची दीक्षा घेण्यास मोठें आमिष आहे. लेनिनचा दोस्त ट्रॉटस्की यानें एका झटक्यास दोन लाख इसमांस आपल्या पक्षांत ओढलें होतें. पण त्याच्या या घाईचा परिणाम फार अनिष्ट झाला व तेव्हांपासून कम्यूनिस्टांस फार कसोशीनें दाखल करून घेण्यास सुरुवात झाली. कोणत्याहि नव्या इसमास कम्यूनिस्ट पक्षांत समाविष्ट केल्यावर सहा महिने ते दोन वर्षांपर्यंत हंगामी म्हणून ठेवण्यांत येतें. सर्व सभासदांवर सक्त नजर राहात व त्यांतील कोणी स्वार्थसाधु असल्याचें आढळून आल्यास त्याची कम्यूनिस्ट पक्षांतून उचलबांगडी होते.

कम्यूनिस्ट सभासद हा बोल्शेव्हिक राज्याचा प्राण असल्यामुळें सर्व राज्यसूत्रें त्याच्याच हातीं राहावीं याबद्दल विशेष खबरदारी घेण्यांत येत असल्यास नवल नाहीं. तथापि एवढ्यावरून बोल्शेव्हिक राज्ययंत्राचे अणुरेणु कम्युनिस्टांचे बनले आहेत असें समजणें चुकीचें होय. कम्यूनिस्ट मतें कशाशीं खातात हें ज्यांस माहीत नाहीं असे कोट्यवधि लोक रशियांत आहेत अशांत मुख्य भरणा शेतकऱ्यांचा. बहुजनसमाजाचे कामकरी व शेतकरी असे दोन वर्ग पाडल्यास कामकरी हे नगरवासी असल्यामुळें त्यांना कम्यूनिस्ट मतांची थोडीबहुत ओळख पटली असण्याचा संभव आहे. परंतु खेड्यापाड्यांतून पसरलेल्या शेतकऱ्यांना त्याचें ज्ञान कोठून असणार? याकरितां राज्यकारभारांत अधिक प्रवेश कामकऱ्यांचा करण्यांत आला असून शेतकरी वर्ग काठाशींच तरंगत आहे.

### खेड्यांतील सोव्हिएट

बोल्शेव्हिकांच्या राज्यकारभाराचा शेवटचा

दुवा खेडें होय. प्रत्येक खेड्यास अगर लहान खेड्यांच्या प्रत्येक समुदायास व्हिलेज कौन्सिल नामक संस्था देण्यांत आली आहे. सदर कौन्सिलांत आपल्यातर्फे प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार अठरा वर्षांवरील सर्व स्त्रीपुरुषांस आहे. मात्र ती स्त्री अगर तो पुरुष श्रमोपर्जावी असला पाहिजे. या श्रमोपर्जावी वर्गांत फक्त कामकरी व शेतकरी यांचाच समावेश होतो. खासगी व्यापारी, धर्मोपदेशक व लहान कारखानदार यांना मत नाहीं. खासगी व्यापाऱ्यावर राग कां तर तो स्वतःचें भांडवल बाळगतो. धर्मोपदेशक नावडता कां तर त्यानें झारशाहींत ख्रिस्ती धर्मानुयायाबरोबर अरेरावीचें वर्तन केलें होतें व कारखानदार वावडा कां तर तो हाताखालीं नोकर ठेवून त्यांजकडून कष्ट करून घेतो. या त्रिवर्गावर बोल्शेव्हिकांचा एवढा कटाक्ष आहे कीं त्यांना सैन्यांत सैनिक म्हणून शत्रूशीं लढण्याचा हक्क नाहीं व खासगी रीतीनें हत्यार बाळगण्याचीहि परवानगी नाहीं. ह्या त्रिवर्गावर तिलांजलि घेऊन बोल्शेव्हिक उभे आहेत. परंतु त्यांस कायद्यानें एकदम चिरडून टाकल्यानें देशांत अव्यवस्था व व्यावहारिक गैरसोयी उत्पन्न होऊन समाजांत व विशेषतः शेतकरी वर्गांत असंतोष पसरेल यासाठींच बोल्शेव्हिकांनीं त्यांस जिवंत राहूं दिलें आहे. तथापि त्यांचा जीवनरस आटविण्याचा प्रयत्न राज्ययंत्रामार्फत निकरानें सुरू असल्यामुळें बोल्शेव्हिकाची राजवट अशीच टिकल्यास किंवा अनुभवानें त्यांच्या विचारसरणींत परिवर्तन घडून न आल्यास भिक्षुक, व्यापारी व लहान कारखानदार यांचे डोळे हळुहळू पांढरे झाल्यावांचून राहाणार नाहींत. भिक्षुक वर्गाची उत्पन्नें खालसा झाल्यामुळें त्यांना पोटाची भ्रांत आजच पडली आहे. त्याचा निर्वाह जेमतेम शेतकरी वर्गाच्या भक्तीवर चालतो. शेतकरी वर्गाच्या नवीन पिढींतील भक्तीचा ओलावा पुसून काढण्याकरिता बोल्शेव्हिकांनीं शिक्षणक्रमामार्फत त्यांच्या काळजांत हात घातला आहे व बोल्शेव्हिकांचा हा प्रयत्न सिद्धीस गेल्यास नवा पुरोहित वर्ग जन्मास येणार नाहीं व जुना पुरोहित वर्ग मरून जाईल.

### व्यापारी, पुरोहित व कारखानदार

ग्रामकौन्सिलाच्या मतदारांतून व्यापारी, पुरोहित व कारखानदार यांस वगळल्यानंतर बहुधा शेतकरी वर्गच शिल्लक राहातो. कौन्सिलांत स्त्रिया निवडून याव्या अशी बोल्शेव्हिकांची फार इच्छा. पण खेडेगांवांतील स्त्रियांना शिक्षण नाहीं व सार्वजनिक कार्याची आवडहि नाहीं. कम्यूनिस्ट मतें शेतकऱ्यांस समजत नाहींत. याकारणानें निवडून आलेल्या प्रतिनिधींत ज्यांस पक्ष नाहीं असा शेतकऱ्यांचाच भरणा मोठा असतो. १९२६ सालीं रशियांतील एका खेड्यांत निवडणूक झाली. तिच्यावरून ग्रामकौन्सिलाची रचना कशी असते याविषयीं कल्पना होईल. त्या कौन्सिलांतील एकंदर ३६ सभासदांत ३ स्त्रिया व ५ कम्यूनिस्ट व बाकीचे सर्व शेतकरी होते. हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच रशियांतील मतदारसंघ निवडणुकीचे बाबतींत बेफिकीर राहतो. सर्व मतदारांतून शें. ४० मतदारहि मतें देण्यास उपस्थित नसतात. हिंदुस्थानांत साक्षात् मतदानाचा अधिकार आहे. याचा अर्थ असा कीं लोकल बोर्डें, म्युनिसिपालिट्या, प्रांतिक कौन्सिलें, लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांतील सभासदांस मतदारसंघ स्वतःच निवडून देतात. रशियांतील निवडणूक अशी सरळ नाहीं. तेथील निवडणुकीस चाळण्या लावल्या आहेत. ग्रामकौन्सिलांत सभासद निवडून आल्यानंतर तालुकाकौन्सिलाला ते आपल्यातर्फे प्रतिनिधी निवडतात. व हाच क्रम स्टेट असेंब्ली व मॉस्कोचें मुख्य कौन्सिल येथपर्यंत पोंचतो. या वस्त्रगाळ निवडणुकींतून मुख्य कौन्सिलांत कम्यूनिस्टांचेंच प्राबल्य राहातें. व आपला प्रयोग पूर्णपणें अमलांत आणावयाचा तर स्वतःच्या हातीं राज्यसूत्रें ठेवणें कम्यूनिस्टांना भाग पडावें यांत नवल नाहीं.

रशिया हा हिंदुस्थानाप्रमाणेंच शेतकींचा देश असल्यामुळें त्यांतील लोकवस्तींत ८० टक्के शेतकरीच आहेत. रशियांतील जमीन लागवडीस आणण्याचा पहिला प्रयत्न जमीनदारांनीं केला व तेच जमिनीचे मालक होऊन बसले, जमीनदार हाताखालीं कुळांना कामाला घेत, परंतु ती कुळें गुलामगिरीच्या स्थितींत असत. त्यांजकडून जमीनदारानें मर्जीस येईल तितकें काम करून घ्यावें व त्यांची जरूर नसल्यास दुसऱ्यास विकावेंहि. इंग्लंडांत गुलामगिरीस मूठमाती देण्याचा कायदा पास होऊन इंग्लंडाचें हें धोरण सर्व पाश्चात्य राष्ट्रांनीं अमलांत आणिलें त्या वेळीं रशियांतील गुलामांचीहि सुटका झाली. अशा रीतीनें गुलाम स्वतंत्र झाले तरी त्याजपाशीं स्वतंत्रपणें चरितार्थ चालविण्यास स्वतःची पुरेशी जमीन नव्हती. याकारणानें त्यांपैकीं पुष्कळांस पूर्वीच्या जमीनदारांपाशींच गुलाम म्हणून नसलें तरी कूळ म्हणून राबत राहाण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. त्यांस या पेंचांतून सुटण्याकरितां राज्यक्रांतीची वाट पाहावी लागली. ही राजक्रांति घडून येतांच जमीनदार, पुरोहित वर्ग व उमराव यांच्या जामनी सोव्हिएट सरकारनें खालसा केल्या. त्यापैकीं ९३ टक्के जमीन शेतकऱ्यास वांटण्यांत आली, ३ टक्के जमीन सरकारनें शेतकीचे प्रयोग करून पाहाण्याकरितां आपल्याकडे ठेवली व उरलेली ४ टक्के जमीन सरकारी शेऱ्यांत गणली गेली.

## शेतकऱ्यांच्या सोयी

महायुद्धांत रशियाचें ७० लक्ष सैन्य गारद अगर जखमी झालें. हे सर्व सैनिक रशियांतील शेतकरी वर्गांतूनच उचलून आणलेले होते. त्यांचा संहार झारच्या अमदानींत झाला. झारच्या जागीं बोल्शेव्हिक आले. त्यांनीं युद्ध थांबवून तरुण शेतकऱ्यांस एक प्रकारें जीवदान दिले इतकेंच नव्हे तर त्यांस भूमिदान करून अन्नदानाचेंहि पुण्य संपादिलें. यामुळें साहजिकच रशियन शेतकऱ्यांस नवें बोल्शेव्हिक राज्य जीव कीं प्राण वाटतें. उलट बोल्शेव्हिक सरकारहि शेतकऱ्यांची काळजी वाहण्याचे बाबतींत आपल्या प्रयत्नांत मुळींच कसूर होऊं देत नाहीं. जेथें वस्ती दाट आहे तेथून शेतकऱ्यांस उठवून पातळ वस्तीच्या प्रदेशांत नेऊन सोडणें, त्यांस जरूर त्या सवलती ठेवणें व चांगल्या अवलादीचीं गुरें पुरविणें अशी ही त्यांची योजना आहे. खेरीज प्रत्येक गांवांत पतपेढ्या स्थापून सहकारितेच्या तत्त्वावर शेत सुधारण्यास साहाय्य करणें ही योजना त्यांनीं अमलांतहि आणिली आहे. या प्रयत्नामुळें झारशाहीपेक्षां बोल्शेव्हिक राजवट शेतकऱ्यांस किती तरी आशादायक व सुखकारक वाटते. परंतु बोल्शेव्हिकांची मजल एवढ्यावर थांबावयाची नाहीं. बोल्शेव्हिकी तत्त्वाप्रमाणें शेतकरी हा जमिनीचा मालक नव्हे. जमिनीची मालकी समाजाची म्हणजे सरकारची असून चरितार्थापुरतें धान्य शेतकऱ्यापाशीं ठेवून बाकीचें उत्पन्न सरकारजमा करणें त्यांस तत्त्वदृष्ट्या जरूर आहे. परंतु शेतकऱ्यांच्या चालू पिढीस हें पसंत पडणार नसल्यामुळें तिजवरील या बाबतींतील सक्ति तूर्त रहित करण्यांत आली असून तरुण पिढीवर त्यांनीं आपली सर्व भिस्त ठेवली आहे. तरुण पिढीस आपल्या मनाजोगी बनविण्याचे बोल्शेव्हिकांचें मुख्य साधन शिक्षण हें होय. ते शिक्षण कोणत्या धर्तीवर देण्यांत येतें या विषयाचा विचार पुढील खेपेवर टाकणें भाग आहे.

# अन्नाची वाण करी शरीराची घाण

शरीरसंवर्धनास जीं पोषक द्रव्यें अन्नांत असावीं लागतात तीं भरपूर नसल्यानें मनुष्याच्या शरीराची पूर्ण वाढ होत नाहीं व त्याच्या शरीरांत विविध रोग फैलावण्यास कशी संधि मिळते या गोष्टी हिंदी लोकांस अपरिचित नसल्या तरी हल्लीं त्या प्रयोगानें सिद्ध करण्यांत आल्या आहेत. कुन्नूर येथील पाश्चरधील इन्स्टिट्यूटमध्यें ले. क. आर. मॅककॅरिसन यांनीं त्या संस्थेत उंदीर, कोंबडीं, बदकें अशासारख्या मूक जनावरांवर शास्त्रीय रीत्या अन्नाचे अनेक प्रयोग करून ही गोष्ट सिद्ध केली आहे कीं, हिंदुस्थानांत शरीराची पुरी वाढ होण्याला अवश्यक असें अन्नच लोकांस मिळत नाहीं व त्यामुळें हिंदी लोकांचीं शरीरें दुबळीं होऊन त्यांच्यांत नाना रोगांचा फैलाव होतो. ले. क. मॅककॅरिसन यांनीं हें जें संशोधनकार्य केलें त्यांत त्यांना अनेक महत्त्वाच्या गोष्टी आढळून आल्या. पोषक अन्नाचा अभाव म्हणजे उपाशी अगर अर्धपोटीं राहणें नव्हे. लोकांस कदाचित् पुरेसें अन्नहि मिळत असेल. परंतु पुरेसें अन्न मिळणें एवढाच प्रश्न नसून मनुष्य रोज जे अन्न खातो त्यांतून त्याला जीवनदायी व उत्साहदायी द्रव्यें किती मिळतात हें पाहाण्याचा डॉ. मॅककॅरिसन यांचा मुख्य प्रयत्न आहे.

यासंबंधीं त्यांनीं केलेले सर्व प्रयोग वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें उंदीर, कोंबडी, बदकें यांजवर केले. त्यांना तेथें सुव्यवस्थित ठेवण्यांत आलें असून वेगवेगळ्या प्रकारचें अन्न त्यांस खाण्यास देण्यांत येतें. त्यांचें प्रारंभींचें वजन व मागाहून सुमारें तीन महिन्यांनीं वजन घेण्यांत येतें.



डॉ. मॅककॅरिसन या प्रयोगावरून म्हणतात कीं, हिंदी लोकांना पुष्टिदायक अन्न भरपूर खावयाला मिळत नाहीं त्यामुळें लोकांचीं शरीरें दुबळीं होत चाललीं आहेत. हिंदुस्थानाखेरीज इतरत्र अशी स्थिति कोठेंहि नाहीं. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जाती पाहिल्या तर हा फरक तेव्हांच लक्षांत येतो. निरनिराळ्या हवामानाप्रमाणें कांहीं फरक होत असेल, नाहीं असें नाहीं. परंतु आम्ही या संस्थेत व कलकत्ता येथें क० मॅके यांनीं केलेल्या संशोधनावरून हीच गोष्ट स्पष्ट झाली आहे की दुबळीं शरीरें होण्याचें मुख्य कारण पोषक अन्नाची वाण हेंच आहे. आम्ही येथें उंदरावर केलेल्या प्रयोगावरून असें सिद्ध केलें आहे कीं, वेगवेगळ्या प्रकृतीच्या प्राण्यावर विशिष्ट अन्नाचे प्रयोग केले असतां त्यांच्यांत असलेले दोष दूर होतात.

भरपूर अन्न म्हणजे पोषक अन्न नव्हे असें वर सांगितलेंच आहे. यासंबंधीं सदर प्रयोगशाळेंत उंदरावर प्रयोग करण्यांत आले. कांहीं उंदरांना नेहमींप्रमाणें साधें अन्न देण्यांत आलें. परतु त्यांत व्हिटामिन मात्र नसे. याचा अनुभव असा आला कीं, प्राणी फक्त प्राणधारणा करूं शकेल. परंतु त्याच्यांत वाढ मात्र होणार नाहीं. हिंदुस्थानांतील पुष्कळशा भागांतील लोकांचें मुख्य अन्न तांदूळ हें आहे. हें अन्न गव्हापेक्षां फारच कमी प्रतीचें असल्यानें तांदूळ खाणारा व गहूं खाणारा यांत फरक राहणारच. कारण गव्हांत तांदुळापेक्षां जास्त द्रव्यें पोषक आढळतात. यासंबंधीं वरील प्रयोगशाळेंत प्रयोग करण्यांत आले. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतां-

तील उंदीर तेथें गोळा केले होते. ते सारख्या वजनाचे, व सारख्या वयाचे असे असून त्या त्या प्रांतांत तेथील लोक जें अन्न खातात तेंच या या उंदरांनाहि देण्यांत येई. यापैकी सर्वांत सकस अन्न शीख, पठाण व मराठा यांचें असल्याचें दिसून आलें. बंगाली व मद्रासी हे सर्वांत कमी प्रतीचे ठरलें. त्या त्या प्रांतातील लोकांच्या अन्नाच्या भरतीला दूध, लोणी व मांस हे पदार्थ घातले तर नुसता भात खाणारांची शरीरयष्टि सुधारते असाहि अनुभव घेण्यांत आला.

निस्सत्त्व अन्नाच्या बाबतींत दुसरा अनुभव असा कीं, ज्या भागांत असलें निसत्व अन्न खाल्लें जातें तेथें कुष्टरोगासारखे रोग मोठ्या प्रमाणांत आढळतात. उ० बंगाल, मद्रास इ० पंजाबमध्यें असल्या रोग्यांची संख्या अत्यल्प आहे. पंजाबपेक्षां ४० पटींनीं लोक मद्रासमध्यें कॉलऱ्यानें पीडित होतात याचें कारणहि हेंच होय!

सारख्या मापाच्या दोन उंदरांच्या टोळ्या, एक चांगल्या सत्त्वांशप्रधान अन्नावर व दुसरी निःसत्त्व अन्नावर ठेवण्यांत आली. त्या वेळीं त्यांचें वजन २५०० ग्राम होतें. या दोहोंपैकीं अखेरीस चांगल्या अन्नापैकीं १७ उंदीर जिवंत राहून त्यांचें वजन ३१६० ग्राम झालें व वाईट अन्नाच्या उंदरांपैकीं ११ जगले व त्यांचें वजन फक्त १३०० ग्राम राहिलें. हे व यासारखेच अनेक प्रयोग करून ही गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, भरपूर अन्नापेक्षांहि पौष्टिक अन्न लोकांस जास्त पाहिजे.

अन्न खाण्याची येथील लोकांची पद्धत एकदम बदलणें शक्य नाहीं. नुसत्या डाळी जास्त खाऊनहि भागणार नाहीं. तेव्हां आहे याच स्थितींत मिळेल तेवढें दूध व ताज्या भाज्या त्यांनीं जास्त खाल्ल्या पाहिजेत. दूध हेंच खरें खरें अन्न आहे. मुबलक दूध पिणे ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. कारण दुधानें पौष्टिक व सात्विक अन्न मिळून उत्साह व तेज संवर्धन होतें.

## शेतकऱ्यांच्या ताटांतली
# अर्धी भाकरी गट्ट करण्याचा हट्ट

चुकार घोडा ज्याप्रमाणें आपल्या तोंडांत लगाम घेण्यास आढेवेढे घेतो त्याप्रमाणें आपल्या अनियंत्रित सत्तेला घालण्यांत येणारी बंधनें नोकरशाहीनें आजवर टाळलीं. पण आतां यापुढें ही टाळाटाळ करणें अशक्य वाटल्यानें अखेरीस एकदाचें जमिनीच्या साराआकारणीचें बिल तयार करून मुंबईसरकारानें प्रसिद्ध केलें. पण हें बिल पाहून 'भीक नको पण कुत्रा आवर' असेच उद्गार शेतकऱ्यांच्या तोंडून निघतील! शेतसाऱ्याची आकारणी कोणत्या तत्वावर करावी व निव्वळ नफ्याचा कितवा भाग सरकारनें सारा म्हणून घ्यावा हें ठरविण्याकरितां सरकारनेंच एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीनें शेतसाऱ्याची आकारणी निव्वळ नफ्याच्या चौथाईहून अधिक असूं नये अशी बहुमतानें शिफारस केली. अर्थात्च जमिनीच्या मालकाला कुळाकडून खंड किती मिळतो हें न पाहातां जमीन कसणारास निव्वळ नफा किती होतो तो पाहून त्यावरून तरमबंदी करावी व ती आकारणी निव्वळ नफ्याच्या चतुर्थांशाहून अधिक असूं नये अशीं दोन तत्त्वें कमिटीच्या बहुमताच्या मुखानें सांगण्यांत आलीं. परंतु कमिटीचें हें बहुमत झुगारून देऊन सरकारनें या तत्त्वांच्या उलट स्वरूपाचें नवें बिल तयार केलें आहे व तें पास करून घेण्याचा सरकार आतां अट्टाहास करील.

शेतसाऱ्याची आकारणी कुळांकडून जमीनदाराला मिळणाऱ्या खंडावरून करणें सयुक्तिक नव्हे व न्याय्यहि नव्हे असेच कमिटीला आपल्या चौकशींत आढळून आलें. एखाद्या गांवांतली अगर तालुक्यांतली पांचदहा टक्के जमीन खंडानें दिलेली असली व बाकीची शेंकडा ९० ते ९५ टक्के जमीन शेतकरी स्वतः अंगमेहतीनें करीत असले तर केवळ ५।१० खंडकऱ्यांच्या परस्परांतील चढाओढीमुळें ९०-९५ शेतकऱ्यांच्या डोकीवर खंडाचा असह्य बोजा चढविला जावा ही कोठली नीति व कोठलें शहाणपण? बार्डोलींत हल्लीं जो वाद चालू आहे त्याच्या बुडाशीं हेंच तत्त्व आहे. तेथें शेंकडा ९५ शेतकरी स्वतःची जमीन करतात तर अवघे शेंकडा ५ इसम खंडानें जमीन करतात. पण हे पांच इसम आपल्या जमीनदाराला जो खंड देतात त्यावरून सबंध तालुक्यांची तरमबंदी सरकारनें ठरविली आहे व ती पद्धति अन्यायाची व वाजवीहून अधिक बोजा लादणारी असल्यानें नवी पाहाणी करावी असें सत्याग्रही लोकांचें म्हणणें आहे. असला वाद पुनः उपस्थित होऊं नये याकरितां मुंबई सरकारनें या नव्या बिलांत कुळांकडून मालकांस मिळणारा खंड हेंच शेतसारा ठरविण्याचें मुख्य साधन होय आणि साऱ्याच्या रूपानें खंडांतला अर्धा हिस्सा घेण्याचा अधिकार सरकारास आहे अशीं दोन तत्त्वें नमूद केलीं आहेत. हे दोन

सिद्धान्त म्हणजे शेतकऱ्यांच्या गळ्याभोंवती सरकार घालूं पाहात असलेल्या फांसाचीं दोन टोकेंच होत. या फांसांत शेतकरी एकदा अडकला कीं त्याचे डोळे पांढरे होण्यास वेळ लागणार नाहीं.

सरकारच्या या कारवाईतला अत्यंत चीड येण्याजोगा प्रकार असा कीं, ज्या लँड रेव्हिन्यू कमिटीनें ही चौकशी केली त्या कमिटीपुढें आलेल्या साक्षीदारांचें बहुमत खंडावरून धारेबंदी ठरविण्याला प्रतिकूल असतां आणि स्वतः कमिटीचें बहुमतहि या तत्त्वाला विरोधी असून खंडावरून जमीनधारा ठरविला तरी तो २५ टक्यांहून अधिक असूं नये असें कमिटीनें बहुमतानें स्पष्ट सांगितलें असतां साक्षीदारांच्या मताची किंवा स्वतः नेमलेल्या कमिटीच्या बहुमताचीहि सरकार पायमल्ली करीत आहे. कमिटीपुढें ज्या साक्षीदारांनीं आपलें मत लेखी सादर केलें त्यांतल्या अवघ्या ४७ इसमांनीं खंडावरून धारेबंदी करावी असें म्हटलें आहे; पण ७१ साक्षीदारांनीं त्याच्या विरुद्ध मत दिलें आहे. विरुद्ध मत देणाऱ्या या ७१ साक्षीदारांत ९।१० जिल्ह्यांचे कलेक्टर्स असून शेतकी खात्याचे ३।४ डेप्युटी डायरेक्टर्सहि आहेत. त्यांत विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट ही कीं, हल्लींचे उत्तर भागाचे कमिशनर मि. स्मार्ट हे त्या वेळीं नगर जिल्ह्याचे कलेक्टर होते व त्या वेळीं त्यांनीं कुळांनीं दिलेल्या खंडावरून धारेबंदी ठरविणें युक्त नव्हे, कारण एकंदर जमिनींपैकीं फारच थोडी जमीन खंडानें केली जाते व त्या खंडकऱ्यांपैकींहि निदान अर्धे खंडकरी तरी असे असतात कीं,ते जो खंड शेताच्या मालकांस देतात तो खरा खंड नसून वास्तविक पाहातां कर्जाच्या रकमेवरचें तें व्याजच असतें; म्हणून अशा रकमेवरून तरमबंदी करणें उचित नव्हे असें म्हटलें होतें. मि. स्मार्ट यांनीं या पद्धतीविरुद्ध जो आक्षेप घेतला आहे तोच बार्डोलीला अक्षरशः लागू पडतो. परंतु योगायोग असा कीं, स्वतःच्या मताविरुद्ध बार्डोलीचा सत्याग्रह मोडून काढण्याची कामगिरी स्मार्टसाहेबांच्याच नशिबीं आली आहे व सरकारच्या राज्ययंत्रांतील एक दुवा या नात्यानें ते ती कामगिरी करीत आहेत!

सांगण्याचा मुद्दा हाच कीं, सरकारी कामगारांतील कित्येक विचारी व अनुभवशीर कामगारांना देखील धारेबंदीचें हें तत्त्व मान्य नाहीं मग जनतेला तें मान्य होणार नाहीं हें निराळें सांगावयास नकोच. असें असतां अंडरसनसाहेबासारख्या काहीं हेकेखोर अधिकाऱ्यांच्या मतावरून मुंबई-सरकार या आडमार्गांत शिरून गोत्यांत पडत आहे. शेतकऱ्यांची ओरड न जुमानतां त्यांच्यावर फोटोनोंदणीची पद्धति लादण्यांत आली. तिचा दुष्परिणाम थोड्यांसच भोवणारा असला तरी त्या पद्धतीविरुद्ध एवढा असंतोष पसरला. पण आतांचे हें बिल तर सगळ्याच शेतकऱ्यांच्या तोंडची अर्धी भाकरी काढून घेणार आहे. लँड रेव्हिन्यु कमिटींतील लोकप्रतिनिधी बजावीत आहेत कीं, शेतसारा खंडावरून घेतलाच तर एका भाकरींतला फार तर एक चतकोर घ्या; पण अधाशी सरकार अर्धी भाकर गट्ट करण्याचा हट्ट धरीत असून ती अर्धी भाकर कायदेशीर रीतीनें घेतां यावी म्हणून हें बिल पुढें आणीत आहे. आधींच अर्धपोटीं राहाणारे शेतकरी अशा रीतीनें अर्धी भाकरी हातची कायमची घालवून बसणार कीं काहीं प्रतिकार करणार? आणि शेतकऱ्यांच्या हितासाठीं झटणारे जनतेचे पुढारी व कौन्सिलांतले शेतकऱ्यांचे प्रतिनिधि सरकारच्या या कायदेशीर लुटीला संमति देणार कीं तिला प्रतिबंध करून सरकारचा हा हल्ला मोडून काढणार असा मुंबई इलाख्यांतील पुढाऱ्यांपुढें प्रश्न आहे.

जमिनीचा तरम आकार ठरवितांना शेताच्या मालकानें स्वतःच्या खर्चानें व मेहनतीनें जी सुधारणा केली असेल त्या सुधारणेमुळें येणारें उत्पन्न हिशेबांत घेऊं नये असा लँडरेव्हिन्यु कोडाच्या १०७ व्या कलमाचा अभिप्राय आहे. तो अभिप्राय प्रस्तुतच्या बिलांत अधिक स्पष्ट केलेला आहे; पण ही मर्यादा प्रत्यक्ष व्यवहारांत कितपत पाळली जाते याचा संशयच आहे. जेथें शेंकडा ५ टक्के जमिनीचे खंडकरी मालकांस जो खंड देतात त्यावरून संबंध गांवाच्या जमिनीचा आकार ठरविण्यांत येणार आणि जेथें सहासहा महिन्यांत दोन दोनशें गांवांची सेटलमेंट केली जाणार तेथें कोणच्या शेताची मालकानें किती सुधारणा केली व त्या सुधारणेचा परिणाम म्हणून खंडांत किती वाढ झाली व ती वाढ वजा टाकून बाकी निव्वळ उत्पन्न किती येतें याचा हिशेब कितपत कसोशीनें केला जात असेल तें दिसतच आहे. स्वतःच्या खर्चानें केलेल्या सुधारणांचा पूर्ण फायदा मालकास मिळण्यास कायमधारेबंदी तरी पाहिजे किंवा प्रत्येक शेताची वेगवेगळी पाहणी करून तरमबंदीच्या वेळची प्रत्येक शेताची स्थिति पुढील पाहणीला आधार म्हणून नमूद तरी करून ठेवली पाहिजे. ज्या अर्थी सरकारकडून यांतली एकहि गोष्ट होत नाहीं त्याअर्थी मालकानें केलेल्या सुधारणांचा सरकार गैरवाजवी फायदा घेऊं इच्छीत नाहीं किंवा घेत नाहीं हें म्हणणें शुद्ध ढोंगीपणाचें होय. ज्या मालकानें आपल्या शेताची सुधारणा केली असेल त्याच्या शेतावर तर आकार वाढतोच, पण त्याच्या जमिनीबद्दल दिल्या जाणाऱ्या खंडावरून गांवांतील इतरांच्या जमिनीचीहि आकारणी वाढते! म्हणजे गोम्याच्या मेहनतीचें प्रायश्चित्त त्याला स्वतःला व त्याच्या सर्व गावकऱ्यांना

मिळते ! यास्तव या कलमांत सरकारनें जी सदिच्छा प्रकट केली आहे तिचा दुरुपयोग न होतां सदुपयोग व्हावा एतदर्थ सरकार कोणता उपाय योजणार आहे व कोणती नोंद ठेवणार आहे याचा खुलासा कौन्सिलरांनीं करून घ्यावा व तो या कलमाला जोडला जावा.

दुष्काळाचे वेळीं तहकुबी व सूट मागण्याचा रयतांना हक्क नाहीं, सरकार तहकुबी व सूट देते ही केवळ सरकारची मेहेरनजर होय, असें सरकार अलीकडे म्हणूं लागलें आहे.पण या बिलानें सरकारला सूटतहकुबीचे नियम करण्याचा अधिकार देण्यांत आल्यानें एक प्रकारें तसले नियम करण्याविषयीं सरकार बांधलें जाणार आहे. या नियमाबरोबरच पिकाच्या आणेवारीची वार्षिक पत्रकें तयार करण्याविषयींहि नियम करण्याचा अधिकार गव्हर्नर-इन. कौन्सिल यांना देण्यांत येणार आहे. पण हे नियम केल्यावर ते कौन्सिलच्या टेबलावर ठेवले जावेत आणि त्या नियमांत पिकाची आणेवारी करतांना आणि सूट तहकुबी ठरवितांना रयतांना आपल्या वतीनें पंच नेमून देण्याचा अधिकारहि देण्यांत यावा. तसें न होईल तर हल्लींचाच 'सरकार करील ती पूर्वदिशा' असला झारशाही अनियमित कारभार कायद्याच्या नांवानें कायम केला जाईल ! पिकाची आणेवारी ठरविणें,सेटलमेंटच्या वेळीं सेटलमेंट कामगाराला माहिती पुरवून सल्लामसलत देणें आणि आपत्प्रसंगीं सूट-तहकुबीची मागणी करणें वगैरे शेतकऱ्यांच्या हिताची हरएक कामें करण्यासाठीं तालुकानिहाय सल्लागार मंडळ नेमलें जावें अशीहि लँड रेव्हिन्यु कमिटीची सूचना होती. ती झिटकारून हा सगळा अधिकार गव्हर्नर-इन-कौन्सिल यांजकडेच सोंपविण्याचा सरकारचा मनोदय दिसतो. यास्तव या बाबतीत जागरूकतेनें व जुटीनें वागून कौन्सिलरांनी सरकारावर सल्लागार मंडळ लादलें पाहिजे. तसें सल्लागार मंडळ नेमलें न जाईल तर या नव्या लँ. रे.बिलानें हल्लींपेक्षांहि अधिक पद्धतशीरपणें पण निर्दयपणें सगळी रयत शेतसाऱ्याच्या वाढीच्या चरकांतून पिळून निघेल आणि ते दुष्परिणाम टाळण्याला मागाहून मार्ग राहणार नाहीं यास्तव या नव्या बिलाचा विचार करण्याकरितां सिलेक्ट कमिटी नेमण्याचा आग्रह धरून त्या कमिटींत हें बिल आमूलाग्र सुधारलें पाहिजे. जमिनीच्या तुकड्यांचें बिल रयतेला नको असल्यानें समूळ फेटाळावयाचें; पण प्रस्तुतचें जमीनधाऱ्याचें बिल तसें न फेटाळतां त्यांत दुरुस्ती घडवून तें पास करण्याचा प्रयत्न करावयाचा. ( १ ) शेतसाऱ्याची आकारणी खंडावरून न करितां निव्वळ नफ्यावरून करावी ( २ ) ही आकारणी निव्वळ नफ्याच्या चौथाईहून केव्हांहि अधिक असूं नये ( ३ ) आणि पिकाची वार्षिक आणेवारी ठरविण्याला व दुष्काळादि प्रसंगीं सूट अगर तहकुबी किती द्यावी तें ठरविण्याला तालुक्याला अगर पेठ्याला एक सल्लागार मंडळ असावें व त्या मंडळाचा सल्ला रेव्हिन्यु कामगारांनीं मानला पाहिजे असा निर्बंध असावा. एवढ्या तीन दुरुस्त्या करून मग हें बिल कायदेमंडळानें अवश्य पास करावें.

# जर्मनी व जमीनविभागणी

( ले.—श्री. द. नागपूरकर. )

जर्मनीच्या प्रशियाभागांत जवळ जवळ इंग्लंडप्रमाणेंच जमीनदारी ( लॉर्ड ) पद्धत चालू असल्यानें शेतकरी लोकांची फार कुचंबणा होत होती. परंतु जर्मन राष्ट्रांतील मुत्सद्यांच्या ही गोष्ट लक्षांत येताच त्यांनीं इंग्लंडाप्रमाणेंच आपल्या देशांत असा कायदा पास केला कीं मोठमोठ्या जमिनीचे तुकडे शेतावर स्वतः कसणाऱ्या मालकाला पोटभर नफा देतील. या कामीं एक मोठें कमिशन नेमलें गेलें व त्याचे हातीं एक भला मोठा पैशाचा निधी दिला. त्या निधीच्यायोगें मोठमोठ्या जमिनी कमिशनानें विकत घेतल्या व त्यांत पाण्यासारखा पैसा खर्च करून जमिनी सुधारल्या व नंतर त्यांची योग्य प्रमाणांत स्वतः शेतामध्यें कसणाऱ्या शेतकऱ्यांमध्यें वांटणी केली व त्यामध्यें खालीं लिहिलेल्या प्रमाणें वर्गीकरण केलें. लहान लहान शेतकऱ्यांना शेतीसाठीं लागणारा जरूर तितका नक्त पैसा पुरविला जाईल अशी तजवीज करविली.

१ मुदतीच्या करारानें जमीन कसण्यास देणें.

२ ज्याला झेपेल त्याला भरपूर किंमत घेऊन जमिनीचा एकच तुकडा विकत देणें.

३ अगर हप्त्या हप्त्यानें किंमतीचे पैसे स्वीकारून जमीन विकत देणें.

या कामीं कमिशनाचे स्वाधीन इतका मुबलक पैसा जर्मन सरकारनें केला होता कीं, प्रत्येक जमिनीचा तुकडा पाणसळींत आणून, पाणीनिचरा योग्य तऱ्हेनें होईल अशी तजवीज करविली होती.प्रत्येक शेतावर जाण्या येण्यास व सर्व मालाची ने-आण करण्यास योग्य असे रस्ते करविले होते. प्रत्येक शेता-

वर सोयीवार व प्रशस्त अशीं घरें बांधविलीं होतीं. परंतु दरघरामधील अंतर अशा व्यवस्थेनें ठेविलें होतें कीं, लोकांमधील सामुदायिक भावनांचा जास्त जास्त परिपोष होत जाईल.

अशा रीतीनें प्रथम जमिनीचे मोठमोठे तुकडे स्वतः शेतावर कसणारे शेतकऱ्यांच्या सोयीसाठीं प्रमाणांत लहान लहान केले गेले. त्यानंतर अत्यंत लहान लहान तुकडे प्रमाणांत मोठमोठे करण्याचें काम जर्मन सरकारनें आपल्या हातीं घेतलें. हें काम अमलांत आणण्याचें ठरलें तेव्हां लहानलहान शेतकऱ्यांनीं आपण आपल्या जमिनीस मुकणार या भावनेनें अत्यंत हरकत घेतली, एवढेंच नव्हे तर कमिशनच्या नोकरांवर दगडांचा वर्षाव केला व त्या लोकांना कुत्तेतोड करून हांकलून लाविलें! या प्रकारची रयतेची हरकत सरकारच्या ध्यानीं येतांच सरकारनें असा नियम केला कीं ज्या भागांत हा कायदा अमलांत आणावयाचा त्या भागांतील ६० टक्क्याहून अधिक लोकांनीं या नियमाची आमच्या भागांत अम्मलबजावणी करा, अशी मागणी केल्याशिवाय हा कायदा त्या भागांत अमलांत आणिला जाऊं नये. ज्यांनीं ज्यांनी आपण होऊन या कायद्याची अम्मलबजावणी करण्यासाठीं मदत केली त्यांना त्यांना खालीं लिहिल्याप्रमाणें सवलती दिल्याः—

१ कायमधारा.

२ शेतकरी बँकेमधून सवलतीनें पैसे मिळण्याची व्यवस्था.

यावरून स्पष्ट लक्षांत येईल कीं, लहान लहान तुकडे एकत्र करून मोठमोठे तुकडे करविणें हें काम हातीं धरण्याचे पूर्वी प्रमाणाबाहेर असलेले मोठमोठे तुकडे प्रमाणबद्ध लहान करून गरीब शेतकऱ्यांचें कल्याण केलें जात आहे, हें गोष्ट रयतेच्या लक्षांत प्रथम आणवावी लागते. नंतर प्रमाणाचे बाहेर असलेले तुकडे एकत्र करून, प्रमाणबद्ध मोठमोठे जमिनीचे तुकडे करविण्याचा कायदा अमलांत आणण्याचा प्रयत्न करणें योग्य होते. परंतु त्या वेळींहि रयतेमध्यें असंतोष न पसरवितां जास्तींतजास्त (मेजॉरिटी) लोकांकडून मागणी करवूनच मायनारिटीच्या (अल्पसंख्याकांच्या) असंतोषाकडे दुर्लक्ष केलें असतां चालेल ही गोष्ट ध्यानांत ठेवून गरीब शेतकऱ्यांच्या सोयीसाठीं कायम धारापद्धत व पैशाच्या सोयी वगैरे केल्यानंतर, लहानलहान तुकड्यांचे मोठमोठे तुकडे करण्याचा कायदा अमलांत आणणें योग्य होतें.

# प्रासंगिक बोल

## दुष्काळांतील गुलामगिरि

बंगाल्यांतील बलुरघाट व पटणीतोला येथील कॉंग्रेस कमिटीच्या चिटणीसांनीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या एका पत्रकांत, दुष्काळपीडित लोकांवर अन्नपाणी न मिळाल्यामुळें, आपल्या पोटच्या पोरांचा क्रयविक्रय करण्याची पाळी कशी येत आहे हें दाखविलें होतें. पण बंगाल सरकारनें जाहीर पत्रक काढून त्याचा इनकार केला व ही केवळ बाजारगप्प आहे असें प्रतिपादिलें. आतां डॉ. जे. एम. दास गुप्त यांनीं बलुरघाट येथें स्वतः जाऊन तेथील दुष्काळपीडित लोकांची विचारपूस करून बायकामुलांचा क्रयविक्रय कसा केला जातो या संबंधानें कागदोपत्रीं पुरावा प्रसिद्ध केला आहे. नित्यहिरणी नांवाच्या एका बाईनें आपल्या मुलीला विजय हारि नांवाच्या एका इसमास बारा रुपयांस विकली. श्रीमती फर्गुन बिबी नांवाच्या एका बाईनें असें लिहून दिलें कीं "अन्नाला मोताद झाल्यामुळें व दुष्काळाच्या ह्या भयंकर आपत्तीमुळें मीं आपली मुलगी जिना बिबी हिजला पांच रुपयांस नाझर मोंडल या गृहस्थास विकली. पण या संबंधीचा सरकारी अधिकाऱ्यांनीं केलेला खुलासा फार अजब आहे असें म्हटल्यावांचून राहावत नाहीं नवऱ्यानें बायकोला पांच दहा रुपयांस विकली असें घडल्यास सरकारी अधिकारी ही गोष्ट खरी न मानतां त्याला घटस्फोटाचें स्वरूप देतात! आईबापांनीं मुलाला अगर मुलीला दहा पांच रुपयाला विकल्यास त्यांनीं हुंडा घेतला असें सांगण्यांत येतें! परंतु वरील जिना बिबीच्या झालेल्या या व्यवहाराची संपादणी सरकार कशी करणार? ही गोष्ट सांगोसांगीची नसून वरील कागदपत्रावर गांवांतील १३ इसमांच्या सह्या आहेत व तो सही-निशाणीचा कागदोपत्रीं पुरावा 'फारवर्ड' पत्रांत प्रसिद्ध झाला आहे. सुधारलेल्या सरकारच्या या राज्यांत, आईबापांवर आपल्या पोटच्या पोराला, नवऱ्यावर आपल्या बायकोला व भावावर आपल्या धाकट्या बहिणीला विकण्याचा प्रसंग यावा व गुलामगिरीचा व्यापार राजरोस सुरू व्हावा ह्यासारखी सरकारला दुसरी शरमेची गोष्ट नाहीं. बलुरघाट व पटणीतोळा या प्रांतांत पाऊस न पडल्यामुळें पीकें आलीं नाहींत म्हणूनच दुष्काळ पडला व अन्नान्न दशा प्राप्त झाली, असें एक पोंचट कारण पुढें करण्यांत येतें. इंग्लंडसारख्या प्रदेशांत गहू, तांदूळ यांसारखीं धान्यें जेथें

कधींच पिकत नाहींत तेथें गेल्या १०० वर्षांत दुष्काळ पडला व अन्नपाण्यावांचून उपासमार सुरू झाल्यामुळें माणसांची क्रयविक्रय होण्यापर्यंत मजल गेली असें घडल्याचें ऐकिवात नाहीं. आणि येथें मात्र पर्जन्यवृष्टि झालीच नाहीं, आम्हीं काय करणार असें सांगण्यात येतें. जणूं काय आसपासच्या भागांतून वाहतुकीच्या साधनांनीं उपजीविकेला लागणारे पदार्थ आणतां येत नाहींत. अशाप्रकारे आपली जबाबदारी सरकार टाळूं पहातें हे त्यास लांछनास्पद आहे. दुष्काळीं नवीन कामें काढणें व वाहतुकीच्या साधनांचा उपयोग करून रयतेला अन्नपाणी पुरवणें हें सरकारचें कर्तव्य आहे. आम्ही हिंदुस्थानचे ट्रस्टी आहों असें तोंडभरून ब्रिटिश अधिकारी सांगत असतात; परंतु सरकार आपल्या कर्तव्याला कितपत जागतें ह्याचा पडताळा वरील उदाहरणावरून सहज येईल.

## वर्णद्वेषामुळें आत्महत्या

आज सर्व जगांत सुधारलेलें व बलिष्ट असें अमेरिका हें एक राष्ट्र असून वेळीं अवेळीं उदारपणाच्या योजना जगापुढें मांडण्याचे बाबतींत त्याचा हात क्वचित्च कोणी धरूं शकेल. पण ह्या सुधारणेच्या शिखरास पोंचलेल्या मिस मेयोच्या मायभूमींत वर्णद्वेषाच्या कालकूटाचा अंमल किती जारीचा व सार्वत्रिक आहे हें पाहिलें म्हणजे अंगावर शहारे आल्यावांचून राहात नाहींत. हिंदुस्थान हें परतंत्र राष्ट्र तर खरेंच, म्हणून हिंदी माणसाचें जीवित पृथ्वीच्या पाठीवर कवडी किंमतीचें व्हावें काय? पेशावर येथील एक तरुण गृहस्थ श्री. विष्णुदास बागरे यांनीं तेथील आपली सर्व इस्टेट विकून पंचवीस हजार डॉलर उभे केले व आपली पत्नी व तीन मुलें घेऊन अमेरिकेंत वसती करून राहाण्यासाठीं ते १९१५ च्या सुमारास अमेरिकेंतील सॅनफ्रॅन्सिस्को या शहरीं जाऊन राहिले. तेथें त्यांनीं व्यापारी पेशा पत्करला व अमेरिकन नागरिक म्हणून ते राहूं लागले. अमेरिकेच्या सरकारनेंहि त्यांना नागरिकत्वाचें सर्टिफिकेट दिलें; पण अलीकडे अमेरिकेंत वर्णद्वेषाचा वणवा भडकल्यामुळें १९२५ सालीं तेथील सरकारनें हें सर्टीफिकेट काढून घेतलें व श्री. बागरे यांचा अमेरिकन नागरिकत्वाचा हक्क बुडविला ! एवढेंच नव्हे तर पुष्कळ वर्षांनीं हिंदुस्थानांतील आपल्या आप्तेष्टांना भेटावें अशी त्यांना इच्छा झाली असतां त्यांना पासपोर्टहि अमेरिकेच्या सरकारनें नाकारला ! अर्थातच ही अपमानकारक परिस्थिति सहन न होऊन श्री. बागरे यांनीं गेल्या मार्च महिन्यांत आत्महत्या केली व त्या कृत्याची जबाबदारी अमेरिकेचें नागरिकत्व नाकारणाऱ्या सरकारवर असल्याचें एक पत्र लिहून सर्व जगाला कळविलें आहे. ही हकीकत वाचून कोणाहि स्वाभिमानी हिंदी माणसास तीव्र संताप व तिरस्कार वाटल्यावांचून राहणार नाहीं. हिंदुस्थानांतील जातिभेदाचें भेसूर काल्पनिक शब्दचित्र काढून तें जगापुढें नाचवून हिंदुस्थानाची नालस्ती करणाऱ्या मिस मेयोनें आपल्या मायभूमीचें त्याच दृष्टीनें संशोधन केलें तर तिला घरबसल्या अनेक अमानुष गोष्टींचा संग्रह करतां येईल व मग हिंदुस्थानाचीं गटारें उपसण्याचे श्रम वांचतील ! हिंदुस्थानाला स्वातंत्र्य नसल्याची जाणीव हरएक रीतीनें परकीय राष्ट्रें आपणास करून देत आहेत असाच श्री. बागरे यांच्या आत्मयज्ञाचा अर्थ नाहीं काय ?

# दासबोधलेखन

( रा. ल. घरत, अलीबाग ) ता. १७।४।२८ च्या पुरवणी केसरींत समर्थ वाङ्मयपरिषदेची हकीगत आली आहे. तीवरून असें दिसतें कीं, ह. भ. प. पांगारकर यांच्या मतें दासबोधाचे पहिले आठ दशक प्रथम लिहिले गेले व नवव्या दशकापासून पुढें वेगवेगळे समास वेगवेगळ्या प्रसंगीं लिहिण्यांत आले. श्रीयुत करंदीकरांच्या मतें पहिल्या सात दशकांतील समासहि मागाहून लिहिलेले असतील. पन्नास वर्षांमागें पुण्यास फार प्रसिद्धीस आलेले वेदान्ती कैवल्यवासी रामकृष्णशास्त्री माटे याच्या मुखांतून मीं असें ऐकिलें आहे कीं, सातवा दशक हा एकच पहिला दासबोध म्हणून लिहिण्यांत येऊन त्यास ज्ञानदशक म्हणून आठव्या दशकाची जोड देण्यांत आली. पहिले सहा दशक व नवव्या पासून पुढील बारा दशक मागाहून वेळोवेळीं लिहिण्यांत आले आणि नंतर विषयानुक्रमानें वीस दशकांची जुळणी झाली. सातव्या दशकाच्या शेवटीं "सरली शब्दाची खटपट। आला ग्रंथाचा शेवट" वगैरे जें म्हटलें आहे तें या सातव्या दशकासंबंधानेंच म्हटलें आहे. सातव्या दशकांत आरंभीं गणेश, शारदा, सद्गुरु, संत सज्जन व श्रोते यांचें स्तवनवंदन केलेलें आहे. पहिल्या दशकांत दुसऱ्या समासापासून दशकसमाप्तीपर्यंत ह्याच स्तवनाचा अनुक्रमानें विस्तार केलेला आहे. सात व आठ या दशकांतील पारमार्थिक विषयांचाच बाकीच्या दशकात परमार्थविषयक समासांत विस्तार केलेला आढळून येतो. ठिकठिकाणी "हे दासबोधीं असे कथिलें ज्ञानदशकीं विशद केलें" इत्यादि प्रकारचे जे उद्गार आहेत ते सातव्या व आठव्या दशकासंबंधींच आहेत. मला ऐकून माहीत असलेली गोष्ट मी तज्ज्ञापुढें मांडीत आहे. यावर साधकबाधक प्रमाणें कोणास उपलब्ध झाल्यास तीं पुढें यावीं इतकाच हेतु आहे.

# बार्डोलींतील स्तुत्य संघटना

तापीव्हॅली रेलवेवर सुरतपासून बार्डोली हें पांचवें स्टेशन आहे. सदर तालुक्यांत वालोड म्हणून एक महाल आहे. त्यासह सर्व तालुक्यांतील लोकसंख्या ८८३३२ असून गांव एकंदर १३७ आहेत. त्यांपैकीं १३ गांव पायखस्त आहेत. प्रदेश डोंगराळ नसून सपाट आहे व जागोजाग बाभळ, वड, पिंपळ, आंबा, कडुलिंब व पळस यांचीं विपुल झाडें आहेत. २-३ ठिकाणीं नद्या असून बाकाचे गांवांत कुव्यांचें विपुल पाणी आहे. बागायत करण्याची पद्धत नाहीं. कपाशी फार पिकते व बाकीचीं भातासकट धान्यें पिकतात. सर्व गांवांत शेतकरी लोक राहातात. त्यास दुसरा धंदा नाहीं. बहुतेक लोक सूत काढतात व शेकडा ९५ इसम खादी वापरतात. पारशी, मुसलमान व गुजराथी लोकांची मुख्य वस्ती आहे. त्यांत मुसलमान फारसे नाहींत. ब्राह्मण-ब्राह्मणेतर व हिंदू-मुसलमान हे वाद नाहींत म्हटलें तरी चालेल.

बार्डोली तालुक्याची ओरिजनल सेटलमेंट १८६५।६६ सालीं झाली असून रिव्हिजन से. १८९६।९७ साली झाली आहे व आतांची री.रिव्हिजन आहे. तालुक्यावर एकूण २२ टक्के वाढ झाली आहे व वाढीसकट एकंदर वसूल ६ लक्ष रुपये आहे. वाढ जवळजवळ एक लक्ष तीस हजार आहे. व्यक्तिशः जास्त वाढ झालेली आहे. एकंदर लागवड जमीन सव्वा लक्ष एकर आहे व सुमारें ६५ गांवांतील तीन हजार खातेदारांची जमीन आतांपर्यंत खालसा झाली असून रोज रोज नवीन खालसा नोटिसा निघत आहेत.

सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर यांनीं केलेली वाढ बेकायदेशीर आहे सबब ती कमी करावी अगर निःपक्षपाती पंच नेमून फिरून चौकशी करावी अशी बार्डोलीच्या लोकांनीं मागणी केली व ती सरकारनें जुमानली नाहीं. यामुळें सत्याग्रहास सुरवात झाली. प्रथमतः मुंबई कौन्सिलचे कांहीं आमदार तेथें गेले व त्यांनीं सर्व तक्रार ऐकून वाढलेल्या साऱ्याबद्दल अलिबागप्रमाणें सारा न देण्याची चळवळ करावी असा सल्ला लोकांस दिला. लोकांनीं त्यांस आपलें पुढारीपण घेण्याबद्दल विनंति केली; परंतु कोणीहि कबूल झाला नाहीं. म्हणून त्यांनीं आपलें डेप्युटेशन अहमदाबादेस श्रीयुत वल्लभभाई यांजकडे नेलें व त्यांस पुढारीपण स्वीकारण्यास विनंति केली. त्यांनीं आपले म्हणण्याप्रमाणें सर्वजण वाटेल तें दुःख, हाल, नुकसान व त्रास सोसण्यास तयार असतील तर आपण प्रमुख होतों असें कबूल केलें. त्याप्रमाणें डेप्युटेशनचे लोकांनीं लोकांचा सल्ला घेऊन श्रीयुत वल्लभभाई यांस रुकार दिला व तारीख ४।२।२८ रोजीं तालुक्याची पहिली सभा बार्डोली येथें बोलावली. त्या सभेस श्री. वल्लभभाई यांनीं आपण सरकारपाशीं पत्रव्यवहार केला आहे त्याचे उत्तराकरिता ८ दिवस थांबावें व मग रंग पाहून सत्याग्रह पुकारवा अशी सल्ला दिली व १२ तारखेस फिरून सभा बोलाविली. सरकारकडून उत्तर न आल्यामुळें व हप्त्याची मुदत भरत आल्यामुळें कांहीं तरी निकाल लावणें भाग होतें म्हणून आपलें म्हणणें कबूल होईपर्यंत बिलकुल सारा ध्यावयाचा नाहीं असा ठराव सभेनें एकमतानें केला व सत्याग्रहास सुरुवात झाली व सर्व खातेदारांकडून त्या मजकुराच्या प्रतिज्ञापत्रकावर सह्या करून घेण्यांत आल्या. श्रीयुत वल्लभभाई सांगतील तो हुकूम पाळण्याची सर्वांनीं शपथ घेतली.

बार्डोली तालुक्यांत एकंदर खातेदार १७ हजार असून त्यांपैकीं १२०० लोकांची जमीन पांच एकरांपेक्षां जास्त नाहीं. ४५०० लोकांची जमीन २५ एकरांपेक्षा जास्त नाहीं. ४०० माणसांची १०० एकरांपेक्षां जास्त नाहीं. सावकार जमिनीचे मालक व कुळें नसतीं उपरी अशी स्थिति नसून बहुतेक जमीन कुळाचे मालकीची आहे व ते बहुतेक याच तालुक्यांत राहाणारे असून जमीन स्वतः कसतात.

सन १९२१ सालीं चौरीचुर्याचे भांडणामुळें बार्डोलीची लढाई थांबली तरी चळवळीचीं बीजे कायमच राहिलीं. लोकांनीं तालुक्यांतील निरनिराळ्या मध्यवर्ती ठिकाणीं ६ स्वराज्यआश्रम बांधले व त्यांत समर्थांचे वेळेप्रमाणें योग्य व लायक महंत ठेविले. त्यांचे हाताखालीं स्वयंसेवक म्हणून सुमारें ३० माणसें लोकोपयोगी कामें २४ तास मेहनत घेऊन करूं लागलीं. कोणी सुताचें काम सुरू केलें तर कोणी मोफत दवाखाने घातले व आपल्या स्वभावामुळें, कष्टामुळें व तपश्चर्येमुळें आजुबाजूचे लोकांचा विश्वास आपणावर बसवून घेतला व हे लोक म्हणतील त्याप्रमाणें खेड्यांतील लोक वागूं लागले. या आश्रमांतील लोकांचा खर्च गांवांतील लोक सोसूं लागले. ठिकठिकाणचे सर्व महंत आपण आपले परीनें लायक असले तरी ते सर्व श्रीयुत वल्लभभाईंचा हुकूम शिरसा वंद्य करण्यास तयार आहेत. यामुळें हल्लीं सर्व तालुक्यावर ब्रिटिश सरकारचें राज्य नसून श्रीयुत वल्लभभाई यांचें राज्य आहे. हल्लीं चालू चळवळीकरितां आणखी ६ सेंटर्स वाढवून एकंदर १-२ ठाणी केलीं आहेत व तेथें प्रत्येकी १-२ महंत असून त्यांचे हाताखालीं सुमारें हजार बाराशें माणसें काम करीत आहेत. बहुतेक स्वयंसेवक तालुक्यापैकींच आहेत.

ते आपआपले घरीं जेवतात. बाहेरून सुमारें १०० माणसें आलीं आहेत. त्यांस निरनिराळया आश्रमांत जेवणांस मात्र घालतात व ते सारा दिवस सांगतील तें काम करतात. लहान ८-१० वर्षांचे मुलापासून ४०-५० वर्षांपर्यंतची मंडळीहि स्वयंसेवक आहेत. प्रत्येक ठाण्यास एक एक मोटार देण्यांत आली आहे. सूत काढण्याचें व वस्त्रें विणण्याचें काम मजूरदार लोकांकडून चालू आहे. आतांपर्यंत पैसा जरी बाहेरून आणण्यांत येत नव्हता तरी हल्लीं तशी मागणी करण्याचें ठरलें आहे. मणीलाल कोठारी, रेवा शंकर, कल्याणजी भाई, दरबार गोपाळदास, आबास तय्यबजी, डॉ. चंदुलाल, डॉ. त्रिभुवनदास, मणीलाल शहा व स्वामी आनंद व दुसरी बरींच माणसें फार उत्तम काम करीत आहेत. गेल्या सात वर्षांत तालुका सर्व सुसंघटित झाला आहे व कसलेंहि संकट आलें तरी आपल्या पुढाऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें प्रत्येक व्यक्ति वागण्यास तयार आहे. प्रतिस्टष्टीची कल्पना या ठिकाणीं (Parallel Govt.) चांगली येते. सरकारी नोकरांचे हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं आश्रमाचेंहि एक गुप्त खातें आहे. महार, पाटील सरकारतर्फे काम करण्यास कबुल नाहींत. राजीनामे देण्यास सर्व तयार झाले आहेत. श्रीमंत व गरीब सर्व या चळवळींत सारखे सामील झाले आहेत. बायकापोरेंहि सर्व तयार दिसतात. ‘विषय तो त्यांचा झाला नारायण’ याप्रमाणें सर्वांचा विषय सत्याग्रह झाला आहे. श्रीमंतहि आपली सर्व स्थावर–जंगम इस्टेट गेली तरी फिकीर करीत नाहींत. सर्वांचेच चेहेरे चिंताग्रस्त न दिसतां प्रफुल्लित दिसतात. नोकर लोक बहुतेक हिंदु बदलून मुसलमान इस्त्रायल वगैरे आणले आहेत व त्यांचे मदतीस पोलीस व मवाली मुंबईचे पठाण दिले आहेत. ठाण्याचे अधिकाऱ्यास अन्न अगर पाणी गांवकऱ्यांकडून आश्रमांतील अधिकाऱ्याचे चिठीशिवाय मिळत नाहीं. मग राहाण्याचे जागेची तर गोष्ट नकोच. सरकारी नोकरांची कमिशनरपासून खालीं पाटलापर्यंत एक कवडीची किंमत राहिली नाहीं. गांवांत जप्तिकामगार केव्हां व कोठें जाणार हें आगाऊ गांवकऱ्यांस समजतें. पूर्वी ड्रम अगर सिटी वाजवीत असत. परंतु पोलीस ॲक्टाखाली त्यांस बंदी झाली आहे! लोकांचे फार हाल चालू आहेत. हल्लीं त्यास दिवसा आपलीं घरें तुरुंगाप्रमाणें झालीं आहेत. ते बाहेरून कुलुपें घालून आंत सर्व व्यवहार करितात. कुलुपें तोडण्यास सरसहा हुकूम अद्याप दिलेले नाहींत. स्वयंसेवकावर खोटे खटले भरण्यांत आले आहेत; पण ते डिफेन्स देत नाहींत, जामीन देत नाहींत अगर फिर्यादीचे साक्षीची क्रॉसहि करीत नाहींत. फक्त आपण गुन्हा केला नाहीं एवढा जबाब देतात. श्रीमंत माणसांची तरुण मुलें सर्व तऱ्हेचा तुरुंगवासाचा त्रास सोसण्यास तयार झालीं आहेत व त्यांचे घरचीं माणसें त्याबद्दल फिकीरहि करीत नाहींत.

आश्रमाचें प्रसिद्धीखातें तर फारच उत्तम काम करीत आहे. रोजचे रोज प्रत्येक गांवांत चौकशी होऊन त्याचा रिपोर्ट ठाण्यावर जातो व तेथून तो सायंकाळीं मुख्य ऑफिस बार्डोली येथें जातो. तेथें सर्व हकीकत एकत्र करून रातोरात सर्व प्रती छापून रवाना होतात व सकाळीं सर्व तालुक्याचे गांवांत त्या वाटल्या जातात. बाहेरचे पत्राकरितां तर रिपोर्टर तेथेंच ठाणें देऊन बसले आहेत. गांवांतील वाचणारे इसम निरक्षर लोकांस रोजची पत्रिका वाचून दाखवितात व ते मोठ्या प्रेमानें व उल्हासानें ऐकतात.

जमिनीचा सारा २ हप्त्यांनीं फेब्रुवारी व एप्रिल या महिन्यांत व्हावयाचा असतो. वसूल सरकारी रिपोर्टप्रमाणें आतांपर्यंत ५४ हजार रु. वसूल झाले आहेत. पण आश्रमाचे लोकांचे माहितीप्रमाणें फक्त २५ हजार रु. वसूल झाले आहेत व तेंहि फसवणूक व धाकदपटशामुळें झालेले आहेत. प्रथम म्हशी वगैरे चांगलीं जनावरें थोड्या किमतीस खाटकास विकलीं. परंतु आतां सुरतच्या सर्व खाटिकांनीं तीं विकत घेण्याचें नाकारलें आहे. पारशी लोकांत कांहीं असलेले गैरसमज मि. नरीमन व मि. भरूचा यांनीं दूर केले आहेत व तेहि आतां मनापासून या चळवळीस मदत करणार आहेत. खटल्याकरितां स्पेशल मॅजिस्ट्रेट नेमिले आहेत. लोकांचा उत्साह विलक्षण दिसतो. सरकार जास्त जुलूम करील तर चळवळ जास्तच जोरांत चालेल असा रंग दिसत आहे. मोठमोठ्या सर्व पुढाऱ्यांनीं आपले मोर्चे बार्डोलीकडे वळविले आहेत. आमचे तुकडे-तुकडे केले तरी धारा भरणार नाहीं असा एका शेतकऱ्यानें श्रीयुत वल्लभभाई यांस भर-सभेंत जबाब दिला. आपलेकडील पत्रांतून छापून येत असलेली सर्व हकीगत जाग्यावर गेले असता खरी आहे त्यांत असत्याचा लेश नाहीं असें आढळून आलें. कारण येथील काम करणारे सर्व सत्याचे वाली आहेत. हल्लीं चळवळ जोरांत आहे व पुढें कांहीं संकटें आलीं तरी तीं जोरानें चालविण्याचा सर्वांचा निश्चय अगदीं स्पष्ट दिसत आहे.

# रशियांतील बोल्शेव्हिक राज्य

## लेखांक ५ वा

### शिक्षणव्यवस्था

जसें पेरावें तसें उगवतें. जसें शिक्षण द्यावें तशी नवी पिढी तयार होते. रशियांतील समाजरचना व राज्यरचना ज्या धर्तीवर बोल्शेव्हिक नेऊं इच्छितात त्या धर्तीचें बीजारोपण नवीन पिढींत करणें जितकें सुकर आहे तितकें जुन्या पिढींत सुकर नाहीं. बोल्शेव्हिकांचा व्यवहारांत प्रत्यक्ष संबंध येतो जुन्या पिढीशीं. या कारणानें जुन्या पिढीस नव्या तालमींत तयार करण्याचा प्रयत्न बोल्शेव्हिकांनीं चालू ठेवलाच आहे. परंतु त्यांचें खरें यश या प्रयत्नावर अवलंबून नाहीं. हें यश पूर्णपणें मिळालें तर तरुण पिढीस हातीं धरण्यानेंच मिळणार असल्यामुळें त्यांनीं आपली मुख्य भिस्त तरुण पिढीवरच ठेवली आहे. रशिया देश हिंदुस्थानच्या चौपट; त्यांत शहरें थोडीं व खेडीं फार. यासाठीं खेड्यांतील शिक्षणपद्धति बदलणें निकडीचें असलें तरी सोपें नाहीं. शिक्षणाचे बाबतींत बोल्शेव्हिकांच्या काल्पनिक भराऱ्या अचाट आहेत. तरी पण त्या मानानें त्यांची प्रगति मात्र पैशाच्या अभावीं फारच मंद आहे. खेडें हा राज्यकारभाराचा पहिला व महत्त्वाचा घटक असल्यामुळें खेड्यांतील शाळा ग्राम कौन्सिलाकडेच सोपविण्यांत आल्या आहेत. शाळा खेड्याच्या ताब्यांत दिली म्हणून ती ताबडतोब सुधारते असें नाहीं. राज्यक्रांतीपूर्वी रशियांत जितक्या शाळा होत्या त्यापेक्षां साप्रतच्या राजवटींत शाळा वाढल्या नाहींतच, पण उलट कमीच झाल्या आहेत! शाळेंत घालण्याच्या वयाचीं मुलें आहेत त्यापैकीं फक्त शे.४६ मुलें शाळांतून शिकत आहेत. शिकणाऱ्या मुलांत दोनतृतीयांश मुलगे व एक तृतीयांश मुली आहेत. यावरून सक्तीचें शिक्षण रशियांत सुरू नाहीं हें कोणाच्याहि लक्षांत येईल.

गावांत जितकीं शिकाऊ मुलें सांपडतील तितक्या सर्वांना शिक्षक, शाळागृहें व शिक्षणाचीं साधनें पुरविण्याची अनुकूलता ग्रामकौंसिलास नाहीं. म्हणून फक्त अत्यंत गरीब शेतकऱ्यांच्या मुलांस प्रथम शाळेंत घेण्यांत येतें. समजूत अशी कीं, सुखवस्तु शेतकरी आपल्या मुलांकरितां स्वतःच्या खर्चानें वेगळी शाळा चालवितीलच. खेड्यांतील शिक्षणक्रम चार वर्षांचा आहे, परंतु पुरेसे शिक्षक नाहींत म्हणून त्या चार वर्षांचे चार वर्ग न पाडतां तीनच वर्ग पाडून त्यांत मुलें कोंबलीं जातात. यांत गैरसोय मुलांची, पण शिक्षकांची सोय अशी कीं, एका शिक्षकास तीन वर्ग एकाच वेळीं संभाळतां येतात. या तीन वर्षांत रशियन मुलांस मिळणारें शिक्षण आपल्याकडील मराठी शाळेंतल्या चारइयत्तांच्या दर्जाचे होय असें समजण्यास हरकत नाहीं. शिक्षकाचा पगारहि साधारण कसबी मजुरास रोजमुरा मिळतो त्याच बेताचा असतो. पगाराचे हें मान दरमहा पंधरा ते तीस डॉलर म्हणजे पंचेचाळीस रुपयांपासून नव्वद रुपयांपर्यंत पडतें. हा पगार आपल्या देशांतील प्राथमिक शिक्षकांच्या पगाराहून खात्रीनें अधिक नाहीं असें कोण म्हणेल?

बोल्शेव्हिक अमदानींत नवीन शाळागृहें बांधण्यास सवडच झाली नाहीं. आहेत तीं झारशाहीपैकीं आहेत. ज्या गांवीं अशींहि शाळागृहें नव्हतीं त्या गांवीं खासगी घरांचा उपयोग या कामीं करण्यांत येतो. तरी देखील जागेची ओरड कायमच असून साऱ्या मुलांस एकाच वेळीं शिक्षण न देतां आल्यामुळें त्यांच्या दिवसांतून दोन दोन पंक्ती उठवाव्या लागतात. शिक्षण-संस्थांचें हें बाह्यांग भिकार असल्याचें कोणीहि कबूल करील. परंतु फरक पडला तो बाह्यांगात नसून अंतरंगांत व तोच महत्वाचा होय. शिक्षक, पालक व छात्रगण यांत एक नवा जोम व नवी आशा उत्पन्न झाली आहे. दरसाल प्रत्येक तालुक्याची एक शिक्षण परिषद भरून तिच्यांत जगांतील अत्यंत आधुनिक शिक्षणपद्धतींचा विचार होत असल्यामुळें खेड्यामधील शिक्षकास आपल्या नाडीचे ठोके जगाच्या नाडी बरोबर मोजून पहातां येतात. ग्रामशिक्षणाचा कार्यक्रम ताजातवाना राखण्यास हा इलाज रामबाण होय यांत शंका नाहीं.

### खरी सुधारणा

रशियांतील शिक्षणक्रमांत नवीन गोष्ट अशी आहे कीं, शाळा ही निर्जीव, नीरस व गैरलागू विषयांचें भजन करण्याची जागा नसून ती एक लहान मुलांस स्वराज्याचें बाळकडू देण्याची रसायनशाळा समजली जाते. शाळेच्या आवारा बाहेर ज्या हालचाली चालू असतात त्यांचें प्रतिबिंब शाळा गृहांत पडलेलें आढळतें. मास्तरानें डोळे वटारावे, छडी वाजवावी व मग मास्तरांची कदर बाळगून मुलांनीं भीतभीत वागावें. या जुन्या पद्धतीस शाळागृहांतून हुसकून लावण्यांत आलें आहे. गुरु-शिष्य समान दर्जाचे लेखले जातात; इतकेंच नव्हे तर

शाळेचा कारभार व शाळेवरील देखरेखहि गुरुजीकडे असली पाहिजे असा नियम नाहीं. तशांत गुरुजी आपलाच अधिकार गाजवूं लागले तर तो त्यांचा अधिक प्रसंग. बहुधा शिष्यांचेंच एक मंडळ असून विद्यार्थ्यांच्या तक्रारी ऐकून घेणें व त्यांस शासन करणें (ताडण नव्हे) इत्यादि महत्त्वाचीं कामें तेंच पाहातें. शिक्षकास विद्यार्थ्यानें सन्मानपूर्वक मास्तर या पदवीनें न संबोधतां त्यांचें नांव घेऊनच हाक मारण्याची चाल पाडलेली आहे. मुलांनीं परवाचा म्हणावयाचा तर त्याची सूचना शिक्षकानें वर्गाच्या सेक्रेटरीस करावयाची व सेक्रेटरीनें सर्व वर्गास तो हुकूम म्हणून मोठयानें सांगावयाचा. प्रत्येक शाळेंत मुलांचें एक वर्तमानपत्र असतें. त्यांत मुलांनीं लेख लिहून शाळेच्या कारभारावर अनुकूल अगर प्रतिकूल टीका करावी व हव्या त्या शिफारशी लिहून ठेवाव्या. हीं वर्तमानपत्रें शाळेच्या भिंतीवर लावण्यांत येतात. शाळा सुटली कीं छात्र व शिक्षक यांचें परस्पर नातें सुटले असें रशियांत होत नाहीं. छात्रांना बरोबर घेऊन शिक्षक रानावनांत, एखाद्या प्रेक्षणीय स्थळीं किंवा एखादी संस्था पाहाण्यास जातात.

समाजसत्तेचा शिक्षण हा पाया होय. अशा दृष्टीनें शाळेंतून सर्वत्र समाजसत्तावादाची हवा खेळविण्याचा प्रयत्न वरीलप्रमाणें बोल्शेव्हिक राजवटींत चालू आहे. कार्ल मार्क्स व लेनिन हे महापुरुष समजून त्यांच्या तसबिरी सर्व शाळांतून लावलेल्या आहेत. राज्यक्रांतींतील महत्त्वाच्या प्रसंगांचे दिवस सणाचे व सुट्टीचे म्हणून पाळण्यांत येतात. आणि व्यापारी व सावकार हे राक्षस होत असा मुलांचा ग्रह करून देण्यांत येतो ! शाळांना ख्रिस्ती धर्माच्या सुट्टया मिळत नाहींत व शाळांतून ख्रिस्ती धर्माचें व येशू ख्रिस्ताचें नांवहि निघत नाहीं. खेडयांतील स्त्री-पुरुष सणवार पाळतात, रविवारीं चर्चमध्यें जातात व भक्तिपूर्वक वागतात; तरी पण शाळांतून वारें वेगळेंच वाहतें. शाळांत जडवाद शिकविण्यांत येतो व देवाचें अस्तित्व नाहीं हें तत्त्व मुलांच्या मनावर मुद्दाम बिंबविण्यांत येतें ! कॉलेजांत धर्म व तत्त्वज्ञान या विषयांस फांटा मिळाला असून अनेक पदवी-परीक्षांबरोबरच श्रमोपजीवनाचीहि पदवी-परीक्षा ठेवलेली आहे.

## जुन्या पिढीचें शिक्षण

तरुण पिढीस समाजसत्तेचें पाणी पाजण्याची वरीलप्रमाणें योजना झाल्यानंतर जुन्या पिढीस बोल्शेव्हिकांनीं अगदींच मोकळें सोडलें आहे असें नाहीं. त्यांजवरहि अनेक द्वारांनीं संस्कार होत आहेत. खेड्यांतील शेतकरी व शहरांतील कामकरी यांजमधील बेबनाव दूर करून स्नेहसंबंध वाढविणें व शहरांत सांचलेलें ज्ञान खेडयापर्यंत पसरून शेतकऱ्यास शहाणा, माहितगार व सुधारलेला बनविणें यासाठीं अनेक इलाज चालू आहेत. सरकार शेतकऱ्यांकरितां एक कॅलेंडर छापतें. त्याजवर शेतकरी कडब्याची पेंढी घेऊन उभा आहे व कामकरी आपल्या पेटीपाशीं काम करीत बसला असून दोघांच्या मध्यें लेनिनचें थडगें आहे असें चित्र काढलेलें असतें. कामगारांस उन्हाळ्यांत सुटी मिळाली म्हणजे त्यांस खेड्यापाड्यांत सुटी घालविण्याकरितां पाठविण्यांत येतें व अशा रीतीनें त्यांचा व शेतकऱ्यांचा संबंध दृढावतो. कॉलेजांतील व शाळांतील विद्यार्थ्यांवरहि सुटीच्या दिवसांत खेड्यांमधील जागृतीचें काम येऊन पडतें. सदर विद्यार्थ्यांकरितां खेड्यांतील कार्य कोणत्या धर्तीवर करावें हें समजून सांगण्यासाठीं वर्ग सुरू होतात व त्यांत माहिती मिळवून मग विद्यार्थी खेडेगांवांत प्रविष्ट होतात. याच कार्यासाठीं लेनिनग्रॅड सोसायटी या नांवाची संस्था निघाली आहे. तिजमार्फत खेड्यांत नाटकें व सिनेमा यांच्या सहाय्यानेंहि ज्ञानदान होतें.

वरील प्रयत्नांपेक्षा अधिक व्यापक व उपयुक्त प्रयत्न म्हटला म्हणजे हाऊस ऑफ पेंझंट्स हा. हें खास शेतकऱ्यांचें राजकीय मंदिरच होय. या मंदिरांचा प्रसार सर्व रशियाभर होण्यास बराच विलंब लागेल. तरी पण त्याजमार्फत आज रशियांत जी कामगिरी बजावली जात आहे ती अनुकरणीय अशीच आहे. हें मंदिर बाजाराच्या गांवीं स्थापन होतें, बाजारच्या दिवशीं आसपासच्या खेड्यापाड्यांतून कसब्याच्या गांवीं शेंकडो बाजारकरी जमतात व त्यांत स्त्रियाहि असतात. ही संधि शेतकऱ्यांस फार नामी होय. शेतकऱ्यांच्या गरजा थोड्या नसतात. ते बाजाराला आले म्हणजे त्यांस नुसती मीठमिरची किंवा सौदा विकत घ्यावयाचा नसतो. त्यांच्यापैकीं कोणास औषधपाणी, कोणास वकिलाचा सल्ला, कोणास नव्या पिकाची माहिती तर कोणास गुरांकरितां दवा लागतो. या सर्व गोष्टींची तरतूद कृषीवल-मंदिरांत होते. त्याकरितां सरकार बाजारच्या दिवशीं एक माणसांचा डॉक्टर, एक गुरांचा डॉक्टर, एक वकील व एक शेतकी खात्याचा माहितगार अधिकारी हजर ठेवतें. हे सर्व गृहस्थ शेतकऱ्यांस वरील प्रकारची माहिती मोफत देतात. कांहीं माहिती व्याख्यानरूपानें पुरविण्यांत येतें.

## कृषिवलमंदिराचें कार्य

याहिपेक्षां रशियांतील व जगांतील राजकीय हालचालींचें ज्ञान शेतकऱ्यांस मिळणें जरूर आहे व त्यासाठीं गांवोगांव मोफत वाचनालयें काढलीं तरी जोंपर्यंत शेतकरी निरक्षर आहेत तोंपर्यंत असलीं वाचनालयें निरुपयोगी होत. ही अडचण लक्षांत घेऊन कृषिवलमंदिरांत शेत

कऱ्यांस जमवून त्यांजकरितां सरकारानें नेमलेले पगारी वाचक मासिक पुस्तकें व वर्तमानपत्रें त्यांजसमोर वाचून दाखवितात. दिवसा बाजार केल्यावर शेतकऱ्यांस सायंकाळीं आपल्या गांवीं परत जावयाचें असतें. मंदिरांतील वरील सोयींचा फायदा घ्यावयाचा तर त्यांस सायंकाळीं कसब्यांतच मुक्काम करावयास पाहिजे. पण अशा गांवांतून राहाण्याची व जेवण्याखाण्याची त्यांची तजवीज कशी होणार? बोल्शेव्हिक सरकारानें हीहि तजवीज ठेवलेली आहे. त्यांनीं कृषिवलमंदीर हें म्हटली तर धर्मशाळा, म्हटलें तर अन्नछत्र, म्हटलें तर वसतिगृह, म्हटलें तर सभागृह व म्हटलें तर भोजनालय बनवून ठेवलेलें आहे. या मंदिरांत शेतकऱ्यांस भोजन मोफत मिळतें, निजण्याकरितां आरामशीर बिछाना हंतरून ठेवलेला असतो व मुलांना संभाळण्याकरितां दाया हजर असतात. त्यांच्या ताब्यांत बायकांनीं आपलीं मुलें द्यावीं व खुशाल बाजारहाट करण्यास किंवा व्याख्यानें ऐकण्यास निघून जावें. वरील व्यवस्थेंत शेतकरी झाला तरी त्याला बिछान्याबद्दल थोडेसें भाडें द्यावें लागतें. अशा प्रकारचीं मंदिरें उभारण्याची कल्पना सन १९१८ सालीं निघाली. तेव्हांपासून आजपर्यंत ३५३ मंदिरांची स्थापना रशियांत झाली व या सर्व मंदिरांत मास्को येथील मंदिर मुख्य होय.

युरोपियन राष्ट्रें भांडवलवालीं व भांडवलवाल्यांची कैवारी आणि रशिया तेवढा कामगारपक्षीय व कामगारपक्षाचा कैवारी याकारणानें रशियाला आपला व्यवहार परराष्ट्रांवर विसंबून ठेवतां येत नाहीं. यासाठीं त्यास आपल्या गरजा देशांतल्या देशांत भागवावयाच्या झाल्या तर शेतकरी वर्गास हातीं धरून त्याजकडून देशांतील उत्पन्न शक्य तितकें वाढवून घेतलें पाहिजे. ही गोष्ट घडून येण्यापूर्वी शेतकरी वर्ग जाणता व कार्यक्षम होणें जरूर असल्यामुळें त्यांची सुधारणा करण्याच्या उद्योगांत बोल्शेव्हिक आहेत.

आज रशियांतील जमीन शेतकऱ्यांत वाटलेली आहे व प्रत्येक रशियन कुटुंब सरकारसारा भरून बाकीचें उत्पन्न आपल्या प्रपंचाकडे खर्च करतें. परंतु समाजसत्तावाद्यांचें हें ध्येय नव्हे, समाजसत्तावादी कुटुंब हा स्वतंत्र घटक समजत नाहींत. समाज हाच त्यांच्यामतें मुख्य घटक. पण त्या घटकापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वी मधल्या किती तरी पायऱ्या चढून गेलें पाहिजे. याची तयारी बोल्शेव्हिकांनीं अन्य रीतीनें चालविली आहे. प्रयोगादाखल पांच पन्नास शेतकऱ्यांच्या समुदायानें जमीन कसण्याचा पहिला पायंडा त्यांनी थोड्या ठिकाणीं पाडला आहे. या एक प्रकारच्या मंडळ्याच असून त्यांना निरनिराळीं नांवें देण्यांत आलीं आहेत. या प्रयोगाखातर जमिनीचा मोठा तळ घेण्यांत येतो. शेतकीचीं आउतें व जनावरें या कंपनीचीं. तिचा सर्व कारभार बोर्डानें पहावयाचा. ज्याला त्याला कामाप्रमाणें मजुरी मिळते. नवीन यंत्रें खरेदी करण्याकरितां सालअखेर उत्पन्नांतून वेगळी रक्कम काढून ठेवल्यानंतर नफा उरला तर कंपनींतील प्रमुख वाटून घेतात. याच कंपन्यांची रचना अखेर कम्यूनिस्ट वळणावर न्यावयाची आहे. सारांश रशियास कालान्तरानें पूर्णपणें कम्यूनिस्ट बनविण्याचा बोल्शेव्हिकांचा इरादा असून त्याचीच ही पूर्वतयारी सुरू आहे.

# रामायणाचा उपसंहार

## रामकालीन युगाचें मर्म
### लेखांक ३

(ले.—**का. न. केळकर**, हायकोर्ट वकील, **पुणें**.)

मागील लेखांत ग्रंथकर्त्यानें अनार्य लोकांची जी संस्कृति वर्णन केली आहे, ती अविश्वसनीय कशी ठरते हें सिद्ध केलें. या लेखांत रामचरित्राचें व तत्कालीन युगाचें ऐतिहासिक दृष्ट्या खरें वैशिष्ट्य काय होतें याचें विवेचन करून या विषयाचा समारोप करूं.

### रामाच्या कीर्तीचें रहस्य

रामचरित्र आज शेंकडो वर्षें हिंदुस्थानांतील आबालवृद्धांना अत्यंत प्रिय झालें आहे. इतकेंच नव्हे तर महाभारतापेक्षांहि किंचित् सरस अशी लोकप्रियता रामायणाला लाभली आहे. पण या लोकप्रियतेचें खरें कारण काय? रामाचें अंगीं जे अनेक तेजस्वी, बहुमोल व दुर्मिळ गुण एकत्र वास करीत होते त्यांचेयोगानेंच केवळ आज सुमारें चार हजार वर्षेंपर्यंत लोकांचें चित्त वेधून राहील हें खरें दिसत नाहीं. लोकाराधन हा रामाचा मुख्य गुण म्हटला तर, तोहि कांहीं असा अद्वितीय नव्हता की अशा प्रकारें निःसीम व्रतानें आणि कडकडीत निष्ठेनें लोकाराधन केल्याचीं उदाहरणें इतिहासांत दुसरी सांपडूच शकणार नाहींत! स्वराज्यसंस्थापक श्रीशिवाजीमहाराजांच्या अंगीं, अगर पांडवांच्या अंगीं लोकाराधनाचा हा सद्गुण व त्याकरिता

लागणारी आत्यंतिक सत्त्वधीरता होती असें म्हटलें, तर तें असिद्ध ठरविणें जडच जाईल. पितृभक्ति हा गुण घेतला तर, पुरूनें ययातीला आपलें तारुण्य देऊं केलें व त्याची जरा स्वीकारली ! भीष्मानें तर राज्यावर उदक सोडलें इतकेंच नव्हे तर, स्वतःच्या संततीकडून बापाच्या मनोरथाला पुढें विरोध निर्माण होण्याचा कदाचित् अप्रत्यक्ष संभव उत्पन्न होईल म्हणून "मी यावज्जीव ब्रह्मचारी राहीन" अशी प्रतिज्ञा केली ! व ही भीष्मप्रतिज्ञा अशी होती कीं, 'ती आजवर कोणी केली नाहीं व पुढेंहि कोणी करणार नाहीं' असें स्वतः व्यासांनींच लिहून ठेविलें आहे. स्वार्थत्यागाची गोष्ट घेतली तर, शिबी राजानें श्येन पक्ष्याला स्वतःच्या अंगचें मांस काढून दिलें व अलर्कानें, तर स्वतःचे डोळे काढून ब्राह्मणास दिले ! सत्त्वनिष्ठा हा गुण घेतला तर, श्रियाळ आणि चांगुणा यांनीं आपल्या लाडक्या एकुलत्याएक मुलाचें मांस शिजवून अतिथींस वाढलें, अशी कथा शिवलीलामृतांत वर्णन केली आहे. अशाच प्रकारचीं शेंकडों उदाहरणें महाभारतांतून, पुराणांतून अगर इतिहासांतून काढून दाखवितां येतील. रामायणकाळाचे गुण पुढील पांच हजार वर्षांच्या इतिहासांत कोठेंहि आढळत नाहीत असें प्रतिपादन करण्यांत मनुष्यजातीला भूषण नाहीं व ऐतिहासिक दृष्टीनें ते खरेंहि नाहीं. रघुवंशांत कालिदासानें म्हटल्याप्रमाणें " प्रवर्तितो दीप इव प्रदीपात् " या न्यायानें सद्गुणाच्या एका दीपज्योतीपासून स्फूर्तीच्यायोगानें दुसरीहि तशीच दीपज्योति निर्माण करतां येते असेंच इतिहासानें दाखविलें आहे. सरोवराच्या एका लहरीच्या संसर्गानें दुसरी लाट उत्पन्न व्हावी त्याप्रमाणें, केवळ स्फूर्तीच्या योगानें अनेक महानुभाव पुरुषांनीं हे दैवी सद्गुण कसे प्रगट केले यानें इतिहासाचा क्रम अखंड भरलेला दिसतो.

## लोकमतावर अखंड दिग्विजय

केवळ स्वार्थत्यागादि वेगवेगळे सद्गुण रामचंद्रामध्यें एकवटले होते, म्हणून इतकीं वर्षें रामचरित्र अजरामर झालें असेल हेंहि संभवत नाहीं. कारण असा गुणसमुच्चय इतरांचे अंगीं असल्याचीं उदाहरणेंहि इतिहासांतून काढून दाखवितां येतील. नुसते सद्गुण मनुष्याला लोकप्रियता व कीर्ति मिळवून देण्याला कारणीभूत होत नाहीत. त्याच्याच जोडीला धैर्य व पराक्रम हे क्रांतिकारक गुण लागतात. लोकांचें मन आपणाकडे वेधून त्यामध्यें आकर्षणशक्ति उत्पन्न करण्याला वर्तमानकालाच्या राजकारणाचें मर्म जाणण्याची उज्वल प्रतिभाशक्ति, अमोघ पराक्रम व कठोर धैर्य हीं जितकीं कारणीभूत होतात, तितके स्वार्थत्यागादि इतर लिवलिवीत सद्गुण होत नाहींत. व हे सर्व क्रांतिकारक गुण तत्कालीन युगामध्यें लोकांना अत्यंत प्रिय असलेल्या एखाद्या कार्यावर खर्च व्हावे लागतात, त्याशिवाय लोकमतावर असा अखंड दिग्विजय चालवितां येत नाहीं. रामाचे सर्व सद्गुण लोकाराधन करण्यांतच खर्ची पडले हें खरें. पण लोकाराधन करून जी लोकसेवा रामानें केली ती कोणत्या प्रकारची होती हें कळण्याला तत्कालीन युगाचें मर्म (Spirit of the age) काय होतें हें बरोबर ओळखलें पाहिजे.

## पृथ्वीसंशोधनाचें युग

रामाच्या वेळेच्या युगांतील हें लोककार्य म्हणजे 'दक्षिणेचा शोध व दिग्विजय' असें सांगतां येईल. त्या युगासंबंधीं विशेष ठळक अशी गोष्ट एकाशब्दानें सांगावयाची तर ती (exploration) या शब्दानेंच सांगतां येईल. किंबहुना त्या युगाला सत्ययुग अगर त्रेतायुग असें नांव न देतां **पृथ्वीसंशोधनाचें युग** असेंच नांव द्यावें लागेल. हिमप्रलयामुळें उत्तर-ध्रुवावरचें वसतिस्थान सोडून आर्य लोक आशियामायनरमध्यें आले, त्या वेळीं दास दस्यु यातुधान वगैरे लोकांशीं त्यांचीं जीं युद्धें झालीं त्यांचें वर्णन वैदिक ऋचांमध्यें आढळतें. इ. स. पू. पांच हजार वर्षांपूर्वी पहिले सूर्यवंशी आर्य लोक हिंदुस्थानांत आले. व त्यांनीं आपलें राज्य सप्तसिंधूच्या प्रांतांत म्हणजे पंजाबापासून तों थेट अयोध्या मिथिलेपर्यंत पसरलें. गंगा व यमुना यांच्या दक्षिणतीरावर या वेळीं अनार्य लोकांची वसति होती. व विशेषतः विंध्याचलाखालचा सर्वच प्रदेश बहुधा अज्ञात असा होता. रामायण महाकाव्यांत रामाचा जो वनवासाचा मार्ग सांगितला आहे, त्यांत नर्मदा, कृष्णा अगर कावेरी या मोठ्या नद्यांचाहि उल्लेख सांपडत नाहीं याचें कारण हेंच होय. सह्याद्रि पर्वतालाहि विंध्य पर्वताचाच भाग मानीत असून कदाचित् त्यास विंध्य हेंच नांव असावें. अगस्ति ऋषीनें विंध्य पर्वत पालथा घातला अशी दंतकथा प्रचलित आहे. रामाच्या पूर्वींच दाक्षिणेंत येऊन अगस्ति ऋषीनें फार मोठा पराक्रम केला. विमानविद्येचाहि शोध अगस्ति ऋषीनें लाविला होता असें अगस्ति संहितेवरून दिसून येतें. या संहितेंत अनुयोगी व प्रतियोगी ( पॉझिटिव्ह व निगेटिव्ह ) विद्युत्प्रवाहांना 'मित्रावरुणौ' असें जोडनांव सांपडतें. विमानांतील पिशवीला 'उर्वशी' असें नांव आहे. हैड्रोजन अथवा हवेपेक्षां हलका असलेल्या वायूला 'उदान' असें नांव सांपडतें. व आश्चर्य हें कीं, विमानाची कृति व विमान हवेंत तरंगलें तरी त्याला इष्ट गतीनें वाहून नेण्याकरितां गरुड, हंस, गिधाडें वगैरे पक्षी शिकवून कसे तयार करावेत, ही शकुंत विद्येची माहितीहि अगस्ति ऋषीनें लिहून ठेविली आहे ! या माहि-

तविर कोणी विश्वास ठेवावा अगर न ठेवावा. परंतु अगस्ति ऋषींनीं मध्य–हिंदुस्थान ओलांडून विंध्य पर्वत पायाखालीं घातला, खाऱ्या समुद्राचा शोध लावला व शेवटीं विंध्याद्रीच्या दक्षिणभागींच देह ठेविला, इतकी माहिती या शोधकासंबंधानें मिळते.

## कांहीं वैदिक कथांचा अर्थ

रामाच्या कुलांतील पूर्वज हे सर्वच पृथ्वी-शोधक व दिग्विजयी होते. व क्षात्रधर्माबरोबरच तत्कालीन आर्यांची ही शोधक प्रवृत्तीहि त्यांचे अंगीं होती असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. ज्ञात पृथ्वी जिंकण्यापेक्षां अज्ञात पृथ्वी जिंकून पायाखालीं घालणें, याकरितांच अश्वमेध वगैरे यज्ञ होते. व असें म्हटलें म्हणजे यज्ञसंस्थेचा खरा अर्थ बरोबर समजतो. सगर हा रामाचा पूर्वज होता. त्यानें केलेला अश्वमेध, राक्षसांनीं यज्ञाचा अश्व पळवून नेणें, त्या अश्वाच्या शोधास गेलेल्या साठ हजार पुत्रांचा (सैनिकांचा) नाश होणें, त्यानंतर दिलीपानें यज्ञ करीन तेव्हांच पितरांचें तर्पण करीन अशी प्रतिज्ञा करणें व अखेर भगीरथानें ती प्रतिज्ञा सिद्धीस नेणें, या सर्व रूपकाचा अर्थ त्या वेळीं चालू असलेल्या पृथ्वी शोधाच्या कल्पनेनेंच नीट लावतां येतो. भगीरथानें स्वर्गांतून गंगा आणली व सगरपुत्रांनीं अश्वशोधाकरितां केलेल्या खड्ड्याला ( अर्थात् सागराला ) ती मिळविली, व तेथें सगरपुत्रांच्या झालेल्या भस्माला गंगास्नान होऊन भगीरथाचे पूर्वज स्वर्गाला गेले; या सर्वांचा अर्थ, पृथ्वी शोध करीत करीत गंगेच्या उगमापासून तो बंगालच्या उपसागरापर्यंत सर्व टापू रघुवंशांतील रामाच्या पूर्वजांनीं जिंकून पायाखालीं घातला असाच केला पाहिजे. बालकाण्डांत विश्वामित्रानें पूर्वजांच्या कथा रामाला सांगितल्या आहेत. हा भाग अगर उत्तर–कांडांतील वैदिक कथा या प्रक्षिप्त अगर कशाहि मानल्या तरी, पृथ्वीचा शोध व दिग्विजय हें जें त्या युगाचें मर्म होतें तें या प्रक्षेपकास बरोबर कळलें होतें यांत शंका नाहीं! रघुवंशांत दशरथ हाच काय तो दिग्विजय न करणारा व केवळ ऐषारामी निपजला असेल. पण तत्कालीन युगाचें हें जें विशिष्ट मर्म होते तें रामानें लहानपणींच बरोबर ओळखलें होतें. विश्वामित्रानें रामाला सांगितलेल्या कथांचा याहून दुसरा अर्थ करतांच येत नाहीं.

## लंकेवर झेंडा रोवला !

रामाच्या हातून भवितव्यतेनें जो पराक्रम घडवून आणला तो केवळ अतर्क्य होय. इतकेंच नव्हे तर, एकाकी अनाथ व आईबापांनीं देशोधडीला लावून अरण्यांत हांकून दिलेल्या या मुलाच्या हातून जितका पराक्रम घडून आला तितका रघुवंशांतील सार्वभौम राजांना चतुरंगबळाच्या मदतीनेंहि करतां आला नाहीं! कैकेयीनें रामास दंडकारण्यांत पाठविलें तेव्हां, भरताकडून पुनः राज्याचा हक्क मागण्यास हा नरमांसभक्षक राक्षसांच्या तावडींतून परत येणार नाहीं, अशीच तिची अपेक्षा होती.पण आपल्या बुद्धिबलानें रामानें सुग्रीवादि वानर राजाशीं तह केले व दिग्विजयाचा झेंडा दक्षिण देशाची हद्द संपून जेथें समुद्राचें साम्राज्य सुरू होतें, त्या लंकेपर्यंत नेऊन पोंचविला! अरण्यवासी झालेल्या एका सर्वस्वी असहाय अशा राजपुत्राचे हातून इतका अद्‌भुत पराक्रम घडल्याचें जेव्हां अयोध्येंतील लोकांनीं ऐकिलें असेल तेव्हां ते खरोखर आश्चर्यानें थक्कच झाले असले पाहिजेत! वनवासाच्या विपरीत परिस्थितींत, म्हणजे प्रत्यक्ष कल्पनेलाहि कल्पना होणार नाहीं अशी वस्तुस्थिति असतांना, अगस्ति सगर दिलीप वगैरे पूर्वकालीन रघुराजे यांच्यापेक्षांहि सर्वांत पुढें जाऊन पृथ्वीच्या शोधाची अंतिम मर्यादा रामानें गांठली, व अभेद्य अशा लंकेवर दिग्विजयाचा झेंडा फडकावला. या पराक्रमामुळेंच त्याचें नांव अजरामर झालें !

## मनूच्या ओंजळींतील मासा

आर्य लोकांच्या सुधारणेचें खरें स्वरूप प्रसरणशील व प्रवृत्तिपर होतें, हें याप्रमाणें रामचरित्रावरूनहि स्पष्ट दिसतें. "बर्फाच्या प्रलयामुळें ध्रुवावरचें मूलस्थान सोडून वाटेल तिकडे जाणें भाग पडल्यावर, प्रतिकूल संकटांशीं झगडत, अनार्य लोकांना जिंकून त्यांना आपलेसे करून आर्यांनीं त्यांच्यावर आपलें वर्चस्व स्थापन केले. व त्यांना भाषा आचार व विचार इत्यादि गोष्टींत आपल्यासारखें आर्य करून सोडले, एवढ्या एकाच गोष्टीकरून आर्यांची मूळ सुधारणा कोणत्या प्रकारची होती याचें अनुमान होतें" असें लोकमान्य टिळकांनीं आपल्या 'आर्क्टिक होम' या ग्रंथांत स्वच्छ म्हटलें आहे. वैदिक धर्म बुडत होता व धर्माला ग्लानि आली होती म्हणून रामचंद्राचें रूपानें परमेश्वरानें अवतार धारण करून धर्मरक्षण केलें ही कल्पना भाविकपणाची असली तरी ऐतिहासिक दृष्ट्या ती चुकीची होय ! राक्षस यज्ञयागांचा विध्वंस करीत हें वर्णन खरें आहे. तथापि यज्ञपद्धति ही धार्मिक म्हणण्यापेक्षां राष्ट्रीय संस्थाच होती हें सहज सिद्ध करतां येईल. "स्वाराज्यं, वैराज्यं, अधिराज्यं" या मंत्राचें स्वारस्य व्यक्तिविषयक अगर पारलौकिक नसलें पाहिजे हें कोणीहि सांगू शकेल. यज्ञक्रिया ही केवळ पारलौकिक कल्याणाची गोष्ट असती तर, जगाच्या कोणत्याही कोन्याकोपऱ्यांत बसून ती आर्यांना करितां आली असती. पण मनूच्या ओंजळींतील मासा वाढतां वाढतां तो समुद्रांतहि मावेना त्याप्रमाणें, उत्तर ध्रुवाची भूमि सुटल्यानंतर आर्यांनीं वेद व यज्ञसंस्था उराशीं बाळगून सर्व जग आक्रमण केलें, याचा अर्थ त्यांच्या संस्कृतीचें वैशिष्ट्य कांहीं वेगळेंच होतें असा उघड ठरतो.

### यज्ञसंस्थेचें राष्ट्रिय स्वरूप

कै. माधवराव कुंटे यांनीं लिहिलेल्या आर्यांच्या संस्कृतीच्या इतिहासांत या विषयाचें अत्यंत मनोरम असें वर्णन सांपडतें. मॅग्नाचार्टा ही जशी इंग्लंडाच्या सर्व राज्यघटनेच्या इतिहासाची पार्श्वभूमि आहे त्याप्रमाणें, आर्य संस्कृतीच्या इतिहासाची यज्ञसंस्था ही पार्श्वभूमि होय. त्याशिवाय तत्कालीन संस्कृतीचें वैशिष्ट्य कळतच नाहीं. यज्ञ म्हणजे सोमरस पिण्याचीं विश्रांतिगृहें अगर ब्राह्मणभोजनें झोडण्याचीं ठिकाणें नव्हतीं! आजच्या राष्ट्रीय सभेप्रमाणें राष्ट्राच्या आकांक्षा जेथें जाहीर केल्या जातात अशा प्रकारची ती एक राष्ट्रीय संस्था होती. हजारों जमातींचे व संघांचे लोक तेथें एकत्र येत व चांगल्या गोष्टींची प्रशंसा व द्यूतासारख्या राष्ट्रीय व्यसनांचा निषेध तेथें प्रदर्शित केला जाई. एखाद्या पराक्रमशाली वीराचा सन्मान करण्याचा प्रसंग असो, तत्त्वज्ञानचर्चा असो, एकादें महाकाव्य विद्वानांपुढें प्रसिद्ध करण्याची गोष्ट असो, संकटांचा परिहार करण्याची वेळ असो, अगर राष्ट्रीय आकांक्षा अगर सामर्थ्य जाहीर करण्याचें कार्य असो, या सर्व हालचाली व चळवळी होण्याचें मुख्य ठिकाण म्हणजे यज्ञभूमि हेंच होतें. राजाच्या दरबारांत शाहीरानें पोवाडा म्हणावा त्याप्रमाणें स्फूर्तिदायक कवनें यज्ञभूमीवर म्हटलीं जात,व कवीचा तेथें जाहीर सन्मान होत असे. तात्पर्य, पाठीमागे,अनार्य लोकांशीं केलेल्या घनघोर रणसंग्रामाचा स्फूर्तिमय इतिहास, व पुढें,जग आक्रमण करण्याच्या आकांक्षेनें उज्वल झालेला भविष्यकाळ! अशा मनःस्थितीचा छाप वैदिक ऋचांमधून व यज्ञसंस्थेवरून स्पष्ट दिसतो तो विसरून कसा चालेल ? वैदिक धर्मावर संकट आलें होतें खरें. पण तें फार पूर्वी. म्हणजे हिमप्रलयकाळ आला व आर्यांना उत्तर-ध्रुवावरचा नंदनवनासारखा प्रदेश सोडावा लागला तेव्हां! पण थोड्याच काळांत आर्यांनीं आपली घडी बसविली. दक्षिणेचा प्रदेश व्यापला, अमेरिकन वसाहतवाल्यांप्रमाणें पूर्वीच्या देवता, पूर्वीचीं शहरें,पूर्वीची संस्कृति यांची आर्यावर्तांत पुनः प्रतिष्ठापना केली, व पर्यायानें पहिल्यासारखी प्रतिसृष्टि निर्माण केली, म्हणूनच "धाता यथा पूर्वमकल्पयत" असा विजयसूचक हर्षोद्गार मंत्रद्रष्ट्या कवींच्या मुखांतून बाहेर पडला!

### समारोप

सारांश अनार्यांना जिंकून त्यांना आर्य संस्कृति चारणें, पृथ्वीचा शोध व आक्रमण करणें, व यज्ञयाग करून दिग्विजय करणें, हें जें आर्यसंस्कृतीचें वैशिष्ट्य त्याचा रामकालीन युगावर पूर्ण छाप पडलेला दिसून येतो. व या ऐतिहासिक दृष्टीनेंच रामायणाकडे पाहिलें पाहिजे.

सरतेशेवटीं, वाचकांनीं या उपसंहारग्रंथास आश्रय देऊन चिपळूणकर आणि मंडळीनें केलेल्या वाङ्मयसेवेचें चीज करावें, असें सांगून हें परीक्षण पुरें करितों.

## चिनी राष्ट्रीय पक्षाचा जयजयकार

पेकिंग पडणार हें अलीकडील बातम्यांवरून ठरल्यासारखेंच होतें. त्याप्रमाणें गेल्या आठवड्यांत तें पडलें व राष्ट्रीय सैन्यानें पेकिंग शहरांत विजयोत्साहानें प्रवेश केला. पेकिंग ही चीनची प्राचीन राजधानी. ती ज्याच्या हातीं तोच चीनचा अधिपति, अशी स्थिति असल्यामुळें पेकिंग स्वाधीन होईपर्यंत राष्ट्रीय पक्षास चीनचें सरकार या नात्यानें सर्वमान्यता मिळण्यास मोठीच अडचण उत्पन्न झाली होती. ही अडचण पेकिंग हस्तगत होऊन दूर झाल्याकारणानें चीनच्या यादवी युद्धावर शेवटचा पडदा लवकरच पडणार अशी आशा बाळगण्यास हरकत उरलेली नाहीं. चॅंगत्सोलीन हा मांचूरियाचा सुभेदार, पण अलीकडे पेकिंग शहरीं राहून पेकिंग सरकारचा प्रमुख म्हणून सर्व सूत्रें तोच हालवीत होता. राष्ट्रीय सैन्याच्या धडकीपुढें पेकिंग शहर आपल्या फौजेस लढवितां येणार नाहीं अशी खात्री पटून से. चांगत्सोलीन पेकिंगची निरवानिरव करूनच बसला होता. पेकिंगमधून पळ काढण्याकरितां त्यानें स्पेशल ट्रेनहि सज्ज ठेविली होती. तिच्यांत बसून चांगत्सोलीन मांचूरियाची राजधानी मुकडेन इकडे जात असतां त्याच्या पाळतीवर राहिलेल्या कांहीं चिनी तरुणांनीं त्याजवर बांब फेकले. त्या धडाक्यांत त्याचें एकदोन हस्तक ठार झाले व खुद्द चांगत्सोलीन यासहि बांबचा मार बसून तो अत्यवस्थ होता पण त्याची प्रकृति आतां सुधारत असल्याचें समजतें.

चांगत्सोलीन यानें पेकिंगकडे पाठ फिरवितांच त्याच्या सैन्यानेंहि पेकिंगमधून पाय काढला. परंतु सदर सैन्य मुकडेनच्या रोखानें निघालें असतां त्याच्या वाटेंतील पूल पाडून राष्ट्रीय सैन्यानें त्याचा रस्ताच बंद केला. अशा रीतीनें अडकून पडलेलें हें सुमारें सत्तर हजार सैन्य राष्ट्रीय सेनापति चॅंगकैशेक यानें पकडलें. ही बातमी खरी असल्यास चॅंगत्सोलीन जिवंत राहिला तरी त्याचे पंख उपटल्यासारखें होऊन तो लुलाच पडणार यांत शंका नाहीं. चांगत्सोलीन हा पूर्वीपासून जपानचा आश्रित; तथापि तो चीनविरुद्ध उघडपणें जपानास मिळेल किंवा जपान त्यास चीन

विरुद्ध उघडपणें मदत करील या दोनहि गोष्टी सिनानफू येथील अत्याचाराचे प्रसंगीं जपानानें ठेवलेल्या धोरणावरून संभवनीय वाटत नाहींत. चीनचें आपसांतील युद्ध व त्यावर राष्ट्रीय पक्षानें चढविलेला विजयाचा मुगुट जगाच्या इतिहासांत अनेक दृष्टींनीं अद्भुतच समजला जाईल. या युद्धास १९२५ च्या मे महिन्यांत तोंड लागलें व त्याचा शेवट १९२८ च्या मे महिन्यांत दिसूं लागला. सदर युद्धानें अशी तीन वर्षें व्यापलीं, या दृष्टीनें हें चिनी युद्ध मोठें व त्याचे जगाच्या भावी इतिहासावर जे विलक्षण परिणाम घडून येणार आहेत त्या दृष्टीनें तें युद्ध क्रान्तिकारकहि ठरणारें आहे.

चीनच्या अधिराज्याखालील एक एक प्रदेश जबरदस्तीनें सोडवून तो आपल्या बगलेंत मारण्याचा रशिया, इंग्लंड व जपान यांचा कावा नव्या मनूतील चिनी तरुणास सहन झाला नाहीं. त्यांतच इंग्लंड, अमेरिका, जपान इत्यादि परकीय राष्ट्रांनीं जे अपमानकारक व नुकसानकारक हक्कसंबंध निर्माण केले त्यायोगानें चीन आपलें स्वातंत्र्य गमावून बसला. हिंदुस्थानच्या हातापायांत बेड्या आहेत तशा बेड्या चीनच्या हातापायांत नव्हत्या एवढ्यावरून चीन स्वतंत्र होता असें म्हणतां येणार नाहीं. चीन हिंदुस्थानाइतका पक्का कैदी नव्हता, पण नजर-कैदेत खास होता. आणि तोहि एका राष्ट्राच्या नसून अनेक राष्ट्रांच्या! या कारणानें त्याला देशांतील कारखान्यांस व उद्योगधंद्यांस संरक्षण देऊन त्यांची वाढ करतां येत नव्हती व परदेशी मालांवरील जकात वाढवून त्याची आयात खुंटवितां येत नव्हती. आगगाड्या व कालवे बांधण्यास त्याजपाशीं पैसा नव्हता व रयतेचें पिढीजाद द्रारिद्र्य खणून काढण्यास कोणतींहि साधनें उपलब्ध नव्हतीं. या सर्व गोष्टी मनाजोग्या जुळून यावयाच्या तर चिनांतील मध्यवर्ती सत्ता मजबूत व सर्वंकष झाली पाहिजे. चिनांत १९१२ सालीं राज्यक्रांति होऊन मांचूराजघराण्याचें सिंहासन पालथें घालण्यांत आलें. तरी त्या ठिकाणीं स्थापन झालेली नवी लोकसत्ता नामधारीच होती. तिचा अंमल पेकिंग बाहेर न पसरल्यानें प्रांतांप्रांतावरील सुभेदार आपापल्या प्रांतांत स्वतंत्र होऊन बसले होते आणि देशांत एकसूत्री अंमल न चालतां सर्वत्र बंडाळी माजली होती.

अशा रीतीनें जें कार्य पेकिंग येथील लोकसत्तेस साधतां आलें नाहीं तें कार्य साधण्यासाठीं सन्यत्सेन यांच्या नेतृत्वानें नवा क्युओमिंटँग पक्ष जन्मास आला. त्यानें आपलें राज्य कंतान येथें उभें केलें व संपूर्ण चीन देश पादाक्रांत करून व पेकिंग शहर जिंकून खऱ्या लोकसत्ताक पायावर मजबूत व मध्यवर्ती राज्याचा मांड मांडावयाची महत्त्वाकांक्षा धारण केली. या नवीन व खंबीर लोकसत्तेचा उदय इंग्लंडआदिकरून परकीय राष्ट्रांस वावडा होता. चीनमध्यें माजलेला बखेडा व अंदाधुंदी हींच त्यांच्या पथ्यावर होतीं. कारण ही अंदाधुंदी टिकून असेपर्यंतच त्यांचा चिनांतील अनियंत्रित कारभार स्वैर चालणार होता. त्यांच्या या कारभारास आळा घालण्याची गोष्ट कंतानच्या राष्ट्रीय सरकारनें काढली कीं इंग्लंडप्रभृति राष्ट्रें चीनचा खरा धनी कोण तो आधीं ठरवा व मग आमच्या बरोबर तहाची भाषा बोलावयास या असें निःशंकपणें सांगत. त्यांचें हें उत्तर पगधस्तीचें असे व त्यावर प्रत्युत्तर देण्यास राष्ट्रीय पक्षास तोंड नसे.

कावेबाज युरोपियन राष्ट्रांचें समाधान करण्यासाठीं नव्हे तर चीनच्या शाश्वत कल्याणासाठीं राष्ट्रीय सरकारनें दोन वर्षांपूर्वी पेकिंग सरकाराविरुद्ध मोहीम सुरू केली; तेव्हां देखील इंग्लंड, अमेरिका व जपान यांनीं चीनच्या राष्ट्रीय पक्षास त्रास देण्यास कमी केलें नाहीं. यादवीनें साऱ्या देशभर पेट घेतल्यामुळें खुद्द चिनी जनतेचें जीवित व वित्त धोक्यांत आलें तर त्याच देशांत वावरणाऱ्या परकीयांचे प्राण व मालमत्ता हीं अगदीं बिनधोक राहावयाचीं कशी व त्याबद्दल परकीयांनीं चीनपाशीं काय म्हणून हमी मागावयाची? परकीयांना आपल्या प्राणाची जर इतकी पर्वा वाटत होती तर त्यांनीं चीन देशास युद्धसमाप्तीपर्यंत किंवा कायमचा रामराम ठोकून स्वदेशास चालते व्हावयाचें होतें. चीन देश चिनी लोकांकरितां होता, परकीयांकरितां नव्हता. युरोपियन लोक चीन देशांत जो व्यापार करीत होते, तो स्वतःचे खिसे भरण्याकरितां, चिनी लोकांच्या डोक्यावर सोन्याची खोळ घालण्याकरितां खास नव्हे. तर मग त्यांनीं आपल्या सुरक्षितपणाची सबब राष्ट्रीय सरकारास सांगून त्यांच्या चालत्या गाड्यास खीळ कां घालावी? चीनची प्रगति इंग्लंड आदिकरून परराष्ट्रांस देखवत नव्हती असा आक्षेप त्यांच्या विरुद्ध याच खोडसाळपणामुळें घेण्यांत येतो. त्यांनीं याच खोडसाळपणामुळें नानकिंग, हँकौ व सिनानफू येथें घोळ घालून व युद्धाची तंबी देऊन चीनसमोर आपल्या फौजा नाचविल्या; परंतु त्यांचाच आपसांत मेळ नसल्यामुळें त्यांची युद्धाची गुरमी जागच्या जागींच जिरली, ही गोष्ट निराळी.

चीनच्या राष्ट्रीय पक्षास वरील रीतीनें बाह्य शत्रू जसे भोंवले त्याचप्रमाणें अन्तस्थ दुहीनेंहि त्यांना भंडावलें. गेल्या वर्षी राष्ट्रीय पक्षांतच फूट पडून समाजसत्तावादी राष्ट्रीयपक्ष व शुद्ध राष्ट्रीयपक्ष असे दोन तट उद्भवले. त्यामुळें राष्ट्रीय पक्षाचें बळ दुभंगलें, त्याची घडी बिघडली व त्याचा यशस्वी सेनानी चँगकैशेक यास अज्ञातवासांत निघून जावें लागून राष्ट्रीय पक्ष विरघळल्या

सारखा दिसला. कंतान हें राष्ट्रीय पक्षाचें आदिपीठ, तेंहि चिनी बोल्शेव्हिकांनीं अचानकपणें कबजांत घेतल्यामुळें तर राष्ट्रीय पक्षाच्या कर्तृत्वशक्तीवरील जगाचा विश्वासहि साफ उडाला. यापुढें चीनचें व बोल्शेव्हिकांचें इतकें विनसलें कीं, त्यांच्या वकिलासहि चीनदेशांतून पाय काढण्यावांचून गत्यंतर राहिले नाहीं. रशियाबरोबर चीनची असलेली गट्टी मोडल्यावर राष्ट्रीय पक्षास दारूगोळ्याचा व शस्त्रास्त्रांचा रशियांतून होणारा पुरवठाहि आटला आणि अन्य मार्गानें चिनास हत्यार-पात्यार मिळूं नये यासाठीं परराष्ट्रांनीं चीनच्या किनाऱ्याभोंवती पूर्वीपेक्षां अधिक नाकेबंदी केली.

या उपायांनीं कोंडलेला व दुहीनें पोखरलेला चिनी राष्ट्रीय पक्ष इतक्यांत डोकें काढील व थांबविलेली मोहीम सुरू करून पेकिंगची सत्ता पालथी घालील अशी आशा कोणास नव्हती. दोन महिन्यांपूर्वी राष्ट्रीय सैन्याची नौबत फिरून झडूं लागली तेव्हां त्याचा तळ यांगत्से नदीच्या आसपास होता. यांगत्से नदी ही कंतान व पेकिंग यांच्या बरोबर मध्यभागीं आहे. कंतानपासून यांगत्से नदीवरील नानकिंगपर्यंतचा मुलुख काबीज करण्यास राष्ट्रीय सैन्यास सुमारें वर्ष दीड वर्ष लागलें; पण त्या पुढची तेवढीच मजल मारून पेकिंगवर मोर्चे लावण्यास राष्ट्रीय सैन्यास अवघे दोनच महिने पुरले. नानकिंगपासून पेकिंगपर्यंतची हजार-आठशे मैलांची दौड दोन महिन्यांत आटोपली ही राष्ट्रीय सैन्याची बहादुरी होय. तिचें श्रेय जितकें राष्ट्रीयांच्या सैन्यास तितकेंच राष्ट्रीयांच्या शिस्तीस व संघटनेसहि देणें जरूर आहे. चिनांतील शेतकरी, कामकरी व विद्यार्थी यांनीं पेकिंग सरकारावर लुब्ध व्हावें असा एकहि गुण त्या सरकारांत नव्हता. त्यांच्यांत धडाडी नव्हती, कर्तृत्व नव्हतें आणि प्रजारक्षणाची व स्वातंत्र्यसंपादनाची हिंमतहि नव्हती.

अशा निर्गुण व निराकार सरकाराविषयीं उदासीन बनलेल्या लोकांस राष्ट्रीय पक्षानें जवळ ओढलें, त्यांचे संघ स्थापन केले व त्यांच्या हृदयांत देशभक्तीचें अमृत ओतून त्यांचा पूर्ण विश्वास संपादन केला. या कारणानें पेकिंग सरकाराविरुद्ध चीनचें सारें घरच फिरलें मग अंगणानेंहि कां फिरूं नये? पेकिंगच्या सैन्यांतील सैनिक फितलेले व सेनापति फितलेले, तें सैन्य ज्या रणमैदानावरून हिंडे तें रणमैदान फितलेलें व तें सैन्य ज्या खडकावर आधाराकरितां पाय ठेवी तो खडक खालून पोखरलेला. अशा या पोकळ डोलाऱ्याला राष्ट्रीय पक्षानें फिरून एकजूट करून एकच धक्का देण्याचा अवकाश कीं तो डोलारा गडगडून कोसळणार हें देवच बोलला होता.

दोन महिन्यांपूर्वी राष्ट्रीय पक्षाचीं दोन शकलें एकत्र सांधलीं गेलीं व त्यांचें रशियन बोल्शेव्हिकांशीं पुन्हां संधान जमून त्यांजकडून थांबलेली मदत पुन्हा चोरून येऊं लागली. राष्ट्रीय सैन्याच्या अग्रभागीं चँगकैशेक, फेंग यू सियांग व येन शीशान हे सेनापति चमकत आहेत. त्यांपैकीं फेंग यू सिआंग यांस बोल्शेव्हिकांचें पाठबळ आहे व प्रसिद्ध हिंदी क्रांतिकारक महेंद्रप्रताप हा त्याचा मदतनीस आहे. राष्ट्रीय पक्षानें आपसांतील फूट मिटवून व सर्व साधनें एकवटून पेकिंग सरकारास शह दिला, त्यामुळेंच पेकिंगपर्यंतचा मुलूख व अखेरीस पेकिंग शहरहि त्यास सर करतां आलें. जगांतील एक चतुर्थांश मनुष्यवस्ती एकट्या चीन देशांत आहे. अनेक शतकें घोरत पडलेला एवढा प्रचंड राक्षस सावध होऊन खडा झाला. आशियाटिक राष्ट्रांच्या दृष्टीनें इतकी अभिमानास्पद, आशाजनक, आश्चर्यकारक व आनंददायक गोष्ट गेल्या कित्येक शतकांत घडली नाहीं. हिंदुस्थान, ब्रह्मदेश, चीन यांसारखीं आशियाखंडांतील प्रमुख राष्ट्रें युरोपखंडाच्या पाशांत सांपडलीं म्हणून सबंध आशियाखंड गुलामगिरीनें जखडला गेला. हीं प्रचंड राष्ट्रें ज्या क्रमानें स्वतंत्र होत जातील त्याच क्रमानें आशियाखंडास लागलेलें पारतंत्र्याचें ग्रहण सुटणार आहे. रशिया हा देश मूळचा युरोपियन गणला गेलेला खरा; परंतु तो बोल्शेव्हिक बनल्यामुळें युरोपियन व ख्रिश्चन राष्ट्रांच्या गोतावळ्यांतून पिढी तोडून निघाला असून भांडवलवाल्या युरोपियन राष्ट्रांचें जगावरील वर्चस्व उठाविणें हेंच ब्रीद त्यानें सांप्रत स्वीकारल्यामुळें त्याचें साहाय्य चिनास मिळालें.

रशिया व जपान यांची सध्या जूट जमण्याच्या बेतांत आहे. चीन आतां जिवंत झाला आहे तसाच तो आपल्या करामतीनें व नैसर्गिक साधनसंपत्तीमुळें सामर्थ्यवान बनल्यास त्यास आपल्या जुटींत सामील करून घेणें जपान व रशिया यांस भाग पडेल. कांहीं विशिष्ट अटीवर त्रिवर्गाची जूट जमून आल्यानें युरोपियन राष्ट्रांच्या जुटीस हा जबरदस्त प्रतिस्पर्धी निर्माण होईल. हिंदुस्थानच्या पश्चिमेस तुर्कस्थान, इराण व अफगाणिस्थान हीं मुसलमानी राष्ट्रें आपला संघ स्थापन करीत आहेत तसाच हिंदुस्थानच्या पूर्वेस पीतराष्ट्रांचा संघ स्थापन झाल्यास या दोन संघांच्या प्रभावानें पुढील पांचपंचवीस वर्षांत आशिया खंडांतील युरोपियन साम्राज्यसत्तेस मूठमाती मिळून गेल्या दोनतीनशें वर्षांत युरोपखंडाचें जड झालेलें बूड हलकें होऊन आशिया खंडाचें दैव उघडल्यावांचून राहाणार नाहीं.

पण या सर्व मनोराज्याचा डोलारा चीनाच्या उदयोन्मुख सत्तेस स्थैर्य येण्यावर अवलंबून

आहे. राष्ट्रीय पक्षानें पेकिंगवर आपलें निशाण उभें केलें आहे व त्याचा पुढचा बेत पेकिंग या एका बाजूच्या शहरीं राजधानी न ठेवतां नानकिंग येथेंच कायम ठेवण्याचा आहे. राष्ट्रीय पक्ष लवकरच आखिल चीनची जंगी परिषद भरविणार असून तिच्यांत पुढील राज्यघटनेचा विचार होणार आहे. राष्ट्रीय सरकारास मजबुती आणून त्याचा चिनी राष्ट्राशीं एकजीव करण्याच्या दृष्टीनें ही योजना फार दूरदर्शीपणाची आहे. चीन हा देश अवाढव्य आहे. त्यांत मनुष्यवस्ती अगणित आहे. लोकसत्तेचें पिढीजाद वळण त्यास नाहीं व सर्व समाज ज्यास विभूतीचा मान देऊन त्याच्या अर्ध्या वचनांत राहील अशी अद्वितीय व्यक्तीहि त्याच्या-शिरोभागीं नाहीं. रशियास लेनिन व तुर्कस्थानास मुस्ताफा लाभला यामुळें या दोन्ही देशांतील बंडाळी मोडून व त्यांतील सर्व पक्षास कह्यांत ठेवून राज्य राखणें त्यांस सोपें गेलें. डॉ. सन्यत्सेन याच्या मृत्यूनंतर चीनच्या वाट्यांस अशा प्रकारची थोर विभूति आलेली नाहीं. आणि मागील फुटीचा वृत्तान्त लक्षांत घेतां चिनास आपल्या आवळ्यांची मोट बांधणें कठीण जाईल अशीहि भीति वाटते.

परंतु हीहि परिस्थिति एका अर्थानें इष्ट अशीच आहे. खरी लोकसत्ता व्यक्तिनिष्ठ असत नाहीं. ती समाजाच्या विस्तृत आसनावरच अधिष्ठित असते व असावी लागते. अशा प्रकारची लोकसत्ता विभूतीच्या अभावीं निर्माण करण्यावांचून व ती टिकविण्यावांचून चिनास गत्यंतर नाहीं. ती उत्पन्न करतांना व टिकवितांना अनेकवार नष्ट होईल व ढासळेलहि; परंतु अशा झटापटींतून जन्मास येणारी सत्ताच अखेर जीव धरील. या दृष्टीनें रशिया व तुर्कस्तान यांतील लोकसत्तेच्या प्रयोगापेक्षां चिनांतील प्रयोग लोकसत्तेच्या मूलभूत तत्त्वांना अधिक जवळचा होय. हिंदुस्थान व चीन या दोन देशांत धर्म, समाज व परिस्थिति या बाबतींत पुष्कळ साम्य असल्यामुळें चिनांतील लोकसत्तेचा नवा प्रयोग हिंदुस्थानास कांहीं अंशीं वस्तुपाठासारखा यापुढें उपयोगी पडल्यावांचून राहाणार नाहीं. स्वातंत्र्यसूर्य उगवत उगवत पूर्वेस हिंदुस्थानच्या क्षितिजापर्यंत आला आहे. त्याच्या रथाच्या घोड्यास ज्या चीननें येथवर खेचीत आणिलें त्या चीनचा जयजयकार हा पौर्वात्य राष्ट्रांच्या स्वातंत्र्यसूर्याचाच जयजयकार नव्हे काय ?

# मिरज संस्थानांतील सारावाढ.

( ले. बाळकृष्ण विठ्ठल शिखरे, मिरज )

मिरज संस्थानांतील रिव्हिजन सर्व्हे चार वर्षांपूर्वी झाली. त्या वेळीं पुष्कळ विचारी गृहस्थांना असें वाटलें कीं, श्रीमंतांनीं रिव्हिजन सर्व्हे करून घेतली तरी सारावाढ होणार नाहीं.

मिरज संस्थानाचे लक्ष्मेश्वर, मोडनिंब व मिरज असे तीन तालुके आहेत. पैकीं मिरज तालुक्याचा सर्व्हेरिपोर्ट तयार होऊन, त्याप्रमाणें सारावाढ जाहीर झाली आहे. राहिलेल्या दोन तालुक्यांची सारावाढहि लवकरच जाहीर होणार आहे.

मिरज तालुक्यांत एकंदर २९गांवें नमूद करण्यांत आलीं असून त्या सर्व्हे गांवाची मिळून प्रथम सर्व्हेप्रमाणें ८४९६० एकर जमीन, हिशेबीं धरली आहे.या सर्व जमिनीचा आकार प्रथम सर्व्हेप्रमाणें रु.१,१०,८२३आहे. म्हणजे सरासरी एकरीं रु. १-४-१० पडतो. नवीन सर्व्हेप्रमाणें,एकरामध्यें ११८५ एकरांची वाढ दाखविण्यांत आली असून (८६१४५) आकारामध्यें रु. ६२६०९ ची वाढ करण्यांत आली आहे. म्हणजे एकंदर आकार रु.१, ७३,४३, २ धरण्यांत आला आहे. नवीन वाढीनें सारा सरासरी रु. २-०-२ पडतो, म्हणजे शेंकडा वाढ, ५६·४ इतकी करण्यांत आली आहे. प्रथम सर्व्हेमध्यें, पद्धतीप्रमाणें चार ग्रूप्स असून, त्यामध्यें एकरी जास्तींत जास्त खालीं दिलेल्या कोष्टकाप्रमाणें आकार घेतला जात असे.

| | जिराईत | | भातजमीन | | बागाईत | |
|---|---|---|---|---|---|---|
| ग्रूप नं. | प्रथम सर्वे | नवीन सर्वे | प्रथम सर्वे | नवीन सर्वे | प्रथम सर्वे | नवीन सर्वे |
| १ | ३–०–० | ४–६–० | ८–०–० | ८–०–० | ५–०–० | १०–०–० |
| २ | २–८–० | ३–४–० | ८–०–० | ८–०–० | ११–०–० | १३–०–० |
| ३ | १–८–० | २–०–० | ८–०–० | ८–०–० | ५–०–० | ८–०–० |
| ४ | १–४–० | १–१४–० | ६–०–० | ८–०–० | ५–०–० | ६–०–० |

यानंतर, प्रथम सर्वेच्या वेळीं ग्रूपच्या क्रमानें, एकंदर जिराईत, भातजमीन व बागाईत किती एकर जमीन होती व आतां नवीन वाढ अगर घट किती झाली आहे हें समजण्याकरितां खालील आंकडे दिले आहेत.

## जिराईत

| ग्रूप नं. | एकर | आकार | सरासरी | नवीन सर्वे | एकर | आकार | सरासरी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २२६५६ | ५८८१७ | २–९–६ | ,, | २१५३७ | ९२३०३ | ४–४–७ |
| २ | १८२७४ | १७१५० | ०-१५-० | ,, | १८०१० | २८५११ | १–९–४ |
| ३ | १३३३२ | १३४७७ | १–०–२ | ,, | १२९४१ | १९८६८ | १–८–७ |
| ४ | २७९९३ | ७८६६ | ०–४–६ | ,, | २८२७४ | ११९९६ | ०–६–९ |
| | ८२२५५ | ९७३१० | १-२-११ | | ८०७६२ | १५२६७८ | १-१४-१० |

## भातजमीन

| ग्रूप नं. | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १–४ | २४ | ४९ | २–०–८ | ,, | २३ | १०८ | ४–११–२ |

## बागाईत

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ५४१ | २८३४ | ५-३-१० | ,, | १२०७ | ५८२६ | |
| २ | ८६४ | ६५४६ | ६-९-३ | ,, | १५९५ | ८९२९ | |
| ३ | ३२१ | १२५४ | ३-१४-६ | ,, | ७८२ | २०३० | |
| ४ | ९५५ | २८३० | २-१५-५ | ,, | १७७६ | ३८६१ | |
| | २६८१ | १३४६४ | ५-०-४ | ,, | ५३६० | २०६४६ | ६-९-९ |

मिरज तालुक्याची एकंदर वाढ जरी सरासरीनें ५६'४ या प्रमाणांत झाल्याचें वर दिलें आहे तथापि कांहीं गांवांस हीच वाढ शेंकडा ७८'३४ पर्यंत झाल्याचें पाहून रयतेच्या पोटांत धडकी भरली आहे व हें अगदीं साहजिक आहे! एकाच वेळीं इतकी बेसुमार वाढ इतर कोणत्या गांवी एकदम केल्याचें आमच्या ऐकण्यांत नाहीं.

वाढत्या सोयीबरोबर गरजाहि वाढतात व वाढत्या गरजांबरोबर खर्चहि वाढतो हें ठरलेलेंच आहे. आणि खर्च वाढला कीं उत्पन्नहि वाढलें पाहिजे हा खुलासा गैरहिशेबी कोण म्हणणार? परंतु सोयी न वाढतां गरजाच वाढल्या, आणि त्यामुळें खर्च वाढला म्हणजे 'भीक नको, पण कुत्रें आवर' असें म्हणण्याची पाळी येते!

श्रीमंतांनीं आणखी वीस वर्षेपर्यंत पुनः सारावाढ होणार नाहीं असें स्वतः बंधन घालून घेतलें आहे. परंतु ही मुदत फार थोडी आहे. आमची अशी प्रार्थना आहे कीं, जास्तींत जास्त शेंकडा २५ टक्के वाढ, फार फार तर करावी व ती प्रत्येक पांच वर्षांनीं सवासहा टक्के याप्रमाणें वीस वर्षांत पुरी करावी. याशिवाय, जी वाढ होईल तिचा केवळ प्रजेच्या सुखसंवर्धनाकडेच उपयोग केला जाईल, असें श्रीमंतांनीं एक वेळ जाहीर रीतीनें आश्वासन देण्याची मेहरबानी करावी.

मिरज तालुक्यांतील रयतेसहि आमची अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनी आपली सर्व स्थिति लक्षांत घेऊन, जाहीर केलेली 'सारावाढ' ही आपल्यास तारणारी नसून मारणारी आहे, याकरितां इतकी वाढ होऊं नये म्हणून ता. २३ जून १९२८ च्या आंत रा. ब. कारभारीसाहेब व श्रीमंत सरकार यांजकडे विनंतिअर्ज पाठविण्यास कचरूं नये. या वेळीं अज्ञान, आळस, भ्याडपणा वगैरेस रजा देऊन, आपल्या राजाच्या नजरेस, आपली खरी स्थिति आणिली पाहिजे. आपल्या खऱ्या अडचणी उघडपणें राजास कळविण्यांत राजनिष्ठा हिणकस ठरत नसून उलट सतेज दिसते हें तत्त्व उराशीं बाळगून कामास लागलें पाहिजे. दिनावाधि उपयोगी नाहीं. व्यक्तिशः व सामुदायिक रीतीनें अर्जावर अर्ज, श्रीमंतांकडे, पाठविल्यास, श्रीमंत त्या अर्जांचा विचार केल्याशिवाय राहातील, अशी आमची मनोदेवता आम्हाला अद्याप सांगत नाहीं.

# श्रीशिवाजीमहाराजांच्या पुतळ्याचा अनावरण–समारंभ

ता. १६ रोजीं संध्याकाळीं पुणें येथील नव्या पुलापलीकडील शिवस्मारकाचे जागेंत श्री. शिवाजी-महाराजांच्या अश्वारूढप्रतिमेचा अनावरणसमारंभ नेक नामदार गव्हर्नरसाहेबांचे हस्तें मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. पुलाच्या अलीकडील महायुद्धाच्या स्मारकापासून पलीकडील शिवाजी स्मारकापर्यंत गव्हर्नरांची लवाजम्यासह मोठ्या थाटाची मिरवणूक काढण्यांत आली. मिरवणुकीसाठीं हा रस्ता पताकांनीं व कमानींनीं सुशोभित करण्यांत आलेला असून मराठा व कोल्हापूर लाइट इन्फंट्रीज व चेशायर रेजिमेंटमधील शिपाई दुतर्फा उभे केलेले होते. अलंकारांनीं व जरतारी झुलींनीं शृंगारलेले हत्ती,-घोडे व उंट यामुळें या मिरवणुकीला दरबारी व बरोबर चालणाऱ्या रिसाल्यामुळें थोडेसें लष्करी स्वरूप प्राप्त झालें होतें. खुद्द गव्हर्नरसाहेब आपल्या पत्नीसह मुख्य हत्तीवरील चांदीच्या हौद्यांत बसले होते! मिरवणूक पाहावयास हजारो लोक भोंवतीं जागोजाग उभे होते. महायुद्धांत साम्राज्याच्या शत्रूंशीं लढतांना पडलेल्या मराठे शिपायांच्या स्मारकापासून पावणेपांच वाजतां मिरवणुकीस आरंभ झाला व स्वराज्य-संस्थापक श्रीशिवछत्रपतींच्या स्मारकापर्यंतचें तीनशें वर्षांचें अंतर तिनें अवघ्या अर्ध्या तासांत आक्रमण केलें.

समारंभासाठीं स्मारकाच्या जागेंत विस्तीर्ण मंडप उभारलेला होता व दहा हजारांवर लोक मंडपांत हजर होते. मंडपांतील उच्चासनावर गव्हर्नरसाहेब, त्यांच्या पत्नी व स्मारकमंडळाचे अध्यक्ष कोल्हापूरचे महाराज यांच्या खुर्च्या मधोमध मांडलेल्या होत्या. उजव्या बाजूस संस्थानिकांसाठीं व डाव्या बाजूस वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांसाठीं व मागल्या बाजूस स्मारकमंडळाच्या सभासदांसाठीं जागा ठेवलेल्या होत्या. सरदार, इनामदार, सरकारी अधिकारी, पदवीधर, स्त्रिया, वकील, धंदेवाईक वगैरे लोकांसाठीं मंडपांतील निरनिराळ्या चौकांत व्यवस्था केली होती. कोल्हापूर, खैरपूर, सांगली, जमखंडी, औंध, भोर, मिरज, फलटण, रामदुर्ग, मुधोळ, सावंतवाडी वगैरे संस्थानांचे अधिपति, नागपूरचे राजे लक्ष्मणराव आणि ग्वाल्हेर, इंदूर, बडोदा, देवास, धार वगैरे संस्थानांचे प्रतिनिधी, मुंबईसरकारचे दिवाण व कौन्सिलर आणि दक्षिणविभागांतील मुख्य लष्करी अधिकारी, मंडपांतील उच्चासनावर प्रामुख्याने दिसत होते. पुण्यांतील बरेच प्रमुख नागरिक हजर होते. मुंबईहून बरेच लोक समारंभाकरितां खास सोडलेल्या गाडींतून आले होते.

मिरवणूक स्मारकभूमीच्या महाद्वाराजवळ येतांच कोल्हापूरचे महाराज, श्री. सांगलीकर व स्मारकमंडळाचे सभासद यांनीं ने. ना. गव्हर्नर यांचें स्वागत केलें. मंडपांत येऊन सर्व मंडळी आपल्या जागांवर बसल्यानंतर कोल्हापूरचे श्री. छत्रपति राजाराम महाराज यांनीं स्मारकमंडळाचे अध्यक्ष या नात्यानें भाषण केलें. सभास्थानीं अतोनात गर्दी झालेली होती व ध्वनिप्रसारकांची योजना केलेली नव्हती यामुळें महाराजांचें भाषण फक्त उच्चासनाच्या आसपासच ऐकूं येत होतें. नेक नामदारांना पुतळा अनावृत करण्याची विनंति करतांना महाराजांनीं स्मारकाचा इतिहास थोडक्यांत सांगून मंडळाला या कामीं मदत करणारांचा गौरवपूर्वक उल्लेख केला. नंतर महाराज म्हणाले कीं, एक काळ असा होता कीं, जेव्हां महाराष्ट्रांतील एका राजकीय पक्षाकडून शिवाजीच्या स्मृतीचा एखाद्या शस्त्रासारखा उपयोग करण्यांत येत होता, म्हणून या महन्नामाचा ज्या चळवळीला संपर्क झालेला असेल तिच्यामध्यें भाग घेण्याला त्या काळीं पुष्कळांना भीति वाटत असे. सात वर्षांपूर्वी युवराजांनीं या स्मारकाच्या पायाचा दगड बसवून देशाभिमान जागृत करणाऱ्या या चळवळीशीं आपलें नांव निगडित करून ठेवलें याबद्दल त्यांचे आभार कोणत्या शब्दांनीं मानावें हेंच मला समजत नाहीं. मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड लॉईड यांनीं उत्साहानें व आपुलकीच्या भावनेनें या कामीं पुढाकार घेऊन स्मारक-मंडळाला वेळोवेळीं साह्य केलें नसतें तर या चळवळीची जबाबदारी शिरावर घेण्याचा मला धीर झाला नसता. सहानुभूतीबद्दल लॉर्ड रेडिंग व लॉर्ड आयर्विन यांचे, औदार्यानें दिलेल्या देणग्यांबद्दल ग्वाल्हेरचे व इंदूरचे माजी महाराज यांचे आणि सहकार्याबद्दल स्मारकमंडळाच्या सभासदांचे आभार मानून महाराजांनीं शिल्पकार श्री. करमरकर यांचा गौरपूर्वक उल्लेख केला. हा पुतळा भावी पिढ्यांना चैतन्य व स्फूर्ति देत राहील अशी आपल्याला खात्री वाटत असल्याचें सांगून सहा वर्षांपूर्वी पायाचा दगड बसवितांना युवराजांनीं काढलेल्या उद्गारांची महाराजांनीं आठवण करून दिली. युवराज त्या वेळीं म्हणाले होते कीं, हिंदुस्थानांतील एका महावीराचा व मुत्सद्याचा हा पुतळा महायुद्धांत पतन पावलेल्या आपल्या वीरांच्या नदीपलीकडील स्मारकाकडे मोठ्या अभिमानानें पाहात राहील"! असे भाषण करून महाराजांनीं नेक नामदारांना पुतळा अनावृत करण्याची विनंति केल्यानंतर स्मारकाच्या कार्यकारी मंडळाचा अहवाल चिटणिसांनीं वाचून दाखविला.

ग्वाल्हेर व कोल्हापूर येथील माजी महाराजांच्या

प्रयत्नांमुळें आणि लॉर्ड रेडिंग व लॉईड यांच्या मदतीनें युवराजांनीं स्मारकाच्या पायाचा दगड बसविण्याचें कबूल केल्याची व त्या वेळच्या समारंभाची हकीकत सांगितल्यावर त्यांनीं स्मारककार्याची माहिती सांगितली. ते म्हणाले, " स्मारकाच्या कार्याचे तीन विभाग पडतात. त्यांपैकीं अश्वारूढ प्रतिमा उभारण्याचा पहिला भाग आज पुरा होत आहे. स्मारकभूमीवर सभागृह व ग्रंथसंग्रहालय यांसाठीं इमारती बांधणें हा स्मारकाचा दुसरा विभाग होय. इमारती बांधण्याचें काम रा. सा. ठुबे यांजकडे सोपविलेलें असून या कामीं सुमारें चार लाख रुपये खर्च व्हावयाचे आहेत. या कामाला पावसाळ्यानंतर सुरवात होईल. शेवटचें पण सर्वांत अधिक महत्वाचें कार्य म्हणजे मराठी इतिहासाच्या संशोधनासाठीं ग्रंथ व वस्तुसंग्रहालय निर्माण करणें व संशोधनासाठीं कायम—निधि उभारणें हें होय. मंडळाने ७ लक्ष ८८ हजार रुपये जमविले आणि पुतळा व प्रास्ताविक बाबी यांसाठीं २ लक्ष २७ हजार रुपये खर्च केले; २ लक्ष ५४ हजार रुपये अजून वसूल व्हावयाचे आहेत. शेवटीं महाराजांविषयीं आदर बाळगणाऱ्या लक्षावधि लोकांनीं स्मारकनिधीला मदत करावी अशी विनंति करून त्यांनी आपलें भाषण संपविलें.

नंतर महाराजांसह पुतळ्याच्या जागीं जाऊन गव्हर्नरांनीं पुतळ्यावरील आवरण दूर केलें. शिवाजीमहाराजांची स्वातंत्र्यप्रीति इतकी जाज्वल्य होती कीं, हें औपचारिक अनावरण होण्यापूर्वीच त्यांच्या सह्याद्रींतून वाहात येणाऱ्या वाऱ्यानें त्यांच्या पुतळ्यावरील आवरण भिरकावून दिलें होतें! आकाश मेघांनीं व्याप्त झाल्यामुळें संध्याकाळपासून अंधार पडला होता, पण अनावरण होतांच मेघ बाजूला झाले व संध्याकाळच्या कोंवळ्या उन्हांत छत्रपतींची प्रतिमा देदीप्यमान दिसूं लागली. मंडपांत व स्मारकभूमीभोंवतीं जमलेल्या लोकांनीं टाळ्यांचा कडकडाट केला व महाराजांच्या स्मृतीला एकोणीस तोफांची सलामी देण्यांत आली. पुतळा ब्रॉंझ धातूचा असून १४ फूट उंच आहे व त्याचें वजन सुमारें ११ टन आहे.

नंतर गव्हर्नरांनीं उत्तरादाखल भाषण केलें. प्रथम स्वतःला आलेल्या युवराज, लॉर्ड आयर्विन, मार्क्विस ऑफ रेडिंग, लॉर्ड गोशेन, फील्ड—मार्शल बर्डवुड यांच्या तारा वाचून दाखविल्या. नंतर भाषणाला सुरवात करून ते म्हणाले, "विशिष्ट पक्षानें व जातीनें आपल्या चळवळीला जोर येण्याचें साधन म्हणून शिवाजीच्या स्मृतीचा उपयोग करण्याचा काळ गेलेला असून आतां शिवाजी हा भारतीय वीर मानला जात आहे अशी माझी समजूत आहे. हें स्मारक हिंदी ऐक्यभावाचे द्योतक समजलें जाईल आणि केवळ एका मराठी महात्म्याचेंच नव्हे तर एका हिंदी विभूतीचें हें स्मारक मानण्यांत येईल असा मला विश्वास आहे." नंतर स्मारकाची योजना तडीला नेल्याबद्दल कोल्हापूरच्या महाराजांचा गौरव करून शिल्पकार श्री. करमरकर यांचें अभिनंदन करतांना ते म्हणाले, "शौर्याची मूर्तिमंत साक्ष देणाऱ्या ज्या भव्य पुतळ्याचें मी नुकतेंच अनावरण केलें तो तयार करणारे सुप्रसिद्ध शिल्पकार श्री. करमरकर यांचा उल्लेख केल्यावांचून मला राहवत नाहीं. ज्या महापुरुषाचें हें स्मारक आहे त्याच्या कीर्तीला साजेसा पुतळा तयार केल्याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. उत्साह, कर्तबगारी व बुद्धिमत्ता यांच्या जोरावर त्यांनी हें कार्य ठराविक मुदतींत पुरें केलें आहे." शिल्पकाराला बहुमोल मदत करणाऱ्या पी. ॲण्ड ओ. कंपनीचा उल्लेख करून आपलें भाषण संपवितांना ते म्हणाले. "मराठ्यांचें शौर्य व राजनिष्ठा ही कोणत्याहि प्रकारें कमी झालेलीं नाहींत अशी माझी खात्री आहे. नदीच्या दोन बाजूंना असलेलीं हीं दोन स्मारकें शिवाजीमहाराजांच्या देशांतील भावी पिढ्यांना स्फूर्ति देत राहतील अशी मला आशा आहे.

नंतर श्री. सांगलीकर यांनीं शिवचरित्रांतील कांहीं प्रसंगांचा उल्लेख करून महाराजांची योग्यता किती श्रेष्ठ दर्जाची होती याचें विवेचन केलें. नंतर नेक नामदार गव्हर्नर, लेडी विल्सन व निमंत्रित पाहुणे यांचें आभार मानून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. शेवटीं हारतुरे व अत्तरगुलाब होऊन हा समारंभ खलास झाला.

# बार्डोलीच्या सत्याग्रहाचें मर्म

गेल्या आठवड्यांत हिंदुस्थानांत सर्वत्र बार्डोलीदिन पाळण्यांत येऊन बार्डोलीच्या सत्याग्रही शेतकऱ्यांस सक्रिय सहानुभूति दाखविण्यांत आली, आणि सरकारच्या जुलमी धोरणाचा व अत्याचाराचा निषेध करण्यांत आला. पण नोकरशाही व तिचे पाठीराखे यांनीं एखादी चळवळ हाणून पाडावयाची असें ठरविलें म्हणजे सत्यासत्याची चाड न बाळगितां त्या चळवळीला विकृत स्वरूप देण्याचा सरकारचा उद्योग सुरू होतो. बार्डोलीच्या लढ्यासंबंधानेंहि सरकारची आतां हीच कारवाई सुरू झाली आहे. कायदेमंडळानें दोन वेळां पास केलेला सारावाढीच्या तहकुबीचा ठराव सरकारनेंच झुगारून दिला; बार्डोली तालुक्यां-

तील खेड्यांतून हिंडून शेतीची स्थिति न पाहतां चुकीच्या आंकड्यांवरून भलतीच आकारणी करण्यांत आली आणि त्या आकारणीचा फेरविचार होण्याकरितां एक कमिटी नेमावी अशी साधी मागणी केली असतां तीहि नाकबूल करून सरकारनेंच आडदांडपणानें वाढता सारा वसूल करण्याचा हुकूम दिला. आणि जणुं काय एवढ्या घोडचुका पुरेशा न वाटून जप्तीच्या कामाकरितां पठाणांच्या हातीं सत्ता देण्याच्या उन्मत्तपणाची त्यांत भर घातली! आणि आतां स्वतःच्या चुकांवर पांघरूण घालण्याकरितां, या जुलमाचा सनदशीरपणानें प्रतिकार करणाऱ्या व त्याकरितां सर्वस्वाची होळी करण्यास सिद्ध होणाऱ्या बार्डोलीच्या शेतकऱ्यांसच, सरकार उलट बेसनदशीर बंडखोर ठरवूं पाहात आहे!

बार्डोलीच्या शेतकऱ्यांनीं जितके सनदशीर उपाय योजावयाचे तितके सगळे योजिले. पण मदांध नोकरशाहीची धुंदी कमी न होतां तिनेंच जेव्हां कायदेमंडळाविरुद्ध बंडखोरी सुरू केली त्या वेळीं बार्डोलीच्या रयतांनींहि बंडखोरीच्या प्रतिकारासाठीं जशास तसें हा मार्ग स्वीकारला. त्यांचें वर्तन जर बेसनदशीर असेल तर त्याचा दोष स्वतः तसें वर्तन प्रथम करणाऱ्या नोकरशाहीकडेच येतो. कायदेमंडळाच्या संमतिविना रिव्हिजन सेटलमेंट करूं नये व सारावाढ होऊं नये असे ठराव दोन वेळां कायदेमंडळांत पसार झाले असतां स्वार्थलोलुप सरकारनें त्या ठरावाविरुद्ध आपणच प्रथम बंडखोरी सुरू केली. आणि आतां तिचा प्रतिध्वनि बार्डोलींतून कानीं पडतांच सरकार 'शांत पांपं' म्हणून कानावर हात ठेवूं पाहात आहे! परंतु सरकार म्हणेल ती पूर्वदिशा मानण्याचें अंध-श्रद्धेचें युग संपून गेलें असल्यानें सरकारने आतां कसलीहि कारवाई केली तरी जनता आपले हक्क पूर्वीसारखे सरकारला बिनतक्रार लुबाडूं देणार नाहीं हें निश्चित आहे.

बार्डोलीस सध्या जो सत्याग्रह चालू आहे त्यांत वादाचे मुद्दे अनेक आहेत. सरकारनें परदेशी, आडदांड व पाषाणहृदयी पठाण आणून त्यांच्या हातीं जप्तीचा अधिकार दिला हा सरकारी जुलमाचा कळस होय! पठाणांच्याविरुद्ध प्रसिद्ध होणाऱ्या कागाळ्या खऱ्या नाहींत, निदान अतिशयोक्तीच्या आहेत आणि पठाणांचें वर्तन अगदीं सोज्वळ आहे अस म्हणून सरकारनें त्रयस्थांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचा प्रथम प्रयत्न केला. पण पठाणांचा नंगा नाच प्रतिज्ञापूर्वक दिलेल्या जबानींनें सिद्ध होत असलेला पाहून सरकार दुसऱ्या लंगड्या सबबी पुढें करूं लागलें आणि तेवढ्यानेंहि हा बोभाटा मिटण्याचा रंग दिसेना तेव्हां निष्कारण गैरसमज राहूं नये म्हणून पठाणांना आम्ही परत बोलावीत आहों असा सरकारनें कांगावा सुरू केला आहे! एवढी घोडचूक दुरुस्त करतांना देखील चुकी कबूल करण्याचा प्रांजलपणा न दर्शवितां सरकार उलट आत्मसमर्थनच करीत आहे. यावरून सरकारची दानत किती भ्रष्ट झाली आहे तें दिसून येतें. पठाण परत बोलावण्याचें एक कारण असें सांगण्यांत आलें आहे कीं आतां पावसाळा सुरू झाल्यामुळें पठाणांचें तेथे काम राहिलें नाहीं! जणूं काय जप्तीचें काम पावसाळ्यांत होऊंच शकत नाहीं किंवा उन्हाळ्यांत मात्र जप्तीकामगारांना पठाणांची मदत लागते. पण पावसाळ्यांत साधे पोलीस पुरे होतात!

जप्तीच्या कामीं आपण पठाणांची नेमणूक केली यांत आपण जगावेगळें कांहीं केलें नाही, कारण गुजराथेंतले अनेक सावकार वसुलीच्या किंवा पाहाऱ्याच्या कामावर पठाणांना नेमतात, असेंहि एक लंगडें समर्थन सरकारतर्फे सांगण्यांत येत आहे. पण वसुलीच्या कामीं कोणीहि पठाणाची नेमणूक केली तरी ती निंद्यच मानली जाते; कारण जे काम करण्यास इतर माणसें तयार होत नाहींत अशाच अबुंज कामाकरितां पठाणांची नेमणूक केली जाते हें सर्वश्रुत आहे. अर्थातच पठाणांची नेमणूक करणें म्हणजेच निष्ठुरपणाचा अतिरेक होय. पण खासगी व्यक्तीनें पठाण नेमणें आणि सरकारनें त्यांची नेमणूक करणें यांत जुलुमाच्या दृष्टीनें जमीनअस्मानाचें अंतर आहे, हें सरकारच्या लक्षांत येऊं नये काय? खासगी व्यक्तीनें वसुलीच्या कामावर नेमलेला पठाण नंगा नाच घालील किंवा बायकांवर हात टाकील किंवा गुरांना मरेमरेतों मारील तर सरकारचा कायदा त्यास तेव्हांच तुरुंग दाखविल्याशिवाय राहणार नाहीं. पण सरकारनेंच जप्तीचा अधिकार असल्या उडाणटप्पूंना दिला असतां त्यांच्या अत्याचारास जर कोणी नागरिक प्रतिबंध करूं लागेल तर सरकारी नोकरास त्याच्या कामांत अडथळा केल्याचा आरोप त्यावर येऊन प्रतिकार करणाऱ्या नागरिकासच तुरुंग पाहावा लागेल! बार्डोली तालुक्यांत पांचपन्नास पठाण एरवीं आले असते तर तेथील शेतकऱ्यांनीं त्याची फिकीर केली नसती. पण सरकार जेव्हां आपल्या कायद्याचें शस्त्र पठाणांच्या हातांत देऊन त्यांस निःशस्त्र प्रजेवर सोडून देतें त्या वेळेस सरकारच्या या राक्षसी कृत्याचा त्वेषानें धिःकार करणेंच प्राप्त होतें!

पण पठाणांचे अत्याचार हा या वादांतला गौण भाग आहे. पठाणांची जप्तीच्या कामीं नेमणूक झाली नसती तरी देखील सरकारची सारावसुलीची छळणूक गर्हणीयच मानली गेली असती आणि म्हणूनच पठाणांना परत बोलाविण्यांत आलें तरी मूळ वाद मिटूं शकत नाहीं. शेतसाऱ्याची आकारणी कोणत्या तत्त्वावर करावयाची, ती आकारणी करण्यांत शेतकऱ्यांचा किंवा त्यांनीं

निवडून दिलेल्या कायदेमंडळांतील प्रतिनिधींचा सल्ला घ्यावयाचा कीं नाहीं आणि असा सल्ला न घेतां, कायदेमंडळांची पायमल्ली करून,सरकार मनसोक्त सारा वाढवील तर तो सारा निमूटपणें द्यावयाचा कीं काय हा खरा वादाचा प्रश्न आहे. स्वार्थी सरकार प्रजेच्या कायदेशीर हक्काच्या मागणीला बंडखोरी म्हणत आहे. पण यांत सरकारचीच बाजू सपशेल चुकीची आहे. कायदे करणें व त्यांची बजावणी करणें,कराची आकारणी करणें व त्याची वसुली करणें, गुन्ह्यांना शिक्षा ठरवून ठेवणें व गुन्हेगारांची चौकशी करणें अशीं राज्यकारभाराचीं दुहेरी अंगें असतात. जेथें केवळ झोटिंग—पाच्छाई न चालवितां नियंत्रित राज्यपद्धति चालू असेल तेथें कायदे करणें, कर किती घ्यावा हें ठरविणें वगैरे गोष्टी लोकप्रतिनिधींच्या संमतीनें घडत असतात. आणि मग त्यांची बजावणी करण्याचा अधिकार मात्र सरकारच्या बजावणी खात्याकडे सोंपवून दिलेला असतो. कायदा रीतसर पास झाला असेल,किंवा कराची आकारणी पद्धतशीर रीतीनें झाली असेल, तर तिच्या बजावणीस हरकत घेणें ही बंडखोरी होय. पण जेथें कायदा पास झालेलाच नाहीं, किंवा जेथे कराची आकारणी कायदेशीर रीतीनें झाली नाहीं अशी तक्रार असेल व ती आकारणी कायदेशीर रीतीनें करा म्हणजे आम्ही वसूल देतों असें पुनः पुनः सांगण्यांत येत असेल तेथें, जें सरकार हा रीतसर मार्ग सोडून ' हम करे सो कायदा ' अशा आडमार्गांत शिरतें, तें सरकारच बंडखोरपणाचें बीं पेरून ठेवतें. बार्डोली तालुक्यांत जी सारावसुली सुरू आहे ती कायदेमंडळाच्या ठरावाला अनुसरून आहे कीं त्या ठरावाच्या विरुद्ध आहे याचें सर लेस्ली विल्सन यांनीं सरळ उत्तर द्यावें.

'अशा रीतीनें सरकार आपला अधिकार हातचा घालवील तर तें सरकार सरकार म्हणवून घेण्यालाहि लायक ठरणार नाहीं ' असें गव्हर्नरसाहेब लिहितात. पण यांत ते लोकांची दिशाभूल करीत आहेत. कर आकारण्याची सत्ता लोकप्रतिनिधींना देणें हें सुधारलेल्या सरकारचें उपलक्षण मानलें जातें. सरकारची ती शरणागति नसून लोकसत्तेचा तो गौरव होय. झारशाही नष्ट करून लोकशाही प्रस्थापित करण्याची ती पहिली पायरी आहे. आणि पूर्वीची झारशाही आजपासून नष्ट झाली असें अभिवचन नव्या सुधारणा—कायद्याच्या अन्वयें भरलेल्या पहिल्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत स्वतः त्या वेळचे व्हाइसरॉय व ड्यूक ऑफ कनॉट यांनीं दिलें आहे. पण नोकरशाही नव्या सुधारणा कितपत मानते तें बार्डोलींत चाललेल्या धुमाकुळावरून स्पष्ट होत आहे. तेथें झारशाही नष्ट झाल्याचें चिन्ह दिसत नसून उलट ती पुष्ट होत चालल्याचा अनुभव येत चालला आहे! लोकप्रतिनिधींच्या संमतीशिवाय नवीन कर बसविण्यांत येऊं नये या हेतूनें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें तरमबंदीचे नियम कायदेमंडळांत पसार करून घ्या असें सांगितलें. मुंबई-सरकारनें ती सूचना अमलांत आणली असती तर बार्डोलीचा हा लढा उपस्थित झालाच नसता. पण लँड रेव्हेन्यू बिलाची दुरुस्ती करण्याकडे सरकार असेंच दुर्लक्ष करील व इकडे रीतसर चौकशीशिवाय सारा बेसुमार वाढवीत जाईल तर हा जुलूम प्रजेनें किती दिवस सहन करावयाचा?

बार्डोली-दिनाचे दिवशीं भरलेल्या येथील जाहीर सभेंत पं. मदन मोहन यांनी म्हटल्याप्रमाणें असल्या गैरसनदशीर करवाढीला विरोध करणें हेंच प्रजेचें कर्तव्य होय. कारण तसा विरोध न होईल तर सरकार स्वतःला कायद्याचें नियंत्रण केव्हांच घालून घेणार नाहीं. अशा परिस्थितींत सत्याग्रह करणें हाच एक मार्ग प्रजेला मोकळा असतो व स्वातंत्र्येच्छु इंग्लिशांनीं याच मार्गाचें अवलंबन केलें आहे. 'शिप मनी'च्या आकारणीला हॅम्डननें विरोध केला याचें इंग्लिश ग्रंथकार केवढें कौतुक करतात! कोणीहि इंग्लिश ग्रंथकार हॅम्डनला बंडखोर किंवा बेसनदशीर म्हणत नाहीं. मग बार्डोलीच्या पुढाऱ्यांचीच वर्तणूक बेसनदशीर कशी? कायदा आम्ही मानीत नाहीं, असें बार्डोलीची रयत म्हणत नसून आधीं कायदा करा, निदान ज्यांच्यावर आमचा विश्वास आहे त्यांच्याकडून फेरचौकशी करवा आणि मग सारावसुली करा असेंच ती म्हणत आहे. पण झारशाहीची चटक लागलेल्या नोकरशाहीला आपल्या हातांतली अनियंत्रित सत्ता तिळमात्रहि कमी व्हावयाला नको आहे. अशा परिस्थितींत केव्हांना केव्हां तरी हा सनदशीर झगडा सुरू होण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

लोकप्रतिनिधींच्या रुकाराशिवाय साऱ्याचा आकार वाढविल्यास वसुलीच्या वेळीं नकारच कानीं पडला पाहिजे; त्याशिवाय सरकारची धुंदी उतरणार नाहीं. आणि झारशाही नाहींशी होणार नाही. आजपासून जुनी झारशाही गेली असें निश्चित समजा (The principle of Autocracy was definitely abandoned) असें जें व्हाइसरॉय व ड्यूक ऑफ कनॉट यांनीं सात वर्षांपूर्वी जाहीर आश्वासन दिलें तें कितपत पाळलें जात आहे हें पाहण्याचा हा प्रसंग आहे. झारशाही नष्ट होऊन तिच्या जागीं जर लोकशाही स्थापन व्हावयाची असेल तर 'प्रतिनिधींच्या रुकाराशिवाय कराचा आकार ठरवूं नये ' ( No taxation without representation) हें मूलतत्त्व प्रथम अमलांत आलें पाहिजे. हें तत्त्व अमलांत आणावयाचें हा तर नव्या सुधारणांचा मूळ

उद्देश होता व त्यास अनुलक्षूनच बादशहांच्या काकासाहेबांनीं दिल्लीच्या राजसभेंत झारशाही नष्ट झाल्याची जाहीर घोषणा केली. पण येथें पाहावें तें दुष्ट झारशाही नष्ट होण्याच्या ऐवजीं पुष्ट होऊन धिंगाणा घालीत आहे ! बार्डोलीचा शेतसारा वाढवितांना कायदे—कौन्सिलाची संमति घेतली का? नाहीं! तेथील शेतकऱ्यांची संमति घेतली कां ? नाहीं ! बरें, निदान योग्य भरपूर चौकशी तरी केली होती का ? नाहीं! सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर यांनीं ज्या तत्त्वावर आकारणी केली तें तत्त्व आंगलट येतें म्हणून अँडरसनसाहेबांनीं सोडून दिलें; आणि खंडाच्या आंकड्यावरून स्वतः वेगळी आकारणी केली. पण त्यांनीं गृहीत धरलेले आंकडे सपशेल चुकीचे ठरत आहेत! अशा रीतीनें सारावाढीच्या बुडाशीं असलेला पायाच कच्चा आहे. याकरितांच तो पाया पुनः तपासून पाहा असें वल्लभभाईंचें सांगणें आहे. यांत बंडखोरी ती काय झाली? सरकारनें चुकीचे आंकडे घेऊन करआकारणी केली असतां हे आंकडे खरे कसे ते दाखवा असें म्हणण्याची देखील जर चोरी असेल तर मुंबईसरकारनें हें सुधारणेचें सोंग टाकून देऊन आपलें खरें झोटिंग पातशाहीचें स्वरूप प्रकट करावें आणि मग खुशाल वाटेल तसा धिंगाणा घालावा !

आमदार मुनशी यांना लिहिलेल्या पत्रांत गव्हर्नरसाहेब पृच्छा करतात कीं, 'कारभार चालविण्याचा आपला अधिकार सरकारानें स्वतंत्र कमिटीच्या मतावर कां सोपवावा ? ' पण बार्डोलीच्या लोकांच्या मागणीचा हा विपर्यास होय. कारभार चालविण्याचा अधिकार वादग्रस्त नसून करभार लादण्याचा अधिकार वादग्रस्त आहे. करभार लादण्यापूर्वी चौकशी तरी केली पाहिजे ना? जी चौकशी केली असेल तिच्यांतले आंकडे तरी खरे असले पाहिजेतना ? मग आपण घेतलेले आंकडे चुकीचे नसून अगदीं बरोबर आहेत असे स्वतंत्र कमिटीपुढें सिद्ध करण्यास सरकारनें कां भ्यावें? कमिटीनें सरकारी हिशेब बरोबर आहे असे मत दिल्यास कमिटी ठरवील तो सारा देण्यास बार्डोली तयार आहे. इतक्या उघडपणें हें जाहीर आव्हान दिलें असतां सरकार ज्याअर्थी तें स्वीकारीत नाहीं त्याअर्थी कोठें तरी पाणी मुरतें आहे असा जनतेला संशय कां येऊं नये? अँडरसन यांचे आंकडे न्यू साहेबांनीं तपासले आणि हॅचसाहेबांनीं त्या आंकड्यांची फेरतपासणी करून ते बरोबर असल्याची खात्री करून घेतली असें सर लेस्ली विल्सन लिहितात. पण हा असला मांजराला उंदराची साक्ष देण्यासारखा आणि पडद्याआडून होणारा चोरटा कारभार कां ? डेव्हेलपमेंट खात्याचा गुप्त गोंधळ उघडकीस आणण्याकरितां कमिटी नेमण्यांत आली तेव्हां सरकारी अधिकाऱ्यांचीं एस्टिमेटें कितपत विश्वसनीय असतात तें सर्वांच्या नजरेस आलेंच आहे. मग ती चौकशी करावयास जशी कमिटी नेमली गेली तशी बार्डोलीच्या सारा आकारणीची चौकशी करण्यास कमिटी नेमण्यांत सरकारला कमीपणा कां वाटावा !

बार्डोलीच्या वादांतील खरें मर्म काय आहे या विषयींचा हा विचार झाला.पण आज या प्रकरणामुळें जो सर्वत्र असंतोष पसरून राहिला आहे तो केवळ तत्वाकरितां नसून सरकारनें चालविलेल्या छळवादामुळें सरकारची सर्वत्र छीः थू. होत आहे. सरकारने हा लढा धर्मयुद्धाच्या नीतीस अनुसरून चालविला नसून शकुनीप्रमाणें कपटाच्या फांशांनीं सरकार आपला डाव खेळत आहे म्हणून सर्वत्रांस चीड आली आहे. पठाणांना बार्डोलीवर सोडणें हा त्यांतला एक भाग आहे. ते पठाण काढून घेतों म्हणून गव्हर्नरांनीं ता. ३ रोजीं आश्वासन दिलें. पण कमिशनर व कलेक्टर हे त्या हुकुमाची बजावणी करण्यास दिरंगाई करीत आहेत. पण समजा, आतां सगळे पठाण परत बोलावले गेले असले तरीसुद्धां जोंपर्यंत सरकारचा दृष्टिकोन बदलला नाहीं तोंपर्यंत अन्याय व छळ चालूच राहणार. पठाणांच्या ऐवजा सशस्त्र पोलिसांनीं धमकी दिली किंवा इतर कोणी दिली तरी तिचा अर्थ सारखाच. आणि असले निंद्य प्रकार बार्डोलींत घडत नाहींत असें सरकार म्हणूं शकत नाही. दारूमक्तेदार शे. दोराबजी यांच्या छळाची आजच्या अंकांत दुसरीकडे जी हकीकत दिली आहे ती वाचून कोणाहि सहृदय माणसास संताप आल्यावांचून राहणार नाहीं; आणि इतकें करूनसवरून सरकारच उलट तक्रार करतें कीं, बार्डोलींतील लोक शेतकऱ्यांना धमकी देतात म्हणून ते सारा भरीत नाहींत, एरवीं त्यांनीं मोठ्या खुषीनें तो भरला असता ! जे दोराबजीशेठ आपल्या दारूमक्तेदारीचा धंदा गमावून आणि ३० हजार रुपये किंमतीची जमीन घालवून पुनः सरकारशीं वाद करण्यास खडे आहेत ते काय वालोद गांवच्या एखाददुसऱ्या स्वयंसेवकाच्या धमकीमुळें? स्वयंसेवकांच्या अंगीं एवढें सामर्थ्य येईल त्या वेळीं सर लेस्लीसारखे गव्हर्नर असल्या जुलुमाचें समर्थन करण्याला येथें राहिलेले दिसणारच नाहींत, कारण त्या वेळीं स्वराज्य स्थापन होऊन गेलेलें असेल.परंतु आजमितीला सर्वसत्ताधारी सरकारच्या जुलमाचा दोराबजी सारखे सात्विक शेठजी जो प्रतिकार करीत आहेत तो केवळ स्वयंस्फूर्तीनें व कर्तव्यजागृतीमुळेंच होय. सरकारच्या हस्तकांच्या नंग्या नाचामुळें बार्डोली तालुक्यांतील जनतेचीं मनें इतकीं विटून

गेलीं आहेत कीं; आतांपर्यंत तेथील ६९ पाटलांनीं आणि १२ तलाठ्यांनीं राजीनामे दिले आहेत. सरकारची सेवा इमानेइतबारें करण्यांत ज्यानें आपल्या आयुष्यांतली २७ वर्षे घालविलीं त्याला आज एकाएकीं राजीनामा देण्याइतकी चीड यावी हें काय दर्शवितें बरें? सरकारनें जर केवळ धर्मयुद्ध चालविलें असतें तर पाटलांना व तलाठ्यांना राजीनामा देण्याचें प्रयोजन काय होतें? परंतु कौरवपक्षीयांत विकर्णासारखे अथवा राक्षसांत सुद्धां बिभीषणासारखे कांहीं साधुपुरुष असतात, त्यांना सतीचा छळ पाहवेनासा होतो व त्या संतापाच्या भरांत ते स्वपक्षाचा संबंध सोडून देऊन जिवाची पर्वा न करतां अप्रिय पण निष्ठुर सत्य बोलून दाखविण्यास सिद्ध होतात. बार्डोलींतल्या तलाठ्यांपैकीं एका तलाठ्यानें आपल्या राजीनाम्यांत सरकारच्या गांजणुकीचा जो पाढा वाचला आहे तो अशाच स्वरूपाचा होय. त्यावरून सरकारची कुटिल नीति किती अधोगतीस जात चालली आहे त्याची कल्पना येते.

ही सर्व वस्तुस्थिति लक्षांत घेतां असा प्रश्न उद्भवतो कीं, प्रजेच्या हक्काकडे, विनंतीकडे, असंतोषाकडे लक्ष देऊन सरकार आपली नीति सुधारणार का आपल्या इभ्रतीच्या खोट्या कल्पनेसाठीं हा छळवाद असाच चालू ठेवणार? प्रजेचा संतोष हीच आमच्या राज्याची बळकटी हें ब्रीदवाक्य व्यवहारांत कधीं उपयोगांत आणावयाचें का ते राणीच्या जाहिरनाम्यांतच शोभेसाठीं राहावयाचें? नव्या असेंब्लीची प्राणप्रतिष्ठा करतांना ड्यूक ऑफ कनॉट म्हणाले कीं, प्रजेच्या संतोषाशिवाय राज्याला बळकटी नाहीं आणि झारशाहींत प्रजेचा संतोष राहणें शक्य नाहीं. आणि सध्या बार्डोलीत तर झारशाही मूर्तिमंत अवतरली आहे. तेव्हां हिंदी प्रजेंत सर्वत्र असंतोष फैलावत चालला असल्यास नवल काय? आपल्या लाख दीड लाख लष्कराच्या जोरावर आपण सर्व असंतोष दडपून टाकून हिंदुस्थानांत सोटेशाहीचें राज्य असेंच चिरकाल चालवूं शकूं असेंच सर्व अधिकारी वर्गास वाटत आहे काय? हा केवळ प्रांतिक प्रश्न, आम्हास त्यांत हात घालण्याचें कारण नाहीं, असें म्हणून लॉर्ड आयर्विन बेफिकीर आणि गव्हर्नर जें जे सूक्तासूक्त करतील त्यास पाठिंबाच द्यावयाचा असा जुना शिरस्ता आहे म्हणून बर्कनहेड व विंटरटन स्वस्थ! अशा स्थितींत हा असंतोषाचा पारा किती डिग्रीपर्यंत चढेल आणि तो मर्यादेबाहेर चढल्यास कसा भडका उडेल याचा कांहीं विचार वरिष्ठ अधिकारी करणार कीं नाहीं? १९१८ सालीं खेडा जिल्ह्यांत तहकुबी व सूट मिळण्याविषयीं असाच लढा उपस्थित झाला असतां हा केवळ प्रांतिक प्रश्न आहे असें म्हणून डोळे झांकून न बसतां त्या वेळच्या व्हाइसरॉयांनीं मध्यस्थी करून तो लढा मिटविला. १९१३ सालीं कानपूरच्या मशिदीच्या प्रकरणांत मेस्टनसाहेब असेच हट्टास पेटले असतां तो केवळ प्रांतिक प्रश्न आहे असें म्हणून डोळेझांक न करतां लॉर्ड हार्डिंज यांनीं मेस्टनसाहेबांस बाजूस सारून कानपूरच्या मुसलमानांस संतुष्ट केलें. सध्याचा बार्डोलीचा लढा त्याहून अधिक व्यापक आहे. तेव्हां शेतकऱ्यांचे कनवाळू म्हणविणारे लॉर्ड आयर्विन हे असंतोषाच्या वणव्याच्या उपशमनासाठीं कांहीं उपाय योजणार का तो वणवा असाच पसरूं देणार? ब्रिटिश मुत्सद्देगिरीची यांतच परीक्षा आहे, आणि हिंदी राजकीय चळवळीची भावी दिशाहि यावरूनच ठरणार आहे. याच दृष्टीनें कॉंग्रेसचे अध्यक्ष डॉ. अन्सारी यांनीं बार्डोलीचे सत्याग्रही हे आमच्या चळवळींतले बिनीचे शिपाई आहेत असें म्हटलें आहे. या बिनीच्या पथकानें ही चळवळ आतांपर्यंत अत्यंत अनत्याचारीपणानें व सनदशीरपणानें चालविली आहे. पण यापुढें ती तशीच राहणें न राहणें हें सरकारच्या मुत्सद्देगिरीवर अवलंबून आहे.

# शिल्पकार विनायकराव करमरकर

## अल्प परिचय

गेल्याचे मागील शनिवारीं पुण्यास श्रीशिवस्मारकाचा अनावरणसमारंभ झाला. स्मारकांतील पुतळ्याचे व बैठकीवरील उठावचित्रांचे काम ज्यांनीं केलें त्या श्री. विनायकराव करमरकर यांच्या जीवनचरित्राचा अल्प परिचय व्हावा अशी प्रत्येक महाराष्ट्रीयाला इच्छा असणें स्वाभाविक आहे. विनायकरावांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांतील अलीबाग तालुक्यांत सासवनें गांवी सन १८९२ मध्यें झाला. त्याचे वडील श्री० पांडोबा करमरकर यांनीं आपल्या वडिलांचा गणपति तयार करण्याचा धंदा चालू ठेवल्यामुळें विनायकरावांना लहानपणापासून शिल्पकलेचें शिक्षण मिळून आनुवंशिक गुणांचा विकास करण्यास संधि मिळाली. लोकमान्यांनीं चालू केलेली राजकीय चळवळ चालू शतकाच्या पहिल्या दशकांत रंगारूपास आली त्या वेळीं नुकताच प्रवेश केलेले विनायकराव राजकीय गणण्यांत येणाऱ्या सार्वजनिक चळवळींमध्यें हौसेनें भाग घेत असत. त्या काळांत अगदीं निरुपद्रवी चळवळीहि दडपून टाकण्यासाठीं सरकारी अधिकाऱ्यांनीं हास्यास्पद रीतीचे प्रयत्न चालविले होते. सासवने गांवीं विनायकरावांनीं एक छोटेसें वाचनालय व एक तरुणांचा संघ स्थापन केला होता. तेथे मॅझिनीच्या चरित्रासारखीं पुस्तकें वाचण्यांत येतात हें समजल्यावरून स्थानिक सरकारी अधिकाऱ्यांचा त्यांजवर बराच रोष झाला होता.

अशा परिस्थितींत म्हणजे १९१० सालीं एप्रिल महिन्यांत कुलाबा जिल्ह्याचे असिस्टंट कलेक्टर मि. रॉथफील्ड हे सासवनें येथें दौऱ्यावर आले. गांवांतून फिरत असतांना विठोबाच्या देवळावर काढलेलें श्रीशिवाजीमहाराजांचें एक चित्र त्यांच्या दृष्टीस पडलें. हें एखाद्या कुशल कारागिराचें चित्र असावें असें त्यांच्या आभिज्ञ दृष्टीला दिसून येतांच चित्रकाराला भेटण्याची उत्सुकता त्यांच्या मनांत उत्पन्न झाली व त्याला आपणाकडे घेऊन येण्यास त्यांनीं फर्मावलें. तालुक्याच्या मामलेदारांना वाटलें कीं छत्रपतींचें चित्र काढणें हा राजद्रोह असल्यामुळेंच चित्रकाराला शासन करण्यासाठीं साहेबांनीं पाचारण केलें असावें. चौकशीअंतीं तें चित्र विनायकरावांनीं काढलें असल्याचें समजतांच त्यांना साहेबांच्या छावणींत गुदरण्यासाठीं मामलेदारांनीं पांडोबाच्या घरीं चार शिपाई रवाना केले! पांडोबा स्वतः मुलाला घेऊन छावणींत गेले. मामलेदारांनीं विनायकरावांच्या राजद्रोही प्रवृत्तीबद्दल भाष्य करून त्याला चांगलें शासन देण्यांत यावें अशी साहेबांजवळ शिफारस केली! पण शिवाजीचें चित्र काढण्यांत राजद्रोह नाहीं व इतकें चांगलें चित्र काढणारा चित्रकार उत्तेजनाला योग्य आहे असें सांगून रॉथफील्डसाहेबांनीं विनायकरावांना स्वतःचा अर्धपुतळा करावयास सांगितला! तयार झालेला पुतळा त्यांना फार आवडला व या तरुण शिल्पकाराला त्यांनीं दहा रुपये बक्षीस दिले. या एका देणगीनें त्यांच्या अंतःकरणांत नव्या आकांक्षा उत्पन्न झाल्या. ही आठवण सांगतांना श्री. करमरकर म्हणाले, हे दहा रुपये मिळाले तेव्हां झाला त्याहून अधिक आनंद होण्याजोगे प्रसंग पुढें पुष्कळच आले. पण तेवढा आनंद मला कधींहि वाटला नाहीं! योगायोगाची गोष्ट अशी कीं, त्यांच्या कलेला उत्तेजन मिळण्याचा पहिला प्रसंग आणि त्यांनीं नुकतेंच मिळविलेलें अपूर्व यश हीं दोनहि त्यांना शिवछत्रपतींच्या कृपेनेंच प्राप्त झालीं आहेत.

विनायकरावांना मुंबईच्या स्कूल ऑफ आर्टमध्यें चित्रकलेचें शिक्षण घेण्यासाठीं पाठवा असें रॉथफील्ड यांनीं पांडोबांना सांगितलें. पण त्यांच्या घरच्या गरिबीमुळें हें शक्य नाहीं असें समजतांच त्यांनीं दरमहा पंधरा रुपयांची मदत करावयाचें कबूल केलें! लगेच विनायकराव मुंबईस रवाना झाले. पहिल्याच महिन्यांत त्यांनीं शाळेंतून दरमहा अठरा रुपयांची शिष्यवृत्ति संपादन केली. १९१० पासून १९१३ पर्यंत त्यांनीं स्कूल ऑफ आर्टमधील शिक्षणक्रम पुरा केला व शेवटच्या वर्षी शिल्पशाखेचें मेयो मेडल मिळविलें.

नंतर हितचिंतकांच्या सहानुभूतीनें त्यांना थोडींबहुत कामें मिळूं लागलीं. १९१६ सालीं श्री. सुरेंद्रनाथ टागोर यांच्या निमंत्रणावरून ते कलकत्त्यास गेले आणि चार वर्षें तेथें राहून त्यांनीं बराच नांवलौकिक कमावला. १९२० सालीं मि. रॉथफील्ड व मुंबईचे सुप्रसिद्ध शस्त्रवैद्य डॉ. भाजेकर यांच्या मदतीनें विलायतेस जाण्यासाठीं त्यांनीं वाडिया चॅरिटीजमधून तीन हजार रुपये कर्जाऊ मिळविले. या दोघांनीं आणि डॉ. राव व शिल्पकार म्हात्रे यांनीं आणखी मदत देण्याचें कबूल केल्यावर विनायकराव शिल्पकलेचें उच्च शिक्षण घेण्यासाठीं विलायतेस रवाना झाले.

पण इंग्लंडातील ब्राँझचें ओतकाम करणाऱ्या कोणत्याहि कारखान्यांत विद्यार्थी म्हणूनहि त्यांस प्रवेश मिळेना! तेव्हां एका शिल्पकाराच्या वशिल्यानें त्यांनीं अल्बियन आर्ट फाऊंड्रीमध्यें मजुरीची नोकरी मिळविली. ते स्वतः प्रवीण शिल्पकार असल्याचें तेथील मुकादमाच्या नजरेस आल्यानंतर त्यानें विनायकरावांना पुतळे ओतावयाचें सर्व शिक्षण दिलें. नंतर रॉयल ॲकेडमीमध्यें प्रविष्ट होण्याची ते खटपट करूं लागले. या संस्थेत फक्त उत्कृष्ट चित्रकारांचा मात्र प्रवेश होतो व तोंपर्यंत कोणाहि हिंदी इसमाचा तेथें प्रवेश झालेला नव्हता. यामुळे तो नाद सोडावा असा त्यांच्या हितचिंतकांनीं त्यांना सल्ला दिला. पण चिकाटीनें प्रयत्न करून त्यांनीं त्या संस्थेत प्रवेश मिळविला. तेथील १९२१ सालच्या प्रदर्शनांत त्यांनीं मांडलेल्या एका पुतळ्याची फार वाहवा झाली. ॲकेडमीच्या शाळेंतील शिक्षणक्रम ५ वर्षांचा असतो. पण त्यांचीं कामें पाहून त्यांना एकदम तिसऱ्या वर्षांत प्रवेश मिळाला. १९२२ सालीं इटालींतील शिल्पकामासाठीं विख्यात असलेल्या रोम, फ्लॉरेन्स, व्हेनिस वगैरे शहरीं जाऊन त्यांनीं शिल्पकलेचा अभ्यास केला. १९२३ सालीं ॲकेडमींतील शिक्षणक्रम संपवून ते हिंदुस्थानांत परत आले व पूर्ववत् कलकत्त्यास त्यांनीं धंद्याला सुरुवात केली.

येथें आल्यानंतरचें त्यांचें पहिलें प्रसिद्ध काम म्हणजे अमेरिकेंतील विनकॉन्सिन संस्थानांतील मिल्टन कॉलेजासाठीं त्यांनीं केलेला संगमरवरी मेडालियन बस्ट हें होय. हें पुरें केल्यापासून दोन वर्षेपर्यंत थोडीं कामें मिळाल्यामुळे त्यांचे फार हाल झाले व कर्ज काढून राहावयाची त्यांजवर पाळी आली. शेवटीं अगदीं त्रासून आपली स्थिति व्यक्त करण्यासाठीं त्यांनीं "शंखध्वनि" या नांवाचा एक पुतळा तयार केला; पण आश्चर्याची गोष्ट ही कीं १९२४ सालीं कलकत्त्याच्या प्रदर्शनांत याच पुतळ्यास बक्षीस मिळालें! तेव्हांपासून त्यांच्या चलतीला फिरून सुरुवात झाली.

कोल्हापूरचे महाराज आपले दिवाण श्री. लट्ठे यांसह १९२५ सालीं कांहीं कामाकरितां कलकत्त्यास गेले होते. या बड्या पाहुण्यांना तेथील महाराष्ट्रमंडळांत पानसुपारी झाली त्या वेळीं विनायकरावांची त्यांजबरोबर ओळख झाली. त्यांचीं कामें पाहून महाराजांनीं आपल्या मातोश्रींचा संगमरवरी पूर्ण आकाराचा पुतळा करण्याचें काम त्यांजकडे सोंपविलें. श्रीशिवस्मारकासाठीं शिवाजीमहाराजांचा पुतळा करावयाचें ठरल्यावर मंडळाच्या सल्ल्यानें महाराजांनीं तें काम श्री. म्हात्रे व श्री. करमरकर यांजकडून करवून घेण्याचें ठरविलें. पुतळ्याचें अधिक महत्त्वाचें काम श्री. म्हात्रे यांजकडे व बैठकीच्या चोहों बाजूंस लावावयाच्या शिवचरित्रांतील प्रमुख प्रसंगांच्या उठावचित्रांचें काम श्री. करमरकर यांजकडे सोंपविण्यांत आलें. पुढें मुदतींत काम होण्याच्या सोयीसाठीं म्हणून पुतळ्याचें कामहि श्री. करमरकर यांनाच देण्यांत आलें. वर्षांच्या मुदतींत त्यांनीं आपलें काम पार पाडलें.

हा पुतळा ब्राँझ धातूचा असून चौदा फूट उंचीचा आहे. त्याचें वजन सुमारें अकरा टन आहे. धातूची मूर्ति ओतावयासाठीं प्रथम मातीचा पुतळा करून त्यावरून दुहेरी सांचे करावे लागतात. मूळ पुतळा श्री. करमरकरांनीं आपल्या मुद्दाम बांधलेल्या चित्रशाळेंत तयार केला. सांचे तयार करण्याचें व मूर्ती ओतण्याचें काम पी. अँड ओ. कंपनीच्या माजगांव डॉक्समधील कारखान्यांत झालें. येथें मोठमोठीं ओतकामें होत असलीं तरी पुतळे ओतण्याची माहिती नसल्यामुळे धातूच्या मिश्रणापासून तों पुतळा ओतून काढण्यापर्यंतचीं सर्व कामें श्री. करमरकरांना स्वतःच्या जबाबदारीवर करावीं लागलीं. कंपनीनें त्यांना मुशी, माणसें व यंत्रसामुग्री पुरवून बहुमोल मदत केली. या कामासाठीं दीडशें कामकरी चार महिनेपर्यंत सारखे राबत होते. पुतळ्यासाठीं केलेले सांचे चाळीस टन वजनाचे होते. बाहेरल्या सांच्याच्या आंत आणखी एक गाभ्यासारखा मातीचा साचा ठेवून त्या दोहोंमधल्या फटींतून धातूचा रस ओतावा लागतो. फटींत वाऱ्याचे बुडबुडे राहिले तर सारें काम फुकट जाण्याचा संभव असल्यामुळें मोठमोठ्या पुतळ्यांचें ओतकाम बहुधा लहान लहान तुकडे पाडून करतात. एवढा मोठा पुतळा हिंदुस्थानांत एकसंधी ओतला जाणें अशक्य आहे असें अनेक तज्ज्ञांचें मत होतें. आतां हें काम यशस्वी झालेलें असल्यामुळे या धंद्याची माहिती असलेले लोक थक्क झाले आहेत! धातूचा रस ओतण्यासाठीं सांचे आडवे ठेवावे लागत असल्यामुळें पलीकडच्या बाजूचा हात मूळच्या सांच्यांतच घेतलेला नव्हता. तेवढा हात वेगळा ओतवून पुतळ्याला सांधण्यांत आला आहे. पण यामुळें पुतळ्याच्या एकसंधीपणाला कोणतेहि वैगुण्य आलेलें नाहीं. कारण इतका मोठा एकसंधी पुतळा हिंदुस्थानांत तर नाहींच, परंतु जगांतहि असे पुतळे हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच आहेत. पुतळ्यासाठीं श्री. करमरकरांना सत्तर हजार रुपये व उठावचित्रांसाठीं पंचेचाळीस हजार रुपये देण्यांत आले आहेत. पण खर्चाचा आंकडा या रकमेहून अधिक झाला असल्याची विश्वसनीय बातमी आम्हाला समजलेली आहे. याचा स्मारकमंडळाकडून विचार होईल अशी आम्हाला आशा आहे.

महाराष्ट्राला श्री. करमरकरांचें चरित्र विशेष अभिमानास्पद वाटणें साहजिक आहे. त्यांनीं ज्या वि-

भूतीची अश्वारूढ मूर्ति तयार केली आहे ती महाराष्ट्रास अत्यंत प्रिय व ललामभूत आहे. इतकेंच नव्हे तर जगतांतील महापुरुषामध्यें गणना होण्याइतकें महाराजांचें विभूतिमत्व आहे. श्री. करमरकरांनीं केलेल्या स्मारक मूर्तीचे माहात्म्य असेंच आहे. हें स्मारक महाराष्ट्रलाच काय पण हिंदुस्थानालाहि भूषणास्पद होईल अशा दर्जाचें आहे. आणि म्हणूनच संपूर्ण महाराष्ट्राकडून या तरुण शिल्पकारांचें कौतुक होईल व धनिक वर्गाकडून त्यांस उत्तेजन मिळेल अशी आम्हास आशा आहे.

# मि. मुनशी यांचें सत्यकथन

आमदार मुनशी हे बार्डोली तालुक्यांत हिंडून तेथील परिस्थिति प्रत्यक्ष पाहून आले व त्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा देऊन आपले अनुभव स्पष्टाभिप्रायपूर्वक गव्हर्नरांना पत्ररूपानें नजर केले आहेत. मि. मुनशी हे कॉंग्रेसवाले, स्वराजिस्ट अगर असहकारी नसून पक्के सनदशीर असल्यामुळें त्यांनीं या पत्रांत केलेली निवडक विधानें विशेष लक्षांत घेण्यासारखीं आहेत, तीं अशीं:—

(१) कायदेभंगाचा प्रतिकार करतांना देखील कोणत्याहि सरकारला लोकांच्या न्याय्य मागण्या नाकारण्याचा, त्यांना अन्याय्य व जुलमी मार्गानें दडपण्याचा व खुनशी धोरण स्वीकारण्याचा अधिकार नाहीं. सरकारनें या गोष्टी केल्यास सनदशीर मनुष्यालाहि निषेधप्रदर्शनाचा परिणामकारक मार्ग स्वीकारणें प्राप्त होतें.

(२) बार्डोलींतील सारावाढीच्या बाबतींत सरकारी रेव्हिन्यू अधिकाऱ्यांचे रिपोर्ट धडधडीत चुकीच्या आंकड्यांवर उभारलेले आहेत. अशा स्थितींत अगदीं अनियंत्रित अशा सरकारनें देखील स्वतंत्र चौकशी करण्याबद्दलची अत्यंत स्वल्प मागणी सहज ओघानें मान्य केली असती.

(३) बार्डोलीच्या लढ्यांत पडलेल्या असहकारी पुढाऱ्यांना चिरडण्याचा सरकारचा इरादा आहे व त्यासाठीं शेंकडो कुटुंबें उध्वस्त झालीं तरी सरकारला त्याची दिक्कत वाटत नाहीं.

(४) निषेधाचा आत्यंतिक मार्ग म्हणून कायदेभंग देशांत बद्धमूल झाला आहे. या चळवळीचे पुढारी हे देशांतील अत्यंत बुद्धिमान व नीतिमान लोक असून ते कोणत्याहि धाकानें अगर लोभानें स्वकर्तव्यापासून च्युत होणारे नाहींत हें सरकारनें लक्षांत ठेवावें. जुनाट दडपशाहीच्या मार्गानें आतां सरकारची इभ्रतहि वाढणार नाहीं व राजनिष्ठाहि उत्पन्न होणार नाहीं.

(५) १३० खेड्यांच्या व १२६००० एकर शेत जमिनीच्या मोठ्या तालुक्यांतील ९० पाटलांपैकीं ६९ पाटलांनीं व ३५ तलाठ्यांपैकीं १३ तलाठ्यांनीं राजीनामे दिले आहेत, आणि ८०,००० पुरुष स्त्रिया आणि मुलें संघटित प्रतिकाराच्या निश्चयी भावनेनें भारून गेलेलीं आहेत.

(६) आपण स्वीकारलेल्या मार्गाबद्दल कोणालाहि वाईट वाटत नाहीं. वल्लभभाई पटेल गांवोगांव हिंडत असतां गरीब अशिक्षित स्त्रीपुरुष व मुलें स्वयंस्फूर्तीनें त्यांचा सत्कार करतात आणि सरकारी दुष्कृत्यें वर्णन करणारीं गाणीं आपल्या खेडवळ चालीवर गातात हें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. लोकांची इच्छा नसतांना त्यांच्यावर ही चळवळ लादली गेली आहे अशा अर्थाचे सरकारी रिपोर्ट हे धडधडीत चुकीचे आहेत.

(७) या ८० हजार लोकांची सरकार उपासमार करील अथवा त्यांच्यावर गोळीबार करील. पण त्यायोगानें या भागांत सरकारी इभ्रत मुळींच शिल्लक राहणार नाहीं.

(८) जप्तीचे अधिकार हे दिवाणी स्वरूपाचे असून त्याची बजावणी इतर न्याय–निवाड्यांच्या बजावणीप्रमाणें रास्तपणें व सरळपणें व्हावयास पाहिजे. पण बार्डोलींतील मुख्य रे. अधिकाऱ्यानें मग तो स्मार्ट असो वा दुसरा कोणी असो, एखाद्या सूडबुद्धीच्या जेत्याप्रमाणें अधिकात अधिक ताप देण्याच्या निश्चयानें हें काम चालविलें आहे. लोकांच्या कणखर संघटित व संयमपूर्ण अशा प्रतिकारामुळें या कामाला आळा बसला ही गोष्ट निराळी.

(९) ७०० रु. च्या वसुलीकरितां चाळीस हजारांची जमीन जप्त; १५००० रु. किंमतीची जमीन १६१ रु. स विकून पुनः ६५ रु. च्या बाकीकरितां स्वयंपाकाची भांडीं जप्त; अडीचशें रुपयांच्या कापसांचा २१ रु. स लिलाव; ३६० रु. च्या वसुलीसाठीं शे. दोराबजीशेठ यांची २००० रु. ची दारू जप्त करून त्यांतली बरीचशी सांडून व बाकीची विकून पुनः ११४ रु. बाकी ठेवलीच आणि त्यासाठींच तीस हजार रु. ची जमीन जप्त करण्यांत आली. जिनिंग फॅक्टरीला विकलेला कापूस जप्त करण्यांत आला. या सर्व उदाहरणांची मी चौकशी करून खात्री करून घेतली. अशीं अनेक उदाहरणें आहेत.

(१०) पण येवढ्यावरच न थांबतां शेतकऱ्यांना भिवविण्यासाठीं म्हशीवर मोहीम सुरू करण्यांत आली. खातेदार नसलेल्यांच्याहि म्हशी जप्त केल्या. एक म्हैस काळजी न घेतल्यामुळें ठाण्यावर मेली व दुसऱ्या एका म्हशीला मरेतों झोडपून काढ-

ण्यांत आलें रीतसर पंचनामे नाहींत. हिशेब नाहीं. हवी ती वस्तु जप्त करावी व हव्या तितक्या कमी किंमतीला विकावी.

(११) आणि या म्हशींच्या जप्त्या धाक बसेल अशा निर्दयपणानें करण्यास पठाण आणले ( आतां ते काढून घेतले आहेत हें फार चांगलें.) पण बेकायदेशीर वर्तन करण्याबद्दल नाणावलेल्या वर्गाकडून सरकारनें दिवाणी स्वरूपाचा बोजा वसूल करावा ही अश्रुतपूर्व गोष्ट होय. सरकारचा जमीदार पाठीशीं उभा आहे व पुढें गेलेल्या पठाणाला कुंपणावरून अगर भिंतीवरून उडी मारून, जबरदस्तीनें दरवाजा उघडून माल जप्त करण्यास सांगत आहे. या देखाव्याचा नैतिक परिणाम काय होईल याचा विचार तरी कोणा सरकारी अधिकाऱ्यानें केला आहे काय?

(१२) १७००० खातेदारांच्या कुटुंबांतलि मुलेंमाणसें धरून ४०००० लोकसंख्या होते ! हे सर्व मिळून एकंदर ४०००० म्हशी बाळगतात. प्राणापलीकडे जतन केलेल्या या गुरांना वांचविण्याकरितां तीनतीन महिने लहानशा घरांत पुरुष बायका व मुलें यांनीं आपल्याला कोंडून घेतलें आहे. अशा तऱ्हेच्या एका घरांत जाऊन तेथील माणसांची व गुरांची खेदकारक स्थिति मी प्रत्यक्ष पाहिली व अशा स्थितींत आणखीहि कांहीं महिने राहण्याचा त्यांचा निश्चयहि श्रवण केला. कारण जप्तीदाराच्या ताब्यांत गुरें जाऊन त्यांचे हाल होण्यापेक्षां ही स्थिति पुरवली. जप्तीच्या या कल्पना काढणारें सुपीक डोकें व ती अमलांत आणण्याची निर्दय पद्धत इत्यादि गोष्टी जुन्या मध्ययुगीन इतिहासाखेरीज इतरत्र सांपडणे कठीण.

(१३) जप्तीला फौजदारी अम्मलबजावणीचीहि जोड देण्यांत आली. आतांपर्यंत १९ माणसांना शिक्षा करण्यांत आल्या. सरकारी अधिकाऱ्याच्या बंगल्यापासून बऱ्याच अंतरावर सार्वजनिक रस्त्यावर बसणाऱ्या तीन स्वयंसेवक मुलांना गैरवर्तणुकीचा आरोप ठेवून पन्नास रु. दंड अगर दोन महिन्यांची साधी कैद अशी शिक्षा देण्यांत आली. यापैकीं एक मुलगा तुरुंगांत असतांच ५० रु. दंड वसूल करण्यासाठीं त्याच्या बापाची म्हैस, वासरूं व गाडी हीं जप्त करण्यांत आलीं.

(१४)कोणत्याहि सुधारलेल्या सरकारला हे उपाय शोभण्यासारखे नाहींत. सारावाढीचा प्रश्न बाजूला ठेवला तरी या प्रकारांची गव्हर्नरांनीं स्वतः चौकशी करावयास पाहिजे. स्थानिक अधिकाऱ्यावर विसंबून स्वस्थ बसतां उपयोगी नाहीं. कायदा व सुव्यवस्था यांची अम्मलबजावणी देखील कायदेशीर व सुव्यवस्थित रीतीनेंच व्हावयास पाहिजे. गव्हर्नरांनीं चौकशी केली तर ब्रिटिश मुत्सद्दी व सभ्य गृहस्थ या नात्यानें त्यांना हे प्रकार असमर्थनीय वाटल्यावांचून राहणार नाहींत. ( आर्थिक लाभाचे बाबतींत ब्रिटिश लोक मुत्सद्दीपणा व सभ्यपणा हीं दोनहि विसरतात. —सं. के. )

(१५) सरकारनें कौन्सिलांत राजकीय दृष्टीचे व राजकीय दृष्टिविहीन असे दोन भाग पाडले व राजकीय दृष्टीच्या लोकांना सत्ताहीन करून टाकलें. १९२४ व २७ सालीं कौन्सिलांत धारावाढ न करण्याबद्दल ठराव झाले, जमीनमहसूल कमिटीनें धारावाढीचे बाबतींत कायदेमंडळाची सल्लागार कमिटी नेमण्याची सूचना केली. पण कौन्सिलांतील भेदनीतीनें सुरक्षित बनलेल्या सरकारनें त्याची पर्वा केली नाहीं.रा.ब.नाईक व शिवदासानी यांनीं अंडरसन यांचे रिपोर्टांतील चूक दाखविली तरी त्यांच्या तक्रारी तुच्छतापूर्वक बाजूला सारण्यांत आल्या. बजेटाच्या वेळीं सरकारनें भेदनीतीनें आपल्या बाजूला बहुमत मिळविलें व तेवढ्या एका बहुमताचा पार्लमेंटापर्यंत डांगोरा पिटविण्यांत येत आहे.

(१६) मोर्ले–मिंटो सुधारणा अमलांत येण्यापूर्वी कौन्सिलचे त्या वेळचे सभासद श्री. गोकुळदास परेख यांना रेव्हिन्यूचे बाबतींत सरकाराकडून चौकशी करवितां आली. मोर्ले–मिंटो सुधारणांचा अंमल चालू असतांना खेडा जिल्ह्याचे बाबतींत सत्याग्रह झाला असतांहि सरकारनें त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार केला. पण आज सरकारच्या मंत्रिमंडळांत पांच हिंदी लोक असतां व 'जबाबदार' राज्यपद्धति सुरू असतां मात्र आम्ही असहाय झालों आहोंत.

(१७) हल्लींच्या राज्यपद्धतींत लोकांची इच्छा अगर गव्हर्नरांची सहानुभूति या दोनहि सारख्याच विफल ठरतात !

---

# शेतकऱ्यांचें स्वराज्य

लोकांचें, लोकांकरितां व लोकांकडून चाललेलें जें राज्य तेंच खरें स्वराज्य, आणि हिंदी लोकांना स्वतःचें राज्य पाहिजे तें अशाच स्वरूपाचें पाहिजे. १९१९ चा सुधारणांचा कायदा हा एक स्वराज्याचा हप्ता म्हणून सरकाराकडून जाहीर करण्यांत आला. पण खऱ्या स्वराज्याचा अंश तरी त्यायोगें लोकांच्या पदरांत पडला काय? हिंदुस्थानांत शेतकरी अगर शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकांची शेंकडा ८०-९० इतकी संख्या आहे. या शेतकरी लोकांना स्वराज्याचा कोणता अंश मिळाला ही खरोखर विचार करण्यासारखी गोष्ट आहे. लोकांच्या प्रतिनिधींच्या संमतीशिवाय कर बसविला जाऊं नये हें स्वायत्त राज्यपद्धतीचें महत्त्वाचें तत्त्व होय. या तत्त्वासाठीं इंग्लिशांचे जातभाई अमेरिकन लोक इंग्लंडाशीं भांडून, लढून स्वतंत्र झाले. पण सुधारणांच्या कायद्यानें शेतकऱ्यांचे बाबतींत हें तत्त्व अमलांत आलें काय? जमीन-महसुलाचें खातें राखीवच राहिल्यामुळें जबाबदार म्हटलेल्या दिवाणांची त्यावर कांहींच हुकमत चालत नाहीं. दिवाणगिऱ्यांच्या रूपानें सरकारनें जबाबदारीचें एक सोंग निर्माण केलें व प्रत्यक्ष कृतीनें तें सोंगहि शक्य तितकें पोकळ करून टाकलें. पण शेतकऱ्यांवरील कराच्या बाबतींत जबाबदारीचें तेवढें सोंगहि सरकारनें आतांपर्यंत सजविलें नाहीं. सर्व प्रांतिक करामध्यें जमीन-महसुलाचा आंकडा सर्वांत मोठा. पण हा सर्वांत मोठा लोण्याचा गोळा सरकारनें अत्यंत बंदोबस्तानें आपल्या हातांत ठेवला आहे. देशांतल्या मोठ्यांतल्या मोठ्या वर्गाकडून घेतला जाणारा मोठ्यांत मोठा कर बसविण्याच्या व कमजास्त करण्याच्या बाबतीत त्या लोकांच्या प्रतिनिधींच्या हातीं काडीमात्र सत्ता जोंपर्यंत नाहीं तोंपर्यंत इतर कितीहि हक्क दिले तरी त्यांत स्वराज्याचा खरा अंश नाहीं असेंच म्हणावें लागेल.

## रेव्हेन्यू खात्याची कोंडी

ही गोष्ट लक्षांत घेऊनच सुधारणा कायद्याच्या तपासणीचा व धोरणाचा विचार करणाऱ्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें अशी सूचना करून ठेवली कीं, जमीन-महसुलाच्या आकारणीची पद्धत कायद्यानें अधिक नियमित करावी. आजपर्यंत ही व्यवस्था अधिकाऱ्यांच्या सोयीप्रमाणें व लहरीप्रमाणें चालत आहे. आणि स्वराज्याचा हप्ता देत असतांनाहि जमीन-महसुलाची व्यवस्था तशीच अनियंत्रित राखली असती तर तो हप्ता निर्जीव करण्यासारखेंच झालें असतें. पण पार्लमेंटरी कमिटीची सूचना सरकारनें मुळींच लक्षांत घेतली नाहीं व आज आठ वर्षे जमीन-महसूल खातें हें जसें होतें तसेंच अनियंत्रित चालू ठेवलें. जमीन-महसुलाची आकारणी करणें हें एक मोठें भानगडीचें गूढ शास्त्र आहे व या खात्यांत काम करून मुरलेल्या अधिकाऱ्यांशिवाय तें कोणास समजावयाचें नाहीं व उमजावयाचें नाहीं असा नोकरशाहीनें या खात्याचा बाऊ करून ठेवला आहे! या खात्यांत सेटलमेंट अधिकारी करील ती पूर्वदिशा व त्यांच्या हातीं इतर कोणत्याहि कराचे बाबतींत नसलेले असे वसुलीचे जादा व कडक अधिकार! अशा रीतीनें रेव्हेन्यू खातें म्हणजे एक स्वतंत्र सरकारच बनलेलें. इतर करांचे बाबतींत झालेल्या अन्यायाबद्दल दिवाणी कोर्टांत तक्रार करण्यास जशी सवड असते तशीहि जमीन—महसुलाचे बाबतींत नाहीं. फिर्याद कांहीं असली तरी ती त्याच रेव्हेन्यू अधिकाऱ्यांकडे करावयाची. जो प्रतिवादी तोच न्यायाधीश! अशी या रेव्हिन्यू खात्याची कोंडी बनलेली आहे. ब्रिटिश सरकार हें मारवाडी आहे. यामुळें ज्या खात्यांत कराची—पैशाची—वसुली आहे तें खातें लोकांच्या हातांत देणें म्हणजे त्यांना जिवावरील संकट वाटावें हें त्यांच्या स्वभावास अनुरूप असेंच आहे. पण या रेव्हिन्यू खात्याची कोंडी फुटल्याशिवाय शेतकऱ्यांना खरें स्वराज्य मिळालें असें म्हणतां यावयाचें नाहीं आणि हिंदुस्थानासारख्या कृषिप्रधान देशांत अत्यंत बहुसंख्य अशा शेतकऱ्यांना स्वराज्य मिळाल्याशिवाय कोणत्याहि सुधारणा उभ्या केल्या तरी त्या पोकळ व निर्जीवच ठरणार.

## बार्डोलीचा संदेश

जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची सूचना १९२४ पर्यंत सरकारने अमलांत आणली नाहीं आणि राष्ट्रीय पक्ष कौन्सिलांत नसल्यानें मवाळांपैकीं कोणीहि ती सरकारावर लादण्याचा प्रयत्न केला नाहीं. ज्याला जागें करावयाचें त्यानें झोंपेचें सोंग घेतलेलें व ज्यानें जागें करावयाचें तोच झोपाळू बनलेला अशी स्थिति होती. १९२४ सालीं लोकप्रतिनिधींनीं यासंबंधानें ठराव आणून तो मंजूर करून घेतला. जॉ. पा. कमिटीच्या सूचनेप्रमाणें जमीनमहसुलाची आकारणी कायद्यानें नियंत्रित करण्याचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमावी व असा कायदा अमलांत येईपर्यंत कोठेंहि साऱ्याची वाढ सरकारनें करूं नये असा हा ठराव होता. सरकारानें कमिटी नेमली पण दुसरीकडे सारावाढीचें सत्र निरनिराळ्या तालुक्यांतून चालू ठेवलें! कौन्सिलाचा हा उपमर्द १९२४ पासून १९२८ पर्यंत चालू आहे आणि एखादें सजीव व जागरूक प्रतिनिधींचें कौन्सिल असतें तर या

उपमर्दाच्या पहिल्या उदाहरणाचे वेळींच त्यानें सरकारला गदगदा हलवून सोडलें असतें! पण मुंबईचें बहुतेक सगळें कौन्सिल ज्ञातिनिष्ठ, अराष्ट्रीय, बेजबाबदार व सरकारी कृपेच्या ताटाखालच्या मांजरांनीं भरलेलें असल्यामुळें कौन्सिलानें हा उपमर्द चार वर्षें निमूटपणें सहन केला. बरें, ज्या शेतकऱ्यांच्या बाबतींत चार वर्षें अन्याय होत आहे तेहि असंघटित. मतदार सुस्त, प्रतिनिधी भिडस्त आणि सरकार जबरदस्त! मिळून या शेतसाऱ्याच्या बाबतींत खालपासून वरपर्यंत आंधळा कारभार चालू राहिला. बार्डोलीच्या लढ्याचे बाबतींत प्रत्यक्ष बार्डोलींत झालेल्या सारावाढीबद्दलच्या न्याय्यान्याय्यतेचा प्रश्न आहेच. पण तो त्या लढ्यांतील वादाचा केवळ एक भाग आहे. वस्तुतः गेल्या आठ वर्षांत सरकारचा कावा, लोकप्रतिनिधींचा आळस व शेतकऱ्यांचा असंघटितपणा याचेयोगानें जो गोंधळ झाला तो निस्तरण्याचे काम बार्डोली करीत आहे. शेतकऱ्यांनीं जागरूक व संघटित होऊन आपल्या हक्काला पदोपदी जपावें व आपल्यावर अन्याय झाल्याबरोबर सरकारला जाणवेल अशी वेळींच चळवळ केल्याशिवाय राहूं नये असा बार्डोलीच्या लढ्याचा संदेश आहे. तो सर्व मुंबई इलाख्यांतील शेतकऱ्यांना समजून त्याप्रमाणें कृति करण्याची सिद्धता झाली तरच बार्डोलीच्या लढ्याचें खरें चीज झालें व त्या लढ्यास चोहोंकडून मिळणारी सहानुभूति सार्थ ठरली असें म्हणतां येईल. शेतकरी जागा व संघटित झाल्याशिवाय खरें स्वराज्य पदरांत पडावयाचें नाहीं असें बार्डोली कंठरवानें सांगत आहे.

### वेळ आजच आहे

बार्डोलीच्या लढ्याचें सार्थक करण्यासारखी कृति करण्याची वेळहि आजच आहे. कारण गेलीं आठ वर्षें कायद्याविना चाललेला गोंधळ कायद्यांनीं पक्का करण्याचा सरकारनें चंग बांधला आहे. हे कायदे पास होऊन गेल्यावर मागाहून शेतकरी जागे झाले तर त्यांच्या जागृतीचाहि कांहीं उपयोग होणार नाहीं. सिंध लँड ॲलीनिएशन बिल, जमीन महसुलाचें बिल व जमीनविभागणी प्रतिबंधक बिल या तीन बिलांचा वेगवेगळा विचार न करतां, शेतीसंबंधीं व शेतजमिनीसंबंधीं सरकारच्या एकाच भयंकर कावेबाज धोरणांतील हे तीन भाग आहेत अशा दृष्टीनें त्यांचेकडे पाहिलें म्हणजे त्या बिलांचें खरें घातकी स्वरूप कळून येईल. जमीन महसूल—कमिटीनें बहुमतानें सूचना केली कीं, निवळ नफ्याच्या एक–चतुर्थांशापेक्षां साऱ्याचा आकार अधिक नसावा. त्या कमिटीच्या सूचनेप्रमाणें कायदा करावा आणि तो अमलांत येईपर्यंत कोठें सारावाढ करूं नये व केलेली वाढ वसूल करूं नये असा ठराव कायदेकौन्सिलांत १९२७ सालीं पुनः झाला. पण सरकारानें कमिटीची सूचना धाब्यावर बसवून, जमिनीच्या खंडाच्या निम्मी रक्कम साऱ्याच्या रूपानें वसूल करण्यास नव्या जमीन महसुलाच्या बिलानें पक्का कायदेशीर आधार निर्माण करण्याचा घाट घातला आहे! जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची सूचना अशी कीं साऱ्याच्या आकारणीची पद्धती कायद्यानें बारकाईनें ( क्लोझर रेग्युलेशन ) नियंत्रित करावी. पण सरकार हल्लींच्या अनियंत्रित पद्धतींतला धोपट मार्गच कायदेशीर करूं पाहात आहे. खंडावरून सारा आकारण्याच्या धोरणाचा पुरस्कार करतांनादेखील सरकारला निवळ नफा हीच आकारणीची खरी कसोटी होय असें मान्य करावें लागतें. पण हा नफा अजमावण्यास खंड हेंच एक सोयीचें व खरें निर्णायक साधन आहे, इतर साधनें फार भानगडीचीं आहेत असा सरकार बहाणा करीत आहे. पण खंड हीच निवळ नफ्याची कसोटी सरकारानें कशावरून ठरविली? ती ठरवितांना तरी निवळ नफ्याचा सरकारानें स्वतंत्रपणें विचार करून ही गोष्ट पडताळून पाहिली आहे काय? पाहिली नसल्यास सरकारचें म्हणणें चुकीचें ठरेल व पाहिली असल्यास स्वतंत्ररीत्या नफा काय होतो याचा अंदाज करण्यास साधनें आहेत असें मानावें लागेल. मग त्याच साधनांचा सरकारानें उपयोग करून निवळ नफा हीच कसोटी कां मान्य करूं नये? शेतकऱ्याला शेतीवर खरा नफा किती होतो याचा हिशेब करीत बसणें सरकारला भानगडीचें वाटत आहे. पण यांत भानगड कसली? सरकार इतर लोकांवर प्राप्तीचा कर बसवितांना निवळ नफ्याचा हिशेब करीत नाहीं काय? निरनिराळ्या धंद्यांना संरक्षण द्यावें का न द्यावें हें ठरविण्यासाठीं टॅरिफ बोर्ड त्या त्या धंद्यांतील उत्पादन-खर्च व बाजारभावाप्रमाणें प्रत्यक्ष प्राप्ति याचा हिशेब करीत नाहीं काय? ली कमिशननें बड्या सनदी नोकरांचे पगार वाढविले तेव्हां सरकारनें त्यांचा वाढता घरखर्च, मुलें इंग्लंडांत शिक्षणासाठीं पाठविण्याचा वाढता खर्च इ. गोष्टींचा हिशेब केला होताना? मग बिचाऱ्या शेतकऱ्यांचें निवळ उत्पन्न ठरवून त्यावर साऱ्याची आकारणी करणें सरकारच्या जिवावर कां यावें?

### दुराग्रही सरकार व निर्बल लोकमत

भानगडीचा हिशेब करावयाचा म्हटला तर सरकार हवा तो भानगडीचा हिशेब करूं शकतें. पण शेतकऱ्यांचे बाबतींत तसें करण्याची सरकारची इच्छाच नाहीं. कारण एकदां निव्वळ उत्पन्न ही शेतसाऱ्याची कसोटी ठरविली म्हणजे स्वतःला अडचणीच्या वाटणाऱ्या अनेक गोष्टी सरकारास मान्य कराव्या लागतील. आणि खंड ही कसोटी ठरविल्यानें जे फायदे

पदरांत पडावयाचे ते निवळ नफ्याच्या कसोटीनें सरकारच्या पदरांत पडणार नाहींत. सन १८७९ मध्यें झालेल्या जमीन—महसुलाच्या कायद्यांत शेतकऱ्याला जमिनीचा मालक म्हणण्याऐवजीं 'नोंदलेला वहिवाटदार' या नांवानें संबोधण्यांत आले. आणि लोकांचा संशय बळावूं नये यासाठीं शेतकऱ्यांच्या मालकी हक्कांत कोणत्याहि प्रकारें फरक झाला नाहीं अशीं पोकळ आश्वासनें कांहीं दिवस अधिकाऱ्यांनीं दिलीं ! पण सरकारी धोरणाचें खरें स्वरूप १९०१ सालीं जमीनमहसुलाच्या कायद्याच्या दुरुस्तीचे वेळीं बाहेर आले. त्या वेळीं जमिनीची मालकी शेतकऱ्यांकडून काढून घेण्याच्या सरकारच्या कारवाईला लोकांकडून कसून विरोध करण्यांत आला व फेरोजशहा मेथा, ना. गोखले इ. लोकप्रतिनिधींनीं कौन्सिलांतून बाहेर पडून सरकारला आपल्या निषेधाची तीव्रता दाखविली. पण दुराग्रही सरकार व निर्बल लोकमत यांच्या झगड्यांत निर्बल लोकमताचें कांहीं चाललें नाहीं, व सरकारच्या मालकीचें तत्त्व अन्यायानें जमीनमहसुलाच्या कायद्यांत घुसडण्यांत आलें. आणि सुधारणा कायद्यान्वयें जबाबदार राज्यपद्धति सुरू झाल्यावरहि ज्याप्रमाणें इतर खात्यांत नोकरशाही आपली जुनी बैठक कायम ठेवण्याचा प्रयत्न करीत आहे त्याप्रमाणेंच जमीनमहसुलाच्या कायद्यांत घुसडण्यांत आलेलें सरकारच्या मालकीचें तत्त्व तसेंच कायम रहावें व साधल्यास तें कायद्यांत अधिकाधिक पक्कें करून टाकावें असा सरकारचा इरादा आहे. शेतसारा निवळ उत्पन्नावरून न ठरवितां खंडावरून ठरविण्याच्या धोरणाचा सरकार जो हट्टानें पुरस्कार करीत आहे तो स्वतःच्या मालकी हक्काचे घोडें दामटण्यासाठींच. निवळ नफ्याचा हिशेब सुरू झाला म्हणजे सरकारला मालकी हक्क सांगण्यास तोंडच राहात नाहीं. शिवाय शेतीच्या नफ्यावर आकारणी केली म्हणजे इतर नफ्यांवरील करांशीं या कराची साहाजिकच तुलना होणार. आणि व्यापारी, पांढरपेशे इत्यादि लोकांच्या नफ्यांतला जो हिस्सा सरकार कराच्या रूपानें घेतें त्यापेक्षां अधिक प्रमाणांत शेतकऱ्यांकडून कां घ्यावा या प्रश्नास सरकारला उत्तर देणें कठिण जाईल. प्राप्तीवरील कराचे बाबतींत कांहीं मर्यादेपर्यंतच्या उत्पन्नावर मुळींच कर बसविला जात नाहीं. मग शेतीच्या बाबतींतहि अगदीं लहान लहान व कमी उत्पन्नाच्या शेतीवर सरकारनें कर घेऊं नये अशी मागणी स्वाभाविकपणें पुढें येईल. आणि जमिनीचे लहान लहान तुकडे गैरफायदेशीर असतात हें तर सरकार मान्य करून बसलें आहे. गैरफायदेशीर म्हणून हे तुकडे एकत्रित करण्यासाठीं सरकारनें बिल आणलें आहे. ज्या मुद्द्यावर या लहान तुकड्यांचें सरकार एकीकरण करणार त्याच मुद्यावर, लहान तुकड्यांना साऱ्याची माफी करावी असे म्हटलें तर मात्र सरकार ऐकणार नाही !

## पोटापाण्याचा प्रश्न

शेतसारा हा खंडावर न ठरविता करासारखी त्याची नफ्यावर आकारणी केली तर इतर करांचे बाबतींत वसुली करण्याचे जितके मार्ग आहेत तितकेच जमीन-महसूल वसूल करण्याचे बाबतींतहि ठेवावे लागतील व आज जे वसुलीचे फाजील कडक व अनिर्बंध असे मार्ग रेव्हिन्यू अधिकाऱ्यांचे हातीं आहेत ते कायम ठेवणें कठीण जाईल. त्याचप्रमाणें जमीनमहसुलाच्या अन्याय्य वसुलीविरुद्ध दिवाणी कोर्टांत दाद मागण्याचा आज हक्क नाहीं तोहि देणें भाग पडेल. सारांश, निवळ नफ्यावरून सारा न ठरवितां खंडावरून ठरवावा हें सरकारचें म्हणणें दिसण्यांत साधें दिसले तरी त्याचे धागेदोरे फार दूरवर पोंचणारे आहेत हे लक्षांत ठेविले पाहिजे. यासाठीं सरकारनें पुढें आणलेल्या लँड रेव्हिन्यू बिलांतील खंडाच्या निम्या हिश्शाइतका सारा घेण्याच्या सरकारी योजनेला लोकप्रतिनिधींनीं कसून विरोध करणें जरूर आहे. आणि सुस्त व बेपर्वा लोकप्रतिनिधींना जागें करण्यास शेतकऱ्यांनीं जागोजाग सभा भरवून व संघ स्थापन करून या नव्या बिलाचा सार्वत्रिक तीव्र निषेध केला पाहिजे. शेतकऱ्यांच्या या प्रश्नांत राजकीय अगर जातिविषयक पक्षभेदांचा संबंध नाहीं. शेतकऱ्यांच्या पोटापाण्याचा तो प्रश्न असल्यामुळें तो जातिभेदातीत व पक्षभेदातीत आहे. यासाठीं या वेळीं सर्वच पक्षांनीं सरकारचें स्वार्थी व शेतकऱ्यांचा नाश करणारें धोरण हाणून पाडण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करावयास पाहिजेत. कर्नाटकांत श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं या शेतीसंबंधाच्या तीनहि बिलांविरुद्ध मोहीम सुरू केली आहे व महाराष्ट्रांतहि पुण्याच्या शेतकरी जमीनसंरक्षक मंडळाने सर्व महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांची परिषद बोलावून या चळवळीस प्रारंभ केला आहे. जमीन—विभागणी बिलाविरुद्ध महाराष्ट्रांत चळवळ थोडीबहुत चालू आहेच. त्यांतच लॅण्ड रेव्हिन्यू बिल व सिंध लँड ॲलीनिएशन बिल यांच्याविरुद्ध चळवळीची भर घातली पाहिजे.

## तुकड्यांचें बिल फेंटाळा

आजच्या अंकांत दुसरीकडे शेतकरी जमीनसंरक्षक मंडळाचे चिटणीस श्री. तिखे यांजकडून आलेली तुकड्यांच्या बिलावरील सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टासंबंधीं विस्तृत टीका छापली आहे. तिच्यावरून हें बिल सिलेक्ट कमिटींत सुधारलें तरी त्याचें विघातक स्वरूप बऱ्याच अंशांनीं कसें कायम राहिलें आहे हें लक्षांत येईल. तुकड्यांचें बिल व जमीन—महसुलाचें बिल यांचा संबंध लक्षांत घेतला तर

हें स्पष्ट दिसून येईल कीं, जमीन-महसूल बिनबोभाट वसूल व्हावा यासाठींच मुख्यतः सरकारला जमिनींचें एकीकरण करावयास पाहिजे आहे. जमिनी लहान व गैरफायदेशीर असतांहि शेतकरी त्यांना चिकटून राहतात याचें कारण देशांत दुसरे उद्योगधंदे राहिले नाहींत हेंच होय. हें मूळ कारण नाहींसें न करतां, लहान लहान जमिनी एकत्रित करून त्या बड्या भांडवलवाल्यांच्या हातीं गेल्यानें हल्लीं असलेले लहान जमिनीचे मालक हे उपरी बनणार व एकीकरणाचा फायदा सर्व बाहेर राहणाऱ्या ( अॅबसेंटी ) भांडवलवाल्यांच्या पदरांत पडणार. सारांश, या बिलानें शेतकऱ्यांवरील संकट कमी न होतां उलट अधिकच वाढणार आहे. आणि लँड रेव्हिन्यू बिलांतील धोरणाची बजावणी सोपी करण्याच्या हेतूनेंच तें या वेळीं पुढे येत असल्यामुळें तें सिलेक्ट कमिटीने कितीहि सुधारलें तरी तें फेटाळून लावणें हेंच कौन्सिलरांचे या वेळीं कर्तव्य होय. कौन्सिलाचे सभासद या बाबतींत कचरत असल्यास शेतकऱ्यांनीं संघटित चळवळीनें त्यांना तसें करण्यास भाग पाडलें पाहिजे.

## कौन्सिलांतील मतव्यापार

सिंध प्रांताला तुकड्यांचें बिल लागू करावयाचें नाहीं. पण सिंधी मुसलमानांच्या मतांचे जोरावर सरकारला तुकड्यांचें बिल व लँड रेव्हिन्यू बिल हीं कौन्सिलांतून मंजूर करून घ्यावयाचीं आहेत. म्हणून सिंधी मुसलमानांच्या हातीं जमिनी राहाव्या, त्या हिंदु लोकांना विकत घेतां घेऊं नयेत असें बिल याच वेळीं आणून सिंधचा पाठिंबा सरकारला संपादन करावयाचा आहे. सिंधमधील जमिनी विकत घेण्याच्या हिंदूंच्या हक्कावर परस्पर तुळशीपत्र ठेवून मुसलमानांची मतें सरकार विकत घेत आहे! सिंधमधील शेतजमिनी म्हणजे सरकारच्या कौन्सिलांतील मतव्यापाराचें विनिमयसाधन होऊन बसलें आहे. सिंधखेरीज इतर भागांत शेतकऱ्यांच्या लहान लहान जमिनी बिनशेतकरी भांडवलवाल्यांच्या हातीं देण्याचा उद्योग सुरू असतां उलट सिंधमध्यें मुसलमानांच्या हातीं जमिनी ठेवण्याच्या अंतस्थ हेतूसाठीं 'शेतकऱ्यांच्या जमिनी बिनशेतकऱ्यांचे हातीं जाऊं नयेत' हें तत्त्व सोयीकरतां सरकार वरकरणी पुढें करीत आहे. वर्गविशिष्ट व ज्ञातिविशिष्ट कलह पेटवून, कौन्सिलांतील मतसंख्या आपल्या मुठींत ठेवून, सुधारणांचा बोजवारा करावयाचा व पूर्वापार चालत आलेला अनियंत्रित अधिकार व अंमल तसाच कायम राखावयाचा यासाठींच हे सर्व खेळ चालू असून शेतकऱ्यांच्या हिताची खरी कळकळ त्यांत बिलकुल नाहीं हें ओळखून शेतकऱ्यांनीं या तीन बिलांविरुद्ध वेळींच तीव्र स्वरूपाची चळवळ करावयास पाहिजे.

## पुढील चळवळ

या चळवळीच्या अंतिम भूमिकेवर बार्डोलीप्रमाणें सत्याग्रह करण्याचा प्रसंग प्राप्त होण्याचा संभव असल्यामुळें जेथें जेथें बार्डोली तालुक्यासारखी अभेद्य संघटना निर्माण करणें शक्य आहे तेथें तेथें ती करण्याच्या मार्गाला शेतकऱ्यांनीं लागावें. स्वराज्य हें ज्याचें त्यानेंच स्वावलंबी प्रयत्नांनीं मिळवावयाचें असतें. शेतकऱ्यांच्या लढ्यांत बिनशेतकरी सुशिक्षित लोक त्यांस शक्य ती मदत करतीलच. पण मुख्यतः शेतकऱ्यांकडूनच या चळवळीची उठावणी होणें जरूर आहे. शेतकऱ्यांना स्वराज्य न देण्याचा सरकारचा हट्ट कोणत्या उग्र-भयानक स्वरूपापर्यंत जाऊं शकतो हें बार्डोलीच्या लढ्यांत दिसून आलें आहे. जमीन-महसुलाची आकारणी ठरविण्याच्या बाबतींत अधिकाऱ्यांनीं केलेल्या अंदाजाची स्वतंत्र कमिटी नेमून चौकशी करा असें म्हटल्याबरोबर 'सरकारच्या अस्तित्वावरच हा घाला आहे' असें गव्हर्नरांच्या मुखानें नोकरशाही आज बोलत आहे. आपल्या कारभारावरील लोकमताचें नियंत्रण मान्य करणें म्हणजे आपलें मरण आहे असें नोकरशाहीस वाटत आहे. आणि अनियंत्रित कारभार हेंच जीवित मानलें तर तें खरेंच आहे. जितक्या प्रमाणांत लोकशाहीची वाढ तितक्या प्रमाणांत अनियंत्रित सत्तेचा नाश हा ठेवलेला आहे. आणि हिंदुस्थानांत तरी शेतकरी जागा व संघटित होऊन आपला अधिकार चालवूं लागल्याखेरीज लोकशाहीचा खरा पाया घातला जाणार नाहीं. शेतकऱ्याला स्वराज्य मिळेल तरच तें इतरांना खऱ्या अर्थानें प्राप्त होईल. बार्डोलीचा लढा बार्डोली पुरता तडजोडीनें मिटविण्यासाठीं गेल्या आठवड्यांत इंडियन मर्चंटस् चेंबरच्या शिष्टमंडळामार्फत गव्हर्नरांशीं कांहीं बोलाचाली सुरू झाली आहे. पण बार्डोलीचा लढा कदाचित् तात्पुरता मिटला तरी तशीच इतर ठिकाणीं सारावाढ झाली त्याची वाट काय? आणि बार्डोलीची सारावाढ ज्या पद्धतीनें झाली ती पद्धत कायमची कायदेशीर करून टाकण्याची सरकारची कारवाई शेतकरी चालू देणार काय? रेव्हिन्यू खात्याचा अनियंत्रित व सर्वतंत्र-स्वतंत्र कारभार सुधारणा कायद्यानंतरहि तसाच चालू द्यावयाचा काय? हे प्रश्न शेतकऱ्यांचे शेतकऱ्यांनींच सोडवावयाचे आहेत. बार्डोलीस शेतकऱ्यांनीं प्रथम लढ्याची तयारी करून मगच दे. वल्लभभाई पटेल यांस पाचारण केलें. आणि बार्डोलीचा लढा हा शेतकऱ्यांच्या स्वराज्यासाठीं शेतकऱ्यांच्या स्वावलंबी व संघटित प्रयत्नांचा ओनामा ठरेल आणि त्यापुढील चळवळी यथाक्रम सुरू होतील तरच तेथील लोकांनीं चालविलेल्या प्रचंड स्वार्थत्यागाच्या दिव्याचें खरें श्रेय राष्ट्राला लाभलें असें म्हणतां येईल.

# रशियांतील बोल्शेव्हिक राज्य

## लेखांक ६ वा

## उपसंहार

रशियांत दहा वर्षांपूर्वी बोल्शेव्हिकांनीं आपली सत्ता स्थापन केली. बोल्शेव्हिक हे आपणास समाजसत्तावादी म्हणविणारे आहेत. समाजसत्तावाद्यांनीं उभारलेली ही राज्यपद्धति जगाच्या पाठीवर अगदींच नवीन असल्यामुळें तिजसंबंधानें हिंदी लोकांस साहजिकच कुतूहल उत्पन्न झालें. विशेषतः युरोपियन राष्ट्रांकडून या सत्तेस सामान्यतः विरोधच होत गेल्याकारणानें हिंदी जनतेची कुतूहलबुद्धि अधिकच वाढली. युरोपियन राष्ट्रांविषयीं हिंदुस्थान व इतर आशियाटिक राष्ट्रें यांचें मत अनुकूल नाहीं. आणि युरोपियन राष्ट्रांस रशियांतील बोल्शेव्हिक राज्य आवडत नाहीं. यायोगानें जें युरोपियन राष्ट्रांस प्रतिकूल तें आपणास अनुकूल अशी साहजिक कल्पना होऊन हिंदी लोक रशियांतील बातम्या सहानुभूतिपूर्वक ऐकूं लागले. तथापि इंग्रजी वर्तमानपत्रें व मासिकें यांनीं रशियाचे बाबतींत अशी विलक्षण व भीतिजनक वर्णनें पसरून दिलीं कीं तीं कानीं पडल्यापासून रशियांतील नवी राज्यपद्धति हें केवळ युरोप खंडावरच नव्हे तर साऱ्या जगावर कोसळणारें संकट होय अशीहि भीति हिंदी लोकांच्या अन्तःकरणांत वावरूं लागली. रशियांत स्त्रीपुरुषांचे विवाह बंद झाले, स्त्रिया राष्ट्रीय मालकीच्या ठरल्या, ख्रिस्ती धर्म साफ बुडाला, सुशिक्षित वर्ग पोटाकरितां देशोधडीस लागला, मनुष्याची सत्ता त्याच्या घरादारांवर, शेतवाडीवर व पैसाआडक्यावर राहिली नाहीं, भांडवलवाल्यांचे कारखाने सरकारनें आपल्या ताब्यांत घेतले व झारचे राजवाडे मजुरांस राहावयास दिले अशा एक ना दोन ऐकीव वदंता बोल्शेव्हिकांच्या राज्यकारभाराविषयीं कोणासहि धास्ती उत्पन्न करणाऱ्याच होत्या यांत शंका नाहीं.

रशियाविषयीं थोड्याशा अनुकूल व बऱ्याचशा प्रतिकूल हकीकती ऐकून व वाचून कोणाचेंहि मन बुचकळ्यांत पडावें हें स्वाभाविक होय. रशियांतील बोल्शेव्हिक राज्यपद्धतीवर अलीकडे इंग्रजी भाषेंत बरेंच वाङ्मय प्रसिद्ध होत आहे. तें सर्व वाङ्मय वाचून त्याच्या आधारें केसरीच्या वाचकांस लेखमाला सादर करणें हा एक स्वतंत्र उद्योगच होऊन बसणारा होता. वर्तमानपत्राच्या वाचकाचे दृष्टीनें एवढ्या प्रचंड उद्योगाची तादृश आवश्यकता नाहीं. रशियांत काय प्रकार चालू आहेत यांचे स्थूल ज्ञान व्हावें इतपतच सामान्य वाचकवर्गास या विषयाचें अगत्य वाटणार. मात्र हें ज्ञान देत असतां बोल्शेव्हिक राज्यपद्धतीचीं बरींवाईट दोनहि अंगें वाचकांचे नजरेस आणून वस्तुस्थितीचा विपर्यास न होईल अशी खबरदारी घेणें एवढेंच आमचे कर्तव्य होतें. गेले पांच लेखांक ज्यांनीं वाचले असतील त्यांची ही खबरदारी घेतली असल्याबद्दल खात्री झालीच असेल. आम्हास बोल्शेव्हिकांच्या ज्या बऱ्या व वाईट बाजू दिसल्या त्या वाचकांपुढें ठेवल्या असून त्यावरून बोल्शेव्हिकांच्या प्रयत्नाविषयीं कोणासहि योग्य तेंच मत बनवितां येईल असें आम्हास वाटतें.

### पाश्चात्य संस्कृतीची प्रतिक्रिया

बोल्शेव्हिकांची समाजसत्ता हाहि पाश्चात्य संस्कृतीच्या गेल्या दीडशें वर्षांतील क्रियेस घडणारी प्रतिक्रिया होय. पाश्चात्य संस्कृति अर्थशास्त्रदृष्ट्या सदोष आहे. तिच्यांत संपत्तीची वांटणी समान नाहीं. समानतेची काल्पनिक रेषा कोणत्याहि काळीं समाजानें गांठली असेल कीं नाहीं याविषयीं शंका वाटते. परंतु आजच्या विषमतेची बरोबरी मात्र कोणताहि काळ करूं शकणार नाहीं. प्रचंड यंत्रसामुग्री व मोठें भांडवल या दोन शक्ती एकवटल्या असतां त्यांचा प्रभाव केवढा होतो याचा अनुभव हिंदुस्थानासहि नाहीं असें नाहीं. कोठें हिंदुस्थान व कोठें इंग्लंड! पण यंत्र व भांडवल यांची सांगड इंग्लंडांत जमतांच त्यापुढें हिंदुस्थानांतलि एवढें मोठें मनुष्यबळ निरुपयोगी ठरलें. इतकेंच नव्हे तर त्याची आडगळ वाटूं लागली. हिंदुस्थानांतील सर्व धंदे सफई बसले व देशांत कच्चा माल विपुल असूनहि हिंदी माणस अन्नास मोताद झाला. आणि आज अशी स्थिति प्राप्त झाली आहे कीं कोणताहि नवा धंदा काढावयाचा झाल्यास तो मोठें भांडवल जमवून मोठ्या प्रमाणावर चालविल्यावांचून तो तगून राहण्याची व भरभराटीस येण्याची आशा राहिली नाहीं.

हिंदुस्थानांत यंत्र नाहीं व भांडवलहि नाहीं आणि तें यदाकदाचित् जमविलें तरी इंग्लंडांतील भांडवलवाल्यांच्या मुठींत सांपडलेल्या हिंदुस्थान-सरकाराकडून संरक्षण मिळून इकडील कारखाने वाढीस लागण्याचीहि आशा नाहीं. हीच स्थिति कायम राहिल्यास हिंदी लोकांचें जीवित सर्वस्वी परदेशी भांडवलवाल्यां

वर अवलंबून राहून देशांतील सर्व वर्गास हळूहळू मजुरांच्या अवस्थेस पोंचणें भाग पडेल. हिंदुस्थान कृषिप्रधान देश असला तरी येथील जमिनी गरीब शेतकऱ्यांच्या हातांतून सुटून श्रीमंत भांडवलवाल्यांच्या मालकीच्या होण्याचा फार संभव आहे. ही देवघेव आजच सुरू झाली असून ती उत्तरोत्तर वाढत जाणार यांत शंका नाहीं. भांडवलवाला मग तो स्वदेशी असो कीं परदेशी असो, त्याची मनोरचना कोठेंहि सारखीच असावयाची. या दृष्टीनें भांडवलवाल्या वर्गाचा विचार केल्यास त्याच्या सामर्थ्यास आळा बसणें आवश्यक होय असेंच कोणीहि म्हणेल.

परंतु तो आळा कोणत्या उपायानें घालावयाचा यासंबंधा ।च वाद माजतो. यंत्रकला अजीबात बुडव । मनुष्यानें हस्तकौशल्यावर भर द्यावा असें म. ग ।ंधीप्रभृतींचा पक्ष म्हणणार तर यंत्रकला जिवंत राखून ती भांडवलवाल्यांच्या मालकीची न ठेवतां समाजाच्या मालकीची करावी असा समाजसत्तावादी आग्रह धरणार. समाजसत्तावादी एवढाच आग्रह धरून थांबत नाहीं. यंत्रकला ही जशी समाजाच्या मालकीची व्हावयास पाहिजे त्याचप्रमाणें यंत्रकलेवर जमलेलें भांडवलहि समाजाच्या मालकीचें झालें पाहिजे अशी आग्रहाची पुढची पायरी तो चढतो. यंत्रकलेवर जमणारं भांडवल मोठं असतें हें खरें. पण त्याखेरीज शेतकी, दुकानदारी व सावकारी यांवरहि थोडेंबहुत भांडवल गोळा होतेंच. तें भांडवल प्रमाणापेक्षां अधिक वाढलें कीं तें यंत्रकलेकडे वळून भयप्रद होणार नाहीं कशावरून? यासाठीं राष्ट्रांतील कोणत्याहि व्यक्तीच्या मालकीचें भांडवल मुळींच असूं नये ही आग्रहाची तिसरी पायरी समाजसत्तावाद्याकडून चढण्यांत येते. रशियांतील बोल्शेव्हिकांनीं हीच पायरी चढून जनतेच्या खासगी मिळकतीवरच धोंड आणिली. देवकीच्या पोटीं आठवा मुलगा येईल तोच आपला घात करणार अशी आकाशवाणी कंसानें ऐकल्यानंतर कोठून मोजलेला तो आठवा याविषयीं कंसासच शंका पडून तो देवकीचें प्रत्येक मूल शिळेवर आपटीत सुटला. त्यांतलाच बोल्शेव्हिकांचा हा प्रकार इतकेंच नव्हे तर बोल्शेव्हिकांनीं कंसावरहि ताण केली आहे.

त्यांनीं भांडवलाचें मूळ जी खासगी मिळकत तीच बुडविल्यामुळें समाजाचा अनादि कालापासून भरलेला पायाच उखडून टाकला आहे. आपल्या बौद्धिक शारीरिक किंवा मानसिक श्रमाचा मोबदला आपणास मिळून आपल्या मुलाबाळांस राहावा अशी इच्छा प्रत्येक मनुष्याची असणार. त्याला आपल्या मनाजोगें घर हवें, गाडी-घोडा हवा, शेतवाडी हवी व ऐषआराम हि हवा. तो कष्ट करील आणि यांपैकीं साधतील तेवढ्या गोष्टी मिळवील. बोल्शेव्हिकांनीं मनुष्यमात्राचें हें स्वातंत्र्य हिरावून घेतलें आहे. त्यांचें मुख्य सूत्र असें आहे कीं, ज्यानें त्यानें यथाशक्ति उद्योग करावा व त्याच्या गरजा लक्षांत घेऊन सरकार जें देईल तें घ्यावें. पंधरा कोटि लोकांवर राज्य करणारें सरकार वेगवेगळ्या व्यवसायांतील माणसांच्या गरजा ठरविणार व त्या एका विशिष्ट नियमाप्रमाणें पुरविणार. या योजनेनें व्यक्तीचें सर्व स्वातंत्र्य नष्ट होऊन ती समाजाच्या अंकित राहाणार. समाजांतील कनिष्ठ वर्गाच्या गतीनें सर्व वर्गास चालावें लागून कनिष्ठ वर्गाच्या सर्व गरजा भागल्यानंतर वरिष्ठ किंबहुना बोल्शेव्हिकांच्या भाषेत बोलावयाचें तर इतर व्यवसायांतील व्यक्तींच्या गरजांचा विचार होणार.

## कर्तृत्वाची कुचंबणा

एखाद्या इयत्तेतील शेवटच्या मुलाच्या चालीनेंच बुद्धिमान व तरतरीत मुलांनीं आपली प्रगति केली पाहिजे असा नियम उद्यां शाळाखात्यानें घालून दिल्यास बुद्धिमान व तरतरीत मुलांची जी कुचंबणा होईल तीच बोल्शेव्हिक राज्यपद्धतींत कवि, ग्रंथकार, चितारी, शास्त्रज्ञ, नाटककार इत्यादि बौद्धिक व मानसिक परिश्रम करणारांची होणार. एखादा वकील किंवा कारागीर जगांत आपल्या उद्योगावर लाखों रुपये कमावण्याची उमेद बाळगतो. त्या कमाईचा कांहीं उपभोग तो स्वतः घेईल व आपल्या पुत्रपौत्रांसहि बाकीची कमाई तो राखून ठेवील. बोल्शेव्हिक राज्यपद्धतींत या व्यवस्थेस थारा नाहीं. त्यानें फार तर स्वतःची काळजी करावी, पोराबाळांची करूं नये. त्याची प्राप्ति पोराबाळांस उपयोगी पडणार नाहीं. त्यांनीं स्वतःच्या हिमतीवर पोट भरावें. याचा परिणाम असा होईल कीं बाप जर बडा वकील असेल तर त्याच्या प्रत्यक्ष मुलावर पाट्या वाहाण्याचा प्रसंग येईल. ही परिस्थिति नाउमेदकारक होय. तिच्यांत कोणीहि गुणी माणूस मन लावून व अंग मोडून काम करणार नाहीं. कारण गुणसंवर्धनास संपत्तीच्या रूपानें उत्तेजनच मिळत नाहीं. या ठिकाणीं हिंदुस्थानांतील सांप्रतची स्थिति लक्षांत आणावी. हिंदुस्थानांतील गुणी जनास राजाश्रय नाहीं, यामुळें सर्व प्राचीन कलाकौशल्याचा लोप होत आहे. काव्य, नाट्य, संगीत, शिल्प, शास्त्र, इत्यादि विषय ऱ्हास पावत आहेत. राजाश्रय नाहीं तोंच ही दुर्दशा तर लोकाश्रयाहि काढून घेतल्यावर काय शिल्लक उरेल याची कल्पनाच केलेली बरी.

## समाजसत्तावाद्यांचें उत्तर

या आक्षेपास समाजसत्तावाद्यांनीं आपलें

उत्तर तयार ठेवलेंच आहे. ते म्हणतात, व्यक्तीनें स्वतःवर व आपल्या कुटुंबावर प्रेम करावें हा संवयीचा व अभ्यासाचा परिणाम आहे. मनुष्याच्या संवयी व अभ्यास बदलला कीं त्याच्या प्रेमाच्या व तन्मूलक सुखाच्याहि कल्पना बदलतात. मनुष्य स्वतःवर व स्वतःच्या कुटुंबावर प्रेम करतो म्हणून त्याला सुख लागतें. तसेंच तो समाजावर प्रेम करावयास शिकला म्हणजे त्याला तिकडूनहि सुख लागेल इतकेंच नव्हे तर त्या सुखाचें प्रमाण अनंत पटींनीं वाढेल. फक्त प्रत्येकास अशा प्रकारच्या समाजसुखाचें बाळकडू लहानपणापासूनच पाजावयास पाहिजे. बोल्शेव्हिकांचा हा आशावाद कोणासहि हंसूं आणणारा आहे यांत शंका नाहीं. प्रत्येक धर्म मनुष्यमात्रास आजवर हेंच शिकवीत आला आहे. जनताजनार्दनाचा अर्थहि हाच. वेदांताचें सार यांतच सांपडतें. वसुधैव कुटुंबकत्वाचा हा एक भागच होय. बोल्शेव्हिक शिकवितात हा वेदान्त जगास नवा नाहीं. तो सांगतां सांगतां साधुसंतांनीं दांतांच्या कण्या केल्या. तथापि जग आपल्या क्रमापासून यत्किंचितहि ढळलें नाहीं. जगाचा हा प्राचीन अनुभव लक्षांत घेतल्यास लेनिन, ट्रॉटस्कीप्रभृति बोल्शेव्हिक पुढाऱ्यांची गणना आज साधुसंतांत झाली तशीच पुढेंहि होईल. पण बहुजनसमाज नित्याच्या चाकोरीपासून मुळींच ढळणार नाहीं.

समाजाचें माहात्म्य बोल्शेव्हिकांनीं किती वाढविलें आहे याचें वर्णन वर आलेंच आहे. पण त्याहि पलीकडे जाऊन त्यांनी समाजहित हेंच सारसर्वस्व व ध्येय ठरविलें आहे. ईश्वर त्याचा प्रेषित येशू ख्रिस्त व त्यानें प्रणीत केलेला ख्रिस्ती धर्म बोल्शेव्हिकांस मान्य नाहीं. भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनम् कुतः, या चार्वाक नीतीप्रमाणें मनुष्याच्या आत्म्याचेंहि अस्तित्व बोल्शेव्हिक कबूल करीत नाहींत. मनुष्याच्या ऐहिक व्यापारापलीकडे बोल्शेव्हिकांस कांहीं कर्तव्य नाहीं. परमेश्वर सर्वसाक्षी असल्यामुळें आपलें प्रत्येक बरेंवाईट कृत्य त्याच्या नजरेस पडेल या भीतीनें मनुष्य सामान्यतः पापाचरणापासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करतो. पण बोल्शेव्हिकांस ती भीति नाहीं. त्यांस फक्त समाजाची भीति. ही भीति आणि सरकारी कायद्याची भीति सारखीच मर्यादित. आपलें वर्तन कायदेशीर ठेवूनहि धूर्त व खिलंदर माणसास स्वतः गुन्हे छपवितां व पचवितां येतात. गुन्ह्यावर नियंत्रण कायद्याचें राहातें. पण गुन्ह्याचा उगम ज्या मनांतून किंवा मेंदूंतून होतो त्यास शुद्ध व पवित्र राखण्याचें कार्य देवविषयक व धर्मविषयक कल्पनांकडून होतें. समाज व कुटुंब या दोन घटकांत मनुष्यास सतत जवळचा घटक कुटुंब हाच होय. कुटुंबापासून त्यास प्राप्त होणारें सुख व दुःख निकटचें व नित्याचें आहे. समाजापासून मिळणारें सुख-दुःख दूरचें व नैमित्तिक आहे. यामुळें कुटुंब व समाज या उभयतांस मनुष्य जोखून पाहूं लागल्यास त्यास कुटुंबाची ओढच जास्ती वाटणार हें उघड आहे.

## समाजसत्ता व रशियन जनता

खऱ्या साधुसंताप्रमाणें खरे तत्त्वनिष्ठ समाजसत्तावादी जगांत मूठभरच राहाणार हें न विसरल्यास रशियांतील बोल्शेव्हिकांचा समाजसत्तावाद सामान्य रशियन जनतेस कितपत रुचेल व पचेल याविषयीं कोणाचेंहि मन साशंक झाल्यावांचून राहात नाहीं. इतकेंच नव्हे तर ख्रिस्ती धर्म व देव यांस मूठमाती दिल्यानें रशियांत अद्यापि जी माणुसकी दृष्टीस पडते तिचा लोप होऊन रशियन माणसें राक्षसी बनतील अशी भीति वाटते. उदाहरणार्थ, जगांत गर्भपात हें पातक समजण्यांत येतें व अशा प्रकारचें कृत्य चोरूनच होतें. परंतु रशियांत गर्भपातांतील पातक कायद्यानें काढून घेतलें आहे. हा गर्भपात कोणीहि करावा. विवाहित स्त्रियांनीं करावा, विधवांनीं करावा व कुमारिकांनींहि करावा. एखाद्या विवाहित स्त्रीस मुलाची अडचण वाटूं लागल्यास तिनें निःशंकपणें डॉक्टराकडे जाऊन आपल्या गर्भाची वासलात लावून टाकावी. हें पातक अशा रीतीनें एकदां पचलें म्हणजे विवाहित स्त्रीस झालेलें मूल तिनें स्वतः मारून टाकण्यासहि कालान्तरानें कायद्याची असलेली हरकत दूर होईल.

मुलांतहि वाजवी संतति व गैरवाजवी संतति हा भेद सर्वत्र समजण्यांत येतो. स्त्रीस भ्रतारापासून झालेली संतति ती वाजवी संतति व अविवाहित अगर विधवा स्त्रीस झालेली संतति ती गैरवाजवी संतति होय. ही दुसऱ्या प्रकारची संतति निंद्य मानली जाते. पण रशियन कायद्यानें हाहि भेद नाहींसा करून दोनहि प्रकारच्या संततीस सारखीच मान्यता दिली आहे. याचा परिणाम काय होईल हें सांगावयास नकोच. कोणत्याहि प्रकारच्या संततीस जर बाध नाहीं तर कुमारिका व विधवा यांस संततीकरितां विवाहापर्यंत वाट पाहाण्याची गरज काय? राजरोस व्यभिचारास व समाजाच्या नाशास हें निमंत्रण नव्हे काय? लग्नाच्या स्थिरपणावरहि बोल्शेव्हिकांनीं असाच घाव घातला आहे. लग्न हा धार्मिक विधि न समजतां तो केव्हांहि करावा व केव्हांहि मोडावा. समाजांतील प्रत्येक व्यक्तीस या बाबतींत मोकळें सोडल्यावर समाजांत सुख शांति व समाधान नांदावें कसें व असला समाज टिकावा कसा ?

## मूलतत्त्वेंच घातक

समाजसत्तावाद्यांचीं मूलतत्त्वें व त्यांची गेल्या दहा वर्षांत बोल्शेव्हिकांनीं रशियांत केलेली अंमल-

बजावणी यांचा येथवर विचार झाला. त्यावरून बोल्शेव्हिकांची राज्यपद्धति जगास कितपत कल्याणप्रद प्रिय होईल याची कल्पना वाचक करतीलच. मूलतत्त्वेंच अशा रीतीनें घातक असल्यामुळें बोल्शेव्हिकांच्या राज्यकारभारांतील बाबींची माहिती केसरींत तपशिलवार आली कीं त्रोटक आली, तिच्यांतील विवक्षित भाग दोन वर्षांपूर्वीचा होता कीं आजचा आहे इत्यादि मुद्दे गौण ठरतात. यासंबंधानें मुंबईहून श्री. वा. ह. जोशी यांनीं टीकात्मक असा एक विस्तृत लेख आमच्याकडे पाठविला होता त्यांस आम्हास एवढेंच सुचवावयाचें आहे कीं त्यांचा व आमचा मतभेद तपशिलाविषयीं नसून तत्त्वाविषयीं आहे. बोल्शेव्हिकांची किंवा समाजसत्तावाद्यांचीं तत्त्वेंच आम्हास मान्य नसल्यामुळें त्यांच्या कारभारांतील बरींवाईट कृत्यें आमच्या दृष्टीनें कमी महत्त्वाचीं होत. शिक्षणप्रसार, शेतकऱ्यांची सांपत्तिक स्थिति सुधारण्याविषयीं आस्था, उद्योगधंद्याच्या वाढीविषयीं तळमळ या त्यांच्या गोष्टी प्रशंसनीय नाहींत असें कोण म्हणेल? परंतु आज रशियांत जी थोडीबहुत सुधारणा दृष्टीस पडते तो बोल्शेव्हिक अर्थात समाजसत्तावादी मतांचा प्रताप खास नव्हे. समाजसत्तेचीं तत्त्वें बोल्शेव्हिकांनीं मोठ्या भांडवलाच्या धनिक वर्गास, जमीनदारांस व मध्यम वर्गास लागू करून त्यांस भिकेस लावलें. परंतु त्याशिवाय उरलेला जो प्रचंड शेतकरी वर्ग त्यांच्या जीवनक्रमांत त्यांनीं अद्यापि मुळींच फरक होऊं दिला नाहीं. त्यांस समाजसत्तावादाचीं तत्त्वें अद्यापि जर समजलीं नाहींत तर त्यांची सदर तत्त्वांस मान्यता मिळणे दूरच. मूठभर समाजसत्तावाद्यांनीं रशियाचा सर्वाधिकार क्रांतीच्या काळापासून आजतागायत आपल्याच हातीं राखला असल्यामुळें रशियांतील किंचित् सुधारणेचें श्रेय समाजसत्ताक तत्त्वांस मिळत नसून कर्तृत्वशाली पुढाऱ्यांस जात आहे हें विसरतां कामा नये. ज्याच्या अंगीं कर्तृत्व आहे, ज्याच्यापाशीं सत्ता आहे व लोककल्याणाची ज्याला तळमळ आहे अशा कोणाहि राजानें अगर राज्यपद्धतीनें अशीच सुधारणा केली असती. मग ती बोल्शेव्हिक पुढाऱ्यांनीं केली यांत नवल काय ! ज्या वेळीं बोल्शेव्हिक पुढारी समाजसत्तावादाचीं सर्व तत्त्वें रशियांतील पंधरा कोटि लोकांस लागू करतील, तीं तत्त्वें रशियन समाज पत्करील व त्या तत्त्वानुसार रशियन राज्यकारभार सुरू होईल त्याच वेळीं बोल्शेव्हिकांचा विजय झाला असें जग कबूल करील.

# शेतकी कमिशनचा रिपोर्ट

रॉयल ॲग्रिकल्चरल कमिशनचा रिपोर्ट ता. २७ जून रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला असून परिशिष्टासुद्धां त्याचीं ७५५ पानें आहेत. नेहमीच्या उपयोगासाठीं म्हणून त्याचाच एक शंभर पानांचा संक्षिप्त रिपोर्टहि प्रसिद्ध झाला आहे. या कमिशनापायीं एकंदर १३७२७३४ रु. खर्च झाला आहे !

या रिपोर्टचीं एकवीस प्रकरणें आहेत. संघटना, शेतकीसंबंधीं संशोधन, शेतकीची सुधारणा, तुकड्यांचें एकत्रीकरण व पोटविभाग, प्रदर्शनें व प्रयोगिक प्रचार, जंगल, शेतकीचे रोग व प्रतिबंध, पाटबंधारे, दळणवळण, जनावरें, सहकार्य, शिक्षण, मजुरी वगैरे अनेक शेतकीसंबंधीं महत्त्वाच्या बाबींच। विचार यांत करण्यांत आला असून कांहीं सूचना व शिफारसीहि करण्यांत आल्या आहेत. त्यांपैकीं निरनिराळ्या विषयांवरील प्रमुख सूचना सारांशरूपानें पुढे दिल्या आहेत.

**शेती-संघटना**—'इंपीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च' नामक एक मध्यवर्ती संस्था स्थापन करण्याची कमिशनानें शिफारस केली आहे. हिंदुस्थानांतील शेतकीच्या संशोधनानें ब्रिटिश साम्राज्यांतील इतर भागांत व दुसऱ्या परकीय देशांत चाललेल्या कृषिसंशोधनाशीं सहकार्य करावें. हें कार्य या कौन्सिलकडे सोंपविण्यांत यावें. या कौन्सिलचे हवालीं पन्नास लाख रुपयांचा एक कायमनिधि त्याच्या व्यवस्थेसाठीं करण्यांत यावा व वेळोवेळीं आर्थिक परिस्थितीच्या मानानें हा निधि वाढविण्यांत यावा.

संशोधनाचे बाबतींत काम करणाऱ्यांना शिक्षण। देण्याची व्यवस्था या कौन्सिलानें करावी. हल्लीं हिंदुस्थानसरकाराच्या शेतकी सल्लागाराकडे असलेलें प्रकाशनाचें काम या कौन्सिलाकडे सोंपवावें. शेतकीविषयक व व्हेटेरीनरी शास्त्रांतील निरनिराळ्या शाखांमधील तज्ज्ञाच्या, त्यांच्या त्यांच्या विषयापुरत्या, वेगवेगळ्या सभा भरविण्याची व्यवस्थाहि या कौन्सिलानें करावी.

शक्य तर हिंदी परिस्थितीचें ज्ञान असलेला अनुभविक मनुष्य या कौन्सिलाचा अध्यक्ष असावा व त्यानें आपला सर्व वेळ या कार्याकडे द्यावा. अध्यक्षांच्या मदतीसाठीं शेतकीकडे एक व जनावरांच्या जोपासनेकडे एक याप्रमाणें दोन मदतनीस असावेत. या खेरीज सदर कौन्सिलांत आठ सभासद हिंदुस्थानसरकारनें नेमावेत. प्रांतिक शेतकी

व व्हेटरीनरी खात्यांचे अठरा प्रतिनिधी, हिंदी विश्वविद्यालयाचे तीन प्रतिनिधी, इंडियन सेन्ट्रल कॉटन कमिटी व शेतकरी वर्ग यांचे दोन आणि सदर कौन्सिलानें नेमलेले पांच मिळून अडतीस सभासद असावेत. हिंदुस्थानसरकारचें ठाणें जेथें असेल तेथेंच या कौन्सिलाचेंहि ठाणें असावें.

सदर कौन्सिलाशीं सहकार्य करण्यासाठीं प्रांतानिहाय कमिट्या नेमण्यांत याव्यात. हिंदुस्थान-सरकारच्या शेतीसल्लागाराची जागा कमी करून त्याचें काम या कौन्सिलाचे अध्यक्ष व त्याचे मदतनीस यांचेवर सोंपवावें. कांहीं विशिष्ट तत्त्वांवर पुसा येथील संस्थेवर देखरेख करण्यासाठी एक डायरेक्टर नेमावा व त्यानें आपला सर्व वेळ याच कामीं लावावा. शेतकीशिक्षणाचे बाबतींत हिंदुस्थान स्वतःच्या पायावर उभा राहाण्यास समर्थ होईल असें करण्यासाठीं शक्य तितक्या लवकर पुसा हें अशा शिक्षणाचें केंद्र करण्यांत यावें. शेतकी संशोधनाचे कामीं विश्वविद्यालयांचेंहि साहाय्य मिळेल असें करावें. या संस्थेच्या अंतर्गत व्यवस्थेच्या बाबतींत रोथमस्टेड येथें अमलांत असलेली पद्धति अवलंबावी. तागासंबंधींच्या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं इंडियन सेंट्रल कॉटन कमिटीच्या धर्तीवर एक मध्यवर्ती मंडळ नेमण्यांत यावें व त्याचा अध्यक्ष इंपीरियल कौन्सिलाचा अध्यक्षच असावा. या मंडळाच्या खर्चासाठीं हिंदुस्थानसरकारच्या तिजोरींतून वार्षिक पांच लाख रुपये देण्यांत यावेत. दि बोर्ड ऑफ ॲग्रिकल्चर हें हल्लींप्रमाणेच कायम ठेवावें.

या प्रश्नावर सर टॉमस मिडलटन व डॉ. हैदर यांनीं भिन्न मत प्रदर्शित केलें आहे. त्यांच्या मतें इंपीरियल कौन्सिलाचे जागीं इंपीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च व बोर्ड ऑफ ॲग्रिकल्चर अशा दोन संस्था स्थापून त्यांच्याकडे अनुक्रमें संशोधनाचें व अंमलबजावणीचें काम यावें. या बोर्डाच्या पांचांपैकीं चार सभासद सदर कौन्सिलानें निवडावेत व त्या कौन्सिलाचे सभासद सदर बोर्डाचे एक्स-ऑफिशियो सभासद असावेत. या बोर्डाचें नांव 'ॲग्रिकल्चरल असोसिएशन ऑफ इंडिया' असें असावें.

**बीं, खतें व आउतें**—हिंदुस्थानांतील शेतकी खातीं हीं सांप्रत खतांचा आर्थिक दृष्टीनें उपयोग कसा करतां येईल या संबंधानें निश्चित सल्ला देण्यास समर्थ नाहींत म्हणून या बाबतींत साधनसामुग्रीचा काळजीपूर्वक विचार करून येणाऱ्या निकालांचा कार्यकारणभाव जुळविला पाहिजे.

पाटबंधाऱ्यांची सोय नसलेल्या जमिनींतून खतासंबंधीं निरनिराळे प्रयोग करून पाहणें विशेष महत्त्वाचें आहे. शेतकीखात्याच्या डायरेक्टराचे नजरेखालीं बियाण्याची परीक्षा करण्यासाठीं एक स्वतंत्र संस्था काढावी व शेतीचीं आउतें व यंत्रसामुग्री यांची कार्यक्षमता, त्यांवरील रेल्वेचे दर यांची पुनः चौकशी करून शक्य तेथें जरूर त्या सवलती देण्याचें कार्य या संस्थेनें करावें. शेतकीचीं आउतें व यंत्रसामुग्री तयार करण्याचे कामीं वापरल्या जाणाऱ्या लोखंड व पोलाद यावरील आयात जकात परत मिळण्याच्या बाबतीतील हिंदी कारखानदारांच्या हक्काची टॅरिफ बोर्डानें चौकशी करावी.

गुरांच्या जोपासनेच्या बाबत कमिशनाची अशी शिफारस आहे कीं, बंगलोर येथील ॲनिमल न्यूट्रिशनमधील कामकरी व साधनसामुग्री हीं वाढविण्यांत यावीं व गुरांच्या जोपासनेच्या प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं एका संशोधन-संस्थेची योजना करावी.

**पाटबंधारे**—शेतकी खातें व पाटबंधारा खातें यांचे संबंध अधिक दृढ करावेत. शेतकी खात्यांतील नोकरवर्गासाठीं अल्प मुदतींत शेतकीचें शिक्षण देणाऱ्या संस्था स्थापाव्यात. पाटबंधाऱ्यांच्या बाबतीतील तक्रारींचा विचार करण्यासाठीं एक संस्था असावी. पाटबंधाऱ्यांच्या बाबतीतील माहिती पुरविण्यासाठीं एक मध्यवर्ती ब्युरो स्थापावा. बंगालमधील इरिगेशन खात्याचे दोन भाग करून एकाकडे पाटबंधाऱ्यांचा व दुसऱ्याकडे डेनेज, नौकानयन इ. प्रश्न सोंपवावेत !

**दळणवळण**—दळणवळणासंबंधीं रस्त्यांच्या वाढीची शिफारस कमिशननें केली आहे. पंजाब व ब्रह्मदेश येथील कम्युनिकेशन्स बोर्डाप्रमाणेंच सर्व प्रांतांतून तेच कार्य करण्यासाठीं रस्तेमंडळें ( रोड बोर्ड्स ) स्थापण्यांत यावींत. निरनिराळ्या पिकांच्या सामर्थ्याच्या दृष्टीनें कांहीं एका ठराविक मुदतीनें रेल्वेच्या दरांची चौकशी व्हावी. सर्व हिंदुस्थानभर एकच वजनें व मापें सुरू करण्याच्या बाबतींत चौकशी करण्याचा प्रश्न हिंदुस्थानसरकारनें पुनः हातीं घ्यावा, त्याच्या शक्याशक्यतेचा विचार करून या बाबींत कांहीं सर्वसामान्य तत्त्वें कायम करावीं व प्रांतिक सरकारांना तीं बंधनकारक असावींत. परदेशांत स्वतंत्र ट्रेड कमिशनर्स नेमणेंहि परिणामीं हितकारक आहे.

शेतकीखात्यांतील नोकऱ्यासंबंधीं बऱ्याचशा सूचना कमिशननें केल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढीलप्रमाणें आहेत. शेतकी खात्याचा डायरेक्टर हा उच्च शास्त्रीय ज्ञानसंपन्न व कार्यक्षम असावा. एखाद्या प्रांतांत डायरेक्टराच्या जागेसाठीं लायक उमेदवार नच मिळेल तर दुसऱ्या प्रांतांतील शेतकीखात्यांतील माणसास प्रथम संधि देण्यांत यावी व तसा कोणी न मिळेल तरच सिव्हिल सर्व्हिसकडे धांव घ्यावी. [या प्रश्नावर कमिशनाचें ऐकमत्य आहे.]

**तुकड्यांचें एकत्रीकरण**—या प्रश्नाबाबत कमिशनची अशी शिफारस आहे कीं, हक्कदारांच्या भावनोद्रेकात्मक कृतींवर या प्रश्नाचा निकाल अवलंबून ठेवूं नये, तर सरकारनें या बाबतींत प्रचाराचें काम करावें. प्रत्यक्ष परिस्थितीचें ज्ञान सर्वांस करून यावें व प्राथमिक स्वरूपांतील सर्व खटाटोपाचा खर्चहि सरकारनें सोसावा. जमिनीचे एकत्रीकरणास कोणी तयार होत असेल तर त्याचा त्यासंबंधांत होणारा खर्च त्याला परत देण्यांत यावा.

या संबंधीं करण्यांत येणारी सर्व सरकारी खटपट पद्धतशीर रीतीनें व आशावादीपणानें करावी. नोटिफिकेशन करण्यासाठी विशिष्ट भागांची निवड करण्यांत यावी आणि कोणतेहि सक्तीचे प्रयत्न अमलांत आणण्यापूर्वी हक्कदारांच्या मतांची सांगोपांग चौकशी करण्यांत यावी.

सरकारी शेत—जमिनीवर प्रदर्शनें भरविण्यापेक्षां शेतकऱ्यांच्या शेतांत ती भरविणें श्रेयस्कर होय. सुधारलेल्या यंत्रसामुग्रीच्या उपयोगाची प्रायोगिक प्रदर्शनें भरविण्यांत यावीत. (अपूर्ण)

# बार्डोलीच्या लढ्याचें रहस्य

( ले.—**पंडिताप्पा रायाप्पा चिकोडी**, बी. ए. )

[ हा लेख आमदार चिकोडी यांनीं मुद्दाम लिहून आमचेकडे पाठविला आहे. श्री. चिकोडी हे मुंबई—कायदेकौन्सिलांत बेळगांव जिल्ह्यातर्फे एक सभासद आहेत. एक आठवड्यापूर्वी त्यानीं मुंबई येथील दैनिक वर्तमानपत्रांतून या विषयावरील आपलें मत त्रोटक रीतीनें जाहीर केलें होतें. त्यांत त्यांनी असें म्हटलें आहे कीं, बार्डोलीचा लढा मिटवावयाचा तर एक अधिकारी व दोन बिन—अधिकारी अशा लोकांची कमिटी नेमली जाऊन तिच्यापुढें बार्डोली तालुक्याच्या तरमबंदीची स्वतंत्र चौकशीच झाली पाहिजे. तशी चौकशी न होऊन लढा मिटला नाहीं व सत्याग्रह चालू राहिला तर लोकमत अधिक स्पष्ट रीतीनें व्यक्त होणें इष्ट म्हणून मी कौन्सिलांतील आपल्या जागेचा राजीनामाहि देण्यास तयार आहे. प्रस्तुत लेखांत चिकोडी यांनीं बार्डोलीच्या प्रश्नाचा विचार तात्विक दृष्टीनें केलेला आहे. —**सं. के.** ]

बार्डोलीचा लढा हा लहानसान नाहीं किंवा त्याला निवळ स्थानिक स्वरूप आहे असें नाहीं. बार्डोली तालुक्यातील शेतकऱ्यांनीं सत्याग्रहाचें शस्त्र उचललें व उगारलें त्यापूर्वीहि या लढ्याला महत्त्वाचें स्वरूप आलेलें होतें आणि त्यांची ही चळवळ अशा रीतीनें सुरू झाली नसती तरी इलाख्यांतील विचारी लोकांना या प्रश्नांत लक्ष घातलेंच पाहिजे होतें, आणि आतां तर सत्याग्रहाला सुरुवातच झाल्यानें व न्याय विरुद्ध जुलूम, निराश्रित प्रजा विरुद्ध बेगुमान अधिकारी, निःशस्त्र प्रतिकार विरुद्ध छळ व जबरदस्ती अशा युद्धाचें स्वरूप त्यांस आल्याकारणानें **बार्डोलीबाहेरच्या हिंदी लोकांनीं या लढ्यांत मनानें सामील झालें पाहिजे. प्रश्न मूलतत्त्वांचा व न्यायान्यायाचा आहे;** तो असा कीं, शेतकरी लोक हे प्रां. सरकारला त्यांच्या उत्पन्नांतील फार मोठा भाग देणारे असतां व नवी तरमबंदी होऊन शेतसारा बेसुमार वाढला असें त्यांना प्रामाणिकपणें वाटत असतांहि त्यांच्या गाऱ्हाण्याची स्वतंत्र रीतीनें चौकशी व्हावी कीं नाहीं? सरकारनें एकदां तरमबंदी म्हणून जाहीर केली म्हणजे मग त्यावर अपीलच उरत नाहीं. पण हा जुलूम कसा चालू द्यावा? त्याचा एकदां निकाल लावलाच पाहिजे. बार्डोली तालुक्यांत जमीनधारा जुन्याहून शेंकडा २० इतका वाढवावा असें सरकारनें ठरविलें आहे. आणि ही वाढ देखील भारी आहे असें तेथील शेतकऱ्यांचें म्हणणें. याची फिरून चौकशी व्हावी अशी शेतकऱ्यांनीं मागणी केली, पण ती नाकारण्यांत आली. मग प्रश्न असा कीं, ह्या विरोधांतून मार्ग कसा निघावा? मार्ग हाच कीं, प्रांतिक सरकारच्या हुकुमावर हिंदुस्थान—सरकारकडे अपील असावें किंवा कायदे-कौन्सिलानें केलेला निकाल तरी सरकारास मान्य व्हावा.

विलायतेंत असल्या प्रकारचा जुलूम लोक चालू देणार नाहींत मुंबई इलाख्यांत जमीन-धाऱ्याबाबत ज्या ज्या सुधारणा म्हणून करण्यांत आल्या त्या सर्व जुलमाच्या ठरल्या. न्यायकोर्टाकडे फिर्याद करावी म्हटलें तर तिकडूनहि दरवाजा बंद करण्यांत आला आहे. तसेंच जमीन-बाब हें प्रांतिक सरकारच्या अखत्यारींतील खातें असें ठरविण्यांत आलें. पण तें राखीव केलें. राखीव खात्यांतील जुलमावर हिंदुस्थानसरकारकडे दाद मागतां यावी अशी तात्विक योजना आहे, पण प्रांतिक सरकारला होईल तितकें स्वातंत्र्य हवें असेंहि एक म्हणणें असल्यामुळें, हिंदुस्थान सरकार आपला अधिकार चालविण्याला नाखूष असतें. याचा अर्थ या बाबतींत प्रांतिक सरकार करील ती पूर्वदिशा असा होतो! हिंदुस्थानसरकारची ही स्थिति,

कायदे-कौन्सिल पाहावें तर तूर्त अजून दुर्बळच आहे, आणि जमीन-बाबखातें दिवाणांच्या हातीं नसतें. मुंबई—कायदेकौन्सिलांत मि. नरीमन यांनीं बार्डोलीच्या प्रश्नासंबंधानें लोकमत व्यक्त करण्याकरितां म्हणून एक रुपयाचा कांट सुचविला होता, व तो ३५ विरुद्ध ४४ मतांनीं नापास झाला.या ४४ पैकीं २७ लोक अधिकारी किंवा त्यांचे पगारी हस्तक होते. तक्रार अधिकारी वर्गाविरुद्ध आणि मतें देणार अधिकारीच! ही गोष्ट गैर होय. कौन्सिलांतील बिनसरकारी सभासदांच्या मतावर हा प्रश्न निकालांत निघावयाचा असता तर वरील कांट मंजूर झाला असता यांत शंका नाहीं. बरें, एक रुपयाचा कांट मंजूर झाला असता तर त्याचा काय उपयोग हाहि प्रश्न उरतोच. कारण कांट मान्य केला तर एक रुपया खर्च वांचेल इतकेंच. तो निंदाव्यंजक ठराव असे समजून, आपणावरील लोकांचा विश्वास उडाला असें मानून कार्यकारी मंडळांतील सभासद राजीनामे थोडेच देणार? १९२४ व १९२७ सालीं मिळून दोन वेळां, तरमबदीचा कायदा झाल्याशिवाय शेतसारा वाढवूं नये असा ठराव मुंबई—कायदेकौन्सिलांत आला व तो मंजूरहि झाला. पण त्याचा काय उपयोग झाला? पूर्वी सर चिमणलाल सेटलवाड, सप्रू, रहिमबक्ष म्हणजे फंक्शन्स कमिटीच्या कांहीं सभासदांनीं निदान मुंबई इलाख्यांत तरी जमीनबाबीचें खातें राखीव न ठेवतां सोपीव करावें असें सुचविलें होतें. इतर कित्येक साक्षीदारांनीं असाच अभिप्राय दिला आहे. यामुळेंच जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें जमीनबाबीसकट यापुढें होणारी कराची सर्व प्रकारची वाढ कायदेकौन्सिलाच्या संमतीनें व्हावी असें ठरविलें. पण तसें न होतां वर दर्शविल्याप्रमाणें जमीनबाबीवर कोणाचा ताबा नाहीं अशी स्थिति झाली आहे. मग शेतकऱ्यांनीं तरी काय करावें? स्वतंत्र चौकशीचा मार्ग मोकळा नसल्यानें निदान तुमची तुम्हींच आम्ही म्हणतों म्हणून चौकशी करा, या त्यांच्या मागणींत गैर काय होतें? कलेक्टर, कमिशनर, सेटलमेंट कमिशनर, हे फक्त कांहीं बाबींवर आपलीं मते देतात. पण शेवटीं प्राथमिक स्वरूपाचे असे हुकूम प्रांतिक सरकार काढतें. मुंबई—सरकारनें काढलेल्या हुकुमावर त्यांच्याकडे फिरून दाद मागणें हेंहि चमत्कारिक दिसतें खरें. पण शेतकऱ्यांना दुसरा उपाय तरी काय? आणि ही मागणी तरी किती साधी आहे! शेतकऱ्यांची आजची स्थिति किती हालाची, आपत्तीची व हलाखीची झाली आहे ह्याचें वर्णन करण्याचें कारण नाहीं. नवीन सारावाढ होणार ती एक—दोन वर्षांकरितां नसून पुरी ३० वर्षांकरितां आहे. अशा स्थितींत सरकारला फिरून चौकशी करा अशी मागणी केली व ती त्यांनीं नाकारली तर वाढलेला शेतसारा देत नाहीं असें म्हणण्याशिवाय गत्यंतर कोणतें? बार्डोलींत सत्याग्रह सुरू झाला असला तरी तो राजकीय हेतूनें नाहीं. असहकारितावाल्यांनीं शेतकऱ्यांना उत्तेजन दिलें म्हणून सत्याग्रह सुरू झाला हें म्हणणें खोटें. उद्यां दुसऱ्या एखाद्या बाबतींत त्यांना सत्याग्रह करण्याला सांगून पाहावें म्हणजे कळेल. **सत्याग्रह करण्याचें ठरल्यावर शेतकऱ्यांना सल्लामसलत देणें व शांततावृत्तीनें राहून सत्याग्रह करण्यास शिकविणें हें पुढाऱ्यांचें स्वाभाविक कर्तव्यच होय**. जलप्रलयाच्या वेळीं दुःख निवारण्याचें जें मोठें कारण झालें त्या वेळीं असहकारितावाले पुढें आले होते. तेव्हां त्यांच्याविषयीं अशी तक्रार कोणी कां केली नाहीं? सरकारचा बाहाणा असा कीं, 'सत्याग्रह सुरू झाल्यावर आम्ही माघार घ्यावी, यांत आमची इभ्रत ती काय राहिली? त्यावर माझें म्हणणें असें कीं, 'तुम्ही इभ्रत खुशाल संभाळा. तुम्हाला मायबाप म्हणून रयतेनें केलेल्या अर्जावरून तुम्ही **फेरचौकशी केली तर त्यांत तुमची इभ्रत खचित जात नाहीं. प्रजेची तक्रार ऐकल्यानें उलट इभ्रत वाढते**.' सत्याग्रहवाले तरी प्रजेचे अधिकार नष्ट करावे असें कोठें म्हणत आहेत? फक्त जुना सारा देतों, वाढलेला देत नाहीं इतकेंच ते म्हणतात. अर्थात् हा केवळ देण्याघेण्याचा संबंध आला. कूळ व जमीनदार यांचा संबंध आला. राजकीय इभ्रतीचा तो प्रश्न नाहीं. आज बार्डोलींत सत्याग्रह झाला, उद्यां सर्वत्र होऊं लागेल असें सरकार म्हणते, पण यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण अशा गोष्टी सुखासुखी होत नाहींत. त्यांना तसें विशेष कारण व विशेष परिस्थिति लागते. उलट हेंच खरें कीं, एका सत्याग्रहामुळें तरमबंदी करणाऱ्या अधिकाऱ्यांना थोडीशी चुणूक तरी मिळेल, थोडीशी अद्दल तरी घडेल व यापुढें ते आपलें काम अधिक सावधगिरीनें करूं लागतील. आज कांहीं थोड्या कौन्सिलाच्या सभासदांनीं राजीनामे दिले एवढ्यावरून इतरांना सरकारी धोरण मान्य आहे असें समजतां कामा नये. सत्याग्रह चालू राहिल्यास आणखीहि राजीनामे देतील. इतकेंच काय पण कौन्सिलमध्यें नसलेल्या इतर लोकांनाहि यांत लक्ष घालावें लागेल. कारण हा केवळ न्यायाचा मार्ग आहे. हा तंटा आर्थिक आहे. १९२०-२१ सालांतील असहकारितेच्या चळवळीसारखी ही चळवळ नाहीं. या चळवळीच्या बुडाशीं कोणतेंहि मोठें राजकीय ध्येय नाहीं. शेतकऱ्यांना आपल्यापुरतें काय करून दाद लावून घेतां येईल इतकाच विचार आहे. म्हणून सरकारनें कितीहि गैरवाका समजविलें तरी त्यांच्या बाहाण्यानें लोक फसणार नाहींत. **बार्डोली येथील स्थिति दिवसेंदिवस**

**अधिक बिकट होत चालली आहे आणि त्याची जबाबदारी सर्वस्वीं सरकारावर आहे** व पुढेंहि राहील याकरितां सरकारनें इभ्रतीचें भय सोडून देऊन प्रजा ही आपलीं लेकरें आहेत असें मानून त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याची तयारी दाखवावी असें माझें म्हणणें आहे.

# बार्डोलीचा लढा

( ले.—आमदार **न. बा. चंद्रचूड** )

[ आमदार चंद्रचूड हे बार्डोलीस जाऊन तेथील परिस्थिति प्रत्यक्ष अवलोकन करून आले. त्यांनीं तेथील अनुभवासंबंधीं माहिती आमचेकडे सविस्तर लिहून पाठविली. यापैकीं बरीच माहिती यापूर्वी केसरींत प्रसिद्ध झाली असल्यामुळें तिची द्विरुक्ति न करतां, या माहितीचे अखेरीस आमदार चंद्रचूड यांनीं स्वतःचे जे विचार प्रदर्शित केले आहेत ते महत्त्वाचे असल्यानें पुढें दिले आहेत.—**सं. के.** ]

## सरकारनें मिळविलें काय ?

पठाण व हत्यारबंद शिपाई गांवोगांव फिरवून व वाटेल तीं गैरकायदा कृत्यें करून सरकारनें आपली इभ्रत घालविली व बेअब्रू करून घेतली, रयतेचे पैशानें पोसल्या जाणाऱ्या अम्मलदारांच्या वेळेचा अपव्यय केला व त्यांचा व आपला बेवकूबपणा लोकांचे निदर्शनास आणला. खुद्द सरकारचे कबुलीप्रमाणें सुमारे सवा लाख रुपये वसूल झाला आहे. परंतु त्यापैकीं रु. ७०००० एका मोठ्या पातीदाराने सरकारचे शेती खात्यास कापूस विकला त्यांतून परस्पर कापून घेतले आहेत व त्याबद्दल लवकरच स्टेट सेक्रेटरीवर फिर्याद होणार आहे !

## हल्लींची परिस्थिति

बार्डोली तालुक्यांत हल्लीं सर्व सामसूम आहे, सरकारनें पठाण परत नेले, बऱ्याच तलाठ्यांनीं राजीनामे दिले आहेत या व इतर कारणांमुळें जप्त्यांचें सत्र सध्या तहकूब आहे. दरदिवशी अगर एकदोन दिवसांचे अंतरानें निरनिराळ्या गांवांत सभा भरवितात. लहान लहान खेड्यांतूनहि ह्या सभांस दोनतीन हजार समाज जमतो; सभांचा कार्यक्रम प्रथम सत्याग्रहाचे सहाय्यास वर्गणी, नंतर राष्ट्रभक्ति व उत्साह परिपोषक अशीं स्त्रियांची गाणीं व श्री. वल्लभभाई पटेल यांचें भाषण असा असतो. श्री. वल्लभभाई यांचे नेतृत्वावर सर्वांचा अखंड विश्वास आहे व तो अस्थानीं आहे असें कोण म्हणेल? सरकारनें खालसा केलेल्या जमिनीची लोक पूर्वीप्रमाणें मेहनत करीत आहेत व कांहीं जमिनी पेरल्या असून कांहीं लवकरच पेरल्या जातील. बहुतेक सर्व पाटलांनी राजीनामे दिले आहेत. बार्डोली तालुक्यांत अत्यंत थोडे फौजदारी गुन्हे होतात अशी पूर्वीपासून ख्याति आहे व आतां तर फौजदारी गुन्ह्याचें नांवहि नाहीं. गांवास पाटील नाहीं, तलाठी नाहीं. पोलीस शिपायाची जरूरी नाहीं. तेव्हां बार्डोली तालुक्यांत कोणतें सरकार व कोणाचा अंमल समजावा !

## ह्या लढाईचा परिणाम

स्वतंत्र चौकशी करून फेरतपासणी केल्याशिवाय सारा द्यावयाचा नाहीं, येईल त्या आपत्तीस तोंड द्यावयाचें असा लोकांचा कृतनिश्चय आहे. उलट ही राजद्रोही (?) चळवळ ठेंचून टाकावयाची व साधी व न्याय्य मागणीहि कबूल करावयाची नाहीं असा तूर्त तरी नोकरशाहीचा निश्चय आहे. कांहीं तडजोड न निघाल्यास चालू पिकाचे हंगामापासून लढाईस खरें तोंड लागेल. परंतु तो प्रसंग येणार नाहीं व फाजील इभ्रतीस बळी न पडतां नोकरशाही बार्डोलीचे खातेदारांचा अंत पाहाणार नाहीं अशी आशा आहे.

## श्री. वल्लभभाईंचा संदेश

"बार्डोलीचे शेतकरी यांचेवर आज जो प्रसंग आहे तो सर्व शेतकऱ्यांवर येणार आहे. बार्डोलीचे शेतकऱ्यांचा पक्ष सर्व शेतकऱ्यांचा आहे व सर्वजण ह्या आणीबाणीचे प्रसंगीं त्यांस पूर्ण सहानुभूतिपूर्वक मदत करतील अशी आशा आहे." श्री. वल्लभभाई ह्यांचा हा संदेश लक्षांत घेऊन महाराष्ट्र बार्डोलीचे शेतकरी वर्गास जरूर तें साहाय्य करीलच

# न. चिं. केळकर यांचा बेळगांवकडील दौरा

गेल्या पंधरवड्यांत न. चिं. केळकर यांनीं बेळगांवाकडे व्याख्यानांचा दौरा काढला होता. मुख्य काम बेळगांव येथील कन्या शाळेच्या वार्षिक समारंभाचें होतें. ही शाळा महिला विद्यापीठाला जोडलेली असून तिचें मुख्य अध्यापकत्व श्री. बनूबाई अहो यांचेकडे आहे. सदर समारंभाला प्रो. धोंडोपंत कर्वे हेहि मुद्दाम आले होते. बेळगांवच्या मानानें या शाळेंतील मुलींची संख्या बरीच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अलीकडे चढाओढीच्या हेतूनें तेथें एक मिशनरी मुलींची शाळा स्थापण्यांत आली आहे. अशा रीतीनें राष्ट्रीय स्त्रीशिक्षणाच्या कार्याला चोहोंकडून अडचणी आहेत. या अडचणी दूर होण्याच्या दृष्टीनें केळकर व कर्वे यांचीं भाषणें झालीं. पुरुष विद्यार्थ्यांच्या राष्ट्रीय शिक्षणाप्रमाणेंच महिला विद्यापीठाच्या हातून होणाऱ्या स्त्रीशिक्षणाचीहि हेटाळणी व हेळसांड आपल्या समाजांतील कांहीं लोक करीत असतात. परंतु महिला विद्यापीठानें अंगिकारलेला कार्यक्रम हाच अखेर बहुजनसंमत होईल. म्हणजे विद्यार्थिनींचें शिक्षण पुरुष विद्यार्थ्यांच्या संस्थांहून वेगळ्या संस्थांतून होईल आणि विशेषतः स्त्रियांकरितांच योग्य असा शिक्षणाचा कार्यक्रम आंखला जाईल. बेळगांव येथील मुलींच्या शाळेचें कार्य श्री. बनूबाई यांच्या स्वार्थत्यागी व उत्साही धोरणामुळें बरेंच चांगलें चाललें असून, शाळेला आज द्रव्यसाधन फारसें अपुरें नाहीं ही गोष्ट चालकांना भूषणावह आहे. बेळगांव येथें मुलींचें सरकारी मिडल स्कूल निघावें अशी मागणी करण्यांत आली आहे. पण ती मान्य होईल असें दिसत नाहीं. केळकरांनीं आपल्या भाषणांत महिला विद्यापीठाचें शिक्षण हें खरोखर राष्ट्रीय कसें आहे याची चर्चा केली.

या दौऱ्यांत इतर अनेक गोष्टी केळकरांना करा्व्या लागल्या. बेळगांव येथील श्रीमारुतीचे देवालयांत त्यांचीं दोन स्वतंत्र व्याख्यानें झालीं. त्यांपैकीं एकामध्यें त्यांनीं '**प्रचलित राजकारण**' या विषयावर बोलतांना, अलाहाबाद व बार्डोली येथें एकाच वेळीं सुरू झालेल्या दोन चळवळींचा उपयुक्तपणा व परस्परोपकारकत्व विशद करून सांगितलें. ते म्हणाले कीं, "अलाहाबाद येथें स्वराज्यघटना मंडळ हें ध्येयाची किंवा साध्याची चिकित्सा करीत बसलें आहे, तर बार्डोली येथें शेतकरी लोक नुस्ती साधनांची चिकित्साच नव्हे तर प्रत्यक्ष प्रयोग करीत बसले आहेत. जिवंत व उत्कर्षेच्छु राष्ट्रांतील राजकारण अशाच रीतीनें दोहि अंगांनीं सुरू असतें. कारण नुस्ती स्वराज्याची घटना बनवून तरी काय उपयोग? तो एक कागदावर काढलेला नकाशाच होय. केवळ घराचा नकाशा चितारल्यानें राहतें घर कोणास भोगवट्याला मिळत नाहीं, त्याचप्रमाणें स्वराज्याची घटना बनविल्यानें स्वराज्य मिळत नाहीं. मुंबई येथील सर्वपक्षीय परिषदेंत निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या अर्थांनीं असें म्हटलें कीं, "स्वराज्यघटना हा काय पदार्थ आहे! आम्ही ती अर्ध्या तासांत लिहून देतों." यांपैकीं थट्टेनें अगर खोडसाळपणानें बोलणारे लोक वगळले तर, खऱ्या मनानें जे बोलले त्यांचें म्हणणें अगदींच खोटें होतें असें नाहीं. पण मुख्य मुद्दा हा कीं, साध्याची रचना पुरी झाली तरी ती कोणत्या साधनांनीं हस्तगत होईल हाच खरा विचार होय. आणि तोहि विचार किंबहुना प्रत्यक्ष प्रयोग बार्डोली येथील लोकांनीं चालविला आहे.

केळकरांचें दुसरें व्याख्यान **हिंदुसभा** या विषयावर झालें. त्यांत त्यांनीं मुख्यतः ज्ञातिविशिष्ट व धर्मविशिष्ट कार्यानें राष्ट्रीय भावनेला व राष्ट्रीय कार्याला बाध येतो या आक्षेपाला उत्तर दिलें. जबलपूर येथील भाषणांत सांगितल्याप्रमाणें बेळगांवींहि त्यांनीं हेंच प्रतिपादिलें कीं, हिंदुस्थानांतील हिंदु लोकांना स्वराज्य मिळवावयाला हवें आहे; तसेच हिंदुत्वहि राखावयाला पाहिजे आहे. हिंदु राहूनच स्वराज्य भोगावें. 'स्वराज्य हवें तर हिंदुत्वाची किंमत द्या' असें म्हणणारांना, 'तर मग आम्हाला तुमचें स्वराज्य नको' असें उत्तर द्यावें हें सयुक्तिक असल्याचें केळकरांनीं प्रतिपादिलें. असहकारितेच्या चळवळींत खिलाफत डोक्यावर घेऊन नाचतांना राष्ट्रीय सभेला धार्मिक चळवळीवरील आक्षेपांची आठवण राहिली नाहीं! शुद्धि—संघटनेची चळवळ अवेळीं होत आहे असें म्हणणारांनीं 'तबलीघ' म्हणजे हिंदूंना बाटविण्याच्या चळवळीला उघडपणें कधीं नांवें ठेविलीं नाहींत वगैरे गोष्टी केळकरांनीं सांगितल्या. स्वराज्याच्या चळवळींत स्वराज्याचा अर्थ राजकारणी असला तरी, स्वराज्याचें अंतिम असें जें स्वातंत्र्य व जो अभिमान तो मनुष्यानें व्यक्तीसंबंधीं, कुळासंबंधीं, ग्रामासंबंधीं, व धर्मासंबंधीं बाळगला पाहिजे तरच तें त्याचें खरें स्वराज्य हीच गोष्ट त्यांनीं स्पष्ट करून सांगितली. बेळगांव हिंदुमहासभेसंबंधानें नागरिकांची जाहीर सभा भरली होती. त्याहि प्रसंगीं केळकर यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें.

याच मुक्कामांत बेळगांव कॉंग्रेस—कमिटीच्या तर्फे खानापूर तालुक्यांतील दोन गांवच्या निमंत्रणावरून, केळकर हे जमीनविभागणी व जमीनमह-

मूल या बाबतच्या बिलासंबंधानें व्याख्यान देण्यास गेले होते. ती गांवें पारिशवाड व इटगी हीं होत. या दोन गांवीं त्यांनीं हीं दोन बिलें, त्यांचे परिणाम, बेळगांव येथील शेतकरी संघाचें कार्य, व कायदेकौन्सिलांतील चर्चेच्या प्रसंगीं आपल्या प्रतिनिधि–सभासदांना निश्चित आज्ञारूप संदेश पाठविण्याचें महत्त्व वगैरे गोष्टींवर भाषणें केलीं. केळकर यांच्याबरोबर गंगाधरराव देशपांडे व आमदार पंडितप्पा चिक्कोडी हेहि गेले होते. त्यांचीहि या विषयावर कळकळीचीं भाषणें झालीं. यानंतर बेळगांव येथील खादीसंघाच्या कार्यालयाला केळकर यांनीं भेट देऊन, स्वतः गंगाधरराव देशपांडे, शंकरलाल बँकर, मथुरादास यांच्याशीं चर्चा केली. बेळगांव तालुक्यांतील हुदली गांवानजीक कुमरी नांवाच्या ठिकाणीं, गंगाधरराव देशपांडे यांनीं खादी व हातसूत यांचा सुव्यवस्थित कारखाना काढला असून, तो पाहण्याकरितां ही सर्व मंडळी मुद्दाम एक दिवस गेली होती. हिंदुस्थानांतील मध्यवर्ती खादी संघाच्या मदतीनें व स्वतःची कांहीं रक्कम घालून गंगाधरराव देशपांडे यांनीं हा कारखाना काढला आहे. कुमरी हें ठिकाण अगदीं एकांतवासांत असून तेथें खादीप्रमाणें मोठ्या प्रमाणावर शेतकी करण्याचीहि सोय आहे. या सोयीचा फायदा घेण्याकरितां राष्ट्रीय हितबुद्धीचे स्वावलंबी विद्यार्थी किंवा तरुण लोक सदर कुमरी येथें जाऊन राहूं म्हणतील तर, त्यांना हवी तितकी जमीन व थोडेबहुत भांडवल व मजुरहि पुरविण्याची देशपांडे यांना उमेद आहे. ही गोष्ट घडून आल्यास शेतकी व हातकामाचे इतर धंदे यांची जोड बसल्यानें जे फायदे होतात ते येथें अनुभवण्यास सांपडून, नमुनेदार औद्योगिक प्रयोगाचें तें एक केंद्र बनण्यास हरकत नाहीं. स्वतः देशपांडे यांचा वर्षांतील बहुतेक वेळ हल्लीं या कुमरीसच जातो. कुमरी येथें व इतर आसपासचीं गांवें या ठिकाणीं खादीची निपज करण्याकरितां प्रचारक व कार्यवाहक नेमलेले आहेत. त्यांच्या हातून सूत कातणारांना कापूस जागच्या जागीं पुरविणें, त्यांच्याकडून कापड विकत घेणें, आणि तें बेळगांव येथील किंवा इतर ठिकाणच्या खादीच्या दुकानांत पाठवून विकविणें, हीं सर्व कामें पद्धतशीर व हिशेबी रीतीनें सुरू आहेत. केळकर बेळगांवास गेले त्या वेळीं बेळगांवच्या केंद्रांतील सर्व ठिकाणच्या खादीसंघाच्या हिशेबांची तपासणी मध्यवर्ती मंडळाच्या हिशेबनिसांकडून चालू होती. खुद्द कुमरी येथें चालू असलेल्या खादीच्या व्यवहारांत जरी म्हणण्यासारखा नफा सुटत नाहीं तरी जमाखर्चाची तोंडमिळवणी होत असून, चालकांचें म्हणणें असें आहे कीं, तेथें तयार झालेल्या खादीला जितकी अधिक मागणी येईल त्या मानानें आहे हेंच भांडवल फिरून फिरून उपयोगांत येऊन, कदाचित मूळ भांडवलावर थोडेसें व्याजहि सुटेल. बेळगांव व कुमरी येथील चर्चेंत खादीकार्यासंबंधानें असलेले प्रचलित मतभेद या विषयावर केळकर, गंगाधरराव देशपांडे व शंकरलाल बँकर यांची बरीच मनमोकळी चर्चा झाली व उभय पक्षीं मान्य होईल अशा नव्या पद्धतीनें खादीकार्याचा प्रचार यापुढे उभयतांनी मिळून करावा असें ठरलें.

बेळगांवच्या या मुक्कामांत केळकरांनीं इतरहि दोन कार्यें केलीं. पहिलें कार्य बेळगांव येथें पुढील वर्षीं भरणाऱ्या मराठी साहित्यसंमेलनाच्या मार्गांत येऊं पाहणाऱ्या अडचणी दूर करणें हें होय. या बाबतींत केळकरांनीं डॉ. साठे यांचे घरीं निमंत्रित मंडळींशीं खासगी चर्चा केली. तसेंच संमेलनाला प्रतिकूल असणाऱ्या लोकांच्या म्हणण्यांत सयुक्तिक व अयुक्तिक काय आहे याची छाननी करून या विरोधी लोकांशीं संभाषणें केलीं. एकंदरीनें पाहतां मराठी संमेलनाला असलेला विरोध कांहीं गैरसमजुतीमुळें रचला गेलेला आहे हें उघडच दिसून आलें. यामुळें या गैरसमजुती दूर करून, संमेलनास खुद्द कर्नाटकी समाजाची सहानुभूति मिळविणें कठीण नाहीं असें केळकर यांचें मत दिसलें. या विषयाला अनुलक्षून दुसरी एक गोष्ट घडली ती अशी कीं, बेळगांव येथें खेळ करीत असलेल्या कर्नाटक नाटक मंडळीचे मालक, चालक व कवि सदाशिवराव गरूड यांनीं केळकरांना '**चतुर्थीचा चंद्र**' या नांवाचा स्यमंतोपाख्यानावर रचलेला नाट्यप्रयोग पाहण्याची विनंति केली. प्रयोगाच्या शेवटीं सदाशिवराव यांनीं केळकरांचा जाहीर सत्कार केला व उलट केळकरांनींहि सदर नाटक कंपनीचें योग्य गुणगौरव करून, आपल्या नाटक मंडळीला घेऊन सदाशिवराव गरूड हे पुण्यास येतील तर महाराष्ट्रीय लोकांना कर्नाटकी नाट्यगुणांचें स्वारस्य प्रत्यक्ष कळून येईल व मंडळीचा सत्कार करण्याचा प्रसंग आपणास लाभेल असें सांगून, केळकरांनीं सदाशिवराव गरूड यांना पुण्यास येण्याचें निमंत्रण दिलें.

बेळगांव येथील मुक्कामाच्या शेवटच्या दिवशीं तेथील ब्राह्मणेतर पक्षाच्या राष्ट्रवीर नामक पत्राचे संपादक शामराव देसाई यांच्याशीं केळकर यांचें सुमारें दोन तास संभाषण झालें. संभाषणाला गंगाधरराव देशपांडे हेहि हजर होते. या संभाषणाचा मुख्य विषय असा होता कीं, हल्लींचा हा ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद कशानें मिटेल? यासंबंधीं देसाई व केळकर यांनीं आपापलें म्हणणें परस्परांना खुलासेवार समजून सांगितल्यावर असें आढळून आलें कीं उभयतांच्या म्हणण्यांत फारसा फरक नाहीं. म्हणून ब्राह्मण-ब्राह्मणेतरांतील वाद कमी करून, दोघांची

बुद्धि व उद्योग हीं केवळ राष्ट्रीय कार्याकडेच खर्च व्हावीं याकरितां, ब्राह्मण-ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या सहीनें उभयसंमत असलेल्या मुद्द्यांचें टिपण रीतसर करून, त्यावर उभयपक्षांतील जितक्या प्रमुख लोकांच्या व अनुयायांच्या सह्या घेतां येतील तितक्या घ्याव्या असें ठरलें व ही गोष्ट घडून आल्यास हल्लीं चालू असलेल्या व इतर राष्ट्रीय चळवळींना पुष्टि मिळेल हें सांगावयास नकोच.

# बार्डोलीच्या-बंडाचा खोटा बोभाटा

## समेटाचें तट्टू अडलें कोठें ?

बार्डोलीच्या सत्याग्रह-प्रकरणांतून अखेरीस कांहीं तरी तडजोड निघेल असें गेल्या आठवड्या-पर्यंत वाटत होतें. पण ती आशा विफल ठरून आतां हा झगडा 'शेंडी तुटो किंवा पारंबी तुटो' अशा निश्चयानें अखेरपर्यंत लढवावा लागणार हें निश्चित झालें. सरकारनें मनांत आणलें असतें तर हा वाद मध्यस्थीनें मिटला नसता असें नाहीं. परंतु मान मोडली तरी बेहेत्तर, पण मान वांकविणार नाहीं असल्या दुर्योधनी दुरभिमानानें जेथें सरकारला पछाडलें आहे तेथें तडजोडीचा प्रयत्न कसा सफळ होणार? पांडवांनीं अखेरीस अर्ध्या राज्याची आशा सोडून पाच गांवें मागितलीं, तरी देखील दुर्योध-नाच्या दुर्बुद्धींत पालट झाला नाहीं, तसाच प्रकार येथें सरकारनेहि चालविला आहे. झालेली चौकशी रद्द ठरवून दुसरी चौकशी कमिटीमार्फत करवा एव-ढीच काय ती बार्डोलीकरांची साधी मागणी आहे. नव्या चौकशींत जो सारा योग्य ठरेल तो देण्याला सत्याग्रही तयार आहेत; एवढेंच नव्हे तर पूर्वीच्या दरानें होणाऱ्या साऱ्याची भरपाई आगाऊ करण्यास तयार आहेत. असें असतां सरकारनें फेरचौकशी कां करूं नये ! तडजोड झाल्यास जप्त झालेल्या जमिनी परत कराव्या लागतील व राजीनामे दिले-ल्या तलाठ्यांना व पाटलांनाहि परत कामावर घ्यावें लागेल. या गोष्टी सरकारला नाकबूल असल्याचें ऐकिवांत नाहीं. मग तडजोडीचें तट्टू अडलें कोठें. ! अडलें, वाढता सारा आधीं भरावा का मग भरावा या मुद्द्यावर ! सरकारचा आग्रह असा कीं, नव्या वाढीसुद्धां सगळा सारा आधीं भरा आणि मग चौकशीची बात बोला. बार्डोलीकरांचें म्हणणें कीं ज्या वाढीविरुद्ध हा सत्याग्रह सुरू केला तो वाढ-लेला सारा आधीं भरल्यावर सत्याग्रहाला अधि-ष्ठान कोठें राहिलें? वाढलेला सारा भरणें हें सत्या-ग्रहाच्या तत्त्वाच्या व शपथेच्याहि विरुद्ध असल्या-मुळें ती अट सोडून इतर कांहींहि बोला. अर्थातच सरकारनें अशक्य गोष्टीचा आग्रह धरल्यामुळें समेट होऊं शकला नाहीं. त्यामुळें मुंब-ईच्या हिंदी व्यापार-मंडळाचे प्रतिनिधी आमदार लालजी नारायणजी यांनींहि निराश होऊन कौन्सि-लाचा राजीनामा दिला. अशा रीतीनें व्यवहारदक्ष अशा व्यापारी वर्गाला देखील ज्याअर्थी सरका-रच्या दुराग्रहाबद्दल चीड आली त्याअर्थी सरकारचा ह परा कोटीला गेला असला पाहिजे हें निश्चित समजावें.

## सरकारचे डावपेंच

समेटाचीं भाषा बंद पडतांच युद्धाचे डावपेंच पुनः सुरू व्हावेत हें साहजिक आहे. परंतु त्या बाबतींत सर्व सत्ताधारी सरकाराशीं दुबळ्या प्रजेनें चढाओढ करणें हें कांसवानें सशापुढें धांवून शर्यत जिंकण्याइतकेंच दुर्घट आहे. निःशस्त्र, अनत्याचारी व पापभीरु प्रजेला हालअपेष्टा सोसण्यासाठी आपल्या मनाचा निर्धार कसा टिकवावयाचा एवढाच विचार करावयाचा असतो. व त्याकरितां कितीहि घोर प्रसंग आला तरी आपला निश्चय ढळूं नये असा एकमेकांला उपदेश करणें आणि आपत्प्रसंगीं एकमेकांला धीर देणें एवढ्याच गोष्टींची त्यास कारवाई करावयाची असते. पण सरकारला सर्वच गोष्टी अनुकूल असल्यानें त्याचे डावपेंच सर्वव्यापी असतात. व त्याप्रमाणें सरकारनें आपल्या डावपेंचांची आतांपासूनच शिकस्त चालविली आहे. प्रतिपक्षाविषयीं जनतेंत गैरसमज पसरविणें हा सरकारचा पहिला डाव असून तें काम सर-कारचे वार्ताधिकारी (डायरेक्टर ऑफ-इन्फर्मेशन) व मुंबईचे टाईम्सकार यांनीं यावच्छक्य चालविलें आहे. महादेवभाई देसाई व श्री. मुनशी यांनीं सेटलमेंट रिपोर्टावर जी टीका केली होती तिचें खंडन करण्याचा या वार्ताधि-काऱ्यानें प्रयत्न करून या टीकाकारांची माहिती चुकीची आहे असा उलट आरोप केला आहे. त्यावर महादेवभाई देसाई व मुनशी यांनीं साधार चरचरीत टीका करून वार्ताधिकाऱ्यांचीं बोटें त्यांच्याच डोळ्यांत घातलीं आहेत.

पण बार्डोलीच्या सत्याग्रहाविषयीं जनतेचें मत कलुषित करण्याचा पक्का कावेबाज प्रयत्न मुंबईच्या पत्रामार्फत चालू आहे. टाईम्ससारखीं अँग्लो-इंडि-यनी पत्रें म्हणजे एक प्रकारें 'नृपांगणगतखल' असून ज्यांच्यावर सरकारचा रोष होईल त्यांच्यावर तोंड टाकून त्यांचा चावा घेणें हेंच यांचें शील. त्या शीलास अनुसरून टाईम्सनें आपल्या खास बात-मीदाराचीं पत्रें प्रसिद्ध करून बार्डोलीच्या बंडाचा निवळ खोटा बोभाटा आरंभिला आहे.

## बोल्शेव्हिझमचा येथें संबंध काय ?

जर्मन महायुद्धाच्या वेळीं ज्याप्रमाणे सरकारला प्रत्येक गोष्टींत जर्मनांच्या कारस्थानाचा संशय येई त्याचप्रमाणें अलीकडच्या प्रत्येक चळवळींत सरकारला बोल्शेव्हिझमचा वास येत असतो ! सरकारच्या या प्रवृत्तीचा फायदा घेऊन टाईम्सच्या बातमीदारानेंहि बार्डोलीचा सत्याग्रह म्हणजे बोल्शेव्हिझम आहे असा कांगावा सुरू केला आहे ! पण यांत बोल्शेव्हिझमचें एक देखील तत्त्व शोधूं गेलें तरीहि सांपडणार नाहीं. यांत सगळी जमीन राष्ट्राच्या मालकीची करण्याचा विचार नाहीं, कोणाच्याहि खासगी मालकीला बाध नाहीं, कोणाच्याहि वारसाहक्काची पायमल्ली करावयाची नाहीं; किंबहुना प्रत्येकाची खासगी मालकी अबाधित राहावी, जमीन सरकारजमा होऊं नये, हा तर या चळवळींतला मुख्य हेतु आहे. अर्थातच सध्या झालेली सेटलमेंट रद्द होऊन नव्या कमिटीमार्फत नवी सेटलमेंट व्हावी अशी मागणी करण्यांत बोल्शेव्हिझमचा संपर्क तरी कोठें येतो हें एक टाईम्सच्या कणिकनीतिपटु बातमीदारासच ठाऊक असेल ! परंतु कुत्रा पिसाळल्याचा बोभाटा केल्याखेरीज त्याजवर राजरोस गोळी घालतां येत नाहीं; आणि टाईम्सकाराला तर बार्डोलींतल्या गोळीबाराची व रक्तपाताची आतांपासूनच स्वप्नें पडूं लागलीं आहेत. तेव्हां तीं स्वप्नें खरीं ठरण्याकरितां बार्डोलीच्या बंडाची खोटीच हाकाटी करणें हा एक सरकारी डाव आहे व तो डाव टाकण्यास टाईम्समधील बातमीदारासारखे भाडोत्री हस्तक सरकारला मिळत आहेत हें देशाचें दुर्दैव होय.

## सारावाढीला आधार काय ?

वल्लभभाईंना तडजोड नको असून बंड करण्याची संधि हवी आहे व त्याची ते तयारी करीत आहेत, असें भासविण्याचा टाईम्सकारांचा हा खोडसाळ यत्न आहे. तडजोड कोणत्या मुद्द्यावर होऊं शकेल हें वल्लभभाईंनीं पांच महिन्यांपूर्वींच गव्हर्नरांना स्पष्ट लेखी कळविलें आहे व ती अट त्यांची आजहि कायम असून तिच्यांत केव्हांहि फेरबदल झालेला नाहीं. नवी चौकशी कमिटी नेमली कीं आमचा सत्याग्रह संपला असें ते आरंभापासून सांगत आहेत. पण कमिटी नेमण्याचा स्वतः आग्रह न धरतां उलट टाईम्सकार वल्लभभाईंवरच तडजोड नाकारण्याचा दोष लादीत आहेत. यांतला हेतु कोणासहि उघड दिसण्याजोगा आहे. बार्डोलींत जो आज असंतोष माजला आहे व सत्याग्रह गाजत आहे त्याचा दोष वल्लभभाईंची मागणी नाकारणाऱ्या सरकारावरच आहे. सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर यांची अनुमानपद्धति अंडरसन यांनीं चुकीची ठरविली आणि अंडरसन यांची शिफारस मुंबईसरकारनें गैरवाजवी ठरवून स्वतः निराळीच शिफारस केली. मुंबईसरकारची वीस टक्के सारा वाढविण्याची शिफारस कोणत्या पुराव्यावर व आधारावर उभारलेली आहे याची अद्यापपावेतों कोणासहि वार्ता नाहीं. हा आधार कळावा व तो ग्राह्य ठरतो कीं अग्राह्य ठरतो याचें परीक्षण व्हावें एवढाच नवीन कमिटी मागण्यांत वल्लभभाईंचा उद्देश आहे. सेटलमेंट ऑफिसर जयकर यांनीं पंचवीस टक्के वाढ करावी असें जें म्हटलें त्याची अंडरसन यांनीं थट्टा केली आहे. आणि मुंबईसरकारनें अंडरसन यांची तीस टक्के वाढ करण्याची शिफारस फेटाळून लावून अंडरसन यांना तसलाच अहेर परत केला आहे ! पण मुंबईसरकारनें तीस टक्क्यांऐवजीं प्रथम बावीस टक्के वाढ व्हावी असें म्हटलें व मागाहून आणखी दोन टक्के कमी करून वीस टक्क्यांवर गाडी आणून सोडली एवढ्यानेंच सरकारचें हें कृत्य अगदीं कांटेतोलपणाचें व न्यायाचें ठरतें असें नाहीं. बावीस टक्के असो वा वीस टक्के असो, हा आंकडा गणिताच्या कोणत्या रीतीनें आला व ती रीत बरोबर आहे कीं नाहीं हें आपणास पाहावयास सांपडावें अशी बार्डोलीकरांची आग्रहाची मागणी आहे. तीस टक्क्यांहून वीस टक्के वाढ कमी जाचक आहे एवढ्यावरूनच ती न्याय्य आहे असें मानणें हे तीस फटक्यांची शिक्षा सांगितलेल्या आरोपीच्या अपिलांत वरिष्ठ कोर्टानें पुराव्याची छाननी न करतांच, तिसाच्या ऐवजीं वीस फटके पुरेत असा निकाल देतांच, अपील कोर्टाचा न्याय यथायोग्य झाला असें सांगत सुटण्याइतकेंच हास्यास्पद आहे. पण सरकाराजवळ स्वतः ठरविलेल्या वाढाव्याला खात्री पटविण्यासारखें सयुक्तिक कारण नसल्यामुळें सरकाराकडून चौकशी कमिटीची टाळाटाळ चालली आहे. आणि टाईम्समधील बातमीदारासारखे सरकारची हांजी–हांजी करणारे चेले सरकारच्या नकाराचा दोष वल्लभभाईंवर लादूं पाहात आहेत; पण त्यांच्या खोडसाळ कृतीनें कोणीहि समंजस वाचक फसणार नाहीं.

## छळ सोसणारा बंडखोर कसा ?

बार्डोलींत बंड उभारलें आहे असें भासविण्याकरितां टाईम्सच्या बातमीदारानें बार्डोलीतील स्थितीचें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन केलें आहे, आणि त्या काव्यमय वर्णनावर स्वतःच्या कुत्सितकल्पनांचे मनोरे रचले आहेत. चौकशी कमिटी नेमल्याशिवाय पूर्वींचा सारा देखील भरावयाचा नाहीं एवढ्यापुरती बार्डोली तालुक्यांतील बहुतेक सर्व शेतकऱ्यांत एकजूट झाली आहे आणि तेवढ्यापुरता सरकारचा कोणताहि हुकूम मानावयास ते तयार नाहींत. पण ही बंडखोरी नव्हे किंवा बंडखोरीचा पूर्वतयारीहि नव्हे. हा सत्याग्रह आहे व त्या सत्या-

ग्रहाची मर्यादा ठरलेली आहे.तेवढी मर्यादा संभाळून सगळे कायदे पाळावयास बार्डोलीकारांची सिद्धता आहे व ते आज पाळीतहि आहेत.लँड रेव्हेन्यू कोडानेंच जेवढी सवलत शेतकऱ्यांना ठेवली आहे तिचा पूर्ण फायदा घेणें म्हणजे बंडखोरी असें तर टाईम्सकार म्हणू शकत नाहींतना? एका दृष्टीनें पाहिल्यास सत्याग्रही मनुष्यच इतरापेक्षां कायद्याला अधिक मान देतो. कारण आपण एक विशिष्ट हुकूम अमान्य केला आहे याची त्यास जाणीव असून त्याचा परिणाम भोगण्याकरितां आपली मान पुढें करण्यास तो सदैव सिद्ध असतो. आपलें सत्त्व राखण्याकरितां सत्याग्रहाचा कायदेशीर परिणाम भोगण्यास तयार झालेल्या बार्डोलीकारांवर बंडाचा आरोप करणें हे सत्त्वपरीक्षेच्या पायीं सर्वस्व घालवून दीन झालेल्या हरिश्चंद्रावर विश्वामित्राचा छळ केल्याचा आरोप करण्याइतपतच समंजसपणाचें ठरेल! छळ चालविला पठाणांच्या दोस्तसरकारनें; छळ सोसला बार्डोलीकरांनीं आणि उलट तेच बंडखोर म्हणून त्यांजवर बालंट घेतले जातें हा खासा न्याय! बार्डोली बंडखोर बनली आहे कीं तिच्यावर टाईम्सकार बालंट घेत आहेत याचा निर्णय करण्याला एकच साधी युक्ति आहे. सरकारनें चौकशी कमिटी नेमण्याची कबुली जाहीर करावी म्हणजे बार्डोलीचे शेतकरी पूर्वीचा सारा भरण्याकरितां तात्काळ पुढें येतात कीं नाहीं यावरून त्यांची परीक्षा होईल. बंडखोर मनुष्य.प्रतिपक्षाला सहज मान्य करतां येण्याजोगी सोपी अट कधींहि घालीत नसतो. तो नेहमीं अशक्य अटीच पुढें करीत असतो. बार्डोलीच्या सत्याग्रहांत तसा प्रकार नाहीं. पण हें टाईम्सकारांना देखील कळत नाहीं असें नाहीं. पण हट्टी सरकारचा खोटा पक्ष उचलून धरून त्याची वकिली करणाऱ्या पत्रकारावर असलीच कुभांडें रचण्याचा प्रसंग येणारच.

## केवळ बचावाचें धोरण

बार्डोलींत आज विलक्षण संघटना आढळून येत आहे. सर्व लोक अत्यंत शिस्तीनें वल्लभभाईंच्या हुकमतीखालीं वागत आहेत. वल्लभभाईंच्या हुकमाशिवाय तेथें पानहि हलत नाहीं ही गोष्ट खरी. आणि सत्याग्रह यशस्वी करावयाचा असल्यास कडक शिस्त पाळण्याची प्रवृत्ति सर्व लोकांत आढळून आलीच पाहिजे. पण या संघटनेचा वल्लभभाईंनीं कोणत्याहि प्रकारें दुरुपयोग केलेला नाहीं. सत्याग्रहाच्या अवश्यक मर्यादेपलीकडे त्यांनीं आपला अधिकार चालविलेला नाहीं. पावसाळ्यांत समुद्र जरी कितीहि तुफान झाला तरी तो आपली मर्यादा सोडीत नाहीं; त्याचप्रमाणें बार्डोलींत जरी शेतसारा न भरण्याच्या सत्याग्रहाचें वादळ जोरात सुरू असलें तरी सत्याग्रहाशीं संबंध नसलेल्या इतर कोणत्याहि कायद्याचें तेथें उल्लंघन केलें जात नाहीं व तसें करण्याची सत्याग्रही लोकांची इच्छाहि नाहीं परंतु सत्याग्रहाची व्याप्ति कोठवर वाढत जाणार हें सरकारच्या कृतीवरच अवलंबून आहे. बोलूनचालून ही सत्याग्रहाची लढत आहे. तींत पेंच-प्रतिपेंच हे चालावयाचेच. पण सरकार प्रबळ असल्यानें चढाई करण्याची शक्ति व प्रेरकता त्यांच्याच हातीं आहे. बार्डोलीकरांचें धोरण केवळ बचावाचें आहे. शक्य त्या उपायांनीं त्यांनीं आत्मरक्षणहि करू नये असें म्हणणें हा शुद्ध आचरटपणा तरी असला पाहिजे किंवा तो कपटी कांगावा तरी असला पाहिजे. चौकशी कमिटी नेमल्याशिवाय शेतसारा द्यावयाचा नाहीं असा निश्चय एकदां ठरल्यानंतर जप्ती-कामगार घराकडे येऊं लागतांच घराला कुलुपें ठोकून मालाचा बचाव करणें हें ओघानेंच प्राप्त होतें. आणि वल्लभभाईंचें अपूर्व कर्तृत्व जर कशांत दिसून आलें असेल तर तें जप्ती-कामगारांच्या टोळधाडीपासून शेतकऱ्यांच्या मालाचा बचाव करण्यांत दिसून आलें. सहा लक्ष रुपये वसूल करण्यासाठीं चंग बांधून आलेल्या जप्ती-कामगारांना पठाणांचें साहाय्य घेऊन देखील पांच-पंचवीस हजार रुपयेहि वसूल करतां आले नाहीत आणि स्मार्टसाहेबांना मनगटें चावीत परतावें लागलें व पठाणांचा दुरुपयोग केल्याचा दुर्लौकिक तेवढा त्यांच्या पदरीं पडला हा वल्लभभाईंच्या संघटनेचा अपूर्व विजय होय!

## बंड नव्हे पण बंडाचा वस्तुपाठ

पण सत्याग्रहाच्या लढतीचा हा नुसता प्रारंभ आहे. तडजोडीचा प्रयत्न विफल झाल्यानें खरी चकमक आतां यापुढेंच झडावयाची आहे. सत्याग्रही लोकांनीं जप्तीच्या टोळधाडीपासून जसा मालाचा बचाव केला तसाच शक्यतोंवर आपल्या शेत जमिनीचा बचावहि ते करणारच. शेतांतून प्रत्यक्ष उचलून नेईपर्यंत शेताचा ताबा सोडावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय आहे. व सरकारचे जमीनजप्तीचे कागदी घोडे कितीहि नाचत असले तरी बार्डोलीचे शेतकरी आपापल्या जमिनींची नांगरणी व पेरणी नेहमीप्रमाणें करीत आहेत. सरकारला जर हें कृत्य गैरकायदा वाटत असेल तर शक्य असल्यास प्रत्येक शेताभोंवतीं दहा-दहा पहारेकरी उभे करून सरकारनें हीं शेतकामें बंद पाडावीं. परंतु बंदोबस्ताची असली कांहींएक तजवीज न करतां बार्डोलीकरांनीं मात्र आपल्या शेतांत यापुढें पाऊलहि टाकूं नये अशी सरकारची अपेक्षा असेल तर ती व्यर्थ होय. युद्धांत ज्याप्रमाणें शत्रूचा किल्ला ताब्यांत घेतल्यावर तेथें बचावार्थ सैन्य ठेवलें तरच तो ताबा कायम राहतो, हा किल्ला माझा आहे अशी नुस्ती ग्वाही फिरवून

किंवा शपथ घालून जसें काम भागत नाहीं, त्याचप्रमाणे जप्त केलेल्या जमिनी प्रत्यक्ष ताब्यांत घेतल्याशिवाय सत्याग्रही लोक सरकारचा अधिकार तेथें चालू देणार नाहींत. पण जमिनींचा तसा ताबा घेण्याची सरकारचीच आज इच्छा नाहीं; कारण सरकारच्या पोटांत पापबुद्धि आहे. नुस्त्या पड जमिनी घेऊन सरकार तरी आज काय करणार? बार्डोलीकर जर आज शेतांत मेहनत करून पीक उभें करीत आहेत तर ते खुशाल करूं देत. पीक तयार झालें कीं, आपण छापा घालून तें पीक लुटून आणूं आणि चालू सालचा व पुढील सालाचाहि सगळा शेतसारा सव्याज चोपून वसूल करूं असला लोभ मुट्न सरकार शेतकऱ्यांच्या पेरणीच्या कामाची मुद्दाम उपेक्षा करीत आहे. अर्थातच हे बार्डोलीकरांचे बंड नसून सरकारचाच भावी दरवडेखोरपणाचा हा एक डाव आहे. पीक तयार झालें कीं तें कसें लुटून न्यावें याचे बेतबात ठरविण्याकरितां स्पेशल पोलीस बार्डोलीभोंवतीं घिरट्या घालीत आहेत. आणि आपल्या मेहनतीनें तयार होणारें पीक फुकटच्या फुकट सरकारच्या पदरांत पडून शेतसारा सव्याज भरून निघून सगळा सत्याग्रह ओफस होऊं नये म्हणून वल्लभभाईहि बचावाच्या तजविजींत आहेत. सरकारच्या शहाला काटशह देणें एवढाच त्यांच्या हालचालीचा हेतु आहे. या त्यांच्या हालचालीला बंड म्हणणें हें केवळ कुभांड होय. हें बंड असल्यास सरकारहि त्याच्या अर्ध्या पापाचे धनी ठरणार आहे. आणि बार्डोलीकरांच्या अंगमेहनतीनें शेतांत पीक उभें राहिल्यावर सरकार जर तें पीक कापून परभारें तिजोरीची भर करील तर तो निवळ दरवडेखोरपणाच होईल, किंबहुना तें एक प्रकारें सरकारचेंच प्रजेविरुद्ध बंड होईल. बार्डोलीकर कांहीं आज बंड करावयास उभे राहिलेले नाहींत; परंतु सरकारचेच जुलमी डावपेंच अशा प्रकारचे चाललेले आहेत कीं त्यांत जुलमी राजाविरुद्ध प्रजेनें कसें बंड करावें याचा एक प्रकारें सरकारच प्रजेला वस्तुपाठ देत आहे! यास्तव आपण काय करीत आहों व याचा भावी परिणाम काय होईल याचा सरकारनेंच पोक्तपणें विचार करावा. तडजोड फेटाळून लावणें सरकारला आज सोपें वाटत असेल; परंतु सरकारच्या चढेलपणामुळें प्रजेंतला असंतोष पराकाष्ठेच्या सीमेपलीकडे गेल्यावर ही चळवळ दडपून टाकणें सरकारला अशक्य होईल. आज सबंध हिंदुस्थानांत एकच बार्डोली आहे म्हणून जादा पोलीसांच्या किंवा लष्कराच्या साहाय्यानें तिला चिरडून टाकण्याची हांव सरकार बाळगीत असेल पण ही बार्डोलीची सांथ प्रांतोप्रांतीं पसरूं लागल्यास फाटलेल्या आकाशास सरकार कितीशीं ठिगळें लावूं शकेल?

# महाराष्ट्र संगीत परिषद्

## अधिवेशन दुसरें

महाराष्ट्र संगीत परिषदेचें पहिलें अधिवेशन गतवर्षी **गांधर्व महाविद्यालयाच्या** विद्यमानें भरविण्यांत आलें. त्या प्रसंगीं ठरल्याप्रमाणे परिषदेचें दुसरें अधिवेशन पुणें येथें तारीख ५, ६, ७ व ८ जुलै रोजीं विजयानंद नाटकगृहांत श्री. तात्यासाहेब केळकर यांचे अध्यक्षतेखालीं यशस्वी रीतीनें पार पडलें. येथील गोपाळ गायन समाजाचे चालक गोविंद गोपाळ देसाई यांच्या परिश्रमानें गीता वाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांच्या अध्यक्षतेखालीं स्वागतमंडळाची स्थापना करण्यांत आली व श्री. न. चिं. केळकर यांनीं परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावें असें ठरविण्यांत आलें. परिषदेकरितां महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांतून गायनप्रेमी लोक आले होते. त्याचप्रमाणें मुंबई, कोल्हापूर, अहमदाबाद, लाहोर, कराची, कानपूर, मद्रास वगैरे ठिकाणांहून गांधर्व महाविद्यालयाच्या शाखांचे अध्यापक परिषदेकरितां आले होते. अधिवेशनाला सुरुवात ठरल्याप्रमाणें गुरुवार तारीख ५ रोजीं सायंकाळीं ५॥ वाजतां झाली. स्वागताध्यक्ष गीतावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यांनीं आलेल्या पाहुणे मंडळींचें व प्रतिनिधींचें स्वागत केलें.

श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारल्यानंतर श्री. गोपाळराव देसाई यांनीं परिषदेला पंतप्रतिनिधि चीफ ऑफ औंध, बी. के. बोस, एम्. बी. बाक्रे, प्रो. फडके, अलाहाबादचे कशाळकर व पटवर्धन, नागपूर, लाहोर, हैद्राबाद येथील गां. वि. चालक, स्टेट कारभारी फलटण वगैरे गृहस्थांकडून आलेल्या अभीष्टचिंतनपर तारा व पत्रें वाचून दाखविलीं. यानंतर अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांचें उद्बोधक व सुश्राव्य भाषण सुमारें दोन तास झालें. स्थलसंकोचास्तव त्याचा फक्त त्रोटक सारांशच खालीं दिला आहे. त्यांनीं प्रथमतः पंडित विष्णु दिगंबर पलुसकर यांच्यासंबंधानें श्रोत्यांस माहिती सांगितली. ते म्हणाले, "पंजाब काश्मीर, बंगाल वगैरे प्रांतांत जाऊन जलसे करून

पं. पलुसकर यांनीं महाराष्ट्रीय संगीताची गोडी व शास्त्रीय पद्धति तेथील लोकांना पटवून दिली व संगीताच्या अध्ययनाचें पवित्र कार्य सुरू केलें, याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतो. सामुदायिक रीतीनें या विद्येचा प्रसार महाराष्ट्रांत व इतर प्रांतांत कसा होईल याविषयीं माझ्या मनांतील कांहीं सूचना कराव्या या हेतूनें व गायनाची गोडी मला मनापासून आहे म्हणून मी अध्यक्षपद स्वीकारलें.शिल्पकला, चित्रकला वगैरे कलांमध्यें जरी कांहीं विशेष गुण असले तरी गायनकलेमध्यें जें विश्वव्यापकत्व आहे तें इतर कलांमध्ये अगर शास्त्रामध्ये आढळत नाहीं.याचें प्रत्यंतर म्हणजे प्रत्येक मनुष्यप्राणी आपले रंजन स्वतःशींच तालावर अगर सुरावर गुणगुणत करीत असतो. मधुर गाण्यानें हत्ती वश होतात असें सांगतात. विषारी सर्प देखील आपल्या बिळांतून बाहेर येऊन गायनाचे मधुर आलाप कानीं पडतांच डोलूं लागतो हें आपण तर प्रत्यक्षच पाहतों. गाण्याचा उपयोग ज्याप्रमाणें लहान मुलांना निजविण्याकरितां करतात त्याचप्रमाणें राजे लोकांना उठविण्याकरितांहि संगीताचा उपयोग केला जातो! प्रेम व क्रोध, युद्ध व शांतता इत्यादि परस्परविरोधी योगांना देखील संगीताचा उपयोग होऊं शकतो. जाति, वयोमान, लिंगभेद यामधील कोणतीहि अडचण गायनशास्त्राच्या आड येत नाहीं व असा मनुष्यप्राणी नाहीं कीं जो गायनाला लुब्ध होत नाहीं. ग्रह व तारेहि भ्रमण करीत असतांना गात असतात व तें त्यांचें गायन तद्रूप झाल्यास ऐकूंहि येतें म्हणतात. पाश्चात्य शिक्षणामुळें आपल्या जुन्या कलांमध्यें नवीन जागृति उत्पन्नझाली आहे. तरी पण पाश्चात्य शास्त्रीय विचारसरणीची भेसळ जशी इतर शास्त्रें व कला यांमध्यें झाली आहे. आहे तशी या संगीत कलेमध्यें झाली नाहीं ही आनंदाची व अभिमानाची गोष्ट आहे. व या नवीन जागृतीचा फायदा घेऊन आपणाला उत्कर्ष करतां येईल. संगीतशास्त्राला राजदरबारांत जें स्थान होतें तें आतां राहिले नाहीं. गवई लोकांचा परामर्ष व संभावना राजे लोक करीत असत; परंतु तो राजश्रय आतां राहिला नाहीं. तथापि लोकाश्रय दसपटीनें वाढला आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे.

देवस्थानांच्या द्वारें देखील संगीतशास्त्राला मदत होत असे व थोड्याफार प्रमाणांत अजूनहि होते. सुमारें ३०-३५ वर्षांपूर्वी मोठमोठे गवई जाहीर जलसे करणें हें कमीपणाचें आहे असें मानीत असत; परंतु जाहीर जलसा करण्याची पद्धत आतां पडूं लागली आहे. एखाद्या गायनाचार्याजवळ कांहीं वर्षे राहून व त्याची सेवा करून गायनप्रेमी शिष्यानें गुरुविद्या संपादन करावी ही सांप्रदायी पद्धति आतां मोडत जाऊन 'गायनशाळा' स्थापन होऊं लागल्या आहेत. गायनाचीं पुस्तकें अलीकडे गुरुस्थानीं येऊं लागलीं.नाट्यसंगीतामुळें गायनविद्या गेल्या २५-३० वर्षांत बरीच पुढें आली. गायनाचार्य नाटकांमध्यें जाऊन गाऊं लागले. शृंगारिक पदें व लावण्या कमी होऊं लागल्या व त्यांचे जागीं व्यावहारिक व लौकिक विषयपर पदें येऊं लागलीं. पाश्चात्य संस्कृतीचा व विचारपद्धतीचा फायदा हा झाला कीं संशोधनदृष्टि वाढूं लागली. अर्थात् संगीतशास्त्राची परागति नसून प्रगति चालू आहे हे अभिमानाची गोष्ट आहे.

पाश्चात्य व पौर्वात्य गायनपद्धतींत तात्विक भेद आहेत व ते असे कीं, पाश्चात्य गायनपद्धतींत अनेक स्वरांच्या एकतानतेला ( Harmony ) महत्त्व अधिक दिलें जातें.एकाच वेळीं अनेक सूर उत्पन्न करणें हेंच काय तें विशेष असें मानण्याची त्यांची पद्धति व ती आपल्या इकडे नाहीं. नियमबद्ध स्वर घोळघोळून म्हणणें व आनंद उत्पन्न करणें हा त्यांच्यांतील व आपल्यांतील अभिरुचीमध्यें फरक आहे. इंग्रजी पद्धतींत राग नाहींत, चिजा आहेत.स्वरलेखनपद्धतीच ते सररास अनुसरतात व आपणाकडे ही पद्धति नवीन आहे. पाश्चात्य पद्धतींत लय आहे पण ताल नाहींत. परंपरेचें वा संप्रदायाचें बंधन तोडून पण त्यांतले चांगलें तेवढें राखून या नव्या जागृतीचा फायदा घेऊन संशोधन अधिक वाढलें पाहिजे. परंपरा अजीबात सोडावी असें माझें म्हणणें नाहीं, तरी पण पंजाबी, आंध्र, तेलंगी, मद्रासी गायनपद्धतींत गुणदोष काय आहेत ह्यासंबंधींची माहिती असणें जरूर आहे व संगीतांतील सर्व पद्धतींमध्यें जो प्रवीण आहे तो श्रेष्ठ ही भावना प्रत्येकानें बाळगली पाहिजे. स्वतःचें आहे तें सुटेल अशी भीति न मानतां उत्कृष्ट व ग्राह्य असेल तें अनुसरण्याकडे प्रवृत्ति व्हावी. जुन्या पदांच्या चाली ठेवाव्या व त्या चालीवर नवे मराठी प्रबंध रचण्यांत यावेत. संभावित स्त्रियांना गाण्याची कला अवगत असणें हें भूषण आहे असें वाटत असेल तर स्त्रियांना उपयुक्त व योग्य असे प्रबंध रचून पुस्तकें प्रसिद्ध झालीं पाहिजेत. हल्लींचा काल शाहिरी वाङ्मयाला अनुकूल नसला तरी उत्कृष्ट गुणाचे पोवाडे बनविण्यांत यावेत. लहान मुलें मुली स्त्रिया व प्रतिष्ठित तरुण या सर्वांना उपयुक्त असें पद्य वाङ्मय उत्पन्न केलें पाहिजे.

राग म्हणजे काय, रागिणी म्हणजे काय, श्रुति बारा आहेत कीं बावीस आहेत, याची खासगी जाहीर चर्चा व्हावी. स्टाफनोटेशनपद्धति चांगली कीं, सा री ग म पद्धति चांगली हें तज्ज्ञांनीं ठरवावें. 'स्टाफनोटेशनपद्धती' मध्ये जर कांहीं गुण असतील तर आपण ज्याप्रमाणें इंग्रजी भाषा आपद्धर्म म्हणून शिकतों त्याप्रमाणें आपद्धर्म म्हणून स्टाफनोटेशन-

पद्धति शिकावयाला काय हरकत ? पण देशांतील संगीत व्यवहाराला ती पद्धती लावू नये. पिंगळे, भातखंडे, पं. पलुसकर, आचरेकर, बर्वे, कृष्णराव मुळे, तांबे, अनंत संताराम माळवे वगैरे गायनाचार्य संगीतशास्त्राच्या संशोधनाचा प्रचार करीत आहेत ही फार आनंदाची गोष्ट आहे. हिंदी गायनपद्धतीचा पगडा महाराष्ट्र गायनपद्धतीवर बसला ही फार शोचनीय गोष्ट आहे. हिंदी भाषेचें हें जूं आपण झुगारून दिलें पाहिजे. हिंदी गायनपद्धतींत यतिभंग, ऱ्हस्व, दीर्घ यांमधील भेद पाहात नाहींत व अर्थाचा तर विधिनिषेधहि नाहीं व हीच पद्धति आपणाकडे अनुसरली जात आहे परराष्ट्रीय राजकारणांत भाषेचा उपयोग लिहिलेल्या खलित्याचा यथार्थ अर्थबोध होऊं नये याकडे करण्यांत येतो व तेंच उदाहरण आमच्या गायन पद्धतीला लागू पडत चाललें आहे. गवई लोक हिंदी भाषेंतील निरर्थक किंवा दूषणास्पद अर्थाची वैचित्र्यरहित पद्यें म्हणून गायनांतील निम्मा आनंद घालवून टाकतात. तरी शुद्ध व अर्थबोधक अशीं मराठी पदें व गायकीप्रबंध बनविले पाहिजेत. हिंदीचें दास्यझुगारून द्यावें व मातृभाषेचा अभिमान धरावा." यानंतर अध्यक्षांनीं गवई लोकांना कांहीं सूचना केल्यात्या अशा कीं, (१) कोणतेहि पद्य म्हणतांना पहिल्यानें तें संपूर्ण व मोठ्याने स्पष्ट म्हणून दाखवावें. कारण त्यायोगानें शब्दबोध व अर्थबोध होईल. (२) राग, पद्याची जाति ताल काय आहे हे गवयानें पहिल्यानें सांगून नंतर गावयाला सुरवात करावी. (३) गुरुपरंपरेचा अभिमान धरून आपलें नांव व गायनपद्धति कोणती तें सांगावें. (४) ज्या चिजा म्हटल्या जातील त्यांचें नोटेशन प्रसिद्ध करण्यांत यावें. (५) संस्कृत पद्यांशीं संबंध ठेवावा. (६) सूरभरणा फारसा असूं नये. (७) हार्मोनियमची मदत फारशी घेऊं नये (८) रागलक्षणांची पदें करण्यांत यावींत. व शेवटची सूचना अशी कीं, श्रोत्यांनीं गायनप्रसंगीं शांतता ठेवावी. कारण सामाजिक आनंद हा सर्वांचाच आहे. असें सांगून केळकर यांनीं आपलें भाषण संपविलें.

## विधवांचा दत्तकाचा अधिकार व

# आमदार जाधवांचें बिल

**(ले. वासुदेव विनायक जोशी वकील, बडोदें )**

मुंबई इलाख्यांत हिंदु विधवा स्त्रियांचा पतीनें मनाई केलेली नसेल अशा सर्व प्रसंगीं दत्तक घेण्याचा जो विस्तृत हक्क आहे तो संपुष्टांत आणण्याच्या उद्देशानें श्री. भास्करराव जाधव यांनीं मुंबई-कायदेकौन्सिलापुढें बिल आणिलेलें असून जुलैतील यत्या बैठकींत तें चर्चेस निघणार आहे. जाधव यांची सूचना म्हटली म्हणजे त्यांत प्रतिगामी धोरण असावयाचेंच. तेव्हां अशा आक्षेपार्ह बिलाची चर्चा होणें जरूर आहे.

इतर इलाख्यांत विधवेस दत्तक घ्यावयाचा असेल तर पतीची स्पष्ट संमति लागते. परंतु मुंबई इलाख्यांत व्यवहारमयूखांत 'अतो विधवाया भर्तुराज्ञां विनाऽप्याधिकारः' ही जी मोकळीक देण्यांत आली ती दत्तकचंद्रिकेंत जास्त विस्तृत करून जेव्हां जेव्हां मनाई केलेली नसेल तेव्हां विधवेस दत्तक घेण्याची पतीची गर्भित संमति समजावी असा जो अभिप्राय व्यक्त झाला तो मुंबई इलाख्यांत आजवर शेंकडे-वर्षे कायदा झालेला असून हायकोर्ट व खुद्द प्रिव्ही कौन्सिल यांनीं तो अभिप्राय मान्य केलेला आहे. आतां जाधवराव असें सुचवितात कीं, कोणाहि विधवेनें (१) नवऱ्यानें अगर त्याच्या वडिलानें योग्य रीतीनें नोंदलेल्या अनुमति–पत्राखेरीज (२) अगर पतीच्या पणज्याच्या वंशांतील पुरुषवंशज-सगोत्र सपिण्ड—यांच्या हयातींत कोणास दत्तक घेतलें तर तें दत्तविधान रद्द समजावें. या बिलाला त्यांनीं जोडलेल्या टीपेमध्यें लोभमूलक प्रतिगामी कल्पनेस त्यांना लपवून ठेवितां आलें नाहीं. ते म्हणतात कीं, नवऱ्याचे नातेवाईक टाकून वाटेल त्या कुटुंबांतील मुलगा दत्तक घेण्याची मुभा विधवेस असल्यानें केवळ अपक्व बुद्धिमत्तेची आणि दुसऱ्याच्या तंत्रानें वागणाऱ्या विधवेच्या दत्तक घेण्याबद्दलच्या कृत्यानें भाऊबंदाच्या कायदेशीर हक्काचें नुकसान होतें, त्यांची मालकीची मिळकत दुसऱ्यास (म्हणजे दत्तकास?) जाते आणि तिऱ्हाईत माणसास मिळकत मिळते; यामुळें कज्जे उत्पन्न होतात आणि खुद्द विधवेसहि नुकसान पोंचतें. कारण सर्व मिळकतीचा उपभोग घेण्याचा हक्क नाहींसा होऊन फक्त अन्नवस्त्रच तिला मिळतें. या शेवटच्या वाक्यांत जाधवरावांनीं विधवेच्या करुण स्थितीबद्दल नक्राश्रु बळेंच आणून या अनुदार बिलाबद्दल सहानुभूति मिळविण्याकरितां कांगावा केलेला दिसत असला तरी त्यांचा उद्देश स्पष्ट झालेला आहे. ' पिण्डोदकक्रियाहेतोर्नामसंकीर्तनाय च ' हा दत्तक घेण्याचा मुख्य उद्देश असून तो

कोणत्या हेतूनें अगर विचारानें केला याची विचक्षणा करण्याचें कारण नाहीं (रामचंद्र वि. मुळजी २२ मुंबई ५५८).

एकीकडे जनतेंत विधवांना वारसांत मिळालेल्या मिळकतीवर संपूर्ण स्वामित्व द्यावे अशी चळवळ चालली असतांना तिला आज असलेला दत्तक घेण्याचा अनियंत्रित हक्क काढून घेण्याची बुद्धि जाधवरावांना कां सुचावी हें एक कोडें आहे. ज्या भाऊबंदांची कायदेशीर मालकीची मिळकत रक्षण करण्यासाठीं यांची येवढी खटपट आहे त्यांच्या त्रासानें विधवा ही इतकी कंटाळलेली असते कीं स्वतंत्र वहिवाटीचें मोल देऊन अन्नवस्त्रावर संतुष्ट राहण्यास तयार होते आणि दत्तक घेते. दत्तक घेतांच त्या भाऊबंदांचा संबंध सुटतो तोंपर्यंत मात्र विधवेच्या उपभोगाचें नियंत्रण करण्यासाठीं हे दावे लावितात. तेव्हां दत्तक घेऊन थोडाफार त्याच्याशीं ठराव करून या भाऊबंदीच्या जंजाळांतून तिला सुटतां येऊं नये अशी योजना या बिलांत केलेली आहे. जाधव हे स्वतः कायदेपंडित आहेत तथापि भाऊबंदाची कायदेशीर मिळकत ही जी शब्दयोजना त्यांनीं योजिली आहे ती उत्तराधिकार वारसांच्या हक्काबद्दल कितपत लावितां येईल याचा त्यांनीं नीट विचार केलेला दिसत नाहीं. जास्तींत जास्त वारसा मिळण्याचा संभव त्यास म्हणतां येईल. तसेंच कोणासहि दत्तक घेतलें म्हणजे तो तिऱ्हाईत कसा राहणार आणि तिऱ्हाइतास मिळकत जाते अगर तिऱ्हाईत घरांत घुसतो या म्हणण्यांत अर्थ तरी काय ? भाऊबंद तरी विधवेस तिऱ्हाईतच नव्हेत का ? कदाचित् तिऱ्हाइतापेक्षांही जास्त त्रासदायक होत. पतीनें अगर त्याच्या वडिलांनीं अनुमति द्यावयाची तीहि नोंदलेली पाहिजे. तें कां म्हणून ? तर दावे जास्त होणार नाहींत. वास्तविक इतर प्रांतांत जेथें पतीच्या अनुमतीची खास अपेक्षा ठेविलेली आहे तेथें ही अनुमति लेखी म्हणजे दस्तऐवजांत अगर मृत्युपत्रांत असली तरी चालते. मग मृत्यूपत्राची तरी जाधवांनीं मोकळीक कां ठेविली नाहीं !

बरें, सदर बिलांत दुसराहि ठळक दोष असा आहे कीं पतीच्या पणज्याचे पुरुषवंशज हेच जसे कांहीं विधवेनंतर वारस म्हणून गणले गेले आहेत. परंतु वास्तविक पाहतां मुंबई इलाख्यांत निपुत्रकाची वारस मुलगी व नंतर बहीणहि होते इतकेंच नव्हे तर त्या दोघीहि पूर्ण मालकी हक्कानें मिळकत घेतात. तेव्हां दत्तकानें जर कोणाच्या हक्कास बाध येणार असेल तर तो मुलगी अगर बहीण यांच्या. तेव्हां त्यांच्या विचाराने दत्तविधान झालें तरी जाधवांच्या योजनेप्रमाणे तें रद्द होणार आहे. मुंबई इलाख्यांत तर इतकी सवलत ठेवलेली आहे कीं, अविभक्त कुटुंबांतील विधवेस इतर ज्या अविभक्त कुटुंबांतील पुरुषांच्या हक्कावर गदा येईल अशांच्या संमतीनें दत्तक घेण्याचा अधिकार आहे. (रामजी वि. गमान ६ मुंबई ४२८; गोपाळ वि. विष्णु २३ मुंबई २५०) विभक्त स्थितींतलि पतीच्या विधवेस तर पतीनें मनाई केलेली नसली म्हणजे पूर्ण अधिकार आहे. मद्रास इलाख्यांतहि जवळच्या नातेवाइकांच्या संमतीनें पतीच्या अनुमतीच्या अभावीं विधवेस दत्तक घेतां येतो. तेव्हां अशा जवळच्या नातेवाइकांना संमति दत्तक विधवेस प्रमाणेंतीप्रमाणें विधवेस दत्तक घेण्याचा अधिकारहि देण्यास जाधव कबूल नाहींत. आणि येवढा आटापिटा कशाकरितां म्हणाल तर, भाऊबंदाच्या अनिश्चित वारस हक्काकरितां. कदाचित् या उदारधोरणी बिलाच्या पाठोपाठ मुलगी आणि बहीण यांनाहि मर्यादित स्वामित्व देण्याचें बिल पुढें मांडण्यास जाधव कचरणार नाहींत. कारण त्यांना इतर प्रांतांतील कायद्याबरोबर येथील कायदाहि आणून सोडावयाचाच आहे. शेवटीं दावे सध्याच्या सवलतीनें होतात असें म्हटलें आहे. जणुं काय जाधवांचें बिल पास झालें म्हणजे दावे कमी होणार आहेत. तेव्हां दरेक दृष्टीनें आमदार जाधव यांनीं आणिलेलें बिल आक्षेपार्ह आहे; इतकेंच नव्हे तर इतर प्रांतांच्या मानानें मुंबई इलाख्याची स्त्रियांच्या कायदेशीर हक्कांच्या कित्येक बाबतींत जी उदारधोरणी परंपरा आजवर चालत आलेली आहे त्या शास्त्रापेक्षां बलवत्तर असणाऱ्या रूढीसहि रसातळास नेऊन विधवा स्त्रियांचें जीवन अधिक दुःखमय करूं पाहणाऱ्या या बिलाचा जनतेकडून निषेध झाला पाहिजे.

# डॉ. मो. गो. देशमुख यांचा मृत्यु

मुंबईचे सुप्रसिद्ध व लोकप्रिय दक्षिणी पुढारी डॉ. मोरेश्वर गोपाळ ऊर्फ नानासाहेब देशमुख यांस काल दुपारीं (सोमवार ता. १६ जुलै रोजीं) ३ वाजतां मुंबईस देवाज्ञा झाली हें कळविण्यास अत्यंत दुःख होतें. सुप्रसिद्ध लोकहितवादी गोपाळ हरि देशमुख यांचे हे पांचवे चिरंजीव होत. नानासाहेबांचा जन्म सन १८५५ मध्यें झाला. अर्थात्‌च ते लोकमान्यांहून एक वर्षानें वडील होते व लोकमान्यहि त्यांस वडील बंधुप्रमाणेंच लेखीत. नानासाहेबांची बुद्धि अत्यंत तीव्र असल्यामुळें ते भराभर परीक्षा पास होत गेले. १८७८ त एल. एम. अँड एस. ची परीक्षा पास झाल्यावर मेडिकल खात्यांत असिस्टंट केमिकल अनलायझरच्या जागेवर त्यांची नेमणूक झाली. तेथें काम करीत असतांना बी. ए. ची परीक्षा देऊन त्यांनीं लगेच एम. डी. ची परीक्षाहि दिली. तरी पण केमिकल अनलायझरची जागा आय. एम. एस. करितां राखून ठेवल्यामुळें त्यांना मिळाली नाहीं व वरिष्ठाचें व त्यांचें पटेना म्हणून त्यांनीं १८९२ सालीं सरकारी नोकरी सोडली व सार्वजनिक कार्यांत भाग घेण्यास ते मोकळे झाले.

१८९७ सालच्या टिळकांच्या खटल्याच्या वेळीं केसरीच्या साहाय्याकरितां जो फंड उभारण्यांत आला त्याचे ते अध्यक्ष होते. त्या वेळेपासून हिंदु एज्युकेशनफंड, रायगडचा समाधिफंड, पैसाफंड, ज्युबिलीफंड, लोकमान्य पर्सफंड इत्यादि अनेक राष्ट्रीय—फंडांचे ते अध्यक्ष असत आणि हीं सर्व कामें ते अत्यंत दक्षतेनें करीत. डॉ. नानासाहेब देशमुख म्हणजे मुंबईतील दक्षिणी मंडळींचा आणि राष्ट्रीय पक्षाचा मोठा आधार होता. लोकमान्यांचे ते अत्यंत निकट स्नेही असून कोणत्याहि महत्त्वाच्या सार्वजनिक कामांत ते लोकमान्यांचा सल्ला घेत आणि लो. टिळकहि डॉ. देशमुखांचा पोक्त सल्ला वारंवार विचारीत असत. राष्ट्रीय शिक्षणाची चळवळ सुरू झाल्याबरोबर जें राष्ट्रीय शिक्षण विचार मंडळ स्थापन झालें त्यांत लो. टिळक, नानासाहेब वैद्य, गु. विजापूरकर, दाजीसाहेब खरे यांच्या बरोबर नानासाहेब देशमुख यांचेहि नांव होतें आणि समर्थ विद्यालयासाठीं फंड जमविण्याकरितां लोकमान्यांनीं व्याख्यानांचा दौरा काढला, त्यावेळीं डॉ. देशमुख हे लोकमान्यांच्याबरोबर सोलापूर, बार्शी, कल्याण वगैरे ठिकाणीं गेले होते. १९०८ सालीं कांचकारखान्याचा पाया घालण्याच्या समारंभाकरितां ते तळेगांवास आले होते व त्या वेळीं त्यांनीं समर्थ विद्यालयास भेट दिली होती. पैसाफंडाचें काम सुव्यवस्थित चालावें म्हणून ती संस्था नोंदली गेली त्यावेळेपासून डॉ. देशमुख हे पैसाफंड संस्थेचे कायमचे अध्यक्ष होते. अशा रीतीनें अनेक सार्वजनिक कार्यांस त्यांचा मोठा आधार होता. डॉक्टरीच्या धंद्यांत तर त्यांच्या वेळच्या डॉक्टरांत त्यांचा हात धरणारा कोणी नव्हता. त्यांची रोगचिकित्सा अचूक असे. त्यांचें डॉक्टरीचें अध्ययन पाश्चात्य पद्धतीनें झालें असलें तरी त्यांनीं आयुर्वेदाचाहि अभ्यास केला होता आणि आयुर्वेदाचा त्यांस मोठा अभिमान वाटत असे. मुंबईच्या हेमंतोत्सव व्याख्यानमालेंत त्यांनीं विवाहकाल, शरीरसामर्थ्य वगैरे विषयांवर आयुर्वेदाच्या आधारें दिलेलीं व्याख्यानें अत्यंत उपयुक्त असून तीं छापून प्रसिद्ध झालीं आहेत.

त्यांची घरची राहणी अगदीं साधी व जुन्या पद्धतीची होती. ते स्नानसंध्याशील व देवभक्त असून पूर्व—परंपरेच्या धार्मिक आचारविचारांवर त्यांची अढळ श्रद्धा होती. सावंतवाडी संस्थानांत तळवडे येथें त्यांनीं दत्तमंदिर बांधलें आहे व तेथें ते दरसाल चार-पांच महिने जाऊन राहात असत. सार्वजनिक कार्यास द्रव्यसाहाय्य करण्यांतहि त्यांचा हात सढळ असे, त्यामुळें कोणीहि अतिथि सहसा त्यांच्या घरून विन्मुख जात नसे. त्यांची भव्य मुद्रा, त्यांचें शुद्ध आचरण आणि त्यांची गाढ विद्वत्ता पाहिली म्हणजे ते अर्वाचीन काळचे एक ऋषीच आहेत असें वाटून कोणाहि पाहणाराला त्यांच्याविषयीं अतीशय आदरबुद्धि वाटत असे. त्यांची शरीरप्रकृति चांगली सुदृढ होती. अलीकडे एक वर्ष मात्र ते अगदीं थकले होते. मरणसमयीं त्यांचें वय ७३ वर्षांचे होतें. असले हे दक्षिणी समाजाचे सन्मान्य पुढारी कालवश झाल्यानें मुंबईतील दक्षिणी समाजाची कल्पनातीत हानि झाली आहे. डॉ. नानासाहेबांच्या मृत्युनें राष्ट्रीय पक्षाची जी हानि झाली ती तर सहसा भरून येण्यासारखी नाहीं. त्यांची स्मशानयात्रा काल रोजीं सायंकाळीं ६ वाजतां निघाली होती, त्या वेळीं दक्षिणी—समाजानें दुःखप्रदर्शनार्थ आपलीं दुकानें बंद ठेविलीं होतीं व त्यांच्या प्रेतयात्रेस अतिशय मोठा समाज जमला होता. डॉ. नानासाहेब देशमुख यांचे दोघे चिरंजीव, धाकटे बंधु श्रीयुत लक्ष्मण गोपाळ देशमुख पेनशनर आणि त्यांच्या कुटुंबांतील इतर मंडळी यांच्यावर दुःखाचा हा मोठा डोंगरच कोसळला आहे. पण जगाच्या रहाटीकडे बघून त्यांनीं विवेकानें दुःख आवरलें पाहिजे.

# अहमदाबाद जिल्हा परिषद

## अध्यक्ष न. चिं. केळकर यांचें भाषण

आज आपण येथें अहमदाबादेस बार्डोलीच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं जमलों आहों. एखादा टीकाकार विचारील कीं, अहमदाबादचा बार्डोलीशीं संबंध काय? आणि त्यांतून मी तर गुजराथेच्याहि बाहेरचा राहणारा! तेव्हां टाइम्सचा कुचेष्टेखोर बातमीदार सहजींच असा प्रश्न करील कीं, माझा बार्डोलीशीं संबंध काय? टाईम्सच्या ज्या बातमीदारानें वल्लभभाई पटेल व मुनशी यांनाहि परकी ठरविलें तो या परिषदेविषयीं असला प्रश्न हटकून विचारील. पण आपण त्यास एकच उत्तर देऊं या कीं, शेतकऱ्याच्या हिताचा प्रश्न, मग तो मुंबई इलाख्यांतला असो किंबहुना हिंदुस्थानांतला असो, सर्वांच्याच सारखा जिव्हाळ्याचा आहे. आणि एखाद्या युरोपियन आगंतुकाला हा प्रश्न विचारण्याचा जेवढा आधिकार आहे त्याहून आम्हाला अधिक आधिकार आहे. डॅनिश किंवा नॉर्वेजियन कायदेपंडिताच्या अध्यक्षतेखालीं, स्वित्झर्लंडमध्यें परिषद भरवून, आफ्रिकेंतल्या मँडेटरी प्रदेशांतील नेटिवांच्या हिताहिताचा विचार करण्याला इंग्लंडला जेवढा आधिकार पोंचतो त्यापेक्षां तरी निदान अधिक हक्क पुण्याच्या अध्यक्षाला अहमदाबाद परिषदेंत बार्डोलीचा विचार करण्याला पोंचतो हें खास आहे.

मुंबई इलाख्यांत सर्वत्र रयतवारी पद्धत चालू असून सरकार स्वतःला जमिनीचें मालक समजतें. या मालकाचा रयतांना इतका कटु अनुभव येतो कीं, पन्नास वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत जसे सावकारांविरुद्ध दंगे झाले तसा सरकाराविरुद्ध दंगा करावा असें वाटण्याइतके रयत बेदिल झालेले असतात. इतर प्रांतांत जेथें जमीनदारी पद्धति चालू आहे तेथें खंडकऱ्यांना जमीनदारांच्या जुलमांतून सोडविण्यासाठीं सरकार पुढें येतें आणि टेनन्सी अॅक्ट पास करतें. पण जेथे सरकारच स्वतः जमीनदार बनलें तेथें रयतेला वांचविण्यासाठीं अशी मध्यस्थी कोण करूं शकेल? अर्थात् रयतेला सेटलमेंट ऑफिसरांच्या अनियंत्रित सत्तेपुढें मान वांकवावी लागते. कोर्टांत दाद मागावी म्हटल्यास तोहि दरवाजा बंद! सरकारचीं पैशाची जरूरी हेंच सारा वाढविण्याला कारण व प्रमाण होऊन बसतें आणि तक्रारी, अर्ज–विनंत्या यांचा बिलकूल उपयोग होत नाहीं. अशा स्थितींत रयतांनीं कायदा आपल्या हातीं घेऊन बार्डोलींतल्याप्रमाणें अनत्याचारी सत्याग्रह करणें याखेरीज दुसरा कोणता मार्ग त्यांस मोकळा आहे? सत्याग्रहाच्या या लढ्यांत सरकारचें खरें स्वार्थपर व कंजुषपणाचें स्वरूप व्यक्त होतें. राजद्रोहादिकांच्या खटल्यांत सरकारला दडपशाहीला थोडें तरी निमित्त असतें. पण वाढलेला सारा देण्याचें नाकारून शेतकरी जेव्हां सत्याग्रह करतात त्यावेळीं ते सरकारावरच उलट पेंच करून त्याला कैचींत धरतात. या लढ्यांत सरकार जुलमी आणि रयतेची बाजू न्यायाची असल्याचें तिऱ्हाइताला तेव्हांच पटतें. कारण तसेंच खरें गाऱ्हाणें असल्याशिवाय रयत आपली जमीन जप्त होऊं देण्याइतका वेडेपणा करील असें कोणासच वाटत नाहीं. आणि म्हणूनच टाईम्सच्या खोडसाळ बातमीदारानें बार्डोलींतील बंडाचें चित्र कितीहि भडक रंगाविलें आणि वल्लभभाईंना सरसेनापति व महात्मा गांधींना युद्धमंत्री म्हणून संबोधिलें तरी जनतेला यांत खरा दोष कोणाचा आहे आणि कोण कोणावर जुलूम करीत आहे तें कळतें. टाईम्सच्या बातमीदारानें बार्डोलींत बोल्शेव्हिझम सुरू आहे असें म्हणून वल्लभभाईंना लेनिन बनविलें आहे! पण लेनिन या शब्दांत कांहीं दुष्टपणाचा कळस होत नाहीं. लेनिनच्या पलीकडची पायरी सैतानाची आहे. पण कदाचित् सैतान या पदवीचें पेटन्ट सरकारनें घेतलें असल्यामुळेच या बातमीदारानें वल्लभभाईंना सैतान म्हटलें नसावें.

बार्डोलींतील चळवळ बोल्शेव्हिक स्वरूपाची आहे असें म्हणणें ही दुष्ट हेतूनें केलेली बदनामीच होय. असला दुष्ट आरोप करणाऱ्यानें पुढें यावें व आपला आरोप सिद्ध करावा असें मी त्यांस आव्हान करतो. वाढलेला सारा देण्यापूर्वी एकदां चौकशी करा असें म्हणण्यांत बोल्शेव्हिझमचा संबंध तरी कसा येतो? या सारावाढीसंबंधीं ज्यांनीं पहिली तक्रार करून सरकारशीं पत्रव्यवहार सुरू केला ते भीमभाई नाईक हे रावबहादुर असून असहकारितेच्या चळवळींत पुनः कधींहि मिसळले नव्हते. अशा गृहस्थांनीं तक्रार केली असतां सरकारनें चौकशी करण्याचें कां नाकारावें? सरकारलाच तेवढी इभ्रत आहे आणि शेतकऱ्यांना कांहीं इभ्रत नाहीं कीं काय? शेतकरी गरीब असेल, खंडकरी असेल, अशिक्षित असेल, रिणको असेल व कायदे न जाणणारा असेल; पण तेवढ्यानें त्याची बाजू सपशेल खोटी व त्याच्या तक्रारीला कांहीं कायदेशीर आधार नाहीं असें होतें काय? सरकारच्या हातीं सत्ता असेल व निग्रहानुग्रहाचीं साधनेंहि असतील; पण

तशीं साधनें शेतकऱ्याजवळ नसलीं म्हणून त्याला त्याच्या देशबांधवांचा पाठिंबा मिळूं नये कीं काय? त्याचप्रमाणें त्याच्या मताच्या जोरावर जे कौन्सिलर कायदेमंडळांत निवडून गेले असतील त्यांनीं अमक्या प्रश्नासंबंधीं अमुकच मत द्या असें सांगण्याचा त्यांस अधिकार नाहीं कीं काय?

बार्डोलींत चालू असलेला हा लढा तत्वासाठीं आहे व तो एका तालुक्यालाच लागू नसून सरकारच्या रेव्हिन्यू खात्याच्या पद्धतीविरुद्ध ही तक्रार आहे. या तक्रारींत इतर अनेक प्रश्नांचा संबंध येतो, पण त्यांचा विचार न करतां मी फक्त एकाच प्रश्नाचा विचार करणार आहे. तो प्रश्न एवढाच कीं, रिव्हिजन सेटलमेंटनें नाराज झालेल्या रयतांनी फेरचौकशीची मागणी केली असतां सरकारनें ती मागणी मान्य कां केली नाहीं ? सरकारनें ही मागणी कबूल केली असती व फिरून चौकशी करविली असती तर त्यांत सरकारची इभ्रत राहिली असती, उदारपणाचा टेंभाहि मिरवितां आला असता आणि न जाणो कदाचित् फेरचौकशींत रयतांचें म्हणणें निराधार ठरून सरकारची बाजू अधिक बळकटच झाली असती. अर्थातच असली फेरचौकशी मागणें हें एक प्रकारचें धाडसच होतें व तें आंगलट येण्याचाहि संभव आहे. असें असतां सरकारनें चौकशी मान्य केली नाहीं यापेक्षां हटवादीपणा दुसरा कोणता असूं शकेल ?

शेताची धारेबंदी करण्याचें शास्त्र म्हणजे एक कोडेंच आहे. सरकार कोणत्या कारणासाठीं धारा वाढवील याचा शेतकऱ्यांना तर्कहि करतां येत नाहीं. बंगाल, संयुक्त प्रांत वगैरे प्रांतांतील शेतकऱ्यांना जमीनदारानें केलेल्या धारावाढीविरुद्ध तक्रार करतां येते. पण मुंबई व मद्रास या प्रांतांतील रयतांना तसें कोणतेंच बचावाचें साधन नाहीं. हा अन्याय दूर करण्यासाठीं लॉर्ड रिपन यांनीं प्रयत्न केला पण तो भारतमंत्र्यानें फेटाळून लावला. रयतेला न्याय देणें तर दूरच राहिलें; पण १९०१ सालीं मुंबई-सरकारनें शेतकऱ्यांचा मालकी हक्कहि काढून घेण्याचा प्रयत्न केला. १९१९ सालीं जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें सारावाढीचा अनिश्चितपणा काढून टाकण्याविषयीं शिफारस केली. तिला अनुसरून आतां मुंबईसरकारनें लँड रेव्हिन्यू कोडाचें दुरुस्ती बिल तयार केलें आहे. पण त्या बिलानें सारावाढीचा अनिश्चितपणा दूर होऊं शकत नाहीं. रिव्हिजन सेटलमेंटच्या वेळीं रयतांना तक्रार अर्जे करण्याची एकदोन वेळां संधि दिली तरच हा अन्याय दूर होईल. बार्डोलीचेंच सध्याचें उदाहरण आपण घेऊं. सेटलमेंट ऑफिसर मि. जयकर यांनीं जो रिपोर्ट केला त्याच्यावर सेटलमेंट कमिशनरानें टीका करून चिंधड्या उडविल्या. सेटलमेंट कमिशनराचा रिपोर्ट रेव्हिन्यू कमिशनराला आवडला नाहीं. आणि शेवटीं मुंबई-सरकारनें खालच्या सगळ्या अधिकाऱ्यांचें मत बाजूला सारून वीस टक्के वाढ कायम केली ! सरकारनें वाढीचें हें प्रमाण कशावरून ठरविलें ? हाच बार्डोलीच्या सत्याग्रही लोकांचा सवाल आहे. वाढीचीं कारणें कळल्याशिवाय ती वाढ योग्य कीं अयोग्य हें कसें ठरणार? सेटलमेंट कमिशनरानें तीस टक्के वाढ चढविली व मुंबईसरकारानें ती दहा टक्के उतरविली, एवढ्यानें कांहीं न्याय केल्याप्रमाणें होत नाहीं. लबाड सावकार अज्ञ कुळांना फसविण्यासाठीं असलाच हिशेब त्यांच्यापुढें करून दाखवीत असतात. तीन चोक तेरा, अधिक तीन बरोबर अठरा, त्यांतून तुझ्यासाठीं म्हणून दोन रुपये सूट, बाकी सोळा रुपये टाक म्हणजे हिशेब पुरा करूं, असली धूळफेंक करून दोन रुपयांची सूट दिल्याचा बाहाणा करून लबाड सावकार पंधरा रुपयांच्या ऐवजीं सोळा रुपये उपटतो व वरती मेहरबानी केल्याची बतावणी करीत असतो ! तसलाच प्रकार बार्डोलीच्या धारेवाढींत सरकारनें चालविला आहे. तीस टक्के असो किंवा वीस टक्के असो, हीं वाढ कोणत्या कारणासाठीं व कोणत्या हिशेबानें झाली हें बार्डोलीकरांना कळावयास हवें व तेवढ्यासाठीं फेरचौकशीची मागणी करण्यांत येत आहे.

सेटलमेंटच्या कामांत अन्याय होऊं नये म्हणून सेटलमेंट करतांना अमुक इतक्या गांवांत स्वतः जाऊन सेटलमेंट कामगारांनीं चौकशी करावी असा नियम केला आहे. बार्डोलीच्या बाबतीत अशी समक्ष चौकशी केली गेली नाहीं अशी भीमभाईंची तक्रार आहे. ही तक्रार हातीं येतांच सरकारनें तिची शहानिशा कां केली नाहीं ? सरकारला अशी संवयच लागून गेली आहे कीं, आपल्या लेखणींतून जे वाक्य निघून गेले तें ब्रह्मलिखित मानून चालावयाचें. रयतांचे अर्ज आले, तक्रारी उपस्थित झाल्या, सर्वत्र बोभाटा झाला तरी सरकार झोंपेतच होतें. आणि सेटलमेंटच्या कागदांचीं भेंडोळीं दप्तरखान्यांत जीं एकदां भिरकावून देण्यांत आलीं होतीं त्या दप्तरावरील धूळ देखील न झाडतां सरकार झोंपेतून उत्तर देत होतें कीं, केलेली चौकशी यथायोग्य आहे सबब आम्ही त्यांत फिरून हात घालूं इच्छित नाहीं ! अशा परिस्थितींत रयतेनें तरी काय करावें ? सरकारच्या या निगरगट्टपणाचा त्वेष येऊन ‘ तुम्ही जर फेरचौकशी करीत नाहीं तर आम्हीहि शेतसारा देत नाहीं,’ असें जर शेतकरी म्हणाला, तर त्यांत त्याचा तरी काय दोष ? सरकारची इभ्रत इतकी नाजुक झाली आहे कीं, रयतांनीं कांहीं थोडीशी हालचाल केली कीं तिला धक्का लागून सरकार चवताळून उठतें. पण शेतकऱ्यांनाहि

इभ्रत असूंच नये असें कांहीं शास्त्र नाहीं. भीमभाईनीं तक्रार केली सरकार मुखस्तंभ, व वल्लभभाईनीं पुनः तक्रार केली तरी सरकार स्तब्ध अशा स्थितींत रयतांनीं तरी सत्याग्रहाशिवाय दुसरा कोणता मार्ग स्वीकारावा?

गव्हर्नर सांगतात कीं, या बाबतींत सगळ्या कौन्सिलरांचें व मंत्र्यांचें एकमत आहे. वास्तविक स्थिति काय असेल ती असो.पण दिवाण आणि कार्यकारी मंत्री मिळून पांच हिंदी गृहस्थ सरकारच्या मंत्रिमंडळांत असतांना ते लोकमत धाब्यावर कसें बसवूं शकतात आणि बार्डोलींतल्याप्रमाणें सरकारला नंगा नाच कसा घालूं देतात, याचेंच सखेदाश्चार्य वाटतें! असलीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे आपल्याच देशबांधवांनीं सरकारी जुलमाला पाठिंबा देण्यापेक्षां मंत्रिमंडळांत आपली मंडळी नसलेलीच पुरविली असें वाटूं लागतें. कारण आपल्या दिवाणांना व मंत्र्यांना फेरचौकशी करण्यापुरतें देखील जर सरकारचें मन वळवितां येत नसेल तर त्यांनीं मंत्रिमंडळांत रहावें तरी कशाला? जर त्यांच्या हातून एवढी कामगिरी होईल तरच त्यांनीं ह्या जागा पत्करल्या त्या स्वार्थासाठीं नसून तत्त्वासाठीं पत्करल्या असें सिद्ध होईल.

अखेरीस सरकारलाहि दोन शब्द सांगणें प्राप्त आहे. ते एवढेच कीं, सरकारनें विनाकारण इभ्रतीचें स्तोम माजवूं नये. सरकार बलिष्ठ असल्यामुळे उदारपणा दाखवूं शकते. असे प्रसंग पूर्वी आले आहेत व हाहि त्यांतलाच एक प्रसंग आहे. या योगानें सरकारची इभ्रत नष्ट होणार नाहीं व जमीन-महसूलहि बुडणार नाहीं. उलटपक्षीं टाईम्सच्या बातमीदारानें केलेल्या वर्णनांतली अतिशयोक्ति सोडून त्यांतले अर्धे वर्णन तरी खरें आहे असें जरी समजून चाललें तरी आजमितीला सरकारची इभ्रत कोठें राहिली आहे? पण हा वास्तविक राजकीय स्वरूपाचा प्रश्न नसून केवळ शेतकऱ्यांचा समजुतीचा प्रश्न आहे व तो सरकारनें उदारपणाणेंच सोडविला पाहिजे. १९१८ सालीं खेडा जिल्ह्यांतील सुटीसंबंधानें असाच प्रश्न उद्भवला होता. त्या वेळीं सर शंकर नायर यांनीं असे उद्गार काढले कीं, लॉर्ड विलिंग्टन यांच्यासारख्याच्या कारकीर्दींत जर अशी गोष्ट घडते, तर त्यांच्याहून कमी सहानुभूतीच्या गव्हर्नराच्या कारकीर्दींत काय होईल? आणि मला तर वाटतें कीं, सर लेस्ली विल्सन हे विलिंग्डनपेक्षांहि अधिक लोकप्रिय आहेत. पण इभ्रतीचा प्रश्न आला कीं, गव्हर्नरसाहेब हे सिव्हिलियनांच्या हातांतलें बाहुलें बनतात! या दृष्टीनें पाहिल्यास बार्डोलींतल्या शेतकऱ्यांचा लढा हा गव्हर्नरांनीं आपल्यावर उपकारच मानला पाहिजे. कारण त्यामुळें तरी इभ्रतीच्या कचाटींतून एकदांचे गव्हर्नर मुक्त होतील.

परंतु या बाबतींत शहाणपणाचा सगळा सल्ला जर फुकट जावयाचा असेल, गव्हर्नराच्या मंत्रिमंडळांतील नामांकित हिंदी मंत्र्यांना जर पोलादी चौकटीच्या कात्रीपुढें मान लवविण्यावांचून गत्यंतर नसेल आणि गव्हर्नरसाहेबांच्या नैसर्गिक उदार स्वभावाला देखील जर हार खावी लागत असेल तर बार्डोलीच्या सत्याग्रही शेतकऱ्यांना "भाई हो, तुम्ही ही चळवळ अशीच नेटानें व चिकाटीनें चालवा" असें सांगणें आणि त्यांच्या या नैतिक व सनदशीर झगड्यांत त्यांना सर्वतोपरी साहाय्य करणें हेंच आमचें कर्तव्य होय. हें कर्तव्य करण्यांत आमचें मन आम्हास कोणत्याहि प्रकारें खाणार नाहीं. बार्डोलीचा हा लढा म्हणजे एक नमुनेदार प्रयोग आहे. धारेबंदी वाढल्याबद्दल तक्रारी होऊन फेरचौकशी करण्याची मागणी बार्डोलीप्रमाणें इतरत्रहि करण्यांत आली आहे. कुलाबा जिल्ह्यांत त्या संबंधानें दोन वर्षें सत्याग्रह चालू आहे आणि आतां देवगड तालुक्याचा वादहि रंगारूपास येऊं पाहात आहे. अशा स्थितींत बार्डोलीकरांना जर हार खावी लागली तर तींत त्यांचें एकट्याचेंच मरण नसून मुंबई इलाख्यांतील सगळ्या शेतकरीवर्गाचें आणि चळवळ्या पुढाऱ्यांचेहि त्यांत मरण आहे. म्हणूनच बार्डोलीच्या शेतकऱ्यांनीं आपल्यावर केवढी जोखीम घेतली आहे व त्यासाठीं केवढा अलोट स्वार्थत्याग चालविला आहे याचें निराळे वर्णन करण्याचें कारण नाहीं. माझी परमेश्वरापाशीं एवढीच प्रार्थना आहे कीं त्यानें बार्डोलीकरांना ही लढत यशस्वी रीतीनें तडीस नेण्यास धैर्य द्यावें आणि परमेश्वराची त्यांजवर तशी कृपादृष्टि होईल असा मला भरंवसा वाटतो.

# आशियांतील परिस्थिति

## व

# हिंदुस्थान सरकारचें लष्करी धोरण

हिंदुस्थानास स्वराज्यप्राप्ति लवकर कशी होईल या फिकीरींत हिंदी राजकीय पुढारी असतात तर ती लांबणीवर कशी टाकतां येईल या उद्योगांत ब्रिटिश मुत्सद्दी गढलेले असतात. महायुद्धापूर्वी हिंदुस्थान केवळ राजकीय स्वराज्याचा विचार करीत होता व त्यास स्वराज्य देणें राहोच पण त्याचें स्वराज्य हें ध्येयहि ब्रिटिश मुत्सद्दी कबूल करण्यास तयार नव्हते. पण युद्धकालीं एकंदर परिस्थितींत पालट पडल्यामुळें खुद्द बादशहा पंचम जॉर्ज यांसच हिंदुस्थानाच्या स्वराज्याच्या ध्येयास मान्यता देणें भाग पडलें. अशा रीतीनें राजकीय स्वराज्याचे ध्येय दृष्टिपथांत आल्यानंतर लष्करी स्वराज्याकडे हिंदुस्थानाची नजर वळावी हें स्वाभाविक होय. कारण स्वराज्याचा रूपानें देशांतील अन्तर्गत कारभार हिंदी लोकांच्या हातीं आला तरी, देशरक्षणाचें महत्त्वाचें काम ब्रिटिश राजकर्त्यांनीं आपमतलबानें त्यांच्या हातास लागूं न दिलें तर स्वराज्याचे मिळालेले अधिकार आभासात्मक व पोकळच मानावे लागतील. यावरून राजकीय व लष्करी स्वराज्याचे अधिकार हातांत हात घालून जोडीनेंच हिंदुस्थानाकडे आले पाहिजेत असें सिद्ध होतें.

हिंदुस्थानांतील सध्याची राजकीय चळवळ प्रायः सनदशीर मार्गानेंच चालू आहे. या मार्गानेंच ती चालू आहे तोंपर्यंत जशी वेगवेगळ्या मुलकी खात्यांतील सत्तेचीं केंद्रें व अधिकाराच्या जागा यावरून क्रमाक्रमानें इंग्रज लोक भ्रष्ट होऊन त्या हिंदी लोकांनीं गजबजून सोडणें जरूर आहे त्याचप्रमाणें लष्करी खात्याचीहि स्थिति आहे. हिंदी सैन्यांत अधिकाराच्या जागा सात हजार आहेत. त्यांपैकीं अवघ्या शंभर—सवाशें जागा हिंदी लोकांस मिळाल्या असून बाकीच्या सर्व जागा गोऱ्या अधिकाऱ्यांनीच बळकावल्या आहेत. सात हजार जागांपैकीं बरोबर निम्या जागा हिंदी लोकांच्या पदरांत पडल्या म्हणजे सरकारच्या दृष्टीनें हिंदी सैन्याचें हिंदीकरण झालें.परंतु संपूर्ण स्वराज्याचा उपभोग हिंदी लोकांस मिळावयास पाहिजे असेल तर सगळ्या सात हजार जागा हिंदी लोकांच्या हातीं लागणें जरूर आहे. तत्त्वतः ही गोष्ट खरी असली तरी हिंदुस्थानाच्या सांप्रतच्या स्थितींत ती दूरची म्हणूनच तूर्त सोडून देऊन स्कीन कमिटीनें इतर अनेक मागण्यांबरोबर हिंदुस्थानांत उच्च प्रतीचें लष्करी शिक्षण देणारें सँढर्स्ट कॉलेज मागितलें. पण ही अल्प मागणीहि विद्यमान सरसेनापति सर विल्यम बर्डवुड यांनीं सरकारातर्फे असेंब्लीच्या गेल्या बैठकींत झिडकारून हिंदुस्थानांतून इंग्लंडांत सांप्रत दरसाल दहा विद्यार्थी उच्च प्रतीचें लष्करी शिक्षण संपादण्यास जातात, त्यांत आणखी थोडीशी भर घालण्यांत येईल एवढेंच आश्वासन दिलें !

स्कीन कमिटीच्या सूचनांचे बाबतींत हल्लींच्या सेनापतींनीं स्वीकारलेलें हें धोरण हिंदुस्थानाच्या लष्करी खात्यांत पूर्वी पासून कसें प्रचलित आहे हें माजी सेनापति लार्ड रॉलिन्सन यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या चरित्रांत त्यांचीं लष्करच्या हिंदीकरणाविषयीं जीं मतें दिलीं आहेत त्यावरून दिसून येतें. लॉर्ड रॉलिन्सन हे हिंदुस्थानांत सेनापतिपदावर १९२४ सालीं होते. त्या वेळीं लष्करी अधिकाराच्या जागा फक्त ऐंशी हिंदी इसमांच्या वांट्यास आल्या होत्या. रॉयल कमिशनाची नेमणूक १९२९ सालीं होईल असा तेव्हांचा अंदाज होता. तोंपर्यंत रॉलिन्सन यांच्या मतें फार फार तर दोनतीनशें जागाच हिंदी लोकांस मिळाव्या. पण हिंदीकरणास निदान निम्या म्हणजे पसतीसशें जागांवर तरी हिंदी अधिकाऱ्यांची नेमणूक होणें जरूर असल्यामुळें तो सोन्याचा दिवस हिंदुस्थानांत उगवण्याचा रंग दीर्घ कालपर्यंत त्यांस दिसत नव्हता. त्यांना हिंदी लोकांत लष्करी जागांवर नेमण्याजोगे लायक तरुणच मुळीं आढळत नव्हते. अशा तऱ्हेचे तरुण निर्माण होण्यास दोन पिढ्या तरी वाट पाहिली पाहिजे असा रॉलिन्सन यांचा अदमास आहे. या दोन पिढ्या म्हणजे आणखी सुमारें साठ वर्षे. साठ वर्षे लायक तरुण मिळण्यास लागणार व त्यांस लष्करी शिक्षण मिळून त्यांजकडून साडेतीन हजार जागा भरून निघण्यास रॉलिन्सन यांच्या हिशेबाप्रमाणें आणखी दीड दोनशें वर्षेंहि पुरणार नाहींत. जपान हाहि हिंदुस्थानाप्रमाणें आशियाखंडांतील एक देश आहे. त्याला आपले सैन्य उभारतां येतें व त्यावर अंमलदार नेमण्यास जपानी तरुणहि मिळतात. मग हिंदी तरुण लष्करी अंमलदारी गाजविण्यास नालायक कां असा प्रश्न कोणीहि विचारील. त्यास रॉलिन्सन यांचें उत्तर असें कीं जपानांत एका जातीचे लोक आहेत, तर हिंदुस्थानांत अनेक

जातींचे लोक आहेत आणि जपानी तरुण अत्यंत देशाभिमानी असताल तर हिंदी तरुण तसे नसतात!

लॉर्ड रॉलिन्सन यांनीं सरसेनापतीसारख्या अत्यंत वरिष्ठ दर्जाच्या व जबाबदारीच्या हुद्द्यावर काम केलें. अशा गृहस्थानें वरील प्रकारचा एखाद्या पोरासहि न शोभणारा युक्तिवाद करावा याचें कोणासहि हसूं आल्यावांचून राहाणार नाहीं. हिंदुस्थानांतील बहुजनसमाज अडाणी असल्यामुळे त्यांतून लष्करांत शिरणाऱ्या सामान्य सैनिकांत देशाभिमान बाणला नाहीं हा दोष त्यांचा नसून त्यांस दीडशें वर्षांच्या अमलानंतरहि अडाणी राहूं देणाऱ्या इंग्रज सरकारचा आहे. पण उच्च प्रतीचें लष्करी शिक्षण घ्यावयास सँढर्स्ट कॉलेजमध्यें जाणारा हिंदी तरुण सुशिक्षित असतो हें रॉलिन्सनसाहेबांस माहीत नव्हतें असें नाहीं. आणि हिंदी सुशिक्षित तरुण देशाभिमानांत कोणत्याहि देशांतील तरुणांस हार जाणारा नाहीं याची साक्ष हिंदुस्थानांतील राजकीय चळवळच देत आहे. मुलकी खात्यांपैकीं कलेक्टर सिव्हिल सर्जन,डि.जज्ज, हायकोर्ट जज्ज, कार्यकारी मंत्री व खुद्द गव्हर्नर अशा लहानमोठ्या सर्व प्रकारच्या हुद्द्यांवर ज्या हिंदी सुशिक्षितांनीं इंग्रज अधिकाऱ्यांच्या तोडीची लायकी शाबीत केली त्यांना लष्करी अधिकार झेपणार नाहीं व पांच सहा वर्षांच्या आंत त्यांतील कडक शिस्तीस कंटाळून हिंदी तरुण तो सोडून देऊन घरचा रस्ता धरतील या लॉर्ड रॉलिन्सन यांच्या विधानास कल्पनेशिवाय दुसरा कोणता आधार आहे? शिवाजी, महादजी, बाजीराव, सदाशिवराव, रणजितसिंग, प्रतापसिंग इत्यादि शेकडो अव्वल प्रतीचे योद्धे व सेनापति या हिंदुस्थानांतच ब्रिटिश राजवटीपूर्वी जन्मास आले होते हें सेनापति रॉलिन्सन यांस माहीत नव्हते काय? ब्रिटिश राज्यापूर्वी जे योद्धे व सेनापति चमकले ते ब्रिटिश राज्यांत चमकत नाहींत हा दोष ब्रिटिश राज्याचा की हिंदी लोकांचा? स्वतःच्या इच्छेप्रमाणें सेनानायकत्व प्रकट करण्यास ब्रिटिश सरकारनेंच हिंदी लोकांस लष्करी हुद्यावर नेमून आपला गुण दाखविण्याची संधि दिली पाहिजे. ही गोष्ट ब्रिटिश सरकारच्या हातची असतां ती ते करीत नाहींत हा दोष हिंदी तरुणांचा नसून ब्रिटिश सरकारच्या स्वार्थसाधूपणाचा होय असेंच सिद्ध होतें.

ब्रिटिश साम्राज्याचा मुकुटांतील हिंदुस्थान हा कोहिनूर हिरा समजण्यांत येतो. या हिऱ्याच्या संरक्षणाचा विचार ब्रिटिश मुत्सद्दी करतात त्या वेळीं स्वार्थ व दूरदर्शित्व यामध्यें त्यांच्या डोक्यांत झगडा लागून राहातो. हिंदुस्थानाचा परचक्रापासून बचाव हिंदुस्थानावर लष्करी जबाबदारी सोंपविल्यानेंच होणार आहे. त्यामुळें दरसाल येणारा लष्करी खर्च बराच कमी होईल, पराक्रम दाखविण्याची व आपलें नशीब काढण्याची हिंदी लोकांस संधि मिळाल्यामुळें हजारों नव्हे लाखों हिंदी तरुण स्वदेशसंरक्षणासाठीं अहमहमिकेनें पुढें येतील आणि हिंदुस्थानाकरितां गोऱ्या ब्रिटिश शिपायांनाहि रणांगणावर आपल्या रक्ताचा सड घालावा लागणार नाहीं. परंतु इतका विश्वास इंग्रजाना हिंदुस्थानाविषयीं कोठें आहे? यापेक्षां हिंदुस्थानास कायमचें दुबळें ठेवून इंग्रजांना हिंदुस्थानापेक्षा आपल्या शत्रूंवरच अधिक विश्वास टाकावासा वाटतो. देशाच्या स्वातंत्र्याची गुरुकिल्ली लष्करी स्वातंत्र्यांत असून ती हिंदुस्थानास मिळूं देण्याचा ब्रिटिश मुत्सद्दी व सेनापति यांचा विचार नाहीं. अशा स्थितींत इंग्लंड हिंदुस्थानाचें रक्षण गोरें सैन्य ठेवूनच करणार हे उघड होय.

परंतु हे रक्षण गोरें सैन्य हिंदुस्थानांत ठेवूनहि घडणें यापुढें कठीण आहे याची जाणीव ब्रिटिश मुत्सद्यांना आहे. इंग्लंड व हिंदुस्थान यांचे दरम्यान सहा हजार मैलांचा समुद्र पसरला आहे. त्या समुद्रावर इंग्लंडचें स्वामित्व आजवर अव्याहत होतें व आशिया खंडांतील कोणत्याहि देशातून परचक्राची भीति त्यास नव्हती. भीति बाळगण्याजोगे काय ते दोन देश; एक रशिया व दुसरा जपान. पण जपानानें सुमारें चोवीस वर्षांपूर्वी रशियास सपशेल जिंकून त्याची खोड मोडल्यामुळें रशियाची भीति नष्ट झाली. आणि रशियास जिंकून बलाढ्य बनलेल्या जपानाबरोबर मैत्री संपादन केल्यामुळें जपानाची भीति उत्पन्न होण्याऐवजी ब्रिटिश साम्राज्यास जपानपासून बळकटीच मिळाली तेव्हांपासून महायुद्धसमाप्तीपर्यंतचीं वर्षे निभावलीं. पण महायुद्धानें जगाच्या राजकारणास जें चालन दिलें आहे तें अद्यापि संपलें नाहीं. महायुद्धानंतर रशिया इंग्लंडाचा कट्टा हाडवैरी बनला असून आशिया खंडांतील बहुतेक देशांस इंग्लंडाविरुद्ध उठविण्यांत त्याचें अंग आहे. जपानाबरोबरचा इंग्लंडाचा तह संपून आपलें राजकीय धोरण आंखण्यास जपान स्वतंत्र झाला आहे. तुर्कस्थान स्वतंत्र होऊन आपलें सैन्य व आरमार यांची जमवाजमव करण्याच्या तयारींत आहे. इराणाचीं सूत्रें इराणी राष्ट्रीय पक्षाच्या तंत्रानें हलत आहेत. अफगाणिस्थानाचे अमीर आशिया, युरोप व आफ्रिका या खंडांत फिरून तुर्कस्थान, इराण, ईजिप्त व रशिया यांजबरोबर तह करून आले आहेत. चीनच्या राष्ट्रीय पक्षानें यादवी युद्धास मूठमाती देऊन चिनांत एकछत्री अंमल स्थापन केला आहे. तो अल्पावधींतच इतका बळकट झाला आहे कीं, चिनांतील उद्योगधंदे, बँका,

शेतकी, परराष्ट्रीय संबंध व सैन्य यांची सुधारणा करण्याचें धोरण त्यानें आतांपासूनच आंखलें आहे. इंग्लंड व जपान या उभयतांनीं चीनचा बहुतेक व्यापार बळकावून त्यास लागणारें कापड पुरविण्याचा जणुं काय मक्ताच घेतला आहे. रशिया व चीन हे दोनहि प्रचंड देश इंग्लंडविरुद्ध मनांतून जळत आहेत आणि आशिया खंडांतील बहुतेक देशांचा व्यापार इंग्लंडनेंच आवरला असल्यामुळें इंग्लंडविषयीं कोणत्याहि आशियाटिक राष्ट्राचें मन अनुकूल नाहीं. यापुढें आशियाखंडांतील जागृत झालेलीं राष्ट्रें आपला व्यापार इंग्लंडाच्या मुठींतून सोडवून आपल्या मुठींत आणण्याचा कसून प्रयत्न करतील. कारण व्यापारावांचून त्या त्या देशांची सांपत्तिक स्थिति सुधारणार नाहीं. आणि सांपत्तिक स्थिति सुधारल्यावांचून शास्त्र, शिक्षण व कला यांत त्यांस आपली प्रगति घडवून आणतां येणार नाहीं. आशियांतील देशांनीं आपला व्यापार आपल्या मुठींत घेतल्यानें इंग्लंडाचा औद्योगिक ऱ्हास होईलच. परंतु त्यांच्या व्यापारी सत्तेस अधिष्ठान हिंदुस्थानाचें असल्यामुळें हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेचें उच्चाटन न झालें तरी ती खिळखिळी करण्याकडे प्रमुख आशियाटिक राष्ट्रांचें हळूहळू लक्ष लागणार हें उघड आहे. त्यादृष्टीनें आशियाटिक राष्ट्रांचे संघ लवकरच उत्पन्न झाल्यावांचून राहाणार नाहींत.

ब्रिटिश मुत्सद्यांस किंबहुना सर्व प्रमुख युरोपियन राष्ट्रांस हें आगामी संकट दिसत नाहीं असें नाहीं. या संकटास तोंड देण्याची तयारी ते आपल्या परीनें करीतच आहेत. सीरिया, इराक, ट्रान्सजॉर्डॅनिया व पॅलेस्टाईन हे देश इंग्लंड व फ्रान्स यांचे मांडलिक बनले आहेत. त्यांचें नायकत्व अरबस्थानांतील इब्न सौद यास देऊन त्याजमार्फत आशिया खंडांतील स्वतंत्र इस्लामी राष्ट्रांस पायबंद घालण्याच्या उद्योगांत ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्दी आहेत. तसेंच युरोपांतहि रशियाविरुद्ध पोलंड व लिथुआनिया यांची जूट इंग्लंड पदरचा पैसा चारून करीत आहे. परंतु आशियांतील इस्लामी गुलाम क्षुल्लक देश आणि पोलंड व लिथुआनिया यासारखीं अर्धीं कच्चीं व नवशिकीं राष्ट्रें इंग्लंड व फ्रान्स यांजवरील रशिया व स्वतंत्र मुसलमानी देश यांचें संकट काय निवारणार ? लष्करी सामर्थ्याचा तोरा मिरविण्याचे दिवस हिंदुस्थानाबाहेरील आशिया खंडांत संपले आहेत. इंग्रजांच्या लष्करी सामर्थ्याची ऐट आशिया खंडापुढें फिक्की पडेल असें रशिया, जपान व चीन यांच्या जागृतीवरून दिसत आहे. इंग्लंडाला आशिया खंडांत यापुढें एकाहून एक उठणारीं मोठीं संकटें टाळून आपल्या साम्राज्याचें रक्षणच करावयाचें असेल तर त्यानें हिंदुस्थानावर विश्वास टाकून त्यास लष्करी स्वराज्य देणें हाच एक उपाय आहे. त्यांत इंग्लंड व हिंदुस्थान या दोनहि देशांचें हित आहे, लॉर्ड रॉलिन्सन किंवा लॉर्ड बर्कनहेड यांजप्रमाणें आपल्या लष्करी सामर्थ्याचा तोरा मिरविण्यांत नाहीं.

---

# पंचांगाच्या वादांतील ठळक गोष्टी

( ले.—ज. स. करंदीकर )

हल्लीं बहुजनसमाजांत रूढ असलेलें ग्रहलाघवी पंचांग स्थूल मानानें केलेलें असल्यामुळें तें आकाशांतील वास्तविक स्थिति दर्शवीत नाहीं. अशा स्थूल मानानें केलेल्या ग्रहलाघवी पंचांगांत व सूक्ष्म मानानें केलेल्या शुद्ध निरयन पंचांगांत किती अंतर पडतें याची तुलना भारतीय ज्योतिषशास्त्रकार शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या ग्रंथांत पृष्ठ ४१५ वर दिली आहे ती अशी—

"तिथींची तुलना करून पाहातां फाल्गुन शुद्ध ९ ही तिथि १३ घटका ४५ पळें कमी आहे. फाल्गुन कृष्ण ६ तेरा घटका ५९ पळें जास्त आहे. शुक्ल ९ रोजीं मृग नक्षत्र १५ घटका २४ पळें कमी आहे व विष्कंभ योगहि १७ घटका २३ पळें कमी आहे. याहून जास्त चूक बहुधा पडत नाहीं. जी चूक पडते ती शुक्ल किंवा कृष्ण ८ च्या सुमारास फार पडते. पौर्णिमा किंवा अमावास्या यांच्या सुमारास फारच थोडी पडते. अष्टमीच्या सुमारास चंद्र कधीं दोन अंश तर कधीं तीन अंश देखील चुकतो. रवि कधीं बरोबर मिळतो, कधीं १५ कलांपर्यंत चुकतो. स्थूल ग्रहलाघवी पंचांगांत तिथीचें लघुत्तम मान सुमारें ५४ घटी आणि महत्तम सुमारें ६५ घटी आहे. परंतु सूक्ष्म पंचांगांत हीं मानें अनुक्रमें ५० व ६७ घटी येतात. ग्रहलाघवी पंचांगांत मंगळाची चुकी सुमारें एक अंश एक कला, गुरूची ३ अंश २६ कला, शुक्राची १ अंश ६ कला, शनीची २ अंश ४० कला, आणि राहूची ४१ कला आहे. बुधाची चुकी ३ अंश ३१ कला आहे कधीं कधीं ती ९ अंशांपर्यंत आढळलेली आहे ! शके १८०६ या वर्षी ग्रहलाघवी पंचांगांत चैत्रांत चंद्रग्रहण नव्हतें. सूक्ष्म निरयन पंचांगांत तें ग्रस्तोदित होतें. शके १८१४ त स्थूल पंचांगांत वैशाखांतलें चंद्रग्रहण सूर्योदयापूर्वी सुटत होतें. सूक्ष्म पंचांगांत तें ग्रस्तास्त होतें."

सारांश, सांप्रत सर्वत्र चालणारीं ग्रहलाघवी पंचांगें आकाशांतील वस्तुस्थिति दर्शवीत नाहींत, म्हणून त्यांतील ग्रहगति शुद्ध झाल्या पाहिजेत. अर्थात् तीं पंचांगें तयार करण्याचे ग्रंथहि शुद्ध झाले पाहिजेत. पूर्वीच्या ग्रंथास बीजसंस्कार देऊन नवीन ग्रंथ करण्याची परंपरा चालत आलेली आहे. त्याप्रमाणें सांप्रत केलें पाहिजे ही गोष्ट जुन्या ज्योतिषांसुद्धां सर्वांस मान्य होणारी आहे.

**केतकी पंचांग व घुलेशास्त्री यांचा अभिप्राय**

जुनें ग्रहलाघवी पंचांग जर इतकें चुकतें आणि तुम्हास दृक्प्रत्ययच पाहिजे असेल तर चित्रा पक्षाचें केतकी पंचांग कां वापरीत नाहीं असा एका गृहस्थांनीं प्रश्न केला असतां नागपूरचे प्रसिद्ध ज्योतिषी कृष्णशास्त्री घुले यांनीं जे समर्पक उत्तर दिलें तें वाचकांच्या माहितीकरितां पुढें दिलें आहे. तें असें.

केतकी पंचांग कां वापरीत नाहीं याला माझें उत्तर असें आहे कीं—

(१) चित्रा पक्ष खोटा आहे, तो पक्ष जुन्या पक्षाची फसवणूक आहे.

(२) श्री. केतकर स्वतः आपल्या ज्योतिर्गणितांत लिहितात कीं, 'तस्माद्वर्षप्रवृत्तिः पुनरपि च यथा रेवतीतारकायां । स्यात्तादृक्सुव्यवस्थाकरण इह मया रैवतः पक्ष उक्तः ॥ इच्छेयुर्येन हातुं सुदृढपरिचियाद्वर्तमानां प्रवृत्तिं । तेभ्यश्चैत्राख्यपक्षः प्रचलनरहितः संगृहीतः किलात्र ॥' म्हणजे सुज्ञांकरितां रैवत पक्ष दिला असून इतरांच्या समजुतीकरितां चित्रा पक्षाचाहि मी संग्रह केला आहे असें केतकर स्वतः लिहितात. या इतरांत स्वतःची गणना करून घेण्याची माझी इच्छा नाहीं.

(३) शके १८४७ सालीं चित्रा पक्षाप्रमाणें फाल्गुन अधिकमास येत असतांहि जुन्या पक्षाला फसविण्याकरितां केतकरांनीं खोटें गणित करून आपल्या पंचांगांत चैत्र अधिक दिला होता.

(४) चित्रा पक्षाप्रमाणें देखील सूर्यसिद्धान्ताचें म्हणजे जुनें वर्षमान ८॥ पळांनीं चूक असतां ती चूक कायम ठेवून आणलेला अधिकमास बरोबर असणें शक्य नाहीं. चित्रा पक्षानें भोळ्या लोकांना खुशाल फसवावें. सुज्ञ लोक त्यांच्या हातचलाखीनें कधींहि फसणार नाहींत हें त्यांनीं लक्षांत ठेवावें.

(महाराष्ट्र ता. १५ जुलै).

या अभिप्रायावरून चित्रा पक्षाचें खरें स्वरूप काय आहे त्याची जनतेस ओळख पटेलच.

**झीटापिशियम हाच रेवतीचा योगतारा**

ज्यो० व्यंकटेश बापूजी केतकर आणि अलीकडे निर्माण झालेला पंचांगैक्यमंडळाचा नवा पक्ष यांनीं झीटापिशियम ही रेवती योगतारा नव्हे असला वाद दुराग्रहानें चालविला आहे. हा शुद्ध वितंडवादच होय. इ. स. १८९५ सालीं शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपला ग्रंथ लिहिला. त्या वेळेपर्यंत झीटा हीच रेवती योगतारा हें केतकरांना मान्य होतें व शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनाहि

तें अमान्य नव्हतें. मुंबईच्या समेलनाच्या वेळींहि केतकरांनीं झीटा ही रेवती योगतारा नव्हे असें कोठें म्हटलें नाहीं किंवा इतर कोणीहि शंका घेतली नाहीं. पुण्याच्या ज्योतिषसंमेलनाच्या वेळीं तर रेवती योगतारा म्हणजे झीटा जर आरंभस्थानीं मानतां तर अयनांश २३ कसे घेतां असा प्रश्न हेच केतकर विचारीत असत. सांगली—संमेलनांत रेवती योगतारा हेंच आरंभस्थान मानावें असें जवळ जवळ एकमतानें ठरल्यावेळेपासून झीटा ही रेवती योगतारा नव्हे असला वितंडवाद केतकरांनीं सुरू केला. तत्पूर्वी त्यांनीं कधींहि ही शंका प्रदर्शित केली नव्हती आणि आपल्या ज्योतिर्गणितांत 'इह मया रैवतः पक्ष उक्तः' असें म्हणून ज्या रैवत पक्षाचें त्यांनीं मंडन केलें होतें तो रैवत पक्ष म्हणजे हल्लींचा पंचांगप्रवर्तनकमिटीचा रैवत पक्षच होय. पण सांगलीसंमेलनानें चित्रा पक्ष नष्ट झालेला पाहतांच रैवत पक्षावर उगारण्यास कांहीं तरी हत्यार पाहिजे म्हणून रेवती योगतारा म्हणजे झीटा नव्हे असला स्वकपोलकल्पित वाद त्यांनीं सुरू केला. ज्याप्रमाणें त्यांच्या चित्रा पक्षाला पूर्वी अस्तित्व नव्हतें त्याप्रमाणेंच सांगलीसंमेलनापूर्वी झीटा म्हणजे रेवती योगतारा नव्हे या आक्षेपालाहि अस्तित्व नव्हतें. चित्रारूपी तोतया पक्षाचें समर्थन करण्याकरितां हा कल्पित आक्षेप निर्माण करण्यांत आला आहे. त्याला तत्पूर्वीचा कोणताहि आधार नाहीं.

## ऐक्य पक्षाचे कोल्हापुरी अयनांश

पुण्याच्या पंचांगैक्यमंडळानें तीन वर्षांपूर्वी येथें जी परिषद भरविली तिचे अध्यक्ष श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधी यांनीं परिषदेच्या सुरवातीपूर्वी असें सांगितलें होतें कीं, पंचांत मतभेद होईल व एकमतानें कोणतीहि गोष्ट न ठरेल तर मी आपला निर्णय कोणावर लादणार नाहीं. पण पुढें वादाच्या भरांत सांपडून श्रीमंतांनीं स्वतःचा अभिप्राय म्हणून निर्णय दिला आणि आतां तर तेवढाहि तटस्थपणा सोडून देऊन ऐक्यमंडळाचें समर्थन करण्याकरितां ते निराधार विधानेंहि करूं लागले आहेत.

श्रीमंतांची सगळी भिस्त काय ती कोल्हापूरचे प्रो. आपटे यांच्या गणितावर. पण जेथें गणिताचा पायाच डळमळीत तेथें त्यावरील इमारत कशी टिकणार? वादाचा मुख्य भर अयनांश किती येतात यावर आहे. पण प्रो. आपटे यांनीं एक प्रकारें ते अयनांश आगाऊ गृहीत धरूनच गणित करून अयनांश काढले व अध्यक्षांनींहि त्यांची चिकित्सा न करता किंवा त्याविषयीं पंचांचीं मतें न घेतां ते अयनांश स्वीकारले. जेथें करणग्रंथांतील वर्षमान आणि त्यायोगानें येणारें अयनचलन या दोनहि गोष्टी वादग्रस्त आहेत तेथें त्याच वादग्रस्त करणग्रंथाच्या आधारें वर्तविलेला रवि तरी बरोबर कसा असूं शकेल? सूर्यसिद्धान्तांतलें वर्षमान ८॥ पळांनीं अधिक आहे आणि त्यामुळेंच त्यांतील ५८॥ विकला ही अयनगतिहि चुकीची आहे. म्हणून त्या सिद्धान्ताप्रमाणें करणगत रवि घेतल्यास अयनांशहि चुकीचेच यावयाचे. प्रो. आपटे यांनीं ता. १३ एप्रिल रोजीं मेषसंक्रमण गृहीत धरून करणगत रवि काढला म्हणून अयनांशहि २२–४१ आले व ते तसे येणार हें कोणीहि सांगूं शकेल. उलटपक्षीं श्रीयुत दप्तरी यांनीं तयार केलेल्या करणग्रंथाप्रमाणें मेषसंक्रमणाच्या दिवशींचा म्हणजे ता. ९ एप्रिलचा करणगत रवि काढला असता तर अयनांश १८ अंश ५२ विकला आले असते. सारांश, 'छायार्कोत्करणागते' ही अयनांश खरे कोणते हे ठरविण्याची कसोटी नव्हे. कोणताहि करणग्रंथ घेतला व त्याप्रमाणें अयनांश काढले तर ते त्या करणग्रंथांतील अयनांशाशीं तंतोतंत जुळतील याविषयीं शंकाच नाहीं. पण वाद आहे तो कोणता करणग्रंथ प्रमाण याविषयींच आहे. अर्थातच ज्याप्रमाणें सूर्यसिद्धान्ताचा आधार घेऊन प्रो. आपटे यांनीं अयनांश २२-४१ काढले त्याचप्रमाणें दप्तरीकृत करणग्रंथ उपयोगांत आणल्यास १८-५२ हेहि अयनांश याच पद्धतीनें सिद्ध होतात. किंबहुना जितके करणग्रंथ प्रचारांत असतील तितके वेगवेगळे अयनांश येणार! मग ते सगळेच अयनांश ग्राह्य व बिनचूक मानावयाचे काय? याचें उत्तर पंतसाहेब किंवा त्यांचे अनुयायी यांनीं द्यावें.

## वर्षागणिक वेगवेगळे अयनांश

श्रीमंत पंतसाहेबांच्या अयनांशनिर्णयपद्धतींत दुसरा एक ढोबळ दोष असा कीं, या पद्धतीनें वर्षागणिक वेगवेगळे अयनांश येणार. समजा, ऐक्यमंडळाची परिषद शके १८०८ सालीं भरली असती तर त्या वेळीं प्रो आपटे यांच्या पद्धतीनें त्या वर्षाचे अयनांश २२-०१ आले असते आणि तेथून अध्यक्षांच्या पद्धतीनें अयनगति घेत गेल्यास शके १८४८ ला अयनांश २२-३४-२८ आले असते. बरें, ही परिषद १८०८ मध्यें न भरतां शके १८२८ मध्यें भरली असती तर त्या वेळीं आपटे-पद्धतीनें अयनांश २२-२१ आले असते व तेथून अध्यक्षांच्या पद्धतीनें अयनगति घेत गेल्यास शके १८४८ ला अयनांश २२-३७-४४ आले असते. मग यांतले २२-३४ अयनांश खरे का २२-३७ खरे का आतां आलेले २२-४१ खरे? परिषद भरल्याचें वर्ष जसजसें वेगळें धरावें तसतसे हे अयनांश वेगवेगळे येत जाणार! असल्या यदृच्छेनें बदलणाऱ्या अयनांशाला शास्त्रशुद्ध कसे व कां मानावयाचें याचे उत्तर ऐक्यमंडळ देऊं शकेल काय?

## वादांतील निष्कर्ष

सारांश, या सगळ्या वादाचा थोडक्यांत निष्कर्ष

सांगावयाचा झाल्यास तो पुढीलप्रमाणें सूत्ररूपानें सांगतां येईल.

१ग्रहलाघवी करणग्रंथांत स्वीकारलेलें नाक्षत्रसौर वर्षमान ३६५ दि. १५ घ. ३१ प. २६ वि. हें वर्षमान ८॥ पळांनीं अधिक असून खरें वर्षमान ३६५-१५-२२-५६ इतकें पाहिजे.

२ वार्षिक अयनगति कांहीं ग्रंथांत ६० विकला व कांहींत ५८॥ विकला दिली आहे. ती चुकीची असून खरी अयनगति ५०.२३ विकला पाहिजे.

३ ज्या करणग्रंथावरून ग्रहलाघवी पंचांगें केलीं जातात त्यांतील वर्षमान व अयनगति वर दिल्याप्रमाणें चुकीची असून तिथि व ग्रहादिक वर्तवितांना जितके सूक्ष्म संस्कार दिले पाहिजेत तितके न दिल्यानें ग्रहलाघवी पंचांगांतील तिथींत १५ घटकांपर्यंतची चुकी येते. ग्रहांच्या गोचर स्थितींतहि २-३ अंशांपर्यंत चुकी येते. ग्रहणाच्या स्पर्शमोक्षाची वेळ तास दीड तासानें चुकते. गुरु-शुक्रादिकांचे उदयास्त सातआठ दिवसांनीं आणि ग्रहांच्या युत्या कित्येक तासांनीं चुकतात. सारांश, हें पंचांग दृक्प्रत्ययदायी नसून त्यांतील वर्षारंभाचे स्थान स्थिर न राहातां तें सरकत चाललें आहे. आतांपर्यंत तें रेवती योगतारेच्या पूर्वेस ४॥ अंश सरकलें आहे.

४ ग्रहलाघवी पद्धतींतले दोष केतकी पंचांगवाल्यांसहि कबूल आहेत. पण केतकी अयनांश अर्धे शुद्ध व अर्धे अशुद्ध असे बाटगे आहेत. कारण त्यांत शके १८०० पर्यंतचे चुकीचे अयनांश कायम ठेवून मग पुढें शुद्ध गति स्वीकारण्यांत आली आहे. त्यामुळें त्यांच्या वर्षारंभस्थानीं कोणताहि स्थिर तारा नसून शून्य अयनांश वर्षहि ग्रंथोक्त वर्षाहून वेगळें येतें. वर्षारंभस्थानहि एकदां चळलेलें कायम आहे.

५ ऐक्य-पंचांगानेंहि शके १८४८ पर्यंतची अयनांशाची चुकी कायम ठेवली आहे. तरी पण त्यांचा जुन्या ग्रहलाघवी अयनांशाशीं किंवा केतकी अयनांशाशींहि पूर्ण मेळ बसत नाहीं. आणि अर्थातच त्यालाहि आरंभस्थानाशीं स्थिर ताऱ्याचा किंवा पूर्वपरंपरेचा अथवा ग्रंथोक्त शून्य अयनांश वर्षाचा आधार नाहीं. म्हणून हेंहि वैदिक परंपरेस सोडून आहे.

६ पं. प्र. कमिटीचे पंचांग हें केरोपंती पंचांगाचेंच पुनरुज्जीवन असून त्यांत वर्षमान व अयनगति शून्य अयनांश वर्षापासून, म्हणजे शके ४९६ पासून, शुध्द करून घेतलेली असून याच्या आरंभस्थानीं ग्रंथोक्त अशी रेवती योगतारा अचल आहे आणि या पंचांगाकरितां नवीन करणग्रंथहि श्रीयुत दप्तरी यांनीं तयार केला आहे. अर्थातच हें पंचांग दृक्प्रत्ययदायी, वैदिक परंपरेस धरून आणि जुनी चुकी शिल्लक न ठेवलेले असें आहे. म्हणून हेंच पंचांग शास्त्रोक्त असून त्याचाच सर्वांनीं उपयोग करावा.

७ हें पंचांग वैदिक परंपरेस कसें धरून आहे याविषयीं श्रीयुत रा. वि. पटवर्धन हे एक लेखमाला लवकरच प्रसिद्ध करणार आहेत.

# लो. टिळक व केरोपंती अयनांश

वि. वि. सांगली ज्योतिषसंमेलनाहून लो. टिळक पुण्यास परत येतांक्षणींच गायकवाड वाड्यांतून त्यांनीं अयनांशासंबंधानें एक पत्र आमचे वडील ती. कै. दादासाहेब ऊर्फ कोंडोपंत छत्रे यांचेकडे तांतडीनें पाठविलें होतें. केरोपंती अथवा पटवर्धनी पंचांग त्या वेळीं आमचे वडील चालवीत असल्यामुळें, लो. टिळक यांनीं हें पत्र वडिलांचेकडेच कां पाठविलें त्याचें महत्त्व समजून येईल. पत्रांत मजकूर पुढीलप्रमाणें आहे.

Gaikwad Wada, Poona City.
18/2/20.

My dear Dadasaheb,

I have just returned from Sangli and I write this to inform you that Keropanti अयनांश or the Raivat paksha has been adopted at Sangli Jyotish Conference almost unanimously and that in future Panchangs will be prepared accordingly. More when we meet. I am leaving for Bombay to-night.

Yours sincerely,

B. G. TILAK.

लोकमान्य टिळक यांस केरोपंती अयनांश मान्य नव्हते असा खोडसाळपणा करण्यास कांहीं शिष्टांनीं सुरवात केल्याचें समजल्यावरून वरील पत्र छापणें जरूर झालें आहे. अस्सल पत्र आमचेकडे अथवा त्याचें छायाचित्र आमचे आतेबंधु विष्णु बाळकृष्ण बापट वकील यांचेकडे घ. नं. १८७ शनिवार पेठ पुणें शहर येथें पाहावयास मिळेल. कळावें.

छत्रे यांचा वाडा, शनिवार पेठ पुणें. } **मुकुंद नीळकंठ छत्रे.**

# ही तडजोड कसली ?

गेले तीन महिने बार्डोली प्रकरणाकडे साऱ्या देशाचें लक्ष वेधलें आहे, आणि दरआठवड्यास आतां हा लढा निकराला आला आहे हें वर्तमानपत्रांचें पालुपद चालूच आहे. जमी-कामगारांचें अन्याय्य वर्तन, लिलावांचे फार्स, अधिकाऱ्यांस अडथळा केल्याच्या निमित्तानें स्वयंसेवकांवर झालेले खटले व त्यांस दिलेल्या जबर शिक्षा, पठाणांचे अत्याचार, पाटील-तलाठ्यांचे राजिनामे, रेव्हिन्यू अधिकाऱ्यांच्या हालचाली, कौन्सिलांतील सभासदांचे राजिनामे व फेरनिवडणुकी, ठिकठिकाणच्या सभांतून व परिषदांतून निषेध, निरनिराळ्या व्यक्तींनीं व संस्थांनीं बार्डोलीस प्रत्यक्ष परिस्थिति पाहून या लढ्यास दिलेला पाठिंबा, इत्यादि निरनिराळ्या प्रकारांनीं बार्डोली प्रकरण सारखें गाजत राहिलें आहे. शेतकऱ्यांच्या हिताचा प्रश्न, बार्डोलीसारखा अपूर्व निश्चयी व संघटित तालुका, लोकांची बाजू सत्याची, मागणी अत्यंत न्याय्य व साधी, वल्लभभाईसारखे कसलेले नेते व सर्व देशाचा एकमुखी पाठिंबा या सर्व गोष्टी एका बाजूस, तर रेव्हिन्यू खात्याचा राखीवपणा व त्यांतील अधिकाऱ्यांची इभ्रत यांचें रक्षण करण्यासाठीं इरेस पडलेलें व त्यासाठीं वाटेल ती गोष्ट करण्यास मागेंपुढें न पाहणारें हटवादी सरकार दुसऱ्या बाजूस, असा हा लढा असल्यामुळें तो प्रथमपासूनच निकराचा होता. पण गेल्या आठवड्यांत त्याचें खरें अंतिम स्वरूप दिसण्यासारख्या घटना घडून आल्या. मुंबईचे गव्हर्नर ना. ल्यू यांच्यासह ता. ११ रोजीं सिमल्यास गेले. तेथें व्हाइसरॉय व त्यांचें कार्यकारी मंडळ यांच्याबरोबर त्यांचें गुप्त खलबत झालें. तेथून परत येतांना वाटेंत सुरत येथें त्यांनीं वल्लभभाई पटेल व त्यांचे सहकारी यांच्या शिष्टमंडळाशीं तडजोडीचें बरेंच बोलणें केलें. पण गव्हर्नरांच्या अटी शिष्टमंडळास मान्य झाल्या नाहींत व शिष्टमंडळाच्या मागण्या गव्हर्नरांस मान्य झाल्या नाहींत.

परस्परांस मान्य न झालेल्या परस्परांच्या या अटी व मागण्याहि उभय पक्षांकडून जाहीर झाल्या आहेत. त्यांत गव्हर्नरांच्या अटी पाहिल्या म्हणजे, साहजिकच असा प्रश्न उद्भवतो कीं, या अटी सांगण्याकरितां सिमल्याची फेरी करावयाचें काय कारण होतें ! लोकांनीं चळवळ बंद करावी, पहिला सारा सर्व भरावा व वाढविलेल्या साऱ्याची सर्व रक्कम सरकारी खजिन्यांत अनामत ठेवावी; सरकारनें एका रेव्हिन्यू अधिकाऱ्याकडून फेरचौकशी करावी, या अधिकाऱ्यास फक्त घडलेल्या गोष्टींसंबंधीं निर्णय देण्याचे कामीं न्यायखात्यांतील एक अधिकारी मदतनीस द्यावा आणि या चौकशींत सारावाढ अन्याय्य ठरल्यास अनामत ठेवलेली वाढत्या साऱ्याची रक्कम परत देण्यांत यावी अशी गव्हर्नरांची योजना आहे. या योजनेंत हिंदुस्थानसरकारची सल्ला घेण्यासारखें असें कांहींच नाहीं. यावरून हिंदुस्थानसरकारची सल्ला या अटींकरतां नसून या अटी अमान्य झाल्यास पुढें काय करावयाचें याबद्दल असली पाहिजे हें उघड दिसत आहे. पुढें करावयाच्या दडपशाहीला न्यायबुद्धीचें रूप देण्यासाठीं व तिची जबाबदारी प्रतिपक्षावर टाकण्यासाठीं हें अटींचें जाळें पुढें करण्यांत आलें आहे. गव्हर्नरांनीं व्हाइसरॉयांची संमति घेतली ती या अटींबद्दल नसून, त्या अमान्य झाल्यावर सरकाराकडून ही चळवळ मोडून काढण्यास जे उपाय योजण्यांत येतील त्याबद्दलच मुख्यतः असली पाहिजे, असा झालेल्या प्रकारावरून संशय आल्याखेरीज राहात नाहीं. सिमल्यापर्यंतची धांवाधांव ही लढा मिटविण्याच्या कळकळीनें झालेली नाहीं. इभ्रतीसाठीं किती निष्ठुर बनावयाचें हें ठरविण्याकरितां झाली असली पाहिजे. आणि यावरूनच या अटी बहुतांशीं मान्य न होण्याच्या अटकळीनेंच घालण्यांत आल्या असाव्या. यदाकदाचित् त्या वल्लभभाईंनीं मान्य केल्याच तर चळवळीचें कंबरडें आपोआप मोडेल; न केल्या तर दडपशाहीनें तें मोडावयाचें असा यांत दुहेरी पेंच आहे.

गव्हर्नरसाहेब येवढी धांवपळ करून तडजोडीस आले व शिष्टमंडळाशीं बोलणें करण्यास तयार झाले, येवढ्या गोष्टीनें हुरळून जाऊन दे. वल्लभभाई पटेल यांनीं या अटी मान्य केल्या नाहींत हें या चळवळींतील त्यांच्या स्थितप्रज्ञतेचें प्रत्यंतरच होय. ही पुढाऱ्यांच्या परीक्षेची वेळ असते. वल्लभभाई या वेळीं कच्च्या दिलाचे ठरले नाहींत. निःपक्षपातीपणानें चौकशी होऊन निर्णय झाल्याशिवाय सारा भरावयाचा नाहीं हें तर चळवळीचें मुख्य सूत्र. सत्याग्रहांतील सत्यासंबंधाचा आग्रह तो हाच. उलट हा आग्रह सोडून देऊन सर्व सारा अगोदर भरल्याशिवाय चौकशी करण्यास सरकार तयार होणार नाहीं या अटींत स्वतःची इभ्रत राखण्याचा सरकारनें सर्व हट्ट सांठविला आहे. सत्याग्रह्यांनीं आपला आग्रह सोडावा व निकाल सरकारच्या रेव्हिन्यू खात्यांतील एका अम्मलदाराच्या निर्णयावर सोपवावा अशा प्रकारच्या या अटींना तडजोड हें नांव द्यावयाचें तर शब्दांचे अर्थच बदलले पाहिजेत. अगोदर आपली चूक कबूल करून, ती निस्तरून सरकारला शरण या व मग चौकशीची भाषा बोला असा गव्हर्नरांचा आग्रह आहे. वंशपरंपरा

जमिनीचा मालक, या देशांतील बहुसंख्य उत्पादक-वर्गापैकीं एक, राज्यघटनेंतील मतदारी चालविणारा घटक, अशा शेतकऱ्याच्या प्रतिज्ञेला काडीचीहि किंमत नाहीं; ती त्यानें मोडलीच पाहिजे! आणि कशा करितां व कोणाकरितां ? तर या देशाशीं हितसंबंध नसलेल्या, या देशाच्या पैशावर पोसणाऱ्या परकी अम्मलदाराच्या एका चुकीच्या शब्दासाठीं ! त्याने साऱ्याची आकारणी केली कीं तितके पैसे तिजोरींत जमा झालेच पाहिजेत. तोंडांतून आंकडा निघाल्या बरोबर तितका पैसा अगोदर भरा, मग काय तक्रार असेल ती बोला. आणि तिचाहि विचार एका रेव्हिन्यू खात्यांतीलच अधिकाऱ्याकडून होणार! या खात्याच्या बाहेरच्या एखाद्या अधिकाऱ्याचें बोट त्यांत शिरकलें तर त्या खात्याची प्रतिष्ठा व कदर ती काय राहिली? रेव्हिन्यू खातें हें शेतकऱ्यांकरितां नसून शेतकरी त्या खात्याकरितां आहेत! रेव्हिन्यू खात्याची ही कोंडी व अम्मलदाराच्या शब्दाची इभ्रत राखून बार्डोलीचा लढा मिटल्यास मिटवावा असा गव्हर्नरांचा इरादा आहे. पण अशा रीतीनें हा लढा मिटविण्यापेक्षां दडपशाहीनें चळवळ मोडली तरी पुरवली असें दे. वल्लभभाई यांना वाटणें साहजिक आहे.

सर्व सारा अगोदर आणून तिजोरींत भरा असें सांगण्यांत चळवळींतील पुढाऱ्यांविषयीं गव्हर्नरसाहेबांचा अविश्वासहि प्रकट होत आहे. चौकशी होऊन साऱ्याची आकारणी रीतसर व न्याय्य ठरली तर सर्व सारा ताबडतोब भरण्यास बार्डोलीची रयत तयार व समर्थ आहे. याबद्दल दे. पटेल व महात्मा गांधी यांनीहि सरकारला हमी दिली आहे. पण सरकारला आपल्या अधिकाऱ्याच्या चुकीच्या शब्दाची किंमत या पुढाऱ्यांच्या प्रामाणिक आश्वासनापेक्षां अधिक वाटते. अशा प्रकारचा अविश्वास व इभ्रतीचा हट्ट, यांतून गव्हर्नर जोपर्यंत मुक्त झाले नाहींत, किंवा खालचे अधिकारी त्यांस मुक्त होऊं देत नाहींत, तोंपर्यंत तडजोडीची भाषा बोलण्यास योग्य अशी सामोपचाराची भूमिकाच उत्पन्न होत नाहीं. तोंपर्यंत तडजोडीच्या नांवाखालीं चाललेली भाषा म्हणजे चळवळ हाणून पाडण्याची एक युक्ति ठरते. सरकारला जर चौकशीची आवश्यकता खरी पटली असेल तर त्याकरितां या अटी कशाला? या अटींनीं लोकांना बांधून घेऊन मग 'गुळाचाच गणपति व गुळाचाच नैवेद्य' अशा प्रकारची रेव्हेन्यू खात्यांतल्याच एका अम्मलदाराकडून चौकशी करावयाची व झालेली सारावाढ योग्य ठरवून टाकावयाची असाच यांत गव्हर्नरांचा हेतु दिसतो.

असली योजना मान्य करून बार्डोलीची चळवळ थांबविल्यानें त्या चळवळींतील कोणताच हेतु सिद्धीस जात नाहीं. चौकशी कमिटी बिनसरकारी असली पाहिजे, असा वल्लभभाईचा आग्रह नाहीं. पण ती निःपक्षपाती असली पाहिजे. आणि यासाठीं सरकारी सभासदांबरोबर योग्य प्रमाणांत लोकांचे प्रतिनिधीहि घ्यावेत किंवा एखाद्या न्यायाधीशाकडून ज्युडीशियल स्वरूपाची चौकशी व्हावी असें वल्लभभाईचें म्हणणे आहे. रेव्हिन्यू खात्यांतील अम्मलदारानेंच केलेली चौकशी कशा प्रकारची होते याचा अनुभव १९०१ सालीं गुजराथेतच आलेला आहे. भडोच जिल्ह्यांतील दुष्काळांत सारावसुलीच्या जुलमाबद्दल ना. पारख यांनीं केलेल्या आरोपांची चौकशी मुंबईसरकारनें एका रेव्हिन्यू अम्मलदाराकडून करवून त्यांत ना. पारख यांचा पुरावा व विधानें खोटीं ठरविली होतीं ! तशाच तऱ्हेचा फार्स आतांहि होऊं नये यासाठींच वल्लभभाई हे खऱ्या निःपक्षपाती चौकशीबद्दल आग्रह धरीत आहेत. त्याचप्रमाणें चौकशी करावयाची ती फक्त सेटलमेंट कमिशनराचे आंकडे व माहिती चूक का बरोबर येवढ्यापुरतीच करावयाची अशी गव्हर्नरांची समजूत दिसते. पण लँड रे. कोडाप्रमाणें सारावाढीपूर्वी जशी चौकशी करावयास पाहिजे तशी केली होती काय आणि या कोडांतील नियमाप्रमाणें सारा वाढ झाली काय हेहि या चौकशींत पाहावयास पाहिजे. सारांश, दे. वल्लभभाई पटेल हे अगोदर सर्व सारा भरण्याची अट मान्य करावयास तर तयार नाहींतच; पण शिवाय चौकशी कमिटीची रचना व कार्यक्षेत्र यासंबंधींहि त्यांचा व गव्हर्नरांचा मतभेद आहे.

पण याशिवाय गव्हर्नरांनीं आपल्या योजनेंत एक गोष्ट अजीबात वगळली आहे. सारावाढ न्याय्य झाली का अन्याय्य झाली हा एक प्रश्न. पण ती झाल्यानंतर सक्तीनें व जुलमानें वसूली करण्यासाठीं जे अन्याय झाले त्यांची चौकशी व परिमार्जन सरकारनें करावयास नको काय ? याबद्दल गव्हर्नर कांहींच बोलले नाहींत. यावरून त्यांच्या मनोवृत्तीची कल्पना होते. रेव्हिन्यू खात्याचा रूळ एकदा फिरला म्हणजे त्यांत जे चिरडले ते चिरडले, शेतकऱ्यानें सारा भरला नाहीं म्हणजे सरकारानें हव्या त्या उपायानें तो वसूल करावा व या उपायांच्या न्याय्यान्याय्यतेबद्दल शेतकऱ्यांना तक्रार करण्याचा हक्क नाहीं असें तर गव्हर्नरांचे म्हणणे नाहींना ? बार्डोलीच्या बाबतीत मूळ सारावाढीच्या अन्यायापेक्षांहि वसुलीच्या कामांतील अन्याय व जुलूम हा अधिक झाला आहे. आणि देशांतील सामान्य जनतेच्या मनांत जो क्षोभ उत्पन्न झाला आहे, तोहि मूळ अन्यायापेक्षां या दुसऱ्या अन्यायानें व जुलमानेंच अधिक झालेला आहे. बार्डोलीचा लढा खरा मिटवावयाची बुद्धि गव्हर्नरांना असती तर या जुलमाच्या चौकशीबद्दल व भरपाईबद्दलहि त्यांनीं

प्रश्न काढला असता. तो त्यांनीं टाळला आहे. याहि गोष्टीवरून ते खऱ्या सामोपचाराच्या व न्यायाच्या बुद्धीनें प्रेरित झालेले नाहींत हे सिद्ध होतें. एक अन्याय दडपून पचविण्यासाठीं हा वसुलीचा दुसरा अन्याय करण्यांत आला; त्याच्या परिमार्जनार्थ सारावाढीच्या चौकशीबरोबरच (१) सत्याग्रही कैद्यांची मुक्तता, (२) जप्त केलेल्या सर्व जमिनी मालकांना परत देणें, (३) गुरें व जंगम माल अतिशय कमी किंमतीला विकण्यांत आला त्याची बाजारभावाप्रमाणें होईल ती किंमत मालकांना देणें व (४) या लढ्यांत ज्यांना कामावरून काढून टाकलें असेल त्यांना कामावर घेणें व ज्यांना शिक्षा देण्यांत आल्या असतील त्यांच्या शिक्षा रद्द करणें, इतक्या गोष्टी अवश्य व्हावयास पाहिजेत असें दे. वल्लभभाई पटेल यांचें म्हणणें आहे. पण वल्लभभाईंच्या या मागण्या गव्हर्नरांना मान्य नाहींत असें सरकारी प्रसिद्धीखात्याच्या पत्रकावरून दिसतें.

श्री. पटेल यांनीं गव्हर्नरांच्या अटी अमान्य करून उलट आपल्या अटी स्पष्ट रीतीनें मांडल्यामुळें तडजोड घडून आली नाहीं. यामुळें सरकार पक्षीय पत्रें वल्लभभाईंवर आग पाखडण्यास सिद्ध झालीं आहेत. किंबहुना वल्लभभाईंना हटवादी ठरविण्यासाठींच हे तडजोडीचे डाव टाकण्यांत आले होते असें वाटल्यावांचून राहात नाहीं. पण वल्लभभाई आपली जबाबदारी ओळखून योग्य तेंच बोलत आहेत अशी लोकांची खात्री आहे. यापुढें जर सरकारनें बार्डोलीची चळवळ दडपशाहीनें मोडून टाकण्याचा प्रयत्न केला तर तिला बार्डोलींतील रयत तोंड देईलच, पण त्या लढ्यांत आजच्याप्रमाणेंच तिला सर्व देशाचा पाठिंबा मिळत राहील हें सरकारनें लक्षांत ठेवावें. गव्हर्नरांनीं सिमल्याची फेरी केली व डेप्युटेशनाला भेटावयास बोलावलें एवढ्याच गोष्टींचें कौतुक होण्याचे दिवस गेले. रयतेच्या कराच्या पैशांतून गव्हर्नर पगार घेत असून रयतेच्या पुढाऱ्यांचें म्हणणें ऐकून घेणें हें त्यांचे कर्तव्यच आहे. गव्हर्नरांच्या अटी व पटेल यांच्या मागण्या या दोनहि लोकांपुढें असून त्यांत खरा दुराग्रह गव्हर्नरांचा आहे असाच जनतेचा निर्णय होईल. अधिकाऱ्यांच्या इभ्रतीपेक्षां रयतेची इभ्रत हीच शतपटीनें अधिक मोलाची आहे, हें सिद्ध करणें हा बार्डोलीच्या लढ्यांतील एक हेतु आहे. यामुळें अधिकाऱ्यांच्या इभ्रतीसाठीं शेतकऱ्यांना शरण येण्यास सांगणाऱ्या गव्हर्नरांच्या तडजोडीच्या अटींना लोक काडीचीहि किंमत देणार नाहींत हें गव्हर्नरांनीं लक्षांत ठेवावें.

# स्फुट सूचना

## दडपशाहीची पूर्व तयारी

काल रोजीं दुपारीं पुण्यास कौन्सिल हॉलमध्यें मुंबई—कायदेकौन्सिलाच्या बैठकीस दुपारीं दोन वाजतां सुरुवात झाली. प्रारंभीं गव्हर्नरांचें भाषण झालें. भाषणांतील मुख्य विषय अपेक्षेप्रमाणें बार्डोली प्रकरण हाच होता. सुरतेहून पुण्यास आल्यावर मध्यंतरीं गव्हर्नरांच्या अटींत कांहीं फेरबदल होईल असें कित्येकांस वाटत होतें. पण गव्हर्नरांनीं या भाषणांत सुरतेला सांगितलेल्या अटी अखेरच्या असून त्यांत बिलकुल फरक होणार नाहीं असें निक्षून सांगितलें. गव्हर्नरांच्या भाषणांतील मुख्य व महत्त्वाचा भाग म्हणजे बार्डोलीच्या रयतेनें सरकारच्या अटी मान्य न केल्यास सरकार शक्य ते सर्व दडपशाहीचे उपाय करण्यास मागेंपुढें पाहाणार नाहीं असा त्यांनीं दिलेला निर्वाणीचा इषारा होय. सरकारचा सारा न भरणें हा कायदेभंग बेसनदशीर, बेकायदेशीर, सरकारच्या अस्तित्वावर गदा आणणारा व अराजक स्वरूपाचा होय व तो मोडून टाकण्यासाठीं सरकार शक्य ते उपाय असलांत आणील व मग लोकांवर कठीण प्रसंग येईल, अशी धमकीहि त्यांनीं लोकप्रतिनिधींना दिली. या धमकीवरून आजच्या अग्रलेखांत सिमल्यास जाण्याच्या कारणाचें आम्ही जें अनुमान केलें आहे तेंच दृढ होतें. या भावी दडपशाहीला सिमल्याहून गव्हर्नरांनीं अगाऊ अनुमति आणली आहे असें दिसतें. बार्डोलीच्या शेतकऱ्यांप्रमाणेच त्यांना पाठिंबा देणारे लोकहि या दडपशाहीच्या सत्रांत भरडले जातील असेंहि गव्हर्नरांनीं ध्वनित केले आहे. सनदशीर मागणी केल्यास सरकारनें ती अवमानली नाहीं असें या भाषणांत तीन-तीनदां सांगतांना सारावाढीविरुद्ध कौन्सिलांचे दोन ठराव गेलीं चार वर्षे सरकारानें धाब्यावर बसविले आहेत त्यांची मात्र गव्हर्नरांना आठवण राहिली नाहीं ! कायदेकौन्सिलांतील प्रतिनिधींना गव्हर्नरांच्या या अटींसंबंधाचें आपलें मत सरकारास कळविण्यास त्यांनीं चौदा दिवसांचा अवधि दिला आहे. पण सरकारनें आपल्या अटी वज्रलेप ठरवल्यावर व दडपशाहीचा आसुरी निश्चय जाहीर केल्यावर कौन्सिलांतील सभासदांचें मत विचारण्याचें तरी काय प्रयोजन ? व त्यांनीं तें दिलें तरी त्याचा काय उपयोग ? मुंबई इलाख्यांत बरेच दिवसांत पाहावयास न मिळालेलें

सरकारी दडपशाहीचें उग्र–भयानक स्वरूप यापुढें प्रगट होणार असून त्याची पूर्वसूचना गव्हर्नरांनीं आपल्या भाषणांत निश्चित शब्दांत दिली आहे. आतां लोकांचीहि परीक्षेची वेळ असून या दडपशाहीला खंबीरपणें तोंड देण्यास त्यांनीं सिद्ध झालें पाहिजे.

# प्रो. कर्वे यांचे राष्ट्रीय शिक्षणाविषयीं विचार

(येरंडवणें येथील महिला पाठशाळेच्या वाढदिवसानिमित्त प्रो. कर्वे यांनीं केलेलें भाषण.)

(आमच्या बातमीदाराकडून)

"सरकारी अभ्यासक्रमापेक्षां निराळा अभ्यासक्रम शिकविणाऱ्या शाळा–कॉलेजांतून सध्या विद्यार्थ्यांची मोठी उणीव आढळून येत असते. तसाच प्रकार आमचेहि मुलींचे कॉलेजांत यंदा आढळून येत आहे. या वर्षी कॉलेजांतील मुलींची संख्या १५ आहे. पण ह्या संख्येनें आपण निराश होतां उपयोगी नाहीं. पुण्याचे टिळक विद्यापीठांतील शाळा व कॉलेज यामध्यें विद्यार्थ्यांची संख्या कमी आहे म्हणून सध्या वर्तमानपत्रांतून टीका होत आहे व तशी टीका आमचे विद्यापीठावर सुद्धां पूर्वी झाली आहे व या वर्षीहि होण्याचा संभव आहे.

कोणत्याहि संस्थेवर टीका करण्याचा अधिकार सर्वांनाच आहे. पण टीका करणारांनी कार्याकडे लक्ष देण्याचीहि जरूरी आहे. प्रचलित अभ्यासक्रम जर सदोष असेल तर त्यामध्यें सुधारणा झाली पाहिजे. अभ्यासक्रम सुधारण्याकरितां युरोप–अमेरिकेंत तिकडील सरकार प्रयोगशाळा (एक्स्पेरिमेंटल स्कूल्स) काढीत असतात. तें कार्य हिंदुस्थानांत राष्ट्रीय शिक्षणसंस्था करीत आहेत. टीकाकारांचा मुख्य आक्षेप असा कीं राष्ट्रीय शिक्षणसंस्था चालविण्यांत येवढा पैसा खर्च होतो व इतके श्रम खर्ची पडतात कीं हा पैसा व श्रम दुसऱ्या कामाकडे खर्ची पडल्यास त्यापासून किती तरी अधिक फायदा होईल! पण ज्यांना ज्या दिशेनें श्रम करणें आवडतें त्या दिशेनें तीं माणसें श्रम करतात. हा आवडीचा प्रश्न आहे. आवडीच्या कार्याकरितां जे श्रम आपण करतों तेच श्रम दुसऱ्या एखाद्या न आवडणाऱ्या कार्याकरितां करावयास सांगितलें तर ते श्रम आपले हातून होतील काय? शिवाय सध्या सरकारी अभ्यासक्रम शिकविणाऱ्या शाळा–कॉलेजांतून लोकांना जरूर नसलेल्या शिक्षणकार्याकरितां काय कमी पैसा खर्च होत असतो? राष्ट्रीय शिक्षणसंस्था चालविण्याकरितां जी मंडळी पैसे देतात त्यांचेंच मत त्या कार्यासंबंधीं घेणें अत्यावश्यक आहे.

आज पुणें, सातारा, तळेगांव, चिंचवड, खामगांव इत्यादि ठिकाणीं राष्ट्रीय शिक्षणप्रसाराचें कार्य चालू आहे. ह्या कार्यांत स्वार्थत्याग करून काम करणाऱ्या शिक्षक व चालक वर्गाचें खरोखर अभिनंदनच केलें पाहिजे. त्यांच्या शाळांतून मुलें कमी आहेत हा त्या शिक्षणसंस्थांचा दोष नसून तो दोष बराचसा 'गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः' ह्या तत्त्वाप्रमाणें वागणाऱ्या बहुजनसमाजाकडे येतो. 'राष्ट्रीय शिक्षणांत तरी निराळे विषय काय शिकवितां?' असा एक प्रश्न विचारण्यांत येतो. पण हा प्रश्न निराळ्या विषयांचा नसून राष्ट्रीय शिक्षणसंस्थांतून सरकारी संस्थांत दिसून न येणारें विचाराचें वातावरण आढळून येतें त्यांत असतो. सासवनें येथील शाळा व चिंचवड येथील शाळा मी प्रत्यक्ष पाहिल्या आहेत. त्या संस्थेंतील वातावरणांत शिकून बाहेर पडणाऱ्या मुलांचे मनावर खात्रीनें निराळा परिणाम होईल. आज टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे वाङ्मयविशारद निरनिराळ्या ठिकाणीं वर्तमानपत्रें चालवीत आहेत, धंदे करीत आहेत, सार्वजनिक चळवळीत पडत आहेत, हा परिणाम त्यांचेवर कोणत्या शिक्षणामुळें झाला? मुंबई विद्यापीठाच्या ग्रॅज्युएट मुलावर सध्या काय परिणाम होतात?

राष्ट्रीय शिक्षणसंस्थेतून शिकणाऱ्या मुलांपुढें नोकरी हें तरी ध्येय नसतें, कारण त्यांच्या पदव्यांना मान्यता नसल्यामुळें नोकरी त्यांना मिळतच नाहीं. आज सरकारी विद्यापीठांतून बाहेर पडणाऱ्या मुलांपैकीं तरी कितीजणांना नोकऱ्या मिळवितां येतील? सध्या मॅट्रिककडे मुलांचा ओढा किती आहे? चार-चार पांच-पांच वेळा मॅट्रिक परीक्षेला पाठविणारे पालक आपण पाहातों. सध्या ग्रॅज्युएट बाहेर किती पडत आहेत; येवढ्यांना नोकऱ्या तरी मिळतील काय? वकील व डॉक्टर सध्या मागणीपेक्षां अधिक बाहेर पडत आहेत. त्यांचें पुढें काय होणार असा प्रश्न असतांहि ह्या दोन धंद्यांकरितां किती विद्यार्थी आपल्या हाडांचीं काडें करीत आहेत! सध्या सरकारी शाळांतून शिकणारे विद्यार्थी व शिक्षक ह्यांची स्थिति किती अनुकंपनीय झाली आहे ह्याचा कोणी विचार केला आहे काय? सरकार शिक्षण सुधारत नाहीं. लोकांनीं प्रयत्न केले तर त्या प्रयत्नाला विद्यार्थी पुरेसे मिळत नाहींत व टीकाकाराकडून टीका होते ती निराळीच! अशा परिस्थितींत राष्ट्रीय शिक्षण–संस्था चालविणाऱ्या चालकांनीं व शिक्षकांनीं धैर्य न सोडतां आपलें कार्य तसेंच

चालू ठेवलें पाहिजे. पुढें काळ असा येईल कीं त्यावेळीं सरकारी शिक्षणसंस्था त्यांचाच कार्यक्रम स्वीकारतील. राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य अत्यंत पवित्र व महत्त्वाचें आहे. कै. विजापुरकरांसारखीं माणसें त्यांत खपलीं आहेत. हें कार्य आपण सर्वांनीं नेटानें चालविलें पाहिजे. सध्या सरकारी शाळांतील टांकसाळींतून सारख्या नमुन्याचीं नाणीं बाहेर पडत आहेत. ह्या नाण्यांनीं देशाचें वैभव वाढून देशांतील औद्योगिक व राजकीय प्रश्न सुटतील असें आपणास वाटतें काय? आपण निराळी टांकसाळ सुरू करून निराळीं नाणीं पाडण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आज त्यांना बाजारभाव नसेल पण पुढील बाजारांत त्यांना भाव येणार नाहीं म्हणून कशावरून ? सध्याच्या प्रचलित नाण्यांचा भाव किती उतरला आहे ह्यावरून ही गोष्ट सिद्ध होण्यासारखी आहे.

पूर्वीच्या अनेक राष्ट्रीय संस्था व राष्ट्रीय विद्यापीठें बुडालीं आहेत. पण त्यांनीं केलेलीं कार्यें आज शिल्लक आहेत. माणसांना ज्याप्रमाणें जन्म व मृत्यु आहे त्याप्रमाणें संस्थांनाहि असतो आज प्राचीन विद्यापीठें अस्तित्वांत आहेत काय? आज महिलाविद्यापीठानें ५७ पदवीधर स्त्रिया निर्माण केल्या आहेत व ह्यापुढें ह्या विद्यापीठाला स्त्रीविद्यार्थ्यांचे अभावीं आपलें काम बंद ठेवावें लागलें तरी देखील ह्या विद्यापीठानें बरीच कामगिरी केली आहे असें म्हणावें लागेल.

प्रचलित सदोष शिक्षणाची परंपरा चालवीत राहणें ह्यांत मोठा पुरुषार्थ नाहीं. नवीन परंपरा उत्पन्न करणें ह्यांत खरा पुरुषार्थ आहे. टीकाकारांना टीका करण्याचा पूर्ण अधिकार आहे व त्यांचे टीकेनें आपण निराश न होतां अधिक कार्याला प्रवृत्त झालें पाहिजे व त्यांचे आभारच मानले पाहिजेत! आज आमचे मुलींचे कॉलेजावर सुद्धां टीका होत आहे. पण ह्या टीकेस आपण अधिक कार्य करून उत्तर दिलें पाहिजे. राष्ट्रीय शिक्षणाचे प्रयोग आपण नाना प्रयत्न करून जगविले पाहिजेत. विद्यार्थ्यांनीं, शिक्षकांनीं व चालकांनीं ह्या संबंधीं स्वार्थत्याग करून दाखविला पाहिजे. बहुजनसमाजांत ह्या कार्यासंबंधीं जागृति जितकी असावयास पाहिजे तितकी अजून झाली नाहीं. ती उत्पन्न करावयास पाहिजे."

# कै. खरेशास्त्री यांच्या तसबिरीचें अनावरण

शनिवार ता. २१ माहे जुलै रोजीं सायंकाळीं ५॥ वाजतां भा. इ. सं. मंडळाच्या दिवाणखान्यांत **श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर** यांच्या अध्यक्षतेखालीं वरील समारंभ साजरा झाला. कै. वासुदेवशास्त्री खरे यांचें तैलचित्र येथील प्रसिद्ध चित्रकार **श्री. स. कृ. पिंपळखरे** यांनीं तयार केलें असून त्यावरून खरे यांची ओळख उत्तम रीतीनें पटते. प्रथम श्री. बाबासाहेब यांनीं प्रास्ताविक भाषण करून तसबिरीवरील आच्छादन दूर केलें व चित्रकार पिंपळखरे यांस एक चांदीचें नक्षीदार पुष्पपात्र नजर करून त्यांचा गौरव केला. श्रीमंतांनीं आपल्या भाषणांत खरेशास्त्री यांची विद्वत्ता, रसिकता, दीर्घोद्योग, साधी राहाणी इत्यादि गुणांचें त्यांच्या अनेक गोष्टी सांगून वर्णन केलें व त्यांच्या साध्या राहाणीचें अनुकरण नवीन पिढीनें केलें तरच त्यांच्या हातून महत्त्वाचीं व उपयुक्त कामें पार पडतील असें सांगितलें. अध्यक्षानंतर श्री. तात्यासाहेब केळकर, प्रो. भानू, दत्तोपंत आपटे व खरेशास्त्री यांचे चरित्रकार दामोदर मोरेश्वर भट यांचीं भाषणें झालीं. श्री. केळकर यांनीं शास्त्रीबुवांच्या अंगच्या प्रमुख गुणांचा उल्लेख केला. शास्त्रीबुवांस गरिबींत दिवस काढावे लागले तरी त्यांनीं आपलें दैन्य कधीं दाखविलें नाहीं. त्यांची बुद्धि तीव्र असून त्यांनीं तिच्या बळावर कोणत्याहि विषयांत प्रावीण्य मिळविलें असतें. त्यांचा व्यासंग व चिकाटी जबर होती. त्यांनीं संसारांत राहून व अगदीं आडबाजूच्या गांवीं आयुष्य घालवून ऐतिहासिक क्षेत्रांत नांव कमावलें यांतच त्यांचें महत्त्व आहे. मनुष्य कोणत्या तरी एका कामावर प्रसिद्धीस येत असतो. त्याप्रमाणें शास्त्रीबुवा इतिहासकार म्हणून पुढें आले असले तरी कवि व नाटककार याहि नात्यांना त्यांनीं कीर्ति मिळविली आहे. इतिहाससंशोधन व ललितकला यांचा छत्तिसाचा आंकडा असलाच पाहिजे असें नाहीं; याचें कै. खरे हें ठळक उदाहरण असून त्यांनीं गायनाचाहि अभ्यास केला होता असें श्री. केळकर यांनी सांगितलें.

प्रो. भानू यांनीं शास्त्री व इंग्रजी विद्या यांचें वितुष्ट असतां शास्त्रीबुवांनीं मोठेपणीं इंग्रजीचा अभ्यास करून त्यांत कसें प्राविण्य मिळविलें तें सांगितलें. श्री. दत्तोपंत आपटे म्हणाले कीं, पदवीधरास आपण विद्वान आहों असा अहंकार असतो व त्यास त्याच्या परिश्रमाच्या मानानें समाजाकडून मानहि अधिक मिळतो. परंतु निवळ मराठी जाणणाऱ्यांचें तसें नाहीं. मराठी संशोधकानें इतिहासाचा खोल अभ्यास करून संशोधनकार्य हातीं घेतलें तरच त्याला नांव कमावतां येतें. तसें नांव कै. खरे यांनीं कमावलें असल्यामुळें त्यांचें चरित्र निवळ मराठी संशोधकांस प्रेरक झाल्यावांचून राहाणार नाहीं. शेवटीं चरित्रकार श्री. भट यांनीं शास्त्रीबुवांच्या चरित्रांतलि ठळक गोष्टी सांगितल्या व अध्यक्षांचें समारोपादाखल भाषण होऊन त्यांचे आभार मानण्यांत आल्यावर समारंभ समाप्त झाला.

# लोकमान्य टिळक व महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांची चळवळ

"शेतकीची निकृष्टावस्था म्हणजे आमच्या सारख्यांस साऱ्या राष्ट्राचीच निकृष्टावस्था होय."
" हिंदुस्थानांत शेतकरी हा राष्ट्राचा आत्मा आहे. त्यांच्यावरील मालिन्याचा पगडा जर दूर करतां आला तरच हिंदुस्थानाचा उद्धार होईल."

—**लो. टिळक.**

गेल्या बुधवारीं पुण्यास जी प्रचंड शेतकरी परिषद झाली तिनें शेतकऱ्यांच्या चळवळीचें नव्या दिशेनें एक पाऊल पुढें टाकलेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. या नव्या दिशेनें प्रत्यक्ष कार्य किती वेगानें होईल हें परिषदेनें नेमलेल्या स्थायी कार्यकारी मंडळाच्या प्रयत्नावर अवलंबून आहे. पण जागा झालेला शेतकरी आतां सबळ व संघटित होण्याच्या मार्गाला लागणार अशी परिषदेच्या वेळीं दिसून आलेल्या शेतकऱ्यांच्या अपूर्व उत्साहावरून आशा वाटत आहे. यामुळें, आजपर्यंत सुशिक्षितांनीं शेतकऱ्यांच्या तर्फेनें केलेल्या चळवळीबद्दल सरकारनें जें उपक्षेचें किंवा चालढकलीचें धोरण चालविलें होतें तें यापुढें तसेंच चालविणें कितपत शक्य होईल याचा सरकारासहि विचार करावा लागेल. आजच सरकारावर असा परिणाम झाल्याचें दिसून येत आहे. फोटो-नोंदणीचें बिल, जमीन एकीकरणाचें बिल व सारावाढीचें बिल हीं सरकारनें मागें घेण्यांत किंवा तहकूब ठेवण्यांत दुसरे कांहीं हेतु असले तरी, शेतकऱ्यांच्या ज्या जागृतीचें व चळवळीचें केंद्रीकरण गेल्या शेतकरी परिषदेंत झालें, त्या चळवळीला व जागृतीलाच वरील अनुकूल प्रकाराचें बरेंचसें श्रेय दिलें पाहिजे. इतरांनीं शेतकऱ्यांसाठीं केलेली चळवळ व शेतकऱ्यांनीं स्वतः संघटित होऊन केलेली चळवळ यांमध्यें परिणामाचे दृष्टीनें किती फरक पडतो हें यावरून दिसून आलें. अज्ञ शेतकऱ्यांच्या हितासाठीं ज्यांनीं आजपर्यंत चळवळी केल्या त्यांना त्यांतील बराचसा भाग शेतकऱ्यांनीं स्वतः उचलण्याचा उपक्रम केलेला पाहून, आपल्या कार्याची ही इष्ट व स्वाभाविक परिणति होय असेंच वाटेल. या चळवळीचा इतिहास पन्नास साठ वर्षांचा आहे. आणि आज शेतकऱ्यांच्या चळवळींतील हें नवें पाऊल टाकतांना या पन्नास-साठ वर्षांत लोकांच्या प्रयत्नाची दिशा व सरकारचें धोरण यांची परिणति कसकशी होत गेली याचा विचार करणें जरूर आहे. हा विचार आज वाचकांपुढें मांडल्यानें गेल्या शेतकरी परिषदेच्या महत्त्वाची यथार्थ कल्पना त्यांस येईलच. पण त्याबरोबरच, लोकमान्य टिळकांनीं यापूर्वीच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला असल्यामुळें, गेल्या पन्नाससाठ वर्षांच्या सिंहावलोकनांत लोकमान्यांच्या पुण्यस्मरणाचें–आजच्या पुण्यतिथि अंकास अनुरूप असें–कार्यहि होईल. हें दुसरें कार्य करतांना आजच्या लेखांत प्रत्यक्ष लोकमान्यांच्या लेखांतील उताऱ्यांचा भरपूर उपयोग केला आहे. यामुळें विवेचन साधार होऊन लोकमान्यांचें धोरण त्यांच्याच शब्दांत वाचकांस वाचावयास मिळणार आहे.

### अव्वल इंग्रजींत व नंतर

पेशवाई राज्य जाऊन इंग्रजी राज्य सुरू झाल्यावर या राज्यासंबंधानें लोकांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं जमीनमहसुलाचें धोरण लोकांना त्रास न होईल अशा बेतानें प्रथम आंखण्यांत आलें. मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनीं या संबंधीं पुढील प्रमाणें कलेक्टरांना हुकूम केले होते—" एतद्देशीय जमाबंदीची पद्धत कायम ठेवावी, जेवढी लागवड झाली असेल तेवढ्यापुरताच सारा घ्यावा; तो जितका हलका करवेल तितका करावा, नवीन कर बसवूं नयेत व जे पूर्वीचे बसविले आहेत त्यापैकीं जुलमाचे आहेत ते वगळून बाकीचे जसेच्या तसेच कायम करावे. " रयतेची तक्रार झाल्यास धारा कमी करण्यांत येत असे. पण कंपनी-सरकारनें हिंदुस्थानाचे उद्योगधंदे बुडवून व हिंदुस्थानाच्या पैशाची लूट करून हिंदुस्थानावर दारिद्र्याचें व दुर्दशेचें साम्राज्य पसरविलें. आणि अशा स्थितींतच साम्राज्य राखण्याकरितां करावा लागणारा जबर लष्करी खर्च व संनदी नोकरांचे जबर पगार यामुळें कारभाराचा खर्च वाढत चालला. तेव्हांपासून शेतसारा वाढवून रयतेला पिळून काढण्यास सुरवात झाली. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं म्हटल्याप्रमाणें 'अव्वल इंग्रजींत जरी न्यायीपणाचा व दयाळूपणाचा प्रकार या देशांत पुष्कळ दृष्टीस पडत गेला, तरी आतां हळूहळू वरील दोनहि वृत्तींचा ऱ्हास होत जाऊन प्रभुत्वाचीं खरीं लक्षणें विरलतेनें आढळूं लागलीं आहेत.' आणि शेतकऱ्यांची अशी अवस्था झाली आहे कीं, 'खांद्यावर आसूड टाकून बैलाच्या पाठीवर राहावें, आणि या आर्यभूमीचें विलेखन करून मेघराजानें जर कृपा केली तर प्रथमतः सरकारची पोतडी भरावी, राहिल्यासाहिल्यांत सावकारास फ़ल नाहीं फुलाची पाकळी वाहावी आणि मग आपण खुशाल शानदार रागदारींस ' देवी श्री विक्टुरिया सार्वभौमिणी ' हीत

कुडींत प्राण आहे तोंवर अत्यंत निष्ठापूर्वक आळवीत बसावें!' अशा रीतीनें अज्ञान, दारिद्र्य व वाढत्या कराचे जुलम यामुळें गांजून जाऊन शेतकरी निकृष्ट स्थितीला येऊन पोंचले.

## न्या. रानडे व सार्वजनिक काका

इंग्रजी शिक्षणानें सुशिक्षित झालेले लोक देशस्थितीचा विचार करूं लागल्याबरोबर पहिल्या प्रथमच शेतकऱ्यांच्या निकृष्ट स्थितीचें हें भेसूर चित्र त्यांचे डोळ्यापुढें उभें राहिलें. यामुळें महाराष्ट्रांतील सार्वजनिक चळवळीच्या प्रारंभापासून सार्वजनिक कार्यकर्त्यांचे लक्ष या प्रश्नानें वेधलेलें आहे. लो. टिळकांच्या पूर्वीच्या, न्या. रानडे व सार्वजनिक काका यांच्या, पिढीनें ही स्थिति सुधारण्यास निरनिराळे उपाय अभ्यासपूर्वक सुचवून या प्रश्नासंबंधानें सरकारला हलविण्याचा प्रयत्न केला. लोकमान्यांनीं तोच प्रयत्न अधिक जोरदार व विस्तृत प्रमाणांत पुढें चालविला व सरकाराप्रमाणें लोकांनाहि हलवून जागें केलें. १८७० सालीं सार्वजनिक सभा स्थापन झाली. १८७१ च्या नोव्हेंबरांत न्या. रानडे पुण्यास बदलून आल्यावर त्यांनीं या सभेचीं सूत्रें हलविण्यास सुरवात केली. या वेळीं त्यांनीं जें पाहिलेंच कार्य सभेकडून घडवून आणलें तें महाराष्ट्राच्या आर्थिक पाहणीचें होय. १८७२ सालीं सभेनें महाराष्ट्राची आर्थिक पाहणी करण्याचा ठराव केला व तो अमलांत आणून ७३ सालीं या पाहणीचा रिपोर्ट प्रसिद्ध केला. या रिपोर्टांत महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या स्थितीचें हृदयद्रावक वर्णन केलें असून ही स्थिति सुधारण्यासाठीं अनेक उपाय सुचविले आहेत. याप्रमाणें महाराष्ट्रांतल्या जुन्यांत जुन्या सार्वजनिक संस्थेचें पहिलें कार्य शेतकऱ्यांसंबंधींच होतें.

## दक्षिणेंतील शेतकऱ्यांचे दंगे

सार्वजनिक सभेचें पुढील कार्य पाहिलें तर त्यांतहि पुढें ज्या ज्या वेळीं शेतकऱ्यांवर संकट आलें त्या त्या वेळीं सार्वजनिक सभेनें शेतकऱ्यांच्या हितासाठीं जागरूकपणें खटपट केलेली आहे. १८७५ सालीं दक्षिणेंत शेतकऱ्यांचे दंगे झाले. शेतकरी कर्जबाजारी झाल्यामुळें, त्यांनीं सावकारांवर हल्ले करून कर्जरोखे, गहाणपत्रें वगैरे जाळून टाकलीं व दुकानांची लूटमार केली. दंग्याचा उद्भव पुणें जिल्ह्यांत प्रथम होऊन नंतर ते नगर नाशिक, खानदेश व सोलापूर या जिल्ह्यांत पसरले. सरकारला या दंग्यांचा बंदोबस्त करण्यास बरेच प्रयास पडले. दंग्याची जबाबदारी सावकाराप्रमाणें सरकारावरहि येत होती. कारण सरकारनें जमिनीचा धारा वाढविला होता व पूर्वीची धान्याच्या रूपानें सारा घेण्याची पद्धत रद्द करून पैशाच्या रूपानें तो वसूल करण्याची पद्धत सुरू केली होती. पण सरकारनें नेहमींप्रमाणें सर्व खापर केवळ सावकारांच्या डोक्यावर फोडलें. या वेळीं न्या. रानडे यांच्या नेतृत्वानें सार्वजनिक काकांनीं ह्या दंग्यांची सभेमार्फत चौकशी करून एक सविस्तर अर्ज सरकाराकडे धाडला. त्यांत दंग्याचे बाबतींत पर्यायानें सरकारच कसें दोषी ठरतें हें दाखवून, शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्यासाठीं काय काय उपाय सरकारनें अमलांत आणावयास पाहिजेत याचें दिग्दर्शन केलें होतें. सरकारनें या दंग्याचे बाबतींत नेमलेल्या कमिशनलाहि सार्वजनिक सभेची विचारसरणीच मान्य करावी लागली. पण सार्वजनिक सभेनें सुचविलेली उपाययोजना मात्र कमिशननें सर्वस्वी मान्य केली नाहीं.

## इ. स. १८७६ सालचा दुष्काळ

पुढील सालीं महाराष्ट्रांत भयंकर दुष्काळ पडला. खावयाला अन्न नाहीं, गांठचा पैसा संपून गेला, गुरांना चारा नाहीं, पाणी नाहीं अशी स्थिति होऊन सर्वत्र हाहाःकार उडाला. १८७६ सालापासून दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं व ७७ सालांत दुष्काळाचें उग्र स्वरूप चोहोंकडे दिसूं लागलें. फॅमिन कोड त्या वेळीं अस्तित्वांत नव्हतें. सार्वजनिक सभेनें हा प्रश्न हातीं घेतला. सभा भरविल्या व ठिकठिकाणीं लोक पाठवून दुष्काळाची माहिती मिळविली. या माहितीच्या जोरावर न्या. रानडे यांनी सरकाराशी पत्रव्यवहार सुरू केला. इंग्लंडमधील वर्तमानपत्रांत जाहिरात देऊन दुष्काळग्रस्तांसाठी मदत मिळविण्याची खटपट केली, वर्गणी जमा करून पीडितांचें दुःखनिवारण करण्यासाठी कमिट्या स्थापन केल्या. त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल यांच्या जाचक धोरणामुळें लोकांना अतिशय त्रास झाला. साऱ्याची सूट न देतां सर्व सारा चोपून वसूल करण्यांत आला! दुष्काळी कामावर येणाऱ्या मजुरांना शक्तीप्रमाणें काम न देतां 'सब घोडे बारा टक्के' अशी व्यवस्था करून मजुरीचे दरहि कमी केले. या सर्व गैरव्यवस्थेबद्दल सार्वजनिक सभेनें सरकाराकडे अर्ज केले. पण सरकारनें त्यांकडे प्रथम दुर्लक्ष केलें. दुष्काळकामावरील अधिकाऱ्यांचा जाच असह्य झाल्यामुळें लोकांनीं तशा स्थितींतहि संप केला तेव्हां मात्र सरकार जागें झालें व या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीपुढें सार्वजनिक सभेतर्फे सार्वजनिक काकांनीं साक्ष दिली व सरकारापुढें दुष्काळनिवारणकार्यासंबंधीं अनेक उपयुक्त सूचना मांडल्या. १८७८ सालीं सरकारनें शेतकी कमिशन नेमून शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाच्या कारणांची चौकशी केली. या कमिशनलाहि शेतकऱ्यांसंबंधींची बरीच माहिती सार्वजनिक काकांनीं पुरविली. या कमिशनाच्या सूचनांवरूनच १८७९

सालीं दक्षिणेंतील शेतकऱ्यांचा ऋणमोचक कायदा सरकारानें मंजूर केला.

### सार्वजनिक सभेचें कार्य

१८७८ सालीं न्या. रानडे यांच्याच प्रेरणेनें सार्वजनिक सभेचें त्रैमासिक सुरू झालें. या त्रैमासिकाचे पहिल्या दोन वर्षांचे अंक दुष्काळाच्या हकीकती, दुष्काळव्यवस्था, शेतकऱ्यांचे दंगे, ऋणमोचक कायद्याच्या मसुद्याची चर्चा इ. हकीकतींनीं व विवेचनांनीं भरलेले आहेत. याच वेळीं सभेनें कायमधारापद्धतीचा पुरस्कार केला. शेतकऱ्यांचा ऋणमोचक कायदा कसा एकांगी आहे हें दाखवून सरकारच्या जमीनमहसुलाचें धोरण सुधारल्याशिवाय शेतकऱ्यांची स्थिति सुधारावयाची नाहीं असें सरकारास सभेनें बजावलें आणि पुढेंहि या कायद्याचा वारंवार ऊहापोह करून सभेनें हाच मुद्दा सरकारपुढें मांडला आहे. उदाहरणार्थ, १८८१ सालीं सभेच्या त्रैमासिकामधील या विषयासंबंधाच्या लेखांतील अखेरचा भाग पाहा. "दोनशें वर्षेपर्यंत दक्षिणेंतील जिल्हे म्हणजे जुन्या ढांसळणाऱ्या साम्राज्यांतील चांगल्या व आशा उत्पन्न करणाऱ्या सर्व गोष्टींचें माहेरघर होते. त्या साम्राज्याचेंच तेज अजून लोकांत आहे. या लोकांची उमेद खचविणारें व जीवनकलहाच्या धडपडींत शक्तिक्षय करणारें जमीनमहसुलाचें जुलमी व जबरदस्त दडपण काढून टाकावें येवढेंच त्यांचें मागणें आहे. तेवढें घडून आल्यास त्यांचीं सर्व दुःखें आपोआप दूर होतील. देशांतील अत्यंत निकृष्ट वर्गावर सर्व करांपैकीं मोठ्यांत मोठा कराचा बोजा लादण्याच्या या अन्यायाकडे सरकार फार दिवस डोळेझांक करीत आहे. सारा सहजासहजीं वसूल होत असल्यामुळें या बाबतींत सरकाराची विवेकबुद्धि जागृत होत नाहीं." १८७९ मध्यें वासुदेव बळवंत फडक्यांचें बंड मोडल्यानंतर त्यासंबंधीं सार्वजनिक सभेनें सरकाराकडे एक विस्तृत विवेचनात्मक पत्र धाडलें. त्यांत सभेनें असें सिद्ध केले होतें कीं, वासुदेव बळवंताला जे लोक सामील झाले ते त्याच्या उपदेशानें नसून, त्यांच्या आर्थिक निकृष्ट स्थितीमुळें व उपजीविकेचा धंदा नसल्यामुळे होत. यासाठीं सरकारनें आपला जमीनधारा जास्त होत आहे काय व वसुलीच्या कामीं फाजील कडकपणा होत आहे काय याची चौकशी करावी, अशी सभेनें विनंति केली. फॅमीन फंडांतून जसा रेलवे–कालवे काढण्याकडे कांहीं खर्च होतो तसाच देशांतील उद्योगधंद्याची वाढ करण्याकडे कांहीं खर्च झाल्यास हा फंड सत्कारणीं लागेल व त्यायोगें दुष्काळ टळतील अशी सूचना १८८५ मध्यें सभेनें केली होती. १८८६ मध्यें लॅंड रेव्हिन्यू कोडाच्या दुरुस्तीचा प्रश्न निघाला असतां शेतकऱ्यानें केलेल्या सुधारणांचा फायदा सर्वस्वी त्यालाच मिळावा याबद्दल सभेनें खटपट केली.

सार्वजनिक सभेचें हें त्रैमासिक १८९७ पर्यंत चाललें. या अवधींत वर दर्शविल्याप्रमाणें शेतकऱ्यांच्या पेढ्या, जमीन-महसुलाचें सरकारी धोरण, जंगलखातें, ऋणमोचक कायद्याचा अंमल व त्याची सुधारणा इ. शेतकऱ्यांच्या हिताशीं निगडित असलेल्या अनेक विषयांवर अभ्यासपूर्वक लिहिलेले व उपयुक्त सुधारणा सुचविणारे असे अनेक लेख त्या त्रैमासिकांत आलेले आहेत. १८७६–७७ सालाप्रमाणेंच १८९६–९७सालींहि महाराष्ट्रांत दुष्काळ पडला. हा दुष्काळ पडण्यापूर्वी त्याचीं पूर्वचिन्हें दिसूं लागल्याबरोबर सभेनें सरकाराशीं पत्रव्यवहार करून सरकारला आगाऊ सूचना दिली. या त्रैमासिकाच्या पहिल्या दोन वर्षांच्या अंकाप्रमाणेंच शेवटच्या वर्षांचे अंकहि सार्वजनिक सभेनें गोळा केलेली दुष्काळाची माहिती व त्यासंबंधीं सरकाराशीं केलेला पत्रव्यवहार यांनीं भरलेले आहेत. १८७७ सालीं दुष्काळांत सार्वजनिक सभेनें जी चळवळ केली तीपेक्षां १८९७ सालच्या दुष्काळातील चळवळींत एक नवी दिशा होती. कारण त्या सालापूर्वी लो. टिळक यांनीं महाराष्ट्रांतील राजकीय चळवळीचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं होतीं. या नव्या दिशेमुळेंच सरकारची या चळवळीवर वक्रदृष्टि फिरली. धारवाड जिल्ह्यांत दुष्काळांत तहकूबी व सूट देण्याचे नियम समजून सांगण्यासाठीं गेलेल्या सार्वजनिक सभेच्या प्रचारकानें त्यासंबंधीं काढलेल्या एका हस्तपत्रकावर सरकारनें आक्षेप घेतला व त्या निमित्तानें सार्वजनिक सभेच्या अर्जाचा विचार सरकार करणार नाहीं असें जाहीर केलें!

### शेतकऱ्यांच्या दुःस्थितीचीं खरीं कारणें

ही नवी दिशा कोणती होती हें समजण्यास टिळकांच्या आयुष्यक्रमाकडे वळलें पाहिजे. टिळकांनीं डे. ए. सोसायटी सोडल्यावर पहिली राजकीय चळवळ क्राफर्ड प्रकरणांत १८८८ व ८९ सालीं केली १८८७ सालीं त्यांच्या नांवावर केसरी निघूं लागला होता. १८९२ सालीं दुष्काळाचें स्वरूप कोठें कोठें प्रगट झालें व सरकारच्या नेहमींच्या परिपाठाप्रमाणें सरकारानें यासंबंधीं एक चौकशी कमिशन नेमलें. त्या वेळीं शेतकऱ्यांच्या प्रश्नासंबंधीं लिहिण्याचा पहिला प्रसंग टिळकांस प्राप्त झाला. साऱ्याची वाढ, त्याची कडक वसुली व देशांत शेतीशिवाय इतर धंदे शिल्लक न ठेवणारें सरकारचें औद्योगिक धोरण हीं शेतकऱ्यांच्या निकृष्टावस्थेचीं मुख्य कारणें असतां त्यासंबंधी कांहींच विचार न करतां केवळ अवांतर गोष्टी सुधारण्याच्या सरकारच्या धोरणावर टीका करण्यास टिळ-

कांनीं सुरुवात केली. आणि या बाबतींत सुशिक्षित मध्यस्थांनीं सरकाराकडे वकिली करूनच केवळ भागावयाचें नाहीं तर शेतकऱ्यांनीं स्वतः त्याबद्दल संघटित प्रयत्न करावयास पाहिजेत असें प्रतिपादन त्यांनीं सुरू केलें.या कमिशनाबद्दल टिळक लिहितात "शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकरितां म्हणून हल्लीं जें कमिशन बसलें आहे त्याचाहि परिणाम एकंदरींत राजसत्ता दृढ करण्याच्या कामींच घडून येणार! शेतकऱ्यांबद्दल जर आमच्या सरकारास येवढी खरोखरच कळकळ आहे तर मद्रास इलाख्यांतील कांहीं प्रांतांत दुष्काळ आपलें उग्र स्वरूप प्रगट करीत असतां व मुंबई इलाख्यांतील कांहीं प्रांतांतून तो डोकावत असतां जमिनीवरील साऱ्याचे अवघे सत्तावीसच रुपये वसूल होण्याचे राहावेत काय? शेतकऱ्यांचें कल्याण करण्याची सरकारची बुद्धि नाहीं असें आम्ही म्हणत नाहीं. तिजोरीस खार न लागतां व जमाबंदीचें नुकसान न होतां शेतकऱ्यांचें जें कल्याण होईल तें करण्यास सरकार तयार आहे. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे शेतकऱ्यांच्या स्थितीची चौकशी करण्याकरितां हल्लीं जें कमिशन बसलें आहे त्यापासून लोकांचे कांहीं कल्याण होईल असें आम्हास वाटत नाहीं."

## लोकांच्या कर्तव्याबद्दल जागृति

यापूर्वी शेतकऱ्यांचें ऋणमोचन करणारा कायदा अमलांत येऊन बारा वर्षे झालीं होतीं व शेतपेढ्याहि सरकारनें काढल्या होत्या. पण शेतकऱ्यांची स्थिति सुधारली नाहीं. या गोष्टीची जाणीव देऊन टिळक म्हणतात कीं,"शेतकऱ्यांच्या दैन्यावस्थेचें मुख्य कारण सावकारांचा जुलम नसून सरकारचाच कडकपणा होय. पण ह्या गोष्टीकडे सरकारतर्फे नेमलेल्या कमिशनाचें दुर्लक्ष होण्याचा पुष्कळ संभव आहे, आणि सर्व दोषांचें खापर बिचाऱ्या सावकारांच्या डोक्यावर फोडून शेतकरी कायदारूपी रामबाण औषधाचा आणखी एकदां प्रयोग केल्यानें आपल्यावरची जबाबदारी टाळण्याची संधि सांपडल्यास सरकारास आनंदच होईल हें उघड आहे; सबब या प्रसंगीं लोकांनीं आपल्याकडून कोणत्याहि प्रकारची कसूर होऊं देणें रास्त होणार नाहीं. आपल्याकडून होईल तितकें करून वस्तुस्थिति कमिशनरांच्या नजरेस आणणें प्रत्येक जिल्ह्यांतील, तालुक्यांतील लोकांनीं आपलें कर्तव्य समजलें पाहिजे." या कमिशनाच्या निमित्तानें लोकांत जागृति उत्पन्न करण्यासाठींच लोकमान्यांनीं हा इषारा दिला, कमिशनापासून प्रत्यक्ष कांहीं फलनिष्पत्ति होईल अशा खोट्या आशावादानें नव्हे. कारण याच लेखांत ते म्हणतात, "एखादी गोष्ट अगदीं नेटास लागली म्हणजे चौकशी करण्याकरितां कमिशन नेमून तूर्तातूर्त तरी लोकांचीं तोंडें बंद करणें हा एकोणिसाव्या शतकांत सर्वसंमत झालेला सुधारलेला उपाय आमच्या सरकारास चांगला अवगत आहे. ह्या येवढ्या खटाटोपापासून अगदींच कांहीं निष्पन्न होणार नाहीं असें आमचें म्हणणें नाहीं. तरी पण आजपर्यंत होऊन गेलेल्या शेंकडों कमिशनांचा इतिहास पाहिला म्हणजे ह्या विषयाचा एकदांचा शेवट होईल अशी आशा करण्याचें फारसें सबळ कारण दिसत नाहीं."

१८९२ सालींच टिळकांनीं हुंडणावळीच्या प्रश्नावर एक सुबोध माहिती देणारी लेखमाला लिहिली. तिचे अखेरीस ते लिहितात, "रुपयाची कृत्रिम किंमत वाढविल्यानें शेतकऱ्यांना कर अधिक द्यावा लागेल इतकेंच नव्हे तर त्याची प्राप्तीहि कमी होईल. इकडे सरकारदेणें वाढलें व तिकडे प्राप्तीहि कमी झाली. अशा स्थितींत त्या बिचाऱ्याने मुलामाणसांचें पोषण करून काळ कसा कंठावा ह्याचा कोणीच विचार केलेला दिसत नाहीं." आणि ह्या अन्यायाबद्दल देशांत कांहींच चळवळ न झालेली पाहून ते म्हणतात, "वेळच्या वेळीं आपल्या हक्काला जपण्याची विद्या आम्हास अजून शिकावयाची आहे. तो काळ केव्हां येईल तेव्हां येवो." याच सालांत रत्नागिरी जिल्ह्यांत वाढविलेल्या साऱ्याच्या निषेधार्थ "हें सारा वाढविणें कीं जुलम?" हा लेख त्यांनीं लिहिला,आणि ह्यूम व वाच्छा यांचे लेख व रा. ब. रानडे यांचें व्याख्यान यांच्या आधारें "शेतकरी लोकांस बंड करावें लागेल काय?" ही लेखमाला लिहिली. कमिशनाचा रिपोर्ट टिळकांच्या अपेक्षेप्रमाणेंच गुळमुळीत निघाला. शेतकऱ्यांच्या कायद्याने शेतकऱ्यांची स्थिति सुधारणार नाहीं हे कमिशनानें कबूल केलें. पण साऱ्याची आकारणी उत्पन्नाच्या मानाने अधिक होते कीं काय याचा कमिशनानें विचारच केला नाही! फक्त सारा सोयीसोयीनें वसूल करावा, व शेतकऱ्यांची सामाजिक व शैक्षणिक स्थिति सुधारावी अशा सूचना केल्या. या रिपोर्टासंबंधीं टिळक लिहितात "सरकारच्या राज्यपद्धतीमुळें, त्यांच्या सारा घेण्याच्या रीतीमुळें, अगर अप्रतिबंध व्यापार सुरू केल्यामुळें हिंदुस्थानवासी रयतेचें आपल्या हातून कांहीं नुकसान होत आहे ही कल्पना देखील सरकारच्या डोक्यांत शिरत नाहीं!"

## ९६ सालचा दुष्काळ

१८९६ सालीं पुनः भयंकर दुष्काळ पडला. १८७६ सालाच्या दुष्काळाप्रमाणें या वेळीं सरकारनें काय करावयाचें या बाबतींत अनिश्चितता नव्हती. 'फॅमीन कोड' तयार होऊन त्यांत साऱ्याची तहकुबी व सूट, जंगलें खुलीं करणें, दुष्काळकामावरील मजुरी, अनाथगृहांची व्यवस्था इत्यादिकांसंबंधीं बारीकसारीक नियम ठरलेले होते.

तथापि दुष्काळाच्या भयंकर परिस्थितींत 'लोकांनीं, लोकांच्या पुढाऱ्यांनीं व सरकारनें काय करावें याबद्दल किलीहि लिहिलें तरी तें थोडेंच आहे' अशा वृत्तीनें लोकमान्यांनीं या विषयावर लिहिण्यास सुरवात करून अखेरपर्यंत त्याचा पिच्छा पुरविला. सरकारी व्यवस्थेचा लोकांना फायदा देण्याचे बाबतींत खालील अधिकाऱ्यांकडून दांडगाई होते ती 'आम्ही करूं देतों म्हणून होते' असें त्यांनीं प्रारंभींच लोकांना बजावलें. आणि हे दिवस कायद्याचे आहेत, दांडगाईचे नाहींत असा त्यांनीं अधिकाऱ्यांनाहि स्पष्ट इशारा दिला. 'कायदेशीर रीतीनें सरकाराशीं भांडावयास रयतेस कसें शिकवावें ही विद्या आमच्या पुढारी लोकांस शिकावयाची आहे व ती ते शिकतील तेव्हांच सरकारी अधिकाऱ्यांचा उर्मटपणा उतरेल' अशी त्यांनीं पुढाऱ्यांनाहि सूचना दिली. 'शेतकरी किंवा मजूर लोक अज्ञानी व गरीब असतात हें आम्ही सांगावयास पाहिजे असें नाहीं. यांच्याकरितां खरा उद्योग सुशिक्षित लोकांनींच केला पाहिजे व तो जर तालुक्यांतील पुढारी लोक करणार नाहींत तर आमच्या देशाचें दुर्दैवच अद्याप संपलें नाहीं असें म्हणावें लागेल.' अशा प्रकारें त्यांनीं ठिकठिकाणच्या सुशिक्षितांस जागें केलें. उंबरगांव पेठ्यांत खत्तलवाडा येथें सार्वजनिक सभेचे दुष्काळ क. चे सेक्रेटरी प्रो. साठे यांनीं सशस्त्र पोलिसांच्या बंदुकांच्या टप्प्यांत भरलेल्या सभेंत 'पिकें बुडालीं असलीं तर सारा देऊं नका' असे लोकांना अधिकाऱ्यांसमक्ष त्रिवार सांगितलें व " पोलीस बदुका घेऊन आले आहेत, पण त्यांना भिण्याचें कारण नाहीं. भ्याल तितके फसाल; न भितां, न डगमगतां कायदेशीर रीतीनें काम चालू द्या " अशा रीतीनें बोलून त्यांनीं लोकांस खंबीर केलें. याच चळवळीमुळेंच सार्वजनिक सभेवर सरकारचा रोष होऊन सरकारनें सार्वजनिक सभेचा अर्ज करण्याचा अधिकार काढून घेतला! त्यासंबंधीं टिळक लिहितात " सार्वजनिक सभेसारख्या ज्या संस्था आहेत त्या सरकारी ठरावानें उत्पन्न होत नाहींत व लयासहि जात नाहींत. त्यांचें जनन व मरण लोकाश्रयावर अवलंबून असतें व सार्वजनिक सभा लोकांची सेवा करीत आहे अथवा त्यांस आपले हक्क समजावून देत आहे तोंपर्यंत सरकारच्या द्वारीं सभेस मज्जाव झाल्यानें सभा बुडेल असें कोणीहि समजूं नये. "

## सरकारची गैरव्यवस्था

१८९७ सालीं हिंदुस्थानसरकारनें ९६ सालाच्या अनुभवावरून फॅमीन कोडांत काय दुरुस्त्या करावयाच्या यासंबंधीं एक चौकशी कमिशन नेमलें. त्या वेळींहि टिळकांनीं दुष्काळव्यवस्थेंतील सर्व दोष सरकारच्या नजरेस आणले. या लेखांत ९६ सालाच्या दुष्काळांतील सरकारच्या गैरव्यवस्थेमुळें लोकमान्यांच्या मनांत उत्पन्न झालेला त्वेष उमटला आहे. ते लिहितात " शेतकऱ्यांच्या गरजा काय आहेत, रयतेला दुष्काळांत मदत व्हावी म्हणून साऱ्याची किती तहकुबी व माफी केली पाहिजे ह्याचा विचार होऊन नंतर ह्या कामीं केवढी रकम खर्च केली पाहिजे हें ठरवावयास पाहिजे. परंतु सनदी नोकरांच्या चैनीकरितां व लष्कराच्या जय्यत तयारीकरितां पाण्यासारखा पैसा खर्च करून कर्जबाजारी झालेल्या सरकारच्या लहरी मनास योग्य वाटेल तेवढ्याच रकमेंत शेतकऱ्यांच्या सर्व गरजा भागवाव्या लागतात, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे.... इंग्रजी राज्यांत हिंदुस्थानांतून इंग्लंडकडे जो संपत्तीचा भयंकर प्रवाह वाहत जातो त्यामुळें व कांहीं अंशीं दैवी कोपामुळें खावयास न मिळून रिलीफ कामावर मजुरी करण्यास जाणारी प्रजा बदमाष चोराहून कमी दर्जाची समजली जावी; संकटसमयीं उपयोगी पडण्याकरितां दुष्काळकर प्रजाजन भरीत असतां तुरुंगांतील अति निंद्य गुन्हेगाराहून अधिक वाईट रीतीनें सरकारनें आपल्या निरपराधी प्रजेस वागवावें, ह्यासारखी इंग्रज लोकांच्या न्यायी बुद्धीस कालिमा आणणारी गोष्ट असेल असे आम्हास वाटत नाहीं."

## सारावसुलीचा जुलूम

१८९७ सालाच्या दुष्काळांत साऱ्याची तहकुबी व सूट देण्याचे कामीं मुंबई--सरकारानें कंजुषपणा केला असा या कमिशनानें अभिप्राय दिला. १९०० सालाच्या दुष्काळांत तहकुबी व सूट सढळ हातानें मिळावी यासाठीं पुनः टिळकांनीं या विषयावर लेखमाला लिहिली. या सालींहि फॅमीन कोडाप्रमाणें व्यवस्था नीट झाली नाहीं अशी लोकांची तक्रार होतीच. १८९७ सालीं सार्वजनिक सभेचें निमित्त सांपडलें. पण १९०० सालीं सभेनें प्रचारक पाठविले नसतांहि लॉर्ड नॉर्थकोट यांनीं लोक सारा न देण्याचा कट करतात अशा तऱ्हेचा आरोप लोकांवर केलाच. याच सालांत भडोच जिल्ह्यांत सारावसुलीच्या बाबतींत काय काय प्रकार झाले याची यादी त्या वेळच्या 'गुजराथी' पत्रांत प्रसिद्ध झाली होती. त्यांत (१) कुलूप लावून बाहेर गेलेल्या इसमांचीं घरें त्यांच्या पश्चात् आंतील मालाची जप्ती करण्यासाठीं फोडणें (२) कांहीं घरांच्या जमिनी आंत द्रव्य पुरलें असेल अशा हेतूनें खणून पाहणें (३) दुष्काळाचे वेळीं धर्मार्थ म्हणून देण्यांत आलेल्या पैशांतून सारा कापून घेणें (४) सारा न देणाऱ्या गांवकऱ्यांस गांवांतील विहिरीचें पाणी भरूं न देणें (५) बाईमणी नांवाच्या एका बाईचा उद्धट रीतीनें झाडा घेणें इ. प्रकार नमूद आहेत. यावरून पाहतां बार्डोलींत नुकताच झालेला सारावसुलीचा जुलूम नोकरशाहीला कांहीं नवीन नाहीं.

## मालकी हक्कावर गदा

१९०१ सालीं सरकारनें लँड रेव्हिन्यू कोडाच्या दुरुस्तीचें बिल आणून शेतकऱ्यांच्या मालकी हक्कावर गदा आणली. या वेळींहि लोकमान्यांनीं या बिलाचें घातक स्वरूप लोकांच्या नजरेस आणलें. 'शेतकऱ्यांनों व सावकारांनों सावध व्हा'' जमिनीची मालकी बुडाली ' 'सावकार मेला आणि कुणबीहि मेला' 'उठा, अजून वेळ गेली नाहीं ' 'दुराग्रही सरकार व निर्बल लोकमत' इ. लोकमान्यांचे लेख राजकीय चळवळ करणारांना आदर्शभूत होण्यासारखे आहेत. लोकांमधील चळवळीला न जुमानतां त्या वेळच्या निर्बल कौन्सिलांत सरकारनें हट्टानें हें बिल पास करून घेतलें व ना. मेथा, सर भालचंद्र, परेख, गोखले व खरे हे सरकारच्या निषेधार्थ कौन्सिलांतून उठून आले. या वेळीं या बिलाविरुद्ध सुमारें ५०००० सह्याचे सुमारें ७०० अर्ज कौन्सिलकडे धाडण्यांत आले होते. पण येवढ्यानें लोकमान्यांना समाधान वाटलें नाहीं. ते लिहितात "आम्हाला जी माहिती मिळाली आहे तीवरून हे अर्ज किंवा यांपैकीं पुष्कळ अर्ज शेतकऱ्यांचे आहेत असें दिसून येतें. शेतकऱ्यांनीं जी ही चळवळ केली ती आजपर्यंतच्या अनुभवावरून बरीच झाली असें म्हणावयास पाहिजे. पण अद्याप आमच्या मतें ती पुरी झाली नाहीं. हल्लीं मुंबई–कायदे कौन्सिलापुढें जें बिल आलें आहे तें अशा प्रकारचें आहे कीं, सर्व खेड्यापाड्यांतील चावडींत त्याची चर्चा होऊन दर खेड्यांतून निदान एक अर्ज तरी सरकाराकडे यावयास पाहिजे होता....विलायतेसारख्या स्वतंत्र देशांत जर असें बिल आलें असतें तर त्याच्या वाचनाचे वेळीं हजारों लोकांचा कायदेकौन्सिलाभोंवतीं गराडा पडला असता. तसा प्रकार येथें होणें शक्य नाहीं, पण त्याऐवजीं कायदे–कौन्सिलाचें टेबल अर्जांच्या ओझ्याखालीं वांकून जावयास पाहिजे. बिलासंबंधानें मुंबई इलाख्यांतील कोणताहि समंजस शेतकरी अनुकूल मत देणार नाहीं अशी आमची खात्री आहे. परंतु स्वतंत्र देशांत लोकमत प्रसिद्ध करण्याच्या ज्या रीती आहेत त्यांचें अनुकरण करण्यास आमचा शेतकरीवर्ग अद्याप न शिकल्यामुळें त्यांचें मत त्यांस सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकमताप्रमाणें व्यक्त करतां येत नाहीं."

## कौन्सिलांतील होयबा

त्या वेळच्या कौन्सिलांत लोकनियुक्त सभासदांचें बहुमत नव्हतें. पण ना. मेथा यांच्या उपसूचनेस सर्व हिंदी सभासदांचीं मतें मिळावयास हवीं होतीं. यासंबंधी टिळक लिहितात, " ना. विंचुरकर आणि चुनीलाल हे दोघेहि कांहीं सरकारी अधिकारी नाहींत व खरें म्हटलें म्हणजे ना. मेथा यांच्या उपसूचनेस अनुकूल मत देण्यास त्यांस कोणतीहि हरकत नव्हती व तसें झालें असतें म्हणजे उपसूचनेस अनुकूल ११ आणि प्रतिकूल ११ मतें होऊन एक तर ती पास झाली असती किंवा गव्हर्नरसाहेबांस आपलें प्रतिकूल मत देऊन ती नामंजूर करावी लागली असती. पण तसा योग यावा कसा? ना. देसाई यांनीं तर बोलूनचालून आपला देह व मतें पोटाकरितां सरकारास विकलीं आहेत. ना. चुनीलाल पेन्शन खात आहेत आणि ना. विंचुरकर हे नुकतेच सरंजामावर चढलेले तरुण गृहस्थ आहेत. तेव्हां या सर्वांनीं आपलीं मतें सरकारास देऊन त्याऐवजीं हुषारीचें व अनुभवाचें सर्टिफिकेट मॉंटीथसाहेबांकडून मिळविलें. देशाचें कल्याण किंवा अकल्याण न पाहतां अशा रीतीनें कौन्सिलांत मत देणारी मंडळी जोंपर्यंत आमच्यांत निपजत आहेत व त्यांत तरुण सरदार मंडळींची भर पडत आहे तोंपर्यंत लोकमताचा कौन्सिलांत केव्हांहि जय होणें अशक्य होय. "

कौन्सिलांत लोकांच्या हिताविरुद्ध मत देणाऱ्यांची अशी झणझणीत हजेरी घेण्याबरोबरच कौन्सिलांतून उठून येणाऱ्या सभासदांचा टिळकांनीं योग्य गौरव केला. टाईम्ससारख्या ज्या पत्रांनीं कौन्सिलांतून उठून जाणाऱ्या सभासदांची कुचेष्टा चालविली होती त्यांचाहि टिळकांनीं खरपूस समाचार घेतला. या पुढाऱ्यांपेक्षां सरकारच्या अधिकाऱ्यांना रयतेचें हित अधिक कळतें असें प्रतिपादन करणाऱ्या टाईम्सकारांस टिळकांनीं उत्तर दिलें कीं " इंग्रजी अधिकाऱ्यांचें खरें स्वरूप उत्तरोत्तर लोकांच्या अधिकाधिक नजरेस येऊं लागून साहेब कागदपत्रांच्या पलीकडे कितीसे जातात हें सर्वांच्या अनुभवास येऊन चुकलें. अशा प्रकारचे अधिकारी दौऱ्यावर गेल्यानें त्यांस रयतेची अधिक माहिती होते व लोकनियुक्त सभासदांपेक्षां रयतेची खरी कळकळ ते अधिक बाळगतात असें प्रतिपादन करणें म्हणजे खेडेगांवातून संचार करणाऱ्या वायूस शेतकऱ्याची स्थिति खुद्द शेतकऱ्यापेक्षां अधिक चांगल्या रीतीनें समजते असें म्हणण्याइतकेंच उपहासास्पद आहे. लोकांत हजारों निमित्तांनीं नेहमीं वावरणाऱ्या व वागणाऱ्या ना. मेथासारख्या पुढाऱ्यांपेक्षां सहा हजार कोसांवरून आलेला सिव्हिलियन दहा वर्षे एखाद्या जिल्ह्यांत पडून राहिल्यानें त्यास शेतकऱ्यांच्या स्थितीचा जास्त अनुभव येतो हें म्हणणें अगदींच असंबद्ध व वेडेपणाचें होय......कुणब्यास त्याचें कल्याण कळत नाहीं तें नाहींच, पण तें ना. फेरोजशहा मेथा, सर भालचंद्र, परेख, गोखले, खरे किंवा या देशांतील शेंकडो ठिकाणचे समंजस गृहस्थ यांनाहि न कळतां ना. लेली व म्यूरमॅकेन्झी यांस तें कळतें अशाच तऱ्हेचें प्रतिपादन,

आमचें राज्य चालू आहे, आम्ही काय पाहिजे तें करूं आणि काय पाहिजे तें सांगूं आणि आमच्या तोंडांतून जे बोल निघतील तेच कल्याणप्रद म्हणून लोकांनीं स्वीकारले पाहिजेत, अशा दुरभिमानानें आणि दुराग्रहानें ग्रस्त झालेल्या राज्यकर्त्यांच्या जातभाईकडून व्हावयाचें व त्याप्रमाणें तें टाईम्सकारांनीं केलें आहे.'' असो. सरकार त्या वेळीं नमलें नाहीं तरी त्या संधीचा लोकांना जागृत करण्याच्या दृष्टीनें लोकमान्यांनीं पुरेपूर फायदा घेतला. प्रांतिक कौन्सिलांत हें बिल मंजूर झाल्यावरहि व्हाइसरॉयांनीं त्यास संमति देऊं नये असे शेंकडो शेतकऱ्यांचे अर्ज व्हाइसरॉयांकडे गेले पाहिजेत अशीहि लो. टिळकांनीं सूचना केली होती.

## सरकारचें अचल रेव्हेन्यु खातें

१९०३ सालीं लोकमान्यांनीं आपल्या लेखांतून सरकारचा सारा कसा डोईजड होत आहे, शेतकी खात्यानें शेतकऱ्यांच्या शिक्षणाची व उद्योगधंद्याची सोय कशी करावयास पाहिजे इ. गोष्टींचें विवेचन चालूच ठेवलें होतें. सारावाढ व उद्योगधंद्याचा अभाव हींच शेतकऱ्यांच्या निकृष्ट स्थितीची मुख्य कारणें आहेत, त्यावर कांहीं उपाययोजना न करतां सरकार केवळ अवांतर कारणांकडे बोट दाखवून आपला दोष झांकीत आहे हाच मुद्दा त्यांनीं वारंवार पुढें मांडला आहे. मुंबई इलाख्यांतील जमीनधाऱ्याच्या पद्धतीवर टीका करतांना ते लिहितात. "मुंबई इलाख्यांत किंबहुना सर्व हिंदुस्थानांत शेतकीखेरीज उपजीविकेचें आतां दुसरें साधन राहिलें नाहीं. कोष्ट्याचे किंवा इतर धंदे परकीय देशांतील माल येथें येऊं लागल्यामुळें बुडाल्यासारखे झाले आहेत. आणि येथील लोकांस उत्पन्नाची बाब म्हटली म्हणजे देशांतील जमीनच काय ती शिल्लक राहिली. सुदैव आमचें कीं ही जमीन येथून परदेशांत वाहून नेतां येत नाहीं ! नाहीपेक्षां इतर धंद्यास ज्याप्रमाणें आम्ही आंचवलों त्याचप्रमाणें शेतकीचीहि व्यवस्था झाली असती." शेतकऱ्यांच्या पेढ्यासंबंधीं विवेचन करतांना ते लिहितात "शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्यास त्यांस हलक्या व्याजानें पैसे मिळण्याची योजना होऊन खेड्यांतील लोकांस करतां येतील अशा प्रकारच्या उद्योगधंद्याची देशांत अभिवृद्धि करावी लागेल." आज लोकांच्या चळवळीचे स्वरूपांत प्रगति होत असली तरी सरकारचें धोरण मात्र आहे तसेंच कायम आहे हें वरील सर्व हकीकतीवरून दिसून येईल. जमीन-विभागणी बिलाविरुद्ध शेतकऱ्यांचा मुख्य आक्षेप हाच होता कीं, जमिनीचे लहान तुकडे होण्याचें मुख्य कारण उद्योगधंद्याचा अभाव हेंच होय. त्याबद्दल कांहींच विचार व उपाययोजना न करतां लहान तुकड्यांच्या मालकांना बेकार बनवून देशोधडीला लावण्याची मात्र सरकारनें योजना केली होती. सार्वजनिक सभेच्या प्रचारकांवर सारा न भरण्याचे कट करण्याचा आरोप सरकारानें ज्या हेतूनें केला त्याच हेतूनें बार्डोलीची चळवळ ही कायदेभंगाची आहे असा सरकार आरोप करीत आहे. भडोच जिल्ह्यांतील सारावसुलीच्या जुलमाचे प्रकारासंबंधीं एका रे. अधिकाऱ्याकडून चौकशी करवून सरकारानें ते खोटे ठरविले. अशाच तऱ्हेची चौकशी बार्डोलीचे बाबतींत वल्लभभाईवर लादण्याचा सरकारनें आजहि प्रयत्न चालविला आहे. सर्व जग फिरत असलें तरी सरकारचें रेव्हिन्यू खातें मात्र अगदीं खुंटाप्रमाणें अचल आहे ! सरकारी अधिकाऱ्यांची लोकांच्या पुढाऱ्यांसंबधानें १९०१ सालीं जी मनोवृत्ति होती तीच आज कायम आहे. जमीनविभागणी बिलाचे बाबतींत सरकार ज्या प्रकारची विचारसरणी मांडीत होतें त्याच प्रकारें १९०१ सालीं मॉंटीथसाहेब त्या वेळच्या बिलासंबंधीं 'लोकांचे हक्क न बुडवितां अनुभव घेण्याची आलेली संधि सरकार दवडूं इच्छित नाहीं' असें म्हणत होते, मात्र त्या वेळीं लोकमत दुर्बल ठरलें आणि आज तें प्रभावी ठरून सरकारास जमीनविभागणी बिल मागें घ्यावें लागलें. फरक लोकांच्या संघटनेंत झाला, पण सरकारच्या वृत्तींत मात्र काडीचाहि फरक झालेला नाहीं.

## टिळकांच्या चळवळीचें परिणत स्वरूप

असो. १९०३ ते १९०८ पर्यंतच्या कालांत कॉंग्रेसचें राजकारण, वंगभंग, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण इ. विषय पुढें आले व १९१४ ते २० पर्यंत होमरूलच्या चळवळीकडेच लोकमान्यांचें लक्ष वेधलें होतें. सुधारणा कायदा अमलांत आल्यावर त्यांनीं तयार केलेल्या कॉंग्रेस लोकशाही पक्षाच्या योजनेंत शेतसारा न्याय्य व कायमचा ठरविणें व गुरचराई, जंगल इ. वर ग्रामपंचायतींचा ताबा असणें इ. शेतकऱ्यांच्या हिताच्या गोष्टी नमूद केल्या होत्या. लोकमान्यांनीं शेतकऱ्यांच्या चळवळीविषयीं १९०१ सालीं जे विचार प्रगट केले त्यावरून त्यांना शेतकऱ्यांची चळवळ कशा प्रकारें व्हावयास हवी होती हें दिसून येतें. शेतकऱ्यांच्या मालकी हक्कावर गदा आणणारें बिल पुढें आलें असतां कौन्सिलाला लोकांचा गराडा पडावयास पाहिजे व कौन्सिलाचें टेबल अर्जांच्या भारानें वांकावयास पाहिजे अशी जी त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली होती तीच परवांच्या शेतकरी परिषदेनें मूर्त स्वरूपांत आणली. सारांश, शेतकरी परिषदेंत चळवळीचें जे धोरण दिसून आलें तें लोकमान्यांनीं केलेल्या चळवळीचेंच परिणत स्वरूप होय. अन्याय्य सारा न देण्याचा सत्याग्रह करण्यासारखीं

त्या काळांत शेतकऱ्यांची जूट व संघटना होणें शक्यच नव्हतें. पण १८९६-९७ मधील दुष्काळांत 'पीक बुडालें असेल तर सारा देऊं नका' असें शेतकऱ्यांना सांगणाऱ्या सार्वजनिक सभेच्या प्रचारकांच्या मनांत करबंदीच्या चळवळीची कल्पना निःसंशय होती. आणि सरकारलाहि सारा न भरण्याच्या कटांचा संशय येत होता तो यामुळेंच. न्या.रानडे व सार्वजनिक काका यांची चळवळ म्हणजे रयत व सरकार यांच्यांत मध्यस्थी करून रयतेच्या तक्रारी सरकारास कळविणें व सरकाराकडून रयतेच्या हितार्थ सुधारणा घडवून आणणें इतक्यापुरतीच होती. आणि सार्वजनिक सभा अशी मध्यस्थी करण्याच्या उद्देशानेंच स्थापन झाली होती. लो. टिळकांनीं एक पाऊल पुढें टाकलें आणि जिल्ह्याच्या तालुक्याच्या व खेड्याच्या पुढाऱ्यांनीं लोकांना जागृत करून त्यांना आपले हक्क समजून द्यावे, व त्यांचेकडून चळवळ करवावी, आपल्या हक्कांचें संरक्षण कसें करावयाचें हे त्यांस शिकवावें अशा प्रकारची चळवळ सुरू केली. आणि याच चळवळीची आणखी परिणति होऊन शेतकरी स्वतःच आपल्या हक्काला जपण्यास व अन्यायाला संघटितपणें तोंड देण्यास समर्थ होईल ही कल्पना त्यांना होती हे त्यांच्या लेखावरून स्पष्ट दिसतें हेंच परिणत स्वरूप महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या चळवळींत लवकरच पूर्णपणें दृष्टीस पडूं लागेल अशी परवांच्या परिषदेनें आशा उत्पन्न केली आहे.

## बार्डोलीचें स्फूर्तिदायक प्रयोगक्षेत्र

'यापुढें शेतकरी आपल्या स्वतःच्या पायावर उभा राहील. सुशिक्षित चळवळ्यांची मदत मिळाली तर ती घेईल, ती नको आहे असे नाहीं, पण ती नसली तरीहि शेतकरी स्वतःच्या प्रयत्नानें आपल्या हक्कांचें रक्षण संघटितपणें करील' अशी भाषा कित्येकांच्या तोंडून परिषदेंत निघाली. पण तशी प्रत्यक्ष स्थिति अजून आलेली नाहीं. सारावाढ बिल व विभागणी बिल यांच्यायोगानें येणाऱ्या आपत्ती शेतकऱ्यांना दुसऱ्यांनीं समजून दिल्यावरच आजची चळवळ झाली. पण अशा रीतीनें समजन दिल्यावर तरी शेतकरी लोकांनीं हजारों अर्ज पाठविणें व प्रत्यक्ष पुण्यास येऊन कौन्सिल हॉलपर्यंत जाऊन आपलें म्हणणें आपल्या प्रतिनिधींपुढें मांडणें या गोष्टी त्यांनीं केल्या. सारांश, शेतकरी आतां आपले हितरक्षण करण्यास समर्थ आहे असें उघड बोलण्याइतकी परिस्थिति प्राप्त झाली आहे. प्रत्येक जिल्ह्यांत व तालुक्यांत शेतकऱ्यांचे संघ स्थापन झाले व चळवळ करण्याच्या सर्व आधुनिक पद्धती अमलांत आणून ते संघ आपलें हितरक्षण सदैव जागेपणानें करूं लागले म्हणजेच आजचें बोलणें खरें कृतींत उतरेल. आणि तेव्हांच खरोखर शेतकऱ्यांच्या चळवळींत सुशिक्षित लोकांची प्रेरक--चालकाची भूमिका जाऊन निवळ सहकाऱ्याची भूमिका त्यांस प्राप्त होईल. स्वावलंबी व स्वाश्रयी असा शेतकरीच सत्याग्रही बनू शकेल. सत्याग्रहाची तयारी झाली पाहिजे असें शेतकरी परिषदेंत अध्यक्ष व इतर वक्ते यांनीं वारंवार बोलून दाखविलें. १८९६ च्या चळवळींत जी करबंदीची कल्पना मनांत होती तिला मूर्त स्वरूप आणून तिचें सप्रयोग शिक्षण महात्मा गांधींनीं अलीकडे जनतेस दिलें आहे. यामुळें सभा, निषेध, अर्ज इ. मार्गांनीं सरकार ताळ्यावर न आल्यास जरूर तर सत्याग्रहहि आपण करूं अशी उमेद शेतकऱ्यांना वाटूं लागली आहे. बार्डोली हें राष्ट्रांतील शेतकऱ्यांना ह्या चळवळीचे वस्तुपाठ देणारें एक स्फूर्तिदायक प्रयोगक्षेत्र बनलें आहे. शेतकरी परिषदेंत प्रत्येक वक्त्याचें भाषणांत बार्डोलीचा हा प्रभाव दिसून आला. हा प्रभाव अल्पकालीन न ठरतां चिरस्थायी होवो अशीच कोणाहि शेतकऱ्याच्या हितचिंतकाची इच्छा असणार.

## सरकारनिर्मित भेदभाव

शेतकरी स्वतःच आपल्या हक्कसंरक्षणाचे प्रयत्न करूं लागल्यावर त्यांची चळवळ जुन्या चळवळीपेक्षां अधिक प्रभावी ठरणार हें निश्चित आहे. पण येवढ्यानें या जुन्या चळवळीचें महत्त्व कमी होत नाहीं. कारण त्या चळवळींच्या पायावरच नव्या चळवळीची उभारणी होत आहे. बहुजनसमाज जागृत होऊन स्वतः चळवळ करील तीच खरी चळवळ पण तत्पूर्वी सुशिक्षितांनीं त्यांच्या हितासाठीं अगर त्यांना जागृत करण्यासाठीं चळवळ केल्यामुळेंच ही आतांची चळवळ आपल्याला दिसूं लागली आहे. महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या चळवळीचें आतांपर्यंत जें समालोचन केलें त्यांत केवळ शेतकऱ्यांशीं साक्षात् संबंध येणाऱ्या गोष्टींचाच उल्लेख केला आहे. पण तसें पाहिलें तर रानड्यांनीं आर्थिक परिषदेंत हिंदुस्थानाच्या आर्थिक परिस्थितीसंबंधानें केलेली जागृति, सार्वजनिक काकांचीं लवाद कोर्टें व स्वदेशी, ना. गोखले यांची प्राथमिक शिक्षणासंबंधीं खटपट इ. गोष्टी बहुजनसमाजाच्या म्हणजे शेतकऱ्यांच्याच हिताच्या नव्हत्या काय? आमच्या देशांतील परकीय राज्यकर्ते आमच्यांत जे नसते भेदभाव उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत असतात त्यांपैकींच सुशिक्षित व सामान्य जनता हा एक भेद होय. ही भेदभावाची भाषा पुनः पुनः उच्चारून त्यांनीं आमच्यातील कित्येक लोकांच्या मनांत भरवून दिली आहे. त्यांतच जातिवैशिष्ट्याची भर घालून त्या भेदाचा उच्चार वेळीं अवेळीं हे लोक करीत असतात.

## लोकमान्यांची व्यापक चळवळ

लोकमान्य टिळकांनीं फक्त पुढारलेल्या वर्गा-

करितां चळवळ केली हा आक्षेप त्यांच्या हयातींतच पुढें आला होता व त्यांच्या पश्चात्‌हि त्यान्ना वारंवार उच्चार होत आहे! एका बाजूनें तत्कालीन सुशिक्षित पुढाऱ्यांनीं टिळकांना 'तेल्या-तांबोळ्यांचे पुढारी' म्हणून त्यांची हेटाळणी केली तर दुसऱ्या बाजूनें ते केवळ पुढारलेल्या वर्गांचे हितकर्ते होते, मागसलेल्यांकरितां त्यांनीं कांहीं केलें नाहीं, असा कित्येक मागासलेल्यांतर्फे बोलणारांनीं त्यांच्यावर आक्षेप घेतला! हा दुसरा आक्षेप त्यांच्यापुढें एका विद्यार्थ्यानें प्रत्यक्ष मांडला असतां त्यांनीं पुढील आशयाचें उत्तर दिलें होतें. "वर्गविशिष्ट अशी कोणती चळवळ मी केली? न्यू इंग्लिश स्कूल काढलें त्यांत अमुकच वर्गांचे विद्यार्थी घ्यावयाचे असा कांहीं मी नियम केला नव्हता. पुढें केसरी काढला तो अमुक एका वर्गाकरितां असा नव्हता व प्रत्यक्ष केसरीच्या वर्गणीदारांची यादी पाहिली तर त्यांत सर्व वर्गांचे लोक आढळतील. दुष्काळ व प्लेग यांत एकाच वर्गाचे लोक मरत होते असें नाहीं. मद्यपाननिषेधानें कांहीं एकाच विशिष्ट वर्गाचें हित साधत नव्हतें. शिवाजी उत्सव व गणेशोत्सव यांत सर्व वर्गांचे लोक भाग घेतात. स्वदेशी—बहिष्काराच्या चळवळीनें कांहीं एका विशिष्ट वर्गाचा फायदा होणार नव्हता. पंचांगें सर्वच वर्ग वापरतात, गीतारहस्य हें सर्व वर्गांनीं वाचावें म्हणूनच मी मराठींत लिहिलें आणि मी होमरूल मागतों तेंहि कांहीं एका विशिष्ट वर्गाकरितां मागतों असें नाहीं. समाजाच्या सेवेचीं व उद्धाराचीं अनेक कामें आहेत त्यांतील सर्वच एका व्यक्तीला करतां येणें शक्य नाहीं. माझ्या बुद्धीला, स्वभावाला रुचलीं तीं कार्यें मी उचललीं; पण यापैकीं कोणतेंहि कार्य मी वर्गविशिष्ट दृष्टीनें केलेलें नाहीं. सामान्य लोकहिताच्या दृष्टीनेंच मी सर्व चळवळी केल्या."

## हेतुपूर्वक विपर्यास

लोकमान्यांच्या कृतीवरून त्यांनीं वर्गविशिष्ट चळवळ केली असें सिद्ध करतां येणें कठीण असल्यामुळें त्यांच्या कांहीं उक्तींचा हेतुपुरस्सर विपर्यास करून तो आरोप सिद्ध करण्याचा अलीकडे कित्येक दिवस प्रयत्न सुरू आहे. उदाहरणार्थ 'कौन्सिलांत शेतकऱ्यांनीं जाऊन तेथें नांगर धरावयाचा आहे कीं काय!' अगर 'वाण्यानें तेथें जाऊन तेल--तूप वजन करावयाचें आहे कीं काय!' अशा अर्थाचें त्यांच्या व्याख्यानांतील एकादें वाक्य पुढें करून टिळकांना या सुधारणा एका विशिष्ट वर्गाकरितां पाहिजे होत्या असें भासवण्यांत येतें! कौन्सिलांतील जातिविशिष्ट निवडणुकीविरुद्ध विवेचन करतांना वरील अर्थाच्या वाक्यांप्रमाणेंच 'ब्राह्मणांनीं तेथें जाऊन वेदपठन करावयाचें आहे कीं काय?' असेंहि ते म्हणत असत. हें सांगण्याचा त्यांचा उद्देश असा असे कीं, कौन्सिलांत अमुक एका जातीचा किंवा धंद्याचा इसम या नात्यानें कोणाचेंच काम नाहीं. ब्राह्मणाला ब्राह्मण या नात्यानें अगर वाण्याला वाणी या नात्यानें तेथें कांहीं करावयाचें नसतें. जो सार्वजनिक हिताचे दृष्टीनें, निर्भीडपणें, कोणत्याहि लोभास बळी न पडतां सरकाराशीं झगडेल, तो कोणत्याहि जातीचा धंद्याचा अगर वर्गाचा मनुष्य असो, त्याला तुम्ही निवडून द्या असेंच त्यांचें सांगणें होतें. कौन्सिलांत जातवारीच्या निवडणुकीची कांहीं जरूरी नाहीं हा मुद्दा लोकांच्या मनावर ठसविण्यासाठीं त्यांनीं उच्चारलेल्या वाक्यांपैकीं एकादें वाक्य घेऊन त्यांच्या धोरणाबद्दल गैरसमज करण्याच्या पद्धतशीर प्रयत्नानें, तेवढेंच वाक्य, तें कोठें कोणत्या विषयानुरोधानें उच्चारलें गेलें याची फारशी चौकशीहि न होतां, कित्येकांच्या मनांत दृढमूल होऊन बसतें. खरें पाहिलें तर सुशिक्षितांनीं शेतकऱ्यांच्या हितार्थ झटलें पाहिजे असा इषारा टिळकांनींच वारंवार दिला आहे. 'सुशिक्षितांचें कर्तव्य' या लेखांत ते म्हणतात "शेतकऱ्यांच्या जमिनीचा सारा थकला कीं त्या जप्त करून सरकारनें आपल्या ताब्यांत घ्याव्या, तीस--तीस वर्षांनीं सारे वाढवावे, आणि शेतकीचे उद्योगधंदे हळूहळू बुडवून टाकावे, पण त्यास आम्ही नांवे ठेवूं नयेत; इतकेंच नव्हे तर, गंगा नदीप्रमाणें विलायतेच्या स्वर्गाहून हा राजनीतीचा ओघ आमचें आचंद्रार्क कल्याण करण्याकरितांच या देशांत येऊन थडकला असें आम्ही मानावें, हें धोरण किंवा मुत्सद्दीपणा सुशिक्षित वर्गास उत्तरोत्तर अधिकाधिक अप्रिय होत जाईल अशी आमची खात्री आहे." सुशिक्षितांना शेतकरी आपला व आपण शेतकऱ्याचे असें वाटावयास पाहिजे असेंच ते नेहमीं म्हणत.

## टिळकांची अपूर्वता

एकानें लोकमान्यांस 'तेल्या—तांबोळ्याचे' पुढारी म्हणावें व दुसऱ्यानें त्यांस फक्त 'पुढारलेल्या' वर्गाचे हितकर्ते म्हणावें या उलटसुलट आक्षेपांमुळें दोषांचा संक्षेप होऊन दोन निसर्गभिन्नास्पद गुणांचा समुच्चय मात्र सिद्ध होतो व लोकमान्यांच्या आयुष्याची एक अपूर्वता दिसते. कारण विद्वत्ता व बुद्धिमत्ता यांचे योगानें केवळ सुशिक्षितांस प्रिय असा संशोधनाचा व ग्रंथ लेखनाचा उद्योग त्यांनीं आयुष्यभर केला असता तर त्यांनीं फुरसुतीच्या वेळांत केलेल्या ग्रंथरचनेसारखीच आणखीहि पुष्कळ ग्रंथरचना त्यांनीं केली असती. पण देशाच्या परिस्थितीकडे लक्ष देऊन त्यांनीं लोकांकरितां सरकाराशीं झगडण्याचा व सामुदायिक चळवळीचा मार्ग पत्करला. आणि अशा

रीतीनें सुशिक्षित व अशिक्षित या दोघांसहि ते सारखेच वंदनीय झाले.

असो. लोकमान्यांनीं म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानांत आजच्या स्थितींत शेतकऱ्यांचा प्रश्न हा सर्व राष्ट्राचा प्रश्न होतो. या प्रश्नावर गेल्या परिषदेंत सर्व पक्षांचें ऐक्य दिसून आलें हें जमीन-विभागणी व सारावाढ या बिलांचे एक प्रकारें उपकारच मानले पाहिजेत. वाइटांतूनहि चांगलें निघतें तें असें. सरकारी घातक धोरणानें शेतकरी खडबडून जागा झाला व सर्व पक्ष एकदिलानें त्यांच्या चळवळीस पाठिंबा देण्यास सिद्ध झाले. परिषदेच्या अध्यक्षांनीहि आपल्या भाषणांत परिषदेच्या अपूर्व प्रसंगाचें सर्व श्रेय सरकारला दिलें, आहे. पण त्यांनीं सांगितल्याप्रमाणें हा सर्व प्रकार म्हणजे एक वाऱ्याची लाट उठून ओसरून गेल्याप्रमाणें होऊं नये. यासाठीं सर्वांनींच खटपट केली पाहिजे.

# सहकारितेचें सोंग सजविलें !

सांप्रतचें मुंबई–कायदेकौन्सिल हें लोकपक्षाचे दृष्टीनें भरंवशाचें कुळ नव्हे याचा कटु अनुभव यापूर्वीं अनेक वेळां आलाच आहे. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतिक कायदेकौन्सिलांत मुंबई–कायदेकौन्सिल अत्यंत नादान कौन्सिल असल्यानें त्यांत सायमन कमिशनाशीं सहकारिता करणारी कमिटी नेमण्याचा ठराव येण्याचा अवकाश कीं तो बहुमताच्या जोरावर हटकून पास होईल अशीच सर्वांची अटकळ होती. आणि तशांत सायमनसाहेब हिंदुस्थानांतील कडकडीत बहिष्काराचा तडाखा खाऊन आपल्या षड्ग्रहींसह विलायतेस परत गेल्यानंतर त्यांनीं सुरू केलेल्या फितुरीच्या कारवाईपुढें बंगाल–कौन्सिलासारखा लोकपक्षाचा मजबूत किल्ला जर ढांसळून पडला तर मुंबई–कौन्सिलाची भंगलेली गढी गडगडून खालीं यावी यांत नवल काय ?

पण राजकीय दृष्टया ज्ञातिकलहानें मुंबई–कौन्सिलाचा पाया अशा रीतीनें आंतून पोखरलेला असला तरीहि कांहीं आगंतुक कारणामुळें कमिटीचा डाव टाकल्यास तो अंगलट येईल की काय अशी मुंबई–सरकारास धास्ती वाटत होती. मुंबई–सरकारावरील या संकटानें कौन्सिलच्या चालू बैठकींत प्रारंभीं फारच उग्र स्वरूप धारण केलें होतें. कौन्सिलापुढें जमीनधारावाढ बिल, जमीनविभागणीप्रतिबंधक बिल व फोटोनोंदणी बिल हीं तीन महत्त्वाचीं बिलें मंजुरीकरितां येण्याचें मुकर ठरलें असल्यानें लोकमत क्षुब्ध झालें होतें. हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांच्या डोक्यावरील कराचा बोजा वाढविणें, त्यांच्या मालकी हक्कावर गदा आणून त्यांना मजूर बनविणें व विनाकारण अधिक खर्चांत घालणें अशा त्रिविध विषानें माखलेली ही बिलांची कट्यार शिरावर लटकत असतां कोणताहि लोकनियुक्त सभासद मनाची लाज नसली तरी जनलज्जेस्तव सायमन कमिशनाबरोबर सहकार्य करण्यास धजणार नाहीं अशी सरकारला भीति होती. सदर बिलांविरुद्ध ठिकठिकाणीं भरलेल्या शेतकऱ्यांच्या प्रचंड सभा, त्यांजकडून आलेले हजारों अर्ज व कौन्सिल हॉलच्या दरवाजापाशीं निषेधार्थ जमलेले शेतकऱ्यांचे थवे पाहून सरकारला सायमन कमिशनाचा प्रश्न व शेतकऱ्यांचा प्रश्न यांची गुंतागुंत करणें धोक्याचें वाटलें. सायमन कमिशनाच्या पायावर शरणागतीचें लोटांगण घालण्याला मुसलमान व ब्राह्मणेतर पक्षाचे लोक मनांतून उत्सुक असले तरी वरील तीन बिलें काढून घेतलीं तरच कमिटी नेमण्याच्या ठरावास ब्राह्मणेतर पक्षानें संमति देणें हें तितकें लोकांच्या डोळ्यावर येणार नाहीं अशी सदर पक्षाच्या पुढाऱ्यांनीं सरकारास गळ घातली असल्यास नवल नाहीं. आणि सिंधमधील मुसलमान गाडदी सरकारी हुकुमाचे बंदे बनून सरकार सांगेल त्यावर वार करण्यास खडे असले तरी ब्राह्मणेतरांचा कंपू आपल्या बाजूस वळविल्यावांचून सरकारास यशाची खात्री वाटत नव्हती.

मुसलमानांच्या दाढ्या केव्हांहि आपल्या बाजूनें हलाव्या यासाठीं सरकारनें सिंध लँड ॲलिअनेशन बिलाचा मलिदा त्यांजकरितां आगाऊ कालवून ठेवलाच होता. आणि ब्राह्मणेतरांचे नेहमीं आपल्या तर्फेनें उडणारे शेमले सायमन कमिशनाच्या प्रसंगीं उलटतील तर त्यांची आपल्या चरणावरील निष्ठा अढळ राहाण्याकरितां सरकारनें वरील तीनहि बिलें तूर्त तहकूब करण्याचें ठरविलें. हीं बिलें सरकारनें कायमचीच गाडून टाकलीं असें नाहीं. त्यांना तीं पुढील कोणत्याहि बैठकींत पुनः सजवून आणून सोडतां येतील. परंतु ब्राह्मणेतर पक्षाचें कोल्हें काकडीच्या एवढ्याच तुकड्याला राजी झालें व त्या तुकड्याकरितां सरकारच्या व सिंधी मुसलमानांच्या हातांत हात घालून सर चुनीलाल मेहता यांनीं चेतविलेल्या चितेंत स्वदेशभक्तीची व स्वाभिमानाची राखरांगोळी करून घेण्यास उभें राहिलें.

तारीख १ ऑगस्ट हा लो. टिळकांच्या पुण्यतिथीचा दिवस. लो. टिळक ही देशभक्ति व स्वाभिमान यांची प्रत्यक्ष मूर्ति. त्यांच्या पुण्यतिथीच्या निमित्तानें सर्व हिंदुस्थान देशभक्ति व स्वाभिमान

या दोन सद्गुणांचा उत्सव साजरा करण्यांत दंग असतां मुंबई-कौन्सिलाच्या पुण्यांतील बैठकींत विपरीत प्रकार सुरू होता. मुंबई-कौन्सिल ही त्या वेळीं दहनभूमि बनली असून तिजवर हिंदी लोकांची स्वदेशभक्ति व स्वाभिमान या दोन राष्ट्रीय सद्गुणांची चिता रचण्यांत आली होती आणि हें चिता रचण्याचें दुष्कृत्य कोणा निगरगट्ट बज्या गोऱ्या अधिकाऱ्यानें आपल्याकडे घेतलें नसून मुंबई-सरकारचे हिंदी गृहमंत्री सर चुनीलाल मेहता यांजवर सोंपविण्यांत आलें होतें. सर चुनीलाल मेहता स्वतः सरकारी अधिकारी, व त्यांनीं कौन्सिलपुढें सायमन कमिशनाबरोबर सहकार्य करणारी कमिटी नेमण्याचा मांडलेला ठरावहि सरकारतर्फेंचा, त्याअर्थी सदर चितेस गोवऱ्या व लांकडें पुरवण्याचा मक्ता केवळ सरकारी अधिकाऱ्यांनीं व सरकारानें नेमलेल्या इतर सभासदांनींच पत्करला असेल अशी कोणी आपली समजूत करून घेतील तर ती मात्र चुकीची आहे. सदर कार्यास हातभार लावण्यास जसे काळे-गोरे सरकारी अधिकारी व सरकारनें नेमलेले बिन सरकारी सभासद सरसावले होते तसेंच मुंबई-कायदेकौन्सिलाचे कित्येक लोकनियुक्त सभासद व लोकनियुक्त सभासदांतून निवडलेले दिवाण यांसहि तें काम करण्यास खंती वाटली नाहीं !

सायमन कमिशनाबरोबर सहकार्य करण्यासाठीं सर चुनीलाल मेहता यांनीं आणिलेल्या ठरावावर बेचाळीस वक्त्यांचीं उलट-सुलट भाषणें दोन दिवस चाललीं व अखेर ठरावास अनुकूल चौसष्ट व प्रतिकूल चाळीस मतें पडून ठराव मंजूर झाला ! अनुकूल मतें देणारांत १५ सरकारी अधिकारी, ४ मुंबई-सरकारचे कार्यकारी मंत्री, ३ दिवाण, ६ युरोपियनांनीं निवडलेले युरोपियन सभासद, ६ सरकारनें नेमलेले बिनसरकारी सभासद, २० मुसलमान, ८ ब्राह्मणेतर व २ इनामदार होते. सरकारी अधिकारी व सरकारनें नेमलेले सभासद वगळून नुसत्या लोकनियुक्त सभासदांनीं सदर ठरावावर मतें द्यावीं अशी योजना सरकारनें ठरविली असती तर ठरावास अनुकूल ३१ व प्रतिकूल ४० मतें पडून ठराव नापास झाला असता. खरें लोकमत समजून घ्यावयाचें तर अशीच योजना होणें इष्ट असून तशा अर्थाची सूचना आमदार पाटसकर यांनीं कौन्सिलाचे अध्यक्ष ना. देहेलवी यांजकडे पाठविलीहि होती. परंतु ती त्यांनीं नियमबाह्य ठरवून फेटाळून लावली ! आणि या गोष्टीचा फायदा घेऊन सरकारी अधिकारी, कार्यकारी मंत्री, सरकारनियुक्त सभासद व दिवाण यांनीं ठरावास अनुकूल मतें दिलीं; इतकेंच नव्हे तर त्यावरील वादविवादांत शिरून रेव्हिन्यू मेंबर ना. न्यू यांनीं बर्कनहेडसाहेबासारखी जेतेपणाची दर्पोक्ति काढून हिंदी लोकांस चिडविण्यास आणि मुसलमान मंत्री ना. हिदायतुल्ला व दिवाण मौ. रफिउद्दीन अहमद यांनीं हिंदु सभासदांस टोले देऊन खिजवण्यास कमी केलें नाहीं ! मौ. रफिउद्दीन अहमद हे दिवाण नवे तरी आहेत. परंतु सात वर्षें दिवाणगिरींत मुरून आतां कार्यकारी कौंसिलांतील मंत्रिपदावर चढलेले हिदायतुल्ला यांनींहि आपली जबाबदारी न ओळखतां एखाद्या वावदूक मुसलमानाप्रमाणें आपल्या भाषणांत हिंदुद्वेष व इस्लामी दुरभिमान प्रकट करावा याचें कोणासहि सखेदाश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. हिंदु दिवाणांनीं ठरावास अनुकूल मतें दिलीं खरीं; पण सरकारची तळी उचलतांना तोंडाला घातलेलें कुलूप मुसलमान दिवाण-मंत्र्याप्रमाणें त्यांनीं उघडलें नाहीं ही मेहरबानीच समजावयाची !

सायमन कमिशनावर बहिष्कार घालण्याचें हिंदी राष्ट्रानें कां ठरविलें याचीं कारणें जगजाहीर आहेत. ब्रिटिश पार्लमेंटानें कमिशन निवळ युरोपियन सभासदांचें नेमून हिंदी लोकांचा स्वयंनिर्णयाचा हक्क काढून घेतला, त्यांजविषयीं अविश्वास दर्शवून हिंदी लोक स्वतःस हवी असलेली राज्यपद्धति ठरविण्यास अपात्र आहेत असा त्यांच्या कपाळावर नालायकीचा छाप मारला आणि अशा रीतीनें हिंदी राष्ट्राचा उपमर्द केला. या उपमर्दाबद्दल ज्यांस स्वाभिमानाची यत्किंचित् चाड आहे असे देशांतील हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, पार्शी, जहाल, मवाळ, राष्ट्रीय, लिबरल, या सर्वांनीं कमिशनाशीं काडीचाहि संबंध न ठेवण्याचें ठरविलें आहे. असे स्वाभिमानी गृहस्थ मुंबई कौन्सिलांतील सर्व जातींच्या व धर्मांच्या सभासदांत असून त्यांनीं सर चुनीलाल यांच्या ठरावास जोराचा विरोध केला. या विरोधकांत स्वतःस ब्राह्मणेतर पक्षाचे अगर मुसलमान पक्षाचे न म्हणविणारे पण वस्तुतः अब्राह्मण व मुसलमान असणारे अनेक गृहस्थ होते. किंबहुना मुंबई कौन्सिलांत जातीनें ब्राह्मण असे सभासद मूठभरहि नसून सगळा भरणा अब्राम्हण, मुसलमान, पार्शी यांचाच आहे. अथवा अन्य रीतीनें बोलावयाचें झाल्यास कौन्सिलांतील ठरावावरील लढा ब्राह्मणेतर-ब्राह्मणेतरांत व मुसलमान-मुसलमानांतच होता असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं.

सरकारला पाठिंबा देणाऱ्या सभासदांनीं या वादांत आपल्या अकलेचें मासलेवाईक प्रदर्शन केलें. डोंगरसिंग पाटील म्हणाले, 'कमिशनांत हिंदी लोक नाहींत ही चूक झाली खरी. परंतु पार्लमेंटानें एक चूक केली म्हणून कमिशनावर बहिष्कार घालण्याची आम्ही दुसरी चूक करावी काय? असहकारिता बेसनदशीर आहे.' बोले बोलले ' ब्राह्मणांचे पुढारी इंडिया ऑफिसांत आहेत व पार्शांचे पुढारी पार्लमें-

टांत आहेत. ब्राह्मणेतरांस असें साधन नसल्यामुळें आम्ही कमिशनाबरोबर सहकार्य करणार!' डॉ. सोळंके यांनीं आलाप काढले कीं, हिंदु लोकांनीं अस्पृश्यांस न्यायानें व माणुसकीनें वागविलें नाहीं म्हणून आम्ही कमिशनबरोबर सहकार्य करणार!' जणूं काय यांना हे बोल शिकविणाऱ्या परक्या अधिकाऱ्यांनीं गेल्या दीडशें वर्षांत यांच्यावर माणुसकीचा वर्षावच केला आहे! "हिंदु लोक सिंध प्रांत वेगळा करण्यास तयार नाहींत म्हणून आम्ही कमिशनाबरोबर सहकार्य करणार" असें नूरमहंमद उद्गारले. कमिशनचे कोणतेहि गुण सांगण्यासारखे नसल्यामुळें त्यांना सिंध विभागणीच्या वादाचें निमित्त हुडकून काढून त्याचा टेकू घ्यावा लागला. ब्राह्मणेतरांचें स्वयंमन्य पुढारी भास्करराव जाधव यांनीं सांगितलें कीं, 'कमिशनावर बहिष्कार घालून ब्राह्मणेतरवर्गाचें हित साधणार नाहीं म्हणून आम्ही सायमन कमिशनाबरोबर सहकार्य करणार.' पण सहकार्यानें काय फायदा होणार याचा खुलासा त्यांनीं केला नाहीं. सरकारचें बहुमत होण्यापुरतीं मेंढरें डोळे मिटून त्यांचे मागें येण्यास तयार असल्यावर त्यांनीं तरी इतक्या खोलांत कां शिरावें ? खा. ब. भुतो यांनीं सर्वांवर ताण करून कमिशनांत हिंदु व मुसलमान सभासद असले तर त्यांनीं एकमेकांचे केस उपटले असते अशा भीतीचें काल्पनिक भूत उभें केलें.

मुंबई–सरकारचे रेव्हिन्यू मेंबर ना. न्यू पक्के ब्युरोक्रॅट आहेत. पण त्यांसहि स्वतःचा देश व त्याजबद्दलची भक्ति असल्याकारणानें स्वदेशाची आठवण होऊन व त्याचा अपमान झाल्यानें आपणास काय वाटलें असतें याची कल्पना येऊन ते म्हणाले 'हिंदी लोकांना कमिशनमध्यें घेतलें नाहीं. म्हणून राग येणें साहजिक आहे.' परंतु ज्यांना देशाभिमान असेल त्यांनाच देशाचा अपमान झाल्याबद्दल राग येणार ! पण कौन्सिलांतील ब्राह्मणेतर, मुसलमान व अस्पृश्य यांना ना देश, ना देशाभिमान, ना देशहित. आणि ज्यांना देशहित कळत नाहीं त्यांना स्वतःच्या जातीचेंहि खरें हित साधतां येणार नाहीं. त्यांना फार तर स्वतःकरितां व स्वतःच्या आप्तेष्टांकरितां सरकारी नोकऱ्या मिळवून घेतां येतील. जातीचें अगर वर्गाचें नांव सांगून स्वतःचा स्वार्थ साधण्याचा हा ब्राह्मणेतर, अस्पृश्य व मुसलमानपक्षीयांचा कावा आहे. पण सबंध देशाचें हित साधल्यावांचून कोणत्याहि एका जातीस आपलें खरें हित साधून घेणें शक्य आहे काय ?

हिंदुस्थानांत शेतकरी वर्ग ८० टक्के आहे. श्री. भास्करराव जाधव स्वतःस एवढ्या प्रचंड शेतकरी वर्गाचे पुढारी म्हणवीत असतील व सायमन कमिशनास शरण जाऊन त्या वर्गाचें कल्याण करावें अशी त्यांची इच्छा असेल तर त्या कल्याणांत साऱ्या हिंदुस्थानाच्या कल्याणाचा समावेश सहजच होतो हें भास्करराव यांस माहीत नाहीं काय? इंग्रज सरकारास जर शेतकरी वर्गाचें कल्याण करावयाचें होतें व सरकाराशीं सहकार्य करून गोडीगुलाबीनें प्रत्येक गाऱ्हाण्याचा समाधानकारक निकाल लावून घेणें शेतकरी वर्गास शक्य असतें तर जमीनविभागणी बिल, सारावाढ बिल, व फोटोनोंदणी बिल यांविरुद्ध मुंबई इलाख्यांतील शेतकरी वर्गावर आकाशपाताळ एक करून सोडण्याची पाळी मुंबई–सरकारनें कां आणिली असती? या दृष्टीनें ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी विशिष्ट जातीच्या अगर वर्गाच्या खऱ्या हितबुद्धीनेंहि प्रेरित झाले नसून व्यक्तिविषयक स्वार्थानें अंध झाले आहेत असेंच म्हणावें लागतें. आणि या व्यक्तिविषयक स्वार्थाची मुंबईच्या कौन्सिलांत थोडींथोडकीं उदाहरणें आहेत असें नाहीं. सर चुनीलाल मेहता, ना. हरिलाल देसाई व गोविंदराव प्रधान हे मंत्रिपदाच्या अगर दिवाणगिरीच्या शीतळ छायेखालीं बसून स्वार्थ साधीत नसते तर त्यांनीं सायमन कमिशनाशीं सहकार्य करणाऱ्या कमिटीवर बहिष्कार घालण्यासच संमति दिली असती.

व्यक्तिस्वार्थाला कोणीं ज्ञातिहिताचें तर कोणीं बुद्धिवादाचें पांघरूण घालून मुंबई–सरकारचा हा डाव साधण्यास मदत केली अशांच्या तीव्र निषेधाबरोबरच बहिष्कारवादी लोकपक्षीय सभासदांचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच होणार आहे. अखेर सरकारच्या बाजूला बहुमत होणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसत असतांहि या सभासदांनीं लोकपक्षाचे मुद्दे व भावना या खणखणीत व निःसंदिग्ध रीतीनें सरकारापुढें मांडल्या व कमिटी नेमण्याचें ठरल्यावरहि निवडणुकीच्या कामांत भाग घेतला नाहीं याबद्दल त्यांचें आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतों. समाजांतील असंतुष्ट व तुटक तृतीयपंथी वर्गांना बगलेंत मारून सहकारितेचें सोंग सजविण्यास देखील सरकारला अनेक लटपटी कराव्या लागल्या आणि सहकारितेचें समर्थन करतांनाहि सरकारला व त्यांच्या बगलबच्च्यांना कमिशनाचा कोणताहि गुण दाखवितां आला नाहीं, उलट त्याचे दोषच कबूल करावे लागले, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. बहिष्कारवादी लोकपक्षीय सभासदांनीं केलेल्या कामगिरीचें चीज करावयाचें असेल तर त्यांच्याच पाठीमागें देशांतील बहुजन–समाज आहे हें येत्या आक्टोबरांत कमिशन हिंदुस्थानांत येईल त्या वेळच्या सार्वत्रिक निषेधाच्या चळवळीनें सिद्ध

केलें पाहिजे. कौन्सिलांत लोकमताचें थोडेंबहुत प्रतिबिंब पडत असलें तरी तें नेहमींच पूर्णपणानें दिसतें असें नाहीं. याचें कारण कौन्सिलाचें हल्लींचें विकृत स्वरूप होय. बहिष्काराच्या चळवळीनें सुधारणांचें हें विकृत स्वरूपहि आपोआपच स्पष्ट दिसून येईल.

# लढाऊ आरमार हिंदी का ब्रिटिश ?

## ( पूर्वार्ध )

महायुद्धाच्या ऐनदंगलींत जर्मनीच्या 'एमडेन' जहाजानें हिंदुस्थानांतील किनाऱ्यावर आपला प्रताप दाखविला व त्यानें आपल्या सामर्थ्याची खात्री इकडील लोकांना पटविल्यामुळें इंग्रजांना चांगली दहशत बसली. अर्थात् व्हर्सेलीसच्या तहानंतर जरी युरोपिअन राष्ट्रें व अमेरिका शांततेच्या गोष्टी बोलत आहेत व युद्धाचा प्रसंग येणें म्हणजे दैवी प्रकोपामुळें एक मोठें संकट ओढवणेंच होय व त्या संकटाचा प्रतिकार सर्व राष्ट्रांनीं जुटीनें करावा अशा प्रकारचीं उदात्त तत्त्वें जरी लीग ऑफ नेशन्समार्फत अगर आणखी एखादा 'शांततासंघ' स्थापून त्या संघामार्फत प्रस्थापित होत असलीं तरी प्रत्येक राष्ट्र भावी महायुद्धाची तयारी झपाट्यानें करीत आहे असें आढळून आल्याशिवाय राहत नाहीं. इंग्लंडाचे परराष्ट्रीय मंत्री सर ऑस्टिन चेंबर्लेन यांनीं तर आतां असे उघड उघड जाहीर केलें आहे कीं "साम्राज्यानंतरच लीग ऑफ नेशन्सचा विचार आपणाला कर्तव्य आहे व तेंच युक्त आहे." हेंच धोरण इंग्लंडाने गेलीं १० वर्षे प्रच्छन्नपणें ठेवलें आहे व त्याला अनुसरून पूर्वेकडील राष्ट्रांवर इंग्रजांना आपल्या आरमारी सामर्थ्याचा वचक बसविण्याकरितां नवीन आरमार तयार करणें जरूर पडलें व त्याकरितां हिंदुस्थानाच्या तिजोरीवर जितका हात चालेल तितका चालवावा ही भावना त्यांच्या मनांत उत्पन्न झाली असल्यास नवल तें काय? १९२० पर्यंत हिंदुस्थानाचें लढाऊ आरमार असें मुळींच नव्हतें. फक्त व्यापारसंरक्षणाकरितां, किनाऱ्याची देखरेख करणारें थोडेंफार आरमारी सैन्य होतें इतकेंच काय तें. हिंदुस्थानाच्या किनाऱ्याचें संरक्षण करण्याची जबाबदारी साम्राज्यसत्तेवर आहे. याकरितां हिंदुस्थानानें ब्रिटिश सरकारला लढाऊ आरमाराच्या खर्चाकरितां म्हणून दरवर्षी १ लाख पौंड बजेटांत खर्ची टाकावे व महासागराचें सार्वभौमत्व इंग्लंडाकडे आहे, अर्थात् भिण्याचें कारण नाहीं असें म्हणत आशाळभूताप्रमाणें तोंड वांकडें करून बसावें अशी स्थिति होती. पण परकीय राज्यसत्तेपुढें केवळ कागदोपत्री व शाब्दिक इलाज चालणें शक्य नाहीं हेंहि खरेंच!

**पूर्वेतिहास**—या हिंदी लष्करी आरमाराचा ( Royal Indian Marine ) पूर्वेतिहास असा आहे. सुमारें ३०० वर्षांपासून हिंदुस्थानाच्या किनाऱ्याशीं इतर राष्ट्रांचा व्यापारी व आरमारी संबंध चालू आहेत. अर्थात् त्या वेळींहि ईस्ट इंडिया कंपनीचें एक लहानसें लष्करी आरमार होतें. १६३० ते १८३० पर्यंत म्हणजे सुमारें २०० वर्षें या आरमाराला 'बाँबे मरीन' या नांवानें संबोधिलें जात असे. १८३० ते १८६३ पर्यंत हिंदी लढाऊ आरमार या नांवानें तें प्रसिद्ध होतें. १८७७ मध्यें बादशहाचें हिंदी आरमार ( His Majesty's Indian Marine ) असें मानण्यांत येऊं लागलें व १८९२ सालीं 'रॉयल इंडियन मरीन' ही त्याला संज्ञा प्राप्त झाली. तरी पण हें लष्करी आरमार व्यापारी संरक्षणाच्या स्वरूपाचें होतें व युद्धाच्या प्रसंगाचे वेळीं १८८४च्या इंडियन सर्व्हिस मरीन ॲक्टान्वयें वेळ पडेल त्याप्रमाणें त्याचें लढाऊ लष्करी आरमारांत रूपांतर करण्याचा अधिकार बादशाही ब्रिटिश सत्तेला देण्यांत आला व या अधिकाराचा उपयोग हिंदुस्थानाचे स्टेट-सेक्रेटरीसाहेब नेहमीं करीत आले. परंतु महायुद्धांत 'जगांत शेराला सवाशेर भेटतो' अशी खात्री इंग्रजांची झाली व आपलें लष्करी लढाऊ आरमारी बल वाढविलें पाहिजे असें ब्रिटिश सरकारास म्हणजेच हिंदुस्थानसरकारास वाटूं लागलें व लॉर्ड ॲडमिरल जेलिको यांच्या सल्लयानुसार हिंदुस्थानसरकारनें लढाऊ लष्करी आरमार उभारण्याची कल्पना योजिली. कारण इंग्लंडावर येणाऱ्या भावी संकटाची काळजी जर कोणत्या ब्रिटिश साम्राज्यांतर्गत देशाला वाटत असेल तर ती हिंदुस्थानाला! व ती जबाबदारी पार पाडण्याकरितां येथील नोकरशाहीनें आपले हातपाय पसरण्यास सुरवात करावी हें उचितच. लढाऊ आरमारी सामर्थ्य वाढविण्याची कल्पना मनांत आल्याबरोबर माजी व्हाइसरॉय लॉर्ड रेडिंग यांनीं १९२५ च्या फेब्रुवारीमध्यें बड्या लोकांच्या खानदानी कौन्सिलांत ही कल्पना अशा मोहक स्वरूपांत मांडली कीं, हिंदुस्थानाच्या आरमाराची सुधारणा व्हावी व हिंदुस्थानानें आरमारी संरक्षणाची आपली जबाबदारी अंगावर घेण्यास तयार व्हावें, याकरितां ह्या रॉयल इंडियन मरीनमध्यें लढाऊ लष्करी आरमाराचा समावेश

होईल या दृष्टीनें रॉयल इंडियन मरीनमध्यें सुधारणा व्हावी. हिंदुस्थानानें लष्करी लढाऊ आरमार उभारावें यांत दुमत असण्याचें कारणच नाहीं. पण हिंदी स्वाभिमानाला चिरड आणण्यासारखें जर कांहीं झालें असेल तर तें हेंच कीं, लॉर्ड रेडिंगसाहेब ह्या आपल्या आकाशवाणीवर कांहीं दिवस स्तब्ध राहून लोकप्रतिनिधींना आपले विचार प्रदर्शित करण्याची संधि न देतां या आपल्या कल्पनेला मूर्त स्वरूप देण्याकरितां सेनापति लॉर्ड रॉलिन्सन यांच्या अध्यक्षतेखालीं एक सरकारी कमिटी नेमून मोकळे झाले. या कमिटीची घटना अशी कीं, माजी सेनापति लॉर्ड रॉलिन्सन (अध्यक्ष) (२) रिअर अॅडमिरल एच. डब्ल्यू. रिचमांड (३) मरीन खात्याचे सेक्रेटरी ई. डब्ल्यु. बर्डन (४) व रॉयल इंडियन मरीन खात्याचे डायरेक्टर ई. जे. हेडलॅम हे चार युरोपिअन अधिकारी व हिंदुस्थानसरकारच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे एक सभासद सर भूपेंद्रनाथ मित्र हे एकटेच काय ते हिंदी सभासद होते. ह्या कमिटीची बैठक कधीं भरली ? साक्षीपुरावा काय झाला ? वगैरे माहिती प्रसिद्ध नाहीं व कोणाला माहीतहि नाहीं. परंतु आश्चर्य हें कीं कमिटी नेमल्यापासून एक महिन्याचे आंत कमिटीचा रिपोर्ट तयार झाला व त्याला लॉर्ड रॉलिन्सन यांची संमति होती असें म्हणतात. मार्च १९२५मध्येंच ते दिवंगत झाले. असो. ह्या लॉर्ड रॉलिन्सन कमिटीनें शिफारसी केल्या त्या अशा कीं शांततेच्या वेळीं हिंदी आरमाराकडे खालील कामें देण्यांत यावीत:—

(१) युद्धाचे वेळीं लागणारें लढाऊ लष्कर शिकवून तयार करणें.

(२) हिंदी महासागर व इराणी आखात यांमध्यें हिंदुस्थानसरकार सांगेल तें काम करणें.

(३) हिंदुस्थानसरकारच्या ताब्यांत असलेल्या बंदरांच्या( एडन,पोर्टब्लेअर व रंगून) आरमारी संरक्षणाची तयारी करणें.

( ४ ) हिंदी महासागराची पाहाणी करणें.

( ५ ) हिंदुस्थानसरकारचें वाहतुकीचे काम करणें व या हिंदी आरमाराला 'रॉयल इंडियन नेव्ही' असें संबोधिलें जावें व साम्राज्यसत्तेच्या लढाऊ आरमाराचें पांढरें निशाण फडकलें जावें.

वरील शिफारसी अमलांत आणण्याकरितां हिंदी लढाऊ आरमाराची साधनसामुग्री काय असावी त्याची चर्चा वरील कमिटीनें केली व कमिटीच्या शिफारसीवरून उभारण्यात येणाऱ्या लढाऊ आरमाराची रूपरेखा खालीलप्रमाणें आहे.

ह्या आरमारी ताफ्यांत ( Squadron) ४ स्लूप्स, २ पेट्रोल क्रॅफ्ट व्हेसल्स, ४ ट्रालर्स, २ सर्व्हे शिप्स, १ डेपोशिप यांचा समावेश केला आहे. व या आरमाराच्या व्यवस्थेकरितां नेमण्यांत येणाऱ्या वारंट ऑफिसर्स व ऑफिसरांची यादी पाहिली असतां आपणाला असें आढळेल कीं, १ फ्लॅग ऑफिसर कमांडर, ९ कॅप्टन्स, १९ कमँडर्स, ४२ ले. कमँडर्स व लेफ्टनंटस, ८ सब-लेफ्टनंटस, ४ मिडशिपमेन, १४ बोसन्स, १ इंजीनिअर कॅप्टन, ५ इंजीनिअर कमांडर्स, ३८ इंजीनिअर ले. कमँडर्स व इंजीनिअर लेफ्टनंटस, ६ असिस्टंट सर्जन्स. यांपैकीं कलकत्ता रंगून मद्रास मुंबई कराची व एडन येथील बंदरांच्या व्यवस्थेकरितां नेमण्यांत येणाऱ्या ५ कॅप्टन्स, ६ कमँडर्स, १ ले. कमँडर, ३ इंजीनिअर्स, १० इं. ले. कमँडर्स, १ बोसन. या ऑफिसरांचा पगार त्या त्या प्रांतिक सरकारच्या तिजोरींतून केला जाणार आहे. व बाकीच्या ऑफिसरांचा हिंदुस्थानसरकारच्या तिजोरींतून केला जावयाचा असून, कमिटीनें खर्चाचा जो अंदाजी तक्ता केला आहे तो असा:—

| | | रुपये |
|---|---|---|
| | हेडक्वार्टर्स स्टाफ | २५९९०० |
| १ | डेपोशिप | ३२४८५१ |
| ४ | स्लूप्स | १२०४२२४ |
| २ | पेट्रोल क्रॅफ्ट व्हेसल्स | ३५९६१६ |
| ४ | ट्रालर्स | १२३१२० |
| ५ | रजेवर जाणाऱ्या ऑफिसरांचा पगारखर्च | २०८०२० |
| ६ | पेन्शन्स | ९१०००० |
| ७ | ऐनजिनसी लागणारा खर्च | ३९८७४० |
| ८ | आरमारी सेनापतीच्या खर्चाकरितां खंडणी | १९००००० |
| ९ | सर्व्हेशिप्स | ४८९००० |
| १० | स्टोअर डिपार्टमेंट | ३०८२० |
| ११ | इंग्लंड व ईस्ट इंडीजमध्यें शिक्षण घेत असलेल्या ऑफिसरांचा खर्च | ५२१४० |
| | | ६२६०४३१ |

याखेरीज किनाऱ्यावरील बंदरांच्या दीपस्तंभांचा व बंदरांतील जहाजांचा दिवाबत्तीखर्च व लष्करी शिपायांचा तराफ्यांतून सफर करण्याचा खर्च मिळून सुमारें १६५०००० रुपये खर्चण्यांत येणार आहेत. म्हणजे १९२५-२६ सालीं रॉयल इंडियन मरीन खात्याचा खर्च ६८ लक्ष १२ हजार रुपये होता तो आतां ८० लक्ष १० हजार रुपये होऊं लागेल. परंतु सध्याच्या आरमारी ऑफिसरांची यादी जी वर दिली आहे त्यांमध्यें एकहि ऑफिसर हिंदी नाहीं. अर्थात् या ८० लक्ष रुपयांचा विनियोग हिंदुस्थानानें लढाऊ आरमार उभारावें या सद्धेतूकरितांच होत आहे कीं काय हें एखादें लहान मूलही सांगूं शकेल. कमिटीचा रिपोर्ट तयार झाला

व लगेच २-४ महिन्यांनीं लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं असेंब्लीच्या सभासदांपुढें त्याचा स्तुतिपाठ वाचला. रिपोर्टाला मान्यता देतांना ते दिमाखानें असें म्हणाले कीं, "ज्यांना ब्रिटिश लोकांच्या पराक्रमाची जाणीव असेल त्यांना लष्करी लढाऊ आरमारावर फडकवण्यांत येणाऱ्या शुभ्र निशाणाचा हक्क हिंदी आरमाराला दिल्याची कल्पना येईल. व गेलीं शेंकडो वर्षें ज्या वैभवाचें व पराक्रमाचें द्योतक म्हणून हें शुभ्र निशाण फडकावलें जातें त्या वैभवांत समभागी होण्याचा मान आज हिंदुस्थानाला इंग्लंडाच्या कृपेमुळें मिळत आहे." व शेवटीं भाषण संपवितांना त्यांनीं या लढाऊ आरमाराची उभारणी करतांना लायक हिंदी उमेदवारांना शक्य त्या सवलती देण्यांत येतील व हिंदी लोकांच्या स्वाभिमानाला व राष्ट्रीय वृत्तीला साजेल असें हें नवीन क्षेत्र त्यांना खुलें केलें जात आहे असें सांगून हळूच एक मधाचें बोट लाविलें. परंतु ब्रिटिश मुत्सद्यांचा बोलघेवडेपणा हिंदी लोकांच्या आतां चांगला परिचयाचा झाला आहे. ब्रिटिश मुत्सद्दी जितकें बोलतील त्याच्या एक-दशांश देखील त्यांच्या मनांत असणार नाहीं. व त्याच्या एक-शतांश देखील त्यांच्या कृतींत उतरणार नाहीं याची खात्री दिवसेंदिवस लोकांना पटूं लागली आहे व याचा अनुभव याहि प्रसंगीं जवळजवळ असाच कसा आला ह्याची हकीकत पुढील लेखांत देऊं.

# केतकी पक्षाचें खंडन

( ले.—**रा. वि. पटवर्धन.** )

तारीख २ आगस्टच्या **"ज्ञानप्रकाशा"**च्या मागील बाजूवर नेहमींप्रमाणें **"टिळक पंचांगा"**-विरुद्ध मजकूर नजरेस पडला, त्याच्या खालीं एका तालुक्याच्या गांवांतील दोन वकिलांच्या सह्या आहेत. परंतु मजकूर पाहातांच त्यांत "केतकीवाल्यांच्या" त्याच त्या शिळ्या बुरसलेल्या **"धनिष्ठाथोतांडा"**च्या वायफळ गप्पाच आहेत असें दिसलें. खेडासारख्या कोनाकोपऱ्यांतील भलत्याच ठिकाणीं 'केतकी' गप्पांचा प्रवेश पाहून हा काय प्रकार असावा त्याची चौकशी केली. तों केतकीवाल्यांच्या आंबलेल्या चोपड्यांचीं पारायणें करणारे आणि केतकीवाल्यांच्या ज्योतिष—गारुडांत पारंगत झालेले वृद्ध केतकरांचे मेहुणे हे खेड येथें आहेत असें कळलें. तेव्हां खेडचे वकील एकदम ज्योतिषी बनून 'टिळक पंचांगाच्या' विरुद्ध प्रलाप कसे काढूं लागले त्याचा उलगडा झाला. केतकीवाल्यांचे सूत्रधार जेथें जातील तेथें थोडा वेळ तरी ते आपल्या गप्पांची करामत करणारच, म्हणून ह्या खेडाच्या चर्वितचर्वणी लेखाकडे दुर्लक्ष करून **केतकीवाल्यांच्या** मूळ चोपड्यांतील गफलतींचाच समाचार घेतों.

शके १८४७ सालीं पुणें येथें "ऐक्य" हें नांव धारण करणाऱ्या केतकी पक्षाशीं पं. प्र. कमिटीचा जो वाद झाला त्यांत केतकी पक्षाचा पूर्ण मोड झाला ही गोष्ट केतकी पक्षीय 'चित्रमय जगत्' कर्त्यांस त्या वेळीं कबूल करावी लागली. परंतु यंदाच्या श्रीगणेशोत्सवाच्या धांदलीचा फायदा घेऊन केतकी पक्ष पुनः वर डोकें काढून ग्रहलाघवीयांत छपून बसून जनतेची दिशाभूल करीत आहे. त्यांनीं धनिष्ठा पक्षाचें त्या वादाचे वेळीं जें एक खूळ उभें केलें त्याचें त्याच वेळीं निरसन झालें, आणि केतकी पक्षाच्या मुद्द्यांचें समूळ खंडन वैदिक आरंभस्थान, ह्या निबंधांत मी पूर्वी केलेंच आहे. परंतु पुष्कळ लोकांना अद्यापि त्या वादाची माहिती नाहीं म्हणून त्या वादांतील महत्त्वाच्या मुद्द्यांचें पुनः स्पष्टीकरण करणें प्राप्त आहे.

## धनिष्ठापुञ्जांतील आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं नव्हती

धनिष्ठाविभागामध्यें "आल्फा" तारेचें स्थान विभागारंभापासून चार अंश पुढें आहे हें "वैदिक आरंभस्थान" या निबन्धांत मी सिद्ध केलेंच आहे. त्याला उत्तर म्हणून द. व्यं. केतकर यांनीं एका पत्रकांत पुनः दुसरा एक लेख लिहून अनेक लपेटी लढविल्या आहेत. त्यांतील मुख्य ही कीं वेदांगज्योतिषाचा काल इ. स. पूर्वी १४०० वर्षें आहे असें निवळ छपवाछपवीनें हळूच गृहीत धरलें आहे. आणि दुसरी ही कीं आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं आहे हेंहि गृहीत धरलें आहे. द. व्यं. केतकर यांच्या असल्या लेखास प्रत्युत्तर देण्याची जरूर नव्हती, परंतु केतकी पक्ष श्रीगणेशोत्सवाला विरोध करूं लागल्यामुळें पुनः लिहिणें प्राप्त झालें आहे. "वैदिक आरंभस्थान" लेखांत पुढील मुद्दे सिद्ध केलें आहेत.

(१) आल्फा तारेंत उदगयन होतें येवढ्यावरूनच आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं मानतां येत नाहीं.

(२) आल्फा तारा धनिष्ठेची योगतारा नव्हे; धनिष्ठेची योगतारा बीटा होय.

( ३ ) शकापूर्वी १४९९ या वर्षी रवि चन्द्र आणि आल्फा यांची युति झालीच नाहीं म्हणून आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं मानण्याला यत्किंचित् सबब उरत नाहीं.

( ४ ) वेदाङ्गकालीन नक्षत्र-विभाग धनिष्ठा योगतारेपासून केलेले नव्हते, म्हणून धनिष्ठा-प्रयुक्त विभाग मानणें हें वैदिक पद्धतींशीं अत्यंत विरुद्ध होय.

( ५ ) वेदाङ्गकालीन नक्षत्रविभाग हे कृत्तिका-कालीं कृत्तिका योगतारेपासूनच केले होते म्हणून कृत्तिका-विभागपद्धति हीच वैदिक पद्धति होय.

इ. स. पूर्वी १४०० वर्षे या वेळीं आल्फा तारेंत उदगयन होत असलें तरी ती तारा धनिष्ठाविभागाच्या आरंभीं मानणें हें वेदांगाच्याच विरुद्ध आहे. ह्याचें कारण पुनः स्पष्ट करतों. धनिष्ठाविभागांत धनिष्ठेच्या पांच—सहा तारा आहेत. त्या सर्वच जवळ जवळ चौथ्या प्रतीच्या म्हणजे बारीक आहेत. परंतु त्यांतले त्यांत "बीटा" तारा हीच आल्फा तारेपेक्षां तेजस्वी आहे. आल्फा ही तारा चौथ्या प्रतीची असून बीटा तारा हिची प्रत ३॥ आहे, हें ज्यो. दीक्षितांच्या नक्षत्रकोष्टकावरून सहज समजेल. एप्सॉयलॉन, बीटा, थीटा, आल्फा, डेल्टा आणि ग्यामा ह्या तारा धनिष्ठापुंजांत आहेत. त्यांपैकीं एप्सॉयलॉन व बीटा ह्या पश्चिमेकडे असून आल्फा त्यांच्या पूर्वेस आहे; आणि ग्यामा तारा ही सर्वांच्या पूर्वेस आहे. संपात-बिंदु आणि त्याच्या अनुरोधानें उदगयन बिन्दु हा पूर्वेकडून पश्चिमेकडे भ्रमण करीत असल्यानें कोणत्याहि नक्षत्रपुंजांतील अगदा पूर्वेकडील तारेमध्यें तो प्रथम येतो आणि पश्चिमेकडील तारेंत शेवटीं जातो. त्याप्रमाणें ग्यामा तारेंत उदगयन प्रथम होऊं लागलें. त्यानंतर आल्फा तारेमध्यें, नंतर बीटा तारेंत, आणि एप्सॉयलॅान ह्या तारेमध्यें शेवटीं झालें. परंतु नक्षत्रविभागाचा आरंभ पश्चिमेकडून होऊन शेवट पूर्वेकडे व्हावयाचा असा संकेत असल्याकारणानें जरी ग्यामा तारेंत उदगयन प्रथम आलें तरी ती तारा धनिष्ठाविभागाच्या अन्तिम सीमेकडे गेली आणि एप्सायलॉन आणि बीटा या आरंभसीमेकडे राहिल्या. नक्षत्रविभागांतील एखाद्या तारेंत उदगयन असणें ही जर विभागारंभाची कसोटी मानली तर वरील सहाहि तारा धनिष्ठा-विभागारंभीं होत्या असें ठरविणें भाग पडेल. कारण त्या प्रत्येकीमध्यें केव्हांना केव्हां तरी उदगयन—बिन्दु आलाच होता. मग प्रत्येक वेळीं विभागारंभाची मर्यादा बदलली असें तरी कबूल करावें लागेल आणि तसें कबूल केलें तरी एप्सायलॉन तारेमध्यें, उदगयन शेवटीं आल्यामुळें तीच तारा धनिष्ठा-विभागारंभीं होती असें मानलें पाहिजे. अर्थात आल्फा ही तारा कांहीं केलें तरी आरंभीं येत नाहीं.

आल्फा तारेचेंच असें वैशिष्ट्य तरी काय कीं तिलाच विभागारंभीं मानावें? प्रतिपक्षी म्हणतील कीं आल्फा ही आम्ही धनिष्ठेची योगतारा मानतों, आणि म्हणून तिची विभागारंभीं स्थापना करतों. परंतु प्रत्येक नक्षत्राच्या विभागारंभीं योगतारा असत नाहीं आणि असणें शक्यहि नाहीं. नक्षत्रांच्या योगतारा विभागारंभीं मानूं लागल्यास, रोहिणी आर्द्रा, मघा-उत्तरा, फाल्गुनी, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, या अत्यंत ठळक तारा विभागारंभीं मानाव्या लागतील आणि सर्वच अनवस्था होईल. शिवाय आल्फा ही योगताराच नव्हे. कारण दुसरें कोणतेंही सबळ कारण नसल्यास पुंजांतील ठळक तारेलाच योगतारा समजतात ( सर्वस्य महती तारा योगतारा) त्या दृष्टीनें बीटा हीच धनिष्ठेची योगतारा ठरते.

सूर्यसिध्दांतांत धनिष्ठेची योगतारा पश्चिमेकडे आहे "धनिष्ठायाश्च पश्चिमा" असें सांगितलें आहे. त्यावरूनहि योगतारेचा मान "बीटा" तारेकडे जातो. एवंच कोणत्याहि कारणानें आल्फा ही तारा धनिष्ठाविभागारंभीं मानतां येत नाहीं.

आल्फा तारेमध्यें शकापूर्वी १४९९ या वर्षी रवि-चंद्राची युति आली अशी एक सबब केतकी पक्षाकडून पुढें करण्यांत आली होती. ह्या खोट्या सबबीचें खण्डन "वैदिक आरंभस्थान" या निबंधांत केलें आहे तथापि केतकरांचें गणित कसें बनावट आहे तें ह्याहि लेखाच्या शेवटीं दाखविलें आहे.

याप्रमाणें एकंदर पुरावा उलट असतां आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभीं आहे असें छपवाछपवीनें गृहीत धरणें हें ज्योतिषी म्हणविणाराला शोभत नाहीं. आल्फा तारा विभागारंभीं आहे कीं काय हाच वादाचा प्रश्न. आणि तीच गोष्ट तुम्ही गृहीत धरतां ! आणि त्यावरून सर्व नक्षत्रचक्राच्या आरंभ-मर्यादा ठरवितां ह्यालाच आम्ही थोतांड म्हणतों. इ. स. पूर्वी १४०० या वर्षी उदगयन अमुक तारे-जवळ होतें किंवा नाहीं हा वादाचा मुद्दा नव्हे. वादाचा मुद्दा हा आहे कीं ज्या आल्फा तारेमध्यें इ.स. पूर्वी १४०० वर्षे या वेळीं उदगयन होतें ती तारा कोणत्याहि सबबीवर धनिष्ठाविभागारंभीं होती असें मानतां येत नाहीं. तें कां तें आता वर दाखविलेंच आहे.

द. व्यं. केतकर यांनीं धारवाडच्या पंचांगसभेच्या वेळीं जें पत्रक प्रसिद्ध केलें त्यामध्यें गणिताच्या ज्या गफलती आहेत त्या "वैदिक आरंभस्थान," या निबंधाच्या द्वारानें चवाट्यावर आणल्याच आहेत. तरी पुनः केतकर पक्षानें नवीन पत्रकांत पुनः गणिताच्या गफलती केल्याच आहेत.

(अपूर्ण.)

# लढाऊ आरमार हिंदी का ब्रिटिश ?

## उत्तरार्ध

गेल्या अंकांत आम्ही लॉर्ड रॉलिन्सन कमिटीच्या रिपोर्टासंबंधाची हकीकत दिलीच आहे. त्या रिपोर्टानंतर आतांपर्यंत काय काय गोष्टी घडल्या व त्या सर्व बाबतींत हिंदी जनतेची कसकशी निराशा झाली याचा विचार या लेखांत करण्याचें योजिलें आहे.

रॉलिन्सन कमिटीचा रिपोर्ट १९२५ च्या एप्रिलमध्यें झाला. १९२५–१९२८ या तीन वर्षांच्या मुदतींत सरकारनें या रिपोर्टाची छाननी करण्याची संधि लोकपक्षाला दिली नाहीं. रिपोर्टाचें काय झालें? हिंदी आरमार उभारण्याची योजना काय आहे? अशा प्रकारचे प्रश्न विचारले गेले. या प्रश्नांवर सरकारचें एकच उत्तर होतें. 'कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झालाच आहे व रिपोर्टाच्या शिफारसी अमलांत कोणत्या आणाव्या यासंबंधीं हिंदुस्थानसरकार स्टेटसेक्रेटरीसाहेबांशीं पत्रव्यवहार करीत आहे, निर्णय ठरतांच जाहीर करूं' याव्यतिरिक्त आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांनीं कांहीं केलें नाहीं. रिपोर्टावर असेंब्लीनें चर्चा करावी व आपलें मत प्रदर्शित करावें, यासाठीं नवीन 'लढाऊ आरमार' उभारण्यांत यावें, व तें रिपोर्टाच्या शिफारसींना अनुसरून अमुक एका स्वरूपाचें असावें अशा अर्थाचा ठराव यावयास पाहिजे होता. पण सरकारनें तो आणला नाहीं. इतकेंच नव्हे तर ले. असेंब्ली अगर बड्या लोकांच्या कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें देखील आपल्या हस्तकामार्फत सरकारनें अशा प्रकारचा ठराव आणला नाहीं, व रॉलिन्सन कमिटीच्या शिफारसी मान्य कितपत आहेत, व आपल्या या योजनेला लोकपक्षाचें पाठबळ आहे कीं नाहीं हें पाहण्याचें सौजन्य देखील सरकारनें दाखविलें नाहीं. कदाचित् आर्मी सेक्रेटरी मि. यंग यांना असें वाटलें असावें कीं वादाच्या भरांत सेक्रेटरी ऑफ स्टेट व हिंदुस्थान–सरकार यांच्यामधील गुप्त पत्रव्यवहार चवाठ्यावर येण्याचा संभव. सुमारें एक वर्षभर हा रिपोर्ट सरकारी दप्तरांत धूळखात पडला होता असें दिसतें. शेवटीं १९२६ च्या फेब्रुवारी महिन्यांत लॉर्ड रेडिंगसाहेबांनीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें कमिटीच्या रिपोर्टाला मान्यता देण्याचा उद्देश जाहीर केला, व सेनापति बर्डवुड यांनीं असेंब्लीमध्यें त्याच भाषणाचा अनुवाद केला. १९२७ च्या मार्च महिन्यांत विंटरटनसाहेबांनीं पार्लमेंटांत एक बिल आणून, गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टांत, लढाऊ आरमार उभारण्यांत यावें अशा अर्थाची दुरुस्ती, हुजूर पक्षाच्या हुकमी बहुमतावर करून घेतली.

विंटरटनसाहेबांनीं पार्लमेंटांत बिल आणलें त्या वेळीं ते आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले कीं, "असेंब्लीनें अशा अर्थाचें बिल मंजूर केल्याशिवाय ह्या बिलाला कायद्याचें स्वरूप येणार नाहीं व त्या बिलाच्या चर्चेच्या वेळीं या लढाऊ आरमाराच्या नवीन योजनेची चर्चा असेंब्लीचे सभासद करतीलच. या लढाऊ आरमारी खर्चावर असेंब्लीचा ताबा 'मिलिटरी' खर्चावर ज्याप्रमाणें आहे त्याप्रमाणेंच राहील !" ह्याचा अर्थ हाच कीं, पार्लमेंटाच्या संमतीनें गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट दुरुस्त करण्याचे पूर्वी असेंब्लीची संमति घेण्याची जरूरी हिंदुस्थानसरकारला भासली नाहीं. व ज्याप्रमाणें मिलिटरी खात्यावर होणाऱ्या ४५ कोटि रुपयांच्या खर्चाची छाननी अवघ्या २–४ तासांतच होऊं शकते त्याप्रमाणेच ह्या आरमारची खात्याचीहि गत होणार आहे. पूर्वीच्या मोर्ले–मिंटो रिफॉर्मसच्या अमदानींत लष्करी खर्चावर वादविवाद करण्याचा व आपलें मत प्रगट करण्याचा अधिकार देण्यात आला होता तोहि या नवीन सुधारणांनीं काढून घेण्यांत आला व वादविवादाची परवानगी दरवर्षी व्हाइसरॉयसाहेबांची बहाल मर्जी होऊन देण्यांत येऊं लागली. अशा ह्या परिस्थितींत विंटरटनसाहेबांनीं 'आरमारी खात्याची' भर लष्करी खर्चांत टाकली. यावरून सुधारणांची प्रगति कोणत्या प्रकारें चालली आहे हें उघड दिसतें. या बिलावरील आपल्या भाषणांत खुल्या मनानें असेंहि त्यांनीं बोलून दाखविलें कीं, "We are not in India for the love of Indians, but we are in India for what we can make out of it." मजूर पक्षाचे एक सभासद मि. ऑमान यांनीं, ले. असेंब्लीची संमति घेतल्याशिवाय हिंदुस्थानाच्या तिजोरीवर खर्चाची भर घालून, साम्राज्य–सरकारचें आरमार वाढविण्यांत येऊं नये अशा अर्थाची एक सूचना आणली होती. परंतु पार्लमेंटामध्यें हुजूर पक्षाचे सभासद ४०० व मजूर पक्षाचे अवघे १५० सभासद असतांना ह्या उपसूचनेला तिलांजलि मिळाली हें सांगणें नकोच. मजूर पक्षाचे दुसरे सभासद मि. व्हिटली यांनीं निदान 'ह्या हिंदी लढाऊ आरमाराचा उपयोग हिंदुस्थानाकरितांच करावा सार्वभौम सत्तेकरितां

लढण्यांत करूं नये ' अशी दुसरी सूचना आणली व तीहि नामंजूर झाली.ती फेटाळून लावतांच व्हिटली यांनीं सामोपचाराची दुसरी एक उपसूचना आणली. ती अशी कीं," ह्या आरमाराचा पैनपै खर्च हिंदुस्थानाच्या तिजोरींतून होणार, याकरितां इंडियन ले. अलेंब्लीचें मत काय आहे हें विचारण्यांत यावें व तोंपर्यंत बिलावरील चर्चा तहकूब करावी. " परंतु अर्ल विंटरटन यांनीं स्पष्टपणें सांगून टाकलें कीं "हिंदुस्थानाच्या तिजोरीवर ताबा हिंदी लोकांचा नाहीं व तसें कोणी म्हणतहि नाहीं. आणि कांहीं विवक्षित लोकांखेरीज तशा प्रकारची मागणी कोणी करीतहि नाहीं." अर्थात् हुजूर पक्षाचे सभासद असे२४० व मजूर पक्षाचे सभासद १२० हजर असतांना, उपसूचना फेटाळल्या गेल्या यांत कांहीं आश्चर्यहि नाहीं. तथापि बिलाच्या तिसऱ्या वाचनाच्या वेळीं मि. व्हिटली यांनीं असें ठणठणीतपणें बजाविलें कीं, " जर सार्वभौम सत्ता पार्लमेंटाकडे आहे तर हिंदी लढाऊ आरमार हे नामाभिधान लागूच पडत नाहीं आणि तर मग ब्रिटिश आरमार असेंच का म्हणाना ? जहाजांचा व आरमाराचा खर्च मात्र पैनपै हिंदुस्थानाच्या तिजोरींतून म्हणजे गरीब रयतेकडून करण्यांत येणार ! हें बिल मंजूर करणें हे केवळ आमची थट्टा आहे. पुढेंमागें जें राष्ट्र हिंदुस्थानाचा मुख्य शत्रु होण्याचा संभव त्या देशाच्या लोकांच्या हातांत ही आरमारी सत्ता राहील व फक्त आम्ही आरमाराचा खर्च करतों असें म्हणण्याची शाब्दिक सत्ता हिंदी लोकांचे हातांत राहील ? "

अर्थात् व्हिटली यांच्या इषाऱ्याचा उपयोग झाला नाहीं व बिल मंजूर झालें हें सांगणें नकोच. परंतु अर्ल विंटरटन यांनीं समारोप करतांना असें आश्वासन दिलें कीं " लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें अशाच अर्थाचें बिल मंजूर केल्याखेरीज हें बिल प्रत्यक्ष अमलांत येणार नाहीं व हिंदी लढाऊ आरमाराच्या प्रश्नाची चर्चा करण्याची भरपूर संधि ले. असेंब्लीला देण्यांत येईल." परंतु अर्ल विंटरटनसोहब आपल्या शब्दास जागले नाहींत. कारण गेल्या फेब्रुवारी महिन्यांत ले. असेंब्लींत आर्मी सेक्रेटरी मिस्टर यंग यांनीं आरमारासंबधींच बिल आणलें तें 'लढाऊ आरमार' उभारणीचें नसून, लढाऊ आरमाराच्या शिस्तीचें बिल होतें. याचा अर्थ हाच कीं पार्लमेंटाच्या कायद्यानें 'लढाऊ आरमार 'तर आम्ही उभारणारच. पाहिजे तर तुमच्या संमतीनें, अर्थात् पटेल तेथें, शिस्तीच्या नियमांत थोडीफार बदल करूं. ले. असेंब्लींतील लोकपक्षानें हें बिल म्हणजे केवळ धूळफेंक आहे असें जाणून सरकारची कानउघाडणी केली व हें बिल ५५ विरुद्ध ५४ मतें पडून फेटाळून लावण्यांत आलें. परंतु या बिलाच्या नामंजुरीनें लढाऊ आरमार-उभारणीच्या सरकारी कल्पनेला तिलांजलि मिळणें शक्य नव्हतें. सुमारें १-२ महिन्यांपूर्वी सरकारनें लोकमतास न जुमानतां, पुनः विचार करून बादशाही सरकारच्या संमतीनें प्रतिष्ठितपणें एक सरकारी ठराव प्रसिद्ध केला. तो पाहिला म्हणजे हिंदुस्थान-सरकारच्या धोरणाची पूर्ण कल्पना येते. ती योजना अशी कीं, "रॉयल इंडियन मरीन हे पूर्वीचेंच नांव कायम राहावें व १९२५ मध्यें नमण्यांत आलेल्या लॉर्ड रॉलिन्सन कमिटीच्या शिफारसीप्रमाणें ज्या तत्त्वावर गेलीं दोन वर्षें रॉयल इंडियन मरीनची तयारी होत आहे त्याच तत्त्वावर 'लढाऊ आरमाराची उभारणी' जोरानें करण्यांत यावी. आरमारांतील ऑफिसरांचे पगार पेन्शन वगैरेचें प्रमाण कमिटीच्या शिफारसीप्रमाणें असावें. वारंट व कमिशण्ड ऑफिसरांचें धोरण जें जाहीर झालें आहे तें तसेंच राहील. तें असें कीं अंमलबजावणी (Executive ) व इंजीनिअरिंग या दोन महत्त्वाच्या खात्यांत कमिशण्ड ऑफिसरांचे जागेकरितां तीन तीन उमेदवार घेण्यांत येतील व या तीन जागांपैकीं प्रत्येक खात्यांत फक्त एक जागा हिंदी उमेदवाराकरितां राखून ठेवण्यांत येईल! शिस्तीचे नियम १८८७ सालाचे जुने तेच राहतील. या हिंदी आरमाराचा उपयोग पश्चिमेस केप ऑफ गुडहोपपासून पूर्वेस मॅगलीनच्या सामुद्रधुनीपर्यंतच्या टापूंत केला जाईल. व याखेरीज साम्राज्य-सरकाराच्या अडीअडचणीच्या प्रसंगाची पळवाट राहीलच! या आरमाराचें नेतृत्व लॉर्ड ॲडमिरल हॅंफ्री चालविन यांचेकडे देण्यांत येणार असून, ते येत्या नोव्हेंबरांत आपल्या या नूतन खात्याचें दप्तर आपल्याकडे घेणार आहेत.

हिंदुस्थानाच्या सरहद्दीचें संरक्षण हिंदी लष्करानें करावें व त्याचबरोबर हिंदुस्थानाच्या किनाऱ्याचे संरक्षणाची जबाबदारी घेण्याला हिंदुस्थानानें तयार व्हावें याबद्दल दुमत असण्याचें कारणच नाहीं. हीच मागणी आज कित्येक वर्षें हिंदी जनता कंठरवानें करीत आहे. परंतु सरकारनें मात्र लोकक्षोभ शमविण्याकरितां एखादी कमिटी नेमावी व कमिटीवरील सरकारी सभासदांनीं देखील जरी लोकपक्षाच्या सभासदांनीं केलेल्या शिफारसींना मान्यता दिली असली तरी सरकारनें सार्वभौमसत्तेच्या जोरावर तो रिपोर्ट दडपून टाकावा हा अनुभव स्कीन कमिटीच्या रिपोर्टावरून आलेलाच आहे. हिंदी लढाऊ आरमाराची वरील योजना जरी लहानशा पोफळाएवढी दिसली तरी हा आरमारी खर्च दिवसेंदिवस वाढणारा आहे. आणि अशा रीतीनें हिंदुस्थानाच्या तिजोरीला एकदां लहानसें भोंक पडलें कीं पुढें १०-५ वर्षांत एक मोठें भग-

दाउ पडेल. एवढेंच नव्हे तर पूर्वेकडील राष्ट्रांवर आपल्या सार्वभौम सत्तेचा वचक ठेवण्याकरितां या आरमाराचा उपयोग ब्रिटिश सरकार केल्याशिवाय राहणार नाहीं. अशा प्रकारची ही योजना लक्षांत घेतां मुख्य मुद्द्याचा प्रश्न निघतो तो हा कीं, (१) या आरमाराचा खर्च कोण करणार? (२) आरमारी ऑफिसर्स कोण असणार? (३) लें. असेंब्लीचा ताबा या आरमारावर कितपत राहणार ? व (४) या आरमाराचा उपयोग कोण कशाकरितां करणार ?

तूर्त या योजनेवर जरी ८० लक्ष रु.खर्च होणार आहेत तथापि ज्याप्रमाणें लष्करी खर्च १५ कोटि रुपयांपासून वाढत वाढत ६५ कोटींपर्यंत गेला व अखेर कमी करतां करतां आज ५५ कोटींवर येऊन बसला आहे. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानाचा किनाराच इतका अफाट आहे कीं, आरमाराची जितकी सुधारणा करावी तितकी थोडीच होईल. या सबबीवर, ह्या आरमारी खर्चाची वाढ कमींत कमी २५–३० कोटींवर गेल्याखेरीज राहणार नाहीं. हिंदुस्थान–सरकारचें उत्पन्न अवघें १३० कोटि; त्यांतून हा संरक्षणखर्चच ७२–७५ कोटि होऊं लागल्यास आर्थिक व सांपत्तिक स्थिति सुधारण्यास कित्येक वर्षे लागतील व तोंपर्यंत हिंदुस्थानाला इंग्लंडाचाच आश्रय धरून राहावें लागेल. कारण या आरमाराच्या हिंदीकरणाची योजना वरील ठरावाप्रमाणें अशी दिसते कीं, 'इंजीनियरिंग' व 'एक्झिक्यूटिव्ह' या दोन प्रकारचें शिक्षण देण्याकरितां दरवर्षी एक एक हिंदी उमेदवार घेण्यांत येईल व ही निवड केवळ लायकीच्या व गुणावगुणाच्या तत्त्वावर केली जाण्याचा संभव फारच कमी. कारण इंडियन सिव्हिल सर्व्हिसप्रमाणें या आरमारभरतींतहि जातवारीचें व राखीव जागेचें तत्त्व सहजच घुसडलें जाणार. आणि एक वर्षी हिंदु, दुसऱ्या वर्षी मुसलमान, तिसऱ्या वर्षी अँग्लो–इंडियन अगर अस्पृश्य व ब्राह्मणेतर निवडण्यांत यावा अशा प्रकारची योजना तयार होईल व या सर्वांवर प्रांतिक वैमनस्याची भर पडल्याखेरीज राहणार नाहीं. असल्या या चाळणींतून निघून जर कांहीं हिंदी आरमारी कामगार तयार झालेच तर लष्कराच्या हिंदीकरणाची योजना म्हणून जशी 'एट युनिट स्कीम' च सर्वांत उत्कृष्ट असें हिंदुस्थानसरकारनें ठरविलें व हिंदी लष्करी कामगारांचे हाताखालीं ब्रिटिश ऑफिसरांना काम करण्याची पाळी येऊं नये, याकरितां हिंदी कामगारांचा एक वेगळाच गट बनवून त्यांना अस्पृश्य मानण्यांत येऊं लागलें, त्याचप्रमाणें या आरमारी हिंदीकरणाची 'वन युनिट स्कीमची' योजना कोणत्या तरी सुपीक डोक्यांतून निघेल व लवकरच अमलांत येईल. याचें समर्थन लॉर्ड बर्कनहेडसाहेब असें करतील कीं, हिंदी कामगारांना स्वतंत्रपणें आरमाराची जबाबदारी कितपत पार पाडतां येते याचा प्रयोग आज आम्ही करून पाहात आहों !

लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा ताबा कोणत्या स्वरूपाचा राहाणार आहे हें लॉर्ड विंटरटनसाहेबांनीं सांगून टाकलेंच आहे. प्रश्न काय तो या आरमाराचा उपयोग कोण कशाकरितां घेणार ? वरील ठरावांत 'पश्चिमेस केप ऑफ गुडहोप आणि पूर्वेस मॅगलीन सामुद्रधुनी' अशी मर्यादा घातली असली तरी सरकारनें साम्राज्याच्या अडी-अडचणीची पळवाट ठेवलीच आहे ! अडीअडचणीचा प्रसंग ठरविणार कोण तर गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल. ह्या गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिलमध्यें हिंदी सभासद कोण आहेत व त्यांचें काम काय असतें हें सर्वांना ठाऊकच आहे. अर्थात् या अडीअडचणीचा स्पष्ट अर्थ असाच कीं, प्रत्यक्ष हिंदुस्थानाच्या संरक्षणाकरितांच जर आरमार पाहिजे असेल तर कदाचित् हिंदुस्थान–सरकार तें येथून हलवणार नाहीं. नाहीं तर वाटेल तेव्हां वाटेल तेथें हिंदुस्थानाचा शेजारी, शत्रू, स्नेही–सोबती या कशाचाहि भेदभाव न करतां हिंदुस्थान–सरकार, सार्वभौम सत्तेच्या जोरावर या हिंदी आरमाराचा उपयोग केल्याशिवाय राहाणार नाहीं. प्रत्यक्ष हिंदुस्थानाला ह्या आरमाराचा उपयोग किती होईल हे महशूरच असल्याकारणानें या हिंदी आरमाराच्या नवीन योजनेनें कोणाचेहि डोळे दिपून न जातां हिंदी जनता त्याकडे साशंकतेनेंच पाहील यांत शंका नाहीं.

# केतकी पक्षाचें खंडन

( ले.—रा. वि. पटवर्धन. )

## वेदांगकाल म्हणजे काय ?

नक्षत्रविभागपद्धतीमध्यें प्रत्येक नक्षत्रविभाग १३⅓ अंशांचा अथवा ८०० कलांचा मानला आहे. म्हणजे तीन तीन नक्षत्र–विभागात ४० अंश भरतात. नक्षत्रांच्या अचल पुंजांतील सर्व तारा, निदान त्यांतील मुख्य ठळक अथवा योगतारा ही त्या विभागामध्यें आली पाहिजे. निदान ती त्या विभागाच्या सन्निध किमान–पक्षीं मर्यादेवर असली पाहिजे. तरच विभागाचा आणि नक्षत्रपुंजाचा संबंध राहील आणि आपल्या नक्षत्रपद्धतीमध्यें हा संबंध काळजीपूर्वक राखला आहे. परंतु प्रत्येक नक्षत्रंपुंजांतील योगतारा त्या त्या नक्षत्रविभागामध्यें १३⅓ अंशांत कोठें तरी असावयाची. अमुकच ठिकाणीं ती असली पाहिजे असा सर्व योगताऱ्यांना सरसकट लागू पडणारा नियम नाहीं. म्हणून अमुक तारेमध्यें उदगयनबिन्दु किंवा संपातबिन्दु होता येवढें कळलें तरी तवढ्यावरून ती तारा तिच्या विभागामध्यें अमुक ठिकाणीं होती हें निश्चतपणें समजणें शक्य नाहीं. अर्थात् धनिष्ठापुंजांतील आल्फा तारेच्या सँन्निध उदगयन होतें असें कळलें तरी धनिष्ठा–विभागातील तिचें स्थान निश्चित होणार नाहीं. तसेंच, धनिष्ठाविभागारंभीं उदगयन होतें असें म्हटल्यानेंही तें अमुक तारेमध्येंच होतें असें ठरणार नाहीं. हा मुद्दा वाचकांनीं पूर्णपणें लक्षांत ठेविला पाहिजे.

धनिष्ठापुञ्जांमध्यें ज्या पांच–सहा तारा आहेत त्यांपैकीं विभागाच्या पूर्वसीमेकडील जी ग्यामा तारा तेथें उदगयनबिन्दु इ. स. पूर्वी १५५० वर्षें या सुमारास होता, तो मागें हटत हटत इ. स. पू. १४०० च्या सुमारास आल्फा तारेमध्यें आला, आणि इ. स. पूर्वी १२०० वर्षांच्या बेतात तो एप्सायलॉन तारेसन्निध पोहोचला. म्हणून इ. पू. १५५० वर्षांपासून १२०० वर्षांपर्यंतचा जो ३५० वर्षांचा काल तें वेदांगयुग होय. आमच्या मतानें इ. स. पू. १२०० हा काल वेदांगयुगाची अंतिम मर्यादा असल्यानें इ. स. पूर्वी १२०० वर्षें हा काल वेदांगकाल होय. इ. स. पू. १४०० वर्षें हा वेदांगयुगांतील एक काल आहे. तो "श्रविष्ठादौ" ह्या पदांत दर्शविल्याप्रमाणें धनिष्ठारंभींचा काल नव्हे. केतकरांची विचारसरणी चुकीची कां, तर त्यांनीं इ. स. पूर्वी १४०० वर्षें हा काल वेदांगाची अन्तिम मर्यादा असें गृहीत धरलें, सिद्ध केलें नाहीं.

## दीक्षितांचा कालनिर्णय

ज्यो. दीक्षितांचा कालनिर्णय या वादांत लागू पडत नाहीं. केतकीवाल्याची सर्व भिस्त ज्यो. दीक्षित यांनीं दिलल्या कालनिर्णयावर आहे परंतु हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, ज्यो. दीक्षितांनीं जो काल दिला तो धनिष्ठाविभागाची आरंभमर्यादा निश्चित करण्याचे हेतूनें दिलेला नाहीं. धनिष्ठाविभागाची आरंभमर्यादा उदगयनानुरोधानें निश्चित करण्याच्या भानगडीत ते पडलेच नाहींत. त्यांचा आक्षेप येवढाच कीं, धनिष्ठाविभाग हा अश्विनी नक्षत्रविभागाच्या अनुरोधानें ठरविला नव्हता. ज्यो. दीक्षितांचा हा आक्षेप आम्हास मान्य आहे. म्हणून धनिष्ठाविभाग हा अश्विनीविभागावरून ठरविला होता असें आम्हीं केव्हांहि प्रतिपादन केलेलें नाहीं. ज्यो. दीक्षितांच्या पुढें वेदांगाचा कालनिर्णय हा प्रश्न होता खरा. परंतु धनिष्ठाविभागाची आरंभमर्यादा त्यांनीं विचारांत न घेतां प्रत्यक्ष तारकापुंज घेऊन कालनिर्णय केला आहे. आतां वेदांगज्योतिषामध्यें जें उदगयन निर्दिष्ट आहे तें विभागारंभींचें आहे. नक्षत्रपुंजांतील एखाद्या तारेतील उदगयन सांगण्याचा हेतु वेदांगाचा नाहीं. "श्रविष्ठादौ" हें पद विभागाचा आरंभ स्पष्टपणें दर्शवितें. असें असतांना विभागाच्या ऐवजीं तारकापुंज घेणें हें वेदांगविरुद्ध होय. विभागपद्धति मानावयाचीच नसेल तर तसें स्पष्ट बोला, लटपटी लढवूं नका. ज्यो. दीक्षितांनीं धनिष्ठेसंबंधानें विभागपद्धति मानली नाहीं. तुम्हास मानावयाची नसेल तर तसें स्पष्ट सांगा म्हणजे वैदिक पद्धतीचा वेदांग पद्धतीशीं संबंधच पोंचत नाहीं असें सिद्ध होईल.

वेदांगज्योतिषाचा आधार पंचांगाला घ्यावयाचा तर विभागपद्धती मान्य केली पाहिजे आणि धनिष्ठेच्या विभागारंभीं उदगयन केव्हां होतें तें सिद्ध केलें पाहिजे. ज्यो. दीक्षितांनीं केलेला कालनिर्णय हा विभागारंभींच्या उदगयनाचा नव्हे. अर्थात् इ. स. पू. १४०० वर्षें हा काळ विभागारंभींच्या उदगयनाचा होऊ शकत नाहीं. भा. ज्यो. इतिहास पान ८७ यांत दीक्षित लिहितात, "वेदांग–ज्योतिषरचना केव्हांहि झाली असली तरी त्या काळीं अश्विन्यादि गणना प्रचारांत नव्हती तर मग त्यास अनुसरून मानलेलें जें विभागात्मक धनिष्ठांचें आरंभस्थान त्याची कल्पना तेव्हां नव्हती हें उघड आहे. अर्थात् तेथें (विभागारंभीं) सूर्य येई तेव्हां उदगयनारंभ होत

असे असें मानून वेदांग–ज्योतिषाचा काल ठरविणें हें चुकीचें आहे. धनिष्ठेच्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या ज्या चार किंवा पांच तारा त्याच्याजवळ चंद्र–सूर्य येत तेव्हां उदगयनप्रवृत्ति होत असे असाच अर्थ घेतला पाहिजे." यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, विभागारंभीं उदगयन हा अर्थ दीक्षितांना मान्य नव्हता. त्यांनीं तारात्मक धनिष्ठेमध्येंच उदगयन मानून कालनिर्णय केला आहे. दीक्षितांनीं धनिष्ठाविभागारंभ निश्चित केलाच नाहीं आणि तेथें आल्फा तारा होती असें म्हटलेंहि नाहीं. तारात्मक नक्षत्रीं असणाऱ्या उदगयनावरून आलेला दीक्षितांचा कालनिर्णय केतकरांनीं मात्र हातचलाखीनें विभागारंभींच्या उदगयनाकडे लाविला आहे! ज्यो. दीक्षितांनीं केलेला कालनिर्णय, केतकरांच्या क्लृप्तीच्या उपयोगी नाहीं. इतकेंच नव्हे तर विभागारंभीं उदगयन मानावें हा अर्थच ज्यो. दीक्षितांना मान्य नव्हता, मग धनिष्ठा–विभागारंभीं आल्फा तारा आहे कीं नाहीं या वादांत ते पडले नाहींत, यांत काय आश्चर्य ? म्हणून, दीक्षितांच्या कालनिर्णयाचा उपयोग जर केतकरांना करावयाचा असेल तर अगादर धनिष्ठा पुंजापैकी अमुक तारा धनिष्ठाविभागारंभीं होती असें त्यांनीं स्वतंत्र प्रमाणानें सिद्ध केलें पाहिजे, त्यावांचून दीक्षितांनीं केलेला कालनिर्णय त्याच्या कांहींएक उपयोगी पडणार नाहीं. ज्योतिर्विद् दीक्षितांनीं केलेला (इ. स. पू. १४०० वर्षें) हा कालनिर्णय धनिष्ठाविभागारंभींच्या उदगयनाचा काल निश्चित करण्याच्या कामीं अगदीं निरुपयोगी आहे आणि पत्युमैनिषदाचा काल हाहि केतकरांनीं वेदांग–ज्योतिषावरच अवलंबून ठेविल्यामुळे केतकरद्वयानें दिलेला (इ.स. पू.१९०० वर्षें) हा त्याचा कालहि प्रस्तुत वादांत त्याज्य आहे.

## कृत्तिकाकालीन उदगयन

कृत्तिका योगतारेमध्यें संपात इ.स.पूर्वी २३६० च्या सुमारास होता, म्हणून उदगयनबिन्दु कृत्तिकेच्या पश्चिमेस, आणि दक्षिणायनबिन्दु कृत्तिका तारेच्या पूर्वेस ९० अंशांवर होता. कृत्तिका तारेपासून बरोबर ९० अंशांवर पूर्वेस मघा तारा आहे. परंतु हे लक्षांत ठेविलें पाहिजे कीं इ. स. पूर्वी २३६० हा कृत्तिका–कालाचा आरंभ नव्हे. कृत्तिका–कालाचा आरंभ कृत्तिकापुंजांतून विषुववृत्त जाऊं लागलें त्या वेळचा म्हणजे इ.स.पूर्वी तीन हजार (३०००) वर्षांइतका आहे. त्या वेळीं उदगयनबिन्दु शततारकेच्या सन्निध होता. आणि दक्षिणायनबिन्दु पूर्वाफाल्गुनी नक्षत्रामध्यें होता. ह्या कालानंतर दक्षिणायनबिन्दु मघा तारकापुंजांतील शेवटच्या तारेजवळ आला. त्या वेळीं जी पौर्णिमा होई ती माघी पौर्णिमा होय. परंतु त्या वेळीं उदगयनबिन्दु शततारका तारेच्या मागें (पश्चिमेस) शततारकाविभागांतच होता. अर्थातच माघी होई तेव्हां पौर्णिमेस दक्षिणायन उदगयनबिंदु धनिष्ठाविभागाच्या आंतच पडला पाहिजे हें केतकरांचें विधान खोटें आणि अशास्त्रीय ठरते. माघी पौर्णिमा याचा अर्थ असा नव्हे कीं, मघा योगतारेमध्येंच चन्द्र पूर्ण झाला पाहिजे. कृत्तिकाकालीन माघी पौर्णिमेस चंद्र मघा योगतारेजवळ असेल, किंवा तो मघा–पुंजांतील शेवटच्या ग्यामा तारेजवळहि असेल. तो फक्त मघाविभागांत असला म्हणजे झालें. म्हणूनच कृत्तिकाकालीं माघी पौर्णिमेस दक्षिणायन प्रथम होऊं लागलें त्या वेळीं उदगयन शततारका नक्षत्रीं होतें असें निश्चित ठरतें.

## कृत्तिकाकालीन माघी (पौर्णिमा) आणि उदगयन

"चतुरहे पुरस्तात् पौर्णमास्या दीक्षेरन्" अशी तैत्तिरीय श्रुति आहे. ही पौर्णिमा माघी होय. वेदांगकालीं उदगयन पौषी अमावस्येस होऊं लागलें म्हणून कृत्तिकाकालीन उदगयनापासून वेदांगकालीन उदगयन मागें किती सरकलें त्याचा विचार करूं. माघी पौर्णिमा म्हणतांक्षणींच मघा योगतारेतील पौर्णमासी असा अर्थ सर्वांना येईल. व कृत्तिका योगतारेतील संपातासंबंधानें पाहतां तो अर्थ योग्यहि आहे. परंतु कृत्तिका योगतारेतील संपात आणि कृत्तिकाकालीन संपात हे भिन्न होत. वास्तविक पाहतां कृत्तिकाकाल हा वर दर्शविल्याप्रमाणें कृत्तिका तारेमध्यें संपात येण्यापूर्वीच सुरू झाला होता. कृत्तिकापुंज क्षितिजांतील पूर्वबिन्दूजवळ उदय पावूं लागला; किंवा ज्योतिषाच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे विषुववृत्त कृत्तिकापुंजांतून जाऊं लागलें तो काल म्हणजे इसवी सनापूर्वी ३१०० वर्षांचा काल होय. तेथपासून तों कृत्तिका नक्षत्राच्या आरंभापावेतों संपातबिन्दु मागें हटेतोपर्यंतचा सुमारें १६०० वर्षांचा जो दीर्घ काल तो कृत्तिकाकाल होय. ह्या कृत्तिका युगामध्यें मघा नक्षत्र–पुंजाच्या पूर्वेकडच्या शेवटच्या ग्यामा तारेजवळ जरी पौर्णिमा होत असली तरी ती माघी पौर्णिमाच होय या दृष्टीनें पाहातां कृत्तिकाकालीन माघी पौर्णिमेस होत असलेलें उदगयन शततारका तारेच्या (पश्चिमेस) सुमारें आठ अंशांवर होत असलें पाहिजे.

कृत्तिकाकालाच्याआरंभीं संपातबिन्दु रोहिणी योगतारेंत होता. आणि कृत्तिकाकालाच्या अखेरीस तो भरणी तारका-पुंजांत पोहोचला. मध्यंतरीं संपातबिन्दु रोहिणी तारेंतून कृत्तिका योगतारेंत आला. तेव्हां उदगयनबिन्दु शततारका योगतारेच्या पश्चिमेस सुमारें बारा अंश होता, तरीहि पौर्णिमा 'माघी'च होती. याप्रमाणें उदगयनामध्यें तीन अंशांचा फरक पडला तरी उदगयनकालीन तिथि तीच राहिली. कृत्तिकाकालीन माघी पौर्णिमेस उदगयनबिन्दु एकदां

धनिष्ठाविभागाच्या आरंभापासून १९ अंश पूर्वेस होता. आणि एकदां १६ अंश होता ही वस्तुस्थिति फार महत्त्वाची आहे. यावरून माघी पौर्णिमेस होणारें उदगयन पौषी अमावास्येस होऊं लागलें येवढ्याचवरून उदगयनबिन्दु अमुकच अंश मागें सरला असला पाहिजे असा जो कोटिक्रम केतकीवाल्यांनीं चालविला आहे तो निराधार ठरतो. असो. कृत्तिकाकालीन उदगयन आणि वेदांगकालीन उदगयन यांच्यांत पंधरा तिथींचें अन्तर पडलें असें क्षणभर मानलें तरी पंधरा तिथींच्या अवकाशांत रवि १६ अंश जाणें शक्य आहे कीं काय असा दुसरा प्रश्न उद्भवतो. त्यास गणिताच्याच जोरावार आम्हीं निक्षून सांगतों कीं, १५ तिथींमध्यें रवीच्या स्पष्ट गतीनें सोळा अंशांपर्यंत अंतर आक्रमण करणें अगदीं शक्य आहे. तेव्हां कृत्तिकाकालापासून वेदांगकालापर्यंत उदगयन १६ अंश मागें हटलें असें म्हणणें पूर्णपणें सयुक्तिक आहे. अर्थात् केतकरपुत्रांनीं आपल्या चोपड्यांत कलम ११ व १४ यांत जो आक्षेप घेतला आहे तो निखालस खोटा आहे; वेदांगज्योतिषांत दर्शविल्याप्रमाणें अयनचलन १६ अंश होऊनहि माघी पौर्णिमेचें उदयगन पौष अमावास्येस येणें ही गोष्ट पूर्णपणें शक्य आणि सुसगत आहे.

# बार्डोलीचा नमुनेदार सत्याग्रह

दुराग्रही सरकार आणि बार्डोलीचे सत्याग्रही पुढारी यांच्या दरम्यान मध्यस्थी करणाऱ्या समेटाग्रही पक्षाच्या प्रयत्नास अखेरीस यश येऊन बार्डोलीच्या तडजोडीच्या अटी उभय पक्षां मान्य झाल्या, सत्याग्रह बंद केल्याचें जाहीर झालें आणि बंदिवासांत पडलेले सत्याग्रही वीर मुक्त होऊन आपल्या आश्रमांत परत आले हें ऐकून कोणाहि स्वराज्याभिमानी मनुष्यास हर्ष वाटल्यावांचून राहणार नाहीं. तीन आठवड्यांपूर्वी जेव्हां मुंबईच्या गव्हर्नरांनीं कायदेमंडळापुढें रावणशाही थाटाचें भाषण केलें तेव्हां तो दडपशाहीची प्रस्तावनाच आहे असें सर्वांस वाटलें. पण तें भाषण जरी धमकीचें होतें तरी स्वतः गव्हर्नरसाहेबांस सोटेशाहीचें धोरण व्यक्तिशः नापसंत असल्यानें त्यांनीं या कोंडींतून निसटण्यास पळवाट म्हणून चौदा दिवसांची मुदत देऊन ठेवली होती. आणि त्यांच्या इच्छेस अनुसरून त्या चौदा दिवसांत शिष्टाईचें लोण एकसारखें इकडून तिकडे जातां येतां अखेरीस अशा एका मध्यबिंदूवर तें स्थिर झालें कीं, त्या मुद्द्यावर उभयतांची एकवाक्यता होऊन शिष्टाई सफल झाल्याच्या आनंदाचा देखावा सर्वांस पहावयास मिळाला.

बार्डोलीच्या वादाचा आरंभापासूनच सरकारनें शांत चित्तानें विचार केला असता तर हे प्रकरण इतकें भडकलेंच नसतें. परंतु नोकरशाहीनें प्रारंभीं आपल्या नेहमींच्या उद्दाम वृत्तीनें फेरचौकशीची साधी मागणी बेमुर्वतखोरपणानें झिटकारली आणि त्याला प्रत्युत्तर म्हणून जेव्हां बार्डोलीच्या शेतकऱ्यांनीं सत्याग्रहाच्या पैजेचा विडा उचलला त्या वेळीं टाईम्सकरांनीं आगलावेपणा करून त्या सत्याग्रहाला बंडाचें स्वरूप देऊन ही आग भडकविली. पण त्यायोगानेंच भारतमंत्री व व्हाइसरॉय यांचें लक्ष तिकडे वेधलें आणि त्यामुळें मुंबई-सरकारलाहि या प्रकरणाचा ताबडतोब सोक्षमोक्ष करून टाकणें भाग पडलें. नाहीं तर हें प्रकरण असेंच धुमसत राहिलें असतें आणि एक-दोन महिन्यांनीं एकदम स्फोट होऊन भयानक भडका उडाला असता. ही आपत्ति टाळावी म्हणून, सर लेस्ली विल्सन यांनीं बाह्यतः जरी धमकीचा देखावा दर्शविला तरी वस्तुतः एकेक पाऊल माघार घेऊन समेटाचा रस्ता खुला करून ठेवला. एकदां सेटलमेंट जाहीर झाल्यानंतर फेर-चौकशीची मागणी करणें देखील पाप आहे असली गुर्मीची गर्जना बंद पडून, 'चौकशी करूं परंतु ती मुलकी कामगाराकडूनच करवूं' अशा आशयाची उतरत्या सुराची भाषा यापूर्वीच सुरू झाली होती. तथापि मुलकी कामगाराकडूनच चौकशी करविणें व चौकशीपूर्वी जुना नवा सगळाच सारा भरणें या दोनहि अटी सत्याग्रह्यांना सर्वस्वी अमान्य असल्यानें सरकारचा हा उतारता सूर देखील बार्डोलीकरांच्या सुराशीं मिळणें अशक्य ठरलें.

अशा परिस्थितींत गव्हर्नरसाहेब सिमल्याहून कानमंत्र घेऊन परत आले आणि त्यांनीं कायदेमंडळापुढें मोठा क्रोधाचा आविर्भाव आणून 'बार्डोलीकरांनीं जर बादशहाविरुद्ध बंड आरंभिलें असेल तर यत्किंचितहि दयामाया न दाखवितां आम्ही तें बंड ताबडतोब चिरडून टाकूं. परंतु जर त्यांच्या मनांत तसला बंडाचा विचार नसेल तर मग आम्ही फेरचौकशीचा विचार करूं आणि ती चौकशी पूर्ण, उघड व स्वतंत्र होईल याविषयीं काळजी घेऊं' असली जरतारी धमकी दिली ! या भाषणानंतर सरकारी कचेरीच्या पडद्याआड जी वाटाघाट झाली आणि जिचें पर्यवसान उभय पक्षांस संमत अशा समेटांत झालें ती वाटाघाट लक्षांत घेतां गव्हर्नरांच्या भाषणांतील धमकी ही बर्कनहेडसारख्या सोटेशाहीच्या पुरस्कर्त्यांच्या व त्यांच्या आगलाव्या बग-

लवचांच्या समाधानाकरितां होती आणि चौकशीची हमी ही समेटवाल्यां पक्षाकरितां होती असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. फेरचौकशीची जी नवी हमी मिळाली तींत मुलकी कामगाराच्या जोडीस एक न्यायाधिकारी देण्याचें आश्वासन मिळालें आणि जेथें जेथें मुलकी अधिकारी व न्यायाधिकारी यांच्यांत मतभेद होईल तेथें तेथें न्यायाधिकाऱ्याचें मतच ग्राह्य मानलें जाईल असेंहि अभिवचन देण्यांत आलें. त्याचबरोबर जुना व नवा सगळाच सारा आगाऊ भरला पाहिजे ही नडणारी अट बाजूस सारून नवा सारा कोणीहि तिऱ्हाइतानें भरला तरी चालेल अशीहि एक महत्त्वाची सवलत देण्यांत आली.

हा सगळाच प्रकार कपटपटु सरकारच्या नेहमींच्या स्वभावास सोडून झाला असें वाटते. सरकारची नेहमींची वहिवाट म्हणजे वरून साखर पेरून आंतून कपटानें आपला कावा साधावयाचा. पण या समेटाच्या प्रकरणांत वरकरणी देखावा धमकीचा असून आंतून शक्य तितक्या सवलती देण्यांत आल्या. मतभेदाच्या बाबतींत रेव्हिन्यू अधिकाऱ्यानें न्यायाधिकाऱ्याचा सल्ला मानला पाहिजे, असें ठरविल्यानें चौकशीचें स्वरूप बदललें व ती चौकशी सत्याग्रह्यांना मान्य झाली. वाढलेला सारा परभारें स्वीकारल्यानें सरकारनें सत्याग्रह्यांच्या शपथेला मान दिल्यासारखा झाला. सत्याग्रही कैदी बंधमुक्त करणें, जप्त केलेल्या जमिनी परत करणें आणि राजीनामा दिलेल्या पाटलांना व तलाठ्यांना परत कामावर घेणें इत्यादि प्रतिपक्षीयांच्या अटी मान्य करण्यांतहि सरकारनें न्यायबुद्धि दाखविली. पण सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, ज्या जमिनी लिलावानें विकून टाकल्यानें दुसऱ्याच्या मालकीच्या झाल्या आणि ज्या लिलावांच्या वेळीं कांहीं झालें तरी हे लिलाव रद्द केले जाणार नाहींत व जमिनी परत दिल्या जाणार नाहींत असे जाहिरनामे कलेक्टराच्या सहीनें गांवोगांव प्रसिद्ध करण्यांत आले होते, ते लिलाव रद्द करून त्या जमिनी मालकांना परत मिळाव्या म्हणून नव्या कलेक्टरसाहेबांनीं आपली भीड खर्चून मध्यस्थी केली व त्या मध्यस्थीकरितांच जुने कलेक्टर मि. हार्टशॉर्न यांची बदली करून वल्लभभाईंच्या विशेष परिचयाचे व सहानुभूतीचे असे नवे कलेक्टर त्या जागीं नेमले गेले ! वल्लभभाईंनीं ज्या अटी पुढें मांडल्या त्यांतील एकच अट सरकारनें नाकारलेली दिसते. ती एक अट म्हणजे सत्याग्रही लोकांच्या नुकसानभरपाईची. पठाणांच्या अत्याचारामुळें किंवा जती-कामगारांच्या जुलमामुळें ज्यांच्यावर घोर अन्याय झाला असेल त्यांचें नुकसान सरकारनें भरून द्यावें अशी सत्याग्रह पक्षाची मागणी होती. परंतु असली अट मान्य करणें सरकारला अत्यंत अपमानास्पद असल्यानें तेवढ्या मुद्द्यावर सरकारनें आपला हट्ट कायम राखला आणि हत्ती मिळाल्यावर अंकुशाविषयीं वाद करणें अप्रशस्त होय असे ओळखून वल्लभभाईंनींहि दुराग्रह न धरतां एवढी एक अट सोडून दिली आणि हळकुंडाकरितां लग्न मोडण्याचा वेडेपणा केला नाहीं हें त्यांस अत्यंत भूषणास्पद आहे.

मुंबई-सरकार व सत्याग्रह पक्ष यांच्या दरम्यान जो करार व्हावयाचा त्याच्या अटी वर दर्शविल्याप्रमाणें उभय पक्षांस मान्य झाल्या खऱ्या. तरी पण मानापमानाचा एक औपचारिक मुद्दा शिल्लक राहिलाच होता. समेटाच्या अटी मनोमनीं मान्य झाल्या तरी शिष्टाई कोणी कोणाकडे करावी ? सरकारचा वरपक्ष म्हणून त्यानें आधीं बोलावयाचें नाहीं आणि सत्याग्रही पक्षानें शपथ घेतली म्हणून त्यानें आपण होऊन कोणतीच याचना करावयाची नाहीं ! अशा परिस्थितींत उपाध्यायाप्रमाणें मध्यंतरीं लुडबुडणारा समेटाग्रही पक्ष नेहमींप्रमाणे उभयतांना उपयोगी पडला. गव्हर्नरांच्या भाषणांतील सर्व अटी पाळल्या जातील असे आश्वासन या समेटवाल्यांनीं सरकारास दिलें आणि तिकडे वल्लभभाईंसहि आपल्या सर्व मागण्या पूर्ण केल्या जातील अशी हमी दिली. समेटवाल्यांचें पहिलें पत्र सरकारच्या हातीं पडतांच सरकारनें चौकशी कमिटी नेमण्याचें जाहीर केलें. ही कमिटी जाहीर झाल्यानंतर मध्यस्थी करणाऱ्या उपाध्यायांनीं सत्याग्रही कैदी अटकेतून सोडणे, तलाठी व पाटील यांना परत कामावर घेणें व जप्त जमिनी परत करणें या तीन गोष्टी करण्याविषयीं सरकाराकडे विनंति केली. या सगळ्या वाटाघाटींत सरकारचा वर्चष्मा जर कशांत शिल्लक राहिला असेल तर तो या औपचारिक भाषेंतच राहिला आहे. कारण ही मागणी हक्काच्या स्वरूपाची नसून ती याचनेच्या स्वरूपाची आहे आणि ती पूर्ण करतांना सरकारहि आपल्या दयालुत्वाचा डांगोरा पिटून, मेहरनजर म्हणून सत्याग्रही कैद्यांना बंधमुक्त करण्यांत येत आहे, जप्त केलेल्या जमिनी मालकांना दयाळूपणानें परत देण्यांत येत आहेत आणि पाटील व कुळकर्णी यांनीं आपापले राजीनामे मंजूर न करतां आपणास पुनः कामावर परत येण्यास परवानगी द्यावी अशी विनंति केल्यावरून दयावंत सरकार त्यांस क्षमा करून कामावर घेत आहे असें जाहीर करीत आहे. पण भाषा कोणीं कशीहि वापरली तरी 'अंदरकी बात' सर्वांस कळून चुकली आहे.

अशा रीतीनें सत्याग्रहाचा येथपर्यंत विजय

झाला असला तरी फेर–चौकशीकरितां नेमलेली कमिटी शेतसारा कमी करते का कायम करते हा महत्त्वाचा प्रश्न अनिश्चित असल्यानें मन साशंक राहतें. परंतु एरवींच्या सेटलमेंटमध्यें वकिलामार्फत साक्षी–पुरावा देण्याला व चौकशीचे कागदपत्र पाहण्याला परवानगी नसते; तसली परवानगी या कमिटीच्या चौकशीसंबंधीं देण्यांत आली आहे. अर्थातच वकिलांच्या मार्फत साक्षी–पुरावा देऊन व उलटतपासणी करून देखील जर शेतसारा वाढविला गेला तर तो न्यायानेंच वाढविला असें ठरेल आणि त्यायोगानें सत्याग्रहाच्या विजयास उणेपणा येऊं शकणार नाहीं. सेटलमेंट कामगारांनीं केलेली चौकशी अपुरी, चुकीची व असमाधानकारक आहे सबब संपूर्ण, उघड व स्वतंत्र चौकशी करा एवढीच मागणी सत्याग्रह पक्षानें केली होती. ही मागणी दिसतांना साधी दिसली तरी आजपर्यंतच्या वहिवाटीच्या विरुद्ध असून नवीन पायंडा पाडणारी आहे. आणि असा नवा पायंडा पाडण्याचें श्रेय बार्डोलीच्या सत्याग्रह्यांना लाभलें हा कांहीं लहानसहान विजय नव्हे. आणि एवढ्याकरितांच बार्डोलीच्या उदाहरणावरून फेर-चौकशीच्या वहिवाटीचा हक्क प्रस्थापित झाला असें कोणीहि मानूं नये असें आगलावे टाईम्सकार कंठशोष करून सांगत आहेत! परंतु आतां हा प्रश्न वहिवाटीचा राहिला नसून तो बलाबलाचा प्रश्न होऊन राहील ज्या शेतकऱ्यांच्या अंगांत बार्डोलीप्रमाणें संघटना करून स्वार्थत्याग करावयाची धमक असेल त्यांच्या सेटलमेंटची अशीच फेर–चौकशी होईल हें कांहीं निराळें सांगावयास नको. बार्डोलीनें आपल्यापुरता तरी नवा पायंडा पाडून एक गोष्ट जगजाहीर केली कीं, सरकारनें वज्रलेप म्हणून जाहीर केलेली गोष्ट देखील चळवळीच्या बळावर बदलतां येते.

नोकरशाहीने वज्रलेप मानलेली गोष्ट चिकाटीनें चळवळ केल्यास बदलूं शकते असा अनुभव प्रथम बंगालच्या फाळणीच्या वेळीं आला व आतां दुसऱ्यांदा बार्डोलीच्या यशस्वी सत्याग्रहांतहि तसाच अनुभव आला. पण बंगालची फाळणी रद्द करून घेण्यास सहा वर्षे चळवळ करावी लागली. बार्डोलीच्या लढ्यांत सत्याग्रहाला ताबडतोब यश मिळालें. यास्तव तो अधिक अभिनंदनीय आहे. आपल्या इभ्रतीच्या रक्षणासाठी सरकार किती हट्टास पेटतें व कसकसे अनन्वित प्रकार करते हें ज्यांना अवगत आहे त्यांना बार्डोलीच्या लढ्यांत सरकारनें निरुपायानें आपल्या इभ्रतीवर पाणी सोडून माघार घेतली याचा खरोखरच आचंबा वाटेल. परंतु बार्डोलीचा हा सत्याग्रहच इतक्या शास्त्रशुद्ध व सुव्यवस्थित पद्धतीनें चालविला गेला कीं, त्याला हटकून यश मिळणें प्राप्तच होतें. या सत्याग्रहाच्या झटापटींत सरकारच्या हातून घोडचुका झाल्या. उलटपक्षीं सरदार वल्लभभाई यांनी मात्र आपली मोहरीं इतक्या कुशलतेनें चालविलीं कीं, त्यांनीं प्रतिपक्षावर प्यादेमात केली यांत कांहीं नवल नाहीं.

बार्डोलीच्या रिव्हिजन सेटलमेंटचा जो रिपोर्ट तयार झाला तोच मुळीं चुकीच्या तत्त्वावर रचला गेला. त्या चुकीचा फायदा घेऊन बार्डोलीच्या शेतकऱ्यांनीं पुनश्च चौकशी व्हावी अशी मागणी केली. ही साधी मागणी आपण अमान्य केल्यास एवढा निकराचा लढा उपस्थित होईल अशी सरकारची कल्पनाच धांवली नाहीं. सरकारचा पहिला पाय घसरला तो येथेंच. पण तेवढ्यानें सावध होऊन आंग सांवरून न घेतां नेहमींप्रमाणें इभ्रतीच्या नादी लागून सरकारनें दुराग्रह चालविला आणि त्यामुळें अधिकाधिक तोल जाऊन अखेरीस सरकारला आपली बाजू सावरणें दुर्घट झालें. सरकारच्या पाठीराख्या टाईम्सकाराला देखील आतां अशी कबूली द्यावी लागत आहे कीं, फेरचौकशीची मागणी सरकारनें अमान्य केल्यामुळेंच या वादाला असें तोंड लागलें. या चौकशीच्या मागणीच्या पाठीशीं सत्याग्रहाचें केवढें बळ उभें आहे याचा प्रारंभीं सरकारला अंदाज करतां आला नाहीं; किंबहुना नेहमींप्रमाणें स्वतःच्या अचाट शक्तीच्या घमेंडींत सरकारनें सत्याग्रहाचें बल साहजिकपणेंच तुच्छ लेखलें. कारण आजपर्यंत किती तरी ठिकाणी शेतसाऱ्याचा बेसुमार वाढ सरकारनें केली होती आणि कांहीं ठिकाणीं त्या वाढीविरुद्ध थोडीबहुत चळवळ उद्भवली तरी ती नोकरशाहीनें आपल्या पचनीं पाडली होती. अशा रीतीनें ही बकासुराची स्वारी आजपर्यंत एकेक बळी गट्ट करून पुष्ट होत आल्यानें केव्हां तरी आपल्यालाहि एखादा खळी भेटेल अशी त्यास कल्पनाच नव्हती. पण सरतेशेवटीं बकासुरास भीम भेटला आणि त्यापुढें त्यास नमतें घ्यावें लागले

बारडोली तालुक्यांत वल्लभभाईनीं जो सत्याग्रह सुरू केला तो यशस्वी होण्याला परिस्थिति तशीच अनुकूल होती. कारण सत्याग्रह यशस्वी होण्याला ज्या ज्या गोष्टी लागतात त्या सर्व तेथें उपस्थित होत्या. सत्याग्रहाचें क्षेत्र मर्यादित होतें आणि ज्याकरितां सत्याग्रह करावयाचा ते गाऱ्हाणेंहि त्या क्षेत्रांतील बहुतेक सर्व रहिवाशांना सारखेंच लागू होतें. सत्याग्रहाची मागणी निश्चित स्वरूपाची होती व ती मान्य करण्यांत सरकारलाहि फारशी तोशीस लागण्यासारखी नव्हती. शिवाय सत्याग्रहाचें स्वरूप सनदशीर असून त्यांत इतर कोणत्याहि राजकीय अथवा सामाजिक भानगडींची भेसळ झाली नव्हती. सारांश, सत्याग्रह कोणत्या परिस्थितींत करावा याविषयीं तात्विक दृष्ट्या जे कोणते नियम शास्त्रकारांकडून घालून दिले

जातील ते सर्व या सत्याग्रहाच्या लक्ष्यांत पाळले गेले होते आणि म्हणूनच हा सत्याग्रह यशस्वी होणार अशीं चिन्हें प्रारंभापासूनच दिसत होतीं.

अशा रीतीनें या सत्याग्रहाला नैसर्गिक अनुकूलता असली तरी त्याच्या यशाचें खरें श्रेय सरदार वल्लभभाई यांच्या अघटित घटनाचातुर्याला, स्वयंसेवकांच्या शिस्तवार परिश्रमाला, आणि सत्याग्रही शेतकऱ्यांच्या निधड्या छातीच्या स्वार्थत्यागालाच दिलें पाहिजे. जो सेनापति युद्धाला प्रारंभ करण्यापूर्वी स्वपरबलाबलाचा अदाज बिनचूक करतो तोच विजयी होतो. वल्लभभाईनीं बार्डोली तालुक्यांतील रयतांच्या निश्चयाची आणि सरकारी कामगारांच्या अदूरदृष्टीची जी अटकळ केली होती ती तंतोतंत खरी ठरली म्हणूनच त्यांस हें यश लाभलें. पण त्या सर्वांपेक्षां सत्याग्रही शेतकऱ्यांच्या दृढनिश्चयावर त्यांची जी भिस्त होती ती खरोखरीच यथायोग्य ठरली. समेटाच्या वाटाघाटीचा इकडे धूमधडाका चालला होता तरी बार्डोलीच्या शेतकऱ्यांनीं समेटाविषयीं यत्किंचितहि अधीरपणा दाखविला नाहीं. त्यांनीं अल्पांशानें देखील जर आतुरता दाखविली असती, तर काकदृष्टीच्या सरकारनें लगेच त्यांच्या उतावळेपणाचा फायदा घेतला असता आणि आपल्या अटी अधिक टणक केल्या असत्या. परंतु स्वतःच्या स्वार्थत्यागाच्या सामर्थ्यावर शेतकऱ्यांचा एवढा दृढ विश्वास होता कीं, वल्लभभाई हे समेटाची भाषा बोलण्याला पुण्यास जात आहेत असें कळतांच, त्यांनीं कोणत्याहि अपमानकारक अटी मान्य करून तडजोड करूं नये अशाविषयीं रयतांनीं महात्माजीजवळ निर्भीडपणें सांगितलें कीं, 'आम्ही आमची सगळी जिनगानी जरी वल्लभभाईंच्या स्वाधीन केली असली तरी आमची अब्रू कांहीं त्यांच्या हवाली केली नाहीं !' अर्थातच अब्रूला धक्का लागण्याजोगी कोणतीहि अट मान्य करण्यास हे सत्याग्रही तयार नव्हते. सारांश, ही सत्याग्रहाची मोहीम हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या चळवळींत अत्यंत नमुनेदार अशीच मानली जाईल, आणि सत्याग्रह कोणी, केव्हां, कोठें, कशाकरितां आणि कशा प्रकारें करावा असा जेव्हां जेव्हां प्रश्न निघेल तेव्हां तेव्हां इतिहासकार उत्तम सत्याग्रहाचें नमुनेदार उदाहरण म्हणून बार्डोलीकडेच बोट दाखवितील.

# केतकी पक्षाचें खंडन

( ले.—रा. वि. पटवर्धन. )

## भीष्मनिर्याणकालाचा उल्लेख

कृत्तिकाकालीन उदगयन भीष्म—निर्याणकालीं ७। नक्षत्रांनीं मागें सरकलें होतें व तो काल मैत्र्युपनिषदांत उल्लेखिलेला काल होय असें "वैदिक आरंभस्थान" या निबंधांत म्हटलें आहे. या वाक्याचा जाणूनबुजून विपर्यास केतकीवाल्यांनीं केला आहे. वस्तुतः या गोष्टीचा धनिष्ठाविभागनिर्णयाशीं प्रत्यक्ष संबंध नाहीं. भीष्मनिर्याणकालीन उदगयनबिन्दु आणि धनिष्ठाविभागाच्या अर्ध्यावरील उदगयनबिन्दु हे एक नव्हेत. भीष्मनिर्याणकाल हा जरी मैत्र्युपनिषत्कालानें दर्शविला असला तरी तो काल आणि मैत्र्युपनिषत्काल यांचें ऐक्य वैदिक आरंभस्थान या निबन्धांत प्रस्थापित केलेलें नाहीं व तसें करणें शक्य नाहीं. या बाबतींत केतकीवालेच आडरानांत शिरून कांट्यांत अडकले आहेत. "भीष्मनिर्याणकालीं उदगयनबिन्दु ७। नक्षत्रें मागें हटला असला " तरी तो " धनिष्ठाविभागाच्या अर्ध्यापर्यंत हटला होता" असें कोणीहि व केव्हांहि म्हटलें नाहीं. असें असतांना ते शब्द पदरचे ढकलून देऊन भलता अर्थ करावयाचा हें अप्रशस्त होय. " श्रविष्ठार्धी " पर्यंत असें जर मला म्हणावयाचें असतें तर उदगयन साडेसात नक्षत्रें मागें हटलें असेंच म्हटलें असतें. कारण कृत्तिकाविभागाच्या अन्तापासून श्रविष्ठार्धापर्यंत ७॥ नक्षत्रें होतात, सवासात नव्हेत.

वेदांग-विवेचनामध्यें ज्योतिषशास्त्रदृष्ट्या जे मुद्दे अत्यंत महत्त्वाचे आहेत, ते, नक्षत्रविभागपद्धति आणि अयनबिन्दूंची स्थिति हे होत. "प्रपद्यते श्रविष्ठादौ सूर्याचान्द्रमसावुदक्, सार्पार्धे दक्षिणार्कस्तु " ह्या कारिकेवरून ते मुद्दे पूर्णपणें प्रस्थापित होतात. आणि त्यावरून अयनबिन्दूंचीं स्थानें वेदांगज्योतिषामध्यें विभाग-पद्धतीस अनुसरूनच सांगितलेलीं आहेत, तारकापद्धतीनें सांगितलेलीं नाहींत असें निर्विवाद ठरतें. ज्यो. दीक्षितांनीं तारकास्थित उदगयन मानलें त्याचें कारण हेंच कीं त्यांचा समज असा झाला होता कीं, आश्विन्यादि पद्धति हीच काय ती विभाग-पद्धति आणि हा समज पुष्कळांचा अद्यापिहि आहे. वेदांगकालीं

आश्विन्यादि पद्धति असणें शक्य नाहीं आणि दुसरी एखादी विभाग-पद्धति त्यांच्यासमोर आलेली नव्हती. म्हणून त्यांनीं तारका-स्थित उदगयनावरून वेदांगाचा कालनिर्णय केला. तथापि आल्फा धनिष्ठेंतील उदगयन हें धनिष्ठा-विभागारंभींचें उदगयन असें ज्यो. दीक्षित हें मुळींच मानीत नाहींत आणि त्यांनीं तसें मानणें शक्य नाहीं. कारण असें कीं इ. स. पूर्वी १४०० च्या सुमारास आल्फा धनिष्ठेमध्यें उदगयन होतें त्याचप्रमाणें इ. स. पूर्वी १३३० च्या सुमारास तें बीटा धनिष्ठेमध्येंहि होतें म्हणनच दीक्षित लिहितात कीं "बीटा-डेल्फिना ही योगतारा धरिली तर इ. स. पूर्वी १३३८ हा ( वेदांग ) काल होईल." परंतु मुद्दा हा कीं उदगयन तुम्ही आल्फामध्यें माना किंवा बीटामध्ये माना, परंतु त्या तारा धनिष्ठाविभागारंभीं होत्या, अथवा आल्फा किंवा बीटा या धनिष्ठापुंजांतील ताऱ्यापासूनच विभक्त केल्या होत्या हें स्वतंत्र पुराव्यानें सिद्धच केलें पाहिजे. तें गृहीत धरून चालणार नाहीं. कारण असें कीं आल्फा वा बीटा या तारा धनिष्ठाविभागारंभी नव्हत्या असेंच उलट सिद्ध होत आहे.

इ. सनापूर्वी १४०० वर्षे हा जो काल ज्यो. दीक्षितांनी ठरविला तो धनिष्ठाविभागारंभींच्या उदगयनाचा नव्हे हें ज्यो. दीक्षितांच्या स्पष्ट विवेचनावरून कसें सिद्ध होतें तें वर दाखविलेंच आहे. त्यावरून आल्फा तारा धनिष्ठाविभागारंभी नाहीं असेंच ठरतें. दीक्षितांचा कालनिर्णय हा धनिष्ठा ताऱ्यांतील उदगयनाचा आहे, धनिष्ठाविभागाच्या आरंभरेषेवरील उदगयनबिन्दूचा नव्हे, ही गोष्ट पुनः पुनः सांगणें भाग आहे. कारण वाटेल तीं कुलंगडीं करून केतकी पक्ष भोळ्या वाचकांस घोटाळ्यांत पाडीत आहे.

नुसतें अमुक नक्षत्रारंभीं उदगयन किंवा दक्षिणायन होतें येवढें म्हटल्यानेंच जर आपण त्या नक्षत्राच्या योगताऱ्यापासून विभागारंभ धरूं लागलों तर अनवस्था होईल. नक्षत्रविभाग वारंवार बदलावे लागतील. "श्रविष्ठादौ" असें म्हटल्यानें जर धनिष्ठा योगतारा धनिष्ठाविभागारंभीं मानावयाची, तर मघाद्यं ( दक्षिणायन ) असें मैत्र्युपनिषदांत म्हटलें आहे त्यावरून मघा योगतारा मघाविभागारंभीं कां मानूं नये ? जो न्याय धनिष्ठेसंबंधानें तोच न्याय मघा नक्षत्रासंबंधानेंहि अमलांत आणलाच पाहिजे. धनिष्ठारंभ म्हणजे जर धनिष्ठा योगतारा, तर मघारंभ म्हणजे मघा योगतारा असाच अर्थ घ्यावा लागेल. दोन्हिं ठिकाणीं सारख्याच पद्धतीचा शब्दसमुच्चय आहे तर दोनहि ठिकाणीं एकाच पद्धतीचा अर्थ केला पाहिजे. दोनहि ठिकाणीं एकच न्याय लावला पाहिजे. केतकीवाले असें कदाचित् म्हणतील कीं जेव्हां विभागपद्धति सुरू होते तेव्हां कोणत्या तरी नक्षत्राचा योगतारा विभागारंभीं मानून विभागपध्दति चालू केली जात असे असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. त्यावर आम्ही उलट विचारतों कीं ठीक आहे. पण असें करण्याचा योग्य प्रसंग कोणता? तर तो प्रसंग अशा वेळीं घडतो कीं नक्षत्राच्या योगतारेमध्ये ( १ ) वसंतसंपात (२) शरत्संपात (३) अथवा उदगयन किंवा (४) दक्षिणायन हे महत्त्वाचे बिन्दू केव्हां तरी आलेले असतात. किंवा नक्षत्र-पुंजांतील एखाद्या महत्त्वाच्या पुंजांतून विषुववृत्त जात असतें. याशिवाय दुसरा कोणताहि प्रसंग विभागपध्दति प्रचलित होण्यास कारण असण्याचा संभव नाहीं.

आतां केतकीवाल्यांना दुसरी तोंडच उरत नाहीं धनिष्ठाविभागारंभी उदगयन आले तेव्हांच विभागपध्दति सुरू झाली, त्यापूर्वी नक्षत्रविभागपध्दति नव्हती हेंच केतकीवाल्यांनीं सिध्द केलें पाहिजे. त्यांनीं दुसरें असेंहि सिद्ध केलें पाहिजे कीं, प्राचीन सूर्यसिद्धान्त जेव्हां प्रचारांत आला तेव्हां त्या सिद्धान्तानें धनिष्ठाविभागपद्धतीच मानली होती. परंतु अशी सिद्धता केतकी पक्षाकडून कालत्रयीं सिद्ध होणें नाहीं. उलट आम्ही असें सिद्ध करूं शकतों कीं, नक्षत्रविभागपद्धति ही वेदांगपद्धतीपूर्वीच प्रचारांत आली होती. आणि ह्या आमच्या विधानाचें उत्कृष्ट प्रत्यंतर

## मैत्र्युपनिषत् हेंच होय

मैत्र्युपनिषत् हें वेदांगज्योतिषाच्या अगोदर पांचशें वर्षें रचलें गेलें आणि त्यांत 'मघाद्यं' 'श्रविष्ठार्धं' असा विभागपद्धतीचा स्पष्ट उल्लेख आहे. या वेळीं उदगयनबिन्दु धनिष्ठापुंजांतील कोणत्याहि तारेमध्यें नव्हता. तेव्हां मैत्र्युपनिषदांमध्यें उल्लेखिलेली विभागपद्धति धनिष्ठा-पुंजांतील आल्फा तारेपासून केलेली असणें शक्यच नाहीं. मैत्र्युपनिषदांत विभागपद्धतीच आहे यांत वाद नाहीं. आणि विभागपद्धतीचें आदिकारण जे संपात अयनबिन्दु किंवा विषुवप्रोतत्व ह्यांपैकीं कोणत्याहि कारणाचा संबंधच धनिष्ठा-पुंजाशीं नव्हता. मग मैत्र्युपनिषदांतील विभाग धनिष्ठा तारेपासून कसे संभवतील ?

## वेदांगापूर्वी पांचशें वर्षें

झालेल्या मैत्र्युपनिषदांतील विभागपद्धतीचा संबंध पांचशें वर्षांनंतर झालेल्या वेदांगाशीं संबंध जोडणें म्हणजे मुलाचा जन्म हेंच बापाच्या जन्माचें कारण आहे असें म्हटल्यासारखें वेडगळपणाचें आहे. केतकीवाले कांहीं म्हणोत; ही नक्षत्रविभागपद्धति मैत्र्युपनिषत्कालीं म्हणजे शालिवाहन शकापूर्वी दोन हजार वर्षांपासून अर्थात् वेदांगज्योतिषाच्या पूर्वी पांचशे वर्षांपासून तरी प्रचारांत आहे. अर्थात् ती

कृत्तिका योगतारेपासून केली असली पाहिजे. धनिष्ठापद्धति हें निवळ थोतांड आणि केतकरी पाखाण्ड होय. यावरून धनिष्ठा पक्ष हा बनावट अशास्त्रीय आणि खोटा असून

**कृत्तिकाविभाग पध्दतीच**

वैदिक परंपरादर्शक होय, ही गोष्ट निःसंशय सिद्ध होत आहे.

याविषयींचें आणखी एक ज्ञापक माघी पौर्णिमा होय हें वर सांगितलेंच आहे. माघी पौर्णिमेस दक्षिणायन असेल तेव्हां त्या अनुरोधानें उदगयन-बिंदूचें चलन किती अंश होऊं शकेल हाहि एक महत्त्वाचा प्रश्न आहे. आश्लेषा नक्षत्रविभागाच्या पहिल्या अर्ध्याच्या अन्तिम सीमेवर जेव्हां दक्षिणायन बिंदु पोहोंचला तेव्हां पौषी अमावास्या समाप्त होत होती' हें "माघशुक्लप्रवृत्तस्य पौषकृष्णसमापिनः युगस्य" ह्या वचनावरून स्पष्ट होतें. म्हणजे आश्लेषा नक्षत्राच्या प्रथमार्धापासून मागें पौष महिन्याची व्याप्ति होती, म्हणून आश्लेषा–विभागाच्या द्वितीयार्धापासून मघा–विभागाच्या अन्तापर्यंत कोणत्याहि अंशावर जरी चंद्र पूर्ण झाला तरी ती पौर्णिमा माघीच ठरणार, आणि त्या पौर्णिमेच्या चन्द्रास अनुसरून उदगयनबिन्दूचें जें जें स्थान येईल त्या त्या स्थानीं उदगयनाचे दिवशीं माघी पौर्णिमाच असणार हें उघड आहे. तेव्हां मघा योगतारेमध्यें जी पौर्णिमा होईल तीच माघी पौर्णिमा; आणि माघी पौर्णिमेचें उदगयन मघा योगतारेसमोरील बिन्दूंतच झालें पाहिजे ही कल्पनाच चुकीची आहे, आणि माघी पौर्णिमेच्या दिवशीचें उदगयन शततारका तारेच्या पश्चिमेस ८ अंशांवर असणेंहि शक्य आहे असें सिद्ध होतें.

(अपूर्ण)

# नेहरू कमिटीनें तयार केलेली हिंदी स्वराज्य–घटना

सर्व–पक्षीय परिषदेनें भावी हिंदी स्वराज्याची घटना तयार करण्याकरितां जी पोटकमिटी नेमली होती त्या कमिटीनें तयार केलेल्या हिंदी स्वराज्यघटनेचा आराखडा पुढीलप्रमाणें आहे.

**नैसर्गिक मूलभूत हक्क**

( १ ) कायदे करणें, न्याय देणें व अम्मलबजावणी करणें ही जी त्रिविध राजसत्ता तिचा उगम जनतेपासूनच असून भावी हिंदी लोकसत्ताक राज्यांत ही सत्ता या स्वराज्यघटनेस अनुसरून निर्माण होणाऱ्या संस्थांच्या मार्फत चालविली जाईल.

( २ ) कायद्याच्या संमतीशिवाय कोणाचेंहि स्वातंत्र्य हिरावून घेतलें जाणार नाहीं, कोणाच्याहि घरांत प्रवेश केला जाणार नाहीं, त्याची जिनगी काढून घेतली जाणार नाहीं, किंवा जप्त केली जाणार नाहीं.

( ३ ) सार्वजनिक नीति व सुव्यवस्था याला बाध न येईल, अशा रीतीनें कोणालाहि मतस्वातंत्र्य व धर्मस्वातंत्र्य राहील व आपल्या धर्माचे आचारविचार पाळतां येतील.

(४) सार्वजनिक नीति व सुव्यवस्था यांस बाध न येईलशा रीतीनें स्वतःचें मत बोलून दाखविण्यास, शस्त्रें न घेतां एकत्र जमण्यास, संघ किंवा संस्था स्थापन करण्यास प्रत्येकास हक्क आहे. ( शीखांना नेहमीं किरपाण वापरण्यास प्रतिबंध नाहीं.)

(५) हिंदी लोकसत्तेच्या प्रत्येक नागरिकाला प्राथमिक शिक्षण मोफत मिळण्याचा हक्क आहे. आणि नवीन लोकसत्ताक राज्यघटनेची घडी बसतांच तसें शिक्षण जात, धर्म, पंथ इत्यादि भेद मनांत न आणतां सर्वांस दिलें जाईल.

(६) कायद्याच्या दृष्टीनें सर्व नागरिक समान दर्जाचे असून सर्वांच्या नागरिकत्वाचे हक्कावर सर्वांचा समान हक्क आहे.

(७) कोणत्याहि फौजदारी कायद्यांत कोणाहि व्यक्तीला किंवा जातीला वेगळा कायदा किंवा नियम लागू केला नाहीं.

(८) ज्या वेळीं एखादें कृत्य घडलें असेल त्या वेळच्या कायद्यानें तो गुन्हा नसल्यास तें कृत्य केल्याबद्दल त्या व्यक्तीस शिक्षा केली जाणार नाहीं.

(९) कोणासहि शारीरिक जाचाची किंवा कसलीहि शारीरिक शिक्षा दिली जाणार नाहीं.

(१०) इंग्लंडांतील हेबिअस कॉर्पस ॲक्टाप्रमाणें कोणाही व्यक्तीस आपल्याला मॅजिस्ट्रेटपुढें उभें करा अशी मागणी करण्याचा हक्क राहील. मात्र युद्धाच्या किंवा बंडाच्या वेळीं हा हक्क हिंदी कायदेमंडळाच्या संमतीनें तहकूब केला जाईल. कायदेमंडळाची बैठक चालू नसल्यास गव्हर्नर–जनरल-इन-कौन्सिल यांस अधिकार तात्पुरता राहील.

(११) अमुक एक धर्म हा सबंध हिंदुस्थानाचा किंवा कोणत्याहि प्रतीचा सरकारी धर्म आहे असें मानलें जाणार नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या विशिष्ट धर्माला किंवा पंथाला किंवा एखाद्या व्यक्तीला धर्मासाठीं म्हणून कांहीं विशेष हक्क दिला जाणार नाहीं किंवा काढूनहि घेतला जाणार नाहीं.

(१२) सरकारी मदत घेणाऱ्या किंवा खुद्द सरकारी अशा कोणत्याही शिक्षण–संस्थेंत कोणाहि

विद्यार्थ्यांवर धार्मिक शिक्षणाच्या वर्गाला हजर राहण्याची सक्ति केली जाणार नाहीं.

(१३) विशिष्ट धर्ममतामुळें कोणाहि व्यक्तीला कोणताहि धंदा करण्याला, सन्मान मिळविण्याला, नोकरीवर नेमणूक होण्याला किंवा विशिष्ट अधिकार मिळण्याला हरकत घेतली जाणार नाहीं.

(१४)सार्वजनिक रस्ते, सार्वजनिक विहिरी व सार्वजनिक आरामस्थानें यांचा उपयोग करण्याचा हक्क सर्वांस सारखा आहे.

(१५) मजुरांची स्थिति सुधारण्याकरितां आणि आर्थिक उन्नतीकरितां संघ करण्याचा हक्क सर्वांस असून तो हक्क कायद्यानें काढून घेतला जाणार नाहीं, किंवा संकुचित केला जाणार नाहीं.

(१६) नोकरी करण्याचा करार मोडणें हा फौजदारी गुन्हा मानूं नये.

(१७) आरोग्य सुधारणे, तनूदुरुस्ती राखणें, पोट भरेशी मजुरी मिळणे, प्रसूतिकालांत सवलती देणे, बालसंगोपन, वृद्ध, व्यंग व बेकार यांची व्यवस्था लावणें याकरितां अवश्य ते कायदे करण्यांत येतील.

(१८) कायदेकानूस विरोध न येईल अशा रीतीनें हत्यारें वापरण्यास प्रत्येक नागरिकास हक्क आहे.

(१९)नागरिकत्वाचे हक्क स्त्रियांना व पुरुषांना समसमान आहेत; त्यांत भेदभाव मानला जाणार नाहीं.

## कायदे–मंडळ

(१) लोकसत्ताक हिंदी स्वराज्यांत कायदे करण्याची सत्ता पार्लमेंटाकडे राहील. राजा, सीनेट व प्रतिनिधिसभा हीं तीन मिळून पार्लमेंट होतें.

(२) राजाकडून गव्हर्नर–जनरलाची नेमणूक केली जाईल व राजाने त्याजकडे सोपविलेले अधिकार नेमणुकीच्या मुदतींत त्याजकडून हिंदुस्थानांत चालविण्यांत येतील. मात्र ते अधिकार या स्वराज्यघटनेस अनुसरून असावे; तिला सोडून असूं नयेत.

(३) या घटनेंत ठरविलेला पगार गव्हर्नर–जनरल यास प्रारंभीं मिळेल. पुढें तो पगार ठरविण्याचा अधिकार पार्लमेंटाकडे राहील. मात्र कोणाहि गव्हर्नर-जनरलाच्या नेमणुकीच्या मुदतींत मध्यंतरींच त्याच्या पगारांत फेरबदल केला जाऊं नये.

(४) सीनेटचे सभासद २०० असावेत व ते प्रत्येक प्रांतानें लोकसंख्येच्या प्रमाणांत निवडून द्यावेत. पण अगदीं लहान प्रांताला किमान संख्या तरी निवडून देतां आली पाहिजे. ही निवड प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांनीं प्रमाणशीर मतदानपद्धतीनें करावी.

(५) प्रतिनिधिसभेंत ५०० सभासद असावेत. वयाला २१ वर्षे पूर्ण झालेल्या व मत देण्याला कायद्यानें नालायक न ठरविलेल्या प्रत्येक स्त्री–पुरुषास मत देण्याचा हक्क आहे. सीनेटची व प्रतिनिधिसभेची सभासदसंख्या वाढविण्याचा हक्क पार्लमेंटाला राहील.

( ६ ) प्रतिनिधिसभेची मुदत पांच वर्षांची व सीनेटची ७ वर्षांची असावी. पण गव्हर्नर–जनरलाला ती मुदत योग्य वाटल्यास वाढविण्याचा किंवा मुदतीपूर्वी सभा बरखास्त करण्याचा अधिकार राहील. कोणतीहि सभा बरखास्त केल्यापासून सहा महिन्याच्या आंत दुसरी सभा पुनः भरली पाहिजे.

( ७ ) देशांत शांतता व सुव्यवस्था राखणें, प्रांतिक सरकाराकडे सोंपविलेल्या कामाखेरीज बाकीच्या कामाची उठावणी करणें, देशांतील व परदेशांतील सरकारी नोकर व इतर नागरिक यांचा सांभाळ करणें, सैन्य, आरमार व नाविक दळ याची योग्य तरतूद करणें वगैरेसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार पार्लमेंटास आहे.

(८) इंग्लंडाच्या स्वयंशासित वसाहतींना परराष्ट्रांशीं जेवढा संबंध ठेवण्याचा अधिकार आहे तेवढाच अधिकार त्या बाबतींत याहि पार्लमेंटाला राहील. मात्र हिंदी संस्थानांच्या संबंधाचा प्रश्न अलाहिदा ठरविला जाईल.

(९) जमाखर्चाच्या संबंधाचें बिल ( मनी बिल) आधीं प्रतिनिधी–सभेंत मांडून पास करून मग सीनेटकडे रवाना होईल. सीनेटनें ते जशाचें तसें पास न केल्यास सीनेटनें केलेल्या फेरफाराचा विचार प्रतिनिधी–सभेंत पुनः होईल आणि मग प्रतिनिधीसभेच्या निकालानंतर तें बिल सीनेटकडे न पाठवितां एकदम गव्हर्नर–जनरलाच्या संमतीकरितां रवाना केलें जाईल.

(१०) वरील अपवादाखेरीज इतर कोणतेंहि बिल प्रथम कोणत्याहि एका सभेंत प्रथम पास करून मग दुसऱ्या सभेकडे पाठविलें जाईल. दोनहि सभांची संमति मिळाल्यावर मग तें गव्हर्नर–जनरलाकडे रवाना होईल.

(११) मनी बिलाखेरीज इतर कोणत्याहि बिलावर सीनेट व प्रतिनिधीसभा यांचें एकमत न होईल तर संयुक्त अधिवेशन होऊन त्यांत मतभेदाच्या मुद्द्यांचा विचार होईल आणि तेथें बहुमतानें पास झाल्याप्रमाणें तें बिल गव्हर्नर–जनरलाकडे संमतीकरितां पाठविण्यांत येईल.

(१२) वरील कलमांत नमूद केल्याप्रमाणें कोणतेंहि बिल गव्हर्नर–जनरलाकडे गेलें असतां त्यानें त्यास संमति द्यावी किंवा फेरविचाराकरितां तें परत पाठवावें किंवा राजाच्या संमतीकरितां त्यांजकडे पाठवून द्यावें.

(१३) राजाकडून किंवा गव्हर्नर–जनरलाकडून दुरुस्ती करण्याकरितां एखादें बिल परत आल्यास त्याचा कायदेमंडळांत पुनः विचार होऊन पास

झालेलें बिल राजाच्या सहीकरितां पुनः पाठविण्यांत यावें. राजाची किंवा त्याच्या नांवे गव्हर्नर–जनरलाची संमति मिळाल्याखेरीज कोणत्याही बिलाला कायद्याचें स्वरूप येणार नाहीं.

## अधिकारी मंडळ

(१) हिंदी लोकसत्ताक राज्याचा अधिकार राजाच्या नांवानें गव्हर्नर–जनरल यानें आपल्या कार्यकारी मंत्र्याच्या सल्ल्यानें व पार्लमेंटानें पास केलेल्या कायद्यास अनुसरून चालवावा.

(२) कार्यकारी मंडळांत एक प्रधान आणि सहा मंत्री असावेत. मंत्र्यांची संख्या कमीजास्त करण्याचा अधिकार पार्लमेंटाला आहे. हें मंत्रिमंडळ आपल्या सर्व कारभाराबद्दल कायदेमंडळाला जबाबदार राहील.

(३) पार्लमेंट दुसरी कांहीं व्यवस्था सुचवीपर्यंत कामगारांच्या नेमणुका व बडतर्फी गव्हर्नर-जनरलाच्या हातीं किंवा त्यानें सोंपविलेल्या कामगाराच्या हातीं राहील.

(४) लष्कर आरमार व वैमानिक दल यांजवरील सत्ता राजाचे प्रतिनिधि या नात्यानें गव्हर्नर–जनरलाकडे राहील.

(५) कानडा देशांतल्याप्रमाणें परदेशांतून आपले वकील व हायकमिशनर्स यांची नेमणक गव्हर्नर–जनरल–इन–कौन्सिल यानें करावी व त्यांचीं कामें त्यांचा पगार व नोकरीच्या अटी त्यानेंच ठरवून द्याव्या.

## प्रांतिक राज्यव्यवस्था

(१) प्रत्येक प्रांतांत एक गव्हर्नर असावा व त्याची नेमणूक राजानें करावी व तो राजप्रतिनिधि मानला जावा. गव्हर्नराचा पगार पार्लमेंटाकडून ठरविला जाईपर्यंत त्यास या बिलांत नमूद केलेला पगार देण्यांत यावा.

(२) प्रांतिक कायदेमंडळांत दरएक लक्षाला एकप्रमाणें प्रांताच्या लोकसंख्येच्या मानानें सभासद असावेत. एक कोटीहून कमी वस्ती असल्यास त्या प्रांताचे कायदेमंडळांत निदान शंभर सभासद असावेत. कायदेमंडळाची मुदत पांच वर्षे असावी, पण ती कमीजास्त करण्याचा अधिकार कायदेमंडळाला असावा.

(३) गव्हर्नरानें कायदेमंडळ बरखास्त केल्यापासून सहा महिन्यांच्या आंत नवीन निवडणूक होऊन कायदेमंडळाची बैठक व्हावी.

(४) कायदेमंडळापुढें येणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा निकाल बहुमतानें केला जावा. कायदेमंडळांतील एखादी जागा रिकामी असली तरी त्याच्या कामास बाध येऊं नये.

(५) प्रांतिक कायदेमंडळाकडे या कायद्यानें जीं खातीं सोंपवून दिलीं आहेत त्या खात्यांसंबंधानें कोणताहि कायदा करण्याचा व बदलण्याचा अधिकार प्रां. कायदेमंडळास आहे. कोणत्याहि प्रां. कायदेमंडळाला स्वतः केलेल्या कायद्याखेरीज इतर कोणत्याहि कायदेमंडळानें केलेला कायदा बदलतां किंवा रद्द करतां येणार नाहीं.

(६) कायदेमंडळानें आपला अध्यक्ष व उपाध्यक्ष आपल्या सभासदांतूनच निवडावा व त्याचा पगार ठरवून द्यावा.

(७) कायदेमंडळानें पास केलेल्या बिलाला गव्हर्नर व गव्हर्नर–जनरल यांची संमति मिळाल्याखेरीज तो कायदा पास झाला असें मानतां येणार नाहीं.

(८) प्रांताचा कारभार चालविण्याकरितां गव्हर्नराला पांच मंत्र्यांचें एक सल्लागार मंडळ असावें. या पांच मंत्र्यांपैकीं मुख्य मंत्र्याची नेमणूक गव्हर्नरानें स्वतः प्रथम करावी व बाकीचे चार मंत्री मुख्य मंत्र्याच्या सल्ल्यानें नेमावे.

## न्यायखातें

(१) सुप्रीम कोर्ट नांवाचें एक कोर्ट स्थापलें जावें व त्या कोर्टाकडे पार्लमेंट सोंपवून देईल तेवढा अधिकार असावा. या कोर्टांत एक मुख्य न्यायाधीश आणि पार्लमेंट ठरवील तितके इतर न्यायाधीश असावेत. या जज्जांचा नेमणूक गव्हर्नर-जनरल–इन–कौन्सिल यानें करावा व त्यांस पार्लमेंट ठरवील तो पगार मिळावा. पण कोणाहि जज्जाचा पगार त्याच्या कामाच्या मुदतींत कमी केला जाऊं नये.

(२) सुप्रीम कोर्टाच्या कोणत्याहि न्यायाधीशाला त्याच्या गैरवर्तनावरून काढून टाकण्याविषयीं पार्लमेंटानें ठराव करून विनंति केल्याशिवाय गव्हर्नरजनरलानें त्यास कामावरून काढूं नये.

(३) या सुप्रीम कोर्टाकडे पुढील कामें सोंपविण्यांत येतीलः—

(अ) गव्हर्नरजनरलानें सोंपवून दिलेलीं कामें.

(आ) प्रांता–प्रांतांमधील वाद.

(इ) परदेशचे कॉन्सल्स किंवा इतर प्रतिनिधि यांच्यासंबंधाचे खटले.

(ई) सरकार वादी किंवा प्रतिवादी असलेले खटले.

(उ) खालच्या कोर्टांतून आलेलीं अपिलें.

(४) सुप्रीम कोर्टाचा निकाल अखेरचा व कायमचा मानला जाईल. या कोर्टाच्या निकालावर पार्लमेंट ठरवील तेवढ्या विशिष्ट बाबतींत राजाकडे अपील करतां येईल. पण तसें अपील करण्याला सुप्रीम कोर्टाची अनुमति मिळविली पाहिजे. पार्लमेंटाच्या कोणत्याहि निर्बंधानें राजेसाहेबांच्या अपील ऐकण्याच्या नैसर्गिक हक्काला कोणत्याहि रीतीनें बाध येऊं शकणार नाहीं.

## जमाखर्चाची व्यवस्था

( १ ) हल्लींच्या १८५८ ते १९१९ पर्यंतच्या इंडिया अॅक्टानें हिंदुस्थानाचा जो वसूल स्टेटसेक्रेटरीच्या नांवें जमा होतो तो यापुढें गव्हर्नरजनरलाच्या नांवानें जमा केला जाईल.

(२) संस्थानिकांडून येणारी खंडणी, करवसुली, दंड, जप्त केलेली जिनगी, बेवारसी जिनगी इत्यादि वसुलाचे प्रकार असून तो सर्व वसूल हिंदुस्थान-सरकारच्या नांवें जमा केला जाईल.

(३) हा कायदा अंमलांत येऊन नवीन राज्य-घटना सुरू होतांच सरकारनें एक चौकशी कमिशन नेमावें. त्या कमिशनमध्यें मध्यवर्ती सरकातर्फे एक आणि प्रत्येक प्रांतिक सरकारातर्फे एक असे प्रतिनिधी असावे आणि मध्यवर्ती सरकारचा एक अधिकारी त्या कमिशनाचा अध्यक्ष असावा. या कमिशनानें जमाखर्चाच्या कोणत्या बाबी प्रांतिक सरकाराकडे असाव्या आणि कोणत्या मध्यवर्ती सरकाराकडे असाव्या आणि यापुढें मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांचे आर्थिक संबंध कसे असावेत हें सर्व ठरवावें.

( ४ ) हिंदुस्थानाचें लष्कर, आरमार व आकाशदल यांतील अधिकारी शिक्षण देऊन तयार करणे आणि त्याकरितां शाळा व कॉलेजें काढणें व त्यांतील शिक्षणाची व्यवस्था करणें हीं कामें या कमिशनानें करावीं. त्याचप्रमाणें या कमिशनानें प्राथमिक शिक्षण सर्वत्र मोफत व सुभलतेनें कसें मिळं शकेल याविषयीं रिपोर्ट करावा. आणि मागसलेल्या वर्गांना विशेष सवलती कोणत्या द्याव्या हेंहि ठरवावें. वर दर्शविल्याप्रमाणें जमाखर्चाची नवी व्यवस्था होईपर्यंत जुनी पद्धति कायम रहावी.

## संरक्षणोपाय

( १ ) गव्हर्नरजनरलानें आपला मुख्य दिवाण, लष्करी खात्याचा मंत्री, परराष्ट्रमंत्री, सेनापति, दर्यासारंग, विमानाधिकारी, जनरल स्टाफवरील अधिकारी आणि दोन तज्ज्ञ इतरयांची मिळून एक कमिटी नेमावी व त्या कमिटीनें देशाच्या संरक्षणासंबंधीं गव्हर्नर-जनरलाला सल्ला द्यावा. या कमिटीचा अभिप्राय पडेल त्याप्रमाणें संरक्षणाच्या कामाकडे खर्च व्हावा. पण त्यायोगानें देशाच्या सुरक्षिततेस बाध येऊं नये. पार्लमेंटाला देशाच्या संरक्षणासाठीं जो खर्च करावा लागेल त्यावर बजेटाच्या वेळीं मत देण्याला लोकप्रतिनिधींना अधिकार असावा.

(२) ही घटना अमलांत येण्याचेपूर्वी जे सरकारी नोकर निरनिराळ्या हुद्द्यावर काम करीत असतील त्यांच्या हक्कास हरकत येऊं नये व त्यांची मर्जी असेपर्यंत त्यांना त्या कामावर राहूं द्यावें. जर कोणा कामगारास या नव्या राज्यघटनेखालीं काम करावयाचें नसेल तर त्यानें तीन वर्षांच्या आंत राजीनामा द्यावा.

(३) ही योजना अंमलांत आल्यावर गव्हर्नरजनरलानें एक पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमावें. त्या कमिशनानें सरकारी कामगारांच्या नेमणुका, बहाली, बडतर्फी, पेन्शन देणें वगैरे कामांवर सत्ता चालवावी. हल्लीं लष्कराच्या कोणत्याहि शाखेंत जे कोणी काम करीत असतील त्यांना त्यांचा हल्लींचा पगार, पेन्शन वगैरे मिळत राहील.

## प्रांतांची पुनर्रचना

(१) पार्लमेंटानें कोणत्याहि प्रांताच्या जनसमूहानें बहुमतानें तशी मागणी केल्यास भाषावार नवीन प्रांतरचना करावी. मात्र कोणताहि नवा प्रांत बनवावयाचा तो आपल्या जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्याला समर्थ आहे कीं नाहीं हें पाहावें. या शिफारसीस अनुसरून सिंध व कर्नाटक हे प्रांत अलग करण्यांत यावे.

( २ ) हिंदू-मुसलमानाचे मतदारसंघ वेगवेगळे न ठेवतां एकत्र करावे व त्या मतदारसंघांनीं प्रांतिक कौन्सिलांच्या व वरिष्ठ कौन्सिलांच्या सभासदांची निवड करावी.

( ३ ) ज्या प्रांतांत मुसलमानांची बहुसंख्या नाहीं, त्या प्रांतांत मुसलमानांकरितां आणि वायव्य सरहद्दीवरील प्रांतांत मुसलमानेतरांकरितां जागा राखून ठेवाव्या. जागा राखून ठेवावयाच्या त्या लोकसंख्येच्या प्रमाणांत असाव्या. पण जेथें अशा जागा राखून ठेवल्या असतील तेथें त्या त्या वर्गाला चढा-

# नेहरू कमिटीची स्वराज्ययोजना

सायमन कमिशनच्या नेमणुकीनें हिंदुस्थानचा इतर कोणताहि फायदा झाला नसला तरी हिंदी लोकांना डवचल्यामुळें त्यांचा स्वाभिमान जागृत झाला आणि त्यांच्यांतील कच्चापक्क्यांची पारख झाली. सायमन कमिशनच्या नेमणुकींत हिंदी राष्ट्राच्या स्वयंनिर्णयास कोठेंच वाव न मिळाल्यानें हिंदी राष्ट्रानें त्या कमिशनावर बहिष्कार टाकला. सायमन सप्तक प्रथम हिंदुस्थानांत आलें त्या वेळीं सर्वत्र हरताळ पाडण्याचा निश्चय तर कॉंग्रेसनें केलाच होता. पण हरताळ पाडणें, साक्षीला न जाणें, मागितलेली माहिती न पुरविणें हें सर्व नकारात्मक कार्यक्रम झाले. तथापि त्यापासून आपला स्वयंनिर्णयाचा हक्क आपण बजावला असें होत नाहीं. यास्तव बहिष्काराच्या निषेधात्मक कार्यक्रमाबरोबरच स्वतः स्वराज्याची घटना तयार करण्याचा विधायक कार्यक्रमहि राष्ट्रानें एकजुटीनें पार पाडावा अशी सूचना आम्ही त्याच वेळीं केली होती. आणि ही सूचना सर्वच बहिष्कारवाद्यांस मान्य होण्यासारखी असल्यामुळें त्या वेळेपासूनच हिंदी राष्ट्राची स्वराज्यघटना तयार करण्याचा संकल्प सोडण्यांत आला. त्यास अनुसरून कित्येकांनीं व्यक्तिशः आपापल्या योजना पूर्वीच प्रसिद्ध केल्या आहेत. तथापि हल्लींचा प्रसंग व्यक्तींच्या मागणीचा नसून राष्ट्राकडून संघटित मागणी पुढें आली तरच कोठें थोडीशी दाद लागावयाची. या कारणामुळे स्वराज्यसंघटनेचे वैयक्तिक प्रयत्न बाजूस सारून सर्व राष्ट्राची एकमुखी मागणी तयार करण्याकरितां एक संयुक्त परिषद भरविण्यांत आली. त्या परिषदेंत नुसत्या राष्ट्रीय सभायाल्यांसच प्रवेश होता असें नव्हे. तर ज्यांचा हिंदी राष्ट्रांशीं अत्यंत दूरचा संबंध अशा अँग्लो-ईंडियनांना सुद्धां पाचारण केलें होतें. त्या परिषदेनें पंडित मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालीं एक पोट-कमिटी नेमली. त्या पोट-कमिटीनें तयार केलेली लोकसत्ताक राष्ट्राची स्वराज्यघटना नुकतीच प्रसिद्ध झाली आहे.

एकटे लॉर्ड बर्कनहेड यांनाच नव्हे तर आमच्यांतल्याच कित्येक अधीर वृत्तीच्या लोकांनाहि कमिटीकडून एकमतानें एखादी स्वराज्यघटना तयार होऊं शकेल याविषयीं संशयच वाटत होता. आणि प्रसिद्ध झालेली योजना तरी अगदीं पूर्णपणें एकमतानें तयार झाली आहे असें नाहीं. तथापि तींत इतकें तरी मतैक्य साधलें आहे हेंच विशेष होय. अर्थातच अशी ही योजना प्रसिद्ध होतांच पंडित मोतीलाल नेहरू व त्यांचे सहकारी यांच्यावर सगळीकडून अभिनंदनाचा वर्षाव होऊं लागला आहे. या रिपोर्टाची चर्चा करण्यासाठीं मुस्लीम लीगनें आपली बैठक लखनौस येत्या आठवड्यांत भरविण्याचें ठरविलें आहे. हिंदुमहासभेनेंहि आपल्या कार्यकारी मंडळाचें अधिवेशन तेथेंच भरविण्याचें योजिलें आहे. या दोन दिव्यांतून पार पडल्यानंतर तो रिपोर्ट ता. २८ रोजीं तेथेंच भरणाऱ्या सर्व-पक्षीय परिषदेपुढें मांडण्यांत येईल आणि या तिसऱ्या दिव्यांतून जर तो धडपणें बाहेर पडला तर त्याला संयुक्त राष्ट्राच्या एकमुखी मागणीचें स्वरूप येईल. इतके सगळे सोहाळे होतां होतां नेहरू कमिटीच्या या गुणी बाळाचा जीव दृष्ट लागून अर्धमेला होतो कीं काय याची धास्तीच वाटते. कारण तूर्त तरी सत्तर वर्षांच्या वृद्ध वंध्येला मोठ्या नव्या नवसानें झालेल्या बाळाप्रमाणें बहुतेकांकडून याचें कौतुकच करण्यांत येत आहे. आणि वास्तविक पाहतां ज्या परिस्थितींत हें बाळ जन्माला आलें ती परिस्थिति लक्षांत घेऊनच याच्या गुणावगुणांची चिकित्सा केली पाहिजे. एरवीं या रिपोर्टाला स्वतःचें अंगभूत असें महत्व थोडेंच आहे, कानडा, आस्ट्रेलिया, न्यूझीलंड, दक्षिण आफ्रिका व आयरिश फ्रीस्टेट अशा चार पांच स्वायत्त वसाहतींची राज्यघटना पुढें ठेवून तींतून निवडक कलमें घेऊन ही घटना बनविलेली आहे. कोणाहि चार कायदेपंडितांकडे असली कामगिरी सोपविली असती तरी त्यांनीं असलें किंवा याहूनहि रुचकर असें कायद्याचें कडबोळें बनवून दिलें असतें. पण नेहरू कमिटीच्या स्वराज्य-घटनेच्या मागें जी पार्श्वभूमिका आहे तिच्यामुळेंच या घटनेला वैशिष्ट आलें आहे आणि त्या पार्श्वभूमिकेच्या अनुरोधानेंच या रिपोर्टाच्या गुणावगुणांचें परीक्षण केलें पाहिजे.

मद्रासच्या राष्ट्रीय सभेनें संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास केला असतां या स्वराज्यघटनेंत वसाहतीच्या स्वराज्याचीच मागणी कां असा एक आक्षेप सकृद्दर्शनींच पुढें येतो. पण मद्रासच्या कॉंग्रेसनें जें ठरविलें तें आपलें अंतिम ध्येय असून सांप्रतची योजना ही सायमन सप्तकाच्या योजनेला व बर्कनहेडच्या आव्हानाला उत्तर म्हणून प्रसिद्ध झाली आहे आणि भावी अंतिम ध्येयाची पहिली पायरी या दृष्टीनें तिची योग्यता कांहीं कमी नाहीं. पालबाबूसारखे कांहीं पश्चात्तापदग्ध देशाभिमानी निर्भेळ स्वातंत्र्यापेक्षा ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत स्वराज्य हेंच अधिक कल्याणप्रद होय असें या वेळीं प्रतिपादन करीत आहेत; पण त्यांत कांहीं तथ्य नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटाकडे जर मागणी करावयाची तर ती 'डोमीनिअन स्टेटस'हून अधिक दर्जाची करता येत नाहीं

आणि सध्याची योजनाहि त्या दृष्टीनेंच तयार केली असल्याने तिची धांव साम्राज्याच्या कुंपणापलीकडे जाऊं शकत नाहीं. तेव्हां त्या मुद्द्यावर नेहरू कमिटीला दोष लावण्यांत कांहीं तथ्य नाहीं. 'डोमीनिअन स्टेटस' मध्यें अंतर्भूत होणारे मुलकी, फौजदारी व लष्करी संपूर्ण अधिकार या योजनेंत अंतर्भूत झाले आहेत आणि कानडा, आस्ट्रेलिया वगैरेंना जेवढा परराष्ट्राशीं संबंध ठेवतां येतो तेवढा हिंदराष्ट्रासहि ठेवतां यावा ही मोघम मागणी लवचीक असून परिस्थिती-प्रमाणें वाटेल तितकी ती ताणतां येण्याजोगी आहे. आणि अशा रीतीनें ताणतां ताणतां ती तुटलीच तर तिचा दोष परिस्थितीच्याच माथीं मारावा लागेल! ही बहिर्मुख दृष्टि अंतर्मुख करून पाहूं लागल्यास तेथेंहि आपलें हें स्वराज्याचें तारूं ठिकठिकाणच्या संस्थानरूपी खडकामुळें अडखळत असलेलें दिसतें. हीहि परिस्थिति अपरिहार्य असल्यानें संस्थानि-कांचे विद्यमान हक्क अबाधित राहतील अशी त्यांना हमी देणें व त्याबरोबरच संयुक्त स्वराज्याचे तुम्ही-हि आपखुषीनें एक घटक व्हा अशी त्यांना विनंति करणें आणि संस्थानिकांचे भावी संबंध स्वराज्य सरकाराशींच राहतील असा त्यांस स्पष्ट इषारा देणें हेंच मुत्सद्दीपणाचे असुन नेहरू कमिटीनें आपल्या योजनेत या तीनहि गोष्टी नमूद करून ठेवल्या आहेत आणि संस्थानिकांचा वर्ग देशद्रोही बनून स्वराज्याच्या प्राप्तीच्या मार्गांत आड येणार नाहीं अशी आशा प्रगट केली आहे.

नेहरू कमिटीच्या मार्गांतली सर्वांत मोठी धोंड हिंदू-मुसलमानांच्या परस्परसंबंधाची. ही धोंड दूर करण्याकरितां या कमिटीने आपलें बरेंच बुद्धि-कौशल्य खर्च केलें आहे आणि जातवार मतदार-संघाचें तत्त्व त्याज्य ठरवून त्याला मूठमाती देण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला आहे. परंतु म्लेच्छ समंध हा ब्रह्मसमंधापेक्षां हट्टी असल्यामुळें त्याला कितीहि गाडून टाकलें तरी तो पुनः आपलें डोकें वर काढतो व त्याप्र-माणें त्यानें या रिपोर्टांतहि आपल्या अस्तित्वाची जाणीव कायम ठेवली आहे. कोणत्याहि जातीचा किंवा धर्माचा अलग मतदारसंघ ठेवावयाचा नाहीं हे तत्त्व या कमिटीनें कसोशीने पाळलें आहे पण कोणत्याहि गटाकरितां जागा राखून ठेवावयाच्या नाहींत या तत्वाला दहा वर्षेपर्यंत हरताळ फांसला जाण्याला कमिटीनें परवानगी दिली आहे! अशा जागा राखून ठेवाल तरच आमचा सवता सुभा आम्ही सोडूं असा मुसलमानांचा दुराग्रहच अस-ल्यास ज्याप्रमाणें अल्पसंख्य मुसलमानांना किमान संख्येची हमी देण्यांत आली आहे, व जिचा फायदा वायव्य सरहद्द प्रांतातल्या हिंदूंनाहि देण्यांत येणार आहे, तशीच हमी पंजाब व बंगाल आणि कमिटीनें वेगळा तोडलेला सिंध प्रांत यांतील अल्पसंख्य हिंदूंना कां देण्यांत येऊं नये? प्रत्यक्ष व्यवहारांत याचा उपयोग सिंधखेरीज इतरत्र होण्याचा संभव फारच कमी. आणि त्याच दृष्टीनें शीखांनीं मोठ्या उदारपणें आपल्या समाजा-करितां तशी हमी मागण्याचा हट्ट साडून दिला हें प्रशंसनीय आहे. पण तत्त्व म्हणून अल्पसंख्य मुसलमानांना जी हमी देतां तीच बंगाल व पंजाब मधील अल्पसंख्य हिंदूंना दिल्याचें नमूद करून ठेवण्यास काय हरकत आहे? हमी दिलेल्या जागांहून अधिक जागा आपल्या कर्तबगारीनें मिळविण्यास मुसलमानांना इतर प्रांतांतून वाव असल्यानें तेथें त्यांना दुहेरी हक्क मिळतो तसाच दुहेरी हक्क बंगाल पंजाब व सिंधमधील मुसलमाने-तराना असावा हें तत्त्वाच्या व निःपक्षपातीपणाच्या दृष्टीनें उचित आहे.

दुसरा महत्वाचा प्रश्न सिंधच्या विभक्तीकर-णाचा. या प्रश्नावर कमिटींत मतभेद होऊन श्रीयुत अणेप्रभृतींनीं त्यास आपली संमति दिली नाहीं. तरी पण कमिटीनें मुसलमानांचा हट्ट पुरविण्याकरितां सिंध प्रांत वेगळा तोडावा असें म्हटलें आहे. जमाखर्चाच्या दृष्टीनें त्यास कांहीं हरकत नसावी अशी एक अट त्यात नमूद केली आहे; पण हिंदूंची समजूत करण्यासाठीं हें उगाच गालबोट लावले असावें असें वाटतें. सर पुरुषो-त्तमदास यांच्या कमिटीनें सिंध प्रांत वेगळा केल्यास सालिना निदान पन्नास लक्ष रुपयांची तूट येईल असा अंदाज केला आहे आणि प्रो. छब-लानी तर एक कोटीची तूट येईल असें म्हणतात. परंतु कितीहि तूट आली तरी सिंध प्रांत वेगळा झालाच पाहिजे असा हट्ट मुसलमान धरणार आणि त्यांना नेहरू कमिटीच्या या रिपोर्टानें अधिक जोर चढणार असा रंग दिसतो.

मतदानाचा हक्क देताना तर नेहरू कमिटीनें उदारपणाची कमाल केली आहे. वयांत आलेल्या प्रत्येक पुरुषालाच नव्हे स्त्रीलाहि मताचा अधिकार देण्यांत आला आहे. दहा वर्षांपूर्वीं पर्यंत इंग्लंडांत स्त्रियांना मुळींच मताधिकार नव्हता. त्यानंतर तो मिळाला तरी त्याची वयोमर्यादा वेगळी ठेवली गेली. सीलोनच्या नव्या योजनेतहि स्त्रियांना ३० वर्षांची अट ठेवलेली आहे. इंग्लंडांत जरी नुकतीच वयाची जादा अट काढून टाकून ती पुरुषांच्या बरोबरीला आणण्यात आली असली तरी तिचा तेथेंहि अद्यापि प्रत्यक्ष अनुभव आलेला नाहीं. त्यातूनहि हिंदुस्थानांत पडद्याचें बंड नसतें किंवा मुसलमानांचा मतदारसंघ अलग ठेवा-वयाचा असता तर स्त्रियांना मिळणाऱ्या या हक्काची इतकी चिकित्सा करण्याचें कारण नव्हतें.

परंतु गोषांतल्या स्त्रिया मतदार म्हणून नोंदल्या जागार आणि त्यांनीं गोषांतल्या गोषांत दिलेल्या मताच्या जोरावर मुसलमान उमेदवार हिंदूंशीं प्रतिस्पर्धा करून त्यांच्या जागाहि पटकावणार. कारण हिंदूंना राखीव जागा अशा कोठेंच नाहींत ! उलटपक्षीं हिंदु स्त्रियांच्या मतांचा मात्र हिंदूंना फायदा मिळणार नाहीं. कारण अल्पसंख्य मुसलमानांच्या किमान जागांची गॅरंटी दिली गेली आहे. हा खास न्याय, आणि ही खाशी निःपक्षपातबुद्धि!!

विशिष्ट धर्मासाठीं म्हणून कोणालाहि कोणतीहि विशेष सवलत मिळणार नाहीं असला समतेचा टेंभा मिरविणाऱ्या या कमिटीनें शीखांचा तेवढा सभास्थानींदेखील किरपान वापरण्याचा हक्क मान्य केला आहे; आणि मुसलमानासाठीं तर आठ—दहा प्रांतांत किमान संख्येइतक्या जागा राखून ठेवल्या आहेत! मग 'हम धर्म बिर्म कूछ जानते नही' असली अश्लाघ्य बेपर्वाईची भाषा रिपोर्टांत वापरण्यांत हंशील काय ? या भावी लोकसत्ताक सरकारास कोणत्याहि धर्मांतील सणाच्या सुट्या देखील बंद करतां यावयाच्या नाहींत, मग इतर देणग्या बंद करण्याची तर गोष्ट दूरच राहिली. धर्मविषयक नवीन देणग्यांचा विचार भावी स्वराज्यांत कसाहि ठरविण्यांत आला तरी जुन्या देणग्या व इनामें चालू ठेवणार का वृत्तिच्छेद करणार ? आणि तीं जर चालू ठेवावयाचीं तर संस्थानिकांना, सिव्हिल सर्व्हंटांना व परदेशी भांडवलवाल्यांना जशी एक प्रकारची हमी देण्यांत आली आहे, तशी धार्मिक संस्थांनाहि तुमचा वृत्तिच्छेद केला जाणार नाहीं असें आश्वासन या रिपोर्टांत कां नाहीं ?

असो. असले कांहीं दोष हा रिपोर्ट लिहितांना त्यांत समाविष्ट झाले असले तरी एकंदरींत नेहरू कमिटीनें आपलें कार्य बऱ्याच कुशलतेनें केलें आहे. त्यांतल्या त्यांत कामकरी व शेतकरी यांची स्थिति सुधारण्याकरितां किमान मजुरी मिळण्याची तजवीज करण्याची हमी आणि बेकारीला आळा घालण्याची सूचना यांत आहे. त्याचप्रमाणे प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत मिळण्याचा प्रत्येकाचा हक्क मान्य केला आहे. हत्यारें वापरण्याला बंदी नसावी असें स्पष्ट सांगून हल्लींच्या तेजोवध करणाऱ्या शेळपटशाही कानूंचा सक्रिय निषेध केला आहे. या सर्व गुणामुळें नेहरू कमिटीच्या या बाळाचें कोणीहि कौतुकच करील. परंतु या बाळाला नोकरशाहीच्या पापी नजरेची दृष्ट लागेल कीं काय किंवा पंजाबी मुस्लीम लीगसारखी एखादी पूतना मावशी त्याच्या जिवावर उठेल कीं काय अशी धास्ती वाटते. ही धास्ती कितपत साधार आहे याचा निर्णय लखनौच्या सर्व—पक्षीय परिषदेंत लागेल आणि कदाचित् या बाळाला दृष्ट लागं नये म्हणून याच्या गळ्यांत तेथें आणखी कांहीं ताईतदोरेहि बांधण्यांत येतील. या सर्व सोहाळ्यांतून सुखरूपपणे बाहेर पडल्यानंतरच या बाळाच्या गुणदोषांची अधिक सूक्ष्म चिकित्सा करणें बरें.

# चिनी राज्यक्रांतीत रशियाची कामगिरी

( रेव्ह्यू दे—द—मोंदवरून )

( ले.—अ. ज. करंदीकर )

चीनमधील राज्यक्रांति ही रशियन लोकांनीं बोल्शेव्हिक तत्त्वज्ञानाला अनुसरून घडवून आणलेली क्रांति आहे व त्या दृष्टीनेंच या क्रांतीचा अभ्यास केला पाहिजे.

" या पृथ्वीच्या बाहेर मला उभे राहण्यापुरती जागा मिळाली तर एखाद्या लाठीनें देखील मी ही पृथ्वी गदगदा हलवूं शकेन" असें ग्रीक गणिती आर्किमिडीज म्हणत असे. कोणत्याहि राष्ट्रांत क्रांति करूं पाहणाऱ्या पुढाऱ्यांची हीच अवस्था असते. परदेशांत कोठे तरी उभे राहण्यापुरती जागा मिळाल्याशिवाय यांना स्वदेशाला हलवितां येत नाहीं व जागृत करतां येत नाहीं. चिनी क्रांतिकारकांना रशियांत अशी जागा मिळाली होती, इतकेंच नव्हे तर वस्तुतः रशियानेंच जागृत चीन देशाला क्रांतीचा मार्ग दाखवून देण्याचें काम आपण होऊन अंगिकारिलें होतें. कांहीं दिवस याच्याहि पुढें जाऊन बोरोडिनच्या मार्फत क्रांतिकारकांचें पुढारीपण देखील स्वतःच्या हातांत वागविण्याचा प्रयत्न रशियानें केला होता. पण अव्यक्त सूत्रचालक कोणीहि असला तरी प्रत्येक देशाच्या रंगभूमीवर त्या त्या देशाचेच नट उभे करावे लागतात. चंगकैशेकनें बोरोडिनला पिटाळून लावल्यावर हे तत्त्व रशियाच्या लक्षांत आलें व त्यानें चिनी बोल्शेव्हिकांचें पुढारीपण फेंगयू—शियांगच्या स्वाधीन केलें. पेकिंग जिंकल्यावर या सेनापतीनें चंग—कैशेकला क्रांतिकारक सैन्यामधून घालवून दिल्याची वार्ता सर्वश्रुतच आहे.

क्रांतीला प्रथम लागतात पुढारी व मग

लागतें तत्त्व. यांपैकीं पुढारीपणाचा विचार वर झाला. आतां या क्रांतींतील तत्त्व पाहावयाचें. चिनी लोक हे अतिशय व्यावहारिक लोक आहेत व त्यांचे गुरु जे बोल्शेव्हिक ते तर पक्के जडवादी. या उभयतांना गहन तत्त्वांचें व ध्येयांचें वावडेंच आहे. १९११ सालीं चीनमध्ये राज्यक्रांति झाली. त्या क्रांतीचें तत्त्वज्ञान अगदीं सुटसुटीत होतें. "चीन देशाची अवनति होत आहे व या अवनतीचें कारण मांचू राजघराणें आहे" या महावाक्याचा प्रचार करून त्या वेळीं सन्यत्सेननें क्रांति घडवून आणली. १९२४ सालीं याच वाक्यांत फेरफार करून सन्यत्सेननें सांगितलें कीं, चीन देशाची अवनति होत आहे आणि या अवनतीच्या मुळाशीं चीनचीं बंदरें व व्यापार बळकावून बसलेलीं परकीं राष्ट्रें आहेत. या परक्या राष्ट्रांना घालवून दिल्याशिवाय चीनची उन्नति व्हावयाची नाहीं. बोल्शेव्हिक लोक देखील याच दिशेने मतप्रचार करीत होते. पण त्यांच्या प्रचारांत हा मुद्दा नवीन होता कीं, "स्वदेशांतील आणि परदेशांतील भांडवलशाहीचा नायनाट केल्याशिवाय दुसऱ्याच्या घरात शिरून त्यांना लुटण्याची प्रवृत्ति जगांतून नाहींशी होणार नाहीं आणि ही प्रवृत्ति नष्ट होईपर्यंत कोणालाहि निर्भयपणें व सुखानें राहतां येणार नाहीं." परक्यांना घालवून देण्यासाठीं देशातील बुद्धिजीवी वर्ग तत्पर असतो व स्व-पर-देशातील भांडवलवाल्यांचा नायनाट करण्यासाठीं मजूरवर्ग तयार होतो. या दोन वर्गांच्या एकवाक्यतेवर क्रांतिकारकांची उठावणी अवलंबून असते.

## क्रांतिकारकांची संघटना

क्रांतिकारकाची संघटना करणें हें अतिशय अवघड कार्य असते. चीनमध्ये हें कार्य कम्युनिस्टांनीं फारच चांगल्या रीतीनें पार पाडलें. रशियांत बोल्शेव्हिकांनी आपली सत्ता स्थापिली, तेव्हां त्यांच्या पक्षाचे लोक फार तर ५ लक्ष असतील. चिनी कम्युनिस्ट पक्षाचे १९२७ सालीं निदान २८ लक्ष सभासद होते.

पुढारी, तत्त्व व अनुयायी इतक्यांचा विचार झाल्यावर मग प्रचारकार्याचा अहवाल पाहावयाचा. चीनमध्यें परक्यांच्या द्वेषाचा प्रचार करणें फार सोपें आहे. कारण चिनी लोकांना मनांत येतील त्या गोष्टी बोलावयाला पूर्ण मुभा आहे आणि तेथील परक्यांनीं कोणतींहि नीच कृत्यें करावयाचीं बाकी न ठेवल्यानें आपल्या कृतीनेंच आपली बेअब्रू करून घेतली आहे. युरोपिअन लोकांचीं दुसऱ्यांवर सत्ता स्थापण्याचीं प्रमुख साधनें म्हणजे बायबल आणि मदिरा हीं होत. चीनमध्यें मदिरेचा प्रसार झाला नाहीं. पण तिच्या ऐवजीं अफूचा फैलाव होऊन त्यांचे डोळे मिटण्याची वेळ आली होती. अफूचा प्रवेश चीनमध्यें होऊं देण्याचें नाकारल्यावरून इंग्लंडानें चीनबरोबर 'अफूयुद्ध' केलें होतें, हें सुप्रसिद्ध आहे. चिनी क्रांतिकारकांनीं विश्वप्रयत्न करून आपल्या देशांतील लोकांचें अफूचें व्यसन सोडविलें.

त्यानंतर बायबलाची पाळी आली. कोणत्याहि धर्माविषयीं असहिष्णुता बाळगणें हें पाप आहे, या समजुतीनें नवशिक्षित चिनी लोक ख्रिस्ती धर्माविरुद्ध बोलावयाला धजत नसत. बोल्शेव्हिक तत्त्वज्ञानाचा चीनमध्यें प्रसार झाल्यावर ही स्थिति पालटून सुशिक्षित चिनी लोकांनीं ख्रिस्ती धर्माविरुद्ध मोहीम सुरू केली. १९२५ सालीं कँटनच्या विद्यार्थ्यांनीं ख्रिस्ती धर्माविरुद्ध काढलेल्या जाहिरनाम्यांतील कांहीं वाक्यें पाहण्यासारखीं आहेत. "आम्हाला ख्रिस्ती धर्माचें अंतःस्वरूप कळून चुकलें आहे. ख्रिस्ती धर्म हें युरोपियन साम्राज्यवाद्यांच्या हातांतील दुसऱ्यांना गुलाम करण्याचें एक साधन आहे. या धर्माचे प्रचारक हे साम्राज्यवादी शिकाऱ्यांचे शिकार पकडणारे कुत्रे व बहिरीससाणे आहेत. दया आणि प्रेम यांच्या प्रचाराचें निमित्त करून आम्हाला गुलाम बनविणें हाच यांचा उद्देश आहे!" ख्रिस्ती धर्माचें असलें खरें स्वरूप बोल्शेव्हिकांनी समजून देईपर्यंत चिनी क्रांतिकारकांना कसें समजलें नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. समजलें नव्हते, असें म्हणावयाला पुरावा हा कीं त्यांचा पुढारी सन्यत्सेन हा स्वतः ख्रिस्तधर्मी होता. ख्रिस्ती धर्मप्रसाराचें राजकीय स्वरूप चीनचे शेजारी जे जपानी लोक त्यांनीं प्रथम दर्शनींच ओळखलें व त्यामुळेंच त्यांचें स्वातंत्र्य टिकून राहिलें.

असो. परक्या लोकांच्या संस्कृतीची निंदा व तिच्यापासून स्वतःचा बचाव करून घेण्याची आवश्यकता केवळ सुशिक्षित लोकांना समजते व पटते. अशिक्षित लोकांना हे संस्कृतीचे वाद समजत नाहींत. क्रांतीला अडथळा आणणारा अशिक्षितांचा दुसरा स्वभावदोष म्हणजे परक्या लोकांकडून आपलें अहित कसें होत आहे, हेंच त्यांना समजत नाहीं. परक्या शत्रूविषयीं त्यांच्या मनांत नुसती तुच्छतेची भावना वसत असते. तर स्वकीय शत्रूविषयीं त्यांच्या मनांत द्वेषभाव वागत असतो. म्हणून अशिक्षितांना क्रांतीच्या मार्गावर न्यावयाचें असल्यास त्यांना त्यांच्या स्वदेशी शत्रूविरुद्ध प्रथम चिथावून द्यावें लागतें. चीनमध्यें अशिक्षित व दरिद्री लोकांना चेतविण्यासाठीं काढलेला एक जाहिरनामा या दृष्टीनें पाहतां हा जाहिरनामा अगदीं नमुनेदार आहे. त्यांतील पुढील शेलकीं वाक्यें पाहा "देशांतील सर्व संपत्ति तुमचीच आहे, ती तुम्ही बळकावून बसा. जमीनदारांना गाडून टाका, पिढ्यानुपिढ्या ते तुमचा प्राण शोषीत आहेत. खतें

व कर्जरोखे जाळून टाका, तीं सारीं अन्यायाचीं आहेत!"

## जमिनदारवर्ग

क्रांतियुद्धाला तोंड लागण्यापूर्वी देशांतील जमीनदारवर्ग क्रांतिकारकांच्या बाजूला असतो. पण युद्धाला रंग चढूं लागला म्हणजे स्वतःच्या अस्तित्वाविषयीं साशंक होऊन तो परक्या साम्राज्यवाद्यांना जाऊन मिळतो. व्यापारी व कारखानदार प्रथमपासूनच क्रांतिकारकांच्या विरुद्ध असतात. यामुळें क्रांतीचा चालक जो बुद्धिजीवी वर्ग तो प्रथम मजुरांना क्रांति पक्षाला मिळवून घेऊन त्यांची उठावणी करतो. चीनमध्यें कँटनमधील व इतर बंदरांतील विद्यार्थ्यांनीं व मजुरांनीं परकी मालावर बहिष्कार पुकारून या क्रांतियुद्धाला सुरवात केली. बॉक्सरबंडाच्या वेळीं सर्व युरोपीय राष्ट्रांनीं एकजूट करून ते बंड मोडून काढलें होतें. पण कँटनमध्यें जेव्हां बहिष्काररूपी बंड उभारण्यांत आलें त्या वेळा युरोपीय राष्ट्रांना त्याचा प्रतिकार करतां येईना. याचें एक कारण म्हणजे त्यांच्यामध्यें आतां पूर्वीसारखी एकजूट होणें दुरापास्त झालें होतें. पण त्याहिपेक्षां महत्त्वाचें कारण म्हणजे युरोपीय लोकांशीं हातघाईचा प्रसंग येऊं द्यावयाचा नाहीं, याविषयीं क्रांतिकारकांनीं अतिशय खबरदारी घेतली होती, हें होय.

महायुद्धापासून चिनी क्रांतिकारकांना कळून चुकलें आहे कीं, आतांचीं युद्धें हीं उभय पक्षांच्या सैन्याच्या कर्तबगारीपेक्षा त्यांच्या प्रचारकांच्या अक्कलहुषारीनेंच जिंकलीं जातात. त्यांना माहीत आहे कीं, दोस्त राष्ट्रांना महायुद्ध जिंकण्यांत कोणत्याहि सेनापतीपेक्षां लॉर्ड नॉर्थक्लिफचें साहाय्य अधिक झालें आहे. हें सर्वांना माहीत आहेच कीं क्रांतिकारकांच्या सैन्यानें शांघायवर चाल केली, तेव्हां युरोपीय राष्ट्रांचीं सैन्यें तेथें जमा झालीं होतीं. या सैन्याशीं हातघाईचा प्रसंग येऊं न देतां चिनी क्रांतिकारक सात महिने शांघायसमोर तळ देऊन राहिले होते. सरतेशेवटीं फंदफितुरीच्या व मतप्रचाराच्या जोरावर एकहि गोळी न खर्चतां त्यांनीं तें शहर हस्तगत करून घेतलें व युरोपीय सैनिकांना फजीत होऊन परत यावें लागलें.

वर सांगितलेंच आहे कीं, क्रांतियुद्धाला रंग चढूं लागला म्हणजे देशांतील जमीनदारवर्ग परक्या साम्राज्यवाद्यांच्या बाजूला वळतो. त्याप्रमाणें शांघायच्या विजयानंतर विजयी सेनापति चंग-कैशेक यानें क्रांतिकारक पक्षाविरुद्ध बंड उभारलें. या प्रयत्नांत त्याला फ्रान्सचा पाठिंबा होता, असें या फ्रेंच रिव्ह्यूच्या लेखकानेंच उघडकीस आणलें आहे. या बंडामुळें हँकौचें क्रांतिकारक सरकार कांहीं दिवस पेंचांत सांपडलें होतें. अशा वेळीं चिनी क्रांतिकारकांना मदत करण्यासाठीं रशियानें सर्व तऱ्हेची युद्धसामुग्री बरोबर देऊन फेंग-यूशियांगची रवानगी केली. त्यानें आपलें काम कसें पार पाडलें हें सर्व प्रसिद्ध आहे. पण त्याच वेळीं चंग-कैशेकच्या विरुद्ध मजूर व शेतकरी लोकांनीं कशीं बंडें केलीं व त्यांच्या अनुभवावरून काय अनुमानें निघतात, हा अज्ञात भाग बोधप्रद असल्यानें तिसऱ्या इंटरनॅशनलच्या एका रिपोर्टावरून संक्षेपानें तो खालीं दिला आहे.

## पहिलें बंड

"या बंडापैकीं पहिलें बंड २७ सालाच्या एप्रिलमध्यें झालें, पण तें फारसें महत्त्वाचें नाहीं. या बंडानंतर चंग-कैशेकनें शेतकी मजुरांचे व कारखान्यांतील मजुरांचे जुने संघ बेकायदेशीर ठरवून मोडून टाकले व आपल्या पक्षाचे मवाळ संघ स्थापले. पण मजुरांना एकीकडे बेकायदेशीर ठरलेले संघ गुप्तपणें चालू ठेवलेच; शिवाय मवाळ संघामध्यें प्रवेश करून व मवाळ अधिकाऱ्यांना पदच्युत करून तेथें आपल्या पक्षाचे अधिकारी नेमले. कांहीं ठिकाणीं त्यांचा हा डाव यशस्वी झाला नाहीं, तेव्हां त्यांनीं नवीन संघाच्या कचेऱ्यांवर हल्ले केले. हीं भांडणें वाढतां वाढतां संपांना सुरवात झाली. संघ मोडण्यासाठीं दडपशाही आली. अनेक ठिकाणीं गोळीबार झाले. लोकक्षोभ वाढत चालला व सर्वांवर कळस म्हणून शेतकऱ्यांनीं बंड पुकारलें. नोव्हेंबर महिन्यांत या बंडाचा विस्तार फार वाढला. सुमारें सहा जिल्ह्यांमधील प्रत्येक खेड्यांत व बहुतेक शहरांत मजूर पंचायतींचें राज्य सुरू झालें, जमिनीमधील सीमेच्या खुणांचा विध्वंस झाला, कर्जखतें जाळून टाकलीं. सर्व जमीन राष्ट्रीय मालकीची करून शेतकऱ्यांना वांटून दिली. डिसेंबरअखेरीपर्यंत क्रान्तिकारकांनीं सातशेंहून अधिक जमीनदारांना जाहीर रीतीनें फाशी दिलें व त्यांची मालमत्ता जप्त करून त्या पैशानें शेतकरीसंघांनीं युद्धसामुग्री विकत घेतली.

शेतकऱ्यांचें बंड सुरू झाल्याबरोबर कँटन येथें चिनी कम्यूनिस्ट पक्षाची सभा भरली व त्यांनीं सर्व सैनिकांना क्रान्तिकारक पक्षाला मिळण्याला उत्तेजन देणारा जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्याप्रमाणें सैनिकांनीं आपल्या अधिकाऱ्यांना पदच्युत करून स्वतःच्या पंचायती नेमल्या. पलटणीच्या पलटणी कम्यूनिस्ट पक्षाला येऊन मिळाल्या. सात डिसेंबर रोजीं कम्यूनिस्ट पक्षाची दुसरी सभा भरून १० तारखेला मध्यरात्रीं बंड करण्याचें निश्चित ठरलें व निरनिराळ्या पोटकमिट्या नेमून त्यांना त्यांचीं कामें वांटून देण्यांत आलीं. त्या कमिट्यांच्या कामांची याद पुढीलप्रमाणें देण्यांत आली आहेः—

१ बंडवाल्यांचा राजकीय कार्यक्रम निश्चित ठरविणें.

२ बंडाची लष्करी तयारी करणें.

३ कँटनमध्यें सोव्हिएट स्थापणें.

४ मजुरांचें मॉबिलिझेशन करणें.

५ सैनिकांना वळवून घेण्याचें काम दुप्पट जोरानें करणें.

६ बंडखोर शेतकऱ्यांशीं दळणवळण ठेवणें.

७ खलाशी, ड्रायव्हर, गाडीवाले वगैरेंच्या मार्फत सर्व तऱ्हेचीं यानेंवाहनें आपल्या ताब्यांत घेणें.

८ बॉंब, काडतुसें व रिव्हॉल्व्हर जमविणें व तयार करणें.

९ सुशिक्षित मजुरांची निवड करून ते लष्करांत अधिकारी नेमण्याला योग्य होतील असें त्यांना शिक्षण देणें.

१० क्रांति पक्षाच्या हेरांची संघटना करणें व शत्रूंची सर्व बातमी काढणें.

११ सर्व कमिट्यांनीं व अधिकाऱ्यांनीं एकमतानें वागावें म्हणून देखरेख करणारें व प्रसंगीं सर्वांना साहाय्य करणारें मंडळ नेमणें.

ठरल्याप्रमाणें या बंडाला १० डिसेंबरच्या मध्यरात्री सुरवात झाली. आरंभीं बंडवाल्यांना जयहि चांगला मिळाला. पण सरतेशेवटीं सैनिकांच्या व परकी राष्ट्रांच्या मदतीनें चंगकैशेकनें हें बंड मोडून टाकलें. बंड मोडल्यावर कँटनच्या मजुरांस दहशत बसविण्यासाठीं त्यांच्यावर अतोनात अत्याचार करण्यांत आले. या पराजयाची चिकित्सा करून वर उल्लेखिलेल्या इंटर-नॅशनलच्या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं, "मजुरांना क्रांतियुद्धांतील मुख्य शक्ति समजणें चुकीचें आहे. मजुरांचे दंगे घडवून आणणें फार सोपें असतें, पण लष्कराच्या जोरावर ते दंगे मोडणेंहि तितकेंच सोपें असतें; शिवाय सर्व मजुरांना एकाच सापळ्यांत पकडून त्यांच्यावर भयंकर रीतीनें सूड उगवितां येतो. असा अनुभव वारंवार आला म्हणजे मजूर लोक दंगे करावयाला धजावयाचे नाहींत. याच्या उलट शेतकरी वर्ग हा बऱ्याच विस्तृत भागावर पसरला असल्यामुळे त्या सर्वांवर एकत्र सूड घेतां येत नाहीं, किंवा लवकर सूड घेतां येत नाहीं, यास्तव बंडाची व्याप्ति जितकी वाढवितां येईल तितकी वाढवावी. शहरांतील मजुरांवर सर्व भार न टाकतां बंडाचा मुख्य भार शेतकऱ्यांवर टाकावा व शत्रूचें सैन्य फितवण्यावर प्रचार-कार्याचा मुख्य भर असावा." एप्रिल १९२८ पासून ही नवी योजना अमलांत आणून चिनी क्रांतिकारकांनीं जय मिळविला. जय मिळविल्यावर एकीकडे चंगत्सोलीनचा खून करून व दुसरीकडे चंगकैशेकला राजीनामा द्यावयाला लावून त्यांनीं आपला मार्ग निष्कंटक करून घेतला आहे.

# हिंदूकरणाचा वाद

नाशिक येथे श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांच्या विद्यमानें मिस मिलरचा हिंदूकरणविधि झाल्यानंतर काशीहून आलेले महामहोपाध्याय पंडित अनंत कृष्णशास्त्री यांच्याशीं जी प्रश्नोत्तररूपानें चर्चा झाली तिचा उल्लेख १।२ महिन्यांपूर्वी येथे झालेल्या प्रवचनांत श्रीशंकराचार्यांनीं केला होता. तीं प्रश्नोत्तरें समग्र छापलीं जावींत अशी इच्छा कित्येकांनीं प्रदर्शित केली. पण संस्कृत प्रश्नोत्तरें छापल्यानें संस्कृत भाषा न जाणणाऱ्यांना कांहींच बोध होणार नाहीं, आणि वाचकवर्गांत अशांचीच बहुसंख्या असणार, हें जाणून त्यांचें मराठी भाषांतर पुढें देण्यांत येत आहे.

सभेच्या प्रारंभीं श्रीधरशास्त्री पाठक, चित्रावशास्त्री आणि नारायणशास्त्री मराठे यांच्याकडून आलेलीं पत्रें वाचून दाखविण्यांत आलीं. त्या सर्वांना पत्रें पाठवून नाशिकला बोलावून नंतर वादविवाद करण्याला कालावधि लागेल आणि तितके दिवस काशीच्या पंडितांना राहाण्याला सवड नाहीं असें जाणून काशीच्या सनातन धर्मसभेचे प्रतिनिधि अनंत कृष्णशास्त्री आणि श्रीशंकराचार्य डॉ. कुर्तकोटी या उभयतांमध्येंच प्रश्नोत्तरें व्हावींत असें ठरलें व त्याप्रमाणें पुढील प्रश्नोत्तरें झालीं. त्यांत अनंत कृष्णशास्त्री यांनीं प्रश्नरूपानें शंका विचारावी व श्रीशंकराचार्य यांनीं त्या प्रश्नाचें उत्तर देऊन शंकेचें निरसन करावें अशी ही चर्चा झाली.

प्र.—हिंदूकरण म्हणजे काय ?

उ०— म्लेंच्छत्वरूप जें अहिंदुत्व तें घालवून हिंदुत्व प्राप्त करून देणे म्हणजे हिंदूकरण होय. ( ही व्याख्या उभयतांना मान्य होऊन ऐकमत्य झालें. )

प्र०— म्लेंच्छत्व म्हणजे काय ?

उ०—म्लेंच्छत्व दोन प्रकारचें आहे, एक अहिंदुत्वाशीं समानाधिकरण असलेलें व दुसरें हिंदुत्वापासून व्यावृत्त असें.

प्र०—हिंदुत्व म्हणजे तरी काय!

उ०—भारतवर्षीय महापुरुषानें प्रस्थापित अशा कोणत्या तरी देवतेची उपासना करण्याची पात्रता असणें हें हिंदुत्व होय. या व्याख्येनें महंमद व ख्रिस्त यांच्या अनुयायांव्यतिरिक्त सर्व हिंदु असा रूढीप्रमाणें अर्थ होतो. महंमद व ख्रिस्त यांच्या अनुयायांत जे म्लेंच्छत्व आहे तें अहिंदुत्वाशीं समानाधिकरण-

त्वानें आहे. पण जे हिंदू महंमदी किंवा ख्रिस्ती मताचा अवलंब करतात त्यांच्यांत हिंदुत्वाशीं समानाधिकरणत्वानें म्लेंच्छत्व असतें. महंमदादिकांच्या अनुयायांचें म्लेंच्छत्व जातिरूप असून बाटलेल्या हिंदूंत ते आगंतुक कारणाने आलेलें व विशिष्ट धर्मस्वरूपाचें असतें.

प्र०—मिस मिलर हिचें म्लेंच्छत्व वरील कोणत्या वर्गांत येतें ?

उ०—तिचें म्लेंच्छत्व जातिरूपच होय.

प्र०—प्रायश्चित्तानें जातीचें परिवर्तन होतें अथवा विशिष्ट धर्मप्राप्ति होते काय ?

उ०—प्रायश्चित्ताचे योगानें जातिपरिवर्तन संभवत नाहीं. धर्मपरिवर्तन मात्र संभवतें.

प्र०—शुद्धीसाठीं जें प्रायश्चित्त देतात त्याचा अर्थ असाच समजावयाचा ना कीं विहित गोष्टी न केल्यानें व निषिद्ध गोष्टी केल्यानें स्वकर्माचें आचरण करण्याला जो प्रत्यवाय आलेला असतो तो दूर व्हावा?

उ०—होय. तेंच त्याचें प्रयोजन.

प्र०—मिस मिलर ही म्लेच्छ जातींत असतांना तिला हिंदुधर्मानें सांगितलेल्या धार्मिक कर्माचरणाचा अधिकार होता काय? तो जर नसेल तर विहित कर्मे न केल्यानें किंवा निषिद्धसेवन केल्यानें तिचा हिंदुधर्माचरणाचा अधिकार नष्ट झाला होता कीं तिच्या जातीमुळेंच तिला अनधिकार आला होता?

उ.—तिचा अनधिकार जातिमूलकच होता. विहित अकरण किंवा निषिद्धसेवन यामुळें कांहीं तो आलेला नव्हता.

प्र.—मिस मिलरला प्रायश्चित्त दिल्यानें हिंदुधर्माला अनधिकारित्व देणाऱ्या तिच्या म्लेंच्छत्वाची निवृत्ति झाली कीं नाहीं?

उ.—जातिनिवृत्ति झाली नाहीं.

प्र.—भगवद्भजन करण्याला व भगवंताच्या स्वरूपाचे ज्ञान प्राप्त करून घेण्याला सगळ्या मनुष्यजातीला अधिकार आहे कीं एखाद्या विशिष्ट जातीलाच तो अधिकार आहे ?

उ०— हा अधिकार कोणत्याहि एका विशिष्ट ज्ञातीचा नसून तो मनुष्यमात्रालाच आहे.

प्र०—तर मग मिस मिलर हिला प्रायश्चित्त देण्याचें प्रयोजन काय?

उ०—गोमांसभक्षणादि गोष्टीनें लागलेलें पाप नाहींसें करणें आणि भारतवर्षीय देवतेची उपासना न केल्यानें त्या देवतेची उपासना करण्याला असलेला व्यत्यय दूर करणें हेंच प्रायश्चित्त देण्याचे प्रयोजन.

प्र०—मिस मिलरला प्रायश्चित्त देण्यापूर्वी भक्तिमार्गाचरणाला अधिकार होता कीं नव्हता ?

उ०—अलबत होता.

प्र०—निषिद्ध कर्मानुष्ठानामुळें भक्तिमार्गाच्या आचरणाला प्रतिबंध येऊं शकतो काय ?

उ०—प्रतिबंध येऊं शकत नाहीं. तथापि निषिद्ध कर्मापासून लागणाऱ्या पापाचा परिहार करण्याकरितां, जर प्रायश्चित्त घेतलें तर त्यांत बिघडलें काय?

प्र०—हें प्रायश्चित्त विधिप्रयुक्त आहे काय ?

उ०—होय विधिप्रयुक्त आहे.

प्र०—जें कर्म विधिप्रयुक्त असेल तें कर्म करणें किंवा न करणें हें आपल्या मर्जीवर असतें काय ?

उ०—वैकल्पिक विधि असेल तर तो न करणें आपल्या मर्जीवर राहातें.

प्र०—भक्तिमार्गाचा अधिकार प्राप्त होण्याला प्रायश्चित्त घ्यावें असा विधि किंवा न घ्यावें असा निषेध सांगितला आहे काय ?

उ०—होय, सांगितला आहे, असें प्रायश्चित्त घ्यावें असा सामान्य विधि आहे आणि कलिसंतरणोपनिषदादिकांतून असले प्रायश्चित्त घेऊं नये असा निषेधहि काढतां येतो.

प्र०—कबीरादिकांनीं गुरूपदेशानें श्रीरामभक्ति स्वीकारली. मिस मिलर हिनेंहि गुरूपदेशानें भक्तिपंथ स्वीकारला. या दोहोंत अंतर काय ?

उ०—अंतर असें कीं कबीरादिकांना वैदिक धर्माविषयीं अधिकार दिला गेला नाहीं. मिस मिलर हिला वैदिक धर्माधिकारहि दिला गेला.

प्र०—मिस मिलर हिला वर्णधर्म व आश्रमधर्म दिला गेला काय?

उ०—वैदिक धर्म या पदानें साधारण धर्मान्चाच बोध होतो. जातिधर्माचा बोध होत नाहीं. कबीरादिकांना सनातन धर्माचा अधिकार दिला नव्हता. म्हणून त्यांना त्यांच्या गुरूंनीं हिंदु म्हणण्याची रूढि पाडली नाहीं. मिस मिलर हिला सनातन धर्माचा अधिकार देखील देण्यांत आला आणि म्हणूनच तिला हिंदु असें संबोधण्यांत येऊं लागलें. प्रायश्चित्त दिल्यानें म्लेंच्छांनाहि वैदिक धर्माचा अधिकार प्राप्त होतो, तसा तो मिस मिलरला प्राप्त झाला. परंतु भारतीय शास्त्रानुसारी अशा चार वर्णांपैकीं कोणत्याहि वर्णांत किंवा संकर जातींत तिचा प्रवेश झाला नाहीं.

प्र०—तिचें म्लेंच्छजातित्व नाहींसें झालें कीं नाहीं ?

उ०—बौद्ध लोक वैदिक धर्माचे अनुयायी नसतांना देखील त्यांना ज्याप्रमाणें आधुनिक समाजांत हिंदु म्हटलें जातें, त्याचप्रमाणें मिस मिलर हिलाहि हल्लींच्या समाजस्थितींतील रूढीप्रमाणें हिंदु म्हटलें जाणें स्वाभाविक आहे. हा हिंदु शब्द हिंदुत्वाची नुसती शक्यता दर्शवितो.

प्र०—बौद्धादिकांना हिंदु शब्द लावणें पूर्वाचार्यांना संमत नव्हतें ना ?

उ०—आत्मतत्त्वविवेक ग्रंथाच्या ९३ व्या पृष्ठावर असें म्हटलें आहे–" परधर्मीयांनीं पूज्य मानलेल्यांना देखील वेदाध्ययना-विषयीं अधिकार प्राप्त होत नाहीं, त्याचप्रमाणें स्वधर्मांतून च्युत झालेल्यांना परधर्मीयांनीं आपल्या धर्मांत घेतल्यानेंहि वेदाचा अधिकार मिळत नाहीं असे उदयनाचार्यांनीं म्हटलें आहे. आणि हें वाक्य प्रमाणभूत मानले जातें. हिंदु-धर्माचें मुख्य लक्षण हें कीं, भारतवर्षांतील एखाद्या महापुरुषानें प्रस्थापित केलेल्या कोणत्याहि देव-तेची उपासना करण्याची योग्यता अंगीं यावी. अशी योग्यता ज्या धर्मानें अंगीं येत असेल त्या धर्मालाच हिंदुधर्म असें नांव लावतां येईल. हिंदू-च्या पोटीं जन्मलेल्या संततीनें ख्रिस्ती मताचा अवलंब केला तरी त्यांचें हिंदुत्व नाहींसें होत नाहीं. यासंबंधानें देवल स्मृतीचें प्रामाण्य मान्य आहे.

प्र०—त्या स्मृतींत असें म्हटलें नाहीं का ? एखा-द्याशीं चार वर्षे सहवास केला कीं तो त्याच्या धर्माचा होतो. या वचनावरून म्लेंच्छांशी चार वर्षांहून अधिक संसर्ग घडला असतां म्लेंच्छत्व येत असल्यामुळें त्याला आमरण प्रायश्चित्त नाहीं असें शूलपाणीनें आपल्या निबंधांत म्हटलें आहे. यावरून चार वर्षांच्या अवधीच्या आधीं प्रायश्चित्त घेतलें असतांना हिंदुधर्माचा जो अधि-कार प्राप्त होतो तो चार वर्षें होऊन गेलीं असतां मागाहून मिळूं शकत नाहीं. देवल स्मृतींत ' पांच वर्षांपासून वीस वर्षांपर्यंत ज्यांना म्लेंच्छांचा सह-वास घडला त्यांना हे दोन चांद्रायणाचें प्रायश्चित्त सांगितलें आहे' असें जें वचन आहे त्यांत केवळ सहवास घडला असेल तरच त्याला चांद्रायणद्वय प्रायश्चित्तानें शुद्ध होतां येईल, इतरांना शुद्ध होतां येणार नाहीं असें स्पष्ट दिसतें. कोण-त्याहि स्मृतीचा अर्थ करतांना इतर स्मृतींच्या वचनांना जो अर्थ घेतला असतां विरोध येणार नाहीं तोच अर्थ ग्राह्य मानावा असा नियम आहे. पांच वर्षांपासून वीस वर्षेपर्यंत अभक्ष्यभक्षण केलें असतां त्याला चांद्रायणद्वयाचें प्रायश्चित्त ज्यांत सांगितलें आहे असें दुसऱ्या कोणत्याहि स्मृतीचें वचन आढळत नाहीं.

उ०—चार वर्षांहून अधिक काल संसर्ग घडल्यानें ज्यांना म्लेंच्छभाव प्राप्त झाला त्यांना पुनः वैदिक धर्माधिकार प्राप्त होऊं शकतो अशाविषयीं ' मातापित्रोर्हि शुश्रूषा.........वेदधर्मक्रियाश्चैव ' इत्यादि महाभारतांतील वाक्य प्रमाणभूत आहे.

(या बाबतींत सनातन धर्मसभेच्या प्रतिनिधींचें असें मत पडतें कीं, हें वाक्य व्रात्य क्षत्रियादिकांना लागू आहे व म्लेंच्छांना लागू नाहीं. यावर श्रींचें म्हणणें असें पडलें कीं, मिस मिलर हिला वैदिक धर्माधिकार प्राप्त झाला अशाविषयीं महाभारतांतील हेंच वचन आम्ही प्रमाणभूत मानलें आहे. या वचनाचा असाच अर्थ होतो किंवा निरा-ळा कांहीं अर्थ होतो याचा निर्णय ठरला म्हणजे या वादाचा निर्णय होईल.)

प्र०—जो कोणी आपल्या जातीहून श्रेष्ठ जातीचें नांव स्वतःला घेऊन त्या नांवानें व्यवहार करतो त्याला ब्रह्महत्येचें पाप लागतें असें मनुवचन आहेना? (मनु ११-१५). या वचनाप्रमाणें पाहातां मिस मिलर हिला जातीनें मी हिंदु आहे असें म्हणतां येईल का ?

उ०—ती जर तसें म्हणेल तर वरील मनुवचनांत सांगितलेलें पाप तिच्या हातून घडेल.

प्र०—मिस मिलरचें जें हिंदूकरण केलें तें हिंदु जातीच्या मनुष्याशीं विवाहोपयोगी अशा स्वरूपाचें आहे का ?

उ०—नाहीं.

प्र०—अशा पद्धतीनें एखाद्याला हिंदु करून घेतलें तर त्यानें स्वजातीयाखेरीज इतर जातीयांशीं केलेला विवाहसंबंध शास्त्रविरुद्ध ठरणार नाहीं का ?

उ०—ठरेल.

याप्रमाणें ही चर्चा संपली. यावर सनातन धर्मसभेच्या प्रतिनिधींनीं पंधरा दिवसांत आपले काय मत असेल तें सविस्तर व सप्रमाण पाठवावें. आणि त्यानंतर त्याचा विचार श्रींनीं जो कांहीं करावयाचा असेल तो करावा असें ठरलें. त्याचप्रमाणें असें उत्तर आल्यानंतर ही सर्व चर्चा व मानपत्रांत प्रसिद्ध करावी असेंहि ठरलें. या ठरावास अनुसरून अनंत कृष्णशास्त्री यांच्या-कडून जें उत्तर यावयाचें तें ही चर्चा आता २ महिन्यानंतर आल्यावरून प्रसिद्ध केली जात आहे.

अनंत कृष्णशास्त्री वगैरेंचें जें पत्र आलें आहे त्यावर श्रींनीं चातुर्मास्य संपल्याबरोबर पीठाचें आज्ञापत्र काढण्याचें जाहीर केलें आहे. आपण फुरसत घेऊन विचार करून लिहिलेल्या पत्रांत देखील पं.अनंत कृष्णशास्त्री वगैरेंनीं महाभारतांतील जीं वाक्यें श्रींनीं हिंदूकरणास प्रमाणभूत धरलीं तीं मुसलमान ख्रिश्चन यांना लागू नाहींत याबद्दल प्रमाण दिलें नसून **' अधिकमवसरांतरे विवेचयिष्यते '** असें कालां-तरावर ढकललें आहे !

( या बाबतींत श्रींनीं असा अभिप्राय दिला कीं हिंदूकरणानें त्या बाईला हिंदु होण्याला अधिकार दिला. व धनगरसमाजानें आपल्या जातींत त्या बाईला घेतल्यामुळें लग्न वगैरेंचा अधिकार प्राप्त झाला असेल, पण त्याशीं पीठाचा संबंध नसल्यामुळें त्या बाबतींत पीठाला प्रश्न करण्याचें कोणाला कार-णच राहात नाहीं. )

# हिंदुस्थानांतील "अल्स्टर"

नेहरू-कमिटीचा रिपोर्ट हें सायमन कमिशनाला बहिष्कारवादी राष्ट्राचें उत्तर असें मानून त्याचा लोकांकडून गौरव करण्यांत आला. पण वस्तुतः हें उत्तर कमिशनाला म्हणण्यापेक्षां कमिशनाशीं सहकारिता करण्यास सांगणाऱ्या स्वकीय-परकीय लोकांना या रिपोर्टानें उत्तर दिले असें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. 'तुमचीं आपसांत भांडणें चालू आहेत व सर्व एकत्र जमून एकमतानें एक राज्यघटना तयार करण्यास तुम्ही बसला असतां कांहीं निर्णय म्हणून होत नाहीं' असें बहिष्कारवाद्यांना हिणवून त्या सबबीवर कित्येकांनीं कमिशनाशीं सहकारिता करण्याच्या आपल्या धोरणाचें समर्थन केलें! कारण कमिशनाचे सांगण्यासारखे असे गुण कांहींच नसल्यामुळें, लोकांचे दोष काढून त्याबद्दल कुरकुर करीत सहकारितेचें समर्थन करणें त्यांस प्राप्त होतें. यामुळें 'तुमची घटना तयार नाहीं' या मुद्द्यावर ज्यांनीं कांहीं हेतूनें मुद्दाम विशेष जोर दिला होता त्यांच्यावर तो मुद्दा नेहरू-कमिटीनें उलटविला हें खास. पण ही चालू वादाची दृष्टि बाजूस ठेवली तर सायमन कमिशनाचें कार्यक्षेत्र नेहरू-कमिटीच्या कार्यक्षेत्राहून बरेंच भिन्न व कांहीं अंशीं संकुचितहि आहे. सायमन कमिशन हें दिलेल्या सुधारणांचा उपयोग कसा काय झाला याची परीक्षा करणार व त्यांत कांहीं दुरुस्त्या करावयाच्या तर त्या कोणत्या दिशेनें कराव्या हें सुचविणार. उलट नेहरू-कमिटीनें सरकारी राज्ययंत्र व त्याचा आजपर्यंत झालेला उपयोग यांचा विचार केवळ भावी राज्यघटनेच्या जरूरीपुरताच केला आहे. शिवाय कमिशन विचार करणार तो फक्त ब्रिटिश हिंदुस्थानापुरताच, कारण तेवढ्या मुलखालाच १९१९ चा सुधारणा कायदा लागू आहे. पण नेहरूकमिटीला असलें कांहीं बंधन नव्हतें. तिनें सर्व हिंदुस्थानाचा म्हणजे संस्थानांचा सुद्धां आपल्या योजनेंत विचार केला आहे.

सायमन कमिशनाच्या निर्णयाचा संस्थानांशीं साक्षात् संबंध नसला तरी, हिंदुस्थान-सरकार व संस्थानें यांचा संबंध आहे. व कमिशनानें हिंदुस्थान-सरकारच्या रचनेंत फरक सुचविल्यास त्याचा पर्यायानें संस्थानांवरहि आज ना उद्यां परिणाम होण्याचा संभव आहे. हिंदुस्थान-सरकारच्या कारभारावर लोकांचें नियंत्रण चालू झालें म्हणजे ते क्रमानें संस्थानिकांशी संबंध असलेल्या पोलिटिकल खात्यावरहि आक्रमण केव्हां ना केव्हां करणारच. या दूरच्या संभवाचा आगाऊच बंदोबस्त करण्यासाठीं संस्थानिकांनीं बटलर कमिटी नेमून घेतली. या कमिटींत संस्थानिकांचा एकहि प्रतिनिधि नसतांना तिच्यापुढें साक्ष देण्याची मानहानीहि संस्थानिकांनीं निमूटपणें पत्करली. प्रजेच्या नियंत्रणाचा दूरचा संबंधहि टाळण्याकरितां ब्रिटिश सरकारचें हवें तें नियंत्रण मान्य करण्यास संस्थानिक तयार झाले! या बटलर कमिटीचें काम जरी गुप्तपणें चाललें असलें तरी या कमिटीच्या भोंवतालीं ब्रिटिश लोकमताची एका विशिष्ट प्रकारची भूमिका तयार करण्याचे जे संस्थानिकांचे प्रयत्न चालू आहेत ते उघड असल्यामुळें बटलर कमिटीपासून संस्थानिकांना काय साधावयाचें आहे याची लोकांना स्पष्ट कल्पना आली आहे. संस्थानिकांच्या बड्या हस्तकांनीं इंग्लंडांत जाऊन तेथील वृत्तपत्रांत संस्थानिकासंबंधीं स्तुति येत राहावी अशी हल्लीं व्यवस्था केली आहे. आजपर्यंत संस्थानिकांच्या चैनी व लोकसत्तेच्या दृष्टीनें त्यांचा मागसलेपणा हा चव्हाट्यावर आणण्यासाठीं इंग्रजी वर्तमानपत्रांचे रकाने खर्च होत. तेच आतां त्यांच्या उदारपणाच्या व प्रगतिप्रियतेच्या स्तुतिस्तोत्रांनीं भरले जात आहेत! सर लेस्ली स्कॉटसारखे कायदेपंडित संस्थानिकांनीं आपली बाजू मांडण्यासाठीं पैसे देऊन नेमले असल्यामुळें, कायद्याच्या दृष्टीनें हिंदी स्वराज्यापासून संस्थानें कायमचीं अलग कशीं राहतील याचा विचार या पंडितांनीं करून तो लेखरूपानें प्रगटहि केला आहे.

सर लेस्ली स्कॉट यांनीं गेल्या जुलै महिन्याच्या 'लॉ क्वार्टर्ली जर्नल' मध्यें प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या लेखावरून संस्थानिकांचा उद्देश स्पष्ट होतो. या लेखांत स्कॉट यांनीं असा सिद्धांत मांडला आहे कीं, 'संस्थानिकांशीं झालेले तहनामे हे व्यक्तिशः संस्थानिक व बादशहा यांच्यांत झालेले करार आहेत. हे करार कंपनी—सरकार अगर हिंदुस्थानसरकार यांच्याशीं झालेले नाहींत. या करारान्वयें बादशहांवर जी संस्थानिकांच्या संरक्षणाची जबाबदारी पडते ती बादशहांनींच चालविली पाहिजे. ती दुसऱ्यातिसऱ्याकडे सोंपवून देतां येत नाहीं. कारण ज्यांच्याकडे ती देण्यांत येईल त्यांचे व संस्थानांचे हितसंबंध यांच्यांत विरोध असण्याचा संभव आहे. बादशहा आपल्यावरील जबाबदारी पार पाडण्याकरितां हस्तक नेमतात हें खरें. पण हस्तकाचें कर्तव्य व त्याचे हितसंबंध यांचा विरोध आल्यास त्याला आपलें काम पार पाडतां यावयाचें नाहीं. हिंदुस्थान-सरकार व संस्थानें यांच्या हितसंबंधांत रेलवे, जकाती, पोस्ट, मीठ इ. खात्यांच्या बाबतींत विरोध येण्याचा संभव आहे. यामुळें संस्थानि-

कांच्या संरक्षणाची आपल्यावरील जबाबदारी बादशहा हिंदुस्थान-सरकाराकडे सोंपवूं शकत नाहींत. ही जबाबदारी पार पाडण्यासाठीं, बादशहांनीं हिंदुस्थानांत जरूर तेवढें सैन्य व आरमार ठेवलें पाहिजे व त्यावर अर्थात् हिंदुस्थान-सरकारचें नियंत्रण असतां उपयोगी नाहीं.

सर लेस्ली स्कॉट यांचा हा नवा सिद्धान्त मान्य केल्यास, हिंदी संस्थानांचा सवता सुभा तर निर्माण होतोच, पण त्याशिवाय ब्रिटिश हिंदुस्थानाचें डोक्यावर ब्रिटिश सैन्याची व आरमाराची तलवार कायमची लटकत ठेवण्याची व्यवस्था होते. बलटर कमिटीच्या नेमणुकीच्या वेळीं संस्थानिकांनीं अशी शाब्दिक ग्वाही दिली कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याला आमचा विरोध नाहीं. पण आपला सवता सुभा स्थापण्यासाठीं त्यांनीं जे बादशहांचे स्वतंत्र अधिकार व जबाबदाऱ्या निर्माण करण्याचा घाट घातला आहे त्यायोगें हिंदी स्वराज्यास कायमचा अडथळा ते निर्माण करीत आहेत. संस्थानिकांची ही कारवाई जगापुढें आली हें संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें एक प्रकारें चांगलेंच झालें. कारण हिंदी राज्यघटनेचा विचार करतांना संस्थानांचा विचार भानगडीचा म्हणून सोडून देण्याची आजपर्यंत प्रवृत्ति होती. कॉंग्रेससारख्या संस्थेनें संस्थानांच्या प्रश्नाला आजवर दूर ठेवले हातें व अजूनहि कॉंग्रेसच्या विचारक्षेत्रांत संस्थानांच्या प्रश्नाला पहिल्या प्रतीचें स्थान प्राप्त झालेलें नाहीं. पण आतां संस्थानी प्रजेकरितां नसलें तरी ब्रिटिश मुलखांतील स्वराज्याच्या मार्गांतली एक दुर्भेद्य अडचण या दृष्टीनें संस्थानिकांचा विचार करणें प्राप्त झालें आहे. बटलर कमिटी नेमली जाऊन तिच्या बुडाशीं असलेले संस्थानिकांचे हेतु प्रगट झाले नसते तर कदाचित् नेहरू-कमिटीनें या प्रश्नाचा आज जितका विचार केला आहे तितका केला नसता. पण संस्थानिकांनीं नेमलेले कायदेपंडित सर लेस्ली स्कॉट यांनीं मांडलेला नवा सिद्धांत केवळ संस्थानी प्रजेसच नव्हे तर ब्रिटिश मुलखांतील स्वराज्यासहि कायमचा नडणारा असल्यानें हा डाव ओळखून तो सिद्धांत एका स्वतंत्र विभागांत नेहरू-कमिटीनें सप्रमाण खोडून काढला आहे.

बटलर कमिटीपुढें निर्णयासाठीं जे प्रश्न आहेत त्यांचा संस्थानी प्रजेशीं व ब्रिटिश प्रजेशीहि संबंध येत असल्यामुळें सरकार व संस्थानिक यांच्याबरोबरच या दोनहि प्रजांच्या प्रतिनिधींनी बसून या गोष्टींचा निर्णय करावयास पाहिजे. त्या ऐवजीं या दोन प्रजाना वगळून केवळ संस्थानें व सरकार यांचे संमतीनें बटलर कमिटीचें गुप्त खलबत चालू झालें आहे. आणि सर लेस्ली स्कॉट यांच्या लेखावरून पाहतां, आयर्लंडप्रमाणें हिंदुस्थानांतहि संस्थानांच्या रूपानें एक कायमचें स्वराज्य विरोधी 'अल्स्टर' निर्माण होणार असल्याची धोक्याची सूचना नेहरू-कमिटीनें दिली आहे. त्याचप्रमाणें सर लेस्ली स्कॉट यांचा नवा सिद्धांत कायदा, इतिहास व वस्तुस्थिति अशा तीनहि दृष्टींनीं कसा निराधार व पोकळ आहे हेंहि कमिटीनें दाखविलें आहे. संस्थानांशीं झालेल्या कराराप्रमाणें येणारी जबाबदारी पार पाडणें व या कराराचा अर्थ ठरविणें हीं कामें हिंदुस्थानसरकारच आजपर्यंत करीत आलें आहे. लॉर्ड रेडिंग यांनीं १९२६ सालीं निजामसरकारला जो खलिता पाठविला त्यांत, तह व करारनामे यांनीं मर्यादित न होणाऱ्या अशा ब्रिटिश सरकारच्या सार्वभौमत्वाच्या स्वयंभू अधिकाराचें स्वरूप स्पष्टपणें मांडलें होतें. आणि हा अधिकार आजपर्यंत अनेक बाबतींत हिंदुस्थानसरकारनेंच अमलांत आणला आहे. अर्थात् संस्थानें व बादशहा यांचे साक्षात् संबंध जोडून हिंदुस्थान-सरकारला बाजूला काढण्याची सर लेस्ली स्कॉट यांची शक्कल निराधार व निरुपयोगी ठरते. आणि आज हिंदुस्थानसरकार जे अधिकार संस्थानिकांच्या बाबतींत गाजवितें तेच अधिकार हिंदुस्थान सरकारच्या जागीं येणाऱ्या भावी डोमीनियन-सरकारला चालविण्यास सनदशीर दृष्ट्या कोणताहि प्रत्यवाय नाहीं. हिंदुस्थान-सरकार व संस्थानें यांचा हितविरोध येत असल्यामुळें संस्थानांसंबंधाची बादशाही जबाबदारी हिंदुस्थान-सरकारासारख्या विरोधी हस्तकाकडून पार पडणार नाहीं असें स्कॉट म्हणतात. पण हिंदुस्थान-सरकार हें, संस्थानांशीं हितविरोध येणाऱ्या बाबतींत सार्वभौमत्वाचे अधिकार आजवर निःशंकपणें चालवीत आलें आहे व संस्थानिकांनीं अगर बादशहांनींहि त्याबद्दल जाहीरपणें कधीं तक्रार केलेली नाहीं. आज हिंदुस्थान-सरकार जरी बादशहांचें हस्तक म्हणून मानलें तरीहि तशाच तऱ्हेनें हिंदुस्थानाचें भावी डोमीनियन सरकार हे बादशहांचें हस्तक होऊं शकेल व त्या नात्यानें हल्लींच्या हिंदुस्थानसरकाराप्रमाणेंच तेंहि संस्थानांशीं संबंध ठेवूं शकेल.

यासाठीं बादशहांशीं साक्षात् संबंध जोडण्याच्या कोत्या कल्पना सोडून देऊन संस्थानें व भावी डोमीनियन सरकार यांचे परस्पर संबंध काय असावेत या व्यावहारिक प्रश्नांचा विचार संस्थानिकांनीं करावयास पाहिजे. सर लेस्ली स्कॉट यांच्या योजनेंत संस्थानिकांचें एक स्वतंत्र कौन्सिल करून या कौन्सिलाचा फक्त व्हाइसरॉयांशीं संबंध असावा असें सुचविलें आहे. पण या योजनेनें एक प्रकारची द्विदल राज्यपद्धति सुरू होणार असल्यानें अनेक अडचणी उपस्थित होतील असें नेहरू-कमिटीचें मत आहे. संस्थानिकांनीं अशा प्रकारें आपला सवता सुभा न ठेवतां

हिंदुस्थानाच्या संयुक्त ( फेडरल ) राज्यघटनेंत एक घटक या नात्यानेंच समाविष्ट होणें जरूर आहे. यासाठीं त्यांना आपल्या राज्यकारभारांत सुधारणा कराव्या लागतील. संयुक्त राज्यघटनेत जें मध्यवर्ती पार्लमेंट असतें त्याचें नियंत्रण केवळ त्यांत समाविष्ट असलेल्या संस्थानांवरच चालतें असें नाहीं, तर तें संस्थानांतील प्रजेवरहि चालतें. अशा रीतीच्या संयुक्त राज्यघटनेंत सामील होण्यास संस्थानिक तयार असतील तर त्यांच्या तहनाम्यान्वयें निर्माण झालेल्या व्यक्तिगत हक्कांबद्दल त्यांस हमी देतां येईल. नेहरू-कमिटीपुढें संस्थानिकांनीं आपलें म्हणणें मांडलें नाहीं व पुढें कधीं लोकपक्षापुढें ते आपलें म्हणणें मांडतील असा संभवहि दिसत नाहीं. यामुळें संस्थानिक संयुक्त राज्यघटनेंत सामील होण्यास तयार आहेत काय, या नेहरू-कमिटीच्या प्रश्नाला उत्तर कसें व कोठून मिळणार ! व ह उत्तर मिळालें नाहीं तोंपर्यंत संस्थान व ब्रिटिश हिंदुस्थान मिळून होणाऱ्या संयुक्त घटनेच्या तपशिलाचा अधिक विचार करणें नेहरू-कमिटीस शक्य नव्हतें. यासाठीं संस्थानिकांसंबंधीं फक्त तीनच कलमें नेहरू-कमिटीच्या राज्यघटनेच्या मसुद्यांत नमूद करण्यांत आलीं आहेत. हीं कलमें अशीं कीं, ब्रिटिश सरकारचे संस्थानांशीं झालेले व अमलांत असलेले सर्व तहनामे भावी हिं. सरकारासहि बंधनकारक राहतील व संस्थानांच्या बाबतींत आजचें हिंदुस्थानसरकार जे अधिकार चालवितें व जबाबदाऱ्या पार पाडतें तेच अधिकार व त्याच जबाबदाऱ्या भावी सरकारहि पार पाडील व चालवील. त्याचप्रमाणें तहनाम्यासंबंधीं वाद उत्पन्न झाला असतां गव्हर्नरजनरलाचे संमतीनें त्याचा निर्णय सुप्रीम कोर्टाकडून व्हावा.

सारांश, आज हिंदुस्थानसरकारला जे जे अधिकार आहेत ते ते भावी लोकनियुक्त व लोकनियंत्रित सरकारच्या हातांत क्रमाक्रमानें जाणार व आज ना उद्यां संस्थानिकांवरील नियंत्रणहि याच सरकारच्या हातीं येणार या गोष्टी अपरिहार्य आहेत. त्यांच्याकडे लक्ष देऊन संस्थानिकांनीं भावी हिंदी स्वराज्यांत आपलें स्थान कोणतें असावें याचाच खरोखर विचार करावयास पाहिजे. पण आज पाहावें तों, या भावी स्वराज्याशीं संबंध ठेवण्याचा प्रसंग कसा टाळतां येईल याचीच विवंचना संस्थानिकांना पडलेली दिसते ! हिंदुस्थानसरकार भविष्यकाळीं लोकनियंत्रित होणार असा दूरचा संभव दिसल्याबरोबर या हिंदुस्थान सरकाराशीं आपला संबंधच नसून साक्षात बादशहांशीं आपला संबंध आहे असें ते म्हणूं लागले आहेत. पण बादशहा तरी कोठें स्वतंत्र आहेत? ब्रिटिश पार्लमेंटाचे त्यांच्यावर नियंत्रण असून बादशहांचा अधिकार पार्लमेंटच चालविणार. अशा रीतीनें ब्रिटिश राष्ट्रांतील लोकांचा अधिकार मानण्यापेक्षां संस्थानिकांनी हिंदी राष्ट्राचे नियंत्रण मानणेंच अधिक श्रेयस्कर नव्हे काय? स्वराज्याचा दूरचा संभव दिसूं लागल्याबरोबर त्याला अलग ठेवण्याचा विचार चालविणाऱ्या संस्थानिकांना 'हिंदी अल्स्टर' ही कमिटीनें दिलेली उपमाहि अपुरी पडते. आयर्लंडांतील अल्स्टर प्रांत हा इंग्रज जमीनदारांनीं व्यापलेला, व आयर्लंडाला स्वराज्य मिळालें तरी आम्हास इंग्लंडाच्या छत्राखालींच राहावयास पाहिजे असा त्यांचा हट्ट आणि त्यांनीं असा सवता सुभा कायम ठेवल्यानें आयर्लंडाच्या स्वराज्याच्या अखंडत्वासच केवळ बाध येत होता असें नाहीं तर त्या स्वराज्याला कायमचा धोका पोंचत होता. तथापि आयर्लंडांतील अल्स्टर हें देशाच्या एका कोपऱ्यांत आहे, आणि हिंदुस्थानांतलें संस्थानरूपी अल्स्टर हें हिंदुस्थानाच्या सर्व भागावर जाळ्याप्रमाणें पसरलें आहे. आयर्लंडांतील अल्स्टरमधले लोक इंग्रजांच्या जातीचे धर्माचे म्हणून त्यांचा ओढा इंग्लंडाकडे राहाणें व आयरिश स्वराज्यांत समाविष्ट होण्याची त्यांस भीति वाटणें ही गोष्ट मनुष्यस्वभावाचे दृष्टीनें साहजिक मानतां येईल. पण हिंदुस्थानांतल्या 'अल्स्टर'चा व इंग्लंडाचा तसा काय संबंध आहे? संस्थानिक व संस्थानी प्रजा यांचे रक्ताचे, धर्माचे व परंपरेचे संबंध ब्रिटिश प्रजेशीं निगडित आहेत. हिंदुस्थानांतल्या कोणत्याहि हिंदी मनुष्यास इंग्रज लोक व त्यांचें राष्ट्र हीं जितकीं परकी तितकींच तीं संस्थानिकांनाहि परकीं आहेत. सारांश, संस्थानिक हे स्वकीयांना सोडून परकीयांकडे धांव घेत असल्यामुळें अल्स्टरच्या भांडणांत जो एक स्वाभाविकपणा होता तोहि संस्थानिकांच्या वादांत नाहीं. म्हणूनच त्यांस बादशहांशीं व्यक्तिशः साक्षात् संबंध जोडण्याच्या अस्वाभाविक कल्पना उभ्या कराव्या लागत आहेत. संस्थानिकांच्या या कारवाईमुळें, हिंदी स्वराज्याच्या मार्गातील एक अडचण या नात्यानें संस्थानांचा विचार कॉंग्रेससारख्या संस्थांतून यापुढें अधिक होऊं लागेल असें नेहरू-कमिटीनें या विषयासंबंधीं ठेवलेल्या दृष्टीवरून अनुमान काढण्यास हरकत नाहीं. म्हणूनच संस्थानांतील स्वराज्याच्या प्रश्नाचा विचार करणाऱ्या व त्या दृष्टीनें खटपट करणाऱ्या लोकांस नेहरू-कमिटीच्या रिपोर्टींतील संस्थानासंबंधाचा स्वतंत्र विभाग हा एक नवा व इष्ट उपक्रम वाटल्यास नवल नाहीं.

# गायकवाडवाड्यांतील गणेशोत्सव

गायकवाडवाड्यांतील गणपत्युत्सवाच्या वादा-संबंधानें गेल्याच्या मागील केसरींत आम्ही कांहीं खुलासा केला आहे.त्यावरून पुष्कळच वाचकांचे समाधान झालें असें दिसतें. तथापि पुण्या-मुंबईच्या बाहेरच्या वाचकांना, वादांतील कित्येक मुद्द्यांच्या गोष्टींची, असावी तितकी कल्पना नाहीं असें कित्येकांनी आमच्याकडे विचारलेल्या माहितीबद्दलच्या प्रश्नांवरून दिसतें. म्हणून या वादांतील मुद्दे व वस्तुस्थिति पुनः एकवार त्रोटक रीतीनें वाचकांचे पुढें मांडण्याचा विचार केला आहे.

(१) गायकवाड-वाड्याचे दोन भाग आहेत. [१] पूर्वेकडील राहता अर्धा भाग. यांत पूर्वी लोकमान्य राहात असत व हल्लीं तो त्यांच्या मुलांकडे आहे. या भागाला त्यांचा एक उत्तराभिमुख थेट रस्त्यावर स्वतःचा असा स्वतंत्र दरवाजा असून, वाड्याच्या मुख्य दरवाजांतूनहि पण फक्त आपल्या घरांत जाण्या-येण्याच्या वहिवाटीचा त्यांना हक्क आहे. वाड्याच्या या राहत्या भागांत पूर्वी सार्वजनिक उत्सवांतील गणपति कधींच बसविलेला नव्हता. लो. टिळक यांच्या हयातींत फक्त घरचा खासगी एक गणपति दोन दिवस घरांत बसविला जाई. [२] याच वाड्यांतील पश्चिमेकडील निंमा भाग हा पहिल्यापासून राहण्याच्या घरासारखा उपयोगांत येत नसून, यांतील इमारती मोकळी जागा वगैरे सर्वांचा उपयोग लो. टिळकांच्या वेळेपासून आतांपर्यंत केसरी कचेरी, छापखाना, कागद, कंपोझिंग खातें, केसरीची लायब्ररी व राष्ट्रीय किंवा सार्वजनिक स्वरूपाच्या संस्था अथवा चळवळी यांच्या कचेऱ्या यासाठीं उपयोगांत येई. टिळकांच्या वेळी ह्या भागांत 'होमरूल लीग' कचेरी होती. हल्लीं तेथें प्रांतिक-काँग्रेस कमिटी, वसंतव्याख्यानमाला, वक्तृत्वोत्तेजक सभा, वगैरे संस्थांच्या कचेऱ्या असतात. याच पश्चिमार्धातील आवारांतच १९०६ पासून म्हणजे टिळकांनीं वाडा घेतल्यापासून उत्सवांतील गणपति बसविला जातो. या गणपतीचा पोलीस-पास जसा टिळकांच्या हयातींत तसाच त्यानंतरहि आज ८ वर्षे, केसरीचे मॅनेजर व एक ट्रस्टी धोंडोपंत विद्वांस यांच्याच नांवें काढण्यांत येत असतो. आणि या उत्सवाचा खर्च आजवर केसरी संस्थेच्या पैशांतून केला जातो. टिळकांच्या हयातीपर्यंत ह्या खर्चाची कमी-अधिक मंजुरी स्वतः टिळक देत असत पण त्यांच्या मरणोत्तर ह्या खर्चाचा सर्वस्वी अधिकार केसरी संस्थेकडे आलेला आहे. आणि या बाबतींत स्वतः आपणाला कांहीं अधिकार आहे असा हक्क लोकमान्यांच्या चिरंजिवांनीं गेल्या वर्षापर्यंत सांगितलाहि नव्हता.

(२) जी गोष्ट खर्चाची तीच उत्सवांतील कार्यक्रमाचीहि. गेल्या सालापर्यंत, म्हणजे टिळकांच्या मृत्यूनंतर सतत सात वर्षेपर्यंत, या कार्यक्रमांत अमुक एक गोष्ट करा न करा म्हणण्याचा अधिकार आपणास आहे अशी मागणी टिळक बंधूंनीं कधींहि केलेली नव्हती. कार्यक्रम ट्रस्टी हेच ठरवीत. आणि पानसुपाऱ्यांच्या निमंत्रणावर केसरीच्या व्यवस्थापकांचीच सही असे. गतवर्षी या कार्यक्रमांत हात घालण्याची बुद्धि टिळक बंधूंना झाली असें पाहतांच, ट्रस्टींनी मनाईतकिदीचा हुकूम कोर्टाकडे मागितला व कोर्टाकडून तो देण्यांतहि आला. यंदा रामभाऊ टिळक यांनीं एक पायरी वर मजल मारली, व एकंदर उत्सवालाच प्रतिबंध करण्याचे हेतूनें एनजिनसी उत्सवांतील गणपतीची मूर्तीच उचलून नेण्याचा प्रयत्न केला.पण तो बेकायदेशीर असल्यामुळें कोर्टानें धुडकावून लावला. आणि रामभाऊविरुद्ध मनाई-ताकिदीचा हुकूम दिला असतां तोहि जाणूनबुजून त्यांनीं मोडला म्हणून त्यांना सरकारी अटकेंत राहावें लागलें.

(३) गतवर्षापर्यंत असला कोणताच हक्क टिळक बंधूंनीं न सांगण्याचे कारण उघड आहे. त्यांना ही जाणीवच होती कीं, तारीख १६ आगस्ट १९२० रोजीं टिळक-बंधू व मृत्युपत्राचे एक्झिक्यूटर धोंडोपंत विद्वांस अशा तिघांनीं लो. टिळकांच्या मृत्युपत्राला अनुसरून व इतर रीतीनें ते पूर्ण करण्याकरिता जें ट्रस्टडीड लिहून दिलें त्यांत उत्सवासंबंधानें एक स्पष्ट कलमच घालण्यांत आलेलें आहे. तें कलम असेंः—

### ट्रस्टडीड कलम ११

"आजपर्यंत **गायकवाडवाड्यांत श्रीगणपत्युत्सव** केसरी ऑफिसचे खर्चानें होत आला आहे त्याप्रमाणें तो उत्सव यापुढेंहि ही संस्था कायम आहे तोंपर्यंत **ट्रस्टी यांनीं ट्रस्ट मिळकतींतून खर्च करून साजरा करावा.**"

यावरून हे लक्षांत येईल कीं 'केसरी' व 'मराठा' पत्राबरोबरच, केसरी-मराठा संस्थेचें एक निश्चित कार्य म्हणून, गणपत्युउत्सव ट्रस्टीकडे गेला. या उत्सवासंबंधानें टिळकांच्या चिरंजिवांना खास असा कोणताच हक्क राखून ठेवण्यांत आलेला नाहीं. अशा रीतीनें टिळकांच्या हयातींत एकाच वेळीं गायकवाडवाड्यांत दोन गणपती बसत असत. एक खासगी. तो त्यांच्या वाड्याच्या राहत्या भागांत असे व त्यांतील मूर्तीचें आवाहन, विसर्जन, पूजाअर्चा वगैरे सर्व खासगी रीतीनें दोन दिवस होत असे.

त्याचबरोबर पुण्यांतील दहा दिवसांच्या सार्वजनिक गणपत्युत्सवांतील एक गणपति म्हणून वेगळी मूर्ति गायकवाड-वाड्याच्या पश्चिमार्धांतील छापखान्याच्या आवारांत बसविण्यांत येत असे, आणि तिला केवळ खासगी किंवा घरगुती असे स्वरूप नसे. केसरी—व्यवस्थापकाच्या कामांतीलच तें एक काम समजलें जाई, म्हणून ट्रस्टडीडमध्येहि या कार्याचा अंतर्भाव ट्रस्टींचें कार्य म्हणून करण्यांत आला.

(४) गायकवाडवाड्यांतील या पश्चिमार्धासंबधानें आणखी एक गोष्ट वाचकांनीं लक्षांत ठेवावी ती ही कीं, त्यांतील इमारतींसह ही जागा केसरी संस्थेकडे भाड्यानें राहावी अशी टिळकांचीच योजना होती व ती त्यांच्या मृत्युपत्रांत स्पष्टपणें नमूद केलेली आहे. आणि त्याप्रमाणें १९२१ सालीं 'केसरी' संस्थेनें ह्या आवाराची **निरंतरची भाडेचिठी** टिळक बंधूंना लिहून दिली असून त्याकरितां केसरी संस्था यांना दरमहा १०० रुपये भाडें देतें. व टिळक बंधु तें भाडें स्वीकारतात. इतकेंच नव्हे तर याच जागेंतील एक लहानसा भाग टिळक बंधूंना वापरावयास हवा लागला तेव्हां त्यांनींहि उलट 'केसरी' संस्थेला भाडेचिठी लिहून ती रजिस्टर करून दिली व त्या भाडेचिठीप्रमाणेंच तो त्यांना देण्यांत आला. अशा रीतीनें वाड्यांतील दोनहि भागाचे हक्क कायमचे व पृथक् करण्यांत आलेले आहेत. अर्थात् टिळक बंधूंच्या खासगी जागेंत त्यांच्या परवानगीशिवाय जाण्याचा केसरी—संस्थेच्या ट्रस्टींना व इतर लोकांना जसा कोणताहि हक्क नाहीं, तसेंच केसरी—संस्थेकडे कायमच्या भाडेचिठीनें असलेल्या या जागेंतहि **ट्रस्टींच्या परवानगीशिवाय** येण्याजाण्याचा किंवा ती जागा वापरण्याचा कोणताहि हक्क (मुख्य दरवाजांतून त्यांच्या राहत्या घरांत जाण्यायेण्याच्या वहिवाटीशिवाय ) टिळक बंधूंना उरलेला नाहीं.

(५) तात्पर्य, अशा रीतीनें उत्सवाची जागा ट्रस्टींच्या पूर्ण सत्तेची आहे, ट्रस्टींकडे उत्सवाचें कार्य हें एक त्यांचे काम म्हणून सोंपविण्यांत आलेलें आहे. उत्सवांत होणारा सर्व खर्च केसरी ऑफिसमधूनच व्हावयाचा असतो, आणि या उत्सवांत टिळक बंधूंना राखून ठेवलेले असे कोणतेहि अधिकार नाहींत. इतक्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे रामभाऊ टिळक यांनीं उत्सवाच्या मंडपांत परवानगीशिवाय शिरावें, हिंडावें, मखराचें कुलूप काढण्याचा प्रयत्न करावा, मखराच्या पुढील दारातून आंत जाऊन गणपतीच्या बैठकीला हात घालावा ही शुद्ध दंडेली नव्हे तर काय ? परवानगीशिवाय रामभाऊ टिळक यांनीं या जागेंत शिरणें हाच मुळीं ट्रेसपसचा (अतिक्रमणाचा) गुन्हा आहे. आतां जोंपर्यंत सख्य व सामोपचार हीं नांदतात तोंपर्यंत कोणाचाहि हक्क व अधिकार कसाहि असला तरी एकमेकांनीं एकमेकांच्या जागेंत भलेपणानें येणेंजाणें ह्या गोष्टी चालू शकतात. परंतु आम्हीं "ट्रस्टडीड मानीत नाहीं ! आठ वर्षांची वहिवाट मानीत नाहीं ! भाडेचिठी मानीत नाहीं ! कोर्टाचा हुकूम मानीत नाहीं ! तात्पर्य कांहींच मानीत नाही. मनाला येईल तेंच दंडेलीनें करणार" अशी वृत्ति रामभाऊ टिळकांची दिसूं लागल्यावर ट्रस्टींना कोर्टाकडे मनाईहुकूम मागणेंच प्राप्त होतें. अशा प्रकारच्या हक्कांसंबंधाचे प्रश्न केसरीच्या हजारों वाचकांच्या स्वतःच्या अनुभवांतहि उपस्थित झाले असतील व पुढेहि होतील. आणि अशा बिकट प्रसंगीं स्वतः त्यांनीं पूर्वी काय केलें असेल व यापुढेहि ते स्वतः काय करतील, म्हणजे वाद उपस्थित झाल्यावरहि स्वतःच्या कायदेशीर हक्कांचें अतिक्रमण करूं देतील कीं काय, हें मनांत आणून, मगच केसरी ट्रस्टींनीं केलें तें बरोबर कीं चूक याचा निर्णय त्यांनीं मनाशीं द्यावा. स्वतःवर संकट नाहीं तोंपर्यंत लोकांना उपदेश करण्याचें पांडित्य कोणालाहि असतें. परंतु अशा गोष्टींत दुसऱ्याला दोष देतांना आत्मौपम्य दृष्टीनेंच पाहावें लागतें.

(६) आपल्या मनासारखा कांहीं विशेष कार्यक्रम व्हावा, किंवा अस्पृश्यदिकांना प्रत्यक्ष मूर्तीची पूजा करूं द्यावी, एवढीच गोष्ट रामभाऊ टिळक यांना हवी असली तर ती त्यांना स्वतःच्या राहत्या जागेंत गणपतीची दुसरी मूर्ति आणून स्थापून सहज करतां आली नसती काय? त्याकरितां ट्रस्टींचा गणपति उचलण्याचें कांहीं कारण नव्हतें. दुकानांतून दुसरा गणपति त्यांना मिळूं शकला असता, आणि जेथें आज आठ वर्षांत गणपतीचें नांव नाही, तेथें त्यांनीं यंदा उत्सव केला असता तर त्यालाहि एक प्रकारें त्यांना 'आमचा गायकवाडवाड्यांतील गणपत्युत्सव' असें म्हणवून घेतां आलें असतें. पण बोलूनचालून आडमार्गानेंच शिरावयाचें, पंचांगवाद व अस्पृश्यतानिवारण यांचें निमित्त करून पर्यायानें केसरी ट्रस्टींच्या जागेंत होणाऱ्या उत्सवावर मालकी प्रस्थापित करावयाची, व यावर मालकी म्हणून मग इतरावरहि मालकी असा आपमतलबी क्रम सुरू करावयाचा असा रामभाऊ टिळक यांचा हट्ट उघड दिसून आल्यामुळे, आपल्या हक्कसंरक्षणाकरितांच ट्रस्टींना दिवाणी कोर्टाकडे जाण्याशिवाय मार्ग राहिला नाहीं. "उत्सव ट्रस्टींचा, तो करणार मी, पण खर्च मात्र द्यावा ट्रस्टींनीं", असला विचित्र कोटिक्रम कोर्टास पटला नाहीं हे साहाजिकच आहे. टिळक बंधूंनीं ट्रस्टींच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याला कोणत्याहि प्रकारें वावच राहू नये म्हणून त्यांच्या विरुद्ध कायम मनाईहुकुमाचा दिवाणी दावा ट्रस्टींनीं गतवर्षी मांडला आहे.

त्यांत मुद्दे निघून आतां मुकदमा पुराव्यापर्यंत आला आहे व लवकरच त्याचा निकालहि होईल. तेव्हां तो निकाल होईपर्यंत थांबणें हेंच रामभाऊ टिळकांना सरळपणाचें झालें असतें. पण तशी वाट न पाहतां केवळ मनच्या हक्कावर व अधिकारावर आपण वाटेल तें करूं असें वर्तन रामभाऊ टिळक यांनीं चालविल्यावर ट्रस्टींनींहि आपल्या कायदेशीर हक्कांचें संरक्षण करणें हेंच त्यांचें कर्तव्य होतें.

(७) कित्येकांना अशी कल्पना सुचते कीं, या वादामुळें केसरी ट्रस्टींनी यंदा उत्सवच अजीबात न केला असता तर काय झालें असतें? पण त्याला उत्तर हेंच कीं, या बाबतींत ट्रस्टींना नेमून दिलेले काम जर त्यांनीं केलें नाहीं तर उलट त्यांच्यावरच कित्येक लोकांनीं शब्द ठेवला असता. आणि ट्रस्टींच्या हक्काला एक बाधक पुरावा म्हणून त्याचा चालू खटल्यांत उपयोगहि केला गेला असता. आज गणपत्युत्सव करूं नका म्हणाले, उद्यां 'आमची मालकी आहे' असें म्हणून केसरी—मराठा पत्र काढण्याच्या बाबतींतहि जर रामभाऊ टिळक असाच हक्क सांगूं लागले तर तो ट्रस्टींनीं मानावा कीं काय?

(८)असो. एकदा मनाईहुकूम मिळाल्यावर मग खरा विरोध रामभाऊ टिळक व ट्रस्टी यांच्यामध्यें उरला नव्हता.तो रामभाऊ टिळक व दिवाणी कोर्टाचे अधिकारी यांच्यामध्यें उरला. म्हणून पोलिसांना ही गोष्ट हातीं घेऊन मॅजिस्ट्रेटपुढें मांडावी लागली. बरें, पोलिसांनीं रामभाऊ टिळक यांना प्रथम अटक केल्यानंतर जरी त्यांनीं माघार घेतली असता तरी देखील पुढील दहा दिवसांची अटक उपस्थित झाली नसती. पण पोलीस अधिकाऱ्यांना रामभाऊ टिळक यांनी आपल्या हातानें जी जबानी म्हणून लिहून दिली तींत त्यांनी असें स्पष्ट लिहून दिलें आहे कीं, **यापुढें मी क्षणभरहि जरी मोकळा राहिलों तरी गणपति उचलून नेण्याचा हट्ट मी पुरा करीन.** असें त्यांनीं निक्षून लिहून दिल्यानंतर त्या दिवशी नाहीं तरी पुढें उत्सवांतील दहा दिवसांत हा प्रसंग क्षणोक्षणीं उद्भवणारच अशी पोलीस अधिकाऱ्यांना परस्पर खात्री पटली म्हणूनच त्यांनीं तसें न करण्याविषयीं जामीन मागितला. अशा जबानीनंतर जामीन घेतल्याशिवाय त्यांना मोकळें ठेवणें ही गोष्ट पोलीस किंवा मॅजिस्ट्रेट यांना अधिकारी या नात्यानें शक्यच नव्हती. यावरून रामभाऊ टिळक यांना दहा दिवसांचा जो **कारागृहवास घडला तो त्यांनीं आपण होऊन आपल्या हातानें ओढवून घेतला,** पोलीस व मॅजिस्ट्रेट हे नको नको म्हणत असतांना ओढवून घेतला, हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

## रामभाऊ टिळक यांची सुटका

(९) कोर्टाचा व पोलिसांचा हुकूम मोडून केसरी ट्रस्टींच्या उत्सवांत दंडेली करण्याचा हट्ट धरल्यामुळें, व मॅजिस्ट्रेटांनीं परोपरीनें सांगितलें असतां अखेरपर्यंत जामीन देण्याचें नाकारल्यामुळें, रामभाऊ टिळक यांना दहा दिवस येरवड्याच्या तुरुंगांत राहावें लागलें. तेथें त्यांस युरोपियन वॉर्डमध्यें ठेवण्यांत आलें होतें. गुरुवार ता. ३० आगस्ट रोजीं सकाळीं त्यांची सुटका होणार त्या दिवशीं त्यांची मिरवणूक काढण्याचें पुण्यांतील केसरीचा द्वेष करणाऱ्या कांहीं मूठभर मंडळींनीं ठरविलें. रामभाऊ टिळकाची दंडेली ही वास्तविक केवळ ट्रस्टींविरुद्ध मालकी हक्काच्या भांडणासाठीं आहे ही गोष्ट आतां सर्व समंजस लोकांना कळून चुकली आहे. तथापि पंचांगवाद व अस्पृश्यता-निवारण या गोष्टी मुद्दाम कांहीं अर्धवट लोकांची दिशाभूल करण्यासाठीं, व कांहीं केसरी संस्थेशीं साधेल त्या मार्गानें विरोध करण्यास नेहमी तयार असलेल्या लोकांचें साह्य मिळविण्यासाठीं, या मालकी हक्काच्या भांडणांत घुसडण्यांत आलेल्या आहेत. रामभाऊंच्या दंडेलीला 'सत्याग्रह' हें नांव देऊन त्यांचा पाठपुरावा करणाऱ्या लोकांपैकीं प्रत्यक्ष सत्याग्रहास कोणीहि पुढें आलें नाहीं, व लिखाणानें पाठपुरावा करणाऱ्या ज्ञानप्रकाशाच्या कंपूंतील मंडळी या मिरवणुकीच्या बाबतींतहि उदासीन राहिली. मिरवणुकीचें हस्तपत्रक निघालें त्यावर ज्ञानप्रकाश कंपूपैकींहि कोणाच्या सह्या नव्हत्या. मिरवणुकीच्या हस्तपत्रकावर चार मुसलमान, कांहीं अस्पृश्य, कांहीं सत्यसमाजिस्ट ब्राह्मणेतर, कांहीं दुराराध्य कट्टर, कांहीं नवीन समतासंघवाले ब्राह्मण व रामभाऊ टिळकांचे नातेवाईक वि. दा. परांजपे अशा अनेकरंगी अनेकविध ४० लोकांच्या सह्या होत्या. व पुढें 'आणखी दीडशें लोक' असें मोघम म्हटलें होतें! हस्तपत्रकांत रामभाऊ टिळकांना 'सत्याग्रही' म्हटलें आहे. त्यांना तुरुंगवास पत्करावा लागला त्यांत "जुन्या पंचांगाचा खरेपणा व विशेषतः अस्पृश्यतानिवारण या दोन गोष्टींचा प्रामुख्यानें समावेश होतो" असें म्हटलें असून रामभाऊंच्या दंडेलीला 'प्रशंसनीय नीतिधैर्य' म्हणून संबोधलें होतें! पण वास्तविक या सत्याग्रहाच्या मुळांतलें सत्य काय आहे हें वर स्पष्ट करून सांगितलेंच आहे!

(१०) रामभाऊ टिळक यांनीं पोलिसाला लिहून दिलेल्या जबाबांत त्यांनी आपण गणेशोत्सवाचे मालक आहोत म्हणून व ट्रस्टींना उत्सव करण्याचा हक्क नाहीं म्हणून मी गणपतीची मूर्ति उचलून नेण्याचा प्रयत्न केला असें स्पष्ट म्हटलें आहे. जुन्या पंचांगाच्या खरेपणासाठीं अगर अस्पृश्यतानिवारणाचें तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीं आपल्याला

ही गोष्ट करावी लागली असें त्यांनीं जबाबांत अगर मॅजिस्ट्रेटपुढेंहि म्हटलेलें नव्हतें. पण ज्यांना केसरी-विरुद्ध येनकेन प्रकारणे हुल्लड उठविण्याची संधि साधावयाची होती त्यांना या गोष्टीची चौकशी करावयाचे कारणच नव्हते! यांतील कट्टर म्हण-विरांना गांधींच्या अनत्याचारी सत्याग्रहाच्या व्याख्येंत रामभाऊंच्या दंडेलीचा अंतर्भाव करून सत्याग्रहाच्या तत्त्वाची आपण विटंबना करीत आहोत याचेंहि भान राहिले नाही. आणि अस्पृश्यतानिवारण करावयाचे तें हिंदूंनीं करावें असें म. गांधी वारंवार सांगत असतां गणेशोत्सव, पंचांग-शुद्धि व अस्पृश्यता-निवारण या वादांत मुसलमानांना पाचारण करण्या-सहि त्यांना कांही हरकत वाटली नाही! यावरून त्यांची वेळीं अवेळीं प्रगट होणारी गांधीभक्ति केवळ केस-रीच्या द्वेषासाठीं पांघरलेली आहे हें उघड झालें आहे. ज्यांना पंचांगवादांत कांहीं ओ चे ठोहि कळत नाहीं, गणेशोत्सवाशीं ज्यांचा धर्मदृष्ट्या कांहीं संबंध नाही, ज्यांनीं सत्याग्रहहि जन्मांत कधीं केला नाहीं, अशा अनेकविध लोकांचा मेळा जमवून त्यांनीं केलें काय? तर रामभाऊ टिळकांच्या मानीव वैय-क्तिक हक्कशाबितीच्या दंडेलीला सत्याग्रहाचें स्वरूप देऊन, पण स्वतः प्रत्यक्ष ‘ सत्याग्रहांत ’ सामील न होतां, अभिनंदन करण्याच्या मिषानें केसरीविरुद्ध द्वेष उगवून घेतला! खादीप्रेमाकरितां म्हणून खादीचें कार्य करतो असें म्हणणारें पुण्याचे **खादीभांडार**-हि या केसरीद्वेषप्रदर्शनांत सामील होतें हेहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

(११) रामभाऊची गुरुवार ता. ३० रोजीं सकाळीं ८ वाजतां येरवड्याच्या तुरुंगांतून सुटका झाली. तेथें बाबूराव जेधे, श्रीपतराव शिंदे, जवळकर, राजभोज, पोतनीस इ. मंडळी मोटार घेऊन गेली होती. जेधे यांनीं रामभाऊंना हार घातला. तेथून मोटार पुणे स्टेशनाजवळ आल्यावर मिरवणूक सुरू झाली ती सासून हॉस्पिटल, रास्ता पेठ, या रस्त्यानें ‘डिप्रेस्ड मिशन’जवळ आली. तेथें जेधे यांच्या अध्यक्षतेखालीं रामभाऊंचें अभिनंदन करण्यांत आलें तेथून नाना पेठ व गणेश पेठ या भागांतून मोतीचौकांतून बुधवार चौकांत मिरवणूक आली. वाटेंत वस्ताद हमजेखान यांच्या तालमीतर्फे राम-भाऊंना हार घालण्यांत आला! बुधवार चौकांत व मार्केटांतहि रामभाऊंना कांहीं ठिकाणीं हार घाल-ण्यांत आले. खादीभांडारातर्फे रामभाऊना हार घाल-ण्यांत आल्याचें ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालें आहे. तें खरें असेल तर आश्चर्य होय. कारण रामभाऊंचे अंगाला आजपर्यंत कोणी कधींहि खादीच्या कपड्याचा विटाळ झालेला पाहिला नाहीं. मिरवणुकीला बुधवारांत साधारणतः दोनशें मंडळी दिसत होती. पत्रकावर सह्या करणाऱ्यांपैकींहि कित्येक इसम मिरवणुकींत दिसत नव्हते. गाय-आळींत ‘स्वराज्य’ पत्राच्या कचेरीतर्फे श्री. लळीत यांनी रामभाऊंना हार घातला! मिरवणुकीचा रस्ता आंखतांना त्यांत श्री. न. चिं. केळकर यांचें घर न वगळण्याची व्यवस्थापकांनीं खबरदारी घेतली होती व त्यांच्या घरावरून जातांना “केसरी कंपू”चा धिःकार करण्याची हौस कित्येकांनीं भागवून घेतली. केसरी कचेरींतील कारकून श्री. यशवंतराव कुळकर्णी यांचे घरावरून जातांनाहि हाच प्रकार झाला. गाय-कवाडवाड्यांत मिरवणूक ११॥ चे सुमारास आली. तेथेंहि केसरीच्या मंडळींचा नांवनिशीवार धिःकार करण्यांत आला. शेवटीं वाड्यांतील ट्रस्टींच्या ताब्यांतल्या आवारांत अनधिकृत रीतीनें सभा भर-विण्यांत आली. त्या ठिकाणीं श्री. जवळकर यांनीं रामभाऊंच्या अभिनंदनपर भाषण केलें. ते म्हणाले “ मी जन्मभर टिळकांना शत्रु मानीत असलों तरी ‘ बापाची इस्टेट मुलाला मिळावी ’ या न्याय्य तत्त्वासाठीं रामभाऊ हे भांडत आहेत म्हणून मी त्यांना मदत करीत आहे. ” म्हणजे पंचांगवाद व अस्पृश्यतानिवारण हीं निमित्त मात्र घेतलेलीं सोंगें बाजूस राहून या अभिनंदनांतील खरें अंतःकरणाजवळ बाळगलेलें बिंग जवळकरांच्या तोंडून बाहेर पडलें! एकूण हा बहुरंगी मेळा राम-भाऊंना वडिलांची संपत्ति मिळवून देण्यासाठीं जमला होता म्हणावयाचा! पण ज्यानें संपत्ति मिळ-विली त्याच्या इच्छेप्रमाणेंच ती खर्च व्हावी हें अधिक न्याय्य तत्त्व होय. वडिलांची संपत्ति मुलास मिळावी या सर्वसामान्य गोष्टीचा प्रचार आज कायदा कोर्ट वकील इ. करीतच आहेत. त्या बाबतींत सार्व-जनिक चळवळ करण्याची आजपर्यंत कोणाला जरूर भासलेली नाहीं. असो. रामभाऊ उत्तर देतांना म्हणाले “ खालच्या कोर्टानें व हायकोर्टानें माझ्याबद्दल अन्याय केला आहे. दहा दिवस येरवड्यास राहून मी जो सत्याग्रह केला **तो पुढील सत्याग्रहाचा प्रारंभ आहे**! पुढील महिन्यांत जुन्या पंचांगाप्रमाणें उत्सव होऊन अस्पृश्यांसाठीं सत्याग्रह होणार त्या वेळी आपणा सर्वांचें साह्य मला मिळावें. ”

(१२) तात्पर्य, रामभाऊ टिळक यांच्याभोंवतीं या वादांत किती, कोणत्या दर्जाचे व कोणत्या मताचे लोक जमा झालेले दिसतात हें वाचकांच्या लक्षांत येईलच. ज्यांनीं लो. टिळकांना जन्मभर उघड शिव्या दिल्या, जे कित्येक अजूनहि त्यांना अपशब्दाशिवाय उल्लेखित नाहींत, जे टिळकांची निंदा प्रत्यक्ष त्यांच्या मुलाच्या तोंडावर करतात, केसरी संस्थेचे वाटोळें झालेलें पाहिल्या-शिवाय आपणाला हायसें वाटणार नाहीं असें जे म्हणतात अशा कित्येक लोकांची संगत केल्यानें

आज रामभाऊ टिळकांना आपल्याला बाहेर जगांत कोणी साहाय्यकर्ते या 'असत्याग्रहां'त आहेत असें वाटत असेल. पण या त्यांच्या कृत्यानें अप्रत्यक्ष टिळक-द्रोहाच्या पातकाशिवाय दुसरें कांहीं त्यांच्या पदरीं पडणार नाहीं हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. टिळकांना अस्पृश्यतानिवारण मान्य होते असे जर स्वतः रामभाऊ कबूल करतात तर टिळकांना मान्य असलेला असा कोणता अस्पृश्यतानिवारणाचा प्रकार आज केसरीला अमान्य आहे किंवा ट्रस्टींना अमान्य आहे, हें तरी त्यांनीं सांगावें ! नव्या पंचांगाच्या विरोधकांपैकीं चिंतामणराव यांनीं असें कबूल केलें आहे कीं, सांगलीसंमेलनांत कांहीं ठरलें असो अगर नसो, पण स्वतः टिळकांना १८ अयनांश इष्ट होते असें असतां रामभाऊ टिळक यांनीं तेवढें आपल्या वडिलांचा नव्या पंचांगाशीं कांहीं संबंध नाहीं असें कां म्हणावें? तात्पर्य, रामभाऊंना नवें पंचांग काय जुनें काय दोहोंचीहि गरज तितपतच आहे. तसेच अस्पृश्यतानिवारणासंबंधानें त्यांना आपले वडिलांचीं मतें व केसरी ट्रस्टींचीं मते यांत फरक दाखवितां येणार नाहीं. अर्थात् हे दोन वाद आडमार्गांत शिरतांना रामभाऊंच्या पायाला लागले तेच ट्रस्टींवर फेंकण्याकरितां त्यांनीं उचलून घेतले. याहून त्यांच्या तत्त्ववादित्वाला अधिक किंमत नाहीं हें केसरीच्या वाचकांना सहज कळून येईल.

# ही घ्या एकमुखी स्वराज्य--घटना

पूर्वी सर्वपक्षीय परिषदेंत ठरल्याप्रमाणें पं. मोतिलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या कमिटीनें हिंदुस्थानास मिळावयाच्या स्वराज्याची योजना तयार केली व तिजविषयीं थोडाबहुत मतभेद असला तरी योजनेचें काम पं. मोतिलालप्रभृति कमिटींतील सभासदांनीं एकंदरींत फार कुशलतेनें व मुत्सद्दीपणानें केलें असाच सर्वांचा अभिप्राय पडून त्याबद्दल साऱ्या हिंदुस्थानांत कमिटीची वाहवाच झाली. तथापि हिंदुस्थानांतील ज्या अनेक पक्षांनीं एकत्र जमून ही कमिटी नेमली त्या सर्वांची संमति कमिटीच्या योजनेस मिळावयाची उरलीच होती. हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांनीं योजनेची वाहवा आगाऊ केली असल्यामुळें ती योजना सर्व पक्षांस पसंत पडेल अशीच सामान्यतः अटकळ होती. परंतु ती गोष्ट साक्षात घडून येईपर्यंत स्वराज्याची आस्था बाळगणाऱ्या कोणाहि विचारी माणसाच्या मनास चिंता वाटणे स्वाभाविक होते. याच चिंतातुर मनानें स्वराज्यवादी हिंदुस्थान गेल्या आठवड्यांत लखनौकडे डोळे लावून बसला होता आणि आनंदाची गोष्ट अशी कीं जनतेची ही आशा सर्व पक्षांनीं लखनौस जमून व नेहरू कमिटीच्या योजनेस थोड्याबहुत फरकानें मान्यता देऊन सफळ केली.

नेहरू कमिटीची योजना जशीच्या तशी सर्व पक्षांनीं कबूल करणें संभवनीय नव्हतें व अशी कोणाची अपेक्षाहि नव्हती. परंतु त्या योजनेंत जरूर ते फेरबदल करूं, पण ती झुगारून देऊन राष्ट्रघात करणार नाहीं या बाबतींत सर्व पक्षांची एकवाक्यता असणें आवश्यक होतें; व तोच अनुभव अखेर आला यांतच लखनौस लाभलेल्या यशाचें खरें बीज आहे. प्रत्येक पक्षाच्या मतानें योजनेंत जे फरक व्हावयास पाहिजेत त्यांची वाटाघाट खुद्द सर्वपक्षीय परिषदेंत करीत बसण्यापेक्षां प्रत्येक पक्षानें आपली वेगळी बैठक भरवून तिच्यांत योजना छाननू घेणें अधिक सोयीचें. या दृष्टीनें परिषदेच्या अधिवेशनापूर्वी प्रत्येक पक्षानें आपली बैठक लखनौस भरविली व तिच्यांत योजना तपासून पाहिली. या तपासणीसाठीं लखनौस मुस्लीम लीग, सेंट्रल खिलाफत कमिटी, हिंदु—महासभा, लिबरल पक्ष व स्वातंत्र्यपक्ष यांनीं आपले तळ कांहीं दिवस आगाऊ दिले. डोमीनियन स्टेटस ऊर्फ वसाहतीचें स्वराज्य प्राप्त करून घेण्यासाठींच नेहरू कमिटीची योजना असल्यामुळें ती लिबरल पक्षास ठोकळमानानें मान्य होण्याजोगी होती आणि हिंदु—मुसलमानांच्या प्रश्नासंबंधीं त्यांचा विशेष आग्रह असा नव्हता, या कारणानें लिबरल पक्षाच्या प्रतिकूलतेची धास्ती कोणास वाटत नव्हती. त्यानंतर पं. जवाहरलाल नेहरू व मौ. हसरत मोहानी यांचा स्वातंत्र्यपक्ष येतो. स्वातंत्र्यपक्षाचें स्वातंत्र्याचें ध्येय मूठभर लिबरल पक्षाचे नेमस्त सोडल्यास कोणासहि पटण्यासारखेंच असून तें नेहरू कमिटीनें आपल्या योजनेंत समाविष्टहि केलें असल्यामुळें त्यास तात्विक विरोध फारच थोड्यांचा होता.

परंतु या तत्त्वाच्या आधारावर हसरत मोहनीसारखे ध्येयवादी गृहस्थ स्वराज्याची योजना ऐनजिनसीं फेटाळून देऊं म्हणतील तर त्यांची मात्रा हिंदुस्थानांतील सर्व पक्ष मिळून बनलेल्या या परिषदेतील बहुमतापुढें चालणारी नसल्यामुळें ध्येयवाद्यांच्या विरोधाची काळजी करण्याचेंहि कारण नव्हतें. खरा खटका हिंदु—महासभा व मुस्लीम लीग यांचे दरम्यान उडावयाचा होता आणि तो टाळून हिंदु—मुसलमानांची समजूत घाल-

ण्यांतच हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या मुत्सद्दीपणाची पारख व्हावयाची होती. खुद्द नेहरू कमिटींत हिंदु-महासभा व मुस्लीम लीग यांची बाजू मांडण्याकरितां श्री. माधवरावजी अणे, सर अली इमाम व श्वेब कुरेषी यांचा सभासद या नात्यानें समावेश करण्यांत आलाच होता. परंतु त्यांसहि ज्या मुद्द्यांचें निराकरण करतां आलें नाहीं असेहि कित्येक मुद्दे वादग्रस्त स्वरूपांत शिल्लक असल्यानें त्या मुद्द्यांवर रणें माजून राहाणार हें उघड होतें.त्यासाठीं हिंदुमहासभेच्या वतीनें पं. मालवीय, लाला लजपतराय, डॉ. मुंजे यांनीं आणि मुस्लीम लीग व खिलाफत कमिटी यांच्या वतीनें डॉ. किश्लू, अबुल कलाम अझाद, महमुदाबादचे राजेसाहेब, सर अली इमाम, डॉ. अन्सारी व श्वेब कुरेषी यांनीं लखनौस परिषदेपूर्वी हजर राहून आपआपल्या मुद्द्यांचा कापूस पिंजून ठेवला होता.

हिंदु-मुसलमानांच्या अलीकडील झगड्यावरून पड खाण्याचा स्वभाव हिंदूंचा व ओढून धरण्याचा स्वभाव मुसलमानांचा याविषयीं बहुतेकांची खात्री पटलीच आहे. पं. मोतलाल नेहरू यांस हिंदु-मुसलमानांच्या स्वभावांतील हा फरक पक्का माहीत आहे आणि सामान्य हिंदु पुढाऱ्यांपेक्षांहि मुसलमानांपुढें ते अल्पसंख्य म्हणून नमतें घेण्याविषयीं त्यांची प्रसिद्धि आहे.पं.मोतिलाल हे स्वराज्ययोजनामंडळाचे अध्यक्ष असल्यामुळे त्यांनीं मुसलमानांचीं तोंडें. मिटविण्याकरितां मुसलमानांच्या पदरांत शक्य तितकें झुकतें माप टाकण्याच्या कामीं कमिटीस मदत केली असल्यास त्याबद्दल कोणासहि आश्चर्य वाटण्याचे कारण नाहीं.अशा रीतीनें ज्या पाण्यांतून ही योजनेची नौका वल्हवावयाची त्यांतील भोवरे मोडून टाकल्यामुळे व खडक फोडल्यामुळें ती बिनधोक पैलतीरास जाऊन पोंचेल अशी नेहरू कमिटीची अटकळ होती व ती सर्वपक्षीय परिषदेंत बहुतांशीं खरी ठरली. हिंदुमहासभा कांहीं बाबतींत मुसलमान पुढाऱ्यांशीं झगडली व तिला अल्पस्वल्प यशहि लाभलें. परंतु तें यश नेहरू कमिटीच्या योजनेंत हिंदूंना अधिक हक्क संपादन करण्याच्या स्वरूपाचे होतें असें म्हणण्यापेक्षां नेहरू कमिटीनें ज्या सवलती मुसलमानांस पूर्वीच दिल्या आहेत त्याहून अधिक सवलती मिळविण्याच्या त्यांच्या प्रयत्नास पायबंद घालण्याच्या स्वरूपाचें होतें असेंच म्हणणें वस्तुस्थितीस धरून होईल.

पंजाब व बंगाल या दोन प्रांतांत हिंदूंपेक्षां मुसलमानांची संख्या अधिक आहे. आणि इतर आठदहा प्रांतांतून मुसलमानांपेक्षां हिंदूंची संख्या अधिक आहे. एवढ्या मोठ्या हिंदुस्थानांत ज्यांत मुसलमान हिंदूंपेक्षां जास्ती आहेत असे अवघे दोनच प्रांत पाहून मुसलमानांस हिंदूंचा हेवा वाटतो व त्याकरितां नवीन मुसलमानी प्रांत निर्माण करण्याच्या युक्त्या ते अलीकडे शोधीत असतात. वायव्य सरहद्दप्रांत पंजाबास जोडूं न देणें, मुंबई इलाख्यापासून सिंध प्रांत वेगळा करणें व बलुचिस्थानालाहि सुधारणा लागू करणें या युक्त्या वरील पैकींच होत. हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या प्रांतांची रचना सदोष आहे व ती सुधारून राज्यकारभाराच्या दृष्टीनें सोयीचे असे भाषावार प्रांत पाडावे अशी सर्व हिंदी लोकांची पुष्कळ दिवसांची मागणीहि आहे हें खरें. परंतु हा मूलभूत हेतु गुंडाळून ठेवून व केवळ मुसलमान या जातीचा अभिमान धरून जेव्हां सिंधसारखा आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण नसणारा प्रांत मुसलमान पुढारी वेगळा करून मागतात तव्हां एकाच राष्ट्रांत राहाणाऱ्या हिंदू-मुसलमानांत कायमची दुही पाडण्याचा ते इरादा बाळगतात असें हिंदूंनी कां समजूं नये? ही गोष्ट उघड दिसत असतां मुसलमानांच्या मर्जीखातर नेहरू कमिटीनें सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून पृथक् करण्यास संमति दिली.

वायव्य सरहद्द व सिंध या दोनहि प्रांतांत मुसलमानांपेक्षां हिंदू फारच थोडे असल्यानें तेथील प्रातिनिधिक संस्थांत आपले कांहीं प्रतिनिधी हटकून निवडून यावे यासाठीं हिंदूकरितां राखीव जागा ठेवण्याची तरतूद नेहरू कमिटीच्या योजनेत हवी होती. तशी तरतूद कमिटीनें सरहद्द प्रांताकरितां आणि सिंध प्रांतांकरितां केली होती. या उपायानें हिंदूंची सोय पाहाण्यांत आली तरी सिंधसारखा छोटा प्रांत वेगळा काढल्यानंतर त्यासाठीं येणारा राज्यकारभाराचा मोठा खर्च भागावयाचा कसा ही अडचण लहान नव्हे. पण तिचा निर्वाह ज्या युक्तीनें झाला ती युक्ति परिणामीं हिंदूंना घातक ठरेल कीं काय अशी भीति वाटते. सिंधमधील बहुमतानें, अर्थात् मुसलमानांनीं, राज्यकारभाराच्या खर्चाचें अवजड ओझें आपल्या शिरावर घेण्याचें ठरविलें तर सिंध प्रांत वेगळा करण्यास कोणी हरकत आणूं नये असें हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या तडजोडींत निश्चित झालें व त्यास सर्वपक्षीय परिषदेची मंजुरीहि मिळाली. तथापि सिंधमधील हिंदू मुसलमानांपेक्षां संख्येनें कमी पण संपत्तीनें अधिक असल्यामुळें तेथील मुसलमान बहुमताच्या जोरावर हिंदूंवर पक्षपातानें कर बसवून त्यांजपासून वाजवीपेक्षां फाजील पैसा पिळून घेणार नाहींत अशी खात्री बाळगण्यास आधार काय ?

सिंध व सरहद्द प्रांत यांत हिंदूंपेक्षां मुसलमान

जितके जास्ती आहेत तितके ते पंजाब व बंगाल या इलाख्यांत नसले तरी संख्याधिक्य मुसलमानांचेंच आहे.या दोन इलाख्यांत आपण अल्पसंख्य आहोंत हें निमित्त सांगून हिंदूंना आपल्याकरितां राखीव जागा मागतां आल्या असत्या. पण त्या त्यांनीं मागितल्या नाहींत. याबद्दल मुसलमान बंधूंनीं त्यांस धन्यवाद द्यावयाचा बाजूसच राहिला. उलट बहुसंख्य असे मुसलमान आपण हिंदूंपेक्षां मागसलेले या सबबीवर राखीव जागा मागतील कीं काय अशी भीति उद्भवली व ती पंजाबांत प्रत्ययासहि आली. वास्तविक अशी धास्ती बाळगण्याचें नेहरू कमिटीनें मुसलमानांस निमित्त ठेवलें नव्हतें. कारण त्या अडचणीवर तोड म्हणून प्रत्येक वयांत आलेल्या स्त्री–पुरुषास मताधिकार असावा अशी मुसलमान पुढाऱ्यांनीं पूर्वींच सुचविलेली युक्ति नेहरू कमिटीनें आपल्या स्वराज्यघटनेंत समाविष्ट केलीच होती. सांप्रत हिंदुस्थानांत मताधिकार हा विशिष्ट प्राप्ति व शिक्षण यांवरच अवलंबून आहे. पण त्या पायरीवरून पाय उचलून सार्वत्रिक मताधिकाराची नेहरू कमिटीनें घेतलेली उडी लांब पल्ल्याची व धाडसाची आहे यांत शंका नाहीं. ही उडी केवळ मुसलमानांची मर्जी राखण्यासाठींच घेतली नाहीं काय? त्या उडीनें संपत्ति व शिक्षण यांस बगल देऊन सर्व वयांत आलेल्या हिंदु–मुसलमान स्त्रीपुरुषांस मतदानाच्या अधिकारभूमीवर आणून ठेवलें तर मग पंजाबांतील मुसलमानांनीं राखीव जागांची सवलत मागण्याचा हट्ट कां धरावा? पण हिंदु–मुसलमानांच्या वागणुकीचें हल्लींचें धोरणच असें आहे कीं, हिंदूंनीं आपले न्यायाचे हक्कहि बुडवावे आणि मुसलमानांनीं आपले अन्यायाचे हक्कहि शाबीत करावे. परंतु प्रकृत स्थळीं सुदैवानें अखेर घडून आलें तें वेगळेंच. पंजाबांतील मुसलमानांनीं आपला राखीव जागांचा दुराग्रह सोडला व तोहि दहा वर्षेपर्यंतच. आणि त्याबद्दल सर्वपक्षीय परिषदेनें पंजाबांतील मुसलमानांची मनापासून पाठ थोपटली हें सांगावयास नकोच. पंजाबातल्याइतके बंगाल्यांतील मुसलमान दुराग्रही नसल्यामुळें बंगाल्यांतील मुसलमानांनीं राखीव जागांचा हट्ट धरला नाहीं हें भाग्यच समजावयाचें !

हिंदु व मुसलमान हे हिंदुस्थानांतील प्रमुख वर्ग होत. हिंदुस्थानानें तयार केलेली कोणतीहि स्वराज्याची योजना ब्रिटिश पार्लमेंटास मान्य होण्यापूर्वी हिंदु व मुसलमान या दोन प्रमुख वर्गांचें शिक्का-मोर्तब सदर योजनेवर पडणें अत्यंत आवश्यक होय. ही आवश्यकता लो. टिळक यांस पटली होती व तत्प्रीत्यर्थ बारा वर्षांपूर्वी लखनौ येथेंच मुसलमानांनीं मागितलेल्या मताधिकाराच्या व प्रतिनिधित्वाच्या विशेष सवलती देऊन लो. टिळकांनीं व इतर पुढाऱ्यांनीं आपल्या स्वराज्यविषयक योजनेस मुसलमानांस वश करून घेतलें. त्याहून निराळ्या रीतीनें पण विशेष सवलतींचाच अवलंब करून आजच्या हिंदुपुढाऱ्यांनाहि बारा वर्षांनंतर मुसलमानांस तसेंच वश करून घ्यावें लागत आहे, ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. नेहरू कमिटीनें एका बाबतींत मात्र महत्त्वाची सुधारणा घडवून आणिली. मोर्लेमिंटो सुधारणेंत सरकारनें जें जातवार मतदारसंघाचें व जातवार निवडणुकीचें घातक व विषारी तत्त्व घुसडून दिलें होतें तें लखनौच्या कराराच्या वेळीं बाहेर काढून टाकतां आलें नाहीं. त्या तत्त्वास भारताच्या विराट शरीरांतून हुसकून लावून तें शरीर निकोप बनविण्याचें श्रेय नेहरू कमिटीनें घेतलें आहे यांत संशय नाहीं. पण त्याकरितां सार्वत्रिक मताधिकाराचें सद्यःस्थितींत न झेपण्यासारखें तत्त्व भारताच्या शरीरांत घुसवून एका नव्या प्रयोगाची सुरवात कमिटीनें करून दिली आहे. तें अमलांत आल्यास त्याचे परिणाम कोठवर जाऊन पोंचतील याचें आज अनुमान करवत नाहीं.

अशा रीतीनें परिषदेंत मान्य झालेल्या घटनेंतील उणीवा, दोष अगर भावी राष्ट्रीय व्यवहारांत घोक्याचीं किंवा अडचणीचीं होणारीं स्थळें शोधल्यास आणखीहि सांपडतील. पण सर्वस्वी निर्दोष अशी घटना करण्याचा आजचा प्रश्न नसून सर्वमान्य अशी घटना होणें ही आजची मुख्य नड होती, या दृष्टीनेंच लजपतराय, मालवीय, बेझंट इ. वृद्ध पुढाऱ्यांनीं तपशीलांतील दुरुस्त्यापेक्षां घटना सर्वमान्य होत आहे या गोष्टीला अधिक महत्त्व दिलें असून त्याच दृष्टीनें लखनौ येथें सर्वपक्षीय परिषदेंत मंजूर झालेल्या स्वराज्यघटनेचें महत्त्व सर्वांनीं ओळखलें पाहिजे. हिंदुस्थानाच्या भावी स्वराज्याची रूपरेखा या नात्यानें नेहरू कमिटीची परिषदेंत दुरुस्त झालेली ही योजना इतिहासांत चिरस्मरणीय झाल्यावांचून राहाणार नाहीं. सदर योजनेस चिकटून राहाण्याची जबाबदारी सर्वपक्षीय परिषदेंत सामील झालेल्या हिंदु–मुसलमान, पार्शी, शीख, नेमस्त, कॉंग्रेसभक्त व स्वातंत्र्यवादी या सर्वांवर सारखीच असल्यामुळें तिला आपण अंतर देणार नाहीं असा बंधनकारक ठराव परिषदेंतील सभासदांनीं पास केला हें सावधगिरीच्या दृष्टीनें योग्य असेंच झालें.

नेहरूकमिटीच्या योजनेस बिलाचें स्वरूप देण्याचें कार्य आतां उरलें असून तें पूर्ण करण्याची जबाबदारी त्याच कमिटीकडे सोपविण्यांत आली आहे. पण हें पुढील कार्य विशेष अवघड नाहीं व तें सायमन कमिशन हिंदुस्थानांत असतांच पुरेंहि

होईल. त्या मानानें झालें हेंच काम अवघड होतें. हिंदुस्थानास स्वराज्य देण्याचें काम केवळ सर्वसंमत अशी स्वराज्याची योजना हिंदी लोकांपाशीं तयार नाहीं म्हणूनच नडलें होतें असें लॉर्ड बर्कनहेडप्रभृतीचें म्हणणें असेल तर ही पाहा स्वराज्याची एकमुखी योजना तयार आहे, आणि हिंदुस्थानास स्वराज्य मिळण्यास हिंदू–मुसलमानांतील दुही आड येत असेल तर ही पाहा हिंदू–मुसलमानांची एक विचारानें ठरविलेली संयुक्त योजना तयार आहे असें रोखठोक उत्तर देण्याला प्रस्तुत योजना हा प्रमाणभूत आधार उत्पन्न झाला यांत शंका नाहीं. स्वराज्याची ही योजना हिंदूमुसलमानांच्या संमतीनें सिद्ध झाल्यानंतर तिचें बल व प्रभाव सायमन कमिशनपुढें द्यावयाच्या साक्षीपेक्षां व सायमन कमिशनपुढें सादर करावयाच्या लेखी पुराव्यापेक्षां सहस्रपटींनीं अधिक परिणामकारक आहे हें आशाळभूत प्रांतिक कमिट्यांच्या व जातवार शिष्टमंडळांच्या लक्षांत आपोआपच येईल. नेहरू कमिटीच्या योजनेस पं. मालवीय यांनीं मोडकीतुटकी नौका म्हणून विनयानें संबोधलें खरें पण एकीचें चिलखत चढविलेली हीच नौका अनुकूल वारा व कुशल कर्णधार लाभल्यास स्वराज्याच्या पैलतीरावर हिंदी राष्ट्रास सुरक्षितपणें नेऊन सोडण्यास समर्थ होणार आहे हें विसरतां कामा नये.

# श्री. नानासाहेब वैद्यांचा घोटाळा

(ले. ज. स. करंदीकर)

श्री. नानासाहेब वैद्य यांच्या लेखांतील मोठा घोटाळा आरंभस्थानाच्या निश्चलत्वाच्या संबंधाचा. आरंभस्थान निश्चल असावें हें त्यांसहि मान्य आहे. पण वर्षमान ८॥ पळें अधिक घेत गेल्यानें आरंभस्थान ढळलें आहे, याला उत्तर देतांना ते लिहितात कीं, जसें वर्षमान ८॥ पळें अधिक घेतलें तशी अयनगति ८॥ विकला अधिक घेतली, तेव्हां चुकीनें चुकी उडून गेली! नानासाहेब वैद्यांची ही चुकीनें चुकी उडवून टाकण्याची युक्ति अजब आहे! वर्षारंभ जेथें व्हावयाचा तेथून सूर्य ८॥ विकला पुढें गेल्यावर जर आम्ही वर्षारंभ झाला असें मानूं लागलों तर आरंभस्थान निश्चल कसें राहील? समजा, एक गृहस्थ एका देवळास प्रदक्षिणा घालीत आहे. तोंडानें तो राम नामाचा जप करीत आहे आणि हातानें माळेचे मणी ओढीत आहे. त्याची समजूत अशी झाली कीं एका प्रदक्षिणेंत १००० जप होतो. त्याप्रमाणें जप करीत माळेचे मणी ओढीत पण देवळाच्या दरवाजाकडे लक्ष न देतां त्यानें १०८ प्रदक्षिणा केल्या व तेथें तो थांबला. वास्तविक स्थिति अशी होती कीं ९९९ जपसंख्येलाच त्याची प्रदक्षिणा पूर्ण होऊन तो देवळाच्या दरवाजासमोर येत असे. पण तिकडे त्याचें लक्ष नसल्यानें जेव्हां १०००×१०८ जप करून तो थांबला तेव्हां तो देवळाच्या दरवाजासमोर न थांबतां १०८ जपसंख्येइतकें अंतर दरवाजाच्यापुढें गेला असला पाहिजे. कारण दरएक प्रदक्षिणेस तो एका जपाच्या वेळेइतका पुढें जात होता. यांत जपाची संख्या व माळ ओढणें या दोन चुकांचा परस्परांशीं मेळ बरोबर बसला तरी प्रदक्षिणेचें आरंभस्थान जे देवळाचें द्वार तें त्याच्या १०८ प्रदक्षिणांच्या समाप्तीच्या वेळीं मूळच्या जागीं न राहतां १०८ जपसंख्येइतकें मागें राहिलें. त्याचप्रमाणें वर्षमान ३६५–१५–३१–२६ आणि अयनगति ५८॥ विकला अशा दोन चुकांचा परस्परांशीं मळ बसला तरी सूर्याचा प्रदक्षिणाकाल याहून ८॥ पळें कमी असल्यानें त्याचें आरंभस्थान बदलत गेलेंच पाहिजे

## निश्चल आरंभस्थान

सायनवाद्यांचें आरंभस्थान संपातावर अवलंबून असून त्यांचें वर्षमान संपातापासून परत संपातापर्यंत असल्यामुळें आणि संपातबिंदु चल असल्यामुळें त्यांचें सांपातिक वर्षमान नाक्षत्र सौरवर्षमानापेक्षांहि लहान म्हणजे दि. ३६५, घ. १४, प ३१, वि. ५३, प्र. वि. २५ आहे आणि त्यांचें आरंभस्थान बदलत असून तें दरसाल ५०·२ विकलांनीं पश्चिमेस हटत जातें. निरयनपद्धतीचा मुख्य कटाक्ष असा कीं, वर्षारंभस्थान संपातचलनाप्रमाणें बदलूं न देतां निश्चल ठेवावयाचें. म्हणून सूर्य क्रान्तिवृत्तांतील एका नक्षत्राच्या एका बिंदूतून निघून त्याच नक्षत्रांतील त्याच बिंदूवर परत येईपर्यंतचा जो काल तें त्याचें वर्ष त्याला नाक्षत्र सौरवर्ष म्हणतात व सूक्ष्म पद्धतीनें हें नाक्षत्र सौरवर्षमान दि. ३६५, घ. १५, प. २२, वि. ५३, प्र. वि. १३ इतकें येतें. पण पूर्वीच्या सिद्धान्तकारांना ही कालगणना, सूक्ष्म साधनांच्या अभावीं, इतकी बिनचूक करतां न आल्यामुळें त्यांनीं हें वर्षमान ३६५–१५–३१–२६ इतकें घेतलें. सूर्यसिद्धान्तकारांनीं दिलेलें व बहुतेक करण ग्रंथकारांनीहि मानलेलें हें वर्षमान वास्तविक वर्षमानापेक्षां ८॥ पळांनीं अधिक असल्यामुळं हें वर्षमान घेऊन गणित करीत गेल्यास

वर्षाच्या आरंभस्थानाचा बिंदु स्थिर न राहातां दरसाल ८॥ पळांनीं पूर्वेस सरकत सरकत जातो. निरयन-पद्धतीची तर अपेक्षा ही कीं, आरंभस्थान बदलूं नये; तें स्थिर असावें.

परंतु वर्षमान बरोबर बिनचूक न सापडल्यामुळें आरंभस्थान थोडथोडें पूर्वेस जात चाललें आणि ग्रहलाघवी पंचांगांत शके ४४४ पासून दरसाल ६० विकला अयनगति घेत आल्यामुळें त्या वेळेपासून आतांपर्यंत म्हणजे शके १८५०पर्यंत १४०६ वर्षांत त्याचें आरंभस्थान पूर्वीच्या खऱ्या आरंभस्थाना-पासून सुमारें चार अंश पूर्वेस हटलें आहे. आतां यापुढें करण ग्रंथांत वर्षमान अगदीं शुद्ध म्हणजे दि. ३६५-१५-२२-५३-१३ इतकें घेत गेल्यास आरंभ-स्थानाचा बिंदु यापुढें अधिक सरकणार नाहीं. परंतु आतांपर्यंत तो चार अंश पूर्वेस सरकला त्याची वाट काय? केतकी पंचांग व ऐक्य पंचांग ही चूक काढून न टाकतां मूग गिळून स्वस्थ बसतात. चौदाशें वर्षांची सांचलेली चुकी ती हीच होय. ही चुकी काढून टाकून आरंभस्थान शके ४९६ ला जेथें होतें तेथें आणलें तर तें रेवती योगताऱ्याशीं (म्हणजे झीटा ताऱ्याशीं) येतें व तेथून संपातबिंदू-पर्यंतचें जें अंतर तें अयनांश होत व ते अयनांश आर्जामतीला १८।५२ येतात.

## ज्यो. केतकर यांची कबुली

सिद्धान्तकारांनीं दिलेलें नाक्षत्र सौरवर्षमान वास्तविक वर्षमानापेक्षां ८॥ पळांनीं अधिक असल्यामुळें आपलें आरंभस्थान हळूहळू बदलत चाललें आहे व तें चार अंश बदललें आहे अशी कबुली ज्यो. व्यंकटेश बापूजी केतकर यांनीं पंचवीस-तीस वर्षांपूर्वीच दिली आहे. त्या वेळचे त्यांचे ज्योतिर्गणितांतले श्लोक पुढीलप्रमाणें आहेत.

शाके षड्गोऽब्धि तुल्ये शरदि समभवत् सौरवर्षप्रवृत्तिः ।
रेवत्यां सौरवर्षे सदलवसुविनाड्युन्मिताधिक्य भावात् ॥
मंदं मंदं पुरः सा प्रचलति सततं रेवतीतश्चतुर्भिः।
भागैरग्रेऽधुना सा भवति पुनरितोप्यग्रतः संभवेच्च ॥
तस्माद्वर्षप्रवृत्तिः पुनरपि च यथा रेवतीतारकायां॥
स्यात् तादृक्सुव्यवस्थाकरण इह मया रैवतः पक्ष उक्तः।
इच्छेयुर्ये न हातुं सुदृढपरिचयाद्वर्तमानां प्रवृत्तिं ।
तेभ्यश्चैत्राख्यपक्षः प्रचलनरहितः संगृहीतः किलात्र॥
ज्योतिर्गणितम् पृ. ४२४

याचा अर्थ—शके ४९६ मध्यें नाक्षत्र सौरवर्षा-रंभ रेवती योगतारेंत (झीटामध्यें) झाला होता, पण आपलें नाक्षत्र सौरवर्षमान ८॥ पळांनीं वाजवीपेक्षां अधिक असल्यानें हें वर्षारंभ-स्थान मंद मंद गतीनें सालोसाल रेवती योगताऱ्या-पासून पूर्वेस चळत चाललें आहे आणि सध्या तें रेवती योगताऱ्यापासून (झीटापासून) चार अंश चळलें आहे आणि (आपण शुद्ध वर्षमान स्वीका-रलें नाहीं तर) तें असेंच पुढें पुढें सरकत जाणार. हें सरकणें बंद होऊन पुनः वर्षारंभ रेवती योगता-रेंत (झीटामध्येंच) होऊं लागावा अशी सुव्यवस्था करण्यासाठीं मी रैवत पक्ष (झीटापक्ष) या ग्रंथांत सांगितला आहे. परंतु ज्यांना फार दिवसांची रूढि सोडवत नसेल त्यांच्याकरितां मी प्रचलनरहित असा चित्रा पक्षहि यांत देऊन ठेवला आहे.

सांगलीसंमेलनाच्या ठरावावर वादविवाद सुरू झाल्यानंतर रैवत पक्ष म्हणजे झीटापक्ष नव्हे आणि रेवती योगतारा म्हणजे झीटा नव्हे असला वितंड-वादाचा आक्षेप केतकी पक्षाच्या अभिमान्यांकडून पुढें येऊं लागला. त्या वेळीं त्यांच्याविरुद्ध त्यांचेच वरील श्लोक साक्ष देऊं लागल्यामुळें त्यांनीं सांगली-संमेलनानंतर एक वर्षानें वरील श्लोक बदलून नवे श्लोक केले ते असे—

शाकेषड्ऽगोब्धितुल्ये सति विषुवमभूद्रेवतीतारकायां ।
चंद्रांशौ सौरवर्षे सदलवसुविनाड्युन्मिताधिक्य-भावात् ॥
मदं मंदं पुरस्तत्स्थलमयति सदा रेवतीतो युगांशैः ।
चित्रायाः समुखं संप्रति भवति पुनर्निःसरेदग्रतश्च ॥
तस्माद्वर्षप्रवृत्तिं पुनरपिहि सदा रेवतीतारकायां ।
इच्छद्भ्यः स्वैरबुद्ध्या प्रचरविरहितो रैवतः पक्ष उक्तः
उच्छेत्तुं नो सहेरन् चिरपरिचितां वर्तमानां प्रवृत्तिं ।
तेभ्यः सद्भ्यो मयांगीकृतविषयपरश्चैत्रपक्षो निबद्धः॥

याचा अर्थ—शके ४९६ सालीं रेवती योग-तारेंत (झीटामध्यें) विषुवदिन होत असे. परंतु आपलें वर्षमान वाजवीहून ८॥ पळें अधिक असल्यामुळें आरंभस्थान हळूहळू पुढें स्थलांतर करीत आहे. आणि आतां तें रेवती योगतारेपासून चार अंश पूर्वेस चळलें असून सांप्रत तें चित्रा तारेच्या संमुख आलें आहे. असें असतां ज्यांना आपल्या स्वैर-बुद्धीनें हा वर्षारंभ पुनः रेवती योगतारेपासूनच व्हावा असें वाटत असेल त्यांच्याकरितां प्रचलन-रहित असा रैवत पक्ष मी या ग्रंथांत दिला आहे. परंतु ज्यांना फार दिवस अंगीं पडलेली रूढि बदलणें असह्य वाटत असेल त्या सभ्यांच्या सोयीसाठीं मी चित्रा पक्ष यांत दिला आहे.

जुन्या श्लोकांत व नव्या श्लोकांत जो फरक आहे त्यांतली मख्खी वाचकांच्या लक्षांत आलीच असेल. सांगली–संमेलनाच्या पूर्वी रैवत पक्ष म्हणजे सुव्यवस्थाकरण असून चित्रा पक्ष हा केवळ रूढिप्रिय लोकांकरितां होता. सांगलीसंमे-लनानंतर केतकरांस रैवत पक्ष मान्य करणें ही स्वैरबुद्धि वाटूं लागली आणि चित्रा पक्ष हाच सभ्य लोकांचा पक्ष असें सांगण्यांत येऊं लागलें! परंतु असला बाह्य देखावा कितीहि नटविला तरी शके

४९६ मध्यें रेवती योगतारेमध्यें विषुवदिन म्हणजे मेषसंक्रमण (वसंतसंपात) होतें, त्या रेवती योगताऱ्यापासून आरंभस्थान आतांपर्यंत चार अंश पूर्वेस सरकलें आहे आणि आतां तें आरंभस्थान चित्रा ताऱ्याच्या संमुख आलें आहे आणि शुद्ध वर्षमान स्वीकारलें नाहीं तर तें आरंभस्थान आणखीहि पूर्वेकडे जात राहील इतक्या गोष्टींची यांत मिळालेली कबुली अत्यंत महत्त्वाची आहे. वर्षारंभस्थान आतां चित्रा ताऱ्याच्या समोर आलें आहे या विधानाचा अर्थच असा स्पष्ट होतो कीं, शके ४९६ पासून आतांपर्यंत तें आरंभस्थान चित्रा ताऱ्याच्या समोर केव्हांहि नव्हतें. अर्थातच जेव्हांपासून अर्वाचीन ज्यो. शास्त्राचे ग्रंथ लिहिले गेले तेव्हांपासून चित्रासंमुख आरंभस्थान केव्हांहि नव्हतें. प्राचीन ग्रंथांत तर कृत्तिकारंभस्थान होतें आणि त्या कृत्तिकारंभस्थानाचा त्याग करून जी नवी मांडणी झाली तीत आरंभस्थान रेवती योगताऱ्यानजीक आलें. अर्थातच चित्रा पक्षाला प्राचीन ग्रंथाचा किंवा परंपरेचा किंबहुना नुसत्या ओझरत्या उल्लेखांचाहि कोठे दखोल आधार नाहीं.

शके ४२१ च्या पूर्वी अयनांशांचा उल्लेखच नसल्यानें त्या वेळीं अयनगति किती घेत असत हा प्रश्नच उद्भवत नाहीं. परंतु शके ४२१ किंवा शक ४४४ अथवा शक ४९६ पासून पुढें केरूनाना छत्रे किंवा व्यं. बा. केतकर यांच्यापर्यंतच्या मध्यंतरींच्या काळांत जे जे ज्योतिषी झाले त्यांनीं अयनगति ५८॥ विकला किंवा ६० विकला घेतली होती. हल्लींप्रमाणें ५०.२ विकला कोणीहि घेतली नाहीं. अर्थातच त्यांच्या वेळचे अयनांश काढतांना किंवा त्यांनीं दिलेल्या अयनांशावरून उलट गणिताने शून्य अयनांश वर्ष काढतांना अयनगति ५८॥ किंवा ६० विकला हीच घेतली पाहिजे. या संबंधांत चिंतामणराव वैद्यांनीं केलेलीं विधानें अगदीं भ्रमोत्पादक आहेत. नकाशा काढणारानें आपला नकाशा ज्या स्केलनें काढला असेल, तें स्केल बरोबर असो किंवा चूक असो, तेंच स्केल गृहीत धरून आपणाला अंतर मोजणें प्राप्त आहे. स्वतः नकाशा काढणारानें एका इंचाला ६० मैल स्केल आहे असें सांगावें आणि आम्ही तें एका इंचाला ५० मैल आहे असें समजून त्यानें दिलेल्या अंतराची चिकित्सा करावी हें अशास्त्रीय होय. परंतु स्केलपट्टी वापरण्यांत त्याची कांहीं चुकी झाली होती असें जर आपणास आढळून येईल तर त्यानें जेथें एका इंचाला ६० मैल धरले तेथें आपण ५० मैल धरून त्याच्या मैलांची संख्या ६०:५० या प्रमाणांत कमी करून शुद्ध करून घेणें अवश्यक आहे. तेव्हां ६०:५० या प्रमाणानें चालू ग्रहलाघवीय अयनांश दुरुस्त करा किंवा दरवर्षाला ८॥ विकलांच्या चुकीप्रमाणें १३५४ वर्षांची सुमारे चार अंशांची चुकी ग्रहलाघवीय अयनांशांतून वजा टाका आणि शून्य अयनांशवर्ष केतकरांनीच मान्य केलेले शक ४९६ हें घ्या म्हणजे खरे शुद्ध अयनांश १८·५२ येतात हें चिंतामणराव वैद्यांनाहि मान्य करणें प्राप्त आहे.

भाकरी जशी कोठूनहि मोडतां येते त्याप्रमाणें वर्तुळांतला कोणताहि बिंदु आरंभस्थान मानतां येतो हे खरें. परंतु ज्या आरंभस्थानापासून आपण मोजण्यास प्रारंभ केला तेथून मोजणी बरोबर होत आहे कीं नाहीं हें वारंवार पाहण्याला साधन म्हणून त्या जागीं एखाद्या निश्चल ताऱ्याचा खुंट अवश्यक आहे. त्याचप्रमाणें सायनवाद्यांप्रमाणें आपणाला आरंभस्थान दरवर्षी बदलावयाचें नसून तें स्थिर ठेवावयाचें असल्यामुळें तें स्थिर आहे कीं नाहीं हें पाहाण्याला आणि सायनवाद्यांचा संपातबिंदु आपल्या निरयन आरंभस्थानापासून किती अंतरावर गेला हें वरचेवर मोजून पाहाण्याला आपल्या आरंभस्थानाची निस्संदेह अशी खूण पाहिजे. अर्थातच आरंभस्थानीं क्रान्तिवृत्ताला अगदीं समीप अशी निश्चल तारा घेणें अवश्यक आहे आणि निःशर रेवती योगतारा ही अशी योगतारा असल्यामुळें सिद्धान्तकारांनीं तीच आरंभीं घेतली हें "पौष्णान्ते भगणः स्मृतः. यत्र रेवती तारा स्थापिता तत्र मीनमेषसन्धिः, रेवत्या योगतारा तु सदा मीनाजसंधिगा, मध्यमोऽयं रैवताख्यः सूर्यः स्यादश्विनीमुखात्, क्रान्तिवृत्ते यो मीनान्तः तं रैवतीतारायां निवेश्य" इत्यादि वचनांवरून स्पष्ट आहे. झीटा तारा निःशर नसून तिला १३ कलांचा शर आहे असें सांगण्यांत येतें; परंतु अर्वाचीन शोधावरून काढलेले शर जुन्या ग्रंथांतील शरांशीं ताडून पाहूं लागल्यास बहुतेक कोणतीच तारा जागेवर राहणार नाहीं; चित्रा तारा ही देखील चित्रा तारा नव्हे असें म्हणण्याचा प्रसंग येईल !

# लखनौच्या ठरावांस पाठिंबा द्या

अशक्य वाटणारी गोष्ट घडवून आणल्याबद्दल हिंदुस्थानांत जिकडे तिकडे नेहरू कमिटीचें अभिनंदन होत आहे आणि विलायती पत्रें मात्र गोंधळून जाऊन जळफळाटाच्या भरांत हिंदी लोकांविरुद्ध भलतेंसलतें बरळत आहेत. सायमन कमिशनाची पूर्वतयारी म्हणून येथील नोकरशाहीनें हिंदू–मुसलमानांत, ब्राह्मण–ब्राम्हणेतरांत, सुशिक्षित–अशिक्षितांत, स्पृश्य–अस्पृश्यात, रावा–रंकांत, सधन-निर्धनांत शक्य तितकी फूट पाडण्यासारखे बनाव बनवून ठेवले आणि त्यांना नैसर्गिक परिणाम अंतःस्थ कलहाच्या रूपानें दृग्गोचर होऊं लागतांच कमिशनाचा बार उडवून देण्याची पर्वणी आली असें समजून बर्कनहेड यांनीं सायमन सप्तकाची नेमणूक जाहीर केली. नोकरशाहीची कल्पना अशी कीं, आधींच आपापसांत झुंजत असलेलीं हीं कोंबडीं कमिशनाच्या सहकारितेचे दाणे पुढें टाकतांच अधिक त्वेषानें आपापसांत झगडूं लागतील आणि त्यांत आपला डाव साधेल.पण कोंबडीं झुंजवावयाला देखील खरे दाणे टाकावे लागतात. पण बर्कनहेड पडले सवाई शायलॉक! त्यांनीं मनात विचार केला कीं, हिंदी लोकांत कलह पेटविण्याकरितां तरी त्यांना खऱ्या सहकारितेचा हक्क कशाला द्या! सहकारितेचें कसलेंहि बाहुलें त्यांच्यापुढें उभें केलें तरी भागेल. परंतु येथेंच त्यांचा अंदाज चुकला. त्यांच्या बेमुर्वतखोर भाषणामुळे आणि तकलुपी सहकारितेच्या कमिट्यांच्या योजनेमुळे हिंदी जनतेंतलि यादवी तात्पुरती बंद पडून सर्वांनीं एकदिलानें सायमन कमिशनवर बहिष्कार पुकारला आणि बर्कनहेडच्या आव्हानास उत्तर म्हणून हिंदी स्वराज्यघटनेची योजना तयार करून तिला सर्वपक्षीय परिषदेची संमति मिळविली.

येथवर घडलेला प्रकार यथायोग्यच झाला. 'तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यं' आणि 'प्रायेण स्वमहिमानं क्रोधात्प्रतिपद्यते जन्तुः' या दोनहि म्हणींचा यथार्थ अनुभव आला. समान संकटामुळे हिंदू–मुसलमानांना आपले मतभेद बाजूस सारून तडजोड करण्याची बुद्धि सुचली आणि बर्कनहेडनें धिक्कारपूर्वक केलेलें आव्हान मर्मी झोंबल्यामुळें स्वाभिमान जागृत होऊन स्वराज्य-घटना तयार करण्याचा आत्मप्रत्यय अंगीं आला. अशा मनस्थितीत स्वराज्यघटना तयार होऊन ती लखनौस भरलेल्या सर्वपक्षीय परिषदेपुढें मांडण्यांत आली आणि तेथें ती सर्वानुमतें मंजूरहि झाली. अशा प्रकारें स्वराज्यघटना तयार झाली खरी, पण पुढ काय हा प्रश्न दत्त म्हणून पुढें उभा राहातो. हिंदी लोकांना एकमतानें स्वराज्ययोजना तयार करतां येणारच नाहीं म्हणून तर आम्ही कमिशन नेमलें असली उद्दामपणाची भाषा वापरणाऱ्या बर्कनहेडच्या भाषणांत जर तिळमात्रहि सच्चेपणाचा अंश असेल तर त्यांनीं ही योजना सर्वसंमत झालेली पाहून आतां आपलें सायमन कमिशन परत बोलावून हीच योजना ब्रिटिश पार्लमेंटापुढें मांडावयास पाहिजे. पण बर्कनहेडच्या आव्हानांत इतका सरळपणा व सच्चेपणा असेल अशी कोणीहि अपेक्षा करीत नसल्यामुळें हा वाद अशा रीतीनें शेवटास जाईल असें कोणीहि समजत नाहीं. अर्थातच ब्रिटिश सरकारला हें बिल पास केल्यावांचून सुटका नाहीं इतकी चळवळीची परमावधि केली जाईल तेव्हांच हें बिल पास केलं जाण्याची आशा धरतां येईल. आणि तशी चळवळ होण्याला हिंदी जनतेस स्वराज्य-संपादनाची तितकी कळकळ आणि हीच घटना पास करून घेऊं अशी तळमळ लागून राहिली पाहिजे. ब्रिटिश जनतेला जेव्हां असें दिसून येईल कीं, हिंदुस्थानांतील यच्चयावत् लोकांची दृष्टि याच बिलावर वेधून राहिली आहे त्याच वेळीं ब्रिटिश पार्लमेंटाला, इतर सर्व विचार बाजूस ठेवून, हिंदी लोकांची हीच मागणी पूर्ण करणे भाग पडेल.

या स्वराज्यघटनेच्या पाठीमागें एवढें बळ उभें करण्याला निदान हिंदी जनतेंतलें तरी सर्व मतभेद लोप पावून या योजनेविषयीं एकवाक्यता होणें अवश्यक आहे, आणि तसें पाहूं गेल्यास या बिलांत म्हणण्यासारखा दोषहि दाखवितां येणार नाहीं. कोणतीहि मानवी कृति निर्दोष असूंच शकत नाहीं या न्यायानें शोधींच गेल्यास या योजनेत नांवें ठेवण्याला जागा सांपडणार नाहीं असें नाहीं. पण जगांतील प्रचलित राज्यपद्धतींत तरी अशी कोणची राज्यघटना आहे कीं जिच्यांत कोणासहि दोष दाखवून देतां येणार नाहीं? अर्थातच निर्दोषता किंवा सर्वांगपूर्णता ही परिस्थितीच्या मानानें सापेक्षपणेंच पाहिली पाहिजे.आणि आजची हिंदी राष्ट्राची स्थिति लक्षांत घेतां लखनौस तयार झालेली स्वराज्यघटना जास्तींत जास्त निर्दोष आहे एवढें मान्य करावेंच लागेल. प्रतिपक्षाच्या दृष्टीनें देखील यांत आक्षेप घेण्यासारखा कोणताहि भाग नाहीं, ही या योजनेची सर्वांगसुंदरतेचीच एक कसोटी होय. नेहरूकमिटीची योजना पुढें येतांच तिचे वाभाडे काढण्यास टपून बसलेल्या विलायतेंतील साम्राज्यवादी पक्षाच्या पत्रकारांना या योजनेत दुसरा कोणताच दोष दाखवितां न आल्यामुळें ही लोकशाहीची राज्यपद्धति पाश्चात्यांचेंच अनुकरण आहे, हिच्यांत

पौर्वात्य संस्कृतीचें वैशिष्ट्य लवमात्र नाहीं आणि म्हणूनच ही पद्धति हिंदुस्थानांत व्यवहार्य ठरणार नाहीं, असले मोघम आक्षेप विलायती पत्रांतून बाहेर पडूं लागले आहेत. आमचेंच तुम्ही अनुकरण करीत आहां असें एकानें दुसऱ्यास म्हटल्यास त्यावरून हटकून असें अनुमान काढावें कीं आपल्या कृतीला नांवें ठेवण्याला प्रतिपक्षाला दुसरी कोणतीच जागा राहिलेली नाहीं.

शत्रूकडून देखील ज्यावर टीकेचा भडिमार होऊं शकत नाहीं, त्याविषयीं स्वकीयांत तर मतभेदाला फारसा वावच राहिला नसला पाहिजे हें उघड आहे. आणि म्हणूनच हिंदी जनतेनें या योजनेला मनःपूर्वक पाठिंबा देऊन ती घटना ब्रिटिश पार्लमेंटाच्या गळीं उतरविली पाहिजे असें आम्ही म्हणतों. यावरून आम्हास तिच्यांत व्यंग मुळींच दिसत नाहीं असा अर्थ समजावयाचा नाहीं. पण नुसती विघातक टीका न करतां विधायक सूचना करावयाचें मनांत आणल्यास या योजनेंतील आक्षेपार्ह वाटणारें कोणतेंहि एक कलम बदलून त्याच्या जागीं दुसरें घालूं लागतांच खरी अडचण लक्षांत येते आणि नेहरू कमिटीनें जें केलें आहे तेंच बरें असें म्हणणें प्राप्त होतें. उदाहरणार्थ, डोमीनियन स्टेटस का निर्भेळ स्वातंत्र्य हाच वाद प्रथम घेऊं. संपूर्ण हिंदी जनतेचें पाठबळ मिळवून ब्रिटिश पार्लमेंटापुढें मांडण्यासाठीं जी योजना तयार करावयाची तिचा पल्ला डोमिनियन स्टेटसच्या पुढें जाऊं शकत नाहीं हें कोणाहि विचारी माणसास कबूल करावेंच लागेल. ऑस्ट्रेलिया, कानडा, दक्षिण-आफ्रिका, किंबहुना रक्तपातानें स्वातंत्र्य मिळविणारें आयर्लंड यानेंहि अखेरीस ब्रिटिश साम्राज्याच्या अंतर्गत अशीच घटना स्वीकारिली. दक्षिण-आफ्रिकेंत किंवा आयर्लंडांत निर्भेळ स्वातंत्र्यवादी पक्ष आस्तित्वांत नाहीं असें नाहीं. तरी पण त्यालाहि व्यवहार्यतेच्या दृष्टीनें डोमीनियन स्टेटसच तूर्त तरी मान्य करावें लागलें आहे. साम्राज्यांतून फुटून बाहेर निघण्याचा हक्क वसाहतींना नाहीं असें कोणी मानीत नाहीं. तरी देखील ज्याअर्थीं या वसाहतींपैकीं कोणतीहि वसाहत अद्यापि वेगळी झाली नाहीं, त्याअर्थीं हिंदुस्थानानेंच त्या अक्षुण्ण मार्गांत प्रथम पाऊल टाकलें पाहिजे असा आग्रह कां धरावा? साम्राज्यांत राहाण्यांत तसाच कटु अनुभव आला तर आपोआपच पुढें त्या मार्गांतहि पाऊल टाकण्याची पाळी येईल. किंवा वसाहतीचा दर्जा देखील राजीखुषीनें देण्यास इंग्लंड तयार नाहीं असें जेव्हां दिसेल व डोमीनियन स्टेटस मिळविण्याकरितां देखील झगडावेंच लागणार असें जेव्हां सिद्ध होईल, तेव्हां मात्र एवींतेवीं सामनाच करावयाचा तर मग अर्धवट स्वातंत्र्याकरितां तो कां करा, निर्भेळ स्वातंत्र्याचाच पुरस्कार कां करूं नये, असें म्हणण्याची वेळ येईल. पण ती वेळ येणें न येणें ही गोष्ट ब्रिटिशांच्या धोरणावर अवलंबून राहाणार असल्यानें तें भविष्य नेहरू कमिटीनें आजच आपल्या रिपोर्टांत लिहून ठेवलें पाहिजे होतें असें नाहीं. नेहरू कमिटीनें लिहिलेल्या घटनेच्या पुढचा अलिखित भाग लिहिण्याची वेळ येईल तेव्हां तो लिहिण्याला कोणीहि माघार घेणार नाहीं.

तसेंच शोधूं गेल्यास दुसरा आक्षेप मुसलमानांना देऊं केलेल्या जादा सवलतीसंबंधीं घेतां येईल. पण येथेंहि शक्यतेची व व्यवहार्यतेचीच कसोटी लाविली पाहिजे. दिलेल्या सवलतींहून कमी सवलती देऊन मुसलमानांची संमति मिळवितां येईल असें जो सिद्ध करून दाखवाल, त्यालाच हा आक्षेप घेण्याचा अधिकार पोंचूं शकेल. अलीकडे अशी एक वहिवाटच पडून गेली आहे कीं, ज्यानें उठावें त्यानें जुन्या लखनौच्या कराराला नांवें ठेवीत सुटावें! पण त्या वेळीं लखनौस जमलेल्या साडेचार हजार प्रतिनिधींतून असा एकहि प्रतिनिधि त्या वेळीं पुढें आला नाहीं कीं, जो मुसलमानांना सवता सुभा न देतां व प्रतिनिधींचें प्रमाण त्यांना सढळ हातानें न देतां त्यांची समजूत घालूं शकला असता! जसा परवां लखनौस दोन दिवस काथ्याकूट झाला तसाच पूर्वींहि लखनौस शक्य तितका काथ्याकूट झाला. पण इतर कोणतीहि तडजोड त्या वेळीं मुसलमानांना पटेना. अर्थातच स्वराज्याची मागणी एकमुखी व परिणामकारक करण्यासाठीं त्या वेळीं लखनौचा पॅक्ट करणेंच प्राप्त होतें. तीच स्थिति नेहरू कमिटीची आज झाली आहे. त्या वेळीं मुसलमानांना मतदारसंघ तोडून देण्यांत आले, आतां मुसलमानांना बंगाल, पंजाब, वायव्य सरहद्द, बलुचिस्थान व सिंध असे प्रांत एक प्रकारें तोडून देण्यात येत आहेत. जसा धोका लखनौच्या पहिल्या करारांत होता तसाच धोका या नव्या करारांतहि आहे. पण जोंपर्यंत दुसरी कोणतीहि सर्वसंमत होणारी तडजोड सुचविली जात नाहीं, अथवा वेगळ्या योजनेला मुसलमानांची संमति मिळविण्याची हमी घेतली जात नाहीं, तोंपर्यंत झालेल्या कराराला नुसतीं नाकें मुरडून काय उपयोग? अजून देखील हा कायदा कांहीं पास झालेला नाहीं; तेव्हां जर कोणास याच्यापेक्षां जास्त निःपक्षपाताची व समतेची योजना सुचत असेल तर त्यानें अजूनहि ती सुचवावी व तिला मुसलमानांची मान्यता मिळवावी म्हणजे नेहरू कमिटी आपल्या बिलांत तशी दुरुस्ती करील.

मुसलमानांना सिंध सुद्धां पांच प्रांत देण्याच्या योजनेवर जसा आक्षेप घेण्यांत येतो तसाच आक्षेप वयांत आलेल्या प्रत्येक स्त्रीपुरुषास मताचा हक्क देण्याच्या सूचनेवरहि घेण्यांत येतो. केवळ वयाची

मर्यादा भरणें याहून कांहीं तरी अधिक कसोटी मतदाराला असावी हें श्रेयस्कर नाहीं असें कोण म्हणेल? परंतु शिक्षणाची, संपन्नतेची किंवा सार्वजनिक कामाच्या अनुभवाची कोणती तरी अट मतदार होण्याला ठेवावी असें म्हणतांच मागसलेल्या वर्गास दडपून टाकण्याची पुढारलेल्या वर्गाची हांव अद्यापि कमी झाली नाहीं व सगळी सत्ता आपल्याच हातांत रोखून ठेवण्याकरितां असले निर्बंध घालण्यांत येत आहेत अशी हाकाटी सुरू होऊन अस्पृश्य वर्ग, ब्राम्हणेतर वर्ग आणि मागसलेले मुसलमान या सर्व वर्गांत चलबिचल होऊन त्यांच्याकडून तशा योजनेवर टीका सुरू होईल आणि आजच्यासारखी ती योजना एकमतानें मान्यहि होणार नाहीं; आणि बर्कनहेडसारख्या निमित्ताला टेकलेल्या साम्राज्यवाद्यांना आमची योजना फेटाळून टाकण्याला तेवढा सबब आयतीच उपयोगी पडेल. अर्थातच सर्व मागसलेल्या वर्गांची समजूत करण्याकरितां आणि स्वतंत्र मतदारसंघाचा हट्ट मुसलमानांना सोडावयास लावण्याकरितां वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांना मताचा हक्क देणें नेहरू कमिटीला भाग पडलें. ग्रामपंचायतीपासून तों लेजिस्लेटिव्ह असेंब्लीपर्यंत ज्या निवडणुकी हल्लीं होतात त्यांतच आजच्या मतदारसंघांत किती गोंधळ उडतो हें ज्यानें पाहिलें आहे त्याला ही सार्वत्रिक मतदानाची कल्पना ऐकूनच धडकी भरेल. पण हें ध्येय केव्हां ना केव्हां तरी गाठावयाचेंच असल्यानें आधीं शिक्षणाची वाढ आणि मग मतदानाच्या हक्काची वाढ असा नैसर्गिक क्रम न ठेवता आधीं मताचा हक्क आणि मग ठेंच लागून येणारें शहाणपण असा उलटा क्रम ठेवला गेला तरी शेवटीं पर्यवसान एकच व्हावयाचें, असें म्हणून सर्व पक्षांच्या समाधानार्थ ही योजना मान्य करणें प्राप्त आहे.

लखनौला मंजूर झालेल्या या स्वराज्यघटनेनें ज्यांचें समाधान होऊं शकत नसेल त्यांना एकच निर्वाणीचा प्रश्न विचारावासा वाटतो. तो प्रश्न हाच कीं, ही योजना अमान्य करून तुम्ही पुढें काय करणार? स्वतः दुसरी अधिक सरस योजना तयार करून तिला हल्लींच्याहून अधिक लोकांची मान्यता मिळविणार आहां काय? तसें करणें शक्य असतें तर तशी योजना पूर्वीच पुढें आली असती. पण ती गोष्ट अशक्य आहे. नेहरू कमिटीच्या योजनेहून अन्य कोणत्याहि योजनेला याच्या शतांशाइतकेंहि पाठबळ मिळावयाचें नाहीं; म्हणून तो मार्ग खुंटला असेंच तुमच्या नजरेस येईल. मग राहिला दुसरा एकच मार्ग, तो म्हणजे सायमनसाहेबांना शरण जाऊन, त्यांच्या पायावर लोटांगण घालून त्यांच्या मार्फत याचना करावयाची! आणि समजा, तुमच्यावर सायमनसाहेब सुप्रसन्न होऊन वर देण्याला सिद्ध झाले, तरी ते काय देऊं शकणार आहेत? ते काय निर्भेळ स्वातंत्र्य देणार आहेत! का डोमिनियन स्टेटस देणार आहेत का निदान प्रांतिक स्वायत्तता तरी देणार आहेत? यांतून एकहि गोष्ट मिळणार नाहीं हें या असंतुष्टांनीं पक्कें समजून राहावें.

नेहरू कमिटीच्या योजनेचें खरें महत्त्व मनावर पक्कें ठसण्यास सायमन सप्तकाच्या योजनेचें चित्र कल्पनेनें मनापुढें ठेवून त्याच्याशीं या स्वराज्य-घटनेची तुलना करावी, आणि मनाला 'हें चित्र पाहा आणि हें चित्र पाहा' असा इषारा द्यावा, म्हणजे नेहरू कमिटीच्या शिफारसींचें मर्म चांगलें लक्षांत येईल. सायमन सप्तकाकडून निर्भेळ स्वातंत्र्य अथवा डोमीनिअन स्टेटस मिळणें तर दूरच राहिलें. नुसत्या मध्यवर्ती सरकारांतहि हल्लींच्याहून अधिक सत्ता मिळावयाची नाहीं. प्रांतिक सरकारांतल्या राखीव खात्यांपैकीं कांहीं खातीं सोंपीव करण्यांत येऊन त्यालाच 'प्रांतिक स्वायत्तता' असें नांव देण्यांत येईल; पण तेवढ्या अधिकारालाहि पायबंद घालण्याकरितां प्रांतिक कायदे-मंडळांत कौन्सिल ऑफ स्टेटप्रमाणें दुसरें एक बड्या लोकांचें मंडळ निर्माण करण्यांत येईल आणि शांतता व सुव्यवस्था राखण्याचें काम प्रांतिक सरकाराच्या हातून नीट पार पडणार नाहीं अशी सबब सांगून पोलीस खात्याचा अधिकार मध्यवर्ती सरकाराकडे ठेवण्यांत येईल. शिवाय प्रांतिक कारभार सुरळीत चालण्यासाठीं रेव्हिन्यू, पोलीस, न्याय, शिक्षण, आरोग्य इत्यादि खात्यांतून अमुक इतक्या प्रमाणापर्यंत ब्रिटिश अधिकारी ठेवले पाहिजेत आणि युरोपियन व्यापाऱ्यांवर जादा कर लादूं नये किंवा त्यांना आपला उद्योगधंदा चालविण्याला प्रतिबंध होईल असा कोणताहि कायदा पास करूं नये असेहि निर्बंध घालण्यांत येतील. आणि ज्या वेळीं मध्यवर्ती सरकारच्या हातांतला अधिकार हिंदी लोकांकडे देण्याची वेळ येईल त्या वेळीं देखील सैन्य, आरमार, व नाविकदळ आणि हिंदुस्थानांतील संस्थानिक व परदेशांतील राजे यांच्याशीं पत्रव्यवहार ठेवणारें परराष्ट्र खातें एवढ्यांवरील अखेरची सत्ता ब्रिटिश सरकारच्या वतीनें भारतमंत्र्याच्या हातीं राखून ठेवून आणि प्रांतिक कारभारांतल्याप्रमाणें युरोपिअन व्यापारी व इंपीरिअल सर्व्हिसेस यांच्या हक्कावर गदा न येईल असे निर्बंध लादून बाकीचें सगळें स्वराज्य तुमच्या हातीं देण्यात येईल!

नेहरू कमिटीची योजना ज्यांना नापसंत वाटत असेल आणि सायमन सप्तकाशीं सहकार्य करण्यास जे उत्सुक झाले असतील त्यांना आमचा असा उघड सवाल आहे कीं, तुम्हाला असलेंच भातुकलीचें स्वराज्य हवें का खरेंखुरें अस्सल

स्वराज्य हवें ? नेहरू कमिटीच्या योजनेला विरोध केल्यानें आणि सायमन कमिशनाशीं सहकार्य केल्यानें खरें स्वराज्य मिळविण्याची संधि हातची जाऊन लुटुपुटीचें स्वराज्याचें खेळणें हातीं पडून तेवढ्यांत समाधान मानावें लागेल. वास्तव प्रांतिक कायदेमंडळांनीं निवडलेल्या ज्या कमिट्या आहेत त्यांना देखील लखनौची स्वराज्यघटना हीच आमची किमान मागणी असें म्हणणें प्राप्त आहे व तसें त्यांनीं म्हटलें तरच त्यांत त्यांची शोभा आहे. मुसलमानांत देखील आतां एक असंतुष्टांचा वर्ग निर्माण झाला आहे आणि त्या वर्गाचे म्होरके असें सांगत सुटले आहेत कीं, मुस्लिम लीगची नेहरू कमिटीच्या सूचनांना संमति नाहीं ! या बेदिल पक्षाला अध्यक्ष डॉ. अनसारी यांनीं सडेतोड उत्तर दिलेंच आहे. पण त्याखेरीज कोणीहि त्यांस असें विचारील कीं, नेहरू कमिटीनें तुमच्याकरितां हिंदूंना नाखुष करून इतक्या जादा सवलती दिल्या असून देखील जर तुमचें समाधान होत नसेल तर नोकरशाही तुम्हाला याहून अधिक काय देऊं शकेल ? हिंदुस्थानाचें सगळें राज्य मुसलमानांच्या स्वाधीन करून आम्ही आपलें चंबूगवाळें आटोपतों असें तर सायमनसाहेब तुम्हाला लिहून देणार नाहींत ना ? मग तुमच्या या बेदिलीनें तुम्ही काय साधणार आहां? नेहरू कमिटीच्या शिफारसींना सर्व पक्षांची संमति मिळाल्यानें त्यांना जो भारदस्तपणा येणार आहे व त्या नाकारण्यांत सरकारला जो धोका वाटणार आहे तेवढा मात्र तुमच्या बेदिलीनें नाहींसा होईल. आणि तुम्हाला तर अधिक कांहीं मिळणारच नाहीं. अशा प्रकारें आपलें नाक कापून सर्वांस अपशकुन करावयाचा नसल्यास तुम्ही या घटनेला मनःपूर्वक पाठिंबा दिला पाहिजे.

सारांश, लखनौच्या सर्व-पक्षीय परिषदेंत जी योजना ठरली, तिच्यांत तपशिलाच्या बाबतींत कांहींहि मतभेद असले तरी ते मतभेदच उगाळीत न बसतां जुळतें किती त्याच्यावर दृष्टि ठेवून सर्वांनीं या योजनेस पाठिंबा दिला पाहिजे. ही योजना सर्वोत्कृष्ट किंवा सर्वदोषविवर्जित आहे असें कोणी मानीत नाहीं. पण आजच्या हिंदी राष्ट्राच्या परिस्थितींत सर्वांना मान्य होण्यासारखी जितकी निर्दोष रचना करतां येईल तितकी ही झालेली आहे. क्रिकेटच्या सर्वपरिचित भाषेंत बोलावयाचें झाल्यास ही योजना म्हणजे सीमातीत टोला ( ओव्हर बाउंडरी हिट ) नव्हे हें खरें असले तरी तो सीमान्तगामी टोला ( बाउंडरी हिट ) आहे यांत संशय नाहीं. आणि ज्याला सीमातीत टोला मारावयाचा असेल त्याचा मार्ग कांहीं या योजनेनें अडविलेला नाहीं. एवढ्यांत काय तें समजून सर्व पक्षांनीं येत्या राष्ट्रीय सभेंत एकत्रित होऊन या योजनेचा पुरस्कार करावा. तसा एकजुटीनें पुरस्कार झाला तरच ही योजना सद्यःफलदायी होईल.

# ज्यो. शिवराम व शिवाजीची कुंडली

ब्यावर येथील ज्योतिषी मिठालाल व्यास यांचे घराण्यांतील बाडांत शिवाजीचा समकालीन ज्योतिषी शिवराम याच्या हातच्या कुंडल्यांचा संग्रह आहे. त्या संग्रहातून प. रघुनाथशास्त्री पटवर्धन यांना शिवाजीच्या खऱ्या जन्मतिथीची कुंडली मिळाली. आतां या कुंडलीसंबंधीं ही कुंडली शिवराम ज्योतिष्याच्या हातचीच कशावरून असा एक मुद्दा बडोद्याचे श्री. वाकसकर यांनीं शिवजन्मतिथीच्या वादांत उपस्थित केला आहे. त्यांच्या माहितीकरितां **रा. ब. गौरीशंकर ओझा** यांच्या **'राजपुतानेका इतिहास'** या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांतील पृ. २७ वरील उतारा पुढें देत आहों. त्यावरून वाचकांची खात्री होईल. तो उतारा असा—

"जन्मपत्रियोंका दुसरा बडा संग्रह ( जो जोधपूरके प्रसिद्ध ज्योतिषी चंडूके घराने कथा ) हमारे मित्र ब्यावरनिवासी मिठालाल व्यासके द्वारा हमे मिला है। इसमे विक्रम संवत् १७३२ और १७३७ के बीच **चंडूके वंशधर शिवराम** पुरोहितने अनुमान ५०० जन्मपत्रियोंका क्रमबद्धसंग्रह किया था और ४० जन्मपत्रिया पीछेसे समय समय पर बढाई गई। इसमे विक्रम संवत् १४७२ से लगाकर वि. सं. १७३७ तकका पुराना संग्रह है, जिसमे दिल्लीके बादशाहो शहाजादो, और अमीरो, तथा राजा एवं राजवंशियोमे सीसोदियो ( शिवाजीसहित ) राठोडो, कछवाहो, देवडो, भाटियों, गोडों, हाडों, गुजरों, जामों, चौहानो, बुंदेलों, आसायचों, पंवारों, खीचियो की, और मुहणोतों, सिंधियों, भंडारियों, पंचोलिया, ब्राह्मणो, राणियोंका तथा कुंवरियों की जन्मपत्रिया है। जन्मपत्रियों इतना बडा कोई दूसरा संग्रह हमारे देखने मे नही आया।"

वरील उताऱ्यांत ज्यो. शिवराम याच्या कुंडलीसंग्रहाचा काल वि. सं. १७३२ ते १७३७ म्हणजे इ.स.१६७६–१६८१ हा असून या जुन्या संग्रहांत सीसोदिया घराण्याच्या कुंडलीसंग्रहाबरोबर शिवाजीची कुंडली आहे. वरील उताऱ्यांत 'सीसोदिया' यांच्यापुढें कंसांत 'शिवाजीसहित' असे शब्द आहेत ते

ओझा यांच्या पुस्तकांतलेच आहेत, आमचे नाहींत.

रा. ब. ओझा यांच्या पुस्तकांतला जो उतारा वर दिला आहे, त्याच्या खालीं ओझा यांनींच टीप दिली आहे ती अशी—"ये जन्मपत्रिया एक बडे गुटकेके मध्यमे है जिसके पहिले और पीछे पुरोहित शिवरामके हाथकी लिखी हुई ज्योतिष-संबधीं कई पुस्तकें तथा फुटकर बातें है। कई पुस्तकोंके अन्तमे उनके लिखे जानेके संवतभी दिया है, जो वि. सं. १७३२ से १७३७ तकके है, और कई जगह उनके लेखक शिवरामका नाम-भी दिया है।"

# १९२८ सालाचा पावसाळा

## ( ले. ज. स. करंदीकर )

या वर्षातील सप्टेंबरअखेरचें पावसाचें अनुमान ता. १० एप्रिलचे अंकांत दिलें होतें. त्यानंतरचें तीन महिन्यांचें भविष्य जूनअखेर द्यावयाचें; परंतु इतर अनेक व्यवसायांमुळें तें लवकर देतां आलें नाहीं. तें आतां देण्यांत येत आहे. तत्पूर्वी एप्रिल ते सप्टेंबरपर्यंतचा अंदाज कितपत जुळला तो पाहूं. एप्रिल महिन्यांत ता. ५,१०,१४ व ३० या तारखा दिल्या होत्या. त्यांत ५,१४ व ३० या तारखांस पाऊस झाला. ता. १० चा पाऊस दोन दिवस आधीं झाला. याखेरीज ता. २५ व २६ ला कर्नाटकांत पाऊस झाला. तो माझ्या अनुमानांत दिलेला नव्हता.

मे महिन्यांत ४, १३ व २१ या तीनच तारखा दिल्या होत्या. हा पाऊस महाराष्ट्रांत पडला नाहीं. पण धारवाड, बेळगांव वगैरे भागात हा पाऊस ता. ५, ११ व २२ या तारखांस होऊन आगाऊ दिलेल्या तारखांत एकदोन दिवसांचा फरक पडला. पण एवढ्या अल्प फरकानें तरी तीनहि वेळां पाऊस पडला.

जून महिन्यापासून पावसाळाच सुरू झाल्यानें बहुतेक दररोज कोठेंना कोठे पाऊस पडतच होता. पण विशेष पावसाच्या म्हणून ज्या तारखा दिल्या होत्या त्यांपैकीं १८ व १९ या तारखांस पाऊस अंदाजापेक्षां कमी पडला आणि ता. २३ ही तारीख दिली नव्हती, पण त्या दिवशीं पाऊस पडला. बाकीच्या तारखा बरोबर जुळल्या. जुलै आणि आगस्ट महिन्यांचे तारीखवार पावसाचे आंकडे अद्यापि गॅझेटांत प्रसिद्ध झाले नाहींत. ते प्रसिद्ध झाल्यावर त्यांचा विचार करण्यांत येईल.

आतां सप्टेंबरपासूनच पुढल्या अंदाजाचा विचार करूं. सप्टेंबर महिन्यांतील ज्या तारखा पूर्वीच दिल्या आहेत त्यांपैकीं ता. ३ व ६ रोजीं पाऊस पडला नाहीं; तरी १०, १२, २०, २१, २४, २९ व ३० या तारखांस पाऊस होईल असा अंदाज आहे. मात्र तो जोराचा होणार नाहीं. खंडवृष्टि होईल.

आक्टोबर ता. २४ ला रविबुधाची छोटी युति आहे.त्या वेळीं व तत्पूर्वींहि पाऊस पडण्याचा संभव आहे. या महिन्यांतल्या तारखा ६-७, ११-१२, १५-१६ आणि २४-२५ एवढ्यांत पाऊस होईल. नोव्हेंबर महिन्यांत पावसाचे योग अगदीं कमी आहेत. तथापि नोव्हेंबर ३, १४, १८, १९, २६ या तारखांस पाऊस पडेल.

डिसेंबर महिन्यांत ९, १८, २१, २३, २८ या तारखांस पाऊस पडण्याचा संभव अधिक आहे. नाताळचे सुटींत महाराष्ट्रांत प्रत्यक्ष पाऊस न पडला तरी मद्रासच्या किनाऱ्यावर व कर्नाटकांत पाऊस पडेल आणि महाराष्ट्रांत निदान थंडीचा गारठा व दंव पडून पावसाचें काम भागेल.

सारांश, येत्या सप्टेंबरांत व नोव्हेंबरच्या उत्तरार्धांत पाऊस नेहमींपेक्षां कमी पडेल. आक्टोबरचा उत्तरार्ध व नोव्हेंबरचा पूर्वार्ध यांत साधारण पाऊस पडेल आणि डिसेंबरांत नाताळचे सुमारास पाऊस पडेल. एकंदरींत पावसाचें मान दरसालपेक्षां कमी आहे असें समजून चालावें.

---

# पोटांत एक ओंठांत एक !

गेल्या आठवड्यांतला असेंब्लींतील सरकारी कामाचा बहुतेक सगळा वेळ बोल्शेव्हिक बिलानें खाल्ला. असेंब्लीच्या सभासदांना वादविवादापूर्वी तीन दिवस आधीं बिलाची प्रत मिळाली नाहीं म्हणून पंडित मोतिलाल यांनीं तक्रार केल्यावरून अध्यक्ष ना. पटेल यांनीं पहिल्या दिवशींचें वाचन तहकूब ठेवलें. पण तेवढ्यानें काहीं सरकारच्या दुराग्रहांत फरक पडणें शक्य नसल्यानें हें बिल गेल्याचे मागील सोमवारीं पुनः असेंब्लीपुढें आलें आणि सोमवार, बुधवार, शुक्रवार व शनिवार अशी चार दिवस चर्चा होऊन तें बिल ६२ विरुद्ध ५९ मतांनीं सिलेक्ट कमिटीकडे सोंपविलें गेलें.

या बिलाची अवश्यकता काय आणि तें इतक्या तांतडीनें पास करून घेण्याची धडपड तरी कां, याचा सरकार पक्षाच्या सभासदांच्या भाषणावरून देखील नीटसा खुलासा होत नाहीं. हिंदुस्थानाबाहेरचा एखादा इसम येथें येऊन बोल्शेव्हिक मतांचा प्रसार करूं लागला आणि येथील सामाजिक व धार्मिक समजुतींच्या विरुद्ध भलभलतीं मतें पसरवूं लागला किंवा हिंदुस्थानांतील राज्ययंत्र मोडून टाकण्याची खटपट करूं लागला तर त्याला गव्हर्नर जनरल यांच्या हुकुमावरून हद्दपार करण्यांत यावें असा या बिलाचा मथितार्थ आहे. हें बिल हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलखांतील किंवा संस्थानांतील प्रजाजनांना लागू नाहीं. पण इंग्लंडांतून इकडे येणाऱ्या इंग्लिशमनलाहि हें लागू आहे. मग रशियासारख्या परदेशाच्या नागरिकांस तें लागू आहे हें सांगावयास नकोच. बिलाचा सगळा रोख कम्युनिस्टांविरुद्ध आहे असें सांगण्यांत येतें. पण बिलांतील भाषा अधिक व्यापक आहे. हिंदुस्थानांतील राज्यपद्धति उलथून टाकणारास जसें तें लागू होईल तसेंच तें सामाजिक किंवा धार्मिक रूढीचा उच्छेद करणाऱ्यांनाहि लागू होईल. पण तें कोणास लागू करावयाचें व कोणास न करावयाचें हें ठरविण्याची सर्व सत्ता नोकरशाहीकडे राहणार असल्यानें नोकरशाहीला अनिष्ट वाटणारा मतप्रसार कोणी परकी माणूस करूं लागल्यास त्याच्याविरुद्ध हें हत्यार चालविलें जाईल. कोणता मतप्रसार इष्ट व कोणता आनिष्ट हें ठरविण्याचा सगळा मक्ता नोकरशाहीच्या हातांत राहणार आणि ज्याच्यावर हद्दपारीचा हुकूम बजाविला जाईल त्याला दाद मागण्याला कोर्टाची सवडहि ठेवली नाहीं.एवढेंच नव्हे तर हद्दपारीचीं कारणेंहि सरकारनें सांगितलींच पाहिजेत असेंहि त्याजवर बंधन नाहीं!

अशा रीतीनें रौलेट ॲक्टाची ही छोटी आवृत्ति काढण्याची सरकारला जरूरी कां वाटूं लागली? अनिष्ट इसमाला प्रतिबंधांत ठेवण्याला १८१८ चा तिसरा रेग्युलेशन सरकारच्या हातीं आहेच आणि तो रेग्युलेशन युरोपियनांनाहि लागू करतां येतो असें कायदे पंडितांचें मत आहे.असें असतां सर्व प्रचलित कायदे अपुरे मानून सरकार ही नवी भरती कां करीत आहे? १८१८ च्या ३ ऱ्या रेग्युलेशनप्रमाणें अनिष्ट इसमांना बंदींत ठेवल्यास हिंदुस्थानांतील तुरुंग कम्युनिस्टांनीं भरून जातील आणि परकी देशांतील बेकारांना हिंदुस्थानांत येण्याला तें एक आमिषच होईल असें सर भूपेन्द्रनाथ मित्र बोलले. जणूं काय हिंदुस्थानांत बेकारी नसून येथें समृद्धि नांदत आहे आणि परदेशांतील बेकारांना हिंदुस्थानांतील तुरुंगांत येऊन राहाण्याखेरीज पोट भरण्याचा दुसरा मार्गच सुचत नाहीं किंवा आवडत नाहीं ! हिंदुस्थानांतल्याच बेकारीचा ज्यांना बंदोबस्त करतां येत नाहीं .आणि ज्यांच्या तुरुंगांतील हालअपेष्टांचें वर्णन वाचून कोणाच्याहि अंगारावर शहारेच येतात अशा नोकरशाहीनें असली फुकटची फाजील फुशारकी मिरवावी हें अत्यंत हास्यास्पद आहे.

बोल्शेव्हिकांच्या विरुद्ध एवढी जय्यत मोहीम सुरू करण्याचें खरें कारण सरकारी अधिकारी लपवून ठेवीत असून भलतींच कारणें पुढें करीत आहेत हें त्यांच्याच भाषणावरून व्यक्त होतें. सरकारच्या पोटांत जें खरें डांचत आहे तें अधिकाऱ्यांच्या ओंठांतून बाहेर येत नाहीं. आणि जीं कारणें कोणालाहि खरीं अगर विश्वसनीय वाटणार नाहींत असलीं कारणें सरकारी अधिकारी पुढें करीत आहेत. बोल्शेव्हिकांचीं मतें हिंदुस्थानांतील हिंदी संस्कृतीला व धर्माला घातक आहेत म्हणून त्यांचा प्रसार आम्ही येथें होऊं देणार नाहीं असें कारण सरकार सांगत आहे. पण याच्यावर कोणाचा विश्वास बसेल? सरकारला हिंदी लोकांच्या देवाची, धर्माची, सामाजिक चालीरीतींची इतकी कळकळ कधींपासून वाटूं लागली? मुसलमान लोक सरकारच्या मर्जीतले आणि शिवाय ते धर्मवेडे म्हणून सरकार सहसा त्यांच्या वाटेस जात नाहीं हें निराळें. पण तेवढ्यावरून त्यांना मुसलमानां धर्माविषयीं किंवा त्यांच्या समाजव्यवस्थेविषयीं इतका आदर वाटतो अशी कबुली सरकारचे मिंधे मुसलमान देखील कदापि देणार नाहींत.

तें असो. परंतु हिंदू लोकांविषयीं बोलावयाचें झाल्यास आम्ही सरकारास असा आव्हानपूर्वक

सवाल करतों कीं, तुम्हास हिंदूंच्या संस्कृतीची, देवाधर्माची आणि सामाजिक चालीरीतींची इतकी काळजी कधींपासून वाटूं लागली? कंपनी-सरकारचें राज्य येथें स्थापन होण्यापूर्वीपासून ख्रिस्ती मिशनरी या देशांत येत आहेत व हिंदू लोकांच्या देवाधर्माची टवाळी करणें याचें तर त्यांना बाळकडूच पाजलेलें असतें. पण कंपनीसरकारनें आपल्या रियासतींत त्यांना आळा घातला नाहीं. आणि तुमच्या धर्मांत आम्ही कधींहि हात घालणार नाहीं असें राणींच्या जाहिरनाम्यांत जाहीर आश्वासन दिल्यानंतरहि हिंदुस्थानसरकारनें मिशनऱ्यांचे हे चाळे बंद पाडले नाहींत. आपल्या उपदेशाचा विशेष कांहीं उपयोग होत नाहीं म्हणून अलीकडे ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं पूर्वींचीं हिंदु देवतांच्या निंदेनें भरलेलीं व्याख्यानें देण्याची पद्धति आपणच कांहीशी बंद केली आहे; तरी देखील मुंबईच्या बॅकबेवर उभे राहून हिंदूंच्या देवाधर्माची अवाच्य निंदा करणारे मिशनरी अजून देखील आढळतात; आणि हिंदु श्रोत्यांनीं त्याविरुद्ध तक्रार केल्यास पोलिसांचा ससेमिरा उलट हिंदूंच्याच पाठीमागें लागतो, हें मुंबईकरांस तरी सांगावयास नकोच. ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आपल्या चोपड्यांतून हिंदु धर्माची कितीहि टवाळी केली तरी सरकारनें मिशनऱ्यांचें पुस्तक जप्त केल्याचें उदाहरण आजपर्यंत ऐकिवांत नाहीं. मिस मेयोच्या पुस्तकाला देखील सरकारनें बंदी केली नाहीं; पंढरपुरासारख्या पवित्र क्षेत्रांत भरयात्रेंत उभे राहून मिशनऱ्यांनीं हिंदुधर्माची निंदा केली तरी सरकार त्यांचा बंदोबस्त करीत नाहीं; आणि आज आता बोल्शेव्हिक बिलाला संमति मिळविण्यासाठीं केररसाहेब हिंदूंच्या धर्मभावनांची कड घेऊन नकाश्रू ढाळूं लागले आहेत, तेव्हां त्यावर लोकांचा विश्वास कसा बसावा?

सरकारच्या या ढोंगी बतावणीस असेम्ब्लींतील कित्येक हिंदु सभासदांनीं खरपूस उत्तर दिलें. बॅ. जयकर यांनीं सरकारास उघड विचारलें कीं, "हिंदुधर्माचा उच्छेद करणारे असे अनेक कायदे आजपर्यंत तुम्ही स्वतः केलेत तेव्हां तुमची हिंदुधर्माची कळकळ कोठें लुप्त झाली होती? हिंदु कुटुंबांतील कोणीहि वारस परधर्मांत गेल्यास त्याला इस्टेटीचा वारसा मिळूं नये हा धार्मिक दृष्ट्या न्याय होय. असें असतां ख्रिस्ती मिशनऱ्यांचा हिंदुधर्मावरील हल्ला बिनतोड व्हावा म्हणून तुम्हींच कायदा केलात कीं, धर्मांतर केलें तरी वारसाचा हक्क नष्ट होत नाहीं! हीच का हिंदुधर्माविषयींची तुमची काळजी? धार्मिक गोष्टींत सरकार हात घालणार नाहीं असें एकीकडे जाहीर आश्वासन देत असतां दुसरीकडे हिंदुधर्माच्या विवाहावर्धीत, दत्तविधानाच्या कायद्यांत, वारसांच्या हक्कांत तुम्ही बेगुमानपणें ढवळाढवळ चालविली आहे. आणि आतां बोल्शेव्हिकांचें बिल पास करण्याला संमति मिळावी म्हणून हिंदुधर्माविषयींच्या नाटकी प्रेमाचें तुम्ही प्रदर्शन करीत आहां! असल्या तुमच्या शब्दावर कोणीं विश्वास ठेवावा?" हिंदुधर्मानें प्रत्येक मुलाला वडिलार्जित जमिनीचा हिस्सा मिळण्याचा हक्क दिला असतां तोहि हिरावून घेऊन त्यांना बेकार मजूर करणारें बिल तुमच्याच संमतीनें मुंबईच्या कौन्सिलांत पुढें आलें होतें. बोल्शेव्हिक सरकार देखील अशा रीतीनें शेतकऱ्यांची जमीन त्यांजकडून काढून घेणार नाहीं असें असतां आमच्यापुढें बोल्शेव्हिकांचाच भेसूर बागुलबोवा उभा करून आमची संमति या बिलास मिळवूं पाहातां, तेव्हां तुम्हास काय म्हणावें?

बोल्शेव्हिक लोक भांडवलवाल्यांची संपत्ति हिरावून घेत असतील, पण तिची ते मजुरवर्गांत समाईक वांटणी करून देऊन मजुरांविषयींची आस्था तरी व्यक्त करतात; पण तुम्ही आपल्या अमदानींत धड भांडवलवाल्यांनाहि उत्तेजन देऊन त्यांच्या कारखान्यांची भरभराट साधली नाहीं; किंवा मजुरांनाहि पोटभर अन्न मिळालेंच पाहिजे अशाविषयींहि कधीं कायदे केले नाहींत! मजुरांनीं आपल्याला पोटभर पगार मिळावा म्हणून संप केला तर तुम्ही कारखानदारांची बाजू उचलून धरून, मजुरांकडून दंगा झाल्याचें निमित्त सांगून, त्यांच्यावर गोळीबार मात्र करतां! बरें, कारखानदारांची तरी तुम्हाला काळजी वाटते म्हणावें तर येथील कारखानदारांच्या तक्रारीला न जुमानतां हुंडणावळीचा दर अठरा पेन्स करून कारखानदारांनाहि तुम्ही धुळीस मिळवीत आहां. मग तुम्हाला काळजी आहे तरी कशाची? आजवर हिंदुधर्माच्या, हिंदु संस्कृतीच्या, हिंदू चालीरीतींच्या, वारसा हक्काच्या, भांडवलवाल्यांच्या हिताच्या किंवा मजुरवर्गाच्या पोटापाण्याच्या कशाच्याहि रक्षणासाठीं किंवा सोयीसाठीं तुम्ही काळजी वाहिलेली दिसत नसून तुम्ही जर कांहीं केलें असेल तर या सर्वांवर घाला घालण्याचेंच शतकृत्य आजपर्यंत केलें आहे! तेव्हां आज तुमच्या तोंडून हिंदी लोकांच्या धर्माविषयीं व समाजव्यवस्थेविषयीं जी आदरबुद्धि व्यक्त होत आहे तो केवळ कपटाचा देखावा असावा असा संशय आम्हास कां येऊ नये? अशा या आव्हानास सरकाराजवळ कांहीं तरी उत्तर आहे काय?

बोल्शेव्हिकांच्या उच्चाटनाची सरकारला आतांच जी घाई सुटली आहे तिचें खरें कारण सरकारनें बोलून दाखविलें नाहीं तरी तर्कानें सहज जाणतां येण्यासारखें आहे. एम्. एन. रॉयच्या ज्या पत्राच्या फुसक्या आधारावर सरकारनें बोल्शेव्हिक बिलाचा डोलारा रचला आहे तें पत्र रॉयचेंच आहे की नाहीं हा प्रश्न

संशयितच आहे. पण तें पत्र खरें मानलें तरी तें लिहिलें गेलें गेल्या डिसेंबरांत, रवाना झालें गेल्या फेब्रुवारींत, हिंदुस्थानांत दाखल होऊन सरकारच्या हातीं पडलें मे महिन्यांत, आणि आतां चार महिन्यांनीं तें पत्र बाहेर येत असून या बिलाच्या बाबतीत मात्र सरकारला चार दिवसांचा विलंबहि असह्य वाटूं लागला आहे! यांतलें खरें इंगित हेंच कीं, गेल्या जूनपर्यंत, बोल्शव्हिकांचा प्रभाव चीन देशांत इतका यशस्वी होईल अशी सरकारला कल्पनाच नव्हती. पण बोल्शेव्हिकांनीं पुरविलेल्या शस्त्रसामुग्रीच्या व लष्करी अधिकाऱ्यांच्या साहाय्यानें चिनी लोकांनीं आपलें स्वातंत्र्य प्रस्थापित केलें आणि परकीय भांडवलवाल्यांना शह देण्यास प्रारंभ केला. बोल्शेव्हिकांच्या कारस्थानांना चीन देशांत एवढा विजय मिळालेला पाहातांच हिंदुस्थानसरकारला दुष्ट स्वप्नें पडूं लागलीं. त्यांतून हिंदुस्थानांतले पंडितजीसारखे पुढारी रशियांत जाऊन तेथील स्थिति समक्ष पाहून आले. तेव्हांपासून सरकारला बोल्शेव्हिकांची धाकधूक अधिकच वाटूं लागली आणि चीन देशांत बोल्शेव्हिकांचा जसा हात चालला तसा तो हिंदुस्थानांत चालूं नये म्हणून सरकारचीहि धांवपळ सुरू झाली आहे. हें बोल्शेव्हिक बिल इतक्या घाईघाईनें पुढें आलें त्याचें खरें कारण हें आहे. रॉयचें पत्र हें उगीच वरकरणी दाखवावयाला निमित्त मिळालें आहे. असलीं पत्रें पूर्वींहि प्रसिद्ध झालीं आहेत व बोल्शेव्हिक बिल पास झालें तरी देखील रशियांतून असलें पत्र हिंदुस्थानांत यापुढें येऊच शकणार नाहीं असें मानण्याइतकें सरकार कांहीं भोळें नाहीं. पण हिंदी लोकांचा रशियाशीं सुरू झालेला स्नेहसंबंध अल्पप्रमाणांत आहे तोंच त्याचा नायनाट करावा एवढ्यासाठींच हें बिल पुढें आलें आहे व तें पास करून घेण्याची सरकारला इतकी जरूरी वाटत आहे. बोल्शेव्हिकांचीं तत्त्वें हिंदी लोकांच्या धर्माला व सामाजिक चालीरीतींना बाधक आहेत म्हणून त्यांच्या रक्षणासाठीं आम्ही हें बिल पास करीत आहों अशी सांगितली जाणारी सबब साफ खोटी असून ब्रिटिशांच्या आजपर्यंतच्या येथील कारवाईचा ज्याला ज्याला म्हणून अनुभव आहे असा कोणीहि मनुष्य त्यावर यत्किंचितहि विश्वास ठेवणार नाहीं.

आणि जनतेचा सरकारावर विश्वास बसावा असें सरकार तरी जनतेसाठीं काय करीत आहे? बोल्शेव्हिकांचीं मतें या देशांत पसरूं नयेत म्हणून बोल्शेव्हिकांना मज्जाव करण्याची सरकार एकीकडे तयारी करीत आहे; पण दुसरीकडे आपल्याच गैरमुत्सद्दीपणामुळें हिंदुस्थानांत बेकारी वाढवून बोल्शेव्हिकांचीं मतें रुजण्याला सरकारच जमीन तयार करून ठेवीत आहे. देशांत असंतोष पसरण्याला हरघडीं नवीं नवीं कारणें घडत असतांना बाहेरच्या बोल्शेव्हिकांना हिंदुस्थानांत येण्यास मनाई केली म्हणून बोल्शेव्हिझमचा प्रसार थोडाच थांबणार आहे ! बोल्शेव्हिक मतें असंतोषाचे पोटीं जन्मास येतात. अर्थातच जेथें सरकारच्या जुलमामुळें मूर्तिमंत असंतोष नांदत असेल तेथें बोल्शेव्हिक मतांचा प्रसार करण्याला परदेशांतूनच उपदेशकांचे पार्सल आणविलें पाहिजे असें नाहीं. येथल्याच लोकांना बोल्शेव्हिक मतें ग्राह्य वाटूं लागून त्यांचा फैलाव होणें ही कांहीं असंभवनीय गोष्ट नाहीं रशियांत जो बोल्शेव्हिझम सुरू झाला तो तेथें कोठून आला? झारशाहीच्या जुलमानेंच त्याला जन्म दिला, आणि हिंदुस्थानांत जर नोकरशाहीच्या गोटांत असेच अनेक झार झळकूं लागतील तर येथेंहि बोल्शेव्हिक मतें आपोआप फैलावूं लागल्याचा देखावा दिसूं लागेल. सारांश, बोल्शेव्हिकांची विचारसरणी देशांत रूढ होऊं नये आणि देशांतील समाजव्यवस्था बिघडूं नये असें जर सरकारला वाटत असेल तर सेफ्टी बिल पास करून परकी बोल्शेव्हिकांना अर्धचंद्र देणें हा खरा उपाय नसून देशांतील असंतोष व बेकारी दूर करण्यासाठीं झटणें हाच त्याचा खरा उपाय होय.

पण हा सरळ मार्ग सोडून ज्या वेळीं सरकार मुद्दाम आडमार्गांत शिरून लोकांच्या इच्छेविरुद्ध त्यांच्यावर असले जुलमी कायदे लादतें त्या वेळीं त्यांत सरकारचा कांहीं तरी स्वार्थ असला पाहिजे हें उघड आहे. आणि पब्लिक सेफ्टी बिलावरील वादविवादांत लाला लजपतराय, श्रीनिवास आय्यंगार, सर पुरुषोत्तमदास इत्यादि अनेक पुढाऱ्यांनीं सरकारचें हें खरें इंगित उघडकीस आणलें! तरी पण आमच्यांतलेच कांहीं दीडशहाणे सरकारच्या भुलथापांना भाळून नोकरशाहीच्या गोटांत शिरल्यामुळें लोकमत अजमाविण्याकरितां हें बिल प्रसिद्ध करण्याची उपसूचना नामंजूर होऊन, सिलेक्ट कमिटी नेमून तिजकडे हें बिल सोपविण्याची सरकारी सूचना मंजूर झाली! अशा रीतीनें केवळ तीन मतें अधिक पडून सरकारचा पहिला डाव साधला. आतां सिलेक्ट कमिटीकडून हें बिल पुनः असेंब्लीकडे येईल त्या वेळीं तरी या सरकारजमा झालेल्या सभासदांचे डोळे उघडतात काय हें पाहावें. ब्रिटिश नागरिकांच्या हक्काला बाध आणणारें असलें हें बिल असेंब्लीला विचारांतच घेतां येत नाहीं, अशी एक कायदेशीर तक्रार पं. मोतिलाल यांनीं उपस्थित केली आहे व त्या तक्रारीविषयीं असेंब्लीचे अध्यक्ष हे आपला निर्णय देणार आहेत. तो निर्णय सरकारला प्रतिकूल असा दिला गेल्यास

सरकारची सगळीच कारवाई ढांसळणार आहे.तेव्हां त्यांतून हें बिल कसें काय बचावून बाहेर येतें पाहावें. पण अखेरचा निर्णय कसाहि होवो, सरकारच्या कारस्थानावरून सरकारच्या पोटांत कपटभाव असून त्याला वरकरणी गोंडस रूप दिलें जात आहे आणि हिंदुधर्माच्या व मुसलमानी धर्माच्या संरक्षणासाठींच आम्ही हा खटाटोप करीत आहों ही भाषा शुद्ध बतावणीची आहे हें सिद्ध झालें आहे.

# पंचांगवादाचा निष्कर्ष

( ले.—ज. स. करंदीकर )

## अयनांश व दृक्प्रत्यय यांचा संबंध

निरयन पंचांगपद्धतीच्या तत्त्वाप्रमाणें आरंभस्थान निश्चल राहिलें पाहिजे. परंतु वाजवीहून वाढतें वर्षमान आणि वाढती अयनगति घेतल्यानें तें आरंभस्थान हळूहळू पूर्वेस कसें सरकत गेलें व त्यामुळें वास्तविक अयनांश जितके यावयाचे त्याहून चार अयनांश अधिक कसे वाढले याचें स्पष्टीकरण मागील लेखांत केलें. यावर असा एक प्रश्न विचारण्यांत येतो कीं, अयनांशांचा दृक्प्रत्ययाशीं संबंध काय? गुरुशुक्रादिकांचे अस्तोदय आणि सूर्यचंद्रांचीं ग्रहणें एवढ्यांचाच दृक्प्रत्ययाशीं संबंध आहे असें मानलें तर अयनांशांचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं असें म्हणतां येईल. पण जेथें अयनांशांचें सगळें गणित वर्षमानावर अवलंबून आहे आणि वर्षमान बदललें कीं आरंभस्थान बदलतें तेथें अयनांशांचा दृक्प्रत्ययाशीं संबंध येतोच येतो. केवळ तिथींचें गणित वर्तवावयाचें असल्यास त्यांत अयनांशांचा संबंध येत नाहीं. पण अमुक ग्रह अमक्या नक्षत्राला केव्हां येणार हें जेथें ठरवावयाचें असेल तेथें आरंभस्थानाचा व अयनांशांचा संबंध आलाच पाहिजे. रवि किंवा दुसरा कोणताहि ग्रह रेवती योगतारा ओलांडून पुढें गेला कीं तो अश्विनी नक्षत्रांत व मेष राशींत गेला असें ग्रंथांच्या आधारें व प्रत्यक्ष दृक्प्रत्ययानें म्हणावें लागेल. पण तुमचें आरंभस्थान जर येथून पुढें चार अंशांवर गेलें असेल, म्हणजे तुम्ही वास्तविक संख्येहून अधिक अयनांश धरीत असाल, तर रेवती ओलांडून पुढें गेलेला ग्रह देखील अद्यापि अश्विनी नक्षत्रांत व मेष राशींत गेला नाहीं असें तुम्ही म्हणाल. पण इकडे आकाशांतील दृक्प्रत्यय आणि 'यत्र तु रेवती तारा स्थापिता तत्र मीनमेषसंधिः' रेवत्या योगतारा तु सदा मीनाजसंधिगा' हीं वचनें तो ग्रह मेष राशींत गेला असें ठरविणार. अशा ठिकाणीं अयनांश वाजवीहून अधिक घेतल्यामुळे दृक्प्रत्ययाला बाध येतो हें उघड आहे. मासल्याकरितां हें एक उदाहरण सांगितलें. पण जेथे आरंभस्थानच चळलें आहे तेथें प्रत्येक ग्रह प्रत्येक नक्षत्रविभागाच्या आरंभीं आला असतां असाच फरक पडणार. यावरून अयनांशांचा दृक्प्रत्ययाशीं संबंध नाहीं हें म्हणणें कसें चुकीचें आहे तें लक्षांत येईल.

## अयनांश व आरंभस्थान यांचा संबंध

असो. आतां या वादांत कित्येकांकडून ज्या कांहीं शंका विचारण्यांत आल्या आहेत त्यांचीं थोडक्यांत उत्तरें देऊन या वादाचा समारोप करूं. सायन रवि व आरंभस्थान यांतील जें अंतर ते अयनांश अशी व्याख्या कोणत्याहि ग्रंथांत दिली नाहीं असा एक आक्षेप घेण्यांत येतो. सायन रवि आणि गणितागत निरयन रवि यांतील अंतर म्हणजे अयनांश ही व्याख्या आक्षेपकांसहि मान्य आहे. आणि वर्षमान नवीन शोधाप्रमाणें अगदीं बिनचूक घेतलें म्हणजे गणितागत रवि आणि आरंभस्थान यांचा बरोबर मेळ बसतो आणि त्यावरून सायन रवि व आरंभस्थान यांतील अंतर ते अयनांश हा नियम आपोआप सिद्ध होतो.

आजपर्यंतच्या करण-ग्रंथांत शुद्ध वर्षमान घेतलें गेलें नाहीं म्हणून त्यांचा गणितागत रवि आरंभस्थानाला सोडून जाऊं लागला आणि त्यामुळें अयनांश ठरवितांना त्यांनीं आरंभस्थानाचा विचार करावयाचें सोडलें. पण आरंभस्थान निश्चल असणें हा तर निरयन पद्धतीचा पाया आणि तें आरंभस्थान निश्चल राहण्याला नव्या शोधानें बिनचूक ठरलेलें वर्षमान घेणें जरूर आहे, आणि असें वर्षमान बिनचूक घेत गेल्यास गणितागत रवीपासून काढलेले अयनांश आणि आरंभस्थानापासून मोजलेले अयनांश तंतोतंत जुळतात व तेच खरे वेधोपलब्ध अयनांश होत. ज्या गणित-ग्रंथांत स्वीकारलेली अयनगति व वर्षमानपद्धति चुकीची आहे त्या ग्रंथावरून गणितागत रवि काढून अयनांश ठरविणें हें चुकीच्या पायावर उभारलेल्या डोलाऱ्याप्रमाणें डळमळीतच असणार. कोल्हापूरचे प्रो. आपटे यांनीं जे अयनांश वर्तवून ऐक्य परिषदेच्या अध्यक्षांस कळविले ते साडेआठ पळांनीं अधिक असलेल्या वर्षमानावरून काढलेले आहेत. म्हणून त्यांत चौदाशें वर्षांची सुमारें चार अंशांची कसर कायम राहिली आहे. अशी चुकी न राहण्याला रेवती योगतारेशीं आरंभस्थान निश्चित करणें आणि सायन मेषार्क व आरंभस्थान यांचें अंतर मोजून अयनांश काढणें हाच खरा बिनचूक मार्ग होय. केरोपंती पंचांगांत घेतलेलें वर्षमान वास्तविक नाक्षत्र सौर म्हणजे ३६५ दिवस

१५ घ. २२ प. ५३ वि. इतकें आहे. अयनगतिहि वास्तविक म्हणजे ५०–२३ इतकी मानली आहे आणि शिवाय यांतील ग्रहगतिस्थिति पूर्ण शुद्ध घेतल्यानें या पंचांगाप्रमाणें ग्रहणें, ग्रहयुति इत्यादि गोष्टी दृक्प्रत्ययास बरोबर मिळतात. अर्थातच या पंचांगांतील गणितागत अयनांश व आरंभापासून मोजलेले अयनांश एकच येतात म्हणूनच हें पंचांग पूर्ण शुद्ध होय. पूर्वी हें पंचांग नॉटिकल अल्मनॅकवरून करीत असत पण ज्योतिषी केतकर यांच्या ग्रंथांतला रैवताख्य पक्ष घेऊन हें गणित करतां येतें आणि अलीकडे नागपूरचे श्री. दप्तरी यांनीं जो करणकल्पलता ग्रंथ केला आहे त्यावरूनहि हें गणित करतां येतें, यामुळें आतां नॉटिकल अल्मनॅकची गरज राहिलेली नाहीं हेंहि आक्षेपकांनीं लक्षांत ठेवावें.

## आरंभस्थानीं तारा अवश्यक आहे

आरंभस्थानाला तारा असण्याचें कारण नाहीं हेंहि एक नवेंच थोतांड आक्षेपकांनीं उभारलें आहे. दिवसभर केलेल्या खोड्या लिहिण्याचें टळावें म्हणून खोडकर मुलगा जसा रोजनिशी लिहिण्याची चाल वाईट असे सांगत असतो किंवा ज्याला आपल्या हातून होणारा जमाखर्च दुसऱ्याचे नजरेस पडणें इष्ट वाटत नाहीं असा बेहिशेबी मनुष्य ज्याप्रमाणें जमाखर्च लिहिण्याची जरूरी काय असें विचारतो, तशासारखाच आरंभस्थानीं तारा कशाला पाहिजे हा प्रश्न आहे. ज्याला आपलें गणित शुद्ध आहे कीं चुकत आहे याचा पडताळा पाहावयाचा असेल त्याला आरंभस्थानीं तारा आवश्यक आहे. जो आकाशाकडे कधींहि पाहत नाहीं आणि जो केवळ रूढ पद्धतीनें गणित करून ग्रहगति व स्थिति ठरवीत असतो व आरंभस्थानापासून आपण किती झुकलों याची ज्याला पर्वा नसते त्याला आरंभस्थानीं तारा असण्याची जरूरी भासत नसेल. कारण त्यानें आरंभस्थानीं तारा घेतली तरी दरसाल ती तारा आगेमागें सरकतच जाणार. परंतु असला कोणताहि घोटाळा होऊं नये असें ज्याला वाटत असेल त्याला आरंभस्थानीं तारा घेणें हेंच उत्तम साधन होय. पूर्वीच्या सर्व ग्रंथकारांनीं आरंभस्थानीं तारा मानलीच आहे. मात्र वर्षगति बरोबर न साधल्यामुळें ती त्यांना न कळत सुटत चालली हें निराळें. ज्या चित्रा पक्षाचे अध्वर्यु आरंभस्थानीं तारा नको म्हणतात त्यांनीं स्वतः देखील आरंभस्थानीं चित्रा तारा घेतलीच आहे. कारण चित्रेच्या समोरून १८० अंशापासून नक्षत्रांचे भोग व अयनांश मोजणें म्हणजे ते पर्यायान आरंभस्थानच्या चित्रा ताऱ्यापासूनच मोजण्यासारखें आहे. आणि स्वतः ज्योतिर्विद केतकर यांनींहि "कालगणनेचें गणित प्रथम सुरू करतांना आरंभस्थानाचा संबंध दृश्य तारकेशीं असल्याखेरीज गणित करणें शक्य नाहीं" अशीच कबुली दिली आहे.

## आरंभस्थानीं रेवतीच घेण्याचा आग्रह कां

आरंभस्थानीं तारा घेण्याची इतकी जरूरीच असेल तर एखादा तारा घ्या, पण तो रेवती योगताराच घेतला पाहिजे असा आग्रह कां ? चित्रेच्या समोर १८० अंशावर असणारा बिंदु घेतला म्हणून काय बिघडलें ? असाहि एक आक्षेप पुढें येतो. आणि त्यास आधार म्हणून पूर्वी एके काळीं मृग नक्षत्र आरंभस्थानीं होतें, पुढें कृत्तिका आल्या, त्यानंतर कदाचित् एके वेळा अश्विनीहि आरंभस्थानीं असतील आणि नंतर तुमचा रेवती योगतारा आरंभस्थानीं आला, हे जसे इतके फेरफार झाले त्याचप्रमाणें आतां रेवती योगताऱ्याच्या ऐवजीं चित्रेच्या समोरचा बिंदु घेतल्यास त्यांत बिघडलें कोठें असेंहि विचारण्यांत येतें ! याला पहिलें उत्तर असें कीं, आम्ही पूर्वीचें आरंभस्थान बदलून अमुक दिवसापासून अमुक ताऱ्यापासून नवें सुरू केलें आहे असें सरळ सांगून आणि करणग्रंथात तसें स्पष्ट नमूद करून मग आरंभस्थान बदललें तर एका दृष्टीनें हरकत घेण्याला जागा राहाणार नाहीं. पण आमचें आरंभस्थान हजारों वर्षांपासूनचें जुनेंच कायम आहे असें सांगावयाचें, त्याला नांव देतांना रेवती योगतारा म्हणावयाचें, आणि खरें आरंभस्थान जुनेंहि नाहीं व जें नांव दिलें तेंहि नाहीं अशी स्थिति असावयाची हें योग्य नव्हे. शके १८०९ मध्यें चित्रा ताऱ्याच्या समोर जो बिंदु कर्मधर्मसंयोगानें आला तेंच आरंभस्थान मानून त्यालाच प्राचीन ग्रंथांचा आधार आहे असे भासविणें हें दोषास्पद होय आणि त्यामुळेंच केतकी पक्षाचे पंचांगावर लपंडाव चालविल्याचा आरोप येतो.

## आरंभस्थान पूर्वेस सरकविणें चुकीचें आहे

पण आरंभस्थान बदलण्यांत दुसरी जी एक दृष्टि ठेवावयास पाहिजे ती केतकी पक्षानें राखली नाहीं हा त्याचा मोठा दोष होय. आरंभस्थान पूर्वी एका काळीं मृग नक्षत्रांत होतें व तेथून बदलत बदलत ते रेवती योगताऱ्यावर आलें हें खरें. तथापि यांत एक क्रम कायम आहे व तो शास्त्रशुद्ध आहे. तो क्रम असा कीं, संपातबिंदु पश्चिमेस सरकत असल्यामुळें निरयन मानाचें आरंभस्थानहि बदलावयाचें झाल्यास तें पूर्वीच्या बिंदूच्या पश्चिमेस नेलें जावें, पूर्वेस नेतां कामा नये आणि मृगापासून रेवतीपर्यंत अशाच क्रमानें तें बदललें आहे; केव्हांहि पश्चिमेकडून पूर्वेस तें नेण्यांत आलें नाहीं. असें असतां शके ४९६ मध्यें जें आरंभस्थान रेवती योगताऱ्यापाशीं (झीटापिसियमपाशीं) सिद्धान्तकारांनीं निश्चित केलें तें पश्चिमेकडे न हलवितां केतकी पक्षानें उलट दिशेला म्हणजे पूर्वेला ४ अंश नेलें आहे. यामुळें

सायन व निरयन यांच्यांत जेवढें अंतर वास्तविक पडावयाचें त्याहून विनाकारण चार अंश अधिक अंतर पडत आहे, हा त्यांतील मोठा दोष होय. आरंभस्थान बदलावयाचें झाल्यास तें केव्हांह पश्चिमेकडून पूर्वेकडे न नेतां पूर्वेकडून पश्चिमेकडेच नेलें पाहिजे व तें ज्या नव्या तान्यानजीक न्यावयाचें तो तारा पूर्वीच्यापेक्षां अधिक सोयीस्कर असला पाहिजे. चित्रेच्या समोरचा बिंदु आरंभस्थान मानण्यांत या दोनहि गोष्टी साधलेल्या नाहींत. तो बिंदू रेवती योगताऱ्याच्या पश्चिमेलाहि नाहीं व चित्रा तारा निःशरहि नाहीं. अर्थातच यापुढें आरंभस्थान बदलावयाचेंच झाल्यास तें सुमारें दीड हजार वर्षांनीं शततारका नक्षत्राशीं नेतां येईल. कारण तो तारा ठळक आहे, रेवतीच्या पश्चिमेस आहे व निःशरहि आहे. पण आजमितीस चालू असलेल्या वादांत भावी स्थलांतराच्या विचाराचा काय उपयोग? आजच्या वादाच्या दृष्टीनें केतकी पक्षानें केलेलें स्थानांतर परंपरेला व शास्त्राला धरून नाहीं एवढें सांगितलें म्हणजे पुरें आहे.

या चर्चेत खरे वादाचे मुद्दे जेवढे होते तेवढ्यांचा विचार येथवर झाला. ज्या आक्षेपांचा गणिताशीं किंवा शास्त्रवचनाशीं कांहींच संबंध नाहीं असल्या बाष्कळ आक्षेपांना वरील विवेचनांत उत्तर दिलें नाहीं व तें देण्याची गरजहि नाहीं, कारण त्या आक्षेपांना शास्त्रीय पद्धतीचा पायाच नाहीं. तेव्हां आतां या सगळ्या विवेचनाचा सारांश वाचकांना थोडक्यांत समजेल अशा पद्धतीनें मांडून ही लेखमाला आटोपती घेऊं.

## वादांतील मुद्द्यांचा निष्कर्ष

( १ ) निरयन पद्धतींत वर्षारंभस्थान निश्चल असलें पाहिजे आणि तें निश्चल राहिलें आहे कीं नाहीं हें समजण्यास तथें निःशर दृश्य तारा पाहिजे.

( २ ) सूर्य एका बिंदूंतून निघून क्रांतिवृत्ताची प्रदक्षिणा करून पुनः परत त्याच बिंदूला आला म्हणजे वर्ष पूर्ण होतें. या वर्षाला नाक्षत्र सौरवर्ष असें म्हणतात.

( ३ ) नाक्षत्र सौरवर्षाचा कालावधि ३६५ दि. १५ घ. २२ प. ५३ वि. इतका आहे. नाक्षत्र सौर वर्षमान बरोबर ठरविण्याला आरंभस्थानाचा बिंदु निश्चित पाहिजे. असा निश्चित बिंदु क्रांतिवृत्तावरील निःशर योगतारा आरंभस्थानीं घेतल्यानें मिळूं शकतो.

( ४ ) वर्षमानाचा कालावधि अगदीं सूक्ष्म व बिनचूक पूर्वी ठरवितां न आल्यामुळें आजपर्यंत निरयन पंचांगवाल्यांनीं जें वर्षमान घेतलें तें साडेआठ पळांनीं अधिक आहे. पण तेवढ्यावरून त्यांचा हेतु नाक्षत्र सौरवर्षमान घेण्याचा नव्हता असें नाहीं. जें वर्षमान ते घेत तें नाक्षत्र सौर म्हणूनच घेत. त्यांत साडेआठ पळांची चुकी आहे व त्यामुळें आपलें आरंभस्थान निश्चल न राहातां तें पूर्वेकडे झुकत चाललें आहे याची त्यांना दखलगिरी नव्हती.

( ५ ) सिद्धांतकारांना ही दखलगिरी नसली तरी अर्वाचीन शोधांवरून शुद्ध वर्षमान किती घ्यावें आणि आतांपर्यंत आरंभस्थानांत किती अंतर पडलें आहे हें आपणास आतां कळलें आहे. म्हणून आरंभस्थान पूर्वीच्या जागीं स्थिर करणें आणि नवीन करणग्रंथांत शुद्ध वर्षमान घेणें या दोनहि गोष्टी अवश्यक आहेत व पचांगप्रवर्तन कमिटीनें अशी दुहेरी शुद्धता साधली आहे.

( ६ ) वर्षमान बिनचूक न घेतां ८॥ पळें अधिक घेत गेलें तरी आरंभस्थान निश्चल राहातें हें म्हणणें गणिताला विरुद्ध आहे. व वर्षमान वाजवीहून अधिक घेतलें तरी आरंभस्थान बदलत नाहीं असें जे म्हणत असतील त्यांनीं तें गणितानें सिद्ध करून द्यावें असें आमचें त्यांस आव्हान आहे.

( ७ ) शून्य अयनांश वर्ष शके ४९६ या वर्षी होतें व तें रेवती योगताऱ्यांत होतें हें केतकर यांनींच सांगलीसंमेलनानंतरहि कबूल केलें आहे. शके ४२१ च्या पूर्वी शून्य अयनांश वर्ष कोणीच दिलेलें नाहीं. दामोदरीय भटतुल्य यानें ३४२ हें वर्ष दिलें आहे. पण तें चुकीनें दिलें आहे. ब्रम्हगुप्ताच्या वेळीं सायन रवि व निरयन रवि यांमध्यें ५४ घटकांचें अंतर होतें त्यावरून शके ४९६ हेंच त्याचें शून्य अयनांश वर्ष येतें.

( ८ ) रेवती योगतारा म्हणजे झीटापिशियम असें शंकर बाळकृष्ण दीक्षितांच्या पूर्वीच्या सर्व ग्रंथकारांनीं कबूल केलें आहे. व त्यांस बापूदेव शास्त्री व व्यं. बा. केतकर यांचीहि संमति आहे.

( ९ ) झीटापिशिअमचा म्हणजे रेवती योगताऱ्याचा शर १३ कला म्हणजे अत्यंत अल्प असल्यामुळें प्राचीन ग्रंथकारांनीं त्यास निःशर असें नांव दिलें आहे.

( १० ) जें शुद्ध व बिनचूक वर्षमान शके १८२४ पासून ज्यो. केतकर यांनीं आणि शके १८४८ पासून ऐक्य पक्षानें स्वीकारलें तें शुद्ध वर्षमान शून्यवर्षारंभापासून घेऊन जे अयनांश येतील तेच खरे अयनांश होत.

( ११ ) जें सौर सिद्धांतोक्त वर्षमान ८॥ पळांनीं अधिक असल्यामुळें केतकी व ऐक्य पक्षानें अग्राह्य ठरविलें तेंच अग्राह्य वर्षमान घेऊन गणितागत रवि काढणें आणि त्यावरून येणारे जुने चुकीचे अयनांश ग्राह्य मानणें ही विसंगततेची व अशास्त्रियतेची कमाल होय!

( १२ ) शुद्ध वर्षमान व शुद्ध अयनगति घेऊन करणागत रवि काढल्यास त्यावरून शके १८४८ त २२–४१ अगर २२–४८ अयनांश येतात असें सिद्ध करून दाखवावें असें आमचें

चित्रा पक्षीयांस व ऐक्य पक्षीयांस आव्हान आहे. हें आव्हान ते न स्वीकारतील तर त्यांचा पक्ष चुकीचा हें आपोआपच सिद्ध होतें.

सगळ्या वादाचा मथितार्थ वरील १२ मुद्द्यांत थोडक्यांत दिला आहे त्यावरून सामान्य वाचकांसहि वादाची भूमिका कळून खरें शुद्ध पंचांग कोणतें याचा निर्णय करतां येईल व तसा निर्णय वाचकांनीं स्वतःच करावा. कारण या बाबतींत जे तज्ज्ञ मानले जातात त्यांचीच कांहीं कारणामुळें 'बोद्धारो मत्सरग्रस्ताः' अशी स्थिति झाल्यामुळ ते स्वतः सत्य पक्ष स्वीकारीत नाहींत आणि इतरांनाहि योग्य सल्ला न देतां आडमार्गाला लावितात. बहुजनसमाज सुधारणेला नेहमीं विन्मुख असतो ही नेहमींची सबबहि या वादांत त्यांना उपयोगी पडण्याजोगी नाहीं. कारण शेंकडा ९० लोकांना या वादांतलें तथ्य कळत नसून ज्यांना ते आजवर तज्ज्ञ मानीत आले ते शिष्ट जें पंचांग वापरण्याला सांगतील तें वापरण्याची त्यांची तयारी असते. अर्थातच स्वतः तज्ज्ञांनीं बहुजनसमाजाची सबब सांगणें ही स्वतःच्या सुधारणाविन्मुखतेवर पांघरूण घालण्याची एक युक्ति आहे. तेव्हां तज्ज्ञांनीं अभिनिवेश सोडून स्वतः खऱ्याखोट्याची पारख करावी आणि आपण खरें शुद्ध शास्त्रोक्त पंचांग वापरून आपल्या अनुयायांसहि हितकर सल्ला देण्याचें श्रेय संपादन करावें एवढीच त्यांस विनंति आहे. अशा रीतीने तज्ज्ञांनीं आपलें योग्य कर्तव्य बजावल्यास निष्कारण वाढलेला हा पंचांगवाद मिटेल अशी खात्री वाटते.

# बुद्धिबळाचा रकाना

( लेखक—**गो. गो. मुजुमदार, सांगली.** )

बुद्धिबळाच्या खेळाची शास्त्रीय माहिती देण्यापूर्वी त्याची परिभाषा व लिपी समजणें अगत्याचें असल्यानें प्रथम तीच हातीं घेऊं. प्रथम वाचकांस इतकें सुचविणें जरूर आहे कीं, ज्यांना ह्या खेळांतील मोहऱ्यांच्या हालचाली समजण्याइतपत तरी या खेळाचे ज्ञान आहे त्यांनाच पुढील विवेचन सहज समजेल. अगदींच नवशिक्या खेळणारांना त्याचा बोध होण्यास अमळ जड जाईल. तरी पण त्यांनासुद्धां उमज पडावा इतक्या सोप्या तऱ्हेने तें सांगण्याचा प्रयत्न केला जाईल. आणि म्हणूनच बुद्धिबळाच्या रकान्यांतील लेख वाचकांनीं पटाच्या साहाय्यानें पडताळून पाहावा व जपून ठेवावा अशी सूचना आहे.

पाश्चात्यांनीं या खेळांत सोईप्रमाणें थोडे फरक करून घेतले आहेत. पण मोहऱ्यांच्या संख्येंत त्यांनीं बदल केला नाहीं. म्हणून राजा, वजीर, दोन उंट, दोन घोडे, दोन हत्ती व आठ प्यादीं असा मोहऱ्यांचा संच त्यांच्याहि पटावर कायम आहे. मात्र वजिराला राणी, उंटाला धर्माध्यक्ष, व हत्तीला किल्ला किंवा बुरूज अशीं वेगळीं नांवें आपल्या युद्धपद्धतीस अनुसरून त्यांनीं कल्पिलीं आहेत व त्या दिशेनें त्यांच्या आकृतींत बदल केला आहे. त्यांचा राजा किरीटयुक्त, वजीर (राणी) लहानशा मुकुटानें संपन्न, उंट (पाद्रीबुवा) चिरलेली टोपी धारण करणारे व घोडे (घोडेस्वार) घोड्याच्या मस्तकाची निशाणी धारण करणारे आढळतात. मोहऱ्यांच्या गती त्यांच्या व आमच्या सामान्यतः सारख्याच आहेत. त्यांच्या खेळांत कोणतेंहि प्यादें मूळ घरांतून वाटल्यास दोन घरें खेळतां येतें. त्याचप्रमाणें कोणतेंहि प्यादें आपल्या आठव्या घरीं पोंचलें म्हणजे त्याचें राजाशिवाय वाटेल तें मोहरें करतां येतें.

इकडच्या पद्धतींत शह लागण्यापूर्वी राजा एकदां अडीच घरें नेतां येतो. पाश्चात्यांनीं तो प्रकार मोडून राजा किल्ल्यांत नेण्याचा प्रचार सुरू केला. राजा व हत्ती (किल्ला) यांच्यामध्यें एकही मोहरें नसलें, राजाला प्रतिपक्षाच्या मोहऱ्याचा शह लागू नसला, राजा व हत्ती यांच्या दरम्यानच्या घरांपैकीं एखाद्यावर प्रतिपक्षीय मोहऱ्याचा मारा नसला, व राजा किंवा हत्ती यांपैकीं कोणी आपली जागा सोडून हलला नसला, तरच राजाशेजारीं एकाच खेळींत उजवीकडचा अगर डावीकडचा हत्ती आणून त्याच्या पलीकडे राजाला ठेवतात. या प्रकाराला "बुरुजांत जाणें" असें म्हणतात. राजाला शह लागला व त्यानें एखादें प्यादें किंवा मोहरें घालून तो टाळला, तर त्याचा बुरुजांत जाण्याचा हक्क केवळ शह लागल्यानें बुडत नाहीं. मात्र शह लागू असून इरेस घालण्याजोगी स्थिति नसेल अशा वेळीं राजा एकदम बुरुजांत नेऊन शह काढतां येत नाहीं.

पाश्चात्य पट आमच्याप्रमाणेंच चौसष्ट घरांचा आहे. मात्र त्यांच्या पटावर डावीकडून उजवीकडे क्रमाने काळीं व पांढरीं घरें राखिलेलीं असतात. त्यामुळें प्रत्येक खेळाडूच्या उजव्या बाजूला पांढरें घर येतें, व पट तसें घर येईल अशाच तऱ्हेनें मांडतात. आमच्याकडे तांबडा, हिरवा, पिंवळा, काळा असे रंग मोहऱ्यांना देण्यांत येतात. त्यांच्या पटावर पांढरा व काळा असे दोनच रंग वापरतात. पांढऱ्यानें प्रथम खेळावयाचें असा प्रघात आहे. पांढऱ्यानें आपल्या मोहऱ्यांचा संच लाविला म्हणजे तो आमच्याप्रमाणेंच असतो, पण काळ्या

मात्र पांढऱ्याच्या राजासमोर राजा व वजिरासमोर वजीर लावतां, यामुळें पटाचे दोन भाग कल्पून एक राजाची फळी व एक वजिराची फळी मानली तर पांढऱ्या राजाच्या फळीसमोर काळ्या राजाची फळी व वजिराच्या फळीसमोर वजिराची फळी येते. इकडच्या पद्धतींत राजासमोर विरुद्ध बाजूचा वजीर असतो. त्यामुळें राजाच्या फळीसमोर विरुद्ध बाजूच्या वजिराची फळी येते.

शह, काटशह, मात, प्यादी किंवा प्यादेमात, इरेस घालणें, दुरुक किंवा दुहेरी शह, लहानथोर किंवा बारीकमोठें वगैरे बहुतेक संज्ञा दोनहि पद्धतींत एकच आहेत. मात्र कांहीं पाश्चात्य संज्ञा आमच्यांत नाहींत त्यांचा खुलासा करणें प्राप्त आहे. आपला डाव प्रतिपक्षावर लवकर लागू करण्याकरितां एखादें प्यादें किंवा मोहरें देणें याला ग्यांबिट किंवा आमिष म्हणतात. त्यांची प्रत्येक हालचाल शास्त्रीय नियमांना अनुसरून चढाईची असल्यामुळें व पांढराच पहिला खेळणारा असल्यामुळें पांढऱ्या बाजूला हल्याची बाजू व काळ्या बाजूला बचावाची बाजू असें म्हणतात. एखादें प्यादें दोन घरें टाकलें असतां प्रतिपक्षाचें प्यादें जर अडीच घरांवर असेल तर दोन घरें सरणाऱ्या प्याद्याला तें प्यादें वाटेंत मारूं शकतें. या प्रकाराला "एन्पासंट" किंवा वाटेंत मारणें म्हणतात. त्यांच्यांत मातेखेरीज दुसरा डाव नाहीं. बुरुजी किंवा पंचमोहरी हे प्रकार त्यांच्यांत नसल्यानें राजास शह लागून मात होईपर्यंत किंवा मात होणार अशी खात्री होईपर्यंत डाव टाकीत नाहींत. एका बाजूचा डाव दुसऱ्या बाजूवर होत नाहीं अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यास बरोबरी झाली असें समजून डाव संपवितात.

पाश्चात्य खेळांत बरोबरीचा आणखी एक प्रकार मानिला आहे तो असा. एका बाजूच्या राजाला प्रत्यक्ष शह तर लागलेला नाहीं, पण खेळावयाला राजाशिवाय दुसरें मोहरें किंवा प्यादें नाहीं; आणि राजा खेळावा तर तो प्रतिपक्षानें धरलेल्या घरांतच खेळला पाहिजे अशी परिस्थिति आहे; तर अशा वेळीं खेळाडू राजा खेळण्याचें नाकारितो व कुजी किंवा बरोबरी झाली असें हक्कानें ठरवून घेतो. तात्विक रीत्या इकडच्या बुरुजी किंवा पंचमोहरीप्रमाणें ही पद्धत सदोष आहे. कारण एका बाजूचें संख्याबल मात करण्याइतकें जोरदार असूनही असलेल्या कुजीमुळें फुकट जाण्याचा संभव असतो. तरी पण आतां ही कुजी सर्वत्र रूढ झाली आहे. येथपर्यंतच्या विवेचनांत आलेल्या मजकुरापैकीं पाश्चात्य तऱ्हेनें पटाची मांडणी, राजा बुरुजांत नेणें, एन्पासंट, आणि कुजी हे चारहि प्रकार वाचकांच्या चांगले लक्षांत यावे म्हणून ते पुढें मांडून दाखविले आहेत.

## आकृति नं. १

### पाश्चात्य पद्धतीनें मांडलेला पट

( प म्हणजे प्यादें असें समजावें. )

**काळा** वरून खालीं खेळणें

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ह | घो | उं | व | रा | उं | घो | ह |
| प | प | प | प | प | प | प | प |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| | | | | | | | |
| प | प | प | प | प | प | प | प |
| ह | घो | उं | व | रा | उं | घो | ह |

**पांढरा** खालून वर खेळणें

## आकृति नं. २

बुरुजांत जाण्यास तयार झालेले राजे. पांढरा उजव्या बुरुजांत व काळाही उजव्याच बुरुजांत जाणार आहे.

**काळा**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ह | | | | रा | उं | घो | ह |
| प | प | प | व | | प | प | प |
| | | घो | प | उं | | | |
| | उं | | | प | | | |
| | | | | प | | | |
| | | घो | प | | घो | | |
| प | प | प | | | प | प | प |
| ह | | उं | व | रा | | | ह |

**पांढरा**

## आकृति नं. ३

राजे बुरुजांत गेले आहेत.

**काळा**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | रा | ह | | उं | घो | ह |
| प | प | प | व | | प | प | प |
| | | घो | प | उं | | | |
| | उं | | | प | | | |
| | | | | प | | | |
| | | घो | प | | घो | | |
| प | प | प | | | प | प | प |
| ह | | उं | व | | ह | रा | |

पांढरा

### आकृति नं. ४

**बुरूज अडलेला देखावा**

पांढऱ्या राजाशेजारचें घर काळ्या उंटानें धरलें असल्यामुळें तो बुरजांत जाऊं शकत नाहीं व काळया राजाचा हत्ती जागा सोडून हलला असल्यामुळें तोही बुरुजांत जाऊं शकत नाहीं.

काळा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | ह | | व | रा | | ह | |
| प | | प | प | | प | प | प |
| उं | | प | | | घो | | |
| | | | | प | | | |
| | | | | **प** | | | |
| **प** | | **प** | | | **घो** | | **प** |
| | **प** | **प** | | | **प** | **प** | |
| **ह** | | **उं** | **व** | **रा** | | | **ह** |

पांढरा

### आकृति नं. ५ एन्पासंट

अर्ध्या पटावरील एक परिस्थिति. पांढरा जर घोड्याचें प्यादें दोन घरें खेळेल तर काळा तें प्यादें वाटेंत फुली केलेल्या घरीं मारूं शकेल.

काळा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | प |
| | | | | रा | | × | **प** |
| | | | | | | **प** | |
| | | | | | | **रा** | |

पांढरा

### आकृति नं. ६ कुजी

अर्ध्या पटावरील एक देखावा. काळ्या घोड्यानें जर पांढरें घोडें मारलें तर पांढऱ्याची खेळावयाची पाळी येणार व त्याच्या राजास खेळावयास मोकळें घर नसल्याने तो कुजीची बरोबरी मागणार.

काळा

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | रा |
| | | | | | | **घो** | **प** |
| | | | व | घो | | | |
| | | | | | | **रा** | |

पांढरा

# साकोरीचे उपासनीमहाराज

( ले.—**नरहरशास्त्री खरशीकर** )

प्रस्तुत बऱ्याच इंग्रजी, गुजराथी व मराठी वर्तमानपत्रांतून साकोरीच्या उपासनीमहाराजांबद्दल चर्चा येत आहे. यासंबंधीं आपणास कांहीं समक्ष स्थिति समजल्यास पाहावी या हेतूनें ब्राह्मण परिषदेच्या प्रचारकार्यासाठीं हिंडत असतां साकोरीस मुद्दाम गेलों. तेथील परिस्थिति पाहातां वर्तमानपत्रांत येत असलेली हकीकत बरीच विपर्यास करणारी दिसत आहे.

उपासनीबाबांच्या साधुत्वाविषयीं बिलकुल शंका घेण्याचें कारण नाहीं. त्यांचें वय जवळ जवळ ७० वर्षांचें असून त्यांची मूर्ति तेजःपुंज आहे. ते वैराग्याचे मूर्तिमंत पुतळे दिसतात. एका गोणपाटाचे आसनावर दिगंबर स्थितींत राहातात. त्यांच्या दर्शनाबरोबर अंतःकरणांत आदरभाव सहज उत्पन्न होतो. एका वैराग्यसंपन्न महात्म्याकडे जनतेचें लक्ष किती वेधलें आहे हें तेथील लाखों रुपयांच्या इमारतींचे रूपानें स्पष्ट दिसत आहे. पुष्कळ सुशिक्षित मंडळी त्यांची अनुयायी आहे. वकील, बॅरिस्टर, इनामदार, जहागीरदार, अधिकारी वगैरे बडीं बडीं माणसें त्यांचे अनुयायांत आहेत. यावरून ही सर्वच मंडळी घसरलीं आहेत असें म्हणण्याचें धारिष्ट करणें सोपें नाहीं. तथापि तेथील दुसऱ्या स्थितीबद्दल मात्र मला लिहिल्यावांचून राहावत नाहीं. महाराजांना कांहीं पालकांनीं व पतींनीं आपली अत्यंत प्रिय वस्तू म्हणून आपल्या मुली व स्त्रिया समर्पण केल्या आहेत. त्यांपैकीं दोन मुली व पत्नी एक आहे. प्रिय वस्तू सद्गुरूस समर्पण करणें हें उत्कृष्ट त्यागाचें लक्षण आहे. पण बापास मुलीचें दान फक्त एका वरासच करतां येतें. अन्यास दान करण्याबद्दल कोठेंच शास्त्र सांगत नाहीं. या ठिकाणीं बाबा हे वर असणें शक्यच नाहीं म्हणून मुलीचा दानविधि अशास्त्र आहे. पतीनें पत्नीचें दान गुरूला करणें हें तर गर्ह्यच आहे. असें दान पतीस बिलकुल देतां येत नाहीं व

कोणास घेतांहि येत नाहीं. आत्मार्पण करणें यापेक्षां श्रेष्ठ दान दुसरें कोणतें असणार? परंतु या दानाचा अर्थ असा नाहीं कीं, त्या दानाबरोबर जीवाचा त्याग होतो. आपल्या सर्वस्वाचें दान करणें "आत्मदारादिकं चैव गुरुभ्यो यः समर्पयेत्" असें गुरुगीतेंत सांगितलें आहे. पण त्याचा अर्थहि पतीनें बाजूस राहून ( आपला हक्क कमी करून ) पत्नीचें सर्वस्वी समर्पण करणें असा होत नसून सर्वस्वावर सद्गुरुसत्ता आहे अशी भावना ठेवणें हाच आहे आणि महाराजांचें सदर स्त्रियांशीं जें वर्तन आहे त्यांत आक्षेप घेण्यास जागा नाहीं. तरी पण लौकिक-दृष्ट्या असले दान देणं घेणें अयोग्य होत असल्यामुळें देणाऱ्यानें तें देऊं नये व घेणाऱ्यानें तें घेऊंहि नये.

असें सांगण्यांत येतें कीं, बाबांच्या जागीं ज्या विवाहित स्त्रीची पूजा होऊं लागली आहे, तिचे ठिकाणी शेगांवच्या गजाननमहाराजांचा आवेश आहे. हें जरी खरें असलें तरीहि त्यायोगानें समर्पणाचें मंडन होत नाहीं. अशा आणखी १२ स्त्रियांचे ठिकाणीं निरनिराळ्या सत्पुरुषांचे आवेश होऊन तेथें राहणार आहेत असें म्हणतात! हा मजकूर जर खरा होईल तर फारच आनंदाची गोष्ट आहे. आज संतांची जरूरी आहे. पण संतांचे अवतार सनातन धर्म, आर्य संस्कृति, चातुर्वर्ण्य यांचे संरक्षणासाठीं होत असतात या दृष्टीनें ही गोष्ट चांगलीच आहे. पण हे संत स्त्रियांतच कां आवेशित होत आहेत देव जाणे! आवेशरूपानें येण्यापेक्षां स्वतंत्र जन्म घेऊन येण्यांत कालाचा अपव्यय होत आहे किंवा आणखी कांहीं अडचणी आहेत कीं काय हें मात्र अगम्य आहे.

महाराजांचें वाङ्मय गूढार्थानें भरलेलें आहे व तें उकलण्यास अधिकारीच पाहिजे असें यांचे सुशिक्षित शिष्य प्रतिपादितात. हल्लीं साईवाक्सुधेचा चौथा अंक प्रसिद्ध झाला आहे. तो पाहिल्यावर यांतील गूढार्थाचें आकलन कधीं होईलसें मला वाटत नाहीं. मागील संतांचें उच्च दर्जाचें वाङ्मय गूढ दिसत नाहीं. पण आजच्या कलिकालामुळें हें गूढ लीहिले असल्यास आम्हास तरी पटत नाहीं. श्रीराम, समर्थ रामदास, शिवाजी हेच युरोपियनांचे रूपानें अवतरले आहेत असें साईवाक्सुधेंत लिहिलेलें पाहून या वाङ्मयाबद्दल अनादर उत्पन्न होतो!

या वाङ्मयांत उच्च तत्त्वें ठिकठिकाणीं आहेत. पण त्यांचेचबरोबर विक्षिप्तपणाहि आहे हें पाहून वाईट वाटतें. संतवाणीबद्दल मला फार आदर वाटतो. पण यांतील कांहीं तत्त्वें पाहून तो आदर राहात नाहीं. हें कदाचित् माझें दौर्बल्याचेंहि लक्षण असेल. यापुढें तरी हल्लींच्या समाजापुढें असले देखावे येऊं नयेत अशी श्रीउपासनीबाबांच्या चरणीं प्रार्थना आहे. संतांचा मार्ग नितांत शुद्ध आहे. त्या मार्गाचें सरळपणें समाजांत अनुकरण करण्यास लावणें हें संतांचें कार्यच आहे. व तसा लोकसंग्रह येथून पुढें झाल्यास महाराष्ट्र धर्माचीहि उन्नति होईल अशी बाबांचे चरणीं विनंति आहे.

# पंचांगवादाचा सामान्य विचार

## (लेखक—कृष्णाजी गणेश जोशी, मालवण)

सध्या भिन्न अधिकमासानिमित्तानें पंचांगवादाचें रण माजून राहिलें आहे व महायुद्धाच्या काळांत ज्याप्रमाणें युद्धशास्त्रविषयक शब्द व युद्ध्यमान राष्ट्रांची थोडीबहुत भौगोलिक माहिती लोकांना परिचित झाली होती, त्याप्रमाणें हल्लीं लोकांना संपात, अयनांश, योगतारा, क्रांतिवृत्त वगैरे शब्द ठाऊक झाले आहेत व या वादांत वैदिक काळांत बुडी मारणाऱ्या संशोधकापासून तों आपल्या दारांत उगवलेल्या अळंब्यांवरून पंचांगाचा खरेखोटेपणा ठरविणाऱ्या म्हाताऱ्या आजीबाईपर्यंत सर्वांनीं आपापल्या परीनें भाग घेतला आहे. त्यांतच या वादप्रसंगाचा फायदा घेऊन, व्यक्तिद्वेषानें व पक्षद्वेषानें झपाटलेल्या कित्येक सद्गृहस्थांनीं, या विषयाला शिमग्याचें स्वरूप आणून धुळवडीचा खेळ खेळण्यासहि आरंभ केला आहे! अशांना उत्तरें देणें बाजूला ठेवून शुद्ध पंचांगाविरुद्ध घेतलेल्या कांहीं लहानमोठ्या आक्षेपांना उत्तरें देण्याचें योजिलें आहे.

**सृष्टिनिरीक्षकांचा आक्षेप**—नवीन( टिळक ) पंचांगांतील असलेल्या गणेशचतुर्थीच्या वेळीं जसें ऋतुमान भासावयाचें तसें भासलें नाहीं.

**उत्तर**—चांद्रमान व सौरमान यांत दरवर्षी अकरा दिवसांचा फरक पडत असतो. ऋतू सूर्यावर अवलंबून असतात, त्यांचा चांद्रमानाशीं नेहमीं मेळ असणें शक्य नाहीं. संक्रांति किंवा लोकांना अधिक परिचित असलेल्या इंग्रजी तारखा यांचा मात्र ऋतूशीं मेळ असतो; म्हणून शुद्ध पंचांगांत या वर्षी ज्या महिन्यांत व ज्या तारखेच्या मानानें चतुर्थी आली आहे, त्या इंग्रजी महिन्यांत त्या मानानें ती पूर्वी आली होती कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. ग्रहलाघवीय पंचांगांत शके १८४७, ४४, ४१, ३६, ३३, २५, २०, १७ या सालीं गणेशचतुर्थी आगस्ट महिन्यांत अनुक्रमें

२३, २४, २९, २३, २७, २२, २१, २३ या तारखांना आली आहे व या वर्षी शुद्ध पंचांगांत ती ऑगस्टचे १९ तारखेला आली आहे. वर दिलेल्या पूर्वीच्या दाखल्यांवरून ऋतुमानासंबंधीं आक्षेप घेण्यास जागा राहात नाहीं हें कोणालाहि दिसून येईल.

**बापटशास्त्री यांचा आक्षेपः**—यंदा शुद्ध पंचांगांत कन्यासंक्रांत भाद्रपद वद्य १२ ला आली आहे व धर्मसिंधुकारांचे मतें कन्यासंक्रांतीशिवाय पक्ष करूं नये वगैरे.

**उत्तर**—शास्त्रीबुवांनीं वरील उत्तरांत दिलेल्या शकांतील ग्रहलाघवीय पंचांगें उघडून पाहाण्याची तसदी घ्यावी. म्हणजे त्या शकांत कन्यासंक्रांत अनुक्रमें वद्य ७, १३, १०, ८, ११, ८, १०, ३० व ११ या तिथींना झाली आहे असें आढळून येईल. सदर शकांत शास्त्रीबुवांनीं धर्मसिंधूच्या वचनांचा काय विचार केला ! शिवाय त्यांनीं 'आदौ मध्येऽवसाने वा' या धर्मसिंधूच्या वचनाचा अर्थ सांगावा.

**जुन्या पंचांगांचे अभिमान्यांचे आक्षेपः**—

१ जुनें पंचांग थोडें चुकतें आहे. त्यांत आम्ही सुधारणा करणार आहों.

२ शुद्ध पंचांगाला सर्व हिंदुस्थानांत अद्याप कोणी मानीत नाहींत.

३ दृक्प्रत्ययाचा अयनांशाशीं संबंध नाहीं.

४ जुने अयनांश व अयनगति कायम ठेवून पंचांगांत सुधारणा केली पाहिजे वगैरे.

**उत्तर**—

१ शुद्ध पंचांग होऊन आठ वर्षे झालीं; एवढ्या वर्षांत जुनें पंचांग चुकतें हें ठाऊक असून, तें सुधारण्याची हिंदुस्थानांतील शुद्ध पंचांग न मानणाऱ्या ज्योतिष्यांनीं कांहींच व्यवस्था कां केली नाहीं?

२ चुकांचें पंचांग आपणच वापरतों असें नव्हे तर हिंदुस्थानांतील शास्त्री–जोशीहि तेंच वापरतात हें सांगण्यांत भूषण नाहीं.

३ अयनांशाशीं दृक्प्रत्ययाचा संबंध नाहीं याचा अर्थ, ज्याप्रमाणें ग्रहणें वगैरे चुकलेलीं सामान्य लोकांना समजतात त्याप्रमाणें अयनांश चुकलेले सामान्य लोकांना कळणें शक्य नाहीं हाच आहे. एरवीं सिद्धांतकारांनीं सांगितलेली आरंभस्थानाची तारा व संपात यांमधील अंतर चुकलें आहे हें वेधकाराला दिसलेंच पाहिजे व त्याचा संबंध दृक्प्रत्ययाशींच आहे.

४ जर अयनगति चुकली असल्याचें ठरत आहे तर अयनांशहि चुकले हें उघड आहे. चुकी कायम ठेवून दुरुस्ती करणें ही गोष्ट अजब आहे. ३६० दिवस जुनें गणित देऊन ग्रहणाची वेळ तेवढी बरोबर लिहिणें ही अज्ञ लोकांची फसवणूक होय. येत्या नोव्हेंबरच्या बारा तारखेचें सूर्यग्रहण, दोनहि पंचांगांत एकाच वेळीं लागत असल्याचें लिहिलें आहे. सामान्य लोकांना ग्रहणाचें गणित समजत नसलें तरी ज्याअर्थी ग्रहणाचे दिवशीं दोनहि पंचांगांतील अमावास्या निरनिराळ्या वेळीं संपत आहेत त्याअर्थी ग्रहणाचे दिवशीं दोनहि पंचांगांतील ग्रहणांतील स्पर्शमोक्ष काल एक असणें शक्य नाहीं, हें ढोबळ रीतीनें लक्षांत येण्याजोगें आहे. सारांश, जुन्या पंचांगाचे अभिमानी लोकांनी ओरड करून त्यांस भाग पाडल्याशिवाय, ती सुधारणा करण्यास जुने ज्योतिषी तयार नाहींत. ग्रहणें चुकलेलीं लोकांना समजतात या ठिकाणीं त्यांचा नाइलाज झाला आहे; पण चुकलेल्या अयनगतींत व अयनांशांत फरक करण्याचें कारण नाहीं, कारण सामान्य लोकांना त्यांत कांहीं समजत नाहीं व म्हणून त्याबद्दल ओरड होणें शक्य नाहीं, अशी त्यांची विचारसरणी आहे. पण त्यांचा हाहि भ्रम लवकरच दूर होईल.

**केतकर पक्षाचे आक्षेप**—

१ आरंभस्थान कोठेंहि मानलें तरी चालेल.

२ रेवती योगतारा निःशर नाहीं, सबब ती आरंभस्थानीं मानतां येत नाहीं.

३ शून्य अयनांश वर्ष शुद्ध अयनगतीनें मागें जातें.

४ वेदांगज्योतिषकालांत धनिष्ठारंभ होता म्हणून धनिष्ठानिर्णीत अश्विन्यारंभ मानिला पाहिजे.

५ या मताला प्रसिद्ध ज्योतिर्विद दीक्षित यांचें पाठबळ आहे.

६ लो. टिळकांनीं सांगलीसंमेलनांत जीं ठरलीं नाहींत अशीं विधानें श्री. छत्रे यांना पाठविलेल्या पत्रांत लबाडीनें दुसऱ्यांच्या नादाला लागून केलीं वगैरे.

**उत्तर**—१ ज्या ठिकाणीं आरंभ मानावयाचा त्याच ठिकाणीं जर अश्विनी नक्षत्राचा आरंभ समजावयाचा आहे तर पाहिजे तेथें आरंभ मानतां येणार नाहीं. कारण फलज्योतिषांत अश्विनी, भरणी इत्यादि नक्षत्रांचीं शुभाशुभ फलें सांगितलीं आहेत. एवढेंच नव्हे तर प्रत्येक नक्षत्राचे चार चरण करून त्यांचींहि फलें सांगितलीं आहेत फलज्योतिषावर कोणाचा विश्वास असो वा नसो, पण जोंपर्यंत आम्ही व्यवहारांत हरघडी तें मानीत आहों तोंपर्यंत ज्या तारेपासून अश्विनीचा आरभ होतो असें सिद्धांतकारांनीं सांगितलें आहे तेथपासूनच तो धरला पाहिजे.

२ शुद्ध पंचांगांत आरंभस्थानीं जी रेवती योगतारा मानिली आहे ती क्रांतिवृत्तापासून सूक्ष्म अंतरावर आहे व सिद्धांतकारांनीं सांगितलेली योगतारा क्रांतिवृत्तावर आहे. म्हणून ही तारा ती नव्हे हा आक्षेप अगदींच पोरकट आहे. पूर्वीच्या स्थूल मानांत हल्लींच्या साधनांनीं पुष्कळ ठिकाणीं सूक्ष्म फरक दिसून येत आहे, तेवढ्यावरून

ही तारा ती नव्हे असें सिद्ध होत नाहीं. जी सूक्ष्म कसोटी केतकर पक्षीय, रेवती योगतारेला लावूं पाहातात ती त्यांनीं इतर ताऱ्यांना लाविल्यास केतकर पक्षाच्या पायाखालची चित्रा नक्षत्राचीहि जागा स्थिर राहाणार नाहीं.

३ शून्य अयनांश वर्ष शुद्ध गतीनें मागें जातें याचा अर्थ काय ? आजचे अयनांश ज्या मानलेल्या वार्षिक अयनगतीनें जेवढ्या वर्षांत सांचले आहेत तीं वर्षें काढण्यास अयनांशाला पूर्वीच्या मानलेल्या गतीनें न भागतां नव्या शुद्ध गतीनें भागावयाचें असेंच म्हणणें असेल तर हा गणिताचा काय नवा प्रकार आहे ?

४ नक्षत्रविभागाच्या आरंभीं असून त्याच वेळीं राशिविभागाच्या आरंभीं असणारी व शिवाय क्रांतिवृत्तालगत असणारी इतकी सोयीची तारा सर्व नक्षत्रचक्रांत ही एकच आहे. इतकी सोयीची तारा, जी आरंभस्थानीं आहे असें सिद्धांतकारांनीं स्पष्ट सांगितलें आहे, ती न मानतां केवळ वेदांगज्योतिषकाळांत धनिष्ठारंभ होता या सबबीवर जिच्या आरंभबिंदूबद्दल यत्किंचित्‌हि पुरावा नाहीं त्या धनिष्ठेपासून अश्विनीचा निर्णय करून शून्य आकाशांत आरंभबिंदु मानावा असें सांगणें ही दुराग्रहाची व दुनिया झुकविण्याचा यत्न करण्याची कमाल होय !

५ ज्यो. दीक्षित यांचेंहि मत असेंच होतें असें सांगण्यांत येतें. पण दीक्षितांनीं "आरंभस्थान शके ४४४ च्या सुमारास संपातांत होतें व रेवती नक्षत्रांपैकीं ३२ वी तारा झीटा त्या वेळीं त्याच्याजवळ होती" असें स्पष्ट लिहून ठेविलें आहे. लोक ऐकत नाहींत तर चित्रेसमोरून आरंभ धरावा असें जर त्यांनीं म्हटलें असेल तर, ते सायनवादी असल्यामुळें यांच्या तत्त्वाला बाध येत नाहीं म्हणून होय. पण निरयन पंचांगवाल्यांना तें मान्य करतां येणार नाहीं.

६ शुद्ध पंचांगाच्या विरुद्ध लिहितांना लेखकांला लो. टिळकांवर लबाडीचा आरोप करावा लागला आहे ! तो करतांना त्यांनीं ज्या विचारसरणीचा व भाषापद्धतीचा अंगिकार केला आहे त्यावरून त्यांच्या लेखणीला आपण काय लिहितों याचें भान राहिलें नसावें असें वाटतें. आणि इतकें करून तुम्ही वाद माजवीत आहां असें केतकर पक्ष प्रो० नाईक आदिकरून कमिटीच्या गृहस्थांस म्हणण्यास तयार! पण हा केतकर पक्ष मानण्यास कोणीच तयार नाहींत व त्याला कोणी विश्वामित्र भेटला तरी तो त्रिशंकूप्रमाणें लोंबत राहाणार.

# बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशन

पुण्याहून मुंबईस जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्यावर सह्याद्रि पर्वतांतील प्रसिद्ध बोरघाट येतो हें बहुतेकांस माहीतच आहे. या घाटामधील अनेक आश्चर्यांपैकीं रिव्हर्सिंग स्टेशन हें एक आश्चर्य होय. हें स्टेशन काढून टाकून तेवढ्यापुरता वेगळा रस्ता बांधण्याचें काम गेलीं थोडीं वर्षें चालू असून तें आतां बहुतेक पुरें झालें आहे. फक्त त्या रस्त्यानें आगगाड्यांची रहदारी सुरू व्हावयाची असून तिला प्रारंभ एप्रिल सन १९२९ मध्यें होईल असा अंदाज आहे. रिव्हर्सिंग स्टेशन कसें टाळतां आलें व त्याऐवजीं नवीन बांधलेल्या रस्त्याचें स्वरूप काय आहे याची माहिती पुष्कळांस व्हावी असें वाटत असेल यामुळें व ती शिल्पशास्त्रांतील हिंदी लोकांची प्रगति या दृष्टीनें महत्त्वाची असल्यामुळें देण्याचें योजिलें आहे, पण ती चांगली लक्षांत येण्यास बोरघाटांतील रस्त्याची वाचकांस नीट कल्पना असणें जरूर आहे, म्हणून प्रथम तीच माहिती देत आहों.

बोरघाटाची मर्यादा खंडाळा ते कर्जत इतकी आहे. मुंबईहून पुण्यास यावयास हाच काय तो मुख्य मार्ग. ब्रिटिश अमदानींत त्यांतून प्रथम गाडीरस्ता झाला व मागाहून आगगाडीचा रस्ता बांधण्यांत आला. त्यापूर्वी लमाण लोक बैल व रेडे यांजवर लादून कोंकणांतील माल घाटावर व घाटावरचा माल कोंकणांत नेत असत. अशा बिकट स्थळांतून गाडीरस्ता बांधणें कठीण व आगगाडीचा रस्ता बांधणें त्याहून कठीण. आगगाडीचा रस्ता बांधतांना कित्येक ठिकाणीं दऱ्या भरून काढाव्या लागतात, दोन टेकड्यांस जोडणारे पूल बांधावे लागतात व समोर डोंगराचा फार मोठा उंचवटा आडवा आल्यास तो सबंध चढून जाण्याऐवजीं त्याच्या पोटांतून बोगद्याचें विवर पाडून पलीकडे पोंचणें श्रेयस्कर असतें.

हे सर्व प्रकार बोरघाटांत पाहावयास सांपडतात. त्या सर्वांत रिव्हर्सिंग स्टेशन फार प्रेक्षणीय होय. रिव्हर्सिंग स्टेशन प्रेक्षणीय असलें तरी तें प्रेक्षणीय व्हावें यासाठीं त्याची योजना केलेली नाहीं. तें ठिकाणच असें चिंचोळें आहे कीं अशा प्रकारची तोड त्याजवर काढल्यावांचून पुढचा मार्ग निघणार नव्हता. पुढें जावें म्हटलें तर समोर रुंद व खोल दरी येते व जागा अगदीं अरुंद असल्यानें गाडीला वळणहि मारतां येत नाहीं. यासाठीं गाडीस तेथें थांबवून व तिचें तोंड बदलून तिला डोंगराच्या चिंचोळ्या तोंडाच्या दुसऱ्या बाजूनें न्यावें लागतें. या रस्त्याची बांधणी १८६० सालीं सुरू झाली व

ती १८६३ त संपली. म्हणजे गेलीं पासष्ट वर्षें रिव्हर्सिंग स्टेशनावरून गाड्यांची वाहातूक सुरू आहे व ती तशीच पुढेंहि सुरू राहिली असती. परंतु रिव्हर्सिंग स्टेशन ही सोय नसून अडचण आहे असें अलीकडे जाणवूं लागलें व तें एक मनोवेधक स्थळ असलें तरी त्याचा लोभ सोडणें भाग पडलें.

## बोरघाटाचें व्यापारी महत्त्व

बोरघाटाची जरूरी मुंबई व पुणें या दोन शहरांनाच केवळ आहे असें नाहीं; तर त्याच्या ताब्यांत दक्षिण-हिंदुस्थानापैकीं फार मोठ्या प्रदेशाचा व्यापार आहे. हा व्यापार गेलीं पासष्ट वर्षें एकसारखा वाढत आहे. सदर घाटांतून दररोज साठ गाड्या जातात येतात इतकें सांगितलें असतां त्यांतील व्यापाराची कोणासहि सहज अटकळ बांधतां येईल. तथापि गाड्यांची हीहि संख्या अपुरी पडते. ही उणीव दोन प्रकारांनीं भरून काढतां येण्यासारखी आहे. गाड्यांची संख्या वाढवून किंवा प्रत्येक गाडींतील डब्यांची संख्या वाढवून.गाड्यांची संख्या वाढविणें तूर्त अशक्य दिसतें.वाढली तर डब्यांचीच संख्या वाढेल.सांप्रत मोठ्या मालगाडीस कमाल म्हणजे तीस—पसतीस डबे असतात.याहून अधिक डबे वाढविण्यास दोन अडचणी उभ्या राहातात. पहिली अडचण ही कीं, कर्जतपासून खंडाळ्याकडे गाडी वर चढवितांना तिला खेंचण्यास दोन एंजिनें लागतात व या दोन एंजिनांना हल्लींहून अधिक लांबीची गाडी झेपणार नाहीं. आणि दुसरी अडचण अशी कीं अधिक लांबीच्या गाडीस रिव्हर्सिंग स्टेशनावर उभें राहाण्यास जागा नाहीं. व ही जागा जास्ती वाढविण्यासहि डोंगराच्या त्या चिंचोळ्या सोंडेवर माया नाहीं. कारण त्या सोंडेवर तीनहि बाजूंस खोल व रुंद तोंडाच्या दऱ्या आहेत. यांपैकीं सोंडेच्या टोकासमोर असलेली दरी ही काय ती भरून काढावयाची किंवा तिजवर पूल टाकून दरीच्या पलीकडच्या बाजूस ती जोडावयाची. पण ही दरी आठशें फूट लांब व एकशेंतीस फूट रुंद असल्यामुळे हें काम अत्यंत अवघड व खर्चाचें म्हणून त्याचा विचार सोडून देणें भाग पडलें आणि त्याऐवजीं हल्लींच्या रस्त्यांत रिव्हर्सिंग स्टेशनापुरता बदल करून नवीन रस्ता आंखणेंच श्रेयस्कर ठरलें.

हा नवीन रस्ता जुन्या रस्त्याप्रमाणें लांब, रुंद व उंच अशा डोंगरांच्या रांगांमधून जातो. त्याची सुरुवात मुंबईहून पुण्यास यावयाच्या रस्त्यावर ७४ व ७५ या मैलांच्या दरम्यान होते व तो खंडाळा स्टेशनापाशीं पुनः जुन्या रस्त्याला येऊन मिळतो.रस्त्याच्या या दोन टोंकांमधील उंची २८० फूट आहे. ही उंची रस्ता बांधून कशी भरून काढावयाची हा प्रश्न. जुन्या रस्त्यानें ही उंची दर १०० फुटांस २·८७ फूट या प्रमाणांत भरून काढली आहे व इतरत्र प्रमाण दर १०० फुटांस २·६४ फूट असें आहे. चढाव जास्ती खडा ठेवला तर रस्त्याची लांबी कमी होते व कमी ठेवला तर रस्त्याची लांबी वाढते. पण चढाव वाढविल्यानें गाडी खेंचणें प्रयासाचें होतें. या बाबतींत तीन योजना पुढें आल्या. व त्यांपैकीं दर १०० फुटांस चढावाचें प्रमाण २·६४ फूट ही योजना पसंत करण्यांत आली. सदर योजनेनें नवीन रस्ता २·११ मैल लांबीचा ठरला. त्या रस्त्याचा चढाव संथ आहे व वळणेंहि सोपीं आहेत. त्यासाठीं ६३ लक्ष रुपये खर्च येईल असा अंदाज झाला. इतर दोन योजनांपेक्षां हा खर्च अधिक असला तरी तो ५-७ वर्षांत सहज भरून येणार असल्यानें हीच योजना मान्य करण्यांत आली.

या नवीन रस्त्यावर महत्त्वाचीं कामें तीन होत. एक मोठमोठ्या भरावाचें काम, दुसरें डोंगरांतील खोदकाम व तिसरें तीन बोगद्यांचें काम. बोरघाटांतील बहुतेक फत्तर ज्वालामुखीच्या रसाचा बनला असल्यामुळें कित्येक ठिकाणीं आडवा येणारा डोंगर खोदून काढण्यापेक्षां बोगदे पाडणेंच कमी खर्चाचें असा अनुभव आला. तथापि बोगद्याचें काम एकंदरींत धोक्याचें खरेंच. बोगदा पाडण्यापूर्वी त्यांत सांपडणाऱ्या दगडांची रचना, त्यांचे गुणधर्म यांची माहिती आगाऊ करून घ्यावी लागते. दगड पक्का असेल तर त्याजपासून धोका कमी असतो. नवीन तीन बोगद्यांपैकीं शेवटचा म्हणजे मुंबईच्या बाजूचा बोगदा थोडासा कठीण दगडांतून व बाकीचा मऊ मुरुमांतून पोखरावा लागला. तो खोदतांना सर्व बाजू लांकडांनीं बांधून घेण्यांत आल्या. प्रथम सहा—सात फूट लांबी तयार करून घ्यावयाची, त्यामागून सीमेंटाची कमान बांधावयाची व मग पुढचें खोदकाम चालू करावयाचें अशा क्रमानें मऊ भागांतील बोगदा वाट काढीत असतो.

## मोठा बोगदा

वरील तीन बोगद्यांपैकीं खंडाळा स्टेशनाजवळचा बोगदा सर्वांत लांब म्हणजे ३१०० फूट आहे. बोगद्याची जागा निश्चित झाल्यावर तो दोनही तोंडांनीं एकदम खोदला जातो. तसें करतांना या बोगद्याचीं दोन तोंडें कामास अपुरीं पडलीं तेव्हां बोगद्यावरील डोंगराच्या माथ्यापासून आंतपर्यंत भोंक पाडून त्यांतून फोडलेले दगड वगैरे माल विद्युच्छक्तीनें चालणाऱ्या पाळण्याच्या साहाय्यानें काढून घेण्यांत येत असे. दुसरा बोगदा एक हजार फूट लांबीचा आहे व त्यांतील सर्व दगड पक्का आहे. तीनही बोगद्यांचा आकार सारखाच ठेवण्यांत आला असून त्यांतून जी. आय. पी. च्या दोन गाड्या एकाच वेळीं शेजार—शेजारच्या रुळांवरून जाऊं शकतात. बोग-

यांतलि खोदकाम सुरुंगानें झालें. सुरुंगाकरितां घ्यावयाचीं भोकें मजुरांनीं पहारांनीं पाडलेलीं नसून हवेनें फिरणाऱ्या यंत्राकडून पाडण्यांत आलीं. सुरुंगास जेलिग्नाईट या जातीची दारू वापरलेली होती. कारण या दारूनें दगड कितीहि कठीण असला तरी तो फुटतो. तीन नव्या बोगद्यांची खोदाई ४० लक्ष घन फूट झाली व बाहेरील खोदकाम ५० लक्ष घन फुटांपर्यंत गेलें. सर्व रस्ता डोंगरांतून असल्यामुळें त्याच्या आजूबाजूस मोठमोठे कडे कोसळलेले आहेत. त्यांचा उपसर्ग रस्त्यास न व्हावा यासाठीं शंभर शंभर फूट रुंद असे ओटे घालण्यांत आले आहेत. या नव्या रस्त्यावर दोन मोठे पूल आहेत. त्यांपैकीं एक ४५ फूट उंच असून यांतील बांधकाम एक लक्ष घनफूट आहे.

### दातार ब्रदर्स

हिंदुस्थानांत बोगद्याचीं कामें फार थोडीं आहेत व तीं कामें वरचेवर होणारहि नसतात. आजपर्यंत हीं सर्व कामें युरोपियन कंपन्यांनींच केलीं. यामुळें त्या बाबतींत येणाऱ्या अनुभवाचा फायदा युरोपियनांनाच मिळाला. नवीन शिल्पकलेंत हिंदी लोकांचा प्रवेश आतां कोठें होऊं लागला आहे. युरोपियन कंपन्यांप्रमाणें हिंदी कंपन्याहि आगगाड्यांचे रस्ते व मोठाले पूल यांसारखीं कामें हातीं घेत असून महाराष्ट्रांतील दातार ब्रदर्स व रानडे ब्रदर्स इत्यादिकांनीं या बाबतींत बरीच आघाडी मारली आहे. बोगद्यासारखें काम क्वचित् होणारें असल्यामुळें त्याचा अनुभव कोणाहि हिंदी कंपनीस नव्हता. तो अनुभव आपणास लाभावा व तसलेंहि काम हिंदी कंपन्यांना उत्तम प्रकारें शेवटास नेतां येतें हें सिद्ध करतां यावें या महत्त्वाकांक्षेनें पुण्यांतील दातार ब्रदर्स यांनीं बोरघाटांतील नव्या कामाच्या एक-तृतीयांश भागाचा मक्ता घेतला व तें काम केवळ हिंदी इंजीनियराच्या मदतीनेंच पार पाडलें ही गोष्ट त्यांस भूषणावह होय यांत शंका नाहीं. बाकीचा दोन-तृतीयांश भाग टाटा कंपनीकडे होता. पण टाटा कंपनी ही खास स्वदेशी कंपनी नव्हे. तिचें सगळेंच भांडवल हिंदी आहे असे नाहीं व तिच्या कामावर देखरेख करणारे सगळे अधिकारी हिंदीच असतात असेंहि नाही. या दृष्टीनें दातार ब्रदर्स यांचें काम सर्वस्वी शुद्ध स्वदेशी असल्याकारणानें त्याचें महत्त्व वाचकांच्या लक्षांत येऊन हिंदी लोकांस ज्या ज्या क्षेत्रांत संधि मिळेल त्या प्रत्येक क्षेत्रांत ते युरोपियनाची बरोबरी करूं शकतात अशी त्यांची खात्री होईल.

# संस्थानिकांचें आत्मसमर्थन

नेहरू कमिटीच्या स्वराज्यघटनेला लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेकडून मंजुरी मिळाल्यावेळेपासून जशी नोकरशाहींत तशीच संस्थानिकांतहि खळबळ उडून राहिली आहे. सायमन कमिशनाच्या नेमणुकीपासूनच संस्थानिकांनीं स्वतःच्या हक्कासंबंधाची कायदेशीर फेरचौकशी व्हावी अशी मागणी केली होती व तिला अनुसरून बटलर कमिटीमार्फत ती चौकशी चालू आहे आणि त्या कमिटीपुढें संस्थानिकांची वकिली करण्याकरितां सर लेस्ली स्कॉट यांची संस्थानिकांनीं योजना केली आहे. त्या वकीलसाहेबांनीं संस्थानिकांचे तहनामे हिंदुस्थान-सरकाराशीं झाले नसून इंग्लंडाच्या राजघराण्याशीं झालेले आहेत; तस्मात् त्या तहनाम्यांची पूर्तता करण्याची जबाबदारी ब्रिटिश सरकारला दुसऱ्यावर सोंपवून देतां येत नाहीं, अशी वकिली शक्कल लढवून संपूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याच्या मार्गांत विघ्न उपस्थित करून ठेवलें आहे. संस्थानिकांचा हा आक्षेप 'मूले कुठारः' अशासारखा असल्यामुळें नेहरू कमिटीनें आपल्या रिपोर्टांत त्याचा खरपूस समाचार घेऊन लेस्ली स्कॉट यांचे हें म्हणणें ऐतिहासिक दृष्ट्या आणि प्रत्यक्ष चालू वहिवाटीवरूनहि टिकूं शकत नाहीं असें सिद्ध केलें आहे. आणि स्वराज्यप्राप्तीनंतरचें हिंदुस्थान-सरकार संस्थानिकांचे सर्व तहनामे व हक्कसंबंध पाळील व जो अधिकार आजमितीला हिंदुस्थान-सरकार चालवीत आहे तो हक्क, स्वराज्ययोजना अमलांत आल्यानंतर, नवें हिंदी सरकार चालवील आणि त्यांत वाद उपस्थित झाल्यास वादग्रस्त प्रश्न सुप्रीम कोर्टापुढें मांडण्यांत येईल असें नवीन योजनेचें स्वरूप दिग्दर्शित केलें आहे.

नेहरू कमिटीच्या या शिफारशीस अनुसरून लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेंत ठराव झाला. त्या ठरावानें व विशेषतः त्या ठरावावरील कित्येक भाषणांनीं संस्थानिकांच्या नाजूक नाकास मिरच्या झोंबल्याप्रमाणें झालें असून त्या भाषणांतील विधानास प्रत्युत्तर देण्याकरितां बिकानेरचे महाराज पुढें सरसावले आहेत. बटलर कमिटीपुढें साक्ष देण्याकरितां बिकानेरचे दिवाण सर मनुभाई मेथा हे विलायतेला निघाले. त्यांना निरोप देण्याकरितां जी बडी मेजवानी झाली त्या मेजवानीच्या वेळीं बिकानेरच्या महाराजांनीं बरेंच अघळपघळ भाषण करून लखनौ परिषदेंतील संस्थानिकांसंबंधाच्या ठरावावर आणि त्या ठरावावरील भाषणावर खरमरीत टीका केली आणि हिंदी संस्थानिक हे

ब्रिटिश इंडियाच्या स्वराज्यप्राप्तीच्या मार्गांत विघ्न उपस्थित करणारे ' अल्स्टरवाले ' नसून उलट १९१८ सालापासूनचें आपलें वर्तन स्वराज्यप्राप्तीला पोषक असेंच आहे असेंहि त्यांनीं निक्षून सांगितलें. बिकानेरचे महाराज म्हणतात तशीच वस्तुस्थिति असली तर ती आम्हास इष्टच असल्यानें तशीं खात्री पटतांच सगळाच वाद आपोआपच मिटेल. परंतु महाराज म्हणतात तसाच खरा प्रकार आहे का हा केवळ वकिली डावपेंच आहे याची शहानिशा करणें जरूर आहे.

बिकानेरच्या महाराजांची पहिली तक्रार अशी कीं, सर लेस्ली स्कॉटच्या ज्या पत्रावर तुमची सर्व अनुमानपरंपरा रचली गेली आहे त्या पत्रांतील योजना हीच कांहीं अखेरची पक्की योजना नव्हे. संपूर्ण योजनेंतला तो एक मधलाच अर्धवट व अर्धकच्चा भाग आहे तेवढ्यावरून संस्थानिकांच्या मनोगताविषयीं अनुमान बांधणें चुकीचें आहे. आपलें गुप्त खलबत आगाऊच प्रकट झालें असतां असलीच ठराविक तक्रार खलबत करणाऱ्यांकडून पुढें येत असते. पण त्या तक्रारीचें उत्तरहि ठरलेलेंच आहे. तुमचें जें काय कारस्थान चाललें आहे तें एकदांचें पडद्याबाहेर येऊं द्या आणि मग त्यांत स्वराज्यविरोधक असें कांहीं लफडें नसल्यास आम्ही आपले आक्षेप परत घेऊं;परंतु आपलें कारस्थान गोषांतील स्त्रीप्रमाणें सात पडद्यांच्या आंत लपवून ठेवावयाचें आणि तुमची माहितीबरोबर नाहीं म्हणून प्रतिपक्षावर आरोप करावयाचा हा कोठला शिष्टपणा ? बटलर कमिटीची चौकशी अशी गुप्त कां ? त्या कमिटीपुढें साक्षीपुरावा देण्याकरितां संस्थानी प्रजेस पाचारण कां केलें नाहीं ? बरें, तसें निमंत्रण नसून देखील प्रजापरिषदेच्या विद्यमानें एक शिष्टमंडळ बटलर कमिटीपुढें साक्ष देण्याकरितां विलायतेला जाणार आहे असें कळतांच प्रजापरिषदेनें असली आगंतुकी करूं नये, तिच्या शिष्टमंडळाची बटलर कमिटीपुढें साक्ष घेण्यांत येणार नाहीं, असें जे संस्थानिकांतर्फे प्रसिद्ध करण्यांत आलें ते कां ? प्रजापरिषदेच्या शिष्टमंडळाची या संस्थानिकांना अशी धास्ती कां वाटावी ? ज्याला कर नाहीं त्याला डर कां ? असो. संस्थानिकांनीं नको म्हटलें तरी आपल्या कर्तव्यास जागरूक राहाण्याकरितां प्रजापरिषदेचें शिष्टमंडळ विलायतेस जाणार आहे. या शिष्टमंडळाची बटलर कमिटीकडून आणि विशेषतः संस्थानिकांच्या वकिलांकडून जी संभावना होईल तीवरून संस्थानिकांचें खरें हृद्गत प्रकट होणार आहे. तेव्हां बिकानेरचे महाराज आश्वासन देतात त्याप्रमाणें खरोखरीच संस्थानिक वर्ग स्वराज्याच्या चळवळीला अनुकूल आहे का ही नुसती हुलकावणी आहे याचा निर्णय शिष्टमंडळाच्या तेथील स्वागताच्या प्रकारावर तहकूब ठेवण्यास आमची ना नाहीं.

बिकानेरच्या महाराजांची दुसरी तक्रार अगदींच बालिश व पोंचट आहे. पूर्वी एके काळीं हिंदुस्थानसरकारनें एखाद्या संस्थानिकाच्या हक्कावर गदाघात केल्यास हिंदी पुढारी संस्थानिकाच्या साहाय्यास धावून येत आणि ब्रिटिश सरकारावर तुटून पडत. असें असतां आतां सगळेच पुढारी व पत्रकार संस्थानिकांवर उलटले आहेत; हें असें कां, असा महाराजांचा सवाल आहे. त्यांस आम्ही एवढेंच सुचवितों कीं, याचा विचार संस्थानिकांनींच आपल्या मनाशीं करावा म्हणजे असा हा मनु कां पालटला त्याचें इंगित त्यांच्याच लक्षांत येईल. ज्या वेळीं ब्रिटिश हिंदुस्थानांत एकजात गोऱ्या नोकरशाहीचा अम्मल चालू होता आणि कार्यकारी मंडळांत तर काय पण कायदेमंडळांत देखील लोकनियुक्त प्रतिनिधींचा प्रवेश होऊं शकत नव्हता, अशा वेळीं म्हैसूर, त्रावणकोर इत्यादि संस्थानिकांनीं कायदेमंडळाची स्थापना केल्यास तें कौतुकास्पद कां वाटणार नाहीं? ज्या वेळीं व्हाइसरॉयांच्या कायदेमंडळांत ना. गोखल्यांचें सक्तीच्या शिक्षणाचें बिल फेटाळलें जात होतें त्याच वेळीं बडोद्यासारख्या संस्थानांत सक्तीच्या शिक्षणाची प्रगति होण्याकरितां फिरत्या मोफत वाचनालयासारखीं 'ज्ञानाचीं सदावर्तें' उघडलीं गेलीं असतां त्यांचें कौतुक कोण करणार नाहीं? ब्रिटिश हिंदुस्थानांत सभाबंदीचा कायदा आणि वर्तमानपत्रांची मुस्कटदाबी यांचा धूमधडाका चालू असतां "माझ्या संस्थानांत असंतोषाचें बींच रुजणें शक्य नसल्यानें मला असल्या दडपशाही कायद्याची जरूरी भासत नाहीं आणि तुम्हीहि आपल्या प्रजेंतला असंतोष दूर कराल तर तुम्हालाहि असले गळचेपीचे कायदे करण्याची गरज राहणार नाहीं" असलें निर्भीडपणाचें व ठणठणीत उत्तर लॉर्ड मिंटो यांना देणाऱ्या संस्थानिकांविषयीं कोणास आदर वाटणार नाहीं?

पण तो मनु बदलला. कोणत्या का कारणानें असेना, ब्रिटिश सरकारला हिंदुस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करणें हेंच आपलें ध्येय आहे असें जाहीर करणें भाग पडलें आणि तसा जाहीरनामा प्रसिद्ध होऊन त्याच्या बजावणीचा कसाबसा तरी उपक्रम चालू झाला. अशा वेळीं संस्थानी प्रजाजनांनीं देखील आमच्या संस्थानांतहि जबाबदार राज्यपद्धति सुरू व्हावी अशी मागणी केल्यास त्यांत वावगें काय आहे? परंतु असली मागणी पूर्ण करणें तर दूरच राहिलें, पण तशी मागणी करण्याकरितां प्रजापरिषद भरवितों असें म्हटल्यास परिषद भरविण्याला देखील ज्या संस्थानांत परवानगी मिळत

नाहीं, अथवा येन केन प्रकारेण "लोक-सभा" भरविली गेली असतां तेवढाच दंश धरून जेथें लोकपक्षीय पुढाऱ्यांवर अज्ञातवासाची पाळी आणण्यांत येते तेथें तसल्या मतभ्रष्ट संस्थानिकांबद्दल प्रजाजनांना चीड कां येणार नाहीं ? अखिल भारतीय संस्थानी प्रजापरिषदेनें एवढीच सर्वसामान्य मागणी केली आहे कीं, जसा बादशहांनीं १९१७ सालीं 'जबाबदार राज्यपद्धति स्थापणें हें आमचें ध्येय आहे' असा जाहिरनामा प्रसिद्ध केला तसाच जाहिरनामा प्रत्येक संस्थानिकानें आपल्या संस्थानांत प्रसिद्ध करावा आणि त्याची पहिली पायरी म्हणून लोकनियुक्त कायदेमंडळ स्थापन करावें. ही मागणी होण्यापूर्वीच ज्यांनीं ज्यांनीं असा उपक्रम केला आहे त्या संस्थानिकांविषयीं कोणासहि आदरच वाटेल आणि लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेत संस्थानिकांच्याविरुद्ध जी कडक टीका झाली ती अशा संस्थानिकांना लागू नाहीं हें उघड आहे. परंतु असले उदारमतवादी संस्थानिक कितीसे आहेत ? सातशें संस्थानांत अशा संस्थानिकांची गणना हाताच्या बोटांवर करण्याइतकीच अल्प असल्यास सामान्यतः संस्थानिकवर्ग स्वतःच्या संस्थानांत स्वराज्याचा ओनामा सुरू करण्यास देखील नाखुष आहे,आणि पर्यायानें ब्रिटिश हिंदुस्थानांतील स्वराज्याच्या अभिवृद्धीसहि तो प्रतिकूल आहे असें म्हटल्यास त्यांत वावगें ते काय झालें ? मेजवानीच्या टेबलाजवळ बसून, आम्ही संस्थानिक इतके उदारमतवादी आहों, असे सालस आहों, सदैव लोक-हितपरायण आहों असें म्हणून आपल्याच हातानें आपल्याभोवतीं दिवे ओवाळून घेण्यांत काय मोठेपणा आहे ? प्रजेची मुस्कटदाबी दूर करा, त्यांच्यावर कोणतेहि निर्बंध न लादतां त्यांना मतप्रदर्शन करण्यास मुभा द्या, आणि मग त्यांच्या तोंडून किती गाऱ्हाणीं बाहेर पडतात तीं पाहा. ज्या संस्थानिकाविरुद्ध प्रजाजनांकडून एकहि कागाळी ऐकूं येणार नाहीं त्या संस्थानिकास आम्ही खरोखरीच वंदनीय मानूं; पण असले रामराजे सातशें संस्थानिकांत कितीसे आढळतील ! संस्थानिकांची बहुसंख्या ज्या कोणत्या दर्जाची असेल त्यावरून त्या वर्गाबद्दल मत बनविलें जातें. आणि वक्त्यांच्या भाषणाचा ओघहि असल्या बहुसंख्य वर्गालाच उद्देशून असतो. अर्थातच लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेंतील वक्त्यांनीं संस्थानिकांची जाणूनबुजून खोटी नालस्ती केली हा दोषारोप निराधार होय. एवढेंच नव्हे तर कित्येक संस्थानिकांचे जे वेडेचार आम्ही ऐकले आहेत ते लक्षांत घेतां आम्ही उलट असें सिद्ध करून देऊं शकूं की लखनौ परिषदेंतील वक्त्यांनीं वापरलेली भाषा बरीच सौम्य स्वरूपाची होती.

बिकानेरच्या महाराजांचा यापुढचा आक्षेप अधिक भयंकर स्वरूपाचा पण तितकाच बेताल विपर्यस्त आहे. महाराज म्हणतात, 'आमच्या संस्थानांतील प्रजाजन सुविचारी, सालस, संतुष्ट अतएव राजनिष्ठ असे असतां, हे बाहेरचे टोळभैरव टीकाकार त्यांच्या मनांत भलभलते कुविचार भरवून देऊन त्यांना राजनिष्ठेपासून भ्रष्ट करूं पाहतात; त्यांचे हे आगलावे लेख व जळजळीत भाषणें आमच्या प्रजाजनांच्या कानावर न पडतील तर आमच्या प्रजेच्या सुखासमाधानाच्या व आनंदाचा कधींहि भंग होणार नाहीं !' संस्थानिक लोक असल्या सुखदायक स्वप्नसृष्टींतून निघून जितके लवकर जागृतावस्थेंत येतील तितकें चांगलें. कारण वस्तुस्थिति त्यांच्या कल्पनेच्या अगदीं उलट असलेली त्यांच्या अनुभवास येईल. ब्रिटिश हिंदुस्थानांतील लेखकांस व वक्त्यांस आपल्या प्रांतांतील जुलमाचे व दुःखाचे डोंगरच असह्य होण्याइतके तापदायक आहेत. त्यांना शेजाऱ्याचें दुःख उसनें घेऊन रडण्याची हौस फेडून घेण्याची गरजहि नाहीं व तितकी फुरसतहि नाहीं. पण समदुःखी पाहिला म्हणजे दुःखाला वाचा फुटते आणि संस्थानी प्रजाजनांपेक्षां ब्रिटिश हद्दींत लेखनस्वातंत्र्य जरासें अधिक असल्यामुळें संस्थानी प्रजेच्या गाऱ्हाण्यांचा पूर ब्रिटिश वृत्तपत्रांच्या द्वारें साहजिकच वाहूं लागतो. परंतु तेवढ्यावरून ब्रिटिश हद्दींतील पत्रें नसतीं गाऱ्हाणीं उकरून काढतात हें म्हणणें साफ खोटें आहे. उलट संस्थानी प्रजेची मात्र अशी तक्रार आहे कीं, काँग्रेसकडून संस्थानांतील जुलमाकडे जितकें लक्ष द्यावें तितकें दिलें जात नाहीं आणि तें खरेंहि आहे. 'घरचें झालें थोडें, व्याह्यानें धाडलें घोडें' असला प्रकार करून आपल्या विवंचनेंत हौसेनें कोण भर घालून घेईल? पण मुक्या संस्थानी प्रजेच्या दुःखाला वाचा फुटण्याला वाव नाहीं असें दिसून येते त्याच वेळीं ब्रिटिश वृत्तपत्रकार तें दुःख वेशीवर टांगण्याचें काम आपल्याकडे घेतात.बिकानेरच्या महाराजांस जर याचा अनुभवच पाहावयाचा असेल तर त्यांनीं निजामच्या हद्दींत प्रजापरिषद भरविण्याला परवानगी मिळवून देण्याकरितां आपली पुण्याई खर्च करावी. त्या संस्थानांत प्रजापरिषद भरूं लागल्यावर पुण्यास तिची बैठक भरणार नाहीं अशी आम्ही हमी घेतों. संस्थानिकांचा कांगावा खरा का संस्थानी प्रजेचें गाऱ्हाणें खरें याची ही कसोटीच आहे. व शक्य तर महाराजांनीं हें आव्हान स्वीकारून आपलें म्हणणें सिद्ध करून दाखवावें. आकंठ जेवून भरल्यापोटीं दुसऱ्याला फुकटचा उपदेश करणें सोपें आहे. परंतु त्या फुकट्या उपदेशानें संस्थानी प्रजेच्या पोटांत पेटलेली आग शांत होऊं शकत नाहीं.

संस्थानी प्रजेचीं गाऱ्हाणीं चवाठ्यावर येऊं नयेत म्हणून 'प्रिन्सेस प्रोटेक्शन बिला'सारख्या कायद्याचे निर्बंध निर्माण करण्याची गळ घालणाऱ्या संस्थानिकांचा साळसूदपणा जगजाहीरच आहे ! आपण प्रजेचा छळ करावयाचा, स्वतःच्या संस्थानांत वृत्तपत्रांना बंदी करावयाची, आणि बाहेरच्या पत्रांतून त्या छळाची परिस्फुटता होऊं नये म्हणूनहि कारवाई करावयाची ! हा प्रकार स्वतः निरपराध्याला फटके मारावयाचे आणि दुसरा त्याला मलमपट्टी लावूं लागला तर त्यालाहि प्रतिबंध करावयाचा अशासारखा अधमपणाचा आहे. संस्थानांतील छळवाद चवाठ्यावर आणणारीं वृत्तपत्रें आगलावीं नसून छळाच्या आगीनें भाजलेल्यास सहानुभूतीची मलमपट्टी लावणारीं असतात. त्यांची तेवढीहि कामगिरी ज्यांना पाहावत नसेल किंवा खपत नसेल त्यांची गणना 'ते के न जानीमहे' याच कोटींत करावयास नको काय ?

बिकानेरच्या महाराजांच्या इतर तक्रारी क्षुल्लक स्वरूपाच्या आहेत. संस्थानिकांचे मामुली हक्क व मानमरातब कायम राहतील अशी हमी नेहरू कमिटीच्या योजनेंत पर्यायानें नमूद आहे. ती 'फंडामेंटल राइटस' च्या यादींत सामील केली नाहीं याचें कारण एवढेंच कीं, संस्थानिक हे प्रजाजन नव्हत ! संस्थानिकांना जर प्रजाजनांच्या पंक्तींत बसण्यांत कमीपणा वाटत नसेल तर ही हमी 'फंडामेंटल राइटस' च्या यादींतहि नमूद करण्यास कोणाचीहि नाखुषी नाहीं! हिंदुस्थान-सरकारनें आधींच संस्थानिकांच्या हक्कांचें अतिक्रमण केलें आहे, तें अतिक्रमण तसेंच चालू ठेवणार काय, असाहि एक महाराजांचा सवाल आहे. त्याचें उत्तर हेंच कीं, तुमचे हक्क जे कांहीं असतील ते आतांच हिंदुस्थान—सरकाराशीं ठरवून घ्या. त्या सरकारनें मान्य केलेले हक्क पुढें चालू राहतील एवढें आम्ही सांगूं शकू. त्यांतूनहि वाद उपस्थित झाल्यास निर्णय देण्याचा सुप्रीम कोर्टाला अधिकार ठेवलेलाच आहे.

संस्थानिकांच्या योजनेंत व्हाइसरॉयांना सल्ला देण्याला एक कौन्सिल आणि कायदेमंडळांशीं सहकारिता करण्याला एक यूनियन कौन्सिल अशा दोन नव्या संस्था असाव्यात अशी मागणी आहे. या मागण्या नेहरू कमिटीच्या योजनेला विरोधक नसल्यास त्यांना कोणीहि हरकत घेऊं इच्छिणार नाहीं. परंतु ज्या मागण्या आक्षेपार्ह नाहींत तेवढ्याच मागण्यांचा आपल्या भाषणांत उल्लेख करून आक्षेपार्ह असलेला खरा भाग बिकानेरचे महाराज लपवूं पाहात आहेत. हिंदी लोकांच्या स्वराज्याच्या योजनेला संस्थानिकांचा पाठिंबा आहे का विरोध आहे हें पाहण्याची कसोटी एकच आहे, व तिचा महाराजांच्या या लांबलचक भाषणांत उल्लेख देखील नाहीं. ब्रिटिश सरकारनें संस्थानिकांच्या अंतर्बाह्य संरक्षणाची जबाबदारी आपणाकडे घेतली आहे व ती पार पाडण्याचें काम हिंदुस्थान—सरकार करीत असतें. स्वराज्याच्या योजनेप्रमाणें हल्लींच्या हिंदुस्थानसरकारचे अधिकार भावी हिंदी पार्लमेंटाकडे येणार. हे हक्क या पार्लमेंटाकडे आले तरी चालतील असें संस्थानिक म्हणणार का ब्रिटिश सरकाराशिवाय आम्ही इतर अधिकारी जाणत नाहीं असें संस्थानिक म्हणणार ? या प्रश्नाचें जें उत्तर येईल त्यावरून संस्थानिक स्वराज्याला अनुकूल आहेत कां प्रतिकूल आहेत तें निश्चित होणार आहे. परंतु असला मुद्द्याचा प्रश्न तेवढा नेमका वगळून महाराजांनीं आपलें एरंडाचें गुऱ्हाळ उगाच लांबविलें आहे. पण असल्या भुलथापांनीं आतां कोणीहि फसणार नाहीं. संस्थानिकांचें समर्थन करण्याकरितां त्यांनीं जी वकिली केली आहे ती अगदींच पोंचट आहे. आणि त्यांत जो मुख्य भरीव भाग असावयास पाहिजे तो त्यांनीं मुद्दामच टाळला आहे त्या मुद्द्याच्या प्रश्नाचें संस्थानिकांकडून जें उत्तर येईल त्यावरूनच संस्थानिक हे 'अल्स्टरवाले' होऊं पाहतात का स्वराज्याचे साहाय्यकर्ते होतात तें ठरेल. यास्तव शक्य तर महाराजांनीं त्या प्रश्नाचा खुलासा करावा.

# बहिष्काराच्या यशाचें रहस्य

सर जॉन सायमन व त्यांचे सहा सहकारी ता. २७ सप्टेंबर रोजी मालोजा बोटीनें हिंदुस्थानांत यावयास निघाले. कमिशनाचा खर्च परभारेंच भागणार असल्यामुळें कमिशनामधील बहुतेक सभासदांनीं आपल्याबरोबर बायकामुलेंहि घेतलीं आहेत. सायमन कंपनीचे एखाद्या नाटक कंपनीप्रमाणें मुक्कामहि लागले असून मुंबईस पाय टेकल्यावर मुंबईच्या लगत्यास मुंबईच्या खालोखाल पुणें हेंच राजधानीच्या दृष्टीनें सोयीस्कर शहर असून तेथें सायमन कंपनी आपला प्रयोग पंधरा दिवसपर्यंत चालू ठेवणार आहे. या प्रयोगांत मुंबईकायदेकौन्सिलानें नेमलेली प्रांतिक कमिटी आणि अर्धी कौन्सिल ऑफ स्टेटनें निवडलेली व अर्धी हिंदुस्थानसरकारनें नेमलेली मध्यवर्ती कमिटी येऊन मिळणार असल्यामुळें सायमन कंपनीच्या नाट्यप्रयोगास बराच रंग चढेल असा सायमनसाहेब आणि त्यांचे साहाय्यक, हितचिंतक व आश्रयदाते यांचा कयास आहे. पण तो कितपत खरा ठरेल हें प्रयोगानंतर समजून येणार हें उघड आहे.

सायमनसाहेब आपल्या प्रयोगाचा रागरंग कसा काय जमतो व तो जमत नसल्यास कसा जमविला पाहिजे याची टेहळणी करून मागील खेपेस हिंदुस्थानातून परत गेले. ते आले तेव्हां बहिष्काराची पहिली सलामी त्यांस मुंबईसच झडली. आणि मुंबईहून आपल्या साथीदारांनिशीं हिंदुस्थानात जेथें जेथें म्हणून ते फिरले त्या प्रत्येक ठिकाणीं बहिष्काराचें पिशाच्च भय दाखवीत त्यांचेबरोबर फिरलें. बहुधा सर्व इंग्रज मुत्सद्यांस राजकारणांतील जादुगारी व नजरबंदी यांचे प्रयोग चांगले अवगत असतात. तशांत सर सायमन इंग्लंडांतील पहिल्या प्रतीचे वकील असल्यामुळें मुत्सद्दीपणास वकिली डावपेंचांची जोड मिळून जादुगारी व नजरबंदी या विद्येंतहि त्यांचा हातखंडा असल्यास नवल काय? बहिष्काराच्या पिशाच्चाला कशी गति द्यावी याचें चिंतन सायमनसाहेब हिंदुस्थानांत असतां चालूच होतें. कमिशनाची नेमणूक जाहीर करतांना पार्लमेंटानें जी शब्दयोजना केली होती तिजवर सायमनसाहेबांनीं आपली मल्लिनाथी लढवून सायमन कमिशन व त्यास मदत करण्यासाठी हिंदुस्थानात निवडावयाच्या कमिट्या यांच्या अधिकारांत व दर्जांत फरक नाहीं असे हिंदी जनतेस भासविण्याच्या उद्देशानें त्यांनीं शब्दांचे अनेक लपंडाव करून पाहिले. पण त्यायोगानें कौन्सिल ऑफ स्टेटखेरीज इतर कायदेमंडळें न फसल्यामुळें सायमनसाहेबांची मति कुंठित होऊन त्यांस थिजलेल्या मनानें विलायतेस परत जावें लागलें.

सर सायमन विलायतेस खट्टू होऊन परत गेले तरी हिंदुस्थानांतील लोकमत आपल्या बाजूला वळविण्याचा प्रयत्न त्यांनीं सोडला नाहीं. हिंदुस्थानांतील लोकमत दोन प्रकारचें. एक ठिकठिकाणच्या कायदेमंडळांतून निवडून आलेल्या लोकप्रतिनिधींचें व दुसरें राष्ट्रीय सभा, मुस्लीम लीग, लिबरल कॉन्फरन्स, हिंदुमहासभा, ब्राह्मणेतर परिषद आदिकरून खास जनतेच्या राजकीय सामाजिक व धार्मिक संस्थांचें. पण यांपैकीं बहुतेक संस्थांतून गेल्या डिसेंबर महिन्यांतच कमिशनाविषयीं लोकमत प्रकट झालें असल्यामुळे सायमनसाहेबांस त्या दिशेनें नवा उद्योग करण्यास जागा दिसत नव्हती. त्यांस यापुढें कायदेमंडळावरच मोहनी टाकावयाची होती. आणि तशी मोहनी टाकण्यास पंजाब प्रांत त्यांस फार अनुकूल आढळला. आधीं पंजाबांत हिंदू–मुसलमानांतील बेवनाव बराच विकोपास गेलेला व त्याच प्रांतांत मुस्लीम लीगच्या एका शकलाची गेल्या डिसेंबर महिन्यांत बैठक भरून पंजाबी मुसलमानांचा सायमन कमिशनाकडे असलेला ओढा नजरेस पडलेला. त्याच सुमारास सर माल्कम हेलेसारखे भेदनीतिविशारद गव्हर्नर पंजाब प्रांतावर आपला अंमल गाजवीत बसलेले. त्यांनीं हिंदू–मुसलमानांच्या द्वेषाग्नीवर कढविलेलें हें लोणकढें तूप सायमनसाहेबांच्या पोळीवर खुबीखुबीनें ओतण्याचें योजिलें. त्यांनीं प्रथम पंजाब कौन्सिलाकडून मदतगार कमिटी नेमून घेतली व मागाहून सदर कमिटीस अधिकाराविषयीं सायमनसाहेबावर भांडावयास सांगितलें. अशा रीतीनें सिद्धपणा हेलेसाहेबांनीं केला व साधकपणासाठीं सायमनसाहेब पुढें सरसावले. त्यांनीं पंजाब कमिटीच्या मागण्यांस मान डोलविली. सर सायमन हिंदुस्थानांत असतां त्यांनीं केलेल्या मखलाशींत कांहीं साक्षीपुरावा हिंदी कमिट्यांना वगळून आपणास घ्यावा लागेल असा एक हातचा ठेवला होता. तोहि हातचा सायमनसाहेबांनीं पंजाब कमिटीबरोबर झालेल्या वाटाघाटींत सोडला. यामुळे येथील नोकरशाहीला कौन्सिलाच्या कमिट्या नेमून घेण्यासाठीं अनेक खटपटी करण्यास हुरूप चढला

ज्ञातिनिष्ठेला गोंजारून व स्वार्थपरायणतेस आर्थिक आमिषें दाखवून गेल्या तीनचार महिन्यांत हिंदुस्थानांतील नऊ प्रांतिक कौन्सिलांपैकीं आठ कौन्सिलांतून सरकारची कमिट्या नेमून घेण्याची कारवाई यशस्वी झाली. कौन्सिलांच्या स्वरूपाकडे व सहकारितेच्या बाजूला पडलेल्या मतांकडे दृष्टि टाकली तर कौन्सिलाच्या या कमिट्यांचा खरा अर्थ सहज कळून येईल. प्रत्येक ठिकाणीं सरकारी व सरकार-

नियुक्त सभासदांच्या मताच्या जोरावरच या कमिट्या निवडल्या गेल्या आहेत. केवळ लोकनियुक्त सभासदांच्या मतसंख्येवर कमिट्यांची उभारणी अवलंबून असती तर इतक्या कामिट्या नेमल्या जाणें अशक्य होतें. आणि प्रांतिक कामिट्या नेमल्या गेल्या तरी असेंब्लीचा बहिष्कार सरकारला मोडतां न आल्यामुळें हें सर्व सहकारितेचें सोंगहि लुलें पडलें आहे.

कौन्सिल ऑफ स्टेट हा सरकारचा हुकमी पत्ताच होता. सदर कौन्सिलांत कमिशनाबरोबर सख्य जोडण्याचा ठराव सर्वांच्या आधी पास झाला असल्यास त्यांत नवल कसलें ? पण नुसत्या स्टेट कौन्सिलाला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. कौन्सिल ऑफ स्टेट हें अर्धांग असून त्याचा मिलाफ ले. असेंब्लीबरोबर झाल्यावांचून त्यास पूर्णता येत नाहीं. सायमनसाहब हिंदुस्थानांत उतरण्यापूर्वी हें शरीर खडें राहून त्याच्याशीं हस्तांदोलन करण्यासाठी सज्ज व्हावयास पाहिजे होतें. सर सायमन यांच्या जादूटोण्यास एवढें यश संपादन करतां आलें असतें तर त्यांत हिंदुस्थानाची मोठीच नामुष्की होती. पण सर सायमन यांचा मंत्र असेंब्लीवर चालेना. व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन यांचाहि डाव असेंब्ली आपल्यावर चालू देईना. असेंब्लीचे खबरदार अध्यक्ष ना. पटेल यांजवर मध्यंतरीं नोकरशाहीनें व इंग्रजांच्या इंग्रजी पत्रांनीं जें काहूर उठविले तें आयर्विन साहेबांच्या दबकावणीस पटेलसाहेब दाद देईनात म्हणूनच नव्हे काय ?

पण असेंब्ली हट्ट धरून बसली तरी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांस मारूनमुटकून मध्यवर्ती कमिटीचें सोंग सजविल्यावांचून गत्यंतर नव्हतें. कौन्सिल ऑफ स्टेटने आपल्यातर्फे मध्यवर्ती कमिटीसाठीं सर शंकरन् नायर, सर आर्थर फ्रूम व राजा नबाब अलीखान यांची निवड केली. तिला जोड देण्याकरितां आयर्विनसाहेबांनीं आपल्या कर्तुमकर्तुं शक्तीनें ले. असेंब्लीच्या मांडीवर सहा सभासदांची अर्धी कमिटी दत्तक बसविली. सदर कमिटींत सरदार शिवदेवासिंग उबेराय, नबाब झुल फर अलीखान, सर हरिसिंग गौर, डॉ. सुऱ्हावर्दी, किकाभाई प्रेमचंद व रावबहादुर एस. सी. राजा असे सहा सभासद आहेत. स्टेट कौन्सिलानें निवडलेले सभासद व व्हाइसरॉय यांनीं नेमलेले सभासद यांची बेरीज नऊ होते. प्रांतिक कमिट्यांतून सात सात सभासदच निवडलेले असतां मध्यवर्ती कमिटीचे सभासद नऊ कां अशी शंका कोणासहि येण्यासारखी आहे. हिंदुस्थानांत एकंदर प्रांत नऊ आहेत. त्यांपैकीं प्रत्येक प्रांताचा एक या हिस्सेरशीनें सभासदांची नेमणूक करण्यांत आली म्हणावें तर तेंहि जुळत नाहीं. त्याऐवजीं धर्म व जात यांचें तत्त्व मात्र नेमणुकीस लागू केलेलें दृष्टीस पडतें. कारण सदरील नऊ सभासदांत चार हिंदु आहेत, तीन मुसलमान आहेत, एक युरोपियनांच्या वतीचा आहे व एक शीखांच्या बाजूचा आहे. सायमन कमिशनामध्यें हिंदी लोकांतर्फेचे सभासद कां घेतल नाहींत या प्रश्नास भारतमंत्री लॉर्ड बर्कनेहेड यांनीं त्या वेळीं चढेलपणानें दिलेलें उत्तर पुष्कळांस अद्यापिहि आठवत असेल. लॉर्डसाहेब म्हणाले होते कीं, कमिशनांत अशी प्रत्येक जातीची वर्णी आम्ही लावीत बसलों तर सभासदांची भली थोरली पंगतच थाटावी लागेल ! लॉर्ड बर्कनेहेड यांच्या या दीर्घशंकेचें लॉर्ड आयर्विन यांनीं आतां परभारें समाधान केलें हें एका अर्थी ठीकच झाले. आयर्विनसाहेबांस मध्यवर्ती कमिटीची नेमणूक करतांना जी तोड सुचली ती ब्रिटिश मंत्रिमंडळास कमिशनच्या नेमणुकीचे वेळीं सुचली नसती असें नाहीं. परंतु हिंदी लोकमतास तुच्छ लेखण्याच्या घमेंडींत कॉन्सर्व्हेटिव्ह मंत्रिमंडळानें आपल्या डोक्यास इतका शीण द्यावा कशाला ?

व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं मध्यवर्ती कमिटीचें असलें सोंग उभें केलें व त्यांत केलेल्या नेमणुकीच्या सभासदांत असेंब्लीचे पांच सभासद आहेत हें खरें. तथापि त्यांची निवडणूक असेंब्लीनें केली नसल्यामुळें स्टेट कौन्सिलच्या अर्ध्या सजीव अंगास अर्ध्या लांकडी अवयवांचें चिकटविलेले सांधे पाहून कोणासहि हंसूं लोटल्यावांचून राहाणार नाहीं! असली मध्यवर्ती कमिटी सायमन कमिशनाचें स्वागत करण्यास पुणें शहरीं सरसावणार व तिजबरोबर करावयाच्या हस्तांदोलनासाठीं आपला लांकडी हात पुढें करणार ! सायमनसाहेबांस असली थोटी व लुली कामटी काय मदत करणार हें दिसतच आहे. तिच्यापासून कमिशनाच्या सभा- ांस त्यांच्या गांवगन्नाच्या प्रवासांत खुषमस्कऱ्या प्रमाणें करमणूक मात्र चांगली होईल यांत शंका नाहीं. कारण कमिटींतल्या सभासदांपैकीं सर शंकरन् नायर हेच काय ते नांव घेण्याजोगे इभ्रतदार गृहस्थ असून त्यांचा वचक सायमन कमिशनास वाटेल तेवढाच. सर आर्थर फ्रूम हे स्वतः युरोपियन असल्यामुळें तें कमिशनाच्या पचनीं केव्हांच पडल्यासारखे आहेत. सर हरिसिंग गौर यांचा भरंवसा कोणासच देतां येणार नाहीं. आणि या तिघांखेरीज उरलेले सहा सभासद आपआपल्या जातीच्या किंवा वर्गाच्या हितापलीकडे बहुधा पाहणार नाहींत.

कमिशनाचा हिंदुस्थानांतील सरंजाम या प्रकारचा जमविण्यांत आला आहे. त्यानें सायमनसाहेबांचें स्वतःचें खरें समाधान किती झालें असेल याविषयीं शंकाच आहे. तरी त्यांनीं येथील व्‌विला-

यतेंतील तयारीचें लॉर्ड रेडिंग यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांस ता. २५ सप्टेंबर रोजीं आल्डविच क्लबानें दिलेल्या मेजवानीचे प्रसंगीं रसभरित वर्णन केलें. नेहरू कमिटीनें आपला रिपोर्ट कमिशनाकडे पाठविला नसतांहि कमिशनानें तो तारेनें मागवून बारकाईनें वाचून पाहिला व त्याचें आपल्या ठिकाणीं कौतुकहि केलें असेंहि सायमनसाहेब जगास सांगत आहेत. हिंदी लोकांस स्वातंत्र्याच्या व जबाबदार राज्यपद्धतीच्या कल्पना इंग्रजांनींच शिकविल्या असल्यामुळें इंग्रजी सत्तेखालींच हिंदुस्थानास स्वातंत्र्य देण्याचें महत्त्व इंग्रज मुत्सद्यांनीं ओळखलें पाहिजे या मुद्दयावर आपल्या भाषणाच्या अखेरीस सायमन यांनीं बराच जोर दिला आहे. पण आजपर्यंतच्या इंग्रज मुत्सद्यांनी व राज्यकर्त्यांनीं त्यांचा पोषाकी उच्चार करण्यापलीकडे कृतीची मजल नेली नसल्यामुळें त्यांच्या उद्गारांतील खरेपणावर कोणाचाहि विश्वास बसणार नाहीं हें उघड आहे. हिंदुस्थानांतून कमिशनाकडे अर्जांचीं भेंडोळीं पांचशेंपर्यंत आलीं असल्याचें सायमनसाहेब सांगतात. पण नेहरू कमिटीनें आपला रिपोर्ट त्यांजकडे पाठविला नाहीं यामुळें सायमन कष्टी झाले असून तो एक रिपोर्ट त्या अर्जांच्या राशींत न सांपडल्यानें अर्जांची ती रास त्यांनीं मनांतून रद्दीच्या ढिगाप्रमाणें तुच्छ लेखावी हें साहजिक होय.

पण सर सायमन यांजपेक्षांहि लॉर्ड रेडिंग यांच्या मनास हिंदी सुशिक्षित वर्गाचा बहिष्कार अधिक झोंबला. पांचशें अर्ज व आठ—नऊ कमिट्या यांच्या लाटा सभोंवतीं कितीहि उसळल्या तरी असा एक वर्ग सायमन साहेबांच्या जादूटोण्यानें नजरबंदी न होतां एकजुटीनें कमिशनापासून अलिप्त राहिला आहे कीं त्यानें रेडिंगसाहेबांसहि अस्वस्थ करून सोडलें आहे. या वर्गांत हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्ष एकवटले आहेत. त्यांत काँग्रेस पक्ष आहे, लिबरलपक्ष आहे, हिंदुमहासभा आहे व मुस्लीम लीगहि आहे. काँग्रेस पक्ष रेडिंगसाहेबांच्या दृष्टीनें कानफाट्या पक्ष होय. त्यानें असहकारितेच्या चळवळींत नोकरशाहीशीं जें वैर धरलें तें अद्यापि कायम आहे व तें वैर लॉर्ड रेडिंग यांच्या अंगवळणीं पडल्यामुळें त्याचा रेडिंगसाहेबांस तसा विषादहि वाटत नाहीं. त्यांना खेद होतो तो लिबरल पक्षाबद्दल. लिबरल पक्षांतील मवाळ व नोकरशाही यांचा पूर्वापार नाजूक संबंध आहे. येवढी थोरली असहकारितेची चळवळ होऊन गेली, पण तिच्यांतहि मवाळांचा लिबरल पक्ष स्वजनांच्या तोंडून देशद्रोहीपणाचे शिव्याशाप खाऊनहि सरकाराशीं इमानानें राहिला! तो पक्ष कमिशनाचे बाबतींत सरकारावर रुसून काँग्रेस पक्षास सामील झाल्यानें असहकारितेच्या चळवळीपेक्षांहि सायमन कमिशनावरील बहिष्काराची तीव्रता सरकारास व रेडिंगसाहेबांस अधिक जाणवली आहे.

सायमन कमिशनामध्यें कोणाहि हिंदी माणसास न नेमून ब्रिटिश सरकारानें हिंदी लोकांच्या स्वाभिमानास लाथाडलें असल्यामुळें लिबरल पक्षानें कमिशनाबरोबर अबोला धरला. आणि ज्यांस स्वातंत्र्याची चाड नाहीं, स्वराज्याची आस्था नाहीं, राष्ट्रीय कल्याणाची फिकीर नाहीं व स्वाभिमानाची पर्वा नाहीं आणि जे स्वार्थानें, स्वजातिपरायणतेनें व मोहानें अंध झाले आहेत अशा लोकांनीं पांचशें नव्हे तर पांच लाख अर्ज कमिशनाकडे पाठविले तरी त्याची सर सायमन व लॉर्ड रेडिंग यांस जगांतील इतर राष्ट्रापुढें पोकळ फुशारकी मारण्यापलीकडे अधिक किंमत ती काय? आणि म्हणूनच रेडिंगसाहेबांनीं बहिष्कारवादी पक्ष फार महत्त्वाचा आहे अशी कबुली प्रांजलपणानें दिली आहे. सायमन कमिशनावर राष्ट्रानें टाकलेल्या बहिष्काराच्या यशाचें रहस्य याच कबुलींत असून देशांतील सर्व प्रमुख राजकीय पक्षाचे पुढारी जोंपर्यंत बहिष्कारवादी आहेत तोंपर्यंत बहिष्कार यशस्वी झाला असेंच विचारी जग म्हणत राहील. बहिष्काराच्या चळवळीचें हें रहस्य लक्षांत घेऊन ज्यांस स्वाभिमानाची, स्वातंत्र्याची व राष्ट्रहिताची चाड आहे त्या सर्व संस्था व व्यक्ती यांनीं कमिशन पुढील महिन्यांत पुण्यास आल्यावर त्याजवरील बहिष्कार कडकडीतपणानें पाळावा व कमिशनास प्रतिस्पर्धी अशा सर्वपक्षीय परिषदेच्या योजनेचा प्रसार करून तिचें महत्त्व प्रस्थापित करावें हेंच त्यांचें कर्तव्य होय.

# स्त्रियांचे हक्क व हिंदु कायदा

( लेखक—**गो. म. जोशी** )

## लेखांक १ ला

'माझें म्हणणें असें आहे कीं ज्या वस्तूबद्दल अगर स्थितीबद्दल तुम्ही बोलत असाल ती वस्तू अगर ती स्थिति यांचें प्रत्यक्ष मोजमाप घेऊन त्यांची मांडणी गणितागत पद्धतीनें जर तुम्हाला करतां येत असेल तर तुम्हाला त्या वस्तूचें किंवा त्या स्थितीचें सत्य ज्ञान झालें आहे असें समजावें. परंतु जर तुम्हाला तसें गणितागत मोजमाप देतां येत नसेल तर तुमचें ज्ञान आभासिक आहे. ती ज्ञानाची सुरवात असेल, तुमचा त्या बाबतींत थोडासा विचारही झाला असेल परंतु तुमचें असलें हें ज्ञान शास्त्रीय कसोटीवर कधींहि टिकणार नाहीं.' रेमंड पर्ल—सुप्रजाशास्त्रीय शोधाच्या पद्धती पान ५१.

गेलीं शंभर वर्षें हिंदु समाजाची बिघडलेली घडी बसविण्याचे आटोकाट प्रयत्न चाललेले असल्याकारणानें पुरुषांचे हक्क, स्त्रियांचे हक्क, ब्राह्मणाचे हक्क, ब्राह्मणेतरांचे हक्क, अस्पृश्यांचे हक्क, स्पृश्यांचे हक्क, वेश्यांचे हक्क, देवदासींचे हक्क, पाळीव जनावरांचे हक्क, ( ह्यूमॅनिटेरियन लीग ) वगैरे अनेक वेगवेगळ्या हक्कांची विवंचना चाललेली दिसून येईल. ही जोंपर्यंत विवंचना होती तोंपर्यंत यांत लक्ष घालण्याचें कांहीच कारण नव्हतें. कारण त्यामध्यें अस्थिर वृत्तीच्या कित्येक व्यक्तींना गुंतवून ठेवणें हा फायदाच होत असे. परंतु मानसशास्त्राच्या ' मनसा निश्चये कृत्वा ततो वाचाऽभिधीयते क्रियते कर्मणा पश्चात्'—महाभारत या नियमानुसार आतां विवंचनेंतून निघून हे हक्क प्रत्यक्ष आकार धरूं इच्छित आहेत व त्याकरितां कायदेमंडळापुढें बिलेंहि येऊं लागलींच आहेत. उदाहरणार्थ डॉ. हरिसिंग गौर यांचें संकरविवाहाचें बिल व हरविलास सारदा यांचें संमतिवयाचें बिल हीं पाहावीं त्याप्रमाणें हल्लींचे स्त्रीविषयक कायदे मूर्खपणाचे अनैसर्गिक, बुद्धीला न पटण्यासारखे आणि अत्यंत एकांगी आहेत असें सांगितलें जाऊं लागलें आहे. कारण कीं, त्या कायद्यांनीं स्त्रियांच्या हक्कांची पायमल्ली होते. अशा तऱ्हेनें स्त्रियांच्या ज्या हक्काची पायमल्ली होते त्यांची एक यादी देऊन मुंबईचे एक विद्वान बॅरिस्टर म्हणतात, या प्रश्नांना बुद्धीला पटण्यासारखें उत्तर देणें शक्य नाहीं. त्यांना एक असा प्रश्न विचारणें जरूर आहे कीं पटण्यासारखें या आपल्या शब्दाचा नक्की अर्थ काय?' पटण्यासारखें ' म्हणजे सृष्टिशास्त्राला धरून उत्पन्न झालेल्या समाजशास्त्राला पटण्यासारखें असा अर्थ असेल तर त्याचें उत्तर देणें कांहीं फारसें कठीण नाहीं. अर्थात् तें उत्तर कायद्याच्या पुस्तकांत सांपडणें शक्य नाहीं. आणि ' पटण्यासारखें ' म्हणजे त्यांच्या मनांतील कल्पनांना पटण्यासारखें असा अर्थ असेल तर त्यांना एवढेंच उत्तर आहे कीं सृष्टीनें आपलें मोजमाप तुमच्या मनांतील कल्पना हें ठेवलें नसल्याकारणानें तुमचा हा अर्थ प्रस्तुत वादांत गैरलागू आहे.

### शास्त्रीय चर्चा

असो. आपणाला या विषयाची शास्त्रीय चर्चा करावयाची असल्याकारणानें समाजशास्त्रदृष्ट्या हक्क व कायदा या चिजा काय आहेत याचे थोडेसे तात्त्विक विवेचन करणे अस्थानीं होईल असें वाटत नाहीं. हक्क व कायदा ही परिभाषा संघटित समाजांतच उत्पन्न होऊं शकते. समाजबाह्य स्थितींत हक्क नाहींत किंवा कायदाहि नाहीं. तेथें व्यक्तीला जे उपभोग घेणें इष्ट वाटेल ते सर्व हक्क व त्यांपैकीं जेवढे मनगटाच्या जोरावर घेणें शक्य आहे तितके घेणें हा कायदा. परंतु समाजरचना ही मानवी कौशल्याची परमावधि असल्याकारणानें समाजरचना करतांनाच ती सृष्टीला धरून असलेल्या कांहीं एका स्थिर तत्त्वावर करावी लागते. म्हणून कायद्याला जरूर लागणारी समाजरचना कोणत्या तत्त्वावर होत असते त्याचा थोडक्यांत विचार करूं. समाजरचना कोणत्या तत्त्वावर होत असतात, त्यांपैकीं कोणती समाजरचना संस्कृतीच्या अंतिम ध्येयाला पोषक आहे, संस्कृतीच्या अंतिम ध्येयाकडे समाज जात आहे किंवा नाहीं हें मोजण्याचें गणितागत मोजमाप कोणतें या गोष्टी ठरविल्यानंतर त्यांशीं विरुद्ध असा कोणताहि हक्क एका व्यक्तीला अगर अनेक व्यक्तींना असूं शकतो ही गोष्ट सांगण्यास सोपें पडेल.

प्रथमतः समाजरचना कोणत्या तत्त्वावर होत असते त्याचा विचार करूं. समाजरचना करतांना

समाजाकडे पाहाण्याच्या दोन दृष्टी असतात. एक शास्त्रीय दृष्टि (सायन्टीफिक मेथड )व दुसरी सुखकारक दृष्टि (ह्यूमन मेथड).पहिल्या दृष्टीनें पाहाणारे मानवी पिंडापेक्षां लाखों पटींनीं सबल अशा सृष्टिनियमांचा विचार करून मानवी समाजाला हितकारक जे नियम ते व्यक्तींनें पाळलेच पाहिजेत असा हुकूम ( मँडेट ) करतात तर दुसऱ्या दृष्टीनें पाहाणारे सृष्टीनें केलेल्या असंख्य शक्तींच्या झगड्यांत आपलें हित ठरविण्याची व्यक्तीला पात्रता आहे असें गृहीत धरून बरें वागण्याची शिफारस ( रेकमेंडेशन ) करतात. त्यामुळें पहिल्या तत्त्वावर उभारलेले समाज नीतिप्रधान असतात. तर दुसरीने पद्धतिप्रधान (मॅनर्स )समाज उत्पन्न होतात. पहिली दृष्टि सृष्टीच्या स्थिर नियमावर अधिष्ठित असते. तर दुसऱ्या दृष्टीचें अधिष्ठान मानवी मनाच्या चंचल भावना हें असतें. त्यामुळें पहिल्या तऱ्हेनें उभारलेले समाज स्थिर सात्विक व सनातन अशा संस्कृती उत्पन्न करतात तर दुसऱ्या दृष्टीनें उभारलेले समाज चर, राजस, तात्कालिक सुखोत्पादक परंतु परिणामीं विनाशी अशा संस्कृती उत्पन्न करतात ( हिबर्ट जर्नलचे फार दिवस असलेले एडिटर प्रो. एल. पी. जॅक्स यांचें ‘ड्रिफ्टिंग सिव्हिलिझेशन’ एडवर्ड कार्पेंटर यांचें सिव्हिलिझेशन ए डीसीझ वगैरे पाहा). त्यामुळें दुसऱ्या तऱ्हेनें उभारल्या गेलेल्या समाजाबद्दल संस्कृतीचे उदयास्त अशी भाषा वापरावी लागते ( सर फ्लाइंडर्स पेट्री यांचें रेव्हाल्यूशन्स ऑफ सिव्हिलिझेशन्स). पहिल्या तऱ्हेनें पाहिलें तर सृष्टिनियमांना प्राधान्य देऊन संघप्रधान ( टाइप्स ) संस्कृति उत्पन्न करावी लागते, तर दुसऱ्या दृष्टीनें पाहिलें तर प्राणिशास्त्र, मानसशास्त्र वगैरे सर्व शास्त्रांना अमान्य असलेली मानवी समता गृहीत धरून त्यावर व्यक्ति प्रधान समाजरचना होते.

ही सुधारणा आहे किंवा कसें हें सांगणं कठीण आहे. परंतु ती समाजरचना बाह्य व व्यक्तिप्रधान स्थिति आहे येवढें मात्र सहज सांगतां येईल. पहिली समाजरचना ही सृष्टीला धरून कौशल्यानें केलेली असल्यामुळें नाश पावत नाहीं, तर दुसरी ‘ श्रेष्ठाची निवड ’ व ‘ कनिष्ठाचा विनाश ’ या सृष्टीनियमाला धाब्यावर बसवीत असल्याकारणानें सृष्टि अर्थातच काल्पनिक समतेकडे दुर्लक्ष करून हा सर्व डोलारा उधळून लावते. मनाशिवाय शरीराकडून व्यावहारिक कर्में होऊं शकतात. परंतु शरीराशिवाय मन हें कांहींच नाहीं हें शास्त्रीय सत्य असल्यामुळें पहिल्या दृष्टीनें पाहाणारे लोक समाजाचें मोजमाप करतां येण्यासारखी जी क्रिया तिज संबंधीं नियम सांगतात तर दुसरी दृष्टि कोणत्याहि आजपर्यंत माहीत असलेल्या शास्त्रानें त्याचें मोजमाप करतां येत नाहीं अशा मनाचे नियम सांगूं इच्छिते.

## धर्म व संस्कृति रक्षण

पहिल्या दृष्टीने पाहाणाराला धर्म म्हणजे संस्कृतिरक्षण हें साध्य असून व्यक्ति ही साधनीभूत आहे. ( न जातु कामात् न भयात् न लोभात् धर्मं त्यजेत जीवितस्यापि हेतोः । धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये ( दुसऱ्या दृष्टीनें धर्म म्हणजे समाजरक्षण हें साधन असून व्यक्तीचें सुख हें साध्य आहे (जीवन् धर्ममवाप्नुयाम् ) त्यामुळें पहिल्या दृष्टीनें पाहाणारे ‘धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ’ अशी साध्यरूप व्याख्या करतात, तर दुसऱ्या दृष्टीनें पाहाणारे ‘ धर्मो विश्वस्य जगतः हेतुः’ अशी साधनरूप व्याख्या करतात. पहिल्या दृष्टीनें पाहाणारे सनातन धर्म हा श्रेष्ठ मानून तात्कालिक राजकारणाला गौण मानतात ‘ शास्त्रात् तु बलवान् धर्मशास्त्रमिति स्थितिः ’ तर दुसऱ्या दृष्टीने पाहाणारे तात्कालिक सुखाला लोलुप होऊन ‘ अर्थायत्तौ धर्मकामौ ’—कौटिलीय अर्थशास्त्र व असलीं बाष्कळ विधाने करतात.असो. अशा तऱ्हेनें समाजाकडे पाहाण्याच्या द्विविध दृष्टी असल्यामुळें मूलतःच समाजामध्यें द्वैविध्य उत्पन्न होत असतें.

त्यापैकीं हिंदुस्थानांतील आर्य ऋषींनीं पहिल्या दृष्टीनें विचार करून समाजरचना घडवन आणली. त्यांनीं सांगितलेले मानवविषयक सृष्टिनियम आजचे शास्त्रज्ञ पुनः कसें शोधून काढीत आहेत याची चर्चा आम्ही पूर्वी केलेली आहे व या लेखमालेंतहि थोडीशी करावी लागेल. ते नियम त्यांनीं मानवी प्राण्याला शक्य तितक्या कसोशीनें पाळले अशी साक्ष आज पाश्चात्य ग्रंथकार देत आहेत. मेरिआस्टोप्स आपल्या संततिनियमनावरील पुस्तकांत म्हणते, ‘ हिंदु ऋषींनीं आपलीं सामाजिक तत्त्वें अत्यंत कसोशीने पाळून त्यावर समाजरचना घडवून आणली ’ पान २६७. असो. हिंदु ऋषींनीं समाजरचना करतांना अशी दृष्टि लावली होती. ती बरोबर आहे किंवा नाहीं हें ठरवितांना संस्कृतीचें ध्येय काय असावें व त्याला पोषक अशी समाजरचना कोणती याचा विचार करावा लागतो.

अशा तऱ्हेची चर्चा जगांतील संस्कृतीच्या उदयास्ताचे नियमांची छाननी करून आम्ही आपल्या शिक्षणावरील निबंधांत केलेली आहे. त्याचें पुनः चर्वित चर्वण न करतां त्यांतील मुद्दे तेवढे येथें उद्धृत करूं. समाजांचे व संस्कृतीचें ध्येय हिंसाप्रिय सृष्टीमध्यें उत्क्रांतीच्या झगड्यांत चिरंजीव होऊन राहाणें हें आहे. संस्कृतीचे विनाश पिंडगत। प्रगति व सांस्कृतिक प्रगति यांचेमध्यें विषमता उत्पन्न झाली म्हणजे होत असतात. तसे विनाश होऊं नयेत असें वाटत असल्यास खालील नियम पाळावे लागतातः—

(१) एका बाजूला निवळ व्यक्ती व दुसऱ्या बाजूला निवळ समाज यांचेमध्यें रक्तानें फार दूरचे नव्हत (हायब्रिडिझम) व रक्तानें फार जवळचे नव्हेत (कॉनसांग्विनिटी) अशा एकरूप व एका ध्येयानें प्रेरित झालेल्या कुटुंबांचे गट करावे लागतात. यालाच आमच्याकडे जाति म्हणतात व युरोपियन समाजशास्त्रज्ञ 'एथ्निक टाईप्स' म्हणतात.

(२) या जाती यावच्छक्य बेटीबंदत्वाच्या तत्त्वावर उभाराव्या लागतात.

(३) जातींचें आर्थिक नियत कर्म समाज नेत्यांनीं त्या जातीची प्रगति पाहून ठरवावें लागतें.

(४) या जातींतून एकच एक व्यक्ती जर जात्यंतर करूं इच्छित असेल तर तसें जात्यंतर तिला करूं देणें हा समाजनाशाचा पायाच आहे.

हे सर्व नियम आम्ही पाश्चात्य शास्त्ररूप महो. दधीचें मंथन करून काढलेले आहेत. आतांपर्यंत समाजरचनेची दृष्टि कशी असते व ध्येयाच्या दृष्टीनें समाजरचना कशी असावी याचा विचार झाला. परंतु हें सर्व मोजण्याचें गणितागत साधन न दिल्यास हे सर्व फुकट असल्यामुळे समाजस्थितिमापनाचें गणितागत साधन पुढील लेखांत देऊं.

# प्रो. अभ्यंकरांचें विलायतेस प्रयाण

सांगलीचे सुप्रसिद्ध वकील व पुणें येथील लॉ कॉलेजाचे प्रोफेसर श्री. गणपतराव अभ्यंकर हे ता. २६ सप्टेंबर रोजीं इतालियन बोटीनें विलायतेस रवाना झाले. श्री. अभ्यंकर हे अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या ठरावाप्रमाणें नेमलेल्या शिष्टमंडळांतून विलायतेस जात असल्यामुळें त्यांच्या प्रयाणास साहजिकच सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालें व याच दृष्टीनें त्यांचा सांगली, मिरज, पुणें व मुंबई येथें सत्कार करण्यांत आला. प्रो. अभ्यंकर यांनीं गेलीं कित्येक वर्षे संस्थानांतील प्रजेची वकिली करून तिच्या आकांक्षा व दुःखें चव्हाट्यावर मांडण्याचें व्रत अखंड चालविल्यामुळें या प्रश्नासंबंधीं सर्वत्र पुष्कळच जागृति झाली आहे यांत शंका नाहीं; व या त्यांच्या कामगिरीचें महत्त्व संस्थानी प्रजेस व संस्थानी प्रजेविषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या खालसांतील हिंदी जनतेस किती वाटतें हें वरील समारंभांत उत्तम प्रकारें निदर्शनास आलें. सांगली येथें श्रीमंत सर आप्पासाहेब सांगलीकर यांनीं त्यांस थाटाची मेजवानी दिली. संस्थानिकांस श्री. अभ्यंकर यांची चळवळ न रुचावी यांत आश्चर्य नाहीं. तथापि त्यांची चळवळ करण्याची पद्धति संस्थानिकांस नापसंत नाहीं हें वरील मेजवानीवरून उघड झालें. श्रीमंत सांगलीकर यांनीं आपल्या भाषणांत संस्थानी प्रश्नाबद्दल आपला अभ्यंकर यांजबरोबर मतभेद असल्याचें सांगितलें. उलटपक्षीं अभ्यंकर यांनीं उत्तर देतांना सांगली संस्थानांत चळवळ करण्यास स्वातंत्र्य मिळतें याबद्दल श्रीमंतांचे आभार मानून सांगली संस्थानांत रयतसभा स्थापन होऊन वीस वर्षे झालीं तरी अद्यापि भोर, औंध या संस्थानांप्रमाणें कौन्सिलाचे हक्क सांगलीस मिळाले नाहींत याविषयीं विषाद दर्शविला.

सांगली संस्थान प्रजापरिषदेतर्फे सांगली येथें शनिवार ता. २२।९।२८ रोजीं सदासुख थिएटरांत सायंकाळीं प्रो. लिमये यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन प्रो. अभ्यंकर यांचें, बटलर कमिटीपुढें संस्थानी प्रजेची बाजू मांडण्याकरितां ते विलायतेत जात आहेत, त्याबद्दल, जाहीर अभिनंदन करण्यांत आलें. समारंभास गांवातील सर्व थोर थोर मंडळी व निरनिराळ्या तालुक्यांतील मंडळी जमली होती. त्याशिवाय साताऱ्याहून श्री. दादासाहेब करंदीकर, पुण्याहून श्री. नलावडे व मिरज, जमखिंडी, कुरुंदवाड वगैरे संस्थानांतील प्रमुख मंडळी हजर होती. अध्यक्ष प्रो. लिमये यांनीं संस्थानी प्रश्नासंबंधीं खुद्द संस्थानिकांचे म्हणणें, नेहरू कमिटीचें म्हणणें व संस्थानी प्रजेचें म्हणणें काय आहे त्याचें उत्तम रीतीनें विवरण करून प्रो. अभ्यंकर हे आपल्या कित्येक वर्षांच्या अभ्यासानें व अनुभवानें संस्थानी प्रश्नाबाबत बोलण्यास कसे अधिकारी आहेत तें दाखवून दिलें व असा खंदा वीर प्रजेची बाजू मांडण्यास मिळाला याबद्दल आनंद व अभिमान प्रदर्शित केला. प्रो. अभ्यंकरांनीं आंगिकारलेल्या कामांत त्यांना सर्व संस्थानी प्रजेचा पाठिंबा असून त्यांच्यावर प्रजेचा विश्वास आहे अशा आशयाचा व त्यांच्या अभिनंदनाचा असे दोन ठराव पास झाले. ठरावास निरनिराळ्या तालुक्यांतील, प्रतिनिधी व श्री. दादासाहेब करंदीकर, नलावडे वगैरे गृहस्थांनीं जोरदार भाषणें करून पाठिंबा दिला. बिकानेरच्या महाराजांनीं संस्थानी प्रजेच्या शिष्टमंडळास 'स्वयंमन्य' असा जो शेरा दिला आहे त्याचा प्रत्येक वक्त्यानें इनकार केला. प्रो. अभ्यंकरांना निरनिराळ्या संस्थानांतर्फे व संस्थांतर्फे हार अर्पण करण्यांत आल्यावर प्रो. अभ्यंकरांनीं अतिशय मुद्देसूद व परिणामकारक असें भाषण केलें.

ते म्हणाले ' केवळ संस्थानिकांविरुद्ध चळवळ करण्याकरितां डेप्युटेशन जाणार आहे हा संस्थानिकांचा गैरसमज असून संस्थानी प्रश्नाचा विचार किती तऱ्हेनें केला पाहिजे तें जबाबदार अधिकाऱ्यांना पटविण्याकरितां मी जात आहें. बटलर कमिटीचा हेतु संस्थानिकांचे हक्क काय आहेत याचा निर्णय करून घेणें हा आहे. संस्थानिक आपली सुटका हिंदुस्थान-सरकारच्या अमलाखालून करून घेऊं इच्छित आहेत. बिकानेरचे महाराज म्हणतात कीं, आम्ही जें कांहीं मागतों तें केवळ आम्हा संस्थानिकांकरितां नको असून आमच्या प्रजेकरितांहि पाहिजे आहे. संस्थानांत सनदशीर राज्यपद्धति असती तर महाराजांच्या वरील उद्गारांत कांही तथ्य आहे असें आम्ही समजलों असतों. तशा प्रकारची सनदशीर व जबाबदार राज्यपद्धति संस्थानांतून सुरू व्हावी एवढीच आमची मागणी आहे. संस्थानिकांविषयीं आम्हास अभिमान वाटतो व त्यांच्या दर्जास कमीपणा येऊं देण्याची आमची इच्छाहि नाहीं. त्यांनीं आपला तनखा ठरवून घ्यावा आणि प्रजेस तिचे जे राजकीय व नैसर्गिक हक्क असतील ते तिला देऊन टाकावे एवढेंच आमचे मागणें आहे. संस्थानी प्रजेनें संस्थानिकांच्या सत्तेचे अंशभागी व्हावें यासाठींच माझी खटपट असून तोच हेतु मी इंग्लंडांत बटलर कमिटीस निवेदन करणार आहे.'

सभेनंतर प्रो. अभ्यंकर यांस जंगी मेजवानी देण्यांत आली. व मिरज येथेंहि त्यांस नाटकगृहांत थाटाची पानसुपारी झाली. ते सांगलीहून मुंबईस जाण्याकरितां पुणे स्टेशनावर आले त्या वेळीं पुण्यांतील सुमारें शंभर प्रमुख गृहस्थांनीं स्टेशनावर हजर राहून त्यांचें स्वागत केलें व त्यांस दक्षिणी संस्थानहितवर्धक सभा, हैद्राबाद प्रजापरिषद, केसरी-मराठा संस्था, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, सांगली विद्यार्थीमंडळ इत्यादि अनेक संस्थांच्या वतीनें हार घालण्यांत आले. गेल्या मंगळवारी मुंबईसहि त्यांस हैद्राबाद पोलिटिकल असोसिएशनतर्फे ॲटहोम पार्टी देण्यांत आली व रात्रौ हिराबागेंत जाहीर सभाहि भरली.

# बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशन

( **गोविंद केशव मनोळीकर**, बी. ई. **पुणें.** )

केसरीच्या मागील अंकांत बोरघाटांत हल्लीं चालू असलेल्या कामाबद्दलची हकीकत दिली आहे. त्यावरून या कामाच्या मोठेपणाची कल्पना वाचकांना आली असेलच. प्रस्तुत हा नवा आगगाडीचा रस्ता तयार करतांना त्यामध्यें बिकट असे विशेष अडथळे कोणते आले व ते कशा रीतीनें पार पाडले यासंबंधीं माहिती मनोरंजक व उपयुक्त असल्याकारणानें खालीं देत आहे.

हा चालू असलेला आगगाडीचा रस्ता सर्व डोंगरांतील असल्यामुळें यामध्यें मोठमोठे दगड अगर कडे कोसळणें साहाजिक असतें व असा प्रकार गेल्या पावसाळ्यांत घडून आला आणि त्यायोगानें एक कडा कोसळला, त्यामधील एक दगड सुमारें १८ हजार मण वजनाचा होता व तो सुरुंगानें फोडावयास एक महिना लागला. या घाटामध्यें दरवर्षी पाऊस फार म्हणजे २०० इंच पडत असल्यामुळें त्यापासून नव्या रस्त्याला पुढें त्रास होऊं नये याबद्दल जागजागीं पूल व मोऱ्या बांधल्या आहेत. तसेंच एके ठिकाणीं फार उंचावरून पडत असलेल्या पाण्याचा प्रवाह वाटेंतच आड येऊं लागल्यामुळें त्याला कस टाळावें हा एक प्रश्नच उभा राहिला व त्यासाठीं फारच कुशलतेनें एक लहानसा ३०० फूट लांबीचा बोगदा पाडण्यांत आला आहे. ह्या पाण्याच्या बोगद्याच्या खालून नंबर २ चा रेल्वेचा बोगदा पाडलेला असल्यामुळें या ठिकाणीं एका बोगद्यावरून दुसरा बोगदा गेला आहे व असें उदाहरण फारच क्वचित् पाहावयास मिळतें. असाच प्रकार पुलांच्या बाबतींतही एके ठिकाणीं झालेला आहे. त्या ठिकाणीं खालच्या पुलावरून मेन लाईन आहे व वरच्या पुलावरून सायडिंग आहे व तसेंच खंडाळा स्टेशनाजवळ असलेलें पाण्याचें मोठें तळें पाहाणाराला हें काय आहे याबद्दल कोडेंच पडतें. थोडेसे उंचावर असल्यामुळें पावसाळ्यांत यामधील पाणी नव्या रस्त्यांत शिरून बोगद्यांतहि येऊं लागले व तेथें एक मोठा बंधारा बांधावा लागला आहे.

नंबर तीनच्या भागांत तर पुष्कळच अडचणी उद्भवल्या आहेत. कारण याला एका बाजूनें टाटा हायड्रोइलेक्ट्रिक कंपनीच्या ६ फुटी ( हत्तीएवढाल्या ) पाण्याच्या नळांनीं वळसाच घातला आहे व ते अगदीं जवळून जात असल्यामुळें त्यावर सुरुंगाचे दगड पडून ते फुटतील कीं काय ही एकसारखी मोठीच भीतिच होती. कारण हे नळ फुटले तर खोपोलीचें पावरहाऊस बंद पडून मुंबईच्या गिरण्यांना विद्युच्छक्ति मिळणार नाहीं व त्यामुळे कामें बंद पडण्याची भीति होती. एके

ठिकाणीं तर हे नळ आडवे आल्यामुळें त्यांच्या बचावासाठीं एक फार मोठा, उंच व वेडावांकडा पूल बांधण्यांत आला आहे. आणखी महत्त्वाचा अडथळा म्हणजे जुन्या रेल्वेरस्त्याचा. हा इतका जवळून गेला आहे कीं, प्रतिक्षणीं यावर सुरुंगाचे दगड येऊन पडतात व त्यामुळें रात्रीं अपरात्रीं आगगाड्यांच्या रहदारीला अडचण होईल कीं काय याबद्दल फार भीति होती. परंतु आतां या बाजूचें काम बहुतेक संपल्यामुळें आतां ही अडचण दूर झाली आहे. पी. डब्ल्यु. डी. चा गाडीरस्ता नं. ३ बोगद्यावरून जातो व तेथें "कट् अँड कव्हर "ची योजना केल्यामुळें तोहि अडथळा सुरक्षितपणें दूर करतां आला आहे व त्यापासून गाड्यांच्या अगर आगगाड्यांच्या रहदारीला एकमेकांचा मुळींच संबंध पोंचत नाहीं.

# पब्लिक सेफ्टी बिल

## न. चिं. केळकर यांचें भाषण

( न. चिं. केळकर यांनीं ता. २४ सप्टेंबर रोजीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें पब्लिक सेफ्टी बिलावर जे भाषण केलें त्याचा सारांश खालीं दिला आहे. )

या बिलाच्या प्राथमिक चर्चेच्या वेळीं मला हजर राहातां आलें नाहीं. तथापि अखेरीला तरी मी बिलाविरुद्ध मत देण्याला येथें राहूं शकलों याबद्दल मला फार समाधान वाटतें. हें बिल निदान सिलेक्ट कमिटींतून तरी बरेंचसें दुरुस्त होऊन बाहेर येईल असें वाटलें होतें. पण दुर्दैवानें तसें झालें नाहीं. आणि बिलाचा घातकपणा बहुतेक जशाचा तसाच कायम राहिला आहे. या बिलाविरुद्ध माझें भांडण दोन प्रकारचें आहे. एक सरकाराशीं व दुसरें या बिलाशीं. या बिलामुळें सरकारच्या हातीं अप्रतिहत व निरंकुश सत्ता जाणार व गुन्हेगार ठरणारा मनुष्य चौकशीवांचूनच शिक्षा भोगणार. फौजदारी कायद्याप्रमाणें आरोपीला शिक्षा व्हावयाची तर प्रथम त्याच्यावर नोटीस निघून त्याला आपलें म्हणणें पुढें मांडण्याची संधि मिळाली पाहिजे. पण या बिलांत पाहावें तों सर्वच विचित्र. कारण, पहिल्याप्रथमच हुकूम सुटावयाचा तो गव्हर्नरजनरलच्या नांवानें. आरोपीनें सुटण्याची आशा मनांत ठेवण्याला मध्यें कोणती पायरीच नाहीं. या नाटकाचा पहिला व शेवटचा अंक दोनहि एकच. तो झाला म्हणजे एकदम खेळ खलास. चौकशी तर राहोच. पण सर्व पुरावाहि गुलदस्तांत राहावयाचा. आणि आरोपी किंवा त्याचा वकील यांना आपला बचाव करण्याची संधीहि मिळावयाची नाहीं. गुन्ह्याचें कार्यक्षेत्र व मर्यादाहि निश्चितपणें सांगितलेली नाहीं. त्यांत हवें तें यावें, व हवा तो मनुष्य फासांत अडकावावा अशी स्थिति आहे. !

कोणत्याही देशाच्या कायद्यामध्यें हेतू, मतें किंवा विशिष्ट मनोवृत्ति हीं गुन्ह्याच्या सदराखालीं येतात असें मानलेलें नाहीं. माणसाचीं मतें किंवा हेतू वाटेल ते असोत, त्या मतानुसार त्याच्या हेतूचें प्रत्यक्ष क्रियेमध्यें रूपांतर होईपर्यंत तो कायद्याच्या क्षेत्रांत उतरतच नाहीं. मोर्ले यांनी आपल्या 'कॉंप्रोमाईझ' या पुस्तकांत असें स्वच्छ म्हटलें आहे कीं, "बादशहांशीं राजनिष्ठेची शपथ घेऊन पार्लमेंटाच्या सभागृहांत बसणाऱ्या सभासदालाहि तात्विक रीतीनें राजसत्तेविरुद्ध आपले विचार असल्यास ते बोलून दाखविण्याला कोणताही प्रत्यवाय नाहीं. त्यानें वाटल्यास खुशाल असें म्हणावें कीं, "इंग्लंडाच्या कॉन्स्टिटयूशनमधून राजा नष्ट व्हावा व राजमुगुट मोडण्यासाठीं तो टांकसाळींत घालण्यात यावा." असें म्हणणें बेकायदेशीर ठरून राजद्रोहाखालीं मुळींच येत नाहीं. कारण हे नुसतें मत आहे व नुसत्या मताबद्दल कायद्यानें कोणाला काय म्हणून शिक्षा करावयाची ? राजसत्तेविरुद्ध तो शस्त्र हातांत घेईल तर तो अलबत गुन्हेगार ठरेल. पण तोंपर्यंत कायद्याच्या सुरीला त्याला स्पर्शही करतां येणार नाहीं.

या बिलाचे बाबतींत माझें सरकाराशीं भांडण असें कीं, सरकारला आपल्या हातीं अधिक सत्ता मिळविण्याचा खरोखर नसता हव्यास उत्पन्न झाला आहे. संरक्षणाच्या नांवाखालीं कायद्याचें एक एक चिलखत सरकार आपल्या अंगावर चढवूं पाहात आहे. पण एका पौराणिक गोष्टींत सांगितल्याप्रमाणें सर्व अंगभर चिलखत चढवून अखेर एका वेड्या शिलेदारानें संरक्षणासाठीं आपल्या डोळ्यावरही चिलखताचें अस्तर चढविलें, तशी हास्यास्पद स्थितीच या बाबतींत सरकारची होणार ! डॉन क्विक्झोटची गोष्ट आपणास माहीत आहेच. गरगर फिरणारी निर्जीव पवनचक्कीहि त्याला लढाईस आलेल्या प्रतिस्पर्ध्यासारखी वाटली व तिच्याशीं झुंज करून त्यानें आपले हातपाय मोडून घेतले. पौराणिक युगांतला तो वेडापीर, व हें बिल आणणारें सरकार हीं सारख्याच दर्जाचीं

नाहींत असें कोण म्हणेल ? खुळ्या भ्रमिष्ट कल्पनांच्या नादीं लागून तुम्ही वाटेल ते कायदे पास करून घ्या. पण त्यांचा अखेर काडीचाहि उपयोग होणार नाहीं हें मी सरकारला बजावून सांगतों.

'कम्यूनिझम'च्या रोगाची सरकारला इतकी भीति वाटत असेल तर त्यांनीं गंभीरपणानें विचार करून त्याची निदानमीमांसा केली पाहिजे. नुसत्या वरपांगी उपचारांनीं काय होणार ? पिनल कोड आस्तित्वांत असतांना सरकारला हा नवा कायदा कां पाहिजे, याचें उत्तर अद्यापि कोणीहि दिलेलें नाहीं. 'रेग्युलेशन्स'च्या कायद्याप्रमाणें सरकारला अनिष्ट वाटणाऱ्या माणसाला वाटेल तितके दिवस डांबून ठेवतां येतें. शिवाय 'फॉरीनर्स ॲक्ट' सरकारच्या मदतीला आहेच. इतकी सगळी जय्यत तयारी असतांना या नव्या कायद्याची वास्तविक जरूरी काय ? पिनल कोडाखालीं वाटेल त्या गुन्ह्याबद्दल माणसावर खटला भरून त्याला तुरुंगांत पाठवितां येतें. पण सरकारचें म्हणणें कीं, आम्हाला पिनल कोड कां नको तर या गुन्हेगारांना हिंदुस्थानाच्या तुरुंगांत ठेवण्याला जागा नाहीं म्हणून ! हिंदी तुरुंग अपुरे पडण्याला हे चळवळ्ये कम्यूनिस्ट आहेत तरी किती ? ते खरोखर मूठभर देखील नाहींत. आणि त्यांना म्हणे हिंदी तुरुगांत ठेवण्याला जागा पुरत नाहीं. पण हा सर्व मानभावीपणाचा खेळ आहे. मी एक पाऊल पुढें जाऊन इतकेंही म्हणतों कीं, हिंदी तुरुंगांत अद्यापि वाटेल तेवढी प्रशस्त जागा आहे. आणि कम्यूनिस्ट लोकांचीच काय, पण सरकारी बांकावर बसलेल्या कांहीं सभासदांच्यावर आम्हाला कायदेशीर रीतीनें खटला भरण्याचा अधिकार मिळेल तर त्यांचीही रवानगी त्याच तुरुंगात करण्याइतके हिंदुस्थानाचे तुरुंग मोठे आहेत!

हिंदुस्थानांत आपल्या मताचा प्रचार करण्याला जे 'कम्यूनिस्ट' लोक येतात, ते चांगले शिकलेले तज्ज्ञ व अनुभविक असेच येतात. इंग्लंडमधून जर ही माणसें इकडे येतात तर त्यांचा वास्तविक प्रथम तेथेंच बंदोबस्त कां होऊं नये ? पार्लमेंटाची ही जबाबदारी हिंदी कायदेमंडळांनीं कां घ्यावी ? व पार्लमेंटानें तरी या लोकांच्या बंदोबस्ताचें काम हिंदी कायदेमंडळावर कां ढकलावे ? पण सरकारला या बाबतींत पाहुण्याचें हातून परस्पर साप मारून आपला कावा साधावयाचा आहे. साप मेला तर काम भागलें. व पाहुणा मेला, तर स्वतःला वाईटपणा न येतां परस्पर पीडा टळली ! पण सरकारचें हें शहाणपण कोणाच्या लक्षांत येणार नाहीं असें नाहीं.

या बिलाच्या कार्यक्षेत्रांत तीन प्रकारच्या गोष्टी येतात. ( १ ) सोव्हिएट सरकार. ( २ ) कम्युनिस्टांचीं मतें. ( ३ ) कम्युनिझमचा प्रचार करणारे चळवळ्ये लोक. पहिले म्हणजे सोव्हिएट लोक. पण त्यांच्याशीं आमच्या सरकारचें युद्ध सुरू नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यांच्याशीं शांततेचे स्नेहसंबंध असून व्यापाराचीं सर्व दळणवळणे त्यांच्याशीं चालू आहेत. कम्युनिझमच्या तात्त्विक मतासंबंधींही हरकत घेण्याचें कारण नाहीं कारण तें नुसतें एक मत किंवा फार झाले तर एक पंथ आहे. कोठलेंहि एखादं नवें मत निघालें कीं, त्याची थोडीबहुत चळवळ होतेच. पण त्यांत एवढें भिण्यासारखें काय? राजकारण किंवा अर्थशास्त्र यांत अनेक नवीन मतें उदयाला आलीं, पण त्यामुळें जशी सृष्टीमध्यें कांहीं उलथापालथ झाली नाहीं, त्याचप्रमाणें कम्युनिझमच्या प्रचारानेंहि होणार नाहीं. फ्रेंच राज्यक्रांतीमध्यें तर स्वातंत्र्य, समता व विश्वबंधुत्व यांचें पीक पिकलें होतें. पण चळवळीची शक्ति संपून गेल्यानंतर घातपाताचें वातावरण नाहींसें झालें व त्या चळवळींतलें चांगलें तेवढें शिल्लक राहिलें. यामुळें फ्रान्समध्येंच काय, पण इतर देशांतही लोकशाही प्रस्थापित झालेली आपण पाहातों. कम्युनिझमला इतकें भिण्याचे कारण नाहीं. सोशियालिझम व कम्युनिझम यांत फारसें अंतर नाहीं. इंग्लंडमध्यें सोशालिस्ट व कम्युनिस्ट इतके सरमिसळ झाले आहेत कीं, कम्युनिस्ट हा प्रयत्नानें हुडकूनच काढावा लागेल! इंग्लंडाला कम्युनिस्ट चालतात. पण सरकारचा बाहणा असा कीं, त्यांना कम्युनिस्ट चालत नाहींत. तो इकडे आला तर, जणु कांहीं आकाश कोसळून पडेल. पण श्री. अणे यांनीं म्हटल्याप्रमाणें, याची चिंता बाळगण्याचे कारण नाहीं. हा फक्त कालावधीचा प्रश्न होय. सरकारनें काहींही केले तरी कम्युनिझमच्या चांगल्या तत्त्वाचा पुढेमागें जय झाल्याखेरीज राहाणार नाहीं.

जमीनदारांच्या हक्कांना कम्युनिझमनें धोका येईल, असा सरकारचा आक्षेप आहे. पण युरोपमध्यें व इतर देशांत तें कार्य भांडवलशाहीनें आधींच केलें आहे असें टॉनी यानें आपल्या पुस्तकांत सिद्ध केलें आहे. मोठे उद्योगधंदे सरकारच्या हातीं जावेत व राष्ट्रीय बनावेत, असेंहि कम्युनिस्टांचें मत आहे; पण त्यांत येवढें भिण्यासारखें काय आहे ? खासगी कंपन्यांच्या हातून रेल्वे काढून घेऊन सरकारनें आपल्या ताब्यांत घेतल्या हेंच त्याला उत्तर आहे. रेल्वेच्या बाबतींत जें तुम्ही केलें तेंच इतर उद्योगधंद्यासंबंधानेंही कम्युनिस्ट करा म्हणतात, वेगळें कांहीं म्हणत नाहींत. धर्म व राजशासनसंस्था या वेगळ्या असाव्यात असें कम्युनिस्टांचें मत आहे. पण धर्म व राजकारण हीं वेगळीं असावीं हें मत आतां इंग्लंडमध्यें मान्य झालेलें आहे, व चर्चचा व राजकारणाचा तेथें कांहीं संबंध राहिला नाहीं. हेंचसें

काय, पण इतर सर्व मुद्दे सरकारनें केवळ ढोंगी-पणानें पुढें मांडले आहेत. 'तुम्हाला संरक्षण देतों' असे सांगून हें बिल त्यांना पास करून घ्याव-याचें आहे. आम्ही जर या बाबतींत संरक्षण मागितलें च नाहीं तर आमच्यावर तें लादण्याची तुम्हाला एवढी उत्सुकता कां?

कम्युनिझमचें तत्त्व तरी असें आजच काय नव्यानें उदयाला आलें आहे? कम्युनिझमच्या कल्पना फार पुरातन आहेत. प्लेटोचें रिपब्लिक, थॉमस मूरची युटोपिया, या ग्रंथांतूनहि त्यांचा निर्देश सांपडतो. इतक्या प्राचीन काळापासून बऱ्यावाईट लोकमताचे सर्व अनुभव या तत्त्वानें घेतले आहेत. आणि आजतागायत स्थिति अशी आहे कीं, कम्युनिझमच्या शुद्ध तत्त्वाबद्दल कोणाचा फारसा वाद राहिला नाहीं. कम्युनिस्ट लोकांसंबंधानें पूर्वी लोकांच्या विनाकरण राक्षसी कल्पना झाल्या होत्या. पण आतां दिशा निवळूं लागल्या आहेत. रशियन कम्युनिस्टांचें तर असें वर्णन सांपडतें कीं, त्यांच्यांत शिस्त, स्वाभिमान, आत्मसंयमन व स्वार्थत्याग हीं प्रमुखपणें दिसून येतात. लेनिनबद्दल तर मी असे वाचलें आहे कीं, त्याचा दरमहा खर्च फक्त २२ पौंडांतच भागत असे. ही त्यांची वृत्ति पाहिली म्हणजे धार्मिक लोकांत जी एक स्वत्वनिवृत्ति आढळून येते, तशीच ती या लोकांतहि आहे असे कबूल करणे भाग पडते. कम्युनिस्ट लोकांना धर्मबुद्धि नाहीं असें म्हणणें म्हणजे शुद्ध थोतांड आहे. समाजसेवा हा ते आपला धर्मच मानतात. आणि या धर्माचा त्यांच्यांत इतका जाज्वल्य अभिमान आढळतो कीं, ख्रिस्ती चर्चचे अनुयायी म्हणविणारे लोक खात्रीनें त्यांच्या पाठीमागें पडतील! सर्व जगभर युद्धाचा धुमाकूळ यांना घालावयाचा आहे अशी कम्युनिस्टांची बदनामी करण्यांत येते. पण रशियावरच्या एका इंग्रजी ग्रंथाच्या आधारानें मी असें स्पष्ट म्हणतो कीं, रशियांतल्या सोव्हिएट लोकांना शांततेची जितकी इच्छा आहे तितकी दुसऱ्या कोणालाहि नसेल. हें युद्ध इतर राष्ट्रांनींच जबरदस्तीनें सोव्हिएट लोकांच्यावर लादलेलें आहे. सर्व जगांतील पैसा व भांडवल यांवर कम्युनिस्टांचा रोख आहे असेहि सांगण्यात येतें. पण हा केवळ विपर्यास होय. कम्युनिस्टांचा रोख भांडवलावर नसून भांडवलशाहीवर आहे! व आधुनिक जगांतील भांडवलशाही ही अत्यंत अधार्मिक, अधोगतीला नेणारी व पापमय आहे असें प्रो. कीन्स यानेंच म्हटलें आहे. जगांत सर्व गोष्टी करण्याला पैसा लागतो, हें काय कम्युनिस्टांना कळत नाहीं? असें समजणें म्हणजे त्यांना मूर्खांतच काढण्यापैकीं आहे. पण लेनिन वगैरे त्यांचे शत्रू समजतात, इतके कांहीं मूर्ख नव्हत.

पण या सर्वांपेक्षांही माझा मुख्य मुद्दा असा कीं, हें बिल हिंदु लोकांच्या आतिथ्यधर्माच्या कल्पनेच्या सर्वस्वी विरुद्ध आहे. उदारबुद्धीने प्रेरित होऊन हिंदुस्थानांतल्या लोकांना कांहीं नव्या व व्यापक कल्पना शिकवाव्या अशा सद्धेतूनें जे लोक इकडे येतात त्यांना आम्ही आमच्या देशांत काय म्हणून मज्जाव करावयाचा? नव्या गोष्टी जर कोणी शिकवीत असेल तर त्या आम्ही कां शिकूं नयेत? अशा लोकांचें आदरातिथ्य करणें हा प्रत्येक राष्ट्राचा हक्क आहे. खुद्द इंग्लंडमध्यें १९ व्या शतकांत अशी स्थिति होती कीं वाटेल त्या देशचे चळवळ्ये लोक आश्रयाकरितां इंग्लंडांत जाऊन राहात व हें आश्रयदान इंग्लंडनें त्यांना कधीं नाकारिलें नाहीं. मॅझिनी, गॅरीबाल्डी, कार्ल मार्क्स, प्रिन्स क्रोपॉटकिन या सगळ्या बंडखोर लोकांना इंग्लंडनें उदार आश्रय दिला व त्यांचें आतिथ्य केलें. इंग्लंड राजसत्तावादी असतांनाही समाजसत्तेचा व लोकसत्तेचा पुरस्कार करणाऱ्या या बंडखोर लोकांविरुद्ध त्यांनीं आपल्या घराचे दरवाजे कधींहि लावून घेतले नाहींत.

ही खुद्द इंग्लंड देशाची स्थिति. मग हिंदुस्थान देश हा अतिथिधर्माचें माहेरघर आहे. इंग्लंडमध्यें जी गोष्ट घडली नाहीं ती येथें आमच्या हातून परस्पर करूं इच्छितां काय? इंग्लंडमध्यें कम्युनिस्टांचे पुढारी सकलातवाला हे पार्लमेंटचे मेंबर राहूं शकतात. पण आमच्या सरकारला हिंदुस्थानांत कम्युनिस्ट औषधालाहि नको. संरक्षणाच्या नांवाखालीं हें बिल आमच्यावर लादण्यांत येत आहे. पण या लोकांपासून आम्हाला संरक्षण द्या अशी सरकारला कोणी कधीं मागणी केली होती? तुमचे संरक्षण हवें कोणाला? हिंदुस्थानांत वाटेल त्यानें यावें व वाटेल तीं आपली मतें सांगावीं. आम्हालाही स्वतःची स्वतंत्र बुद्धि आहे. आम्ही वाटेल तें ऐकूं, वाटेल तें घेऊं व वाटेल तें सोडून देऊं. आमच्या हिताहिताचा विचार करण्याचा चोंबडेपणा करण्याचें सरकारला कारण काय? सगळ्या राष्ट्राच्या बुद्धीचे प्रतिनिधी येथें बसले आहेत, त्यांना आपल्या हिताहिताची येवढी साधी गोष्ट कळत नाहीं कीं काय? पण सरकारचें खरें इंगित वेगळेंच आहे. साम्राज्य—वादित्वावर कुऱ्हाड पडते म्हणून कम्युनिझमची सरकारला नाकेबंदी करावयाची आहे! पण सरकारचीं हीं आंतडीं बाहेर काढून लोकपक्ष त्याच्यावर घाव घातल्यावांचून कधींहि राहाणार नाहीं. केवळ एका अर्थानेंच आम्ही बादशहांशीं राजनिष्ठ आहोंत असें म्हणत असलों तरी, सरकारच्या साम्राज्यवादित्वाला आतां कोणीहि भर देणार नाहीं. साम्राज्याचे तुकडे होऊन साम्राज्य नष्ट व्हावें

असेंच कोणीही हिंदी सभासद आपलें मत देईल. साम्राज्यांतल्या इतर घटकाप्रमाणें हिंदुस्थानाचा दर्जा स्वतंत्र व्हावा अशी आज हिंदुस्थानाची मागणी असतांना सरकारच्या म्हणण्याला कोण मान तुकवणार ? सारांश, कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी ै विल हाणून पाडणेंच आपलें कर्तव्य आहे.

# स्त्रियांचे हक्क व हिंदु कायदा

( लेखक–गो. म. जोशी.)

## लेखांक २ रा

आतां या लेखामध्यें प्रस्तुत विषयांत गणितागत मोजमाप घ्यावयाचा प्रयत्न करावयाचा. परंतु यापूर्वी सदर वस्तूचें वर्णनात्मक उपाधियुक्त लक्षण सांगणें जरूर आहे. समाजांत वावरणारा मनुष्यप्राणी हा दोन मोठमोठाल्या शक्तींचा परिणाम म्हणून वावरत असतो. अगदीं गणितागत भाषेंत सांगावयाचें तर ‘ Man is a function of two variables ’. त्या शक्ती म्हणजे ज्या सृष्टीचा मनुष्यप्राणी आपणाला सर्वांत श्रेष्ठ दुवा असें मानून घेतो त्या सृष्टीच्या नियमानें बद्ध अशा पिंडगत शक्ती. यांचा अभ्यास उत्क्रांतिशास्त्र, वंशशास्त्र वगैरे शास्त्रांतून करावा लागतो. दुसऱ्या शक्ती म्हणजे परिस्थितीशीं झगडणाऱ्या मानवी मनानें हुडकून काढलेल्या व झगडण्यांत उपयोगी पडणाऱ्या युक्त्या अगर संस्कार. यांचा विचार अर्थशास्त्र, धर्मशास्त्र, कामशास्त्र वगैरे सर्व शास्त्रांतून करावा लागतो. या दोनही शक्तींचा विचार केल्याशिवाय कोणतीहि समाजरचना पूर्ण होऊं शकत नाहीं. म्हणून आमच्याकडे चातुर्वर्ण्याची व्याख्या करतांना ‘ चातुर्वर्ण्यं प्रकृतिविशेषात् संस्कारवशाच्च ’ अशी समुच्चयात्मक व्याख्या वसिष्ठ करतात. यालाच युरोपियन समाजशास्त्रज्ञ व अमेरिकन समाज शास्त्रज्ञ स्वभाव (नेचर) व संस्कार (नर्चर) असें म्हणतात. इंग्लिश समाजशास्त्रज्ञ कार्लपियरसन म्हणतो, स्वभाव हा संस्कारांच्या दसपट प्रभावी असतो. आमच्या स्वतःच्या मतानें स्वभावच सर्वांशीं प्रबल असतो ( जिनीव्हा पॉप्युलेशन कॉन्फरन्समधील ई. जे. लीडबेटर यांचा निबंध वाचा ). परंतु तो वाद करण्याचें हें स्थळ नाहीं. येथें एवढेंच सांगावयाचें आहे कीं समाजाविषयीं बोलतांना यांपैकीं कोणत्याहि एकाच शक्तीसंबधानें बोलून भागणार नाहीं.

आतां समाजांची पिंडगत व सांस्कृतिक सुस्थिति किंवा दुःस्थिति मोजण्याच्या गणितागत साधनांचा विचार करावयाचा. परंतु तत्पूर्वी आज आमच्यापुढे जें मोजमाप ठेविलें जातें तें कितपत शास्त्रीय आहे याचा विचार करूं. येथें त्या मोजमापांचें दिग्दर्शन करून थोडीशीच चर्चा करूं व आपला मुख्य मुद्दा जें गणितागत मोजमाप त्याचा विचार करूं. प्रथमतः असें सांगितलें जातें कीं, अमका तमका समाज राज्य करतो म्हणून तो समाज श्रेष्ठ होय. दुसऱ्या एखाद्या समाजांत आक्रमशक्ति ( या शब्दाचा नक्की अर्थ काय होतो तें कळणें बरेंच कठीण आहे ) आहे म्हणून तो समाज श्रेष्ठ. परंतु उत्क्रांतीच्या झगड्यामध्यें एखादे स्थळीं किंवा एखादे काळीं जेतृत्व व आक्रमशक्ति असलेला समाज जगत नाहीं, व जित व आक्रमशक्ति नसलेले समाज मरत नाहीत असें पाहिलें म्हणजे अन्वयव्यतिरेकानें राजसत्ता किंवा आक्रमशक्ति ही समाजाच्या श्रेष्ठत्वाची लक्षणें नव्हत ही गोष्ट सहज लक्षांत येईल.

### पिंडगत गुण

उत्क्रांतीच्या झगड्यांत ज्या समाजांना जगावयाचें असेल त्यांच्यामध्ये पिंडगत गुण कोणते असावे लागतात याचा विचार करूं. त्यांपैकीं एकहि गुण आपल्या कृतीनें कमी करण्याचा हक्क कोणत्याहि व्यक्तीला पोहोचत नाहीं.

(१) प्रजोत्पादनाची शक्ति फार श्रेष्ठ स्वरूपाची असणें. यालाच आमच्याकडे ‘ प्रजाभिरग्ने अमृतत्वमश्याम्’ असें सूत्र सांगितलेलें आहे. डॉक्टर कुक ‘जर्नल ऑफ हेरेडिटीमध्यें’ म्हणतात ‘एशिआटिक लोकांना कांहीं देशांतून बाहेर ठेवल्यानें हा पौर्वात्यांचा प्रश्न सुटणें शक्यच नाहीं. एशिआटिकांचें प्रजोत्पादन असेंच कांहीं पिढ्या चालू राहिल्यास सर्व भूगोल त्यांनींच लवकर व्याप्त होईल. आपणाला त्यांच्या स्वारीची कोणत्याही तऱ्हेची भीति नाहीं. परंतु पौर्वात्य वंशाचा हळूहळू, शांतपणानें व निष्प्रतिकार असा जो आक्रम चालतो त्याला उपाय कोणता? त्यांनीं समाजरचना अशीच घडवून आणली आहे कीं त्यांचा समाज कोणतीहि तदितर संस्कृति हळूहळू पोखरूं शकतो ?

(२) कोणत्याहि तऱ्हेची आर्थिक परिस्थिति उत्पन्न झाली असली तरी देखील आपले वंश टिकवून धरण्याची चिकाटी, या गोष्टीला अत्यंत श्रीमंती व निकृष्ट दारिद्र्य या दोनहि स्थिति विरुद्ध आहेत.

( ३ ) वंशविनाशक अथवा वंशसंचारी असे जे रोग असतील किंवा व्यसनें असतील त्यांपासून दूर राहाण्याची पात्रता.

( ४ ) पिंडाची सोशिक शक्ति.

हे गुण ज्या वंशामध्यें पिंडदृष्टया असतील ते समाज लक्षावधि शत्रूंशीं टक्कर द्यावी लागली तरी शेवटीं विजयीच होतील ही गोष्ट निश्चित आहे.

असो. पिंडाचें श्रेष्ठत्व मोजण्याच्या साधनांचा विचार केल्यानंतर जी सामाजिक प्रगति म्हणून मानली जाते ती मोजण्याच्या साधनांचा विचार करावयाचा. प्रथमतः ही गोष्ट निसर्गसिद्ध अशी दिसून येईल कीं सर्व मानवी जीवांचा पहिला हव्यास स्वतःला या उत्क्रांतीच्या झगड्यांतून टिकून कसें राहातां येईल हें पाहण्याकडे असतो. सर इ. रे. लॅंकेस्टर म्हणतात 'मनुष्य हा सृष्टींतील बंडखोर प्राणी आहे. सृष्टि जेथें 'मरा' म्हणून हुकूम करते तेथें मनुष्य-प्राणी म्हणतो 'मी जगेन '(वईल टु लिव्ह, वुइल टु पावर वगैरे ग्रंथ पाहा. दि किंगडम ऑफ मॅन पान ११४ पाहा). ज्या समाजांतून ही जगण्याची इच्छा नष्ट होत आहे, म्हणजे थोडक्यांत सांगावयाचें तर ज्या समाजामध्यें जीवांची स्वनाशाकडे प्रवृत्ति वाढत असेल ते समाज एका विवक्षित स्थळीं व काळीं कितीहि श्रेष्ठ दिसले तरीहि ते मुमुर्षु आहेत असें मानावें. ही जीवांची स्वनाशाकडे होत असलेली प्रवृत्ति मोजण्याचें साधन म्हणजे त्या समाजांत लोकसंख्येच्या वाढीच्या मानाने आत्महत्यांचें प्रमाण फार जोराने वाढत आहे किंवा काय ही गोष्ट पाहाणें हें होय. जर एखाद्या समाजांत लोकसंख्येचें प्रमाण जोरानें वाढत असून आत्महत्यांचें प्रमाण त्या मानाने कमी होत असेल किंवा मुळींच नसेल तर तो समाज सर्वांत श्रेष्ठ होय. परंतु जर समाजांत प्रजोत्पादनाचें मान कमी होऊन आत्महत्येचे प्रमाण वाढत असेल तर तो समाज उत्क्रांतीच्या झगड्यांत नष्ट होणार. ज्यांनीं ज्यांनीं धार्मिक, राजकीय, आर्थिक अशा तऱ्हेचें कोणतें तरी कर्तृत्व करून दाखविलें त्यांच्या-त्यांच्यामध्यें, आजच्या पाश्चिमात्यांच्या अशास्त्रीय समाजरचनेमध्ये, प्रजोत्पादनाची शक्ति कमी होत जाऊन आत्महत्येचें प्रमाण वाढत आहे ही गोष्ट आज पाश्चात्य समाजशास्त्रज्ञ कंठरवानें सांगत आहेत. या विषयाचा युरोपमध्यें ओएटिंजन, मॉर्सेली, वेस्टकॉट, लेगाय, मॅसॅरिक मेयर आणि डर्कहेम वगैरे पंडितांनीं अभ्यास केलेला आहे.

दुसरें म्हणजे मनुष्याच्या मनाची समाजांतर्गत स्थितींत प्रगति चालली आहे किंवा काय हें कसें मोजावें तें पाहूं. मनुष्याच्या मनाच्या विकृतीची अंतिम स्थिति म्हणजे मनाच्या सर्व वेगवेगळ्या शक्तीमधील समता नष्ट होऊन मनुष्याला वेड लागणें ही आहे. म्हणून लोकसंख्येच्या वाढीच्या मानानें एखाद्या कोणत्याही समाजांत वेड लागण्याचें प्रमाण जर वाढत असेल तर त्या समाजाचा मानसपिंड अधोगतीला लागला आहे असें खुशाल मानावें. कारण कीं सबलापेक्षां मनानें दुर्बल अशा पिंडाची वाढ फार झपाट्यानें होत असते. 'पांच पिढ्या पूर्वींपासून मनानें दुर्बल असलेल्या एका व्यक्तीपासून उत्पन्न झालेलीं ७५ मनानें दुर्बल अशीं माणसें आज समाजांत वावरत आहेत. समाजांतील साधारण प्रजेची वाढ येवढ्या झपाट्यानें कधींहि होत नाहीं' (गेटस हेरेडिटी अँड युजेनिक्स पान १५९). 'दुर्बलांची झपाट्यानें वाढ हा एक अत्यंत मोठी काळजी उत्पन्न करणारा प्रश्न आहे. अशा लोकांच्या प्रजेच्या वाढीला राजसत्तेनें आळा घालणें अत्यंत जरूर आहे' (विल्हेलमाईन की, हेरेडिटी अँड सोशल फिटनेस). म्हणून आम्ही म्हणतों कीं, कोणत्याहि समाजांतील लोकसंख्येच्या प्रमाणाशीं पडणारें वेड लागण्याचें प्रमाण हें त्या समाजाची सबल अगर दुर्बल स्थिति मोजण्याचें श्रेष्ठ साधन आहे.

आतां तिसऱ्या तऱ्हेनें विचार करावयाचा तर जे रोग वंशनाशक म्हणून प्रसिद्ध असतील असल्या रोगांचें प्रमाण लोकसंख्येच्या मानानें समाजांत वाढत किंवा कमी होत जाणें हेंहि समाजाची सबळ अगर दुर्बळ स्थिति मोजण्याचें एक निश्चित गमक आहे. रोग तसून सर्वच वाईट. परंतु कांहीं रोग हे फक्त व्यक्तीचा नाश करतात तर दुसरे वंशसंचारी ( इनहेरिटेबल ) असल्याकारणानें सर्व वंशचे वंश उध्वस्त करतात. रोग सर्व समाजांत सर्व स्थळीं व सर्वच काळीं असतात. परंतु त्यांतले वंशसंचारी आणि वंशनाशक रोग ज्यामध्यें जास्त प्रमाणांत असतील ते समाज अर्थातच जास्त निर्बल मानावे. परंतु याला मदत म्हणून वैयक्तिक हक्काच्या आचरटपणाखाली यांची प्रजा समाजानें वाढूं दिली तर तो पुढील पिढीवर अत्यंत असमर्थनीय असा जुलूम केल्याचें श्रेय आपण घेऊं. अशा तऱ्हेच्या रोगांचा आमच्याकडे व युरोपमध्येंही अभ्यास झालेला आहे. अशा सामाजिक शत्रूंतील सर्वांत श्रेष्ठ रोग म्हणजे फिरंग रोग किंवा उपदंश होय. त्याचा अगदीं जवळचा सहचर म्हणजे दारुबाजी ( अल्कोहॉलिझम ) हा आहे. या दोन वस्तू जेथें असतील तेथें जगांतली सर्व ज्ञात किंवा अज्ञात रोगांची पैदास होऊं शकते व त्यापासून पुढें वंशनाश होतो. या विषयाची जास्त माहिती प्रो. फोर्नियर, प्रो. टार्नोस्की वगैरेंच्या ग्रंथांत सांपडेल. म्हणून ज्या समाजामध्यें लोकसंख्येच्या मानानें उपदंशादि विकारांचें प्रमाण वाढत असेल ते समाज अंतिम झगड्यामध्यें विजयी होण्यांला अपात्र असें समजावें.

**समाजाचें श्रेष्ठत्व कसें मोजावें ?**

सबंध चर्चेचा निष्कर्ष काढावयाचा तर खालील तत्त्वें समाजाच्या श्रेष्ठत्वाचीं गणितागत साधनें म्हणून सांगतां येतीलः—

( १ ) ज्या लोकसमाजामध्यें आत्महत्यांचें प्रमाण वाढत असेल ते निकृष्ट व तदितर समाज हे प्रबल होत.

( २ ) ज्यामध्यें वेड लागण्याचें प्रमाण वाढत असेल ते निकृष्ट व तदितर समाज हे प्रबल होत.

( ३ ) ज्यामध्यें उपदंशादि वंशनाशक रोगांचें प्रमाण वाढत असेल ते निकृष्ट व तदितर समाज हे प्रबल होत.

( ४ ) ज्यामध्यें प्रजोत्पादनाची शक्ति चांगल्या सुदृढ स्थितींत आहे ते समाज वरिष्ठ व तदितर समाज कनिष्ठ मानावेत.

(५) ज्या समाजांतील व्यक्तींना कोणत्याहि आर्थिक परिस्थितींत आपले वंश टिकवून ठेवण्याचें सामर्थ्य आहे ते समाज श्रेष्ठ होत. अर्थशास्त्राच्या भाषेंत बोलावयाचें तर ज्या समाजांतील व्यक्ती जास्त प्रमाणांत बेकार होत चालल्या असतील ते समाज मुमुर्षु होत. अशा बेकारांना पोसण्याची व्यवस्था करणारे समाज पुढल्या पिढीकरितां बेकारीचें दुप्पट पीक तयार करीत असतात.

(६) वंशनाशक दुर्गुणापासून अलिप्त राहाण्याचें ज्या पिंडामध्यें सामर्थ्य असेल ते वंश श्रेष्ठ मानावेत. कोणत्याहि तऱ्हेची सोशिक शक्ति असणारे समाज श्रेष्ठ मानावे. वर आम्ही समाजाची श्रेष्ठता किंवा निकृष्टता मोजण्याचीं कोणा व्यक्तीच्या कल्पनेला धरून नसलेलीं परंतु सृष्टीला धरून असलेलीं गणितागत साधनें दिलेलीं आहेत. आतां पुढील लेखामध्यें स्त्रिया ज्या हक्कासाठीं बंड करावयास तयार आहेत असें सांगितलें जातें त्या हक्कांचा वरील मुद्द्यांना धरून विचार करूं.

# दुराराध्यांना ताळ्यावर आणा

नेहरू कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यापासून हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व जातींनीं त्या रिपोर्टाला पाठिंबा देऊन कमिटीच्या कामाविषयीं आपला आदर व्यक्त केला हें अभिनंदनीय आहे. विशेषतः हिंदी ख्रिस्ती, अँग्लो-इंडियन्स, अस्पृश्य यांनींहि कांहीं ठिकाणीं सभा भरवून आपली संमति दर्शविली आहे. परंतु कित्येक मुसलमानांनीं मात्र अश्लाघ्य असें धरसोडीचें वर्तन चालविलें आहे. नेहरू कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध होतांच हिंदूंनीं स्वाभाविकपणेंच त्यांत आपल्या हिताला बाधक अशा किती गोष्टी आहेत त्यांची मोजदाद केली आणि नेहरू कमिटीनें मुसलमानांच्या पदरांत झुकतें माप टाकलेलें पाहून त्यांना सात्त्विक संतापहि आला. तरी पण केवळ आपल्या विरोधामुळे कमिटीनें एवढ्या प्रयत्नानें उभारलेला डोलारा ढासळूं नये म्हणून हिंदूंनीं आपला क्रोध आवरला आणि एवढ्यानें तरी मुसलमानांचें समाधान होतें कीं नाहीं पाहावें आणि हिंदूंच्या हक्कांचा एवढा बळी घेऊन जर तो समाज संतुष्ट होत असेल तर हा वाद कायमचा धुमसत राहण्यापेक्षां आपल्या कायदेशीर हक्कांचें थोडेसें अतिक्रमण करूं देऊन तरी तो मिटता घ्यावा अशा बुद्धीनें हिंदुमहासभेच्या प्रतिनिधींनीं लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेंत तटस्थ वृत्ति स्वीकारली. हेतु हा कीं सर्वपक्षीय परिषद मोडण्याच्या दोषाचें खापर हिंदूंच्या माथ्यावर फुटूं नये. एवढ्याचसाठीं सिंधच्या विभक्तीकरणाच्या कलमाला देखील हिंदूंनीं फारसे आढेवेढे घेतले नाहींत; मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणाइतके प्रतिनिधी मिळण्याची हमी देऊन शिवाय हिंदूंशीं चढाओढ करण्याला त्यांना मुभा ठेविली गेली याविषयीं हिंदूंनीं तक्रार केली नाहीं, आणि मुसलमानांच्याच मुर्वतीस्तव मतदारीच्या हक्काची कल्पनातीत वाढ करण्यासहि संमति दिली. मुसलमानी समाज संतुष्ट व्हावा म्हणून हिंदूंनीं जेव्हां इतका स्वार्थत्याग केला तेव्हां कोठें इस्लामी समाज आपला नेहमींचा चढेलपणा सोडून कांहींसा वळणावर आला आणि लखनौची सर्वपक्षीय परिषद एकदांची तडीस गेली.

पण लखनौच्या परिषदेंत जें साधतां आलें नाहीं तें बाहेर बंडाळी माजवून साधावें असा कित्येक मुसलमानांचा कावा असल्याचें दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें आहे. लखनौच्या ऐक्य परिषदेंत ज्या मुसलमानांनीं मनःपूर्वक भाग घेतला ते सर्वमान्य व जबाबदार पुढारी पूर्वीसारखेच नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला पाठिंबा देत आहेत. विशेषतः अध्यक्ष डॉ. अन्सारी, संयुक्त प्रांताचे पुढारी महमुदाबादचे राजे, बहार प्रांताचे पुढारी सर अल्ली इमाम, बंगालच्या मुसलमानांचे हितकर्ते सर अबदुल रहीम, पंजाब प्रांताचे पुढारी डॉ. किचलु इत्यादि प्रमुख मुसलमानांनीं आपली इमानदारी कायम राखली ही आनंदाची गोष्ट आहे. तरी पण ठिकठिकाणचे अल्पसंख्याक मुसलमान नेहरू कमिटीच्या विरुद्ध मोहीम चालवीत असून त्या मोहिमेंत दिल्लीच्या असेंब्लींतील आणि प्रांतिक कायदे-मंडळांच्या कक्षेंतील बरेच खासदार व आमदार सामील झाले आहेत. या असंतुष्ट मुसलमानांनीं अनधिकारीपणानेंच का होईना पण एक मुस्लीम परिषद भरवून तिच्या नांवावर हा सगळा डाव

उधळून टाकण्याचा संकल्प योजला आहे म्हणूनच मुसलमानांचें खरें लोकमत कोणतें असाहि कित्येकांस विचारावासा वाटतो.

पूर्वी १९१६ सालीं, लखनौचा सुप्रसिद्ध करारनामा झाला त्या वेळीं, महमुदाबादच्या राजेसाहेबांनीं पुढाकार घेऊन मुसलमानांच्या मागण्या स्पष्टपणें निर्दिष्ट केल्या आणि तेवढ्या कलमांची तडजोड ठरतांच काँग्रेसच्या योजनेला त्यांनीं संमति दिली. त्या वेळी मुसलमानांच्या दुय्यम दर्जाच्या पुढाऱ्यांनीं महमुदाबादचे राजे आपले पुढारी नव्हेत असें केव्हांहि सांगितलें नाहीं. त्यामुळेंच लखनौच्या कराराला महत्त्व प्राप्त झालें आणि त्याचा योग्य परिणाम सरकारावरहि होऊन बादशहांना हिंदी लोकांना स्वराज्य देण्याचा जाहिरनामा प्रसिद्ध करावा लागला. असें असतां आतां तेच मुसलमान त्याच महमुदाबादच्या राजेसाहेबांना बाजस सारून नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला विरोध करण्याला पुढें सरसावले आहेत याचें सखेदाश्चर्य वाटतें. सर्वच मुसलमानांनीं नेहरू कमिटीची योजना त्याज्य ठरविली असती तर एका अर्थी तें हिंदूंना श्रेयस्कर झालें असतें. कारण मग हिंदूंनाहि मुसलमानांच्या मुर्वतीखातर आपल्या हक्कावर आपण होऊन पाणी सोडण्याचा प्रसंग आला नसता; सर्वपक्षीय परिषद निष्फळ केल्याचा दोष मुसलमानांवर उघडपणें लागू झाला असतां आणि सगळाच डाव उधळल्यामुळें नवी योजना तुम्ही तरी कसली करतां तें पाहूं असें जबाबदार मुसलमानांना आव्हान देण्याला हिंदू मोकळे झाले असते. परंतु डॉ. अन्सारीसारख्या समंजस मुसलमानांनीं तडजोड करण्याची वृत्ति दर्शिविली म्हणून हिंदूंनीं आपल्या कायदेशीर हक्कासाठींहि ओढून न धरितां कशी तरी एकदांची एकी होवो म्हणून स्वार्थावर पाणी सोडून नेहरू कमिटीच्या योजनेला संमति दिली. पण एकीसाठीं केलेला हा स्वार्थत्याग फुकट जाऊन पुनः फूट कायम राहते कीं काय अशी आतां धास्ती वाटूं लागली आहे.

सर्व-पक्षीय परिषदेंतून मुसलमानांनीं फुटून वेगळें होऊं नये अशा विषयीं महमुदाबादचे राजे, डॉ. अन्सारी व सर अली इमाम हे झटून प्रयत्न करीत आहेत. तथापि त्यांच्या प्रयत्नास यश येईल कीं नाहीं याविषयीं शंकाच वाटते. असंतुष्ट मुसलमानांनीं दिल्लीस मुसलमानांची जादा परिषद भरविण्याचें योजिलें आहे व त्या योजनेचें पुढारीपण घेण्यांत गतवर्षीच्या कलकत्त्याच्या मुस्लीम लीगच्या अधिवेशनाचे अध्यक्ष महमद याकूब हेहि सामील झाले आहेत आणि अध्यक्षस्थानीं ना. आगाखान यांची योजना होणार आहे ही सर्वांत अधिक खेदकारक गोष्ट होय. बॅ. जिनांच्या गैरहजेरींत महंमद याकूब यांच्यासारख्यांनीं असली जादा परिषद भरवून मुसलमानांत फूट पाडून आपल्या शत्रूचें बळ वाढवूं नये म्हणून महमुदाबादच्या राजांनीं त्यांना जाहीर विनंतीहि केली आहे. परंतु तिचा फारसा उपयोग झालेला दिसत नाहीं. मुसलमानांच्या ज्या कांहीं महत्वाच्या मागण्या होत्या त्यांतल्या बहुतेक सर्व मागण्या नेहरू कमिटीनें मान्य केल्याच आहेत. वायव्य सरहद्द प्रांताला व बलुचिस्थानाला सुधारलेली राज्यपद्धति लागू करणें, सिंध प्रांत वेगळा करणें, अल्पसंख्याक मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणांत जागा राखून ठेवणें या चार मागण्या नेहरू कमिटीनें स्वीकारल्या आहेत. मध्यवर्ती कायदेमंडळांत ⅓ जागा राखून ठेवाव्या आणि बंगाल व पंजाब या प्रांतांत मुसलमान बहुसंख्याक असले तरी त्यांच्या करितांहि जागा राखून ठेवाव्या या दोन मागण्या मात्र नेहरू कमिटीनें मान्य केल्या नाहींत. पण त्याला तसें योग्य कारणहि आहे. बंगाल व पंजाब या प्रांतांतील मुसलमान पुढाऱ्यांनींच राखीव जागांचा आग्रह आपण होऊनच सोडला; तेव्हां त्याचा दोष नेहरू कमिटीकडे येऊं शकत नाहीं. मध्यवर्ती कायदेमडळांत मुसलमानांच्या जागा राखून न ठेवण्याला कारण एवढेंच कीं, लोकसंख्येप्रमाणें मतदारी मिळाल्यावर जागा राखून न ठेविल्या तरी निदान शेंकडा ३० टक्के मुसलमान साहजिकच निवडून येऊं शकतील असें महमुदाबादच्या राजांनींच आपल्या जाहीर पत्रकांत कबूल केलें आहे.

अशा तऱ्हेनें मुसलमानांच्या ज्या ज्या म्हणून मागण्या होत्या त्या त्या कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें मुसलमानांच्या पदरांत पडण्याचा पूर्ण संभव आहे. असें असतां महमद याकूबसारख्या पुढाऱ्यांनीं पुनः दिल्लीस परिषद भरविण्याचा हट्ट धरावा हे अश्लाघ्य होय. महमुदाबादचे राजे किंवा डॉ. अन्सारी यांच्या युक्तिवादाची किंवा विनंतीचीहि पर्वा न बाळगतां या अदूरदर्शी मुसलमानांनीं नेहरू कमिटीचा रिपोर्ट धुडकावून लावण्याचा दुराग्रह धरावा हे कशाचें द्योतक आहे बरें ? शिवाय त्यांत मौलाना शौकतअलीसारखे खिलाफत कमिटीचे पुढारीहि सामील झाल्यामुळें आणि ना. आगाखानांनीं अध्यक्ष होण्याचें कबूल केल्यामुळें दिल्लीच्या भावी जादा परिषदेस नसते महत्त्व येणार आहे. यामुळें मुसलमान पुढाऱ्यांतील कोणता पक्ष अखेरीस बहुसंख्य ठरेल व कोणता अल्पसंख्य ठरेल हें समजणे कठीण झालें आहे. मुसलमानांचा ओढा सायमन कमिशनाकडे आहे असें जें मुंबईचा टाईम्स भासवीत आहे तें साफ खोटें आहे. फार तर मूठभर मुसलमान सायमन सप्तकाशीं सहकार्य करण्याला सिद्ध झालेले आढळतील. नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला विरोधक असलेले मौलाना

शौकत अलीसारखे कित्येक पुढारी सायमन कमिशनावर बहिष्कार घालावा असेंच म्हणणारे आहेत यांत शंका नाहीं. आणि त्यावरून मुसलमानांतला सायमनाशीं सहकार्य करूं इच्छिणारा पक्ष अगदीं अल्पसंख्य आहे हें निश्चित आहे. त्याचप्रमाणें नेहरू कमिटीला विरोध करणारा पक्षहि तितकाच निर्बळ ठरावा अशीच सर्वांची इच्छा आहे. पण त्या बाबतींत मात्र कित्येक मुसलमान पुढाऱ्यांचीं मतें अद्यापि डळमळीत दिसतात. ही त्रिशंकूप्रमाणें मध्येंच लोंबकळणारी मंडळी नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला पाठिंबा देण्याचें लवकर जाहीर न करतील तर ती मंडळी हळुहळू घसरत घसरत कदाचित् सायमन कमिशनच्या गोटांतहि जाऊन पडतील अशी धास्ती वाटते! कारण कोणीहि मनुष्य फार वेळ अधांतरीं राहूं शकत नाहीं. इकडे नेहरू कमिटीचाहि आधार घ्यावयाचा नाहीं आणि तिकडे सायमन कमिशनालाहि स्पर्श करावयाचा नाहीं, अशा निराधार स्थितींत ही अर्धवट मंडळी फार काळ राहूं शकणार नाहीं. अर्थातच नेहरू कमिटीवरील रागाच्या भरांत हे त्रिशंकू सायमन कमिशनाच्या गोटांत जाऊन पडण्याचा कित्येकांस संभव वाटतो. याकरितां डॉ. अन्सारी, सर अली इमाम आणि महमदाबादचे राजे यांसारख्या पुढाऱ्यांनीं या अर्धवटांची आतांच स्पष्ट कानउघाडणी करून जादा अधिवेशन भरविण्याचा त्यांचा नाद सोडविला पाहिजे, किंवा त्यांनीं तसें अधिवेशन हट्टानें भरविल्यास त्यांत स्वतः हजर राहून नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला पाठिंबा देण्याचा ठराव तेथें प्रचंड बहुमतानें पास करून घेतला पाहिजे. यांतून कोणतीहि एक गोष्ट लवकर घडून न येईल तर मुसलमानांचें खरें मत काय याविषयीं विचारी माणसांना काळजीच लागून राहण्याचा संभव आहे.

महमद याकूबसारख्या मुस्लीम लीगच्या माजी अध्यक्षांनीं आणि खिलाफत कमिटीच्या कित्येक पुढाऱ्यांनीं नेहरू कमिटीचा इनकार करावा, दिल्लीस जादा परिषद भरविण्याची खटपट करावी, मुंबईच्या कायदेमंडळांतील मुसलमान आमदारांनीं आणि दिल्लीच्या असेंब्लींतील मुसलमान खासदारांनीं डॉ. अन्सारींचें मत आम्हास ग्राह्य वाटत नाहीं असें उघडपणें जाहीर करून लखनौच्या परिषदेतील ठराव झिडकारून द्यावेत आणि नव्याच मागण्यांचें नवें कोलीत हातांत घेऊन हिंदूमुसलमानांच्या ऐक्यमंदिरास आग लावण्यास सिद्ध व्हावें आणि तिकडे डॉ. अन्सारीसारख्यांनीं हा उपद्व्याप बंद पाडण्याच्या पूर्वीच सगळा मुसलमानी समाज नेहरू कमिटीला अनुकूल आहे, यास्तव मूठभर उपद्व्यापी पुढाऱ्यांच्या बडबडीकडे लक्ष देऊन मुसलमानांच्याविषयीं तुम्ही आपला निष्कारण गैरसमज करून घेऊं नका असें ऐक्यपरिषदवाल्यांना सांगत राहावें ही गोष्ट कोणत्याहि रीतीनें श्रेयस्कर नाहीं. मुसलमानांतील बहुसंख्याक आणि वजनदार अशा पुढाऱ्यांचा नेहरू कमिटीला जर खरोखरीच पाठिंबा आहे तर त्या वजनदार पुढाऱ्यांनीं अल्पसंख्याक दुराराध्यांचे हे चाळे बंद पाडले पाहिजेत. त्यांच्याकडून ते चाळे जर लवकर बंद न होतील तर मुसलमानांतील हा विरोधक पक्ष दुर्बळ नसून बराच प्रबळ आहे असें म्हणावें लागेल; किंवा हे वजनदार पुढारी सिद्ध-साधकपणा करून इकडे नेहरू कमिटीला अनुकूलता दर्शवून त्या कमिटीकडून कांहीं सवलती पदरांत पाडून घेणार आणि तिकडे विरोधक पुढाऱ्यांच्या कारस्थानाकडे डोळेझांक करून त्यांच्या विरोधामुळें आणखी कांहीं अधिक सवलती मिळतात कीं काय हें पाहात बसणार असा देखील कित्येक फाजील शकेखोरांना संशय येऊं लागेल. हा संशय खरोखरीच अनाठायीं आहे हें सर्वांस पटवून देण्याकरितां डॉ. अन्सारीसारख्या पुढाऱ्यांनीं महमद याकूबसारख्या विरोधक पक्षाची अतःपर बिलकूल हयगय न करतां त्यांची कानउघाडणी करून त्या दुराराध्यांना वठणीवर आणिलें पाहिजे आणि त्यांच्याकडून नेहरू कमिटीला संमति मिळविली पाहिजे. यांतून कोणतीहि एक गोष्ट न करतां या दुराराध्य त्रिशंकूना असेंच अधांतरीं लोंबत ठेवणें धोक्याचें आहे एवढा इषारा मुसलमानी पुढाऱ्यांना देणें हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों.

# जगांतील तरुण व युद्ध

गेल्या आगस्ट महिन्याचे अखेरीस हॉलंडमध्यें ओमेनजवळ कँप इर्डी या ठिकाणीं सर्व जगांतील तरुणांची शांतता–परिषद झाली. या परिषदेची थोडीशी हकीकत मागें आम्ही केसरींत दिलीच होती. परिषदेस सव्वीस राष्ट्रांचे मिळून सुमारें ५०० प्रतिनिधी आलेले होते. युरोप खंडांतील बहुतेक राष्ट्रांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य सिद्ध होऊन बरींच वर्षे लोटलेलीं आहेत. यामुळें तेथील तरुणांना आंतरराष्ट्रीय दृष्ट्या विचार करण्यास फुरसत आहे व परिस्थितिहि अनुकूल आहे. आणि युरोपांत तरुणांना काय अगर वृद्धांना काय, डोळ्यासमोर भावी युद्धाचें भेसुर चित्र दिसत असल्यामुळें त्यांच्या तोंडांतून शांतताप्रवर्तक व युद्धविरोधी विचार निघावे यांत नवल नाहीं. राष्ट्रसंघाच्या कमिट्या शस्त्रनियंत्रणाचा सारखा विचार व वाटाघाट करीत असतां त्यांतून निर्णय असा कांहींच निघत नाहीं. आणि राष्ट्रसंघाला बाजूस सारून अमेरिकन मुत्सद्दी मि. केलॉग यांनीं युद्धसंन्यासाच्या करारनाम्यावर कित्येक राष्ट्राच्या सह्या घेतल्या तरी या युद्धसंन्यासाचे सोंग उभें राहिलें नाहीं तोंच त्याचे पाय लटपटूं लागले आहेत. वृद्ध मुत्सद्यांच्या या प्रयत्नाप्रमाणेंच तरुणांच्या प्रयत्नांचेंहि पर्यवसान असेंच निष्फळ होण्याचा बराच संभव आहे शस्त्रनियंत्रण अगर युद्धसंन्यासाचे करारनामे सिद्ध झाले तरीहि युद्ध टळेल असा नेम नाहीं. कारण युद्ध करण्याचें मनांत आलें म्हणजे असले वाटेल ते करारनामे पायाखालीं तुडविण्याचे बाबतींत आतां सर्वच युरोपियन राष्ट्रें निगरगट्ट बनलीं आहेत. आणि आज विद्यमान असलेलें लष्करी सामर्थ्य वाढविलें नाहीं तरीहि तेवढ्या सामर्थ्यावर प्रत्येक राष्ट्राला युद्धांत उडी घेतां येईलच व युद्ध चालू असतांना शस्त्रास्त्रांची जरूर ती वाढहि करतां येईल. करारनामे व शस्त्रनियंत्रण या ढोबळ साधनांनीं जेथें युद्ध टळत नाहीं तेथें केवळ आंतरराष्ट्रीय सलोख्याची भावना उत्पन्न करण्याच्या सूक्ष्म साधनानें तें टळेल काय? राष्ट्रीयत्वाच्या पलीकडचें आंतरराष्ट्रीय जागतिक ऐक्य उत्पन्न करण्याचा तरुणांचा प्रयत्न कालांतरानेंच यशस्वी होण्यासारखा आहे पण तो प्रयत्न चालू असतां जगांतून युद्धें नाहींशीं झालीं अशी कोणीहि आपली समजूत करून घेऊं नये.

## युरोपिअन राष्ट्रांचा मिथ्याचार

या तरुणांच्या शांतता–परिषदेंतच दोन राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं या शांतताविचारास मर्यादा घालणाऱ्या कल्पना बोलून दाखविल्या. रशियाच्या 'कम्यूनिस्ट यूथ इंटरनॅशनल' संस्थेचे सेक्रेटरी मि. क्रिप्टनर हे म्हणाले कीं, साम्राज्यवादाचा प्रतिकार न करतां केवळ युद्धाला विरोध करण्याचा प्रयत्न सुरू ठेवण्यांत धोका आहे हें या परिषदेनें ध्यानांत ठेवावें. आणि चीनचे प्रतिनिधी म्हणाले, "चीनमध्यें सुव्यवस्था प्रस्थापित झाली व ज्या तहनाम्यांसंबंधानें वाद आहे ते तहनामे बदलले गेले म्हणजे मग चीन देशांतील तरुणहि जगांतील तरुणांशीं शांततेच्या कामांत सहकार्य करतील." शांततेची व युद्धविरोधी अशा विचारांची जगांतील सद्यःपरिस्थिति लक्षांत घेतां त्यांना ज्या दोन मर्यादा आहेत त्या या दोघां प्रतिनिधींच्या तोंडून अशा रीतीनें बाहेर पडल्या. गेल्या जर्मन महायुद्धामध्यें युरोपियन राष्ट्रांची जी भयंकर मनुष्यहानि व द्रव्यहानि झाली त्यायोगानें स्मशानवैराग्यासारख्या शांततेच्या व युद्धविरोधाच्या गोष्टी युरोपियन राष्ट्रांना सुचत आहेत. पण ज्या एका कारणानें हीं महायुद्धें होतात तें कारण नाहींसें न करतां वरवरचे युद्धविरोधी उपाय कितीहि केले तरी ते टिकाऊ नव्हत. बाह्यतः सर्व इंद्रियांचें संयमन केल्यासारखें दाखवून मनांतून विषयांचें अखंड चिंतन करणाऱ्या मिथ्याचारी लोकांसारखी पाश्चात्य राष्ट्राची आज स्थिति आहे. पापपुण्याच्या बाबतींत असें मार्मिक सुभाषित प्रचलित आहे कीं—

पुण्यस्य फलमिच्छंति पुण्यं नेच्छंति मानवाः ।
न पापफलमिच्छंति पापं कुर्वंति यत्नतः ॥

ज्यायोगानें युद्धें निर्माण होतात तो व्यवहार सर्व राष्ट्रें अहमहमिकेनें करीत आहेत, पण हें पाप चालू असून पापाचें फल जें युद्ध त्याची मात्र भीति बाळगीत आहेत. कायमची शांतता प्रस्थापित होण्यास जी कृति करावी लागते ती करण्यास हीं राष्ट्रें तयार नाहींत आणि फुकटाफुकटीं शांतता लाभावी म्हणून त्यांची धडपड चालू आहे!

## युद्धांचे अनेक प्रकार

युद्धाचे प्रकार अनेक आहेत. पण त्यांपैकीं एकच प्रकार आज पाश्चात्य राष्ट्रांच्या डोळ्यापुढें आहे. या सर्व राष्ट्रांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य सिद्ध झालेलें असल्यामुळें या स्वातंत्र्यासाठीं कराव्या लागणाऱ्या स्वातंत्र्ययुद्धाची कल्पना त्यांच्या डोळ्यापुढें आज नाहीं. जगांतील सर्व मोकळे असलेले प्रदेश यांच्यापैकीं कोणीना कोणी बळकावलेले असल्यामुळें नवीन प्रदेश बळकावण्यासाठीं करावें लागणारें आक्रमक युद्धहि त्यांच्या डोळ्यापुढें आज नाहीं. बळकावलेल्या प्रदेशांतील स्वातंत्र्योर्मी मुळांतच दडपून टाकण्याइतकें सामर्थ्य आज या सर्व राष्ट्रांजवळ असल्यामुळें असल्या साम्राज्यरक्षक युद्धाचीहि त्यांना आज फिकीर नाहीं. बहुतेक युरोपियन राष्ट्रांतून

लोकसत्ता प्रस्थापित झालेली असल्यामुळें अंतर्गत युद्धाचीहि त्यांना भीति आज वाटत नाहीं. पण जगांतील प्रदेश बळकावले असतांना एकानें जास्त बळकावले व दुसऱ्यानें कमी बळकावले, यामुळें उत्पन्न होणारें वैषम्य व असूया, आणि दुसऱ्याच्या हातांतील प्रदेश किंवा त्यांतील व्यापार अगर संपत्ति आपल्या हातीं यावी हा लोभ किंवा हाव, यांच्यायोगानें साम्राज्यसंपन्न राष्ट्रांत जीं युद्धें होतात तीं आज मुख्यतः पाश्चात्य राष्ट्रांच्या डोळ्यापुढें आहेत. गेले जर्मन महायुद्ध झालें तें असेंच साम्राज्य--युद्ध होतें. युरोपांत असलेल्या जर्मन देशाचा एखादा भाग इंग्लंडाला पाहिजे होता अगर युरोपांत असलेल्या इंग्लंड देशाचा भाग जर्मनीला पाहिजे होता असें मुळींच नाहीं. कारण आजच्या स्वातंत्र्यप्रिय व स्वातंत्र्यसंपन्न राष्ट्रांचा एखादा लचका कोणी तोडून घेतला तरी तो त्यास फार वेळ न पचतां कायमचा त्रासदायक होईल. इंग्लंड व जर्मनी यांच्या मर्यादा युरोप खंडापुरत्याच असत्या तर हें युद्ध होण्याचें कांहींच कारण नव्हतें. या दोन राष्ट्रांत युद्ध सुरू झालें व त्यांत इतर राष्ट्रें सामील झालीं याचें कारण त्यांचीं बाहेर पसरलेलीं साम्राज्यें हेंच होय.

## साम्राज्यवादाचें घोर प्रायश्चित्त

युरोपियन राष्ट्रांचीं एकमेकावर आक्रमण करणारीं युद्धें केव्हांच संपलीं आहेत. जर्मन महायुद्धापूर्वी इंग्लंड व फ्रान्स यांच्यांत जीं युद्धें झालीं तेव्हांपासून बाहेरच्या साम्राज्यामुळें उत्पन्न झालेली चढाओढ युद्धास कारणीभूत होत आहे. स्पेन, पोर्तुगाल, इंग्लंड, फ्रान्स यांनीं समुद्रयानांत प्रगति करून जगावरील भौतिक दृष्ट्या मागसलेले प्रदेश आक्रमण करण्यास सुरवात केली तेव्हांपासून हें साम्राज्यवादाचें वेड युरोपियन राष्ट्रांना लागलें आहे. आणि आज अमेरिका जरी शांतिपाठ म्हणण्यांत अग्रगण्य दिसली तरी तो देशहि साम्राज्यग्रस्त झालेला आहे. युरोपियन राष्ट्रांत संपत्तीची विषमता, मजुरांची बेकारी, आर्थिक वर्गकलह, लष्करी खर्चाची व राष्ट्रीय कर्जाच्या बोजाची अतोनात वाढ, इ. ज्या अनिष्ट गोष्टी माजल्या आहेत त्यांच्या बुडाशीं युद्ध आहे ही गोष्ट हीं राष्ट्रें बोलून दाखवितात, व हें युद्ध नाहींसें व्हावें अशी इच्छा करतात. पण या युद्धाच्या बुडाशीं साम्राज्यवाद आहे ही गोष्ट कळत असली तरी तीं बोलत नाहींत. सुधारलेल्या भौतिक सामर्थ्याच्या जोरावर इतर मागसलेल्या राष्ट्रांचें स्वातंत्र्यहरण करून व त्यांतील लोकांस गुलाम बनवून त्यांच्या संपत्तीचा लूट अनेक मार्गांनी करणें ही साम्राज्याची पापी व निसर्गविरुद्ध चटक युरोपियन राष्ट्रांना लागलेली आहे. जगड्व्याळ व भयंकर संहार करणाऱ्या युद्धाच्या रूपानें या साम्राज्याच्या पापाचें प्रायश्चित्त त्यांस भोगावें लागतें. हें पापाचें फल तेवढें टाळण्याची त्यांची इच्छा आहे. पण एकीकडे आपण बळकावलेले प्रदेश आपल्याच मुठींत राहावेत, आपल्या साम्राज्याला धक्का पोहोचूं नये याबद्दल तीं साम्राज्यग्रस्त राष्ट्रें डोळ्यांत तेल घालून जपत आहेत व दुसरीकडे आपल्या सत्तेखालीं अगर नियंत्रणाखालीं असलेल्या राष्ट्रांना सारखीं दडपून ठेवीत आहेत.

## साम्राज्य राखा व युद्ध टाका ?

युरोपियन राष्ट्राचे शांततारक्षक प्रयत्न म्हणजे लुटारूंचे प्रयत्न असें म्हणतात तें यामुळेंच. साम्राज्यासाठीं संभावित लूट करण्याला आतां जगांत अवकाश राहिला नाहीं. तेव्हां नव्या लुटीसाठीं या लुटारूंना भांडण्याचें कारण नाहीं. पण कोणाला अधिक लूट मिळाली, कोणाला कमी मिळाली हा विचार त्यांच्या डोक्यांत आहेच. हा विचार यापुढें कोणी न करतां प्रत्येकाला आपापल्या लुटीचा निर्वेधपण उपभोग घेऊं द्यावा यासाठीं युरोपियन राष्ट्रें युद्धनिवारणाचा विचार करीत आहेत. पण जोंपर्यंत या राष्ट्रांचीं साम्राज्यें अस्तित्वांत आहेत, तोंपर्यंत त्यांचें आपापसांत भांडण केव्हां सुरू होईल याचा नियम नाहीं. आणि ही संशयीवृत्ति व भीति आहे तोंपर्यंत बाहेरून शस्त्रनियंत्रणाच्या गोष्टी कितीहि चालल्या असल्या तरी मनांतून, आपलीं शस्त्रास्त्रें जय्यत राहावीं, नियंत्रण पाळूनहि युद्ध सुरू झाल्याबरोबर एकदम त्यांत वाढ करण्याची सोय करून ठेवावी ही प्रत्येकाची इच्छा. यामुळें एका दिवशीं युद्धसंन्यासाच्या करारावर सह्या तर लगेच दुसऱ्या दिवशीं लष्करी सामर्थ्यरक्षणाचा गुप्त करार, आणि हा करार बाहेर आल्याबरोबर ज्यांनीं युद्धसन्यासाच्या कराराचा उपक्रम केला तेच लोक त्या निमित्तानें आपल्या लष्करी सामर्थ्याची उघडपणें वाढ करणार ! असा मिथ्याचार आज पाश्चिमात्य राष्ट्रांत सुरू आहे. विषवृक्षाच्या फांद्या तोडून उपयोग नाहीं त्याच्या मुळावरच घाव घालावयास पाहिजे. यासाठीं साम्राज्यवादाच्या अस्वाभाविक व पापी व्यवहाराचा जगांतून नायनाट झाल्याशिवाय जगांतील युद्धें नाहींशीं व्हावयाचीं नाहींत. साम्राज्यवाद उराशीं बाळगून युरोपियन राष्ट्रांच्या चाललेल्या युद्धविरोधाच्या गप्पा या केवळ शिळोप्याच्या गप्पा होत. यासाठींच तरुणांच्या परिषदेंत रशियन प्रतिनिधीनें सर्वांना इषारा दिला कीं, साम्राज्य राखा आणि युद्ध मात्र टाका असें म्हणणें हा वदतो--व्याघात आहे !

## साम्राज्यवाद नाहींसा करा

मग तरुणांना जुन्या जगाच्या कल्पनांचीं जळमटें झाडून टाकून नव्या मार्गाचा अवलंब करावयाचा असेल तर त्यांनीं जगांतील साम्राज्यवादाला

मूठमाती कशी द्यावयाची याचा विचार केला पाहिजे. अर्थात् राष्ट्रसंघापेक्षां साम्राज्यविरोधी जागतिक परिषद हीच त्यांनीं खरी परिणामकारक शांतता परिषद मानली पाहिजे. पण हा साम्राज्यवाद कसा नाहींसा होणार ? साम्राज्यसंपन्न राष्ट्रें स्वतः होऊन या साम्राज्यावर पाणी सोडण्यास तयार होतील काय ? त्यांना त्यांच्या पापाची व त्याच्या दुष्परिणामांची जाणीव करून देऊन आणि त्यांच्या अंतःकरणांत बदल घडवून आणून त्यांनी आपोआप साम्राज्यवाद सोडून द्यावा असा प्रयत्न कोणास करावयाचा असेल तर खुशाल करावा. पण आजपर्यंतचा अनुभव व मनुष्यस्वभाव यांच्या सर्वस्वी विरुद्ध अशी ही गोष्ट आहे. त्याचप्रमाणें एखादें स्वतंत्र पण साम्राज्यग्रस्त नसलेलें असें सामर्थ्यवान राष्ट्र, परोपकारबुद्धीनें व जग सुधारण्याच्या निस्स्वार्थी इच्छेनें, साम्राज्यसंपन्न राष्ट्रांशीं झगडा करून साम्राज्यपीडित राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळवून देईल ही कल्पनाहि असंभवनीय आहे. या दोन्हिं उपायांनीं साम्राज्यवाद नाहींसा होणार नाहीं. त्यासाठीं साम्राज्यपीडित राष्ट्रांनीं आपलें स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे आणि जरूर तेथें त्यासाठीं स्वातंत्र्ययुद्धहि केलें पाहिजे असेंच ओघानें सिद्ध होतें. सारांश, सर्व साम्राज्यपीडित राष्ट्रें स्वतंत्र झाल्याशिवाय साम्राज्ययुद्धें नाहींशीं व्हावयाचीं नाहींत. साम्राज्यपीडित राष्ट्रांची साम्राज्यविरोधी परिषद हीच खऱ्या अर्थानें जगाची शांतता—परिषद होय.

आतां ही गोष्ट खरी कीं, वर सांगितलेले दोन उपाय या तिसऱ्या खऱ्या प्रभावी उपायाला अल्प प्रमाणांत पोषक होतील. साम्राज्यांतील सत्ताधारी राष्ट्रामधील लोकमत साम्राज्यकल्पनेच्या विरोधी असें करणें अल्प प्रमाणात शक्य आहे. त्याचप्रमाणें आपण होऊन एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याचा प्रयत्न करणें ही गोष्ट असंभाव्य असली तरी एखाद्या देशाचें स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाल्यावर त्याला जवळचीं राष्ट्रें मदत करणार नाहींत असें नाहीं मग ती मदत कोणत्याहि हेतूनें केलेली असो. म्हणून जगांत साम्राज्यवादाविरुद्ध वातावरण निर्माण करणें, साम्राज्यपीडित राष्ट्रांनीं स्वातंत्र्ययुद्धासाठीं इतर राष्ट्रांची सहानुभूति व मदत मिळविणें आणि एकमेकांसंबंधानें सहानुभूति व सहकारिता वाढविणें या सर्व उपायांबरोबरच, सदर राष्ट्रांनीं स्वावलंबनानें साम्राज्यबंधन तोडण्यास सिद्ध होणें हा मुख्य उपाय केला तरच साम्राज्यवादाचा नाश होण्याचा संभव आहे. आणि अशा रीतीनें साम्राज्यवादाचा नाश झाला नाहीं तोंपर्यंत जगांतील युद्धें थांबावयाचीं नाहींत. युरोपांतील स्वतंत्र राष्ट्रांतील तरुणांना स्वतःसाठीं स्वातंत्र्ययुद्ध करण्याची जरूरी नाहीं. पण त्यांच्या डोक्यावरील साम्राज्ययुद्धाची आपत्ति इतरांच्या स्वातंत्र्यप्रयत्नानेंच नाहींशी होणें शक्य आहे. या स्वातंत्र्यप्रयत्नांना ते मदत करतील व साम्राज्यवादाविरुद्ध जगांतील बंडांत सामील होतील तरच त्यांची शांततेची आस्था खरी, नाहीं तर त्यांचे प्रयत्न राष्ट्रसंघाच्या वळणावर जाऊन तितकेच निष्फळ होण्याचा संभव आहे.

## लुटारू भांडलेलेच बरे

साम्राज्यसंपन्न राष्ट्रांतील तरुण व साम्राज्यपीडित राष्ट्रांतील तरुण यांच्यामध्यें दुसऱ्याहि एका तऱ्हेनें हितविरोध येण्याचा संभव आहे. साम्राज्यवाद नष्ट होण्याच्या अगोदर जगांतील साम्राज्ययुद्धें नाहींशीं झाली तरी ती शांतता साम्राज्यपीडित राष्ट्रांना नको. लुटारूंनीं आपापसांत करारमदार करून संगनमत केलें व एकाच्या लुटीवर घाला आला असतां दुसऱ्यानें त्यास मदत करावी अशी त्या लुटारूंचा जूट झाली तर ती साम्राज्यपीडित स्वातंत्र्येच्छु राष्ट्रांस घातकच ठरेल. साम्राज्यसंपन्न राष्ट्रांचा असा अभेद्य कट झाल्यास, साम्राज्यपीडित राष्ट्रांना कायमचें पारतंत्र्यांत ठेवण्याची व्यवस्था होईल. उलट साम्राज्यसंपन्न राष्ट्रांत भांडणें लागून युद्ध झालें तर ती एक साम्राज्यपीडित राष्ट्रांना स्वातंत्र्यासाठीं उत्थापन करण्याची संधीच असते. जगांतील युद्धें बंद कशीं होतील या विवेचनेपेक्षां आपल्या स्वातंत्र्यप्रयत्नास संधि देणारें असें एखादें साम्राज्ययुद्ध केव्हां होईल याचीच विवचना कित्येक साम्राज्यपीडित राष्ट्रांतील लोक मनांतून करीत राहणार. स्वातंत्र्ययुद्धाशिवाय साम्राज्ययुद्धें कायमचीं थांबणें शक्य नाहीं हें तर झालेंच. पण तशीं तीं तात्पुरतीं थांबणें हें देखील स्वातंत्र्येच्छु राष्ट्रांना फारसें हितावह नाहीं. सारांश, आजचा जगांतील शांततेचा खटाटोप निरर्थक होय. आणि कदाचित् तो सार्थ ठरला तरीहि ती शांतता स्वातंत्र्येच्छु राष्ट्रांच्या प्रयत्नास पोषक होणार नाहीं. लुटारू राष्ट्रांच्या संगनमतानें निर्माण झालेली स्वार्थी शांतता स्वातंत्र्येच्छु राष्ट्रांना नको. त्यांच्यांत भांडण असलेलेंच चांगलें.

## आधीं राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळवा

वरील प्रतिपादनावरून येवढी गोष्ट स्पष्ट झाली कीं, जगांतील युद्धें बंद करण्याची जी भाषा चालू आहे तींत कांहीं तथ्य नसून, परतंत्र राष्ट्रांनीं तरी आपल्या डोळ्यापुढें भावी युद्ध सतत ठेवलें पाहिजे. परतंत्र राष्ट्रांच्या दृष्टीनें, जगांत कोणीना कोणी पारतंत्र्यांत असतांना व साम्राज्यवादाचें भूत जिवंत असतांना जगांतील युद्धें बंद होणें धोक्याचें आहे. कोणतेहि परतंत्र राष्ट्र स्वतंत्र होईल तेव्हांच ते आंतरराष्ट्रीय सलोख्याच्या गोष्टी बोलूं शकेल. तोंपर्यंत

तशीं गोष्टी बोलणें निरर्थकच होय. परतंत्र राष्ट्रांतील तरुणांच्या सहानुभूतीचें पाणी जेथें पडतें तेथेंच पारतंत्र्याचा खड्डा असल्यामुळें ता भरून काढल्या-शिवाय तें पाणी बाहेरच्या जागेवर कसें पसरेल ? जगांत शांतता प्रस्थापित करून नंदनवन करावयाचें असेल तर पारतंत्र्याचे खांचखळगे बुजवून राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें समसमान भूमिकेवर सर्व देश आले पाहिजेत. राष्ट्रीय स्वातंत्र्य ज्या देशांना प्राप्त झालें आहे त्या देशांतील तरुण, त्या भूमिकेवरून 'तरुण हा जगाची पुनर्घटना करील' असें ध्येय बोलूं शकतात. कारण त्यांच्या स्वतःच्या देशाची पुनर्घटना करण्याचें काम फारसें शिल्लक नसतें. पण परतंत्र राष्ट्रांतील तरुणांनीं वरील मंत्र उच्चारावयाचा तर त्यांत असा फरक करून उच्चारला पाहिजे कीं, "मी जगाची पुनर्घटना करण्याची पहिली पायरी म्हणून स्वतःच्या राष्ट्राची पुनर्घटना करीन व जगांतील युद्धें बंद करण्याच्या दृष्टीनें स्वातंत्र्य—युद्धाची प्रथम सिद्धता करीन."ज्यांचें राष्ट्रीय स्वातंत्र्य पूर्ण सिद्ध झालें नाहीं त्या देशांची ही भूमिका लक्षांत ठेवूनच तरुणांच्या जागतिक शांतता परिषदेंत चिनी तरुणानें सांगितलें कीं "आमच्या स्वतःच्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य पूर्ण सिद्ध केल्यावर मगच आम्ही जगांत शांतता प्रस्थापित करणाऱ्या तरुणांच्या प्रयत्नांत सहकारिता करूं."

### साम्राज्याचें विविध आक्रमण

आतां परतंत्र राष्ट्रे घेतलीं तरीहि त्यांच्यांत पुनः भेद आहेत. एक परतंत्र राष्ट्र जी गोष्ट करूं शकतें तीच दुसरें परतंत्र राष्ट्र करूं शकेल असें नाहीं. साम्राज्याचें आक्रमण विविध प्रकारचें असतें. साधेल तेथें सर्व देशच ताब्यांत घ्यावयाचा, मोकळाच सांपडला तर वसाहती करावयाच्या, अगदींच रानटी लोक भेटले तर त्यांचा नाश करावयाचा, नाहीं तर त्यांना नुसतें नियंत्रणांत ठेवावयाचें, देश ताब्यांत घेतां आला नाहीं तर व्यापारी हक्क मिळवावयाचे, तेथें त्या हक्कांच्या संरक्षणाचें निमित्त करून सैन्य घुसवावयाचें, त्या सैन्याच्या जोरावर राज्यकारभारांत थोडाबहुत हात शिरकवावयाचा, असे साम्राज्याच्या आक्रमणाचे अनेक प्रकार आहेत. अर्थात् त्या मानानें परतंत्रतेंतहि निरनिराळ्या पायऱ्या आहेत. चीन, इजिप्त हे देश वरच्या पायरीला तर आफ्रिकेंतील नीग्रो हे खालच्या पायरीला आहेत. व हिंदुस्थान, कोरिया, फिलिपाईन बेटें हीं मधल्या पायरीला आहेत. पारतंत्र्याचा खड्डा कोणाला अगदीं तळापासून भरावयाचा आहे, कोणाला अर्धा भरावयाचा आहे तर कोणाला फक्त तोंडाशीं शिल्लक राहिलेला खोलगटपणा नाहींसा करावयाचा आहे. अर्थात् राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें परतंत्र राष्ट्रांतील तरुणांनीं आपापल्या पुनर्घटनेचा विचार वेगवेगळ्या रीतीनें करावयास पाहिजे. हिंदुस्थानाची परिस्थिति तर सर्वांहून भिन्न व अगदीं विशिष्ट अशी आहे. त्या परिस्थितीचा युद्धाचे दृष्टीनें विचार करून तो विचार एका विशिष्ट पद्धतीनेंच हिंदी तरुणांनीं हिंदी लोकांपुढे मांडला पाहिजे. अर्थात् या विषयाचा विचार स्वतंत्रपणे करावयाचा असल्यामुळें तो पुढील खेपेवर टाकणे प्राप्त आहे.

# पुण्यांतील बहिष्कार व हरताळ

सर जॉन सायमन व त्यांचे साथीदार यांचे आगमन पुणें शहरांत शुक्रवार ता. १२ रोजीं होणार हें आगाऊ ठरलेंच होतें. कमिशनाचा मुक्काम हिंदुस्थानांतील वेगवेगळ्या शहरांत पुढील पांचसहा महिन्यांत व्हावयाचा आहेच. परंतु त्याचा पहिला मुक्काम पुणें शहरींच पडावा अशी योजना नोकरशाहीनें केली. मुंबईच्या बंदरांत कमिशनानें पाऊल टाकल्यावर मुंबई हेंच कमिशनाला साक्षीपुरावा घेण्यास अगदीं गैरसोयीचें शहर होतें असें नाहीं. तथापि मुंबईस मुक्काम करणें राहोच, पण तेथें पळभरहि न थांबतां कमिशनानें एकदम पुणें पाहावें अशी योजना करण्यांत आली. यामुळें कमिशनास जाहीर निषेधाची पहिली सलामी ठोकण्याचा प्रसंग पुणेंकरांस लाभला.

कमिशन येण्यास महिनाभर अवकाश होता. तोंच निषेधाची तयारी करण्याकरितां सभा भरविण्यात येऊं लागल्या. निषेधाच्या कार्यक्रमांत बहुधा तीन गोष्टींचा समावेश होतो; मिरवणूक, हरताळ व जाहीर सभा. या तिनही बाबतींत पुण्यांतील सर्व प्रमुख राजकीय पक्षांची एकी घडून आली होती. यामुळें कार्याच्या यशस्वितेविषयीं एक प्रकार जामीनच पटल्यासारखा झाला. पुण्यांत खासगी बैठकी भरून हरताळबहिष्काराची तयारी होत होती तशी जाहीर सभा भरूनहि हरताळ—बहिष्काराच्या चळवळीस जनतेचें मन अनुकूल करून घेण्यांत येत होतें. पुण्यांतील बहिष्काराचें हें कार्य एकट्या पुण्याचें नसून मुंबई इलाख्याचें होय अशा भावनेनें मुंबईकरांनींहि पुणेंकरांस साहाय्य करण्याचें ठरविलें.

सायमन कमिशन पुण्यास शुक्रवारीं सायंकाळीं येणार अशी बातमी प्रथम प्रसिद्ध झाली होती. परंतु कार्यक्रमांत ऐनवेळीं फरक करण्यांत आला.

ज्या बोटीनें सायमनप्रभृति सभासद मुंबईस उतरावयाचे होते ती बोट मुंबईस गुरुवार ता. ११ रोजीं रात्रीं नऊ वाजतां मुंबईच्या बंदरांत आली व त्यानंतर दोन तासानीं म्हणजे ११ वाजतां कमिशन स्पेशल ट्रेनमधून पुण्यास येण्याकरितां निघालें. कमिशन बॅलार्ड पियरवर अपरात्रीं उतरलें व परभारें स्पेशल ट्रेनमध्यें चढलें. याकारणानें मुंबईतील बहिष्कारवाद्यांस त्यांची संभावना करण्यास पुरेशी संधीच मिळाली नाहीं. तथापि त्यांतूनहि सवड काढून व भाड्याच्या बोटींत बसून समुद्रांतल्या समुद्रांत सायमनसाहेबांस बहिष्काराची चुणूक दाखविण्यास मुंबईकर चुकले नाहींत. सायमन सप्तकाचे स्वागत करण्यास मुंबईच्या बंदरांत चार सरकारी अम्मलदार व पोलीसशिपाई काय ते हजर होते.

मुंबई ते पुणें या आगगाडीच्या रस्त्यावर रिव्हर्सिंग स्टेशनपासून पुढें खंडाळा, लोणावळा, मळवली इ. स्टेशनांवर युवकसंघांतील तरुणांची एक एक तुकडी काळ्या निशाणासह आगाऊ जाऊन बसली होती. रिव्हर्सिंग स्टेशनवर गेलेल्या चौघां तरुणांना पोलिसांनीं अटकेंत ठेवलें. पण तेथूनहि त्यांनीं गाडी स्टेशनांत आल्याबरोबर 'सायमन परत जा' अशी घोषणा केलीच. पुढेंहि प्रत्येक स्टेशनवर युवकसंघाने हाच ध्वनि सायमन कमिशनाच्या कानावर आदळण्याची व्यवस्था केली होती.

कमिशनापूर्वी एक दिवस पं. मोतिलाल नेहरू पुण्यास येणार अशी बातमी होती. परंतु त्याच सुमारास त्यांची प्रकृति बिघडल्यानें ते येऊं शकले नाहींत. पण मुंबईहून सुमारें दीडदोनशें मंडळी पुण्यास येणार असें ठरलें होतें. त्यांचें भांबुर्ड्याच्या स्टेशनावर स्वागत करणें व त्यांस पुणेंकरांत सामील करून घेतल्यावर सायमन कमिशनाच्या संभावनेसाठीं हजर राहाणें हीं दोन महत्त्वाचीं कामें पुणेंकरांस करावयाचीं होतीं. गुरुवारीं सकाळीं १० वाजतां मिरवणुकीचा कार्यक्रम निश्चित झाल्यावर कॉंग्रेसकमिटीनें तीन वाजण्याचे आंत तीस हजार हस्तपत्रकें छापवून घेतलीं व तीन ते सातपर्यंत सर्व ठिकाणीं ती वांटून टाकलीं. या कामीं पुणें शहर कॉंग्रेसकमिटीच्या श्री. र. गो. बाब्रस, श्री. द. वा. मोडक या व इतर स्वयंसैनिकांची फार मदत झाली. शनिवारवाड्यासमोर सर्वांनीं या कार्यक्रमानुसार सकाळीं ५॥ वाजतां जमावें असें ठरलें. शुद्ध पंचांगाप्रमाणें हा दिवस नरकचतुर्दशीचा होता तरी तो सण साजरा करून मंडळी पहांटेपासूनच शनिवारवाड्यासमोर जमूं लागली. ही मिरवणूक सहाच्या सुमारास शनिवारवाड्यापुढून भांबुर्डा स्टेशनाच्या रोखानें निघाली. वाटेनें तिला लोकांच्या झुंडीच्या झुंडी येऊन मिळत होत्या. मिरवणुकीबरोबर असंख्य काळीं निशाणें फडकत 'सायमनसाहेब चालते व्हा' 'साम्राज्यशाहीचा धिःकार असो' अशीं निषेधवचनें लिहिलेलीं मोठीं निशाणेंहि बरींच होतीं.

मिरवणूक स्टेशनावर पोंचल्यावर थोड्या वेळानें मुंबईची गाडी आली व तिच्यांतून दे. नरीमन, डॉ. वेलकर, श्री. बा. गं. खेर, मुंबईच्या युवकसंघाचे चिटणीस मेहेरअली, बालचमूचें एक पथक याप्रमाणे पार्शी, गुजराथी व दक्षिणी अशीं सुमारें दीडशें माणसें उतरलीं. भांबुर्डा स्टेशनावर पोलिसाचा बंदोबस्त कडेकोट होता. मिरवणुकीस मालधक्क्याच्या पलीकडे पुणें स्टेशनाकडे जाण्यास बंदी होती व धक्क्याजवळचा रस्ता पोलिसांनीं रोखला होता. फक्त भांबुर्डा स्टेशनापासून धक्क्यापर्यंतचा रस्ता खुला होता तरी त्यावरहि पोलिसांचा पहारा व्यवस्थेसाठीं ठेवलेलाच होता. हा रस्ता पुणें ते मुंबई या दरम्यानचा असून त्याजवरच डिस्ट्रिक्ट कोर्टाची नवी इमारत आहे. याच इमारतींत साक्षीपुरावा घेण्याचें काम कमिशन चालविणार होतें व याच रस्त्यानें पुणें स्टेशनावर उतरल्यानंतर कमिशनामधील सभासद गणेश खिंडीकडे गव्हर्नरसाहेबांचे बंगल्यावर मुक्कामास जाणार होते. त्याखेरीज या रस्त्याचें महत्त्व असें कीं तो रेलवेस अगदीं समांतर असून सायमनसाहेबांना पुणें स्टेशनाकडे जावयाच्या स्पेशल ट्रेनमधून तो स्पष्ट दिसण्यासारखा होता. अशा दृष्टीनें हा रस्ता अगदीं नाक्याचा असल्यामुळें मिरवणूक तेथें येऊन सडकेच्या कडेनें एका शिस्तींत उभी राहिली.

मिरवणुकीबरोबर पुण्यांतील सर्व राजकीय पक्षांतील प्रमुख गृहस्थ हजर होते. श्री. न. चिं. केळकर प्रो. शि. म. परांजपे, दा. वि. गोखले, न. वि. गाडगीळ, नारायणराव गुंजाळ, ग. वि. केतकर, दि. वा. दिवेकर, ल. ब. भोपटकर, वा. कृ. भावे, बाळकाका कानिटकर, बाबुराव फुले, डॉ. पळमुले इत्यादि अनेक गृहस्थ मिरवणुकींत होते. सायमनसाहेबांची गाडी येईपर्यंत ही मिरवणूक वाट पाहात उभी राहिली. तिजमधील जमाव ४।५ हजाराइतका असावा. मिरवणुकीबरोबर बँड वाजत असून तिची व्यवस्था फारच शिस्तीची होती. ही शिस्त राखण्याकरितां दे. नरीमन, न. वि. गाडगीळ इत्यादि गृहस्थ व स्वयंसेवक अविश्रांत खटपट करीत होते. एका बाजूस शिपाई व अधिकारी आणि दुसऱ्या बाजूस स्वयंसेवक व पुढारी असा हा सामना होता. मधून मधून गणेश खिंडीकडून स्टेशनाकडे स्वागतार्थ जाणाऱ्या मोटारी व चौचाक्या यांतील माणसांचीहि योग्य संभावना करण्यांत येतच होती. सर्वांचें लक्ष अर्थातच मुंबईहून यावयाच्या स्पेशल ट्रेनकडे लागून राहिलें होतें. स्पेशल ट्रेनची वेळ सकाळीं साडेआठाची होती. त्या

सुमारास एक 'ट्रायल ट्रेन' भांबुर्डा स्टेशनावरून पुणें स्टेशनाकडे गेली. पण तिच्यांत कमिशनमधील सप्तग्रह नव्हते. अखेर जवळजवळ ठरलेल्या वेळे-लाच कमिशनाची स्पेशल ट्रेन आली. तिला डबे पांचसात होते. बहुतेक डबे रिकामेच दिसत असून त्यांपैकीं एका डब्यांत सायमनसाहेब स्वतः खिड-कींतून तोंड काढून बसलेले आढळले. स्पेशल गाडी व तिच्यांतील सायमनसाहेब दिसतांच 'सायमन साहेब परत जा' व 'शेम शेम' यांचा त्या प्रचंड जन-समुदायांतून एकच कल्लोळ उठला, काळीं निशाणें फडकलीं व हा निषेध आपणास पोंचला असें सर सायमन यांनींहि मान हलवून दर्शविलें!

कमिशनाची गाडी पुणें स्टेशनाकडे निघून गेल्या-वर मिरवणुकानें पुणें स्टेशनाच्या रोखानें माल-धक्क्याच्या बाजूस कूच केलें. मालधक्क्यापुढील स्टेशनावर जाण्याचा रस्ता पोलिसांनीं रहदारीस बंद ठेवला असल्यामुळें फिरून मिरवणूक माल-धक्क्यापाशींच खुंटली. सायमन कमिशन पुणें स्टेशनावर पोंचल्यानंतर त्याला पुणें सबरबन म्युनिसिपालिटीनें मानपत्र सादर केलें. या मानपत्रसमारंभास सदर म्युनिसिपालिटीचे मूठभर सभासद, कांहीं सरकारी अधिकारी व थोडेसे सर-दार-इनामदार यांच्याशिवाय दुसरें कोणीहि फिर-कलें नाहीं. तो समारंभ आटोपल्यावर कमिशनाचे सभासद गणेशखिंडीवर जावयाचे असल्यानें त्यांना निषेधाची सलामी जवळून देण्याची संधि मिरवणु-कीनें दवडणें शक्य नव्हतें. कमिशनाच्या तीनचार मोटारी कांहीं वेळानें स्टेशनाकडून आल्या व त्या मिरवणुकीच्या गर्दीतून सावकाश नेणें भाग पड-ल्यामुळें निषेधाचा धिक्काराचा व काळ्या निशा-णाचा पाहुणचार मनमुराद घेत घेत कमिशन चालतें झालें.

मिरवणुकीचें मुख्य कार्य अशा परिणामकारक रीतीनें व भव्यपणानें पार पडल्यावर मिरवणूक शह-रांत शिरली व ती गाडीतळ, नरपतगीर गेट, रास्ते-वाडा, दारूवाल्याचा पूल, मोतीचौक व बुधवार-चौक यावरून रेमार्केटपाशीं पोंचली. शहरांतील सर्व दुकानें बंद राहून सर्वत्र सामसूम होतें. रेमा-र्केटपाशीं मिरवणूक पोंचल्यावर वस्ताद गुलाम दस्तगीर, दत्तोपंत गुप्ते व नारायणराव गुंजाळ यांनीं मिरवणुकींत सामील झालेल्या सर्व धर्मांच्या, जातींच्या व पक्षांच्या लोकांचे आभार मानले.

हरताळाचा कार्यक्रम या खेपेस फेब्रुवारी महि-न्यापेक्षांहि जास्त यशस्वी व परिणामकारक झाला ही गोष्ट सर्व वर्तमानपत्रांनीं मान्य केलेली आहे. यंदा दिवाळी (नवीन पंचांगाप्रमाणें) व पोंवळा ? सण हरताळाच्या दिवसाला लागूनच असल्या-मुळें यशस्वी व संपूर्ण हरताळ पाडणें ही गोष्ट फार कठीण होती. तथापि काँग्रेसच्या विनंतीला मान देऊन मंडई व इतर सर्व व्यापारी पेठा यांम-धील लहानमोठ्या सर्व व्यापाऱ्यांनीं व दुकानदा-रांनीं हरताळ पाडण्याचें आनंदानें कबूल केलें व हरताळादि कार्यक्रमाचे हस्तपत्रकावर शेंकडा सह्या मोठ्या अहमहमिकेनें दिल्या. स्थलसंकोचामुळें शेंकडो सह्या छापतां आल्या नाहीत, फक्त सुमारें पांचशेच निवडक नागरिकांच्या व व्यापाऱ्यांच्या सह्या छापतां आल्या व सह्या मिळविण्याचे कामीं काँग्रेसला पुणें शहर व लष्करमधील सर्व हिंदु-मुसलमान व्यापाऱ्यांनीं मदत केली. काँग्रेसकमिटीचे अध्यक्ष, चिटणीस यांनीं शहरांतील इतर निवडक पुढाऱ्यांसह गांवांतील सर्व व्यापारी पेठांतून हरताळाच्या आदल्या दिवशीं हिंडून व्यापाऱ्यांच्या गांठी घेतल्या व त्यास हर-ताळ यशस्वी करण्याचे कामीं मदत करण्याची विनंति केली. यामुळें हरताळ यशस्वी व परिणाम-कारक होण्यास फार मदत झाली.

सायंकाळीं ६ वाजतां शनिवारवाड्यासमोरील विस्तीर्ण पटांगणांत कमिशनाचा निषेध करण्या-करितां जंगी जाहीर सभा भरली. सभेस सुमारें १०।१२ हजार समुदाय हजर असावा. सभेचें अध्यक्षस्थान प्रो. शिवराम महादेव परांजपे यांनीं स्वीकारलें होतें. सभेच्या सुरवातीस श्री. ग. ना. कानिटकर यांनीं सभेचा उद्देश सांगितल्यावर श्री. वासुदेवराव कुळकर्णी यांनीं निषेधपर पदें गाइलीं. त्यानंतर अध्यक्ष दे. परांजपे यांचें पुढील आश-याचें भाषण झालें. ते म्हणाले—"हा जमलेला अफाट समुदाय पाहून या दगडाच्या शनिवार-वाड्यालाहि आनंद वाटत असला पाहिजे. आज आपल्याकडे केवळ किल्ल्याचे दगड पाहात नसून छत्रपति शिवाजीमहाराजांपासून शेवटच्या पेश-व्यांपर्यंतचे सर्व स्वराज्यसंस्थापक व स्वराज्यसंर-क्षक कौतुकानें पाहात आहेत. ते तुम्हाला असें सांगत आहेत कीं, हे आमच्या देशबांधवांनो! तुम्ही एक व्हा. व एक झालांत तर या किल्ल्याच्या दगडांत जी शक्ति आहे ती तुमच्या छातींत उत्पन्न होईल. स्वातंत्र्याच्या काळांत हें पटांगण लढणाऱ्या शिपायांनीं भरून जात असे. आज तें स्वराज्याच्या चळ-वळींतील तुम्ही सर्वांनीं भरून काढलें आहे. सायमनसाहेब मतें पाहाण्यासाठीं व अजमावण्या-साठीं येथें आले आहेत. आणि त्यांनीं आज लोक-मत पाहिलें असल्यामुळें कमिशनास जनतेची अनु-कूलता किती हें त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नसेल. सायमनसाहेब आमच्यांत मोकळे-

पणानें मिसळतील तर त्यांस हिंदी लोकमत उत्तम प्रकारें कळून चुकेल."

अध्यक्षांच्यामागून श्री. मेहेरअल्ली यांनीं सांगितलें कीं हिंदू-मुसलमानांनीं स्वराज्याच्या ध्येयासाठीं एक व्हावें. मुंबईचे सॉलिसिटर श्री. बाळ गंगाधर खेर म्हणाले, 'शंभर सायमन कमिशनें येऊन जें कार्य होणार नाहीं तें कार्य नेहरू कमिटीच्या रिपोर्टानें व ऐक्य परिषदेनें केलें आहे'. माणिकलाल वकील यांनीं परदेशी कापडावर बहिष्कार घालण्याचा उपदेश केला. श्री. बाबूराव गोखले म्हणाले 'इंग्रज लोक स्वतःस मठ्ठ डोक्यांचे सजमतात. त्यांच्या डोक्यांत सत्य उतरविण्याचा हा काळ नसला तरी त्यांच्या कानांत आपणांस तें घालतां येईलच. जो खुषीनें गुलाम राहात असेल तो गुलाम. आम्ही इंग्रजांची गुलामगिरी खुषीनें पत्करण्यास तयार नाहीं ही गोष्ट सायमनसाहेबांनीं विसरतां कामा नये'. श्री. केशवराव बागडे यांनीं सांगितले कीं, गेलीं दीडशें वर्षे इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत आहे. इतक्या वर्षांत इंग्रज नोकरशाहीनें हिंदुस्थानांत काय काम केलें याची चौकशी सायमनसाहेबांनीं आधीं करावी.

यानंतर शांतारामपंत शृंगारपुरे यांनीं मुंबईच्या युवकसंघातर्फे भाषण केल्यावर श्री. तात्यासाहेब केळकर यांचें भाषण झालें. ते म्हणाले 'सायमनसाहेब रेलवेनें आले व मोटारनें हिंडले. त्यांची ही हौस सरकारनें भागविली आहे. विमानांत बसण्याची त्यांची हौस सरकारनें पुरविली असती तर त्यांना ही सभा पाहावयास मिळून खरें लोकमत कळून चुकलें असतें. सायमनसाहेबांचे डोळे टांग्याला जुंपलेल्या घोड्याप्रमाणें आहेत. त्यामुळें त्यांना आजूबाजूचें कांहीं दिसत नाहीं. आज आपण स्वातंत्र्याचें घर बांधावयास काढलें आहे. पण सायमन सांगतात कीं आम्ही म्हणूं तसें घर बांधा. हें सांगण्यास सातासमुद्रापलीकडचे हे सात शहाणे कशाला पाहिजेत? या सप्तर्षींना कमिट्यारूपी अरुंधती दिली असली तरी ती नाटकांतील आहे, खरी नव्हे. म्हणून विलायती कमिशन व देशी कमिट्या यांचें लग्न लावून कधींहि मूल होणार नाहीं. ही गोष्ट नाटकांतील लग्नांत आपणास प्रत्यहीं दृष्टीस पडतेच.' श्री. केळकर यांच्यामागून कॉंग्रेसवाला, श्री. न. वि. गाडगीळ यांचीं भाषणें झालीं व शेवटीं अध्यक्षांनीं सर्वांचे आभार मानल्यावर व अध्यक्षांचे आभार श्री. पोपटलाल शाहा यांनीं मानल्यावर या संस्मरणीय सभेचें काम संपलें.

पुण्यांतील हरताळ, मिरवणूक व निषेध या बाबतींत पुणें नगर कॉंग्रेसकमिटी, जिल्हा कॉंग्रेसकमिटी, प्रांतिक कॉं. कमिटी, खिलाफत कमिटी, सार्वजनिक सभा पुण्यांतील युवकसंघ, इतर स्वयंसेवक, मुंबईकर नरीमनप्रभृति पुढारी, व भाटिया कच्छी बँड व युवकसंघाचे सभासद यांनीं अमूल्य कामगिरी केल्यामुळे हें कार्य अत्यंत यशस्वी रितीनें पार पडलें.

# सांघिक कुस्तीचे सामने

(ले.—**नी. वि. वणीकर,** हिंदविजय जिमखाना बडोदें.)

बडोद्यांतील हिंदविजय जिमखान्यानें यंदा वार्षिक शर्यतींचे प्रसंगीं विद्यार्थ्यांच्या कुस्त्यांत "सांघिक कुस्ती" ही एक नवीन बाब ठेविली आहे, हें ता. २-१०-२८ च्या केसरीवरून सर्वांस समजलें असेलच. हा सांघिक सामना ह्या वर्षी प्रयोगादाखल ठेवला आहे; आणि त्याचे नियमहि प्रयोगावस्थेंतच आहेत. ठरविलेल्या नियमानुसार येथें श्री. प. हं. नारायणगुरूंचे तालमींत कुस्त्या खेळवून पाहिल्या आहेत, आणि तेथें जमलेल्या तज्ज्ञांच्या सूचना विचारांत घेऊन यंदाचे वर्षाकरितां नियम मुक्रर केले आहेत.

कुस्ती हा आमचा राष्ट्रीय खेळ आहे, आणि अद्याप ह्या खेळांत आम्ही इतर कोणत्याही राष्ट्रास हार गेलों नाहीं, असें मोठ्या अभिमानानें म्हणतां येतें. कुस्तीच्या कलेची अशीच किंवा ह्याहीपेक्षां अधिक जोपासना आणि वृद्धि करीत गेल्यास आम्हास केव्हांही हार खावी लागणार नाहीं अशी खात्री वाटते. तथापि हा खेळ जोडीचा (म्हणजे दोन माणसांचा) व बहुतांशीं वैयक्तिक आहे.

हल्लींच्या वैयक्तिक सामन्यांच्या प्रकारांत कुस्तीगिरीला अवश्य असणाऱ्या मल्लयुद्धपोषक गुणांची चांगलीशी पारख होत नाहीं. कुस्ती खेळणारास (१) कलेंतील नैपुण्य, म्हणजे कोणताहि डाव योग्य वेळीं, योग्य प्रसंगीं, बिनचूक आणि बिनतोड बांधणें (२) खेळण्याची तडफ व चपलता (३) कुस्तीचे प्रसंगीं टिकून राहणारा दम आणि (४) प्रतिस्पर्ध्यास फसविण्याचें कौशल्य, ह्या चार गुणांची अवश्यकता आहे. वैयक्तिक सामन्यांत प्रतिस्पर्धी केव्हां तडफेनें मारला जातो तर केव्हां खेळणाराच स्वतः दमांत उखडतो. सर्वसाधारण खेळाडूंत नैपुण्य व कौशल्य हीं बेताचींच असतात; आणि हे चार गुण वाढविण्याच्या दृष्टीनें सामुदायिक शिक्षण फार थोडें ठिकाणीं दिलें जातें. आम्ही जी सामन्याची

योजना सुचवीत आहोंत, त्या योजनेनें हे सर्व वैयक्तिक व सामुदायिक गुण एकदम जोरानें फोफावूं लागतील असें आमचें म्हणणें नाहीं; तथापि ह्या योजनेचा थोडाफार इष्ट परिणाम होईल; आणि एका महत्त्वाच्या राष्ट्रीय खेळाला राष्ट्रसंवर्धक स्वरूप प्राप्त होईल. ही योजना अमलांत आणून वैयक्तिक सामने थांबवावे असे आमचें मुळींच मत नाहीं. उलट त्या सामन्यांबरोबरच असे सामुदायिक सामने करण्याची पद्धत सुरू करावी अशी आमची सूचना आहे.

अशा प्रकारचे सामने पूर्वी डेक्कन जिमखाना, पुणें, ह्या संस्थेनें लावले होते. त्यांची सामने चालविण्याची योजना वैयक्तिक कुस्तीसारखीच होती. ज्या बाजूचे सर्व गडी आधीं पडतील ती बाजू हरली असें समजलें जाई. अशा प्रसंगीं विरुद्ध बाजूचा एक निष्णात गडी सर्वांना पाडूं शके व मग त्या निष्णाताच्या बाजूस असणाऱ्या इतर गड्यांचा हिशेब नसे.

ह्या वर्षी प्रयोगादाखल मुकर केलेली आमची पद्धति क्रिकेटच्या सामन्याच्या पद्धतीप्रमाणें आहे. दोन पथ्यांपैकीं एक कांहीं वेळ हल्ला करणारा व दुसरा प्रतिकार करणारा असे असतात. नंतर हीं नातीं उलटसुलट होतात. वैयक्तिक कुस्तींत हीं नातीं खेळणारांच्या कसबाप्रमाणें क्षणोक्षणीं पालटत असतात. ही वैयक्तिक कुस्तीपुरती गोष्ट संघकुस्तींतहि कायम आहे. तथापि ह्या नवीन योजनेप्रमाणें प्रत्येक संघाला हल्ला करणारा "तोडणारा" आणि प्रतिकार करणारा "लढणारा" अशीं दोन नातीं उत्पन्न होतात; आणि त्या नात्यांप्रमाणेंच त्यांचे परस्पर हक्क निरनिराळे आहेत.

सामन्याचे संपूर्ण नियम पुढें दिले आहेत. नियम प्रयोगावस्थेंत आहेत, अगदीं अनपेक्षित अडचणीकरितां थोडासा फेरफार अपरिहार्य वाटल्यास तसा फेरफार करण्यांत येईल.

## नियम

१ प्रत्येक संघांत सहा खेळाडू असावेत ( आकस्मिक अडचणीकरितां प्रवेशअर्जांत आठ खेळाडूंचीं नांवें द्यावीत ). २ कोणाही खेळाडूचें वजन १२० पौंडांच्या वर नसावें, व त्याचें वय ता. ३१ डिसेंबर सन १९२८ रोजीं पूर्ण वीस वर्षांवर नसावें ३ सामना सुरू होण्यापूर्वी, मुख्य निर्णायक ( chief umpire ) दोनही बाजूंच्या नियंत्यांना ( captains ) बोलावून वरफेंक ( toss ) करील. ज्याच्या उपनांवाचें आद्याक्षर वर्णानुक्रमांत प्रथम असेल त्यानें दान (राजा किंवा पाठ) मागावें. जो दान जिंकील त्यानें आपला पक्ष तोडणारा ( attack ) कीं लढणारा (def nce) तें ठरवावें व तसें मुख्य निर्णायकास कळवावें. ४ लढणाऱ्यापैकीं प्रत्येकानें तुटेपर्यंत ( चीत होईपर्यंत ) प्रतिपक्षाच्या गड्याशीं लढत राहिलें पाहिजे. लढणाऱ्यापैकीं कोणासही कुस्ती मध्येंच सोडून परततां येईल; परंतु पुनः त्या डावांत ( innings ) त्यास खेळतां येणार नाहीं व तो तुटला असें समजलें जाईल. ५ सर्व गडी संपेपर्यंत लढणाऱ्या पक्षानें एक गडी तुटतांच ताबडतोब दुसरा गडी पाठविला पाहिजे ( ह्याकरितां आखाड्याचे बाजूला एक गडी सतत तयार राखावा. ) ६ लढणारा एक किंवा अनेक प्रतिस्पर्ध्यांस जितके वेळां चीत करील तितके चीत त्याचे नांवावर जमा होतील. ७ एकच लढणारा पूर्ण पांच मिनिटें एकाच तोडणाऱ्याशीं खेळत राहिल्यास आणि त्या पांच मिनिटांनीं तोडणारा एकदांही चीत न होतां मागें फिरल्यास, लढणाऱ्या पक्षास एक पोकळ चीत मिळेल. ८ तोडणारा आपलीं पांच मिनिटें संपण्यापूर्वी मागें फिरल्यास, उरलेल्या प्रत्येक मिनिटाबद्दल किंवा मिनिटाचे अंशाबद्दल लढणाऱ्या पक्षास तीन पोकळ चीत मिळतील. ९ तोडणाऱ्या पक्षापैकीं कोणीही लढणाऱ्या खेळाडूशीं आपल्या प्रत्येक खेपेस पांच मिनिटें कुस्ती केली पाहिजे. पांच मिनिटे पुरीं होण्यापूर्वी एक लढणारा खेळाडू तुटल्यास दुसऱ्याशीं कुस्ती केली पाहिजे. आखाड्यांत उतरल्यापासून पांच मिनिटे पुरीं होतांच मुख्य निर्णायक इशारत देईल. इशारत मिळतांच असेल तशी कुस्ती सोडून तोडणाऱ्यानें परत फिरावें व दुसऱ्या तोडणाऱ्यानें त्याच लढणाऱ्याशीं प्रथमपासून कुस्ती सुरू करावी. १० एक तोडणारा त्याचीं पांच मिनिटें संपण्यापूर्वीच मागें फिरल्यास तीं पांच मिनिटे संपेपर्यंत दुसरा तोडणारा कुस्तीकरितां उतरावयाचा नाहीं. ११ तोडणारा कितीही वेळां चीत झाला तरी त्यानें पांच मिनिटें संपेपर्यंत लढणाऱ्याशीं खेळत राहिलें पाहिजे. १२ लढणाऱ्या पक्षाचे सर्व खेळाडू चीत झाले म्हणजे एक डाव ( innings ) झाला असें समजावें. १३ प्रत्येक डावाचे शेवटीं १५ मिनिटें विश्रांति द्यावी. डावास एक तासापेक्षां अधिक वेळ लागला असल्यास व त्यांत मधली सुटी आली नसल्यास ही विश्रांति अर्धा तास द्यावी व मधली सुटी गाळावी. १४ खेळ सुरू झाल्यापासून दीड तासांत डाव न संपल्यास दीड तासानें अर्धा तास मधली सुटी द्यावी. १५ सामने सकाळीं १०-३० वाजेपर्यंत व सायंकाळीं ३-३० च्या पुढें चालवावेत. १६ सकाळीं किंवा संध्याकाळीं सामन्यास लागणाऱ्या वेळास क्रीडायाम किंवा आयाम म्हणावें. १७ कोणत्याही आयामांत प्रत्यक्ष खेळाचा वेळ तीन तासांपेक्षां जास्त असूं नये. १८ एका आयामांत प्रत्येक

पक्षाचा आमूलाग्र डाव संपल्यास आयाम समाप्त करावा. १९ दोन आयामांत निदान अठरा तासांचें अंतर असावें. २० एका आयामांत कोणत्याही कारणाकरिता बदली खेळाडू घेतां येणार नाहीं. २१ प्रत्येक पक्षाचे दोन डाव होतील; आणि दोन डाव मिळून ज्या पक्षास जास्त चीत मिळाले असतील तो विजयी झाला, किंवा त्यानें मात केली असें समजलें जाईल. २२ दोनही पक्षाना सारखे चीत मिळाल्यास, जो पक्ष दोन डावांत मिळून अधिक वेळ लढला असेल, तो विजयी होईल. २३ तीन दिवसांत दोनही डाव न संपल्यास पहिल्या डावावरून निकाल देण्यांत येईल. २४ कुस्ती खेळतांना तोडणाऱ्याच्या किंवा लढणाऱ्याच्या शरीरास मुद्दाम अपाय केल्यास अपाय करणाऱ्या खेळाडूस काढून टाकण्यांत येईल. २५ तोडणाऱ्याच्या शरीरास अपाय होऊन तो पांच मिनिटें संपण्यापूर्वी मागें फिरल्यास, आणि निर्णायकांची त्या अपायाबद्दल खात्री झाल्यास, लढणाऱ्या बाजूस पोकळ चीत मिळणार नाहींत. तथापि त्याचीं पांच मिनिटें संपेपर्यंत दुसरा तोडणारा खेळास उतरावयाचा नाहीं. २६ जिमखान्याचे कुस्तीचे इतर नियम ह्या योजनेसही लागू आहेत. कुस्ती खेळणाऱ्याने अंगास तेल लावून येऊं नये व त्याचीं नखें काढलेलीं असावीं.

वरील नियमावरून सामने चालविण्याच्या योजनेची पूर्ण कल्पना ध्यानांत येईल. ही योजना सर्वस्वी निर्दोष आहे असें आमचें मुळींच म्हणणें नाहीं. तसेंच दुसरी एखादी अगदीं निराळ्या तत्त्वावर योजना सुचवितां येईल. येथील नरवणबंधु यांनीं दुसरी एक योजना सुचविली आहे. तिचा प्रयोग करून ती लोकांना कितपत रुचते हें पाहावयाचें आहे. कोणत्याहि योजनेने खेळाडूंत व बघणाऱ्यांत ईर्षा व स्फुरण चढेल तर ती यशस्वी होईल. निरनिराळ्या कुस्तीप्रेमी मंडळींनीं व संस्थांनीं वर सुचविलेल्या योजनेप्रमाणें सामने लावून पाहावे व त्यांना येणाऱ्या अनुभवावरून आम्हास हितकारी सूचना कराव्या अशी विनंति आहे.

# बुद्धिबळाचा रकाना

( ले.—गो. गो. मुजुमदार )

बुद्धिबळाच्या खेळाला शास्त्रीय स्वरूप देण्यांत त्याच्या संक्षेप लिपीनें मोठेंच साहाय्य केलें आहे. नवीन खेळाडूंनीं काढलेल्या नव्या कल्पना, हल्ल्याचे नवे प्रकार, त्यावरचे बचाव वगैरे खेळांतील आंगोपांगाची शास्त्रीयदृष्ट्या छाननी करून त्यांना अधिकाधिक निर्दोष करण्यास संक्षिप्त लिपीची फार जरूर आहे हें जाणून पाश्चात्यांनीं सन पंधराशेंच्या सुमारास लिपीची कल्पना काढली. लवकरच तिची उपयुक्तता लोकांस पटून खेळाडूंनीं व वृत्तपत्रादिकांच्या संपादकांनीं तिचा उपयोग करण्यास सुरवात केली व तिची व्याप्ति क्रमानें वाढून, आज पाश्चात्य देशांत गेल्या तीनचारशें वर्षांत होऊन गेलेल्या नामांकित खेळाडूंचे सबंध डावचे डाव पाहावयास मिळण्याची, मोठमोठ्या सामन्यांचे इतिहास वाचण्याची, व अनेक हल्ल्याची व बचावांची आमूलाग्र उपपत्ती अभ्यासण्याची सर्वांस सोय झाली आहे.

उलटपक्षीं लिपीच्या अभावीं हिंदुस्थानांत आजपर्यंत होऊन गेलेल्या मोठमोठ्या खेळाडूंच्या क्रीडापटुत्वाची कोणत्याही प्रकारें प्रतीति येण्यास इकडे आम्हास मार्ग राहिला नाहीं! यामुळें ईस्ट इंडिया कंपनीचे कारकीर्दीपासून तों तहत परवांपर्यंत दरम्यानच्या काळांतील महेश बानर्जी, गुलाम हुसेन, दाते, राचप्पा लिंगाईत, बंडंभट मेहेंदळे वगैरे खेळाडूंची नांवांपलीकडे आज विशेष माहिती उपलब्ध नाहीं; मग त्यांच्या खेळांतील वैयक्तिक विशेष समजण्याचें तर दूरच राहिलें! बरें, असल्या लिपीची बीजकल्पनाच इकडे नव्हती म्हणावें तर तसेंहि नाहीं; कारण घोडा सर्व पटांतल्या चौसष्ट घरांतून उडविण्याची पद्धत जी श्लोकांत सांगितलेली आढळते ती एक प्रकारची लिपीच होय. मग तसल्याच एखाद्या लिपीचा उपयोग खेळाडूंचे डाव उतरण्याकडे कां झाला नाहीं याचें कारण इतिहासलेखनाकडे एकंदरींत असणाऱ्या आमच्या उदासीनतेवांचून दुसरें कांहीं असेलसें वाटत नाहीं.

हल्लीं चोहोंकडे रूढ असलेल्या लिपींत मोहऱ्यांचीं नांवें आद्याक्षरानें सांगण्याचा प्रघात आहे. जसें रा=राजा, घो=घोडा, प किंवा प्या=प्यादा, उं=उंट वगैरे. पटांत प्रत्येक बाजूला राजाची व वजीराची अशा दोन फळ्या असतात हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांतील राजाच्या फळींतील मोहऱ्याचा उल्लेख त्याच्या नांवाचा संक्षेप जोडून, व वजिराच्या फळींतील मोहऱ्याचा उल्लेख त्याच्या नांवाचा संक्षेप जोडून करतात. जसें, राघो=राजाचा

घोडा, वह=वजिराचा हत्ती, राघोप—राजाच्या घोड्याचें प्यादें वगैरे. पुष्कळ वेळां डाव बराच खेळून झाल्यावर मोहरीं आपली जागा सोडून हललेलीं असतात, व अमुक मोहरें राजाच्या फळींतलें कीं वजिराच्या फळींतलें हें चटकन् ओळखण्यास मार्ग राहत नाहीं, अशा वेळी त्या मोहऱ्याचा उल्लेख अमुक स्थळीं असलेलें मोहरें असा जागेवरून करतात. जसें, घो ( राउं ५ ) = राजाच्या उंटाच्या पांचव्या घरीं असलेला घोडा, ह ( रा २ ) = राजाच्या दुसऱ्या घरीं असलेला हत्ती वगैरे.

पटावरील पगांच्या उभ्या ओळी प्रत्येक मोहऱ्यास एक याप्रमाणें आठ मोहऱ्यांत वांटून दिल्या आहेत, व मोहऱ्यांचें वसतं घर हें त्या ओळींतलें मूलस्थान म्हणजे पहिलें घर व त्या समोरचें दुसरें, त्याच्या पुढचें तिसरें अशा उभ्या क्रमानें निर्देश करण्याची चाल आहे. अर्थात् पट मांडून तयार झाला म्हणजे प्रत्येक मोहरें आपल्या पहिल्या घरीं असतें व त्यांचें प्यादें त्या मोहऱ्याच्या दुसऱ्या घरीं असतें. पांढरा व काळा आपापल्या मोहऱ्यांचा व त्यांच्या पगांचा निर्देश आपापल्या बाजूकडून करीत असतो. त्यामुळें पांढऱ्या राजाच्या दुसऱ्या घरीं असलेल्या प्याद्याला काळी बाजू आपल्या राजाच्या सातव्या घरीं असलेलें प्यादें म्हणेल, व पांढऱ्या वजिराच्या चौथ्या घरीं असलेल्या उंटाला काळी बाजू आपल्या वजिराच्या पांचव्या घरीं असलेला उंट म्हणेल हें उघड आहे. परंतु प्रत्यक्ष खेळांत दोनहि बाजूंच्या खेळ्या पृथक् पृथक् उतरावयाच्या असल्यानें हा भाषाविरोध कोणतीहि अडचण उत्पन्न करीत नाहीं.

खेळ्या नमूद करण्याचे जे तीन प्रकार, १ अमुक मोहरें अमुक ठिकाणीं खेळणें, २ मोह-यानें मोहरें घेणें व ३ बुरुजांत राजा नेणें; हे अनुक्रमें १ आडवी रेघ–, २ गुणिले चिन्ह ×, व दोन किंवा तीन शून्यें ०० किंवा००० अशा खुणांनीं दाखवितात. जसें, " काळा राजा आपल्या उंटाच्या पहिल्या घरी खेळतो " ही खेळी लिपीमध्यें "रा-राउं१" अशी लिहिली जाईल. " पांढऱ्या वजिराच्या उंटाच्या तिसऱ्या घरीं असलेला घोडा काळ्या वजिराच्या घोड्याचे चौथे घरीं असलेलें प्यादें मारतो " हा मजकूर "घो (वउं ३)× प (वघो ४)" असा संक्षेपानें लिहितां येईल. राजा आपल्या बुरजांत गेला ही खेळी"रा००" अशी व वजिराच्या बुरुजांत गेला ही खेळी"रा०००" अशी मांडली जाते. प्याद्यानें दोन घरें एकदम सरलेलें प्यादें वाटेंत मारल्यास "प×प वा. मा. " असा उल्लेख करतात.

डावाची विशेष परिस्थिति मांडून दाखवितांता दोन चिन्हांचा उपयोग करतात. एक बाजू दुसऱ्या बाजूपेक्षां सरस आहे असें दाखवावयाचें असल्यास ती अधिक चिन्हानें दाखवितात. व दोनही बाजूंची परिस्थिति बरोबरीची आहे असें दाखविणें झाल्यास = या चिन्हानें दाखवितात. डाव उतरणें झाल्यास दोन स्तंभ करून एकास पांढरा व एकास काळा अशीं नावें देऊन त्या त्या स्तंभांखालीं त्या त्या बाजूच्या खेळ्या लिहितात व मागं दोनही बाजूंस साधारण असा अनुक्रमांक टाकतात.किंवा एकाच मोठ्या रेघेच्या वरच्या बाजूस पांढऱ्यांची खेळी व.खालच्या बाजूस काळ्याची खेळी लिहितात. एखादी खेळी चांगली झाली हें त्या खेळीं पसंतीचें दर्शक उद्गारचिन्ह टाकून दाखवितात. एखादी खेळी वाईट वा संशयित योग्यतेची आहे असें दाखवावयाचें असल्यास तिच्यापुढें प्रश्न–चिन्ह घालतात. पाश्चात्य लोकांत चांगल्या डावावर नेहमीं टीपा देऊन त्यांतील महत्त्वाच्या खेळांची छाननी करण्याचा प्रघात आहे. व तो खेळाच्या प्रगतीस फारच पोषक झाला आहे. तसला एक डाव आमच्या वाचकांच्या सोईकरितां, वर लिहिलेल्या चिन्हांचा उपयोग करून, पुढें मांडून दाखवितों व त्यांवर टीपाहि देतो. खेळाडू वाचकांनी सदर डाव पटावर प्रत्यक्ष खेळून त्याची रुजवात घ्यावी, म्हणजे त्यांस लिपीच्या उपयोगाची बरीच कल्पना येईल.

## डाव नं. १

वजिराच्या प्याद्याचे तोड ( अ )

| **पांढरा** | **काळा** |
|---|---|
| **व्हिड्मार** | **नीमझोविश** |

नुकतीच अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं बुद्धिबळाची जी टूर्नामेंट झाली तिजमध्यें व्हिड्मार व नीमझोविश-या रशियन खेळाडूंमध्यें पुढील डाव खेळला गेला.

| **पां.** | **का.** |
|---|---|
| १ प्या–व ४ | घो–रा उं ३ |
| २ घो–राउं ३ | प्या–रा ३ |
| ३ प्या–राघो ३ | प्या–व ४ |
| ४ उं–घो २ | व घो–व २ (आ) |
| ५ ०–० (इ) | उं–व ३ |
| ६ प्या–व घो ३ | प्या–उं ३=(ई) |
| ७ व घो– व २ | ०–० |
| ८ उं–घो २ | व रा २ |
| ९ प्या–उं ४ | प्या–व घो४(उ) |
| १० घो–रा ५! (ऊ) | उं × घो |
| ११ प्या × उं | घो–घो ५ |
| १२ प्या–रा ४ ! | रा घो × रा प्या |
| १३ रा प्या × प्या | रा प्या × प्या |
| १४ प्या × व प्या | प्या × प्या |
| १५ उं × प्या +(ऋ) | ह–घो १ |
| १६ ह–रा १ | व–व ३ |

| | |
|---|---|
| १७ घो–उं ३ | घो × घो शह |
| १८ व × घो | रा–ह् १ |
| १९ व ह्–उं १ | ह्–घो ३ |
| २० ह् × उं! | ह् × ह् |
| २१ व × उं प्या | व–रा घो ३ |
| २२ व × घो | डाव हरतो (ॠ) |

**टीपा**

अ...वजिराचें प्यादें प्रथम दोन घरें खेळण्याच्या पद्धतीला हें नांव आहे.

आ...येथपर्यंत दोनहि बाजू बरोबर खेळत आहेत.

इ...दोन पूज्यें व मध्यें रेघ ही खूण राजा आपल्या बुरुजांत गेला असे दाखविते.

ई...समांतर रेषा आतांपर्यंत दोघांचा डाव बरोबरीचा आहे हें दाखवितें.

उ...ही खेळी वाईट झाली हें दाखविण्याकरितां प्रश्न–चिन्ह घालतां आलें असतें. खेळी वाईट कां हें वाचकांस आतांच चांगलेसें कळणार नाहीं.

ऊ...उद्गार–चिन्हावरून ही खेळी चांगली झाली हें वाचकांनीं ताडलें असेल.

ऋ...येथून पांढऱ्याचा डाव सरस राहिला हें अधिक–चिन्हावरून दिसून येईल. त्यांचीं सर्व मोहरीं मोकळीं होऊन लागू झालीं.

ॠ...आतां डाव वांचण्याजोगा नसल्यानें काळ्यानें तो आपणावर झाल्याची कबुली दिली.

# स्त्रियांचे हक्क व हिंदु कायदा

(लेखक–**गो. म. जोशी.**)

**लेखांक ३ रा**

"अवयवभूत व्यक्तीपेक्षां अवयवीरूप असलेला समाज हा सहस्र पटींनीं श्रेष्ठ आहे. त्यामुळें व्यक्तिगत जीवन, त्याची प्रजावृद्धि, त्याचे सामाजिक वर्तन वगैरे जीवाच्या हालचालीशीं संबद्ध असलेल्या एकूण एक बाबतींत समाजाचे व्यक्तीवरील हक्क अमर्याद आहेत. समाज कांहींच्या जीविताचा ताबा आपणाकडे घेईल तर कांहींची प्रजोत्पादनाची शक्ति नष्ट करून टाकील. कांहींना अस्पृश्य मानून (Segregation करून) त्यांची वृद्धि थांबवील तर कांहीं सुपिंडाचा वरील जीवनार्थ कलहाचा बोजा हलका करून प्रजेची वाढ करण्याला सवड देईल. अशा शेकडो तऱ्हांनीं व्यक्तीला नियंत्रण घालण्याचा समाजाला हक्क आहे इतकेंच नव्हे तर पुढील पिढ्यांकरितां तसें करणें हें समाजाचें कर्तव्यकर्म आहे." (सी. बी. 'डेव्हनपोर्ट हेरेडिटी इन रिलेशन टू युजेनिक्स' पान २६७)

हल्लींच्या हिंदु कायद्यानें स्त्रियांच्या ज्या हक्कांची पायमल्ली होते असें म्हणणें आहे त्याचे मुख्यत: दोन विभाग पडतात. पहिला विवाहविषयक आणि दुसरा दायभागविषयक. या दोनही हक्कांसंबंधीं असें म्हणणें आहे कीं, कायदे पुरुषांनींच केले असल्यामुळें व त्यांचे अर्थहि पुरुषांनींच लाविले असल्यामुळें ते कायदे अर्थातच एकपक्षीय व आपमतलबी झाले आणि ते स्त्रियांचें सर्व जीवन व्यापून राहिले. विवाहविषयक कायदे पाहिले तर कौमार्य, विवाहित स्थिति व वैधव्य या तीनहि स्थिति स्त्रियांना जाचक वाटतात. म्हणून स्त्रियांना खालील सर्व बाबतींत फरक व्हावयास पाहिजे आहे व तो न झाल्यास त्या बंड करणार आहेत व त्या बंड करणार नसल्यास आम्ही तें त्यांना करावयास सागणार आहोंत.

स्त्रियांना ज्या गोष्टी जाचक वाटतात त्यांची यादी खालीलप्रमाणें—

(१) स्त्रियांना विवाहसंस्कार आवश्यक नसावा (२) सध्या स्त्रियांचे विवाह अतिशय बालपणीं होतात. ती स्थिति कायद्यानें बंद करावी. विवाहसंस्काराचें किमान पक्ष वय सोळा हें असावें व अठरा वर्षांपूर्वी स्त्रीनें नवऱ्याजवळ राहिलेंच पाहिजे असा जुलूम असूं नये (३) तिला पतीची निवड करण्याचा हक्क अनुलोम व प्रातिलोम पद्धतीनें कोणत्याहि जातींतून असावा (४) ज्याअर्थी पुरुषांना अनेक स्त्रिया करतां येतात त्याअर्थी स्त्रियांना देखील घटस्फोटाची व पुनर्विवाहाची परवानगी असावी. हे विवाहविषयक हक्क स्त्रियांना पाहिजे आहेत त्यांचा आपण प्रथमतः विचार करूं.

(१) विवाहसंस्कार हा स्त्रियांना आवश्यक नसावा. वेदांच्या काळीं तो तसा नव्हता असें त्यांचें म्हणणें आहे. 'बॅ. जयकर म्हणतात, वेदांच्या काळीं लग्न हा संस्कार आवश्यक असावा असें दिसत नाहीं. स्त्रिया आमरण अविवाहित राहात असें दिसतें. त्या बहुतेक आपलें आयुष्य विद्यार्जन व परोपकार या दोन गोष्टींत खर्च करीत असाव्या असें वाटतें' (बॉंबे क्रॉनिकल ऑगस्ट २७). वेदांच्या काळीं काय होतें हा वाद किंचित्काल बाजूला ठेवून आमरण 'अविप्लुत ब्रह्मचर्या' कुमारी राहाणें शक्य आहे काय व असल्यास इष्ट आहे काय या गोष्टीचा विचार

करूं. एखाद्या कोणत्याही इंद्रियाची प्रक्रिया योग्य वेळीं न झाल्यास शारीर पिंड व मानस पिंड विकृत होतो किंवा नाहीं हा प्रश्न स्त्रिरोगचिकित्सक (गायनेकॉलॉजिस्ट), इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ (फिजिऑलॉजिस्ट), मनःपृथक्करणशास्त्रज्ञ (सायकोॲनॅलिस्ट) यांचकडे सोपवून निवळ सामाजिक दृष्टीनें आम्ही सांगतों की समाजांत प्रजा जास्त अविवाहित राहूं लागल्यास समाजांतील आत्महत्यांचें प्रमाण वाढतें. खालील आंकडे आमच्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ देतों. प्रत्येक वर्गाच्या दहा लाख लोकांशीं खालील प्रमाण सांगितलेलें आहे.

| वर्ग | आत्महत्यांचें प्रमाण |
|---|---|
| ४५ वर्षें वयाचे अविवाहित पुरुष | ९७५ |
| ४५ ,, विवाहित व संततियुक्त पुरुष | ३३६ |
| ,, ,, परंतु संततिरहित ,, | ६४४ |
| ६० वर्षांचे अविवाहित पुरुष | १५०४ |
| ,, विवाहित व संततियुक्त | ९३७ |
| ,, विवाहित व संततिरहित | १२५८ |

अशाच तऱ्हेचें गणितागत प्रमाण स्त्रियांमध्येंहि दिसून येतें, परंतु मुख्यतः स्त्रियांचा भर वेड लागण्याकडे असतो. वरील आंकड्यांवरून सहजच अनुमान काढतां येईल कीं विवाह हा समाजाचा एक संरक्षक घटक आहे व त्यानें जीवाची स्वनाशाकडे प्रवृत्ति ही जी सामाजिक विकृत स्थिति तिला आळा पडतो. म्हणून जास्तींत जास्त व्यक्तींना गृहस्थाश्रम स्वीकारतां येईल अशा तऱ्हेची समाजरचना करणें हें श्रेष्ठ पुढाऱ्यांचें कर्तव्य आहे.

(२) विवाहेच्छु कन्येचें वय काय असावें? बॅ. जयकर यांच्या मतानें सोळा वर्षांपूर्वी कन्येचा विवाह करणें हा कायद्यानें गुन्हा मानला जावा व अठरा वर्षांपूर्वी स्त्रीला नवऱ्याजवळ राहणें भाग पाडूं नये. याला कारणें अशीं सांगितलीं जातात कीं बालविवाहापासून होणारी प्रजा कमी दर्जाची असते. मुलीला अकालीं मातृपद आल्यामुळें तिला आपल्या संततीची काळजी घेतां येत नाहीं. लवकर मातृपद आल्यानें स्त्रियांची प्रकृति बिघडून क्षयादि विकार प्रबल होतात व एकंदरींत स्त्रियांचा व त्यांच्या संततीचा म्हणजे भावी पिढीचा ऱ्हास होतो. आतां या सर्व मुद्द्यांचा शास्त्रीय दृष्टीनें विचार करूं. प्रथमतः हें सांगणें जरूर आहे कीं या बाबतींत वयाचा आंकडा देणें अत्यंत अशास्त्रीय आहे व दिलाच तर तो निदान सृष्टिक्रमाप्रमाणें येणारा सर्वसाधारण (ॲव्हेरेज) आंकडा तरी द्यावा. दुसरें असें कीं वर बालविवाहाच्या विरुद्ध म्हणून जे मुद्दे आणले गेलेले आहेत त्यांपैकीं कांहीं समाजशास्त्रदृष्ट्या गैरलागू आहेत व कांहीं निवळ भ्रामक अशास्त्रीय व असत्य आहेत. तिसरें आम्हीं वर समाजाची सवलत किंवा दुर्बलता मोजण्याची जीं गणितागत साधनें दिलीं आहेत तीं लावून पाहिलीं असतां उशीरा लग्नें हीं अत्यंत घातुक आहेत असें दिसेल व चौथें म्हणजे जी विवाहेच्छु कुमारी तिचा विवाहापूर्वी पुरुषांशीं संबंध झालेला नसावा (अनन्यपूर्विका) किंवा असावा याचा त्यांनीं खुलासा केलेला नाहीं तो जरूर करावा.

आतां प्रथमतः किरकोळ मुद्द्यापासून सुरुवात करूं. पुरुषांशीं संबंध झालेला असावा किंवा नसावा, या बाबतींत नसावा असें गृहीत धरून आम्ही असा प्रश्न विचारतों कीं, आपण ज्या संस्कृतीची नक्कल करूं इच्छितां त्या संस्कृतीची या बाबतींत काय परिस्थिति आहे याची माहिती आपण मिळविली आहे काय? जस्टिस बेन लिंडसे यानें अमेरिकेंतील स्थितीचा अभ्यास करून ग्रंथ लिहिला आहे त्यावरून अगदीं श्रेष्ठ घराण्यांत देखील व आपण ज्यांना लहान मुली समजतों त्यांच्या बाबतींतसुद्धा पुरुषांशीं संबंध होण्याच्या दृष्टीनें हें उशीरा लग्न करण्याचें तत्त्व म्हणजे थोतांड आहे असें दिसून येत आहे. जस्टिस लिंडसेपेक्षां जास्त अधिकारयुक्त वाणीनें सांगणारा लेखक पाहिजे असेल तर वेस्टरमार्कचा 'हिस्टरी ऑफ ह्यूमन मॅरेज'मधील खालील उतारा बघा. 'आजच्या स्थितींत पाहिलें तर मोठमोठाल्या शहरांतून खालच्या वर्गामध्यें ज्यांचे विवाह शास्त्रानें निषिद्ध मानले आहेत त्यांच्यामधील व्यवहार कांहीं थोडेथोडके दिसून येत नाहींत. आणि वरच्या वर्गांत देखील एकाच घराण्यांतील मुला–मुलींचे संबंध वडील माणसें व पालक समजतात त्याप्रमाणें कमी प्रमाणांत घडून येतात असें नाहीं. खरोखर सांगावयाचें तर बारा वर्षें वयाच्या किंवा त्यापेक्षां जरा जास्त वयाच्या बहीण-भावामध्यें घडलेल्या अशा पुष्कळ गोष्टी मला माहीत आहेत. परंतु ऋतुप्राप्तीनंतर या गोष्टी थांबतात.'

आतां बालविवाहाच्या विरुद्ध आणलेल्या गेलेल्या एकेका मुद्द्याची छाननी करूं आणि किरकोळ बारीकसारीक मुद्दे घेत बसण्यापेक्षां प्रथमच बालविवाहानें प्रजा हीन स्वरूपाची होते या मुद्द्याचा विचार करूं. बालविवाहापासून निर्माण होणारी प्रजा हिंदुस्थानांत देखील ऋतुप्राप्तीच्या पूर्वी उत्पन्न होत असते असें कोणीहि दाखविल्याचें आमच्या वाचनांत नाहीं. सृष्टीनें ऋतुप्राप्ति ही प्रजा उत्पन्न होण्याची सुरुवात असें आपल्या नियमानें दर्शविलेच आहे. परंतु सृष्टीपेक्षां शहाणा झालेला मनुष्यप्राणी म्हणतो कीं इतक्या लवकर झालेली प्रजा हीन स्वरूपाची निपजते. याला कसोटी काय? म्हणून विचारलें तर समाजशास्त्रीय गणितागत कसोटी न सांगतां असें सांगितलें जातें कीं, बालविवाहापा-

सून उत्पन्न झालेल्या प्रजेंत बालमृत्यूचें प्रमाण जास्त पडतें, लहान वयांत झालेल्या संततींत जीवनशक्ति कमी असते, त्यांच्यांत धडाडी कमी असते. परंतु आम्ही उलट असा प्रश्न विचारतों कीं समाजाची अधोगति दाखविणारे आत्महत्यांचें प्रमाण बालविवाहापासून उत्पन्न झालेल्या संततींत वाढत असतें काय? त्यांच्यामध्यें मानसिक अधोगति वाढविणारें वेड लागण्याचें प्रमाण वाढलें आहे काय? या बाबतींत श्री. फडके यांनीं आपल्या 'सेक्स प्रॅब्लेम इन इंडिया' या ग्रंथांत पा. २८५ वर याचे तुलनात्मक आंकडे दिलेले आहेत ते जिज्ञासूंनीं जरूर पाहावे.

आतां पहिला मुद्दा म्हणजे बालविवाहापासून उत्पन्न झालेल्या प्रजेंत बालमृत्यूचें प्रमाण जास्त असतें. तें बालविवाहानें वाढते काय, बालहत्यांचें प्रमाण कमी असणें हें समाजाच्या श्रेष्ठत्वाचें दर्शक आहे किंवा काय याचा विचार स्वतंत्र आहे. परंतु बालमृत्यूंचें प्रमाण (Selective death rate) कमी करूं इच्छिणाऱ्या व कमी केलेल्या राष्ट्रांना व समाजांना आम्ही असा प्रश्न विचारतों कीं, 'बालमृत्यूंचें प्रमाण कमी करण्याबरोबरच श्रेष्ठ बालकांचें जन्माचें प्रमाण (Selective birth rate) जास्त होण्याची आपण काय व्यवस्था केली आहे? सृष्टीच्या विनाशाचें कार्य करूं न दिल्यामुळें ज्या व्यक्ती समाजांत राहिल्या त्याचा परिणाम असा झाला कीं, याच पद्धतीनें आपण गेल्यास लवकरच अशी स्थिति येईल कीं, समाजांतील पंचमांश प्रजेवर बाकीची सर्व प्रजा पोसण्याचा बोजा येऊन पडेल. (सर जॉन बार यांनीं मेरिआ स्टोप्सबाईंच्या कॉंट्रासेप्शन पुस्तकाला लिहिलेली प्रस्तावना बघा.)

दुसरा मुद्दा म्हणजे बालपणीं झालेल्या प्रजेंत जीवनशक्ति कमी असते. हा नियम लावावयाचा तर वयाच्या सोळा वर्षांपासून तीस वर्षांपर्यंत जी संतति निर्माण होते त्या संततीमध्यें जीवनशक्ति जास्त दिसून यावयास पाहिजे. मेरिआ स्टोप्स म्हणते, बालमृत्यूंचें प्रमाण जास्त असतें. परंतु जीं मुलें जिवंत राहातात त्यांपैकीं प्रथम जन्मलेल्यांची जीवनशक्ति मागून जन्मलेल्यांच्या जीवन शक्तीपेक्षां श्रेष्ठ असते. व्यक्तींच्या हीनत्वाची किंवा श्रेष्ठत्वाची कल्पना ठरवितांना त्यांच्या मातृपितृपदाचा विचार सोडून चालणार नाहीं. काळजीपूर्वक अभ्यास करणारा लेखक इवर्ट यानें दाखविलें आहे कीं ज्या व्यक्तींचा जन्म आपल्या मातापितरांच्या पोटीं उशीरा झाला त्यांच्या संततीमध्यें जीवनाची शक्ति फारच कमी असते (Low survival value of the offspring) (कॉंट्रासेप्शन पान २५२. पाहा. शिवाय इवर्टचा लेख वाचून बघा.) सारांश, समाजशास्त्राच्या दृष्टीनें बालविवाहाच्या विरुद्ध आक्षेप घेतां येणार नाहीं. आतां बालपणीं विवाह झाला असतां मुलीचें शिक्षण न झाल्यामुळें तिला संततीची काळजी घेतां येत नाहीं हा मुद्दाहि चुकीचा आहे. या बाबतींत कोणत्या मुलींना संततीची काळजी जास्त घेण्याचें ज्ञान असतें या बाबतींत शंभर अशिक्षित व शंभर सुशिक्षित स्त्रियांना तद्विषयक प्रश्न विचारल्यास सहज कळून येईल. परंतु हा मुद्दाच मुळीं आमच्या समाजाला गैरलागू आहे. आमच्याकडे अविभक्त कुटुंबपद्धति असल्यामुळें त्यांच्यावर मुलांचें संगोपन करण्याची जबाबदारी मुळींच पडत नसे.

# सायमन कमिशनाची आरती

सर सायमन आपल्या सहा साथीदारांनिशीं ता. १२ रोजीं पुण्यास आले तरी त्यांच्या कामास खरी सुरवात ता. १५ रोजींच झाली व तें काम मुंबई इलाख्यापुरतें ता. २६ रोजीं संपलें. या बारा दिवसांत कमिशन साक्षीपुरावा घेण्यांत सतत गुंतलें होतें असें मुळींच नाहीं. त्यानें घेतलेल्या सुट्या वजा केल्यास सुमारें ८।९ दिवसच चौकशीचें काम चाललें. कमिशन व त्यांच्या मदतगार कमिट्या यांतील सभासदांची संख्या तेवीस असल्यामुळें तो एक छोटासा नाटकी दरबारच होता असें म्हणण्यास हरकत नाहीं! दरबारच्या मध्यभागीं सायमनसाहेबांचें उच्चासन असून कमिशनामधील बाकीचे सहा सभासद त्यांच्या उजव्या-डाव्या हाताला आणि त्यांच्या-पलीकडे एका बाजूस मुंबई इलाख्याची भुतो कमिटी व दुसऱ्या बाजूस हिंदुस्थानाची शंकरन् कमिटी बसली होती. कमिशन व या दोन कमिट्या हे वस्तुतः तीन पृथक् कंपूच होत. या तीन कंपूंचे तीन अध्यक्ष इंग्रज, मुसलमान व हिंदु होते इतक्यापुरता विचार केल्यास जातवारीच्या दृष्टीनें समानतेचें तत्त्व पूर्णपणें अमलांत आलें असून तें कमिशनापुढें येणाऱ्या जातीजातींच्या तंट्याचें सूचक होतें म्हटलें तरी चालेल.

वरील तीन कंपूंस एकच नांव देण्याची आवश्यकता सायमन यांस भासल्यावरून त्यांनीं त्या सर्वांस 'संयुक्त खुला दरबार' अशी संज्ञा दिली. खुला दरबार याचा अर्थ एवढाच दिसतो कीं, तीनहि कंपूंतील सभासदांत साक्षीपुराव्याच्या बाबतींत आडपडदा न राहातां सर्व पुरावा सर्वांपुढें सारखाच मांडण्यांत यावा. असा पडदा ठेवण्यांत आला होता कीं

नाहीं हें फक्त कमिट्यांच्या सभासदांसच माहीत. परंतु कमिशन व कमिट्या यांचा दर्जा समान राहील असें अभिवचन पंजाब कमिटीस सायमन-साहेबांनीं पूर्वी दिलें होतें तें मात्र पूर्णपणें पाळलेलें आढळलें नाहीं. कारण मध्यवर्ती कमिटीचे अध्यक्ष सर शंकरन् नायर यांनीं ही बरोबरी प्रस्थापित होण्याकरितां ज्या सवलती हिंदुस्थानसरकारापाशीं मागितल्या त्या हिंदुस्थानसरकारनें दिल्या नाहींत. आपल्या कमिटीस 'पार्लमेंटरी कमिटी' असा हुद्दा मिळावा व कमिशनास मानपत्रें मिळतील त्यांत आपल्या कमिटीचाहि समावेश व्हावा अशा सर शंकरन् यांच्या मुख्य अटी होत्या. त्या हिंदुस्थानसरकारानें फेटाळून लावल्या. खेरीज साक्षीदारास प्रश्न विचारण्याच्या बाबतींतहि सदर कमिट्यांस सायमनसाहेबांनीं तितकें स्वातंत्र्य ठेवलें नव्हतें. यामुळें कीं काय कोण जाणे, शंकरन् नायर हे कमिशनाच्या पुण्यांतील बैठकींत फारसें लक्ष घालीत नव्हते. सर शंकरन् यांच्या अशा प्रकारच्या वृत्तीवरून त्यांच्या स्वाभिमानास कमिटीच्या अध्यक्षपदाची खुर्ची खुपत होती असेंच अनुमान निघत असून राष्ट्रीय बहिष्काराची आज्ञा न मानण्यांत आपण चूक केली हा विचार त्यांच्या मनास सतत खात असावा असेंच म्हणावें लागतें.

कमिशनापुढें दोन प्रकारच्या साक्षी झाल्या; कांहीं सरकारी अधिकाऱ्यांच्या व कांहीं खासगी संस्थांच्या. सरकारी अधिकाऱ्यांच्या साक्षी सुधारणा कायद्यासंबधानें सरकारची बाजू मांडण्याकरितां होत्या परंतु मुंबईसरकारनें कमिशनास सादर केलेल्या ज्या कैफीयतीच्या आधारें या साक्षी झाल्या ती कैफीयत बरीचशी गुलदस्तांत ठेवण्याचा प्रयत्न झाल्यामुळें सदर साक्षी वाचतांना अंधारातून चांचपडत चालणाऱ्या प्रवाशा प्रमाणें वाचकांची अवस्था झाली. जी अडचण सरकारी साक्षींत तीच अडचण कांहीं अंशीं खासगी साक्षींतहि नडली. कारण खासगी इसम कमिशनापुढें एकंदरींत फार थोडे आले असले तरी त्यांजपैकीं पुष्कळांच्या कैफीयती प्रसिद्ध झालेल्या नाहींत. तथापि या खासगी साक्षीदारांतील बहुतेक साक्षीदार ब्राम्हणेतर, अस्पृश्य व मुसलमान अशा वर्गांचेच असून त्यांच्या मागण्या व मतें सर्वांच्या परिचयाचीं असल्यामुळें त्यांच्या साक्षीवरून त्यांनीं सादर केलेल्या कैफियतींची कल्पना कोणासहि बिनचूक करितां येईल. पण सरकारचा कारभार असा उघडा नाहीं. त्याचा छडा एखादा टर्नर किंवा एखादा मॅकमिलन यांच्या तोंडातून बाहेर पडणाऱ्या साक्षीबरोबर सगळाच्या सगळा लागण्यासारखा नाहीं. तथापि एखाद्या दिवशीं पहांटे कोंबडा आरवावयास विसरला म्हणून सूर्य उगवावयाचा थांबत नाहीं, तोच न्याय पटूकर्णीं झालेल्या गोष्टीसहि लागू पडतो. मुंबईसरकारची कैफीयत षट्कर्णांना काय पण तेवीस सभासदांच्या शेचाळीस कर्णांना पोंचली असल्यामुळें तिचा सुगावा बाहेरच्या जगास लागल्यावांचून कसा राहील ? फ्री प्रेसच्या बातमीदारानें हा सुगावा काढून त्याची टिमकी जगभर केव्हांच वाजविली. तिजवरून मुंबईसरकारच्या शिफारशीचा बराच अंदाज लागतो.

मुंबईसरकारचा अभिप्राय असा आहे कीं, सन १९१९ च्या सुधारणा कायद्यानें स्वराज्याचे अधिकार हिंदी लोकांस देण्यांत आले. ते अधिकार वाढविण्याची वेळ आतां खास आली आहे. सध्याची द्विदल राज्यपद्धति बंद करून पांच प्रधानांच्या मंत्रिमंडळाकडे सर्व सत्ता सोंपविण्यांत यावी. हे पंचप्रधान कौन्सिलच्या लोकनियुक्त सभासदांतून नेमलेले असावेत. या पांच प्रधानांत एक प्रधान मुख्य असून त्याच्या शिफारशींवरून बाकीच्या प्रधानांची नेमणूक व्हावी. न्याय व पोलीस हींहि खातीं त्यांजवर नियंत्रण ठेवून मंत्रिमंडळाकडे देण्यांत यावीं. मंत्रिमंडळ कायदेमंडळास जबाबदार असणार हें उघड होय. परंतु त्याजकडून सत्तेचा दुरुपयोग होऊं नये म्हणून आणखी एक वरिष्ठ कौन्सिल असावें व त्यात एकतृतीयांश सरकारनियुक्त सभासद असावेत. हिंदू-मुसलमानांच्या विचारानें हिंदु-मुसलमानांकरितां संयुक्त मतदार-संघ करावेत व मुसलमानांपुरत्या कांहीं जागा राखून ठेवण्यांत याव्या. मराठे व तत्सम जाती यांची संख्या महाराष्ट्रांत शे. ७० च्या पुढें असल्यामुळें त्यांच्याकरितां जागा राखून ठेवण्याचें कारण नाहीं. अस्पृश्यांकरितां तीन जागा राखीव असाव्या व कनिष्ठ कौन्सिलांत सरकारनें नेमलेला असा एकहि सभासद नसावा.

मुंबईसरकारच्या शिफारशी या आशयाच्या असून वरवर पाहाणाऱ्यास त्या बऱ्या वाटतील. पण त्यांत जातवारीच्या बाबतींत हिंदू-मुसलमानाच्या संमतीची अट घालून मुंबईसरकारनें ज्ञातिनिषेधाच्या तत्त्वास वैगुण्य आणिलें आहे. व तेंच पुढें भोंवणार आहे. शिवाय एका हातानें प्रांतिक स्वायत्तता दिल्याचें सोंग करून दुसऱ्या हातानें वरिष्ठ कायदेमंडळाचें कौन्सिल ऑफ स्टेटसारखें दडपण त्यावर घातलें आहे. याच शिफारशींस अनुसरून चीफ सेक्रेटरी मि. टर्नर, नगरचे कलेक्टर मि. मॅकमिलन, फडणविशी खात्याचे सेक्रेटरी मि. वाईल्स, इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलीस मि. ग्रिफिथ इत्यादि सरकारी अधिकाऱ्यांनीं साक्षी दिल्या. पण त्यांच्या स्वतःच्या साक्षींत मुख्य शिफारशींचा फारच थोडा अंश उतरला असल्यानें सदर साक्षींवरून मुंबईसरकारच्या अभिप्रायाची

कल्पना करतां येणें कठीण होतें. सर्व सरकारी साक्षीदारांनीं, दिवाणांकडे सोंपविलेल्या खात्यांचा कारभार व त्याचप्रमाणें हिंदी अंमलदारांना सुधारणा कायद्यास धरून दिलेले नवीन अधिकार समाधानकारक रीतीनें बजावण्यांत आले अशीच कबुली दिली आहे. पण हिंदी लोकांकडे कारभार सोंपविला व तो हिंदी लोकांनीं बिघडविला याचें एकच उदाहरण म्हणजे म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डे या स्थानिक संस्थांचें. याबद्दल मुंबई-सरकारनें आपल्या कैफियतींत रागानें कपाळावर आठ्या चढविल्या आहेत व मि. टर्नर यांनीं आपल्या साक्षींत या स्थानिक संस्थांची तर अगदींच टर उडवून दिली आहे.

मुंबई इलाख्यांतील म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डे बेजबाबदार ज्ञातिनिष्ठ ब्राम्हणेतरांच्या ताब्यांत गेल्यामुळें कारभाराची धूळधाण झाली, नालायकांच्या हातीं अधिकारसूत्रें आलीं, करांच्या बाक्या लोकांकडे थकल्या, जो तो सभासद आपआपल्या जातीच्या माणसास पाठीशीं घालूं लागला व त्याचा गुन्हा उघडकीस येऊं न देतां छपवून ठेवूं लागला. जातींचें हें वेड नोकरींतहि शिरलें आणि सिंधमध्यें हिंदु व मुसलमान, महाराष्ट्रांत ब्राह्मण व ब्राम्हणेतर आणि कर्नाटकांत ब्राह्मण व लिंगायत यांचेमध्यें मारामाऱ्या व भांडणं लागण्यापर्यंत पाळी आली. प्रत्येक इसम दुसऱ्या इसमाकडे जातीच्या चष्म्यांतून पाहाण्यास शिकल्यामुळे सर्वत्र अविश्वास वाढला. गेल्या दहा वर्षांतच ब्राम्हण-ब्राम्हणेतर व हिंदु-मुसलमान यांच्यांतील द्वेषानें विशेष पेट घेतला असून जातवारीच्या पिशाच्चानें हिंदी समाज जोंपर्यंत झपाटलेला राहील तोंपर्यंत मुंबई इलाख्यांतच काय पण: हिंदुस्थानांतहि स्वस्थता उत्पन्न होणार नाहीं अशीच सर्व राजकीय पुढाऱ्यांची यापूर्वीच बालंबाल खात्री पटली आहे. इतकेंच नव्हे तर नेहरू कमिटीनें आपल्या रिपोर्टांत जातवारीच्या पिशाच्चास हरप्रकारें गाडून टाकण्याचाच उपाय सुचविला आहे.

जातवारीचें हें विष सध्यांच्या मुंबई--कौन्सिलांत मुसलमानांकरितां वेगळा मतदारसंघ आणि मराठे व तत्सम जाती यांजकरितां सात राखीव जागा या रूपानें भिनलें आहे. जगांतील सर्व सुधारलेल्या राष्ट्रांनीं जी गोष्ट निंद्य मानली तीच गोष्ट आपल्या शहाणपणाचा टेंभा मिरविणाऱ्या ब्रिटिश मुत्सद्यांनीं जाणूनबुजून हिंदुस्थानाच्या राज्यघटनेंत समाविष्ट केली. पण हा विषवृक्ष ऊर्ध्वमूल आहे. त्याचीं मुळें कौन्सिलांत रुजलीं व त्या मुळांपासून उद्भवलेल्या शाखा म्युनिसिपालट्या व लोकल बोर्डे येथपर्यंत पसरविण्यांत आल्या. या विषवृक्षाचा प्रताप जर तुम्हाला माहीत होता तर तो विषवृक्ष तुम्ही आपल्या हातानें, त्यास खतपाणी घालून, स्थानिक स्वराज्यसंस्थांतून वाढीस कां लावला असा चीफ सेक्रेटरी मि. टर्नर यांस रोकडा प्रश्न विचारण्यांत आला. त्यास टर्नरसाहेबांनीं दिलेलें उत्तर ब्रिटिशांच्या कुटिल राजनीतीस शोभण्यासारखें नाहीं असें कोण म्हणेल? टर्नरसाहेब सांगतात 'अहो, आम्हाला तरी जातवार निवडणुकीची हौस आहे कोठें? पण काय करावें? लोक मागतात तेव्हां त्यांची भीड पडून ती द्यावी लागते!' किती साळसूदपणाचें हें उत्तर! पण यावर प्रश्न असा कीं, लोक दारूचे गुत्ते बंद करा म्हणून गेलीं पंचवीस वर्षे तुमच्या कानींकपाळीं ओरडत आहेत, ते गुत्ते बंद करून दारूबाजीचा नायनाट इलाख्यांतून कां ताबडतोब करीत नाहीं?

टर्नरसाहेबांच्या या मानभावी भाषणाबद्दल जुन्या वैद्याची गोष्ट कोणासहि आठवणार आहे. वैद्यानें एका अदूरदृष्टि रोग्यास औषध दिले व त्याबरोबर तेलकट पदार्थ वर्ज्य करण्यास सांगितले. पण रोगी पडला अदूरदृष्टि व मूर्ख. त्यानें वैद्यबुवांस विनविलें कीं, मी औषध इमानेइतबारें घेईन, पण मला तेलकट पदार्थांचा लोभ सुटत नसल्यामुळे औषधाबरोबर तेहि खाण्यास परवानगी असावी. वैद्यानें रोग्यापासून दुप्पट फी घेऊन औषधास तेलकट पदार्थ हेंच पथ्य सांगितलें! रोग्याचा आजार बळावला व तो पुनः वैद्यबुवांकडे कांहीं दिवसांनीं नवें औषध मागण्यास आला. नोकरशाहीनें जातवारीची विषवल्ली राज्यकारभारांत अशाच प्रकारें रोवली. समजूत अशी कीं, त्या विषाची बाधा परभारें हिंदी जनतेस होऊन त्यानें भारलेल्या जाती परस्परांत भांडूं लागतील व आपल्या पाठीमागची राजकीय चळवळींची ब्याद आपोआप सुटेल. परंतु या जातवारीनें सरकारी अधिकाऱ्यांसहि भंडावून सोडल्यामुळें टर्नरसाहेबांनीं कमिशनापुढें जातवारीचे राजरोस धिंडवडे काढले.

कमिशनापुढें साक्षी देण्यास फारशी खासगी माणसें पुण्याच्या बैठकींत आलींच नाहींत. जीं आलीं त्यांत वजनदार व महत्त्वाचीं माणसें कोणीच नव्हतीं. सरदार व इनामदार वर्गातर्फेचे प्रतिनिधि सरदार आण्णासाहेब मुतालीक यांच्याशिवाय बाकीचे साक्षीदार ब्राम्हणेतर, अस्पृश्य, व मुसलमान या जातिविशिष्ट पक्षांचेच होते. अस्पृश्यांची बाजू डॉ. आंबेडकर यांस भुतो कमिटींतून सभासदाच्या जागेवरून उठून व साक्षीदाराच्या खुर्चीवर बसून मांडावी लागली. कर्नाटक, गुजराथ, मुंबई व सिंध या प्रांतांतून आणि ख्रिस्ती व पारशी या जातींतून कोणीहि इसम साक्ष द्यावयास कमिशनापुढें गेले नाहींत. यामुळें पुण्याच्या बैठकींत आठदहा दिव-

सांच्या मुदतींत जातवारीचेंच बंड कमिशनापुढें माजून राहिलें, आणि स्वराज्याचें औषध जातवारीचें तेंऊकट पथ्य सांगून देण्याची मागणी जातिनिष्ठांनीं जोरानें केली! सध्याच्या कौन्सिलांत मुसलमानांकरितां मतदारसंघ व स्वतंत्र जागा आणि मराठे व तत्सम यांजकरितां राखीव जागा मिळाल्या आहेत. पण पुढील कौन्सिलांत ब्राह्मण, ब्राह्मणेतर, अस्पृश्य, मुसलमान व हिंदु–मुसलमानेतर यांजकरितां स्वतंत्र मतदारसंघ व स्वतंत्र जागा असाव्या अशी मागणी नगरचे नवले यांनीं ब्राह्मणेतर पक्षातर्फे केली.

पण ब्राह्मणेतर पक्षहि एकजात नसल्यामुळें ब्राह्मणेतरांच्या नांवावर मिळालेल्या जागा मराठेच उपटतात अशी तक्रार ॲडव्होकेट सुर्वे यांची असून त्यांनीं मराठेतरांकरिता वेगळ्या जागा मागितल्या! या मागण्याप्रमाणें सुधारणा कायदा दुरुस्त झाल्यास मुंबई-कौन्सिलांतील जातींचीं भांडणें पाचपट वाढून आणखी दहा वर्षांनी प्रत्येक जातीचा स्वतंत्र संघ व त्याचे स्वतंत्र प्रतिनिधी अशी व्यवस्था करावी लागेल हे उघड होय. या जातवारीच्या शर्यतींत अस्पृश्यांचा घोडा ब्राह्मणेतरांच्या पुढे होता व मुसलमानांचा घोडा अस्पृश्यांच्याहि पुढें जाऊन पुढचा वर्ग पूर्वीच्या वर्गास बरे म्हणवीत होता! मुसलमानांनीं तर अशी मागणी केली कीं, मुंबई युनिव्हर्सिटीच्या सिंडिकेटमध्येंहि मुसलमानास जातीच्या हक्कानें जागा मिळाल्या पाहिजेत. मग नेमलेले सभासद पदवीधर नसले तरी चालतील. मागणीच मागावयाची तर थोडी का? "ऑ. इं. मु. फेडरेशन" असें अगडबंब नांव धारण करणाऱ्या संस्थेचे प्रतिनिधि मि. काजी कबिरुद्दिन यांनीं युनिव्हर्सिटीच्या परीक्षकांत जातीच्या हक्कानें मुसलमान आले पाहिजेत, मग त्यास परीक्षेस बसलेल्या उमेदवारांचे पेपर न तपासतां आले तरी चालतील अशी मागणी केली असती तर सायमन कमिशनामधील कोणत्या सभासदाची काजीसाहेबांच्या तोंडावर हात ठेवण्याची प्राज्ञा होती? मागणी मागण्याचा केवढा तरी अधिकार कमिशनाने हिंदी लोकांस दिला आहे! मग त्यांचा भरपूर उपयोग ज्ञातिपरायणांनीं करून घेण्याचे कां सोडावें? या जातवार घोड्यांच्या शर्यतींत सर हिदायतुल्ला, ना. रफिउद्दिन अहमद व ना. भास्करराव जाधव यांनींहि आपले खासगी घोडे गुप्तपणें सोडले होते असें समजतें.

सर कावसजी जहांगीर, सर इब्राहिम रहिमतुल्ला व सर सी. व्ही. मेहता यांच्या साक्षी महत्त्वाच्या असून त्या घेण्यांत आल्या नाहींत ही सरकारच्या दृष्टीनें मोठीच चूक होय आणि सरकारी अधिकाऱ्यांशिवाय इतरांच्या साक्षी फार थोड्या व अगदीं क्षुल्लक असल्यामुळे मुंबई इलाख्यानें कमिशनावर घातलेला बहिष्कार पूर्णपणें यशस्वी झाला अशीच मुंबईच्या टाईम्सच्या खास बातमी दारानें कबुली दिली आहे. सायमन कमिशनचे पुण्यास आगमन झालें त्या वेळीं पुण्याप्रमाणेंच इतर ठिकाणींहि बहिष्काराच्या सभा, मिरवणुकी व हरताळ इ. कार्यक्रमाचे रूपानें बहिष्कारवादी जनतेनें त्यांस सलामी दिली. कमिशनचा मुक्काम पुण्यास होता तेवढ्या कालांत मुंबई इलाख्यांत व इतरत्र नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला सर्वत्र पाठिंबा देणाऱ्या सभा व परिषदा झाल्या. अशा रीतीनें देशांतील वजनदार संस्था, प्रमुख पुढारी व बहुसंख्या जनसमाज हा सायमन सप्तकाच्या विरुद्ध कसा आहे हें दिसून आलें. आणि इकडे कमिशनपुढें झालेल्या साक्षींत नालायक व असंतुष्ट यांचाच भरणा असल्यामुळें पुण्यांतील काम गैरशिस्त, गोंधळाचें व टाकाऊ झालें अशी सरकारचा पाठपुरावा करणाऱ्या वृत्तपत्रालाच कबुली द्यावी लागली. पुण्यापुरती किंवा मुंबई इलाख्यापुरती कमिशनाची 'आरती' करतांना इतरत्रहि कमिशनाला असाच खडतर अनुभव येईल आणि विध्वंसक व विधायक अशा उभयविध बहिष्काराच्या चळवळीमुळें नोकरशाहीनें व हुजूरपक्षानें कमिशनच्या रूपानें टाकलेला डाव अखेर त्यांच्याच अंगावर उधळला जाईल अशी आम्हास आशा आहे.

---

# मैत्र्युपनिषदांतील नक्षत्रविभाग

( ले---रामचंद्र विनायक पटवर्धन )

उत्तर

## मघा पुञ्ज




| | प्रत | | प्रत |
|---|---|---|---|
| एप्सा. | ३·१ | ग्यामा | ३ |
| म्यू | ४ | ईटा | ३·६ |
| जीटा | ३·६ | आल्फा | १·२ |

वेदांगामध्यें जे नक्षत्रविभाग निर्दिष्ट आहेत ते वेदांगाचे वेळीं नव्यानेंच सुरू केले असा नानासाहेब वैद्य ह्यांच्या म्हणण्याचा आशय दिसतो. वेदांगाच्या पूर्वी पांचशे वर्षे देखील नक्षत्रविभागपद्धति प्रचारांत होती हें मैत्र्युपनिषदावरून निर्विवाद सिद्ध होतें; आणि तें नाकबूल करतां येत नाहीं म्हणून वैद्य अशी कल्पना लढवूं पाहत आहेत कीं, **मैत्र्युपनिषत्कालीन** विभागपद्धति आणि वेदांग-विभागपद्धति ह्या **भिन्न** होत. असें त्यांनीं स्पष्टपणें अद्यापि म्हटलें नाहीं, परंतु अशा धोरणावर त्यांचें लिहिणें आहे. वेदांगामध्यें **दाक्षिणायनबिन्दु** आश्लेषाविभागाच्या अर्ध्यावर होता असा उल्लेख आहे. पण मैत्र्युपनिषत्कालीं तोच बिन्दु **मघाविभागाच्या आरंभीं** म्हणजे **वेदांगकालीन स्थानाच्या (पूर्वेस)** ६° ४०' इतका होता. ही स्थिति वेदांगाच्या पूर्वी (६° ४०'×७२=) ४८० वर्षे अस्तित्वांत होती. वेदांगामध्ये जशी "**श्रविष्ठादौ**", आणि "**सार्पार्धे**" अशीं पदें आहेत, तशींच मैत्र्युपनिषदामध्येंहि "**मघाद्यं**" "**श्रविष्ठार्धम्**" अशीं पदें आहेत, म्हणून मैत्र्युपनिषत्कालीं देखील विभागपद्धतीच प्रचारांत होती, ह्यांत बिलकुल संशय उरत नाहीं. आतां मैत्र्युपनिषदांतील विभागपद्धतीचें **आरंभस्थान** कोठून मानलें होतें हा प्रश्न येतो. पूर्वीच्या एका लेखांत मी म्हटलेंच आहे कीं **विषुववृत्त**, संपात, किंवा अयनबिंदु ह्यांचा संयोग नक्षत्रपुंजांतील एखाद्या तारेशीं होणें हें विभागपद्धतींतील आरंभस्थानाचें निमित्तकारण आहे, विभागपद्धति **प्रथमच चालू** झाली असल्यास तिच्या आरंभस्थानाचा निश्चय या कारणावांचून अन्य कार-

णानें होणें संभवनीय नाहीं. परंतु जें आरंभस्थानें विभागपद्धतीच्या प्रारंभीं एकदां निश्चित झालें असेल तें पुढे बदललें असेल असाहि पण संभव नाहीं. प्राचीन सूर्यसिद्धांतामध्यें निर्दिष्ट असलेलें आरंभस्थान वराहानें स्वीकारलें; ब्रह्मगुप्तासहि तेंच आरंभस्थान स्वीकारणें भाग पडलें, आणि वर्तमान सूर्यसिद्धांतामध्यें तेच आरंभस्थान आहे. ह्यावरून आरंभस्थान किंवा नक्षत्रविभागांची मर्यादा बदलणें मोठमोठ्या विद्वान ज्योतिर्विदांनाहि शक्य नाहीं. म्हणूनच वेदांगज्योतिषाच्या वेळीं मैत्र्युपनिषदांत निर्दिष्ट केलेली मर्यादा बदलली असे कां मानावें ? आणि तसें मानलें तर वेदांग-विभाग-पद्धति ही पूर्वपरंपरेचा उच्छेद करणारी आणि म्हणूनच त्याज्य आहे असा आरोप तिच्यावर सहज येतो. हा आरोप अनिष्ट आहे. म्हणून मैत्र्युपनिषन्निर्दिष्ट, वेदांगनिर्दिष्ट आणि सूर्यसिद्धान्तनिर्दिष्ट अशा तिन्हा विभागमर्यादा एकच असल्या पाहिजेत, आणि त्या तशा वस्तुतः आहेत हेंच दाखविलें पाहिजे नुसतें " धनिष्ठा " धनिष्ठा" "वेदांग वेदांग" म्हटल्यानें कार्यसिद्धि होणार नाहीं. वैद्यांना इष्ट जें आरंभस्थान तेंच या तीनही ग्रंथांत आहे असें त्यांनीं सिद्ध केलेंच पाहिजे. आणि कृत्तिका-प्रयुक्त आरंभस्थान हें विभागपद्धतीप्रमाणें सर्वांत प्राचीन असल्यानें तेंच वेदांगामध्यें विवक्षित आहे असें आम्हीहि दाखवूं.

आतांपर्यंत मी लेख लिहिले त्यांत जे मुद्दे व्यक्त केले आहेत ते असेः—

( १ ) धनिष्ठापुंजांतील योगतारा **बीटा** होय, आल्फा नव्हे.

( २ ) बीटा धनिष्ठा किंवा आल्फा धनिष्ठा ह्या तारेमध्यें उदगयन झालेलें असलें तरी नक्षत्रांचे विभाग तत्पूर्वीच ठरून गेले असल्यामुळें त्या तारा विभागारंभींच आहेत असें मानतां येणार नाहीं.

(३) वेदांगापूर्वीच विभागपद्धति अस्तित्वांत होती हें मैत्र्युपनिषदावरून सिद्ध होतें. वैद्यांनाहि तें मान्य आहे. आतां चौथा मुद्दा असा प्रस्थापित होत आहे कीं, (४) वेदांगापूर्वी अस्तित्वांत असलेली विभागपद्धति वेदांगकालीं बदलली असणें शक्य नाहीं. कारण त्यायोगानें परंपरोच्छेदाचा आरोप वेदांगावर येतो.

ह्या आरोप टाळण्याकरितां 'नृसिंह' ह्या सहीनें लेख लिहिणाऱ्या गृहस्थानीं एक कोटि लढविली आहे. वास्तविक निनांवी लेखाला उत्तरच देऊं नये, परंतु हे 'नृसिंह' नामधारी गृहस्थ माझ्या परिचयाचे आहेत. 'नृसिंह' म्हणतात कीं, त्यांच्या मताप्रमाणें (आल्फा) धनिष्ठा तारेपासून केलेला जो विभागारंभ म्हणजे धनिष्ठाविभागपद्धति तीच मैत्र्युपनिषदांत विवक्षित आहे. हें नृसिंहाचें म्हणणें अत्यंत हास्यास्पद आहे. कारण वेदांगापूर्वी ५०० वर्षांच्या मैत्र्युपनिषत्कालीं आल्फा तारेशीं उदगयनाचा **अर्थाअर्थीहि** संबंध नव्हता. अशा स्थितींत मैत्र्युपनिषत्कालीन विभाग आल्फा तारेपासून झालेले असणें शक्य नाहीं. त्या वेळीं उदगयन धनिष्ठाविभागाच्या मधोमध म्हणजे आल्फा तारेपासून फार दूर होतें. त्या वेळीं दक्षिणायनबिन्दु मघा नक्षत्रविभागाच्या मात्र आरंभीं होता, परंतु त्या वेळीं विभागपद्धति प्रचलित होती, तर अशा पद्धतीला नक्षत्राचा आरंभ जगा सोईस्कर, तसा नक्षत्राचा मध्यभाग सोईस्कर नव्हे. आरंभ कोठनहि ठरतो परंतु आरंभ ठरल्याशिवाय मात्र मध्य कोणता तें ठरणार नाहीं. पांचशें वर्षांनीं पुढे एखाद्या तारेमध्यें होणाऱ्या उदगयनावरून आज त्या अनुरोधानें आरंभस्थान ठरविणें हें उपहासास्पदच नव्हे तर अशक्य आहे. असें म्हणणें म्हणजे मुलानें बापाला जन्म दिला, किंवा शंकर भाष्यावरून गीता रचली गेली, किंवा गीतेवरून उपनिषदें लिहिलीं असें म्हणण्याइतकें मूर्खपणाचें आहे. अर्थात् मैत्र्युपनिषदांतील विभागपद्धतीचा धनिष्ठाविभागाशीं जो संबंध आहे तो पिता-पुत्र असा आहे. म्हणून वेदांगांतील विभाग धनिष्ठेवरून ठरले नसून ते मैत्र्युपनिषत्कालींच ठरलेले होते. आणि त्यांतील मघारंभावरूनच वेदांगांतील धनिष्ठारंभ निश्चित केला गेला होता.

वरील विचारसरणी "नृसिंहा" च्या मुळींच लक्षांत आली नाहीं. त्यांनी लो. टिळक यांच्या Vedic Calendar ह्या भागांतील एक उतारा दिला आणि त्याच्यापासून मन मानेल तसे तर्क चालविले. तो उतारा असाः—

" It is expressly stated that the winter solstice in those days occurred when the Sun, the Moon, and the *Asterism* of Dhanistha were together; and *this Nakskatra* is therefore taken as the first point of the celestial sphere which is siderial and not———Tropical in character. Starting from this *First Point* the zodiac is divided into 27 equal parts. " ( p 23. ) ——For this purpose we may well make the *Vedanga—Jyotisha* as our *starting Point* and see what elements of the system contained therein are found in the older Vedic works.

S. B. Dixit has shown that in the Brahmana period of the Vedic literature the nature of the Calendar was *substantially the same;*——with this difference that whereas Dhanistha is the first in the Vedanga—Jyotisha, the **( Nakshatra ) series in the Brahmana**

and the Samhitas always begins with the Krittikas." (Incomplete)

ता. ३०।१०।१३

लोकमान्यांच्या वरील उताऱ्याचा आशय असा आहे कीं, "सूर्य चन्द्र आणि **धनिष्ठापुंज हे सर्व एकत्र होते.** अशा वेळीं उदगयन झालें, असा स्पष्ट निर्देश आहे, म्हणून हें **धनिष्ठा नक्षत्र** ज्योतिषचक्राचा आरंभ (starting point) मानिला आहे; अर्थात् नक्षत्रचक्र हें तारात्मक आहे, संपातानुवर्ती नव्हे; आणि ह्या नक्षत्रापासून आरंभ करून राशिचक्राचे २७ सारखे विभाग केलेले आहेत......म्हणून वेदांगज्योतिष हें आमच्या संशोधनाचा आरंभ (starting point) मानून त्यांतील कोणकोणतीं तत्त्वे जुन्या वैदिक ग्रंथांत उपलब्ध होतात तें आपणास पाहिले पाहिजे. परंतु हें कार्य ज्यो.शं.बा. दीक्षित यांनीं केलेंच आहे.त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, वैदिक वाङ्मयकालांतील ब्राह्मण ग्रंथकालीं **पंचांगाचें स्वरूप तत्त्वत: तेंच होतें.** फरक इतकाच की, वेदांग–ज्योतिषामध्यें गणना जी धनिष्ठादि आहे ती ब्राह्मण आणि संहिता-कालीं नेहमीं कृत्तिकादि असे." (अपूर्ण)

मंडाले

ता. ३० आक्टोबर १९१३

लोकमान्यांच्या उताऱ्याचा आशय वरील-**प्रमाणें आहे.**

ह्या उतारा वरवर वाचणाराच्याहि सहज लक्षांत येईल. तो केतकी पक्षाला बिलकुल अनुकूल नाहीं. केतकीपक्षीय 'नृसिंह' हे first point ह्या शब्दानेंच फसले आहेत.वरील उताऱ्यांतील first point ह्या शब्दाचा खरा अर्थ त्यांच्या लक्षांत मुळींच आला नाहीं. Point ह्याचा अर्थ ते लहानपणीं घोकल्या-प्रमाणें "बिंदु" असा समजले. परंतु ह्या ठिकाणीं point ह्या शब्दाचा "बिंदु" असा अर्थ मुळींच होत नाहीं. लोकमान्यांनीं **धनिष्ठा योगतारा** असा जर निर्देश केला असतां तर "बिंदु" हा अर्थ तेथें योग्य दिसला असता. परंतु धनिष्ठा योगतारा असे शब्द तेथें नसून **धनिष्ठापुंज** (म्हणजे अनेक तारांचा समूह) असे शब्द आहेत. सर्वच पुंज बिंदु होऊं शकणार नाहीं हें उघड आहे. म्हणून विशिष्ट तारेचा उल्लेख न करतां "पुंज" असे सामान्यतःच म्हटलें. कारण, अमुकच तारेपासून धनिष्ठाविभाग सुरू झाला असें निश्चित विधान लोकमान्यांना करावयाचे नव्हतें, व प्रसंगहि निश्चित विधान केलेंच पाहिजे असा नव्हता. म्हणून त्या ठिकाणीं Point ह्या शब्दाचा अर्थ "बिंदु" असा होणें शक्य नाहीं. तेथें त्याचा अर्थ सामान्यतः "आरंभ" असाच केला पाहिजे. **ह्याच उताऱ्यांत लोकमान्यांनीं "वेदांगा"लाहि** StartingPoint असें **म्हटलें आहे; मग "नृसिंहाच्या" कोटिक्रमाप्रमाणें वेदांगालाहि "आरंभबिंदु"** म्हणावें लागेल ! **वेदांगासारख्या** ग्रंथाला आरंभबिंदु म्हणणें हें कोणालाहि **हास्या-स्पद** दिसेल. आणि म्हणूनच **वेदांगग्रंथासंबंधानें** जसा Point ह्या शब्दाचा अर्थ लाक्षणिक **केला** पाहिजे, तसाच तो नक्षत्र "पुंजा" **संबंधानेंहि** लाक्षणिकच केला पाहिजे.

"नृसिंहा"चा उद्देश असा दिसतो कीं, धनिष्ठा-पुंजांतील योगतारेपासून वेदांगकालीं **विभागारंभ** कल्पिले असा अर्थ लोकमान्यांच्या **वरील उताऱ्यां**-तून कसा तरी **ओढूनताणून काढून लोकांना उगाच** भ्रम पाडावा, व 'खेडा' सारख्या **खेडेगांवीं राहून** त्यांनीं तो प्रयोगहि करून पाहिला. परंतु **सबंध नक्षत्रपुंजालाच** First point **म्हटल्यानें** ह्या भ्रमाला जागाच राहत **नाहीं. धनिष्ठा पुंजामध्यें** निदान पांच तारा तरी **आहेत.** त्या **सर्वच आरंभस्थानीं संभवतील** किंवा आरंभ-स्थानासंनिध असूं शकतील हें **दाखविण्याकरितांच विशिष्ट तारेचा** निर्देश न करतां, **पुंज** हा **सामान्य** शब्द लोकमान्यांनीं वापरला आहे. एरवीं **पुंज** शब्द घालण्याचें कांहींएक कारण **नाहीं.** शिवाय असें कीं, वरील उतारा 'अपूर्ण' **असून तो** मंडाले येथें १९१३ मध्यें लिहिला गेला. त्यानंतर दोन वर्षांनीं १९१५ मध्यें प्रख्यात **'गीतारहस्य'** प्रसिद्ध झालें, त्यांतहि वेदांगांतील विभागारंभाचा निर्देश अनिश्चितच आहे. (पान ५४७ मध्यें) लोक-मान्य लिहितात कीं, **'वेदांगज्योतिषांतील उदगयनस्थिति इसवी सनापूर्वीं सुमारें १२०० किंवा १४०० वर्षांची आहे असें ज्योतिर्गणितावरून सिद्ध होतें.'** ह्यावरून लोकमान्यांचें मत धनिष्ठाविभागाचा आरंभ अमुक एका **तारेजवळ** आहे अशा निश्चित स्वरूपाचे नव्हतें. तसें **असतें** तर वरील उल्लेखामध्यें जो कालनिर्णय **आहे तो** त्यांनीं निश्चितच दिला असता. कारण **अमुक तारे-**जवळ उदगयन आणि विभागारंभ **आहे** हें **निश्चित** ठरल्यावर मग कालनिर्णय संदिग्ध कसा **राहील !** अर्थात् गीतारहस्याच्या पुराव्यावरून **तर असें** खात्रीनें म्हणतां येतें कीं, धनिष्ठापुंजांतील **एखाद्या** विशिष्ट तारेपासूनच वेदांगकालीं विभागारंभ **होत** होता अशा प्रकारचें त्यांचें मत ठाम बनलें **नव्हतें.** व म्हणूनच वरील उताऱ्यामध्यें '**पुंज**' असा मोघम शब्द त्यांना वापरला आहे **व काल-**निर्णयहि **मोघमच** सांगितला आहे.

अर्थात् लोकमान्यांच्या Vedic Calendar मधील उतारा केतकीपक्षास अनुकूल **तर नाहींच** पण प्रतिकूल मात्र आहे, आणि **त्याचक्रम पुढील अनुमानें स्पष्टपणें निघतातः—**

१ धनिष्ठाविभागारंभ अमुक एका तारेजवळ आहे असें लोकमान्यांचें **ठाम मत नव्हतें.**

२ वेदांगकालीं जी विभागपद्धति होती तीच **तत्त्वतः** संहिताकालींहि होती.

३ म्हणजे लोकमान्यांच्या मताप्रमाणें संहिताकालीं देखील विभागपद्धति प्रचलित असून विभागारंभ कृत्तिकपासून होता. त्यावरून हें सहज सिद्ध होतें कीं संहिताकालानंतरचें जें मैत्र्युपनिषत् त्यांत जी विभागपद्धति आहे तीहि कृत्तिकादिच असली पाहिजे; आणि धनिष्ठेपेक्षां कृत्तिकादि विभागगणना हीच अधिक प्राचीन असल्यामुळें सर्वांस अत्यंत आदरणीय असलीच पाहिजे.

वरील अनुमानें केवळ लोकमान्यांच्याच ग्रंथावरून निघतात असें नसून ज्योतिषशास्त्रदृष्टयाहि तींच अनुमानें निघतात. तरी तीं कशीं सत्य आहेत तें दाखवितों.

मैत्र्युपनिषदांत जी अयनस्थिति वर्णिली आहे तिच्यावरून मघाविभागाचा आरंभ कोणत्या ठिकाणीं असण्याचा संभव आहे हें पाहिलें पाहिजे. मघा नक्षत्राचे अधिष्ठाते **पितर** आहेत असें वचन तैत्तिरीय श्रुतीमध्यें आहे.

"उपहूताः **पितरो** ये मघासु मनोजवसः सुकृतः सुकृत्यः ते नो नक्षत्रे हवमा—गमिष्ठाः स्वधाभिर्यज्ञं प्रयतं जुषंताम्"

यावरून तैत्तिरीय श्रुतिकालींहि दक्षिणायन-बिन्दु मघापुंजामध्यें होता हें सिद्ध होतें. तो बिन्दु मैत्र्युपनिषत्कालीं मघाविभागाच्या आरंभीं येण्यापर्यंत पश्चिमेकडे हटला. मैत्र्युपनिषत्काल हा लोकमान्यांच्या मताप्रमाणेंहि निश्चित नव्हता; त्याचा काल गीतारहस्यांत (पान ५४७) लोकमान्यांनीं केवळ स्थूल मानानेंच इ. स. पूर्वी १६८० ते १८८० पर्यंत असा अनिश्चित दिला आहे. ह्यावरून तीन अंशांचा जो फरक पडतो तो **कमींत कमी** किती पडेल तें दर्शविणारें अनुमान आपणास काढलें पाहिजे.

मघाविभागाचा आरंभ पश्चिमेकडे, व शेवट पूर्वेकडे होतो हें सर्वांना मान्यच आहे. म्हणून मघापुंजामध्यें जितक्या **ठळक तारा** असतील तितक्या **सर्व विभागाच्या आंत** समाविष्ट होतील अशा रीतीनें विभागाचा आरंभ ठरविला पाहिजे. अर्थात् मघापुंजामध्यें **ठळक** तारा किती, आणि त्या सर्वच तारा विभागमर्यादेमध्यें समाविष्ट केल्या पाहिजेत कीं काय असे दोन प्रश्न उपस्थित होतात. दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर **"अस्ति"** पक्षींच दिलें पाहिजे. कारण सूर्यसिद्धान्ताप्रमाणे मघा **योगतारा** विभागमर्यादेपासून ९ अंश पूर्वेस आहे. आणि सुदैवाची गोष्ट अशी कीं मघा योगतारेचा शर शून्य म्हणजे अल्पकलात्मक असल्यानें ध्रुवाभिमुख आणि कदंबाभिमुख हे दोनाहि प्रकारचे भोग जवळ जवळ सारखेच येतात. वराहमिहिरोक्त मूळ सूर्यसिद्धांतामध्यें मघा तारेचे भोग दिले आहेत. परंतु तो मूळ ग्रंथ अशुद्ध असल्यानें त्यांतील मूळ पाठाचा निश्चय होत नाहीं. वराहोक्त श्लोकांचा पाठ पित्र्यस्य स्वक्षेत्रे स्वाष्टे(चांशे)समायोगः असा आहे. स्वाष्टे ह्याचा अर्थ विभागाचा आठवा अंश असा धरला तरीहि हरकत नाहीं. म्हणजे एकंदरींत मघा योगतारेच्या पश्चिमेस ८।९ अंशांच्या आत जितक्या ठळक तारा येतील तितक्यांचा समावेश मघापुंजामध्यें केलाच पाहिजे असें स्पष्ट होतें.

आतां पहिला प्रश्न मघापुंजामध्यें ठळक तारा किती त्याचा निर्णय करूं. ज्यो. दीक्षित लिहितात 'मघाच्या तारा कोणी ५ व कोणी ६ मानतात.' म्हणून तारा ५ मानाव्या किंवा ६ मानाव्या असा उपप्रश्न पुनः उत्पन्न होतो. त्यासाठीं मघापुंजाचा आलेख (नकाशा) दिला आहे त्यावरून मघापुंजामध्यें तारा किती घ्याव्या त्याचा सहज निर्णय होईल. आलेखाच्या खालीं तारांच्या चकाकीची वर्गवारी दिली आहे. त्यावरून पुंजामध्यें सहा तारांचा अन्तर्भाव करण्यास काहींच हरकत नाहीं. आतां पांच तारा जर मानावयाच्या तर एक तारा वगळावी लागेल, आणि ती कोणती असाहि प्रश्न पडेल. परंतु मघापुंजाच्या आकृतीचें वर्णन जें ग्रंथामध्यें आहे त्यावरून पुंजामध्यें सहा तारांचा समावेश केला आहे असें दिसतें. **"ज्योतिर्निबन्ध"** हा ग्रंथ **आनंदाश्रम** पुस्तकावलीमध्यें छापला आहे. त्यांत नक्षत्रप्रकरणीं **श्रीपति** ह्याच्या वचनाचा उल्लेख आहे. तो उल्लेख असाः—

"मणि—गृह—शर—चक्राभानि—शालोपमं भम्"

ह्या उल्लेखामध्यें **मघा**पुंजाची आकृति शालेप्रमाण म्हणजे चतुष्कोणी गृहाप्रमाणें आहे असें वर्णन आहे. अशी आकृति एप्सायलॉन तारेचा समावेश पुंजामध्यें केल्याशिवाय बरोबर जमत नाहीं हें नकाशावरून वाचकांच्या सहज लक्षांत येईल. परंतु वराहमिहिराच्या "बृहत्संहिते"त मघाच्या पांचच तारा सांगितल्या आहेत. म्हणून पांच तारा आणि शालेची आकृति ह्यांचा मेळ जर बसावयाचा असेल तर एप्सायलॉन तारेच्या पूर्वेस जवळच मघाविभागाचा आरंभ होता असें समजलेंच पाहिजे हें एक अनुमान; व मघाविभागारंभाजवळ जी तारा आपण निश्चित करूं त्या तारेसन्निध मैत्र्युपनिषदुक्त दक्षिणायन होत होतें त्यावरून विभागाची मर्यादा ठरविणें हें दुसरें अनुमान; याप्रमाणें दोनहि अनुमानांचा मेळ घालून मग जर विभाग—मर्यादा निश्चित केली तर ती बहुतेक बिनचूक आणि सूक्ष्म येईल. म्हणून प्रथम एप्सायलॉनचे चालू वर्षारंभाचे स्पष्ट सायनभोग काढूं.

शके १८५० च्या आरंभींचे विषुवांश व क्रांतिः—
विषुवांश= १४५° ३०′ क्रांति=+२४° ६′
∴ विषुवांशांचा पूरक—कोन ३४° ३०′
ला. को—भु. ३४° ३०′ = ९.९१५९९४
ला. को—भु. क्रांत = ९.९६०३९२

ला.को—भु कर्ण ४१° १३′ = ९.८७६३८६
ला. स्प. ३४° ३०′ = ९.८३७१३४
ला. को. स्प. कर्ण = १०.०५७५२२

को—भु. क्रांतिमुख ३८°१९′ = ९.८९४६५२
क्रांतिमुख—कोन = ३८° १९′
—( उगे ) परम क्रांति २३° २७′

शराभिमुख कोन = १४°५२′
ला. को—भु. शरा. कोन = ९.९८५२१३
ला. कोस्प. कर्ण =१०.०५७५२२

स्पर्श. भोग—पूरक ४०°१५′=९.९२७६९१
एप्सायलॉन स्पष्ट सायनभोग=( १८०—४०° १५′)
=१३९° ४५′

म्हणजे वर दर्शविलेल्या पहिल्या अनुमानानुरूप विभागारंभ स्थूल मानानें निश्चित होईल व कसर आहे ती काढून टाकिली असता अयनांश बरोबर येतील.

मघाविभागारंभभोग ( शके १८५० ) १३९° उणे कृत्तिका सायनभोग ५८° ५९′=८०° १′ म्हणजे मघाविभाग कृत्तिका योगतारेपासून बरोबर सहा नक्षत्राइतक्या अंतरावर येतो म्हणून मैत्र्युपनिषनिर्दिष्ट मघाविभागारंभ कृत्तिका योगतारेपासूनच मोजला होता. आणि गणनाहि कृत्तिकादिच होती असें सिद्ध होतें.

याचप्रमाणे "म्यू." तारेचे शके १८५० चे विषुवांश १४७°१५′, व क्रांति+ २६°२१′ इतकी आहे त्यावरून वरील गणितपद्धतीनें "म्यू." चा सायनभोग ( शके १८५० चा ) १४०°३०′ इतका येतो ह्याहि भोगावरून मघाविभागारंभ कसा निश्चित होतो त्याचा विचार पुढील लेखांत करूं.

# प्रांतिक व वरिष्ठ सरकार यांजमधील खजिन्याचें वर्गीकरण

( लि. आ. म. )

गेल्याचे मागील आठवड्यांत मुंबईसरकारच्या फडणविशी खात्याचे चिटणीस मि.वाईल्स यांची सायमन कमिशनापुढें साक्ष झाली, त्या वेळी त्यांनीं मेस्टन सेटलमेंटनें मुंबई इलाख्याचा प्रत्यक्ष तोटाच झाला असें प्रतिपादिलें व तें एका दृष्टीनें बरोबरहि आहे. कारण मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणान्वये जमीनमहसुलाचें व न्यायखात्याच्या स्टॅंपाचें उत्पन्न प्रांतिक सरकारांना तोडून देण्यांत आलें. त्याचप्रमाणें एक्साईज व इरिगेशन या खात्याचें अर्धे उत्पन्न प्रांतिक सरकाराकडे १९१३—१४ पासून चालू होतें, तसेंच तें ठेवण्यांत आलें. व यामुळें मद्रास व संयुक्त प्रांत या प्रांतांचें जमीनमहसुलाचेंच उत्पन्न जास्त असल्यानें त्या प्रांतांचा साहजिकच फायदा झाला. या मेस्टन सेटलमेंटसंबंधानें वाईल्ससाहेब व सर जॉन सायमन यांचीं प्रश्नोत्तरें होत असतांना सर जॉन सायमन यांनीं नेहरू कमिटीनें मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकार यांच्या आर्थिक व सांपत्तिक परिस्थितीचा व त्यांचेमधील हितसंबंधाचा प्रश्न सोडविणें अंगाबाहेर टाकलें याबद्दल नेहरू कमिटीवर शिंतोडे उडविले. पं.नेहरू यांनीं सायमनसाहेबांना उत्तर दिलेंच आहे. तें उत्तर असें कीं, 'वसाहतीचें स्वराज्य' प्रस्थापित झाल्यानंतर पुढें प्रांतिक सरकार व मध्यवर्ती सरकार यांमधील हितसंबंध आणि त्यांच्या खजिन्याच्या व्यवस्थेसंबंधाचा प्रश्न स्वतंत्र कमिशन नेमून ठरवितां येईल. टाईम्ससारख्या अँग्लो—इंडियन व युरोपियन यांच्या कैवारी पत्रांनीं याबद्दल नेहरू रिपोर्टाची टवाळी केली व सर जॉन सायमन यांच्या चौकस बुद्धिमत्तेबद्दल सर्वत्र तारीफहि केली आहे. तथापि सरकारनें प्रजेचा पैसा पाण्यासारखा खर्चून याच प्रश्नावर जीं कमिशनें व कमिट्या नेमल्या त्या कमिशनांच्या व कमिट्यांच्या रिपोर्टांचा उपयोग काय झाला व १९२१ च्या सुधारणा कायद्याला पूरक म्हणून लॉर्ड मेस्टन कमिटीच्या रिपोर्टानें केलेली प्रांतिक व हिंदुस्थानसरकार यांच्यामधील हितसंबधाची योजना कशी विघातक ठरली यासंबंधाची चर्चा या लेखांत करूं.

## जमाखर्चाच्या विभागणीचा इतिहास

हिंदुस्थानसरकारच्या राज्यव्यवस्थेचा व खजिन्यांतून होणाऱ्या जमाखर्चाचा पूर्वेतिहास असा आहे कीं, १८७१ पर्यंत हिंदुस्थान—सरकारच्या खजिन्यांतच सर्व पैसा जमा होत असे. व हिंदुस्थानसरकार प्रांतिक सरकारांना जमा झालेल्या पैशाचा कोणता हिस्सा द्यावयाचा तें ठरवीत असे. १८७१--८२ या मुदतींत पोलीस शिक्षण आरोग्य यांसारखीं कांहीं खर्चाचीं खातीं व त्या खात्यांवर खर्च करण्याची रक्कम ठरवून देण्यांत

आली. १८८२-१९०४ या अमदानींत प्रांतिक सरकारांना जमीनमहसूल, एक्साईज, रजिस्ट्रेशन, स्टँप या उत्पन्नांपैकीं कांहीं हिस्सा देण्याचें ठरविण्यांत आलें. पण ही व्यवस्था सयुक्तिक न वाटून १९०४ सालीं तात्पुरती कायमची व्यवस्था म्हणून करण्यांत आली व प्रांतिक सरकारांना कांहीं ठराविक खात्यांचें उत्पन्न तोडून द्यावें असें ठरविण्यांत आलें. परंतु हें तत्त्व अमलांत आलें नाहीं. कारण जमीनमहसूल, प्राप्तीवरील कराचे उत्पन्न, स्टँप, जंगलखात व जकातीच उत्पन्न यांपैकीं कांहीं प्रांतांना ½ हिस्सा तर कांहींना स्टँपाच्या उत्पन्नाचा ½ व बाकीच्या उत्पन्नाचा ½ हिस्सा देण्यांत आला. ही चूक १९०८ सालीं दुरुस्त करण्यांत आली. १९११ सालीं प्रांतिक सरकार व हिंदुस्थान सरकार यांच्यामध्यें खजिन्याचें कायमचें वर्गीकरण म्हणून करण्यांत आलें. सेल्बी कमिशनाच्या शिफारसीप्रमाणें एक्साईज रजिस्ट्रेशन व स्टँप हीं खातीं तोडून देण्यांत आलीं. व जमीनमहसूल व प्राप्तीवरील कर यांच्या उत्पन्नाचा अर्धा हिस्सा तोडून देण्यांत आला.

## सुधारणानंतर

यानंतर १ ऑगस्ट १९१७ रोजीं जबाबदारीचें स्वराज्य देण्याचें ध्येय बादशहांनीं जाहीर केलें व या तत्त्वाला अनुसरून माजी स्टेटसेक्रेटरी मॉंटेग्यूसाहेब व माजी व्हाइसरॉय चेम्सफर्ड यांनीं खजिन्याची व राज्यव्यवस्थेची पाहाणी केली. खजिन्याचे बाबतींत तरी निदान प्रांतिक स्वायत्तत्ता देण्यांत आली. तथापि प्राप्तीवरील करांचें वाढतें उत्पन्न कस्टम्स, मिठावरील कराचें उत्पन्न हीं खातीं सरकारनें आपणाकडेच ठेवून घेतलीं व प्रांतिक सरकारांना जमीनमहसूल, रजिस्ट्रेशन, एक्साईज, इरिगेशन वगैरे खात्यांचें उत्पन्न नवीन कराच्या रूपानें वाढविण्याचा अधिकार दिला. प्रांतिक सरकारच्या राज्यव्यवस्थेत द्विदल राज्यपद्धति सुरू केली व शिक्षण, आरोग्य, उद्योगधंदे, शेतीसुधारणा यांसारखीं खर्चाचीं डोईजड खातीं दिवाणांच्या हातीं दिलीं. पण इतकें होऊनहि भागलें नाहीं. प्राप्तीवरील कराचें उत्पन्न व कस्टम खात्याचें उत्पन्न वाढतें असतांना देखील प्रांतिक सरकारांना जमीनमहसुलाचें व स्टँपाचें उत्पन्न तोडून दिल्यामुळें हिंदुस्थानसरकारचा कारभार आंतबट्ट्याचा होऊं लागला असें भासविण्यांत आलें. १९२०-२१ सालीं ३२ कोटि २७ लक्ष रुपयांची तूट आली व १९२१-२२ सालच्या अंदाजी जमाखर्चांत ही तूट ९ कोटि १६ लक्ष येणार असें ठरलें. अर्थात् जकातीचे दर वाढविण्यांत आले. त्याबरोबरच लॉर्ड मस्टन, मि० चार्लस रॉबर्टस व कमांडर हिल्टन यंग यांची एक कमिटी नेमली व या मेस्टन कमिटीनें, प्रांतांचें वाढतें उत्पन्न, लोकसंख्या व इतर खात्यांच्या उत्पन्नांची पाहाणी करून, हिंदुस्थानसरकारची ९ कोटि ८३ लक्ष रुपयांची येणारी तूट प्रांतिक सरकारानें खंडणीरूपानें द्यावी असें ठरविलें. त्या कमिटीच्या शिफारसी कोष्टकरूपानें मांडल्यास असें आढळेल कीं,

| प्रांत | नवीन खजिन्याच्या वर्गीकरणामुळें वाढलेलें प्रांतिक खर्चाचें आधिक्य | हिंदुस्थानसरकारला द्यावयाची खंडणी | खंडणी दिल्यानंतर वाढलेलें खर्चाचें प्रांतिक आधिक्य | खंडणीचें शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|
| मद्रास | ५७६ | ३४८ | २२८ | ३५.५ |
| मुंबई | ९३ | ५६ | ३७ | ५.६ |
| बंगाल | १०४ | ६३ | ४१ | ६.५ |
| यु. पी. | ३९७ | २४० | १५७ | २४.५ |
| पंजाब | २८९ | १७५ | ११४ | १८ |
| बर्मा | २४६ | ६४ | १८२ | ६.५ |
| बिहार ओरिसा | ५१ | — | ५१ | — |
| सी. पी. | ५२ | २२ | ३० | २ |
| आसाम | ४२ | १५ | २७ | १.५ |

वरील ९८३ लाख रुपयांची खंडणी हिंदुस्थानसरकारच्या गरजेप्रमाणें कमीजास्त होणारी होती. तथापि 'मेस्टन' करारानें प्रांतानिहाय खंडणीचें कोष्टक बदलणारें होतें. तें असें—

| प्रांत | १९२२-२३ | १९२३-२४ | १९२४-२५ | १९२५-२६ | १९२६-२७ | १९२७-२८ | नंतर कायम |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मद्रास | ३२.५ | २९.५ | २६.५ | २३ | २० | | १७ |
| मुंबई | ७ | ८ | ९.५ | १०.५ | १२ | | १३ |
| बंगाल | ८.५ | १०.५ | १२.५ | १५ | १७ | | १९ |
| यु. पी. | २३.५ | २२.५ | २१ | २० | १९ | | १० |
| पंजाब | १६.५ | १५ | १३.५ | १२ | १०.५ | | ९ |
| बर्मा | ६.५ | ६ | ६.५ | ६.५ | ६.५ | | ६.५ |
| बिहार ओरिसा | — | — | — | — | — | | — |
| सी. पी. | २.५ | ३ | ३.५ | ४ | ४.५ | | ५ |
| आसाम | १.५ | २ | २ | २ | २ | | २.५ |

पण इतकें होऊनहि भागलें नाहीं. कारण ही खंडणी तूट जास्त पडेल त्याप्रमाणें हिंदुस्थानसरकारनें स्टेटसेक्रेटरीच्या संमतीनें वाढवावी असें ठरलें व ह्या खंडणीच्या खर्चाचा बोजा प्रांतिक सरकारच्या तिजोरीवर पहिल्यानें पडूं लागला. वरिष्ठ सरकारची मुस्कटदाबी करण्याकरितां प्रांतिक सरकारला स्वतःच्या पोटाला चिमटा घेणें भाग पडलें. ह्या वरील कोष्टकांवरून दिसून येईल कीं, पंजाब, मद्रास, यु. पी. या प्रांतांचे जमिनीचें उत्पन्न

अधिक यामुळें त्या प्रांतांचा तादृश तरी निदान फायदा झाला. पण बंगालमध्यें कायमधारापद्धति चालू असल्यामुळें जमीनमहसूलाचें उत्पन्न वाढणें शक्य नाहीं, पण खंडणीच्या हिस्सेरशीचें प्रमाण मात्र वाढतें होतें. मुंबई प्रांतांत मेस्टनसाहेबांच्या आंकडेशास्त्राच्या ज्ञानाप्रमाणे जमीनमहसुलाचें उत्पन्न २ कोटींनीं व जकातीचें उत्पन्न २॥ कोटींनीं वाढावयास पाहिजे होतें. परंतु जमीनमहसुलाच्या उत्पन्नांत चारदोन लाखांपलीकडे फारशी वाढ झाली नाहीं. व लोकपक्ष दारूबंदीकरितां हट्ट धरून बसत असतांना देखील मुंबईसरकारला वाढत्या उत्पन्नाची हांव आंवरली नाहीं, तथापि हे अंदाजी आंकडे कागदावरच राहिले.

## मुंबईसरकारची उधळपट्टी

'खजिना हेंच राष्ट्राचें जीवन' असल्यामुळें दिवाणांना फडणविसांच्या तोंडाकडे पाहात बसाव लागलें. व शिक्षणासारख्या राष्ट्रसंवर्धन खात्याची उपासमार झाली. मुंबई प्रांतिक सरकारनें 'बॅकबे स्कीम' 'लॉईड बॅरेज स्कीम' यांसारखे पांढरे हत्ती पोसण्याचें ठरविलें. हिंदुस्थानसरकारला दरवर्षी द्यावयाची वाढती खंडणी चुकत नाहीं व खजिन्यांत पैशाची तूट येते, याकरिता मुं. सरकारने एन्टरटेन्मेंट टॅक्स बसविला व स्टँपांचे दरहि वाढवून प्रजेवरील कराचा बोजा वाढविला व हिंदुस्थानसरकारच्या वाढत्या खंडणीची तोंडमिळवणी केली. यानंतर १९२५-२६ सालीं हिंदुस्थानसरकारचे फडणवीस सर बेसिल ब्लॅकेट यांनीं तोंडमिळवणी करून शिल्लक टाकली व २५० लाख रुपयांची खंडणीची सूट दिली. पण या सुटींत मद्रास प्रांताला १२६ लाख, यु. पी. ६१, पंजाब ५६ व बर्मा ७लाख रुपये अशी सूट देण्यांत आली.१९२६-२७ सालीं मद्रास ५७ लाख, यु. पी. ३३, पंजाब २८ व बर्मा ७ लाख अशी सूट देण्यांत आली. १९२७-२८ सालीं मात्र मुंबई—सरकारच्या वांट्याला १९ लाख रुपये आले. परंतु हिंदुस्थानसरकारच्या उत्पन्नांत तूट येण्याचे दिवस निघून गेले व शिल्लक राहूं लागल्यामुळें सर्व प्रांतिक सरकारांना खंडणीची सूट देण्यांत आली. परंतु तात्त्विक दृष्ट्या ह्या खंडणीच्या सुटीमुळें मुंबई सरकारचे नुकसान झालें. कारण प्रांतानिहाय खजिन्याचें वर्गीकरण समसमान झालें नाहीं. मद्रास, पंजाब, यु. पी. या सारख्या कृषिप्रधान प्रांतांचा फायदा झाला मुंबई इलाख्यांत शेतीपेक्षां उद्योग—धंदे व कारखाने जास्त म्हणून व्यापारउदीम करणाऱ्या लोकांचा भरणा अधिक यामुळें, मुंबई इलाख्यांतून प्राप्तीवरील कराचें उत्पन्न व कस्टमखात्याचे उत्पन्न वाढूं लागलें, तथापि याचा मोबदला मात्र मुंबई—सरकारास मिळं लागला नाहीं. कारण गेल्या ३० वर्षांतील जमीन कसणाऱ्या व इतर उद्योग करणाऱ्या इसमांवर लादण्यांत येणाऱ्या कराचे आंकडे ताडून पाहल्यास आपणास असे दिसतें कीं,

| वर्ष | जमीन कसणार | इतर धंदा करणारा |
|---|---|---|
| १९०२–३ | २८१० | १८१० |
| १९१३–१४ | ३८१ | २८५ |
| १९२२–२३ | ४८१२ | ६८५ |

यावरून अलीकडे जमीन कसणारा फक्त ४ रु. १२ आणे कर देतो व उद्योग करणारा ६ रु. ५ आणे देतो व उद्योगधंदा करणाऱ्याचा हा कर हिंदुस्थानसरकाराकडे जातो. अर्थात् उद्योगधंदे, कारखाने, व्यापार यांची वाढ ज्या प्रांतांत होते त्या प्रातिक सरकारला याचा मोबदला मिळत नाहीं. मुंबई प्रांतांतून शेंकडा ३६ टक्के प्राप्तीवरील कर गोळा होतो. म्हणजे १९ कोटींपैकीं ३॥ कोटि रुपये मुंबई इलाख्यांतील लोक देतात. ह्या उद्योगधंद्याच्या व व्यापाराच्या वाढीकरितां खटपट करावी प्रांतिक सरकारनें व त्याचा मोबदला घ्यावा हिंदुस्थानसरकारने अशी ही खजिन्याच्या वर्गीकरणाची योजना आहे. तथापि हें प्राप्तीवरील कराचें उत्पन्न मुंबई इलाख्यांत कापडाच्या गिरण्यांचे धंद्यावर, बंगल्यांत तागाचे व्यापारावर, आसामांत चहाचे धंद्यावर व बिहारमध्ये कोळशाच्या खाणीचे धंद्यावर अवलंबून असल्यामुळें प्राप्तीवरील कराचा ठराविक हिस्सा सर्व प्रांताना सारखा वांटतां येणार नाहीं,व उद्योगधंदे व कारखाने सर्वत्र पसरले असल्यामुळें मूळ उत्पन्न कोठें झालें व कसें झालें हें ठरविणे कठीण आहे. त्याचप्रमाणें करकमिटीनें परदेशी दारूवरील जकातीचें उत्पन्न व न्यायखात्याबिगर स्टँपाचे उत्पन्न वरिष्ठ सरकारनें घ्यावें असें सुचविलें आहे यामुळेंहि प्रांतिक सरकारांच्या खजिन्यांत पडणार आहे. तरी हा प्रश्न शक्य तितक्या लवकर सोडविणें जरूर आहे. अशा तऱ्हेनें प्रांतिक सरकार व हिंदुस्थानसरकार यांमध्यें खजिन्याची विषम वांटणी झाली आहे. अर्थात् वांटणी समसमान कशी व्हावी हे ठरविण्याकरितां पं. नेहरू यांचेप्रमाणें स्वतंत्र कमिटी नेमून ही गोष्ट ठरविण्यांत यावी असें करकमिटीच्या रिपोर्टांवरील ठरावावर असेंब्लींत चर्चा चालू असतां, सर बेसिल ब्लॅकेट यांनीं आपल्या भाषणांत सांगितलें आहे. करकमिटीनेंहि आपल्या रिपोर्टांत खजिन्याची वांटणी सम प्रमाणांत झाली नाहीं व प्राप्तीवरील करा या उत्पन्नांपैकीं कांहीं उत्पन्न प्रांतिक सरकारांना वांटून द्यावें व ती वांटणी कशी करावी हें स्वतंत्र कमिटी नेमून ठरविण्यांत यावें असें सुचविलें आहे. याची जाणीव हिंदुस्थानसरकारास होऊन सर जॉन सायमन यांचे मदतीला एकॉन-

मिस्ट पत्राचे संपादक मि. लेटन यांस देण्यांत आलें आहे. यावरून नेहरू रिपोर्टमध्यें केलेली सूचना कशी बरोबर आहे हें दिसून येईल. प्रांतिक सरकार व स्थानिक संस्था यांच्यामधील हितसंबंध व खजिन्याच्या वर्गीकरणाचें विवेचन पुनः केव्हां तरी करूं.

# मुसलमानी अमदानींत हिंदूंची स्थिति

हल्लींचे राज्यकर्ते अशी घमेंड मारीत असतात कीं, आमच्या राजवटींत हिंदूंना जसें धार्मिक स्वातंत्र्य आहे त्याप्रमाणें मुसलमानी अमदानींत नव्हतें. आज हिंदु लोक निर्वेधपणें आपले धार्मिक आचार पाळीत आहेत, त्याप्रमाणें त्यांना मुसलमानी रियासतींत स्वातंत्र्य नव्हतें. आपल्या धर्मावर केव्हां आघात होईल त्याचा त्या वेळीं भरंवसा नव्हता. हिंदुधर्माचा कट्टा शत्रु अवरंगजेब यासंबंधानें इंग्रजी इतिहासकार व त्यांचे शिष्यवर यांनीं तर येथपर्यंत विधानें केलेलीं आढळतात कीं, हिंदुस्थानांत जर इंग्रजांचें राज्य स्थापन झालें नसतें तर आज हिंदुस्थान हें नांव हि ऐकावयाला सांपडलें नसतें. परंतु याच औरंगजेब बादशहानें हिंदु-मुसलमानांसंबंधानें एक जाहिरनामा काढलेला प्रसिद्ध झाला आहे, त्यावरून हिंदु-मुसलमानी संबंधांत त्याची दृष्टि कशा प्रकाप्रकारची होती याचा बोध होतो. आमच्या मुसलमान बंधूंनींहि या जाहिरनाम्याचें अवश्य मनन करावें.

## जाहिरनामा

"सर्व प्रजेच्या कल्याणासाठीं व स्वाभाविक दयेनें प्रेरित होऊन पुढील जाहिरनामा प्रसिद्ध करण्याला हुकूम देत आहों. आमच्या प्रजेनें राव व रंक या सर्वांनीं एकमेकांशीं गुण्यागोविंदानें व आनंदानें वागलें पाहिजे. इस्लामच्या आदेशान्वयें या जाहिरनाम्याच्या द्वारें आम्ही सर्वांस असा हुकूम फर्मावीत आहें कीं, हिंदूंचीं देवालयें व मूर्ति यांचे रक्षण केलें पाहिजे. आमच्या कानीं असें आलें आहे कीं, अलीकडे बनारस येथें राहणारे लोक हिंदूंशीं अपमानकारक रीतीनें व गर्व्हिपणें वागत असतात व ब्राह्मणांच्या पूजाअर्चेत विघ्नें आणीत असतात. या कारणामुळें हिंदूंचीं मनें असंतुष्ट झालीं असल्याचेंहि आम्ही ऐकतों म्हणून आम्ही या जाहिरनाम्याच्या द्वारें जाहीर करतों कीं, आमच्या साम्राज्यांत कोणाहि हिंदूला अगर हिंदु मंदिराला कोणी कसलाहि उपद्रव देतां कामा नये. सर्वांनीं शांतिपूर्वक राहून आमचे ऐश्वर्य वाढण्याबद्दल ईश्वराची प्रार्थना करावी."

मुसलमानी अमदानींत तत्कालीन बादशहा हिंदूंच्या धार्मिक भावनाकडे कशा दृष्टीनें पाहात होते हें समजून येईल. मुसलमान इतिहासकार जनाब पीर गुलाम हुसेनखा यानें सियारुल मुतखेरीन नामक इतिहासांत हिंदु-मुसलमानांच्या इतिहास-कालीन दंग्याची माहिती दिली आहे. त्यानें त्यांत नमूद केलेले दंगे अहमदाबाद व दिल्ली येथें झाले होते. अर्थात् त्याची हकीकत मुसलमानी दृष्टीनें लिहिली असली तरी आजच्या स्थितीवर प्रकाश पडण्याला तिचा बराच उपयोग होईल.

## स. १७१४ चा अहमदाबादचा दंगा

अहमदाबाद येथें हिंदू व मुसलमान यांचीं घरें शेजारीं होतीं. एकदां हिंदु शेजारी होलिकोत्सव करूं लागला. त्याला मुसलमानानें विरोध केला. तेव्हां हिंदु म्हणाला, प्रत्येक मनुष्य आपल्या घरचा मालक आहे, तो तेथें आपल्या इच्छेप्रमाणें वागेल. नंतर लागलीच हजरत अलीचा वर्षदिन आला. तेव्हां हिंदूचा सूड घेण्याची इच्छा मुसलमानाला होऊन त्यानें आपले घरीं गोवध केला व तें मांस गरिबांना वांटण्याचें ठरविलें. हिंदूंना हें समजतांच बरेच हिंदू एकत्र जमून त्यांनींमुसलमानावर हल्ला केला तेव्हां तो आपला जीव बचावून पळाला. हिंदूंना तो गोवध करणारा इसम सांपडला नाहीं, परंतु त्याचा १४ वर्षांचा मुलगा सांपडून त्याला हिंदूंनीं पकडून ज्या ठिकाणीं गोवध करण्यांत आला त्या जागीं त्या मुलाला ठार केला. तेव्हां हजारों मुसलमान जमा होऊन काजीकडे दाद मागण्यासाठीं गेले; परंतु तो घरांत लपून बसला. मुसलमानांनीं घर फोडून त्याला बाहेर काढला व त्याचें घर पेटवून दिलें, हिंदू-मुसलमानांत ही गडबड बरेच दिवस चालली. शेवटीं मुसलमानांनीं आपले तीन पंच नियुक्त करून दिले. व शेवटीं फैसला झाला त्यांत हिंदूच्याकडे कांहीं अपराध नसून मुसलमानांनींच आगळीक केली असा निर्णय झाला.

## सन १७२९ चा दिल्लीचा दंगा

हा दंगा होळीच्या वेळीं झाला. कांहीं चांभारांचीं व मुसलमानांचीं प्रेतें उचलण्यावरून हा दंगा झाला. या दंग्यांत एका हिंदु जव्हेऱ्यानें एका मुसलमानास मारलें, त्यामुळें मुसलमानांत असंतोष माजला, व त्यांनीं हिंदूंवर फिर्याद दिला. फिर्यादीची सुनावणी होण्यापूर्वी त्यांनीं सांगितलें कीं, आम्ही प्रेतें उचलणार नाहीं. अर्थात् त्यांचें दफन राहिलें. इतक्यांत चांभारांनीं दिल्लीची मशीद ताब्यांत घेतली व तींत मुसलमानांना नमाज पढूं देत नाहीं असें कळविलें. काजीनें मध्यस्थी कर-

ण्याचा प्रयत्न केला, तोहि विफल झाला. सरकारच्या कानावर ही हकीकत गेली. कमरुद्दीन वजीर व जाफरखा दिवाण यांना मध्यस्थीसाठीं पाठविलें. परंतु तडजोड न होतां प्रसंग हातघाईवर आला व वजीर कमरुद्दीन यांस जीव घेऊन पळावें लागलें. जाफरखाला चांभारांनीं जोड्यांनीं मारलें. अखेरीस वजीर पुनः येऊन गोड बोलून त्यानें सर्वांस शांत केलें व दंगा मिटला.

खुद्द मुसलमानी राजवटींत हिंदूंच्या धार्मिक भावनेकडे कशा प्रकारें लक्ष दिलें जात असे हें दाखविण्यास हीं दोन उदाहरणें पुरीं आहेत. परंतु हल्लीं वाद्यें वाजविण्यासारख्या व गोवधासारख्या प्रश्नावरून कशी रणधुमाळी माजत आहे हें पाहिलें म्हणजे धार्मिक शांतता कोणत्या राजवटींत जास्त होती याचा उलगडा होतो.

# लाहोरच्या पोलिसांचा अत्याचार !

लाहोर येथें गेल्या मंगळवारीं सायमन कमिशन गेलें असतां नोकरशाहीच्या लाडक्या व राखीव 'शांतता-सुव्यवस्था' खात्यांतील उत्पातप्रिय बंदोबस्तबहाद्दरांनीं लाला लजपतरायादि सन्मान्य हिंदी पुढाऱ्यांवर जो निष्कारण भ्याडपणाचा हल्ला केला त्यायोगें कोणाहि स्वाभिमानी हिंदी मनुष्याचें डोकें त्वेषानें भणाणल्याशिवाय राहणार नाहीं. सरकारचें लष्करी सामर्थ्य पाठीशीं असल्यामुळें, आपल्या हातांतील दंडुक्याचे प्रहार अनत्याचारी लोकपक्षीय पुढाऱ्यांवर करण्यास उद्युक्त होणाऱ्या नोकरशाहीच्या या बगलबच्चांचा धिःकार करण्यास पारतंत्र्याच्या शब्दमर्यादेंतली भाषाच अपुरी पडते. किंबहुना कसल्याहि भाषेनें असल्या अत्याचारांचा प्रतिवाद केला तरी तो अपुराच होय. असल्या क्षोभकारक प्रकारांच्या आवृत्त्या जर सायमन कमिशनाच्या फेरींत इतर ठिकाणींहि निघणार असतील तर लोकांच्या अनत्याचारी सहनशीलतेचें बंधन तुटल्याशिवाय राहणार नाहीं. लाला लजपतराय यांच्यासारख्या अखंड देशसेवेनें काळ्याचे पांढरे केस झालेल्या सन्मान्य वृद्ध पुढाऱ्यांचे जोडे पुसण्याचीहि ज्यांची लायकी नाहीं असल्या यःकश्चित् हडेलहप्प्यांनीं निर्लज्जपणानें केलेला हा उपमर्द पाहिल्याबरोबर त्यांचें तेथल्या तेथें टाळकें सडकावें अशीच पहिली प्रतिकाराची ऊर्मि कोणाहि सामान्य मनुष्याच्या डोक्यांत उसळणार. पुढाऱ्यांच्या उपदेशानें व शिस्त राखण्याच्या शिकस्तीच्या प्रयत्नामुळेच लोकांनीं ही उर्मि दाबून ठेविली व लाहोरचा प्रसंग विकोपास गेला नाहीं. पण लोकांच्या आत्मसंयमनाचा व सहनशीलतेचा अंत सरकारास पाहावयाचा नसेल तर त्यानें आपल्या पोलीस खात्याच्या या बेतालपणाला वेळींच आळा घालणें जरूर आहे.

लाहोरच्या प्रसंगाची हकीकत कळल्याबरोबर पंडित मोतीलाल नेहरू यांनीं लजपतरायांना अशा अर्थाची तार पाठविली कीं, तुमच्या छातीवर घातलेले घाव वस्तुतः नोकरशाहीच्या अंगावर उमटले असून त्यायोगें नोकरशाहीचा पाडाव होत असल्याचें मला दिसत आहे. सायमन कमिशनाचा डाव आपल्याच अंगावर उलटत चालल्याबद्दल नोकरशाहीच्या मनांत चाललेल्या अंतस्थ खळबळीचा स्फोट लाहोरच्या पोलिसांच्या चिडखोरपणाचे रूपानें प्रगट झाला हेंच खरें. कारण सायमन कमिशनच्या प्रवासांतील प्रत्येक मुक्काम म्हणजे नोकरशाहीच्या कारवाईचा डोलारा अधिकाधिक ढांसळल्याचें प्रदर्शनच होऊन बसलें आहे. गेल्या फेब्रुवारींत सायमन कमिशन हिंदुस्थानास प्राथमिक भेट देऊन गेलें त्या वेळीं बहिष्काराच्या चळवळीची चुणूक त्यांच्या निदर्शनास चांगलीच आली होती. पण सायमनसाहेबांच्या मनांत प्रामाणिक स्वतंत्र वृत्तीऐवजीं प्रवाहपतित सांगकामेपणाची वृत्ति असल्यामुळें त्यांनीं येथील नोकरशाहीवर वाजवीपेक्षां अधिक विश्वास टाकला व पुढील फेरींत बहिष्काराची चळवळ थंडावेल अशी आशा करीत ते येथून गेले. 'बहिष्काराच्या चळवळींत कांहीं अर्थ नाहीं असें तुम्ही इंग्लंडांत सांगा व आम्ही इकडे ही चळवळ हाणून पाडण्याचा तुमच्या दुसऱ्या फेरीपर्यंत कसून प्रयत्न करतों' असें येथील नोकरशाहीनें सायमन यांस सांगितलें व त्यांनीं तें मानलें. पण नोकरशाहीनें सायमन यांना दिलेलें आश्वासन तिला पार पाडतां आलें नाहीं. लोकपक्षानें बहिष्काराची घोषणा चालू ठेविली व विशेषतः नेहरू कमिटीचा रिपोर्ट व सर्वपक्षीय परिषद यांच्यायोगानें बहिष्काराच्या चळवळीस भक्कम विधायक अधिष्ठान प्राप्त करून दिलें.

आपल्या सत्तेचा फोलपणा जगाच्या निदर्शनास येणें ही स्वयंमन्य सत्ताधाऱ्यांना अत्यंत नाचक्कीची गोष्ट वाटते. अर्थात सायमन यांच्या दुसऱ्या फेरींत या आपल्या नाचक्कीचें प्रदर्शन कमिशनपुढें होऊं नये अशा दृष्टीनें त्यांच्या येथील कार्यक्रमाची व्यवस्था नोकरशाहीनें करण्याचें ठरविलें. मुंबईस कमिशन गुपचूप अंधारांत उतरवून त्यास तडक पुण्यास आणलें. पण मुंबईच्या समुद्रांत व

सह्याद्रीच्या डोंगरांत 'सायमन परत जा' हा हिंदुस्थानाचा आवाज त्यांच्या कानावर गेलाच. पुणें स्टेशनांत आगगाडींतून जातांना व तेथून गव्हर्मेंट हाऊसकडे मोटारींतून जातांना असंख्य काळ्या निशाणांचें दृश्य व 'सायमन परत जा' हा आवाज यांचे योगानें बहिष्काराच्या चळवळीची यथार्थ कल्पना कमिशनाला झाली. उलट पुण्याच्या स्टेशनावरील मूठभर जो-हुकूमवाल्यांचें नोकरशाहीनें उभें केलेलें स्वागत व लोकांचा पाठिंबा नसलेल्या असंतुष्ट अलबत्यागलबत्यांच्या विचित्र साक्षी, यांचे योगानें नोकरशाहीची पुरी नाचक्की झाली. साक्षींच्या बाबतींतली घसरलेली बाजू सांवरतां येणें शक्य नसलें तरी निदान स्वागताच्या बाबतींत हात दाखवून अवलक्षण नको म्हणून नोकरशाहीनें स्वागत समारंभांची यातायात सोडून दिली. पुण्याहून कमिशन चोरासारखें गुपचूप बाहेर पडलें तें १३०० मैलांचा प्रवास करून एकदम लाहोरास गेलें. येवढ्या मोठ्या प्रवासांत एकाहि स्टेशनावर कमिशनाचा सन्मान झाला नाहीं, इतकेंच नव्हे तर लाहोरच्या स्टेशनावरहि सार्वजनिक स्वरूपाचें स्वागत करण्याचें नोकरशाहीनें टाळलें. पण लोकांचा बहिष्कार अशानें थोडाच थांबणार ? पुण्याप्रमाणेंच, किंबहुना त्यापेक्षांहि मोठ्या प्रमाणावर, लाहोरास सभा व मिरवणुकी होणार असें तेथील हिंदु-मुसलमान-शीख पुढाऱ्यांच्या प्रयत्नावरून नोकरशाहीला कळून चुकलें. एका बाजूला सार्वजनिक स्वागताचा अभाव व दुसऱ्या बाजूला सार्वजनिक धिःकाराचा प्रचंडपणा हा देखावा आगाऊ मनःचक्षुपुढें उभा राहिल्यानें नोकरशाहीच्या मनाचा जळफळाट झाला.

हा जळफळाट प्रगट होण्याचें नेहमींचें द्वार म्हणजे 'शांतता व सुव्यवस्था' या भव्य नांवाखालीं चाललेलें सरकारचें आडदांड पोलीसखातें. या खात्यानें नेहमींप्रमाणें व्यवस्थेच्या नांवाखालीं लोकांना नियंत्रण घालण्याची तयारी केली. १४४ कलमान्वयें, मॅजिस्ट्रेटचे परवानगीशिवाय सभा व मिरवणुकी होऊं नयेत अशीं फर्मानें निघालीं. पण या फाजील धावपळीमुळें आगींत तेल ओतल्याप्रमाणें झाले. लोकांनीं या हुकमांचा जाहीर धिःकार केला. कार्यक्रमांत सामील होण्याबद्दल जे एरवीं कदाचित उदासीन राहिले असते ते लोक व पुढारी त्यांत सामील झाले. लाला लजपतराय हे देखील प्रथम बहिष्काराच्या मिरवणुकींत सामील होणार नव्हते. पण शांततेच्या नांवानें अशांतता व क्षोभ उत्पन्न करणारें १४४ कलमाचे अस्त्र नोकरशाहीनें बाहेर काढलेलें पाहून त्यांनीहि या मिरवणुकींत आपण प्रविष्ट होणार असें इतर पुढाऱ्यांना ताबडतोब कळविलें. इकडे, हुकूम मोडला तर ताबडतोब सर्व लोकांना पकडून दुसरीकडे नेण्याची जय्यत व्यवस्था केली आहे अशा प्रकारचे जाहिरनामे काढून अधिकाऱ्यांनीं लोकक्षोभ अधिक भडकविण्याचें श्रेय घेतलें ! ता. २९ रोजीं म्हणजे कमिशन लाहोरला पोंचण्याच्या आदल्या दिवशीं रात्रीं प्रचंड सभा होऊन दुसऱ्या दिवसाचा मिरवणुकीचा कार्यक्रम निश्चित करण्यांत आला. सकाळीं मोची गेटाजवळ सभा भरून तेथून मिरवणूक निघावयाची व दुपारीं कमिशन स्टेशनवर येण्याच्या वेळेला स्टेशनवर पोंचावयाची असें ठरलें. त्या रात्रीच्या सभेंत सबंध रात्रभर भाषणें चाललीं तरी आम्ही बसावयास तयार आहोंत असें लोकांनीं सांगितलें होतें ! ठरल्याप्रमाणें सकाळीं सभा होऊन मिरवणूक निघाली. या सभेंत लोकांना शिस्तीनें व शांततेनें राहण्याबद्दल पुढाऱ्यांनीं बजावलें व अत्याचाराचा दूरचा संभवहि टाळण्यासाठीं कित्येक लोकांच्याजवळील काठ्याहि काढून घेतल्या.

पण नोकरशाहीला अत्याचाराच्या काल्पनिक पिशाच्चानें पछाडलें होतें. पोलिसांनीं स्टेशनाच्याभोंवतालीं शेंदोनशें यार्डांच्या अंतरानें सर्व रस्त्यांवर लांकडी खांब व कांटेरी तारा यांचें कुंपण उभें केलें ! कांटेरी तारांचीं कुंपणें चोरांचें किंवा जनावरांचें निवारण करण्यासाठीं उभीं करतात. किंवा युद्धप्रसंगीं खंदक अगर वसाहती यांचें संरक्षण करण्यासाठीं त्यांचा उपयोग केला जातो. यावरून नोकरशाही हिंदी लोकांना त्यांच्या देशांतच चोरांप्रमाणें अगर जनावरांप्रमाणें लेखीत आहे अगर एका बाजूला लोकपक्ष व दुसऱ्या बाजूला लोकमत-विरोधी कमिशन यांच्या युद्धांत एखाद्या खंदकाप्रमाणें कमिशनाचें संरक्षण करण्याची नोकरशाहीवर पाळी आली आहे असें म्हटलें पाहिजे. सायमन कमिशनच्या संरक्षणार्थ लावलेल्या कांटेरी तारा म्हणजे हिंदुस्थानाच्या पारतंत्र्याचें क्षोभकारक चिन्हच होतें. आपल्या जन्मभूमींत आपण चोर अगर शत्रु ठरतों, या विपरीत घटनेची जाणीव प्रत्यक्ष कांटेरी तारांपेक्षांहि लोकसमुदायाच्या मनाला अधिक बोचणारी होती. परतंत्र देशाच्या कपाळाची कवटी उलटी लागलेली असते आणि परकीय राज्यकर्त्यांच्या डोळ्यांतील बाहुल्या अधिकाराच्या धुंदीनें उलट्या फिरलेल्या असतात. म्हणूनच देशभक्त पुढारी चोर ठरतात व परस्वहारक सत्ताधारी अन्याय्य वर्तन करून बेगुमानपणें साव म्हणून मिरवतात. राष्ट्रानें स्वावलंबनाच्या व संघटनेच्या जोरावर आपलें हें भवितव्य फिरवलें पाहिजे व सत्ताधाऱ्यांच्या डोळ्यांवरील धुंदी चरचरीत अंजन घालून उतरविली पाहिजे हीच टोंचणी या कांटेरी तारांच्या योगानें लोकांना झाली असेल.

पण असल्या क्षोभाच्या प्रसंगांहि लोकांनीं विलक्षण शांतपणा राखला. कांटेरी तारांमुळें लोक चिड-

तील अशी पोलीस अधिकाऱ्यांची अपेक्षा असावी. पण लोकांनीं कोणत्याच प्रकारें चिरडीस न जातां या क्रांटेरी तारांपाशीं मिरवणूक थांबविली व सर्व शांततेनें उभे राहिले. पोलिस अधिकाऱ्यांनाच आंतबाहेर जाण्याकरतां या कुंपणाला एक लहानशी खिड ठेविलेली होती. ती राखण्यासाठीं पोलीस अधिकारी जय्यत तयारीनें उभे होते. या खिडींतून रिपोर्ट घेण्यासाठीं स्टेशनावर जाणाऱ्या वर्तमानपत्रांच्या बातमीदारानाही अटकाव करण्यांत येत होता व एका बातमीदाराला पकडून नेऊन त्याची झडती घेण्यांत आली ! त्यानें दाखविलेल्या पासावरही पोलिसांचा विश्वास बसेना. या प्रसंगानें पोलिसांच्या संशयग्रस्त, चिडलेल्या व भांबावलेल्या मनःस्थितीची कल्पना येते. अशा मनःस्थितीत लोकसमूहाला आपल्या बंदोबस्ताच्या अधिकाराचें सक्रिय प्रदर्शन एकदां तरी झालें पाहिजे, नाहींतर आपली काय शोभा, अशीच वृत्ति अधिकाऱ्यांची झाली असावी, असें पुढील प्रकारावरून दिसतें. कित्येक तिकिटकलेक्टरांना तिकीट दाखणाऱ्या माणसापेक्षां तिकीट नसलेला मनुष्य पाहून अधिक आनंद झालेला दिसतो किंवा एखाद्या मारक्या मास्तराला मुलानें बरोबर उत्तर दिल्यापेक्षां चूक केल्यास अधिक आनंद वाटतो. कारण त्यायोगें यांना अधिकारप्रदर्शनाची संधि मिळते ! अशाच तऱ्हेची अधिकारप्रदर्शनाची संधि अधिकारी पाहात असावेत. पण मिरवणुकींतील लोकांनीं तारा बाजूस सारून जाण्याचा प्रयत्न केला नाहीं, इतकेंच नव्हे तर बाजूच्या खिडींतून कदाचित् कांहीं लोक आंत घुसतील म्हणून त्या ठिकाणीं लाला लजपतराय, रायजादा हंसराज, डॉ. गोपीचंद व डॉ. सत्यपाल इ. पुढारी उभे होते.

पोलिसांना ही शांतताच असह्य झाली असावी. आणि पुढाऱ्यांवर सूड उगवण्याची संधि दिसतांच एका गोऱ्या पोलीस अधिकाऱ्यानें लाला लजपतराय यांना आपल्या काठीचे तडाखे देण्यास सुरुवात केली व त्यानें आणि त्याच्या साथीदारांनीं या सर्व पुढाऱ्यांवर नामर्दपणाचा अत्याचारी हल्ला केला. लजपतरायांना काठीचे दोन तडाखे छातीवर बसले व त्यांची छाती सुजली. हंसराज यांच्या हातावर तडाखे बसल्यानें त्यांतून रक्त वाहूं लागलें, गोपीचंद यांच्या डोक्यावर व हातावर मार बसला, डॉ. अलम व डॉ. सत्यपाल यांच्याहि हातावर जोराचे तडाखे बसले. इंग्लंडसारख्या स्वतंत्र देशांत पोलिसांनीं असला अधम अत्याचार केला असता तर त्यांना तेथल्या तेथें लोकांनीं ठेंचलें असतें. पण हिंदुस्थानांतील जमाव स्वभावानें, शिकवणीनें व अपरिहार्यतेनें सहनशील व शांत असल्यामुळेंच पोलिसांना हें 'शौर्य' प्रगट करण्याची बुद्धि झाली. लाला लजपतराय यांनीं हल्ला करणाऱ्या गोऱ्या अधिकाऱ्यास त्याचें नांव पुनः पुनः विचारलें असतां त्यानें तें सांगण्याचें नाकारलें. पोलिसांचा हल्ला झाल्यावर लालाजींनीं सर्व जमावास शांततेनें खालीं बसण्यास सांगितलें व सर्वांनीं तें मानलें. पोलिसांच्या हल्ल्यानें लोकांनीं आंखलेल्या कार्यक्रमांत यत्किंचितहि बदल झाला नाहीं. सायमन कमिशनाची व मध्यवर्ती कमिटीची गाडी येईपर्यंत लोक ठरल्याप्रमाणें तेथेंच बसून राहिले व या गाड्या येतांच काळीं निशाणें दाखवून 'सायमन परत जा' असा घोष त्यांनीं केला. यानंतर संध्याकाळपर्यंत सर्व शहरांत पंडित मालवीय, डॉ. सत्यपाल इ. पुढाऱ्यांच्या नेतृत्वानें बहिष्काराची मिरवणूक फिरत होती. एके ठिकाणीं बंदी केलेल्या रस्त्यावर जाऊन पंडित मालवीय व इतर पुढारी यांनीं पोलिसांचा हुकूम मोडला, पण त्यांना पकडण्यांत आलें नाहीं. पकडण्याचा आम्हास हुकूम नाहीं; फक्त बंदी केलेल्या भागांत लोक आल्यास हुसकून देण्याचा आम्हाला हुकूम आहे असें पोलिसांनीं सांगितलें. या ठिकाणींहि लोकांचा जमाव व पोलिसांची तुकडी यांच्यांत खटका उडण्याचा संभव होता पण पुढाऱ्यांनीं लोकांना आवरून धरलें. सायंकाळीं प्रचंड सभा झाली. लाला लजपतराय यांच्या छातींत दुखत असतांहि त्यांनीं सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारून नोकरशाहीला स्पष्ट उत्तर देणारें खणखणीत भाषण केलें.

अशा स्थितींत नोकरशाहीनें नेहमींप्रमाणें झालेल्या प्रकाराचें निगरगट्टपणानें समर्थन केलेंच आहे. लोकांनीं कांटेरी तारा बाजूला सारण्याचा प्रयत्न केला व पोलिसांवर दगड फेंकण्यांत आल्यामुळें पोलिसांनीं हल्ला केला अशी सबब पुढें करण्यांत आली आहे. आणि या निमित्तानें पोलिसांनीं जे लोक सांपडले त्यांवर हल्ला केला ! लाला लजपतराय यांनीं या सरकारी खुलाशाला उत्तर दिलें असून सरकारला हे आरोप सिद्ध करण्यास उघड आव्हानच दिलें आहे. झालेल्या प्रकाराबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्याची गोष्ट तर नोकरशाहीचे बाबतींत बोलावयासच नको. पण या प्रकाराची चौकशी करण्याचेंहि सरकारनें जाहीर केलें नाहीं. रायजादा हंसराज यांनीं गव्हर्नरांची गांठ घेतल्यावर गव्हर्नरांनीं चौकशी करण्याचें आश्वासन दिल्याची बातमी हंसराज यांचेमार्फत बाहेर पडत आहे ! लजपतराय यांनीं आपल्या भाषणांत सरकारला १९२० सालच्या चळवळीची आठवण दिली ती योग्यच होय. कारण सायमनबहिष्काराच्या चळवळींतील लाहोर-प्रकरण हें एक पंजाबप्रकरणच झालें. जनरल डायर यानें ज्या वृत्तीनें जालियांवाला-बागेंत मशीन गन्स चालविल्या तीच वृत्ति सन्मान्य हिंदी पुढाऱ्यांवर हल्ला करणाऱ्या लाहोरच्या पोलिसांची होती.

त्यांच्या हातीं डायरप्रमाणें मशीन गन्स नव्हत्या व लष्करी कायदा पुकारलेला नव्हता, म्हणून केवळ बाह्य परिणामाचे दृष्टीनें फरक वाटतो. पण मनावर होणाऱ्या परिणामाच्या दृष्टीनें हे दोनही उपमर्द जवळ जवळ सारखेच. म्हणून १९२० सालाप्रमाणें देश हालवून सोडणारी व सरकारला कांहीं काल स्तंभित करणारी चळवळ यापुढें झाली तरच लाला लजपतराय यांच्या छातीवर पडलेले घाव नोकरशाहीच्या वर्मी लागले ही पं. नेहरूंची उक्ति सर्व दृष्टींनीं सार्थ ठरेल.

# हिंदी तरुण व युद्ध

जगांत चाललेली युद्धसंन्यासाची भाषा पोकळ असून, साम्राज्यवाद नाहींसा झाल्याशिवाय जगांतील युद्धें थांबावयाचीं नाहींत. आणि हा साम्राज्यवाद नाहींसा करण्यासाठीं परतंत्र राष्ट्रांनीं स्वातंत्र्य संपादन केलें पाहिजे, हाच जगांत शांतता प्रस्थापित करण्याचा खरा उपाय होय. परतंत्रांचें स्वातंत्र्यसंपादनाचें कार्य संपल्याशिवाय ते आंतरराष्ट्रीय शांततेच्या विचारांत खरा भाग घेऊं शकत नाहींत इतकेंच नव्हे तर हें स्वातंत्र्यसंपादन पूर्ण झाल्याखेरीज इतर स्वातंत्र्यसंपन्न राष्ट्रांचे आंतरराष्ट्रीय सलोख्याचे प्रयत्नहि कसे बिनबुडाचे व निरुपयोगी ठरतात हें गेल्या लेखांत (ता.१६-१० चे अग्रलेखांत सांगितलें. त्याचप्रमाणे परतंत्रतेच्या निरनिराळ्या पायऱ्या कशा असतात याचेंहि विवेचन करून त्यांत हिंदुस्थानाची परिस्थिति इतर परतंत्र राष्ट्रांहून भिन्न असल्यामुळें हिंदी लोकांच्या दृष्टीनें युद्धासंबंधाचा विचार स्वतंत्रपणें मांडावयास पाहिजे इतकी प्रस्तावना केली. या देशांतील प्रजा निःशस्त्र असंघटित व विस्कळित; देशाचा विस्तार अवाढव्य; भौतिक व शास्त्रीय सुधारणेच्या दृष्टीनें देश सर्व जगाच्या पाठीमागें पडलेला; आणि इंग्लंडासारख्या पहिल्या प्रतीच्या बलिष्ठ साम्राज्यसत्तेच्या तावडींत सांपडलेला. याप्रमाणें एका बाजूला स्वातंत्र्ययुद्धाची नितांत अशक्यता तर दुसऱ्या बाजूला धूर्त परसत्तेनें शांततेच्या आक्रमणाची व चळवळीची आशा लावण्यापुरतें स्वायत्ततेचें सोंग पुढें केलेलें. यामुळें स्वातंत्र्ययुद्धाची कल्पना सुचत नाहीं,पचत नाहीं व रुचतहि नाहीं.निःशस्त्र असहायतेंत गळ्याइतकें खोल गाडलेल्या दुर्दैवी राष्ट्रानें कितीहि डोळे ताणले तरी स्वातंत्र्ययुद्ध त्याच्या दृष्टिकक्षेंत येऊं शकत नाहीं. आणि मनाची भरारी जरी दृष्टीच्या पलीकडे जात असली तरीहि त्या मनाला परिस्थितीचा विचार सुटत नसल्यामुळें तेंहि स्वातंत्र्य—युद्धापर्यंत जाऊं शकत नाहीं. आणि दुरून त्यास स्पर्श केला तरी तें वाचेसह परत फिरतें.

### 'आम्हाला मार्ग दाखवा'

सारांश, स्वतंत्र राष्ट्रांच्या शांततेच्या विचारांत चीनच्या प्रतिनिधीनें जी भूमिका घेतली तीहि हिंदुस्थानाला घेतां येत नाहीं. चिनी प्रतिनिधीनें तरुणांच्या परिषदेंत सांगितलें कीं, आम्हाला जाचक होत असलेले तहनामे आम्ही रद्द करून घेऊं व मगच स्वतंत्र राष्ट्रांच्या बरोबरीनें बसून शांतता-प्रस्थापनेच्या कामांत सहकारिता करूं. हिंदुस्थानाचे प्रतिनिधि श्री. नलिनाक्ष सन्याल हे एवढेंहि बोलूं शकले नाहींत. साम्राज्यवाद नाहींसा झाल्याशिवाय शांतता प्रस्थापित होणें अशक्य ही गोष्ट त्यांनीं ठणठणीतपणानें सांगितली. पण आम्ही आमची स्वतंत्रता मिळविणार हें चिनी तरुणाने जसें सांगितलें तसे सन्याल यांना सांगतां आलें नाहीं. ते जगांतील सर्व राष्ट्रांच्या तरुणांना म्हणाले "आम्हाला तुम्ही स्पष्ट मार्ग दाखवा. आम्ही काय करावें तें सांगा आणि आम्हाला जें करावयास सांगाल त्या बाबतींत तुमच्यावर ज्या जबाबदाऱ्या येऊन पडतील त्यांचाहि नीट विचार करा." याचा अर्थ हा कीं, तुम्ही आम्हास युद्ध करून स्वातंत्र्य मिळविण्यास सांगत असाल तर तें सामर्थ्य आमच्यांत नाहीं; इतकेंच नव्हे तर तुम्हालाहि या बाबतींत किती मदत करतां येणें शक्य आहे याबद्दल शंका वाटते.

शांततेच्या चळवळीनें कालांतरानें मिळणाऱ्या स्वराज्यानें संतोष नाहीं व पूर्ण स्वातंत्र्याला अवश्यक अशा स्वातंत्र्ययुद्धाची शक्यता दिसत नाहीं अशा पेचांत हिंदी लोक सांपडले आहेत. स्वातंत्र्य हें ध्येय मानल्यानंतर, न्याय्य व शांततावप्रधान साधनांची मर्यादा राहात नाहीं. यामुळे शक्य त्या साधनांनीं स्वातंत्र्य मिळविणें अशा अर्थाचा ठराव पंजाबच्या परिषदेनें मंजूर केला आहे. व कांहीं दिवसांनीं साधनासंबंधाची ही शब्दयोजना कॉंग्रेसच्या घटनेंतहि कदाचित् समाविष्ट होईल. आज शांततायुक्त साधनांचाच उपयोग करणें शक्य आहे. या अपरिहार्य शांततेला सद्गुणस्वरूप देण्याचा जो एक अप्रामाणिकपणा आजच्या शब्दयोजनेंत दिसतो तो 'शक्य त्या साधनांनीं' अशा शब्दयोजनेनें दूर होईल हें खरें. पण याशिवाय दुसरा कोणताहि फरक या नव्या शब्दयोजनेमुळें होणार नाहीं. कारण आजच्या परिस्थितींत शक्य व शांतताप्रधान हे शब्द समानार्थकच आहेत. सारांश, "शक्य त्या साधनांनीं" असें म्हटलें

तरीहि वर सांगितलेला पेंच सुटत नाहीं. श्री. सन्याल यांनीं हाच पेंच जागतिक तरुण परिषदे-पुढें मांडला. ते म्हणाले " आमच्या लोकांचे हाल पाहिले म्हणजे माणुसकी व प्रेमाचें सामर्थ्य यांव-वरील माझा विश्वास डळमळतो. तरीहि महात्मा गांधींच्या अनत्याचारी तत्त्वाला चिकटून राहण्याचा मीं चिकाटीनें प्रयत्न करीत आहे. आम्ही तें तत्त्व सोडून कम्यूनिझमचा स्वीकार करावा कीं काय याचें उत्तर तुम्हा साम्राज्यसंपन्न राष्ट्रांतील तरुणांनीं द्यावयाचें आहे. या प्रश्नाला तुम्हाकडून सक्रिय उत्तर मिळण्याची आम्ही वाट पाहात आहों." हिंदुस्थानानें स्वातंत्र्य-युद्ध करावयाचें तर त्याची बरीचशी जबाबदारी परराष्ट्रांतील साम्राज्यविरोधी लोकांनीं घेतली पाहिजे आणि तशी त्यांची मान-सिक तयारी व सामर्थ्य नाहीं हाच संन्याल यांच्या भाषणाचा अर्थ आहे.

## खरी राजनिष्ठा

स्वातंत्र्य-युद्धाची ही अंतर्बाह्य अशक्यता पुढें करून कोणी असें प्रतिपादन करतात कीं, "आजच्या मारून—मुटकून पाळण्यांत येणाऱ्या शांततेला सद्गुणाचें स्वरूप देऊन हिंदुस्थानानें शांतिपाठ म्हणण्याचें फुकटचें श्रेय कां घेऊं नये ? आणि युद्धकल्पना व युद्धसामर्थ्य यांच्यावर पाणी सोडावें लागत असतां 'धर्मो मे भविष्यति' असें म्हणून समाधान कां मानूं नये ? स्वातंत्र्य—ध्येय बोलून साधनांच्या पेंचांत पडण्यापेक्षां, आज सर्वमान्य असलेलें साम्राज्यां-तर्गत स्वराज्याचें ध्येय घेतलें तर ते आजच्या परिस्थितींत शक्य अशा शांततेच्या मार्गानें मिळू शकेल. आणि मग युद्धाची 'तामसी' कल्पना व युद्धसिद्धतेचा 'पाशवी' विचार करण्याचें कारण न राहतां हिंदी लोकांची सात्विक शांतता-वृत्ति अखंड राहील." पण स्वातंत्र्यवाद सोडला व साम्राज्यवाद अगर साम्राज्यबंधन पत्करलें तरी युद्धकल्पना सुटत नाहीं हें सर्वांनीं लक्षांत ठेवले पाहिजे. साम्राज्याचें रक्षण करणें हें साम्राज्यनिष्ठांचें, व राज्याचें रक्षण करणें हें राजनिष्ठांचे कर्तव्य होय.पण हें साम्राज्यसरकार जगांतील एखाद्या महा-युद्धांत गुंतलें व येथें असलेलें सैन्य बाहेर पाठवावें लागलें तर मग येथील राजनिष्ठ व साम्राज्याभि-मानी प्रजा तरी इंग्रज सरकारच्या राज्याचें कसें रक्षण करणार? जर्मन महायुद्धात एक वेळ अशी आली होती कीं, हिंदुस्थानांतील बहुतेक सैन्य बाहेर गेलें होतें व अगदीं थोडक्या सैन्यावर कांहीं काळ हिंदुस्थानाचें रक्षण होऊं शकलें. पण ती वेळ निराळी होती. आज हिंदुस्थानाच्या भोंव-तालच्या परिस्थितींत विलक्षण पालट झालेला आहे. त्या वेळीं आशियांत जपानाखेरीज दुसरें समर्थ असें राष्ट्र नव्हतें व जपानाला इंग्रजांनीं करारमदारांनीं बांधून ठेवलें होतें. अर्थात् त्या वेळीं हिंदुस्थानावरील इंग्रजी राज्याला परच-क्राची भीति नव्हती. पण आज काय परिस्थिति आहे तीं पाहा. हिंदुस्थानाभोंवतालच्या सर्व एशि-याटिक राष्ट्रांत गेल्या दहा वर्षांत जमीन--अस्मा-नाचा फरक झाला आहे. तुर्कस्थानामध्यें केमाल-पाशानें सर्व युरोपियन सुधारणा उचलल्या आहेत, युद्धसामर्थ्याच्या आधुनिक सिद्धतेच्या बाबतींत तुर्कस्थान युरोपियन राष्ट्रांच्या बरोबरीला लवक-रच येईल असें दिसत आहे. अफगाण अमीर हे जगपर्यटन करून आले असून, जगांतील शास्त्रीय ज्ञानाची व सुधारलेल्या युद्धसामर्थ्याची आपल्या स्वतःच्या राष्ट्रांत प्रतिष्ठापना करण्याचा चंग त्यांनीं बांधला आहे. चिनी राष्ट्राची पुनर्घटना जलदीनें होत असून तें एक आधुनिक युद्धसाधनसंपन्न सामर्थ्यवान् राष्ट्र बन-ण्याच्या बेतांत आहे. आणि रशियासारखें राष्ट्र या एशियाटिक राष्ट्रांना मदत करण्यास त्यांच्या पाठीशीं उभें आहे. जर्मन महायुद्धासारखी परिस्थिति आज प्राप्त झाली तर राजनिष्ठ व साम्राज्यनिष्ठ लोक हिंदुस्थानाचें संरक्षण कसें करणार ?

## पोषाकी साम्राज्यनिष्ठा काय कामाची?

राजनिष्ठा म्हणजे केवळ राज्याविषयीं अगर राजाविषयी निष्क्रिय आस्था बाळगणें नव्हे. तर राजावर किंवा राज्यावर संकट आल्यास तें निवा-रण करण्यास राजनिष्ठानें सिद्ध असावयास पाहिजे, असें प. वा. ना. गोखले यांनीं राजनिष्ठेचें लक्षण सांगितलेलें आहे. आणि तेंच लक्षण साम्राज्य-निष्ठालाहि लावतां येईल. आजची हिंदुस्थानाच्या भोंवतालच्या राष्ट्रांची स्थिति पाहातां, ब्रिटिश साम्राज्यसत्ता युद्धांत गुंतलेली असतांना या राष्ट्रां-कडून हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यावर घाला पड-ण्याचा संभव आहे. हिंदुस्थानांत आज जें खडें सैन्य आहे तें मुख्यतः ब्रि. साम्राज्याच्या रक्षणासाठीं असून हिंदुस्थानाच्या बाहेरहि त्याचा उपयोग केला जातो. एखाद्या महायुद्धांत ब्रिटिश राष्ट्र गुंतलेलें असतां व येथील खडें सैन्य बाहेरच्या कामगिरीवर पाठविलें असतां हिंदुस्थानां-तील नोकरशाहीचें व ब्रिटिश साम्रा-ज्याचें रक्षण करण्याची जबाबदारी येथील राजनिष्ठ व साम्राज्यनिष्ठ लोकांवरच येते. ही जबाबदारी ओळखून ती पार पाडण्यासाठीं काय काय गोष्टी कराव्या लागतील व त्यांपैकीं सरकाराकडून काय काय करवून घ्याव्या लागतील याची विवंचना या लोकांनीं केली पाहिजे. ती ते न करतील तर त्यांची राजनिष्ठा केवळ स्वार्थी व पोषाकी होय असेंच मानावें लागेल.

सारांश, हिंदुस्थानांत स्वातंत्र्यवादी असो, साम्राज्यनिष्ठ असो वा राजनिष्ठ असो, यांपैकीं कोणालाहि भावी युद्धाची कल्पना बाजूला सारतां येत नाहीं. स्वातंत्र्यवादी माणसांपेक्षांहि साम्राज्यनिष्ठांना व राजनिष्ठांना, साम्राज्यसंरक्षक व राज्यसंरक्षक युद्धाची कल्पना अधिक जवळची व दृष्टीच्या टप्प्यांतली आहे. स्वातंत्र्यवाद्याला अंतिम रणाची दीर्घ सूचना गूढ रीतीनें मनांत बाळगून ठेवावी लागते. पण साम्राज्यनिष्ठांना व राजनिष्ठांना अशी कसलीच चोरी नाहीं. त्यांना उघड रीतीनें या संरक्षक युद्धाची कल्पना बोलतां येईल, नोकरशाहीपुढें व साम्राज्यसत्तेपुढें ती मांडतां येईल व या संरक्षक युद्धाची सिद्धता करून देण्यासाठीं सरकाराशीं भांडतांहि येईल. पण आजचे राजनिष्ठ व साम्राज्यनिष्ठ पाहिले तर ते या उभय निष्ठांच्या योगानें मिळणारे मानमरातब व आर्थिक फायदे यांतच गुंग असलेले दिसतात. जी निष्ठा संकटसमयीं उपयोगी पडते तीच खरी. पण आजची हिंदुस्थानांतील राजनिष्ठा व साम्राज्यनिष्ठ लोकांची वृत्ति 'तोबऱ्याला पुढें व लागामाला मागें' अशी आहे.

भावी कालाकडे दृष्टि ठेवणाऱ्या तरुणांनीं स्वातंत्र्यवादी असावें व इतरांनाहि स्वातंत्र्यवादी बनवावें, आणि अशा सर्व स्वातंत्र्यवाद्यांना अंतिम रणाची दीर्घसूचनाहि द्यावी. पण बाकीच्यांनाहि स्वस्थ बसूं देऊं नये. तुम्ही साम्राज्यनिष्ठ अगर राजनिष्ठ असलां तर राज्याचें व साम्राज्याचें संरक्षण करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे. ती पार पाडण्यासाठीं तुम्ही काय करीत आहां अशी त्यांनाहि टोचणी लावली पाहिजे. कृत्रिम शांततेचा असा एक दुर्गुण आहे की त्यायोगें मनुष्य भोगळ व गाफील राहतो. पण उलट अशांततेची भीति असली म्हणजे मनुष्य सावध, संनद्ध व सिद्ध राहतो. हिंदू-मुसलमानांच्या मारामाऱ्यांनीं राष्ट्राचें नुकसान झालें हें खरें. पण या वाइटांतून कांहीं ठिकाणीं एक चांगली गोष्ट निघाली की, संघटना व संरक्षण-सिद्धता या गोष्टींकडे असंघटित समाजाचें अधिक लक्ष वेधलें. दंग्याच्या संभवनीयतेमुळें जो हा इष्ट परिणाम लहानशा व्यक्तिसमूहावर होतो तोच परिणाम भावी युद्धाच्या संभवनीयतेमुळें राष्ट्रावरहि होतो. याचसाठीं आम्ही भावी युद्धाच्या सर्वव्यापी संभवनीयतेचें हें विवेचन करीत आहोत. या संभवनीयतेंतून साम्राज्यनिष्ठ अगर राजनिष्ठहि सुटत नाहींत. किंबहुना स्वातंत्र्यवाद्यांपेक्षांहि त्यांच्यापुढें हा संभव अधिक स्पष्ट व कालदृष्ट्या निकटवर्ती आहे. व त्यासाठीं जरूर ती सावधगिरीची सिद्धता राष्ट्रांत निर्माण करणें त्यांना स्वातंत्र्यवाद्यांपेक्षां सुलभ आहे. भावी युद्धविचाराच्या कक्षेंतून निसटूं पाहाणाऱ्या या दोन वर्गांपुढें त्यांच्यावर पडणारी जबाबदारी स्पष्टपणें हिंदी तरुणांनीं मांडली पाहिजे.

## स्वसंरक्षण केलेंच पाहिजे

जगांतील युद्धविरोधी विचाराला जागतिक परिस्थितीच्या दृष्टीनें पडणाऱ्या मर्यादा आम्ही पाहिल्या लेखांत सांगितल्या आणि ह्या लेखांत हिंदुस्थानाच्या दृष्टीनें त्याच प्रश्नासंबंधाचा विशिष्ट विचार मांडला. पण जागतिक शांततेचा परिस्थित-निरपेक्ष व नुस्ता तात्विक विचार मांडला तरीहि राष्ट्राचें पुढील एक युद्ध टळत नाहीं. व्यक्तीव्यक्तींत हक्कासंबंधानें वाद माजला असतां रानटी पारिस्थितींत प्रत्यक्ष मारामारीनें म्हणजे शक्तीच्या जोरावर त्याचा निकाल होत असे. ही स्थिति सुधारून व्यक्तीव्यक्तीमधील वाद आज तिऱ्हाईत न्यायाधीशांच्या मार्फत मिटविण्याची सुधारणा झालेली आहे. या सुधारलेल्या परिस्थितींत कायदा आपल्या हातांत घेणें हें अडाणीपणाचें लक्षण समजलें जातें. पण अशा स्थितींत देखील ज्या वेळीं कायदेशीर संरक्षण मिळण्याच्या अगोदरच व्यक्तीच्या वित्ताची अगर जीविताची कायमची हानि होण्याचा संभव असेल त्या वेळीं व्यक्तीलाहि कायदा आपल्या हातांत घेऊन, स्वसंरक्षणापुरता प्रतिकार करण्याची मुभा कायद्यानें ठेवली आहे. आज व्यक्तीव्यक्तीमध्यें जी व्यवस्था आहे तीच उद्यां राष्ट्राराष्ट्रांत स्थापन होऊन अमलांत आली तरीहि एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर अचानक अन्याय्य हल्ला केला असतां व आंतरराष्ट्रीय पंचायतीचें संरक्षण मिळण्याच्या आधींच राष्ट्राची जीवितहानि अगर वित्तहानि होण्याचा प्रसंग आला असतां व्यक्तीप्रमाणें राष्ट्रालाही स्वसंरक्षणाचा हक्क कोणत्याहि भावी आंतरराष्ट्रीय पंचायतीला ठेवावा लागेल. व्यक्तीव्यक्तींत कायद्याची सुव्यवस्था चालू असतांहि व्यक्तीला जितकें स्वसंरक्षणार्थ सिद्ध असावें लागतें तितकेंच राष्ट्रांनाहि राहावें लागेल. युद्धसामुग्रीची चढाओढीनें आज युरोपियन राष्ट्रांत अतिशय वाढ झालेली आहे व त्यावर नियंत्रण घालण्याचे प्रयत्न स्तुत्य आहेत. पण या नियंत्रणाची सीमा स्वसंरक्षणास अवश्य असलेल्या युद्धसामुग्रीपर्यंतच आहे. या मर्यादेच्या बाहेर गेलेल्या राष्ट्रांना या मर्यादेपर्यंत मागें खेंचण्याच्या प्रयत्नाबरोबरच या मर्यादेच्या आंत असलेल्या राष्ट्रांनीं या मर्यादेपर्यंत येण्याचा प्रयत्न केला पाहिजे हें उघड होय. सारांश, परिस्थितिनिरपेक्ष व केवळ तात्विक दृष्ट्या विचार केला तरीहि हिंदुस्थानानें स्वसंरक्षणापुरतें लढाऊ सामर्थ्य संपादन केलेंच पाहिजे.

## विज्ञानबलाचा पाया

आगामी युद्धाचा अपरिहार्य विचार करतांना युद्धाचें आजचें स्वरूप विचारांत घेणें जरूरीचें आहे. भावी युद्धांची जी युरोपियन राष्ट्रांना विशेष भीति वाटते ती आधुनिक शास्त्रीय साधनांच्या संहारकपणामुळेंच होय. वैयक्तिक शौर्य, संघटना किंवा डावपेंच यांपेक्षांहि शास्त्रीय दृष्टया परिपूर्ण अशी साधनसामुग्री हीच हल्लींच्या युद्धांत अधिक महत्त्वाची. यांत्रिक व रासायनिक संहारक साधनें यांनाच आजच्या युद्धांत विशेष महत्त्व आहे. जर्मनीवर जबर खंडणी बसविली व त्याच्या युद्धसामुग्रीवर नियंत्रण घातलें तरी फ्रान्सला जर्मनीबद्दल भीतिं वाटते. कारण ज्या शास्त्रीय ज्ञानाच्या साहाय्यानें सर्वोत्कृष्ट युद्धसामुग्री निर्माण होऊं शकते तें शास्त्रीय ज्ञान जर्मनीमध्यें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत त्याचें भय इतरांना राहाणारच. हिंदुस्थानाच्या भोंवतालचीं राष्ट्रें पाहिलीं तर तीं झपाटयानें सर्व भौतिक विद्या आत्मसात् करण्याचा अहमहमिकेनें प्रयत्न करीत आहेत. त्यांत केवळ आर्थिक उन्नतीचा विचार नसून युद्धसिद्धतेचाहि विचार आहे. यांत्रिक व शास्त्रीय ज्ञान हें शांततेच्या काळांत उद्योगधंद्यासाठीं उपयोगी पडतें व युद्धाच्याहि उपयोगी येतें. युद्धसिद्धतेच्या इतर गोष्टी परावलंबी असल्या तरी विज्ञानबल संपादन करण्याची ही गोष्ट धाडसी स्वावलंबन व परदेशगमन यांच्या योगानें तरुणांना साध्य करतां येण्याजोगी आहे. त्यायोगें देशांतील बेकारीचा व दारिद्र्याचा नित्याचा प्रश्न सुटेल व युध्दाच्या नैमित्तिक प्रसंगाच्या दृष्टीनेंहि देशाची प्रगति होईल.

# स्त्रियांचे हक्क व हिंदु कायदा

( लेखक—**गो. म. जोशी** )

### लेखांक ४ था

आतां बालविवाहानें, आंब्याचा किंवा इतर झाडांचा मोहोर ज्याप्रमाणें गळून पडतो, त्याप्रमाणेंच बालमृत्यूंचें प्रमाण फार मोठें राहातें असा आक्षेप आहे त्याचा विचार करूं. बालमृत्यूंचे प्रमाणाचा लवकर संतति होण्याशीं कांहींहि संबंध नाहीं असें प्राणिशास्त्र, वैद्यकशास्त्र वगैरे शास्त्रांचें अध्ययन करून आमचें मत झालेलें आहे. परंतु त्याचा प्रस्तुत विचार कर्तव्य नसल्यामुळें आम्ही एवढेंच विचारतों कीं बालमृत्यूंचें प्रमाण कमी होणें हें समाजश्रेष्ठत्वाचें लक्षण आहे काय ? तें आहे असें जे म्हणत असतील त्यांना सृष्टीचे व सामाजिक उत्क्रांतीचे नियम मुळींच माहीत नाहींत असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. सृष्टीचा, असलेल्या परिस्थितीशीं झगडा करून जगण्यास जे पिंड समर्थ असतील तेच पिंड जगविणें, हा नियम आहे. परंतु मानवप्राणी सुधारला असल्याकारणानें अशा हीन व दुर्बळ पिंडांना जगविण्याचा याचा आटोकाट प्रयत्न चाललेला असतो. त्यामुळें आमची सर्व सहानुभूति दीन, मुके, बहिरे, आंधळे, पांगे इत्यादि स्वतः जगण्याला असमर्थ अशा पिंडांकडे ओढली जाते व ते जगतात. अशा तऱ्हेच्या पिंडांकडे परोपकाराच्या व सुखःदुखाच्या दयार्द्र दृष्टीनें बघून आपण त्यांच्या जगण्याची व सुखसोयीची व्यवस्था करतों व ती करावीहि. परंतु अशा संततीची प्रजाभिवृद्धि समाजांत होऊं देणें म्हणजे हा अत्यंत गर्हणीय नैतिक गुन्हा आहे व सृष्टि याबद्दल भरपूर शिक्षा दिल्याशिवाय कधींहि राहाणार नाहीं.

या तात्विक चर्चेला गणितागत पुरावे देणें अत्यंत जरूर आहे. ज्या ज्या देशांत बालमृत्यूंचें प्रमाण कमी झालेलें आहे त्या देशांतील समाजाचा गाणितागत अभ्यास करून चॅटरटन हिल म्हणतो कीं 'बालमृत्यूंचें प्रमाण कमी झालें. परंतु याचा परिणाम असा झाला कीं वीसपासून पंचेचाळीस वर्षांपर्यंत आयुष्याच्या कर्तृत्वाचा जो मध्यान्हकाळ त्या स्थितींतल्या माणसांच्या मृत्युसंख्येचें प्रमाण बाढत चाललें आहे. अशा तऱ्हेनें हीन प्रजेचें रक्षण केल्यामुळें एकंदर सर्व वंशच अधोगतीला लागले आहेत.'

असो. येथपर्यंत बालविवाहाच्या विरुद्ध आणल्या गेलेल्या आक्षेपांची चर्चा झाली व त्यांत सत्य ठरविण्याकरितां योजलेलें मापन अशास्त्रीय आहे, कांहीं आक्षेप गैरलागू आहेत, कांहीं भ्रामक आहेत आणि कांहीं कोणती तरी कोठें तरी चळवळ करण्याची संवय लागलेल्या व्यक्तींनीं पसरविलेलीं असत्य विधानें आहेत हें पाहिलें. आतां प्रौढविवाहाच्या विरुद्ध गोष्टी असल्यास त्या पुढें मांडणें हें अर्थातच बालविवाहाला पोषक आहे. प्रथम सुदृढ समाजांचें आह्मी जें लक्षण दिलें त्याप्रमाणें विचार करावयाचा. तें लक्षण म्हणजे वंशांची प्रजोत्पादनाची शक्ति कमी होत जाणें हें आहे. आमच्याकडे विवाहाला पुरेशीं माणसें मिळत नाहींत असें म्हणणारांनीं

या दृष्टीनें या जातीचा जरूर विचार करावा. विवाहाचें वय जसजसें प्रौढ होत जाईल तसतशी त्या पिंडांतील प्रजोत्पादनाची शक्ति कमी होत जाते ही गोष्ट सर्व प्राणिशास्त्रज्ञांस माहीत आहे. तिच्या सिद्धयर्थ खालील आंकडे देऊं.

### प्रौढविवाहाचा दुष्परिणाम

| पुरुषांच्या विवाहाचें वय | त्यांना झालेल्या संततीचें सरासरी मान |
|---|---|
| २५ पेक्षां कमी | ३·२ |
| २५–२९ | ३·२५ |
| ३०–३४ | ३·०२ |
| ३५–४४ | २·२८ |
| ४५–५० | १·१ |

मनाची व शरीराची तयारी झाल्यानंतर ज्या प्रमाणांत विवाहाचें वय पुढें ढकललें जाईल त्या प्रमाणांत समाजांत उपदंशादि वंशनाशक विकार, असंमत संततीचे जनक व अनेक तऱ्हेचे मानसिक विकार यांचा फैलाव होत जाईल. म्हणून आम्ही म्हणतों कीं लग्नाचीं वयें वाढविणें हें प्रजोत्पादनाची शक्ति कमी होत जाते म्हणून प्रत्यक्ष रीतीनें हानिकारक आहे व उपदंशादि विकार वाढत जातात म्हणून अप्रत्यक्ष रीत्या हानिकारक आहे. यामध्यें स्त्रियांचें शिक्षण वगैरे असंबध्द प्रश्न मुळींच घुसडून देऊं नयेत. कारण कीं जगांतल्या सर्व ग्रंथांचे पठन केलें तरी कमी झालेली प्रजोत्पादनाची शक्ति वाढत नाहीं व त्यापासून उत्पन्न होणारा वंशनाश (race suicide) थांबत नाहीं व शिक्षणामध्यें मनाला सबळ करण्याचे कोणतेच प्रयत्न केले जात नसल्याकारणानें दुसरे अप्रत्यक्ष दुष्परिणाम आमच्या समाजावर होणार नाहींत हें म्हणणें वेडेपणाचें आहे.

वर चर्चा केली तिज वरून दिसून येईल कीं दोषच असल्यास ते प्रौढविवाहांतच जास्त आहेत, बालविवाहांत नाहींत. तरी विवाहाची साधारणतः वेळ कोणती मानावी ? आमचें असें मत आहे कीं, सृष्टीनें दर्शविलेली वेळा म्हणजे ऋतुप्राप्ति हीच साधारणतः विवाहाची वेळा मानली जावी. आतां वरांचें वय काय असावें हा अत्यंत मनोरंजक प्रश्न होईल. परंतु त्याचा विचार सध्याच्या विवेचनांत अप्रस्तुत होय.

स्त्रियांना अनुलोम व प्रतिलोमपद्धतीनें कोणत्याहि जातींतून पति निवडण्याचा हक्क असावा. या मुद्द्यासंबंधीं मुख्य प्रश्न असा आहे कीं, स्त्रियांना पति निवडण्याचा हक्क असावा काय ? असल्यास तो जातिबाहेराल निवडणें इष्ट आहे काय ? म्हणून प्रथमतः पहिल्या सर्वसाधारण प्रश्नाचा विचार करूं. पति निवडण्याचा हक्क असावा म्हणणारांचें म्हणणें असें कीं, ज्याच्याबरोबर जन्म काढावयाचा त्याचे गुणरूप पारखून घेतल्याशिवाय स्त्रियांना सुख कसें लागेल ? त्यांचें एकमेकांवर प्रेम असावयास नको काय ? आतां येथें गुणरूपामुळें प्रेम बसतें का प्रेमामुळें गुणरूप दिसतात हा प्रश्न किंचित् काळ दृष्टीआड करून यांनीं धरलेलीं गृहीत कृत्यें खरीं आहेत काय याची छाननी करूं. ' आजकाल घटस्फोटाची न्यायगृहांत होणारी चर्चा व कादंबऱ्यांत दिसून येणारी पद्धति यामध्यें मुख्य मानलेलीं विवाहितांचीं सुखदुःखें या तत्त्वांचा सुप्रजाजननशास्त्राशीं काडीचाही संबंध नाहीं. या शास्त्राच्या दृष्टीनें आम्हाला कोणा तरी वेड्यापिरानें उत्पन्न केलेल्या या प्रेमाच्या पोरखेळाबद्दल तिरस्कार वाटतो असें डेव्हनपोर्ट म्हणतो. विवाहसंस्था ही सामाजिक घटना आहे. कारण कीं या विवाहेच्छु व्यक्तींची संतति पुढें समाजांत वावरणार आहे. ही संतति जर समाजांत राहावयाची नसती तर अर्थातच समाजाला या गोष्टींत लक्ष घालण्याचें कांहींच कारण नव्हतें व तशी कांहीं व्यवस्था ही प्रेमविवाहेच्छु जोडी करणार असल्यास समाज त्यांना पति अगर पत्नी निवडण्याची पूर्ण मोकळीक देण्याला तयार होईल. परंतु तसें नसेल तर मात्र जे दोन पिंड पुढे प्रजा निर्माण करणार त्यांची यावच्छक्य शास्त्रीय ज्ञानानें निवड करणेंच अत्यंत जरूर आहे. आतां पति व पत्नी निवडण्याचा व्यक्तीला हक्क आहे असें मानणें म्हणजे सुप्रजा कशी निर्माण होईल या शास्त्राचें सर्वज्ञान व्यक्तीला आहे असें मानणें भाग पडतें. परंतु ती गोष्ट असिद्ध असल्याकारणानें ही जोडी कशी असावी या संबंधीं कांहीं शास्त्रीय नियम समाजनेत्यांनीं घालून द्यावे लागतात.

### मनूचें मत

हे नियम घालून देण्यामध्यें समाजशास्त्रांत ज्या ज्या गोष्टींचा विचार करावा लागतो त्यांची यादी मनूनें दिलेली आहे व ती अत्यंत शास्त्रीय म्हणजे अलीकडे पुढें येत असलेल्या शास्त्रांशीं तंतोतंत जुळती आहे म्हणून तिला धरूनच या गोष्टीचा विचार करूं. मनु म्हणतो 'देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मान् च शाश्वतान् पाषंडगणधर्मांश्च ग्रंथेऽस्मिन् उक्तवान् मनुः'. प्रथमतः देशाचे गुण पाहावे लागतात. यालाच युरोपियन समाजशास्त्रामध्यें 'एथनिक ग्रुप्स' असें म्हणतात. देशविशेषांचे कांहीं दुर्गुण किंवा सद्गुण असतात ही गोष्ट प्राणिशास्त्रदृष्ट्या भौगोलिक विचार करून डेव्हनपोर्ट यानें निश्चित दाखविलेली आहे. म्हणून एका देशांतील पुरुषाने दुसऱ्याच देशांतील स्त्रीशीं विवाह करावयाचा म्हणजे कळत न कळत आपल्या पिंडाशीं विसंगत असे गुणधर्म आपल्या घरांत आणणें होय.

याच्यापुढें कुलधर्माचा विचार करावयाचा म्हणजे मेंडेलची परंपरापद्धति सर्वच येथें सांगावी लागेल, परंतु स्थलाभावास्तव ती गोष्ट करतां येत नाहीं.

परंतु पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं ही गोष्ट स्पष्ट करून दाखविली आहे कीं घराण्याचे गुण त्या त्या व्यक्तींत उतरत असतात. हे गुण दोन प्रकारचे असतात. शारीर व मानस. मानसिक गुण देखील व्यक्तींत संक्रांत होतात ही गोष्ट आतां नाकबूल करून चालणार नाहीं. यापैकीं कांहीं गुण दृश्य ( 'Dominant ) व कांहीं गुण तिरोहित ( Recessive ) असतात म्हणून कोणत्या घराण्यांतील स्त्री-पुरुष विवाहाला वर्ज्य मानावेत याचा विचार करावा लागतो. त्याची व्यवस्था मनूनें खालीलप्रमाणें केली आहे ' हीनक्रियं निष्पुरुषं निश्छन्दो रोमशार्शसम्। क्षय्यामयाव्यपस्मारी श्वित्रि कुष्ठि कुलानि च। नोद्वहेत् कपिलां कन्यां नाधिकांगीं न रोगिणीं। नालोमिकां नातिलोमां न वाचाटां न पिंगलां॥ तनुलोमकेशदशनां मृद्वंगीं उद्वहेत् स्त्रियम्। (म.अ.३-७ते१०) यांत दिलेले गुण पिंड व संस्कार या दोनही गोष्टींना धरून सांगितलेले आहेत व ते अत्यंत बिकट अशा कोणत्याही कसोटीला टिकण्यासारखे आहेत. सर्वांवर भाष्य करणे अर्थातच स्थलाभावास्तव करतां येणार नाहीं. परंतु त्यांतील कांहीं निवडक शब्द घेऊन त्याचा अर्थ करू. 'हीनक्रियं' व ' निश्छन्दं ' हीं दोन पदें संस्कारदर्शक आहेत. येथें 'नर्चर' अगर 'कल्चरचा' म्हणजे संस्कृतीचा विचार केलेला आहे. निष्पुरुषं याचा अर्थ केवळ कन्यांना जन्म देणारी. रोमशार्शसम् केंसाळ व मूळव्याधीचे राग असलेली. त्यापैकीं अतिशय केंस असणें ही गोष्ट विकृत मनोपिंड दर्शविते ही गोष्ट प्रो. लांब्रोसो यानें आपल्या ' क्रीमिनल मॅन' या ग्रंथांत व त्याचा शिष्य प्रो. फेरी यानें आपल्या ' क्रीमिनल सोशिऑलजी ' या ग्रंथांत दाखविलेली आहे. मूळव्याध हा रोग वंशसंचारी आहे. व तसा जेथें नसेल तेथें तो उपदंशविकारापासून उद्भूत होत असतो.क्षय (टयूबरक्युलॉसिस) रोग वंशसंचारी आहे ही गोष्ट वैद्यकावरचा कोणताहि ग्रंथ पाहिला असतां दिसून येईल. इतर सर्व रोगविषयक पदें अत्यंत शास्त्रीय आहेत. अधिकांगीं याचा अर्थ मेधातिथि षडंगुली असा करतो. ही विकृति वंशसंचारी आहे ही गोष्ट पाश्चात्यांना देखील कबूल झालेली आहे. म्हणून कोणत्याहि कुलांतील कन्या व कोणत्याहि कुलांतील वर यांचे विवाह प्रेमाच्या नांवाखालीं घडवून आणणें अशास्त्रीय आहे. या बाबतींत शिक्षणाचा काडीचाहि संबंध येत नाहीं. कारण शिक्षणानें व्यक्तीच्या पिंडांतील जे प्रजोत्पादक गुण त्यांच्यावर कांहींहि परिणाम होत नाहीं. यालाच पाश्चात्य प्राणिशास्त्रामध्यें 'Acquired traits are not inherited ' असें सूत्र आहे. ( वेजमान, गेट्स, फेरी किंवा कोणीहि वंशशास्त्रज्ञ यांचे ग्रंथ पाहा. ) म्हणून शिक्षण व द्रव्य यानें उत्पन्न होणारी आभासिक समता विवाहादि स्थितीच्या बाबतींत गृहीत धरणें अशास्त्रीय आहे.

# राष्ट्रीय सभेंतील नवें वादळ !

सत्यमूर्ति व श्रीनिवास अय्यंगार यांचा एक जुना पराक्रम महाराष्ट्रीयांच्या चांगल्या आठवणींतला आहे. मागें एकदां पंडित नेहरू यांनीं दिवाणगिऱ्यांच्या वादासंबंधानें स्वराज्य पक्षांत पडलेली फूट सावरण्याच्या दृष्टीनें केलेला समेट सत्यमूर्ति व अय्यंगार यांनीं उधळून लावला, हा तो पराक्रम होय. या पूर्वानुभवावरून पाहातां दिल्लीच्या ऑ. इं. कॉं. कमिटीमध्यें देशांतील एकी बिघडविण्यासारखी फूट हे मद्रासचे वीर पाडणार कीं काय अशी भीति वाटत होती. उभय पक्षांच्या ओढाताणींत दिल्लीस झालेला ठराव हा दोनहि बाजूंनीं ओढतां येण्याइतका लवचीक झाल्यामुळें त्यावर भाष्यरूपानें उभयपक्षीय पुढाऱ्यांत जे शाब्दिक वाद होतील ते होवोत; पण ऑ. इं. कॉं. कमिटीमध्यें एका बाजूला मोतीलाल नेहरू व दुसऱ्या बाजूला अय्यंगार–सत्यमूर्ति असा अटीतटीचा वाद होण्याचें टळलें व उभय पक्षांस मान्य अशा शब्दयोजनेचा एकच ठराव उभय पक्षांच्या अनुमतीनें मंजूर झाला.

## काल्पनिक विरोधाचें निरसन

सर्वपक्षीय स्वराज्ययोजनेला ' डोमीनियन स्टेटस'चें म्हणजे साम्राज्यांतर्गत स्वराज्याचें स्वरूप कांहीं नेहरू कमिटीनें दिलेलें नाहीं. जी योजना करावयाची ती डोमीनियन स्टेटसची असावी असा ठराव सर्वपक्षीय परिषदेच्या अगदीं पहिल्याच बैठकींत झाला होता व तदनुसार नेहरू-कमिटीनें काम केलें. शिवाय लखनौ येथें स्वातंत्र्यवादाचा विचार झाला नाहीं असेंहि नाहीं. लखनौच्या ठरावांत प्रारंभींच स्वातंत्र्यवाद्यांना आपला प्रचार करण्यास पूर्ण मुभा ठेवलेली आहे. स्वातंत्र्याच्या ठरावाचे प्रवर्तक पंडित जवाहरलाल हे आपला स्वातंत्र्यवाद नमूद करून बाजूस झाले. सर्वपक्षीय परिषदेच्या कामांत व्यत्यय आणावयाचा नाहीं व आपला स्वातंत्र्यवादाचा प्रसार स्वतंत्रपणें चालवावयाचा असें त्यांनीं ठरविलें. पण मद्रासला बेझंटबाईनीं सर्वपक्षीय परिषद भरविल्यापासून एकदम साक्षात्कार झाल्याप्रमाणें सत्यमूर्ती व अय्यंगार यांना नेहरू कमिटीचा रिपोर्ट हा स्वातं-

त्र्यवादाच्या मुळावर येणार असें वाटूं लागलें! मद्रासला स्वातंत्र्यचा ठराव केला असल्यामुळें कॉंग्रेस ही नेहरू रिपोर्टाला संमति देऊं शकत नाहीं असा त्यांनीं गवगवा सुरू केला! पंडित नेहरू यांनीं या लोकांशीं हुजत घालीत न बसतां, 'तुमच्या स्वातंत्र्याच्या ठरावास बाध येणार नाहीं अशी हवी ती शब्दयोजना करून तुम्ही सर्वपक्षीय योजनेस पाठिंबा द्या' असें त्यांना सांगितलें! यामुळें विशेष वाद न माजतां सभेटाचा ठराव मंजूर झाला आणि सत्यमूर्ती व अय्यंगार यांनी जो एक काल्पनिक विरोध उत्पन्न केला होता त्याचें तात्पुरतें निरसन झालें.

## नवा प्रकाश काय पडला?

मद्रासला संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ठराव झाला त्या वेळीं संपूर्ण स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिशांशीं यत्किंचितहि संबंध नसणें असा त्याचा अर्थ हडसून-खडसून निश्चित झाला होता. शिवाय 'संपूर्ण स्वातंत्र्य' या शब्दयोजनेचा दुसरातिसरा अर्थच संभवत नसून, मद्रासच्या कॉंग्रेसनंतर या शब्दांवर निराळा अर्थहि कोणी लादलेला नाहीं. अर्थात् ऑ. इं. कॉं. कमिटीच्या ठरावांत संपूर्ण स्वातंत्र्याचा स्पष्टीकरणासह पुनः एकदां उच्चार करवून अय्यंगार-सत्यमूर्तींना शाब्दिक समाधानाशिवाय दुसरें काय लाभलें? ब्रिटिशांशीं संबंध तोडण्याच्या शब्दयोजनेला मालवीय व बेझंट यांनीं विरोध केला हें खरें. पण त्यांचा मद्रासच्या स्वातंत्र्याच्या ठरावासच विरोध होता हें लक्षांत ठेवलें पाहिजे. मद्रासच्या स्वातंत्र्याचा ठराव ज्यांनीं मान्य केला त्यांच्यासाठीं स्वातंत्र्याचें स्पष्टीकरण करण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. दिल्लीच्या ठरावांत अय्यंगार व सत्यमूर्ती यांनीं 'कॉंग्रेसच्या स्वातंत्र्याच्या ठरावास बाध न आणतां' नेहरू कमिटीच्या रिपोर्टाला सामान्यपणें मान्यता दिलेली आहे. स्वातंत्र्यवाद्यांना आपला प्रचार करण्यास पूर्ण मुभा पूर्वींच दिली गेली असल्यानें या नव्या शब्दयोजनेनें कांहीं नवा अर्थ -प्रकाश कोणाच्या डोक्यांत पडला असेल असें आम्हास वाटत नाहीं. कॉंग्रेसनें नेहरू रिपोर्टाला पाठिंबा देणें म्हणजे स्वातंत्र्याच्या ठरावावर पाणी सोडणें असा अर्थ कोणीच मानला नव्हता. अर्थात अय्यंगार-सत्यमूर्तींनीं आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें स्ववैशिष्ट्यदर्शन केलें व सर्वपक्षीय परिषदेच्या निर्णयास विशेष बाध न येईल इतक्या बेतानें पं. मोतीलाल व इतर पुढारी यांनीं त्यांस तें करूं दिलें इतकाच ऑ. इं. कॉं. कमिटींतील या विषयाच्या वादापुरता निष्कर्ष निघतो.

## पराक्रम अंगावर आला

पण अय्यंगार-सत्यमूर्ती यांचा हा पराक्रम एका दृष्टीनें त्यांच्याच अंगावर थोडासा उलटलेला दिसतो. स्वातंत्र्याच्या ठरावाबद्दल देवढी काळजी घेणारे हे मद्रासी वीर कौन्सिलाचे व असेंब्लीचे सभासद आहेत. ऑल-इं. कॉं. कमिटीनें जर नेहरू रिपोर्टाला बिनशर्त मान्यता दिली तर स्वातंत्र्याच्या नाजूक ठरावावर प्राणांतिक संकट ओढवेल म्हणून जे मद्रासी वीर तत्संरक्षणार्थ दिल्लीस धांवले ते कौन्सिलांत राजनिष्ठेची शपथ घेऊन स्वातंत्र्याच्या ठरावाच्या नरड्याला सरकारी अधिकाऱ्यांसमोर नख कसें लावूं शकतात हें एक गूढच आहे! याला अय्यंगार यांनीं असें उत्तर दिलें आहे कीं, ती शपथ फक्त कौन्सिलापुरती असते व आम्ही मनांतली अढी मनांत ठेवून फक्त वरवर शपथ घेतों! पण अय्यंगार व सत्यमूर्ती हे ज्या कॉंग्रेसच्या पक्षाचे प्रतिनिधी म्हणून कौन्सिलांत बसतात त्या कॉंग्रेसचा ठराव कौन्सिलापुरता तरी त्यांना धाब्यावर कसा बसवतां येईल ? जो स्वातंत्र्याचा ठराव सरकारदरबारांत निमूटपणें मनोमय कोषांत लपून बसतो व हूं का चूं करीत नाहीं तो बिचाऱ्या सर्वपक्षीय परिषदेपुढें-घरच्या म्हातारीपुढें-असें अवसान आणतो कीं कांहीं विचारूं नका! जे लोक परकीय सरकाराच्या कौन्सिलांत कार्य साधण्यासाठीं स्वातंत्र्याचा ठराव मनोमय-कोषांत दडपून ठेवतात त्यांनीं आपल्याच देशबांधवांमधील निरनिराळ्या पक्षांची एका विशिष्ट कार्यासाठीं झालेली एकी सांभाळण्यासाठीं, त्या सर्व पक्षांनीं स्वातंत्र्यवाद्यांना स्वतःचा हवा तो प्रचार करण्याची पूर्ण मुभा ठेवली असतां, तेवढ्यापुरता स्वातंत्र्यवाद जरा बाजूला ठेवला असता, तर काय बिघडलें असतें? पण असें केलें असतें तर स्वातंत्र्य-प्रस्तावप्रवर्तक पं. जवाहरलाल यांच्यापेक्षांहि 'अहं-विशेषः' म्हणून झळकण्याची सुवर्णसंधि अय्यंगार-सत्यमूर्तींना कशी लाभली असती? जे लोक सरकारच्या तोंडापुरता स्वातंत्र्यवाद मनोमय कोषांत दडपून ठेवतात ते लोकांपुढें स्वातंत्र्यवाद बोलत असतां त्यांच्या मनोमय कोषांत तिसरेंच कांहीं असेल अशी उलट लोकांना शंका वाटल्यास त्यांत नवल काय ?

## नेहरूंना पाठिंबा द्या

पंडित मोतीलाल नेहरू यांनीं ऑ. इं. कॉं. कमिटींत भांडण टाळलें. पण त्यानंतर ऑ. इं. कॉं. कमिटींतील ठरावावर जीं मतें व भाष्यें निरनिराळ्या पुढाऱ्यांकडून होत आहेत त्यायोगें पुनः वाद उपस्थित झाला आहे. मालवीय व बेझंट यांनीं मद्रासला स्वातंत्र्याच्या ठरावास जोराचा विरोध केला होता. तोच विरोध ते ऑल-इं. कॉं. कमिटीच्या ठरावावर भाष्यरूपानें व्यक्त करीत आहेत. अर्थात् मद्रासचा स्वातंत्र्याचा ठराव मान्य असलेल्यांनीं त्या विरोधाकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं. पण दिल्लीला सभेटाचा

ठराव मंजूर झाल्यावरहि त्या ठरावासंबंधानें मोतीलाल नेहरू व अय्यंगार यांच्यांत मतभेद व्हावा ही आश्चर्याची गोष्ट आहे. या ठरावावर भाष्यरूपानें अय्यंगार-सत्यमूर्ती हे जे फांटे फोडीत आहेत त्यासंबंधाचा स्पष्ट निर्णय कलकत्त्याच्या कॉंग्रेसपूर्वीच करून घेण्याचा पंडित मोतीलाल नेहरू यांनीं एक मार्ग काढला आहे. पंडित मोतीलाल यांना मद्रासचा स्वातंत्र्याचा ठराव मान्य आहे. संपूर्ण स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिशांशीं कसलाहि संबंध नसणें या अर्थाबद्दलहि त्यांना शंका नाहीं. हा अर्थ स्पष्ट करून ऑ. इ. कॉं. कमिटीनें नेहरू रिपोर्टास मान्यता दिली. त्यांत जातीजातींतील वादासंबंधानें नेहरू कमिटीनें केलेली योजना ऑ. इं. कॉं. कमिटीनें सर्वस्वी मान्य केली आहे. बाकीच्या योजनेबद्दल सर्वसामान्य मान्यता दर्शवून स्वातंत्र्याच्या बाबतींत सर्वपक्षीय योजनेच्या पुढें जाण्याचा आपला हक्क राखून ठेवला आहे. ऑ. इं. कॉं. कमिटीच्या ठरावाचा हा सरळ अर्थ पंडित मोतीलाल नेहरू हे मानतात. त्यांना सर्व प्रांतिक कॉंग्रेसकमिट्यांनीं पूर्वीच कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडले आहे. पण या कमिट्यांतील बहुमताला हा अर्थ मान्य नसेल तर त्यांनीं पंडित मोतीलाल यांना तसें कळवावें व प्रांतिक कमिट्यांचें बहुमत त्यांच्या विरुद्ध असल्यास ते कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजिनामा देणार आहेत. कलकत्त्याच्या कॉंग्रेसपर्यंत हा वाद चिघळत न ठेवतां त्याचा आगाऊच निर्णय करून घेण्याची पंडित मोतिलाल यांनीं केलेली ही योजना त्यांच्या दूरदर्शी समयज्ञतेचीच द्योतक आहे. निरनिराळ्या प्रांतिक कमिट्यांतील बहुमताच्या हातीं कॉंग्रेसमधील हा अनिष्ट वाद मिटविण्याचें काम अशा रीतीनें पंडितजींनीं सोपवलें आहे. पंडितजींच्या मतालाच सर्व प्रांतिक कॉंग्रेसकमिट्या पाठिंबा देतील व हा वाद मिटवितील अशी आम्हांस आशा आहे.

## अय्यंगार-सत्यमूर्ति काय साधणार ?

'श्रेष्ठ हें श्रेयाचें वैरी होऊं शकत नाहीं' अशा अर्थाची इंग्रजींत एक म्हण आहे. पण ज्या वेळीं श्रेष्ठाला आपलें श्रेष्ठपण कृतीपेक्षां केवळ श्रेयाला विरोध करून शाब्दिक रीतीनेंच प्रस्थापित करतां येण्यासारखें असतें अशा वेळीं श्रेष्ठ व श्रेय यांच्यामध्यें वाद माजतो. दिल्लीस भरलेल्या ऑल-इंडिया कॉंग्रेस-कमिटींत अय्यंगार व सत्यमूर्ती यांनीं उपस्थित केलेला वाद याच स्वरूपाचा होता. कॉंग्रेसनेंच सर्वपक्षीय परिषद भरवून सर्वमान्य अशी स्वराज्य-योजना तयार करावी असें ठरविलें. या कल्पनेस सर्व पक्षांचें साह्य मिळून अनेक अडचणी व गंडांतरें यांतून परिषदेनें आपला मार्ग काढला. परिषदेंतून निर्माण झालेल्या योजनेचा प्रसार निरनिराळ्या प्रांतांतील सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांनीं सभा, परिषदा, व्याख्यानांचे दौरे इ. साधनांनीं उत्साहानें चालविला आहे. मठभर कट्टर ज्ञातिनिष्ठांकडून या योजनेस विरोध होत असून या ज्ञातिनिष्ठांचा पाठपुरावा करून नेहरू रिपोर्टास गौणत्व आणण्याचें काम 'टाईम्स'-सारख्या पत्रांनीं चालविलें आहे. अशा वेळीं ज्या कॉंग्रेसनें सर्वपक्षीय परिषदेचें बाळंतपण केलें त्या कॉंग्रेसमधूनच परिषदेच्या कार्यावर एखादें संकट उपस्थित झालें तर तें देशाचें दुर्दैवच होय. सर्वपक्षीय परिषदेनें स्वातंत्र्यवाद्यांना आपला प्रचार करण्यास पूर्ण मुभा ठेवली आहेच. हीच मुभा ऑ. इं. कॉं. कमिटीमध्यें अधिक स्पष्ट रीतीनें मांडून पंडित नेहरू यांनीं सत्यमूर्ती व अय्यंगार यांचें तोंड मिटाविलें. पण या ठरावांतून भाष्यरूपानें नवा वाद उपस्थित करण्याचा सत्यमूर्ती व अय्यंगार यांचा विचार दिसत आहे. कॉंग्रेसचे वेळीं विषयनियामक कमिटीचें काम करणाऱ्या ऑ. इं. कॉं. कमिटींत नेहरू रिपोर्टाचा विचार होणार आहेच. यामुळें दिल्लीच्या बैठकींत आगाऊ त्याबद्दल वाद उपस्थित करण्याचें कांहीं कारण नव्हतें. बरें, तेथें तो वाद समेटानें मिटल्यावरहि पुनः कॉंग्रेस व सर्वपक्षीय परिषद यांच्यांत विरोध उत्पन्न करविण्यानें अय्यंगार व सत्यमूर्ति हे काय साधणार आहेत तें समजत नाहीं. ऑ. इं. कॉं. कमिटींतील ठरावांतून कॉंग्रेसनें नेहरू रिपोर्ट अमान्य केला अशा तऱ्हेचा मतलबी अर्थ काढून टाईम्ससारखीं पत्रें आजच त्याचा गवगवा करीत आहेत. ज्ञातिनिष्ठ मुसलमानांनीं नेहरू रिपोर्टावर केलेले हल्ले व स्वातंत्र्यवाद्यांनीं नेहरू रिपोर्टावर केलेले हल्ले यांच्यायोगानें या विद्वेषी वृत्तपत्रांना सारखाच आनंद होत आहे. मद्रासी स्वातंत्र्यवाद्यांचा नेहरू रिपोर्टास विरोध करण्यांत काय उच्च हेतु असेल तो असो, पण त्याचा परिणाम मात्र भलताच होत आहे. असल्या विरोधानें स्वातंत्र्याचें ध्येय जवळ येण्यापेक्षां तें दूरवर लोटलें जाण्याचाच अधिक संभव आहे.

## निरर्थक वाद

स्वातंत्र्य व डोमीनियन स्टेटस यांच्या निष्कारण वादाबरोबर सर्वपक्षीय परिषद श्रेष्ठ का कॉंग्रेस श्रेष्ठ असाहि एक वाद अय्यंगार-सत्यमूर्ति यांनीं उपस्थित केला आहे. देशांतील पुरोगामी राजकीय विचारांचें स्थान दाखवावयाचें असेल तर पहिला निर्देश कॉंग्रेसचा होईल. उलट देशांतील सर्व पक्षांचे प्रतिनिधी ज्यांत बसतात अशी व्यापक संस्था कोणती असें विचारलें तर सर्वपक्षीय परिषदेकडेच बोट दाखवावें लागेल. या दृष्टीनें कोणी सर्वपक्षीय परिषदेला महत्त्व दिलें तर त्याबद्दल कॉंग्रेसवाल्यांना

वैषम्य वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण काँग्रेसनेंच सर्वपक्षीय परिषद उत्पन्न करण्याच्या कार्यास चालना दिलेली आहे. पूर्वी एके काळीं काँग्रेसच्या कोणत्याहि ठरावापेक्षां काँग्रेस व मुस्लीम लीग मिळून तयार केलेल्या योजनेला अधिक महत्त्व प्राप्त झालें होतें. त्या वेळीं काँग्रेसवाल्यांनीं त्याचें वैषम्य मानलें नाहीं. काँग्रेसनें 'स्वराज्य' हें ध्येय १९०६ पासून मानलें असतांहि कित्येक वर्षे तिनें राज्यकारभारांत कांहीं सुधारणांची, म्हणजे स्वराज्याच्या अलीकडच्या सुराज्याची मागणी केली. त्या वेळींहि स्वराज्याचें ध्येय व सुराज्याची मागणी यांच्यांत विरोध येतो असें कोणी म्हटलें नाहीं. पुढेंहि संपूर्ण स्वराज्य हें ध्येय असतां काँग्रेसनें वेळोवेळीं अर्धवट स्वराज्याच्या योजना सरकारापुढें मांडल्या. सारांश, काँग्रेसनें स्वातंत्र्य हें ध्येय मानल्यावर, त्यापेक्षां कमी असलेल्या योजनेस संमति दिल्यास त्या ध्येयाला बाध येतो अशी अय्यंगार व सत्यमूर्ती यांची हाकाटी निष्कारण व चुकीची आहे. शिवाय काँग्रेसचें स्वराज्याचें ध्येय अजून कायम आहे हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे. मद्रासच्या काँग्रेसनें हिंदू-मुसलमानांच्या समेटासंबंधानें जो ठराव केला होता त्यांत सर्वपक्षीय परिषदेनें पुष्कळच फरक केला आहे. आणि असा फरक झाला असतांहि अय्यंगार-सत्यमूर्ति हे या बाबतींतल्या सर्वपक्षीय परिषदेच्या निर्णयाचा उत्साहानें पुरस्कार करीत आहेत. अर्थात या बाबतीत काँग्रेसपेक्षां सर्वपक्षीय परिषदेसच त्यांनीं अधिक महत्त्व दिलें हें उघड आहे. सारांश, कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी अय्यंगार-सत्यमूर्ति यांनीं उपस्थित केलेले वाद निरर्थक ठरतात, कलकत्याच्या काँग्रेसच्या वेळीं या वादांत न गुरफटतां काँग्रेसमधील बहुमत नेहरू रिपोर्टास पाठिंबा देईल व सर्वपक्षीय परिषदेचें अवशिष्ट कार्य यथासांग पार पाडण्यास सर्व प्रकारें साहाय्य करण्याचेंच धोरण ठेवील अशी आम्हास आशा आहे.

# पंचांगवादांतील प्रश्नोत्तरें

(ले. ज. स. करंदीकर.)

ता. ९।१०।२८ च्या केसरींत विचारलेल्या नऊ प्रश्नांस ज्योतिर्विद् व्यं. बा. केतकर यांचे चिरंजीव श्रीयुत द. व्यं. केतकर (विजापूर) यांचेकडून उत्तरें आलीं आहेत. त्यांत लागू व गैरलागू अशा मजकुराची सरमिसळ असल्यानें चालू वादांतील मुद्द्यासंबंधाचीं त्यांचीं उत्तरें व त्यावर माझीं प्रत्युत्तरें अनुक्रमानें पुढें दिलीं आहेत.

प्रश्न १—निरयनपद्धतींत स्वीकारलेलें आरंभस्थान निश्चल राहिलें पाहिजे कीं नाहीं?

२ अलीकडील अत्यंत सूक्ष्म शोधावरून नाक्षत्र सौर वर्षमान ३६५ दिवस १५ घटका २२ पळें व ५३ विपळें आणि अयनगति ५०'२३ विकला असल्याचें सिद्ध झालें आहे कीं नाहीं?

३ वरील कलमांत नमूद असलेल्या वर्षमानाहून अधिक वर्षमान घेतल्यास आरंभस्थान चलित होतें कीं नाहीं?

उत्तर—पहिल्या दोन प्रश्नांबद्दल आमची पूर्ण संमति आहे. परंतु तिसऱ्या प्रश्नांत वर्षमानाबरोबरच अयनगतीचाहि उल्लेख जरूर होता. तो करंदीकरांनीं केला नाहीं म्हणून अधिक वर्षमानाप्रमाणेंच अधिक अयनगतीनें सुद्धां आरभस्थान चलित होतें हें आम्ही त्यांना येथेंच सुचवून ठेवितों.

प्रत्युत्तर--प्रश्न १, २ व ३ यावर केतकर यांचें उत्तर मान्य आहे. आमचें वर्षमान नाक्षत्र सौर नाहीं अशी शंका घेणाऱ्यांनीं हें उत्तर लक्षांत घ्यावें. अधिक वर्षमानाप्रमाणेंच अधिक अयनगतीनें सुद्धां आरंभस्थान चलित होतें हें कांहीं निराळें सांगावयास नको. अर्थातच केतकरांनीं सुचविण्यासारखें यांत नवें कांहींच नाहीं.

प्रश्न ४—शके ४४४ पासून पंचांग करण्याची जी पद्धति रूढ आहे तींत घेतलेलें वर्षमान वरील कलमांत दिलेल्या वर्षमानाहून ८।।ते १० पळांनीं अधिक आहे कीं नाहीं? ते जर अधिक असेल तर आजपर्यंत आरंभस्थानाचा बिंदु दरसाल थोडथोडा पूर्वेस सरकत आहे कीं नाहीं?

उत्तर—पंचसिद्धांतिकोक्त आद्यसूर्यसिद्धांत हा ४४४ शकाच्या पुष्कळच पूर्वीचा असून त्यांतहि चुक वर्षमानच घेतलें आहे. तर मग—"त्या सिद्धांताच्या कालापासून पंचाग करण्याची जी पद्धत रूढ आहे"—असा प्रश्न न करतां—"शके ४४४ पासून जी पद्धत रूढ आहे"—असें अर्धवट विधान कां करतात?

प्रत्युत्तर— श्रीयुत द. व्यं. केतकर यांनीं उत्तर देण्याची टाळाटाळ कां केली? शके ४४४ च्या पूर्वी आरंभस्थान ढळलें का ढळलें नाहीं याचा विचार पुढील एका प्रश्नांत येईलच. पण शके ४४४ मध्यें असलेलें प्रारंभस्थान आतांपर्यंत ४ अंश ढळलें आहे, तें निश्चल राहिलें नाहीं, असें सरळ उत्तर देण्यास केतकर कां आडेवेढे घेतात?

शके ४४४ ते ५०० या दरम्यान जें आरंभस्थान होतें तें आरंभस्थान केतकी पक्षानें घेतलेलें नाहीं. टिळक पंचांगानें तेंच आरंभस्थान घेतलें आहे. अर्थातच टिळक पंचांगाने पूर्वपरंपरा राखली आहे; केतकी पंचांगानें ती मुद्दाम सोडली आहे आणि ग्रहलाघवी पंचांगांत ती न कळत सुटत आली आहे. या गोष्टी कोणाहि गणितज्ञास नाकबूल करतां येणार नाहींत.

प्रश्न ५—वर्षमान ८॥ ते १० पळें अधिक धरल्यामुळें शके ४४४ पासून शके १८४८ पर्यंत आरंभस्थानाचा बिंदु किती अंश पूर्वेस सरकला?

६ गेल्या १४०० वर्षांत आरंभस्थानाचा बिंदु जो पूर्वेस सरकत चाललेला आहे तो परत पूर्वीच्या आरंभस्थानाला परत नेण्याची कोणती योजना केतकी पंचांगवाल्यांनीं व ऐक्य पंचांगवाल्यांनीं केली आहे?

७ अशी योजना केली नसेल तर त्यांनीं आतां गृहीत धरलेलें आरंभस्थान शुद्ध कसें ठरतें व त्यांचे अयनांश तरी शुद्ध कसे ठरतात?

उत्तर—करंदीकरांच्या '१८४८ उणें ४४४ बरोबर १४०० वर्षे' या समीकरणांतील ४४४ हा आंकडा वंध्यापुत्रवत् आहे.

(अ)—४४४ हें दृक्प्रत्ययाचें शून्यायनांश वर्ष नव्हे. तें ७०० वर्षांनंतर भास्कराचार्यांनीं व १००० वर्षांनंतर गणेशदैवज्ञांनीं नमूद केलें आहे. म्हणून तें विश्वसनीय नाहीं इतकेंच नव्हे तर खालील कारणामुळें तें अवास्तव आहे.

(आ)—भास्कराचार्यांच्या वेधानें ११०५ शकांत ११ अयनांश आले. परंतु शून्य वर्ष काढतेवेळीं ५०-२३ या गतीच्या ऐवजीं ६० विकला ही चुकीची गति घेऊन ४४५ हें वर्ष त्यांनी काढिलें. आतां ६० विकला ही गति जर चूक तर ४४५ हें वर्षहि चूकच.

(इ)—मुंजालोक्त कलियुगारंभीय सायन (६० अं. २३ क.) सूर्यावरून (६०°।२३) × ६०" −३१७९=४४४ हे गणेशदैवज्ञांनीं=शून्यायनांश वर्ष काढिलें. परंतु गति ६० विकला म्हणजे चुकीची. अर्थात् ४४४ हें तज्जन्य वर्ष ही चूकच.

(ई)—४४४ शकाचा छायार्क उणें ४४ चा करणागत रवि=० अयनांश, हें चूक; कारण अधिक वर्षमानामुळें करणागत सूर्यच चुकीचा असणार. अधिक वर्षमान घटित रवि बरोबर कसा समजावयाचा—असें स्वतः करंदीकरच नवव्या प्रश्नांत विचारतात. "वर्षमान चूक तर ग्रंथोक्त चूक रवि असणारच व त्याची छायार्कोशीं तुलना करून येणारे अयनांशहि चुकीचेच असणार हें उघड आहे" असें प्रो. नाईकहि म्हणतात. म्हणून चुकीच्या रवीमुळें हें शून्य अयनांश वर्ष चूकच; अर्थात् ४४४ चा छायार्क उणें ४४४ चा ग्रंथागत चूक रवि =चुकीचें शून्यायनांश वर्ष या समीकरणावरून ४४४ हें वर्ष गणितविरुद्ध व त्यामुळें १४०० वर्षें हें उत्तर त्याज्यच होय.

प्रत्युत्तर—सध्याच्या रूढ ग्रहलाघवपद्धतींतील शून्य अयनांश वर्ष ४४४ हेंच सर्वत्र रूढ आहे म्हणून त्या वेळेपासून शके १८४८ पर्यंत आरंभस्थान किती सरकलें असा प्रश्न केला आहे. शके ४४४ हें शून्य अयनांश वर्ष वंध्यापुत्रवत् आहे असें केतकर म्हणतात! पण तें वर्ष साध्या गणितानें काढतां येण्याजोगे आहे. शके ११०५ त भास्कराचार्यांनीं वेध घेतले असतां अयनांश ११ आले ही गोष्ट केतकर यांना मान्य आहे, त्याचप्रमाणें भास्कराचार्य हे अयनगति ६० विकला मानतात हेंहि केतकर यांना ठाऊक आहे. मग त्यावरून भास्कराचार्यांच्या अयनांशांचें आरंभस्थान कोणतें हें केतकरांना कां काढतां येऊं नये? ११ अंशांला ६० विकलांनीं भागून येतील तीं वर्षे ११०५ तून वजा केल्यास भास्कराचार्यांचें शून्य अयनांश वर्ष ४४५ येतें हें एखादें मूलहि सांगूं शकेल. भास्कराचार्यांनीं घेतलेलें वर्षमान किंवा अयनगति चुकीची असली तरी त्या चुकीच्या मापानेंच परत मोजीत गेल्यास त्यांचें आरंभस्थान नेमकें सांपडतें; यांत केतकरांना गूढ तें काय वाटलें? एखाद्यानें चुकीची मैलाची सांखळी घेऊन तिनें मोजमाप घेऊन पुणें शहर ११ मैल अंतरावर आहे असें सांगितल्यास त्याच सांखळीनें पुण्यापासून परत मोजीत जाऊन हे चुकीचे ११ मैल कोणत्या आरंभस्थानापासून त्यानें ठरविले हें शोधून काढतां येणार नाहीं काय? पण मुद्दाम झोंपेचें सोंग घेणाऱ्यास जागें कोण करूं शकेल?

भास्कराचार्य यांच्या शके ११०५ मधील ११ अयनांशांवरून जसें उलट गणितानें शून्य अयनांश वर्ष काढतां येतें तसेंच शके १४४२ त गणेशदैवज्ञांनीं वेधानें १६ अंश ३८ कला अयनांश काढले या आंकड्यावरूनहि त्याच पद्धतीनें उलट गणित केल्यास शके ४४४ शून्य अयनांश वर्ष येतें.

पण शून्य अयनांश वर्ष न काढतांना देखील साध्या त्रैराशिकानें खरे अयनांश कोणते हें सांगतां येण्याजोगे आहेत. ६० अयनगति धरल्यानें जर २३ अयनांश येतात तर ५० अयनगति धरल्यास अयनांश किती येतील, याचें उत्तर साधें त्रैराशिक समजणारें मूलहि देऊं शकेल. मग केतकरांसारख्या गणितज्ञाला तें कां सोडवितां येऊं नये? पण हें निवळ ढोंग आहे. वरील त्रैराशिकाचें जें उत्तर येईल तें त्यांना इष्ट असें नसल्यानें हें गणितच बरोबर नव्हे असली तक्रार त्यांनीं आतां सुरू केली आहे. पण पूर्वी ज्यो. केतकर यांचे जे लेख प्रसिद्ध झाले आहेत त्यांत त्यांनीं याच पद्धतीनें शून्य अयनांश वर्ष काढलें आहे व तें ४४४ हेंच येतें हें त्यांच्या पुस्त-

कांत नमूद आहे. त्याचप्रमाणें रैवतपक्षाचें खरें शून्य अयनांश वर्ष ४९६ हेंहि पूर्वी केतकरांनींच मान्य केलें आहे. पण तें त्यांच्या चित्रापक्षाला आणि धनिष्ठादि आरंभस्थानाच्या नव्या क्लृप्तीला जुळेनासें झालें म्हणून त्यांनीं शून्य अयनांश वर्ष गणितानें काढतांच येत नाहीं असला अशास्त्रीय वाद अलीकडे दहा वर्षांत सुरू केला आहे.

वरील सर्व प्रश्नांत शके ४४४ हें आरंभस्थान वादाकरितां गृहीत धरून प्रश्न विचारले आहेत. याचें कारण एवढेंच कीं, ग्रहलाघवपद्धतीनें जीं पंचांगें करण्यांत येतात त्यांत शके ४४४ हेंच शून्य अयनांश वर्ष मानून अयनांश काढण्यांत येतात, तेव्हां त्यांच्याच शून्य अयनांश वर्षापासून शुद्ध गति घेत गेल्यास त्यांचे हल्लींचे अयनांश चुकीचे ठरून खरे अयनांश सुमारें १९ येतात हें त्यांना त्यांच्याच गणितावरून पटवून द्यावें. निरनिराळ्या ग्रंथांतील उल्लेख पाहिल्यास शके ४२१ पासून शके ५३२ पर्यंत निरनिराळीं वर्षें शून्य अयनांश वर्ष म्हणून दिलेलीं आहेत. पण त्यांतलें कोणतेंहि वर्ष ४२१ च्या पूर्वी किंवा ५३२ च्या पुढें जात नाहीं. अर्थातच या दोन मर्यादांच्या दरम्यान कोठें तरी खरें शून्य अयनांश वर्ष असलें पाहिजे. हें अनुमान ठरविल्यानंतर 'पौष्णांते भगणः स्मृतः' या वचनास अनुसरून रेवतीपुंजातील झीटा योगताऱ्याजवळ वसंतसंपात कोणत्या वर्षी होता हें शुद्ध गणितानें शोधून पाहिल्यास शके ४९६ हें शून्य अयनांश वर्ष पक्कें येतें आणि तें ४२१ व ५३२ या मर्यादांच्या आंत येणारें असेंच आहे.

शके ४९६ पासून पुढें घेतलेली वर्षमानपद्धति व अयनगति जर चूक आहे तर शके ४९६ च्या पूर्वीचेहि वर्षमान चूकच असणार, तेव्हां त्याचा विचार कां करीत नाहीं असें केतकर विचारतात. परंतु शके ४९६ मध्यें प्रत्यक्ष वसंतसंपात ज्या बिंदूंत होता तोच बिंदु आरंभस्थान मानल्यावर तत्पूर्वीच्या चुकीच्या वर्षमानाचा या गणिताशीं संबंध काय राहिला ? सायनरवि व करणागत रवि यांच्यामधील अंतर काढून अयनांश ठरवावयाचे असल्यास करणागत रवि बरोबर आहे का नाहीं या शंकेला जागा राहाते. परंतु जो सायनरवि तोच करणागत रवि घेऊन तेंच आरंभस्थान मानावयाचें झाल्यास करणागत रवि शून्य झाल्यानें त्यांत चूक कोठून राहणार ? सांपातिक बिंदु वेधानें व शुद्ध गणितानें कोणालाहि केव्हांहि ठरवितां येतो. व तेंच आरंभस्थान मानावयाचें असें ठरविलें म्हणजे करणागत रवि निराळा काढावाच लागत नाहीं. मग जेथें करणागत रवीचें गणितच नाहीं तेथें तें चूक कसें असणार ? अर्थातच झीटावाल्यांचें आरंभस्थान शके ४९६ मधील वसंतसंपातबिंदूपासूनच ठरविलें असल्यामुळें त्यांत मागील कसल्याहि चुकीचा संबंध राहात नाहीं. तें आरंभस्थान ठरविल्यानंतर पुढें जर वर्षमान व अयनगति शुद्ध घेतलीं नाहींत तर त्या वेळेपासून चूक सांचूं लागेल. अशी चूक गेलीं १३५४ वर्षें ग्रहलाघवीय पंचांगांत सांचत आली आहे. पण ती शुध्द पंचांगांतून काढून टाकण्यांत आली असून शके ४९६ पासून शुध्द वर्षमान व वेधोक्त अयनगति घेऊन अयनांश ठरविण्यांत आले आहेत.

केतकर यांच्या चित्रापक्षाचे अयनांश खरे मानल्यास शून्य अयनांश वर्ष शके २१३ पर्यंत मागें जातें; पण शके २१३ हें शून्य अयनांश वर्ष कोणत्याहि ग्रंथकारानें दिलें नाहीं. वास्तव केतकरांचें शून्य अयनांश वर्ष केवळ कल्पित आहे. "वराहमिहिराच्या पूर्वी अयनगतीविषयीं कांहीं विचारच झालेला आढळत नाहीं. मूळ सूर्यसिद्धांतादिक प्राचीन पंचसिद्धांतांत अयनांशाविषयीं कांहीं होतें असें दिसत नाहीं. पहिला आर्यभट्ट व लल्ल यांच्या ग्रंथांत अयनगतीविषयीं कांहीं नाहीं. शके ४४५ नंतर केव्हां तरी छायेवरून रवि बरेच वेळां काढून प्रथम तत्कालीन अयनांश मग अयनगति आणि त्यावरून शून्य अयनांशाचें वर्ष या गोष्टी आमच्या लोकांनीं निश्चित केल्या" असें शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे. "ब्रह्मगुप्ताच्या पूर्वीच्या शके ५०० च्या विष्णुचंद्राच्या ग्रंथांत अयनगतिविचार आहे. सारांश, शके ५०० च्या सुमारास अयनगतीचा विचार होऊं लागला, शके ८०० च्या पूर्वी तिचें सूक्ष्म ज्ञान झालें होतें आणि शके ८५४ पासून अयनगति ६० विकला प्रचारांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं" असेंहि शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनीं आपल्या पुस्तकांत नमूद केलें आहे. यावरून अयनांशांचा विचारच शून्य अयनांश वर्ष शके ४४४ च्या पूर्वी जाऊं शकत नाहीं, आणि म्हणूनच केतकी पक्षाचें शके २१३ हें शून्य अयनांश वर्ष काल्पनिकच होय.

शके ५५० च्या ब्रह्मगुप्ताच्या ग्रंथांत सायनरवि व करणागत रवि यांत ५४ घटकांचें अंतर येतें असा उल्लेख आहे आणि अयनांशासंबंधाचा हा जुन्यांत जुना उल्लेख होय व त्यावरून शून्य अयनांश वर्ष ४९६ हेंच येतें. त्यानंतरचा उल्लेख शके ८५४ मधला मुंजालाच्या ग्रंथांतला आहे व त्या वेळीं अयनांश ६-५० इतके सांगितलेले आहेत. त्यानंतर भास्कराचार्यांच्या वेळीं ( शके ११०५ ) अयनांश ११ येत होते असें त्यांनींच सांगितलें आहे व त्यांनीं स्वतः दिलेली ६० विकला गति घेऊन उलट गणित केल्यास शून्य अयनांश वर्ष ४४५ येतें, त्याच्या मागें जाऊं शकत नाहीं, त्या-

नंतर गणेशदैवज्ञ यांनीं शके १४४२ त अयनांश काढले व ते १६-३८ इतके आले. यांचेहि उलट गणितानें काढलेले शून्य अयनांश ४४४ येतें. कोणत्याहि ग्रंथकारानें दिलेल्या अयनांशावरून गणित केल्यास शून्य अयनांश ४४४ च्या पूर्वी जाऊं शकत नाहीं हें यावरून सिद्ध आहे.

भास्कराचार्य यांनीं शके ११०५त आणि गणेशदैवज्ञ यांनीं शके १४४२ त वेध घेऊन अयनांश काढले तेव्हां ते अयनांश चुकीचे कसे असा प्रश्न कित्येकांकडून विचारण्यांत येतो. पण वेध घेणें एवढ्या शब्दानेंच त्यांची दिशाभूल झालेली दिसते. वेध घेऊन अयनांश काढले तरी त्याला करणागत रवि गणितानेंच तयार करून घ्यावा लागतो आणि जेथें वर्षमान चूक तेथें करणागत रवि चूक आणि त्या करणागत रवीवरून आलेले अयनांशहि वर्षमानाच्या चुकींतील प्रमाणाइतके चूकच असणार हें कोणाहि गणितज्ञास समजूं शकेल. अर्थातच भास्कराचार्य अगर गणेशदैवज्ञ यांनीं जे अयनांश काढले ते छायार्क व करणागत रवि यांच्या अंतरावरूनच काढले असल्यानें त्या वेळच्या वर्षमानाची चूक त्यांच्या अयनांशांत प्रतिबिंबित झाली असली पाहिजे हें आक्षेपकांनीं लक्षांत ठेवावें. कोल्हापूरचे प्रो. आपटे यांनीं ऐक्यपरिषदेच्या अध्यक्षास जे अयनांश काढून दिले त्यांतहि करणागत रवि असाच चुकीचा घेतल्यानें तेहि अयनांश वरच्याप्रमाणेंच चूक होत. हा लेख बराच लांबल्यामुळें केतकर यांच्या बाकीच्या उत्तरांतील धनिष्ठादि गणनेचा विचार पुढील अंकावर टाकणें भाग आहे.

# अमेरिकन प्रेसिडेंट हूव्हर

(ले.—अ. ज. करंदीकर.)

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या राज्यघटनेप्रमाणें तेथील अध्यक्षांच्या चतुर्वार्षिक निवडणुकीची प्रास्ताविक निवडणूक होऊन मि. **हर्बर्ट हूव्हर** हे प्रेसिडेंट होणार हें निश्चित ठरलें. एकंदर ४½ कोटि मतदारांपैकीं ३ कोटि मतें मि. हूव्हरच्या बाजूस पडून ४९ संस्थानांपैकीं ४१ संस्थानांची अनुकूलता हूव्हरला मिळाली. अवघ्या आठ संस्थानांतलें बहुमत मि. स्मिथ यांच्या बाजूला पडलें. अर्थातच येत्या मार्चपासून मि. हूव्हर हे अधिकारारूढ होणार. मि. हूव्हर हे रिपब्लिकन पक्षाचे उमेदवार होते व त्यांचे प्रतिस्पर्धी मि. स्मिथ हे डेमोक्रॅटिक पक्षाचे उमेदवार होते. डेमोक्रॅटिक पक्षापेक्षां पांचपट अधिक संस्थानांचा पाठिंबा रिपब्लिकन पक्षास मिळाला यावरून अमेरिकेंतील राजकीय वातावरणाची कल्पना करतां येईल.

इ. स. १८७४ सालीं एका धर्मनिष्ठ 'क्वेकर' कुटुंबांत **हर्बर्ट हूव्हरचा** जन्म झाला. त्याचा बाप लोहाराचा धंदा करीत होता. वाचकांना माहीत असेलच कीं, इटालीचा डिक्टेटर मुसोलिनी हाहि लोहाराच्या कुटुंबांत जन्मला आहे. हूव्हरची आई तिच्या धीरोदात्त स्वभावासाठीं व वक्तृत्वगुणासाठीं 'क्वेकर' पंथाच्या मंडळींत प्रसिद्ध होती. पण हूव्हरला मातापित्यांचें सुख फार दिवस लाभलें नाहीं. तो सहा वर्षांचा असतांना पिता व ९ वर्षांचा असतांना माता अशीं क्रमानें वारलीं. त्यानंतर त्याचें व त्याच्या भावंडांचें पालन त्याच्या चुलत्यानें केलें. हूव्हरच्या काकाची इच्छा होती कीं आपल्या पुतण्याला धर्मोपदेशकाच्या धंद्यांत घालावें. पण दैवयोगानें हूव्हरला त्याच्या लहानपणीं एक इंजीनियर मित्र मिळाला होता. त्यानें वारंवार आपल्या धंद्याची स्तुति करून हूव्हरचें मन इंजीनियर होण्याकडे वळविलें. इंजीनियरिंग कॉलेजांत शिकत असतांना हूव्हरची भूगर्भशास्त्र शिकणाऱ्या एका मुलीशीं ओळख झाली व पुढें तिच्याशीं त्याचें लग्न झालें.

कॉलेजांतून पार पडल्यावर हर्बर्ट हूव्हर हा आस्ट्रेलियांतील सोन्याच्या खाणींमध्यें इंजीनियर झाला. हूव्हरला ही नोकरी मिळविण्यासाठीं थोडी लबाडी करावी लागली ! ऑस्ट्रेलियांतल्या त्याच्या मालकांना निदान ३५ वर्षांचा पोक्त इंजीनियर हवा होता. हूव्हरचें वय त्या वेळीं अवघें २३ होतें. त्यामुळें त्याला वय वाढवून दाखविण्यासाठीं दाढी वाढवावी लागली ! ऑस्ट्रेलियांतील खाणीमधून सोनें निघण्याचें प्रमाण दरवर्षी कमी होत चाललें होतें. त्याविषयीं कांहीं शोध व पुष्कळसे श्रम करून हूव्हरनें त्या खाणी पूर्वीसारख्या सुस्थितीला आणल्या व तेव्हांपासून **'आजारी खाणींचा डॉक्टर'** म्हणून त्याची प्रसिद्धि झाली. या प्रसिद्धीमुळें चीनच्या तेव्हांच्या बादशहानें आपल्या 'माइनिंग' ब्यूरोचें आधिपत्य हूव्हरला दिलें. या नात्यानें तो चीनमध्यें काम करीत असतां बॉक्सर बंडाचा प्रादुर्भाव झाला. त्या बंडाच्या धामधुमींत हूव्हरनें मोठ्या मर्दुमकीनें टीन्स्टीनमधील युरोपियन व अमेरिकन लोकांचें बंडवाल्यांपासून संरक्षण केलें. पण मौजेची गोष्ट ही कीं, त्यांना सोडवण्यासाठीं म्हणून आलेल्या युरोपियन सैन्यानेंच इतर लुटालुटींत हूव्हरचेंहि घर लुटलें !

असो. हूव्हरनें सुमारें वीस वर्षेपर्यंत आपला इंजीनियरचा धंदा चालविला. या मुदतींत चारहि खंडांत मिळून व जगांतील साऱ्या वंशांचे सुमारें दीड लाख लोक त्याच्या हाताखालीं खपत होते. एवढ्या दीर्घ अवधींत त्याच्या हाताखालच्या लोकांनीं एकवार देखील संप केला नाहीं. १९१४ सालीं पनामा प्रदर्शनाच्या कांहीं कामासाठीं हूव्हर युरोपांत आला होता. तो इंग्लंडांत असतांना एकाएकीं महायुद्ध सुरू झालें. त्याचा एक परिणाम असा झाला कीं, त्या वेळीं युरोपांत असलेले दोन लक्ष अमेरिकन प्रवासी रोख पैशाच्या अभावीं युरोपांत अडकून पडले, कारण युद्धाच्या प्रारंभाबरोबर केवळ पतीवर कोणताहि व्यवहार होणें अशक्य झालें होतें. या सर्व प्रवाशांना अमेरिकेला परत पोंचविण्यासाठीं हूव्हरनें एक साहाय्यक समिति स्थापली व तिच्या मार्फत अमेरिकेंत पोंचतांच फेडण्याच्या अटीवर सर्व प्रवाशांना वाटखर्चापुरते पैसे पुरविण्यांत आले. हे पैसे बहुतेक सर्व वसूल झाले.

या लोकांची रवानगी केल्यावर हूव्हरनें स्वतः अमेरिकेला जाण्याची तयारी केली. अशा वेळीं ब्रुसेल्समध्यें राहणारा एक अमेरिकन इंजीनियर हूव्हरच्या भेटीला आला. त्या वेळीं जर्मन लोकांनीं बेल्जम जिंकून त्या देशांतील सर्व अन्न आपल्या सैन्यासाठीं राखून ठेवलें होतें व बेल्जमच्या लोकांची उपासमार होऊं लागली होती. या लोकांना तटस्थ राष्ट्रांनीं अन्न पुरवावें अशी त्या इंजीनियराची इच्छा होती. पण बेल्जममध्यें अन्न जाऊं देण्याला इंग्रज नाकबूल होते व बेल्जममध्यें उतरणारें धान्य आम्ही आमच्या सैन्यासाठीं राखून ठेवूं अशा धमक्या जर्मन सेनापति देत होते! या दोन राष्ट्रांचीं मनें वळवून बेल्जमच्या लोकांना अन्न पुरवण्याची जबाबदारी हूव्हरनें पत्करली व यासाठीं त्यानें आपला धंदा सोडला.

इंग्रजी आरमाराच्या व जर्मन सबमरीनच्या तावडींतून बेल्जमच्या किनाऱ्यावर अन्नसामुग्रीच्या आगबोटी लावावयाच्या व सुमारें एक कोटि लोकांना अन्न पुरवावयाचें असला प्रचंड धाडसाचा उद्योग हूव्हरनें अमेरिका युद्धांत पडेपर्यंत चालविला. या मुदतींत १०० अब्ज डॉलर रकमेची त्यानें घडामोड केली. पण या सर्व रकमेचा हिशेब अगदीं नमुनेदार रीतीनें ठेवला होता. अमेरिका युद्धांत पडल्यावर हूव्हर अमेरिकेचा फूड कंट्रोलर झाला. युद्ध संपल्यावर मध्ययुरोपाला अन्न पुरवण्यासाठीं नेमलेल्या आंतरराष्ट्रीय कमिशनाचा तो अध्यक्ष झाला. त्यानंतर अमेरिकेंत मिसिसिपीच्या पुरानें कहर केला असतां त्या लोकांना वांचविण्याचें काम हूव्हरकडेच आलें. अशा रीतीनें मानव जातीची क्षुधा निवारण करण्याचे कामांत फार मोठा भाग घेतल्यानें हूव्हरचें नांव जगप्रसिद्ध झालें आहे.

राजकारणांत हूव्हर अगदीं अलीकडे पडला. प्रे. हार्डिंगनें त्याला अमेरिकेच्या व्यापार खात्याचा प्रधान केलें व तें काम तो आज सात वर्षें करीत आहे. परराष्ट्रीय राजकारणांत युरोप व अमेरिका यांनीं एकमतानें वागावें या मताचा तो आहे. शिवाय तो इंग्रजांचा कट्टा पक्षपाती आहे. यामुळें त्याच्या निवडणुकीमुळें इंग्लिशांना आनंद झाला आहे.

अमेरिकेंतील यादवी युद्धानंतर आतांपर्यंत तेथें १५ वेळां अध्यक्षांची निवडणूक झाली. त्यांत चार निवडणुकींतच काय तो डेमोक्रॅटिक पक्षास जय मिळाला. यावरून अमेरिकनांचा ओढा रिपब्लिकन पक्षाकडे आहे हें सिद्ध होतें. रिपब्लिकन पक्ष हा भांडवलशाहीचा कैवारी असल्यानें प्रे. हूव्हरच्या कारकीर्दींत तरी रशियन कारस्थानांना व कम्युनिस्ट पक्षाच्या चळवळींना अमेरिकेंत थारा मिळेलसें वाटत नाहीं.

---

# पंजाबचा सिंह गेला !

पंजाबचे सिंह व आज चाळीस वर्षे आपलें सर्वस्व राष्ट्राला वाहून राष्ट्राची अनेकांगी व निरलस सेवा करणारे वंदनीय पुढारी लाला लजपतराय हे गेल्या शनिवारीं सकाळीं कालवश झाले, ही वार्ता कानीं आल्याबरोबर सर्व देशभर दुःखाची व उद्वेगाची छाया पसरली आहे. राष्ट्रांतील आणीबाणीच्या प्रसंगीं कशाचीहि पर्वा न करतां प्राप्त परिस्थितीशीं धैर्यानें झगडणारे लाला लजपतरायांसारखे पुढारी हेच परतंत्र राष्ट्राच्या आशेचे आधार होत. हिंदी राष्ट्रांतील स्वातंत्र्याच्या लढ्यामध्ये आजचा काल हा एक आशादायक संक्रमणकाल असून अशा वेळीं लाला लजपतराय यांच्यासारख्या अनुभवी, धोरणी, कर्तृत्ववान व निस्सीम देशभक्त पुढाऱ्याच्या मार्गदर्शकत्वाची राष्ट्राला अतिशय जरूरी होती. त्यांना आमच्यांतून याच वेळीं काळानें अचानक उचलून न्यावें हें राष्ट्राचें दुर्दैव असून ही हानि सहजासहजीं भरून निघण्यासारखी नाहीं.

लाहोरास गेल्या ता. ३० रोजीं लाला लजपतराय यांच्या छातीवर बसलेले एका उन्मत्त अधिकाऱ्याचे प्रहार नोकरशाहीच्या वर्मी लागून तिचा नायनाट केव्हां होईल तो होवो, पण आज मात्र या प्रहारांनी लाला लजपतरायांसारख्या वीराचा बळी घेतल्यानें ते राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या चळवळीच्या वर्मी लागले आहेत. एका अधिकाऱ्याच्या पापावर सारवण घालण्यासाठीं सरकारानें दुसऱ्या एका अधिकाऱ्यामार्फत चौकशीचें जाळें निर्माण केलें. पण पंजाबचा सिंह या जाळ्यांत अडकला नाहीं. त्यांनीं या चौकशीच्या फार्साला झिडकारलें व सरकाराला उघड चौकशीचे आव्हान केलें. पण या आव्हानास न जुमानतां नोकरशाहीनें आपली चौकशी चालवून एकदोन बिनसरकारी साक्षीदार उभे केले व हल्ला करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या साक्षी घेतल्या. लाहोराच्या मिरवणुकींत झालेल्या दुखापती किरकोळ स्वरूपाच्या होत्या असे भासवून, त्यांच्याबद्दल झालेल्या गवगव्याचा उपहासपूर्ण उल्लेख, लजपतरायादि पुढाऱ्यांवर हल्ला करणाऱ्या पोलीस अधिकाऱ्यानें, ज्या दिवशीं चौकशी—अधिकाऱ्यापुढें केला त्याच दिवशीं रात्रीं लजपतराय यांच्या छातींत असह्य कळा निघत होत्या व दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्यांची हृदयक्रिया थांबून त्यांचा अंत झाला !

यावरून किरकोळ गोष्टीचा हिंदी लोक उगाच गवगवा करतात हा या पोलीस अधिकाऱ्याचा आरोप तर खोटा ठरलाच, पण सरकारी बंदोबस्तासाठीं सहज लीलेनें क्षुल्लक इजा करीत आपलें दंडुके चालविणाऱ्या अधिकाऱ्यांच्या कृत्यांचे परिणाम किती भयंकर होतात हें मात्र लालाजीच्या मृत्यूनें राष्ट्राला कधींहि न विसरतां येण्यासारख्या भडक रीतीनें दिसून आलें. लालाजींच्या शरीरावर ता. ३० रोजीं लागलेल्या काठीच्या माराचा तात्कालिक परिणाम जरी विशेष दिसला नाहीं तरी त्या दिवसापासून त्यांना चैन पडत नव्हतें व दिल्लीच्या ऑ. इं. कॉं. कमिटीचे वेळींहि त्यांना थोडासा ज्वर आल्यामुळें जाहीर सभेंत भाषण करण्याचें रहित करावें लागलें. पोलिसांच्या दंडुक्याचा प्रहार व त्या उपमर्दानें झालेला मनःसंताप, यांचा संयुक्त परिणामच त्यांच्या शरीरावर होऊन त्यांचा अंत झाला. यावरून सायमन कमिशनाच्या बंदोबस्तासाठीं नोकरशाहीनें लालाजींचा बळी घेतला हेंच खरें. राष्ट्रावरील संकटास व आपत्तीस प्रथम आपली छाती पुढे करून पंजाबानें आजपर्यंत तोंड दिलें आहे व पंजाबच्या सिंहानें आपल्या प्रांताचा हा लौकिक आपल्या मरणानें सार्थ केला. पंचभौतिक देह सोडल्यावर लालाजी इहलोकींच्या रागद्वेषातीत झाले. पण त्यांचा झालेला उपमर्द राष्ट्र विसरूं शकत नाहीं व विसरून चालणार नाहीं. ता. ३० च्या प्रसंगानंतर लजपतरायांनीं केलेल्या भाषणांत या उपमर्दाचें निराकरण करण्याचा मार्ग स्पष्ट दाखवून दिला असून तोच त्यांचा राष्ट्राला अखेरचा संदेश होय. या उपमर्दाचें निराकरण राष्ट्रीय स्वातंत्र्यानेंच होणारें आहे असें त्यांनीं सांगितलें. व सरकारलाहि इषारा दिला कीं, "सरकार व त्यांचे अधिकारी लोकांशीं असलें वर्तन चालू ठेवतील तर आमच्यांतील तरुण माणसें आमच्या मर्यादेच्या बाहेर जाऊन राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं सांपडेल तो मार्ग स्वीकारतील. हा प्रसंग पाहाण्यास मी जिवंत असेन वा नसेन. पण मी जिवंत असलों किंवा नसलों तरी असा प्रसंग सरकारनें आमच्या तरुणांवर आणल्यास त्या झगड्यांत माझा आत्मा त्यांना आशीर्वादच देईल." लजपतराय विचारी व थंड डोक्याचे असले तरी त्यांच्या अंतःकरणांत राष्ट्रीय स्वाभिमानाचा हा अग्नि प्रज्वलित होता म्हणूनच आज तीस वर्षे राष्ट्रीय चळवळींत त्यांना राष्ट्रानें प्रमुख स्थान दिलें.

लालाजींचा संदेश आचरणांत आणावयाचा असेल तर तरुण पिढीनें त्यांच्या अखंड राष्ट्रसेवातत्पर आयुष्यक्रमाचें चिंतन केलें पाहिजे. एके काळीं राष्ट्राच्या व विशेषतः तरुण पिढीच्या नित्यस्मरणींत 'लाल—बाल—पाल' ही स्फूर्तिदायक त्रिमूर्ति प्रविष्ट झाली होती. यापैकीं श्री. बिपिन चंद्र पाल यांची

स्फूर्ति ही तात्पुरती ठरली. पण लालाजींनीं मात्र या त्रयींतील आपलें पहिलें स्थान सार्थ केलें.टिळकांप्रमाणेंच लालाजींनीं धार्मिक व शैक्षणिक कार्यांतूनच राजकारणांत पाऊल टाकलें व तें टाकतांक्षणींच त्यांच्याबद्दल सरकारच्या मनांत जी अढी उत्पन्न झाली ती अखेरपर्यंत कायम राहिली. टिळकांप्रमाणेंच तीनचार वेळां लालाजींना सरकारी प्रकोपाचे परिणाम भोगावे लागले.१९०७ सालाची ब्रह्मदेशाकडील हद्दपारी, महायुद्धानंतर अमेरिकेंतून हिंदुस्थानांत येण्याची बंदी करून सरकारनें कांहीं काळ लालाजींना दिलेली हद्दपारीची शिक्षा, व असहकारितेच्या काळांत त्यांना भोगावी लागलेली कैद, या तीनहि प्रसंगांत लालाजींच्या धैर्याची व देशभक्तीची परीक्षा झाली व या कसोटींतून ते तावूनसुलाखून बाहेर पडले. १९०७ सालची त्यांची हद्दपारी अल्पकाल टिकली तरी ती आकस्मिक रीतीनें व अत्यंत अरेरावीनें केलेली असल्यामुळें देशांत प्रचंड क्षोभ झाला व त्यायोगाने चळवळीचें पाऊल पुढेंच पडलें. असहकारितेची चळवळ महात्मा गांधींच्या प्रेरणेनें व नेतृत्वानें उत्पन्न झाली व चालली तरी पंजाबांत लालाजी, बंगाल्यांत दासबाबू, व संयुक्त प्रांतांत पंडित मोतीलाल नेहरू असे तीन प्रातांत तीन खंदे पुढारी मिळाल्यानेंच या चळवळीला इतकें यश लाभलें. या तिघांहि पुढाऱ्यांनीं या नव्या चळवळीच्या शिंगेवर उभे राहून सरकारचा रोष व तदनुषंगिक तुरुंगवास पत्करला.

लालाजींचा जन्म लुधियाना जिल्ह्यांत जागरन नांवाच्या खेडेगांवांत १८६५ सालीं झाला. त्यांचे वडील लाला राधाकिसन हे महर्षी दयानंदप्रणीत आर्यसमाजाचे कट्टे अनुयायी होते. पंजाबांतील हिंदूंमध्यें आर्यसमाजानें धडाडीनें नवचैतन्य उत्पन्न करून तेथील आर्यसंस्कृतीचें बिकट परिस्थितींत संरक्षण व संवर्धन केलें. याच पंथाच्या तत्त्वांचा लालाजींच्या मनावर बालपणापासून संस्कार झाला. आर्यसमाजाच्या धार्मिक कार्यक्रमांत सर्वांगीण शिक्षण आणि निस्स्वार्थी समाजसेवा या गोष्टींना महत्त्वाचें स्थान आहे. यामुळें राधाकिसन हे वैश्य असूनहि त्यांनीं लालाजींच्या शिक्षणाची व्यवस्था केली व लालाजींनींहि १८८५ सालीं हायकोर्ट वकिलीची परीक्षा पास झाल्यावर वकिलीच्या धंद्याबरोबरच शैक्षणिक व सामाजिक कार्यास सुरुवात केली. हिस्सार या गांवीं सात वर्षें घालविल्यावर ते १८९२ मध्यें लाहोरास आले. १८८६सालीं लाला लजपतराय,लाला हंसराज व गुरुदत्त विद्यार्थी या तिघां तरुणांच्या प्रयत्नानें लाहोरास ' दयानंद आंग्लो–वेदिक कॉलेज ' ची स्थापना झाली. टिळकांप्रमाणें लालाजींनीं प्रारंभींच वकिलीचा धंदा सोडला नसला तरी या धंद्यांतील बहुतेक प्राप्ति त्यांनीं सार्वजनिक कार्यास लावली, आणि पुढें तो धंदाहि त्यांनीं सोडून दिला व सर्व आयुष्य राष्ट्रसेवेस वाहिलें.

दयानंद कॉलेजाचा खर्च चालविण्याकरितां लजपत राय आपल्या प्राप्तीचा मोठा वाटा देत असत.कॉलेजावर व कॉलेजांतील विद्यार्थ्यांवर त्यांचें पुत्रवत् प्रेम असल्यामुळें कॉलेजाशेजारीं आपणास नेहमीं राहावयास सांपडावें या उद्देशानें त्यांनीं एक लहानसें घरहि बांधलें होतें. लाहोर येथील कॉलेजाशिवाय फिरोजपूर येथें हिंदूंकरितां एक प्रचंड अनाथालय उभारण्यांतहि लजपतराय यांनींच पुढाकार घेतला होता.१९०५सालीं 'कांग्रा दरी'स धरणीकंपाचा धक्का बसून हजारों माणसें प्राणास मुकलीं व हजारों बायकामुलें उघडीं पडलीं.त्या प्रसंगीं लालाजींनींच धांवून येऊन निराश्रितांच्या क्लेशनिवारणार्थ पुष्कळ पैसा गोळा केला. अशा रीतीनें अव्याहत पंचवीस वर्षेंपर्यंत आर्यसमाजाची व पंजाबांतील एकंदर जनतेची सामाजिक, धार्मिक व शिक्षणात्मक सेवा केल्यानंतर आपल्या राजकीय मतांचा व चळवळीचा उपसर्ग आर्यसमाजास बाधतो अशी त्यांस शंका येतांच त्यांना समाजाच्या कित्येक संस्थांशीं असलेला आपला संबंध तोडावा लागला.

लालाजींच्या लोककार्याची व्याप्ति धार्मिक,शैक्षणिक व भूतदयात्मक कार्यापुरतीच मर्यादित नव्हती-व्यापक दृष्टीनें लोककल्याणाचा विचार केल्यास राजकीय चळवळीचा त्यांत प्रामुख्यानें समावेश होतो ही गोष्ट लालाजींसारख्या विशाल बुद्धीच्या पुरुषांस तेव्हांच उमगली असली पाहिजे. कारण वरील चळवळीबरोबरच त्यांनीं राजकीय चळवळीकडेहि आपली दृष्टि वळविली. १८८८ सालाच्या अलाहाबादच्या राष्ट्रीय सभेस ते प्रथमच हजर राहिले.पण यापुढें त्यांनीं केलेल्या राजकीय कामगिरीमुळेंच त्यांना 'पंजाबचे सिंह' ही पदवी प्राप्त झाली. अलीगड कॉलेजाचे उत्पादक सर सय्यद अहमद हे लजपतराय यांचे एका अर्थी त्या वेळेचे राजकीय गुरु होत. हिंदू–मुसलमानांत दुजाभाव नसून दोघांचे हितसंबंध एक आहेत असेंच सर सय्यद अहमद यांचें प्रथम मत असतां,त्यानंतर मुसलमानांचा सवता सुभा सजविण्याच्या उद्योगास ते लागले याबद्दल त्यांजविरुद्ध स्पष्टोक्तिपूर्ण अनावृत पत्रें लिहून लालाजींनीं याच सुमारास सर अहमद यांच्या चुका त्यांच्या पदरांत बांधल्या; त्यामुळें व अलाहाबादेस भरलेल्या राष्ट्रीय सभेंतील भाषणामुळें लाला लजपतराय याची विवादपटुता व वक्तृत्व या गुणांची पंजाबाबाहेरहि छाप बसली. १९०५ सालीं ना. गोखले यांजबरोबर राष्ट्रीय सभेनें लालाजींस विलायतेस ब्रिटिश जनतेस हिंदुस्थानाची

स्थिति व्याख्यानरूपानें समजून देण्यास पाठविलें, व त्यामुळें तर त्यांच्या वरील गुणास राष्ट्रीय मान्यताच मिळाल्यासारखी झाली. याच वेळीं लजपतरायांनीं युरोपांतील कांहीं भागांत व अमेरिकेंत प्रवास केला व तेथील स्वातंत्र्याच्या वातावरणाचा त्यांच्या मनावर बराच परिणाम झाला.

पण १९०५पर्यंत लालाजींचें नांव हिंदुस्थानांतील केवळ सुशिक्षित वर्गाच्याच परिचयाचें होतें. पण १९०७ सालीं अशी एक गोष्ट घडली कीं तिजमुळें त्यांचा कीर्तिरवि मध्यान्हीं आला. त्या वर्षी सरकारनें १८१८ च्या तिसऱ्या कानूखालीं लाला लजपतराय यांस चौकशीवांचून मंडाले येथें हद्दपार केलें.अशा प्रकारची भयंकर शिक्षा आधुनिक काळांत पंजाबांत पहिलीच होती. शिक्षेच्या या भयंकरपणामुळें जनतेच्या दृष्टीनें लजपतराय यांची योग्यता पुष्कळच वाढून त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. राष्ट्रपुरुष या नांवाचा पहिला मान त्यांना या शिक्षेनें मिळून लाल—बाल—पाल ही राष्ट्रीय त्रयी आबालवृद्धांच्या जिव्हाग्रीं याच वेळेपासून नाचूं लागली. त्यानंतर लालाजी कांहीं दिवसांनीं सुटून आल्यावर सुरत येथें भरणाऱ्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान लालाजींसच देण्यांत यावें याबद्दल लो.टिळक यांनीं गर्जना केली. त्यांच्या या गर्जनेचा प्रतिध्वनि बंगाल्यांतहि उमटून त्यांच्या नांवाने अखिल हिंदुस्थान दुमदुमल्यामुळें तर लालाजींचें वैभव कळसास चढलें.

सुरतेच्या कॉंग्रेसनंतर लालाजींनीं नेमस्त कन्व्हेन्शनच्या क्रीडवर सही केली तरी सुरतेस फुटून निघालेल्या नव्या राष्ट्रीय पक्षाकडे त्यांची सहानुभूति होती. लालाजींनीं राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षपदाचा मान विनयानें १९०७ सालीं नाकारला. तो त्यांस फिरून १९२० सालीं लाभला. मध्यंतरींच्या तेरा वर्षांच्या काळांत त्यांची देशभक्ति चांगली कसाला लागली. आघाडीच्या हिंदी पुढाऱ्यांत लजपतराय यांच्याइतका युरोप व विशेषतः अमेरिका या खंडांचा दीर्घ अनुभव फारच थोड्यांना घ्यावयास मिळाला. १९१३ सालीं ते जपानांत गेले होते व महायुद्ध सुरू झाल्यावर तेथून ते अमेरिकेंत गेले.सन १९२० पूर्वीचीं पांच वर्षे लालाजींस हिंदुस्थानात येण्यास सरकारची परवानगी न मिळाल्यामुळें हद्दपारीसारखींच गेलीं.त्या पांच वर्षांत पैशाच्या अभावीं लजपतराय यांना आपली रोटी आपल्याच हातानें पकविण्याची पाळी आली. या बातम्या हिंदुस्थानांत कळतांच दुःखानें हिंदी जनतेच्या आतड्यांस दुःसह पीळ बसला. लो. टिळक यांनीं त्यांच्या कार्याच्या मदतीकरितां बरीच मोठी रक्कम पाठविली होती. पण तिच्यांतील एका शिवराईसहि स्पर्श न करतां त्यांनीं ती रक्कम जशीच्या तशी परत केली. लालाजी अमेरिकेंत होते तो काळ महायुद्धाचा,महायुद्धानंतरचा, व मॉंटेग्यू—चेम्सफर्ड योजनेचा असल्यामुळें तो काळ लालाजींनीं आपली जोरदार लेखणी व वाणी अमेरिकेंत झिजवून हिंदी लोकांसंबंधीं अमेरिकन लोकांत इंग्रजांकडून पसरविण्यांत आलेल्या गैरसमाजाचें निराकरण करण्यांत खर्च केला. तेथें होमरूल लीग स्थापन करून हिंदुस्थानाच्या वतीनें लालाजींनीं अमेरिकेंत बजावलेली ही कामगिरी अपूर्व होय यांत शंका नाही.

हिंदुस्थानांत आल्यावरहि सरकारनें लजपतराय यांस चैन पडूं दिलें नाहीं. लालाजींना असहकारितेच्या कार्यक्रमाचा कांहीं भाग तत्त्वतः पसंत नव्हता,व कलकत्त्याच्या आपल्या भाषणांत त्यांनीं ही नापसंती निर्भीडपणानें दर्शविली होती. परंतु सर्व राष्ट्र असहकारितेच्या झंजावातांत सांपडल्यावर दुसरी कांहीं चळवळ होणें शक्य नव्हतें व लालाजींच्या प्रकृतीला स्वस्थ बसणें शक्य नव्हतें,म्हणून त्यांनीं आपलें मत कांहीं काळ बाजूस ठेवलें व असहकारितेंत ते उत्साहानें सामील झाले. हद्दपारीची शिक्षा लाला लजपतराय यांनीं पूर्वींच भोगली होती. पण देशसेवेच्या सोपान मार्गांतील इं.पि. कोडखालील तुरुंगाची शिक्षेची पायरी चुकली होती. तीहि असहकारितेच्या चळवळींत ते चढले. त्या शिक्षेंत त्यांची प्रकृति एकदां खालावली ती गेल्या पांचसात वर्षांत मुळींच सुधारली नाहीं. ते हिमालयाच्या पायथ्याशीं जाऊन राहिले व त्यांनीं युरोपांतहि प्रवास केला. त्यायोगानें त्यांना किंचित् आराम पडला तरी त्यांची गेलेली ताकद फिरून आली नाहीं. स्वराज्यपक्ष स्थापन झाला त्या वेळीं ते निवडणुकीस उभे राहिले नाहींत. पण त्यांनीं त्या पक्षाला साहाय्य केलें. पुढें एक वर्षानें त्यांच्यासाठीं लाला हंसराज यांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला व त्यांचे जागीं लाला लजपतराय असेंब्लीचे सभासद झाले. १९२६ च्या निवडणुकींतहि ते पुनः असेंब्लींत निवडून आले व असेंब्लींतील राष्ट्रीय पक्षाचें अध्यक्षस्थान त्यांस मिळालें. पक्ष स्वतंत्र असला तरी पंडित मोतीलाल यांच्याशीं सहकारितेचें धोरण त्यांनीं ठेवलें होतें. अलीकडे ते हिंदुसभेच्या चळवळींतहि लक्ष घालीत व मुंबईस भरलेल्या हिंदूमहासभेच्या अध्यक्षस्थानावरून त्यांनीं केलेलें व्यापक दृष्टीचें व स्फूर्तिदायक भाषण पुष्कळांच्या स्मरणांत असेल. हिंदुसभेचे पुरस्कर्ते असूनहि राष्ट्रीय हितावरील त्यांची दृष्टि ढळली नव्हती, व सर्वपक्षीय योजना तयार झाल्यावर त्यांनीं तिलाच पाठिंबा दिला. मजूर—संघाच्या चळवळींतहि ते लक्ष घालीत व जिनीव्हा येथील ट्रे. यू. कॉंग्रेसला हिंदुस्थानाचे प्रतिनिधी म्हणून ते जाऊन आले. ब्रिटिश मजूर पक्षाचे पुढाऱ्यांत लालाजींचे कित्येक स्नेही आहेत. पण सायमन कमिशनासंबंधानें जे

धोरण स्वीकारलें त्यावरून साम्राज्यवादानें ब्रिटिश मजूर पक्षालाहि कसें ग्रासलें आहे याची त्यांना कल्पना आली. सायमन कमिशनवरील बहिष्काराच्या चळवळींत त्यांनीं पंजाबांत जोरानें चालना दिली व लाहोरला १४४ कलमाचें अस्त्र सरकारनें सोडलेलें पाहून बहिष्काराच्या मिरवणुकीचें नेतृत्व त्यांनीं पत्करलें.

तीनच महिन्यांपूर्वी त्यांचा मुक्काम पंधरा दिवस पुण्यास होता. त्या मुक्कामांत लो. टिळकांच्या पुण्यतिथीचे दिवशीं शिवाजीमंदिरांत त्यांचें जाहीर व्याख्यानहि झालें होतें. परंतु त्यांचा वाटोळा अंगलोट भव्य व मर्दानी रुबाब ज्यांनीं पूर्वी पाहिला असेल, व त्यांचा मेघांच्या गडागडाटाप्रमाणे दूरवर पोंचणारा आवाज ऐकला असेल, त्यांस या वेळची त्यांची खंगलेली मुद्रा व शरीरयष्टि पाहून व खोल गेलेला आवाज ऐकून त्यांच्या प्रकृतीविषयीं धास्ती वाटल्यावांचून राहिली नसेल. तथापि तेव्हांहि लालाजी आपणास आणखी दहापांच वर्षें सहज लाभतील अशीच सर्वांस आशा होती. परंतु राष्ट्राच्या या आशेचा भंग नोकरशाहीच्या दंडुकेगिरीनें केला असून पोलिसांनीं दिलेल्या ठोशांमुळें लजपतरायांसारख्या परम थोर व सच्छील देशभक्ताचा आत्मा अपमानानें व संतापानें कसा तडफडत होता हें त्यांनीं त्याप्रसंगीं काढलेल्या निर्वाणीच्या उद्गारांनीं जगास कळून चुकलेंच आहे. लाला लजपतराय यांची सेवा स्वदेशाच्या चरणीं अनेक अंगांनीं रुजू आहे. त्यांची वक्तृत्वशक्ति अमोघ होती. तशीच त्यांची लेखनशक्तिहि न दमणारी होती. त्यांनीं उर्दूंत व इंग्रजींत अनेक ग्रंथ लिहिले आहेत व त्यांपैकीं कित्येक ग्रंथ चिरकाल टिकणारेहि आहेत. माझिनी, गॅरीबाल्डी, शिवाजी, श्रीकृष्ण व दयानंदसरस्वती यांचीं चरित्रें त्यांनीं उर्दूंत लिहिलीं आहेत. त्याखेरीज 'आर्यसमाज' 'युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका' 'कॉल टू यंग इंडिया' 'नॅशनल एज्यूकेशन' व त्यांनीं अगदीं अलीकडे मिस मेयो या नागिणीच्या विषावर उतारा म्हणून रचलेलें 'अनहॅपी इंडिया' इत्यादि ग्रंथ इंग्रजींत प्रसिद्ध आहेत. त्याखेरीज उर्दूंत दैनिक 'वंदेमातरम्' व अलीकडे इंग्रजींत साप्ताहिक 'पीपल' हीं पत्रेंहि त्यांनीं चालविलीं होतीं. त्यांच्या सर्व लेखांतून त्यांची बुद्धिमत्ता व भाषाप्रभुत्व याबरोबरच त्यांची प्रामाणिक कळकळहि दृग्गोचर होते.

'सर्व्हंटस ऑफ पीपल'सोसायटी व 'टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स' या दोन राजकीय संस्था त्यांनीं स्थापन केल्या आहेत.यावरून गोखले व टिळक या दोन महाराष्ट्रीय पुढाऱ्यांतील चांगल्या गोष्टी निर्विकारतेनें ग्रहण करण्याची त्यांची प्रवृत्ति दिसून येते. त्यांनी देशसेवा ही धार्मिक व्रताप्रमाणें अंगिकारली होती. त्यांचें ध्येय निश्चित होतें व तें त्यांनीं तरुणपणापासून डोळ्यापुढें अखंड ठेवलें होतें. प्रबळ भावना व खोल विचार या दोनही शक्ति त्यांचें ठिकाणीं होत्या म्हणून कधीं विचारास भावनेची व कधीं भावनेस विचाराची जोड मिळाल्यामुळें ते आपल्या अवसानाबाहेर सहसा उडी मारीत नसत.पण त्यांच्या उक्तीच्या पाठीमागें कर्तृत्वशक्तीचा जोर असल्यामुळें तिचा प्रभाव सरकारावरहि पडत असे. या गुणामुळें पंजाबच्या पुढाऱ्यांत त्यांना अद्वितीय स्थान प्राप्त झालें होतें. युरोपांत व अमेरिकेंत पुष्कळ दिवस राहून आल्यामुळें त्यांना हिंदी लोकांतील कित्येक दोष ठळकपणानें दिसत.हिंदी लोकांत वैयक्तिक दृष्ट्या नीतिमत्ता व धर्मनिष्ठा उच्च प्रतीची असली तरी त्यांच्यांत सार्वजनिक कर्तव्यनिष्ठेचा व सार्वजनिक नीतिमत्तेचा अभाव आहे असें ते म्हणत. त्यांच्या या टीकेंत पुष्कळच तथ्य असून त्यापासून तरुणपिढीनें योग्य तो बोध जरूर घेतला पाहिजे.

सरकारी अधिकारी सपाट्यांत सांपडले म्हणजे लालाजी त्यांस टीकेचा वर्मी चोप देत. त्यामुळेंच चिडून जाऊन पंजाबचे माजी गव्हर्नर सर इबेटसन यांनीं त्यांची क्रांतिकारकांत गणना केली होती, व त्यांनींच लॉर्ड मोर्ले यांचे कान भरल्यावरून लालाजींस सरकाराच्या अविचारामुळें हद्दपारीवर जाण्याचा प्रसंग आला होता. पंजाबसरकारची त्यांजसंबंधानें हीच वृत्ति अखेरपर्यंत कायम होती. त्यांस लाहोरास मिळालेले ठोसे याच वृत्तीचे द्योतक होत. लो. टिळकांचे बाबतींत सरकारनें जी चूक केली तीच लालाजींच्या बाबतींत केली व अशा रीतीनें या दोनही थोर देशभक्तांस आमरण छळ सोसावा लागला. परंतु अशा प्रकारें झिजलेले देशभक्त हेच भावी स्वराज्याचे व स्वातंत्र्याचे आधारस्तंभ होत. त्यांची कर्तव्यनिष्ठा व तपश्चर्या स्वराज्याचा खडतर मार्ग चोखाळण्यास जनतेंत स्फुरण उत्पन्न करीत असते. लालाजी शेवटपर्यंत मनानें तरुण होते व त्याच गुणाच्या जोरावर देशांतील राजकीय पुढाऱ्यांत त्यांना आपलें स्थान कायम राखतां आलें. त्यांच्या मृत्यूमुळें केवळ पंजाबचीच हानि झाली नसून अखिल हिंदुस्थानास ही हानि जाणवणार आहे. नेहरू योजनेला उचलून धरून ती येत्या राष्ट्रीय सभेंतून निभावून नेण्यास लालाजींच्या मदतीची फार अपेक्षा होती. या दृष्टीनें त्यांची उणीव कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेस तीव्रतेनें भासेल. पण त्यांची स्मृतीच सद्यःस्थितींत पुढाऱ्यांना दूरदर्शीपणाचा मार्ग दाखवील अशी आम्हास आशा आहे.

# स्त्रियांचे हक्क व हिंदु कायदा

( लेखक—**गो. म. जोशी** )

**लेखांक ५ वा**

उद्वहेत द्विजो भार्यां सवर्णां लक्षणान्विताम् ।
असपिंडा च या मातुः असगोत्रा च या पितुः ॥
सा प्रशस्ता द्विजातीनां दारकर्मणि मैथुने ॥
हीनजातिस्त्रियं मोहादुद्वहन्तो द्विजातयः ।
कुलान्येव नयंत्याशु ससंतानानि शूद्रताम् ॥
मनु अध्याय ३

सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु ।
आनुलोम्येन संभूता जात्या ज्ञेयास्त एव ते ॥
स्त्रीष्वनन्तरजातासु द्विजैरुत्पादितान् सुतान् ।
सदृशान् एव तान् आहुर्मातृदोषविगर्हितान् ॥
अनन्तरासु जातानां विधिरेष सनातनः ।
द्व्येकांतरासु जातानां धर्म्यं विद्यादिमं विधिम् ।
शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ।
क्षत्रियाजातमेवं तु विद्याद्वैश्यात्तथैव तु ॥
व्यभिचारेण वर्णानाम् अवेद्यावेदनेन च ।
स्वकर्मणां च त्यागेन जायन्ते वर्णसंकराः ॥
जातो नार्याम् अनार्यायाम् आर्यादार्यो भवेद्गुणैः।
जातोऽप्यनार्यात् आर्यायामनार्य इति निश्चयः॥
अनार्यमार्यकर्माणम् आर्यं चानार्यकर्मिणम् ।
संप्रवेक्ष्याब्रवीद्धाता न समौ नासमौ इति ॥
मनु अध्याय १०

स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ।
उत्सीदेयुरिमे लोकाः न कुर्यां कर्मचेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥
भगवद्गीता

"In a population of pure lines, the process of selection for any real qualities is simpler than in a hybrid population, for it consists merely in finding one or few individuals with the desired qualities and giving them opportunity for increased propagation."
Heredity and Eugenics
Gates 221.

'शुद्धवंशीय प्रजेमध्यें कोणत्याहि खरोखरीच्या आवश्यक गुणाची निवड करणें मिश्रवंशीय प्रजेमधून निवड करण्यापेक्षां फार सोपें असतें. ते गुण असलेली एक अथवा अनेक व्यक्ती घेऊन त्यांच्या प्रजोत्पादनाला जास्त वाव दिली म्हणजे झालें.' गेटस.

आतां या लेखामध्यें घटस्फोट व पुनर्विवाहाचे हक्क आणि अनुलोम व प्रतिलोमपद्धतीनें कोणत्याहि जातींतून वर पसंत करण्याची परवानगी याचा विचार करावयाचा राहिला. याला पोषक म्हणून प्रथमतः खालील चर्चा करावी लागेल (१) जातिनिरपेक्ष निवळ स्त्रीपिंड व पुरुषपिंड घेतल्यास परिणामाच्या दृष्टीने कोणाचें कोणावर प्राबल्य (डॉमिनन्स) आहे ? म्हणजे एकमेकांशीं संबंध झाल्यानें पुरुषाचें प्रजोत्पादक तत्त्व स्त्रीगुणग्रहण करतें कीं स्त्रीचा पिंड पुरुषगुणग्रहण करतो ? (२) जे आज विजातीय मानले जातात त्यांचे विवाह झाल्यास वंशशास्त्रदृष्ट्या काय परिणाम होतील ?

## स्त्रीपिंड व पुरुषपिंड

स्त्रीपिंड व पुरुषपिंड यांच्या संबंधांत कोणाचा कोणावर परिणाम होतो तें पाहावयाचें. पुरुषाचा प्रजोत्पादक पिंड (जर्म-प्लाझम) हा कोणताहि फरक पावत नाहीं हा सिद्धांत सर्व वंशशास्त्राचा पाया आहे. 'बापलेकामध्यें साधर्म्य असतें याचें कारण बापापासून मुलाला कांहीं गुण येतात असें नसून त्यांच्यामध्यें सावत्र भावंडाचें नातें असतें. म्हणजे ते एका शुक्रबिंदूपासून निराळ्या स्त्रियांचे ठिकाणीं जन्माला आलेले असतात' याला मनु 'जायायास्तद्धि जायात्वं यदस्यां जायते पुनः' असें म्हणतो तर याज्ञवल्क्यहि 'यदस्यां जायते पुनः' असें म्हणतो. उलट स्त्रीपिंडासंबंधीं 'टेलेगानी' शास्त्राचें मत असें आहे कीं, ज्या पुरुषाशीं स्त्रीचा प्रथम संबंध आला त्या पुरुषाचे गुण ती उचलीत असते. जास्त स्पष्ट करून सांगावयाचें तर ज्या पुरुषाशीं स्त्रीचा प्रथम संबंध आला तो पुरुष नष्ट झाल्यानंतर तिला दुसऱ्या एखाद्या पुरुषापासून संतति झाली तर ती कांहीं खेपांपर्यंत तरी पहिल्या पुरुषाशीं सदृश होते. अशी कांहीं तरी गोष्ट स्त्रीपिंडांत घडत असावी. याबाबत मेरिआ स्टोप्स या बाईनें खालीलप्रमाणें मत दिलें आहे 'पुरुषाच्या रेतांतील श्रेष्ठ उत्तेजक द्रव्यांना स्त्रीच्या पिंडांत घुसून त्यामध्यें पिंडगत (organic) फरक घडवून आणणे शक्य आहे व तसा तीं तो फरक घडवून आणीत असलीं पाहिजेत असें मला वाटतें' यालाच मनु 'यादृशं भजते हि स्त्री सूतं सूते तथाविधम्' 'यादृग्गुणेन भर्त्रा स्त्री संयुज्येत यथाविधि। तादृग्गुणा सा भवति समुद्रेणेव निम्नगा' असें म्हणतो. मग आम्ही असा सरळ प्रश्न विचारतों कीं प्रत्येक आघाताबरोबर ज्याच्यामध्यें फरक पडतो अशा स्त्रीपिंडाला ज्याच्यामध्यें मुळींच फरक पडत नाहीं अशा पुरुषपिंडाच्या बरोबरीनें हक्क असू

शकतील काय? व्यभिचारी किंवा अनेक भार्या करणारा पुरुष स्वतःच शरीरनाश किंवा उपदंशादि विकारांची वाढ करणारा या दृष्टीनें सर्वथा त्याज्य आहे. परंतु त्याची म्हणून जी संतति होते तिच्यांत त्याच्याकडून गुणसंकर होत नाहीं हा नियम लक्षांत ठेवून भगवद्गीता म्हणते कीं 'स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः' या गोष्टीचा विचार पुनर्विवाहादि प्रश्नांत व्हावयास नको काय? घटस्फोट ज्या प्रमाणांत वाढत जातात त्या प्रमाणांत समाजांत आत्महत्यांचें व वेड लागण्याचें प्रमाण वाढत जातें. (पाहा 'ल सुइसाईड' प्रो. डर्केहेम, 'रिव्ह्यु द फिलॉसफी' च्या फेब्रुवारी १९०७ च्या अंकांतील हिलचा निबंध, वेस्टर मार्क व्हा. तिसरा इत्यादि.) ही गोष्ट लक्षांत घेऊन आम्ही असें विचारतो कीं, विवाह हा आजन्म न मोडणारा संस्कार असावा असें म्हणणारें धर्मशास्त्र हें काय वेड्यापिरांनीं रचलेलें आहे?

आतां शेवटीं संकरविवाहांचा विचार करावयाचा. तो करण्यापूर्वी मेंडेलचा अगदीं सोपा नियम देऊं. जी प्रजा $(a+b)^2=a^2+2ab+b^2$ या नियमानें वाढते त्यापैकीं ab ही संकर प्रजा व तो टाईप कधींच स्थिर होत नाहीं. यालाच मनु म्हणतो, 'न कथं च न दुर्योनिः प्रकृतिं स्वां नियच्छति' या विवाहांना युरोपमध्यें शास्त्रज्ञ ज्या मर्यादा घालतात त्या अशा कीं रक्त फार दूरचीं असूं नयेत व फार जवळचीं असूं नयेत. त्याला तिकडे Consanguinity आणि Hybridism म्हणतात. आमच्याकडे या मर्यादा एका बाजूला सगोत्र व सपिंड हे त्याज्य व दुसऱ्या बाजूला जात्यंतर त्याज्य अशा घातलेल्या आहेत व त्या अर्थातच शास्त्रीय आहेत. आतां विजातीय विवाहामध्यें किती पक्षोपपक्ष होतात तें पाहू. (१) तुल्यवर्ण, तुल्यजाती व तुल्यसंस्कार ही सर्वश्रेष्ठ पद्धति. हीच आज हिंदु समाजांत चालू आहे, (२) तुल्यवर्ण, अतुल्यजाती व तुल्यसंस्कार ही पद्धति सुरू व्हावी असें पोटजाती मोडून टाकाव्या असें म्हणाऱ्यांचें म्हणणें आहे, (३) तुल्यजाती व अतुल्यसंस्कार या पद्धतीनें समाजांत कोणतेहि घोटाळे माजत नाहींत. कारण आम्हीं असें दाखविलें आहे कीं संस्कारांचा प्रजातंतूवर कांहींच परिणाम होत नाहीं, (४) अतुल्यजाती व तुल्यसंस्कार व त्यांतच अनुलोम व प्रतिलोम. यांत अनुलोम व प्रतिलोम याचा विचार पाश्चात्यांनीं अजून केलेला नाहीं. परंतु ते लवकरच करूं लागतील असें दिसूं लागलें आहे. वरील पहिल्या तीन पक्षांच्या बाबतींत फारशी चर्चा करण्याचें कारण नाहीं. त्यापैकीं दुसऱ्या पक्षाबद्दल आम्हाला थोडेसें बोलावयाचें आहे. याला इंग्रजी ग्रंथकार (इर्रिलेटेड रेसेस) Irrelated races म्हणतात व मनु अनन्तरजाता स्त्री म्हणतो. 'स्त्रीष्वनन्तरजातासु द्विजैरुत्पादितान् सुतान्.' अशा विवाहांत कांहीं फारसे वाईट परिणाम निदान दुसऱ्या पिढींत दिसत नाहींत असें डॉक्टर गेटस म्हणतो तर मनु त्यांना 'सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान्' असें म्हणतो. आमची यावरील शंका थोडीशी दुसऱ्या स्वरूपाची आहे. रेमंड पर्ल म्हणतो, आज वेगवेगळ्या युरोपियन वंशांत जर संकर झाला तर जी संतति उत्पन्न होते तीमध्यें पुरुष–जननाचें प्रमाण जास्त पडतें. (रिलेशन ऑफ रेस क्रॉसिंग टु दि सेक्स रेशिओ १९०८.) म्हणून हा प्रश्न हातांत घेणारांनीं जरा काळजीपूर्वक वागलें पाहिजे असें वाटतें.

## संकर प्रजा

आतां जात्यंतरांतील विवाहासंबंधीं इतकेंच सांगावयाचें कीं, दूरच्या रक्तांचे संबंध आले असतांना व 'गुणकर्मविभागशः' (मग त्याचा अर्थ कांहींहि असो.) समाजरचना मान्य केल्यास त्याचे समाजावर काय परिणाम होतात या बाबतींत पाश्चात्य देशांत इतकें वाङ्मय झालें आहे कीं, तें सर्व येथें सांगणें अशक्य आहे; म्हणून सर्व चर्चेंतून निष्पन्न होणारे कांहीं सिद्धांत तेवढे देऊं. 'दूरच्या रक्तांतील स्त्री-पुरुषांत घडून येणारे विवाह समाजांत कांहीं अत्यंत निरर्थक प्रश्न उत्पन्न करतात व थोडक्यांत सांगावयाचें तर ते सर्वथा त्याज्य आहेत. अशा लग्नांनीं पुढारलेले वंश निर्बल (diluted) होऊन हळूहळू अधोगतीला जातात व कांहीं मागसलेल्या मानसिक व नैतिक गुणधर्मांना कांहीं सद्गुणाच्या शेजारानें उगीच वरची जागा प्राप्त होते!' 'वंशांतील गुण ('Unit Traits) हजारों वर्षें झालीं तरी तसेच दिसून येतात व नसलेले गुण कधींहि नवीन उत्पन्न होत नाहींत.' 'लहान जीवणी व मोठाले दांत, मोठाले पुरुष परंतु सूक्ष्म अशी शरीरांतील यांत्रिक रचना, किंवा अपुरी अशी रुधिराभिसरणपद्धति वगैरे वेगवेगळ्या शारीरिक विसंगती उत्पन्न होतात व त्यामुळें त्या पिंडावर पावलोपावलीं फरक करण्याचें ओझें येऊन पडतें. 'ही गुणांची स्वतःसिध्द (Segregation) राहाण्याची शक्ति अशी आहे कीं, त्यामुळें एकाच व्यक्तीमध्यें अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत निकृष्ट असे गुण एकसमयावच्छेदेंकरून राहूं शकतात.'' संकर प्रजेच्या बाबतींत शारीरिक, मानसिक, भावनात्मक वगैरे सर्व तऱ्हांच्या विसंगती दिसून येतात व त्यामुळें ती प्रजा भोंवतालच्या परिस्थितीशीं एकरूप केव्हांच होत नाहीं आणि ही गोष्ट आत्यंतिक दुःखाला कारण होते. संकर प्रजा ही नेहमीं अस्थिर वृत्तीची व असंतुष्ट

मनाची असते. आणि समाजांत दिसून येणारी बरीच गुन्हेगारी व बरेचसें वेड लागण्याचें प्रमाण हे माता-पित्यापासून आलेल्या मानसिक व भावनात्मक (mental and temperamental) विसंगतीचा परिणाम आहेत. अशा तऱ्हेच्या विभिन्न तत्त्वापासून श्रेष्ठ प्रजा निर्माण होईल असें मानणें म्हणजे निवळ वेडगळपणा आहे'. म्हणून आम्ही म्हणतों, जात्यंतर विवाह हें अत्यंत त्याज्य तत्त्व आहे. विवाहाच्या बाबतींत कुल व जाति हा मुख्य प्रश्न असून शिक्षण, प्रेम, समान स्वभाव, सुखदुःखें हे प्रश्न अत्यंत गैरलागू आहेत.

बॅ. जयकर ज्या हक्काकरितां स्त्रियांच्या बंडामध्यें नेतृत्व घेणार आहेत त्यांची समाजरक्षणाच्या दृष्टीनें अशी ही स्थिति; म्हणून समाजाला मला इतकेंच सांगणें आहे कीं बाबांनों, हजारों वर्षे ज्या नियमांनीं आपली संस्कृति ताजीतवानी ठेविली ते नियम सोडूं नका. शेवटीं भगवच्छब्दांत 'मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव' इतकी विनंति करून ही लेखमाला जनताजनार्दनाच्या पायावर अर्पण करतों.

# महाराष्ट्रीय सर्वपक्ष--परिषद

## पुणें ता. १८ नोव्हेंबर १९२८

### अध्यक्षांचें भाषण

परिषदेच्या कामास रविवार ता. १८ रोजीं सकाळीं सार्वजनिक सभेच्या मोठ्या सभागृहांत प्रारंभ झाला. अध्यक्ष श्री. **न. चिं. केळकर** यांनीं पुढील आशयाचें भाषण केलें:—

"महाराष्ट्रांत आतांपर्यंत नेहरू कमिटीच्या रिपोर्टासंबंधानें बराच प्रचार झाला आहे. आजची ही सर्वपक्षीय महाराष्ट्रीय परिषद त्यासाठींच भरलेली आहे. विधायक व विध्वंसक कार्याचें उद्दिष्ट एकच असलें म्हणजे तीं परस्पर-पोषक होतात. सायमन कमिशनाचा विध्वंसक बहिष्कार व नेहरू रिपोर्टाचा विधायक पुरस्कार हीं दोनही मिळून सध्याच्या राजकीय परिस्थितीचें पूर्ण चित्र तयार होतें. नेहरू रिपोर्टास पाठिंबा देण्यासाठीं ता. २८ आक्टोबरला पुण्यास सर्वपक्षीय जिल्हापरिषद झाली व इतर जिल्ह्यांतूनहि परिषदा भरल्या नसल्या तरी सभांच्या रूपानें रिपोर्टास पाठिंबा देण्यांत आला आहे.

या महिन्याचे प्रारंभीं दहा मंडळींचें प्रातिनिधिक शिष्टमंडळ नगर, नाशिक, जळगांव, धुळें, इ. ठिकाणीं रिपोर्टाचा प्रचार करून आलें आणि पुढें सोलापूर, कुलाबा व रत्नागिरीकडे जाण्याचा विचार आहे. मध्यंतरीं सर्व प्रांतांचें मत एकमुखी रीतीनें दिग्दर्शित करण्यासाठीं ही परिषद भरविण्यांत येत आहे. परिषदेस आलेल्या प्रतिनिधींचें मी अभिनंदन करतों.

नेहरू रिपोर्ट हा योग्य वेळीं तयार झाला व राष्ट्राच्या जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीस त्यानें मूर्त स्वरूप दिलें व तेंहि बहुतेक सर्व मोठ्या राजकीय पक्षांना पसंत पडेल अशा रीतीनें. कांहीं बाजूंनीं रिपोर्टास विरोध झाला तरी तो विरोधहि रिपोर्टाच्या मुख्य भागासंबंधानें नाहीं, ही गोष्ट पुष्कळ लोक विसरतात. नेहरू रिपोर्टाचा मुख्य भाग म्हणजे पूर्ण जबाबदार राज्यपद्धतीची योजना. जबाबदार राज्यपद्धति कां दिली पाहिजे यासंबंधानें गेलीं कित्येक वर्षे कॉंग्रेस व इतर राजकीय संस्था समर्थन करीत आहेतच. नेहरू रिपोर्टाच्या प्रस्तावनेमध्ये यासंबंधाच्या कांहीं नव्या आक्षेपांचाच थोडक्यांत विचार केला आहे. मुख्य नेहरू रिपोर्ट म्हणजे भावी हिंदी राज्यघटनेचा ८७ कलमांचा मसुदा होय. हिंदी राज्यघटनेचें स्वरूप, नागरिकत्वाचे हक्क, हिंदी पार्लमेंट, प्रांतिक कायदेमंडळें, प्रांतिक व मध्यवर्ती मंत्रिमंडळ, न्यायखातें, सिव्हिल सर्व्हिस, राष्ट्रसंरक्षणखातें व परराष्ट्रीय संबंध इतके विषय त्यांत येतात. या सर्वांमध्यें फक्त कायदेमंडळांतील जागांची जातवार वांटणी, मतदारसंघ व प्रांतांची पुनर्घटना यासंबंधानेंच काय तो वाद आहे. पण हे वादविषय नेहरू रिपोर्टाच्या मुख्य भागांत दिलेले नाहींत. त्यांचें विवेचन निराळें केलें आहे. जबाबदार राज्यपद्धति ही मुख्य असून हे वाद गौण आहेत, असेंच नेहरू कमिटीचें मत आहे. मतदारसंघ व प्रतिनिधित्व यासंबंधानें भिन्न मतें असलेल्या लोकांचीहि मूळ ८७ कलमी जबाबदार राज्यपद्धतीच्या योजनेला मान्यता आहे. म्हणून अडचणीचा प्रश्न कोणाला विचारावयाचा तर तो लोकांपेक्षां सरकारालाच असा विचारला पाहिजे कीं, नेहरू रिपोर्टाचीं हीं सर्वमान्य ८७ कलमें तुम्ही मान्य करावयास तयार आहांत काय?

दक्षिण-आफ्रिकेप्रमाणें हिंदुस्थानांतहि सर्व पक्ष मिळून ठरवतील ती राज्यघटना ताबडतोब पार्लमेंटाकडून मंजूर करून अमलांत आणण्याचा ब्रिटिशांनीं करार केला तर सर्व पक्षांचें परिपूर्ण ऐक्य होऊन

एकमुखी योजना होऊं शकेल. पण अशा प्रकारचें वचन न देतां सरकार आमच्या योजनेंतील किरकोळ वादग्रस्त प्रश्नांचा बाऊ करीत आहे. सरकार पूर्ण जबाबदार राज्यपद्धति देण्यास तयार असेल तर मतदारसंघासंबंधाचीं स्वतःचीं मतें बाजूस ठेवून ठरेल त्या सामान्य योजनेस आम्ही पाठिंबा देऊं. बेझंटबाईंना सार्वत्रिक मताधिकार पसंत नाहीं. पण आपल्या हयातींत हिंदुस्थानास पूर्ण स्वातंत्र्य मिळण्याची संधि दिसल्यास त्या आपला वैयक्तिक हरकत बाजूस ठेवतील. भिन्न भिन्न व्यक्ती विचार करण्यास बसल्या असतां कोठेंहि असे मतभेद होणारच. दक्षिण--आफ्रिकेंतील राऊंड टेबल कॉन्फरन्सलाहि असल्याच मतभेदांतून मार्ग काढावा लागला असेल. पण त्यांचे मतभेद नाहींसे होण्याला जसें सरकारचें स्पष्ट वचन होतें तसें तें हिंदुस्थानांत नाहीं. फार कशाला, आजचें ब्रिटिश मंत्रिमंडळ घेतलें तरी त्याचे सर्व निर्णय एकमतानें होतात काय ? त्यांच्यांतहि मतभेद होतात व बहुमताच्या निर्णयापुढें वैयक्तिक मतें बाजूला ठेवावीं लागतात. हिंदी बहुमताचा निर्णय मान्य करण्याचें वचन सरकार देत असेल तर सर्व पुढारी अगदीं एकमुखी अशी योजनाहि करून देतील. पण सरकार हा प्रामाणिकपणाचा मार्ग स्वीकारीत नाहीं, स्वतः लोकांपुढें योजना मांडीत नाहीं व लोकांनीं केलेल्या योजनेंतील दोष काढीत आहे. सरकाराजवळ ' जबाबदार राज्यपद्धतीचें क्रमशः आक्रमण ' ( प्रोग्रेसिव्ह रिॲलिझेशन ऑफ रिस्पॉन्सिबल गव्हर्मेंट ) एवढीच एक विकृत शब्दयोजना तयार आहे. पण या बाबतींत लोकमान्य टिळकांनीं ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे ' या मंत्रानें सरकारला उत्तर दिलेंच आहे जन्मसिद्ध हक्क हा कांहीं तुकडे तुकडे करून व वारंवार परीक्षा घेऊन द्यावयाचा नसतो.

महायुद्धांत स्वयंनिर्णयाचें तत्त्व बाहेर आलें तेव्हां त्याला अशी परीक्षांचीं व हप्त्यांचीं बंधनें नव्हतीं. जबाबदारीशिवाय नुस्ती प्रातिनिधिक राज्यघटना, पहिला हप्ता म्हणून प्रसृत करणें या गोष्टीला महायुद्ध सुरू होण्याच्याहि पूर्वी आठ वर्षें मि. चर्चिल यांनीं ट्रान्सवालचे बाबतींत विरोध केला होता. जबाबदारीशिवाय प्रातिनिधिक राज्यपद्धति चालू केली असतां केव्हांहि व कोठेंहि ती जाचकच झालेली आहे. वसाहतींच्या राज्यपद्धतीच्या संबंधीं विचार करणाऱ्या प्रत्येक विचारी लेखकानें असली पद्धति रद्द ठरविली आहे. पूर्ण जबाबदार राज्यपद्धती देण्याचे बाबतींत अडथळे आणणाऱ्यांवरच ते अडथळे कां आणतात याचें उत्तर देण्याची जबाबदारी पडते असें चर्चिल यांनीं म्हटलें होतें.

हिंदू व मुसलमान मिळून जें मागतील तें देऊं अशी सरकारनें आजहि हमी दिली तर उभय जातींतील भेद नाहींसे होतील. किंवा नेहरू कमिटीच्या रिपोर्टांतील मुख्य ८७ कलमें आज सर्वांना मान्य असल्यामुळें तेवढीं अमलांत आणण्याबद्दल सरकारने जाहिरनामा काढावा. मग मतदारसंघ संयुक्त असावेत अगर विभक्त असावेत व कोणाला किती जागा द्याव्यात यासंबंधानें सरकारनें हवा तो निर्णय केला तरी आम्हास चालेल.

पण ब्रिटिश साम्राज्यांतील लहान वसाहतींना साम्राज्यानें जो न्याय लागू केला, किंवा युरोपियन राष्ट्रांनीं छोट्या राष्ट्रांना जो न्याय लागू केला तो देखील हिंदुस्थानाचे बाबतींत लागू करण्यांत येत नाहीं. अपमानकारक हत्तेबंदी, पोकळ परीक्षा, क्रमाक्रमानें विचार व कर्मांत कमी मागणी कोणती याचा कांटेतोल शोध इ. उपमर्द हिंदुस्थानाच्याच वांट्याला येत आहेत. यासाठींच सर्व हिंदुस्थान सायमन कमिशनाच्या फसवणुकीविरुद्ध उठलें असून, किरकोळ मतभेद बाजूस ठेवून नेहरू रिपोर्टास मान्यता देण्यास तयार झालें आहे. सर्व पक्षांना मान्य होण्यासारखा यापेक्षां अधिक चांगला रिपोर्ट तयार होणें शक्य नाहीं.

मुसलमान व अस्पृश्य यांच्या विरोधापेक्षां स्वातंत्र्यसंघाच्या विरोधाचें महत्त्व अगदींच कमी. कॉंग्रेसमधील उभय दलांचा ऑ. इं. कॉं. कमिटींत समेट झाला ही चांगली गोष्ट झाली, पण हा समेट झाला नसता तरी त्यापासून नेहरू रिपोर्टाला अपाय झाला असता असें समजणें वेडेपणाचें आहे. उलट स्वातंत्र्यसंघाच्या चळवळीनें 'डोमीनियन स्टेटस'च्या मागणीला जोर आलेला आहे. स्वातंत्र्यसंघाच्या कल्पनेपासून सरकारनें हा इषारा घेतला पाहिजे कीं, हिंदुस्थानाला डोमीनियन स्टेटसहि दिलें नाहीं तर आयर्लंडप्रमाणें हिंदुस्थानांतहि ' डी व्हॅलेरा ' निर्माण होतील.

सायमन कमिशनाला होणाऱ्या विरोधाचा परिणाम कमिशनावर खास होत आहे. सहकारिता करण्यास लाभलेले कौन्सिलांतील गण व साक्षीदार यांच्या संबंधानें सायमन यांना खास असमाधान वाटत असेल. बहिष्कारवादी पुढाऱ्यांचें महत्त्व यांच्या मनाला पटलें असलें पाहिजे व बहिष्काराच्या चळवळीनें त्यांच्या मनाला खंती वाटत असली पाहिजे. जिना यांचा नेहरू रिपोर्टाला विरोध असेल. पण त्यापेक्षांहि त्यांचा सायमन कमिशनाला असलेला विरोध कमिशनास अधिक जाचक होणारा आहे. जिना व नेहरू यांच्यांत किरकोळ मतभेद असले तरी सायमन कमिशनाचा बहिष्कार व डोमीनियन स्टेटसची मागणी या बाबतींत ते एकच आहेत.

कलकत्ता कॉंग्रेसमध्यें नेहरू रिपोर्टाला सुलभतेनें मान्यता मिळेल अशी मला आशा आहे. जिना यांनींहि ही गोष्ट लक्षांत आणावी कीं, फाजील मुत्सद्दीपणा हा आंगलट येतो. यासाठीं त्यांनीं सर महंमद शफी यांच्याशीं एखादी जाचक होणारी तडजोड करण्यापेक्षां, डॉ. अन्सारी व अबुल कलाम अझाद यांच्या मतास मुस्लीम लीग पाठिंबा देईल असाच प्रयत्न करून आपला राष्ट्रीय बाणा सार्थ करावा. जिना यांनीं सायमन कमिशनासंबंधीं जें धोरण स्वीकारलें आहे तें, नेहरू रिपोर्टास त्यांनीं पाठिंबा न दिल्यास निरर्थक ठरणार आहे.

# संस्थानिकांची स्वार्थी कारवाई

## वर हात खालीं लाथ !

'बाजार भरण्याच्या आधींच उचल्ये कंबर बांधतात' अशी एक म्हण आहे ! स्वराज्याच्या चालू चळवळींत या म्हणीचा प्रत्यय मोठा मौजेचा आला. स्वराज्याचा बाजार अजून हिंदुस्थानांत भरावयाचाच आहे. पण त्याच्या आधींच उचल्या संस्थानिकांनीं गुजरीच्या दंगलींत काय हाताला लागेल तें उपटून पळून जाण्याला जणू काय कंबरा बांधल्या ! गतवर्षी सायमन कमिशन नेमण्यांत आलें तें आणखी कांहीं नवे हक्क देतें, कीं दिलेले कांहीं जुनेच हक्क काढून घेतें, याची अद्यापि वानवाच आहे. पण यामुळें जणु कांहीं "हिंदपुत्राच्या हातीं आतां संपूर्ण स्वराज्य आलें व आपली धडगत राहिली नाहीं, म्हणून राजे-बादशहांनीं आपल्या संरक्षणाला धांवलें पाहिजे" असा संस्थानिकांनी धावा मांडला ! दुसरे पणाची बायको लाडकी खरी, पण नवरा मरण्यापूर्वीच सावत्र मुलाकडून अन्नवस्त्र मागण्याकरितां एखाद्या सधवा-विधवेने कोर्टांत अर्ज करावा तशी संस्थानिकांच्या हातून ही घिसाड घाई झाली खास ! सायमन कमिशनाबरोबर त्यांनीं बटलर कमिटी नेमवून घेतली. आणि २० लक्ष रुपयांचा मलिदा चारलेला बॅरिस्टर तिच्यापुढें उभा करून, 'भावी हिंदी स्वराज्याशीं आमचा कांहींएक संबंध राहूं नये' अशी तक्रार निर्लज्जपणानें उघड मांडली. पण नेहरू कमिटीच्या रिपोर्टांत या कांगावखोर तक्रारीला खरपूस उत्तर दिलें आहे. आणि संस्थानी प्रजेच्या वतीनें दि. ब. रामचंद्रराव व प्रो. अभ्यंकर यांनीं विलायतेंत चळवळ सुरू केली आहे. हिंदी स्वराज्याच्या चळवळीला अपशकून करण्याकरितां स्वतः सरकारनें संस्थानिकांच्या लोभाचा भस्मासुर निर्माण केला, तो संस्थानी प्रजेप्रमाणें गव्हर्नर जनरलाच्या डोक्यावरहि हात ठेवूं पाहात आहे. पण संस्थानिकांनीं लक्षांत ठेवावें कीं आपलें काम झाल्याबरोबर इंग्रज सरकार या भस्मासुराचा हात त्याच्याच डोक्यावर ठेवावयाला लावून त्याचें पुनः भस्म करणार आहे ! उगीच गमजा नकोत !

एका गोष्टींत चार गोष्टी साधाव्या त्याप्रमाणें या संस्थानिकांनीं आरंभिलेली कारवाई चौफेर आहे. ती अशी-(१) जुने तह व करारनामे वज्रलेप करून घ्यावयाचे. (२) हिंदुस्थानसरकारचा संबंध तोडून टाकावयाचा व तो थेट बादशहाशीं जोडावयाचा. (३) आपल्या अंतर्व्यवस्थेत म्हणजे संस्थानी प्रजेच्या कारभारांत गव्हर्नर जनरलांनींच काय पण खुद्द राजेसाहेबांनींहि हात घालूं नये असें ठरवून घ्यावयाचें. आणि (४) आपले जे कोणी मांडलीक असतील नसतील त्यांच्यावर अधिराजत्व संपादावयाचें. यांपैकी पहिल्या तीन मुद्द्यांची चर्चा सर्वत्र सुरूच आहे. परंतु चौथा मुद्दा लोकांच्या डोळ्यापुढें अद्यापि तितकासा आलेला नाहीं. म्हणून त्याचेंच थोडेसे विवेचन करण्याचें आज आम्हीं योजिलें आहे.

हिंदुस्थानांत सुमारें सातशें 'संस्थानें' आहेत. यांत हैद्राबादच्या निजामापासून तो लहानांत लहान संस्थान नहारा (रेवाकांठा एजन्सी) येथपर्यंत सर्वांचा समावेश होतो. "श्वानं युवानं मघवानमाह" या सुभाषितांत वर्णिलेल्या विचारी पाणिनीच्या अविचाराप्रमाणें ही लहान मोठीं संस्थानें एकाच सूत्रांत गोंविलेलीं आहेत, व तें सूत्र म्हटलें म्हणजे 'परवशता.' पण या परवशतेचा विसर पाडून घेण्याचे प्रकार मात्र अनंत आहेत. कोणी संस्थानिक आम्ही बादशहाच्या बरोबरीचे 'मित्र व दोस्त' म्हणवितात. कोणी अगदींच मित्र व दोस्त म्हणवून घेण्याला लाजतात, पण आम्ही 'स्वतंत्र' आहों असें म्हणून स्वाभिमान संभाळतात. कोणी बोलूनचालून मांडलिक आहेत, पण आम्ही जबाबदार असलों तरी खुद्द ब्रिटिश सरकारला, वरिष्ठ संस्थानिकाला नाहीं असा हक्क सांगतात. या सर्व ब्रह्मघोटाळ्याचें खरें कारण असें कीं, कंपनीसरकारनें सांपडेल तेथें, सांपडेल तेव्हां, सांपडला तसा उणा पुरा, खरा किंवा नांवाचा तह प्रत्येक संस्थानिक म्हणविणाराशीं केला आहे; व जेथें तह नाहीं तेथें चालू वहिवाटीनें ती उणीव भरून काढली आहे.

इंग्रज सरकारच्या ताब्यांत हा अभागी देश आण्याच्या वेळीं त्याची स्थिति कशी विस्कळित होती, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत कसा नव्हता, जो तो आपापल्यापुरतें कसें पाहात होता, याची कल्पना येण्याला संस्थानिकांचा इतिहास हें उत्तम साधन आहे! असो. जोंपर्यंत संस्थानिकांत चळवळच नव्हती, व जो तो कोणीकडून तरी व्यक्तिशः आपलें बस्तान सरकारार्शी बसविण्याचा प्रयत्न करीत काळ कंठीत झुरत होता,तोंपर्यंत संस्थानी राजकारण हें पडदानशीन स्त्रीप्रमाणें गुप्त स्वरूपांत होतें. पण अलीकडे संस्थानिकहि कांहीं अंशीं पडदा बाजूला सारून पुढें येऊन सामुदायिक चळवळ करावयास शिकले. पण त्यामुळें त्यांच्या परवशतेच्या जाळ्याचे धागेदोरे लोकांना अधिक दिसूं लागले.

इकडे सरकारनेंहि संस्थानिकांच्या चळवळीला मान दिल्यासारखें दाखवून 'चेंबर ऑफ प्रिन्सेस' (नरेंद्र मंडळ) नांवाची सभा स्थापली; व आतां तर बटलर कमिटी नेमल्यामुळें सरकार व संस्थानिक यांच्या नात्यागोत्याची सगळीच जमीन कायदेपंडितांच्या युक्तिवादांच्या फाळानें नांगरून निर्धुं घातली आहे. नरेंद्र मंडळ स्थापल्यामुळें संस्थानिकांची मर्गवारी करणें भाग पडलें. आणि संस्थानिक सातशें असले तरी तह करारनामा अशा कायदेशीर गोष्टींचे प्रकार दोनतीनच असल्यामुळें, मोठ्याबरोबरच लहान संस्थानिकांच्या हक्कांचा विचार डोळ्याआड करणें कठिण झालें. अजूनहि कांहीं संस्थानिक नरेंद्र मंडळाला भेट देत नाहींत व त्यांत बसत नाहींत. कांहीं संस्थानिक बटलर कमिटीकडे तुच्छतेनें बघत नसले तरी, श्रम व खर्च न लागतां आपलें काम परस्पर होऊन जाईल अशा मुत्सद्देगिरीच्या विचारानें जागा धरून बसले आहेत. पण उलट कांहीं संस्थानिकांना नरेंद्र मंडळांत स्थान नसतां, किंवा बटलर कमिटीकडून निमंत्रण नसतांहि, त्यांनीं आपले दूत कमिटीच्या पाठीवर सोडून आपल्या हक्कांची जाणीव व दक्षता प्रगट केली आहे!

एकंदर संस्थानांची संख्या सुमारें सातशें असली तरी नरेंद्रमंडळांत फक्त सुमारें अडीचशेंचाच समावेश प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष झालेला आहे. व बटलर कमिटीनें आपली प्रश्नावली इतक्यांकडेच पाठविली आहे. पण या कमिटीच्या चौकशीचें फळ पदरांत पडावयाचें तें यांच्याहून फार थोड्या संस्थानिकांच्या पदरांत. 'वर हात खालीं लाथ' या शब्दांनीं ज्यांच्या धोरणाचें वर्णन आम्हीं वर केले आहे तें याच संस्थानिकांच्या धोरणाचें. कारण तहांचा आधार दाखवून एकीकडे त्यांना आपल्या अधिकाराची बढती करून घ्यावयाची आहे, तर दुसरीकडे त्यांना हे तह गुंडाळून ठेवून किंवा पायाखालीं तुडवून, आपल्या अंकित किंवा मांडलिक संस्थानांचें आज असलेलें थोडेंबहुत स्वातंत्र्यहि नष्ट करावयाचें आहे! एकवीस वर्षे वयाच्या प्रत्येक हिंदी स्त्रीपुरुषाला मतदारीचा हक्क असावा, व तो लोकसत्ताक स्वराज्याचा सरदार बनावा, ही नेहरू कमिटीची उदार शिफारस कोणीकडे? आणि आपला बडेजाव वाढवितांना त्याचबरोबर आपल्या वर्गांतील इतरांचा मानमरातब कमी करण्याची संस्थानिकांची नीच कारवाई कोणीकडे!

आणि असा हा विरोध पाहिला म्हणजे संस्थानिकांच्या अंधाऱ्या मनोविवरांत नव्या विचारसूर्याचा एक किरणहि अद्यापि शिरला नाहीं असें मोठ्या कष्टानें आम्हांस म्हणावें लागतें. हा सर्व देखावा पाहून वेदांती लोक सांगतात त्या चुटक्याची आठवण होते. माशी खावयाला मिळणार म्हणून बेडूक दबा धरून बसलेला, बेडूक खावयाला मिळेल म्हणून साप दबा धरून बसलेला, व साप खावयाला मिळेल म्हणून मुंगुस दबा धरून बसलेलें! त्याप्रमाणें छोट्या संस्थानिकांपासून ब्रिटिश सरकारापर्यंत स्वार्थी भक्षकांची एकच रांग लागून गेलेली आहे. येऊनजाऊन या संस्थानी चळवळींत कायदेशीर दाद लागत नाहीं कोणाची? तर छोट्या मांडलिक संस्थानिकांची व यच्चयावत् संस्थानी प्रजेची! असो. संस्थानी प्रजाजनासंबंधानें आम्ही नेहमीं लिहीतच असतों. पण त्यांच्याशीं समदुःखी असलेल्या मांडलिक म्हटल्या जाणाऱ्या संस्थानिकांचीहि स्थिति आज कशी आहे तें पाहूं.

मांडलिक म्हटल्या जाणाऱ्या संस्थानांची स्थिति अशी आहे कीं, तीं आज नांवानें कोणा मोठ्या संस्थानाखालीं आहेत, पण त्यांच्यावरची खरी व प्रत्यक्ष देखरेख सरकारी पोलिटिकल खात्याचीच असते. इतकेंच नव्हे तर त्यांना वरिष्ठ संस्थानानें धक्का लावूं नये, याबद्दल ब्रिटिश सरकारनें मांडलिक म्हटल्या जाणाऱ्या संस्थानांना जामिनकी दिलेली असते. कित्येक मांडलिकांशीं कारणपरत्वें सरकाराचे तहवजा स्वतंत्र करारहि झालेले असतात. मांडलिक म्हणवून घेण्याची पाळी आलेल्या कित्येक संस्थानांचें महत्त्व लक्षांत घेऊन त्यांना नरेंद्र मंडळांत स्थान देण्यांत आलेलें आहे. कोणाला नजराणा माफ असतो, कोणाला दत्तकाची परवानगी अधिराज्य म्हणून नेमून दिलेल्या संस्थानाकडून घ्यावी लागत नाहीं, किंवा ती मागावी लागली तरी अखेर निर्णय ब्रिटिश सरकाराकडेच असतो. मांडलिकांनाहि दिवाणी व मुलकी अधिकार प्रायःअमर्यादित असतात. पण फक्त हायकोर्टाचे किंवा सेशन कोर्टाचे फौजदारी अधिकाराचे बाबतींत त्यांच्या अधिकाराला मर्यादा असते. व तेव्हांहि

वरिष्ठ अधिकार, वरिष्ठ म्हटल्या जाणाऱ्या संस्थानाकडे नसून ब्रिटिश सरकारच्या पोलिटिकल खात्याकडेच असतो. तात्पर्य, मांडलिक म्हणून एक संस्थानांचा प्रतिष्ठित वर्ग आहे; व त्यांचें उत्पन्न व क्षेत्रफळ हीं लहान असलीं तरी त्यांचा संबंध प्रत्यक्ष वरिष्ठ संस्थानापेक्षां सरकाराशींच अधिक असतो व येतो.

अशी स्थिति असतां, वरिष्ठ म्हणविणाऱ्या संस्थानांनीं आतां अशी कारवाई सुरू केली आहे कीं "मांडलिक संस्थानांना सर्वस्वी आमच्या हातीं सरकारनें द्यावें, त्यांच्यावर देखरेख आम्ही करूं, आणि आमच्याविरुद्ध दाद मागावयाची तर ती जशी आज मांडलिकांना एकदम व परस्पर ब्रिटिश सरकाराकडे जाऊन मागतां येते ती तशी यापुढें मागतां येऊं नये!" स्वतःसंबंधाने पाहिलें तर, या वरिष्ठ संस्थानामध्यें त्यांच्या मांडलिकांपेक्षां सुराज्यव्यवस्था अधिक आहे किंवा अधिराजे म्हणविण्याची पात्रता त्यांच्यांत अधिक आहे असा प्रकार नाहीं. पण स्वतः यांची महत्त्वाकांक्षा इतकी वाढली आहे कीं, प्रथम यांनीं 'आम्हाला प्रांतिक गव्हर्नराच्या हातून काढून बड्या लाट साहेबांच्या हातीं द्या' अशी मागणी केली, व आतां तर ते असें म्हणू लागले आहेत कीं, 'आम्हाला व्हाइसरॉयहि नको तर आमचें लग्न खुद्द राजे बादशहांशींच लावा'! या मागणीचा हेतु हाच कीं, सातासमुद्रापलीकडचा पति वरला म्हणजे इकडे वाटेल तो धिंगाणा घालावयाला व त्याच्या नांवावर हवीं तशीं सौभाग्यसुखें भोगावयाला सांपडावीं!

वरिष्ठ संस्थानिकांचें म्हणणें असें कीं आम्ही स्वातंत्र्यप्रिय, स्वतंत्रता भोगण्यास आम्ही लायक, म्हणून राजे बादशहांनीं आम्हाला तर स्वतंत्रता द्यावीच, पण आमच्या मांडलिकांवर वाटेल तसा जुलूम करण्याचीहि परवानगी आम्हांस द्यावी. पण हें हास्यास्पद नव्हे काय! कल्पना करा कीं एखादा कैदी जेलरला म्हणूं लागला कीं "माझ्या कोठडींत एक पिंजरा ठेवावयाला मला परवानगी द्या, कारण त्यांच्या बंदींत मी एक पोपट ठेवला म्हणजे माझ्या पायांत बिड्या असल्या तरी त्याचें दुःख वाटणार नाहीं. कारण माझ्याहि हातीं एक कैदी असेल!" किंवा समजा कीं, या कैद्याला सोडून देण्यात येऊं लागलें तेव्हां तो जेलरला म्हणाला, "माझी मुक्तता करतां ती खरी कशावरून? ती खरी ठरण्याला मला तुमचा दुसरा एक कैदी माझा गुलाम म्हणून घरीं घेऊन जाण्याला माझ्या स्वाधीन करा." वरिष्ठ संस्थानांनीं स्वतः बंदींत असतां आजवर पहिल्या कैद्याप्रमाणें हक्क सांगितला. आतां ते स्वातंत्र्येच्छु झाले आहेत तेव्हां या दुसऱ्या कैद्याप्रमाणें हक्क सांगूं लागले आहेत. पण दोहोंतहि असंबद्धपणा व हास्यास्पदता सारखीच आहे.

स्वतंत्रतेचा सामान्य अर्थ "दुसरा कोणी जुलूम करीत असेल तर त्यापासून आपली मुक्तता" असा आहे. "मला इच्छेप्रमाणें दुसऱ्या कोणावर जुलूम करण्याची मोकळीक" असा नव्हे! पण अधिराजे म्हणविणारे संस्थानिक स्वतंत्रतेचा हा दुसराच अर्थ करतात असें दिसतें. उघडच आहे. लहान मुलीला आई व्हावेसें वाटलें तर तिची ती आकांक्षा सफळ होण्याला तेव्हां साधन एकच; म्हणजे रागें भरावयाला व उगीच मालगुचे घेण्याला हातांत एक बाहुली मिळणें हें. शहाण्या आया लहान मुलींची समजूत अशीच बाहुली देऊन काढीत असतात. आणि इंग्रज सरकारहि 'बड्या' संस्थानिकांच्या स्वातंत्र्याचे लाड व अधिकाराची हौस भागविण्याला त्यांच्या हातीं मांडलिक संस्थानिक देणारसें वाटतें. म्हणजे बिनखर्ची परस्पर लाड पुरले!

पण हा अन्याय होय. बटलर कमिटीपुढें संस्थानिकांच्या हक्कांची जी चौकशी सुरू आहे ती मुख्यतः तह व करार यांच्या आधारावर. बड्या संस्थानिकांच्या कैफियती मांडतांना सर लेस्ली स्कॉट यांनीं हाच आधार घेतला आहे. पण 'याच आधारानें आमच्याहि हक्कांची चौकशी करा' असें जर मांडलीक म्हणूं म्हणतील तर तें म्हणे 'बटलर' कमिटीच्या 'चौक्यां'त बसूं शकत नाहीं! बटलरसाहेबांनीं संस्थानी स्वयंपाक आरंभला तर तो सगळाच्या सगळा या चौक्यांत व्हावा. पण आंखूड चौका आंखून घेऊन बसलेल्या 'परदेशी' आचाऱ्याप्रमाणें बटलरसाहेब मांडलिकांना चौक्यांत येऊं देत नाहीत! पण त्यांतहि एक युक्ति निघूं शकते. ती अशी कीं, चौक्यांत बसलेल्या परदेशी पुरभय्या स्वयंपाक्याच्या हातांत, कोणी बाहेरून पोळी लाटून उंचावरून फेकली तर तिचा तो विटाळ मानीत नाहीं. म्हणून आम्हाला अशी सूचना करावीशी वाटते कीं, कमिटीपुढें साक्षीदार किंवा पक्षकार म्हणून न जातां आलें तरी, कांहीं मांडलीक संस्थानिकांनीं बटलर कमिटीभोंवतीं घिरट्या घालण्याला पाठविलेले दूत विलायतेच्या वर्तमानपत्रांतून दुरून बोलूं शकतात, तें ऐकून तरी बटलर कमिटीनें सावध राहावें; आणि मांडलिक संस्थानांच्या पश्चात्, त्यांचें कांहींएक म्हणणें न ऐकतां, त्यांना हातपाय बांधून वरिष्ठ म्हणविणाऱ्या संस्थानिकांच्या हातीं देण्याचा निर्दय अन्याय करूं नये. ज्या कारणाकरितां मांडलिकांना बटलर कमिटीपुढें स्थान नाहीं त्याच कारणाकरितां, कमिटीपुढें येणाऱ्या वरिष्ठ संस्थानिकांच्या कैफियतींत मांडलिकांवरील हक्कांचें कलमहि येऊं शकत नाहीं. पण त्यांनीं तें आडमुठेपणानें दडपून दिलें तरी कमिटीनें त्याचा विचार करूं नये हेंच न्यायाचें होईल.

बरें, कमिटीनें हा मुद्दा विचाराला घेतला तरी तिला असाच निर्णय करावा लागेल कीं, तह म्हणजे तह, आणि करार म्हणजे करार. त्याचा पवित्रपणा, त्याचें बंधन, मांडलिक असला म्हणजे कमी व वरिष्ठ संस्थानिक म्हटला म्हणजे जास्त असूं शकतें असें नाहीं. वचन हें सत्याप्रमाणें निरपेक्षच असतें." मांडलिकांना दिलेलीं "वचनें आश्वासनें जामिनक्या या लक्षांत घेऊं नका," असें वरिष्ठ संस्थानिक सरकारला म्हणावयाला कधींहि कमी करणार नाहींत; तितके ते बेशरम आहेतच. पण मांडलिकांना अशांच्या हातीं देऊन आपण काय मिळविणार ? याचा सरकारनें विचार करावयाला पाहिजे. समुद्र खवळला तर जहाजावरून तेलाचें एखादें पीप ओतून देणें ठीक आहे. पण जहाजाचें ओझें कमी व्हावें म्हणून त्यावर आश्रय घेणारा मनुष्य फेंकून देणें हा गुन्हा आहे. बादशहांनीं आपल्या शिकारखान्यांतील पिंजऱ्यांत, रंगीबेरंगी पोपटाप्रमाणें, आमचे संस्थानिक आपल्या करमणुकीकरितां व वैभवाकरितां ठेवून त्यांचें स्वातंत्र्यहरण केलेंच आहे. पण त्याचा मोबदला म्हणून, किंवा या पोपटांना आपल्या चोचीनें स्वतःचें भक्ष्य मिळविणें अशक्य झालें म्हणून, बादशहांनीं मांडलिकांची कीडमुंगी आपल्या हातानें उचलून या पोपटांना खाऊं घालणें ही स्वातंत्र्यनाशाच्या एका गुन्ह्याला हत्येच्या दुसऱ्या गुन्ह्याची जोडच होईल.

# पंचांगवादांतील प्रश्नोत्तरें

( ले.—ज. स. करंदीकर )

**प्रश्न ६**—गेल्या १४०० वर्षांत आरंभस्थानाचा बिंदु जो पूर्वेस सरकत चालला आहे तो परत पूर्वीच्या आरंभस्थानाला नेण्याची कोणती योजना केतकी व ऐक्य पंचांगवाल्यांनीं केली आहे ?

**उत्तर**—चुकीचें वर्षमान, चुकीची अयनगति, अविश्वसनीय शून्य अयनांश वर्ष व चुकीचे सिद्धांतोक्त नक्षत्रभोग यांचा नाद अजीबात सोडून ज्योतिर्विद केतकर यांनीं आरंभस्थान ठरविण्याकरितां दृश्य नक्षत्रोपलक्षित उल्लेखाचा आधार घेतला आहे. तो असा—

"व्यूनं शकेंद्रकालं" या पितामहोक्त आदियुगाच्या व्याख्येवरून रवि चंद्र व धनिष्ठा (आल्फा) यांची त्या वेळीं समान भोगयुति होते. या युतीची गणितपरीक्षा केली तर ती तंतोतंत जमते. जसें त्या दिवशीं—

| | | |
|---|---|---|
| सूर्यसायनभोग | =२८९.४ | अंश |
| चंद्रसायनभोग | =२८९.४ | ,, |
| आल्फा--धनिष्ठा | =२८९.२ | ,, |
| | =युति येते. | |

ही उपर्युक्त युति बिनचूक येते. (याचें सविस्तर गणित आमच्या पंचांगसंशोधन पुस्तक १-२ यांत दिलें आहे तें पाहावें.) म्हणून हेंच प्रमाण श्रेष्ठतम होय. ग्रंथकारोद्दिष्ट आरंभस्थान व गणितपरीक्षा या दोहोंचा पूर्वोक्त युतीमध्यें व गर्गोक्त चित्राचंद्रयुतीमध्यें जसा समरस मेळ आहे तसा झीटावाल्यांनीं आजपर्यंत आरंभस्थाननिर्णायक म्हणून पुढें मांडलेल्या एकाहि मुद्दयांत चित्तग्राही सामरस्य मुळींच नाहीं.

आल्फा—धनिष्ठाप्रयुक्त अश्विन्यारंभ २१३ शकांत संपातीं होता असें खऱ्या अयनगतीनें (चुकीच्या नव्हे) सिद्ध होतें. त्याच गतीनें आजचे खरे व शुद्धतम अयनांश व आरंभस्थान दृश्य तारकोपलक्षित उल्लेखांचे तत्सदृश गणितपरीक्षणानें ग्रंथकारोद्दिष्ट आरंभस्थानाशीं पडणाऱ्या तंतोतंत मेळावरून निर्णीत केलें गेलें आहे.

बेंटलीनें दिलेल्या दीर्घपरंपरागत आर्यचक्रांच्या मालिकेंतहि नेमकें २१३ शकवर्षच नमूद आहे. या वर्षचक्रांतील अयनगति व वर्षमान हीं दोनहि सूक्ष्मच आहेत. त्यावरूनहि धनिष्ठायुक्त अश्विन्यारंभ व आजचे अयनांश २२.५० हेच सिद्ध होतात.

केतकरांनीं केलेला अश्विन्यारंभाचा निर्णय कोणत्याहि अशुद्ध मानावरून केला नसल्यामुळें—आरंभस्थान सरकलें नाहीं—तें किती सरकलें तें परत न्यावयास पाहिजे कीं नाहीं—इत्यादि संशयग्रस्त भानगडींत केतकरांना पडावेंच लागत नाहीं. किंबहुना त्यांत पडावें लागूं नये म्हणूनच त्यांनीं तो मार्ग सोडून दिला.

**प्रत्युत्तर**—ज्योतिर्विद केतकर यांनीं शून्यअयनांश वर्ष आधीं ठरवून त्यावरून हल्लींचे अयनांश किती येतात ते काढण्याचा मार्ग सोडून दिला, एवढें एकच विधान वरील उत्तरांत निर्विवाद असें आहे. तो मार्ग कां सोडून दिला आणि आल्फाधनिष्ठेवरूनच केतकरांनीं आपले अयनांश घेतले कीं काय या संबंधीं मात्र द. व्यं. केतकर हे वरील उत्तरांत जीं विधानें करतात तीं निराधार अशीं आहेत. केतकरांनीं आपल्या ज्योतिर्गणितांत जेव्हां चित्रा ताऱ्यापासून १८० वर आरंभस्थान घेण्याचें

ठरविलें त्या वेळीं त्याचा मेळ आल्फाधनिष्ठेशीं बरोबर बसतो म्हणून हें आरंभस्थान मी स्वीकारतों असें त्यांनीं कोठेंहि लिहिलेले नाहीं. आपल्या आरंभस्थानाचा व शून्य अयनांश वर्षाचा धनिष्ठेशीं संबध जोडण्याची त्यांची कल्पना अगदीं अलीकडची आहे. अर्थातच आधीं खटल्याचा निर्णय आणि मागाहून पुराव्याचा शोध असा हा विपर्यस्त प्रकार असल्यानें पुराव्याच्या कायद्याच्या दृष्टीनें तो पुरावा अग्राह्य आहे. इतकेंहि करून हा मेळ घालण्यासाठीं केतकर यांनीं जें गणित दिलें आहे त्यावर ऐक्यपरिषदेंत प्रो. नाईक यांनीं आणि त्यानंतर स्वतंत्र निबंधांतून रा. वि. पटवर्धन यांनीं आक्षेप घेतले आहेत. पण हा सगळा वाद गणितशास्त्रातला व क्लिष्ट असल्यानें तो सामान्य वाचकांस समजण्याजोगा नाहीं म्हणून तो वाद वगळून इतर प्रमाणांचाच तेवढा मी विचार करणार आहे.

शून्य अयनांश वर्षावरून केतकरांनीं अयनांश ठरविले नाहींत असें द. व्यं. केतकर हे लिहितात. पण आपल्या अयनांशाला आधार म्हणून शके २१३ हें शून्य अयनांश वर्ष होय असें ते बेंटलीच्या चक्रांच्या आधार व अयनगतीवरून सांगतात. ( पूर्वी एकदां हे शून्य अयनांश वर्ष २०९ असें तेच म्हणत होते.) साठ विकला अयनगति घेणाऱ्या ज्योतिष्यांनीं आपल्या ग्रंथांत जे अयनांश दिले आहेत तेच अयनांश ५० विकला गतीनें आलेले आहेत असें समजून शून्य अयनांश वर्ष शके २१३ पर्यंत मागें खेंचणें हें गणितशास्त्र नसून गणिताच्या नांवावर वाचकांच्या डोळ्यांत धूळ फेकणें होय. एका मापानें धान्य मोजावयाचें आणि निराळ्याच मापानें ठरलेली किंमत त्या मोजमापाला लावावयाची अशांतला हा प्रकार आहे ! शके ४२१ च्या पूर्वी अयनांशांचा विचार केल्याचा उल्लेख, अमुक इतके अयनांश अमुक वर्षी होते असा एकदां उल्लेख किंवा ज्या ग्रंथकाराचे अयनांश त्या ग्रंथकारानेंच स्वीकारलेल्या अयनांशगतीवरून शून्य अयनांश वर्ष काढणें यांपैकीं कोणत्याहि पद्धतीचा आधार केतकर यांच्या विधानाला नाहीं. बेंटली यांच्या ज्या सात चक्रांचा केतकर हे उल्लेख करतात त्यांत शके २१३ मधलें सातवें चक्र हेंच कांहीं शेवटचें चक्र नसून शके ४६० मधलें आणखी एक आठवेंहि चक्र दिलेलें आहे. मग ही चक्रपद्धति शके २१३ पर्यंतच चालू होती व तेथून नवी पद्धति चालू झाली असें केतकर कशावरून म्हणतात ? बेंटलीचाच आधार घ्यावयाचा तर तो शके २१३ पेक्षां शके ४६० लाच अधिक घेतां येईल; पण केतकर हे शके २१३ पर्यंतच येऊन कां थांबतात ? कारण हेंच कीं, तें वर्ष त्यांच्या गृहीत गोष्टीशीं जुळतें आणि शके ४६० हें वर्ष घेतल्यास तें नेमकें झीटापक्षाशीं जुळतें ! केतकर यांची ही हातचलाखी पूर्वी के. वि. फणसे यांनीं केसरी पत्रांतूनच उघडकीस आणली आहे.

आपले अयनांश वेदांगज्योतिषाशीं जुळतात ही केतकर यांची प्रौढी तर वाळूच्या पायावर उभारल्यासारखी डळमळीत आहे. कारण वेदांगज्योतिषाचा काल किंवा त्यांतील युगारंभ या गोष्टी कांहीं कोणत्याहि अवांतर पुराव्यानें सिद्ध झालेल्या नाहींत. शून्य वर्षारंभाच्या अयनांशावरून व योगताऱ्यांच्या भोगावरून मागें गणित करीत जाऊन वेदांगज्योतिषाचा काल ठरवावयाचा व त्याच कालावरून परत आपलें शून्य अयनांशवर्ष जुळवून दाखवावयाचें यांत अन्योन्याश्रयाचा मोठा दोष धडधडीत दिसत आहे. बरें, बेंटलीच्या चक्रकालाचा आरंभ पाहिला तर तो शकपूर्व १२७० च्या वेळीं झालेला दिसतो आणि केतकर हे वेदांगज्योतिषकाल शकपूर्व १५०० घेतात. म्हणजे एकीकडचें टोंक वेदांगज्योतिषकालाशीं (श.पू. १५००) जोडावयाचें व दुसरीकडचें टोंक बेंटलीच्या मधल्याच एका चक्राशीं (शके २१३) जोडावयाचें आणि चित्रापक्षाचा वेदांगज्योतिषकालाशीं किती उत्तम मेळ बसतो म्हणावयाचें हें खरोखरीच धाष्टर्य होय.

प्र. ८— कोल्हापूरचे प्रोफेसर आपटे यांनीं ऐक्य परिषदेला अयनांश काढून देतांना करणागत रवि कोणत्या ग्रंथाप्रमाणे घेतला ? त्या ग्रंथांत वर्षमान कोणतें मानलें आहे ? आणि तें वर्षमान जर अलीकडील सूक्ष्म वेधाप्रमाणे बरोबर नसेल तर त्यांचा रवि बरोबर कसा समजावयाचा ? व त्यांनीं त्यावरून काढलेले अयनांश तरी शुद्ध कसे मानावयाचे ?

उत्तर—याचें उत्तर प्रो. आपटे देतीलच. तथापि करंदीकरांनी स्वीकारलेल्या ४४४ या वर्षाच्या करणागत सूर्यासंबंधानें, त्यांनीं प्रो. आपटे यांना टाकलेले प्रश्नच उलट आम्ही त्यांनाच विचारतों. त्याचें उत्तर त्यांनीं ४४४ शकीय ग्रंथोक्त रवीला अनुलक्षून द्यावें.

**प्रत्युत्तर**—प्रो. आपटे किंवा डॉ. लद्दू यांनीं अद्यापि या प्रश्नाचें उत्तर दिलेलें नाहीं व ते देतील असें वाटत नाहीं. यावरूनच वाचकांनीं काय तें समजावें. पण केतकर यांनीं मलाच जो उलट प्रश्न विचारला आहे त्याचें उत्तर मी मागील अंकांतील प्रत्युत्तरांत दिलेंच आहे. शके ४९६ ला वसंतसंपात झीटा ताऱ्याशीं असल्यानें करणागत रवि सायन रवीच्या बरोबरीचा म्हणजे शून्य घेऊन तेथूनच पुढें अयनांशांचा प्रारंभ मानलेला असल्यानें तत्पूर्वीच्या करणागत रवीच्या चुकीचा संबंध त्या वर्षाला राहिलाच नाहीं.

प्र. ९—केतकी पंचांगवाले व ऐक्य पंचांगवाले हल्लीं आपल्या पंचांगांत वर्षमान व अयनगति नवीन शोधाप्रमाणें शुद्ध घेतात का सूर्यसिद्धांताप्रमाणें अशुद्ध

घेतात ! ते जर हल्लीं वर्षमान व अयनगति सूर्यसिद्धांताप्रमाणें न घेतां नवीन शोधाप्रमाणें घेत असतील तर अनुक्रमें शके १८०० व १८४८ यापूर्वीचे अयनांश ठरवितांना त्यांनीं अशुद्ध वर्षमान व अशुद्ध अयनगति कां घेतली ? ही चुकी कायम राखल्यामुळें त्यांनीं स्वीकारलेले अयनांश अशुद्ध ठरत नाहींत काय ?

उत्तर —केतकर तीं दोनहि मानें शुद्धच घेतात हें प्रश्नकारांना विदितच आहे. शके १८०० च्या पूर्वी केतकरांनीं अशुद्ध वर्षमान व अशुद्ध अयनगति घेतली हा करंदीकरांचा अपूर्व शोध किंवा अपूर्व अज्ञानाचा नमुना आहे !

प्रामादिक शून्य अयनांश वर्षाशीं केतकरांनीं आरंभस्थाननिर्णयाचा संबंध जोडला नसल्यामुळें त्यांच्या २२–५० या अयनांशांत कसलीहि कसर राहूं शकलच नाहीं हें पूर्वोक्त प्रतिपादनावरून उघड आहे.

प्रत्युत्तर— केतकर हे आपल्या पंचांगांत वर्षमान व अयनगति हीं शुद्धच घेतात हें मलाहि मान्य आहे. पण शके १८०० चे जे अयनांश त्यांनीं ठरविले ते ग्रहलाघवीय अयनांशांशीं जुळण्याकरितां ज्योतिर्विद शंकर बाळकृष्ण दीक्षित यांच्या सूचनेप्रमाणें घेतले आणि म्हणून ते अयनांश शुद्ध नव्हते हें मी अद्यापिहि म्हणत आहे. हा कांहीं माझा अपूर्व शोध नव्हे, किंवा हें माझ्या पदरचें विधान नव्हे. दीक्षितांचा ग्रंथ सर्वांच्या परिचयाचा आहे. त्यांत पृ. ४४० वर त्यांनीं ही युक्ति सुचविली आहे आणि तींत सुचविल्याप्रमाणें केतकरांनीं ग्रहलाघवीयांचेच चार अंश वाढलेले अयनांश कायम ठेवून पुढें मात्र शुद्ध गणित चालू केलें याला आधार केतकरांच्या ज्योतिर्गणितांतच पृष्ठ ४२४ वर आढळेल.

॥ तस्माद्वर्षप्रवृत्तिः पुनरपि च यथा रेवती तारकायाः॥
स्यात्तादृक्सुव्यवस्थाकरण इह मया रैवतः पक्ष उक्तः॥
इच्छेयुर्येन हातुं सुदृढपरिचयाद्वर्तमानां प्रवृत्तिं।
तेभ्यश्चैत्राख्यपक्षः प्रचलनरहितः संगृहीतः किलात्र॥

असा मुद्द्याचा श्लोक ज्योतिर्गणितात पूर्वी होता. पुढें इ. स. १९२१ मध्यें स्वतः ज्योतिर्विद व्यं. बा. केतकर यांनीं केसरी ऑफिसांत येऊन दुरुस्त केलेला श्लोक करंदीकरांपाशींच पूर्वीच्या श्लोकाच्या जागीं घालण्याकरितां आणून दिला. त्यांत रैवत पक्षाला सुव्यवस्थाकरण असें न म्हणतां स्वैरबुद्धीचा पक्ष असें म्हटलें आहे! पण या नवीन केलेल्या श्लोकांत देखील शके ४९६ मध्यें वसंतसंपात रेवती ताऱ्यांत होता व तेव्हांपासून आजपर्यंत आरंभस्थान ४ अंश पूर्वेस सरकलें आहे, हें विधान कायमच आहे. केतकरांच्या मतें जर शून्य अयनांश वर्ष ४९६ नसून २१३ हें आहे तर सांगली–संमेलनानंतर त्यांनींच नव्या केलेल्या श्लोकांत तरी शके २१३ मध्यें वसंतसंपात रेवती योगताऱ्यांत होता असे कां म्हटलें नाहीं ? अर्थातच शके ४९६ मध्यें झीटा ताऱ्याजवळ संपातबिंदु होता व तें आरंभस्थान ग्रहलाघवीय पंचांगांत चार अंशांनीं ढळलें आहे ही गोष्ट केतकरांना अद्यापहि कबूल असलीच पाहिजे. याकरितांच शके ४९६ पासून शके १८०० पर्यंत सांचलेली चुकी काढून न टाकतां शून्य अयनांश वर्ष मागे खेंचून नेऊन ती चुकी पचविण्याचा केतकरांनीं प्रयत्न केला असें मी केतकरांच्या वरील श्लोकाच्या आधारानेंच अद्यापिहि म्हणतों.

## वादाचा निष्कर्ष

असो. या प्रश्नोत्तरांतून जो निष्कर्ष निघतो तो असा—१ शुद्ध अयनगति वि. ५०·२३ आणि शुद्ध वर्षमान ३६५-१५-२२-५३ घेतलें पाहिजे. २ ग्रहलाघवीयांनीं शके ४२१ ते ५०० च्या दरम्यान जें कोणतें आरंभस्थान मानलें असेल तें त्यांचें आरंभस्थान स्थिर राहिलें नसून चार अंश पूर्वेस सरकलें आहे. ३ पंचांग-प्रवर्तन कमिटीनें हें आरंभस्थान शके ४९६ मध्यें जेथें होतें तेथेंच पुनः कायम करून तेथून तें यापुढें पुनः चळणार नाहीं अशी सुव्यवस्था केली आहे. ४ केतकी पक्षानें शके १८०० पर्यंतचे अयनांश ग्रहलाघवीयांचेच घेतले आणि तेथून पुढें मात्र शुद्ध गति व शुद्ध वर्षमान सुरू केलें. ५ ऐक्यपंचांगवाल्यांनीं शके १८४८ चा करणागत रवि, सूर्यसिद्धान्तांत दिलेल्या ८½ पळांच्या अधिक वर्षमानाप्रमाणें घेतला असल्यामुळें त्यांच्याहि अयनांशांत १४०४ वर्षांची दरसालची ८½ पळांची चुकी कायमच राहिली आहे. ६ अर्थातच पंचांगप्रवर्तन कमिटीच्या टिळक पंचांगांतले अयनांश जसे पूर्ण शुद्ध आहेत तसे इतर कोणत्याहि पंचांगांतले पूर्णपणें शुद्ध नाहींत.

येथपर्यंत हा विचार ज्योतिषग्रंथांतील वचनांवरून करण्यांत आला. पण याहून अगदीं स्वतंत्र अशा ऐतिहासिक पुराव्यानेंहि शुद्ध पंचांगांतील आरंभस्थानच खरें ठरतें. तो पुरावा स्वतंत्र असल्यानें त्याचा समावेश या प्रश्नोत्तरांत न करतां ऐतिहासिक आधार म्हणून तो वेगळाच देण्यांत येईल.

# पुण्यांतील गीताजयंती

## दिवस पहिला

गीताधर्ममंडळाच्या विद्यमानें होणाऱ्या येथील गीताजयंतीच्या उत्सवास बुधवार मार्गशीर्ष शु. ९ रोजीं प्रारंभ झाला. पहिल दिवशीं सायंकाळीं ६ वाजतां टिळक स्मारक मंदिरांत **विद्यावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे** यांचें **ज. स. करंदीकर** यांचे अध्यक्षतेखालीं '**गीताविषयसंगति**' या विषयावर व्याख्यान झालें. व्याख्याते भिडेशास्त्री म्हणाले, गीतेंतील विषयांची संगति सांगण्यापूर्वी सामान्यतः गीताशास्त्राचा व्यवहाराशीं किती संबंध येतो हें पाहिलें पाहिजे. आपल्याइकडे ज्या शास्त्रांत पूर्वपक्ष-उत्तरपक्ष करून पांडित्याचें प्रदर्शन करता येतें असल्या शास्त्रावरच अधिक भर दिला जातो त्यामुळें समाजधर्माचें विवेचन करणारे ग्रंथ आपल्यांत कमी. त्याचा परिणाम असा झाला आहे कीं, आपल्या समाजांतून कर्तव्यतत्परतेचा ऱ्हास झाला आहे. ही कर्तव्यतत्परता गीता ग्रंथाच्या अध्ययनानें समाजांत येऊं शकेल असें मला वाटतें. म्हणूनच गीता ग्रंथाचा प्रचार करण्याविषयीं आमचा खटाटोप चालला आहे. गीतेंत जें तत्त्वज्ञान सांगितलें आहे तें राष्ट्रधर्माचें, समाजधर्माचें प्रतिपादन करणारें आहे. अर्जुनाला राष्ट्रकल्याणापेक्षां स्वतःच्या व्यक्तीच्या व कुलाच्या कल्याणाचें महत्त्व अधिक वाटत होतें म्हणून तो क्षत्रियधर्म सोडून भिक्षा मागण्याला देखील तयार झाला! पण श्रीकृष्णानें त्याला उपदेश करून ताळ्यावर आणलें व त्यास क्षात्रधर्म आचरण्यास लाविलें.

गीतेचा अर्थ बरोबर कळण्यास अर्जुनाच्या शंका बरोबर कळल्या पाहिजेत. पण कित्येक भाष्यकार हा पहिला अध्यायच गाळून टाकतात! गीतेच्या उपदेशाचें सार 'त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन' या श्लोकांत आलें आहे. निस्त्रैगुण्य, निर्द्वंद्व, नित्यसत्वस्थ, निर्योगक्षेम आणि आत्मवान हे जे कर्मयोगाचे पांच अंश त्यांचें विवेचन गीतेंत क्रमाक्रमानें आलें असून पंधराव्या अध्यायांत 'इति गुह्यतमं शास्त्र इदमुक्तं मयानघ' या श्लोकांत त्या विवेचनाचा शेवट झाला आहे.

उपवक्ते **दिवेकरशास्त्री** म्हणाले—गीतेंतील कर्मयोग समजण्यास अर्जुनाची मनःस्थिति समजून घेणें जितकें जरूरीचें आहे तितकेंच भारतीयुद्ध व गीता यांचा निकट संबंध असल्यामुळें महाभारत ग्रंथाचा परिचय करून घेणेंहि आवश्यक आहे; त्याशिवाय गीतेचें रहस्य कळणार नाहीं. गीता हा हिंदुधर्मांतला सर्वश्रेष्ठ व सर्वमान्य असा एक ग्रंथ आहे. षड्दर्शनें प्रसिद्ध आहेत, पण गीता हें अत्यंत महत्त्वाचें असें सातवें दर्शन आहे. महाभारतांतला व गीतेंतला हिंदुधर्म जयिष्णु व वर्धिष्णु आहे म्हणून त्या ग्रंथाचा जितका प्रसार होईल तितका हिंदु समाजास इष्टच आहे.

गीताधर्माचा व्यवहारास साक्षात् उपयोग कसा होईल याचें विवेचन शास्त्रीबुवांनीं एखाद्या स्वतंत्र व्याख्यानांत करावें अशी दा. वि. **गोखले** यांनीं सूचना केली.

अध्यक्ष **ज. स. करंदीकर** म्हणाले, गीतेंतल्या प्रतिपादनाची संगति समजण्याला जसें अर्जुनाच्या शंकांचें यथार्थ स्वरूप कळावयास हवें त्याचप्रमाणें भारताचाहि परिचय व्हावयास हवा हें खरें. पण तें सौतीचें महाभारत नव्हे तर व्यासांचा 'जय' नामक आद्य ग्रंथ होय. 'जय' ग्रंथांतला जयिष्णुपणा सौतीच्या महाभारतांत राहिलेला नाहीं. असो. अर्जुनाच्या शंकांचे, आप्तांच्या मृत्यबद्दल दुःख, आपल्या हातून त्यांना मृत्यु येणार असल्यानें स्वतःला पाप लागेल हें भय तेणेंकरून आणि मोक्षाच्या मार्गांत उपस्थित होणारा अडथळा, असें त्रिविध स्वरूप आहे. त्यास श्रीकृष्णानेंहि अनुक्रमें आत्म्याचें अमरत्व, क्षात्रधर्माच्या परिपालनाची जरूरी आणि कर्म करूनहि कर्मबंध तोडण्याची युक्ति अशा स्वरूपाचें त्रिविध उत्तर दिलें आहे.

## दिवस दुसरा

गुरुवार रोजीं **श्रीयुत बाबासाहेब पोतदार** यांचें '**गीता व भागवतधर्म**' यावर व्याख्यान झालें. व्याख्याते म्हणाले, काशी येथील ब्राम्हणमहासंमेलनांत भागवतधर्माची दीक्षा कोणालाहि द्यावी असें ठरलें. त्यावरून मला या विषयाचा विचार सुचला. भारतांत नारायणीय धर्म सांगितला आहे. तो भागवतधर्मच होय. गीतेंतला धर्म स्वतः भगवंतानें सांगितला म्हणून तोहि भागवतधर्मच होय. नारायणीय धर्म हा प्रवृत्तिपर आहे; तरी पण त्यांत यतींचा धर्महि सांगितला आहे. त्याचप्रमाणें गीतेंतहि कर्मयोगाबरोबर ज्ञानयोग, भक्तियोग यांचेंहि विवेचन आहे. महाराष्ट्रांतल्या वारकरी पंथालाहि भागवतधर्म म्हणतात; पण हा भागवतधर्म आणि पूर्वीचा सात्वत धर्म किंवा गीतेंतील कर्मयोग यांत फरक आहे. नारदपांचरात्रांतलि चतुर्व्यूहाची कल्पना वारकरी पंथांत नाहीं. ज्ञानेश्वरादिकांनीं गीतेचा अनुवाद मराठींत

केला व वारकरी पंथ ज्ञानेश्वराला आद्य संत मानतात. तथापि वारकरी पंथाची परंपरा व गीतेची परंपरा वेगळी आहे. ज्ञानेश्वरींतील कांहीं ओंव्यांवरून ज्ञानेश्वरांना कर्मयोग मान्य होता असें दिसतें. तुकारामाच्या अभंगांतहि कित्येक अभंग असेच कर्मयोगपर आहेत. परंतु वारकरी पंथाचा मुख्य उद्देश समाजांत समता व प्रेम वाढविणें हा आहे. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला वारकरी पंथानें आळा घातला आहे. अलीकडे गुरुशिष्य संप्रदायाचें बंड फार माजलें आहे. प्राचीन ग्रंथांत गुरूपदेश देण्याचें कार्य ब्राम्हणांनीं करावें असें म्हटलें आहे. ती शास्त्रमर्यादा अलीकडे सुटत चालली आहे. तुकाराममहाराजांपर्यंत ती मर्यादा सुटली नव्हती.

उपवक्ते **भिडेशास्त्री** म्हणाले, ज्ञान संपादनाला गुरूची अवश्यकता आहे हें उपनिषदांनीं व गीतेनेंहि सांगितलें आहे व व्यवहारदृष्ट्या ज्ञानगुरूची अवश्यकता सर्वांना मान्य आहे. पण मंत्रगुरूचें जें बंड माजलें आहे तें अनिष्ट आहे. त्यांतून ज्याला मौंजीबंधनांत गायत्री मंत्राचा उपदेश झाला त्याला इतर मंत्राची जरूरी काय ? परंतु ज्या वेळेपासून क्षत्रिय–वैश्यादिकांत मौंजीबंधनाचा प्रचार बंद पडत चालला त्या वेळेपासून हा गुरूपदेशाचा प्रचार वाढत चालला असावा. यानंतर कांहीं प्रश्नोत्तरें होऊन सभेचें काम संपलें.

## दिवस तिसरा

शुक्रवारीं **श्रीयुत तात्यासाहेब केळकर** यांचे अध्यक्षतेखालीं **ज. स. करंदीकर** यांचें 'गीतेंतील बुद्धियोग' यावर व्याख्यान झालें. व्याख्याते म्हणाले—संन्यासमार्गीय टीकाकार अर्जुनाला अज्ञानी ठरवून कर्मयोगाच्या उपदेशाची विल्हेवाट लावतात ! पण वस्तुस्थिति तशी नाहीं. अर्जुनाची योग्यता नरनारायण या जोडीनेंच सिद्ध होते. वास्तविक पाहतां अर्जुन हाच 'जय' ग्रंथाचा नायक होय. त्याच्या ज्या शंका होत्या त्यांत कर्मबंधनाच्या भीतीची जी सात्विक शंका होती तिलाच मुख्यतः उत्तर देण्याकरितां गीतेची प्रवृत्ति आहे.

गीतेंत अर्जुनाला कर्मयोग तर सांगितला आहेच, पण जें कर्म करावयाचें तें 'कसें' करावयाचें याची युक्ति मुख्यतः सांगितली आहे. या युक्तीलाच **'बुद्धियोग'** असे नांव गीतेंत दिलेलें आहे.

बुद्धियोगे त्विमां शृणु । बुद्धयायुक्तो यया पार्थ
कर्मबंधं प्रहास्यसि ॥ (२–३९)

येथून ही युक्ति सांगण्याला प्रारंभ झाला आणि

चेतसा सर्व कर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥
( १८–५७ )

येथें त्या बुद्धियोगाचा उपसंहार झाला. कर्म **'कां'** करावें आणि **'कोणतें'** करावें याचा विचार गातेंत अगदीं त्रोटक रीतीनें केला आहे. प्रकृति स्वस्थ बसूं देत नाहीं म्हणून, स्वधर्म म्हणून, यज्ञचक्र चालावें म्हणून व लोकसंग्रह व्हावा म्हणून कर्म केलें पाहिजे; आणि जें कर्म स्वभावज असेल, शास्त्रविहित असेल, परिस्थितिप्राप्त असेल तें कर्म केले पाहिजे. एवढ्यांत 'कां' व 'कोणतें' याचा विचार संक्षेपानें आला.

कर्म **'कसें'** करावें याचा विचार गीतेंत विस्तारपूर्वक सांगितला आहे. यांत कर्त्याच्या बुद्धीची जी वृत्ति वर्णिली आहे तोच बुद्धियोग होय. या बुद्धियोगांत निर्ममत्व, निःस्पृहत्व व अनासक्ति हे तीन गुण निषेधरूप असून समत्व, नित्यसत्त्वस्थ, आत्मवान हे गुण विधिरूप आहेत. याशिवाय कर्त्याची बुद्धि 'व्यवसायात्मिका' म्हणजे ध्येयनिष्ठ असावी आणि कर्ता 'धृत्युत्साहसमन्वित' असावा असेंहि गीतेंत सांगितलें आहे. अशा योगस्थ वृत्तीनें जें कर्म हातून घडतें तें अकर्मच होय. अशा पुरुषास उद्देशूनच 'हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते' असा गीतेनें निर्णय दिला आहे.

हा बुद्धियोग ज्यास साधला तो कर्मयोगी संन्यासमार्गाचा स्वीकार न करतांच कर्मयोगाच्या जोरावर 'सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः' असा होऊन मोक्षाप्रत जाऊं शकतो.

ज्ञान्यानें निष्काम बुद्धीनें जें कर्म करावयाचें त्याचा समावेश 'अकर्मांत' करून संन्यास संप्रदायी लोक ज्ञान्याच्या हातून कर्म होतच नाहीं असें म्हणतात! बंधनाभावाच्या दृष्टीनें तें अकर्म असलें तरी लोकसंग्रहादि परिणामाच्या दृष्टीनें तें कर्मच असल्यानें कर्मयोगी होऊन असलें निष्कामकर्म प्रत्येकानें करावें असा लोकमान्यांचा आग्रह आहे व तो गीतेंतील शब्दयोजनेस आणि विचारसरणीस धरून आहे. बुद्धियोगाची अवश्यकता मुख्यतः कर्मयोग्यालाच आहे. म्हणूनच गीतेंत बुद्धियोगावर एवढा कटाक्ष आहे.

याप्रमाणें भाषण झाल्यावर पां. वा. गाडगीळ यांनीं रागद्वेष टाकण्याला व अहंकार सोडण्याला गीतेंत कोणतीं साधनें सांगितलीं आहेत त्यांचें विवेचन केलें. श्रीयुत वा. दा. तळवलकर यांनीं अहंकाराचा पूर्ण त्याग केल्यावर कर्म कसें संभवतें व लोकसंग्रह तरी कां करावयाचा अशी शंका विचारली. व्याख्यात्यांनीं उत्तर दिलें कीं, मनुष्यप्राणी जो जन्मास येतो तो कांहीं कर्तव्यांची जबाबदारी जन्मतःच घेऊन येतो. त्या ऋणांची फेड करणें हें कर्तव्य आहे व तें कोणालाहि टाळतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें मायावादाप्रमाणें जग हें मिथ्या असलें तरी त्यास

व्यावहारिक सत्ता आहेच व ती आहे तोंपर्यंत सुष्टांचें पालन, दुष्टांचें दंडन इत्यादि कार्यें परमेश्वरासहि करावींच लागतात, मग त्याच्या भक्तांची त्यांतून सुटका कशी होईल ?

समारोप करतांना अध्यक्ष म्हणाले, बुद्धियोगाचें लक्षण एका शब्दांत सांगावयाचें झाल्यास 'तोल संभाळणें' असें तें सांगतां येईल. ज्यायोगानें जगाचा समतोलपणा न बिघडेल असेंच प्रत्येकानें वागलें पाहिजे. हा तोल संभाळण्याचें कार्य प्रकृति आपल्या परीनें करीतच असते. पण शहाण्या माणसानें तेंच कार्य स्वेच्छेनें केलें पाहिजे व तसें तो न करील तर परेच्छेनें म्हणजे राजदंडाने त्यांस तें करावयास लावावें लागतें.

याप्रमाणें भाषणें होऊन त्या दिवसाचा कार्यक्रम समाप्त झाला. शनिवारीं भिडेशास्त्री यांचें समारोपात्मक भाषण झालें. त्याची हकीकत पुढील अंकीं देण्यांत येईल.

# संस्थानिकांची स्वार्थी कारवाई

## वर हात खालीं लाथ !

मागील लेखांत दर्शविल्याप्रमाणें नवीन चळवळीचा फायदा घेऊन हिंदुस्थानांतील बड्या संस्थानिकांनीं स्वतः स्वतंत्र होऊन, आपल्या अंमलाखालच्या मांडलिकांना मात्र अधिक परतंत्र करण्याचा उद्योग कसा चालविला आहे ही गोष्ट सोदाहरण लोकांपुढें यावी याकरितां महाराष्ट्रांतील संस्थानांसंबंधीं हा प्रश्न कसा उत्पन्न झाला आहे याचा विचार करूं. दक्षिण—महाराष्ट्रांत सर्वांत मोठें संस्थान म्हटलें म्हणजे कोल्हापूर होय. पण त्याबरोबर इतर अनेक लहान संस्थानें आहेत. म्हणून दुरून पाहणाराला क्वचित् असा भास होतो कीं, कोल्हापूर हें वरिष्ठ संस्थान व इतर संस्थानें हीं सर्व त्याचीं मांडलीक होत आणि हा भास उत्पन्न व्हावा अशा प्रकारचें कोल्हापूर संस्थानाचें वर्तन आजवर अनेक वर्षें सुरू आहे. स्वतः कोल्हापूरच्या अमलाखालीं असलेल्या नऊ मांडलिकांचे अधिकार व हक्क दिवसेंदिवस अधिकाधिक संपुष्टांत आणण्याचा प्रयत्न कोल्हापूर-दरबार करीत आहेच. पण ज्यांचा त्यांच्याशी अर्थाअर्थी संबंध नाहीं अशा पटवर्धनी संस्थानांनाहि केवळ शेजारधर्मामुळें उपद्रव करण्यास कोल्हापूर-दरबारानें कमी केलं नाही.

इतिहासाकडे नजर फेकली असतां असें दिसून येईल कीं, कोल्हापूरदरबाराला अशा प्रकारची आगळीक करण्याला, म्हणजे इतरांचे अधिकार आहेत ते काढून घेऊन किंवा कमी करून आपलें स्तोम माजवावयाला कांहींच कायदेशीर अधिकार नाहीं. पण मुंबईच्या निरनिराळ्या गव्हर्नरांना खुष ठेवण्याचे निरनिराळे मार्ग कोल्हापूरदरबाराचे कोणते आहेत, या सर्वांचा उपयोग कसकसा केला जातो, व गव्हर्नरासारखे अधिकारीहि त्याला कसे बळी पडतात, हें पाहिलें म्हणजे कोल्हापूर सरकारनें आजपर्यंत त्यांचे मांडलीक असणाऱ्या किंवा नसणाऱ्या छोट्या संस्थानिकांना किंवा जहागीरदारांना सगळेच्या सगळेच कसें खाऊन टाकलें नाहीं याचेंच आश्चर्य वाटते. दुर्दैव असें कीं, बटलर कमिटी नेमली तिच्यापुढें वकिलामार्फत जाण्याला कोल्हापूरदरबारला मात्र अधिकार आहे ! पण महाराष्ट्रांतील मांडलिकांना तसा अधिकार नाहीं ! सगळ्याची सगळींच नातीं चांचपून पाहण्याची संधि प्राप्त झाली असतां, बटलर कमिटीच्या दरबारांत मोठ्यांना मात्र प्रवेश व धाकट्यांना मज्जाव ! यास्तव बिचाऱ्या मांडलिकांची खरोखरच कींव येते.

ब्रिटिश मुलखांतील प्रजेला अद्यापि स्वराज्य मिळालें नाहीं तरी तिनें तीक्ष्ण स्वरूपाची राजकीय चळवळ करून आपलें बरेंच बस्तान बसवून घेतलें आहे. संस्थानी प्रजाहि आतां जागृत झाली असून, संस्थानिकांकडे आपली दाद स्वतः लावून घेण्याचें सामर्थ्य हळूहळू अंगीं आणूं पाहात आहे. पण वरच्यांची कृपा नाहीं व खालच्याचा आदर नाहीं अशी स्थिति मांडलिकांची होऊन बसली आहे. गव्हर्नरसाहेबांना खुष ठेवण्याचीं साधनें व तीं नेहमीं सज्ज ठेवण्याला लागणारा मुबलक पैसा हा त्यांच्या संग्रहीं नाहीं. आणि त्यांच्या प्रजेने त्यांच्याकरितां अधिराजे म्हणविणारांशीं भांडू लागावें इतकें तादात्म्य मांडलिक व त्यांची प्रजा यांच्या हितामध्यें अजून आलें नाहीं. यामुळें दुष्काळांत मध्यम वर्गाची जी स्थिति होते तीच मांडलिकांची झाली आहे. दुष्काळाच्या दरानें जिन्नस विकत घेऊन संसार चालविण्याची ऐपत नाहीं, व अब्रूदारपणा व संभावितपणा यांच्या परंपरागत कल्पनांमुळें दुष्काळी कामावर खडे फोडण्याला जाण्याचें मनोधैर्य नाहीं. अर्थात् घरबसल्या उपासमारीनें मरणें हेंच त्यांचें नशीब. हल्लीं मांडलिकांचीहि बरोबर अशीच स्थिति झाली आहे. बटलर कमिटीच्या निमित्तानें इतिहास, हक्क,

अधिकार, नातीं, तह, करार, वहिवाटी या सगळ्यांच्या मुळांत नांगर घालून रान उकरून उलथेंपालथें होण्याचें घाटतच आहे. तेव्हां अशा प्रसंगीं पावलापावलानें आक्रमण करूं पाहणारा कोल्हापूरदरबार व त्या पावलाखालीं हळूहळू दडपून जाणारे मांडलिक यांचा खरोखर संबंध काय हें पाहाणें बरेंच बोधप्रद होईल.

नमुन्याकरितां इचलकरंजी संस्थानाचेंच उदाहरण घेऊं. सन १८१७ सालीं बाजीराव पेशव्यानें इंग्रजांशीं तह करून मराठ्यांचा राष्ट्रसंघ मोडल्याची कबुली दिली. यापूर्वी कोल्हापूर, सावंतवाडी, ग्वाल्हेर, इंदूर, नागपूर व बडोदें यांनीं इंग्रज सरकाराशीं वेगळे तह करून आपले हक्क तोडून घेतले होते. तसेंच या तहामुळें महाराष्ट्रांतील संस्थानें व मांडलीक यांचेंहि अधिराज्यत्व इंग्रजांकडे आलें, पुढें पेशवाई नष्ट झाल्यावर १८१९ सालीं सांगली, मिरज, जमखिंडी, कुरुंदवाड, रामदुर्ग, मुधोळ इत्यादि संस्थानांनीं इंग्रजांशीं स्वतंत्र तह केले. याच सालीं साताऱ्च्या अमलाखालच्या अक्कलकोट, भोर, औंध, जत, फलटण, वाई या संस्थानांच्या अधिपतींनींहि इंग्रजांशीं स्वतंत्र तह केले आणि साताऱ्चें राज्य अद्यापि शिल्लक होतें त १८४८ सालीं नष्ट झाल्यावर तर अधिराजे या नात्यानें इंग्रजांखेरीज इतर कोणाशीं यांचा संबंध उरला नाहीं. इंग्रज सरकारनेंहि प्रथम प्रथम पेशवे व सातारकर यांचें राज्य गेलें तरी त्यांच्या पदरच्या मांडलिकांचे जुने हक्क बहुधा अबाधित ठेवले. राहतां फक्त कोल्हापूरच्या अमलाखालील जहागीरदारांचा प्रश्न उरला. हे जहागीरदार किंवा मांडलीक एकंदर नऊ असून त्यांतील चार मोठे व पांच धाकटे आहेत. मोठे चार म्हणजे विशाळगड, बावडा, कागल व इचलकरंजी हीं संस्थानें. परंतु छोट्यांप्रमाणें मोठ्या मांडलिकांचेहि अधिकार काढून आपले हातीं आणावे अशी कोल्हापूरदरबारच्या कारवाईची परंपरा १८९१ पासून १९२६ पर्यंत एकसारखी सुरू आहे. जुन्या काळीं या कारवाईला प्रत्यक्ष युद्ध व स्वाऱ्या यांचें स्वरूप येई. सुदैवानें इंग्रजी राज्यांत मांडलिकांवरची तेवढी आपत्ति टळली आहे. पूर्वी पेशवाई अमलांत कोल्हापूरदरबार व त्याचे मांडलिक यांच्या तंट्यांत कोन्हेरराव त्रिंबक, महादजी शिंदे, पांडुरंगराव गोविंद, परशुरामभाऊ पटवर्धन वगैरे सरदारांना मध्यें पडून मांडलिकांचें रक्षण करावें लागलें. तथापि इंग्रजी राज्यांतहि कोल्हापूरदरबारानें मांडलिकांवर इतकें बेसुमार अतिक्रमण केलें आहे कीं, १८२७ च्या तहानें कोल्हापूर दरबाराला त्याने मांडलिकांच्या केलेल्या नुकसानीबद्दल सुमारें १½ लाख रुपये ब्रिटिश सरकाराकडे भरावे लागले. वास्तविक मिरज, सावंतवाडी, वगैरे संस्थानांचा कोल्हापुराशीं कांहीं संबंध नाहीं. असें असतां या संस्थानांच्या मुलखावर दरबारानें वाटेल तसें अतिक्रमण केल्याची गोष्ट १८४७ सालीं कॅप्टन ग्रँहॅम नामक पोलिटिकल अधिकाऱ्यानें रिपोर्ट केला त्यांत नमूद आहे. कोल्हापूरदरबारनें मुलुखगिरी करून लूट आणावी व ती पोलिटिकल एजंटानें परत करावी, असे प्रकार जर खुद्द ब्रिटिश अमलांत झाले तर मग जुन्या काळीं काय झालें असेल याची कल्पना येईलच. पण नव्या–जुन्यांत फरक इतकाच कीं, जुन्या काळीं दरबाराशीं छातीठोकपणें दोन हात करण्याचें समाधान तरी मांडलिकांना लाभे. पण हल्लींच्या काळीं गव्हर्नरसाहेबांना खूष करण्याकरितां नजराणे, मेजवान्या, प्रदर्शनें, शर्यती व इतर अनेक तऱ्हेचे पाहुणचार करण्याचा मार्ग असल्यामुळें दरबाराचें अतिक्रमणाचें काम अधिक सोयीचें व सुखाचें होऊन बसलें आहे व बाहेर त्याचा गवगवा होत नाहीं.

पण मांडलिका–मांडलिकांतहि फरक आहे. जे मांडलिक कोल्हापूरदरबाराच्या अन्नानें वाढलेले किंवा मूळ त्याच्या कृपेनें नांवारूपाला आलेले त्यांच्यावर अतिक्रमण झालें तरी ज्यांनीं दिलें त्यांनींच काढून घेतलें असें तरी म्हणतां येईल. पण इचलकरंजीसारख्या संस्थानाचें उदाहरण' घेतलें तर तेथें तसाहि प्रकार नाहीं. इचलकरंजीच्या घोरपड्यांचा मूळ पुरुष कोल्हापूरदरबाराचे सेनापति यांच्या आश्रयानें नांवारूपाला आला हें खरें असलें तरी कोल्हापूर–दरबारापासून इचलकरंजीकरांना प्रत्यक्ष अशी कोणतीच जहागिरी अगर इनाम मिळालेलें नाहीं. कदाचित् एखाददुसरा गांव मिळाला असेल. देणग्यांपैकीं मुख्य देणग्या सातारकर छत्रपति व पेशवे यांजकडूनच मिळालेल्या आहेत व त्याहि १७३० सनापूर्वी म्हणजे सातारा व कोल्हापूर येथील छत्रपतींचें भांडण तहानें संपून त्यांनीं मुलूख वांटून घेण्यापूर्वी. इचलकरंजीकरांचे यजमान कापशीकर घोरपडे हे कोल्हापूर छत्रपतींचे सरदार असले तरी पुढें या यजमानाशीं नोकरीचा संबंध सुटून त्यांचा संबंध पेशव्यांशीं जडला व तोहि जिव्हाळयाचा होता. कारण कापशीकर घोरपड्यांनीं इचलकरंजीकरांना मुलासारखें मानलें तर बाळाजी विश्वनाथ पेशव्यानें प्रत्यक्ष आपली मुलगीच इचलकरंजीकरांच्या घराण्यांतील मूळ पुरुषाचे चिरंजीव व्यंकटराव घोरपडे यांना दिली. अर्थात् पेशव्यांकडून व सातारकर छत्रपतीकडूनच इचलकरंजीकरांना बहुतेक गांवें मिळालीं.

ही सर्व मिळकत बहुधा इनामाच्या स्वरूपाचीच आहे. म्हणजे नोकरी केली तरच उत्पन्न भोगावें अशी अट नाहीं ! इनामदार असून पेशव्यांचे जांवई म्हणन म्हणा किंवा कोल्हापुराशीं प्रत्यक्ष संबंध

न आल्यामुळें म्हणा, इचलकरंजी हें संस्थान प्रथमपासूनच स्वतंत्र असल्यासारखें राहिलें. म्हणजे एकीकडे गांवें इनाम असल्यामुळें तीं परत घेण्याचा अधिकार कोणास नव्हता व दुसरीकडे वरिष्ठ हुकूम कोणाचाहि नसल्यानें इचलकरंजीचें संस्थान स्वतंत्र राहून त्याच्या मुलखांत त्याचे अधिपति सर्व प्रकारचे अधिकार चालवीत. दिवाणी फौजदारी बहुतेक सर्व अधिकार पेशवाई बुडेपर्यंत तरी इचलकरंजीकर पूर्णपणें चालवीतच; पण पुढेंहि अनेक वर्षे त्यांनीं ते चालविले व कालांतरानें जरी त्या अधिकारावर मर्यादा घातली गेली तरी या बाबतींत वरिष्ठ अधिकार कोल्हापूरदरबाराकडे तेव्हां देण्यांत आला नाहीं, तर तो इंग्रज सरकारच्या पोलिटिकल खात्याकडेच राहिला.

सातारचें राज्य असेपर्यंत त्या छत्रपतीच्या निशाणाखालीं इचलकरंजीकर प्रायः लढत. पेशवाई बुडाल्यावर कांहीं दिवस आपण स्वतंत्र आहों असाहि हक्क इचलकरंजीकरांनीं सांगितला. पण प्रत्यक्ष व रीतसर असा तह त्यांचा इंग्रजांशीं न झाल्यामुळें कोल्हापूरदरबाराचें फावलें. तथापि १८३५ सालीं मुंबईसरकारनें इचलकरंजीकर हे महाराष्ट्रांतील इतर संस्थानिकांप्रमाणें स्वतंत्र असून कोल्हापूरदरबाराखालीं नाहींत असा निकाल दिला. १८३५ पासून इचलकरंजी संस्थान हें आपल्या अंमलाखालीं घेण्याची कारवाई कोल्हापूरदरबारानें जी सुरू केली ती परवांच्या दत्तकप्रकरणांपर्यंत व त्यानंतर दिवाणी, फौजदारी मुलकी अधिकारांतील अधिराज्य आपल्या हातीं घेण्याच्या प्रयत्नापर्यंत एकसारखी चालू आहे. दुर्दैवानें दरबाराच्या अनेक अंगीं अनेक रंगी प्रयत्नांमुळें इंग्रज सरकारच्या अनुकूळ निकालांना मधून मधून त्यांचा त्यांनींच केव्हां केव्हां धक्का दिला आहे! तथापि कोल्हापूरदरबाराला तुमच्यावर आम्ही कसलेंहि अतिक्रमण करूं देणार नाहीं अशी गॅरेंटी किंवा जामिनकी याच इंग्रज सरकारनें स्पष्ट शब्दांनीं दिली आहे. संस्थानाचा कारभारी इचलकरंजीकर स्वतःच नेमतात. दिवाणी दाव्यांत इचलकरंजीकरांना दुसरे अपील व तपासणीखेरीज बाकी हायकोर्टाचे अधिकार आहेत. फौजदारीसंबंधानें सात वर्षांपर्यंतच्या शिक्षेच्या गुन्ह्यापर्यंत हायकोर्ट व स्थानिक सरकार असे सर्व अधिकार आहेत. मुलकी अधिकारांत तर ते सर्वस्वी स्वतंत्र आहेत. इचलकरंजीकरांनीं आपला वकील पुणें येथील सरदारांच्या एजंटाकडे अजून ठेविला आहे. हे दक्षिण-महाराष्ट्रांतील फर्स्ट क्लास सरदार असल्यानें गव्हर्नरसाहेब या संस्थानिकांची स्वतंत्र भेट घेतात. पण अशा रीतीनें सामान्य सरंजामदारांहून वेगळ्या स्वरूपाचे स्वतंत्र संस्थानाचे अधिकार इचलकरंजीकरांना आहेत, ही गोष्ट कोल्हापूरदरबाराला न साहून त्यांच्यावरील शेषाधिकारित्व व अधिराज्यत्व आपल्याकडे घेण्याचा उद्योग दरबारानें पराकाष्ठेनें चालविला आहे.

बरें, इचलकरंजी संस्थानांत सुराज्य-व्यवस्था अशी कोणती कमी आहे! निदान ती खुद्द कोल्हापुरांत काय अधिक आहे कीं, जिच्यामुळें या दरबाराला इचलकरंजीवर वरिष्ठ अधिकार न मिळाला तर संस्थानाच्या प्रजेचा मोठा घात होणार आहे! दरबाराला हे नवे अधिकार मिळविण्यापासून पैशाचा विशेष फायदा आहे असेंहि म्हणवत नाहीं. अर्थात् दरबाराचा हेतु एकच असला पाहिजे व तो हा कीं, लहानसान संस्थानांना आपल्या खिशांत घालून आपलें प्रस्थ वाढवावयाचें व आम्ही आधींच मोठे होतों व आतां तर अधिकच मोठे झालों, म्हणून आमच्यावर तुमच्या अधिकारांचें आज जें थोडेसें बंधन आहे तेंहि काढून आमच्या जुलुमाला दाही दिशा मोकळ्या करा असें ब्रिटिश सरकाराला दिमाखखोरपणानें सांगावयाचें. समुद्रांतलि प्रत्येक मासा आपणाहून लहान असणाऱ्या सगळ्या माशांना गिळंकृत करण्याचा अधिकार सांगतो व बजावतो. पण त्याच्याहून मोठ्या माशांशीं गांठ पडली म्हणजे मग मात्र त्याला धर्म, नीति, तह, करार, वहिवाट या सगळ्या गोष्टी आठवतात!

एका दृष्टीनें पाहतां संस्थानिक लहान झाला काय मोठा झाला काय, जो आपल्या प्रजेला स्वराज्याचे थोडेहि अधिकार देत नाहीं त्याला मोठ्या संस्थानिकांनीं आज खाऊन टाकलें तरी तिऱ्हाइताला वाईट वाटण्याचें कारण नाहीं. उलट आनंद असा वाटेल कीं, मांडलिकांना आपल्यावरील या संकटामुळें आत्मौपम्यबुद्धि सुचून आपल्या प्रजेला स्वातंत्र्य व स्वराज्याचे अधिकार देण्याची त्यांस बुद्धि होईल. पण आम्ही सर्वांकरितांच स्वातंत्र्य मागत आहों. व स्वातंत्र्य हें न्यायावर अधिष्ठित असल्यामुळें प्रजेच्या नात्यानें जसें तें संस्थानी प्रजेला मिळावें असा आमचा आग्रह आहे तसेंच ते मोठ्या संस्थानिकाविरुद्ध छोट्या संस्थानिकांना व मांडलिकांनाहि मिळावें असाच आग्रह आम्ही धरूं.

स्वार्थी संस्थानिकांचें म्हणणें असें कीं, जर ब्रिटिश सरकार सामान्य हिंदी प्रजेला स्वातंत्र्य व जबाबदारी देण्याला तयार झालें आहे तर तें स्वातंत्र्य व ती जबाबदारी त्यांनीं संस्थानिकांना कां देऊं नये? एवढेंच नव्हे तर या लोकांच्या आधींहि संस्थानिकांना ती मिळणें जरूर आहे. ब्रिटिश प्रजा ही जिंकली गेलेली. अर्थात् या दोहोंमध्यें संस्थानिकच स्वातंत्र्य देण्याला अधिक लायक होत! पण यावर उत्तर असें कीं, संस्थानिक जर न जिंकलेले व स्वातंत्र्य राखून बसलेले असे म्हणावयाचे तर त्यांनीं संरक्ष-

णाचें तह सरकाराशीं केले तरी कशाला ? सबॉर्डिनेट अलायन्समध्यें शिरले कशाला ? आणि आजपर्यंत हिंदुस्थानसरकारच्या ताब्याचें जूं मानेवर असें वागविलें कशाला ? दुसरें उत्तर असें कीं, हिंदी प्रजेला सरकार जें स्वातंत्र्य देणार आहे असें म्हणतें (केव्हां देणार तें कोणास ठाऊक !) तें स्वातंत्र्य कोणाहि एका व्यक्तीला द्यावयाचें नाहीं तर तें सर्व जनतेला मिळून. प्रांतिक स्वातंत्र्य उद्यां दिलें व प्रांतिक प्रधानमंडळ जनतेला उद्यां जबाबदार झालें तर व्यक्तिशः कोणाहि एका प्रजाजनाला सत्तेचें स्वातंत्र्य असा वाढावा किती मिळेल? हजारों मतांत ह्या बिचाऱ्याचें एक मत मोजलें जाईल इतकीच त्याची खरी सत्ता. पण संस्थानिक जें स्वातंत्र्य जबाबदारीच्या नांवाखालीं मागतात तें सर्व त्यांच्या एका व्यक्तीकरितां आहे. प्रजास्वातंत्र्य म्हणजे सत्ता वांटून जाणें, व संस्थानिक स्वतंत्र करणें म्हणजे सत्ता एकवटणें. संस्थानिकांनी हे असें स्वतःकरितां स्वातंत्र्य न मागतां आपल्या संस्थानाला म्हणजे प्रजेसकट स्वतःला तें मागितलें तर आम्ही त्यांचें समर्थन करूं. बटलर कमिटीपुढें इतक्या संस्थानिकांच्या कैफियतीचीं भेंडोळीं जाऊन पडलीं आहेत. पण शपथेला त्यांतील एकामध्यें तरी आपल्या राज्यांतील प्रजेला स्वराज्याचे हक्क व स्वातंत्र्य देण्याची तत्परता दिसून यते काय ? ही तत्परता राहोच, पण आपल्या संस्थानांत प्रजेला कोणतेहि अधिक हक्क देण्याच्या कल्पनेनें त्यांच्या मनाला स्पर्श केला असेल असें दिसत नाहीं. आणि मांडलीक संस्थानिकांच्या स्वातंत्र्यरक्षणाकरितां जरी हा लेख आम्ही लिहिला असला तरी त्यांच्यावरहि आमचा हाच शेरा आहे. त्यांना वरून दडपणाराचें बंधन तोडावयाला पाहिजे आहे; पण ज्यांना हे संस्थानिक पायाखालीं दडपतात त्यांच्यावरचें बंधन काढून टाकण्याची मात्र गोष्ट नाहीं !

# लालाजींची हद्दपारी

## [ १ ]

लाला लजपतराय यांस १९०७ सालाच्या मे महिन्यांत हद्दपारीची शिक्षा झाली व त्यानंतर सहाच महिन्यांनीं ते मंडालेहून सुटले. तो काल हिंदुस्थानांत बराच अस्वस्थतेचा गेला. लालाजी यांजवर कोर्टांत खटला चालून प्रत्यक्ष शिक्षा अशी कोणतीच सुनावली गेली नसल्यामुळें त्यांना शारीरिक कष्ट सोसावे लागले नाहींत. तरी पण प्रतिबंधांतील मानसिक जाच झालाच. या जाचांत जगाचा एरवी मिळणारा अनुभव घ्यावयास सांपडला. त्यासंबंधाची हकीकत बरीच मनोरंजक असून लालाजींच्या मृत्यूमुळें तिची आठवण कोणासहि होणें साहजिक आहे. जुन्या पिढींतील वाचकांस तिचा विसर पडला असेल व नव्या पिढीस ती आठवण अगदींच नवी वाटेल. यासाठीं त्या काळाची हकीकत जुन्या वाङ्मयांतून शोधून ती वाचकांस आम्ही सादर करीत आहों.

***

सन १९०७ पूर्वी लाला लजपतराय यांचा लौकिक एकट्या पंजाबांत होता. पंजाबाबाहेर त्यांची ओळख राष्ट्रीय सभेस जाणाऱ्या व राष्ट्रीय सभेच्या कामांत लक्ष घालणाऱ्या प्रमुख राजकारणी माणसांसच पाहून व ऐकून काय झाली होती तेवढीच. पण त्या सालाच्या मे महिन्यांत लजपतराय यांस हद्दपार करण्यांत आलें. हद्दपारी ही शिक्षा म्हणून ती वाईटच. परंतु वाइटांतूनहि कधीं कधीं चांगलें निघत असतें. त्याप्रमाणें याहि शिक्षेचें होऊन लजपतराय यांची गणना प्रमुख राष्ट्रीय पुढाऱ्यांत झाली. अशा प्रकारच्या शिक्षेस अलीकडे आवर्जून मान समजण्यांत येतो व तो मान मिळविण्याचे दोन हंगाम गेल्या वीस–एकवीस वर्षांत राष्ट्रांत येऊन गेले. ते दोनही मान वंगभंगाच्या चळवळींत व त्यानंतर बंगाल प्रांतांतील पुढाऱ्यांसच मिळाले. परंतु लजपतराय यांस जो मान मिळाला त्याची सर त्यानंतरच्या दोनही प्रसंगीं हालअपेष्टा भोगलेल्या देशभक्तांच्या वांट्यास आली नाहीं.

***

हद्दपारीची शिक्षा ही फार भयंकर शिक्षा समजली जाते व त्या शिक्षेस पात्र झाला तो मनुष्य सरकारच्या दृष्टीनें भयंकर असतोच. पण लोकहि त्याला भयंकर मानतात, पण निराळ्या अर्थानें. असा माणूस सरकारविरुद्ध बंड करणारा देशभक्त असला पाहिजे अशा कल्पना त्याचे सामान्य देशबांधव साहजिक करतात. त्यास लोकमान्यता मिळण्याचें प्रबळ कारण हेंच होय. तथापि लालाजीनंतर या शिक्षा वारंवार देण्यांत आल्यामुळें त्यांचा खरा अर्थ लोकांस कळूं लागला ही गोष्ट वेगळी. लजपतराय यांच्या हद्दपारीच्या वेळीं सदर शिक्षेची ओळख लोकांस तितकीशी न झाल्यानें लजपतराय यांनीं पंजाब प्रांतांत रणजितसिंगाप्रमाणें स्वतंत्र राज्य स्थापण्याचा बेत केला होता कीं काय अशी बहुजनसमाजापैकीं कित्येकांस शंका आली. परंतु

खरा प्रकार त्याहून अगदींच वेगळा होता. पंजाबांत जमिनीसंबंधाचा अप्रिय कायदा झाल्यामुळें पंजाबचा शेतकरी वर्ग बेदिल बनला होता. शेतकऱ्यांचें हे मत प्रदर्शित करण्याकरितां रावळपिंडीस एक प्रचंड सभा भरली. सदर सभेंत लाला हंसराज, लाला गुरुदास व लाला अमोलकराम यांचीं भाषणें झालीं.

***

सदर भाषणाबद्दल वरील तीन गृहस्थांची जाहीर चौकशी करण्याचें रावळपिंडीचे डे. कमिशनर मि. ॲग्न्यू यांनीं ठरविलें व त्या वेळीं स्वतः हजर राहाण्याची त्यांस नोटीसहि देण्यांत आली. ते तिघेहि रावळपिंडीचे मुख्य वकील होते. लाला लजपतराय यांस वरील हकीकत लाहोरास समजली व ते तावडतोब त्या तिघां गृहस्थांस मदत करण्यासाठीं रावळपिंडीस धांवले. त्यांनीं डि. मॅजिस्ट्रेटाची नोटीस बेकायदेशीर असून त्या तिघांना कोर्टात जातीनें हजर राहाण्याचें कारण नाहीं असें सांगितलें. कोर्टात त्यांच्यातर्फे फक्त वकील हजर राहिले व वकिलांबरोबर लजपतरायहि गेले. कोर्टात अतिशय गर्दी लोटली होती. डे. कमिशनर त्या गर्दीतून वाट काढून आपल्या आसनावर विराजमान झाले. पण त्यांनीं त्या दिवशीं काम न चालवितां खटला दुसऱ्या दिवसापर्यंत तहकूब ठेवला. खटल्याचा निकाल त्याच दिवशीं लागावा ही लोकांची इच्छा. ती तृप्त न झाल्यामुळें लोक खवळले व डे. कमिशनराच्या बंगल्यांत शिरून त्यांनीं बरीच मोडतोड केली. ही बातमी सर्व गांवभर पसरली व लोक हवालदिल होऊन गेले.

***

लाला लजपतराय हे स्वभावानें धीट पण तितकेच विचारी. त्यांना त्या दिवशीं रावळपिंडीच्या नागरिकांनीं सद्यःपरिस्थिति या विषयावर जाहीर व्याख्यान देण्याचा आग्रह केला व तसें करणें अशा अस्वस्थतेच्या वेळीं अदूरदर्शीपणाचें असल्याविषयीं त्यांची खात्री होती तरी भिडस्त स्वभावामुळें त्यांना ती संमति द्यावी लागली. तथापि जी अडचण त्यांना स्वतःला टाळतां आली नाहीं ती अन्य कारणामुळें पुढे परस्पर टळली. कारण रावळपिंडीचे डे. कमिशनर यांनीं हुकूम काढून संध्याकाळच्या सभेस बंदी केली व त्यामुळें व्याख्यानाचा बेत आपोआपच रहित झाला. दुसऱ्या दिवशीं रावळपिंडी प्रकरणावर निराळाच रंग चढला. त्या दिवशीं गांवभर दाट बातमी पसरली कीं पांच वकिलांना पकडणार आहेत व त्यासाठीं पांच वॉरंटें सुटलीं आहेत. त्या पांचांत लाला हंसराज, लाला गुरुदास व लाला अमोलकराम हे नसून कसें चालेल? पण त्यांच्याखेरीज बॅ. खजानसिंग यांचें नांव ऐकूं आलें. तथापि पांचवें वॉरंट कोणाकरितां? लोकांचा तर्क असा कीं तें लजपतराय यांजकरितांच. इतक्यांत लाला हंसराज व अमोलकराम हे टांग्यांत बसले आहेत व त्यांना ब्रिटिश घोडेस्वार घेऊन जात आहेत असें लजपतराय यांनीं समक्षच पाहिलें.

आतां लजपतराय यांनीं रावळपिंडींत राहाण्यांत अर्थ नव्हता. पकडलेल्या पुढाऱ्यांस लाहोर येथें जाऊन चीफ कोर्टाकडून जामिनावर सोडवून घेण्याची खटपट करणें जरूर होतें व त्या खटपटीसाठीं ते त्याच दिवशीं लाहोरास रवाना झाले. पण त्यांच्या खटपटीस कांहीं यश आलें नाहीं हें सांगावयास नकोच. पुढाऱ्यांस जामिनावर न सोडल्याचा परिणाम मात्र अनिष्ट झाला. त्यायोगानें जनता चिडली व लाहोरच्या अनारकली बाजारांतहि थोडीशी गडबड उडाली. रावळपिंडीस पकडलेल्या पुढाऱ्यांपेक्षां लाला लजपतराय यांचें वजन पंजाबांत किती तरी अधिक.त्यांना उचलण्याचा विचार सरकारच्या डोक्यांत घोळत होताच. त्याच विचाराला लाहोर येथील दंग्यानें जास्त चिडविल्यानें लजपतराय यांजवरील सरकारची वक्र दृष्टि अधिकच वक्र होऊन त्यांना पकडणार असल्याची बातमी लाहोरांत उठली, व ती थोडक्याच अवकाशांत खरी ठरली.त्या वेळीं म्हणजे ता.१०मे रोजीं लालाजी लाहोरच्या चीफ कोर्टात होते.कोर्टात फारसें काम नसल्यामुळें व आपण पकडले गेलों तर त्यापूर्वीं सगळ्या व्यवहाराची निरवानिरव करण्याची त्यांस जरूरी वाटल्यामुळें ते कोर्टातून बाहेर पडणार तोंच त्यांच्या मुनशीनें त्यांना येऊन सांगितलें कीं बाहेर दोन गृहस्थ आपली वाट पाहात आहेत.

***

ते सर्व पोलीस अधिकारी होते.लालाजींना प्रथम वाटलें कीं लाहोरांतील गडबड मोडण्याकरितां लाहोरचे कमिशनर व डे. कमिशनर वजनदार गृहस्थांची मदत घेत असून त्यापैकींच एखादें काम कमिशनर आपणास सांगणार असतील. परंतु पाहातात तों प्रकार निराळाच. तो त्यांच्या लक्षांत येण्यास विलंब लागला नाहीं. त्यांनीं पोलिसांस आपल्याच गाडींत घेतलें व त्यासुद्धां ते कमिशनर मि. यंग हजबंड यांजकडे गेले. कमिशनरानें त्यास हद्दपार करण्याचें वॉरंट गव्हर्नर-जनरल-इन-कौन्सिल यांनीं काढलें असल्याचें सांगितलें.लालाजींनीं घरीं लिहावयाचीं पत्रें लिहिलीं व त्यांना घेऊन डे. कमिशनर, पोलीस सुपरिंटेंडंट, पोलीस इन्स्पेक्टर इत्यादि अधिकारी मियानमीर स्टेशनावर आले. ते ज्या गाडींत बसले होते ती मोटार गाडी हांकण्याचें काम स्वतः डे.कमिशनरांनीं

केलें. त्यांना नेत असतांना तोफखानाहि सज्ज ठेवला होता. तो पाहून लजपतराय यांस हंसूच लोटलें. मियानमीर स्टेशनावर आगगाडी उभीच होती. तिच्यांत लालाजी जाऊन बसले. ही गाडी एकदां सुटली व लाहोर दृष्टीआड झालें म्हणजे आपण पुनः लाहोर कधीं पाहूं याविषयीं लजपतरायांस खात्री नव्हती. तरी पण लाहोरास आपण जन्माचे अंतरलों असें त्यांस कधींच वाटलें नाहीं.

***

पंजाबांतून त्यांची गाडी जात असतां त्यांच्या डब्याच्या खिडक्या बंद ठेवण्यांत आल्या होत्या. परंतु पंजाब सोडून औध–रोहिलखंड या भागांत शिरल्यावर खिडक्या खुल्या झाल्या. लाहोर सोडल्यानंतर तिसऱ्या दिवशीं त्यांची गाडी पूर्व-बंगालमधील डायमंड हार्बर रेलवे स्टेशनावर आली. तें स्टेशन दृष्टीस पडतांच आपणास रंगून किंवा मंडाले येथें राहावें लागणार हें त्यांनीं ओळखलें. पण ती बातमी त्यांजपासून गुप्त राखण्यांत आली. त्या स्टेशनावरून लजपतराय यांनीं आपल्या मुलास पत्र लिहिलें. त्यांत म्हटलें होतें कीं, 'मी आनंदानें राहाण्याचा निश्चय केला आहे. जी स्थिति येईल तिला तोंड देण्याचें मी ठरविलें आहे. तूं मात्र आपले आजोबा व मातुश्री यांची काळजी घेत जा व मर्दाप्रमाणें राहा.' लालाजींस लवकरच हुगळी नदींतून स्टीम लॉंचमध्यें बसवून आगबोटीवर चढविण्यांत आलें. आगबोटीवर जी जागा त्यांना राहाण्याकरितां दिली होती ती गलिच्छ व दुर्गंधमय होती. लालाजींनीं त्याविरुद्ध तक्रार केली व चांगली जागा देणें हें सरकारचें काम आहे असें बजावलें. तेव्हां त्यांना युरोपियन सब–इन्स्पेक्टराकरितां राखून ठेवलेल्या केबिनमध्यें जागा मिळाली.

***

लालाजींच्या बोटीनें डायमंड हार्बर ता. १२ मे रोजीं सोडलें व ती बोट रंगून येथें ता. १५ मे रोजीं पोंचली. रंगून येथें उतरल्यावर त्यांना बसण्याकरितां एक पालखीवजा गाडी मिळाली. या गाडींतून उतरल्यावर त्यांजकरितां आगगाडी तयार होतीच. तिच्यांत पहिल्या वर्गाचा डबा त्यांच्यासाठीं राखून ठेवलेला होता. रंगूनहून ते मंडालेस ता. १६ रोजीं आले व तेथील किल्ल्यांतील एक बंगला त्यांस राहावयास मिळाला. लाहोरपासून मंडालेपर्यंतच्या प्रवासांत लालाजींस अनेक अनुभव आले. त्यांपैकीं हिंदु व मुसलमान पोलीस शिपायांनीं त्यांस जें सौजन्य दाखविलें तें पाहून त्यांचें अंतःकरण पुष्कळ वेळां आनंदानें भरून आलें. रंगून ते मंडाले या रस्त्यावर त्यांस एक मुसलमान शिपाई भेटला. त्यानें आपल्या खिशांतून ब्रम्हदेशचीं केळीं काढलीं व तीं लालाजींच्यापुढें केलीं. त्यांस बरें वाटण्याकरितां लालाजींनीं त्यांतील एक केळ घेतलें पण त्यावर त्यानें 'एकच कां घेतां, आणखी घ्या' असा त्यांस आग्रह केला. व म्हणाला कीं 'पुनः कशानें आपले पाय आमच्या दृष्टीस पडणार? आतां आपण आपल्या जन्मभूमीला व आम्हाला कायमचे अंतरलां.' पण लजपतराय यांनीं त्याची समजूत घातली व धीर देऊन सांगितलें कीं 'तसें वाटूं देऊं नका. मी थोड्याच दिवसांत खात्रीनें परत येईन.' लालाजींच्या या आश्वासनानें त्यास बरें वाटून त्यानें लालाजींचे पाय धरले. हे पोलीस म्हणजे दरमहा ७।८ रु. पगाराचे शिपाई. त्यांनीं लालाजींसारख्या सरकारच्या इतराजीस पात्र झालेल्या पुढाऱ्यांविषयीं सहानुभूति दाखविणें म्हणजे आपल्या अन्नावर पाणी आणणेंच होतें. परंतु हा धोका डोळ्यासमोर असतांहि ते या गोष्टीस प्रवृत्त झाले यांत त्यांच्या मनाचा थोरपणा दिसून आला.

***

याहिपेक्षां एक हृदयस्पर्शी दृश्य मंडाले स्टेशनाच्या प्लॅटफॉर्मवर घडलें व तें महाराष्ट्रीयांस अधिकच आकर्षक वाटणारें होतें. लालाजी प्लॅटफॉर्मवर उतरण्यापूर्वी प्लॅटफॉर्मवरील सर्व लोकांस बाहेर घालवून देण्यांत आलें होतें. फक्त ऑफिसच्या खिडक्यांतून व दरवाज्यांतून कित्येक पंजाब्यांचीं तोंडें दिसत होतीं. लालाजी स्टेशनाच्या बाहेर पडले नाहींत तोंच त्यांच्या पायावर कोणी तरी येऊन पडलें. लालाजी पायाकडे पाहातात तोंच ते दुसरें तिसरें कोणी नसून पुण्याचे गोपाळराव देवधर आहेत असें त्यांस आढळून आलें व इतक्या दूरदेशीं ते कसे याचेंहि त्यांस फार आश्चर्य वाटलें. आपल्या एका जुन्या मित्रानें आपले पाय धरावेत यानें लालाजींचें अन्तःकरण गहिंवरलें. पण पोलिसांनीं आपली निराळीच कल्पना करून घेतली. ते समजले कीं देवधर लालाजींस सोडवून नेण्याकरितांच आले आहेत! इन्स्पेक्टरानें लालाजींचा दंड धरला व युरोपियन सार्जंटानें देवधरांस ओढून मागें खेंचलें. थोड्याच वेळांत देवधर गाडींत बसून निघून गेले व जातां जातां त्यांनीं लालाजींस नमस्कार केला व तो लालाजींनीं घेतलाहि. पण लालाजींना वाईट येवढेंच वाटलें कीं, यापुढें गुप्त पोलिसांचा डोळा देवधरांवर राहून त्यांना ते सतावून सोडतील.

# संगीत परिषदेच्या टीकाकारांना उत्तर

( ले. प्रो. वि. ना. पटवर्धन गंधर्व ना. मंडळी )

पुण्यास होऊन गेलेल्या संगीत परिषदेंत संगीत-कलेंतील तज्ज्ञांनीं जमून बराच खल करून कांहीं ठराव पास केले आहेत. ते अमलांत आणणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. हे दोन ठराव म्हणजे (१) महाराष्ट्रांतील गवयांनीं मराठी भाषेंत नवीन ख्यालादि चिजा तयार करून त्या परिपाठांत आणाव्या, आणि (२) नोटेशन-पद्धति (स्वरलेखनपद्धति) अमलांत आणावी हे होत. या ठरावांच्या बरेवाईटपणाची चर्चा करण्याऐवजीं प्रो. कपिलेश्वरी यांनीं नवा काळ पत्रांत (ता. ३१ आक्टोबर) या सुधारणेस विरोध करण्याचें कार्य केलें आहे. नवीन चिजा मराठींत तयार करण्यास यांचा विरोध असण्याचें कारण काय? तर त्यायोगें तुम्ही एक प्रकारें मुसलमानी गवयांची व त्यांच्या पद्धतीची पायमल्ली व अनादर करतां! वस्तुतः या शास्त्रीय वादांत हिंदु व मुसलमान हा भेद करण्याचें मुळींच कारण नाहीं; किंबहुना, एका व्यासपीठावर येऊन समानता उत्पन्न करण्याचें गायन हें स्थान आहे अशी माझी समजूत आहे. पण मराठी चिजा तयार करणें म्हणजे मुसलमानांचें संगीतशास्त्रांतील आधिपत्य झुगारणें होय अशी निरधिष्ठान कल्पना करून प्रो. कपिलेश्वरी यांनीं परिषदेंतील ठरावावर टीका केली आहे.

मुसलमान गवयांनीं संगीतकला पुष्कळ महाराष्ट्रीयांस शिकविली व यापुढेंहि त्यांचे चेले महाराष्ट्रांत कदाचित् तयार होतील हें खरें, पण मराठी चिजा तयार करून त्या गायिल्यानें महाराष्ट्रीयांच्या पदरीं कृतघ्नपणा कसा येतो हें या लेखकासच माहीत! "गायनपद्धति निर्माण करण्याइतकी रसवत्ता व भावनोत्कटता महाराष्ट्रीयांत नाहीं" असें विधान करून प्रो. कपिलेश्वरी यांनीं या कलेचें जनकत्व अप्रत्यक्षपणें मुसलमानांकडे अर्पण केलें आहे! हें जनकत्व मुसलमानांना अर्पण करीत असतां प्रो. कपिलेश्वरी यांना आपल्या प्राचीन पूर्वजांची आठवण झाली असती तर बरें झालें असतें! कारण, संगीत विद्या भरतादि हिन्दु पण्डितांनींच पूर्णत्वास आणली असून मुसलमानांनीं त्यांच्याकडूनच ती मिळालेली आहे. एवढ्या एका ऐतिहासिक सत्याची प्रो. कपिलेश्वरींना आठवण करून दिल्यास स्वतःचा एककलीपणा त्यांच्या लक्षांत येईल असें वाटतें. कारण, आहोबलांचा 'संगीतपारिजात,' 'हृदयनारायण देवांचा' 'हृदयकौस्तुभ' व 'हृदयप्रकाश,' श्रीनिवास पण्डिताचा रागतत्त्वविबोध, भाव भट्टांचा 'अनूपसंगीतरत्नाकर,' व्यंकटमुखींची 'चतुर्दण्डप्रकाशिका' अशासारखे ग्रंथ त्यांनीं पाहिले असते म्हणजे त्यांना असलें अज्ञानीपणाचें व विपर्यासाचें विधान करण्याचें धाडस झालें नसतें. नारद--भरतादिकांपासून गायनशास्त्राची अव्याहत परंपरा चालत आलेली आहे हें इतिहासांतील निरपवाद सत्य आहे. मुसलमानांची बादशाही या देशांत सुरू झाली तेव्हां या कलेंतील निष्णात अशा तानसेनादि पण्डितांना मुसलमानी धर्मांत समाविष्ट करून घेण्यांत आलें, व सांप्रदायिक गवयांचीं म्हणून जीं कित्येक घराणीं हल्लीं मुसलमानांत चालू आहेत ती त्या धर्मान्तरितांची प्रजा होय असें इतिहास सांगत असतां कृतज्ञतेच्या नांवाखालीं मुसलमानी गवयांना नसता मोठेपणा देणें म्हणजे सत्याचें स्वरूप विकृत करणें नव्हे काय?

बरें, संगीतकलेच्या जनकत्वाचा वाद क्षणभर बाजूला ठेविला, आणि महाराष्ट्रीयांस संगीतकला शिकविणाऱ्या मुसलमानी गवयांबद्दल पराकाष्ठेची कृतज्ञता मनांत धारण केली, तरी मराठी भाषेंतून गवई चिजा तयार करण्याविरुद्ध प्रो. कपिलेश्वरीसारख्यांनीं अकाण्डताण्डव करण्याचें प्रयोजन काय हें समजणें कठिण आहे. गायन म्हणजे तोंडांतून अक्षरें अगर बाराखड्या म्हणणें खचित नव्हे! गायिल्या जाणाऱ्या चिजेंतील शब्दांचा व त्यांच्या अर्थाचा मनावर बोध उत्पन्न करणें व रसपरिपोष करणें हा या शास्त्राचा उद्देश असतो व हा उद्देश मान्य केला म्हणजे श्रोत्यांना सहज समजण्यासारखी चीज गाणें अर्थात् ती त्यांना समजण्यासारख्या त्यांच्या मातृभाषेंतून गाणें हें क्रमप्राप्तच आहे. यांत निसर्गास सोडून अथवा कोणास उपमर्दकारक असें काय आहे? गायिल्या जाणाऱ्या चिजेचा अर्थ कळावा अशी श्रोत्यांची अपेक्षा असते, म्हणून तर श्रोते अमुक एक पद म्हणा अशी 'फर्माएष' करीत असतात, नाहीं तर अर्थहीन चिजा म्हणतांना श्रोत्यांच्या मनावर कांहींहि अर्थबोध व त्यापासून आनंद उत्पन्न होत नाहीं. उदाहरणार्थ,

लाडी थारी बात नु चाकरे,
मांडी खबरेनली तिजानी,
उर्फ मेगोय मूकी फर्दा—

वगैरे वगैरे शेंकडो चिजांचीं उदाहरणें देतां येतील कीं ज्या चिजांचा अर्थ म्हणणारांना व

श्रोत्यांनाहि कळत नाहीं ! असल्या निरर्थक चिजा गाण्याऐवजीं मराठींतून तयार केलेल्या चिजा महाराष्ट्रीय गवयांनीं म्हटल्या तर गानमाधुर्य व अर्थसौंदर्य यांचा मधुर संगम होऊन गाणारा व ऐकणारा यांच्या चित्तवृत्ती आनंदसागरांत निमग्न होणार नाहींत काय ? असला आनंद प्राप्त करून घेणें हेंच तर या कलेचें अन्तिम प्रामण्य आहे; आणि तें जर मातृभाषेतील चिजा गायिल्यानेंच होणार असलें तर जाणत्या लोकांनीं त्यास विरोध कां करावा हें कळणें दुरापास्त आहे ! भूमितिशास्त्र मूळचें लॅटिन भाषेंतील असलें तरी त्याच्या सिद्धान्तास बाध न येतां तें इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, मराठी इत्यादि भाषांतून लिहिलें जाऊं शकतें. तर जें संगीतशास्त्र मूळचें संस्कृत त्याच्या चिजा संस्कृतोद्भव अशा मराठी भाषेंतून करण्यास कोणता प्रत्यवाय ?

प्रो. कपिलेश्वरी यांचा दुसरा मुद्दा म्हणजे नोटेशन (स्वरलेखनपद्धती) संबंधाचा होय. स्वरलेखनपद्धति आपल्याकडे सुरू झालेली आहे, पण ती पूर्णत्वास गेलेली नाहीं हें मलाहि मान्य आहे. तिचा जसजसा उपयोग करण्यांत येईल तसतशी तिजमध्यें सुधारणा करतां येण्यासारखी आहे. एखाद्या गवयानें म्हटलेली चीज ज्यानें ती स्वतः ऐकिलेली नाहीं असाहि एखादा गवई या नोटेशनपद्धतीच्या साहाय्यानें हमखास गाऊन दाखवूं शकतो हें मी सप्रमाण सिद्ध करून द्यावयास तयार आहे. एवढा या नोटेशनपद्धतीचा उपयोग असतां प्रो. कपिलेश्वरी यांनीं तिचाहि विपर्यास करून नोटेशनपद्धतीचा स्वीकार म्हणजे "गुरुमुखाच्या पद्धतीवर आघात" असें त्याचें विपर्यस्त स्वरूप वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे. हिंदुस्थानी संगीत नोटेशनपद्धतीच्या हद्दीच्या फार पलीकडे गेलेलें आहे असें विधान करणें म्हणजे स्वरलेखनपद्धतीविषयीं पराकाष्ठेचें अज्ञान प्रकट करणें होय असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं.

कण्ठमाधुर्य गुरुमुखानें अथवा स्वरलेखनपद्धतीनें कोणास देतां येणार नाहीं खरें. पण मी प्रतिज्ञेनें हें सांगूं शकतों कीं, खुद्द प्रो० कपिलेश्वरी यांनीं वाटेल तेवढी कठिण तान गाऊन दाखविली तर ती स्वरलेखनपद्धतीनें लिहून दाखविण्यास तयार आहे. एका मात्रेच्या सोळाव्या हिश्शापर्यंत तान घेतली तर तीहि लिहून दाखवितां येते एवढेंच नव्हे तर ती तान मी विद्यार्थ्याकडून स्वरलेखनपद्धतीच्या साहाय्यानें गाऊन दाखवूं शकतों. एक तर षोडशांशापेक्षां जास्त जलद तान कोणाची तयार असेल तर तिला तान न म्हणतां हवाच म्हणावी लागेल. पण तेवढीहि कोणी कण्ठगत केलीच तर तिचेंहि स्वरलेखन करणारा उदयास आल्याशिवाय खचित राहणार नाहीं. या स्वरलेखनपद्धतीवर माझा एवढा विश्वास आहे कीं कोणत्याहि गवयानें कठिणांत कठीण चीज तालबद्ध म्हणून दाखवावी, त्याचें स्वरलेखन गांधर्व महाविद्यालयांतील प्रोफेसर झालेले तज्ज्ञ खात्रीनें करून दाखवतील, अथवा मी स्वतः करून द्यावयास तयार आहे.

सुधारणा म्हटली कीं तिला विरोध करणारे लोक समाजांत असावयाचेच ! पण प्रो. कपिलेश्वरी यांनीं स्वतःची त्यांत गणना करून घ्यावी याबद्दल कोणालाहि खेद वाटल्यावांचून राहणार नाहीं ! ज्यांनीं या कलेच्या उत्कर्षाकरितां कांहीं तरी युक्त्या सुचवावयाच्या व तिच्या उन्नतीस मदत करावयाची त्यांनी तिला मागें खेंचून धरण्याचा उद्योग करावा हें शोचनीय आहे! सांप्रदायिक गवयांची पद्धती पूर्णत्वास पोहोचलेली नाही तींत सुधारणा करण्यास अवकाश आहे. ज्यांना मुळांत संगीत परिषदच नको त्यांना तिच्या अध्यक्षस्थानीं दे. भ. केळकर नकोत, स्वरलेखनपद्धति नको, श्री. भिंडेशास्त्री यांच्यासारख्या तज्ज्ञांचे प्रगतिपर विचारहि नकोत. असल्या लेखकांनीं संगीत परिषदेवर केवढीहि आग पाखडली तरी ती व्यर्थ होणारी आहे ! व म्हणून प्रो. कापिलेश्वरी यांनीं आपल्या लेखांत काढलेल्या सर्व उद्गारांस उत्तरें देण्याच्या भानगडींत न पडतां मी त्यांच्या फक्त दोन मुद्द्यांस उत्तर दिलें आहे. त्यानें वाचकांचा गैरसमज दूर होईल अशी मला खात्री वाटते.

वस्तुतः दे. भ. तात्यासाहेब केळकर यांनीं मराठी भाषेंतून चिजा करण्याचा ठराव तयार करतांना चिजांचीं सौंदर्यस्थानें (जागा) व खानदानी घराण्यांचें वैशिष्ट्य हें कायम ठेवण्याची मराठी चिजा करणारांनीं व गाणारांनीं अवश्य काळजी घेतली पाहिजे अशा अर्थाचे शब्द मुद्दाम घालावयास सांगितले, व उपसंहारांत त्याचा खुलासाहि केला. पुण्याच्या संगीत परिषदेचा एक सेक्रेटरी म्हणून मला हा लेख लिहिणें अवश्य वाटलें. प्रो. कपिलेश्वरी यांस माझी विनंति आहे कीं, आमचे प्रयत्न त्यांना पसंत नसतील तर त्यांनीं दुसरी दिशा सुचवावी. अथवा गांधर्व महाविद्यालयातर्फे होणाऱ्या येत्या परिषदेस हजर राहून त्यांनीं आपल्या विचारांची छाप परिषदेच्या ठरावावर अवश्य पाडावी. आम्हाला देखील त्यांच्यासारख्या तज्ज्ञांच्या नेतृत्वाची जरूरीच आहे. म्हणून परिषदेस हजर न राहातां घरीं बसून तिच्यावर आक्षेप घेण्याऐवजीं परिषदेस समक्ष येऊन त्यांनीं आपलें म्हणणें तेथील विद्वानांकडून मान्य करून घ्यावें, म्हणजे त्यांचें स्वतःचें मत प्रस्थापित होईल व संगीतकलेच्या उन्नतीसहि त्यांची मदत होईल.

# पुण्यांतील गीताजयंती

## दिवस चौथा

शनिवार मार्ग. शु. १२ या दिवशीं ६ वाजतां दे. भ. **तात्यासाहेब केळकर** यांचे अध्यक्षते-खालीं, **गीता-वाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे** यांचें समारोपाचें भाषण झालें. व्याख्याते म्हणाले—

'गीता-विषयसंगति' या विषयावर माझेंच पहिल्या दिवशीं व्याख्यान झालें असल्यामुळें त्याचा निराळा समारोप करण्याचें कारण नाहीं. श्री. तात्यासाहेब करंदीकर व बाबासाहेब पोतदार यांचे व्याख्यानाबद्दल मुख्यत्वेंकरून थोडक्यांत सांगाव-याचें आहे. श्रीयुत पोतदारांनीं सांगितलें कीं, नारा-यणीय धर्म, सात्वत धर्म, व गीतेंतील कर्मयोग हे तीनहि वस्तुतः एकच असून, तोच भागवधर्म म्हणून वारकरी संप्रदायानें स्वीकारला आहे. यावर माझें मत असें कीं, गीतेंतील भागवतधर्म वारकरी पंथांत आला नाहीं व आणलाहि नाहीं. गीतेच्या काळांत, आपण ज्या वर्णांत जन्माला आलों, अगर आपली प्रकृति ज्या वर्णासारखी बनली आहे त्या वर्णाला अनुसरून आपल्या हातून एखादें विशिष्ट कार्य घडल्यावांचून आपल्या जन्माचें सार्थक होत नाहीं अशा प्रकारच्या भाव-नेची लोकांच्या मनावर छाप होती. आणि म्हणू-नच धर्मसंरक्षणाकरितां करावें लागणारें युद्ध हें क्षत्रियांना अत्यंत श्रेयस्कर होय, भाग्यवंत क्षत्रि-यांनाच अशी सोन्याची संधि लाभते असें श्रीकृ-ष्णांनीं अर्जुनास सांगितलें (गी. अ. २ श्लो. ३१ व ३२). ऋणत्रयाचाहि अभिप्राय हाच आहे. राष्ट्र-सेवा केल्यावांचून देवऋणाची फेड होत नाहीं. आणि हीं तीनहि ऋणें प्रत्येक आर्यानें फेडलींच पाहिजेत अशी त्या वेळीं सार्वत्रिक भावना होती. त्यामुळेंच प्राचीन काळचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आपआपल्या वर्णास अनुसरून परमार्थबुद्धीनें राष्ट्रकार्य करीत असत. त्यामुळें देशभक्तीची निराळी भावना उत्पन्न करण्याची अवश्यकताच नव्हती.

बुद्धोत्तरकाळांत संन्यासमार्गानें उचल खाल्ल्या-वर वर्णधर्माच्या इतिकर्तव्यतेबरोबरच या ऋण-त्रयासहि चाट मिळाला. 'सर्व कर्मसंन्यासपूर्वक आत्मज्ञान' संपादन करून मनुष्यानें मोक्षाचा मार्ग धरल्यास हीं तीन ऋणें त्याला फेडावीं लागत नाहींत, असा संन्यासमार्गानें सिद्धांत ठोकून दिला. त्यामुळें सहज घडणारी राष्ट्रसेवा अजीबात नाहींशी झाली व व्यक्तिधर्मासच प्राधा-न्य येऊन बसलें. भागवतधर्मी साधुसंतांनीं नीति-मत्तेचा चांगला उपदेश केला व प्रसंगविशेषीं प्रतिकाराचेंहि माहात्म्य गाइलें हें खरें. पण समाज-सेवा किंवा राष्ट्रसेवा मनुष्याच्या हातून घडलीच पाहिजे असें कोठेंहि प्रतिपादन केलें नाहीं. उलट संन्यासमार्गानें प्राधान्य पावलेल्या व्यक्ति-धर्मालाच त्यांनीं सर्वस्वी दुजोरा दिला. गीतेंतील भागवत-धर्म हा 'राष्ट्रधर्म' असून साधुसंतांचा भागवत-धर्म हा व्यक्तिधर्म आहे.हा या दोहोंत मोठा फरक आहे.

श्री. तात्यासाहेब करंदीकर यांनीं 'बुद्धियोगाचें' महत्त्व आपल्या व्याख्यानांत उत्कृष्ट रीतीनें मांडलें. बुद्धियोग हें मोक्षाचें प्रत्यक्ष साधन आहे (गी. अ. २ श्लो. ५१). वैदिक धर्मानें अभ्युदय व निःश्रेयस हेंच धर्माचें साध्य किंवा ध्येय म्हणून सांगितलें आहे. बुद्धियोगानें किंवा योगनिष्ठेनें हें दुहेरी साध्य प्राप्त होतें. अभ्युदय म्हणजे मनुष्य मेल्यावर मिळ-णारा स्वर्ग, असा बुद्धोत्तरकाळात अर्थ करण्यांत आला; परंतु तो बरोबर नाहीं. गीतेच्या शेवटच्या श्लोकात अभ्युदयाचें शुद्ध स्वरूप दिलें आहे. त्यांत स्वातंत्र्य, संपत्ति, पराक्रम, व धार्मिक नीति या चार गोष्टींचा समुच्चय म्हणजेच अभ्युदय असें म्हटलें आहे. यावरून सर्वांगीण राष्ट्रोन्नति म्हणजेच खरा अभ्युदय होय, असा गीतेचा अर्थ आहे. राष्ट्राची अवनति असेल तर त्यांतील व्यक्तीचा पूर्णत्वानें उत्कर्ष होऊंच शकत नाहीं हा नियम अनु-भवसिद्ध आहे. बुद्धियोग, निःश्रेयसाप्रमाणेंच अभ्युदयालाहि उपयोगी पडणारा आहे. संन्यास-मार्गाची तशी गोष्ट नाहीं. संन्यासमार्गानें फक्त मोक्षच मिळेल, परंतु अभ्युदय मिळणार नाहीं. बुद्धोत्तरकाळांत वैदिक धर्माच्या या ध्येयाचा विपर्यास झाला.

अभ्युदय व निःश्रेयस हे परस्पर विरुद्ध आहेत असें संन्यासमार्गीयांनीं ठरविलें. पण ही गोष्ट वैदिक धर्माच्या प्राचीन परंपरेस सोडून झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कर्मयोगानें हेंच ध्येय प्राप्त होत असल्यामुळें प्रत्येक हिंदु मनुष्यानें याच ध्येयावर दृष्टि कायम ठेवून आपलें कर्तव्यकर्म आच-रिलें पाहिजे. बुद्धियोगाचा देखील मुख्यत्वेंकरून या प्रकारच्या कर्मासच उपयोग आहे. म्हणून बुद्धि-योग हा राष्ट्रधर्माचा पाया होय असें ठरतें. या राष्ट्रधर्माची भावना वैदिक परंपरेस अनुसरून जागृत झाल्यास समाजात कर्तव्यबुद्धि जागृत होईल व समाजाची ही कर्तव्यबुद्धि जागृत झाली म्हणजे

लहानसान कामापासून मोठमोठ्या कार्यापर्यंत तिचा प्रकाश पडल्यावांचून राहाणार नाहीं. आज व्यवहारांत किरकोळ कामांत देखील ‘ कुचराई ’ हा आपला स्वभावधर्म होऊन बसला आहे. हा दोष नाहींसा व्हावयाचा असेल तर समाजाची कर्तव्य-बुद्धि जागृत केल्यावांचून दुसरा मार्गच उरत नाहीं व ही कर्तव्यबुद्धि जागृत होण्यास गीताभ्यसनासारखें दुसरें उत्कृष्ट साधन मिळणें कठीण आहे. ही कर्तव्य-बुद्धि जागृत करणाऱ्या गीता-धर्माचा प्रसार करणें हेंच गीता–धर्म–मंडळाचें मुख्य कार्य आहे.

यानंतर कांहीं प्रश्नोत्तरें झाल्यावर गीता–धर्म-मंडळाचे चिटणीस श्री. ग. वि. केतकर यांनीं उत्सवास मदत करणाऱ्या सर्व मंडळींचे आभार मानले व गेल्या सहा महिन्यांतील मंडळाच्या कार्याची थोडक्यांत माहिती सांगितली. शेवटीं अध्यक्षांचा समयोचित समारोप झाल्यावर हा गीताजयंत्युत्सवाचा कार्यक्रम पूर्ण झाला.

# राष्ट्रीय शक्तीचीं तीन केंद्रस्थानें

नाताळची सुटी आली म्हणजे दरसाल कोठें तरी कॉंग्रेस भरतच असते. राजकीय चळवळीचा कॉंग्रेसची बैठक भरवणें हा एक आवश्यक भाग मानला जातो व तो नित्य कर्माप्रमाणें पाळलाहि जातो. तथापि कॉंग्रेसच्या बैठकीला विशिष्ट महत्त्व येण्याला तशींच कांहीं नैमित्तिक कारणें घडावीं लागतात. कॉंग्रेसच्या चव्वेचाळीस वर्षांच्या आयुष्यक्रमांत पांचचार वेळाच अशा प्रकारचें वैशिष्ट्य तिला प्राप्त झालें असेल. बाकीच्या बैठकी मामली स्वरूपाच्या असल्यानें त्यांकडे प्रतिपक्षानें विशेष लक्ष दिलें नसेल. अर्थातच ज्यांत राजकीय चळवळीला कांहीं नवें क्रांतिकारक वळण लागतें अशा बैठकी थोड्या झाल्या असल्या तरी पण भावी इतिहासकार तेवढ्या बैठकींचेंच भावी काळांत कौतुकानें वर्णन करतील. कलकत्त्यास दादाभाईंच्या तोंडून जेव्हां स्वराज्याची मागणी प्रथमच बाहेर पडली आणि ज्या वेळीं स्वराज्यप्राप्तीची राष्ट्रीय शिक्षणादि चतुःसूत्री पुढें आली, ती कॉंग्रेसची बैठक इतिहासांत अवश्य नमूद केली जाईल. अशाच दृष्टीनें सुरत, लखनौ, अमृतसर व कलकत्ता येथील कॉंग्रेसच्या बैठकींना अपूर्वता प्राप्त झाली होती आणि सायमन कमिशनाच्या नेमणुकीनें व बर्कनहेडच्या भाषणानें गतवर्षींच्या मद्रासच्या कॉंग्रेसलाहि ऐनवेळीं असेंच अपूर्वतेचें सौभाग्य लाभलें.

मद्रासच्या कॉंग्रेसनें स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करण्याच्या ठरावाची घोषणा केल्यानंतर आतां येत्या कॉंग्रेसला पुढें पाऊल टाकण्याला कांहीं अवसरच राहिला नाहीं, असें कदाचित् कित्येकांस वाटेल. पण येत्या कलकत्त्याच्या कॉंग्रेसला पूर्वींच्या सर्व बैठकींहून अधिक भाग्य लाभणार आहे. मद्रासच्या कॉंग्रेसमध्यें सायमन कमिशनवर बहिष्कार घालावा असा ठराव झाला, पण येत्या कॉंग्रेसमध्यें त्या ठरावाच्या बजावणीचा हिशेब दिला जाणार आहे. बहिष्काराच्या ठरावाबरोबरच सर्व–पक्षीय परिषद भरवून स्वराज्याची योजना तयार करावी असेंहि मद्रासला ठरलें आणि त्याची फलश्रुति नेहरू कमिटीच्या रिपोर्टाच्या रूपानें आज राष्ट्रापुढें आलेली आहे. तिचा यथायोग्य परामर्ष घेणें हेंहि एक कलकत्त्याच्या कॉंग्रेसचें महत्त्वाचें कर्तव्यच आहे. आणि या नेहरू कमिटीच्या रिपोर्टाचें महत्त्व लखनौच्या कॉंग्रेस लीग स्कीमहून अनेक पटींनीं अधिक असल्यामुळें केवळ नेहरू रिपोर्ट मान्य करून घेण्यानें देखील कलकत्त्याच्या कॉंग्रेसला लखनौहून अनेक पटींनीं महत्त्व येणार आहे.

पण येत्या कॉंग्रेसच्या अपूर्वतेचें व क्रांतिकारकत्वाचें बीज याहून वेगळेंच आहे. मद्रासच्या कॉंग्रेसनें स्वातंत्र्याच्या ध्येयाचा जसा नुसता उच्चार केला तसा नेहरू कमिटीच्या रिपोर्टाच्या मान्यतेचा कलकत्त्याला नुसता उच्चार करून भागणार नाहीं. त्या रिपोर्टाला देशांतील सर्व पक्षांचा व सर्व वर्गांचा पाठिंबा आहे हें अगोदर कॉंग्रेसला दाखवावें लागेल व त्याकरितां मुसलमानांतील कित्येक बेदिल बनलेल्या पुढाऱ्यांना ताळ्यावर आणावें लागेल. आणि नेहरू कमिटीच्या रिपोर्टांतील योजना अमलांत कशी आणावयाची याचा विचार येत्या कॉंग्रेसला मुख्यतः करावा लागेल. तुम्हाला पाहिजे काय हें देखील एकमतानें तुम्हांला सांगतां येत नाहीं अशी बर्कनहेड यांनीं हिंदी राष्ट्राची हेटाळणी केली आणि तिला हिंदी पुढाऱ्यांनीं नेहरू कमिटीची योजना तयार करून खरपूस उत्तर दिलें. पण ही नुसती कागदी योजना तयार केल्यानें काम भागत नाहीं; त्या योजनेची बजावणी कशी करावयाची याचा विचार करून निश्चित मार्ग ठरविणें अवश्य आहे; आणि नेहरू रिपोर्ट तयार केला, पण आतां पुढें काय, असा प्रश्न बर्कनहेडचेच भाईबंद तशाच हेटाळणीच्या स्वरांत आजहि विचारीत आहेत. त्यांच्या या प्रश्नाला उत्तर देण्याची जबाबदारी येत्या कॉंग्रेसवर आहे.

अग्नीला डिवचल्याशिवाय त्याच्या आंगचें तेज प्रगट होत नाहीं हें जसें खरें तसेंच राष्ट्राच्या स्वाभिमानाला धक्का लागल्याखेरीज राष्ट्राकडूनहि महत्कार्य घडून येत नाहीं, हेंहि खरें आहे. गत वर्षी बर्कनेहेड यांनीं निवळ गोऱ्या लोकांचें कमिशन नेमून उद्दामपणानें हिंदी राष्ट्रास आव्हान केलें.त्यामुळें हिंदी राष्ट्राचा स्वाभिमान जागृत होऊन सायमन कमिशनाच्या बहिष्काराची निषेधात्मक व स्वराज्ययोजनेची विधेयात्मक चळवळ निकरानें चालविण्यांत आली आणि स्वराज्य योजनाहि तयार झाली. हिंदी राष्ट्रीय चळवळीचें हें विक्राळ स्वरूप पाहून बर्कनेहेड यांनीं आपलें तोंड लपविलें व राजकारणास त्यांनीं राम राम ठोकला! त्यामुळें हिंदी राष्ट्राचा जागृत झालेला स्वाभिमान पुनः पूर्वस्थितीप्रत जातो कीं काय अशी शंका वाटूं लागली होती. पण बर्कनेहेडच्याच सारखे उद्दाम वृत्तीचे अधिकारी नोकरशाहींत अनेक असल्यानें अशी भीति बाळण्याचें कारणच नाहीं. लाहोरच्या नाठाळ लाठ्याळांनीं लालाजींच्या छातीवर आणि लखनौच्या खुनशी पोलिसांनीं जवारहरलाल नेहरूंच्या व गोविंद वल्लभपंत यांच्या आंगावर जे तडाखे लगावले ते त्या त्या व्यक्तींच्या आंगावर नसून राष्ट्राभिमानाच्या मूर्त देहावरच ते तडाखे बसले असल्यानें स्वाभिमानरूपी अग्नीला पुनः फुंकर घातल्याप्रमाणें होऊन तो अधिक पेट घेऊं लागला आहे. त्यामुळें नेहरू रिपोर्टाच्या योजनेला मूर्त स्वरूप कसें द्यावें याचा विचार येत्या कॉंग्रेसमध्य करताना लालाजींचा मृत्यु सर्व कॉंग्रेसभक्तांना असेंच बजावीत राहील कीं, राष्ट्रीय पुढाऱ्याच्या छातीवर पुनः असे ठोसे मारण्याची छाती नोकरशाहीला होणार नाहीं असा एकदांचा कायमचा सोक्षमोक्ष करून टाका. लालाजींच्या स्वर्गस्थ आत्म्याकडून येणारा हा जो संदेश त्याचा परिणाम कॉंग्रेसच्या ठरावावर झाल्याशिवाय खचित राहाणार नाहीं.

पण जणुं काय राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या एवढ्या उपमर्दानें नोकरशाहीचें समाधान न होऊन संयुक्त प्रांताचे गव्हर्नर सर माल्कम हेले हे हिंदी पुढाऱ्यांच्या मर्मावर आणखी घाव घालण्यास उद्युक्त झाले आणि लखनौस तालुकदारांच्या वनभोजनाच्या प्रसंगीं त्यांनीं स्वराज्यवाद्यांस अशी धमकी दिली कीं, स्वराज्याचे पुढचे हप्ते देण्याची गोष्ट तर दूरच राहिली, पण आतांपर्यंत जेवढा स्वराज्याचा अधिकार तुम्हास दिला गेला तेवढ्याचा देखील जर तुम्ही सदुपयोग केला नाहीं असें आढळून येईल तर दिलेलें दान देखील परत घेण्यास आम्ही कचरणार नाहीं! सर माल्कमच्या तोंडचीं हीं मुक्ताफळें सायमन कमिशनच्या सर्व सभासदांच्या समोर बाहेर पडलीं यांत विशेष गर्भितार्थ आहे. हिंदुस्थानांत जिकडे तिकडे कम्युनिस्टांचा सुळसुळाट माजला आहे आणि कॉंग्रेसमध्यें कम्युनिस्टांचाच वर्चष्मा असल्यामुळ रशियातील बोल्शेव्हिकांप्रमाणें हे कॉंग्रेसवाले आपल्या हातांत सत्ता येतांच तालुकदार, जमीनदार, इनामदार इत्यादिकांच्या पूर्वापार हक्कांची पायमल्ली करून त्यांच्या इस्टेटी जप्त करून टाकतील असली भीति हक्कदार वर्गाच्या मनांत उभी करून त्यांना भेडसावणें आणि त्यांना स्वराज्यद्रोही बनवून त्या शिखंडीच्या आडून स्वराज्यवाद्यांवर प्रहार करणें ही कपटनीति बरेच दिवस चालू आहे. संस्थानिकांना सांगावयाचें कीं, हिंदुस्थानाला ज्यां स्वराज्याचे हक्क दिल्यास तुमची काय वाट होईल त्याचा विचार करा; जमीनदारांच्या मनांत असा धाक उत्पन्न करावयाचा कीं, तुमचा जमीनजुमला स्वराज्यांत सुरक्षित राहणार नाहीं; भांडवलवाल्या कारखानदारांस व व्यापाऱ्यांस भीति दाखवावयाची कीं, स्वराज्यवाद्याच्या कारकीर्दीत तुमच्या कारखान्यांची व व्यापाराची धडगत नाहीं; मुसलमानांस चिडवावयाचें कीं, स्वराज्यांत तुमच्या मशिदी फुटतील; हिंदूंस भिववावयाचें कीं तुम्हास स्वराज्य दिल्यास पठाण लोक तुमच्या घरादारांचें वाटोळें करतील, सांभाळा! अशा रीतीनें ज्याचा त्याचा रागरंग पाहून प्रत्येक वर्गाच्या कानांत स्वराज्यद्रोहाचें विष ओतण्याचा हा कार्यक्रम नृपांगणगत खलभुजंगांनीं कित्येक दिवस चालविलाच आहे, आणि ज्यांच्या ज्यांच्या मनावर त्या विषाचा परिणाम झाला असेल ते ते लोक नोकरशाहीचे मिंधे होऊन देशद्रोह करण्यास प्रवृत्तहि होत आहेत.

नोकरशाहीची असली ही भेदनीति स्वराज्यवाद्यांच्या पूर्ण परिचयाची आहे व ते आजपर्यंत तिला पुरून उरले आहेत. पण या भेदनीतीच्या कपटनाटकाचा प्रयोग सायमनसाहेबांच्यासमोर करून दाखविण्यांत सर माल्कम हेल्यांचा दुहेरी हेतु उघड दिसतो. घाबरट तालुकदारांना धीर देण्याचाच नुसता उद्देश असता तर तालुकदारांची भेट हेल्यांना इतरत्र कोठेंहि घेतां आली असती व असलें आश्वासन त्यांनीं या पूर्वीहि त्यांना दिले नसेल असें नाहीं. परंतु स्वराज्याचा पुढचा हप्ता केवढा द्यावा याचा विचार करण्याकरितां आलेल्या सायमनसाहेबांच्या समोर हा सिद्धसाधकांचा संवाद होतो. याचा अर्थच असा कीं, सायमन कमिशनची चौकशी हा नुसता फार्स असून नोकरशाहीच्या मतें मॉंटेग्युसाहेबांनीं जी चुकी केली ती निस्तरण्याकरितां हा सर्व खटाटोप चालू आहे! नोकरशाहीच्या अंतरंगांत असलें कारस्थान चाललें नसतें तर स्वराज्यमंदिराचा आतांपर्यंत भरलेला पाया

कच्चा आहे का पक्का आहे हें आम्ही पाहूं आणि तो कच्चा असल्याचें आढळल्यास नवीन बांधकाम करावयाचें बाजूसच राहून आतांपर्यंत झालेलें बांधकाम देखील आम्ही पाडून टाकूं असली उद्दामपणाची भाषा हेल्यांच्या तोंडून आलीच नसती. हिंदी राष्ट्राला व विशेषतः नेहरू रिपोर्टाचा विचार करूं पाहणाऱ्या कॉंग्रेसप्रभृति सर्व संस्थांना तर हें एक प्रकारचें आव्हान आहेच. पण हा सर्व नाटयप्रयोग सायमन सप्तकाच्या संगनमतानें जर झाला नसेल तर सायमन कमिशनलाहि ही एक प्रकारची धमकीच आहे. कोर्टाच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास सायमन कमिशनरूपी कोर्टाची ही बेअदबी आहे. कारण कोर्टापुढें खटला चालू असतां त्या खटल्याचा निकाल अमुकच प्रकारचा व्हावा किंवा तो तसा न होईल तर असें अरिष्ट कोसळेल असली टीका करणें यालाच 'कंटेम्ट ऑफ दी कोर्ट' म्हणतात. सायमन कमिशन आज जी चौकशी करीत आहे ती याच मुद्दयावर करीत असून त्या चौकशीचा निकाल कोणत्या स्वरूपाचा व्हावा अशी नोकरशाहीची अपेक्षा आहे याचें दिग्दर्शन सर माल्कम हेल्यांच्या भाषणांत आहे. नोकरशाहीशीं आगाऊ संगनमत करून चौकशीचा केवळ देखावा करण्याकरितां जर सायमन सप्तक येथे आलें असेल तर त्यास हेले यांचें हें भाषण ऐकून आंतून आनंदाच्या उकळ्या फुटल्या असतील. तसा सिद्धसाधकपणा नसेल तर सायमनसाहेबांनीं हेल्यांना असल्या धमकीवजा व बेअदबी करणाऱ्या भाषणाबद्दल जाब विचारला पाहिजे. तसा जाब विचारला जाणार नाहीं व सर माल्कम यांच्यावर दिलगिरि प्रदर्शित करण्याचाहि प्रसंग येणार नाहीं हें निश्चित असल्यानें हेलेसाहेबांनीं रंगभूमीवरचा पडदा केवळ उतावळेपणानें अगाऊ वर ओढल्यामुळें भावी देखावा अगोदरच दृष्टीस पडला असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट आजपर्यंत तर्कानें जाणली गेली नव्हती असें बिलकुल नाहीं. तरी पण तर्कापेक्षां प्रत्यक्ष प्रमाण अधिक परिणामकारक असल्यानें हेलेसाहेबांच्या या भाषणाचा हिंदी राष्ट्रावर योग्य परिणाम झाल्यावांचून राहाणार नाहीं.

येत्या कॉंग्रेसमध्यें व तत्पूर्वी सर्वपक्षीय परिषदेंत नेहरूकमिटीच्या रिपोर्टाचाचाच मुख्यतः विचार व्हावयाचा आहे. याच ऐनसंधीस हेले यांचें हें उद्धट आव्हान प्रसिद्ध झालें हा योगायोगच मानला पाहिजे. कारण स्वराज्यरूपी मंदिर किती मजली बांधावें, त्या मंदिरावर आजच कळस चढवावा का तो मागाहून एखादी पर्वणी पाहून चढवावा, त्या मंदिरांतील किती व कोणते दिवाणखाने कोणकोणास कसकसे वाटून द्यावे याविषयीं आपापसांत हमरीतुमरी चालली असतांना त्या मंदिराचें आगाऊ झालेलें बांधकाम देखील पाडून टाकण्याचा उपद्व्याप घुशींनीं चालविल्याचें दिसून आल्यास आधीं त्या घुशींचा समाचार घेतला पाहिजे याविषयीं एकमत होऊन आपापसांतलीं भांडणें आपोआप मिटतील. नेहरू कमिटीच्या रिपोर्टावर कमी अधिक वांटणीच्या दृष्टीनें आक्षेप घेणारे कित्येक मुसलमानबंधू आणि स्वराज्यमंदिराच्या एकेक मजल्याचें बांधकाम सुरळीत चालू होण्याच्या आधींच निशाण चढविण्याचा उतावळेपणा करणारा निर्भेळ स्वातंत्र्यवादी आयंगारपक्ष यांना असें सांगणें आहे कीं, स्वराज्यमंदिराचें झालेलें बांधकाम पाडून टाकण्याकरितां त्यास धडका मारणारे हेले आणि पाया देखील पोखरून टाकणाऱ्या घुशी यांच्या बंदोबस्ताचा विचार आधीं एकमतानें करूं या, आणि मग आपापसांत काय मतभेद असतील त्यांचा निर्वाह कसा करावयाचा तें पाहूं या.

कलकत्ता कॉंग्रेसपुढें जर कोणतें मुख्य काम असेल तर स्वराज्यमंदिराची उभारणी निर्विघ्नपणें कशी चालू होईल याचा विचार करणें हीच होय. या कामांत विघ्नें उपस्थित करण्यास प्रतिपक्षी कसे सज्ज आहेत त्याचा ताजा मासला सर माल्कम यांच्या भाषणावरून पाहावयास मिळालाच आहे. नेहरू कमिटीच्या रिपोर्टानें स्वराज्यमंदिराचा नकाशा तयार झाला आहे. त्या नकाशांतील बारीकसारीक तपशिलाबद्दल वाद करीत बसणें हा कालाचा व शक्तीचा अपव्यय होय. घर बांधल्यावर देखील त्यांतल्या खोल्या लहान-मोठ्या करतां येतात व त्यावर आपल्या हौसेप्रमाणें निशाण उभारतां येतें. पण आधीं या बांधकामालाच विरोध करण्याला जे उभे राहिले आहेत त्यांचा विरोध दूर करण्याची शक्ति निर्माण करणें व ती एकवटून तिचा योग्य स्थळीं व योग्य काळीं उपयोग करणें हेंच खरें कौशल्याचें काम आहे. यंदाच्या कॉंग्रेसमध्यें जर कोणत्या गोष्टीचा प्रामुख्यानें विचार व्हावयाचा असेल तर तो अशी संघटित शक्ति निर्माण करण्याच्या योजनेचाच होय. ही शक्ति निर्माण करण्याचीं मुख्य केंद्रें तीन आहेत. हिंदुस्थानांतला बहुजनसमाज शेतकऱ्यांचा असल्यानें शेतकरी वर्गाचें संघटन हें पहिलें महत्त्वाचें केंद्र होय. मजूरवर्गाची संख्या अल्प असली तरी तो वर्ग लवकर संघटित होतो व अधिक कार्यक्षम होतो. यास्तव त्या वर्गाचें संघटन हें दुसरें महत्त्वाचें केंद्र होय.आणि राष्ट्रीय झगड्यांत उत्साहानें कार्यभाग घेणारा व कोणत्याहि संकटास न डगमगणारा तरुणवर्ग हें तिसरें महत्त्वाचें केंद्र होय. या तीनहि केंद्रस्थानांत

योग्य प्रेरणा करून स्वराज्यमंदिराच्या उभारणीस त्यांचा कसा उपयोग करून घ्यावा याचा विचार येत्या काँग्रेसच्या चाळकांनीं मुख्यतः केला पाहिजे. हीं तीन केंद्रस्थानें म्हणजे एकाच राष्ट्रदेवतेच्या ब्रह्मा, महेश व विष्णू अशा तीन मूर्ति होत. या त्रिमूर्तीची उपासना कशी करावयाची व त्यांच्यापाशीं अनुक्रमें कोणतें वर मागावयाचे यांचा विचार पुढील लेखांत करूं.

# लालाजींची हद्दपारी

## [२]

लाला लजपतराय यांना राहण्याकरितां एक बंगला देण्यांत आला होता. बंगल्याच्या समोर सरकारी बाग असून बंगला व बाग यांच्या दरम्यान पक्की सडक होती. या सडकेनें जाण्यायेण्याची सर्वांस मोकळीक होती. बंगला दुमजली व पक्क्या विटांनीं बांधलेला होता. दुसऱ्या मजल्यावरच्या दोन खोल्या लालाजींस राहण्याकरितां मिळाल्या होत्या. त्यांत जेवण्याकरितां एक टेबल, वाचण्याकरितां एक टेबल, एक आरामखुर्ची व दोन साध्या खुर्च्या इत्यादि सामान होतें. त्याखेरीज दोन शामदानें व एक दिवाहि होता. भिस्ती व धोबी हेहि दिमतीस दिले असून एक दिवसाआड न्हावीहि हजामतीकरितां येत असे. न्हाव्याच्या बाबतींत एक मजेची हकीकत घडून आली. हजामतीस एक महिना भरला व न्हावी पगार मागावयास येऊन उभा राहिला. पण लालाजींनीं त्यास सांगितलें कीं जसा भिस्ती व धोबी यांचा पगार सरकार देतें तसा हजामाचाहि पगार सरकारनेंच दिला पाहिजे. पण त्यावर जेल सुपरिंटेंडंटानें सदर पगार तुम्हापासून घेण्यास सांगितलें असल्याचें हजाम लालाजींस म्हणाला. लालाजींनीं सुपरिंटेंडंटाची गांठ पडल्यावर त्याजपाशीं न्हाव्याच्या पगाराचा विषय काढला व म्हटलें कीं, १८१८ चा रेग्युलेशन नंबर ३ याप्रमाणें माझ्या दर्जाप्रमाणें मला वागविण्यास सरकार बांधलें गेलें असल्यामुळें न्हाव्याचा पगार सरकारनेंच दिला पाहिजे.

***

बंदिवानाच्या तोंडून इतका खडखडीत जबाब ऐकल्यावर साहेबाच्या रागास काय पारावार राहाणार ! साहेब गरम झाले व त्यांनीं सांगितलें कीं, हजामत ही चैन आहे. आणि ही चैन चालविण्याचा सरकारनें कांहीं मक्ता घेतला नाहीं. साहेबांनीं एवढ्यावरच आपलीं मुक्ताफळें आवरलीं नाहींत. त्यांनीं हजामत या गंभीर विषयावर लालाजींपुढें एक प्रवचनहि झोडलें. ते म्हणाले, 'एखाद्या मुसलमानानें आपलें डोकें वरचेवर केलें पाहिजे असा हट्ट धरला तर तो क्षणभर कोणी ऐकून घेईल. पण तुमच्यासारख्या हिंदूनें एक दिवसाआड दाढी कशाला करून घ्यावयास पाहिजे ? अशी दाढी न काढतां वाढविलेली काय वाईट ?' लालाजींनीं त्यावर सरळ उत्तर असें दिलें कीं, मी घरीं दाढी राखीत असतों तर येथेंहि दाढी राखली असती. सुपरिंटेंडंटानें हजामतीसारख्या क्षुल्लक बाबीसाठीं इतकी घासाघीस करावी हा लालाजींस अपमान वाटून त्यांनीं स्वतःच्या पदरचा पगार न्हाव्यास देण्याचें कबूल केलें पण लजपतराय यांचा पैसा सुपरिंटेंडंटापाशींच असल्यामुळें सुपरिंटेंडंटानें त्यांतून न्हाव्यास परस्पर पगार द्यावा असें लालाजींनीं सांगितलें. हीहि सूचना साहेबास न पटून लालाजींनीं आपल्याच हातानें पैसे दिले पाहिजेत असाच आग्रह त्यानें धरला व तो लजपतराय यांस पुरा करावा लागला.

***

भोजनाचे बाबतींतहि लजपतराय यांस अधिकाऱ्यांची अरेरावी अशीच अनुभवण्यास मिळाली. त्यांजकरितां एक मद्रासी पोऱ्या आचारी म्हणून ठेवला होता. त्यास स्वयंपाक नीट करतां येत नव्हताच. पण त्याखेरीज लांकडेंच ओलीं आहेत, भांडींच चांगलीं नाहींत अशी त्याची नित्य कुरकुर चाले. अखेर त्यानें स्वतःच तोड सुचविली कीं स्वयंपाक वेगळा उघड्यावर करण्यापेक्षां सुपरिंटेंडंटाच्या स्वयंपाकघरांत केलेलाच सोयीस्कर. लालाजींची त्या योजनेस मान्यता मिळाल्यावर पोऱ्यानें स्वयंपाक करणेंच बहुतेक सोडून दिलें. तो सुपरिंटेंडेंटच्या आचाऱ्याचा पित्त्या असल्यामुळें त्याजबरोबर त्यानें संगनमत केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं सुपरिंटेंडेंटाच्या आचाऱ्यानें लालाजींचें व पोऱ्याचेंहि अन्न शिजवावें, पोऱ्यानें लालाजींकरितां मिळालेलें सर्व साहित्य आचाऱ्याच्या हवाली करावें, स्वतःचा पोटगीखर्च दरमहा ६ रु. प्रमाणें त्यास द्यावा व परस्पर शिजविलेलें अन्न लालाजींस पोंचवावें.

***

हें अन्न अर्थातच इंग्रजी पद्धतीचें असल्यामुळें लालाजींस तें मनापासून आवडत नव्हतें. त्याऐवजीं पंजाबी पद्धतीचें अन्न पंजाबी माणसानें तयार

केलेलें आपणास मिळेल तर बरें असें त्यांस साहाजिक वाटत असे व तशा प्रकारची विनंतिहि त्यांनीं सुपरिंटेंडेंटापाशीं अनेकदां केली होती. या दुमण्यास कंटाळून एके दिवशीं सुपरिंटेंडंटानें एक पंजाबी धटिंगण लजपतराय यांजसमोर आणून उभा केला. त्यास पाहातांक्षणींच लजपतरायांनीं हेरलें कीं याला स्वयंपाकांतलें कांहीं गम्य नसावं. तथापि तो आपला प्रांतबंधु आहे व त्याजबरोबर पंजाबी भाषेंत बोलण्याचा दुर्लभ आनंद उपभोगावयास मिळेल या आशेनें त्यास त्यांनीं दोन दिवस ठेवून घेतलें. पण त्या दोन दिवसांच्या अनुभवानें त्यांस समजून आलें कीं या धटिंगणांत कांहीं राम नाहीं. म्हणून त्यांनीं त्याला साहजिकच रजा दिली. व पुनः कथा मूळ पदावर येऊन तो मद्रासी पोऱ्या व तो सुपरिंटेंडंटाचा आचारी यांजबरोबर लालाजींची सांगड जमली. पोऱ्या, आचारी व सुपरिंटेंडंटाचा बटलर यांचें एक प्रकारें सूत असून बटलरची आंतून फूस असल्यानें पोऱ्या लालाजींस जुमानीनासा झाला व हव्या त्या जिनसा आणून देईना. सुपरिंटेंडंटाकडे तक्रार नेली कीं त्यांनीं पोऱ्याकडे बोट दाखवावें व पोऱ्यास विचारलें कीं त्यानें बटलरची सबब सांगावी.

***

ह्या विलक्षण तऱ्हेचा लजपतराय यांस राग आला व त्यांनीं हें प्रकरण चांगलें पेटविण्याचा निश्चय केला. एके दिवशीं मद्रासी पोऱ्यानें नित्याप्रमाणें लालाजींस जेवण आणून दिलें. त्यांतला गोड लागला तेवढाच पदार्थ लालाजींनीं खाल्ला व भाजी नसल्यामुळें बाकीचें अन्न परत घेऊन जाण्यास पोऱ्यास सांगितलें. पोऱ्यानें बटलरच्या कानावर हा मजकूर घातला. बटलरनें सुपरिंटेंडेंटाकडे त्याचा गिल्ला नेला व अमुक एक भाजी बाजारांत मिळत नाहीं, तीच लालाजींनीं मागितली व ती न मिळाल्यामुळें लालाजींनीं अन्नच खाल्लें नाहीं असें बटलरने साहेबाचे कान भरले! साहेब लाल झाला व तसाच लालाजींकडे आला व अन्न परत करण्याचें कारण त्यानें लालाजींस विचारलें. 'जें गोड लागलें तें मी खाल्लें, सगळें अन्न खाल्लेंच पाहिजे अशी जबरदस्ती मजवर चालणार नाहीं. मला भाजी हवी होती ती मिळाली नाहीं' असा लजपतराय यांनीं जबाब दिला. तुम्ही मागाल ती भाजी मी उत्पन्न केली पाहिजे असें का तुमचें म्हणणें असा साहेबानें लालाजींस घमेंडखोरीनें टोमणा लगावला. पण लालाजी मागत होते ती भाजी मंडईत मिळत असल्याचें सार्जंटच त्याजपाशीं बोलला होता. तथापि सार्जंटाला या भानगडींत पडण्याचें कारण नाहीं असें फर्मावून सुपरिंटेंडंटानें त्यांचें तोंड बंद केलें.

लजपतराय यांना रात्रीं झोंप नीट न लागण्याची खोड पूर्वीपासून होती. त्यांतच मंडालेस जाण्याच्या आधीं यकृताचा विकार वाढला होता. अशा स्थितींत प्रकृति सुधारण्यास व्यायाम हाच एक उपाय. बंदिवासांत असतां व्यायामापैकीं रोजची रपेट हाच काय तो व्यायाम त्यांस करतां आला असता; पण त्यालाहि एक विघ्न उभें राहिलें. लालाजींस सामान्यतः दोघांचा सासुरवास असे. एक तर कैदी या नात्यानें त्यांजवर जेल सुपरिंटेंडंटाचा मुख्य ताबा व दुसरा फिरावयास निघतांना पोलीस सुपरिंटेंडंटाचा ताबा. कैदी पळून जाऊं नये यासाठीं पो. सुपरिटेंडंट आपला शिपाई बरोबर देत असे. मंडालेस उन्हाचा ताप इतका तीव्र कीं दिवस मावळण्यापूर्वी घराबाहेर पडण्याची सोय नसे. आणि पोलीस शिपाई तर दिवस मावल्यानंतर त्यांस बाहेर फिरूं देण्यास तयार नसे. यामुळें फिरणें जवळ जवळ बंदच पडलें. या अडचणीवर जेल सुपरिंटेंडेंट व डे. कमिशनर यांनीं वेगळीच तोड सुचविली.

***

लालाजींच्या बंगाल्याजवळच मोठा कालवा होता. त्या कालव्यांत मासे धरण्याचा अभ्यास तुम्ही कां करीत नाहीं? असे सुपरिंटेंडंटानें लालाजींस एकदा विचारलें. लालाजींना ही कल्पना तितकी पसंत पडली नाहीं. तथापि या निमित्तानें का होईना, उघड्यावर पुष्कळ वेळ काढावयास सांपडेल अशा आशेनें त्यांनीं कबुली दिली. त्यांजकरितां एक गळ सार्जंटानें पैदा केला. लालाजींबरोबरचे शिपाई बहुधा गळ टाकून मासे पकडीत व लालाजी तें पाहात बसत. पण युरोपियन सार्जंट खांद्यावर बंदूक टाकून लालाजींपाशीं कालव्यावर तासन्तास पहारा करण्यास कंटाळला व त्यामुळें हळूहळू हाहि व्यायाम सुटला.

***

लजपतराय बाहेर फिरावयास जात त्या वेळीं बरेच गमतीचे प्रकार होत. त्यांना ब्रह्मदेशांत ठेवण्यांत आलें होतें म्हणून त्यांस हिंदी माणसें पाहाण्यास मिळणें अगदींच बंद पडलें होतें असें नाहीं. ब्रह्मदेशांत अनेक हिंदी माणसें वेगवेगळ्या व्यवसायांत गुंतलेली असून त्यांपैकीं बरेच शीख व इतर पंजाबीहि आहेत. लालाजी दृष्टीस पडले कीं त्यांस आदरपूर्वक नमस्कार किंवा मुजरा करावा अशी हिंदी लोकांस साहजिकच इच्छा होई व त्याचप्रमाणें ते नमस्कार किंवा मुजरा करीतहि. पण हिंदी लोकांनीं दाखविलेला हा आदर लालाजींवर देखरेख ठेवणाऱ्या सरकारी अधिकाऱ्यांच्या पापी नजरेला देखवत नसे. ते अशा लोकांस दटावून हुसकून लावीत. पण त्यांपैकीं कित्येक असे खमंग असत कीं ते अशा दटावणीनें मुळींच दबले न

जात असा एक शीख होता. त्यानें लालाजींस नमस्कार केला. त्याबद्दल त्यास पोलिसांनीं पकडून पोलीस सुपरिंटेंडंटापुढें हजर केलें. सुपरिंटेंडंटाला सदर इसम शीख असल्यामुळें त्याजविषयीं संशय येऊन सुपरिंटेंडंटानें त्यास कसून छेडलें. त्यास सुपरिंटेंडंटानें विचारलें कीं, लालाजींस तुम्ही ओळखतां म्हणून त्यांना तुम्ही नमस्कार केला काय? त्यास शीखानें दिलेलें उत्तर विचार करण्यासारखें आहे. तो म्हणाला 'त्यांना मी फक्त त्यांच्या कीर्तीवरून ओळखतों. ते साधु व मोठे गृहस्थ असल्यामुळें त्यांना नमस्कार करणें माझें कर्तव्य आहे.' सदर शीखास त्या बाजूस पुनः न फिरकण्याची ताकीद देऊन सुपरिंटेंडंटानें त्यास सोडून दिलें!

***

वरील शीखापेक्षां दुसरा एक खमंग शीख पोलिसास भेटला. आपल्या बाहेर फिरण्यानें वाटेचे वाटसरू विनाकारण पेंचांत येतात हें पाहून लालाजींस फार वाईट वाटे. म्हणून ते बाहेर गेले व समोरून कोणी हिंदी लोक येत आहेत असें दृष्टीस पडलें तर ते परत फिरून त्यांस पाहिल्या न पाहिल्यासारखें करीत. तथापि लालाजींच्या या टाळाटाळीस न जुमानणारेहि कोणी त्यांना भेटतच. कित्येक लजपतरायांच्या बंगल्यापाशीं येऊन त्यांजकडे पाहात उभे राहात. असा एक शीख रस्त्यांतून बंगल्याकडे पाहात उभा राहिला होता. लालाजी सहज आपल्या बंगल्याच्या पडवींत आले व त्यांस शीखानें नमस्कार केला. त्याच्या या गुन्ह्याबद्दल पोलिसांनीं त्यास पकडलें! त्याची व ब्रह्मी सब-इन्स्पेक्टरची बरीच झटापट उडाली. सब-इन्स्पेक्टर त्यास टाकून बोलला त्याबरोबर त्याला शीखानें रोखठोक उत्तर दिलें. शेवटीं रागावून इन्स्पेक्टर म्हणाला 'कां हो! सरकारला जर खपत नाहीं तर तुम्ही लोक यांना नमस्कार करतां कां?' शीखानें उत्तर दिलें 'सरकार झालें म्हणून तें कांहीं आम्हाला कायद्यानें बंदी करूं शकणार नाहीं.'

***

लालाजींबरोबर जेल सुपरिंटेंडेंटाचें वर्तन प्रारंभीं बरें असे. परंतु हळूहळू त्याच्याहि अंगांत अधिकाराचा मद भरून तो लालाजींशीं बेतालपणानें वागूं लागला. लजपतराय यांस हिंदी लोक किती मानीत याचीं उदाहरणें वर दिलींच आहेत. परंतु त्याच्या अगदीं उलट गोरे अधिकारी त्यांचा कधीं कधीं अपमान करून त्यांच्या दुःखावर डागण्या देत. त्याच वर्गांतील जेल सुपरिंटेंडेंट हाहि होता. लालाजींस घरून पत्रें येत. त्यांपैकीं पुष्कळ पत्रें या नाहीं त्या निमित्तानें सुपरिंटेंडेंट दडपून ठेवीत असे. लजपतराय यांचे बंधु धनपतराय यांनीं लालाजींस भेटण्याकरितां पंजाबसरकारापाशीं परवानगी मागितली. पंजाबसरकारनें ती नाकारल्यानंतर धनपतराय यांनीं लजपतराय यांस लिहिलेलें पत्र सुपरिंटेंडेंटानें दाबून ठेवून लालाजींस 'धनपतराय म्हणून तुमचा कोणी भाऊ आहे काय' एवढेंच विचारलें. त्यावर लालाजींनीं होय म्हणून उत्तर दिलें. सुपरिंटेंडेंट निघून गेला व लालाजींस शंका आली कीं सुपरिंटेंडेंटानें ज्याअर्थीं भावाचें नांव विचारलें त्याअर्थीं भावाकडून आपणास आलेलें पत्र सुपरिंटेंडंटानें आपल्यापाशीं ठेवून घेतलें असावें. पुष्कळ वेळां सुपरिंटेंडंट जीं पत्रें लालाजींस देत नसे तीं पत्रें पाठविणारांचीं नांवें मात्र त्यांस सांगत असे. तो या पूर्वीच्या दाखल्यावरून लालाजींनीं सुपरिंटेंडंटास सदर पत्रलेखकाचें नांव पत्रानें विचारलें. सुपरिंटेंडंटास तेवढेंहि सहन झालें नाहीं. नेहमींप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सुपरिंटेंडंट विचारपूस करण्यासाठीं लालाजींच्या बंगल्यापाशीं आला. त्यानें युरोपियन सार्जंट व पोलीस यांची सलामी घेतली. ती संपतांच नित्यासारखा सुपरिंटेंडंट खालून च हाक मारील या कल्पनेनें लालाजी माडीवरच्या सज्जांत येऊन उभे राहिले. त्यांस पाहून सुपरिंटेंडंट वसकन् त्यांच्या अंगावर ओरडून म्हणाला 'तुम्ही असले उद्धटपणाचे प्रश्न मला विचारीत जाऊं नका. ते मला मुळींच खपणार नाहींत.' लालाजींनीं त्यावर 'यांत तुम्हाला राग येण्यासारखें काय म्हणून विचारतांच सुपरिंटेंडंटानें उत्तर दिलें 'तुमच्याशीं या बाबतींत बोलण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं.' अशा मगरुरीच्या उत्तरानें लालाजींच्या मनाची स्थिति काय झाली असेल याची वाचकांनींच कल्पना करावी.

# अफगाणिस्थानाच्या मार्गावर

## बेत कसा ठरला ?

अफगाणिस्थान हा आपल्या हिंदुस्थानापेक्षांहि मागसलेला देश, धार्मिक समजुती व रूढींचा पगडा तेथें विशेष, राज्यपद्धति जुन्या चालीची, आधुनिक सुधारणेचा प्रवेश तेथें फार उशीरा झालेला. असें असतांहि तेथील अमिरांनीं आपल्या राष्ट्राची सर्वांगीण प्रगति मोठ्या झपाट्यानें व्हावी असे प्रयत्न सुरू केले. तेव्हां आपणासहि आपल्या शेजारच्या राष्ट्राकडून कांहीं उपयुक्त गोष्टी शिकतां येतील त्या पाहाव्या म्हणून तिकडे जाण्याचें ठरविलें.

अशा हेतूनें प्रेरित होऊन दुर्योधनाचा मातुल देश पाहाण्यासाठीं निघावयाचें ठरलें. पण त्यांत अडचणी कांहीं कमी नव्हत्या. पहिली अडचण परवान्याची. कारण अफगाणिस्थान हा बोलूनचालून परकीय देश. सध्याच्या नाजूक वातावरणांत त्याला विशेष राजकीय महत्त्व प्राप्त झालें असल्यानें तिकडे जाणाऱ्या-येणाऱ्यावर सरकाराचें फार कडक नियंत्रण आहे. प्रथमतः आमच्याच सरकारनें परवानगी दिली तर अफगाण-सरकाराकडे अनुज्ञा विचारावयाला जावयाचें. तेव्हां पासपोर्ट ऑफिसांत चौकशी केली. तेथें असें कळलें कीं, युरोप किंवा अमेरिका खंडांत प्रवास करण्याची परवानगी तत्काल मुंबईहून मिळत असली तरी अफगाणिस्थानाला जाण्याची अनुज्ञा हिंदुस्थान-सरकारच्या संमतीविना देतां येत नाहीं.

जाण्याचा मार्ग व हेतु, कोणत्या गांवीं हिंडावयाचें, किती दिवस तिकडे काढणार इत्यादि सविस्तर लिहून हिंदुस्थानसरकारकडे परवानगीची मागणी केली. पण उत्तर येण्यास निदान ३ आठवडे लागतात असें कळलें. कारण अफगाणिस्थानांतील ब्रिटिश वकिलातीची आणि अफगाण परराष्ट्रीय मंत्र्यांची अशा येणाऱ्या इसमास कांहीं हरकत आहे काय अशी पृच्छा करण्यांत येते व समाधानकारक उत्तर आल्यावरच "पासपोर्ट" दिला जातो.

एवढ्यानेंच काम भागतें असें नाहीं. पासपोर्टावर असलेल्या अफगाण वकिलाची संमतिदर्शक सही घ्यावी लागते. मुंबईला अफगाण वकिलाची एक कचेरी आहे. तेथें गेलों असतां असें कळलें कीं, रहदारीवर शिक्कामोर्तब करण्यासाठीं अफगाण-सरकारनें दोन खास अधिकारी नेमले आहेत. त्यांच्याकडे गेलें असतां काम लवकर होईल.

मुंबईच्या अफगाण वकिलाकडून पुष्कळ माहिती याच भेटींत मिळाली. अफगाणिस्थानाला जाण्याचे मार्ग दोन; एक पेशावरहून खैबर घाटांतून काबूलला जाण्याचा आणि दुसरा क्वेट्याहून कंदाहारला पोंचणारा. पेशावरहून प्रतिदिवशीं सकाळीं ८ वाजतां मोटारगाड्या निघतात. सायंकाळीं जलालाबाद येथें मुक्काम होऊन दुसरे दिवशीं सकाळीं प्रवास सुरू झाला म्हणजे तिसऱ्या प्रहरीं काबूलला पोंचतां येतें. अशी माहिती मिळाली खरी; पण त्याच वेळीं वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेल्या बातमीविषयीं त्याला विचारल्यावर फारच गंमतीचें उत्तर मिळालें! मुंबईच्या अफगाण वकिलातीसाठीं येत असलेल्या तिजोरीवर सरहद्दीवरील रानटी लुटारूंनीं हल्ला केला अशी ती बातमी होती ! पण त्या वकिलानें तात्काळ एक नोटांचें पुडकें काढून दाखविलें आणि म्हटलें कीं, "हे पाहा आमचे पैसे ! ते आम्हाला बँकेंतून मिळतात. आमच्या राज्यातून एक रुपयाहि बाहेर जात नाहीं. कारण राजेसाहेबांची सक्त ताकीदच आहे."

मी त्यावर त्यांना विचारलें कीं, "मग वर्तमानपत्रांतल्या बातम्या खोट्याच तर ?" वकिलानें उत्तर केलें "समजा आम्हाला कांहीं पैसे पाठवावयाचे असले तर बरोबर रखवालदार दिल्याविना कोण पाठवील ? इतके का आमचे अधिकारी वेडे आहेत? हे पैसे कालच आले. आणखी पुढील आठवड्यांत येतील. वर्तमानपत्रें अफगाणिस्थानाची बातमी म्हटली कीं कांहीं तरी तिखटमीठ लावून लिहितात."

अशा प्रकारचें बोलणें झाल्यावर मी विषय बदलण्यासाठीं असा प्रश्न केला कीं 'हिंदु म्हणून मला कांहीं तेथें त्रास होईल काय ?' त्यास असें उत्तर मिळालें कीं, "मुळीच नाहीं; फारच प्रेमानें आमचे लोक आपलें स्वागत करतील. शिवाय आमच्या देशांत पुष्कळ पंजाबी हिंदु व शीख आहेतच. साहेबांना मात्र तेथें कोणी विशेष मानीत नाहीं."

इतकी माहिती मला पुरी झाली. तेवढ्यावर संतुष्ट होऊन पेशावरला जावें व तेथें पुढची माहिती मिळवावी असें ठरविलें.

### पेशावरचा परिचय

मुंबईहून पेशावर १५४५ मैल (जी. आय. पी. मार्गें) आहे. बी. बी. सी. आय रेल्वेने ९५ मैल जवळ पडतें. तेथें जाण्यास सोईच्या अशा गाड्या दोनहि रेल्वेच्या आहेत. सर्वांत अधिक सोईची जाणारी गाडी बी. बी. सी. आय. ची फ्रॉंटियर मेल असल्यानें मी त्याच गाडीनें आलों. सुमारें ४४ तासांत हा प्रवास झाला आणि पेशावरला येतांच पासपोर्ट अधिकाऱ्याकडे जाऊन माझ्या 'रहदारी'वर

शिका मारण्याविषयीं विनंति केली; पण सरहद्दीवरील गडबडीमुळें तिकडे जाण्याची कोणासच परवानगी देतां येत नाहीं असें सांगण्यांत आलें.

काबूलचा रस्ता जो अडला गेला तो अफगाण हद्दींतलाच आहे. खैबर घाटापुढे डाका म्हणून अफगाणिस्थानांतलें एक गांव आहे. त्यानंतर जलालाबाद हें दुसरें शहर. आणि नंतर काबूल अशा मार्गानें मोटारी जातात. सध्या जी गडबड आहे ती डाका व जलालाबाद यांच्यामध्यें असलेल्या भागांत आहे. सरहद्दीवरील प्रांतांत आफ्रिडी, वजिरी, महसुदी, बलुची इत्यादि अनेक रानटी जातींचे लोक आहेत. त्या सर्वांत 'शिनवारी' म्हणून जी जात ती विशेष नाठाळ आहे. त्यांच्यावर सत्ता कोणाचीच नाहीं; म्हणजे ते कोणालाच मानीत नाहींत. आणि स्वतःपैकीं कोणाला तरी मुख्य मानून त्याच्याच तंत्रानें चालण्यासाठीं लागणारी विचारशक्ति त्यांना नाहीं. थोडक्यांत सांगावयाचें तर प्रत्येकजण अगदीं राजाप्रमाणें स्वतंत्र, नव्हे निस्तंत्र, आहे! त्यांचा प्रांत अफगाणाधिपतीच्या सत्तेखालीं मोडत असला तरी त्यांच्यावर हुकमत गाजविणें आजपर्यंत कोणासहि शक्य झालें नाहीं. राजा हा त्यांचा केवल 'शब्दपति' होय असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. लूट मारहाण चोरी हे त्यांचे वडिलोपार्जित धंदे होत. तेव्हां त्यांना कोणीहि लगाम घालण्याचा प्रयत्न केला कीं ते चवताळणारच आणि हाच प्रकार सध्या झाला असल्यानें या शिनवरी लोकांनीं डाका व जलालाबादमधील रस्त्यांत पुंडाई मांडली आहे.

ही अव्यवस्था दूर होऊन पूर्ववत् रहदारी सुरू व्हावी म्हणून अफगाण-सरकारचे प्रयत्न जारीनें चालू आहेत. शिनवरी लोकांस वठणीवर आणण्यासाठीं काबुलाधिपति जातीनें जलालाबादपर्यंत आले होते. विमानें, मशीनगन्स यांचाहि उपयोग केला आणि तात्पुरती शांतता प्रस्थापित झाली आहे असें म्हणतां येतें. कारण तीन दिवसांपूर्वीच एक 'काफिला' काबूलहून येथें आला. काफिला म्हणजे उंटवाल्या व्यापारी लोकांचा तांडा. हा काफिला किती मोठा असतो याची कल्पना प्रत्यक्ष पाहिल्याविना यावयाची नाहीं. ५००-६०० उंट एकामागून एक चालत असतात, बरोबर त्यांचे रक्षकहि असतातच. पण अशा या मालिकेनें मैल मैल रस्ता अडल्यास नवल नाहीं. कित्येक काफिले १०-१५ मैल असतात असें म्हणतात. प्रत्यक्ष पाहिलेला असा हा काफिला केवळ २॥-३ मैलच होता. हा काफिला या धामधुमींत डाक्याजवळ अडकला होता. तो आला तेव्हां रस्ता खुला झाला असेल अशी साहजिक कल्पना झाली. परंतु पुनः दंगाधोपा होण्याची भीति असल्यामुळें दुसऱ्या आणखी काफिल्यास जलालाबादकडूनच मागें फिरविलें असें त्यांनीं सांगितलें. म्हणजे अद्याप पूर्ण शांतता नांदत नाहीं हें उघड आहे.

येथें आल्यापासूनच्या रिकामपणाच्या काळांत बरीच माहिती पेशावर शहरासंबंधानें मिळाली. आजची ही पठाणांची वस्ती पाहून कीं काय कोण जाणे हिला 'राक्षसनगरी' म्हणण्याचा प्रघात आहे. परंतु—

"येन धौता गिरः पुंसां विमलैः शब्द-वारिभिः
कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै पाणिनये नमः"

असें ज्या जगांतील अद्वितीय वैयाकरणाचें वर्णन आहे तो अष्टाध्यायीकर्ता पाणिनी येथेंच जन्मला असें म्हणतात! इतकेंच नव्हे तर २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करणारा जमदग्निसुत परशुराम या पुरीचा जनक समजला जातो. पूर्वी परशुपुर किंवा पुरुषपूर म्हणून हें शहर विख्यात होतें, असाहि सर्वजनांचा समज आहे. पुराणवस्तुसंशोधन खात्यानें लाविलेल्या शोधामुळें परिक्षित राजाच्या सर्पसत्राची भूमि तक्षशिला नगरी हीहि येथून जवळ असलेल्या तक्षिला गांवांतच असली पाहिजे असें तज्ज्ञांचें म्हणणं आहे. कदाचित् शिकंदराच्या वेळचा 'पौरस' राजाहि या पेशावरचा स्थापनकर्ता असू शकेल. इतकें मात्र निश्चितीनें म्हणतां येतें कीं, अल्बीरुणीनें निर्दिष्ट केलेलें 'परशुशावरः' किंवा अबुल फझलनें आपल्या ग्रंथांत उल्लेखलेलें 'पेशावर' अथवा हल्लींचे पेशावर हीं सर्व एकच होत. शिवाय अकबरानें पेशावरच्या ऐवजीं 'पेशावर' हें नांव ठेवलें आणि तें यथार्थहि होतें. आजही यथार्थ आहे. पेशावर याचा अर्थ सीमानगर-सरहद्दीवरील शहर असा आहे.

वायव्यसीमा प्रांताधिकाऱ्यांची राजधानी, सरहद्दीवरील मोठें लष्करी नाकें, वैमानिक दलाचें ठाणें, इराण अफगाणिस्थान व मध्य-आशियांतील इतर देश यांच्या सर्व व्यापाराची मोठी उतारपेठ, रेल्वेचें मोठें स्टेशन इत्यादि अनेक बाबींमुळें या शहरास महत्त्व प्राप्त झालें आहे. पाणी मुबलक असल्यानें भाजीपाला विपुल व चांगला मिळतो. सर्व प्रकारचें धान्य व खाद्य वस्तू फारच स्वस्तांत मिळतात. महागाई आहे ती एक स्वच्छतेचीच! हिंवाळ्याचा नुकताच प्रारंभ असला तरी थंडी आपल्या पुण्याकडील मानानें बोलावयाचें तर कडाक्याची पडते असें म्हणतां येईल. सूर्याचा प्रखरपणा असा भासतच नाहीं. अगदीं स्वच्छ ऊन पडलें तरी तासच्या तास कांहींहि त्रास न होतां उन्हांत बसतां येतें, बसावेसें वाटतें! शिवाय गेले २।३ दिवस पावसाची झिमझिम चालू आहे. यानंतर थंडीस अर्थातच जास्त जोर येईल.

पठाणांची भाषा पुश्तु हीच सर्वत्र चालू आहे. पण पंजाबी बोलणारे लोकहि आढळतात. लिपी उर्दू असल्यानें हिंदु देवालयावर असणारे फलकहि उर्दूत लिहिलेले पाहून विचित्र वाटतं ! न वदेद्यावनीं भाषाम् प्राणैः कण्ठगतैरपि असा निर्बंध घालणारानें " श्रीकृष्णमंदिर " अशी पाटी उर्दूत लिहिलेली पाहिली असती तर त्याचा कोपानल किती भडकला असता याची कल्पनाच करावी ! मंदिरांत पूजेसाठीं वरकोट [ ओव्हरकोट ] घालूनहि आंत जाणारे पुजारी किंवा पठाणांच्यासारख्या रंगीत कापडाच्या पोकळ विजारी घालणाऱ्या हिंदु स्त्रिया दृष्टीस पडल्या म्हणजे एकदम धक्का बसल्यासारखें होतें. पण इकडील तो रिवाजच असे लक्षांत आल्यावर कांहीं वाटत नाहीं. कांहींहि म्हटलें तरी विजारी व सदरे घालणाऱ्या हिंदु स्त्रिया ही कल्पना मनाला एकदम पटत नाहीं, डोळ्यांना रुचत नाहीं हें खरें. पण हे देश-देशचे रिवाज आहेत.

पुराणवस्तुखात्याचें संग्रहालय, सरकारी उद्यान, शहराचा बाजार व लष्करांतील नवीन धर्तीचीं दुकानें इत्यादि भाग प्रेक्षणीय आहेत. पेशावरचा किल्ला हल्लीं ब्रिटिशांच्या ताब्यांत असून तेथें बिनतारी तारायंत्राचें मोठें स्टेशन आहे.

अशा या पेशावर शहरीं मराठी बोलणारी मंडळी अगदीं दुर्मिळ हें खरें; परंतु आश्चर्य हें कीं येथें मुंबईहून ४-५ महाराष्ट्रीय मंडळी मुलामंडळीसह पेशावर पाहण्याच्या उद्देशानें आली होती ! कर्मधर्मसंयोगानें आम्ही सर्व एकाच ठिकाणीं उतरलों होतों म्हणून त्यांच्या सहवासांत ४ दिवस झटकन् गेले. आतां येथून केट्टा गांठावयाचा व कंदाहारमार्गे काबूलला जावयाचें असा आजचा बेत आहे.

# राष्ट्रकार्यांत तरुणांचें स्थान

गेल्या अंकांत राष्ट्रीय शक्तीचीं तीन केंद्रस्थानें सांगितलीं आहेत. पण तीं तीन स्थानें अगदीं परस्पराहून अलग नसून त्यांचा एकमेकांशीं निकट संबंध आहे. त्यांतल्या त्यांत शेतकरीवर्ग व मजूरवर्ग यांच्यांत जागृति उत्पन्न करण्यास व विशेषतः नवचैतन्य ओतण्यास तरुण वर्ग उपयोगी पडत असल्यानें तरुण वर्ग हा शक्तित्रयाचें उगमस्थान होय असें मानण्यासहि हरकत नाहीं. शेतकरी वर्गाला किंवा कामकरी वर्गाला संघटित करण्याला जशीं अनेक कारणें उद्भूत होतात तशीं कोणतींहि कारणें सर्व तरुण वर्गाला लागू पडण्यासारखीं नसतात. तरी पण इतर वर्गांत जेवढी संघशक्ति निर्माण होऊं शकेल तिच्यापेक्षा अधिक शक्ति या एकाच वर्गाच्या संघटनेनें उत्पन्न करतां येते. हा वर्ग भावनाप्रधान असल्यानें त्याच्या एकीकरणाला अल्प निमित्त पुरेसें होतें. जो तरुण वर्ग अद्यापि व्यवहारांत पडलेला नसतो, त्याला वैयक्तिक स्वार्थ नसल्यामुळें त्याचे विचार संकुचित दृष्टीचे नसून सर्वव्यापक असतात. म्हणूनच कोणत्याहि एखाद्या सार्वजनिक स्वरूपाच्या प्रश्नासंबंधानें तो इतर कोणाशींहि तादात्म्य पावूं शकतो. आणि अशा तादात्म्य पावण्याच्या त्याच्या वृत्तीमुळेंच इतरांचें संकट जणुं काय स्वतःवरच ओढवलेलें आहे अशा भावनेनें तो त्याच्या प्रतिकारार्थ झगडण्यास बद्धपरिकर होतो.

या वर्गांत भावनेचें असें प्राबल्य असल्यामुळें त्याच्या रागद्वेषादि भावना तत्काळ प्रगट होऊं लागतात. हा एका दृष्टीनें गुण तर खराच. पण त्यांत चांचल्यदोष असल्यानें तेच विकार केव्हां उलटतील याचाहि नेम नसतो. आज ज्या व्यक्तीविषयीं त्याच्या मनांत पूज्यबुद्धि असेल, त्याच व्यक्तीविषयीं उद्यां कदाचित् त्याच्या मनांत विपरीत भावनाहि प्रगट होऊं शकेल. आणि म्हणूनच या वर्गाची तुलना शीघ्रकोपी अशा रुद्र देवतेशीं करतां येईल. तिच्या आराधनेचें सर्व तंत्र सुरळीत चाललें तर ती प्रसन्न होण्यासहि वेळ लागत नाहीं आणि कोणाला कसला वर द्यावा याचेंहि तिला तारतम्य नसते. आणि जर का तांत्रिक विधींत कोठें यत्किंचित् व्यंग दिसलें तर तिला रुष्ट होण्यालाहि वेळ लागत नाहीं. तरुण वर्गाच्या भावनेंत असला रंगपालट केवळ लहरीखातर होतो असें म्हणण्याचा आमचा उद्देश नाहीं व तसा अनुभवहि नाहीं. भावनाप्रधानत्व हा तरुणांच्या अंगचा दोष नसून गुणच आहे, पण जसा उत्तम ताजवा थोडेसें वजन कमजास्त झालें कीं उलट्याचा सुलटा होतो, तसाच प्रकार तरुणसंघांतहि होत असतो. पण हें त्याचें विकार-सुलभत्व जाणून जो त्याला यथायोग्य दिशा दाखवील त्याला पाशुपतास्त्रासारखें अमोघ साधन होतें आल्याप्रमाणें वाटेल यांत शंका नाहीं.

तरुणांच्या संघशक्तींत अशा तऱ्हेनें विचारशक्तीपेक्षा विकारशक्तीच अधिक असल्यानें तिचें कार्यक्षेत्रहि मर्यादितच असतें; आणि म्हणूनच या शक्तीस रुद्र देवतेची उपमा साजते. रुद्र देवता जशी मुख्यतः संहारकर्त्री आहे तशीच ही युवकसंघशक्तिहि मुख्यतः संहारकर्त्री आहे आणि राष्ट्रांत ज्या ज्या वेळीं राजकीय, सामाजिक, आर्थिक इत्यादि कोणत्याहि बाब-

र्तीत जुनी घडी मोडून नवी घडी बसवावयाची असते, त्या वेळीं या शक्तीचा उपयोग जुनी घडी मोडण्याच्या कामाकरितां होत असतो. आजवरच्या इतिहासाचा अनुभव असाच आहे. उत्क्रांति व क्रांति हे जे सुधारणेचे दोन मार्ग. त्यांपैकीं उत्क्रांतीच्या कामीं या वर्गाचा विशेष उपयोग होण्याजोगा नसतो. पण जेथें उत्क्रांतीनें कार्यभाग होऊं शकत नाहीं, किंवा मुंगीच्या पायानें होणाऱ्या सुधारणेची वाट पाहात बसण्याइतका धीर निघेनासा होतो, अशा वेळीं क्रांतीच्या मार्गांत पहिले पाऊल टाकून क्रांतीचें निशाण पुढें चालविण्याचें कार्य, पंडित जवाहिरलाल नेहरू यांनीं म्हटल्याप्रमाणें, तरुणांच्या कडूनच होत आलें आहे. अमेरिकेनें स्वातंत्र्ययुद्धास प्रारंभ करण्यापूर्वी स्वातंत्र्यप्राप्तीच्या मार्गाची भवति-न-भवति चालविली होती. आणि इंग्लंडाहून येणाऱ्या मालावर बहिष्कार घालण्याचा ठरावहि अमेरिकन कॉंग्रेसनें मंजूर केला होता. पण जेव्हां अमेरिकन तरुणानीं रेड इंडियन्सचीं सोंगें घेऊन इंग्लिश जहाजांवर चढून त्यांतील चहाच्या पेट्या समुद्रांत फेकून दिल्या, तेव्हांच खरें लढाईस तोंड लागलें आणि 'उत्क्रांति का क्रांति' हा वाद बंद पडला.

पण अशा पल्ल्यापर्यंत मजल येऊं देणें किंवा न देणें हें प्रतिपक्षाच्या स्वाधीन असते. सनदशीर मार्गाची विफलता सर्वांना पटली आणि निराशेचें साम्राज्य सर्वत्र पसरलें तरच असले क्रांतिकारक विचार मनांत उद्भवूं लागतात व ते कृतींत आणण्याकरितां युवक-संघ अहमहमिकेनें पुढें येऊं लागतो. त्यास अशा रीतीनें पुढें येऊं द्यावयाचें नसल्यास सनदशीर मार्गावरील विश्वास ढळणार नाहीं अशी खबरदारी प्रतिपक्षानें घेतली पाहिजे. अर्थातच निराशेच्या वैरागानें उत्क्रांतीचा मार्ग सोडून देऊन क्रांतीच्या मार्गांत पाऊल टाकण्याची उत्सुकता देशांत वाढूं लागल्यास तरुणांच्या नांवानें खडे फोडण्याऐवजीं आपल्या हातून चूक घडत आहे हें ओळखून प्रतिपक्षानें तात्काळ ती चूक सुधारण्याच्या मार्गास लागलें पाहिजे.

तरुण-संघाच्या अंगांत संचारणारा हा उत्साह क्षणिक असतो व थोडक्याशा आपत्तीनें तो पार मावळून जातो अशी कित्येकांची समजूत आहे, आणि या समजुतींत थोडेसें तथ्यहि आहे. पण उत्साहाच्या पहिल्या भरतीच्या आवेशांत जितके तरुण राष्ट्रकार्य करण्याला पुढें सरसावतात तितके सगळेच त्या कार्यांत यश येईपर्यंत टिकून राहातील, अशी कोणीहि विचारी माणूस आपली समजूत करून घेत नाहीं. वसंत ऋतु येतांच आंब्याच्या झाडाला जेवढा मोहोर येतो तेवढ्या सगळ्याचे आंबे धरले जातील असें कोणीहि समंजस मनुष्य समजत नाहीं. झाडावर जेवढा मोहोर आला असेल, त्यांतला बराचसा भाग गळून पडणार हें सर्वांस ठाऊकच असतें. तरी पण मोहोर धरल्याशिवाय आंबा लागत नाहीं हेंहि तितकेंच खरें असतें. याच न्यायानें जितके तरुण विद्यार्थी राष्ट्रकार्याकरितां आज उत्सुकतेनें पुढें येत असतील त्यांतले शें. ९० विद्यार्थी अल्पावधींतच या खटाटोपास कंटाळून तो सोडून देतील, असें मानलें तरीहि जे शें. १० विद्यार्थी कायमचे टिकून राहातील ते या उत्साही वर्गांतलेच असणार हें निश्चित आहे. भावनाप्रधान अशा ऐनतारुण्याच्या भरांत ज्याच्या मनांत राष्ट्रकार्याचें प्रेम उचंबळत नाहीं व राष्ट्रीय आपत्तीशीं झगडण्याकरितां निधड्या छातीनें त्या वेळीं जो पुढें येत नाहीं, तो पस्तिशी उलटल्यावर राष्ट्रकार्याला कितपत उपयोगी पडूं शकेल? म्हणूनच राष्ट्राची सगळी भिस्त तरुण पिढीवर असते असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. शिवाय ज्यांनीं आधींपासून सारासार विचार करून पोक्तपणानें राष्ट्रकार्याचें निशाण हातीं घेतलें असेल त्यांच्यांतले तरी सर्वच लोक अखेरपर्यंत टिकाव धरतात असें थोडेंच आहे. "बळाचे पुढें घातले चालवीले। पुढें काष्ठयंत्रांत ते घालवीले। घरें लूटिलीं सर्वही नागवीलें। पुढें सोडिता थंड झाले निमाले ॥" यांत समर्थांनीं वर्णिल्याप्रमाणें काष्ठयंत्रांतून एकदां सुटका झाल्यावर पुढें गप्पगार होणारे आणि राजकीय चळवळीचें नांवहि न घेणारे अनेक पोक्तहि आढळतात! तेव्हां अर्ध्या वाटेंतच हातपाय गाळण्याचा हा दोष तरुणांतच असतो आणि इतरांत नसतो असें म्हणून तरुणांच्या चळवळीचा उत्साहभंग करण्याचें कारण नाहीं.

तरुणांची वृत्ति भावनाप्रधान व अस्थिर असल्यामुळें त्यांचें ध्येय वारंवार बदलतें आणि आज ही चळवळ हातीं घे, उद्यां ती टाकून दुसरीच सुरू कर असला धरसोडपणा झाल्यानें कोणतेंहि एक कार्य त्यांच्या हातून पूर्णपणें तडीस जात नाहीं असाहि एक आक्षेप घेण्यांत येतो. पण तरुणांच्या या धरसोडीला पोक्त पुढाऱ्यांच्याच विचारांतला अनिश्चितपणा पुष्कळांशीं कारणीभूत होत असतो. ध्येयासंबंधानें पुढाऱ्यापुढाऱ्यांत देखील एकमत नाहीं. कोणी चतकोर स्वराज्य मागणार, कोणी वसाहतीचें स्वराज्य मागणार तर कोणी निर्भेळ स्वातंत्र्य हेंच ध्येय मानणार! अशा स्थितींत तरुणांनीं निर्भेळ स्वातंत्र्य हेंच आपलें ध्येय ठरविलें हें स्वाभाविकच आहे. कारण हें ध्येय जसें त्यांच्या मनोभावनेला पटेल तसें दुसरें कोणतेंहि अर्धवट ध्येय त्यांना पटणार नाहीं. आणि तरुणांनीं संपूर्ण स्वातंत्र्य हेंच आपलें ध्येय मानल्यानें त्यांच्या चंचलत्वाला एक प्रकारें आळाच बसेल. कारण एकदां अखेरच्या परमोच्च ध्येयाचा उच्चार केल्यावर त्यापुढें ध्येय बद-

घ्यायला अवसरच राहात नाहीं. अर्थातच ध्येयापुरता तरी चंचलत्वाचा दोष यापुढें तरुणांच्या माथीं मारतां येणार नाहीं.

खरा वाद ध्येयासंबंधानें नसून मार्गासंबंधाचा आहे. नेहरू कमिटीचा रिपोर्ट हिंदुस्थानांतील सर्व पक्षांना मान्य झाला तरी त्यांत रेखाटलेलें वसाहतीचें स्वराज्य चळवळीशिवाय आपोआप प्राप्त होणार आहे काय? तें जर चळवळीशिवाय प्राप्त होत असेल व तेवढ्यानें जर काँग्रेसचें समाधान होत असेल तर मग मार्गाचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. परंतु असल्या असंभाव्य गोष्टीवर विश्वास ठेवणारा आतां कोणी राहिला नसेल. सायमन कमिशनाच्या आगमनाच्या वेळच्या बहिष्काराची चळवळ जिच्यापुढें अगदींच फिकी पडेल अशी प्रचंड खळबळ उडवून देणारी चळवळ यापुढें करावी लागेल हें निश्चित आहे. आणि त्या चळवळीची व्याप्ति सुशिक्षित वर्ग व मोठालीं शहरें एवढ्यापुरतीच राहणार नसून अशिक्षित वर्गांत व लहानांत लहान अशा खेड्यांत देखील तिची लाट पोंचली पाहिजे. राष्ट्राचा हा संदेश देशाच्या काना कोपऱ्यापर्यंत पोंचविण्याचें कार्य तरुण वर्गाशिवाय कोण करूं शकेल?

युवकसंघानें हें कार्य आपल्या शिरावर घेण्यापूर्वी आपल्याला तरुणांची खात्री करून देतां आली पाहिजे कीं ही चळवळ इतक्या स्वार्थत्यागानें चालविल्यास आपलें ध्येय हस्तगत होईल. या संबंधांत युवकवर्ग थोडासा साशंक असल्यास तो त्याचा दोष नव्हे. तरुणपिढी स्वार्थत्याग करावयास कचरते किंवा नाखुष असते हें म्हणणें खरें नाहीं. प्राणावर उदार होणे ही स्वार्थत्यागाची परम सीमा होय. आणि राष्ट्रकार्यासाठीं ही परम सीमा अनेक तरुणांनीं आजपर्यंत गांठली आहे व पुढेंहि ते गांठतील. परंतु स्वार्थत्याग व ध्येयसिद्धि यांचा प्रत्यक्ष संबंध त्यांस पटवून दिला पाहिजे. अमुक मंत्र जपला म्हणजे ग्रहण सुटतें असल्या भोळ्या कल्पनेप्रमाणेंच अमुक मंत्र जपल्यास स्वराज्य प्राप्त होतें याहि भोळसट कल्पनेवर त्यांचा विश्वास बसणार नाहीं. आपल्या समोरचा हा गड सर करावयाचा आहे व त्या कामीं शंभर बळी दिल्यास तो किल्ला सर होईल असें सेनापतीनें निश्चयपूर्वक सांगितल्यास शंभरच काय पण पांचशे देखील शिपाई कुरबानी करण्यास अहमहमिकेनें पुढें येतील. पण जर एखादा सेनापति असें सांगूं लागला कीं, या गांवच्या विहिरींत पांच माणसांनीं जीव दिल्यास दिल्लीचा किल्ला तुमच्या हस्तगत होणार आहे तर एकहि शिपाई जीव देण्यास पाऊल देखील पुढें टाकणार नाहीं. सांगण्याचा मतलब हा कीं, तरुणांना आपल्या स्वार्थत्यागाचें चीज खात्रीनें होणार आहे असा प्रत्यक्ष कार्यकारणसंबंध दाखवून दिल्यास स्वार्थत्यागाच्या कामीं ते केव्हांहि माघार घेणार नाहींत.

चळवळीचें लोण खेड्यापाड्यापर्यंत पोंचविणाऱ्या तरुणांची जशी आपल्या चळवळीच्या उपयुक्ततेविषयीं आणि यशस्वितेविषयीं आधीं खात्री पटवून दिली पाहिजे, त्याचप्रमाणें शेतकरी वर्गाला व मजूर वर्गाला ते जो संदेश सांगणार तोहि त्यांना पटणारा व तात्काळ अनुभवास येणारा असा असला पाहिजे. स्वराज्याच्या अभावीं आज या वर्गावर कोणत्या आपत्ती ओढवत आहेत आणि स्वराज्य प्राप्त झाल्यानंतर त्या कशा दूर होतील व नवी स्वराज्यघटना त्यांना कशी कल्याणकारक होणार आहे याची माहिती तरुण वर्गाला सप्रमाण करून दिल्यास त्यांना शेतकरी व मजूर यांची मनोभूमिका करबंदीच्या व सार्वत्रिक संपाच्या योजनेस अनुकूल करून घेता येईल. मात्र प्रत्येक वर्गाला त्याच्या स्वार्थत्यागाचें फल त्यालाच मिळणार आहे अशी खात्री पटवून दिल्याखेरीज सामुदायिक चळवळ होऊं शकत नाहीं हें राष्ट्राच्या पुढाऱ्यांनीं लक्षांत ठेवावें.

राजकीय चळवळीची तीव्रता जसजशी वाढत जाईल तसतशी तरुणांच्यावरची जबाबदारीहि वाढत जाईल. परंतु या तीव्रतेचा पारा यंदाच अंतिम टोकाला पोंचण्याचा संभव नाहीं. सायमन कमिशनाचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊन पार्लमेंटरी बिल तयार झालें म्हणजे हिंदी राष्ट्रीय चळवळीला नवा जोम चढणार आहे आणि 'उत्क्रान्ति पद्धति का क्रान्ति पद्धति' या वादाचा अखेरचा निर्णय त्या वेळीं लागणार आहे. तोंपर्यंत तरुणांनीं स्वतःची संघटना करून पुढील मोहिमेची पूर्वतयारी करावी. अद्यापि युवकसंघाची चळवळ कित्येक इलाख्यांतून पसरलेली नाहीं आणि या इलाख्यांतहि तिचा शाखाविस्तार व्हावयाचाच आहे. हें प्रास्ताविक कार्य आटोपूनही चळवळ बद्धमूल झाल्यानंतर युवकसंघानें आपल्यापुढें जे ध्येय ठेवलें आहे त्यांतील स्वदेशीचा प्रसार, ब्रिटिश मालावर बहिष्कार, अस्पृश्यतानिवारण, खेडेगांवची सुधारणा इत्यादि कामें तरुणांनीं हातीं घ्यावीं. पण तत्पूर्वी संघांतील प्रत्येक घटकाने स्वतःच्या स्वाधीन असलेलें जें कार्य करावयाचें तें पूर्णत्वानें पार पाडलें पाहिजे. स्वदेशीचा आणि परकी मालावरील बहिष्काराचा उपदेश करण्यापूर्वी त्यानें स्वतः स्वदेशीचें व्रत पूर्णपणें पाळावें आणि खेडेगांवांची सुधारणा करावयास निघण्यापूर्वी आपली राहाणी खेडेगांवांतील राहाणीशीं सुसंगत होईल आणि आपल्याविषयीं खेडेगांवच्या लोकांस आदर वाटेल अशी ती ठेवावी. त्याचप्रमाणें प्रत्येक तरुणानें शरीरबलसंपन्न व्हावें आणि कॉलेजांतून हल्लीं जेवढें लष्करी शिक्षण मिळतें तेवढें तरी अवश्य संपादन करावें. परवांच्या युवक-

परिषदेंत हत्यारांचा कायदा रद्द करण्याविषयींचा ठराव झाला. पण तो कायदा रद्द होण्याची वाट पहात न बसतां कॉलेजांतून मिळणारें यू. टी. सी. चें शिक्षण घेऊन हत्यारांचा प्रत्यक्ष परिचय करून घेण्याची जेवढी संधि सध्यां मिळते तेवढी तरी त्यांनीं दवडूं नये. सर्वांत महत्त्वाचा ठराव 'यूथ गाईड' स्थापण्यासंबंधाचा आहे. तेवढ्या एका ठरावाची जरी बजावणी झाली आणि प्रत्येक जिल्ह्यांतून निदान शंभराचें एकेक पथक जरी तयार झालें तरी युवक परिषद भरविण्याच्या श्रमाचें सार्थक झालें असें मानतां येईल.

हा सगळा प्रास्ताविक कार्यक्रम युवकसंघाला मिळमिळीत वाटण्याचा संभव आहे. पण भावी चळवळींत त्यांच्यावर जी जबाबदारी पडणार आहे ती पार पाडण्याची पात्रता या पूर्वतयारींवरून त्यांच्या अंगीं येणार नाहीं. आणि अशी पात्रता त्यांनीं दाखविली नाहीं तर कॉंग्रेसला तरी निर्भेळ स्वातंत्र्य हेंच आमचें आजचें ध्येय आहे असें म्हणण्याची स्फूर्ति कशी होईल? संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी न करितां नेहरू कमिटीनें वसाहतीच्या स्वराज्यावरच तूर्त आपली तहान भागवून घेण्याचें कां ठरविलें असा प्रश्न विचारण्यांत येतो. पण तरुणांच्या कार्यकर्तृत्वाविषयीं कॉंग्रेसला आत्मविश्वास वाटूं लागेल तर कॉंग्रेस तरी वसाहतीच्या स्वराज्याला कशाला चिकटून राहील? अर्थातच आपल्या कृतीनें राष्ट्रीय पुढाऱ्यांची खात्री पटवून देणें युवकसंघाचें कर्तव्य आहे. या कर्तव्याची त्यांना जाणीव झाल्यास राष्ट्रकार्यांत तरुणांचें स्थान कोणतें आहे याचें त्यांना आत्मज्ञान होईल व त्यापासून सर्वांनाच कार्यस्फूर्ति मिळेल.

# इंग्लंडाचें दुटप्पी धोरण

राजनीति ही बहुरुप्याप्रमाणें अनेक सोंगें धारण करते असें सामान्यतः म्हणण्याचा प्रघात आहे. पण हा प्रकार ज्या राष्ट्राचा राजकीय पसारा जगांत मोठा त्या राष्ट्राच्या बाबतींत वारंवार अनुभवावयास मिळतो. इंग्लंडाएवढें विस्तृत साम्राज्य आज जगाच्या पाठीवर दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्राचें नाहीं. त्याचे हितसंबंध युरोपांत आहेत, आफ्रिकेंत आहेत, आशियांत आहेत व अमेरिकेंतहि आहेत. निराळ्या शब्दांनीं हीच कल्पना मांडावयाची झाल्यास ब्रिटिश साम्राज्य या पसाऱ्यामुळें एका अर्थी जितकें प्रबल आहे तितकेंच तें परावलंबीपणामुळें दुर्बळहि आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ब्रिटिश साम्राज्याचें सामर्थ्य त्याच्या आरमारांत व सैन्यांत असलें तरी केवळ त्या सामर्थ्यावर जगाशीं तुच्छतेने वागून साम्राज्याचा टिकाव लागण्याची आशा नाहीं. इंग्लंडाचे लष्करी व आरमारी सामर्थ्य लुंग्यासुंग्या चारपांच राष्ट्रांस व प्रबल अशा एखाद्या-दुसऱ्या राष्ट्रास नमवूं शकेल. परंतु चारपांच प्रबल राष्ट्रांनीं इंग्लंडाविरुद्ध आपली जूट बांधली तर त्यांजपुढें इंग्लंड क्षणभरहि दम धरणार नाहीं.

इंग्लंडाचें साम्राज्य साम्राज्याबाहेरील सर्व राष्ट्रांच्या स्वार्थास व महत्त्वाकाक्षांस कोंडून ठेवीत असल्यामुळें या साम्राज्याचा नाश झाला तर त्यांपैकीं पुष्कळ राष्ट्रें साखरच वाटतील! परंतु तें जिवंत आहे तोंपर्यंत त्याच्या आश्रयानें आपलें हित साधून घेण्याची बहुतेकांची इच्छा असणारच. अशा रीतीनें स्वार्थसाधु देशास इंग्लंडाचा आश्रय जसा पाहिजे तशीच इंग्लंडालाहि असल्या आश्रितजनांची, स्वतःची सत्ता टिकवून धरण्याकरितां, आवश्यकता आहेच. किंबहुना या प्रकारचे आश्रितजन मिळतील तितके बगलेंत भारण्यास इंग्लंड उत्सुक आहे. इंग्लंडाचा हा आश्रय इच्छिणारीं सर्व राष्ट्रें समान विचाराचीं व समान हितसंबंधाचीं असतीलच असा नियम नाहीं. कदाचित् त्यांच्या हितसंबंधांत छत्तिसाचा आंकडाहि असेल. पण अमले अन्योन्य शत्रू इंग्लडाकडे आशातुर नजरेनें पाहूं लागल्यास इंग्लंड त्यांजवर प्रेमकटाक्ष टाकण्यास चुकणार नाहीं. असाच कांहींसा प्रकार फ्रान्स, जर्मनी व अमेरिका यांजबरोबर सांप्रत इंग्लंडानें जी लाडीगोडी चालविली आहे तिच्यांत दृष्टीस पडतो. फ्रान्स व जर्मनी यांचें हाडवैर जुनें आहे हें सर्वांस माहीतच आहे. हीं दोन राष्ट्रें दैववशात् एक झालीं तर इंग्लंडाला आपला साम्राज्याचा गाशा हळूहळू गुंडाळावाच लागेल यांत शंका नाहीं. म्हणून जर्मनी व फ्रान्स यांचें हाडवैर न मोडूं देण्याकरितां त्यांच्या द्वेषाग्नीस धूर्तपणानें सर्पण पुरविण्यास इंग्लंड कसूर करणार नाहीं हें उघड आहे. जर्मनी व फ्रान्स यांचें हाडवैर कायम राखावयाचें व त्याच वेळीं इंग्लंडानें मात्र उभयतांशीं स्नेहसंबंधाचें स्मित हास्य गालावर दिसूं द्यावयाचें हें कसब बेमालुमपणानें साधणें फार कठीण आहे, परंतु तें काम इंग्लंडानें सांप्रत अट्टाहासानें चालू ठेवलें असल्याचें आढळून येतें.

### व्हर्सेलीसचा तह

महायुद्धानंतर व्हर्सेलीस मुक्कामीं इंग्लंडप्रभृति दोस्तराष्ट्रें व जर्मनी यांच दरम्यान तह झाला. त्या तहाप्र-

माणें जर्मनीवर खंडणीचा अवजड बोजा दोस्त राष्ट्रांनीं ठेवून दिला व त्याखेरीज जर्मनीनें आपलें आरमार बुडवावें व सैन्य कमी करावें अशाहि अटी घातल्या. या अटी इमानेंइतबारें पार पाडण्याची दहशत जर्मनीस सतत वाटावी अशासाठीं जर्मनीच्या ऱ्हाईन नदीवरील प्रदेशांत फ्रान्स, इंग्लंड व बेल्जम यांनीं आपलें सैन्य ठेवावें ही महत्त्वाची अट जर्मनीस कबूल करावी लागली. ऱ्हाईन प्रांत हा भरवस्तीचा सुपीक आणि खनिज पदार्थांनीं व कारखान्यांनीं समृद्ध असा जर्मनीचा प्रदेश आहे.तो प्रदेश दोस्तांच्या ताब्यांत देण्यांत जर्मनीची मानखंडणा होती तरी ती जर्मनीनें पत्करली. तथापि हा अपमान कोणीहि नाक मुठींत धरूनच पत्करीत असल्यामुळें अपमानाचें हें शल्य लवकरच उपटून निघावें अशी जर्मनीनें आशा बाळगावी यांत गैरवाजवी कांहींच नाहीं.

ऱ्हाईन प्रांतात दोस्तांचें सैन्य राहाण्याची मुदत तहानें पंधरा वर्षांची निश्चित केली होती.दोस्तांनीं प्रारंभीं तेथें ठेवलेलें सैन्य सुमारें पाऊण लाख होतें. परंतु दरपांच वर्षांनीं तेथील सैन्य क्रमाक्रमानें हलवून पंधरा वर्षांनंतर सदर प्रदेश दोस्तांकडून खालीं व्हावयाचा असल्यामुळें पहिल्या पांच वर्षांत कांहीं सैन्य कमी होऊन आतां साठ हजार सैन्य ऱ्हाईन प्रदेशांत शिल्लक आहे. यांतील बहुतेक सैन्य फ्रेंचाचें असून इंग्लंड व बेल्जम यांच्या पलटणी अगदींच जुजबी आहेत. इंग्लंड व बेल्जम यांना आपल्या फौजांचा पाळ जर्मन भूमीवर ठेवण्याचा हट्ट धरण्याचें कांहीं कारण नाहीं. त्यांनीं आपल्या फौजा जर्मनींत ठेवल्या असल्या तर त्या केवळ फ्रान्सच्या भिडेखातरच होत. अशा स्थितींत दोस्तांचें सैन्य जर्मनींतून उठविण्याचा आग्रह जर्मनीकडून फ्रान्सासच होणें जरूर आहे. जर्मन मुत्सद्दी ही गोष्ट जाणून असल्यामुळें केलॉग यांनीं आणिलेल्या युद्धनिवारणाच्या तहावर सही करण्याकरितां जर्मन चॅन्सेलर स्ट्रेसमन पॅरिस शहरीं गेले असतां त्यांनीं फ्रेंच मुत्सद्दी एम. ब्रियांद यांजबरोबर त्या बाबतींत खलबत करण्याची संधि दवडली नाहीं.

महायुद्ध संपल्यापासून गेल्या दहा वर्षांत जर्मनीनें आपल्या चांगल्या वर्तणुकीचा दाखला इंग्लंड, फ्रान्स आदिकरून दोस्त राष्ट्रांस प्रसंगाप्रसंगानें अनेक वेळां पटवून दिला आहे. जर्मनीनें महायुद्धांत फ्रान्सचा पूर्वभाग तोफांच्या आगीनें भाजून काढून मालमत्तेची राखरांगोळी केली याबद्दल फ्रान्सचा जर्मनीवर मोठा राग. पण त्या नुकसानासंबंधानें फ्रान्सनें आकाशपाताळ कितीहि हलविलें तरी तें नुकसान दंडाच्या रकमेंतून भरून काढणें हा एकच उपाय होय.त्याप्रमाणें लोकार्नो येथें नुकसानभरपाईची हप्तेबंदी दोस्तांनीं सुचविली तशी जर्मनीनें कबूल केली. व कबूल केल्यासारखे हप्तेहि आजवर भरले. इतकेंच नव्हे तर आपण स्थापन केलेल्या राष्ट्रसंघाच्या कटांत दोस्तांनीं जर्मनीस घेऊन आपल्या बरोबरीचा दर्जा जर्मन राष्ट्रास मिळवून दिला आणि उलट युद्धनिवारणाच्या तहावर सही करून, जर्मनी कधीं काळीं आपल्यावर उठेल, या फ्रान्सच्या भीतीचें मूळहि जर्मनीनें उपटून टाकलें. फ्रान्सवर चढाई करण्यास पुरेसें सैन्य जर्मनीपाशीं नाहीं, आरमार तर नाहींच नाहीं आणि संपत्तीचा रग म्हणावी तर तीहि उरलेली नाहीं. अशा रीतीनें तीर्थयात्रा केलेल्या व सक्षौर प्रायश्चित्त घेतलेल्या जर्मनीची चित्तशुद्धि पाहावयाची ती काय राहिली?

तथापि फ्रान्सचा जर्मनीवर अद्यापि विश्वास बसत नाहीं. व फ्रान्सचा हा संशयखोरपणा किंवा खुनशीपणा ब्रिटिश मुत्सद्यांस आवडत नसला तरी फ्रान्सचे कान उपटून जर्मनीस न्याय मिळवून देण्याचें ब्रिटिश मुत्सद्यांत धैर्य नाहीं. यामुळें फ्रान्सला सोडवत नाहीं व जर्मनीला धरवत नाहीं अशी इंग्लंडाची तिरपीट उडाली आहे.या तिरपिटीचें चित्र इंग्लंडचे परराष्ट्रमंत्री सर ऑस्टिन चेंबर्लेन यांनीं पंधरा दिवसांपूर्वी काढलें. त्यांना पार्लमेंटांत दोनदां प्रश्न विचारण्यात आले व त्या दोनहि प्रसंगीं त्यांनीं दोन प्रकारचीं उत्तरें दिलीं. पहिलें उत्तर देतांना चेंबर्लेनसाहेब म्हणाले कीं, ऱ्हाईन प्रांतांतून दोस्तांस आपलें सैन्य लवकर हालविण्यास सांपडलें तर त्यासारखा दुसरा आनंद कोणता आहे? सर चेंबर्लेन यांच्या तोंडून वरील उत्तर निघाल्यास तीनच दिवस झाले. त्यांना वाटलें कीं आपल्या उत्तरानें फ्रेंच मुत्सद्यांत चलबिचल उडाली.लागलीच चेंबर्लेनसाहेबांनीं आपल्या तोंडावरचा बुरखा बदलून पार्लमेंटांत पुनः सांगितलें, "छेः हो, माझ्या बोलण्याचा अर्थ तसा नाहीं.जर्मनीनें व्हर्सेलीसच्या तहांत कबूल केलेल्या सगळ्या अटी कोठें पाळल्या आहेत? त्या पाळल्या जाईपर्यंत सैन्य हलवा अशी मागणी जर्मनीस फ्रान्सपाशीं करण्याचा हक्क प्राप्त होत नाहीं."

## चेंबर्लेन साहेबांची हातचलाखी

चेंबर्लेनसाहेबांचीं दोनहि उत्तरें दुटप्पीपणाचीं आहेत. खरी आहेत व खोटींहि आहेत. फ्रेंच सैन्याचा तळ जर्मनींतून उठावा ही इंग्लंडाची सदिच्छा खरीच व भरपाईची सगळी रक्कम जर्मनीपासून फ्रान्सला पावती झाली नाहीं तोंपर्यंत सैन्य हलविण्याची मागणी करण्याचा हक्क जर्मनीस पोंचत नाहीं हेंहि खरेंच.परंतु जर्मन राष्ट्र असल्या पगधस्तीच्या उत्तरांसाठीं खोळंबलेलें नाहीं.त्यानें आतांपर्यंत ठेवलेल्या वागणुकीवरून त्याच्या शुद्ध हेतूविषयीं व भरपाई चुकती करण्याच्या प्रामाणिक इच्छेविषयीं तुमची खात्री

झाली आहे कीं नाहीं?असा जर्मनीचा इंग्लंडास सरळ सवाल आहे. आणि जर खात्री झाली आहे असें तुम्ही कबूल करतां तर कायदेशीर ढालीमागें आपलें तोंड न दडवितां फ्रान्सवर आपलें वजन घालून त्यास सैन्य काढून नेण्यास कां भाग पाडीत नाहीं? किंवा निदान तुम्ही आपल्या पलटणी हलवून आपला प्रामाणिकपणा का सिद्ध करीत नाहीं ? असेंच जर्मनी इंग्लंडास विचारणार हें उघड आहे.

इंग्लंडाच्या या हातचलाखीवरून एक गोष्ट स्पष्ट होते ती अशी कीं, इंग्लंडाला जर्मनीपेक्षां फ्रान्सचें अगत्य अधिक वाटतें आणि फ्रान्स व जर्मनी या जोडींत इंग्लंडाचा ओढा फ्रान्सकडे जसा जास्ती तसा फ्रान्स व अमेरिका या दुसऱ्या जोडींतहि इंग्लंडाचा ओढा फ्रान्सकडेच जास्ती दिसतो.तथापि फ्रान्सकरितां जर्मनीस उघडपणें दूर लोटण्यास इंग्लंड जसें तयार नाहीं त्याप्रमाणेंच फ्रान्सकरितां अमेरिकेसहि झिडकारण्याची इंग्लंडाची मनापासून इच्छा नाहीं. उलट असेंहि म्हणतां येईल कीं फ्रान्सपेक्षां इंग्लंडास अमेरिकाच जवळची. कारण इंग्रज लोक व अमेरिकन लोक हे उभयतां एकाच हाडामांसाचे आहेत. आणि इंग्रज लोक व फ्रेंच हे मुळचे एकमेकांचे हाडवैरी आहेत.परंतु व्यवहार पाहावा तों अगदीं निराळा. जगांतील प्रमुख राष्ट्रांपैकीं लढाऊ जहाजें कोणाचीं किती असावींत हें एकदां कायमचें ठरवून टाकावें अशी अमेरिकेची फार दिवसांची इच्छा असून त्यासाठीं वॉशिंग्टन शहरीं अमेरिकेनें प्रमुख राष्ट्रांची परिषदहि भरविली होती. तथापि बड्या जहाजांच्या बाबतींत इंग्लंड व अमेरिका यांचा फारसा बेबनाव नसला तरी क्रूझर बाळगावयाचीं तीं लहान व मोठीं कोणीं किती बाळगावीं याविषयीं उभय राष्ट्रांत जिनीवा मुक्कामीं कांहीं महिन्यांपूर्वी मतभेद होऊन दोनहि राष्ट्रांचे प्रतिनिधी विषण्ण मनानें उठून गेले.

## बारावें व बारसें

अशा रीतीनें उभयतांचें फिसकटलें असतांहि जगांतील युद्धांचें निवारण करण्याच्या गोष्टी बोलण्यास अमेरिका तयार व अमेरिकेचा ताल धरून तिनें मांडलेल्या तहाच्या खर्ड्यावर सही ठोकण्यास इंग्लंड तयार. या तहावरील सह्यांची शाई वाळली नाहीं तोंच ज्याच्यायोगानें जगांत युद्धाची खाई लवकरच पेटेल असला तह फ्रान्सबरोबर करण्यास फिरून इंग्लंड तयारच. म्हणजे इंग्लंडाची तयारी बाराव्यालाहि आहे व बारशालाहि आहे असाच याचा अर्थ नव्हे काय? इंग्लंडानें फ्रान्सशीं केला हा गुप्त तह असून त्यायोगानें इंग्लंड देश अमेरिका व जर्मनी यांजविरुद्ध वैराचा पाया रचीत आहे. हा तह इंग्लंड व फ्रान्स यांच्या लष्करी व आरमारी सैन्यास सारखाच लागू आहे. किंबहुना या तहानें इंग्लंड व फ्रान्स यांनीं आपल्या लष्करी व आरमारी गरजा भागवून जो शत्रु फ्रान्सचा तोच इंग्लंडाचा व जो मित्र इंग्लंडाचा तोच फ्रान्सचा असें ठरवून टाकलें आहे. सदर तहांतील कलमेंहि गमतीचीं आहेत. वॉशिंग्टनच्या तहांत ठरलीं तेवढींच बडी जहाजें फ्रान्सनें बाळगावी; त्याखालचीं क्रूझर व टॉर्पेडो आदिकरून जहाजे फ्रान्स व इंग्लंड यांनीं आपल्या सोयीस येतील तितकीं बांधावीं असें त्यांत म्हटलें आहे. सैन्याच्या बाबतींत इंग्लंडानें फ्रान्सचे पुष्कळच लाड पुरविले आहेत. फ्रान्सनें लष्करांत सक्तीनें सैन्यभरती करावा, पण सैनिक होणारांस कांहीं दिवसच लष्करांत ठेवून घ्यावें अशी युक्ति त्यांत आहे.

तहाच्या वरील कलमांवरून तहाच्या हेतूविषयीं मुळींच संशय राहात नाहीं. अमेरिका,जर्मनी व फ्रान्स या तीन प्रमुख राष्ट्रांतून इंग्लंडाला फ्रान्सच्या मैत्रीचीच मातब्बरी अधिक वाटत असून प्रसंगीं जर्मनी व अमेरिका हीं दोन राष्ट्रें आपल्याविरुद्ध उठलीं तरी चालतील, पण फ्रान्सच्या मैत्रीस मुकावयाचें नाहीं असा इंग्लंडानें पणच केला असल्याचें स्पष्ट दिसून येतें. जगांत इंग्लंडाला एकट्या अमेरिकेच्या आरमारी बळाची भीति वाटत होती. ती भीति इंग्लंड व फ्रान्स यांच्या आरमारी जुटीनें दूर होणार आहे. जर्मनीचें लष्करी बळ मोडलें असलें तरी जर्मनी गुप्तपणें तयारी करून कोणत्या वेळीं आपला कसा घात करील याचा फ्रान्सला भरंवसा नाहीं. पण फ्रान्सच्या मदतीस इंग्लंडाचें सैन्य आतां सदैव सिद्ध राहावयाचें असल्यानें फ्रान्सला जर्मनीची धास्ती बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. इंग्लंड व फ्रान्स यांची जोडी अशा रीतीनें फिरून जमल्यामुळें फ्रान्स जें ठरवील त्यास मान तुकविण्यापलीकडे इंग्लंडाला कांहींच कामगिरी राहिलेली नाहीं. इंग्लंडानें केलेला हा तह अनेक ब्रिटिश मुत्सद्यांस पसंत नाहीं. महायुद्धाच्या काळांत असलाच तह इंग्लंडनें फ्रान्सबरोबर करून आपल्या मानेस तात लावून घेतली. असल्याच तहानें दहा लाख ब्रिटिश सैनिकांच्या रक्ताच्या नद्या वाहविल्या व अब्जावधि रुपयांचा चक्काचूर उडाला अशी त्यांची तक्रार आहे. इंग्लंडाचा बळी घेऊन फ्रान्स आपलें वैभव टिकवीत व वाढवीत आहे असा या तक्रारींचा आशय आहे.

परंतु ब्रिटिश सरकारच्या बाजूनें असें म्हणतां येईल कीं, खुद्द इंग्लंडाच्या जिवावर एखादें संकट बेतलें तर जर्मनी दूर राहील व अमेरिकाहि अटलांटिक महासागरापलीकडे अडकून पडेल आणि मदतीकरितां कोणी धावून आला तर फ्रान्सच येईल.

महायुद्धांतहि जर्मन सैन्याचा अचानक सुटलेला लोंढा फ्रेंचांच्या मदतीस जाऊन इंग्रजांनीं परभार फ्रान्सांत दाबून धरला नसता तर तो लोंढा इंग्लंडांत शिरून इंग्लंड देश व इंग्लंडाचें साम्राज्य कदाचित् रसातळास पोंचण्याचाहि संभव होता. या दृष्टीनें इंग्लंड व फ्रान्स या जोडींत कोण कोणास वांचवितो असा प्रश्न उपस्थित केल्यास दोघहि एकमेकांस वांचवितात हेंच उत्तर द्यावें लागेल. तथापि इंग्लंडानें फ्रान्स-बरोबर केलेला तह गुप्त आहे. पण तो आतां प्रगट झाल्यामुळें इंग्लंडावरचा अमेरिका व जर्मनी यांचा विश्वास उडणार हें उघड आहे. इतकेंच नव्हे तर इटालीसहि हा तह म्हणजे भावी युद्धाचें रणशिंगच वाटतें आहे. फ्रान्स, जर्मनी व अमेरिका या तिघांस गोड भुलथापांनीं झुलवीत ठेवतां ठेवतां गुप्त तह फुटून इंग्लंडास त्याच्या दुटप्पीपणानें तोंडघशीं पाडलें. त्यांतून अब्रू निशा तें कसें काय उठून उभें राहातें पाहावें.

# कै. दे. भ. लाला लजपतराय यांचा अमेरिकेंतील जीवनक्रम

( ले.—ना. सु. हर्डीकर, हुबळी )

लेखांक १ ला

[ डॉ. हर्डीकर यांनीं लाला लजपतराय यांच्यासमवेत अमेरिकेंत तीन वर्षांचा काळ घालविला असून त्या अवधींतील लालाजींच्या जीवनक्रमाचा इतिहास त्यांनीं इंग्रजी व कानडी पत्रांमधून क्रमशः लिहिण्यास सुरुवात केलेली आहे. मराठी वाचकांनाहि त्याचा फायदा मिळावा या उद्देशानें 'केसरी' पत्रातर्फें त्यांना विनंति करण्यांत आली व ती त्यांनीं मोठ्या आनंदानें मान्य करून, इंग्रजी मजकुराच्या आधारें केसरीकरितां जास्त माहिती ग्रथित करून त्यांनीं सांगितली. सदर लेखमाला इंग्रजी लेखांचा अनुवाद असला तरी मराठी वाचकांकरितां विशेषतः केसरी पत्राकरितां म्हणून त्यांनीं या लेखमालेंत बऱ्याच अप्रसिद्ध गोष्टींचा समावेश केला आहे असें वाचकांना आढळून येईल.—**राधातनय**. ]

## प्रास्ताविक

लालाजींच्या मरणामुळें हिंदुस्थानच्या राजकारणाचें दीर्घकालपर्यंत भरून न निघणारें नुकसान झालेलें आहे. अशा वेळीं लालाजींनीं आपल्या चाळीस वर्षांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमाच्या रूपानें आमच्यापुढें आंखून ठेवलेला मार्ग आक्रमण करणें आणि त्यांचेंच ध्येय डोळ्यापुढें ठेवणें आमचें पवित्र कर्तव्य होय.

माझ्या अमेरिकेंतील वास्तव्या पूर्वी मी लालाजींचेंच केवळ नव्हे, तर " लाल बाल पाल " या त्रयीचें नांव हिंदुस्थानांत ऐकिलें होतें. त्या प्रसंगीं म्हणजे १९०७ सालीं, आमच्या वयोमनाप्रमाणें या राष्ट्रीय त्रैमूर्तींबद्दल सादर अभिमानहि वाटत होता.

" लाल बाल पाल " या तिघांपैकीं अमेरिकेस जाण्यापूर्वी लालाजींना पाहण्याचा सुयोग मला लाभलेला नव्हता. बाल ( लो. टिळक ) यांस देखील सर्व आयुष्यांत १९०६ सालीं एकदांच त्यांच्या वाड्यांत दर्शनार्थ गेलों होतों. पाल यांची मात्र कलकत्त्यास बऱ्याच वेळां गांठ पडली होती. पहिल्या दोन व्यक्तींबद्दल माझ्या मनांत अत्यंत पूज्यभाव असून लो. टिळक यांना तर मी गुरुस्थानीं मानीत असे व आहे. लाला लजपतराय यांच्याबद्दल पूर्वीचाच आदरभाव असल्यामुळें हे अमेरिकेंत आल्याबरोबर महाराष्ट्र मंडळाचा कार्यदर्शी या नात्यानें त्यांचें मी पत्रानें स्वागत केलें हाच त्यांचा व माझा पहिला पत्रव्यवहार होय.

## प्रथम परिचय

डिसेंबर १९१४ ते डिसेंबर १९१९ पर्यंतचीं त्यांचीं पांच वर्षें अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत गेलीं. दरम्यानच्या काळांत ते जपानांतही जाऊन आले. पण जपानांत ते फार दिवस राहिले नाहींत. सन १९१६ ते १९१९ या तीन वर्षांत मला त्यांचा पूर्ण सहवास घडला. आणि लालाजींच्या या तीन वर्षांचें जीवनचरित्र मी महत्त्वाच्या गोष्टींच्या रूपानें रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. ज्यांची मला पूर्ण माहिती आहे अशाच केवळ ठोकळ गोष्टींचा या लेखमालेंत विचार केला असून, विस्तार किंवा पाल्हाळ केलेला नाहीं. त्या काळांतील त्यांच्या जीवनक्रमाची समस्त माहिती मी माझ्या व लालाजींच्या निरनिराळ्या मित्रांकडून मागविली असून ती हातीं आल्यावर 'अमेरिकेंतील पांच वर्षें' या नांवानें त्यांचा अमेरिकेंतील जीवनेतिहास प्रसिद्ध करण्याचा माझा मानस आहे. याच नांवाचें एक पुस्तक लिहिण्याचा लालाजींचा मानस होता, पण दुर्दैवेंकरून त्यांच्या आकस्मिक निधनामुळें हा त्यांचा प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं.

हिंदुस्थानाचें नावास काळिमा फांसण्याच्या दृष्टीनें ब्रिटिशांचे बगलबच्चे अमेरिकेंत जो उपक्रम करीत होते, त्याविरुद्ध लालाजींना मुख्यतः कार्य करावयाचें होतें. त्या वेळीं युरोपांत पसरलेल्या महायु-

द्वाच्या ज्वाळांच्या झळी अमेरिकेसही झोंबत असल्यामुळें, अमेरिकेंत जन्मास आलेले ब्रिटिश लोक आपल्या मातृभूमीस (इंग्लंडास) कोणत्याही प्रकारचा धक्का पोंचूं नये अशा उद्देशानें अमेरिकेंतील निरनिराळ्या धर्मांच्या व देशांच्या लोकांना आपणांकडे ओढण्याचा ते प्रयत्न करीत असत. व अशा प्रसंगीं तेथील हिंदी लोकांवरहि निष्कारण शिंतोडे उडविण्याच्या त्यांच्या उपद्यापामुळें हिंदी जनतेस अमेरिकेंत राहणेंहि दुष्कर झालें होतें. म्हणून त्या देशांतील लोकांना हिंदुस्थानांत इंग्रजांच्या चाललेल्या धिंगाण्याची व त्यापासून हिंदी जनतेच्या मनावर झालेल्या परिणामाची माहिती करून देणें अत्यंत जरूरीचें आहे. अशा प्रकारचे विचार तेथील हिंदी लोकांच्या मनांत घोळत असतांनाच दे. भ. लालाजी अमेरिकेंत येऊन दाखल झाले.

मी त्या वेळीं अमेरिकेंतील हिंदी विद्यार्थी संघाचा अध्यक्ष असल्यामुळें मला व माझ्या सहकारी मित्रांना (या लेखमालेंत मला स्वतांसंबंधीच्या बऱ्याच गोष्टींचा उल्लेख करावा लागणार आहे. परंतु लालाजींचा अमेरिकेंतील जीवनक्रम माझ्या जीवनक्रमाशीं निगडित असल्यामुळें त्यांच्या जीवनक्रमाबद्दल लिहीत असतांना माझ्या नांवाचा उल्लेख टाळणें फारच कठीण आहे. म्हणून वाचक आत्मवृत्ताच्या उल्लेखाबद्दल मला क्षमा करतील अशी आशा आहे.—हर्डीकर) भेटून या गोष्टींची चर्चा करण्याची इच्छा व्यक्त केली. तेव्हां १९१६ च्या सप्टेंबर महिन्यांत आम्ही सर्व एकत्र जमलें आणि त्या वेळच्या परिस्थितीचा सर्वांनीं सर्व प्रकारें विचार केल्यावर 'मला आपला संपूर्ण वेळ देणारा एखादा कार्यवाहक मिळाल्यास मी हें कार्य आजच सुरू करीन' असें लालाजी बोलले व या कामी लालाजींनीं माझी निवड केली आणि मला आपल्या हाताखालीं काम करण्यांस सांगितलें!

## स्वहित कीं देशहित?

लालाजींच्या या प्रश्नामुळें मी बुचकळ्यांत पडलों, कारण विश्वविद्यालय सोडून, केवळ याच कार्याकडे सर्वतोपरी लागणें म्हणजे, जीवनक्रमाची दिशाच बदलणें होय असें मला वाटलें. इतका स्वार्थत्याग माझ्या सामर्थ्याबाहेरचा आहे असें मला वाटूं लागलें. पण मला कांहीं तासांचा अवधि दिल्यास मी याचें उत्तर देईन, असें त्यांना सांगून मी साधकबाधक गोष्टींचा पूर्णपणें विचार केला व माझ्या मित्रांचाहि सल्ला घेऊन मी विश्वविद्यालयाच्या पदव्यांची हाव सोडून दिली आणि लालाजींच्याबरोबर राजकारणाच्या क्षेत्रांत पूर्ण वाहून घेण्याचें त्यांस अभिवचन दिलें. त्यानंतर पुढील कार्यासाठीं लालाजी न्यूयॉर्क शहरीं गेल्यावर मी आमच्या विश्वविद्यालयांत (मिचिगन युनिव्हर्सिटींत) गेलों. आणि आपलें सर्व सामानसुमान घेऊन विश्वविद्यालयांतील अधिकाऱ्यांचा निरोप घेतल्यावर न्यूयॉर्क येथें आपल्या कामावर रुजू होण्याकरितां निघालों. सन १९१६ च्या नोव्हेंबरपासून न्यूयॉर्क येथें लालाजी व मी एकत्र राहूं लागलों.

## निरनिराळ्या संस्था

सन १९१६ च्या नोव्हेंबरपासून सन १९१९ च्या डिसेंबरपर्यंत तीन वर्षें आम्ही एकत्र राहून एकाच ठिकाणीं व एकाच ध्येयासाठीं काम करीत होतों. त्या वेळीं लालाजी हे 'इंडियन होमरूल लीग'चे अध्यक्ष व मी त्या संस्थेचा जनरल सेक्रेटरी होतों. ही संस्था ज्या उद्देशानें स्थापन केली होती, त्या उद्देशाचा लोकांत प्रचार करण्याच्या हेतूनें लालाजींनीं 'यंग इंडिया' नांवाचें एक मासिक सुरू करण्याचें ठरविलें. या मासिकाचा पहिला अंक १९१७ च्या जानेवारी महिन्यांत बाहेर पडला. हिंदुस्थानाची बातमी मिळविण्याकरितां लोकांच्या झुंडीच्या झुंडी यंग इंडिया ऑफिसकडे येऊं लागल्यामुळें खास त्याच कामाकरितां म्हणून, 'हिंदुस्थानवार्ताप्रसारक संघ' नांवाची एक संस्था लालाजींनीं उघडली, व खास त्याच कामाकरितां म्हणून एक कार्यवाहक नेमला. हिंदुस्थानाची माहिती मिळविण्यास अमेरिकेंतील हिंदी प्रवासी, हिंदी विद्यार्थी व हिंदी कामकरी वर्ग, अशा सर्व प्रकारचे लोक येत असल्यामुळें, माहिती पुरविण्याचें काम बरेंच अवघड झालेलें होतें. स्वतः लालाजीहि, अशा प्रकारच्या हिंदुस्थानविषयक माहितीच्या जिज्ञासु लोकांचे प्रश्न ऐकण्यांत व उत्तरें देऊन माहिती पुरविण्यांत आपला पुष्कळ वेळ देत असत. अगदीं अशिक्षित पण हुषार अशा अनेक हिंदी मजुरांनींहि संयुक्त संस्थानांत हिंदुस्थानविषयक ज्ञानाचा प्रसार करण्यास आम्हाला बरीच मदत केली. याहूनहि मोठ्या प्रमाणावर आम्हाला याच दिशेनें मदत करण्याच्या हेतूनें, त्या लोकांस स्वतःची एक वेगळीच संस्था असावी असें वाटल्यावरून लालाजींनीं त्या सर्वांना एकत्रित करून 'हिंदी मजूर संघ' या नांवाची एक संस्था स्थापन केली. त्यांना शिक्षण देण्याकरितां आम्ही सायंकाळचे वर्ग सुरू केले. हे वर्ग चालविण्यांत लालाजीहि आम्हांस पुष्कळ मदत करीत, आणि कैक वेळां स्वतः त्या मजुरांस लिहिणें वाचावयास शिकवीत. या अशिक्षित मजुरांनीं आमच्याशीं पूर्ण सहकार्य करून आपलीं स्वतःचीं कामें संभाळूनहि आम्हाला आमच्या कार्यांत कल्पनेबाहेर मदत केली. मिळणाऱ्या मानानें मोठ्या कष्टानें मिळविलेल्या आपल्या अगदीं थोड्याशा रोजमजुरींतूनहि त्यांनीं आम्हाला यथाशक्ति आर्थिक साह्य केलें आणि हिंदुस्थानविषयक माहितीचें प्रचारकार्य तेरहाके त्या एक ठिकाणच्या कोनाट

कोपऱ्यांतूनहि केलें. याप्रमाणें लालाजींनीं येथील हिंदी लोकांस संघटित करण्याचा आणि हिंदुस्थानापासून हजारों मैलांवर दूर असलेल्या अशा त्या देशांत हिंदी राष्ट्राचा लढा लढविण्याला मिळालेली एकहि संधि वाया जाऊं दिली नाहीं.

या शिवाय अमेरिकेंत हिंदी लोकांनीं सुरू केलेल्या अनेक संस्था होत्या, त्यांच्या चालकांचीं व लालाजींचीं राजकीय मतें भिन्न असलीं तरी लालाजी हे हिंदुस्थानाचे एक प्रमुख पुढारी आहेत हें जाणून अशा संस्थांच्या चालकांकडूनही त्यांना मान मिळत असे, व लालाजींच्या कार्याकरितां वेळोवेळीं आर्थिक मदतहि त्यांचेकडून मिळत असे.

## लालाजींच्या मार्गांतील कंटक !

हिंदुस्थानांतून इंग्लंडास जाणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांप्रमाणें, अमेरिकेस जाणारे हिंदी विद्यार्थी सधन चैनी किंवा खुशालचेंडू नसून गरीब असत, व त्यांचें जीवन कष्टार्जित असेंच बहुधा असे. आजहि अमेरिकेंतील हिंदी विद्यार्थ्यांची काय किंवा इतर हिंदी लोकांची काय अशीच स्थिति आहे.

स्वयंनिर्णय तत्त्वासाठीं झगडणाऱ्या अमेरिकेसारख्या परराष्ट्रीय देशांत ब्रिटिशांच्या स्वार्थसाधूंनीं आणि हिंदुस्थानांतील ब्रिटिश नोकरशाहीला उचलून धरणाऱ्या अशा साम्राज्यवाद्यांनीं हिंदुस्थानाच्या आकांक्षांविरुद्ध हरप्रकारची चळवळ चालविल्याबद्दलचा उल्लेख एकवार केलेला आहे. याचविषयीं जास्त सांगावयाचें म्हणजे या पोलादी चौकटीच्या साम्राज्यसंरक्षक ब्रिटिश नोकरशाहीचे बगलबच्चे सर्व ठिकाणाप्रमाणें अमेरिकेंतहि असत. अशा प्रकारचे पगारी बगलबच्चे अमेरिकेंत राहून हिंदुस्थानाविषयीं तेथील जनतेचें मत कलुषित करण्याचें कार्य करीत होते ! रुस्तुम रुस्तुमजी नांवाचे एक पारशी गृहस्थ अशा प्रकारें पगार खाऊन, अमेरिकेंतील हिंदी लोकांवर देखरेख ठेवण्याचें व अमेरिकन लोकांचीं मनें हिंदुस्थानाविषयीं कलुषित करण्याचें कार्य करीत असत कीं नाहीं ? अशा अर्थाचे प्रश्न ३।४ वर्षांपूर्वी दिल्ली येथील असेंब्लीमध्यें लालाजींनीं व इतर नामदारांनीं विचारलेले होते, त्या प्रश्नांना सरकाराकडून स्पष्टपणें उत्तरें दिलीं गेलीं नाहींत ही गोष्ट सर्वांना विदित आहेच ! अशा प्रकारच्या प्रबळ व गुप्त शत्रूंविरुद्ध लालाजींना अमेरिकेंत कार्य करावयाचें होतें. यावरून त्यांच्या कार्याची कठिणता किती होती हें कळून येणार आहे.

## आर्थिक अडचणी

लालाजींना अशा प्रकारच्या अडचणींतून मार्ग कंठावयाचा होता, व ब्रिटिश नोकरशाहीच्या हस्तकांची चळवळ हाणून पाडावयाची होती. पण पैशाशिवाय हें काम हातीं तरी कसें घेणार ! "सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः" या श्लोकाप्रमाणें द्रव्यबलावरच सर्व चळवळींचें अधिष्ठान अवलंबून असतें आणि या ठिकाणीं तर पैशाचा अभावच होता ! लालाजींनीं एक संस्था व एक मासिक सुरू केलें खरें, पण "तंडुलाच्या" अडचणीमुळें होमरूल लीगचें काम प्रथम त्यांस फारच सावकाश करावें लागलें ! अमेरिकेसारख्या स्वतंत्र देशांत हिंदुस्थानाविषयीं लोकमत दूषित करणारे हिंदी नोकरशाहीचे हस्तक असावेत, आणि त्यांजपासून आपल्या चळवळीस धोका होत आहे अशा प्रकारची कल्पना हिंदी जनतेस त्या कालीं नसावी असें वाटतें. कारण तसें असतें तर लो. टिळकांसारखे पुढारी स्वस्थ राहिले नसते ! हिंदी पुढाऱ्यांना या हस्तकांच्या आगलावेपणाची माहिती नसल्याकारणानें म्हणा, किंवा येथील कार्यबाहुल्यामुळें परदेशस्थ चळवळीकडे लक्ष देणें त्यांस जमलें नाहीं म्हणून म्हणा, अमेरिकेसारख्या स्वातंत्र्यप्रिय देशांत सुद्धां चाललेल्या ब्रिटिश नोकरशाहीच्या हस्तकांच्या या कारवाईकडे लक्ष दिलें गेलें नव्हतें. याच संधीस लाला लजपतराय यांना हद्दपारीमुळें तिकडे जावें लागलें, या दृष्टीनें विचार केल्यास लालाजींची हद्दपारी ही हिंदुस्थानावर आलेली इष्टापत्तीच होय असें म्हणावें लागतें !

त्यांनीं होमरूल लीगचें काम आस्ते आस्ते चालविलें व अमेरिकेंतील हिंदी लोकांस पैशाचे बाबतींत त्यांनी जाहीर विनंति केली. कांहीं लोकांकडून द्रव्यसाहाय्य मिळालें, पण तें पुरेसें नव्हतें. त्यामुळें या कार्याकरितां द्रव्य मिळविण्याचे दुसरे मार्ग शोधणें भाग पडलें. आणि लालाजींना त्या गोष्टीविषयीं काळजी लागून राहिली. तरीहि आम्हास कसेबसे कांहीं दिवस काढावे लागले. हातीं घेतलेलें कार्य विशेष विस्तृत प्रमाणावर पुढें चालविण्याची उत्कट इच्छा असूनहि आर्थिक अडचणीमुळें लालाजींना ती तशीच दाबून ठेवावी लागली. तथापि हळूहळू कार्य करतां करतां आम्हास मदत मिळूं लागली आणि आमच्या इच्छेनुसार आपलें कार्यक्षेत्र वाढविण्यास आम्हास थोडासा उत्साह वाटूं लागला.

## लालाजींचा उदरनिर्वाह कसा चाले ?

स्वतःच्या उपजीवनाकरितां लालाजींना लेख लिहावे लागत असत व व्याख्यानें द्यावीं लागत. अमेरिकेंत व्याख्यानांकरितां व्याख्यात्यांना व लेखाकरितां लेखकांना मोबदला मिळत असतो. या मार्गानें त्यांना थोडेंबहुत धन मिळे. आरंभींचा बराच काळ संयुक्त संस्थानांत लालाजींचें नांव विशेष कोणास माहीत नव्हतें ! आणि हिंदी राष्ट्राविरुद्ध चळवळ करणाऱ्यांच्या विरोधामुळें प्रथम प्रथम लालाजींच्या व्याख्यानांचे कार्यक्रम कोणी 'कबीनात व त्यांचे लेखहि तेथील नियतकालिकें

स्वीकारीनांत! अशा परिस्थितींत त्यांस आपला चरितार्थ चालविणेंच मुष्किलीचें झालें. मग त्यांनीं निर्माण केलेल्या संस्थेची उन्नति तरी कशी व्हावी? पण सन १९१६सालाच्या सप्टेंबर महिन्यांत त्यांनीं लिहिलेल्या यंग इंडिया पुस्तकानें त्यांच्या कष्टप्रद स्थितींत कांहीं अंशीं बदल झाला.

### यंग इंडिया पुस्तक

यंग इंडिया हें पुस्तक लालाजींनीं अमेरिकेंत व जपानांत प्रवास करीत असतांना लिहिलें आहे. त्या दृष्टीनें या पुस्तकाची थोरवी कळून येईलच. यंग इंडिया पुस्तकामुळें, विशेषतः त्या पुस्तकावर अमेरिकेंतील नियतकालिकांमधून प्रसिद्ध झालेल्या अभिप्रायामुळें लालाजींचें नांव लोकांच्या तोंडीं होऊं लागलें. त्या पुस्तकाची पहिली आवृत्ति केवळ आठच महिन्यांत संपून गेली! व १९१८ च्या एप्रिल महिन्यांत दुसरी आवृत्ति काढण्याचा योग आला. याप्रमाणें लालाजी हे उत्तरोत्तर अनेक लोकांस परिचित झाले. आणि अमेरिकेंतील नियतकालिकांनींहि त्यांचे लेख प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. अनेक व्याख्यान-संस्थांनीं लालाजींस व्याख्यानें देण्याकरितां निमंत्रणें दिलीं व शिक्षणविषयक संस्थांनीं आणि विश्वविद्यालयांच्या चालकांनीं विद्यार्थ्यांपुढें बोलण्याविषयीं लालाजींना विनंत्या केल्या. ब्रिटिश सरकारनें 'यंग इंडिया' पुस्तकास आपल्या हद्दींत प्रतिबंध केलेला होता! तरी १९१७ च्या नोव्हेंबरच्या पूर्वींच त्या पुस्तकाचा इंग्लंडमध्यें शिरकाव झाला! आणि इंग्लंडच्या इंडियन होमरूल लीगनें त्याची एक आवृत्ति प्रसिद्ध केली! या आवृत्तीस कर्नल वेजवुड यांनीं प्रस्तावना लिहिली, व त्यांनींच स्वतःच्या खर्चानें पार्लमेंटाच्या प्रत्येक सभासदास त्या पुस्तकाची एक एक प्रत दिली.

या ठिकाणीं ही एक गोष्ट सांगणें अवश्य वाटतें कीं, 'यंग इंडिया' पुस्तकास प्रस्तावना लिहिणारे मि. कर्नल वेजवुड यांचा व लाला लजपतराय यांचा प्रत्यक्ष परिचय नव्हता, एवढेंच नव्हे तर त्यांचा पत्रव्यवहारहि कधीं झालेला मला माहीत नाहीं. पण लालाजींनीं लिहिलेलें 'यंग इंडिया' पुस्तक कर्नलसाहेबांनीं वाचून पाहतांच, या पुस्तकामुळें हिंदुस्थानचें हित होईल असें त्यांच्या मनास पटून त्यांनीं त्या पुस्तकास प्रस्तावना लिहिली व पार्लमेंटाच्या सभासदांना पुस्तकाच्या मोफत प्रती दिल्या.

या पुस्तकाच्या प्रसाराबरोबरच लालाजींची कीर्तीहि पसरूं लागली. त्यांच्या लेखांना मागण्यावर मागण्या येऊं लागल्या व त्यांना थोडेबहुत पैसेहि मिळूं लागले. नियतकालिकांकरितां रात्रीं अपरात्रीं जागून त्यांनीं लेख लिहिण्यास आरंभ केला. याप्रमाणें लेखनापासून, त्यांस स्वतःच्या उपजीविकेकरितां कांहीं पैसा मिळूं लागल्यानें त्यांचा चरितार्थ नीट चालून, आपण आंखलेल्या कार्याकडे त्यांना लक्ष देतां आलें.

# अफगाणिस्थानाच्या मार्गावर

### अटकेवर झेंडा लावल्याचें स्मारक करा

काशी, प्रयाग, गया ही जशी धार्मिक हिंदूंची त्रिस्थळी यात्रा, तशीच मराठी इतिहासप्रेमी जनांची रायगड, रावेरखेडी आणि अटक अशी त्रिस्थळी यात्रा आहे. परंतु भेद इतकाच कीं धार्मिक यात्रेकरूंची गर्दी लाखोंनीं मोजतां येते तशी ऐतिहासिक यात्रेकरूंची गोष्ट नाहीं. त्यांची गणनाच मुळीं करतां येत नाहीं. कारण ते बहुशः नसतातच. ही परिस्थिति बदलून लवकरच ऐतिहासिक प्रसिद्ध ठिकाणीं यात्रा करावयास जाणारे लोक वाढत जातील अशी आशा आहे.

हे विचार सुचण्याचें कारण हेंच कीं मराठ्यांच्या उत्कर्षाचें परमोच्च ठिकाण आणि हिंदु विजयाचा सुमंगल दिवस आज आमच्या आठवणींतून जात आहे. 'अटकेला झेंडा लावणें' ही म्हण प्रचारांतहि आली, पण खुद्द अटकेला या प्रसंगाची आठवण करून देणारें स्मारक कांहींच नाहीं!

"अटक" हा पंजाबांतला एक जिल्हा, परंतु नुकतेंच जिल्ह्याचें ठिकाण "कँबेलपूर" येथें नेल्यामुळें अटकेचें महत्त्व कमी होत चाललें आणि दिवसानुदिवस तें गांव ओस पडत आहे. वायव्य सरहद्दीला लागूनच हा गांव असल्यानें मुसलमानी पठाणांची वस्ती पुष्कळ आहे. अटक गांवांत आज ५-६ च हिंदू आहेत. यावरून मुसलमानांचें आधिक्य किती आहे हें समजेल. किल्ल्याच्या आजूबाजूची वस्ती धरून सुमारें ३००० आहे. त्यांत हिंदूंचीं १० पेक्षां अधिक घरें नाहींत!

असो. अशा परिस्थितींत मराठ्यांच्या अतुल पराक्रमाचें स्मारक केलें असतें तरी राहिलें नसतें. आमचा इतिहास पूर्वजांनीं लिहून न ठेवल्यामुळें आज आम्हाला किती तरी अडचणी येत आहेत. आणि अटकेला आज जर स्मारक झालें नाहीं तर १-२ पिढ्यानंतर अटकेला मराठे गेले होते कीं काय याविषयीं मोठा वादच माजेल!

अटकेचा किल्ला १५८१ मध्यें अकबरानें बांधला. त्याच्या उत्कर्षाला येथें 'अटकाव' झाला म्हणून त्यानें 'अटक' हें नांव ठेवलें तें यथार्थच! कारण पुढें मराठ्यांनीं तो किल्ला काबीज करून

मुसलमानांच्या लुटारू वृत्तीस 'अटक' केली. तसेंच १८१२ मध्यें रणजितसिंगानेंहि तेंच कार्य साधलें. १८४९ मध्यें हा किल्ला जेव्हां ब्रिटिशांकडे कायमचा गेला तेव्हांपासून हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याला अटकाव झाला हें तर प्रसिद्ध आहे. असा हा अन्वर्थक किल्ला सिंधूच्या पूर्वतीरावर असून लष्करी दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे. दिल्लीहून येणारा रस्ता व पेशावरचा मार्ग हे दोनहि या किल्ल्यांतून अशा युक्तीनें रोखतां येतात कीं, फार सैनिकांचीहि आवश्यकता लागत नाहीं. अटक ज्याच्या हातांत तो पेशावरचा स्वामी असें मानण्यांत मुळींच प्रत्यवाय नाहीं. पेशावर येथून केवळ ४७ मैल राघो भरारीची अर्ध्या दिवसाची मजल आहे. सिंधु नद पार होण्यास एकच मार्ग त्या काळीं उपलब्ध होता आणि तो किल्ल्याच्या पायथ्याशीं असे म्हणजे नाकेबंदी कशी पूर्ण होई हें ध्यानांत येईल. या किल्ल्यांत आजमितीसहि ब्रिटिशांनीं तोफा व पलटण ठेवून त्याचें महत्त्व ओळखलें आहे.

किल्ल्यांत अर्थातच मराठ्यांच्या पराक्रमाचें कांहींच अवशिष्ट स्मारक नाहीं. पेशावरच्या रस्त्यावर ब्रिटिश सैन्यानें केलेल्या बारीकसारीक कामगिरीचें वर्णन शिलांकित करून लहानसें का होईना पण स्मारक केलेलें आढळतें. पण या जगड्व्याळ पराक्रमाचा कांहीं मागमूसहि लागत नाहीं ! सरकारी गॅझेटिअरमध्यें अकबरानें किल्ला बांधतांना कोणत्या लोकांना बळी दिले त्यांचीं नांवें किंवा ब्रिटिशांनीं किल्ला घेतांना कामास आलेल्या क्षुल्लक अधिकाऱ्यांच्या पराक्रमाचें ( ! ) वर्णन सांपडतें; परंतु मराठ्यांनीं हा किल्ला १५०० मैलांची मजल मारून हस्तगत केला या पराक्रमाचा निर्देशहि नसावा काय !

किल्ल्याच्या पायथ्याला जी वस्ती आहे ती बहुधा मुसलमानांचीच आहे आणि त्यांच्या मशिदी वगैरे धार्मिक स्थानेंहि तेथें आहेत. त्यांच्या बाजूसच एक शिवालय जीर्णोद्धारित असून अटकेंत असलेलें हिंदु मंदिर काय तें एकच! तेथें कदाचित् मराठ्यांच्या पराक्रमाची खूण सांपडेल या आशेनें जावें तर वेगळाच इतिहास कळतो.

किल्ला बांधला अकबरानें हें खरें, पण त्याच्याबरोबर मानसिंग, तोडरमल्ल, बिरबल (?) इत्यादि हिंदु मंडळी असल्यानें त्यांनीं आपल्या पूजेसाठीं शिवमंदिरहि बांधलें तें किल्ल्याच्या अगदीं द्वारासमीप होतें. परंतु मध्यंतरींच्या काळांत काय झालें कोणास ठाऊक, देवालयाच्या इतर भागाचा विध्वंस होऊन तेथें सर्व मुसलमानी वस्ती आली आणि अटकेंतल्या त्या एकुलत्या एक शंकरासही कांहीं काल अज्ञातवास घडला !

२०-२५ वर्षांपूर्वी एक गुरुजी तेथें आले व हें दृश्य पाहून त्यांना विषाद उत्पन्न झाला. त्यांनीं आपल्या एका पट्टशिष्याला आज्ञा दिली कीं या शिवमंदिराचा जीर्णोद्धार करून हिंदु यात्रेकरूंची सोय लावून दे. सिंधुनदावर स्नानासाठीं आणि अस्थिसमर्पणासाठीं किती तरी यात्रेकरू येत असतात. परंतु कोठें तरी स्नान करावें, क्रियाकर्मांतर आटोपावें असा त्यांचा क्रम असे. आतां त्या शिवमंदिरांत सुमारें २०-२५ मंडळी मोठ्या व्यवस्थेनें राहतील इतकी बांधलेली जागा आहे आणि पर्वकाळीं किंवा यात्रेच्या वेळीं २-३ हजार यात्रेकरूंची सोय केली जाते. इतकेंच नव्हे तर एक सुंदर पण छोटासा घाट बांधून अभ्यागतांच्या पुडीची सोयही केली जाते. हा सर्व उद्धाराचा कार्यक्रम गेल्या १८—२० वर्षांतलाच आहे. तेव्हां त्या हिंदु गुरूच्या चेल्यांना ज्यांनीं हें सर्व कार्य घडवून आणलें त्यांना पूर्वींची काय माहिती असणार ! "राघोबा पंत" अटकेंत आले होते इतकें मी ऐकलें आहे. पण ते कोठें होते, किती दिवस राहिले यासंबंधीं कोणासच ज्ञान नाहीं असें त्यांनीं सांगितलें.

अटकेंत एकटेंच एक शिवालय, किल्ल्याच्या अगदीं प्रवेशद्वाराजवळ, सिंधूच्या पवित्र तीरावर वसलेलें, तेव्हां राघो भरारीनें त्याच ठिकाणीं आपला "जरीपटका" रोवला असावा असा तर्क करण्यास जागा आहे. निदान या काळीं आपणास स्मारक करण्यास अन्य स्थान योग्य नाहीं. तें शिवालयाच्या आवारांतच व्हावें हें युक्त दिसतें. आजूबाजूची भूमि मुसलमानांच्या स्वामित्वाची असून अद्यापिही शिवालयाच्या जागेसंबंधीं कोर्टांत झगडे चालू आहेत.

**"बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला"** असें अशक्य कोटींतील एक कार्य कवीनें वर्णिलेलें आहे. परंतु शिवालयाच्या महंतांनीं मुसलमानांच्या ताब्यांत गेलेली आपली जागा परत मिळवून सुमारें ४०००० रुपये खर्च करून स्मृतिशेष झालेलें स्थान पुनः जागृत केलें व त्याला चिरस्थायी बनविलें. ही कामगिरी मकरदाढेंतून मणि काढल्यावर त्याला उचित असें कोंदण बसविण्यासारखीच प्रशंसनीय झाली आहे हें निःसंशय !

या ठिकाणीं स्मारक करण्यासाठीं लागणारी जागा देण्यास महंत अनुकूल आहेत. पाहिजे असल्यास "भगवा झेंडा" कायमचाच सिंधुतीरावर फडकत राहील असें करावें. कारण किल्ल्यावरील ब्रिटिश निशाण किंवा मशिदीच्या बाजूचीं हिरवीं फडकीं हींच काय तीं दिसून येतात. भगव्या झेंड्याचा वार्षिक उत्सव केल्यानें हा दिवसहि चिरस्मरणीय होईल आणि भावी पिढीस या पराक्रमाचें महत्त्व कळेल.

राघोबा चैत्र शु. १ स अटकेच्या जवळपास होते. त्यांचें एक पत्र चैत्र शु. ८ शके १६७९ च उपलब्ध आहे. तें अटकेवर झेंडा रोवल्यानंतरचें असल्याचें निश्चित स्थिति कोणती या वाद-विवादांत न पडतां ध्वजारोपणाचाच दिवस अटकेच्या उत्सवाला ठरवावा हें सर्वथैव उचित होईल

अटकेला उत्सव करण्यास जावें आणि घरोघर भगव्या झेंड्याच्याच गुढ्या उभाराव्या अशी सूचना कित्येकांनीं केली आहे. ती या वर्षापासून अमलांत आणावी. आणि हरप्रयत्न करून अटकेस चिरकालीन स्मारकाची व्यवस्था व योजना करण्याच्या खटपटीस लागावें अशी आग्रहाची सूचना आहे.

अटकेस आल्यावर राघोबादादांस " तुलसी किस झाडकी पत्ती " असें कां वाटावयास लागलें हें सिंधूच्या तीरावर किंचित्क्षणमात्र उभे राहिल्या-वर समजून येतें! किल्ला पिछाडीला, उजवे बाजूस काबूल नदी, पुढें दुर्लंघ्य असा सिंधु इत्यादि दृश्य पाहून आणि आपण १५०० मैल दूर येऊन किल्ला सर केला ही जाणीव झाली कीं अशा आत्म-विश्वासाचा वारा आपोआपच वाहूं लागतो. राघोबाचा विजय हा अखिल हिंदु जातीचा आहे हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे. त्या वेळीं मुसलमानांच्या वाढत्या लुटारूपणास आळा घातला तो राघोबांच्या या थोर कृत्यानेंच! तेव्हां हें स्मारक हिंदुमात्राकडून झालें पाहिजे !

# शेतकरी व कामकरी यांचे संघ

राष्ट्रीय शक्तीच्या केंद्रस्थानांपैकीं युवकवर्गाचा विचार गतांकीं झालाच आहे. आतां या अंकांत शेतकरी व कामकरी या दोन वर्गांच्या संघटनेचा विचार कर्तव्य आहे. 'शेतकरी' या शब्दाचा अर्थ केवळ शेती करणारा असा नसून, अर्थशास्त्रांतील कच्च्या मालाच्या उत्पत्तीचें जें जें क्षेत्र त्या त्या क्षेत्रांत मालकी हक्कानें वागणारा व काम करणारा तो तो शेतकरी होय. त्याचप्रमाणें 'कामकरी' हा शब्दहि केवळ मोलमजुरी करणारा या अर्थानें योजलेला नसून त्यांत बुद्धिजीवी व श्रमोपजीवी या उभयतांचाहि समावेश होतो.

हिंदुस्थान हा देश कृषिप्रधान असल्यानें या देशांतील शेकडा ८० लोक प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें शेतीवर निर्वाह करणारे आहेत. या दृष्टीनें पाहतां शेतकरी वर्ग हा राष्ट्रीय शक्तीचें महत्त्वाचें केंद्रस्थान होय. पण हा शेतकरी वर्ग साहजिकपणेंच देश-भर पसरलेला असल्यानें संख्येच्या मानानें त्यांच्यांत जितकी शक्ति केंद्रीभूत व्हावी तितकी ती झालेली नाहीं. वाफेच्या जोरावर आगगाड्या व गिरण्या चालतात खऱ्या; पण केव्हां ? तर ती वाफ शक्य तितक्या लहान जागेंत कोंडून ठेवावी तेव्हां. उलटपक्षीं तीच वाफ मोकळी सोडून इतस्ततः पसरूं दिली तर त्या वाफेनें गिरणीचें बडें चक्र चालावयाचें तर राहिलेंच, पण एखाद्या घड्याळाच्या लहानांत लहान चक्राएवढें चक्रहि फिरावयाचें नाहीं. आजमितीला हिंदी शेतकऱ्यांच्या नैसर्गिक शक्तीची स्थितीहि अशाच पसरलेल्या वाफे-सारखीच झालेली आहे. तिच्यांत संघटितपणा नसल्यानें त्या शक्तीचें आस्तित्व क्वचितच भासतें. यामुळें राष्ट्रीय शक्तीचें हें प्रमुख स्थान असून त्या मानानें त्याला मिळावा तितका मान मिळत नाहीं.

जगांत असला उफराटा न्याय अनेक ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतो. शेतकरी हा सगळ्या राष्ट्रीय संपत्तीचा उत्पत्तिकर्ता म्हणजे ब्रम्हदेव होय. आणि म्हणूनच राष्ट्रीय शक्तीच्या त्रिमूर्तींत त्यास ब्रम्हा म्हणणें साजेल. पण ब्रम्हदेवानें उत्पन्न केलेल्या सगळ्या सृष्टींत स्वतः ब्रम्हदेवाचें देऊळ क्वचितच दृष्टीस पडतें! रुद्र हा संहारकर्ता म्हणूनच त्याचीं देवळें जागोजाग आढळतात. विष्णु हा धारण-पोषण-कर्ता म्हणून त्याचींहि देवळें दृष्टीस पडतात. पण ब्रम्हदेव हा सगळ्या सृष्टीचा उत्पत्तिकर्ता असून त्याचे भक्त कोणीच नाहींत! हिंदी राजकारणांत शेतकऱ्यांची स्थिति अशीच झाली आहे. राष्ट्रीय संपत्तीचा मूळ उगम शेतकऱ्यांपासून; त्यानें उत्पन्न केलेल्या कच्च्या मालाच्या जिवावर पुढें सगळ्यांचे सगळे धंदे चालणार. असें असतां खास शेतकऱ्याच्या हितासाठीं म्हणून केल्या जाणाऱ्या गोष्टींची गणना करूं लागल्यास बहुतकरून 'अनामिका सार्थवती' च ठरेल. जमीनमहसुलाच्या रूपानें शेतकरी वर्ग ३५ कोटी रुपये प्रत्यक्ष कर भरतो, याशिवाय अप्रत्यक्ष करांत त्याचा वांटा असेल तो वेगळाच. पण एवढ्या करवसुलीपैकीं कितीशी रकम शेतकऱ्यांच्या राहण्याच्या क्षेत्रांत म्हणजे खेडेगांवांत खर्च होते ?

नव्या दिल्लींत टोलेजंग इमारती उठल्या. मुंबई कलकत्ता कराची इत्यादि बंदरांतून मोठमोठाले धक्के बांधण्यांत आले. जागजागीं विजेच्या आगगाड्या झाल्या. इस्पितळें झालीं. सगळें सगळें कांहीं झालें. पण बिचारे शेतकरी जेथें राहतात अशा सात लक्ष खेडेगांवांपैकीं कितीशा खेड्यांत शाळा आहेत ? किती ठिकाणीं औषध-

पाण्याची सोय केलेली आहे? दळणवळणाचे सोईस्कर व प्रशस्त रस्ते तरी किती खेड्यांतून आहेत? खास शेतकऱ्यांच्या हितासाठीं म्हणून कांहीं कायदे सरकारनें पास केले आहेत; परंतु ते कायदे तरी कशासंबंधाचे म्हणाल तर शेतकऱ्यांना सावकारानें किंवा जमीनदारानें किती लुबाडावें याची मर्यादा ठरविण्याकरितां! शेतकऱ्याला परत द्यावें किती व काय यासंबंधानें एकहि कायदा नाहीं. शेतकऱ्याच्या खिशांतून घेणारेच सगळे! मात्र त्यांतल्यात्यांत जमीनदार तालुकदार सावकार इत्यादिकांनीं अमुक एका प्रमाणाबाहेर शेतकऱ्याच्या खिशाला चट्टा लावूं नये एवढ्यापुरती मर्यादा. पण तीहि मर्यादा स्वतः सरकारला लागू नाहींच. पुनःपुनः सेटलमेंट करून शेतसारा वाढविण्याला सरकार मोकळेंच आहे!

शेतकऱ्यांच्या या अगतिक स्थितीची जाणीव अलीकडे सुशिक्षित वर्गास होऊं लागून त्यांच्या प्रयत्नानें शेतकरी वर्गांतहि जागृति दिसूं लागली आहे. 'संघे शक्तिः कलौ युगे' या वचनाचा प्रत्यय येऊं लागल्यामुळें सार्वजनिक स्वरूपाच्या आपत्तीच्या प्रतिकारार्थ शेतकरी वर्गहि संघटित होऊं लागला आहे. शेतकऱ्याच्या मालकी हक्कावर गदा आणण्यास मुंबई इलाख्यांत १८६५ पासून सुरवात झाली. १९०१ सालाच्या लँड रेंव्हिन्यू अमेंडमेंट बिलानें, एखादृदुसऱ्या वर्षाचा शेतसारा थकला कीं जमीन सरकारच्या मालकीची व्हावी, असला अधिकार सरकारनें स्वतःकडे घेतला. त्या वेळीं शेतकऱ्यांत लो.टिळकांच्या प्रयत्नानें थोडीशी चळवळ झाली व त्या बिलाविरुद्ध हजारों अर्ज कौन्सिलाच्या टेबलावर जाऊन पडले. तथापि ती चळवळ प्रथमचीच असल्यानें व्हावी तितकी ती यशस्वी झाली नाहीं.त्यानंतर अगदीं अलीकडे जमिनीच्या तुकड्यांचें बिल आणि सारावाढीचा जुलूम यांचा प्रतिकार करण्यासाठीं अनेक ठिकाणीं चळवळी झाल्या. त्यांत तुकड्यांच्या बिलाच्या संबंधानें आणि बार्डोलीच्या फेरचौकशीच्या मागणीसंबंधानें जी चळवळ झाली ती बरीच सुव्यवस्थित रीतीनें झाल्यामुळें तींत बरेंच यश आलें आणि संघटनेचें महत्त्व शेतकऱ्यांच्या मनावर पक्केपणीं बिंबलें.

शेतकरी वर्गांतली ही जागृति कायम राहील आणि शेतकऱ्यांच्या संघटनेला सुव्यवस्थित स्वरूप येऊन एवढी प्रचंड शक्ति राष्ट्रकार्याला उपयुक्त होईल अशी योजना राष्ट्रीय सभेनें केली पाहिजे. शेतकऱ्यांच्या ज्या शेंकडोशें तक्रारी आहेत त्या दूर करून भावी स्वराज्य-घटनेंत शेतकऱ्यांचें जीवित निर्भय व आनंदमय होईल अशी हमी राष्ट्रीय सभेनें दिली पाहिजे. सगळ्या जमिनीचे मालक आपण आणि शेतकरी हा नुसता खंडकरी असें भासविण्याचा प्रयत्न सध्याचें सरकार करीत आहे. त्याच्याऐवजीं शेतकऱ्यांचा जमिनीवरील मिरासी हक्क मान्य करून केवळ उत्पन्नावरील कर म्हणून त्याजकडूनच शेतसारा घेतला जाईल असें आश्वासन शेतकऱ्यास मिळाल्यास त्याच्या जिवांतजीव येईल, मजूर वर्गाला ज्याप्रमाणें निदान गरिबीनें तरी गुजराण करतां येईल इतकी मजुरी किमानपक्ष मिळाली पाहिजे असा हक्क सांगतां येतो त्याप्रमाणेंच शेतकऱ्यालाहि शेतकामावर किमानपक्ष आपला व आपल्या कुटुंबाचा निर्वाह होण्याइतक्या उत्पन्नावर हक्क सांगतां आला पाहिजे.अर्थातच शेतसाऱ्याची भरती करण्यासाठीं त्याची उपासमार होणार नाहीं एवढी हमी त्यास मिळणें जरूर आहे.

याशिवाय त्या वर्गांत साक्षरतेचा प्रसार आणि शेतकामाला आवश्यक असणाऱ्या शेतकीच्या प्रायोगिक शिक्षणाचा प्रसार करणें आवश्यक आहे. यासाठीं प्रत्येक तालुक्याच्या ठिकाणीं एकेक तरी प्रयोगक्षेत्र असलें पाहिजे. शेतीची सगळी मदार गाईबैलांवर असल्यामुळें गोधनाच्या संहाराला कांहीं तरी आळा बसेल आणि गुरांची जोपासना सुलभतेनें होईल अशी गुरचराईची सोय लागली पाहिजे. या व याच स्वरूपाच्या अनेक सुधारणा नुसत्या शेतकऱ्यांच्याच नव्हे तर अखिल राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें होणें अगत्याचें आहे. कारण शेतकरी वर्ग जर सुखी व सुसंपन्न होईल तरच राष्ट्राचा अभ्युदय होईल.

जें सरकार शेतकऱ्यांच्या अशा सुखसोयीची सुव्यवस्था करीत नाहीं तें 'सरकार' या पदवीस पात्र नाहीं, आणि त्यास शेतकऱ्यांकडून करवसूल करण्याचाहि अधिकार न्यायतः पोंचत नाहीं. शेतकऱ्यांनीं आपल्या या हक्कांची मागणी करण्याइतकी त्यांच्यांत जागृति जाणीव व जूट उत्पन्न करण्याची जबाबदारी सुशिक्षित वर्गावर असून, राष्ट्रीय सभेनें हें कार्य स्वयंसेवकांकडून करविलें पाहिजे. दीडशें वर्षांत सरकारानें आपल्याकडून कराच्या रूपानें किती पैसा उकळला आणि त्यांतला किती थोडा अंश खेड्यापाड्यांच्या व प्रत्यक्ष शेतकऱ्यांच्या कल्याणाकरितां खर्च केला याची माहिती शेतकऱ्यांस होईल तर आपलें हें 'मायबाप' म्हणविणारें सरकार खरोखरी अंतरंगीं कोणत्या जातीचें आहे तें त्यास उमजेल.आणि आपली ही आजवर चाललेली नागवणूक यापुढें तरी कशी थांबवावी याचा ते विचार करूं लागतील.

मजूरवर्गाची स्थिति यापेक्षां एका अर्थानें बरी आहे. पाश्चात्य राष्ट्रांतल्या मजूरसंघांच्या चळवळीचा इतिहास डोळ्यापुढें असलेले मजूर-संघाचे पुढारी त्यांच्या हितासाठीं झटत असून, मजूरवर्गाच्या

गाऱ्हाण्यांची ओरड राष्ट्रसंघापर्यंत पोंचली असल्यामुळें मजूरवर्गाचा प्रश्न हा एक प्रकारें आंतरराष्ट्रीय झाला आहे. अर्थातच मजुरांचें मागणें तरी काय आहे आणि मजुरांची सुस्थिति होण्याला कोणकोणत्या सुधारणांची जरूरी आहे याचा विचार कोणत्याहि एका देशांत झाला तरी त्याचा फायदा इतर देशांतील मजुरांना मिळूं शकतो. तथापि प्रत्येक देशांतल्या मजुरांच्या स्थानिक अडचणी म्हणून कांहीं असतात. त्याप्रमाणें हिंदी मजुरांच्या अडीअडचणींची माहिती करून घेऊन त्या दूर करण्याकरितां त्यांच्या संघाच्या विद्यमानें नेटाची चळवळ करण्याची जरूरी आहे. मजूरसंघाची स्थापना अलीकडे बरेच ठिकाणीं होत आहे. आणि सरकाराकडूनहि या संघाना मान्यता मिळत आहे. तथापि बोल्शेव्हिकांच्या काल्पनिक भीतीनें गांगरलेलें सरकार यापुढें मजूरसंघाच्या चळवळीला प्रत्यक्ष नसला तरी अप्रत्यक्ष विरोध करील असें वाटतें.

अशा वेळीं मजूर-संघांच्या पुढाऱ्यांनीं आपली चळवळ मोठ्या दक्षतेनें चालविली पाहिजे. आपल्या मनांत देखील जे हेतु नाहींत ते सरकाराकडून आपल्यावर विनाकारण लादले जाऊं नयेत अशाविषयीं त्यांनीं सावधानता तर राखावीच, पण त्याबरोबरच आपल्या तांतडीच्या ज्या मागण्या आहेत तेवढ्या तरी पूर्ण करून घेतल्याखेरीज राहूं नये. नेहरू कमिटीच्या भावी स्वराज्य-घटनेंत मजुरांना संघ-स्वातंत्र्य दिलें आहे आणि प्रत्येक मजुराला निदान पोटापुरती मजुरी मिळेल अशी तजवीज करण्याचें आश्वासनहि दिलें आहे, हल्लींचें सरकार मजुरांविषयीं कितपत कळकळ बाळगतें याचा अनुभव मुंबईच्या संपवाल्यांना नित्य येत आहेच. संप होऊन इतके महिने झाले तरी सरकार स्वस्थच आहे. शपथेला मोकळें होण्यासाठीं एक चौकशी कमिटी नेमण्यांत आली आहे. पण ती कमिटी काय निर्णय देणार आणि मजूर वर्गाचें त्यानें समाधान कितपत होणार तें आजच बोलून दाखविण्यांत अर्थ नाहीं ! अशा परिस्थितींत मजूरवर्गानें आपल्या चळवळीची भावी दिशा आतांपासूनच आंखून ठेवली पाहिजे.

ब्रिटिश सरकारास एक वेळ शेतकऱ्यांची कळकळ वाटूं लागेल, कारण ब्रिटिश कारखानदारांना जरूर असलेल्या कच्च्या मालाची निपज त्याच्या हातीं आहे. परंतु हिंदुस्थानांतील कारखान्यांची भरभराट ही विलायतेच्या कारखानदारांच्या मुळावर येणार असल्यानें हिंदी करखान्यांच्या हेव्यादाव्यांत हिंदी मजूरवर्ग चिरडला गेला तरी बनिया सरकारास त्याची फारशी फिकीर वाटणार नाहीं. यामुळें हिंदुस्थानाला संपूर्ण स्वराज्य मिळाल्याखेरीज येथील मजूरवर्गाची भरभराट होण्याच्या मार्गांतील विघ्नें दूर होणार नाहींत. अर्थातच हिंदी स्वराज्याचा प्रश्न मजूरवर्गाला इतरांपेक्षां अत्यंत जिव्हाळ्याचा वाटला पाहिजे व राष्ट्रीय सभेनें ही जाणीव मजूरवर्गाला करून दिली पाहिजे.

सारांश, **शेतकरी, कामकरी** व **युवकवर्ग** या त्रयींत प्रचंड राष्ट्रीय शक्तीचा गुप्त ठेवा सांठविलेला आहे. परकी बनिया सरकारनें या तीनहि वर्गांची अत्यंत हेळसांड केली आहे. शेतकरी हा कराच्या भाराखालीं अज्ञानरूपी अंधारांत चिरडला जात आहे. कारखान्यांच्या अभावी मजूरवर्गाला हातपाय हलवण्यास पुरेशी जागा नसल्यानें त्याची कुचंबणा व विटंबना होत आहे. तरुणवर्गाला तेजोवध करणारें मेलेलें शिक्षण देण्यांत येऊन त्याची महत्त्वाकांक्षा नष्ट करून टाकण्यांत येत आहे. आणि औद्योगिक शिक्षणाच्या अभावीं तरुण वर्ग बेकारीच्या भयानक भोवऱ्यांत सांपडला असून सरकारला त्याची तिळमात्र काळजी वाटत नाहीं. राष्ट्राचे आधारस्तंभ होणारे हे तीनहि वर्ग हाताशीं धरून राष्ट्रीय सभेनें त्यांच्यांत योग्य संघटना केली, व त्यांच्या प्रकृतीस अनुरूप अशीं कार्यें त्यांजकरवीं करविण्याची खबरदारी घेतली, तर राष्ट्रीय सभेच्या पाठीशीं एवढी मोठी शक्ति उभी राहील कीं कोणत्याहि सरकारास राष्ट्रीय सभेच्या स्वराज्याच्या मागणीची हेटाळणी करण्याचें धाडस होणार नाहीं. असा आत्मप्रत्यय आधीं आला तरच राष्ट्रीय सभेचें पाऊल जोरानें पुढें पडेल,



# सूचिपत्र.



---